# भारतीय संस्कृतिकोश

केंद्रीय शिक्षामंत्रालय, नवी दिल्ली आणि
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृतिमंडळ, मुंबई
यांच्या साहाय्याने प्रकाशित

## नववा खंड

विहार ते सिंधी लोक

संपादक

पं. महादेवशास्त्री जोशी



तर्कती[illegible] होडारकर, एम्. ए.

**भारतीय संस्कृतिकोश मंडळ**

४१० शनिवार पेठ, पुणे ४११०३०

प्रकाशक :
पं. महादेवशास्त्री जोशी, कार्यवाह,
भारतीय संस्कृतिकोशमंडळ,
४१० शनिवार पेठ, पुणे ४११०३०



मूल्य दिडशे रुपये : मूल्य
१५०/– रुपये



मुखपृष्ठ :
श्री. सुधाकर खाजगीवाले

अंतर्गत सजावट :
श्री. दत्ता महाबळेश्वरकर
श्री. सुधाकर खाजगीवाले
श्री. म. दि. पारखी

हा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षण खात्याने उपलब्ध केलेला, सरकारी सवलतीच्या दरातील आहे.



ठसे :
श्री. ब. शं. दाते,
कलाभुवन, पुणे ४११०३०



प्रथमावृत्ती :
शके १८९८
(३० नोव्हेंबर १९७६)
प्रती ३०००

मुद्रक :
श्री. सइद इस्हाक
संगम प्रेस लि.,
१७ कोथरुड, पुणे ४११०२९

: एकमेव विक्रेते
पॉप्युलर बुक डेपो,
डॉ. भडकमकर मार्ग,
मुंबई ४००००७

# प्रास्ताविक

भारतीय संस्कृतिकोशाच्या नवव्या खंडाच्या प्रकाशनाचा सुयोग आज येत आहे, त्याबद्दल आनंद वाटतो.

कोशाचा संकल्प, योजना आणि व्याप्ती यांविषयी प्रथम खंडाच्या प्रस्तावनेत सविस्तर लिहिलेच आहे. म्हणून या ठिकाणी त्याची पुनरुक्ती करीत नाही. मात्र काही गोष्टींचा खुलासा आधीच्या खंडाच्या प्रस्तावनेत केला आहे, तोच पुन्हा इथेही करणे आवश्यक वाटते.

**शुद्धलेखन** — कोशाच्या पहिल्या खंडात महाराष्ट्र साहित्य परिषदेने केलेले शुद्धलेखनाचे नियम पाळले. त्यानंतर मराठी साहित्य महामंडळाने शुद्धलेखनाचे नवे नियम केले आणि ते महाराष्ट्र राज्य सरकारने मान्य केले. त्या नियमांना अनुसरून दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या, पाचव्या, सहाव्या, सातव्या व आठव्या खंडांचे मुद्रण केले आहे. तेच नियम या नवव्या खंडाच्या मुद्रणातही पाळले आहेत.

**जाती-जमातींची माहिती** — गेल्या शतकात व चालू शतकाच्या प्रारंभी अनेक पाश्चात्य संशोधकांनी भारतातील बहुसंख्य जाती-जमातींचे संशोधन करून मोठमोठे ग्रंथ लिहून ठेवले आहेत. जाती-जमातींची माहिती देताना आम्ही त्या ग्रंथांचा उपयोग केला आहे. कालमानाप्रमाणे बहुतेक जाती-जमातींच्या व्यवसायांत, राहणीत व चालीरीतींत पुष्कळ प्रमाणात बदल झालेला असणे शक्य आहे. पण त्यांची प्रत्यक्ष पाहणी करून त्यांच्याविषयी अद्ययावत माहिती मिळविणे ही गोष्ट आम्हांला शक्य झालेली नाही. अलिकडे भारतीय किंवा पाश्चिमात्य संशोधकांनी काही जाती-जमातींचे प्रत्यक्ष संशोधन करून नवे ग्रंथ लिहिलेले आहेत, त्यांचा मात्र आम्ही उपयोग करून घेतला आहे. जनगणनेचे अहवाल आणि भारतातील अनेक जिल्ह्यांचे जिल्हानामे (गॅझेटिअर्स) यांचाही आवश्यक तेवढा उपयोग आम्ही केला आहे.

प्रस्तुत कोशातील व्रते, सण व उत्सव यांतील तिथी अमान्त मास धरून लिहिलेल्या आहेत. पूर्णिमान्त मास मानणाऱ्या प्रदेशांत त्यांच्या मासनामांत फरक पडेल, हे ध्यानात घ्यावे. उदा० – धूलिवंदनाच्या तिथीला अमान्त मासपद्धतीने फाल्गुन वद्य प्रतिपदा असे म्हटले जाते. पण पूर्णिमान्त मासात तीच तिथी चैत्र वद्य प्रतिपदा ठरेल. कारण पूर्णिमान्त मासाचा प्रारंभ कृष्ण प्रतिपदेपासून होत असतो.

**माननीयांचे साहाय्य व सहकार्य** — तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, म. म. पोतदार, डॉ. रा. ना. दांडेकर, सर्वश्री न. र. फाटक, सेतुमाधवराव पगडी, अॅड. सी. ग. फडके, चिं. श्री. नातू, अ. अं. कुलकर्णी, पोपटलाल शहा, सौ. सुधाबाई जोशी, सर्वश्री रामदास भटकळ, सदानंद भटकळ, पी. एन्. कुमठा, जयंतराव टिळक, मे. जी. डी. आपटे आणि कंपनी, ऑडिटर्स; श्री. बळवंत गिरिराव घाटे, औरंगाबाद; सर्वश्री श्री. र. भिडे, गोंधळेकर, वा. रा. पाटणकर, शं. मं होडारकर, ग. ह. खरे, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे; डॉ. विठ्ठलराव घाटे, श्री. बाळ सामंत, मुंबई; श्री. ग. बा. नेवाळकर, मुंबई; प्रा. वसंत नूलकर, पुणे; अॅड. त्रि. सी. जोशी,

धुळे; सौ. जयश्री फाटक, सर्वश्री सुब्राय काशीनाथ नायक, मडगाव; माधव रामकृष्ण बर्वे, म्हापसे; मधुकर द. वैद्य, पणजी; आत्माराम द. फडके, म्हापसे; बा. द. सातोस्कर, पणजी; पी. डी. कुंटे, मुंबई; गोवा हिंदू असोसिएशन, कला विभाग, मुंबई; ग्रंथपाल, केसरी-मराठा संस्था, पुणे; ग्रंथपाल, भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणे; ग्रंथपाल, हिंद सेवक संघ ग्रंथालय, पुणे; ग्रंथपाल, जयकर ग्रंथालय, पुणे विद्यापीठ; इत्यादी मंडळींनी कोशाला हस्ते परहस्ते अनेक प्रकारे मदत केली आहे. आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो व प्रस्तुत कार्याला त्यांचे सहकार्य अखंडपणे मिळत राहो, असे प्रार्थितो.

**अनुदाने** –– कोशाच्या आठव्या खंडाप्रमाणेच या नवव्या खंडासाठीही महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृतिमंडळाकडून आरंभी पाच हजार रुपये अनुदान मिळाले असून, आठव्या खंडाच्या प्रकाशनानंतर पंधरा हजार रुपये मिळाले आहेत, तसेच नवव्या खंडाच्या प्रकाशनानंतर पंधरा हजार रुपये मिळायचे आहेत. या अनुदानाबद्दल महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृतिमंडळाचे आम्ही अत्यंत ऋणी आहोत.

कोशाच्या चौथ्या खंडापासून दहाव्या खंडापर्यंत सात खंडांसाठी केंद्रीय शिक्षणमंत्रालयाने चाळीस हजार रुपयांचे अनुदान मंजूर केले आहे. त्यातील साडेसदतीस हजार रुपये मंडळाला मिळाले आहेत. त्याबद्दल भारतीय संस्कृतिकोशमंडळ केंद्र सरकारचे ऋणी आहे.

पुणे विद्यापीठाकडून कोशाच्या आठव्या खंडासाठी एक हजार रुपयांचे अनुदान मंडळाला मिळाले आहे. त्या अनुदानाबद्दल भारतीय संस्कृतिकोशमंडळ पुणे विद्यापीठाचे ऋणी आहे. प्रस्तुत नवव्या खंडासाठीही पुणे विद्यापीठाकडून असेच अनुदान मिळेल, अशी अपेक्षा आहे.

माननीय मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या निधीतून देणगी म्हणून रु. १०,००० /– मंडळाला मिळाले आहेत. या देणगीबद्दल आम्ही मा. मुख्य मंत्र्यांचे अत्यंत ऋणी आहोत.

**देणग्या** –– भारतीय संस्कृतिकोशमंडळाला काही मान्यवर दात्यांकडून देणग्या मिळाल्या आहेत. त्यांतील काही देणग्या पुढीलप्रमाणे ––

| | |
|---|---|
| श्रीमान शेठ अरविंद नवीनचंद्र मफतलाल, मुंबई (आजपर्यंत एकूण) | रु. ८५,००० |
| श्री. दयानंद बांदोडकर, पणजी | रु. १६,००० |
| सर दोराबजी टाटा ट्रस्ट, मुंबई | रु. १०,००० |
| श्री. डॉ. ना. भि. परुळेकर, पुणे | रु. २,००१ |
| गोवा हिंदू असोसिएशन, मुंबई | रु. १,५८६ |
| श्री. ठक्कर जादवजी कारा चॅरिटी ट्रस्ट, मुंबई | रु. १,५०० |
| दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लि., पुणे | रु. १,००० |
| श्री. दे. कृ. जाधव, ग्वाल्हेर | रु. १,००० |
| श्री. मेघजी तुलसीदास भाटिया धर्मशाळा ट्रस्ट, मुंबई | रु. १,००० |
| श्री. विश्वासराव चौगुले, वास्को (संभाजीनगर) | रु. १,००० |
| आंतर भारती, पुणे | रु. १,००० |
| हिंदुस्थान मटीरियल्स प्रा. लि., मुंबई | रु. १,००० |
| अखिल भारतीय आर्य (हिंदू) धर्म सेवा संघ, दिल्ली | रु. १,००० |

| | |
|---|---|
| संचालक, नाट्यमंदिर, कोल्हापूर, मुंबई | रु. १,००१ |
| श्री. जगन्नाथ वामन खलप व डॉ. ना. वा. खलप, म्हापसे | रु. १,००१ |
| श्रीमान धेंपे बंधू, पणजी | रु. १,००१ |
| महाराज फत्तेसिंह चॅरिटीज, बडोदे | रु. १,००० |
| श्री. प्रभाकर पणशीकर, नाट्यसंपदा, मुंबई | रु. ७५१ |

पुणे महानगरपालिकेकडून मंडळाला दर वर्षी ५०० रुपयांची देणगी मिळते. या सर्व दात्यांनी केलेल्या साहाय्याबद्दल भारतीय संस्कृतिकोशमंडळ अत्यंत कृतज्ञ आहे.

आजपर्यंत कोशाचे आगाऊ मूल्य देऊन ज्यांनी आमचे कार्य पुढे जाण्यास मदत केली, त्या सर्व सज्जनांना हार्दिक धन्यवाद.

या खंडाच्या मुद्रणासाठी आवश्यक असलेला कागद मंडळाला शासकीय कागद-समितीच्या सहकार्यामुळे सवलतीच्या दराने मिळाला आहे. त्याबद्दल मंडळ महाराष्ट्र शासनाचे आणि कागद-समितीचे अत्यंत आभारी आहे.

प्रस्तुत कोशाच्या मुद्रणाची जबाबदारी संचालक, संगम प्रेस लि., पुणे २९ यांनी स्वीकारली आहे. कोशाचे मुद्रण निर्दोष, स्वच्छ व सुंदर व्हावे, यासाठी ते संपादकांशी आत्मीयतेने सहकार्य करीत आहेत. त्याबद्दल त्यांना धन्यवाद देऊन त्यांचे सहकार्य आम्हांला असेच अविच्छिन्न मिळत राहो, अशी आकांक्षा धरतो.

कलाभुवन, पुणे या संस्थेचे चालक श्री. ब. शं. दाते यांनी कोशातले सर्व ठसे सुबक करून दिल्याबद्दल त्यांचेही मन:पूर्वक आभार !

प्रस्तुत खंडातली रेखाचित्रे श्री. सुधाकर खाजगीवाले, श्री. दत्ता महाबळेश्वरकर व श्री. म. दि. पारखी यांनी काढलेली आहेत. त्याबद्दल त्यांचेही आभार मानले पाहिजेत.

कोशाच्या दहाव्या खंडाच्या मुद्रणाला आम्ही लवकरच प्रारंभ करू, असे आमच्या ग्राहकांना, वाचकांना व चाहत्यांना आश्वासन देऊन हे प्रास्ताविक पुरे करतो.

सर्वांचा नम्र,
**महादेवशास्त्री जोशी**
संपादक व कार्यवाह

**संपादकीय विभागात काम करणारी मंडळी**

| | |
|---|---|
| श्री. व. ग. सहस्रबुद्धे, बी. एस्सी. | उपसंपादक |
| श्री. रा. शं. नगरकर, बी. ए. | उपसंपादक |
| श्री. सु. ह. जोशी, एम्. ए. | उपसंपादक |
| श्री. विद्याधरशास्त्री भिडे, एम्. ए., पीएच्. डी. | समीक्षक |
| श्री. मोरेश्वर माधव वाळिंबे | उपसंपादक |
| श्री. मा. य. मिराशी | लेखनिक |
| श्री. अ. चिं. जोगळेकर | प्रमुख लेखनिक |
| श्री. ज. स. इनामदार | लेखनिक |
| श्री. अ. गो. साठे | लेखनिक |

# संदर्भ ग्रंथ संक्षेप

अ. अ. — अभिधान अनुशीलन, विद्याभूषण विभु, १९५८
अ. पा. — अश्वत्थाची पाने, स. अं. डांगे, १९७४
अ. प्र. — अस्पृष्टांचा प्रश्न, श्री. म. माटे, १९३३
अ. बृ. ज्यो. — अभिनव बृहज्जोतिषसार, वासुदेव गुप्त, १९६०
अ. भा. सं. — अरब और भारत के संबंध, रामचंद्र वर्मा, १९६०
अ. म. भा. — अथर्ववेदाचे मराठी भाषांतर, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९७२
अ. श. ब्र. प्रे — अठारहवीं शताब्दी के ब्रजभाषाकाव्य में प्रेमाभक्ति, देवीशंकर अवस्थी, १९६९
अ. सं. सा. — अर्वाचीन संस्कृत साहित्य, श्री. भा. वर्णेकर, १९६३
अ. सा. — अपभ्रंश साहित्य, हरिवंश कोछड, १९५६
अ. हि. आं. कं. — Early History of the Andhra Country, K. Gopalachari, 1941
आं. सा. इ. — आंध्र का सामाजिक इतिहास, सुरवरम प्रताप रेड्डी, अनुवाद – आर. वेंकटराव, १९५९
आ. द. दे. — आमच्या दहा देवता, सदानंद चेंदवणकर, १९६४
आ. भा. — आधुनिक भारत, शं. द. जावडेकर, १९३८
आ. सं. — आर्य संस्कृति, बलदेव उपाध्याय, १९५३
आ. सं. मू. — आर्य संस्कृति के मूलाधार, बलदेव उपाध्याय
आ. सा. मा. — आचार्य सायण और माधव, बलदेव उपाध्याय, १९४७
आ. अ. आ. लि. — Aspects of Early Assamees Literature, Editor – B. Kakti, 1953
आ. आ. दे. — आर्यों का आदिदेश, संपूर्णानंद, १९५७
आ. स. प्रा. अ. इ. — आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास, ऋग्वेदी, १९१६
आ. हि. सा. शो. — आदिकालीन हिन्दी साहित्य शोध, हरीश, १९६६
इं. इं. — Immortal India, J. H. Dave, 1960
इं. कॉ. — Indian Costumes, G. S. Ghurye, 1951
इं. नॉ. फ्राँ. ना. सें. — India's North-East Frontier in the Nineteenth Century, Verrier Elwin, 1959
इं. फो. लो. — Indian Folklore
इं. बु. इ. — The Indian Buddhist Iconography, Benoytosh Bhattacharya, 1958
इं. वे. क सू. — India of Vedic Kalpasutras, Ram Gopal, 1959
इं. स्ट. पा. प्रे. — Indian Studies, Past and Present, Culcutta
इ. फी. इं. क. — Essential Features of Indian Culture, K. M. Panikkar, 1967
उ. अ. — उपनिषदांचा अभ्यास, के. वि. वेलसरे, १९६५
उ. कों. प्रा. इ. — उत्तर कोंकणाचा प्राचीन इतिहास, पु. बा. जोशी, १९२६
उ. ध्रु. गं. — उत्तर ध्रुव से गंगा, परमानंद पटेल, १९६०
उ. प्र. बौ. वि. — उत्तर प्रदेश में बौद्ध धर्म का विकास, नलिनाक्ष दत्त, कृष्णदत्त वाजपेयी, १९५६
उ. प्र. लो. — उत्तर प्रदेश के लोकगीत, भगवतशरण सिंह, १९६०
उ. भा. मं. — उत्तर भारतातील मंदिरे, कृष्ण देव, १९६९
उ. भा. सं. प. — उत्तरी भारत की संत परंपरा, परशुराम चतुर्वेदी, १९५२
उ. यो. द. — उमेश योग दर्शन, उमेशचंद्रजी, अनु. – प्रभाकर रानडे, १९५९
उ. र. — उपनिषद्रहस्य, रा. द. रानडे, अनुवाद – कृ. वें. गजेंद्रगडकर, १९५९
उ. सं. क. रे. — उदासी संप्रदाय और कवि संत रेण, सच्चिदानंद शर्मा, १९६७
उ. सा. इ. — उत्कल साहित्य का इतिहास, अनसूया प्रसाद पाठक
ऋ. आ. — ऋग्वेदिक आर्य, राहुल सांकृत्यायन, १९५७
ऋ. द. — ऋग्वेद दर्शन, रा. गो. कोलंगडे, १९५४
ऋ. ब्र. स. — ऋग्वेदीय ब्रह्मकर्म समुच्चय
ऋ. म. भा. — ऋग्वेदाचे मराठी भाषांतर, सि. वि. चित्राव, १९६९
ऋ. सां. इ. — ऋग्वेदकालीन सांस्कृतिक इतिहास, चिं. ग. काशीकर, १९३५
ए. इं. — Ancient India, R. C. Majumdar, 1960
ए. एफ. एफ. डब्ल्यू. — Aspirations from a fresh world, Shakuntala Rao Shastri, 1954
एन्सा. मुंडा. — Encyclopaedia Mundarica, Haufman, 1950
एन्सा. रि. — An Encyclopaedia of Religion, Virgilius Ferm

एन्सा. रि. ए. — Encyclopaedia of Religion and Ethics, James Hastings, 1955

ए. सि. ए. हिं. — The Educational System of Ancient Hindus, Santosh Kumar Das, 1930

ए. हो. रा. — एक होता राजा, सरोजिनी बावर, १९६४

ऐ. सं. नि. – ऐतिहासिक संकीर्ण निबंध, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे ३०

ओ. डे. रा. अँ. — Origin and Development of the Rituals of Ancestor worship in India, Dakshinaranjan Shastri, 1963

औ. जी. सौ. — औपनिषदिक जीवन-सौख्य, के. ल. दप्तरी, १९५७

कं. सं. लि. — A Companion to Sanskrit Literature, Sures Chandra Banerji, 1971

क. क. — कथा कल्पतरू, र. दा. यंदे, १९५४

क. का. — कवि और काव्य, बलदेव उपाध्याय, १९४७

क. प्रा. बु. — कला के प्राण बुद्ध, जगदीश चंद्र, १९५६

क. सं. — कल्पना संगीत, गो. स. टेंबे

क. हे. इं. — Cultural Heritage of India, S. K. Chatterjee, 1958

कॉ. टे. इं. — The Costumes and Textiles of India, Brija Bhushan Jamil, 1958

का. ट्रा. नि. डो. — The Castes and Tribes of H. E. H. The Nizam's Dominions, S. S. Hassan, 1920

का. ट्रा. स. इं. — Caste and Tribes of Southern India, Thurston

का. सा. सा. — काशी की सारस्वत साधना, गोपीनाथ कविराज, १९६५

का. सृ. — कालिदासाची सृष्टी, मा. दा. आळतेकर, १९३७

का. ह. सा. — कार्तिकेय हस्त सामुद्रिक, द. शं. केळकर, १९६९

की. पॉ. — The Keys of Power, J. Abbot, 1932

कुं. ती. र. — कुंदकुंदाचार्य के तीन रत्न, गो. जी. पटेल, १९४८

कु. धा. सं. नि. — कुमारांसाठी धार्मिक संस्कार व नित्यकर्म, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९६५

कृ. क. — कृत्य कल्पतरू, लक्ष्मीधर भट्ट, १९४८

क्रि. स्ट. ले. उ. — A Critical Study of the Later Upanishadas, S. G. Desai

ग. को. — श्रीगणेश कोश, अमरेंद्र गाडगीळ, १९६८

ग. लो. सां. अ. — गढवाली लोकगीत, एक सांस्कृतिक अध्ययन, गोविंद चातक, १९६८

गां. गा. — गांवगाडा, त्रि. ना. आत्रे, १९५९

गॉ. इं. — The Gods of India, E. O. Martin, 1972

गा. दै. — गाजती दैवते, पं. महादेवशास्त्री जोशी, १९५९

गॉ. नॉ. बु. — The Gods of Northern Buddhism

गा. म. वि. — गायत्री महाविज्ञान, पं. श्रीरामशर्मा आचार्य, १९५९

गा. स. — हाल सातवाहनाची गाथा सप्तशती, स. आ. जोगळेकर, १९५६

गा. से. प. — A Giude to Seringpatam, M. H. Krishna, 1939

गु. ग्रं. को. — गुरु ग्रंथ कोश

गु. रा. सा. त. सो. — गुरुदेव रानडे साक्षात्काराचे तत्त्वज्ञान व सोपान, ग. वि. तुळपुळे, १९६२

गु. सा. इ. — गुप्त साम्राज्य का इतिहास, वासुदेव उपाध्याय, १९३९

गुज. सा. इ. — गुजराती साहित्य का इतिहास, जयंतकृष्ण हरिकृष्ण दवे, १९६३

गो. च. प. — श्रीगुरु गोरक्षनाथ चरित्र आणि परंपरा, रा. चिं. ढेरे, १९५९

गो. बा. — Golden Bow, James Frazer

गो. ब्रा. इ. — गोवर्धन ब्राह्मणांचा इतिहास, महादेवशास्त्री दिवेकर, १९३७

च. भा. नि. — चतुर्दश भाषा निबंधावलि, बिहार राष्ट्रभाषा परिषद, १९५७

च. व. चिं. — चतुर्वर्ग चिंतामणि, हेमाद्रि, सदाशिवाचार्य दीक्षित, १९०२

चा. या. प. — चातुर्मास्य यागपरिचय, मीमांसा विद्यालय, १९५६

चि. छा. — चिनारच्या छायेत, श्रीपाद जोशी, १९६२

ज. वि. ध. — जगातील विद्यमान धर्म, रा. व. आठवले, १९३५

जॉ. ऋ. इं. — The Geography of Rigvedic India, M. L. Bhargava, 1964

जा. का. भा. सं. — जातक कालीन भारतीय संस्कृति, पंडित मोहनलाल महतो 'वियोगि', १९५८

जॉ. पु. — The Geography of The Puranas, S. Muzfer Ali, 1966

जा. मा. — जातकमार्गोपदेशिका, खंड १ ला, य. के. प्रधान, १९४९

जै. इ. — The Jain Iconography, B. C. Bhattacharya

जै. क. — Jain Community – A Social Survey, V. A. Sangve, 1959

जै. ध. — जैनधर्म, कैलाशचंद्र शास्त्री, १९५५

जै. भ. पृ. — जैन भक्तिकाव्य की पृष्ठभूमि, प्रेमसागर जैन, १९६३

जै. व्र. वि. सं. — जैन व्रत — विधान — संग्रह, बारेलाल जैन राजवैद्य, १९५२

जै. सं. सं. — जैन संप्रदाय आणि संस्कृति, शां. भा. देव, १९६३
जै. सा. इ. – जैन साहित्य और इतिहास, नाथूराम प्रेमी, १९५६
जै. सि. भा. — जैन — सिद्धान्त — भास्कर, त्रैमासिक पत्र, आरा.
ज्यो. वि. — ज्योतिर्विलास, शं. बा. दीक्षित, १९४८
टें. त. ना. — Temples of Tamilnad, R. K. Das, 1964
टें. ली. आं. प्र. — Temples and Legends of Andhra Pradesh, N. Ramesan, 1962
टें. ली. बि. — Temples and Legends of Bihar, P. C. Roy Choudhury, 1965
ट्रा. ए. इं. — Tribes in Ancient India, Editor–Bimal Churn Law, 1943
ट्रा. का. बाँ. — The Tribes and Castes of Bombay, R. E. Enthoven
ट्रा. का. सें. प्रॉ. इं. — Tribes and Castes of The Central Provinces of India, R. V. Russel, R. B. Hiralal
डि. इ. — Dictionary of Islam, T. P. Hughes, 1935.
डि. क्ला. सा. कॅ. — Deppressed Classes of South Canara, R. G. Kakade, 1949
डि. सा. इं. म्यु. म्यु. — A Dictionary of South Indian Music and Musicians, P. Sambmoorthy
डे. हिं. इ. — The Development of Hindu Iconography, Jitendranath Banarjee, 1959
त. प्र. हिं. कृ. — आळवार भक्तोंका तमिल प्रबन्धम् और हिंदी कृष्णकाव्य, मलिक मोहंमद, १९६४
तां. बौ. सा. सा. — तान्त्रिक बौद्ध साधना और साहित्य, म. म. नागेंद्रनाथ उपाध्याय, १९३९
तां. वा. शा. दृ. — तांत्रिक वाङ्मय में शाक्त दृष्टि, गोपीनाथ कविराज, १९६३
ती. म. — तीर्थरूप महाराष्ट्र, पं. महादेवशास्त्री जोशी, १९५६
ते. उ. सा. — तेलुगु और उसका साहित्य, हनुमच्छास्त्री, 'अयाचित'
ते. वा. — तेलुगु वाङ्मय, परशा, १९३२
ते. सा. इं. — तेलुगु साहित्य का इतिहास, बालशौरि रेड्डि, १९६४
त्रि. दे. दै. — त्रिलिंग देशांतील दैनंदिनी, कृष्णाकुमार, १९४३
थ. वि. — The Thirtytwo Vidyas
द. सं. इ — दत्त संप्रदायाचा इतिहास, रा. चिं. ढेरे, १९६४
दा. चं. — दानचंद्रिका
दि सं. लँ. — The Sanskrit Language, T. Burrow, 1959
दे. ऋ. ब्रा. प. — देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिचयग्रंथ, सि. वि. चित्राव, १९४४
दे. को. — देवी कोश – आदिशक्तीचे विश्वस्वरूप, प्र. कृ. प्रभुदेसाई
दे. लि. स्व. वि. स. — देवनागरी लिपी–स्वरूप विकास और समस्याएँ, न. चिं. जोगळेकर, भगवानदास तिवारी, १९६२
द्र. गॉ. मॉ. हिं. — Dravidian Gods in Modern Hinduism, W. T. Elmore
ध. तं. शि. — धन्वंतरि तंत्रशिक्षा, पं. कन्हैय्यालाल मिश्र, १९५३
ध. लो. सा. — धर्म आणि लोकसाहित्य, दुर्गा भागवत, १९७५
ध. शा. मं. — धर्मशास्त्रमंथन, महादेवशास्त्री दिवेकर, १९३३
ध. शा. वि. — धर्मशास्त्रविचार, पां. वा. काणे, १९३५
ध. सिं. — धर्मसिंधु
ध. सू. ओ. डे. — Dharma Sutras: A Study in their Origin and Development, S. C. Banerjee, 1962
धा. सं. नि. — कुमारांसाठी धार्मिक संस्कार व नित्यकर्म, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९६५
न. हिं. ध. — नवा हिंदुधर्म, पं. महादेवशास्त्री दिवेकर, १९४२
ना. पं. नि. सं. — नाथपंथ और निर्गुण संत-काव्य, कोमलसिंह सोलंकी, १९६६
ना. प्र. प. — नागरी प्रचारिणी पत्रिका.
ना. भा. ध. — नाथांचा भागवत धर्म, श्रीधर कुलकर्णी, १९५८
नि. उ. सा. — निमाडी और उसका साहित्य, कृष्णलाल हंस, १९६०
नि. म. भा. — निरुक्ताचे मराठी भाषांतर, वै. का. राजवाडे, १९३५
नि. सिं. — निर्णयसिंधु
न्यू इं. अँ. — New Indian Antiquary
पं. क. — पंडित-कवि, के. ना. वाटवे, १९५२
पं. जी. सा. — पंजाब जीवन और साहित्य, मनसराम शर्मा, १९६१
पं. ज्यो. शा. — पंचांगांतील ज्योतिःशास्त्र, त्र्यं. गो. ढवळे, १९५८
पं. हिं. सा. इ. — पंजाब प्रांतीय हिंदी साहित्य का इतिहास, चंद्रकांत बाली, १९६०
प. का. भा. — पतंजलिकालीन भारत, प्रभुदयाळ अग्निहोत्री, १९६२
प. भा. व. — पवित्र भारत वर्णन, केशव बळवंत जोशी, १९५७
पा. का. भा. — पाणिनिकालीन भारतवर्ष, वासुदेवशरण अग्रवाल, १९५५
पा. पु. क. — पाटलिपुत्र की कथा, सत्यकेतु विद्यालंकार, १९४६
पॉ. रि. फो. नॉ. इं. — Popular Re

ligion and Folklore of Northern India, Crooke, 1894
पा. सा. इ. -- पाली साहित्य का इतिहास, भरतसिंह उपाध्याय, १९५१
पि. प. — पिशाचांच्या परिसरात, रा. दा. करमरकर, १९५२
पी. के. गो. को. व्हॉ. — P. K. Gode Commemoration Volume, Ed. Hariyappa, Patkar, 1968
पु. इं. -- Puran Index, V. R. Ramchandra Dikshitar, 1955
पु. त. नि. — पुरातत्त्व निबंधावली, राहुल सांकृत्यायन, १९३७
पु. नि. — पुराणनिरीक्षण, त्र्यंबक गुरुनाथ काळे
पु. भा. सा. इ. — पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास, सुमंत मुरंजन, १९७३
पु. वि. -- पुराणविमर्श, पं. बलदेव उपाध्याय, १९६५
पु. वे. सा. स. अ. -- पुराणगत वेदविषयक सामग्री का समीक्षात्मक अध्ययन, रामशंकर भट्टाचार्य, १९६५
पू. म. भा. — पूर्वमध्यकालीन भारत, वासुदेव उपाध्याय, १९५३
पू. मा. प्र. — पूजामार्गप्रदीप, अनंत वासुदेव मराठे, १९६२
पे. का. म. — पेशवेकालीन महाराष्ट्र, वा. कृ. भावे, १९३५
पे. पु. – पेरिय पुराण
पै. सा. रा. — पैठणचे सातवाहन राजकुल, पं. वि. रानडे, १९६५
पो. वी. हिं. सि. -- Position of Women in Hindu Civilization, A. S. Altekar, 1956
पौ. भा. ध. — पौराणिक भागवतधर्म, शं. दा. पेंडसे, १९६७
प्रा. ऐ. श. — प्राचीन ऐतिहासिक शस्त्र, माणिकराव, १९३१
प्रा. का. शा. — प्राचीन काव्यशास्त्र, र. पं. कंगले, १९७४
प्रा. च. को. — प्राचीन चरित्र कोश, सि. वि. चित्राव, १९३२
प्रा. भा. क. — प्राचीन भारतीय कला, म. श्री. माटे, १९७४
प्रा. भा. क. वि. — प्राचीन भारत के कलात्मक विनोद, हजारीप्रसाद द्विवेदी, १९५२
प्रा. भा. न. न. जी. — प्राचीन भारत में नगर तथा नगर-जीवन, उदय नारायणराव, १९६५
प्रा. भा. म. — प्राचीन भारतीय मनोरंजन, मन्मथ राय, १९५७
प्रा. भा. रा. -- प्राचीन भारतीय राजनीति, र. पं. कंगले, १९६९
प्रा. भा. लो. ध. -- प्राचीन भारतीय लोकधर्म, वासुदेवशरण अग्रवाल, १९६४
प्रा. भा. वि. -- प्राचीन भारतीय विद्यापीठें, ना. गो. तवकर, १९५०
प्रा. भा. वे. — प्राचीन भारतीय वेशभूषा, मोतीचंद्र, १९५१
प्रा. भा. शि. प. -- प्राचीन भारतीय शिक्षण पद्धति, अ. स. आळतेकर
प्रा. भा. सं -- प्राचीन भारतीय संस्कृति, स. का. दीक्षित, १९६०
प्रा. भा. सं. द. — प्राचीन भारत : संस्कृति दर्शन, चौवळ–बादरायणी, १९६०
प्रा. भा. सां. — प्राचीन भारत की सांग्रामिकता, रामदीन पांडेय, १९५७
प्रा. भा. – सां. अ. — प्राचीन भारत – सांस्कृतिक अध्ययन, चिं. त्र्यं. केंधे, १९६२
प्रा. भा. सा. आ. इ. — प्राकृत भाषा और साहित्य का आलोचनात्मक इतिहास, नेमिचंद्र शास्त्री
प्रा. भा. सा. सां. भू. – प्राचीन भारतीय साहित्य की सांस्कृतिक भूमिका, रामजी उपाध्याय, १९६६
प्रा. भा. हिं. का. -- प्राचीन भारत, हिंदु काल, राजबलि पाण्डेय
प्रा. भा. ज्ञा. -- प्राचीन भारतीयांची ज्ञानसाधना, ना. गो. तवकर, १९७३
प्रा. म. — प्राचीन महाराष्ट्र, श्री. व्यं. केतकर, १९६३
प्रा. म. को. ले. -- प्राचीन मराठी कोरीव लेख, शं. गो. तुळपुळे, १९६३
प्रा. म. जै. सा. — प्राचीन मराठी जैन साहित्य, सुभाषचंद्र अक्कोळे, १९६८
प्रा. म. वा. स्व. — प्राचीन मराठी वाङ्मयाचे स्वरूप, ह. श्री. शेणोलीकर, १९६२
प्रा. म. सं. — प्राचीन मराठी संतकवी, ज. र. आजगांवकर, १९५७
प्रा. मौ. बि. — प्राङ्मौर्य बिहार, देवसहाय त्रिवेदी, १९५४
प्रा. यु. वि. -- प्राचीन युद्धविद्या, कृ. वि. वझे, १९३४
प्रा. व्य. प्र. — प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश अथवा हिंदुधर्मशास्त्रदर्पण, संपा. वि. दा. धारूरकर, १९०८
प्रा. सा. इ. — प्राकृत साहित्य का इतिहास, जगदीशचंद्र जैन, १९६१
प्रा. हिं. शि. शा. — प्राचीन हिंदी शिल्पशास्त्रसार, कृष्णाजी विनायक वझे, १९२४
प्रो. ऑ. ओ. कॉ. -- Proceedings and Transactions of all India Oriental Conference
प्ले. बु. इं -- Places of Buddhist Interest, Publication Division, 1956
फे. फे. आ. — Fairs and Festivals of Assam, Barua, Baveja, 1956
फे. हॉ. इं. — Festivals and Holidays of India, P. Thomas, 1971
फो. डा. म. — Folk Dance of Maharashtra, A. G. Agarkar, 1950

फो. लो. नॉ. इं. — Folklore in Northern India.

बं. सा. सं. इ. — बंगला साहित्य का संक्षिप्त इतिहास, सत्येंद्र, १९६१

बॉं. बे. क्रा. — Bombay Beggars and Criers

बि. ज. स्मा. ग्रं. — बिहार-जयंति-स्मारक ग्रंथ, शिवपूजन सहाय, १९४२

बु. ई. ए. — Buddhism in East Asia, Sukumar Dutt, 1966

बु. भा. स. — बुद्धकालीन भारतीय समाज, ना. गो. कालेलकर, १९३६

बु. मं. मो. इं. — Buddhist Monks and Monasteries of India, Sukumar Dutt, 1962

बौ. का. भा. — बौद्धकालीन भारत, जनार्दन भट्ट, १९२६

बौ. द. मी. — बौद्ध-दर्शन-मीमांसा, पं. बलदेव उपाध्याय, १९५४

बौ. ध. द. — बौद्ध — धर्म — दर्शन, आचार्य नरेंद्र देव, १९५६

ब्र. कृ. मा. भ. — ब्रजभाषा के कृष्ण काव्य में माधुर्य भक्ति, रूपनारायण, १९६२

ब्र. ख. बो. तु. अ. — ब्रजभाषा और खडी बोली का तुलनात्मक अध्ययन, कैलाशचंद्र भाटिया, १९६२

ब्र. ध. सं. इ. — ब्रज के धर्मसंप्रदायों का इतिहास, प्रभुदयाल मीतल, १९६८

ब्र. सां. इ. — ब्रज का सांस्कृतिक इतिहास, प्रभुदयाल मीतल, १९६०

भां. को. व्हॉं. — R. G. Bhandarkar Commemoration Volume, 1917

भा. आ. भा. हिं. — भारतीय-आर्य भाषा और हिन्दी, सुनीतिकुमार चाटुर्ज्या, १९५७

भा. ज्यो. इ. — भारतीय ज्योतिष का इतिहास, गोरख प्रसाद, १९५६

भा. ज्यो. शा. — भारतीय ज्योतिष शास्त्र, शं. बा. दीक्षित, १९३१

भा. द. — भारतीय दर्शन, (१) बलदेव उपाध्याय, १९५७, (२) उमेश मिश्र, १९५७

भा. द. इ. — भारतीय दर्शनशास्त्र का इतिहास, देवराज, रामानंद तिवारी, १९५०

भा. द. सं. — भारतीय दर्शन संग्रह, पं. द. वा. जोग, १९५८

भा. ध. त. — भारतीय धर्म व तत्त्वज्ञान, श्री. भा. वर्णेकर, १९७५

भा. न. क. — भारतीय नगरों की कहानी, भगवतशरण उपाध्याय, १९५९

भा. प्र. वि. — भारतीय प्रतीकविद्या, जनार्दन मिश्र, १९५९

भा. प्रा. जैं. ती. — भारत के प्राचीन जैन तीर्थ, जगदीशचंद्र जैन, १९५२

भा. प्रा. लि. — भारतीय प्राचीन लिपिमाला, पं. गौरीशंकर ओझा, १९५९

भा. प्रा. रा. — भारत के प्राचीन राजवंश, विश्वेश्वरनाथ रेउ, १९२१

भा. प्रा. सं. — भारत की प्राचीन संस्कृति, रामजी उपाध्याय, १९४८

भा. बृ. इ. — भारत वर्ष का बृहद् इतिहास, भगवद्दत्त

भा. ब्रा. जा. प्र. — भारतीय ब्राह्मण जाति-प्रदीपिका, इंद्रदेव नारायण सिंह, १९५८

भा. मौ. ए. — भारत की मौलिक एकता, वासुदेवशरण अग्रवाल, १९५५

भा. रा. प्र. — भारतीय राज्यशास्त्र प्रणेता, श्यामलाल पांडेय, १९६४

भा. लो. नृ. — भारत के लोकनृत्य, लक्ष्मीनारायण गर्ग, १९६१

भा. वा. इ. — भारतीय वाद्यांचा इतिहास, ग. ह. तारळेकर, १९७३

भा. वि. को. — भाषा विज्ञान कोश, भोलानाथ तिवारी, १९६४

भा. वि. प. — भारतवर्ष में विवाह एवं परिवार, के. एम. कापडिया, १९६३

भा. शि. सं. इ. — भारतीय शिक्षा का संक्षिप्त इतिहास, वंशीधर सिंह, भूदेव-शास्त्री, १९५७

भा. श्रे. — भारतीय श्रेष्ठत्व, द. गो. लिमये, १९२२

भा. सं. — भारतीय संस्कृति, शिवदत्त ज्ञानी, १९४४

भा. सं. — भागवत संप्रदाय, बलदेव उपाध्याय, १९५४

भा. सं. क. — भारत की संस्कृति और कला, राधाकमल मुकर्जी, १९५९

भा. सं. जैं. यो. — भारतीय संस्कृति में जैन धर्म का योगदान, हिरालाल जैन, १९६२

भा. सं. प. — भारत की संग्रामपद्धति, वीरेंद्रसिंह रघुवंशी, १९६५

भा. सं. म. — भारत के संत-महात्मा, रामलाल, १९५७

भा. सं. सा. — भारतीय संस्कृति और साधना, गोपीनाथ कविराज, १९६४

भा. सं. सां. चे. — भारतीय संस्कृति और सांस्कृतिक चेतना, रामलेखन पांडेय, १९६७

भा. स. उ. — भारतीय सण व उत्सव, कुमुदिनी रांगणेकर, १९५७

भा. सा. — भारत सावित्री, वासुदेवशरण अग्रवाल, १९५७

भा. सा. इ. — भारत वर्ष का सामाजिक इतिहास, विमलचंद्र पाण्डेय, १९६०

भा. सा. शा. — भारतीय साहित्यशास्त्र, ग. त्र्यं. देशपांडे, १९५८

भा. सा. सां. रे. — भारतीय साहित्य की सांस्कृतिक रेखाएँ, परशुराम चतुर्वेदी, १९५५

भा. स्त्री. — भारतीय स्त्री, के. रा. पालकर, १९६७

भू. स. द. — भूदान-यज्ञ, समग्र दर्शन, वा. ज. कुंटे, १९५६

भो. भा. सा. — भोजपुरी भाषा और

साहित्य, उदयनारायण तिवारी, १९५४
भो. रा. हिं. क. — भोसला राजदरबार के हिंदी कवि, कृष्ण दिवाकर, १९६९
म. क. — मनोरम कश्मीर, मनोहर कृष्ण दर, १९५८
म. क. च. — महाराष्ट्रीय कविचरित्र, ज. र. आजगावकर
म. का. स. — मराठेकालीन समाजदर्शन, शं. ना. जोशी, १९६०
म. गा. — महाराष्ट्र गाथा, कृ. पां. कुलकर्णी, १९६०
म. ग्रा. स. — महाराष्ट्राची ग्रामीण समाजरचना, दांडेकर–जगताप, १९५७
म. च. को. — मध्ययुगीन चरित्रकोश, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९३७
म. जि. — महाराष्ट्राचे जिल्हे, महाराष्ट्र सरकार
म. जी. — महाराष्ट्र जीवन, संपादक – गंगाधर बाळकृष्ण सरदार, १९६०
म. त. म. — मराठी तत्त्वज्ञान महाकोश, संपा. – दे. द. वाडेकर, १९७४
म. ध. प्र. — महाराष्ट्र धर्माचे प्रणेते, १९५८
म. भा. इ. — मध्य भारत का इतिहास, द्विवेदी, १९५६
म. भा. उ. — महाभारताचा उपसंहार, चिं. वि. वैद्य, १९२१
म. भा. ना. — महाभारत में नारी, वनमाला भवाळकर, १९६४
म. भा. व्य. — महाभारतातील व्यक्तिदर्शन, शं. के. पेंडसे, १९६४
म. भा. स. — महाभारतकालीन समाज, सुखमय भट्टाचार्य, १९६५
म. म. वा. — महानुभावीय मराठी वाङ्मय, य. खु. देशपांडे, १९६०
म. यु. भा. — मध्ययुगीन भारत, चिं. वि. वैद्य, १९२३
म. लो. उ. — मराठी लोकसंस्कृतीचे उपासक, रा. चिं. ढेरे, १९६४
म. लो. मा. — महाराष्ट्र लोकसाहित्यमाला, महाराष्ट्र लोकसाहित्य समिती
म. लो. सं. — मराठी लोकांची संस्कृति, इरावती कर्वे, १९५१
म. वा. इ. — मराठी वाङ्मयाचा इतिहास, (१) संपा. ल. रा. पांगारकर, १९३९ (२) संपा. रा. श्री. जोग
म. वे. व्या. त. — महर्षि वेदव्यास, अवतार कार्य व तत्त्वज्ञान, कृ. के. कोल्हटकर, १९७३
म. श. को. — महाराष्ट्र शब्दकोश, य. रा. दाते
म. सं. क. — महाराष्ट्र संत-कवयित्री ज. र. आजगावकर, १९३९
म. स. द. — मराठे कालीन समाजदर्शन, शं. ना. जोशी, १९६०
म. सा. — महाराष्ट्र सारस्वत, वि. ल. भावे, १९६३
म. सा. अ. — मध्यकालीन साहित्य में अवतारवाद, कपिलदेव पांडेय, १९६३
म. सा. पु. — महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना, रा. शं. वाळिंबे, १९६२
म. ज्ञा. को. — महाराष्ट्रीय ज्ञानकोश, श्रीधर व्यंकटेश केतकर
मा. दे. मा. लो. — माझा देश माझे लोक, श्रीपाद जोशी, १९५७
मि. अॅ. सें. इं. — The Mystics Ascetics and Saints of India, J. C. Oman, 1973
मि. मि. इं. — Medieval Mysticism in India, Kshitimohan Sen.
मी. द. — मीमांसा दर्शन, मंडनमिश्र-शास्त्री, १९५५
मुं. इ. जा. — मुंबई इलाख्यातील जाती, गो. मं. कालेलकर, १९२८
मु. इं. — Observation on the Mussulmans of India, Mrs. Meer Hassan Ali, 1917
मु. चिं. — मुहूर्त चिंतामणि
मु. पू. म. — मुसलमानपूर्व महाराष्ट्र, वा. कृ. भावे, १९४६
मु. म. सं. — मुसलमान मराठी संतकवी, रा. चिं. ढेरे, १९६७
मु. स. सं. — मुस्लिम सण आणि संस्कार, श्रीपाद जोशी
मू. वि. — मूर्तिविज्ञान, ग. ह. खरे
मै. गु. अ. ग्रं — मैथिलीशरण गुप्त अभिनंदन ग्रंथ, संपा. – वासुदेवशरण अग्रवाल, १९५६
मै. ट्रा. का. — Mysore Tribes and Castes, Nanjundayya and Iyer, Mysore University
मो. सिं. स. — मोहेंजो-दडो तथा सिंधु-सभ्यता, सतीशचंद्र काला, १९५१
म्यु. इं. — Music of India, Herbert A. Popley, 1921
यं. चिं. — यंत्रचिंतामणि
या. का. म. — यादवकालीन महाराष्ट्र, मु. ग. पानसे, १९६३
यो. सो. पू. — योगसोपान पूर्वचतुष्क, ह. ता. घमंडे, १९५१
रा. अ. ग्रं. — राजर्षि अभिनंदन ग्रंथ, संपादक-स्नातक, व्यास, १९६०
रा. इ. — राजपुताने का इतिहास भाग १, श्री. गहलोत
रा. का. सं. — रामायणकालीन संस्कृति, शां. ना. व्यास, १९५८
रा. का. स. — रामायणकालीन समाज, शां. ना. व्यास, १९५८
रा. जा. — राजस्थान की जातियाँ, बजरंगलाल लोहिया, १९५४
रा. भ. शा. — रामभक्तिशाखा, रामनिरंजन पांडेय, १९६०
रा. भा. सा. — राजस्थानी भाषा और साहित्य, मोतीलाल मेनारिया, १९५२
रा. र. सं. — रामभक्ति में रसिक संप्रदाय, भगवतीप्रसाद सिंह, १९५७
रा. रा. उ. व्हा. — राजपुत राज्यांचा उदय व व्हास, ह. वा. देशपांडे, १९३८

रा. ले. सं. — राजवाडे लेखसंग्रह, संपा. लक्ष्मणशास्त्री जोशी, १९५८
रा. लो. गी. — राजस्थानी लोकगीत, सूर्यकरण पारीक, १९५६
रा. स. रा. — राजगुरू समर्थ रामदास, शं. दा. पेंडसे, १९७४
रा. सं. सि. सा. — राधावल्लभ संप्रदाय, सिद्धान्त और साहित्य, विजयेंद्र स्नातक, १९५८
रा. सा. गौ. प. – राजस्थानी साहित्य की गौरवपूर्ण परम्परा, अगरचन्द नाहटा, १९६७
रा. सा. म. उ. — रामभक्ति साहित्य में मधुर उपासना, भुवनेश्वरनाथ मिश्र, १९५७
रि. इं. — The Religions of India, A. P. Karmarkar, 1950
रि. इं. ट्रा. — Religion of An Indian Tribe, Verier Elwin
रि. इं. रि. — Review of Indological Research in last 75 years, (M.M. Chitrao Shastri Felicitation Volume,) 1967
रि. सं. क. — Report of the Sanskrit Commission, Govt. of India, New Delhi, 1958
ल. र. प. — लघु रत्न परीक्षा, म. ल. खांबेटे, १९४१
ल. वि. सो. — लग्नविधि आणि सोहळे, ना. के. अलोनी, १९०४
लो. सं. क्षि. — लोकसंस्कृतीची क्षितिजे, रा. चिं. ढेरे, १९७१
लो. सा. रू. — लोकसाहित्याची रूपरेखा, दुर्गा भागवत, १९५६
लो. सा. ले. — लोकसाहित्याचे लेणे, सौ. मालतीबाई दांडेकर, १९५२
लौ. दं. — लौकिक दंतकथा, गो. मं. कालेलकर, १९३४
लौ. नी. — लौहित्य और नीलाचल, हेम बारुआ, १९६१
वं. दॅ. वॉ. इं. — The Wonder that was India, A. L. Basham, 1953
व. व जा. — वर्ण व जाती, मो. वि. पटवर्धन, १९६६
वा. गु. यु. — वाकाटक – गुप्तयुग, मजुमदार, अल्तेकर, १९६८
वा. रा. को. — वाल्मीकिरामायण-कोश, रामकुमार राय, १९६५
वि. ए. इं. — Viharas in Ancient India, D. K. Barua, 1969
वि. ध. द. — विश्व धर्म दर्शन, सांवलिया विहारीलाल वर्मा, १९५३
वि. पु. भा. — विष्णुपुराण का भारत, सर्वानन्द पाठक, १९६७
वि. मुं. रा. प. — विशाल मुंबई राज्य परिचय, प्रसाद प्रकाशन, १९६०
वि. सं. मं. वा. — विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक
वि. स्मृ. ग्रं — विक्रम स्मृतिग्रंथ, १९४५
वृ. प. इ. — वृत्तपत्रांचा इतिहास, वि. कृ. जोशी, रा. के. लेले, १९५१
वे. इं. — Vedic Index of Names and Subjects, Macdonell and Keith, 1954
वे. ए. — Vedic Age, History and Culture of Indian People, Vol. 1, Bharatiya Vidya Bhavan, 1957
वे. का. स. — वेदकालीन समाज, शिवदत्त ज्ञानी, १९६७
वे. रा. द. — वेदांतील राष्ट्रदर्शन, म. म. वाळशास्त्री हरदास, १९५७
वे. शा. दी. — वेदशास्त्रदीपिका.
वे. वि. नि. — वेदविद्यानिदर्शन, भगवद्दत्त, १९५९
वै. दे. अ. द. — वैदिक देवतांचे अभिनव दर्शन, रा. ना. दांडेकर, १९५१
वै. वा. भा. वि. — वैदिक वाङ्मयातील भागवतधर्माचा विकास, शं. दा. पेंडसे, १९६५
वै. वि. भा. सं. — वैदिक विज्ञान और भारतीय संस्कृति, गिरिधर शर्मा चतुर्वेदी, १९६०
वै. सं. वि. — वैदिक संस्कृतीचा विकास, लक्ष्मणशास्त्री जोशी, १९७२
वै. सा. — वैदिक साहित्य, पं. रामगोविंद त्रिवेदी, १९६०
वै. सा. ना. — वैदिक साहित्य में नारी, प्रशांतकुमार, १९६४
वै. सा. सं. — वैदिक साहित्य और संस्कृति, बलदेव उपाध्याय, १९५८
व्या. ज्ञा. को. — व्यायाम ज्ञानकोश, सरदार मुजुमदार, बडोदे
व्र. ति. नि. — व्रततिथिनिर्णय, नेमिचंद्र शास्त्री, १९५६
व्र. प. — व्रतपरिचय, हनुमान शर्मा, १९५७
व्हि. गॉ. सा. इं. — The Village Gods of South India, Henry Whitehead, 1921
शं. हि. टा. — Shankardeo and His Times, Maheshwar Neog, 1965
श. क. — शब्दकल्पद्रुम, राजा राधाकान्त देव
श. शा. — Sharirak Shastra, Indian Science of Hand-reading based on Kartikeya System, V. A. K. Ayer, 1960
शि. इ. — शिखांचा इतिहास, न. वि. गाडगीळ, १९६३
शि. नि. — शिवाजी निबंधावली, श्रीशिवचरित्र कार्यालय, पुणे, १९३०
शि. व शि. — शिवराज्य व शिवकाल, वा. कृ. भावे, १९५७
शी. स्फू. इ. — शीखांचा स्फूर्तिदायक इतिहास, शं. पु. जोशी, १९३९
शू. ए. इं — Shudras in Ancient India, R. S. Sharma, 1958

**श्री. च. का.** — श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन, चिं. नी. जोशी, १९५१

**श्री द. ज्ञा. को.** — श्री दत्तात्रेय ज्ञानकोश, संपा. प्र. न. जोशी, १९७४

**श्री. भा. क. शि.** — श्रीमद् भागवत : कथाभाग आणि शिकवण, ग. वि. अकोलकर, १९६५

**श्रौ. य. प.** — श्रौतयज्ञपरिचय

**सं. क.** — संत कवयित्री, पिरोज आनंदकर, १९६७

**सं. क. द.** — संस्कृत-कवि-दर्शन, भोलाशंकर व्यास, १९५५

**सं. का. पं. प्रा.** — संस्कृत काव्याचे पंचप्राण, के. ना. वाटवे, १९४७

**सं. कौ.** — संस्कारकौस्तुभ, वेंकटाचार्य गजेन्द्रगडकर, १९१४.

**सं. चा. अ.** — संस्कृति के चार अध्याय, रामधारीसिंह दिनकर, १९५६

**सं. द.** — संत दर्शन, त्रिलोकी नारायण दीक्षित, १९५३

**सं. ना. सौं.** — संस्कृत नाट्यसौंदर्य, के. ना. वाटवे, १९६२

**सं. प. प. पं.** — संत पलटूदास और पलटू पंथ, राधाकृष्ण सिंह, १९६६

**सं. प्र.** — संस्कृतीची प्रतीके, पं. महादेवशास्त्री जोशी, १९७६

**सं. प्रा.** — संस्कृतीच्या प्रांगणात, पं. महादेवशास्त्री जोशी, १९६९

**सं. म.** — संस्कार-महिमा, स. कृ. देवधर, १९७२

**सं. मि.** — संशोधकाचा मित्र, ग. ह. खरे, १९३१

**सं. मु.** — संशोधन-मुक्तावली, वा. वि. मिराशी

**सं. वा. वि. इ.** — संस्कृत वाङ्मय का विवेचनात्मक इतिहास, सूर्यकांत, १९७२

**सं. शा.** — संगीतशास्त्र, के. वासुदेवशास्त्री, १९५८

**सं. शा. क. इ.** — संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास, लक्ष्मण दत्तात्रय जोशी, १९३५

**सं. स. सं.** — संतमत का सरभंग संप्रदाय, धर्मेन्द्र ब्रह्मचारीशास्त्री, १९५९

**सं. सा.** — संत साहित्य, सुदर्शनसिंह मजीठिया, १९६२

**सं. सा. इ.** — संस्कृत साहित्य का इतिहास, (१) ए. बी. कीथ, १९६० (२) बलदेव उपाध्याय, १९५६ (३) वाचस्पति गैरोला, १९६०

**सं. सा. फ.** — संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती, गं. बा. सरदार, १९५०

**सं. सा. वि.** — संस्कृत साहित्यातील विनोद, के. ना. वाटवे, १९६२

**सं. सा. सो. इ.** — संस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास, त्रि. वा. करंबळेकर, १९५४

**सं. सा. स्व.** — संतमत में साधना का स्वरूप, प्रतापसिंह चौहान, १९६१

**स. पॉ.** — The Serpent Power, Arthur Avalon, 1958

**स. भा. प्र. व.** — सचित्र भारत प्रवास वर्णन, बाळासाहेब घोरपडे, १९१२

**स. म. खे. पु.** — सचित्र मराठी खेळांचे पुस्तक, अ. वा. देवधर, १९०५

**स. सा. वा.** — समग्र सावरकर वाङ्मय.

**सां. द. इ.** — सांख्य दर्शन का इतिहास, पं. उदयवीर शास्त्री, १९५०

**सा. इं. इ. गॉ. गॉ.** — South Indian Images of Gods and Goddesses

**सा. इं. गॉ.** — South Indian Gods, Bartholomaeus *Ziegeubalg*

**सा. इं. फे.** — South Indian Festivities, P. V. Jagadisa Ayyar, 1921

**सा. भा. वि.** — सामान्य भाषा विज्ञान, बाबूराम सक्सेना, १९४३

**सा. भू.** — सारस्वत भूषण, ग. रा. शर्मा, १९५०

**सा. वा. चा.** — साधकाची वाटचाल, ग. वि. तुळपुळे, १९६४

**सा. स. चिं.** — साहित्य विचार आणि समाज चिंतन, संपा. – भा. शं. भणगे, १९६८

**सिं. ऋ. हिं. सं.** — सिंधुसंस्कृति, ऋग्वेद व हिंदुसंस्कृति, प्र. रा. देशमुख, १९७६

**सिं. क.** — Sindhi Culture, U. T. Thakur, 1958

**सिं. भा. सं. प.** — सिंधी भाषा का संक्षिप्त परिचय, कृष्णचंद्र जैतली, १९५७

**सि. आ. प. भा.** — सिकंदर का आक्रमण, और पश्चिमोत्तर भारत, बलराम श्रीवास्तव, १९५७

**सि. इ.** — सिख इतिहास, ठाकूर देशराज, १९५४

**सि. सा.** — सिद्ध साहित्य, धर्मवीर भारती, १९५५

**सी. ऋ.** — The Seers of The Rigveda, V. G. Rahurkar 1964

**सु. का. शा.** – सुलभ काव्यशास्त्र, पं. महादेवशास्त्री जोशी, १९६१

**सु. वि. को.** – सुलभ विश्वकोश, य. रा. दाते, चिं. ग. कर्वे.

**सु. स्तो. सं.** — सुबोध स्तोत्रसंग्रह, म. म. पां. ग. गोस्वामी.

**से. इं.** — Census of India.

**से. इं. वे. बें.** — Census of India, West Bengal, 1951

**स्ट. उ.** — Studies in the Upapuranas vol. 1, R. C. Hajara 1958

**स्ट. वा. वि.** — A Study on Vastuvidya, Tarapad Bhattacharya, 1947

**स्वा. वि. ग्रं** — स्वामी विवेकानंद ग्रंथावली, श्रीरामकृष्ण आश्रम, नागपूर

**ह. च. – सां. अ.** — हर्षचरित – एक

सांस्कृतिक अध्ययन, वासुदेवशरण अग्रवाल, १९५३

ह. प्रा. लो. — हमारे कुछ प्राचीन लोकोत्सव, मन्मथ राय, १९५३

ह. सा. स्मृ. ग्रं. — हरविलास सारडा स्मृतिग्रंथ.

हिं. इ. आ. — हिंदुधर्म : इतिहास आणि आशय, रा. ना. दांडेकर, १९६९

हिं. इ. सी. — Hinduism in Cylon, James Cartman, 1957

हिं. क. भ. तु. अ. — हिंदी और कन्नड में भक्ति-आंदोलन का तुलनात्मक अध्ययन, हिरण्मय, १९५९

हिं. कृ. मा. — हिंदी कृष्णकाव्य में माधुर्योपासना, श्याम नारायण पाण्डेय, १९६३

हिं. जै. भ. क. — हिंदी जैन भक्तिकाव्य और कवि, प्रेमसागर जैन, १९६४

हिं. ते. वै. भ. — हिंदी और तेलुगु वैष्णव भक्तिसाहित्य, के. रामनाथन, १९६८

हिं. प. मी. — हिन्दु परिवार मीमांसा, हरिदत्त वेदालंकार, १९५५

हिं. बं. वै. क. — १६ वीं शती के हिंदी और बंगाली वैष्णव कवि, रत्नकुमारी, १९५६

हिं. रा. तं. — हिंदु राज्यतंत्र, काशीप्रसाद जायस्वाल, १९५२

हिं. वि. को. — हिन्दी विश्वकोश, संपा. — फूलदेवसहाय वर्मा

हिं. शि. शा. — हिंदी शिल्पशास्त्र, कृष्णाजी विनायक वझे, १९२८

हिं. सं. — हिंदू संस्कार, राजवली पांडेय, १९५७

हिं. स. — हिंदु सभ्यता, राधाकुमुद मुकर्जी, १९५८

हिं. स. द. — हिंदु-समाज-दर्शन, ल. ब. भोपटकर, १९३५

हिं. स. सं. वि. — हिंदुसमाज — संघटना आणि विघटना, पु. ग. सहस्रबुद्धे, १९६७

हिं. सा. — हिंदी साहित्य, धीरेंद्र वर्मा, व्रजेश्वर वर्मा, १९५९

हिं. सा. आ. — हिन्दी साहित्य का आदिकाल, आचार्य हजारीप्रसाद द्विवेदी, १९५७

हिं. सा. को. — हिंदी साहित्यकोश, संपादक — धीरेंद्र वर्मा, १९५९

हिं. सा. वि. — हिंदी साहित्य और विहार, संपादक — शिवपूजनसहाय, १९६०

हिं. सा. बृ. इ. — हिंदी साहित्य का बृहत् इतिहास, संपा. — राजबली पांडेय

हि. इं. ज. — History of Indian Journalism, J. Natarajan, Report of the Press Commission, Part II, 1955

हि. इं. लि. — History of Indian Literature, M. Winternitz, 1972

हि. क. इं. पी. — History and Culture of the Indian People, Bharatiya Vidya Bhavan

हि. जॉ. ए. इं. — Historical Geography of Ancient India, Bimal Churn Law, 1954

हि. जै. मो. — History of Jain Monachism, S. B. Deo, 1956

हि. ध. — History of Dharma Shastra, P. V. Kane

हि. प्र. — हिमालयातील प्रवास, काका कालेलकर, १९४५

हि. बें. लँ. लि. — History of Bengali Language and Literature, D. C. Sen, 1954

हि. सं. लि. — A History of Sanskrit Literature, (1) A. B. Keith, 1928; (2) S. N. Dasgupta; S. K. De, 1962

# संदर्भ ग्रंथ सूची


अध्यात्मदर्शन — के. वि. बेलसरे, १९६२
अश्वत्थाची पाने — स. अं डांगे, १९७४
अष्टादशी — (सार्थ) – विनोबा, १९७३
आंध्रभारती — वालशौरि रेड्डी, १९५९
ओरायन — The Orion or Researches into the Antiquity of the Vedas, B. G. Tilak, 1893
कर्नाटक — पं. महादेवशास्त्री जोशी, १९६१
कवि – श्री माला, सिन्धी — किशिनचन्द 'बेवसि', १९६२
कुलदैवत — सरोजिनी बाबर, १९७४
चंपा. गॅझे. — Gazetteer of India, Champaran District, P. C. Roy Condhury 1960
चित्पावन — ना. गो. चापेकर, १९३८
जैनधर्मामृत — पं. हीरालाल जैन, १९६०
ज्योतिर्वैभव — त्र्यं. गो. ढवळे, १९५६
ज्योतिषकौस्तुभ — पं रघुनाथशास्त्री पटवर्धन, १९६४
ट्री-वर्शिप — Tree Worship and Ophiolatory, G. S. Pillai, 1948
तर्पण — ना. गो. चापेकर, १९४८
दर्शन मंदाकिनी — पुरुषोत्तमशास्त्री दत्तवाडकर, १९५९
दि खासीज् — The Khasis, Major P. R. T. Gurdon, 1907
दि सिख टुडे — The Sikhs To-day, Kushwant Singh, 1959
देवीकोश — आदिशक्तीचे विश्वस्वरूप, प्र. कृ. प्रभुदेसाई, १९६८
धर्मशास्त्रविचार — पां. वा. काणे, १९३५
नंदादीप — संपा. सरोजिनी बाबर, १९७२
नक्षत्रलोक — पं. महादेवशास्त्री जोशी, १९५७
नवयुगधर्म १ — नवयुगधर्म प्रथम खंड, स. कृ. फडके, १९२७
पंचामृत — वालशौरि रेड्डी, १९५४
पावन जीवन — पं. श्रीपाद दामोदर सातवळेकर, १९६९
पूजातत्त्व — गोपीनाथ कविराज, १९५८
पूना गॅझे. — Gazetteer of Bombay Presidency, Poona District, 1884
पृथिवीपुत्र — वासुदेवशरण अग्रवाल, १९६०
प्रतीकशास्त्र — पूर्णानंद वर्मा, १९६४
भागवतदर्शन — हरवंशलाल शर्मा, १९६३
भारतीय व्रतोत्सव — पुरुषोत्तम शर्मा चतुर्वेदी, १९५७
मध्यदेश — धीरेन्द्र वर्मा, १९५५
महागणपती — महाराष्ट्रातील महागणपति, सदानंद चेंदवणकर, १९६५
मुझफर. गॅझे — Gazetteer of India Muzaffarpur district, P. C. Roy Choudury, 1958
योगविद्या — श्री. शं. खानवेलकर, १९५८
योगिनी तंत्रम् — संपा. पं. कन्हैयालाल मिश्र, १९५७
रजःकण — ना. गो. चापेकर, १९४३
रामकथा — कामिल बुल्के, १९६२
रूपसौदर्य — म. ग. पातकर, १९६३
लोकमाता — काका कालेलकर
विविधा — रा. चिं. ढेरे, १९६७
वेदविद्या — वासुदेवशरण अग्रवाल, १९५९
वैष्णव धर्म — परशुराम चतुर्वेदी.
व्रत परिचय — हनुमान शर्मा, १९५७
व्रतराज — विश्वनाथ शर्मा, १९५३
शंकराचार्य — शंकराचार्य व त्यांचा संप्रदाय, म. रा. वोडस, १९२३
शक्ती अँड शाक्त — Shakti and Shakta, Sir John Woodroffe, 1959
शैवमत — यदुवंशी, १९५५
श्रीगणेशकोश — अमरेंद्र गाडगीळ, १९६८
श्रीगुरुदत्तयोग — श्री. शं. खानवेलकर, १९५७
श्रीविद्यार्णवतंत्र — Iconography of Shri Vidyarnava Tantra, S. Shrikanth Shastri
श्रीरामकोश — संपादक अ. ल. गाडगीळ, १९७३
श्रीशंकराचार्य — बलदेव उपाध्याय, १९५०
संत दर्शन — त्रिलोकी नारायण दीक्षित, १९५३
संस्कृति-संगम — द. के. केळकर, १९५६
संस्कृति सुगंध — संपादक – वेंकटेशशास्त्री जोशी, १९७०
सह्याद्रि — स. आ. जोगळेकर, १९५२
सह्याद्रि खंड — श्रीस्कन्दपुराण – सह्याद्रिखण्ड, गजाननशास्त्री गायतोंडे, १९७१
सुरत गॅझे. — Gazetteer of India, Surat District, Govt. of Gujarat, 1962
सूर्यफूल — शं. ना. हरीप, १९५२
स्फुट निबंध — संपूर्णानंद, १९६७
हडप्पा — सिंधुसभ्यता का आदिकेंद्र, केदारनाथ शास्त्री, १९५९
हिंदु आयडियल — The Hindu Ideal, Ramananda Saraswati, 1959
हिंदुत्व — रामदास गौड, १९३९

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | स्तंभ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| १३ | २ | १ | आंध्र | कर्नाटक |
| २२४ | १ | २१ | भर्तृहरी | दंडी |

# भारतीय संस्कृतिकोश

## खंड नववा

**विहार** (आठव्या खंडातील अपूर्ण विषय पुढे चालू) हिमाचल प्रदेशातील स्पिती येथे काही गुंपा होते; त्यांतील तालो गुंपामध्ये शेकडो सुंदर भित्तिचित्रे रंगवलेली होती. त्यांत बुद्धाच्या जीवनातले प्रसंग चितारलेले होते. पंजाबातही चीनभुक्ती (अमृतसरच्या उत्तरेला ११ मैलांवर), जालंधर, बहावलपूर, थानेसर, इ. ठिकाणी बौद्ध विहार होते.

**उत्तर प्रदेश** – मतिपुरा, अयोध्या, मथुरा, संकास्य (संकिसा), श्रावस्ती (सहेत-महेत), कुशीनगर (कुसिया), गोपालपूर, कौशांबी (कोसम), सारनाथ ही या प्रदेशातील प्राचीन बौद्ध क्षेत्रे असून, तिथे अनेक विहार होते. मतिपुरा म्हणजे बिजनोरच्या उत्तरेला ८ मैलांवर असलेले मुंडोर होय. तिथे बौद्ध पंथाचे मोठे शिक्षणकेंद्र होते. त्या ठिकाणी युआन च्वांगला दहा बौद्ध मठ आढळले. त्यांत हीनयान पंथाच्या सर्वास्तिवादी शाखेचे सुमारे ८०० भिक्षू होते.

अयोध्येच्या परिसरात फाहियानला बौद्ध मठ दिसले नाहीत; पण युआन च्वांगला १०० मठ आढळले. त्यांत ३००० भिक्षू हीनयान व महायान पंथांच्या ग्रंथांचे अध्ययन करीत होते. वसुबंधू व असंग ज्या मठात वास्तव्य करीत होते, त्यांचा त्याने उल्लेख केला आहे. मात्र अयोध्येच्या जवळपास एकाही बौद्ध विहाराचे अवशेष अद्याप सापडलेले नाहीत. मथुरेजवळ युआन च्वांगला एका डोंगरावर एक गुहाविहार आढळला होता; पण तो अजून सापडलेला नाही. युआन च्वांगने संकास्य येथे आढळलेल्या ४–५ विहारांचे वर्णन केले आहे; पण त्यांचेही अवशेष अजून सापडलेले नाहीत.

सहेत-महेत हे ठिकाण उ. प्रदेशातील गोंडा व बहराइच या जिल्ह्यांच्या सीमेवर आहे. तिथेच प्राचीन श्रावस्ती नगरी होती, असे म्हणतात. तिथेच प्रसिद्ध जेतवन विहाराचे अवशेष सापडले आहेत. बुद्धाच्या काळापासून श्रावस्ती हे बौद्ध पंथाचे महान केंद्र होते. फाहियानला तिथे ९८ विहार आढळले होते. युआन च्वांगने तर शेकडो विहार पाहिले. मात्र ते मोडकळीस आलेले होते. तिथल्या विहारांच्या भग्नावशेषांत बुद्धाच्या व बोधिसत्त्वांच्या पाषाणमूर्ती सापडल्या आहेत.

वरील विहारांत जेतवन विहार सर्वांत महत्त्वाचा होय. त्यात गौतम बुद्धाने २५ वर्षावास केले होते. त्या भागाला गंधकुटी म्हणतात. हा विहार सातमजली होता. फाहियान तिथे गेला, तेव्हा तो जळून गेला होता. पूर्वी तिथे मोठे विद्यापीठ व ग्रंथालय असून, हजारो भिक्षू व विद्यार्थी त्या विहारात राहत होते, असे युआन च्वांगने ऐकले होते. पण तो तिथे गेला, तेव्हा त्याला सर्व विहार पडून गेलेला दिसला. केवळ एकच विटांची इमारत उभी होती व तिच्यात बुद्धाची मूर्ती होती. मात्र त्यानंतर तिथे पुन्हा दुसरा विहार केव्हातरी बांधण्यात आला असावा. तसा उल्लेख काही दानपत्रांत आढळतो.

श्रावस्ती येथील विहारांतले पुब्बराम (पूर्वाराम), अंधवन व राजकाराम हे विहारही उल्लेखनीय आहेत. पूर्वाराम विहाराची निर्मिती मोग्गलान याच्या देखरेखीने झाली. राजकाराम विहार प्रसेनजित राजाच्या आज्ञेने निर्माण करण्यात आला. अंधवन विहार केवळ भिक्षुणींसाठी होता.

कुशीनगर येथे बुद्धाचे महापरिनिर्वाण झाले. त्यामुळे ते बौद्धांचे महान पुण्यक्षेत्र ठरले. तिथे अनेक विहार निर्माण झाले. फाहियान व युआन च्वांग या दोघांनीही ते पाहिले होते. एका विहारात बुद्धाची निर्वाणमूर्ती आहे. आता तिथे स्तूपांचे व विहारांचे केवळ भग्नावशेष सापडले आहेत.

गोरखपूरच्या दक्षिणेला २८ मैलांवर गोपालपूर येथे एका बौद्ध विहाराचे अवशेष सापडले आहेत आणि त्यांत काही विटांवर बौद्ध तत्त्वज्ञानातील वाक्ये कोरलेली आहेत.

यमुनेच्या काठी, प्रयागपासून ३० मैलांवर असलेले कोसम म्हणजेच कौशांबी होय. तिथे बरेच विहार बांधले गेले होते. त्यांतले घोसिताराम व बदरिकाराम हे विहार विशेष उल्लेखनीय होते. तिथे बुद्धाने काही काळ वास्तव्य केले होते, असे म्हणतात. युआन च्वांगला तिथे दहाहून अधिक विहार दिसले, पण ते पडलेले होते. नगरातील प्रासादात एक सुमारे ६० फूट उंचीचा विहार असून, त्यात बुद्धाची चंदनी मूर्ती होती. हूण आक्रमकांनी ते सर्व विहार उद्ध्वस्त केले.

सारनाथ येथील धर्मचक्रप्रवर्तन विहार प्रख्यात आहे. बुद्धाच्या

वेळी तिथे दोन विहार बांधण्यात आले होते. पण युआन च्वांगला तिथे तीस संघाराम आढळले. त्यात १५०० भिक्षू होते. तिथल्या सुंदर स्तूपांचे व चैत्यांचे वर्णन त्याने केले आहे. इ. स. च्या १२ व्या शतकात कनोजचा राजा गोविंदचंद्र गाहडवाल याची राणी कुमारदेवी हिने सारनाथ येथे एक सुंदर विहार निर्माण केला. त्यातील एका शिलालेखात तिची प्रशस्ती कोरलेली आहे. अशोकाच्या वेळी जशी वास्तू होती तशीच ही निर्माण केली आहे, असे त्या प्रशस्तीत म्हटले आहे. पुढे त्या विहाराचे वर्णन केलेले आहे, ते असे –

**विहारो नवखण्डमण्डलमहीहारः कृतोयं ...**
**यं दृष्ट्वा प्रतिचित्रशिल्परचनाचातुर्यसीमाश्रयम् ।**

**अर्थ** – हा विहार नवखंड पृथ्वीचा जणू हार आहे. याला पाहिल्यावर तिथले चित्र–शिल्परचनेचे चातुर्य पराकोटीला गेलेले दिसते.

तो विहार म्हणजे एक विशाल चौकोनी वास्तू असून. पूर्वीच्या भग्न वास्तूच्या जागीच बांधलेला होता. आता त्याचे भग्नावशेषच तिथे सापडले आहेत. त्यांच्या आसपास गुप्त काळातील विहारांचे व मंदिरांचे अवशेष आहेत. त्यांतील एक विहार विशेष उल्लेखनीय आहे. तो चतुःशाला संघाराम होता. पन्नास फूट लांबीरुंदीचे प्रांगण, त्याच्या चारही बाजूंना स्तंभयुक्त सोपा आणि नंतर चारही बाजूंना खोल्या अशी त्याची रचना होती. त्याला एक प्रवेशमंडपही होता.

**बिहार** – वैशाली, नौलगढ, बोधगया, पाटलिपुत्र, ओदंतपुरी, राजगृह, नालंदा, तिलडक, फुल्लहरी, विक्रमशिला, इ. ठिकाणी असंख्य बौद्ध विहार निर्माण झालेले होते. त्यांतील वैशाली ही लिच्छवी संघाची राजधानी होती. तिथे बरेच बौद्ध मठ स्थापन झाले होते. फाहियानला वैशालीच्या उत्तरेकडील अरण्यात एक मोठा विहार आढळला. गौतम बुद्धाने तिथे वास्तव्य केले होते. त्या वेळी वैशाली नगरीत आम्रपालीने बांधलेला विहार अस्तित्वात होता. युआन च्वांगला तर वैशालीत शेकडो संघाराम दिसले होते. मात्र ते जीर्णावस्थेत होते. वैशालीजवळ श्वेतपूर नामक संघाराम त्याने पाहिला, त्याला दुमजली गोल मनोरे होते.

बोधगया येथे फाहियानला तीन मठ आढळले. त्यांत बौद्ध भिक्षू राहत होते. त्यांतील महाबोधी संघाराम खूप मोठा होता. त्यात सहा सभागृहे होती व तीनमजली चार मनोरेही होते. त्याच्या भोवती ३०–४० फूट उंचीचा तट होता. त्या विहारातील भिंतींना अतिशय चांगले रंग दिलेले होते. तिथे मोठाले स्तूप असून, त्यांत बुद्धाचे अवशेष होते आणि बुद्धाची एक सोन्या-चांदीची मूर्ती असून, ती रत्नांनी सुशोभित केलेली होती. तिथे महायान पंथाचे सहस्र भिक्षू राहत होते. हा विहार श्रीलंकेच्या राजाने बांधलेला असून, युआन च्वांगच्या वेळी तिथे श्रीलंकेतले बरेचसे भिक्षू होते. महावंशावरून कळते, की श्रीलंकेचा राजा मेघवण्ण याने समुद्रगुप्ताच्या अनुमतीने हा विहार निर्माण केला. बोधिमंदिराच्या जवळ अमरसिंहकोट नामक एक प्रचंड उंचवटा आहे, तिथेच हा विहार होता.

पाटलिपुत्र (पाटणा) येथे केलेल्या उत्खननात अनेक बौद्ध विहारांचे अवशेष सापडले आहेत. त्यांतील अशोकाराम नामक विहार फार मोठा होता. तो सम्राट अशोकाने बांधला, असे महावंशावरून कळते. अशोकाच्या काळातच इथे तिसरी बौद्ध परिषद भरली होती. इथल्या एका महायान पंथाच्या विहारात फाहियान तीन वर्षे राहिला होता. तिथे त्याने विनयपिटक लिहून काढले.

राजगृह (राजगिर) हे बिहारातले महान बौद्ध केंद्र होते. बुद्धाने इथे कित्येकदा एकांतवास केला होता. त्याच्या महापरिनिर्वाणानंतर लवकरच इथल्या सप्तपर्णी गुंफेत पहिली बौद्ध परिषद भरली होती. सारीपुत्त व मोग्गलान यांनी बौद्ध पंथाची दीक्षा इथेच घेतली. त्यानंतर या नगरात अनेक बौद्ध विहार बांधले गेले. त्यांतील वेलुवन विहार प्रसिद्ध आहे. तो बिंबिसार राजाने बुद्धाला व संघाला दान दिला होता. या विहाराला सुशोभित दरवाजे व मनोरे होते. तिथला जीवकारामही बुद्धाच्या वेळी जीवक नावाच्या वैद्याने संघाला अर्पण केला होता. बुद्धाने तिथे अनेकदा वसती केली होती. तो दगड-गोटे चिखलात वसवून बांधलेला असावा. त्याचा विस्तार बराच मोठा होता. फाहियानने अंबपालीच्या बागेत जीवकाने बांधलेल्या विहाराचा उल्लेख केला आहे. युआन च्वांगला एक विटांनी बांधलेला विहार माहीत होता. तो खूप भव्य आणि सुंदर होता. बुद्धाने तिथे अनेकदा वास्तव्य केले होते. तिथली बुद्धाची मूर्ती युआन च्वांगने पाहिली होती.

पाटण्यापासून सुमारे ४० मैलांवर नालंदा नामक बौद्ध केंद्र होते. गुप्त काळात तिथे अनेक विहार निर्माण झाले. त्यानंतर त्या सर्वांचा मिळून एक महाविहार झाला. तिथे अनेक शतके एक विद्यापीठ चालू होते. युआन च्वांगने त्या महाविहाराचे विस्तृत वर्णन केले आहे. तिथे एक मोठे ग्रंथालयही होते. इथल्या उत्खननात जे अवशेष सापडले आहेत त्यांवरून असे ध्यानात येते, की या विहाराचा विस्तार एक मैल लांब व अर्धा मैल रुंद होता. त्यातील वसतिगृहे व चैत्यगृहे भव्य-सुंदर होती. त्यांची रचना योजनापूर्वक केलेली होती. त्या आवारात अनेक लहान सरोवरे होती. सर्व महाविहाराला वेढणारी एक भिंत होती व तिला एकच द्वार दक्षिणेला होते.

धर्मस्वामी नामक एक तिबेटी भिक्षू इ. स. च्या १३ व्या शतकात भारतात आला होता. त्याला नालंदा महाविहारात काही भिक्षू अध्ययन-अध्यापन करीत असलेले आढळले. मुसलमानी

अत्याचारातून वाचलेले काही विहार तिथे असावे. मात्र कालांतराने तेही नष्ट झाले.



दार्जिलिंगजवळचा विहार

नालंदापासून सुमारे २१ मैलांवर तळडक संघाराम होता. युआन च्वांगने त्याचे वर्णन केले आहे, त्यावरून तो खूप मोठा असावा, असे वाटते. त्यात तीन अनेकमजली वसतिगृहे होती. त्यांची रचना फार सुंदर होती. मधल्या विहारात बुद्धाची ३० फूट उंचीची मूर्ती होती. उजव्या बाजूला अवलोकितेश्वराची व डाव्या बाजूला तारेची मूर्ती होती. त्या विहारात महायान पंथाचे १००० भिक्षू होते.

विक्रमशीला विहार वंगाधिपती धर्मपाल याने स्थापन केला. विक्रमशील हे धर्मपाल राजाचे दुसरे नाव किंवा विरुद असून, तेच नाव या विहाराला मिळाले, असे श्री. रमेशचंद्र मजुमदारांचे मत आहे. भागलपूरजवळ सुलतानगंज येथे एका टेकडीवर जे अवशेष सापडले आहेत ते या विहाराचे आहेत, असे संशोधकांनी ठरवले आहे. तो विहार विशाल होता, पण इ. स. च्या १३ व्या शतकात तिबेटी लामा धर्मस्वामी तिथे गेला तेव्हा त्याला तो पूर्णपणे उद्ध्वस्त झालेला दिसला.

ओदंतपुरी येथे इ.स.च्या ८ व्या शतकात एक विहार बांधण्यात आला होता. बंगालचा राजा गोपाल याने तो निर्माण केला, असे म्हणतात. हे स्थान बिहारमध्ये बिहारशरीफजवळ आहे, असे काही पंडितांचे मत आहे. अन्य संशोधकांच्या मते ते बंगालमधील नवद्वीपाजवळ आहे. धर्मरक्षित, शीलरक्षित, अभयंकर गुप्त, दीपंकर श्रीज्ञान, इ. महापंडित तिथल्या महाविहारात होते. एका तिबेटी आख्यायिकेवरून कळते, की तिथे १२००० बौद्ध भिक्षू राहत होते. इ. स. च्या १२ व्या शतकाच्या अखेरीस तो विहार नष्ट झाला.

**बंगाल** – कापत्य, सन्नगर, वलण्डा, बाहुलारा, वाराग्राम, देविकोट, त्रैकूटक, सोमपुरी, वाशिभ, रक्तविटी, जागद्दल, विक्रमपुरी, शालवन, गुनाइघर, पट्टिकेरक, चित्तगाँग, ताम्रलिप्ती, इ. ठिकाणी बौद्ध मठ होते. त्यांतील सोमपुरीचा विहार फार प्रसिद्ध होता. विक्रमशीला विहाराप्रमाणेच या विहारात महान विद्याकेंद्र होते. बंगालमधील पहाडपूर म्हणजेच प्राचीन सोमपुरी होय. धर्मपाल राजाने तिथे विहार बांधला आणि तो अनेक शतके चालू होता. दीपंकर श्रीज्ञान व त्याचा गुरू रत्नाकरशांती हे दोघे तिथे अनेक वर्षे होते. या महाविहाराची लांबी ९०० फुटांहून अधिक असून, त्यात सुमारे १७७ खोल्या होत्या. त्याला अनेक मजले होते आणि मधल्या प्रांगणाभोवती सोपा होता. सर्व विहाराच्या भोवती उंच भिंत होती. श्री. दीक्षितांच्या मते हा सर्वांत मोठा संघाराम होता. इ.स.च्या ११व्या शतकात वर्मा वंशातील जातवर्मा राजाने त्याचा नाश केला असावा, कारण तो बौद्धविरोधी होता. त्यानंतरही काही वर्षे तो चालू होता. आता मात्र त्याचे भग्नावशेष तेवढे उरले आहेत.

वाशिभ संघाराम उल्लेखनीय आहे. तो पुण्ड्रवर्धन या राजधानीच्या पश्चिमेला सुमारे तीन मैलांवर होता, असे युआन च्वांगने म्हटले आहे. त्यात मोठी सभागृहे व अनेकमजली वसतिगृहे होती. तिथे भव्य मंडप व उंच मनोरेही होते. भासुआ येथे त्यांचे अवशेष सापडले आहेत. युआन च्वांगने रक्तविटी (लाल माती) नामक विहाराचाही उल्लेख केला आहे. तो विहार कर्णसुवर्ण येथे होता. त्याची वास्तू खूप भव्य होती. तिथे बौद्ध पंथाचे मोठे केंद्र होते.

जागद्दल महाविहार रामावती किंवा वरेंद्री या प्राचीन नगरीत रामपाल राजाने (इ. स. १०८४–११३०) बांधला. इथे बौद्ध विद्याकेंद्र होते. इथे अनेक तिबेटी भिक्षू येऊन राहिले होते. शुभाकर गुप्त, धर्माकर, विभूतिचंद्र, इ. महापंडितही इथे वास्तव्य करीत होते.

पूर्व बंगालमधील टिप्पेरा जिल्ह्यात कोमिल्लाजवळ गुनाइघर येथे एक मोठा विहार होता, असे तिथे मिळालेल्या एका ताम्रपटावरून समजते. तो ताम्रपट वैन्यगुप्ताचा इ. स. ५०७–५०८ मधला असून, त्यात काही जमीन एका बौद्ध मठाला अग्रहाररूपाने दान दिल्याचा उल्लेख आहे. त्या भागात पट्टिकेरा, मैनामती, इ. ठिकाणी आणखी अनेक विहार होते. त्यांचे अवशेष सापडले आहेत. काहींचे उल्लेख कोरीव लेखांत आढळतात.

प. बंगालमधील मिदनापूर जिल्ह्यात तामलुक नावाचे गाव आहे, त्याला प्राचीन काळी ताम्रलिप्ती हे नाव होते. फाहिया-

नला तिथे बावीस बौद्ध मठ आढळलें होते. हे ठिकाण रूपनारायण व हुगळी या नद्यांच्या संगमापासून १२ मैलांवर, समुद्रकिनारी होते. तिथल्या विहारात फाहियान दोन वर्षे राहिला. पण युआन च्वांग तिथे गेला तेव्हा त्याला फक्त दहा बौद्ध संघाराम आढळले. तथापि त्यांत सुमारे १०० बौद्ध भिक्षू होते. ते विहार नंतर नष्ट झाले. सांप्रत तिथे बर्गा-भीम नावाचे एक देऊळ आहे. ते देऊळही प्राचीन विहारच असावे.

**ओडिसा** – या प्रदेशात बौद्ध पंथाचा बराच प्रसार झाला होता. युआन च्वांगला त्या प्रदेशात सुमारे १०० संघाराम आढळले; त्यांत १०,००० भिक्षू होते. त्यांतील पुष्पगिरी, रत्नगिरी, विराज, तोसली, दंतपुरी, भौरशैल, मुंजशी, हे विशेष उल्लेखनीय आहेत. पुष्पगिरी विहार ओडिसाच्या नैर्ऋत्य भागात म्हणजे उदयगिरीवर असावा. तिथल्या पाषाण-स्तूपातून दिव्य प्रकाश पसरत असे. कटकच्या ईशान्येला ४० मैलांवर रत्नगिरी विहार होता. तिथे फार मोठे बौद्ध केंद्र होते. याची स्थापना इ. स. च्या ५ व्या शतकापूर्वीच झाली होती. भौमकर वंशाच्या राजवटीत बौद्ध पंथाचा व बौद्ध कलांचा खूप विकास झाला. तिबेटी ग्रंथात या महाविहाराची माहिती मिळते. त्या जागी सापडलेल्या भग्नावशेषांत दोन शिलालेख मिळाले आहेत. त्यावरून त्या माहितीला दुजोरा मिळतो.

विराजनगर म्हणजे सध्याचे जाजपूर होय. त्याच्या परिसरात अनेक बौद्ध विहारांचे अवशेष सापडले आहेत. भौमकर वंशाच्या राजवटीत तिथले बौद्ध मठ चांगल्या स्थितीत चालू होते. त्यात अनेक बौद्ध मूर्ती होत्या. इ. स. च्या ८ व्या – ९ व्या शतकांत त्या भागात बौद्ध पंथाचा बराच प्रसार झाला होता, असे दिसते.

भुवनेश्वराजवळ शिशुपालगढ येथे केलेल्या उत्खननात एका प्राचीन नगरीचे अवशेष सापडले आहेत. ती नगरी सनपूर्व ३ ऱ्या शतकापासून इ. स. च्या ४ थ्या शतकापर्यंत अस्तित्वात होती, असे दिसते. हीच प्राचीन तोसली नगरी असावी, असे अनुमान संशोधकांनी केले आहे. तिथे पूर्वी महायान व हीनयान या दोन्ही पंथांचे मठ होते. काही शिलालेख व ताम्रपट या भागात सापडले आहेत, त्यावरून इथल्या मठांची थोडीशी माहिती मिळते.

कलिंग देशाची प्राचीन राजधानी दंतपुरी म्हणजे सध्याची पुरी होय. त्या ठिकाणी गौतम बुद्धाचा सोन्याचा दात एका स्तूपात काही शतके ठेवलेला होता. युआन च्वांगला तिथे महायान पंथाचे मोठे केंद्र आढळले. नगरीभोवती प्रचंड तट असून, त्याच्या बाहेर पाच मोठे बौद्ध विहार होते. त्यांत अनेकमजली उंच मनोरे होते. प्रत्येक विहारात बुद्ध व बोधिसत्त्व यांच्या सुंदर प्रतिमा कोरलेल्या होत्या.

भौरशैल येथे एक बौद्ध मठ होता, तो दिङ्नाग नामक महापंडिताच्या वास्तव्यामुळे प्रसिद्ध आहे. देलांग हे एका गावाचे नाव त्या पंडिताच्या नावावरूनच पडले आहे, अशी समजूत आहे. तिथपासून भुवनेश्वरपर्यंत अनेक टेकड्या असून, त्यांत लहान लहान गुहा आहेत. त्या गुहांमध्ये बौद्ध भिक्षू राहत होते. भौरशैल विहार याच गुहासमूहांत असावा.

तिबेटी साहित्यात मुंजशी नामक विहाराचा उल्लेख आढळतो. तिथे मोठे बौद्ध विद्याकेंद्र होते, असे कळते. मुंज नावाचा ओडिसाचा राजा होता व नागार्जुनाने त्याला बौद्ध पंथाची दीक्षा दिली होती. त्याने हा विहार स्थापला असावा. इ. स. च्या ११व्या शतकात महान तंत्रपंडित आनंदगर्भ याने त्या विहाराला भेट दिली, तेव्हा त्या विहारात बौद्ध पंथाचे कार्य जोमाने चालू होते. मात्र त्या विहाराचे नेमके स्थान अजून समजले नाही.

**मध्य प्रदेश** – युआन च्वांगला मालव देशात सुमारे १०० संघाराम आढळले. त्यांत हीनयान पंथाचे २०,००० भिक्षू होते, असे त्याने म्हटले आहे. गुप्त वंशाच्या राजवटीत उज्जयिनी हे विद्येचे व बौद्ध पंथाचे महान केंद्र होते. तिथे बरेच विहार होते. युआन च्वांगला बहुतेक विहार पडून गेलेले दिसले. फक्त ४-५ विहार उभे होते. अभयकुमार, धम्मपाल, महाकच्चायन, इ. अनेक बौद्ध आचार्य त्या मठांचे रहिवासी होते.

भोपाळपासून वीस मैलांवर सांची येथे अत्यंत मोठे बौद्ध केंद्र होते. त्याचे अवशेष तिथे सापडले आहेत. तिथल्या शिलालेखांत सांचीचे प्राचीन नाव काकनाव किंवा काकनाय असे दिले आहे. त्यानंतर ते काकनाड असे आढळते. इ. स. च्या ७ व्या शतकाच्या अखेरीस त्या स्थानाला वोट – श्री – पर्वत हे नाव होते. महावंशात सांचीला चेतियगिरी म्हटले आहे. सम्राट अशोकाची राणी देवी हिने विदिशा येथे एक महाविहार बांधला होता. इ. स. च्या ४थ्या ते १२व्या शतकापर्यंत या ठिकाणी अनेक विहार निर्माण झाल्याचे कळते. त्यांतील काही दगडी होते आणि काहींच्या सोप्यांत स्तंभ होते. काही विहार मध्ययुगात निर्माण झालेले आहेत, ते अजून बऱ्या स्थितीत उभे आहेत.

धारच्या नैर्ऋत्येला २५ मैलांवर बाघ नावाच्या गावाजवळ एका डोंगरात काही गुहा खोदलेल्या आहेत. त्या गुहांत बौद्ध भिक्षूंची वसती होती. त्या गुहांची बरीच पडझड झाली आहे. पण काही अजून चांगल्या आहेत. त्यांतील खोल्या चौकोनी आहेत. क्र. २ ची गुहा पांडवांची गुंफा या नावाने ओळखली जाते. ती चौकोनी असून, तिच्या तीन बाजूंना खोल्या आहेत. मागच्या भागात एक स्तूप आहे. (बाघगुंफा पाहा) या गुहांमध्ये अजंटाच्या लेण्यांतील भित्तिचित्रांसारखी रंगीत चित्रे आहेत. त्यांतील काही अजून चांगली आहेत.

कर्सानाच्या दक्षिणेला ४ मैलांवर अत्रंजिखेर नामक स्थानी प्राचीन विहारांचे अवशेष सापडले आहेत. युआन च्वांगला तिथे दोन विहार आढळले. त्यांत महायान पंथाचे ३०० भिक्षू होते. त्या स्थानाला वीरसन असे नाव होते. तिथे एक प्राचीन संघारामही होता. त्यात अशोकाने निर्माण केलेला १०० फूट उंच स्तूप होता. मात्र तो त्या वेळी ढासळलेला होता.

**गुजरात** – वलभीचे विद्यापीठ प्राचीन काळी फार प्रसिद्ध होते. युआन च्वांगने तिथल्या महाविहाराचे अवशेष पाहिले होते. मैत्रक राजांनी त्या विहाराला पुष्कळ दान दिले होते. त्या जागी सुमारे १०० संघाराम असून त्यांत ६००० भिक्षू हीनयान पंथाच्या ग्रंथांचे अध्ययन करीत. पण सांप्रत त्या विहाराचे भग्नावशेष भावनगराजवळ वल नावाच्या गावी सापडले आहेत.

सुरतजवळ कांपिल्य नामक विहार होता. राष्टकूट राजे दंतिवर्मा व धारावर्ष यांनी त्या विहाराला दाने दिल्याची माहिती मिळते. दंतिवर्म्याचा इ. स. ८६७ चा एक ताम्रपट मिळाला आहे. त्यात स्थिरमती नामक भिक्षूच्या विनंतीला मान देऊन राजाने कांपिल्य विहाराला भूमिदान केले आहे. त्या विहारात सिंधुदेशातले ५०० बौद्ध भिक्षू राहत होते.

सौराष्ट्रातील जुनागढ येथे अशोकाच्या वेळीच बौद्ध केंद्र स्थापन झाले होते. तिथे अशोकाचा एक शिलालेख आहे. युआन च्वांगला तिथे ५० संघाराम आढळले. त्यांत महायान पंथाचे ३००० भिक्षू होते. ते डोंगरात खोदलेल्या गुहांत राहत. काही विहार दोन किंवा तीन मजली होते. गिरनार पर्वतावरही काही अवशेष सापडले आहेत. जुनागढमधील काही गुहांत सुंदर कोरीव काम केलेले स्तंभ आहेत.

ऊनाच्या उत्तरेला १६ मैलांवर, तळाजाजवळ सानाह नामक स्थान आहे. तिथेही बौद्ध गुहा-विहार होता. तिथल्या डोंगरात साठहून अधिक गुहा सापडल्या आहेत. त्यांतील सर्वांत मोठी गुहा एभल मंडप या नावाने ओळखली जाते. ती ६८ × ६१ × १६ फूट लांबरुंदखोल असून, तिच्या दर्शनी भागात ६ स्तंभ आहेत.

**महाराष्ट्र** – या प्रदेशातील अनेक ठिकाणी डोंगरावरील खडकांत लेणी खोदलेली आहेत. त्यांत चैत्यगृहांशेजारी विहारही आढळतात. महाराष्ट्रात खोदीव विहार शेकडो आहेत, पण बांधीव विहारांचे अवशेष आढळलेले नाहीत. कान्हेरी येथील लेण्यातील एका शिलालेखात कल्याणजवळच्या अंबालिक या बौद्ध मठाचा उल्लेख आहे. हा मठ अंबरनाथजवळ असावा, असे संशोधकांचे अनुमान आहे. तिथे शिलाहारकालीन मंदिराजवळ काही जुने पाये आढळतात.

अजंटा – येथील लेण्यांत काही बौद्ध लेणी आहेत. क्र. ४ ची गुहा हा सर्वांत मोठा विहार आहे. त्यात पद्मपाणी बोधिसत्त्वाची सुंदर प्रतिमा कोरलेली आहे. गुहा क्र. ६ हा दुमजली विहार आहे. क्र. ८ व ९ ही लेणी हीनयान पंथाची असून सन पूर्व १०० च्या सुमारास खोदलेली असावी. क्र. १० ची गुहा हा सर्वांत जुना विहार असून, त्यात ३६ फूट लांबीरुंदीचे दालन आहे. त्याच्या छताला स्तंभांचा किंवा अन्य आधार दिसत नाही. त्याच्या तीन्ही बाजूंना खोल्या आहेत आणि दर्शनी भागात एक दरवाजा व दोन खिडक्या आहेत. या विहारात अनेक सुंदर कमानी आणि नक्षीकाम आहे. क्र. ११ च्या गुहेतील विहारात स्तंभ आहेत. क्र. १६ व १७ हे विहार सुरेख नक्षीकामाने सुशोभित आहेत. क्र. १६ च्या विहारात ६५ फूट लांबीरुंदीचे दालन असून, त्यात २० स्तंभ आहेत. त्याच्या बाजूंना १६ खोल्या व चैत्यमंदिर आहे. त्या मंदिरात बुद्धाची मूर्ती आहे. भिंतींवर सुंदर चित्रे होती. क्र. १७ च्या विहारातील आगाशीच्या डाव्या बाजूच्या भिंतीवर भव-चक्र रंगवलेले दिसते. त्या दोन्ही विहारांत दीर्घ शिलालेख आहेत, ते बहुधा इ. स. च्या ५ व्या शतकातले असावे.

या लेण्यातील आग्नेय बाजूची ५ लेणी आणि पश्चिम बाजूची ६ लेणी यांपैकी एक लेणे चैत्यगृह असून, बाकीचे दहा विहार आहेत. क्र. ४ च्या विहारात २८ स्तंभ आहेत. मात्र त्याच्या खोल्या खोदून झालेल्या नाहीत. क्र. २४ च्या विहाराचे दालन ७५ × ७३ फूट लांबीरुंदीचे असून, त्यात २० स्तंभ खोदायचे होते. पण त्याचे काम अपुरेच राहिलेले आहे.

**औरंगाबाद** – अजंटा आणि वेरूळ येथील लेण्यांव्यतिरिक्त



औरंगाबादजवळचा एक विहार

या शहराजवळ आणखी काही लेणी आहेत. त्यांतील एक चैत्यगृह असून, पाच विहार आहेत. त्या विहारांतील काही दालने

खूप मोठी आहेत. सर्व विहारांत अनेक प्रकारच्या मूर्ती कोरलेल्या असून, काही विहारांत सुंदर नक्षीकाम केलेले स्तंभ आहेत. मूर्तींचे शिल्पकाम उत्कृष्ट आहे. एका विहारात मागील भिंतीवर अवलोकितेश्वराची उभी मूर्ती असून, दालनाच्या मध्यभागी मूर्तिमंदिर व भोवती प्रदक्षिणामार्ग आहे. याच लेण्यात नृत्याचे प्रेक्षणीय दृश्य कोरलेले आहे. ही लेणी इ. स. च्या ६ व्या व ७ व्या शतकांत खोदलेली असावी.

कान्हेरी – मुंबईच्या उत्तरेला असलेल्या साष्टी बेटातील एका डोंगरावर शंभरहून अधिक गुहा खोदलेल्या आहेत. तिथे एक बौद्ध मठ होता. ती लेणी सातवाहनांच्या काळात खोदली गेली असावी. इ. स. च्या ९ व्या शतकात तिथे बौद्ध विद्याकेंद्र होते. त्या केंद्रात मोठे ग्रंथालयही होते. शिलाहार राजांनी आणि इतर काही दात्यांनी त्या मठाला दाने दिलेली होती.

कार्ले – पुणे-मुंबई मार्गावरील मळवलीपासून २ मैलांवर एका डोंगरावर ही लेणी खोदलेली आहेत. बौद्ध लेण्यांत ही सर्वोत्कृष्ट मानली जातात. इथे एक बौद्ध मठ आहे. त्यांतील मुख्य विहार तीनमजली असून, त्याच्या वरच्या मजल्याला पुढची पडवी आहे. त्याचा बराच दर्शनी भाग ढासळला आहे. तिथल्या शिलालेखावरून कळते, की हा विहार वैजयंतीचा शेठ्ठी भूतपाल याने निर्माण केला. सातवाहन नृपती पुलुमायी (२ रा) याने या विहाराला एक गाव दान दिले होते.

कोंडाणे – कार्ल्यापासून १० मैलांवर वायव्य दिशेला एका दरीत हे लेणे आहे. तिथे भाजे येथील चैत्यगृहासारखे चैत्यगृह असून, त्याच्या डाव्या बाजूला विहार आहे. हे लेणे सन पूर्व २ ऱ्या शतकाच्या पूर्वार्धातले म्हणजे सर्वांत प्राचीन आहे. याचे शिल्पकाम प्रारंभीच्या अवस्थेतले आहे. त्याचे स्थानही दुर्गम आहे. विहाराच्या दालनात स्तंभ आहेत. दर्शनी भागात स्तंभयुक्त लहान ओसरी असून, तिच्या आत जाळीदार भिंत व प्रवेशद्वार आहे. ती ओसरी मात्र पडलेली आहे. दालनाच्या तीन्ही बाजूंना खोल्या आहेत. दालनाचे छत व स्तंभ यांच्यामध्ये तुळया आहेत.

जुन्नर – पुण्याच्या उत्तरेला ४८ मैलांवर हे गाव असून, त्याच्या परिसरात प्राचीन लेण्यांचे सात गट आहेत. त्यांतील गणेश, तुळजा व मानमोड या गटांतील लेण्यांत बौद्ध विहार होते. गणेश गटातील विहाराचे रूपांतर गणेशमंदिरात झाले आहे. त्यांत स्तंभ नाहीत. त्याच्या दर्शनी पडवीत मात्र सहा स्तंभ आहेत. तुळजा गटातील विहारात ५ खोल्या आहेत. मानमोड गटातला विहार लहान असून, त्याच्या पडवीत अष्टकोनी स्तंभ आहेत.

नासिक – येथील लेण्यात अनेक बौद्ध विहार आहेत. त्यांतील तीन मोठे विहार विशेष उल्लेखनीय आहेत. नहपानविहार (क्र. ८) हा सर्वांत प्राचीन म्हणजे इ. स. १०० च्या सुमारास निर्माण झाला. क्र. ३ चा गौतमीपुत्रविहार इ. स. १३० च्या सुमारास व क्र. १५ चा श्रीयज्ञविहार इ. स. १८० च्या सुमारास



गौतमीपुत्रविहार – नासिक

निर्माण झाला. या तीन्ही विहारांत मोठी मध्यवर्ती दालने व दर्शनी द्वारमंडप आहेत. द्वारमंडपात अलंकृत स्तंभ आहेत, पण दालनात नाहीत. त्याच्या तीन्ही अंगांना खोल्या आहेत. नहपान व गौतमीपुत्र या विहारांतील शिलालेख महत्त्वाचे आहेत.

क्र. १५ चा विहार बराच मोठा असून, त्याची लांबी ६१ फूट आहे. पुढची बाजू ३७ फूट आहे, तर मागची ४४ फूट आहे. प्रत्येक बाजूला ८ खोल्या आहेत. क्र. १७ चा विहार त्यानंतर सुमारे चारशे वर्षांनी खोदलेला असून, त्याचा आकार विचित्र आहे. त्यात आलेख नसला तरी त्यातील मूर्तिकाम व स्तंभांचा प्रकार यांवरून तो इ. स. ६०० च्या सुमाराचा असावा, असे वाटते.

सनपूर्व २ ऱ्या शतकात सातवाहन नृपती कृष्णराज याच्या वेळी खोदलेला एक लहान विहार तिथे आहे. त्याच्या समोरचे चैत्यगृहही त्याच काळातले असावे. पांडव लेणे या नावाने प्रसिद्ध असलेला विहार शक क्षत्रप उषवदात याने इ. स. च्या २ ऱ्या शतकात खोदलेला आहे. हा विहार त्रिरश्मी पर्वतावर आहे. एका शिलालेखात त्यासंबंधी दानपत्र आहे.

भाजे – मळवलीजवळ विसापूरच्या डोंगरात हे लेणे खोदलेले आहे. ते अशा प्रकारच्या लेण्यांतले सर्वांत प्राचीन म्हणजे सनपूर्व २ ऱ्या शतकातले आहे. तिथे चैत्यगृहाप्रमाणे लहानसा विहारही आहे. त्यात एका दालनाभोवती खोल्या व पुढे सोपा अशी रचना आहे.

बेडसे – कार्ल्यापासून ११ मैलांवर हे लेणे असून, ते भाजे येथील लेण्यानंतर खोदलेले आहे. त्यात चैत्यगृहाच्या सोप्यातच तीन खोल्या भिक्षूंसाठी काढलेल्या आढळतात.



भाजे येथील छोटा विहार

वेरूळ – इथल्या लेण्यातील बौद्ध विहार उभ्या पहाडात खोदलेले नसून, डोंगराच्या उतारावर खोदलेले आहेत. क्र. १ च्या लेण्यातला विहार सर्वांत प्राचीन असावा; त्यात आठ खोल्या आहेत. क्र. २ च्या लेण्यात प्रथम उघडे प्रांगण असून, त्यातून खोल्यांत प्रवेश करता येतो. या विहारात जाण्यासाठी बऱ्याच पायऱ्या चढाव्या लागतात. क्र. १ ते ४ च्या लेण्यांना धेडवाडा म्हणतात. त्याला लागूनच क्र. ५चा विहार आहे, त्याला महारवाडा म्हणतात. त्याची रुंदी ६० फूट असून, खोली ११७ फूट आहे. त्याचे छत मात्र उंच नाही.

या विहारांच्या वर डोंगरात चार विहार आहेत. त्यांत बऱ्याच खोल्या आहेत. एका विहारात भव्य दालन होते. त्याचा पुढचा बराच भाग ढासळलेला आहे. त्या विहारांतील मंदिरांत बुद्धाच्या मूर्ती आहेत. लेणे क्र. १० हे चैत्यगृह असून, विश्वकर्मा लेणे म्हणून प्रसिद्ध आहे.

विश्वकर्मा लेण्याच्या उत्तरेला दोन विहार आहेत, ते तीन मजली आहेत. त्यांतील एकाचा एक मजला भरून गेलेला असल्यामुळे त्याला दोनताल हे नाव पडले होते. दुसरा तीन मजली विहार साधा, पण भव्य असून, त्याच्या दर्शनी भागात स्तंभयुक्त सोपे आहेत. त्याची उंची सुमारे ५० फूट आहे. फर्ग्युसनच्या मते, अशा प्रकारच्या विहारांत हा उत्कृष्ट आहे. याचे शिल्पकाम अत्यंत रेखीव व डौलदार आहे. हे विहार इ. स. ५५० ते ७५० या काळात खोदलेले आहेत.

या बौद्ध विहारांत असंख्य मूर्ती कोरलेल्या आहेत. त्यांत बुद्ध व बोधिसत्त्व यांच्या प्रचंड मूर्ती, बुद्धाचे अनेक अवतार, गंधर्व व अप्सरा, भक्त व भक्तिणी, प्रचंड द्वारपाल, इ. मूर्ती व संकटमोचन प्रार्थना–पट उल्लेखनीय आहेत.

द. भारत – बौद्ध धर्माचा प्रसार द. भारतात सुरू झाल्यानंतर त्या भागातही अनेक मठ–विहार निर्माण झाले. त्यांना राजे-महाराजांचा उदार आश्रय मिळत असे. काही विहारांत शिक्षणकेंद्रे स्थापन झाली. त्यांचे शिल्पकाम, त्यांतील सुंदर मूर्ती, तिथले नियमबद्ध जीवन आणि महान पंडितांचे वास्तव्य यामुळे काही मठ उत्तर भारतीय बौद्ध मठांपेक्षाही अधिक नावाजले गेले.

शंकरम – विझगापट्टम जिल्ह्यात शंकरम डोंगरावर एका विहाराचे भग्नावशेष आढळतात. तो विहार गुप्त काळातला असावा. तिथे अनेक स्तूप होते, काही गुहा-मठ होते व एक मोठा बांधलेला विहारही होता. त्या विहारात एक मोठे १५० × ७० फूट लांबीरुंदीचे प्रांगण असून, त्यात तीन चैत्यगृहे होती आणि भोवती भिक्षूंच्या खोल्या होत्या.

गुंटुपल्ले – गोदावरी जिल्ह्यात एलूरपासून वीस मैलांवर उत्तरेला हे ठिकाण असून, तिथला संघाराम सनपूर्व २००च्या सुमारास खोदलेला असावा. तिथे विटांनी बांधलेल्या एका चैत्याचे अवशेष व काही लहानमोठे स्तूप आहेत. त्या विहारातील खोल्या निरनिराळ्या आकारांच्या, लहानमोठ्या आणि वेगवेगळ्या जागी, योजना न करता खोदलेल्या आहेत. त्या निरनिराळ्या कालखंडातील असाव्या. तिथे एका बांधलेल्या महाविहाराचे भग्न अवशेषही आढळले आहेत. युआन च्वांगने वर्णिलेला विंगिलजवळचा विहार तोच असावा. त्यात प्रशस्त दालने, उंच मनोरे व सुंदर सज्जे होते. तिथे बुद्धाची एक सुरेख मूर्तीही होती. त्या विहाराच्या दर्शनी भागात लहान लहान कमानी होत्या. त्याच्या काही खोल्या अजून उभ्या आहेत.

अमरावती – हे एक प्रख्यात बौद्ध केंद्र असून, सातवाहनकाळात बांधलेला एक भव्य स्तूप इथे होता. त्या स्तूपाच्या आसमंतात बौद्ध भिक्षूंचा विहार होता. त्यात प्रारंभी महासांघिक शाखेचे भिक्षू राहत होते. पण कालांतराने तो महायान पंथाचा मठ झाला. तिथे विद्येचे मोठे केंद्रही होते. युआन च्वांगला तिथे अनेक संघारामांचे अवशेष दिसले. तिथे सुमारे वीस संघाराम उभे असून, त्यांत सुमारे १००० भिक्षू राहत होते. इथे नगरीच्या पूर्वेला व पश्चिमेला दोन टेकड्यांवर दोन मठ होते. युआन च्वांगने इथल्या विहारात कित्येक महिने वास्तव्य केले होते.

नागार्जुनकोंड – हे फार मोठे बौद्ध केंद्र असून, तिथे चार विहारांचे अवशेष सापडले आहेत. तिथे स्तूप, विहार, चैत्य हे सर्व विटांचे बांधलेले होते. तिथल्या विहारांत मध्यभागी उघडे प्रांगण असून, त्याच्या भोवती विटांची भिंत होती. प्रांगणाच्या

मध्यभागी सभागृह असून, त्याला दगडी स्तंभांवर आधारलेले लाकडी छत होते. भिंतीच्या बाहेर भिक्षूंच्या खोल्या असून, त्यांना जोडणारा सोपा बाहेरच्या बाजूला होता. नागार्जुनकोंड हे स्थान पूर्वी विजयपुरी या नावाने जगद्विख्यात होते. तिथून जवळच श्रीपर्वतावर मोठा गुहाविहार होता. त्या विहारात प्रसिद्ध बौद्ध पंडित नागार्जुन याने आपले अखेरचे दिवस घालवले, असे म्हणतात. श्रीपर्वताच्या आसमंतातही सुमारे २७विहारांचे अवशेष सापडले आहेत. फाहियान याने श्रीपर्वतावरील एका विहाराचे वर्णन केले आहे. तो पाचमजली विहार पहाडात खोदलेला होता. त्याचा पहिला मजला हत्तीच्या आकाराचा असून, त्यात ५००खोल्या होत्या; दुसरा मजला सिंहाकार असून, त्यात ४०० खोल्या होत्या; तिसरा मजला अश्वाकार असून, त्यात ३०० खोल्या होत्या. चौथा मजला वृषभाकार असून, त्यात २०० खोल्या आणि पाचवा मजला कपोताकार असून, त्यात १०० खोल्या होत्या. विहाराच्या वर एक झरा होता; त्याचे पाणी सर्व खोल्यांतून खेळवलेले असून, तळमजल्यावरील एका द्वारातून बाहेर पडत होते. हे वर्णन श्रीपर्वतावरील महाविहाराला जुळते आहे, पण युआन च्वांगला तो विहार मोडकळीस आलेला आढळला.

एका आलेखात कुलह व सिहल नावाच्या दोन विहारांचा उल्लेख आहे. कुलह विहार एका सामंत घराण्याने निर्माण केलेला होता; तर सिहल विहार हा सिंहलद्वीपातील भिक्षूंसाठी बांधलेला होता.

नागार्जुनकोंड येथील बौद्ध मठ इ.स.च्या ३ऱ्या शतकात अत्यंत समृद्ध स्थितीत होता. इक्ष्वाकू वंशाच्या राजवटीत तिथल्या विहारांचा जीर्णोद्धार झाला. त्या कामासाठी इक्ष्वाकू राजांच्या राण्यांनी व श्रीमान श्रेष्ठींनी बरेच द्रव्य दिले होते. तिथला मुख्य विहार खूपच विशाल व भव्य असावा. त्यात भिक्षूंच्या खोल्या, भिक्षुणींचा वेगळा विहार, स्तूप व बुद्धाची मूर्ती यांसाठी दोन चैत्यगृहे आणि एक रुग्णालय अशा वास्तू होत्या. त्यावरून तिथे एक मोठे विद्यापीठ असावे, असे वाटते.

वनवासी – युआन च्वांग या प्रदेशात गेला होता, तेव्हा त्याला तिथे सुमारे १०० संघाराम आढळले; त्यांत महायान व हीनयान या दोन्ही पंथांचे मिळून सुमारे १०,००० भिक्षू होते. वनवासी नगरीत २ संघाराम व ३ स्तूप असून, तिथे अनेक प्रसिद्ध पंडित राहत होते. नगरीपासून जवळच असलेल्या एका विहारात मैत्रेय बुद्धाची चंदनी मूर्ती युआन च्वांगने पाहिली होती. इ. स. च्या ६व्या शतकानंतर इथल्या बौद्ध मठांचा ऱ्हास सुरू झाला.

डंबाळ व बेलगामी येथे इ. स. च्या ११व्या शतकात बौद्ध विहार होते, असे तिथल्या दानपत्रांवरून समजते.

कांचीपुरी – इथे एक मोठा बौद्ध मठ होता. त्याचे सुमारे शंभर विहार असून, त्यांत थोर बौद्ध पंडित राहत होते. युआन च्वांगने तिथल्या मठातले ग्रंथालय पाहिले होते. कांचीपुरीचा थोर पंडित धर्मपाल हा नालंदा विद्यापीठात अध्यापन करीत होता, असे त्याने लिहून ठेवले आहे. कांचीपुरी हे प्रसिद्ध विद्याकेंद्र असून, श्रीलंकेतले बौद्ध पंडितही तिथे अध्ययनासाठी येऊन राहत होते.

नागपटम – मद्रासच्या दक्षिणेला १७० मैलांवर समुद्रकिनारी हे स्थान आहे. तिथे चोळ वंशाच्या राजवटीत एक बौद्ध विहार होता. प्रसिद्ध बौद्ध पंडित धर्मपाल याने नेत्तिपकरण या ग्रंथावरील भाष्याच्या प्रस्तावनेत नागपटमच्या धर्माशोक विहाराचा उल्लेख केला आहे. तिथेच त्याने ते भाष्य लिहिले. इ. स. च्या ११व्या शतकातील एका ताम्रपटात राजराज चोळ याने चूळामणिविहाराला अनैमंगलम नामक गाव दान दिल्याचा उल्लेख आहे. हा विहार नागपटम येथे श्रीविजयचा शैलेंद्र राजा मारविजयोत्तुंग वर्मा याने बांधला होता. इथल्या विहारात बुद्धाची सुवर्णप्रतिमा होती; पण श्रीरंगम येथील रंगनाथमंदिर उभारण्यासाठी आवश्यक असलेले द्रव्य मिळवण्याकरता ती मूर्ती विकण्यात आली, असे म्हणतात. तथापि इ. स. च्या १२व्या शतकापर्यंत नागपटम हे महान बौद्ध केंद्र होते.

केरळ प्रदेशात मूलवासम नावाच्या ठिकाणी एक मोठा बौद्ध विहार होता. त्याचा उल्लेख वेनाडू वंशातील राजा विक्रमादिथिय वरगुण याच्या इ स. ८६८ च्या दानपत्रात आढळतो. तो विहार फार प्रसिद्ध होता. मूलवासम हे स्थान कुठे आहे, ते निश्चित समजलेले नाही. ते समुद्रकिनारी असावे, असे वाटते.

मणिमेखलै या प्रसिद्ध ग्रंथात वंजी येथील विहाराचा उल्लेख आहे. हे स्थान क्रंगनोरजवळ असावे. पण त्या विहाराचे अवशेष सापडलेले नाहीत. केरळमध्ये तलपल्ली तालुक्यात काही गुहाविहार सापडले आहेत, ते लहान आहेत.

याव्यतिरिक्त द. भारतात भट्टिप्रोलू, जग्गय्यपेठ, गुसिवाड, घंटशाळ, इ. अनेक ठिकाणी बौद्ध मठ होते. भट्टिप्रोलू व जग्गयपेठ येथे अगदी प्राचीन काळातली बौद्ध केंद्रे होती. प. गोदावरी जिल्ह्यात अरुगोलनू येथे एका मोठ्या विहाराचे भग्नावशेष सापडले आहेत. तिथेही मोठे बौद्ध केंद्र स्थापन झाले असावे. दंडपुरी व रामतीर्थम येथेही बौद्ध विहार होते. गंजम जिल्ह्यात वंशधारा नदीच्या काठी शाळिहुंडम येथेही एक मोठे बौद्ध केंद्र गुप्त काळात नांदत होते. तिथला विहार एका डोंगरावर स्थापलेला होता.

बौद्ध मठ-विहार व चैत्य यांच्या निर्मितीसाठी व योगक्षेमा-

साठी राजे-महाराजे, सरदार, श्रेष्ठी व सामान्य जन या सर्वांनी विपुल दानधर्म केल्यामुळेच त्यांचा एवढा विस्तार होऊ शकला. अशी असंख्य दानपत्रे सापडली आहेत. सर्व लोक विहार व चैत्य निर्माण करणे हे आपले पवित्र कर्तव्य मानीत होते; कारण त्यांच्या मनावर बौद्ध भिक्षूंचे सदाचरण, ज्ञान व समर्पण यांचा विलक्षण प्रभाव पडला होता. पण कालांतराने बौद्ध भिक्षूंचे जीवन भ्रष्ट झाले. ज्ञानार्जनाऐवजी ते हीन तांत्रिक साधनेत मग्न झाले. त्यामुळे त्यांच्या मठांचा ऱ्हास झाला. सनातनी ब्राह्मणांच्या आक्रमक धोरणामुळेही अनेक मठ नाश पावले. हूणांच्या अत्याचारामुळे गांधार व काश्मीर या प्रदेशांतील असंख्य विहार उद्‌ध्वस्त झाले. त्यानंतर मुसलमानांनी जो भयानक नाश केला, त्याला जगाच्या इतिहासात तोड नाही. [ वि. ए. इं.; सह्याद्रि; श्री अजय मित्र शास्त्री, वि. सं. मं. वा. १९५८ ]

**विहीर** पाणीपुरवठ्याचे एक साधन. प्राचीन काळापासून लोक या साधनाचा वापर करीत होते. भावप्रकाशकार विहिरीचे लक्षण सांगताना म्हणतो. 'अल्प विस्तार असलेली, भूमीत खोल आणि गोलाकार खणलेली, बांधलेली किंवा न बांधलेली, ती विहीर होय.' सिंधु-संस्कृतीमधील लोकांच्या घरोघर आणि घराबाहेरही चव्हाट्यावर विहिरी होत्या. त्यांतील काही गोलाकार आणि दोन अंडाकार होत्या. त्या चारही बाजूंनी बांधलेल्या होत्या. काही विहिरींना पायऱ्या असून, काही वरून बंद केलेल्या आढळल्या. पुरातत्त्व-अभ्यासकांच्या मते या विहिरींवर रहाट बसविलेले असावे.

हडप्पा येथील उत्खननात केवळ सहा विहिरी मिळाल्या आहेत. श्री. वत्सांच्या मते येथील लोक विहिरीच्या पाण्याचा उपयोग फक्त पिण्यासाठी करीत असावे. अन्य उपयोगाला ते नदीचे पाणी वापरीत असावे.

अनेक सहस्र वर्षांच्या कालावधीनंतरही विटांच्या साहाय्याने बांधलेल्या यांतील काही विहिरी उत्तम अवस्थेत पाहायला मिळतात. ही वास्तुशिल्पाच्या दृष्टीने एक भूषणाची बाब आहे. या विहिरीतील गाळ काढून त्या आजही वापरात ठेवलेल्या आहेत.

ऋग्वेदात अनेक ठिकाणीं विहिरींचे उल्लेख आढळतात. वैदिक आर्य त्या पाण्याचा उपयोग पिण्यासाठी व शेतीसाठी करीत असावे, असे वाटते. रहाटगाडग्याने ते विहिरीतून पाणी काढीत असत (ऋ. १०.२५.४, ९३.१३). त्याशिवाय विहिरीवर दगडी चाक बसवून, त्यावरून कातडी वाद्या सोडूनही ते पाणी उपशीत असत. ते त्या वाद्यांना लाकडी पोहरा लावीत असत (ऋ. १०.१०१.५–७). या काळातील विहिरींना पायऱ्या बांधण्याची पद्धत होती की नाही, हे निश्चित सांगता येत नाही. कारण विहिरीत अडकून पडलेल्या त्रित आप्त्य नावाच्या ऋषीने आत्मसंरक्षणासाठी विश्वेदेवांचा आणि पराक्रमी इंद्राचा धावा केल्याचा उल्लेख आढळतो (ऋ. १.१०५.१७, १०६.६). शुक्ल यजुर्वेदात विहिरीतील जलाला आहुती अर्पण केल्याचा निर्देश आहे (२२.२५).



उत्खननात सापडलेली विहीर – मोहेंजोदडो

पावसाच्या पाण्यावर भिजणारी जमीन देवमातृक आणि त्याहून भिन्न पाण्यावर भिजणारी जमीन अदेवमातृक किंवा नदीमातृक म्हणून ओळखली जाते. रामायणात कोसल राज्यातील शेतीला अदेवमातृक म्हटले आहे (२.१००.४५). अदेवमातृकात नद्या, विहिरी, तलाव, इत्यादींचा समावेश होतो. भरताने चित्रकूटावर रामभेटीला जाताना अनेक कारागिरांच्या बरोबर कूपकारांनाही घेतले होते. त्यांनी त्या मार्गांवर अनेक विहिरी खणल्या; तसेच मार्गांच्या आड येणाऱ्या बऱ्याच विहिरी बुजवून टाकल्या (वा. रा. २.८०). रामायणाप्रमाणे महाभारतातही देवमातृक आणि नदीमातृक शेतीचे उल्लख आहेत (सभा. ५.७८; ५१.११). कौरव-पांडवांची विहिरीत पडलेली विटी द्रोणाचार्यांनी काढून दिल्याची कथा महाभारतात आहे (आदि. १३०).

पाणिनीने अष्टाध्यायीत कालव्याच्या द्वारे पाणी शेतात नेणे आणि बैलांकडून विहिरीचे पाणी मोटेने खेचून काढणे, असे उभय उल्लेख केले आहेत. मोटेसाठी उदंचन शब्दाचा वापर केला आहे (३.३.१२३). शिवाय त्याने विपाशा नदीच्या उभय तीरांवरील अनेक विहिरींचा निर्देश केला आहे. पतंजलीने विहिरी खणण्यात निष्णात असणाऱ्या मजुरांचा उल्लेख केला आहे.

जातककथांमधून विहिरींचे आणि विहिरी खणल्याचेही उल्लेख मिळतात. बोधिसत्वाने अशीच एक विहीर खणून खुणेसाठी तिथे ध्वज लावल्याचा उल्लेख वण्णुपथ जातकात आढळतो. विनयपिटकाच्या चुल्लवग्गात, विहाराच्या नवनिर्माणाचे नियम सांगताना, गौतमाने विहिरींसंबंधी बरीच चर्चा केली आहे. त्यावरून त्या काळातील विहिरी विटा, चुना, लाकूड, इ. साहित्य वापरून

बांधीत असत, असे दिसते. या विहिरींना कठडे होते, रहाट होते व रहाटांवर दोरही होते.

या संदर्भात कौटिल्याने पुरविलेली माहिती महत्त्वाची आहे. तो म्हणतो की मातीला लोणा लागणार नाही अशा जागी, चौकोनी विहीर खोदावी. तिचा तळ आणि सर्व बाजू बांधून काढाव्या. तिला भुईसपाट लाकडाची बळकट दारे असावी. तिच्यात तीन मजले व अनेक कोठड्या असाव्या (अ. २६). विहिरीनजीकच्या जमिनीत भाजीपाला लावावा (अ. ४५). या पाण्यावर शेती करणाऱ्यांनी राजाला ⅕ पाणीपट्टी द्यावी (अ.४५). तळी, विहिरी यांच्या आसपास कोणी मलोत्सर्ग केला तर त्याला एक पण दंड करावा (अ. ५७). ज्या मार्गाने शत्रू येण्याचा संभव आहे, त्या मार्गावर आड व गुप्त विहिरी असाव्या (अ. १२९).

संभाव्य दुष्काळाला तोंड देणे, लांबच्या प्रवाशांची पाण्याची सोय करणे, इ. कारणांसाठी प्राचीन काळापासून राजेलोक कर्तव्यबुद्धीने तलाव व विहिरी बांधीत असत. अशोक, शेरशहा, पेशवे, अहल्याबाई इत्यादिकांनी अशाच विहिरी बांधल्या आहेत. राजांप्रमाणेच धनिक वर्गही या कामात पुढाकार घेत होता. ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकरांनी अनेक विहिरी बांधल्या आहेत.

जलाशय, विहिरी व तलाव बांधणे हे मध्ययुगात पुण्यप्रद कृत्य समजले जाई. त्यांची स्थावर तीर्थांत गणना होत असे. अशा प्रकारच्या बांधकामांना धार्मिक दृष्ट्या पुत्रप्राप्तीइतके महत्त्व प्राप्त झाले होते. त्यांची कोणी मोडतोड केली तर राजाने गुन्हेगाराला दंड करावा, असे प्रायश्चित्तव्यवहारप्रकाशात म्हटले आहे. विहिरीवरील दोर व घागर एखाद्याने चोरली, तर चोराकडून ते सामान भरून घ्यावे आणि राजाने त्याला एक मासा सोने दंड करावा, असे मनुवचन आहे (मनु. ८.१९). धर्मभावनेने एखादा माणूस कुठे विहीर बांधू लागला, तर जमिनीच्या मालकाने त्याला हरकत घेऊ नये, असा संकेत असे. मात्र त्याने जमिनीच्या मालकाची परवानगी घेणे आवश्यक असे. कोणी दुसऱ्याच्या जमिनीत विहीर खणली, तर विहिरीला लागणाऱ्या जागेपेक्षा तिच्या पाण्याने भिजणारी जमीन कितीतरी अधिक असते, म्हणून नुकसानीचा प्रश्न निर्माण होऊ नये, अशी मिताक्षरेची विचारसरणी आहे.

जलाशयांमध्ये मनुष्य किंवा पशू पडून तो मरण पावला, तर ते पाणी अशुद्ध समजून त्याच्या शुद्धीसाठी मध्ययुगात शांतिविधी निर्माण झाले. त्याचप्रमाणे विहिरीतले पाणी उकळू लागले किंवा त्या पाण्याला दुर्गंधी येऊ लागली तर अशा विपरीत गोष्टींच्या शांतीसाठी जलवैकृत शांतीसारखे प्रयोग तयार झाले.

जलाशय हे नगररचनेच्या नवांगांतील एक महत्त्वाचे अंग असे. या अंगाचा कै. कृ. वि. वझे यांनी बराच विचार केला आहे. त्याचा सारांश असा– ज्या विहिरीला चारी अंगांनी पायऱ्या असतात तिला पुष्करणी आणि एकाच बाजूने पायऱ्या असतात तिला वापी असे म्हणतात. सामान्यतः गावाच्या ईशान्य दिशेला विहीर असावी. पायऱ्या असलेली विहीर पूर्वपश्चिम लांब असावी; दक्षिणोत्तर लांब असू नये. कारण वारा, पाऊस यांमुळे उत्पन्न होणाऱ्या लाटांनी ती बाजू झिजून विहीर पडण्याची शक्यता असते. आणि जर विहीर दक्षिणोत्तर बांधणे भाग



वर्तमान काळातील विहीर

असेल, तर तिची ती बाजू, दगडांनी अगर लाकडांनी भक्कम बांधून काढावी. बांधकामाच्या मागे मातीची जी भर घातली जाईल ती धुमसून मजबूत करावी. विहिरीच्या जवळपास ककुभ, वड, पिंपळ, आंबा, कदंब, कडुनिंब, ताड, मोह, बकुळ अशी झाडे लावावी. कारण ही झाडे जमिनीतील पाणी वर ओढतात.

विहीर खणत असताना जर झरा लागला तर झऱ्याच्या तोंडात वडाची पारंबी किंवा वेत घालावा म्हणजे पाण्याचा मार्ग बंद न होता पाणी सतत येत राहते. पाणी लागले म्हणजे वरुणाला बली द्यावा. त्याची पूजा करून मग विहीर बांधावी. तिला पायऱ्या करताना दर चार-पाच पायऱ्यांमागे एक पायरी मोठी करावी. त्यामुळे चढण्या उतरण्याचा त्रास होत नाही.

विहीर खोदण्यापूर्वी जमिनीच्या पोटात पाणी आहे, की नाही हे समजावे लागते. वराहमिहिराने बृहत्संहितेच्या उदकार्गल नामक अध्यायात (अ. ५८) यासंबंधी काही आडाखे सांगितले आहेत. त्याचप्रमाणे पराशरानेही काही ठोकताळे दिले आहेत. जिथे पांढरी शाडू, वाळू हे पदार्थ लागतात, तसेच उंबर, शमी व वारुळे ही जिथे असतात तिथे पाणी असते. झाडांना जिथे मोठी व रसदार पाने असून, त्यांना छिद्रे नसतात तिथे आणि भुईकमल, उशीर, नल, खर्जुर, अर्जुन, वेत, इ. झाडे असतात तिथे पाणी असते. जिथे गाळाची माती व काळी किंवा तांबूस

माती असते, अशा ठिकाणी मुबलक पाणी सापडते. ज्या ठिकाणच्या मातीचा रंग सूर्य, अग्नी, राख, उंट, गाढव, बोकड यांच्या रंगासारखा असेल तिथे पाणी खोल असते. पायाळू माणूस जमिनीतले पाणी ओळखतो असे म्हणतात. रेताळ तांबडया मातीतल्या पाण्याची चव कडवट असते. काळ्या मातीतले खारे आणि निळसर व पांढऱ्या मातीतले पाणी गोड असते.

लोकसंस्कृतीत विहिरीसंबंधी बरेच संकेत आढळतात. ओसाड व पडक्या विहिरीत भुतांचा व आसरांचा निवास असतो, अशी समजूत आहे. प्रत्येक संक्रांतीपासून सातवा, नववा, दहावा, चौदावा आणि चोवीसावा या दिवशी व मंगळवारी विहीर खोदायला प्रारंभ करीत नाहीत. प्रथम गणपतिपूजन आणि भूमिपूजन करून नियत जागी नारळ वाहतात. मग खोदायला प्रारंभ करतात. हाती घेतलेले काम निर्विघ्नपणे तडीला जावे म्हणून पाणी लागेपर्यंत रोज गणपती व जलदेवता यांची पूजा करण्याची कुठे कुठे वहिवाट आहे. विहीर खणून पाणी लागल्यावर जलदेवता प्रसन्न व्हावी म्हणून तिला सोन्याची गाय वाहतात. पानडयाला भोजन देऊन रुमाल बांधतात. कर्नाटकात पाणी लागल्यावर ते पाणी चांदीच्या भांडयात घेऊन त्याची पूजा करतात आणि मग ते भांडे ब्राह्मणाला दान देतात.

काही ठिकाणी विहीर खोदण्याचा शुभारंभ रविवारी करतात. विहीर खणायच्या आदले दिवशी रात्री पाण्याने भरलेली लहान लहान भांडी संभाव्य जागी ठेवतात. ज्या भांडयातले पाणी कमी सुकते, ती जागा विहिरीसाठी चांगली असे समजतात. विहीर खणायला प्रारंभ केल्यावर तिचा मधला भाग तसाच ठेवतात. त्याला ख्वाजाजी (जलदेव) म्हणतात. आणि सर्वांत शेवटी त्याची पूजा करून तो पाडतात. ख्वाजाजी मधेच तुटला, तर अपशकुन समजून विहीर दुसऱ्या जागी एक आठवडयाने खणतात. विहिरीचे काम पूर्ण झाले, की काही ठिकाणी विष्णु-तुळशींच्या लग्नाचा समारंभ करतात.

काही विहिरींतले पाणी प्याल्याने वांझपणाचा दोष दूर होतो, अशी समजूत आहे. दिवाळीच्या दिवशी अशा सात विहिरींचे पाणी एकत्र करून वंध्येला न्हायला घातले, की तिच्या अंगचा वांझपणा जातो असे म्हणतात. ओडिसातल्या एका विहिरीत ब्राह्मण बऱ्याच सुपाऱ्या टाकतो. त्या मिळविण्यासाठी निपुत्रिक स्त्रिया बरीच धडपड करतात. जिला सुपारी मिळते तिला मूल होते असे सांगतात. काठेवाड भागात मंडणगड नावाचे गाव आहे. तिथे एक विहीर असून, तिचे पाणी प्याल्याने सर्पविष उतरते, असे म्हणतात. जुनागडजवळच्या मृगी कुंडातल्या पाण्याने कुष्ठरोग बरा होतो व काशीतल्या ज्ञानवापी कुंडातले पाणी प्राशन केल्याने ज्ञानप्राप्ती होते, अशी श्रद्धा आहे. सोलापूर-जवळ कुत्र्याची वाडी म्हणून एक गाव आहे. तिथल्या विहिरीच्या पाण्याने कुत्र्याचे विष बाधत नाही असे म्हणतात.

कित्येक विहिरींचा देवदेवतांशी संबंध जोडलेला असतो. मिर्झापूर जिल्ह्यातील विंदाचल टेकडीवरील आणि मोंघीर-जवळच्या एका विहिरीशी राम–सीतेच्या वनवासाचा संबंध जोडतात. अशा बऱ्याच विहिरी सीतान्हाणी या नावाने ओळखल्या जातात. जिथे गरम पाण्याचे झरे असतात, तिथे सीतेने अग्निदिव्य केले अशा स्थानिक दंतकथा सांगितल्या जातात किंवा त्या विहिरींमध्ये अग्नीचा निवास असतो, असे म्हणतात. काशीच्या मणिकर्णिका कुंडात शिवाचे कर्णभूषण पडल्याचे सांगितले आहे. [ मो. सिं. स.; हडप्पा; ॠ. म. भा.; ॠ. सां. इ.; वे. इं.; भा. प्रा. सं.; वे. का. स.; रा. का. स.; म. का. स.; श. क.; पा. का. भा.; प. का. भा.; जा. का. भा. सं.; विनयपिटक – संपा. राहुल सांकृत्यायन; कौटिलीय अर्थशास्त्र– संपा. ज. स. करंदीकर, श्री. ह्विरगावकर, १९२७; या. का. म.; हिं. शि. शा. भाग ४ था; प्रा. हिं. शि. शा.; लौ. दं.; फो. लो. नॉ. इं.; पॉ. रि. फो. नॉ. इं.; पे. का. म. ]

## विज्ञान

विशेष ज्ञान, शास्त्रीय ज्ञान, तत्त्वज्ञान, अपरोक्ष ज्ञान, ब्रह्मज्ञान असे या शब्दाचे विविध अर्थ आहेत. पण सामान्यपणे जड पदार्थ आणि नैसर्गिक घटना यांचे निरीक्षण करून व प्रयोग करून, आपल्या इंद्रियांच्या साहाय्याने जे ज्ञान प्राप्त होते, ते क्रमबद्ध व नियमबद्ध केले असता जे शास्त्र निर्माण होते, त्याला विज्ञान म्हणतात. यासंबंधी प्रा. के. वि. बेलसरे यांनी जे विवेचन केले आहे, ते असे–

भौतिक वस्तूंचे गुणधर्म व परस्परसंबंध जाणून घेऊन, त्यांतील सामान्य नियम शोधून काढणे व त्या नियमांची तर्कशुद्ध प्रणाली बनवणे हे विज्ञानाचे कार्य होय. सूक्ष्म निरीक्षण, वर्गीकरण, नियम व त्यांच्या आधारे अनुमान करणे या विज्ञानपद्धतीच्या चार पायऱ्या आहेत. वस्तूंच्या वागण्याचे नियम समजले, की त्यांच्या वागण्यावर सत्ता चालविण्याचा प्रयत्न करता येतो. अशा रीतीने वीज, उष्णता, प्रकाश, आवाज, पाणी, हवा, इ. शक्तींना स्वाधीन करून घेऊन स्थल, काल, गती, रोग इत्यादींवर मनुष्य विजय मिळवू शकतो.

जगातील वस्तूंच्या वागण्याचे जे विविध नियम आहेत, त्यांत कार्यकारणभाव हा नियम सर्वांत व्यापकपणे आढळतो. म्हणून विज्ञानाचा मुख्य भर वस्तूंमधील कार्यकारणसंबंध निश्चित करण्यावर असतो. विज्ञानाच्या दृष्टीने जगातील सर्व घटना अत्यंत नियमबद्ध आहेत. निसर्गात गूढ, चमत्कारमय असे काही नाही. ज्या घटना गूढ वाटतात, त्यांचा कार्यकारणभाव कळल्या-

नंतर त्या गूढ वाटत नाहीत. कार्यकारणभावाच्या ज्ञानाचा उपयोग करून मनुष्याने आगगाडी, विमाने, विजेचे दिवे, रेडिओ, दूरध्वनी, इ. विलक्षण साधने निर्माण केल्यामुळे आपले नित्याचे जीवन पार बदलून गेले आहे.

अत्यंत प्राचीन काळी काष्ठावर काष्ठ घासून मानवाने अग्नी उत्पन्न केला, तेव्हाच विज्ञानाचा पाया घातला गेला. कारण अग्नीच्या साहाय्यानेच बाष्पशक्ती निर्माण करता येते, इंधन जाळून यंत्रे चालविता येतात आणि विविध प्रक्रिया करता येतात. अग्नी ही आद्य शक्तिदेवता होय.

आधुनिक युगात पाश्चिमात्य लोकांनी विज्ञानाच्या साहाय्याने अमाप अन्न, वस्त्र व अन्य पदार्थ उत्पन्न करून समृद्धी निर्माण केली आहे; तसेच सुखोपभोगाची विविध साधने बनवून जीवन सुखी करण्याचा प्रयत्न केला आहे; निसर्गावर जय मिळवला आहे. मनुष्य सागरात, अंतराळात आणि आता अवकाशातही संचार करू लागला आहे. तथापि विज्ञानामुळे मनुष्याला भयानक संहारशक्तीही प्राप्त झाली आहे, हे विसरता येणार नाही. विज्ञानाच्या साहाय्याने तो विशाल नगरे व गगनचुंबी इमारती उभारू शकतो, त्याचप्रमाणे क्षणार्धात त्यांची राखरांगोळीही करू शकतो. पण हा दोष विज्ञानाचा नसून, मनुष्याचा आहे. विज्ञानाच्या मदतीने नवनिर्मिती करणे किंवा विध्वंस करणे हे मनुष्याच्या मनावर अवलंबून आहे.

भारतीय संस्कृती केवळ अध्यात्माचा विचार करीत आली आहे आणि भारतीय लोकांनी आधिभौतिक शास्त्रांची आजवर उपेक्षाच केली, अशी आजवर पाश्चात्य विद्वानांची समजूत होती. मध्ययुगात भारतीय लोक केवळ मोक्षप्राप्तीचाच विचार करीत होते, ही गोष्ट सत्य आहे. पण इ. स. च्या १० व्या शतकापर्यंत भारतीय शास्त्रज्ञांनी अनेक भौतिकशास्त्राचे ग्रंथ रचले होते. त्यानंतर मात्र ती परंपरा खंडित झाली आणि योगसाधना, भक्तिमार्ग, मोक्ष, परलोक, इ. विषयांवरच विद्वानांची ग्रंथरचना होत राहिली.

पण गेल्या शतकापासून पाश्चात्य संशोधकांनी भारतातील विशाल साहित्यसागराचे मंथन सुरू केल्यामुळे आपल्या प्राचीन विद्यांचे व कलांचे ज्ञान आपल्याला नव्याने उपलब्ध होऊ लागले आहे. प्राचीन काळी आयुर्वेद, रसायन, ज्योतिष, गणित, शिल्प, इ. शास्त्रांत आमची जी प्रगती झाली होती, ती अत्यंत अभिमानास्पद होती. आपल्या पूर्वजांनी भौतिक शास्त्रांचा बराच विकास केलेला होता.

भौतिक शास्त्रांच्या विकासाची ही परंपरा वेदकालाइतकी प्राचीन आहे. ज्ञानाच्या सर्व शाखांचे मूलबीज वेदांत सापडते. वेदांमध्ये मुख्यतः यज्ञयागांचे विधान सांगितलेले आहे. त्याच्या अनुषंगाने ज्योतिष, भूमिती, व्याकरण, छंद, इ. शास्त्रांची माहिती त्या ग्रंथांत दिलेली आढळते. ही शास्त्रे प्राचीन काळी वेदांगे म्हणून गौरविली जात होती.

वेदांमध्ये आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्व वेद (संगीतशास्त्र) यांचाही उगम झालेला दिसतो. त्यांना उपवेद असे गौरवाने म्हणत. आयुर्वेदात शरीर व आरोग्य यांची चर्चा केलेली आहे. धनुर्वेदात शस्त्रविद्या व युद्धविद्या यांचा अंतर्भाव आहे. गांधर्ववेदात गायन, वादन व नृत्य या कलांची माहिती आहे.

आयुर्वेदाचा विकास अत्यंत प्राचीन काळीच झाला होता. धन्वंतरी, सुश्रुत, चरक, इ. अनेक आचार्यांनी या विषयावर ग्रंथ लिहिले आहेत. त्या ग्रंथांत असंख्य बहुगुणी औषधी रसायनांची माहिती आहे. हे संस्कृत ग्रंथांतले वैद्यकाचे ज्ञान प्रथम बगदादला, तिथून अरबस्तानात व ग्रीस देशात आणि तिथून पश्चिम युरोपात गेले, असे म्हणतात. शस्त्रक्रियेतही आपले कौशल्य तत्कालीन इतर देशांतल्या लोकांपेक्षा कितीतरी पटींनी अधिक होते. रसायनशास्त्र, ज्योतिष, गणित, शिल्प, इ. शास्त्रांचाही पुष्कळ विकास झाला होता. शिल्पशास्त्रात वास्तुविद्या, मूर्तिकला, चित्रकला आणि इतर विविध कलांचा अंतर्भाव होतो. या शास्त्रांवरही अनेक आचार्यांनी ग्रंथरचना केली होती. त्यातील काही प्राचीन ग्रंथ उपलब्ध आहेत. या शास्त्रातील हिंदू लोकांची प्रगती पाहून पाश्चात्य लोक चकित होऊन गेले. मोठाली गोपुरे, देवालये, कैलास लेण्यासारखी भव्य लेणी, विहार, स्तूप, स्तंभ, इ. सुंदर शिल्पांची रचना केवळ अंदाजाने करणे असंभवनीय आहे. त्यासाठी शिल्पशास्त्रज्ञांनी काही नियम निश्चित केले असले पाहिजेत. काही एक योजना मनाशी करून, तिची रूपरेखा कागदावर उतरविणे आणि त्या योजनेप्रमाणे हजारो कारागिरांनी शिल्परचना करणे हे, त्या विषयाचे तांत्रिक ज्ञान पराकोटीला गेल्याचे लक्षण आहे. धातूचे प्रचंड पुतळे व स्तंभ बनवण्याचे कौशल्यही प्राचीन काळातल्या हिंदू शिल्पकारांजवळ होते. भारतातली अद्भुत शिल्पे पाहून परकीय शिल्पशास्त्रज्ञांनी, त्या कलेचा परमोत्कर्ष येथे झाला होता, असे मत व्यक्त केले आहे. हिंदू कारागीर ही विद्या परंपरेने शिकत आले असावे. शिल्पशास्त्रावरील प्राचीन ग्रंथांतील विस्तृत माहिती पाहता, या विद्येच्या सशास्त्रतेविषयी शंका उरत नाही.

विज्ञानाचे तात्त्विक व तांत्रिक असे दोन भाग आहेत. ज्ञानाचे संकलन करून सृष्टीच्या व्यापारासंबंधी शास्त्रज्ञांनी जे अनेक सिद्धांत प्रस्थापित केले आहेत, त्यांचा समावेश तात्त्विक विज्ञानात केला जातो. त्या सिद्धांतांच्या आधारे असंख्य प्रयोग करून त्यांनी विविध पदार्थ, साधने व यंत्रे निर्माण करण्याचे जे तंत्र विकसित केले आहे, त्याला तांत्रिक विज्ञान म्हणतात. भारतात

प्राचीन काळी तांत्रिक विज्ञान बरेच प्रगत झाले होते हे खरे. पण भारतीय साहित्यात तात्त्विक विज्ञानाचे ग्रंथ आढळत नाहीत. धार्मिक व आध्यात्मिक तत्त्वज्ञानांचे विपुल साहित्य भारतीय पंडितांनी निर्माण केले. पण भौतिक सृष्टी व नैसर्गिक घडामोडी यांच्याविषयी, प्रायोगिक ज्ञानावर आधारलेले सिद्धांत आपल्या साहित्यात नाहीत.

पं. हजारीप्रसाद द्विवेदी यांनी विज्ञान व अध्यात्म यांच्याविषयी जे विचार प्रकट केले आहेत, ते असे – भौतिक विज्ञानामुळे मानवाला बाह्य समृद्धी प्राप्त झाली असली, तरी आंतरिक समाधान मिळत नाही. प्राचीन भारतीय पंडितांनी समाजाला आंतरिक व बाह्य सुख सारखेच लाभावे, या दृष्टीने प्रयत्न केले. कारण आंतरिक सुखावाचून बाह्य सुख निरर्थक ठरते. इ. स. च्या १० व्या शतकानंतर आमच्या देशाची उन्नती कुंठित झाली. कारण आम्ही केवळ आंतरिक साधनेलाच महत्त्व देऊ लागलो. भक्ती व धर्म या क्षेत्रांत विपुल विचारविमर्श चालू राहिला; पण विज्ञानाकडे आम्ही दुर्लक्ष केले; इतकेच नव्हे तर प्राचीन ऋषीमुनींनी संग्रहित केलेले ज्ञानही आम्ही विसरून गेलो. संस्कृत साहित्यातील वैज्ञानिक ग्रंथ पाहिल्यानंतर आपल्या ध्यानात येते, की आपल्या मध्ययुगीन पूर्वजांनी त्या ग्रंथांची उपेक्षा केल्यामुळे आपली अपरिमित हानी झाली आहे. पाहा – अंकगणित, आयुर्वेद, जीवशास्त्र, ज्योतिपशास्त्र, बीजगणित, भूमिती, रसायनशास्त्र, वास्तुविद्या, शिल्पकला. [ अध्यात्मदर्शन; विज्ञानबोध – श्री. म. माटे, १९३४; पं. हजारीप्रसाद द्विवेदी – आकाशवाणी प्रसारिका, ऑक्टो. डिसेंबर, १९५४ ]

**विज्ञानभिक्षू** (इ. स. चे १४ वे शतक) सांख्य व योग या शास्त्रांचा एक आचार्य. हा काशीत राहत होता. याने सांख्यप्रवचनभाष्य, सांख्यसार, योगवार्तिक, योगसारसंग्रह, ब्रह्मसूत्रभाष्य विज्ञानामृत, ब्रह्मादर्श, पाषण्डमतखंडन, श्वेताश्वतरोपनिषद्‌भाष्य, इ. ग्रंथ लिहिले आहेत. याने आपल्या ग्रंथांत शंकराचार्यांच्या अनुयायांना पाखंड म्हणून संबोधले असून, जागोजागी शंकराचार्यांच्या अद्वैत वेदान्तमताचे खंडन केले आहे.

प्रसादमाधव योगी, भावागणेश दीक्षित व दिव्यसिंह मिश्र हे याचे प्रमुख शिष्य होते. [ का. सा. सा.; सां. द. इ.; कं. सं. लि. ]

**विज्ञानेश्वर** (इ. स. चे ११ वे १२ वे शतक) एक धर्मशास्त्रकार. याज्ञवल्क्यस्मृतीवर याने मिताक्षरा नामक टीका लिहिली आहे. या टीकेत प्रत्येक अध्यायाच्या शेवटी याने आपली माहिती दिली आहे. हा भारद्वाजगोत्री असून, पद्मनाभ भट्टोपाध्यायाचा पुत्र होता. त्याच्या गुरूचे नाव उत्तमपाद असे होते. तो संन्यासी होता. सांप्रतच्या आंध्र राज्यातील कल्याणी नामक गावी याच्या काळी सहावा विक्रमादित्य (किंवा विक्रमार्क) पश्चिम चालुक्य राजा राज्य करीत होता. त्याच्या पदरी हा होता. त्या राजाची याने फार स्तुती केली आहे. विज्ञानेश्वराने मिताक्षरेच्या शेवटच्या श्लोकांत स्वतःला विज्ञानयोगी असे म्हटले आहे. त्यामुळे याच्या नंतरच्या लेखकांनी याचा उल्लेख त्याच नावाने केला आहे.

धर्मशास्त्राच्या इतिहासात विज्ञानेश्वराचे स्थान महत्त्वाचे आहे. व्याकरणाच्या इतिहासात जे स्थान पतंजलीच्या महाभाष्याला आहे, तेच स्थान धर्मशास्त्रविषयक वाङ्मयात विज्ञानेश्वराच्या मिताक्षरा टीकेला आहे. या ग्रंथापूर्वीच्या सुमारे दोन हजार वर्षांतील धर्मशास्त्रविषयक विचारांचे सार या ग्रंथात दिलेले आहे. त्यामुळे दत्तक, वारसाहक्क, इ. हिंदू कायद्याच्या विषयांत कोर्टामध्ये हा ग्रंथ प्रमाण मानला जातो.

मिताक्षरा ही वास्तविक याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीका आहे. पण विज्ञानेश्वराने आपली प्रकांड विद्वत्ता आणि समन्वय बुद्धी यांच्या साहाय्याने त्या ग्रंथात इतकी सामग्री एकत्र केली आहे, की तिला स्वतंत्र ग्रंथाचे स्वरूप प्राप्त झाले आहे. अनेक हस्तलिखित प्रतींत या ग्रंथाला ऋजुमिताक्षरा, प्रमिताक्षरा किंवा मिताक्षरा असे नाव दिलेले आहे. ग्रंथाची शैली संक्षिप्त असल्यामुळे हे नाव अन्वर्थक ठरले आहे. असे असले, तरी विज्ञानेश्वराने आपले विचार विस्ताराने मांडले आहेत. तसेच, या ग्रंथात अनेक स्मृतींतील पुष्कळ उतारे एकत्र दिले असून, त्यांतील परस्पर विरोधी मतांचा समन्वय पूर्वमीमांसा शास्त्रातील न्यायांच्या आधारे केला आहे. स्मृतिग्रंथांतील विषयांचा त्याने योग्य तो अनुक्रम लावला आहे.

मिताक्षरा या ग्रंथात आंगिरस, बृहदांगिरस, अत्री, आपस्तंब, आश्वलायन, उपमन्यू, इ. सत्त्यायंशी स्मृतिकारांची आणि असहाय, मेधातिथी, श्रीकर, भारुची, विश्वरूप व भोजदेव अशा सहा भाष्यकारांची व निबंधकारांची नावे दिली आहेत. तसेच त्याने वैदिक साहित्य, उपनिषदे, निरुक्त, पुराणे, इ. ग्रंथांतील उतारे दिले आहेत.

मिताक्षरा या ग्रंथाची रचना इ. स. १०७० ते ११०० या काळात झाली. हा ग्रंथ इतका महत्त्वाचा आहे, की त्याच्यावरही विश्वेश्वर, नंदपंडित व बाळंभट्ट यांनी टीका लिहिल्या आहेत.

मिताक्षरा ही संपत्तीवर वारसाहक्क ठरवण्याची एक पद्धती आहे. ही पद्धती बंगाल व आसाम हे प्रदेश वगळून बाकी सर्व भारतात प्रमाण मानली जाते.

काही प्रदेशांत मिताक्षरेबरोबरच अन्यही काही ग्रंथ प्रमाण मानले जातात. त्यावरून मिताक्षरा संप्रदाय द्रविड, महाराष्ट्र,

मिथिला, काशी व पंजाब या पाच शाखांत विभागलेला आहे.

मिताक्षरा पद्धतीनुसार जन्म घेताक्षणीच पुत्राचा पित्याच्या किंवा कुळाच्या संपत्तीवर हक्क प्रस्थापित होतो. म्हणून या मताला, जन्मस्वत्ववाद असे नाव दिलेले आहे. विज्ञानेश्वराने दाय म्हणजे पैतृक धन, याची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे– 'तत्र दायशब्देन यद् धनं स्वामिसम्बन्धादेव निमित्तादन्यस्य स्वं भवति तदुच्यते'= दाय म्हणजे ती संपत्ती होय, जिच्यावर तिच्या स्वामीशी संबद्ध असल्यामुळे दुसऱ्या व्यक्तीची मालकी प्रस्थापित होते. पित्याच्या संपत्तीवर पुत्राला अधिकार मिळतो, तो पित्याशी संबंधित असल्यामुळे मिळतो आणि हा संबंध जन्मापासूनच उत्पन्न होतो. म्हणून पैतृक संपत्तीवर जन्मापासून मालकी समजली पाहिजे.

मिताक्षरा पद्धतीप्रमाणे संयुक्त किंवा एकत्र कुटुंबाच्या संपत्तीच्या विभागणीची काही वैशिष्टये आहेत, ती अशी–अविभक्त कुटुंबात, कुटुंबाच्या पैतृक संपत्तीवर सर्व कुटुंबियांची संयुक्त मालकी असते. पैतृक संपत्तीवर स्वामित्व जन्मापासून उत्पन्न होत असल्यामुळे, नवे उत्तराधिकारी जन्मले की स्वामित्व असणाऱ्यांची संख्या वाढते आणि जुने दायाद मरण पावले, की त्यांची संख्या कमी होते. त्यामुळे कुटुंबियांचा हिस्सा कधी निश्चित नसतो. संख्येनुसार तो बदलत असतो. दुसरे वैशिष्टय असे, की एक हिस्सेदार मरण पावल्यावर, त्याला जर पुत्र, पौत्र किंवा प्रपौत्र नसेल, तर त्याच्या वाटणीची संपत्ती इतर कुटुंबियांना मिळते. नारदाने (१३.२५) स्पष्ट सांगितले आहे, की काही भावांपैकी एक भाऊ अपुत्र मरण पावला किंवा संन्यासी झाला, तर स्त्रीधनाव्यतिरिक्त त्याचे सर्व द्रव्य त्याच्या भावांनी वाटून घ्यावे. मिताक्षरा पद्धतीनेही ही व्यवस्था मान्य केली आहे. हिचे तिसरे वैशिष्टय असे, की यात स्त्रियांना पुरुषाच्या वारसदारांबरोबर पैतृक संपत्तीत वाटा मिळत नाही. या पद्धतीचे चौथे वैशिष्टय असे, की पुत्रांना पित्याच्या ह्यातीत संपत्तीतील आपला वाटा मागता येतो आणि पाचवे वैशिष्टय असे, की संपत्तीच्या विनियोगाच्या बाबतीत पित्याला मर्यादित अधिकार असतात. धार्मिक कार्यांच्या खर्चासाठी काढलेले ऋण फेडण्यासाठी त्याला संयुक्त मालकीच्या वस्तू विकता येतात. पण एखाद्या हिस्सेदाराला आपल्या वाटणीच्या द्रव्याचा इतर हिस्सेदारांना विचारल्याशिवाय आपल्या मनाप्रमाणे विनियोग करता येत नाही.

एखादा मनुष्य जोपर्यंत जिवंत आहे, तोपर्यंत त्याच्या पुढच्या तीन पिढ्यांतील वारस म्हणजे त्याचे पुत्र, पौत्र व प्रपौत्र त्याच्या संपत्तीवर हक्क सांगू शकतात; प्रपौत्राच्या पुत्राला मात्र असा हक्क नसतो. जे वारस जिवंत असतील, त्या सर्वांचा संपत्तीवर सामायिक हक्क असतो. सर्वजण तिचा उपभोग घेऊ शकतात. विभक्त होण्यापूर्वी कोणी किती धन खर्च केले, त्याचा हिशेब विभागणीच्या वेळी पाहता येत नाही. प्रत्येक सामायिक वारसाला विभागणीची मागणी करण्याचा अधिकार असतो. त्यामुळे पित्याच्या इच्छेविरुद्धही तो जिवंत असताना वाटण्या होऊ शकतात.

कुटुंबाची स्थावर, जंगम व इतर सर्व प्रकारची संपत्ती, पिढीजात व घटकांनी संपादलेली, विभागणीच्या वेळी लक्षात घ्यावी लागते. कुटुंबातील एखाद्या व्यक्तीने अगदी स्वतंत्रपणे व स्वतःच्या कष्टाने जे मिळवले असेल, ते मात्र अविभाज्य मानले जाते. त्याचप्रमाणे रोजचे वापरायचे कपडे, अलंकार, वाहने, शिजवलेले अन्न, पाणी (विहीर), दासी, तसेच धार्मिक कार्ये, यज्ञयाग इत्यादीसाठी ठेवलेले द्रव्य, नेहमीच्या वहिवाटीचा मार्ग, या बाबी अविभाज्य मानतात. [हि. ध.; हिं. प. मी.; पू. म. भा.; म. च. को.]

## वीज

आकाशात मेघ दाटून येतात व कित्येकदा मेघगर्जनेसह विजा चमकतात. या विजेविषयी अनेक लौकिक समजुती आहेत, त्यांपैकी काही अशा–

दक्षकन्या लंबा हिचे अपत्य म्हणजे वीज किंवा कंसाच्या हातून निसटून आकाशात गेलेली यशोदेची कन्या म्हणजे वीज होय. ती मेघराजाची बहीण आहे. इंद्राच्या देदीप्यमान शस्त्राची ती चमक आहे. इंद्राच्या विवाहसमयी देवांनी लावलेली दीपमाला व केलेले दारुकाम यांचे ते तेज आहे.

रोहिणी नक्षत्रात आकाश मेघाच्छादित न होता जर विजा चमकू लागल्या, तर प्रखर उन्हाळा होतो. आषाढ शु. द्वितीया व पंचमी या दिवशी वीज चमकली, तर उत्तम पाऊस पडतो. पुष्कळ वेळपर्यंत एकसारख्या विजा चमकत राहिल्यास लोकांच्या जीविताला धोका पोचण्याचा संभव असतो. अकाली वीज चमकली तर देशावर आपत्ती येते. आषाढ शु. पंचमीला किंवा श्रावण शु. द्वितीयेला वीज शृंखलाबद्ध होते आणि मग तिची भीती उरत नाही. [लौ. दं.]

## वीजावर्गी

राजस्थानातील एक जात. हे लोक औषधी वनस्पती व सुगंधी द्रव्ये विकतात. यांच्यामध्ये अनेक भेद आहेत. पखां, खोटेवां, नायकवां; सीदवां, इ. त्यांची नावे आहेत. सर्व पोटभेदांत विवाहसंबंध होतो. हे लोक अत्यंत चलाख व धूर्त समजले जातात. हे मुख्यत्वे शैव आहेत. [रा. जा.]

## वीणा

प्राचीन काळापासून अत्यंत लोकप्रिय असलेले सर्वश्रेष्ठ तंतुवाद्य. ऋग्वेदात काही जागी वाण नामक वाद्याचा उल्लेख आहे. सायणाचार्यांनी वाण म्हणजे मरुद्वीणा किंवा मरु-

तांची वीणा असे स्पष्टीकरण दिले आहे. मरुत देव वीणा वाजवीत असत, असे वर्णन ऋग्वेदात आहे. ही वीणा शंभर तारांची असून, त्या तारा मुंज गवतापासून बनवलेल्या असत. यज्ञाच्या वेळी सामगायनाला वीणेची साथ असे. वीणावादन करणाऱ्याला वीणावाद म्हटले आहे. कांडवीणा या वाद्याचा उल्लेख ऋग्वेदात (२.४३.३) व काठक संहितेत (३४.५) आहे. उत्तरकालीन संहितांमध्ये आणि ब्राह्मण ग्रंथांत शततंत्री या नावाने वीणेचा निर्देश केलेला आढळतो (तैत्ति. सं. ६.१.४.१; मैत्रा. सं. ३.६.८; श. ब्रा. ३.२.६.४; जै. ब्रा. १.४२). शततंत्री म्हणजे शंभर तारांचे वाद्य होय. वाज. संहितेत (३०.१९.२०) पुरुषमेधाच्या प्रसंगी बळी द्यावयाच्या माणसांच्या नामावलीत वीणावाद याचा समावेश केलेला आहे. ऐतरेय आरण्यकात (३.२.५) वीणेच्या निरनिराळ्या भागांची नावे दिलेली आहेत— शिरस् म्हणजे भोपळा असलेला शिरोभाग, उदर म्हणजे पोकळ भाग, अंभण म्हणजे ध्वनिवर्धक फलक, तंत्री म्हणजे तारा, वादन म्हणजे तारा छेडण्याचा दंड, इत्यादी. छांदोग्योपनिषदाच्या



कांडवीणा — कलकत्ता येथील वस्तुसंग्रहालय

आठव्या खंडात वीणेचे विविध प्रकार सांगितले आहेत. ब्राह्मण वाङ्मयात व श्रौतसूत्रांत गोधा, काण्डमयी, पिच्छोरा, वक्रा, कपिशीर्ष्णी, पिशील, अलाबू, इ. वीणाप्रकारांचा निर्देश आढळतो. घोरपडीच्या कातड्याने मढवलेली वीणा ती गोधा, असे कात्यायन श्रौतसूत्राच्या भाष्यकाराने स्पष्ट केले आहे. वांबूची कांडे जोडून कांडवीणा तयार केली जात असावी. अलाबू म्हणजे भोपळा असलेली वीणा होय.

रामचंद्राचे पुत्र लव आणि कुश यांनी वीणेच्या साथीवर रामायणाचे गायन केले, असे रामायणाच्या बालकांडात (४.८) म्हटले आहे. हरिवंशात नारदाच्या वल्लकी वीणेचा उल्लेख आहे. तिच्यातून मूर्छनेचे सात स्वर निघतात असे म्हटले आहे (हरिवंश १.४८.३५). निरनिराळ्या पुराणांत नारदाच्या वीणावादनाचा उल्लेख आलेला आहे. नारदाचे वीणावादन ऐकून श्रीहरी प्रसन्न होत असल्यामुळे वीणेचे माहात्म्य वाढले.

वीणेची निर्मिती महादेवाने केली असून, तिचे सर्व अवयव देवतामय आहेत, अशी दंतकथा प्रचलित आहे. वीणेचा दंड म्हणजे साक्षात शिव, तार म्हणजे भगवती उमादेवी, खांदा म्हणजे विष्णू, घोडी म्हणजे लक्ष्मी, भोपळा म्हणजे ब्रह्मा, नाभी ही सरस्वती, तारदान म्हणजे वासुकी, जवा हा चंद्र आणि खुंटी म्हणजे सूर्य, असे या वाद्याचे वर्णन केलेले आहे. रुद्रवीणेविषयी पौराणिक आख्यायिका आहे, ती अशी—

एकदा पार्वती शुभ्र चांदण्यात पुष्पशय्येवर शयन करीत असताना महादेवाने तिला पाहिले आणि त्याच्या मनात वीणेची कल्पना उगम पावली. पार्वतीची कृश तनू ही वीणेची ग्रीवा आणि तिचे सुडौल उरोज हे वीणेचे तुंबे, असे त्याला भासले. मग त्याने रुद्रवीणा निर्माण केली.

सरस्वतीवीणेचा आविष्कार देवी सरस्वतीने केला, असे मानले जाते. हे वाद्य दक्षिण भारतात विशेष प्रचलित आहे.

भरताच्या नाट्यशास्त्रात चित्रा व विपंची हे वीणेचे मुख्य प्रकार सांगितलेले आहेत. घोषा, कच्छपी, इ. गौण प्रकारही त्या काळात प्रचलित होते. चित्रा व विपंची या वक्राकार वीणा होत्या. चित्रेला व विपंचीला सात तारा असत. विपंची क्वचित नऊ तारांचीही असे. सात स्वरांसाठी सात तारा आणि अंतर गांधार व काकली या दोन स्वरांसाठी दोन तारा अधिक असत. अनुरणनासाठी असलेला या वीणांचा खालचा लाकडी भाग नावेच्या आकाराचा असे. त्या भागावर मध्यभागी असलेल्या पट्टीला तारांचे एक टोक बांधलेले असे. नावेच्या एका टोकाला उभी वक्राकार दांडी जोडलेली असून, त्या दांडीला तारांची दुसरी टोके बांधलेली असत. चित्रा ही बोटांनी वाजवायची व विपंची ही कोणाने वाजवायची, असे भरतमुनीने सांगितले आहे. सनपूर्व २ ऱ्या शतकापासून, इ. स. च्या ८ व्या शतकापर्यंतच्या काळातील भारतीय शिल्पांत अशा वीणा दिसून येतात.

नाट्यशास्त्राचा टीकाकार अभिनवगुप्त व त्याचा अनुयायी शार्ङ्गदेव यांनी नाट्यशास्त्रातील मुख्य वीणा २१ तारांची मानली आहे व तिला मत्तकोकिळा हे नाव दिले आहे.

कच्छपी वीणेला पडदे नसत. तिला चार, पाच किंवा सहा तारा लावलेल्या असून, त्या खालच्या गोलाकार भागात ठेवलेल्या घोडीवरून नेऊन, वरच्या टोकाला असलेल्या खुंट्यांना

ताणून बांधलेल्या असत. या वीणेचा वरचा भाग निमुळता होत गेलेला असे. या वीणेत एका हाताच्या बोटांनी तारा छेडून, दुसऱ्या हाताच्या बोटांनी त्या दाबून विविध स्वर निर्माण केले जात.

घोषा ही वीणा एक तारेची असावी. या वीणेच्या दांडीला वरच्या बाजूला भोपळा असे. प्राचीन शिल्पात एक तारेची व भोपळा असलेली वीणा सरस्वतीच्या हातात दिसते. कोणाने किंवा बोटाने तिची तार छेडून ती तार उजव्या हाताच्या बोटांनी दाबून विविध स्वर निर्माण केले जात.



वक्र वीणा–अमरावती शिल्प

मध्ययुगात संगीत मकरंद, संगीत रत्नाकर, संगीत समयसार, संगीत पारिजात, वाद्यरत्नकोश, रसकौमुदी, इ. अनेक ग्रंथ रचले गेले. त्यांत अनेक वीणांची नावे दिलेली आहेत.



कच्छपी वीणा– अमरावती शिल्प

शार्ङ्गदेवाने संगीत रत्नाकराच्या सहाव्या म्हणजे वाद्याध्यायात काही वीणांचे विस्तृत वर्णन केले आहे–

**एकतंत्री** – या वीणेची दांडी खैराच्या लाकडाची, गोल, सरळ व गुळगुळीत केलेली, तीन हात लांबीची असून, तिचा परीघ एक वीत आणि आतली पोकळी १५ अंगुळ असे. दांडीच्या एका टोकाला १७ अंगुळे सोडून ६० अंगुळे घेराचा गोल भोपळा बांधलेला असे. दुसऱ्या टोकाला ककुभ नामक लाकडी चौकोनी तुकडा असून, त्यावर कासवाच्या पाठीच्या आकाराची धातूची पट्टी बसवलेली असे. तातेची बनवलेली तार ककुभाच्या वरच्या पट्टीवरून नेऊन ताणून बांधलेली असे. ही अन्य वीणांची जननी मानली आहे. तिचे दर्शन व स्पर्श हे भोग व मोक्ष देणारे आहेत, असेही म्हटले आहे. ही वीणा सर्व देवतांनी युक्त असल्यामुळे अत्यंत पवित्र मानली गेली आहे.

मध्ययुगातील अनेक ग्रंथांत पडदे असलेल्या वीणांचे वर्णन आढळते. आणि तशा वीणा अनेक ठिकाणच्या शिल्पांतही दिसून येतात. नान्यदेव (इ. स. चे ११ वे शतक), सोमेश्वर (१२ वे शतक) व शार्ङ्गदेव (१३ वे शतक) यांनी किन्नरी वीणेला पडदे सांगितले आहेत. बेलूर येथील एका शिल्पात १३ पडदे असलेली वीणा सरस्वतीच्या हातात दिसते. त्या वीणेला दोन भोपळे आहेत. गिरनार पर्वतावरील वस्तुपाल-तेजपाल मंदिरातील शिल्पात १३ पडदे असलेली वीणा एका स्त्रीच्या हातात आहे. त्या वीणेला भोपळा नाही; गोलाकार लाकडी पेटी आहे.

वीणेच्या विकासात पडद्यांचा उपयोग हा एक महत्त्वाचा टप्पा मानला जातो. पडद्यांमुळे तारांची संख्या कमी करता येते. पडद्यांवर तारा दाबून निरनिराळे स्वर उत्पन्न करता येतात.

**किन्नरी** – हे प्राचीन लोकवाद्य असून, तिला काही पडदे असत. मध्यकालातील किन्नरी वीणा हे तिचेच विकसित रूप होय. हिचे लहान व मोठी असे दोन प्रकार होते. लहान किन्नरीला दोन भोपळे व मोठीला तीन भोपळे असत. हिची दांडी पोकळ बांबूची, तीन किंवा चार विती लांब व ५ किंवा ६ अंगुळे जाड असे. हिच्यावर १४ सारिका (पडदे) बसवलेल्या असून, पोलादी तार ककुभामध्ये घट्ट बसवून, सारिकांवरून दुसऱ्या टोकाला असलेल्या खुंटीला ताणून बांधलेली असे. मोठ्या किन्नरीची तार तातेची असे. (किन्नरी पाहा.)

**मत्तकोकिला** – ही २१ तारांची वीणा असून हिलाच महती असेही नाव होते. मध्ययुगात वक्राकार वीणेच्या ऐवजी सध्याच्या स्वरमंडळासारखी ही वीणा प्रचारात होती. तिचे शरीर म्हणजे लाकडी पेटी २७ इंच लांब, १३.५ इंच रुंद व ३इंच उंच होती. तिची लांबी एका बाजूला कमी कमी होत गेलेली होती. या वीणेला २२ तारा असून, त्यांतील २१ तारा क्रमाने मंद्र, मध्य व तार सप्तकांत लावलेल्या असत. सर्वांत खालची २२ वी तार अनुरणनासाठी असे.

**आलापिनी** – या वीणेची दांडी आतून पोकळ अशा सरळ बांबूची असे. हिचा ककुभ २ अंगुळे लांब व अर्धे अंगुळ रुंद असून, त्यावर पत्रिका नसे. (आलापिनी वीणा पाहा)

**पिनाकी** – ही वीणा धनुष्याच्या आकाराची असून, तिची

दांडी ४१ अंगुळे लांब व २.२५ अंगुळे जाड असे. हिची तार तातेची असून, हिचे वादन धनुकलीने करीत. हिला एकच भोपळा असे. (पिनाकी पाहा)

**रुद्रवीणा –** हिला तंजावर वीणा असेही म्हणतात. हिची



रुद्रवीणा

दांडी व एका बाजूचा गोलाकार भोपळ्यासारखा भाग सामान्यपणे फणसाच्या लाकडापासून बनवतात. दुसऱ्या टोकाला एक लहान भोपळा लावलेला असतो. हिला २४ पडदे असून, चार मुख्य तारा व तीन बाजूच्या तारा असतात. पडदे लोह व कासे या धातूंचे असतात. दोन मुख्य तारा पितळी असून, बाकीच्या पाच तारा पोलादी असतात. दांडीच्या दुसऱ्या टोकावर सिंहाचे किंवा अन्य प्राण्याचे तोंड असते. (रुद्रवीणा पाहा)

**कछवा –** या वाद्याला कच्छपी किंवा काश्यपी वीणा, सुरबहार, इ. अन्य नावेही आहेत. भोपळा आडवा कापून त्याच्या खालच्या भागावर फळी बसवून तिला दांडी जोडलेली असते. भोपळ्याचा आकार कासवाच्या पाठीसारखा दिसत असल्यामुळे या वाद्याला कछवा हे नाव मिळाले. हे सतारीसारखेच, पण अधिक लांब व रुंद असते. याचा आवाज गंभीर असतो. (कच्छपी वीणा पाहा)

**विचित्रवीणा –** या वीणेची दांडी पोकळ व सरळ बांबूची किंवा लाकडाची केलेली असते. आतील पोकळीमुळे वीणेचा झंकार अधिक स्पष्ट निघतो. वीणेला चार मुख्य तारा व चोवीस पडदे असतात. पडदे म्हणजे पितळी तुकडे मेणामध्ये घट्ट बसवलेले असतात. वीणेच्या दोन भोपळ्यांतील अंतर मांडी व खांदा यांतील अंतराएवढे म्हणजे २७ ते ३० इंच असते. भोपळ्यांवर लाकडाचे कातीव आवरण असते, त्याला गळा किंवा करा म्हणतात. ज्या ठिकाणी तारा अडकवतात त्याला तारदान किंवा मोगरा म्हणतात. वीणेच्या खुंट्या खैराच्या लाकडाच्या करतात. एक भोपळा खांद्यावर व दुसरा मांडीवर घेऊन हे वाद्य वाजवतात. वाजविण्यासाठी नखीचा किंवा मुद्दाम वाढवलेल्या नखाचा उपयोग करतात.

उत्तर भारतीय व दक्षिण भारतीय वीणांमध्ये अल्पसा भेद आहे. उ. भारतीय वीणा म्हणजे नारदीय वीणा होय. दक्षिण भारतात सरस्वती वीणा प्रचलित आहे. सरस्वती वीणेची रचना साधी आहे. तिचे स्वर अधिक तीव्र असतात. उत्तर भारतीय वीणेची रचना क्लिष्ट असली, तरी तिचे स्वर अत्यंत कोमल असतात. भारतीय संगीतशास्त्रज्ञांनी वीणेला साक्षात सरस्वतीच मानले आहे. त्यामुळे तिची साधना पवित्र वातावरणात करण्याची प्रथा आहे. संगीतसभेतील वीणावादनही विधिपूर्वक केले जाते.



सुरवीणा – कलकत्ता संग्रहालय

मध्ययुगात तानसेनाचे घराणे, त्याचे दौहित्र घराणे व मेवाती घराणे ही तीन घराणी वीणावादनासाठी विशेष प्रसिद्ध होती. आणि त्यांची परंपरा या शतकाच्या आरंभापर्यंत अखंड चालू होती.

प्राचीन संस्कृत साहित्यात वीणेचे स्थान उच्च होते. चारुदत्ताने

वीणेला सर्व वाद्यांतील रत्न मानले आहे. अनेक कथांमध्ये वीणा-वादनाचे प्रसंग आहेत. वीणा सर्व काळी अत्यंत लोकप्रिय होती. पंचशिव नामक गंधर्वाच्या कारुण्यपूर्ण वीणावादनाने वीतराग बुद्धाचेही अंतःकरण द्रवले होते, अशी कथा बौद्ध साहित्यात आढळते.

सांची, भरहूत, पितळखोरे, अमरावती, नागार्जुनकोंड, पवाया, बोधगया, बादामी, अजंटा, पट्टदकल, वेरूळ, भुवनेश्वर, इ. ठिकाणी असलेल्या शिल्पात वीणेची निरनिराळी रूपे पाहायला मिळतात. [भा. वा. इ.; प्रा. भा. क. वि.; 'संगीत' वाद्य अंक, जानेवारी, १९५१; श्री. बी. एच. कपाडिया, पूना ओरिएंटॅलिस्ट व्हॉ. २६ (१ व २), जानेवारी व एप्रिल १९६१]

**वीणापा** (इ. स. च्या ९ व्या शतकाचा पूर्वार्ध) चौऱ्यायंशी सिद्धांतील अकरावा सिद्ध. हा वीणा वाजवून आपली पदे गात असे म्हणून याला हे नाव मिळाले, असे म्हण-तात. याचा जन्म बिहारमध्ये झाला आणि हा भद्रपाचा शिष्य होता, असे पं. राहुल सांकृत्यायन यांचे मत आहे. म. म. हर-प्रसाद शास्त्रींच्या मते हा विरूपाचा शिष्य, तर मिश्रबंधूंच्या मते कण्हपाचा शिष्य होय. डॉ. धर्मवीर भारतींच्या मते हा अश्वपाचा शिष्य होता.

तंजूर ग्रंथालयात वीणापाचे तीन ग्रंथ आहेत. त्यांपैकी वज्र डाकिनी निष्पन्नक्रम हा ग्रंथ प्राचीन हिंदीत आहे. [ हिं. सा. वि.; सि. सा.; पु. त. नि. ]

**वीतहव्य आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या सहाव्या मंडलातील पंधरावे सूक्त याने रचले आहे. प्रस्तुत सूक्तात बऱ्याच ठिकाणी त्याचा उल्लेखही आहे. अग्नी ही या सूक्ताची देवता आहे. याची एक ऋचा अशी—

**अग्निमग्निं वः समिधा दुवस्यत प्रियंप्रियं वो अतिथिं गृणीषणि ।**
**उप वो गीर्भिरमृतं विवासत देवो देवेषु वनते हि वार्यं**
**देवो देवेषु वनते हि नो दुवः ॥**

(ऋ. ६.१५.६)

अर्थ — हे स्तोत्यांनो, समस्त देवगणांमध्ये संपत्तिसंपन्न आणि अतिथितुल्य पूज्य अशा प्रतिसाददात्या, सर्वप्रिय, प्रशंसनीय, आणि अमर अग्नीची तुम्ही स्तोत्रसमिधांच्या साह्याने सेवा करा.

हे सूक्त भरद्वाज बार्हस्पत्याच्याही नावावर आढळते. वीत-हव्य व भरद्वाज यांचा इथे एकत्रित उल्लेख आढळतो (ऋ. ६. १५.३). त्याचप्रमाणे सुदासाबरोबरही वीतहव्य शब्द आला आहे. अथर्ववेदात, एक गाय किंवा ब्राह्मण स्त्री पळविल्यामुळे वैतहव्य राजे पराभूत झाले, अशी कथा आहे (५.१७.६–७, १८.१०–१२). अभ्यासकांच्या मते तिथे जमदग्नी व असित यांच्याशी त्या गाईचा किंवा त्या ब्राह्मण स्त्रीचा संबंध असावा. या वैतहव्यांचा प्रमुख सृंजय होता. त्याने भृगूला मारले होते (अथर्व. ५.१९.१). प्रस्तुत उल्लेख परशुरामाने पृथ्वी निःक्षत्रिय करायला कारण झालेल्या घटनेचा असावा, असे म्हणतात. हा व दुसरा वीतहव्य एकच असावा, असे मत आहे. [ प्रा. च. को.]

**वीथी** एक संस्कृत नाट्यप्रकार. यात एकच अंक असतो व पात्रे एक किंवा दोन असतात. त्यामुळे या प्रकारात, आकाशभाषितांचा उपयोग करावा लागतो. हा रूपकप्रकार शृंगारप्रधान असतो. याचे उदाहरण मात्र कोणीच दिलेले नाही. याच्या प्रस्तावनेचे तेरा प्रकार आहेत. त्यांना वीथ्यंगे म्हणतात. उद्घात्यक, अवगलित, प्रपंच, त्रिगत, छल, इत्यादी त्यांची नावे आहेत. [ सं. ना. सौं. ]

**वीरगळ** वीरपुरुषांच्या स्मारकशिळा. पाहा – वीरपूजा.

**वीरदास** (इ. स. चे १७ वे शतक) एक जैन मराठी कवी. हा जैन धर्मोपदेशक व औरंगाबाद येथील बला-त्कारगण भट्टारकपीठाचा प्रमुख आचार्य म्हणूनही प्रसिद्ध आहे. याच्या गुरूचे नाव धर्मचंद्र होय. धर्मचंद्राने याला मुनिदीक्षा दिल्यावर हा पासकीर्ती या नव्या नावाने ओळखला जाऊ लागला. याने सुदर्शनचरित्र हा बृहद्ग्रंथ व बहुतरी, नवकार-मंत्रप्रकृती, नेमिनाथ वऱ्हाड, इ. लहान लहान काव्ये लिहिली आहेत. [ प्रा. म. जै. सा. ]

**वीरनंदी** (इ. स. चे १२ वे शतक) एक जैन आचार्य. याच्या पित्याचे नाव मेघचंद्र त्रैविद्यदेव असून, तोच त्याचा गुरूही होता. वीरनंदी हा न्याय, साहित्य, व्याकरण, इ. शास्त्रांचा गाढा पंडित होता. सिद्धान्तशास्त्रातली विद्वत्तादर्शक अशी सिद्धान्तचक्रवर्ती ही पदवी त्याला मिळाली होती. आचारसार हा त्याचा संस्कृत ग्रंथ जैन विद्वानांनी शिरोधार्य मानला आहे. [ जै. सि. भा., जून १९३९. ]

**वीरनिर्वाणसंवत** एक कालगणना. याचा आरंभ भगवान महावीर याच्या निर्वाणापासून मानतात. काही शिलालेख व प्राधान्याने जैन ग्रंथ यांतून या कालगणनेचा वापर केला असल्याचे दिसून येते. मेरुतुंगाच्या विचारश्रेणी नामक ग्रंथात, वीरनिर्वाण व विक्रम या दोन संवतांत ४७० वर्षांचे अंतर असल्याचे म्हटले आहे. विक्रम संवतात ४७०, इसवी

सनात ५२७ व शालिवाहन शकात ६०५ मिळवले, की वीर-निर्वाण संवत येतो. [ सु. वि. को.; सं. मि. ]

**वीरपूजा** युद्धात किंवा एखाद्या साहसी कृत्यात गतप्राण झालेल्या शूर, पराक्रमी पुरुषांना वीर म्हणतात व त्यांच्याविषयी वाटणाऱ्या आदरामुळे किंवा त्यांनी आपले कोणत्याही प्रकारे अशुभ करू नये म्हणून, त्या त्या व्यक्तींच्या नावाने उभे दगड, लाकडी ठोकळे, अनघड पाषाणखंड किंवा घडीव मूर्ती यांची पूजा करण्याची जी प्रथा आहे तिला वीरपूजा असे म्हणतात.

वीर हा शब्द जसा शूर वृत्तीच्या व्यक्तींसाठी वापरतात, तसाच तो क्रूर व उग्र प्रकृतीच्या यक्ष श्रेणीतल्या ग्रामदैवतांसाठीही वापरतात. हे वीर सामान्यतः पंचवीर, बावनवीर, अशा संख्यात्मक शब्दात उल्लेखिले जातात. भारतात सर्वत्र त्यांचा अशा विशिष्ट संख्येने उल्लेख होत असला, तरी भिन्न भिन्न प्रदेशांत त्यांची भिन्न भिन्न नावे मिळतात. नरसिंग, झोटिंग, चेडा, वेताळ, मेसोबा, मुंजा, भैरव, इ. पुरुष आणि तुकाई, मायराणी, जाखमाता, इ. स्त्री वीरांची नावे या संदर्भात उल्लेखनीय आहेत. कलगी-तुर्रा संप्रदायाचे मराठी शाहीर या बावनवीरांना आपली दैवते मानतात व प्रतिपक्षावर मात करण्यासाठी ह्यांना आवाहन करतात. या आवाहनगीतांना वीर म्हणजे वीर अशीच संज्ञा आहे. कलगी-तुर्रा या शब्दसंहतीचे नामरहस्य उलगडण्याच्या कामी केरळी संस्कृतीतील कळियाट्टम् (काली+आट्टम्=काली नृत्य) या नृत्यप्रकाराचा परिचय उपकारक आहे. या नृत्यप्रकाराच्या विकसनात तेयाट्टम्, कोलंकेट्टु, तिर्रायाट्टम्, इ. प्रकार येतात. हे नृत्य लोकधार्मिक असून, ते शिव-शक्ती व त्यांच्या परिवारदेवतांच्या तुष्टीसाठी करतात. वरील नृत्यप्रकारांपैकी तिर्रायाट्टम् या प्रकाराचा संबंध वीरपूजेशी येतो. हे नृत्य केरळातल्या कोट्टायम् राज्यात जन्मले. प्रसिद्ध युद्धप्रसंगांच्या आणि त्यांत झुंजणाऱ्या रणझुंजारांच्या कथा-गाथा त्या काळी जागोजाग प्रसंगा-प्रसंगाने गायिल्या जात. कोट्टायम्‌मधल्या लोककलाकारांनी कळियाट्टम्‌मध्ये शिवशक्तीबरोबर वीरांनाही स्थान दिले. हे लोककलाकार कोलम म्हणजे नृत्यवेष परिधान करून वीरांच्या तऱ्यांपुढे (तर्रा=चवुतरा किंवा समाधिशिला) नृत्य करू लागले, तसेच वीरांच्या कथा-गाथा, कवने, पोवाडे गाऊ लागले. तऱ्यांपुढे होणारे नृत्य म्हणून हे तर्रायाट्टम् किंवा तिर्रायाट्टम् होय.

हे तर्रे किंवा वीरस्मारके खेडोपाडी विपुल प्रमाणात आढळतात. कालांतराने त्यांनाच ग्रामदैवतांची प्रतिष्ठा प्राप्त झाली. केरळात ज्याला तर्रा म्हणतात, त्यालाच कानडीत कल्लू म्हणतात. कल्लू म्हणजे शिळा किंवा स्मारकशिळा. कर्नाटकात जे वीरकल्लू म्हणून ओळखले जातात, त्यांनाच महाराष्ट्रात वीरगळ म्हणतात. या स्मारकशिळांवर कोणाचे नाव नसते; फक्त काही चित्रे कोरलेली असतात. त्या चित्रांवरून त्या त्या वीराचे वीरकृत्य समजून येते. काही वीरगळ ओबडधोबड असले, तरी काही सुबक घडणीचे असतात. त्यांतले काही चबुतऱ्यावर उभे असतात, तर काहींवर मंडपी उभारलेली असते. काही वीरगळांवर वीरवृत्तीला पोषक ठरणारी वाक्ये कोरलेली दिसतात. त्यांपैकी एक वाक्य असे–'जो रणांगणात देहत्याग करतो तो स्वर्गाला जातो.' हे वीरगळ त्या त्या ग्रामवासियांचे पूजाविषय असतात.



वीरगळ – मळकर्णे (गोवा)

कलगी-तुर्रावाल्यांची दैवते असणारे वीर हे जरी यक्षश्रेणीतले असले, तरी कलगी-तुर्रावाले आपले नृत्य-गायनाचे कार्यक्रम प्राधान्याने वीरकृत्य करून धराशायी होणाऱ्या वीरांच्या पुण्यस्मरणार्थ केल्या जाणाऱ्या उरुसांत किंवा उत्सवांत सादर करतात. शूर वीर आणि यक्ष वीर यांचा हा अन्योन्यसंबंध आणखी एका गोष्टीमुळे स्पष्ट होतो. हॉपकिन्स आपल्या एपिक मायथॉलॉजी या ग्रंथात सांगतो, की ज्यांना तलवारीने लढतालढता वीरमरण लाभते, त्यांच्यासाठीच गुह्यकांची (निधिरक्षक यक्षांची) सृष्टी आहे. महाभारतातील स्त्रीपर्वात (२६.१४) 'शस्त्रेण निधनं प्राप्ता गतास्ते गुह्यकान्प्रति' असे एक वचन आहे. त्यावरून शस्त्राने मृत्यू पावलेला यक्षलोकाला जातो, असे दिसते. पुढील काळात यातूनच वीर आणि यक्ष यांचा अनुबंध दृढ झाला.

याशिवाय वीरांचा आणखी एक प्रकार महाराष्ट्रात दिसतो. हे वीर फाल्गुनात धूलिवंदनाच्या दिवशी संध्याकाळी वीरवेष परिधान करून देवदर्शनाला जातात. काचा घालून पीतांबर किंवा धोतर नेसलेले, दोन्ही खांद्यांवरून रुंद काठांच्या उपरण्यांचे पट्टे

परस्परांना छेद देऊन कमरेपर्यंत आणलेले, कंबरेला शेला, डोक्यावर पगडी किंवा फेटा, उजव्या हाती टोकाला लिंबू खोचलेली तलवार, डाव्या हाती एका वाटीत किंवा करवंटीत कुलदेवाचा टाक घालून ती वाटी रुमालात गुंडाळून रुमालाची टोके धरलेली, डोळ्यात काजळ व कपाळी कुंकुमतिलक असा या वीरांचा वेष असतो. हे वीर चालताना द्वंद्वाच्या पवित्र्यात पावले टाकतात व त्याच तालात हातही हालवतात. ग्रामदेवतेचे किंवा मारुतीचे देऊळ हे त्यांचे लक्ष्य असते. चालताना काही काही वीरांच्या अंगात त्या त्या देवतेचा संचार होतो. पुण्यात अशा वीरांचा एक मारुतीच आहे. आपल्या वीर पूर्वजांच्या स्मृत्यर्थ त्या त्या कुळातील पुरुष अशा प्रकारे स्वतःच वीर बनून व वीर-वेष धारण करून हा देवदर्शनाचा सोहळा साजरा करतात. श्री. रा. चिं. ढेरे यांच्या मते मात्र हाही प्राचीन यक्षपूजेचाच एक अवशेष असावा.

वीर आणि ब्रह्म हे दोन्ही शब्द यक्षवाचकच असून, उत्तरेत अनेक ठिकाणी वीरब्रह्म या संयुक्त नावाने वीरपूजा चालू आहे. महाराष्ट्रात जागोजाग शेंदूर फासलेले दगड दिसतात, ते वीर देवच होत. म्हसोबा, म्हस्कोबा, चेडोबा, बिरोबा, मारुती अशी त्यांची नावे असतात. काही ठिकाणी या वीरांनाच पीर असे म्हणतात; परंतु त्यांचा मुस्लिम पीरांशी काही संबंध नाही. राजस्थानातले पंचपीर प्रसिद्ध आहेत. पाहा – पंचपीर. [ लो सं. क्षि.; म. लो. उ.; सं. प्रा; पृथिवीपुत्र. ]

## वीरभद्र

एक शिवपार्षद. याची उत्पत्तिकथा अशी – स्वायंभुव मन्वंतरात दक्षप्रजापतीने एक यज्ञ केला. सती ही दक्षाची कन्या होय. तिने दक्षाच्या मनाविरुद्ध शिवाशी लग्न केले आणि त्यामुळे सासऱ्या-जावयांत वैर निर्माण झाले. त्या कारणाने दक्षाने सतीला आणि शिवाला यज्ञासाठी बोलावणे केले नाही. सती एकटीच अनाहूतपणे आणि शिवाच्या विरोधाला न जुमानता दक्षाकडे गेली. पण यज्ञमंडपात तिची कोणीही विचारपूस केली नाही. दक्षाने तिला आणि शिवालाही अपमान-कारक शब्द उच्चारले. सतीला ती गोष्ट सहन झाली नाही. अशा बापाची मुलगी म्हणून जगणे तिला घृणास्पद वाटले. तिने त्याच मंडपात योगाग्नी प्रज्वलित करून स्वतःचा देह जाळून टाकला. ही वार्ता शिवाला समजली तेव्हा शिव खवळला. त्याने क्रोधाने आपल्या जटा झटकल्या. त्यासरशी त्यातून वीरभद्राची उत्पत्ती झाली (भाग. पु. ४.५; स्कंद पु. १.१–३)

पद्मपुराणात, हा शिवाच्या घर्मबिंदूपासून जन्मला व महा-भारतात, तो शिवाच्या मुखातून जन्मला, अशा वेगळ्या कथा आहेत. (पद्म पु. सृष्टि. २४; म. भा. शांति. २७४).

उत्पन्न होताच वीरभद्राने शिवाला 'मी काय सेवा करू' असे विचारले आणि शिवाने त्याला दक्षयज्ञाचा विध्वंस कर-ण्याची आज्ञा दिली. तद्नुसार तो रुद्रगणांसह यज्ञमंडपात गेला. त्याने मंडपावर धाड घालताच समस्त देव त्याच्याशी युद्ध करायला पुढे आले. उभयपक्षी तुंबळ युद्ध माजले. त्यात वीरभद्राने देवांचा पराभव केला, भृगू ऋषीच्या दाढी मिशा उपटल्या, भगाचे डोळे काढले, पूषनचे दात पाडले. आणि शेवटी दक्षाचे मस्तक तोडून ते यज्ञकुंडात फेकून दिले.



वीरभद्र

या विध्वंसानंतर वीरभद्र समस्त सृष्टीचा संहार करण्यास प्रवृत्त झाला. ते पाहून शिवाने त्याला आवरले व शांत केले. मग त्याला वर देताना शिव म्हणाला. 'तू आकाशातल्या ग्रह-मालिकेत मंगळ नावाचा ग्रह होशील. लोक तुला ग्रहमंडळात श्रेष्ठ समजतील. माणसे तुझी पूजा करतील. आणि त्यामुळे त्यांना आयुष्य, आरोग्य व ऐश्वर्य प्राप्त होईल (भाग. पु. ७.१७; पद्म पु. सृष्टि. २४).

वीरभद्र आपल्या पराक्रमाने शिवगणांचा सेनापती बनला. शिवाने त्रिपुरदाह केला त्या प्रसंगी आणि जालंधराशी युद्ध केले त्या प्रसंगी वीरभद्राने मोठा पराक्रम गाजविला.

वीरभद्र हा असुरांचा संहारक आणि देवांचा संरक्षक होता. एकदा कश्यपादी सारे ऋषी आणि देव दावाग्नीत जळून गेले असता त्याने मंत्रसिद्ध भस्माच्या साहाय्याने त्यांना जिवंत केले. ज्या भस्माने त्याने देवतांना पुनश्च सजीव केले, त्या भस्माला त्र्यायुष असे नाव मिळाले. हा पार्वतीचा लाडका सेवक होता. गौरवर्ण प्राप्त करण्यासाठी पार्वती जेव्हा तप करायला गेली, त्यावेळी तिने वीरभद्राला शिवाची सेवा करण्यासाठी नियुक्त केले होते.

विष्णूने नृसिंह अवतार घेतला आणि हिरण्यकशिपूला ठार केले. नंतर तो नृसिंह विश्वसंहाराला प्रवृत्त झाला असता, वीरभद्राने त्याचे दमन केले.

कोकणात कित्येक जत्रांमधून मुख्य नाटक झाल्यानंतर दक्षयज्ञाचा प्रवेश करतात व त्यात वीरभद्राचे सोंग आणतात. त्या वेळी ते सोंग घेणाऱ्या पात्राच्या अंगात वीरभद्राचा संचार होतो, अशी समजूत आहे. म्हणून वीरभद्र रंगमंचावर येताच दक्षाचे सोंग घेतलेल्या पात्राला लगेच बाजूला घेतात. मग वीरभद्राला त्या आवेशाच्या अवस्थेतच देवळात देवापुढे नेऊन बसवितात व त्याला तीर्थ पाजतात. मग वीरभद्राचा तो आवेश ओसरतो.



वीरभद्र (सतीसह)

वीरभद्रमूर्ती—वीरभद्र हा शिववाहन नंदीच्या शेजारी वीणा व त्रिशूळ घेतलेला असा करावा, असे मत्स्यपुराणात सांगितले आहे. महाराष्ट्रात घारापुरी व वेरूळ येथील गुहामंदिरांत वीरभद्राच्या मूर्ती पाहायला मिळतात. त्या अष्टभुज व रौद्रस्वरूप असतात.

शिवाचा आवडता पार्षद म्हणून वीरशैव पंथात वीरभद्राला महत्त्वाचे स्थान मिळाले आहे. [ प्रा. च. को.; मू. वि. ]

**वीरभाण** (इ. स. १६८८–१७३५) एक राजस्थानी कवी. हा जोधपूर राज्यातील घडोई नामक गावचा रहिवासी असून, जातीने रत्नू शाखेचा चारण होता. जोधपूरचे महाराज अभयसिंह आणि गुजरातचा सुभेदार शेर विलंदरखाँ यांच्यांत इ. स. १७३० मध्ये अहमदाबाद येथे जी घनघोर लढाई झाली, तिचे प्रत्यक्ष वर्णन करणारा राजरूपक नावाचा एक ग्रंथ याने डिंगल भाषेत लिहिला आहे. या लढाईत वीरभाण प्रत्यक्ष युद्धस्थानी उपस्थित होता. त्यामुळे इतिहासविदांना या ग्रंथाचे मोल विशेष वाटते. [ रा. भा. सा. ]

**वीरभान** (इ. स. चे १६ वे शतक) एक हिंदी संत व सत्तनामी पंथाचा प्रवर्तक. हा नारनौलचा रहिवासी असून, साध संप्रदायी उदादास याचा पट्टशिष्य होता. याची पद्यरचना बानी या नावाने संकलित केलेली आहे. याची आणखी काही पदे आदिउपदेश नामक ग्रंथात समाविष्ट असून, त्यांत सांप्रदायिक नीतिनियम सांगितले आहेत. हा परमेश्वराला सत्यनाम म्हणून संबोधीत असल्यामुळे त्याने प्रवर्तिलेल्या पंथालाही सत्यनाम किंवा सत्तनाम हे नाव मिळाले. [ उ. भा. सं. प.; अ. अ.; रजत जयंती ग्रंथ – रा. भा. प्रचार समिती, वर्धा. ]

**वीरमुद्रा** जैनांच्या मूर्तिकलेतील एक मुद्रा. सुखासनावर बसून हाताचे तळवे बाहेरच्या बाजूने उघडून उभे धरणे, असे या मुद्रेचे स्वरूप आहे. जैनांच्या यक्षिणी आणि विद्यादेवी यांच्या मूर्ती वीरमुद्रा दाखवतात. [ जै. इ. ]

**वीररस** शृंगारादी आठ रसांपैकी दुसरा रस. रसांमध्ये वीररसाला महत्त्वाचे स्थान आहे. साहित्यदर्पणकार विश्वनाथ याने त्याला इतर रसांपेक्षा श्रेष्ठ मानले आहे. त्याच्या मतानुसार वीररसाचा स्थायीभाव उत्साह, देवता महेंद्र व वर्ण सुवर्णासारखा आहे.

शत्रू हा या रसाचा आलंबन विभाव आहे. शत्रूचे आक्रमण, त्याने आपल्या राज्यात चालवलेली फंदफितुरी, त्याने चालवलेली शस्त्रास्त्रांची वाढ, सैन्याची जमवाजमव, इ. प्रकारांनी वीरांच्या अंगातला उत्साह वृद्धिंगत होतो. म्हणून या प्रकारांना या रसाचे उद्दीपनविभाव म्हणतात. चातुर्य, स्थिरता, आपले साह्यकर्ते कोण आहेत, ते पाहून त्यांना एकत्र करणे, इ. या रसाचे अनुभाव आहेत. गर्व, हर्ष, तर्क, धैर्य, हे याचे व्यभिचारी भाव होत.

अर्जुनाने साक्षात शंकराशी युद्ध करून पाशुपतास्त्र मिळविले. कौरव-पांडव एकमेकांशी लढले. अभिमन्यूने चक्रव्यूहाचा भेद केला. तानाजीने सिंहगड सर केला. बाजीरावाने बुंदेलखंडावर स्वारी केली. चिमाजीअप्पाने वसईचा किल्ला जिंकला. राणी लक्ष्मीबाईने इंग्रजांशी तुंबळ युद्ध केले. यासारखी कोणतीही पराक्रमाची कृत्ये ही वीररसाची उदाहरणे होतील.

रघुवंशाच्या चौथ्या सर्गात रघूच्या दिग्विजयाची हकीकत दिली आहे. तिच्यातही वीररसच प्रमुख आहे.

वीररसाचे युद्धवीर, दानवीर, धर्मवीर आणि दयावीर असे चार भेद आहेत. वर वर्णन केले आहे, ते युद्धवीर या प्रकाराचे

आहे. रामचंद्र हा युद्धवीर होता. परशुराम हा दानवीर होता. समुद्रवलयांकित पृथ्वी त्याने दान केली. आजच्या काळातही दीनदुबळयांसाठी आणि सार्वजनिक कार्यासाठी संपत्तीचे दान करणारे जे त्यागी लोक आहेत त्यांना आपण दानशूर म्हणजेच दानवीर म्हणतो. धर्मासाठी लढणाऱ्यांना आणि धर्मासाठीच मरणाऱ्यांना धर्मवीर असे नाव आहे. भयंकर रोगाच्या साथीत सापडलेल्यांच्या शुश्रूषेसाठी जिवावर उदार होऊन पुढे होणारे, युद्धभूमीवर घायाळ झालेल्या वीरांना उपचार करण्यासाठी धाव घेणारे, दुर्बलांवर होत असलेल्या अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी झटणारे, इ. उपकारी पुरुष दयावीर या संज्ञेलाच प्राप्त होतात. अशा लोकोत्तर व्यक्तींचे आणि त्यांच्या उदात्त कृतीचे वर्णन ज्यात असेल ते काव्यही वीररसात्मक होय.

वीररसाच्या या चार भेदांसंबंधी साहित्यशास्त्राच्या आचार्यांत मतभेद आहेत. [ सुलभ काव्यशास्त्र; हिंदी वीरकाव्य संग्रह— संपा. गणेश प्रसाद द्विवेदी, १९५६; कालिदासाची सृष्टी ]

## वीरराघव

(इ. स. चे १८ वे शतक) एक तेलुगू कवी. हा नियोगी ब्राह्मण होता. वेंकटपती हे त्याचे वडील होत. वीरराघव नेल्लूरला राहत होता म्हणून तो नेल्लूरी वीरराघव या नावाने प्रसिद्ध आहे. तो मंत्र, ज्योतिष, स्मृती, पुराणे, वास्तू, गणित, इ. शास्त्रांचा जाणकार होता. शिवाय समस्यापूर्ती करणारा आणि शीघ्र कवी म्हणूनही त्याची ख्याती होती. त्याने यादव-राघव-पांडवीयमू नावाचे एक त्र्यर्थी काव्य रचले आहे. त्यातून श्रीकृष्ण, श्रीराम व पांडव यांची कथा सांगितली आहे. हे काव्य चार आश्वासांमध्ये विभागले आहे. सरस काव्यापेक्षा अर्थचमत्कृती व कारागिरी ह्याच या काव्याचा प्रधान गुण आहे. आपण एकाच वेळी दहा अर्थ सांगणारे काव्य रचू शकतो, अशी प्रौढीही त्याने गायली आहे. [ ते. सा. इ.; ते. उ. सा. ]

## वीरलू

आंध्र प्रदेशातील धनगरांचे देव. वीरलू म्हणजे वीर पुरुष. धनगरपुराणात यांच्या दंतकथा आढळतात, त्या अशा — हे मूळ माडिगा जातीचे आहेत. छेन्निया वालुदू नावाचा कतम राझूचा एक भाऊ होता. त्याने एका लढाईत माडिगांची मदत मागितली. ते आले आणि वीरश्रीने लढले. छेन्नियाने लढाई जिंकली. दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने आपल्या प्रधानाला सांगितले. 'सर्व माडिगा वीरांना मेजवानीसाठी बोलावून आणा.' छेन्निया त्या वीरांची अस्पृश्यता विसरून सर्वांची एक पंगत करणार होता. पण प्रधानाला ते आवडले नाही. त्याने त्या वीरांना बोलवायला जाण्याचे ढोंग केले आणि छेन्नियाला दोन-तीन वेळा काहीतरी खोटेच सांगून वेळ मारून नेली. छेन्निया कंटाळून गेला. भोजन तयार होते. त्याने मग त्यांचे अन्न बाजूला काढून ठेवले आणि इतरांना जेवायला वाढले. ही गोष्ट माडिगांना कळली. मग ते घाईघाईने भोजनमंडपाकडे आले. पाहतात तो त्यांचे अन्न बाजूला काढून ठेवल्याचे त्यांना दिसले. माडिगांना त्यामुळे दुःख झाले. ते म्हणाले. 'खांद्याला खांदा लावून लढताना आमची अस्पृश्यता तुम्हांला खुपली नाही. जेवायच्या वेळेला मात्र ती पुढे आली.' छेन्नियाने आपण प्रधानाला बोलावणे करण्यासाठी धाडल्याचे सांगितले; पण त्यांना ते पटले नाही. ते म्हणाले. 'आम्ही न जेवताच पुढची लढाई लढू.' छेन्निया म्हणाला. 'ते मला आवडायचे नाही.' माडिगा ऐकेनात, तेव्हा त्याने त्यांची रवानगी केली. ते सरळ कतम राझूकडे आले. तोही त्यांच्यावर रागावला. अखेर त्या सर्वांनी प्राणार्पण करायचे ठरविले. त्यांनी आपापली शस्त्रे हवेत फेकली आणि त्यांच्या खाली आपल्या छात्या उघड्या केल्या. ते सर्वजण उरी घाव लागून पडले व मेले. त्यांना स्वर्गात जागा मिळाली. पुढे ते सगळे वीरलू बनून धनगरांचे उपास्य झाले.

ज्या ठिकाणी ही हाराकिरी झाली, त्या ठिकाणी सांप्रत एक दगड दाखवितात. मात्र वीरलूंचे वास्तव्य शमीच्या झाडावर असते, अशी समजूत आहे. लग्नाच्या प्रसंगी धनगर या वीरलूंची पूजा करतात. वीरलूंचे सामर्थ्य नवदंपतीच्या संततीत उतरावे, अशी त्यामागची इच्छा असते. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

## वीरव्रत

एक शिवव्रत. शिव किंवा उमा अथवा दोन्ही या व्रताच्या देवता होत. नवमीला या व्रताला आरंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. या व्रताचा विधी असा — व्रतदिनी एकभुक्त करावे. कुमारिकांना भोजन द्यावे. उद्यापनाच्या वेळी सुवर्णाचा सिंह करून दान द्यावा. फल — व्रत करणारा प्रत्येक जन्मात रूपवान होतो, शत्रूकडून पराभूत होत नाही आणि अंती शिवलोकाला जातो. [ हि. ध. ]

## वीरशासनजयंती व्रत

एक जैन व्रत. श्रावण वद्य प्रतिपदेला हे व्रत करतात. या दिवशी भगवान महावीराची पूजा व उपवास आणि 'ॐ ह्रीं श्रीमहावीराय नमः' या मंत्राचा त्रिकाल जप करायचा असतो. जैन लोक या तिथीला बरेच महत्त्व देतात. कारण महावीराने राजगृहानजीकच्या विपुलाचल पर्वतावर या दिवशी प्रातःकाली पहिले धर्मचक्रप्रवर्तन केले. शिवाय त्यांच्या मते हा युगारंभदिन होय. सुषम — सुषमादी कालचक्राचा आरंभही याच तिथीला होतो. अमान्त मासगणनेनुसार ही तिथी म्हणजे आषाढ पौर्णिमा होय. [जै. ध.; व्र. ति. नि.; जै. सि. भा., जून १९३९; जै. व्र. वि. सं.

**वीरशैवसंप्रदाय** कर्नाटकात उगम पावून मुख्यत्वे त्याच प्रदेशात वाढलेला एक शैवसंप्रदाय. अर्वाचीन वीरशैव पंडितांच्या मते प्रस्तुत पंथ हा वैदिक धर्माचा समकालीन म्हणजेच वैदिक धर्माच्या उत्पत्तीबरोबरच निर्माण झाला आहे. पण कोणत्याही सबळ पुराव्याच्या अभावी हे मत ग्राह्य ठरत नाही. श्री. फ्लीट हा प्राच्यविद्यापंडित या संदर्भात सांगतो, ते असे–

वीरशैव पंथाचा उद्‌गम वीर बाणंजू या संप्रदायातून झाला आहे. पाचशे स्वामींनी ऐहोळे या गावी त्या पंथाची स्थापना केली. हे स्वामी शैवपंथीय असले, तरी ते स्वतंत्र विचाराचे होते. ज्या नवीन पंथात ते पुढे सामील झाले, त्या पंथाचा उगम अठलूर या गावी रामय्याच्या प्रेरणेने झाला.

वीरशैव मताच्या उगमाचा शोध घेण्यास उपयुक्त ठरतील असे दोन ताम्रपट उपलब्ध झाले आहेत. त्यांपैकी पहिला बागेवाडीजवळच्या मनगोळी खेड्यात मिळाला आहे. त्याचा काळ इ. स. ११५६ हा आहे. बसवेश्वर हा रेवणदासाचा नातू आणि चंडीरामाचा पुत्र होता; तसेच तो सद्‌गुणी व सच्छील होता, असे त्यात लिहिले आहे.

दुसरा ताम्रपट धारवाड जिल्ह्यातील अडलूर गावी सापडला. तो इ. स. १२०० मधला आहे. त्यात एकांतद रामय्या या शिवभक्ताचे वर्णन आहे–एकदा रामय्याचा जैनांशी वादविवाद झाला आणि त्यात जैन हरले. रामय्याने जैनांना केवळ वाग्‌युद्धातच जिंकले असे नव्हे; तर एक मोठा चमत्कार दाखवूनही त्यांना चकित केले. रामय्याने स्वतःचे शिर स्वतःच्या हाताने तोडले आणि ते सात दिवसांनी धडाला जोडल्यावर रामय्या जिवंत झाला. शिवकृपेने हे अद्‌भुत घडले, असे सदर ताम्रपट सांगतो.

वरील दोन्ही ताम्रपटांवरून रामय्या व बसवेश्वर हे दोघे समकालीन होते म्हणजे ते इ. स. च्या १२ व्या शतकात जन्मले आणि ते महान धर्मसुधारक होते असे कळते. या दोहोंपैकी रामय्या हाच वीरशैव मताचा संस्थापक होय. बसवेश्वर हा त्याचा संस्थापक नसून तो सुधारक आहे.

प्रारंभी हा संप्रदाय म्हणजे एक गूढवादी पंथ होता. बसवेश्वराने वीरतेचा अंगीकार करून एका बाजूने शैव पंथातील नानाविध विकृती दूर केल्या आणि दुसऱ्या बाजूने त्या भागातील जैनांचे प्राबल्य कमी करून लोकांना शिवभक्तीकडे आकर्षित केले. बसवेश्वराचे हे कार्य एवढे प्रभावी ठरले, की त्यामुळे मूळ संस्थापकाचे म्हणजे रामय्याचे नाव मागे पडले आणि बसवेश्वराचे नाव पुढे आले.

वीरशैव पंथ हा सर्वस्वी नवा पंथ नसून, तो माहेश्वर पंथातून उगम पावला आहे. त्या पंथाने प्रतिपादन केलेल्या सिद्धान्तांचाच तो विकास आहे. हा माहेश्वर पंथ तमिळनाडमध्ये प्रचलित होता. त्या पंथाचे लोक आपल्या पंथाला वीर माहेश्वर म्हणत. वीरशैव पंथाने आपल्या नावामागे जोडलेला वीर शब्द त्या मूळ नावातूनच घेतलेला दिसतो. माहेश्वर पंथातील काही पारिभाषिक शब्दही वीरशैवांनी स्वीकारले आहेत. वीरशैवांचा षट्स्थल सिद्धान्तही मूळ माहेश्वरांचाच आहे. तमिळनाडमधल्या तिरुमूलर या शैवाचार्यानेही आपल्या ग्रंथात षट्स्थलांचे वर्णन केले आहे.

वरील संदर्भात डॉ. नंदीमठ यांनी विशेष माहिती दिलेली आहे, ती अशी – इ. स. च्या १२व्या शतकाच्या पूर्वी कर्नाटकात शैवमत अनेक रूपांत प्रचलित होते. काश्मिरी व गौडीय शैवमत यांनी प्रभावित झालेला तमिळनाडमधील शैव सिद्धान्त कर्नाटकात प्रविष्ट झाला होता. त्याव्यतिरिक्त शाक्त, नाथ, कापालिक व कालामुख या शैवमताच्या शाखांचाही कर्नाटकात प्रसार झाला होता. त्यातल्या त्यात कालामुख गुरूंचा कर्नाटकातील राजेलोकांवर विशेष प्रभाव होता. या सर्वांचे परिष्कृत रूप म्हणजे वीरशैव संप्रदाय होय.

बसवेश्वर व अल्लमप्रभू हे दोघे या पंथाचे अध्वर्यू मानले जातात. त्या काळी ईश्वरभक्ती व ईश्वरपूजा हा उच्चवर्णीय श्रीमंतांचा मक्ता बनला होता. ही मक्तेदारी नष्ट करून सामान्य माणसालासुद्धा भक्तिमार्ग सुलभ करून देण्यासाठी व सामाजिक सुधारणा घडवून आणण्यासाठी बसवेश्वरप्रभृती वीरशैवांनी पंथीय चळवळ सुरू केली. प्रत्येक व्यक्तीला उच्चनीच भेद न मानता मोक्षप्राप्तीचा अधिकार आहे; तसाच तो स्त्रियांनाही आहे, अशी या पंथधुरीणांनी घोषणा केली. प्रस्तुत पंथ कर्नाटकात सुरू झाल्यामुळे या पंथप्रचारकांची भाषा कन्नड राहिली. त्यांनी त्या मातृभाषेच्या द्वारेच पंथाचे धार्मिक व तात्त्विक विचार लोकांत प्रसृत केले.

पंथप्रचाराचे श्रेय मुख्यत्वे बसवेश्वर व अल्लमप्रभू यांना असले, तरी त्याचा बराच वाटा त्यांच्या शेकडो स्त्री-पुरुष शिष्यांकडे जातो. या शिष्यांना शिवशरण म्हणत. वीरशैव मताची स्थापना एखाद्या ग्रंथात प्रतिपादिलेल्या तत्त्वांना अनुसरून झाली, असे म्हणण्यापेक्षा त्या पंथातील शिवशरणांच्या अनुभवावर आधारून झाली, असे म्हटले पाहिजे. बसवेश्वराने कल्याणनगरीत शिवानुभवमंडप नावाची एक संस्था निर्माण केली. अल्लमप्रभू हा त्या संस्थेचा ज्येष्ठ व श्रेष्ठ आचार्य होता. त्या मंडपात वेळोवेळी शिवशरण एकत्र जमत आणि धार्मिक, सामाजिक व आध्यात्मिक विषयांवर विचारविनिमय करीत. या त्यांच्या विचारसंथनातून वीरशैव मताला रूप व

आकार या गोष्टी मिळाल्या. शिवशरणांच्या चर्चांचे व अनुभवांचे सारसर्वस्व म्हणजे त्यांनी निर्माण केलेले वचनसाहित्य होय. (वचनसाहित्य पाहा) शिवशरणांनी हिरीरीने व एकनिष्ठपणे वीरशैव तत्त्वज्ञानाचा प्रसार केल्यामुळे कर्नाटकात त्या पंथाला लक्षावधी अनुयायी मिळाले. या शिवशरणांची एकूण विचारसरणी अशी–

परमेश्वर म्हणजेच परमशिव हा सर्वव्यापी आहे. तो प्रत्येकाच्या शरीरातही वास करतो. त्याची मनोमन पूजा करावी, पण पूजाविधीचे अवडंबर माजवू नये. देवाला नैवेद्य किंवा बळी देऊ नये. त्याच्यासाठी भव्य मंदिरे बांधू नयेत. थाटामाटाचे उत्सव करू नयेत. देवपूजा ही बाह्य नसून आंतरिक असावी. प्रत्येकाने अंतर्मुख व्हावे आणि स्वतंत्र वृत्तीने शिवाची भक्ती करावी. दुसऱ्याकरवी देवपूजा करवून घेणे योग्य नव्हे.

वीरशैवसंप्रदायाचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य हे, की त्याने काही नूतन सिद्धान्तांच्या आधारावर समाजाचे पुनर्घटन करण्याचा प्रयत्न केला. त्यातल्या मुख्य बाबी अशा–

(१) वर्णाश्रमधर्माचे खंडन आणि व्यक्ती–व्यक्तीत कोणत्याही प्रकारचा भेद न मानणे.

(२) अग्निपूजा व मूर्तिपूजा यांचा निषेध.

(३) शरीरावर शिवलिंग धारण करणे व शिवभक्ती करणे.

(४) पंचसूतके न मानणे.

(५) सामाजिक जीवनात शरीरश्रमांना प्रतिष्ठा.

(६) सात्त्विक शाकाहार सेवन करणे व प्राणिहिंसा न करणे.

(७) एकेश्वरवादावर विश्वास.

प्रारंभी या पंथात लिंगधारण होते, असे वाटत नाही. पुढे त्या पंथाच्या श्रीपतिप्रभृती आचार्यांनी लिंगधारणाचा आधार जुन्या ग्रंथातून शोधून काढला, असे म्हणतात. मुळात हा पंथ वर्णाश्रमाच्या व जातिव्यवस्थेच्या विरुद्ध नव्हता. श्रीपती पंडितानंतर बसवपुराण लिहिले गेले, त्यात म्हटले आहे ते असे–

**वर्णाचारानुरोधेन शैवाचारं प्रवर्तय।**

(बसव पु. २.३२)

अर्थ – (शिव नंदीला सांगतो) तू वर्णाश्रमधर्माला अनुसरून शैव धर्माचे प्रवर्तन कर.

सिद्धान्तशिखामणी या ग्रंथात वीरशैव शब्दाची व्याख्या केली आहे ती अशी –

**विद्यायां शिवरूपायां विशेषाद्रमणं यतः।**

**तस्मादेते महाभागा वीरशैवा इति स्मृताः॥**

अर्थ – शिवरूप विद्येच्या ठिकाणी विशेषेकरून रममाण होत असल्यामुळे या महाभागांना वीरशैव असे म्हणतात.

वीर, नंदी, भृंगी, वृषभ व स्कंद या पाच गणाधीश्वरांच्या गोत्रांत वीरशैवांची उत्पत्ती झाली. त्यांची धारणा अशी–अखिल जगताचा कर्ता, भर्ता, हर्ता पंचब्रह्मरूप शिव आहे. जगताचे उपादान व निमित्त कारणही तोच आहे. त्याच्या पाच मूर्तींना मिळून पंचब्रह्म म्हणतात. पहिली ईशान म्हणजे क्षेत्रज्ञ होय. तो सगळ्या प्रकृतिवर्गाचा भोक्ता आहे. दुसरी तत्पुरुष मूर्ती म्हणजे प्रकृती होय. ती परमात्म्याची गुहा आहे. तिसरी अघोर मूर्ती ही बुद्धी होय. तिची आठ अंगे आहेत. चौथी वामदेव मूर्ती म्हणजे अहंकार होय. तो सर्व जगाला व्यापून आहे. पाचवी सद्योजात मूर्ती हे सर्व प्राणिमात्रांच्या शरीरांत स्थित असणारे मनस्तत्त्व होय. वीरशैवांचे पंचाचार्य परमशिवाच्या या पाच मूर्तींपासून प्रकट झाले. ईशानापासून विश्वाराध्य, तत्पुरुषापासून पंडिताराध्य, अघोरापासून एकोरामाध्य, वामदेवापासून मरुळाराध्य व सद्योजातापासून रेवणाराध्य असे पाच माहेश्वर नावाचे जगद्गुरू कलियुगाच्या प्रारंभी प्रकट झाले. परब्रह्म शिवाच्या ईशानमुखापासून एक गणेश्वर प्रकट झाला. तोही शिवाप्रमाणे पंचमुख होता. त्याच्या पाच मुखांपासून मखारी, कलारी, पुरारी, स्मरारी आणि बेदारी असे पाच पंचम निर्माण झाले. त्यांच्यापासून आणखी उपपंचम प्रकट झाले. भक्त, जंगम, शीलवंत, बंजिग व पंचमशाली ही त्यांची नावे होत.

वीरशैवांत तीन भेद आहेत, ते असे –

(१) सामान्य वीरशैव – षडध्वशोधनादिपूर्वक आणि शिवदीक्षा न घेता केवळ गुरुकृपेने शक्तिपातपूर्वक कलशस्थापन, लिंगसंस्कार, भस्मधारण, रुद्राक्षधारण, मंत्रोपदेशस्वीकार व शिवलिंग धारण करून लिंगाचे व गुरुजंगमाचे पूजन करणारे आणि शिवेतर देवतांची पूजा न करणारे.

(२) विशेष वीरशैव – कुंडमंडप, गंगादी तीर्थांच्या पंच कलशांत रेणुकादी पंचाचार्यांची पूजा, जलाधिवास, धान्याधिवास आणि रुद्र पंचब्रह्मादी वैदिक मंत्रांनी षडध्वपूर्वक शिवलिंगाची पूजा करणारे; तसेच विध्युक्त शिवलिंग ग्रहण करून शिवलिंगाची त्रिकाल पूजा व गुरुजंगमाची सेवा करणारे; अष्टावरणसंपन्न आणि शिवाचारादी पंचाचारयुक्त असणारे.

(३) निराभारी वीरशैव– जे आश्रमधर्माचा त्याग करून शहरात पाच रात्री व खेड्यात एक रात्र राहतात आणि भक्तांना उपदेश करतात, असे योगी.

प्रस्तुत पंथात दीक्षेचे एकंदर २१ प्रकार असून, त्यांत पुढील तीन दीक्षा प्रमुख आहेत – गुरूपदेश घेऊन व्रताची प्रतिज्ञा करणे ती वेददीक्षा. गुरूकडून मिळणारी ती मंत्रदीक्षा व विरक्ताश्रम्यांना दिली जाणारी ती क्रियादीक्षा.

**ग्रंथ व ग्रंथकर्ते** – नीलकंठभाष्य, श्रुतिसारभाष्य, सोमनाथभाष्य, रेणुकभाष्य, शिवाद्वैतमंजरी, सिद्धांतशिखामणी, वीरशैव

चिंतामणी, वीरमाहेश्वराचार्यसंग्रह, वीरशैवाचारकौस्तुभ, बसवराजीय, इ. ग्रंथ वीरशैवांना प्रमाण आहेत. तसेच कामिकादी बातुलपर्यंत १८ आगम व १८ पुराणांपैकी स्कंद, लिंग, इ. पुराणे, तसेच शैवमताला अनुसरणारी उपनिषदे यांनाही प्रस्तुत पंथात प्रामाण्य आहे.

नीलकंठ शिवाचार्य, शिवयोगीश्वर, पंडिताराध्य, मंचणपंडित, षडक्षरदेव, मुप्पिनषडक्षरदेव, मग्गिमायदेव, नंजणार्य, निजगुणयोगी, बसवेश, चन्नबसव, अक्क महादेवी, नागांबा, नीलांबा, इ. ग्रंथकार व वचनकार प्रस्तुत पंथात निर्माण झाले.

**तत्त्वज्ञान** – वेदान्तसंप्रदायात जसे अद्वैत, द्वैत, इ. संप्रदाय प्रसिद्ध आहेत, त्याचप्रमाणे वीरशैवांचा शक्तिविशिष्टाद्वैत हा तत्त्वज्ञानसंप्रदाय प्रसिद्ध आहे. शंकराचार्यांचा अद्वैतमार्ग हा संन्यासप्रधान आहे. तो कर्मसंन्यासपूर्वक ब्रह्मवाद स्थापित करतो. पण वीरशैवांचा हा शक्तिविशिष्टाद्वैत सिद्धात कर्मप्रधान आहे. तो निष्काम कर्माचा पुरस्कार करतो.

शक्तिविशिष्टाद्वैत शब्दाची व्याख्या वीरशैव आचार्य सांगतात, ती अशी –

**शक्तिश्च शक्तिश्च शक्ती । ताभ्यां विशिष्टौ जीवेशौ शक्तिविशिष्टौ । तयोरद्वैतं शक्तिविशिष्टाद्वैतम् ।**

अर्थ – शक्तिविशिष्ट जीव आणि शक्तिविशिष्ट शिव या दोहोंचे सामरस्य अर्थात परस्पर एकाकार होणे, म्हणजे शक्तिविशिष्टाद्वैत होय.

शक्तीचे दोन भेद आहेत. एक स्थूल चिदचिद्विशिष्ट शक्ती आणि दुसरी सूक्ष्म चिदचिद्विशिष्ट शक्ती. पहिल्या शक्तीने जीवाचा व दुसऱ्या शक्तीने परशिवाचा बोध होतो. शक्ती व परशिव ही दोघे परस्पर भिन्न नाहीत. अग्नी व त्याचे दाहकत्त्व ही दोन्ही जशी अभिन्न आहेत, त्याचप्रमाणे शक्ती व परमात्मा ही दोन्ही अभिन्न समजावी. शक्ती परशिवाच्या ठिकाणी अत्यंत गुप्त रूपाने राहते.

जगत – हे जग शक्तिविशिष्ट परशिवापासून उत्पन्न झाले असून, ते मिथ्या नाही; तर सत्य आहे. रेणुकाचार्य म्हणतात. 'ज्याप्रमाणे पुष्प आणि फल ही वृक्षापासून भिन्न नाहीत, त्याचप्रमाणे शिवापासून उत्पन्न झालेले हे जग शिवापासून भिन्न नाही.' शंकराचार्यांचा अद्वैतवाद 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' असा उद्घोष करतो; तर वीरशैवसंप्रदाय ब्रह्माबरोबर जगतालाही सत्य मानतो. वीरशैव म्हणतात. 'कासव ज्याप्रमाणे एका वेळी आपले पाय बाहेर पसरून पाण्यामध्ये चालत राहतो आणि दुसऱ्या वेळी आपल्या पायांचा संकोच करून म्हणजे ते पोटाखाली लपवून चुपचाप बसून राहतो, त्याचप्रमाणे परशिव आपल्याशी नित्य संबधाने राहणाऱ्या जगताचा एका वेळी विकास करतो, तर दुसऱ्या वेळी त्याचा संकोच करतो. कासवाने पाय बाहेर काढल्यानंतर ते उत्पन्न झाले आणि त्यांचा संकोच केल्यानंतर ते नाश पावले हे म्हणणे जसे हास्यास्पद तसेच सत्य आणि नित्य अशा या जगाचे उत्पत्ती व विनाश होतात, असे म्हणणेही हास्यास्पद ठरेल.' म्हणून वीरशैव उत्पत्ती व विनाश या शब्दांच्या जागी शक्तिविकास आणि शक्तिसंकोच असे शब्द वापरतात.

जीव – जीव हा शिवाचा अंशरूप आहे. त्या दोहोंत पारमार्थिक भेद आहे आणि अभेदही आहे. ज्याप्रमाणे अग्नी व त्याच्यापासून उत्पन्न झालेले कण यांत अत्यंत भेद असत नाही आणि अभेदही असत नाही, तसेच परमार्थात शिव आणि जीव यांचे आहे. जर अंश आणि अंशी यांच्यांत अभेद मानला, तर अग्नीप्रमाणेच अग्निकणांनीही पाकादी क्रिया सिद्ध झाली पाहिजे; पण तसे होत नाही. जर आत्यंतिक भेद मानला तर अग्नीहून भिन्न अशा जलाप्रमाणे अग्निकणातही शीतलतेचा अनुभव यायला हवा; पण तो तसा येत नाही. त्याचप्रमाणे जर शिव आणि शिवाचा अंशरूप जीव यांच्यांत अभेद मानला तर शिवाप्रमाणेच जीवांच्या ठिकाणी सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व, इ. गुण मानावे लागतील; पण तसे ते नसतात. जर दोहोंत भेद मानला तर शिवाहून भिन्न अशा घटपटादी अचेतन वस्तूंत जसा सकल वस्तुज्ञानाचा अभाव असतो, तसाच जीवांच्या ठिकाणी मानावा लागेल; पण जीवांच्या ठिकाणी घटादीविषयक ज्ञान असते म्हणून शिव आणि जीव यांचा पारमार्थिक भेदाभेद स्वीकारावा लागतो.

शिव – सच्चिदानंदस्वरूप सत्य, नित्य, आद्यंतरहित आणि सर्वशक्तिसमन्वित अशा परशिव ब्रह्माच्या ठिकाणी अविनाभाव संबधाने असणाऱ्या विमर्श शक्तीचे स्फुरण हेच तत्त्वरूपाने परिणत होते. ही तत्त्वे छत्तीस प्रकारची आहेत. त्यांमधल्या मुख्य तत्त्वांची नावे शिव, शक्ती, सदाशिव, ईश्वर, माया, विद्यापुरुष, प्रकृती, मन, अहंकार, इ. आहेत. जेव्हा परशिव ज्ञानशक्तीशी एकाकार होऊन, 'मी सर्वज्ञ आहे', अशा प्रकारचा अभिमान धारण करतो, तेव्हा त्याला शिवतत्त्व अशी संज्ञा प्राप्त होते. तोच परशिव आपल्या क्रियाशक्तीत लीन होऊन 'मी सर्वकर्ता आहे' असा अभिमान धारण करतो, तेव्हा त्यालाच शक्ती अशी संज्ञा प्राप्त होते.

**साधनमार्ग** – वीरशैवांनी आपला साधनमार्ग षट्स्थल सिद्धान्ताच्या रूपाने मांडला आहे. 'ॐ नमः शिवाय' हा त्यांचा उपासनामंत्र षडक्षरी आहे. त्यावरून त्यांनी साधनमार्गाची सहा स्थले किंवा टप्पे सांगितले आहेत आणि इतर आनुषंगिक गोष्टीही सहा संख्येतच बसविल्या आहेत.

वीरशैवांनी सांगितलेली स्थलाची व्याख्या अशी –

**स्थीयते लीयते यत्र जगदेतच्चराचरम् ।**
**तद् ब्रह्म स्थलमित्युक्तं स्थलतत्त्वविशारदैः ।।**

अर्थ – हे चराचर जगत जिथे उत्पन्न होऊन ज्या ठिकाणी लय पावते, अशा ब्रह्माला स्थल असे म्हणतात.

स्थलाचे लिंगस्थल व अंगस्थल असे दोन प्रमुख भेद आहेत. लिंगस्थल म्हणजे शिव व अंगस्थल म्हणजे जीव होय. लिंग हे ज्योतिःस्वरूप किंवा प्रकाशस्वरूप आहे. अंगाचे म्हणजेच जीवाचे लिंगाशी म्हणजे परशिवाशी ऐक्य होणे म्हणजे लिंगांगसामरस्य होय. साधकाचे हेच परमसाध्य आहे. अंगाचा लिंगाशी सामरस्य प्राप्त करण्याचा हा प्रवास विशिष्ट टप्प्यांनी होत असतो. हे टप्पे सहा आहेत. त्यांची नावे अशी–

(१) भक्तस्थल – या ठिकाणी साधकाची शिवाच्या ठिकाणी भक्ती जडते.

(२) माहेश्वरस्थल – या ठिकाणी शिवच मुक्तिदाता आहे, यावर आणि शिवाच्या सर्वश्रेष्ठत्वावर साधकाचा विश्वास बसतो आणि तो नीति–नियमांचे काटेकोर पालन करतो.

(३) प्रसादी स्थल– या ठिकाणी जीव आपल्या मनाच्या प्रसन्नतेसाठी व मन निर्मल होण्यासाठी पत्र, पुष्प, फल, तोय, इ. शिवाला समर्पून ते परत प्रसाद म्हणून स्वीकारतो.

(४) प्राणलिंगी स्थल– या ठिकाणी जीव शिवात्मक ज्योतीचे ध्यान करीत राहतो व बाह्य वस्तूंना पराङ्मुख होतो.

(५) शरणस्थल – सतीपतीभाव हा या स्थलाचा विशेष आहे. यात जीव एखाद्या पतिव्रतेप्रमाणे शिवावर अव्यभिचारी निष्ठा ठेवतो. या स्थली शरण व शरण्य हा भाव राहतो. यात शरीराचे द्वैत पण मनाचे अद्वैत आढळते.

(६) ऐक्यस्थल– या ठिकाणी जीवाला शिवाशी पूर्ण ऐक्य झाल्याची जाणीव होते व त्याला शिवानंदाचा लाभ होतो. लिंगांगसामरस्य म्हणतात ते हेच होय.

लिंगाचेही आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जङ्गमलिंग, प्रसादलिंग आणि महालिंग असे सहा भेद आहेत.

वीरशैव मताच्या सिद्धान्तांचा सारांश प्रा. बलदेव उपाध्याय यांनी सांगितला आहे, तो असा–

वीरशैव दर्शनाला शक्तिविशिष्टाद्वैत असे म्हणतात. यातील परमतत्त्व एकमात्र शिव हे आहे. शिव हा पूर्ण अहंतारूप आणि पूर्ण स्वातंत्र्यरूप आहे. त्याची पारिभाषिक संज्ञा स्थल अशी आहे. जेव्हा या परशिवाला उपास्य व उपासक या भेदाने क्रीडा करण्याची इच्छा होते, तेव्हा त्या शिवाच्या ठिकाणी कंपन उत्पन्न होते व त्यामुळे स्थलरूप शिवाचे शिव आणि जीव किंवा लिंग आणि अंग असे दोन भेद होतात. शिव चैतन्यात्मक असून, जीव जड असतो. शक्ती ही शिवाच्या ठिकाणी नितांत ऐक्य धरून राहते. ती शिवापासून कधीही वेगळी होत नाही. या शक्तीचे सूक्ष्म व स्थूल असे दोन भेद आहेत. शक्तीचा क्षोभ होतो, तेव्हाच स्थलाच्या ठिकाणी लिंगांगभेद निर्माण होतो. लिंगाच्या शक्तीला कला म्हणतात. ती प्रवृत्ती उत्पन्न करते. अंगाच्या शक्तीला भक्ती म्हणतात. ती निवृत्ती उत्पन्न करते. लिंगाचे भावलिंग, प्राणलिंग व इष्टलिंग असे तीन प्रकार होतात. अंगाचेही योगांग (कारणरूप प्राज्ञ), भोगांग (सूक्ष्मरूप तैजस) व त्यागांग (स्थूलशरीररूप विश्व) असे तीन प्रकार होतात. जीवाचे आपल्या स्वाभाविक भक्ति–शक्तीने परमशिवाशी ऐक्य किंवा सामरस्य होते, तीच मुक्ती होय. परमशिवाच्या अनुग्रहाने जीवाला भक्ती प्राप्त होते. गुरूने दिलेली दीक्षा ही भक्तीच्या प्राप्तीसाठी अत्यावश्यक असते. वेधात्मिका, मंत्रात्मिका व क्रियात्मिका असे दीक्षेचे तीन प्रकार असतात. दीक्षा मिळाल्यावरच जीव शिवत्वाला प्राप्त करून घेऊ शकतो. पाहा – बसवेश्वर; लिंगायत; शिवशरण; वचनसाहित्य. [ विवेक चिंतामणी – प्रा. पंडित आवळीकर, १९६३; भा. द.; म. ज्ञा. को.; हिंदुत्व ]

**वीरसाधन** एक तांत्रिक विधान. अष्टमीच्या किंवा चतुर्दशीच्या दिवशी दीड प्रहर रात्र उलटल्यावर चितास्थानातून एक शव आणून त्याच्या जवळ बसून किंवा श्मशानात जाऊन ही साधना करतात. श्मशानात जाताना पूजेसाठी व बलिदानासाठी सामिषान्न, गूळ, बोकड, सुरा, फळे, दूध वगैरे साहित्य बरोबर नेतात. तसेच शस्त्रधारी इष्टमित्र, गुरु, बंधू किंवा ब्राह्मणही बरोबर घेऊन जातात. त्यानंतर संकल्पपूर्वक गणेश, बटुक, योगिनी, मातृका, श्मशानाधिप, भैरव, कालभैरव, महाकाल, इ. देवतांची पूजा करतात. मग महाकाली, भूतनाथ व श्मशानाधिप यांना बली प्रदान करतात. त्यानंतर श्मशानातील अस्थींचे पंचगव्याने किंवा जलाने प्रोक्षण करून त्यांच्यावर पीत वस्त्राचे आच्छादन घालतात. त्याच्यावर पीठमंत्र लिहिलेले वटपत्र किंवा भूर्जपत्र ठेवतात आणि त्याच्यावर व्याघ्रचर्म पसरून साधक त्याच्यावर वीरासन घालून बसतात. मग वातीचा दिवा लावून ठेवतात आणि इष्ट देवतेची पूजा करून मंत्राचा जप करतात. मंत्र एकाक्षरी, द्व्यक्षरी, त्र्यक्षरी किंवा त्याहून जास्त अक्षरांचा असल्यास त्या मानाने अनुक्रमे दहा सहस्र, आठ सहस्र, पाच सहस्र किंवा एक हजार आठ असा जप सूर्योदयापर्यंत करतात. जप सुरू केल्यावर काही वेळाने 'वरं वरय' (= वर माग) असे शब्द ऐकू आल्यावर साधक देवीला आपले अभीष्ट निवेदन करतात. जप पूर्ण झाल्यावर बोकड किंवा रेडा बळी देतात व घरी परत येतात.

त्यानंतर इष्टमित्रांना भोजन देतात व गुरूला दक्षिणा देऊन कर्म समाप्त करतात. [ ध. तं. शि. ]

**वीरासन** अल्प श्रमाने साध्य होणारे एक योगासन. याची कृती अशी – डावा पाय गुडघ्याजवळ मोडून त्याची टाच कुल्यांच्या खाली आणावी. बसताना पायाच्या बोटांवर बसावे. पायाचा पंजा ताठ असावा. डावा हात डाव्या पायाच्या गुडघ्यावर ठेवावा. उजवा पाय वाकवून तो डाव्या पायाचा गुडघा व मांडी यांच्या मध्यभागाला लावावा. उजव्या पायाचा गुडघा उभा करून त्यावर उजवा हात ठेवावा. छाती फुगवावी. कंबर, पाठ व डोके शक्य तो वर सरळ ठेवावे. श्वासोच्छ्वास चालू ठेवावा. पोट साधारणतः दाबून ठेवावे.



वीरासन

याच प्रकाराने हे आसन उजव्या पायानेही करता येते. असे उभयप्रकारे आसन केल्याने शरीर हलके होऊन, मन प्रसन्न होते. निर्भयता, साहसीपणा, इ. गुणांचा लाभही होतो. सर्व कृच्छ्रांमध्ये आणि अघमर्षण व्रतामध्येही शरीराची ही स्थिती ठेवावी लागते. त्यामुळे सर्व पापांचा नाश होतो. वीरासनाचे अनेक प्रकार आहेत. [ उ. यो. द.; यो. सो. पू.; हठयोगप्रदीपिका; हि. ध. ]

**वीर्य-पारमिता** बौद्धांच्या सहा पारमितांमधली चौथी. वीर्य म्हणजे उत्साह होय. अविषाद, बलव्यूह, निपुणता, आत्मवशर्वातिता, परात्मसमता व परात्मपरिवर्तन यांनी वीर्यवृद्धी होते, असे तथागत बुद्धाने म्हटले आहे. पाहा– पारमिता. [ बौ. ध. द.; बौ. ध. मी. ]

**वीर्यस्तंभनासन** विशेष श्रमाने साध्य होणारे एक आसन. दोन पायांत सुमारे चार फूट अंतर ठेवून, जमिनीवर सरळ उभे राहावे. मग दोन्ही हात कमरेच्या मागे घेऊन डाव्या हाताने उजव्या हाताचे मनगट धरावे. श्वास घ्यावा. नंतर डाव्या पायाचा गुडघा मोडून त्याच्या अंगठ्याला नाक लावावे. श्वासोच्छ्वास चालू ठेवावा. शक्य असेल तितका वेळ या अवस्थेत राहून, श्वास घेऊन सरळ उभे राहावे. अंगठ्याला नाक लावताना उजवा पाय गुडघ्यात न वाकू देता, सरळ ठेवावा. छाती व सर्व शरीर ताठ ठेवावे. डोळे मिटून, पोट दाबून ठेवावे. अशाच प्रकारे उजव्या बाजूने ही कृती केली म्हणजे हे आसन पूर्ण होते. आपल्या प्रकृतीला अनुसरून या आसनाचा वेळ ३० सेकंदापर्यंत वाढवीत न्यावा.

या आसनामुळे तारुण्याचे संरक्षण होते; मधुमेहासारखे रोग नष्ट होतात; बद्धकोष्ठता, शरीराची स्थूलता, कोरडा खोकला, इ. विकार नाहीसे होतात. [ उ. यो. द. ]

**वृंताकत्यागविधी** एक प्रकीर्णक व्रत. हे व्रत आयुष्यभर, वर्षभर, सहा महिने किंवा तीन महिने करतात. वृंताक म्हणजे वांगे. वांगे खाणे वर्ज्य करणे, हा या व्रताचा प्रमुख विधी होय. भरणी किंवा मघा नक्षत्र असेल त्या दिवशी रात्री उपवास करावा. यम, काल, चित्रगुप्त, मृत्यू व प्रजापती यांना आवाहन करून त्यांची गंधादिकांनी पूजा करावी. मग यम, नील, नीलकंठ, यमराज, चित्रगुप्त आणि वैवस्वत यांच्यासाठी तीळ व तूप यांचे एकशे आठ हवन करावे. उद्यापनाच्या वेळी ब्राह्मणभोजन घालून, सोन्याचे एक वांगे, काळी गाय, बैल, आंगठ्या, कर्णवलये, छत्री, पादत्राणे, काळ्या वस्त्रांचा एक जोड व काळा रंग या वस्तू दान द्याव्या. जो ह्यातभर हे व्रत करतो, तो विष्णुलोकाला जातो. एक वर्ष किंवा एक महिना हे व्रत करणाऱ्याला यमनगरी दिसत नाही. [ हि. ध. ]

**वृंद** (इ. स. १६४३–१७२३) एक हिंदी नीतिवचनकार. हा जातीने शाकद्वीपीय ब्राह्मण होता. याचा जन्म मेडता (जोधपूर) गावी झाला. श्रीरूप हे याचे वडील आणि कौसल्या ही माता होय. वृंदाने काशीला जाऊन निरनिराळ्या शास्त्रांचे विधिवत अध्ययन केले. तिथून परतल्यावर त्याच्या प्रतिभेने आणि पांडित्याने प्रभावित होऊन जोधपूरच्या जसवंतसिंह महाराजाने त्याचा खूप सन्मान केला व त्याला काही भूमी दान दिली. नंतर त्याने औरंगजेबाचा कृपापात्र सरदार मुहंमद याच्याशी त्याचा परिचय करून दिला. त्यामुळे कालांतराने औरंगजेबाच्या दरबारात त्याला प्रवेश मिळाला. औरंगजेबाने आपला मुलगा बहादुरशहा आणि नातू अजीमुशान यांना शिक्षण देण्याचे काम त्याच्यावर सोपविले. पुढे किशनगढचा महाराज राजसिंह याने

वृंदाला किशनगढला नेऊन तिथे मोठी जहागीर दिली. तिथे असतानाच त्याने निंबार्कसंप्रदायी आचार्य देव याचे शिष्यत्व पत्करले. अखेर तो तिथेच मरण पावला.

वृंद डिंगल व पिंगल भाषेत काव्यरचना करीत असे. त्याने अकरा ग्रंथांची रचना केली आहे. त्यात दृष्टांत-सतसई हा सातशे दोह्यांचा नीतिविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहे. याव्यतिरिक्त शृंगारशिक्षा, वचनिका, सत्यस्वरूप हे त्याचे ग्रंथ रसिकमान्य झाले आहेत. [ हिं. सा. द्वितीय खंड; हिं. सा. को. २. ]

**वृंदावती दासी** (इ. स. चे १७ वे शतक) एक भक्त कवयित्री. ओडिया भाषेतील प्रसिद्ध कवी जगन्नाथदास हे हिचे वडील होत. पुरी जिल्ह्यातील मलिपडा गावच्या चंद्रशेखर नामक कवीबरोबर हिचे लग्न झाले. चंद्रशेखर मोठा भक्त होता. वृंदावतीने अनेक ग्रंथांचा अभ्यास करून पूर्णतम चंद्रोदय नावाचे एक काव्य रचले. हे काव्य म्हणजे शुद्धा भक्तिमार्गाचा ओडिसातील एक अपूर्व ग्रंथ होय, असे म्हटले जाते. या ग्रंथात श्रीकृष्णाची सख्यभावाने आराधना केली आहे. वृंदावतीचे सारे घराणेच अभ्यासू व कवी म्हणून प्रसिद्ध होते. या घराण्याने ओडिसाच्या भक्तिसाहित्यात फार मोलाची भर घातली आहे. [ उ. सा. इ. ]

**वृंदावन** व्रजमंडलातले एक पुण्यक्षेत्र. या ठिकाणी श्रीकृष्णाने किशोरलीला केल्या आणि पराक्रमही केले, म्हणून समस्त वैष्णवांचे हे आवडते क्षेत्र ठरले आहे. हे क्षेत्र मथुरा नगरीपासून ६ मैल उत्तरेला आहे. कोण्यातरी काळी इथे तुलसीचे वन होते म्हणून या क्षेत्राला वृंदावन हे नाव मिळाले, अशी लोकप्रसिद्धी आहे. राधेच्या सोळा नावांत वृंदा हे नाव आहे. तिने श्रीकृष्णासह इथे क्रीडा केल्या म्हणून याचे नाव वृंदावन पडले, असे ब्रह्मवैवर्त पुराणात म्हटले आहे (१७.१३). श्रीकृष्णाची रासस्थली असल्यामुळे व्रजमंडलातल्या सर्व वनांत वृंदावन श्रेष्ठ मानले गेले आहे.

इथल्या लीलास्थलांत कालियाडोह, वंशीवट, रासचबूतरा, केसीघाट, राधाबावडी, दावानलकुंड, ब्रह्मकुंड व धीरसमीरघाट ही स्थळे विशेष प्रसिद्ध आहेत. यात्रेकरू या सर्व स्थळांचे दर्शन घेतात. वृंदावनात जेवढी घरे, तेवढी मंदिरे, अशी लोकोक्ती आहे. त्यांतल्या प्रमुख मंदिरांची माहिती अशी –

**गोविंददेव** – हे मंदिर सर्व मंदिरांत जुने म्हणजे इ. स. च्या १६ व्या शतकातले आहे. हे लाल दगडांचे बनवलेले आहे. याची स्थापत्य-कला प्रेक्षणीय आहे. मात्र यातली जुनी देवमूर्ती आज त्याच्या गाभाऱ्यात नसून दुसरीच बसवलेली आहे. जुनी मूर्ती जयपूरमध्ये आहे. राजा मानसिंह याने हे मंदिर निर्माण केले.

**मदनमोहन** – हे मंदिर मथुरेच्या व्यापारी वर्गाने दक्षिणेतल्या श्रीरंगम येथील मंदिराच्या धर्तीवर उभारले आहे. हे



गोविंददेवाचे मंदिर, वृन्दावन

रामानुज संप्रदायाचे मंदिर असून, त्याच्या प्राकारात एक तलाव आणि उंच सुवर्णस्तंभ आहे. मंदिराच्या जवळच गौडीय भक्तांचे एक समाधिस्थळ आहे.

**बाँकेबिहारी** – हा देव हरिदासस्वामींचा उपास्य होता. वृंदावनात याचे माहात्म्य आहे.

**गोपेश्वर महादेव** – या देवाने रासोत्सवात भाग घेण्यासाठी गोपवेष धारण केला होता.

**निधिवन** – हे एक निसर्गरम्य स्थान आहे. इथे स्वामी हरिदास व त्यांचे शिष्य संगीत व काव्य यांच्या साधनेत निमग्न राहत. स्वामी हरिदास, विठ्ठलविपुल, भगवत रसिक, इ. भक्तांच्या समाध्या इथेच आहेत.

महाप्रभू वल्लभाचार्य, विठ्ठलनाथ, गोकुलनाथ व दामोदरदास यांच्या बैठका हरसानीच्या जवळ आहेत. अद्वैतस्वामींची तपोभूमी, अद्वैतवट, चार संप्रदायांच्या छावण्या, उडियाबाबाचा आश्रम, इ. स्थळे इथे जवळ जवळ आहेत. हरिराम व्यास यांची समाधी, रूपसनातनाची भजनकुटी, चंद्रसखीचा कुंज, ग्वालजीकी हवेली आणि राधाचरणस्वामींचे पुस्तकालय ही येथील आणखी उल्लेखनीय स्थळे होत. इथे धर्मशाळा, आश्रम, संकीर्तन भवने यांची विपुलता आहे. इथे जागोजाग 'श्रीराधे, जैराधे' हा ध्वनी सदैव उमटत असतो.

वर्तमान वृंदावनाकडे पहिल्या प्रथम गौडीय भक्तांचे चित्त आकृष्ट झाले. चैतन्य महाप्रभू इथली निसर्गशोभा पाहून

प्रभावित झाले. अनेक भक्तकवींची काव्यरसमाधुरी इथेच प्रवाहित झाली. हिंदी भक्तकवींनी या क्षेत्रावर जेवढी काव्यरचना केली आहे, तेवढी दुसऱ्या कोणत्याही क्षेत्रावर नाही. भागवत, पद्मपुराण, स्कंदपुराण, नारद पांचरात्रातले श्रुतिविद्या संवाद, बृहद्ब्रह्मसंहिता, इ. संस्कृत ग्रंथांतही वृंदावनाचे माहात्म्य वर्णिलेले आहे.

कृष्णकथांमध्ये लीलावतारी कृष्णाच्या वृंदावनलीला भक्तिभावाने वर्णिल्या गेल्या आहेत. वृंदावनलीलांचे कृष्णभक्तांनी दोन भाग केले आहेत. एक अलौकिक लीला आणि दुसरी लौकिक लीला. अलौकिक लीलांमध्ये वृंदावनगमन, असुरवध, कालियदमन, दावानलप्राशन, गोवर्धनोद्धारण, इ. लीला समाविष्ट आहेत. लौकिक लीलांत गोचारण, राधासमागम, स्त्रीरूपधारण, पनघट लीला, वसंतक्रीडा, दानलीला, मानलीला, रासलीला, इत्यादींचा समावेश आहे. अलौकिक लीलांचे शब्दांकन मुख्यत्वे वल्लभसंप्रदायाच्या कवींनी केले असून, भागवताच्या भाषानुवादांतही ते आढळते. मधुराभक्तीच्या सांप्रदायिकांनी कृष्णाच्या लौकिक लीला विशेषत्वाने गायिल्या आहेत. कृष्णभक्तिसंप्रदायात वृंदावन हे राधा-कृष्णांची रासस्थली आणि नित्य विहाराचे स्थान मानले गेले आहे. त्यांच्या दृष्टीने वृंदावन हे भौतिक असूनही शाश्वत आहे. सकल कृष्णभक्तांना सदैव वृंदावनाची आस लागून राहिली आहे. सूरदास म्हणतो –

माधो, मोहि करो वृंदावन रेनु
जिहि चरननि डोलत नंदनंदन
दिन दिन प्रतिदिन चारत धेनु

अर्थ – हे माधवा, जिथे नित्य गाई चारताना तुझे चरण विहरतात, त्या वृंदावनाच्या भूमीतील एक रेणू मला कर.

अनन्य अली तर याच्याही पुढे गेला आहे. तो म्हणतो–

विष के खाय आगमें जरो। श्रीजमुनामें बूड हौं मरो।
वृंदाबन छाडो नहीं ॥

अर्थ – मला विष खावे लागले, आगीत जळावे लागले अथवा यमुनेत बुडून मरावे लागले, तरी मी वृंदावन सोडणार नाही.

संत चरणदासाने आपल्या ब्रजचरित्रात वृंदावनाच्या प्रकट व अप्रकट रूपांचे वर्णन करताना म्हटले आहे, ते असे –

पुरुषोत्तम प्रभु लीलाधारी वृंदावनमें सदा विहारी।
निजधामाकी कहियत शोभा वृंदावनमें रहे अलोभा।
दिव्य दृष्टि बिनु दृष्टि न आवे सकल पुराण वेद यो गावै ॥

अर्थ – लीलालाघवी पुरुषोत्तम प्रभू जो श्रीकृष्ण तो वृंदावनात सदैव विहार करीत आहे. म्हणून या निजधामाची शोभा वर्णीत वृंदावनात निर्लोभ वृत्तीने राहावे. परंतु दिव्य दृष्टीविना वृंदावनाचे अलौकिकत्व दिसणार नाही, असे सर्व वेद व पुराणे वृंदावनाचे माहात्म्य गात आहेत.

वृंदावनात समस्त वैष्णव संप्रदायांची केंद्रे आहेत, हे त्याचे आणखी एक वैशिष्टच होय. पाहा – मथुरा, ब्रजमंडल. [ हिं. सा. को. २; ब्रज और ब्रजयात्रा – गोविंददास व अग्रवाल, १९५९. ]

**वृंदावनदास** (इ. स. चे १६ वे शतक) एक चैतन्यमतानुयायी बंगाली कवी. हा नारायणी ठकुराणीचा मुलगा होय. याने चैतन्य भागवत नावाचा एक ग्रंथ रचला आहे. चैतन्य मंगल हे या ग्रंथाचे मूळ नाव होते. त्यात चैतन्यप्रभूला विष्णूचा अवतार मानून त्याचे चरित्र वर्णन केले आहे. हा ग्रंथ तीन खंडांत विभागला असून, त्याचे बावन्न अध्याय आहेत.

इ. स. च्या सोळाव्या शतकातील अनेक घडामोडींचे ऐतिहासिक चित्रण या ग्रंथात असल्याने समाजशास्त्राच्या अध्ययनाला हा ग्रंथ फार उपयुक्त आहे. या व्यतिरिक्त त्याने तत्त्व-विलास, दधिखंड, वैष्णव-वंदना, भक्तिचिंतामणी हे ग्रंथ व काही पदे रचली आहेत. [ हिं. वं. वै. क.; हि. बें. लँ. लि. ]

**वृचीवत** वैदिक युगातला एक जनसमूह. ऋग्वेदात यांचा उल्लेख तुर्वशांवरोबर झालेला आढळतो. अभ्यावर्ती चायमान याने या जनांचा हरियूपीया नदीच्या तीरावर पराजय केला होता. दुसऱ्या एका उल्लेखावरून सृंजयराज दैववात याने त्यांना जिंकले होते, असे कळते. तुर्वशांप्रमाणे वृचीवत लोकही सृंजयाच्या शत्रुपक्षात होते (ऋ. ६. २७). वृचीवत आणि जह्नू या जनांमध्ये राजसत्तेसाठी संघर्ष झाला होता. त्यात जह्नूंचा राजा विश्वामित्र याने वृचीवतांचा पराभव केला, असे तांड्य ब्राह्मणात (२१.१२.२) म्हटले आहे. [ प्रा. च. को. (हिंदी) ]

**वृज्जी** प्राचीन गणराज्यांचा संघ. या संघात आठ किंवा नऊ गणराज्ये समाविष्ट होती. त्यांतील विदेह, लिच्छवी, ज्ञातृक व वज्जी ही गणराज्ये प्रमुख होत. वैशाली ही लिच्छवी गणराज्याची राजधानी असून, वृज्जी संघाचे मुख्य स्थान तिथेच होते. उ. बिहारमधील मुजफ्फरपूर जिल्ह्यातील बसाढ या ठिकाणी पूर्वीची वैशाली नगरी होती. या संघात पूर्वी राजसत्ता प्रचलित असावी.

बुद्धाच्या पूर्वीच ही गणराज्ये संघटित झालेली असून, बुद्धाच्या काळी हा संघ अत्यंत बलवान व संपन्न होता. बुद्धाने त्याला आदर्श राज्य मानले होते. कालांतराने लिच्छवी गणराज्य प्रबळ झाल्यामुळे त्याचे नाव या संघाला मिळाले.

या संघाचे मगधाशी शत्रुत्व होते. वैशालीच्या सेनेने मगधावर आक्रमण केले असता, मगधाधिपती बिंबिसार याने त्याचा

पराभव केला. मग बिंबिसाराने लिच्छवींच्या राजकन्येशी विवाह केला. तिचे नाव छेल्लना असून, ती चेटक राजाची कन्या होती. तिची एक बहीण महावीराची माता होती व दुसरी बहीण वत्सराज उदयनाची माता होती. [ हि. क. इं. पी. २; हिं. स.; म. भा. इ.; पा. पु. क. ]

**वृत्तपत्रे** वृत्त म्हणजे वार्ता किंवा बातमी मिळवून तिचा प्रसार व स्वमताचा प्रचार करण्याचे एक साधन. वृत्तपत्र-संस्था मुद्रणकलेच्या शोधामुळेच उगम पावली आहे. भारतात मुद्रणाचा प्रारंभ गोमंतकात इ. स. च्या १६ व्या शतकाच्या मध्यावर झाला असला, तरी वर्तमानपत्रांचा उदय होण्यास आणखी सव्वा–दोनशे वर्षांचा काळ जावा लागला. इ. स. १७८० च्या जानेवारी महिन्यात जेम्स ऑगस्टस हिकी नावाच्या गृहस्थाने ' बेंगॉल गॅझेट ' हे साप्ताहिक सुरू केले. कोणत्याही उदात्त ध्येयाने प्रेरित होऊन त्याने ते सुरू केले नव्हते; तर बंगालमध्ये जे थोडे इंग्रज लोक होते त्यांची करमणूक करून देशोदेशीच्या बातम्या समजण्याची त्यांची हौस पुरी करावी, एवढाच त्याचा उद्देश होता. मात्र तो विचारस्वातंत्र्याचा पुरस्कर्ता होता.

त्या वेळच्या सरकारने हिकीला विरोध न करता प्रोत्साहनच दिले. कंपनी सरकारच्या अंमलाखालील प्रजेची एक गैरसोय दूर होईल, अशा समजुतीने सरकारने त्या पत्राला लगेच परवानगी दिली. बातम्या पुरविणे, मनोरंजन करणे आणि त्यायोगे मन व बुद्धी यांचा विकास साधणे हे ध्येयवाक्य हिकीने वापरले असले, तरी त्याला त्याचा विसर पडला. त्याच्या साप्ताहिकाच्या दोन पानांतली अर्धी जागा जाहिरातींनी व्यापलेली असे आणि बाकीच्या जागेत लोकांच्या खाजगी जीवनावर कुत्सित टीका असे. गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्ज व मुख्य न्यायाधीश सर एलिजा इम्पे यांच्यावरही त्याने शिंतोडे उडविले. एका स्वीडिश मिशनऱ्याने हिकीविरुद्ध अब्रूनुकसानीची फिर्याद केली आणि हिकीला कैदेची व दंडाची शिक्षा झाली. तरीही त्याने आपले असभ्य टीकालेखन बंद केले नाही. त्यामुळे त्याला पुन्हा तुरुंगवास भोगावा लागून, जबर दंडही भरावा लागला आणि त्याने सुरू केलेले साप्ताहिक बंद पडले.

हिकीच्या हीन टीकेमुळे त्याच्यावर कंपनी सरकारचा रोष होऊन त्याचा नाश झाला असला, तरी त्याने जो मुद्रणस्वातंत्र्याचा पुरस्कार केला, त्याला महत्त्व आहे. त्याचप्रमाणे त्याने कंपनीच्या नोकरवर्गावर केलेली टीका गर्हणीय असली, तरी तिच्यामुळे कंपनीच्या कारभारातील बऱ्याच भानगडी उजेडात आल्या आणि त्यामुळे कंपनीचा कारभार सुधारू लागला. कंपनीच्या अनियंत्रित कारभारावर प्रकाशझोत टाकून लोकमताचा दाब पाडणे यासाठी वर्तमानपत्र हेच एक साधन होते आणि हिकीची ती कामगिरी प्रशंसनीय होती.

हिकीच्या बेजबाबदार लिखाणाला विरोध करण्यासाठी पीटर रीड व बी. मेस्सिनिक या दोघांनी इ. स. १७८० च्या नोव्हेंबर महिन्यात ' इंडिया गॅझेट ' नावाचे साप्ताहिक सुरू केले. त्याची चार पाने असून, छपाई आकर्षक होती. त्यातील काही लिखाण उपदेशपर असे.

त्यानंतर इ. स. १७८४ च्या फेब्रुवारी महिन्यात ' कलकत्ता गॅझेट ' सरकारी कृपाछत्राखाली निघाले. इ. स. १७८५ च्या फेब्रुवारीत ' बेंगॉल जर्नल ' सुरू झाले व एप्रिलात ' ओरिएन्टल मॅगेझिन किंवा कलकत्ता अम्यूझमेंट ' नावाचे मासिक निघाले. इ. स. १७८६ मध्ये ' कलकत्ता क्रॉनिकल ' सुरू झाले.

इ. स. १७८५ मध्ये मद्रासचा सरकारी मुद्रक रिचर्ड जॉन्सन याने ' दि मद्रास क्युरियर ' नावाचे पत्र सुरू केले. त्याची चार पाने असून, त्यात बातम्या व जाहिरातींबरोबर इंग्लंडमधील वृत्तपत्रांतील उतारे, वाचकांची पत्रे व कविताही असत. त्यात सरकारी नोटिसाही प्रसिद्ध होत असत. सरकारने त्याला टपालखर्चही माफ केला होता.

मुंबईतले पहिले वर्तमानपत्र ' बाँबे हेरॉल्ड ' हे इ. स. १७८९ मध्ये सुरू झाले; पण या पत्रासंबंधी कसलीही माहिती उपलब्ध नाही. त्यानंतर इ. स. १७९० मध्ये मॅक्लीन याने ' बाँबे गॅझेट ' हे साप्ताहिक सुरू केले. पोलिसखात्यावर टीका केल्यामुळे सरकारने एकदा या गॅझेटला समज दिली. मग मॅक्लीनने मद्रास क्युरियरप्रमाणे सरकारी मान्यता मिळावी म्हणून अर्ज केला. सरकारने तशी मान्यता दिली व ते सरकारी पत्र म्हणून प्रसिद्ध होऊ लागले. हे बाँबे गॅझेट इ. स. १९१४ पर्यंत चालू होते.

इ. स. १७९२ साली ल्यूक ॲशबर्नर याने ' बाँबे क्युरियर ' हे साप्ताहिक सुरू केले. ते जरी इंग्रजीत छापले जात होते, तरी त्यात देशी भाषेतील, विशेषतः गुजराती भाषेतील जाहिराती छापल्या जात होत्या. काही जाहिराती मोडी लिपीतही छापलेल्या आढळतात

इ. स. १७९५ च्या जानेवारीत ' दि वीकली मद्रास गॅझेट ' सुरू करण्यात आले. मद्रास सरकारने त्याला परवानगी दिली आणि सरकारी जाहिरातीही त्याला मिळू लागल्या. त्याच वर्षी एप्रिल महिन्यात हंफ्रीस नावाच्या गृहस्थाने ' इंडिया हेरॉल्ड ' नावाचे वर्तमानपत्र सुरू केले. त्याला सरकारने परवानगी नाकारली होती, तरी त्याने ते सुरू केले. तेव्हा सरकारने त्याच्यावर सरकारची बेअब्रू करणारा मजकूर छापल्याचा आरोप करून त्याला हद्दपार केले.

वरील वृत्तपत्रांतला मजकूर साधारणपणे भारतात येणे

राहिलेल्या इंग्रजांना रोचक व उपयुक्त असे. या देशातल्या घडामोडींची माहिती त्यांत फारशी नसे. पार्लमेंटमधले वादविवाद व विलायतेतील इंग्रजी वर्तमानपत्रांतले उतारेही त्यांत दिले जात. पुढे क्युरिअर पत्रात या देशातील वातमीपत्रे छापली जाऊ लागली. याच्या वर्ष ६, अंक २२९ व २३०मध्ये 'पर्शियन अखबार' या सदरात दौलतराव शिंदे यांच्या छावणीतून पाठवलेल्या बातमीपत्राचे उतारे आढळतात. क्युरिअरच्या १६ डिसेंबर १७९७ च्या अंकात शिवाजीमहाराजांनी सुरतेवर केलेल्या स्वाऱ्या आणि त्या वेळी इंग्रजांनी आपल्या वखारींचे केलेले रक्षण यांचे वर्णन आहे. तसेच ९ डिसेंबरच्या अंकात मुंबईत प्रथमच सुरू होणाऱ्या घोड्यांच्या रेसेसची माहिती आढळते.

कंपनी सरकारच्या ताब्यात असलेल्या प्रदेशातील वसाहतींतच ही वृत्तपत्रे सुरू करण्यात आली होती. प्रारंभी त्या वसाहतींत केवळ कंपनीचा नोकरवर्ग राहत असे. पण पुढे इतर लोकही हिंदुस्थानात येऊन राहू लागले. त्यांनी ब्रिटिश वर्तमानपत्रांचा स्वतंत्र बाणा व इंग्लंडमधील लोकशाही वृत्ती आपल्यावरोबर आणली होती. त्यामुळे कंपनीचा एकतंत्री कारभार व नोकरवर्गाचा बेजबाबदारपणा त्यांना सहन होणे शक्य नव्हते. त्यावर टीका करण्यासाठी वर्तमानपत्रे उदयाला आली. त्या टीकेचा परिणाम होऊन कंपनीचा कारभार सुधारू लागला. तथापि वृत्तपत्रांसंबंधी सरकारी धोरण कडक होते. ते मुद्रणस्वातंत्र्याला विरोधी होते. वृत्तपत्रांतील क्षुल्लक टीकेबद्दलही सरकार आक्षेप घेऊ लागले व वृत्तपत्रचालकांना भुर्दंड सोसावा लागला. इ. स. १७९८ साली लॉर्ड वेलस्ली गव्हर्नर जनरल म्हणून हिंदुस्थानात आला आणि त्याने ब्रिटिश साम्राज्याचा पाया घातला. त्यासाठी त्याने आक्रमक धोरण स्वीकारले. तशा परिस्थितीत वृत्तपत्रांना सरकारवर अनिर्बंध टीका करण्यास मुभा देणे योग्य नव्हते. इ. स. १७९८ मध्ये डॉ. मॅक्लीन याने 'बेंगॉल हरकारू' हे पत्र सुरू केले. गाझीपूरच्या मॅजिस्ट्रेटने सरकारी अधिकारी म्हणून केलेल्या काही कृत्यांचा निषेध करण्यासाठी डॉ. मॅक्लीन याने 'टेलिग्राफ' या पत्रात एक पत्र लिहिले. त्यावरून या वृत्तपत्रावर व पत्रलेखकावर खटला भरण्यात येऊन डॉ. मॅक्लीनला हद्दपार करण्यात आले.

त्या वेळी कलकत्ता येथे (१) बेंगॉल हरकारू (२) मॉर्निंग पोस्ट (३) कलकत्ता क्युरिअर (४) टेलिग्राफ (५) ओरिएन्टल स्टार (६) इंडिया गॅझेट व (७) एशिआटिक मिरर ही वृत्तपत्रे चालू होती. त्यांतील एशिआटिक मिररचा संपादक ब्रूस याने त्या वेळचे युरोपियन व देशी लोक यांच्या शक्तीविषयी तुलनात्मक विचार आपल्या लेखात मांडले. वेलस्लीला तो लेख आक्षेपार्ह वाटला आणि त्याने लगेच कलकत्त्यातील वृत्तपत्रांवर बरेच निर्बंध घातले. इ. स. १८०० मध्ये ते निर्बंध मुंबई व मद्रास येथील वर्तमानपत्रांवरही लादण्यात आले.

मुंबईत फ्रॅन्सिस वॉर्डन हा कंपनी सरकारचा मुख्य चिटणीस होता. त्याच्याकडे हे निर्बंध लादण्याचे काम देण्यात आले. ते त्याने पंधरा वर्षे केले; पण त्याला ते निर्बंध अन्यायकारक वाटले व त्याने त्यांची अंमलबजावणी उदारपणे केली. पुढे वेलस्लीनेही इंग्लंडला परत गेल्यावर स्वतः लादलेल्या त्या निर्बंधाबद्दल प्रतिकूल मत प्रकट केले. 'रागाच्या आवेशात व न्यायबुद्धी न वापरता घेतलेला तो निर्णय होता' असे त्याने म्हटले आहे. त्याने घातलेले निर्बंध वृत्तपत्रांच्या संपादकांकडून नीटपणे पाळले जात नव्हते. त्यामुळे त्यांना वारंवार समज देणे सरकारला भाग पडत होते. मद्रासचा गव्हर्नर लॉर्ड बेंटिक याने मात्र वृत्तपत्रनियंत्रण कसोशीने केले.

इ. स. १८१८ मध्ये वृत्तपत्रनियंत्रण रद्द करण्यात आले. त्या वेळचा गव्हर्नर जनरल लॉर्ड हेस्टिंग्ज याचे धोरण उदार होते आणि पेशवाई नष्ट झाल्यामुळे राजकीय परिस्थिती बरीच बदलली होती. म्हणून वृत्तपत्रनियंत्रण उठवणे शक्य झाले. तथापि कंपनी सरकारच्या धोरणात व नोकरशाहीच्या मनोवृत्तीत फरक झाला नव्हता. त्यामुळे सरकारी अधिकारी पूर्वीप्रमाणेच वृत्तपत्रांवर कडक नजर ठेवीत आणि चालू असलेल्या नियंत्रणाचे पालन कटाक्षाने करीत. त्या काळी इंग्लंडमध्ये उदारमतवादी विचारसरणी वळावत होती. तीच इथल्या इंग्लिश समाजातही प्रसृत होऊ लागली आणि विचारस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य यासाठी झगडण्याची वृत्ती वाढू लागली.

त्या वेळी कलकत्त्यात ८–९ वृत्तपत्रे होती; पण व्यापारी लोकांचे मुखपत्र एकही नव्हते. म्हणून कलकत्त्यातील तीस व्यापाऱ्यांनी कलकत्ता गॅझेट व मॉर्निग पोस्ट या दोन पत्रांचे कॉपीराइट मिळवून कलकत्ता जर्नल नावाचे नवीन पत्र सुरू केले. जेम्स सिल्क बकिंगहॅम हा त्याचा पहिला संपादक धाडसी व स्वतंत्र वृत्तीचा होता. त्याने विविध प्रकारचा मजकूर छापून त्या पत्राला नवीन स्वरूप दिले. त्यात त्याने सार्वजनिक हिताच्या गोष्टींची चर्चा, पोलिसांची नालायकी व काही व्यक्तींचा रस्त्यावरील मवालीपणा यांवर टीका, प्रवासवर्णन, इ. सदरे समाविष्ट केली. तो खुल्या व्यापाराचा पुरस्कर्ता होता. म्हणून त्याने कंपनीच्या व्यापारी मक्तेदारीवर हल्ला चढवला. त्यामुळे कंपनी सरकारशी त्याचे वितुष्ट आले. त्याच्या यशामुळे इतर वृत्तपत्रांचे चालकही त्याचा द्वेष करू लागले. त्याला विरोध करण्यासाठी कलकत्त्यामधील सनातनी वृत्तीच्या इंग्रजांनी जॉन बुल नावाचे पत्र सुरू केले. त्या पत्रात बकिंगहॅम-

वर वैयक्तिक व असभ्य टीका येऊ लागली. त्यानेही प्रतिटीका व प्रत्युत्तरे छापली. त्या झटापटीत बकिंगहॅम यशस्वी झाला. पण सरकारशी जो त्याचा संघर्ष सुरू झाला त्यात शेवटी तो हरला. त्याने सरकारी अधिकाऱ्यांवर केलेली टीका सरकारला सहन झाली नाही व त्याला हद्दपार करण्यात आले. बकिंगहॅमने हिंदी वृत्तपत्रसृष्टीत एक नवीन परंपरा निर्माण केली. जे सत्य व न्याय्य असेल, त्याचाच पुरस्कार त्याने केला व हिंदी जनतेच्या दुःखांना वाचा फोडण्याचे कार्यही निःपक्षपाती भूमिकेवरून केले.

देशी भाषेतील पहिले वृत्तपत्र बेंगॉल गॅझेट हे इ. स.१८१६ मध्ये निघाले. गंगाधर भट्टाचार्य नामक गृहस्थाने ते सुरू केले. पण त्या पत्राविषयी अधिक माहिती उपलब्ध नाही. श्रीरामपूरच्या मिशनने इ. स. १८१८ च्या एप्रिल महिन्यानंतर समाचार-दर्पण हे साप्ताहिक बंगाली भाषेत सुरू केले. ते डिसेंबर १८४१ पर्यंत चालू होते. त्यात धार्मिक चर्चा असे. देशी व परदेशी बातम्या, राजकीय व ऐतिहासिक लेख, सरकारी कारभारावर योग्य अशी टीका, इ. मजकुराप्रमाणेच त्यात ख्रिस्ती धर्माचा प्रचार व हिंदू धर्माची निंदा केलेली असे. त्या पत्रातील टीकेमुळे सरकारी नोकरांच्या वर्तनात थोडी सुधारणा झाली. खोट्या अफवांना पायबंद घालून सरकारविषयी निष्ठा उत्पन्न करण्याचे कार्यही दर्पणाने केले.

इ. स. १८२१ मध्ये समाचार चंद्रिका हे पत्र निघाले. ते सामाजिक बाबतीत पूर्ण सनातनवृत्तीचे होते. त्याच वर्षी डिसेंबर महिन्यात भवानीचरण बानर्जी या गृहस्थाने संवाद कौमुदी हे पत्र सुरू केले. ते संपूर्णपणे हिंदी लोकांच्या मालकीचे असून, बंगाली भाषेत छापले जाई. राजा राममोहन राय हे त्याचे प्रमुख लेखक होते. स्वमतप्रचार व लोकशिक्षण यासाठी महत्त्वाचे साधन म्हणून त्यांनी त्या पत्रात विपुल लेखन केले. धार्मिक, नैतिक व राजकीय विषय, देशातील घडामोडी, देशी व परदेशी वार्ता, महत्त्वाच्या स्थानिक विषयांवर लेख या साप्ताहिकात प्रसिद्ध करण्यात येतील, असे जाहीर करण्यात आले होते. त्याप्रमाणे बातम्या व लेख असत. समाचार दर्पण या पत्रात हिंदू धर्मावर टीका असे व समाचार चंद्रिकेत जुन्या हिंदू रूढींचे समर्थन असे. त्या दोन्हीमधील फोलपणा दाखवून, हिंदू धर्मात सुधारणा कशी घडवून आणता येईल, याचे विवेचन राजा राममोहन राय संवाद कौमुदी पत्रात करीत. कलकत्ता जर्नलचा संपादक बकिंगहॅम याने संवाद कौमुदीतल्या लेखांची प्रशंसा केली. पण साम्राज्यवादी व टोरी पक्षाच्या लोकांनी राजकीय दृष्टिकोनातून विरोधी टीका केली.

इ. स. १८२२ साली लॉर्ड हेस्टिंग्ज गव्हर्नर जनरलच्या पदावरून निवृत्त झाला आणि नवीन गव्हर्नर जनरलची नेमणूक होण्यापूर्वी काही दिवस चीफ सेक्रेटरी अॅडॅम्स् गव्हर्नर जनरलचे काम पाहू लागला. तो वृत्तपत्रस्वातंत्र्याच्या विरुद्ध होता. बकिंगहॅमला शिक्षा करण्याच्या हेतूने त्याने वृत्तपत्रनिर्बंधाचा कायदा संमत करून घेतला. त्या कायद्यान्वये कोणतेही वृत्तपत्र सुरू करण्यापूर्वी मुख्य चिटणिसाचा परवाना घ्यावा लागे व मॅजिस्ट्रेटपुढे शपथ घ्यावी लागे. या कायद्याविरुद्ध अर्ज करून राजा राममोहन राय यांनी तो रद्द करण्याची बरीच खटपट केली. पण त्यांना यश आले नाही. त्या कायद्याच्या जोरावरच अॅडॅम्सने बकिंगहॅमला हद्दपार केले. त्यानंतर लवकरच कलकत्ता जर्नलचा परवानाही रद्द करण्यात आला.

मुंबईच्या बाँबे गॅझेटचा संपादक सी. जे. फेअर याने न्यायालयावर टीका केली म्हणून त्याला हद्दपार करण्यात आले. इ. स. १८२७ साली मुंबई सरकारनेही वृत्तपत्रनिर्बंधाचा कायदा केला. तथापि या कालखंडात अनेक अँग्लो इंडियन पत्रे निघाली. सरकारने काही वृत्तपत्रांना मधूनमधून इशारे दिले, तरी त्यांचा विशेष परिणाम झाला नाही आणि सरकारने कडक धोरणही अवलंबिले नाही.

इ. स. १८२८ मध्ये लॉर्ड बेंटिंक गव्हर्नर जनरल झाला. त्याचे धोरण उदार असल्यामुळे अनेक नवीन वृत्तपत्रे उदयाला आली. इ. स. १८३० मध्ये भारतीय भाषांमध्ये १३ पत्रे होती.

त्या वेळी बंगालमध्ये ३३ इंग्लिश वृत्तपत्रे चालू होती. त्यानंतर तीन वर्षांत आणखी १९ वृत्तपत्रे निघाली. त्याच कालखंडात बाँबे गव्हर्नमेंट गॅझेट व कलकत्ता गॅझेट सुरू झाले. त्या कालखंडात वृत्तपत्रस्वातंत्र्यासंबंधी बराच ऊहापोह झाला. पुढे इ. स. १८३५ मध्ये सर चार्लस मेटकाफ याने वृत्तपत्रांवरील निर्बंध उठवले. त्यानंतर इ. स. १८५७ पर्यंत वृत्तपत्रांचे स्वातंत्र्य बरेचसे अबाधित राहिले.

मुंबई प्रांतात देशी भाषेतले पहिले पत्र मुंबई समाचार हे जुलै १८२२ मध्ये सुरू झाले. समाचार प्रेसचा मालक फर्दुनजी याने हे पत्र गुजरातीत सुरू केले. हे प्रथम साप्ताहिक होते. इ. स. १८३[illegible] साली ते दैनिक झाले. पण एका वर्षातच त्याचे पुन्हा साप्ताहिक करण्यात आले. पुढे इ. स. १८५५ मध्ये ते पुन्हा दैनिक झाले.

त्यानंतर गुजरातीत अनेक वृत्तपत्रे सुरू झाली. इ. स. १८३० मध्ये मुंबई वर्तमान हे पत्र नवरोजी दोराबजी चंदारू याने सुरू केले. इ. स. १८३३ मध्ये त्याचे नाव मुंबईना चाबूक असे बदलण्यात आले. इ. स. १८३२ मध्ये सनातनी पारशांचे मुखपत्र म्हणून पेस्तनजी माणेकजी मोटीवाला याने जामे जमशेद हे पत्र सुरू केले. इ. स. १८३८ साली नसरवानजी तेमुळजीने मुंबई दुर्बिण हे पत्र सुरू केले. त्यानंतर १८४९ मध्ये समाचार दर्पण, १८५[illegible] मध्ये चित्रज्ञान दर्पण व १८५१ मध्ये दादाभाई नवरोजी

रास्त गोफ्तार ही गुजराती पत्रे सुरू झाली. इ. स. १८५७ च्या बंडाच्या काळात अँग्लोइंडियन पत्रे व सरकारी मुस्कटदाबीचा कायदा यांच्या संयुक्त हल्ल्याला तोंड देऊन हिंदी लोकांची बाजू सांभाळण्याचे काम त्यांनी केले. त्यासाठी रास्त गोफ्तार व मुंबई समाचार या पत्रांत इंग्रजी लेखही छापण्यात आले.

मराठी वृत्तपत्रांचा उदय इ. स. १८३२ मध्ये प्रथम झाला. त्या वर्षी बाळशास्त्री जांभेकर यांनी दर्पण नावाचे वर्तमानपत्र सुरू केले. ते मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांत निघत असे. आधुनिक ज्ञान व चालू परिस्थितीची माहिती लोकांना देणे हा दर्पणाचा उद्देश होता. जातिभेद, स्त्रीशिक्षण, विधवाविवाह, धर्म, वाफेचे यंत्र, धूमकेतू, इ. विषयांवरचे लेख त्यात येत. श्रेष्ठ न्यायालयांचे निर्णय, सरकारी खात्यातील अफरातफर यांवरही लेख असत. हे पत्र इ. स. १८४० मध्ये बंद पडले. ते खूप लोकप्रिय व राजमान्य झाले होते. बाँबे नेटिव्ह ऑब्झर्वर नावाच्या मिशनरी पत्रातही त्याची प्रशंसा केलेली आढळते.

मुंबई अखबार हे पूर्ण मराठी पत्र इ. स. १८४०मध्ये निघाले. त्यात दर्पणाप्रमाणेच सर्व माहिती छापण्याचा उद्देश होता. पण ते लवकरच बंद पडले असावे. इ. स. १८४१ च्या ऑक्टोबरमध्ये प्रभाकर हे पत्र भाऊ महाजन यांनी सुरू केले. ते सुमारे २० वर्षे चालले. त्यात इतर वर्तमानपत्रांतील बातम्या, वाचकांची पत्रे, सरकारी अधिकाऱ्यांच्या नेमणुका व बदल्या, विचारप्रवर्तक लेख, इ. मजकूर असे. लोकहितवादींची शतपत्रे त्यातच प्रसिद्ध झाली. इंग्रजी राज्यपद्धतीवर टीका प्रभाकरातच प्रथम करण्यात आली.

इ. स. १८४२ मध्ये अहमदनगर येथील अमेरिकन मिशनने ज्ञानोदय सुरू केले. ते प्रथम मासिक होते, ते नंतर १८४५ पासून पाक्षिक झाले. पुन्हा १८७३ पासून ते साप्ताहिक रूपात निघू लागले. त्यात १८६६ पर्यंत इंग्रजी व मराठी लेख येत. नंतर १८६७–७२ केवळ मराठी व मग पुन्हा इंग्रजी-मराठी लेख येऊ लागले. ख्रिस्ती धर्माचा प्रचार हाच त्याचा मुख्य उद्देश होता. त्याचबरोबर हिंदू धर्मावर टीकाही केली जात असे.

पुण्यात पहिले इंग्रजी पत्र पूना ऑब्झर्वर हे मे १८५२मध्ये निघाले. या पत्राचा मालक दादाभाई बहिरामजी होता; तर पहिला संपादक चार्लस विल्यम ॲलन हा होता.

इ. स. १८४९ मध्ये ज्ञानप्रकाश हे पत्र निघाले. प्रथम ते साप्ताहिक होते. पण इ. स. १९०४ पासून दैनिक झाले. याच काळात इतर अनेक वृत्तपत्रे सुरू झाली. त्यातील ज्ञानसिंधू, चंद्रोदय, वर्तमानदीपिका, धूमकेतू, विचारलहरी, इ. पत्रे उल्लेखनीय आहेत.

या कालखंडात बंगालमध्ये अनेक नवी वृत्तपत्रे सुरू झाली होती. पण त्यांतील बरीच लवकर बंद पडली. इ. स. १८५२ मध्ये बंगालमध्ये एकूण १५-२० पत्रे चालू होती.

तमिळमधले पहिले वृत्तपत्र तमिळ मॅगेझिन इ. स. १८३१मध्ये रिलिजस ट्रॅक्ट सोसायटीने सुरू केले. ते ४-५ वर्षे चालले. इ. स. १८५५ मध्ये राजव्रिधी बोधिनी नावाचे पत्र निघाले. दिनवर्तमणी नावाचे साप्ताहिकही त्याचवेळी निघाले. त्याला सरकारी मदत मिळत होती. मद्रासमध्ये त्या वेळी एक तेलुगू, एक फारसी व एक फारसी-इंग्रजी अशी तीन पत्रे चालू होती. मलयाळम भाषेत विज्ञानम निक्षेपम नावाचे वृत्तपत्र इ. स. १८४० मध्ये सुरू झाले. ते कोट्टायम येथून प्रसिद्ध होत असे. ही वृत्तपत्रे मिशनरी लोकांनी सुरू केली होती.

उत्तर भारतात वरील कालखंडात काही उर्दू व फारसी वृत्तपत्रे सुरू झाली होती.

इ. स. १८३८ मध्ये मुंबईतील काही युरोपियन व्यापाऱ्यांनी एक कंपनी स्थापून बाँबे टाईम्स हे पत्र सुरू केले. सर जमशेटजी जीजीभाँय हे त्या कंपनीत होते. गव्हर्नर सर रॉबर्ट ग्रँट यांनी त्या पत्राला प्रोत्साहन दिले. प्रारंभी हे पत्र आठवडयातून दोनदा निघत होते. इ. स. १८५० मध्ये त्याचे दैनिकात रूपांतर करण्यात आले. इ. स. १८४० पासून १८५७ पर्यंत डॉ. बुइस्ट हे त्याचे संपादक होते.

इ. स. १८४६ साली बाँबे टेलिग्राफ अँड ईस्टर्न इंटेलिजन्स हे पत्र निघाले व क्युरिअर हे पत्र त्यात विलीन होऊन टेलिग्राफ अँड क्युरियर या संयुक्त नावाने पत्र निघू लागले.

या कालखंडातील वृत्तपत्रांत अग्रलेख किंवा दीर्घ लेख नसत. इंग्रजी पत्रांतील बातम्या भाषांतर करून दिलेल्या असत. क्वचित 'आमच्या पत्र लिहिणाऱ्यांकडून' आलेली बातमीपत्रे आढळतात. हवामान, पंचांग, बाजारभाव यांचाही आढळ होतो. वाचकांची पत्रे व त्यांना उत्तरे असत. पत्रकाराचे मतप्रदर्शन क्वचितच केलेले असे. सरकारी अधिकाऱ्यांच्या नेमणुका व बदल्या यांनी बरीच जागा अडवलेली असे. जाहिराती छापण्याची फारशी प्रथा नव्हती. बरीच वृत्तपत्रे शिळाछापाने छापली जात. वाचकवर्ग फारसा मोठा नव्हता. बहुतेक पत्रे त्या काळी साप्ताहिक निघत होती. वर्गणी बरीच असे.

इ. स. १८५७ मधील स्फोटक राजकीय परिस्थितीमुळे वृत्तपत्रांवर पूर्वीसारखे निर्बंध लादणे सरकारला आवश्यक वाटले आणि लॉर्ड कॅनिंगने १८२३ च्या कायद्याप्रमाणेच नवीन कायदा पास करून घेतला. त्याच्या अन्वये बंगाल हरकारूचा परवाना रद्द करण्यात आला होता. पण तो पुन्हा मिळाला. दुर्बिण, सुलतान – इ – अखबार, इ. काही पत्रांनाही त्याची झळ सोसावी लागली. मात्र बंगालच्या बाहेर कोणत्याही वृत्तपत्रावर त्या कायद्याचा बडगा उगारण्यात आला नाही. पण अँग्लोइंडियन

पत्रांनीच हिंदी पत्रांवर जोरदार हल्ला चढवला. बॉंबे टाइम्सचा संपादक बुइस्ट याने स्वातंत्र्ययुद्धात इंग्लिश लोकांची जी कत्तल झाली त्याबद्दल हिंदी लोकांविरुद्ध खूपच ओरड सुरू केली. मुंबई समाचार, जामे जमशेद व रास्तगोफ्तार या गुजराती पत्रांत त्याला सडेतोड उत्तरे देण्यात आली. त्यानंतर बुइस्टला बडतर्फ करण्यात आले. त्याच्या जागी आलेला रॉबर्ट नाइट याने हिंदी लोकांची बाजू उचलून धरली. मात्र त्या कालखंडात अँग्लोइंडियन वृत्तपत्रांत हिंदी लोकांसंबंधी जे कडवट लेख आले, त्यांमुळे ती वृत्तपत्रे व हिंदी वृत्तपत्रे यांच्यांत बराच बेबनाव उत्पन्न झाला आणि तो वाढतच गेला.

इ. स. १८५७ च्या प्रेस अॅक्टविरुद्ध अनेक जणांनी कोर्ट ऑफ डायरेक्टर्सकडे अर्ज-विनंत्या केल्या; पण त्यांचा काही उपयोग झाला नाही. युद्धानंतर एक वर्ष उलटल्यावर कंपनी सरकारच्या जागी राणीचे सरकार हिंदुस्थानवर राज्य करू लागले आणि त्याच्या उदार धोरणामुळे वृत्तपत्रांना थोडा दिलासा मिळाला.

त्या काळी बंगालमधील वृत्तपत्रांचा सरकारी धोरणांवर थोडासा प्रभाव पडू लागला होता. इ. स. १८५३ साली गिरीश चंदर घोष यांनी सुरू केलेले हिंदू पेट्रियट हे वृत्तपत्र त्या दृष्टीने विशेष उल्लेखनीय आहे. ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या शोमप्रकाश नामक साप्ताहिकात पुष्कळ उपयुक्त माहिती आणि राजकीय घटनांची चर्चा करणारे लेख असत. इ. स. १८६१ च्या ऑगस्टमध्ये मनमोहन घोष यांनी इंडियन मिरर नामक पाक्षिक सुरू केले. पुढे ते केशवचंद्र सेन यांनी चालवले. त्यांनीच त्याचे दैनिकात रूपांतर केले. सुलभ समाचार हे त्यांचे पत्रही चांगले चालले. त्यांनी सण्डे मिरर नावाचे साप्ताहिकही सुरू केले. इ. स. १८६८ मध्ये गिरीश चंदर घोष यांनी सुरू केलेले बेंगाली हे पत्रही त्यातील निर्भीड मतप्रतिपादनाबद्दल प्रसिद्ध होते. पुढे ते पत्र सुरेंद्रनाथ बानर्जी यांनी चालवले.

इ. स. १८६८ साली घोष बंधूंनी अमृतबझार पत्रिका सुरू केली. प्रारंभी ती पत्रिका अगदी लहान होती. घोष बंधूंनी अनेक संकटांना तोंड देऊन ती वाढवली. लोकजागृती करणे हेच त्यांचे उद्दिष्ट होते व ते काम त्यांनी निर्भयपणे व जिद्दीने केले.

इ. स. १८५८ मध्ये मुंबईत सुरू झालेले स्टॅंडर्ड हे पत्र १८५९ मध्ये बॉंबे टाइम्समध्ये विलीन झाले आणि १८६१ मध्ये टेलिग्राफ अॅंड क्युरियर हे संयुक्त पत्रही बॉंबे टाइम्समध्ये समाविष्ट करण्यात आले. या सर्वांचे मिळून झालेले टाइम्स ऑफ इंडिया वृत्तपत्र अजून चालू आहे. याच काळात अलाहाबादला पायोनियर, लाहोरला सिव्हिल अॅंड मिलिटरी गॅझेट व कलकत्त्याला स्टेट्स्मन ही तीन अँग्लोइंडियन पत्रे सुरू झाली. मद्रास मेल हे सायंकाळचे पहिलेच पत्र निघाले. त्यानंतर लवकरच हिंदू हे पत्र सुरू झाले. स्वातंत्र्ययुद्धाच्या काळात अनेक उर्दू पत्रे बंद पडली होती. त्यांच्या जागी आता नवी पत्रे सुरू झाली. इ. स. १८६१ मध्ये ११ उर्दू व ६ हिंदी पत्रे चालू होती. त्यांतील ८ पत्रे आग्रा येथे प्रसिद्ध केली जात होती.

इ. स. १८६७ साली छापखाने व वृत्तपत्रे यांच्यासंबंधी एक कायदा पास करण्यात आला. त्यात १८३५ च्या मेटकाफच्या कायद्यातील सर्व कलमे असून, छापील पुस्तकांच्या संबंधीही कलमे होती. त्यांत सर्व वृत्तपत्रांच्या व छापील पुस्तकांच्या प्रती सरकारकडे पाठवण्याचा आदेश होता. या कायद्यामुळे वृत्तपत्रांवर कसलेही बंधन आले नाही. सरकारला छापखाने व वृत्तपत्र यांची माहिती मिळावी, एवढाच त्याचा उद्देश होता.

मुंबईच्या टाइम्स ऑफ इंडियाचा संपादक रॉबर्ट नाइट याने इ. स. १८७२ साली कलकत्त्याला जाऊन इंडियन इकॉनॉमिस्ट हे मासिक सुरू केले. लवकरच बंगाल सरकारने त्याला शेतीखात्यात असि. सेक्रेटरी व अॅग्रिकल्चरल गॅझेट ऑफ इंडियाचा संपादक नेमले. इ. स. १८७४ मध्ये त्याने गव्हर्नर जनरलच्या धोरणावर टीका केल्यामुळे वृत्तपत्रस्वातंत्र्याचा प्रश्न पुन्हा उद्भवला. तेव्हा रॉबर्ट नाइटने सरकारी नोकरीचा राजीनामा दिला व स्टेट्स्मन हे पत्र सुरू केले.

त्यानंतर त्याने श्रीरामपूरच्या बॅप्टिस्ट मिशनने चालविलेले फ्रेण्ड्स ऑफ इंडिया हे पत्रही विकत घेतले. ही दोन पत्रे दोन वर्षे वेगळी चालू होती. इ. स. १८७७ साली फ्रेण्ड्स ऑफ इंडिया हे साप्ताहिक स्टेट्स्मनच्या परदेशी साप्ताहिक आवृत्तीत विलीन झाले. नाइटच्या निर्भीडपणामुळे व कार्यक्षमतेमुळे स्टेट्स्मनचा खूप प्रसार झाला. त्यावेळी इंडियन डेली न्यूज व इंग्लिशमन ही दोन अँग्लोइंडियन पत्रे होती. त्यांना या पत्राशी स्पर्धा करणे फार कठीण झाले.

मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेपासून मुंबईत उच्च शिक्षणाचा जो प्रसार होऊ लागला, त्यातून समाजसुधारणेची चळवळ उद्भवली आणि तिचा पुरस्कार करण्यासाठी इंदुप्रकाश हे पत्र इ. स. १८६२ मध्ये सुरू करण्यात आले. त्या वेळी नाव घेण्याजोगे ज्ञानप्रकाश हेच एक पत्र पुण्यात चालू होते. मुंबईत तसे पत्र नव्हते. लोकहितवादी, विष्णुशास्त्री पंडित, न्या. रानडे यांनी त्यासाठी बरीच खटपट केली.

इंदुप्रकाश इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांत निघत असे. प्रारंभी चार महिने न्या. रानडे इंग्रजी विभागाचे संपादक होते. ज. स. गाडगीळ हे मराठी संपादक होते. इ. स. १८६४ पासून विष्णुशास्त्री पंडित संपादक झाले. सर नारायणराव चंदावरकर यांनी काही वर्षे इंग्रजी विभागाचे संपादन केले. इंदुप्रकाशाला अनेक विद्वान संपादक लाभले. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे लेखही

त्यात छापले जात. त्यामुळे त्याला खूपच प्रतिष्ठा लाभली.

इ. स. १८६४ मध्ये रावसाहेब मंडलिक यांनी नेटिव्ह ओपिनियन हे इंग्रजी साप्ताहिक सुरू केले. १ जुलै १८६६ पासून त्यात मराठी मजकूरही देण्यात येऊ लागला. या कालखंडात आणखीही काही वृत्तपत्रे मराठीत निघाली. त्यांतील अरुणोदय, हिंदुपंच, सुबोधपत्रिका, किरण, दीनबंधू ही उल्लेखनीय होत. इ. स. १८७६–७७ च्या अहवालात मुंबई प्रांतातील देशी भाषांतील वृत्तपत्रांची संख्या ६५ च्या वर गेल्याचा उल्लेख आहे. त्यांतील ४० मराठी व २३ गुजराती होती.

त्या वेळी जी देशी भाषांतली पत्रे चालू होती, त्यांत सरकारविरोधी टीका येत असल्यामुळे त्यांच्या विरुद्ध उपाययोजना करण्याचे सरकारने ठरवले आणि इ. स. १८७८ साली व्हर्नाक्युलर प्रेस अ‍ॅक्ट पास करण्यात आला. त्याची आवश्यकता पटवण्यासाठी देशी भाषांतील १५० वृत्तपत्रांतील लिखाणांचे नमुने सरकारने प्रसिद्ध केले होते. त्यांत सरकारवर कडक टीका असली, तरी त्यांतून सरकारविषयी अप्रीती उत्पन्न झाली असती, असे वाटत नाही. केवळ जास्त सावधगिरी असावी म्हणून हा कायदा सरकारने केला होता. त्याला देशी वृत्तपत्रांनी खूप विरोध केला.

हा कायदा पास करण्याचे एक विशेष कारण होते, ते असे— इ. स. १८६८ मध्ये घोषबंधूंनी सुरू केलेली अमृतबझार पत्रिका मधली काही वर्षे बंद होती. इ. स. १८७४ मध्ये त्यांनी ती कलकत्त्यात पुन्हा सुरू केली. ती बंगाली भाषेत निघत असे. त्या पत्रिकेतील जोरदार टीकेमुळे सरकार अस्वस्थ झाले होते. त्या वेळच्या बंगालच्या ले. गव्हर्नरने शिशिर घोष यांना सरकारी कृपेचे आमिष दाखवून सरकारशी सहकार्य करण्यास सुचविले. पण शिशिरबाबूंनी स्पष्ट नकार दिला. त्यामुळे चिडून अमृतबझार पत्रिका नष्ट करण्याच्या दुष्ट हेतूनेच प्रेस अ‍ॅक्ट बनवण्यात आला, अशी आख्यायिका प्रचलित आहे. पण तो पास होण्यापूर्वीच घोषबंधूंनी पत्रिका इंग्रजीत छापण्यास प्रारंभ करून सरकारी बडगा चुकविला.

हा प्रेस अ‍ॅक्ट पास झाल्यानंतर देशी वृत्तपत्रांतील लिखाणात थोडा बदल झाला. मात्र त्यांत सरकारवर टीका चालू राहिली. तथापि त्या कायद्यान्वये कोणावरही खटला भरण्यात आला नाही. लवकरच लॉर्ड रिपन हा उदारमतवादी व्हाइसरॉय आला व त्याने १८७८ चा प्रेस अ‍ॅक्ट रद्द केला. मद्रासमध्ये मद्रास मेल, नेटिव्ह हेरॉल्ड, क्रेसेंट, नेटिव्ह पब्लिक ओपिनियन, मद्रासी, इ. काही पत्रे निघाली होती, पण ती अल्पजीवी ठरली. इ. स. १८७८ च्या प्रेस अ‍ॅक्टमुळे लोकांना चांगल्या वृत्तपत्राची उणीव भासू लागली. तेव्हा ट्रिप्लिकेन लिटररी सोसायटीच्या काही तरुण सभासदांनी हिंदू हे इंग्रजी साप्ताहिक सुरू केले. जी. सुब्रह्मण्य अय्यर व वीरराघवाचारियर या दोघा शाळामास्तरांनी ते कठीण परिस्थितीत बरेच दिवस चालवले. इ. स. १८८७ मध्ये मद्रास येथे राष्ट्रीय सभेचे अधिवेशन झाले, तेव्हा या पत्राचा खूप बोलबाला झाला. दोन वर्षांनंतर हे दैनिक झाले. पुढे इ. स. १९०५ साली कस्तूरीरंग अय्यंगार या कर्तबगार गृहस्थाने ते पत्र चालवायला घेऊन त्याचा खूप उत्कर्ष केला.

इ. स. १८९२ मध्ये जी. पी. पिलै नामक तरुणाने १८७७ मध्ये सुरू झालेल्या मद्रास स्टँडर्ड या अँग्लोइंडियन पत्राचे संपादकपद स्वीकारले व त्याचे दैनिकात रूपांतर केले. तो समाजसुधारक असूनही, त्याचे पत्र खूप लोकप्रिय झाले.

हिंदूचा सहसंपादक म्हणून काम करणारा करुणाकर मेनन याने ते पद सोडून इंडियन पेट्रियट हे वेगळे पत्र सुरू केले होते. ते काही वर्षे चांगले चालले व मग बंद पडले.

जी. सुब्रह्मण्य अय्यर यानेच इ. स. १८८२ मध्ये स्वदेशमित्रम हे तमिळ साप्ताहिक सुरू केले होते. इ. स. १८९९ मध्ये त्याने हिंदूचे संपादकपद सोडून दिले व स्वदेशमित्रमचे दैनिकात रूपांतर केले. त्यानंतर ते खूप लोकप्रिय झाले. सुब्रह्मण्य अय्यर याने वार्तावितरणाबरोबरच लोकशिक्षणाचे कार्यही चालू ठेवले आणि तमिळ भाषेचाही उत्कर्ष साधला.

इ. स. १८८१ ते १८८४ या चार वर्षांत बंगालमध्ये अनेक नवी वृत्तपत्रे सुरू करण्यात आली. त्यांतली इंडियन नेशन, होप, वंगवासी व संजीवनी ही विशेष उल्लेखनीय होत. वंगवासी व संजीवनी ही पैसापत्रे म्हणून बरीच वर्षे चांगली चालली. अमृतबझार पत्रिकेप्रमाणेच वंगवासीमध्येही सरकारवर कडक टीका केली जात असे.

इ. स. १८८९ साली सरकारने ऑफिशियल सीक्रेटस् अ‍ॅक्ट पास केला. त्या वेळी अनेक सरकारी अधिकारी अँग्लोइंडियन वृत्तपत्रे चालवीत आणि सरकारी गुप्त कागदपत्रांतील माहितीचा उपयोग करून लेख लिहीत. त्यांच्यासाठीच हा कायदा मुख्यतः केला होता.

विसाव्या शतकाच्या प्रारंभीची काही वर्षे बरीच खळबळीची गेली. अनेक क्रांतिकारक संस्था स्थापन झाल्या. सरकारी दडपशाहीमुळे लोक चिडले होते. बंगालच्या फाळणीमुळे सर्वत्र असंतोष धुमसत होता. अनेक वृत्तपत्रांत सरकारविरोधी चळवळीला प्रोत्साहन देणारे लेख येत होते. म्हणून १९०८ च्या जून मध्ये सरकारने एक कायदा करून बंडाला प्रेरणा देणाऱ्या पत्रांच्या संपादकांवर खटला भरण्याची तरतूद केली. त्या कायद्याप्रमाणे लगेच नऊ जणांवर खटले भरण्यात आले. आणि त्यांतील सात जणांना शिक्षा होऊन त्यांचे छापखाने जप्त करण्यात आले. त्या कायद्याच्या मागोमाग १९१० चा प्रेस अ‍ॅक्ट पास

झाला. त्या कायद्यान्वये ७०० हून अधिक वृत्तपत्रांकडून जामीन मागण्यात आला. तो भरता न आल्याने सुमारे ८० वृत्तपत्रे बंद पडली.

निरनिराळ्या प्रांतांतील वृत्तपत्रांची माहिती अशी–

**मुंबई** – विसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकात मुंबईत टाइम्स ऑफ इंडिया, दि बाँबे गॅझेट व ॲड्व्होकेट ऑफ इंडिया ही तीन ॲंग्लोइंडियन पत्रे चालू होती. ॲड्व्होकेट ऑफ इंडिया हे पत्र १८८८ मध्ये फिरोजशहा मेहता यांनी पुन्हा सुरू केले होते. कैसर–इ–हिंद हे ॲंग्लोगुजराती व ओरिएंटल रिव्ह्यू हे इंग्लिश अशी दोन साप्ताहिके होती. फिरोजशहा मेहतांनी १९१३ च्या मार्चमध्ये बाँबे क्रॉनिकल हे पत्र सुरू केले. बेंजामिन हॉर्निमन हा त्याचा संपादक अत्यंत कर्तबगार होता. त्याचे लिखाण जेम्स बकिंगहॅमच्या लिखाणासारखेच स्फोटक होते. सरकारवर आणि उजव्या उदारमतवादी लोकांवर तो कडक टीका करीत असे. बाँबे क्रॉनिकलमध्येच पंजाबात १९१९ साली झालेल्या अत्याचारांची माहिती दिली गेली; तेव्हा लेखक लाला गोवर्धनदास याला तीन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा झाली. हॉर्निमन याने अमृतसर येथील अत्याचारासंबंधी लिहिले तेव्हा त्याला हद्दपार करून इंग्लंडला परत पाठवण्यात आले.

**बिहार** – बिहारमध्ये इ. स. १८६० नंतर अनेक हिंदी व उर्दू पत्रे निघाली. इ. स. १८८० च्या सुमारास बिहार हेरॉल्ड हे इंग्लिश पत्र निघाले. १८८१ मध्ये इंडियन क्रॉनिकल, १८९४ मध्ये बिहार टाइम्स आणि काही वर्षांनी बिहार गार्डियन ही पत्रे सुरू झाली. १९१८ मध्ये आधुनिक बिहारचे निर्माते सच्चिदानंद सिंह यांनी सर्चलाइट हे राष्ट्रीय वृत्तपत्र सुरू केले. दरभंगा संस्थानच्या महाराजांनी १९३० मध्ये इंडियन नेशन हे पत्र सुरू केले. प्रदीप हे सर्चलाइटचे हिंदी भावंड असून, आर्यावर्त हे इंडियन नेशनचे हिंदी भावंड आहे.

**बंगाल** – या कालखंडात बंगालमधील पत्रांत अमृतबझार पत्रिका प्रमुख स्थानी होती. सुरेंद्रनाथ बानर्जी यांचे बेंगाली हे पत्रही आघाडीवर होते. त्या दोन पत्रांत सतत वाद चाले. बेंगाली हे नेमस्त पक्षाच्या विचारांचा पुरस्कार करणारे पत्र मानले जात होते. नायक हे त्यांचे बंगाली भावंड होते. पण लवकरच बेंगाली हे पत्र बंद झाले.

नवशक्ती हे दैनिक मनोरंजन गुह यांनी १९०६ साली सुरू केले. नायक हे बानर्जींनी १९०८ साली सुरू केले. १९१४ मध्ये वसुमती हे पत्र सुरू झाले. हेमेंद्र प्रसाद घोष हे त्याचे संपादक होते. १९२२ साली मृणालकांती घोष, प्रफुल्लकुमार सरकार व सुरेशचंद्र मजुमदार यांनी आनंदबझार पत्रिका बंगालीत सुरू केली. मजुमदार हे तिचे संपादक होते.

अमृतबझार पत्रिकेप्रमाणेच ही पत्रिकाही लोकप्रिय झाली.

इ. स. १९२० मध्ये श्यामसुंदर चक्रवर्तींनी सर्व्हंट हे पत्र सुरू केले. ते म. गांधींच्या नाफेर पक्षाचे होते. चक्रवर्तींनी खूप धडपड करून ते बरीच वर्षे चालवले. चित्तरंजनदास यांचे फॉवर्ड हे पत्र १९२३ मध्ये सुरू झाले तेव्हा सर्व्हंट मागे पडले, तरी चक्रवर्ती यांनी ते चालू ठेवले होते.

**उत्तर प्रदेश** – इ. स. च्या १९ व्या शतकाच्या शेवटच्या दशकात लखनऊला ॲड्व्होकेट हे इंग्लिश पत्र सुरू झाले. बिशन नारायण धर व अंबिकाचरण मजुमदार हे याचे संपादकद्वय पुढे राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष झाले. हे दोघेही खंदे लेखक व वक्ते होते. त्यामुळे त्यांचे पत्र राजकीय चळवळीचे प्रभावी साधन ठरले. पण राष्ट्रीय सभेत दुफळी झाली तेव्हा अंबिकाचरण मजुमदार नेमस्त पक्षात गेल्यामुळे ते पत्र लवकरच बंद झाले. इंडियन डेली टेलिग्राफ हे लखनऊचे इंग्लिश पत्र काही वर्षे चालून बंद पडले.

पं. मदनमोहन मालवीय यांनी १९०९ च्या ऑक्टोबरात लीडर हे इंग्लिश पत्र अलाहाबादला सुरू केले. प्रथम तेच संपादक होते. नंतर सी. वाय. चिंतामणी हे त्या पत्राचे संपादक झाले. इ. स. १९०३ साली नगेंद्रनाथ गुप्त यांनी अलाहाबाद येथे इंडियन पीपल नावाचे साप्ताहिक सुरू केले होते. लीडर हे पत्र सुरू झाले तेव्हा इंडियन पीपल हे त्यात विलीन करण्यात आले व गुप्त हाच त्याचा संपादक झाला. पण लवकरच त्याने ते पद सोडले व लाहोरच्या ट्रिब्यूनचे संपादकत्व स्वीकारले.

चिंतामणी यांनी लीडरची धुरा उत्तम प्रकारे वाहिली. लीडर हे सर्व देशात एक प्रमुख पत्र मानले जात होते. काँग्रेसमधील उजव्या पक्षाचे ते मुखपत्रच होते. पं. मोतीलाल नेहरू हे लीडरचे एक संपादक होते. त्यांना ॲनी बेझंट व म. गांधी यांचे पुरोगामी धोरण पसंत होते; पण चिंतामणी लिबरल पक्षाचे होते. तेव्हा मोतीलाल नेहरूंनी इंडिपेंडंट हे नवे पत्र सुरू केले. बाँबे क्रॉनिकलचे हॉर्निमन हे त्यांच्या मदतीला आले. पण ते पत्र थोडी वर्षे चालून बंद पडले.

लीडरच्या उत्कर्षामुळे पायोनियरची स्थिती खालावली. पायोनियरचे सरकारी अधिकाऱ्यांशी घनिष्ठ संबंध असल्यामुळे फक्त त्यात काही महत्त्वाच्या बातम्या प्रसिद्ध होत; पण असोसिएटेड प्रेस ऑफ इंडियाच्या द्वारे सर्व वार्तावितरण सुरू झाल्यामुळे ती मक्तेदारी नष्ट झाली. कलकत्त्याचे स्टेट्स्मन व मुंबईचे टाइम्स ऑफ इंडिया या पत्रांचा खप सर्व भारतात खूप वाढला होता. त्यामुळेही पायोनियरचा खप कमी झाला. पुढे त्या पत्राचे धोरण डाव्या पक्षाकडे झुकले व त्याची किंमत कमी करण्यात आली. तेव्हा खप पुन्हा वाढला.

नॅशनल हेरॉल्ड हे पत्र इ. स. १९३८ साली सुरू झाले. पं. जवाहरलाल नेहरू त्याच्या संचालकमंडळाचे अध्यक्ष होते. ते काँग्रेसचे मुखपत्र नसले, तरी काँग्रेसच्या ध्येयधोरणाचाच पुरस्कार करीत होते. युद्धकाळात त्याच्यावर अनेकदा संकटे आली. पण त्यांतून ते पार पडले. ते खूप लोकप्रिय होते. इ. स. १९४२ च्या ऑगस्टमध्ये मात्र सरकारने त्याचे कार्यालय बंद केले व ते पत्र बंद पडले. पुढे १९४५ मध्ये ते पुन्हा सुरू झाले.

गांधीजींना १९४२ मध्ये अटक झाल्यानंतर त्यांनी असे उद्‌गार काढले, की कडक निर्बंधाखाली वर्तमानपत्र चालविण्यापेक्षा ते न चालवणेच बरे. त्यामुळे काही पत्रे बंद करण्यात आली; पण बरीच चालू राहिली. बंद करण्यात आलेलीही १९४३ मध्ये पुन्हा सुरू झाली.

**पंजाब** – इ. स. १८८१ मध्ये लाहोरचे ट्रिब्यून हे पत्र सरदार दयालसिंग मथीजिया यांनी सुरू केले होते. शीतलकांत चटर्जी त्याचे संपादक होते. विपिनचंद्र पाल इ. स. १८८७ मध्ये उपसंपादक झाले. त्यामुळे ते पत्र बरेच लोकप्रिय झाले. पण १८८८ मध्ये त्यांनी राजिनामा दिला. इ. स. १९१७ मध्ये कालिनाथ राय संपादक झाले. ते निर्भीड व स्वतंत्र बाण्याचे असल्यामुळे ट्रिब्यूनची कीर्ती वाढली. त्यांच्या लिखाणाला पंजाब सरकार, दिल्लीचे केंद्र सरकार व ब्रिटनचे सरकारही मानीत होते. ते पत्र त्यांनी १९४५पर्यंत चालविले. इ. स.१९४७मध्ये देशाच्या फाळणीनंतर त्या पत्राचे सिमल्याला व नंतर १९४८ मध्ये अंबाल्याला स्थलांत करण्यात आले.

**मद्रास** – ॲनी बेझंट यांनी १९१४ च्या जुलैत मद्रास स्टँडर्ड हे पत्र विकत घेऊन ते न्यू इंडिया या नावाने चालू केले. त्यात होमरूलचा पुरस्कार केला गेला. त्यात सरकारवर प्रखर टीका केली जात असल्यामुळे ते बरेच लोकप्रिय झाले. पण त्यात गांधीजींच्या असहकाराच्या चळवळीवर टीका सुरू झाल्यानंतर त्याचा खप कमी झाला. या पत्राच्या प्रसारामुळे करुणाकर मेनन यांच्या इंडियन पेट्रियटचा खप कमी झाला होता.

इ. स.१९१५ मध्ये जस्टिस पार्टी हा ब्राह्मणेतरांचा पक्ष उदय पावला व त्याने जस्टिस हे पत्र सुरू केले. ए. रामस्वामी मुदलियार हे त्याचे संपादक असताना त्याचा खूप उत्कर्ष झाला. पण नंतर ते बंद झाले. १९४२ मध्ये लिबरेटर हे पत्र सुरू झाले. डॉ. कृष्णस्वामी मुदलियार हे त्याचे संपादक होते. तेही १९५३ पर्यंत चालले.

इ. स. १९२० मध्ये गांधीजींची चळवळ सुरू झाली, तेव्हा काँग्रेसला एका वृत्तपत्राची आवश्यकता वाटू लागली. हिंदू पत्र राष्ट्रीय विचार प्रसृत करीत असले, तरी ते स्वतंत्र होते. इ. स. १९२२ साली टी. प्रकाशम यांनी स्वराज्य हे पत्र सुरू केले. प्रारंभी ते खूप लोकप्रिय झाले. पण ५–६ वर्षांतच ते बंद पडले.

बंगालमध्ये चित्तरंजन दास यांनी सुरू केलेले फॉवर्ड हे पत्र त्यांच्या मृत्यूनंतर नीट चालेनासे झाले व १९२९ साली बंद पडले. त्यानंतर काही वर्षांनी जे. एम. सेनगुप्त यांनी अॅडव्हान्स हे पत्र सुरू केले. ते चांगले चालले आहे. विश्वामित्र हे त्याचे बंगाली भावंड होय.

इ. स. १८९९ मध्ये रवींद्रनाथ ठाकूर यांनी साधना हे पत्र सुरू केले. सुरेंद्रनाथ ठाकूर हे त्याचे संपादक होते. सच्चिदानंद सिंह यांनी कायस्थ सम्माचार हे इंग्रजी साप्ताहिक अलाहाबादला सुरू केले होते. रामानंद चटर्जी त्याचे संपादक होते. लवकरच त्याचे नाव हिंदुस्थान रिव्ह्यू असे ठेवण्यात आले. इ. स. १९२५ मध्ये त्याचे कलकत्त्याला स्थलांतर झाले. पुढे ते पाटण्याला नेण्यात आले व सच्चिदानंद सिंह हे त्याचे संपादक झाले.

इ. ल. १९०० साली जी. ए. नटेशन यांनी मद्रासला इंडियन रिव्ह्यू सुरू केले. रामानंद चटर्जींनी प्रवासी सुरू केले वर्षांनंतर त्यांनीच मॉडर्न रिव्ह्यू सुरू केले.

देशी भाषांतील वृत्तपत्रे –

**आसामी** – इ. स. च्या १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात प्रथम साप्ताहिके व मग दैनिके मिशनरी लोकांनी काढली. दैनिक बटोरी जोरहाटहून थोडे दिवस चालू होते. नंतर दैनिक असमिया व आसाम ट्रिब्यून ही पत्रे निघाली. दै. असमिया १९५० पर्यंत चालू होते. मग नूतन असमिया सुरू झाले.

इतर नियतकालिकांपैकी विशेष उल्लेखनीय म्हणजे टाइम्स ऑफ आसाम – दिब्रुगड, इंग्लिश (बंद). अस्सामिया – सर्वांत जुने साप्ताहिक. देक अस्मेन – गौहाटी, असोन सेवक – तेजपूर. श्रमिक – दिब्रुगड आणि जन्मभूमी – जोरहाट.

जुगावेरी आसाम हेरॉल्ड – सिल्हेट. क्रॉनिकल, जनशक्ती, जुगशक्ती, वसुमती ही साप्ताहिके (बंगालजवळच्या भागात).

**बंगाली**– आनंदबझार पत्रिकेशी संबंधित पत्र हिंदुस्थान स्टँडर्ड (इंग्लिश) प्रथम १९३७. देश – साप्ताहिक, सुरेश मजुमदार संपादक. बंगाली साप्ताहिक आत्मशक्ती १९२६ व दैनिक बंगलार कथा इ. स. १९२७ ही फॉरवर्डशी संबंधित पत्रे. तीन्ही १९२९ साली बंद. कारण फॉरवर्डमध्ये ई. इं. रेल्वेची बदनामी करणारा लेख छापला म्हणून दंड झाला. पण त्याच वर्षी तीन्ही पत्रे लिबर्टी, बंगवाणी व नवशक्ती या नावांनी पुन्हा सुरू करण्यात आली. इ. स. १९३३ साली लिबर्टी बंद पडून फॉर्वर्ड या नावाने ते पुन्हा सुरू झाले.

इ. स. १९३७ मध्ये आनंदबझार पत्रिकेच्या चालकांनी हिंदुस्थान स्टँडर्ड हे इंग्लिश पत्र सुरू केले व अमृतबझार पत्रिकेच्या चालकांनी युगांतर हे बंगालीत सुरू केले. इ. स. १९४३

पासून अमृतबझार पत्रिका अलाहाबाद येथूनही इंग्लिशमध्ये प्रसिद्ध होऊ लागली व १९५० पासून अमृत पत्रिका हे हिंदी दैनिक सुरू झाले.

इ. स. १९३९ मध्ये भारत हे दैनिक माखनलाल सेन यांनी व कृषक हे दैनिक कृषक प्रजापक्षाने सुरू केले. इ. स. १९४१ मध्ये ए. के. फझलुल हक यांनी बंगालीत नवयुग सुरू केले; तर १९४६ मध्ये कम्युनिस्ट पक्षाचे मुखपत्र स्वाधीनता व सत्येंदरनाथ मजुमदारांचे स्वराज्य ही पत्रे सुरू झाली.

कलकत्त्याला आझाद नावाचे बंगाली दैनिक १९३६ साली मौ. आक्रमखान यांनी व इत्तेहाद हे दैनिक १९४७ मध्ये सुन्हा-वर्दी यांनी सुरू केले होते. श्रमिक ट्रस्ट सोसायटीने १९४८त लोकसेवक, संपादक चक्रवर्ती व अतुल्य घोष यांनी जनसेवक ही पत्रे सुरू केली. टाइम्स ऑफ इंडियाच्या चालकांनी १९४९मध्ये सत्ययुग सुरू केले ते १९५३ मध्ये बंद पडले.

**गुजराती** – खेडा वर्तमान (खेडा जिल्ह्यात १८६१पासून) व सुरत मित्र (गुजरात मित्र) (१८६३ पासून) ही दैनिके व गुजराती हे साप्ताहिक (१८८० –१९५३ पर्यंत) मुंबईला; देश-मित्र – सुरत (१८७३ – १९५०) कैसर – इ – हिंद साप्ताहिक (१८८० – चालू मुंबई), काठियावार टाइम्स १८८८ पासून चालू – राजकोट, प्रजाबंधू (गुजरात समाचार – अहमदाबाद, सयाजी विजय (१८९५ ते १९५४) बडोदे, गुजरात पंच (१९०१ – १९५०) अहमदाबाद, सांजवर्तमान मुंबई (१९०२ – १९५०) सायं-पत्र.

रणछोडदास लोटवाला यांनी अखबार – ए – सौदागर हे पत्र विकत घेऊन १९१३ मध्ये त्याला हिंदुस्थान हे नाव दिले. संपादक – रतनलाल शहा – समाजसुधारणेचा पुरस्कार केला. लोटवाला यांनी अॅड्व्होकेट ऑफ इंडिया हेही घेतले – संपा. इंदुलाल याज्ञिक. प्रजामित्र – समाजसुधारणा. पुढे ही दोन पत्रे हिंदुस्थान प्रजामित्र या संयुक्त नावाने लोटवालांनी चालू ठेवली. अॅड्व्होकेट मात्र लवकरच बंद पडले.

लोटवाला प्रारंभी गांधींना पाठिंबा देत. पुढे ते विठ्ठलभाई पटेलांच्या कौन्सिलप्रवेशवादी पक्षाला पाठिंबा देऊ लागले. हिंदुस्थान प्रजामित्रात गांधींच्या चळवळीवर टीका म्हणून खप कमी. इ. स. १९४० पासून ते साप्ताहिक झाले. काही वर्षांनी बंद.

इंदुलाल याज्ञिक यांचे नवजीवन हे मासिक गांधीजींनी घेऊन साप्ताहिक केले. त्यात त्यांनी सत्य-अहिंसा-सत्याग्रहाचा प्रचार केला. दलितांचा उत्कर्ष, आंतरजातीय विवाह, हिंदु-मुस्लिम ऐक्य यावर जोर दिला. सुधारणावादी असूनही त्याचा खूप प्रसार झाला आणि गुजराती व गुजराती पंच ही मागे पडली; तसेच १९३२-मध्ये नवजीवनचे हरिजन बंधू झाले. १९४० ते १९४६ हरिजन गटाची पत्रे सरकारी कायद्याच्या निषेधार्थ बंद होती ती पुन्हा सुरू झाली.

अमृतलाल सेठ यांनी १९२१ मध्ये सौराष्ट्र हे साप्ताहिक रणपूरहून सुरू केले. त्यांनी १९४३ मध्ये जन्मभूमी हे गुजराती दैनिक सुरू केले. ते चांगले चालू आहे. १९४१ मध्ये सामळदास गांधी यांनी वंदेमातरम सुरू केले.

इ. स. १९२१ मध्ये नंदलाल बोडिवाला यांनी स्वराज्य पत्र सुरू केले. पण ते दोन वर्षांत बंद पडले. मग त्यांनी संदेश हे सायंदैनिक सुरू केले. १९३७पर्यंत त्याची किंमत १ पैसा होती. अहमदाबाद समाचार हे प्रतिस्पर्धी पत्र त्यांनी विकत घेतले. पुढे संदेश सकाळचे दैनिक झाले. १९४३मध्ये त्यांनीच सेवक हे सायं-दैनिक सुरू केले.

लोक प्रकाशन लि. ची गुजरात समाचार दैनिक, लोकनाद सायंदैनिक व प्रजाबंधू हे साप्ताहिक चालू आहे. काकलभाई कोठारी यांचे प्रभात दैनिक, नवसौराष्ट्र साप्ताहिक व कुमार मासिक चालू आहे.

सुरतेला दोन दैनिके – समाचार १९२२ मध्ये एम्. आर. विद्यार्थी यांनी सुरू केले. गुजराती १९२१ मध्ये रमणलाल छोटूभाई देसाई यांनी सुरू केले.

बडोदे – सयाजी विजय १८९५ हे पासूनचे साप्ताहिक १९५० मध्ये दैनिक झाले.

जय गुजरात १९४२ मध्ये सुरू. राजकोटला जयहिंद, नूतन सौराष्ट्र व फुलछाब ही तीन दैनिके आहेत. भूज येथे आझाद कच्छ, कच्छ मित्र व जय कच्छ ही तीन दैनिके आहेत.

गुजराती पत्रे कलकत्ता, पुणे, मद्रास या शहरांतही निघतात. त्यांतील बहुतेक चांगली चालतात.

**हिंदी** –गेल्या शतकाच्या पूर्वार्धात उत्तर भारतात काही वृत्तपत्रे उर्दू व हिंदी अशी मिश्र स्वरूपाची निघत होती. पूर्ण हिंदी वृत्तपत्रे उत्तरार्धात निघू लागली. इ. स. १८६७ मध्ये जम्मू येथे वृत्तांत वितास, सिकंदराबाद येथे ज्ञानदीपक व बनारसला कवि-वचनसुधा ही हिंदी वृत्तपत्रे चालू होती. कवि-वचन सुधाचे संपादक भारतेन्दू हरिश्चंद्र हे होते. त्यांच्या प्रभावी लेखनामुळे हिंदी वृत्तपत्रव्यवसायाला स्थिरता लाभली. त्यानंतर अनेक चांगली हिंदी वृत्तपत्रे सुरू झाली होती, पण ती थोड्या वर्षांत बंद झाली. भारतमित्र हे इ. स. १८७७ मध्ये सुरू झालेले साप्ताहिक मात्र इ. स. १९३७ पर्यंत चालू होते, पण ते सरकारी दडपशाहीमुळे बंद करावे लागले. इ. स. १८८४ मध्ये रामकृष्ण वर्मा यांनी भारतजीवन हे पत्र सुरू केले ते १९१३ मध्ये बंद पडले.

इ. स. १८८४ ते १८९४ या दहा वर्षांत सुमारे १५० वृत्तपत्रे व कालिके सुरू झाली.. त्यांतील बहुतेक धार्मिक व सामा-

जिक विषयांवरील लेख छापीत. अगदी मोजक्या वृत्तपत्रांत राजकीय लेख असत. चालू शतकाच्या पहिल्या दोन दशकांतही हिंदी वृत्तपत्रांत मुख्यतः सामाजिक, धार्मिक व साहित्यविषयक लेख असत. राजकीय लेख अगदी थोड्या वृत्तपत्रांत येत. हिंदी प्रदीप, हिंदी केसरी, कर्मयोगी, अभ्युदय, प्रताप व ज्ञानशक्ती ही त्या दृष्टीने विशेष उल्लेखनीय होत.

पहिले महायुद्ध सुरू झाले तेव्हा अनेक साप्ताहिके दैनिक स्वरूपात निघू लागली. कलकत्ता समाचार, अभ्युदय, श्रीवेंकटेश्वर समाचार (मुंबई), हिंदी बिहारी (पाटणा), जयाजी प्रदीप (ग्वाल्हेर) ही दैनिके झाली; पण १९१७ नंतर त्यांतली काही पुन्हा साप्ताहिके झाली. महावीरप्रसाद द्विवेदी व बालमुकुंद गुप्त हे त्या काळातले पत्रकार विशेष गाजले. वृत्तपत्रलेखन व हिंदी भाषा दोन्ही त्यांच्यामुळे समृद्ध झाली. द्विवेदींचे सरस्वती हे मासिक फार लोकप्रिय होते. त्यांनी खडी बोलीचा खूप पुरस्कार केला. बालमुकुंद हे कलकत्त्याच्या भारतमित्राचे संपादक झाल्यापासून ते प्रमुख हिंदी पत्र ठरले.

इ. स. १९२० साली अंबिकाप्रसाद वाजपेयी यांनी स्वतंत्र हे पत्र सुरू केले आणि श्रीप्रकाश यांनी बनारस येथे आज सुरू केले. इ. स. १९२० व १९३० च्या कायदेभंग चळवळीला पाठिंबा दिल्यामुळे स्वतंत्र हे पत्र खूप लोकप्रिय झाले. इ. स. १९२३मध्ये बाबूराव पराडकर हे आजचे संपादक झाले तेव्हापासून ३० वर्षे ते संपादक होते. त्यांच्यामुळे त्या पत्राला फार मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली.

स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वी बरीच हिंदी वृत्तपत्रे सुरू झाली. त्यांतील काही प्रमुख पत्रांची नावे – सैनिक (आग्रा १९२८), शक्ती (लाहोर १९३०), प्रताप (कानपूर), नवयुग (दिल्ली), नवराष्ट्र (मुंबई), भारत (अलाहाबाद, १९३३), लोकमत (नागपूर १९३१), लोकमान्य (कलकत्ता १९३०), वर्तमान (कानपूर १९२०), विश्वामित्र (कलकत्ता १९१७, मुंबई १९४१, दिल्ली १९४२), नवभारत (नागपूर १९३४), अधिकार (लखनौ १९३८), अग्रगामी (काशी १९३८), उजाला (आग्रा १९४०), आर्यावर्त (पाटणा १९४२), इंदोर समाचार (इंदोर १९४३), राष्ट्रवाणी (पाटणा १९४२), संसार (काशी १९४३), नया हिंदुस्थान (दिल्ली १९४४), जयहिंद (जबलपूर १९४६), संग्राम (काशी व कलकत्ता १९४६).

**मराठी** – १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात मराठीत बरीच वृत्तपत्रे निघाली. त्यांतली इंदुप्रकाश, नेटिव्ह ओपिनियन, विविध ज्ञानविस्तार, अरुणोदय, दीनबंधू, केसरी, सुधारक, वार्ताहर, काळ, प्रभाकर, इ. वृत्तपत्रे विशेष उल्लेखनीय होत. लोकमान्य टिळकांच्या केसरीने महाराष्ट्रातील वृत्तपत्रव्यवसायाला वेगळेच वळण लावले. बहुतेक सर्व वृत्तपत्रे ज्ञानप्रसार व समाजात जागृती करण्याच्या उद्देशाने निघाली. तथापि केसरीकारांच्या समोर विशिष्ट ध्येय होते. लोकांत राजकीय जागृती उत्पन्न करून स्वातंत्र्यासाठी चळवळी करायला लोकांना उद्युक्त करावे, ही त्यांची आंतरिक तळमळ होती. 'लोकांत जागृती, कळकळ व संघशक्ती उत्पन्न करणे हेच वर्तमानपत्रकार या दृष्टीने आमचे मुख्य कर्तव्य आम्ही समजतो,' असे त्यांनी एका लेखात म्हटले आहे. त्या उद्देशानेच त्यांनी केसरीत लेख लिहिले आणि त्यामुळेच ते भारतीय असंतोषाचे जनक ठरले. केसरीतील राजकीय लेखांमुळे महाराष्ट्रात अल्पावधीत राष्ट्रीय विचारांची अभूतपूर्व जागृती झाली. 'काळ' कर्ते शिवरामपंत परांजपे यांची कामगिरीही त्या दृष्टीने चिरस्मरणीय आहे.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात मराठी वृत्तपत्रव्यवसाय खूपच वाढला. त्यात अनेक नामवंत पत्रकार निर्माण झाले. (मराठी भाषा व साहित्य पाहा)

**कन्नड** – या भाषेतील पहिले वर्तमानपत्र बंगलोर येथे इ. स. १८६५ मध्ये सुरू झाले. कर्नाटक प्रकाशिका हे त्याचे नाव. त्याचे संपादक पंडिती पद्धतीचे गद्य लिहीत. इ. स. १८८० ते १९०८ या कालखंडात अनेक वृत्तपत्रे उदयाला आली. देशाभिमानी हे त्यांतले प्रमुख वृत्तपत्र होते. पण म्हैसूरचे दिवाण सर के. शेषाद्री अय्यर यांनी काही कारणांनी ते बंद केले. वेंकटकृष्णय्या यांनी मैसोर हेरॉल्ड हे इंग्लिश व वृत्तांत चिंतामणी हे कन्नड अशी दोन पत्रे सुरू केली. श्रीनिवास अय्यंगार यांनी मडगन्नडी हे कन्नड साप्ताहिक सुरू केले, ते मैसोर स्टँडर्ड या पत्राशी संबंधित होते. इ. स. १९१२मध्ये सर विश्वेश्वरय्या हे म्हैसूरचे दिवाण झाल्यानंतर कन्नड वृत्तपत्रांना चांगले दिवस आले. त्यांच्या उदार धोरणामुळे तो व्यवसाय स्थिरावला. सर मिर्झा इस्माइल हे दिवाण असतानाही बरीच दैनिके सुरू झाली व त्यांतली अनेक दीर्घ काळपर्यंत चालू राहिली.

बंगालच्या फाळणीविरुद्ध जी चळवळ सुरू झाली होती, तिच्यामुळे कर्नाटकातही वृत्तपत्रांना तेजी आली होती. इ. स. १९०७ साली डॉ. हर्डीकरांनी लो. टिळकांच्या केसरीचे भाषांतर करून कन्नड केसरी हे पत्र हुबळीहून सुरू केले. कंठरव आणि स्वदेशाभिमानी ही साप्ताहिके दीर्घ काळ चालली. नवभारत हे कन्नड दैनिक आणि प्रभात व राष्ट्रमत ही साप्ताहिकेही चालू आहेत. कर्नाटक–वैभव हे साप्ताहिक पत्र विजापूरला इ. स. १८९२ मध्ये सुरू झाले. तेही दीर्घ काळ चालले. राजहंस नावाचे दैनिक धारवाडला इ. स. १८८५ पासून १९२२ पर्यंत चालू होते. इ. स. १९०१ साली कर्नाटकवृत्त हे साप्ताहिक पत्र कृष्णराव मुडवेडकरांनी सुरू केले, ते १९३६ पर्यंत चालू होते.

इ. स. १९२१ मध्ये श्री. रंगराव दिवाकर व श्री. हुकेरीकर यांनी कर्मवीर नावाचे साप्ताहिक पत्र सुरू केले. तेही दीर्घ काळ चालू राहिले. इ. स. १९२४ साली संयुक्त कर्नाटक हे साप्ताहिक बेळवी, जोशी व दातार यांनी बेळगावला सुरू केले. ते १९३३ मध्ये दैनिक रूपांत निघू लागले.

१९४७ मध्ये विशाल कर्नाटक व नवयुग ही दैनिके हुबळी येथे सुरू झाली.

इ. स. १९३७ साली डॉ. हर्डीकर यांनी हुबळी गॅझेट सुरू केले. त्याला १९४७ साली जयहिंद नाव देण्यात आले.

**मलयाळम** – इ. स. १८७६ मध्ये सुरू झालेले साप्ताहिक सत्यानंदम हे दीर्घ काळ चालू राहिले. इ. स. १८८४ मध्ये सी. के. मेनन यांनी कालिकत येथे केरळ पत्रिका हे राजकीय वृत्तपत्र सुरू केले. त्यातील लेख उच्च दर्जाचे असत. त्याच वेळी केरळसंचारी व मनोरमा ही दोन साप्ताहिके सुरू झाली. के. आर. पिल्ले हे एक निर्भीड लेखक त्या काळात गाजले. त्यांनी केरळमध्ये राजकीय जागृती घडवून आणली. त्यांच्या प्रेरणेमुळे सरकारच्या दडपशाहीला लोक प्रतिकार करू लागले, म्हणून १९१० साली त्यांना त्रावणकोरमधून हद्दपार करण्यात आले.

इ. स. १८७५ च्या सुमारास मलयाल मनोरमा हे दैनिक कोट्टायम येथे सुरू झाले, ते दीर्घ काळ चालू राहिले. त्यात प्रसिद्ध व्यक्तींचे उत्तम लेख येत असत. त्यानंतरच्या कालखंडात मलयाळी, कयन कौमुदी, नस्रनी दीपिका, केरळ केसरी, योगक्षेमम, देशाभिमानी, इ. अनेक पत्रे व कालिके निघाली. स्वातंत्र्यसंग्रामामुळे अनेक नवीन वृत्तपत्रे सुरू झाली, त्यांतील मातृभूमी हे विशेष उल्लेखनीय आहे. ते १९२३ मध्ये सुरू झाले व फार लोकप्रिय झाले. स्वराट, अलअमीन, मलयल राज्यम, दीनबंधू व केरळ कौमुदी ही पत्रेही त्या काळी गाजली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर जी पत्रे निघाली त्यांतली चंद्रिका व पौरशक्ती ही उल्लेखनीय आहेत.

**ओडिया** – ओडिसामध्ये गेल्या शतकात वृत्तपत्रे नव्हती, ती या शतकाच्या आरंभी सुरू झाली. सहापैकी उत्कल दीपिका व उत्कल साहित्य ही दोनच काही वर्षे चालू राहिली. बाकीची लवकर बंद झाली. इ. स. १९१२ मध्ये बिहारमधून ओडिसा हा प्रांत वेगळा करण्यात आला, तेव्हा आणखी काही नवी पत्रे निघाली. त्यांतली आशा व समाज ही विशेष उल्लेखनीय आहेत. म. गांधींच्या सत्याग्रह चळवळीमुळेही बरीच नवी पत्रे निघाली. पण ती विकट आर्थिक परिस्थितीमुळे बंद झाली. हरेकृष्ण मेहताब यांनी सुरू केलेले प्रजामित्र हे दीर्घ काळ चालले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बरीच नवी पत्रे निघाली. त्यांतील मातृभूमी हे दैनिक विशेष उल्लेखनीय आहे.

**पंजाबी** – गेल्या शतकाच्या उत्तरार्धात पंजाबी भाषेत वृत्तपत्रे निघू लागली. पहिले पत्र लुधियांना येथील इंग्लिश मिशनने सुरू केले. ते गुरुमुखी लिपीत छापले जात होते. इ.स.१८६७ साली अमृतसर येथे अखबार श्री दरबारसाहिब हे पत्र सुरू झाले. या नावावरून ते शिखांचे मुखपत्र वाटत असले, तरी तसे ते नव्हते. इ.स.१८८० पर्यंत आणखी दोन गुरुमुखी पत्रे निघाली; पण ती शिळाछापावर छापली जात. सिंग सभेने इ. स. १८८० मध्ये गुरुमुखी अखबार व १८८५ मध्ये खालसा अखबार ही पत्रे सुरू केली. भाई गुरुमुख सिंग हा त्यांचा संस्थापक होता. त्यानेच खालसा गॅझेट व सुखररक ही दोन पत्रे स्वतंत्रपणे सुरू केली. त्या वेळी अमृतसर व लाहोर येथे इंग्लिश, उर्दू व हिंदी पत्रे चालू होती. सिंग सभेने पंजाबीच्या प्रसारासाठी अनेक नियतकालिके सुरू केली. मात्र ती सामाजिक व धार्मिक कामाला वाहिलेली होती.

विसाव्या शतकाच्या आरंभी पंजाबी गद्याचा विकास सुरू झाला. अनेक नवी कालिके उदयाला आली. त्यांतील बहुतेक सिंग सभेच्या प्रेरणेने सुरू झाली होती. पुढे १९०६ ते १९१० या कालखंडात अनेक पत्रे निघाली. मात्र ती राजकीय नव्हती. इ.स.१९२१ मध्ये अकाली आंदोलन सुरू झाल्यानंतर पंजाबी वृत्तपत्रांना वेगळे वळण लागले. त्यानंतरच्या १०–१५ वर्षांत २३ दैनिके, ६७ साप्ताहिके, ४ पाक्षिके व २५ मासिके सुरू झाली. त्यानंतरच्या निवडणुकी व दुसरे महायुद्ध यांमुळेही अनेक नवी पत्रे सुरू झाली. युद्धजन्य परिस्थितीमुळे सरकारने अनेक पत्रे बंद केली. तथापि त्या काळातही ३ दैनिके, ३१ साप्ताहिके, ४ पाक्षिके व ५२ मासिके नवी निघाली. त्या काळात वृत्तपत्रांत राजकीय, आर्थिक व साहित्यिक चर्चा बरीच होऊ लागली.

पुढे १९४७ साली पंजाबची फाळणी होऊन, लाहोर हे पंजाबी वृत्तपत्रांचे केंद्रस्थान पाकिस्तानात गेल्यामुळे सर्व गुरुमुखी पत्रे बंद पडली. पण त्यांतली बरीच पुन्हा भारतात सुरू होऊन चांगली चालू लागली.

**तमिळ** – स्वदेशमित्र हे इ. स. १८८२ मध्ये साप्ताहिक रूपात सुरू झाले होते, ते १८९७ पासून आठवड्यात तीनदा निघू लागले. त्यातील वैचारिक परंपरेमुळेच तमिळ वृत्तपत्रव्यवसायाला स्थिरता आली. इ. स. १८९९ पासून ते दैनिक स्वरूपात निघू लागले. इ.स.१९१७ पर्यंत तमिळमधले ते प्रमुख पत्र होते. त्या वर्षी देशभक्तन हे दैनिक सुरू झाले. त्याचे संपादक क्रांतिकारक चळवळीचे पुरस्कर्ते होते, म्हणून ते पत्र बरेच गाजले. ते तीनच वर्षे चालू होते. पण त्यात भाषाशैलीचा विकास झालेला दिसतो. १९२६ मध्ये तमिळनाडू या साप्ताहिकाचे संपादक वरदराजुलू नायडू यांनी एक दैनिकही सुरू केले. ते ४–५ वर्षे खूप

लोकप्रिय होते. पण १९३० च्या सत्याग्रही आंदोलनाला त्याने पाठिंबा न दिल्यामुळे त्याचा खप कमी झाला. काँग्रेसचे पत्र इंडिया हे तेव्हा तेजीत होते.

इ. स. १९३३ च्या सुमारास जयभारती हे एक पैसा-पत्र सुरू झाले, त्याची किंमत दोन पैसे होती. या स्पर्धेमुळे इंडिया हे पत्र बंद पडले व तमिळनाडू हे दिनमणीत विलीन करावे लागले. दुसरे महायुद्ध सुरू होण्यापूर्वी जयभारती बंद झाले.

महायुद्धाच्या काळात भारतदेवी व दिनसरी ही नवी पत्रे निघाली. ही बहुतेक सर्व पत्रे (दैनिके) मद्रासहून निघत होती. १९४२ मध्ये यंथी नावाचे दैनिक एकाच वेळी मदुरा, मद्रास, सेलम व तिरुचिरापल्ली येथून निघू लागले. पण लवकरच मदुरा व मद्रासची आवृत्ती सोडून बाकीची बंद झाली. इ. स. १९५२ मध्ये मदुरा येथे तमिळनाडू पुन्हा सुरू झाले.

सुब्रह्मण्य भारती यांचे इंडिया हे साप्ताहिक राष्ट्रीय जागृती व साहित्यसेवा या दृष्टींनी विशेष उल्लेखनीय आहे. स्वतंत्रसंघू हे आठवड्यात तीनदा निघणारे पत्र १९३० च्या चळवळीला जोरदार पाठिंबा देत होते म्हणून फार लोकप्रिय झाले.

तेलुगू – इ. स. १८५० नंतर मिशनरी लोकांनी तेलुगू वृत्तपत्रे सुरू केली. हितवादी हे साप्ताहिक काही वर्षे चालून बंद पडले. कॅनेडियन बॅप्टिस्ट मिशनचे साप्ताहिक रवी काकिनाडाहून निघू लागले. त्यात धार्मिक प्रचाराबरोबरच वार्तापत्रेही असत. वीरेशलिंगम पंतुलू या विद्वान व सुधारक शिक्षणशास्त्रज्ञाने विवेकवर्धिनी नावाचे साप्ताहिक सुरू केले. आंध्रभाषासंजीवनी हे पत्र वेंकटरामन पंतुलूनी काढले. तेही विद्वान व समाजसुधारक असून, त्या दोन पत्रांत बरेच वादविवाद चालत. इ. स. १८८६ साली पार्थसारथी नायडू यांनी मद्रासला आंध्रप्रकाशिका नावाचे पहिले साप्ताहिक सुरू केले. गेल्या शतकाच्या अखेरीस इतर शहरांतून काही वृत्तपत्रे सुरू झाली. देवगुप्त शेषाचलराव यांचे देशाभिमानी हे पहिले दैनिक होय. प्रारंभी ते पाक्षिक होते, मग साप्ताहिक झाले, मग आठवड्यातून दोनदा निघू लागले व शेवटी दैनिक झाले.

विसाव्या शतकात पिंजलसुब्रह्मण्य चेट्टी यांनी समदर्शिनी नावाचे दैनिक सुरू करून, त्यात ब्राह्मणेतरांच्या उत्कर्षासाठी खूप लिखाण केले. गांडीवम व देवदत्तम ही एक पैसा–पत्रे काही दिवस बरीच लोकप्रिय होती, पण ती फार काळ चालू राहिली नाहीत.

इ. स. १९०८ मध्ये नागेश्वर राव यांनी मुंबईला आंध्रपत्रिका हे पत्र सुरू केले, ते खूप यशस्वी ठरले. प्रथम ते साप्ताहिक होते. इ. स. १९१४ साली ते मद्रासला नेण्यात आले व काही वर्षांनी दैनिक रूपात निघू लागले.ते तेलुगू समाजात खूप लोकप्रिय आहे. इ.स. १९३९ मध्ये सुरू झालेले आंध्रप्रभा हेदेखील बरेच लोकप्रिय आहे.

आंध्रमध्ये साप्ताहिक वृत्तपत्रे अधिक स्थिरपणे चालू राहिली. कृष्णपत्रिका हे १९०२ मध्ये सुरू झालेले साप्ताहिक त्यातील राष्ट्रवादी विचारसरणीमुळे उत्कर्ष पावले आहे. प्रजामित्र, आनंदवनी, जनवाणी, प्रजावंधू व स्वतंत्र (इंग्लिश व तेलुगू)ही साप्ताहिकेही यशस्वी वाटचाल करीत आहेत.

उर्दू– १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धानंतर उर्दू पत्रे मोठ्या संख्येने सुरू झाली. मात्र त्यांतील लेख संयमपूर्ण असत. शिक्षण, इतिहास, पाश्चात्य विद्या यांविषयी बरेच लिखाण त्यांत येत असे. औध अखबार (१८५८) सायंटिफिक सोसायटीज मॅगेझिन (अलिगड)व सर सय्यद अहंमदखान यांचे तेहझिब-उल-अखलाक (अलिगड) ही प्रमुख पत्रे होती. लाहोर, दिल्ली, लखनऊ आग्रा, अलिगड व मीरत ही उर्दूची मुख्य केंद्रे होती. इ.स. १८८७ मध्ये औध अखबार, रोझाना अखबार व पैसा अखबार ही तीन दैनिके चालू होती. त्या कालखंडात सय्यद अहंमदखान व स्वामी दयानंद यांनी धर्मसुधारणेसाठी बरेच प्रयत्न केले. त्यामुळे राजकीय जागृतीही झाली. सय्यद अहंमदखान यांचे तेहझिब-उल–अखलाक हे त्या दृष्टीने खूप प्रभावी ठरले. त्यानंतरच्या उर्दू पत्रांत राजकीय लेख अधिकाधिक छापले जाऊ लागले.

इ. स. १९०२ च्या सुमारास ७० उर्दू कालिके चालू होती, त्यांतली औध अखबार, पैसा अखबार व सुल्ह–ए–कुल ही दैनिके होती. पुढच्या वर्षात उर्दू पत्रांची संख्या १५१ पर्यंत वाढली. नॅशनल काँग्रेस व मुस्लिम लीग यांच्या प्रभावामुळे उर्दूभाषी समाजात बरीच जागृती झाली व त्यामुळे वृत्तपत्र-व्यवसाय वाढू लागला. अलाहाबादला १९०७ मध्ये उर्दू स्वराज्य हे पत्र सुरू झाले. १९१२ साली मौलाना अबुल कलम आझाद यांनी अल्‌हिलाल हे साप्ताहिक सुरू केले. राष्ट्रीय विचार, धार्मिक व सामाजिक सुधारणांचा पुरस्कार यांमुळे ते पत्र फार लोकप्रिय झाले. त्याचमुळे मुसलमान पुढारी त्यावर जोरदार टीकाही करू लागले. मौ. आझाद यांचे लिखाण कडक व प्रभावी असल्यामुळे सरकारलाही ते त्रासदायक वाटू लागले. इ. स. १९१५च्या एप्रिलमध्ये वंगाल सरकारने त्यांना हद्दपार केले.

इ.स. १९१२ साली हमिदुल अनसारी यांनी बिजनोर येथे मदिना हे पत्र सुरू केले. त्यातील राजकीय व सामाजिक लेखांचा मुस्लिम समाजावर बराच प्रभाव पडला. मौलाना मोहंमद अली यांची कॉम्रेड (इंग्लिश) व हमदर्द (उर्दू) ही पत्रेही बरीच प्रभावी होती. इ. स. १९१३ मध्ये पाटणा येथे पाटणा अखबार, इत्तेहाद व स्टार ऑफ इंडिया ही पत्रे सुरू झाली. त्याच वर्षी मौ. आझाद यांनी अल् बलाघ हे पत्र सुरू केले.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात वृत्तपत्रांवर बरेच निर्बंध होते. १९१९ मध्ये लखनऊला हकीकत व लाहोरला प्रताप ही दैनिके सुरू झाली. इ. स. १९२० मध्ये लाला लजपतराय यांनी वंदेमातरम् हे पत्र सुरू केले. ते बरेच लोकप्रिय होते. पण लालाजींच्या मृत्यूनंतर ते बंद पडले. मौ. झाफर अलिखान यांचे दैनिक जमीनदार हे पत्र त्यातील राष्ट्रीय विचारसरणीमुळे विशेष गाजले. इ. स. १९२३ मध्ये सुरू झालेले मिलाफ हे आर्यसमाजाचे पत्र असले तरी राष्ट्रीय काँग्रेसच्या धोरणांना पाठिंबा देत असे.

इ. स. १९२३ मध्ये स्वामी श्रद्धानंद यांनी दिल्लीला तेज हे पत्र सुरू केले. त्यात राष्ट्रीय विचारसरणी व समाजसुधारणा या दोन्हींविषयी लेख येत.

इ. स. १९२५ च्या सुमारास काही उर्दू पत्रे सुरू झाली, ती जातीय वृत्तीची होती. इ. स. १९२८ मध्ये गोस्वामी गणेश दत्त यांनी वीरभारत हे दैनिक लाहोर येथे सुरू केले. ते सनातन धर्माचा पुरस्कार करणारे असले, तरी त्यात स्वातंत्र्यसंग्रामाला अनुकूल व काँग्रेसला पाठिंबा देणारे लिखाण येत असे. पं. मदनमोहन मालवीय यांच्या मार्गदर्शनाप्रमाणे ते चालत होते. इ. स. १९३० ते १९४० या कालखंडात अनेक उर्दू पत्रे निघाली. इ. स. १९४० मध्ये लाहोरला अजित हे पत्र सुरू झाले. ते शीख समाजाचे मुखपत्र होते. अकाली दलाचा त्याला पाठिंबा होता.

इ. स. १९४२ मध्ये लाहोरला प्रभात हे पत्र सुरू झाले. ते श्रमिक पत्रकारांनी सहकारी पद्धतीने सुरू केले होते. ते स्वतंत्र वृत्तीचे असून, हिंदू धर्माचे अभिमानी होते. मात्र ते काँग्रेसला पाठिंबा देत असे. पण पुढे ते मास्टर तारासिंग यांनी विकत घेतले व आपल्या मताप्रमाणे चालविले.

या कालखंडात मुंबईलाही काही उर्दू पत्रे सुरू झाली. इ. स. १९४५ मध्ये पं. जवाहरलाल नेहरूंनी कौमी आवाज हे पत्र लखनऊला सुरू केले.

भारताच्या फाळणीमुळे अनेक उर्दू पत्रे बंद पडली. लाहोरची प्रताप, मिलाप वगैरे काही पत्रे दिल्लीला पुन्हा सुरू झाली. वीर भारत हे अमृतसर येथून निघू लागले. प्रभातही अमृतसर येथे गेले. लाला जगत नारायण यांनी जालंधरला हिंद समाचार हे पत्र सुरू केले.

इ. स. १९२१ मध्ये सर तेजबहादूर सप्रू हे व्हाइसरॉयच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे लॉमेंबर होते, तेव्हा त्यांनी १९०८ चा व १९१० चा प्रेस ॲक्ट हे दोन्ही रद्द करवून घेतले. इ. स. १९३० साली गांधीजींची चळवळ सुरू झाली, तेव्हा १९१० चा प्रेस ॲक्ट वटहुकमाच्या रूपात पुन्हा लादण्यात आला व १९३२ साली त्याला कायद्याचे रूप देण्यात आले. इ. स. १९३१ मध्ये प्रेस इमर्जन्सी पॉवर्स ॲक्ट पास झाला होता, तो फक्त हिंसाचाराबद्दल होता. त्या कायद्यान्वये सुमारे १००० वृत्तपत्रांवर कारवाई करण्यात आली. इ. स. १९३९ साली दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर सरकारने वृत्तपत्रांवर पूर्वतपासणीचे बंधन घातले. प्रेस इमर्जन्सी पॉवर्स ॲक्टातही काही बदल करण्यात आला; तसेच १९४५ साली महायुद्ध थांबल्यानंतर वरील कायदे रद्द करण्यात आले. पण निरनिराळ्या प्रांतांत जातीय दंगली सुरू झाल्यामुळे सरकारला वटहुकूम काढून वृत्तनियंत्रण करावे लागले. त्या वटहुकुमांचे मग कायद्यात रूपांतर करण्यात आले. इ. स. १९५१ मध्ये दि प्रेस (ऑब्जेक्शनल मॅटर्स) ॲक्ट पास झाला. पूर्वीचे बहुतेक कायदे रद्द करण्यात आले. इ. स. १९५२ मध्ये प्रेस कमिशन स्थापण्यात आले. त्या कमिशनचा अहवाल १९५४ मध्ये तयार झाला. त्यातील दुसरा भाग हिस्टरी ऑफ इंडियन जर्नालिझम नामक पुस्तकाच्या रूपाने प्रसिद्ध करण्यात आला. त्यानंतरच्या वीस वर्षांच्या कालावधीत वृत्तपत्र सृष्टीत बरीच स्थित्यंतरे झाली. त्यांची रूपरेखा देणेही कठीण आहे.

**गोमंतकातील वृत्तपत्रे** – गोव्यात मुद्रणकला प्रथम आली असली, तरी वृत्तपत्रव्यवसाय मात्र उशीरा सुरू झाला. गाझेत द गोबा हे पहिले साप्ताहिक इ. स. १८२१ साली सरकारी मुखपत्र म्हणून सुरू झाले. पत्रव्यवसायाचा आरंभ गोव्यात स्थानिक ख्रिस्ती लोकांनी केला व जवळजवळ दीडशे वर्षे त्यांनीच त्याचा विकास केला. पोर्तुगीज भाषेतील पत्रव्यवसायात हिंदूंचा प्रवेश फार उशीरा झाला.

बिनसरकारी पातळीवरून पहिले वृत्तपत्र निघाले ते एको द लुझितानिया. ते १८३६ साली निघाले. त्यातूनच स्थानिक लोक पोर्तुगीज भाषेत लेखन करू लागले. इ. स. १८३७ साली बोलेती दु गोव्हेर्नु हे सरकारी पत्र सुरू झाले व त्यातूनही स्थानिक लोक लिहू लागले.

इ. स. १८२१ ते १८९५ या कालखंडात सुमारे साठ वृत्तपत्रे निघाली. पण त्यांतली बहुतेक अल्पजीवी ठरली. ज्यांच्याजवळ वेळ, पैसा व लिहायची हौस होती, अशा लोकांनी ती पत्रे काढली होती. आर्थिक नुकसान होऊ लागले, की ती बंद होत. ऊ उल्मामार हे मात्र पन्नास वर्षे व अ ईंदिय पुर्तुगेझ हे शंभरापेक्षा अधिक वर्षे चालले. ऊ उल्मामार हे साप्ताहिक फर्नांडु फ्रांसीस्कु दकोस्त या साष्टीतील ख्रिस्ती पुढाऱ्याने इ. स. १८५९ साली सुरू केले. त्यासाठी त्याने स्वतंत्र छापखाना काढला. त्याचा भाऊ आंतानियु याने ते १९११ पर्यंत अखंड चालवले. त्याच्या निधनानंतर ते बंद पडले.

ऊ उल्मामार हे ख्रिस्ती ब्राह्मणांचे पत्र होते. म्हणून साष्टीतील ब्राह्मणेतरांनी इ. स. १८६१ मध्ये अ ईंदिय हे पत्र सुरू केले. त्या दोन पत्रांत ब्राह्मण–ब्राह्मणेतरांची भांडणे चालत. त्या-

नंतर पोर्तुगीज साप्ताहिके व मासिके काढण्याचे लोण खेडोपाडीं पसरले. इ. स. १८९५ ते १८९७ या दोन वर्षांत सरकारच्या जाचक निर्बंधामुळे सर्व वृत्तपत्रे बंद पडली होती.

इ. स. १८९७ ते १९६१ या कालखंडात गोव्यात दैनिकांची परंपरा सुरू झाली. इ. स. १९०० साली प्रा. मेसीयश गॉमिश यांनी ऊ एराल्दु हे दैनिक सुरू केले. ते त्यांनी कुशलतेने चालवून लोकप्रिय केले. इ. स. १९०८ मध्ये आंतोन मारीय द कून्य यांनी एराल्दु हे दुसरे दैनिक सुरू केले. हे पत्र १९६१ पर्यंतच्या अर्धशतकात गोव्यातील सुशिक्षित ख्रिस्ती समाजाचे मुखपत्र मानले गेले. ते सरकारधार्जिणे असून ख्रिस्ती विद्वान व पुढारी मंडळींचा त्याला पाठिंबा होता. बातम्यांपेक्षा विद्वानांच्या लेखांवरच त्याचा भर होता. गोवामुक्तीच्या चळवळीला त्याने प्रखर विरोध केला. इतर पत्रे आधी विरोध करीत होती; पण मुक्तीनंतर त्यांनी मोहरा बदलला. एराल्दुने मात्र मुक्तीला आक्रमण मानून पोर्तुगीजांना पाठिंबा दिला व विरोधी आंदोलनाचा प्रयत्न केला. राष्ट्रवादी जनतेने त्या पत्राची रस्त्यावर होळी केली. मग ते पत्र बंद झाले.

त्यानंतर ऊ दिआरिओ द नोइत हे पहिले सायंदैनिक इ.स. १९१९ साली निघाले. लुईश द मिनेझिस या कल्पक गृहस्थाने ते मुक्तीनंतरही चांगले चालवले. पण लवकरच ते बंद पडले. इ. स, १९३८ मध्ये अ विद हे दैनिक मडगावला सुरू झाले. कट्टर कॅथॉलिक कंपूचे ते मुखपत्र होते. ते गोवामुक्तीनंतर काही काळ चालून बंद झाले. इ. स. १९४६ साली मडगावला अ वोझ द इंदिय हे सहकारी पद्धतीने चालणारे दैनिक निघाले. ते राष्ट्रीय वृत्तीचे असून, त्याचे वाचक बहुतेक हिंदू होते. सरकारशी संघर्ष टाळून चालकांनी ते चालविले. तरीही १९५० साली सरकारी हुकमाने ते बंद झाले.

इ. स. १९५३ साली मडगावला ऊ दिआरिऊ द गोवा हे दैनिक निघाले. ते मुक्तीनंतरही काही दिवस चालू होते.

गोव्यात साप्ताहिके अनेक निघाली पण ती दीर्घकाळ चालली नाहीत. दीर्घायुष्य लाभलेली पत्रे म्हणजे ऊ देवाती (१०वर्षे) व अतेर्रा (२४ वर्षे) ही होत. ऊ देवाती हे साप्ताहिक मिनेझिस ब्रांगास नामक विचारवंत गृहस्थाने चालवले होते. वृत्तपत्रीय इतिहासात त्यांचे नाव अविस्मरणीय ठरले आहे. ते उदारमतवादी असून पोर्तुगीज सरकारच्या भोंगळ कारभारावर प्रखर टीका करीत. प्रकाश नामक साप्ताहिकातूनही त्यांनी स्फोटक लेखन केले. त्यामुळे सालाझारशाहीत ते साप्ताहिक बंद पडले. ते हिंदूंनी काढलेले पोर्तुगीज पत्र होते.

सालाझारशाहीत इतर पत्रे खऱ्या अर्थाने वृत्तपत्रे नसून सरकारची मनधरणी करणारी पत्रे होती.

गोवा-मुक्तीपूर्वी पोर्तुगीजप्रमाणे मराठीतही साप्ताहिके व मासिके यांचाच भरणा होता आणि एकही दैनिक निघाले नव्हते. कारण मुंबई–पुण्यातील दैनिके गोव्यात जात होती. इ. स.१८७२ मध्ये निघालेले देशहितेच्छू हे गोव्यातले पहिले साप्ताहिक होय. इ.स. १८७२ ते १८९५ या काळात सुमारे पंधरा मराठी कालिके निघाली. त्यांपैकी गोवापंच व पथ्यबोध ही महत्त्वाची होत. गोवापंच हे म्हापशाहून निघत होते. त्याने समाजसुधारणेचा प्रचार केला.

पथ्यबोध हे कालिक गोव्यातले सार्वजनिक कार्यकर्ते भिषग्वर दादा वैद्य यांनी इ. स. १८८८ साली सुरू केले. त्यांनी गोव्यातल्या पत्रव्यवसायात मोठी कामगिरी बजावलीं आहे. शिक्षणप्रसार, सुधारणा, आरोग्य, स्त्रियांचे प्रश्न, इ. विषयांवर लेखन करण्यासाठी त्यांनी अनेक कालिके काढली.

गोव्यातील मराठी साप्ताहिकांपैकी बहुतेक साप्ताहिकांत एक पोर्तुगीज विभाग असे. हिंदू समाजाचा दृष्टिकोन राज्यकर्ते व ख्रिस्ती बांधव यांना कळावा, हा त्यातला हेतू.

दादा वैद्यांप्रमाणे रा. वा. नाईक करंडेशास्त्री हेदेखील एक थोर संपादक व लेखक होऊन गेले. त्यांचे सत्संग मासिक महाराष्ट्रातही लोकप्रिय झाले होते. त्यातले औपरोधिक लेखन हिंदुस्थान सरकारला झोंबल्यामुळे त्याने गोवा सरकारवर दडपण आणून ते बंद करविले.

डॉ. पु. रा. शिरगावकर यांनी इ. स. १९११ साली प्रभात हे मराठी-पोर्तुगीज साप्ताहिक सुरू केले व १९१६ मध्ये निधन होईपर्यंत चालवले. त्या पत्राने हिंदू समाजाच्या दृष्टीने फार मोठी कामगिरी केली. इ. स. १९१२ मध्ये ॲ. गो. पुं. हेगडे देसाई यांनी भारत हे मराठी-पोर्तुगीज साप्ताहिक काढले व ते १९४७ पर्यंत चालवले. या साप्ताहिकात पोर्तुगीज सरकारवर प्रखर टीका येत असे. त्यामुळे सरकारने संपादकांवर ३०–३५ खटले भरले. इ. स. १९२४–३० या काळात द. व्यं. पै यांनी हिंदू हे दर्जेदार मराठी साप्ताहिक चालवले. त्यानेही राजकीय व सामाजिक क्षेत्रात मोठी कामगिरी केली.

इ. स. १९१५ मध्ये वि. का. प्रियोळकरांनी स्वयंसेवक हे मासिक सुरू केले. त्याचा दर्जा चांगला होता. इ. स. १९२१ साली नवजीवन, इ. स. १९३० मध्ये सुबोध, १९३४ मध्ये प्रधान व १९३५ साली कला ही मासिके निघाली आणि काही काळ चालून बंद पडली. इ. स. १९२१ मध्ये सुरू झालेले ना. भा. नाईक याचे भारतमित्र हे मात्र अजून चालू आहे.

इ. स. १९३३ मध्ये पोर्तुगालात सालाझाराची हुकूमशाही सुरू झाली आणि त्यामुळे गोव्यातील पत्रव्यवसायावरही संकट आले. जाचक सरकारी निर्बंधामुळे व हजारो रुपये सरकारकडे अना-

मत ठेवावे लागत असल्यामुळे सर्व कालिके बंद पडली. इ. स. १९४६ साली डॉ. लोहियांनी स्वातंत्र्यसंग्राम सुरू केला, तेव्हा सरकारी दडपशाही वाढली. त्यामुळे १९६१ पर्यंत मराठी कालिक निघू शकले नाही.

गोवा मुक्त झाल्यानंतर तिथल्या वृत्तपत्रव्यवसायाचे चित्र पालटून गेले. वृत्तपत्रस्वातंत्र्य मिळाल्यामुळे नवीन कालिके भराभर निघू लागली. मराठी,पोर्तुगीज, इंग्रजी व कोकणी या भाषांतली १० दैनिके एकाच वेळी सुरू झाली. त्यांतली काही पुढे बंद पडली. आज गोव्यात ३ मराठी, १ इंग्रजी, १ पोर्तुगीज व १ कोकणी अशी सहा दैनिके चालू आहेत. या नव्या भरतीला प्रारंभ झाला तो गोमंतक या मराठी दैनिकापासून. बा. द. सातोस्कर हे त्याचे पहिले संपादक होते. आधुनिक पद्धतीने सुरू झालेले, पी. टी. आय्. सारख्या वृत्तसंस्थांकडून व स्वतःच्या वार्ताहरांकडून वार्ता घेणारे, गोमंतक हे गोव्यातले पहिले संपूर्ण दैनिक होय. आज श्री. माधव गडकरी हे त्याचे संपादक आहेत.

त्यानंतर राष्ट्रमत हे मराठी (संपादक – चंद्रकांत केणी ), नवहिंद टाइम्स (प्रथम संपादक त्र्यं. वि. पर्वते व लँबर्ट मस्कारेन्हास आणि नंतर के. एस्. के. मेनन), गोमंतवाणी (संपादक– श्री. शं. नवरे व मग राम प्रधान) व प्रदीप (संपादक – ज. प. शिंक्रे) ही मराठी आणि दिवटी, उजवाड, व सॉंत ही कोकणी दैनिके निघाली. इंग्रजीत गोमंतक हे सायंदैनिक निघाले. पुढे दिवटी, इंग्रजी गोमंतक, गोमंतवाणी, प्रदीप व सॉंत ही बंद पडली. मुक्तिपूर्व कालातले ऊ एराल्दु हे दैनिक अजून चालू आहे. [श्री. बा. द. सातोस्कर, पणजी; वृ. प. इ.; हि. इं. ज.]

**वृत्र** अंतरिक्षातील एक दैत्य. इंद्राचा एक प्रमुख शत्रू. हा जलधारा रोखून बसत होता व गायींचे हरण करीत होता. त्याने सूर्याला झाकून टाकले होते, मेघांना आपल्या उदरात गडप केले होते. महासर्पाप्रमाणे तो पाण्याला वेष्टन घालून बसलेला असल्यामुळे त्याला अही असेही नाव मिळाले होते (ऋ २.१५.६, २.१९.३; ४.१९.८; ७.२१.३).

हा वृत्र म्हणजे कोणी मानवदेहधारी प्राणी नसून, तो एक वृष्टी रोखून धरणारा मेघ होता, असे यास्काने निरुक्तात म्हटले आहे (२.१६). ऐतिहासिक परंपरेत त्याला त्वष्टयाचा पुत्र मानले आहे; पण यास्काला ते मान्य नाही. लो. टिळक यांच्या मते इंद्र-वृत्र युद्ध हे एका भौगोलिक घटनेचे रूपक आहे. त्यांनी ती घटना उलगडून सांगितली आहे, ती अशी –

वृत्र म्हणजे बर्फाचे प्रतीक आणि इंद्र हे सूर्यप्रतीक समजावे. ध्रुव प्रदेशात कडक थंडीमुळे नद्या गोठतात व त्यांचे प्रवाह रुद्ध होतात. वसंतकालीन सूर्य आपल्या प्रखर किरणांनी त्या नद्यांतले बर्फ वितळवतो आणि त्यामुळे नद्या पुनश्च प्रवाहित होतात. वेदातले इंद्र-वृत्र-संघर्षाचे उल्लेख ध्रुव प्रदेशातील भूगोलाचे परिचायक आहेत.

पण हे मत डॉ. रा. ना. दांडेकर यांना मान्य नाही. ते म्हणतात – इंद्र-वृत्र संघर्षाच्या वेळचे इंद्राचे वीरश्रीप्रधान आणि भीतिजनक असे जे वर्णन वेदांत केलेले आहे, ते मृदू आणि तुलनेने शांत अशा वासंतिक सूर्याला मुळीच लागू पडण्यासारखे नाही. शेवटी ते निष्कर्ष सांगतात की, कोणत्याही उपपत्तीने इंद्र-वृत्र संघर्षाचा योग्य असा अन्वयार्थ लागू शकत नाही.

इंद्र-वृत्र-युद्ध आणि इंद्रकृत वृत्रवध या घटना ऋग्वेदापासून पुराणांपर्यंत सर्वत्र आढळून येतात. पुराणांत तर या घटनेचे मोठे आख्यानच आहे. या संघर्षाचा वेदापासून मागोवा घेता येतो, तो असा –

ऋग्वेद– वृत्र हा स्वतःला अजिंक्य व अमर समजत असे. तो पाण्यामध्ये स्वस्थ पडून होता. इंद्र त्याच्या शोधाला निघाला तेव्हा तो स्वतःभोवती धुक्याचे आवरण घेऊन बसला. तो मोठा लढवय्या व मायावी होता. सारे देव त्याच्या समोर जायला भीत असत, म्हणून त्यांनी इंद्राला पुढे केले. इंद्र मात्र मोठ्या धैर्याने त्याच्याशी लढला. जे जे पराक्रम आपल्या मोठेपणाच्या वीरश्रीने उभयतांना करून दाखवावयाचे होते, ते दाखविण्यासाठी इंद्र आणि वृत्र हे एकमेकांशी झुंजले. पण इंद्राने वृत्राला ठार मारताच जगातील निबिड अंधकार तत्काळ नष्ट झाला आणि आपल्या पराक्रमाने अगदी प्रथम पाचारण करणाऱ्या योग्य अशा सर्व दिव्य विभूतींचा इंद्र हाच अधिपती झाला (ऋ. १०. ११३.७). इंद्र-वृत्र युद्ध त्रिककुद पर्वतावर झाले आणि इंद्राने वृत्राचा वध केल्यानंतर ती शुभ वार्ता वायूने सर्व विश्वाला कळविली.

यजुर्वेद – वृत्र हा त्वष्टयाचा पुत्र होय. एकदा त्वष्टयाने यज्ञ केला आणि त्यात सर्व देवतांना सोम दिला; पण इंद्राला मात्र वगळले. कारण इंद्राने त्वष्टयाच्या विश्वरूप नामक पुत्राचा वध केला होता. इंद्राच्या वाटयाचा सोम त्याने अग्नीत टाकला. त्यातूनच वृत्राचा जन्म झाला. या वृत्राने समस्त सृष्टीला त्रस्त केले. पण इंद्राने अग्नीकडून सामर्थ्य मिळवून त्याचा वध केला (तै. सं. २.४.१२; २.१.४).

पुराणांत व महाभारतात याला कृतयुगातला असुर मानले असून, दिती व कश्यप हे त्याचे आई-बाप असल्याचे सांगितले आहे. (पद्मपु. उ. ९)

वृत्राच्या संदर्भात श्री. स. अं. डांगे यांनी विशेष माहिती दिली आहे, ती अशी –

वृत्राला मारल्यानंतर त्याच्या शरीरातील रस सर्व बाजूंनी पसरू लागला. त्याचा परिणाम असा झाला, की पृथ्वीवरील जलांना भरती येऊन ती वाहू लागली. या वाढलेल्या जलापासून कुश गवत निर्माण झाले; आणि यज्ञात पवित्र (पाणी शुद्ध करण्याचे साधन) म्हणून त्याचा उपयोग होऊ लागला (श. ब्रा. १.१.३.४–५). वृत्राच्या शरीरातच ऋक्, साम, यजुस् हे वेद होते. इंद्राने त्याला मारण्याचे ठरविल्यानंतर त्याने एकेक करून ते इंद्राला देऊ केले (श. ब्रा. ५.५.५.१–६). तसेच इंद्राने वृत्राचा कटीखालचा भाग फोडला. त्यापासून 'त्रिधातु' नावाचे हविर्द्रव्य निर्माण झाले. त्या द्रव्याला 'त्रिधातु' म्हणण्याचे कारणही असे दिले आहे, की वृत्रात तीन वेद होते, म्हणून त्याच्या शरीरापासून निघालेले हे द्रव्य त्रिधातू होय. या प्रकारे पूर्वीच्या सर्व कल्पना यज्ञीय विधीत गोवल्या जाऊ लागल्या. इंद्राने पुरोडाशाने वृत्राला मारले म्हणून पुरोडाशाचे महत्त्व आहे (श. ब्रा. ५.२.३.७). इंद्राच्या वज्राचे तुकडे झाले; त्यापैकी एकापासून स्फ्य (यज्ञविधीत उपयोगी येणारी लाकडी तलवार), एकापासून यूप आणि एकापासून रथ झाला. (श. ब्रा. १.२.४.२). तसेच यज्ञाचे वैश्विक स्वरूप सूचित करताना असे सांगितले आहे, की चंद्र आणि सूर्य हे वृत्राच्या अंगापासून निर्माण झालेले आहेत. एकदा त्वष्टयाने यज्ञ करायचे ठरवून सोम लपवून ठेवला. पण इंद्राला ते कळल्यानंतर त्याने त्वष्टयाच्या नकळत सोम पिऊन टाकला. त्वष्टयाला हे कळले, तेव्हा त्याला फार क्रोध आला. उरला सुरला सोम त्याने अग्नीत टाकला आणि "इंद्रशत्रु निर्माण हो" असे म्हटले. त्याचा उद्देश असा होता की जो निर्माण होईल तो इंद्राला मारणारा (शत्रु=शातयिता) होईल. पण त्याचा स्वर चुकल्यामुळे "इंद्रशत्रु" याचा अर्थ 'इंद्र ज्याला मारणारा आहे" असा झाला. मंत्र म्हटल्यानंतर वृत्रासुर त्या यज्ञाग्नीतून निर्माण झाला. पण तो इंद्राच्या हातून मारला गेला. इंद्राने त्याचे दोन भाग केले. त्याच्या शरीरातील अग्नीच्या भागापासून सूर्य निघाला, तर सोमाच्या भागापासून चंद्र निघाला. जो भाग दानवयुक्त होता त्यापासून इंद्राने प्राण्यांची पोटे निर्माण केली (श. ब्रा. १.६.३.१). यात यज्ञीय द्रव्य सोम आणि चंद्र यांचे; तसेच अग्नी आणि सूर्य यांचे समानीकरण साधलेले आहे.

देवी भागवतात याची कथा दिली आहे. ती अशी – वृत्राने कठोर तपश्चर्या केली. मग ब्रह्मदेवाने त्याला काही अटींवर अमरत्वाचा वर दिला. त्या वराच्या बळावर त्याने इंद्राचा पराभव करून देवराज्य बळकावले. दधीची ऋषीच्या अस्थींचे वज्र मिळाल्यावर इंद्र त्याला ठार मारू शकला.

पूर्वजन्मात हा चित्रकेतू नामक विष्णुभक्त राजा होता. मृत्यूच्या पूर्वी त्याने इंद्राला भागवत धर्माचा उपदेश केला. सनत्कुमारांकडून त्याला योगज्ञान मिळाल्यामुळे मृत्यूनंतर त्याला सद्गती मिळाली.

याच्या नावावर एक गीता असून तिला वृत्रगीता असे नाव आहे.

हा ब्राह्मण असल्यामुळे त्याच्या वधाने इंद्राला ब्रह्महत्येचे पातक लागले. [ऋ. द.; प्रा. च. को.; वै. दे. अ. द.]

**वृद्धकन्या** कुरुक्षेत्रातील एक तीर्थ. हे कसे निर्माण झाले या विषयीची कथा अशी – गर्गमहर्षीची वृद्धकन्या नावाची एक कन्या होती. मोठी झाल्यावर गर्गांनी तिचे लग्न करण्याचा घाट घातला; पण अत्यंत विरक्तीमुळे तिने लग्नाची गोष्ट नाकारली. पुढे तिने कुरुक्षेत्रात घोर तपश्चर्या केली. तिथे तिला नारद भेटला. तो तिला म्हणाला. 'तू कितीही घोर तप केलेस तरी लग्न केल्यावाचून तुला स्वर्ग मिळणार नाही.' मग तिने शृंगवत ऋषीशी एका रात्रीच्या करारावर लग्न केले आणि नंतर ती स्वर्गाला गेली. तिचा आश्रम कुरुक्षेत्रात ज्या ठिकाणी होता, ती जागा पुढे तीर्थस्थान बनली. [प्रा. च. को.]

**वृद्धिश्राद्ध** विवाहोपयनादी मंगल कार्याच्या प्रारंभी पितरांच्या तृप्तीसाठी करायचे श्राद्ध. याला नांदीश्राद्ध असेही म्हणतात. पाहा–नांदीश्राद्ध.

**वृश्चिक** मेषादी गणनेतील आठवी राशी. विशाखांचा चौथा चरण, अनुराधा व ज्येष्ठा मिळून ही राशी बनते. हिचा स्वामी मंगळ आहे. ही राशी आर्द्र, स्थिर, बहुप्रसव व स्त्रीत्वदर्शक आहे. हिचा अंमल गुह्येंद्रियांवर चालतो. या राशीत केतू उच्चीचा असतो. बल, धैर्य, एकाग्रता, चोखपणा, उत्कट निष्ठा, प्रामाणिकपणा, इ. या राशीचे गुण असून क्रूरत्व, संशयी स्वभाव, मत्सर, प्रतिष्ठेचा हव्यास, हे या राशीचे दोष आहेत. या राशीवर जन्मणाऱ्या माणसांत हे गुण-दोष आढळतात. [जातकमार्गोपदेशिका]

**वृष** शिवाचा एक अवतार. हा वृषभरूपात उत्पन्न झाला. समुद्रमंथनातून ज्या सुंदर स्त्रिया निर्माण झाल्या, त्यांच्यावर विष्णू आसक्त झाला. विष्णूने त्यांच्या ठिकाणी पुत्र उत्पन्न केले. या विष्णुपुत्रांनी पाताळात राहून समस्त पृथ्वीला खूप त्रस्त केले. शेवटी त्या पुत्रांना निपटून काढण्यासाठी शिवाला वृष अवतार धारण करावा लागला. त्याने विष्णुपुत्रांचा नाश केला आणि विष्णूचाही पराभव केला. [प्रा. च. को.]

**वृषदान** अयन, विषुवसंक्रांती, युगादी तिथी, ग्रहणे, अमावास्या, इ. पर्वकाळी वृषदान करावे, असे धर्मशास्त्रकार सांगतात. या दिवशी एक उत्तम, निखोड बैल आणतात. मग शुचिर्भूत झाल्यावर यथाविधि दानसंकल्प करून वृषाची व दान घेणाऱ्या ब्राह्मणाची पूजा करतात. दानोदक सोडून स्वस्तिचिंतन झाल्यावर दानविधी पुरा होतो. फल – पापनाश. [ दान चंद्रिका; व्रतपरिचय ]

**वृषभ** मेषादी राशिगणनेतील दुसरी राशी. कृत्तिकांचे पुढचे तीन चरण, रोहिणी आणि मृगशीर्षाचे अर्ध मिळून ही राशी बनते. या राशीचा स्वामी शुक्र होय. ही राशी स्थिर, स्त्रीप्रसव, पृथ्वीतत्त्वाची व लिंबवर्णी आहे. या राशीने रुपे व तांबे दर्शविले जाते. हिचा अंमल कंठावर चालतो. या राशीत चंद्र उच्चीचा असून, केतू नीच असतो. या राशीवर जन्मणारा मनुष्य एकनिष्ठ, कुशाग्र बुद्धीचा, शिस्तप्रिय, व्यवहारकुशल, प्रेमळ, विनोदी, धीमा व शांत असतो. हट्टीपणा व दीर्घसूत्रीपणा हे या राशीचे दोष होत. या राशीला शांत व स्थिर जीवन आवडते. [ जातकमार्गोपदेशिका ]

**वृषभव्रत** एक काम्य व्रत. या व्रताचे दोन पर्याय आहेत, ते असे – (१) कोणत्याही महिन्याच्या शुक्ल पक्षातील सप्तमीला उपवास करतात. अष्टमीच्या दिवशी एक बैल दोन पांढऱ्या वस्त्रांनी आणि अलंकारांनी सजवून दान देतात. शिव ही व्रताची देवता आहे. फल – शिवलोकप्राप्ती. (२) ज्येष्ठ महिन्याच्या अमावास्येला बैलांची पूजा करतात. आदल्या दिवशी लाकडाचे बैल तयार करून त्यांची घरात पूजा करतात आणि धर्म म्हणून त्यांची प्रार्थना करतात. कारण धर्माला वृष असे म्हटलेले आहे. फल – शिवलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**वृषभाद्री** एक प्राचीन क्षेत्र. हे स्थान तमिळनाडू प्रदेशातील मदुराई जिल्ह्याच्या उत्तरेला बारा मैलांवर आहे. स्थानिक लोक याला अलगर कोविल असे म्हणतात. या पर्वतावर धर्मराज यमाने वृषरूपात विष्णूची आराधना केली आणि इथेच त्याला विष्णुदर्शन घडले, म्हणून या पर्वताला हे नाव मिळाले, अशी कथा सांगतात. अग्निपुराण, ब्रह्मांडपुराण, वराहपुराण, वामनपुराण, इ. ग्रंथांतून याचे माहात्म्य वर्णन केले आहे.

वृषभाद्री पर्वतावर एक प्राचीन किल्ला आहे. किल्ल्यात श्रीसुंदरराजाचे, दाक्षिणात्य पद्धतीचे एक विशाल मंदिर आहे. मुख्य मंदिरात श्रीसुंदरराजाची (श्रीनारायणाची) भूदेवीसह मूर्ती आहे. हे मंदिर कोणी व केव्हा बांधले, याचा निश्चित पुरावा उपलब्ध नसला, तरी श्रीपोइगैआळवार, भूतत्ताळवार, इ. आळवार संतांनी याचा उल्लेख केला आहे. त्यावरून त्यांच्या पूर्वी केव्हातरी हे मंदिर उभारले गेले असावे, असे अनुमान करता येते. पांडवांनी द्रौपदीसह इथे येऊन अलगर देवीची उपासना केली होती, अशी समजूत आहे. ते ज्या गुहेत राहिले होते त्या गुहेला पांडव-शय्या असे नाव आहे.

या पर्वतावर नूपुरगंगा नावाचा एक जलप्रवाह आहे. त्यात स्नान करून मग श्रीसुंदराच्या दर्शनाला जाण्याची प्रथा आहे. तपस्यामग्न धर्मराजाला दर्शन देण्यासाठी भगवान विष्णू इथे आले, तेव्हा त्यांच्या नूपुरातून एक जलस्रोत प्रकट झाला, तीच नूपुरगंगा बनली, अशी कथा आहे. नूपुरगंगेचे जल पापनाशक मानले जाते.

या क्षेत्रात दोन उत्सव होतात. पहिला चैत्र शुद्ध चतुर्दशीपासून पाच दिवस चालतो. दुसरा गुरुपौर्णिमेपासून दहा दिवस असतो. पाहा – अलगर कोविल. [ कल्याण – तीर्थांक ]

**वृषल** शूद्र या अर्थी वृषल शब्द वापरतात. मनूने वृषल लोकांविषयी पुढील माहिती दिली आहे –

> शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः ।
> वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥
> पौंड्रकाश्चौड्रद्रविडाः काम्बोजा यवनाः शकाः ।
> पारदाः पह्लवाश्चीनाः किराता दरदाः खशाः ॥
> (मनु. १०·४३–४४)

अर्थ–पौंड्रक, औड्र, द्रविड, कांबोज, यवन, शक, पारद, पह्लव, चीन, किरात, दरद व खश या क्षत्रिय जाती धार्मिक क्रियालोपामुळे व ब्राह्मणांशी संपर्क तुटल्यामुळे हळूहळू वृषल बनल्या.

मनुस्मृतीचा टीकाकार कुल्लूकभट्ट याने वृषल शब्दाचा अर्थ शूद्र असा दिला आहे.

सुत्तनिपात या पाली ग्रंथात वृषल (वसल) शब्दब्राह्मणेतर जातींसाठी योजलेला आहे.

मेदिनीकोशात वृषल ही चंद्रगुप्ताची एक उपाधी होती, असे सांगितले आहे.

मुद्राराक्षस नाटकात चाणक्याने चंद्रगुप्ताला अनेक लोकांसमक्ष वृषल असे संबोधले आहे. वृषल या शब्दाचा अर्थ इथे राजा असा आहे, असे श्री. हरिश्चंद्र सेठ यांनी सांगितले आहे. तसेच बसिलिओ या यूनानी शब्दाचे वृषल हे संस्कृत रूप आहे असे त्यांचे मत आहे. शक व कुषाण राजे अजेस व कदफिसेस यांच्या मुद्रांवर बसिलिओ अशी उपाधी कोरलेली आढळते. चंद्रगुप्ताचा शिकंदराच्या ग्रीक सेनेशी घनिष्ठ संबंध होता, त्यामुळे त्याला वृषल ही उपाधी मिळणे सहज शक्य होते, असे श्री. सेठ

यांचे मत आहे. [ सि. भा. सं. प.; शब्द और संस्कृति – डॉ. बुद्ध-प्रकाश, ना. प्र. प. वर्ष ६०, अंक ३–४. सं. २०१२ ]

**वृषलीपती** एक पारिभाषिक संज्ञा. वृषलीपतीचे लक्षण उद्-वाहतत्त्वात पुढीलप्रमाणे दिले आहे –

पितुर्गेहे च या कन्या रजः पश्यत्यसंस्कृता ।
भ्रूणहत्या पितुस्तस्याः सा कन्या वृषली स्मृता ॥
यस्तु तां वरयेत् कन्यां ब्राह्मणो ज्ञानदुर्बलः ।
अश्राद्धेयमपाङ्क्तेयं तं विद्याद् वृषलीपतिम् ॥

अर्थ–विवाहसंस्कार न झालेली कन्या पित्याच्या घरी जेव्हा ऋतुमती होते, तेव्हा तिला वृषली असे म्हणतात. तिच्या पित्याला यामुळे भ्रूणहत्येचे पातक लागते. जो अज्ञानी ब्राह्मण तिचे पाणि-ग्रहण करतो, त्याला वृषलीपती असे नाव आहे. त्याला श्राद्ध-प्रसंगी बोलावीत नाहीत किंवा पंक्तीलाही घेत नाहीत. [ श. क. ]

**वृषवास्तुचक्र** मुहूर्तज्योतिषातील एक संज्ञा. घर, राज-वाडा, मंदिर किंवा गाव यांच्या बांधकामाला प्रारंभ करताना सूर्य ज्या नक्षत्राला असेल त्यापासून तीन नक्षत्रे वास्तुवृषभाच्या मस्तकावर असतात. त्याचे फळ वास्तू जळणे असे आहे. त्यापुढील चार नक्षत्रे पुढच्या दोन पायांवर असून, त्याचे फळ लोकवस्ती न होणे हे आहे. पुढची चार नक्षत्रे मागच्या दोन पायांवर असतात. त्यामुळे गृहकर्त्याचे वास्तव्य स्थिर होते. त्यापुढील तीन नक्षत्रे पाठीवर असतात. त्यामुळे संपत्तीची प्राप्ती होते. पुढची चार नक्षत्रे उजव्या कुशीवर असतात. लाभ हे त्याचे फळ होय. नंतरची तीन नक्षत्रे पुच्छावर असतात. त्या-मुळे गृहपतीचा नाश होतो. त्यापुढील चार नक्षत्रे डाव्या कुशी-वर असतात. दारिद्र्य हे त्याचे फळ आहे. अखेरची तीन नक्षत्रे मुखावर राहतात. त्यामुळे सततची पीडा होते. एकंदरीत गृहा-दिकांच्या आरंभाला सूर्य-नक्षत्रापासून सात नक्षत्रे अशुभ होत. वृषवास्तुचक्र पाहून ज्या दिवशी शुभ नक्षत्र असेल त्या दिवशी बांधकामाला आरंभ करायचा असतो. [ मु. चिं.; नि. सिं. ]

**वृषव्रत** एक तिथिव्रत. शिव ही या व्रताची देवता आहे. कार्तिकी पौर्णिमेला एक बैल पोळ म्हणून सोडणे व त्या दिवशी नक्त करणे असा याचा विधी आहे. फल – शिवलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**वृषाकपी** एक वैदिक व्यक्ती. हा मंत्रद्रष्टाही आहे. वृषाकपी या शब्दाचा अर्थ वर्षाव करणारे माकड असा आहे. याला इंद्राने पाळले होते, असे काहींचे मत आहे. याचा इंद्र व इंद्राणी यांच्याशी झालेला संवाद ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातल्या ८६ व्या सूक्तात आहे. इंद्राचे या वृषाकपीवर विल-क्षण प्रेम होते. त्यामुळे इंद्राणी वृषाकपीचा मत्सर करीत असे. त्या बाबतीत तिचा इंद्रावरही राग होता.

वृषाकपी म्हणजे नक्की कोण, या विषयी विद्वानांत मतभेद आहेत. लो. टिळकांनी ती एक भौतिक घटना असल्याचे म्हटले आहे. ते लिहितात – वृषाकपी म्हणजे दक्षिणायन बिंदूजवळचा किंवा ध्रुवप्रदेशातील दीर्घ काळोख्या रात्रीच्या प्रारंभी क्षिति-जाखाली उतरणारा सूर्य होय.

श्री. राहुल सांकृत्यायनांच्या मते वृषाकपी म्हणजे अग्नी होय. कारण इंद्र हा अग्निमुखानेच हवी ग्रहण करीत असल्यामुळे तो इंद्राचा परम मित्र असणे स्वाभाविक ठरते. आपला पती आपल्या-पेक्षाही अग्नीची अधिक परिचर्या करतो, हे सहन न होऊन इंद्राणीने त्याचा राग धरला आहे.

श्री. प्र. रा. देशमुख यांनी वृषाकपीच्या बाबतीत एक नवा विचार मांडला आहे, तो असा–

वृषाकपी हा सिंधुसंस्कृतीतील लोकांचा वानर देव असावा. सिंधुसंस्कृतीच्या उत्खननात ज्या देवमूर्ती सापडल्या आहेत, त्यांत एक वानराची मूर्तीही आहे. ऋग्वेदिक आर्यांच्या शत्रूंचाही तशाच प्रकारचा देव असल्याचे वैदिक ऋचांवरून निदर्शनास येते. वर उल्लेखलेल्या वृषाकपीच्या सूक्तावरून वीर्यसिंचन हे वृषाकपीचे प्रमुख कार्य होते आणि तो आर्यपूर्वांचा देव होता, असे कळते. सूक्तनिर्मितीच्या काळी आर्यपूर्वांचे इतर देव ज्या-प्रमाणे आर्यांनी स्वीकारले, त्याचप्रमाणे वृषाकपीही स्वीकारला. सूक्तामध्ये वृषाकपी व इंद्र यांची तुलना करून वृषाकपीपेक्षा इंद्र श्रेष्ठ आहे, असे दाखवले आहे. त्यांतील एका ऋचेचा अर्थ असा – जेव्हा आमचा स्वामी इंद्र याने तुमची पोषण करणारी संपत्ती हरण केली, तेव्हा तुमच्या या जंगली पशूने म्हणजेच वृषाकपीने काय केले ? आमचा इंद्रच श्रेष्ठ आहे.

वृषाकपी म्हणजे वीर्य सिंचन करणारा म्हणजे मैथुनक्रियेत जोरदार असा अर्थ घेऊनही वृषाकपीपेक्षा इंद्रच श्रेष्ठ असल्याचे वरील सूक्तातच म्हटले आहे. यावरून आर्यपूर्वांच्या देवांपेक्षा आपले देव अधिक श्रेष्ठ आहेत, असे दाखवण्याचा हा आर्यांचा प्रयत्न दिसतो.

सांप्रत सर्वत्र पूजाविषय झालेला वानरस्वरूपी हनुमान हा मुळात सिंधुसंस्कृतीतील लोकांचा देव होता. वेदांत त्यालाच वृषा-कपी असे संबोधिले आहे. शाक्तांच्या उपासनेतही त्याला वृषा-कपीच म्हटले असून, आपल्या बीजाक्षर कोशात त्याच्यासाठी र, रं अशी बीजाक्षरे दिली आहेत. हाच देव लोकसंस्कृतीत हनु-मान किंवा हनुमंत बनला. यावरून वृषाकपी हा अत्यंत प्राचीन

असा देव असल्याचे समजते. तो लिंगपूजक लोकांचा देव असल्यामुळे वीर्यसिंचन हे त्याचे प्रधान कार्य ठरले.

श्री. अ. ज. करंदीकर यांनी वृषाकपीचा संबंध एका तारकापुंजाशी जोडला आहे. ते म्हणतात – कन्या तारकापुंजांतील काही तारे मिळून एका कपीची आकृती मिसर आणि चीन यांसारख्या दूरदूरच्या देशांतील प्राचीन ज्योतिष्यांनी कल्पिली होती. नारायणीयोपाख्यानांतील परंपरेप्रमाणे एकत आणि द्वित या ऋषींना वानरजन्मात रामाच्या रूपाने साक्षात दर्शन देण्याचे अभिवचन नारायणाने दिले होते. हेच कन्या राशीतील हस्तनक्षत्रात सवित्यासह निवास करणारे एकत आणि द्वित, वृषाकपिरूपाने ऋग्वेदांत आणि हनुमानरूपाने रामायणांत भेटतात. [ ऋ. आ.; प्रा. च. को.; सि. ऋ. हिं. सं. ]

## वृषोत्सर्ग

याचा अर्थ बैल किंवा वळू कायमचा सोडून देणे असा आहे. मृताला स्वर्ग मिळण्यासाठी मृताच्या अकराव्या दिवशी वृषोत्सर्ग करावा, असे सांगितले आहे. काही श्रद्धाळू माणसे आजही तो करतात. वृषोत्सर्ग हा केवळ अंत्यक्रियेतलाच विधी नाही, तर तो काम्यही आहे. ज्याला उत्तम गतीची अपेक्षा असते, तो स्वतःच्या पारलौकिक कल्याणासाठी आणि इहलोकी आपला वंशवेल अविच्छिन्न राहण्यासाठी वृषोत्सर्ग करतो. काम्य वृषोत्सर्ग कार्तिक पौर्णिमेला किंवा रेवती नक्षत्र असलेल्या आश्विन पौर्णिमेला करावा, असे सांगितले आहे.

या विधीत जो वळू सोडायचा तो सुलक्षणी, काळा किंवा तांबडा असावा. त्याचे तोंड, शेपूट, पाय व शिंगे शुभ्र असावी. तो गायींच्या कळपांचे रक्षण करण्यास समर्थ म्हणजे धष्टपुष्ट आणि उंच असावा. त्याच्याबरोबर चार कालवडी, निदान एक तरी कालवड सोडावी. अशा प्रकारचा हा वळू सोडून दिला असता कर्त्याला अश्वमेधाचे फल लाभते आणि मागच्या दहा व पुढच्या दहा पिढ्या पवित्र होतात, असे देवीपुराण व भविष्यपुराण यांत सांगितले आहे. ऋग्वेदीय ब्रह्मकर्मात वृषोत्सर्गाचे विधान सांगितले आहे, ते असे–

कर्त्याने घराच्या बाहेर पवित्र ठिकाणी वृषोत्सर्गाचा संकल्प करावा. आचार्याने स्थंडिलादी कृत्ये करून अध्वर नामक अग्नीची प्रतिष्ठा करावी. मग त्या अग्नीत रुद्रासाठी चरू, सोमासाठी पायस व इंद्रासाठी यावक या पदार्थांचे हवन करावे. मग सोडायचा वळू किंवा पाडा आणि एका वर्षाहून अधिक वयाची कालवड या दोघांना पुढे आणावे. त्या दोघांना अभिषेक करावा. वस्त्रे, पुष्पमाला इ. साधनांनी त्यांना सजवावे. 'ऋषभं मा समानानाम्' (ऋ. १०.१६६) हे सूक्त जपावे. वळूला प्रदक्षिणेने अग्नीच्या पूर्वभागी आणावे. मग त्याच्या उजव्या जांघेवर त्रिशूल व चक्र तापवून त्याचें डाग द्यावे. आणि वळू आणि कालवड दोघांनाही सोडून द्यावे. यजमानाने त्या जाणाऱ्या वळूची पुढील वाक्याने प्रार्थना करावी –

> 'भो वृष अनया वत्सतर्यासह तृणं भक्ष जलं पिब
> यथासुखं क्रीडस्व '

अर्थ – हे वृषभा, तू या कालवडीसह गवत खा, पाणी पी आणि मनसोक्त विहार कर.

त्यानंतर यजमानाने काही सूक्तांचे पठण करावे. मृतासाठी वृषोत्सर्ग असेल तेव्हा मृताच्या नामगोत्रादिकांचे उच्चारण करून वळूच्या शेपटीवर तर्पण करावे. मग शेषकर्म समाप्त करून ब्राह्मणाला आमान्न, उदकुंभ व दक्षिणा द्यावी. या सोडलेल्या वळूला कोणीही धरू नये, बांधू नये व नांगराला जुंपू नये, असे सांगितले आहे.

काम्य वृषोत्सर्गात वळू व कालवड सोडण्याच्या पूर्वी त्या दोघांचे लग्न लावण्याचीही पद्धत आहे. वृषोत्सर्ग हे एक प्राचीन विधान आहे. प्राचीन काळी गायी व बैल हेच प्रमुख धन मानले जात होते. या धनाची अभिवृद्धी व्हावी म्हणून एखादा बैल चांगल्या प्रकारे वाढवून व धष्टपुष्ट करून गायींच्या कळपात सोडीत. मग कळपातला म्हातारा वळू कळपातून काढून घेत. कळपांत नवा वळू सोडणे व जुन्या म्हाताऱ्या बैलाचा याग करणे यासंबंधीचे विधान व मंत्र तैत्तिरीय संहितेत (३.३९) सांगितले आहेत. चांगल्या वळूमुळे गायी-बैलांची पैदास चांगली होत असे. म्हणून अशा प्रकारे वळू सोडणे हे एक पुण्यकर्म मानले गेले. सांप्रतचे वृषोत्सर्ग विधान त्या प्राचीन परंपरेतून आले आहे. [ हि. ध.; नि. सिं. ]

## वृष्टिप्रद व्रत

एक काम्य व्रत. पाऊस वेळेवर व पुरेसा पडावा म्हणून हे व्रत करतात. याचा विधी असा–एका शुभ दिवशी प्रातःकाळी किंवा वारुण योगावर व्रतकर्त्याने स्नान करून व ओले वस्त्र नेसून सूर्याकडे तोंड करून शुभासनावर बसावे. त्या दिवशी निराहार राहावे. हातात जल, फलपुष्प व गंधाक्षत घेऊन 'मम समस्तलोकोपकारकामनासिद्ध्यर्थं वृष्टिप्राप्तये ऋग्वेदीय अच्छावदेति सूक्तस्यानुष्ठानमहं करिष्ये' असा संकल्प करावा. जलवेताच्या दहा हजार समिधा तुपात किंवा दुधात बुडवून 'अच्छावदत०', 'विवृक्षान् हन्ति०', 'रथीव कशया०', इ. सूक्तांनी पर्जन्याला उद्देशून त्यांचे अग्नीत हवन करावे. अशा प्रकारे जास्तीत जास्त पाच दिवस व पाच रात्री हवन करावे. रात्री एकट्याने जागरण करणे शक्य नसेल तर आणखी तीन व्यक्तींचे साहाय्य घ्यावे व पाळीपाळीने हवन करावे. असे केल्याने हमखास भरपूर वृष्टी होते. [ व्र. प. ]

**वृष्णिवंश** यमुनेच्या किनाऱ्यावरील शूरसेन देशात प्राचीन काळी मथुरा येथे भीमाचा पुत्र अंधक राज्य करीत होता. भीमाच्या दुसऱ्या पुत्राचे नाव वृष्णी असे होते. वृष्णीच्या वंशातील शूर नामक पुरुषाने शूरसेन प्रदेशातच शौरपुर नामक शहर वसवले व तिथे आपले वेगळे राज्य स्थापन केले. शूराचा पुत्र वसुदेव होता. वसुदेवाला कृष्ण व बलराम असे दोन पुत्र होते. वृष्णिवंशातील लोकांना यादव अशी संज्ञा होती. कृष्णाच्या अवतारसमाप्तीनंतर प्रभासक्षेत्रात यादवांचे आपसात युद्ध झाले व त्यात या वंशातील यादवांचा संपूर्ण नाश झाला.

महाभारतात वृष्णिवंशातील यादवांचा उल्लेख अंधक व भोज या राजांबरोबर केलेला आहे. हे तीनही वंश यादववंशाच्या शाखा होत्या. पाहा – यादव राजवंश. [ प्रा. च. को.; ब्र. सां. इ.]

**वृक्षपूजा** वड, पिंपळ, औदुंबर, इ. वृक्षांची पूजा प्राचीन काळापासून जगात सर्वत्र सुरू आहे. या पूजेचे प्रयोजनही थोडयाफार फरकाने सर्वत्र सारखेच आहे. भारतातील वृक्षपूजेचा उगम पाहता जी कारणे कळून येतात, ती अशी –

(१) पृथिव्यादी पंचमहाभूतांच्या ठिकाणी असणाऱ्या अलौकिक शक्ती आदिमानवाला पूजनीय वाटल्या व त्यांची प्रत्यक्ष प्रतीके म्हणून मानव दगड-धोंडे, पशु-पक्षी, झरे, नद्या यांप्रमाण वृक्षांचीही पूजा-प्रार्थना करू लागला.

(२) वेगवेगळ्या वृक्षांच्या पानांचा, फुलांचा, फळांचा, खोडांचा, मुळांचा किंवा त्यांच्या इतर अंगांचा मनुष्यप्राण्याला आसऱ्यासाठी, सुवासासाठी, अन्नासाठी उपयोग होऊ लागला. तेव्हापासून मानवाची वृक्षाकडे कृतज्ञभावाने पाहण्याची प्रवृत्ती वाढू लागली आणि उपकारकर्त्याविषयीची आदरभावना बळावून वृक्षपूजेची प्रथा सुरू झाली.

(३) देव, यक्ष, राक्षस, गंधर्व, किन्नर, इ. दैवी व अतिमानवी योनीतील अद्‌भुत, अलौकिक कृत्ये करणाऱ्या शक्तींचा वास उच्च स्थानी व त्यातही प्राधान्याने वृक्षांवर असल्याची मानवाची कल्पना होती आणि त्यामुळे देव, यक्ष, गंधर्वादी शक्तींविषयी पूज्यभाव व्यक्त करण्याचा प्रत्यक्ष पर्याय म्हणून वृक्षपूजा प्रचलित झाली.

(४) काही देवांचा आणि काही महामानवांचा किंवा देवत्वाप्रत पोचलेल्या सत्पुरुषांचा या ना त्या निमित्ताने ज्या ज्या वृक्षांशी संबंध आला, ते ते वृक्ष लोकांना पूज्य व वंदनीय वाटू लागले. उदा० भगवान् बुद्धाला ज्या अश्वत्थ वृक्षातळी बोधी प्राप्त झाली, तो अश्वत्थ वृक्ष बोधिवृक्ष या नावाने बौद्धांना प्रिय, वंदनीय व पूजनीय ठरला. दत्तात्रेयाचे वास्तव्य औदुंबराच्या तळवटी असल्याच्या पौराणिक कल्पनाबंधामुळे औदुंबर हाच दत्तात्रेयाचे दृश्य प्रतीक म्हणून पूजाविषय झाला. सावित्रीने आपल्या पातिव्रत्यप्रभावाने यमाला निरुत्तर केले व त्याच्या वरप्रसादाने आपला मृत पती सत्यवान याला पुनश्च जिवंत केले, तो प्रसंग वटवृक्षाखाली घडला असल्यामुळे त्या प्रसंगाचे चिरंजीव प्रतीक म्हणून वटवृक्ष, त्याची फांदी किंवा त्याचे चित्र हा स्त्रियांच्या सौभाग्यव्रतात एक पूज्य भाग होऊन राहिला.

वेद, उपनिषदे, महाभारत, गीता, इ. ग्रंथांत अश्वत्थ नामक एका दिव्य वृक्षाचे वर्णन वारंवार येते. या वृक्षाला अश्वत्थ हे नाव मिळण्याचे कारण ऋग्वेदात व नंतरच्या यज्ञीय परंपरेत आढळणाऱ्या एका कल्पनेत आढळते. सूर्य हा वैश्विक अश्व आहे, ही ती कल्पना होय, अश्वत्थ म्हणजे अश्वस्थ. म्हणजेच अश्वात मूळ धारण करणारा वृक्ष. हा सूर्यरूपी वृक्ष होय. सूर्यरूपी अश्व हे प्रकाशवृक्षाचे मूळ. सूर्यकिरण या त्याच्या डहाळ्या. दररोज साक्षात दिसणारा मध्यान्हीचा सूर्यप्रकाश म्हणजेच अश्वत्थवृक्ष ही प्राचीन लोकांची त्यामागची कल्पना होती.

भगवद्‌गीतेत (गीता १५.१-६) या अश्वत्थ वृक्षालाच संसारवृक्ष मानून त्याचे सविस्तर वर्णन केले आहे. कठोपनिषदात (३.१,) या वृक्षाला ब्रह्मवृक्ष म्हटले आहे.

ऋग्वेदात वरुणाच्या स्तूपाचे वर्णन करतानाही तो एक प्रकाशवृक्ष असल्याचे म्हटले आहे (ऋ. १.२४). ऋग्वेदातच अन्यत्र सूर्यवृक्षाची एक वेगळी कल्पना मांडली आहे. आदित्यमंडल हे प्रकाशवृक्षावर असलेले मधाचे पोळे असून, त्यातून बाहेर पडणारे किरण हे पक्षी आहेत. हे किरणपक्षी त्या सूर्यबिंबाच्या पोळ्यातील मध खातात (ऋ. १.१६४.२१–२२).

यमाचे निवासस्थान अंतरिक्ष लोकी अश्वत्थ वृक्षाखाली असल्याचे ऋग्वेदात सांगितले आहे (ऋ. १०.१३५.१). अथर्ववेदातही अश्वत्थ वृक्षाला देवांचे निवासस्थान म्हटले आहे. वरच्या बाजूस मुळे पसरलेल्या आणि खालच्या बाजूस फांद्या लोंबत असलेल्या वरुणाच्या वृक्षाचा निर्देश ऋग्वेदातच (ऋ. १.२४.७) असून, हा वारुण वृक्ष म्हणजे अश्वत्थच होय, असे चित्रावशास्त्री सांगतात. (अश्वत्थ पाहा).

**वृक्षविषयक संकेत व समजुती** – प्राचीन काळी वृक्षांना अग्नीत आहुती देत. त्यांच्या प्रीत्यर्थ यज्ञात नरबळीही देत. त्यांना कौल लावला असता ते कीर्ती, संपत्ती व संतती देतात, अशी समजूत होती. वृक्षांच्या फांद्यांना माळा घालून, त्यांच्या भोवती दिवे पाजळून व त्यांना नैवेद्य समर्पण करून लोक वृक्षोत्सव करीत, असे जातकात सांगितले आहे. अश्वत्थाची मुंज व तुळशीचे लग्न करण्याची प्रथा प्राचीन काळापासून आहे. याशिवाय, एखाद्या पुरुषाच्या दोन बायका मृत झाल्या व तिसऱ्यांदा त्याला लग्न

करायचे असल्यास त्या होणाऱ्या वधूचा किंवा वराचा अपमृत्यू होऊ नये म्हणून वराचे प्रथम रुईशी लग्न लावण्याची प्रथा आहे. रुईला सूर्यकन्या मानले आहे. क्वचित रुई वृक्षाला सूर्यप्रतीकही समजतात. काही आदिवासींमध्ये मुलीचे लग्न प्रथम एखाद्या वृक्षाशी व मग वराशी लावतात. दोन वृक्षांचेही परस्परांशी विवाह करण्याची चाल काही जातींत आढळते. बृहत्संहितादी ग्रंथांतून वृक्षांचा उपयोग भूत-पिशाच्यांच्या निवासासाठी व जादूटोण्यासाठी असल्याचे सांगितले आहे. एखादा वृक्ष तोडण्यापूर्वी त्यात वास्तव्य करणाऱ्या आत्म्याची क्षमा मागण्याची प्रथा पुष्कळशा जाती-जमातींमध्ये आढळते. शाक्तपंथी लोक काही विशिष्ट वृक्षांना आपले कुलवृक्ष मानतात आणि त्यांना वंदन केल्याशिवाय दिवसाच्या कामांना आरंभ करीत नाहीत. काही जातींत विवाहप्रसंगी देवक म्हणून बेल, अंजीर, वड, शमी यांच्या सपर्ण शाखा पूजतात.

**वृक्षमाहात्म्य** – वृक्ष हे मानवांना व अन्य प्राणिमात्रांना छाया, निवारा, पाने, फुले, फळे, इंधन, ओषधी, इ. देऊन विविध प्रकारे त्यांच्या उपयोगी पडतात. वृक्षांच्या या परोपकारी स्वभावाचा महिमा प्राचीन काळापासून आजपर्यंत भारताच्या सर्व भाषांत गायिला गेला आहे. याविषयी एक संस्कृत सुभाषित आहे, ते असे –

**छायामन्यस्य कुर्वन्ति तिष्ठन्ति स्वयमातपे ।**
**फलन्ति च परार्थेषु नात्महेतोर्महाद्रुमाः ।।**

(सिंहासन बत्तीशी २)

**अर्थ** – महावृक्ष स्वतः उन्हात उभे राहतात आणि अन्यांना सावली देतात. ते दुसऱ्यांच्यासाठी फळे धारण करतात. स्वतःसाठी नाही.

ज्ञानेश्वरमहाराजांनी सत्पुरुषाची लक्षणे सांगताना वृक्षांचा असाच गौरव केला आहे. ते म्हणतात–

**जो खांडावया घावो घाली । कां लावणी ज्याने केली ।**
**दोघां एकचि सावुली । वृक्ष दे जैसा ।।**

तुकाराम महाराजांना तर वृक्षवल्ली ही स्वतःची सोयरी वाटतात.

भारतीय लोकसाहित्यातही जागोजाग वृक्षगौरव आढळतो. सिमल्याच्या डोंगरी विभागात एक लोककथा प्रसिद्ध आहे ती अशी–

एका शेतकऱ्याच्या शेतात एक प्रचंड, सुंदर आणि घनदाट आम्रवृक्ष होता. आंब्याच्या मोसमात तो भरभरून आंबे देई. एरवी गार सावली देई. एका गरीब शेतकऱ्याच्या शेतात इतका सुंदर आणि एवढी भरपूर फळे देणारा वृक्ष असावा ही गोष्ट त्या गावच्या राजाला आवडली नाही. त्याने तो वृक्ष तोडून टाकण्याची आज्ञा दिली.

त्याच रात्री त्या राजाच्या स्वप्नात एक दिव्य पुरुष आला व त्याने राजाला म्हटले –

'राजा, अनेक वर्षांपूर्वी मी एका गावात वाण्याच्या रूपात राहत होतो. त्या वेळी मी फार पाप केले. संपत्तीने धुंद होऊन गोरगरिबांना छळले व नाडले. मरणोत्तर मी चित्रगुप्ताच्या न्यायालयात पोचलो. तिथे माझ्या पापी वागण्याबद्दल चित्रगुप्ताने शिक्षा सांगून आज्ञा केली, की 'तू आता मृत्युलोकात वृक्षरूपाने जन्म घे व मागील जन्मी जे अधर्माने मिळविले आहेस, ते पुढील जन्मी सद्धर्माने वागून लोकांना सढळ हाताने देऊन टाक.'

'चित्रगुप्ताच्या त्या आज्ञेप्रमाणे गेली पन्नास-साठ वर्षे या वृक्षाच्या रूपाने मी इथे उभा आहे व लोकांना सुखसमाधान देत आहे. नुकतेच माझे सर्व पाप फिटले आहे. तू आता मला खुशाल तोडून टाक. मी आनंदाने भूमिशयन करीन व मग दिव्य लोकाला जाईन.'

राजाला त्या गोष्टीतला मथितार्थ समजला व वृक्षाच्या परोपकारितेचा गौरव करून त्याने तो वृक्ष पाडण्याची आपली आज्ञा रद्द केली.

अनेक धार्मिक व लौकिक समारंभांतून वृक्षांविषयी आदरभाव व्यक्त करण्यासाठी त्यांच्या शाखा, पल्लव, पुष्पे, इ. पवित्र मानली जातात. केवळ वृक्षांविषयीचे उत्सवही साजरे केले जातात. उदा० तुलसीविवाह, अश्वत्थपूजन, वटपौर्णिमा, आवळीभोजन, अर्कविवाह इत्यादी.

असलेल्या वृक्षांचे पूजन, संरक्षण करणे याबरोबरच नवनवीन वृक्षांचे रोपण करणे ही प्रथाही प्राचीन काळापासून सर्वत्र रूढ आहे. वृक्षारोपणाचा शास्त्रोक्त विधीही प्रचलित आहे. भविष्योत्तर पुराणात वृक्षारोपणाचे माहात्म्य सांगणारा एक श्लोक आढळतो, तो असा–

**अश्वत्थमेकं पिचुमन्दमेकं न्यग्रोधमेकं दशचिञ्चिणीकम् ।**
**कपित्थबिल्वामलकीत्रयं च पञ्चाम्ररोपी नरकं न पश्येत् ।।**

(१२८.२.१०)

**अर्थ** – जो (मानव) एक पिंपळ, एक निंबवृक्ष, एक वड, दहा चिंचवृक्ष, तीन कवठाची, तीन बेलाची, तीन आवळीची व पाच आंब्याची झाडे लावतो, तो कधीही नरक पाहत नाही.

वृक्षारोपणसमयी बागेतील आधीच्या वृक्षांवर सर्वौषधीयुक्त जल शिंपडून सुगंधी द्रव्ये व पुष्पे यांनी त्यांना सुशोभित करावे. त्यांना रेशमी वस्त्रे नेसवावी, वृक्षांच्या पानांना सुवर्णाच्या सुईने छिद्रे पाडावी, तसेच त्यांना सोन्याच्या काडीने काजळ लावावे; मग नव्या वृक्षासाठी उंच आसन करावे, त्यावर सात-आठ सोन्याची फळे ठेवावी, आसनाखाली सोन्याचे तुकडे घाल

लेली पात्रे ठेवावी, नंतर इंद्र, लोकपाल व वनस्पती यांना हविर्भाग द्यावा; आणि एका दुभत्या गाईला शुभ्र वस्त्र पांघरून व



वृक्षपूजा – एक प्राचीन शिल्प

सुवर्णालंकार घालून वृक्षवाटिकेत मुक्त सोडावे, असे सांगितले आहे. या प्रसंगी सर्व पुरोहितांचा सन्मान करावा; त्यांना गायी, सुवर्णाच्या साखळ्या, अंगठ्या व मानवस्त्रे देऊन पक्वान्नभोजन घालावे; तसेच त्या दिवसापासून चौथ्या दिवशी यव, काळे तीळ, मोहऱ्या व पलाशाच्या समिधा यांनी होम करावा, असेही सांगितले आहे.

एका वृक्षारोपणाचे महत्त्व दहा पुत्रांएवढे आहे, असे मत्स्यपुराणात (१५४.५१२) म्हटले आहे.

स्कंदपुराणाच्या मते विष्णूचे वास्तव्य वटवृक्षात, ब्रह्मदेवाचे पलाशवृक्षात, शक्तीचे आम्रवृक्षात, इंद्राणी व अन्य देवपत्न्या यांचे लतावेलींमध्ये आणि उर्वश्यादी अप्सरा यांचे मालती व तत्सम पुष्पवृक्षांत असते. श्रीकृष्ण हा अश्वत्थतळी निजधामाला गेला. वटवृक्ष हा काल किंवा यम या देवतेचे प्रतीक आहे. अर्क वृक्ष सूर्याला; तुळस, कदंब, अश्वत्थ कृष्णाला; बिल्व, अशोक शिवाला; तसेच शमी, मंदार, दूर्वा गणपतीला प्रिय असल्याचे पारंपरिक संकेत आहेत.

द. भारतातील शिवमंदिरांतून विविध वृक्षांचे माहात्म्य आहे. हे वृक्ष स्थलवृक्ष या नावाने मान्यता पावले आहेत. मदुरेच्या मीनाक्षीच्या मंदिरात मीनाक्षी-सुंदरेश्वराचा कदंब वृक्ष आणि त्रिचनापल्लीजवळच्या जंबुकेश्वराचा जंबू वृक्ष ही त्याची दोन ठळक उदाहरणे होत. भारताच्या विविध भागांतील अनेक मंदिरांतून, शिलापट्टांतून व लेण्या-विहारांतून अनेक वृक्ष शिल्पांकित झाले आहेत, त्याचे कारण म्हणजे त्यांच्याविषयी लोकमानसात वसत असणारी श्रद्धा हे होय.

सिंधुखोऱ्यात सापडलेल्या शिक्क्यांवर व भाजलेल्या मातीच्या ताइतांवर वृक्षपूजेची चित्रे आढळतात. निरनिराळ्या शिलालेखीय पुराव्यांवरून कळते, की प्राचीन काळी प्रत्येक गावात एकेक पवित्र व पूजनीय वृक्ष असे. काही शिलालेखांत म्हटले आहे, की अशा वृक्षांखाली न्यायदानाचे काम चालत असे. एका शिलापट्टात एका राजाची पूजा एका पवित्र वृक्षाखाली चालू असल्याचे दिसते. सूर्य एखाद्या पवित्र वृक्षावरून जात असता त्या वृक्षाला सन्मानाने भोजन दिले जाई. नरबळी हा विशिष्ट वृक्षाखाली देत. प्राचीन शिलापट्टांत ज्या वृक्षाची पूजा केली जात असल्याचे दाखवले आहे, त्यांत बहुतेक ठिकाणी तो अश्वत्थ वृक्ष असल्याचे दिसते. [ एन्सा. रि. ए.; रि. इं.; प्रतीकशास्त्र; लौ. दं.; अश्वत्थाची पाने; देवीकोश ३; ट्री-वर्शिप; फोकलोअर – जून, जुलै, १९६४ व एप्रिल, मे, जून १९६५ ]

**वृक्षासन** एक योगासन. याची कृती पुढीलप्रमाणे आहे – प्रथम जमिनीवर सरळ उभे राहावे. दोन्ही हात वर उचलून त्यांचे आंगठे एकमेकांना चिकटवावे. नंतर पायाच्या बोटांवर जोर देऊन उभे राहावे. या वेळी पायांचे तळवे जमिनीपासून वर उचलावे. सर्व शरीर ताणून धरावे. श्वासोच्छ्वास चालू ठेवावा. यथाशक्य अभ्यास केल्यावर हात खाली घ्यावे. मग पायाचे तळवे जमिनीवर टेकवावे. आपल्या शक्त्यनुसार सुमारे दीड मिनिटापर्यंत हे आसन करावे. या आसनामुळे शरीराचा कंप कमी होतो. [ उ. यो. द.; यो. सो. पू. ]

**वेंकटनाथ** (इ. स. १२६८–१३६९) एक वैष्णव आचार्य. याच्या पित्याचे नाव अनंतसूरी व मातेचे नाव तोतारंबा असे होते. द्वितीय रामानुजाचार्य किंवा वादिहंसांबुवाचार्य हे त्याचे मामा व गुरु होते. न्यायकुलिश हा त्यांचा प्रसिद्ध ग्रंथ होय. कांचीजवळच्या थूपिल नामक गावी वेंकटनाथाचा जन्म झाला. मुंजीनंतर तो आपल्या मामाकडे अध्ययनासाठी गेला. जात्याच त्याची बुद्धी फार तीव्र असल्यामुळे त्याने विशीच्या आतच सर्व शास्त्रांचे अध्ययन पूर्ण केले. नंतर तो गृहस्थाश्रमी बनला. आचार्य विद्यारण्य हे त्याचे सहाध्यायी व मित्र होते. हे दोघेही मोठे दार्शनिक व कवी होते.

काही दिवस अध्यापनाचे काम केल्यावर वेंकटनाथ तिरुपा-

[?]द्रपुरम या गावी जाऊन राहिला. इथेच त्याला सर्वतंत्रस्वतंत्र ही उपाधी मिळाली. मग तो तिरुक्कोइलरला गेला व पुढे कांचीला स्थायिक झाला. तिथून त्याने उत्तर भारताची यात्रा केली. यात्रेहून परतल्यावर श्रीरंगमच्या पंडितांनी आग्रह केला म्हणून तो तिथे राहायला गेला. मलिक काफूर मदुरेवर स्वारी करायला चालला असता त्याने श्रीरंगमचीही नासधूस केली. त्या वेळी वेंकटनाथ स्वतःचे प्राण वाचवून सत्यकाल नामक गावी जाऊन राहिला.

विद्यारण्याने विजयनगरच्या स्थापनेनंतर वेंकटनाथाला बोलावले होते; पण त्याने त्या निमंत्रणाचा स्वीकार केला नाही. मग विजयनगरच्या वैष्णव भक्तांनी विनंती केल्यावरून त्यांच्यासाठी त्याने अनेक ग्रंथांची देशी भाषेत रचना केली. सुभाषितनीती हा त्यांतला सर्वप्रसिद्ध ग्रंथ होय.

वेंकटनाथ मोठा भक्त होता. शिवाय उत्तम धर्मोपदेशक, आदर्श शिक्षक व प्रतिभासंपन्न कवी म्हणूनही त्याची ख्याती होती. त्याने सुमारे एकशेआठ ग्रंथांची रचना केली. हे सारे ग्रंथ बव्हंशी तमिळ भाषेत व त्याच लिपीत आहेत. त्यांतील काही ग्रंथांची नावे गरुडपंचशती, अच्युतशतक, रघुवीरगद्य, दायशतक, अभीतिस्तव, पादुकासहस्र, न्यायपरिशुद्धी, गीताटीका, ईशावास्योपनिषद्भाष्य अशी आहेत. [ हिंदुत्व ]

**वेंकटमाधव** (इ. स. चे ११ वे शतक) ऋक्संहितेचा एक भाष्यकार. काही लोकांचे अनुमान आहे, की याने ऋग्वेदावर दोन भाष्ये लिहिली आहेत. पहिल्या भाष्याच्या पहिल्या अध्यायाच्या शेवटी वेंकटमाधवाने आपला परिचय दिला आहे. त्यावरून याच्या पित्याचे नाव वेंकटार्य व मातेचे नाव सुंदरी असे होते, याला वेंकट व गोविंद असे दोन पुत्र होते, हा कौशिकगोत्री असून, दक्षिणापथातील चोल देशाचा रहिवासी होता, असे कळते.

याच्या भाष्याचे नाव ऋगर्थदीपिका असे असून, ते अत्यंत संक्षिप्त आहे. त्याने केवळ मंत्रांतील पदांचीच व्याख्या केली आहे. याने अनेक ठिकाणी ब्राह्मणग्रंथांतील प्रमाणे दिली आहेत. वेदांतील गूढ अर्थ समजण्यासाठी ब्राह्मणग्रंथांचा फार उपयोग होतो, असे याने सांगितले आहे. ऋग्वेदाचा अर्थ कोणाला किती समजतो, या बाबत त्याचा एक श्लोक प्रसिद्ध आहे, तो असा—

> संहितायास्तुरीयांशं विजानन्त्यधुनातनाः ।
> निरुक्तव्याकरणयोरासीत् येषां परिश्रमः ।।
> अथ ये ब्राह्मणार्थानां विवेक्तारः कृतश्रमाः ।
> शब्दरीतिं विजानन्ति ते सर्वं कथयन्त्यपि ।।

अर्थ — ज्यांनी केवळ निरुक्त व व्याकरण यांचे अध्ययन केले आहे, अशा आधुनिक लोकांना ऋक्संहितेचा फक्त एकचतुर्थांश अर्थ समजतो. परंतु ज्यांनी ब्राह्मणग्रंथांच्या अर्थाचे विवेचन श्रमपूर्वक केले आहे, अशा शब्दरीती जाणणाऱ्या विद्वानांनाच वेदाचा समस्त अर्थ समजतो व ते तो सांगतात.

वेंकटमाधवाने वेदार्थाचे ब्राह्मणग्रंथांना अनुकूल असे प्रतिपादन केले आहे. वैदिक मंत्रांचा अर्थ समजण्याच्या कामी याच्या भाष्याचा फार उपयोग होतो, कारण ते संक्षिप्त आहेत. [ वै. सा.; वै. सा. सं.; आ. सा. मा. ]

**वेंकटाध्वरी** (इ. स. चे १७ वे शतक) एक संस्कृत कवी. हा अत्रिगोत्री रघुनाथ दीक्षित व सितांबा यांचा मुलगा आणि प्रसिद्ध अप्पय्य दीक्षिताचा नातू होय. हा अप्पय्य दीक्षित कुवलयानंदकर्त्या अप्पय्य दीक्षिताहून भिन्न आहे. वेंकटाध्वरी कांचीला राहत होता. वेदांताचार्य वेंकटनाथ हे त्याचे गुरु आणि नीलकंठ चंपूचा कर्ता, प्रसिद्ध कवी नीलकंठ दीक्षित हा त्याचा सहाध्यायी होता. वेंकटाध्वरी सर्व शास्त्रांत निष्णात असून, रामानुजी वैष्णव संप्रदायाचा अनुयायी होता. लक्ष्मी ही त्याची उपास्य देवता होती. त्याने अनेक ग्रंथ रचले असून, त्यांत विश्वगुणादर्शचंपू, लक्ष्मीसहस्रस्तोत्र, हस्तिगिरीचंपू, इ. काव्ये प्रसिद्ध आहेत.

विश्वगुणादर्शात कवीने प्रत्येक वस्तूची स्तुती व निंदा केली आहे. त्यात लक्ष्मीही त्याच्या निंदास्तुतीचा विषय बनली. त्यामुळे लक्ष्मी कोपली व तिच्या कोपाने तो अंध झाला असे म्हणतात. पण त्याने एका रात्रीत लक्ष्मीसहस्रस्तोत्र रचून लक्ष्मीची क्षमा मागितली आणि त्यामुळे त्याची दृष्टी परत आली अशी दंतकथा आहे.

वेंकटाध्वरीचा संस्कृत भाषेवर मोठा अधिकार होता. त्याची कवित्वशक्ती उत्तुंग होती. त्याच्या काव्यात यमक, चित्र, श्लेष, उत्प्रेक्षा, अनुप्रास, इ. अलंकारांची उत्तम उदाहरणे पाहायला मिळतात. प्रसाद हा त्याच्या काव्याचा एक असाधारण गुण आहे. तत्कालीन परिस्थितीच्या अभ्यासासाठीही याचे वाङ्मय मोलाचे आहे. पाहा — चंपू वाङ्मय. [ क. का.; सं. सा. सो. इ.; सं. सा. इ.; म. गा.; म. च. को. ]

**वेंकटेश** विष्णूचे एक रूप. याचे प्रमुख स्थान आंध्र प्रदेशातील चित्तूर जिल्ह्याच्या चंद्रगिरी तालुक्यात शेषाचल पर्वतावर आहे. त्याला तिरुपती असे म्हणतात. वेंकटेशाला व्यंकोबा, वेंकटरामन, वेंकटाध्वरी, वेंकटाद्री, श्रीनिवास, इ. नावे आहेत. उत्तर भारतात हा देव गिरीचा बालाजी म्हणून प्रख्यात आहे. कारण त्याचे स्थान पर्वतावर आहे.

वेंकटेशाला विष्णूचा अवतार समजतात. तिरु म्हणजे श्री

आणि तिरुपती म्हणजे श्रीपती अर्थात विष्णू अशी त्याची व्युत्पत्ती सांगतात. काही पंडित वें = पाप, कट = नाश करणे यावरून पापनाश करणारा तो वेंकटेश असे म्हणतात. काहीजण वेंकट शब्द संस्कृत, तेलुगू वा कन्नड यांपैकी कोणत्याही भाषेतला नाही असे सांगतात. त्यांच्या मते वेंगल हा तमिळ शब्द असून, त्याचा अर्थ उज्ज्वल पर्वत असा आहे. वेंकटेशाचे मंदिर पर्वतावर आहे, म्हणून त्याला हे नाव प्राप्त झाले असावे.

ज्याप्रमाणे वेंकटेशाला विष्णूचा अवतार मानतात, त्याप्रमाणे वेंकटाद्रीला शेषनागाचे स्वरूप समजतात. वेंकटाद्रीचे तमिळ रूप तिरुमलै होय. तिरु = श्री व मलै = पर्वत. यावरून श्रीपर्वत हे रूप सिद्ध होते. वेंकटाचलाला तद्देशीय लोक मुडलाद्री शेषाचल असेही म्हणतात

वेंकटाचलावर राहणाऱ्या विष्णूला श्रीनिवास असे नाव आहे. त्याची पहिली पत्नी लक्ष्मी. नंतर त्याने पद्मावतीशी विवाह केला. त्यासंबंधीची कथा भविष्यपुराणात दिली आहे, ती अशी–

कालहस्ती येथे माधव नावाचा ब्राह्मण राहत होता. तो एका वेश्येच्या प्रेमात पडला आणि तिच्याजवळ राहू लागला. तिच्या संगतीत तो मद्यमांसही सेवन करू लागला. कालांतराने ती वेश्या वारली आणि माधव यात्रेकरूंच्या एका जथ्यावरोबर वेंकटाचलावर गेला. तिथे गेल्यावर त्याची सर्व पापे जळून गेली. ब्रह्मदेवाने त्याला दर्शन दिले आणि सांगितले, की तू आकाशराजा म्हणून काही जन्मांनंतर पुन्हा जन्म घेशील आणि सर्व तोंडमंडलावर राज्य करशील. जगन्माता तुझ्या उदरी जन्म घेईल आणि भगवान विष्णू तिचे पाणिग्रहण करील.

फार पूर्वी कश्यपादी ऋषी जाह्नवीच्या तीरावर यज्ञ करीत होते. यज्ञफल मिळण्यासाठी कोणता देव योग्य आहे, हे त्यांना ठरवता येईना. तेव्हा योग्य देव शोधून काढण्याची जबाबदारी त्यांनी भृगू ऋषीवर सोपविली. भृगू प्रथम ब्रह्मलोकात आणि नंतर कैलासाला गेला. ब्रह्मा व शिव हे दोन्ही देव त्याला योग्य वाटले नाहीत म्हणून तो वैकुंठाला गेला. तिथे विष्णू शेषावर पहुडला होता आणि लक्ष्मी त्याच्या जवळ बसली होती. भृगूने विष्णूच्या वक्षःस्थळावर लाथ मारली. पण विष्णू त्याच्यावर रागावला नाही. उलट त्याच्या पायाला लागले नाही ना, अशी त्याने चौकशी केली. तेव्हा प्रसन्न होऊन भृगू म्हणाला की विष्णू हा सर्वोत्तम देव आहे आणि लक्ष्मी ही त्याच्या खालोखाल पूज्य आहे.

भृगूशी विष्णूने केलेले सदय वर्तन लक्ष्मीला आवडले नाही. ती विष्णूवर रागावली आणि पृथ्वीवर करवीर क्षेत्रात येऊन राहिली. विष्णूला तिचा विरह सहन होईना आणि तो वेंकटाचलावर पुष्करिणीच्या जवळ असलेल्या एका वारुळात तेजोरूपाने येऊन राहिला.

हजार वर्षे मध्यंतरी निघून गेली. चोळ देशावर एक पुण्यवान राजा राज्य करीत होता. त्या वेळी ब्रह्मदेवाने गायीचे, रुद्राने वासराचे व लक्ष्मीने गौळणीचे रूप घेतले. गौळणीने चोळराजाला गायवासरू विकले. नंतर ती गाय वेंकटाचलावरील श्रीनिवासाच्या वारुळावर आपला पान्हा सोडू लागली. तिचा हा रोजचाच क्रम सुरू झाला. गायीच्या गुराख्याच्या एकदा ध्यानात आले की गायीची कास रोज रिकामी असते. म्हणून तो एक दिवस तिच्या मागोमाग गेला. गाय नेहमीप्रमाणे वारुळावर पान्हा सोडीत असताना त्याने तिच्यावर काठी मारली. पण विष्णूने तो तडाखा आपल्या अंगावर झेलला. तत्काळ गुराखी मरण पावला. चोळराजाला हे कळल्यावर तो त्या स्थळी गेला. तेव्हा त्याला पिशाच होण्याचा शाप मिळाला. राजाने उःशाप मागितला तेव्हा श्रीनिवास त्याला म्हणाला, ' तू लवकरच शापमुक्त होशील आणि आकाशराजाच्या रूपाने जन्म घेशील. तुझ्या पद्मावती नामक कन्येशी मी विवाह करीन आणि तुला पुण्य मिळेल. '

श्रीनिवासाने नंतर वराहावतारातील विष्णूकडून वेंकटाचलावर राहण्याची अनुज्ञा मिळवली. शिवाय, वराहस्वामीने श्रीनिवासाच्या देखभालीसाठी आपली सेविका बकुलमालिका त्याला दिली. ती दुसरीतिसरी कोणी नसून पूर्वजन्मीची यशोदा होती.

द्वापर युगाच्या शेवटी तोंडमंडलावर आकाशराजा राज्य करीत होता. त्याच्या राणीचे नाव धरुणीदेवी. त्यांना संतान नव्हते म्हणून राजाने यज्ञ करायचे ठरवले. यज्ञासाठी भूमी नांगरीत असता त्याला एका कमळाच्या आत एक सुंदर कन्या सापडली. पद्मात म्हणजे कमळात सापडली म्हणून राजाने तिचे नाव पद्मावती असे ठेवले.

कालांतराने पद्मावती मोठी झाली. एक दिवस ती आपल्या सख्यांसह बागेत विहार करीत असता शिकारीसाठी हत्तीचा पाठलाग करीत श्रीनिवास तिथे आला. पद्मावतीला पाहून श्रीनिवास तिच्या प्रेमात पडला. तिच्याशी लग्न करण्याची इच्छा त्याने व्यक्त केली; पण पद्मावतीने ती इच्छा मानली नाही.

घरी आल्यावर श्रीनिवासाने पद्मावतीशी लग्न करण्याची इच्छा बकुलमालिकेला बोलून दाखवली आणि आपल्या रामावतारातील ती वेदवती म्हणजे मायासीता असल्याचे सांगितले. तसेच द्वापर युगात आपण तिच्याशी विवाह करू असे त्याने खऱ्या सीतेला त्या वेळी आश्वासन दिले असल्याचेही सांगितले. कारण सीतेने त्याच अवतारात तिच्याशी लग्न करण्याबद्दल रामाला विनवले होते.

हे सर्व ऐकल्यावर बकुलमालिका आकाशराजाकडे पद्मा-

वतीला मागणी घालण्यासाठी गेली. राजाने तिची इच्छा मानली व श्रीनिवास आणि पद्मावती यांच्या विवाहाचा मुहूर्त ठरवला.

पण श्रीनिवासाला लक्ष्मीची सारखी आठवण येत होती. म्हणून त्याने सूर्याला करवीर क्षेत्रात जाऊन लक्ष्मीला घेऊन यायला सांगितले. त्याप्रमाणे सूर्य लक्ष्मीला भेटला आणि श्रीनिवास तिच्यासाठी झुरत असल्याचे त्याने तिला सांगितले. तेव्हा ती लगेच वेंकटाचलावर गेली. दोघांनाही खूप आनंद झाला. नंतर तिच्या संमतीने त्याने पद्मावतीशी विवाह केला.

वेंकटेशाचे देवस्थान बरेच प्राचीन आहे. बलराम तीर्थयात्रा करीत दर्शनासाठी इथे आला असल्याची नोंद भागवतात आढळते (५.१९.१६; १०.७९.१३). याशिवाय बहुतेक सर्व पुराणांत वेंकटेशमाहात्म्य आहे. चोळ, पांड्य, पल्लव व तुळुव या दक्षिणेतील प्रमुख राजघराण्यांतील अनेक राजे आणि आळवार संत हे वेंकटेशाचे भक्त होते. इथली पूजापद्धतीही श्रीरामानुजाचार्यांनी ठरवून दिल्याप्रमाणे चालते.

तिरुपतीच्या वेंकटेशाची मूर्ती शैव-वैष्णव प्रतीकांनी युक्त आहे. हे स्थान ज्या डोंगरावर आहे, त्याचे पूर्वीचे नाव वृषशैल असे आहे. यावरून त्याचे शैवस्वरूप दिग्दर्शित होते. काहींच्या मते ही मूर्ती मुळात वीरभद्राची असावी. परंतु नंतर तिचे वैष्णवीकरण झाले.

वेंकटेशाची मूर्ती पाषाणाची आहे व तिचा वर्ण श्याम आहे. वेंकटेशाच्या मूळ मूर्तीचा श्रीलक्ष्मीची मूर्ती हा एक अविभाज्य भाग आहे. ती त्याच्या उजव्या छातीवर कोरलेली आहे. वेंकटेशाला रोज अनेक पुष्पहारांनी व रत्नहारांनी सजवतात. त्याच्या अलंकरणात तीन इंच व्यासाचा एक पाचू आहे. तो जगातील सर्वांत मोठा पाचू समजतात. रत्नखचित सुवर्णमुकुट, दोन हातांत शंख-चक्र, सोन्याची मकरकुंडले, सोन्याच्या पेटीत ठेवलेल्या दोन वाघनखांची माला. दोन बाहूंवर रत्नखचित सोन्याची नागभूषणे, लक्ष्मीच्या एकशे आठ प्रतिमा असलेली माला, तुळसीमाला, सोन्याच्या कोंदणात बसवलेल्या शाळिग्रामांची माला, सोन्याचे अनेक हार, वरद व कटीवर ठेवलेल्या हातांसाठी रत्नखचित सोन्याची आच्छादने, सोन्याचे जानवे, पायांना सोन्याची आवरणे, दशावतार कोरलेला सोन्याचा कंबरपट्टा, त्यात लटकावलेली सोन्याची सूर्यकटचार, छातीवर उजव्या-डाव्या बाजूंना सोन्याच्या कोंदणात बसवलेल्या श्रीलक्ष्मी व पद्मावती यांच्या प्रतिमा, इ. अलंकारांनी वेंकटेशाची मूर्ती नटलेली असते.

मंदिराच्या गर्भगृहात वेंकटेशाव्यतिरिक्त आणखीही काही मूर्ती आहेत, त्या अशा –

(१) **भोगश्रीनिवास** – मूलविग्रहाची ही चांदीची प्रतिकृती आहे. ही मूर्ती उभी व चतुर्भुज असून, तिच्या वरच्या दोन हातांत शंख-चक्र ही आयुधे आहेत. खालचा एक हात वरदमुद्रेत व दुसरा कटीवर ठेवलेला आहे. या मूर्तीत सहा टोकांचे एक यंत्र बसवलेले आहे. या मूर्तीला सर्व भोग आणि उपचार अर्पण करतात. ही मूर्ती मूलविग्रहाच्या जवळच असते. पल्लव राणी समवाई हिने इ. स. ९६६ मध्ये ही मूर्ती मंदिरात स्थापन केली आणि तिला पुष्कळ अलंकारही दिले.

(२) **मलय्यप्पन स्वामी** – वेंकटेशाची ही उत्सवमूर्ती आहे आणि मूलविग्रहाची प्रतिकृती आहे. मूर्ती सुमारे तीन फूट उंच असून, कमळावर उभी आहे. रत्नखचित अशा सोन्याच्या व प्लॅटिनमच्या अलंकारांनी ती विभूषित आहे. तिच्या उजव्या हाताला श्रीदेवी व डाव्या हाताला भूदेवी आहे.

(३) **उग्र श्रीनिवास** – पूर्वी ही वेंकटेशाची उत्सवमूर्ती होती. मूर्ती सुमारे दीड फूट उंच असून, तिच्या दोन्ही बाजूंना श्रीदेवी व भूदेवी उभ्या आहेत. सांप्रत वर्षातून एकदाच कार्तिकी द्वादशीला पहाटे या मूर्तीची मिरवणूक काढतात.

(४) **कोलुवू श्रीनिवास** – हा देव रोज दरबार भरवतो. त्या वेळी देवस्थानच्या हुंडीत किती रक्कम जमली ते त्याला सांगतात. त्या रकमेवर तो देखरेख ठेवतो अशी धारणा आहे. त्याला रोज पंचांग वाचून दाखवतात.

(५) **श्रीकृष्णमूर्ती** – नृत्याच्या अवस्थेतली याची बालमूर्ती फार सुंदर आहे. त्याच्या उजव्या हातात लोण्याचा गोळा आहे. त्याच्या शेजारी रुक्मिणी आहे. धनुर्मासात या मूर्तीला शय्याभोग अर्पण करतात.

(६) **चक्रत्तुलवर** – ही सुदर्शन चक्राची अधिष्ठात्री देवता आहे. मिरवणुकीच्या वेळी उत्सवमूर्तीच्या पुढे हिची मूर्ती असते.

(७) श्रीराम, सीता, लक्ष्मण व सुग्रीव यांच्या तांब्याच्या मूर्ती गर्भगृहात आहेत.

देवस्थानात वर्षभर अनेक उत्सव चालू असतात. वर्षातून चारदा इथे ब्रह्मोत्सव होतो–आश्विनातल्या श्रवण नक्षत्रावर, रथसप्तमीला, कार्तिकातल्या कौशिक एकादशीला आणि मुक्कोटी एकादशीला. त्यांपैकी पहिला अधिक महत्त्वाचा असतो. श्रवण नक्षत्राच्या आदल्या दिवशी सजवलेल्या घटांत धान्य पेरतात. उत्सवाच्या दिवशी ध्वजारोपण करतात. उत्सवमूर्तीची वाहनावर बसवून सकाळी व रात्री मिरवणूक काढतात. एक दिवस देवाला झोपाळ्यावर बसवून झोके देतात. आठव्या दिवशी रथोत्सव होतो. अकराव्या दिवशी पुष्करणीत देवाला स्नान घालतात आणि उत्सव समाप्त होतो.

मुक्कोटी एकादशीला अध्ययनोत्सव सुरू होतो. तो वीस दिवस चालतो. या काळात वेदमंत्रांचे आणि तमिळ प्रबंधम्‌मधील स्तोत्रांचे पठण करतात.

श्रावण शुद्ध दशमीला पवित्रोत्सव होतो. वसंत ऋतूत वसंतोत्सव होतो. तेलुगू वर्षप्रतिपदेपासून पुढे चाळीस दिवस नित्योत्सव होतो. वर्षातून एकदा, पाच दिवस जलविहार उत्सव होतो. पहिल्या दिवशी श्रीकृष्ण, दुसऱ्या दिवशी राम आणि पुढचे तीन दिवस श्रीदेवी, भूदेवी यांच्यासह वेंकटेशाची उत्सव-मूर्ती यांना सजवून नावेतून पुष्करणीत फिरवतात. कल्याणोत्सवात देवाचे श्रीदेवी व भूदेवी यांच्याशी लग्न लावतात.

या सर्व उत्सवांत भाविकांची खूप गर्दी इथे लोटते.

वेंकटेशाच्या देवालयात काही विशिष्ट प्रथा प्रचारात आहेत. रामानुजांनी त्या घालून दिल्या आहेत. त्या प्रथा अशा–

वेंकटेशाच्या मूर्तीच्या कपाळावर जो मोठा नाम असतो, तो कापराचा असतो. तो नाम दर शुक्रवारी पुसतात. मूर्तीच्या डोळयांत काजळ घालतात. दर शुक्रवारी मूर्तीच्या अंगावरील पुष्पमाला काढून तिला पूर्ण अभिषेक करतात. अभिषेकाच्या आधी पद्मावतीची प्रतिमा मूर्तीच्या गळयातून काढण्याच्या वेळी नच्चियार प्रबंधम गातात. वराहमूर्तीची आधी पूजा करतात व तिला नैवेद्यही आधीच अर्पण करतात. नंतर वेंकटेशाची पूजा करतात. वेंकटाचलावर जीवहिंसेला बंदी आहे.

मंदिरातील पूजाअर्चा वैखानस आगमानुसार होते. वेंकटेशाच्या मूलविग्रहाच्या हनुवटीला रोज दीड तोळा कापराचा लेप देतात. वेंकटेशाच्या मूलविग्रहाला दर शुक्रवारी अभिषेक करतात. पण भोगमूर्तीला रोज अभिषेक करतात. अभिषेकानंतर प्रबंधम व तैत्तिरीय उपनिषद यांचा पाठ करतात. मूर्ती चांगली राहावी म्हणून तिला विशिष्ट प्रकारचे तेल चोपडतात.

देवालयातील नित्य विधींचा क्रम असा– देवालयातील दिवसाची सुरवात पहाटे चार वाजता देवाला झोपेतून जागे करण्याच्या सुप्रभातम या कार्यक्रमाने होते. त्या वेळी प्रतिवादी भयंकर अण्णारचित सुप्रभातम या स्तोत्राचे पठण करतात. या स्तोत्रात एकोणतीस श्लोक असून, ते अत्यंत भक्तिरसपूर्ण आहेत. त्यांतील काही श्लोक असे–

> उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविन्द उत्तिष्ठ गरुडध्वज ।
> उत्तिष्ठ कमलाकान्त त्रैलोक्यं मङ्गलं कुरु ।।

अर्थ– हे गोविंद, हे गरुडध्वज, हे कमलापती ऊठ आणि त्रैलोक्याचे कल्याण कर.

> ईषत्प्रफुल्लसरसीरुहनारिकेल–
> पूगद्रुमादिसुमनोहरपालिकानाम् ।
> आवाति मन्दमनिल: सह दिव्यगन्धै:
> शेषाद्रिशेखरविभो तव सुप्रभातम् ।।

अर्थ– अर्धवट उमललेल्या कमळांच्या आणि नारळीपोफळी व तर सुवासिक वनस्पतींच्या सुगंधाने भरलेला असा मंद वारा वाहत आहे. हे शेषाद्रिशिखराच्या प्रभो, तू जागा हो.

> श्रीमन्नभीष्टवरदाखिललोकबन्धो
> श्रीश्रीनिवास जगदेकदयैकसिन्धो ।
> श्रीदेवतागृहभुजान्तरदिव्यमूर्ते
> श्रीवेंकटाचलपते तव सुप्रभातम् ।।

अर्थ– हे लक्ष्मीपते, हे वरदात्या, सर्व लोकांच्या बंधो, जगातील एकमेव दयासागरा, श्रीश्रीनिवासा, वक्ष:स्थळावर लक्ष्मीला धारण करणाऱ्या दिव्यमूर्ते, वेंकटाचलाच्या अधिपते, ऊठ, जागा हो. मंगल प्रभात उगवली आहे.

सुप्रभातम स्तोत्र म्हणून झाल्यावर लगेच शयनमंडपातील शय्येवर असलेली भोगश्रीनिवासाची मूर्ती गर्भगृहात नेतात. तिथे देवाला नवनीत-आरती करतात आणि गायीचे दूध व लोणी-साखर यांचा नैवेद्य दाखवतात. नंतर जमलेल्या भाविकांना देवाचे दर्शन घेता येते.

थोमलूसेवा किंवा भगवतीआराधना–देवळाची शुद्धी म्हणजे सफाई झाल्यावर देवाला अभिषेक करतात. मूलविग्रहाच्या सुवर्ण-आवरणांना व भोगश्रीनिवासाला समंत्रक अभिषेक करतात आणि फुलांच्या माळांनी मूर्ती सजवतात.

सहस्रनाम अर्चना– देवाची हजार नावे उच्चारून पूजा करतात. या पूजेसाठी ज्यांनी पैसे भरले असतील त्यांनाच पूजेच्या वेळी आत येऊ देतात.

नैवेद्य– शयनमंडप स्वच्छ केल्यावर तिथे शिजवलेले अन्न आणून ठेवतात. आणि मग दारे बंद करून देवाला महानैवेद्य दाखवतात. त्या वेळी मंडपात घंटानाद करतात.

सथुमुरै– नैवेद्य दाखवताना नालायिर प्रबंधम्‌चे पठण करतात.

धर्मदर्शन– दिवसातून ठराविक वेळी भाविकांना देवाचे विनामूल्य दर्शन घेऊ देतात.

मध्यान्हपूजा– मध्यान्ही, वराहपुराणात आलेली देवाची एकशे आठ नावे घेऊन पूजा करतात आणि त्याला नैवेद्य दाखवतात. भाविकांना पैसे भरून ही पूजा करवता येते.

रात्रिपूजा– रात्रीही देवाची पूजा करतात.

पर्वालिपू सेवा आणि अर्धयाम सेवा– देवाला शय्येवर ठेवण्यापूर्वी त्याची पूजा करून मिठाईचा नैवेद्य दाखवतात.

एकांतसेवा– झोपाळयावर मखमलीची शय्या पसरून त्यावर भोगश्रीनिवासाची मूर्ती ठेवतात. देवाला दूध, फळे, मिठाई यांचा नैवेद्य दाखवतात आणि गीते गातात. यानंतर मंदिर बंद होते. पैसे भरून ही पूजा पाहता येते. याशिवाय ठराविक वारी काही विशिष्ट विधी देवालयात होतात, ते असे–

पुलंगी सेवा– दर गुरुवारी ही विशिष्ट पूजा असते. या पूजेच्या वेळी मूलविग्रहाच्या अंगावरचे जवळजवळ सर्व दागिने

काढतात आणि कपाळावरचा व डोळ्यांवरचा नाम पुसट करतात. त्यामुळे मूर्तीचे चांगले दर्शन घडते.

अभिषेक– दर शुक्रवारी वेंकटेशाच्या मूलविग्रहाला समंत्रक अभिषेक करतात. त्या वेळी मूर्तीच्या अंगावरचे सर्व अलंकार व कपडे उतरवतात. श्रीलक्ष्मीची प्रतिमा मात्र काढत नाहीत. अभिषेक तासभर चालतो व त्या वेळी चंदन, हळद, दूध, इ. द्रव्ये वापरतात.

श्रीपादरेणू – देवाच्या अंगावरील कापूर कस्तुरी वगैरे द्रव्ये गोळा करतात, त्यांना हे नाव आहे. हा महत्त्वाचा प्रसाद समजतात.

सहस्रघट अभिषेक– पैसे भरून भाविकांना देवाला हजार घटांतील पाण्याने स्नान घालता येते.

काही जुन्या प्रथांप्रमाणे चित्तूरचा जिल्हाधिकारी, न्यायाधीश आणि चंद्रगिरीचा तहसीलदार यांना मंदिरात पूजेचे काही खास अधिकार आहेत.

दक्षिणेतील अनेक घराण्यांचे हे कुलदैवत आहे. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांकडे आश्विन मासात याचा नवरात्र महोत्सव होत असतो. परंतु त्याचे पारणे मात्र मार्गशीर्षात करतात. रामदास, मध्वमुनी, इ. संतांनी याची गीते गायली आहेत. देवीदासाचे व्यंकटेशस्तोत्र तर प्रसिद्धच आहे. कन्नड भाषेत व्यंकटेश-पारिजात नावाचा एक गद्यग्रंथ असून, त्यात लक्ष्मी-वेंकटेशाच्या विवाहाचे रसभरित वर्णन आहे.

मारवाडात याचे भक्त फार आहेत. काही अडचणीच्या प्रसंगी ते याला नवस बोलतात. या नवसाच्या नावाने मोठी रक्कम बाजूला काढून ठेवण्याची त्यांची पद्धत आहे. या रकमेला ते मुडुप असे म्हणतात. तिरुपतीला जाऊन नवस फेडता आला नाही, तर ते नवसाची रक्कम एखाद्या यात्रेकरूबरोबर पाठवितात. त्यामुळे रथोत्सवाच्या दिवशी प्रतिवर्षी देवस्थानाच्या भांडारात लाखो रुपये जमा होतात.

गुजरात प्रदेशात वेंकटेशाची बालाजी या नावाने बरीच मंदिरें आहेत. महाराष्ट्रात देऊळगाव राजा, मेहकर, पंढरपूर, नाशिक, इ. ठिकाणीं याची प्राचीन मंदिरे आहेत. महानुभावांच्या स्थानपोथीत वंकनाथ म्हणून याच्या स्थानाचा निर्देश आढळतो.

दक्षिण भारतातील श्रीमंत मंदिरांत तिरुपतीच्या या मंदिराची गणना होते. पाहा–तिरुपती–तिरुमलै. [ प्रा. च. को.; श्रीवेंकटेशमाहात्म्य; या. का. म.; सा. इं. इ. गॉ. गॉ.; आं. सा. इ.; वि. ज्ञा. वि. ५८.१२; श्रीवेंकटेश्वर, पी. सीतापती, १९७२ ]

**वेंगी** आंध्र प्रदेशातील एक विभाग. याला प्राचीन काळी वेंगिदेश किंवा वेंगिनाडू असे नाव होते. हा कृष्णा व गोदावरी नद्यांच्या मध्ये होता. गोदावरी जिल्ह्यात एल्लोरजवळ पेद्दवेगी नावाचे गाव आहे, तिथे वेंगीपूर नामक नगर होते. इ. स. च्या ४थ्या शतकात तिथे वैंगेयक नामक घराणे राज्य करीत होते. त्या घराण्यातील काही राजांची देववर्मा, हस्तिवर्मा, नंदिवर्मा, चंडवर्मा, स्कंदवर्मा ही नावे ज्ञात आहेत. पण त्यांच्याविषयी अधिक माहिती उपलब्ध नाही. इ.स. च्या ५व्या व ६व्या शतकांत या प्रदेशावर विष्णुकुंडी वंशाचे राज्य होते. या वंशातील गोविंदवर्मा याचा पराभव करून चालुक्य राजा पुलकेशी याने आंध्र प्रदेशावर आपली सार्वभौम सत्ता स्थापली आणि आपला धाकटा भाऊ कुब्ज विष्णुवर्धन याला तिथे राज्यपाल नेमले. पण विष्णुवर्धनाने तिथे आपले स्वतंत्र राज्य स्थापले. त्याचे घराणे पूर्व चालुक्य या नावाने प्रसिद्ध आहे. पाहा–चालुक्य राजवंश. [ अ. हि. आं. कं. ]

**वेट्टुवन** एक जात. या लोकांची वस्ती तमिळनाड प्रदेशातील सेलम, कोइंबतूर, व मदुराई या जिल्ह्यांत आहे. केरळातही यांची वस्ती आढळते. केरळातील या लोकांच्या उत्पत्तीसंबंधी एक दंतकथा सांगितली जाते, ती अशी– एका वेट्टुवन पुरुषाने एका नायर कुमारिकेला मागणी घातली. तिच्या बापाने एका अटीवर ही गोष्ट मंजूर केली. तो म्हणाला, 'सर्व वेट्टुवन स्त्री-पुरुषांनी माझ्याकडे येऊन, बी नसलेल्या गोल फळांवर उभे राहून नाच करावा. या नाचात जो कोणी पडेल



वेट्टुवन पुरुष व स्त्री

त्याला मी बाणाने ठार मारीन.' वेट्टुवनांनी ते कबूल केले. पण नाचताना ते सगळे खाली पडले, आणि ठार मारले गेले. फक्त

एक मुलगी वाचली. एका नायराला तिची दया आली आणि त्याने तिला गुप्तपणे पळवून आपल्या घरातील एका मुलाशी तिचे लग्न लावले. त्यांची जी संतती ती सांप्रतची वेट्टुवन जात होय.

यांच्यांत कोडी व पेरिंगल अशा दोन पोटजाती आहेत. कोडी स्त्रिया वस्त्रे वापरतात आणि पेरिंगल स्त्रिया झाडाची पाने नेसतात व बांबूंच्या झोपड्यांत राहतात.

शेती, शेतमजुरी व शिकार हे यांचे प्रमुख व्यवसाय होत. याशिवाय ते रानातील लाकुडफाटा, पाने, फळे वगैरे गोळा करून विकतात.

यांच्यांतील काही कुटुंबे मद्य-मांसाहारी आहेत. पण काही-जण शाकाहारी असून, ते स्वतःला श्रेष्ठ मानतात.

छेव्व, छतन, करिनकुत्ती, परकुत्ती, कप्पिरी व कंदकरनन या ग्रामदेवतांना हे भजतात. त्या कोपू नयेत म्हणून त्यांच्या मूर्तींची घरोघर पूजा करतात. हे कालीभक्त असून, तिला पशुबली देतात. बलीच्या प्रसंगी काली अंगात येऊन भविष्य सांगते अशी यांची समजूत आहे. हे पितरांचीही पूजा करतात.

अविवाहित स्त्री गरोदर झाल्यास जातिप्रमुख त्या प्रकाराची चौकशी करून संबंधित पुरुषाला त्या स्त्रीबरोबर लग्न करायला लावतो. पण तो नाकबूल झाल्यास त्याला फटके मारून जाति-बहिष्कृत करतात. विवाहपूर्व गरोदर स्त्रीला प्रायश्चित्त म्हणून गोमय मिसळलेले पाणी पाजतात. तिच्या शरीराला जखम करून थोडे रक्त काढून टाकतात. स्त्रीने हे प्रायश्चित्त घेतले तर तिला दुसरा विवाह करता येतो. यांच्यांत विधवाविवाहाची चाल नाही.

*मर्तिकप्रथा*– हे लोक प्रेतांना जाळतात किंवा पुरतात आणि पंधरा दिवस सुतक पाळतात. [ का. ट्रा. स. इं.; डि. क्ला. सा. कॅ. ]

**वेण** एक प्राचीन जात. हिलाच वैण असे दुसरे नाव आहे. मनू (१०.१९) आणि बौधायन (१.९.१३) सांगतात, की वैदेहक पुरुष आणि अंबष्ठ स्त्री यांची ही संतती होय. याउलट कौटिल्य (३.६३) सांगतो, की अंबष्ठ पुरुष आणि वैदेहकी स्त्री यांची ही संतती असून, हे लोक रथकाराचा धंदा करतात. वाद्ये वाजवणे हा यांचा धंदा होय, असे मनूचे म्हणणे आहे (१०.४९). विश्वरूपाने वेणालाच बुरुड म्हटले आहे. वसिष्ठधर्मसूत्रकाराच्या मते वेण ही प्रतिलोम जात असून, शूद्र पुरुष व क्षत्रिय स्त्री यांची संतती होय (१८.२). शूद्र कमलाकराने आदिपुराणाचा हवाला देऊन म्हटले आहे, की वेण हा ढोलक्या असून, तो राजाच्या आज्ञा उद्घोषित करतो.

बुद्धकालीन भारतीय समाजात वेणांची तिरस्कृत जातींत गणना होत होती. कुस जातकात तर यांना चांडालांच्या पंगतीत बसविले आहे. हे लोक बांबूची (वेणू) कामे करीत म्हणून यांना वेण हे नाव मिळाले असावे. [ हि. ध.; भा. सा. इ.; बु. भा. स. ]

**वेणाबाई** (इ. स. १६२७ ते १६७८) समर्थ रामदासांची शिष्या व एक संत कवयित्री. कोल्हापूर येथे देश-पांडे नामक एका देशस्थ ब्राह्मण घराण्यात हिचा जन्म झाला. लहानपणापासून तिचा स्वभाव अत्यंत शांत होता. वयाच्या आठव्या वर्षी मिरज येथील एका तरुणाशी तिचे लग्न झाले; पण दुर्दैवाने लग्नानंतर थोड्याच दिवसांत तिच्यावर वैधव्याची कुऱ्हाड कोसळली. आपल्या सुनेवर अशी दारुण आपत्ती कोसळ-लेली पाहून तिच्या सासूसासऱ्यांना तिच्याबद्दल सहानुभूती वाटू लागली. त्यांनी तिला लिहायला-वाचायला शिकवले आणि पोथ्या-पुस्तके वाचायला परवानगी दिली. तिच्या कुलोपाध्यायाने तिला एकनाथी भागवताचे पारायण करायला सांगितले. त्या प्रमाणे मोठ्या भक्तिभावाने ती भागवताचे वाचन करू लागली

एक दिवस समर्थ रामदासस्वामी हिंडत हिंडत मिरजेला पोचले. गावात भिक्षा मागत फिरत असता ते वेणाबाईच्या घरी गेले आणि त्यांनी तुंबाभर दूध मागितले. घरात दूध होते; पण ते मारुतीच्या नैवेद्यासाठी ठेवलेले असल्याने देता येत नाही, असे वेणाबाईच्या सासूने समर्थांना सांगितले. सासूने दूध नाही म्हटले म्हणून वेणाबाईला फार वाईट वाटले. समर्थांना रिक्त हस्ताने पाठवू नये म्हणून तिने सासूकडे थोड्या दुधाची याचना केली व ते घेऊन ती त्यांना देण्यासाठी बाहेर आली. पण तोपर्यंत समर्थ दूर निघून गेले होते. घडल्या घटनेचे वेणाबाईला फार दुःख झाले आणि समर्थांच्या पुनर्भेटीची तिला तळमळ लागली.

पुढे काही दिवसांनी समर्थ रामदास वेणाबाईच्या घरी पुन्हा भिक्षा मागायला गेले. त्या वेळी वेणाबाई तुळशीवृंदावनाजवळ एकनाथी भागवत वाचीत बसली होती. समर्थांनी तिला विचा-रले. ‘ कोणत्या ग्रंथाचे पारायण चालले आहे ? ’ वेणाबाईने सांगितले. ‘ एकनाथी भागवताचे. ’ त्यावर त्यांनी पृच्छा केली. ‘ मुली, तुला त्यातले काही समजते का ? ’ वेणाबाई उत्तरली. ‘ भक्तिभावाने पोथी वाचावी, एवढेच मला ठाऊक. त्यात काय सांगितले आहे आणि ते कसे आचरणात आणायचे, हे गुरुकृपे-शिवाय मला कुठून कळणार ? तरी पण मी आपल्याला यासंबंधी काही प्रश्न विचारते. आपण कृपाळू होऊन त्यांची उत्तरे दिली तर बरे होईल. ’

मग वेणाबाईने समर्थांना जीव, शिव, आत्मा, परमात्मा, अनात्मा, प्रपंच, काम, विद्या, अविद्या, माया, मोक्ष इत्यादींविषयी पंचवीस प्रश्न विचारले. ते पंचवीस प्रश्न एका अभंगात व त्याची उत्तरे दुसऱ्या अभंगात गोवून समर्थांनी ते अभंग वेणाबाईला दिले

या प्रश्नोत्तरांना वेणाबाईचे पंचवीस प्रश्न असे म्हणतात.

पुढे वेणाबाई माहेरी कोल्हापूरला गेली. त्या वेळी रामदासांची कीर्तने तिथे चालू होती. आईवडिलांची अनुज्ञा घेऊन वेणाबाई रोज कीर्तनाला जात असे. एक दिवस तिने कीर्तन संपल्यावर रामदासांच्या पायांवर डोके ठेवले आणि आपल्यावर अनुग्रह करण्याची विनंती केली. ती मान्य करून रामदासांनी तिला राममंत्रोपदेश दिला. त्यामुळे वेणाबाई कृतार्थ झाली. पण तिची ही परमार्थवृत्ती तिच्या सासूसासऱ्यांना किंवा आईबापांना फारशी आवडली नाही. आसपासच्या टवाळ लोकांनीही, मुलगी स्वैरपणे वागू लागली, असा बोभाटा सुरू केला. तिच्या आईवडिलांना व सासूसासऱ्यांनाही लोक नावे ठेवू लागले. तेव्हा त्यांनी तिला या मार्गापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. पण तिची वृत्ती बदलली नाही. ती म्हणते –

**रामनामेंविण मज कंठेना ॥ ध्रु० ॥**
**कोणी वंदिती कोणि निंदिति । वास मी त्यांची पाहीना ॥**
**हृदयीं धरिले सद्‌गुरुचरण । प्राणांतींहि विसंबेना ॥**
**वेणीचें निजधन रामचि जीवन । होणार तें कां सुखें होइना ॥**

वेणाबाई गुरुभक्ती सोडायला तयार होईना आणि जननिंदेलाही उधाण आलेले. तेव्हा हे सर्व असह्य होऊन आईबापांनी दुधात विष कालवून ते तिला प्यायला दिले. ते पोटात जाताच वेणाबाईच्या अंगाचा फार दाह होऊ लागला. ती एका खोलीत तळमळत पडली. तेव्हा आईबापांनी खोलीला बाहेरून कुलूप लावले व तिला सर्पदंश झाला आहे, असे लोकांना सांगितले. इकडे वेणाबाईने समर्थांचा धावा सुरू केला. तेव्हा समर्थ त्या ठिकाणी प्रगट झाले आणि त्यांनी आपल्या हातातील काठी तिच्या अंगावरून फिरवली. त्यासरशी तिची विषबाधा दूर झाली; पण तिचा गौर वर्ण मात्र नाहीसा होऊन ती काळी दिसू लागली. ते पाहून समर्थ म्हणाले, की हे ठीक झाले. कारण–

**फिरावें लागतें अरण्यांत । सोसावें लागतें उष्ण शीत ॥**
**नाजुकपणाचे हें नव्हे कृत्य । नीळ कवच घातलें श्रीरामें ॥**

यानंतर वेणाबाईने माहेर सोडले व ती समर्थांच्या सहवासात जाऊन राहिली. तिने समर्थांचे शिष्यत्व पत्करले. समर्थांनी आपल्या मठातील निरनिराळी कामे निरनिराळ्या शिष्यांकडे सोपविली होती. त्यांपैकी उपाहाराचे काम त्यांनी वेणाबाईकडे दिले. ते काम झाल्यावर ती उरलेला वेळ गुरुसेवेत, ग्रंथवाचनात आणि काव्यरचनेत घालवी.

इ. स. १६५० ते १६५६ पर्यंत ती समर्थांच्या परिवारात शिक्षण घेत होती. मठात नेहमी कीर्तने व पुराणप्रवचने चालत. ती वेणाबाई ऐकत असे. पुढे इ. स. १६५६ मध्ये मिरजेला एका मठाची स्थापना करून समर्थांनी तिला तिथले महंत नेमले व आपला शिष्यसंप्रदाय वाढविण्याची परवानगी दिली.

समर्थांच्या ज्या अनेक शिष्या होत्या, त्यांत वेणाबाईचा पारमार्थिक अधिकार फार मोठा होता. स्त्री–शिष्यांपैकी फक्त तिलाच सभेमध्ये उभे राहून कीर्तन करण्याची अनुज्ञा होती.

एकदा समर्थांचा मुक्काम परळीच्या किल्ल्यावर होता. त्या वेळी वेणाबाईकडे त्यांच्या भोजनाची व्यवस्था होती. समर्थांसाठी स्वयंपाक करून ती त्यांचे ताट वाढून एका खोलीत नेऊन ठेवी. समर्थ तिथे एकांतात भोजन करीत. ते भोजन करीत असता कोणीही खोलीच्या आसपास फिरकायचे नाही, अशी त्यांची सक्त ताकीद होती. एक दिवस वेणाबाईने नेहमीप्रमाणे ताट वाढून त्यांच्या खोलीत नेऊन ठेवले. पण एक पदार्थ वाढायचा राहिला असे मागाहून तिच्या लक्षात आले. तेव्हा तो घेऊन ती लगबगीने समर्थांच्या खोलीकडे गेली व तिने हळूच दार किंचित उघडले. त्या वेळी समर्थांबरोबर वज्रदेही मारुती भोजन करीत असल्याचे तिला दिसले व ती मूर्च्छित पडली. काही वेळाने समर्थ बाहेर आले. तेव्हा त्यांच्या दुसऱ्या एक शिष्या आक्काबाई यानी वेणाबाईला सावध करण्याविषयी समर्थांची प्रार्थना केली. त्यावर समर्थ म्हणाले, 'नैवेद्यसमयी आत येऊ नये. अशी आज्ञा असता ही का आत आली ?' यावर आक्का म्हणाल्या. 'महाराज, आपण मायबाप. आपल्याकडे कन्या आली, तर तो काय गुन्हा झाला ?' त्यावर समर्थ हसले आणि वेणाबाईच्या अंगावरून हात फिरवून त्यांनी तिला सावध केले.

एकदा समर्थ पंढरपूरला गेले असता त्यांना भेटण्यासाठी काशीचे पंडित आले. त्यांना समर्थांबरोबर वेदान्त विषयावर वाद करायची इच्छा होती. त्या वेळी समर्थांनी वेणाबाईला बोलावून चौदा ब्रह्मांचा समन्वय केलेला समास तिला वाचायला सांगितला व त्यांना परस्परच उत्तर दिले.

वेणाबाई एकावन्न वर्षांची झाल्यावर आपले जीवन संपवावे, असे तिला वाटू लागले. त्यासाठी तिने समर्थांची अनुज्ञाही घेतली. चैत्र वद्य चतुर्दशीच्या दिवशी तिने समर्थांच्या आज्ञेप्रमाणे श्रीरामाला आपल्या हातचा नैवेद्य समर्पण केला; दुपारी कीर्तन केले, आरती झाल्यावर आपल्या हातातली वीणा समर्थांच्या हाती दिली आणि आपले मस्तक समर्थांच्या चरणी ठेवले ते पुन्हा वर उचललेच नाही. आपले पंचप्राण तिने गुरुचरणी अर्पण केले.

सज्जनगडावर तिची समाधी आहे. समाधीजवळ एक तुळशीवृंदावन आहे.

सीतास्वयंवर, कौल, श्रीरामगुहसंवाद, काही अभंग व पदे एवढी वेणाबाईची कविता सांप्रत उपलब्ध आहे. घरगुती वर्णनाची भाषा व स्त्रीसुलभ अशी सहृदयता ही तिच्या काव्याचे

वैशिष्टये आहेत.

सीतास्वयंवर या काव्याच्या पहिल्या समासात, विश्वामित्राने जनकाकडे यज्ञरक्षणार्थ रामलक्ष्मणांना पाठविण्याची विनंती केली तेव्हा दशरथाची काय स्थिती झाली व त्याने कोणते उत्तर दिले, ते वेणाबाईने पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

विश्वामित्राचे उत्तरी । रायांसि भेदिले जिव्हारीं
जैसे वज्राचिया धारीं । हृदय विदारे ॥
तनु कांपती थर्थरां । नेत्रीं लागल्या अश्रुधारा ।
कांहीं धरूनियां धीरा । राजा बोलता जाला ॥
म्हणे माग स्वर्गीचे बरवें । माग पातालिचे आघवे
देईन पुरुषार्थवैभवें । दिशावलयांकित हे धरा ॥
श्रेष्ठ स्वामी मुनिराज । रामावेगळे माग मज ।
वज्र घेऊन सुरराज । देईन तुज सांगातें ॥

कौल व रामगुहसंवाद ही स्फुट प्रकरणेही वेणाबाईच्या काव्यशक्तीची व कल्पनाविलासाची द्योतक आहेत. कौल म्हणजे राजाकडून प्रजेला मिळणारे अभयपत्र. रावणवधानंतर राम सिंहासनस्थ झाल्यावर प्रजेने त्याच्याकडे काही मागण्या केल्या. रामचंद्राने त्या पुऱ्या करण्याचें आश्वासन दिले व लक्ष्मणाला त्या लिहून घ्यायला सांगितले, असा हा कौल या काव्याचा विषय आहे. त्यातील काही ओळी अशा–

बहू कष्टलों पातलों जी स्वदेशा प्रजा बोलती कौल दे राघवेशा
खुसीने कदा पीक सांडू नये रे वदे राम लक्ष्मणा हे लिही रे

याप्रमाणे प्रजेने रामाजवळ धनधान्य, गाईबैल, गाड्या, भाग्य, दया व शेवटी ' तुझे दार सर्वांना खुले असू दे ' अशी मागणी केली.

शब्दांची ओढाताण, ऱ्हस्व-दीर्घ, व्याकरण, छंदःशास्त्र, इ. विषयीची उदासीनता ही रामदासी कवितेची वैशिष्टये वेणाबाईच्या काव्यातही आढळतात. [ सं. क.; म. सं. क.; म. ध. प्र. ]

**वेणीदान** प्रयाग क्षेत्रात त्रिवेणीसंगमावर सौभाग्यवती स्त्रिया वेणीदान करतात. त्याचा विधी पुढीलप्रमाणे आहे– प्रथम वेणी घालावी. मंगल वेष धारण करावा. पतीने आज्ञा दिली तर सर्व वपन करावे. अन्यथा वेणीचे अग्र दोन अंगुळे कापावे. नंतर स्नान करून त्रिवेणीसंगमाची पूजा करावी. कापलेला वेणीचा भाग वेळूच्या पात्रात ठेवून व त्यात सोने, मोती घालून ते पात्र संगमात सोडावे. यामुळे पापांचा नाश होऊन सौभाग्याची वृद्धी होते, असे सांगितले आहे. पाहा – प्रयाग.

**वेताळ** एक शिवगण. भूतप्रेतपिशाचांचा अधिपती. याचे पूर्ववृत्त असे – एकदा गिरिजा व शंकर एकांतात विहार करीत असताना, भैरव द्वारपाल म्हणून काम करीत होता. इतक्यात शंकराने आज्ञा केली म्हणून गिरिजा तशाच अवस्थेत बाहेर गेली. तिच्या त्या रूपाकडे पाहून भैरव मोहित झाला आणि त्याने गिरिजेला बाहेर जायला प्रतिबंध केला. भैरवाचा हा उद्धटपणा पाहून पार्वतीने त्याला शाप दिला, की तू मनुष्यरूपाने पृथ्वीवर जन्म घेशील. या शापाने तो पृथ्वीवर वेताळ म्हणून आला. शिवानेही आपल्या या भक्तासाठी महेश नावाने आणि गिरिजेने पार्वती म्हणून पृथ्वीवर अवतार घेतला (शिव. शत. २१).

यासंबंधी दुसरी कथा आहे, ती अशी–चंद्रशेखर नावाचा एक राजा होता. त्याला तारावती नावाची राणी होती. तारावतीला



वेताळदेव, आजगाव (गोवा)

कपोत मुनीच्या शापामुळे भृंगी व महाकाल हे वेताळ व भैरवरूपाने पुत्र झाले. भृंगी व महाकाल हे पूर्वजन्मीचे शिवदूत होते.

पार्वतीच्या शापामुळे त्यांना पृथ्वीवर जन्म घ्यावा लागला.

राजा चंद्रशेखर हा त्यांचा पालक पिता असून त्याला दमन, उपरिचर व अलर्क असे तीन अन्य औरस पुत्र होते. राजाने आपली सर्व संपत्ती औरस पुत्रांमध्ये वाटली, म्हणून वेताळ व भैरव तपासाठी अरण्यात निघून गेले. तिथे कपोताची व त्यांची भेट झाली. कपोताच्या सांगण्यानुसार ते दोघे संध्याचल पर्वतावर वसिष्ठाला शरण गेले. वसिष्ठकृपेने त्यांना शिवदर्शन झाले आणि कामाख्या देवीच्या उपासनेने त्यांना शिवगणात स्थान मिळाले (का. पु. ४५,४९).

महाभारताच्या शल्यपर्वात याला शस्त्रधारी स्कंदानुचर म्हटले आहे (अ. ४५.६७) आणि त्याची आई वेतालजननी ही-देखील स्कंदानुचरी मातृका असल्याचे म्हटले आहे (अ. ४६. १३). भागवत (१०.६३.१०), मत्स्यपुराण (२५९.२४), ब्रह्मांडपुराण (३.४१.२९) इ. ठिकाणी याचा शिवगण म्हणून उल्लेख येतो.

वेताळाचे शारीरवर्णन आढळत नाही. पण महाभारतात स्कंदानुचरांची शारीरिक वर्णने दिली आहेत. त्या वर्णनानुसार काही अनुचरांना जनावरांची मुखे होती. काहींची तोंडे खांद्या-वर, काहींची पोटावर तर काहींची कमरेवर होती. काही महो-दर, दीर्घकर्ण आणि विकृत पायांचे होते. काहींच्या दाढा विक-राल होत्या व नेत्र पिंगट होते. काहींनी चामडे पांघरलेले होते (शल्य. अ. ४५). ब्रह्मांडपुराणानुसार वेताळ क्रूर नेत्रांचा व एक आयुत रुंद आहे. (४.२४.५५-५७).

वेताळ सदैव युद्धोद्यत व शस्त्रधारी सैनिक आहे (म. भा. शल्य. ४५.९६), त्यामुळे युद्धप्रसंगी त्याची उपस्थिती असल्याचे उल्लेख भागवत (१०.६३.१०), मत्स्यपुराण, इ. ग्रंथांत आढळतात. मराठी संतवाङ्मयातही वेताळ आणि त्याचे अनुचर यांचा अनेक युद्धप्रसंगी आढळ होतो.

त्याला आग्या वेताळ, ज्वालावेताळ किंवा प्रलयवेताळ असेही म्हटले जाते. नवरस नारायणाने आपल्या शल्यपर्वात त्यांचा उल्लेख केला आहे, तो असा— शकुनी पांडवांच्या नाशा-साठी स्मशानात गेला आणि तिथे नग्न होऊन मंत्रसाधना करू लागला. मंत्रसिद्धीने त्याने क्षेत्रपाळ व वेताळ यांना चेतविले. वेताळाने पांडवसैन्यात अग्निप्रलय मांडला. पांडवसैनिक घाबरून कृष्णाकडे गेले आणि कृष्णाने त्या वेताळाला शांत केले.

वेताळादी स्कंदसैनिकांचा भूतगणात समावेश केला जातो (म. भा. शल्य ४५.५७). मत्स्यपुराणात वेताळाला रक्त-मांस खाणारा असे म्हटले आहे (१४८.१६). रक्तमांसाच्या भोजनाने तृप्त झालेल्या वेताळाचा उल्लेख लक्षधीरानेही रुक्मिणी-स्वयंवरात केला आहे (१६.२४).

वेताळाच्या या उग्र गुणविशेषांमुळे तो क्षुद्रदेव किंवा ग्राम-देव बनला असावा. गोमंतकातील प्रियोळ, आमोणे, सावर्डे, इ. गावांचा आणि पुणेपरिसरातील बऱ्याच गावांचा तो ग्रामदेव आहे. गोमंतकात त्याच्या मूर्ती आहेत. देशावर तो शेंदूर फास-लेल्या तांदळयाच्या स्वरूपात गावाच्या शिवेवर विसावलेला असतो. त्याच्या भोवती शेंदराने माखलेले आणखीही काही लहान लहान तांदळे असतात. त्यांना वेताळाचे सैनिक म्हणतात. महाराष्ट्रातील महार त्याचे उपासक आहेत. त्याची पूजा नागव्याने करतात. त्याला प्रसन्न करून घेण्यासाठी कोंबड्या-बकऱ्यांचा बळी देतात.

वेताळ शिवसैनिक आहे. शिव हा भूत-पिशाचांच्या प्रभाव-ळीत वावरणारा, स्मशानात हिंडणारा आणि गळयात रुंडमाळा घालणारा आहे. शिवाने वेताळाला पिशाचांचे आधिपत्य दिले.

हा भूतनाथ मध्यरात्री आपल्या सैनिकांसह गावात संचाराला निघतो. त्या वेळी त्याच्या हातात एक दंडा आणि खांद्यावर घोंगडी असते, असे म्हणतात. तो पायी भ्रमंती करतो म्हणून त्याच्या पायांतील वहाणा झिजून जातात या समजुतीने सावंत-वाडी भागातील लोक त्याला प्रत्येक महिन्याला नव्या वहाणा अर्पण करतात (द कल्ट ऑफ विठोबा, पृ. १८३). एखाद्याला कोण्या भुताने झपाटले तर या भूतराजाला आवाहन करून त्या भुताची झाडणी करतात. त्या वेळी भगत काही प्राकृत मंत्रही म्हणतात. तसेच जादुगाराकडून आलेल्या मुठीला प्रतिटोला देऊन ती निष्प्रभ करण्यासाठी दुसरा जादूगार वेताळाचे मंत्र जपतो. त्यांतील एक मंत्र असा—

ॐ नमो, आदेश गुरुकू, आग्यावेताळ आव, आगे जाव, आग्या वीर वेताळ गुरु राजा विक्रमके सारथी हुये, आगे राख, पीछे राख, तीट राख, वज्रेकी छाया कर, लोहेका कोट कर, सैता-नका भूत कर, चौकमारी, चूरकर, ज्या वैद्याने याला केले त्याला तूर्त मारी, उठता मारी, हिंडता मारी, फिरता मारी, हागता मारी, मुतता मारी, ना मारी तरी राया विक्रमाची दुराई, पावल्या पादुका नमस्तुते.

या मंत्रामुळे वैऱ्याचेही उच्चाटण होते, अशी श्रद्धा आहे. मांत्रिक लोक वेताळाला वीर म्हणतात.

कामनापूर्तीसाठी वेताळाला नवस केला तर तो नवसाला पावतो अशी लोकश्रद्धा आहे. पेशव्यांनी याला नवस केला आणि तो त्यांना पावला म्हणून त्यांनी याला एक घंटा अर्पण केली. आजही ही घंटा पुण्यातील वेताळमंदिरात (१८८ गुरुवार पेठ) पाहायला मिळते.

वैताली ही वेताळाची आई मातृका म्हणूनही महत्त्व पावली आहे. वेताळ ही देवता फार प्राचीन असल्यामुळे त्याची मंदिरे

भारतभर पाहायला मिळतात. ओडिसा प्रदेशातील भुवनेश्वर येथे एक वेताळमंदिर आहे. महाराष्ट्र, गोमंतक, कर्नाटक, इ. प्रदेशांतही त्याची मंदिरे आहेत.

वेताळाच्या मूर्ती काष्ठाच्या किंवा पाषाणाच्या असतात. ग्रामदेवतेच्या स्वरूपातील वेताळ तांदळाच्या आकारात असतो. गोमंतकात याच्या लाकडी व पाषाणाच्या मूर्ती असून, त्यांतील काही नग्न आहेत. याच्या हातात त्रिशूळ किंवा दंडा असतो.

याचे विविध ठिकाणचे उत्सव वैशाख, मार्गशीर्ष किंवा माघ महिन्यात साजरे होतात. उत्सवाच्या निमित्ताने काही ठिकाणी जत्रा भरतात आणि कुस्त्यांचे फडही होतात.

**वेत्रवती** मध्य भारतातली एक प्रसिद्ध नदी. सांप्रत ही वेतवा या नावाने ओळखली जाते. भोपाळपासून २० मैल अंतरावर पारियात्र पर्वतावरील झिरीबेहडा नामक स्थानी उगम पावून ही नदी भिलसा, झाशी, टिकमगढ व जालौन जिल्ह्यातून वाहत जाते आणि उ. प्रदेशातील हमीरपूर जिल्ह्यांत, पत्योरा गावाजवळ यमुनेला मिळते. हिची लांबी सुमारे ३६० मैल आहे. धसान, पावन, जमनी. इ. नद्या हिला मिळतात. ही मध्य प्रदेशातली गंगा मानली जाते.

कालिदासापासून भूषण कवीपर्यंत अनेक कवींनी हिचे काव्यमय वर्णन केलेले आहे. राणा सांगा, चंपतराय, छत्रसाल, झाशीची राणी लक्ष्मीबाई, पृथ्वीराज, आल्हाऊदल, इ. अनेक वीर पुरुषांची व स्त्रियांची रणभूमी या नदीच्या तीरावर पसरलेली आहे. बुंदेलखंडाच्या संस्कृतीची ही रसधाराच होय. चंदेरी, विदिशा, देवगड इ. प्रसिद्ध स्थाने याच नदीच्या काठी आहेत. [ हिं. वि. को.; श्री. हरगोविंद गुप्त–आजकल, नोव्हेंबर १९६१]

**वेद** भारतीय धर्माचे व संस्कृतीचे मूलाधार ग्रंथ. जगातील पहिले वाङ्मय. वेद हे मानवसृष्टीच्या आधी परमेश्वराने मानवाच्या कल्याणासाठी निर्माण केले आणि म्हणूनच ते अनादी आहेत अशी वैदिकांची धारणा आहे.

वेद हा शब्द विद् या धातूपासून भाव, कर्म व करण या अर्थी धञ् प्रत्यय लागून तयार झालेला आहे. यावरून वेद शब्दाचा अर्थ ज्ञान, ज्ञानाचा विषय किंवा ज्ञानाचे साधन असा होतो. असणे, मिळवणे, ज्ञान करून घेणे किंवा पाहणे असे विद् धातूचे अनेक अर्थ आहेत. संस्कृतमधल्या विद् धातूला जवळचा व्हिडिओ (vidio) असा एक लॅटिन भाषेतही धातू आहे. त्यापासूनच व्हिजन (vision) इत्यादी शब्द उत्पन्न होतात. प्राचीन काळी ऋषींनाही वेद दिसले म्हणून त्यांना वेद असे नाव मिळाले आहे. सत्, चित् आणि आनंद असे ब्रह्माचे स्वरूप असल्याचे वेदांत म्हटले आहे; म्हणून वेदाला ब्रह्म असाही पर्यायी शब्द वापरला जातो. वेदाचे ज्ञानस्वरूप ब्रह्म असे जरी असले, तरी लौकिक आणि अलौकिक ज्ञानाचे साधन म्हणजे वेद होत. वेद म्हणजे असे शब्द आहेत की, ज्या ठिकाणी स्वरोच्चार बरोबर झाल्यास फल उत्पन्न करण्याची गूढ शक्ती वास करते. ज्या शब्दसमूहाच्या द्वारे अव्यक्त विचार व्यक्त होतात, तो शब्दसमूह म्हणजेच वेद होय. वेदाचे लक्षण करताना सायणाचार्य लिहितात–

> **इष्टप्राप्त्यनिष्टपरिहारयोरलौकिकमुपायं यो ग्रन्थो वेदयति स वेदः ।**

अर्थ– ईप्सित फलाची प्राप्ती आणि अनिष्ट गोष्ट दूर करण्याचा मानवी बुद्धीला अगम्य असा उपाय, जो ग्रंथ दाखवून देतो, त्याला वेद असे म्हणावे.

**वेदाविष्कार**– वेदवाङ्मय कसे निर्माण झाले, यासंबंधी अनेक मते आढळून येतात. यासंबंधी प्रत्यक्ष वैदिक वाङ्मयातही काही उल्लेख आढळतात. सृष्टिक्रमाच्या मुळाकडे जाऊ लागल्यास एखादे स्वतःप्रमाण असे तत्त्व मानावे लागते. त्यालाच परमात्मा, ईश्वर किंवा महाभूत असे म्हटले आहे. या महाभूताचे निःश्वास म्हणजे वेद होत, असे बृहदारण्यकोपनिषदात (२. ४. १०) म्हटले आहे. याचाच अनुवाद करताना सायणाचार्यांनीही आपल्या भाष्याच्या प्रारंभी परमेश्वराला वंदन करताना म्हटले आहे –

> **यस्य निःश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् ।**
> **निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थमहेश्वरम् ॥**

अर्थ – ज्याचे निःश्वास म्हणजे वेद आहेत, ज्याने वेदापासूनच सर्व जगत निर्माण केले आहे, त्या विद्यास्वरूपी पवित्र परमेश्वराला मी नमस्कार करतो.

अतिप्राचीनकाळी प्राचीन ऋषींना या वेदवाङ्मयाचा साक्षात्कार झाला म्हणजेच त्यांना वेद दिसले, त्यांचे ज्ञान झाले म्हणूनच ऋषींना ऋषी असे म्हणावे, असे यास्काचार्यांनी म्हटले आहे. तपस्येमध्ये मग्न असताना ऋषींना हे ज्ञान झाले असे अनेक ठिकाणी म्हटले आहे. मनू म्हणतो–

> **युगान्तेऽन्तर्हितान् मन्त्रान् सेतिहासान् महर्षयः ।**
> **लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा ॥**

अर्थ – युगाच्या शेवटी नष्ट झालेले मंत्र (=वेद) त्यांच्या इतिहासासह ब्रह्मदेवाच्या आज्ञेने महर्षींना तपाच्या सामर्थ्याने पूर्वी मिळाले.

परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी अशा शब्दांच्या चार अवस्था आहेत. सूक्ष्मातिसूक्ष्म ज्ञान म्हणजे परा वाक् होय. त्यालाच वेद असे म्हणतात. या वेदवाणीचा ऋषिमुनींना साक्षा-

त्कार झाला म्हणून त्याच वाणीला पश्यन्ती वाक् असे म्हणतात. ज्ञानस्वरूप वेदांचा शब्दमय असा हा आविष्कार होय. या वाणीचे स्थूल स्वरूप म्हणजे मध्यमा वाक् होय. वेदवाणीची ही तीन्ही स्वरूपे अत्यंत गूढ आहेत. चौथी वैखरी वाणी ही सामान्य लोक उच्चारत असतात. यासंबंधी ऋग्वेदात म्हटले आहे, ते असे—

**चत्वारि वाक् परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः।**
**गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥**
(ऋ. १. १६४. ४५)

अर्थ— वाणीची चार रूपे असून, ती ज्ञानी अशा ब्रह्मवेत्त्यांनाच अवगत आहेत. वाणीच्या या रूपांपैकी तीन गुप्त असून, तिचे चौथे रूप शब्दमय वेदरूपाने लोकांत प्रचारात असते.

वेद कसे निर्माण झाले हे सांगताना ते परमेश्वराच्या मुखातून बाहेर पडलेले शब्द आहेत असे म्हटले आहे. या दृष्टीने आविर्भूत, विनिःसृत, उत्सृष्ट इ. शब्द पुराणवाङ्मयात वापरलेले आढळून येतात. मनूने म्हटले आहे, की अनादी आणि नित्य अशी ही वाणी ब्रह्मदेवाच्या मुखातून बाहेर आली. यज्ञाच्या सिद्धीसाठी ऋक्, यजुस्, साम हे वेद परमेश्वराने उत्पन्न केले (ब्रह्मपु. १ ४९; अग्निपु. १०. १३; हरिवंश १. १. ३९; मत्स्यपु. १४२. २८). वेदांचे निर्मातृत्व कोणाकडे तरी दिलेच पाहिजे म्हणून पुराणांनी चार तोंडे असलेल्या ब्रह्म्याकडे त्याचे कर्तृत्व दिले आहे. ब्रह्मदेवाच्या चार मुखांतून चार वेद निर्माण झाले, असे अनेक ठिकाणी म्हटले आहे.

पुराणांमध्ये ब्रह्मदेव म्हणून ज्याचा उल्लेख आढळतो, त्याला वैदिक वाङ्मयात प्रजापती म्हटले आहे. प्रजापतीने सृष्टी उत्पन्न केली आणि तिच्या कल्याणासाठी वेदवाङ्मय निर्माण केले. प्रजापतीने आपल्या निःश्वासावरोबर वेद उत्पन्न केले, असेही म्हटले आहे. प्रजापतीचा हा हुंकार प्रथम ऋषींनी ऐकला म्हणून त्या हुंकाराला म्हणजे वेदालाच श्रुती असे नाव मिळाले.

वेद हे शब्दस्वरूप असल्यामुळे ते आकाशातून उत्पन्न झाले असेही एक मत आहे. शब्द हा आकाशाचा गुण आहे. हृदयाकाश किंवा चिदाकाश यांतून जी दिव्य वाणी प्रगट होते, तिलाच वेद असे म्हटले आहे. ही वाणी तपस्या करणाऱ्या प्राचीन ऋषींच्या अंतःकरणात प्रगट झाली म्हणूनच वेद ऋषींना स्फुरले असे म्हटले जाते.

वेद प्रजापतीपासून किंवा ब्रह्मदेवापासून निर्माण झाले, असे जरी म्हटले असले तरी वेगवेगळ्या पुराणकारांनी आपापल्या संप्रदायाप्रमाणे वेदांचे कर्तृत्व वेगवेगळ्या देवतांकडे दिले आहे. विष्णुपुराणात वेदांचे प्रवर्तन विष्णूने केल्याचे सांगितले आहे.

वामदेवापासून ब्रह्म्याला वेद मिळाले, असेही पुराणांतरी म्हटले आहे. वामदेव म्हणजे शिव होय. शिवाची जी पाच मुखे आहेत, त्यांत वामदेव हे एक मुख आहे. ऋक्, यजुस् व साम यांचे मूलस्थानही रुद्रच आहे.

ओंकारापासून वेदांची उत्पत्ती झाली, असेही कित्येक पुराणांत म्हटले आहे. शिवपुराणात (७.६.२७) म्हटले आहे, की अ, उ, म् आणि सूक्ष्म नाद यांपासून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद निर्माण झाले. सर्व वाङ्मयच ओंकारापासून निर्माण झाले, असे भगवद्गीतेत (७.८) म्हटले आहे. पूर्वी एकच वेद होता व तो ओंकारस्वरूप होता, असे महाभारतात सांगितले आहे.

देवीमाहात्म्य सांगणाऱ्या पुराणकारांनी वेदांचे कर्तृत्व देवीकडे दिले आहे (ब्रह्मवै. पु. १.८.२).

वेद हे गायत्रीपासून निर्माण झाले, असे मत्स्यपुराणात (१.७१.२४) म्हटले आहे. गायत्रीला अनेक ठिकाणी वेदमाता असे म्हटले आहे.

सूर्यापासून वेदांची उत्पत्ती झाली, असेही काही पुराणांत म्हटले आहे (मार्कण्डेयपु. ७८.२; भविष्यपु. ५८.२७).

**वेदांचे महत्त्व व प्रामाण्य** — वेद हे आर्यधर्माच्या मूलस्थानी आहेत. 'वेदोऽखिलो धर्ममूलम्' असे मनुवचन प्रसिद्धच आहे, म्हणून भारतीय संस्कृतीच्या अभ्यासात वेदांचे स्थान श्रेष्ठ ठरते आहे. 'वेद हे भारतीय वाङ्मयात प्राचीनतम असल्याकारणाने भारतीयांचा आध्यात्मिक जीवनक्रम व संस्कृती या संबंधी यथार्थज्ञान वैदिक वाङ्मयात गती करून घेतल्याशिवाय मिळणार नाही' असे ज्ञानकोशकार डॉ. केतकर म्हणतात. वेदांमध्ये तत्कालीन आर्य जनांच्या भौतिक उन्नतीची कल्पना येते. व्यक्ती, समाज व राष्ट्र या तीन गोष्टींच्या माध्यमातून आर्यांनी भौतिक उत्कर्ष साधला होता. यासंबंधी लिहिताना संस्कृतिसंगम या आपल्या पुस्तकात श्री. केळकर लिहितात— 'वेद हे प्रपंच नेटका करण्याविषयी हव्यास बाळगणाऱ्या विजिगीषू, आक्रमणशील, अचाट उत्साही आणि उद्योगी अशा आपल्या पूर्वजांचे वाङ्मय होय. यज्ञांनी देवतांना संतुष्ट करून त्यांच्याकरवी ऐहिक जीवन सुखी कसे करता येईल या विषयीच्या उद्योगात ते चूर असत.'

प्रा. माक्स म्यूलर या वेदपंडिताने एका ठिकाणी म्हटले आहे ते असे — " प्राचीन ग्रंथांचा आधार घेतल्याशिवाय भारतीय वाङ्मयाच्या अभ्यासकाला कोणत्याही विषयाचा अभ्यास करता येणार नाही. हे वाङ्मय ऐहिक आणि पारलौकिक ज्ञानावर आधारित आहे. दैविक आणि आध्यात्मिक विचार सांगणारे, काव्यमय भाषेत लिहिलेले, कायदा, ज्योतिष, व्याकरण, छंद, कोश इत्यादींचे हे संग्रहग्रंथ आहेत. या सर्व प्राचीन वाङ्मयाचा उल्लेख एकाच शब्दाने करता येतो आणि तो शब्द म्हणजे वेद होय."

वेदांचे महत्त्व प्राचीन काळापासून आधुनिक युगापर्यंत अबाधित राहिले आहे. पाश्चात्य पंडितांनीही वेदांचा सखोल अभ्या-

करून वेदांचे माहात्म्य अनेक दृष्टींनी जगासमोर मांडले आहे.

आजच्याही काळात वेदांच्या अभ्यासाला किती महत्त्वाचे स्थान आहे, हे सांगताना श्री. बाळशास्त्री हरदास लिहितात– "आजच्या नवनिर्मितीच्या प्रश्नाच्या दृष्टीने आजपर्यंत चालत आलेले व मृत्यूवर विजय संपादन केलेले भारतीय भावजीवन चीनप्रमाणे नष्ट करून आत्महत्या करावयाची, की त्या भावजीवनाच्याच आधारशिलेवर नव्या जीवनमंदिराची उभारणी करावयाची व आपली मृत्युंजय परंपरा अक्षुण्ण राखायची हा खरा महत्त्वाचा प्रश्न आहे. ते मरणाच्या योग्यतेचे असते तर केव्हाच मेले असते. पण ज्या अर्थी ते जगले आहे त्या अर्थी ते त्या योग्यतेचेच होते व आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. ही आधारशिला जीवनमंदिराच्या उभारणीसाठी घ्यावयाची आहे असे म्हटले, की तिचे स्वरूप पाहणे आवश्यक ठरते आणि वेदांच्या अभ्यासावाचून हे स्वरूप ध्यानात येण्याची शक्यता नाही. कारण भारतीयांचा धर्म, त्यांची नीती व त्यांची जीवनदृष्टी याचे सम्यक्ज्ञान वेदांवाचून होण्याची शक्यता नाही. आपण जसेच्या तसे त्यांचे ज्ञान करून घेणे, आपल्याच नव्हे तर मानवतेच्या इतिहासाच्या दृष्टीने आवश्यक आहे."

वेद हे धर्माचे मूळ ठरल्यामुळे वेदांचे प्रामाण्य त्रिकालाबाधित आहे असेच समजले गेले आहे. मनूने धर्माची जी चार प्रमाणे सांगितली आहेत, ती अशी–

> वेदः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।
> एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षात् धर्मस्य लक्षणम् ॥
>
> (मनु. २.१२)

अर्थ – वेद, स्मृती, सदाचार आणि स्वतःच्या अंतःकरणास जे बरे वाटेल ते, अशी धर्माची चार प्रकारची लक्षणे आहेत.

यांमध्ये वेदाला पहिले स्थान आहे. वेदाच्या विरोधी नसलेल्या स्मृती हे धर्माचे दुसरे प्रमाण होय. वेद किंवा श्रुती व स्मृती यांच्या आधारावर योग्य आचार करणारा विद्वान हे धर्माचे तिसरे प्रमाण होय. आणि श्रुतिस्मृतींच्या आधाराने वागणारा सच्छील आणि सदाचारी असा जो विद्वान, त्याच्या अंतर्यामी स्फुरणारा विचार हे धर्माचे चौथे प्रमाण समजावे.

भारतीय आस्तिक दर्शनांनी आपापले तत्त्वज्ञान मांडताना वेदांचाच आधार घेतला आहे. वेदवाक्यांचा आधार घेऊनच प्रत्येक दर्शनाने आपला विचार मांडला आहे. प्रत्यक्ष, अनुमान इत्यादी जी वेगवेगळी प्रमाणे दर्शनकारांनी मानली आहेत, त्यांत शब्द हे सर्वश्रेष्ठ प्रमाण असल्याचे सर्वांनीच मानले आहे.

नास्तिक दर्शने म्हणून ज्यांचा उल्लेख केला जातो, त्या जैन-बौद्धांनीही वेदांचा आदरच केला आहे. बौद्ध धर्माचे तत्त्वज्ञान मांडणाऱ्या गौतमाने वेदांचा अभ्यास केला होता, असे दिसते. 'वेद का राष्ट्रीय गीत' या पुस्तकात प्रियव्रत वाचस्पती लिहितात–

'बौद्ध धर्म नास्तिक आहे किंवा नाही हा मुद्दा वेगळा, पण बौद्ध धर्म वेदाला मान देतो. हा धर्म वेदाला मानत नाही हे म्हणणे केवळ भ्रांतिमूलक आहे. गौतमबुद्ध खऱ्या अर्थाने आस्तिक होता. तो वेदाला मानत होता. त्याने सदाचाराच्या ज्या सिद्धान्तांवर जोर दिला, ते सर्व वैदिक वाङ्मयात आढळून येतात. बौद्धांची वेदासंबंधीची असलेली कल्पना अधिक स्पष्ट करताना डॉ. केतकरांनी म्हटले आहे ते असे–

"वेदांचे प्रामाण्य मान्य न करणारे बौद्धदेखील, वेद हे मूळचे ब्रह्मदेवाने निर्माण केलेले आहेत, ही गोष्ट कबूल करतात, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. मात्र त्यांचा असा आग्रह आहे की, ब्राह्मणांनी वेदांच्या मूलस्वरूपात फरक केल्यामुळे त्यांत अनेक दोष आढळतात."

वेदांचे प्रामाण्य न मानणारे दुसरे दर्शन म्हणजे जैन दर्शन होय. परंतु जैनांनीही आपल्या पुराणग्रंथांत वेदांची स्तुती केलेली आहे. खरा वेदधर्म आम्हीच पाळतो, असे जैन ग्रंथकारांनी आपल्या पुराणग्रंथांतून उच्च रवाने घोषित केले आहे.

वेदांचे प्रामाण्य न मानणाऱ्या चार्वाकवाद्यांनी मात्र वेदाची सर्व प्रकारे निंदाच केली आहे. वेदांच्या मंत्रद्रष्ट्या ऋषींना त्यांनी भंड, धूर्त, निशाचर इ. नावांनी संबोधिले आहे.

श्रुतिस्मृतींच्या आधारावर जी पुराणे निर्माण झाली, त्या पुराणांतील धर्म लोकांना सांगणाऱ्या तत्त्वचिंतकांनी आणि संतांनी मात्र वेदांचे प्रामाण्य अबाधित राखले आहे. ज्ञानेश्वर वेदाला श्रुती-माउली म्हणतात; तर तुकारामासारखे संत 'वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा' असे म्हणून वेदांचा गौरव करतात.

आर्यसमाजाचे संस्थापक महर्षी दयानंद हे कट्टे वेदाभिमानी होते. त्यांनी वेदांच्या पावित्र्यासंबंधी अनेक सिद्धान्त मांडून वेदांचे अनादित्व, अपौरुषेयत्व इ. गोष्टींचे समर्थन केले आहे. त्यांनी विरोध केला तो ब्राह्मणग्रंथांतील यज्ञसंस्थेला. त्यांनी केवळ संहिताग्रंथांचीच अभिनव पद्धतीने मीमांसा केली.

**वेदांचा कालनिर्णय** – वेद हे केव्हा निर्माण झाले, यासंबंधी प्राचीन टीकाकारांनी काहीही चर्चा केली नाही. त्यांनी वेदांना अनादि-अनंत मानले. वेद हे कोणत्याही पुरुषाने लिहिलेले नसल्यामुळे ते अपौरुषेय आहेत, असे एकदा मानल्यावर वेद कोणी रचले व केव्हा रचले याची चर्चा करण्याचे त्यांना कारणच नव्हते. म्हणून वेदाच्या टीकाकारांनी वेदांत सांगितलेल्या धर्माचाच ऊहापोह केला.

वेदांचा अर्थ करून त्याप्रमाणे आचारधर्म पाळण्याकडेच शास्त्रकारांनीही लक्ष दिले. संपूर्ण वेद हा कर्मासाठी आहे, असे

मीमांसासूत्रात (१.२.१) जैमिनीने म्हटले आहे, ते यासाठीच.

वेद अनादी आहेत म्हणजे काय, या प्रश्नाची चर्चा आधुनिक कालखंडात सुरू झाली. विशेषतः वेदांच्या अभ्यासाकडे जेव्हा पाश्चात्यांनी आपले लक्ष वळविले, तेव्हा इतर गोष्टींच्या बरोबरच त्यांनी वेदांच्या कालनिर्णयासंबंधीही चर्चा सुरू केली. पाश्चात्य पंडितांमध्ये प्रसिद्ध पंडित माक्स म्यूलर यांनी इ. स. १८५९ साली वेदांच्या कालनिर्णयासंबंधी आपले विचार मांडले. वैदिक वाङ्मय बुद्धपूर्वकालीन आहे, ही गोष्ट गृहीत धरून त्यांनी वेदांच्या कालनिर्णयासंबंधी चार कालखंड कल्पिले. यासंबंधी त्यांचे प्रतिपादन असे –

बौद्ध धर्माच्या पूर्वीचा जो काळ, त्या काळच्या ग्रंथसमूहाचे चार भाग करता येतात. त्यांपैकी पहिल्याला मी सूत्रकाल असे नाव देतो. ही सूत्रे फार संकुचित असून, अल्पाक्षरी मंत्रासारखी आहेत. दुसऱ्या कोणत्याही भाषेत या सूत्रग्रंथाच्या तोडीचे काही माझ्या आढळण्यात आले नाही. ही सूत्रे ख्रिस्ती शकाच्या पूर्वी ५ व्या किंवा ६ व्या शतकात होऊन गेली.

सूत्रकालाच्या पूर्वी दुसरा एक काल आहे, त्याचे नाव ब्राह्मणकाल (ख्रि. पू. ६००–८००). ब्राह्मणग्रंथ गद्यात्मक असून, त्यांची लिहिण्याची तऱ्हाही सूत्रग्रंथांहून अगदी भिन्न आहे. ही ब्राह्मणे स्वरसंयुक्त आहेत. सूत्रांना स्वर नाहीत. ब्राह्मणग्रंथांचा मुख्य हेतू यज्ञाचे वर्णन व यज्ञव्यवस्था हा होय. सूत्रग्रंथ बरोबर समजण्यास ब्राह्मण ग्रंथ समजणे अत्यंत आवश्यक आहे. सूत्रकाल जर ख्रिस्ती शकापूर्वी ६०० वर्षे झाला अशी कल्पना केली, तर ब्राह्मणकाल त्याच्यापूर्वी २०० वर्षे तरी झाला, असे समजले पाहिजे. कारण, त्याच्या उत्पत्तीचा व वृद्धीचा विचार केला व त्यात प्रमाण म्हणून दिलेल्या प्राचीन आचार्यांच्या संख्येचा विचार केला म्हणजे निदान २०० वर्षांची तरी कालमर्यादा कल्पिणे योग्य दिसते. पण ही कालमर्यादा केवळ तारतम्यार्थ मानली आहे. मुख्य गोष्ट ही, की सूत्रकाळाच्या खाली दुसरा एक मोठा थर आहे, तो ब्राह्मणकाळाचा होय व त्या थराखालीही तिसरा एक थर आहे, त्याचे नाव मी मंत्रकाल (ख्रि. पू. ८००–१००० पर्यंत) असे ठेवले आहे.

या काळी ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद या चार वेदांच्या संहितांत आढळणाऱ्या वैदिक मंत्रांचा संचय झाला व त्यांची शिस्तवार व्यवस्था लागली. या चार मंत्रसंचयांचा हेतू याज्ञिक संबंधाचा आहे. प्रत्येकात असे मंत्र आहेत, की जे विशिष्ट उपाध्यायांनी विशिष्ट यज्ञाच्या वेळी म्हणायचे असतात. या जुन्या मंत्रांचा संग्रह करण्यास जितका काळ लागला, त्याचे नाव मी मंत्रकाळ असे ठेवले आहे. या काळाचा विस्तार ख्रिस्ती शकापूर्वी १००० पासून ८०० पर्यंत असावा.

ख्रिस्ती शकापूर्वी १००० वर्षांच्या पलीकडच्या काळात वेदरूप काव्ये रचली असावी, असे दिसते. काही विद्वानांचे असे मत आहे, की छंदाचा काळ ख्रिस्ती शकापूर्वी दोन किंवा तीन हजार वर्षांपूर्वीचा असावा.

माक्स म्यूलरने वेदांच्या कालनिर्णयासंबंधी मांडलेले हे मत तत्कालीन बहुतेक विद्वानांनी मानले. पण भाषाशास्त्राच्या आधारावर अशा प्रकारचा कालनिर्णय करणे हे योग्य नाही. तसा प्रयत्न केल्यास त्यात फार मोठी विसंगती निर्माण होईल. म्हणून वेदांचा काळ ठरविण्यासाठी ज्योतिषपद्धती अधिक विश्वसनीय आहे. अशा प्रकारचा पहिला प्रयत्न जर्मन पंडित याकोबी याने इ. स. १८९३ साली एक लेख लिहून केला. वेदकाल सनपूर्व ३००० वर्षे मागे नेला पाहिजे असे त्याने आपले मत मांडले. याच सुमारास लोकमान्य टिळकांनीही 'ओरायन' हा ग्रंथ लिहून वेदकालासंबंधी आपले मत सविस्तर मांडले. त्यांच्या मताचा सारांश असा –

'वेदकाळाचा निर्णय करण्याकरता वेदवाक्यांचाच आधार घेतला पाहिजे. कालमापनाच्या हल्ली ज्या सायन, चांद्र, नाक्षत्र, व सौर अशा रीती आहेत, त्यांचा वैदिक ग्रंथांत कुठेही उल्लेख नाही. परंतु कालनिश्चय करण्यासाठी वैदिक ऋषींनी काहीतरी व्यवस्था करून ठेवली असलीच पाहिजे, असे उघड होते. यज्ञयागासंबंधीच्या ग्रंथांवरून असे दिसते, की चंद्राचे वृद्धि-क्षय, ऋतूंचे भेद, सूर्याची दक्षिण व उत्तर अशी दोन अयने, या घटना त्या काळी कालमापनाच्या मुख्य खुणा होत्या.

जुने याग किंवा सत्रे यांतील मुख्य गोष्टी व संवत्सरातील मुख्य गोष्टी या एकच आहेत. ही सत्रे एक एक वर्षाची असत. ती सूर्याच्या वार्षिक गतीच्या अनुरोधानेच बसवलेली असत. त्यांचे सहा सहा महिन्यांचे दोन भाग करून प्रत्येक महिन्याला तीस तीस दिवस दिलेले असत. या दोन भागांच्या बरोबर मध्ये विषुवान म्हणजे मध्य दिवस अथवा विषुवदिन हा असे. यावरून असे उघड दिसते, की वैदिक ऋषींनी आपले पंचांग मुख्यतः यज्ञकर्मासाठीच केले होते. सत्र पुरे होई, त्याच वेळी वर्षही पुरे होत असे.

कालमापनाचे स्थूल परिमाण सावन दिवस धरून ३६० सावन दिवसांचे एक वर्ष वैदिकांनी मानले. परंतु तीस सावन दिवसांचा महिना चांद्र मासांबरोबर जमेना म्हणून सावन व चांद्र महिन्यांचा मेळ घालण्यासाठी ते सावन महिन्यातून एकेक दिवस गाळीत असत. परंतु जेव्हा चांद्र व सौर वर्षांचा मेळ घालणे जरूर पडले, तेव्हा त्यासाठी अधिकमास धरण्याची युक्ती प्राचीन आर्य लोकांनी काढली, असे दिसते. या अधिकमासांचे उल्लेख ऋग्वेदापासून सर्व वैदिक वाङ्मयांत आढळतात.

वैदिक ग्रंथांतील अनेक उल्लेखांवरून असे दिसते, की प्राचीन आर्य लोकांचे वर्ष सौर होते, महिने चांद्र होते व ते वर्षारंभ वसंतसंपातापासून धरीत असत. हल्लीची आपली पंचांगे वसंतसंपात रेवतीच्या चतुर्थ चरणी आहे, असे धरून केलेली असतात. रेवतीमध्ये वसंतसंपात शालिवाहन शक ४९६चे सुमारास होता. तेव्हापासून सध्याची पंचांगपद्धती सुरू झाली.

वैदिक वाङ्मयातील अनेक ग्रंथांत नक्षत्रचक्राचा आरंभ कृत्तिकांपासून असल्याचे म्हटले आहे. तैत्तिरीय संहितेत आणि ब्राह्मणग्रंथांत अशी नक्षत्रगणना दिसून येते. त्या अर्थी त्या काळी वसंतसंपात कृत्तिकेत होता आणि तेव्हापासून वर्षारंभ होत होता, असे समजते. तैत्तिरीय संहितेमध्ये गवामयनासारख्या सत्रांची जी चर्चा केली आहे, त्यावरून हा काळ सनपूर्व २५०० असावा. ऋग्वेदातील अनेक उल्लेखांवरून असे दिसून येते, की त्या काळी वसंतसंपात मृग नक्षत्रात होता. परंतु ऋग्वेदसंहिता तयार होण्यापूर्वी वेगवेगळे मंत्र रचले गेले त्या वेळी वसंतसंपात पुनर्वसू नक्षत्रात असावा.

सर्वांत पूर्वीच्या या काळाला अदितिकाळ असे म्हणतात. त्या काळी पूर्ण ऋचा निर्माण झाल्या असाव्या, असे नाही. अर्धवट गद्य, अर्धवट पद्य अशा वाक्यांत देवतांची नावे, त्यांच्या विशेष संज्ञा व त्यांचे पराक्रम वैदिक ऋषींनी ग्रंथित केले असावे.

आता दुसरा मृगशीर्षकाळ. त्याच्या मर्यादा स्थूलमानाने सनपूर्व ४००० ते २५००पर्यंत म्हणजे कृत्तिकांशी वसंतसंपात येईपर्यंतचा काळ या होत. हा काळ सर्वांत महत्त्वाचा आहे. ऋग्वेदातील बरीचशी सूक्ते याच वेळी तयार झाली. या काळाच्या उत्तरभागात ग्रीक व भारतीय आर्य हे एकमेकांपासून विभक्त झाले.

तिसरा काळ म्हणजे कृत्तिकाकाळ. याच्या मर्यादा म्हणजे सनपूर्व २५०० पासून १४०० पर्यंत म्हणजे वेदांगज्योतिषाच्या काळापर्यंतचा काळ या होत.

चौथा काळ म्हणजे सनपूर्व १४०० ते ५०० पर्यंतचा काळ होय. याला बुद्धपूर्वकाळ म्हणतात. याच काळात सूत्रे व षड्दर्शने निर्माण झाली. अशा रीतीने ज्योतिषविषयक उल्लेखांच्या अनुरोधाने वेदकाळ सनपूर्व ४०००वर्षांच्या सुमारास निश्चित करता येतो.

लोकमान्य टिळकांनी मांडलेल्या या सिद्धान्ताला श्री. शं. बा. दीक्षित आणि व्यंकटेश बापूजी केतकर यांनी अनेक आधार देऊन बळकटी आणली. लो. टिळक यांनी मांडलेला सिद्धान्त आता बहुतेक विद्वानांनी मानला आहे.

पावगीसारख्या काही विद्वानांनी मात्र भूगर्भशास्त्रांतील प्रमाणांचा व कल्पनांचा आधार घेऊन, ऋग्वेदाचा काळ ९००० वर्षांपूर्वीचा असावा, असे म्हटले आहे.

काही पंडितांनी तर वेदकाळ हा सव्वादोन लाख वर्षांपूर्वीचा असावा, असे मानले आहे. श्री. दीनानाथशास्त्री चुलेट यांनी वेदकालनिर्णय हे पुस्तक लिहून वेदांचा काळ ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. शुक्ल यजुर्वेदाच्या पारस्कर गृह्यसूत्राचा भाष्यकार कर्काचार्य याचा काळ पंधरा हजार वर्षांपूर्वीचा आहे, असे त्यांनी म्हटले आहे. त्याचा आधार घेऊन पारस्कर गृह्यसूत्राचा काळ एकोणीस हजार वर्षांपूर्वीचा, शतपथ ब्राह्मणाचा काळ साठ हजार वर्षांपूर्वीचा व संहितेचा काळ सव्वादोन लाख वर्षांपूर्वीचा आहे, असे श्री. चुलेट म्हणतात.

भूस्तरशास्त्र व ऋग्वेदात आढळणारी काही नावे आणि नद्या यांच्या आधारावरही कालनिर्णय करण्याचा प्रयत्न काही विद्वानांनी केला आहे. डॉ. भांडारकर ऋग्वेदाचा काळ सनपूर्व २५०० मानतात; तर अविनाशचंद्र दास यांच्या मते तो सनपूर्व २५००० वर्षे इतका मागे जातो.

वेदकालनिर्णय करण्यासाठी उत्खननशास्त्राचाही काही विद्वानांनी आधार घेतला आहे. डॉ. विङ्कलर यांनी इ. स. १९०७ मध्ये पश्चिम आशियामध्ये उत्खनन केले. त्यात त्यांना एक शिलालेख सापडला असून, त्यामध्ये हित्तिती व मितानी या दोन जमातींचा उल्लेख आहे. यांच्यांत झालेल्या युद्धाचा निर्देश करताना मितानी जातीच्या देवतांची नावे आढळतात. त्यांमध्ये मित्र, वरुण, इंद्र व नासत्यौ (अश्विनौ) या चार वैदिक देवतांची नावे आहेत. त्यावरून मितानी जात प्राचीन आर्यांचीच शाखा होती, असे कळून येते. वैदिक देवतांना पूज्य मानणारे हे लोक भारतातून तिकडे गेले किंवा ते मूळचे तिथलेच यासंबंधी काहीही सांगता येत नाही. मात्र पश्चिम आशिया व भारत यांचा ऐतिहासिक संबंध फार प्राचीन आहे, ही गोष्ट निर्विवाद. डॉ. विङ्कलर यांना मिळालेला हा शिलालेख विक्रम संवत्पूर्व १४००चा आहे. यावरून मितानी आणि हित्तिती यांच्यांत झालेल्या युद्धाच्या पूर्वी अनेक वर्षे वैदिक धर्म व वैदिक देवता यांच्या संबंधीच्या कल्पना आर्यसमाजात दृढमूल झाल्या होत्या. तात्पर्य वेदकाळ हा विक्रमसंवत्पूर्व दोन हजार वर्षांपूर्वीचा असावा, असे डॉ. विङ्कलर यांचे मत आहे.

अशा प्रकारे वैदिक वाङ्मयाच्या प्रत्येक अभ्यासकाने वेदांच्या कालनिर्णयासंबंधी काहीना काही लिहिले आहे. प्रत्येकाने आपापल्या मताच्या पुष्टचर्थ वेदवाक्यांचाच आधार घेतला आहे. सनपूर्व दोन हजार ते सव्वा दोन लाख वर्षांपर्यंत असणारे हे परस्पर विरोधी निर्णय पाहिले म्हणजे ठामपणे निर्णय करण्याचे कोणतेही प्रमाण नाही, हेच लक्षात येते. म्हणून प्राचीन परंपरेप्रमाणे वेद हे अनादी आहेत असेच मानावे लागते व

कालनिर्णय करायचा झालाच, तर सनपूर्व ४००० वर्षे हाच काळ सर्वमान्य झालेला असल्यामुळे तो मानणे योग्य ठरते.

**वेदांचे अपौरुषेयत्व** – वेद हे कुठे निर्माण झाले किंवा त्याचा काल कोणता यासंबंधी अशी अनेक मतमतांतरे आहेत. त्याचप्रमाणे वेद कोणी लिहिले यासंबंधी निश्चित कोणतेच मत सांगता येत नाही. वाङ्मयाचा आविष्कार म्हटला, की ते वाङ्मय कोणीतरी रचलेले असलेच पाहिजे असे समजले जाते. पण भारतीय दर्शनांच्या मते शब्द हा नित्य असून, त्याचा अर्थाशी स्वयंभू असा संबंध असतो. वेदांतील शब्द हे असेच नित्य समजले गेले असल्यामुळे वेद हे अपौरुषेय ठरतात.

वेद कसे निर्माण झाले हे लक्षात घेत असताना प्राचीन ऋषी तपश्चर्येत मग्न असताना त्यांना वेदांचा साक्षात्कार झाला असे सांगितले जाते. त्यांना परमेश्वराचे संगीत ऐकू आले, त्याचेच त्यांनी उच्चारण केले आणि याच वाङ्मयसृष्टीला वेद असे नाव मिळाले.

वेदांचे अपौरुषेयत्व मानल्यामुळे वेदमंत्रांतील शब्दांचा अनुक्रम हा जसा आहे तसाच तो म्हटला पाहिजे, असा नियम ठरला. यासंबंधी निरुक्तकार म्हणतात, की 'नियतानुपूर्व्या नियतवाचोयुक्तयः' म्हणजे शब्द नित्य आहे, त्यांचा अनुक्रम नित्य आहे आणि त्यांची उच्चारणपद्धतीही नित्य आहे. म्हणूनच वेदांचा अर्थही नित्य आहे.

वेदमंत्राच्या प्रत्येक पदात अथवा शब्दाच्या एकेक अक्षरात एक प्रकारचे सामर्थ्य आहे, असे शतपथ ब्राह्मणात सांगितले असून, प्रत्येक अक्षराचे रहस्य स्पष्ट केले आहे. मांडूक्य उपनिषदाने तर पद निर्माण करणाऱ्या मात्रांचा उच्चारही सामर्थ्यशाली असल्याचे सांगून ॐ या एका अक्षराच्या श्रेष्ठतेचे वर्णन केले आहे.

अशी ही वेदवाणी प्रत्यक्ष परमेश्वरानेच निर्माण केली आहे, असे सांगताना महाभारतात म्हटले आहे, ते असे–

**अनादिनिधना नित्या वागुत्सृष्टा स्वयम्भुवा ।**
**आदौ वेदमयी दिव्या यतः सर्वाः प्रवृत्तयः ।।**

(म. भा. शांति. २३३.२४)

अर्थ – जिच्यापासून सर्व जगत उत्पन्न झाले, अशी अनादी व नित्य असणारी वेदरूप दिव्यवाणी जगन्निर्मात्याने सर्वांत प्रथम निर्माण केली.

वेदांचे कर्तृत्व प्राचीन ऋषींच्याकडे दिले जाते; पण ऋषी हे मंत्रांचे द्रष्टे आहेत, कर्ते नव्हेत असे अनेक ग्रंथांत म्हटले आहे. ऋषी या शब्दाचा अर्थ स्पष्ट करताना 'ऋषिर्दर्शनात्' = साक्षात्कार झाल्यामुळे त्यांना ऋषी म्हणतात, असे निरुक्तात म्हटले आहे. म्हणजे नित्य अस्तित्वात असलेल्या वेदांचा ऋषींना साक्षात्कार झाला, असेच म्हटले पाहिजे. या दृष्टीनेही वेदांचे कर्तृत्व कोणाकडेही जात नसल्यामुळे वेद हे अपौरुषेय आहेत असे म्हटले जाते. (अपौरुषेयवाद पाहा.)

**वेदांचे निर्मितिस्थान** – प्राचीन परंपरेप्रमाणे वेद हे ईश्वराच्या उच्छ्वासापासून निर्माण झाले आणि तपश्चर्येत मग्न असलेल्या ऋषींना त्याचे ज्ञान झाले असे समजले जाते. पण वेदांच्या भाषेचा आणि त्यांमध्ये आलेल्या विषयांचा अभ्यास करून 'वेद हे प्राचीन काळी आर्यांनी रचलेले वाङ्मय होय' असे बहुतेक सं[illegible] पाश्चात्य आणि भारतीय आधुनिक संशोधकांनी म्हटले आहे. म्हणून वेद कोणी रचले यासंबंधी जरी निश्चित माहिती आढळून येत नसली तरी त्यांची रचना कुठे झाली असावी, यासंबंधी अनेक संशोधकांनी आपली मते लिहून ठेवली आहेत.

अतिप्राचीन काळी म्हणजे सुमारे १०००० वर्षांपूर्वी उत्तर ध्रुवापाशी लोक राहत होते. पुढे तिथले हवामान जीवनाला अनुकूल न वाटल्यामुळे त्यांनी तो प्रदेश सोडून दिला. मग ते म[illegible] आशियामध्ये असलेल्या उरल पर्वताच्या परिसरात स्थायिक झाले. या ठिकाणी या प्राचीन लोकांनी अनेक चमत्कार पाहिले आणि या विश्वात नियमांनी चालणाऱ्या अनेक गोष्टींचे त्यांनी निरीक्षण केले. सूर्य नियमितपणे उगवतो व अस्ताला जातो, पाऊस वेळेवर पडतो, नद्या ठराविक दिशेनेच वाहतात, इ. अनेक गोष्टी ज्या अर्थी नियमाने चालतात, त्या अर्थी विश्वामध्ये चाललेल्या या सर्व घटनांमागे या नियमांचे काटेकोरपणे पालन करणारी एखादी शक्ती असली पाहिजे, असा विचार प्राचीन विद्वानांच्या मनात प्रथम आला असेल. या शक्तीला संतुष्ट करून घेतले असता आपले जीवनही सुखी होऊ शकेल, या क[illegible]नेने त्या शक्तीला उद्देशून त्यांनी मंत्र रचले. वेदमंत्रांचा हा पहिला आविष्कार होय. ही घटना मध्य आशियामध्ये आर्य जेव्हा राहत होते, तेव्हाचीच असावी. म्हणून वेदांचे पहिले निर्मितिस्थान मध्य आशिया हे होय, असे मानावे लागते.

ऋग्वेदाची भाषा व पर्शियन, ग्रीक, लॅटिन, स्लाव्हॉनिक इ. भाषा यांच्यात बरेच साम्य असल्यामुळे हे सर्व लोक प्रथम एका ठिकाणी राहत असावे, असे अनुमान केले जाते. डॉ. पी. गा[illegible] यांनी असे सुचविले आहे की, आर्यांचे मूलस्थान सध्या हंगेरी, ऑस्ट्रिया व बोहेमिया या राष्ट्रांनी व्यापलेले युरोपचे प्रदेश असावे. इथून आर्यांच्या अनेक शाखा निरनिराळ्या दिशांना गेल्या. जे लोक मध्य आशियात आले, त्यांनी निसर्गातील घटनांवर काव्ये लिहिली. तोच वेदवाङ्मयाचा पहिला आविष्कार होय.

पण सर्व वैदिक वाङ्मयाची रचना एकाच ठिकाणी झाली असेही म्हणता येणार नाही. उत्तर ध्रुव प्रदेशात त्यांनी जे जे साक्षात्कार पाहिले, त्यांचे वर्णन करणाऱ्या ऋचाही मध्य आशि[illegible]

मध्येच त्यांनी रचल्या असाव्या. 'ध्रुवतारा आम्हांस आकाशात डोक्यावर दिसत आहे', 'येथे लांबच लांब रात्र आहे', 'सप्तर्षिमंडल आकाशात फिरत आहे' इ. वर्णनें ज्या ऋचांतून आढळतात, त्या ऋचा सर्वांत प्राचीन असल्या पाहिजेत. विश्वाचे नियमन करणारा म्हणून वरुणाला 'ऋतावान्' किंवा 'असुर' असे म्हटले आहे. म्हणून असुरवरुणाचा उल्लेख असलेल्या ऋचा उरल प्रदेशांत आर्य असताना रचल्या गेल्या असाव्या. कालांतराने उरल प्रदेशांतूनही आर्यांची निर्गमने झाली. काही लोक इराण देशात गेले, तर काही लोक पूर्वेकडे हिंदुकुश पर्वताकडे निघाले. हिंदुकुश पर्वत ओलांडून जे आर्य पूर्वेकडे जात होते, त्यांना अनेक लोकांशी युद्धे करावी लागली आणि त्यांत विजय मिळविण्यासाठी त्यांनी निरनिराळ्या देवतांच्या स्तुतिपर असे नवे नवे मंत्र रचले.

मध्य आशिया हा प्रदेश वेदांच्या निर्मितीचे मूलस्थान असावा, यासाठी आणखीही एक पुरावा लक्षात घेणे उचित होईल. जे लोक मध्य आशिया सोडून इराण देशात गेले, ते लोक पुढे पारशी या नावाने प्रसिद्ध झाले. त्यांचा धर्मग्रंथ जो अवेस्ता त्यामध्येही ऋग्वेदातील प्राचीन ऋचांशी साम्य असलेले अनेक मंत्र आढळून येतात. त्यामुळे हे मंत्रदेखील मध्य आशियातच रचले गेले असावे. ऋग्वेदांतील असुर-वरुणाच्या उल्लेखाप्रमाणे अवेस्त्यात 'असुर' म्हणजे 'अहुर' असा शब्द आढळतो. म्हणजे वैदिक आर्य व पारशी लोक हे प्राचीन काळी एकत्र राहत होते, हीच गोष्ट त्यावरून स्पष्ट होते. अवेस्त्यातील मंत्र आणि ऋग्वेदातील प्राचीन ऋचा यांचा तौलनिक अभ्यास केल्यास त्यांतील साम्य अनेक प्रकारे दाखविता येते. पण कालांतराने आर्यांच्या या दोन शाखा परस्परांहून खूपच वेगळ्या झाल्या आणि त्यामुळे त्यांच्या धार्मिक कल्पनांमध्येही पुष्कळ बदल झाले. अहुर (असुर), वेरेथ्रघ्न (वृत्रघ्न), मिथ्र (मित्र), अहोम (सोम), असे कितीतरी सारखे शब्द अवेस्ता व ऋग्वेद या दोन्ही ग्रंथांत आढळून येतात. वैदिक भाषेचा आणि अवेस्तन भाषेचा व्याकरणदृष्ट्या अभ्यास करताना त्यांमध्ये पुष्कळच साम्य आढळते. तात्पर्य पारशी लोक आणि वैदिक आर्य जेव्हा मध्य आशियात होते तेव्हाच वैदिक वाङ्मय अस्तित्वात आले, असे म्हणता येते.

जे आर्य भारतात प्रवेश करीत होते त्यांमध्ये काही विद्वान चिंतनशील असे ऋषी होते, तर काही क्षत्रिय होते. हे विद्वान लोक क्षत्रियांना सर्व प्रकारे मदत करीत म्हणून त्यांना पुरोहित म्हणत. या आर्यांना नव्या नव्या प्रदेशात प्रवेश करीत असताना स्थानिक लोकांशी युद्धे करावी लागली. या युद्धात जय मिळविण्यासाठी अदृश्य अशा शक्तींचे आपणांस साहाय्य मिळाले पाहिजे म्हणून विद्वान ऋषींनी नवे मंत्र रचले. युद्धाला मदत करणारी व त्यात विजय मिळवून देणारी देवता म्हणजे इंद्र होय. या देवतेची अनेक प्रकारे स्तुती करून तिला अनुकूल करून घेण्यासाठी जे नवे नवे मंत्र आणि सूक्ते गायिली गेली, ती आर्य लोक सप्तसिंधू प्रदेशात येऊन पोचण्यापूर्वीची होत. इंद्रासंबंधी जी सूक्ते वेदांत येतात, त्यांमध्ये युद्धाची वर्णने आढळतात.

सप्तसिंधूंच्या प्रदेशात आल्यानंतर आर्य तिथे स्थायिक झाले आणि त्यांच्या जीवनाला एक प्रकारचे स्थैर्य आले. त्यांच्या धार्मिक कल्पना निश्चित झाल्या. तिथल्या नद्या, ऋतुमान, समृद्धी, इ. सर्व गोष्टी त्यांना अनुकूल अशाच ठरल्या. त्यानंतर मग सूर्य, उषस्, पर्जन्य, पृथ्वी अशा नव्या देवतांसाठी नवीन नवीन ऋचा रचल्या गेल्या. त्या ठिकाणी आणखी एक महत्त्वाची गोष्ट झाली ती म्हणजे निरनिराळ्या मंत्रांचे संहितीकरण झाले ही होय. देवतांना उद्देशून जी सूक्ते गायिली गेली होती, त्यांची एक संहिता तयार झाली. एकाच ऋषिकुलातील लोकांनी रचलेली सूक्ते एकत्र करण्यात आली आणि त्यांतूनच दहा मंडले असलेली ऋग्वेदसंहिता तयार झाली. याच वेळी निरनिराळ्या अदृश्य शक्तींना संतुष्ट करण्यासाठी जे मंत्र उपयोजिले जात होते, त्यांचा संग्रह अथर्ववेदात करण्यात आला. तात्पर्य, ऋग्वेद आणि अथर्ववेद यांच्या संहितांचे निर्मितिस्थान सप्तसिंधू प्रदेश हेच होय, यात शंका नाही.

आर्यांच्या जीवनाला एक प्रकारचे स्थैर्य आल्यावर त्यांच्या धर्मकल्पनेत अनेक प्रकारचे बदल झाले. यज्ञाला अधिक प्राधान्य मिळाले. विंटरनिट्झ म्हणतो, 'यज्ञ हा धर्माच्या केंद्रस्थानी होता तर धर्म हा समाजजीवनाचा केंद्रबिंदू होता.' यज्ञाला जसे जसे महत्त्व येऊ लागले तसतसे त्याला उपयुक्त असे नवे नवे वाङ्मयही निर्माण होऊ लागले. यजुर्वेदातील गद्य मंत्र आणि गायनाला उपयोगी पडतील असे सामवेदातील मंत्र सप्तसिंधू प्रदेशातच रचले गेले असावे. म्हणजे यजुर्वेदाच्या संहिता आणि सामवेदाच्या संहिता यांच्या निर्मितीचे स्थानही सप्तसिंधू प्रदेश हेच असावे. या वेळी आर्यजनांत ब्राह्मण, क्षत्रिय इ. वर्ण निश्चित झालेले होते. नवा प्रदेश जिंकण्याच्या इच्छेने प्राचीन क्षत्रिय राजांनी गंगा-यमुनांचा प्रदेश आणि मध्यदेश यांवर आक्रमणे केली. या क्षत्रियांना ब्राह्मणांचे सर्व प्रकारे साहाय्य होते. अश्वमेध, राजसूय, अशा मोठमोठ्या यज्ञांचे विधान सांगून या नव्या प्रदेशांत त्यांनी यज्ञधर्माचा प्रसार केला. या वेळी यज्ञविषयक माहिती देणारे प्रचंड वाङ्मय निर्माण झाले. त्यांनाच ब्राह्मणग्रंथ असे म्हणतात. यावरून मध्यदेश हेच ब्राह्मणग्रंथाच्या निर्मितीचे स्थान असल्याचे सिद्ध होते. आरण्यके व उपनिषदे हे स्वतंत्र ग्रंथ नसून, त्यांचा समावेश त्या त्या ब्राह्मणग्रंथांच्या शेवटच्या भागांत केलेला आहे. (ब्राह्मणे पाहा)

तात्पर्य, संपूर्ण वैदिक वाङ्मय एकाच ठिकाणी आणि एकाच वेळी निर्माण झालेले नाही, ही गोष्ट निर्विवाद ठरते. मध्य आशिया, सप्तसिंधू आणि मध्यदेश हे तीन प्रदेश वेदांच्या निर्मितीचे स्थान म्हणून समजायला हरकत नाही.

**वेदविभाग** – वैदिक वाङ्मयाचे आज अनेक विभाग असले तरी, प्राचीन काळी वेद ही एक राशी होती, असे उल्लेख पुराणवाङ्मयात आढळतात. या एका वेदराशीचे अध्ययनाच्या सोयीसाठी चार विभाग केले गेले. चार पाद असलेला असा एकच वेद होता, असे पुराणांत म्हटले आहे. हे चार पाय म्हणजे चार वेद होत. (अग्निपु. १५०.२४; विष्णुपु. ३.४.१; वायुपु. १.१७९; पद्मपु. ५.२.४३). वेदांचे हे चार भाग करणारे म्हणून व्यासांना 'व्यास' (विभाग करणारा) असे नाव प्राप्त झाले. वेदाचे चार भाग प्रत्यक्ष विष्णूने केले म्हणून विष्णूलाच व्यास म्हणावे, असे विष्णुपुराणात (३.३.५) म्हटले आहे. वेदांची परंपरा कालाच्या ओघात नष्ट झाली आणि त्या वेदांचे प्रवर्तन करून व्यास नावाच्या लोकांनी त्या वेदांचे रक्षण केले, असेही म्हटले आहे. म्हणूनच पुराणांत अनेक व्यासांचे उल्लेख आढळून येतात. अशा प्रकारे वेदांचे विभाग आतापर्यंत अठ्ठावीस वेळा झाले, असेही पुराणांत म्हटले आहे. एकाच वेदाचे चार भाग का झाले यासंबंधी वैदिक वाङ्मयात आणि पुराणांत अनेक प्रकारची चर्चा केलेली आढळून येते. यज्ञाच्या सातत्यासाठी एका वेदाचे चार भाग केले असे भागवत पुराणात (१.४.४९) सांगितले आहे.

**व्यदधात् यज्ञसन्तत्यै वेदमेकं चतुर्विधम् ।**

अर्थ – एकच वेद यज्ञविस्तारासाठी चतुर्विध केला.

वेदांचे चार भाग असल्याचे अनेक उल्लेख वैदिक वाङ्मयातही आढळून येतात. ऋग्वेदातील एका ऋचेत (१०.७१.११) या विषयीचे सूचन आढळते. पुरुषसूक्तामध्ये आलेले ऋच्, साम, छन्द व यजुस् हे शब्द एकाच वेदाचे चार भाग झाल्याचे दर्शवितात. ब्राह्मणग्रंथांतही वेद चार प्रकारचे असल्याचे म्हटले आहे. 'चत्वारि शृङ्गा...' या ऋचेचा अर्थ स्पष्ट करताना गोपथ ब्राह्मणात (१.२.१६) म्हटले आहे, की 'चत्वारि शृङ्गेति वेदा वा एते उक्ता' = चार शिंगे म्हणजे चार वेदच होत.

तैत्तिरीय संहितेचा भाष्यकार भट्टभास्कर आपल्या भाष्याच्या उपोद्घातात लिहितो–

**पूर्वं भगवता व्यासेन जगदुपकारार्थमेकीभूयस्थिता वेदा व्यस्ताः शाखाश्च परिच्छिन्नाः ।**

अर्थ – पूर्वी एकत्र असलेल्या वेदांचे विभाग व्यासांनी जगताच्या कल्याणासाठी केले व अनेक शाखा निर्माण केल्या.

वेद एक होता व त्याचे यज्ञाकरिता चार भाग केले, असे भर्तृहरीनेही वाक्यपदीयाच्या आरंभश्लोकात म्हटले आहे.

पण ब्राह्मणग्रंथात मुख्यतः यज्ञाचे संविधान असल्यामुळे ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद अशा तीनच वेदांचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं आहे. या दृष्टीने त्रयी विद्या किंवा वेदत्रयी असे शब्द योजिलेले आढळून येतात. 'यमृषयस्त्रयिविदा विदुः !' = तीन वेद जाणणारे ऋषी ज्याला समजून घेतात, असे तैत्ति. ब्राह्मणात म्हटले आहे. यज्ञसंस्थेच्या विस्तारात ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांचाच प्रामुख्याने उपयोग होता. सर्व प्रकारचे श्रौतयाग या तीन वेदांच्या साहाय्यानेच होत. या प्रत्येक वेदाचा एकेक ऋत्विज यज्ञात प्रमुख असे. अध्वर्यू, होता आणि उद्गाता हे तीन प्रमुख ऋत्विज होत. अथर्ववेदामध्ये मंत्र-तंत्र, जारण-मारण, राजकर्म, वशीकरण, इ. विषय आलेले असल्यामुळे त्यांचा यज्ञकर्मात काहीही उपयोग होत नव्हता.

कालांतराने अथर्ववेदाचाही यज्ञकर्मात समावेश करण्यात आला व त्याला इतर वेदांबरोबर स्थान मिळाले. म्हणून नंतरच्या वाङ्मयात वेद चार असल्याचे उल्लेख आढळतात. बृहदारण्यकोपनिषदात म्हटले आहे, की त्या श्रेष्ठ महाभूतापासून म्हणजे परमेश्वरापासून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद असे चार वेद उत्पन्न झाले. वेदाच्या स्वरूपाचे वर्णन करताना तैत्ति. उपनिषदात (२.३) म्हटले आहे, की वेदपुरुषाचे यजुस् हे मस्तक आहे, अथर्ववेद हा आधार आहे, ऋग्वेद ही उजवी बाजू आहे आणि सामदेव ही डावी बाजू आहे.

वेद दोन प्रकारे प्रगट झाला, असेही वर्णन आढळते. प्रणवरूप व शब्दरूप असे हे दोन प्रकार होत. प्रणवरूप वेद हा 'सोऽहं' शब्दस्वरूप व पुरुषदेहखेरीज इतर सर्व ठिकाणी राहतो. प्रणवरूप वेद हा सर्वांचा प्रेरक असा ईश्वर आहे. याच ईश्वरापासून शब्दरूप वेद झालेला आहे. पुरुषदेहात मात्रा उत्पन्न होऊन त्या वैखरी वाचेने स्पष्ट झाल्यानंतर त्याचे शब्द तयार झाले. याप्रमाणे प्रवृत्ति निवृत्तिदर्शक शब्दरूप वेद पुरुषदेहात प्रगट झाला. या दोन रूपांचा उल्लेख लघुवाक्यप्रवृत्तीतही आहे.

वेदाचे किती भाग होते यासंबंधी निरनिराळी मते असली तरी वेदाच्या चार संहिता मुख्यतः प्रसिद्ध आहेत. या संहितांमध्ये आलेल्या विषयांचा अभ्यास केल्यांअंती असे दिसते, की या संहिता परस्पर पूरक आहेत. त्यांचे अध्ययन निरपेक्षपणे करणे योग्य नाही. म्हणून अतिप्राचीन काळी चार वेद मुखोद्गत असणारे ते चतुर्वेदी, तीन वेद मुखोद्गत असणारे ते त्रिवेदी, दोन वेद मुखोद्गत असणारे ते द्विवेदी, असे विद्वान असत. व्यासांनी हे चार वेद आपल्या चार शिष्यांना शिकविले, असे म्हटले आहे. त्यांनी पैल नावाच्या शिष्याला ऋग्वेद, वैशंपायनाला यजुर्वेद, जैमिनीला सामवेद व सुमंताला अथर्ववेद शिकविला. या चार

शिष्यांनी चार वेदांचे प्रवर्तन केले. म्हणून प्रत्येक वेदसंहितेचा तो तो मूल आचार्य समजला जातो. शिष्यपरंपरेने वेदांचे रक्षण झाले; पण त्यामध्ये अनेक शाखा निर्माण झाल्या. या चार वेदांच्या शाखा कशा निर्माण झाल्या, त्यांची नावे कोणती व त्या शाखांचा प्रचार कुठे होता, याची माहिती चरणव्यूहात दिली आहे. चरणव्यूहाच्या मते ऋग्वेदाच्या आठ, यजुर्वेदाच्या शहायंशी, सामवेदाच्या एक हजार आणि अथर्ववेदाच्या नऊ शाखा होत्या (चरणव्यूह पाहा). विष्णुपुराणान्वये यजुर्वेदाच्या सत्तावीस शाखा होत्या. ऋग्वेदाच्या एकवीस शाखा, यजुर्वेदाच्या एकशे-एक शाखा, सामवेदाच्या एक हजार शाखा व अथर्ववेदाच्या नऊ शाखा होत्या, असे पतंजलीने पस्पशाह्निकात म्हटले आहे. एकेका वेदशाखेवर कर्माच्या विधानासाठी अनेक सूत्रग्रंथ निर्माण झाले व सूत्रभेदाने शाखाभेद समजले जाऊ लागले. या शाखा थोड्याफार फरकाने एकमेकींशी मिळत्याजुळत्या असाव्या; पण काळाच्या ओघात अनेक शाखा लुप्त झाल्या. सध्या उपलब्ध असलेल्या वेदशाखा कोणत्या व त्यांचे ब्राह्मण, आरण्यक व उपनिषद् ग्रंथ कोणते त्यांची नोंद सोबतच्या कोष्टकात केली आहे—

| वेद | संहिता | ब्राह्मण | आरण्यके | उपनिषदे |
|---|---|---|---|---|
| ऋग्वेद | शाकल, बाष्कल (त्रुटित) | ऐतरेय कौषीतकी (शांखायन) | ऐतरेय | ऐतरेय, बाष्कल कौषीतकी |
| यजुर्वेद (शुक्ल) | माध्यन्दिन, काण्व | शतपथ (मा.) शतपथ (का.) | बृहदारण्यक (मा.) बृहदारण्यक (का.) | बृहदारण्यक ईशावास्य शिवसंकल्प |
| यजुर्वेद (कृष्ण) | तैत्तिरीय मैत्रायणी काठक कपिष्ठल | तैत्तिरीय | तैत्तिरीय, मैत्रायणी | तैत्तिरीय महानारायण मैत्री, कठ, श्वेताश्वतर |
| सामवेद | कौथुम राणायनी जैमिनी | तांड्य महाब्राह्मण (पंचविंश) षड्विंश, वंश, सामविधान, आर्षेय, मंत्र दैवत, संहितोपनिषद् जैमिनी (तलवकार) | | केन, छांदोग्य |
| अथर्ववेद | शौनक पैप्पलाद | गोपथ | | प्रश्न, मुंड, मांडूक्य, अथर्वशिखा वगैरे बावन्न उपनिषदे |

**वेदांचे रक्षण व अध्ययन**— वेदांच्या कालनिर्णयाची चर्चा अनेक प्रकारे केली गेली असली, तरी वेद हे अतिप्राचीन आहेत याबद्दल कोणाचाही मतभेद नाही. इतकेच काय, जगातील पहिले वाङ्मय म्हणूनही वेदांचा गौरव केला जातो. अशा या प्राचीनतम वाङ्मयाचे हजारो वर्षे कसे संरक्षण झाले, वेदरक्षणाचा हा चमत्कार कसा घडला, हे एक जगातील आश्चर्य आहे. व्यासांनी वेदांचे प्रवर्तन केले व त्यांच्या शिष्यांनी वेदांचे ग्रहण करून त्यांची परंपरा पुढे चालू ठेवली. हे सर्व शिष्य ज्ञानोपासक होते. वेदांचे अध्ययन करणे, त्यांचे अध्यापन करणे व वेदांचे संरक्षण करणे हेच त्यांचे जीवितकार्य होते. पिढ्यान्‌पिढ्या भारतात हे कार्य चालू राहिले. वेदांत संकलित केलेले मंत्र स्वराचाही फरक न होता मूळच्या स्वरूपात आपणांपर्यंत पोचले आहेत. वेद हे आर्यांचे धार्मिक वाङ्मय असल्यामुळे त्यांतील ऋचा जिवंत ठेवून त्यांची जोपासना करण्यासाठी ब्राह्मणांनी अपार कष्ट केले व स्वार्थत्यागही केला. जन्मभर वेदांचा अभ्यास करून हे प्रचंड वेद-वाङ्मय मुखोद्गत ठेवणे व ते पुढच्या पुढच्या पिढ्यांना यथास्थित स्वरूपात पोचते करणे, हे ब्राह्मणांचे प्रथम कर्तव्य

ठरल होते. या कार्यासाठी सर्वस्वी वाहून घेतल्यामुळे ऐहिक उन्नतीकडे त्यांचे दुर्लक्ष होणे साहजिकच होते. वेदाच्या अभ्यासाने विशेषसा द्रव्यलाभ होत नसला, तरी त्याची पर्वा न करता वेदाचे अध्ययन व अध्यापन करण्याचे काम ब्राह्मणांनी श्रद्धेने शतकानुशतके चालूच ठेवले. वेदांच्या रक्षणाबरोबरच त्यांवर अवलंबून असलेल्या विद्यांचे व शास्त्रांचेही रक्षण त्यांनी केले म्हणूनच प्राचीन काळी समाजात त्यांना श्रेष्ठ स्थान प्राप्त झाले होते.

अत्यंत प्राचीन अशा ऋचा, मंत्र व ब्राह्मणग्रंथ हे सर्व इतका प्रदीर्घ काल सुरक्षित कसे राहिले, याबद्दल आश्चर्य प्रगट करून माक्स म्यूलर लिहितो – ' या सर्वांचे उत्तम संरक्षण वैदिकांनी केवळ उत्तम प्रकारचा संस्कार जिला मिळाला आहे, अशा स्मृतीच्या द्वाराने केले. स्मृती कशी सुधारावी, वेदपठण कसे करावे, या गोष्टींचे नियम बांधून टाकलेले असत. लेखनकला निघण्यापूर्वी धर्मग्रंथांचे संरक्षण करण्यास याहून, म्हणजे ग्रंथ मुखोद्गत करण्याहून दुसरा मार्गच नव्हता. धर्म व आचारविचार यांचा पाया म्हणजे वेद होय. पण या वेदांचे रक्षण करणारे ब्राह्मण खेड्यांत राहतात, लोकांकडून भिक्षा मागून तिच्यावर आपला उदरनिर्वाह करतात आणि पाठशाळेत राहून अभ्यास करतात. वेदनिंदकांशी संभाषण केल्याने आपण भ्रष्ट झालो, असे त्यांना वाटते. तीनचार हजार वर्षांपूर्वीच्या त्यांच्या पूर्वजांप्रमाणे या हल्लीच्या लोकांसही ऋग्वेद मुखोद्गत असतो. त्यांच्याजवळ पोथ्या असतात; पण ही पवित्र विद्या ते त्यांवरून शिकत नाहीत. हजारो वर्षांपूर्वी त्यांचे पूर्वज जसे शिकले, त्याचप्रमाणे ते आजकालदेखील वेदविद्या गुरुमुखातून शिकतात. '

मूळच्या वेदमंत्रांमध्ये कोणत्याही प्रकारचा बदल होऊ नये, यासाठी प्राचीन ऋषींनी अनेक क्लृप्त्या योजल्या आहेत. प्रातिशाख्ये, शिक्षा वगैरे ग्रंथ निर्माण करून त्यांत वेदमंत्रांच्या उच्चारणाचे नियम व स्वर म्हणायचे नियम सांगितले आहेत. वेदांतील मंत्राचा एखादा स्वर जरी चुकला, तरी अर्थहानी होते असे त्यांनी प्रतिपादिले. ' वेदांचे अध्ययन सस्वर केले पाहिजे, मंत्राचा स्वर चुकल्यास तो मंत्र वज्र होऊन यजमानाचा घात करतो ' असे पाणिनीय शिक्षेत म्हटले आहे. म्हणून वेदामध्ये स्वरप्रक्रियेला फार महत्त्वाचे स्थान आहे. स्वर म्हणजे नाद. विशिष्ट प्रकारचा स्वर म्हणून शब्दाचे उच्चारण केल्यास त्यातून जो नाद प्रगट होतो, त्यामुळे तो शब्द सिद्ध होत असतो. म्हणून योग्य स्वर योग्य प्रकारे उच्चारून वेदमंत्राचे पठण केल्यास तो मंत्र सिद्ध होत असतो. अशा मंत्रात प्रचंड शक्ती असते आणि ही शक्ती टिकविण्यासाठी शुचिर्भूतपणे त्या मंत्रांचे सतत पठण करावे लागते.

हे वेदमंत्र सस्वर असे टिकावे यासाठी आणखी एक युक्ती प्राचीन आर्यांनी योजिली आणि ती म्हणजे वेदांच्या विकृती तयार करणे, ही होय. त्यासाठी वेगवेगळ्या वेदशाखांमध्ये असलेल्या मंत्ररूप संहितांचे पदपाठ तयार करण्यात आले. ऋग्वेदाचा पदपाठ शाकल्याने, सामवेदाचा गार्ग्याने व तैत्तिरीय संहितेचा आत्रेयाने केला. या पदपाठाच्या आधारे क्रम, जटा, घन, इ. विकृती तयार करण्यात आल्या. वेदमंत्रांतील पदे उलट्यासुलट्या क्रमाने म्हणणे व त्यांत होणारे स्वरांतील बदल लक्षात घेऊन त्यांचे उच्चारण करणे, यासाठी वेदविकृती उपयोगी पडल्या. (वेदविकृती पाहा)

वेदमंत्र हे सिद्ध असून, ते भारतीय धर्माचे मूलस्रोत आहेत. म्हणजेच धर्माचे अधिष्ठान वेदच आहेत. अशा वेदांचे रक्षण अत्यंत पवित्रपणे केले पाहिजे असा आग्रह आहे. आजच्या काळात कोणी असा प्रश्न करील की, अध्ययनाचा एवढा खटाटोप कशाला ? वेदाची पुस्तके छापली, त्याची भाषांतरे छापली, त्यांचे ध्वनिमुद्रण करून ठेवले किंवा त्यांची मायक्रोफिल्म काढून ठेवली तरी वेदांचे रक्षण होईल. पण खऱ्या अर्थाने वेदांचे रक्षण होणार नसून, ते केवळ अक्षरस्वरूप वेदाचे रक्षण होईल. वेदाचा उच्चार योग्य माणसाने, योग्य वेळी व योग्य परिस्थितीत केल्यानेच त्यातील खरा अर्थ प्रगट होतो. वेदांतील हा खरा अर्थ जाणून घेण्याची प्राचीन आर्यांना तीव्रतर आकांक्षा होती. म्हणून त्यांनी वेदांचे अध्ययन शास्त्रशुद्ध रीतीने करून त्यांचे रक्षण करण्याची जबाबदारी एका वर्गाकडे सोपविली. वेदाचे अक्षरज्ञान झाले, तरी त्यातील गूढार्थ समजणे कठीण असते. यासंबंधी ऋग्वेदांतील अस्यवामीय सूक्तात एक ऋचा आली आहे, ती अशी –

**ऋचो अक्षरे परमे व्योमन् यस्मिन् देवा अधि विश्वे निषेदुः ।**
**यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत् तद्विदुस्त इमे समासते ॥**

(ऋ. १. १६४. ३९)

अर्थ – श्रेष्ठ, अविनाशी व उच्च असा गूढार्थ ऋचा प्रगट करीत असत. सर्व देव त्याचा आश्रय करतात. ज्याला हा गूढार्थ समजत नाही, त्याला ती ऋचा काय करणार ? पण जे हे सर्व जाणतात, ते त्या ज्ञानाने आत्यंतिक सुख मिळवितात.

म्हणून वेदाध्ययन हे एकाग्रतेने, दक्षतेने, इंद्रियनिग्रहाने, बहुश्रुतपणे व तपाचरणाने केले पाहिजे. त्यासंबंधी जे नियम सांगितले आहेत, त्यांचे कसोशीने पालन केले पाहिजे. वेदाध्ययनाला प्रारंभ करताना 'ॐ' म्हणून प्रारंभ करावा, स्नान संध्या करून वेदाध्ययनास बसावे, शुचिर्भूत ठिकाणी अध्ययन करावे, वेदपठण करताना मांडी घालून बसावे, डोके व पाय हालवू नयेत, इ. नियम धर्मसूत्रे व स्मृती यांमध्ये सांगितले आहेत. गुरूने जसे सांगितले तसेच्या तसे उच्चार करून शिष्याने वेदमंत्र उच्चारावे

यालाच अध्ययन म्हणतात. वेदाध्ययन हे जसे शास्त्रोक्त पद्धतीने केले पाहिजे, त्याचप्रमाणे वेद शिकविणाऱ्या अध्यापकानेही काही नियम पाळले पाहिजेत. वेदाध्यापकाने केव्हाही वेतन घेऊ नये. त्याने योग्य शिष्यालाच जवळ करून म्हणजे त्याचे उपनयन करून त्याला वेद शिकवावा.

पण हे वेदाध्ययन एकदा केल्यानंतर ते अध्ययन सतत ताजेतवाने कसे राहणार, हाही प्रश्नच होता. म्हणून दैनंदिन कर्मामध्ये ब्रह्मयज्ञाचा अंतर्भाव करण्यात आला. आपण जे अध्ययन केले असेल, त्यातील काही भागाचा दररोज स्वाध्याय करणे यालाच ब्रह्मयज्ञ असे म्हणतात. या ब्रह्मयज्ञाचा उल्लेख पंचमहायज्ञांमध्ये केलेला आहे. प्रत्येकाने नित्य स्वाध्याय केला पाहिजे आणि वेदाध्ययन करताना जे नियम पाळले, ते स्वाध्यायाच्या वेळीही पाळले पाहिजेत. याशिवाय वेदपाठकाने नेहमीच शुद्ध व पवित्र आचरण ठेवले पाहिजे. वेदांचे रक्षण करणे हे एक जीवितकार्य आहे, असे त्याने समजले पाहिजे.

हा स्वाध्याय करीत असताना वेदांतील मंत्रांच्या अर्थाचेही चिंतन केले पाहिजे. अर्थज्ञानाशिवाय वेद म्हणणाऱ्याला यास्काचार्याने ' स्थाणु ' (भारवाहक) असे म्हटले आहे (निरुक्त १.१८). वेदमंत्राचे अर्थज्ञान कर्माच्या दृष्टीनेही आवश्यक आहे. वेदमंत्रांचा विनियोग वेगवेगळ्या यज्ञकर्मात सांगितला आहे; तर वेदाच्या गद्यरूप भागामध्ये यज्ञांचे विवेचन केले आहे. म्हणून श्रौतप्रक्रियेच्या यथार्थ ज्ञानाने वेदमंत्राचा गूढार्थ उलगडता येतो. कर्माच्या वेळी मंत्र म्हटले जात असल्यामुळे ते ते मंत्र कर्माचा योग्य अर्थ स्पष्ट करीत असतात, असे मीमांसाग्रंथांत म्हटले आहे.

वेदांच्या अध्ययनासंबंधी आणखी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. जर गुरूने विनावेतन अध्यापन केले असेल, तर अध्ययनसमाप्तीनंतर विद्यार्थ्याने गुरूला काही द्रव्य द्यायचे असते. यालाच गुरुदक्षिणा असे म्हणतात. ही दक्षिणा ऐच्छिक असे. शिक्षणाच्या वेळी याबाबत गुरुशिष्यांमध्ये कोणताच करार होत नसे. पण अध्ययन संपल्यावर शिष्याने गुरूला दक्षिणा समर्पण करावी, असा संकेत असे. यासंबंधी स्मृतीत म्हटले आहे की 'गुरूने एक अक्षर जरी शिकविले तरी पृथ्वीवर अशी एकही वस्तू नाही, की जी देऊन गुरूच्या त्या ऋणातून मुक्त होता येईल.'

प्राचीन काळी काही स्त्रियांचेही उपनयन होत होते व त्यांनाही वेदाध्ययनाची परवानगी होती. अपाला, विश्ववारा, घोषा, इ. वेदपाठक स्त्रिया प्राचीन काळी होऊन गेल्या.

**वैदिक देवता** – वैदिक संहितांमध्ये अनेक देवतांना उद्देशून गायिलेले मंत्र आढळून येतात. परंतु या देवतांचे स्वरूप कोणत्या प्रकारचे असावे हे निश्चित सांगता येत नाही. एकेका देवतेची वेदांत आढळणारी माहिती एकत्रित करून देवतांचे स्वरूप वर्णन करण्याचा प्रयत्न मुख्यतः पाश्चात्य पंडित मॅक्डोनेल याने केला. काही विद्वानांच्या मते या देवता म्हणजे आकाशात दिसणारे तारे होत. त्या ताऱ्यांकडे बघून ज्या कल्पना वैदिक कवींना सुचल्या, त्यांचेच वर्णन त्यांनी वेदवाङ्मयात केले. या वैदिक देवतांचे स्वरूप लक्षात घेण्यासाठी कोणत्या परिस्थितीत प्राचीन आर्यांनी वैदिक वाङ्मयाची निर्मिती केली, हेही पाहिले पाहिजे.

आर्य हे सप्तसिंधू प्रदेशात येऊन राहिले. तिथे त्यांच्या जीवनात स्थैर्य आले. त्यांच्यांत सामाजिक व धार्मिक भावना उत्पन्न झाल्या. या आर्य जनांत जे विद्वान ऋषी होते, त्यांनी आपल्या सभोवती असलेल्या निसर्गातील शक्तींचे निरीक्षण केले. नैसर्गिक घटनांचे निरीक्षण करताना त्यांनी अनेक आश्चर्ये पाहिली. उदा० ' खाली तोंड करून असलेला, निराधार हा सूर्य खाली का पडत नाही ? तो उताणा होऊन वर कसा जातो ' असे सूर्याचे वर्णन ऋग्वेदात ( ४.१३.५ ) केले आहे. निसर्गात घडणाऱ्या घटना या सचेतन आहेत आणि म्हणूनच त्यांत दैवी शक्ती आहे, अशी श्रद्धा वैदिक आर्य जनांत निर्माण झाली. मनुष्याच्या सभोवती असलेल्या या दैवी शक्तींना संतुष्ट करून घेतले, तरच आपले जीवन सुखी होईल, या कल्पनेने वैदिक ऋषींनी निसर्गातील वेगवेगळ्या शक्तींना उद्देशून स्तोत्रे रचली. निसर्गातील शक्तींना इंद्र, वरुण, मरुत्, पर्जन्य, उषस् इत्यादी वेगवेगळ्या नावांनी संबोधून त्यांनी सूक्ते रचली.

निसर्गातील देवतांची व इतर देवतांची पूजा करणे हे एक धर्माचे प्रमुख अंग होते; पण वाईट शक्तींचा परिणाम मानवी जीवनावर होऊ नये किंवा झाला असल्यास तो नष्ट करण्यासाठी तंत्राचा उपयोग करण्याची प्रथाही सुरू झाली होती. याची माहिती अथर्ववेदात पुष्कळच आहे. कर्मकांडाला जरी महत्त्व आले असले, तरी देवतांसंबंधीच्या कल्पनाही विशुद्ध स्वरूपांत व्यक्त झालेल्या आढळून येतात. या दृष्टीने ऋग्वेदाच्या आधारे देवतांचा विकासक्रम लक्षात घेण्यासारखा आहे.

या देवतांचे वर्णन करताना त्या चैतन्यमय असल्या पाहिजेत, अशी त्यांनी कल्पना केली. देवतांवर मानवी शरीराचा आरोप करून त्यांनी देवतांच्या स्वरूपाचे वर्णन केले. मनुष्य ज्याप्रमाणे हालचाल करतो, व्यवहार करतो, त्याच्या ज्याप्रमाणे मनोवृत्ती असतात, त्याप्रमाणे देवताही व्यवहार करतात असे प्राचीन ऋषींनी मानले आहे. म्हणूनच अग्नीच्या ज्वाळा म्हणजे त्याची जीभ आहे, सूर्याचे किरण त्याचे हात आहेत, सूर्य हा मित्र व वरुण त्यांचा डोळा आहे, उषेचा तांबूस रंग म्हणजे सुंदर वस्त्र आहे, अशी वर्णने वेदांत आढळतात. अग्नी, सूर्य, उषस्, इ. देवता आपापल्या रथात बसून येतात; तर इंद्र आणि वरुण हे राजे असल्यां-

मुळे ते उत्तम प्रासादात राहतात, अशीही वर्णने आढळतात.

ऋग्वेदात अशा शेकडो देवतांचा उल्लेख आढळून येतो; पण तरीही काही ऋषींच्या काही विशिष्ट देवता अधिक आवडत्या आहेत, असे दिसून येते. उदा० ऋग्वेदातील सातव्या मंडलात वरुणाचे वर्णन करताना वसिष्ठांची प्रतिभा अधिकच खुललेली दिसते. एखाद्या विशिष्ट देवतेचे गुणवर्णन करताना ती देवता सर्वश्रेष्ठ व सर्वगुणसंपन्न असल्याचे त्या त्या ऋषींनी म्हटले आहे. एखाद्या विशिष्ट कर्मामध्येही एखादीच देवता प्रधान असते म्हणून त्या देवतेचे वर्णन तिथे प्रकर्षाने आढळून येते.

अशा प्रकारे अनेक देवता मानल्या गेल्या असल्या, तरी या सर्व देवतांच्या मुळाशी एकच एक कोणी तरी देव असला पाहिजे, असे वैदिक ऋषींना वाटू लागले असावे. इंद्र आपल्या मायेच्या साह्याने अनेक रूपे धारण करतो, असे ऋग्वेदात म्हटले आहे (ऋ. ६.४७.१८). दुसरी एक ऋचा अशी–

**एकं सद् विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ।**

(ऋ. १.१६४.४६)

**अर्थ**–एकच सत् आहे, त्याला लोक अग्नी, यम, मातरिश्वा असे म्हणतात.

ऋग्वेदातील दैवतशास्त्राच्या विकासाचा अभ्यास करता असेही आढळून येते, की या सर्व देवतांची वर्णने करीत असताना वैदिक ऋषींनी श्रेष्ठतम अशा तत्वज्ञानाचाही विचार केलेला असावा. या दृष्टीने वेदांत आढळून येणाऱ्या तत्वज्ञानविषयक सूक्तांचा अभ्यास केल्यास ही गोष्ट स्पष्ट होते. देवतांचे स्वरूप-वर्णन हे निश्चितच काल्पनिक आहे. अखिल विश्वात ज्या घटना घडत असतात, त्यांच्यावर अधिसत्ता गाजवणारी अशी निर्गुण, निराकार आणि अवर्णनीय अशी एक शक्ती आहे, असे विचार वैदिक ऋषींनी मांडले आहेत. एखाद्या देवतेला श्रेष्ठ स्थान देण्यापेक्षा सर्वांच्या पाठीमागे एक प्रेरक शक्ती कोणती आहे, तेच शोधून काढण्याचा हा प्रयत्न आहे. अनेकदेवतावादातून एकेश्वरीवादाकडे विचारप्रवाह सुरू झाल्याचे हे द्योतक आहे. सर्व विश्वामागे एकच प्रेरक शक्ती असली, तरी त्या शक्तीचे स्वरूप नेमके काय यावद्दल मात्र निश्चित कल्पना आलेली दिसत नाही. सर्व देवतांना उद्देशून 'विश्वे देवाः' ही संज्ञा त्यांनी वापरात आणली. ब्राह्मणग्रंथांत याच देवाला प्रजापती असे म्हटले गेले. परंतु याही कल्पनेचा विचार फार काळ टिकला नाही व निसर्ग आणि परमेश्वर हे भिन्न नाहीत, असे म्हटले गेले.

देवतांसंबंधीचा विचार पारशी लोकांच्या अवेस्ता नामक धर्मग्रंथातही आढळून येतो. उच्चतम अशा या एकाच एका शक्तीला तिथे अहुरमज्द असे म्हटले आहे.

दैवतशास्त्रासंबंधी वेगवेगळ्या कल्पना आढळून येत असल्या, तरी देवांचाही एक समाज होता, त्यांना आदी म्हणजे उत्पत्ती आहे आणि त्यांच्या अनेक पिढ्या होत्या, अशीही वर्णने वेद-वाङ्मयात आढळून येतात. काही पहिले देव व काही नंतरच्या युगातील देव, असे उल्लेख ऋग्वेदात (१०.७२.२) आढळतात. देव हे प्रथमतः मर्त्यच होते, असे अथर्ववेदात (११.५.१९) म्हटले आहे. देव हे प्रथम अमर नव्हते. त्यांनी अग्नी, सविता यांच्यासाठी सोमयाग केला. त्या देवांनी मग इतर देवांना अमरत्व दिले. इंद्र हा जन्मतःच अजातशत्रू आहे, असे ऋग्वेदात म्हटले आहे (१.१०२.८). ऋभू हे सुधन्व्याचे पुत्र होत. देव हे अदितीचे पुत्र होत. सोम हे देवांना अमरत्व देणारे पेय आहे, असे शतपथ ब्राह्मणात (९.५.१८) म्हटले आहे. यावरोबरच तपाचरण करून देवांनी मृत्यूवर विजय मिळविला, असेही म्हटले आहे. देवांनी अनेक यज्ञ केल्याचेही उल्लेख आढळतात. यावरून मनुष्यांच्यापेक्षा उच्च कोटीतील एक समूह म्हणूनच देवांचे वर्णन वैदिक वाङ्मयात आढळते.

वेदांमध्ये या वेगवेगळ्या देवतांची जी स्वरूपवर्णने केलेली आहेत, त्यांवरून त्या त्या देवतांची पुष्कळ माहिती मिळू शकते. अग्नी, इंद्र, वरुण, उषस्, सूर्य, इ. देवतांची माहिती कोशात त्या त्या नावाखाली दिलेली आहे.

**वेदकालीन संस्कृती**–वैदिक काळी संस्कृती कशी होती याचा विचार करताना आर्यांचा समाज कसा निर्माण झाला, हे प्रथम पाहिले पाहिजे. सप्तसिंधू प्रदेशात आर्यांच्या वसाहती निर्माण होत असतानाच त्यांच्या सामाजिक जीवनातही अनेक प्रकारची परिवर्तने होत होती. आर्यांच्या ज्या वेगवेगळ्या टोळ्या येत होत्या, त्यांच्यांत दोन गट पडले आणि त्यांमध्ये संघर्ष निर्माण झाला. एका बाजूला भरत लोक सुदास राजाच्या नेतृत्वाने एकत्र झाले. तृत्सू या नावाच्या जनसमूहाचे त्यांना साहाय्य मिळाले आणि वसिष्ठ हा त्यांचा पुरोहित झाला. दुसऱ्या पक्षात राजे आणि त्यांचे लोक होते. विश्वामित्राने या पक्षाचे नेतृत्व केले. पुरू, अनू, यदू, द्रुह्यू व तुर्वश हे पाच आर्य जनसमूह आणि अलिन, पक्थ, भलान, शिव व विषाणी हे पाच अनार्य जनसमूह होते. या दहा राजांच्या म्हणजे जनसमूहांच्या विरुद्ध भरतांचे जे युद्ध झाले, त्यालाच दाशराज्ञ युद्ध असे नाव मिळाले. ऐतिहासिक दृष्ट्या हे पहिलेच युद्ध होय. याचे वर्णन ऋग्वेदात केलेले आहे. या युद्धात सुदासाचा विजय झाला आणि आर्यावर्तावर भरतांचे राज्य निर्माण झाले.

या युद्धाचा महत्त्वाचा परिणाम असा झाला, की आर्य आणि अनार्य यांचा संमिश्र असा समाज निर्माण झाला. या समाजात दास, दस्यू, असुर, इ. कृष्णवर्णी लोक, विचित्र भाषा बोलणारे यज्ञविरोधी असेही लोक मिसळून गेले. या संमिश्र आर्य सम-

जाचा इतिहास मुख्यत: ऋग्वेदावरून आणि इतर वैदिक वाङ्मयावरून समजून घ्यावा लागतो.

आर्यांच्या समाजजीवनात व्यक्ती आणि समाज, ऐहिक आणि पारलौकिक यांचा सुंदर समन्वय घातला गेला आहे. अनेक जमातींनी बनलेला हा समाज असला तरी, व्यक्तीच्या विकासासाठी त्यात विचार केलेला आढळतो. या जीवनविकासाचे सूत्र होते अध्यात्म. वेदकालीन समाजजीवनाचा उद्देश केवळ भौतिक जसा नव्हता, त्याप्रमाणे केवळ आध्यात्मिकही नव्हता; तर भौतिक व अध्यात्म यांचा तो सुरेख संगम होता. कौटुंबिक जीवन, तीन ऋणे, वर्णव्यवस्था, आश्रमव्यवस्था आणि चार पुरुषार्थ या पाच आधारांवर वैदिक लोकांचे समाजजीवन आधारलेले होते.

**कौटुंबिक जीवन** – कुटुंब हा वेदकालीन समाजाचा एक अत्यंत महत्त्वाचा घटक होय. अनेक लोक एकोप्याने एकत्र राहत. आई, वडील, मुले, भाऊबंद, वहिणी-भावांची मुले, इ. सर्व मिळून एक कुटुंब तयार होई. यात पित्याला किंवा कर्त्या पुरुषाला महत्त्वाचे स्थान असे. त्याला गृहस्थ असे म्हणत. सर्व कुटुंबाची काळजी वाहणे, कुटुंबाच्या सुखासाठी सतत झटणे, द्रव्यार्जन करणे व संपत्तीचे रक्षण करणे या गोष्टी मुख्यत: गृहस्थाने करायच्या असत. गृहस्थजीवनाचा विचार वैदिक वाङ्मयात अनेक ठिकाणी मांडला आहे. वैदिक कालीन कुटुंबसंस्थेत अग्नीला महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले होते. घरात प्रस्थापित केलेल्या अग्नीला गृहपती असे त्यांनी नाव दिले आहे. या अग्नीच्या साहाय्याने कुटुंबाच्या स्वास्थ्यासाठी अनेक कृत्ये गृहस्थाला करावी लागत. यात देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, अतिथियज्ञ आणि ब्रह्मयज्ञ हे पंच महायज्ञ त्याला करावे लागत. कुटुंबपद्धती पितृसत्ताक असल्यामुळे कुटुंबाच्या मालमत्तेवर पित्याचे नियंत्रण असे. संपत्तीची वाटणी त्याच्या इच्छेनुसार होत असे. पण अशी वाटणी सामान्यत: न्यायदृष्ट्याच केली जाई. मुलांच्या शिक्षणाची काळजी स्वत: पित्यालाच घ्यावी लागे. वेदाध्ययनाचा आरंभ, तसेच आनुवंशिक धंदेशिक्षणाचा आरंभही पिताच करीत असे.

घरच्या सर्व व्यवस्थेत मातेचे स्थान उच्च असे. मुलांचे संगोपन करणे, अतिथींचा सत्कार करणे, इ. कामे गृहिणीला करावी लागत. स्त्रीपुरुषांमध्ये शिथिलता किंवा स्वैराचार असता कामा नये, यावर कटाक्ष होता. पालक नसलेल्या स्त्रिया स्वैराचारी बनतात, असे म्हटलेले असले तरी, ऋग्वेदातील विवाहसूक्ताचा (ऋ. १०.८५) बारकाईने अभ्यास करता असे दिसते, की विवाहसंस्थेचे पावित्र्य समाजाने मान्य केले होते. विवाहाची बंधने आयुष्यभर पाळावी लागत. पती आणि पत्नी यांमध्ये एकोपा असावा, म्हणून अनेक सूक्तांत देवतांची प्रार्थना केलेली आहे. एकपत्नीत्वाचा सामान्य नियम असला तरी क्वचित बहुपत्नीत्वाची चाल रूढ असावी. विशेषत: राजघराण्यातील व श्रीमंत घराण्यातील पुरुष अनेक बायका करीत.

**तीन ऋणे** – वैदिक कालातील समाजामध्ये अनुशासन व नियमित जीवन यांच्या द्वारे उच्च नागरिक जीवनाची कल्पना असल्याचे आढळून येते. समाजातील कोणतीही व्यक्ती उच्छृंखल बनू नये व तिला आपल्या जीवनाचे ध्येय समजावे म्हणून ऋणकल्पना सांगितली गेली. ऋण ही कल्पना भारतीय सामाजिक नीतिशास्त्रात अत्यंत वैशिष्टचपूर्ण आहे, असे तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी म्हटले आहे. देवऋण, पितृऋण व ऋषिऋण या तीन ऋणांचा उल्लेख व्यक्तीच्या जीवनाशी असला, तरी मनुष्यऋण आणि अतिथिऋण यांचा संबंध समाजजीवनाशी निगडित आहे. या ऋणकल्पनेमुळेच संस्कृतीचा सर्वांगीण विकास होऊन वेदकालीन समाज अग्रेसर होऊ शकला. (ऋणत्रय पाहा)

**वर्णव्यवस्था** – ऋग्वेदकाली वर्णव्यवस्था अस्तित्वात नव्हती, असेच म्हटले पाहिजे. कारण वर्ण हा शब्द रंग या अर्थाने ऋग्वेदात आढळतो. आर्यांच्या समाजात प्रथमत: दोनच वर्ग होते. देवतांसाठी सूक्ते गाणारा, यज्ञयागादी कृत्ये करणारा आणि राजाला मार्गदर्शन करणारा असा एक वर्ग होता; तर युद्धे करणारा, असा वीर पुरुषांचा दुसरा एक वर्ग होता. या वर्गांचा उल्लेख 'ब्रह्म' आणि 'क्षत्र' या शब्दांनी केलेला आढळतो. या दोन वर्गांचे परस्परांशी अत्यंत सहकार्य होते या दोन वर्गांशिवाय जे लोक शिल्लक राहिले, त्यांचा उल्लेख 'विश्' म्हणजे प्रजा या शब्दाने केला गेला. तात्पर्य, आर्य समाजात हळूहळू ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य असे तीन वर्ग निर्माण झाले आणि त्यांनाच वर्ण असे म्हणण्यात आले. प्रथमत: तीन वर्णांतच विभागलेला हा समाज होता; पण कालांतराने आर्येतरांतील निरनिराळे लोक या समाजाशी एकरूप होऊ लागले. त्यामुळे नव्याने आर्य समाजात समाविष्ट झालेल्या या लोकांचा एक स्वतंत्र वर्ग निर्माण झाला. त्यालाच शूद्र असे नाव दिले गेले.

अशा रीतीने चार वर्णांवर आधारित अशी समाजव्यवस्था हळूहळू निर्माण झाली. या चार वर्णांना एकाच समाजपुरुषाचे भिन्न भिन्न अवयव म्हटले गेले. समाजरूपाने एक पण अवयवरूपाने भिन्न, हेच जिवंत समाजाचे लक्षण आहे. वेदकालीन समाजात सर्व वर्गांना आत्मविकास साधण्याची समान संधी दिली जात असे. एखाद्याला आपला वर्णही बदलता येत असे. त्यासंबंधी फारशी बंधने नसत. उदा० – वैश्य वर्णात जन्माला आलेला नाभानेदिष्ठ, भलांदन आणि वत्सप्री हे ब्राह्मण

झाल्याचा उल्लेख वैदिक वाङ्मयात आढळतो. महाभारतात म्हटले आहे, की 'शीलसंपन्न व गुणवान शूद्रदेखील ब्राह्मण होतो; क्रियाहीन ब्राह्मण शूद्रापेक्षाही निकृष्ट होय.' चातुर्वर्ण्य हे परमेश्वराने समाजाच्या स्वास्थ्यासाठी निर्माण केले आहे, असे मनूनेही म्हटले आहे. वैदिक समाजात असलेल्या वर्णव्यवस्थेतून भिन्न भिन्न जाती कशा निर्माण झाल्या, यासंबंधी तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी लिहितात–

'चातुर्वर्ण्यव्यवस्थेच्या मुळाशी कर्मतत्त्व आहे. ही तात्त्विक दृष्टी धर्मशास्त्रकारांनी प्रथमतः मूलभूत स्वरूपात स्वीकारली तरी, तिला अनेक कारणास्तव मर्यादा पडल्या. जसे बीज तसे कर्म, असा सिद्धान्त धर्मशास्त्रकारांनी मानला. त्यामुळे बीजाला महत्त्व देण्याचा विचार बळावला व चार वर्णांच्या संकरापासून अनेक जाती निर्माण झाल्या. वर्णाच्या चौकटीत न बसणाऱ्या जमातींना वर्णसंकरापासून झालेल्या जाती असा शिक्का स्मृतिकारांनी मारला.' (चातुर्वर्ण्य पाहा)

**आश्रमव्यवस्था** – सामाजिक व्यवस्थेचा विचार करता, व्यक्तिगत जीवन उन्नत झाले पाहिजे यासाठीही प्राचीन ऋषींनी अनेक दृष्टींनी विचार केला होता, असे दिसते. व्यक्तीच्या उन्नतीकरिता प्राचीन काळी आश्रमव्यवस्था निर्माण झाली. वैदिक साहित्यात अनेक ठिकाणी चार आश्रमांचा उल्लेख आला आहे. आश्रमव्यवस्थेच्या द्वारे व्यक्तिगत जीवन उन्नत करून वर्णव्यवस्थेच्या द्वारे सामाजिक जीवनाचा विकास साधणे, हे जीवनाचे ध्येय होते. वैदिक वाङ्मयात ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ आणि संन्यास अशा चार आश्रमांचा उल्लेख आढळत नसला, तरी व्यक्तीच्या संपूर्ण आयुष्याचे काही भाग कल्पून त्या त्या भागात त्याने कोणत्या प्रकारचा आचार करावा, याचा विचार केलेला आहे.

प्राचीन काळी शिक्षण हे गुरूच्या घरी जाऊनच घ्यावे लागे. म्हणून मुलांना लहान वयातच गुरुघरी पोचवले जाई. त्या मुलांनी गुरूजवळच राहून निरनिराळ्या विद्यांचे अध्ययन करायचे असे. या काळात त्यांना जे अनेक प्रकारचे नियम पाळावे लागत, त्यांचाच उल्लेख ब्रह्मचर्यव्रत या शब्दाने केला जातो. अध्ययनाचा काळ कमीत कमी बारा वर्षांचा असे. म्हणजे साधारणपणे पंचविसाव्या वर्षापर्यंत ब्रह्मचर्यव्रत पाळून अध्ययन पुरे केले जात असे.

त्यानंतर विवाह करून त्या व्यक्तीने निरनिराळे यज्ञयाग करणे, द्रव्यार्जन करणे, कुटुंबाची जबाबदारी स्वीकारणे, आपल्या मुलांचे संगोपन करणे, अशा प्रकारची अनेक कामे करायची असत. आयुष्यातील हा कालखंड महत्त्वाचा समजला जाई. यालाच गृहस्थाश्रम असे नंतरच्या काळात नाव दिले गेले. हा काळ नक्की किती वर्षांचा, याचा उल्लेख वैदिक वाङ्मयात दिसत नाही. विशिष्ट जबाबदाऱ्या पार पाडल्यानंतर मनुष्याने निवृत्तीचा मार्ग स्वीकारावा ही गोष्ट अभिप्रेत असली तरी, वानप्रस्थ किंवा संन्यास या आश्रमांचा नामनिर्देश मात्र आढळत नाही.

छांदोग्योपनिषदात मनुष्याचे आयुष्य ११६ वर्षांचे आहे असे मानून, मनुष्याच्या जीवनाचे तीनच भाग कल्पिलेले आहेत. आयुष्यातील पहिली २४ वर्षे अध्ययनाचा आणि ज्ञानार्जनाचा काळ आहे. यानंतरची ४४ वर्षे ही अत्यंत महत्त्वाची होत. कारण याच काळात यज्ञयागादि कर्मे करायची असत. यापुढची ४८ वर्षे, म्हणजे ६८ ते ११६, मनुष्याने परमेश्वराच्या चिंतनात घालवावी अशी अपेक्षा असे. म्हणजे येथे ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम आणि वानप्रस्थ या तीन आश्रमांचाच अप्रत्यक्षपणे उल्लेख केलेला आहे.

संन्यास या चौथ्या आश्रमाचा विचार वैदिक वाङ्मयात फारसा नाही. काही उपनिषदांत असे म्हटले आहे, की सर्व गोष्टींचा त्याग केल्यानेच अमृतत्व मिळते. महानारायणीयोपनिषदात (१०.१०) म्हटले आहे –

न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ।

अर्थ – कर्माने मोक्ष मिळत नाही, प्रजोत्पत्ती केल्याने मोक्ष मिळत नाही किंवा द्रव्यार्जन केल्यानेही मोक्ष मिळत नाही. तर सर्वसंन्यास केल्यानेच (संन्यासी) मोक्ष मिळवतात.

परंतु वैदिक काळाच्या अखेरीस चार आश्रम निश्चित झाले आणि व्यक्तीच्या जीवनविकासात त्यांचे महत्त्व अनेक प्रकारे सांगण्यात आले.

**चार पुरुषार्थ**– वैदिक काळात धर्माला सर्व प्रकारचे स्थान होते. धर्म समाजजीवनाच्या आणि व्यक्तिजीवनाच्या केंद्रस्थानीच होता. त्यामुळे प्रत्येक गोष्टीचा विचार धर्माच्या आधारावरच केला जात असे. मनुष्याने आपल्या स्वतःच्या आणि कुटुंबाच्या सुखासाठी द्रव्यार्जन केले पाहिजे आणि सर्व प्रकारची ऐहिक सुखे उपभोगिली पाहिजेत, असा विचार वैदिक वाङ्मयात आढळतो. जीवनाकडे पाहण्याची प्राचीन लोकांची दृष्टी ही सुखवादी होती. या त्यांच्या ऐहिक उन्नतीच्या कल्पनेचा उल्लेख अर्थ आणि काम या शब्दांनी करता येईल. पण याचा अर्थ असा नव्हे, की प्राचीन लोक हे केवळ भोगवादी आणि सुखवादी होते. त्यांना शेवटी मोक्षप्राप्तीच अपेक्षित होती. त्यासाठी आध्यात्मिक कल्पनेचाही विचार त्यांनी केला होता. हाच चौथा पुरुषार्थ होय.

**वेदकालीन समाजव्यवस्था**– वेदकालीन समाजव्यवस्थेचा विचार करताना त्या समाजाचे पाच घटक मानले जात होते. त्यांची थोडक्यात माहिती अशी –

कुल– लहानसे कुटुंब हा समाजव्यवस्थेतील महत्त्वाचा घटक होय. एका कुटुंबात कर्ता पुरुष, त्याचे वडील, त्याची मुले अशा तीन पिढ्या सुखाने नांदत. कुटुंबातील निरनिराळ्या संबंधाने एकत्र आलेले लोक आपापली वसाहत करून राहत. यालाच कुल असे म्हटले आहे. प्राचीन काळी संपत्ती गाईंच्या स्वरूपात मोजली जाई. म्हणून एका कुलात राहणाऱ्या सर्व लोकांच्या गाई एकत्र असत. गाईंचे जिथे रक्षण होई त्या स्थानाला गोत्र (गो+त्र) असे नाव होते. आणि नंतरच्या काळात ते ते कुलच गोत्र असे समजले जाऊ लागले. वसिष्ठ, विश्वामित्र, अत्री, इ. गोत्रनावे यावरूनच पडली.

ग्राम– अशा अनेक कुलांचा किंवा गोत्रांचा समूह एकत्र झाला म्हणजे त्याला ग्राम अशी संज्ञा मिळे. या गावातील व्यवस्था नीट राहावी म्हणून ग्रामपंचायतीसारखी एखादी संस्था अस्तित्वात आली असावी. या संस्थेच्या प्रमुखाला ग्रामणी असे नाव दिलेले आढळते.

विश्– ऋग्वेदात हा शब्द सर्वसामान्य जनता या अर्थाने वापरला आहे. अनेक गावांचा समूह यालाही विश् असे म्हटले आहे. शासनाच्या आणि समाजव्यवस्थेच्या दृष्टीने विश् हा घटक महत्त्वाचा होय. याच्या प्रमुखाला विश्पती किंवा विशांपती असे म्हटले आहे. विश् म्हणजे एखादे स्वतंत्र लहानसे राज्यच होय.

जन – ज्यांची भाषा एक आहे, देवता एक आहेत, आचार एक आहे आणि शत्रूही समान आहे, अशा लोकसमाजाला जन हे नाव होते. या समाजाच्या सर्व व्यवस्थेसाठी प्राचीन काळी शासनसंस्था निर्माण झाली. या राजकीय संस्थेचा प्रमुख तो जनाधिप समजला जाई. जनांचा वास्तव्यप्रदेश ते जनपद म्हणून ओळखले जाई. जनपद म्हणजे एक प्रकारचे गणराज्य होय. वश, उशीनर, विदेह, कोसल, कुरू, पांचाल, काशी इ. जनपदांचे उल्लेख शतपथादी ब्राह्मणग्रंथांत आढळून येतात.

राष्ट्र – ब्राह्मणग्रंथांत राष्ट्राची कल्पना अधिक स्पष्टपणे मांडलेली दिसून येते. एका सार्वभौम राजाच्या आधिपत्याखाली जेवढा भूभाग असेल, त्याला राष्ट्र म्हणावे असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे. राजन् किंवा राट् या शब्दापासूनच राष्ट्र हा शब्द तयार झाला आहे. ज्या भूभागाला एखादा समाज आईसमान पवित्र मानतो, जिथे त्या समाजाने मानलेल्या देवदेवतांचा निवास आहे आणि जो समाज एकाच धर्माने आणि संस्कृतीने बांधला गेला आहे, अशा समाजाला राष्ट्र म्हणतात. राष्ट्रातील शासनकर्ते, विद्वान लोक आणि सर्वसामान्य जनता यांमध्ये सर्व प्रकारचा एकोपा असे.

समाजजीवन – वैदिककालीन समाजातील लोकांची राहणी त्यांचे खाणेपिणे, वस्त्रे व अलंकार यांच्यासंबंधीच्या कल्पना, इ. विषयांची माहिती वैदिक साहित्यावरून पुष्कळ मिळू शकते. परंतु त्यासंबंधी अधिक विचार न करता त्यांच्या उद्योगधंद्यासंबंधी थोडी माहिती मिळवणे इष्ट आहे. प्राचीन काळी शेती हा महत्त्वाचा उद्योग होता. वेदांतील अनेक सूक्तांमध्ये शेत नांगरणे, शेताला पाणी देणे, पिकांची निगा राखणे, उत्तम पीक येण्यासाठी काही संस्कार करणे, वगैरे गोष्टींचे उल्लेख येतात. 'कृषिमित् कृषस्व' (ऋ. १०.३४.१३) म्हणजे 'शेतीच कर' ही त्या काळची महत्त्वाची घोषणा होय. शेतीबरोबरच अनेक प्रकारचे कारागिरी– उद्योग चालत असत. या कारागिरांस 'कारू' असे म्हणत. सूतकताई, विणकाम, रथ तयार करणे, रथांवर कोरीव काम करणे, सोन्याचे दागिने घडविणे, इ. व्यवसाय प्रचलित होते.

रथाला घोडे जुंपीत. गाड्या ओढल्या जात. समुद्रातून प्रवास चालत असे. ऋग्वेदात उल्लेखलेले पणी लोक म्हणजे फिनिशिअन लोक होत, असे काही विद्वानांनी म्हटले आहे. या पणींच्या बरोबरच वैदिक लोकांचा व्यापार चालत असावा. सुरेसारखी उन्मादक पेये तयार करणे, शिकार करणे हेही व्यवसाय रूढ होते. अनेक प्रकारचे उद्योगधंदे करणारा असा एकरूप समाज वैदिक काळी होता आणि त्या समाजाचे एक राष्ट्र निर्माण झालेले होते.

वैदिक राष्ट्रदर्शन – वैदिक काळात राष्ट्रासंबंधी निश्चित कल्पना होत्या, असे दिसून येते. राष्ट्राचा शासक म्हणून राजाचा उल्लेख वैदिक वाङ्मयात आढळतो. राजा हा शासक असला तरी तो प्रजेशी एकनिष्ठ असे. समाजातील अनेकांच्या सहकार्यानेच त्याला राज्यकारभार करणे आवश्यक असे. राष्ट्राच्या समृद्धीसाठी आणि राष्ट्रातील लोक सुखी व्हावे यासाठी निरनिराळे यज्ञ राजाने करावे असे ब्राह्मणग्रंथांत म्हटले आहे. राजसूय यज्ञ हा राजाच्या जीवनात अतिशय महत्त्वाचा असे. हा एक सामाजिक आणि राष्ट्रीय उत्सव समजला जाई. समाजातील वेगवेगळ्या थरांतील लोकांच्या घरी जाऊन राजा यज्ञातील काही विधी करीत असे. राजाची निवड सर्वांच्या संमतीने होत असे. यासंबंधी अथर्ववेदात म्हटले आहे, ते असे –

ये राजानो राजकृत: सूता ग्रामण्यश्च ये ।
उपस्तीन्पर्ण मह्यं त्वं सर्वान् कृण्वभितो जनान् ।।

(अथर्व. ३.५.७)

अर्थ – जे राजे आहेत, राजा बनविणारे आहेत, जे सूत आहेत, जे गावातील पुढारी आहेत, त्या लोकांना हे पर्णमणे तू माझ्याभोवती असणारे कर.

राजांच्या संबंधी अथर्ववेदात अनेक सूक्ते आली आहेत. त्यांत राजा कसा असावा, राजाची कर्तव्ये कोणती, यासंबंधी पुष्कळ विचार केला आहे.

पुरोहित– राजाला सर्व बाबतींत साहाय्य करण्याचे महत्त्वाचे काम पुरोहिताचे असे. पुरोहिताच्या साहाय्यानेच राजाने न्यायदान, दंड, युद्ध, इ. गोष्टी करायच्या असत. पुरोहित हा वेदवेत्ता व मंत्रतंत्रात कुशल असावा असे म्हटले आहे. त्याला केव्हाही सत्तेची अभिलाषा नसे. म्हणूनच राष्ट्राच्या उद्धाराच्या कार्यात नेहमी मग्न असलेल्या पुरोहितांनी आत्मविश्वासाने म्हटले आहे – 'वयं राष्ट्रे जागृयाम पुरोहिताः' (तै. सं. १.७.१०) = आम्ही पुरोहित या राष्ट्रात जागे राहू. म्हणून राजांच्या बरोबर पुरोहितांचाही वैदिक वाङ्मयात मोठ्या गौरवाने उल्लेख केलेला आढळून येतो. प्राचीन काळात अनेक थोर राजे होऊन गेले आणि त्यांचे पुरोहितही विद्वान म्हणून प्रसिद्ध झाले.

राजा हा पुरोहिताच्या सल्ल्याने राज्यकारभार करीत असला, तरी केवळ एका व्यक्तीच्या सल्ल्याने वागणे योग्य नव्हे हे जाणून राज्यशासन सुव्यवस्थित चालविण्यासाठी राजा समाजातील अनेकांची मदत घेत असे. यातूनच सभा आणि समिती यासारखी दोन मंडळे निर्माण झाली असावी, असे दिसते.

सभा – सभा हा शब्द वैदिक वाङ्मयात पुष्कळ ठिकाणी आढळतो. परंतु त्याचा अर्थ अगदीच वेगळा आहे. द्यूत खेळण्याची जागा असा त्याचा अर्थ आहे. द्यूत खेळणे हा यज्ञातील एक महत्त्वाचा विधी असे. राजाने किंवा एखाद्या क्षत्रियाने अग्निहोत्र घेताना सभेमध्ये द्यूत खेळावे, असे मैत्रायणी संहितेत म्हटले आहे (१.६.११). राजसूय, अश्वमेध यांसारख्या यज्ञप्रसंगीही द्यूत खेळले जाई. सभेत जो अग्नी प्रस्थापित करीत त्याला सभ्याग्नी असे म्हणत. या खेळण्याच्या वेळी गावातील विद्वान ब्राह्मण, श्रीमंत, पुढारी वगैरे अनेक दर्जाचे लोक भाग घेत. या खेळणाऱ्या लोकांना उद्देशून सभिक असे नाव आढळते. खेळणे झाल्यावर या लोकांबरोबर राजाची जी बोलणी होत, त्यांमध्ये राज्यकारभारासंबंधी निर्णय घेतले जात. या सभांतून राजाला मार्गदर्शन मिळे. या सभेत मंत्रीही असत. पण या सभेत स्त्रियांना भाग घेता येत नसे. अशा प्रकारे सभा हा एक राज्यव्यवस्थेचा महत्त्वाचा घटक ठरला होता.

समिती– विशेष प्रसंगी राष्ट्रातील विद्वान, अनुभवी आणि ज्ञानसंपन्न लोकांना राजा मुद्दाम बोलवी. यालाच समिती असे म्हटले आहे. या समितीत महत्त्वाच्या गोष्टींबद्दल एकमताने निर्णय घेतले जात. या समितीच्या निर्णयाप्रमाणे राजाला वागावे लागे. कित्येक वेळा राजाची निवड करणे हेही काम या समितीकडे सोपविले जाई. समितीत वेगवेगळ्या प्रकारचे लोक असत आणि ते राजाला योग्य असा सल्ला देत. यावरून कळते, की राजा हा प्राचीन काळी अनियंत्रित नव्हता.

**वैदिक धर्म व यज्ञ** – आर्यांच्या धर्माचा मूलस्रोत वेद असल्यामुळे त्याला वैदिक धर्म असे म्हणतात. यालाच सनातन धर्म असेही नाव दिलेले आढळते. वैदिक धर्मात देवतांच्या प्रार्थनांना फार महत्त्व असल्यामुळे, वेगवेगळ्या देवतांना उद्देशून वैदिक वाङ्मयात अनेक सूक्ते आढळून येतात. देवतांच्या वेगवेगळ्या स्वरूपाविषयी अनेक प्रकारची वर्णने सूक्तांतून येतात.

वैदिक धर्मात प्रार्थनेबरोबर यज्ञालाही फार महत्त्वाचे स्थान आहे. ऋग्वेदाच्या सर्व मंडलांत यज्ञविधीसाठी खास सूक्ते आढळून येतात. मात्र वैदिक काळी यज्ञाचे स्वरूप अतिशय सोपे होते. मध्यदेशात आर्यांच्या नव्या वसाहती स्थापन होत असताना यज्ञाला कर्मकांडाचे स्वरूप प्राप्त झाले. त्यासाठी ब्राह्मणग्रंथांसारखे नवे वाङ्मय निर्माण झाले. ब्राह्मणकाळात यज्ञाचा विस्तार झाला. समाजातील विद्वान लोकांनी आणि राजे लोकांनी परस्परांच्या सहकार्याने सुस्थिर असा समाज निर्माण करण्याचा प्रयत्न केला आणि त्याचे महत्त्वाचे साधन म्हणजे यज्ञ हे ठरवले. जे लोक यज्ञाला मानीत, तेच आर्य समजले गेले. पण जे यज्ञाला विरोध करीत, त्यांच्याबरोबर युद्ध करून त्यांना यज्ञधर्म म्हणजे आर्यधर्म मानायला भाग पाडले जात असे. म्हणूनच यज्ञाच्या द्वारे प्राचीन नेत्यांनी आर्यांचा एक स्थिर समाज निर्माण केला. 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' अशी त्यांची घोषणा होती.

परंतु यज्ञाचा विस्तार जसजसा होत गेला, तसतसे वैदिक धर्मात अधिक गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण झाले. धर्माचे साधे स्वरूप जाऊन त्याला श्रेष्ठ–कनिष्ठभावाचे स्वरूप प्राप्त झाले. पण अध्यात्मविचार मात्र सुटला नाही. अभ्युदय आणि निःश्रेयस ही धर्माची मुख्य सूत्रे कायम राहिली. अभ्युदयाला गौणत्व आले पण तरीही ते अंग लोप पावले नाही. वैदिक काळाच्या नंतरही हा सनातन धर्म याच दोन आधारांवर उभा राहिला आहे. (धर्म, यज्ञसंस्था पाहा)

**वेदकालीन शिक्षण** – प्रत्येक व्यक्तीचा शारीरिक, मानसिक व आत्मिक विकास व्हावा यासाठी शिक्षण आवश्यक आहे. शिक्षणाच्या क्रमासंबंधी प्राचीन साहित्यात पुष्कळ माहिती आढळून येते. प्राचीन काळी लहान मुलांना प्राथमिक शिक्षण घरीच दिले जात असे. पण वयाच्या आठव्या वर्षानंतर मुलाला गुरूच्या घरी पाठविले जाई. यावेळी उपनयन नावाचा एक संस्कार केला जात असे. समाजात जे वेगवेगळे वर्ण होते, त्यांतील सर्व मुलांना शिक्षणासाठी गुरूकडे पाठवीत. ब्राह्मण वर्णातील मुलांना आठव्या वर्षी, क्षत्रिय मुलांना अकराव्या वर्षी, तर वैश्य वर्णातील मुलांना बाराव्या वर्षी गुरूच्या घरी नेऊन पोचविले जात असे.

यानंतर विद्यार्थ्यांना ब्रह्मचर्य व्रत पाळावे लागे. अग्नीची उपासना करणे व अध्ययन करणें हे ब्रह्मचाऱ्याचे रोजचे काम

असे. याशिवाय गुरूच्या घरची सर्व कामे करणे, समिधा व फुले आणणे, यासारखी कामेही विद्यार्थ्यांना करावी लागत. अध्ययनाची निश्चित वेळ ठरलेली नसे. त्यांना वेळ मिळेल तेव्हा आपला अभ्यास करावा लागे. वेदांचे अध्ययन आवश्यक असे. हे अध्ययन झाल्यावर निरनिराळ्या विद्यार्थ्यांना आपापल्या वर्णानुसार शस्त्रविद्या, धनुर्विद्या, गणित, दंडनीती, अर्थशास्त्र, भूतविद्या, तांत्रिक शिक्षण, वैद्यक, इ. विषय शिकविले जात. शिक्षणाच्या काळात विद्यार्थ्यांना घरी जाता येत नसे. शिक्षणाचा कालावधी २४, ३६ किंवा ४८ वर्षांचा असे. विद्यार्थ्यांना शिक्षण मोफत होते आणि ते सर्वांना खुले होते. काही उल्लेखांवरून असे कळते, की स्त्रियांनाही शिक्षणाची परवानगी होती. वेदाध्ययन करून विदुषी बनलेल्या काही स्त्रिया वैदिक काळात होऊन गेल्या. त्यात घोषा, विश्ववारा, लोपामुद्रा, उर्वशी, अपाला या प्रमुख होत. पण स्त्रियांना गुरुगृही पाठविले जात होते का नाही, ते नक्की सांगता येत नाही. हारीतस्मृतीत व कूर्मपुराणात असे म्हटले आहे, की पूर्वीच्या काळी स्त्रियांचाही मौंजीबंधन संस्कार केला जात होता. यावरून काही स्त्रियांचे उपनयन करून त्यांना गुरुगृही पाठविले जात असावे. स्त्रियांना शिकविण्यासाठी आचार्याला घरी बोलवावे, असेही काही ठिकाणी म्हटले आहे.

शिक्षणाच्या काळात गुरुशिष्यांचे संबंध कसे असावे, यासंबंधीही काही माहिती वैदिक साहित्यात आढळते. अध्ययन पूर्ण करून विद्यार्थी परत घरी जाण्यासाठी निघत, तेव्हाचा प्रसंग मोठा हृद्य असे. त्या वेळी गुरू विद्यार्थ्यांना अमोल असा उपदेश करी. तैत्तिरीय उपनिषदात (१.११) तो उपदेश आला आहे.

**वेदांतील दार्शनिक विचार** – पहिल्याप्रथम एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती ही, की वेद हे ज्ञानस्वरूप असूनही वेदान्तसूत्रांप्रमाणे ते दार्शनिक ग्रंथ नाहीत. केवळ अध्यात्मचिंतन हा वेदांचा विषय नव्हे. त्यांत लौकिक आणि अलौकिक अशा सर्व विषयांसंबंधी विचारकण आढळतात. हे विचारकण औपनिषदिक विचारांना प्रेरक व परमतत्त्वाच्या प्राप्तीसाठी साहाय्यक ठरले आहेत. धार्मिक आचरण आणि अंतर्बाह्य पावित्र्य यांच्यामुळे निर्मळ झालेल्या अंतःकरणात ज्ञानाची अभिव्यक्ती होऊन त्यानंतर परमपदाचा लाभ होतो, असा सिद्धान्त आहे.

**सृष्टिविचार** – वेदातील ऋषींनी या जगताच्या मुळाशी जे कोणते नियामक असे मूलतत्त्व आहे, ते आपल्या सूक्ष्म तात्त्विक दृष्टीने शोधायचा प्रयत्न केला आहे. त्या दृष्टीने ऋग्वेदातले नासदीय सूक्त अत्यंत महत्त्वाचे आहे. त्या सूक्ताचा ऋषी, या सृष्टीच्या मुळाशी कोणते बरे तत्त्व असेल याचा विचार करीत असता काहीसा गोंधळात पडला आहे. त्याने त्याविषयी अनेक विचार प्रस्तुत केले आहेत–

नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद् रजो नो व्योमा परो यत्।
किमावरीवः कुह कस्य शर्मन्नम्भः किमासीद् गहनं गभीरम् ॥
न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत् प्रकेतः।
आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किञ्चनास ॥
(ऋ १०.१२९.१ – २)

अर्थ – सृष्टीच्या आदिम काली असत् नव्हते व सत्‌ही नव्हते. त्या वेळी अंतरिक्षात्मक रजोलोक नव्हता किंवा आकाशही नव्हते. तसेच आकाशाच्या बाहेर पलिकडे जे काही आहे तेही नव्हते. अशा वेळी आवरण तरी कोणते असणार! सुखाचा आश्रय तरी कुठला आणि कोणाचा असणार! त्या वेळी अत्यंत दुर्गम आणि खोल असे उदक कुठून असणार? त्या वेळी मृत्यू नव्हता आणि अमृत म्हणजे अमरत्वही नव्हते. तसेच रात्र आणि दिवस यांचाही पत्ता नव्हता. अशा वेळी अगदी निश्चल असे जे आदितत्त्व ते मात्र आपल्याच अतर्क्य शक्तीने श्वासोच्छ्वास करीत होते. पण तो श्वासोच्छ्वास वायुविरहित होता. त्या वेळी तेच (तत्त्व) एकटे विद्यमान होते. त्याच्यावाचून दुसरे किंवा त्याच्यापेक्षा पलिकडे किंवा श्रेष्ठ असे काहीही नव्हते.

त्यापुढे हा वैदिक ऋषी म्हणतो – प्रथमतः तम उत्पन्न झाले. नंतर निराकार पण गतिमान असे उदकतत्त्व सर्वत्र भरून राहिले. ते उदक तमाच्या पातळ थराने झाकलेले होते. पण नंतर तैजस तत्त्वाच्या प्रभावाने तिथे एक म्हणजे सृष्टीचे बीज उत्पन्न झाले.

याशिवाय इतर अनेक ऋषींनी जगाच्या उत्पत्तीसंबंधी विविध प्रकारची मते व्यक्त केली आहेत. कोणी अग्नीपासून सृष्टीची उत्पत्ती झाल्याचे सांगतो; तर कोणी सोमापासून पृथ्वी, अंतरिक्ष, दिन, रात्र, जल व औषधी उत्पन्न झाल्याचे सांगतो. कोणी विश्वनिर्मितीचा अधिकार इंद्राला देतो, तर कोणी तो त्वष्टयाला देतो.

विश्वात अनेक देव आहेत; पण त्या सर्व देवांच्या मुळाशी कोणी तरी एकमेव असा श्रेष्ठ देव आहे आणि त्याच्याच विविध शक्ती विभिन्न देवतांच्या रूपाने प्रकट झाल्या आहेत, ही जाणीव वैदिक ऋषींना झाली होती (ऋ १.१६४.४६; १०.८२.३; १०.१२१.८). नानात्वामध्ये एकत्वाची भावना, भिन्नत्वामध्ये अभिन्नत्वाची कल्पना हे दार्शनिक विश्वातले एक मौलिक तत्त्व आहे आणि त्या तत्त्वाचा मागोवा घेण्याचे कार्य वैदिक ऋषींनीच प्रथम सुरू केले.

या एकमेव सर्वश्रेष्ठ अशा देवाला वैदिकांनी प्रजापती, हिरण्यगर्भ आणि पुरुष या नावांनी गौरविले. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलात हिरण्यगर्भाच्या स्तुतीचे एक सूक्त असून, त्याची पहिलीच ऋचा अशी आहे –

**हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत्।**
**स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥**
(ऋ. १०.१२१.१)

अर्थ – हिरण्यगर्भ हा सर्व देवतांच्या आधी उत्पन्न झाला आणि उत्पन्न झाल्यावर प्राणिमात्राचा एकमेव अधिपती बनला. पृथ्वी, अंतरिक्ष व आकाश यांचे तो धारण करतो. यज्ञयागामध्ये त्याच्याच प्रसन्नतेसाठी आम्ही हवी अर्पण करतो.

याच सूक्तात पुढे म्हटले आहे, की हा हिरण्यगर्भच भूतांचा प्राणदाता आणि बलदाता असून, मृत्यू आणि अमरत्व या दोन गोष्टी छायेसारख्या त्याच्या अधीन राहतात.

ब्राह्मणग्रंथांत यालाच प्रजापती या नावाने सर्वश्रेष्ठत्व दिले आहे. शतपथ ब्राह्मणात देवतांची संख्या ३३ दिली आहे. पण प्रजापती ही ३४ वी देवता अर्थात् सर्वश्रेष्ठ देवता आहे असे म्हटले आहे (श. ब्रा. ५.१.२.१०).

ब्रह्म किंवा पुरुष हा सर्वव्यापी कसा आहे, याचे वर्णन पुरुषसूक्तात आढळते. पुरुष हा हजार मस्तके, हजार डोळे आणि हजार पाय धारण करणारा आहे. तो चारही बाजूंनी या पृथ्वीला घेरून दहा अंगुळे अधिक उरला आहे.

**पुरुष एवेदं सर्वं यद् भूतं यच्च भव्यम् ।**
(ऋ. १०.९०.२)

अर्थ – जे कोणी सांप्रत वर्तमान आहे, जे कोणी उत्पन्न झाले आणि जे कोणी उत्पन्न होणार आहे, ते सर्व पुरुषच आहे.

हा जो कोणी पुरुष किंवा सर्वव्यापक देव आहे, त्याला अथर्ववेदामध्ये स्कंभ किंवा उच्छिष्ट म्हटले आहे. स्कंभ म्हणजे सर्वाधार ब्रह्म होय. जगातले समस्त पदार्थ या स्कंभाच्या आश्रयाने राहतात आणि आपापली सत्ता धारण करतात. स्कंभ हे विश्वाचे कारण आहे. ब्रह्माचेही तेच कारण आहे. म्हणूनच त्याला ज्येष्ठ ब्रह्म असेही म्हणतात. या स्कंभाच्या ठिकाणी भूमी, अंतरिक्ष आणि आकाश समाविष्ट आहे आणि अग्नी, चंद्र, सूर्य आणि वायू हे समर्पित होऊन राहिले आहेत. इतकेच नव्हे, तर तो स्कंभच भूत, भविष्य आणि वर्तमान यांचा अधीश्वर आहे (अथर्व. १०.७.१२, ३५; १०.८.१). या स्कंभाची आत्म्याशी एकता पुढील मंत्रात स्पष्ट शब्दात सांगितली आहे –

**अकामो धीरो अमृतः स्वयम्भू रसेन तृप्तो न कुतश्चनोनः ।**
**तमेव विद्वान् न बिभाय मृत्योरात्मानं धीरमजरं युवानम् ॥**
(अथर्व. १०.८.४४)

अर्थ – निष्काम, धैर्यशाली, अमर, स्वयंभू, आनंदमय, ज्ञानसंपन्न, अजर आणि चिरतरुण अशा स्कंभस्वरूपी आत्म्याला जाणणाऱ्या ज्ञात्याला मृत्यूचे भय राहत नाही.

अथर्ववेदातल्या उच्छिष्ट सूक्तामध्येही (११.९) या ब्रह्माचेच प्रतिपादन आहे. उच्छिष्ट म्हणजे सर्व व्यापून किंवा सर्वां[चे] निराकरण केल्यानंतर उरलेले तत्त्व अर्थात बाधरहित परब्रह्म होय. बृहदारण्यकात याच उच्छिष्टाची अभिव्यक्ती करण्यासाठी 'नेति' म्हटले आहे (२.३.११). हे नव्हे, ते नव्हे, किंबहुना जगा[त] जे पदार्थ दिसतात तेही नव्हेत; त्याच्याही बाहेर जे सूक्ष्म, अमूर्त, अनभिव्यक्त असे जे उरते (उच्छिष्ट) ते ब्रह्म समजावे. प्रस्तुत सूक्तात उच्छिष्टावर नाम-रूपे अवलंबित आहेत, असे जे म्हटले आहे, त्याला अद्वैत वेदान्ताच्या दृष्टीने फार महत्त्व आहे. सूक्तकार म्हणतो, की उच्छिष्टाचा महिमा अवर्णनीय आहे.

वरील ऋग्वेद आणि अथर्ववेद यांतील सूक्तांचे परिशीलन केल्यास असे दिसते, की प्रजापती, पुरुष, हिरण्यगर्भ, स्कंभ [व] उच्छिष्ट हे सारे शब्द एकाच परमतत्त्वाचे वाचक आहेत. उप[]निषदांतल्या ब्रह्मवादाची आणि ब्रह्मात्मैक्यवादाची ही पूर्व[]पीठिका होय.

विश्वाचे तत्त्व किंवा ईश्वर हा पुरुष आहे ही कल्पना, तो निसर्गशक्तिरूप आहे या विचारापेक्षा अधिक गंभीर आणि अर्थपूर्ण अशी आहे. ईश्वर पुरुषरूप आहे या कल्पनेने मनुष्यांच्या धार्मिक भावनेला कृतार्थता प्राप्त झाली. मानवी शरीराच्या रचनेतील गुंतागुत, विविध अवयवांचे व विविध धातूंचे पर[स्प]रावलंबित्व आणि परस्परपूरकत्व, त्याच्यातली आश्चर्यकार[क] सुव्यवस्था आणि विश्वातल्या सर्व शक्तींचा मनुष्याच्या ठिकाणी झालेला संगम पाहूनच ही परमपुरुषाची कल्पना वेदातल्या नारा[]यण ऋषीला सुचली असावी. हा पुरुष अग्निरूप आहे कि[ंवा] सूर्यरूप आहे, असा विचारही वेदांमध्ये आढळतो. अग्नीचे [व] सूर्याचे सुवर्णसदृश झळाळते तेज पाहून वैदिक ऋषींनी त्या[ला] हिरण्मय पुरुष असे नाव दिले. हा पुरुष तमाच्या पलिकडे आ[हे] आणि त्याला जाणल्यानेच मनुष्य मृत्यूच्या पलीकडे जातो, अ[से] वाजसनेयी संहितेत (३१.१८) म्हटले आहे.

अशा प्रकारे मानवी चैतन्य, कालचैतन्य आणि विश्वचैतन्य या तिघांना पुरुष अशी संज्ञा मिळाली. हे चैतन्य शरीरात वास्तव्य करते; पण शरीराहून भिन्न आहे हे कळून आल्यावर पुरुष म्हण[जे] शरीररूपी पुरात वास्तव्य करणारे तत्त्व असा त्याचा अर्थ के[ला] गेला. हा कुलनिवासी पुरुष आत्मा या शब्दाशी समानार्थ[क] बनला. त्याचप्रमाणे विश्वाचे अंतिम सत्यही पुरुष किंवा [] या नावाने वैदिक वाङ्मयात ओळखले जाऊ लागले.

**वैदिक भाषा–** ऋग्वेदादी वैदिक वाङ्मयात जी भाषा आ[ढ]ळते, तिला वैदिक संस्कृत असे म्हणतात. ही भाषा साहित्यग्रं[थांत] दिसून येणाऱ्या संस्कृतपेक्षा पुष्कळच वेगळी आहे. भाषा[शा]स्त्राच्या अभ्यासकांनी वैदिक संस्कृत भाषेचे साम्य ग्रीक, लॅटि[न], जर्मन, इत्यादी भाषांबरोबर दाखविले आहे. या विद्वानां[]

मताप्रमाणे वरील भाषांच्याही अगोदर एक इंडोजर्मॅनिक नावाची काल्पनिक भाषा होती. या भाषांत ज्याप्रमाणे साम्य दाखविता येते, त्याचप्रमाणे त्या भाषेत उपलब्ध असलेल्या वाङ्मयातही पुष्कळ सारखेपणा आढळून येतो. पारशी लोकांच्या अवेस्ताशी ऋग्वेदाचे साम्य अनेक विद्वानांनी दाखविले आहे. ओल्डेन्बर्ग याने वैदिक देवता आणि ग्रीक देवता यांचा तुलनात्मक अभ्यास केला आहे. पण परस्पर भाषांमध्ये साम्य आढळले तरी, त्या भाषांचा विकासक्रम मात्र अगदी वेगळा आहे.

वैदिक संस्कृताचा विकासक्रम संहिता, ब्राह्मणे, आरण्यके व उपनिषदे यांत आढळून येतो. त्यामुळेच संहितांपेक्षा ब्राह्मण-ग्रंथांची भाषा वेगळी दिसते. वैदिक शब्दप्रयोगांचा अभ्यास करून एका शुद्ध अशा भाषेचा विचार वैयाकरणांनी केला. अशी शुद्ध भाषा प्रथमतः रामायणात आढळते. पाणिनीने अष्टाध्यायीमध्ये सूत्रांची रचना करून संस्कृत भाषेला नियमांनी बांधून टाकले. म्हणून वेदांतील संस्कृत भाषा व पाणिनीच्या नंतरची संस्कृत भाषा यांत पुष्कळ भिन्नता आढळून येते. वेदांतील, ब्राह्मणांतील, सूत्रांतील व पाणिनीनंतरची अशा संस्कृत भाषेच्या चार अवस्था आढळून येतात.

वैदिक संस्कृत भाषा व नंतरची संस्कृत भाषा यांमध्ये स्वर, व्यंजने, शब्द, धातू, प्रत्यय वगैरे गोष्टी सारख्याच असल्यामुळे त्यांच्यांत खूपच साम्य आहे. वैदिक संस्कृतातूनच अभिजात संस्कृत भाषेचा विकास झाला, ही गोष्ट स्पष्ट आहे. वैदिक संस्कृतात स्वरांना फार महत्त्वाचे स्थान आहे. स्वरांमुळे कित्येक वेळा अर्थामध्येही फरक पडतो. स्वरांच्या उच्चारणाचे नियमही पुष्कळ आहेत. त्यांचे उच्चारण गुरूच्या मार्गदर्शनावाचून करता येत नाही. योग्य स्वरोच्चारण करून मंत्र उच्चारल्यासच त्याचे फळ मिळते, असे सांगितले आहे. वैदिक भाषा ही जिवंत भाषा आहे. त्यामुळे तिच्यात प्रवाहीपणा आढळून येतो. उपसर्ग, प्रत्यय, शब्द हे अनेक प्रकारांनी वापरले जातात. त्या भाषेत नादमाधुर्य आढळते. एकेक शब्द भिन्न भिन्न अर्थांनीही वापरला जातो. ती भाषा काटेकोर नियमांनी बांधलेली नाही. पण पाणिनीनंतरची संस्कृत भाषा ही नियमबद्ध भाषा बनली. तिच्यात मुक्तरूपे आढळत नाहीत. त्या भाषेत निरनिराळ्या शैली निर्माण झाल्यामुळे तिचे स्वरूपही बदलत गेले.

वैदिक भाषेचे स्वतंत्र असे व्याकरण नाही. परंतु वन्याचशा वेदशाखांची जी वेदांगे तयार झाली, त्यांनी वेदांमधल्या शब्दांचा अर्थ व त्यांची व्युत्पत्ती देण्याचा प्रयत्न केला. ऋग्वेदातील अवघड शब्दांचा संग्रह म्हणजे निघंटू होय. यावरच यास्काचार्यांनी निरुक्त नावाचा ग्रंथ रचला. वेगवेगळ्या वेदशाखांची प्रातिशाख्ये तयार झाली आणि त्यांनी शब्दांचे उच्चारण, त्यांचा अर्थ इ. गोष्टींचा विचार केला. (प्रातिशाख्ये पाहा)

**वेदांचे भाष्यकार** – वैदिक वाङ्मय अतिप्राचीन काळापासून मौखिक परंपरेने चालत आलेले आहे. या वेदांत काय आहे, त्यांतील मंत्रांचा अर्थ काय वगैरे गोष्टींची चर्चा प्राचीन काळी केली गेली नाही, असे काही विद्वानांचे मत आहे; पण हे बरोबर नाही. वेदांचा अर्थ करू नये असा एक पक्ष, तर वेदांचा अर्थ करण्यास हरकत नाही, असा दुसरा पक्ष. हे दोन्ही पक्ष प्राचीन काळातही होते. याचे उत्कृष्ट उदाहरण निरुक्तात पाहायला मिळते. मंत्रांचा अर्थ करू नये, ते अनर्थक आहेत, असे कौत्स नावाच्या ऋषीचे मत पूर्वपक्ष म्हणून सांगून, वेदांचा अर्थ केलाच पाहिजे असे यास्काचार्यांनी सांगितले आहे. यासंबंधी कौत्साचा पूर्वपक्ष असा – मंत्र हे अनर्थक आहेत; कारण, त्यांत योजलेले शब्द तसेच उच्चारले पाहिजेत. त्यांचा क्रम आहे तसाच ठेवला पाहिजे, मंत्रांना अर्थ नसल्याने त्यांचा विनियोग ब्राह्मणग्रंथांत सांगितला आहे. मंत्रांत परस्परविरोधी वचने आढळतात. ज्यांचा अर्थ स्पष्ट आहे ते मंत्र म्हणण्यासाठी प्रैष म्हणजे आज्ञा दिल्या जातात. म्हणूनही मंत्र अनर्थक आहेत. असंबद्ध अशी रचना मंत्रांत आढळते. अनेक अवघड शब्द त्यात योजले आहेत. या सर्व कारणांनी मंत्रांचा अर्थ करण्यात अर्थ नाही.

यावर उत्तर देताना यास्काने पूर्वपक्षाच्या मतांचे क्रमशः खंडन केले आहे. शब्दांचा क्रम हा लौकिक भाषेतही आहेच. मंत्रांतील अर्थाकडे लक्ष वेधण्यासाठीच ब्राह्मणग्रंथांनी त्यांचा विनियोग सांगितला आहे. देवतांची स्तुती करताना परस्पर-विरुद्ध शब्दयोजना आढळते. यामुळे मंत्रांचा अर्थ करू नये असे म्हणणे योग्य नव्हे. अवघड शब्दांचा अर्थ समजत नाही, या पूर्व-पक्षाच्या मताचे खंडन करताना निरुक्तात म्हटले आहे–

> **यथो एतदविस्पष्टार्था भवन्तीति । नैष स्थाणोरपराधो यदेनमन्धो न पश्यति पुरुषापराधः स भवति ।**
>
> (निरुक्त १.१६)

अर्थ – मंत्रांतील शब्दांचा अर्थ समजत नाही, असे जे म्हटले आहे (ते बरोबर नाही). आंधळ्याला खांब दिसत नाही, यात त्या खांबाचा अपराध नसून, त्या मनुष्याचा तो दोष आहे

वेदांचे अध्ययन करून त्यांचा अर्थ ज्याला समजत नाही, तो स्थाणू म्हणजे भूमीला भारभूत आहे, असेही निरुक्तात म्हटले आहे.

वेदार्थनिर्णयाच्या साधनांपैकी पहिले साधन म्हणजे ब्राह्मण-ग्रंथ होत. त्या ग्रंथांत काही वेदमंत्र उद्धृत करून त्यांचे यज्ञ-यागाच्या दृष्टीने विवरण केलेले असते. सर्व प्राचीन सूक्ते केवळ यज्ञाकरिताच रचली गेली आहेत आणि यज्ञातील क्रियांशी जो अर्थ जुळण्यासारखा असेल, तोच त्या सूक्तद्रष्टयाच्या ऋषीला

अभिप्रेत असला पाहिजे, अशी ब्राह्मणग्रंथकारांची कल्पना होती. असे असले तरी हे ग्रंथ कालदृष्ट्या वेदांना जवळचे असल्यामुळे त्यांतील मते विचारात घेणे आवश्यक ठरते.

वेदार्थनिर्णयाचे त्यानंतरचे साधन म्हणजे निघण्टू व यास्काचे निरुक्त होय. निघण्टूत वैदिक शब्दांचा संग्रह केलेला आहे; पण त्यात सर्व कठीण शब्दांचे अर्थ नाहीत व काही शब्दांचे जे अर्थ सांगितलेले आहेत, त्यांत निश्चिती नाही. निघण्टूच्या आधारावर यास्काने निरुक्त हा ग्रंथ रचला. त्यात ऋग्वेदातील काही मंत्रांचा अर्थ सांगताना त्याने व्युत्पत्तीचा उपयोग केला आहे. एका शब्दाचे अनेक अर्थ देण्याच्या त्याच्या पद्धतीवरून हे उघड होते, की त्याला स्वतःला ह्यासंबंधी निश्चित ज्ञान नव्हते. तात्पर्य, खऱ्या वैदिक परंपरेचा वारसा निघण्टुकर्त्याकडे किंवा निरुक्तकार यास्काकडे नव्हता.

यास्काचार्य हा वेदांचा पहिला व प्राचीन भाष्यकार होय. त्याच्या नंतरचे सर्व भाष्यकार त्याच्या ग्रंथाचाच आधार घेतात. तसा दुसरा ग्रंथ उपलब्ध नाही.

यास्काचार्य सनपूर्व सहाव्या–सातव्या शतकात होऊन गेले. त्यानंतर वेदांच्या अर्थाची चिकित्सा जर कोणी केली असेल तर ती सायणाचार्यांनी. म्हणून सायणाचार्यांचाच उल्लेख सर्वत्र गौरवाने केला जातो. त्यांनी सर्व वेदांवर भाष्ये लिहिली आहेत. पण अगोदर कोणत्या वेदावर त्यांनी भाष्य लिहिले त्यासंबंधी तैत्तिरीय संहितेच्या भाष्योपोद्घातात ते लिहितात – ‘यजुर्वेद हा भिंतीच्या ठिकाणी आहे, तर त्यावर रेखाटलेल्या चित्रांच्या ठिकाणी इतर म्हणजे ऋग्वेद व सामवेद आहेत, म्हणून यजुर्वेदाचेच आम्ही प्रथमतः विवेचन करीत आहो.’ प्रत्येक वेदशाखेवर भाष्य लिहिताना सायणाचार्यांची प्रतिभा वेगवेगळी दिसून येते. शतपथ, ऐतरेय, तैत्तिरीय व सामवेदाचे सर्व ब्राह्मणग्रंथ यांवरही सायणाचार्यांची भाष्ये आहेत.

सायणाचार्यांच्या पूर्वीही भट्टभास्करमिश्र, वेंकट माधव यांसारखे भाष्यकार होऊन गेले; त्यांच्या नंतरही उव्वट, महीधर यांसारखे भाष्यकार झाले. तथापि त्यांनी एकेका वेदसंहितेवरच भाष्ये लिहिली. ही सर्व भाष्ये संस्कृत भाषेतच असून, वेदांत आलेल्या यज्ञ विषयाचा विचार करून लिहिली गेली आहेत.

वेदांच्या अर्थनिर्णयाची परंपरा काही काल खंडित झाली. पण गेल्या शे-दोनशे वर्षांत वेदांच्या अर्थाचा विचार वेगळ्याच पद्धतीने केला जाऊ लागला. नवे नवे भाष्यकार निर्माण झाले. वैदिक वाङ्मयाचा चिकित्सक पद्धतीने अभ्यास सुरू झाला. या प्रकारच्या अभ्यासाचे श्रेय पाश्चात्य विद्वानांनाच दिले पाहिजे. या अभ्यासकांचा अग्रेसर म्हणजे माक्स म्यूलर होय. यानंतर लुडविग, गेल्डनेर, विल्सन, कीथ, इ. पंडितांनी वेदांचा सखोल अभ्यास करून त्यांच्या अर्थाची चर्चा केली.

वेदार्थनिर्णयासंबंधी श्री. चिं. ग. काशीकर यांनी जे विवेचन केले आहे, त्याचा सारांश असा–

काही शब्दांचे अर्थ यास्क व सायण यांनी भिन्न भिन्न दिले आहेत. त्यांनी काही शब्दांचे अनेक अर्थ सांगितले आहेत. यावरून त्यांना खऱ्या अर्थाचे ज्ञान होते, असे म्हणता येणार नाही. सायणाने अनेक शब्दांचे भिन्न भिन्न स्थळी भिन्न भिन्न अर्थ दिले आहेत. अर्थात त्यांपैकी काही अर्थ चुकीचे असले पाहिजेत. ऋग्वेदात असे पुष्कळ शब्द आहेत, की ज्यांच्या खऱ्या अर्था-विषयी यास्क व सायण यांना परंपरेने किंवा व्युत्पत्तीवरून निश्चित ज्ञान नव्हते.

पाश्चात्य पंडितांनी जेव्हा वेदांचा अभ्यास सुरू केला, तेव्हा त्यांना निरुक्त व सायणभाष्य हे ग्रंथ फार महत्त्वाचे वाटणे साहजिक होते. विल्सन, लुडविग, गेल्डनेर, इ. पंडितांनी सायणभाष्याचा उपयोग केला आहे. प्राचीन साधनांविषयी रोथ व माक्स म्यूलर यांनी आदर प्रकट केला असला, तरी वेदार्थ सांगताना त्यांनी सायणभाष्याचा फारसा उपयोग केला नाही. पाश्चात्य पंडितांनी वेदाभ्यास करताना भाषाशास्त्र, पुराणकथाशास्त्र व दैवतशास्त्र या आधुनिक साधनांचाही उपयोग केला आहे. याव्यतिरिक्त मानववंशशास्त्र व पुरातत्त्वशास्त्र यांचाही या कामी उपयोग होतो. मात्र प्राचीन साधनांचा उपयोग अपरिहार्य आहे. विशेषतः वैदिक धर्माचे प्रमुख अंग जे यज्ञविधी त्यांच्या विवरणाकरिता या प्राचीन साधनांचा आश्रय केल्या-खेरीज गत्यंतरच नाही.

वेदांचे आधुनिक भारतीय भाष्यकार म्हणून दयानंद सरस्वतींचा उल्लेख करायला हवा. अनेक पद्धतींनी वेदांचा अभ्यास करून वेदांतील शब्दांचा व वाक्यांचा अर्थ ध्यानात घेऊन भारतीय संस्कृती, धर्म व समाज यांचा अभ्यास करण्याचा प्रयत्न आधुनिक काळात अनेक विद्वान करीत आहेत. त्यामुळे वेदां-संबंधी प्रचंड वाङ्मय निर्माण होत आहे.

**वेदांचे रूपध्यान** – वेदांमध्ये ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे चार वेदच प्रमुख समजले जातात. हे चार वेदपुरुष आहेत अशी कल्पना करून, त्यांच्या रूपासंबंधी, गोत्रासंबंधी व देवतांसंबंधी माहिती दिलेली आढळते. ऋग्वेद हा सोनेरी वर्णाचा, कमळाच्या पानाप्रमाणे रुंद डोळे असणारा, सुंदर मान असणारा, पांढऱ्या दाढीमिशा असणारा व दोन हात उंचीचा असा पुरुष असून, त्याचे गोत्र अत्री, देवता ब्रह्म व छंद गायत्री आहे. यजुर्वेद हा किडकिडीत, तांबूस वर्णाचा, पाच हात उंच, सोनेरी डोळ्यांचा असा पुरुष असून, त्याचे गोत्र भारद्वाज, देवता रुद्र, छंद त्रिष्टुभ आहे. सामवेद हा नेहमी माळ धारण करणारा

स्वच्छ वस्त्र नेसणारा, चर्म व दंड धारण करणारा, सोनेरी डोळ्यांचा व सहा हात उंच असा पुरुष असून, त्याचे गोत्र गाश्यप, देवता विष्णू व छंद जगती आहे. अथर्ववेद हा काळ्या कवाचा, क्रूर; क्षुद्र कर्म करणारा, सपत्नीक, निळ्या रंगाचा र् नऊ हात उंचीचा पुरुष असून, त्याचे गोत्र वैजान, देवता इंद्र व छंद अनुष्टुभ आहे.

चार वेदांचे चार वेदपुरुष कल्पिलेले असल्यामुळे ऋषितर्पणामध्ये या वेदपुरुषांचा समावेश केलेला आढळून येतो. [भा. शि. सं. इ.; जीवन प्रकाश, श्री. दा. सातवळेकर, १९३९; वे. का. स.; उ. ध्रु. गं.; ऋ. द.; वै. सं. वि.; ज. वि. ध.; वे. शा. दी.; वे. रा. द.; वै. सा. सं.; ओरायन; भट्ट मोक्षमुल्लरकृत धर्मविषयक व्याख्याने; भा. द.; वै. वि. भा. सं.; स्फुट निबंध; हिंदु आयडियल; क. हे. इं.; पु. वे. सा. स. अ.; ए. इं.; भा. सं. सां. चे.; प्रा. भा.–सां. अ.; ब्र. ध. सं. इ.; ब्र. ख. वो. तु. अ.; संस्कृतिसंगम; म. ज्ञा. को.; श्री. चिं. ग. काशीकर, पुरुषार्थ, ऑक्टोबर १९३९; हि. इं. लि.–विंटरनिट्झ]

**वेदनायकी** एक देवता. दक्षिण लोहमार्गावर वेदारण्य नावाचे एक स्थान असून, तिथे वेदनायक नामक शंकराचे मंदिर आहे. या ठिकाणच्या शक्तिदेवीचे नाव वेदनायकी असे आहे. तिला वीणावादनविभूषिणी असेही म्हणतात. वीणावादनामध्ये सरस्वती श्रेष्ठ असताही एकदा पार्वतीने तिचा पराजय केला, म्हणून तिला हे नाव प्राप्त झाले. वेदनायकीच्या मंदिरात सप्तमातृकांच्याही मूर्ती आहेत. [देवीकोश ३]

**वेदविकृती** वेदांचे संरक्षण चांगल्या प्रकारे व्हावे आणि वेदांतील अक्षरे व स्वर यांत कोणत्याही प्रकारे बदल होऊ नये, म्हणून प्राचीन ऋषींनी वेदांच्या विकृती तयार केल्या. त्या आठ असून, त्यांची नावे अशी –

**जटा माला शिखा रेखा ध्वजो दण्डो रथो घनः।**
**अष्टौ विकृतयः प्रोक्ताः क्रमपूर्वा महर्षिभिः ॥**

अर्थ – जटा, माला, शिखा, रेखा, ध्वज, दंड, रथ आणि घन या क्रमपूर्वक आठ विकृती महर्षींनी सांगितल्या आहेत.

या विकृती कोणी तयार केल्या यासंबंधी मधुशिक्षेत सांगितले आहे, ते असे –

**भगवान् संहितां प्राह पदपाठं तु रावणः।**
**बाभ्रव्यर्षिः क्रमं प्राह जटां व्याडीरवोचत् ॥**
**मालापाठं वसिष्ठश्च शिखापाठं भृगुर्व्यधात्।**
**अष्टावक्रोऽकरोद् रेखां विश्वामित्रोऽपठद् ध्वजम् ॥**
**दण्डं पराशरोऽवोचत् कश्यपो रथमब्रवीत्।**
**घनमत्रिमुनिः प्राह विकृतीनामयं क्रमः ॥**

अर्थ – परमेश्वराने संहिता सांगितली. रावणाने तिचा पदपाठ तयार केला. बाभ्रव्य ऋषीने क्रम सांगितला. व्याडीने जटा, वसिष्ठाने माला, भृगूने शिखा, अष्टावक्राने रेखा, विश्वामित्राने ध्वज, पराशराने दंड, कश्यपाने रथ आणि अत्रीने घन अशा क्रमाने आठ विकृती सांगितल्या.

पद व क्रम यांना विकृती म्हणत नाहीत. पुढच्या विकृतींत पदांची उलटापालट होते म्हणजे त्यांचा अनुक्रम बदलतो. या व्युत्क्रमात मूळ संहितेतील स्वर बदलतात व संधिनियमांनुसार वेगवेगळे स्वर येतात. म्हणूनच या विकृती मुखोद्गत करणे व राखणे हे अत्यंत कष्टाचे काम आहे.

अष्टविकृतींपैकी जटा व घन याच मुख्यत्वे प्रचारात आहेत. त्यांची उदाहरणे कोशात त्या त्या नावाखाली दिली आहेत. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**वेदव्रते** गौतमधर्मसूत्रांत चार वेदव्रतांचा उल्लेख मिळतो. महानाम्नी, महाव्रत, उपनिषद आणि गोदान अशी त्यांची नावे आहेत. याव्यतिरिक्त वेगवेगळ्या शाखांच्या अध्ययनापूर्वी काही विशेष कृत्यांचे विधान वसिष्ठाने सांगितले आहे. प्रारंभी ही व्रते त्रैवर्णिकांना विहित होती. पण क्षत्रिय व वैश्य यांनी वेदाध्ययनाची परंपरा सोडल्यामुळे ती केवळ ब्राह्मणांपुरतीच मर्यादित झाली. ब्राह्मण वैदिक कर्मकांडाच्या विशेष ज्ञानासाठी वेदाध्ययन करीत राहिले आणि त्यासाठी ब्राह्मण परिवारात ही व्रते चालू राहिली. कालक्रमाने ब्राह्मणांतही वेदाध्ययनाचे प्रमाण कमी कमी होत गेले आणि त्यांच्या मध्येही वरील व्रते प्रचलित राहिली नाहीत. बऱ्याचशा गृह्यसूत्रांत आणि धर्मसूत्रांत त्यांचा उल्लेख आढळत नाही आणि स्मृतींमध्ये तर त्यांचा संकेतही मिळत नाही. [इं. वे. क. सू.]

**वेदारंभ** एक संस्कार. गौतमाने ज्या प्राचीन संस्कारांचे परिगणन केले आहे, त्यांत प्रस्तुत संस्काराचा समावेश नाही. पुढे संस्कारांच्या इतिहासात जे परिवर्तन झाले, त्यातून वेदारंभ हा एक स्वतंत्र संस्कार म्हणून जन्म पावला. प्रारंभी उपनयनाबरोबरच वेदांच्या अध्ययनाला प्रारंभ होत असे. उपनयनात गुरूने बटूला गायत्री मंत्राचा उपदेश करणे, हाच वैदिक स्वाध्यायाचा प्रारंभ समजला जात असे.

पुढच्या काळात संस्कृत भाषा ही बोलचालीची भाषा राहिली नाही. उपनयनालाही एक देहसंस्कार एवढेच महत्त्व राहिले. तो विद्यारंभाचा संस्कार राहिला नाही. त्यामुळे ज्या कोणाला वेदांचे अध्ययन करावेसे वाटे, अशा विद्यार्थ्यासाठी वेदारंभ

हा एक नवा संस्कार केला जाऊ लागला. त्याचा विधी असा –

प्रथम एखादा शुभ दिवस निश्चित करीत. त्या दिवशी आरंभी मातृकापूजन, नांदीश्राद्ध, इ. आवश्यक कृत्ये करीत. मग गुरू लौकिक अग्नीची स्थापना करी. शिष्याला बोलावून अग्नीच्या पश्चिम भागी बसवून घेई. ऋग्वेदाचा आरंभ करायचा असल्यास अग्नी व पृथ्वी, यजुर्वेदाचा प्रारंभ करायचा असल्यास अंतरिक्ष व वायू, सामवेदाचा आरंभ करायचा असल्यास द्यौ व सूर्य आणि अथर्ववेदाचा आरंभ करायचा असल्यास दिशा आणि चंद्र यांच्यासाठी अग्नीत आज्याहुती दिल्या जात. याव्यतिरिक्त ब्रह्म, छंद व प्रजापती यांनाही आज्याहुती देत. शेवटी आचार्याला पूर्णपात्र व दक्षिणा देत. मग आचार्य शिष्याला वेदाची संथा देई. पाहा– वेदव्रते. [हिं. सं.]

**वेदांगे** वेदांतील मंत्रांचा अर्थ नीट समजण्यासाठी, तसेच त्याचे विशेष विवरण करण्यासाठी वेदांग ग्रंथांचा उपयोग होतो. श्रौत विधी व यज्ञयाग करण्यासाठीही हे ग्रंथ साहाय्यकारी होतात. शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष ही सहा वेदांगे आहेत. (त्यांची माहिती त्या त्या नावाने कोशात दिलेली आहे.) शिक्षा ही वेदाची नासिका, कल्प त्याचा हात, व्याकरण मुख, निरुक्त श्रोत्र, छंद पाय आणि ज्योतिष नेत्र आहे, असे पाणिनीय शिक्षेत सांगितले आहे.

वेदांग शब्दाची फोड वेद + अंग = वेदांचे अंग अशी होत असली तरी, वेदांगांचा समावेश श्रुतींत करीत नाहीत. कारण, श्रुती म्हणजे वेद हे अपौरुषेय मानलेले आहेत. वेदांगे ही मानवनिर्मित आहेत. म्हणून त्यांचा अंतर्भाव स्मृतिवाङ्मयात करतात.

वेदांगांचा काळ सर्वसाधारणपणे सनपूर्व १४०० ते ७०० असा मानतात. [क. हे. इं.; प्रा. भा. ज्ञा.; वै. सा.; वे. शा. दी.]

**वेदान्त** षड्दर्शनांपैकी एक दर्शन. अद्वैतवेदान्त या दर्शनाला वेदान्त असे म्हणण्याची पद्धत आहे. वेदान्त दर्शन हे भारतीय अध्यात्मशास्त्राचा मुकुटमणी मानले जाते. हे दर्शन उपनिषदांतील सिद्धान्तांवर आधारलेले आहे. वेदांतील चरम सिद्धान्त या अर्थी, उपनिषदांतच वेदान्त हा शब्द प्रथम योजलेला आढळतो. उपनिषदांतील रहस्यमय वैदिक सिद्धान्तांचे प्रतिपादन करीत असल्यामुळे त्याला दिलेले वेदान्त = वेदांचा अंत, हे नाव सार्थ ठरते. पाहा – अद्वैत-दर्शन.

**वेदी** (१) यज्ञासाठी तयार केलेले कुंड. 'यज्ञार्थपरिष्कृता भूमिः' = यज्ञासाठी परिष्कृत केलेली भूमी, असे वेदीचे लक्षण सर्वलक्षणसंग्रहात सांगितले आहे. निरनिराळ्या यज्ञांसाठी निरनिराळ्या आकाराच्या वेदी विधिपूर्वक तयार करतात. वेदीला अंतर्वेदी असेही म्हणतात.

दर्शपूर्णमास किंवा तत्सदृश यागात आहवनीय अग्नीच्या पाठीमागे वेदी तयार करतात. तिची लांबी यजमानाच्या प्रमाणाएवढी म्हणजे सामान्यतः चार अरत्नी असते. वेदीच्या पश्चिम भागी दोन्ही टोके योनीच्या आकाराची असतात. आहवनीयाजवळ असलेल्या वेदीच्या टोकाला अंस असे म्हणतात. वेदी दोनतीन बोटे खोल खणतात आणि मध्यभागी तिला बांक असतो. निरनिराळ्या सूत्रांमध्ये या वेदीचा आकार निरनिराळा सांगितला आहे. कात्यायनसूत्रानुसार वेदीचे अंस आहवनीयाच्या दोन्ही बाजूंना असतात. तसेच वेदीची रुंदी जास्त असून, पश्चिमेकडील टोकांजवळ वेदीला बांक करतात.

चातुर्मास्य यागात, पशुयागात किंवा सोमयागात वेदींचे प्रमाणे निरनिराळी सांगितली आहेत. पशुयाग किंवा सोमयाग यांसारख्या यागांत नेहमीच्या आहवनीयापासून पुढे पूर्वेकडे एक वेदी तयार करतात. सोमयागात ही वेदी बरीच लांब-रुंद असते. पश्चिमेकडे तीस प्रक्रम रुंद, छत्तीस प्रक्रम लांब आणि पूर्वेकडे चोवीस प्रक्रम रुंद अशी सौमिकी वेदी असावी, असे सत्याषाढ शुल्बसूत्रांत (२५.२.७) सांगितले आहे. पशुयागात यापेक्षा लहान प्रमाणाची वेदी असते. त्या त्या यागात लागणारे हवि वेदीत ठेवतात [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

(२) विवाहाच्या वेळी वधूवरांना बसण्यासाठी जे बोहले तयार करतात, त्यालाही वेदी असे म्हणतात. नारदाच्या मतानुसार घराच्या वामभागी एक हात उंच, चार हात लांब व चार हात रुंद अशी चतुरस्र वेदी करावी. ती पूर्वेला व उत्तरेला किंचित उतरती असावी व तिला पायऱ्या असाव्या. तिच्या चारी बाजूंना केळीचे चार स्तंभ असावे. [नि. सिं.]

(३) ख्रिस्ती धर्माच्या चर्चमध्ये देवाला नैवेद्य ठेवण्यासाठी किंवा धूप जाळण्यासाठी एक उंच ओटा बनवलेला असतो. त्याला वेदी असेच म्हणतात. प्राचीन काळी ही वेदी लाकडाची असून, तिचा आकार चौकोनी किंवा गोल असे. प्रारंभी तिच्यावर वस्त्र, पवित्र पात्रे किंवा गॉस्पेलचे पुस्तक ठेवीत. नंतर तिच्यावर क्रूस व मेणबत्त्या ठेवू लागले. नंतरच्या काळात पाषाण, माती किंवा धातू यांपासून वेदी बनवू लागले व त्यांच्यावर कलाकुसर करू लागले. काही चर्चमध्ये एकापेक्षा जास्त वेदी ठेवू लागले. पुढे येशू ख्रिस्ताचे अवशेष वेदीवर ठेवण्याची पद्धत सुरू झाली आणि अवशेषासह वेदी ठेवण्याचा समारंभ मोठ्या थाटाने होऊ लागला. प्रभुभोजन ज्या टेबलावर करतात, त्यालाही वेदी असेच नाव आहे. ज्यू लोकांचे सर्व धार्मिक विधी वेदीवर केले जात असत. [एन्सा. रि.; सु. वि. को.]

**वेध** आकाशस्थ ग्रहगोलांचे किंवा वातावरणातील घडामोडींचे अवलोकन करून त्यांची माहिती मिळवणे, याला वेध घेणे असे म्हणतात. निरनिराळ्या यंत्रांच्या साहाय्याने जिथे हे कार्य केले जाते, त्या स्थानाला वेधशाळा असे म्हणतात. तिथे तपमान, वारा, पाऊस, इ. घटकांचे वेध घेऊन हवामानाची माहिती मिळवली जाते. त्याचप्रमाणे ज्योतिषशास्त्रातील ज्ञान मिळवण्याचे कार्यही अशा वेधशाळेत चालते. आकाशातील निरनिराळ्या घटकांचे वेध घेऊन, त्यावरून सामान्य अनुमान करायचे आणि त्याची सत्यता पडताळून पाहण्यासाठी पुन्हा वेध घ्यायचे, अशीही पद्धत असते.

वेदकाळी आकाशातील ग्रहताऱ्यांचे वेध घेण्याकरिता कोणत्या यंत्राचा उपयोग करीत, त्याचा स्पष्ट उल्लेख आढळत नाही. पण ऋग्वेदाच्या ५व्या मंडलातील एका सूक्तात ( ५.४०.६ ) तुरीय हा शब्द सूर्याच्या संदर्भात आलेला आहे. त्याचा अर्थ तुरीय यंत्र होऊ शकेल. वेदांग ज्योतिषात कालमापनाची कोष्टके दिलेली आहेत. त्यावरून त्या काळी कालमापनाची काही साधने असली पाहिजेत, असे वाटते. मात्र त्या साधनांची किंवा वेधयंत्रांची माहिती मिळत नाही. सूर्यसिद्धान्ताच्या काळापर्यंत ज्योतिषशास्त्राची जी प्रगती झालेली दिसते, ती कशी झाली आणि वेध कसे घेतले गेले, हे समजत नाही. मधल्या काळातले ग्रंथ उपलब्ध नाहीत. जे आहेत ते संक्षिप्त आहेत. त्यांत केवळ ग्रहगतीचे सिद्धान्त मात्र सांगितले आहेत.

सूर्यसिद्धान्ताच्या तेराव्या प्रकरणात अनेक यंत्रांचे वर्णन आहे. त्यातील शंकू यंत्राचे वर्णन वराहमिहिर, आर्यभट्ट, इ. प्राचीन ग्रंथकारांनी केले आहे. या यंत्राच्या साहाय्याने पृथ्वीच्या दैनंदिन व वार्षिक गतीचा अभ्यास करता येतो.

वराहमिहिराने बृहत्संहितेत केतुचार नामक अध्यायात अनेक धूमकेतूंचे वर्णन केले आहे. गर्ग, पराशर, असित, देवल, इ. ऋषींनी केलेल्या वर्णनांच्या आधारे त्याने ही माहिती दिली आहे. उद्दालक, कश्यप, इ. नावे त्या त्या ऋषींनी शोधून काढलेल्या धूमकेतूंना देण्यात आली असावी. कित्येक शतके परंपरेने हे संशोधन चालू असले पाहिजे.

निरनिराळ्या ज्योतिष्यांनी मध्यम ग्रहांस बीजसंस्कार सांगितले आहेत, ते ग्रहांचे वेध घेतल्यावाचून कल्पिले नसतील. भास्कराचार्याने फलक-यंत्र बनवले. त्याच्या साहाय्याने आकाशातील गोलांचे नतांश, उन्नतांश व स्फुटकाल काढता येतात. भास्कराचार्यानंतर पद्मनाभ नामक गणित्याने ध्रुवभ्रम यंत्र रचले. त्याच्या साहाय्याने रात्री केव्हाही सूर्याचा स्फुटकाल काढता येतो. त्यानंतर यंत्ररचनेवर काही स्वतंत्र ग्रंथ निर्माण झाले. त्यांतील चक्रधराचा यंत्रचिंतामणी विशेष प्रसिद्ध आहे.

गणेश दैवज्ञाचा पिता केशव हा मोठा ज्योतिर्विद होता. त्याने स्वतः केलेल्या वेधांचे वर्णन लिहून ठेवले आहे.

प्राचीन काळी उज्जयिनी नगरीत वेधशाळा असावी, असे वाटते. मध्ययुगात मानसिंग व जयसिंग या राजपूत राजांनी काही वेधशाळा निर्माण केल्या. त्या अजूनही पाहायला मिळतात. पाहा – ज्योतिषशास्त्र. [ भा. ज्यो. शा.; ज्योतिर्वैभव; वेधसाधने आणि वेधशाळा – ज्योतिर्विद्या परिसंस्था, पुणे ]

**वेमन्न** एक निर्गुणोपासक तेलुगू संतकवी. याला आंध्रचा कबीर असे म्हटले जाते. याच्या कालाविषयी आणि जन्मस्थलाविषयी विद्वानांत मतभेद आहेत.

इ. स. च्या १५ व्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंतच्या ४०० वर्षांत हा केव्हातरी होऊन गेला असावा. ब्राऊनच्या मते तो १७ व्या शतकात झाला, तर कॅम्बेलच्या मते १६ व्या शतकात झाला. तेलुगू साहित्याचे इतिहासकार श्री. बालशौरी रेड्डी वेमन्नाचा जीवनकाल इ. स. १४१२–१४८० असा देतात, तर खुद्द वेमन्नाच्या काव्यपंक्तींवरून तो इ. स. १४१२–१४७२ असा ठरतो. श्री. चलसानी सुब्बाराव यांनी नवीन संशोधनान्ती, वेमन्न इ. स. च्या १८ व्या शतकात होऊन गेला असल्याचे सिद्ध केले आहे.

वेमन्नाच्या कालाप्रमाणेच त्याच्या वास्तव्यस्थानाविषयीही मतमतान्तरे दिसून येतात. काहींच्या मते तो कडप्पा जिल्ह्यातील कटारुपल्ले गावचा, तर काहींच्या मते कुर्नूल जिल्ह्यातील एका खेडेगावचा रहिवासी होता. काहींनी त्याला गंदीकोटचा राहणारा म्हटले आहे. वेमन्न आंध्रातल्या निरनिराळ्या गावी राहिला हे तर खरेच; त्यामुळे वरील सर्वच गावांशी त्याचा संबंध होता. त्याच्या व त्याच्या शिष्यांच्या काव्यांतर्गत पुराव्यांवरून असे दिसते, की त्याचा जन्म कोंडवीडू नामक गावी झाला, गंदीकोटला त्याचे दीर्घ काळ वास्तव्य राहिले व कटारुपल्ले या गावी त्याने देह ठेवला. कटारुपल्ले हे गाव सांप्रतच्या अनंतपूर जिल्ह्यात येते. वेमन्नाच्या काव्यातील त्याच्या जन्मस्थानाविषयीचा उल्लेख असा–

> ऊरु कोंडवीडु नुनिकि पश्चिम वीथि
> मूर्गचिंतपल्ले मोदटि इल्लु ।
> एड्डे रेड्डि कुल मदेमनि तेल्पुदु
> विश्वदाभिराम दिनुर वेंम ।।

भावार्थ – कोंडवीडू नगराच्या, मूर्गचिंतपल्ले मोहल्ल्याच्या पश्चिम दिशेच्या गल्लीतले पहिले घर हेच माझे जन्मस्थान. मी रेड्डी कुलात जन्मलो.

वेमन्नाच्या बापाचे नाव कोमरगिरी वेमा रेड्डी व आईचे

मल्लमांबा असे होते. हा जातीने कापू शेतकरी होता. वेमन्नाचा थोरला भाऊ राजवेमारेड्डी हा कोंडवीडूचा राजा असून, तो व त्याची पत्नी नरसंबा या दोघांनी वेमन्नाचे पालनपोषण केले.

वेमन्नाचे बालपण नुसते सुखातच नव्हे, तर वैभवात व विलासात गेले. त्याच्या घरचे वातावरण सुसंस्कृत व शालीन होते. त्याचे वडील, भाऊ हे सर्व विद्वानांचे, पंडितांचे व कलावंताचे आश्रयदाते होते. वेमन्नावरही तेच संस्कार घडले. त्यालाही कविता स्फुरू लागली. परंतु वयात येताच त्याच्या या काव्यात्म वृत्तीमुळेच त्याचे पाऊल वाकडे पडले. वेमन्न एका वेश्येच्या मोहजालात सापडला. तिने त्याच्यावर एवढी मोहिनी घातली, की जवळ असलेली सर्व मौलिक संपत्ती त्याने तिच्या पायी उधळून टाकली. शेवटी तो पुरता कफल्लक बनला, तेव्हा वेश्येने त्याच्याकडे त्याच्या भावजयीचा चंद्रहार मागितला. वेमन्नाने वहिनीला ही गोष्ट सांगितली. आपल्या दिराचा हा अध:पात पाहून तिला फार वाईट वाटले; तथापि तिचे त्याच्यावर पुत्रवत् प्रेम असल्यामुळे तिने त्याला चंद्रहार काढून दिला व कळवळून सांगितले–

'वेमन्ना, हा चंद्रहार मी तुला देते. तो तू तुझ्या प्रेयसीला नेऊन दे. मात्र मी सांगते तेवढे कर. हार देण्यापूर्वी तू तुझ्या प्रेयसीला पूर्ण प्रकाशात नग्नावस्थेत उभी राहायला सांग व तिचे शरीर आपादमस्तक न्याहाळून घे.'

वेमन्नाने ते मान्य केले व तो वेश्येकडे गेला. चंद्रहार पाहून ती हुरळली; परंतु वेमन्नाने तिला पूर्ण विवस्त्र पाहण्याची इच्छा सांगितली. तिने तसे केले. त्याबरोबर त्याला स्त्रीदेहाचा, वेश्येच्या नकलीपणाचा व एकूणच कामजीवनाचा वीट आला.

तिच्या घरून तो जो निघाला तो घरी न परतता एका डोंगराच्या गुहेत जाऊन बसला व अंतिम सत्याचा शोध घेण्यास प्रवृत्त झाला. बरेच दिवस अशा प्रकारे रानावनात भटकल्यावरही त्याला शांती मिळेना. मग तो घरी परतला. राजाराणी दोघांनाही तो घरी आल्यामुळे आनंद झाला; परंतु आता त्यांना निराळीच काळजी वाटू लागली. ऐन तारुण्यात वेमन्न सर्व वेळ ध्यान–धारणेत व जप-तपात घालवीत बसला आहे, लग्न, संसार, मुले-बाळे, राजकाज या कशाचाच तो विचार करीत नाही, हे पाहिल्यावर ती दोघे दु:खी झाली. त्यांनी वेमन्नाला विविध प्रकारे समजावून पाहिले; पण वेमन्न विरागीच राहिला.

याच काळात राजाने राणीसाठी काही दागिने घडवावे म्हणून अभिराम आणि लक्ष्मण या नावाच्या दोघां सोनारांना राजवाड्यात कामासाठी बोलावले व त्यांच्या कामावर देखरेख करण्यासाठी वेमन्नाची नेमणूक केली. दोन-चार दिवसांतच वेमन्नाच्या असे लक्षात आले की, अभिराम रोज उशीरा कामास येतो. त्यामुळे वेमन्नाने अभिरामला त्याचे कारण विचारले. 'पूजापाठ करण्यात वेळ जातो,' असे अभिरामने त्याला उत्तर दिले. तेव्हा वेमन्नाने ही गोष्ट राजाच्या कानी घातली. राजा संतापला व म्हणाला, 'बरोबरच आहे! त्याला पूजापाठामुळे विलंब होतो आणि तुला ध्यानधारणेमुळे वेळ मिळत नाही!' वडील भावाचा हा टोमणा वेमन्नाने स्वीकारला; पण त्याच वेळी अभिरामाचा पूजापाठ कुठे चालतो, हे पाहण्याचेही त्याने ठरविले.

दुसऱ्या दिवशी पहाटे तो अभिरामाच्या घरासमोरील एका झाडावर लपून बसला. अभिरामाने आपली प्रात:कर्मे आटोपल्यावर पूजा-साहित्य घेऊन रानाचा रस्ता धरला. वेमन्न त्याच्या मागून लपतछपत जाऊ लागला. शेवटी अभिराम एका गुहेच्या तोंडाशी थांबला. त्या गुहेत लंबिका नामक एक योगी तप करीत बसला होता. अभिरामाने त्याच्यापुढे गुडघे टेकून त्याची प्रार्थना केली, त्याच्या चरणांवर फुले वाहिली व उपाहारासाठी फळे ठेवली. थोड्या वेळाने योग्याची समाधी उतरली. त्याने अभिरामाला प्रसन्न होऊन आशीर्वाद दिला व 'उद्या पहाटे याहीपेक्षा लवकर ये,' असे सांगितले.

वेमन्न हे सारे लपून पाहत होता. योग्याने अभिरामाला दुसऱ्या दिवशी पहाटे लवकर कशासाठी बोलावले असेल



वेमन्न

याविषयी त्याच्या मनात कुतूहल जागृत झाले. घरी परतल्यावर त्याने वहिनीला सांगितले की, 'तू आज रात्री अभिरामा

घरी न पाठवता राजवाड्यातच कामात गुंतवून ठेव.' वहिनीने कारण विचारले, परंतु वेमन्नाने ते सांगायचे नाकारले. त्या रात्री अभिराम राजवाड्यात अडकून पडला. दुसऱ्या दिवशी पहाटे योग्याकडे जाणे त्याला जमले नाही. वेमन्न मात्र अभिरामाच्या ऐवजी तिथे गेला व योग्यापुढे हात जोडून बसला. समाधी उतरल्यावर योग्याने पाहिले, तो समोर दुसराच माणूस! त्याने वेमन्नाला विचारले, 'तू कोण आहेस.' वेमन्नाने खरे ते सांगितले. इतकेच नव्हे, तर 'तुम्ही अभिरामाची वाट पाहू नका. तो आज येऊ शकणार नाही,' असेही सांगितले. तरीही योगी काही बोलेना. मग वेमन्नाने योग्याला विचारले, 'तुम्ही अभिरामाला आज इतक्या पहाटे कशासाठी बोलावले होते?'

'त्याला मंत्रदीक्षा देण्यासाठी!' योगी म्हणाला. त्यावर वेमन्नाने अधीर होऊन विचारले,

'मग तुम्ही त्याच्याऐवजी मलाच मंत्रदीक्षा का देत नाही?'

आता योग्याला सर्व उलगडा झाला. वेमन्नाचा हा उपटसुंभपणा त्याला आवडला नाही; परंतु त्याने त्याची उत्कट इच्छा जाणून त्याच्या कानात 'ॐशिवम्' या मंत्राचा उच्चार केला व तोच मंत्र त्याच्या जिव्हेवर लिहिला. त्याच दिवशी लंबिका योग्याने तिथून अन्यत्र प्रयाण केले.

वेमन्न मग परत फिरला. मात्र त्याला त्याच्या कृत्याची लाज वाटू लागली. अभिरामाला आपण फसविले हे बरे केले नाही, असे त्याला वारंवार वाटू लागले. घरी परतताच त्याने अभिरामाला सर्व वृत्तात सांगून त्याची क्षमा मागितली व म्हटले, 'जरी तुझ्या गुरूने मला मंत्रदीक्षा दिली असली, तरी ते भाग्य मला तुझ्यामुळेच प्राप्त झाले असल्याने खरे पाहता तूच माझा गुरू आहेस.'

वेमन्नाने हे शब्द केवळ तोंडदेखले उच्चारले नाहीत, तर आपल्या प्रत्येक कवनाच्या अंती 'विश्वदाभिराम विनुर वेम।' अशी नाममुद्रा घालून अभिरामाला स्वतःच्या नावाशी कायमचे बांधून टाकले.

श्री. बालशौरी रेड्डी यांच्या मते मात्र 'विश्वदाभिराम' म्हणजे कोणी हाडामांसाची सदेह व्यक्ती नसून, तो आत्माराम या अर्थी आत्मसंबोधनवाचक शब्द आहे. अर्थात वरील कथा खरी मानायची, तर त्याची वहिनी, अभिराम आणि लंबिका योगी हे तिघेही वेगवेगळ्या निमित्तांनी वेमन्नाचे गुरूच ठरतील.

वेमन्नाला मंत्रदीक्षा मिळाल्यावर तो आपला सर्व वेळ आत्मचिंतनातच घालवू लागला. कालांतराने त्याला सिद्धावस्था प्राप्त झाली. मग तो अद्वैततत्त्वज्ञानाच्या प्रचाराकडे वळला. 'खोटे बोलू नका, खोटे वागू नका, जातिभेद पाळू नका, अस्पृश्यता पाळू नका, मूर्तिपूजा करू नका, अंधश्रद्धांना बळी पडू नका, एका जगच्चालक परमात्म्याचेच चिंतन करा, वासनांचा त्याग करा, सर्व प्राणिमात्रांना समानतेने वागवा,' असा त्याने सर्व लोकांना उपदेश सुरू केला.

आपल्या विचारांच्या प्रसारासाठी त्याने कंद, आटवेलदी, यांसारख्या सोप्या व सुटसुटीत छंदांत पद्यरचना केली. त्यासाठी तेरगीतांची शैली व जनसामान्यांची सहजसुलभ बोली स्वीकारली. अत्यंत अशिक्षित व अडाणी माणसालाही पटकन आकलन होईल, अशी दृष्टांतसमृद्ध भाषा त्याने वापरली. एकेक गीत चार-चार ओळींचे. त्यांत मावेल एवढाच आशय. काव्य, महाकाव्य, असल्या प्रचंड खटाटोपात तो कधीच पडला नाही. लोकांच्या तोंडी सहज खेळतील आणि मनात घोळतील अशा सूक्तिसदृश काव्यपंक्तींचीच त्याने रचना केली.

वेमन्नाचा तीर्थयात्रादी कर्मकांडावर विश्वास नव्हता. एक चित्त शुद्ध असल्यावर बाह्यशुद्धीचे कारण नाही, असे त्याचे मत होते. तो म्हणतो–

**तिरुमलकुनु बोव तुरक दासरि गाडु।**
**काशि बोव लंज गरित काबु।**
**कुक्क सिंह मगुने गोदावरिकि बोव।**
**विश्वदाभिराम विनुर वेम॥**

भावार्थ– तिरुमलै तीर्थाच्या यात्रेला जाऊन (एखादा) मुसलमान काही विष्णूचा दास बनत नाही किंवा काशीयात्रेला गेली म्हणून एखादी वेश्या काही पतिव्रता बनत नाही. तसेच (दक्षिणगंगा) गोदावरीच्या तीरी राहिला किंवा तिचे पाणी प्यायला म्हणून एखादा कुत्रा (नृ) सिंहपद (देवत्व) प्राप्त करू शकत नाही.

ढोंगधत्तुऱ्याविषयी त्याच्या मनात अत्यंत घृणा होती. ढोंगी साधूंचे वाभाडे काढताना तो लिहितो–

**पुस्तकमुलु जटलु पुलितोलु बेत्तम्बु।**
**कक्षपाललु पदि लक्ष लैन।**
**मोत चेटे गानि मोक्षंबु निच्चुना।**
**विश्वदाभिराम विनुर वेम॥**

भावार्थ-ढोंगी साधूंचे पोथीपठण व जटा, व्याघ्रचर्म, काठी, कमंडलू या वस्तू लाखांची संख्या का जमा करणार नाहीत? त्यामुळे दबदबा वाढला, तरी मोक्ष मिळणार नाही.

मूर्तिपूजेतील फोलपणा सांगताना वेमन्न म्हणतो–

**हृदयमुन नुन्न ईशुनि तेलियक।**
**शिलल केल्ल म्रोक्कु जीवुलार।**
**शिललनेमियुंडु जीवुलंदे काक।**
**विश्वदाभिराम विनुर वेम॥**

भावार्थ– वेडा माणूस हृदयस्थ ईश्वराला न ओळखता दग-

डांची पूजा का करतो ? त्या दगडात काय आहे ? परमेश्वर तर (सर्व) प्राणिमात्रांच्या ठिकाणी (हृदयात) राहतो.

वेमन्नाच्या कवनांतून प्राधान्याने डोळ्यात भरतो, तो त्याचा सत्याग्रही बाणा. त्याला खोटे किंचितही खपत नसे. स्वतः एखादी गोष्ट पाहिली-अनुभवली असल्यावाचून तो त्याविषयी मुळीच बोलत नसे. स्वतःच्या जीवनात घडलेल्या सर्व घटनांची त्याने प्रामाणिकपणे कबुली दिली आहे. त्यामुळेच त्याच्या काव्यात परस्परविरोधी विचार आढळतात. त्याची कवने ही त्याच्या जीवनाच्या वेगवेगळ्या कालखंडाशी संलग्न आहेत. वेमन्नाने त्याला पायांखाली घालता आला तेवढा प्रदेश बारकाईने पाहिला. त्यामुळे समाजाचे नेमके दुखणे, नेमक्या अडचणी, काय आहेत त्यांची त्याला कल्पना आली व ती दुखणी, त्या अडचणी दूर करण्यासाठी तो काया-वाचा-मनाने झिजला. आयुष्याच्या अखेरीस वेमन्नाने एका गुहेत जाऊन जीवत्समाधी घेतली, अशी आख्यायिका आहे. [ ते. वा.; ते. सा. इ.; पंचामृत; आंध्रभारती ]

**वेमुलवाडा** एक तीर्थक्षेत्र. आंध्र प्रदेशातील करीमनगर जिल्ह्यात हे गाव आहे. इथले राजेश्वरमंदिर आणि धर्मकुंड फार प्रसिद्ध आहे. पश्चिम चालुक्यांपैकी नरसिंहवर्मा राजादित्य (पहिला) याने इ. स. च्या ९ व्या किंवा १० व्या शतकात राजेश्वरमंदिर बांधले असावे किंवा त्याच्या नावावरून मंदिराला हे नाव दिले असावे. या गावात भीमेश्वर आणि केदारेश्वर अशी दोन प्राचीन मंदिरेही आहेत.

वेमुलवाडाराजेश्वरमाहात्म्य या ग्रंथात राजेश्वरमंदिराविषयी एक आख्यायिका दिली आहे, ती अशी – पांडवांपैकी अर्जुनाचा नातू नरेंद्र एकदा शिकारीसाठी वनात गेला असता त्याच्या हातून चुकून एका ऋषीची हत्या घडली आणि त्याला ब्रह्महत्येचे पातक लागले. त्या पापापासून मुक्ती मिळावी म्हणून तो अनेक तीर्थे हिंडला, पण व्यर्थ. शेवटी तो वेमुलवाडा क्षेत्रात गेला आणि धर्मकुंडातील तीन ओंजळी पाणी प्याला. त्यामुळे त्याचा ब्रह्महत्येचा दोष नष्ट झाला. त्या रात्री देव त्याच्या स्वप्नात आला आणि त्याने धर्मकुंडाच्या तळाशी असलेले शिवलिंग वर काढून त्याची धर्मकुंडाच्या किनाऱ्यावर स्थापना करायला सांगितले. नरेंद्राने त्याप्रमाणे केले.

इंद्राने वृत्रासुराला मारल्याबद्दलचा दोष याच धर्मकुंडात स्नान करून घालवला, अशीही कथा आहे. या धर्मकुंडाच्या माहात्म्याविषयी पुढील श्लोक प्रसिद्ध आहे–

श्रीशैले दर्शनान्मुक्तिः काश्यां तु मरणाद् ध्रुवम् ।
अन्यत्र तपसा क्षेत्रे धर्मकुण्डस्य नामतः ॥

अर्थ – श्रीशैलावर दर्शनाने, काशीत मृत्यू आल्याने, इतर क्षेत्रांत तप केल्याने आणि धर्मकुंडाचे केवळ नाव उच्चारल्याने मुक्ती मिळते.

वर्षभर इथे राजेश्वराच्या दर्शनासाठी भाविक लोक येत असतात. पण महाशिवरात्रीला आणि फाल्गुनी पौर्णिमेच्या कल्याणोत्सवाला इथे खूप मोठी यात्रा भरते. त्या उत्सवात श्रीमंत यात्रेकरू देवाला सहस्र सुवर्ण-पुष्पांचा अभिषेक करतात आणि त्याच्या नावे पोळ सोडतात.

मंदिराची व्यवस्था सरकारी असून, सरकारतर्फे इथे एक धर्मशाळा आणि संस्कृत पाठशाळा चालवली जाते. [ टें. ली. आं. प्र. ]

**वेरूळ** मराठवाड्यातील प्रसिद्ध स्थान. हे गाव औरंगाबादच्या वायव्येला सुमारे अठरा मैलांवर वसलेले आहे. गावाजवळून इला नदी वाहते. तिच्या तीरावर घृष्णेश्वराचे मंदिर आहे. ते बारा ज्योतिर्लिंगापैकी एक मानले जाते. छत्रपती शिवाजीमहाराजांचे आजोबा मालोजीराव भोसले हे वेरूळचे पाटील होते.

मात्र वेरूळ हे गाव जगद्विख्यात झाले आहे, ते गावाच्या पश्चिमेला एका मैलावरील डोंगरात खोदलेल्या लेण्यांमुळे. भारतातील सर्व लेण्यांत ही लेणी उत्कृष्ट मानली जातात. ही लेणी उभ्या पहाडात खोदलेली नसून, डोंगराच्या उताराव[र] आहेत. हा डोंगर दक्षिणोत्तर पसरलेला असून, त्याचा आकार चंद्रकोरीसारखा आहे.

या डोंगरात एकूण चौतीस गुंफा खोदलेल्या आहेत. त्यांतील दक्षिणेकडील बारा गुंफा बौद्ध पंथाच्या, उत्तरेकडील पाच गुंफा जैन पंथाच्या, आणि त्या दोन्हींच्या मधल्या सतरा गुंफा ब्राह्मणी पद्धतीच्या आहेत. बौद्ध लेणी इ. स. ५५०–८०० या कालखंडातली असून, ती महायान पंथाची आहेत. त्यांत एकच चैत्यगृह असून, बाकीची बुद्धप्रतिमायुक्त विहारगृहे आहेत.

इ. स. ६५० नंतर इथल्या ब्राह्मणी गुंफांची निर्मिती सुरू झाली. त्यांतील कैलास मंदिर हे अत्यंत सुंदर लेणे राष्ट्रकूट राजा कृष्णराज (पहिला) याने इ. स. च्या ८ व्या शतकात निर्माण केले. जैन लेणी इ. स.च्या ९ व्या व १० व्या शतकांतली असून ती राष्ट्रकूट वंशातील अमोघवर्ष (पहिला) किंवा कृष्णराज (दुसरा) यांच्या वेळी खोदलेली आहेत.

वेरूळचे मूळ नाव एलापूर असे होते. राष्ट्रकूटांच्या एका ताम्रपटात एलापूरच्या शिवमंदिराची म्हणजे कैलास लेण्याची अतिशय प्रशंसा केली आहे. ते एलापूर म्हणजेच वेरूळ होय. एलापूरचा अपभ्रंश होऊन वेरूळ हे नाव त्या गावाला मिळाले असावे, असे काही पंडितांचे मत आहे.

इथे पहिल्या प्रथम बौद्ध लेण्यांची रांग लागते.

लेणे क्र. १ व २–ही अगदी साधी आहेत. त्यांत भिक्षूंसाठी आठ खोल्या आहेत. हा सर्वांत प्राचीन विहार असावा. दुसरे लेणे म्हणजे चैत्यगृहच असावे. काही पायऱ्या चढून गेले, की एक सोपा लागतो. त्याचे स्तंभ व छत पडून गेले आहे. त्याच्या दोन्ही अंगी दोन खोल्या आहेत. एका बाजूला उच्चासनावर जंभलाची तुंदिलतनू मूर्ती आहे. तो बौद्धांचा कुबेर होय. दर्शनी भिंतीवर अनेक बुद्धमूर्ती कोरलेल्या दिसतात. मुख्य मंडपात प्रवेश करताना दोन मोठे द्वारपाल दिसतात. मंडपाला बारा भव्य स्तंभ असून, त्याच्या दोन्ही बाजूंना बुद्धाच्या प्रचंड मूर्ती आहेत. या सर्व मंडपात नाजूक नक्षी कोरलेली आहे. मंडपाचे स्तंभ विविध प्रकारचे व मनोहर आहेत. या मंडपाच्या भिंतीत तारा व बोधिसत्त्व यांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत.

या मंडपाच्या मागे गाभारा आहे. त्याच्या द्वारावरही प्रचंड द्वारपाल आहेत. त्या मूर्ती बोधिसत्वांच्या च आहेत. गाभाऱ्यात सिंहासनावर बसलेली बुद्धाची प्रचंड मूर्ती धर्मचक्रप्रवर्तनमुद्रेत आहे. तिच्या दोन्ही अंगी चवरीधारी सेवक आणि पुष्पमाला वाहणारे गंधर्व आहेत.



धर्मचक्रप्रवर्तन मुद्रेत भगवान बुद्ध – वेरूळ

लेणे क्र. ३–हा एक विहार असून, त्यात आठ खोल्या आहेत. याचा काही भाग पडलेला आहे. सोप्याच्या उत्तरेकडील भागात एक प्रार्थनापट असून, त्यात अवलोकितेश्वराचे चमत्कार चित्रित केलेले आहे. मुख्य मंडपात पूर्णकलशयुक्त बारा स्तंभ असून, गर्भगृहाच्या द्वाराजवळ दोन प्रचंड द्वारपाल आहेत.

लेणे क्र. ४–याचा बराच दर्शनी भाग पडलेला आहे. त्यात दोन मजले असले तरी, आता वर जाता येत नाही. मुख्य मंडपात पद्मपाणी बोधिसत्त्वाची बैठी मूर्ती असून, दोन्ही बाजूंना स्त्रीसेविका आहेत. गाभाऱ्यात बोधिवृक्षाच्या छायेत बसलेल्या बुद्धाची मूर्ती आहे.

या चार लेण्यांना धेडवाडा असे नाव आहे. धेड हे अतिशूद्र लोक बौद्ध पंथात प्रथम प्रविष्ट झाले, त्याचे हे द्योतक असावे; किंवा थेरवादी लोकांचे निवासस्थान म्हणजे थेरवाडा याचे हे अपभ्रष्ट रूप असावे.

लेणे क्र. ५–हा एक प्रशस्त विहार आहे. त्याला महारवाडा म्हणतात. महाविहार याचे विकृतरूप होऊन हे नाव मिळाले असावे. याची लांबी ११७ फूट व रुंदी ५८.५ फूट असून, त्यात २४ स्तंभ आहेत. दोन्ही बाजूंना दोन पडव्या आहेत व स्तंभांच्या दोन रांगांच्यामध्ये दोन ओटे आहेत. या विहारात सुमारे २० खोल्या होत्या. मंडपाच्या मागच्या भिंतीत बुद्धमूर्तियुक्त मंदिर आहे. त्यात बुद्धाची प्रचंड मूर्ती आहे. त्याच्या दोन्ही बाजूंना द्वारपालांच्या प्रचंड मूर्ती आहेत. त्या खूप अलंकृत आहेत. या लेण्याच्या माथ्यावरून एक जलप्रवाह पुढच्या दरीत सतत कोसळत असतो.

लेणे क्र. ६–हे लेणेही खूप प्रशस्त आहे. त्याच्या मध्यभागी एक मोठा मंडप, त्यामागे अंतराळ व पाठीमागे बुद्धमंदिर असून, मंडपाच्या दोन्ही बाजूंना दोन मोठे मंडप आहेत. त्या मंडपांना लागून खोल्या आहेत. या लेण्याचा दक्षिणेकडचा व दर्शनीभाग पडून गेला आहे. या मंडपाचे स्तंभ घटपल्लवयुक्त

नक्षीने सुशोभित केलेले असून, त्यांच्या वरच्या भागात शार्दूल-प्रणाल आहेत. प्रवेशद्वाराच्या दोन्हीं बाजूंना द्वारपालांच्या प्रचंड मूर्ती आहेत. उजव्या बाजूच्या भिंतीत महामायुरीची प्रतिमा कोरलेली आहे व डाव्या बाजूच्या भिंतीत तारादेवीची. या सर्व मूर्तींची घडण सुबक आहे. प्रवेशद्वाराची चौकट आणि द्वारपाल यांच्यामध्ये गंगा व यमुना यांच्या सुवक मूर्ती दिसतात. गाभाऱ्यात बुद्धाची भव्य बैठी मूर्ती आहे. गाभाऱ्याच्या भिंतीत कोरलेल्या बुद्ध व बोधिसत्त्व यांच्या मूर्ती विशेष प्रेक्षणीय आहेत.

**लेणे क्र. ७**—सहाव्या लेण्याच्या खाली हे लेणे आहे. ते अगदी साधे व अपूर्ण अवस्थेत आहे. त्याचा मंडप ५१.५ फूट लांब व ४३.५ फूट खोल असून, त्यात चारच स्तंभ आहेत. त्याच्या मागल्या बाजूला ५ खोल्या व दोन्ही बाजूंना तीन तीन खोल्या आहेत.

**लेणे क्र. ८**—यात जाण्यासाठी वरील लेण्यातून वाट आहे. त्या लेण्यात एक मंडप २८′×२५′ लांबी-रुंदीचा असून, त्यात चार स्तंभ व चार अर्धस्तंभ आहेत. उत्तरेकडील भिंतीत तीन खोल्या आहेत. मागच्या बाजूला एका वेगळ्या दालनात गर्भ-गृह व त्याच्या भोवती प्रदक्षिणापथ आहे. गाभाऱ्यात बुद्धाची बैठी मूर्ती असून, दोन्ही बाजूंना दोन बोधिसत्त्व उभे आहेत. अंतराळाच्या उजव्या भिंतीमध्ये महामायुरीची मूर्ती आहे. गाभाऱ्याच्या प्रवेशद्वाराजवळ दोन द्वारपाल आहेत.

**लेणे क्र. ९**—यात जाण्यासाठी लेणे क्र. ६ मधून वाट आहे. हे लेणे दक्षिणाभिमुख असून, त्याचा दर्शनी भाग अत्यंत सुरेख आहे. समोर एक सोपा असून, त्याच्या मागे दोन स्तंभ व मग आतले दालन लागते. त्या दालनाच्या मागच्या भिंतीत दोन अर्धस्तंभ असल्यामुळे भिंतीचे तीन भाग झाले आहेत. मधल्या खणात धर्मचक्रप्रवर्तन मुद्रेतील बुद्धाची मूर्ती कोरलेली असून तिच्यावर चार गंधर्व आहेत. डाव्या बाजूच्या खणात पद्मपाणी व उजव्या बाजूच्या खणात बोधिसत्त्व आहे. लेण्याच्या दर्शनी भागात बोधिसत्त्वासहित बुद्धप्रतिमांची एक रांग असून, वर चैत्यगवाक्षांच्या रांगा आहेत. त्या गवाक्षांमध्येही बुद्धप्रतिमा असून, तारा अभयदान करीत आहे, असे शिल्प आहे. अशा प्रकारची तारेची मूर्ती प. भारतातील अन्य लेण्यात कुठेही नाही.

**लेणे क्र. १०**—हे लेणे विश्वकर्मा या नावाने प्रसिद्ध आहे. याला सुतार लेणे असेही म्हणतात. याचे कारण हे असावे, की या लेण्यात प्राचीन काष्ठशिल्पाचे अनुकरण केलेले दिसते. लाकडी फासळ्यांसारख्या फासळ्या दगडात कोरून काढलेल्या आहेत. हे एक चैत्यगृह आहे.

या लेण्यातील चैत्यगुंफेचे दर्शन घेण्यासाठी एका नैसर्गिक तटाच्या दरवाज्यातून आत जावे लागते. प्रथम एक प्रशस्त प्रांगण लागते. त्याच्या तीन्ही बाजूंना घटपल्लवयुक्त स्तंभांवर आधारलेले सोपे आहेत. समोरच्या सोप्यातून मागच्या चैत्य-गृहात जाण्यासाठी दरवाजा आहे. हे आतले दालन ८६′ लांब, ४३′ रुंद व ३४′ उंच असून, त्यात स्तंभाच्या दोन रांगा असल्यामुळे दोन्ही बाजूंना वीथिका तयार झाल्या आहेत. दालनाची मागची भिंत गोलाकार असून, त्या भागात एक प्रचंड स्तूप आहे. त्याची उंची २७′ व व्यास १५.५′ असून, त्याच्या दर्शनी भागावर भव्य बुद्धमूर्ती सिंहासनावर विराजमान झालेली आहे. स्तूपाच्या वरच्या भागात बोधिवृक्षाचे तोरण व गंधर्वांच्या आकृती कोरलेल्या आहेत. दोन्ही बाजूंना बोधि-सत्त्वाच्या प्रतिमा आहेत.

दालनातील स्तंभांच्या रांगा पाठीमागच्या अर्धगोलाकार भिंतीशी समांतर होऊन स्तूपाला वेढतात. हे स्तंभ साधे असले तरी त्यांच्या वरचा भाग शिल्पयुक्त आहे. त्यातील कोनाड्यात बुद्ध व बोधिसत्त्व यांच्या प्रतिमा कोरलेल्या दिसतात. त्यांच्या खाली यक्षमूर्तींची रांग आहे. कोनाड्याच्या वर नाग व नाग-देवी यांच्या आकृती कोरलेल्या असून, त्यांच्या पृष्ठभागातून निघालेल्या अर्धवर्तुळाकार दगडी तुळया छताला आधार देतात.

सोप्याच्यावर सज्जा असून, त्याचा दर्शनी भाग अत्यंत सुरेख आहे. कार्ले, भाजे वगैरे ठिकाणी असलेल्या चैत्यगृहांच्या भव्य व नालाकार गवाक्षांपेक्षा इथले गवाक्ष लहान आणि वेगळ्या आकाराचे आहे. त्याच्या दोन्ही अंगी अंतरिक्षात संचार करणारे गंधर्व आपल्या भार्यांसह बुद्धाला वंदन करीत असलेले दाखवले आहेत. त्याच्या वरच्या भागात अनेक कोनाडे असून, त्यांत प्रणयी युग्मे कोरलेली आहेत. गवाक्षाच्या खाली मोठे प्रवेशद्वार असून, त्यात दोन स्तंभ आहेत. प्रवेशद्वार व गवाक्ष यांच्यावर एक त्रिदली मेहरप किंवा बिल्वतोरण आहे. त्या तोरणाच्या दोन्ही बाजूंना दोन शिखरे कोरलेली आहेत. त्यांच्या खाली कोनाड्यात अवलोकितेश्वर, वज्रपाणी व तारा यांच्या मूर्ती आहेत. डाव्या बाजूच्या कोनाड्याजवळ एक शिलालेख आहे. त्यात कोरलेला मंत्र महायान पंथाचा असला तरी, हे लेणे हीनयान पंथाचे आहे.

गवाक्षाखालच्या द्वारातून आत शिरले, की एक लहान सज्जा आहे. त्याच्या कठड्यावर नृत्यमूर्ती कोरलेल्या आहेत. तिथून मागच्या चैत्यगृहाचा अंतर्भाग पाहता येतो.

या लेण्यातील प्रांगणाच्या दोन्ही बाजूंच्या सोप्यांतून आत डोंगरात खोल्या खोदलेल्या असल्या, तरी तो संघाराम नव्हता. हे हीनयान पंथाचे चैत्यगृहच आहे. त्याची घडण अत्यंत आखीव रेखीव आणि सुबक दिसते.

लेणे क्र. ११ – हे लेणे दोनताल या नावाने ओळखले जात होते. कारण इ. स. १८७६ पर्यंत त्याचा खालचा मजला मातीने पूर्णपणे भरलेला होता. तो मोकळा केल्याने हे तीन मजली लेणे ठरले आहे. पुढच्या भिंतीतून आत शिरल्यावर एक विस्तीर्ण प्रांगण लागते. त्याच्या उजव्या बाजूला मोठे भिक्षुगृह असून डाव्या बाजूला पाण्याची टाकी आहे. तिथे जवळच अवलोकितेश्वराची अलंकारयुक्त मूर्ती व दोन्ही बाजूंना तारा व भ्रुकुटी यांच्या मूर्ती आहेत. वरच्या बाजूला लहान लहान बुद्धमूर्ती व गंधर्वांच्या प्रतिमा आहेत. तळमजल्याच्या दर्शनी भागात सात स्तंभ असून, सोप्याची लांबी १०२′ व रुंदी ९′ आहे. मागील भिंतीच्या मध्यभागी असलेल्या गाभाऱ्यात सिंहासनावर ध्यानस्थ बुद्ध आणि बाजूला पद्मपाणी व वज्रपाणी यांच्या मूर्ती आहेत.

वरच्या मजल्याच्या सोप्यात आठ स्तंभ असून, मागच्या भिंतीत पाच दरवाजे आहेत. दुसऱ्या दरवाज्यातून आत गेले, की बुद्धाची प्रचंड मूर्ती भूमिस्पर्श मुद्रेत व ध्यानासनात सिंहासनारूढ अशी दिसते. त्याच्या दोन्ही बाजूंना दोन बोधिसत्त्व आणि समोर दोन सेविका आहेत. या गर्भगृहाच्या भिंतीवर बुद्ध, बोधिसत्त्व, जंभल व तारा यांच्या अनेक मूर्ती कोरलेल्या दिसतात. तिसऱ्या द्वारातून आत गेले, की एक सभामंडप लागतो. त्याच्या मागच्या गाभाऱ्यात ध्यानासनस्थ बुद्धाची प्रचंड मूर्ती आहे. इथेही पहिल्या गाभाऱ्यातील मूर्तीप्रमाणेच अनेक मूर्ती आहेत. चौथी खोली दुसऱ्या खोलीप्रमाणेच असून, तिच्यात तसाच एक गाभारा आहे. त्यात बुद्ध व बोधिसत्त्व यांच्या अनेक मूर्ती आहेत. पाचवे दार एका साध्या खोलीचे आहे.

या मजल्यावरील डाव्या बाजूच्या खोलीत वर जाण्यासाठी जिना आहे. तिसऱ्या मजल्यावरही १०१′ लांब व २१′ रुंद सोपा असून, त्याच्या मागे मध्यभागी एक सभामंडप आहे. त्याला जोडून अंतराळ व गर्भगृह असून, गर्भगृहात धर्मचक्रप्रवर्तनमुद्रेतली बुद्धाची मूर्ती आणि तिच्या दोन्ही बाजूंना सेवकांच्या मूर्ती आहेत. मुख्य मंडपाच्या डाव्या बाजूला एक लहानसे गर्भगृह असून, त्यात बुद्धमूर्ती आहे. मंडपाच्या भिंतीवर बुद्ध, पद्मपाणी, गणेश, महिषासुरमर्दिनी इ. देवतांच्या मूर्ती कोरलेल्या आढळतात.

लेणे क्र.१२ – हे तीनताल या नावाने ओळखले जाते. कारण त्यात तीन मजले आहेत. हे चैत्यगृह आणि विहार असे संमिश्र स्वरूपाचे लेणे असून, वेरूळच्या बौद्ध लेण्यांत सर्वांत मोठे आहे. विश्वकर्मा लेण्याप्रमाणेच याच्या समोर डोंगरी भिंत असून, तिला दरवाजा आहे. त्यातून आत गेले, की विस्तीर्ण प्रांगण लागते. लेण्याच्या तीन्ही मजल्यांच्या दर्शनी सोप्यात आठ आठ स्तंभांच्या रांगा आहेत. तळमजल्याचे मधले दोन स्तंभ पूर्णघटयुक्त व नक्षीने सुशोभित आहेत. बाकीचे सर्व स्तंभ चौकोनी व साधे आहेत. मात्र त्यांच्या ठसठशीतपणामुळे संपूर्ण वास्तू भव्य व बलिष्ठ वाटते. तळमजला ११६′ लांब व ४२′ रुंद असून, त्यात स्तंभांच्या आणखी दोन रांगा आहेत. त्यांच्या मागील अंतराळात दोन दोन स्तंभांच्या आणखी तीन रांगा आहेत. अंतराळातील भिंतीवर एका बाजूला एक मूर्तिपट आहे. त्यात नऊ चौकोन आहेत. मधल्या चौकोनात बुद्ध व चौरीधारक, डाव्या व उजव्या अंगी पद्मपाणी व वज्रपाणी आणि खाली व वर ६ चौकोनांत विविध मूर्ती कोरलेल्या दिसतात. त्या भिंतीत दोन खोल्या आहेत. गर्भगृहात जाण्यासाठी जे द्वार आहे त्याच्या दोन्ही अंगी दोन द्वारपाल बसलेले आहेत. त्यांच्या पलिकडे भिंतीत अवलोकितेश्वर व मंजुश्री यांच्यासह बसलेल्या बुद्धाची प्रतिमा आहे, ती आता भग्न झाली आहे. त्या बाजूच्या भिंतीतही दोन खोल्या आहेत. त्या व्यतिरिक्त अंतराळाच्या एका बाजूच्या भिंतीत तीन खोल्या व दुसऱ्या बाजूला दोन खोल्या आहेत,

गर्भगृहात ध्यानस्थ बुद्धाची प्रचंड मूर्ती असून, दोन्ही बाजूंच्या भिंतींवर उंच जागी पाच ध्यानस्थ बुद्ध आणि खाली चार बोधिसत्त्व अशा प्रतिमा कोरलेल्या दिसतात. प्रवेशद्वाराच्या एका बाजूला आतील भिंतीत तारेची व दुसऱ्या बाजूला चुंडेची मूर्ती आहे.

वरच्या मजल्यावर जाताना अर्धा जिना चढून गेले, की एक खोली लागते. त्या खोलीत मागच्या भिंतीवर सिंहासनारूढ बुद्धाची प्रतिमा कोरलेली असून, दोन्ही बाजूंना बोधिसत्त्वांच्या प्रतिमा आहेत. उजव्या बाजूच्या भिंतींवर जंभल, अवलोकितेश्वर व तारा यांच्या मूर्ती आणि डाव्या बाजूच्या भिंतीत नऊ चौकोनांचा मूर्तिपट आहे.

वरच्या मजल्याची रचना क्र. ११ च्या लेण्यातील वरच्या मजल्याप्रमाणेच आहे. सोप्याच्या मागच्या बाजूला दोन स्तंभ असून, त्यांच्या मागे सभामंडप आहे. त्यात ८–८ स्तंभांच्या दोन रांगामुळे त्याचे तीन भाग पडले आहेत. सभामंडपाच्या भिंतीवर पद्मपाणी, तारा, बुद्ध, इ. मूर्ती कोरलेल्या आहेत.

सभामंडपाच्या मागे गर्भगृह असून, त्याच्या प्रवेशद्वाराजवळ दोन द्वारपालांच्या उंच व सुंदर मूर्ती आहेत. गर्भगृहात ध्यानस्थ बुद्धाची प्रचंड प्रतिमा असून, दोन्ही बाजूंना पद्मपाणी व वज्रपाणी यांच्या मूर्ती चवरी घेऊन उभ्या आहेत. बाजूच्या भिंतीवर बोधिसत्त्वांच्या चार चार मोठ्या प्रतिमा कोरलेल्या आहेत. त्यांच्या वर बुद्धाच्या सात प्रतिमा आहेत. प्रवेशद्वाराच्या डाव्या व उजव्या बाजूला बुद्धासमोर तारा व जंभल यांच्या मूर्ती आहेत. या मजल्याच्या उत्तरेकडील कोपऱ्यात धर्मचक्रप्रवर्तन करणाऱ्या बुद्धाची एक मूर्ती आहे. तिथेच वर जाण्यासाठी जिना आहे. वरचा मजला शिल्पकला व स्थापत्यरचना या दोन्ही

दृष्टींनी उत्कृष्ट आहे. दर्शनी भागात आठ स्तंभ व त्यांच्या मागे आठ स्तंभांच्या चार रांगा मिळून चाळीस स्तंभांचा मंडप असून, त्याची रुंदी ६४' आहे. त्याच्या मागे अंतराळ असून त्याला आणखी दोन दर्शनी स्तंभ आहेत. दक्षिण व उत्तर बाजूंच्या भिंतीत प्रत्येक खणात चार अशा प्रचंड बुद्धप्रतिमा आहेत. पाठी-मागच्या भिंतीत प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूंना सात सात मानुषी बुद्धांच्या मूर्ती आहेत. अंतराळाच्या दोन्ही बाजूंच्या भिंतीत तीन तीन स्त्रीप्रतिमा आहेत. त्या सर्व मूर्ती कमलासनावर बसलेल्या व मस्तकी सुंदर मुकुट धारण करणाऱ्या आहेत.

मुख्य मंदिराचे प्रवेशद्वार साधे असून, दोही अंगी द्वारपाल आहेत. गर्भगृह २१' रुंद आणि २४' खोल असून, मध्यभागी ११' उंच भूमिस्पर्श मुद्रेतील बुद्धमूर्ती आहे. बाजूच्या भिंतींवर बोधि-सत्त्वाच्या पाच पाच उभ्या मूर्ती आहेत. बुद्धमूर्तीभोवती प्रदक्षिणामार्ग आहे. या मूर्तीवर पांढरा लेप दिसतो आणि छतावर रंगीत चित्रेही दिसतात.

तीनताल हें लेणे कैलास लेण्याला समकालीन असून, या लेण्याची भव्यता व त्यातील उत्कृष्ट शिल्पे यांमुळे ते महायान पंथाच्या लेण्यामधील एक अत्यंत महत्त्वाचे लेणे मानले जाते.

क्र. १ ते १२ ही लेणी बौद्ध पंथीय होत. त्यानंतर ब्राह्मणी पद्धतीची सतरा लेणी लागतात.

**लेणे क्र. १३** – हे तीन तालच्या उत्तरेला १००–१२५ फुटां-वर आहे. ते अगदी साधे दालनवजा असून, त्यात कसलेही शिल्प नाही.

**लेणे क्र. १४** – रावण की खाई या नावाने हे प्रसिद्ध आहे. कारण, त्यात कैलासपर्वत हालविणाऱ्या रावणाचे शिल्प कोरलेले आहे. हे लेणे इ. स. च्या ७ व्या शतकाच्या उत्तरार्धात खोदले गेले असावे, असे अनुमान करता येते. याची रुंदी ५४' असून, खोली ८५' आहे. दर्शनी भागात चार स्तंभ आहेत. त्यांचा खालचा अर्धा भाग चौकोनी असून, वरच्या भागात पूर्णकलश व यक्ष-मूर्ती आहेत. त्यांच्या आत ५५' खोल सभामंडप असून, त्याच्या मध्यभागी एका चौकोनात बारा स्तंभ आहेत. दोन्ही बाजूंच्या भिंतीत जे अर्धस्तंभ आहेत, त्यांवर बरेच कोरीव काम केलेले आहे. या अर्धस्तंभांमुळे भिंतींचे जे भाग पडलेले आहेत, त्यांत निरनिराळ्या प्रसंगांची शिल्पे कोरलेली दिसतात. उत्तरेकडील भिंतीत पहिल्या खणात दुर्गादेवी हातात त्रिशूळ घेऊन व सिंहा-वर पाय ठेवून उभी आहे. दुसऱ्या खणात उत्फुल्ल कमलावर लक्ष्मी, बाजूला शंखचक्रधारी चतुर्भुज सेवक कुंभ घेऊन उभे व मस्तकी जलसिंचन करणारे दोन दोन हत्ती दोन्ही बाजूंना असे शिल्प आहे. तिसऱ्या खणात वराहरूपी विष्णूने स्त्रीरूपी पृथ्वीला सागरातून वर उचलले आहे, असे दृश्य दिसते. पुढच्या खणात श्रीदेवी व भूदेवी यांच्यासह विष्णूची मूर्ती आहे. शेवटच्या खणात विष्णु-लक्ष्मी यांची प्रतिमा मकरतोरणाखाली कोरलेली आहे. खालच्या बाजूला निरनिराळी वाद्ये घेतलेले सेवक आहेत.

त्यानंतर गाभारा लागतो. त्याच्या द्वाराजवळ दोन प्रचंड द्वारपाल उभे असून, एका बाजूला मकरावर गंगादेवी व कूर्मावर यमुनादेवी उभी दिसते. तिथेच आणखी काही स्त्रीमूर्ती व सेवक आहेत. गंगा-यमुनांच्या मूर्ती पुष्ट स्तन व विशाल नितंब यांमुळे ठसठशीत वाटतात. गाभाऱ्यात महिषासुरमर्दिनीची मूर्ती एका चबुतऱ्यावर उभी आहे. सभामंडपाच्या मागे गाभाऱ्या भोवती प्रदक्षिणापथ असून, त्यात उत्तरेच्या बाजूला भिंतीत उजव्या हाताला वीरभद्राची प्रतिमा आहे. त्यानंतर हंसवाहना ब्राह्मी, नंदीवाहना माहेश्वरी, मयूरवाहना कौमारी, गरुडवाहना वैष्णवी, वराहवाहना वाराही, गजवाहना इंद्राणी व घुबड-वाहना चामुंडा या सप्तमातृकांच्या मूर्ती आहेत. या सर्व मातृका-मूर्ती सुंदर अलंकारांनी सुशोभित असून, प्रत्येकीजवळ एक लहान बालक आहे.

सप्तमातृकांच्या नंतर भिंतीत गणपतीची मूर्ती असून, शेवटी काली व काल यांच्या प्रतिमा कोरलेल्या दिसतात. काल व काली यांचे देह अस्थिपंजर असून, डोळे बटबटीत व दात बाहेर आलेले असल्यामुळे त्या मूर्ती भयानक वाटतात.

प्रदक्षिणापथातून पुन्हा सभामंडपात आले, की दक्षिणेकडील भिंतीच्या पहिल्या खणात अंधकासुरवधाचा प्रसंग दिसतो. दुसऱ्यात रावणानुग्रहाचा प्रसंग कोरलेला आहे. कैलास पर्वता-वर शिवपार्वती बसली आहेत. रावण आपल्या सर्व हातांनी पर्वत उचलण्याचा प्रयत्न करीत आहे. पार्वती भयभीत झाली आहे, पण शिव शांत आहे. रावणाने आपली सर्व शक्ती एकवटून पर्वत उचलण्यासाठी पवित्रा घेतला आहे, हे स्पष्ट दिसते.

तिसऱ्या खणात तांडवनृत्य करणाऱ्या शिवाची सुंदर मूर्ती आहे. उजव्या बाजूला तीन डमरूधारी गण व भृंगी असून पाठीमागच्या बाजूला पार्वती आपल्या गणांसह दिसते. वरच्या बाजूला एका कोपऱ्यात ब्रह्मा व विष्णू आणि दुसऱ्या कोपऱ्यात इंद्र व अग्नी यांच्या प्रतिमा आहेत. पुढच्या खणात शिवपार्वती सोंगट्या खेळताना दिसतात. या शिल्पातील शिव सौम्य आणि पार्वतीचा अनुनय करताना दिसतो. बाजूला गणपती, भृंगी व सेवकसेविका असून, खालच्या बाजूला नंदी व खेळकर शिवगण दाखवले आहेत. शेवटच्या खणात महिषासुरमर्दिनीचे सुंदर शिल्प आहे.

**लेणे क्र. १५** – हे दशावतार लेणे या नावाने प्रसिद्ध आहे. याच्या समोर प्रशस्त प्रांगण असून, त्याच्या मध्यभागी एका लहानशा चौथऱ्यावर लहानसा मंडप उभा आहे. त्याचे स्तंभ

सुबक आहेत. त्यात एका जागी राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग याचा लेख कोरलेला आहे. तो इ. स. च्या आठव्या शतकातला आहे.

या मंडपाच्या भिंतीत जाळीदार गवाक्षे असून, त्याच्या बाजूला अनेक देवता, गंगा-यमुना, मंदिरांच्या प्रतिकृती, मिथुने अशा आकृती कोरलेल्या आहेत. मंडपाच्या वर चारही कोपऱ्यांवर ऐटबाज सिंहप्रतिमा आणि त्यांच्यामध्ये पक्ष्यांच्या प्रतिमा आहेत.

पश्चिमेकडील द्वाराच्या दोन्ही बाजूंना गंगा व यमुना यांच्या मूर्ती असून, खाली पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंना बसलेले हत्ती आहेत.

मंडपाच्या मागे दोन मजली मुख्य लेणे आहे. त्याच्या पायऱ्यांजवळ दोन गजमुखे कोरलेली आहेत. तळमजला म्हणजे एक ९५′ लांबीचे दालन असून, त्यात १४ साधे चौकोनी स्तंभ आहेत. मागच्या बाजूला दोन खोल्या आहेत. उत्तरेकडील कोपऱ्यात वर जाण्यासाठी जिना आहे. त्याचे दोन भाग असून, पहिला भाग संपल्यावर एक खिडकी आहे आणि तिथेच भिंतीत २′ उंचीचे ११ कोनाडे आहेत. त्यात गणपती, शिवपार्वती, सूर्य, शिवपार्वती-गणपती-नंदी, महिषासुरमर्दिनी, अर्धनारीश्वर, भवानी, गणेश, उमा, अर्धनारीश्वर व काली यांच्या सुबक मूर्ती दिसतात. जिन्याचा दुसरा भाग उलट दिशेने वर जातो. दुसऱ्या मजल्यावरील दालनात ४४ स्तंभ आहेत. सहा स्तंभांच्या सात रांगा आणि त्यांच्या मागे अंतराळाचे दोन स्तंभ. त्यानंतर गाभारा लागतो. त्यात एक भग्न शिवलिंग आहे. गाभारा धरून दालनाची खोली १०९′ आहे. दर्शनी सहा स्तंभांवर कोरीव काम चांगले आहे. बाकीचे स्तंभ साधेच पण भव्य आहेत.

दालनाच्या दोन्ही बाजूंच्या भिंतीत अर्धस्तंभ असून, त्यांच्या मधील जागेत शैव आणि वैष्णव शिल्पपट कोरलेले आहेत. उत्तरेकडील भिंतीत पहिला पट अंधकासुरवधाचा आहे. त्यातील अष्टभुज शिवाचे रूप अत्यंत भीषण दिसते. जवळच कालीचीही भयानक मूर्ती आहे. पार्वतीची मूर्ती मात्र सौम्य असून, ती विस्मित दृष्टीने शिवाचे रौद्र रूप पाहत आहे. दुसऱ्या खणात तांडवनृत्य करणाऱ्या शिवाची प्रतिमा आहे. तिसऱ्या खणात एका चौथऱ्यावर शिवलिंग दिसते. चौथ्या खणात शिव-पार्वती सोंगटचा खेळत आहेत. खालच्या बाजूला नंदी व शिवगण आहेत. वरच्या दोन्ही बाजूंना पुष्पमालाधारी गंधर्वमिथुने दिसतात. पाचव्या खणात कल्याणसुंदर म्हणजे शिवपार्वती-विवाहाचा प्रसंग अत्यंत सुरेख कोरलेला आहे.

सहाव्या खणात रावणानुग्रहप्रसंग आहे. पाठीमागच्या भिंतीवर मार्कंडेयाचे यमापासून संरक्षण करणाऱ्या शिवाची मूर्ती आहे. या शिल्पपटात शिवाचा आवेश सुंदर रीतीने दाखविला आहे. दुसऱ्या खणात गंगावतरणाचा प्रसंग कोरलेला आहे. अंतराळात डाव्या बाजूला भिंतीत गणपतीची भव्य मूर्ती आहे. गर्भगृहाच्या द्वाराच्या दोन्ही बाजूंना द्वारपाल, एका बाजूला गजलक्ष्मी व दुसऱ्या बाजूला सरस्वती आहेत. द्वारपाल भव्य असून कमलावर उभे आहेत. अंतराळात उजव्या बाजूच्या भिंतीवर मयूरारूढ कार्तिकेयाची मूर्ती आहे. अंतराळातील स्तंभावर मिथुने आहेत. अंतराळातून बाहेर आल्यावर पाठीमागच्या भिंतीवर एका खणात लिंगोद्भवमूर्ती व दुसऱ्या खणात त्रिपुरांतक शिवाची रथारूढ मूर्ती आहे. स्वतः ब्रह्मदेव त्या रथाचे सारथ्य करीत आहे.

उजव्या बाजूच्या भिंतीवर पहिल्या खणात श्रीकृष्णाने गोवर्धनोद्धार केला, तो प्रसंग कोरलेला आहे. दुसऱ्या खणात शेषशायी विष्णूचे सुंदर शिल्प आहे. तिसऱ्या खणात गजेंद्रमोक्षाची कथा आहे. त्या शिल्पात विष्णू गरुडावर बसलेला दिसतो. चौथ्या खणात गाभारा असून, त्यात शिवलिंग आहे. पाचव्या खणात वराहरूपी विष्णू पृथ्वीचा उद्धार करीत आहे, हे शिल्प दिसते. सहाव्या खणात विष्णूचा वामनावतार आणि बळीला पाताळात दाबण्यासाठी घेतलेले त्रिविक्रमाचे रूप हा शिल्पपट दिसतो. या पटाची रचना अत्यंत समतोल व सुंदर वाटते. दर्शनी सोप्याच्या बाजूच्या खणात हिरण्यकशिपुवधाचे अप्रतिम शिल्प आहे. त्यातील नृसिंहाचा आवेश स्पष्ट दिसून येतो. या शिल्पात नृसिंहाचे मुख सिंहाचे नसून मानवी आहे.

मंडपाच्या मध्यभागी गर्भगृहासमोर नंदीची एक सुटी मूर्ती आहे. दर्शनी स्तंभाच्या बाहेरच्या अंगाला दोन्ही बाजूंना द्वारपालांच्या प्रचंड प्रतिमा आहेत.

प्रांगणात दक्षिण बाजूला एक मोठे पाण्याचे टाके आहे व उत्तरेकडील भिंतीत दरवाज्याजवळ एक लेणे आहे. हे इ. स. च्या १० व्या शतकानंतर कोरलेले असावे. त्यातील गर्भगृहात शिवलिंग व त्यामागे त्रिमुख महेशमूर्ती उठावाने कोरलेली दिसते. उत्तरेकडील भिंतीत आणखी एक दालन आहे. त्याच्या तीन्ही बाजूंच्या भिंतीत दोन दोन खोल्या आहेत.

**लेणे क्र. १६** – हे लेणे कैलास या नावाने जगद्विख्यात आहे. हे शिवमंदिर इ. स. च्या ८ व्या शतकात राष्ट्रकूट राजा कृष्ण (पहिला) याच्या राजवटीत खोदलेले आहे. गिरिशिल्पात हे अद्वितीय आहे. याचे अद्भुत शिल्पसौंदर्य पाहणाऱ्याला विस्मित करते. भक्ती, श्रद्धा, दिव्यत्व आणि भव्यत्व या सर्वांचे ते प्रतीकच वाटते.

हे संपूर्ण मंदिर एकाच खडकात खोदलेले असले तरी, डोंगरापासून वेगळे केलेले आहे. त्याच्या भोवती २७६′ लांब व १५४′ रुंद असा प्राकार असून, मागील बाजूला १०७′ उंचीचा पहाड उभा दिसतो. प्राकाराभोवती पाषाणाची नैसर्गिक भित असून, दर्शनी भिंतीत अर्धस्तंभांनी विभागलेली देवकोष्टे आहेत. त्यात दिक्पाल, शिव, विष्णू, इंद्र-इंद्राणी, महिषासुरमर्दिनी,

नृसिंह, वराह, त्रिविक्रम, ब्रह्मा, इ. देवतांची भव्य शिल्पे आहेत. प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूंना गंगा व यमुना यांच्या मूर्ती कोरलेल्या असून, खालच्या भागात हत्ती, सिंह वगैरे पशूंच्या रांगा दिसतात.

प्रवेशद्वार गोपुरासारखे भव्य असून, त्याच्या भिंतीवरही गोवर्धनोद्धार, दिक्पाल इ. शिल्पे कोरलेली आहेत. आत शिरताच त्या भिंतीतच दोन दालने खोदलेली दिसतात. त्यांच्या दर्शनी भागात पूर्णघटयुक्त स्तंभ आहेत. या भिंतीतील प्रवेशमार्गातून प्रांगणात जाण्यापूर्वी दोन्ही बाजूंना शंखनिधी व पद्मनिधी यांच्या मूर्ती भिंतीत कोरलेल्या दिसतात.

प्रांगणात प्रवेश करताच समोर गजलक्ष्मीची सुंदर मूर्ती दिसते. एका सरोवरातील कमळावर लक्ष्मी बसलेली असून, बाजूला हत्ती, वरती गंधर्वमिथुने व छत्र आणि दोन्ही बाजूंना अर्धस्तंभ व द्वारपाल आहेत. लक्ष्मीसमोरील प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूंच्या भिंतीत देवकोष्ठात गणपती व महिषासुरमर्दिनी यांची शिल्पे आहेत. प्रांगणात दोन्ही बाजूंना दोन दगडी हत्ती दिसतात.

गजलक्ष्मीचे दर्शन घेऊन डाव्या बाजूला वळल्यावर गंगा, यमुना व सरस्वती या नद्यांचे मंदिर दिसते. ते एका उंच जोत्यावर असून, दर्शनी भागातील दोन स्तंभांमुळे त्याचे तीन खण झालेले आहेत. आतील भिंतीच्या तीन खणांत तीन कोनाडे आहेत. दोन्ही बाजूंना गोल स्तंभ, त्यावर वेलबुट्टीयुक्त तोरण, त्यावर मकरमुख आणि त्या तोरणाखाली नदीदेवता उभी अशी ही रचना आहे. एका खणात कमळावर उभी सरस्वती, मधल्या खणात मकरावर उभी गंगा व उजव्या बाजूच्या खणात कूर्मारूढ यमुना आहे. पल्लव शिल्पशैलीच्या या मूर्ती अत्यंत कमनीय वाटतात.



कैलास लेणे—एक विहंगम दृश्य

त्यानंतर पूर्वेकडे वळून काही पायऱ्या चढून गेले, की विस्तीर्ण प्रांगण लागते. त्या प्रांगणात गजलक्ष्मीच्या मागे दुमजली नंदीमंडप असून, त्याच्या मागे १६४′ लांब व १०९′ रुंद अन् सुमारे २०′ उंच चौथरा आहे. त्या चौथऱ्यावर मुख्य मंदिर

उभे आहे. चौथऱ्याच्या भिंतींवर हत्ती व सिंह यांच्या प्रचंड आकृती ओळीने कोरलेल्या आहेत. त्यांच्या पाठीवरच मंदिर आधारलेले आहे, असे भासते.

नंदीमंडपाच्या दोन्ही बाजूंना दोन उंच ध्वजस्तंभ आहेत. त्या स्तंभांवर शिवाचे त्रिशूळ होते. ते धरून स्तंभाची उंची सुमारे ५०' होती. मुख्य मंदिराची प्रांगणाच्या तळापासूनची उंची ९६' आहे. मंदिराचे विमान द्रविड पद्धतीचे त्रितल म्हणजे तीन मजली असून, त्यावर कळस आहे. गर्भगृहाच्या पुढे अंतराळ व त्यापुढे मोठा सभामंडप आहे. त्या सभामंडपात चारही कोपऱ्यांत चार चार स्तंभ आहेत आणि भोवती भित आहे. सभामंडपाला तीन्ही बाजूंना छोटे प्रवेशमंडप आहेत. त्यांतील अग्रमंडपापासून नंदीमंडपाकडे जाण्यासाठी पूल आहे आणि त्याच्या दोन्ही बाजूंना सोपान आहेत.

नंदीमंडपाच्या उत्तर बाजूच्या भिंतीवर मध्ये नटराज शिवाची मूर्ती व त्याच्या दोन्ही बाजूंना हरिहर व अर्धनारीश्वर यांची शिल्पे आहेत. नंदीमंडप व चौथरा यांच्यामध्ये समोरासमोर दोन उत्कृष्ट शिल्पपट आहेत. नंदीमंडपाच्या भिंतीवर अंधकासुरवधाचा प्रसंग असून, समोरच्या भिंतींवर महायोगी शिवाची मूर्ती आहे. त्या मूर्तीच्या बाजूला वरुण, वायू, इंद्र, यम, ईशान, महेश्वर, कुबेर, अग्नी, यांच्या प्रतिमा कोरलेल्या दिसतात. नंदीमंडपाच्या उत्तरेकडील सोपान चढून वर जाताना बाजूच्या भिंतीवर एक शिल्पपट आहे व त्यात रावण कैलास पर्वत हालविण्याचा प्रयत्न करीत आहे. दक्षिणेकडील पायऱ्या चढून जाताना बाजूच्या भिंतीवर ब्रह्मा, विष्णू व शिव यांच्या मूर्ती आहेत. नंदीमंडपाच्या दक्षिण बाजूच्या भिंतीवर नरसिंह व हिरण्यकशिपू यांचे युद्ध दाखवलेले आहे.



शिव महायोगी—कैलास लेणे, वेरूळ

दक्षिणेकडील सोपानाच्या खालच्या भिंतीवर रामायणातील काही प्रसंग आणि उत्तरेकडील सोपानाच्या खालच्या भिंतीवर महाभारतातील प्रसंग कोरलेले दिसतात. अग्रमंडपाच्या दोन्ही बाजूंना दोन शिल्पपट, त्यानंतर सुंदर जाळी आणि पुन्हा पुढे आलेल्या कोनाड्यात देवतांच्या मूर्ती आहेत. उजव्या बाजूला लिंगोद्भव शिवाचा शिल्पपट व ब्रह्मदेवाची मूर्ती आणि डाव्या बाजूला गंगाधर शिव आणि मार्कंडेयरक्षण या मूर्ती आहेत. या मंडपाच्या छतावर सुंदर चित्रे आहेत. सभामंडपाच्या प्रवेशद्वाराजवळ दोन भव्य द्वारपाल गदांच्या आधाराने उभे आहेत.

सभामंडप ५७' रुंद व ५५' खोल आहे. त्यात प्रत्येक कोपऱ्यात चार, असे सोळा स्तंभ व सोळा अर्धस्तंभ असून, त्यांवर समुद्रमंथन, नरसिंहअवतार, इ. पौराणिक प्रसंग कोरलेले दिसतात. छतावर मध्यभागी नटराज शिवाची सुंदर मूर्ती आहे. या छतावरही रंगीत चित्रे होती. म्हणून त्या मंडपाला रंगमहाल म्हणत.

अंतराळात उजव्या बाजूला नंदीवर आरूढ शिव-पार्वती-स्कंद असा शिल्पपट आहे. त्यात खाली शिवगण दिसतात. दुसऱ्या बाजूला शिव-पार्वती सोंगट्या खेळत आहेत. अंतराळाच्या छतावर अन्नपूर्णेची मूर्ती असून, तिच्या दोन्ही बाजूंना ब्रह्मा व विष्णू आणि चारही बाजूंना गंधर्व आहेत.

गर्भगृहाच्या प्रवेशद्वाराच्या उजव्या बाजूला यमुना व डाव्या

बाजूला गंगा दिसते. पण त्यांची मुखे भग्न झाली आहेत. गर्भगृहात शिवलिंग असून, छतावर अष्टदल कमळ कोरलेले आहे.

सभामंडपाच्या उत्तरेकडे व दक्षिणेकडे जे प्रवेशमंडप आहेत त्यांत प्रवेशद्वारे असून, त्यांच्या दोन्ही बाजूंना द्वारपाल आणि भिंतीत बाहेरच्या बाजूला शिल्पपट आहेत. उत्तरेकडील भिंतीत अंधकासुरवध, महिषासुरमर्दिनी, जाळीदार खिडक्या आणि कोनाड्यात शिव व विष्णू यांच्या मूर्ती आहेत. दक्षिणेकडील भिंतीत जटायुवध, वाली-सुग्रीवयुद्ध व नरसिंह-हिरण्यकशिपुयुद्ध हे शिल्पपट आहेत. एका कोनाड्यात लकुलीशाची मूर्ती आहे.



रावण-जटायू-युद्ध, कैलास लेणे, वेरूळ

सभामंडपाच्या दोन्ही मागील कोपऱ्यांतील द्वारांतून बाहेर गेले, की गर्भगृहाभोवती असलेला रुंद ओटा लागतो. गर्भगृहाच्या बाहेरील भिंतीवर व विमानावर देवकोष्ठांमध्ये शिवमूर्ती व अनेक सुंदर शिल्पे आहेत. त्यांतील अंतराळात उडणाऱ्या गंधर्वांच्या मूर्ती अत्यंत सुरेख व सजीव वाटतात. शिवाच्या नृत्यमूर्ती व अर्धनारीश्वर मूर्तीही विशेष उल्लेखनीय आहेत.

मुख्य मंदिराच्या दोन्ही बाजूंना, गर्भगृहाच्या ओळीत, चौथ्याच्या कडेला दोन उपमंदिरे आहेत; त्यावर शालशिखरे आहेत. तसेच एक मंदिर गर्भगृहाच्या पाठीमागे मध्यभागी आहे आणि दोन्ही कोपऱ्यांत मुख्य मंदिराप्रमाणेच शिखर असलेली दोन मंदिरे आहेत. मात्र या पाच मंदिरांत कोणत्याही देवता नाहीत.

हे लेणे राष्ट्रकूट सम्राज्ञी माणिकावती हिने निर्माण करविल्यामुळे, त्यातील शिवाला माणिकेश्वर हे नाव मिळाले, असे वेरूळच्या परिसरात प्रचलित असलेल्या एका लोककथेवरून कळते. गणेशपुराणावरील संजीवनी टीका लिहिणारा यदुमाणिक हा वेरूळच्या या माणिकेश्वर शिवाचा भक्त होता. शिवाच्या या नावावरून कैलास लेण्याला माणिकेश्वर लेणेही म्हणता येईल, असे श्री. रा. चिं. ढेरे यांनी प्रतिपादले आहे (मराठी संशोधन पत्रिका, एप्रिल १९६०).

विमानावरच्या शेवटच्या तलावर चारी कोपऱ्यात चार बसलेले नंदी आहेत. सभामंडपावर अनेक शिखरे असून, मधल्या शिखरावर चार सिंह आहेत. अग्रमंडपावरही शिखर व त्यावर दोन सिंह आहेत. नंदीमंडप व त्याच्या समोरचे गोपुर यांवरही शिखरे, मूर्तिपट व गंधर्वमिथुने दिसतात.

मुख्य मंदिराच्या दक्षिणेकडे अलिंदाच्या खाली कैलास हलविण्याचा प्रयास करणाऱ्या रावणाचा उत्कृष्ट शिल्पपट आहे. असे शिल्पपट वेरूळच्या लेण्यात अनेक जागी आढळतात. त्यांतला हा सर्वांत सुरेख वाटतो.

मुख्य मंदिराच्या भोवती सुमारे तीस फूट रुंदीचे प्रांगण असून, त्याच्या भोवतालच्या तीन्ही बाजूंच्या भिंतीमधील अर्ध-स्तंभामुळे जे खण पडले आहेत, त्यांतही सुंदर शिल्पपट आहेत. उत्तरेकडून या प्रदक्षिणापथात प्रवेश केला, तर पहिल्या खणात रावण आपली शिरकमले शिवलिंगाला वाहत आहे, असे दृश्य दिसते. रावणाच्या मुखावर श्रद्धा, भक्ती व कृतार्थता हे भाव स्पष्ट दिसून येतात. या बाजूला बारा खण असून, त्यांतील बहुतेक खणांत शिवपार्वतीची निरनिराळ्या प्रकारची शिल्पे आहेत. शेवटच्या खणात मार्कंडेयाचे यमापासून रक्षण हा प्रसंग आहे.

मंदिराच्या पाठीमागच्या भिंतीत १९ खण असून, त्यांतील पहिल्या खणात शिवपार्वतीविवाहाचे शिल्प आहे. दुसऱ्या खणात अंधकासुरवध करणारा शिव, तिसऱ्यात त्रिपुरांतक शिव, चौथ्यात शिवपार्वतींची आलिंगनमूर्ती, त्यानंतर अनुक्रमे चतुर्भुज शिव, लिंगोद्भवमूर्ती, गंगाधर शिव, हरिहर, विष्णु, शिव, ब्रह्मा, शिव, त्रिनेत्र शिव, भिक्षाटन मूर्ती, नटराज शिव, त्यानंतर शिव व शिव-पार्वती अशा मूर्ती दिसतात. त्यानंतर दक्षिणेकडील भिंतीत १२ खण असून, पहिल्या खणात अर्धनारी-

श्वर, दुसऱ्यात चतुर्भुज शिव, तिसऱ्यात गोकर्ण महाबळेश्वर येथे जमिनीवरील शिवलिंग उचलण्याचा प्रयास करीत असलेला रावण, त्यानंतर हिरण्यकशिपु-नृसिंह, शेषशायी विष्णू, गोवर्धनधारी कृष्ण, त्रिविक्रम, गरुडारूढ विष्णू, पृथ्वीचा उद्धार करणारा वराहरूपी विष्णू, कालियामर्दन, शंखचक्रगदाधारी चतुर्भुज विष्णू – यात गदेची मूर्ती आहे व गरुडही दिसतो. शेवटच्या खणात अन्नपूर्णेची सुंदर मूर्ती आहे. तिच्या दोन हातांत कणीस व कमंडलू, एका हातात अक्षमाला व एक हात वरद मुद्रेत आहे.

उत्तरेकडील भिंतीत नदीदेवतांच्या मंदिराजवळ एका स्तंभयुक्त दालनात गजलक्ष्मीचा शिल्पपट असून, तिथेच वरच्या लेण्यात जाण्यासाठी सोपान आहे. प्रथम एक मंडप लागतो, त्यात सत्तावीस स्तंभ व काही अर्धस्तंभ आहेत. ते स्तंभ बुटके व खूप जाड असून, काही स्तंभांवर मध्यभागी पूर्णघट कोरलेले दिसतात. मंडपाच्या पूर्वेला अंतराल व गर्भगृह असून, गर्भगृहाभोवती प्रदक्षिणापथ आहे. गर्भगृहाच्या प्रवेशद्वारी गंगा व यमुना यांच्या मूर्ती असून, गर्भगृहात भग्न योनिपट आहे. मागच्या भिंतीत त्रिमुख शिवाचे शिल्प दिसते.

मंडपाच्या समोर नंदी असून, त्याच्या दोन्ही बाजूंना द्वारपाल उभे आहेत. मंडपाच्या उत्तर बाजूच्या भिंतीत, अर्धस्तंभामुळे बनलेल्या खणात गणपती, नृसिंह – हिरण्यकशिपू, मधल्या खणात हंस, वृषभ, गरुड या वाहनांवर आरूढ ब्रह्मा, शिव व विष्णू, नंतरच्या खणात पंचाग्निसाधन करणारी उमा आणि शेवटच्या खणात पृथ्वीचा उद्धार करणारा वराह ही शिल्पे आहेत. पाठीमागच्या भिंतीत सूर्यनारायणाची मूर्ती कोरलेली आहे. प्रदक्षिणापथाच्या एका टोकाला शिवपार्वती सारीपाट खेळताना दिसतात व दुसऱ्या टोकाला शिवपार्वती व खाली रावण असे शिल्प आहे. दक्षिणेकडील खणात पश्चिमाभिमुख असे, प्रत्यालीढ अवस्थेत तांडव नृत्य करणाऱ्या शिवाचे शिल्प दिसते. नृत्याचा आवेश व आनंद या शिल्पात स्पष्ट दिसून येतो. यानंतर कडेच्या प्रत्येक खांबावर सुंदर शिल्प कोरलेले आहे. त्यातील गंगाधर शिव, अर्धनारीश्वर व महिषासुरमर्दिनी ही शिल्पे विशेष चांगली आहेत. या मंडपाच्या छतावर मध्यभागी कमलामध्ये नटराज शिवाची सुंदर मूर्ती कोरलेली आहे. स्तंभ व स्तंभशीर्षे यामध्ये शालभंजिका आहेत. छतावर सुंदर चित्रे रंगविलेली होती. नंदीमंडपातील चित्रे अजून दिसतात. त्यात शिवपार्वती आहेत.

प्राकाराच्या दक्षिणेकडील भिंतीतही दुसऱ्या मजल्यावर एक लेणे असून, त्यात सप्तमातृकांचे मंदिर आहे. त्यात सप्तमातृकांच्या मूर्ती वाहनांसह संपूर्ण कोरलेल्या आहेत. त्यांच्या बाजूंना वीरभद्र व गणपती आहेत. पूर्वेकडील भिंतीत चवरीधारी सेविकेसह सुंदर स्त्रीचे डौलदार शिल्प आहे. ही राष्ट्रकूट वंशातील राणी असावी व तिनेच हे मंदिर कोरविलेले असावे. पश्चिमेकडील भिंतीत विक्राळ कालाची मूर्ती व दुर्गेच्या दोन प्रतिमा आहेत. या मंदिरात दोन यज्ञकुंडे कोरलेली आहेत, म्हणून याला यज्ञशाळा म्हणतात. या लेण्याच्या समोरच मुख्य मंदिराच्या चौथऱ्याच्या भिंतीत रावणानुग्रहाचे शिल्प आहे.

कैलास लेण्याच्या उत्तरेला एक लहान जलप्रपात असून, त्याच्या जवळ दोन लेणी आहेत. त्यांत दर्शनी स्तंभ, लहान मंडप, द्वारपाल, गंगा-यमुना व गर्भगृह असून, एका लेण्यातील गर्भगृहात त्रिमुख महेशाची मूर्ती मागील भिंतीवर कोरलेली आहे. या लेण्याच्या खालीही एक लहानसे लेणे असून, त्यात सप्तमातृकांचा शिल्पपट आहे. त्यात मातृकांच्या उभ्या मूर्ती आहेत. हे खालचे लेणे इ. स. ७ व्या किंवा ८ व्या शतकातले असावे. मात्र वरची दोन लेणी इ. स. च्या १०व्या शतकातली वाटतात. डोंगराच्या माथ्याजवळ आणखीही काही लेणी आहेत.

**लेणे क्र. १७** – हे कैलास लेण्याच्या उत्तरेला जलप्रपातापासून सुमारे ३०० फुटांवर आहे. एका लहान प्रांगणात उंच चौथऱ्यावर प्रथम प्रवेशमंडप लागतो. त्याच्या भोवती तीन्ही बाजूंना स्तंभांवर आधारित ओवरी आहे. अग्रमंडपाचे व ओवरीचे छत तुटलेले आहे. अग्रमंडपाच्या दोन्ही बाजूंना शिल्पपट आहेत. उजव्या बाजूच्या शिल्पपटात कमलाधिष्ठित ब्रह्मा व समोरच्या बाजूला विष्णूची मूर्ती आहे. सभामंडपात बारा स्तंभ आहेत. हे स्तंभ खूप जाड व उंचीला कमी असून, मधल्या खणातील बाजूचे स्तंभ शिल्पयुक्त आहेत. त्यावर गंधर्व, शालभंजिका, वाद्यवादक, इ. अनेक सुंदर मूर्ती दिसतात. गर्भगृहाजवळचे स्तंभही सुशोभित असून, त्यांच्या खालच्या भागात कोनाड्यात देवतांच्या सुंदर मूर्ती आहेत. प्रत्येक भागातील देवकोष्ठात कमलधारी देवता दिसतात.

गर्भगृहात उंच योनिपटात शिवलिंग आहे. प्रवेशद्वारात भव्य द्वारपाल आहेत. गर्भगृहाभोवती प्रदक्षिणापथ आहे. या लेण्यात पहिल्या खणात बाजूच्या भिंतीत समोरासमोर गणेश व महिषासुरमर्दिनी यांची सुंदर शिल्पे आहेत.

**लेणे क्र. १८** – याच्या दर्शनी भागात चार स्तंभ असून, गाभाऱ्यात शिवलिंग आहे. यात इतर कोणतेही शिल्प नाही.

**लेणे क्र. १९** – प्रदक्षिणापथयुक्त गर्भगृह, सोळा स्तंभांचा सभामंडप व अग्रमंडप अशी याची रचना आहे. सभामंडपाच्या पुढच्या तुळईवर मध्यभागी लकुलीश शिवाची मूर्ती आहे.

**लेणे क्र. १९ अ** – हे लेणे बौद्ध विहारासारखे असून, अग्रमंडपाच्या दोन्ही बाजूंना दोन लहान खोल्या आहेत. दर्शनी चार

स्तंभ असून, लेण्यात प्रवेश करण्यासाठी तीन दरवाजे आहेत. आत स्तंभरहित मंडप असून, बाजूच्या भिंतीत खोल्या खोदण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. लेण्याच्या दर्शनी भागात उत्तरेला कुबेराची मूर्ती आहे. ती बौद्ध लेण्यातील जंभलासारखीच दिसते. हे मूळचे बौद्ध लेणे असावे.

**लेणे क्र. २०** – हे एका उंच चौथऱ्यावर असून, चौथऱ्याच्या दोन्ही बाजूंना दोन सोपान आहेत. त्यांच्या बाहेरच्या कठड्यावर हत्तीची सोंड व पाय दिसतात. चौथऱ्याच्या मध्य भागावर अनेक शिवगणांच्या आकृती कोरलेल्या आहेत. या चौथऱ्यावर पुन्हा एक चौथरा असून, पायऱ्या चढून लेण्याच्या प्रांगणात गेल्यावर नंदीचा चबुतरा मध्यभागी दिसतो. प्रांगणाच्या बाजूच्या भिंतींत उजव्या बाजूला महिषासुरमर्दिनीची व डाव्या बाजूला गणपतीची मूर्ती दिसते. लेण्यात प्रदक्षिणापथयुक्त गर्भगृह असून, त्याच्या द्वाराशी भव्य द्वारपाल आहेत.

**लेणे क्र. २१** – हे रामेश्वर या नावाने प्रसिद्ध आहे. याच्या विस्तीर्ण प्रांगणात उंच चौथऱ्यावर नंदी असून, प्रांगणाच्या दोन्ही बाजूंच्या भिंतीत द्विस्तंभाधारित मंडप आहेत. उत्तरेकडील मंडपात गणेशमूर्ती व दक्षिणेकडील मंडपात कार्तिकेयाची मूर्ती आहे. मुख्य लेण्याच्या दर्शनी भागात शालभंजिकायुक्त व पूर्ण घटयुक्त चार स्तंभ असून, दोन्ही बाजूंना अर्धस्तंभ आहेत. मधले रुंद प्रवेशद्वार सोडून बाजूच्या स्तंभांना जोडणारा सुंदर कठडा आहे. त्या कठड्यावर हत्तींची रांग व त्यावर प्रत्येक बाजूला सात याप्रमाणे सुंदर मिथुने दिसतात. या कठड्याला लागून बाजूच्या भिंतीत उत्तरेला गंगा व दक्षिणेला यमुना यांच्या सुंदर मूर्ती आहेत. दर्शनी स्तंभाच्या वर वेलबुट्टीयुक्त कोनाड्यात नृत्य करणारे शिवगण आणि प्रवेशद्वारावर लकुलीश शिवाची मूर्ती दिसते.

सभामंडपाच्या दोन्ही बाजूंना जरा उंच जोत्यावर दोन लहान दालने असून, त्यांत सुंदर शिल्पपट आहेत. उत्तरेकडील दालनात समोरील भिंतीवर तीन भागांत शिव-पार्वती विवाहाची कथा साकार केलेली आहे. बाजूच्या भिंतीवर महिषासुरमर्दिनी व कार्तिकेय यांचे शिल्पपट आहेत. या दालनाला लागून, अंतरालाच्या बाजूला पश्चिमाभिमुख रावणानुग्रह – शिवाचा शिल्पपट आहे. दक्षिणेकडील दालनात समोरच्या भिंतीत वीणाधर शिव, सप्तमातृका व गणेश यांच्या मूर्ती असून, बाजूच्या भिंतीत नटराज शिव, काल-काली यांचे शिल्पपट समोरासमोर आहेत. हे दोन्ही शिल्पपट फार सुंदर आहेत. या दालनाला जोडून पश्चिमाभिमुख भिंतीवर शिव-पार्वती सारीपाट खेळताना दिसतात.

मुख्य मंडपाच्या मधोमध दोन स्तंभांचे अंतराल व त्यामागे गर्भगृह आहे. गर्भगृहात उंच चबुतऱ्यावर शिवलिंग आहे. द्वाराशी प्रचंड द्वारपाल आहेत. प्रवेशद्वाराची चौकट व अं[illegible]रालातील स्तंभ सुशोभित आहेत. द्वारपालाच्या जवळ दोन से[illegible] उभे आहेत. त्यांच्या मूर्तीही सुंदर आहेत.

**लेणे क्र. २२** – याला नीळकंठ लेणे असे म्हणतात. या[illegible] प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूंना जाड भिंती असून, त्यान[illegible] ४२'×४२' लांबी-रुंदीचे प्रांगण लागते. प्रांगणाच्या मध्यभा[illegible] उंच चबुतऱ्यावर नंदीमंडप आहे. प्रांगणाच्या उजव्या बाजू[illegible] एक मंडप असून, त्यात वीरभद्र, सप्तमातृका, गणेश व [illegible] यांची शिल्पे आहेत. त्यांतील ब्रह्माणी त्रिमुख व वाराही वरा[illegible]मुख आहे.

मुख्य लेणे प्रांगणापेक्षा खूप उंच अशा चौथऱ्यावर अ[illegible] समोर साधे चौकोनी स्तंभ आहेत. लेण्यांच्या दोन्ही बाजू[illegible] खडक फोडून केलेल्या मोठ्या खोबणीत दोन द्वारपाल दिसत[illegible] ते गदेवर हात ठेवून डौलाने उभे आहेत. मधल्या मंडपात [illegible] स्तंभ आहेत व दोन्ही बाजूंना उंच जोत्यावर अरुंद मंडप आहे[illegible] अंतरालामध्ये बाजूच्या भिंतीत गणेश व कार्तिकेय यांच्या मू[illegible] समोरासमोर असून, मागच्या भिंतीत गजलक्ष्मी व दुसरी [illegible] देवी आहे. गर्भगृहात शाळुंका व शिवलिंग आहे. त्या लिंगा[illegible] निळ्या रेघा असल्यामुळे त्याला नीळकंठ हे नाव देण्यात [illegible] आहे.

**लेणे क्र. २३** – हे अगदी साधे आहे.

**लेणे क्र. २४** – यात चार शिवमंदिरे आहेत; पण [illegible] शिवलिंगे नाहीत. उरलेल्या शाळुंका तेलाच्या घाणीसार[illegible] दिसतात, म्हणून या लेण्याला तेली का घाना म्हणतात. [illegible] गणपती व शिव यांच्या लहान मूर्ती आहेत.

**लेणे क्र. २५** – याला कुंभारवाडा म्हणतात. याच्या प्रांग[illegible] एक सोपान असून, त्याच्या दर्शनी भागात गजलक्ष्मी आहे. [illegible] लेणे खूप मोठे आहे; पण त्याचे दर्शनी खांब पडून गेले आहे[illegible] आतील विस्तीर्ण मंडपाच्या उजव्या कोपऱ्यात कुबेराचे [illegible] शिल्प आहे. अंतराळातील स्तंभ चौकोनी असून, आतील स्तं[illegible] वर शालभंजिका दिसतात. मधल्या चौकोनातील छतावर [illegible] लक्ष्मी असून, गाभाऱ्याजवळच्या छतावर रथारूढ सूर्यप्रति[illegible] उठावाने कोरलेली आहे. गर्भगृहाच्या दोन्ही बाजूंना खड्गधा[illegible] द्वारपाल आहेत. गर्भगृहात नुसता चबुतराच आहे. त्यावर [illegible] नाही. हे सूर्यमंदिर असावे.

**लेणे क्र. २६** – या भव्य लेण्याच्या दर्शनी भागात चार स्तं[illegible] दोन अर्धस्तंभ आहेत. प्रवेशद्वाराजवळ दोन गजमुखे कोरले[illegible] दिसतात. स्तंभशीर्षात घटपल्लवाची नक्षी आहे. मधल्या [illegible] नाच्या दोन्ही बाजूंना उंच जोत्यावर दोन मोकळे मंडप आहे[illegible] दालनाच्या मागे दोन स्तंभ व दोन अर्धस्तंभ असून, त्या[illegible]

अंतराळ आहे. अर्धस्तंभांच्या जवळ चवरीधारी सेविका असून, त्यांच्या जवळ एक ठेंगू पुरुष व दुसरी सेविका आहे. त्यानंतर गर्भगृह असून, त्याच्या भोवती प्रदक्षिणापथ आहे. प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूंना प्रचंड द्वारपाल आहेत. या लेण्याला जानवसा म्हणतात.

लेणे क्र. २७.– हे लेणे एका घळीच्या काठावर असून, त्याच्या वरून एक जलप्रपात कोसळत असतो. याला गौळणगुंफा म्हणतात. याचे पुढचे स्तंभ अष्टकोनी होते; पण त्यांतला एकच उरला आहे. त्यामागे लांब व अरुंद अग्रमंडप असून, त्याच्या मध्यभागी दरवाजा आहे. त्याच्या दोन्ही बाजूंना दोन दोन चौकोनी वातायने आहेत. दरवाज्याच्या उजव्या बाजूला बलराम, सुभद्रा व कृष्ण यांच्या मूर्ती आहेत. बाजूच्या भिंतीत शेषशायी नारायणाची ओबड-धोबड प्रतिमा आहे. दरवाज्याच्या डाव्या बाजूला ब्रह्मा, विष्णू व महेश यांच्या उभ्या प्रतिमा असून, बाजूच्या भिंतीत पृथ्वीचा उद्धार करणारा वराह आहे. डाव्या बाजूला दोन्ही खिडक्यांमध्ये महिषासुरमर्दिनीचे शिल्प आहे. आतील मंडपाच्या भिंतीत तीन खोल्या आहेत. अंतरालाच्या दर्शनी भागात दोन स्तंभ असून, गर्भगृहाच्या प्रवेशद्वाराजवळ कोनाड्यात द्वारपाल कोरलेले आहेत. गर्भगृहात नुसता चबुतरा आहे, मूर्ती नाही.

लेणे क्र. २८ – ज्या कड्यावरून जलप्रवाह खाली कोसळतो, त्याच्या खाली हे लहानसे लेणे आहे. याच्या प्रवेशद्वाराच्या बाजूंना गंगा व यमुना यांची शिल्पे होती. पण ती नष्ट झाली आहेत. आतील गर्भगृहाच्या द्वाराजवळ दोन द्वारपाल आहेत. गर्भगृहात एक योनिपट आहे. सभामंडपाच्या भिंतीवर अष्टभुजा देवीची मूर्ती आहे.

लेणे क्र. २९ – सीता की नहानी या नावाने हे लेणे प्रसिद्ध आहे. याची रुंदी १४८′, खोली १४९′ व उंची १७′ पेक्षा अधिक आहे. याच्या अग्रमंडपाच्या चौथऱ्यावर दोन भव्य सिंह आहेत. अग्रमंडपात उजव्या बाजूच्या भिंतीवर अंधकासुरवधाचा शिल्पपट आहे. त्यानंतर विस्तीर्ण सभामंडप लागतो. त्यात स्तंभांच्या सहा ओळी आहेत. त्यांच्या दोन्ही बाजूंना बाहेरच्या अंगाला पार्श्वमंडप आहेत. दक्षिणेकडील पार्श्वमंडपात समोरासमोर दोन उत्कृष्ट शिल्पपट आहेत. पूर्वेकडील भिंतीतला शिव-पार्वतीविवाहाचा प्रसंग फारच प्रेक्षणीय आहे. या बाजूच्या प्रांगणात सरस्वतीची मूर्ती आहे. समोरच्या भिंतीत शिव-पार्वती खेळताना दिसतात. हा शिल्पपटही सुरेख आहे. या पार्श्वमंडपातून एक सोपानमार्ग खाली जलप्रपाताकडे जातो.

उत्तरेकडील पार्श्वमंडपात समोरासमोर नटराज शिव आणि लकुलीश शिव यांच्या मूर्ती आहेत. उत्तरेकडील प्रांगणाच्या बाजूला कूर्मारूढ यमुनेची मूर्ती आहे.



सभामंडपात २६ भव्य स्तंभ आहेत. त्याच्या मागे गर्भगृह असून, त्याला चारही बाजूंना प्रवेशद्वारे आहेत. प्रत्येक द्वाराजवळ दोन द्वारपाल व सुंदर सेविका यांची भव्य शिल्पे आहेत. वर गंधर्वयुग्मे आहेत, ती अत्यंत सुरेख आहेत. आत एका चबुतऱ्यावर शिवलिंग आहे. या लेण्यात प्रकाश येण्यासाठी दोन्ही बाजूंच्या प्रांगणातील छत खोदून गवाक्षे केली आहेत.

या लेण्याला डुमार लेणे असेही म्हणतात. रामेश्वर, दशावतार, कैलास ही शैव लेणी असली तरी, त्यांत वैष्णव शिल्पे जागोजागी दिसून येतात. पण डुमार लेण्यात कुठेही विष्णू व लक्ष्मी यांची शिल्पे आढळत नाहीत.

रामेश्वर व डुमार ही लेणी विशेष प्रेक्षणीय वाटतात. त्यांच्यामधली नीलकंठ, तेली का घाना, कुंभारवाडा, जानवसा, गौळणगुंफा ही लेणी शिल्पकलेच्या दृष्टीने सामान्य असली तरी, पावसाळ्यात तिथे उत्पन्न होणारा धबधबा फारच आकर्षक आहे. रामेश्वर ते डुमार अशी अर्धवर्तुळाकार दरीच आहे. त्या दरीतील दरडीत ही लेणी खोदलेली आहेत.

क्र. १३ ते २९ या लेण्यांना ब्राह्मणी लेणी म्हणतात. इथून पुढे जैनांची लेणी लागतात. वेरूळ येथील जैनांची ही लेणी दिगंबरपंथी असून, त्यांत गोमटेश्वराची प्रतिमा वारंवार कोरलेली दिसते. या लेण्यातील तीर्थंकरांच्या मूर्ती शिल्पकलेच्या दृष्टीने महत्त्वाच्या नाहीत, कारण त्या एकाच प्रकारच्या व निर्जीव वाटतात. ब्राह्मणी लेण्यांतील शिल्पात दिसणारा जोम इथे दिसत नाही. बारीक नक्षीकाम मात्र चांगले आहे.



डुमार लेणे – प्रवेशद्वार

लेणे क्र. ३० – हे छोटा कैलास या नावाने प्रसिद्ध आहे, कारण त्याची रचना कैलास लेण्यासारखीच आहे. त्याचे आकारमान मात्र लहान आहे. १३०′ लांब व ८०′ रुंद अशा खोलगट जागेत हे द्रविड पद्धतीचे मंदिर डोंगरापासून वेगळे खोदून

काढलेले आहे. गर्भगृहात महावीराची मुख्य मूर्ती असून, बाजूच्या भिंतीत इतर तीर्थंकरांच्या प्रतिमा आहेत. उत्तरेकडील भिंतीत मात्र अष्टभुजा देवीची प्रतिमा आहे. सभामंडपात कैलास लेण्यातील स्तंभासारखेच सोळा स्तंभ आहेत. त्याच्या तीन्ही बाजूंना छोटे मंडप आहेत. सभामंडपाच्या छतावर रंगीत चित्रांचे अवशेष अजून दिसतात. अग्रमंडपात दोन्ही बाजूंना दोन प्रचंड द्वारपाल गदेवर रेलून उभे आहेत. सभामंडपाच्या बाजूला भिंतीत पार्श्वनाथ आदी तीर्थंकरांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत. गाभाऱ्याच्या दोन्ही बाजूंना आणि वर उपमंदिरे असून, 'त्यांतही तीर्थंकरांच्या विविध आसनांतील मूर्ती आहेत.

अग्रमंडपाच्या दोहो बाजूंना पाठीमागच्या भिंतीवर कपोताखाली यक्षाच्या नृत्यमूर्ती आहेत. त्या नटराज शिवाच्या नृत्यमूर्तीसारख्या वाटतात. सभामंडपाच्या भिंतीवर ठिकठिकाणी गंधर्वमिथुने कोरलेली आहेत.

गोपुराच्या दक्षिणेकडील भिंतीत तीर्थंकरांची शिल्पे असून, उत्तरेकडील भिंतीत ऋषभनाथाची यक्षिणी चक्रेश्वरी हिची प्रतिमा आहे. तिला बारा हात असून, त्यांत पद्म, शंख चक्र, गदा, इ. आयुधे आहेत. मात्र बरेच हात भग्न झालेले आहेत. खाली वाहन म्हणून गरुडाची आकृती कोरलेली दिसते. या मंदिरातील भिंतीवर आणि स्तंभावर नर्तक-नर्तिकांच्या सुबक मूर्ती असून, नक्षीकामही खूप कोरलेले आहे.

**लेणे क्र. ३० अ** – हे अपूर्ण आहे. अग्रमंडपात चार स्तंभ व मागील सभामंडपात १२ स्तंभ आहेत. त्यामागे गर्भगृह खोदण्याची कल्पना असावी. सभामंडपात मध्यभागी चतुर्भुज तीर्थंकराची प्रतिमा असून, छतावर कमल कोरलेले दिसते. लेण्याच्या जोत्यात पुढे आलेले हत्ती दिसतात.

**लेणे क्र. ३१** – हे लेणे लहान असून, त्यात चार बोजड स्तंभ आहेत. सभामंडपात उजव्या बाजूला गोमटेश्वराची कायोत्सर्ग मूर्ती व तिच्या समोर पार्श्वनाथाची कायोत्सर्ग मूर्ती आहे. गर्भगृहात ध्यानमुद्रेतील महावीराची मूर्ती असून, वर त्रिछत्र व बाजूला चामरधारी सेवक आहेत. गर्भगृहाच्या बाहेर डाव्या बाजूला हत्ती व मातंगाची वटवृक्षाखाली बसलेली मूर्ती असून, उजव्या बाजूला सिंहारूढ सिद्धायिकेची आम्रवृक्षाखाली प्रतिमा आहे. या दोन्ही प्रतिमा चांगल्या आहेत.

**लेणे क्र. ३२** – इथे लेण्यांचा एक समूह आहे. त्यात दोन दुमजली लेणी व एक एकमजली लेणे आणि काही उपासनामंदिरे आहेत. त्यांतील मुख्य लेण्याला इंद्रसभा म्हणतात. त्याच्या भोवती असलेल्या प्रांगणात प्रवेश करण्यासाठी दक्षिणेकडील भिंतीतून द्वार आहे.

प्रांगणात उजव्या बाजूला एका चबुतऱ्यावर मोठा हत्ती व डाव्या बाजूला एक स्तंभ आहे. या स्तंभाची उंची २७' असून माथ्यावर चतुर्मुख मूर्ती होती. प्रांगणाच्या मध्यभागी जे दुमजली लेणे आहे, तेच इंद्रसभा या नावाने प्रसिद्ध आहे. याच्या तळमजल्यात एक वीथिका असून, पडद्यासारख्या एका भिंतीमुळे तिचे दोन भाग झाले आहेत. मागे बारा स्तंभांचा मंडप आहे, पण तो अपूर्ण अवस्थेत आहे. वीथिकेच्या मागील स्तंभावर शांतिनाथाच्या दोन प्रचंड नग्न मूर्ती आहेत. एका मूर्तीखाली एक लेख कोरलेला आहे. तो इ. स. च्या १० व्या शतकातला असावा. मंडपाला जोडून असलेल्या गाभाऱ्यात महावीराची प्रतिमा आहे.

वीथिकेच्या पूर्वेकडील टोकाला एक सोपान आहे. तो अर्धा चढून गेले, की एक उपासनामंदिर आहे. त्यात सिंहासनावर महावीर, बाजूला पार्श्वनाथ व गोमटेश्वर, मागे इंद्र व इंद्राणी यांच्या मूर्ती आहेत.

सोपान चढून गेले, की अग्रमंडप लागतो. त्याच्या दोन्ही टोकांना समोरासमोर इंद्र व इंद्राणी यांच्या भव्य प्रतिमा आहेत. कैलास लेण्यातील गतिमानता इथे दिसत नाही. मात्र पुष्ट अवयव, बरेच अलंकार व विपुल नक्षीकाम यामुळे त्या प्रेक्षणीय आहेत. सभामंडपात बारा स्तंभ असून, तेही घटपल्लवांनी व नक्षीने सुशोभित केलेले आहेत. त्याच्या मध्यभागी चतुर्मुख तीर्थंकर असून, त्याच्यावर छतात कमल कोरलेले आहे. मागील भिंतीत गर्भगृह असून, त्याच्या दोन्ही बाजूंना पार्श्वनाथ व गोमटेश्वर यांचे शिल्पपट आहेत. सभामंडपात इतरत्र अनेक शिल्पे कोरलेली आहेत. गर्भगृहात महावीराची मूर्ती आहे.

सभामंडपाच्या दक्षिणेकडील व उत्तरेकडील कोपऱ्यांत बाजूच्या लेण्यांत जाण्याचा मार्ग आहे. पूर्वेकडील लेण्यात दर्शनी सोपा आणि आत चार चौकोनी स्तंभ आहेत. त्यात उजवीकडील कोनाड्यात गोमटेश्वराची व डावीकडे पार्श्वनाथाची मूर्ती आहे. सोप्याच्या एका टोकाला इंद्राची मूर्ती आणि प्रवेशद्वाराजवळ इंद्राणीची मूर्ती आहे. प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूंना द्वारपाल आहेत. छतावर रंगकामाचे अवशेष दिसतात. आतील मंदिरात महावीराची मूर्ती आहे.

प्रांगणाच्या पश्चिम बाजूला जे लेणे आहे, त्यात पुढे दोन खांब व मागे दोन खांब असलेला मंडप आहे. दक्षिणेकडील भिंतीत मध्यभागी पार्श्वनाथाची मूर्ती आहे. त्याच्या समोरच्या भिंतीत गोमटेश्वराची मूर्ती आहे. मागील भिंतीत इंद्र व इंद्राणी यांच्या मूर्ती आहेत. आतील गाभाऱ्यात सिंहासनावर त्रिछत्राखाली महावीर बसलेला आहे. या लेण्याच्या प्रवेशद्वारी चतुर्भुज देवीची मूर्ती आहे. तिच्या दोन हातांत चक्रे व एका हाती [illegible] आहे. डाव्या बाजूला मयूरावर अष्टभुजा देवी आहे.

या सर्व लेण्यांतील तीर्थंकरांच्या मूर्ती कायोत्सर्ग अवस्थेत म्हणजे उभ्या किंवा ध्यानावस्थेत कोरलेल्या आढळतात.

**लेणे क्र. ३३** – याला जगन्नाथसभा म्हणतात. हे दुमजली असून, तळमजल्यावर अग्रमंडपात दोन्ही बाजूंना इंद्र व इंद्राणी यांच्या उत्कृष्ट मूर्ती आहेत. त्यांतील वृक्षावरील पाने, फळे, पक्षी व इतर नक्षी अत्यंत सुरेख आहे. वरच्या मजल्यावर १२ स्तंभांचा सभामंडप असून, बाजूच्या भिंतीत तीर्थंकरांच्या प्रतिमा आहेत. आतील गाभाऱ्यात महावीराची प्रतिमा आहे. यालाच जगन्नाथ समजून या लेण्याला जगन्नाथसभा हे नाव दिले गेले आहे. या लेण्यात भित्तिचित्रांचे अवशेष दिसतात.

या लेण्याच्या प्रांगणाच्या उत्तरेला व दक्षिणेला काही लहान लेणी आहेत.

**लेण क्र. ३४** – यात अग्रमंडप, सभामंडप, अंतराळ व गर्भगृह असून, गर्भगृहात महावीराची प्रतिमा आहे. सभामंडपात चार स्तंभ आणि पार्श्वनाथ व गोमटेश्वर यांच्या प्रतिमा आहेत.

जैन लेण्यांतील स्तंभांच्या सौंदर्याकडे कलाकारांनी विशेष लक्ष दिले आहे. हे स्तंभ आमलक व पूर्णकलश यांनी युक्त आहेत.

**गणेशलेणी** – डुमार लेण्याजवळ जो धबधबा आहे, त्याच्या वरच्या अंगाला सुमारे ३०० फूट चढून गेल्यानंतर दरीच्या दोन्ही बाजूंच्या दरडींमध्ये अनेक छोटी लेणी आहेत, त्यांना हे नाव आहे. त्यांतील पहिले दक्षिणाभिमुख लेणे विशेष उल्लेखनीय आहे. त्यात गोपुर, प्रांगण, अग्रमंडप व त्याच्या मागे गाभाऱ्यात शिवलिंग आहे. अग्रमंडपाच्या छतावर चित्रे आहेत. त्यांत लिंगोद्‌भव शिव व समुद्रमंथन हे प्रसंग दिसतात. चौथे लेणे पश्चिमाभिमुख असून, त्याच्या आत गणेशमूर्ती आहे.

**योगेश्वरी लेणी** – जलप्रवाहाच्या काठाने आणखी वर गेले, की योगेश्वरी या नावाने ओळखली जाणारी काही लेणी आहेत. ती लहान असून, त्यांत शिवाच्या प्रतिमा आहेत.

गणेश लेण्यापासून क्र. २४ च्या तेली का धाना नामक लेण्याकडे जाताना वाटेत दोन लेणी लागतात. त्यांत महेश, उमा, गणेश यांच्या मूर्ती व शिवलिंगही आहे.

ही लहान लेणी इ. स. च्या ११ व १२ व्या शतकांत खोदलेली असावी. त्यांतील शिल्पकाम पूर्वीइतके चांगले दिसत नाही. त्या वेळी कोरीव स्थापत्यकलेचा ऱ्हास झाला होता.

लेणे क्र. ३२ च्या जवळ अलिकडेच केलेल्या उत्खननात एक मंदिर सापडले आहे. त्यात महानुभाव पंथाचे प्रमुख आचार्य चक्रधर यांची पद्मासनातली मूर्ती असून, ती थोडीशी खराब झालेली आहे. [ वेरूळ लेणी – श्री. म. न. देशपांडे, मराठवाडा दिवाळी अंक, १९५८; एलुरा केव्ह टेंपल्स, जेम्स बर्गेस, १९७२; मराठवाड्याचे शिल्पवैभव–श्री. म. श्री. माटे, १९६४; सह्याद्रि ]

## वेलकळी

केरळमधील एक युद्धनृत्य. हे त्रावणकोरमध्ये विशेष प्रचलित असून, नायर लोकांचे ते आवडते नृत्य आहे. चैत्र मासात त्रिवेंद्रम् येथील पद्मनाभस्वामीच्या उत्सवात हे नृत्य केले जाते. त्यात कौरव-पांडवांचे युद्ध खेळतात. त्यासाठी पांडवांचे भव्य लाकडी पुतळे उभे करून ठेवतात. त्यांना शेंदरी कपडे घालतात. नाचणारे पुरुष कौरव होतात. ते प्रारंभी स्नान करून मंदिरात प्रार्थना करतात, कपाळाला गंध व भस्म लावतात, पांढराशुभ्र युद्धवेष करून चिलखत व शिरस्त्राणही धारण कर-



वेलकळी नृत्य

तात आणि मग हाती ढालतलवार घेऊन पांडवांच्या पुतळ्याबरोबर लढण्याचा आविर्भाव करून नाचतात. ह्या नृत्याला मुख्यत: तुतारी व ढोलकी यांची साथ असते. कधी शिंग, नगारा, इ. वाद्येही वाजतात. तास दीड तास युद्ध झाल्यावर कौरव नर्तक समारंभपूर्वक माघार घेतात. [ ए. हो. रा.; सो. चें. म.; फोकलोअर, नोव्हेंबर-डिसेंबर १९६० ]

## वेलन

द. भारतातील एक जात. यांची वस्ती पूर्वीच्या कोचीन संस्थानात आहे. संस्थानाच्या दक्षिण भागात राहणाऱ्या लोकांना वेलन आणि उत्तर भागात राहणाऱ्या यांच्या भाऊबंदांना मन्नान असे म्हणतात.

वेलन लोकांचा प्रमुख व्यवसाय म्हणजे आशौच संपल्यावर स्नान करण्यापूर्वी ब्राह्मण, क्षत्रिय, अंतराळ जाती, नायर, कम्मालन व इझुवन या लोकांना वस्त्र नेसायला देणे, हा होय. रजस्वला स्त्रीला चौथ्या दिवशी, बाळंतिणीला पाचव्या, नवव्या, अकराव्या व सोळाव्या दिवशी आणि मृताशौच असलेल्या सर्व लोकांना सोळाव्या दिवशी ते वस्त्रे देतात. ही वस्त्रे नेसून लोक स्नान करतात आणि स्नान झाल्याबरोबर लगेच ती वेलन पुरुषाला परत देतात. ही वस्त्रे त्याच्या मालकीची असतात किंवा कुटुंबातील लोकांनी त्याला अगोदरच दिलेली असतात. या त्याच्या सेवेबद्दल त्याला थोडे भात व काही पैसे मिळतात. काही मंदिरांतील मूर्तींचे कपडेही ते धुतात. काही वेलन माडांवर चढून नारळ काढतात, छत्र्या बनवतात, गाद्या-उशा तयार करतात व शेतात काम करतात. काहीजण जादूटोणा करतात, तर काही मांत्रिक असतात. काही वैद्यकी करतात. प्रत्येक गावात काहीजण विवाहादी धार्मिक प्रसंगी गीते गाण्याचे काम करणारे असतात.

**विवाहप्रथा–** मुलगा लग्नाच्या वयाचा झाला, की त्याचा बाप आणि मामा त्याला अनुरूप अशी मुलगी शोधतात. पत्रिका जुळल्या तर लग्न पक्के करतात. त्याच दिवशी देजाची काही रक्कम वधूपित्याला देतात. लग्न वधूगृही होते. त्यासाठी घरासमोर मांडव घालतात. लग्नाचा मुहूर्त सर्वसाधारणपणे रात्रीचा असतो. वरपक्षाकडील मंडळी आल्यावर त्यांच्यापैकी एक पुरुष वधूवस्त्रे, वधूमूल्य, विडे, सुपाऱ्या व वधूमातेसाठी वस्त्र एवढे असलेली थाळी वधूकडच्या एका पुरुषाकडे देतो. तिच्यातील वधूमातेचे वस्त्र वगळून बाकी सर्व जिन्नस तो पुरुष काढून घेतो आणि त्याला थाळी परत करतो. वराची बहीण वधूला नवी साडीचोळी नेसवून मंडपात घेऊन जाते व वराच्या शेजारी बसवते. वधू वराला एक किंवा दोन चमचे दूध व केळयाचे काही तुकडे देते. एवढ्याने ती दोघे पतिपत्नी बनतात. मग जमलेल्या लोकांना जेवण देतात. त्यानंतर उरलेली रात्र नृत्यगायनात घालवतात. दुसऱ्या दिवशी वधू-वर वधूच्या नातेवाइकांसह वरगृही जातात. तिथे वरपक्षाकडील लोक त्यांना जेवण देतात. चौथ्या दिवशी वधू-वर ग्रामदेवतेची पूजा करतात. नंतर ती दोघे वधूगृही जाऊन आठ-पंधरा दिवस राहतात. परत सासरी जाताना वधूपिता आपल्या ऐपतीप्रमाणे मुलीला काही दागिने, जेवायची थाळी, दिवा व काही भांडी देतो.

वेलनांत विधवेला पुनर्विवाह करता येतो. स्त्रीला व पुरुषाला घटस्फोटही सहजपणे घेता येतो. पुरुषाला जेव्हा घटस्फोट घ्यायचा असतो, तेव्हा तो पत्नीला माहेरी पोचवतो व तसे करण्याचे कारण सांगतो. स्त्रीला जेव्हा घटस्फोट घ्यायचा असतो, तेव्हा ती पतीला सोडून जाते. तेवढ्याने घटस्फोट मिळू शकतो.

मुलीला जेव्हा प्रथम ऋतुप्राप्ती होते, तेव्हा तिला स्ना[illegible] घालतात व एका खोलीत ठेवतात. चौथ्या दिवशी घरापुढे घा[illegible]लेल्या मांडवात तिला बसवतात. तिच्या हातांत तांदूळ, का[illegible] पैसे व पेटती वात असलेला द्रोण देतात. त्या वेळी त्या प्रसंगा[illegible] साजेशी गीते गातात. गाणाऱ्यांना त्याबद्दल भात, नारळ[illegible] काही पैसे देतात.

**प्रसूतिप्रथा–** गर्भवती स्त्रीला नवव्या महिन्यात चिंचेचा [illegible] पाजण्याचा समारंभ होतो, त्याला पुलिकुटी असे नाव आहे. स्त्री[illegible] प्रसूती एका स्वतंत्र खोलीत होते. त्या वेळी तिला दोन-ती[illegible] स्त्रिया मदत करतात. जननाशौच पंधरा दिवस असते.

दुष्ट भुताखेतांमुळे माणसाला रोग होतात, अशी या लोकां[illegible] समजूत आहे. त्यामुळे आजारी माणसाला गंडेदोरे, ताईत बां[illegible] व मंत्र म्हणून हे लोक उपचार करतात.

**देवधर्म–** हे लोक चंदन, मुंडियन, करिनकुट्टी, इ. दुष्ट देवतां[illegible] भजतात. घराच्या आवारात एखाद्या झाडाखाली या देवतांच्या नावाने दगड स्थापलेले असतात. वर्षातून तीन-चार वेळा त्यां[illegible] फळे, लाह्या व कोंबडी-बकरी अर्पण करतात. याशिवाय, [illegible] भगवती व पितर यांनाही भजतात.

**मृतिकप्रथा–** हे लोक मृताला जाळतात किंवा पुरतात. मृ[illegible] शौच पंधरा दिवस असते. सोळाव्या दिवशी मृताच्या आप्तेष्टां[illegible] जेवायला घालतात. वर्षश्राद्धही करतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## वेलमा

द. भारतातील व मध्य प्रदेशातील एक जात. [illegible] भारतात पूर्वीच्या निजामराज्यात यांची वस्ती अ[illegible] या जातीला येलमा असेही म्हणतात.

हे लोक शेती, शेतमजुरी, कापसाचा व्यापार, कापड वि[illegible] व रंगविणे, इ. व्यवसाय करतात. पूर्वी हे लोक वरंगळ [illegible] विजयनगर इथल्या राजांच्या पदरी सैनिक म्हणून नोकरी[illegible] होते. त्यांच्यापैकी काहींना बहादुरी केल्याबद्दल जमिनी इ[illegible] मिळालेल्या आहेत.

वेलमा लोक क्षत्रिय असून, नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेशा[illegible] राज्य करीत होते, असे यांची परंपरा सांगते. पण यांच्याहू[illegible] पराक्रमी लोकांनी यांना त्यांच्या राज्यातून हाकलून दिले. ते[illegible] त्यांच्यापैकी सत्त्याहत्तर लोक नर्मदा ओलांडून खाली वरं[illegible] राज्यात आले. त्या वेळचा वरंगळचा राजा प्रतापरुद्र (इ[illegible] ११६२) याचे त्यांच्या धिप्पाड शरीराने लक्ष वेधून घेतले आ[illegible] त्याने त्यांची आपल्या राज्यातील सत्त्याहत्तर किल्ल्यांवर नें[illegible]णूक केली.

हे लोक पूर्वी जानवे घालीत असत; पण हे नर्मदा ओलांड[illegible] असता तिला एकाएकी पूर आला, तेव्हा त्यांनी नर्मदेची प्रा[illegible]

केली की, 'जर आम्ही सुखरूप पैलतीराला पोचलो, तर तुला आमची जानवी अर्पण करूं.' त्यानंतर नर्मदेचा पूर एकदम ओसरला व ते पैलतीराला पोचले. तेव्हापासून त्यांनी जानवी घालणे सोडून दिले.

वेलमा लोक उंच, गोरे व धिप्पाड असतात. दक्षिणेत आल्यावर त्यांनी इथल्या कापू स्त्रियांशी विवाह केले.

या लोकांचे राच किंवा तर्कसटी किंवा शिखामणी, एको, गुणे व नाईक असे पोटभेद आहेत. राच वेलमा हे प्रतिष्ठित असून, त्यांच्यापैकी अनेकजण जमीनदार आहेत. यांच्या स्त्रिया गोषा वापरतात. एको वेलमा कापसाचे व्यवहार करतात. गुणे वेलमा हे विणकर व रंगारी आहेत. यांच्यापैकी बरेच लोक शिकलेले आहेत. नाईक वेलमा हे मात्र अत्यंत रानटी अवस्थेत असून, शिकारीवर आपली उपजीविका करतात.

वेलमा लोकांत सत्त्याहत्तर गोत्रे असून, समान गोत्रांच्या घराण्यांत विवाहसंबंध होत नाही.

यांच्यापैकी काही मराठवाड्यात स्थायिक झाले असून, त्यांनी तिथल्या कुणब्यांचे रीतिरिवाज उचलले आहेत.

**विवाहप्रथा** – मुलींचे विवाह लहानपणी किंवा मोठेपणी होतात. यांचा विवाहविधी कापू लोकांच्या विवाहविधीसारखाच असतो. वराने वधूच्या गळ्यात मंगळसूत्र बांधणे, हा लग्नातील मुख्य विधी होय. लग्नाच्या आधी राच वेलमांचे एक दांपत्य जेवायला बोलावतात आणि त्या दांपत्याला नवे वस्त्र देतात आणि लग्नासाठी त्याची परवानगी घेतात. लग्नाच्या वेळी नवरामुलगा आपल्याजवळ एक खंजीर बाळगतो. पूर्वी गुणे वेलमा लोकांना लग्न करताना पल्ली नामक कोळ्यांमधील दोन लग्नांचा खर्च द्यावा लागत असे. आता लग्नाच्या वेळी घरात नुसते कोळ्याचे जाळे टांगून ठेवले, की भागते.

**देवधर्म** – हे लोक नरसिंह व इतर क्षुद्र दैवते यांना भजतात. लग्नविधीच्या प्रारंभी हे नरसिंहाची पूजा करतात. हे तिरमणिधारी किंवा विभूतिधारी आहेत. धार्मिक कार्याच्या वेळी ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात. लहान मुलांची आणि देवी व हगवण या रोगांनी मेलेल्या माणसांची प्रेते पुरतात. अकराव्या दिवशी श्राद्ध करतात.

विजगापट्टम जिल्ह्यातील वेलमा लोकांचे पेड किंवा पद्म, कम्म व कोप्पल किंवा तोथ्थल असे पोटभेद आहेत.

**पेड्ड किंवा पद्म** – यांचे पूर्वज सैनिकी पेशाचे होते आणि पेड्ड राजुडू लोकांचे आश्रित होते. पेड्ड राजुडू हे बोब्बिली वंशाचे संस्थापक होते आणि त्यांना इ. स. १६५२ मध्ये शेर मुहंमद खानाकडून जहागीर मिळाली होती. पेड्ड स्त्रिया गोषा पाळतात. पूर्वी यांच्यांत विधवाविवाहाला बंदी होती. या लोकांना डोरा ही उपाधी आहे.

**कम्म वेलमा** – यांची वस्ती मुख्यत्वे कृष्णा जिल्ह्यात आहे. यांच्या स्त्रियाही गोषा पाळतात. या लोकांना नायडू ही उपाधी आहे.

**कोप्पल किंवा तोथ्थल** – या जातीचे पुरुष डोक्यावरचे केस न कापता त्यांची मस्तकावर गाठ बांधतात. यांच्यांत मामेबहिणीशी लग्न करण्याची पद्धत आहे. लग्नाचे पौरोहित्य ब्राह्मण करतो. स्त्रिया उजव्या हातात चांदीचे कडे व डाव्या हातात बांगड्या घालतात. मोठ्या भावाला लहान भावाच्या विधवेशी लग्न करता येते. या लोकांना अण्णा, अय्या या उपाधी आहेत. जेव्हा ते श्रीमंत होतात, तेव्हा त्यांना नायडू हे बिरुद मिळते.

गोदावरी जिल्ह्यातील वेलमा घरचे लग्न करताना माल लोकांपैकी एक लग्न जुळवतात व त्यांचा खर्च करतात. पूर्वी केव्हातरी गुप्त धन हस्तगत करण्यासाठी वेलमांनी माल पुरुषाचा बळी दिला होता, त्याबद्दल कृतज्ञता म्हणून त्यांनी ही पद्धत स्वीकारली आहे. [का. ट्रा. स. इं.; का. ट्रा. नि. डो.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं.]

## वेलाळी

पुणे जिल्ह्यातील खेड व मावळ तालुका आणि पुणे शहर या ठिकाणी आढळणारी एक लहानशी जात. या जातीचे लोक स्वतःला वैश्य म्हणवतात आणि त्रिचनापल्ली व तंजाऊर या भागातून पोट भरण्यासाठी आपण इकडे आलो, असे सांगतात. या लोकांचे पिल्ले व मुदलियार असे दोन भेद आहेत. हे लोक शेती, व्यापार, दुकानदारी, दलाली, इ. व्यवसाय करतात. हे लोक मेहनती, उत्साही, नीटनीटके, शांत स्वभावाचे व आतिथ्यशील आहेत. सुखवस्तू लोकांत यांची गणना केली जाते.

यांच्यापैकी पिल्ले लोकांचे रीतिरिवाज पुढीलप्रमाणे आहेत-

**विवाहप्रथा** – लग्न ठरले, की हे लोक साखरपुडा करतात. त्यासाठी मुलाचे आईबाप व आप्तेष्ट वाजतगाजत मुलीच्या घरी जातात. ते आपल्याबरोबर नारळ, केळी, उसाची मोळी व मुलीसाठी नवी साडीचोळी आणि दागिने नेतात. मुलीला या सर्व वस्तू दिल्यावर मुलीची आई मुलाच्या आईच्या गळ्यात फुलांचा हार घालते आणि माझी मुलगी तुमच्या मुलाला दिली आहे, असे म्हणते. तेव्हा मुलाची आई म्हणते, की मी माझ्या मुलासाठी तुमची मुलगी वधू म्हणून स्वीकारली आहे. आणि तुमच्या मुलाकडे मी जावई म्हणून पाहते. जेवणावळ झाल्यावर साखरपुड्याचा विधी संपतो.

लग्न मुलाच्या घरी होते. लग्नाच्या आदल्या दिवशी मुलाच्या

घरी मांडव घालतात आणि शुभ खांब रोवतात. मातीचा घोडा, सिंह व हत्ती आणि तीन रिकामी गाडगी ही सर्व एकावर एक रचली असता यांचे देवक होते. लग्नाच्या दिवशी सकाळी वधू-कडील लोक वाजतगाजत वरगृही जातात. वधू बोहल्यावर वराच्या शेजारी बसते. त्यांच्या समोर एक कलश ठेवलेला असतो, त्यावरचा नारळ घेऊन तो फोडतात व त्याच्या एका वाटीत मंगळसूत्र ठेवून ते सर्वांना दाखवतात. मग नवरामुलगा ते वधूच्या गळयात बांधतो. नंतर वधू-वर अग्नीसमोर बसतात. त्यांच्या एका बाजूला तांदुळांचा व नारळांचा ढीग ठेवतात. वडीलधारी माणसे त्या ढिगातून ओंजळभर तांदूळ घेऊन वधू-वरांच्या मस्तकावर टाकतात आणि एक नारळ त्यांच्या भोवती ओवाळून फोडतात. तो नारळ धोबी घेऊन जातो. नंतर वधू-वर अग्नीभोवती तीन प्रदक्षिणा घालतात. दुपारी जेवणावळ होते. दुसऱ्या दिवशी वधू खिचडी शिजवते आणि देवकाला तिचा नैवेद्य दाखवते.

**प्रसूतिप्रथा** – जननाशौच दहा दिवस पाळतात. पाचव्या दिवशी मुलाची नाळ कापलेल्या चाकूची पूजा करतात. दहाव्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात. जावळ तीन वर्षांपर्यंत केव्हाही काढतात. त्यासाठी जवळपासच्या एका बागेत जातात. तिथे उसाचे एक मखर बनवतात आणि त्यात कामाक्षी देवतेच्या नावाने दोन दगड स्थापतात. त्यांच्यापुढे अनेक नारळ, केळी व ऊस ठेवतात. एक बकराही देवीच्या नावाने कापतात. मामाच्या मांडीवर मुलाला बसवून न्हावी त्याचे केस कापतो. मग ते गोळा करून नदीत किंवा जलाशयात टाकतात. दहा ते चौदा या वयात मुलाची मुंज करतात.

**देव-धर्म** – हे लोक स्मार्त असून प्रामुख्याने महादेवाला भजतात. कामाक्षी व मरिअम्म या त्यांच्या कुलदेवता आहेत. शैव तेलंगी ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात.

**मर्तिकप्रथा** – माणूस आसन्नमरण झाला, की दारात मांडव घालून व त्यात दर्भ पसरून त्यावर त्याला ठेवतात. त्याचा प्राण गेल्यावर उत्तराधिकारी विहिरीचे पाणी आणायला जातो. त्या वेळी जंगम पुरोहित शंख वाजवीत पुढे चालतो. विहिरीच्या पाण्याने स्नान घातल्यावर मृताला स्मशानात नेऊन जाळतात. मृताशौच सोळा दिवस पाळतात. [ पूना गॅझे. ]

**वेल्लाळ** तमिळनाडमधील एक जात. शेती हा या लोकांचा प्रमुख व्यवसाय आहे. यांच्या उत्पत्तीच्या दोन कथा आहेत, त्या अशा –

(१) हजारो वर्षांपूर्वी, जेव्हा लोकांना शेतीची माहिती नव्हती, तेव्हा पृथ्वीवर एकदा दुष्काळ पडला. त्या वेळी लोकांनी भूदेवीची प्रार्थना करून आपल्यावरचे संकट निवारण्याची विनंती केली. तेव्हा तिने आपल्या शरीरातून एक नांगर धारण करणारा पुरुष उत्पन्न केला. त्या पुरुषाने त्यांना जमीन कशी नांगरावी व शेती कशी करावी, ते शिकवले. वेल्लाळ लोक हे त्या पुरुषाचीच संताने होत.

(२) प्राचीन काळी एकदा शंकर-पार्वती कैलासावर एकांतात असता, विश्वकर्मा तिथे गेला. त्यामुळे त्यांच्या एकांताचा भंग झाला आणि त्यांनी रागावून त्याला शाप दिला की, गंगेच्या तीरी आम्ही तुझा शत्रू उत्पन्न करू आणि तो तुला शिक्षा करील. त्यावर विश्वकर्म्याने आपण त्याला एकाच घावात ठार करू, अशी प्रतिज्ञा केली आणि तो आपल्या विमानातून गंगेच्या काठी फिरत राहिला. एक दिवस जमिनीतून एक किरीट वर येताना त्याने पाहिला. तेव्हा ते मस्तक आहे, असे समजून त्याने त्याच्यावर तलवारीचा वार केला. त्यानंतर थोड्या वेळाने जमिनीतून एक पुरुष वर आला. तेव्हा विश्वकर्मा त्याच्या अंगावर धावून गेला. त्या वेळी ब्रह्माविष्णुमहेश तिथे प्रगट झाले आणि त्यांनी त्याला एकाच घावात शत्रूला मारण्याच्या त्याच्या प्रतिज्ञेची आठवण करून दिली व तो एक घाव आधीच मारून झाला असल्याचे त्याला सांगितले. मग विश्वकर्मा व तो पुरुष यांच्यांत समझौता झाला. त्यानुसार विश्वकर्म्याचे पाच पुत्र सोनार, सुतार, लोहार, पाथरवट व झाळकाम करणारे हे त्या पुरुषाचे दास ठरले. देवांनी मग त्या पुरुषाला भूमिपालकुडू (पृथ्वीचा रक्षणकर्ता), गंगाकुल व मुर्डकपालकुडू अशी नावे दिली. तसेच त्याचा किरीट नष्ट झाल्यामुळे त्याच्या कुलातील कोणी राजा होणार नाही; पण राज्याभिषेकाच्या वेळी राजाच्या डोक्यावर मुकुट ठेवायचा मान या कुलातील पुरुषांना मिळेल असे सांगितले. देवांनी मग त्याला जानवे घालायला दिले आणि इंद्र व कुबेर यांच्या मुलींशी त्याचे लग्न लावून दिले. इंद्र आणि धर्मराज यांनी त्याला जमीन नांगरण्यासाठी पांढरा बैल व पांढरा रेडा दिला. त्या पुरुषाला मग अनेक पुत्र झाले. त्यां पैकी काहींना भूमिपालकुडू, काहींना वेल्लाळ शेट्टी व काहींना गोवू शेटलू अशी नावे मिळाली.

वेल्लाळ लोक शांतताप्रेमी, उद्योगी व कंजूष आहेत. ते उत्तम शेतकरी असून, तांदूळ, सुपारी व तंबाखू ही पिके काढण्यात पटाईत आहेत. यांच्यापैकी सुशिक्षित लोक मात्र सरकारी नोकऱ्या करतात.

या लोकांचे त्यांच्या राहण्याच्या ठिकाणावरून भेद पडले आहेत, ते असे – (१) तोंडमंडल = पल्लव देशात राहणारे (२) सोलिय किंवा सोझिय = चोळ देशात राहणारे (३) पांड्य = पांड्य देशात राहणारे व (४) कोंग = कोंगू देशात राहणारे

या लोकांचे पुन्हा अनेक पोटभेद आहेत. चारही प्रमुख भेदांतील लोकांचे मुख्य आचार समान आहेत. यांची लग्नें पौराणिक विधीने होतात. कोंग लोकांव्यतिरिक्त इतर लोकांच्या लग्नात ब्राह्मण पुरोहित असतात. प्रत्येक भेदातील काही लोक शैव तर काही वैष्णव असतात. सर्वजण प्रेते जाळतात व पंधरा दिवस आशौच पाळतात. ते श्राद्ध व महालय करतात. या चार भेदांत परस्पर विवाहसंबंध होत नाही. [ का. ट्रा. स. इं. ]

**वेश्यावृत्ती** कोणत्याही कामातुर पुरुषाकडून द्रव्य घेऊन त्याला आपले शरीर उपभोगू देणाऱ्या स्त्रीला वेश्या, वारांगना किंवा गणिका म्हणतात. ऐतिहासिक काळाच्या आरंभापासून जगातील सर्व समाजांत अशा स्त्रिया आहेत. वैदिक युगातही वेश्यावृत्ती अस्तित्वात असावी, असे वेदांतील काही उल्लेखांवरुन वाटते. ऋग्वेदाच्या एका ऋचेत (१.१६७.४) अनेक पुरुषांशी संग करणाऱ्या स्त्रीला साधारणी म्हटले आहे. निराधार तरुणी उपजीविकेसाठी शरीरविक्रय करू लागतात आणि स्वैर वृत्तीच्या स्त्रिया विषयसुखासाठी अनेक पुरुषांशी रममाण होतात, अशा प्रकारचे निर्देश वेदांत आढळतात (ऋ. १.१२४.७; ४.५.५; अथर्व. १.१७.१). त्या काळी अशा स्त्रिया धनार्जनासाठी यात्रेच्या ठिकाणी जात (ऋ. ४.५८.८). अप्सरा या स्वर्गातील वेश्या होत, असेही म्हटले आहे (ऋ. १०.९५). पंचचूडा नामक अप्सरेपासून वेश्यांची उत्पत्ती झाली, अशी समजूत आहे. यजुर्वेदातही वेश्यावृत्तीचा उल्लेख आढळतो (३०.१५).

असे असले तरी वैदिक युगात वेश्याव्यवसाय पुष्कळ प्रमाणात प्रचलित होता, असे वेदांतील वरील निर्देशांवरून म्हणता येत नाही. त्यानंतरच्या काळात मात्र तो व्यवसाय बराच वाढला असावा. पुढे वेश्यावर्ग हा समाजाचा एक आवश्यक घटकच बनला. धर्मसूत्रे व स्मृती या ग्रंथांत वेश्यांची सामाजिक व्यवस्था केलेली आढळते. धर्मशास्त्रांत वेश्यागमनाबद्दल प्रायश्चित्त, शिक्षा, वेश्यांचा दायभाग, इत्यादींसंबंधी नियम सांगितलेले आहेत. मात्र वेश्यांचे समाजातले स्थान हीन होते. वेश्यावृत्तीने उपजीविका करणाऱ्या ब्राह्मण स्त्रीचा वध केला तरी, त्यासाठी प्रायश्चित्त आवश्यक नाही, केवळ आठ मुठी धान्य अपराध्याने द्यावे, असे गौतमाने सांगितले आहे (२२.२७). ब्राह्मणाने वेश्येकडून अन्न घेऊ नये, असे मनू म्हणतो (४.२०९). चतुर व लबाड वेश्येला राजाने दंड करावा, असेही मनूने सांगितले आहे (९.२५९).

महाभारताच्या काळात वेश्यावर्गाला प्रतिष्ठा प्राप्त झाली होती, असे दिसते. राजघराण्यांतील दासी राजपुरुषांच्या कामोपभोगासाठीही उपयोगी पडत. त्यांना मानाचे स्थानही मिळत असावे. कौरवांच्याजवळ ज्या वेश्यादासी होत्या, त्यांचे कुशल युधिष्ठिराने विचारले, असे उद्योगपर्वात (३०.३८) सांगितले आहे. श्रीकृष्ण पांडवांचा शांतिदूत म्हणून कौरवांकडे गेला, तेव्हा त्याच्या स्वागतासाठी वेश्या सामोऱ्या आल्या, असे वर्णन आहे (उद्योग. ८६.१५). पांडवांची सेना युद्धासाठी निघाली तेव्हा तिच्या बरोबर वेश्यांचा एक समूह होता (उद्योग. १५१.५८; वन. २२९.३७; कर्ण. ९४.९६).

वेश्यांचे तीन वर्ग होते – (१) दासी – एकाच पुरुषाची सेवा करणारी स्त्री, (२) गणिका – नृत्यगायनात कुशल व चतुर अशी उच्च श्रेणीची वेश्या व (३) पण्य स्त्री – रोज अनेक पुरुषांना भोग देऊन धनार्जन करणारी स्त्री. अशा स्त्रियांना समाजात मानाचे स्थान नव्हते. त्यांच्यामुळे समाजाचे अकल्याण होते, अशी कल्पना होती. त्यांची वसती नगराच्या विशिष्ट भागातच असे. वेश्यागमन निंद्य मानले जात होते. वेश्यांच्या अनैतिक व्यवसायावर निर्बंध घालणे हे राजाचे कर्तव्य मानले जात होते (म. भा. शांति. ८९.१३–१४). अशा व्यवसायात दलाली करणाऱ्या कुट्टिनींचा उल्लेख महाभारतात आहे.

गणिका किंवा वारांगना या आपल्या सौंदर्य, चातुर्य, कलाकौशल्य, इ. गुणांमुळे राजकार्यातही उपयोगी पडत. राजकीय कपटकारस्थानात अशा स्त्रियांचा उपयोग केला जात असे (म. भा. वन. ११०-११३). गुप्तचर म्हणूनही त्या महत्त्वाची कामगिरी करीत. मंगलकार्ये, उत्सव, इ. प्रसंगी त्यांची उपस्थिती शुभ मानली जात असे.

कौटिलीय अर्थशास्त्रात वेश्याव्यवसायाचे नियमन कसे करावे, ते सांगितले आहे.

बौद्ध व जैन साहित्यात गणिकांचा उल्लेख असंख्य जागीं आढळतो. जातककथांत अनेक गणिकांची वर्णने आहेत. मात्र त्या गणिका रूपगुणसंपन्न, कलावंत व श्रीमंत आहेत. त्यांचा बौद्धिक, शारीरिक व सांस्कृतिक विकास उच्च कुलांतील स्त्रियांसारखाच झालेला आहे. जैन ग्रंथांतही अशा गणिका आढळतात. अशा गणिकांव्यतिरिक्त सर्वसामान्य पुरुषांची कामतृप्ती करणाऱ्या शेकडो वारयोषिता प्रत्येक नगरात होत्या. त्यांची वस्ती वेगळी असे. त्या काळी वेश्याव्यवसाय खूप प्रचलित होता, असे दिसते. तो अनैतिक मानला जात असला तरी, त्याचेही काही संकेत ठरलेले होते व त्यावर राजाचे नियंत्रण होते.

समाजाच्या दृष्टीने वेश्यावर्ग हीन मानला जात असला, तरी बौद्धसंघात वेश्यांना प्रवेश मिळत असे. गौतम बुद्ध अशा पतित स्त्रियांशी सहानुभूतिपूर्वक व प्रेमाने वागत असे.

गणिका या नावाचा गणाशी संबंध असावा, असे काही पंडितांचे मत आहे. गणातील सर्वजणांचा जिच्यावर हक्क असतो,

ती गणिका, असा अर्थ केला जातो. कात्यायनाची वार्तिके व पतंजलीचे महाभाष्य यांवरून समजते, की त्यांच्या काळी निरनिराळ्या नगरांतील गणिकांचे संघ स्थापले गेले होते.

राजघराण्यांत जशा दासी राजपुरुषांची कामसेवा करीत, त्याप्रमाणे सामान्य जनांच्या घरात राहून, एकाच पुरुषाची सेवा करणाऱ्या वेश्यांचा एक वर्ग असे. अशा स्त्रियांना रक्षा किंवा रखेली म्हणतात. याज्ञवल्क्याने त्यांचे अवरुद्धा व भुजिष्या असे दोन पोटभेद केले आहेत. अवरुद्धा ही धन्याच्या घरातच राहते आणि भुजिष्या वेगळी राहते, पण एकाच धन्याशी संबंध ठेवते. अशा स्त्रीशी अन्य पुरुषाने कामाचार केला, तर त्याला पन्नास पण दंड करावा असे सांगितले आहे (याज्ञ. २.१९२). नारदाच्या मते (नारद. स्त्री-पुंस. ७८-७९) ब्राह्मणेतर स्वैरिणी, वेश्या, दासी, किंवा परित्यक्ता स्त्री पुरुषाहून हीन जातीची असेल, तर तिच्याशी समागम करण्यास हरकत नाही; पण ती उच्च जातीची असेल, तर मात्र समागम निषिद्ध होय. अशी स्त्री हीन जातीची असूनही, एकाच पुरुषाने तिला ठेवलेली असेल, तर तिच्याशी संभोग करणे दोषार्ह होय. पण पुरुषाने आपल्या पत्नीशी एकनिष्ठ राहावे, असे स्मृतिकारांचे विधान असल्यामुळे (याज्ञ. १.८१) वेश्यागमन हे पाप मानून प्राजापत्य कृच्छ्र करायला सांगितले आहे (अत्रि. ५.२.७१). पण्यस्त्रीने एखाद्या पुरुषाकडून द्रव्य घेऊनही त्याला भोग नाकारला, तर तिच्याकडून दुप्पट दंड घ्यावा आणि एखाद्या पुरुषाने वेश्येशी संभोग करूनही तिला ठरलेले शुल्क दिले नाही, तर त्यालाही तितकाच दंड करावा, असेही धर्मशास्त्रकारांनी सांगितले आहे (याज्ञ.२.२९२; नारद – वेतनस्यानपाकर्म १८).

वात्स्यायनाने वेश्यांचे कुंभदासी, परिचारिका, स्वैरिणी, कुलटा, नटी, शिल्पकारिका, प्रकाशविनिष्टा, रूपाजीवा व गणिका असे नऊ भेद सांगितले आहेत. तथापि त्यांतील कुंभदासी, रूपाजीवा व गणिका हे तीनच प्रकार त्याने प्रमुख मानले आहेत. कामसूत्रांत त्याने वेश्यांच्या जीवनाविषयी विपुल माहिती दिली आहे. दारावरून जाणाऱ्या पुरुषांना आपले आकर्षण वाटावे म्हणून वारयोषितांनी साजशृंगार कसा करावा, कसे उभे राहावे, कसे हावभाव करावे, ते वात्स्यायनाने सांगितले आहे. गुंड व लबाड लोकांपासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी काही प्रभावी व्यक्तींशी त्यांनी दोस्ती करावी, असेही त्याने सुचविले आहे. प्रत्येक वेश्येजवळ तिची काळजी वाहणारी आई किंवा अन्य कोणी वृद्ध स्त्री असावी आणि तिच्या सांगण्याप्रमाणे हिने वागावे, असेही तो सांगतो.

प्राचीन काळी वेश्यांच्या मुली वयात आल्यावर त्यांचे लग्न करण्याची प्रथा होती. जो पुरुष सर्वांत जास्त द्रव्य देई त्याच्याशी मुलीचा विवाह करीत. तो तात्पुरताच असे. त्या पुरुषाबरोबर एक वर्षभर राहून ती मुलगी स्वैरपणे वेश्यावृत्तीने राहू लागे. असा पुरुष न मिळाल्यास छडीशी किंवा तलवारीशी मुलीचा विवाह लावीत. मग ती लगेच वेश्याव्यवसाय सुरू करी.

वात्स्यायनाने आपल्या ग्रंथात वेश्याधर्मांचे पुष्कळ वर्णन केलेले आहे.

मत्स्यपुराणात असे म्हटले आहे की, प्राचीन काळी देवासुरयुद्धात असंख्य पुरुष मृत्यू पावले, तेव्हा त्यांच्या स्त्रिया इंद्राच्या आज्ञेला अनुसरून पण्यस्त्रिया बनल्या. मत्स्यपुराणातच ब्राह्मणाने वेश्येकडे जाणे निंद्य व दंडनीय मानलेले आहे. पण यात्रेच्या वेळी वेश्येचे दर्शन शुभ मानले आहे.

पुराणकारांच्या मते वेश्येने कळत न कळत एखाद्या व्रताचे पालन केले, तर ती पापमुक्त होऊन स्वर्गात जाऊ शकते. अशा प्रकारच्या अनेक कथा पद्मपुराणात सांगितलेल्या आहेत. तथापि समाजजीवनात वेश्या पतितच मानल्या जात होत्या.

मध्ययुगात वेश्याव्यवसाय खूपच वाढला असावा, असे तत्कालीन वाङ्मयातील विविध उल्लेखांवरून कळते. वेश्यांची संख्या वाढल्यामुळे त्यांतील अनेक वेश्या हीन वृत्तीच्या असणे संभवनीय ठरते. शरीरसौष्ठव, कलाकौशल्य, सौजन्य, इ. गुणांमुळे पुरुषाला आकर्षून घेणाऱ्या वारांगनांपेक्षा कपट, लबाडी वगैरे करून पुरुषांना फसवून त्यांच्यांकडून जास्त धन लुबाडणाऱ्या लोभी कुलटांची संख्या अधिक असावी. कुट्टनीमतम् या ग्रंथात पण्यस्त्रियांचा ढोंगीपणा, लोभीपणा, नीचपणा, इ. अवगुणांचे वर्णन केलेले आहे. समयमातृकामध्ये एक कुट्टनी (वेश्या) म्हणते – ग्राहकांच्या निर्बुद्धतेमुळेच आमची चैन चालते. मूर्ख लोकच आमच्या ढोंगाला भुलतात व फसतात. लबाडी करूनच वेश्या खूप पैसा कमावू शकतात. सच्चेपणाने वागून त्यांचे कधीही भले होत नाही, तर नाशच होतो.

चाणक्यनीतिसार या ग्रंथात वेश्यांच्या दयनीय जीवनाचे वर्णन केलेले आढळते. ग्राहकांच्या लहरीप्रमाणे त्यांचे रागलोभ सांभाळून वागणे, वेळी-अवेळी देह त्यांच्या ताब्यात देणे आणि ते देतील तो त्रास सहन करणे, यामुळे त्यांचा व्यवसाय दुःखमय असतो, असे म्हटले आहे.

गेल्या पाच-सहाशे वर्षांत, विशेषतः गेल्या शंभर-दीडशे वर्षांत वेश्याव्यवसाय खूपच वाढला आहे, कारण त्याची मागणी वाढली आहे. वेश्यावृत्तीचे मूळ कारण पुरुषाची कामासक्ती हे होय. नैसर्गिक कामवासना नेहमीच्या नैतिक मार्गाने शमविणे कठीण झाले, की कामविव्हल पुरुष इतर मार्ग शोधू लागतो. आणि साम, दाम, इ. उपायांनी तो कोणतीही स्त्री

मिळवून आपली वासना तृप्त करून घेतो. जो जो जगाची सुधारणा होत आहे, तो तो कामवासना उद्दीपित करणारी साधने अधिकाधिक उत्पन्न होत आहेत. अन्न व काम या मनुष्याच्या प्राथमिक गरजा आहेत. अन्नासाठी कष्ट करावे लागतात तेव्हा कामवासना संयमित राहते. पण पोटाची काळजी कमी होऊन कष्ट कमी व स्वास्थ्य अधिक झाले, की कामवासना प्रदीप्त होते. अशा पुरुषांची संख्या वाढली, की त्यांच्या वासनेला बळी पडणाऱ्या स्त्रियांची संख्याही वाढते.

सगळ्या वेश्या केवळ पैशासाठी या धंद्यात शिरतात, असे नाही. निरनिराळ्या अनेक कारणांनी त्या वाममार्गाला लागतात आणि मग त्यांना हा धंदा करून पोट भरावे लागते. सामान्य स्त्रीपेक्षा कमी बुद्धीच्या व चंचल मनाच्या स्त्रिया या अनैतिक धंद्यात सहज ओढल्या जातात, असे दिसून आले आहे. भित्रेपणा, चांगल्या संस्कारांचा अभाव, छानछोकीची हाव, खळबळजनक घटनांची आवड, घरातील रुक्ष वातावरण किंवा त्रासदायक जीवन, अशा विविध कारणांमुळे तरुण मुली कामातुर पुरुषांच्या मोहजालात सापडतात व फसतात. कित्येक मुलींना आईबापांचे प्रेम लाभत नाही. जे नातेवाईक निराधार मुलींना वाढवितात, त्यांना त्यांच्या गरिबीमुळे किंवा अन्य कारणांमुळे अशा मुली नकोशा वाटतात. त्या मुलींना नीट अन्न-वस्त्र मिळत नाही, संस्कार-शिक्षण लाभत नाही, कष्टही भरपूर करावे लागतात. अशा जीवनाला विटून त्या काहीतरी वेगळे शोधू लागतात. कामासक्त माणसे अशा मुलींना खरी-खोटी आमिषे दाखवून आपली कामना शमवतात आणि मग त्या मुली वाईट मार्गाला लागतात. पुष्कळदा त्यांना अशा पुरुषांच्या दुष्ट हेतूची कल्पनाच नसते. कष्टमय जीवनातून सुटका होईल या आशेने उपकारकर्त्या पुरुषावर भरवसा ठेवून तरुण मुली त्यांना वश होतात आणि भ्रष्ट झाल्यामुळे निरुपायाने वेश्यावृत्ती पत्करतात.

या धंद्यातील बहुतेक स्त्रिया ज्या कुटुंबांतल्या असतात त्यांची सांपत्तिक परिस्थिती चांगली नसते हे खरे. पण केवळ तेवढ्यामुळेच त्या अनैतिक व्यवसाय पत्करतात, असे म्हणता येणार नाही. सधन कुटुंबांतल्या तरुणींना पळवून नेऊन त्यांना शीलभ्रष्ट करून हा धंदा करायला लावणारे लोकही आहेत. त्याचप्रमाणे चैनीसाठी जास्त पैसा मिळविण्याच्या हेतूनेही काही मुली वेश्यावृत्तीने वागू लागतात. काही स्त्रियांना फार कठीण परिस्थितीत कामधंदा किंवा नोकरी करावी लागते आणि ती टिकविण्यासाठी किंवा जास्त पगार मिळविण्यासाठी वरिष्ठ अधिकाऱ्याला शीलाचे मोल द्यावे लागते. काही स्वैर वृत्तीच्या तरुणी केवळ चैनीसाठीही अधिकाऱ्याला वश होतात.

अलिकडे चित्रपटांचा प्रसार फार झाला आहे. त्यांतील कामुक प्रसंग, विलासी जीवन, स्वैर वर्तन, यामुळे तरुण-तरुणींच्या मनावर विपरीत परिणाम होऊन काहीजण बेछूट वागू लागतात. स्वैरसंभोगाचा परिणाम मुलीला भोगावा लागतो आणि ती वेश्याव्यवसायाकडे वळते. काही मुलींना चित्रपटधंद्याचे जबरदस्त आकर्षण वाटून, त्यात प्रवेश मिळविण्यासाठी त्या प्रयत्न करू लागतात आणि त्यातील लबाड दलालांच्या भूलथापांना बळी पडून आपले शील गमावतात. मग त्यांना घरी परत जाणे अवघड वाटते आणि त्या वेश्याव्यवसायात ओढल्या जातात.

काही विवाहित स्त्रियाही नवऱ्याच्या जाचाला व व्यसनीपणाला वैतागून आणि एखाद्या ओळखीच्या माणसाचा बदसल्ला खरा मानून मोठ्या आशेने या धंद्यात पडतात. हा मार्ग त्या खुषीने पत्करतात असे भासते, पण तसे नसते. दुःखमय वैवाहिक जीवनाला कंटाळून, निराशेने व निरुपायानेच त्या वेश्यावृत्ती अंगिकारतात. आपखुषीने हा धंदा करू लागणाऱ्या स्त्रिया थोड्याच असतील. बहुसंख्य वेश्यांना त्या अडचणीत सापडलेल्या असताना, त्यांना मदत करण्याच्या मिषाने, या धंद्यातील हस्तकांनी या मार्गावर आणून सोडलेले असते.

धर्माच्या नावाखाली चाललेल्या काही अनैतिक रूढींतूनही वेश्यावृत्ती उत्पन्न होते. त्यांतील देवदासींची प्रथा प्रसिद्ध आहे. देवाच्या सेवेला ठेवलेल्या मुलींना देवदासी म्हणतात. देवाचा प्रतिनिधी म्हणून पुजारी त्या मुलींचा उपभोग घेतो. त्यामुळे त्या पवित्र होतात, या धार्मिक अंधश्रद्धेतून ही प्रथा उगम पावली. द. भारतातील काही देवालयांत शेकडो देवदासी असत आणि त्या देवसेवेबरोबर वेश्याव्यवसायही करीत. त्या पुजाऱ्याच्या दृष्टीने दासी असल्या तरी, समाजात त्यांना मान मिळत असे. देवदासींच्या मुलीही देवदासीच बनत.

देवदासींव्यतिरिक्त आईबापांनी देवाला वाहून टाकल्यामुळे वेश्या बनलेल्या स्त्रियांचाही एक वर्ग आहे. त्यात खंडोबाच्या मुरळ्या, जोतिबाच्या व यल्लमाच्या जोगतिणी व अंबाबाईच्या आराधिणी यांचा समावेश होतो. मूल होत नसले किंवा होऊनही जगत नसले तर, 'जे मूल होईल ते देवाला अर्पण करीन' असा नवस काही स्त्रिया बोलतात व तो खरा करतात. अशा प्रकारे देवाला वाहिलेल्या मुली पुढे वेश्याव्यवसाय करू लागतात.

वेश्यांचा धंदा उघडपणे मोठ्या प्रमाणात चालतो, तसाच किंवा त्याहून जास्त प्रमाणात चोरून चालतो. उघडपणे धंदा करणाऱ्या वेश्या शहराच्या विशिष्ट भागात राहतात. त्या संध्याकाळी नटूनथटून खिडकीत किंवा दारात बसून, हावभाव करून गिऱ्हाइकांना बोलावतात. पण चोरून धंदा करणाऱ्या स्त्रिया

शहरभर पसरलेल्या असतात. त्यांचा भाव अधिक असतो. त्यांची राहणी चांगली असते. मध्यस्थाच्या ओळखीने घरी आलेल्या पुरुषाशीच त्या संबंध ठेवतात. त्यांना स्वतंत्रपणे गिऱ्हाइकाशी संपर्क साधता येत नाही. सभ्य कुटुंबाच्या शेजारीच त्यांची वसती असल्यामुळे त्यांनाही बाह्यात्कारी सभ्यपणाने राहावे लागते.

औद्योगिक विकासामुळे अनेक शहरांची वाढ झाली, त्यांची लोकसंख्या वाढली आणि समाजजीवनात खूप बदल झाला. नोकरीधंद्यासाठी लाखो लोक शहरांत येतात, पण तिथे राहण्यासाठी पुरेशी जागा त्यांना मिळत नाही. त्यांची बायकामुले परगावी राहतात. तात्पुरत्या कामानिमित्तही हजारो लोक काही दिवसांसाठी शहरात येऊन राहतात. शहरातील वातावरण कामोद्दीपक असते. त्यामुळे वेश्यांना खूप ग्राहक मिळतात. या धंद्यातील दलाली करणारेही बरेच लोक असतात. त्यांना नीति–अनीतीची चाड नसते. ते कोणत्याही मार्गाने कामातुर पुरुषांना भुलवून वेश्यांकडे नेतात, फसवतात व लुबाडतात.

काही वेश्या स्वतंत्रपणे धंदा करतात; पण बहुतेक वेश्या कुंटणखान्यात राहून देहविक्रय करतात. कुंटणखाना चालवणारी स्त्री मूळची वेश्या, पण वृद्धपणामुळे स्वतः देहविक्रय न करता तरुण मुलींना सांभाळून धंदा करीत असते. तिचे हस्तक नानाविध उपायांनी अडाणी तरुणींना फसवून आणतात किंवा विकत घेतात व कुंटणखान्यात कोंडून ठेवून भ्रष्ट करतात. त्यांच्या कमाईतला पोटापुरता भाग त्यांना देऊन बाकीचा मोठा भाग हे लोक लाटतात. वाटेल त्या पुरुषाच्या संसर्गामुळे त्या मुलींना दुर्धर रोग जडतात व त्यांच्या द्वारे समाजातही त्या रोगांचा फैलाव होतो.

प्रमेह व उपदंश हे दोन गुप्त रोग वेश्यांच्यामुळे त्यांच्या ग्राहकांना व त्यांच्यामुळे त्यांच्या बायकांना होतात. हे रोग बरे करणे फारच कठीण असून, त्यांचे परिणाम रोग्यांच्या मुलांवरही होतात. ती दुर्बल मनाची निपजतात. अशा प्रकारे या अनैतिक धंद्यामुळे समाजाचा दुहेरी घात होऊ लागला, तेव्हा त्यावर नियंत्रण घालण्यासाठी सरकारने कायदेशीर उपाय सुरू केले; पण त्यांचा व्हावा तसा उपयोग झाला नाही. वेश्याव्यवसाय पूर्वीप्रमाणेच पण गुप्तपणे चालू राहिला व रोगांचा फैलावही वाढला. चोरून चाललेल्या अनैतिक संबंधामुळेच या रोगांचा प्रसार जास्त होतो, असे आढळून आले. त्यानंतर या धंद्याचे नियंत्रण करणारे कायदे रद्द करून, निर्मूलन करणारे कायदे करण्यात आले. रोगांचा फैलाव होऊ नये म्हणून, वैद्यकीय तपासणी व औषधोपचार यांची व्यवस्था करण्यात आली. तथापि हजारो वर्षे चालत आलेला हा व्यवसाय कसाही असला, कितीही समाजघातक असला, तरी तो कायद्याने बंद करणे शक्य नाही. कारण समाजाच्या सर्व थरांतील असंख्य पुरुषांच्या कामवासनेमुळे तो चालू आहे, वाढतो आहे व असाच वाढत जाणार आहे. त्याचे भयानक परिणाम टाळण्यासाठी काही जुजबी उपाय करणे एवढेच सरकारच्या हातात आहे. [ हि. ध.; भा. सा. इ.; म. भा. ना.; प्रा. भा. म.; वेश्या व वेश्याव्यवसाय– श्री. पु. गो. नाईक, १९५८.

**वेषभूषा** माणूस आपले शरीर आच्छादण्यासाठी वस्त्रे केव्हापासून वापरू लागला, याविषयी अनेक कल्पना प्रचलित आहेत. थंडी, वारा, ऊन, पाऊस इत्यादींपासून शरीराचे संरक्षण व्हावे, म्हणून शरीर आच्छादण्याची प्रथा सुरू झाली, असे सर्वसाधारण मत आहे. सुरुवातीला आदिमानव पाने किंवा गवत यांनी शरीर झाकत असे. पुढे वस्त्राचा शोध लागल्यावर मानव अंगाभोवती वस्त्र लपेटू लागला. मनुष्याला नटण्यासजण्याची हौस स्वाभाविक असते. त्या वृत्तीतून वस्त्रे वापरण्याची प्रथा अस्तित्वात आली, असे काहीजणांचे मत आहे. परपुरुषांच्या दृष्टीपासून स्वतःच्या स्त्रीचे रक्षण करण्याची जी प्रवृत्ती पुरुषांमध्ये असते, तिच्यातून भिन्न भिन्न वेष निर्माण झाले, असे आणखी काही लोकांचे म्हणणे आहे. काही लोकांच्या मते आदिमानव जे काही वेष वापरीत होता त्यांत संरक्षण, लपवालपवी व साज-शृंगार या सर्व भावनांचे मिश्रण आढळते. स्त्री व पुरुष वयात आल्यानंतर त्यांना परस्परांविषयी लज्जा उत्पन्न झाली आणि शरीर आच्छादण्याचे महत्त्व अधिकच जाणवले. पुढे संस्कृतीचा विकास झाल्यानंतर पोषाखाला इतके महत्त्व प्राप्त झाले, की त्यावरून माणसाचा दर्जा ठरू लागला. व्यक्तीचा पोषाख त्याचा प्रतिनिधी मानला जाऊ लागला. कोणत्याही देशाच्या संस्कृतीचे बाह्य स्वरूप हे वेषभूषेच्या द्वारे विशेषत्वाने प्रकट होऊ लागले.

भारतात प्राचीन काळापासून आतापर्यंत मानवाच्या पोषाखात कसकसा बदल होत गेला, हे पाहणे उद्‌बोधक ठरेल.

**सिंधुसंस्कृतीचा काळ** – (सनपूर्व ३०००) या संस्कृतीचे अवशेष मोहेंजोदडो व हडप्पा येथील उत्खननात सापडले आहेत. इथे मिळालेल्या कापडाच्या तुकड्यांवरून असे दिसते, की त्या काळात सूत कातणे व सुतापासून वस्त्र विणणे या कला लोकांना अवगत झाल्या होत्या. लोक सुती व लोकरी असे दोन्ही प्रकारचे कपडे वापरीत होते. इथे काही प्रतिमाही मिळाल्या आहेत. त्यांवरून त्या वेळच्या लोकांच्या वेषभूषेची कल्पना येते. एका मनुष्यमूर्तीने डाव्या खांद्यावरून व उजव्या खांद्याखालून तलम शाल पांघरली आहे. त्या माणसाचा उजवा हात मोकळा आहे. दुसऱ्या एका प्रतिमेत पायापर्यंत शाल पांघरलेली आहे.

या शालीच्या आत अधोभागी पुरुष काही वस्त्र वापरत

होता का नाही, हे सांगणे मात्र कठीण आहे. कारण, अनेक पुरुषप्रतिमा प्रायः वस्त्ररहित आहेत. परंतु मुद्रांवर अंकित



गंधार–शिल्पातील स्त्री-पुरुषांची वेषभूषा

केलेल्या देवता व वीर पुरुष एक सुती वस्त्र नेसलेले दाखविले आहेत. या काळातील लोकांना शिवलेले कपडे माहीत होते का नाही, ते कळत नाही. एकाच मूर्तीत सदऱ्यासारखा कपडा दिसतो. तो कंबरेला एका दोरीने बांधलेला आहे.

या काळातील स्त्रियांची वेषभूषा अगदी साधी होती. त्या गुडघ्याच्या वर येईल असे एक वस्त्र कमरेभोवती गुंडाळीत व पट्ट्याने बांधीत. काही दागिने वगळल्यास कमरेच्या वरच्या भागी या मूर्ती वस्त्ररहित आहेत. एका स्त्रीमूर्तीचे हात वस्त्राने झाकलेले आहेत; पण वक्षःस्थळ मात्र उघडे आहे.

या काळातील स्त्रीपुरुष पंख्याच्या आकाराची वस्तू मस्तकावर धारण करीत. मॅकेच्या मतानुसार हा एक कडकडीत केलेला सुती कपडा असून, तो एका साच्यावर बसवीत. तसेच तो कपडा दागिन्यांनीही मढवीत. काही स्त्रीमूर्तींच्या मस्तकावर टोपलीसारखी वस्तू दिसते. तिच्यात दिवा ठेवीत, असे दिसते. या मूर्ती पृथ्वीमातेच्या असाव्या, असे वाटते. मध्यकालातील दीपलक्ष्मीच्या मूर्तींशी या मूर्तींचे बरेच साम्य आहे. काही स्त्रीमूर्तींच्या डोक्यावर पगडी आहे. मातीच्या काही मूर्तींच्या डोक्यावर सैलसर टोप्या आहेत. स्त्रियांच्या व पुरुषांच्या टोप्या वेगवेगळ्या आहेत. काही पुरुषप्रतिमांच्या गळ्याभोवती एक पातळ दुपट्टा दिसतो. मॅकेच्या मते तो विशिष्ट पदाचा किंवा मताचा सूचक आहे. हडप्पा येथे सापडलेली एक पुरुषमूर्ती जांघ्या किंवा धोतर नेसलेली आहे; तर आणखी एक पुरुषमूर्ती चुण्या असलेले घागऱ्यासारखे वस्त्र नेसलेली आहे. या काळातील स्त्रीपुरुष आपले केस डोक्याच्या मागच्या बाजूला, विणलेल्या दोऱ्याने बांधीत असत.

**वैदिक युग** – (सनपूर्व २५०० ते सनपूर्व १५००) – सिंधुसंस्कृती नष्ट झाल्यावर सुरू झालेल्या वैदिक युगाची पुष्कळ माहिती वैदिक साहित्याच्या आधारे मिळते.

लोकर कातून तिचे सुंदर कापड विणण्याची कला आर्यांना ज्ञात होती. ते बहुधा लोकरीचेच कापड वापरीत. त्यांच्या घरात कांबळे व गादी या वस्तू असत. देवदेवता, मुनी, आर्य, अनार्य व व्रात्य लोक चामड्याचा वस्त्रासारखा उपयोग करीत. मरुत् मृगचर्म धारण करीत, असा उल्लेख आहे. मुनी भुऱ्या रंगाच्या चामड्याचा उपयोग करीत. व्रात्य व त्यांचे अनुयायी काळ्या व पांढऱ्या रंगाचे असे दुहेरी चर्म पांघरीत. दस्यू किंवा अनार्य लोक कृत्ती व दूर्श नामक चामडी नेसत.

कृष्णमृगाचे चामडे बहुधा धार्मिक कार्यांच्या वेळी वापरीत. मेषचर्म वापरण्याची पद्धत होती. याव्यतिरिक्त वैदिक वाङ्मयात बरासी, दूर्श, क्षौम, पांड्व व तार्प्य या कपड्यांचा उल्लेख येतो. हे बहुधा वनस्पतींच्या दोरापासून बनवलेले असावे, असे वाटते.

वैदिक काळात कपडे विणण्याचे काम स्त्रिया करीत. अशा स्त्रियांना वायित्री किंवा सिरी असे म्हणत. ऋग्वेदात आणि इत-



सांची येथील शिल्पातील धनुर्धारी व साधा सैनिक

रही ग्रंथांत पोषाखाला वासस् हा शब्द योजला आहे. सुंदर वस्त्रे नेसण्याची वैदिक आर्यांना आवड होती. सुवसन शब्दाचा अर्थ

उत्तम पोषाख असा आहे. असे पोषाख बनविणाऱ्यांना वासो-वाय असे नाव होते. वस्त्रांवर कशीदा काढीत व जरीचे कामही करीत. वस्त्रांना किनारी असत व त्यांच्यावर जरीचे काम केलेले असे. लोक साधारणपणे पांढरे कपडे वापरीत; पण यज्ञाच्या वेळी स्त्रिया रंगीत वस्त्रे नेसत. व्रात्य लोकांना काळचा व निळचा रंगाच्या कपडयांची आवड होती.

वैदिक काळी लोक अधोवस्त्र (नीवी), त्याच्यावर एक वस्त्र व उत्तरीय अधिवास अशी तीन वस्त्रे वापरीत. नीवी स्त्रिया व पुरुष दोघेही वापरीत. नीवी हे वस्त्र प्रत्येकजण आपल्या आवडीप्रमाणे कमरेला कलात्मक गाठी मारून नेसत असे. स्त्रीपुरुष कमरेच्या वरचा भाग उपवसन, पर्याणहन किंवा अधिवास प्रतिधी, द्रापी, अत्क यांनी झाकीत. उपवसन हे कदा-चित शालीसारखे वस्त्र असावे.

वरील वस्त्रांशिवाय शिवलेल्या काही वस्त्रांचा उल्लेख वैदिक वाङ्मयात आलेला आहे. त्यांपैकी अत्क म्हणजे सारे शरीर झाकणारा, लांब, भडक रंगाचा व जरीकाम केलेला असा पुरु-षांचा कंचुक होय. पेशस् नामक वस्त्र बहुधा आधुनिक खमिसा-सारखे असावे. त्याच्यावर सुंदर वेलबुट्टी काढलेली असे. द्रापी नामक वस्त्र अंगरख्यासारखे असावे. त्याच्यावर जरीचे काम केलेले असे. काही विशिष्ट स्त्रीपुरुष ते धारण करीत.

यज्ञप्रसंगी राजे लोक शिरोवस्त्र धारण करीत. इंद्राणीनेही पगडी घातल्याचा उल्लेख आहे. व्रात्य लोकांचे उष्णीष पांढरे असे.

प्राचीन वैदिक संहितांत वहाणांचा उल्लेख मिळत नाही. यजु-र्वेद, अथर्ववेद व ब्राह्मणग्रंथ यांत उपानह् शब्द आलेला आहे. धार्मिक कृत्यांच्या वेळी लोक आणि विशेषतः व्रात्य जोडे घालीत. यज्ञाच्या प्रसंगी हरिण किंवा वराह यांच्या चामडयाच्या खडावा वापरीत.

**मौर्यपूर्वकाल –** (सनपूर्व ६५००–३२०) – या काळातील राजकीय व सामाजिक इतिहासाची पुष्कळ माहिती बौद्ध व जैन साहित्य, तसेच धर्मसूत्रे, गृह्यसूत्रे व अष्टाध्यायी यांवरून मिळते.

या कालात सूत कातण्याची व वस्त्रे विणण्याची कला खूप विकसित झाली होती. बौद्ध जातकांत कापूस, रेशीम, कुश, तृण, सण व कौटुंबर यांच्या वस्त्रांचे वर्णन मिळते. काशीच्या आसपास पिकणाऱ्या कापसापासून प्रामुख्याने वस्त्रे बनवीत. रेशमी वस्त्रेही काशीत तयार होत. प्राचीन काळापासून काशीत बन-णारी वस्त्रे त्यांचा मुलायमपणा व तलमपणा यांसाठी प्रसिद्ध आहेत. लोकरी व सुती कापडाचे गालिचे, पडदे व मेजपोशही बनवीत असत. त्यांना निरनिराळी नावे आहेत. बिछाना झाक-ण्यासाठी अनेक वस्त्रांच्या तुकडयांपासून बनवलेल्या रंगीबेरंगी गोधडीला चित्तक असे नाव होते. पांढऱ्या लोकरीच्या गालि-च्याला पलिका असे म्हणत. जवळ जवळ फुले काढलेल्या गालि-



तीन वस्त्रे नेसलेली स्त्री – गंधारशिल्प व अलंकार घातले[ले]
द्वारपाल – द. भारत, स. पू. १ ले शतक.

च्याला पटलिका अशी संज्ञा होती. सिंह, वाघ, इ. पशूंची चित्रे काढलेल्या आस्तरणाला विकटिका व जवाहिरांनी सजवलेल्या आस्तरणाला कठ्ठिस अशी नावे होती. सोळा नर्तकी ज्याच्यावर एकाच वेळी नृत्य करू शकतील, एवढ्या मोठ्या लोकरी गालि-च्याला कुत्तक असे म्हणत. स्वच्छ फरशीवर अंथरायच्या आस्त-रणाला चिलिमिका अशी संज्ञा होती. कापूस भरलेली र[जा]ई तूलिका या नावाने प्रसिद्ध होती.

वाल्मीकीच्या काळी मृगचर्म, वल्कल व वस्त्र असे तीन्ही प्रकारचे वेष प्रचलित होते. वस्त्रोद्योगाची वाढ झाल्यामुळे वस्त्रे विविध प्रकारची व मोठ्या प्रमाणावर तयार होत. जनकाने आपल्या कन्यांच्या विवाहप्रसंगी खूप वस्त्रे उपहार म्हणून दिली होती. वस्त्रे दानही दिली जात. वनात जाण्यापूर्वी रामसीतेने आपल्या परिजनांना सुंदर सुंदर वस्त्रे भेट म्हणून दिली होती. भरताच्या सेनेच्या स्वागतसमारंभात भरद्वाजाने कपडयांचे ढीगच्या ढीग मांडले होते. लंकादहनाच्या वेळी वानरांनी विवि[ध] रेशमी व लोकरी वस्त्रे अग्नीत टाकली होती.

साजशृंगार केलेल्या स्त्रियांचे वर्णन वाल्मीकीने अनेकवार केले आहे. दशरथाचा राजवाडा सुंदर वेषभूषा केलेल्या प्रम-दांनी भरलेला होता. रावणाचे अंतःपुर रंगीबेरंगी वस्त्रे नेस[लेल्या]

लेल्या सुंदरींनी सुशोभित होते. रेशमी वस्त्रे (कौशेय) त्या काळी खूप प्रचारात होती. राजकन्यांना ती विशेष आवडत असत. सीतेला अनेकदा कौशेयवासिनी असे म्हटले आहे. ब्राह्मण लोकही प्रायः रेशमी वस्त्रे वापरीत. क्षौम वस्त्रे मुलायम, तलम व अधिक किमतीची होती. पूजेच्या वेळी, विशेषतः त्यांचा वापर करीत. उत्सवप्रसंगीही क्षौम वस्त्रे परिधान करीत. नववधू सीतेचे स्वागत करण्याच्या वेळी दशरथाच्या राण्या क्षौम वस्त्रे नेसल्या होत्या. स्त्रिया कमरेला गाठ मारून वस्त्र नेसत आणि वर कमरपट्टा किंवा रशना बांधून ते घट्ट करीत. चोळी किंवा कंचुकी यांचा उल्लेख मात्र रामायणात आढळत नाही. स्त्रिया उत्तरीयानेच आपले वक्षःस्थळ झाकीत.



शुंग युगातील स्त्रीचे वस्त्रालंकार

त्या काळात तलम वस्त्रांना सूक्ष्म वस्त्र; भारी किमतीच्या वस्त्रांना महार्ह वस्त्र; नक्षीदार व किनार असलेल्या वस्त्रांना संवीत वस्त्र आणि नव्या कपड्यांना अहत वस्त्र अशा संज्ञा होत्या. त्या काळी शिवलेली वस्त्रे फारशी प्रचारात नव्हती. सेवकांचे कंचुक मात्र शिवलेले असत.

योग्यतेप्रमाणे पुरुष मस्तकावर मुकुट किंवा उष्णीष घालीत. लोक पायांत लाकडी खडावा किंवा चामड्याची पादत्राणे घालीत. स्त्री-पुरुष दोघेही सोन्याचे व रत्नांचे अलंकार घालीत.

महाभारतकाळी पुरुषांचा पोषाख अंतरीय व उत्तरीय अशी दोन वस्त्रे आणि उष्णीष असा होता. गृहस्थांची वस्त्रे क्षौम, कौशेय व आविक अशा प्रकारची असून, वानप्रस्थ व तपस्वी कुशचीर वल्कले व चर्म पांघरीत. स्त्रियाही कटिवस्त्र व उत्तरीय अशी दोन वस्त्रे वापरीत. श्रीमंत लोक, विशेषतः स्त्रिया, रेशमी वस्त्र नेसत. स्त्रीपुरुष दोघेही अलंकारांनी शरीर सजवीत.

त्या काळी गंधार व पंजाब लोकरीच्या वस्त्रांसाठी प्रसिद्ध होते. राजसूय यज्ञाच्या वेळी युधिष्ठिराला पंजाब, वायव्य सरहद्द प्रांत व पूर्व अफगाणिस्तान या देशांतून लोकरीची वस्त्रे व चामडी भेट म्हणून आली होती, असा उल्लेख आहे.

जैन श्रमणांच्या वस्त्रांविषयी सीहनादसुत्तात माहिती दिली आहे. जैन श्रमण सणापासून बनवलेली वस्त्रे, मृताच्या शरीरावरून काढलेली वस्त्रे (छवदुस्स), तिरीटाच्या सालीपासून बनविलेली वस्त्रे, मृगचर्म, कृष्णमृगाच्या चामड्याच्या पट्ट्या काढून तयार केलेली वस्त्रे, कुशचीर, केसांपासून बनविलेली वस्त्रे, इ. वस्त्रे वापरीत. ते दोन क्षौम धोतरे व एक लोकरी बुरणूस एवढी वस्त्रे वापरीत.

बौद्ध भिक्षू व भिक्षुणी पिवळ्या रंगाची प्रत्येकी तीन वस्त्रे वापरीत. संघाटी म्हणजे कमरेभोवती गुंडाळायचे, अंतरवासक म्हणजे शरीराचा कमरेपासून वरचा भाग झाकणारे व तिसरे उत्तरीय वस्त्र होय. याशिवाय, बसण्यासाठी एक आसन, खरूज वगैरे झाल्यास वापरण्यासाठी एक कौपीन आणि पावसाळ्यात नेसण्यासाठी आणखी एक वस्त्र वापरण्याची परवानगी त्यांना होती. भिक्षू आयोगपट्ट व कमरबंध वापरीत. भिक्षुणी कंचुकी घालीत.

सर्वसाधारण पुरुष अधोवस्त्र, उत्तरीय व उष्णीष असा पोषाख करीत. याशिवाय, स्त्रीपुरुष लहानसा कंचुकही घालीत. स्त्रिया साडी नेसत. लोकांना कपडे चांगल्या पद्धतीने नेसण्याची आवड होती. अधोवस्त्र किंवा धोतर नेसण्याचे अनेक प्रकार प्रचारात होते. हस्तिशौंडिक नामक प्रकारात धोतराचा एक सोगा हत्तीच्या सोंडेप्रमाणे लटकत ठेवीत, तर तालवृंतक प्रकारात तो ताडाच्या पंख्याप्रमाणे सोडीत. चतुष्कर्णक प्रकारात वस्त्राचे चारही कोन दिसत. कमरेला बांधायचे पट्टेही विविध प्रकारचे असत. वहुतेक लोक लाकडी किंवा गवताच्या खडावा व निरनिराळ्या चामड्यांची पादत्राणे वापरीत. श्रीमंतांच्या खडावांवर व पादत्राणांवर जरतारी काम केलेले असे व रत्ने जडवलेली असत.

या काळातील लोकांना कपडे शिवण्याची कला ज्ञात होती.

**मौर्य–शुंग व शक–सातवाहन काल** (सनपूर्व ३२० ते इ. स. ३००) – या कालातील वेषभूषेविषयी तत्कालीन साहित्याशिवाय मूर्तिकला व शिल्पकला यांवरूनही माहिती मिळते. जातकग्रंथ व विनयपिटक यांत वर्णिलेली वेषभूषा या कालातही प्रचलित होती.

कौटिल्याच्या अर्थशास्त्रात एका सबंध अध्यायात सूत्राध्यक्षाची कर्तव्ये सांगितली आहेत. या काळात लोकांना सूत कातण्याची, वस्त्रे विणण्याची व कपडे शिवण्याची कला ज्ञात होती. लोकर, कापूस, रेशीम, ताग इत्यादींपासून वस्त्रे तयार करीत. ती तयार करणाऱ्यांना त्यांच्या वेतनाव्यतिरिक्त अनेक भेटी व इनामे देण्यात येत.

मौर्यकालापासून पुढे कापसाचा उपयोग पुष्कळ प्रमाणात होऊ लागला. या काळातील लोकांचा गुडघ्याखाली पोचणारे

सुती धोतर व उत्तरीय असा वेष होता. या कालातील परखम, बडोदा, बेसनगर व दीदारगंज येथील मूर्तींचा पोषाख अशा प्रकारचा आहे. स्त्रियाही एक कटिवस्त्र नेसून वर मेखला बांधीत. कटिवस्त्रात पुढच्या बाजूला नाभीच्या जरा खाली निऱ्या केलेले एक वस्त्र खोचीत. कमरेच्या वरच्या शरीरावर त्या दुपट्टा घेत. तो दोन्ही खांद्यां-वरून किंवा खांद्याखालून मागे सोडीत. पुरुष डोक्याला फेटा बांधीत. स्त्रिया व पुरुष लांब बाह्यांचा कंचुक घालीत व तो कमरपट्ट्याने कमरेभोवती घट्ट करीत.



जंगली जमातीतला सैनिक— गंधारशिल्प

भरहुत येथे मिळालेल्या मूर्तींत स्त्रिया पुरुषांच्या धोतरा-सारखीच साडी नेसलेल्या दिस-तात. साडी गुडघ्याखाली पोच-णारी असून, तिच्या पुढच्या बाजूला निऱ्या काढलेला पटका लोंबत असतो. साडी मेखला आणि कमरपट्टा यांनी आवळ-लेली दिसते. त्यांनी आपले मस्तक सुंदर वस्त्राने आच्छादले आहे. काही स्त्रियांच्या मस्तकावर उष्णीष आहे.

सांचीस्तूप व कार्लेगुंफा येथील मूर्तींच्या व चित्रांच्या वेष-भूषेवरून सनपूर्व पहिल्या शतकातील भारतीय वेषभूषेची कल्पना येते. पुरुष गुडघ्यापर्यंत पोचणारे धोतर नेसत, त्याची कास घालीत व पुढच्या बाजूला त्याच्या निऱ्या काढीत. काही वेळा धोतराचे एक टोक कमरेभोवती गुंडाळीत व दुसरे डाव्या खांद्यावरून मागे टाकीत. कमरपट्टा असेच. कार्ले येथील मूर्तींचे कटिवस्त्र जरा तोकडे आहे. पुरुष कधी कधी वरचे अंग उघडेच ठेवीत, तर कधी उत्तरीय पांघरीत. पुरुष आकर्षक पद्धतीने डोक्याभोवती साफा गुंडाळीत किंवा उष्णीष किंवा टोपी घालीत. उष्णीषाचा आकार गोल, चौकोनी किंवा पंख्यासारखा करून बांधीत. सांची येथील रथ हाकणाऱ्याच्या मूर्तीत शिरस्त्राणासारखी टोपी आणि टोपीत एक पीस खोच-लेले दिसते. काही परदेशी लोकांनी आपल्या कपाळावर एक फीत बांधलेली आहे. अजंटा येथील चित्रात उष्णीष दिसत नाहीत. त्याऐवजी डोक्यावर मध्यभागी केसांची गाठ बांधून तिच्या भोवती एक फीत बांधलेली दिसते.

स्त्रिया दोन प्रकारे कटिवस्त्र नेसत. एक लंगोटीप्रमाणे असे. त्याचे एक टोक पुढच्या बाजूने मेखलेत अडकवून खाली सोडीत व एक मागे खोचत. दुसऱ्या प्रकारचे वस्त्र गुडघ्यापर्यंत लांब असे व त्याचा कासोटा घालीत. हल्लीच्या नऊवारी साडीसारखे ते दिसे. एका मूर्तीत कमरेभोवती एक वस्त्र गुंडाळलेले आहे व त्याचे एक टोक चुणीदार करून बगलेत बांधले आहे. स्त्रिया सुंदर किनार असलेले वस्त्र मस्तकाभोवती गुंडाळीत व त्याची टोके मागे पाठीवर सोडीत. क्वचित हे वस्त्र दोरीने बांधीत. याशिवाय, स्त्रिया उष्णीष व अरुंद टोप्याही घालीत.

सांची येथील मूर्तींत शिवलेली वस्त्रे दृष्टीला पडतात. रथ हाकणारे, शिपाई, राजांचे अंगरक्षक, पताकावाहक आणि स्तूपाची पूजा करणारे परदेशी लोक, शिवलेले, पूर्ण बाह्यांचे कुडते व चड्डया घातलेले दिसतात. परदेशी लोकांचे उत्तरीय पाठीवर फडकत असते व पुढच्या बाजूने गळ्याखाली त्याच्या टोकांची गाठ बांधलेली असते. त्यांनी मस्तकावर अरुंद फीत बांधलेली आहे किंवा टोपी घातली आहे. त्यांच्या पायांत पूर्ण बूट आहेत.

ब्राह्मण व साधू कौपीन नेसत व वैकक्ष्य पांघरीत. वैकक्ष्य डावा खांदा व छाती झाकत असे. छातीचा उजवा भाग तसाच उघडा राही. ऋषिपत्न्या कमरेभोवती एक वस्त्र गुंडाळीत आणि वर वैकक्ष्य घालीत.



देशी वेषभूषा — गंधारशिल्प.

इ. स. चे १ ले शतक ते ३ रे शतक या कालातील वेषभूषेची माहिती गंधार व मथुरा येथील मूर्ती व अर्धचित्रे आणि अमरावती व नागार्जुनकोंडा इथल्या स्तूपांवरून मिळते. पुरुषांचा धोतर, उत्तरीय व उष्णीष हा आणि स्त्रियांचा साडी व ओढणी हा पोषाख या कालातही प्रचलित होता. पण त्याचबरोबर जांघ्या, पायजमा, पूर्ण बूट, कवच, टोपी, इ. शिवलेली वस्त्रेही लोक वापरू लागले. बहुधा मध्य आशि-यातील व इराणातील लोकांच्या पोषाखाचे हे अनुकरण असावे.

या काळात उच्च प्रतीच्या कापसाची लागवड खूप मोठ्या प्रमाणा-वर सुरू झाली. त्यापासून विदर्भातील लोक उत्तम सुती कापड बनवीत. नाग जातीचे लोक आणि कलिंगातील लोक तलम मलमल तयार

करीत आणि ती रोम, अरबस्तान, इजिप्त, इ. देशांत पाठवीत.

लोक मोठ्या प्रमाणावर सुती वस्त्रांचा वापर करीत, त्याचबरोबर रेशमी वस्त्रेही वापरीत. सांप्रत गुजरातेत पटोला या नावाने प्रसिद्ध असलेल्या रंगीबेरंगी रेशमी साडीला विचित्र पटोलक असे म्हणत. द. भारतातील स्त्रिया लाल रंगाचे रेशमी वस्त्र नेसत.



शुंग–कालातील शिरोभूषणे

उत्तम लोकरीची वस्त्रेही त्या काळी तयार होत. काश्मीरातील लोकरी शाली प्रसिद्ध होत्या. वेलबुट्टीदार सोनेरी कपडे (हर्यणी हिरिवस्त्र), दुकूल वृक्षाच्या धाग्यांचे वस्त्र (पांडुदुकूल), बनारसी सुती व रेशमी कपडे (काशिक वस्त्र), सिंध, गुजरात व कोकण येथील अपरांतक नामक वस्त्र, चीट (फुट्टक), छापलेले किंवा वेलबुट्टी काढलेले वस्त्र (पुष्पपट्ट), इ. वस्त्रे लोक त्या काळी वापरीत. सोपारा बंदरात बनारसी रेशमी कपड्यांचे एक स्वतंत्र दुकान होते, असा उल्लेख दिव्यावदानात आहे.

तमिळ साहित्यातील अनेक उल्लेखांवरून तमिळ देशातील लोकांच्या पेहरावाची कल्पना येते. राजे कटिवस्त्र नेसत आणि मस्तकावर रत्नजडित उंच सुवर्णमुकुट, केयूर, हार, इ. अलंकार घालीत. मध्यम वर्गातील लोक कटिवस्त्र व उष्णीष असा पोषाख करीत. राजमहालाचे रक्षक कोट व कुडता घालीत. श्रीमंत लोक रेशमी रंगीत दोऱ्यात नीलमणी ओवून त्याने आपले केस बांधीत.

तमिळ स्त्रिया घोटयापर्यंत पोचेल, अशी साडी नेसत. त्यांचा छातीचा भाग उघडाच असे. त्यावर त्या चंदनादी सुगंधी द्रव्यांचा लेप देत. दरबारातील वेश्या अर्ध्या मांड्या झाकतील असे मलमलीचे वस्त्र कमरेभोवती गुंडाळीत.

गंधार कलेतील मूर्तींत राजपुत्र व श्रीमंत पुरुष लांब चुणीदार धोतर व उत्तरीय असा पोषाख केलेले दिसतात. थंडीच्या दिवसांत लोक लांब कुडता, कोट, पायजमा, असा वेष करीत. पुरुष कधी केस मोकळे सोडीत तर कधी डोक्यावर त्यांची गाठ बांधून मोती किंवा रत्ने यांनी ती सजवीत. बहुधा डोक्याला ते उष्णीष घालीत. उष्णीष वेगवेगळ्या ढंगदार पद्धतीने बांधीत.

असंस्कृत जातींचे सैनिक लुंगी नेसत व ती कमरबंदाने आवळीत. वर घडी केलेले उत्तरीय असे. इतर सैनिक शीर्षकटाह व कवच घालीत. कवच म्हणजे अर्ध्या बाह्यांचा गुडघ्यापर्यंत पोचणारा कंचुक असे. काही सैनिक अर्ध्या चड्डया घालीत.

ब्राह्मण व ब्रह्मचारी लुंगी नेसत व उत्तरीय घेत. त्यांचे केस मानेवर मोकळे असत. परदेशी लोक उंच व त्रिकोणी टोप्या घालीत.

स्त्रिया बाह्यांचा कुडता, घागऱ्यासारखे वस्त्र व शाल असा पोषाख करीत. साडी अनेक प्रकारे नेसत. कधी ती सकच्छ असे; तर कधी तिचे एक टोक डाव्या खांद्यावर टाकलेले असे. दुपट्टा साधारणपणे खांद्यांवर टाकीत. स्त्रिया केसांत माळा घालीत.

या कालातील मध्यदेशाच्या लोकांची वेषभूषा मथुरा येथील मूर्तिकलेवरून स्पष्ट होते. पुरुषांचा पोषाख सर्वसाधारणपणे धोतर व दुपट्टा असा होता. दुपट्टा घेण्याच्या तऱ्हा अनेक होत्या. वरच्या दर्जाचे लोक कमरबंद वापरीत. ते एक सुंदर वस्त्र नाभीजवळ धोतरात खोचत. सर्व लोक उष्णीष वापरीत. त्यावर धातूंचे गोलाकार किरीट घालीत किंवा त्यात रंगीबेरंगी पिसेही खोवीत.



सातवाहन–कालातील शिरोभूषणे

शक शासक व शिपाई प्राय: लांब कुडता, पायजमा, टोपी व उंच बूट असा पोषाख करीत. कुडत्यांचे अनेक प्रकार असून, त्यांवर वेलबुट्टी काढलेली असे.

मथुरा कलेतील मूर्तींत स्त्रिया बहुधा घोटयापर्यंत लांब साडी नेसलेल्या दिसतात. त्यावर सुंदर मेखला घातलेली असते. काही मूर्तींत दुपट्टा दोन्ही खांद्यांवरून मागे टाकलेला दिसतो. कमरबंद अनेक सुंदर प्रकारांनी बांधलेले आढळतात. परदेशी स्त्रिया कुडता व साडी नेसत. त्यांच्या साडीचा एक पदर कमरेभोवती गुंडाळलेला असून, दुसरा छातीवरून डाव्या खांद्यावर टाकलेला असे. बहुतेक स्त्रियांचे मस्तक उघडेच असे.

अमरावती, नागार्जुनकोंडा, इ. ठिकाणच्या स्तूपांवरील पुरुषमूर्ती आखूड धोतर किंवा लुंगी नेसलेल्या आहेत. लुंगी विविध प्रकारे बांधलेली दिसते. तिच्या पुढच्या व मागच्या बाजूला एक चुणीदार पटका खोचलेला आहे. कमरपट्टे विविध कलात्मक ढंगांत बांधलेले आहेत. केस अलंकारांनी व विविध उष्णीषांनी सजवलेले दिसतात. टोप्यांचेही त्रिकोणी, गोल, असे आकार दिसतात. परदेशी लोक व कहार, गायक, इ. लोक कुडता घालीत.

या कालात द. भारतातील स्त्रिया घोटयापर्यंत पोचणारी साडी नेसत. तिच्यावर मेखला घालीत. पुढच्या बाजूला खाली लोंबणारा एक पटका खोचत. छातीचा भाग बहुधा उघडाच असे. त्या अनेक प्रकारची केशरचना करीत. आणि तिच्याभोवती चारही बाजूंनी कलात्मक रीत्या शिरोवेष्टन घालीत. सजवलेले किरीट व मुकुटही त्या घालीत. लहान मुले अर्धी चड्डी घालीत. त्यांच्याही डोक्याला उष्णीष असे.

गुप्तकाल (इ. स. चे ४ थे ते ७ वे शतक) – या कालात कापडावर छपाई करण्याची कला अतिशय विकसित झाली. तसेच तलम व सुंदर कापडही या काळात तयार होऊ लागले.

सर्वसाधारण लोक साधे, सुती पांढरे कपडे वापरीत. पुरुष धोतर नेसत व त्याचे एक टोक डाव्या खांद्यावर टाकीत. स्त्रिया साडी नेसत व पदर घेत. उत्तर भारतातील लोक थंडीच्या दिवसांत कोट घालीत, असे युआन च्वांगने त्या काळातील लोकांच्या पोषाखाचे वर्णन केले आहे.

मूलसर्वास्तिवादी बौद्ध भिक्षू संघाटी, उत्तरासंग व अंतरवास असा पोषाख करीत. याशिवाय, कारणपरत्वे बसण्यासाठी आसन, दोन अंतर्वस्त्रे, छातीचा भाग झाकण्यासाठी दोन वस्त्रे, अंग पुसण्यासाठी पंचा, तोंड पुसण्यासाठी रुमाल, औषध वगैरे गाळण्यासाठी वस्त्र, इ. वस्त्रे त्यांना मिळत. चार निकायांचे भिक्षू वेगवेगळ्या तऱ्हेने कटिवस्त्र नेसत. भिक्षूंची वस्त्रे रेशमी असत.

भिक्षुणी भिक्षूंप्रमाणेच वेष करीत. पण त्या लहंगाही नेसत.

उच्चपदस्थ राज्याधिकारी व उच्च वर्णाचे लोक धोतर व उत्तरीय असा पोषाख करीत. काश्मीरसारख्या थंड प्रदेशात लोक कोट, पायजमा घालीत. कोट लोकर किंवा चामडे यापासून बनवीत. उत्तर भारतातील सर्व लोक कुडता घालीत. काही लोक अर्ध्या बा ह्यां चा क मी ज घालीत. स्त्रीपुरुष पायघोळ कुडता घालीत. त्याला प्रपदीन असे नाव होते. अजंटाच्या चित्रांत तो पाहायला मिळतो.



राजाचा मंत्री – अजंटा येथील भित्तिचित्र.

गुप्तकालीन संस्कृत साहित्यात, विशेषतः कालिदास व बाण यांच्या ग्रंथांत तत्कालीन वेषभूषेविषयी माहिती मिळते.

स्त्रिया साडीशिवाय शाल व वैकक्ष्य वापरीत. शालीच्या टोकांची गाठ छातीजवळ मारीत. स्त्रिया चोळी घालीत. कधी कधी विविध प्रकारची फुले व पक्षी काढलेल्या तलम साड्या नेसत. ऋतुपरत्वे त्या तलम व गरम कपडे घालीत.

राजेलोकांचा पोषाख भडक व भारी नसे. हर्ष राजा पांढरे स्वच्छ रेशमी धोतर नेसला होता व तारकांकित उत्तरीय त्याने पांघरले होते, असे हर्षचरितात सांगितले आहे. पांढऱ्या धोतरावर बहुधा हंसाचे चित्र काढलेले असे.

शिपाई कुडता घालीत व डोक्याला रुमाल बांधीत. कमरे-भोवती ते दुहेरी कपडा गुंडाळीत आणि त्यात तलवार खोचीत. घोडेस्वार वारबाण धारण करीत व डोक्याभोवती पांढरी पट्टी गुंडाळीत. वारबाण म्हणजे बहुधा कापूस भरलेले जाड कापडाचे चिलखत असावे.

या काळातील जैन श्रमणांना जंगिम, भंगिम, शाणक व पोत्तक कपडे घालण्याची परवानगी होती. उंटाच्या केसांपासून जंगिम, भांगेच्या झुडपापासून भंगिम व तागापासून शाणक वस्त्रे बनत असत. ते प्रमाणबद्ध, टिकाऊ, मृदू व सुंदर कपडे नेसत. थंडीचे निवारण करण्यासाठी ते लोकरी शाल पांघरत. ते कमरेभोवती चार अंगुळे रुंद असा पांढरा पट्टा गुंडाळीत.

जैन साध्वींची वेषभूषा त्यांचे सर्व शरीर झाकणारी असे. अवग्रह, पट्ट, अर्धोरुक, अभ्यंतरनिवसनी, बहिर्निवसनी, कंचुक इ. अकरा वस्त्रे वापरण्याची त्यांना मुभा होती. त्या साडीही नेसत.

नर्तक व नर्तकी कंचुक व पायजमा घालून आपले सर्व अंग झाकीत.

या काळात अनेक प्रकारची वस्त्रे तयार होत. सर्वसाधारण वस्त्राला अठरा कार्षापण, तर उत्तम प्रतीच्या वस्त्राला एक लक्ष कार्षापण मूल्य पडे.

दासी सर्वसाधारणपणे भडक वेषभूषा करीत. त्या साडी, कमरपट्टा आणि कशिदा काढलेला घागरा किंवा कंचुक घालीत.

अजंटा येथील चित्रांत स्त्रियांच्या व पुरुषांच्या वेषभूषेचे निरनिराळे प्रकार पाहायला मिळतात. या काळातील वस्त्रे अनेक रंगांत रंगवलेली असत. तसेच त्यांवर फुले, पाने, पक्षी, तारे, इ. चित्रित करीत. श्रीमंत लोकांच्या पांढऱ्या दुकूलांवर गोरोचनाने हंसमिथुने काढलेली असत. पांढऱ्या धोतरांच्या किनारी लाल, निळ्या किंवा पिवळ्या रंगाने रंगवीत. स्त्रियांच्या साड्यांचे काठ वेलबुट्टी किंवा भूमितीय आकृत्यांनी सजवीत. वस्त्रे विणताना निरनिराळ्या रंगांच्या धाग्यांचा उपयोग करून आकर्षक वस्त्रे तयार करीत.

इ. स. च्या १० व्या शतकात महाराष्ट्रातील स्त्रिया चोळी

घालू लागल्या. काश्मीरचा राजा हर्ष याने नंतर आपल्या राज्यात चोळीचा प्रचार केला. मगध, ओडिसा, बंगाल, इ. पूर्वेकडील प्रदेशात त्या काळी स्त्रिया लुगडे नेसत व त्याच्या एका पदराने वक्षःस्थळ झाकून, तोच पदर डोक्यावरून घेत. उत्तर भारतात, याच काळात काही स्त्रिया साडीचोळीऐवजी घागराचोळी असा पोषाख करीत आणि वर दुपट्टा घेत.

**इ. स. ११०० ते १८०० –** प्राचीन राजस्थानी चित्रशैलीत श्रीकृष्णाचा पोषाख चुडीदार पायजमा व अंगरखा असा दाखवला आहे. गुजरात–राजस्थानातील व उ. भारतातील बहुसंख्य पुरुष चुडीदार पायजमा, अंगरखा, दुपट्टा व पागोटे असा वेष करीत. ब्राह्मण पुरुष मात्र धोतर नेसत आणि त्याच्या पुढच्या बाजूने निऱ्या काढीत. सर्वसाधारणपणे अशाच तऱ्हेचा पोषाख १८ व्या शतकापर्यंत चालू राहिला. १८ व्या शतकाच्या शेवटी गुजराती ब्राह्मणाचा पोषाख कसा होता, त्याचे वर्णन क. मा. मुन्शींनी केले आहे, ते असे– तो डाक्क्याच्या मलमलीचा तलम अंगरखा घाली. तो अंगासरसा बसत असे व त्याच्यावर भरत-काम केलेले असे. तो लाल किनारीचे नागपुरी धोतर नेसी आणि डोक्यावर नडियादचे गडद तांबडया रंगाचे पागोटे घाली.

इ. स. च्या १५ व्या शतकात द. भारतात विजयनगर व मदुरा येथील राजे गुडघ्यापर्यंत धोतर नेसत, असे त्या वेळच्या मूर्तींवरून दिसते. कांचीचा राजा सिंहविष्णु याचे धोतर मात्र घोटयापर्यंत लांब दिसते. सर्व राजांच्या मस्तकावर उंच व निमुळती होत गेलेली टोपी आहे. राजे व सरदार यांचे कमरेवरचे अंग उघडेच दिसते. पण त्या काळचे लोक सदऱ्यासारखे काही-तरी अंगात घालीत, असे बार्बोसा व नुनीझ या प्रवाश्यांनी लिहून ठेवले आहे.

इ. स. च्या १८ व्या शतकातील पंजाबी महिला मागे बटणे असलेल्या कुडत्यावर जाकिट घालीत आणि डोक्यावरून दुपट्टा घेत. राजस्थान व उ. भारत या प्रदेशात स्त्रियांच्या पोषाखाचे चार प्रकार आढळतात. मथुरेच्या पूर्वेकडील प्रदेशातील स्त्रिया सध्याच्या सहावारी साडीसारखी साडी नेसत व तिचा पदर डोक्यावरून घेत. पोषाखाचा दुसरा प्रकार कांगडा चित्रशैलीत दिसतो. हा पोषाख सरदारांच्या किंवा श्रीमंतांच्या स्त्रिया वाप-रीत असाव्या, असे वाटते. स्त्रिया पायात तंग तुमान घालीत व वर फ्रॉकसारखा पायघोळ कोट घालीत. त्याला हातासरशी बसणाऱ्या लांब बाह्या असत. मानेपासून पायांपर्यंत हा कोट सर्व अंग झाकून टाकी. खाली त्याला खूप घोळ असे. डोक्यावरून त्या ओढणी घेत. तिसऱ्या प्रकारच्या वेषात स्त्रिया घागरा व चोळी घालीत व वरून ओढणी घेत.

चौथा प्रकार म्हणजे स्त्रिया घागरा नेसून त्यावर एक लहानशी साडी नेसत. आणि डाव्या खांद्यावरून व डोक्यावरून पदर घेऊन तो उजव्या खांद्यावर आणीत. त्या चोळीही घालीत.



गुप्त युगातील दासींची वेषभूषा

सांप्रतही या चारही प्रकारच्या वेषभूषा थोडयाफार फरकाने पाहायला मिळतात.

मुसलमान स्त्रिया लेहंगा व कुडता वापरीत.

मोगलकाळी वस्त्रोद्योगाची खूप भरभराट झाली आणि १८ व्या शतकाच्या अखेरपर्यंत भारतीय वस्त्रे सर्व जगभर प्रसिद्धी पावली. त्या काळात सुमारे दोनशे भिन्न भिन्न प्रकारची सुती वस्त्रे परदेशी पाठविली जात होती. रेशमी कापडाची निर्यात त्या मानाने कमी होती. कारण, बहुतेक सर्व रेशीम भारतातच खपत असे. उच्च वर्गातील सर्व लोक बहुतेक रेशमी कपडेच वापरीत. त्याशिवाय, चीन, मध्य आशिया, इराण इ. देशांतूनही रेशमी कापड आयात केले जात असे. पण ते फार किंमतीचे असल्याने अत्यंत श्रीमंत लोकांनाच ते वापरता येत असे.

रेशमी वस्त्रे विणण्याचे काम गुजरातेतील खंबायत, अहमदा-बाद व पाटण या ठिकाणी प्रामुख्याने होत असे.

लोकरीच्या कपडयांचा उपयोग धनिक वर्गच करीत असे. सर्वसामान्य लोक थंडीच्या दिवसांतही कापसाच्या रजया वाप-रीत किंवा रजईसारख्या कापडाची जाकिटे घालीत. काश्मीरच्या लोकरी शाली त्या काळी फार प्रसिद्ध होत्या. पण इटली, तुर्क-स्तान, इराण इथून लोकरी कपडे भारतात येत व धनिक लोक ते वापरीत.

त्या काळी भारतात उत्कृष्ट प्रकारची सुती वस्त्रे तयार होत. काही वस्त्रे इतकी तलम व सुरेख रंगवलेली असत, की रेशमी वस्त्रांपेक्षाही त्यांची किंमत अधिक असे. डाक्क्याची मलमल तर सर्व जगात प्रसिद्ध होती.

मूर्तिपूजेला मुसलमानांचा विरोध असल्यामुळे मोगलकाळात वस्त्रांवरील नक्षीतही मनुष्याकृती काढणे निषिद्ध होते. म्हणून

कलावंतांनी निसर्गाकडे दृष्टी वळवली व वेली, पाने, फुले, पक्षी, इ. नमुने ते वस्त्रांवर काढू लागले. इराणी संस्कृतीच्या प्रभावामुळे आम्रवृक्षाचाही नक्षीसाठी उपयोग करू लागले.

मुसलमान लोकांना नमाज पढण्याच्या वेळी जमिनीवर अंथरण्यासाठी आसन लागत असे. सुती, रेशमी किंवा लोकरीच्या वस्त्रावर नक्षीदार छपाई करून अशी आसने बनवीत. त्यावर मशिदीचा दर्शनी भाग, कुराणातील आयते वगैरे छापलेले असत. गालिचे बनवण्याची कलाही त्या काळी प्रगत झाली होती. खास मोगल शैलीचे गालिचे जहांगिरच्या वेळी तयार होऊ लागले.



मोगल सरदाराचा पोषाख

प्रारंभी मुसलमानी स्त्रियांचा पोषाख पुरुषांच्या पोषाखाप्रमाणे असे. फक्त त्याचा रंग निराळा असे. घराबाहेर जाताना त्या तोंडावर बुरखा घेत. पण हा पोषाख जरा तंग असल्यामुळे त्यात स्त्रियांचे शरीर उठून दिसत असे. म्हणून पुढे स्त्रियांनी सैल कपडे घालायला सुरवात केली आणि सर्वांग झाकणारा बुरखाही त्या वापरू लागल्या.

मुसलमानी अंमलाच्या सुरवातीला पुरुष घट्ट तुमान व अंगरखा घालीत. पण पुढे लांब व सैल असा झगा घालण्याची पद्धत पडली. याला चोगा असे नाव होते. तो खांद्यांशी घट्ट व पुढून खुला असे. मुसलमान पुरुष पगडीच्याऐवजी विविध प्रकारच्या टोप्या वापरू लागले. वायव्य सरहद्द प्रांत व पंजाब या भागात पगडीचा वापर लोक करीत आणि इतर भागात फक्त राजे व सरदार विशेष समारंभप्रसंगी तिचा उपयोग करीत. अजूनही विवाहप्रसंगी मुसलमान लोक पगडी घालतात. वधू-वरांचा पोषाख जुन्या मोगल पद्धतीचा असतो. वधूच्या पगडीला पेशबाज म्हणतात.

पेशवाईच्या काळात, अंगात आतून कुडते, वरून अंगरखा, डोक्याला पागोटे, खाली पायजमा किंवा धोतर, अंगावर शेला किंवा दुपट्टा व पायांत जोडा, असा महाराष्ट्रीयांचा सामान्यतः पोषाख होता. सरदार वगैरे श्रीमंत लोक पागोटे शोभिवंत दिसण्यासाठी त्याच्यावर तुरा, शिरपेच व कलगी बसवीत. ते कंबरेभोवती एक वस्त्र गुंडाळीत. त्याला बस्ता म्हणत. श्रीमंत लोकांचा अंगरखा हातमागावर विणलेल्या पांढऱ्या व तलम सुताचा असे. कमरेखाली त्याचा घोळ साधारणपणे सत्तावीस हात असून तो नऊ ठिकाणी जोडलेला असे. हा सत्तावीस हात घोळ चुण्या घालून कमरेपाशी एका वारात बसवलेला असे.

अंगात घालायच्या कपड्यांची नावे झगा, अंगरखा, डगला, कुडते, अंगडे अशी आढळतात. झग्यापेक्षा अंगरखा व डगला आखूड, अंगरख्यापेक्षा अंगडे आखूड व अंगड्यापेक्षा कुडते आखूड असे. झगा दरबारप्रसंगी घालण्याचा रिवाज होता. अंगरखा दरबारात व इतर वेळीही घालीत. झगा घोट्याइतका लांब, अंगरखा व डगला गुडघ्याइतका, अंगडे मांड्यांइतके व कुडते कमरेबरोबर असे. झगा बादलीचा व जरीचा, डगला जरीचा व बुटेदार छिटाचा, अंगडे शालूचे व औरंगजेबी कापडाचे असे. बहुतेक पुरुषांच्या डोक्याला पागोटे, तिवट, पटका, मंदिल, फेटा व वत्ती यांपैकी काहीतरी असे. लहान मुलांच्या डोक्याला बंदाच्या टोप्या घालीत. काही टोप्या जरीच्या व मखमलीच्या असत. घोंगडी, पासोडी व शालजोडी ही पांघरायची वस्त्रे होती. शालजोडीचा प्रघात वरिष्ठ वर्गात विशेष होता. श्रीमंतांची वस्त्रे रेशमी, उंची लोकरीची व जरीची असत.

स्त्रिया प्रसंगानुसार लुगडी, साड्या, चिरड्या, पातळे, पीतांबर, शालू व पैठण्या नेसत व अंगात चोळी घालीत. विशेष प्रसंगी त्या अंगावर शेला घेत. मुली परकर-चोळी घालीत.

शिपाई लोक डोक्याला पागोटे, पायात चोळणा आणि अंगात अंगरखा व कुडते घालीत. सरदार वगैरे लढाईवर असताना डोक्याला कातड्याची व आतून बाहेरून जाड कापड शिवलेली टोपी घालीत. त्यांचा अंगरखाही गोधडीचाच असे व त्यात छाती, बरगडी व पोट या ठिकाणी कातडे शिवलेले असे.

गरीब लोक मात्र लंगोटी लावीत, अंगावर घोंगडी घेत व डोक्याला बारीकसे वस्त्र गुंडाळीत.

मुसलमानी अंमलाच्या उत्तरार्धात पाश्चात्य लोकांशी बरोबर संबंध आल्यामुळे अचकन प्रचारात आली. आता तिला शेरवानी म्हणतात. अचकन म्हणजे गुडघ्याच्या खाली पोचणारा लांब कोट असतो आणि त्याला पुढे अनेक बटणे असतात.

इ. स. १८०० ते १९५० –१९ व्या शतकातील पारशी पुरुष मखमली किंवा रेशमी पायघोळ अंगरखा, रेशमी विजार आणि कमरेला गोंडे लावलेला लोकरी पट्टा असा पोषाख करीत. बाहेर जाताना ते अंगात जाकिट आणि रेशमी झगा घालीत. पारशी लोकांची पगडी मुद्दाम विशेष प्रकारे बनवलेली असे

ती काळसर, लाल किंवा तपकिरी रंगाची असून, तिला जुन्या अग्निमंदिरासारखा आकार दिलेला असे. पारशी स्त्रिया घोट्या-जवळ बांधलेली रुंद रेशमी विजार, कमरेशी आवळलेला पायघोळ अंगरखा आणि सर्वांगावर तलम रेशमी बुरखा, असा वेष करीत. डोक्याला पांढऱ्या कापडाचा पट्टा गुंडाळून त्यात त्या आपले केस झाकून टाकीत.

सर्वसामान्य हिंदू माणसाचा पोषाख धोतर व सुती किंवा रेशमी अंगरखा हा असे. धोतर नेहमी पांढरे शुभ्र, पायघोळ व कमरेशी शालीने किंवा कमरबंदाने बांधलेले असे. पुरुष डोक्याला मलमलीचे पागोटे बांधीत व उत्सव प्रसंगी उजव्या खांद्यावर रंगीत रुमाल टाकीत.

हिंदू स्त्रिया, साडी नेसत व अंगात चोळी घालीत. साडी कमरेभोवती गुंडाळून समोरच्या बाजूला एकत्र आणीत. तिच्या एका पदराने वरचा भाग लपेटून घेत व शेवटी तो डोक्यावरून ओढून घेत.

इ. स. च्या १९ व्या शतकातील भारतीय लोक, टोप्या, पगडया, फेटे, इ. अनेक प्रकारची शिरोभूषणे वापरीत. सर्व-साधारणपणे पुरुष साधे मलमलीचे पागोटे बांधीत. काही लोक पगडी घालीत. पट्टीदार, जुरीदार, खिडकीदार असे पगड्यांचे प्रकार होते. म्हैसूर प्रदेशात व द. भारतात चक्रीदार पागोटे बांधण्याची चाल होती. पेढीवाले धनिक सेठी नावाची पगडी घालीत. मलमलीच्या फेट्याला मंदिल असे नाव होते. त्याच्या-वर जरीचे पट्टे, ठिपके असत आणि त्याच्या टोकाला जरीच्या झिरमिळ्या असत. सैन्यातील अधिकारी असले मंदिल बांधीत. पागोटे म्हणजे नऊ ते बारा इंच रुंद आणि पंधरा ते पंचवीस वार लांब कापडाचा पट्टा असे. त्याची किनार व टोके जरीने किंवा मोती, रत्ने यांनी सुशोभित करण्याची पद्धत होती. हे शिरो-भूषण म्हणजे वेषभूषेचा एक अत्यंत महत्त्वाचा भाग समजला जाई. त्यावरून मनुष्याचा दर्जा, जात व धर्म समजून येई. उन्हापासून संरक्षण करण्यासाठी त्याचा उपयोग होई. या काळात उघड्या डोक्याने कोणी घराबाहेर पडत नसे.

या काळातील टोप्यांचे आकार व रंग अनेक होते. द. भार-तातील काही ब्राह्मण, योगी व बौद्ध भिक्षू केशरी रंगाच्या सुती कानटोप्या घालीत. मलबारमधील मोपले पिळदार रेशमाच्या कडक टोप्या वापरीत.

सिंधी लोक विविध रंगाच्या गोल टोप्या घालीत. वायव्य सरहद्द प्रांतातील लोक कोकराच्या कातड्याच्या टोप्या वाप-रीत. लखनौ व गया भागातील लोकांत मुसलमानी लहान टोप्या फार लोकप्रिय होत्या. त्यांच्यावर कशिदा काढलेला असे. कुलू प्रदेशात रंगीत चिटात कापूस भरून त्याच्या लहान टोप्या बनविण्याची चाल होती. काचेचे मणी, निळे खडे, मीना-काम केलेले ताईत, इ. वस्तूंनी सुशोभित करून असल्या टोप्या स्त्रियाही घालीत असत.



अजंटा येथील भित्तिचित्रातील द्वारपाल व गुप्त युगातील समृद्ध नागरिक

इ. स. च्या १९ व्या शतकाच्या अखेरीला मुसलमान पुरु-षांचा वेष खूप भपकेदार होता. श्रीमंत पुरुष किनखापी चुणी-दार पायजमा, मलमलीचा सदरा, अचकन व युरोपियन बूट असा पोषाख करीत.

पंजाबी – या कालातील पंजाबी पुरुष चुडीदार पायजमा घालीत. पायाच्या घोटयाशी तो थोडा आवळलेला असे. वर ते लांब बाह्यांचा कुडता घालीत. त्याला डाव्या अंगाला बटणे असत. विशेष समारंभप्रसंगी ते अचकन नामक लांब कोट घालीत.

सांप्रत काही पंजाबी पुरुष काचा घालून गुडघ्याखाली पोचेल, असे धोतर नेसतात. वर सदरा आणि भरजरी मखमली जाकिट घालतात व डोक्याला रंगीबेरंगी रुमाल गुंडाळतात. पंजाबी महिला सलवार, खमीस आणि दुपट्टा असा पोषाख करतात. काही वेळा त्यांच्या दुपट्ट्याला किनार असते. पूर्वी या स्त्रिया घागरा नेसत असत. सांप्रत गुजर स्त्रिया आणि इतरही काही जातींतील स्त्रिया घागरा नेसतात. काही जातींत वधूला सल-वारीवर घागरा नेसायला लावीत. हल्ली अनेक पंजाबी स्त्रिया साडी नेसतात.

सिंधी – सिंध प्रांताच्या उत्तर भागातील ब्राह्मण व बनिया सोडून इतर लोक चुणीदार पायजमा व पैरण घालीत. पैरणीला डाव्या बाजूने बटणे असत. तिच्या बाह्या सैल असत. बाहेर जाताना काही लोक लांब कोट घालीत; अंगावर रंगीत दुपट्टा घेत. उत्तर सिंधमधील लोक घरात साधी पांढरी टोपी व दक्षिण सिंधमधील, कशिदा काढलेली टोपी घालीत. बाहेर जाताना ते डोक्याला घट्ट बसणारे रंगीत पागोटे घालीत.

सिंधी स्त्रिया सुथन नामक चुणीदार पायजमा, पैरण किंवा सदरा आणि ओढणी असा वेष करीत. बाहेर जाताना प्रतिष्ठित स्त्रिया पेशगीर नामक घागरा पायजम्यावर घालीत. पुढच्या काळात स्त्रिया साडी नेसू लागल्या.

पुढच्या काळात इंग्रजांच्या प्रभावामुळे सिंधी पुरुषांच्या वेषात बदल झाला. चुणीदार पायजम्याऐवजी रुंद पायजमा व वर सदरा प्रचारात आला. सुशिक्षित व अधिकारी लोक विजार व कोट वापरू लागले. दुपट्टा फक्त म्हातारे पुरुषच वापरीत राहिले. डोक्याला पागोटचाऐवजी हंगेरियन टोपी बसू लागली. ती काळ्या मखमलीची व अंडाकृती होती.

राजस्थानी – सर्वसाधारण राजस्थानी लोक गुडघ्यापर्यंत पोचणारे धोतर, बंडी व डोक्याला रुमाल असा पोषाख करीत. त्यांची बंडी सौराष्ट्रातील काही जातींत वापरतात, त्या पासाबंधी केडियूसारखी असे. छातीपर्यंत ही बंडी अंगासरशी बसणारी असते. पण छातीच्या खालच्या बाजूला तिला चुणीदार घेर असतो. सुशिक्षित व नोकरी करणारे लोक बहुधा चुडीदार पायजमा व कुडता आणि त्यावर अचकन घालतात. मारवाडी लोक पागोटे आधी गुंडाळून तयार करतात आणि मग टोपीसारखे डोक्या-वर ठेवतात व काढतात. तसेच बहुतेक राजस्थानी लोक अंगा-वर उपरणे घेतात व तेच कधी कधी कमरेभोवती गुंडाळतात.

राजस्थानी स्त्रिया खूप चुण्या व घेर असलेला घागरा नेसतात. त्याला वीस वार तरी कापड लागते. राजस्थानी लोकसाहित्यात त्याला घेर घुमालो असे नाव दिलेले आहे. सौभाग्यवती स्त्रिया आपल्या सौभाग्याची निदर्शक अशी एक रंगीत नक्षीदार पट्टी स्तनांवर बांधतात. त्यावर त्या रंगीबेरंगी तुकडयांची, पाठ उघडी टाकणारी व मागे बंद असणारी काचोळी घालतात. वर ओढणी घेतात. तिचे एक टोक नाभीजवळ खोचतात आणि उरलेला भाग डाव्या बाजूने पाठीवर नेतात व नंतर डोक्यावर घेतात. ओढणीचे दुसरे टोक उजव्या बगलेतून घेऊन काचोळीत किंवा घागऱ्यात खोचतात. ओढणीला चुनडी, घुंगट, लहरियो, शालू, इ. नावे आहेत. ती अनेक रंगांची असून सौभाग्यनिदर्शक आहे. पुढच्या काळात ओढणीचे रूपांतर साडीत झाले.

उच्चवर्णीय स्त्रिया बाहेर जाताना सर्व अंगाभोवती पांढरे कापड गुंडाळून जात असत. त्याला थिरमा असे नाव आहे.

इंग्रजांच्या संपर्कात आल्यानंतर राजस्थानात जोधपूर ब्रीचे[illegible] नामक एका नव्या वस्त्राचा उदय झाला. त्याला मांडचोळ[illegible] असेही म्हणतात. गुडघ्याखाली हा चोळणा अगदी पायांवर[illegible] बसणारा असतो. त्यावर कॉलर असलेला लहान कोट घालता[illegible]

कच्छ आणि सौराष्ट्र या भागातील काही उच्चवर्णीय अ[illegible] वाद सोडल्यास सर्वसाधारण लोक चुडीदार पायजम्यासारख[illegible] चोळणा घालीत. मांडयांवर तो सैल असून गुडघ्याखाली [illegible] असतो. तिथे त्याला गोलाकार चुण्या पडतात. शेतकरी व का[illegible] करी लोक वर पासाबंधी केडियू नामक बंडीसारखा कपडा घा[illegible] तात. त्याला बंद असतात. त्याच्या बाह्या लांब व निमुळ[illegible] असतात. आणि त्याचा छातीखालचा भाग चुणीदार व घोळ[illegible] असतो. ब्राह्मण, बनिया आणि इतर काही लोक कासोटा घा[illegible] धोतर नेसत. ते तयार पगडी घालीत किंवा फेटा बांधीत. [illegible] रंगी पगडी त्या काळी लोकप्रिय होती.

शेतकरी व कामकरी स्त्रिया कमरेभोवती एक जाडेभर[illegible] वस्त्र गुंडाळीत आणि वर चोळी घालीत. गरज पडेल त्या वे[illegible] त्या ओढणी डोक्यावरून घेत व इतर वेळी कमरेला बांधून ठेव[illegible]

गुजराती – गुजरातमधील पुरुष किनार असलेले धोतर ने[illegible] आणि वर जुन्या पद्धतीचा लहानसा डबलब्रेस्ट कोट घाली[illegible] त्याला बदन किंवा बदियान असे नाव होते. हा कोट गळ्या[illegible] घट्ट बसणारा व कमरेपर्यंत पोचणारा असे. त्याच्या बा[illegible] हातासरशी बसणाऱ्या होत्या. समारंभप्रसंगी उच्चवर्णीय लो[illegible] लांब कोट घालीत. त्याला अंगरखा, वागो, वाघो किंवा जा[illegible] अशी नावे होती. त्यावर ते उपरणे घेत व डोक्याला तय[illegible] पगडी घालीत किंवा फेटा बांधीत.

गुजराती उच्चवर्णीय स्त्रिया परकर नेसून त्याच्यावर पा[illegible] वारी साडी नेसत. त्या उजव्या खांद्यावरून पदर घेऊन तो क[illegible] रेच्या डाव्या बाजूला खोचत. अंगात त्या काचोळी घालीत. ति[illegible] बंद पाठीमागे असत व तिने पाठ उघडी राही. उच्चवर्णीय द[illegible] स्कर स्त्रिया मात्र पुढच्या बंदांची चोळी घालीत.

इंग्रजांच्या संपर्कात आल्यानंतर जुन्या अंगरख्याऐवजी बरे[illegible] लोक पारशी फॅशनचा, अर्ध्या मांडयांपर्यंत पोचणारा लांब [illegible] घालू लागले. त्याला कॉलर असे आणि पुढच्या बाजूला म[illegible] भागी बटणे असत. याच सुमारास तरुण पिढीत टोपी घालण्या[illegible] पद्धत रूढ झाली. तसेच तरुण मुलीही साडीचा पदर डोक्याव[illegible] न घेता पाठीवरून उजव्या खांद्यावर घेऊ लागल्या.

बिहारी – हिंदी-बिहारी प्रदेशाची वेषभूषा थोडी निरा[illegible] होती. पश्चिमेला मथुरेपासून पूर्वेला कोसी नदीपर्यंत आ[illegible] उत्तरेला दिल्लीपासून दक्षिणेला नर्मदा नदीपर्यंत या प्रदेशा[illegible]

विस्तार होता. या प्रदेशातील पुरुष पुढच्या बाजूने निऱ्या काढून व काचा घालून धोतर नेसत. काहींचे ते पायघोळ असे. खालच्या वर्गातील लोक थोडचा वेगळचा प्रकाराने धोतर नेसत. राजपुतांशी संबंधित पुरुष व इतरही काही उच्चवर्णीय पुरुष समारंभप्रसंगी चुडीदार पायजमा किंवा सुरवार घालीत. बहुतेक सर्व पुरुष अंगात कुडता किंवा बगलबंडी घालीत. पगडी, फेटा यांबरोबरच लोक भव्याटोपी या नावाने ओळखली जाणारी पांढरी टोपी घालीत. दक्षिण भागात जावे, तसतसा तिचा प्रचार कमी झालेला दिसतो. तसेच ते खांद्यावर अंगोछा किंवा दुपट्टा घेत.

या प्रदेशातील स्त्रिया लेहंगा-कुडता घालीत किंवा साडी नेसत. चोळी घालण्याची प्रथा ही त्या प्रदेशात नंतर आली. या स्त्रिया अंगात चोळी घालीत, तिला पाठ नसे व तिचे बंद मागच्या बाजूला असत. हिंदीत या चोळीला अंगिया म्हणत. बाहेर जाताना प्रतिष्ठित स्त्रिया अंगावर चादर पांघरीत. या प्रदेशाच्या पूर्व भागातील लोकांचा पांढरी वस्त्रे नेसण्याकडे कल दिसतो. इंग्रजांच्या संपर्कात आल्यानंतर या प्रदेशात शेरवानीचा प्रचार झाला आणि स्त्रिया पाचवारी साडी व ब्लाउज असा पोषाख करू लागल्या.

उ. प्रदेश – उत्तर प्रदेश, मध्य भारत आणि बिहार या प्रदेशांतील पुरुष धोतर आणि अंगावर चादर असा पोषाख करीत. धोतराला किनार नसे. बंगाली पुरुष पुढे सोगा सोडून धोतर नेसत. कचेरीत कामाला जाताना मात्र बंगाली पुरुष पायजमा, कुडता व लांब कोट असा पोषाख करीत. सर्वसाधारण लोक यावर चादर पांघरीत, तर उच्चभ्रू लोक सैल अंगरखा घालीत. त्याला चोगा असे नाव आहे. डोक्याला ते थबडके पागोटे बांधीत.

स्त्रिया सहावारी साडचा नेसत आणि वरचा भागही तिनेच लपेटून घेत. साडीचा पदर त्या उजव्या खांद्यावर टाकीत किंवा उजव्या बगलेतून घेऊन डाव्या खांद्यावर टाकीत. त्या चोळी घालीत नसत. उडिया स्त्रियाही अशीच साडी नेसत. त्या कासोटा घालीत आणि वर चादर पांघरीत. साडचांना रंगीत किनारी आणि पदर असत. इंग्रजांशी संबंध आल्यावर इथले लोक कॉलर असलेला आखूड कोट वापरू लागले. इथले बरेचसे लोक टोपी न घालता उघडचा डोक्यानेच हिंडत. इंग्रजांशी संबंध आल्यावर उच्चवर्णीय स्त्रियाही चोळी व तिचे विविध प्रकार वापरू लागल्या.

महाराष्ट्री – महाराष्ट्रातील बरेच पुरुष कासोटा घालून पायघोळ धोतर नेसत. या धोतराला बारीक रंगीत किनार असे. काही पुरुष मात्र गुडघ्यापर्यंत पोचणारी आखूड पाटलोण किंवा खाली निमुळता होत जाणारा पायजमा घालीत. वर ते बाराबंदी घालीत. शेतकरी, कामकरी लोक मात्र पुढे बटणे असलेली, अर्ध्या बाह्या असलेली व कमरेपर्यंत पोचणारी बंडी घालीत. उच्चवर्णीय लोक समारंभप्रसंगी अंगरखा घालीत. उपरणे खांद्यावर टाकले, की त्यांची वेषभूषा पुरी होत असे. काही वेळा पुरुष अंगावर नुसते उपरणेच घेत. रोजचे कपडे साधे असले, तरी समारंभाच्या वेळचे त्यांचे कपडे भारी असत. पुरुष डोक्यावर पगडी घालीत किंवा फेटा, पटका वा रुमाल बांधीत.

महाराष्ट्रातील बहुतेक स्त्रिया नऊवारी लुगडे, ओचा व कासोटा घालून नेसत. लुगडयाला काठपदर असे. काही स्त्रिया गोल साडी नेसत. साडीचा पदर उजव्या खांद्यावर घेत. त्या अंगात चोळी घालीत, तिला पुढे गाठ मारीत. उच्चवर्णीय स्त्रिया बाहेर जाताना अंगावर शाल किंवा शेला घेत.

कर्नाटक – कर्नाटकातील पुरुष धोतर नेसत व अजूनही नेसतात. त्यांची धोतर नेसण्याची पद्धत अजंटा चित्रांतील शैलीशी व विजयनगर आणि नायक राजांच्या पद्धतीशी जुळणारी आहे. ते धोतराचा कासोटा घालतात.

कर्नाटकातील ब्राह्मण स्त्रिया कासोटा घालून साडी नेसतात; पण इतर जातींच्या स्त्रिया मात्र कासोटा न घालता निऱ्यांचा घोळ पुढे सोडतात व डोक्यावरून साडीचा पदर घेतात. त्या अंगात चोळी घालतात.

आंध्र – आंध्रातील पुरुष पंचकट्टू किंवा पंचगट्टू पद्धतीने धोतर नेसतात. ते धोतराचा काचा घालतात. ब्राह्मण पुरुष डोक्याला काही न घालताच फिरतात. खालच्या जातीतले लोक उन्हापासून संरक्षण व्हावे म्हणून डोक्याभोवती एक लहानसे फडके गुंडाळतात.

आंध्रातील स्त्रियांचे लुगडे आठ वार असते. त्या दोनतीन प्रकारांनी लुगडे नेसतात. ब्राह्मण स्त्रिया लग्नप्रसंगी एका विशिष्ट प्रकारे लुगडे नेसतात. आंध्रच्या ईशान्य भागातील स्त्रिया पांढऱ्या रंगाची साडी पसंत करतात. स्त्रिया अंगात चोळी घालतात.

तमिळनाड – तमिळनाडमधल्या पुरुषांनी धोतराच्या आत लंगोट नेसलाच पाहिजे, असा नियम आहे. त्यांच्या पांढऱ्या धोतराला बारीक रंगीत किनार असते. धोतर तीन प्रकारांनी नेसतात. ब्राह्मण लोक कासोटा घालून व पुढच्या बाजूला निऱ्या काढून महाराष्ट्रातील पुरुषांप्रमाणेच धोतर नेसतात. काही लोक ते नुसते कमरेभोवती गुंडाळतात. शेतकरी, कामकरी लोकांचे धोतर आखूड असते. ते कासोटा घालून व पुढे निऱ्या काढूनच धोतर नेसतात; पण पुन्हा धोतराचा डावा सोगा कमरेला खोचतात. उच्चवर्णीय लोक अंगावर उपरणे घेतात. ते डोक्याला

मात्र काही घालीत नाहीत. इतर लोक डोक्याला फेटा किंवा मुंडासे बांधतात.

तमिळ स्त्रियांचे लुगडे सात वारांपासून दहा वारांपर्यंत लांब असते. वयोमानाप्रमाणे किंवा जातीला अनुसरून लुगडे नेसण्याची पद्धत बदलते. यांची लुगडे नेसण्याची पद्धत थोडी गुंता-गुंतीची पण वैशिष्टयपूर्ण आहे. त्या लुगडयाचा पदर घेतात. अय्यंगार व अय्यर स्त्रियांच्या साडी नेसण्यात फरक आहे. पूर्वी बऱ्याच स्त्रिया अंगात चोळी घालीत नसत. पण ब्रिटिश राजवटीनंतर स्त्रिया चोळी, पोलके वगैरे घालू लागल्या.

केरळ – केरळमधील हवा उष्ण व दमट असल्यामुळे तिथले लोक कमीत कमी कपडे वापरीत व अजूनही तसेच वापरतात. त्यांचे कपडे नेहमी पांढरे असतात. पुरुष कमरेभोवती पांढरे वस्त्र नुसते गुंडाळतात. त्याला मुंडू असे नाव आहे. तसेच ते खांद्या-वर एक पंचा घडी करून टाकतात.

केरळातील स्त्रिया कमरेभोवती एक पांढरे वस्त्र गुंडाळीत. ब्राह्मण स्त्रिया मात्र ते धोतरासारखे व पायघोळ नेसत. त्याचा पदर घेत नसत. वरचे अंग त्या दुसऱ्या एका वस्त्राने झाकीत. ब्राह्मण व क्षत्रिय स्त्रिया वगळून इतर जातीच्या स्त्रियांनी वरचे अंग उघडे ठेवले पाहिजे, असा पूर्वी नियम होता. पण काळाच्या ओघात तो नियम नष्ट झाला आणि त्याही वरचे अंग एका वस्त्राने झाकू लागल्या.

आधुनिक कालात बहुतेक सर्व लोकांच्या पोषाखात थोडा–फार बदल झालेला आहे. खेडयापाडयांत व शहरांतही काही लोक पूर्वीप्रमाणे धोतर नेसतात; पण त्यांची संख्या दिवसेंदिवस कमी होत आहे. धोतराऐवजी पायजमा व पँट प्रचारात आली आहे. पँटही नव्या नव्या फॅशन्स येतात, त्याप्रमाणे कधी ड्रेन-पाइप, कधी बेलबॉटम, तर कधी लहान-मोठया खिशांच्या, पाहायला मिळतात. वर घालायच्या कपडयांतही सदरा, बुशशर्ट, बुशकोट, मॅनिला असे निरनिराळे प्रकार अस्तित्वात आले आहेत. फॅशन असेल त्याप्रमाणे नेहरू शर्ट, गुरुकुडता, इ. प्रकार तरुणांत प्रिय होतात. साडीचा प्रसार आता सर्व भारतात सर्व थरांतील स्त्रियांत झाला आहे. मुलींच्या पोषाखातही नवे नवे बदल होत आहेत. पूर्वीच्या परकरपोलक्याची जागा आता स्कर्टब्लाउजने घेतली आहे. तर साडीच्या ऐवजी शहरातील तरुण मुली आता स्लॅक्स, बेलबॉटम पँट, मिनी स्कर्ट, मॅक्सी, सलवार-खमीस, इ. प्रकारचे कपडे घालू लागल्या आहेत. तरुण मुलांप्रमाणे पोषाख करण्याची मुलींची प्रवृत्ती वाढत आहे. मुली केसांची वेणी घालण्याऐवजी त्यांचा बॉबकट करणे किंवा ते पाठीवर मोकळे सोडणे यात भूषण मानू लागल्या आहेत. पाश्चात्य तरुणांच्या अनुकरणाने तरुण मुले केस वाढवू लागली आहेत. त्यामुळे पाठीमागून एखादी व्यक्ती पुरुष आहे का स्त्री आहे, ते चटक[illegible] ओळखता येईनासे झाले आहे.

सरकारी कचेऱ्या, बँका, किंवा इतरही खासगी कचेऱ्यांत काम करणारे बहुसंख्य लोक पँट, शर्ट, कोट असा पोषाख करतात. द. भारतातील केरळ, तमिळनाड या प्रदेशांतील कचेऱ्यांत मात्र काही लोक पूर्वापार पद्धतीने लुंगी, धोतर वगैरे नेसतान[illegible] दिसतात.

रोज टोपी, पगडी, पागोटे घालण्याची पद्धत शहरात जवळ-जवळ नामशेष होत चालली आहे. धोतर, नेहरू शर्ट घालणारे लोक मात्र रोज टोपी घालतात. जुन्या पिढीतले काही लोक अजून पगडी घालतात. खेडयापाडयांत मात्र टोपी, पागोटे, मुंडासे वगैरे घालण्याची पद्धत टिकून आहे.

कॉंग्रेसने धोतर किंवा पायजमा, नेहरू सदरा व गांधी टोपी असा भारतातील लोकांचा राष्ट्रीय वेष ठरवला आहे. [illegible] चुडीदार पायजमा, अचकन किंवा शेरवानी आणि गांधी टोपी हा भारताचा दरबारी पोषाख ठरला आहे. पायजमा [illegible] आणि अचकन काळी असते. आंतरराष्ट्रीय परिषदांत भारता[illegible] प्रतिनिधी बहुधा हाच पोषाख घालून वावरतात. भारता[illegible] प्रत्येक राज्यातील लोकांचा पोषाख निरनिराळा आहे. आपाप[illegible] प्रांतांत होणाऱ्या सणसमारंभांत लोक प्रांतिक पोषाख करत[illegible] मंगल प्रसंगी, सणासमारंभाच्या वेळी पुरुष उंची पोषाख [illegible]तात. स्त्रियाही अशा प्रसंगी भरजरी, रेशमी कपडे वापरतात[illegible] अलंकारांनी शरीर सुशोभित करतात.

सुती, लोकरी व रेशमी कपडयांशिवाय सांप्रत लोक नायलॉन[illegible] रेयॉन यांसारख्या कृत्रिम धाग्यांपासून बनवलेले कपडेही मोठ्[illegible] प्रमाणावर वापरू लागले आहेत. [ प्रा. भा. वे.; म. भा. [illegible] प्रा. भा. सा. सां. भू.; म. भा. उ.; रा. का. सं.; इं. [illegible] श्री. मोतीचंद्र, नागरी प्रचारिणी पत्रिका, विक्रमांक (उत्तरा[illegible] संवत् २००१ वैक्रम; सुनीतिकुमार चटर्जी, मार्च ऑफ इंडि[illegible] मार्च १९५६; कॉ. टे. इं.; पे. का. म. ]

## वैकाशी-विशाखा

वैकाशी अर्थात वैशाख मासात [illegible] विशाखा नक्षत्र येते, त्या वेळी द[illegible] पौर्णिमेला यमधर्माची पूजा करतात. सुब्रह्मण्यम देवाचा अव[illegible] याच दिवशी झाला, म्हणून हा दिवस अत्यंत पवित्र मा[illegible] जातो. धर्मराज हा दक्षिण-दिक्पाल मानलेला आहे. मंगळ[illegible] कृष्ण पक्षातली चतुर्दशी असली, तर त्या दिवशी धर्मरा[illegible] पूजा केल्यामुळे शारीरिक व्याधींपासून मुक्ती होते, [illegible] समजूत आहे.

या महिन्यात फार उन्हाळा असतो, म्हणून दहीभात, [illegible]

पेये, इ. पदार्थांचे दान करावे; त्यामुळे मुलांना दीर्घायुष्य लाभते, स्त्रियांना संतती प्राप्त होते व रोग बरे होतात, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. छत्री, पंखा, पादत्राणे, इ. वस्तूंचे दान करावे; तसेच तुलसी, अश्वत्थ, इ. वृक्षांना पाणी घालावे, असेही सांगितले आहे.

अशा प्रकारे दानधर्म करण्यासाठी काही स्थाने विशेष योग्य मानली जातात. कुंभकोणम्‌जवळचे स्वामीमलै हे त्यांपैकी एक आहे. तंजाऊरजवळचे तिरुमझुवादी हे स्थानही त्या दृष्टीने फार पवित्र मानले जाते. कारण तिथे महादेवाने या पर्वकाळी खड्‌गनृत्य केले होते. त्याचप्रमाणे नंदीनेही तिथे अवतार घेतला होता.

नम्माळवार या वैष्णव संताचा जन्म वैकाशी पूर्णिमेला अल्वर्तिरू येथे झाला, म्हणून त्या दिवशी त्या ठिकाणी उत्सव करतात. विजयनगरजवळ सिंहाचलम येथे एका डोंगरात नरसिंहाची मूर्ती आहे. त्या मूर्तीला वर्षभर चंदनाचा लेप लावलेला असतो. तो वैकाशी पौर्णिमेला काढतात. त्या वेळी हजारो भक्त तिथे दर्शनार्थ जातात. [सा. इं. फे.]

## वैकुंठ

श्रीविष्णूचे निवासस्थान. विविध पुराणांतून वैकुंठाचे वर्णन आलेले आहे, ते असे—

वैकुंठ हा भूलोकापासून १८ कोटी योजने अंतरावर आहे. तो अप्रतिम सुंदर आणि दिव्य गृहांनी भूषित आहे. त्यामध्ये वापी, सरोवर व नद्या आहेत. तिथल्या जलाशयातून हंस, सारस व चक्रवाक हे पक्षी विहार करतात. चंपक, अशोक, कल्हार, मंदार, बकुल, इ. वृक्ष तिथे सर्वत्र आढळतात. तिथे रम्य व दिव्य उपवने आहेत. चित्रांनी सुशोभित व रत्नखचित असे सुवर्णाचे प्रासाद आहेत. या लोकात गाणारे गंधर्व आणि अप्सरा यांचा कलाविलास सदैव चालतो. ऋषी, मुनी त्या ठिकाणी वेदपठण करून लक्ष्मीची व भगवंताची स्तुती करतात.

वैकुंठात श्रीविष्णूचा दिव्य, सुंदर असा प्रासाद आहे. त्याला चार द्वारे असून, सुवर्णाची गोपुरे आहेत. पूर्व द्वारावर चंड-प्रचंड, दक्षिण द्वारावर भद्र-सुभद्र, पश्चिम द्वारावर जय-विजय व उत्तर द्वारावर धाता-विधाता या नावांचे द्वारपाल आहेत. त्या ठिकाणी सर्व सुलक्षण व अलंकृत अशा दासांनी परिवृत असा श्रीविष्णू विराजतो. वैकुंठात पूर्वेला वासुदेवाचे मंदिर आहे, दक्षिणेला संकर्षणाचा प्रासाद आहे, नैर्ऋत्येला सरस्वतीचे निवासस्थान आहे, पश्चिमेला प्रद्युम्नाचे मंदिर आहे, वायव्येला रतिलोक आहे, उत्तरेला अनिरुद्धाचे स्थान आहे आणि ईशान्येला शांतिलोक आहे. वैकुंठाच्या भोवती सात आवरणे आहेत (पद्मपु. स्वर्ग ६).

पद्मपुराणाच्या उत्तरखंडात वैकुंठाचे माहात्म्य विशद करताना जे श्लोक लिहिले आहेत, त्यांपैकी काही असे—

> अमृतं शाश्वतं नित्यमनन्तं परमं पदम्।
> हिरण्मयं मोक्षप्रदं ब्रह्मानन्दसुखाह्वयम्॥
> एवमादिगुणोपेतं तद्विष्णोः परमं पदम्।
> यद्‌गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं हरेः॥
> न हि वर्णयितुं शक्यं कल्पकोटिशतैरपि।
> अपि द्रष्टुमशक्यं तद् ब्रह्मरुद्रादिदैवतैः॥
> ज्ञानेन शास्त्रमार्गेण द्रक्ष्यते योगिपुङ्गवैः।
> तत्स्थानमुपभोक्तव्यमव्यक्तब्रह्मसेविनाम्॥
> (पद्मपु. उत्तर. २८)

**अर्थ** — वैकुंठ हा अमृत, शाश्वत, नित्य, अनंत, सुवर्णमय, मोक्षप्रद व ज्याला ब्रह्मानंदसुख असे नाव देता येईल, असा असून, ते विष्णूचे परमपद आहे. या श्रीहरीच्या परमपदाला जो जाईल, त्याला पुनरावृत्ती नाही. वैकुंठ हे स्थान इतके अनुपम आहे, की कोटिकोटी कल्प जरी त्याविषयी बोलत राहिले, तरी त्याचे वर्णन पुरे होणे शक्य नाही. ब्रह्मा, रुद्र, इ. देवतांना वैकुंठ लोक दिसणे अशक्य आहे. जे कोणी योगीश्रेष्ठ आहेत, ते ज्ञानाने व शास्त्राचरणाने वैकुंठाचे दर्शन घेऊ शकतात. अव्यक्त अशा ब्रह्माची उपासना करणाऱ्या ज्ञानी लोकांना त्या स्थानाचा उपभोग घेता येतो.

## वैकुंठ एकादशी

मार्गशीर्ष शुद्ध एकादशीला हे नाव आहे. दक्षिणेत हिला मुक्कोडी एकादशी असे म्हणतात. हे नाव पडण्याची दक्षिणेतील कथा अशी — कृतयुगात मुरन नावाचा असुर देवांना फार त्रास देऊ लागला. त्याने बेजार होऊन सर्व देव विष्णूकडे गेले. मग त्यांचे दुःख दूर करण्यासाठी विष्णूने अवतार घेऊन त्या असुराला मारले. त्या वेळी विष्णूसह मुक्कोडी (तीन कोटी) देव पृथ्वीवर अवतरले. तो दिवस एकादशीचा होता.

या एकादशीला विष्णूची पूजा करून निश्चक्र उपवास करायचा असतो. अनेक एकादश्या केल्याचे पुण्य या एका एकादशीमुळे लाभते. या व्रताची कथा अशी —

पूर्वी रुक्मांगद नावाचा राजा पृथ्वीवर राज्य करीत होता. त्याच्या राजधानीत सुंदर, सुवासिक फुलांनी सदैव बहरलेले एक उद्यान होते. एकदा परमेश्वराची पूजा करण्यासाठी इंद्राला फुले हवी होती. म्हणून त्याने काही देवांना फुले आणण्यासाठी पृथ्वीवर पाठविले. ते देव रुक्मांगदाच्या उद्यानातून रोज फुले चोरून नेऊ लागले. ते अदृश्यपणे हे चौर्यकर्म करीत असल्यामुळे ते दिसेनात. फुले मात्र नित्य नाहीशी होत होती.

एके दिवशी बागेजवळ जाबाली ऋषी चिंतन करीत बसला

होता. रक्षकांना वाटले, की हाच चोर आहे. त्यांनी जाबालीला धरले व राजापुढे उभे केले. राजा ऋषीला ओळखत असल्यामुळे त्याने त्याची क्षमा मागितली. त्या वेळी राजाला जाबालीने काही वनस्पती दिल्या व उद्यानात त्यांचा धूर करायला सांगितले. त्या धुराच्या प्रभावाने फुले चोरणाऱ्या देवांना पार्थिव रूप प्राप्त झाले. त्यामुळे त्यांना त्या जड रूपाने स्वर्गात जाता येईना. त्यांनी सारा वृत्तान्त राजाला सांगितला. त्यांना लघुरूपाने स्वर्गात परत जायचे होते व त्यासाठी कोणाचे तरी पुण्यफल हवे होते. राजाने नगरात तशी दवंडी पिटविली. ती ऐकून एक धोबीण पुढे आली आणि तिने आपल्या एकादशीव्रताचे पुण्य देवांना दिले. त्या पुण्यामुळे ते देव स्वर्गात जाऊ शकले. धोबिणीने हे पुण्य मार्गशीर्ष शुद्ध एकादशीच्या व्रताने मिळविले होते.

भौतिक वस्तूंच्या मोहातून सुटका, सुख-शांतीचा लाभ आणि अंती वैकुंठप्राप्ती, हे या व्रताचे फल आहे.

दक्षिणेत या एकादशीचे माहात्म्य विशेष आहे. त्या दिवशी लोक प्रातःकाळी स्नान करून विष्णुमंदिरात दर्शनाला जातात व उपवास करून जागरण, विष्णुपुराणाचे वाचन व श्रवण करतात.

तमिळनाडमधील विष्णुमंदिरांना एक वेगळे दार असते. त्याला वैकुंठ – वासल (वैकुंठाकडे जाणारे दार) म्हणतात. वर्षातून फक्त एकदाच या तिथीला ते दार उघडतात. त्यातून आत जाण्यासाठी भाविकांची गर्दी होते. तिरुचिरापल्ली येथील विष्णुमंदिरात वैकुंठ एकादशीचा उत्सव सतत एकवीस दिवस चालतो. हजारो लोक त्या उत्सवासाठी तिथे जमतात. [ श्री. ऐयर, मार्च ऑफ इंडिया, मे-जून १९५३; सा. इं. फे. ]

## वैकुंठ चतुर्दशी

एक व्रत. कार्तिक शुद्ध चतुर्दशीला हे नाव आहे. हे हरि-हरांचे संयुक्त व्रत आहे. तो त्या दोन देवांच्या भेटीचा दिवस मानतात. या दिवशी पूजा व उपोषण या दोन गोष्टी विहित आहेत. प्रथम विष्णूची पूजा व त्यानंतर शंकराची पूजा करायची असते. पूजाविधी आटोपल्यावर नाममंत्राने प्रत्येक देवाला सहस्र कमले वाहणे, हे या पूजेचे वैशिष्ट्य आहे. या व्रताची कथा अशी–

कृतयुगात या दिवशी भगवान विष्णू वैकुंठाहून निघून वाराणशीला आला. त्या दिवशी रात्रीच्या चौथ्या प्रहरात त्याने मणिकर्णिका तीर्थात स्नान केले व सहस्र कमळे जमा करून शंकराची पूजा आरंभली. शंकराने त्याच्या भक्तीची कसोटी पाहायचे ठरविले व त्यांतले एक कमळ लपवले. विष्णूला एक कमळ कमी पडल्याचे कळले. आसनावरून उठून कमळ आणायला जायचे, तर पूजेचा भंग होणार होता. तो टळावा व पूजा यथाविधि व्हावी, यासाठी विष्णूने मग स्वतःचे नेत्रकमळ काढून शंकराला वाहिले आणि सहस्र संख्या पुरी केली. ते पाहून शिव विष्णूवर प्रसन्न झाला. 'आजपासून मी तुला त्रैलोक्याचे राज्य बहाल केले असून, तू त्याचे पालन कर', असा वर त्याने विष्णूला दिला. 'आणखी काही हवे तर माग' असेही त्याने म्हटले. त्यावर विष्णू म्हणाला. 'माझ्या हातून दैत्यांचा नाश व्हावा, अशी इच्छा आहे.' हे ऐकून शंकराने विष्णूला सुदर्शन चक्र दिले.

त्या दिवसापासून या तिथीला वैकुंठ (विष्णू) चतुर्दशी असे नाव मिळाले.

शैव-वैष्णवांतला विरोध शमवण्यासाठी या व्रताची योजना झाली असावी, असे वाटते. कारण या दिवशी शैव-वैष्णव दोघेही हरि-हरांची पूजा करून उपोषण करतात. [ व्रतराज ]

## वैकुंठमाता

एक देवता. ही माजगावची ग्रामदेवता आहे. माजगाव आज मुंबई शहरात समाविष्ट झालेले आहे. तिथल्या एका टेकडीवर हिचे मंदिर आहे. देवी चतुर्भुज असून, वाघावर बसलेली आहे. तिच्या मागे भैरव व जरीमरीचे शेंदूर फासलेले पाषाण आहेत. भैरवाला सुपाऱ्या लावून कौल घेण्याची पद्धत इथे आहे. महाशिवरात्रीला हिची यात्रा भरते.

कोळी समाज वैकुंठमातेचा उपासक आहे. पेशवाईतील सखारामबापू व चिमाजीअप्पा हिचे भक्त होते, असे म्हणतात. वसईच्या मोहिमेनंतर चिमाजीअप्पाने देवीच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला, असे सांगतात. [ देवीकोश २ ]

## वैखानस

शंभर ऋषींचा एक समूह. हा ब्रह्मदेवाच्या नखापासून उत्पन्न झाला. रहस्यूदेवमलिम्लुच याने मुनिमरण नामक क्षेत्रात यांचा वध केला, अशी कथा पंचविंश ब्राह्मणात आहे ( १४.४.७ ). याहून त्यांची वेदकालीन अधिक माहिती मिळत नाही.

प्राचीन काळी गृहस्थाश्रम पुरा केल्यावर वनात राहून तप करणाऱ्या मुनींनाही वैखानस म्हणत. तपोवनात वृक्षांतळी झोपडी उभारून राहणाऱ्या व शमधर्माचे पालन करणाऱ्या वृद्ध गृहस्थांना भवभूतीने वैखानस म्हटले आहे (उ. रा. च. १.२५). वानप्रस्थ हे नाव त्या आश्रमाला मिळण्यापूर्वी अशा वनवासी मुनींना वैखानस म्हणत, असे दिसते. वैखानस लोक तृणधान्ये गोळा करून उपजीविका करीत व आतिथ्यधर्मही पाळीत. कण्वाचा आश्रम हा वैखानसांच्या आदर्शावर संघटित झालेला होता. वैखानसांना आपल्या स्त्रियांसह आश्रम चालवण्याची मुभा होती.

वैखानस बनात राहूनही वैदिक यज्ञयाग करीत होते. कालां-

तराने त्यांनी वैदिक कर्मे दुर्लक्षित करून उपासनामार्ग स्वीकारला. त्यांच्यामध्ये वैष्णव उपासनेने प्रवेश मिळवला. पुढे त्या उपासनेचे नेमधर्म सांगणारे आगमही त्यांनी निर्माण केले. गुप्तकालात त्यांनी उपासनेच्या क्षेत्रात पांचरात्र मताचा अवलंब करून व्यूहपूजा स्वीकारली. गुप्तकालात या वैखानसधर्माने खूप प्रतिष्ठा मिळवली. कालोचित अशा अनेक गोष्टी स्वीकारून त्यांनी आपला संप्रदाय विकसित व लोकाभिमुख केला. वसिष्ठ व जनक हे वैखानसांनी आपल्या जीवनाचे आदर्श ठरवले.

वैखानस मुनी हा त्यांचा संप्रदायप्रवर्तक होय. या वैखानसाविषयी काही आख्यायिका प्रचलित आहेत, त्या अशा –

(१) ब्रह्मदेवाने वैखानसाचा अवतार घेतला व नैमिषारण्यात विष्णूने त्याला दीक्षा दिली.

(२) विष्णूच्या आज्ञेने वैखानसाने पृथ्वीवर जन्म घेऊन विष्णूच्या पूजे-अर्चेचा म्हणजेच वैष्णवधर्माचा प्रसार केला.

वैखानसांचा विशेषकरून दक्षिण भारतात प्रचार होता. चोळ देशाचा राजा राजराज ( १ ला ) याच्यापासून तिथल्या कोरीव लेखात वैखानसांचे नाव आढळू लागते. त्या काळी वैखानसांनी वानप्रस्थ सोडून खेड्यात व शहरात राहायला सुरुवात केली होती. त्यांच्याकडे विष्णुमंदिरांची व्यवस्था बघण्याचे काम दिलेले होते. मंदिराप्रमाणे मंदिराच्या मालमत्तेचा कारभारही ते पाहत व विष्णूची पूजाअर्चा व इतर सर्व गोष्टी करीत. या त्यांच्या सेवेबद्दल राजाकडून किंवा ग्रामपंचायतींकडून त्यांना देणग्या किंवा वतने मिळत.

विजयनगरचा राजा अच्युतराय याच्या इ. स. १५३९ च्या एका ताम्रपटावरून कळते, की त्या सम्राटाने गोविंदराजाच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करण्याबद्दल वैखानसांना आज्ञापत्र काढले. ही प्राणप्रतिष्ठा वैखानस आगमाप्रमाणे व्हायची असल्याने त्यासाठी नेमलेल्या वैखानस पुजाऱ्यांना त्याने चार खेड्यांचे उत्पन्न वेतन म्हणून नेमून दिले.

१२व्या शतकामध्ये रामानुजांचा वैष्णव संप्रदाय उत्कर्षाप्रत पोचला. त्याला तिकडच्या राजांचा आश्रयही मिळाला. त्यामुळे वैखानस मागे पडले. असे असले तरी, वैष्णव मंदिरांतील पूजेचा हक्क रामानुजी वैष्णव त्यांच्याकडून काढून घेऊ शकले नाहीत. तिरुपती येथील वेंकटेशाच्या देवस्थानावर रामानुज मताचा फार मोठा प्रभाव होता. तिरुपती व तिरुचानूर ही मंदिरे परस्पर संलग्न होती. तिथे पांचरात्र उपासना सुरू झाली. रामानुजी जियारांनी (संन्यासी) तिरुपतीच्या मंदिराचा कब्जा घेतला व ते क्षेत्र रामानुज संप्रदायाचे बनवले. रामानुजी वैष्णव तिथे राहून तिरुपतीची सेवाचाकरी करू लागले. पण मंदिराच्या गाभाऱ्यात त्यांचा हक्क चालू शकला नाही. तिथले वैखानस आपल्या आगमाप्रमाणे वेंकटेशाची पूजा करीत राहिले. आजही द. भारतात पांचरात्र आगमापेक्षा वैखानस आगमाप्रमाणे चालणारी विष्णुमंदिरे अधिक आहेत.

परिवारदेवतांच्या मांडणीत पांचरात्र आणि वैखानस यांच्यामध्ये मतभिन्नता आहे. पांचरात्र हे आंडाळ आणि इतर स्त्रीभक्त यांच्या मूर्तींची प्राणप्रतिष्ठा करतात. तसे केल्याने या स्त्रीभक्तांच्या मूर्तींना विष्णुभार्येचा दर्जा प्राप्त होतो. रामानुज संप्रदायात रामानुज आणि आळवार यांना विष्णुसदृश मानले जाते. वैखानसांच्या परंपरेत असा प्रकार आढळून येत नाही.

**वैखानसांचे तत्त्वज्ञान** – वैखानस हे नारायणाला परमेश्वर आणि अंतिम तत्त्व मानतात. नारायण हा 'सकल' आणि 'निष्कल' आहे. ही त्याची दोन्ही रूपे एकमेकांपासून वेगळी करता येत नाहीत. या दोन्ही रूपांमध्ये नारायण सगळीकडे व्यक्त होतो. श्री अथवा लक्ष्मी ही त्याची शक्ती आहे आणि तीच त्याची मूल प्रकृती आहे. या शक्तीच्या बळावर श्रीविष्णू वेगवेगळी रूपे घेतो. ही शक्ती चेतन व अचेतन अशा सृष्टीची जडणघडण करते. पर, व्यूह, विभव, अंतर्यामी व अर्चा या विष्णूच्या पाच अवस्था होत. त्या सर्वांमध्ये लक्ष्मी किंवा शक्ती विष्णूबरोबर असते. या दोहोंचे ऐक्य अविच्छिन्न आहे. एकटा नारायण नव्हे; तर लक्ष्मीसह नारायण हाच उपास्य आणि प्राप्तव्य होय. भक्ती आणि प्रपत्ती म्हणजे नारायणाच्या कृपेचे दार उघडण्याची गुरुकिल्लीच आहे,

वैखानसांचे नियम भृगू, मरीची आणि काश्यप या तीन ऋषींनी तयार केले, असे ते समजतात. मुळात ते आळवार आणि आचार्य यांना भजत नव्हते; पण त्यांच्यावरही रामानुजमताचा प्रभाव पडल्यावाचून राहिला नाही. पुढच्या काळात त्यांनीही आळवारांच्या व आचार्यांच्या प्रतिमा आपल्या मंदिरांमध्ये स्थापन केल्या. इतर वैष्णवांप्रमाणे वैखानस हे आपल्या शरीरावर शंखचक्रादी मुद्रा उमटवीत नाहीत. रामानुजी वैष्णव पूजेच्या वेळी तमिळ भाषेतील प्रबंधम या पद्यसंग्रहातली पदे गातात. वैखानस तसे करीत नाहीत. द. भारतात सांप्रत वैखानसांची लोकसंख्या अगदीच नगण्य आहे. तमिळनाड, आंध्र व कर्नाटक यात वैखानसांची तुरळक वस्ती आढळते. पण द. भारताच्या आध्यात्मिक जीवनातील त्यांचे स्थान आजदेखील मोठे आहे.

[ क. हे. इं.; प्रा. च. को.; ह. च.–सां. अ. ]

## वैखानस आगम

एक वैष्णव आगम. पांचरात्र आगमाइतका हादेखील प्रमाणभूत असला, तरी तितका प्रसिद्ध नाही. एका काळी त्याचा खूप प्रचार होता; पण कोणत्या तरी कारणाने त्याची लोकप्रियता नष्ट झाली व आज

तर त्याचे नावही ऐकायला मिळत नाही. प्रस्तुत आगमाचे पांचरात्रमताशी पुष्कळ अंशी साम्य होते. मतभेद होता तो मंदिरे आणि मूर्ती यांच्या प्रक्रियेत. पांचरात्र या ग्रंथात याची माहिती मिळते.

वैखानस ही कृष्णयजुर्वेदाची एक स्वतंत्र शाखा होती. तिचा संबंध औखेयशाखेशी होता. या शाखेचे मंत्रसंहिता, गृह्यसूत्र, धर्मसूत्र व श्रौतसूत्र असे केवळ चारच ग्रंथ आजवर उपलब्ध झाले आहेत.

मरीचिप्रोक्त वैखानस आगम अलिकडेच प्रकाशित झाला आहे. ग्रंथ मोठा आहे व त्याची ७० पटले आहेत. त्याचा अभ्यास केल्यावर वैखानसांच्या प्राचीन सिद्धांतांचे ज्ञान होते. प्रतिष्ठा-विधिदर्पण या ग्रंथात नारायण-विखनस-काश्यप-मरीची अशी त्या आगमाची आचार्यपरंपरा दिली आहे. क्रिया आणि चर्या हे वैखानस आगमाचे विषय होत. थोडक्यात त्यांचे वर्णन असे– मंदिराच्या भिन्न भिन्न अंगांची निर्मिती, राम, कृष्ण, इ. मूर्तीचे वैशिष्ट्य, मूर्तींची प्रमाणे, प्रतिष्ठा, अर्चना व बलिकर्म.

तत्त्वज्ञान–या जगाची उत्पत्ती नारायणापासून झाली. विष्णू, महाविष्णू, सदाविष्णू व सर्वव्यापी या त्याच्या चार मूर्ती आहेत. या चारांच्या अंशांपासून अन्य चार मूर्ती झाल्या. विष्णूच्या अंशापासून धर्मप्रधान पुरुष, महाविष्णूच्या अंशापासून ज्ञानात्मक सत्य, सदाविष्णूच्या अंशापासून ऐश्वर्यात्मक अच्युत व सर्वव्यापीच्या अंशापासून वैराग्यप्रधान अनिरुद्ध या त्या मूर्ती होत. चार मूर्तींनी युक्त असल्याने नारायण पंचमूर्तिरूप बनतो.

भगवंताच्या मायेने जीवाला बंध प्राप्त होतो व त्याच्याच कृपेने त्याला मोक्ष मिळतो. विष्णूची अर्चना करणे हे जीवाचे मुख्य कर्तव्य होय. ती पुढील चार प्रकारांनी करायची असते–

(१) जप–भगवंताचे ध्यान धरून अष्टाक्षर किंवा द्वादशाक्षर मंत्राचा जप.

(२) अग्निहोत्रादी हवन.

(३) ध्यान–अष्टांग योगमार्गाने नारायणाचे चिंतन.

(४) अर्चना–प्रतिमापूजन. हे चौथे साधनच मुख्य होय. अर्चनेसाठी मूर्ती अशी असावी – श्री विष्णू आणि त्याच्या दोही अंगी श्रीदेवी व भूदेवी. त्याचप्रमाणे उजव्या अंगी पुरुष व सत्य. डाव्या अंगी अच्युत व अनिरुद्ध या मूर्ती. मंदिरात अशा सपरिवार विष्णूची विधिपूर्वक प्रतिष्ठा करून वैदिक मंत्रांनी त्याची पूजा करावी. ही अर्चना योग्यप्रकारे झाल्यास जीवाला सायुज्य मुक्ती प्राप्त होते. [ भा. द.–बलदेव उपाध्याय. ]

## वैखानस गृह्यसूत्र

हे सूत्र कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचे आहे. यात विवाहादी सर्व संस्कार व पाकयज्ञ यांची माहिती आढळते. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

## वैखानस धर्मप्रश्न

एक धर्मग्रंथ. महादेवाने आपल्या सत्याषाढ श्रौतसूत्रावरील वैजयंती नावाच्या भाष्यामध्ये कृष्णयजुर्वेदाच्या सहा श्रौतसूत्रांचा उल्लेख केला असून, त्यांत वैखानसाचे नाव दिले आहे. शौनकाच्या चरणव्यूहामध्येही वैखानसाचे नाव आले आहे. प्राचीन धर्मशास्त्रविषयक ग्रंथांमध्ये याचे उल्लेख वारंवार येतात. त्यावरून वैखानस हा एक प्राचीन ग्रंथकार होता, असे अनुमान निघते.

प्रस्तुत ग्रंथात तीन-तीन प्रश्नांचे तीन भाग असून, प्रत्येक प्रश्नात खंड नामक पोटभाग आहेत. असे एकेचाळीस खंड या ग्रंथात आहेत. यात विवेचिलेले धर्मशास्त्रीय विषय असे –

चार वर्णं आणि त्यांचे विशेष अधिकार, चार आश्रम, ब्रह्मचाऱ्यांचे चार प्रकार व त्यांची कर्तव्ये, गृहस्थांचे चार प्रकार व त्यांची कर्तव्ये, वानप्रस्थ व भिक्षू यांचे प्रकार, योग्यांचे तीन प्रकार, आचमन, संध्या, अभिवादन, अनध्याय, ब्रह्मयज्ञ, अन्नग्रहणाचे नियम, वस्तूंची शुद्धी, प्रेतसंस्कार, अनुलोम-प्रतिलोम पोटजाती, व्रात्य, इत्यादी.

प्रस्तुत ग्रंथ गौतम आणि बौधायन यांच्या नंतरच्या काळातला असावा, असे डॉ. काणे म्हणतात. [ हि. ध. ]

## वैखानस धर्मसूत्र

हे कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेशी संबंधित आहे. याचे वैशिष्ट्य हे, की यात वर्णाश्रमांच्या कर्तव्यांचे मुख्यतः वर्णन आहे. यातले आश्रमांचे वर्गीकरण अगदी परिपूर्ण आहे. इतर धर्मसूत्रांमध्ये तसे ते आढळत नाही. मिश्र जातींची यात फार मोठी नामावली दिली आहे. तशी ती अन्यत्र आढळत नाही. या सूत्रातील सुमारे पन्नास श्लोक मनुस्मृतीतल्या श्लोकांशी बरेच साम्य दाखवतात. यात दिलेले धर्मनियमही मनुस्मृतीला अनुसरूनच आहेत. [ इ. सू. ओ. डे.; इं. वे. क. सू. ]

## वैखानस श्रौतसूत्र

कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचे एक सूत्र. बौधायन, आपस्तंब, सत्याषाढ यानंतर याचा उल्लेख येतो. या सूत्रात दर्शपूर्णमास, सोमयाग इ. श्रौतयज्ञासंबंधी माहिती आढळते. या सूत्राचे अन्य सूत्रांशी पुष्कळच साम्य आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे. ]

## वैजनाथ

(१) मराठवाड्यात परळी येथे एका टेकडीवर वैजनाथाचे मंदिर आहे. हे बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक स्थान मानले जाते. पाहा– परळी-वैजनाथ.

(२) उत्तर प्रदेशात हिमालयाच्या पायथ्याशी कुमाऊँ विभागात वैजनाथ नामक गावात हे शिवमंदिर आहे. कत्यूरी वंशाच्या राजवटीत या गावाला कार्तिकेयपूर हे नाव होते. वैजनाथाचे शिवमंदिर एका कत्यूरी राणीने बांधले. इथल्या महादेवाला वैद्यनाथ असेही म्हणतात. या देवालयात गोपुरासारखे



वैजनाथमंदिराचे प्रवेशद्वार – परळी

भव्य शिल्पकाम केलेले आहे. इथला पाषाण विशेष चांगला असून, त्यापासून घडवलेल्या अनेक मूर्ती मंदिरात पहायला मिळतात. त्या इ. स. च्या ८ व्या व ९ व्या शतकांत आणि १२–१३ व्या शतकांत घडवलेल्या आहेत. [ श्री. कुमार – मार्च ऑफ् इंडिया, ऑक्टो. १९५६ ]

(३) पंजाबातील कांगडा जिल्ह्यात वैजनाथ नावाचे शहर आहे व तिथे ४००० फूट उंच डोंगरावर एक प्राचीन शिवमंदिर आहे. त्यातील शिलालेखात हे मंदिर इ. स. १२०४ मध्ये निर्माण झाल्याचा उल्लेख आहे. मंदिरात सर्वत्र निरनिराळ्या देवतांच्या सुंदर मूर्ती असून, त्यांत एक षड्भुज गणेशमूर्ती आहे. सर्व भिंती व छत यांवर विपुल नक्षीकाम कोरलेले दिसते. हे स्थान अत्यंत निसर्गरम्य आहे. [ श्री. त्रिलोक खोसला – धर्मयुग, २४ ऑगस्ट १९५८ ]

## वैतरणी

विंध्य पर्वतात उगम पावून, कलिंग देशातून वाहत जाऊन, ब्राह्मणी नदीला मिळणारी एक नदी. हिचा उल्लेख महाभारतात (वन. ११३) आहे. अनेक पुराणांत हिला पवित्र व पिंडदानासाठी योग्य नदी मानले आहे. राम, लक्ष्मण व सीता यांनी वनवासात असताना काही दिवस या नदीच्या काठी वसती केली होती, अशी समजूत आहे. ओडिसातील केओंझरगडच्या वायव्य भागातील डोंगरात ही उगम पावते व केओंझरमधून वाहत जाऊन ब्राह्मणीला मिळते.

ही यमाची नदी मानली जाते. ही मलमूत्ररक्तादी दुर्गंधी पदार्थांनी भरलेली असून, वैतरणी नामक नरकात जाताना ओलांडावी लागते. मृताच्या अंत्यसंस्कारात गोदान केले असता, त्या गायीच्या शेपटीला धरून मृताचा आत्मा ही नदी पार करू शकतो, अशी समजूत आहे.

परशुरामाने ही नदी पृथ्वीतलावर आणली, असे मत्स्य व पद्म पुराणांत सांगितले आहे. [ हि. जॉ. ए. इं.; एन्सा. रि. ए.; पु. इं. ]

## वैतरणी धेनुदान

यमपुरीच्या द्वाराशी असलेली वैतरणी नदी ओलांडून जाणे सुकर व्हावे, म्हणून हे दान करतात. संक्रांती, ग्रहण किंवा अन्य पर्वकाळी कृष्ण वर्णाची धेनू दान द्यावी, असे सांगितले आहे. मृत्युसमयी धेनुदान करावे व ते पुत्राने केले तरी चालेल, असे शास्त्रवचन आहे. काळी गाय नसल्यास इतर कोणत्याही रंगाची द्यावी; तीही नसेल तर द्रव्य द्यावे, असे पर्याय सांगितले आहेत. या धेनुदानाचा विधी असा– काळी किंवा तांबूस वर्णाची सवत्स धेनू आणून तिची शिंगे व खूर सोन्या-रुप्याने मढवावे. तिला कृष्णवस्त्रांचे आच्छादन व फुलांच्या माळा घालून सजवावे. तिच्या बरोबर दान देण्यासाठी सात धान्ये व यमाची सुवर्णाची प्रतिमा आणावी. कापसाच्या राशीवर तिला बसवावी. मग धेनूची व ब्राह्मणांची पूजा करावी आणि पाणी व घृत यांसह गायीचे पुच्छ ब्राह्मणाच्या हाती द्यावे. त्यानंतर ब्राह्मणाची व नंतर गायीची प्रार्थना करावी. [ दानचंद्रिका. ]

## वैतरणीव्रत

मार्गशीर्ष कृष्ण एकादशीला हे व्रत सुरू करतात. गाय ही या व्रताची देवता होय. एकादशीला मध्याह्नसमयी स्नान करून हे व्रत वर्षभर करण्याचा संकल्प करायचा असतो. रात्री कृष्णवर्णाच्या गायीचे पाय व शिंगे गंधोदकाने धुवून, तिच्या अंगाला चंदनाची उटी लावतात. त्यानंतर तिच्या सर्व अवयवांची समंत्रक पूजा करतात. मग धूप, दीप व वस्त्र यांचे दान करून पुढील मंत्र म्हणतात –

असिपत्रादिकं घोरं नदीं वैतरणीं तथा ।
प्रसादात्ते तरिष्यामि गौर्मातस्ते नमो नमः ।।

मार्गशीर्षापासून चार महिने भाताचा नैवेद्य, चैत्रापासून चार महिने शिजवलेल्या सातूंचा व श्रावणापासून चार महिने पायसाचा नैवेद्य दाखवून, त्याचे तीन भाग करतात. एक भाग

गायीला व एक भाग ब्राह्मणाला देऊन उरलेला एक भाग स्वतः भक्षण करायचा असतो. वर्षाच्या अंती उद्यापनाच्या वेळी पलंग व सुवर्णाची गाय कुटुंबवत्सल ब्राह्मणाला दान देतात. फल – असिपत्र नरक आणि वैतरणी नदी सहज तरून जाणे, यमलोक चुकविणे व दुःखनाश. [ हि. ध.; व्रतराज ]

**वैतान श्रौतसूत्र** अथर्ववेदाशी हे संबंधित श्रौतसूत्र आहे. यात दर्शपूर्णमासादी इष्टीतील ब्रह्मा, ब्राह्मणांच्छंसी, आग्नीध्र व पोता या चार ऋत्विजांची कर्तव्ये सांगितली आहेत. या सूत्रात यजुर्वेदातीलही अनेक मंत्र आढळतात. [ हिंदुत्व; वै. सा. ]

**वैती** ठाणे जिल्ह्यात वसलेली एक जात. सुरत जिल्ह्यातही या लोकांची थोडी वसती आढळते. सोनकोळी लोकांपैकी हे लोक असावे, असे वाटते; पण यांचा दर्जा सोनकोळ्यांपेक्षा हीन आहे. यांच्यापैकी काहीजण वाल्या कोळी याला आपला मूळपुरुष मानतात; पण काहीजण त्याचे नाव कैवर्तक होते, असे म्हणतात. कुलाबा जिल्ह्यातील चौल हे त्यांचे मूळ ठिकाण होय. यांच्यांत पोटजाती नाहीत. हे लोक मच्छीमारी, शेती, मजुरी वगैरे धंदे करतात. काही लोक लाकूड व गवत यांचा व्यापार करतात.

**देवधर्म** – हे लोक रामाचे उपासक आहेत. हे समुद्राचीही पूजा करतात. मात्र ते कोणत्याही मूर्तीची पूजा करीत नाहीत. घरात नारळ ठेवलेला असतो, त्याची हे कधीतरी पूजा करतात. हे लोक दसरा, दिवाळी वगैरे सण साजरे करतात आणि अनेक तीर्थक्षेत्रांची यात्राही करतात. मृत पूर्वजांच्या प्रतिमांची पूजा करून त्यांना कोंबडी-बकरी अर्पण करण्याची चाल यांच्यांत आहे. रोगाची साथ आली, की हे जरीमरीची पूजा करतात, तिला बकरा अर्पण करतात व तो बकरा देवीच्या नावाने मोकळा सोडतात. हे लोक सर्व प्रकारचे मांस खातात व मद्यही पितात.

**विवाहप्रथा** – यांच्यांत मुले वयात आल्यावर लग्न करतात. क्वचित लहानपणीही लग्ने होतात. एखाद्या मुलीने जातीतल्या तरुणाशी अनैतिक संबंध केला, तर तिला दंड करून जातीत ठेवतात. ती त्या तरुणाशी लग्न करू शकते. अन्य जातीतल्या पुरुषाशी संबंध ठेवणाऱ्या मुलीला मात्र जातीबाहेर काढतात.

मुलाचा बाप मुलीला मागणी घालतो. लग्न ठरल्यानंतर दोन्ही पक्षांचे लोक मद्यपान करतात. मुलीसाठी तिच्या बापाला देज देण्याची पद्धत आहे. ब्राह्मण पुरोहित लग्नाचा मुहूर्त सांगतो व तोच लग्नविधी चालवतो. कुणबी लोकांप्रमाणेच यांचा लग्नविधी असतो. पंचपालवी हे यांचे देवक आहे.

या लोकांत आते-मामे-मावस भावंडांचे विवाह होत नाहीत. पुरुष आपल्या बायकोच्या धाकटचा बहिणींशी लग्न करू शकतो. दोघे भाऊ दोघी बहिणींशी लग्न करीत नाहीत. यांच्यांत एका पुरुषाला अनेक बायका करता येतात. विधवांचा पुनर्विवाह रूढ आहे. मात्र अविवाहित पुरुषाला विधवेशी लग्न करता येत नाही. घटस्फोट रूढ नाही.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते जाळतात. कुष्ठरोग किंवा देवी यांमुळे मरण पावलेली माणसे व एक वर्षाच्या आतील मुले यांची प्रेते मात्र पुरतात. पुरताना डोके दक्षिणेकडे ठेवतात. तिसऱ्या किंवा पाचव्या दिवशी राख व हाडे गोळा करून पाण्यात टाकतात. ११व्या दिवशी पिंडदान करतात व जातीला जेवण घालतात. [ ट्रा. का. बॉं. ]

**वैदू** औषधे विकत फिरणाऱ्या लोकांची एक जात. वास्तविक पाहता भोई, धनगर, कोळी, माळी, इ. निरनिराळ्या जातींचे लोक या लोकांत समाविष्ट झालेले आहेत. झाडपाल्याची औषधे, भस्मे वगैरे घेऊन गावोगावी फिरणाऱ्या लोकांचा हा एक वर्ग होता. पण आता त्यांची वेगळी जात झाली आहे. महाराष्ट्रातील पुणे, खानदेश, नासिक व अहमदनगर या जिल्ह्यांत यांची वसती आहे. आपण मूळचे हैद्राबादकडचे होतो, असे ते म्हणतात. हैदराबादजवळ कुडेरमट्टी नामक गाव आहे. तिथल्या एका धनगराला हे धर्मगुरू मानतात. तिरुपतीचा वेंकोबा हा त्यांचा उपास्य देव आहे. त्यांच्यांतले बरेच लोक अजूनही घरांत तेलुगू भाषा बोलतात. त्यावरून हे लोक मूलतः हैद्राबादकडील असणे संभवनीय वाटते. त्यांच्यांतले बरेच लोक मूळचे धनगर असावे. महाराष्ट्रात आल्यानंतर काही मराठी बोलणाऱ्या जातींचे लोक त्यांच्यांत सामील झाले.

याच्या तीन प्रमुख पोटजाती असून, झोळीवाले, दाढीवाले व चटईवाले अशी त्यांची नावे आहेत. त्यांच्यांतही आणखी पोटभेद आहेत. दाढीवाले म्हणजे दाढी राखणारे होत. बाकीचे वैदू दाढी राखीत नाहीत. हे सर्व लोक वर्षभर बायका-मुलांसह गावोगावी फिरून औषधे विकतात व भीकही मागतात. त्यांच्या जवळ कापडाची पाले असतात. ती गावाबाहेर माळावर उभी करून त्यांत हे लोक आपला संसार मांडतात. सामान वाहण्यासाठी ते गाढवे बाळगतात.

त्यांच्या जवळ भगव्या कपडचाच्या झोळ्या असून, त्यांत वनस्पतींची मुळे, पाने वगैरे औषधे, निरनिराळी भस्मे आणि विषे असतात. सर्दी–खोकल्यापासून क्षयापर्यंत वाटेल त्या रोगावरचे औषध त्यांच्या जवळ असते. ते जळवा लावून रक्तही काढतात. त्यांच्या झोळीत सरडचाचे कातडे, साळीचे काटे

वाघनखे, अस्वलाचे केस व दात, कोल्ह्याचे डोके, इ. वस्तूही असतात. रस्त्यांतून हिंडताना हे लोक 'नाडीपरीक्षा–वैद, मंडूर–वैद, गर्मी–वैद, वाताला ओखद, सर्दीला ओखद' अशा प्रकारे असंख्य रोगांची नावे घेऊन ओरडत जातात. त्यांच्या बायकाही औषधे विकण्याचा धंदा करतात. त्याचप्रमाणे त्या रांगोळी व चटया बनवूनही विकतात.

यांच्यांतील काही पोटजातींचे परस्पर लग्नसंबंध होत नाहीत, पण काहींचे होतात. अंबिले, चिटफळ, मानपाटी, शिगडे, मोरे, शितोळे, पवार, जाधव, शिंदे, माळी, कोळी, परीट, अशी यांची आडनावे असतात. एकाच आडनावाच्या घराण्यांत लग्न-संबंध करीत नाहीत. समान देवक असलेल्या लोकांचेही लग्न-संबंध होत नाहीत.

पूर्वी कुणबी, धनगर वगैरे इतर जातींच्या लोकांना या जातीत प्रवेश मिळत असे. त्या प्रसंगी प्रवेश घेणाऱ्या माणसाला एक झोळी दिली जात असे. त्याने त्या झोळीची पूजा केल्या-नंतर, त्याला औषधांची व रोगपरीक्षेची माहिती देण्यात येत असे. त्यानंतर त्याने सर्व जातिबांधवांना मेजवानी दिली, की प्रवेशसमारंभ संपत असे.

यांच्यांत मुले वयात आल्यानंतर त्यांची लग्ने करतात. लग्नापूर्वी स्वैराचार निषिद्ध मानतात व कोणी तो केला तर त्याने दंड व ज्ञातिभोजन दिले तरच त्याला जातीत राहू देतात. कधी कधी अशा व्यक्तीच्या जिभेवर डागही देतात.

**विवाहप्रथा** – लग्नासाठी वराचा बाप मुलीला मागणी घालतो व तिच्यासाठी त्याला देज द्यावे लागते. गावातला जोशी लग्नाचा मुहूर्त सांगतो. सामान्यपणे जातीतला वयस्क मनुष्य व गावातला न्हावी हे मिळून लग्नविधी चालवतात. मराठा वैदू मात्र त्यासाठी ब्राह्मण पुरोहित बोलावतात व धनगर वैदू गावा-तल्या परिटाकडून लग्नविधी करवतात.

प्रथम वधूला व नंतर वराला तेलहळद लावतात. नंतर वराला वाजतगाजत वधूच्या घरी नेतात. तिथे जमिनीवर कापड पसरून त्यावर गव्हांचा चौकोन करतात. त्यावर वराला बस-वतात. मग वधूला त्याच्या डावीकडे बसवतात. पाच सुवासिनी त्यांच्या कपाळी गायीच्या शेणाचे भस्म लावतात. शेवटी मेज-वानी होते. दुसऱ्या दिवशी मुलीच्या गळ्यात गरसोली बांधतात व दोघांच्या हातांना कंकणे बांधतात. आणि दोघांच्या वस्त्रांची गाठ बांधतात. मग वधू-वर परस्परांची नावे उच्चारतात. मग सर्वजण वराच्या घरी जातात. कंकण बांधणे हाच लग्नातला मुख्य विधी असतो. ज्यांची देवके आहेत, ते आपले देवक घेऊन मारुतीच्या देवळात जातात, तिथे ते मारुतीपुढे ठेवतात व मग घरी परत आणतात.

पूर्वी यांच्यांत अनेक बायका करण्याची चाल होती. विध-वांचा पुनर्विवाह रूढ आहे. घटस्फोटही रूढ आहे.

**देवधर्म** – हे लोक वेंकोबा, मरिअम्म व मारुती या देवतांना भजतात. दसरा व शिमगा हे दोनच सण पाळतात. दसऱ्याच्या दिवशी देवाला बोकड बळी देतात व त्याचे मांस खातात.

हे लोक गाय सोडून सर्व पशूंचे मांस खातात व मद्य पितात. हे लोक दहाबारा कुटुंबे मिळून हिंडतात. त्यांच्या जवळ गाढवे, शेळ्या, कोंबड्या व बरेच शिकारी कुत्रे असतात. रानात जाऊन ससे, तरस, घोरपडी, साप, माकडे, उंदीर, घुशी, बेडूक, रान-मांजरे, कलिंदरे, इ. प्राण्यांना पकडण्याचा उद्योगही हे करतात.

यांच्या बायकाही डोक्यावर झोळी घेऊन औषधे, दाभण, सुया, बिब्बे वगैरे वस्तू विकण्याचा धंदा करतात व भीकही मागतात. पूर्वी मजुरी करणे निषिद्ध होते; कोणी केल्यास त्याला जातीबाहेर टाकीत.

यांच्यांत प्रत्येक टोळीचा एक पुढारी असून, तो टोळीतील जाणत्या लोकांच्या सभेत निरनिराळ्या तंट्यांचा निकाल करीत असे व जातरूढींचे पालन न करणाऱ्याला शिक्षाही करीत असे.

**मर्तिकप्रथा** – या लोकांत मृत व्यक्तीचे प्रेत जाळतात किंवा पुरतात. दाढीवाले वैदू प्रेते पुरतात. मृत व्यक्ती विवाहित अस-ल्यास तिचे प्रेत बसल्या स्थितीत पुरतात. जे प्रेत पुरायचे असते ते एका झोळीत ठेवून व ती वांबूला बांधून दोन माणसे वाहून नेतात. जे प्रेत जाळायचे असेल ते मात्र तिरडीवरून नेतात. प्रेतदहनानंतर तिसऱ्या दिवशी राख नदीनाल्यात टाकून देतात आणि दहनाच्या जागी किंवा प्रेत पुरले असेल तिथे अन्नपाणी ठेवतात. अकराव्या दिवशी जंगमासह सर्वजण नदीवर जातात. तिथे मृताचा मुलगा नदीत उभा राहून एका सुपात तीन पिंड घेतो व ते मागच्या बाजूला टाकतो. मग तो स्वतः पाण्यात पडतो. त्यानंतर जंगम शंख वाजवून घोषणा करतो, की मृताचा आत्मा कैलासाला गेला. हे लोक श्राद्ध करीत नाहीत. [ द्रा. का. बाँ.; बाँ. बे. ऋा.; गां. गा. ]

**वैदूर्य** एक रत्न. कामभूतिक प्रदेशाच्या सीमेवरील विदूर नामक पर्वतात याचे खडे मिळत होते, म्हणून याला हे नाव प्राप्त झाले. हिंदी भाषेत यालाच लहसणिया म्हणतात. हिरवा, पिवळा, पांढरा, निळसर, काळसर असे विविध रंगांचे याचे खडे असतात. वालवाय पर्वतात याच्या खाणी असून, विदूर नामक स्थानी याच्या खड्यांवर संस्कार केले जात म्हणून याला वैदूर्य हे नाव मिळाले, असेही एक मत आहे. या रत्नात मांजराच्या बुबुळांतील रंगांप्रमाणे विविध रंगांची चमक दिसते, म्हणून त्याला मार्जारनेत्री असेही म्हणतात. सोनेरी मार्जारनेत्री

हे उत्तम मानले जाते. त्यात पांढऱ्या रंगाचे दोरेही दिसतात. अडीच सुती मार्जारनेत्री उत्तम होय. स्वच्छ, तेजस्वी, अखंड, सुतार (शुभ्र धागे असलेले), घन (भरीव) व कलिल (चमकदार) असा वैदूर्यमणी चांगला होय. केतू ही याची देवता आहे. हे रत्न उष्ण, कफवायुनाशक व शूलप्रशामक आहे.

कौटिलीय अर्थशास्त्रात वैदूर्य मोराच्या कंठासारखे किंवा बांबूच्या कोवळ्या पानांसारखे निळे व चमकदार असते, असे म्हटले आहे. द. भारतात पुन्नाट, पट्टियाळी, वणियंबडी व मुळ्ळुस या ठिकाणीं याच्या खाणी होत्या. ग्रीक व रोमन व्यापारी या भारतीय रत्नाचा मोठा व्यापार करीत होते. पेगू, बोर्निओ, लंका, उ. अमेरिका, ब्राझील व उरल पर्वत या प्रदेशांतही लहसणिया किंवा वैदूर्य या रत्नाचे खडे सापडतात. [ ल. र. प.; श. क.; मै. गु. अ. ग्रं.; सु. वि. को. ]

## वैद्यकशास्त्र

आयुर्वेदाच्या आधारे रोगचिकित्सा व रोगोपचार करण्याचे शास्त्र. भरद्वाजाचे शिष्य धन्वंतरी व आत्रेय हे या शास्त्राचे आद्य प्रवर्तक मानले जातात. धन्वंतरीने शल्यतंत्राचा व आत्रेयाने भिषग्विद्येचा प्रसार केला. धन्वंतरीचा शिष्य सुश्रुत याने आपल्या संहितेत शल्यतंत्राचे ज्ञान संग्रहीत केले. आत्रेयाचा शिष्य अग्निवेश व त्याचा शिष्य चरक होय. चरकाने आपल्या संहितेत कायचिकित्सेचे ज्ञान संग्रहीत केले. चरकसंहिता व सुश्रुतसंहिता हे दोन ग्रंथ वैद्यकशास्त्राचे प्रमाणभूत ग्रंथ मानले जातात.

सर विल्यम हंटर याने म्हटले आहे, की आर्यवैद्यक इतर पूरक शास्त्रांशी अगदी एकरूप झालेले होते. शरीररचना, अवयव, स्नायू, रक्तवाहिन्या व शरीरघटक धातू यांचा आर्यवैद्यकात विस्तृत विचार केलेला आहे. सर्वमान्य व सर्वसंग्राहक वैद्यक ग्रंथांत वनस्पतिजन्य, खनिज, प्राणिज, इ. सर्व पदार्थांचा समावेश झाला आहे. औषधांच्या वर्गीकरणाचे व सेवनाचे नियम अत्यंत सूक्ष्म आहेत. आरोग्य व अन्नसेवन यांकडे पुष्कळ लक्ष दिले आहे.

प्रो. विल्सनच्या मते भारतीय वैद्यांचे निदान अगदी तंतोतंत प्रकृत स्थितीशी जुळते असून, लक्षणांची व्याख्या व पृथक्करणही सूक्ष्म आहे. औषधयोजनेतही त्यांचे कौशल्य अलौकिक वाटते. त्यांची चौकस बुद्धी, कष्टाळू वृत्ती, सूक्ष्म दृष्टी, इ. गुणांमुळे आणि वनस्पतींच्या विपुलतेमुळे भारतीय वैद्यकाची फारच भराभर वाढ झाली.

हिंदूंचे शस्त्रक्रियेचे ज्ञान व कौशल्यही प्राचीन काळी खूप विकास पावले होते. नाक, कान, इ. अवयव कापून नवे बसवणे हे सध्या कष्टसाध्य असलेले कामही त्या काळी करता येत होते. त्यासाठी लागणारी शस्त्रे अत्यंत तीक्ष्ण व नाजूक असत.

वैद्यकाची परंपरा वेदांइतकी प्राचीन आहे. वैदिक युगात हा व्यवसाय हीन मानला जात नव्हता. त्या काळातले प्रसिद्ध वैद्य अश्विनीकुमार विलक्षण औषधींचा उपयोग करून अत्यंत कठीण रोगही बरे करीत. लुळे-पांगळे, आंधळेही बरे केले जात होते. अथर्ववेदात औषधी व मंत्र या दोन्हींचा उपयोग रोगनिवारणार्थ सांगितलेला आहे. धर्मसूत्रकारांनी मात्र वैद्यकव्यवसाय हीन मानला. यजुर्वेदातही तसेच मत आढळते. परंतु कालांतराने वैद्यकाला पुन्हा प्रतिष्ठा प्राप्त झाली. रोगहरण करून मनुष्याला सुखशांती प्राप्त करून देणाऱ्या भिषग्वर्याला समाजात मानसन्मान मिळणे साहजिक होते.

निरनिराळ्या वनस्पतींचे व पदार्थांचे संशोधन करून आणि त्यांचे औषधी गुणधर्म जाणून घेऊन रोगनिवारणार्थ त्यांचा उपयोग करण्याची प्राचीन परंपरा अनेक शतके चालू होती. वैद्यकशास्त्राचे सांगोपांग तात्त्विक व व्यावहारिक शिक्षण तक्षशिला, नालंदा, इ. विद्यापीठांत दिले जात असे. असे सखोल अध्ययन केलेले वैद्य समाजाच्या सर्व थरांतील रुग्णांना निरपेक्ष बुद्धीने औषधोपचार करीत. राजे व सरदार यांचे खास वैद्यराज ठरलेले असत व त्यांना फार मानाने वागवले जाई. त्यांना जहागिरीही मिळत. औषधोपचार करताना वैद्य लोक श्रीमंत गरीब असा भेदभाव ठेवीत नसत. कारण, सर्व रोगी आपापल्या ऐपतीप्रमाणे काही तरी दक्षिणा देत. अगदी निर्धन मनुष्याने काही न दिले तरी चालत असे. कारण, वैद्यांना विपुल द्रव्य मिळत असे.

या वैद्यकशास्त्राचा विलक्षण विकास प्रथम भारतात झाला आणि मग ते ज्ञान अरबस्तानात व तिथून युरोपात प्रसृत झाले, असे इतिहास सांगतो. इ. स. च्या आठव्या शतकापासून अरबस्तानातले पंडित इकडे येऊन संस्कृत ग्रंथांची भाषांतरे करू लागले. त्यांनी काही संस्कृत पंडितांना आपल्याबरोबर बगदादला नेले. तिथे हरून-अल्-रशीद व त्याचा वजीर बरमाक यांच्या प्रेरणेमुळे त्या पंडितांनी आपले ज्ञान तिथल्या पंडितांना दिले. अरबी भाषांतरांत अश्विनीकुमार, सुश्रुत, चरक, इ. नावे वारंवार आलेली असून, त्यांचे गुणगानही केलेले आढळते. अरबी भाषेतील ग्रंथांवरूनच आर्यवैद्यकाचा प्रसार युरोपातील निरनिराळ्या देशांत झाला. अरबांप्रमाणेच प्राचीन काळातील ग्रीक लोकांनीही आर्यवैद्यकाचे ज्ञान मिळवून त्याचा प्रसार केला. पाहा – आयुर्वेद. [ वे. इं.; भा. श्रे.; अ. भा. सं.; हिं. स. द.; ए. सि. ए. हिं. ]

## वैद्य गजानन भास्कर

(इ. स. १८६७-१९२१) मुंबईच्या हिंदू मिशनरी सोसायटीचे संस्थापक व आद्य हिंदू मिशनरी. ते प्रभू जातीचे होते. त्यांचे शिक्षण

मुंबई येथे झाले. इ. स. १८९३ साली ते बी. ए. झाले व १८९८ पासून त्यांनी थिऑसॉफीचा प्रचार सुरू केला. ते उत्तम वक्ते होते. दादाभाई नौरोजी यांनी काढलेल्या स्टुडंटस् लिटररी व सायंटिफिक सोसायटीच्या विद्यालयात ते इ. स. १९०४–१९२१ या काळात अध्यापक होते. इ. स. १८९९-१९२० ही २१ वर्षे ते मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचे अध्यक्ष होते.

बाटलेल्या हिंदूंना स्वधर्मात परत घ्यावे, या मताचा त्यांनी पुरस्कार केला. त्यासाठी त्यांनी शंकराचार्यांना पुढाकार घेण्याची



गजानन भास्कर वैद्य

विनंती केली. पण ती व्यर्थ ठरली. तेव्हा त्यांनी जुलै १९१७ मध्ये मिशनरी सोसायटीची स्थापना केली, हिंदू मिशनरी हे साप्ताहिक सुरू केले आणि परधर्मात गेलेले व जन्मलेले अशा शंभर स्त्री-पुरुषांना शुद्ध करून हिंदू धर्मात घेतले. तेव्हापासून महाराष्ट्रात शुद्धिकार्याला चालना मिळाली.

ते वादविवादात अत्यंत कुशल आणि लिहिण्यात व बोलण्यात फार मार्मिक होते. त्यांनी रेखात्मक यथार्थ दर्शन, चित्रविद्या, प्रश्नोपनिषद, देहदानमीमांसा, विष्णूचे अवतार, हितोपदेशकथा, विक्रमोर्वशीयम्, सनातन धर्मविचार, सनातन धर्मसंवाद, आश्रम व आश्रमधर्म, उपनयनविधी, वैदिक विवाहविधी, इ. लहान मोठी पुस्तके लिहिली आहेत. [अ. च. को.]

**वैद्यनाथ** (१) बिहारमधील संताळपरगणा जिल्ह्यात देवघर नामक गावी हे शिवस्थान आहे. काही पंडितांच्या मते बारा ज्योतिर्लिंगांपैकी वैद्यनाथ हे शिवलिंग परळीचे नसून देवघरचे होय. वैद्यनाथ हे ज्योतिर्लिंग चिताभूमीत असल्याचा उल्लेख आहे. सतीचे हृदय या स्थानी गळून पडले व इथे शिवाने त्याचे दहन केले, अशी आख्यायिका आहे. त्यामुळे हे एक शक्तिपीठही मानले जाते. या स्थानासंबंधी एक कथा शिवपुराणात आहे, ती अशी–

लंकाधीश रावणाने कैलास पर्वतावर जाऊन कठोर तप केले. त्यामुळे शंकर प्रसन्न झाला व त्याने रावणाला वर मागण्यास सांगितले. रावणाने प्रार्थना केली, की शंकराने लंकेत वास्तव्य करायला यावे. तेव्हा शंकराने एक ज्योतिर्लिंग त्याला दिले व ते लंकेत नेऊन स्थापण्यास सांगितले. मात्र मार्गात हे कोठेही पृथ्वीवर न ठेवता नेले पाहिजे, खाली ठेवल्यास पुन्हा उचलता येणार नाही, असेही सांगितले.

देवांना, ते शिवलिंग लंकेत जाऊ नये, असे वाटले. म्हणून आकाशमार्गे लंकेला परत जाणाऱ्या रावणाच्या देहात वरुणाने प्रवेश केला व रावणाला लघुशंकेचा आवेग आला; म्हणून तो पृथ्वीवर उतरला. तेवढ्यात विष्णू एका वृद्ध ब्राह्मणाच्या रूपात तिथे उपस्थित झाला. रावणाने आपल्याजवळचे लिंग थोडा वेळ धरून ठेवण्यासाठी त्याच्या जवळ दिले. बराच वेळ वाट पाहून रावण परत न आल्यामुळे ब्राह्मणाने लिंग जमिनीवर ठेवले व तो नाहीसा झाला. मग ते लिंग तिथेच प्रस्थापित झाले.

त्यानंतर बैजू नामक भिल्लाने त्या शिवलिंगाची पूजा केली व जन्मभर सेवा केली, म्हणून त्या शिवलिंगाला बैजनाथ हे नाव मिळाले. त्याचेच रूपांतर होऊन वैद्यनाथ हे नाव रूढ झाले.

हे स्थान अत्यंत पवित्र मानले जाते. वैद्यनाथाच्या दर्शनाने सर्व पापांचे क्षालन होते. शंकराचे असंख्य भक्त तिथे जाऊन निर्जल व्रत करतात. ज्यांचे व्रत पूर्ण होते, त्यांच्या सर्व कामना पूर्ण होतात, असे म्हणतात.

सांप्रत इथल्या शिवमंदिराभोवती एक प्रांगण व त्याभोवती दगडी तट आहे. मंदिराच्या गाभाऱ्यातले शिवलिंग विशेष उंच नाही. मंदिराजवळच शिवगंगा नामक मोठे कुंड असून, देवदर्शनापूर्वी यात्रेकरू त्या कुंडात स्नान करतात. बहुतेक यात्रेकरू गंगाजल घेऊन येतात व ते शिवलिंगावर वाहतात. शिवगंगा कुंडाजवळच एक विहीर आहे. त्या विहिरीत सर्व नद्यांचे तीर्थ एकत्र मिळते, असे म्हणतात. रावणानेच ती विहीर निर्माण केली, अशी दंतकथा प्रचलित आहे. त्या विहिरीचे पाणी प्याल्याने कुष्ठरोग बरा होतो, असे म्हणतात.

या मंदिराच्या आसमंतात बरीच अन्य मंदिरे आहेत. वैद्यनाथमंदिरासमोरचे गौरीमंदिर हेच तिथले शक्तिपीठ होय. त्यात एका सिंहासनावर जयदुर्गा व त्रिपुरसुंदरी यांच्या मूर्ती

आहेत. त्याव्यतिरिक्त कार्तिकेय, गणपती, ब्रह्मा, संध्यादेवी, कालभैरव, हनुमान, मनसादेवी, सरस्वती, सूर्य, श्रीराम, गंगा, हरगौरी, कालिका, अन्नपूर्णा, लक्ष्मीनारायण, नीलकंठ, महादेव, इ. देवतांची मंदिरे तिथे आहेत.

देवघरापासून चार मैल पूर्वेला एका पर्वतावर तपोवन नावाचे स्थान आहे. तिथेही एक शिवमंदिर आहे. स्थानिक लोक याला वाल्मीकीचे तपोवन असे म्हणतात. देवघरापासून १० मैलांवर त्रिकूट नामक पर्वत आहे. त्याच्यावर त्रिकूटेश्वराचे मंदिर आहे. या पर्वतावर मयूराक्षी नदीचा उगम आहे.

वैद्यनाथाच्या वायव्येला नंदन पर्वत आहे. त्याच्या माथ्यावर छिन्नमस्ता देवीचे मंदिर व पायथ्याजवळ कालीचे मंदिर आहे. पाहा–परळी वैजनाथ. [ कल्याण–तीर्थांक; श्री. दवे– भारती, ३० मार्च १९५८ ]

(२) बेळगावच्या पश्चिमेला १२ मैलांवर वैद्यनाथाचा डोंगर असून, त्याच्या माथ्यावर एक प्राचीन शिवमंदिर आहे. तिथे माघ वद्य चतुर्दशीला महाशिवरात्रीचा उत्सव होतो. त्या दिवशी मध्यरात्री एक वाघ देवळात येऊन शिवमहादेवाला वंदन करून गुपचूप निघून जातो, असे म्हणतात. त्या डोंगरावर असंख्य मौलिक औषधी वनस्पती सापडतात. [ कुलदैवत ]

(३) तमिळनाडूमध्ये चिदंबरमपासून १६ मैलांवर एक खेडे असून, तिथे वैद्यनाथाचे मंदिर आहे. या मंदिरात जाऊन महादेवाचे दर्शन व जप केल्यामुळे अनेक रोग बरे होतात, अशी भाविकांची श्रद्धा आहे. जवळच एक मोठे तळे असून, त्याचे पाणीही रोगनाशक आहे, असे म्हणतात. त्याचप्रमाणे तिथल्या एका वृक्षाची पानेही फार गुणकारी असून, ती भक्षण केल्यामुळे रोग बरे होतात, अशी समजूत आहे. त्यामुळे हे एक महान तीर्थक्षेत्र मानले जाते.

हे देवालय बरेच मोठे असून, त्याच्या आवारात अनेक मंदिरे व मंडपही आहेत. एका मंदिरात पार्वतीची मूर्ती आहे. तिला बालांबिका असे म्हणतात. एका मंदिरात सुब्रह्मण्यमची सुंदर मूर्ती आहे. गोपुरात सुवर्णमंडित स्तंभ आहे. या स्थानाला वैदीश्वरन कोईल असेही नाव आहे. [कल्याण–तीर्थांक]

(४) खजुराहो येथे एक वैद्यनाथमंदिर होते. त्याचे भग्नावशेष तिथे सापडले आहेत. एका शिलालेखात, ते मंदिर इ. स. १००१ मध्ये कोक्कल्ल याने निर्माण केले, असा उल्लेख आहे.

(५) गुजरातेत उभोई येथेही एक वैद्यनाथमंदिर आहे. [ भारती, ३० मार्च १९५८ ]

**वैद्यनाथ पायगुंडे** (इ. स. चे १८ वे शतक) एक संस्कृत पंडित व धर्मशास्त्रकार. याच्या पित्याचे नाव रामभट्ट व पुत्राचे नाव बाळंभट्ट असे होते. हा नागोजीभट्टाचा शिष्य होता. याच्या पत्नीचे नाव लक्ष्मी असे होते. चान्द्रमासप्रयोग, वेदान्तकल्पतरुमंजरी, शास्त्रदीपिकाव्याख्या प्रभा इ. ग्रंथ याने रचले आहेत. [ म. च. को. ]

**वैधृतिजननशांती** सूर्यसंक्रांती, व्यतीपात किंवा वैधृतियोग असताना प्रसूती झाल्यास शांती करावी, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. कारण, हे योग दारिद्र्यकारक आहेत. या शांतीचा विधी असा–

प्रथम गोप्रसवशांती करावी. शुद्ध केलेल्या भूमीवर प्रथम व्रीही, त्यावर तांदूळ व त्यावर तीळ पसरावे. नंतर या तीनही धान्यांच्या राशीवर अष्टदळ कमळ काढावे. त्याच्यावर पूर्णपात्रासहित कुंभ ठेवावा. पूर्णपात्रावर ठेवलेल्या सुवर्णप्रतिमेवर रुद्राचे आवाहन करावे. त्याच्या दक्षिणेला सूर्य व उत्तरेला सोम यांचे आवाहन करावे. देवतांची यथाविधि पूजा करून त्या त्या देवतांची सूक्ते, 'आ नो भद्राः' हे सूक्त व पुरुषसूक्त यांचा जप करावा. तसेच, ग्रहदेवतांचे स्थापन व पूजन करावे. नंतर अग्निस्थापनेपासून प्रधानहोमापर्यंत कर्म करावे. मुख्य देवतांना समिधा, चरू व आज्य यांच्या आणि रुद्र देवतेसाठी तिळाच्या आहुती द्याव्या. शेवटी देवतांना सदीप माषभक्त बली द्यावा. यजमान व बालकासह माता यांना अभिषेक करावा. आचार्याला दक्षिणा देऊन शांतीचा विधी संपवावा. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**वैनायक व्रत** एक तिथिव्रत. प्रत्येक चतुर्थीला नक्त भोजन करणे हा या व्रताचा प्रधान विधी होय. व्रतावधी एक वर्ष. गणेश ही या व्रताची देवता आहे. उद्यापनाच्या वेळी सोन्याचा हत्ती दान द्यावा. फल–शिवलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**वैभाषिक** एक बौद्ध दार्शनिक संप्रदाय. हा मूळ हीनयान संप्रदायातून निर्माण झाला. या संप्रदायाला वैभाषिक ही संज्ञा इ. स. च्या पहिल्या शतकात प्राप्त झाली. त्यापूर्वी त्याला सर्वास्तिवादी म्हणत. शंकराचार्यांनी आपल्या ब्रह्मसूत्रभाष्यात (२.२.१८) व वाचस्पतिमिश्राच्या भामती टीकेत वैभाषिकांना सर्वास्तिवादीच म्हटले आहे. सर्वास्तिवादाचा मूळ ग्रंथ म्हणजे आर्य कात्यायनीपुत्ररचित ज्ञानप्रस्थानशास्त्र हा होय. तो बुद्धाच्या निर्वाणानंतर ३०० वर्षांनी निर्माण झाला. त्या ग्रंथात ८ परिच्छेद, ४४ वर्ग व १५ हजार श्लोक होते. हा संस्कृत ग्रंथ दुर्दैवाने सांप्रत उपलब्ध नाही. पण त्याचा चिनी अनुवाद उपलब्ध आहे. कनिष्काच्या काळात (इ. स. पूर्व १ ले शतक) बौद्धांची चतुर्थ संगीती भरली होती. ती

धर्मपरिषदेत वरील ग्रंथावर एक प्रचंड टीका निर्माण झाली. तिचे नाव अभिधर्म विभाषाशास्त्र असे ठेवले गेले. मग त्या ग्रंथाला सर्वास्तिवाद्यांनी संप्रदायाचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ म्हणून मान्यता दिली आणि त्यामुळेच पुढच्या काळात सर्वास्तिवादी हे वैभाषिक म्हणून प्रसिद्धी पावले. या वैभाषिक मताचा प्रसार कनिष्काने फार मोठ्या प्रमाणावर केला. चीनमध्ये सांप्रत जे धर्ममत प्रचलित आहे, ते वैभाषिकच होय.

**वैभाषिक साहित्य**– ज्ञानप्रस्थानशास्त्र व विभाषाशास्त्र यांच्या शिवाय वसुबंधूचा अभिधर्मकोश हा काश्मीरमधील वैभाषिकांचा परम आदरणीय ग्रंथ होय. त्याची रचना मौलिक आहे. समयप्रदीपिका हा वैभाषिक सिद्धान्ताचा सारग्रंथ आहे.

**वैभाषिकांचे सिद्धान्त**– हे नानात्मक जगत वस्तुतः सत्य आहे. त्याच्या स्वतंत्र सत्तेचा अनुभव प्रत्यक्ष ज्ञानाच्या द्वारे होतो. भौतिक जगत व मानसिक जगत या दोघांचीही स्वतंत्र सत्ता आहे. विषयीगत व विषयगत अशा दोन प्रकारांनी वस्तुविभाग करता येतो. विषयीगत विभाजन पद्धतीने समस्त पदार्थ तीन प्रकारांनी विभागता येतात–

(१) पंचस्कंध– रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान.

(२) द्वादश आयतन– अनुभवाला साधनीभूत द्वार म्हणजे आयतन होय. यांची संख्या बारा आहे– सहा इंद्रिये म्हणजे चक्षू, श्रोत्र, घ्राण, जिव्हा, काय व मन, तसेच सहा विषय; अशी ही बारा आयतनें होत.

(३) अष्टादश धातू– ज्या शक्तींच्या एकीकरणाने घटनांचा एक प्रवाह निष्पन्न होतो, त्याला धातू म्हणतात. धातूंची संख्या १८ आहे. त्यांतले बारा धातू म्हणजे बारा आयतने आणि उर्वरित धातू म्हणजे चक्षुर्विज्ञान, श्रोत्रविज्ञान, घ्राणविज्ञान, जिव्हाविज्ञान, कायविज्ञान व मनोविज्ञान हे होत.

विषयगत विभाजनानुसार हे त्रैधातुक जगत दोन प्रकारच्या धर्मांचा समुच्चय आहे. प्रत्येक सत्तात्मक पदार्थ म्हणजे धर्म होय. सास्रव (मलयुक्त) व अनास्रव (मलरहित) असे दोन प्रकारचे धर्म आहेत. सास्रव धर्माची दुसरी संज्ञा संस्कृत अशी आहे. संस्कृत म्हणजे संस्कार असणारे धर्म. रागद्वेषादी मल त्यांच्या आश्रयाने राहतात, म्हणून ते सास्रव होत. संस्कृत धर्म ७२ प्रकारचे असतात.

(१) रूपधर्म– याचे ११ प्रकार आहेत.

(२) चित्तधर्म– (मन किंवा विज्ञान) याचा एकच प्रकार.

(३) चैत्तधर्म– (म्हणजेच विज्ञानाशी संबंधित असलेले)– याचे ४६ प्रकार आहेत. व

(४) रूप-चित्त-विप्रयुक्त (भौतिक व मानसिक या धर्मांहून वेगळे) असे संस्कार. यांचे १४ प्रकार होतात.



असंस्कृत म्हणजे नित्य धर्म होत. त्यांचे तीन प्रकार होतात–

(१) आकाश– हा निर्विशेष, अनंत, नित्य, सर्वव्यापक असा सत्तात्मक पदार्थ आहे. याला रूप नाही; पण तरीही तो स्वतंत्र सत्तात्मक पदार्थ आहे. आवरणाभाव हे आकाशाचे लिंग आहे.

(२) प्रतिसंख्यानिरोध– प्रतिसंख्या म्हणजे प्रज्ञा आणि तिच्या द्वारे उत्पन्न होणाऱ्या सास्रव धर्मांचा पृथक पृथक वियोग म्हणजे प्रतिसंख्यानिरोध होय. जर प्रज्ञेच्या उदयानंतर एखाद्या सास्रव धर्माच्या विषयात राग किंवा ममता हिचा सर्वथा परित्याग केला जाईल, तर तो त्या धर्मासाठी प्रतिसंख्यानिरोधाचा उदय ठरेल.

(३) अप्रतिसंख्यानिरोध– प्रज्ञेवाचून होणाऱ्या निरोधाला हे नाव आहे. ज्या वस्तूचा अप्रतिसंख्यानिरोध होतो, ती वस्तू भावी कालात उत्पन्न होत नाही. या निरोधामुळे आस्रवक्षय-ज्ञान उदित होते. अर्थात समस्त मलांचा नाश होण्याचे ज्ञान उत्पन्न होते. मग भविष्यात त्यांच्या उत्पत्तीची संभावना उरत नाही. हे अनुत्पादज्ञान अप्रतिसंख्यानिरोधाचे फल आहे. त्याच्यामुळे जीव भवचक्रातून मुक्त होतो.

ज्ञानाची साधने ग्रहण व अध्यवसाय अशी दोन आहेत. ग्रहणाच्या द्वारे पदार्थांच्या सामान्य रूपाचे ज्ञान होते. कोणत्याही वस्तूला नाम, जाती, इ. कल्पनांनी संयुक्त करणे म्हणजे अध्यवसाय होय. 'या पदार्थाचे नाव गाय आहे आणि ही काळ्या रंगाची आहे' या विशेष ज्ञानाला अध्यवसाय म्हणतात.

वैभाषिकांच्या तत्त्वज्ञानाची संगतवार मांडणी पं. पुरुषोत्तमशास्त्री दत्तवाडकर यांनी केली आहे, तिचा सारांश असा–

(१) ज्ञेय–पंचमहाभूतांपासून हे दृश्यमान विश्व निर्माण होते. ही सर्व भूते अणुरूप आहेत. विश्वाच्या निर्मितीला कारणीभूत असलेले हे अणू सावयव असले, तरी चक्षुरादी इंद्रियांना गम्य नाहीत. त्या त्या तत्त्वाचे परमाणू समुदायरूपाने एकत्रित आले, की त्या समुदायाला भूत म्हणावे आणि त्या परमाणूंपासून बनलेल्या पदार्थांना भौतिक म्हणावे. भूत-भौतिक सर्वच पदार्थ क्षणिक आहेत. विश्वातील प्रत्येक पदार्थ अर्थक्रियाकारी आहे. म्हणजे तो सुख तरी देतो किंवा दुःख तरी देतो. सुख किंवा दुःख देणे हेच पदार्थांच्या अस्तित्वाचे सत्यस्वरूप आहे. बाह्य भूत-भौतिकाप्रमाणेच चित्त व चैत्य (चित्तात निर्माण होणारे पदार्थ) हेही क्षणिकच आहेत. चित्त हे अतिशय चंचल व सतत परिणामशील असल्याने ते त्या त्या इंद्रियांच्या द्वारे त्या त्या पदार्थाचे आकार चटकन स्वीकारते. याच चंचल परिणामांना ज्ञान म्हणतात. पंचमहाभूतांचा सारभूत अंश म्हणजे चित्त होय. तिथे ज्ञान प्रकाशते.

चैत्य म्हणजे चित्तात निर्माण होणाऱ्या विविध वृत्ती होत. चैत्य पाच प्रकारचे आहेत– (१) विज्ञान, (२) वेदना, (३) संज्ञा, (४) संस्कार व (५) रूप.

यांपैकी रूप म्हणजे इंद्रिये होत. त्यांनीच विषयांचे ग्रहण होते. विज्ञान म्हणजे सृष्ट पदार्थांचे ज्ञान होय. वेदना म्हणजे सुख-दुःखांचा अनुभव होय. अनुभवाने त्या त्या वस्तूचे यथार्थ ज्ञान होते. यालाच संज्ञा म्हणतात. यथार्थ ज्ञानानेच एखाद्या वस्तूने प्रवृत्ती किंवा निवृत्ती घडवून आणणारा संस्कार तयार होतो. या पाचांना पंचस्कंध म्हणतात. मानवाला जी सुख-दुःखे प्राप्त होतात, त्यांचे कारण म्हणजे हे पंचस्कंधाचे चक्र. हे सर्व ज्ञेय होय.

(२) ज्ञाता– जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती यांत जे कायम असेल किंवा जे या तीन्ही अवस्थांचा अनुभव मिळवून देणारे असेल, त्याला ज्ञाता म्हणावे. ज्ञाता म्हणजे ज्ञान व विज्ञान. या व्यतिरिक्त तिसरी वस्तू संभवतच नाही. पहिल्याला आलयविज्ञान व दुसऱ्याला प्रवृत्तिविज्ञान असे म्हणतात. पहिल्याचे स्वरूप 'मी, मी' या पद्धतीचे व दुसऱ्याचे 'माझे, माझे' या पद्धतीचे. वायुलहरींनी तलावात तरंग निर्माण होतात, तसे पंचस्कंधांनी प्रेरित झालेल्या चित्तात भिन्न भिन्न विज्ञानरूप तरंग निर्माण होतात. यालाच प्रवृत्ति– विज्ञान म्हणावे. वारा शांत झाल्यावर तलाव जसा स्थिर म्हणजेच स्वस्वरूपाने राहतो, तसेच काहीसे स्वरूप आलयविज्ञानाचे आहे. आलयविज्ञान हा ज्ञाता होय. ज्ञान उत्पन्न झाल्यावर अज्ञान राहिले, असे कधीच घडत नाही. त्यामुळे ज्ञाता हा स्वयंप्रकाशी समजावा.

(३) अज्ञान– अस्थिर पदार्थांना स्थिर मानणे हे घोर अज्ञान होय. हीच भावना दुःख व उद्वेग यांना कारणीभूत होत असते. सर्व पदार्थ अस्थिर म्हणजेच क्षणिक आहेत, म्हणून त्यांच्या ठिकाणी ममत्व ठेवणे; तसेच देहसुद्धा क्षणिक असल्यामुळे त्याच्या ठिकाणीही ममत्व ठेवणे हे अज्ञानाचेच लक्षण आहे. पदार्थांचे हे क्षणिकत्व प्रत्यक्ष व अनुमान या दोन्ही प्रमाणांनी सिद्ध होऊ शकते.

(४) दुःख– प्रतिकूल संवेदना म्हणजे दुःख व अनुकूल संवेदना म्हणजे सुख होय. हे धर्म चित्ताचेच आहेत. चित्त हे पंचस्कंधांच्या वेगाने सतत फिरत राहते. त्यामुळे त्या त्या वासनांपासून निर्माण होणाऱ्या भोगांना अनुकूल असे देह त्याला लाभत असतात. हे दुःख पाच चैत्तांपैकी वेदना नावाच्या चैत्तात अंतर्भूत होते.

(५) ज्ञान– इंद्रियसन्निकर्ष नसताना किंवा असतानाही जी वृत्ती निर्माण होते, तिलाच ज्ञान म्हणतात. ते स्वयंप्रकाशी आहे. हे सर्व दृश्यजात अस्थिर किंवा क्षणिक आहे, अशी भावना होणे हेच ज्ञानाचे स्वरूप आहे. वस्तूचे यथातथ्य ज्ञान होणे म्हणजेच तत्त्वज्ञान होय. अस्थिर पदार्थांच्या ठिकाणी ते अस्थिर आहेत, अशी अनेकवार प्रचीती आल्याने पदार्थांवरील स्थिरत्वभावनेचा समूळ उच्छेद होतो व त्यामुळेच माणसाला दुःखमुक्त झाल्याचे समाधान मिळते.

(६) मोक्ष– ज्ञानामुळे जर दुःखांचा शेवटचा नाश करायचा असेल, तर प्रथम त्या ज्ञानाने अज्ञानाचे समूळ उच्छेदन व्हायला हवे. म्हणून अज्ञान हे अनादी आहे असे मानावे लागेल. तरच ज्ञानाने दुःखांचा शेवटचा नाश होतो, असे म्हणणे युक्तीला धरून होईल. प्रत्यक्ष उत्पन्न होणारा व नाश पावणारा देह काही अनादी ठरू शकणार नाही. म्हणून अनादी अज्ञानाचा आश्रयही अनादीच मानणे भाग आहे आणि तो म्हणजे चित्तच होय. हे चित्त सतत परिणमनशील आहे. हेच चित्त मागे सांगितलेल्या रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान या अवस्थांना कारणीभूत आहे. वस्तुतः या अवस्थांना सोडून चित्त म्हणून स्वतंत्र वस्तू आहे, असे मुळीच नाही. ज्ञान, अज्ञान, सुख, दुःख, इच्छा हेसुद्धा नुसते म्हणणे आहे. कारण विकाराचाच अनुभव माणसाला येत असतो. बंध व मोक्ष हे सुद्धा विकारच होत. अशा रीतीने चित्ताला बंध आहे किंवा मोक्ष आहे, असे म्हणणेसुद्धा योग्य नव्हे. तत्त्वज्ञानाचा उदय होईपर्यंत हा बंध सत्य आहे, अशा भावनेने त्याचा उच्छेद करण्यामध्ये पुरुषार्थप्राप्ती आहेच. सतत दुःखाचा अनुभव घेणारा जीव गुरूपदेशाने किंवा वर उल्लेखिलेल्या मार्गाने बंध हा मिथ्या आहे, असे जाणतो, त्या वेळी त्याच्या दुःखांचा अखेरचा नाश होतो. नंतर त्याला दुःखप्राप्ती नाही. हा त्याचा मोक्ष होय. [बौ. द. मी.; भा. द.; दर्शनमंदाकिनी]

**वैमृधेष्टी** एक याग. पूर्णमासेष्टी झाल्यावर इंद्र वैमृध या देवतेसाठी ही इष्टी करायची असते. हिच्यात एका दशकपाल पुरोडाशाचा याग करतात. याचा विधी पूर्णमासेष्टीप्रमाणे असतो. पूर्णमासेष्टीबरोबर याही देवतेचा याग करावा, असे एक मत आहे. वैमृधेष्टी केलीच पाहिजे असे नाही. परंतु इंद्र वैमृधासाठी एकदा याग केला, तर तो प्रत्येक पौर्णिमेला करावा लागतो. सोमयाग केल्यावर दर पौर्णिमेस पूर्णमासेष्टीबरोबर वैमृधेष्टी करावी, असेही एक मत आहे. वैमृधेष्टीमध्ये आपल्या इच्छेप्रमाणे दक्षिणा द्यावी, असे म्हटले आहे. [श्री विद्याधरशास्त्री भिडे]

**वैरागी** (१) राजस्थानातील एक प्राचीन राजवंश. या वंशाने सुमारे पन्नास वर्षे राज्य केले. या वंशात हरिप्रेम, गोविंदप्रेम, गोपालप्रेम व महाबाहू असे चार राजे झाले. शेवटच्या राजावर बंगालच्या आंधिसेन या राजाने स्वारी करून त्याचा पराभव केला. [भा. सं. प.]

(२) राजस्थानातील एक वैष्णव संप्रदाय. यात साधू व दादू या दोन्ही पंथांचा समावेश होतो. हे लोक गळ्यात तुळशीची माळ घालतात व गोपीचंदनाचा टिळा लावतात. हे मद्यमांस निषिद्ध मानतात. संप्रदायातले लोक ब्रह्मचारी, गृहस्थ व संन्यासी

असू शकतात. गृहस्थ लोकांपैकी काही लोक मंदिरांमध्ये पुजाऱ्याचे काम करतात व काही सैन्यातही दाखल होतात. ब्रह्मचारी



वैरागी साधू – राजस्थान

व संन्यासी जटा-दाढी वाढवतात व सर्वांगाला भस्म फासतात. जोधपूरपासून दोन मैलांवर असलेल्या चौपासनी या गावी जे गोवर्धन कृष्णाचे मंदिर आहे, ते वैरागींचे प्रमुख तीर्थस्थान आहे. इथली मूर्ती मूळची गोकुळातली असून, औरंगजेबाच्या भीतीने ती तिथून चौपासनी या गावी आणली गेली, अशी आख्यायिका आहे. म्हणून हे लोक त्या स्थानाला नाथद्वाराइतकेच पवित्र तीर्थक्षेत्र मानतात. [ रा. जा. ]

**वैराज** एक पितरांचा समुदाय. हे आकाररहित आहेत. हे योगभ्रष्ट असून, पुन्हा योगाच्याच आश्रयाने शाश्वत लोकांची प्राप्ती करून घेतात. ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या अखेरीस हे पुनश्च ब्रह्मवादी म्हणून जन्माला येतात. नंतर त्यांना पूर्वस्मृती येते. मग ते सांख्य व योग या मार्गाने मोक्ष मिळवतात. हिमालयाची पत्नी मेना ही यांची मानसकन्या होय.

याच नावाचा एक देवसमुदायही आहे. हे देवही ब्रह्मदेवाने उत्पन्न केलेले आद्य देव होत. हेही आकाररहित आहेत. संतानक नावाच्या आद्य लोकांची व्यवस्था लावण्यासाठी ब्रह्मदेवाने यांना निर्माण केले. [ पु. इं. ]

**वैराज्य** एक वैदिक प्रजातंत्री शासनपद्धती. राजारहित शासनप्रणाली हे हिचे वैशिष्ट्य आहे. सारी जनता एकत्र जमून कायदे करी व ते अंमलात आणी. अर्थात असे शासन लहानशा विभागापुरतेच मर्यादित असायचे, हे स्पष्ट आहे. ऐतरेय ब्राह्मणानुसार ही राज्यव्यवस्था उत्तरमद्र व उत्तरकुरू या प्रदेशांत चालू होती (८.१४). पण शुक्ल यजुर्वेदाच्या काळात ही पद्धत दक्षिणेतही रूढ असल्याचे उल्लेख मिळतात (१५.११). यावरून भारताच्या भिन्न भिन्न भागांत वैराज्य चालू होते, असे म्हणता येईल. [ वै. सा.; हिं. रा. तं. १ ]

**वैरोचन** पाच ध्यानी बुद्धांतला तिसरा. तांत्रिक ग्रंथांत याचे वर्णन केलेले आहे. त्या सर्वांत अद्वयवज्रसंग्रह या ग्रंथातले वर्णन संपूर्ण आहे, ते असे – पद्माच्या पूर्वदलावरील चंद्रमंडलावर असलेल्या ओंकारातून याचा उदय झाला असून, हा शुभ्र वर्णाचा आहे. शुभ्र चक्र हे याचे अभिधान चिन्ह आहे. हा धर्मचक्र मुद्रा धारण करतो. हा मोहस्वरूप असून रूपस्कंधनिदर्शक आहे. हा तथागत कुळाचा मुख्य व मूर्तिमंत आदर्शज्ञान आहे. सपक्ष सर्पयुग्म हे याचे वाहन आहे. हेमंत ऋतू, मधुर रस, वर्णमालेतील 'क' वर्ग, प्रातःकाल व सायंकाल यांचे प्रतीक.

निष्पन्नयोगावलीत याची दोनपेक्षा अधिक भुजा असलेली ध्याने वर्णिलेली आहेत. चतुर्मुख व अष्टभुज वैरोचनाला वज्रधातू म्हणतात. लोचना ही वैरोचनाची शक्ती होय. वैरोचनापासून अनेक बौद्ध देवता उत्पन्न झाल्या आहेत. मारीची ही त्यांतील प्रमुख होय.



वैरोचनमूर्ती – नेपाळ

नेपाळात याला सर्वांत प्राचीन व पहिला ध्यानी बुद्ध मानतात. बौद्ध शिल्पांत याचे स्थान स्तूपाच्या अंतर्भागी असते; इतर ध्यानी बुद्धांचे स्थान स्तूपाच्या बाहेर असते. तथापि नेपाळमधील काही स्तूपांच्या बाहेरील भागावर अक्षोभ्य व रत्नसंभव यांच्यामध्ये याला स्थान दिलेले आढळते. [ इं. बु. इ. ]

**वैरोटी** जैन दैवतसमूहातील यक्षिणी. प्रतिष्ठासंग्रहात हिचे वर्णन केलेले आहे, ते असे – हिरव्या रंगाची, सर्पवाहना, चतुर्भुज, हातात धनुष्य, बाण व दोन सर्प धारण करणारी.

श्वेतांबर हिला विदिता किंवा विजया म्हणतात. ती कमलासना आणि धनुष्य, बाण, पाश व सर्प धारण करणारी आहे. ही विद्यादेवीही आहे.

अपराजिता नावाचे हिचे दुसरे रूप असून, त्या रूपात ती सिंहवाहना आणि तीन हातांत ढाल, तलवार व खेटक धारण करणारी, तसेच चौथ्या हाताने वरदमुद्रा करणारी अशी आहे. पाहा – अपराजिता, विजया. [ जै. इ.; देवीकोश ३ ]

**वैवस्वत** चौदा मनूंपैकी सातवा. ब्रह्मदेवाच्या सातव्या मुखापासून जन्मला. याला नऊ पुत्र होते. त्यांतला मोठा श्राद्धदेव हा होय. तूर्त या पृथ्वीवर वैवस्वत मन्वंतर चालू आहे. शतपथ ब्राह्मणानुसार जलप्रलयातून जगाला तारणारा मनू तो हाच होय. पुराणातील माहितीपेक्षा ऋग्वेदातील याची माहिती वेगळी आहे. पाहा – मनू वैवस्वत. [ पु. इं. ]

**वैशंपायन** एक महर्षी. निगद अर्थात कृष्ण यजुर्वेद याचा प्रवर्तक. कृष्ण यजुर्वेदाची तैत्तिरीय संहिता याने निर्माण केली. तैत्तिरीय आरण्यक आणि आश्वलायन, कौषीतकी व बोधायन ही गृह्यसूत्रे यांत वैशंपायनाचे उल्लेख आढळतात. ऋग्वेदातल्या कित्येक मंत्रांचा नवा अर्थ लावण्याचे युगप्रवर्तक कार्य वैशंपायनाने सुरू केले. याचे वैयक्तिक चरित्र उपलब्ध नाही. त्याने जे फार मोठे कार्य केले, त्यावरूनच तो एक महान आचार्य गणला गेला आहे. शबरस्वामी म्हणतो, की 'स्मर्यते च वैशंपायनः सर्वशाखाध्यायी' ( = वैशंपायनाने कृष्ण यजुर्वेदाच्या सर्व शाखांचे अध्ययन केले होते, अशी स्मृती आहे.) (मीमांसा–भाष्य १. १. ३०). त्याने आपल्या शिष्यांना समस्त यजुर्वेदशाखांचे अध्यापनही केले होते. पाणिनीने एक वैदिक गुरू म्हणून वैशंपायनाचा निर्देश केला आहे (अष्टा. ४.३.१०४).

वैशंपायन हा व्यासांच्या चार प्रमुख वेदप्रवर्तक शिष्यांपैकी एक होता. त्याला संपूर्ण यजुर्वेदाचे ज्ञान प्राप्त झाले होते, असे उल्लेख पुराणांत अनेक ठिकाणी आढळतात.

व्यासांकडून मिळालेल्या कृष्ण यजुर्वेदाच्या त्याने ८६ संहिता बनविल्या व त्या आपल्या ८६ शिष्यांना वाटून दिल्या. विष्णुपुराणानुसार हा आकडा २७ आहे. त्याच्या ८५ शिष्यांनी कृष्ण यजुर्वेदाच्या प्रसाराचे कार्य केले. भौगोलिक भेदानुसार त्याची शिष्य परंपरा उ. भारत, म. भारत व पू. भारत या तीन विभागांत काम करीत होती. त्या विषयीचा श्लोक असा –

> आलम्बिश्चरकः प्राचां पलङ्गकमलावुभौ।
> ऋचाभारुणिताण्ड्याश्च मध्यमीयास्त्रयोऽपरे॥
> श्यामायन उदीच्येषु उक्तः कठकलापिनोः॥
>
> (अष्टा. ४. ३. १०४ वरील काशिका)

अर्थ – आलंबी, पलंग व कामली असे तीन चरण देशाच्या पूर्व भागात; ऋचाभ, आरुणी व तांड्य हे चरण मध्य देशात व श्यामायन, कठ व कलापी हे तीन चरण उत्तर विभागात वेदप्रसाराचे कार्य करीत होते.

कृष्ण यजुर्वेदाला पुढे तैत्तिरीय हे नाव प्राप्त झाले (म. भा. शांति. ३०६). याविषयीची कथा अशी –

वैशंपायनाचा याज्ञवल्क्य नावाचा एक शिष्य होता. त्यालाही वैशंपायनाने कृष्ण यजुर्वेद शिकवला होता. पण पुढे त्या दोघांत संघर्ष उत्पन्न झाला. वैशंपायनाला त्याचे वर्तन आवडले नाही. त्याने याज्ञवल्क्याला रागावून म्हटले, 'मी शिकविलेला माझा वेद मला परत कर.'

ते ऐकून याज्ञवल्क्याने गुरूकडून मिळालेल्या वेदाचे वमन केले. लगेच वैशंपायनाच्या अन्य शिष्यांनी तित्तिर पक्ष्याचे रूप घेऊन ते वमन केलेला वेद पुनश्च ग्रहण केला. पुढे या तित्तिर शब्दावरून कृष्ण यजुर्वेदाला वैदिक परंपरेत तैत्तिरीय म्हणू लागले.

वैशंपायनप्रणीत ८५ शाखांपैकी तैत्तिरीय, मैत्रायणी, कठ व कपिष्ठल एवढ्याच शाखा सांप्रत विद्यमान असून, वाकीच्या शाखा लुप्त झाल्या आहेत.

पुढच्या काळात कृष्ण यजुर्वेदाला चरक हे नाव प्राप्त झाले. चरक शब्दाचा अर्थ ज्ञानोपार्जनासाठी देशभर भ्रमण करणारा विद्वान असा आहे. वैशंपायन व त्याचे शिष्य भ्रमणशील होते. त्यामुळे त्याला व त्याच्या शिष्यांना चरक म्हणू लागले. काशिकेत म्हटले आहे, की 'चरक इति वैशम्पायनस्य आख्या' (काशिका ४.३.१०४) यज्ञात अध्वर्यूचे काम यजुर्वेद्याकडे असते. वैशंपायनाचे शिष्य यज्ञात आध्वर्यव करू लागल्यामुळे त्यांना याज्ञिक परंपरेत चरकाध्वर्यू म्हणू लागले.

केवळ कृष्ण यजुर्वेदाचे प्रणयन एवढेच वैशंपायनाचे कार्य नसून, व्यासकृत 'जय' ग्रंथाचे 'भारत' बनविणे हेही तेवढ्याच तोलामोलाचे कार्य आहे. व्यासांनी आपला जय नामक ग्रंथ सर्वप्रथम वैशंपायनालाच ऐकवला. तो कौरव-पांडवांच्या संघर्षापुरताच मर्यादित होता. त्याचे केवळ ८८०० श्लोक होते. त्या ग्रंथाची वैशंपायनाने वाढ करून तो ग्रंथ २४ हजार श्लोकांचा बनवला आणि त्याला भारत हे नाव ठेवले. वैशंपायन हा अर्जुनाचा नातू जनमेजय, याचा राजपुरोहित होता. जनमेजयाला आपल्या पूर्वजांची कथा ऐकण्याची इच्छा झाली आणि त्या

वैशंपायनाला ती सांगण्याची विनंती केली. वैशंपायनाने ती कथा सांगितली; पण तिच्यात बरीच वाढही केली. वैशंपायनाच्या या २४ हजार श्लोकांच्या भारताचे लक्षश्लोकात्मक महाभारत बनविण्याचे प्रचंड कार्य पुढे सौतीने केले. (महाभारत पाहा).

वैशंपायन हा जनमेजयाचा राजपुरोहित होता. पण याज्ञवल्क्य व वैशंपायन यांच्या संघर्षात ते पौरोहित्य वैशंपायनाला सोडावे लागले व राज्यत्यागही करावा लागला. जनमेजयावर याज्ञवल्क्याचा प्रभाव पडला व त्याने कृष्ण यजुर्वेदाचा त्याग करून याज्ञवल्क्याचा शुक्ल यजुर्वेद स्वीकारला. स्वतःच्या अश्वमेध यज्ञात त्याने वैशंपायनाला टाळून याज्ञवल्क्यालाच ब्रह्मा हे सर्वश्रेष्ठ ऋत्विजाचे पद दिले.

संहिता, नीतिसंग्रह, स्मृती व नीतिप्रकाशिका असे चार ग्रंथ वैशंपायनाच्या नावावर आहेत.

वैशंपायन हे एक गोत्रनामही आहे. ऋषितर्पणात त्याचा समावेश आहे. [ प्रा. च. को. हिंदी; पा. का.भा.; भा. वृ. इ. ]

**वैशाख** चैत्रादी गणनेतील दुसरा मास. या मासातील पौर्णिमा विशाखा नक्षत्राने युक्त असते किंवा विशाखा नक्षत्र तिच्या आगेमागे असते, म्हणून याला वैशाख म्हणतात. या



वैशाख मासाचे सांकेतिक चित्र

मासाचे प्राचीन नाव माधव असे होते. चैत्र व वैशाख हे दोन वसंत ऋतूचे महिने मानले जातात. तथापि वैशाखात उन्हाळा बराच असतो, त्यामुळे या मासातील व्रत-वैकल्ये उन्हाळ्याला योग्य अशीच सांगितलेली आहेत.

या मासात प्रातःस्नान विशेष पुण्यप्रद आहे. तुला, मकर व मेष या राशींत सूर्य असेल तेव्हा पवित्र नद्यांमध्ये स्नान केल्याने महापातकांचा नाश होतो. वैशाखातील प्रातःस्नान अश्वमेधाचे फल देते. या मासात कृष्ण व श्वेत तुलसीदलांनी भगवंताची पूजा करणारा नारायणस्वरूप होतो. प्रातःस्नान करून अश्वत्थाच्या मुळांना पाणी घालून त्याला प्रदक्षिणा केली असता पितर, देव आणि चराचर जग यांचे तर्पण केल्यासारखे होते. एकभुक्त, नक्त किंवा अयाचित भोजन केले असता सर्व मनोरथ पूर्ण होतात.

वैशाख मासात जलदान करावे; देवावर जलाभिषेक करावा; पादत्राणे, छत्रे, पंखे, तलम वस्त्रे, चंदन, उदकपात्रे, पुष्पे, शीतल पेये, द्राक्षे, केळी, इत्यादींचे दान करावे, असे स्कंदपुराणात सांगितले आहे. संपूर्ण महिनाभर प्रातःस्नान करणे शक्य नसेल तर त्रयोदशी, चतुर्दशी व पौर्णिमा या तीन दिवशी तरी ते करावे. त्यामुळे पापांपासून मुक्ती मिळते.

वैशाख हा मलमास असेल, तर मलमासात काम्य कर्मसमाप्तीचा निषेध सांगितलेला आहे. त्यासाठी मग दोन महिने स्नान करावे. मात्र मासोपवास व चांद्रायणादी व्रते मलमासात समाप्त करावी. वैशाख मासातील धार्मिक कृत्ये अशी—

या मासातील तृतीया, चतुर्दशी व पौर्णिमा या तिथी विशेष पवित्र मानल्या जातात. तृतीयेला अक्षय्य तृतीया म्हणतात. कारण, त्या दिवशी केलेले दान, हवन, इ. कृत्ये अक्षय्य होतात. त्याच तिथीला परशुरामजयंतीही असते. चतुर्दशीला नरसिंहजयंती असते. पौर्णिमेला दानधर्म केला असता विशेष पुण्य लागते.

याव्यतिरिक्त वैशाख शुद्ध सप्तमीला गंगेची पूजा करावी, असेही सांगितले आहे. कारण, त्या तिथीला जन्हूने प्राशन केलेली गंगा आपल्या उजव्या कानातून बाहेर सोडली. अष्टमीला दुर्गेची अपराजिता या नावाने पूजा करावी. वैशाख शुद्ध नवमीला बंगालमध्ये सीता नवमी म्हणतात. कारण, त्या दिवशी जनकाला जमीन नांगरताना ही बालिका सापडली. त्या दिवशी भूदान केल्याने पुण्य लागते, अशी श्रद्धा आहे. दशमीला आद्य शंकराचार्यांची जयंती असते. वैशाख पौर्णिमेला बुद्धजयंती असते. [ नि. सिं.; हि. ध.; भा. स. उ. ]

**वैशाखस्नान** एक पुण्यस्नान व व्रत. चैत्र शुद्ध एकादशी, पौर्णिमा किंवा मेषसंक्रांत या दिवशी या स्नानाला प्रारंभ करतात. प्रारंभदिनी मधुसूदनाची पूजा करतात आणि

वैशाखं सकलं मासं मेषसङ्क्रमणे रवेः ।

**प्रातः सनियमः स्नास्ये प्रीयतां मधुसूदनः ॥**

हा मंत्र म्हणून स्नानासाठी ब्राह्मणाची अनुज्ञा घेतात. नदी, सरोवर, तीर्थ, किंवा विहीर यांपैकी कोणत्याही जलाशयावर विष्णूचे स्मरण करून स्नान करतात. त्या जलाशयाला विशिष्ट नाव असेल तर त्याचा उच्चार करावा; अन्यथा विष्णुतीर्थ म्हणून त्याचे नाव घ्यावे असे सांगितले आहे. पुत्रप्राप्तीची इच्छा असेल, तर स्नानानंतर अभिलाषाष्टक म्हणावे.

संपूर्ण महिना स्नान करणे शक्य नसेल, तर ते शेवटचे तीन दिवस करावे, असा संकेत आहे. स्नानकालात हविष्यान्नाचे भक्षण, ब्रह्मचर्य, इ. नियम पाळावे. वैशाख हा अधिक मास असेल तर दोन महिने स्नान करावे लागते.

या स्नानमहात्म्याची कथा पद्मपुराणात पुढीलप्रमाणे सांगितली आहे– मुनिशर्मा नावाचा एक ब्राह्मण होता. तो वैशाखात नर्मदास्नानाला निघाला असता, वाटेत त्याला पाच दुःखी पुरुष भेटले. ते सगळे ब्रह्महत्या, गुरुहत्या, इ. पापांनी पतित झाले होते. ते एकमेकांशी बोलत होते; पण एकमेकांना स्पर्श करीत नव्हते. मुनिशर्म्याला पाहून त्यांनी आपले दुःख त्याला सांगितले. मुनिशर्मा त्यांना म्हणाला, की ‘ तुम्ही वैशाख महिन्यात नर्मदास्नान करा, म्हणजे उद्धरून जाल. ’ मग ते पाचही जण मुनिशर्म्याबरोबर निघाले. वाटेत त्यांना आठ पिशाचे भेटली. मुनिशर्म्याने त्यांना ‘ नमो नारायणाय ’ मंत्राने दीन केले व त्यांनाही वैशाखस्नानाचे माहात्म्य सांगितले. त्याप्रमाणे त्या सर्वांनी करताच त्यांचा उद्धार झाला.

उद्यापनाच्या वेळी विष्णु–लक्ष्मीची पूजा, हवन व विविध दाने करतात. [ ध. सिं.; व्रतराज.; नि. सिं. ]

## वैशाखी

वैशाख शुद्ध प्रतिपदेला उत्तर भारतात, विशेषतः पंजाबात वैशाखी हा उत्सव अतिशय उत्साहाने साजरा केला जातो. त्या वेळी थंडीचे दिवस संपून उबदार व सुखदायक हवामान सुरू झालेले असते. शेते पिकून कापणीला प्रारंभ झालेला असतो. त्यामुळे लोक आनंदात असतात. सर्वत्र जत्रा भरतात व ग्रामीण भागातले लोक तिथे गर्दी करतात. निरनिराळे खेळ व नाचगाणी यांना बहर येतो.

शिखांच्या दृष्टीने हा दिवस अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण याच दिवशी गुरू गोविंदसिंगाने खालसाची स्थापना केली. त्या दिवशी गुरुद्वारात जाऊन ग्रंथसाहेबाचे पठण करणे हा मुख्य कार्यक्रम असतो. नंतर ग्रंथसाहेबाची वाजतगाजत मिरवणूक काढतात. पंचप्यारे म्हणून पाच नेते हाती तलवारी घेऊन तिच्या पुढे चालतात. कार्यक्रम पूर्ण झाल्यानंतर मेजवानी होते. त्या वेळी ग्रामीण भागातले लोक जी नृत्ये करतात, त्यांतले भांगडा नृत्य फार लोकप्रिय आहे. त्या दिवशी हजारो शीख अमृतसरच्या सुवर्णमंदिराच्या दर्शनाला जाऊन तिथल्या तलावात स्नान करतात. [ फे. हॉ. इं.; साप्ताहिक हिंदुस्थान, १८ एप्रिल १९६५ ]

## वैशाखी व्रत

वैशाखी पूर्णिमेला हे व्रत करतात. त्या दिवशी दानधर्म केल्याने विशेष पुण्य लागते, असे सांगितले आहे. त्याचे विविध प्रकार असे– (१) धर्मराजाच्या नावाने जलपूर्ण कुंभ व पक्वान्न दान केल्याने गोदानाचे फल प्राप्त होते. (२) पाच किंवा सात ब्राह्मणांना शर्करायुक्त तिळांचे दान केले असता सर्व पापांचे क्षालन होते. (३) स्वच्छ व शुद्ध केलेल्या भूमीवर तीळ पसरून त्यावर शिंगे व शेपटी असलेले कृष्णमृगचर्म पसरून आणि त्यावर विविध वस्त्रे ठेवून ते दान दिले असता सर्व पापे नाश पावतात. (४) तिलयुक्त जलाने स्नान करून तीळ, तूप व साखर यांनी भरलेले पात्र विष्णूला समर्पण करून त्यातून अग्नीला आहुती द्यावी किंवा तीळ व मध यांचे दान करावे. तिळाच्या तेलाचे दिवे लावावे, तिलयुक्त जलाने तर्पण करावे. किंवा गंगास्नान करावे. त्यामुळे सर्व पापांतून मुक्ती मिळते. (५) एकभुक्त राहून सत्यनारायणाची पूजा करावी. त्यामुळे सर्व कार्यांत यश, सुख व संपत्ती यांची प्राप्ती होते. [ व्र. प.; व्रतराज ]

## वैशाली

एक प्राचीन भारतीय नगर व गणराज्य. आजच्या बिहारमधील मुझफरपूर जिल्ह्यात असणाऱ्या हाजीपूर परगण्यातील बसाढ नामक गाव हेच प्राचीन वैशालीचे मूळ स्थान मानले जाते. तथापि चंपारण्य, मुझफरपूर, दरभंगा या प्रदेशांचा बराचसा भूभाग या नगराच्या प्राचीन विस्तारात समाविष्ट होता. याच्या प्राचीन सीमा निश्चितपणे सांगता येत नसल्या, तरी पश्चिमेला गंडक, पूर्वेला प्राचीन गंडक, दक्षिणेला गंगा व उत्तरेला हिमालय पर्वतश्रेणी एवढ्या भूभागावर वैशालीचे स्वामित्व होते. डॉ. अ. स. अळतेकर यांच्या मते प्राचीन वैशाली नगर चार मैल लांब व दोन मैल रुंद होते.

वैशालीचे सर्वांत प्राचीन वर्णन वाल्मीकिरामायणात (बाल. ४४.९–११; ४५; ४७.) आढळते. तिथे वैशाली नगरी गंगेच्या उत्तर किनाऱ्यावर वसली असल्याचे सांगितले आहे. अवदानकल्पलता या ग्रंथातील वर्णनानुसार वैशाली फल्गुमती नदीच्या तीरावर वसली होती. वाल्मीकिरामायणात (बाल. ४७.११–२४) या नगरीच्या निर्मितीविषयी एक कथा सांगितली आहे. तिचा सारांश असा–

अलंबुषा नामक एक अप्सरा होती. तिला इक्ष्वाकू वंशातील त्याच नावाच्या राजापासून एक मुलगा झाला. त्याचे नाव विशाल

विशालाने ही नगरी वसविल्यामुळे तिचे नाव वैशाली पडले.

वाल्मीकिरामायणात विशालाचे उत्तराधिकारी म्हणून हेमचंद्र, सुचंद्र, धूमाश्व, सृञ्जय, सहदेव, कुशाश्व, सोमदत्त, काकुत्स्थ, सुमती, इ. राजांची नामावली दिलेली असून, त्यांच्या पराक्रमाचे आणि कर्तृत्वाचेही वर्णन केले आहे. राम सीतास्वयंवरासाठी मिथिलेला निघाला, तेव्हा मार्गात त्याला वैशाली नगरी लागली होती. मनुपुत्र नाभानेदिष्ट हा वैशालीचा पहिला राजा व सुमती हा शेवटचा राजा होय. त्याच्या पुढच्या वैशालीच्या राजांची वंशावळ मिळत नाही. वैशालक वंश कलिपूर्व १३४२ या वर्षी सुरू झाल्याचे विद्वानांचे अनुमान आहे.

वैशालीचा सलग, साधार इतिहास बुद्धकाळापासून उपलब्ध होतो. त्या काळातील सहा वैभवशाली महानगरींत वैशालीचा अग्रक्रम होता. या नगरीत तेव्हा लिच्छवी वंशाचे राज्य होते. वैशालीची लोकसंख्या अगणित होती. मोठमोठी शोभिवंत व भव्योत्तुंग मंदिरे, राजप्रासाद, उपवने, उद्याने, तळी व तलाव ही या नगरीची भूषणे होती. मार्टिन आणि कनिंगहॅम यांनी बसाढ येथे सापडलेल्या प्राचीन ध्वंसावशेषांवरून वैशालीची तत्कालीन मांडणी कशी होती, याचे शब्दचित्र रेखाटले आहे.

राजा विशाल याचा प्रासाद दक्षिण बाजू सोडता तीन्ही बाजूंनी जलाशयांनी वेढलेला असे. पावसाळ्यात व हिवाळ्यात राजा जवळच्या एका किल्ल्यावर जाऊन राही. हा किल्ला आजच्या बसाढ गावानजीक असून, डॉ. ब्लाश याच्या मते तो उत्तरेला ७५७ फूट, दक्षिणेला ७८० फूट, पूर्वेला १६५५ फूट आणि पश्चिमेला १६५० फूट असा सुदीर्घ विस्तारला होता. किल्ल्याभोवतालचा खंदक १५ फूट खोल व १२५ फूट रुंद होता. ब्लाशला इथे एक गणपतीची मूर्ती मिळाली. या मूर्तीवरून त्या काळच्या वैशालीजनांच्या धर्मभावनेवर काही प्रकाश पडू शकेल, असे त्याचे मत आहे.

वैशालीभोवती सुमारे बावन्न तलाव असल्याची एक दंतकथा प्रचलित आहे. दुसऱ्या एका दंतकथेवरून पुराणातील बलीराजाला वामनाने पाताळात दडपल्याची घटना वैशालीनजीकच घडल्याचे समजते. बली बसाढ येथे राहत असल्याचे त्या दंतकथेत सांगितले आहे.

गौतम बुद्धाच्या काळी ईशान्य भारतातील एक सामर्थ्यशाली व वैभवशाली गणराज्य म्हणून वैशालीचा सर्वत्र उल्लेख होई. त्या काळी ज्या ज्या नामवंत राजवटींचे उदयास्त झाले किंवा जे जे राष्ट्रीय महत्त्वाचे प्रसंग घडले, त्या सर्वांचा या ना त्या कारणाने वैशालीशी संबंध होता. वैशाली नगरीत एक विशाल सभागार किंवा संथागार असन, त्यात लिच्छवींच्या सभा होत. इथे ते विवादग्रस्त प्रश्नांविषयी एकमताने निर्णय घेत. सर्व सदस्यांचा अधिकार समान असे. ललितविस्तरानुसार, हे सदस्य ज्येष्ठ, वृद्ध, मध्य किंवा उच्च प्रतीच्या कोणाही माणसाला खास आदर दाखवीत नसत. प्रत्येक जण आपापल्या परी राजासमानच असे. सभेच्या एका सदस्याचा दुसऱ्या सदस्यावर कोणत्याही प्रकारचा अधिकार किंवा दबाव चालत नसे. त्यामुळे सभेत वाद कितीही झाला, तरी अंतिम निर्णय हा सर्वानुमते एकच होई.

भगवान बुद्धाला वैशालीचे विशेष आकर्षण होते. तिथल्या आम्रवनात आणि नगराबाहेरील महावनात त्याचा वारंवार मुक्काम असे. त्याने केलेल्या अनेक संस्मरणीय धर्मप्रवचनांपैकी पुष्कळशी वैशालीत व वैशालीच्या परिसरात केली होती. वैशालीची नगरवधू आम्रपाली ही तर बुद्धाच्या प्रथमदर्शनानेच भारावून गेली व सर्वसंगपरित्याग करून भिक्षुणी बनली.

भगवान महावीराची माता त्रिशला ही वैशालीच्या राजघराण्यातील केतक नामक राजाची वहीण होती. वैशालीच्या



अशोकस्तंभ – वैशाली

कुंडग्राम नावाच्या उपनगरात महावीर जन्मला. अभयदेवसूरीने भवानीसूत्र या ग्रंथावर लिहिलेल्या टीकेत वैशालीपुत्र या अर्थी महावीराला वैशालिक व त्याच्या मातेला वैशालीसुता अशा अर्थाने विशाला असे म्हटले आहे. महावीराचे बालपण वैशालीतच गेले व जिनदीक्षेनंतरचे त्याचे बारा पावसाळेही इथेच व्यतीत झाले. महावीराचा वैशालीशी असा घनिष्ठ संबंध असल्यामुळे जैनांना वैशाली नगर तीर्थरूप ठरले आहे.

युआन च्वांग याच्या वर्णनावरून कळते, की वैशालीत बुद्धाचे परमशिष्य आनंद व सारिपुत्र मोग्गलायन यांच्या स्मरणार्थ स्तूप बांधले होते; तसेच एका महासरोवराच्या काठी पन्नास फूट उंच असा एक स्तंभ होता. त्या स्तंभावर एक सिंहमूर्ती होती. या सरोवराजवळ आणखी दोन स्तूप होते. गौतम बुद्धाच्या महापरिनिर्वाणानंतर सुमारे एकशे दहा वर्षांनंतर वैशाली येथे एक बौद्ध संगीती किंवा धर्मपरिषद भरली होती व त्या संगीतीत सातशे बौद्ध भिक्षूंनी भाग घेतला होता, असेही युआन च्वांग सांगतो.

वैशालीच्या लिच्छवी गणांनीही बुद्धाच्या अवशेषांवर वैशाली येथे एक स्तूप उभारला होता. युआन च्वांग इ. स. च्या ७ व्या शतकात वैशालीला गेला, तेव्हा तो स्तूप अस्तित्वात होता. पुढे मात्र तो केव्हा तरी भूगर्भात गाडला गेला. [प्रा. मौ. बि.; एन्सा. रि. ए.; हि. जॉ. ए. इं.; मुझफर. गॅझे.; भारती – सप्टें. १९५९; बि. ज. स्मा. ग्रं.; भा. न. क.; प्रा. भा. न. न. जी.]

## वैशेषिक दर्शन

षड्दर्शनांपैकी एक दर्शन. याला काणाद दर्शन किंवा औलूक्यदर्शन अशीही नावे आहेत. ही दोन्ही नावे या दर्शनाचा आद्य प्रवर्तक, उलूक ऋषीचा पुत्र कणाद याच्या नावावरून पडली आहेत. विशेष नामक एका पदार्थाची या दर्शनात कल्पना केलेली असल्यामुळे याला वैशेषिक असे नाव मिळाले आहे. 'काणादं पाणिनीयं च सर्वशास्त्रोपकारकम्' = कणाददर्शन व पाणिनीचे व्याकरण ही सर्व शास्त्रांत उपकारक आहेत, असे पंडित लोकांत एक सुभाषित प्रचलित आहे. शब्दाच्या यथार्थ निर्णयाच्या बाबतीत ज्याप्रमाणे पाणिनीय व्याकरण उपयोगी पडते, त्याप्रमाणे पदार्थांच्या स्वरूपनिर्णयाच्या बाबतीत वैशेषिक दर्शन साहाय्यकारी होते. जैन व बौद्ध या दोन्ही मतांपेक्षा वैशेषिक दर्शन प्राचीन आहे.

या दर्शनाचे प्रमुख आचार्य पुढीलप्रमाणे –

कणाद – महर्षी कणाद हा या दर्शनाचा सूत्रकार आहे. (कणाद पाहा). त्याच्या सूत्रांवर रावणाने एक भाष्य लिहिले होते. तसेच भरद्वाजानेही या सूत्रांवर एक वृत्ती लिहिली होती. पण हे दोन्ही ग्रंथ उपलब्ध नाहीत.

प्रशस्तपाद – इ. स. च्या ६ व्या शतकापूर्वी प्रशस्तपाद किंवा प्रशस्तदेव नावाचा एक मोठा विद्वान होऊन गेला. त्याने पदार्थधर्मसंग्रह नामक एक ग्रंथ लिहिला. त्याला भाष्य असे म्हणण्याची पद्धत आहे. पण ते भाष्य नसून वैशेषिक सिद्धान्तांवर त्याने आपले स्वतंत्र विचार त्यात प्रगट केले आहेत. वैशेषिक सूत्रांनंतर या दर्शनाच्या इतिहासात हाच ग्रंथ प्रामाणिक मानला जातो. या ग्रंथावर अनेक टीका झालेल्या आहेत. त्यांपैकी दाक्षिणात्य व्योमशिवाचार्यांची व्योमवती, मिथिलेच्या उदयनाचार्यांची किरणावली आणि बंगालच्या श्रीधराचार्यांची कंदली या टीका विशेष प्रसिद्ध आहेत. त्यांतही किरणावली ही व्याख्या विशे[ष] महत्त्वाची असून, तिच्यावरही अनेक टीका लिहिल्या गेल्या आहेत. त्यांपैकी वरदराज (इ. स. चे ११ वे शतक), वादी[न्द्र] (इ. स. च्या १३ व्या शतकाचा पूर्वभाग), वर्धमानोपाध्याय (इ. स. चे १३ वे शतक), पद्मनाभ मिश्र (इ. स. चे १६ वे शतक) यांच्या टीका विशेष प्रसिद्ध आहेत.

शिवादित्य मिश्र (इ. स. चे १० वे शतक) – याने आपल्या सप्तपदार्थी या सुप्रसिद्ध ग्रंथात वैशेषिक सिद्धान्तांचा नैयायिक सिद्धान्तांशी मनोरम समन्वय केला आहे. लक्षणमाला नामक आणखीही एक ग्रंथ याने लिहिला आहे.

वल्लभाचार्य (इ. स. चे १२ वे शतक) – याचा न्यायलीलावती हा ग्रंथ वैशेषिक सिद्धान्तांचे आगर असून, त्याच्यावर अनेक टीका लिहिल्या गेल्या आहेत. त्यांपैकी वर्धमानकृत प्रकाश, शंकर मिश्राची कंठाभरण व रघुनाथ शिरोमणीची दीधिती या टीका अधिक प्रसिद्ध आहेत.

शंकर मिश्र (इ. स. चे १५ वे शतक) – दरभंग्याजवळ असलेल्या सरिसव गावाचा हा रहिवासी होता. हा एक असाधारण प्रतिभेचा दार्शनिक होता. याने कणादरहस्य, उपस्कार, आमोद, कल्पलता, आनंदवर्धन, मयूख, इ. ग्रंथ लिहिले आहे[त].

इ. स. च्या १५ व्या शतकापर्यंत न्याय व वैशेषिक या दोन दर्शनांची परंपरा स्वतंत्रपणे चालत आली होती. त्यानंतर या दोन्ही दर्शनांतील विषय एकत्र करून न्यायवैशेषिक दर्शनांवर अनेक ग्रंथ लिहिले गेले. त्यांचे लेखक असे –

विश्वनाथ न्यायपंचानन (इ. स. चे १७ वे शतक) – याने भाषापरिच्छेद नामक ग्रंथात वैशेषिक सिद्धान्तांचे सुगम वर्णन केले आहे. यात १६८ कारिका असून, यानेच त्यांच्यावर न्याय-सिद्धान्तमुक्तावली नावाची टीका लिहिली आहे. त्याशिवाय या ग्रंथावरच्या दिनकरी, रामरुद्री, मंजूषा, इ. टीका फार प्रसिद्ध आहेत. या एकाच ग्रंथाच्या अभ्यासाने लोकांना नव्य न्यायाच्या शैलीचा चांगला परिचय होतो.

अन्नंभट्ट (इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध) – याचा तर्कसंग्रह हा ग्रंथ अत्यंत लोकप्रिय आहे. यानेच त्याच्यावर दीपिका नामक टीका लिहिली आहे. तर्कसंग्रहावर पंचवीस व दीपिकेवर दहा टीका लिहिल्या गेल्या आहेत. यावरून या ग्रंथाचे महत्त्व ध्यानात येईल.

**तत्त्वमीमांसा** – वैशेषिक लोक जगातल्या सर्व वस्तूंना पदार्थ असे म्हणतात. पदार्थ या शब्दाचा व्युत्पत्तिलभ्य अर्थ अभिधेय वस्तू असा आहे. प्रमितीचा म्हणजे ज्ञानाचा विषय होणे, अभि[धेय असणे हे] पदार्थाचे लक्षण सांगितले आहे. म्हणून अभिधेयत्व व ज्ञे[यत्व]

हे पदार्थाचे सामान्य लक्षण मानलेले आहे.

वैशेषिक सूत्रांत सहा पदार्थांची नावे दिलेली आहेत. कणादाने अभावाचे वर्णन केले आहे; पण त्याला पदार्थ मानलेले नाही. नंतरच्या आचार्यांनी अभावाचा पदार्थांत अंतर्भाव केला.

वैशेषिकांच्या मते जगातील सर्व वस्तू द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय व अभाव या सात पदार्थांत विभागलेल्या आहेत. त्यांचे क्रमाने विवरण पुढीलप्रमाणे —

द्रव्य — कार्याचे समवायी कारण व गुण आणि कर्म यांचा आश्रयभूत पदार्थ म्हणजे द्रव्य होय. कोणत्याही कार्याचे उपादान कारण द्रव्यच असते. द्रव्यापासूनच नव्या वस्तू बनवल्या जातात. पृथिवी, जल, तेज, वायू, आकाश, काल, दिक्, आत्मा व मन अशी नऊ द्रव्ये वैशेषिकांनी मानली आहेत. पृथिवी, जल, तेज, वायू व आकाश या पाच द्रव्यांना महाभूते असे म्हणतात. गंध हा पृथ्वीचा विशेष गुण आहे. रूप, रस, स्पर्श, संख्या, इ. इतर द्रव्यांत आढळणारे गुणही पृथ्वीत आहेत. नित्य व अनित्य असे पृथ्वीचे दोन प्रकार आहेत. सर्व पार्थिव पदार्थांची उत्पत्ती अत्यंत सूक्ष्म व अविभाज्य अशा परमाणूंपासून होते. म्हणून कारणभूत परमाणूंत राहणारी पृथ्वी नित्य व कार्यरूप पृथ्वी अनित्य आहे. अनित्य पृथ्वीची शरीर, इंद्रिय व विषय अशी तीन रूपे आहेत. शीत स्पर्शाने युक्त द्रव्याला जल व उष्णस्पर्शयुक्त द्रव्याला तेज असे नाव आहे. पृथ्वीप्रमाणेच जल व तेज यांचे नित्य व अनित्य असे भेद आहेत. रूपरहित व अनुष्णाशीत स्पर्शाने युक्त असलेल्या द्रव्याला वायू असे नाव आहे. शरीरात संचार करणाऱ्या वायूला प्राण असे म्हणतात. शब्द हा गुण आकाशात राहतो. आकाशाची उत्पत्ती किंवा नाश कधी होत नाही. त्यामुळे ते नित्य आहे. आकाश, काल, दिक् व आत्मा ही चार विभू द्रव्ये आहेत. भूत, वर्तमान व भविष्य यांचे असाधारण कारण काल आहे. एखादी घटना दुसऱ्या एखाद्या घटनेच्या आधी घडली, त्याच वेळी घडली किंवा मागून घडली असे जे ज्ञान आपल्याला होते त्याचे कारण काल हेच आहे. त्याचप्रमाणे इथे-तिथे, जवळ-दूर, मागे-पुढे, पूर्व-पश्चिम, इ. लोकव्यवहाराची कल्पना दिक्वर आश्रित आहे. दोन्ही अमूर्त असल्यामुळे त्यांचे प्रत्यक्ष होत नाही. काल व दिक् वस्तुतः अखंड आहेत. पण उपाधिभेदाने अखंड कालाचे लव, निमेष, प्रहर, दिन, रात, पक्ष, इ. व दिक्चे पूर्व, पश्चिम, इ. दहा भेद होतात.

प्रत्येक शरीरात आत्मा निवास करतो. आत्मा नित्य आहे व तो ज्ञानाचा आश्रय आहे. तो शरीराहून भिन्न असून, इंद्रियांचा अधिष्ठाता आहे. तो मानस प्रत्यक्षाचा विषय व विभू आहे. बुद्धी म्हणजे ज्ञान, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्माधर्म, संस्कार, इ. त्याचे गुण आहेत. प्रत्येक शरीरात भिन्न भिन्न आत्मा वास करतो. कारण जगात एकाच वेळी कोणी सुखी, तर कोणी दुःखी, कोणी श्रीमंत, तर कोणी गरीब दिसतो. तेव्हा भिन्न भिन्न आत्म्यांची कल्पना केल्याशिवाय याची संगती लावता येणार नाही.

मन हे शेवटचे द्रव्य असून, त्याच्या साहाय्याने आत्मा सुख-दुःखांचा अनुभव घेतो. प्रत्येक शरीरात भिन्न असल्यामुळे मने अनेक आहेत. मन अणुपरिमाण आहे.

गुण — हा दुसरा पदार्थ आहे. गुण हा नेहमी द्रव्यात राहतो. हा स्वतः निर्गुण व निष्क्रिय आहे. वैशेषिक सूत्रांत सतराच गुण सांगितलेले आहेत; पण भाष्यकारांनी त्यांत आणखी सात गुणांची भर घालून चोवीस गुण मानले. ते असे — रूप, रस, गंध, स्पर्श, संख्या, परिमाण, पृथक्त्व, संयोग, विभाग, परत्व, अपरत्व, बुद्धी, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, गुरुत्व, द्रवत्व, स्नेह, संस्कार, शब्द, धर्म व अधर्म. यांपैकी संख्या, परिमाण, इ. सामान्य गुण असून, बुद्धी, सुख, दुःख हे विशेष ठिकाणी राहत असल्यामुळे वैशेषिक गुण होत.

नेत्रेंद्रियाने ग्राह्य गुणाला रूप असे म्हणतात. ते पांढरे, निळे, पिवळे, हिरवे, लाल, कपिश व चित्रविचित्र असे सात प्रकारचे आहे. पृथ्वी, जल व वायू हे रूपवान पदार्थ आहेत. मधुर, आम्ल, लवण, कटू, कषाय व तिक्त असे रसाचे सहा प्रकार आहेत. सुगंध व दुर्गंध असा गंध द्विविध आहे. स्पर्श शीतल, उष्ण व अनुष्णाशीत असतो. रस पृथ्वी आणि जल यांत, गंध पृथ्वीत आणि स्पर्श पृथ्वी, जल व तेज यांत राहतो. एक, दोन, इ. व्यवहाराला संख्या कारण आहे. मान ( कमीजास्त ) व्यवहाराच्या कारणाला परिमाण असे म्हणतात. ते अणू, महत्, ह्रस्व व दीर्घ असे चार प्रकारचे आहे. परमाणू, द्वयणुक व मन यांचे अणुपरिमाण, घटाचे महत्परिमाण, आकाशाचे परम महत् किंवा दीर्घ आणि द्वयणुकाचे ह्रस्व परिमाण असते.

पृथक व्यवहाराचे कारण पृथक्त्व गुण आहे. प्रथम अलग असणारे पदार्थ एकत्र आले असता, त्याला संयोग असे नाव आहे. हा तीन प्रकारचा आहे. एका पदार्थाच्या गतीने होणारा. उदा० पक्षी उडून झाडावर जाऊन बसतो. दोन पदार्थांच्या गतीने होणारा. उदा० दोन दिशांनी येणाऱ्या दोन माणसांची टक्कर. आणि संयोगज संयोग. चौपाईवर ठेवलेल्या पुस्तकाला हात लावला असता हाताचा व चौपाईचीही संयोग होतो. संयोगाचा नाश करणाऱ्या गुणाला विभाग असे नाव आहे. देश व काल यांच्या अपेक्षेने परत्व व अपरत्व ठरते. दूर असलेल्याला पर व समीप असलेल्याला अपर असे म्हणतात. पतनाचे कारण गुरुत्व हा गुण आहे. तो फक्त पृथ्वी व जल यांमध्ये राहतो.

वाहण्याचे असमवायी कारण द्रवत्व आहे. तर पिंडीभावाचे

(एकत्र गोळा होण्याचे) कारण स्नेह हा गुण आहे. तो फक्त जलातच राहतो. कानांनी ग्रहण करण्यायोग्य गुण शब्द आहे. ध्वन्यात्मक आणि वर्णात्मक असा शब्द दोन प्रकारचा आहे. भेरी, पटह, इ. वाद्यांचा शब्द ध्वन्यात्मक व संस्कृत भाषा वर्णात्मक आहे. सर्व प्रकारच्या व्यवहाराचा हेतू, ज्ञान किंवा बुद्धी ही आहे. स्मृती आणि अनुभव असे तिचे दोन भेद आहेत.

आत्म्याला अनुकूल असते, ते सुख व प्रतिकूल असते, ते दुःख होय.

संस्काराचे तीन भेद आहेत – (१) भावना – प्रथम अनुभवलेल्या विषयाची स्मृती संस्कारामुळे होते. हिलाच भावना असे नाव आहे. भावना हा आत्म्याचा गुण आहे. (२) वेग – मूर्तिमान पदार्थांत विशेष कारणाने वेग उत्पन्न होतो. व (३) स्थितिस्थापकता. धर्म हा आत्म्याचा गुण आहे. ज्यामुळे कर्त्याला सुख, प्रिय वस्तू किंवा मोक्ष यांची प्राप्ती होते, तो गुण धर्म होय. अंतःकरणाची शुद्धता व पवित्र संस्कार यांनी हा उत्पन्न होतो. अधर्म हा कर्त्याला दुःख व अहित यांची प्राप्ती करून देतो.

कर्म – कर्मही द्रव्यावर आश्रित असते. गतिमात्राला कर्म असे नाव आहे. त्याचे उत्क्षेपण (= वर फेकणे), अपक्षेपण (= खाली फेकणे), आकुंचन, प्रसारण व गमन असे पाच भेद आहेत. पृथ्वी, जल, तेज, वायू व मन यांवरच कर्म राहते. आकाशादी विभू द्रव्यावर राहत नाही.

सामान्य – अनेक वस्तूंत समवाय संबंधाने राहणाऱ्या पदार्थाला सामान्य किंवा जाती असे म्हणतात. उदा० गोत्व, मनुष्यत्व, इ. जाती होत. सामान्य नित्य व एक आहे. मनुष्य उत्पन्न होवो किंवा मरो, मनुष्यत्वरूप सामान्य नेहमी विद्यमान असते. व्यापकतेच्या दृष्टीने सामान्याचे पर सामान्य, अपर सामान्य व परापर सामान्य असे तीन भेद आहेत. पर सामान्यालाच सत्ता असे नाव आहे. सत्ता द्रव्य, गुण व कर्म यांच्या ठिकाणी राहते. अपर सामान्य कमी व्यक्तींच्या ठिकाणी राहते. उदा० घटत्व फक्त घटावरच राहते. द्रव्यत्व हे परापर सामान्य आहे. कारण, घटत्वापेक्षा द्रव्यत्व हे जास्त ठिकाणी व सत्तेपेक्षा कमी ठिकाणी राहते.

विशेष – द्रव्यांचा अंतिम विभाग जो परमाणू, त्यामध्ये व नित्य द्रव्यांत राहणाऱ्या पदार्थाला विशेष हे नाव आहे. विशेष एका परमाणूचा दुसऱ्या परमाणूपासून व एका पदार्थाचा दुसऱ्या पदार्थापासून भेद करतो. तो अनंत आहे. विशेष मानला नसता तर सर्व आत्मे एकसारखेच झाले असते व त्यांच्यांत वैशिष्ट्य दिसले नसते.

समवाय – कोणतीही वस्तू दुसऱ्या कोणत्याही वस्तूबरोबर एखाद्या संबंधाशिवाय राहू शकत नाही. अयुतसिद्ध पदार्थांत समवाय संबंध राहतो. अवयव–अवयवी, गुण–गुणी, क्रिया–क्रियावान, जाती–व्यक्ती, विशेष–नित्य द्रव्य हे अयुतसिद्ध पदार्थ होत. वस्त्र हे अवयवी व तंतू हे अवयव होत. वस्त्र तंतूंना सोडून कधीही राहत नाही. वस्त्र तंतूंत नेहमी समवेत असते, म्हणजे समवाय संबंधाने राहते. जल हे गुणी व शैत्य हा गुण आहे. शैत्य गुण जलात नेहमी राहतो. म्हणून त्या दोघांत समवाय संबंध आहे. त्याचप्रमाणे, गती ही वायूत, गोत्व हे गो व्यक्तीत व विशेष नित्य द्रव्यांत समवाय संबंधाने राहतो. अशा प्रकारे समवाय हा नित्य व स्वाभाविक संबंध आहे. न्याय-वैशेषिक सिद्धान्तासाठी समवाय संबंधीची कल्पना नितांत आवश्यक आहे कारण या कल्पनेवरच त्यांचा कार्यकारणभाव अवलंबून आहे.

अभाव – हा सातवा पदार्थ आहे. अभावाचे संसर्गाभाव व अन्योन्याभाव असे दोन भेद आहेत. संसर्गाभावाचे पुन्हा प्रागभाव, प्रध्वंसाभाव व अत्यंताभाव असे तीन प्रकार आहेत. उत्पत्तीच्या पूर्वी कारणात कार्याचा जो अभाव असतो, त्याला प्रागभाव असे नाव आहे. तो अनादी व सान्त असतो. उत्पत्तीच्या नंतर कारणात कार्याचा जो अभाव होतो, त्याला प्रध्वंसाभाव असे म्हणतात. म्हणून प्रध्वंसाभाव हा सादी व अनंत मानलेला आहे. दोन वस्तूंचा संबंध वर्तमान, भूत व भविष्य या तीन्ही कालात जेव्हा होत नाही, तेव्हा त्याला अत्यंताभाव असे म्हणतात. कोणतीही वस्तू एखाद्या अधिकरणात एखाद्या संबंधाने राहते. उदा० घट हा भूतलावर संयोग संबंधाने राहतो, समवाय संबंधाने नाही. त्यामुळे भूतलावर घटाचे चाक्षुष प्रत्यक्ष झाले, तरी भूतलावर समवाय संबंधाने घट नाही, असा अत्यंताभाव होऊ शकतो. खपुष्प व शशशृंग हीही अत्यंताभावाची उदाहरणे होत. ज्याचा अभाव असतो, त्याला न्यायदर्शनाच्या परिभाषेत प्रतियोगी असे नाव आहे. अत्यंताभाव हा अनादी व अनंत आहे. एका वस्तूचा जेव्हा दुसऱ्या वस्तूशी भेद असतो, तेव्हा त्याला अन्योन्याभाव म्हणतात. उदा० घट हा पट नाही.

अभाव हा पदार्थ मानणे आवश्यक आहे; कारण तो जर मानला नाही, तर सर्व पदार्थ नित्य होतील आणि कुणाचाच नाश होणार नाही. प्रागभाव जर मानला नाही, तर सर्व वस्तू अनादी मानाव्या लागतील. प्रध्वंसाभाव मानला नाही, तर वस्तूंचा कधीच नाश होत नाही, असे म्हणावे लागेल. अत्यंताभाव मानला नाही, तर सर्वत्र सर्व वस्तूंची सत्ता मानावी लागेल. आणि अन्योन्याभाव स्वीकारला नाही, तर वस्तूवस्तूंत भेद राहणार नाही.

**जगताची उत्पत्ती** – इतर दार्शनिकांप्रमाणे वैशेषिकांनीही जगताच्या उपादानाच्या बाबतीत विशेष विचार केला आहे. त्यांच्या मते जगत हे परमाणूंचे कार्य असून, कर्माच्या सहकार्याने ईश्वरनियमित आहे. परमाणू हे पार्थिव, जलीय, तैजस

व वायवीय असून, ते सूक्ष्म, इंद्रियातीत, निरवयव व नित्य द्रव्यरूप आहेत. या परमाणूंपासून जगताची उत्पत्ती कशी होते, त्याचे वर्णन प्रशस्तपादांनी आपल्या भाष्यात केले आहे, ते असे– अणुपरिमाणविशिष्ट परमाणूंच्या संयोगाने द्व्यणुकाची उत्पत्ती होते. हा द्व्यणुकही अणुपरिमाणविशिष्टच असतो व त्यामुळे तो अतींद्रिय असतो. पण कार्य असल्यामुळे तो अनित्य असतो. अशा तीन द्व्यणुकांच्या संयोगाने त्र्यणुकाची उत्पत्ती होते. त्याला त्रसरेणू किंवा त्रुटी अशीही नावे आहेत. हा त्र्यणुक महत्परिमाण असल्यामुळे त्याचे चाक्षुष प्रत्यक्ष होते. अशा प्रकारे त्रसरेणूपासून पुढील सर्व कार्य द्रव्य इंद्रियगोचर होते. घराच्या खिडकीतून सूर्यकिरण आत प्रवेश करतात, तेव्हा त्यांत जे छोटे छोटे कण दिसतात, त्यांना त्रसरेणू असे नाव आहे. त्याचा सहावा भाग म्हणजे परमाणू होय. चार त्रसरेणूंच्या संयोगाने चतुरणुक उत्पन्न होते आणि त्यानंतर क्रमाने जगताची सृष्टी होते. प्रत्येक द्रव्याच्या सृष्टीत असाच क्रम असतो.

वैशेषिकांच्या मतानुसार परमाणू स्वभावतः शांत अवस्थेत निष्पंद रूपाने राहतात. त्यांच्यांत प्रथम परिस्पंद का उत्पन्न होतो, असा प्रश्न आहे. प्राचीन वैशेषिकांच्या मते प्राण्यांच्या धर्माधर्मरूप अदृष्टामुळे तो उत्पन्न होतो. पण नंतरच्या आचार्यांनी अदृष्टाच्या सहकार्याने पण ईश्वराच्या इच्छेने परमाणूंत स्पंदन उत्पन्न होते व मग सृष्टी उत्पन्न होते, असे मानले आहे. ईश्वराला जेव्हा जगताचा संहार करण्याची इच्छा उत्पन्न होते, तेव्हा अदृष्टाची शक्ती रुद्ध होते व लगेच प्रलय होतो. पण जेव्हा प्राण्यांचे कर्म फलोन्मुख होते व अदृष्ट कार्य करू लागते, तेव्हा परमेश्वराच्या सृष्टी निर्माण करण्याच्या इच्छेने आत्मा व परमाणू यांचा संयोग उत्पन्न होतो. त्यामुळे परमाणूंत स्पंद उत्पन्न होतो व क्रमाने सृष्टीची उत्पत्ती होते.

जगात जेवढ्या वस्तू उत्पन्न होतात, त्या जीवांच्या भोगासाठी असतात. आपल्या पूर्वजन्मातील कर्माच्या प्रभावाने, विशेष प्रकारच्या कर्माचा भोग भोगण्यासाठी जीव उत्पन्न होतो. त्या भोगाला अनुकूल असे शरीर, योनी, कुल, इ. त्याला मिळते. जेव्हा तो भोग भोगून संपतो, तेव्हा त्याचा मृत्यू होतो.

**ज्ञानमीमांसा** – प्रशस्तपादांनी आपल्या भाष्यात ज्ञानाची मीमांसा केली आहे. ज्ञानाचे सामान्यतः विद्या व अविद्या असे दोन प्रकार आहेत. अविद्येचे पुन्हा संशय, विपर्यय, अनध्यवसाय व स्वप्न असे चार भेद आहेत. संशय प्रसिद्धच आहे. विपर्यय म्हणजे भ्रम. अनध्यवसाय म्हणजे अनिश्चय. संस्कारपाटव, धातुदोष व अदृष्ट ही स्वप्नाची कारणे आहेत.

विद्येचेही प्रत्यक्ष, लैंगिक (अनुमान), स्मृती व आर्ष असे चार भेद आहेत. प्रत्यक्ष व अनुमान यांची कल्पना नैयायिकांप्रमाणेच आहे. वैशेषिक लोक उपमान व शब्द या प्रमाणांचा अनुमानातच अंतर्भाव करतात. म्हणजे ते प्रत्यक्ष व अनुमान अशी दोनच प्रमाणे मानतात. स्मृती प्रसिद्धच आहे. ऋषींच्या अतींद्रिय विषयांच्या प्रतिभाजन्य यथार्थ ज्ञानाला आर्ष असे नाव आहे. प्राचीन काळी या दर्शनाचे बौद्ध दर्शनाशी घनिष्ठ साहचर्य होते. तसेच शब्द हे स्वतंत्र प्रमाण न मानल्यामुळे प्राचीन ग्रंथांत यांचा उल्लेख अर्धवैनाशिक (अर्धे बौद्ध) असा केलेला आढळतो.

**कर्तव्यमीमांसा** – धर्माची व्याख्या करणे, हे महर्षी कणादाचे मुख्य लक्ष्य आहे. त्याने धर्माचे लक्षण केलेले असे–'यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः' = ज्याच्या द्वारे तत्त्वज्ञान व मोक्ष यांची किंवा तत्त्वज्ञानपूर्वक मोक्षाची प्राप्ती होते, तो धर्म होय. धर्माला साधक अशी कर्मे दोन प्रकारची आहेत– सामान्य व विशेष. सामान्य कर्मात धर्मावरील श्रद्धा, अहिंसा, प्राणिहित, सत्यवचन, अस्तेय, देवताभक्ती, उपवास, इ. गोष्टींचा समावेश होतो. विशिष्ट कर्मात वर्णाश्रमाला अनुकूल अशी कर्मे येतात. ही कर्मे निष्कामपणे केली असता तत्त्वज्ञान होते व तत्त्वज्ञानाच्या द्वारे मोक्षाची प्राप्ती होते. कणादाच्या मते अदृष्टाचा अभाव झाला, की कर्मचक्राची गती आपोआप थांबते. मग आत्म्याचा शरीराशी असलेला संबंध तुटतो व जन्ममरणाची परंपराही खंडित होते. त्या वेळी सर्व दुःखांचा नाश होतो. हीच मुक्ती होय. जोपर्यंत कर्माचा काही भाग शिल्लक राहतो, तोपर्यंत त्याचे फल भोगण्यासाठी जन्म घ्यावा लागतो. जेव्हा संचित व प्रारब्ध कर्माचे फल समाप्त होते व नव्या कर्माची उत्पत्ती होत नाही, तेव्हा पुनर्जन्म मिळत नाही व आत्म्याची दुःखातून कायमची सुटका होते. अशा प्रकारे दुःखात्यन्तनिवृत्तिरूप व आत्मविशेषगुणोच्छेदरूप मुक्ती वैशेषिकांनी मानली आहे.

वैशेषिक दर्शनावर इतर दर्शनांच्या आचार्यांनी काही आक्षेप घेतले आहेत. वैशेषिकांनी सातच पदार्थ मानले, याला काही नियामक तत्त्व नाही; ते याहून कमी किंवा जास्ती मानता आले असते, हा त्यांचा मुख्य आक्षेप होय. स्वतंत्र पदार्थ हे आपल्या अस्तित्वासाठी दुसऱ्यावर अवलंबून असता कामा नयेत. परंतु, गुण व कर्म हे वैशेषिकांचे स्वतंत्र पदार्थ द्रव्यावर आश्रित आहेत, हे योग्य नाही. तसेच, विशेष या स्वतंत्र पदार्थाची कल्पनाही अनावश्यक आहे. जैन दार्शनिक मल्लिषेण याचे म्हणणे आहे, की सर्व पदार्थ स्वाभाविकपणेच स्वतःच अनुवृत्ती व व्यावृत्ती उत्पन्न करतात. उत्पन्न होणारा घट, आपल्या आकाराच्या सर्व द्रव्यांत घटप्रतीती उत्पन्न करतो व सजातीय आणि विजातीय अशा द्रव्यांपासून आपले स्वरूप स्वतःच अलग करतो. त्यामुळे विशेष हा पदार्थ मानणे अनावश्यक आहे. यांची सामान्याची म्हणजे जातीची कल्पना वास्तव नाही, असे सांगून बौद्धांनी तिचे खंडन

केले आहे. इतर दार्शनिकांनीही सामान्य या कल्पनेबद्दल मतभेद दर्शविला आहे.

वैशेषिकांचा परमाणुकारणवादही तर्काच्या कसोटीला उतरत नाही. वेगवेगळे असलेल्या परमाणूंत सृष्टिकाळी संयोग उत्पन्न होतो व द्वयणुकादी क्रमाने सृष्टी उत्पन्न होते, असे वैशेषिकांनी मानले आहे. संयोग हा कर्मापासून उत्पन्न होतो. आता प्रश्न असा आहे, की हे कर्म कसे उत्पन्न होते ? दृष्ट कारणांपैकी प्रयत्न हे कारण मानता येईल. पण त्या वेळी शरीर उत्पन्न न झाल्यामुळे, आत्ममनःसंयोगापासून उत्पन्न होणारा प्रयत्न संभवत नाही. अदृष्ट जर मानावयाचे ठरवले, तर ते अचेतन असल्यामुळे कर्म निर्माण करू शकणार नाही. अशा प्रकारे कोणत्याही नियत कर्माच्या अभावामुळे अणूंमध्ये प्रथम कर्म उत्पन्न होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे कर्मजन्य संयोग व संयोगजन्य द्वयणुकादी सृष्टीही निर्माण होऊ शकत नाही. प्रलयकालातही अशाच प्रकारे वियोगोत्पादक कर्माचा अभाव असल्यामुळे जगताचा प्रलय होणेच शक्य नाही. परमाणूंमध्ये स्वाभाविक प्रवृत्ती मानली, तर प्रलयाचा अभाव होईल आणि त्यांच्यांत निवृत्ती मानली, तर नित्य निवृत्तिरूप असल्यामुळे सृष्टीचा अभाव होईल. जर ते प्रवृत्तिनिवृत्ती-उभयस्वभाव मानले, तर परस्पर विरोध येईल. त्यामुळे त्यांच्या आद्य संयोगाला कोणीतरी चेतन नियामक मानणे इष्ट होईल. अशा प्रकारे परमाणुकारणवादाचे कोणत्याच तऱ्हेने समर्थन करता येत नाही. समवायाची कल्पनाही प्रमाणांच्या आधारावर टिकत नाही. अशा प्रकारे वैशेषिकांचे सिद्धान्त तर्कदृष्ट्या सर्वमान्य नाहीत. परंतु त्यांची भौतिक जगताची कल्पना लौकिक दृष्टीने अत्यंत उपयोगी आहे.

[भा. द. – बलदेव उपाध्याय; भा. द. – उमेश मिश्र; भा. द. इ.]

## वैश्य

चातुर्वर्ण्यातील तिसरा वर्ण. ब्राह्मण व क्षत्रिय या दोन वर्णांखालोखाल समाजात वैश्यांना प्रतिष्ठा होती. ऋग्वेदातील पुरुषसूक्तात (ऋ. १०.९०.१२) ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य परम पुरुषाच्या मुख, बाहू व जानू यांपासून उत्पन्न झाले, असे म्हटले आहे.

ब्राह्मण व क्षत्रिय यांप्रमाणे वैश्यांनाही अध्ययन, यजन व दान यांचा अधिकार होता. आपत्काली वैश्य पुरुष ब्राह्मणाकडून विद्या ग्रहण करू शकत असे. कौटिल्यानेही वैश्याला अध्ययन, यजन व दान ही कर्मे करायला परवानगी दिली होती. असे असले तरी वैश्यांनी शिक्षणाकडे विशेष लक्ष दिलेले दिसत नाही. कृषी, गोरक्ष्य व वाणिज्य ही कामे वैश्यांकडे सोपवलेली होती. त्यावरच त्यांनी आपले सर्व लक्ष केंद्रित केले. कारण सर्व समाजाच्या भरणपोषणाची जबाबदारी त्यांच्यावर होती. तैत्ति. संहितेत (७. १.१.४-६) वर्णोत्पत्तीच्या वर्णनात असे सांगितले आहे, की प्रजापतीने वैश्य व गाय यांना एकदमच उत्पन्न केले. वैश्य व गाय यांचा हा संबंध अर्थपूर्ण आहे. कारण शेतीच्या विकासात गाय व बैल यांचे स्थान फार महत्त्वाचे आहे.

महाभारतात (शांति. १८८.१-१८) सांगितले आहे, की समाजाच्या ज्या वर्गाने अध्ययन, यजन, इ. कर्मे सोडून शेती व गोपालन हे व्यवसाय अंगीकारले, त्याला वैश्य असे म्हणू लागले. धान्य पिकवून, दुधदुभते विकून व व्यापार करून धन मिळवणे हा या वर्गाचा मुख्य हेतू होता. सर्वांपेक्षा अधिक धनवान असल्यामुळे वैश्य लोक राजाला अधिक कर देत असत. इतर वर्णांप्रमाणेच वैश्य लोकांच्या कर्मावरही नियंत्रण होते. त्यांना याज्ञ कर्माचा अधिकार नव्हता. व्यापारी असूनही मद्य, मांस, लोह, चर्म या वस्तू विकायला त्यांना बंदी होती. युद्ध करणे हे मुख्यतः क्षत्रियाचे काम होते. तरी संकटकाळी वैश्यांनाही युद्धात भाग घ्यावा लागे. गाय व ब्राह्मण यांच्या रक्षणासाठी आणि वर्णसंकर टाळण्यासाठी वैश्यांनीही हातात शस्त्र धरायला हरकत नाही, असे बौधायनाने सांगितले आहे.

मेगॅस्थेनीसनेही वैश्य वर्णाचे वर्णन केले आहे. तो म्हणतो, की इतर वर्णांपेक्षा वैश्य वर्णात अधिक लोक होते. ते शांत वृत्तीचे असत आणि युद्धापासून अलिप्त राहत. शेती हा त्यांचा प्रमुख व्यवसाय असून, धामधुमीच्या किंवा युद्धाच्या काळात ते शांतपणे आपली शेती करीत. पिकलेल्या धान्याचा चौथा हिस्सा कर म्हणून ते राजाला देत.

व्याजाने लोकांना पैसे देणे, हेही वैश्यांचे उपजीविकेचे साधन होते. पण मन मानेल तसा व्याजाचा दर लावून त्यांनी लोकांची लूटमार करू नये, म्हणून त्यांच्यावर काही निर्बंध घातलेले होते. त्याप्रमाणे व्याजाचा दर लावणे, हे त्यांचे कर्तव्य होते.

आपत्काली वैश्याने आपल्या खालच्या शूद्र वर्णाची कामं करून निर्वाह करायला हरकत नाही, असे गौतमाने सांगितले आहे.

अशा प्रकारे धन मिळवणे हे वैश्यांचे प्रमुख कार्य होते. पण ते मिळवतानाही त्यांच्यावर काही धार्मिक बंधने लादलेली होती. त्यामुळे सर्व समाजाला त्यांच्या धनाचा आवश्यक तेवढा फायदा मिळत असे.

प्राचीन काळी ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांना वानप्रस्थाश्रम विहित होता. पण वैश्यांमध्ये तो प्रचलित नसावा. कारण वैश्यांपैकी श्रवणकुमाराच्या पित्याने तेवढा वानप्रस्थाश्रम स्वीकारला होता, असे दिसते. कदाचित धनधान्याच्या उत्पादनात गुंतून गेल्यामुळे त्यांना संसाराची ओढ अधिक वाटत असावी, म्हणून ते वानप्रस्थाला जात नसावे.

सांप्रत वैश्य हा शब्द वर्ण या अर्थाने फारसा प्रचारात नाही

तर जाती या अर्थाने तो प्रचलित आहे. पाहा– चातुर्वर्ण्य. [भा. सा. इ.; म. ज्ञा. को.; वे. का. स.]

**वैश्यसव** एक यज्ञ. हा यज्ञ फक्त वैश्यांनीच करायचा असतो. त्यात पशू व पुरोडाश ही हविर्द्रव्ये असतात. यज्ञाच्या शेवटी यजमानाला बैलाच्या कातड्यावर वसवून अभिषेक करतात. सूत्रग्रंथांत या यज्ञाला स्थपतिसव अशीही संज्ञा दिलेली आहे. [म. ज्ञा. को–वेदविद्या]

**वैश्वदेव** याला देवयज्ञ असेही म्हणतात. हा कुटुंबप्रमुखाने नित्य आचरायचा विधी आहे. विश्व म्हणजे सर्व. आपल्या अन्नातला अंशभाग सर्वांना अर्पण करणे म्हणजे वैश्वदेव होय. आपण जे अन्न खातो त्यात देव, मनुष्य, पशू, पक्षी, इ. सर्वांचा वाटा असतो. तो वाटा त्यांना दिल्याखेरीज मनुष्याने अन्नग्रहण करणे म्हणजे ते पाप होते, या कल्पनेवर वैश्वदेवाची उभारणी झाली आहे. वैश्वदेवाच्या संकल्पात मात्र तो 'पंचसूना दोषा'च्या परिहारासाठी करावा, असे म्हटले आहे. पंचसूना म्हणजे घरात जीवहिंसा होण्याची पाच ठिकाणे होत. उखळ, जाते, चूल, पाणी ठेवण्याची जागा आणि सूप या पाच वस्तूंचा उपयोग करीत असता नकळत जीवहिंसा घडते आणि तिचे पाप वैश्वदेवाने नष्ट होते.

वैश्वदेवासाठी चुलीवर शिजविलेल्या भातापैकी थोडा भाग घेऊन त्यावर तूप घालून अन्नशुद्धी करतात. मग त्याचे तीन भाग करतात. एका भागाने अग्नीत आहुती देतात, दुसऱ्याने भूतयज्ञ म्हणजे बलिहरण करतात आणि तिसऱ्याने घराबाहेर काकबळी देतात. वैश्वदेवाचा प्रयोग असा–

प्रथम आचमन, प्राणायाम व संकल्प. मग कुंडात रुक्मक नामक अग्नीची स्थापना. परिसमूहन व पर्युक्षण. अग्नीची पूजा. नंतर पुढील देवतांना आहुतिप्रदान– सूर्य, प्रजापती, अग्नी, प्रजापती, सोम, अग्नीषोम, इंद्राग्नी, द्यावापृथिवी, धन्वंतरी, इंद्र, विश्वेदेव, ब्रह्मा, भूः, भुवः, स्वः. मग विभूतिग्रहण व अग्नीची प्रार्थना.

वैश्वदेव हा प्राचीन यज्ञसंस्थेचा अवशेष असून, तो चालू शतकाच्या आरंभापर्यंत बहुतेक कुटुंबांत केला जात होता. कुटुंबसंस्था मोडकळीस आल्यामुळे ज्या अनेक धार्मिक गोष्टी समाजातून लुप्तप्राय झाल्या, त्यांपैकीच वैश्वदेव हा एक होय.

प्राचीन काळी वैश्वदेव दुपार–संध्याकाळ दोन्ही वेळा करीत. पुढे तो दुपारीच एकदा करू लागले. पुढे तोही बंद झाला. आणि स्वयंपाक करणारी गृहिणी भाताच्या चार आहुती चुलीत टाकून वैश्वदेव केल्याचे समाधान मानू लागली. पुढे तीही जाणीव राहिली नाही. पूर्वी प्रत्येक कुटुंबात वैश्वदेवाचे तांब्यापितळेचे कुंड असे. सांप्रत तेही दिसेनासे झाले आहे. पाहा– पंचमहायज्ञ. [ऋ. ब्र. स.; धा. सं. नि.]

**वैश्वानर** एक वैदिक देवता. पाहा– अग्नी.

**वैश्वानर इष्टी** पुत्र जन्मल्यानंतर ही इष्टी करतात. ती केल्याने मुलगा सदाचरणी, तेजस्वी व पराक्रमी निपजतो, असे म्हटले आहे. जातकर्म झाल्यावर पौर्णिमेला किंवा प्रतिपदेला ही इष्टी करतात. [हि. ध.]

**वैश्वानर विद्या** एक आत्मविद्या. छांदोग्योपनिषदात (५. ११.१७) या विद्येचे वर्णन केलेले आहे. एकदा प्राचीनशाल, सत्ययज्ञ, इंद्रद्युम्न, जन व बुडिल हे पाचजण आत्म्याचे ज्ञान मिळावे, म्हणून अश्वपती कैकेयाकडे गेले. प्राचीनशाल द्युलोकाची आत्मा म्हणून उपासना करीत असे, सत्ययज्ञ आदित्याची, इंद्रद्युम्न वायूची, जन आकाशाची व बुडिल उदकाची आत्मा म्हणून उपासना करी. अश्वपती हा आत्मज्ञानी होता. त्याने त्यांना आत्मविद्या सांगितली, ती अशी–

पिंडामध्ये शुद्ध मीपणाने राहणारा आत्मा आणि ब्रह्मांडाला व्यापून असणारा परमात्मा दोन्ही एकरूप आहेत. आदित्य, वायू, इ. सगुणाची उपासना जर समजून केली, तर ती योग्य मार्गाला नेते. परंतु सगुण हे सर्वस्व मानणे म्हणजे आंधळ्याने हत्तीच्या एका भागाला संपूर्ण हत्ती समजण्यासारखे चुकीचे आहे. सगुणाची उपासना करता करता आपले उपास्य दैवत सर्व ठिकाणी व्यापून राहिले आहे, अशी धारणा बनत गेली पाहिजे. सगुणाची उपासना धारणाशक्ती वाढवून शरणागती शिकवते आणि शरणागतालाच खरे आत्मदर्शन घडते.

दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी, की रोज आपण जे अन्न खातो, ते खाताना मनाने अंतरात्म्याला अर्पण करून खावे. प्राण, व्यान, अपान, समान व उदान हे प्राणाचे पाच प्रकार भिन्न दिसतात; पण ते सर्व मिळून आत्मस्वरूप चैतन्याचे दृश्य आविष्कार आहेत. त्यांच्या नावाने आहुती द्याव्या, म्हणजे ते तृप्त होतात.

या ठिकाणी विश्वात्मक आत्मा हा अग्निरूपाने वर्णन केलेला आहे. अग्नी म्हणजे वैश्वानर होय. म्हणून या विद्येला वैश्वानरविद्या असे नाव मिळाले आहे. [उ. अ.; अष्टादशी; थ. वि.]

**वैश्वानर व्रत** एक काम्य व्रत. वसंत व ग्रीष्म या ऋतूंखेरीज अन्य ऋतूंमध्ये ब्राह्मणाला सरपण देणे, हा या व्रताचा प्रमुख विधी आहे. उद्यापनाच्या वेळी तूप व गाय यांचे

दान द्यावे, असे म्हटले आहे. फल – ब्रह्मलोकप्राप्ती. [कृ. क.]

**वैष्णवदास** (इ. स. चे १८ वे शतक) एक वैष्णव कवी. हा रसजानी वैष्णवदास म्हणून प्रसिद्ध आहे. नाभादासाच्या भक्तमाल ग्रंथाचा प्रसिद्ध टीकाकार प्रियादास याचा हा नातू होय. आजोबाच्या कृपेनेच हा काव्यरचना करू लागला. याने ब्रज भाषेत अनेक ग्रंथ रचले असून, त्यांत भागवत भाषा व गीत गोविंद भाषा हे दोन ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. भागवत भाषा हा भागवताचा दोहा व चौपाई छंदातला अनुवाद आहे. त्यात पंधरा हजार छंद आहेत. [भागवत दर्शन; ब्र. ध. सं. इ.]

**वैष्णव व्रत** एक मासव्रत. विष्णू ही या व्रताची देवता होय. आषाढ महिन्यापासून पुढे चार महिने रोज प्रातःस्नान करणे, हा या व्रताचा प्रमुख विधी होय. उद्यापनाच्या वेळी एका ब्राह्मणाला भोजन आणि एक गाय व तुपाने भरलेले एक पात्र दान द्यावे. फल–पापनाश. [हि. ध.]

**वैष्णवाचार** वैष्णव व्यक्तीने काही विशेष आचार पाळायचे असतात, ते असे – मुद्राधारण, ऊर्ध्वपुंड्र लावणे, मंत्रग्रहण, पूजा, जप, ध्यान, नामस्मरण, कीर्तन, श्रवण, नमस्कार, तीर्थग्रहण, नैवेद्यभक्षण, भक्तांची सेवा, द्वादशीव्रत, तुळशीरोपण आणि ईश्वराची चरणसेवा. नित्य विष्णूपूजा, तप्तमुद्राधारण आणि होम हेही विधी आवश्यक म्हणून सांगितले आहेत. [पद्मपु. उ. खं. अ. २२४]

**वैष्णवास्त्र** अस्त्रविद्येतील एक प्रधान अस्त्र. या अस्त्राच्या आघाताने कृष्णाशिवाय अन्य कोणीही वाचू शकत नव्हते. भगदत्ताने हे अस्त्र अर्जुनावर टाकले असता, कृष्णाने ते आपल्या छातीवर झेलले. त्यामुळे अर्जुनाचा प्राण वाचला. हे अस्त्र मूळचे कृष्णाचे होते. परंतु पृथ्वीदेवीने आपला मुलगा नरकासुर याच्यासाठी ते कृष्णाकडून मागून घेतले होते. नरकासुराकडून त्याचा मुलगा भगदत्त याला ते मिळाले (म. भा. द्रोण. २९).

**वैष्णवी** अष्टमातृकांपैकी एक देवता. हिला विष्णूची राजस शक्ती म्हटले आहे. ब्रह्मवैवर्तपुराणात हिचे वर्णन दिले आहे, ते असे (प्रकृतिखंड अ. ५४) –

**विष्णुभक्ता विष्णुरूपा विष्णोः शक्तिस्वरूपिणी ।**
**सृष्टौ च विष्णुना सृष्टा वैष्णवी तेन कीर्तिता ॥**

अर्थ – वैष्णवी ही विष्णुभक्त, विष्णुरूप आणि विष्णूची शक्ती आहे. सृष्टीच्या प्रारंभी विष्णूने हिला जन्माला घातले म्हणून सर्व जण हिला वैष्णवी या नावाने ओळखू लागले.

हिचे रूपवर्णन असे– श्यामवर्ण, चतुर्भुज. दोन हातांच्या अभय व वरद या मुद्रा. दुसऱ्या दोन हातांत शंख व चक्र. पुष्ट स्तन. पीतवस्त्र, किरीटमुकुट धारण करून राजवृक्षाच्या खाली वास्तव्य करणारी व गरुडवाहन. खिचिंग येथील एका देवळातील कोनाड्यात या देवीची अत्यंत सुंदर मूर्ती आहे. तिच्या दोन हातांत शंख व चक्र असून, उजव्या हाताची अभय मुद्रा आहे व डाव्या हाताने तिने बालकाला धरले आहे. ती विविध अलंकारांनी सजलेली आहे. [दे. को. खंड २.]



वैष्णवी – खिचिंग

**वैष्णोदेवी** एक वैष्णव देवी. हिचे स्थान जम्मू-काश्मीरमध्ये जम्मूपासून २६ मैलांवर उंच डोंगरावर आहे. वर चढण्यासाठी पायऱ्या बांधल्या आहेत. यात्रेकरू कत्रा गावाजवळच्या वालगंगा नामक एका झऱ्यात प्रथम स्नान करतात व तिथून डोंगरचढणीला लागतात. वाटेत अदकनवारी हे स्थान लागते. अदकनवारी म्हणजे आदिकुमारी देवी होय. तिथून पुढे भैरवघाटी लागते. तिथे भैरवाचे एक लहानसे मंदिर आहे. तिथून पुढे एक घनदाट जंगल लागते. त्याला माता का बाग असे म्हणतात.

वैष्णोदेवी ही एका गुहेत असून ती ५७३० फूट उंचीवर आहे. यात्रेकरूला देवीच्या दर्शनासाठी या गुहेतून ५० फूट जावे लागते. काली, लक्ष्मी व सरस्वती अशी देवीची तीन रूपे इथे आहेत. गुहेच्या बाहेर एक मोठा चबुतरा आहे. त्याला विष्णु दरबार असे म्हणतात. यात्रेकरू त्यावर होम करतात. वर्षभर इथे यात्रा चालू असते. सरकार यात्रेकरूंच्या सुखसोयींसाठी पुष्कळ प्रयत्न करते. ज्यांना डोंगर चढून जाणे शक्य नसते त्यांना इथे घोडी भाड्याने मिळतात.

ही वैष्णोदेवी एवढ्या दुर्गम प्रदेशात का जाऊन राहिली

याविषयी एक आख्यायिका सांगिली जाते, ती अशी–

भैरव नामक दैत्याला वैष्णोदेवीशी लग्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली. पण देवीला त्याच्याशी लग्न करायचे नव्हते. भैरव बलप्रयोगाने आपला हेतू साध्य करील अशी देवीला भीती उत्पन्न झाली. म्हणून त्याला चुकविण्यासाठी ती डोंगरात पळून गेली व अदकनवारी या ठिकाणी लपून बसली. भैरव तिचा शोध करीत तिथवर पोचला. ते पाहून ती डोंगरावर उंच उंच चढत राहिली. शेवटी एका गुहेजवळ भैरवाने तिला गाठलेच. मग मात्र वैष्णोदेवीने आपले उग्र स्वरूप प्रकट केले व भैरवाशी झुंज देऊन त्याला ठार मारले. मग ती त्या गुहेत शिरली व कायमची तिथेच राहिली.

वैष्णोदेवीची यात्रा केल्यावर यात्रेकरूला खाली उतरून कत्रा गावातल्या भुवनेश्वरीची पूजा करावी लागते. ती केल्यानेच यात्रा सुफल होते. [ म. क.; दे. को. २ ]

## वोडेयर राजघराणे

पूर्वीच्या म्हैसूर संस्थानावर राज्य करणारे एक घराणे. या घराण्यातील दोन मूळ पुरुष मथुरा येथून दक्षिणेत आले. त्यांच्याविषयी एक कथा प्रसिद्ध आहे, ती अशी–

इ. स. १३९९ मध्ये मथुरा येथील घराण्यातील यादव राजदेव नामक राजाचे दोन पुत्र यदुराय व कृष्णराय हे आपले नशीब काढण्यासाठी दक्षिणेत आले. फिरत फिरत ते विजयनगर राज्यात आले आणि कावेरी नदी ओलांडून म्हैसूर गावाजवळ पोचले. तिथे त्यांनी आजूबाजूच्या देवतांचे दर्शन घेतले.

त्याच सुमारास म्हैसूरवर राज्य करणारा चामराज हा स्थानिक राजा मरण पावला होता. मार नायक नामक एका पुरुषाने त्याची सत्ता हस्तगत केली होती आणि तो चामराजाच्या पत्नीला व कन्येला त्रास देत होता. राणीला राजघराण्यातील या दोन पुरुषांच्या आगमनाची वार्ता समजली आणि आपले विश्वासू लोक पाठवून तिने त्यांच्याकडे मदतीची याचना केली. त्यांनी तिची विनंती मान्य केली आणि काही मोजक्या लोकांनिशी त्यांनी मार नायकावर हल्ला करून त्याला ठार मारले.

त्यांच्यापैकी यदुरायाने राजकन्येशी विवाह केला आणि तो म्हैसूरचा राजा झाला. त्याने चौवीस वर्षे राज्य केले. मेलकोटे येथील देवीच्या प्रसादाने आपल्याला हे राज्य मिळाले, अशी त्याची धारणा होती. म्हणून त्याने डोंगरावर एक किल्ला बांधला व त्याला मेलकोटे असे नाव दिले.

यदुरायानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र चामराज हा गादीवर बसला. त्याने इ. स. १४२३ ते १४५९ असे छत्तीस वर्षे राज्य केले. त्यानंतर त्याचा पुत्र थिम्मराज वोडेयर (१४५९–१४७८) आणि चामराज वोडेयर, (दुसरा) (१४७८–१५१३), चामराज वोडेयर, (तिसरा) (१५१३–१५५३), थिम्मराज वोडेयर (दुसरा) (१५५३–१५७२) चामराज वोडेयर (चौथा) (१५७२–१५७८) या राजांनी राज्य केले. पण त्यांच्याविषयी विशेष माहिती मिळत नाही.

राज वोडेयर (इ. स. १५७८–१६१७) – हा फार पराक्रमी व मुत्सद्दी राजा होता. त्याच्याकडे सुरवातीला फक्त तेहतीस गावे एवढाच मुलूख आणि तीनशे सैनिक होते. पण नंतर त्याने आपले सैन्य खूपच वाढवले आणि आसपासच्या मांडलिक राजांना जिंकून घेतले. इ. स. १६१० मध्ये त्याने श्रीरंगपट्टम येथील विजयनगरच्या राजप्रतिनिधीला हुसकून लावले व आपली राजधानी तिथे नेली. जिंकलेल्या प्रदेशाच्या व्यवस्थेसाठी त्याने प्रत्येक गावात अधिकारी नेमले. तसेच, बेट्टड अरसू या आपल्या पुतण्याला त्याने सेनाप्रमुख व सर्वाधिकारी नेमले.

राज वोडेयर हा धर्मनिष्ठ, विद्वान व सुसंस्कृत होता. त्याने श्रीरंगपट्टम, म्हैसूर व मेलकोटे इथल्या देवालयांचा जीर्णोद्धार केला व त्यांच्या खर्चासाठी जमिनी लावून दिल्या. तो प्रजाहित दक्ष होता. त्यामुळे प्रजेच्या मनात त्याच्याबद्दल प्रेम निर्माण झाले.

चामराज वोडेयर (पहिला) (इ. स. १६१७–१६३७) – राज वोडेयर इ. स. १६१७ मध्ये मरण पावल्यावर त्याचा चौदा वर्षांचा नातू चामराज (पहिला) हा गादीवर आला. पण तो लहान असल्यामुळे राज्यकारभार सेनापती बेट्टड अरसू हाच पाहत असे. चामराजाच्या कारकिर्दीत म्हैसूरचे राज्य चारही दिशांनी वाढले. उत्तरेला चेन्नपट्टणपर्यंत, पूर्वेला मलवल्लीपर्यंत आणि पश्चिमेला पेरियपट्टणपर्यंत राज्याचा विस्तार झाला. या नव्याने जिंकलेल्या प्रदेशाचा राज्यकारभार त्याने कार्यकर्ता नामक अधिकाऱ्यांकडे सोपविला. सैन्य हे राज्याचा आधार आहे, हे त्याने ओळखले होते आणि म्हणून सैन्याला दरवर्षी नियमितपणे हत्तींचा पुरवठा होत राहील, अशी व्यवस्था त्याने केली. तसेच त्याने एक शस्त्रागारही निर्माण केले. त्यात शत्रूंची मिळालेली शस्त्रे साठवण्याची व्यवस्था केली आणि अधिक शक्तिशाली शस्त्रांची नवीन निर्मितीही सुरू केली.

चामराजाने त्या काळी प्रचलित असलेल्या शैव, वैष्णव व जैन या तीन्ही पंथांना आश्रय दिला होता. तो स्वतः शैव व वैष्णव अशा दोन्ही देवतांना भजत असे.

त्याने श्रीरंगपट्टणजवळ कावेरी नदीला असलेल्या कालव्यांचे पुनरुज्जीवन केले आणि कावेरीवर एक पूल बांधला. मेलकोटे येथील कल्याणी या पवित्र तलावावर यात्रेकरूंना स्नानासाठी घाट बांधले.

चामराज स्वतः मल्लविद्यानिपुण, उत्तम घोडेस्वार, वाङ्मय-

प्रेमी व वीणावादक होता. देशोदेशीच्या विद्वानांना त्याने आश्रय दिला होता. अशांपैकी रामचंद्र पंडिताने अश्वशास्त्र व पद्मण्ण पंडिताने हयसारसमुच्चय असे दोन ग्रंथ कन्नड भाषेत लिहिले. स्वतः चामराजाने ब्रह्मोत्तरखंड हा शैव तत्त्वज्ञान व आचार यासंबंधीचा ग्रंथ रचला. तसेच त्याने रामायणाची कथा चामराजोक्तिविलास या नावाने कन्नड गद्यात लिहिली.

राज वोडेयर (दुसरा) (इ. स. १६३७–१६३८) चामराज इ. स. १६३७ मध्ये मृत्यू पावला. त्यानंतर राज वोडेयरचा पुत्र, राज वोडेयर (दुसरा) या नावाने गादीवर बसला. त्या वेळी हा पंचवीस वर्षांचा होता. याचा सेनापती विक्रमराय याचे व राजाचे वितुष्ट आले आणि राजा आजारी असता याने वैद्यामार्फत त्याला विषप्रयोग करून ठार मारले.

रणधीर कंठीरव नरसराज वोडेयर (इ. स. १६३८-५९) – राज वोडेयर (दुसरा) याला पुत्रसंतान नसल्यामुळे त्याच्या नंतर राज वोडेयर (पहिला), याचा भाऊ बेट्टद चामराज याचा पुत्र रणधीर कंठीरव नरसराज हा गादीवर बसला. याचे शिक्षण पित्याच्या देखरेखीखाली झाले होते. तो शक्तिमान होता आणि तलवार चालवण्यातही वहाद्दर होता. त्याच्या या नैपुण्याविषयी एक कथा सांगतात, ती अशी–

त्रिचनापल्लीच्या राजाच्या पदरी एक मल्ल होता. तो स्वतःला अजिंक्य समजत होता. आणि याची निशाणी म्हणून त्याने आपला लंगोट किल्ल्याच्या दरवाजावर बांधून ठेवला होता. त्यामुळे लोकांना त्याच्या खालून जावे लागे. रणधीर कंठीरवाला ही गोष्ट समजली, तेव्हा त्याने त्या मल्लाचा नक्षा उतरवायचे ठरवले. एका यात्रेकरूच्या वेषाने तो त्रिचनापल्लीला गेला. त्याने तो लंगोट फाडून टाकला आणि नगरात जाऊन मल्लाला कुस्तीचे आव्हान दिले. राजाच्या समोर कुस्ती झाली. त्यात रणधीर कंठीरवाने आपल्या तलवारीने त्याचे शिर धडावेगळे केले. हा जय मिळवून परत येत असताना वाटेत त्याने तलवारीने संगजिऱ्याच्या खांबाचे दोन तुकडे केले.

याची कारकीर्द धामधुमीतच गेली. याचे सैन्य सदैव कोणाचा तरी हल्ला परतविण्यात किंवा कोणाच्या तरी मुलखावर स्वारी करण्यात गुंतलेले असे. याच्या कारकिर्दीच्या अखेरीला याच्या राज्याच्या सीमा उत्तरेला चेन्नपट्टण व तुरुवेकेरेपर्यंत, दक्षिणेला सत्यमंगलमपर्यंत आणि पश्चिमेला कूर्गपर्यंत भिडल्या होत्या.

कंठीरव हा दूरदृष्टीचा राज्यकर्ता होता. सेनापती वरचढ होऊ नयेत, म्हणून त्याने वारंवार ते बदलले. त्याच्या वीस वर्षांच्या कारकीर्दीत दहा सेनापती होऊन गेले. राज वोडेयरने सुरू केलेल्या राज्यपद्धतीचा त्याने बारकाईने अभ्यास केला आणि जमीनमहसूल गोळा करण्यासाठी, हिशेब व्यवस्थित ठेवण्यासाठी व प्रजेच्या रक्षणासाठी त्याने योग्य अधिकारी नेमले.

तो अत्यंत धार्मिक होता. त्याने श्रीरंगपट्टण, म्हैसूर, मेलकोटे, नंजनगुड, इ. ठिकाणी शिवाची व विष्णूची काही नवी मंदिरे बांधली, जुन्या मंदिरांचा जीर्णोद्धार केला आणि त्यांच्या खर्चा-साठी देणग्या दिल्या. कलाकारांना त्याने उदार आश्रय दिला आणि संस्कृत व कन्नड भाषांतील विद्वानांना त्याने सक्रिय प्रोत्साहन दिले. भास्कराचार्यांचे बेहर गणित, थिम्मरसाचे मार्कंडेय रामायण, गोविंद वैद्याचे कंठीरव नरसराजविजय हे ग्रंथ त्याच्याच कारकिर्दीत रचले गेले.

कंठीरवाला दहा राण्या होत्या. पण त्याला एकच पुत्र झाला आणि तोही वयाच्या पाचव्या वर्षी मरण पावला. कंठीरव स्वतः १६५९ मध्ये वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षी मरण पावला.

देवराज वोडेयर (इ. स. १६५९-१६७३) – कंठीरव नरसराजानंतर त्याचा पुतण्या, राज वोडेयरच्या सावत्र भावाचा मुलगा, देवराज हा गादीवर आला. त्या वेळी तो बत्तीस वर्षांचा होता. गादीवर आल्याबरोबर त्याला शत्रूंच्या हल्ल्यांना तोंड द्यावे लागले. प्रथम बिदनूरचा शिवप्पा नाईक व त्याचा मांडलिक श्रीरंग राजा यांनी मोठ्या फौजेनिशी राज्यावर चाल करून म्हैसूर शहराला वेढा घातला. पण देवराजाने त्यांचा हल्ला शौर्याने परतवून लावला. त्यानंतर मदुरेच्या नायक राजाने त्याच्या राज्यावर चाल केली. पण देवराजाने त्याचाही पराभव केला आणि उलट त्याचाच काही मुलूख हस्तगत केला. तसेच या शत्रूंकडून मिळालेल्या लुटीतील रत्नांनी त्याने आपले जोडे सजविले व समारंभप्रसंगी तो ते वापरू लागला. उरलेली काही लूट त्याने आपल्या सैनिकांना वाटली आणि काही रकमेतून देवळे, तलाव वगैरे बांधले. चामुंडेश्वरी टेकडीवर जाण्यासाठी त्याने हजार पायऱ्या बांधल्या व टेकडीच्या अर्ध्या वाटेवर ग्रानाइ-डाचा भव्य नंदी स्थापन केला.

आपल्या राज्यातून फिरणाऱ्या प्रवासी व यात्रेकरू लोकांसाठी त्याने मुख्य सडकांवर दर दहा मैलांवर एक धर्मशाळा, एक दगडी निवारा, वृक्षराजी आणि तलाव एवढ्या सोयी केल्या आणि मुख्य रस्त्यांच्या दुतर्फा छायेसाठी वृक्ष लावले. तो नेहमी दानधर्म करीत असे. प्रजेच्या हिताकडे लक्ष दिल्यामुळे प्रजा त्याच्यावर संतुष्ट होती. त्याच्या कारकिर्दीत म्हैसूर राज्याला साम्राज्याचा दर्जा प्राप्त झाला.

चिक्क देवराज वोडेयर (इ. स. १६७३-१७०४)–देव राजानंतर त्याचा पुतण्या चिक्क देवराज हा राजा झाला. राज्यावर आला, त्या वेळी तो अठ्ठावीस वर्षांचा होता. गादीवर बसल्यानंतर पाच दिवसांच्या आत त्याला मदुरेच्या चोक्कनाथ नायक या राजाच्या स्वारीला तोंड द्यावे लागले. त्या लढाईत

चोक्कनाथाचा पूर्ण पराभव केला आणि सत्यमंगलम व धारापुरम यांच्या राजांचा पराजय करून त्यांच्याकडून खंडणी वसूल केली. त्यानंतर इक्केरीच्या राजाशी त्याची लढाई झाली. पण तिच्यात चिक्क देवरायाला यश मिळाले नाही. त्यानंतर विजापूरच्या राजाशी मधूनमधून चकमकी झडतच होत्या. त्यांत कधी याला यश मिळे, तर कधी अपयश पदरात येई. इ. स. १६७७ मध्ये शिवाजीमहाराजानी याच्या राज्यावर चाल केली.याने त्यांना धैर्याने तोंड दिले आणि आपल्या राज्यातून त्यांच्या सैनिकांना घालवून दिले.

यानंतर चिक्क देवरायाने स्वतः मदुरा राज्यावर चाल केली आणि त्या राजाचे दोन किल्ले जिंकून घेतले. मग त्याने मगडी, मद्दुगिरी व कोरटगेरे ही गावे व त्यांच्या आसपासचा मुलूख जिंकून घेतला. इ. स. १६८२ मध्ये संभाजीने त्याच्यावर स्वारी केली. पण त्याने संभाजीचा पुरता मोड केला. इ. स. १६८६ मध्ये म्हैसूरचा सम्राट म्हणून तो स्थिरपद झाला व सर्व दक्षिण भारतावर त्याचा अंमल चालू झाला.

इ.स. १६८७ मध्ये तुमकूरच्या मोगल राजाने म्हैसूरवर स्वारी केली, पण त्याचा पराभव झाला. एकोजीने बंगलोर याला विकले. त्यामुळे बंगलोर म्हैसूर राज्याचा एक भाग बनले.

इ. स. १६९९ च्या सुमारास चिक्क देवराजाने औरंगजेबाच्या दरबारात आपला एक दूत पाठवला. औरंगजेबाने त्याचे चांगले स्वागत केले आणि त्याला राजा जगदेव अशी पदवी दिली. शिवाय त्याने एका मोहोरेवर राजा चिक्क देवराज मुहम्मद शायी अशी अक्षरे कोरून ती त्याला दिली.

चिक्क देवरायाने गादीवर आल्यावरोबर मंत्र्यांचे एक मंडळ सल्लामसलतीसाठी नेमले होते. आपल्या राज्यात त्याने टपालाची व्यवस्था सुरू केली. त्यायोगे लोकांची सोय झाली आणि सरकारलाही लोकांच्या हालचालींची माहिती मिळू लागली. त्याच्या सैन्यात बारा हजार घोडदळ व एक लाख पायदळ होते. शिवाय व्यवस्थित राज्यकारभारासाठी अनेक अधिकारी नेमलेले होते. या सर्वांचा खर्च भागवण्यासाठी पुष्कळ द्रव्याची गरज होती. त्याने जमीनमहसूल व इतर कर ठरवून दिले आणि कोणालाही लोकांच्या डोळ्यांवर येईल इतका पैसा साठवण्याची सवलत ठेवली नाही. या त्याच्या कृत्यामुळे काही लोक त्याच्यावर रुष्ट झाले व त्यातूनच त्याचा मुख्य अमात्य विशालाक्ष पंडित याचा खून झाला.

राज्यकारभारासाठी त्याने अठरा खाती पाडली होती. खेडेगावांतून शेती व उद्योगधंदे यांची वाढ व्हावी, म्हणून त्याने विशेष अधिकारी नेमले होते. सरकारी नोकरांचा पगार अर्धा पैशांत व अर्धा धान्याच्या स्वरूपात दिला जाई. प्रत्येकाने आपल्या उत्पन्नापेक्षा जास्त खर्च करू नये, असा आदेश त्याने काढला होता. आणि कोणी अधिक पैसे खर्च करताना आढळल्यास त्याला त्याबद्दल खुलासा द्यावा लागे. त्यामुळे सरकारी क्षेत्रातील भ्रष्टाचाराला बराच पायबंद बसला.

सरकारचे वार्षिक उत्पन्न सात लाख वीस हजार पागोडे होते. त्यानुसार अर्थमंत्र्याला रोज दुपारपर्यंत दोन हजार पागोडे सरकारी खजिन्यात भरावे लागत. ते भरल्याचे समजल्यावर मग राजा अन्नोदक ग्रहण करी. शेतीकडे चांगले लक्ष दिल्यामुळे त्याच्या खजिन्यात नऊ कोटी पागोडे जमा झाले व तो नवकोट नारायण म्हणून प्रसिद्ध झाला.

राज्यातील व्यापारवृद्धीकडेही त्याने चांगले लक्ष दिले. बंगलोर शहरात त्याने नव्या बाजारपेठा वसवल्या. तसेच बंगलोरच्या किल्ल्यात त्याने बारा हजार विणकर वसवले आणि त्यांनी विणलेले कापड तो बाहेरच्या पेठांतून पाठवू लागला. श्रीरंगपट्टण येथील शस्त्रास्त्रांचा कारखाना त्याने वाढवला आणि त्यात बंदुका व बंदुकीची दारू यांचे उत्पादन सुरू केले. तसेच, त्याने कावेरी नदीला श्रीरंगपट्टणजवळ बांध घालून दोन मोठे कालवे काढले.

राज्यावर आल्यावर त्याने गुंडलपेट येथे परवासुदेवाचे मंदिर बांधले व त्याच्या भोवती अनेक घरे बांधून ती योग्य लोकांना राहायला दिली. त्याशिवाय त्याने श्वेतवराह, गोपालकृष्ण, वरदराज, इ. अनेक देवतांची मंदिरे बांधली.

तो स्वतः विद्वान व कवी होता. त्याच्या नावावर चिक्कदेवराजबिन्नपम व गीतगोपालम हे दोन व इतरही काही ग्रंथ आहेत. त्याच्या कारकिर्दीत चिक्कुपाध्याय, तिम्मकवी, तिरुमलार्य, इ. अनेक कवी होऊन गेले आणि त्यांनी संस्कृत व कन्नड वाङ्मयात मोलाची भर घातली.

चिक्क देवराय हा एक आदर्श राजा होऊन गेला, असे त्याच्या कारकिर्दीवरून म्हणता येते. त्याला दहा राण्या होत्या. पण पुत्र मात्र एकच व तोही मुका होता. त्याला एक कन्याही होती.

कंठीरव नरसराज वोडेयर (इ.स.१७०४–१७१४)– चिक्क देवरायाचा मुका मुलगा त्याच्या नंतर गादीवर आला. त्याच्या वतीने त्याची आई व प्रधान तिरुमलेंयंगार यांनी कारभार चालवला. हा गादीवर आल्यावर औरंगजेबाने मोठ्या सैन्यानिशी म्हैसूरवर स्वारी केली, तेव्हा त्याने दीड कोटी रुपये देऊन त्याच्याशी तह केला.

दोड्डकृष्णराज वोडेयर (१७१४–१७३२)– कंठीरवाचा पुत्र त्याच्या नंतर गादीवर आला. त्या वेळी तो फक्त बारा वर्षांचा असल्यामुळे सर्व सत्ता सेनापती व मुख्य सर्वाधिकारी नंजराजिय्या यांच्या हातात गेली. तिचा दुरुपयोग करून त्यांनी वैयक्तिक स्वार्थ साधून घेतला. इ. स. १७२४ मध्ये अर्काटच्या नवा-

वाने इतर राजांच्या सहकार्याने म्हैसूरवर स्वारी केली. तेव्हा राजाने एक कोटी रुपये देऊन त्याच्याशी तह केला. त्यानंतर पहिल्या बाजीराव पेशव्याने म्हैसूरवर स्वारी केली, तेव्हा त्याने पेशव्यांचा पराभव केला.

हा राजाही धार्मिक वृत्तीचा होता. तसेच तो विद्वान आणि संगीत व वाङ्मय यांचा भोक्ता होता. अनेक विद्वानांना त्याने आश्रय दिला व अनेक मंदिरांना देणग्या दिल्या.

चामराज वोडेयर (इ. स. १७३२–१७३४) – दोड्डकृष्णराज निपुत्रिक असल्यामुळे त्याच्या विधवा राणीने चामराज वोडेयर या नातलगाला दत्तक घेऊन राज्यकारभार करायला सुरुवात केली. पण पुढे चामराज आणि सेनापती, प्रधान आणि सर्वाधिकारी ही तीन पदे संभाळणाऱ्या तीन भावांत तेढ उत्पन्न झाली. कारण ते तिघे मिळून प्रजेला फार त्रास देत होते. म्हणून त्याने सेनापती व सर्वाधिकारी यांना बडतर्फ करून त्यांच्या जागी नव्या नेमणुका केल्या. पण सेनापतीने बंड करून चामराजाला त्याच्या पत्नीसह कैदेत टाकले. तेव्हा विधवा राजमाता देवजम्मन्नी हिने आणखी एक मुलगा दत्तक घेतला व इम्मडी कृष्णराज वोडेयर या नावाने त्याला गादीवर बसवले.

इम्मडी कृष्णराज वोडेयर (इ. स. १७३४–१७५७) – याच्या कारकिर्दीत निजाम, पेशवे, फ्रेंच, इंग्रज, इ. अनेक शत्रूंनी म्हैसूरवर स्वाऱ्या केल्या. या वेळी हैदर अली या सैनिकाने राज्य सुरक्षित राखले. तो पुढे सेनापती झाला व राज्यकारभारही स्वतःच चालवू लागला. इ. स. १७६२ मध्ये त्याचा मृत्यू झाल्यावर त्याचा मुलगा टिपू सुलतान याने मात्र म्हैसूरचे राज्य बळकावले व तो स्वतः सुलतान झाला. टिपूला पदच्युत करून म्हैसूरचे राज्य हस्तगत करण्यासाठी महाराणी लक्षम्मण्णीने भगीरथ प्रयत्न व अनेक राजकीय डावपेच केले. शेवटी इंग्रजांच्या मदतीने तिने म्हैसूरवर पुन्हा आपला अंमल बसवला.

महाराणी लक्षम्मण्णी (इ. स. १७९९–१८१०) – ही एक अत्यंत कर्तबगार व राजकारणी स्त्री होती. हिचा विवाह महाराज कृष्णराज वोडेयर (२रा) याच्याशी झाला होता. त्या सुमारास हैदरने आपली सत्ता वाढवून राजसत्ता नाममात्र केली. विवाहानंतर सात वर्षांनी कृष्णराज मरण पावला व राजसत्तेचे आणि राजघराण्याचे रक्षण करण्याची जबाबदारी तिच्यावर पडली. सुदैवाने प्रधान तिरुमलराव व नारायणराव हे दोन राजनिष्ठ मंत्री तिला लाभले. त्यांच्या मदतीने मद्रासच्या इंग्रजी सत्तेशी तिने संधान बांधले व त्यांच्या मदतीने टिपू सुलतानाचा नाश केला. इंग्रजांशी झालेल्या तहानुसार म्हैसूरवर पुन्हा वोडेयर राजघराण्याची सत्ता स्थापन झाली. महाराणी लक्षम्मण्णी कृतकृत्य झाली. पुढे दहा वर्षे तिने अज्ञान युवराजाचा कारभार मोठ्या हुषारीने चालवला. इ. स. १८१० मध्ये ती मरण पावली.

मुम्मडी कृष्णराज वोडेयर (इ. स. १७९९–१८३१ व १८६७–१८६८) – इ. स. १८१० मध्ये मुम्मडी कृष्णराज सोळा वर्षांचाच होता. त्याचा दिवाण पूर्णिया हा १२ वर्षे राज्यकारभार चालवीत होता. त्या वेळी कोल हा म्हैसूर दरबारात इंग्रज रेसिडेंट म्हणून होता. पूर्णिया हा पुष्कळ वर्षे टिपूचा दिवाण होता. तो टिपूशी इतका एकनिष्ठ होता, की टिपूनंतर त्याच्या वंशजांकडे म्हैसूरचे राज्य राहावे व आपण दिवाणपदावर असावे, अशी त्याची इच्छा होती. पण त्याची पहिली इच्छा फलद्रूप झाली नाही. त्यामुळे नाराज होऊन तो राजाशी उद्धटपणे वागू लागला. म्हणून कृष्णरायाने अल्पवयी असूनही स्वतः राज्यकारभार पाहायचे ठरवले. पूर्णियाला त्याने बारा वर्षे दिवाणपदावर ठेवले होते. त्यानेही म्हैसूरचा दिवाणी व लष्करी कारभार उत्तम चालवला आणि राज्याच्या उत्पन्नात भर घातली. इ. स. १८११ साली दिवाणपद सोडताना खजिन्याचा हिशेब झाल्यावर त्याच्याकडे ४३ लाख रुपये येणे निघाले. कृष्णराजाने पूर्णियाला १९ लाखांची सूट देऊन उरलेले २४ लाख रुपये त्याच्याकडून वसूल केले.

इ. स. १८०० नंतर इंग्रजांनी भारताची सत्ता हस्तगत करण्याच्या हेतूने संस्थानिकांना नालायक, चैनी, व्यसनी ठरवण्याचे आणि निपुत्रिक राजांना व संस्थानिकांना दत्तक पुत्र घेण्यास हरकती घेण्याचे धोरण स्वीकारले. इंग्रजांनी त्यांचा राज्यकारभार चालवण्यासाठी आपला कमिशनर व देखरेख करण्यासाठी रेसिडेंट नेमण्यास सुरवात केली. त्याप्रमाणे कृष्णराजाला नालायक ठरवून म्हैसूर दरबारात इंग्रजांनी आपले रेसिडेंट व कमिशनर नेमले. इ. स. १८२५ मध्ये रेसिडेंट कोलने कृष्णराजाला नालायक ठरवले व तो पेंढारी आणि पाळेगार यांच्या लूटमारीत सामील असल्याचा अहवाल इंग्लंडला कंपनीच्या डायरेक्टरांकडे पाठवला. त्यानुसार इ. स. १८३१ मध्ये कर्नल ब्रिग्ज व सी. एम्. लुशिंग्टन यांना म्हैसूरचा राज्यकारभार पाहण्यास नेमल्याचे कृष्णराजाला कळवण्यात आले. कृष्णराजाने शांतपणे सर्व अधिकार इंग्रज कमिशनरच्या हाती दिले. पुढे १८३४ मध्ये लॉर्ड बेंटिंकने आपल्या सदसद्विवेकबुद्धीला अनुसरून 'राजा सुधारला आहे व तो राज्यकारभार चांगला करील' असा अहवाल पाठवला; पण त्याचा काही उपयोग झाला नाही. पुढे १८५७ सालचे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाले. त्या वेळी कृष्णराजाने ते मोडण्यासाठी प्रयत्न केले. पुढे राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. त्या वेळी त्याने डॉ. कँपबेलबरोबर राणीला रत्नहार, म्हैसुरी घोडे, गायी, बैल असा नजराणा पाठवला. पण कृष्णराजाला राज्य काही परत मिळाले नाही. पण डॉ. कँपबेल

बक्षी नरसप्प या दोघांनी खूप परिश्रम करून १८६७ मध्ये कृष्णराजाला राज्य परत मिळवून दिले.

कृष्णराज १७९९ साली अल्पवयात राजा झाला. इ. स. १८१० ते १८३१ पर्यंत तो राजा होता. नंतर १८३१ ते १८६७ पर्यंत त्याचे राज्यपद गेले होते. पुन्हा १८६७ ते १८६८ या कालात त्याने राज्य केले. इ. स. १८६८ च्या मार्चमध्ये तो मरण पावला. या कालावधीत त्याने अनेक लोकोपयोगी कामे केली.

टिपूने उद्‌ध्वस्त केलेली अनेक देवालये त्याने दुरुस्त केली व काही नव्यानेही बांधली. त्यांच्या खर्चाकरता त्याने इनामे दिली. त्याने अनेक अग्रहार बांधून त्यांना आपल्या नातलगांची नावे दिली व ते विद्वान ब्राह्मणांना दिले. त्यांना थोडी शेतजमीनही दिली आणि तिच्यावर अल्प सारा बसवला किंवा तो माफ केला. प्रवाशांच्या सोयीसाठी त्याने धर्मशाळा बांधल्या, सडकांच्या दुतर्फा झाडे लावली व तलाव बांधले. गोसाव्यांसाठी त्याने एक धर्मशाळा बांधली व त्यांना फुकट अन्न-वस्त्र देण्याची व्यवस्था केली. त्याने अनेक प्रकारची दाने दिली व वाजपेयासारखे यज्ञही केले. राजधानीत त्याने मोफत सार्वजनिक दवाखाने सुरू केले. एक प्राणिसंग्रहालयही त्याने तयार केले. त्याने नद्यांवर पूल बांधले आणि म्हैसूर नगरात लोकरंजन महाल व जगन्मोहन महाल असे प्रेक्षणीय महाल बांधले.

ग्रंथरचनेच्या क्षेत्रातही त्याची कामगिरी महनीय आहे. त्याने अनेक विद्वानांना आश्रय दिला होता. त्याच्या कारकिर्दीत श्रीतत्त्वनिधी, गणितसंग्रह, स्वरचूडामणी, सांख्यरत्नकोश, कृष्णकथासंग्रह, चतुरंगसारसर्वस्व, इ. अनेक शास्त्रीय, धार्मिक व वाङ्मयीन ग्रंथ लिहिले गेले. म्हैसुरात त्याने इंग्रजी शाळा चालू केली व तिची व्यवस्था इंग्रज विद्वानांकडे दिली. स्वतःही त्याने त्या शाळेच्या प्रगतीकडे लक्ष पुरवले. अशा रीतीने कार्य करून त्याने खूप कीर्ती मिळवली.

चामराजेंद्र वोडेयर (इ. स. १८६८ – १८९४) – हा कृष्णराजाचा दत्तक पुत्र होता. राज्यावर आला तेव्हा तो अल्पवयीन होता. पुढे अठरा वर्षांचा झाल्यावर १८८१ पासून तो राज्यकारभार पाहू लागला. इंग्रज सरकारने त्याला वारस म्हणून मान्यता देताना त्याच्यावर अनेक अटी लादल्या होत्या. त्यानुसार इंग्रजांनी जवळजवळ सर्व सत्ता आपल्या हाती ठेवली होती आणि राजा हा नाममात्र होता.

इंग्रज सरकारच्या अटींना अनुसरून चामराजाने प्रजेला उद्देशून एक जाहीरनामा काढला. त्याने रंगाचार्लू दिवाण, थुंबू चेट्टी, कृष्णराव व सभापती मुदलियार यांचे एक कौन्सिल बनवले. रंगाचार्लूंने दिवाण व हायकोर्टजज्ज म्हणून वीस वर्षे काम केले. त्याने बारकाईने लक्ष ठेवून राजवाड्यातील गैरकारभार बंद केला व गुन्हेगारांना कडक शिक्षा दिल्या. तसेच त्याने युरोपियन अधिकारी काढून टाकून, त्यांच्या जागी कमी पगारावर हिंदू अधिकारी नेमले. त्याने १४४ प्रतिनिधींची लोकसभा स्थापन केली. मध्यंतरी १८७५ ते १८७७ अशी तीन वर्षे म्हैसुरात फार मोठा दुष्काळ पडला व त्यात दहा लाख लोक मरण पावले. त्या वेळी दुष्काळी कामे काढल्यामुळे सरकारला पुष्कळ कर्ज झाले होते. ते त्याने एकेचाळीस वार्षिक हप्त्यांनी फेडण्याचे ठरवले. राज्यातही त्याने अनेक सुधारणा केल्या. त्याच्या नंतर इ. स. १८८३ ते १९०० या काळात शेषाद्री अय्यर याने दिवाण म्हणून काम केले. त्याने राज्यात शैक्षणिक सुधारणा केल्या; तसेच पाणीपुरवठ्याच्या योजना हाती घेऊन त्या पार पाडल्या; राज्यात अनेक दवाखाने काढले. त्याच्या काळात राज्याचे महसुली उत्पन्न वाढले.

कृष्णराज वोडेयर (४ था) (इ. स. १९०२-१९४०) – पित्याच्या मृत्यूच्या वेळी हा अज्ञान होता. म्हणून त्याची आई महाराणी हिने सुमारे आठ वर्षे राज्यकारभार चालवला. इ. स. १९०२ पासून तो स्वतः कारभार करू लागला. त्याच्या कारकिर्दीत कृष्णमूर्ती, माधवराव, आनंदराव, विश्वेश्वरय्या, कंठराज उर्स, बानर्जी व सर मिर्झा इस्माइल एवढे दिवाण होऊन गेले. कृष्णमूर्तीने तलाव व कालवे यांच्या द्वारे पाणीपुरवठा करून शेती सुधारली आणि शिक्षणाचा प्रसार केला. त्याने कावेरी वीजप्रकल्प सुरू केला. माधवरावाने ग्रामपंचायती स्थापून स्वराज्याचा पाया घातला. त्याने लोकनियुक्त कायदेकौन्सिलची स्थापना केली. तसेच, दसऱ्याच्या समारंभात औद्योगिक व शेतकी प्रदर्शने भरवून लोकांना शेती व औद्योगिक हत्यारे यांची माहिती देण्याची व्यवस्था केली. आनंदरावाने सर्वांगीण आर्थिक सुधारणेसाठी प्रयत्न केले. विश्वेश्वरय्यांनीही राज्यात अनेकविध सुधारणा केल्या. त्यांनी कन्नमवडी धरण बांधायला सुरवात करून सुमारे एक लाख एकर जमीन बागायती बनविण्याची योजना केली; शाळांच्या संख्येत वाढ करून म्हैसूर युनिव्हर्सिटी स्थापन केली; रेशमाच्या कापडाचा, चंदनी तेलाचा व लोखंडाचा असे कारखाने उभारले; व्यापारवृद्धीसाठी प्रयत्न केले व अनेक नव्या सडका आणि रेल्वेमार्ग बांधले. मिर्झा इस्माइलने औद्योगीकरणाचे कार्य पुढे चालवले व पुष्कळ गावांना विजेचा पुरवठा केला.

महाराज कृष्णराज हा स्वतः दयाळू, धार्मिक व कर्तव्यतत्पर राजा होता. त्याने हिंदू, ख्रिश्चन, मुसलमान या सर्वांच्या देवस्थानांना मदत दिली. स्वतः त्याने सर्व भारतातील तीर्थयात्रा केल्या. इतकेच नव्हे; तर मानस सरोवरातील जलाने सूर्याला अर्घ्यप्रदान केले. उत्तम राज्यकारभार करून तो १९४० मध्ये मरण पावला.

**जयचामराज वोडेयर** (इ. स. १९४०)– चौथा कृष्णराज याला पुत्र नसल्यामुळे, त्याचा पुतण्या जयचामराज हा म्हैसूरच्या गादीवर बसला. याचा जन्म १९१९ साली झाला व शिक्षण रॉयल स्कूल, महाराजा कॉलेज या ठिकाणी झाले. त्याने पदवीही मिळवली. हा गादीवर आला, तेव्हा सर मिर्झा इस्माइल हा दिवाण होता. नंतर तीन महिन्यांनी तो निवृत्त झाला व एन्. माधवराव हा दिवाण झाला. याच्या कारकिर्दीतही लोककल्याणकारी योजना चालू राहिल्या. याच्या कारकिर्दीत १९३९ ते १९४५ या कालात दुसरे महायुद्ध चालू होते. त्या वेळी इंग्रज सरकारला याने पुष्कळ आर्थिक व सैनिकी मदत केली. इ. स. १९४५ ते १९४९ या काळात सर रामस्वामी मुदलियार हे दिवाण होते. याच्या काळातही म्हैसूर राज्यात शैक्षणिक, औद्योगिक प्रगती चालू होती. तलाव, कालवे, धरणे यांनी शेतीला व्यवस्थित पाणीपुरवठा चालू होता. कोलारच्या खाणीतून सोने निघत होते. सर्वत्र वीज खेळवली जात होती. वृंदावन बागेसारखी अप्रतिम बाग भारतातील सर्व लोकांचे आकर्षण ठरली होती. सर्वच क्षेत्रात संस्थानाची प्रगती चालू होती.

इ. स. १९४७ मध्ये भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर भारतातील सर्व संस्थाने खालसा करण्यात आली. त्यानुसार म्हैसूर संस्थानही खालसा करण्यात आले व म्हैसूरचे स्वतंत्र राज्य स्थापन करण्यात आले. राजे जयचामराज यांना २६ जानेवारी १९५० रोजी राजप्रमुख म्हणून नेमण्यात आले. नंतर त्यांना राज्यपाल नेमण्यात आले.

विश्व हिंदू परिषदेचे ते पहिले अध्यक्ष होते. १९७४ मध्ये त्यांचा मृत्यू झाला. अशा रीतीनें म्हैसूरवर राज्य करणाऱ्या वोडेयर राजघराण्याचा अंमल संपुष्टात आला. [ हिस्टरी ऑफ मैसोर अ‍ॅण्ड द यादव डिनॅस्टी– जी. आर्. जोसीअर ]

## व्यंजनद्वादशी

एक व्रतोत्सव. मार्गशीर्ष शुद्ध द्वादशीला विष्णूची षोडशोपचार पूजा करून अन्नकूटाप्रमाणे त्याला अनेक खाद्य पदार्थ अर्पण करावे आणि विष्णुभक्तांना प्रसाद द्यावा, असे सांगितले आहे. व्रतधारी व्यक्तीने या दिवशी नक्त भोजन करायचे असते. [ व्र. प. ]

## व्यंतर देवता

अतिमानवी देवतांचा एक प्रकार. हिंदू, बौद्ध व जैन साहित्यात या देवतांच्या नामावली आढळतात. बौद्ध व जैन वाङ्मयात यक्ष, नाग, राक्षस, गंधर्व, असुर, गरुड, किन्नर, महोरग, भूत, पिशाच, इ. देवतांचा व्यंतर देवतांत समावेश केला आहे. हिंदूंच्या पौराणिक साहित्यामध्येही या देवता असून, शिवाय कुंभांड, कवंध, दैत्य, दानव, अप्सरा, सिद्ध, साध्य, विद्याधर, प्रमथ अशा अन्य देवताही आहेत.

हे सर्व आदिवासींचे म्हणजे आर्यांच्या पूर्वीच इथे वसलेल्या जमातींचे देव होत, असे एक मत आहे. आर्य लोक यांहून निराळ्या देवतांची उपासना करीत होते. पुढे कालांतराने त्यांतून अनेक देवता व त्यांचे उपासनापंथ निर्माण झाले. त्यामुळे आर्यांहून अन्य लोकांच्या देवतांना गौण स्थान मिळाले. जैनसाहित्यात अशांनाच व्यंतर देवता म्हटले आहे. मुख्य देवतांचे सेवक किंवा शत्रू म्हणून त्यांची वर्णने पुराणांत आढळतात. शिल्पातही या देवतांचे दर्शन अशाच प्रकारे घडते. पाहा – देवता. [ डे. हिं. इ. ]

## व्यतीपात

पंचांगातल्या २८ योगांपैकी एक योग. जेव्हा सूर्य व चंद्र परस्पर संमुख म्हणजे १८० अंशांच्या अंतरावर येतात त्या कालाला व्यतीपात व त्या दिवसाला व्यतीपात-दिन म्हणतात. हा दिवस युगादी असून, श्राद्धाला उत्तम आहे. मात्र हा योग शुभकर्मांना अशुभ मानलेला आहे. [ पु. इं. ]

## व्यतीपातजननशांती

व्यतीपात योग असताना मुलाचा जन्म झाल्यास अरिष्ट ओढवते, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. ते अरिष्ट दूर होण्यासाठी ही शांती करतात. गोमुखप्रसवाचा विधी केल्यानंतर संकल्पपूर्वक या शांतीला सुरवात करतात. तांदुळांच्या राशीवर कलश मांडून त्याच्यावर पूर्णपात्र ठेवतात. नंतर सोन्याच्या सूर्यप्रतिमेवर सूर्याचे आवाहन करतात. या कर्मात सूर्य हीच प्रधान देवता आहे. सूर्याच्या दक्षिणेला अग्नी आणि उत्तरेला रुद्र या देवतांचे आवाहन करतात. आवाहित देवतांची यथाविधि पूजा केल्यावर कलशाला स्पर्श करून सौर मंत्र, मृत्युंजयमंत्र, पुरुषसूक्त, इ. सूक्तांचा आणि मंत्रांचा जप करतात.

वरील देवतांच्या पश्चिमेला एका स्थंडिलावर अग्निस्थापना करून त्याच्या ईशान्येला पीठावर ग्रहांचे आवाहन व पूजन करतात. प्रधानहोमाच्या वेळी नवग्रहांसाठी समिधा, भात आणि आज्य यांच्या आहुती देतात. सूर्य, अग्नी आणि रुद्र या प्रधान देवतांसाठी त्याच हविर्द्रव्यांनी आहुती देतात. मृत्युंजयासाठी तिळाच्या एकशे आठ आहुती देतात. शेवटी यजमान व यजमानपत्नी यांना कलशातील जलाने अभिषेक करतात. आचार्याला वस्त्र, कुंडले व अंगठी आणि ऋत्विजांना दक्षिणा देऊन शांतिकर्म समाप्त करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## व्यतीपात व्रत

एक काम्य व्रत. मार्गशीर्ष महिन्यात ज्या दिवशी व्यतीपात योग असेल, त्या दिवशी या व्रताला प्रारंभ करतात. त्या दिवशी सकाळी नदीवर

जाऊन, पंचगव्य घेऊन स्नान करतात. नंतर साखरेने भरलेल्या कलशावर ताम्रपात्र ठेवतात. त्यात एक सुवर्णकमळ ठेवतात आणि त्याच्यावर व्यतीपाताची अष्टादशभुज अशी सोन्याची नराकृती करून तिची स्थापना करतात. मग तिची षोडशोपचारे पूजा करतात. त्या दिवशी उपवास करून ' व्यतीपात ते नमः ' या मंत्राचा जप करतात. फल – पापनाश व समृद्धी.

प्रत्येक महिन्यात व्यतीपात योग असेल, त्या दिवशी हे व्रत करतात. तेरा वेळा व्रत केल्यावर चौदाव्या वेळी व्रताचे उद्यापन करतात. त्या वेळी वस्त्रवेष्टित अशी पुष्पमंडपिका तयार करतात व तिच्यात सर्वतोभद्रमंडलावर ब्रह्मादी मंडलदेवतांची पूजा करतात. त्यांच्या समोर साखरेने भरलेल्या कुंभावर ताम्रपात्र किंवा मातीचे पात्र ठेवून, त्यात व्यतीपातासहित लक्ष्मीनारायणाच्या सुवर्णप्रतिमेची स्थापना करतात. मग सर्व मूर्तींची यथाविधि पूजा करतात. त्यानंतर

गृहाणार्घ्यं व्यतीपात सोमसूर्यसुत प्रभो ।
सप्तजन्मकृतं पापं त्वत्प्रसादात् प्रणश्यतु ॥

हा मंत्र म्हणून शेवटी अर्घ्य देतात. मग पलाश व अर्क (रुई) यांच्या समिधा, घृत व तीळ या द्रव्यांचा होम करतात. आचार्याला गाय दान देतात व तेरा ब्राह्मणांना भोजन घालून दक्षिणा देतात. एवढ्याने व्रतविधी पुरा होतो.

व्यतीपाताच्या उत्पत्तीसंबंधी वराहपुराणात एक कथा दिली आहे, ती अशी – एकदा चंद्र बृहस्पतिपत्नी तारा हिचे हरण करून तिला नेत असता, सूर्याने त्याला पाहिले व तसे न करण्याविषयी त्याला सांगितले. पण चंद्राने त्याचे म्हणणे ऐकले नाही व तो तसाच पुढे जाऊ लागला. तेव्हा सूर्य त्याच्याकडे रागाने पाहू लागला. चंद्रानेही आपली क्रोधपूर्ण नजर सूर्यावर रोखली. त्या दोघांच्या नजरांच्या परस्परांवर होणाऱ्या संपातामुळे एक अक्राळविक्राळ आणि तोंड वासून वस्तुजाताला गिळंकृत करायला निघालेला तेजस्वी पुरुष निर्माण झाला. तोच व्यतीपात होय. त्याने आपली भूक कशी शमन करावी, ते चंद्र-सूर्यांना विचारले. तेव्हा त्यांनी सांगितले, की तू दुष्ट व पापी लोकांचे भक्षण करून तुझी भूक भागव. जो कोणी तुझे अस्तित्व असता स्नान, दान, जप, होम, इ. करील, ते कितीही अल्प असले तरी, त्याला त्याचे फळ अनंत पटीने मिळेल. [ हि. ध.; व्रतराज ]

**व्यभिचार** स्त्री-पुरुषांच्या अनैतिक संबंधाला व्यभिचार असे नाव आहे. हा एक सामाजिक गुन्हा असून, स्मृतिग्रंथांत त्याला शिक्षा सांगितलेली आहे. ब्राह्मण स्त्रीने शूद्र पुरुषाशी व्यभिचार केल्यास, राजाने तिला कुत्र्यांकडून फाडून खाववावे आणि क्षत्रिय किंवा वैश्य पुरुषाशी समागम केल्यास, तिचे सक्तीने मुंडण करावे व तिला गाढवावरून धिंड काढण्याची शिक्षा द्यावी, असे स्मृतिचंद्रिका आणि व्यवहारमयूख या ग्रंथांत सांगितले आहे.

पुरुषाने जर आपल्याच वर्णातील एखाद्या स्त्रीशी अनैतिक संबंध ठेवला, तर त्याला काही धर्मशास्त्रकारांनी वधदंडाची शिक्षा सांगितली आहे. स्मृतिचंद्रिकेत मात्र अशा पुरुषाची सर्व मालमत्ता जप्त करून त्याची गाढवावरून धिंड काढावी व त्याचे लिंग आणि वृषण कापून टाकावे, असे सांगितले आहे. खालच्या वर्णातील स्त्रीशी समागम केल्यास पुरुषाला यापेक्षा निम्मी शिक्षा सांगितली आहे.

खालच्या वर्णातील पुरुषाने श्रेष्ठ वर्णाच्या स्त्रीशी तिच्या संमतीने समागम केल्यास, स्त्रीला नाक-कान कापण्याची व पुरुषाला वधाची शिक्षा सांगितली आहे. यमाच्या मते स्त्रीला एवढी शिक्षा न देता तिचा फक्त त्याग करावा. कात्यायनाच्या म्हणण्याप्रमाणे पुरुषाच्या शिक्षेच्या निम्मी शिक्षा स्त्रीला द्यावी. म्हणजे पुरुषाला जर वधाची शिक्षा मिळाली, तर स्त्रीचे नाक-कान कापावे आणि पुरुषाला जर दंड झाला, तर त्याच्या निम्मा दंड स्त्रीला व्हावा.

माता, मावशी, सासू, मामी, आत्या, मित्रस्त्री, शिष्यस्त्री, बहीण, तिची मैत्रीण, सून, मुलगी, आचार्यपत्नी, सगोत्र स्त्री, आश्रित स्त्री, राणी, प्रव्रजिता स्त्री, दाई, साध्वी व श्रेष्ठ वर्णाची स्त्री यांच्याशी समागम केल्यास ब्राह्मण वगळून इतर वर्णातील पुरुषाला लिंगच्छेदनाचीच शिक्षा द्यावी, असे नारद म्हणतो. एखाद्या पुरुषाने बलाने एखाद्या स्त्रीशी समागम केल्यास त्याला वधाची शिक्षा सांगितली आहे. तसेच, पुरुषाने फसवून एखाद्या स्त्रीशी समागम केल्यास त्याच्या कपाळावर भगचिन्ह काढून, त्याला गावातून हाकलून द्यावे, असे म्हटले आहे. अशा प्रकारात स्त्रीला शिक्षा सांगितलेली नाही. पण तिला कृच्छ्र किंवा पराक प्रायश्चित्त घ्यावे लागे आणि प्रायश्चित्त घेईपर्यंत तिला चांगला वेष किंवा अलंकार घालणे आणि पलंगावर झोपणे या गोष्टी वर्ज्य असत. बलात्कार आणि व्यभिचार यांबद्दलच्या शिक्षेचा कमी-अधिकपणा, स्त्री व पुरुष यांचा वर्ण, स्त्री विवाहित किंवा अविवाहित, यावर आणि ती संरक्षित आहे किंवा नाही, या गोष्टींवर अवलंबून असे. याज्ञवल्क्याने या गुन्ह्याबद्दल दंडाची शिक्षा सांगितली आहे.

ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य स्त्री शूद्र पुरुषाशी रत झाली असेल आणि तिला जर अपत्यप्राप्ती झाली नसेल, तर ती प्रायश्चित्त घेतल्यावर शुद्ध होते. पण अशा स्त्रीला धार्मिक आणि कौटुंबिक कृत्यांचा अधिकार राहत नाही. तसेच, संपत्तीवरचाही तिचा हक्क जातो. मात्र पुन्हा ऋतुप्राप्ती झाल्यावर तिला पूर्वीचा

दर्जा प्राप्त होतो. पतीचा शिष्य किंवा गुरू व अगदी हीन दर्जाचा पुरुष, यांच्याशी व्यभिचार करणाऱ्या आणि पतीला ठार मारण्याचा प्रयत्न करणाऱ्या स्त्रीचा त्याग करावा, असे याज्ञवल्क्यस्मृतीत म्हटले आहे. पण इथे संपूर्णतया त्याग अभिप्रेत नाही, असे मनूचे मत आहे. मनूच्या मताप्रमाणे व्यभिचार हे एक उपपातक असून, प्रायश्चित्ताने त्याची निष्कृती होते. देवल आणि अत्री यांसारख्या स्मृतिकारांनी तर व्यभिचारी स्त्रीला दंडही सांगितलेला नाही. इतर वर्णांतील पुरुषाशी व्यभिचार केल्यामुळे स्त्रीला गर्भसंभव झाल्यास प्रसूती होईपर्यंत किंवा तसे नसल्यास पुढील मासिक पाळीपर्यंत ती अशुद्ध राहते आणि त्यानंतर आपोआप शुद्ध होते, असे त्यांचे मत आहे. [ हि. ध. ]

**व्यवहारविवादजयद यंत्र** व्यवहारात उत्पन्न झालेले भय नष्ट व्हावे आणि वादविवादात यशप्राप्ती व्हावी, म्हणून या यंत्राचा प्रयोग करतात. त्यासाठी भूर्जपत्रावर अष्टदलयुक्त चौकोन काढतात. चतुष्कोणात प्रारंभी ह्रीं मां ह्रीं ही तीन बीजाक्षरे लिहून त्याखाली साध्यनाम लिहितात. मग दक्षिण, पश्चिम, उत्तर व पूर्व या दिशांना असणाऱ्या पद्मदलांत अनुक्रमे रोध, स्तंभ, क्षोभ व मोह ही बीजे आणि चारही उपदिशांच्या पद्मदलांत क्ष हे बीज लिहितात. अशा प्रकारे यंत्र तयार झाल्यावर ते शरावसंपुटात ठेवून त्याची गंध-पुष्पादी पूजोपचारांनी यथाविधि पूजा करतात. आणि अष्ट दीपांनी नीराजन करतात. नंतर आठ लोकपालांची पूजा करून कुमारिकांना भोजन देतात. मग अष्ट दिशांना बलिदान करतात. जोपर्यंत कार्यसिद्धी होत नाही, तोपर्यंत हा पूजाविधी चालू ठेवतात. प्रयोग यशस्वी झाल्यावर साधकाला जय प्राप्त होतो आणि राजकुलात अधिक प्रतिष्ठा लाभते. असा या यंत्रराजाचा विलक्षण प्रभाव आहे. [ यंत्रचिंतामणि ]

**व्यश्व आंगिरस** आंगिरस कुळातील एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील सव्विसावे सूक्त याने रचले आहे. अश्विनौ व वायू यांची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. प्रस्तुत सूक्तात व्यश्व म्हणून त्यांचा उल्लेख आढळतो. याची एक ऋचा (ऋ. ८.२६.७) अशी –

> **उप नो यातमश्विना राया विश्वपुषा सह ।**
> **मघवाना सुवीरावनपच्युता ॥**

अर्थ – हे धनवान, सामर्थ्यवान आणि अच्युत अशा अश्विनी कुमारांनो, सर्व पोषक धनासह तुम्ही आमच्याकडे या.

पंचविंश ब्राह्मणात या नावाचा एक सामद्रष्टाही निर्दिष्ट आहे (१४.१०.९). [ प्रा. च. को. ]

**व्याकरण** कोणत्याही भाषेच्या अंगप्रत्यंगांचे विश्लेषण व विवेचन ज्यात केले जाते, ते व्याकरण होय. व्याकरणाचा व्युत्पत्तिलब्ध अर्थ असा – 'व्याक्रियन्ते शब्दा अनेन इति व्याकरणम्' = ज्याच्या द्वारे अपशब्दांपासून सुशब्द वेगळे काढले जातात किंवा ज्याच्यापासून साधुशब्दांचे ज्ञान होते, ते व्याकरण होय. व्याकरणाचे दुसरे नाव शब्दानुशासन असे आहे. शब्दांचे अनुशासन करणे म्हणजे शब्दसिद्धी करणे हे व्याकरणाचे प्रधान कार्य असते. प्रकृती व प्रत्यय अशा उभय अंगांनी शब्दाचे स्वरूप व त्याचा अर्थ निश्चित करणे, यासाठी व्याकरणशास्त्राची प्रवृत्ती आहे. कोणत्या शब्दाचा कशा प्रकारे प्रयोग करावा हे व्याकरणावरून कळते. कोणत्याही भाषेत शब्दांची प्रवृत्ती स्वभावसिद्ध असते. शब्द व्याकरणाच्या आदेशानुसार चालत नाहीत. भाषेची प्रवृत्ती लक्षात घेऊन शब्दांचा प्रयोग कसा करावा, या विषयी व्याकरण केवळ निर्देश करते. व्याकरण भाषेवर सत्ता चालवीत नसून, तिची स्थिती व प्रवृत्ती लक्षात घेऊन लोकशिक्षण करते.

जगातल्या उपलब्ध साहित्यात ऋग्वेद हा आद्यग्रंथ आहे. आजतागायत त्याचे महत्त्व अबाधित राहिले आहे. हा वेद अभ्यासूंना सुगम व अर्थबोधक व्हावा, यासाठी व्याकरणाची गरज निर्माण झाली. या बाबतीत पतंजलीने एक जनश्रुती सांगितली आहे, ती अशी–

एकदा प्रबुद्ध देव देवाधिपती इंद्राकडे गेले व प्रार्थना करून म्हणाले. 'वेद ही आमची भाषा आहे. पण ती अव्याकृत आहे. तिचे व्याकरण व्हायला हवे. हे काम तुम्ही करावे.' इंद्राने ते मान्य केले व प्रत्येक पद मध्ये तोडून प्रकृति-प्रत्ययभेदांनी व्याकरण निर्माण केले. अशा प्रकारे भारतात सर्वप्रथम व्याकरणविद्येचा जन्म झाला.

पाणिनीय शिक्षेत वेदाची सहा अंगे सांगितली असून, व्याकरणाला वेदपुरुषाचे मुख मानले आहे. यावरून षडंगांत व्याकरणाला प्राधान्य असल्याचे कळते. मुखावाचून भोजनादी व्यवहार होत नाहीत आणि ते न झाल्यास शरीरपोषण होत नाही, तद्वत व्याकरणावाचून वेदपुरुषाची शरीररक्षा आणि स्थिती असंभाव्य आहे. हे जाणूनच प्राचीन ऋषींनी व्याकरणाचे महत्त्व अनेक मुखांनी कथन केले आहे.

वररुचीने व्याकरणशास्त्राच्या अध्ययनाची पुढील पाच प्रयोजने सांगितली आहेत–

(१) रक्षा – व्याकरणाच्या अध्ययनाचे मुख्य उद्दिष्ट वेदांचे रक्षा करणे, हे आहे. वेदरक्षणाचा मुख्य भार वैयाकरणांच्या शिरावरच आहे.

(२) ऊह – नव्या पदांची कल्पना.

(३) आगम– स्वतः श्रुती हीच व्याकरणाच्या अध्ययनासाठी प्रमाणभूत आहे. श्रुतिप्रामाण्याचा स्वीकार करून व्याकरणाचे अध्ययन करणे, हे प्रत्येक द्विजाचे कर्तव्य आहे.

(४) लघू – लघुतेसाठीही व्याकरणाचे अध्ययन अवश्य आहे. संस्कृत भाषेच्या प्रत्येक शुद्ध शब्दाचे अध्ययन करायचे, तर ती गोष्ट एका जन्मात पुरी होणारी नाही. त्यासाठी व्याकरण हाच एक लघू उपाय आहे.

(५) असंदेह– वैदिक विषयांच्या संदर्भात उत्पन्न होणाऱ्या संदेहाचे निराकरण व्याकरणच करू शकते.

वरील पाच प्रयोजनांव्यतिरिक्त पतंजलीने काही अन्य प्रयोजनेही सांगितली आहेत. त्यांतली काही अशी–

(१) अपभाषण– अशुद्ध शब्द उच्चारले जाणार नाहीत असा मार्ग व्याकरणच दाखवते.

(२) दुष्टशब्द– शब्दांच्या शुद्धाशुद्धतेचे ज्ञान व्याकरणाच्या अधीन आहे.

(३) अर्थज्ञान– वेदांचा अर्थ समजण्यासाठी व्याकरणाचे ज्ञान आवश्यक आहे.

(४) धर्मलाभ– जो मनुष्य भाषेच्या व्यवहारात शुद्ध शब्दांचा प्रयोग करतो, तो स्वर्गलोकी अनंत फल मिळवतो. याउलट जो सदैव अपशब्दच वापरतो, तो पापाचा धनी होतो.

गोपथ ब्राह्मणात प्राचीन व्याकरणाच्या विषयांचा निर्देश केलेला आढळतो. धातू, प्रातिपदिक, नाम, आख्यात, लिंग, वचन, विभक्ती, प्रत्यय, स्वर, उपसर्ग, निपात, मात्रा, वर्ण, अक्षर, पदसंयोग, स्थानानुप्रदान, इ. विषय त्यात दिले आहेत. हे सगळे त्या शास्त्रातले मान्य असे पारिभाषिक शब्द आहेत. त्यावरून असे कळते, की गोपथ ब्राह्मणाच्या पूर्वकाली या शास्त्राची बरीच वाढ झाली होती.

शाकटायनाने आपल्या ऋक्तंत्रात व्याकरणाची परंपरा सांगितली आहे– पहिल्या प्रथम ब्रह्मयाने बृहस्पतीला व्याकरण उपदेशिले. बृहस्पतीने ते इंद्राला दिले. इंद्राने भरद्वाजाला, भरद्वाजाने ऋषींना आणि ऋषींनी ते ब्राह्मणांना दिले. त्यापूर्वी व्याकरणाचा अभाव होता.

यावरून संस्कृत भाषेचा आद्य व्याकरणकार इंद्र होता, हे सिद्ध होते. त्याच्या व्याकरणाला ऐंद्र व्याकरण म्हणतात.

अग्निपुराणात ३४९ ते ३५९ या ११ अध्यायांत व्याकरणाची माहिती दिली आहे. त्यात स्कंद (कार्तिकस्वामी), कात्यायन ऋषीला व्याकरणाचे सार सांगत आहे, असे सांगून अइउण्, ऋॡक्, इ. चौदा माहेश्वरसूत्रे, प्रत्याहार, संधी, शब्दरूपावली, कारक, समास, तद्धित, उणादिप्रत्यय, तिङ्प्रत्यय वगैरे साधारण माहिती देऊन विषय संपवला आहे. गरुडपुराणातही हीच माहिती दिलेली आहे या व्याकरणाला कौमार व्याकरण असे म्हणतात.

प्रत्येक वेदाच्या प्रातिशाख्यातही व्याकरणविषयक थोडा विचार म्हणजे, वर्णांचे संधी व विश्लेष कसे होतात, याची माहिती आढळते. तिचा उपयोग पद, क्रम, जटा, घन, इ. वेदविकृतींच्या अध्ययनासाठी होतो. यास्कानेही निरुक्तात वैदिक शब्दांचे अर्थ करण्याकरिता उपयुक्त असणारी धातू वगैरेंची माहिती देऊन अर्थाची फोड केली आहे. यासंबंधी विद्याभूषण रंगाचार्य रड्डी लिहितात, ते असे–

प्रधान व्याकरणकार म्हणजे पाणिनी होय. याच्या पूर्वी शाकटायन, स्फोटायन, काशकृत्स्न, आपिशली, पौष्करस वगैरे व्याकरणकार होऊन गेले. कारण पाणिनीनेच आपल्या सूत्रांत प्रसंगाने त्यांचा उल्लेख केला आहे. परंतु यांपैकी कोणाचाही ग्रंथ आज उपलब्ध नाही. कैयट वगैरे प्राचीन ग्रंथकार आपिशली, काशकृत्स्न यांच्या ग्रंथांचा उल्लेख करतात. त्यावरून त्या वेळी ते ग्रंथ उपलब्ध असावेत, असे वाटते. भगवान पाणिनीने श्रीशंकराने उपदेशिलेली जी 'अइउण्' इत्यादी चौदा सूत्रे, ज्यांस अक्षरसमाम्नाय असे वैयाकरण पंडित समजतात, त्यांचा प्रत्याहारास आश्रय घेऊन तत्तत्प्रत्याहारघटित विविध सूत्रे रचून आपल्या व्याकरणाची उभारणी केली आहे व म्हणून या व्याकरणास वेदांगत्व प्राप्त झाले आहे. यात लौकिक शब्दांचे विवेचन पूर्णपणे केले असल्यामुळे हे लौकिक पंडितांसही मान्य झाले आहे.

सांप्रत पाणिनीय व्याकरण हा व्याकरणरूपी वेदांगाचे प्रतिनिधित्व करणारा एक मान्य ग्रंथ आहे. पाणिनीने अल्पाक्षर अशा चार हजार सूत्रांच्या द्वारे संस्कृत भाषेचे नितांत वैज्ञानिक असे व्याकरण प्रस्तुत करून आधुनिक भाषाशास्त्रज्ञांनाही आश्चर्यचकित केले आहे.

पाणिनीच्या नंतर संस्कृतात नव्याने आलेल्या शब्दांची व्याख्या करण्याचा उद्देश मनात धरून कात्यायनाने (सन पूर्व ४ थे शतक) वार्तिकांची रचना केली. त्यानंतर पतंजलीने पाणिनीच्या सूत्रांवर (सन पूर्व २ रे शतक) भाष्य रचले. सूत्रांवर भाष्ये अनेक आहेत. पण विषयाची व्यापकता आणि विचारांची गंभीरता या दोन गोष्टींमुळे पतंजलीचे भाष्य हे महाभाष्य म्हणून गौरवान्वित झाले आहे. व्याकरणाच्या दार्शनिक सिद्धान्तांची मीमांसा सर्वप्रथम महाभाष्यातच उपलब्ध होते. हा ग्रंथ प्रश्नोत्तररूपी असून साहित्यिक शैलीचा आहे. व्याकरणशास्त्रात सूत्रे, वार्तिके आणि महाभाष्य या तीन ग्रंथांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. म्हणूनच पाणिनी, कात्यायन व पतंजली यांना व्याकरणाचे मुनित्रय म्हणतात.

महाभाष्यानंतर व्याकरणाचा दार्शनिक ग्रंथ म्हणजे वाक्य-

पदीय हा होय. भर्तृहरीने इ. स. च्या सहाव्या शतकात तो रचला. व्याकरण हे शैवागमाच्या अंतर्गत आहे. त्याची स्वतःची विशिष्ट अशी साधना आहे. भर्तृहरी हा शब्दाद्वैताचा संस्थापक आहे. त्याच्या दृष्टीने स्फोट म्हणजेच एकमात्र परमतत्त्व असून, हे चराचर जगत त्याचे विवर्तरूप आहे. ' स्फुटति अर्थः तस्मात् इति स्फोट :' = ज्याच्यापासून अर्थ फुटतो, म्हणजेच अर्थाची प्रतीती होते, तो स्फोट होय.

स्फोटाचे विवेचन श्री. रंगाचार्य रड्डी यांनी केले आहे, ते असे–

कोणी एका व्यक्तीने दुसऱ्या एका व्यक्तीस ' घोडा घेऊन ये ' असे सांगितले असता, श्रोता तो शब्दध्वनी श्रवणेंद्रियाने ग्रहण करतो. पुढे ते ध्वनी त्याच्या बुद्धीत व अंतःकरणात प्रविष्ट होतात व नंतर ते अर्थरूपी शब्दस्फोटाला व्यक्त करतात व नंतर त्या शब्दस्फोटापासून अर्थप्रतीती होते. येथे दोन ध्वनींची प्रतीती असते. वक्ता वैखरी वाणीने जो उच्चारतो तो एक ध्वनी व त्याच वेळी मध्यमा वाणीने जो ध्वनी उत्पन्न होत असतो, तो दुसरा ध्वनी. याप्रमाणे वक्त्याच्या ठिकाणी दोन ध्वनी उत्पन्न होतात. श्रोत्याच्या ठिकाणी फक्त मध्यमा वाणीने उत्पन्न होणारा एकच ध्वनी असतो. वक्त्याचा वैखरीनाद हा मध्यमानादाला उत्साहक असतो. म्हणून वक्त्याला श्रोत्यापेक्षा लवकर अर्थबोध होतो. श्रोत्याच्या ठिकाणी वैखरीनाद नसल्यामुळे त्याला वक्त्याच्या मानाने अर्थबोध होण्याला विलंब लागतो. याप्रमाणे स्फोटाची कल्पना आहे. याचे वर्णस्फोट, वाक्यस्फोट वगैरे कल्पित असे भेद आहेत. ते शास्त्रकारांनी वर्ण, पद, वाक्य वगैरेंना जे अर्थबोधकत्व कल्पिले आहे, त्यावर अवलंबून आहेत. या सर्वांत अखंडवाक्यस्फोट हाच मुख्य मानतात.

या कालापर्यंत पाणिनीय सूत्रांवर ज्या टीका लिहिल्या गेल्या, त्या साऱ्या सूत्रांचा क्रम सांभाळून लिहिल्या गेल्या. पण १५ व्या शतकात रामचंद्राचार्य या वैयाकरणाने सूत्रांच्या प्रक्रियेला अनुसरून आपला टीकाग्रंथ रचला. त्याने पदांची सिद्धी हे आपले लक्ष्य ठरवले. हीच पद्धती स्वीकारून आपला ग्रंथ लिहिणारा भट्टोजी दीक्षित हा एक विख्यात वैयाकरण निर्माण झाला. सिद्धान्त कौमुदी हा त्याचा ग्रंथ होय. त्याने आचार्य शेष यांचेजवळ अध्ययन केले आणि आपल्या ग्रंथाने व्याकरणाच्या इतिहासात एक नवे युग निर्माण केले. सिद्धान्त कौमुदीनंतर त्याने शब्दकौस्तुभ व मनोरमा हे दोन ग्रंथ निर्मिले. त्या कालापासून आजतागायत देशभर याच तीन्ही ग्रंथांचे अध्ययन – अध्यापन होत राहिले आहे. भट्टोजी दीक्षिताच्या परंपरेत नागेश भट्ट नावाचा एक वैयाकरण जन्माला आला. त्याने पाणिनीय व्याकरणातल्या परिभाषांचे निदर्शन करणारा परिभाषेन्दुशेखर हा ग्रंथ निर्माण केला व तो व्याकरणाच्या अभ्यासात सर्वमान्य ठरला. नागेश भट्टाच्या नंतर (इ. स. १७००) व्याकरणाचा इतिहास धूसर होत जातो. त्यापुढच्या काळात टीका ग्रंथांवर टीका लिहिल्या गेल्या. गेल्या २०० वर्षांत पाणिनीय संप्रदायाच्या प्रसिद्ध टीकाकारांमध्ये सर्वश्री वैद्यनाथ पायगुंडे, विश्वेश्वर, ओरमभट्ट, भैरवमिश्र, राघवेंद्राचार्य गजेंद्र गडकर, कृष्णमित्र, नित्यानंद पर्वतीय, जयदेव मिश्र, वासुदेव शास्त्री अभ्यंकर, मन्युदेव चिद्रुपाश्रय, इ. नावे उल्लेखनीय ठरली आहेत.

व्याकरणावर अनेक परिभाषाग्रंथ निर्माण झाले. त्यांची माहिती प्रा. का. वा. अभ्यंकर यांनी दिली आहे, ती अशी–

व्याडी नावाच्या वैयाकरणाने लिहिलेला परिभाषासूचन नावाचा एक हस्तलिखित ग्रंथ उपलब्ध आहे. पाणिनीय सूत्रांवरून ज्ञापकाने सिद्ध केलेल्या ९१ परिभाषांचे विवेचन व्याडीने केले आहे. शाकटायनाच्या व्याकरणावरील ' परिभाषासूत्राणि' म्हणून उल्लेख केलेला व पाल्यकीर्ती शाकटायनाने शब्दानुशासनाला जोडलेला ९८ परिभाषांचा पाठ डॉ. बुल्हरने दिलेला आहे. व्याडीकृत परिभाषासूचनातील ९३ परिभाषांशी या पाठाची तुलना केल्यास हा पाठ व्याडीच्या परिभाषापाठावर अधिष्ठित आहे, असे म्हणणे शक्य आहे. शाकटायनपरिभाषासूत्रासारखीच चांद्रपरिभाषासूत्रेही उपलब्ध आहेत. त्यांची संख्या ८६ आहे. या परिभाषापाठांमध्ये व्याडी व शाकटायन यांच्या परिभाषांपेक्षा निराळ्या अशा काही परिभाषा आहेत. चंद्रव्याकरण हे पाणिनीय व्याकरणावर आधारलेले सुलभ व्याकरण आहे. त्याप्रमाणे वैदिक शाकटायनशब्दानुशासनावर आधारलेले कातंत्र हेही सुलभ व्याकरण आहे, असे विद्वान समजतात. कातंत्र शब्दाचा अर्थ लघुतंत्र असा आहे. या कातंत्रव्याकरणाचेच काही सूत्रांची भर घालून केलेले संस्करण कालाप या नावाने प्रसिद्ध आहे. कातंत्र व्याकरणाची परिभाषासंख्या ९६ आहे, तर कालापाची ११८ आहे.

इ. स. च्या ११ व्या शतकाच्या पूर्वार्धात भोज राजा होऊन गेला. त्याने आपल्या सरस्वतीकंठाभरण या व्याकरणग्रंथात ११८ परिभाषासूत्रे दिली आहेत. इ.स. च्या १२व्या शतकाच्या प्रारंभी गुजरातमध्ये हेमचंद्र नावाचा प्रसिद्ध जैन वैयाकरण होऊन गेला. पाणिनीच्या व्याकरणाला अनुसरून हैमशब्दानुशासन नावाचा एक विस्तृत व्याकरणग्रंथ त्याने लिहिला. या ग्रंथामुळे जैन शाकटायनशब्दानुशासन व जैनेंद्रव्याकरण हे दोन्ही ग्रंथ मागे पडले. हेमचंद्राच्या शिष्यपरंपरेत हेमहंसगणी नावाचा एक वैयाकरण झाला. यानेही एक परिभाषाग्रंथ लिहिला आहे. यानंतर थोड्याच कालात बंगालमध्ये पुरुषोत्तम देव नावाचा वैयाकरण झाला. त्याचा परिभाषावृत्ती हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याच्या काळात बंगाल व त्याच्या जवळचे प्रदेश यांमध्ये पाणिनीय

व्याकरणाचा चांगला पुरस्कार झाला व अनेक विद्वानांनी व्याकरणशास्त्रावर पांडित्यपूर्ण ग्रंथ लिहिले. त्यापुढच्या काळात सीरदेव हा महान वैयाकरण होऊन गेला. त्याने आपल्या पूर्वीच्या सर्व परिभाषाकारांचे ग्रंथ विचारात घेऊन आपला परिभाषावृत्ती हा विवेचनपूर्ण ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथामुळे पूर्वीचे परिभाषा ग्रंथ मागे पडले.

या परिभाषावृत्तीलाही मागे सारणारा ग्रंथकार अठराव्या शतकाच्या आरंभी निर्माण झाला. तो नागेश होय. त्याने परिभाषेन्दुशेखर नावाचा जो ग्रंथ लिहिला, तो थोड्याच कालात सर्वमान्य झाला. सर्व परिभाषाग्रंथांचा तो मुकुटमणी शोभतो. सांप्रत सर्व भारतभर त्याचेच अध्ययन चालते. त्या ग्रंथावर मुद्रित व अमुद्रित मिळून २५ च्या वर टीका उपलब्ध आहेत.

पाणिनीव्यतिरिक्त इतरही व्याकरणसंप्रदाय निर्माण झाले व काही काल प्रचलित राहिले. त्यांची माहिती अशी –

**इंद्रसंप्रदाय–** देवराज इंद्राच्या नावाने हा संप्रदाय प्रचलित झाला. इंद्राचे व्याकरण सांप्रत उपलब्ध नाही. पाणिनीय व्याकरणाने या संप्रदायाला नामशेष केले, असे कथासरित्सागरावरून कळते. प्रसिद्ध विद्वान बर्नेल म्हणतो, की तोळकाप्पियम हे प्राचीन तमिळ व्याकरण बव्हंशी इंद्रसंप्रदायाने प्रभावित आहे.

**कातंत्र व्याकरण–** तिबेटी इतिहासकार तारानाथ म्हणतो, की इंद्रव्याकरणाच्या आधारावरच कातंत्र व्याकरणाची रचना झाली. सातवाहन राजा शर्ववर्मा याला अल्पकालात व्याकरण शिकवण्याच्या उद्देशाने सुमारे ८४० सूत्रांचे हे सरल, सुबोध व्याकरण रचले गेले. पाणिनीय व्याकरणाची जटिलता या व्याकरणात टाळलेली आहे. मुख्य ग्रंथात केवळ संधी, शब्दरूपे व धातुरूपे तेवढीच होती. पुढच्या काळात त्या व्याकरणाला कृत् व तद्धित ही प्रकरणे जोडली गेली. यात प्रत्याहार सूत्रांच्या जागी प्रचलित वर्णमाला उपयोगात आणलेली आहे. बंगालमध्ये कित्येक वैयाकरणांनी या व्याकरणावर ग्रंथरचना करून प्रस्तुत संप्रदायाला पाणिनीय संप्रदायाच्या तोडीला आणण्याचा प्रयत्न केला. बंगालमध्ये आजही कातंत्र व्याकरणाचा प्रचार आहे. काश्मीरमध्येही शिकविले जाणारे व्याकरण ग्रंथ म्हणजे कातंत्र व्याकरणाचे परिवर्तित रूप समजता येईल.

**चंद्रसंप्रदाय –** याचा प्रवर्तक चंद्रगोमी नावाचा एक बौद्ध वैयाकरण इ. स. च्या ४ थ्या शतकात होऊन गेला. बौद्धधर्मियांत याचा विशेष प्रचार झाला. तिबेट व लंका या देशांत याची लघुसंस्करणे आजही प्रचारात असल्याचे कळते.

**जैनेंद्रसंप्रदाय –** चौथ्या शतकात झालेला देवनंदी हा या संप्रदायाचा प्रवर्तक होय. पाणिनीय व्याकरणातील सूत्रे व वार्तिके मिळवून-जुळवून देवनंदीने आपली सूत्रे रचली. जैनेंद्र व्याकरणावर सोमदेवाची टीका असून, द. भारतातल्या दिगंबर जैनांत याचा कुठे कुठे प्रचार आहे.

**शाकटायनसंप्रदाय –** याचे व्याकरण इ. स. च्या ८ व्या शतकात श्वेतांबर जैनांच्या अध्ययनार्थ लिहिले गेले. या व्याकरणावर चंद्र व जैनेंद्र या दोन्ही व्याकरणांचा प्रभाव आहे. शाकटायनाने स्वतःच आपल्या ग्रंथावर वृत्ती लिहिली आहे.

**भोजसंप्रदाय–** याचा प्रधान ग्रंथ सरस्वतीकंठाभरण हा असून, तो भोजराजाने इ. स. च्या १० व्या शतकात लिहिला. यात सहा हजार सूत्रे आहेत. यात वैदिक व्याकरणाचे निरूपण केलेले आहे. हा संपूर्ण ग्रंथ प्रकाशित झालेला आहे. या व्याकरणात पाणिनीच्या नंतर भाषेत जी परिवर्तने झाली, त्यांना मान्यता देणारे नियम बनवलेले आहेत.

**हेमचंद्रसंप्रदाय –** हेमचंद्र या जैन विद्वानाने १० व्या शतकात शब्दानुशासन नावाचा आठ अध्यायांचा ग्रंथ लिहिला. शेवटच्या अध्यायात त्याने प्राकृत भाषांचेही व्याकरण सांगितले. आपल्या ग्रंथावर त्याने स्वतःच बृहद्वृत्ती व लघुवृत्ती अशा दोन टीका लिहिल्या. सूत्रांच्या विवेचनात उदाहरणे देण्यासाठी त्याने स्वतःच द्वयाश्रय महाकाव्याची रचना केली.

**सारस्वत संप्रदाय –** याचा आदिप्रवर्तक अनुभूतिस्वरूपाचार्य हा होय. याने १२ व्या शतकात सारस्वतप्रक्रिया या नावाने ७०० सूत्रांचे व्याकरण रचले. हे व्याकरण विद्यार्थ्यांना सुलभ व सुबोध असल्याचे सांगतात. ५० वर्षांपूर्वी उ. भारतात या व्याकरणाचा बराच प्रचार होता. इंग्रज विद्यार्थ्यांना संस्कृत व्याकरण शिकविण्यासाठी सारस्वतप्रक्रिया या ग्रंथाचा उपयोग केला जात असे.

प्रमुख संस्कृत व्याकरणांचे स्वतःचे असे गणपाठ व धातुपाठ आहेत. गणपाठाच्या संबंधात जे स्वतंत्र ग्रंथ झाले, त्यांत वर्धमानाचा (१२ वे शतक) गणरत्नमहोदधी व भट्टयज्ञेश्वराचा गणरत्नावली (इ. स. १८७४) हे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. काशकृत्स्नाचा धातुपाठ कन्नड भाषेत व भीमसेनाचा धातुपाठ तिबेटी भाषेत (भोट) प्रकाशित आहे. पूर्णचंद्राचा धातुपारायण, मैत्रेयरक्षिताचा धातुप्रदीप, क्षीरस्वामीचा (१० वे शतक) क्षीरतरंगिणी, सायणाचा माधवीय धातुवृत्ती, श्रीहर्षकीर्तीचा धातुतरंगिणी, बोपदेवाचा कविकल्पद्रुम व भट्टमल्लाचा आख्यातचंद्रिका हे ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत. लिंगबोधक ग्रंथांमध्ये पाणिनी, वररुची, वामन, हेमचंद्र, शाकटायन, शांतनव, हर्षवर्धन, वगैरेंची लिंगानुशासने प्रचलित आहेत.

**प्राकृत भाषांचे व्याकरणकार –** भारतीय वैयाकरणांनी कित्येक साहित्यिक भाषांच्या समूहाला प्राकृत भाषा असे म्हटले आहे. प्राकृत शब्दाची व्युत्पत्ती देताना हेमचंद्र म्हणतो –

**प्रकृतिः संस्कृतम्। तत्र भवं तत आगतं वा प्राकृतम् ॥**

**अर्थ** – प्रकृती अर्थात आधारभूत भाषा म्हणजे संस्कृत भाषा होय. या संस्कृतापासून जी भाषा निघाली, तिला प्राकृत म्हणावे.

अशीच व्याख्या धनिक, मार्कंडेय, सिंहदेवगणी, इ. आचार्यांनी केली आहे. वररुचीच्या मते महाराष्ट्री, पैशाची, मागधी व शौरसेनी या प्राकृत भाषा होत. हेमचंद्राने यांच्याव्यतिरिक्त आर्ष, चूलिका, पैशाचिक व अपभ्रंश या आणखी प्राकृत भाषा सांगितल्या आहेत. मार्कंडेयाने प्राच्या, अवन्ती व मागधी यांचा उल्लेख केला आहे. या प्राकृत भाषांचा निरनिराळ्या प्रदेशांत प्रचार झाला आणि त्यांमध्ये ग्रंथरचनाही सुरू झाली, तेव्हा त्यांची व्याकरणे निर्माण होण्याची गरज उत्पन्न झाली.

प्राकृत भाषांच्याविषयी ज्या ज्या लेखकांनी आपले विचार प्रगट केले, त्यांमध्ये भरत हा श्रेष्ठ मानायला हवा. मार्कंडेयाने आपल्या प्राकृतसर्वस्व या ग्रंथाच्या प्रारंभी भरताचा उल्लेख केला असून, आपण आपल्या ग्रंथाची काही सामग्री भरताकडून मिळविल्याचे लिहिले आहे. मार्कंडेयाने शाकल्य व कोहल या आणखी दोन प्राकृत व्याकरणांचा उल्लेख केला आहे. मार्कंडेयाचा काल अंदाजे इ. स. चा १ ला चरण हा आहे. काही प्राचीन आचार्यांनी, पाणिनीनेही प्राकृतलक्षण नावाचा ग्रंथ लिहिल्याचे म्हटले आहे. पण सर्वांत जुना प्राकृत व्याकरणाचा जो ग्रंथ मिळतो, तो वररुचीचा प्राकृतप्रकाश हा होय. त्यानंतर चंड नावाच्या विद्वानाने प्राकृतलक्षण नामक ग्रंथ लिहिला. धनपालाने प्राकृताचा कोश तयार केला. इ. स. च्या ११ व्या शतकात हेमचंद्राने सिद्ध हेमचंद्र नावाचे प्राकृत व्याकरण लिहिले आणि ते प्राकृत व्याकरणांत सर्वोत्तम ठरले. हेमचंद्राने आपले व्याकरण पाणिनीप्रमाणेच चार पादांत विभाजित केले आहे. पहिल्या दोन पादांत मुख्यत्वे ध्वनिशास्त्राचे विवेचन, तिसऱ्या पादात शब्दरूपावली व चौथ्या पादात धात्वादेश आहे.

हेमचंद्रानंतर क्रमदीश्वर हा व्याकरणकार झाला. त्याने संक्षिप्तसार नावाचे, आठ भागांत विभाजित असे व्याकरण लिहिले. याच्या आठव्या पादातच प्राकृत व्याकरणाचे नियम सांगितले आहेत. त्रिविक्रमाने आपल्या प्राकृत व्याकरणाच्या टीकेत हेमचंद्रालाच आधारभूत मानले आहे. त्या आधारेच त्याने आपला प्राकृतरूपावतार हा ग्रंथ लिहिला.

त्यानंतर रामतर्कवागीश या ग्रंथकाराने इ. स. च्या १६ व्या शतकात प्राकृतकल्पतरू हा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ मार्कंडेयाच्या व्याकरणग्रंथाशी बराच मिळता-जुळता असून, तो लंकेश्वराच्या प्राकृतकामधेनू नामक ग्रंथावर आधारित आहे. याव्यतिरिक्त भारद्वाज, अप्पय्य दीक्षित, समंतभद्र, चंद्रशेखर, इ. प्राकृत वैयाकरणांचीही नावे प्रसिद्ध आहेत. [ वे. शा. दी.; हिं. वि. को.; प्रा. भा. व्या.; श्री. चतुर्वेदी– ना. प्र. प., सं. २००१ ]

**व्याख्यान** एक लेखनप्रकार. शतपथ ब्राह्मणातील एका उताऱ्यात (३.६.२.७) व्याख्यान शब्द कथा या अर्थी योजला आहे आणि उदाहरण म्हणून कद्रू व सुपर्णी यांच्या कलहाच्या कथेचा उल्लेख केला आहे. त्याच ब्राह्मणात अन्य ठिकाणी (६.१.२७.३३; ७.२.४.२८) व्याख्यान शब्दाचा अर्थ भाष्य किंवा टीका असा आहे. बृहदा. उपनिषदात 'व्याख्यानाः' असा बहुवचनी शब्द आलेला आहे. तिथे त्याचा अर्थ भाष्य असाच असावा.

धार्मिक व लौकिक विषयांवरील फुटकळ ग्रंथांवरील व्याख्यानग्रंथ किंवा टीकाग्रंथ हे या प्रकारच्या साहित्यात येतात. व्यावहारिक गोष्टींच्या पूर्ततेसाठी अशा प्रकारचे अनेक ग्रंथ प्राचीन काळी रचले गेले आहेत. वैदिक मंत्रांचा अर्थ समजावून सांगण्यासाठी, त्यांच्या निरनिराळ्या पाठांची कारणे सांगण्यासाठी, यज्ञीय कर्मकांड व्यवस्थित समजावण्यासाठी, वेदांगांच्या विषयावरील विवरणासाठी किंवा दर्शन, विज्ञान, ज्योतिष, क्षत्रविद्या इ. विद्यांचे स्पष्टीकरण करण्यासाठी असे अनेक व्याख्यानग्रंथ लिहिले गेले आहेत. [ वे. इं.; पा. का. भा. ]

**व्याडी** एक व्याकरणकार. हा पाणिनीचा मातृवंशाकडील नातेवाईक होता किंवा काहींच्या मते पाणिनीचा मामा होता. हा संबंध पाणिनीचे दाक्षीपुत्र हे विशेषण व व्याडीचे दाक्षायण हे विशेषण यांवरून जोडला गेला आहे. मात्र वेबर म्हणतो, की व्याडी हा पाणिनीच्या उत्तरकालीन होता. त्याच्या पित्याचे नाव व्यड असावे आणि त्या वंशाच्या मूळ पुरुषाचे नाव दक्ष असावे, असे श्री. चित्रावशास्त्री म्हणतात. काही विद्वान मात्र दाक्षायण हे त्याचे आडनाव पैतृक नसून दैशिक असावे आणि तो दाक्षायण देशाचा रहिवासी असावा, असे सुचवतात. व्याडी हा शौनकाचा शिष्य होता. त्याने आपल्या एका ग्रंथात शौनकाला नमन केले आहे.

व्याडीच्या व्याकरणग्रंथाचे नाव संग्रह असे आहे. तो केवळ वैदिक व्याकरणाचाच नव्हे, तर पाणिनीय व्याकरणाचाही श्रेष्ठ भाष्यकार होता. महाभाष्यातही या ग्रंथाला एक श्रेष्ठ दार्शनिक ग्रंथ मानले असून, तो अष्टाध्यायीप्रमाणेच सूत्रात्मक होता, असे म्हटले आहे. या ग्रंथात चौदा हजार शब्दरूपांचे विवेचन होते असेही महाभाष्यावरून कळते. चांद्र व्याकरणाच्या परंपरेत मात्र प्रस्तुत ग्रंथ श्लोकात्मक असून, त्यात पाच अध्याय व एक लक्ष श्लोक होते, असे म्हटले आहे. व्याडीचा हा ग्रंथ सांप्रत उपलब्ध नाही. उत्तरकालीन ग्रंथांमध्ये त्यातली जी उद्धरणे घेतली आहेत त्यांवरून त्याची कल्पना करावी लागते. प्रस्तुत ग्रंथ पूर्ण झाल्याबरच पतंजलीने व्याकरणमहाभाष्याची रचना केली.

आधुनिक विद्वानांच्या मते यास्क, शौनक, पाणिनी, पिंगल, व्याडी व कौत्स हे व्याकरणाचार्य प्राय: समकालीन होते.

व्याडीच्या नावावर वरील ग्रंथांव्यतिरिक्त विकृतवल्ली, व्याडिव्याकरण, बलरामचरित, व्याडिपरिभाषा व व्याडिशिक्षा असे अन्य ग्रंथ आहेत.

व्याडी हा मीमांसाशास्त्राचाही महान पंडित होता, असे त्याला मिळालेल्या 'मीमांसाग्रणी' या उपाधीवरून कळते. मीमांसेवर त्याचा एखादा ग्रंथही असावा. त्याची शिष्यशाखाही विस्तृत असावी. गरुडपुराणात, त्याचा रत्नविद्येवरही एक ग्रंथ होता, असे म्हटले आहे (१.६९.३७). [प्रा. च. को. हिंदी.]

**व्याडेश्वर** एक शिवस्थान. हे ठिकाण कोकणात चिपळूणपासून सत्तावीस मैलांवर असलेल्या गुहागर गावी आहे. व्याडेश्वर अनेक कोकणस्थ कुटुंबांचा कुलस्वामी आहे. इथे शिवपंचायतन मंदिर असून, ते पूर्वाभिमुख आहे. मंदिरानजीक एक तळे व विठ्ठल-रखुमाईचे देऊळ आहे.

व्याडेश्वराची पिंडी स्वयंभू असून, भव्य व काळ्या पाषाणाची आहे. एकदा या पिंडीचे तीन कपचे उडाले आणि ते असगोली, बोऱ्या अडूर व अंजनवेल या स्थानी पडले. मग त्या तीन्ही स्थानांवर अनुक्रमे वाळकेश्वर, टाळकेश्वर व उडालेश्वर या नावाची तीन शिवमंदिरे उभारली गेली, असे म्हणतात. ही तीन्ही मंदिरे व्याडेश्वराचे अंशभाग आहेत, अशी स्थानिक लोकांची समजूत आहे.

माघ मासात पाच दिवस इथे व्याडेश्वराचा उत्सव असतो. उत्सवात कथा-कीर्तनाचे कार्यक्रम होतात; त्याचप्रमाणे पालखीची मिरवणुकही असते. चातुर्मासात व्याडेश्वरलिंगावर सतत रुद्राभिषेक असतो. आषाढी व कार्तिकी एकादशी आणि महाशिवरात्र या दिवशीं मंदिरात शिवाची चांदीची मूर्ती ठेवतात. [चित्पावन; प्रसाद, ऑगस्ट १९७०]

**व्यायाम** याची व्याख्या अशी – 'स्वास्थ्योन्नतिसम्पादनार्थं विधिपूर्वकमङ्गसञ्चालनम्' = शरीराचे आरोग्य नीट राहावे म्हणून, नियमानुसार अवयवांची हालचाल करणे, याला व्यायाम असे नाव आहे (सर्वलक्षणसंग्रह). शरीराचे स्वास्थ्य टिकून राहावे आणि शरीराचे निरनिराळे अवयव कार्यक्षम राहावे, यासाठी त्या अवयवांना काम देणे जरूर आहे. जर त्यांना पुरेसे काम मिळाले नाही तर ते ढिले पडतात व त्यांची शक्ती क्षीण होते. व्यायामाच्या द्वारे निरनिराळ्या अंगप्रत्यंगांची शक्ती वाढते व त्यांच्या क्रिया व्यवस्थित होतात.

प्राचीन काली लोकांना विविध प्रकारचे व्यायाम माहीत होते. प्राणायाम व योगासने यांचाही व्यायामात अंतर्भाव होतो. प्राणायामाने फुप्फुसांना ताकद येते व योगासनांनी निरनिराळे अवयव सुदृढ होतात. आजही योगासनांचे महत्त्व लोकांना पटलेले आहे. निरनिराळे खेळ, पोहणे, अंग मर्दन करणे, यांनीही शरीराला व्यायाम होतो. पाहा – बलोपासना.

**व्यास** एक अलौकिक व्यक्तिमत्वाचा महापुरुष, ग्रंथकार व महाज्ञानी. व्यासांची अनेक नावे प्रचलित आहेत. वर्णाने काळे म्हणून त्यांना कृष्ण म्हणत; द्वीपात जन्मले म्हणून द्वैपायन म्हणत. कृष्णद्वैपायन असेही जोडनाव रूढ आहे. त्यांनी 'वेदान् विव्यास' = वेदांचे विभाग केले, म्हणून त्यांना व्यास असे संबोधीत. पराशरपुत्र म्हणून त्यांना पाराशर्यही म्हणत. व्यासांचा उल्लेख करताना भगवान व्यास असे म्हणण्याची विद्वज्जनांत परिपाटी आहे. श्रीशंकराचार्य त्यांना तशाच उपाधीने उल्लेखीत. त्यांना महर्षी असेही म्हटले जाते.

व्यास हे ज्ञानगंगेचे भगीरथ आहेत. ज्ञानरूपी हिमाचलाच्या शिखरावर वाहणारी दिव्य जले व्यास जणू भूतलावर घेऊन आले. म्हणूनच 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्' = जगातले सर्व ज्ञान व्यासांनी उष्टे करून सोडले आहे, अशी लोकोक्ती रूढ झाली आहे. युगायुगातून एखाद्याच वेळी अशी विभूती जन्माला यायची. व्यासांचा जन्म भारतात झाला, ही गोष्ट भारतीय जनतेला अनंत कालपर्यंत एक अभिमानाची गोष्ट राहील. आजवर जगात असा दिव्योदात्त, विद्वान आणि साहित्यकार झाला नाही व होणार नाही असे म्हटले, तर त्यात अतिशयोक्ती वाटण्याचे कारण नाही. वेदोत्तर कालापासून तो आजतागायत व्यास हे भारतीय संस्कृतीचे महाप्राण ठरले आहेत. आपली संस्कृती व्यासकृत महाभारत आणि पुराणे यांवर आधारलेली आहे. इतिहास-पुराणांची रचना, प्राचीन युगातील विस्मृतप्राय अशा विद्या-कलांचे पुनरुज्जीवन, वेदवेदांगांचे संकलन–संपादन आणि विभाजन या भगीरथतुल्य प्रचंड उद्योगाने व्यासांनी भारतीय संस्कृती अक्षुण्ण राखली. इतिहासातले हे एक महदाश्चर्यच म्हणावे लागेल.

अखिल भारतात एकात्मता निर्माण करावी, तसेच वेदांतली आणि लोकवाङ्मयातली मूल्ये परिष्कृत करून त्या द्वारे विश्वप्रेमाची प्रतिष्ठा साधावी, हाच व्यासांच्या अंतरंगातला दिव्योदात्त आशय होता. त्या दृष्टीने प्रेम, मैत्री, उद्योग, मानवतेचा गौरव, सामाजिक व राष्ट्रीय सौहार्द, नीतिशिक्षण, इ. गोष्टींचा उपदेश व्यासांनी केला आहे. या खंडप्राय देशातील आर्य-अनार्य, वेदवादी आणि वेदविन्मुख; गृहस्थ आणि संन्यासी; ज्ञान, भक्ती व कर्म; शैव, शाक्त आणि वैष्णव; निर्गुण आणि

सगुण, यांच्यांतले अंतर्द्वंद्व समाप्त होऊन भारताच्या राष्ट्रीय जीवनात सद्भाव, सुहृद्भाव आणि नैतिक व आध्यात्मिक उत्कर्ष प्रस्थापित व्हावा या महनीय उद्देशाने व्यास प्रेरित झाले होते.

**व्यासनामे** – व्यास हे व्यक्तिनाम नसून ती उपाधी आहे. ते एक धार्मिक पीठ आहे. प्रत्येक द्वापर युगामध्ये एकेक महनीय पुरुष व्यास होतो.

> **द्वापरे द्वापरे विष्णुर्व्यासरूपी महामुने ।**
> **वेदमेकं सुबहुधा कुरुते जगतो हितः ॥**

अर्थ – हे महामुने, प्रत्येक द्वापर युगात विष्णू व्यासरूपाने अवतार घेतो व जगाच्या हितासाठी एका वेदाचे विभाग करतो.

असे २८ व्यास झाले असून, कृष्णद्वैपायन हे शेवटचे व्यास होत. देवी भागवतात दिलेली २८ व्यासांची नामावली अशी – (१) ब्रह्मा (२) प्रजापती (३) शुक्राचार्य (४) बृहस्पती (५) सूर्य (६) यम (७) इंद्र (८) वसिष्ठ (९) सारस्वत (१०) त्रिधामा (११) त्रिवृष (१२) भारद्वाज (१३) अंतरिक्ष (१४) धर्म (१५) त्र्य्यारुणी (१६) धनंजय (१७) मेधातिथी (१८) व्रती (१९) अत्री (२०) गौतम (२१) हर्यात्मा (२२) वाजश्रवा (२३) सोम आमुष्यायण (२४) तृणबिंदू (२५) भार्गव (२६) शक्ती (२७) पराशर व (२८) कृष्णद्वैपायन. काही पुराणांतल्या नामावलीत काही नावांमध्ये फरक आढळतो. पण २८ वा व्यास कृष्णद्वैपायन हे निश्चित आहे.

अठ्ठावीस व्यासांची ही कल्पना अनैतिहासिक असून, व्यासांची महत्ता वाढवण्यासाठी पुराणकारांनी नंतरच्या काळात ती तयार केली असावी, असे श्री. चित्रावशास्त्री यांचे मत आहे.

**व्यासांची जीवनकथा** – हस्तिनापुराजवळच्या एका प्रदेशात राजा उपरिचर वसू याच्या वीर्याने सत्यवती नामक कन्येचा जन्म झाला. लहानपणापासून तिचे पालनपोषण यमुनेच्या तीरावर राहणाऱ्या दाशराजाने केले. तो कोळी होता. यमुनेवर नाव चालवून लोकांना ऐलपैल नेणे हा त्याचा व्यवसाय होता. हळूहळू ते काम सत्यवतीही करू लागली.

एके दिवशी पराशर मुनी तिथे आला आणि त्याने आपल्याला पैलतीरावर पोचवण्याबद्दल दाशराजाला सांगितले. दाशराजाने ते काम सत्यवतीला सांगितले. सत्यवतीने नाव सोडली. पराशर तिच्यात आरूढ झाला. नाव चालू झाली. पराशराने पाहिले, की आपल्यापुढे बसून नाव चालवणारी धीवरकन्या यौवनाने रसरसलेली आहे. तिच्याकडे पाहता पाहता पराशराला कामवासना उत्पन्न झाली आणि लगेच ती अनावर झाली. त्याने तिला जवळ केले आणि तिच्याशी समागमाची इच्छा व्यक्त केली. देवीपुराणात त्यानंतरचा कथाभाग आहे, तो असा –

सत्यवतीने पराशराला म्हटले. 'माझ्या शरीराला माशांची दुर्गंधी आहे. माझ्याशी समागम तुम्हांला सुखप्रद होणार नाही.' ते ऐकून पराशराने आपल्या तपःप्रभावाने तिच्या शरीराचा मत्स्यगंध दूर करून तिला सुगंधित केले. सत्यवती योजनगंधा झाली. पुन्हा ती म्हणाली. 'मुनिवर्य, ही दिवसाची वेळ आहे. कोणी पाहिलेसवरले तर तुम्ही आणि मी लोकनिंदेला पात्र होऊ.' पराशराला तिचे म्हणणे योग्य वाटले. त्याने पुन्हा आपल्या तपोबलाने नावेभोवती दाट धुके उत्पन्न केले. मग त्या दोघांचा कामसंग झाला.

पैलपार गेल्यावर पराशराने यमुनेत स्नान केले. तिथून पुढे जाताना तो सत्यवतीला म्हणाला. 'तुला पुत्र होईल आणि तो जगद्वंद्य महापुरुष होईल. आणि पुत्राला प्रसवूनही तुझे कौमार्य अभंग राहील.' पुढे सत्यवतीने यमुनेच्या एका द्वीपात एका गुप्त जागी एका पुत्राला जन्म दिला. हा पुत्र म्हणजेच वेदव्यास होत.

ऐतिहासिकांच्या मते व्यासजन्माचा काल सामान्यतः सनपूर्व ३१०० हा ठरतो.

पुढे काही कालाने व्यासांनी आपल्या पित्याचा शोध घेतला आणि ते हिमालयातल्या त्याच्या आश्रमात तपश्चर्येसाठी निघून गेले. जाताना त्यांनी सत्यवतीला सांगितले, की 'तू स्मरण करशील, तेव्हा मी तुझ्यापुढे उपस्थित होईन.'

तरुणपण येताच व्यासांनी जाबालीची कन्या वटिका हिच्याशी लग्न केले. तिच्या पोटी शुक हा पुत्र निर्माण झाला. महाभारतानुसार शुक हा घृताची नामक अप्सरेच्या ठिकाणी जन्मलेला व्यासपुत्र होय.

व्यासमाता सत्यवतीचा शांतनूशी विवाह झाला. ती हस्तिनापूरची राणी बनली. कालांतराने शांतनू मरण पावला. सत्यवतीला दोन पुत्र झाले होते. त्यांपैकी एक युद्धात मेला आणि दुसरा क्षयरोग होऊन निवर्तला. क्षयरोगी पुत्राचे नाव विचित्रवीर्य होते. त्याला अंबिका व अंबालिका अशा दोन भार्या होत्या. पण विचित्रवीर्य मेला, त्या वेळी दोघींनाही संतान नव्हते.

पुत्रवियोग तर झालाच; शिवाय पुढे वंशही खुंटला. त्यामुळे सत्यवती विव्हल झाली. विचार करता करता तिला नियोगाची कल्पना सुचली. त्या काळी अपत्यहीन विधवेला दीराकडून पुत्रोत्पत्ती करून घेण्याबद्दल धर्माची संमती होती. विचित्रवीर्य जसा सत्यवतीचा पुत्र होता, तसाच व्यासही पुत्र होता. म्हणजे व्यास हे विचित्रवीर्याच्या भार्येचे दीरच ठरत होते. हा विचार करून सत्यवतीने व्यासांना बोलावून आणले आणि त्यांना नियोगाची आज्ञा दिली. त्यावर व्यास म्हणाले –

'मी हा असा काळा आणि कुरूप पुरुष आहे. माझ्या अंगाला उग्र दुर्गंधी असून, माझी जटा व दाढी ही भुऱ्या रंगाची आहे.

तुम्या नाजुक सुनांना माझे हे असले रूप सहन होईल का ?'

सत्यवतीने तीही संमती मिळवली. मग ती नियोगक्रिया यथायोग्य पार पडली. पण दुर्दैव असे, की अंबिकेला धृतराष्ट्र नावाचा पुत्र झाला, तो जन्मांध निपजला. आणि अंबालिकेचा पुत्र पांडू हा पांडुरोगी निपजला. ते दोघे क्षेत्रदृष्टया विचित्रवीर्याचे पुत्र असले, तरी बीजदृष्टया व्यासांचे पुत्र होते. साहजिकच त्यांच्याविषयी व्यासांच्या मनात वात्सल्यभाव वसत राहिला. धृतराष्ट्राचे पुत्र कौरव आणि पांडूचे पांडव असा कुरुवंशाचा विस्तार वाढला. कौरव-पांडवांत लहानपणापासूनच राज्यासाठी अंतःसंघर्ष सुरू झाला आणि कालांतराने त्याची एका महायुद्धात परिणती झाली. पांडव सच्छील, सद्वर्तनी असल्यामुळे व्यासांचा त्यांच्याकडे कायमचा ओढा राहिला. कुरुवंशातला वैराग्नी शमून त्यामध्ये सख्य आणि सामंजस्य निर्माण व्हावे, म्हणून व्यासांनी बरेच परिश्रम केले; पण त्यात त्यांना यश आले नाही.

व्यासांचा आश्रम हस्तिनापुराजवळच सरस्वतीच्या तीरावर होता. तिथून ते हस्तिनापुरी जा-ये करीत. कौरव-पांडवांच्या अस्त्रपरीक्षेच्या वेळी ते त्या समारंभाला उपस्थित होते. एकचक्रा नगरीत पांडवांची भेट घेऊन त्यांनी पांडवांना द्रौपदीच्या स्वयंवराला उपस्थित राहण्याचा आदेश दिला. स्वयंवरानंतर द्रौपदी पाचही पांडवांची पत्नी झाली. त्या वेळी एक मुलगी पाचांना कशी द्यायची, हा धर्मप्रश्न उभा झाला असता व्यासांनीच त्याची सोडवणूक केली. युधिष्ठिराला राजसूय यज्ञाची प्रेरणाही त्यांनीच दिली. द्यूतात हरून पांडव वनवासाला गेले, तेव्हा प्रथम धृतराष्ट्राला भेटून त्यांनी पांडवांशी अन्यायाने न वागण्याचा त्याला उपदेश केला व स्वतः द्वैतवनात जाऊन पांडवांची भेट घेतली. तिथे त्यांनी युधिष्ठिराला प्रतिस्मृती नावाची सिद्धविद्या दिली. अज्ञातवास संपवून पांडव प्रकट झाल्यावर त्यांनी धृतराष्ट्राला पांडवांशी समझोता करण्याचा उपदेश केला. युद्धानंतर युधिष्ठिर हतवल होऊन बसला असता त्यांनी त्याला राज्यासाठी उद्युक्त करून अश्वमेध यज्ञ करण्याची प्रेरणा दिली. अश्वत्थाम्याची कानउघाडणी करून त्याच्या मस्तकीचा मणी व्यासांनीच पांडवांना देववला व त्याला निर्बल करून पांडवांना निर्भय केले.

युद्धानंतर सोळा वर्षांनी हिमालयात जाऊन ते धृतराष्ट्राला भेटले व त्याला तप करण्याचा उपदेश करून आपल्या आश्रमाकडे निघून गेले. त्यानंतर जेव्हा यादवसंहार झाला आणि कृष्ण निजधामाला गेला, तेव्हा अर्जुन द्वारकेला गेला आणि कृष्णाच्या सर्व स्त्रियांना घेऊन हस्तिनापुरी यायला निघाला. वाटेत सरस्वतीच्या काठी वसणाऱ्या आभीर गणांनी अर्जुनावर हल्ला करून कृष्णस्त्रियांना पळवून नेले. त्या दुर्धर घटनेने अर्जुन विव्हल झाला आणि व्यासांकडे गेला. तेव्हा व्यासांनी त्याला कालचक्राची अनिवार्यता पटवून त्याचा शोक दूर केला. ते म्हणाले—

कालमूलमिदं सर्वंजगद्वीजं धनञ्जय ।<br>
काल एव समादत्ते पुनरेव यदृच्छया ।<br>
स एव बलवान् भूत्वा पुनर्भवति दुर्बलः ।।

(म. भा. मौसल. ८.३३–३४)

अर्थ — काल हे सर्व जागतिक घटनांचे आणि विश्वसंहाराचे बीज आहे. कालच आपल्या शक्तीने हे विश्व खाऊन टाकतो. कधी तो बलवान असतो, तर कधी दुर्बल होतो.

डॉ. वासुदेवशरण अग्रवाल म्हणतात — व्यासांनी आपल्या ज्ञानचक्षूंनी कालाचा महिमा जाणून घेतला होता. कालाच्या दुर्धर्ष सत्तेवर विश्वास हे व्यासांच्या दर्शनाचे एक अभिन्न अंग आहे.

व्यासांचा पुत्र शुक. तो लहानपणापासूनच वीतराग होता. पुढे जनकाकडून आत्मज्ञान मिळवून तो जीवन्मुक्त झाला. नंतर त्याने हिमालयातून निर्वाणाच्या मार्गाला लागायचे ठरवले. शुक परत न येण्याच्या मार्गाने जात आहे, हे पाहून व्यास पुत्रशोकाने विव्हल झाले. आपले जगणे आता अर्थशून्य झाले, असे वाटून त्यांनी आत्महत्येचा निर्णय केला. त्यावेळी शंकराने त्यांना दर्शन देऊन आत्मत्यागाच्या विचारापासून परावृत्त केले (म. भा. शांति. ३३३). व्यासांचे संक्षिप्त जीवनचरित्र हे जसे भव्यदिव्य आहे, तसेच ते मानवी गुणदोषांपासूनही अलिप्त नाही. अनेक पुराणांतून व्यासांच्याविषयी काही कथा आढळतात; पण त्या सगळ्या भाकडकथाच मानायला हव्या.

**ऐतिहासिक पुरुष** — व्यास नावाचा कोणी पुरुष खरोखरीच होऊन गेला की नाही, याविषयी अनेक पाश्चात्य संशोधकांनी संशय व्यक्त केला आहे. सर्वश्री विल्सन, वेबर, हॉपकिन्स, मॅकडोनेल, विंटरनिट्झ हे सगळे संशोधक व्यासांच्या नास्तित्वाचे प्रतिपादन करतात.

पण भारतीय विद्वानांनी मात्र व्यास हे ऐतिहासिक पुरुष असल्याचेच मानले आहे. त्याला आधारही भरपूर आहेत. वसिष्ठ, पराशर, हे वैदिक ऋषी आहेत. पराशर हा व्यासांचा पिता आणि वसिष्ठ हा त्यांचा पितामह, ही परंपरा ब्राह्मणे व उपनिषदे इथपासून अविच्छिन्न आढळते. सामविधान ब्राह्मणात 'व्यासाय पाराशर्याय' (३.९.८) असा उल्लेख आहे. तै. आरण्यकात 'स होवाच व्यासः पाराशर्यः' (१.९.२) असे म्हटले आहे. बोधायन आणि भारद्वाज यांच्या गृह्यसूत्रांतही व्यासांचा उल्लेख पराशरपुत्र असाच आहे. पाणिनीनेही व्यास हा पराशरपुत्र असल्याचे आपल्या एका सूत्रात सांगितले आहे (अष्टा. ४.३.११०). श्री शंकराचार्य आणि त्यांच्याही आधीचा कुमारिल भट्ट यांना व्यासांचे अस्तित्व मान्य आहे. शंकराचार्यांनी आपली गुरुपरंपरा व्यासांपासूनच सांगितली आहे. बौद्ध साहित्यात व्यासांचे कृष्ण-

द्वैपायन हे नाव कण्हदीपायन असे सांगितले असून, तो बुद्धाचाच एक पूर्वजन्म असल्याचे म्हटले आहे. अश्वघोषाच्या सौंदरनंद या ग्रंथात व्यासांचा आणि त्यांच्या पूर्वजांचाही निर्देश आहे. पुराणपरंपरेत तर व्यासांना त्यांच्या मागच्या पुढच्या पुरुषांसह नमन केलेले आहे. तो श्लोक असा—

**व्यासं वसिष्ठनप्तारं शक्तेः पौत्रमकल्मषम् ।**
**पराशरात्मजं वन्दे शुकतातं तपोनिधिम् ।।**

अर्थ – वसिष्ठांचा पणतू, शक्तीचा नातू, पराशराचा पुत्र आणि शुकमुनीचा पिता अशा तपोनिधी व निष्पाप व्यासांना मी वंदन करतो.

इतिहासातल्या वंशावळीवरूनही व्यासांचे ऐतिहासिकत्व कळून येते. पं. उमाशंकर दीक्षित म्हणतात, की ब्राह्मण समाज अनादिकालापासून गोत्रप्रवररूपी एका अविच्छिन्न शृंखलेने बांधलेला आहे. वसिष्ठ, पराशर आणि पाराशर्य या गोत्रांचे अनेक ब्राह्मणवंश आजही विद्यमान आहेत. पुष्कर क्षेत्रातले बरेचसे ब्राह्मण पाराशर्य या गोत्राचे आहेत. शतपथ ब्राह्मणांचे भाष्यकार हरिस्वामी स्वतःला पाराशर्य म्हणवतात.

एतावता भारतीय परंपरेला तरी व्यासांच्या ऐतिहासिक अस्तित्वाविषयी काडीमात्र शंका नाही.

**व्यासचर्या** – भारतीय संस्कृतीचे सर्वांगांनी यथावत ज्ञान करून घ्यायचे, तर व्यासरचित ग्रंथांचे अध्ययन करणे अपरिहार्य आहे. व्याससाहित्य हा भारतीय संस्कृतीचा मेरुदंड आहे. व्यासरचित आणि व्याससंपादित ग्रंथांना मिळून व्यासचर्या असे म्हणतात. व्यासचर्येच्या अध्ययनाने मनुष्याचा आत्मा शुद्ध व विशद बनतो, असे वराहपुराणात म्हटले आहे (१७५.९).

वेदविभाग – आदियुगात वेद हा एक राशी होता. त्यामुळे तो अध्ययनाला अवघड होऊ लागला होता. आपले अध्ययन समाप्त केल्यावर व्यासांना ही गोष्ट कळून आली. त्यांना दिसले, की वेदांची सूक्ते आणि ऋचा इतस्ततः वेगवेगळ्या गोत्रांतून विखुरलेल्या आहेत. यज्ञसंस्थेला उपयुक्त होईल आणि परंपरेने वेद टिकतील अशा प्रकारे या सर्व वेदराशीचे विभाजन करायला हवे. तसे जर केले नाही, तर वेद नष्ट होतील. किंबहुना त्यात नको तसली भरही पडेल. वेद जर नष्ट-भ्रष्ट झाले, तर वेदाधिष्ठित अशी आपली संस्कृती लयाला जाईल. म्हणून ते त्या कार्याला उद्युक्त झाले. त्यांनी वेदराशीतल्या सर्व ऋचा वेगळ्या काढल्या आणि त्यांच्या संग्रहाला ऋग्वेद असे नाव दिले. त्यांतल्याच गानयोग्य अशा ऋचा वेगळ्या काढून त्यांच्या समूहाला सामवेद अशी संज्ञा दिली. यज्ञप्रक्रियेची तपशीलवार माहिती देणाऱ्या गद्यभागाला यजुर्वेद म्हणून बाजूला काढले. आणि यातुविद्येचे तसेच लौकिक व्यवहारात उपयोजिले जाणारे मंत्र वेगळे करून त्यांचे अथर्ववेद हे नामकरण केले. अशा प्रकारे व्यासां[ी] चार वेदांच्या चार वेगवेगळ्या संहिता तयार करून त्यांनी त्या आपल्या चार प्रमुख शिष्यांना पढवल्या. बह्वृचनामक ऋग्वेद संहिता पैलाला दिली, निगदाख्य यजुर्वेदसंहिता वैशंपायनाला दिली, छंदोग नामक सामवेदसंहिता जैमिनीला दिली आणि आंगिरसी नामक अथर्वसंहिता सुमंतूला दिली. व्यासांचे हे वेद विभाजनाचे कार्य तत्कालीन आचार्यांनी कोणतीही तक्रार न करता मान्य केले. यावरून त्यांच्या या कार्याचे महत्त्व कळून येते. व्यासांच्या वरील चार शिष्यांनी पुढे आपापल्या शिष्यांना स्वतःच्या संहिता पढवल्या. पुढे त्यांच्या अनेक शाखा होऊन वेद अनेकधा विभक्त झाला. कालधर्माप्रमाणे त्यांतल्या बऱ्याचशा शाखा सांप्रत लुप्त झाल्या असून, त्यांतल्या काही शाखा शिल्लक राहिल्या आहेत.

ब्रह्मसूत्रे – उपासना आणि आत्मसाधना यांची उभारणी एखाद्या दर्शनावर आधारित असावी लागते. तरच त्या गोष्टींना महत्त्व येते. वेदामध्ये भगवंताच्या ज्या निर्विशेषरूपाचे प्रतिपादन झाले आहे, त्याच्या अभिव्यक्तीचे एखादे दर्शन तोवर नव्हते. व्यासांनी ब्रह्मसूत्रे लिहून ते काम केले. त्यांनी अध्यात्माचे सिद्धान्त त्या ग्रंथात सूत्ररूपाने ग्रथित केले. ही वेदान्तसूत्रे किंवा ब्रह्मसूत्रे बादरायणाच्या नावावर आहेत. काही पाश्चात्य व भारतीय संशोधकांच्या मते वेदव्यास आणि कृष्णद्वैपायन म्हणजेच बादरायण या दोन व्यक्ती भिन्न आहेत; पण पाणिनी आणि शंकराचार्य यांनी पाराशर्य व्यास हाच ब्रह्मसूत्रांचा कर्ता असे मानले आहे. स्कंद व भागवत पुराणांवरून तीच गोष्ट प्रत्ययाला येते. मध्वाचार्य आणि भामतीकर्ते वाचस्पतिमिश्र निस्संदिग्धपणे तेच मानतात. मात्र श्री. चित्रावशास्त्री यांच्या मते मूळ ब्रह्मसूत्रे जैमिनीची असून, वेदव्यासांनी त्यांच्यावर संस्कार केला आहे. म्हणजे ब्रह्मसूत्रांचे हे संस्करण व्यासकृत आहे, हे निश्चित.

शंकराचार्य, निंबार्काचार्य, रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, मध्वाचार्य, इ. दर्शनकारांनी ब्रह्मसूत्रे ही आधारभूत धरून आपापली सांप्रदायिक दर्शने उभी केली आहेत.

पुराणनिर्मिती – भारतीय संस्कृतीचा लौकिक विस्तार समजायला पुराणांवाचून दुसरा मार्ग नाही. पुराणकार केवळ वैदिकांचे आणि केवळ त्रैवर्णिकांचाच आचारधर्म आणि उपासना सांगत नाहीत; तर सर्व जातीजमातींच्या आणि पुरुषांप्रमाणेच स्त्रियांच्याही उद्धाराचा मार्ग दाखवतात. पुराणकारांची तशी प्रतिज्ञा आहे. लौकिक संस्कृत साहित्यात पुराणांचे स्थान सर्वोच्च आहे. मत्स्यपुराणात सांगितले आहे, की पुराणे ही वेदाच्याही आधीची आहेत (५३.१). पुराणांची एक परंपरा आहे आणि ती अनादिकालापासून चालत आली आहे.

पण प्राचीन काली या पुराणांचे स्वरूप अव्यवस्थित होते. ती सूत–मागधांच्या निरनिराळ्या गटांत विखरून राहिलेली होती. त्यांचे नेटके संपादन झालेले नव्हते. त्यांच्यावर सुंदर भाषेचा साजही चढला नव्हता. अशी गाथारूप फुटकळ पुराणे एकत्र करून व्यासांनी एक सुबद्ध अशी पुराणसंहिता तयार केली आणि आपला शिष्य लोमहर्षण याला ती पढवली. 'या पुराणसंहितेचा तू लोकांत प्रसार कर' अशी आज्ञा व्यासांनी त्याला दिली. त्याने व्याससंहितेच्या आधारावर स्वतःची अशी एक पुराणसंहिता तयार केली आणि ती आपल्या सहा शिष्यांना पढवली.



व्यासमूर्ती – वरदराजमंदिर, कांची

त्या शिष्यांनी स्वतः स्वतंत्रपणे संशोधन व संकलन करून आपापल्या नव्या संहिता तयार केल्या. अशा प्रकारे मूळ एका पुराणाची १८ पुराणे निर्माण झाली. अशा या पुराणसृष्टीच्या नव्या युगाचे प्रवर्तकही व्यासच होत.

महाभारत – या सर्व ग्रंथसंपदेत आणि वाङ्मयकार्यात महाभारताचा महिमा अलौकिक आहे. व्यासांच्या कीर्तीचा तो शुभ्र जयस्तंभ आहे. त्या ग्रंथात अर्थशास्त्र, धर्मशास्त्र आणि मोक्षशास्त्र ही तीन्ही जीवनदर्शने व्यासांनी सुंदर कथांनी सजवून–शोभवून मांडली आहेत. आर्य जातीचे विस्तृत ज्ञान आणि विशाल लोकजीवन यांचा सुस्पष्ट साक्षात्कार त्यावरून घडतो. म्हणूनच त्याला 'पाचवा वेद' ही गौरवास्पद उपाधी प्राप्त झाली आहे.

हिमालयाच्या उच्च प्रदेशात नर-नारायण नावाचे दोन पर्वत आहेत. तियून भागीरथीचा प्रवाह चालतो. तिच्या काठी विशाला बदरी नावाचे एक पवित्र स्थान आहे. व्यासांनी तिथे आपला आश्रम केला. भारतीय युद्धाच्या समाप्तीनंतर लवकरच ते या आश्रमात जाऊन बसले आणि त्यांनी तीन वर्षे सतत काव्योद्योग करून महाभारतरूपी उत्तम आख्यान निर्माण केले. (म. भा. आदि. ५६.३२)

या महाभारताची गौरवकथा डॉ. वासुदेवशरण अग्रवाल पुढीलपणे वर्णितात–

महाभारत खऱ्याखुऱ्या अर्थाने प्राचीन भारतवर्षाचा विश्वकोश आहे. जगातल्या साहित्यात तो एक दिग्गज ग्रंथ आहे. याच्या तुलनेने ग्रीकांचे इलियड व ओडेसी किंवा आइसलँड व स्कँडिनेव्हियाचे प्राचीन एड्डा व सागा ही महाकाव्ये फार मागे पडतात. महाभारत एका अंगाने नीती व धर्म यांचे अक्षय्य भांडार आहे; तर दुसऱ्या अंगाने त्यात प्राचीन गाथाशास्त्राची अनंत सामग्री आहे. व्यासांनी महाभारत केवळ अतीत घटनांची निव्वळ जंत्री या स्वरूपात रचले नाही. तसे असते, तर अनेक ऐतिहासिक ग्रंथांप्रमाणे ते पुस्तकांच्या कपाटात धूळ खात पडले असते. पण महाभारत तसे नाही. ते एक जित्याजागत्या चित्राप्रमाणे आमच्या दृष्टीसमोर राहिले आहे. त्यातील अर्थाचे व्याख्यान अगणित प्रवचनकार आपापल्या व्यासपीठावरून करीत राहिले आहेत. पाश्चात्य विचारवंतांची सांप्रत अशी तक्रार आहे, की त्यांचे नवे ज्ञान केवळ विशेषज्ञांच्याच हातांत असून, सामान्य लोकांपासून ते दूरच राहिले आहे. जीवन, मरण, सृष्टी आणि प्रलय यांच्या संबंधात होणारी नवी नवी वैज्ञानिक संशोधने लोकांपर्यंत नेऊन पोचविण्याचे आणि ती लोकांच्या जीवनात समाविष्ट करण्याचे कोणतेही साधन वैज्ञानिकांजवळ नाही. पण भारतवर्षात मात्र कथा-कीर्तनांच्या, प्रवचनांच्या द्वारे विशेषज्ञ आणि सामान्य लोक यांच्यातली दरी बुजवण्याचे काम प्राचीन काळापासून होत आले आहे. त्यामुळेच रामायण, महाभारत आणि पुराणे यांच्यांतल्या कथा देशाच्या कोनाकोपऱ्यापर्यंत पसरल्या आणि व्यासांचे महनीय ज्ञान सामान्य जनांच्या कानामनात रिगून अमर झाले.

**व्यास आणि राष्ट्रीय अभ्युत्थान** – अज्ञात अतीतापासून वर्तमानापर्यंत आणि हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत एक प्रचंड देशकाल व्यासांच्या विशाल दृष्टीपुढे उभा होता. या राष्ट्राचे अभ्युत्थान घडावे एतदर्थ ते बद्धपरिकर झाले होते. राष्ट्र सुखी, संपन्न आणि सर्वांगी परिवर्धित व्हायचे, तर आधी राज्यातली

राजनीती सुरक्षित राहिली पाहिजे. राजा नीतिमान, चारित्र्यवान, समर्थ आणि सर्वार्थी सावधान असला पाहिजे. जर राजा समर्थ नसेल, तर दुष्ट-दुर्जन सज्जनांना खाऊन टाकतील आणि धर्माची नौका बुडून जाईल. राष्ट्राचा म्हणून एक सामान्य धर्म असतो आणि तो शासनाच्या दक्षतेवर आणि सुव्यवस्थेवर आधारलेला असतो. म्हणून व्यासांनी राजसत्तेला विस्तृत आणि सुयोग्य मार्गदर्शन केले आहे. सर्व धर्म हे राजधर्माच्या आधीन असतात, हे व्यासांना पूर्णपणे उमगले होते. म्हणून ते राजधर्माचे विवरण करताना म्हणतात – जो लोकरंजन करतो, अर्थात प्रजेला सुखी ठेवतो तो राजा. जो लोकांना संकटाच्या खाईतून बचावतो तो क्षत्रिय. राजा जेव्हा योग्य प्रकारे दंडनीतीचे पालन करतो तेव्हा तो काल घडवू शकतो. त्याच वेळी भूमीवर सत्य युग अवतरते. राजाने माळी व्हावे, कोळसे बनवणारा होऊ नये. माळी फुलांफळांसाठी वृक्षांची जोपासना करतो. तद्वत राजाने प्रजेला समृद्धीचा मार्ग दाखवून तिच्याकडून त्या समृद्धीतला चतुर्थांश कररूपाने ग्रहण करावा. कोळशांचा व्यापारी सगळा वृक्षच मुळापासून तोडून तो जाळून टाकतो. तद्वत राजाने प्रजेला मुळासकट उच्छेदून तिला ओरबाडून घेऊ नये. एक राजधर्म बिघडला, की वेद, धर्म, वर्ण, आश्रम, त्याग, तप, विद्या, सगळे काही रसातळाला गेले असे समजावे (म. भा. शांति ६३).

**व्यास आणि धर्म** – व्यासांनी धर्माचे जे विवेचन केले आहे, ते त्यांचे महान ऋषित्व किंवा दर्शन आहे. देशकालपरिस्थितीत व्यक्ती, राष्ट्र, समग्र जीवन, लोक आणि परलोक या सर्वांचे धारणपोषण करतो, तो धर्म होय, अशी त्यांची धर्मव्याख्या आहे. लोकस्थितीचे सनातन बीज म्हणजे धर्म होय. धर्म म्हणजे केवळ स्वर्ग-मोक्षाचा विचार नव्हे, तर या व्यावहारिक जगात लोकधारणा करतो; लोकांना सुखी, समृद्ध, परस्परपूरक, नीति-प्रवण आणि पुरुषार्थी बनवतो, तो धर्म होय. धर्माने इहलोकी माणसाचे कल्याण करायला हवे. ते परलोकीच्या कल्याणाहूनही श्रेष्ठ होय.

जर धर्म ही जीवनाचे धारण करणारी उत्तम वस्तू असेल, तर जीवनही तितकेच मूल्यवान असायला हवे. व्यासमते जीवन रडण्या-कुढण्याचे नसून ते आनंदमय आहे. माया समजून त्याचा त्याग करता कामा नये. व्यास इहलोकी कर्मवाद मानतात, त्याबरोबरच दैववादही मानतात आणि अध्यात्म किंवा आत्म-तत्त्व यांच्यावरही विश्वास ठेवतात. व्यासदर्शनाचा केंद्रबिंदू देव नसून मनुष्य आहे. ते स्पष्टपणे उद्घोषितात –

> गुह्यं ब्रह्म तदिदं ब्रवीमि ।
> न हि मानुषाच्छ्रेष्ठतरं हि किञ्चित् ।
> (म. भा. शांति. १८०.१२)

अर्थ – (लोकहो), मी हे रहस्यज्ञान तुम्हाला सांगतो, की मनुष्याहून या जगात दुसरे काहीही श्रेष्ठ नाही.

म्हणूनच त्यांनी माणसाला पुरुषार्थाचा उपदेश केला आहे. पाणी म्हणजे हात म्हणजेच पुरुषार्थ, पुरुषाचा उद्यम. व्यासांची पुरुषार्थावर विलक्षण श्रद्धा होती. त्यासाठी त्यांनी इंद्राच्या मुखाने पाणिवादाची प्रशंसा केली. इंद्र म्हणतो –

> अहो सिद्धार्थता तेषां येषां सन्तीह पाणयः ।
> अतीव स्पृहये तेषां येषां सन्तीह पाणयः ।
> पाणिमद्‌भ्यः स्पृहाऽस्माकं यथा तव धनस्य वै ।
> न पाणिलाभादधिको लाभः कश्चन विद्यते ॥
> (म. भा. शांति. १८०.११.१२)

अर्थ – ज्यांना हात आहेत ते काय करू शकणार नाहीत! ज्यांना हात आहेत ते सिद्धार्थ होत. ज्यांना हात आहेत ते मला अतिशय आवडतात. जशी तुला धनाची आकांक्षा, तशीच मला हातांची. पाणिलाभाहून दुसरा कोणताही वरचढ लाभ नाही.

**व्यासांचा मानवीय दृष्टिकोण** – या संसारात जेवढे म्हणून प्रयत्न आहेत, जेवढ्या म्हणून योजना आहेत, त्या सर्वांचा मध्यबिंदू मानव आहे. सर्व काही तेव्हाच खरे, की जेव्हा ते मानवाला हितकारी ठरेल. मानवी जीवनात ज्ञान आणि कर्म यांचा समन्वय आहे. त्या जीवनाची पूर्णता होण्यासाठी आध्यात्मिक साधना आणि सिद्धी जितकी आवश्यक आहे, तितकीच लौकिक समृद्धीही आवश्यक आहे.

मानवी ऐहिक जीवनाचे आधारस्तंभ दोन, एक वार्ता किंवा अर्थशास्त्र आणि दुसरा राज्यशास्त्र किंवा दंडनीती. अर्थावाचून जगात पान हालत नाही. आणि हा मानवी अर्थ राजधर्माधिष्ठित आहे. म्हणून राजाने योग्य प्रकारे नीतीला अनुसरून शासन चालवावे आणि माणसाने उद्यमशील राहावे. जो अर्थलाभ करून घ्यायचा तो स्वाभिमान जागृत ठेवून साधावा. अप्रतिष्ठेच्या मार्गाने माणसाने कोणत्याही वस्तूची आकांक्षा धरू नये. भीक मागणाऱ्याचा मार्ग किंवा लुटारूपणाचा मार्ग अप्रशस्त होय. मग त्यात केवढाही अर्थलाभ व्हायचा असो. श्रमार्जित लाभ, हेच तत्त्व माणसाने सदैव डोळ्यांपुढे ठेवावे.

महाभारत लिहिताना व्यासांना युद्धे, कपट-कारस्थाने, कुरुक्षेत्रावरचा अठरा अक्षौहिणींचा संहार आणि त्यातून अखिल भारतावर पसरलेला विषण्ण उद्वेग, इ. सर्व गोष्टींचे वर्णन करावे लागले. त्यामुळे रचना पूर्ण झाल्यावर त्यांच्याही मनाला विषादाने ग्रासले. कोणत्याही गोष्टीने त्यांना चैन पडेना. अशा परिस्थितीत एके दिवशी त्यांना नारदमुनी भेटले. आपली मनोव्यथा व्यासांनी नारदांना सांगितली. त्यावर नारद म्हणाले, 'तुम्ही श्रीकृष्णाचे चरित्र भक्तिभावाने वर्णन करणारा ग्रंथ

ळाच ग्रंथ लिहा, म्हणजे तुमच्या मनाची अशांती दूर होईल.'

मग व्यास भागवतपुराणाच्या रचनेला लागले. त्याच्या दशम स्कंधात त्यांनी साद्यंत कृष्णचरित्र वर्णिले. त्यात त्यांना योगेश्वर श्रीकृष्णासारखा अद्वितीय नायक वर्णायला मिळाला. त्यामुळे त्यांची भक्तिधारा भागीरथीसारखी वाहू लागली. त्यांच्या प्रतिभेला जणू नवा बहर आला. त्यांनी भागवतात कित्येक अप्रतिम कृष्णस्तोत्रे रचून घातली. त्यांचे भागवत हे भक्तीचे महाकाव्य ठरले आणि ते जन्माला घालून व्यास शांत झाले.

महाभारताच्या शेवटी जे चार श्लोक आहेत, त्यांना भारत सावित्री म्हणतात. त्यांत व्यासांनी मानवजातीला शाश्वत संदेश देऊन ठेवला आहे, तो असा–

> न जातु कामान्न भयान्न लोभात्
> धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः ।
> धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये
> जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ।

अर्थ – काम, भय किंवा लोभ, तसेच जीव यांपैकी कोणत्याही कारणासाठी माणसाने धर्माचा त्याग करू नये. कारण धर्म हा नित्य, शाश्वत असून, सुखदुःखे अनित्य आहेत. तसेच जीव (आत्मा) नित्य असून, जन्म आणि मृत्यू हे अनित्य आहेत.

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर व्यासांच्या कार्याची महती सांगताना म्हणतात –

हिंदुस्थानच्या वाङ्मयातच काय, तर जगाच्या वाङ्मयात अत्यंत थोर अशी व्यक्ती म्हटली म्हणजे कृष्णद्वैपायन व्यास हीच होय. यापेक्षा थोर व्यक्ती सापडणे शक्य नाही. होमर आणि वाल्मीकी या व्यक्ती कदाचित तुल्य होऊ शकतील, पण त्यांमध्ये आणि व्यासांमध्ये महदंतर आहे. वाल्मीकीने एक सुंदर काव्य करून एका राजघराण्यातील एका पुरुषास देवतुल्य केले. ती कामगिरी लहान नाही. तथापि वाल्मीकीचे हे कार्यदेखील कृष्णद्वैपायनाच्या कार्यापेक्षा लहान आहे. वाङ्मयामार्फत जगाचे एकीकरण घडवावे या तऱ्हेची कल्पना मनात आणून, तिचा उठाव करणारा पुरुष जगात व्यासांशिवाय दुसरा झालाच नाही.

ऋग्वेद हा पंजाबातील सोमयाजींचा संप्रदाय होता. यजुर्वेद हा दक्षिणेकडील पशुयाग करणाऱ्यांचा संप्रदाय होता. सामवेद हा अत्यंत प्राचीन सत्रसंस्था चालविणाऱ्यांचा संप्रदाय होता आणि अथर्ववेद हा मगधातील प्राचीन मगांच्या परंपरेचा विकास होय, असे शोधाअंती दिसून येईल. या भिन्न लोकांचे यजनसंप्रदाय एक करून सर्वसामान्य धर्म निर्माण करणे, ही क्रिया वेदव्यासांनी केली आणि त्या क्रियेचे फल आजची वेदचतुष्टयीची रचना हे होय. या रचनेमुळे प्रत्येक वेद भिन्न धर्म न राहता एकाच मोठ्या समवाय धर्माचे अंग बनला. हे कार्य करण्याकरिता व्यासांनी जी मोठी संस्था स्थापन केली, तीमुळेच त्यांना 'कुलपति' ही पदवी प्राप्त झाली. सर्व ठिकाणच्या लोकांचे संग्रहण त्यांच्या विद्येचे संग्रहण केल्याने होते आणि संप्रदायभिन्नतेमुळे होणारा विरोधदेखील या संग्राहक कृतीने काढून टाकता येतो, हे समाजशास्त्रीय तत्त्व व्यासांनी जाणले आणि आपल्या थोर कार्याची उभारणी केली. एकीकृत विद्येचा प्रसार पुन्हा निराळ्या तऱ्हेने वेदव्यासांनी केला. वेदव्यासांना असेही दिसून आले, की सामान्य लोकांत यज्ञधर्माचा प्रसार नाही; सामान्य लोकांचा धर्म निराळाच आहे. सामान्य जनतेस मान्य अशी निरनिराळी स्थानिक दैवते आहेत, तीर्थस्थाने आहेत, पवित्र झालेले प्रदेश आहेत; वीरकथा आणि राक्षसमर्दनाच्या कथा जागोजाग आहेत; शिव, विष्णू, देवी या तीन देवतांच्या उपासना चोहोकडे आहेत व या सर्व गोष्टींस सहायक होईल असे प्राचीन वाङ्मय सूतवर्गाने बरेचसे संरक्षून ठेवले आहे. अशा परिस्थितीत केवळ हवी अर्पण करणाऱ्या लोकांच्या धर्मकर्माच्या एकीकरणाने जनतेचे ऐक्य घडविण्याचा कार्यभाग होणार नाही. तर सामान्य लोकांचे उपासनासंप्रदायदेखील एकत्रित केले पाहिजेत आणि त्यांचे वाङ्मयही एकत्रित झाले पाहिजे. या दृष्टीमुळे वेदव्यासांनी चोहोकडच्या साहित्याचे एकीकरण करण्यास सुरुवात केली. त्यांनी ज्या कार्यास सुरुवात केली, ते कार्य अनेक अनुयायांमार्फत पुढे वृद्धिगत झाले आणि त्यामुळे सर्व पुराणांचे आद्यकर्ते अशी त्यांची प्रसिद्धी झाली. [प्रा. म.; प्रा. च. को. हिंदी; भारती, ऑगस्ट १९५९; म. भा. व्य.; पुराणम्, जुलै १९६१; पु. वि.; नवभारत, जून १९६४.]



**व्यासराय** (इ. स. १४४७–१५३९) कर्नाटकातील एक महान वैष्णव भक्त व कवी. याला व्यासतीर्थ असेही म्हणतात. कावेरी नदीच्या तीरावरील बन्नूर या गावी याचा जन्म झाला. तो मोठा नैयायिक होता. न्यायामृत, तर्कतांडव व चंद्रिका हे त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याव्यतिरिक्त त्याने कन्नड भाषेत अनेक भक्तिरसपरिपूर्ण पदे रचली आहेत.

व्यासराय एक कुशल राजनीतिज्ञही होता. विजयनगरच्या सम्राटांचा राजगुरू होण्याचा मान त्याने मिळवला होता. तो विजयनगरचा राजकीय सल्लागार असून, त्या साम्राज्याच्या उत्कर्षात त्याचाही अंशभाग होता. सम्राट त्याला धर्माचा आधारस्तंभ म्हणून गौरवीत.

श्रेष्ठ हरिदास पुरंदरदास व कनकदास हे याचे शिष्य होते. चैतन्यदेवाचा हा गुरू होता, अशी आख्यायिका आहे. आजही चैतन्यमताचे अनुयायी स्वतःला व्यासरायमठाचे शिष्य समजतात.

व्यासरायाची बुद्धी जितकी प्रखर, तितकीच त्याची भक्तीही

एकांतिक होती. दासकूटातील ही एक असामान्य विभूती गणली जाते. व्यासरायाने हरिदासपंथ लोकव्यापी केला, संप्रदायातील उच्चनीच भेद नष्ट करून सर्वांना समान भूमिकेवर आणले आणि भक्तीचे द्वार सर्वांना खुले केले.

याने कृष्णभक्तिपर अनेक पदे रचली आहेत, त्यांतील एक पद असे–

**अंतरंगदल्लि हरियकाणदव हुट्टुकुरुडनो ।**
**संतत श्रीकृष्णचरिते केळदव**
**जडमति किवुडनो एंदेंद्रिगु पल्लवी ॥**
**कुरुवीरसखनाद कृष्णन मुंदे कुणियदव कुंटनो ।**
**नरहरिचरणोदक न धरिसद**
**शिर नायुंड हेंचु कणो ॥**
**हरुषदिंदलि नरहरिय पूजेय**
**माडदवने कै मुरुकनो ।**
**सुरवर्य कृष्णप्रसादवल्लद ऊट**
**सूकरभोजनवो एंद्रेंदिगु ॥**

अर्थ– अंतरंगात श्रीहरीला न पाहणारा तो जन्मजात आंधळा होय. नेहमी श्रीकृष्णचरित्र श्रवण न करणारा तो जडमती बहिरा होय. कुरुवीरसखा जो कृष्ण त्याच्या समोर न नाचणारा तो पंगू होय. नरहरीचे चरणोदक धारण न करणारा तो कुत्रा, तो शिवलेले मडके होय. आनंदाने नरहरीची पूजा न करणारा, तो थोटा होय. तसेच सुरवर कृष्णाचा प्रसाद नसलेले जेवण जेवणारा तो सूकरभोजी होय.

याच्या पदांच्या शेवटी सिरिकृष्ण अशी मुद्रिका असते.

हंपीजवळ तुंगभद्रा नदीतील एका बेटावर व्यासरायाची समाधी आहे. [ भागवत दर्शन; हिं. क. भ. तु. अ.; कर्नाटक ]

## व्यास हरिराम

(इ. स. १४९२–१५९८) राधावल्लभ संप्रदायातला एक कवी. वृंदावनात हरित्रयी नावाने जे तीन रसिक संतकवी प्रसिद्ध आहेत, त्यांतला हरिराम व्यास हा एक होय. याचा जन्म मध्यप्रदेशातील ओरछा राज्यात टीकमगढ येथे झाला. याच्या वडिलांचे नाव संमोखन शुक्ल असे होते. मुळात व्यास ही हरिरामाची पांडित्यदर्शक उपाधी होती; पण पुढे ते त्याचे आडनावच ठरले.

हरिराम हा गृहस्थ होता. त्याला तीन मुलगे आणि एक मुलगी होती. तारुण्यात येईपर्यंत संस्कृत साहित्य आणि दर्शने यांत तो पारंगत झाला. त्याने काशीसारख्या विद्वानांच्या नगरीत जाऊन तिथल्या पंडितांशी शास्त्रार्थही केले. पण एवढी विद्वत्ता मिळवूनही हरिरामाच्या मनाला शांती लाभेना. मग त्याला काही रसिक भक्त भेटले आणि त्यांनी त्याला राधावल्लभ संप्रदायाचे संस्थापक श्रीहितहरिवंश यांना भेटायला सांगितले. हरिराम वृंदावनात जाऊन त्यांना भेटला. त्यांनी त्याच्यावर अनुग्रह करून त्याला राधावल्लभ संप्रदायाची विधियुक्त दीक्षा दिली. या प्रसंगाविषयी तो लिहितो–

**उपदेस्यौ रसिकन प्रथम, तब पाये हरिवंश ।**
**जब हरिवंश कृपा करी, मिटे व्यासके संस ॥**
**मोह मयाके फन्द बहु, व्यासहि लीनौ घेरि ।**
**श्रीहरिवंश कृपा करी, लीनो मोको टेरि ॥**

भावार्थ– रसिकांनी उपदेश केला म्हणून मी श्रीहरिवंशजींना भेटलो. त्यांनी कृपा केल्यावर मला शांती मिळाली. मोह-मायेने मला घेरून टाकले होते. पण हरिवंशजींच्या कृपेमुळे माझा उद्धार झाला.

हरिराम हा राधावल्लभ संप्रदायात राधेची सखी विशाखा हिचा अवतार मानला जातो. तो अतिथिसत्काराविषयी जसा प्रसिद्ध होता; तसाच निर्भय, धर्मपरायण व नितांत प्रेमळ होता.

हरिरामाने हिंदी भाषेत दोन व संस्कृत भाषेत एक असे तीन ग्रंथ लिहिले. यांपैकी व्यासवाणी हा त्याचा ग्रंथ लोकप्रसिद्ध आहे. पूर्वार्ध व उत्तरार्ध असे त्याचे दोन भाग आहेत. माधुर्य भक्ती व राधा-कृष्णांची निकुंजलीला हे व्यासवाणीचे प्रतिपाद्य विषय होत. त्याने स्वकीय–परकीय हे भेद सोडून राधेचे वर्णन केले आहे. रासलीला हा त्यातला महत्त्वाचा भाग आहे. रासलीलेची पदे सुमारे ५० आहेत. त्यांतले एक पद असे–

**राजत दुलहिनि दूलह संग ।**
**रास रच्यौ राधा मोहन मिल गुनसागर झिलिरंग ।**
**कमल मंडली पुलिन खंड में चंद किरन अनुषंग ।**
**गावत कोकिल कल सुर बाजत भूषन ताल मृदंग ।**
**बीच-बीच मुरली मन चुरली बाजत सुख सुख चंग ।**

भावार्थ– श्रीकृष्णाने वृंदावनात रास रचला. राधा त्याला तिथे भेटली. चांदणी रात्र होती. यमुनेच्या वाळवंटात कमळे उमललली होती. कोकिळ गात होते. रास नृत्याला ताल-मृदंगाची साथ होती. मधे मधे कृष्णाची मनमोहक मुरली वाजत होती आणि श्रीकृष्ण हा 'दूल्हा' आपल्या 'दुल्हनी' सह त्या रासमंडलात विराजत होता.

व्यासवाणी ही भक्तिभावनेचा परिपोष करणारी प्रौढ रचना आहे. त्याच्या पद्यात व्रजभाषेचे मार्दव प्रतीत होते. हरिरामाला संगीताचे उत्तम ज्ञान होते. त्याने आपली पद्ये गेयतेचा विचार करून रचली आहेत. त्याच्या वाणीवर कबीर, नंददास व हित हरिवंश यांच्या काव्यशैलीचा फार मोठा प्रभाव आहे.

हरिराम हा उदार आणि व्यापक दृष्टीचा पुरुष होता. धर्मक्षेत्रातले आडंबर त्याला मान्य नव्हते. धर्माच्या नावावर उ

पोषण करणाऱ्या ब्राह्मणांची त्याने कठोर शब्दांत निर्भर्त्सना केली आहे. [ हिं. सा. को.; रा. सं. सि. सा. ]

**व्याहृतिव्रत** एक काम्य व्रत. चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून याला आरंभ करावा. व्रतावधी एक वर्ष. व्रतधारी व्यक्तीने एखाद्या जलाशयात स्नान करावे. सहा दिवस अनुक्रमे गोमूत्र, गोमय, दूध, दही, तूप व कुशमिश्रित जल प्राशन करावे. सातव्या दिवशी उपवास करावा. रोज तिळाचा होम महा-व्याहृती उच्चारून करावा. याप्रमाणे प्रत्येक महिन्यात हे व्रत आचरावे. उद्यापनाच्या वेळी नवे वस्त्र, दक्षिणा, सोने, कांस्यपात्र व दुभती गाय यांचे दान करावे. फल–सम्राटपद-प्राप्ती. [हि. ध.]

**व्यूह** विशिष्ट आकाराची सैन्यरचना. युद्धातील डावपेचांचा एक भाग आणि स्वपक्षाच्या संरक्षणाचे व शत्रुपक्षाच्या निर्दालनाचे एक अमोघ साधन म्हणून प्राचीन काळी व्यूहरचना केली जात असे. आपल्या सैनिकांची संख्या, त्यांच्याकडून करून घ्यायचे काम, तसेच प्रतिपक्षाचे बल, इ. बाबींचा विचार करून ही रचना करणे आवश्यक असते. कारण योजनाबद्ध काम कमी शक्तीत अधिक फलदायी ठरते.

मधला भाग, दोन बाजू, पुढला व मागचा भाग असे व्यूहाचे घटक असतात. पुढच्या भागाला मुख किंवा बिनी, मागील भागाला पृष्ठ किंवा पिछाडी, दोन बाजूंना पक्ष वा बगल आणि मध्य भागाला वक्ष किंवा मध्यभाग अशा संज्ञा आहेत. स्थूल मानाने बिनीला रथी, दोन बाजूंना घोडेस्वार, मध्ये हत्ती व पिछाडीला पायदळ अशी सैनिकांची व्यवस्था असते.

व्यूह प्राण्यांच्या वा पक्ष्यांच्या आणि विशिष्ट वस्तूंच्या आकाराचे असतात. कौटिल्याने व्यूहाचे दंडाकार, सर्पाकार, मंडलाकार व असंहत असे चार प्रमुख प्रकार मानले आहेत. यांचेच अनेक प्रकार करून व्यूहांची संख्या वाढविता येते. सैनिक तिरक्या रांगेने उभे केले म्हणजे ती दंडाकार रचना होते. एका-भोवती एक वर्तुळे तयार केली म्हणजे सर्पाकार व्यूह होतो. सर्व बाजूंना तोंडे करून सैनिक उभे केले म्हणजे मंडलाकार रचना होते आणि सैन्याचे स्वतंत्र विभाग करून, त्या प्रत्येक विभा-गाला पृथक्पणे हालचाल करता येईल, अशा प्रकारे उभे केले म्हणजे ती असंहत रचना होते. याशिवाय व्यूहाच्या मध्यभागी रथ, बगलांवर हत्ती व पिछाडीला घोडे असले, की त्याला अरिष्ट व्यूह म्हणतात. पायदळ, घोडे, रथ व हत्ती हे एकामागे एक रांगेने असले, की त्याला अचलव्यूह असे नाव आहे. हत्ती, घोडे, रथ व पायदळ एकामागे एक असले, तर त्याला कौटिल्य अप्र-तिहत व्यूह म्हणतो.

शत्रूने एखादा व्यूह रचला तर त्याचा भेद करण्यासाठी कोणता प्रतिव्यूह रचावा याची माहिती चाणक्याने पुढीलप्रमाणे दिली आहे–प्रदर व्यूहावर दृढक, दृढकावर असह्य, श्येनावर चाप, प्रतिष्ठितावर सुप्रतिष्ठ, संजयावर विजय, स्थूलकर्णावर विशाल विजय व पारिपंततकावर सर्वतोभद्र. शत्रूने कोणताही व्यूह रचला तरी, दुर्जय व्यूह बनवून त्याला तोंड देता येते, असे चाणक्याचे मत आहे.

महाभारताचा काळ हा व्यूहज्ञानाच्या दृष्टीने उत्कर्षाचा काळ मानला जातो. बृहस्पती, भीष्म, द्रोण व अर्जुन हे व्यूह-ज्ञाते म्हणून प्रसिद्ध आहेत. या शास्त्राचे ज्ञान अपुरे असले म्हणजे मृत्यूशीच सामना असतो. अभिमन्यूला चक्रव्यूहात शिरण्याचे ज्ञान होते, पण बाहेर येणे त्याला माहीत नव्हते. म्हणून त्याला मरण पत्करावे लागले. या युद्धात कौरव-पांडवांनी अनेक व्यूह रचले होते. कौरवांनी रचलेल्या काही प्रमुख व्यूहांची नावे अशी – गरुडव्यूह, मकरव्यूह, क्रौंचव्यूह, मंडलव्यूह, कूर्मव्यूह व सर्वतोभद्रव्यूह. पांडवांनी रचलेले काही प्रमुख व्यूह असे – क्रौंचव्यूह, अर्धचंद्रव्यूह, श्येनव्यूह, मकरव्यूह, कर्कव्यूह, वज्रव्यूह, शृगालव्यूह, अचलव्यूह, अजगरव्यूह व सर्वशत्रुंजयव्यूह.

मनुस्मृतीत दंड, शकट, वराह, मकर, सूची व गरुड या व्यूहांचे उल्लेख आहेत (७.१८७).

सैन्य एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जात असताना सर्व बाजूंनी आक्रमणाचे भय असल्यास दंडव्यूहाने मार्गक्रमण करावे, असे मनुस्मृतीवरील टीकेत कुल्लूकाने म्हटले आहे (७.१८७). याच संदर्भात या टीकेत पुढील विवरण आहे – सैन्याच्या मागच्या बाजूने भय असल्यास शकट व्यूहाने चालावे, बाजूंना भीती असल्यास वराहव्यूहाने गमन करावे, समोरून आक्रमणाची शक्यता असल्यास सूचीव्यूहाने जावे. राजाने मात्र सदैव पद्म-व्यूहाने नगरातून बाहेर पडावे.

जमीन समतल असल्यास दंड, गरुड व सूची हे व्यूह आणि ती उंच-सखल व अडचणींची असल्यास शकट, मकर व वराह या व्यूहांनी चालावे, असे सांगितले आहे.

महाभारतकालानंतर इ. स. च्या १५ व्या १६ व्या–शतका-पर्यंत व्यूहरचना होत असल्याचे उल्लेख मिळतात. पानिपतच्या रणभूमीवर इ. स. १५२६ मध्ये बाबर व इब्राहीम लोदी यांच्यांत झालेल्या युद्धात इब्राहीमने खासानी व्यूह रचला होता, असा उल्लेख आढळतो. अशा प्रकारचे व्यूह रचले जात असले, तरी त्यात शास्त्रीय ज्ञानापेक्षा परंपरागत ज्ञान अधिक असावे, असे म्हटले जाते. [ कौटिलीय अर्थशास्त्र – श्री. करंदीकर, श्री. हिवरगावकर, १९२७; व्या. ज्ञा. को.; म. भा. स.; वे. रा. द. उत्तरार्ध; प्रा. भा. सं.; म. भा. उ.]

**व्योमव्रत** एक काम्य व्रत. सूर्य ही या व्रताची देवता होय. पांढऱ्या चंदनाच्या गंधाची व आंगठयाच्या एका पेराच्या लांबीची आकाशाची प्रतिमा करून ती सूर्यपुढे ठेवावी. करवीर फुलांनी सूर्याची पूजा करावी. आकाशाच्या प्रतिमेच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर या दिशांना अनुक्रमे केशर, अगरू, पांढऱ्या चंदनाचे गंध व चतुःसम (दालचिनी, वाहव्याचे पान, लवंग व केशर किंवा कस्तूरी, चंदन, केशर व कापूर) आणि मध्ये रक्तचंदनाचे गंध लावावे व ' खखोल्काय नमः ' हा मंत्र म्हणावा. फल–सूर्यलोकप्राप्ती. [हि. ध.]

**व्योमशिवाचार्य** वैशेषिक दर्शनाचा एक भाष्यकार. याच्या नावावरून, हा दाक्षिणात्य असावा असे अनुमान केले जाते. प्रशस्तपादभाष्यावर याची व्योमवती नावाची सर्वांत प्राचीन टीका आहे. उदयनाचार्याने किरणावलीत ' आचार्याः ' म्हणून याचा गौरवाने उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणे राजशेखरानेही न्यायकंदलीत अनेक भाष्यकारांच्या नामावलीत प्रथम याचे नाव गोवले आहे. यावरून हा इ. स. च्या १० व्या शतकापूर्वी होऊन गेला असावा, असे वाटते. श्रीधर, शिवादित्य आणि वल्लभाचार्यादी आचार्य प्रत्यक्ष व अनुमान असे प्रमाणद्वय मानतात. पण व्योमशिवाचार्य त्या व्यतिरिक्त शब्द हेही एक स्वतंत्र प्रमाण मानतो. [भा. द.; पू. म. भा.]

**व्योमषष्ठी** एक काम्य व्रत. याचा विधी असा – सूर्याच्या प्रतिमेची पूजा न करता षष्ठीला सायंकाळी आकाशातल्या सूर्याची आणि आकाशाची पूजा करावी. सूर्याला प्रस्थ मापाचे तूप व मधाने भरलेले एकेक पात्र अर्पण करावे, तसेच एक प्रस्थ तीळ व तीन प्रस्थ तांदूळ अर्पण करावे असे सांगितले आहे. फल – सूर्यलोकप्राप्ती. [ हि. ध.]

**व्रजमंडल** एक पुण्यप्रदेश. मथुरेच्या आसपासच्या भागाला हे नाव आहे. पाहा–व्रज.

**व्रत** विशिष्ट कालासाठी किंवा आमरण आचरायचा विशिष्ट नेमधर्म म्हणजे व्रत होय. व्रत हा शब्द आणि व्रतकल्पना या दोन्ही गोष्टी फार प्राचीन असून, ऋग्वेदातही त्यांचा आढळ होतो. व्रत हा शब्द वृ=निवड करणे या धातूपासून बनलेला आहे. या धातूपासूनच वर हा शब्द बनलेला आहे. वर म्हणजे कन्येने निवडलेला पती होय. वृ याचा अर्थ इच्छा करणे असाही होतो. सत्ताधीश किंवा अधिकारारूढ असलेल्या व्यक्तीची इच्छा दीच इतरेजनांना आज्ञा किंवा कायदा म्हणून मान्य करावी लागते. श्रद्धाळू लोकांची अशी धारणा असते, की देवांनी स्वतःकरिता आणि प्राणिमात्राकरिता काही विशिष्ट आज्ञा केल्या आहेत. अशा आज्ञा किंवा कर्तव्ये दीर्घ काळ पाळली जातात, तेव्हा त्यांना रूढी किंवा चालीरीती यांचे स्वरूप प्राप्त होते. देवांनी नेमलेली विशिष्ट कृत्ये आपण केलीच पाहिजेत, अशी श्रद्धा लोकांमध्ये उत्पन्न होते, तेव्हा त्यांना धार्मिक आचार किंवा उपासना असा अर्थ प्राप्त होतो. जेव्हा एखादी व्यक्ती आपल्या आचारावर किंवा अन्नादी व्यवहारांवर देवाच्या कृपे साठी निर्बंध घालते, तेव्हा त्या निर्बंधांना पवित्र प्रतिज्ञा किंवा धार्मिक कर्तव्य असे स्वरूप येते. या सर्वांवरून आज्ञा, आज्ञापालन, धार्मिक कर्तव्य, देवतांची उपासना, नैतिक आचरण, विधियुक्त प्रतिज्ञा, अंगीकृत कार्य असे विविध अर्थ व्रत या शब्दाच्या भोवती जमा होतात.

ऋग्वेदात ईश्वरी आज्ञा किंवा नैतिक आचरणाचे प्रकार या अर्थांनी व्रत शब्द आलेला दिसतो. उदा० –

**विष्णोः कर्माणि पश्यत यतो व्रतानि पस्पशे ।**
**इन्द्रस्य युज्यः सखा ।।** (ऋ. १.२२.१९)

अर्थ– हे स्तोत्यांनो, तुमची सारी कृत्ये (म्हणजे व्रते) बारकाईने निरीक्षण करणाऱ्या आणि इंद्राचा जिवलग सखा असणाऱ्या विष्णूचे पराक्रम तुम्ही अवलोकन करा.

**त्वमग्ने व्रतपा असि देव आ मर्त्येष्वा ।**
**त्वं यज्ञेष्वीड्यः ।।** (ऋ. ८.११.१)

अर्थ – हे व्रतपा म्हणजे यज्ञकर्मरक्षक, तेजस्वी अग्ने, आम्ही तुझे यज्ञीय स्तवन करतो.

धार्मिक कृत्य अंगीकारण्याचा निश्चय या अर्थाने व्रत शब्द अथर्ववेदातल्या पुढील मंत्रात आलेला आहे–

**समानो मन्त्रः समितिः समानी । समानं व्रतं सह चित्तमेषाम् ।**
(अथर्व. ६.६४.२)

अर्थ– (हे लोकांनो) आपणा सर्वांची प्रार्थना, विचारस्थाने तसेच ज्ञान आणि मने एकसारखी असावी. एकाच व्रताने म्हणजे धार्मिक कृत्याने आपण देवपूजन करावे.

इतर संहितांमध्ये व्रत हा शब्द सामान्यतः पुढील दोन अर्थांनी वापरला आहे–

(१) धार्मिक कृत्य किंवा प्रतिज्ञा किंवा धार्मिक कृत्य करताना अन्न व आचरण यासंबंधी पाळायचे निर्बंध.

(२) धार्मिक कृत्य करताना उदरनिर्वाहासाठी सेवन करायचे विशिष्ट अन्न. उदा० गायीचे दूध, यवागू (जवाची कांजी) किंवा आमिक्षा (तापलेले दूध व दही यांचे मिश्रण) इत्यादी.

व्रताचे हे दोन्ही अर्थ यास्काने आपल्या निरुक्तात दिले आहेत. व्रत शब्दाचे हे दोन्ही अर्थ पुढील मंत्रात आढळून येतात.

तस्यैतद् व्रतं नानृतं वदेन्न मांसमश्नीयान्न स्त्रियमुपेयान्नास्य पल्पूलनेन वासः पल्पूलयेयुरेताद्ध देवाः सर्वं न कुर्वन्ति ॥

(तै. सं. २.५.५.६)

अर्थ–हे त्याचे व्रत आहे. त्याने असत्य बोलू नये, मांसभक्षण करू नये, स्त्रीसन्निध (संभोगार्थ) जाऊ नये, आणि स्वच्छ करणाऱ्या मीठमिश्रित केलेल्या पाण्याने आपले वस्त्र धुवू नये. कारण देवता या गोष्टी करीत नाहीत.

तैत्ति. उपनिषदामध्ये व्रत म्हणून पुढील आदेश आहेत–

अन्नं न निन्द्यात् । तद् व्रतम् । अन्नं बहु कुर्वीत । तद् व्रतम् । न कञ्चन वसतौ प्रत्याचक्षीत । तद् व्रतम् ॥

(तै. उ. ३.७.१०)

अर्थ– अन्नाची निंदा करू नये, ते एक व्रत आहे. अन्न पुष्कळ निर्माण करावे, ते एक व्रत आहे. जो अतिथी आश्रय मागण्यास येईल त्याला राहायला मनाई करू नये. ते एक व्रत आहे.

प्रायश्चित्तांमध्ये कित्येक कडक नियम पाळावे लागतात. म्हणून मन्वादी स्मृतिकारांनी त्यांनाही व्रते असे म्हटले आहे. महाभारतात व्रत शब्द धार्मिक कृत्य किंवा प्रतिज्ञा याच अर्थाने योजला असून, त्यात व्रतकर्त्याने अन्नसेवन आणि इतर आचरण यांच्याविषयी पाळायचे नियम, असे त्याचे स्पष्टीकरण सांगितले आहे.

अलीकडील काळात व्रत या संज्ञेत पुढील कल्पना समाविष्ट असून, त्यांवरून व्रत या शब्दाचा विस्तृत अर्थ जाणवतो– विशिष्ट तिथीला, वाराला, महिन्याला किंवा इतर पर्वकाली विशिष्ट देवतेची उपासना करून आपला इच्छित हेतू साध्य होण्याकरिता काही अन्नसेवनाचे आणि इतर आचरणाचे निबंध पाळायचे व या सर्व गोष्टींना व्रत असे समजायचे.

अमरकोशामध्ये व्रत आणि नियम हे समानार्थी शब्द आहेत. व्रत म्हणजे काही क्रिया करण्याचा व काही क्रिया न करण्याचा निश्चय, असे मिताक्षरेत म्हटले आहे. रघुनंदन हा धर्मशास्त्रकार म्हणतो, शास्त्रविहित नियम म्हणजे व्रत होय. ते उपवासादिलक्षण असते. मात्र शास्त्राने सांगितलेल्या प्रत्येक नियमाला व्रत म्हणता येणार नाही. उदा० ऋतुकाली स्त्रीगमन करावे हा शास्त्राचा नियम आहे; पण ते व्रत नव्हे.

**वैदिक यज्ञ व व्रते** – या दोहोंत फरक आहे. बहुतेक यज्ञांचे फल हे स्वर्गप्राप्ती असते व ते फल मृत्यूनंतर मिळायचे असते. व्रतांचे तसे नाही. व्रताची फले व्रतकर्त्याला याच जन्मात मिळतात. वैदिक यज्ञ त्रैवर्णिकांनाच विहित आहेत, तर व्रते शूद्र, कुमारिका, सुवासिनी स्त्रिया, विधवा, वेश्या या सर्वांना विहित आहेत. देवीपुराण व महाभारत यांच्या अन्वये तर यवन, किरात, गांधार, चीन, शबर, बर्बर, शक, आंध्र, इ. सर्व लोकांनाच व्रताचा अधिकार आहे. या बाबतीत देवल म्हणतो –

व्रतोपवासनियमैः शरीरोत्तापनैस्तथा ।
वर्णाः सर्वेऽपि मुच्यन्ते पातकेभ्यो न संशयः ॥

अर्थ – व्रत, उपवास, नियम व शरीरशुद्धी यांमुळे सर्व वर्ण पातकांपासून मुक्त होतात, यात शंका नाही.

सौभाग्यवती स्त्रियांच्या बाबतीत एक विशेष नियम लिंगपुराणात सांगितलेला आहे, तो असा–

नियोगादेव तत्कार्यं भर्तॄणां द्विजसत्तमाः ।
जपं दानं तपः सर्वमस्वतन्त्रा यतः स्त्रियः ॥

(लिंगपु. पूर्वार्ध ८४.१६)

अर्थ – स्त्रियांनी जप, दान, तप व इतर धर्मकार्ये आपल्या पतीच्या अनुज्ञेने करावी. कारण स्त्रिया या अस्वतंत्र असतात.

**व्रतांची प्राचीनता** – विविध व्रते सनपूर्व कित्येक शतके अस्तित्वात आली होती, यावद्दलचा पुरावा आपस्तंब धर्मसूत्रावरून मिळतो. वर्षभर करायचे एक व्रत आपस्तंब धर्मसूत्रात सांगितले असून, त्याचे फल ४८ वर्षे ब्रह्मचर्य व्रत पाळणाऱ्याच्या फलाइतके मिळते, असे सांगितले आहे (२.८.१८–१९).

**व्रतसंख्या** – इ. सनापूर्वीच्या काही शतकांत व्रतांची संख्या फार मोठी नव्हती. इ. स. च्या पुढील वर्षांत ती झपाटयाने वाढत गेली व सुमारे एक हजार व्रते निर्माण झाली. त्यानंतर अनेक धर्मशास्त्रकारांनी नानाविध व्रतांची योजना करून त्यांची संख्या अमर्याद वाढवली. पुराणकारांनीही व्रतांच्या संख्येत भर घातली. श्री. गोपीनाथ कविराज यांनी विविध ग्रंथांतल्या व्रतांची मोजदाद करून व्रते अंदाजे १६२२ आहेत, असे म्हटले आहे.

लक्ष्मीधरकृत कृत्यकल्पतरू, जीमूतवाहनाचा कालविवेक, हेमाद्रीचा व्रतखंड, चंडेश्वराचा कृत्यरत्नाकर, आदित्यनाथाचा कालनिर्णय, शूलपाणीचे विवेकग्रंथ, अल्लादनाथाचा निर्णयामृत, गोविंदनंदाचा वर्षक्रियाकौमुदी, गदाधराचा कालसार, रघुनंदनाचे तत्त्वग्रंथ, मित्रमिश्राचा समयप्रकाश, नीलकंठाचा समयमयूख, शंकरभट्टाचा व्रतार्क, दिवाकराचा तिथ्यर्क, हारीतवेंकटनाथाचा दशनिर्णय, शंकरभट्ट घारे यांचा व्रतोद्यापनकौमुदी, विश्वनाथाचा व्रतराज, विष्णुभट्टाचा पुरुषार्थचिंतामणी, काशीनाथाचा धर्मसिंधू, इ. ग्रंथांतून व्रतांची पुष्कळ संख्या पाहायला मिळते.

**व्रतविधान** – कोणत्याही सर्वसाधारण व्रतांमध्ये व्रतारंभ, संकल्प, पूजा, होम, उपवास, दान, अन्नदान, जागरण, पारणा व उद्यापन एवढया गोष्टी येतात.

**व्रतारंभ** – सामान्यतः सर्व व्रते दिनशुद्धी पाहून आणि ग्रहांची विशिष्ट स्थिती असताना सुरू करायची असतात.

अस्तगे च गुरौ शुक्रे बाले वृद्धे मलिम्लुचे ।

**उद्यापनमुपारम्भं व्रतानां नैव कारयेत् ॥**

अर्थ – गुरू, शुक्र अस्तंगत असताना किंवा ते बाल आणि वृद्ध असताना आणि अधिकमासात कोणतेही व्रत करू नये किंवा व्रताचे उद्यापनही करू नये.

आशौच असताना आणि वार, नक्षत्र, योग हे दुष्ट असताना व्रतारंभ करू नये, असेही सांगितले आहे. देवल याविषयी आणखी सांगतो, ते असे–

**अभुक्त्वा प्रातराहारं स्नात्वाचम्य समाहितः ।**
**सूर्यादिदेवताभ्यश्च निवेद्य व्रतमाचरेत् ॥**

अर्थ – प्रातःकाली आहार न घेता (आदल्या रात्रीही उपवास करून) स्नान करून सूर्यादिदेवतांना व्रतविषयक निवेदन करून व्रतारंभ करावा.

व्रतारंभ केल्यानंतर व्रतसमाप्तीपर्यंत नित्य प्रातःस्नान, नियमित अन्नसेवन व गुरू, देव आणि द्विज यांची पूजा करावी आणि क्षार, क्षौद्र (मद्य) व मांस वर्ज्य करावे, असे अग्निपुराणात सांगितले आहे (१७५.१२).

संकल्प – व्रतारंभ करण्यापूर्वी त्या व्रताचा संकल्प करावा लागतो. हा संकल्प कसा करावा याविषयी एक श्लोक असा –

**गृहीत्वोदुम्बरं पात्रं वारिपूर्णमुदङ्मुखः ।**
**उपवासं तु गृह्णीयाद्यद्वा सङ्कल्पयेद् बुधः ॥**

अर्थ – ज्या शहाण्या पुरुषाने व्रतनिश्चय केला असेल त्याने जलपूर्ण औदुंबर पात्र (ताम्रपात्रही विहित आहे) हाती घेऊन व उत्तरेला तोंड करून व्रत किंवा उपवास यांचा संकल्प करावा.

संकल्प केल्याने व्रताचे फल मिळते. संकल्प न केल्यास अर्धे फल नष्ट होते. संकल्पाने देवता संतुष्ट होतात आणि संकल्प न करणारे अल्पबुद्धी लोक व्यर्थ शारीरिक क्लेश भोगतात, असेही सांगितले आहे.

पूजा– प्रत्येक व्रताची विशिष्ट देवता असते. व्रतांमध्ये त्या देवतेची षोडशोपचार पूजा करायची असते. या पूजेत प्रत्येक देवतेची पत्र–पुष्पेही विशिष्ट असतात. नैवेद्यही विशिष्ट असतात. उदा० शिवाला श्वेतपुष्प. बिल्वपत्र, विष्णूला कमळ, तुळशीपत्र. गणपतीला रक्तपुष्प, दूर्वा, इत्यादी.

काही व्रतांत पूजेनंतर त्या त्या देवतेच्या मंत्राचा जपही सांगितला आहे.

होम– व्रतांमध्ये व्रतदेवतेला उद्देशून विशिष्ट द्रव्याचा होम करायचा असतो. त्या त्या व्रतविधानात ती ती हविर्द्रव्ये सांगितलेली असतात. तशी ती न मिळाल्यास त्या ऐवजी आज्याहुती देतात. आहुतींची संख्या १०८, २८ किंवा ८ याप्रमाणे यथाशक्ति असावी. त्यासाठी यजमानाला आचार्यवरण करावे लागते. मग आचार्य यजमानासाठी अग्निमुख करून प्रत्येक हविर्द्रव्याला एकेका ब्राह्मणाची योजना करून होम पुरा करतो व त्याचे श्रेय यजमानाला समर्पितो.

उपवास– यज्ञ करणाऱ्या यजमानाने गार्हपत्य अग्नीजवळ रात्री वास्तव्य करणे हा उपवास शब्दाचा प्रथम अर्थ होता. अन्न कमी कमी ग्रहण करणे किंवा निरशन करणे असा त्याचा गौण अर्थ पुढील काळात रूढ झाला.

व्रतामध्ये उपवास या शब्दाचा अर्थ अन्न ग्रहण न करणे किंवा विशिष्ट अन्न सेवन करणे असा आहे. उपवासाचे एकभुक्त, अयाचित, नक्तभोजन व हविष्यान्नभोजन असे काही पर्याय आहेत. एकादशी आणि शिवरात्र या व्रतांत आठ प्रहरांचा उपवास असतो. कित्येक वारव्रतांत एकभुक्त राहायचे असते. संकष्ट चतुर्थीचा उपवास चंद्रोदय होईपर्यंत करायचा असतो. काही उपवासासाठी वऱ्यांचे तांदूळ, भुईमूग, गोरसाचे पदार्थ व फळे चालतात. उपवासाने कर्त्याला तितिक्षा प्राप्त होते आणि वासनांवर विजय मिळवता येतो. म्हणून व्रतांमध्ये उपवासाला फार महत्त्व दिलेले आहे.

महाभारतात उपवासाला कालमर्यादा सांगितली आहे, ती अशी– ब्राह्मण आणि क्षत्रिय यांनी तीन दिवसांपेक्षा जास्त उपवास करू नये. वैश्य-शूद्रांनी फक्त दोन दिवसच उपवास चालू ठेवावा (म. भा. अनु. १०६.११-१३).

दान– सर्व व्रतांमध्ये गोप्रदान हे आवश्यक सांगितले आहे. या व्यतिरिक्त व्रतदेवतेला उद्देशून विविध वस्त्रे, पात्रे व पदार्थ यांचे दान करायचे असते. अन्नदान हाही व्रताचरणाचा एक भाग असतो. कित्येक व्रतांत ब्राह्मण-सुवासिनीभोजन, कित्येक व्रतांत दंपतीभोजन, कित्येक व्रतांत कुमारकुमारिका भोजन विहित असते. कित्येक व्रतांत दरिद्री, अंध आणि अपंग यांनाही भोजन देण्याबद्दल आवर्जून सांगितले आहे.

जागरण– व्रताच्या दिवशी व्रतकर्त्याने रात्री जागरण करायचे असते. या जागरणात कथाश्रवण व व्रतदेवतेच्या संतोषासाठी गीत, वाद्य व नृत्य यांची योजना करणे या गोष्टीही विहित आहेत.

पारणा– व्रतसमाप्तीनंतर उपवास सोडून जे भोजन करायचे असते, त्याला पारणा म्हणतात. हे भोजन स्वादुभोजन असावे आणि देवाला महानैवेद्य समर्पून त्याचे सेवन करावे. उदा० एकादशीला उपवास केल्यानंतर द्वादशीच्या दिवशी पारणा केलीच पाहिजे. त्या दिवशी उपवास करायचा नसतो. केल्यास पाप लागते.

उद्यापन– व्रत पूर्ण झाल्यावर त्याची सांगता करण्यासाठी जप, होम, पूजा इत्यादी कृत्ये केली जातात, त्या सर्वांना मिळून उद्यापन म्हणतात. (उद्यापन पाहा.)

तिथिनिर्णय– व्रतांच्या बाबतीत तिथिनिर्णय ठरवणे, ही [illegible]

महत्त्वाची गोष्ट असते. त्यावर व्रताचे फल अवलंबून असते.

श्रौतं स्मार्तं व्रतं दानं यच्चान्यत्कर्म वैदिकम् ।
अनिर्णीतासु तिथिषु न किञ्चित्फलति द्विज ।।
(नारदपु. पूर्वार्ध २९.२)

अर्थ– श्रौत, स्मार्त, व्रत, दान किंवा अन्य कोणतेही वैदिक कर्म हे करण्याची तिथी निश्चित केली नसेल, तर त्या कृत्याचे फल मिळत नाही.

कर्मणो यस्य यः कालस्तत्कालव्यापिनी तिथिः ।
तया कर्माणि कुर्वीत ह्रासवृद्धी न कारणम् ।।

अर्थ– धार्मिक कृत्य ज्या तिथीला करायचे ती तिथी सकाळी, दुपारी किंवा सर्व दिवस चालू असेल, तेव्हाच करावे. तीच वेळ योग्य होय. तिथीची क्षयवृद्धी विचारात घेण्याचे कारण नाही.

तिथिनिर्णय हा किचकट विषय आहे. अनेक धर्मशास्त्रकारांनी त्यावर ग्रंथ लिहिले आहेत. त्या सर्वांचे एकमत नाही. पण तिथिविषयक एक सामान्य नियम बहुतेक सर्वांनी सांगितला आहे, तो असा–

यां तिथिं समनुप्राप्य उदयं याति भास्करः ।।
सा तिथिः सकला ज्ञेया दानाध्ययनकर्मसु ।।

अर्थ– सूर्योदयाच्या वेळी जी तिथी असेल ती तिथी त्या दिवशी कमी-जास्त कशीही असली, तरी तिला सकला समजावे आणि त्या तिथीला योग्य असतील ती दाने, अध्ययन व कर्मे आचरावी.

व्रतांचे वर्गीकरण–वेगवेगळ्या प्रकारांनी व्रतांचे वर्गीकरण केले जाते. पहिले वर्गीकरण असे–

(१) प्रायश्चित्तरूप – उदा० कृच्छ्र, अर्धकृच्छ्र, चांद्रायण, इत्यादी.
(२) कर्तव्यरूप – उदा० ब्रह्मचारी, स्नातक व गृहस्थ यांनी आचरायची कर्तव्ये.
(३) ऐच्छिक – विशिष्ट फलाच्या प्राप्तीसाठी स्वतःवर लादून घेतलेली व्रते.

पुढचे वर्गीकरण काही अंशी वरीलप्रमाणेच आहे–

(१) नित्य–विशिष्ट आश्रमाची अपरिहार्य अशी कर्तव्ये. उदा० ब्रह्मचर्य, ब्रह्मयज्ञ, पंचमहायज्ञ; तसेच देव, द्विज व गुरू यांची पूजा इत्यादी.
(२) नैमित्तिक–विशिष्ट नियमाने करायची व्रते. उदा० रामनवमी, जन्माष्टमी, नवरात्र, इत्यादी.
(३) काम्य – धन, पुत्र, सौभाग्य, ऐश्वर्य, सत्ता, इ. कामना मनात धरून केली जाणारी व्रते, उदा० सत्यनारायण, सत्यविनायक, सोळा सोमवार, इत्यादी.

आणखी एक वर्गीकरण असे–

(१) मानसिक, (२) कायिक, (३) वाचिक. या तीनही व्रतांचे वर्णन करणारे पद्मपुराणातले श्लोक असे–

अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यमकल्कता ।
एतानि मानसान्याहुर्व्रतानि हरितुष्टये ।।
एकभुक्तं तथा नक्तमुपवासमयाचितम् ।
इत्येवं कायिकं पुंसां व्रतमुक्तं नरेश्वर ।।
वेदस्याध्ययनं विष्णोः कीर्तनं सत्यभाषणम् ।
अपैशुन्यमिदं राजन् वाचिकं व्रतमुच्यते ।।
(पद्म पु. ४.८४.४२-४४)

अर्थ – अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य, अकुटिलता किंवा निर्दंभता ही मानसिक व्रते असून, त्यांनी श्रीहरी संतुष्ट होतो. एकभुक्त, नक्तभोजन, उपवास आणि अयाचित भोजन ही मनुष्यांची शारीरिक व्रते होत. वेदाध्ययन, विष्णूचे नामसंकीर्तन, सत्यभाषण, चहाडी न करणे ही वाचिक व्रते होत.

पुढील वर्गीकरण कालविषयक आहे. व्रत जितक्या काल चालवायचे असेल, त्या कालानुसार त्यांची वर्गवारी केलेली आहे. उदा० दिवसव्रत, पक्षव्रत, मासव्रत, अयनव्रत, संवत्सरव्रत; तिथिव्रत, नक्षत्रव्रत, वारव्रत, संक्रातिव्रत, इत्यादी.

गणेशव्रते, शिवव्रते, देवीव्रते, विष्णुव्रते, सौरव्रते, हे वर्गीकरण देवताविषयक आहे.

**व्रतपरिभाषा** – हिंदू धर्मात स्त्रीपुरुषांनी आचरायची अनेक व्रते सांगितलेली आहेत. त्या व्रतांसंबंधी सर्वसाधारणपणे पाळायच्या नियमांना व्रतपरिभाषा असे म्हणतात.

स्त्रिया आणि शूद्र यांना दोन दिवसांपेक्षा अधिक उपवास करण्याचा अधिकार नाही. सौभाग्यवती स्त्रियांना पतीच्या अनुज्ञेवाचून व्रताचा अधिकार नाही. उपवासाच्या दिवशी काष्ठाने दात न घासता पानाने घासावे किंवा बारा चुळा भराव्या. प्रातःकाळी तांब्याच्या भांड्यात उदक घेऊन, उत्तरेकडे तोंड करून व्रताचा संकल्प करावा. अधिकमास, गुरुशुक्रांचे अस्त, दुष्ट योग, क्रूर वार, अमावास्यादी निषिद्ध तिथी वगैरे असता नव्या व्रताचा आरंभ किंवा व्रताचे उद्यापन करू नये. सत्य, क्षमा, दया, दान, शुद्धी, अस्तेय, इंद्रियनिग्रह, देवपूजा, हवन व संतोष हे धर्म सर्व व्रतांना लागू आहेत. ज्या देवतेचे व्रत असेल तिचा जप, ध्यान, कथाश्रवण, अर्चन, कीर्तन, इ. गोष्टी कराव्या. उपवासाच्या दिवशी अन्नाचे अवलोकन, अन्नाचा वास घेणे, तैलाभ्यंग, तांबूल, उटी ही वर्ज्य करावी. मात्र सौभाग्यवती स्त्रियांना सौभाग्यव्रतांत तैलाभ्यंग आणि तांबूल वर्ज्य नाहीत. उदक, मूल, फल, दूध, हवी, ब्राह्मणाची इच्छा, गुरूचे वचन आणि औषध या आठ गोष्टी व्रतभंग करणाऱ्या नाहीत. चुकून व्रतभंग झाल्यास तीन दिवस उपोषण आणि

पुरुषाने क्षौर करून पुन्हा व्रत करावे. उपवास करायला अशक्त असेल त्याने एका ब्राह्मणाला भोजन, द्रव्यदान, सहस्र गायत्री-जप अथवा बारा प्राणायाम हे प्रायश्चित्त समजावे. आरंभलेले व्रत पुढे चालवायला असमर्थ असेल, त्याने ते प्रतिनिधीच्या द्वारे करावे. पुत्र, पत्नी, पती, बंधू, उपाध्याय आणि मित्र हे प्रतिनिधी समजावे. अनेक वेळा पाणी पिणे, तांबूलचर्वण, दिवसा झोप आणि मैथुन यांच्या योगे व्रतभंग होतो. आमिषान्ने वर्ज्य करावी व हविष्यान्ने सेवन करावी. जिथे व्रताचा विधी सांगितला नसेल, तिथे त्या व्रतातील देवतेची पाच गुंजा सोन्याची किंवा रुप्याची प्रतिमा करून तिची पूजा करावी. द्रव्य सांगितले नसेल, तिथे तुपाचा होम करावा. देवता सांगितली नसेल, तिथे प्रजापती देवता समजावी. मंत्र सांगितला नसेल, तिथे समस्त व्याहृतिमंत्र योजावे. होमातल्या हवनाची संख्या सांगितली नसेल, तिथे एकशे आठ, अठ्ठावीस किंवा आठ ही संख्या समजावी. उपवासाच्या सांगतेसाठी ब्राह्मणभोजन घालावे. उद्यापन सांगितले नसेल, तर गाय किंवा सुवर्ण यांचे दान करावे. ब्राह्मणाच्या वचनाने व्रताची सांगता होते. आशौच, रजस्वला-दोष किंवा ज्वरादी रोग आले असता, शारीरिक नियम स्वतः करावे आणि पूजा वगैरे विधी दुसऱ्याकडून करावे. काम्य कर्मे प्रतिनिधीच्या द्वारे करू नये. नित्य व नैमित्तिक कर्मे मात्र केली तरी चालतात. एकापेक्षा अधिक व्रते एका काळी आली असता, ज्या गोष्टी विरुद्ध नसतील, त्या क्रमाने कराव्या. नक्तभोजन व उपोषण अशी विरुद्ध असतील, तेव्हा एक आपण करावे आणि दुसरे प्रतिनिधीच्या द्वारा करावे.

**व्रतमाहात्म्य**—पुराणकार आणि निबंधकार यांनी व्रताचे माहात्म्य लोकांच्या मनावर ठसविण्यासाठी आपल्या त्या ग्रंथांचा बराचसा भाग खर्ची घातला आहे. या बाबतीत त्यांनी अति-शयोक्तीही भरपूर केली आहे. उदा०

> व्रतमेव परं लोकसाधनं भोगसाधनम् ।
> व्रतेनैव जयो यस्मात्तस्मात्सर्वो व्रतं चरेत् ॥
> एको धर्मो मनुष्याणां व्रतमेव महात्मना ।
> प्रोक्तो नानाविधैस्तन्त्रैः शङ्करेण हरिं प्रति ॥
> सन्ति यद्यपि भूयांसो लोके धर्मा युगे युगे ।
> तथापि व्रतधर्मस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ॥
> देवता दितिपुत्राश्च सिद्धगन्धर्वकिन्नराः ।
> ऋषयश्च परां सिद्धिमुपवासैरवाप्नुवन् ॥
>
> (अग्निपु. १७५.४४ व ५७)

**अर्थ** – (सर्व धार्मिक कृत्यांत) व्रत हेच लोकसाधन व भोग-साधन आहे. व्रतानेच जय मिळतो. म्हणून सर्वांनी व्रत आचरावे. व्रत हाच मनुष्याचा एकमेव धर्म असून, तो महात्मा शंकराने विष्णूला नानाविध तंत्रांनी कथन केला आहे. प्रत्येक युगात धर्म (वेगवेगळे) अनेक आहेत. तथापि ते व्रतधर्माच्या सोळाव्या कलेलाही योग्य ठरत नाहीत. देव, दैत्य, सिद्ध, गंधर्व, कि[illegible] आणि ऋषी हे उपवासादी व्रतांनीच परमसिद्धी मिळवते झाले.

पुण्य, संतती, सौंदर्य, ऐश्वर्य, सद्गुण, कीर्ती, विद्या, दीर्घायुष्य, संपत्ती, पावित्र्य, सुखप्राप्ती, स्वर्ग आणि मोक्ष ही सारी फळे व्रताचरणानेच मिळवायची असतात, असेही अग्निपुराणात म्हटले आहे.

**बौद्धव्रते** – पौराण धर्माप्रमाणेच बौद्धांनीही व्रतकल्पना स्वीकारली आहे. बौद्ध धर्माची दीक्षा घेताना जो त्रिशरण मंत्र म्हणायचा असतो, तो म्हणजे जीवनव्यापी व्रताचा संकल्प होय. या व्रतात बुद्ध, धर्म व संघ या तीहींवर दृढ निष्ठा ठेवायची असते आणि बुद्धोपदिष्ट नियमांचे पालन करून शुद्ध जीवन जगायचे असते. स्वतःचे कर्तव्य करीत राहणे आणि त्याच बरोबर जनांना सत्यमार्ग दाखविणे हे प्रत्येक बौद्धाचे एक व्रतच असते. बौद्ध भैषज्यगुरूने रोगग्रस्तांचे व पीडितांचे दुःख निवारण करण्याचे व्रत घेतले होते आणि अमिताभ बुद्धाने त्याच्या तारक शक्तीवर निष्ठा ठेवणाऱ्यांना सुखावती नामक स्वर्ग मिळवून देण्याचे व्रत घेतले होते. बौद्ध भिक्षू पावसाळ्यात चार महिने वर्षावास करीत, तेही त्यांचे व्रतच होय. वैशाखी पौर्णिमा, ज्येष्ठपौर्णिमा, आषाढी पौर्णिमा, नागपंचमी, विजयादशमी, आश्विनपौर्णिमा, वसंतपंचमी, माघी पौर्णिमा व फाल्गुनपौर्णिमा या तिथींना करायची धर्मकृत्ये म्हणजे बौद्ध व्रतेच होत.

**जैनव्रते** – पौराणिकांप्रमाणेच जैनांची शेकडो व्रते आहेत. या व्रतांच्या कालात जिनपूजा, मंत्रजप, उपवास व शेवटी पारणे ही पौराणिकांची आणि जैनांची व्रतपद्धती सारखीच आहे. जैनांनी आपल्या व्रतांच्या दोन पातळ्या मानल्या आहेत. प्रत्येक व्रताचे जे प्रखर आणि प्रगल्भ स्वरूप असते, त्याला ते महाव्रत म्हणतात. महाव्रताचेच सौम्य व संक्षिप्त रूप म्हणजे अणुव्रत होय. मुनी आणि श्रमण यांनी महाव्रतांचे व सामान्य गृहस्थांनी अणुव्रताचे पालन करायचे असते. जैन गृहस्थाची अशी एकूण बारा व्रते आहेत. या व्रतांचा भंग घडू नये म्हणून मुनिजनांची समिती दक्षता घेत असते. व्रतात पाळावयाच्या विधि-निषेधांना ते गुप्ती म्हणतात. जैनांची ही व्रतसंरक्षक यंत्रणा होय.

ख्रिस्ती, झरथुष्ट्री आणि इस्लाम या धर्मांतही ज्यांना तत्त्वतः व्रते म्हणता येईल, असे काही धार्मिक विधी आढळतात. तात्पर्य, व्रते आणि नेमधर्म यांच्याशिवाय कुठलाही धर्म उभा राहू शकत नाही.

व्रतांच्या मागे जसे काही तत्त्वज्ञान असते, तसे मानसशास्त्रही असते. या उभय दृष्टींनी व्रतांचा मागोवा घ्यायला हवा. [illegible]

कितीही बुद्धिवादी असला, तरी त्याच्या अंत:करणाच्या खोल कप्प्यात भावनेला थोडीफार तरी जागा असतेच. भावना धार्मिक स्वरूपाची असली, तर ती व्रतांचा आश्रय घेते. भावना जशी धार्मिक असते तशी ती राष्ट्रीय, सामाजिक, कौटुंबिक वगैरे निरनिराळ्या प्रकारचीही असू शकते व ज्या प्रकारची ती असेल तसा तिचा मनावर परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. सुशिक्षित व विचारी मनुष्य जेव्हा सत्यनारायणाचे व्रत करतो तेव्हा त्याच्या मागे मानसशास्त्राचा काही सिद्धान्त असतो. त्यामुळेच प्रत्येक धर्मात विश्वास ठेवायला अपात्र अशी व्रते दिसून येत असली, तरी त्यांचे आचरण करण्यास माणसाला कमीपणा वाटत नाही. महात्मा गांधी सोमवारी मौनव्रत कटाक्षाने पाळीत. ते केवळ सोयीसाठी नव्हते, तर त्याच्या मागे धार्मिक भावना होती. धार्मिक भावना प्रबल असल्याशिवाय मनाचा निश्चय पूर्ण होत नाही, असा अनुभव आहे. [ हि. ध.; एन्सा. रि. ए.; ध. शि. ]

**व्रतचारी चळवळ** बंगालमधील एक चळवळ. इ. स. १९२९ मध्ये श्री. जी. एस्. दत्त यांनी ही चळवळ सुरू केली. मानवाचे सर्व जीवन हे एक व्रत मानून, मानवी शरीर आणि मन यांत सुसंवाद राखणे, हे या चळवळीचे उद्दिष्ट आहे. प्रत्येक व्रतचारी व्यक्तीने ज्ञान, शरीरश्रम, सत्य, ऐक्य व आनंद यांच्या द्वारे जीवनाचे सम्यक दर्शन घ्यावे, अशी या चळवळीची भूमिका आहे. सर्व जीवन हे आनंदमय असून, जीवनाचा आधार आनंद हाच आहे, अशीही व्रतचारी चळवळीची धारणा आहे.

एखाद्या व्यक्तीला या चळवळीचे सभासद व्हायचे असेल, तर तिला पुढील प्रतिज्ञा कराव्या लागतात–

मी बंगाल, भारत व जग यांवर प्रेम करतो. मी या तिघांचीही सेवा करीन. मी बंगाल, भारत व जग या तीन्ही ठिकाणांचा व्रतचारी होईन. मी ज्ञान, श्रम, सत्य, ऐक्य व आनंद ही व्रते पालन करीन. मी माझ्या अंगात तारुण्याचा उत्साह आणण्याचा प्रयत्न करीन. तसेच, माझे शरीर सुदृढ आणि मन मुक्त आणि उदार ठेवीन.

याशिवाय, ज्ञानाच्या कक्षा वाढविणे, श्रमाला प्रतिष्ठा मिळवून देणे, भाजीपाला व फळझाडे यांची लागवड करणे, गुरांची जोपासना करणे, पाणी स्वच्छ राखणे, स्वत: नीटनीटके राहणे; कवायत, लोकनृत्ये व खेळ यांना उत्तेजन देणे, नेहमी आनंदी असणे, अशा प्रकारच्या काही गोष्टी व्रतचारींना आचरणात आणाव्या लागतात. भूक नसताना खाणे, वैभवात लोळणे, संकटाशी मुकाबला न करणे, शब्द न पाळणे, इ. काही गोष्टी त्यांनी निषिद्ध ठरविल्या आहेत.

या चळवळीत लोकनृत्यांवर फार भर दिला आहे. रोज एखादे तरी लोकनृत्य केलेच पाहिजे, असा व्रतचारींचा नियम आहे. नृत्यामुळे शरीर कार्यक्षम राहते आणि मनही उत्साही होते, अशी व्रतचाऱ्यांची धारणा आहे. काठी नृत्य, जरी नृत्य, रायवन्शी नृत्य व कसरती, झुमूर, बाउल, धाली, कीर्तन, व्रतनृत्य, धमाईल, इ. नृत्ये व्रताचारी स्त्री-पुरुष नाचतात. नृत्याला गाण्याची व काही वेळा ढोलाचीही साथ असते. मोकळ्या हवेत केलेल्या नृत्यांनी व्यायामाबरोबर आपल्या संस्कृतीशी व परंपरेशी ओळख होते आणि मातृभूमीशी व इथल्या ग्रामीण जनतेशी घनिष्ठ नाते निर्माण होते, असे ते मानतात.

व्रतचाऱ्यांच्या निरनिराळ्या निष्ठा व त्यांचे रोजचे आचरण यांचे महत्त्व विशद करणारी अनेक गीते श्री. दत्त यांनी बंगाली भाषेत रचली आहेत. त्यांचेही व्रतचारी सामूहिक गायन करतात.

इ. स. १९३४ मध्ये या चळवळीचा प्रसार सर्व बंगालमध्ये झाला. प्राथमिक शाळांपासून महाविद्यालयांपर्यंत या चळवळीने मूळ धरले. तिच्या उद्दिष्टांचे पालन केल्यामुळे विद्यार्थीविद्यार्थिनींची शारीरिक क्षमता वाढली, त्यांच्या वृत्तीत बदल झाला. त्यांच्या मनात राष्ट्राबद्दल प्रेम निर्माण झाले आणि सामाजिक सेवेबद्दल त्यांच्या मनात आस्था निर्माण झाली. समाजातील इतर स्त्री-पुरुषांतही ही चळवळ प्रिय झाली. बंगालमध्ये व्रतचारी सोसायटी स्थापन झाली. बिहार, आसाम व त्या वेळच्या हैद्राबाद संस्थानात ही चळवळ पसरली व तिथे व्रतचारी सोसायट्या व संघ स्थापन झाले. इतकेच नव्हे, तर लंडनमध्येही भारतीय व इंग्रज लोकांसाठी वेगवेगळ्या व्रतचारी सोसायट्या स्थापन करण्यात आल्या. [ दि व्रतचारी सिंथिसिस– श्री. जी. एस्. दत्त, १९४० ]

**व्रतद्वयी पूर्णिमा** फाल्गुनी पूर्णिमेच्या दिवशी कश्यपाला अदितीपासून अर्यमा (आदित्य) व अनसूयेपासून चंद्रमा अशी दोन मुले झाली. म्हणून त्या दिवशी सूर्योदयाला आदित्याची आणि चंद्रोदयाला चंद्राची किंवा चंद्रोदयाच्या वेळी सूर्य व चंद्र यांची विधिपूर्वक पूजा करावी व रात्री जागरण करावे, असा या व्रताचा विधी आहे. [ व्र. प. ]

**व्रतनृत्य** बंगालमधील स्त्रियांचे एक लोकनृत्य. नृत्यात भाग घेणाऱ्या स्त्रिया फेर धरून, जमिनीला पाय घासत डाव्या बाजूला नाचत जातात. नृत्यात कमरेच्या वरच्या भागाचे अंगसंचालन असते. विवाहित स्त्रिया व कुमारिका यांचे हावभाव निरनिराळे असतात, हा या नृत्याचा विशेष होय. [ भा. लो. नृ. ]

**व्रतराजतृतीयाव्रत** एक काम्य व्रत. हे व्रत विशेषतः स्त्रियांनी करायचे असते. व्रतविधी असा – शुद्ध तृतीयेला वस्त्राच्या दोन तुकडयांवर रोचना, कापूर व नीळ यांनी उमा व शिव यांच्या प्रतिमा काढाव्या; त्या दोघांना उद्देशून निरनिराळे पौराणिक मंत्र म्हणून त्यांची पूजा करावी आणि त्यांना सोन्याचा हार व रत्ने अर्पण करावी. होम करावा. फल– पती, पुत्र व बंधू यांचा वियोग होत नाही. [ हि. ध. ]

**व्रात्य** एक जातिसंज्ञा. व्रात्य हा शब्द फार प्राचीन आहे. ऋग्वेदात व्रात हा शब्द आला असून, अथर्ववेदात तर एक व्रात्यकांडच आहे. आपस्तंब सूत्रांमध्ये व्रात्य शब्दाची व्युत्पत्ती व्रत या शब्दापासून दिली असून, व्रात्य म्हणजे वेदाच्या एका शाखेचे अध्ययन केलेला श्रोत्रिय अर्थात धार्मिक पुरोहित, असा त्याचा अर्थ दिलेला आहे. बोधायनाने व्रात्य म्हणजे धार्मिक दीक्षा न घेतलेल्या पुरुषाचा पुत्र, असे म्हटले आहे. मनुस्मृती (२.३९) व विष्णुधर्मोत्तरपुराण यांमध्ये, व्रात्य म्हणजे सावित्रीपतित (उपनयन संस्कार न झालेला), अशी त्याची व्याख्या दिली आहे. शूद्र पुरुषाला क्षत्रिय स्त्रीच्या ठिकाणी झालेला पुत्र किंवा क्षत्रियाचा अनौरस पुत्र म्हणजे व्रात्य, असे महाभारतात म्हटले असून, व्रात्यांची गणना विषप्रयोग, व्यभिचार व गर्भपात करणाऱ्या जातींमध्ये केली आहे.

पण वरील व्युत्पत्तींवरून किंवा अर्थावरून व्रात्य हे खरे कोण होते, त्याचा उलगडा होत नाही. विद्वानांनी त्याचा छडा लावण्याचा प्रयत्न केला असून, वैदिक व इतर साहित्याच्या आधारे काही अनुमाने केली आहेत, ती अशी –

व्रात्य नावाचा एक आर्येतर समाज आर्यांच्या आगमनापूर्वी भारतात सर्वत्र विखुरलेला होता. व्रात्यांमध्ये जातिसंस्था होती आणि त्यांच्यांत अर्हंत आणि यौध्र असे दोन वरिष्ठ वर्ग होते. अर्हंत हे विद्वान, सदाचारी आणि भ्रमणशील असत. ते तपस्वीही असत. समाजात त्यांना मोठा मान असे. त्यांच्याविषयी अथर्ववेदात पुढील आदेश दिलेला आढळतो – एखादा ज्ञानी व्रात्य पुरुष एखाद्या राजाच्या राजवाडयात गेला, तर राजाने त्याला स्वतःहून श्रेष्ठ मानून त्याचा आदरसत्कार करावा (अथर्व. १५.१०).

दुसरा वर्ग म्हणजे यौध, हा होय. हे लोक लढाऊ वृत्तीचे होते. लाटचायन श्रौतसूत्रात (८.६.७) म्हटले आहे, की 'व्रात्याः प्रसेधमानाः यन्ति ' = व्रात्य लोक लोकांना पीडा देत व लूटमार करीत फिरतात. हे लोक आयुधजीवी होते. याशिवाय व्रात्यांमध्ये इतरही कनिष्ठ दर्जाचे वर्ग समाविष्ट होते. डॉ. दे.रा. भांडारकर यांच्या मते भारतात जातिव्यवस्थेचा उगम मुळात व्रात्य समाजात झालेला असून, तिच्यावरूनच आर्य लोकांनी आपली चातुर्वर्ण्यव्यवस्था निर्माण केली. सिंधूच्या खोऱ्यात वास्तव्य करणारे लोक हे व्रात्यच होते, असे प्रा. करमरकर यांनी साधार दाखवले आहे.

मोहेंजोदडो येथील उत्खननात विटांवर कोरलेली एक मुद्रा सापडली असून, तिच्यावर त्रिमूर्तीचे प्रतीक आहे. त्यात एक मुख पुरुषाचे, दुसरे मुख स्त्रीचे आणि तिसरे मुख त्यांच्या पुत्राचे आहे, असे श्री. करमरकरांचे मत आहे. अथर्ववेदात उल्लेखिलेला एकव्रात्य नावाचा देव तो हाच असावा. तिथले त्याचे वर्णन असे–

त्याने (एकव्रात्याने) प्रजापतीला कार्यप्रवृत्त केले. प्रजापतीने स्वतःमध्ये सुवर्ण असल्याचे पाहिले आणि सुवर्ण निर्माण केले. ते सर्वोत्कृष्ट झाले. तो (एकव्रात्य) वाढू लागला. तो मोठा झाला. तो महादेव झाला. तो देवांचा अधिपती झाला (अथर्व १५.१).

द्राविड संस्कृती शिवाला सर्वश्रेष्ठ देव मानते. द्रविडांनी शिवालाच सृष्टीचा कर्ता, धर्ता मानले आहे. शिव, शिवाची स्त्री अम्म (पुराणातील पार्वती), त्या दोघांचा पुत्र मुरुग (कार्तिकेयाचे प्राचीन नाव) अशी द्रविडांची त्रिमूर्ती आहे. मोहेंजोदडो येथील त्रिमूर्ती याच तिघांची असावी. यावरून एकव्रात्य हे शिवाचेच मूलरूप असावे. व्रात्य समाज हा काही विद्वानांच्या मते प्राचीनतम रुद्रपूजक होता. आर्य हे यज्ञप्रधान होते. त्यांना या शिवपूजक धर्मपंथाचा तिटकारा वाटत होता. आर्य लोक प्रेतांचे दहन करीत, तर व्रात्य लोक प्रेते पुरीत. हा त्या दोघांमधला विशेष फरक होता. व्रात्य लोक यज्ञयाग करीत नव्हते; तर एकव्रात्याची उपासना करीत होते.

आश्वलायन, शांखायन, बौधायन, लाटचायन, इ. श्रौतसूत्रांत व्रात्यांच्या चालीरीतींचे आणि वेषभूषेचे उल्लेख मिळतात. त्यांच्याजवळ चार चाकांचा, फळयांनी बनवलेला एक रथ असे व त्या रथात बसून ते संचार करीत (कात्या. २२.४.१६). त्यांच्याजवळ एक विशेष प्रकारचे धनुष्य (ज्याह्रोड) असे (लाटचा. ८.६.७). ते डोक्याला उष्णीष (तिरकी पगडी) बांधीत व मेषचर्म परिधान करीत. त्यांच्यामधले जे विद्वान अध्ययनशील असत, ते लाल उष्णीष वापरीत. त्यांची वस्त्रे तांबडीच असत. इतर लोक काळी वस्त्रे वापरीत. मोहेंजोदडो येथे एकव्रात्यापुढे बळी देण्याकरिता उभे केलेल्या सात पुरुषांचा पोषाख पाहिल्यावर व्रात्य पुरुषांच्या पोषाखाची कल्पना येते. त्या सात लोकांच्या पायात पादत्राणे, अंगात लांब झगा व डोक्यावर तिरके उष्णीष असलेले दिसते. व्रात्य लोकांच्या रथासारखा एक रथ मोहेंजोदडो येथील उत्खननात आढळला आहे.

व्रात्य लोक हे गावे वसवून राहत असत. त्यांच्या गावच्या मुख्याला व्रातपती म्हणत. त्यांच्यांतले वृद्ध आचार्य आपल्या

यायांना उपदेश करीत, की 'युद्धात लढता लढता मरण पत्करा; तुम्हांला देवलोक प्राप्त होईल.' व्रात्याचार्य हे नृत्य, गीत, वाद्य व शस्त्र यांत प्रवीण असल्याचे उल्लेखही श्रौतसूत्रांत आढळतात. ते आपली विद्या-कला आपल्या अनुयायांना शिकवीत (कात्या. २२.४.३ वरील टीका).

या व्रात्यांचा आणि आर्यांचा संबंध आणि संपर्क आल्यावर आर्यांनी त्यांना आपल्या समाजात समाविष्ट करून घेण्याचा विचार केला आणि त्यासाठी व्रात्यस्तोम नावाचा एक विधी निर्माण केला. श्रौतसूत्रांच्या काळात किंवा जनपदयुगात व्रात्यस्तोम विधीने व्रात्यांना आर्य धर्मात समाविष्ट करून घेण्याची प्रक्रिया सुरू झाली. [रि. इं.; पा. का. भा.]

**व्रात्यस्तोम** एक याग. ज्यांना व्रात्य असे संबोधण्यात आले आहे, अशा लोकांना शुद्ध करून घेण्यासाठी हा याग करीत. या यागाचा विधी ताण्डच ब्राह्मणात (१७.१–४) सांगितला आहे. आचारभ्रष्ट, निंद्यकर्म करणारे, ज्ञातिबहिष्कृत आणि ज्यांच्या जननेन्द्रियाचें सामर्थ्य नष्ट झाले आहे, असे व्रात्यांचे चार प्रकार सांगितले आहेत आणि त्यांच्यासाठी व्रात्यस्तोमही चार प्रकारचे सांगितले आहेत. यांतील दुसरा व्रात्यस्तोम हा उक्थ्याचा विकार असून, बाकीचे तीन अग्निष्टोमाचे विकार आहेत. म्हणजे या व्रात्यस्तोमांचे सर्व विधान अग्निष्टोम यागाप्रमाणेच आहे. या यज्ञात कोणती सामे म्हणावयाची व त्यांची आवृत्ती करताना स्तोमसंख्या किती असावी, यासंबंधी काही विशेष नियम सांगितले आहेत. उदा० पहिल्या प्रकारच्या यज्ञात सर्व स्तोत्रे षोडशस्तोमात म्हणावी, दुसऱ्या यज्ञात सहा स्तोत्रे षोडशस्तोमात म्हणावी, तिसऱ्यात दोन स्तोत्रे षोडशस्तोमात म्हणावी व शेवटच्या यज्ञात त्रिवृत्, इ. सर्व स्तोमांत स्तोत्रे म्हणावी. या व्रात्यस्तोमात ज्या दक्षिणा सांगितल्या आहेत त्यांना व्रात्यधन असे नाव आहे. उष्णीष, प्रतोद (बैल हाकण्याचे लोखंडी साधन), ज्याह्रोड (दोरीशिवाय धनुष्य), वाकडातिकडा चालणारा रथ, काळे कापड, इ. वस्तू मगध देशातील एखाद्या मूर्ख मनुष्यास दक्षिणा म्हणून द्याव्या, असे कात्यायन श्रौतसूत्रांत (२२.४.२४) सांगितले आहे.

अग्निष्टोम किंवा उक्थ्य हे यज्ञ अग्निहोत्र्यालाच करता येतात. पण एखाद्या व्रात्याला शुद्ध व्हायचे असेल, तर त्याच्याकडून आधानपूर्वक व्रात्यस्तोम करवावा. व्रात्याने आधान न करता लौकिक अग्नीच गार्हपत्य म्हणून घ्यावा आणि त्याच्या आधारे व्रात्यस्तोम यज्ञ करावा, असे कात्यायनाचा टीकाकार कर्काचार्य याने म्हटले आहे. ब्राह्मणकाळात व श्रौतसूत्रांच्या काळांत व्रात्यस्तोम हा एक श्रौतयज्ञ होता व तो सामांच्या विकारांवर आधारित होता. श्रौतयज्ञाला विरोध करणारे व आचारहीन अशा लोकांना तो यज्ञधर्म मानायला लावण्यासाठीच हा यज्ञ निर्माण झाला.

पण पुढे सावित्रीपतितांनाही व्रात्य म्हणण्यात आले (मनु. २.३९) व त्यांना पुन्हा वेदाध्ययनाचा अधिकार देण्यासाठी व्रात्यस्तोमाचा उल्लेख गृह्यसूत्रे व स्मृती यांनी केला. व्रात्यस्तोम केल्यानंतर त्या लोकांशी कोणताही संबंध ठेवण्यास हरकत नाही, असे म्हटले आहे.

या व्रात्यस्तोमासंबंधी डॉ. केतकर पुढीलप्रमाणे माहिती देतात — परकीयांस स्वसदृश करावे आणि त्यांस आपल्या समाजाचे सदस्य करावे म्हणून जी चळवळ झाली तीत व्रात्यस्तोमास महत्त्वाचे स्थान दिले पाहिजे. हा विधी कीकटांत उत्पन्न झाला. तेथील लोक मात्र संस्कृतीच्या लोकांपेक्षा भिन्न होते. हे शक असावेत. त्यांचे उपाध्याय मग असावेत. व्रात्यस्तोम या विधीत अनेक कुटुंबे एकदम यजनयोग्य करावीत अशी पद्धती दिलेली आहे.

मूळ श्रौतयज्ञ म्हणून असलेल्या या व्रात्यस्तोमाचे स्मार्त स्वरूप कसे असावे, यासंबंधी निश्चित माहिती मिळत नाही. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**शंकरदास** (१) (इ. स. चे १८ वे शतक) एक रामभक्त हिंदी कवी. याला रामदर्शन घडले होते, असे म्हणतात. तो शंकर चौबे या नावानेही परिचित आहे. शोभाराम हे याच्या पित्याचे नाव होय. शंकरदासाचा जन्म बिहार प्रदेशाच्या सारण जिल्ह्यातील इसुआपुर नावाच्या गावी झाला. त्याचे प्राथमिक शिक्षण गावीच झाले. पण तो कुशाग्र बुद्धीचा असल्याने त्याने काशीला जाऊन पुढचे अध्ययन केले आणि शास्त्री ही उपाधी मिळविली.

त्याला कुष्ठरोग झाला होता, असे म्हणतात. त्यातून मुक्त होण्यासाठी त्याने गंगेकाठच्या चिरान नामक गावी वास्तव्य केले. तिथे तो गंगासेवन करून राहत होता. या कालावधीत त्याने गंगास्तुतिपर बरीच कविता केली. पुढे तो रोगमुक्त होऊन तिथून परतला आणि त्याने चारी धाम, उज्जैन, नैमिषारण्य, इ. यात्रा केल्या. मग त्याचा विवाह झाला. वृद्धावस्थेत संसाराची उपाधी सोडून जीवन राममय करण्यासाठी तो गंगाशरयूच्या संगमावर जाऊन अंतकालापर्यंत राहिला. तिथे त्याला बरेच शिष्यही मिळाले.

शंकरदास शीघ्रकवी होता. त्याने रामनाममाला नावाचा एक मोठा काव्यग्रंथ रचला. या ग्रंथात ११६६४ भजने आहेत. त्याच्या काव्यात भाषासौष्ठव नसले तरी विचारगांभीर्य खूप आहे.

काव्याची भाषा मागधीमिश्रित भोजपुरी आहे. या भाषेत रामकाव्य फारच कमी प्रमाणात आढळते. त्यामुळे हिंदी साहित्याच्या इतिहासात रामनाममालेला एक आगळे स्थान प्राप्त झाले आहे. याची स्फुट रचनाही बरीच आढळते. [हिं.सा.वि.; रा. र. सं.]

(२) (इ. स. चे १८ वे शतक) निरंजनस्वामी कऱ्हाडकरांच्या परंपरेतील एक गाणपत्य. याला निरंजनस्वामींचा नातू भगवंतदेव याचा गुरुबोध झाला असावा, असे अनुमान आहे. याचे मूळ नाव काशी असून, हा स्वतःला शंकरदास, शिवदास किंवा काशी शिवदास म्हणवितो. मार्तंड भैरव हा याचा कुलस्वामी आहे. याने शिवरात्रिकथा, निरंजनचरित्र, गणपतिस्वयंवर आणि गणपति-कार्तिकस्वामीभांडण असे लहानमोठे प्रकरणग्रंथ रचले आहेत. निरंजनचरित्र म्हणजे शंकराचार्यांच्या ओंकाराष्टक व निरंजनाष्टक यांवरील टीका होय. गणपति-कार्तिकस्वामी प्रकरणातील त्याच्या काव्याचा एक नमुना असा–

**सज्जना। परिसा अनुभवखुण रंजना॥**
**सहजीं सहज नमन त्यासी।**
**उरणें कैंचें शंकरदासीं॥**
**विवरूं अखंड रायीयासी। हो सज्जना०॥**
**पार्वतीसी स्फुरली स्फूर्ति।**
**तोचि सर्वेश्वर त्रिमूर्ति॥**
**आख्या जाली मंगलमूर्ति॥ हो सज्जना०॥**
**षण्मुख प्रत्यग्वस्तूठायीं।**
**आनंदादिक षड्विध पाहीं॥**
**यास्तव षण्मुख यॆसे गायी॥ हो सज्जना०॥**

शंकरदासाच्या भाषेत सहजता आहे. [विविधा; म. सा.]

## शंकरदेव

(इ. स. १४४९–१५६९) आसाममधील एक थोर वैष्णव संत, महापुरुषिया नामक भक्तिपंथाचा संस्थापक, कवी व नाटककार. याच्या जन्मकाली आसाममधील लोकस्थिती अत्यंत अवनत दशेला पोचली होती. राजकीय दृष्ट्या त्या वेळी आसामवर छुतिया, कचारी, भूयान किंवा भुइया व आहोम हे चार राजवंश सत्ता गाजवीत होते आणि प्रतिदिवशी परस्परांशी हेवेदावे करीत होते. त्यांच्या आपसातील यादवीने आसामचे सारे जीवनच अस्थिर व दोलायमान झाले होते. राज्यकर्त्यांच्या जुलमाला लोक अगदी कंटाळून गेले होते.

सामाजिक व धार्मिक दृष्ट्या तर आसामचे चित्र आणखीच भीषण होते. आसामात त्या वेळी अनेक परस्परविरोधी आचार-विचार सांगणाऱ्या पंथोपपंथांचा सर्वत्र सुळसुळाट झाला होता. त्या सर्व पंथांत शाक्तपंथ हा विलक्षण प्रभावी होता. तिथल्या मूळ गारो, खासी, किरात, इ. टोळ्यांचा हा पंथ होय. हे लोक मंगोल वंशाचे. ते मातृसत्ताक कुटुंबपद्धतीचे पुरस्कर्ते असल्या[ने] त्यांच्यांत मातृपूजेची प्रथा रूढ होती. कामाख्या ही त्यां[ची] प्रसिद्ध मातृदेवता. तिला ते पशुबली देत. प्रसंगविशेषी न[र]बलीही अर्पण करीत. या देवीचे मूलस्थान खासी व गारो [या] नावाच्या टेकड्यांमध्ये होते. आरंभी नरकासुराने व नंतर कोच राजांनी या शाक्तपंथाचा अंगिकार केला. नरकाने तर बाहेरच्या देशातून ब्राह्मण बोलावून आणले व त्यांना या भूमीत कर्म... करून त्यांच्या द्वारा या शाक्तपंथाचे तंत्र बनवले. ब्राह्मणां[नी] त्यासाठी वेदापासूनच्या कथा अभ्यासल्या, ब्राह्मणे व पुरा[णे] धुंडाळली; याशिवाय अन्य अनेक लौकिक कथा-गाथा एकत्र के[ल्या] व काही नव्याने सिद्ध केल्या. मग त्या सर्वांची सुंदर-सुबोध गुंफण करून त्याचे उपासनाशास्त्र तयार केले. पण पुढे या उपास[ने]नेत अनेक विकृती शिरल्या. बौद्धांनी तांत्रिक वळण स्वीकार[ून] त्या विकृतीत आणखी भर टाकली. मत्स्य, मद्य, मांस, मुद्रा आणि मैथुन अशा पंचमकारांच्या आत्यंतिक पुरस्कारामुळे ... धार्मिक जीवन गढूळ बनून गेले. वामाचार रूढ झाला. बौद्धां[चे] मंत्रयान, कालचक्रयान, इ. पंथ केवळ तांत्रिक विधि-विधानां[ना] प्राधान्य देणारे होते. याशिवाय नाथपंथ, मनसा संप्रदाय, ... छोटेमोठे पंथ सामान्य माणसाला अधिकाधिक गोंधळात टाक[त] होते. जादूटोणा, मंत्रतंत्र आणि वळीवगाडे यांचे केंद्र म्हणू[न] आसामची सर्व देशभर दुष्कीर्ती झाली होती.

अशा अत्यंत क्रांतिकारक कालखंडात जन्म घेऊन शंकरदे[वाने] समस्त आसामला एका श्रद्धा-संस्कृतीच्या गोफात गुंफले व त्या[चे] जीवन सर्वार्थाने सुसह्य, सुसंपन्न करण्याचा आटोकाट प्र[यत्न] केला. असमिया भाषा, धर्म, संस्कृती, साहित्य व रंगभूमी [या] सर्वांचा त्याने पुनरुद्धार केला. एका अर्थाने तो आसामचा 'शंकराचार्य' ठरला.

ब्रह्मपुत्रा नदीच्या तीरावर नौगाव नावाचे एक गाव [आहे.] तिथून १६ मैल दूर अलिपुखुरी नामक दुसरे एक छोटेसे [खेडे]गाव आहे. या गावी शके १३७१ च्या विजयादशमीच्या दि[वशी] शंकरदेव एका श्रीमंत कायस्थ कुळात जन्मला. त्याच्या व[डि]लांचे नाव कुसुंबर व आईचे सत्यसंधा. लग्नानंतर बराच [काळ] लोटला, पण त्या दंपतीला संतान झाले नाही. त्यामुळे कुसुं[बर] निराश झाला. मध्यंतरी त्याने दुसरे लग्नही केले; परंतु व्यर्थ. शेवटी त्याने शिवाची कडक उपासना आरंभली. त्या उपा[स]नेला फळ मिळाले. कुसुंबराला पुत्ररत्नाचा लाभ झाला. व[डि]लांनी त्याचे नाव शंकर असे ठेवले. शिवकृपेने जन्मला म्हणून ह[ा] त्याला शंकराचा अवतार समजू लागले.

शंकरदेवाचे माता-पिता दोघेही त्याच्या लहानपणीच [मृत्यू] पावले व लहानग्या शंकराचे पालनपोषण त्याच्या वडिलांच्या...

खेरसुती हिने केले. महेंद्रकंदली नावाच्या एका सुप्रसिद्ध ब्राह्मण पंडिताच्या पाठशाळेत त्याचे शिक्षण झाले. मूलतःच त्याची बुद्धी कुशाग्र व वृत्ती एकपाठी असल्यामुळे शालेय विश्वात तो एक हुषार विद्यार्थी म्हणून नावाजला जाऊ लागला. एके दिवशी दुपारी तो एका झाडाखाली निजला असताना, झाडाच्या ढोलीतून एक नाग बाहेर आला व त्याने त्याच्या मस्तकावर आपले फणाछत्र धरले. महेंद्रकंदलींनी जेव्हा हे आश्चर्यकारक दृश्य पाहिले, तेव्हा त्यांनी मनोमन जाणले, की हा कोणी भावी काळातला महापुरुष आहे. त्या दिवसापासून ते स्वतः शंकराला शंकरदेव अशा आदरार्थी संबोधनाने गौरवू लागले. शंकरदेवाचे सहाध्यायीही त्याला शंकरदेवच म्हणू लागले. महेंद्रकंदलींच्या पाठशाळेत शंकरदेव सहा-सात वर्षे होता. त्या काळात त्याने वेद, उपनिषदे, ब्राह्मणे, आरण्यके, पुराणे, तंत्रशास्त्र, कलाप व्याकरण, काव्यशास्त्र, रामायण, महाभारत, इ. विषयांचा सांगोपांग अभ्यास केला. त्याच काळात त्याची कवित्वशक्तीही पालवली. अनेक सुंदर व मधुर कविता तो लीलया करू लागला व सुरेल आवाजात त्या गाऊही लागला. हरिश्चंद्र उपाख्यान हे एक सोपे कथाकाव्य त्याने याच काळात रचले असावे, असे त्याच्या काही चरित्रकारांचे मत आहे. योगसाधनेचे धडेही त्याने शालेय जीवनातच गिरवले.

अशा प्रकारे शिक्षण पुरे करून शंकरदेव घरी परतला. शिरोमणी भूयान या घराण्याचा तो कर्ता पुरुष असल्यामुळे भूयान जातीच्या लोकांची स्वाभाविकच अशी अपेक्षा होती, की शंकरदेवाने आता आपल्या जातीच्या संघटनेचे काम हाती घ्यावे व शिरोमणीपदाची वस्त्रे धारण करून गावाचा कारभार करावा. परंतु शंकरदेवाला त्यात रस नव्हता. एकान्तात बसून ध्यानधारणा करावी, कविता रचून गाव्या, साहित्य-संगीत व शास्त्रचर्चा यांत रात्री जागवाव्या, असे त्याला वाटे.

थोड्याच दिवसांत सूर्यवती नामक एका सुंदर व सद्‌गुणी मुलीशी शंकरदेवाचा विवाह झाला. परंतु शंकरदेवाची ही पत्नी मनू किंवा हरिप्रिया नावाच्या एका मुलीला जन्म देऊन मरण पावली. त्यामुळे शंकरदेवाला वैराग्य आले. तथापि हरिप्रियेचे लग्न होईपर्यंत कसाबसा तो संसारात तग धरून राहिला.

इ. स. १४८१ साली, वयाच्या बत्तिसाव्या वर्षी शंकरदेव विरक्त होऊन तीर्थयात्रेला निघाला. त्याच्या बरोबर जे सतरा लोक निघाले, त्यांत त्याचे पाठशाळेतले शिक्षक महेंद्रकंदली व त्याचा जिवलग मित्र रामराम विप्र हे दोघे होते. उत्तर भारतातील सर्व प्रसिद्ध तीर्थक्षेत्रे पाहून झाल्यावर शंकरदेव आपल्या सहयात्रिकांना घेऊन जगन्नाथपुरी येथे गेला व तिथे बरीच वर्षे वास्तव्य करून राहिला. पुरीच्या वास्तव्यातच त्याचा भागवतपुराणाशी दृढ परिचय झाला. तिथल्या गोवर्धन मठातील एक ज्येष्ठ महंत व विरागी संत श्रीधरस्वामी यांच्या भागवत-भावार्थ-दीपिका या भाष्यग्रंथाने शंकरदेवाला भागवताचे खरे रहस्य उकलून सांगितले.



शंकरदेव

अशा प्रकारे प्रदीर्घ काळ बाहेर वास्तव्य करून शंकरदेव स्वगृही परतला. त्या काळापावेतो त्याची आजी विद्यमान होती. तिने आणि अन्य ज्येष्ठ आप्तांनी शंकरदेवाला पुन्हा लग्नाचा आग्रह चालवला. शंकरदेवाला तो मानावा लागला.

मग इ. स. १४९७ साली शंकरदेवाने कालिंदी नामक एका मुलीशी दुसरे लग्न केले. त्यापूर्वीच त्याला भूयानपदाची जबाबदारीही स्वीकारावी लागली. तथापि त्याचे मन मात्र या ऐहिक व्यापतापात मुळीच रमत नव्हते. दिवसाचा बराच काळ तो ध्यानधारणेत व जपतपात व्यतीत करी. त्यासाठी त्याने अगदी एकान्तात एक छोटेसे देऊळ बांधून घेतले. तिथे तो कधीकधी आपल्या स्नेह्यासहकाऱ्यांसह वेदान्ताची चर्चा करी. पुढे आसामात सर्वत्र स्थापन झालेल्या 'सत्र' नामक धर्मस्थानांचा हा प्रथमाविष्कार होता. (सत्र पाहा.)

याच काळात पुरीहून जगदीश मिश्र नामक एक साधू 'भागवत–भावार्थ–दीपिका' हा श्रीधरस्वामींचा भागवतावरील टीकाग्रंथ घेऊन शंकरदेवाकडे आला. प्रत्यक्ष पुरीच्या जगन्नाथाच्या आज्ञेनेच त्याने ही गोष्ट केली असल्याची आख्यायिका आहे.

त्या ग्रंथाच्या आधारेच त्याने पुढे एक वर्षभर भागवतावर प्रवचने केली. लोकही त्याच्या निरूपणाने विशेष प्रभावित झाले. हळूहळू शंकरदेवाला वाटू लागले, की विविध धर्म–पंथांतील सद्‌विचारांचा संग्रह करून त्यांच्या द्वारा एका विष्णूच्या उपासनेलाच प्राधान्य देणाऱ्या एखाद्या नव्या पंथाचे प्रवर्तन करावे व सर्व प्रकारचे मतभेद नष्ट करण्याचा प्रयत्न करावा. या नवधर्मप्रवर्तनाच्या कामी आपल्याला भागवतपुराणाचा खूप उपयोग होईल, असेही त्याला वाटू लागले.

लौकरच त्याने आपल्या नव्या पंथाच्या तत्त्वांची आचारसंहिता सिद्ध केली. या पंथाच्या प्रमुख तीन तत्त्वांपैकी पहिले तत्त्व सत्संग हे होते. दुसरे तत्त्व नाम म्हणजे भगवंताचे नामस्मरण. तिसरे तत्त्व एकशरणता म्हणजे एकाच देवतेची अनन्य भक्ती. ही तीन तत्त्वे अत्यंत सोपी व त्याच्या नव्या पंथप्रचाराला सोयीची होती. या तत्त्वांच्या स्वीकारामुळे व लोकांना सहज समजेल अशा त्यांच्या परिभाषेमुळे शंकरदेवाचा हा एकशरणिया किंवा महापुरुषिया नामक वैष्णवपंथ खूप वेगाने आसामात सर्वत्र विस्तारला. (महापुरुषिया संप्रदाय पाहा.)

सर्वसामान्य जनांना आपल्या पंथाचे त्वरित व स्पष्ट आकलन व्हावे, यासाठी शंकरदेवाने विविध कलांचा आश्रय घेतला. अंकिया नाट हा त्यांतलाच एक प्रकार होय. हे एक गद्य–पद्य मिश्रित असे एकांकी नाटक असते. शंकरदेवाने अशी बरीच नाटके लिहिली असावी, असा असमिया साहित्यिकांचा अंदाज आहे. मात्र आज त्याची केवळ सहाच नाटके उपलब्ध असून, त्यांची नावे पुढीलप्रमाणे– पत्नीप्रसाद, कालियदमन, केलिगोपाल, रुक्मिणीहरण, पारिजातहरण व रामविजय. ही सर्व नाटके प्राधान्याने भागवत पुराणातील व श्रीकृष्णचरित्रातील कथाप्रसंगांवर आधारित आहेत. चिन्हयात्रा हे शंकरदेवाचे सचित्र नाटक होय. त्यातली पार्श्वभूमीची रंगीत चित्रे शंकरदेवाने स्वतःच काढली होती. या नाटकाला संगीत देण्याचे, त्यातली नृत्ये व संवाद घटवून घेण्याचे, नाटकाच्या प्रयोगाचे सूत्रसंचालन करण्याचे आणि काही भागांत भगवान विष्णूची भूमिका वठविण्याचे अशी सर्व कामे शंकरदेवाने स्वतःच केली. शंकरदेवाच्या या पहिल्याच नाटकाने तो असमिया जनतेच्या गळ्यातला ताईत बनून गेला.

शंकरदेवाच्या भूयान जमातीचा भोवतालच्या कचारी टोळ्यांशी नेहमी झगडा होई. शंकरदेव भूयानशिरोमणी असतानाही तो वारंवार उद्‌भवे; परंतु शंकरदेवाच्या सामोपचाराच्या धोरणामुळे प्रकरण फारसे विकोपाला जात नसे. शंकरदेवाने आपल्या नवपंथप्रवर्तनाच्या कामाला व अध्यात्मसाधनेला वेगाने आरंभ केल्यावर स्वाभाविकच त्याचे जमातविषयक कामकाजाकडे दुर्लक्ष होऊ लागले. एकदा त्याच्या भूयान बांध-वांनी प्रतिपक्षियांना बेदम ठोकून काढले. त्यामुळे वातावरण गढूळ बनले. यापुढे कचारी लोकांशी संघर्ष किंवा समझोता दोन्ही अशक्य असल्याचे दिसून आल्यावर शंकरदेवाने त्याचे अनुशासन मानणाऱ्या भूयान लोकांना घेऊन ब्रह्मपुत्रेच्या अगदी लगतच्या उत्तर भागात, दुसऱ्या भूयान राज्यात स्थलांतर केले; परंतु तिथेही त्याला फार काळ सुरक्षितता लाभली नाही. तिथे कोच राजांचा उपद्रव सुरू झाल्यामुळे तो जवळच्या आहोम राज्यात शिरला. याही राज्यात कोच राजांचा त्रास चालूच राहिला. त्याच्या जोडीला डाफळा टोळ्यांचेही हल्ले होऊ लागले. मग शंकरदेव आपल्या अनुयायांना घेऊन ब्रह्मपुत्रेतील माजुली बेटावर जाऊन राहिला व बराच काळपर्यंत तिथेच स्थिर झाला. शंकरदेवाचा पंथ या भूमीवर वेगाने फोफावला. त्याचा पट्ट-शिष्य माधवदेव त्याला तिथेच प्रथम भेटला. (माधवदेव पाहा.)

शंकरदेवाच्या पंथाची जसजशी भरभराट होऊ लागली, तसतसा तत्कालीन ब्राह्मणी धर्माच्या वर्चस्वाला सुरुंग लागू लागला. त्यामुळे ब्राह्मणी धर्माचे लोक शंकरदेवाला जागोजाग विरोध करू लागले. शंकरदेवाने धार्मिक व सामाजिक समतेचा पुरस्कार करून ब्राह्मण व अस्पृश्य यांना एका पंक्तीत आणले; एकशरण भक्तीला अग्रस्थान देऊन विष्णुदेवतेचे माहात्म्य वाढविले व सरसकट समाजाला ईश्वरभक्तीचे स्वातंत्र्य देऊन टाकले, ही या धर्ममार्तंडांच्या क्रोधाची कारणे होती. शंकरदेवाच्या पंथप्रचाराला भरघोस यश प्राप्त होणे म्हणजे ब्राह्मणांच्या तांत्रिक आणि कर्मकांडप्रधान धर्माला ओहोटी लागणे असा त्याचा अर्थ होता. ब्राह्मण धर्मप्रमुखांनी शंकरदेवाला आरंभी वादात पराजित करण्याचा चंग बांधला; परंतु ते अयशस्वी होतो, असे पाहिल्यावर त्यांनी शंकरदेवाला व त्याच्या अनुयायांना ठिकठिकाणी अभद्र शिव्याशाप द्यायला व त्यांच्यावर प्रसंगी प्राणघातक हल्लेही चढवायला सुरुवात केली. ब्राह्मणांच्या या आततायी आक्रमणाला तोंड देणे शंकरदेवाला अशक्यच होते. कारण त्याची शिकवणूक सर्वधर्मसमभावाची व सर्वांभूती भगवंत पाहण्याची होती. सर्व प्रकारचे हल्ले शांत-पणाने सहन करीत, अधिक मार्दवाने आपले म्हणणे दुसऱ्यांच्या गळी उतरविणे, एवढेच त्याला शक्य होते आणि तो ते करीत राहिला. ब्राह्मणांच्या हल्ल्यांबरोबरच बौद्ध तांत्रिकांनीही शंकरदेवाला कडवा विरोध आरंभिला होता. शेवटी सर्वांच्या आक्षे-पांना शंकरदेवाने एका वादसभेत चोख उत्तरे दिली. त्यामुळे ब्राह्मणी व बौद्ध तांत्रिकांचे समाधान झाले नसले, तरी शंकरदेवाचा पंथ मात्र पूर्ण तावूनसुलाखून निघाला व त्याला असंख्य अनुयायी लाभले.

ब्राह्मणवर्गाने मग आहोम राजा सुहुयुंग याच्याकडे धाव घेतली व शंकरदेवाने आपल्या धार्मिक बाबतीत ढवळाढवळ चालू केल्या-विषयी तक्रार नोंदवली. राजाने मग शंकरदेवाची चौकशी आरंभली; परंतु त्याच्या उपदेशात आक्षेपार्ह असे काही न आढळल्यामुळे त्याने शंकरदेवाला सोडून दिले व एका सच्छील सत्पुरुषाविरुद्ध कागाळ्या केल्यावरून ब्राह्मणांनाच दूषण दिले.

या घटनेमुळे शंकरदेवाला राजाच्या न्यायबुद्धीचा विश्वास आला आणि त्याने आहोम राज्यात राहण्याचा निश्चय केला. एवढ्यात एक नवेच संकट उद्भवले. राजाने शंकरदेवाबरोबरच्या भूयान लोकांना हत्ती पकडण्याच्या कामगिरीवर पाठवले. शंकरदेवाचा जावई हरी हा शंभर भूयानांचा शिलेदार होता. तो हत्ती पकडण्याच्या या कामगिरीत अयशस्वी झाला. त्यामुळे राजा संतापला व त्याने हरी आणि माधवदेव या दोघांना पकडले. त्यांच्यावर पुढे खटला भरल्यावर हरी दोषी ठरला. त्याला फाशी देण्यात आले. माधवदेव मात्र सद्वर्तनाच्या हमीवर मुक्त झाला. राजाच्या या लहरीपणामुळे शंकरदेवाला स्वतःच्या जीविताचीही काळजी वाटू लागली. मग तो आपल्या अनुयायांसह कोच राजा नरनारायण याच्या स्वामित्वाखाली असलेल्या कामरूप प्रदेशात गेला व बारपेटा गावी स्थायिक झाला. तिथेही तो फार काळ राहू शकला नाही. तिथून निघून आणखी दोन ठिकाणी थोडथोडा काळ काढल्यावर शंकरदेव पाटबौसी नामक गावी गेला. यानंतर देह ठेवीपर्यंत तो तिथेच वास्तव्य करून होता. पाटबौसीच्या वास्तव्यातच शंकरदेवाने आपली बहुतेक नाटके व अन्य महत्त्वाचे ग्रंथ लिहिले. दामोदरदेव, हरिदेव, अनंतकंदली यासारखे त्याचे प्रमुख शिष्यही त्याला प्रथम तिथेच भेटले.

इ. स. १५५० च्या सुमारास शंकरदेव दुसऱ्यांदा तीर्थयात्रेला निघाला. ही त्याची यात्रा जगन्नाथपुरीपर्यंत होती. या यात्रेत त्याच्या बरोबर सुमारे सव्वाशे भक्त होते. शंकरदेवाची या यात्रेत चैतन्य महाप्रभूंशी भेट झाली असल्याविषयी एक आख्यायिका प्रचलित आहे.

पुरीहून परतल्यावर शंकरदेवाने धर्मसभा भरविणे, नव्या अनुयायांचा स्वीकार करून त्यांना मार्गदर्शन करणे आणि ग्रंथलेखन ही आपली नेहमीची कामे पुन्हा सुरू केली. परंतु एवढ्यात ब्राह्मण पुरोहितांनी पुन्हा बळ बांधले व राजा नरनारायणाकडे जाऊन शंकरदेवाविरुद्ध बरेच गरळ ओकले. त्यामुळे नरनारायणाने शंकरदेवाला पकडून, बेड्या ठोकून आपल्यासमोर आणण्याची आज्ञा केली. शंकरदेवाच्या शिष्यांना हे समजताच त्यांनी त्याला अन्यत्र सुरक्षित हलविले. राजाचे शिपाई पाटबौसीला पोचल्यावर त्यांना शंकरदेवाऐवजी त्याचे दोन शिष्य फक्त सापडले. त्यांची नावे नारायण ठाकूर व गोकुलचंद अशी होती. त्या दोघांचा खूप छळ करूनही त्यांनी राजाला शंकरदेवाचा ठावठिकाणा कळू दिला नाही. पुढे राजाने चिडून त्यांना काही भूतानी व्यापाऱ्यांना विकून टाकले; परंतु त्यांची साधुवृत्ती पाहून भूतानी व्यापारी प्रभावित झाले व त्यांनी त्यांना सोडून दिले.

पुढे शंकरदेव प्रकट झाला व जेमतेम दोन-अडीच महिने मुक्तावस्थेत वावरला. तेवढ्यात पुन्हा राजाची माणसे त्याला पकडण्यासाठी निघाली असल्याची वार्ता येऊन थडकली. राजगुरू कंठभूषण व सेनापती चिलाराय याच्या चाकरीत असलेला शंकरदेवाचा भक्त रमानंद, या दोघांनी चिलाराय याला ही वार्ता कळवून शंकरदेवाला अभय देण्याची विनंती केली. चिलाराय हा राजा नरनारायण याचा सख्खा भाऊ, राज्याचा सेनापती व राज्याचा भावी वारस असून, शंकरदेवाचा चाहता होता. त्यामुळे नरनारायणाच्या अविचारी निर्णयाला त्याने पायबंद घातला. त्याने, शंकरदेवाच्या केसालाही धक्का लागणार नाही, असे नरनारायणाकडून वचन घेतल्यावरच, शंकरदेवाला राजदरबारात पाठविले. शंकरदेव दरबारात पोचल्यावर त्याच्या देदीप्यमान व्यक्तित्वामुळे राजा प्रभावित झाला. त्यानंतर शंकरदेवाच्या नवपंथप्रवर्तनाचे काम निर्वेध व सुरळीत चालू झाले. सेनापती चिलारायाने शंकरदेवासाठी राजधानीच्या जवळच एक सत्र बांधून दिले. हे सत्र भेलादंगा सत्र या नावाने विख्यात आहे. या सत्रातच त्याने आपले उर्वरित आयुष्य व्यतीत केले. आपल्या आयुष्याच्या या शेवटच्या कालखंडात शंकरदेवाने वृंदावनातील कृष्णलीलांचे चित्रण करणारा एक कापडी चित्रपट्ट सिद्ध केला. वृंदावनी वस्त्र म्हणून या चित्रपट्टाची प्रसिद्धी आहे.

इ. स. १५६९ या वर्षी शंकरदेव अल्पशा आजारानंतर पाटबौसी येथे मरण पावला.

आसाममधील एका मोठ्या वैष्णवपंथाचा संस्थापक व प्रचारक, एक साक्षात्कारी संत, असमिया साहित्याच्या एका सामर्थ्यशाली युगाचा प्रवर्तक; संगीत, नृत्य व नाटय या कलांना नवसंजीवन देणारा महान कलावंत, इत्यादी विविध नात्यांनी शंकरदेव आसामच्या आणि भारताच्या इतिहासात अजरामर ठरला आहे. आसाममधील आदिम जातिजमातींचे संघटन, या संघटित समाजाचे नैतिक उन्नयन आणि शेवटी त्याचे महापुरुषिया संप्रदायाच्या भक्तिभागिरथीत विलयन, ही शंकरदेवाची कामगिरी महान होय. आपल्या संप्रदायाच्या प्रचारासाठी त्याने स्वतःच्या साहित्य, संगीत, नृत्य, नाटय, वक्तृत्व, अभिनय, चित्रकला, पांडित्य, इ. सर्व शक्ती कामी लावल्या. त्याचे विचार हे प्राधान्याने सर्वसामान्य जनांसाठी असल्यामुळे ते जास्तीत जास्त सोप्या भाषेत आविष्कृत व्हावे व सामान्यांतल्या सामान्य मनुष्यालाही त्याचे आकलन व्हावे, असा त्याचा प्रयत्न असे. शंकरदेवाने

आपले उपास्य दैवत म्हणून कृष्णाची निवड केली असली, तरी त्याचा कृष्ण हा राधाकृष्ण नाही; तो केवळ कृष्ण आहे. त्यामुळे त्याच्या पंथात, राधेसहित असणाऱ्या अन्य वैष्णव संप्रदायांत आढळणारे शृंगारिक लीलाविलास आले नाहीत. त्यामुळे पंथातील वातावरण शुद्ध राहिले.

शंकरदेवाने आपल्या प्रदीर्घ आयुष्यात विविध स्वरूपाचे ग्रंथ-लेखन केले. त्याने काही संस्कृत ग्रंथांची भाषांतरे केली, काहींवर टीका लिहिल्या व काही ग्रंथ स्वतंत्रपणे रचले. वैष्णवांचा सर्व-प्रिय ग्रंथ म्हणजे भागवतपुराण. शंकरदेवाने त्याचा असमिया भाषेत अनुवाद आरंभिला; परंतु ते काम प्रचंड असल्यामुळे त्याच्या एकट्याच्याने सिद्धीस गेले नाही. त्याने भागवताचे १ ते ३, ७ ते १० व १२ एवढेच स्कंध अनुवादिले व उर्वरित स्कंधांचा अनुवाद आपल्या शिष्यांकडून करवून घेतला. भाग-वताचा असमिया भाषेतला अनुवाद अनेक नव्या कवींना काव्य-रचनेला प्रोत्साहन देणारा ठरला. सामान्य जनांसाठी सोपा करून लिहिला असला, तरीही शंकरदेवाचा हा भागवतानुवाद काव्यमय व रसाळ उतरला आहे. यातील भक्तीचे माहात्म्य वर्णन करणाऱ्या काही काव्यपंक्ती पुढीलप्रमाणे–

**भजे माधवक नाम स्मरे सर्वक्षण ।**
**एके बारे सिजे तार तिनि प्रयोजन ।।**
**प्रथमे ओपजे प्रेम लक्षण भक्ति ।**
**गृहशरीर ते पाछे मिले विरक्ति ।।**
**प्रेमर आस्पद कृष्णमूर्ति स्फूर्ति हय ।**
**एके काले मिले आसि सम्पद त्रितय ।।**
**अतिशय क्षुधार्त भुजन्त येन मते ।**
**सिजे तिनि प्रयोजन प्रत्येक ग्रासते ।।**
**होवे तुष्ट देह पुष्ट क्षुधा गुछी याय ।**
**प्रेम भक्तिर राजा शुना अभिप्राय ।।**
**अल्प भकतित होवे प्रेम अति पुष्ट ।**
**किंचित भोजने येन किच्छु मान तुष्ट ।।**

भावार्थ– जो माधवाचे नित्य स्मरण व मनन करतो, त्याचे तीन हेतू एकदम साध्य होतात. प्रथम, भक्तीचे लक्षण जे प्रेम ते उप-जते; नंतर देह-गेहाविषयी विरक्ती येते आणि अखेरीस प्रेमाचे प्रत्यक्ष निधानच अशी कृष्णमूर्ती आवडू लागते. ज्याप्रमाणे क्षुधार्ताला अन्न मिळाले असता तीन गोष्टी साध्य होतात–मन संतुष्ट होते, देह पुष्ट होतो व क्षुधा नष्ट होते; त्याप्रमाणे वरील तीन लाभ एकदम होतात. राजा, भक्तिप्रेमाचा आशय ऐक. अल्प भक्तीमुळे प्रेमाची वृद्धी होते; थोडेसे अन्न मिळाले तरी समाधान होते.

नवविधा भक्तीपैकी श्रवण आणि कीर्तन या दोन भक्तींना शंकरदेवाने विशेष महत्त्व दिले आहे. भगवंताचे नामसंकीर्तन स्वतः करावे आणि दुसऱ्यांनी केलेले गुणगान ऐकावे, असे त्याचे म्हणणे. हा भगवंत म्हणजे त्याच्या मते एकमात्र भगवान श्रीकृष्ण होय. भक्तिप्रदीप नामक एका पदात खुद्द भगवान श्रीकृष्णाच्या मुखातूनच आपल्या एकनिष्ठ भक्तीचे महिमान त्याने वर्णिले आहे, ते असे–

**एकचित्ते तुमि मोक मात्र करा सेवा ।**
**परिहरा दुरते यतेक आन देवा ।।**
**हुयोक शरणापन्न एक मोते मात्र ।**
**मोके भजा हुइवा तेवे मुकुतिर पात्र ।।**
**नामनु शुनिबा तुमि आन देवतार ।**
**येन मते नुहिवे भकति व्यभिचार ।।**

भावार्थ– अन्य सर्व देवतांना विसरून तुम्ही माझी उपासना एकचित्ताने करा, मलाच शरण या. म्हणजे तुम्ही मोक्षाला प्राप्त व्हाल. दुसऱ्या देवतांचे नावही ऐकू नका. (असे केलेत) तरच तुमची भक्ती अव्यभिचारी होईल.

शंकरदेवरचित गुणमाला हे विष्णुस्तोत्र यमक-अनुप्रासादि अलंकारांनी नटलेले व सोपे असल्यामळे प्रत्येक आसामी वैष्ण-वाच्या नित्यपाठात समाविष्ट झाले आहे. त्यातले काही चरण असे–

**कालिक दमिला पूतन शुषिला ।**
**देवक तुषिला व्रजक भूषिला ।।**
**केशिवत्सबक समस्त दैत्यक ।**
**लागाइला चमक उकाइला यमक ।।**

कीर्तनघोषा ही शंकरदेवाची एक अत्यंत सुंदर व मनोहर रचना आहे. तिच्यात एकूण सव्वीस गीते असून, त्या गीतांत भागवतातल्या उद्बोधक प्रसंगांचे गायन केले आहे. काही महत्त्वाचे धर्मविचार, वैकुंठवर्णन, तसेच मोहिनीचे सुरेख शृंगारिक व प्रत्ययकारी चित्रण, स्त्रीमोहामुळे घडून येणारा सत्कार्याचा विनाश, तसेच स्त्रियांचे स्वतःसिद्ध माहात्म्य, इ. विविध विषयांचा त्यात समावेश आहे. स्त्रीमोहाविषयीं सावधगिरीचा इषारा देताना शंकरदेवाने म्हटले आहे–

**घोर नारी माया सर्व मायाते कुत्सित ।**
**महासिद्ध मुनिरो कटाक्षे हरे चित्त ।।**
**दर्शने करे जप-तप-योग भंग ।**
**जातिज्ञानिगणे कामिनीर एरे संग ।।**

भावार्थ– सर्व मोहांमध्ये स्त्रीचा मोह फार घातुक. (स्त्रीच्या) एका कटाक्षाने मोठमोठ्या सिद्धांचे आणि मुनींचे चित्त विच-लित होते. (तिच्या) नुसत्या दर्शनाने जप, तप, योग यांचा भंग होतो. म्हणून जातिवंत ज्ञानी पुरुष स्त्रीचा संग टाळतात.

कीर्तनघोषा या ग्रंथाची अनेक गुणवैशिष्टचे आहेत. त्यांत धार्मिक व नैतिक उपदेशावरोबरच समतेचा पुरस्कार करणारी वचनेही आहेत. सज्जनांचे लक्षण सांगताना शंकरदेव लिहितो—

ब्राह्मणर चंडालर निबिचारि कुल ।
दातात चोरत येन दृष्टि एकतुल ।।
नीचत साधुत यार भैल एकज्ञान ।
ताहाकेसे पंडित बुलिय सर्वजान ।।

भावार्थ – जो ब्राह्मण आणि चांडाळ यांचे कुल विचारीत नाही, दाता आणि चोर यांच्याकडे समदृष्टीने पाहतो, दुष्ट आणि सज्जन यांच्याविषयी एकाच प्रकारचा (सद्) भाव बाळगतो, त्यालाच सर्वजण पंडित (म्हणजे संत-सत्पुरुष) म्हणतात.

शंकरदेवाने आपल्या ऐन तारुण्यात हरिश्चंद्र–उपाख्यान व रुक्मिणीहरण ही दोन लघुकाव्ये रचली. त्यांतली वर्णने अत्यंत वास्तव आहेत. कारण त्याने आपल्या काळातील वेषभूषा, चालीरीती, अलंकार, निसर्गदृश्ये यांना पौराणिक परिवेष चढवून त्यांचा आपल्या काव्यात वापर केला आहे.

शंकरदेवाने रामायणाचे उत्तरकांडही रचले आहे. त्यातला कथाभाग वाल्मीकिरामायणातून उचलला असला, तरी ते मुळातल्या उत्तरकांडाचे तंतोतंत भाषांतर अथवा रूपांतर नव्हे. राम हा विष्णूचा अवतार आहे, ही एकच गोष्ट महत्त्वाची मानून त्याने तिच्या भोवती साऱ्या कथा गुंफल्या आहेत.

शंकरदेवाच्या वडगीतांची भाषा निर्भेळ असमिया नाही. मैथिली-असमिया यांच्या मिश्रणातून जन्मलेली ब्रजबुली नामक एक नवीच भाषा त्याने त्यासाठी वापरली आहे. देव, धर्म, अध्यात्म, नीती, भक्ती, वेदान्त यांच्या सुलभ व सुगम प्रकटीकरणासाठी वडगीतांची निर्मिती झाली आहे.

अंकिया नाटांच्या रचनेमुळे शंकरदेवाने असमिया रंगमंच, संगीत, चित्र, नृत्य, इ. कलांना नवा घाट आणि नवा आशय दिला. [शंकरदेव – श्री. महेश्वर नियोग, १९६७; आ. अ. आ. लि.; लौ. नी.; च. भा. नि. ]

**शंकरभट्ट** (१) (इ. स. चे १७ वे शतक) एक मीमांसक. हा स्वतःला मीमांसाद्वैतसाम्राज्यनीतिज्ञ असे म्हणवून घेतो. काशीनिवासी प्रसिद्ध धर्मशास्त्रज्ञ व महामीमांसक नारायणभट्ट याचा हा दुसरा मुलगा होय. शंकराने अनेक ग्रंथ रचले आहेत. पार्थसारथी मिश्राच्या शास्त्रदीपिका ग्रंथाच्या दुसऱ्या भागावर याची प्रकाश नावाची टीका आहे. द्वैतनिर्णय हा त्याचा गाजलेला ग्रंथ होय. या ग्रंथात कृष्णजन्माष्टमीव्रत, नवरात्रव्रत, संनिपाताशौच, इ. विषयांत जी मतमतांतरे आहेत, त्यांचा विचार करून मीमांसाशास्त्राच्या आधारे याने काही निर्णय सांगितले



आहेत. दाक्षिणात्य ग्रंथकारांच्या मतांवर विसंबून आपण हे निर्णय दिले आहेत, असे त्याने स्वतःच म्हटले आहे. मीमांसाबालप्रकाश हा त्याचा ग्रंथ म्हणजे पूर्वमीमांसासूत्रांत सांगितलेल्या सिद्धान्तांचे बालसुबोध विवेचन होय. मीमांसासंग्रह हा त्याचा पद्यग्रंथ आहे. त्यात या शास्त्रातील प्रधान तत्त्वांची चर्चा आहे. हा ग्रंथ म्हणजे त्याच्या काव्यशक्तीचा एक अनोखा नमुना होय. याव्यतिरिक्त निर्णयचंद्रिका, व्रतमयूख, विधिरसायन, श्राद्धकल्पसार, ईश्वरस्तुती, इ. ग्रंथ त्याने लिहिले आहेत. विधिरसायनात अप्पय दीक्षिताच्या विधिरसायन ग्रंथाचे खंडन आहे. गाधिवंशानुचरित असाही त्याचा एक ग्रंथ आहे.

सिद्धान्तकौमुदीचा कर्ता भट्टोजी दीक्षित हा शंकरभट्टाचा शिष्य आणि भगवद्भास्कर या बृहत्ग्रंथाचा लेखक नीलकंठ हा त्याचा मुलगा होय. [ मी. द.; शि. नि. १; का. सा. सा. ]

(२) (इ. स. चे १७ वे शतक) एक धर्मशास्त्रकार व मीमांसक. नीलकंठ हे त्याच्या वडिलांचे नाव होय. शंकराने पित्याच्या संस्कारमयूख नावाच्या ग्रंथसंकलनात खूप मदत केली व स्वतःही ग्रंथरचना केली. त्याने रचलेल्या ग्रंथांची नावे पुढीलप्रमाणे आहेत – कुंडभास्कर, व्रतार्क, कुंडार्क, कर्मविपाकार्क, सदाचारसंग्रह व एकादशीनिर्णय. कुंडभास्कर ही त्याच्या वडिलांच्या कुंडोद्योतावरील टीका आहे. हा ग्रंथ कुंडोद्योतदर्शन म्हणूनही ओळखला जातो. कुंडभास्कर व कुंडार्क हे दोन भिन्न की अभिन्न ग्रंथ, यासंबंधी अभ्यासकांत संदेह आहे. याची भट्टभास्कर नावाची जैमिनिसूत्रांवरील टीका अप्रकाशित आहे. व्रतकौमुदी नावाचा एक ग्रंथ शंकरभट्टाच्या नावावर मिळतो. पण तो शंकरभट्ट कोण हे कळत नाही. म. म. डॉ. गोपीनाथ कविराज यांच्या मते हा ग्रंथ याच शंकरभट्टाचा असावा. [ का. सा. सा.; मी. द. ]

**शंकर मिश्र** (इ. स. चे १५ वे शतक) एक प्रतिभासंपन्न दार्शनिक. बिहार प्रदेशाच्या दरभंगा जिल्ह्यातील सरिसव नामक गावी त्याचा जन्म झाला. भवनाथ मिश्र ऊर्फ अयाची हे त्याचे वडील मीमांसा, व्याकरण, इ. शास्त्रांत निष्णात होते. रघुदेव उपाध्याय अथवा कणाद व महेश ठक्कर हे शंकरमिश्राचे गुरू होत. त्याने खंडनखंडखाद्य ग्रंथावर टीका रचली असली, तरी तो द्वैतवादी व शिवभक्त होता. आपल्या जन्मगावी त्याने बांधलेले सिद्धेश्वरीचे मंदिर आजही विद्यमान आहे. आयुष्याच्या अखेरीला तो काशीत जाऊन राहिला होता. शंकर मिश्रासंबंधी अनेक दंतकथा प्रसिद्ध आहेत. त्याने विविध विषयांवर बरेच ग्रंथ रचले. त्यांची नावे अशी –

(१) उपस्कार – ही कणादकृत वैशेषिकसूत्रांवरील फार

लोकप्रिय टीका आहे. (२) कणादरहस्य, (३) आमोद, (४) कल्पलता, (५) कंठाभरण, (६) मयूख, (७) वादि-विनोद व (८) भेदरत्नप्रकाश. याखेरीज याचे स्मृतीवर तीन ग्रंथ आणि शिव-पार्वतींच्या विवाहप्रसंगावर गौरीदिगंबर-प्रहसन हे नाटक व अन्यही काही ग्रंथ आहेत. [ म. च. को.; का. सा. सा.; भा. द.; वि. ज. स्मा. ग्रं. ]

**शंकरस्वामी** (इ. स. चे ६ वे शतक) एक बौद्ध नैयायिक. डॉ. विद्याभूषणांच्या मते हा दक्षिण भारताचा रहिवासी असावा. दिङ्नाग हा याचा गुरू असून, हा नालंदा विद्यापीठात श्रेष्ठ आचार्य म्हणून काम करीत होता. शंकरस्वामीने हेतुविद्या न्यायप्रवेशशास्त्र अथवा न्यायप्रवेशतर्कशास्त्र नावाचा ग्रंथ लिहिला आहे. युआन च्वांगने प्रस्तुत ग्रंथाचा चिनी भाषेत अनुवादही केला आहे. [ गु. सा. इ. २; म. च. को. ]

**शंकरा** हिंदुस्थानी संगीतातील एक राग. हा राग विलावल थाटातून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहात मध्यम स्वर वर्ज्य असल्याने याची जाती षाडव-षाडव आहे. याचा वादी स्वर गांधार व संवादी निषाद आहे. या रागाच्या दुसऱ्या प्रकारात ऋषभ व मध्यम हे दोन्ही स्वर वर्ज्य करतात. त्यामुळे याची जाती औडुव-औडुव होते. या प्रकारात वादी षड्ज व संवादी पंचम ठेवतात. गानसमय– रात्रीचा दुसरा प्रहर.

या रागाची वृत्ती अत्यंत उत्साही व वीररसपूर्ण आहे. उल्हसित वृत्तीने तांडव नृत्य करणाऱ्या महादेवाच्या यथार्थ स्वरूपाची कल्पना हा राग करून देतो. [ क. सं.; सु. वि. को. ]

**शंकराचार्य (आद्य)** (इ. स. चे ७–८ वे शतक) एक महान यती, ग्रंथकार, अद्वैत मताचा प्रचारक, स्तोत्रकार आणि धर्मसाम्राज्याचा संस्थापक. भगवान शंकराचार्य ही भारतवर्षात होऊन गेलेली एक दिव्य विभूती आहे. त्या विभूतीच्या तेजाची प्रभा आज चारही दिशा प्रकाशित करीत आहे. आचार्य होऊन गेल्याला बाराशे वर्षांचा काळ लोटला आहे; पण अजूनही त्यांच्या धवल कीर्तीला शिळेपणा आला नाही. वैदिक धर्माच्या इतिहासात आचार्यांचा आविर्भाव एका नवीन युगाचा प्रवर्तक ठरला आहे. ज्या काळात भारतवर्षामध्ये अवैदिक पाखंडे माजली होती, अनाचार आणि दुराचार हेच धर्म म्हणून गाजू लागले होते आणि सारा भारत देश अवैदिक मतामतांच्या गलबल्यात अकर्मण्य, भ्रांतचित्त व मूढ-विकल होऊन पडला होता, अशा काळी शंकराचार्यांचा पुण्योदय झाला. विझू पाहणारी वैदिक धर्माची ज्योत त्यांच्या विशुद्ध आचरणामुळे, ग्रंथकर्तृत्वामुळे आणि अखंड दीर्घोद्योगामुळे पुन्हा प्रकाशमान झाली. वैदिक धर्माचा यशोदुंदुभी सर्वत्र वाजू लागला, उपनिषदांची दिव्य वाणी पुनश्च प्रभावशाली बनली, भगवद्गीतेला अधिक गौरव प्राप्त झाला आणि देशातल्या धार्मिक अराजकाचे साम्राज्य निरस्त झाले.

**आचार्यपूर्व भारत** – कोणत्याही धर्माचा प्रवाह अविच्छिन्न गतीने सार्वकाल वाहत राहत नाही. त्याला अधूनमधून अडथळे येतात आणि त्यावर चारही बाजूंनी आघात होतात. पण त्या धर्मात जर अंगभूत चिवटपणा असेल तर कालांतराने त्याचा रुद्ध मार्ग मोकळा होतो आणि पुनश्च त्याचा प्रवाह सुरू होतो. तो धर्म अधिक तेजस्वी बनून लोकांच्या पुढे प्रकाशित होतो. वैदिक धर्माचे असेच झाले आहे.

जैन व बौद्ध हे धर्म नव्याने उदयाला आले आणि त्यांनी वैदिक धर्माशी संघर्ष सुरू केला. त्या दोघांत बौद्धांचा आघात जबरदस्त होता. बुद्धाचा आचारप्रधान धर्म उपनिषदांच्या तत्त्वप्रणालीवरच अधिष्ठित होता. कर्मकांडाविषयी अनादर, प्रपंचाच्या मुळाशी अविद्या हे कारण मानणे, तृष्णेचा उच्छेद करून रागद्वेषादी बंधनातून मुक्ती मिळवणे, कर्मसिद्धान्ताची व्यापकता, इ. बौद्ध धर्माचे सामान्य सिद्धान्त उपनिषदांतूनच स्वीकारलेले आहेत. असतापासून सताची उत्पत्ती हा बौद्ध सिद्धान्तही छांदोग्य उपनिषदात निर्दिष्ट आहे. पण बुद्धाने आपल्या धर्मात अशा काही नवीन गोष्टी समाविष्ट केल्या, की त्यांना श्रुतीचा आधार नव्हता. श्रुतीला म्हणजे वेदाला अप्रमाण मानूनच त्याने त्या गोष्टी पुढे आणल्या. त्याने श्रुतिप्रणीत आत्मवादाची अवहेलना केली आणि यज्ञकर्मालाही प्रखर विरोध सुरू केला.

मौर्यांच्या काळात बौद्ध धर्माला राजाश्रय प्राप्त झाला आणि त्याचे सामर्थ्य वाढले. सम्राट अशोक बौद्ध धर्माचा महान प्रचारक बनला. मात्र त्याची दृष्टी समन्वयात्मक होती. त्याने श्रमण आणि ब्राह्मण यांच्याविषयी समान आदरभाव दाखविला. पण अशोकाच्या नंतर गादीवर आलेल्या राजांमध्ये ही सहिष्णुता राहिली नाही. अशोकोत्तर काळात बौद्धांनी वैदिक धर्माला पायदळी तुडवण्याचा आवेशपूर्वक प्रयत्न सुरू केला.

मौर्यांच्या पतनानंतर सनपूर्व दुसऱ्या शतकात शुंगवंश राज्यसत्तेवर आला. पुष्यमित्र शुंग हा ब्राह्मण होता आणि वैदिक धर्माचा प्रखर पुरस्कर्ता होता. वैदिक धर्माचा इतिहासकालीन गौरव पुनश्च त्याला मिळावा म्हणून पुष्यमित्राने दोन अश्वमेध केले. मानवाची आणि वर्णाश्रमांची कर्तव्ये प्रतिपादन करणारी वैदिकधर्माला उजळा देणारी मनुस्मृती याच काळात निर्माण झाली. कट्टर वेदाभिमानी भृगुवंशी ब्राह्मणांनी हे कार्य केले. त्यामुळे बौद्ध धर्म थोडा दबला, पण हतप्रभ मात्र झाला नाही.

बौद्धांनी कुशाणकालात पुनश्च उभारी घेतली. कनिष्क हा कुशाण वंशातला राजा महापराक्रमी होता. बौद्ध संघाने त्याच्यावर आपला प्रभाव टाकला आणि तो बौद्ध बनून त्या धर्माचा प्रचारक बनला. त्याने आपल्या सत्ताकाळात चौथी बुद्धसंगीती (धर्मपरिषद) भरवली आणि चीन, जपान, इ. पूर्वेकडील देशांत बौद्ध भिक्षूंना धर्मप्रचारासाठी पाठवले. भारतातही त्या धर्माच्या फैलावाला खूप गती मिळाली आणि त्यामुळे वैदिक धर्मियांना अंग चोरून जगण्याची वेळ आली.

पण पुढच्या गुप्तयुगात वैदिक धर्माची पुन: प्रगती सुरू झाली. गुप्तसम्राट हे वैष्णव होते. परमभागवत हे विरुद त्यांनी घेतले होते. अठरा पुराणांचे परिवर्धित संस्करण याच काळात झाले आणि नव्या स्मृतींचीही रचना झाली. गुप्तसम्राटांनी वैदिक धर्माच्या उद्धारासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले आणि अश्वमेधाची खंडित झालेली परंपरा पुनश्च सुरू केली.

पण एवढचा काळापर्यंत बौद्ध धर्माने खूप सामर्थ्य मिळवले होते. बौद्ध आचार्यांनी आपल्या सर्व सामर्थ्यानिशी वैदिक धर्माला सर्व बाजूंनी नामोहरम करण्याचा चंगच बांधला. ते आपल्या उग्र सामर्थ्याने भारतात निरनिराळचा राजांचा आधार आणि आश्रय मिळवू लागले. या विषयी माधवाचार्य आपल्या शंकरदिग्विजयात म्हणतात – बौद्ध धर्माचे प्रचारक आपल्या शिष्यसमुदायासह बेधडक एखाद्या राजाच्या राजवाडचात घुसत आणि घोषणा करीत.–'हा राजा आमच्या धर्माचा आहे आणि याची सारी प्रजा बौद्ध आहे. आता या राज्यात वैदिक धर्मावर कोणीही श्रद्धा ठेवता कामा नये' (शं. दि. ७.३१).

गुप्त आणि त्यापुढील हर्षवर्धन यांचा सत्ताकाळ हा धर्म व तत्त्वज्ञान यांच्या इतिहासातला महत्त्वाचा कालखंड ठरला आहे. याला वैदिक व बौद्ध-जैन यांचे संघर्षयुग म्हटले तरी चालेल. याच कालात बौद्ध न्यायाचा उदय आणि विकास झाला. नागार्जुन, वसुबंधू, दिङ्नाग व धर्मकीर्ती या प्रकांड बौद्ध पंडितांनी बौद्ध न्यायाचा आश्चर्यकारक उत्कर्ष केला. या नैयायिकांनी वैदिक सिद्धान्तांचे तर्काच्या आधारे युक्तिसंगत खंडन केले. समंतभद्र व सिद्धसेन दिवाकर यांनी जैन न्यायाला जन्म दिला. या दोन्ही संप्रदायांनी वैदिक धर्माविरुद्ध तार्किक आघाडी उघडली. ब्राह्मण नैयायिकही हात जोडून स्वस्थ बसले नाहीत. वात्स्यायन, उद्योतकर व प्रशस्तपाद या तार्किकत्रयीने न्यायपद्धतीनेच जैन-बौद्धांना खोडून काढले. अशी ही केवळ शाब्दिक आणि बुद्धिगम्य लढाई बराच काळ चालू राहिली. पण त्याचा वैदिक धर्माला उजळा मिळण्याच्या कामी फारसा उपयोग झाला नाही.

जैन-बौद्धांच्या बरोबरीनेच या देशात जागजागी अड्डे जमवून बसलेले अन्य संप्रदायही त्या काळात वैदिक धर्माला आतून पोखरीत होते. शैव, शाक्त, वैष्णव, गाणपत्य, कापालिक अशी त्या संप्रदायांची नावे होती. त्यांच्या जोडीला तांत्रिकही मोठचा प्रमाणावर होते. इ. स. चे सातवे शतक हे तांत्रिकांच्या उत्कर्षाचे युग मानायला हवे. शैव, शाक्त, बौद्ध, गाणपत्य, इ. अनेक तंत्रे त्या काळी मोठचा जोरावर होती. या तंत्रविद्येच्या नावाखाली त्या काळात अनाचाराचे थैमान सुरू झाले. तंत्रविद्येचे रहस्य जाणणारे फारच थोडे. त्यामुळे भोंदू आणि विषयलंपट लोकांचे फावले. मद्य, मांस, मीन, मुद्रा आणि मैथुन ही तांत्रिक उपासनेची पाच साधने; पण ती केवळ प्रतीकात्मक होती. त्यांना विशिष्ट आध्यात्मिक अर्थ होता. बाह्य पूजेशी प्रत्यक्षपणे त्यांचा काहीही संबंध नव्हता. पण हे विसरून वामाचारी तांत्रिकांनी 'पंचमकार' लौकिक अर्थाने आपल्या उपासनेत दाखल केले. उपासनेच्या नावाखाली ते लोकांची दिशाभूल करून स्वत: विषयविलासात लोळू लागले. त्यामुळे सामान्य लोकांना खरे काय आणि खोटे काय, हेच समजेनासे झाले. सर्व बाजूंनी त्यांची दशा दयनीय झाली. जो तो पंथ त्यांना अहमहमिकेने आपल्या जाळचात ओढू लागला. खरा धर्म या कोलाहलात गडप झाला. भारतात सर्वत्र धार्मिक अराजक माजले.

अशा या अराजकाच्या काळात वैदिक धर्माला केवळ शाब्दिक पंडिताची नव्हे; तर क्रियाशील पंडिताची गरज होती.ज्याचे आचरण शुद्ध असेल, ज्याची बुद्धी सखोल आणि वाणी पवित्र असेल, ज्याच्या अंतरात सामान्य जनांच्या उद्धाराचा कळवळा असेल, असा कोणीतरी लोकोत्तर पुरुष त्या कामासाठी अवतरायला हवा होता. 'एष पन्था एतत्कर्म' असे आपल्या वाणीने आणि कृतीने उद्घोषित करील असा तो पुरुषश्रेष्ठ असायला हवा होता.

भगवत्पूज्यपाद श्रीशंकराचार्य तशा महापुरुषाच्या रूपाने अवतरले. त्यांनी वैदिक धर्मावरचे आघात परतवून लावले, धर्मातल्या विकृती दूर केल्या, कालधर्माप्रमाणे वाढलेली त्याच्यावरची जळमटे दूर केली आणि आचारप्रधान व अद्वैतप्रधान अशा वैदिक धर्माचा प्रकाश भारतभूमीवर सर्वत्र भरून टाकला. या लोकोत्तर कृतीने शंकराचार्य हे जगद्गुरू ठरले.

**आचार्यांचा जन्मकाल** – शंकराचार्यांचा जन्म कोणत्या शतकात झाला याविषयी खूप मतभेद आहेत. कोणी त्यांना सातव्या शतकातले मानतात, तर कोणी त्यांना नवव्या शतकापर्यंत नेतात. लो. टिळकांनी त्यांचा काळ सातव्या शतकाचा शेवटचा चरण मानला आहे. प्रा. बलदेव उपाध्याय यांनी सातव्या शतकाचा अंतिम चरण ते आठव्या शतकाचा प्रथम चरण एवढा त्यांचा काल मानला आहे. हेच मत सामान्यत: प्रमाणभूत मानायला हरकत नाही.

**जीवनचरित्र** – केरळात कालटी नावाचे एक गाव आहे आणि

त्याला लागूनच अलवाई नदी वाहते. त्यामुळे गावाला प्राकृतिक सौंदर्य लाभले आहे. त्या गावी शिवगुरू नावाचा एक तपोनिष्ठ नंपूतिरी ब्राह्मण राहत होता. विशिष्टा किंवा सती हे त्याच्या पत्नीचे नाव. हे दांपत्य शिवभक्त, तसेच धर्मपरायण होते. पण बराच काळ लोटला तरी त्यांच्या पोटी संतान होईना. मग त्यांनी ठरवले, की पुत्रप्राप्तीसाठी शंकराची उपासना करायची. गावाजवळच वृष नावाचा पर्वत होता आणि त्यावर शिवमंदिर होते. शिवगुरू तिथे जाऊन शिवोपासना करू लागला. काही काळाने शिव त्याला प्रसन्न होऊन म्हणाला. 'तुला काय पाहिजे?' शिवगुरूने प्रार्थिले, की 'पुत्र पाहिजे.' शिवाने त्यावर म्हटले. 'सर्वज्ञ पुत्र हवा असेल तर तो अल्पायुषी मिळेल. सामान्य हवा असेल तर तो दीर्घायुषी मिळेल.' शिवगुरू बोलला. 'भगवन, अल्पायुषी असला तरी चालेल; पण मला सर्वज्ञ पुत्र दे.' शिवाने 'तथास्तु' म्हटले. योग्य कालाने वैशाख शुद्ध पंचमीच्या दिवशी सती देवीने एका पुत्राला जन्म दिला. शिवप्रसादाने जन्मला म्हणून पित्याने त्याचे नाव शंकर असे ठेवले.

बालपणापासूनच शंकराच्या बुद्धिमत्तेची चमक दिसू लागली. तीन वर्षांत तो मलयाळम ही आपली मातृभाषा शिकला. शिवगुरूने विचार केला, की मुलगा तल्लख आहे तेव्हा पाचव्या वर्षीच त्याचे उपनयन करून त्याचा संस्कृत अध्ययनाचा मार्ग मोकळा करावा. पण त्याच्या हातून मुलाचे मौजीबंधन होण्याचा योग नव्हता. थोडयाच दिवसांत शिवगुरूचे निधन झाले. मातेवर आकाशाची कुऱ्हाड कोसळली. आता पुत्राचा भार तिलाच वाहावा लागणार होता. पतीच्या इच्छेप्रमाणे तिने पाचव्या वर्षीच शंकराचे उपनयन करवले.

शंकर गावातच एका गुरूकडे संस्कृत शिकू लागला. थोडयाच दिवसांत त्याने त्या गुरूकडची सर्व विद्या आत्मसात केली. तो गुरुगृहातून स्वगृही आला आणि स्वतः विद्यार्थ्यांना पढवू लागला. तो अतीव मातृभक्त होता आणि परोपरींनी तो तिची सेवा करी. पण तिच्या मनाला मात्र आपला हा गुणी मुलगा अल्पायू आहे, याची टोचणी लागून राहिली होती. तरीही तिला वाटे, की मुलाचे लग्न करावे.

इकडे शंकराच्या मनात वेगळेच विचार सुरू झाले होते. त्याला वाटे, संन्यास घेऊन आपले जीवन धर्मकार्याला वाहून टाकावे. पण प्रश्न होता आईच्या परवानगीचा. ती मिळणार नाही, हे त्याला पक्के ठाऊक होते. आईवर नितांत प्रेम असल्यामुळे तिचे मन दुखवायलाही तो धजत नव्हता. अशा द्विधा मनःस्थितीत काही दिवस गेले. कशाही परिस्थितीत आईची अनुज्ञा मिळवून संन्यास घ्यायचाच असा त्याने निर्धार केला. आणि तो योग एका चमत्कारिक प्रसंगाने जुळून आला. एक दिवस आईला घेऊन तो अलवाई नदीवर स्नानाला गेला होता. आई घाटावर उभी असताना शंकर पात्रात उतरला. थोडा पुढे गेला, तोच त्याचा पाय एका मगरीने पकडला. ती त्याला हळू हळू गिळायला लागली. शंकर ओरडला, मगरमिठीतून पाय सोडवून घ्यायला धडपडू लागला. आई आक्रोश करू लागली. एवढयात शंकर तिला म्हणाला, 'आई, ही मगरमिठी मला सुटत नाही. मी आता मरणार. तू मला या वेळी तरी संन्यास घेण्याची परवानगी दे.' मी 'संन्यस्तं मया' म्हणेन आणि मरणोत्तर तरी मोक्षाचा अधिकारी होईन.' रडत, कळवळत तिने पुत्राच्या कल्याणासाठी 'घे बाबा, संन्यास' असे म्हटले. तो आता मगरीशी तीव्र झटापट करू लागला. एवढयात काही नावाडीही पात्रात उतरले. त्यांनी त्या मगरीला ढोसून त्याचा पाय सोडवला. मगरमुखातून तो मुक्त झाला आणि बाहेर आला. जखम झाली; पण जीव बचावला.

तो आईबरोबर घरी आला; पण संन्यासी होऊनच. मात्र तो आपत्संन्यास होता. यापुढे विधियुक्त दीक्षा घेणे आवश्यक होते आणि त्यासाठी योग्य गुरू मिळवणेही आवश्यक होते. तो त्या तयारीला लागला. त्याने आपली घराण्याची संपत्ती कुटुंबियांना वाटून दिली आणि मातेच्या भरणपोषणाचा भार त्यांच्यावर सोपवला. गृहत्याग करून तो निघाला. जाते वेळी आपल्या शोकमग्न मातेला त्याने आश्वासन दिले. 'आई, मी कुठेही असलो तरी तुझ्या अंतकाळी येऊन तुला मांडी देईन.' बिचारी आई तेवढयाच आश्वासनावर जीव धरून राहिली.

त्याला आता दीक्षा घेण्यासाठी आणि विशेष अध्यापनासाठी 'शाब्दे परे च निष्णात' असा गुरू हवा होता. गावातल्या गुरूकडून पातंजल महाभाष्याचे अध्ययन करीत असता गुरूने त्याला एक गोष्ट सांगितली होती की, 'गोविंद भगवत्पाद नावाचा एक महाप्राज्ञ यती नर्मदेच्या तीरावर अखंड समाधीत बसला आहे. लोक त्याला पतंजलीचा अवतारच समजतात.' ही गोष्ट त्याला एकदम स्मरणात आली.

शंकर घरून निघाला, तो सरळ मध्यदेशाच्या वाटेला लागला. अनेक नद्या, पर्वत आणि दुर्गम प्रदेश धीराने पार करीत तो नर्मदेच्या तीरावर जाऊन पोचला. गोविंदयतीचे गुहास्थानही त्याने शोधून काढले. तो गुहेच्या दारात बसून राहिला.

समाधी उतरल्यावर गोविंदयतींची त्याच्यावर दृष्टी पडली. पहिल्याच दृष्टिक्षेपात त्यांना साक्ष पटली, की आलेला बटू अलौकिक बुद्धिमत्तेचा, त्याचबरोबर प्रखर वैराग्य धारण करणारा आहे. शंकराने त्यांना नमस्कार केला. कोण, कुठला, उद्देश काय इ. प्रश्नोत्तरे झाली. गोविंदयतींनी शंकराला शिष्य म्हणून स्वीकारले; त्याला विधिवत संन्यासदीक्षा दिली व शंकराचा

असे त्याचे नाव ठेवले. अशा प्रकारे शंकराचे शंकराचार्य बनले.

ते आपल्या गुरूकडे तीन वर्षे राहिले. गोविंदयतींचे गुरू गौडपादाचार्य, यांनी अद्वैतपर आणि सांप्रदायिक अशी ब्रह्म-सूत्रांची व्याख्या गोविंदांना शिकवली होती. तीच त्यांनी



आद्य शंकराचार्य

शंकराचार्यांना पढवली; त्याचबरोबर उपनिषदेही अध्यापिली. शंकराचार्य त्या तीन वर्षांत अद्वैतसिद्धान्ताचे पक्के मर्मज्ञ झाले. अद्वैत त्यांच्या बुद्धीतच नव्हे; तर हृदयातही ठसले.

एके दिवशी नर्मदेला फार मोठा पूर आला. गोविंदयती ज्या गुहेत समाधिस्थ बसले होते, त्या गुहेत पुराचे पाणी शिरू लागले. सगळे शिष्य घाबरले. गुरूचा समाधिभंग करणे अशक्य आणि पूर तर अनावर झाला होता. त्या वेळी शंकराचार्य पुढे आले. त्यांनी एक मातीचा घडा गुहेच्या दारात ठेवला. पुराचे पाणी त्या घड्यात शिरले आणि त्यातच मुरले. त्याला गुहेत प्रवेश करायला संधीच मिळाली नाही.

थोड्या कालाने पूर ओसरला आणि गोविंदयतीही समाधीतून उठले. घडलेल्या चमत्काराबद्दल त्यांना आश्चर्य तर वाटलेच; शिवाय आचार्यांचे सामर्थ्यही कळून आले. त्या संदर्भात मग त्यांना एका गोष्टीचे स्मरण झाले. यती आचार्यांना म्हणाले.

" तू आता काशीला जाऊन विश्वनाथाचे दर्शन घे आणि ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिही. वेदव्यासांनी एका वेळी सांगून ठेवले होते, की जो कोणी पुराचे पाणी एका घड्यात सामावून ठेवू शकेल, तोच माझ्या ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिहू शकेल. ती घटना तुझ्या बाबतीत चरितार्थ झाली आहे. "

गुरूची आज्ञा घेऊन शंकराचार्य काशीला गेले. त्यांनी विश्व-नाथाचे दर्शन घेतले. त्यांच्या बरोबर काही शिष्यही होते. त्यांना आचार्य मणिकर्णिका घाटावर वेदान्ताचे पाठ देऊ लागले. गुरू बारा वर्षांचा आणि शिष्य तरुण तसेच प्रौढ. काशीतल्या विद्वा-नांना या गोष्टीचा फार अचंबा वाटला. काशीतले मोठमोठे पंडित आचार्यांचे पाठ ऐकायला येऊ लागले. त्यांना आचार्यांच्या विद्वत्तेने व प्रतिभेने अचंबित केले. मग तेही आचार्यांच्या पाठाला बसू लागले. या प्रौढ विद्वानांत सनंदन नावाचा एक पंडित असून, तो चोल देशाचा रहिवासी होता. हा आचार्यांचा प्रथम शिष्य होय.

एके दिवशी एक चमत्कार घडला. आचार्य आपल्या शिष्यां-समवेत मध्याह्नकृत्यासाठी गंगेवर जात असता रस्त्यात त्यांना एक चांडाल आडवा आला. त्याच्या बरोबर त्याचे चार भयानक कुत्रेही होते. आचार्य त्याला म्हणाले. ' चांडाला, बाजूला हो. मला तुझा विटाळ होईल. ' त्यावर तो चांडाल विनीत भावाने पण स्पष्टपणे बोलला. ' यतिवर्य, आपण अद्वैती. जो परमात्मा सर्वत्र भरला आहे, तोच माझ्या ठिकाणीही नाही का ? तो जर सर्वत्र भरून उरला असेल, तर मला बाजूला हटायला जागा कुठली ? यतिराज, तुम्ही अद्वैताचे पाठ देता, पण तुमचे अद्वैत केवळ तुमच्या बुद्धीतच राहिले आहे. ते तुम्ही अनुभवले नाही. '

शंकराचार्यांनी चांडालाचे हे बोल ऐकले आणि ते एकदम अवाक् झाले, स्तंभित झाले. ' तू माझा गुरू आहेस ' असे म्हणून त्यांनी त्या चांडालाला प्रणाम केला. त्या क्षणी अद्वैत आचा-र्यांच्या काळजात कोरले गेले.

तो चांडाल म्हणजे साक्षात काशीविश्वनाथ होता. त्याने आचार्यांची परीक्षा घेतली होती. आचार्य परीक्षेत उतरले. मग त्याने निजरूपात त्यांना दर्शन दिले. महादेव त्यांना म्हणाला. ' वत्सा शंकरा, मी तुजवर प्रसन्न आहे. तुझ्या द्वारा आता मी या देशात वैदिक धर्माचा प्रचार करीन. तू ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिही आणि या देशात अद्वैत ब्रह्माचे प्रतिपादन कर. तुझ्या हातून जे जे कार्य होईल ते ते माझेच कार्य असेल. '

तो प्रसंग संपल्यावर थोड्याच कालात शंकराचार्यांनी भाष्य-लेखनाचा निश्चय केला. मग त्यांना वाटले, की ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिहायचे, तर ते जिथे व्यासांनी ब्रह्मसूत्रे रचली, त्या

बदरिकाश्रमात बसूनच लिहावे. व्यास हे चिरंजीव असल्यामुळे ते अदृश्यपणे आपणाला स्फूर्ती देतील आणि मार्गदर्शन करीत राहतील. म्हणून ते हिमालयाच्या प्रवासासाठी काशीक्षेत्रातून बाहेर पडले. प्रथम काही दिवस ते हरिद्वारला थांबले आणि मग हिमालय चढायला लागले. त्यांनी बदरीक्षेत्राची मोहोर धरली.

वाटेत एके ठिकाणी त्यांना देवीपुढे नरबळी देण्याचा प्रसंग दिसला. त्या काळी तांत्रिक उपासनेने उग्र आणि आणि विकृत रूप धारण केले होते. तांत्रिक पुरोहित त्या उपासनेत नरबळी द्यायलाही कचरत नसत. आचार्यांना ती प्रथा निषिद्ध वाटली. त्यांनी त्या लोकांना उपदेश करून हिमालयातली नरबलिप्रथा बंद पाडली.

बदरीक्षेत्री जातात, तो मंदिरात नारायणाची मूर्ती त्यांना दिसेना. चौकशी करता पुजाऱ्यांनी सांगितलें, की 'चिनी मूर्ति-भंजकांच्या (तिबेटी-भोट) भीतीने आम्ही ती नारदकुंडात बुडवली आणि आता ती आम्हांला काढता येत नाही.' आचार्यांनी ते ऐकले आणि लगेच अलकनंदेच्या नारदकुंडात उडी घेतली. त्यांनी नदीच्या जोरदार प्रवाहाशी टक्कर देऊन ती नारायणमूर्ती वर काढली. मग त्या नारायणमूर्तीची मोठ्या समारंभाने त्यांनी मंदिरात पुनःप्रतिष्ठा केली.

तिथले पुजारी मंत्रमुख नव्हते. तेव्हा नारायणाची नित्य पूजा जाणकार वैदिक ब्राह्मणांकडून व्हावी, यासाठी त्यांनी केरळातून काही वैदिक विद्वान बदरीक्षेत्री आणले आणि त्यांना त्या पूजेचा अधिकार देऊन टाकला.

बदरीक्षेत्राजवळच व्यासतीर्थ आहे. तिथेच व्यासांचा आश्रम होता. तिथे व्यासांनी भारताची रचना केली होती. आचार्य त्या जागी गेले आणि तिथे राहिले. तिथे राहूनच आचार्यांनी ब्रह्मसूत्रे, गीता व काही प्रमुख उपनिषदे यांवर भाष्ये लिहिली.

नंतर आचार्य हिमालयातल्या अन्य तीर्थांच्या दर्शनाला निघाले. जिथे मुक्काम होईल, तिथे शिष्यांना पाठ द्यायचे असा क्रम त्यांनी सुरू केला. एके दिवशी पाठ चालू असता एक काळा ब्राह्मण तिथे आला. त्याने आचार्यांना जरा जोरातच विचारले–

"तू कोण आहेस? आणि शिष्यांना काय पढवतो आहेस?"

पण गुरूने उत्तर देण्याआधी शिष्यच त्या ब्राह्मणाला म्हणाले–

"आमचे गुरु प्रकांड पंडित आहेत. त्यांनी द्वैत मताच्या निराकरणासाठी ब्रह्मसूत्रांवर अद्वैतपर भाष्य लिहिले आहे आणि तेच ते आम्हांला पढवीत आहेत."

"मी अशा व्यक्तीच्या शोधातच होतो. तुमच्या गुरूंना अद्वैत पक्के समजले असेल, तर त्यांनी, मला एका सूत्राविषयी शंका आहे, ती दूर करावी."

मग आचार्य नम्रपणे मध्ये पडले. त्यांनी यथामति शंका दूर करण्याचे वचन दिले. ब्राह्मणाने सूत्र उच्चारले. आचार्यांनी त्यावर विवरण केले. एक शंका दूर होताच त्या ब्राह्मणाने एकेक करून अनेक शंका विचारल्या. आचार्यांनी त्यांचेही समाधान केले. ब्राह्मण संतुष्ट झाला. त्याने आपले निजरूप दाखवले. ते साक्षात वेदव्यास होते. 'माझा खरा अभिप्राय तूच जाणलास' असे म्हणून प्रसन्न मनाने त्यांनी आचार्यांना अनेक आशीर्वाद दिले. आचार्यांना आता सोळावे वर्ष चालू होते. ते वर्ष त्यांच्या अपमृत्यूचे होते. वेदव्यासांनी त्यांना सोळा वर्षांचे अधिक आयुष्य दिले आणि ते गुप्त झाले.

एवढ्यात आचार्यांना समजले, की कुमारिल भट्ट नावाचा एक महामीमांसक आणि वैदिक कर्मकांडाचा प्रखर अभिमानी प्रयाग येथील त्रिवेणी संगमावर वास्तव्य करून आहे. त्याला भेटण्याची इच्छा मनी धरून आचार्य हिमालय उतरले आणि प्रयागला आले. कुमारिल भट्टाच्या दर्शनाला म्हणून जातात तर तो तुषाग्नीत स्वतःला जाळून घेत होता. शंकराचार्यांना या गोष्टीचे फार वाईट वाटले. त्यांनी विचारले –

"भट्टमहोदय! हा आत्मघात कशासाठी?"

कुमारिल भट्टाच्या कानी आचार्यांची कीर्ती गेलेली होती. अंतकाली त्यांचे दर्शन घडले, ही गोष्ट त्याला भाग्याची वाटली. तो म्हणाला.

"यतिवर्य, तुमच्या प्रश्नाच्या उत्तरासाठी एक गोष्ट सांगतो. मला बौद्ध धर्माचे सप्रमाण खंडन करायचे होते. पण त्यासाठी बौद्ध धर्माचे सूक्ष्म ज्ञान असणे आवश्यक होते. म्हणून मी नालंदा विद्यापीठात गेलो आणि त्या धर्माची दीक्षा घेऊन तिथे बौद्ध तत्त्वज्ञानाचा अभ्यास करू लागलो. धर्मपाल नावाचे एक महान बौद्ध तत्त्वज्ञ माझे गुरू होते. मी त्यांच्याकडून बौद्धविद्या शिकलो, पारंगत झालो आणि एके दिवशी वादात त्यांनाच पराभूत केले. त्यामुळे माझ्याकडून गुरुद्रोह घडला. या पापाचे प्रायश्चित्त म्हणजे कोंड्याच्या आगीत जाळून घेणे. तेच मी करीत आहे."

त्यावर आचार्य म्हणाले– "तुम्ही या कृत्यापासून निवृत्त व्हा. वैदिक धर्माला तुमच्यासारख्या क्रियावान पंडिताची गरज आहे. तुम्ही म्हणत असाल तर आता मी ही आग विझवून टाकतो."

पण कुमारिल भट्टाने आचार्यांना तशी अनुज्ञा दिली नाही. म्हणाला–

"वैदिक धर्माच्या उद्धारासाठी आता माझी गरज नाही. तुम्ही ते काम पुरे कराल याची मला खात्री आहे. मी आता कशाही स्थितीत जगणार नाही. माझा मंडनमिश्र नावाचा महापंडित असा शिष्य आहे. तो वैदिक कर्मकांडाचा अभिमानी आहे. तुम्ही त्याला अद्वैत वेदान्ताच्या मताकडे वळवून घ्या.

तुम्हांला तुमच्या कार्यात फार मोठा साह्यकर्ता होईल."

त्या दोन अलौकिक तेजोनिधींची ही भेट अशी समाप्त झाली. कुमारिल भट्टाला अग्नीने कवळून घेतले. आणि नंतर आचार्य मंडनमिश्राकडे जाण्यासाठी तिथून निघाले.

मंडनमिश्र हे मध्यदेशात माहिष्मती व नर्मदा यांच्या संगमावर राहत होते. या क्षेत्राला सांप्रत मांधाता म्हणतात. तिथे त्यांचा प्रशस्त वाडा होता. त्या वाड्यात नेहमी यज्ञयाग आणि शास्त्रार्थचर्चा चालत. मंडनमिश्र हे तत्कालीन पंडितांचे मुकुटमणी होते. मीमांसाक्षेत्रात त्यांचा शब्द अखेरचा मानला जात होता. साऱ्या भारतवर्षीय पंडितवर्गावर त्यांचे प्रभुत्व होते. अद्वैत वेदान्ताचा अबाधित प्रचार करायचा तर त्यांना आपल्या मताकडे वळवणे आणि त्यासाठी त्यांना वादात जिंकणे शंकराचार्यांना भाग होते. एक मंडनमिश्र अनुकूल झाले तर भारतातले समस्त वैदिक पांडित्य आपोआप त्यांच्या पक्षाला मिळणार होते.

हा सर्व विचार करीत आचार्य मंडनमिश्रांच्या गावी पोचले. वेळ दुपारची होती. त्यांनी आपल्या शिष्यमंडळीला तिथल्या शिवमंदिरात विश्राम करायला सांगितले व ते एकटेच मंडनमिश्रांच्या वाड्याकडे गेले. वाड्याचा दिंडीदरवाजा बंद होता. मंडनमिश्र आत आपल्या वडिलांचे श्राद्ध करीत बसले होते. आचार्यांनी कसावसा तिथवर प्रवेश मिळविला आणि ते मंडनमिश्रांच्या पुढे उभे झाले. श्राद्धाच्या वेळी यतिदर्शन हे निषिद्ध मानलेले आहे. त्यामुळे मंडनमिश्र आचार्यांवर रागावले. पण आचार्यांच्या मुखावरचे दिव्य तेज पाहून त्यांनी राग आवरला. 'कशासाठी आगमन?' असा त्यांनी प्रश्न विचारताच आचार्य म्हणाले, की 'मला तुमच्याशी शास्त्रार्थ करायचा आहे.' मंडनमिश्र म्हणाले. 'मी आज माझे पितृकृत्य उरकतो. उद्या सकाळी आपण शास्त्रार्थाला बसू.' आचार्यांनी ते मान्य केले.

पण दुसऱ्या दिवशी वादाला बसण्यापूर्वी एक प्रश्न उपस्थित झाला. 'जय-पराजय उद्घोषित करणारा मध्यस्थ कोण?' मंडनमिश्राची पत्नी उंबा किंवा अंबा ही नुसती गृहिणी नव्हती; तर तीही शास्त्रनिष्णात होती. त्यामुळे ती शारदा व भारती या नावांनीच ओळखली जात असे. त्यामुळे सभेचे अध्यक्ष तिने व्हावे असे ठरले आणि आचार्यांनीही ते मान्य केले.

मग आचार्य आणि मंडनमिश्र समोरासमोर आसनस्थ झाले. अध्यक्षस्थानी शारदादेवी विराजित झाली. पंडितसभा दाटली. मंडनमिश्र आचार्यांना म्हणाले.

'तुमची प्रतिज्ञा मांडा. या वादात तुम्ही हरलात, तर ही भगवी वस्त्रे टाकून तुम्हाला गृहस्थाश्रम स्वीकारावा लागेल.' आचार्यांनी ते मान्य करून वादाला आधारभूत ठरणारी आपली प्रतिज्ञा मांडली, ती अशी—

'या जगात ब्रह्म हे एकच सत्, चित्, निर्मल व यथार्थ तत्त्व आहे. तेच जगद्रूपाने भासित होते. ज्या प्रकारे उन्हात शिंप चमकते आणि तो जणू चांदीचा तुकडा आहे असे भासते, त्याप्रमाणे जग हे परब्रह्माच्या ठिकाणी जगद्रूपाने भासित होते. शिंपीवरची चांदी जशी मिथ्या, तसेच हे. ब्रह्माच्या ज्ञानानेच या प्रपंचाचा नाश होतो आणि जीव बाह्य पदार्थांपासून विन्मुख होऊन आपल्या विशुद्ध रूपात म्हणजेच ब्रह्मरूपात प्रतिष्ठित होतो. मग तो जन्ममृत्युरहित होऊन मुक्त होतो. या सिद्धान्ताला उपनिषदे प्रमाण आहेत, हीच माझी प्रतिज्ञा.'

त्यानंतर मंडनमिश्रांनी आपली प्रतिज्ञा मांडली—

'वेदाचा कर्मकांड हा भागच प्रमाण आहे. उपनिषदांना मी प्रमाणकोटीत धरीत नाही. कारण ती चैतन्यस्वरुप ब्रह्माचे प्रतिपादन करून सिद्ध वस्तूचे वर्णन करतात. पण वेदाचे तात्पर्य आहे, विधीचे वर्णन करणे. शब्दांची शक्ती कार्यमात्राच्या प्रकटीकरणात आहे. दुःखमुक्ती कर्माच्या द्वारेच होते आणि म्हणून कर्माचे अनुष्ठान प्रत्येक मनुष्याने जन्मभर करीत राहिले पाहिजे. मीमांसक या नात्याने ही माझी प्रतिज्ञा. या शास्त्रार्थात माझा पराभव झाला तर मी गृहस्थधर्म सोडून संन्यासी बनेन.'

मग या दोन प्रतिज्ञांचे उभय बाजूंनी खंडन-मंडन सुरू झाले. वाद खूप रंगला. पण त्यात अखेरीस मंडनमिश्राचाच पराभव झाला. शारदादेवीनेच तशी घोषणा केली. पण तिला आपल्या पतीच्या पराभवाचे दुःख झाल्यावाचून राहिले नाही. ती आचार्यांना म्हणाली—

"तुम्ही माझ्या पतीला वादात जिंकलेत; पण तेवढे पुरेसे नाही. मी त्यांची अर्धांगी आहे; म्हणजे माझ्या पतीचे अर्धे अंग अजून अपराजित आहे. तेव्हा आता तुम्ही माझ्याशी शास्त्रार्थ करा. माझ्या प्रश्नांना उत्तरे द्या. ती उत्तरे समर्पक ठरली, तरच हा तुमचा विजय पूर्ण होईल."

आचार्यांनी ते मान्य केले. पण शारदादेवीने त्यांना प्रश्न विचारले, ते कामशास्त्रातले. आचार्य बालसंन्यासी असल्यामुळे त्या शास्त्राच्या बाबतीत अनभिज्ञ होते. पण ते मागे सरले नाहीत. त्यांनी शारदेकडून सहा महिन्यांची मुदत मागून घेतली आणि ते तेथून निघाले.

जाताना वाटेत एक जंगल लागले. तिथे अमरुक नावाचा एक राजा शिकारीसाठी आला असता मरण पावला होता. त्याच्या राण्या आणि मंत्रिगण सभोवती बसून शोक करीत होते. आचार्यांनी ते पाहिले आणि त्यांच्या मनात एक धक्कादायक विचार स्फुरला. ते आपल्या शिष्यांना म्हणाले. "मी या राजाच्या मृतशरीरात योगबलाने प्रवेश करीन. त्यामुळे तो राजा जिवंत होईल. मी त्याच्या देहात सहा महिने वास्तव्य

करून सगळे कामशास्त्र जाणून घेईन. नंतर ते शरीर सोडीन. तोवर तुम्ही माझा निश्चेष्ट देह सांभाळून ठेवा. "

आणि शंकराचार्यांनी तसे केले. राजा उठून बसला व थोडया वेळाने आपल्या राजधानीला गेला. सगळया राण्या त्याच्या सेवेला होत्याच. त्यांच्यासह यथेष्ट विहार-विलास करून आचार्य कामशास्त्रात पारंगत झाले. मग तो देह सोडून ते आपल्या मूळच्या देहात आले. सर्व शिष्यांना आनंद झाला. आचार्य त्यांच्यासह मांधात्याला गेले. तिथे त्यांनी वादात शारदेलाही जिंकले. तिने पराभव मान्य केला.

या शारदेसंबंधी एक आख्यायिका प्रचलित आहे ती अशी – ती पूर्वजन्मी ब्रह्मदेवाची पत्नी सरस्वती होती. तिला दुर्वास ऋषींच्या शापामुळे भूलोकी जन्म घ्यावा लागला. तिचा विवाह मंडनमिश्र या पंडिताशी झाला. शंकराचा अवतार शंकराचार्य यांचे दर्शन झाल्यामुळे ती शापमुक्त झाली आणि निजधामी जाण्यास निघाली. तेव्हा शंकराचार्यांनी तिला विनंती केली की, तिने शृंगेरी येथे वास्तव्य करून भक्तजनांची सेवा घ्यावी. तिने ती विनंती मानली आणि शृंगेरीला जाऊन तुंगा नदीत जलसमाधी घेतली. तिचा आत्मा सत्यलोकी गेला व पार्थिव देह तिथेच शिलारूपात राहिला. शंकराचार्यांनी त्या शिलेवर चक्र कोरले आणि शारदेची चंदनीमूर्ती बनवून तिची तिथे प्रतिष्ठापना केली. तिला शारदांबा म्हणतात. ती शृंगेरीच्या शारदामठाची उपास्य देवता आहे. पुढे विद्यारण्यांनी एक मंदिर बांधले व त्यात शारदांबेची सुंदर सुवर्णप्रतिमा स्थापन केली.

त्यानंतर लगेच मंडनमिश्रांनी संन्यास घेतला आणि आचार्यांचे शिष्यत्व पत्करले. ते पक्के अद्वैतवादी आणि ज्ञानमार्गी बनले. आचार्यांनी त्यांचे नाव सुरेश्वराचार्य ठेवले. आचार्य तिथून निघाले, तेव्हा तेही 'गृहसुतधनदारा' या सर्वांचा त्याग करून आचार्यांच्या समागमे निघाले. पुढील आयुष्यात मंडनमिश्रांनी आपली सर्व विद्वत्ता आणि बुद्धिमत्ता आचार्यांच्या अद्वैतसिद्धान्ताच्या मंडनातच सार्थकी लावली. मंडनमिश्र आचार्यपक्षाला मिळाल्यामुळे साऱ्या उत्तर भारतातली विद्वत्ता अद्वैतसिद्धीसाठी कटिबद्ध झाली.

आचार्य मग शिष्यगणांसह दक्षिणयात्रेला निघाले. महाराष्ट्रातून ते आंध्रात प्रविष्ट झाले; तिथून श्रीशैलपर्वतावर मल्लिकार्जुनाच्या दर्शनाला गेले. श्रीशैल हे भारतातले एक महान क्षेत्र. बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक. पण तिथे वैदिक धर्माचा मागमूस राहिला नव्हता. कापालिक शैवांनी तिथे आपला आखाडा बनवला होता. त्यांची शिवोपासना उग्र होती, वाममार्गी होती. ते शिवाला मद्यमांसाचे उपहार समर्पीत आणि स्वतःही त्यांचे सेवन करीत; देवाला पशुबळी, प्रसंगी नरबळीही देत.

शंकराचार्यांनी तिथली ही परिस्थिती अवलोकन केली. त्यांनी काही काल तिथेच आपला मुक्काम केला. ते आपल्या प्रवचनांच्या द्वारे तिथल्या लोकांना सात्त्विक उपासनेचा उपदेश करू



शारदांबा – शृंगेरी

लागले, खरा धर्म शिकवू लागले. लोक हळूहळू त्यांच्या उपदेशाप्रमाणे वागू लागले. कापालिकांच्या तिथल्या सत्तेला हळूहळू पायबंद बसू लागला.

अर्थात ही गोष्ट त्या उग्रपंथियांना सहन होणे शक्य नव्हते. ते आचार्यांवर बिथरले. त्यांचा उग्रभैरव नावाचा एक नायक आचार्यांना मारायला प्रवृत्त झाला व एक दिवस त्रिशूळ घेऊन त्यांच्यावर धावला. पण ऐन वेळी पद्मपाद हा त्यांचा शिष्य तिथे आला आणि त्याने त्या उग्रभैरवाच्याच त्रिशूळाने त्याला कंठस्नान घातले. कापालिकांना आपला पराभव मान्य करावा लागला. हळूहळू त्यांनी आपले श्रीशैलावरचे केंद्र उठवले आणि ते दुसरीकडे निघून गेले. अशा प्रकारे श्रीशैलपर्वत वैदिक धर्मावलंबी करून आचार्य तिथून खाली उतरले.

तिथून पुढे आचार्य गोकर्णक्षेत्री गेले. तिथून श्रीबली नावा

अग्रहारात पोचले. हस्तामलक हा शिष्य त्यांना तिथेच मिळाला. तिथून पुढे ते शृंगेरीला गेले.

शृंगेरी हे निसर्गरम्य ठिकाण होते. आचार्यांना ते आवडले. त्यांनी तिथे एक मठ स्थापून काही काल तिथे वास्तव्य केले. तिथल्या वास्तव्यात त्यांनी आपल्या शिष्यांना प्रस्थानत्रयीवरची भाष्ये स्वमुखाने पढवली व शिष्यांना अद्वैत वेदान्तात पारंगत केले. तोटकाचार्य नावाचा एक शिष्य त्यांना इथेच मिळाला. काही कालानंतर शृंगेरी मठावर सुरेश्वराचार्यांची स्थापना करून ते केरळ देशातल्या आपल्या जन्मग्रामाकडे निघाले.

आचार्यांना आता मातेच्या दर्शनाची ओढ लागली होती. ते आपल्या घरी जातात तो त्यांची माता मृत्युशय्येवर पडली होती आणि आयुष्याचे अखेरचे दिवस मोजीत होती. आचार्य गेले आणि तिच्या पाया पडले. त्यांच्या भेटीसाठीच तिचा जीव अडकून राहिला होता. राम-कौसल्येसारखीच ती मातापुत्रांची भेट हृद्य आणि करुणापूर्ण होती.

मग थोडयाच दिवसांत आचार्यांची माता मृत्यू पावली. पुढे तिच्या अग्निसंस्काराचा प्रश्न आला. संन्याशाने आपल्या नातलगांचा दाहसंस्कार करायचा नसतो. पण आचार्यांनी संन्यासाची अनुज्ञा मिळविते वेळी मातेला तसे वचन दिले होते. म्हणून ते त्या कामासाठी पुढे झाले. पण त्यांना मदत करायला त्यांच्या जातीचा कोणीही पुढे येईना. शेवटी त्यांनी मातेचा मृत देह कसाबसा एकटयानेच घरापुढच्या अंगणात आणला आणि तिथेच त्याला अग्नी दिला. त्या वेळी त्यांना त्यांच्या जातिबांधवांचे जे दर्शन घडले, त्याने ते कष्टी झाले. न कळत त्यांच्या मुखातून शापवाणी बाहेर पडली. ' हे नंपुतिरी ब्राह्मणांनो, यापुढे तुम्हांलाही तुमची प्रेते आंगणातच जाळावी लागतील. '

त्यानंतर आचार्य दिग्विजयार्थ बाहेर पडले. त्यांच्या समागमे शिष्यमंडळी तर होतीच, शिवाय त्यांचा भक्त बनलेला सुधन्वा नामक राजाही होता. मोठमोठया नगरांत आणि प्रसिद्ध तीर्थक्षेत्रांत जायचे आणि तिथे वैदिक धर्माची स्थापना करायची, असा त्यांचा उद्योग सुरू झाला. जे वादासाठी पुढे येत, त्यांच्याशी शास्त्रार्थ करून आचार्य अद्वैततत्त्वज्ञान त्यांच्या गळी उतरवीत. उज्जयिनी, काशी, कांची, द्वारका, पुरी, प्रयाग, बदरीनाथ, रामेश्वर, श्रीशैल, हरिद्वार, इ. अनेक क्षेत्रांत त्यांनी संचार केला. अशा प्रकारे त्यांची विजययात्रा पुरी झाली. सर्वत्र अद्वैताचा डिंडिम वाजू लागला. वैदिक धर्माला तेज प्राप्त झाले. पाखंडी, वामाचारी संप्रदाय भंगले. आचार्यांनी द्वारका, पुरी, बदरी आणि शृंगेरी या चार ठिकाणी मठस्थापना करून आपल्या चार प्रमुख शिष्यांना तिथे मठपती नेमले. आपापल्या सत्ताक्षेत्रातील धर्मनिर्णय त्यांनी द्यावा आणि लोकांनी तो मान्य करावा, असा त्यांनी धर्मादेश दिला. सर्वत्र तशी व्यवस्था सुरू झाली.

त्यानंतर आचार्य काश्मीरला गेले. काश्मीर हे एक विद्यापीठ होते आणि अनेक शास्त्रांतले प्रकांडपंडित तिथे वास्तव्य करीत होते. काश्मीरात एक शारदेचे मंदिर होते. ज्ञान-विज्ञानाच्या रूपाने जणू शारदाच तिथे वास्तव्य करीत होती. त्या मंदिरात एक पीठ होते. त्याला सर्वज्ञपीठ असे म्हणत. जो सर्वज्ञ असेल त्यानेच त्या पीठावर अधिरोहण करायचे असे.

मंदिराला चार दरवाजे होते. त्यांपैकी तीन उघडे होते आणि दक्षिणेचा तेवढा बंद होता. याचा अर्थ आजवर सर्वज्ञपीठावर बसेल असा कोणी दाक्षिणात्य पंडित काश्मीरात गेला नाही, असा होत होता.

शंकराचार्यांनी हा वृत्तांत ऐकला आणि त्यांनी त्या सर्वज्ञपीठावर चढायचे ठरवले. आचार्य तिथे शिष्यांसह गेले आणि त्यांनी धडक मारून मंदिराचा दक्षिण दरवाजा उघडला. तिथली पंडित मंडळी धावून आली आणि त्यांनी आचार्यांना घेरले. ' तुम्ही स्वतःला सर्वज्ञ समजता काय ? ' हा त्यांचा प्रश्न. आचार्य आत्मविश्वासाने बोलले. ' होय; मी सर्वज्ञ आहे. ' मग त्या विभिन्न मतांच्या अनेक विद्वानांनी आचार्यांना अनेक अवघड प्रश्न विचारले. आचार्यांनी त्या सर्वांना खणखणीत उत्तरे देऊन गप्प बसवले आणि मग पुढे होऊन त्या सर्वज्ञपीठावर अधिरोहण केले. आचार्यांचे ते अलौकिक तेज, पांडित्य आणि बुद्धिवैभव पाहून सगळे काश्मीरी पंडित दिपून गेले आणि त्यांनी आचार्यांचा जयजयकार केला.

तिथून पुढे आचार्य नेपाळात गेले. तिथला पशुपतिनाथ म्हणजे शिवाच्या अष्टमूर्तींपैकी एक. पण ते शिवस्थान बौद्धांनी बळकावले होते. तिथली वैदिक पूजापद्धती बंद पडली होती. आचार्य तिथे जाताच तिथल्या राजाने त्यांचे हर्षभराने स्वागत केले. आचार्यांना वैदिक पूजापद्धती चालू करून पशुपतिनाथाचा जणू जीर्णोद्धारच करायचा होता. राजाचीही त्या गोष्टीला अनुमती होती. पण तिथे पूजापद्धती जाणणारा एकही वैदिक ब्राह्मण शिल्लक उरला नव्हता. म्हणून मग आचार्यांनी केरळातून वैदिक विधि-विधान जाणणारे काही नंपुतिरी ब्राह्मण तिथे आणवले आणि पशुपतिनाथाच्या पूजेअर्चेचे सर्व अधिकार त्यांना दिले. नेपाळनरेशानेही त्या योजनेला मान्यता दिली.

भाष्यलेखन, प्रचार, दिग्विजय, मठस्थापना, इ. प्रचंड उद्योग आचार्यांनी अवघ्या एकतीस वर्षांत पूर्ण केला. त्यांना बत्तिसावे वर्ष लागले. हे वर्ष आपल्या निर्याणाचे आहे, हे त्यांना ठाऊक होते. त्या दृष्टीने त्यांनी मग सर्व निरवानिरव करून परत हिमालयाची वाट स्वीकारली. ते बदरीकेदार या क्षेत्री गेले. तिथूनच मोक्षमार्ग सुरू होतो. पांडव त्याच मार्गाने स्वर्गारोहणाला

निघाले होते. देहत्यागासाठी केदारक्षेत्राची भूमी ही पवित्र भूमी होती. तिला केदारनाथाचे सान्निध्यही लाभले होते. आचार्य त्या क्षेत्री जाऊन विसावले. त्यांनी योगधारणा सुरू केली. हळूहळू ते निर्विकल्प समाधीत प्रवेशते झाले. आणि मग वैशाख शुद्ध एकादशीच्या दिवशी या तेजोधाम यतिश्रेष्ठाची प्राणज्योत परब्रह्मात विलीन झाली !

आचार्यांच्या निर्याणाबद्दल मतभेद आहेत. काही लोक, त्यांनी केरळात वृषपर्वतावर देह ठेवला, असे मानतात; तर कांचीच्या कामकोटिपीठाचे आचार्य, त्यांचे देहावसान कांचीत झाल्याचे सांगतात. निर्याणतिथीबद्दलही वैशाख शुद्ध एकादशी, वैशाखी पूर्णिमा आणि कार्तिक शुद्ध एकादशी अशी भिन्न मते आहेत.

**शिष्यपरिवार** – वैदिक धर्माच्या प्रचारासाठी आचार्यांनी जे शिष्य मिळवले आणि तयार केले, त्यांपैकी प्रमुख शिष्य चार होते. सुरेश्वर, पद्मपाद, हस्तामलक व तोटक अशी त्यांची नावे होती. हे सगळे शिष्य विद्वान, आचारशील आणि संन्यासी होते.

यांपैकी सुरेश्वराचार्यांचे चरित्र फारसे मिळत नाही. त्यांचे पांडित्य अलौकिक होते, एवढे मात्र कळते. त्यांचे प्रतिभासंपन्न पांडित्य लक्षात घेऊन आचार्यांनी त्यांना आपल्या ब्रह्मसूत्रभाष्यावर वृत्ती लिहिण्याचा आदेश दिला. पण इतर शिष्यांना ती गोष्ट आवडली नाही. त्यांचा विरोध लक्षात घेऊन आचार्यांनी मग सुरेश्वरांना स्वतंत्र ग्रंथ आणि वार्तिके लिहायला सांगितली. गुरूंच्या आदेशानुसार त्यांनी मग आचार्यांच्या अनेक ग्रंथांवर वार्तिके लिहिली आणि ती विद्वानांच्या जगात आदरणीय ठरली. वेदान्तशास्त्राच्या इतिहासात वार्तिककार या उपाधीने सुरेश्वरांचाच बोध होतो.

सुरेश्वरांचे गृहस्थाश्रमातले नाव मंडनमिश्र होते आणि ते कुमारिल भट्टांचे शिष्य आणि पक्के कर्मठ होते, असे माधवकृत शंकरविजयावरून कळते (३.१.३६). पण सुरेश्वर आणि मंडनमिश्र या भिन्न व्यक्ती होत्या, असे अलिकडच्या संशोधकांनी सिद्ध केले आहे. पं. कुप्पुस्वामी शास्त्री हे त्यांत प्रमुख आहेत. ते म्हणतात, ब्रह्मसिद्धी ग्रंथाचा लेखक मंडनमिश्र हा आचार्यांचा शिष्य नव्हता आणि त्याने संन्यासही घेतला नव्हता. तो सुरेश्वरांहून भिन्न होता आणि त्याचे अद्वैतही प्रस्थानत्रयीतल्या अद्वैताहून भिन्न होते. सुरेश्वरांचे गृहस्थाश्रमातले नाव विश्वरूप होते. तेही कुमारिल भट्टाचे शिष्य होते. आचार्यांशी संपर्क आल्यावर ते अद्वैती आणि संन्यासी बनले. ते शांकरअद्वैताचे पक्के अनुयायी होते. त्यांनी मंडनमिश्राच्या वेगळ्या अद्वैतमताचे आपल्या ग्रंथात खंडन केले आहे.

पद्मपादांचे मूळ नाव सनंदन होते व ते चोल देशाचे निवासी होते. आचार्यांनी त्यांना संन्यासदीक्षा दिली आणि त्यांनीही आचार्यांच्या मतप्रसाराला फार मोठा हातभार लावला. चिद्विलास यतीने आपल्या शंकरविजयविलास या ग्रंथात त्यांच्या विषयी काही अधिक आणि वेगळी माहिती दिली आहे, ती अशी

पद्मपादांच्या वडिलांचे नाव माधवाचार्य होते. त्यांच्या ठिकाणी विद्वत्ता आणि संपन्नता या दोन्ही गोष्टी नांदत होत्या. ते दक्षिणेतल्या अहोबल क्षेत्रात राहून नरसिंहाची उपासना करीत होते. पद्मपादही त्यामुळे नरसिंहाचे उपासक बनले. त्याच्याच प्रेरणेने पुढे ते काशीत जाऊन आचार्यांना भेटले, त्यांचे शिष्य झाले आणि कायम त्यांच्या बरोबर राहिले. त्यांनी पंचपादिका, विज्ञानदीपिका, विवरण टीका व पंचाक्षरी भा[illegible] असे ग्रंथ लिहिले. तंत्रशास्त्रातही ते पारंगत होते.

हस्तामलक हे तिसरे आचार्यशिष्य होत. त्यांचे मूळचे नाव पृथ्वीधर होते. बालपणापासूनच ते विरक्त असून, बालोन्मत्त पिशाचवत राहत होते. त्यांच्या या वृत्तीने त्यांचे वडील [illegible] चिंतामग्न असत. मुलगा काही तरी सुधारावा म्हणून ते त्यांना घेऊन एक दिवस आचार्यांकडे गेले. त्यांना पाहून आचार्यांनी विचारले. "हे शिशो, तू कोण ? कोणाचा ? कुठून आला[illegible] नाव काय ?"

त्यावर त्या शिशूने शीघ्रकवित्वाच्या रूपाने आचार्यांना उत्तर दिले, ते असे–

नाहं मनुष्यो न च देवयक्षो न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रः।
न ब्रह्मचारी न गृही वनस्थो भिक्षुर्नचाहं निजबोधरूपः।

अर्थ – मी मनुष्य नाही, तसाच देव, यक्षही नाही. मी चार वर्णांपैकी कोणी नाही आणि चारही आश्रमांपैकी कोणी न[illegible] मी केवळ आहे निजबोधरूप अर्थात ज्ञानरूप.

हे उत्तर ऐकून आचार्य स्तिमित झाले. ते त्या गृहस्थांना म्हणाले. 'बाबारे, हा मुलगा तुझ्या कामाचा नाही. हा कोणी जीवन्मुक्त आत्मा या शरीरात प्रविष्ट झाला आहे. याला माझ्या हाती सोपव.' त्या गृहस्थांनी ती गोष्ट मान्य [illegible] अशा रीतीने पृथ्वीधर शंकराचार्यांचे शिष्य बनले आणि दि[illegible] जययात्रेत आचार्यांच्या समागमे राहिले.

चौथे शिष्य तोटकाचार्य. त्यांचे मूळचे नाव गिरी होते. [illegible] गुरुभक्ती पराकोटीची होती. पण तो बुद्धीने जडच होता. [illegible] शिष्यमंडळी त्याला तुच्छ समजत. एक दिवस शिष्यांना [illegible] सुरू करण्याच्या वेळेला गिरी तिथे उपस्थित नव्हता. तो [illegible] धुण्यासाठी तुंगभद्रेवर गेला होता. आचार्य म्हणाले. '[illegible] येऊ दे, मग पाठ सुरू करू'. इतर शिष्यांना ती गोष्ट [illegible] एका बुद्धिमंद शिष्याविषयी आचार्य एवढी आस्था दाखव[illegible] हे त्यांना रुचले नाही. आचार्यांनी ते अंतर्ज्ञानाने जाणले. [illegible] त्यांनी तिथूनच चौदा विद्या गिरीच्या हृदयात संक्रांत [illegible]

तो नदीवरून परत आला आणि तोटक वृत्तात श्लोकामागून श्लोक रचीत अध्यात्मविद्येची मांडणी करू लागला. सारे शिष्य या प्रकाराने स्तंभित झाले. मग आचार्यांनी तोटकवृत्तावरून त्याचे नाव तोटकाचार्य ठेवले व त्याला आपला पट्टशिष्य बनवले.

या चार शिष्यांना शंकराचार्यांनी आपल्या चार पीठांवर पीठाधिपती म्हणून नेमले. त्यांचा अनुक्रम असा– पद्मपाद – गोवर्धन मठ (ओडिसा), सुरेश्वर – शृंगेरी मठ (दक्षिण देश), हस्तामलक – शारदापीठ (द्वारका) व तोटक – ज्योतिर्मठ (हिमालय). या चारही शिष्यांनी स्वतंत्रपणे आपापल्या शिष्य-शाखा निर्माण केल्या व त्या त्या पीठांचे कारभार चालवले.

श्रीविद्यार्णवतंत्रात याविषयी थोडी वेगळी माहिती आहे. आचार्यांचे एकूण चौदा शिष्य असून, त्यांतले पाच संन्यासी व नऊ गृहस्थ होते, असे तिथे म्हटले आहे.

**आचार्यांची गुरुपरंपरा** – उपलब्ध ग्रंथांत शंकराचार्यांच्या गुरुपरंपरेविषयी भिन्नता आढळते. प्रचलित ग्रंथांच्या आधारे ही परंपरा दिसते ती अशी–विष्णू-शिव-ब्रह्मा-वसिष्ठ-शक्ती-पराशर-शुक-गौडपाद-गोविंद आणि शंकर. या परंपरेप्रमाणे आचार्य हे गौडपादांचे प्रशिष्य आणि गोविंदाचे शिष्य असल्याचे कळते.

पण श्रीविद्यार्णवतंत्रात काही वेगळी माहिती आहे. श्रीविद्यार्णवतंत्र हा ग्रंथ कोण्या विद्यारण्य नामक आचार्यांचा असून, त्यात श्रीविद्येची उपासना ही मुख्य धरून तंत्रशास्त्राच्या संपूर्ण सिद्धान्तांचे विवेचन केलेले आहे. आचार्य हे श्रीविद्येचे उपासक होते, हे सर्वमान्य आहे. आचार्यांच्या काही मठांत श्रीचक्राची स्थापना केलेली असते आणि तिथल्या मठपतींच्या दैनिक कृत्यांत श्रीचक्राची पूजा हा विशेष विधी असतो. आजही ही प्रथा चालू आहे. आचार्यांचे सौंदर्यलहरी आणि प्रपंचसार हे प्रकरणग्रंथ तंत्रविद्येचेच आहेत. प्रस्तुत श्रीविद्यार्णवतंत्रावरून आचार्य हे गौडपादांचे प्रशिष्य नसून, गौडपाद व गोविंद यांच्यामध्ये आणखी पाच पुरुष आढळतात. ते विचारात घेतल्यानंतर जी परंपरा निश्चित होते, ती अशी–गौडपाद–पावक–पराचार्य-सत्यनिधी-रामचंद्र-गोविंद आणि शंकर.

**आचार्यांचे मठ** – आचार्यांनी भारतवर्षाची धार्मिक व्यवस्था अक्षुण्ण चालू ठेवण्यासाठी भारताच्या चार दिशांना चार मठांची स्थापना केली. त्या त्या मठांचे अधिकारक्षेत्रही निश्चित केले. उत्तर आणि मध्य देश, तसेच कुरू, काश्मीर, कंबोज, पांचाल, इ. देश हिमालयातल्या ज्योतिर्मठाच्या शासनाखाली दिले. सिंधू, सौवीर, सौराष्ट्र व महाराष्ट्र अर्थात भारताचा समग्र पश्चिम भाग द्वारकेतल्या शारदा मठाच्या अधिकारात ठेवला. आंध्र, कर्नाटक, केरळ व द्रविड हे देश शृंगेरी मठाच्या कक्षेत समाविष्ट केले. अंग, वंग, कलिंग, उत्कल, मगध, बर्बर, इ. पूर्वेकडील देश जगन्नाथपुरीच्या अधिकारक्षेत्रात समाविष्ट केले. अशा प्रकारे संपूर्ण भारतावर आचार्यांनी आपले धर्मसाम्राज्य स्थापित केले.

वरील चार प्रमुख पीठांव्यतिरिक्त काशीचा सुमेरमठ आणि कांचीचे कामकोटिपीठ ही दोन्ही पीठे आचार्यनिर्मितच असल्याचे मानण्यात येते. कामकोटिपीठाचे अधिपती त्यालाच आचार्यांचे प्रधानपीठ समजतात. त्यांच्या मते आचार्यांनी चार मठांवर शिष्यांची नियुक्ती केली आणि ते कांची क्षेत्री आले. तिथे त्यांनी स्वतःसाठी पीठ निर्माण केले. कैलासाहून आणलेले योगलिंग त्यांनी इथे स्थापले आणि कामाक्षी देवीची उपासना करीत इथेच आपला देह ठेवला.

वरील प्रमुख पीठांच्या अंतर्गत काही उपपीठेही निर्माण झाली आहेत. त्यांची नावे अशी– कूडली, संकेश्वर, पुष्पगिरी, विरूपाक्ष, हव्यक, शिवगंगा, कोप्पाल, श्रीशैल, रामेश्वर व बागड.

आचार्यांनी सर्व मठपतींना जो उपदेश केला आहे, त्याला महानुशासन असे म्हणतात. त्यातल्या धर्माज्ञा अशा–

मठपतींनी आपल्या राष्ट्राच्या प्रतिष्ठेसाठी आणि धर्मप्रतिष्ठेसाठी आळस सोडून प्रयत्न करावा. त्यांनी आपापल्या शासनप्रदेशात सदैव भ्रमण करून लोकांना वर्णाश्रमांच्या कर्तव्यांचा उपदेश करावा, सदाचार वाढवावा. एका मठपतीने दुसऱ्या मठाच्या अधिकारक्षेत्रात जाऊ नये. सर्व मठपतींनी अधूनमधून एकत्र जमून धर्मचर्चा करावी आणि देशात धार्मिक सुव्यवस्था ठेवण्यासाठी झटावे; वैदिक धर्म प्रगतिशील व अक्षुण्ण राहावा यासाठी दक्ष असावे.

आचार्यांनी आपल्या या महानुशासनात देशातल्या विद्वान मंडळीवरही एक जबाबदारी सोपवली आहे. विद्वान लोकच धर्माच्या बाबतीत नियामक होऊ शकतात. त्यांनी या धर्मपीठांवर नजर ठेवावी. वेळोवेळी मठपतींचे आचरण तपासावे. विद्वान, चारित्र्यवान आणि कर्तव्यदक्ष अशा सद्गुणी संन्याशालाच पीठाधिष्ठित करावे. तो पीठाध्यक्ष कर्तव्यच्युत ठरल्यास विद्वानांनी त्याला पीठावरून पदच्युत करावे. जर पीठाध्यक्ष सुयोग्य अधिकारी असेल, तर लोकांनी त्याला माझ्या नावानेच ओळखून योग्य तो सन्मान द्यावा व त्याच्या आज्ञा पाळाव्या.

**ग्रंथसंपदा** – आचार्यांनी आपल्या अद्वैत सिद्धान्ताच्या प्रस्थापनेसाठी अनेक ग्रंथ रचले. त्यांच्या नावावर दोनशेहून अधिक ग्रंथांची नोंद आहे. पण एवढे ग्रंथ एका आचार्यांनी निर्माण केले असतील हे मान्य करणे कठिण आहे. आचार्यांच्या नंतर शांकरपीठावर अधिष्ठित झालेल्या अनेक विद्वान आचार्यांनी पुष्कळ ग्रंथरचना केली असून, ती आद्य शंकराचार्यांच्या सिद्धान्ताला अनुसरूनच आहे. हे सगळे आचार्य स्वतःला शंकराचार्यच म्हण-

वून घेतात. यामुळे ही सारी ग्रंथरचना मूळ आचार्यांच्या नावावरच जमा झाली आहे. त्यामुळे आचार्यांचे ग्रंथ कोणते आणि इतरांचे कोणते, हे ठरवणे अवघड झाले आहे. आचार्य आपल्या प्रत्येक ग्रंथाच्या पुष्पिकेत गोविंदभगवत्पाद यतींचा शिष्य शंकर अशी नाममुद्रा ठसवतात. पण त्यावरूनही आचार्यकृत ग्रंथांचा निर्णय ठरवणे अशक्य झाले आहे. कारण इतर आचार्यही आपली गुरुपरंपरा न सांगता आचार्यांचीच नाममुद्रा ठोकतात. त्यामुळे तेही लक्षण व्यवच्छेदक ठरत नाही. ग्रंथकार आपल्या विवेचनाच्या ओघात स्वतः दुसरे काही ग्रंथ निर्माण केलेले असल्यास त्यांची नावे घेतो. पण आचार्यांनी तसे कुठेच केले नाही. त्यामुळे तेही साधन उपलब्ध होऊ शकत नाही. मग राहता राहिली अंतरंगपरीक्षा. तिचाच आधार घेऊन संशोधकांनी आद्य शंकराचार्यांचे म्हणून जे ग्रंथ निश्चित केले, त्यांची नावे अशी–

प्रस्थानत्रयीवरची भाष्ये – प्रस्थान शब्दाचा अर्थ गमन असा होतो. पण इथे त्याचा अर्थ मार्ग असा लक्षणेने घेतलेला आहे. वेदान्ताची तीन प्रस्थाने म्हणजे तीन मार्ग आहेत– (१) श्रुती अर्थात उपनिषदे. (२) स्मृती अर्थात गीता आणि (३) सूत्रे अर्थात ब्रह्मसूत्रे. या तीन स्थानांतून यात्रा किंवा गमन केल्याने अध्यात्माचा यात्रेकरू शेवटी परब्रह्मापर्यंत जाऊन पोचतो. वरील तीन्ही ग्रंथ ब्रह्माकडे म्हणजे सत्याकडे नेणारे आहेत.

ब्रह्मसूत्रभाष्य – ही आचार्यांची सर्वांगसुंदर आणि प्रौढप्रगल्भ अशी रचना आहे. ब्रह्मसूत्रे ही अत्यंत अल्पाक्षर असल्यामुळे, एखाद्या भाष्याच्या मदतीवाचून त्यांचा अर्थ समजणे अत्यंत कठिण होते. आचार्यांनी ती सरळ, सुबोध व प्रौढ भाषेत विशद करून त्यांच्या ज्ञानाचा मार्ग सोपा केला. वाचस्पतिमिश्रांसारख्या प्रकांड दार्शनिकाने ब्रह्मसूत्रभाष्याला प्रसन्न, गंभीर आणि गंगाजलाप्रमाणे पवित्र अशा शब्दांत गौरवले आहे. (भामती-मंगलश्लोक.)

उपनिषद्भाष्ये – आचार्यांनी पुढील १२ उपनिषदांवर भाष्ये लिहिली– (१) ईश (२) केन (३) कठ (४) प्रश्न (५) मुंडक (६) मांडुक्य (७) तैत्तिरीय (८) ऐतरेय (९) छांदोग्य (१०) बृहदारण्यक (११) श्वेताश्वतर व (१२) नृसिंह–तापिनी. त्यांच्या उपनिषद्भाष्यांविषयी पं. बलदेव उपाध्याय लिहितात–

आचार्यांच्या अन्य भाष्यांची जी शैली आहे, तीच उपनिषद्भाष्यांमध्येही दिसून येते. प्रत्येक उपनिषदाच्या उपोद्घातात आचार्यांनी अनेक सिद्धान्तांचे सुंदर प्रतिपादन केले आहे. जागजागी आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ प्राचीन वेदान्ताचार्यांची मते उद्धृत केली आहेत. काही ठिकाणी परमतखंडनासाठीही त्यांचा उपयोग केला आहे. सर्व उपनिषदांच्या भाष्यात बृहदारण्यकाचे भाष्य सर्वांत अधिक विद्वत्तापूर्ण, व्यापक व प्रांजल झाले आहे. त्यात आचार्यांनी ब्रह्मप्राप्तीच्या साधक उपायांत कर्माची उपादेयता अमान्य करून कर्मवाद्यांच्या मुद्यांचे प्रबल युक्तिवादाने खंडन केले आहे. ही भाष्ये भाषाशैलीच्या दृष्टीनेही सरस आहेत. ती प्रौढ शास्त्रीय संस्कृत गद्याचे उत्तम नमुने ठरतील अशी आहेत. सरल सुबोध भाषेच्या द्वारे गंभीर अर्थाचे विवेचन त्यात आढळून येते.

गीताभाष्य – आचार्यांचे गीताभाष्य गीतेच्या दुसऱ्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकापासून सुरू होते. प्रारंभी त्यांनी आपल्या भाष्याचा दृष्टिकोण चांगल्या प्रकारे समजावून सांगितला आहे. या ग्रंथात पूर्वीच्या टीकाकारांचे खंडन केलेले आहे. हे सं[illegible] टीकाकार ज्ञानकर्मसमुच्चयवादी होते. केवळ कर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञानाने मोक्षाची प्राप्ती होणे शक्य नसून, अग्निहोत्रादि श्रौतस्मार्त कर्मांशी ज्ञानाचा समुच्चय केल्यानेच ती होऊ शकते असे त्यांचे मत होते. पण आचार्यांना हा ज्ञानकर्मसमुच्चय मान्य नव्हता. तत्त्वज्ञानानेच मोक्ष मिळू शकतो, अशी त्यांची धारणा होती. म्हणून त्यांनी कर्मसंन्यासावर भर देऊन गीतेची ज्ञानपरक व्याख्या केली.

आचार्यांच्या सुबोध गद्याचा गीताभाष्याच्या उपोद्घातातील पुढील उतारा नमुना म्हणून देता येईल–

स च भगवाञ्ज्ञानैश्वर्यशक्तिबलवीर्यतेजोभिः सदा सम्पन्नस्त्रिगुणात्मिकां वैष्णवीं स्वां मायां मूलप्रकृतिं वशीकृत्याजोऽव्ययो भूतानामीश्वरो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावोऽपि सन् स्वमायया देहवानिव जात इव लोकानुग्रहं कुर्वन्निव लक्ष्यते। स्वप्रयोजनाभावेऽपि भूतानुजिघृक्षया वैदिकं हि धर्मद्वयमर्जुनाय शोकमोहमहोदधौ निमग्नायोपदिदेश। गुणाधिकैर्हि गृहीतोऽनुष्ठीयमानश्च धर्मः प्रचयं गमिष्यतीति। तं धर्मं भगवता यथोपदिष्टं वेदव्यासः सर्वज्ञो भगवान् गीताख्यैः सप्तभिः श्लोकशतैरुपनिबबन्ध।

भावार्थ – तो भगवान सदैव ज्ञान, ऐश्वर्य, शक्ती, बल, वीर्य आणि तेज या सहा गुणांनी युक्त आहे. त्याने त्रिगुणात्मक म्हणजे सत्त्व, रज व तम या तीन गुणांनी युक्त अशा आपल्या वैष्णवी मायेला वश करून घेतले व मनुष्याप्रमाणे देह धारण केला. भगवान नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव असूनही, लोकानुग्रह करण्यासाठी जणू मनुष्यदेहधारी बनला. त्याला स्वतःला अनुग्रह घेण्याचे प्रयोजनच नव्हते. त्याने भूतानुकंपेसाठी शोक व मोह यांच्या महासागरात बुडालेल्या अर्जुनाला अभ्युदय-निःश्रेयसरूप धर्मद्वयाचा उपदेश केला. अर्जुनालाच उपदेश करण्याचे कारण असे, की ज्याच्या ठिकाणी गुणांचे आधिक्य असते, त्याच्याकडून जाणलेला व आचरलेला धर्म वृद्धिंगत होतो. भगवंताने ज्याप्रमाणे त्या धर्माचा उपदेश केला, त्याप्रमाणे तो धर्म सर्वज्ञ भगवान

वेदव्यासांनी गीता नामक सातशे श्लोकांत ग्रथित केला.

स्तोत्रे – आचार्यांनी अनेक देवतांच्या स्तुतिपर अशी कित्येक स्तोत्रे रचली आहेत. ते परमार्थतः अद्वैतवादी होते; पण व्यवहाराच्या भूमिकेवर ते नाना देवतांच्या उपासनेची सार्थकता मानीत होते. निर्गुणाच्या उपलब्धीसाठी सगुणाची उपासना हे प्रबल साधन आहे आणि जोवर एखादा साधक सगुण ईश्वराची उपासना करीत नाही, तोवर त्याला निर्गुण ब्रह्माची प्राप्ती होणार नाही, असे ते मानीत. ते स्वतः लोकसंग्रहार्थ सगुणोपासनेचा अवलंब करीत. त्या उपासनेला बल, सौंदर्य आणि गांभीर्य येण्यासाठी त्यांनी शिव, विष्णू, देवी, गणेश, इ. देवतांची सुंदर भावपूर्ण स्तोत्रे रचली आहेत. आचार्यांचे हृदय विशाल होते. त्यात सांप्रदायिक क्षुद्रतेला मुळीच थारा नव्हता. तत्त्वज्ञानाच्या उच्च नभोवितानात विहार करणाऱ्या एका दार्शनिकाने इतकी ललितकोमल, भावमधुर व रसार्द्र स्तोत्रे निर्माण करावी, ही घटना आश्चर्यजनक वाटते. संशोधकांनी पुढील स्तोत्रे ही आचार्यकृत असल्याचे ठरविले आहे.

आनंदलहरी – हे भगवती देवीच्या वर्णनपर स्तोत्र आहे. त्यात शिखरिणी वृत्ताचे वीस श्लोक आहेत. या स्तोत्रावर ३० टीका उपलब्ध असून, त्यांतली एक स्वतः आचार्यांनीच लिहिली आहे. देवीची ही स्तुती रसिकजनांना आनंदप्रद ठरली आहे. त्या स्तोत्रातील एक श्लोक असा –

मुखे ते ताम्बूलं नयनयुगले कज्जलकला
ललाटे काश्मीरं विलसति गले मौक्तिकलता ।
स्फुरत्काञ्ची शाटी पृथुकटितटे हाटकमयी
भजामस्त्वां गौरीं नगपतिकिशोरीमविरतम् ॥

अर्थ – माते भवानी ! तुझ्या मुखात तांबूल रंगला आहे. दोन्ही नेत्रांमध्ये काजळाची कोर, भालप्रदेशी केशरकुंकुमतिलक, आणि गळ्यामध्ये मोत्यांचा हार शोभत आहे. अंगावर भरजरी शालू असून, त्यावर विशाल कटिभागी सुंदर कमरपट्टा चमकत आहे. याप्रमाणे शोभणारी गौरवर्ण आणि पर्वतराज हिमालयाची कन्या तू पार्वती, त्या तुला मी निरंतर भक्तिभावाने भजत आहे.

दक्षिणामूर्तिस्तोत्र – हे शार्दूलविक्रीडितात असून, याच्यावरही अनेक आचार्यांच्या टीका आहेत. या स्तोत्रात वेदान्त प्रतिपादनाबरोबरच तांत्रिक उपासनेचेही काही पारिभाषिक शब्द आले आहेत. आचार्यांची तंत्रविषयक मते समजून घेण्यासाठी हे स्तोत्र उपयुक्त ठरते. याचा प्रथम श्लोक असा –

विश्वं दर्पणदृश्यमाननगरीतुल्यं निजान्तर्गतं
पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूतं यथा निद्रया ।
या साक्षात्कुरुते अबोधसमये स्वात्मानमेवाद्वयं
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥

अर्थ – निद्रेच्या वेळी स्वप्नात भासणाऱ्या पदार्थांप्रमाणे हे सर्व विश्व ज्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणी, आरशात दिसणाऱ्या एखाद्या नगरीच्या प्रतिबिंबासारखे प्रत्ययास येते आणि आत्मसाक्षात्काररूपी जागृतीच्या क्षणी नाहीसे होते, त्या वेळी केवळ एकमेव अद्वितीय अशा आत्मस्वरूपाचाच ज्याला साक्षात्कार होतो, त्या आत्मस्वरूपी श्रीगुरू दक्षिणामूर्तीला मी नमस्कार करीत आहे.

चर्पटपंजरी – हे १७ श्लोकांचे स्तोत्र अत्यंत नादमधुर असून, त्याचा आरंभ 'भज गोविन्दं भज गोविन्दं' असा होतो. यात वैराग्याचा उपदेश आहे. त्यातील एक श्लोक असा –

दिनमपि रजनी सायं प्रातः शिशिरवसन्तौ पुनरायातः ।
कालः क्रीडति गच्छत्यायुस्तदपि न मुञ्चत्याशावायुः ॥
भज गोविन्दं भज गोविन्दं भज गोपालं मूढमते ।
प्राप्ते सन्निहिते मरणे न हि न हि रक्षति डुकृञ् करणे ॥

अर्थ – दिवस-रात्र, सकाळ-संध्याकाळ, शिशिरऋतू–वसंतऋतू पुनःपुन्हा येतात व जातात. अशा प्रकारे कालाची लीला नित्य चालली आहे. कालचक्र फिरत आहे. आयुष्य कमी कमी होत आहे. तरी पण आशारूपी वारा काही पिंड (देह) सोडीत नाही. देहाची आशा काही कमी होत नाही. अरे वेडच्या गोविंदाला भज. गोपालकृष्णाला भज. मूर्खा ! मरण जवळ आल्यानंतर हे 'डुकृञ् करणे' तुझे रक्षण करणार नाही.

षट्पदी – सात श्लोकांच्या या स्तोत्रातला एक श्लोक असा–

सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ।
सामुद्रो हि तरङ्गः क्वचन समुद्रो हि तारङ्गः ।

अर्थ – हे प्रभो, तुझ्या माझ्यातला भेद नष्ट झाला असला (दोघांत अद्वैत झाले असले) तरी, (एक सूक्ष्म भेद आहे.) मी तुझा खरा; पण तू माझा नाहीस. (दृष्टान्त) समुद्रावर तरंग उठतात, ते समुद्राचे असतात. समुद्र मात्र तरंगांचा नसतो.

हरिमीडे स्तोत्र – या स्तोत्रात विष्णूची प्रशंसा असून, त्याला वेदान्ताची पक्की बैठक आहे.

शिवभुजंगप्रयात – या स्तोत्रात भुजंगप्रयात वृत्तामध्ये चौदा श्लोक आहेत. शंकरदिग्विजयात असे सांगितले आहे, की आचार्यांनी आपल्या मातेच्या अंतकाळी या स्तोत्राने शिवाला आळवले आणि शिवाने प्रसन्न होऊन आचार्यांच्या मातेसाठी शिवदूत पाठवले. त्यातला एक श्लोक असा –

महादेव देवेश देवाधिदेव
स्मरारे पुरारे यमारे हरेति ।
ब्रुवाणः स्मरिष्यामि भक्त्या भवन्तं
ततो मे दयाशील देव प्रसीद ॥

अर्थ – हे महादेवा, तुझ्या अनेक नावांनी मी भक्तीने तुझे स्मरण करतो. तू दयाशील आहेस, मजवर प्रसन्न हो.

सौंदर्यलहरी – हे एक काव्यदृष्टया सरस, प्रौढ व रहस्यपूर्ण असे स्तोत्र आहे. तसेच हे एक शतककाव्य आहे. सर्व संस्कृत स्तोत्रसाहित्याचा मुकुटमणी शोभेल असे हे अनुपम स्तोत्र आहे. या स्तोत्रातल्या पहिल्या ४१ श्लोकांत आचार्यांनी तंत्रविद्येतली रहस्ये उकलून सांगितली आहेत. पुढच्या ५९ श्लोकांत त्रिपुरसुंदरीच्या-अंगप्रत्यंगांचे सरस व चमत्कृतिपूर्ण वर्णन आहे. त्रिपुरसुंदरी ही आचार्यांची उपास्यदेवता होती. हे स्तोत्र आचार्यांचे असल्याबद्दल काही संशोधक संदेह व्यक्त करतात, पण परंपरा ते आचार्यांचेच असल्याबद्दल ग्वाही देते. यातले दोन श्लोक असे –

**कवीन्द्राणां चेतः कमलवनबालातपरुचिं**
**भजन्ते ये सन्तः कतिचिदरुणामेव भवतीम् ।**
**विरिञ्चिप्रेयस्यास्तरुणतरशृङ्गारलहरी–**
**गभीराभिर्वाग्भिर्विदधति सतां रञ्जनममी ।।**

भावार्थ – हे माते त्रिपुरेश्वरी ! तुझा स्वाभाविक वर्ण अरुण आहे आणि तुझे नावही अरुणाच आहे. तेव्हा वर्णाने आणि नावानेही तू अरुणा असल्याचे शास्त्रात वर्णन केलेले आहे. तुझ्या या स्वरूपाचे जे कोणी सज्जन ध्यान करतात ते आपल्या अपूर्व वाग्विलासांनी सज्जनांची, मोठ्यामोठ्या विद्वानांची अथवा देवतांचीही मने रमविण्यास समर्थ होतात.

**अहः सूते सव्यं तव नयनमर्कात्मकतया**
**त्रियामां वामं ते सृजति रजनीनायकतया ।**
**तृतीया ते दृष्टिर्दरदलितहेमाम्बुजरुचिः**
**समाधत्ते सन्ध्यां दिवसनिशयोरन्तरचरीम् ।।**

अर्थ – माते त्रिपुरसुंदरी ! तुझा उजवा नेत्र हा सूर्यस्वरूप असल्यामुळे तो दिवस निर्माण करतो व डावा डोळा चंद्रस्वरूप असल्यामुळे तो रात्र निर्माण करतो. किंचित विकसित झालेल्या सुवर्णकमलाप्रमाणे आरक्तवर्ण दिसणारा तुझा तिसरा नेत्र प्रत्यक्ष अग्निस्वरूप असल्यामुळे तो रात्र व दिवस आणि दिवस व रात्र यांचा संधिकाल निर्माण करतो.

प्रकरणग्रंथ – आचार्यांनी वेदान्ताच्या प्रतिपादनासाठी अन्य काही छोटेमोठे ग्रंथ लिहिले आहेत, त्यांना प्रकरणग्रंथ म्हणतात. यांत मोक्षसिद्धीला साधनभूत असलेल्या शमदमादी संपत्तीचे विवेचन असून, अद्वैताच्या मूलभूत सिद्धान्ताचेही वर्णन आहे. आचार्यांची प्रस्थानत्रयीवरची भाष्ये शास्त्रीय चर्चेने समृद्ध, पण तर्ककठोर आहेत. ती केवळ विद्वानांचीच वस्तू आहे. आचार्यांना विद्वानांचे समाधान करून त्यांना आपल्या मताकडे वळवायचे होते, त्याबरोबरच अद्वैत वेदान्त सामान्य व्युत्पन्न लोकांनाही सुगम करायचा होता. त्यासाठीच त्यांनी प्रकरणग्रंथ रचण्याचे परिश्रम घेतले. त्यांतील काही महत्त्वाचे प्रकरणग्रंथ असे–

(१) अद्वैत पंचरत्न – यात फक्त ५ श्लोक असून, प्रत्येक श्लोकाच्या अंती 'शिवोऽहम्' असे शब्द आहेत.

(२) अद्वैतानुभूती – यात ८४ श्लोक असून, अद्वैत तत्त्वाचे विवरण आहे.

(३) अनात्मश्रीविगर्हण – आत्मतत्त्वाचा साक्षात्कार करून न घेता किंवा त्या मार्गालाही न जाता केवळ विषयसुखात लोळणाऱ्या लोकांची यात निर्भर्त्सना केली आहे.

(४) उपदेशसाहस्री – या नावाचे दोन ग्रंथ आहेत. एक गद्य आणि दुसरा पद्यमय आहे. पद्यमय प्रबंधात वेदान्तातल्या नाना विषयांवर १३ प्रकरणे आहेत.

(५) धन्याष्टक – यात ब्रह्मज्ञानाने धन्य झालेल्या पुरुषांच्या दृष्टीचे रमणीय वर्णन आहे. त्यातील एक श्लोक असा–

**सम्पूर्णं जगदेव नन्दनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमाः ।**
**गाङ्गं वारि समस्तवारिनिवहः पुण्याः समस्ताः क्रियाः ।**
**वाचः प्राकृतसंस्कृताः श्रुतिगिरो वाराणसी मेदिनी ।**
**सर्वावस्थितिरस्य वस्तुविषया दृष्टे परे ब्रह्मणि ॥**

अर्थ – एकदा परब्रह्माचा साक्षात्कार झाला, की त्याच्या वाट्याला संपूर्ण जग हे नंदनवन, सर्व वृक्ष हे कल्पवृक्ष, सगळीकडचे जलसंचय हे गंगोदक, सर्व क्रिया या पुण्यकारक, सर्व प्राकृत संस्कृत वाणी हे श्रुतिविवेचन आणि सर्व पृथ्वी ही वाराणसी वाटते. सर्व वस्तूंत आपणच भरून राहिलो आहो, असा अनुभव घडतो.

(६) विवेकचूडामणी – अद्वैतप्रतिपादक एक व्यापक ग्रंथ. या ग्रंथात लहानमोठे ५८१ श्लोक आहेत. यात नाना सुंदर दृष्टान्तांनी वेदान्ततत्त्वे उलगडून दाखवली आहेत. या ग्रंथाची भाषाशैली प्रसन्न आहे.

शंकराचार्य व बौद्ध मत – शंकराचार्यांना काही विद्वान प्रच्छन्न बौद्ध मानतात आणि त्यासाठी पद्मपुराणातल्या पुढील श्लोकाचा आधार घेतात–

**मायावादमसच्छास्त्रं प्रच्छन्नं बौद्धमुच्यते ।**
**मयैव कथितं देवि कलौ ब्राह्मणरूपिणा ।।**

अर्थ – मायावाद हे असच्छास्त्र आहे. ते तत्त्वज्ञान हे झाकलेले बौद्ध तत्त्वज्ञानच होय. ते मीच कलियुगात ब्राह्मणरूप घेऊन (शंकराचार्यांच्या रूपाने) प्रवर्तित केले.

वरील श्लोकाच्या आधारे काही विद्वान मायावाद म्हणजे बौद्ध दर्शनाचे उपनिषदांच्या आधारे केलेले संस्करण, असे समजतात. विज्ञानभिक्षूने आपल्या सांख्यप्रवचनभाष्यभूमिकेत वरील श्लोक उद्धृत करून आचार्यांना प्रच्छन्न बौद्ध ठरवले आहे. आचार्यांच्या उत्तर काली झालेले द्वैती आचार्यही मायावाद्यांना

बौद्धदर्शनातल्या सिद्धान्तांचा एक नवा आविष्कार समजून त्याची निंदा करतात. अलिकडील महापंडित राहुल सांकृत्यायन यांचे प्रतिपादनही तसेच आहे. ते आपल्या दर्शनदिग्दर्शन या ग्रंथात लिहितात—

'शंकर ब्रह्मवाद मानतात आणि उपनिषदांतल्या अध्यात्म-ज्ञानाला सर्वाधिक प्राधान्य देतात. पण सूक्ष्मपणे पाहिल्यास शंकराचार्यांचा मायावाद नागार्जुनाच्या शून्यवादाचे केवळ नामांतर आहे. या मायावादाची आधारशिला बसवणारे गौडपाद बुद्ध व नागार्जुन यांच्या दर्शनाचे अनुयायी होते. शंकराचार्यांचा सर्वांत मोठा अनुयायी म्हणजे श्रीहर्ष होय. त्याचा खंडनखंडखाद्य हा ग्रंथ काही मामुली गोष्टी वगळल्यास माध्यमिक दर्शनाचा म्हणजे शून्यवादाचाच ग्रंथ आहे, असे म्हणता येईल.

पण दुसरे एक दार्शनिक विद्वान प्रा. बलदेव उपाध्याय यांनी वरील मताचा परामर्श घेतला आहे, तोही विचारणीय आहे. या बाबतीत त्यांनी जे तर्कसंगत विवेचन केले आहे, त्याचा सारांश असा—

शंकराचार्यांनी आपल्या भाष्यग्रंथांतून अद्वैताचे प्रतिपादन केले आहे, हे सर्वविश्रुत आहे. पण हा अद्वैतवाद आचार्यांनी निर्माण केलेला नसून, तो फार प्राचीन आहे. अद्वैताचे प्रतिपादन केवळ उपनिषदांतच नव्हे; तर त्याही पूर्वी वेदांच्या संहिताग्रंथातही आढळते. अद्वैतवाद ही वैदिक ऋषींनी आध्यात्मिक जगाला दिलेली महत्त्वपूर्ण देणगी आहे. आचार्यांनी या पूर्वसूरींना अनुसरूनच अद्वैताची मांडणी केली आहे.

अद्वैताच्या सिद्धीसाठी आचार्यांनी मायावादाचा स्वीकार केला व त्याच्या आधारे जगताचे काल्पनिक रूप प्रमाणित केले. हा मायावादही आचार्यांना त्यांचे आजेगुरू गौडपाद यांच्याकडून मिळाला आहे. त्यांनी मांडूक्यकारिकांमध्ये मायावादाच्या आधारेच अद्वैत सिद्ध केले आहे. शंकराची गुरुपरंपरा नारायणापासून सुरू होते आणि या नारायणानेच प्रथम मायावादाचा उपदेश केला आहे. आचार्यांनी फक्त त्याचा सर्वांगीण विकास केला. हे सर्व विचारात घेता शंकराचार्यांना मायावादाचे प्रवर्तक समजणे चूक आहे.

शंकराचार्य प्रच्छन्न बौद्ध नाहीत, हे खुद्द बौद्धांच्या दृष्टीनेही सिद्ध होऊ शकते. बौद्ध दार्शनिकांनी शांकरमताचे खंडन करताना, ते तत्त्वज्ञानाच्या बाबतीत बौद्धांचे ऋणी होते, असे कुठेही म्हटलेले नाही. आचार्य जर प्रच्छन्न बौद्ध असते आणि बौद्धांचा शून्यवादच मायावादाच्या नावाखाली प्रचारीत असते, तर बौद्धांनी त्यांच्यावर टीका केली नसती. पण तसे झाले नाही. शांतरक्षितासारखा प्रकांड बौद्ध दार्शनिक तर आचार्यांच्या मतावर तुटून पडला आहे.

आचार्य विज्ञानरूप ब्रह्म एक, स्वगत, सजातीय आणि विजातीय भेदांनी रहित मानतात. पण विज्ञानवादी बौद्ध विज्ञानाचे नानात्व सांगतात. त्यांच्या दृष्टीने विज्ञान हे सजातीय भेदाने रहित नाही. ब्रह्म नित्य पदार्थ आहे, तर विज्ञान क्षणिक आहे. एवढा स्पष्ट भेद असल्यानंतर आचार्यांचा ब्रह्माद्वैतवाद हे विज्ञानाद्वयवादाचे रूपांतर आहे, असे कसे म्हणता येईल?

योगाचारी विज्ञानाची सत्ता तरी मानतात. पण शून्यवादी माध्यमिक विज्ञानाचाही अभावच मानतात. त्यांच्या मते केवळ शून्य हेच एकमात्र तत्त्व आहे. शून्यवादी शून्याला सत्, असत्, सदसत् आणि सदसदनुभय म्हणजे 'चतुष्कोटिविनिर्मुक्त' समजतात. त्यांचे ते शून्य ज्ञानरूपही नाही. पण शंकराचार्यांचे ब्रह्म सत्स्वरूप आणि ज्ञानस्वरूप आहे. अद्वैतमतात नित्य विज्ञान हे पारमार्थिक आहे. बौद्धमतात सर्व काही अनिर्वचनीय आहे; पण अद्वैतमतात विज्ञानाव्यतिरिक्त हे विश्व सत् आणि असत् या दोहोंहून अनिर्वचनीय आहे. बौद्ध आणि आचार्य यांच्या तत्त्वज्ञानात एवढा भेद असता, एखाद्याने शंकराचार्यांना प्रच्छन्न बौद्ध म्हणावे हे साहस होय.

**आचार्यांचे तत्त्वज्ञान** – आचार्यांनी जो अद्वैत सिद्धान्त प्रस्थापित केला, त्याचा मूलमंत्र असा–

**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः।**

अर्थ – (१) ब्रह्म हेच सत्य म्हणजे अंतिम तत्त्व आहे. (२) जगत् मिथ्या म्हणजे भ्रमात्मक आहे. (३) जीव हा ब्रह्मच आहे व (४) जीव ब्रह्माहून कोणत्याही प्रकारे भिन्न नाही.

हे चार सिद्धान्त म्हणजे अद्वैतवादाची आधारशिला आहे. (अद्वैतदर्शन पाहा).

**आचार्यांचे अलौकिकत्व** – आचार्यांचे मानवजीवन अनेक असामान्य गुणांनी समृद्ध होते. त्यांच्या संपर्कात ज्या ज्या व्यक्ती आल्या, त्या सर्वांशी त्यांचे संबंध अविच्छिन्न राहिले. आचार्यांची मातृभक्ती उत्कट होती. शिष्यांवर त्यांचे अपार प्रेम होते. आपल्या प्रतिस्पर्ध्यांविषयी त्यांच्या मनात क्षमाशीलता होती. त्यांची मानसिक शक्ती अपूर्व होती. त्यांची धारणाशक्ती अत्यंत तीव्र होती. त्यांचे हृदय भावकोमल होते.

काही लोक त्यांच्या मायावादाचा वरवर विचार करून त्यांनी देशात अकर्मण्यता फैलावली आणि मानवी जीवनातली महत्त्वाकांक्षाच खुडून टाकली, असा त्यांच्यावर आरोप करतात. पण तो किती खोटा आहे, ते त्यांच्याच चरित्रावरून कळून येते. ते कधीही स्वस्थ बसले नाहीत. त्यांनी प्रचंड ग्रंथरचना तर केलीच; शिवाय देशाच्या कोनाकोपऱ्यात संचार करून वैदिक धर्माची ध्वजा उंच उभविली. आलस्य, सुखासीनता, अकर्मण्यता,

हे दोष त्यांनी आपल्या जीवनाला कधीही स्पर्शू दिले नाहीत.

आचार्यांनी पांडित्य आणि तर्क यांच्या बळावर विरोधी मतवाद्यांचे फड मोडून काढले. हे विरोधी मतवाले लोक भारताच्या पुण्यक्षेत्रांमध्ये आपापले आखाडे स्थापून बसले होते. आचार्यांनी त्यांना तिथून हटवले आणि सगळी तीर्थक्षेत्रे वैदिक धर्माच्या कक्षेत आणली. ज्या वैदिक धर्माची त्यांनी पुनःप्रतिष्ठा केली, तो वैदिक धर्म पुढेही देशात जिता-जागता राहायला हवा होता. त्या कामी सतत आणि शास्त्रशुद्ध प्रचाराची गरज होती. त्या कार्यासाठी त्यांनी भारताच्या चारही दिशांना चार धर्मपीठे तर स्थापलीच; शिवाय धर्मजागृती कायम ठेवण्यासाठी यतींचा एक संघही स्थापन केला.

आचार्यांच्या हृदयात पांडित्य आणि कवित्व यांचा मनोज्ञ संगम होता. तर्काच्या कुठाराने प्रतिपक्षाच्या सिद्धान्तांवर कठोर प्रहार करणारे आचार्य भावभूमीवर गेले, की एकदम कुसुमकोमल होतात, ईश्वराला भक्तिभावे शरण जातात, त्याची करुणा भाकतात. अशा वेळी त्यांच्या कवित्वाला विलक्षण आर्द्रता येते. आचार्यांची स्तोत्रे मनोभिराम झाली आहेत, ती याच भावकोमलतेमुळे. शब्दसौष्ठव, श्लेषादी अलंकार आणि प्रेमरस या गुणांमुळे ही सारी स्तोत्रे रसिकांना आणि पंडितांनाही आस्वाद्य ठरली आहेत. आचार्यांची कविता ही संस्कृत साहित्याला मिळालेली अमोल देणगी आहे. ते तर आत्मबोधाने संसारभयापासून केव्हाच मुक्त झाले होते; पण तरीही भक्तीच्या भूमिकेवर आल्यावर ते श्रीहरीला कळवळून प्रार्थितात –

**अविनय मपनय विष्णो दमय मनः शमय विषयमृगतृष्णाम्।**
**भूतदयां विस्तारय तारय संसारसागरतः ॥**

अर्थ – हे विष्णो, माझ्यातले औद्धत्य दूर कर, माझ्या मनाचे दमन कर, माझी विषयमृगतृष्णा शांत कर, माझ्या ठिकाणी भूतदयेचा विस्तार कर आणि मला संसारसागरातून पैलपार ने.

पार्वतीला अपर्णा असे एक नाव आहे. त्या शब्दावर श्लेष साधून आचार्य एक भावमधुर कल्पना व्यक्त करतात –

**सपर्णामाकीर्णां कतिपयगुणैः सादरमिह**
**श्रयन्त्यन्ये वल्लिं मम तु मतिरेवं विलसति ।**
**अपर्णैका सेव्या जगति सकलैर्यत्परिवृतः**
**पुराणोऽपि स्थाणुः फलति किल कैवल्यपदवीम् ॥**

अर्थ – सर्व लोक सपर्णा (पत्रयुक्त) व अनेक गुणयुक्त अशा वल्लीचा आदराने आश्रय करतात, (कारण त्यांना तिचे मधुर फल हवे असते). पण माझ्या बाबतीत म्हणाल तर मला अपर्णा (पर्णरहित, पक्षी पार्वती) हीच सेव्य आहे. कारण तिचा चमत्कार असा आहे, की अपर्णा ज्या स्थाणूला (सुकलेल्या खोडाला, पक्षी शंकराला) वेष्टून राहते, तो पुरातन असूनही कैवल्य पदवीने फलित होतो. म्हणजे ही अपर्णा स्वतः तर फल देतेच; शिवाय त्या जुनाट स्थाणूला (शंकराला) ही फलित करते.

शंकराचार्य हे तंत्र-मंत्रशास्त्राचे मर्मज्ञ विद्वान होते. त्यांची त्रिपुरसुंदरीची उपासना ही तांत्रिक होती. त्यांनी आपल्या मठांमध्ये त्रिपुरसुंदरीची तांत्रिक पूजापद्धती सुरू केली. ती परंपरा आजही प्रचलित आहे. ते आत्मज्ञानी असूनही कर्मप्रवण होते, ज्ञानाचे उपासक असूनही उपासनेचे समर्थक होते. वर्णाश्रमधर्माची मर्यादा अक्षुण्ण राहावी, वैदिक धर्माचा ध्वज सतत फडकत राहावा, यासाठी त्यांचा हा सगळा साक्षेप होता. आचार्यांनी ज्या वृक्षाचे बीजारोपण केले, तो वृक्ष वाढला-विस्तारला. त्यांचा उद्देश सिद्ध झाला. आज या भारतभूमीत वेदांविषयी जी श्रद्धा व ज्ञानाविषयी जो काही आदर दिसतो, त्याचे बरेचसे श्रेय आचार्यांनाच द्यावे लागेल. भारतीय जनता आचार्यांना शंकराचा अवतार मानून त्यांच्यापुढे नतमस्तक होते. त्यांचे विरोधकही त्यांचे उदात्त चरित्र आणि शुद्ध सात्त्विक जीवन पाहून त्यांचा आदर करतात. भारतात आजही द्वैत, विशिष्टाद्वैत, शक्तिविशिष्टाद्वैत, इ. संप्रदाय प्रचलित आहेत. त्यांचा अनुयायीवर्गही बराच आहे. पण भारतातली बहुसंख्य जनता आचार्यांचे अद्वैतच शिरोधार्य मानते. भारतात आजही आचार्यांच्या अद्वैताचाच प्रकाश सर्वत्र भरून राहिला आहे.

आचार्यांनी हे एवढे प्रचंड आणि महनीय कार्य वयाच्या अवघ्या बत्तीस वर्षांत पुरे केले, हे तर जगातले एक महदाश्चर्य होय. [ श्रीशंकराचार्य – श्री. बलदेव उपाध्याय, १९[illegible]; सौंदर्यलहरी – श्री. ह. बा. भिडे, १९६१; आद्य श्रीशंकराचार्य – श्री. रा. गो. कोलंगडे, १९६९; सु. स्तो. सं. ]

**शंकरानंद** (१) (इ. स. चे ११ वे शतक) एक बौद्धानुयायी तर्कशास्त्रज्ञ. हा काश्मीरी ब्राह्मण होता. याने धर्मकीर्तीच्या प्रमाणवार्तिकावर आणि संबंधपरीक्षा नामक ग्रंथावर टीका लिहिली आहे. अपोहसिद्धी व प्रतिबंधसिद्धी हे त्याचे अन्य ग्रंथ होत. शंकरानंदाच्या सर्व ग्रंथांची तिबेटी भाषांतरे झाली आहेत. [भ. च. को.]

(२) (इ. स. चे १४ वे शतक) एक अद्वैती आचार्य. विद्यारण्यस्वामीचा गुरू होय. विद्यारण्याने पंचदशीच्या प्रारंभी त्याला गुरू म्हणून नमनही केले आहे. त्याने अद्वैताच्या प्रचारासाठी प्रस्थानत्रयीवर टीका लिहिली आहे. त्याची सर्व टीका शांकरमतानुसार, पण साध्या व सोप्या भाषेत आहे. त्याच्या ग्रंथांवरून तो मोठा पंडित असावा, असे सर्व अभ्यासक म्हणतात. याशिवाय त्याचा आत्मपुराण नावाचा आणखी एक ग्रंथ आहे. हा ग्रंथ म्हणजे सर्वोपनिषदांचे सार होय. त्याचे सर्व [illegible]

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने श्रेष्ठ आहेत. [ हिंदुत्व.; श्रीशंकराचार्य ]

(३) (इ. स. चे १८ वे शतक) एक धर्मशास्त्रकार व मीमांसक. याचे पूर्वाश्रमीचे नाव बाळकृष्णभट्ट असे होते. संन्यासग्रहणानंतर तो शंकरानंद या नावाने परिचित झाला. हा काशीला राहत होता. खंडदेव त्याचे गुरू होत. शंकरानंदाने खंडदेवाच्या भाट्टदीपिका नावाच्या मीमांसा ग्रंथावर प्रभावली नावाची टीका रचली. धर्मशास्त्राशी संबंधित असलेले त्याचे अन्य ग्रंथ –कालतत्त्वविवेचनसारसंग्रह, त्रिंशच्छ्लोकीनिर्णयसारोद्धार व पातयज्ञप्रयोग. याशिवाय त्याने तंत्रशास्त्रावर सुंदरीमहोदय नावाचा एक अपूर्व ग्रंथ लिहिला आहे. [ का. सा. सा. ]

**शंकरार्कव्रत** एक तिथिव्रत. रविवारी येणाऱ्या अष्टमीला हे व्रत करायचे असते. शंकराचा उजवा नेत्र असलेल्या सूर्याची पूजा हा या व्रताचा प्रधान विधी होय. एका अर्धचंद्राकार आकृतीत केशर व रक्तचंदन या द्रव्यांनी वर्तुळ काढतात व त्यात सोन्यात मढविलेले एक माणिक ठेवतात. हे माणिक म्हणजेच शिवाचा नेत्र असून, तो नेत्र हीच या व्रताची देवता आहे. माणिक उपलब्ध नसेल, तर सोने चालते. [ हि. ध. ]

**शंख** विष्णूच्या हातातील एक आयुध आणि देवपूजेतील एक महत्त्वाचे उपकरण. देवी भागवतात याच्या निर्मितीची कथा पुढीलप्रमाणे सांगितली आहे– शंखचूड नामक दैत्याचा



देवपूजेतला शंख

तुलसीबरोबर गांधर्व पद्धतीने विवाह झाला. पुढे तो दैत्य फार मातला. त्याने देवराज्यावर स्वारी केली. देव पराभूत झाले. सर्व देवांनी मिळून शिवापुढे आपली असहाय्यता प्रकट केली. शंकर शंखचूडाच्या पारिपत्यासाठी निघाला. त्या दोघांचे तुंबळ



युद्ध झाले, पण दैत्य मरण्याचे चिन्ह दिसेना. कारण त्याची पत्नी महापतिव्रता होती, म्हणून तो सर्वांना अवध्य ठरला होता. विष्णूने शंखचूडाचे रूप धारण करून तुलसीच्या पातिव्रत्याचा भंग केला. मग शंखचूड मरण पावला आणि त्याच्या



समुद्रकिनारी मिळालेला शंख – रामेश्वर

अस्थींचे विविध शंख बनले. विष्णूचे कपटकारस्थान ध्यानी आल्यावर तुलसीने त्याला 'तू पाषाण बनशील' असा शाप दिला. त्यावर विष्णू तिला म्हणाला. 'मी गंडकीकाठचा पाषाण होईन आणि तुझा पती शंखरूपाने माझ्या पूजेत समाविष्ट होईल. (तुलसी पाहा.)

देवपूजेत कलशपूजेनंतर पुढील मंत्र म्हणून शंखपूजा करतात आणि त्याला गंध-फूल व तुळशीपत्र वाहतात. मग शंखोदक फुलाने आपल्या अंगावर व पूजासाहित्यावर शिंपडतात. त्या वेळी म्हणायचे श्लोक असे –

> शङ्खादौ चन्द्रदैवत्यं कुक्षौ वरुणदेवता ।
> पृष्ठे प्रजापतिश्चैव अग्रे गङ्गा सरस्वती ।।
> त्वं पुरा सागरोत्पन्नो विष्णुना विधृतः करे ।
> अग्रतः सर्वदेवानां पाञ्चजन्य नमोऽस्तु ते ।।

अर्थ – शंखाच्या मूलभागी चंद्र, कुक्षीत वरुण, पृष्ठभागी प्रजापती आणि अग्रभागी गंगा-सरस्वती वास करतात. हे पांचजन्य नावाच्या शंखा, पूर्वी तू सागरात उत्पन्न झालास. विष्णूने तुला हातात धारण केले. सर्व देवांच्या अग्रभागी तुझे वास्तव्य असते. म्हणून माझा तुला नमस्कार असो.

काही ठिकाणी पुढील मंत्र म्हणण्याचा परिपाठ आहे–

> पाञ्चजन्याय विद्महे पावमानाय धीमही ।
> तं नः शङ्खः प्रचोदयात् ।।

या वेळी शंखमुद्राही करतात. शिव व सूर्य यांच्या अभिषेकाच्या वेळी मात्र शंखाचा उपयोग करीत नाहीत. अन्य सर्व देवांना शंखोदक प्रिय असते.

शंखध्वनी केल्याविना देवद्वार उघडू नये, असे वराह पुराणात म्हटले आहे. या नियमाचे जो उल्लंघन करील तो जन्मजन्मांतरीचा बहिरा होईल, अशी भविष्यवाणी तिथे वर्तविली आहे. मंदिरात शंखघोष करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो, असे बृहन्नारदीय पुराणात सांगितले आहे.

देवपूजेप्रमाणेच राजाज्ञा घोषित करण्यासाठी प्राचीन काली शंख वाजवीत असत. राक्षसांनी हनुमंताला पकडल्यावर त्याला रावणाने जी शिक्षा केली, ती शंखघोषानेच जाहीर करण्यात आली (वा. रा. सुंदर. ५३.१७).

शंख हे एक समरवाद्यही आहे. स्वसैनिकांना स्फूर्ती येऊन त्यांचे बाहू स्फुरण पावावे आणि शत्रुसैन्याच्या हृदयात धडकी भरावी, या उद्देशांनी हे वाद्य वाजविले जात असे. युद्धाच्या प्रारंभी आणि युद्ध संपल्यावरही ते वाजविण्याची पद्धत होती.



अमरावती येथील प्राचीन शिल्पातील शंख

भारतीय युद्धाला प्रारंभ होण्यापूर्वी भीष्मांनी आपला शंख वाजविला होता. त्यापाठोपाठ कृष्ण व अर्जुन यांनीही आपापले शंख फुंकल्याचे वर्णन आढळते (म. भा. भीष्म. २५). प्रत्येक प्रसिद्ध योद्धा आपल्या शंखाला विशिष्ट नाव देत असे. महाभारतात सांगितलेली काही प्रसिद्ध शंखांची व त्यांच्या धारणकर्त्यांची नावे अशी –

**पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनञ्जयः ।**
**पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः ॥**
**अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।**
**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥**

अर्थ – श्रीकृष्णाने पांचजन्य, अर्जुनाने देवदत्त, भयंकर कर्म करणाऱ्या वृकोदराने (भीमाने) पौंड्र, कुंतीपुत्र युधिष्ठिराने अनंतविजय आणि नकुल व सहदेव यांनी सुघोष व मणिपुष्पक हे शंख वाजविले (म. भा. भीष्म. २५.१५-१६).

भारतीय शिल्पशास्त्रात शंखाचा प्राणिज रत्नांत समावेश केला आहे. हे शंख समुद्रात सापडतात. बिंब्याच्या रंगाचा किंवा चंद्रासारखा पांढरट पिवळसर शंख चांगला असे म्हणतात. त्याशिवाय बारीक तोंडाचे, फुगीर आकाराचे व स्निग्ध शंख मौल्यवान मानले जातात.



अलंकरणातील शंख

शंखाचे वामावर्त व दक्षिणावर्त असे दोन प्रकार आहेत. त्याच्या अंगावर असणाऱ्या पिळांवरून हे प्रकार ठरविले जातात. पिळाच्या रेषा अपुऱ्या असतील, तर त्या सोन्याने पुऱ्या कराव्या म्हणजे त्याचा दोष नष्ट होतो, अशी समजूत आहे. शंख, विशेषेकरून दक्षिणावर्त शंख, दुर्मिळ असतात. म्हणून अलिकडे तसले नकली शंखही तयार होऊ लागले आहेत. भारतात, प्राधान्याने रामेश्वर येथे अशा प्रकारचे शंख विपुल प्रमाणात मिळतात. शंख न फुंकताच कानाशी लावला तर त्यातून एक प्रकारचा मधुर नाद येतो, ही त्याच्या खरेपणाची परीक्षा म्हणून सांगतात.

चंद्राला प्रसन्न करण्यासाठी शंखाचे दान द्यावे, असे मत्स्य पुराणात म्हटले आहे (५७.२१; ९२.६०).

वैद्यकशास्त्रात शंखाला खूप महत्त्व आहे. त्याचे ते महत्त्व स्पष्ट करून सांगणारे एक स्वतंत्र सूक्तही अथर्ववेदात आहे (४.१०). त्याशिवाय आयुर्वेदीय ग्रंथांतही त्याचे विशेष गुणधर्म सांगितलेले आहेत.

वंगालमध्ये शंखाला फार पवित्र मानले जाते. प्रत्येक मंगल कार्यात तिथे शंखनाद केला जातो. शंखांपासून उत्तम प्रकारच्या बांगड्या तयार करतात. त्यांवर सुंदर कोरीव कामही करतात. हे काम करणारे लोक शंखकार या नावाने ओळखले जातात. ही जातही फार प्राचीन आहे.

**शंखद्वीप** प्राचीन भारतवर्षाजवळचे एक द्वीप. वायुपुराणात (अ. ४८) याचे वर्णन दिले आहे, ते असे: या द्वीपाचा विस्तार शंभर योजने आहे. या प्रदेशात म्लेच्छांची अनेक गणराज्ये आहेत. तसेच, यात रानटी लोकांचीही वस्ती आहे. यातील शंखगिरी पवित्र असून, त्याचा आकार शंखासारखा आहे. त्याच्यावर पुष्कळ रत्ने सापडतात. या द्वीपात शंखनाग या पवित्र नदीच्या तीरावर शंखमुख नामक नाग राजाचा आश्रम आहे.

अरबी भूगोलवेत्त्यांच्या मते आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील ॲबिसिनिया ते मादागास्करपर्यंतच्या प्रदेशाला किंवा त्याच्या काही भागाला शंखद्वीप असे म्हणत.

शंखद्वीप म्हणजे शंखांचे बेट. स्ट्रॅबोच्या मते इथले लोक शंखांच्या माळा गळयात घालीत असत. पण काही पुराणकारांचे म्हणणे आहे, की इथले लोक शंखासारख्या पोकळ गुहांत राहत असत. शंखासुर हा शंखात राहत होता व श्रीकृष्णाने त्याचा वध केला, अशी कथा आहे. शंखमुख या नागराजाला एक मानवासारखा व दुसरा नागासारखा असे दोन चेहरे होते. या नागाचे फूत्कार अत्यंत जहरी व उष्ण होते. त्यांनी तो शंभर योजनांपर्यंतच्या प्रदेशातील सर्व वृक्षवनस्पती व प्राणी नष्ट करून टाकीत असे. या प्रदेशातील हुबाव या पर्वतराजीवरून वाहणाऱ्या अतिशय उष्ण वाऱ्यांचा निर्देश या फूत्कारांनी केला आहे, असे जाणकारांचे मत आहे.

शंखद्वीपाचा विस्तार शंभर योजने सांगितलेला आहे. त्यावरून पुराणांतील शंखद्वीप म्हणजे मादागास्कर बेट किंवा त्या बेटाजवळचा आफ्रिकेच्या किनारपट्टीवरील थोडा प्रदेश किंवा हे दोन्ही भाग असावे. [ जॉ. पु. ]

**शंखपुरुष** विष्णूच्या शंख या आयुधाची मानवी मूर्ती. बंगालमधील सरिसदह गावी विष्णूची चतुर्भुज मूर्ती आहे. त्या मूर्तीजवळ शंखपुरुषाची मूर्ती आहे. विष्णूचे मागचे दोन हात गदादेवी व चक्रपुरुष यांच्यावर ठेवलेले आहेत. शंखपुरुष व पद्मपुरुष एका कोपऱ्यात आहेत. शंखपुरुषाचा उजवा हात व्याख्यान मुद्रा दर्शवीत असून, त्याच्या डाव्या हातात एक कमळ आहे. कमळावर शंख आहे. पद्मपुरुषाच्या उजव्या हाताची अभय मुद्रा आहे आणि डाव्या हातात एक कमळ आहे. याशिवाय देवगडच्या अनंतशयन शिल्पात या आयुधपुरुषांच्या मूर्ती आहेत. पाहा – आयुधपुरुष, चक्रपेरुमल. [ डे. हिं. इ. ]

**शंखमुद्रा** विष्णूची एक आवडती मुद्रा. त्याच्या पूजेतील शंखपूजेनंतर ही मुद्रा करून त्याला दाखवतात. हिची कृती पुढीलप्रमाणे आहे–

डाव्या हाताचा आंगठा उजव्या हाताच्या मुठीने घट्ट धरून मूठ उताणी करावी आणि उजव्या हाताचा आंगठा ताठ करावा. डाव्या हाताची बोटे एकमेकास घट्ट चिकटवून, ताठ करून, उजव्या हाताच्या बोटांच्या मागील बाजूला स्पर्श करून उजव्या हाताच्या आंगठ्यास तर्जनीचे अग्र जोडावे. अशा प्रकारे दोन्ही हातांच्या बोटांची जी रचना होते, ती शंखासारखी दिसते, म्हणून तिला शंखमुद्रा असे म्हणतात. [ आचारेन्दुः ]

**शंख यामायन** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील पंधरावे सूक्त याने रचले आहे. पितर ही या सूक्ताची देवता असून, त्यात यम व मृताचा आत्मा यांना आवाहन केलेले आहे. स्मशानात केल्या जाणाऱ्या और्ध्वदेहिक विधीत हे आणि या पुढचे दमन यामायन विरचित सूक्त (१०.१६) पठण करतात. याची एक ऋचा अशी–

**ये सत्यासो हविरदो हविष्पा इन्द्रेण देवैः सरथं दधानाः ।**
**आग्ने याहि सहस्रं देववन्दैः परैः पूर्वैः पितृभिर्घर्मसद्भिः ॥**
(ऋ. १०.१५.१०)

अर्थ– यज्ञभक्तांनी सहस्रावधी स्तोत्रांनी स्तविलेल्या हे अग्निदेवा, इंद्ररथारूढ, हविर्भक्षक आणि सोम पिणाऱ्या पितरांसमवेत तू ये.

प्रस्तुत सूक्तातील ११ व्या आणि १४ व्या ऋचेवरून त्या काळी मृताचे दहन करीत असल्याचे कळते.

या सूक्ताची देवता पितर असल्याने, त्याचा निर्देश राक्षोघ्नसूक्त म्हणून करू नये, असे म. म. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचे मत आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**शंखलिखितधर्मसूत्र** शंख आणि लिखित या दोघा बंधूंनी लिहिलेले धर्मसूत्र. पूर्वी वाजसनेयी ब्राह्मण या धर्मसूत्राचा विशेष अभ्यास करीत असत. द्वापर युगात धर्मनिर्णयासाठी शंखलिखितांचे धर्मसूत्र प्रमाणभूत मानावे, असे पराशरस्मृतीत सांगितले आहे.

गौतमाच्या किंवा आपस्तंबाच्या धर्मसूत्रांत जे विषय आलेले आहेत, तेच बहुतेक सर्व या धर्मसूत्रात आहेत. यात नियोगाला परवानगी दिलेली आहे. बारा प्रकारच्या गौण पुत्रांचा उल्लेख यात केलेला आहे. तसेच, यात अनेक प्रकारची दिव्ये, मिळकतीचे वाटप, वारसा हक्क, आर्यावर्ताच्या मर्यादा, इ. विषय तपशीलवार दिले आहेत. स्त्रियांना वारसा हक्क मिळावा, हे मत या सूत्रकारांना मान्य नाही. प्रजापती, आंगिरस, उशनस, प्राचेतस, वृद्ध गौतम, इ. धर्मशास्त्रकारांची मते यात नावासह दिली आहेत.

या धर्मसूत्रावर एक भाष्यही आहे. सनपूर्व ३०० ते इ. स. १०० या दरम्यान या धर्मसूत्राची रचना झाली असावी. [ हि. ध. ]

**शंखस्मृती** शंखलिखित एक स्मृती. हिच्यात पुढील विषय आहेत – चारही वर्णांची कर्मे, निषेकादी संस्कारांचा काल, यज्ञोपवीत धारण केल्यावर ब्रह्मचाऱ्याने पालन करायचे नियम; ब्राह्म, इ. आठ प्रकारच्या विवाहांचे निरूपण, पाच हत्यांच्या दोषांच्या निवृत्तीसाठी पंच महायज्ञांचे कथन, अग्निसेवा व अतिथिपूजा ही गृहस्थाश्रमाची कर्तव्ये, वानप्रस्था-

श्रमाच्या धर्माचे निरूपण, संन्यासाश्रमाचे निरूपण, अष्टांग योग व ध्यानयोग यांचे विवरण, नित्य-नैमित्तिक भेदाने षड्विध स्नान-प्रकार, श्राद्धाला योग्य काल, आशौचशुद्धी, इत्यादी. [ हिंदुत्व ]

**शंखासुर नृत्य** महाराष्ट्रातील एक लोकनृत्य. ब्रह्मदेव तप करीत असता शंखासुर वेद चोरून नेतो, या घटनेशी या नृत्याचा संबंध लावतात. कुठे या नृत्याचा एकपात्री प्रयोग होतो; तर कुठे या नाचाबरोबर राधानृत्यही सादर केले जाते. नृत्य करणारा पुरुष शंखाच्या आकाराशी मिळता-जुळता शंखासुराचा मुखवटा धारण करतो. मग तो कधी उंच उडचा मारतो, तर कधी मोठमोठ्याने ओरडतो. त्याला बिदागी मिळाली की तो शांत होतो आणि नृत्याचा कार्यक्रम आटोपतो. पाहा – दशावतार, शिमगानृत्य. [ भा. लो. नृ. ]

**शंखोद्धार** वैष्णव भक्तांचे एक तीर्थस्थान. हे कच्छच्या आखातातील एक बेट आहे. उद्धव द्वारका सोडून बदरिकाश्रमी गेल्यावर द्वारकेत नाना प्रकारची अनिष्ट चिन्हे दिसू लागली, तेव्हा श्रीकृष्णाने सर्व स्त्रिया, मुले व वृद्ध यांना या बेटावर जाण्याची आज्ञा केली, असा भागवतात उल्लेख आहे (११.३०). इथे धरा नावाने सतीचे वास्तव्य असते. हे एक श्राद्धयोग्य ठिकाण आहे. [ हि. ध.; पु. इं. ]

**शंभुव्रत** एक संवत्सरव्रत. शिव ही या व्रताची देवता होय. दोन हजार पळचा म्हशीच्या तुपाच्या आहुती अग्नीत टाकणे हाच या व्रताचा मुख्य विधी होय. फल -- नंदी-पदप्राप्ती. [ हि. ध. ]

**शंयुवाक** कोणत्याही श्रौतयागामध्ये सूक्तवाकाचे पठण झाल्यावर शंयुवाकसंज्ञक मंत्राचे पठण होते. शंयु-वाकाला निगद असे म्हटले आहे. शं म्हणजे कल्याण. यज-मानाच्या सर्व कुटुंबियांचे आणि त्याच्या पशुधनाचे कल्याण होवो, अशा अर्थाचे वाक्य शंयुवाकामध्ये आहे (तै. ब्रा. ३.५.११). याचे पठण उच्च स्वरात करायचे असते. या वेळी अध्वर्यू अग्नी-वर परिधी देतो. शंयुवाक होत्याने म्हणायचा असतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**शंयू बार्हस्पत्य** एक सूक्तद्रष्टा. हा बृहस्पतीचा ज्येष्ठ पुत्र म्हणून याला बार्हस्पत्य म्हटले असावे. ऋग्वेदाच्या सहाव्या मंडलातील ४४ ते ४६ व ४८ ही चार सूक्ते याने रचली आहेत. त्यांपैकी पहिल्या तीन सूक्तांमध्ये इंद्र-स्तुती हा प्रधान विषय असून, अखेरचे सूक्त पृश्निसूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. ऋग्वेदसर्वानुक्रमणीत या सूक्ताला तृणपाणिक पृश्निसूक्त असे म्हटले आहे. त्यावरून तृणपाणिक हे शंयूचे वैकल्पिक नाव असावे, असे श्री. म. म. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचे मत आहे. प्रस्तुत सूक्तातील 'मा काकम्बीरमुद् वृहो' (ऋ. ६.४८.१७) हा मंत्र श्राद्धविधीत म्हटला जातो. माकबाचा मंत्र या लौकिक नावाने हा मंत्र प्रसिद्ध आहे. याची एक ऋचा अशी (६.४६.११)–

> अध स्मा नो वृधे भवेन्द्र नायमवा युधि ।
> यदन्तरिक्षे पतयन्ति पर्णिनो दिद्यवस्तिग्ममूर्धानः ॥

अर्थ – हे शत्रुतापक, ऐश्वर्यवान आणि बलवान इंद्रा, तुझ्या प्रिय भक्तांना तू खादाड शत्रूंच्या ताब्यात देऊ नकोस. कर्महीन सोमद्वेष्ट्यांचा तू निःपात कर.

शंयुविरचित ४४ व्या सूक्ताच्या अखेरीला 'दशयंत्रयुक्त मानवी देह' या अर्थाचा शब्दप्रयोग आहे. यात पाच ज्ञानेंद्रिये व पाच कर्मेंद्रिये यांचा निर्देश अभिप्रेत असावा. कारण या सूक्ताच्या शेवटी 'चक्षुश्च श्रोत्रं च मनश्च वाक् च' हा मानवी देहाचे स्पष्टीकरण सांगणारा खिलमंत्र आढळतो.

४५ व्या सूक्ताच्या अखेरच्या तीन ऋचांमध्ये बृबू नावाच्या काष्ठकाराची दानस्तुती आहे. काही अभ्यासकांच्या मते बृबू हा पणी जातीचा असून, तो जहाजे बांधण्याचा व्यवसाय करीत होता. त्यापुढच्या सूक्तात, युद्धात मरण आले तर स्वर्गप्राप्ती होते, असा उल्लेख आहे. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को.-हिंदी ]

**श** देवनागरी वर्णमालेतील तिसावा वर्ण. याच्या विकास-क्रमात पाच अवस्था दिसतात. पहिली अशोकाच्या खालशी येथील शिलालेखात, दुसरी कुशाण राजांच्या वेळच्या मथुरा येथील लेखात (इ. स.चे पहिले व दुसरे शतक), तिसरी राजा



श च्या रूपाचा विकासक्रम

यशोधर्मन याच्या काळातील (इ. स. ५३२) मंदसोर येथील लेखात, चौथी जपानमध्ये मिळालेल्या एका (उष्णीषविजय-धारिणी) ताडपत्री ग्रंथात (इ. स. चे ६ वे शतक) व पाचवी अपराजित नावाच्या मेवाडच्या गुहिलवंशी राजाच्या वेळच्या कुंडेश्वर लेखात (इ. स. ६६१) आढळते.

श या अक्षराचे शंकर, सुख, कल्याण, शस्त्र, सत्तर, इत्यादी विविध अर्थ होतात.

कामधेनुतंत्रात याचे रूपवर्णन पुढीलप्रमाणे केले आहे—

शकारं परमेशानि ! शृणु वर्णं शुचिस्मिते ।
रक्तवर्णप्रभाकारं स्वयं परमकुण्डली ॥
चतुर्वर्गप्रदं देवि ! शकारं ब्रह्मविग्रहम् ।
पञ्चदेवमयं वर्णं पञ्चप्राणात्मकं प्रिये ॥
रजःसत्त्वतमोयुक्तं त्रिबिन्दुसहितं सदा ।
त्रिशक्तिसहितं वर्णमात्मादितत्त्वसंयुतम् ॥

अर्थ – हे देवी, शकार हा वर्ण रक्तप्रभ असून, परमकुंडली आहे. तो चतुर्वर्गप्रद, ब्रह्मकाय, पंचदेवमय व पंचप्राणात्मक आहे. तो तीन्ही गुणांनी युक्त असून, त्रिबिंदू व त्रिशक्ती यांनी व आत्मादी तत्त्वांनी युक्त आहे.

तालू हे याचे उच्चारणस्थान आहे. [ म. ज्ञा. को.; श. क.]

## शक लोक

भारतातील काही प्रदेशांवर राज्य करणारे परकीय लोक. हे लोक सिथियन वंशाचे असून, फार प्राचीन काळी मध्य आशियात टोळ्याटोळ्यांनी भटकत असत. कालांतराने त्यांनी अनेक वसाहती केल्या. त्यांतील एक वसाहत सिरदरियाच्या खोऱ्यात होती. सनपूर्व २ ऱ्या शतकात यूएची जमातीच्या लोकांनी त्या वसाहतींवर आक्रमण करून शक लोकांना तिथून हुसकावून लावले. तेव्हा त्यांतले बरेच शक लोक अमुदरिया नदी पार करून काबूलमध्ये शिरले. पण तिथल्या यवन राजांनी त्यांना विरोध केल्यामुळे ते पश्चिमेकडे वळले आणि हेरातमार्गे इराणमध्ये घुसले. पूर्व इराणच्या पह्लव राजांनी त्यांना तीव्र प्रतिकार केला आणि शेवटी त्यांचा पराभव केला.

शक लोक काही काळ पूर्व इराणमध्ये राहिल्यामुळे त्या प्रदेशाला शकस्तान (सीस्तान) हे नाव मिळाले. तिथे त्यांचा पह्लवांशी घनिष्ठ संबंध आला असावा व त्यांच्यांत रक्तसंकरही झाला असावा. त्यानंतर शक लोकांनी पूर्वेकडे स्थलांतर केले आणि बोलन खिंडीतून भारतात प्रवेश करून सिंधूच्या पश्चिम तीरावर वसाहत केली. पुराणांत त्या प्रदेशाला शकद्वीप हे नाव दिलेले आहे. टॉलेमीने त्याला इंडो–सिथिया म्हटले आहे.

रामायण, महाभारत, मनुस्मृती व पुराणे यांत शक लोकांचा यवन व पह्लव लोकांबरोबर उल्लेख आलेला आहे. त्या तीन्ही जमातीचे लोक परदेशातून येऊन भारतात वसले आणि इथल्या समाजात मिसळून गेले. हिंदू समाजाने त्यांना शूद्र वर्णात समाविष्ट केले. मनूने त्यांना पतित क्षत्रिय मानले आहे.

जैन साहित्यात कालकाचार्य सूरीची कथा आहे. त्या कथेत शकांनी उज्जयिनी नगरी कशी जिंकून घेतली, ते सांगितले आहे. सनपूर्व पहिल्या शतकात उज्जयिनी येथे गंधर्व वंशातील गर्दभिल नामक राजा राज्य करीत होता. त्याने कालकाचार्यांची रूपवती भगिनी सरस्वती हिला पकडून आपल्या अंतःपुरात ठेवले. तेव्हा कालकाचार्य क्रुद्ध झाला. त्या वेळी सिंध देशात शक वंशातील साही घराणे राज्य करीत होते. कालकाचार्य तिथे गेला व त्याने शक राजाला मालव देशावर आक्रमण करण्याची प्रेरणा दिली. तेव्हा शकांनी उज्जयिनीवर स्वारी केली व कालकाचार्यांच्या साहाय्याने गर्दभिल राजाचा पराजय करून तिथे आपले राज्य स्थापले.

पण शकांचे राज्य फार काळ तिथे राहिले नाही. कारण गर्दभिल राजाच्या पुत्राने शकांना पराभूत करून आपले राज्य परत जिंकून घेतले. तोच विक्रमादित्य होय. त्या घटनेच्या स्मृत्यर्थ विक्रम संवताचा आरंभ झाला.

शकांनी लवकरच वायव्य सीमा–प्रदेशात आपली सत्ता स्थापली आणि सिंधू नदी ओलांडून मथुरेपर्यंत आक्रमण केले. त्यांनी माळव्यात उज्जयिनी येथे व कच्छ–काठियावाडातही राज्य स्थापले. शक राजे स्वतःला क्षत्रप म्हणत. क्षत्रप म्हणजे राज्यपाल किंवा सामंत होय. मात्र हे शक–क्षत्रप कोणत्या सम्राटाचे राज्यपाल होते, ते माहीत नाही. बहुधा ते स्वतंत्र राजेच होते. त्यांच्यापैकी जे बलाढ्य झाले ते स्वतःला महाक्षत्रप म्हणू लागले. या राजांची पुष्कळ नाणी सापडली आहेत व काही अभिलेखही उपलब्ध आहेत. त्यावरून त्यांच्याविषयी माहिती मिळते ती अशी–

**वायव्य भारत** – सिंधमधून शकांनी पंजाबावर आक्रमण केले आणि राज्य स्थापले. तिथे सर्वप्रथम माओस (किंवा मोग) याने राज्य केले (स. पू. २० ते इ. स. २२). त्याने पूर्व इराणमधील पह्लव राजाचे वर्चस्व झुगारून दिले आणि आपले स्वतंत्र राज्य स्थापले. गंधार व पश्चिम पंजाब या प्रदेशांवर त्याची सत्ता होती. त्याच्या नाण्यांवर राजाधिराज ही पदवी आढळते. त्याने इ. स. १५ पर्यंत मथुरेपर्यंत आपल्या राज्याचा विस्तार केला होता.

माओसनंतर अझेस (१ला) याने राज्य केले (इ. स. २२–३०). तो माओसचा जावई व इराणच्या शहाचा पुत्र असावा. त्याने यवनांचा पराभव करून पूर्व पंजाबही जिंकला. त्याच्या नंतर त्याचा पुत्र अझिलिसेस (इ. स. ३०–४०) याने राज्य केले. त्याचा पुत्र अझेस (२ रा) याने त्यानंतर इ. स. ७९ पर्यंत राज्य केले. त्यानंतर त्या प्रदेशावर पह्लव (पार्थियन) लोकांची सत्ता स्थापन झाली.

माओसच्या वेळी लिअक कुसुलक या नावाचा क्षत्रप तक्षशिलेजवळच्या चुक्ष विभागावर राज्य करीत होता. चुक्ष म्हणजे सध्याचे छछ होय. त्याचा पुत्र पतिक हा तक्षशिलेचा क्षत्रप होता.

तो महादानपती म्हणून प्रसिद्ध होता. त्याने तक्षशिला येथे एक संघाराम स्थापला आणि त्यात शाक्यमुनीच्या देहावशेषांचीही स्थापना केली.

असे आणखीही काही क्षत्रप त्या काळी निरनिराळ्या ठिकाणी राज्य करीत होते.

**मथुरा** – माओस राजाने मथुरेवर सत्ता स्थापली होती. तिथे सापडलेल्या पाषाणाच्या सिंह-शीर्षावर कोरलेल्या लेखात मथुरेच्या शक-क्षत्रप राजांची माहिती मिळते. त्यांतला पहिला राजा राजुल (रंजुवुल) हा प्रथम माओसचा क्षत्रप होता. पण काही कालानंतर तो महाक्षत्रप झाला. त्याच्या काही नाण्यांवर अप्रतिहतचक्रक्षत्रप ही उपाधी आढळते. त्यावरून तो बलाढ्य होता, असे दिसते. त्याची पट्टराणी अयसी ही कंबोज देशातली असून, मोग राजाचा पुत्र खरओस्ट याची कन्या होती. तिने बौद्ध पंथाची दीक्षा घेतली होती आणि मथुरा नगरीत एक संघाराम व एक स्तूप निर्माण करून त्यात बुद्धाचे अवशेष स्थापले होते. त्यासाठी तिचा पुत्र शुडिस (शोंडास) याने भूमी दिली होती. हा संघाराम त्याने सर्वास्तिवादी शाखेच्या भिक्षूंना अर्पण केला होता.

राजुलचा पुत्र शोंडास हा देखील प्रथम क्षत्रप व नंतर महाक्षत्रप झाला. त्यानेही एक गुहाविहार बांधून बौद्ध भिक्षूंना अर्पण केला होता. त्याच्या नाण्यांवर तोरणदास किंवा भरणदास नामक क्षत्रपाचा उल्लेख आहे. त्याची स्वतंत्र नाणीही आहेत. तो शोंडासाचा पुत्र असावा. त्या व्यतिरिक्त हगान, हगामश, शिवघोष, शिवदत्त, इ. क्षत्रपांची नावे नाण्यांवर आणि कोरीव लेखांत आहेत.

या शक–क्षत्रपांच्या राजवटीत मथुरा हे बौद्ध, जैन व भागवत या तीन्ही पंथांचे केंद्र होते. त्यावरून शक राजे धार्मिक बाबतीत उदार होते, असे दिसते. हे मथुरेचे शकराज्य कुशाण वंशातील कनिष्काने नष्ट केले असावे.

**पश्चिम भारत** – सनपूर्व पहिल्या शतकात शक लोकांनी काठेवाड प्रदेशात प्रवेश केला होता. पेरिप्लसमध्ये मंबरुस नामक शक राजाचा उल्लेख आहे. त्याचे राज्य काठियावाड, गुजरात व राजस्थानातील काही भाग एवढ्या प्रदेशावर पसरले होते. इ. स. च्या पहिल्या शतकात शकांनी उत्तर कोकणावरही सत्ता स्थापली असावी. इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अखेरीस कुशाण सम्राट कनिष्क याने मंबरुसच्या घराण्याचा नाश करून, त्याचे राज्य जिंकले असावे. त्यानंतर गुजरात व काठियावाड या प्रदेशांवर क्षहरात घराण्याने कुशाणांचे क्षत्रप म्हणून राज्य केले. ते शक वंशाचे होते.

क्षहरात घराण्यातला पहिला राजा भूमक याची नाणी गुजरात व काठियावाड या प्रदेशाप्रमाणेच माळवा व अजमेर या भागातही सापडली आहेत. मात्र त्याच्याविषयी अधिक माहिती मिळत नाही. नहपान हा त्याचा पुत्र असावा. त्याची नाणी व अनेक अभिलेख पाहता, त्याने इ. स. ११९–२५ या काळात राज्य केले, असे दिसते. तो प्रथम क्षत्रप होता. नंतर महाक्षत्रप झाला. त्याला राजन ही उपाधीही लावलेली आढळते. त्याची सत्ता माळवा, गुजरात, काठियावाड, उत्तर कोकण; तसेच महाराष्ट्रातील नासिक, जुन्नर वगैरे भाग, राजस्थानाचा बराच भाग एवढ्या विस्तृत प्रदेशावर असावी. त्याची कन्या दक्षमित्रा ही दीनिकाचा पुत्र ऋषभदत्त किंवा उषवदात याची पत्नी होती. उषवदात हा नहपानाचा प्रतिनिधी म्हणून दक्षिण गुजरात, भरुच ते सोपारा, नासिक, पुणे या भागावर राज्य करीत होता. पेरिप्लस या ग्रंथात नहपानाला नेंबोनेस व त्याच्या राजधानीला मिन-नगर म्हटले आहे. इ. स. १२५ च्या सुमारास गौतमीपुत्र सातकर्णी याने नहपानाचा पराभव करून क्षहरात घराण्याचा अंत केला आणि सुराष्ट्र (काठेवाड), कुकुर (गुजरात), अनूप (महेश्वर), अपरांत, आकर व अवंती या सर्व प्रदेशांवर आपली सत्ता स्थापली. पुणे व नासिक या भागातून त्याने उषवदाताला पळवून लावले.

क्षहरात घराण्याचा अंत झाल्यानंतर त्याच्या जागी कुशाणांचे क्षत्रप म्हणून कार्दमक घराणे राज्य करू लागले. त्या घराण्यातला पहिला राजा चष्टन हा प्रथम सिंधमध्ये कुशाणांचा क्षत्रप म्हणून रा[ज्य] करीत अ[सा]... नहपानाच्या ... नंतर त्याला गु[ज]रात-काठियावा[ड] माळवा या प्र[दे]शांचा क्षत्रप ... ण्यात आले. उ[ज्ज]यिनी ही त्याची राजधानी हो[ती]. इ. स. १३० ... सुमारास तो म[हा]क्षत्रप म्हणून ...



चष्टनचे नाण्यावरील चित्र

त्याचा नातू रुद्रदामन हा क्षत्रप म्हणून राज्य करीत होता. ... दोघांनी सातवाहन राजाचा पराभव करून बराच प्रदेश ... जिंकून घेतला. रुद्रदामन हा कार्दमक घराण्यातला श्रेष्ठ रा[जा] होय. इ. स. १५० च्या गिरनारच्या शिलालेखात त्याच्या ... याचे व प्रशासनाचे वर्णन केलेले आहे. त्याने उत्तरेकडील ...

यांचा व दक्षिणापथातील गौतमीपुत्र सातकर्णीचाही पराभव केला. सिंधू, सौवीर, कच्छ, आनर्त, सुराष्ट्र, मरू, अपरांत, आकर व अवंती या प्रदेशांवर त्याचे राज्य होते. त्याची कन्या गौतमीपुत्राच्या मुलाला दिली होती. त्यामुळे त्याने सातवाहनांचा नाश केला नाही.

रुद्रदामनने पह्लव वंशातल्या सुविशाखाला सुराष्ट्राचा राज्यपाल नेमले. तिथे त्याने सुदर्शन तलावाचा जीर्णोद्धार केला. रुद्रदामनच्या शिलालेखांत संस्कृत व नाण्यांवर प्राकृत भाषेचा उपयोग केलेला आहे. तो स्वतः संस्कृत कवी व पंडित असून, त्याला संगीताची आवड होती. तो अनेक स्वयंवर समारंभांत उपस्थित होता आणि अनेक राजकन्यांनी त्याला वरले होते.



रुद्रदामनचे नाण्यावरील चित्र

रुद्रदामन (प्रथम) इ. स. १७० च्या सुमारास मृत्यू पावला. त्यानंतर त्याचा पुत्र दामसद किंवा दामजदश्री (प्रथम) हा गादीवर आला. पित्याच्या कारकिर्दीत तो क्षत्रप होता. महाक्षत्रप झाल्यानंतर त्याने नाणी पाडली. त्यांपैकी फारच थोडी सांप्रत उपलब्ध झाली आहेत. त्यांच्यावरील चित्रांवरून असे दिसते, की राज्याभिषेकाच्या वेळी तो वृद्ध झाला होता. त्यामुळे इ. स. १७५ च्या नंतर तो राज्यावर नसावा, असे वाटते.

दामजद (प्रथम) याला जीवदामन व सत्यदामन असे दोन पुत्र होते. दामजदाच्या नंतर इ. स. १७५ च्या सुमारास त्याचा मोठा पुत्र जीवदामन हा महाक्षत्रप बनला. तो अगदी तरुण होता व त्याला राज्यकारभाराचा काही अनुभव नव्हता. त्याचा चुलता रुद्रसिंह हा महत्त्वाकांक्षी होता व त्याचा राज्यावर डोळा होता. जीवदामनच्या कारकिर्दीत सुरवातीला काही महिने त्याने क्षत्रप म्हणून काम केले आणि संधी मिळताच आभीर सेनापतीच्या साहाय्याने जीवदामनला पदच्युत करून तो स्वतः महाक्षत्रप बनला. जीवदामनला बहुधा आपला भाऊ सत्यदामन याच्यासह देशत्याग करावा लागला. परंतु अन्यायाने बळकावलेले हे राज्य रुद्रसिंह (प्रथम) याला फार काळ लाभले नाही. नासिक येथे स्वतंत्र राज्य स्थापन केलेल्या ईश्वरदत्त नामक आभीर सेनापतीने रुद्रसिंहाला पदच्युत केले व इ. स. १८८ मध्ये तो स्वतः महाक्षत्रप झाला. रुद्रसिंहाने त्याची सत्ता मानली व क्षत्रप म्हणून काम करणे स्वीकारले. याच पदावर असताना त्याने आपले सामर्थ्य वाढवले आणि सुमारे दोन वर्षांच्या अवधीत त्याने ईश्वरदत्ताला पदच्युत केले आणि तो स्वतः महाक्षत्रप बनला. इ. स. १९१ ते १९७ या कालात त्याने राज्य केले.

मध्यंतरीच्या काळात सातवाहन राजा यशश्री शातकर्णीने उत्तर कोकण भाग शक क्षत्रपांकडून जिंकून घेतला.

इ. स. १९७ मध्ये रुद्रसिंह (प्रथम) याचा पुतण्या जीवदामन पुन्हा महाक्षत्रप झाला. या वेळी चुलता व पुतण्या यांच्यांत काही समझोता झाला असावा, असे दिसते. कारण रुद्रसिंहाचा पुत्र रुद्रसेन याला त्याने क्षत्रप म्हणून नेमले. जीवदामनने फार काळ राज्य केले नाही. कारण इ. स. २०० मध्ये रुद्रसेन (प्रथम) हा महाक्षत्रप झालेला दिसतो.

रुद्रसेन ( प्रथम ) (इ. स. २००–२२२) याने बावीस वर्षे शांततेने राज्य केले. त्याला संघदामन व दामसेन असे दोन भाऊ व पृथिवीसेन आणि दामजद असे दोन पुत्र होते. त्यामुळे सत्तास्पर्धेला घरातच खूप वाव होता. पण तो टळावा म्हणून त्यांनी महाक्षत्रपाच्या भावांना क्रमाने गादी मिळावी, असे ठरवले. त्यामुळे रुद्रसेनानंतर त्याचे भाऊ संघदामन व दामसेन यांना राज्य मिळाले आणि पृथिवीसेन व दामजद (द्वितीय) हे त्यांच्या कारकिर्दीत क्षत्रप म्हणून कारभार करू लागले.

रुद्रसेन (प्रथम) याच्या कारकिर्दीत त्याच्या ताब्यात माळवा, गुजरात, काठियावाड व पश्चिम राजस्थान एवढा मुलूख होता. उज्जयिनी ही त्या राज्याची राजधानी होती. या कालापर्यंत शक क्षत्रपांनी हिंदू धर्माचा स्वीकार केला होता व ते संस्कृत भाषा आणि हिंदू धर्म यांचे रक्षक म्हणून प्रसिद्धी पावले होते. भारतातील इतर राजघराण्यांशी त्यांचे लग्नसंबंध जडले होते. आंध्रदेशाचा इक्ष्वाकू राजा वीरपुरुषदत्त याने शक राजकुमारी रुद्रधर भटारिका हिच्याशी विवाह केला होता.

संघदामन व दामसेन (इ. स. २२२–२३८)–रुद्रसेन (प्रथम) याला पृथ्वीसेन व दामजद असे दोन पुत्र होते. पृथिवीसेन पित्याच्या कारकिर्दीत क्षत्रपही होता. पण त्याला गादी न मिळता त्याचा चुलता संघदामन याला ती मिळाली. पण त्याने सुमारे दीड वर्षच राज्य केले. कदाचित अजमेर–उदयपुर प्रदेशात मालवांबरोबर झालेल्या युद्धात तो मारला गेला असावा. या युद्धात मालवांचा जय होऊन ते स्वतंत्र झाले. त्यानंतर सिंधही क्षत्रपांच्या हातून गेला.

संघदामननंतर त्याचा लहान भाऊ दामसेन महाक्षत्रप झाला. त्याच्या कारकिर्दीत पश्चिमी क्षत्रपांचे राज्य माळवा,

गुजरात व काठियावाड एवढ्या प्रदेशापुरते मर्यादित झाले.

दामसेनाचा मृत मोठा भाऊ रुद्रसेन (प्रथम) याचे पुत्र पृथ्वीसेन व दामजद (द्वितीय) हे दोघे त्याच्या कारकिर्दीत क्षत्रप होते. पुढे त्याने आपला पुत्र वीरदामन याला क्षत्रप केले. पण तो पित्यापूर्वीच मरण पावला असावा. कारण इ. स. २३८ मध्ये त्याचा लहान भाऊ यशोदामन पित्याचा उत्तराधिकारी म्हणून महाक्षत्रप बनला.

इ. स. २३८ पासून २७९ पर्यंत यशोदामन (प्रथम), विजयसेन, दामजद (तृतीय) व रुद्रसेन (द्वितीय) यांनी राज्य केले.

रुद्रसेन (द्वितीय) याला धाकटा भाऊ नसावा, असे वाटते. त्यामुळे त्याचा ज्येष्ठ पुत्र विश्वसिंह इ. स. २७९ च्या सुमारास गादीवर बसला. त्याने सुमारे तीन वर्षेच राज्य केले. कारण इ. स. २८२ मध्ये त्याचा लहान भाऊ भर्तृदामन महाक्षत्रप झाला. राज्यारोहणापूर्वी चार वर्षे तो क्षत्रप म्हणून राज्यकारभार करीत होता. त्याने इ. स. ३०४ पर्यंत राज्य केले असावे. त्याचा पुत्र विश्वसेन इ. स. २९४ पासून क्षत्रप म्हणून कारभार करीत होता. भर्तृदामन व विश्वसेन यांनी अनुक्रमे महाक्षत्रप व क्षत्रप म्हणून पाडलेली नाणी मोठ्या संख्येने सापडली आहेत. त्यावरून त्यांनी आपले नष्ट झालेले वैभव पुन्हा स्थापित केले असावे, असे अनुमान करता येते.

रुद्रसिंह (द्वितीय) व यशोदामन (द्वितीय) (इ. स. ३०४–३४५) – भर्तृदामनच्या कारकिर्दीच्या शेवटी अशा काही घटना घडल्या, की ज्यामुळे गुजरात व काठियावाड येथे पावणेदोनशे वर्षे राज्य करणाऱ्या कार्दमक घराण्याची सत्ता संपुष्टात आली. भर्तृदामननंतर त्याचा पुत्र विश्वसेन महाक्षत्रप झाला नाही. तर स्वामी जीवदामन याचा पुत्र रुद्रसिंह (द्वितीय) हा महाक्षत्रप झाला. त्याचे भर्तृदामनशी काय नाते होते हे अज्ञात आहे. सिंहासन मिळवण्यासाठी त्या काळी मोठा संघर्ष झाला. पण गादीवर आल्यावर रुद्रसिंह (द्वितीय) याने एका वर्षाच्या आत आपला जम बसवला. त्याने इ. स. ३१६ पर्यंत राज्य केले. त्यानंतर त्याचा पुत्र यशोदामन (द्वितीय) गादीवर आला. त्याने इ. स. ३३२ पर्यंत राज्य केले, हे निश्चित आहे. या दोघा पितापुत्रांनी कधीही महाक्षत्रप ही उपाधी घेतली नाही; तर क्षत्रप या उपाधीवरच संतोष मानला. हे असे का झाले, ते नीटसे समजत नाही. रुद्रसिंह (द्वितीय) व यशोदामन (द्वितीय) काही काळपर्यंत वाकाटकांचे सामंत बनले होते, असे काही इतिहासकारांचे मत आहे.

रुद्रदामन (द्वितीय) व त्याचे उत्तराधिकारी (इ. स. ३४५–३९५) – यशोदामन द्वितीय याला बाजूला करून गादीवर बसणारा रुद्रदामन (द्वितीय) हा बहुधा कार्दमक घराण्यातीलच असावा. त्याने सुमारे दोन-तीन वर्षे राज्य केले. त्यानंतर त्याचा पुत्र रुद्रसेन (तृतीय) महाक्षत्रप बनला. त्याने सुमारे तीस वर्षे राज्य केले. त्याच्या कारकिर्दीत इ. स. ३५१ नंतर तेरा वर्षे बरीच राजकीय अशांतता माजली. पण नंतर त्याने आपले आसन स्थिर केले. त्यानंतर त्याने आपली नाणी पाडली. इ. स. ३८० च्या सुमारास त्याचा मृत्यू झाला. त्यानंतरचा पश्चिमी क्षत्रपांचा इतिहास विशेषसा ज्ञात नाही. काही राजांनी थोडा काळ राज्य केले एवढेच. रुद्रसिंह (तृतीय) याचा इ. स. ३८८ नंतर काही वर्षांत चंद्रगुप्त (द्वितीय) याने पराभव केला आणि गुजरात व काठियावाड हे प्रदेश गुप्तसाम्राज्याला जोडून टाकले. अशा रीतीने शकांचे पश्चिमेकडील राज्य कायमचे नष्ट झाले. [ब्र. सां. इ.; ए. इं.–मजु., मुकर्जी; दि शकाज; इन इंडिया, श्री. चट्टोपाध्याय १९५५; वा. गु. यु.; म. भा. इ.; हि. क. इं. पी. २ व ३]

**शकटव्यूह** सैन्यरचनेचा एक महत्त्वाचा प्रकार. गाडीच्या आकाराची ही रचना असते, म्हणून हिला शकटव्यूह अशी संज्ञा आहे. जेव्हा शत्रूचे समोरून आणि मागच्या बाजूनेही आक्रमण होण्याची शक्यता असे, तेव्हा या व्यूहाची रचना केली जाई. या व्यूहाच्या आघाडीला आणि पिछाडीला अत्यंत शूर सैनिक असत. डाव्या व उजव्या बाजूंच्या सैनिकांना संरक्षणाचे काम असे. मध्यभागी राजा, त्याचे रक्षक व सेवक असत. व्यूहाच्या प्रवेशद्वारावर बरेच सैन्य असे. पायदळाच्या डाव्या-उजव्या बाजूंनाही पुन्हा असे विभाग असे. महाभारतीय युद्धात उभय पक्षांनी या व्यूहाची रचना केलेली होती. जयद्रथवधाच्या प्रसंगी द्रोणाचार्यांनी हा व्यूह रचला होता. [भा. सं. प.]

**शकपूत** एक सूक्तद्रष्टा राजा. हा नृमेध आंगिरसाचा पुत्र होता म्हणून याला नार्मेध असे म्हणतात. ऋग्वेदानुक्रमणीत नृमेधपुत्र म्हणून याचा उल्लेख आहे. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे बत्तीसावे सूक्त याने रचले असून, मित्रावरुणांची स्तुती हा प्रस्तुत सूक्ताचा विषय असून, त्याने सूक्तात मित्रावरुणांनी शत्रूपासून माझे संरक्षण करावे, अशी प्रार्थना केली आहे. याची एक ऋचा अशी–

ता वां मित्रावरुणा धारयत्क्षिती सुषुम्नेषितत्वता यजामसि ।
युवोः क्राणाय सख्यैरभि ष्याम रक्षसः ॥
(ऋ. १०.१३२.२)

अर्थ – हे इष्ट देवतास्वरूप, पृथ्वीरक्षक आणि धनदाते मित्रावरुणांनो; तुमच्या साह्याने आम्ही यज्ञद्वेषी राक्षसांना पराजय करतो.

या सूक्ताच्या सातव्या ऋचेत त्याचा उल्लेख आहे. पाहा–नृमेध. [प्रा. च. को.; म. ज्ञा. को.; सी. ऋ.]

## शकुन-अपशकुन

भविष्यसूचक शुभचिन्ह व दुश्चिन्ह. या शुभाशुभ कल्पनांचे प्रत्यंतर निकटच्या भविष्यकालात येते आणि त्यावर कार्यसिद्धी किंवा कार्यनाश अवलंबून असतो, असा लोकविश्वास आहे. प्राधान्याने युद्ध, प्रवास, मंगलकार्य, एखादी महत्त्वाची घटना, इ. प्रसंगीं याचा विचार केला जातो.

**कल्पनांच्या निर्मितीची संभाव्य कारणे –** भारतभर विखुरलेल्या या कल्पना एकाच वेळी आणि एकाच जागी निर्माण झाल्या, असे समजण्याचे कारण नाही. एखाद्या वस्तूचे वारंवार दर्शन घडले आणि त्यातून निर्माण होणाऱ्या कार्यात सारखेपणा आहे, असे आढळून आले, तर ही परिस्थिती अनेक कल्पनांच्या निर्मितीची गंगोत्री ठरते. मग या कल्पनांमागे शास्त्रीय कार्यकारणभाव असलाच पाहिजे असा आग्रह असत नाही. कधी कधी अतूट साहचर्यामुळेही या कल्पना केल्या जातात. उदा० घराचा पाया खणताना जर कोळसे लागले, तर ती जागा अशुभ समजली जाते. याचे एक संभाव्य कारण असे, की जिथे कोळसे असतात तिथे अवदसेचे वास्तव्य असते, अशी पौराणिक समजूत आहे(पद्म. ब्र. ९–१०). एखादी वस्तू किंवा प्रसंग पाहताक्षणीच मन प्रसन्न झाले किंवा एखाद्या दृश्याने त्यासंबंधी घृणा उत्पन्न झाली, तर त्यातूनही शुभाशुभ कल्पना निर्माण होणे शक्य असते. नग्न माणसाचे दर्शन अशुभ मानले जाते, त्यांमागे हे एक कारण असावे, असे वाटते. प्राचीन कालापासून मनावर झालेल्या बऱ्यावाईट संस्कारांतून हे शुभाशुभाचे संकेत निर्माण झाले असावे. हाच न्याय वृक्ष, पशू, सर्प, इ. प्राण्यांच्या संदर्भात लावता येतो.

भविष्य जाणून घेणे ही मानवाची एक सहजप्रवृत्ती आहे. त्यातूनच शुभाशुभ घटना सांगण्यासाठी फलज्योतिषाचे अंगभूत असे शकुनशास्त्र जन्माला आले. परंतु ज्यांनी या शास्त्राचा ग्रंथाधारे अभ्यास केला नाही, असे लोकज्योतिषीही भारतभर निर्माण झाले. त्यांनी सामान्यजनांची यासंबंधीची जिज्ञासा काही आडाख्यांच्या आधारे तृप्त करण्याचा प्रयत्न केला. त्यांत उत्तर भारतातले घाघ, पूर्व भारतातले खना, डाक; दक्षिणेत अनेक नावांनी वावरणारे जोशी आणि पश्चिमेकडील डाकोत व भड्डरी यांचा समावेश होतो.

शकुन-अपशकुन या कल्पना सर्वत्र सारख्याच असत नाहीत. याचे एक प्रमुख कारण म्हणजे स्थानिक अनुभवांची भिन्नता आणि सांप्रदायिक आचारविचारांतील व तत्त्वज्ञानातील भेद हे होय. उदा० ठगांना डावीकडून उजवीकडे जाणारा कोल्हा दिसला, तर ते अपशकुन मानतात आणि अन्यत्र हेच दृश्य शुभ समजण्याकडे प्रवृत्ती आढळते. परंतु मांजर आडवे गेले तर कार्यसिद्धी होत नाही, हा समज मात्र सर्वत्र सारखाच आढळतो.

**प्राचीनता –** शुभाशुभ कल्पना फार प्राचीन आहेत. शकुन या शब्दाचा मूलार्थ पक्षी असा आहे. ऋग्वेदात भारद्वाज पक्ष्याची दोन शकुनसूक्ते आहेत. त्यांत असे म्हटले आहे, की 'हे शुभंकर आणि शुभवाची पक्षिराजा, आमच्या घराच्या उजव्या अंगाला येऊन तू आवाज काढ' ( ऋ. २.४२,४३ ). प्रवासाला निघताना अशुभ पक्ष्यांचा आवाज कानी आला, तर तो अपशकुन दूर करण्यासाठी प्रस्तुतच्या दोन्ही सूक्तांचा जप करावा, असे आश्वलायन गृह्यसूक्तात म्हटले आहे (३.१०.९). याव्यतिरिक्त ऋग्वेदात अन्यही काही अपशकुनपरिहारक मंत्र दिलेले आहेत ( ऋ. ८.१००.११; ९.९७.३२ ). अथर्ववेदात सुशकुन या शब्दाचा प्रयोग केला गेला आहे ( १९.८ ). या सूक्तात चंद्रसंबंधित शकुनाचा निर्देश असून, शिंका, निंदा, रिक्तघट, इ. अपशकुनांचा उल्लेख आहे. कौशिकसूत्रात उभ्या काठीच्या साहाय्याने किंवा दर्भ, समिधा किंवा फासे या साधनांच्या साहाय्याने शकुन पाहावा, असे म्हटले आहे. काठी उजव्या बाजूला पडली अथवा दर्भादी वस्तू समप्रमाणात विभागल्या गेल्या, तर तो शकुन मानीत. हा शकुन पाहत असताना अथर्ववेदातील ब्रह्मसाक्षात्कार सूक्त म्हणत (अथर्व २.१).

उत्तरकालीन वाङ्मयात या प्रकारांच्या संकेतांत खूप वाढ झाली आणि त्या सर्वांना शकुन हेच सामान्य नाव प्राप्त झाले. रावणाच्या त्रासातून सुटण्यासाठी जीवनाचा त्याग करायला तयार झालेल्या सीतेला काही शकुन झाले. त्यात तिचा डावा डोळा लवू लागला व डावा हात स्फुरण पावू लागला. त्यामुळे तिला आपले भविष्य चांगले आहे, असे वाटून ती आत्मघाताच्या विचारापासून परावृत्त झाली आणि पुढे तिचा शोकही दूर झाला, असे रामायणात म्हटले आहे (वा रा. सुंदर. २९). मारीचाला मारण्यासाठी गेलेला राम अशुभ चिन्हे दिसू लागली म्हणून व्याकुळ होऊन लक्ष्मणाला म्हणाला. 'मृगांचे कळप, कोल्हे आणि पक्षी उजेडाच्या दिशेने तोंड वासून भयंकर आवाज काढीत आहेत. माझा डावा डोळा लवत आहे. मन उदास झाले आहे, म्हणून मला सीतेची काळजी वाटत आहे (वा. रा. अरण्य. ५७). सीता लंकेत आल्यापासून ज्या अशुभ गोष्टी घडू लागल्या, त्यांचे वर्णन रावणाला सांगताना बिभीषण म्हणतो. 'अग्नीच्या ठिणग्या उडत आहेत. मंत्र म्हणून आहुती टाकल्या तर अग्नी पेटत नाही. पाकगृहात, अग्निशालेत व वेदाध्ययनाच्या जागी सर्प वावरू लागले आहेत. हवनीय द्रव्यात मुंग्या झालेल्या दिसतात. गायी आटल्या आहेत आणि हत्तींचे मद

सुकले आहेत. खेचरे, उंट, गाढवे यांचे केस गळून पडत आहेत (वा. रा. युद्ध. १०).' यासारख्या अनेक कल्पना साऱ्या रामायणभर विखुरलेल्या आहेत.

महाभारतातही हा प्रकार विपुल प्रमाणात आढळतो. या ग्रंथात द्रोणाचार्य व अर्जुन या गुरुशिष्यांचा शकुनज्ञाते म्हणून गौरव केला आहे (म. भा. भीष्म. ११२). पांडव द्यूतात हरल्यावर कौरवांच्या सभेत द्रौपदीवर जो प्रसंग गुदरला, त्या वेळी धृतराष्ट्राच्या अग्निशालेत कोल्हे, गिधाडे व गाढवे यांनी ओरडून अपशकुन केले. त्या वेळी भीष्म, द्रोण, कृप, इ. आचार्यांनी 'स्वस्ति–स्वस्ति' असे म्हणून ते अमंगल टाळण्याचा प्रयत्न केला (म. भा. सभा. ७१). जयद्रथ द्रौपदीला पळवून नेत असता एक रडत असलेला कोल्हा पांडवांच्या रथापासून डावीकडून उजवीकडे गेला. त्या वेळी धर्मराज भीम व अर्जुन यांना म्हणाला, की आमच्यावर कौरवांकडून काहीतरी संकट कोसळणार असे दिसते (म. भा. वन. २६९). पांडवांचा दूत म्हणून श्रीकृष्ण हस्तिनापुराकडे चालला असता झालेल्या शकुनांचे आणि उत्पातसूचक अपशकुनांचे वर्णन एका समग्र अध्यायात आले आहे. त्याचा सारांश असा– आकाशात ढग नसताही विजा चमकून मुसळधार पाऊस पडला. पूर्ववाहिनी सिंधू पश्चिमेकडे वाहू लागली. सर्वत्र आगी लागू लागल्या. धरती कंप पावू लागली. हस्तिनापुरात वादळाने हाहाकार माजविला. परंतु कृष्णाला मात्र अनेक शुभ शकुन झाले. तो जिथे जिथे थांबत होता तिथे तिथे सुखकारक वारा वाहात होता. त्याच्यावर फुलांचा वर्षाव होत होता. मार्गात ठिकठिकाणी ब्राह्मण त्याची पूजा करीत होते (उद्योग. ८४).

धर्मशास्त्रात व सामान्यजनांत यासंबंधी जी परंपरा आढळते, तिचे स्थूल स्वरूप पुढीलप्रमाणे आहे– प्रवास, सर्प, पाल, कावळा, कुत्रा, मांजर, कोल्हा, शिंक, उचकी, जांभई, श्वासोच्छ्वास, निरनिराळ्या ग्रहांचे खडे, अंगस्फुरण व संख्या यांच्या माध्यमातून शकुन पाहिले जातात. श्वासोच्छ्वासासंबंधीचा काही विचार असा– उजव्या व डाव्या नाकपुडीला अनुक्रमे सूर्यनाडी व चंद्रनाडी असे म्हणतात. सुमारे दोन तासपर्यंत एका नाकपुडीचे श्वसन जलद चालू असते. युद्धाला निघताना किंवा एखाद्या महत्त्वाच्या प्रसंगी सूर्यनाडी चालू असेल, तर तो शकुन मानला जातो. नवीन अलंकार धारण करण्यापूर्वी, शेताची नांगरट सुरू करण्यापूर्वी किंवा घराची वास्तुशांत करायच्या आधी चंद्रनाडी असावी, असे म्हणतात.

**शुभ शकुन** – मोर, चातक, मुंगूस, डाव्या बाजूला जाणे; परटीण धुण्याचे गाठोडे घेऊन व ब्राह्मण पळी पंचपात्री घेऊन समोर येणे; लग्नाची मिरवणूक, पाण्याने भरलेली घागर घेतलेली सुवासिनी अथवा कुमारिका, मूल घेतलेली माता, दांपत्य, सवत्स गाय समोर येणे; हरीण, मांजर, साप उजवीकडे जाणे; गाढव उजव्या बाजूला ओरडणे; कोकिळेचा ध्वनी ऐकणे; घंटानाद, घोड्याचे खिंकाळणे, कुत्र्याचे कान फडफडावणे, शुभ वचन, शिजविलेले अन्न, फळांची टोपली घेतलेला माणूस, दिवा हे सर्व शुभ शकुन होत.

**अशुभ शकुन** – बोडका ब्राह्मण, विधवा, रजस्वला व काळ्या वस्तू समोर येणे; गाढव डाव्या बाजूला ओरडणे, पक्षी व कुत्रे यांचे रडके स्वर ऐकणे, गोवऱ्या, जळकी लाकडे दिसणे, इ. अशुभ शकुन होत.

अशुभ शकुनाच्या परिहारासाठी धार्मिक व तांत्रिक विधी करण्याची पद्धत प्राचीन कालापासून रूढ आहे. त्यासाठी दाने देतात व शांतीही करतात.

ज्योतिषशास्त्राच्या ग्रंथांत शकुनासंबंधी बराच विचार केलेला असतो. याशिवाय संस्कृत व देशी भाषांतून यासंबंधी अनेक ग्रंथ आहेत.

अतिप्राचीन कालापासून भारतीय समाजात या कल्पना किती दृढमूल झालेल्या आहेत, याचे हे ढोबळ दर्शन आहे. या कल्पनांच्या आहारी गेल्याने प्रसंगी माणसाचे कर्तृत्व लोप पावण्याची भीती असते. अशा समजुती केवळ भारतातच आहेत असे नाही तर जगाच्या पाठीवर त्या सर्वत्र आढळतात. पाहा – अपशकुन, पल्लीपतन, लोकभ्रम. [ ऋ. म. भा.; अ. म. भा.; पॉ. रि. फो नॉ. इं.; म. भा. स.; लौ. दं.; श्रीरामकोश १ ]

## शक्तिगणप

गणपतीचे एक रूप. याचा वर्ण सुवर्णासारखा असतो. याच्या चार हातांत पाश, अंकुश, दंत व महाळुंग असते आणि शुंडाग्रावर मोदक असतो. काही वेळा याच्या हातांत अक्षमाला, कल्पलता, शिंग, मुद्गर, इ. वस्तू असतात. कधी तो दशभुज असतो, तर कधी सिंहावर बसलेला असतो. [ मंत्र–महोदधि ]

## शक्तिचालनमुद्रा

अपान वायूला रोधून, मूलाधारकमळात स्वस्थ पडून राहिलेल्या कुंडलिनीला जागृत करण्याच्या क्रियेला शक्तिचालनमुद्रा अशी संज्ञा आहे. शक्तिचालन गुरूच्या सान्निध्यात आणि त्याच्या मार्गदर्शनाखाली करायचे असते. या मुद्रेचा नियमितपणे अभ्यास करणाऱ्या साधकाचे आयुष्य वाढते; त्याचे सर्व रोग नष्ट होऊन त्याला अष्टसिद्धी प्राप्त होतात. दोन मुहूर्तपर्यंत सतत शक्तिचालन करण्याची क्रिया ज्याला साधते, त्याला कोणतीच गोष्ट सिद्ध करणे अशक्य नसते, असे म्हणतात. पाहा– कुंडलिनी. [ शिवसंहिता ]

**शक्तिदेवता** शाक्त संप्रदायाचे सर्वश्रेष्ठ उपास्य दैवत. सामान्य लोकही मातृभावाने शक्तीला भजतात. सौभाग्यवती स्त्रिया आपले सौभाग्य चिरकाल टिकावे म्हणून शक्तीची उपासना करतात. त्यांच्या लेखी शक्ती ही जगदंबा आहे. जगदंबा म्हणजे सर्व जगाची आई. ब्रह्मा, विष्णू आणि महेश या तीन्ही देवांशी तिचा संबंध पोचतो.

**शक्ती शब्दाचे अर्थ** – शक् = समर्थ होणे, असणे या धातूला क्तिन् प्रत्यय लागून शक्ती हे नाम बनले आहे. सामर्थ्य, पराक्रम, प्राण हे शक्ती शब्दाचे तीन प्रमुख अर्थ आहेत. प्रत्येक पदार्थामध्ये कार्योत्पादनाला उपयोगी आणि कधीही त्या पदार्थापासून वेगळा न राहणारा असा जो विशिष्ट धर्म असतो, त्याला शक्ती असे म्हणतात. उदा० अग्नी हा शक्तिमान आणि दाहकता ही त्याची शक्ती. दाहकता ही अग्नीपासून कधीच वेगळी राहत नाही. प्रत्येक पदार्थात ज्याची त्याची अशी एक शक्ती असते. त्यामुळे शक्तीही अनंत आहेत.



जगदंबा

भगवंताच्या अशा अनेक शक्ती त्याच्या ठिकाणी तादात्म्य संबंधाने राहतात. त्यांपैकी पुढील तीन शक्तींना प्राधान्य दिले आहे – (१) अंतरंग – या शक्तीला नारायणाची स्वरूपशक्ती म्हटले आहे. (२) तटस्थ – अत्यंत स्वरूपात्मकही नाही व सर्वथा विजातीयही नाही, अशा शक्तीला तटस्थ म्हटले आहे. विश्वातले अगणित जीव ही भगवंताची तटस्थ शक्ती होय. (३) बहिरंग – महत्तत्त्वापासून पृथ्वीपर्यंत आणि समस्त भौतिक वस्तूंसह अशी जी संसाररूप प्रकृती तिला बहिरंग शक्ती म्हणतात.

**शक्तीची कार्ये** – नारायणाच्या शक्तीला महालक्ष्मी असे नाव आहे. लक्ष्मीतंत्रात ती स्वतः आपली कार्ये पुढीलप्रमाणे सांगते–

**तिरोभावस्तथा सृष्टिः स्थितिः संहृतिरेव च ।**
**अनुग्रह इति प्रोक्तं मदीयं कर्मपञ्चकम् ।**

अर्थ – (१) तिरोभाव = कर्मरूप अविद्येने जीवात्म्याला आच्छादित करणे, (२) सृष्टी, (३) तिचे पालनपोषण, (४) सृष्टीचा संहार आणि (५) अनुग्रह (जीवात्म्याला मोक्ष मिळवून देणे) ही माझी पाच कर्मे होत.

**तीन मुख्य रूपे** – मूळ जी आद्या शक्ती किंवा महामाया तिला दुर्गा म्हणतात. या दुर्गेनेच पुढे देवकार्यासाठी आणि मानवकल्याणासाठी प्रसंगाप्रसंगाने तीन रूपे घेतली. महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वती ही ती तीन रूपे होत. ही तीन रूपे त्रिगुणात्मक आहेत. महाकाली ही तमोगुणी असून, ती त्याच गुणाच्या रुद्रशिवाशी संबद्ध आहे. महालक्ष्मी ही सत्त्वगुणी असून, ती जगदंबा आहे व सत्त्वगुणी विष्णूशी संबद्ध आहे. तिला नारायणी असेही म्हणतात. महासरस्वती ही रजोगुणी असून, त्याच गुणाच्या ब्रह्म्याशी संबद्ध आहे. ही विद्यादायी देवता आहे. या तीन्ही रूपांच्या उत्पत्तिकथा मार्कंडेय पुराणातल्या सप्तशतीत दिलेल्या आहेत. त्यांचा सारांश असा –

(१) महाकाली – प्रलयकाली विष्णू योगनिद्रेत शेषशय्येवर पहुडला होता. त्या वेळी मधु-कैटभ नामक दोन दैत्य त्याच्या कानातून बाहेर पडले. त्यांना प्रथम दिसला तो ब्रह्मा. ते त्याला मारायला धावले. ब्रह्म्याने भगवंताच्या योगनिद्रेची स्तुती केली आणि तिला प्रार्थिले. ‘तू या असुरांना मोहित कर आणि विष्णूला जागे कर.’ ते ऐकताच विष्णूच्या अंगातून महाकाली उत्पन्न झाली. लगेच विष्णूही जागा झाला. मग त्याचे व मधु-कैटभांचे युद्ध सुरू झाले. महाकालीने त्या दैत्यांना मोहित करण्याचे काम व्यवस्थित केले. त्यांना बुद्धिभ्रम झाला. ते विष्णूला म्हणाले. ‘तू लढाई चांगली खेळतोस. आम्ही तुझ्यावर प्रसन्न आहो. तुला हवा तो वर माग.’ त्यावर विष्णू म्हणाला. ‘माझ्या हातून तुमचा वध व्हावा हाच मला वर द्या.’ दैत्य म्हणाले. ‘ठीक आहे; पण एक अट आहे. जिथे पृथ्वीवर पाणी नाही अशा जागी तू आम्हांला मार.’ (कारण त्या वेळी सर्व पृथ्वी जलमय होती.) विष्णूने ती अट मानली आणि आपल्या मांडीवर त्यांची शिरे घेऊन ती छेदून टाकली. महाकालीने मधु-कैटभांच्या बुद्धीला असा भ्रम पाडला. (काली पाहा.)

महालक्ष्मी – महिषासुर नामक दैत्य महाबली बनला. त्याने देवांशी युद्ध सुरू केले. इंद्राचा पराभव करून तो स्वतः इंद्र बनला. मग सर्व देव ब्रह्मदेवाला पुढे घालून विष्णू व शंकर यांच्याकडे गेले. महिषासुराचा वृत्तान्त ऐकून त्या दोघांच्या भुवया वक्र बनल्या. लगेच त्या दोघांच्या व इतर देवांच्याही शरीरातून तेजाचा स्रोत बाहेर पडला. ती सर्व तेजे पुंजीभूत होऊन त्यातून एक देवी उत्पन्न झाली. तीच महालक्ष्मी होय. देवांनी तिची स्तुती केली, तिला आपापली शस्त्रे दिली आणि महिषासुराचा वध करण्याबद्दल प्रार्थिले. तिने मग प्रचंड गर्जना केली. लगेच

महिषासुर धावून आला. त्याने महालक्ष्मीशी भयंकर युद्ध मांडले. पण महालक्ष्मीने त्याचा वध करून देवांना अभय दिले.

महासरस्वती – शुंभ-निशुंभ हे दैत्य देवांना पराजित करून स्वतः यज्ञभोक्ते बनले. मग देवांनी हिमालयावर जाऊन पार्वतीची स्तुती आरंभली. त्या वेळी लगेच पार्वतीच्या शरीरकोशातून जी देवी प्रगट झाली, तीच महासरस्वती होय. तिने शुंभ-निशुंभांशी युद्ध करून त्यांना ठार मारले.

अशी ही दुर्गेची तीन प्रमुख रूपे होत. या प्रत्येक रूपात आणखी दोन दोन रूपे प्रविष्ट होऊन तिघींचे त्रिवृत्करण झाले. मग त्या नऊ रूपांना नवदुर्गा हे नाव मिळाले.

शक्तितंत्रांत नऊ या अंकाला त्यामुळेच विशेष महत्त्व मिळाले. नऊ हा अंक श्रीशक्तीचे स्वरूप दर्शवणारा अद्भुत अंक आहे. दशमानातील तो सर्वांत मोठा अंक होय. तसाच तो परिपूर्णही आहे. कारण, नवाची कितीही पट केली तरी येणाऱ्या संख्येतील अंकांची बेरीज नऊच भरते. त्यामुळे शक्ति-उपासनेत नऊ हे शक्तीचे अंकप्रतीक ठरले आहे.

अशा प्रकारे या आदिशक्तीने दैत्यांचा संहार केल्यावर देवांना कायमचे अभयवचन देऊन ठेवले –

> इत्थं यदा यदा बाधा दानवोत्था भविष्यति ।
> तदा तदाऽवतीर्याहं करिष्याम्यरिसंक्षयम् ।।

अर्थ – देवहो, जेव्हा जेव्हा तुम्हांला अशी दानवांची बाधा उद्भवेल, तेव्हा तेव्हा मी अवतार घेऊन शत्रूचा निःपात करीन.

अन्य देवतांप्रमाणेच शक्तीच्याही रूपाची कल्पना केलेली आहे. सामर्थ्याचे प्रतीक असा सिंह हे तिचे वाहन आहे. ती चतुर्भुज, अष्टभुज, दशभुज, अष्टादशभुज किंवा अनंतभुज आहे. तिच्या हाती त्रिशूळ, खड्ग, खेटक, परशू, इ. अनेक शस्त्रे आहेत. तिच्या भालप्रदेशी तृतीय नेत्र आहे. तिला चंडी, चामुंडा, भैरवी, कात्यायनी, कौशिकी, त्रिपुरा, ललिता, श्रीविद्या, कामारण्या, मीनाक्षी, भगवती, इ. अनेक नावे आहेत. प्रत्येक नामरूपाचे काहीतरी वैशिष्ट्य आहे. प्रत्येकाच्या मागे काहीतरी कथा आहेत.

**शक्तिकल्पनेचा इतिहास** – वैदिक आर्यांची कुटुंबसंस्था ही पुरुषप्रधान होती. कुटुंबातल्या माणसांवर आणि कौटुंबिक व्यवसायावर सत्ता पुरुषाची होती. स्त्रीला दुय्यम स्थान होते. तिला मान होता; पण तो मर्यादित. त्यामुळेच वैदिक आर्यांचे सगळे महत्त्वाचे देव पुरुष होते. ऋग्वेदात उषा, राका, सिनीवाली, सार्पराज्ञी, अशा काही स्त्रीदेवताही आढळतात. पण त्यांची जागा तिसऱ्या चौथ्या क्रमांकावर येते. असे असले तरी, विराट सामर्थ्याच्या अशा एका स्त्रीदेवतेचा साक्षात्कार वैदिकांनाही झाला होता, असे दिसून येते. ही देवता म्हणजे अदिती होय. या आदितीचा व्यापकपणा सांगताना वैदिक आर्यां[illegible] काहीही हातचे राखून ठेवले नाही. गोतम राहूगण हा वैदि[illegible] ऋषी म्हणतो (ऋ. १.८९.१०)–

> अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षमदितिर्माता स पिता स पुत्रः।
> विश्वे देवा अदितिः पञ्च जना अदितिर्जातमदितिर्जनित्वम्।

अर्थ – अदिति ही द्यौ, अंतरिक्ष, माता, पिता, पुत्र, विश्वे देव, पंचजन, भूत, भविष्य, सर्व काही आहे.

ऋग्वेदाच्या १०व्या मंडलातले १५५ वे सूक्त हे वागांभृणी या स्त्रीच्या नावावर आहे. तिच्यातही जणू शक्तितंत्र[illegible] झाल्यासारखा वाटतो. ती म्हणते –

" मी ब्रह्मांडाची अधीश्वरी आहे. मी जीवांना कर्मांचे [illegible] भोगवते. ऐश्वर्यही मीच देते. मी चेतन आहे, सर्वज्ञ आहे; [illegible] असूनही नाना रूपांनी नटले आहे. मी सर्वतंत्रस्वतंत्र [illegible] माझ्यावर कोणाचेही प्रभुत्व नाही. हे अखिल विश्व ही माझी विभूती आहे. "

बह्वृचोपनिषदात वरील वागांभृणीच्या उद्गारांचा [illegible] तपशील आढळतो तो असा –

'त्या पराशक्तीपासून ब्रह्मा, विष्णु, महेश, रुद्र, म[illegible] गंधर्व, वाजा वाजवणारे किन्नर, हे उत्पन्न झाले. तसेच [illegible] भोग्य पदार्थ, चारही खाणी, चौऱ्यांयशी लक्ष योनींचे [illegible] स्थावर, जंगम, मनुष्य हेही त्या पराशक्तीच्या सर्वां[illegible] निर्माण झाले.

केनोपनिषदात (४) ही आद्या शक्ती उमा हैमवतीच्या [illegible] इंद्राला उपदेश करताना आढळते. मैत्र्युपनिषदात ([illegible] ब्रह्माची दोन रूपे सांगितली आहेत– जड व चेतन. जड [illegible] परिवर्तनशील व विनाशशील; चेतन सत् ब्रह्म व [illegible] शाक्तांनी वर उल्लेखलेल्या दोन्ही रूपांना एकत्र करून [illegible] या नावाने निर्दिष्ट केले.

भारतीय दर्शनांत तंत्रशास्त्र हे आगळेवेगळे दर्शन [illegible] त्यात आढळणारे शक्तीचे स्वरूप दिव्योदात्त आहे. तांत्रि[illegible] तिला सृष्टीचे आदिकारण मानले आहे. एका तंत्रात श[illegible] वर्णन केले आहे, ते असे–

> यस्यादृष्टो नैव भूमण्डलांशो यस्यादास्यो विद्यते न क्षितीं[illegible]
> यस्याज्ञातं नैव शास्त्रं किमन्यैर्यस्याकारः सा पराशक्तिरेव।

अर्थ – पराशक्तीला विश्वातला कुठलाही भाग अदृष्ट [illegible] तिचा दास नाही असा कोणीही राजा नाही. पराशक्ती [illegible] नाही असे कोणतेही शास्त्र नाही. आणि ज्याला आकार [illegible] आहे, ते ते सारे म्हणजे पराशक्तीच आहे.

पुराणकालात देवीविषयक पुष्कळ पुराणे निर्माण [illegible] त्यांनी शक्तीचे निग्रहानुग्रहसामर्थ्य विविध कथांच्या [illegible]

लोकमानसावर ठसवले आणि भल्याभल्या देवांनाही शक्तीपुढे लोटांगण घालायला लावले. ब्रह्मवैवर्तपुराणात भगवान स्वत: आपल्या प्रकृतीचे म्हणजेच आदिमायेचे स्तोत्र करतो, ते असे–

त्वमेव सर्वजननी मूलप्रकृतिरीश्वरी ।
त्वमेवाद्या सृष्टिविधौ स्वेच्छया त्रिगुणात्मिका ।।
कार्यार्थे सगुणा त्वं च वस्तुतो निर्गुणा स्वयम् ।
परब्रह्मस्वरूपा त्वं सत्या नित्या सनातनी ।।
तेज:स्वरूपा परमा भक्तानुग्रहविग्रहा ।
सर्वस्वरूपा सर्वेशा सर्वाधारा परात्परा ।।
सर्वबीजस्वरूपा च सर्वपूज्या निराश्रया ।
सर्वज्ञा सर्वतोभद्रा सर्वमङ्गलमङ्गला ।।

अर्थ – हे शक्तिरूपिणी देवी, तू विश्वजननी, मूलप्रकृती आणि ईश्वरी आहेस. तू सृष्टीच्या उत्पत्तिसमयी आद्या शक्तीच्या रूपात राहून स्वेच्छेने त्रिगुणात्मक बनतेस. वस्तुत: तू निर्गुण आहेस; पण कार्यवशात सगुण होतेस. तू परब्रह्मस्वरूप, सत्य, नित्य व सनातन आहेस. तू परम तेज:स्वरूप आहेस. तू भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीच शरीर धारण करतेस. तू सर्वस्वरूप, सर्वेश्वरी, सर्वाधार व परात्पर आहेस. तू सर्वबीजस्वरूप, सर्वपूज्य व आश्रयरहित आहेस. तू सर्वज्ञ, सर्वतोभद्र व सर्व मंगलांचेही मंगल आहेस.

**बौद्धांची शक्तिपूजा** – बौद्ध धर्मात शक्तिपूजेचा प्रारंभ महायान पंथाच्या विकासाबरोबरच झाला. तारा, हारीती, वसुधारा, प्रज्ञापारमिता, वागीश्वरी, मारीची या देवता महायानी पंथात प्रविष्ट झाल्या. त्यांच्या मूर्तीही त्यांनी निर्मिल्या. पाच ध्यानी बुद्धांच्या पाच स्वतंत्र शक्ती त्यांनी मानल्या. अक्षोभ्याची लोचना, वैरोचनाची तारा, अमिताभाची पांडरा, अमोघवज्राची आर्यतारा व रत्नसंभवाची मामकी अशी त्यांची नावे आहेत. बौद्ध तंत्रांत या प्रत्येकीच्या उपासनेसाठी विशिष्ट मंत्र, मुद्रा, मंडल, इ. आहेत.

तिबेटी बौद्धांत तारा या देवतेला सर्वोच्च स्थान आहे. उग्रतारा, वज्रतारा, महाचीनतारा, इ. तिचीही अनेक रूपे त्यांनी कल्पिली आहेत, तारेच्या मूर्ती घडवल्या आहेत आणि चित्रेही निर्माण केली आहेत.

बौद्धांची अनेक शक्तितंत्रे आहेत. त्या तंत्रांत त्यांनी शक्तीला शून्य या संज्ञेने संबोधले आहे. हे शून्य विज्ञान व महासुख यांनी साकार झाले आहे. या शून्यातूनच सर्व काही उत्पन्न होते आणि त्यातच विलय पावते. हे परमशून्य होय. त्याला ते नैरात्मा म्हणतात. नैरात्मेचा संबंध बोधिसत्त्वाशी असतो. शिव आणि शक्ती ही जशी परस्परसंश्लिष्ट असतात, तशीच नैरात्मा व बोधिसत्त्व हीदेखील आलिंगनावस्थेत असतात. त्या दोघांचे द्वैत हे केवळ वरवरचे आहे, असे बौद्ध लोक मानतात.

**जैनांची शक्तिपूजा** – बौद्ध धर्मातील ध्यानी बुद्धांच्या पाच शक्तींप्रमाणेच जैनांच्या श्वेतांबर मतात प्रत्येक तीर्थंकराची एकेक शासनदेवी मानलेली आहे. जैनांमध्ये चक्रेश्वरी या देवीला फार महत्त्व आहे. रोहिणी, प्रज्ञप्ती, शृंखला, इ. सरस्वतीच्या सोळा प्रकारच्या विद्याव्यूहाला जैनांमध्ये मान्यता आहे. शाक्त संप्रदायाच्या सारस्वत कल्पालाही जैन लोक मानतात. जैनांनी आपल्या शासनदेवता, विद्यादेवी व चक्रेश्वरी यांच्या मूर्तीही घडवल्या आहेत. याशिवाय प्रत्येक तीर्थंकराची परिचारिका म्हणून एक यक्षिणी असते. शाक्त संप्रदायात शक्तीची जी विविध रूपे आकाराला आली आहेत, तीच रूपे यक्षिणी या रूपात वेगळ्या नावांनी जैनांनी स्वीकारली आहेत. तांत्रिकांच्या षट्चक्रवेधपद्धतीला अनुसरून जैनांनी आपले धर्मज्ञान निर्माण केले आहे. त्या ध्यानाच्या अंतर्गत पडस्थ नामक ध्यानात त्यांनी वर्णमयी देवीचे चिंतन सांगितले आहे. जैन मंत्रामध्ये प्रणव, माया, इत्यादींची बीजाक्षरे शाक्त तंत्राच्या अनुरूपच असतात.

**शक्तिपूजा व उपासना** – शक्तिपूजा ही स्मार्त व तांत्रिक अशा उभयविध पद्धतींनी केली जाते. स्मार्तपूजा ही सात्त्विक असते. तिच्यात अवडंबरही कमी असते. ती केवळ देवीच्या संतोषासाठी असते. सात्त्विक उपासना निष्काम असावी, असा संकेत आहे. पण काही कामना मनात असली, तरी बिघडत नाही. कारण सकाम उपासनेतही देवीचा संतोष आणि तिची कृपा या गोष्टी प्रथम अपेक्षित असतात. अशी ही उपासना पुढील पाच प्रकारांनी सिद्ध होते–

(१) अभिगमन – देवप्रतिमेची व देवगृहाची स्वच्छता ठेवणे, सडासंमार्जन, निर्माल्य दूर करणे, इत्यादी.

(२) उपादान – गंधपुष्पादी पूजासाहित्य जमवणे.

(३) योग – इष्ट देवतेच्या ठिकाणी आत्मभावना.

(४) स्वाध्याय – मंत्राचा अर्थ जाणून त्याचा जप करणे, स्तोत्रपाठ, नाम-गुणसंकीर्तन, इत्यादी.

(५) इज्या – वेदशास्त्रविहित चतु:षष्ट्यादी उपचारांनी पूजा करणे.

मंत्र, यंत्र, चक्र, न्यास, मुद्रा, दीक्षा, भूतशुद्धी, प्राणप्रतिष्ठा ही तांत्रिक उपासनेची अंगे होत. चर्या, क्रिया, योग, इ. प्रकारही आहेत. तंत्रसाधक मुख्यत्वे श्रीयंत्रावर देवीची उपासना करतो. साधकही स्वभावानुसार पशू, वीर किंवा दिव्य असतो. वीर साधकाला गुरूच्या सान्निध्यात एक विशिष्ट क्रिया करावी लागते. ती रहस्यसाधना असते. तिच्यात पंच मकारांचा समावेश असतो. या साधनेची दोन रूपे असतात – एक चक्रसाधना व दुसरे लतासाधना. पुराणकारांनी अशा प्रकारे शक्तिमाहात्म्य

प्रस्थापित केल्यानंतर शैव आणि वैष्णव संप्रदायांनाही आपापल्या मतांत शक्तितत्त्वाचा स्वीकार करणे भाग पडले. शैव संप्रदायात मग उमा ही शंकराची भार्या न राहता त्याची शक्ती ठरली. शैवांनी शक्तिरहित शिवाला 'शव'च ठरवून टाकले. काही उग्र शैव संप्रदायात शक्ती देवी शिवाला भूमीवर उताणा घालून त्याच्या उरावर नृत्य करते, असे तिचे ध्यान कल्पिले आहे.



शिवारूढा काली

**सीताशक्ती**– वाल्मीकी रामायणात सीता ही रामाची अर्धांगी आहे. ती पतिपरायण आहे. तिथले तिचे रूप अतीव सौम्य आणि सात्त्विक आहे. अध्यात्म रामायणातही सीतेचे हेच रूप कायम आहे. पण अद्‌भुतरामायणात तिचे उग्र शक्तिरूप आविष्कृत केले गेले. हे रामायण इ. स. च्या १४ व्या शतकाच्या सुमाराचे आहे. त्या काळात शक्तिसंप्रदाय भारतात सर्वत्र प्रभावी झाला होता. सीता ही आदिशक्ती आहे, ही कल्पना १० व्या ११ व्या शतकातच रूढ झाली होती. अद्‌भुतरामायणाने त्याच्या पुढे मजल मारली. सहस्रमुखी रावण जेव्हा रामाच्या हातून मरेना, तेव्हा सीतेने अट्टाहास करून एकदम विकराल रूप धारण केले. ती दीर्घजंघा बनली. तिने आपल्या गळ्यात मुंडमाळा घातल्या. ती चंडशेषा आणि घंटापाशधारिणी बनली. मग तिने क्षणार्धात रावणाची सहस्र मस्तके तोडून त्याला ठार मारले. तिने त्या वेळी आपल्या रोमरोमातून अक्राळ-विक्राळ अशा मातृका निर्माण केल्या. त्यांना बरोबर घेऊन सीता राक्षसमस्तकांचा चेंडू खेळू लागली. तिने नृत्य सुरू करताच पृथ्वी चळचळा कापू लागली. आकाशात देवांची विमाने एकमेकांवर आदळू लागली. जणू विश्वाचा प्रलयकाळच ओढवला. मग सर्व देव शिवाकडे गेले. शिव त्या सीतारूपी शक्तीचा उपशम करायला निघाला. शवरूप धारण करून तो सीतेच्या नाचत्या पायाखाली येऊन पडला. तेव्हा कुठे सीतेचे ते प्रलयंकर नृत्य थांबले. नंतर तिने रामाला आपले विश्वरूप दाखवून त्याला असे सुचवले, की 'तू माझ्या मदतीशिवाय काहीही करू शकत नाहीस.' मग रामाने तिची सहस्रनामांनी स्तुती केली (अद्‌भुतरामायण सर्ग १७–२६).

**राधाशक्ती** – देवी भागवत पाहिल्यावर राधेची योग्यता खूप उंचावलेली दिसते. प्रस्तुत पुराणानुसार राधा ही केवळ बरसान्यामध्ये राहणारी वृषभानूची कन्या नाही; तर ती श्रीकृष्ण परमात्म्याची परा शक्ती आहे. आद्याप्रकृतीची दुर्गा, राधा, लक्ष्मी, सरस्वती व सावित्री अशी पाच रूपे होतात. त्यांत राधेला दुसरे स्थान आहे. सीतेप्रमाणेच राधा ही अयोनिसंभव आहे. ती सीतेप्रमाणेच सर्वदेवमयी, सर्ववेदमयी, सर्वशास्त्रमयी, सर्वलोकमयी व सर्वशक्तिमयी आहे. ती सच्चिदानंदमयीही आहे. नारदपांचरात्रात राधेची सहस्र नामे दिलेली आहेत. ब्रह्मवैवर्तपुराणात राधेची उत्पत्ती सांगणारा एक श्लोक आहे तो असा –

> गोलोकवासिनी सेयमत्र कृष्णाज्ञयाधुना ।
> अयोनिसम्भवा देवी मूलप्रकृतिरीश्वरी ॥

अर्थ – पूर्वीची गोलोकवासिनी शक्ती तीच आता कृष्णाच्या आज्ञेने अयोनिसंभव अशी राधा बनली आहे. ती ईश्वरी मूलप्रकृती आहे.

राधा आणि कृष्ण ही दोघे एकप्राण, एकात्म व एकरूप आहेत. राधेच्या उपासनेवाचून श्रीकृष्णाच्या प्रेमाची प्राप्ती होऊ शकत नाही. निंबार्क संप्रदायात याच आशयाला प्राधान्य दिलेले आहे. राधा आणि कृष्ण हे एकाच ब्रह्मज्योतीचे दोन आविष्कार आहेत, असे त्यांनी म्हटले आहे.

**चौसष्ट शक्ती**– विद्याराज्ञी मंत्राची साधना करताना चौसष्ट शक्तींची आवरणपूजा करायची असते. कुलेशी, कुलनंदा, वागीशी, भैरवी, उमा, श्री, शांती, चंडा, धूम्रा, काली, करा-लिनी, महालक्ष्मी, कंकाली, रुद्रकाली, सरस्वती, वाग्वादिनी, नकुली, भद्रकाली, शशिप्रभा, प्रत्यंगिरा, सिद्धलक्ष्मी, अमृतेश्वरी, चंडिका, खेचरी, भूचरी, सिद्धा, कामाक्षी, हिंगुला, बला, उ[...], विजया, अजिता, नित्या, पराजिता, विलासिता, घोरा, वि[...], मुग्धा, धनेश्वरी, सोमेश्वरी, महाचंडा, विद्या, हंसी, विनायकी, वेदगर्भा, भीमा, उग्रा, वैद्या, सद्‌गती, उग्रेश्वरी, चंद्र[...], ज्योत्स्ना, सत्या, यशोवती, कुलिका, कामिनी, काम्या, ज्ञान[...], डाकिनी, राकिनी, लाकिनी, काकिनी, शाकिनी व हाकिनी अशी त्यांची नावे आहेत. पाहा–काली, दुर्गा, देवी. [कल्याण शक्ति-अंक; पूजातत्त्व; क. हे. इं.; भारती, मातृशक्ति–विशेषांक, सप्टें.-ऑक्टो. १९६१; तां. वा. शा. दृ.; भा. सं. सा. २; शक्ति विद्या; मंत्रमहोदधि; प्रसाद, शक्ति–विशेषांक, ऑगस्ट १९[...]

**शक्तिपात** एक उच्च दर्जाची यौगिक प्रक्रिया. गुरूने आपली शक्ती शिष्याच्या ठिकाणी संक्रांत करून त्याची आध्यात्मिक योग्यता वाढवणे व त्या द्वारे शिष्याला ईश्वराप्रत पोचवणे, या क्रियेला शक्तिपात म्हणतात. या प्रकाराला महायोग, सिद्धयोग, गुरुदत्तयोग व शक्तिसंचार अशीही नावे आहेत. गुरूने आपली शब्दशक्ती, क्रियाशक्ती, अनुभवशक्ती किंवा ज्ञानशक्ती यांच्या द्वारे आपली विद्या, कला; तसेच स्थूल व सूक्ष्म ज्ञान शिष्याच्या ठिकाणी संक्रांत करणे म्हणजे शक्तिपात होय. शिष्य ज्या मानाने मृदू, मध्य किंवा तीव्र शक्तीचा असेल, त्याप्रमाणे त्याच्या ठिकाणी त्या शक्तिपाताचा अनुभव मृदू, मध्य किंवा तीव्र या स्वरूपात दृग्गोचर होतो.

या कामी गुरूही तसाच म्हणजे सिद्धकोटीतला असावा लागतो. स्पर्श, दृष्टी, संकल्प किंवा शब्द यांपैकी कोणत्याही माध्यमाच्या द्वारे तो आत्मशक्ती शिष्याच्या हृदयात घालू शकतो. याविषयीचे वर्णन कुलार्णव तंत्रात आले आहे (उ. १४.३४–३७).

शक्तिपातदीक्षेचा मुख्य हेतू म्हणजे शिष्याची कुंडलिनी जागृत करणे हा असतो. ती जागृत होताच ती षट्चक्रांचा भेद करून ब्रह्मरंध्रात प्रवेशते व तिथे स्थिर होते. यौगिक परिभाषेत याच गोष्टीला समाधी लागणे, असे म्हणतात. ही दीक्षा जर बरोबर झाली, तर त्यामुळे शिष्याला प्रबोध व आनंद ही दोन्ही मिळतात. मालिनीविजय तंत्रात म्हटले आहे, की अशा शिष्याची शिवाच्या ठिकाणी भक्ती दृढ होते. त्याचा मंत्र सिद्ध होतो, सर्व प्राण्यांना स्वाधीन ठेवण्याचे सामर्थ्य त्याला मिळते, त्याला कवित्वस्फूर्ती होते व समस्त शास्त्ररहस्य अवगत होते.

शक्तिपातदीक्षा मिळाली, की लगेच साधक समाधिस्थितीप्रत पोचतो असे नाही. अल्पावधीत त्या अवस्थेला पोचणे किंवा न पोचणे हे दीक्षेच्या तीव्रतेवर व साधकाच्या धारणाशक्तीवर अवलंबून असते. शक्तिसंक्रमण झाले, की साधकाची देहशुद्धी करणे हे त्या शक्तीचे पहिले कार्य असते. त्यासाठी मानवी शरीरातल्या ७२ हजार नाड्यांतून ती फिरते व प्रत्येक नाडी तिच्या संचाराने शुद्ध होत जाते. शरीरान्तर्गत मल झाडून टाकणे व रोगांचे निर्मूलन करणे, ही कार्ये ती सहजपणे करते. त्यामुळे साधकाचे शरीर कांतिमान होते, जठराग्नी प्रदीप्त होतो, मन सदैव उत्साही व आनंदी राहते आणि निद्रासुख चांगले मिळते. इथून पुढे हळू हळू त्याला आध्यात्मिक अनुभव घडू लागतात. जर त्याने साधना अखंड चालू ठेवली, तर त्या अनुभवांना घनसांद्रता येत जाते. मात्र साधनेत शैथिल्य आल्यास शक्तिपातदीक्षा मिळूनही प्रगती होत नाही. पाहा – कुंडलिनी. [ श्रीगुरुदत्तयोग – श्री. शं. खानवेलकर, १९५७; देवात्मशक्ती – श्री. विनायकराव करमळकर, १९६३ ]

**शक्तिपीठे** शिवपत्नी सती हिच्याशी संबंधित अशी पवित्र स्थाने. शक्तिपीठांसंबंधी ब्रह्म, मत्स्य, पद्म, कूर्म, इ. पुराणांत एक कथा दिलेली आहे, ती अशी – सत्ययुगात दक्ष प्रजापतीने बृहस्पतिसव नामक एका यज्ञाला आरंभ केला. काही कारणाने पूर्वी शिवाने त्याचा अपमान केला होता. म्हणून त्याने आपली कन्या सती व जामात शिव यांना वगळून सर्व देवदेवतांना यज्ञासाठी निमंत्रण दिले. आपला पिता यज्ञ करीत आहे, तो पाहायला जावे, अशी सतीच्या मनात इच्छा उत्पन्न झाली आणि आपली इच्छा तिने शिवाच्या कानावर घातली. सतीने यज्ञासाठी पितृगृही जावे, हा विचार प्रथम शिवाला रुचला नाही. पण तिने फारच आग्रह धरल्यामुळे शिवाने तिला जाण्याची अनुज्ञा दिली. सती आपल्या अनुचरांसह पितृगृही गेली. पण तिथे कोणी तिची विचारपूससुद्धा केली नाही. इतकेच नव्हे, दक्षाने क्रोधाविष्ट होऊन तिच्या तोंडावर शिवाची निंदा करायला सुरवात केली. पित्याच्या मुखातून पतीची निंदा ऐकणे सतीला असह्य झाले आणि तिने यज्ञकुंडात उडी घेतली. तिच्या शरीरत्यागाची वार्ता समजताच शिव आपल्या गणांसह तिथे गेला. त्याने दक्षाला ठार मारले आणि त्याच्या यज्ञाचा विध्वंस केला. मग त्याने सतीचे शरीर आपल्या खांद्यावर टाकले आणि तो बेभान होऊन इकडे तिकडे हिंडू लागला. तेव्हा भगवान विष्णूने आपल्या सुदर्शनचक्राने सतीचा एकेक अवयव तोडला. तिची ही अंग–प्रत्यंगे एकावन्न ठिकाणी गळून पडली आणि ती स्थाने पुढे शक्तिपीठे बनली. त्या प्रत्येक ठिकाणी एकेक भैरव व एकेक शक्ती निरनिराळी रूपे धारण करून राहतात, अशी श्रद्धा आहे. या स्थानांना महापीठे असेही म्हणतात. कोणकोणत्या ठिकाणी सतीचा कोणकोणता अवयव गळून पडला आणि त्या ठिकाणी कोणता भैरव व कोणती शक्ती राहिली, त्याची माहिती शिवचरितात दिली आहे, ती अशी – स्थान, अंग किंवा प्रत्यंग, शक्ती आणि भैरव अशा क्रमाने ही नावे दिलेली आहेत–

(१) हिंगुला, ब्रह्मरंध्र, कोट्टरी, भीमलोचन.
(२) शर्कर, त्रिनेत्र, महिषमर्दिनी, क्रोधीश.
(३) तारा, नेत्रांशतारा, तारिणी, उन्मत्त.
(४) करतोयातट, वाम कर्ण, अपर्णा, वामेश.
(५) श्रीपर्वत, दक्षिण कर्ण, सुंदरी, सुंदरानंद.
(६) सुगंधा, नासिका, सुनंदा, त्र्यंबक.
(७) वक्रनाथ, मन, पापहरा, वक्रनाथ.
(८) गोदावरी, वाम गंड, विश्वमातृका, विश्वेश.
(९) गंडकी, दक्षिण गंड, गंडकी, चक्रपाणी.
(१०) अनल, ऊर्ध्व दंत, नारायणी, संक्रूर.
(११) पंचसागर, अधोदंत, वाराही, महारुद्र.

(१२) ज्वालामुखी, जिह्वा, अंबिका, वटकेश्वर उन्मत्त.
(१३) काश्मीर, कंठ, महामाया, त्रिसंध्य.
(१४) श्रीहट्ट, ग्रीवा, महालक्ष्मी, सर्वानंद.
(१५) भैरव पर्वत, ओष्ठ, अवंती, नम्रकर्ण.
(१६) प्रभास, अधर, चंद्रभागा, वक्रतुंड.
(१७) प्रभासखंड, मर्म, सिद्धेश्वरी, सिद्धेश्वर.
(१८) जनस्थान, चिबुक, भ्रामरी, विकृताक्ष.
(१९) प्रयाग, द्विहस्त–अंगुली, कमला, वेणीमाधव.
(२०) मानस सरोवर, दक्षिण हस्तार्ध, दाक्षायणी, हर.
(२१) चट्टग्राम, दक्षिण हस्तार्ध, भवानी, चंद्रशेखर.
(२२) मिथिला, वाम स्कंध, महादेवी, महोदर.
(२३) रत्नावली, दक्षिण स्कंध, शिवा, शिव.
(२४) मणिबंध, वाम मणिबंध, गायत्री, शंकर.
(२५) मणिवेद, दक्षिण मणिबंध, सावित्री, स्थाणू.
(२६) उजानी, वाम कफोनी, मंगलचंडी, कपिलांबर.
(२७) रणखंड, दक्षिण कफोनी, बहुलाक्षी, महाकाल.
(२८) बहुला, वाम बाहू, बहुला, भीरुक.
(२९) वक्रेश्वर, दक्षिण बाहू, वक्रेश्वरी, वक्रेश्वर.
(३०) जालंधर, वाम स्तन, त्रिपुरमालिनी, भीषण.
(३१) रामगिरी, दक्षिण स्तन, शिवानी, चंड.
(३२) वैवस्वत, पृष्ठ, त्रिपुटा, शमनकर्मन् निमिष.
(३३) वैद्यनाथ, हृदय, नवदुर्गा-जयदुर्गा, वैद्यनाथ.
(३४) उत्कल, नाभी, विजया, जय.
(३५) हरिद्वार, जठर, भैरवी, वक्र.
(३६) कोकामुख, कुक्षी, कोकेश्वरी, कोकेश्वर.
(३७) कांची, कंकाल, वेदगर्भा, रुरू.
(३८) कालमाधव, वाम नितंब, काली, असितांग.
(३९) नर्मदा, दक्षिण नितंब, शोनाक्षी, भद्रसेन.
(४०) कामरूप, महामुद्रा (योनी), कामाख्या, रावानंद.
(४१) मालव, वाम जानू, शुभचंडी, ताम्र.
(४२) त्रिस्रोता, दक्षिण जानू, चंडिका, सदानंद.
(४३) जयंती, वाम जंघा, जयंती, क्रमदीश्वर.
(४४) नेपाळ, दक्षिण जंघा, महामाया-नवदुर्गा, कपाली.
(४५) त्रिहुत, वाम पाद, अमरी, अमर.
(४६) त्रिपुरा, दक्षिण पाद, त्रिपुरा, नल.
(४७) क्षीरग्राम, दक्षिणपादांगुष्ठ, योगाद्या, क्षीरखंड.
(४८) कालीघाट, दक्षिणपादांगुली, कालिका, नकुलेश.
(४९) विभास, वाम गुल्फ, भीमरूपा, कपाली.
(५०) कुरुक्षेत्र, दक्षिण गुल्फ, संवरी-विमला, संवर्त.
(५१) विंध्यशेखर, वामपादांगुली, विंध्यवासिनी, पुण्यभाजन.

बहुतेक पुराणांत एकावन्न ही शक्तिपीठांची संख्या मानलेली आहे. पण काही तंत्रग्रंथांत व पुराणांत ही संख्या चार, सात, दहा, अठरा, बेचाळीस अशी वेगवेगळी सांगितली आहे. तसेच, तिथल्या देवतांच्या नावांतही एकवाक्यता नाही. देवी भागवतात एकशे आठ पीठांचा उल्लेख आहे आणि तिथे फक्त पीठस्थाने आणि त्यांच्या अधिदेवता एवढ्यांचाच निर्देश केलेला आहे.

ही सर्व शक्तिपीठे अत्यंत पूज्य मानलेली असून, भाविक लोक त्यांची यात्रा करतात व तिथल्या देवतांचे दर्शन घेतात. [ कल्याण-शक्ति-अंक; दि शाक्त पीठाज्, दिनेशचंद्र सरकार, १९४९ ]

**शक्ती** भाल्यासारखे एक शस्त्र. त्याचे पाते लोहाचे असून, दोन हात लांब असे. त्याचा दांडा एक गज लांब असून, त्याला मूठ लावलेली असे. त्याच्या टोकाला सिंहमुख व त्यातून जिभेसारखे टोकदार त्रिकोणी पाते बाहेर आलेले असे. हे वजनदार असल्यामुळे दोन्ही हातांनी फेकावे लागत असे. ते [illegible] गतीने जात असे.

या शस्त्राच्या आघाताने लक्ष्मण मूर्च्छित झाला, असे वर्णन रामायणात आहे. महाभारतात घटोत्कचाजवळच्या शक्तीचे वर्णन केलेले आहे. त्या शस्त्राला आठ चक्रे व शूल लावलेले होते. ते एक युद्धयंत्रच असावे. त्या शस्त्रामुळे कर्णाच्या रथाचे घोडे ठार झाले आणि त्याच्या सेनादलात हाहाकार झाला. तेव्हा कर्णाने घटोत्कचावर वासवी शक्तीचा प्रयोग केला. ती वासवी शक्ती म्हणजे एक दिव्य अस्त्र असावे. [ प्रा. भा. सां. ]

**शक्रव्रत** एक काम्य व्रत. व्रतावधी एक वर्ष. व्रतविधी अ[illegible] आश्विन पूर्णिमेला उपवास करून इंद्र-इंद्राणी, ऐरावत, वज्र व मातली यांची गंधादिकांनी पूजा करावी. उद्यापनाच्या वेळी सुवर्णदान द्यावे. फल – इंद्रलोकप्राप्ती. या व्रताचे अन्यही काही पर्याय आहेत. [ हि. ध. ]

**शक्वरी** एक वैदिक छंद. याच्या एका पादात चौदा अक्षरे असतात. या छंदाचे असंबाधा, वसंततिलका, सिंहोद्धता, अपराजिता, प्रहरणकलिका, वासंती, लोला व नांदीमुखी असे भेद आहेत.

ऋग्वेदात शक्वरी असा शब्द आलेला असून, तिथे त्याचा [illegible] शक्वरी मंत्र असा आहे. [ श. क.; वे. इं. ]

**शची पौलोमी** एक सूक्तद्रष्टी. पुलोमा असुराची कन्या म्हणून तिला पौलोमी असे म्हटले आहे. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे एकोणसाठावे सूक्त [illegible]

रचले आहे. या सूक्तात तिने आपल्या सवतीच्या नाशाची प्रार्थना केली आहे. या सवतीनाशक सूक्ताचा सूर्याला उद्देशून जप करतात. हिची एक ऋचा अशी –

**येनेन्द्रो हविषा कृत्व्य भवद् द्युम्न्युत्तमः।**
**इदं तदक्रि देवा असपत्ना किलाभुवम्॥**

(ऋ. १०.१५९.४)

अर्थ – हे हविर्दत्त देवांनो, तुमच्या कृपेने इंद्रासारखा जगद्विख्यात पती प्राप्त झालेली मी आज सवतीच्या काचातून मुक्त झाले आहे.

वेदोत्तरकालात हिला इंद्राची पत्नी व जयंताची आई असे म्हटले आहे. पाहा – इंद्राणी. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**शततारका** अश्विन्यादी नक्षत्रगणनेतले चौविसावे नक्षत्र. यालाच शतभिषक् किंवा शतभिषा असे आणखी एक नाव आहे. धनिष्ठा आणि पूर्वा भाद्रपदा यांच्या खालच्या अंगाला जिथे विषुववृत्ताला आयनिक वृत्त छेदते, त्या दुबेळक्यात शततारकांचे घर आहे. हा एक शंभर तारकांचा मंडलाकृती पुंज आहे. वरुण ही या नक्षत्राची देवता आहे. या नक्षत्राचे शततारका हे नाव वेदकाळानंतरचे आहे.

या नक्षत्रावर जन्मलेली व्यक्ती कोळी, धोबी, दारूचा किंवा मासे विकण्याचा धंदा करणारी; सत्यवचनी, बोलकी, कठोर बोलणारी, धाडसी, अविचारी, स्वतंत्र वृत्तीची, जुगारी, कुमार्गी, स्त्रीलंपट, चतुर, शत्रूचा पूर्ण निःपात करणारी अशी असते, असे कोष्ठीप्रदीपात व नाक्षत्र फल देणाऱ्या अन्य ग्रंथांत म्हटले आहे. शततारका हे नक्षत्र कल्याणप्रद, ऊर्ध्वमुख, मंदलोचन आहे.

तै. ब्राह्मणात या नक्षत्राविषयी म्हटले आहे, ते असे –

**क्षत्रस्य राजा वरुणोऽधिराजः। नक्षत्राणां शतभिषग्वसिष्ठः॥**
**तौ देवेभ्यः कृणुतो दीर्घमायुः। शतं सहस्रा भेषजानि धत्तः॥**
**यज्ञं नो राजा वरुण उपयातु। तं नो विश्वे अभिसंयन्तु देवाः॥**
**तन्नो नक्षत्रं शतभिषग्जुषाणम्। दीर्घमायुः प्रतिरद्भेषजानि॥**

(तै. ब्रा. ३.१.२)

अर्थ – क्षत्रियांचा राजा वरुण हा सर्वांचा अधिराजा आहे. (सर्व) नक्षत्रांमध्ये शततारका नक्षत्र श्रेष्ठ आहे. ते दोघेजण म्हणजे शततारका व वरुण, देवांच्या करिता (यजमानास) दीर्घायुष्य देवोत आणि (त्यासाठी) शेकडो हजारो औषधे देवोत. राजा वरुण आमच्या यज्ञात हवी ग्रहण करण्यासाठी येवो. सर्व देव या आमच्या यज्ञात येवोत. प्रेमळ असे शततारका नक्षत्र औषधे देऊन आम्हांस दीर्घायुष्य देवो.

[नक्षत्र लोक; ज्योतिषकौस्तुभ; च. व. चि.; श. क.]

**शतपथ ब्राह्मण** शुक्ल यजुर्वेदाचा ब्राह्मणग्रंथ. शुक्ल यजुर्वेदाच्या माध्यंदिन व काण्व दोन्ही शाखांच्या दोन्ही ब्राह्मणांचे नाव शतपथ असेच आहे. या ब्राह्मणात शंभर अध्याय असल्यामुळे याला शतपथ हे नाव मिळाले आहे. माध्यंदिन शतपथ ब्राह्मणात १४ कांडे, १०० अध्याय, ६८ प्रपाठक, ४३८ ब्राह्मणे व ७६२४ कंडिका आहेत. काण्व शतपथ ब्राह्मणात प्रपाठक हे विभाग नाहीत. त्यात १७ कांडे, १०४ अध्याय, ४३५ ब्राह्मणे व ६८०६ कंडिका आहेत. या दोन्ही ब्राह्मणांत बरेचसे साम्य आहे; पण काही पाठभेद आहेत.

माध्यंदिन शतपथ ब्राह्मणात पुढील विषय आलेले आहेत – पहिल्या कांडात दर्शपूर्णमास इष्टीचे व दुसऱ्या कांडात आधान, अग्निहोत्र, पिंडपितृयज्ञ, आग्रयण व चातुर्मास्य याग यांचे वर्णन आहे. तिसऱ्या व चौथ्या कांडांत सोमयागाशी संबद्ध अशा नाना यागांचे विवरण आहे. पाचव्या कांडात वाजपेय व राजसूय या यागांचे विवेचन आहे. सहा ते दहा या कांडांत उखासंभरण, विष्णुक्रम, वनीवाहनकर्म, चयनवर्णन, शतरुद्रिय होम, चितिसंपत्ती, अग्नीची उपासना, इ. विषयांचे वर्णन आहे. अकराव्या कांडात काही कर्मे सांगितली आहेत आणि ती समजावी म्हणून यज्ञयागांच्या कथा दिल्या आहेत. बाराव्या कांडात सौत्रामणी याग व प्रायश्चित्त यांचा विधी आहे. तेराव्या कांडात अश्वमेध, सर्वमेध, पुरुषमेध व पितृमेध यांची चर्चा आहे. चौदावे कांड हे आरण्यक कांड म्हणून प्रसिद्ध आहे. त्यातल्या शेवटच्या भागाला बृहदारण्यकोपनिषद असे नाव आहे. बारा हजार ऋचा, आठ हजार यजुस् व चार हजार सामे यांचा संग्रह प्रजापतीने केला, असे या ब्राह्मणात सांगितले आहे. पण सांप्रत उपलब्ध असलेल्या तीन्ही वेदांत एवढे मंत्र मिळत नाहीत.

या ब्राह्मणात महाभारतातील अनेक कथांचे सार आलेले आहे. सीता व राम यांची नावेही या ब्राह्मणात आढळतात. कद्रू व सुपर्णा यांचे युद्ध, पुरूरवा व उर्वशी यांची कथा, अश्विनीकुमारांनी च्यवन ऋषीला यौवन दिले ती कथा, मनू व मासा ही कथा, इ. काही कथा यात संक्षेपाने दिल्या आहेत. मिथिलेच्या विदेह राजाच्या दरबारांत अनेकदा जे मोठमोठे वादविवाद होत, त्यांचे बरेच विस्तृत वर्णन यात आले आहे. या ब्राह्मणाचे वैशिष्टच असे, की यात निरनिराळ्या यज्ञयागांचे सांगोपांग वर्णन केलेले आहे.

सांप्रत उपलब्ध असलेल्या सर्व ब्राह्मणग्रंथांत शतपथ ब्राह्मण हे प्राचीन आहे. आर्यांचा प्रसार भारतात कुठवर झाला होता, त्याचे दिग्दर्शन करणारी एक कथा याच्या पहिल्या कांडात आली आहे. विदेघ माथव सरस्वतीच्या तीरावर राहत होता. तिथून अग्नी वैश्वानर सर्व स्थाने जाळीत जाळीत उत्तरगिरीतून

(हिमालयातून) पूर्वेकडे वाहणाऱ्या सदानीरा नदीपर्यंत गेला व तिथेच राहिला. राजा विदेघ माथव व त्याचा पुरोहित गोतम रहूगण त्याच्या मागे मागे गेले आणि त्यांनी अग्नीला आपले निवासस्थान कोणते करावे, ते विचारले. त्याने सदानीरा (गंडक) नदीच्या पूर्वेकडील प्रदेशात राहण्याची त्यांना आज्ञा केली. या कथेवरून त्या काळी वैदिक धर्माचा प्रसार भारताच्या पूर्वभागात झाला होता, हे सूचित होते.

या ब्राह्मणात (१.१.१.६) सांगितले आहे, की देवांच्या उत्पत्तीमुळे उजेड व असुरांच्या उत्पत्तीमुळे अंधार झाला. त्यामुळे दिवस हा देवांचा व रात्र असुरांची ठरली आहे. अंधारात असुरांचे बल वाढते, ते त्यामुळेच.

यात आठ वसू, अकरा रुद्र, बारा आदित्य, आकाश व पृथ्वी अशा तेहतीस देवता मानलेल्या आहेत.

यात रेत किंवा वीर्य याला सोम असे म्हटले आहे (१.९.२.९). रेत शरीरातील प्राण व इंद्रिये यांना प्रसन्न ठेवते. मस्तकाला शक्ती देणारा रेताशिवाय दुसरा कुठलाही दिव्य पदार्थ नाही. म्हणून त्याचे रक्षण करावे, असा उपदेश यात केला आहे.

यात स्त्रियांचा उत्तराधिकार मानलेला नाही (श. ब्रा. ४.४.२.१३). कारण हिंदू धर्मात स्त्रीचे स्वतंत्र अस्तित्व मानलेले नाही. स्त्रीचे गोत्र, प्रवर वगैरे पतीच्या गोत्रादिकात विलीन होतात. पती हेच तिचे सर्वस्व असते. पुढे यात असे सांगितले आहे, की पुरुष हा शरीराचा अर्धा भाग आहे. जोपर्यंत त्याला पत्नी मिळत नाही व पुत्र होत नाही, तोपर्यंत तो पूर्ण होत नाही (श. ब्रा. ५.१.६.१०). ज्या मनुष्याला पत्नी नाही, त्याला यज्ञ करता येत नाही, असेही सांगितले आहे.

वैदिक वाङ्मयात या ब्राह्मणाला अनेक दृष्टींनी महत्त्व आहे. इतर ब्राह्मणग्रंथांप्रमाणे यात विशिष्ट यज्ञांचे स्पष्टीकरण तर केलेले आहेच; त्याव्यतिरिक्त, शब्दांचे अर्थ आणि विशिष्ट मंत्रांचे स्पष्टीकरणही दिले आहे. सर्व वैदिक वाङ्मयावर या ग्रंथामुळे विशेष प्रकाश पडतो. तत्कालीन वेगवेगळ्या विद्यांत प्रवीण असणाऱ्या आचार्यांची नावे या ग्रंथात आढळतात. याच्या ६ ते १० या कांडांत वेदीच्या रचनेसंबंधी विचार केलेला असून, त्यात शांडिल्याच्या मताला प्राधान्य दिलेले आहे. इतर भागात साधारणपणे याज्ञवल्क्याच्या मताला महत्त्व दिलेले असून, शेवटी तर हा ग्रंथ याज्ञवल्क्यानेच लिहिला, असे सांगितले आहे. यात गांधार, साल व केकय या वायव्य प्रदेशातील लोकांचा निर्देश असून, कुरू, पांचाल, कोसल, विदेह, सृंजय या प्रांतांतील लोकांचा उल्लेख प्रामुख्याने आहे. त्यावरून वैदिक संस्कृतीचे केंद्र पंजाबातून पूर्व भारतात सरकल्याचे कळते.

शतपथ ब्राह्मणावर हरिस्वामी, सायण व कवींद्राचार्य सरस्वती यांची भाष्ये आहेत. [वै. सा. सं.; वै. सा.; वे. शा. दी.; हिदुत्व]

**शतप्रभेदन वैरूप** एक सूक्तद्रष्टा. हा विरूपाचा मुलगा म्हणून याला वैरूप म्हटले आहे. ऋग्वेदात याचा उल्लेख नाही. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे तेरावे सूक्त याने रचले आहे. प्रस्तुत सूक्त इंद्रस्तुतिपर आहे. याची एक ऋचा (१०.११३.७) अशी–

**या वीर्याणि प्रथमानि कर्त्वा महित्वेभिर्यतमानौ समीयतुः।**
**ध्वान्तं तमोऽव दध्वसे हत इन्द्रोमह्ना पूर्वहूतावपत्यत ।।**

अर्थ–प्राणपणाने लढणारे इन्द्र व वृत्र एकत्र येताच वृत्र अंधकारराशीत लुप्त होऊन, इन्द्रमाहात्म्य वृद्धिगत झाले. [प्रा. च. को.; म. ज्ञा. को.; ऋ. म. भा.]

**शतभिषक्स्नान** एक नक्षत्रव्रत. विष्णू व वरुण या दोन्ही व्रताच्या देवता होत. व्रतविधी असा– धनिष्ठा नक्षत्राच्या दिवशी व्रतधारी व्यक्ती व त्याचा पुरोहित या दोघांनीही उपवास करावा. व्रत करणाऱ्याला भद्रासनावर बसवून, शंभर जलपात्रांमध्ये शंख व मोती घालून, त्या पाण्याने त्याला स्नान घालावे. मग त्याने कोरे वस्त्र परिधान करून केशव, वरुण, चंद्र व शतभिषक नक्षत्र यांची गंधादिकांनी पूजा करावी. पुरोहिताला पेय पदार्थ, गाय, एक भांडे व सोने द्यावे. इतर ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. व्रतकर्त्याने बांबूच्या [illegible] ठेवलेले आणि शमी व शाल्मली यांच्या पानांत गुंडाळलेले [illegible] शरीरावर धारण करावे. फल–रोगनाश. [हि. ध.]

**शतातृण्णा** एक यज्ञीय पात्र. शंभर ठिकाणी छिद्रे असलेली ही एक मातीची स्थाली असते. त्यामुळे हिला शतछिद्रा असेही म्हणतात. सुरेचा होम झाल्यावर दक्षिणाग्नीवर ही स्थाली ठेवून, तिच्यात पितरांना उद्देशून सुरा ओततात. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**शतानंद** (इ. स. चे ११ वे शतक) एक प्रसिद्ध ज्योतिषी ग्रंथकार. हा जगन्नाथपुरीचा रहिवासी [illegible] वैष्णव होता. याने वराहमिहिराच्या सूर्यसिद्धान्ताधारे भास्वती करण नावाचा एक करणग्रंथ रचला आहे. या ग्रंथात [illegible] क्षेपक स्पष्ट मेषसंक्रमणकालाचे म्हणजे शके १०२१ [illegible] अमावास्या, गुरुवार या दिवशीचे आहेत. मध्यमग्रह अहर्गणावरून नसून वर्षगणावरून आहे. श्री. शं. बा. दीक्षि‌तांच्या मते ही पद्धत फार सोयीची आहे. या ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणजे, यात क्षेपक आणि ग्रहगतीचे गुणक [illegible]

शतांश पद्धतीने दिले आहेत. ही पद्धत आजच्या दशांश पद्धतीशी मिळतीजुळती आहे.

भास्वतीकरण हा ग्रंथ तिथिध्रुवाधिकार, ग्रहध्रुवाधिकार, स्फुटतिथ्यधिकार, ग्रहस्फुटाधिकार, त्रिप्रश्न, चंद्रग्रहण, सूर्यग्रहण व परिलेख अशा आठ अधिकारांत विभागलेला आहे. प्रस्तुत ग्रंथावर बऱ्याच संस्कृत टीका आहेत. मलिक मुहंमद जायसीच्या पद्मावत ग्रंथातही याची चर्चा आढळते. यावरून हा ग्रंथ फार लोकप्रिय असावा, असे दिसते. या ग्रंथाचे बहुतेक सर्व टीकाकार उत्तर भारतातले आहेत. [ भा. ज्यो. इ.; भा. ज्यो. शा. ]

**शताक्षी** देवीचे एक रूप. तिची कथा अशी– पृथ्वीवरील ब्राह्मण वेदमंत्र विसरले. त्यामुळे इथल्या यज्ञक्रिया बंद पडल्या. पाऊस पडेनासा झाला. शंभर वर्षे भयंकर दुष्काळ पडला. तेव्हा हा अनर्थ टाळण्यासाठी काही ब्राह्मण हिमालयावर गेले आणि त्यांनी तिथे देवीची प्रार्थना केली. जगताच्या कल्याणासाठी देवीने हजारो नेत्रांनी युक्त असे आपले स्वरूप प्रकट केले. पुढे तिच्या कृपेनेच सर्व लोक सुखी झाले. राजा हरिश्चंद्र या देवीचा भक्त होता. (दे. भा. ७. २८–२९).

**शत्रुंजय** एक जैन तीर्थस्थान. याला सिद्धाचल व पुंडरीक अशी अन्य नावे आहेत. जैनांनी भारतातले पाच पर्वत पवित्र मानले आहेत. गिरनार, शत्रुंजय, संमेत शिखर, अबू व तरंग ही त्यांची नावे होत. शत्रुंजय हे स्थान सौराष्ट्राच्या पालिताणा शहराजवळ आहे. शत्रुंजय प्राधान्याने श्वेतांबर जैनांचे क्षेत्र आहे. या पर्वतावर सुमारे नऊशे मंदिरे असून, प्रत्येक मंदिरात तीर्थंकराची संगमरवरी मूर्ती आहे. जगातील सर्वांत मोठी मंदिरनगरी, असे या स्थानाचे वर्णन श्री. बर्जेस यांनी केले आहे.

शत्रुंजय पर्वतावर पहिला तीर्थंकर ऋषभदेव याने तप केले होते, असे सांगतात. पांडवांना व अनेक मुनींना इथे मोक्ष मिळाला, अशी जैनांची समजूत आहे.

गुजरातमधील कुमारपाल राजाचा अधिकारी वाघदेवभट्ट याने इथल्या काही मंदिरांचा जीर्णोद्धार केला होता. इथे असलेल्या मंदिरांपैकी चौमुख मंदिर, आदिनाथ, कुमारपाल, विमलशाह, संप्रीतिराजा वगैरे मंदिरे उत्तम आहेत. शत्रुंजयावरील सर्वच मंदिरांभोवती एक प्रचंड तट आहे.

श्वेतांबर जैन या पर्वताची परिक्रमा करतात. कार्तिक व चैत्र पूर्णिमेला इथे मोठी यात्रा भरते.

या तीर्थस्थानी श्रावकांना निवास, भोजन, इ. गोष्टी निषिद्ध आहेत. लघुशंकाही निषिद्ध आहे. [ कल्याण–तीर्थांक; हि. जॉ. ए. इं.; वि. मुं. रा. प.; अ. अ.; जै. ध.; भा. प्रा. जै. ती. ]

**शत्रुनाशकव्रत** एक नक्षत्रव्रत. कृत्तिका किंवा भरणी नक्षत्र असेल त्या दिवशी उपवास करून हे व्रत करायचे असते. व्रतविधी असा– पांढरी फुले, केशर, गुग्गुल, धूप, तुपाचा दिवा, तांबडे वस्त्र यांनी वासुदेवाची पूजा करावी. होम करून मोहऱ्यांचे हवन करावे. ब्राह्मणांना आयुधे, दक्षिणा व भोजन द्यावे. फल– शत्रुनाश. [ हि. ध. ]

**शत्रुमारणयंत्र** प्रबल किंवा दुर्बल शत्रूला मरण यावे म्हणून या यंत्राचा प्रयोग करतात. प्रयोग असा – वद्य चतुर्दशीला मध्यरात्री, निःशंक मनाने स्मशानात जाऊन, एकांतात एकटेच नग्न बसून, विषमिश्रित हरताळाने भूर्जपत्रावर कावळ्याच्या पिसाच्या लेखणीने त्रिकोण काढावा. त्रिकोणाच्या मध्यभागी ह्रीं हे बीजाक्षर लिहून, त्याखाली साध्यनाम लिहावे. त्रिकोणाच्या प्रत्येक कोनाला लागून एकेक त्रिशूळ काढावा. अशा रीतीने यंत्र पूर्ण झाल्यावर त्याची यथाविधि पूजा करावी. पूजेत प्राधान्याने स्वरक्ताचा उपयोग करून बली व मांसोपहार द्यावा. मग ते यंत्र माणसाच्या पायाच्या हाडात ठेवून स्मशानात पुरावे. या प्रयोगानंतर शत्रू हमखास मरण पावतो, अशी मांत्रिकांची समजूत आहे.

याच उद्दिष्टाच्या सफलतेसाठी किंवा शत्रूवर विजय मिळवण्यासाठी अथवा त्याचे उच्चाटन होण्यासाठी किंवा शत्रूशत्रूत विद्वेष निर्माण करण्यासाठी यंत्रचिंतामणीत अन्यही काही यंत्रे आणि मंत्रमहोदधीत काही मंत्र सांगितले आहेत. [ यं. चिं. ]

**शनिप्रदोषव्रत** एक पूजाप्रधान काम्य व्रत. कोणत्याही महिन्यातील त्रयोदशी शनिवारी आल्यास हे व्रत करावे. परंतु विशिष्ट हेतू मनात ठेवून हे व्रत करायचे असेल, तर ते कार्तिक शुद्ध त्रयोदशी ज्या शनिवारी येईल, त्या दिवशी करावे, असे शास्त्रकार सांगतात. स्त्रिया व पुरुष या उभयतांना हे व्रत करता येते. व्रतावधी एक वर्ष. परंतु निष्काम आचरायचे असेल, तर ते बारा वर्षे करतात. शिव ही या व्रताची प्रधान देवता होय. व्रतविधी असा –

व्रतदिनी आवळे व तीळ यांचा कल्क लावून मध्याह्नस्नान करावे. पंचोपचारांनी शिवपूजा करावी. प्रदोषकाल झाला म्हणजे पुन्हा स्नान करून षोडशोपचारांनी शिवलिंगाची पूजा करावी. पूजेच्या वेळी एक सहस्र किंवा शंभर अथवा बत्तीस तुपाचे दिवे लावावे. पूजा आटोपल्यावर शिवाची निरनिराळ्या शंभर नावांनी स्तुती करावी. शंभर प्रदक्षिणा व तितकेच नम-

स्कार करावे.

कार्तिकातल्या शनिवारी संपूर्ण त्रयोदशी असेल, तेव्हा या व्रताचे उद्यापन करावे. उद्यापनाच्या वेळी दशभुज अर्धनारीनटेश्वराची सोन्याची प्रतिमा करून तिची पूजा करावी. रात्री गीत, नृत्य, इ. कार्यक्रम करून जागर करावा. दुसऱ्या दिवशी आचार्यपूजा, ब्राह्मणसंतर्पण व गोदान देऊन व्रतसमाप्ती करावी. इंद्राने हे व्रत करून वृत्रासुराचा नाश केला, अशी कथा आहे. फल – संतती, आयुरारोग्य व शत्रुनाश. [ हि. ध.; व्रतराज ]

**शनिवार** सप्ताहातला सातवा वार. या दिवशी सूर्योदयाच्या वेळी शनीचा होरा असतो, म्हणून संपूर्ण दिवसाला शनिवार हे नाव मिळाले आहे. या वाराचा अधिपती इंद्र असून ब्रह्मा ही त्याची देवता आहे. चौथ्या प्रहरी याचा विशेष काल असतो. हा रात्रिदोषाचा वार आहे. या वारी तैलाभ्यंग करावे असे सांगितले आहे. हा वार संपत्तिप्रद मानतात.

शनिवारी गृहारम्भ, गृहप्रवेश इ. स्थिरकृत्ये करायची असतात. लोखंड, पोलाद, शिसे, कथील इ. धातूंचे व्यवहारही या दिवशी केले असता फलप्रद होतात.

शनी अनिष्ट असता त्या वारी मारुतीची उपासना करतात, शनिमाहात्म्य वाचतात. श्रावणातल्या शनिवाराला संपत शनिवार असे नाव आहे. त्या दिवशी सूर्योदयापूर्वी अश्वत्थाची पूजा करावी व एका मुंजा मुलाला अभ्यंगस्नान घालून भोजन घालावे असे सांगितले आहे. शनिवारी प्रवासाला निघू नये आणि नूतन वस्त्र धारणादी मंगल कृत्येही करू नयेत. शनिवारी भाजलेले चणे खाऊ नयेत. कोळसा व तेल यांची खरेदी विक्री करू नये.

चैत्र कृष्ण त्रयोदशी शततारका नक्षत्र आणि शनिवार यांनी युक्त असता तो महावारुणी योग होतो. या योगावर गंगास्नान अतिपुण्यप्रद मानलेले आहे. [ श. क.; अ. वृ. ज्यो. ]

**शनिवारव्रत** श्रावणातल्या प्रत्येक शनिवारी हे व्रत करतात. व्रतविधी असा – शनीच्या लोखंडाच्या मूर्तीला पंचामृताचे स्नान घालून तिची पूजा करावी. शनीच्या कोणस्थ, पिंगल, बभ्रू, कृष्ण, रौद्र, अंतक, यम, सौरी, शनैश्चर व मंद या नावांचा जप करावा. तांदूळ व उडीद एकत्र शिजवलेली खिचडी, पायस, अंबिल आणि पुऱ्या, यांचा नैवेद्य दाखवावा. फल – शनिबाधेचा नाश.

या व्रताचा आणखी एक पर्याय पुढीलप्रमाणे आहे–श्रावणातल्या प्रत्येक शनिवारी लक्ष्मी–नृसिंह, शनी व हनुमान यांची पूजा करावी. या दिवशी मारुतीला रुईच्या पानांची माळ घालावी. लक्ष्मी-नृसिंहाप्रीत्यर्थ ब्राह्मण व सवाष्ण यांना जवायला बोलवावे. शनीप्रीत्यर्थ सूर्योदयापूर्वी पिंपळाची पूजा करावी. मुंज्या मुलाला अभ्यंग स्नान व भोजन घालावे. एकभुक्त राहावे. श्रावण शनिवाराला संपत शनिवार असे म्हणतात. या व्रताची कथा अशी –

एक गरीब ब्राह्मण होता. त्याला तीन सुना होत्या. तो सर्वांना घेऊन शेतावर जाई. परंतु धाकटचा सुनेला मात्र घरी ठेवी. एके दिवशी श्रावणातल्या शनिवारी शनिदेव कुष्ठरोग्याचे रूप घेऊन तिच्या दारात आला आणि तिला म्हणाला. 'मला आंघोळ घालून काहीतरी खायला दे.' सुनेने त्याला तेल लावून आंघोळ घातली व भाकरी खायला दिली. शनी संतुष्ट झाला. त्याने आपली उष्टी पत्रावळ वळचणीला खोचली आणि 'तुला संपत्ती मिळेल' असा वर तिला दिला. संध्याकाळी शेतावरची मंडळी घरी परततात तो त्यांना घर भरलेले दिसले. सर्वांना आनंद झाला. दुसऱ्या शनिवारी ब्राह्मणाने दुसऱ्या सुनेला घरी ठेवले. तिसऱ्या शनिवारी तिसऱ्या सुनेला घरी ठेवले. या दोन्ही वारी शनिदेव आला. पण तिथे त्याला काही मिळाले नाही. तो शाप देऊन निघून गेला. यामुळे ब्राह्मण फार दुःखी झाला. चौथ्या शनिवारी त्याने पुन्हा धाकटचा सुनेला घरी ठेवले. शनिदेव कुष्ठरोगी बनून आला. तिने प्रेमाने त्याचा आदरसत्कार केला. तो वर देऊन निघून गेला. सायंकाळी सासरा घरी आला तेव्हा त्याला पुन्हा घर भरलेले दिसले. त्याने धाकटचा सुनेला याचे कारण विचारले. सुनेने घडलेली हकीगत निवेदन केली. वळचणीची उष्टी पत्रावळ काढून पाहिली, तो तीत त्याला हिरे–माणके मिळाली. त्या दिवसापासून ब्राह्मण संपत शनिवारचे व्रत करू लागला. [ हि. ध. ]

**शनिव्रत** एक काम्य व्रत. व्रतावधी एक वर्ष. व्रतविधी असा– शनिवारी तेल लावून स्नान करावे आणि एका ब्राह्मणाला तेल दान द्यावे. उद्यापनाच्या वेळी शनीची लोहमूर्ती तेलाने भरलेल्या लोखंडाच्या किंवा मातीच्या पात्रात ठेवून ती व काळ्या वस्त्रांची एक जोडी दान द्यावी. 'शं नो देवीरभिष्टये' हा मंत्र म्हणावा. फल – शनिबाधेचा नाश. [ हि. ध. ]

**शनी** सूर्यमालेतला सातवा ग्रह. हा गुरूपेक्षा लहान व इतर ग्रहांपेक्षा मोठा आहे. पृथ्वीहून त्याचा आकार ७५० पट मोठा असून, तो सूर्यापासून ८८ कोटी ६० लक्ष मैल दूर आहे. त्याला सूर्याभोवती एक प्रदक्षिणा पुरी करायला सामान्यपणे २९.५ वर्षे लागतात व स्वतःभोवती प्रदक्षिणा पुरी करायला १० तास १४ मिनिटे लागतात. शनीचे वस्तुमान पृथ्वीच्या ९५ पट आहे.

साध्या डोळ्यांनी पाहिला असता शनी फिकट पिवळा दिसतो

दुर्बिणीतून पाहिले असता त्याच्या भोवती तीन वलय आणि दहा उपग्रह दिसतात. हे उपग्रह शनीपासून अतिदूर असल्यामुळे फार बारीक दिसतात. शनीचा आकार गोल नसून चपटा आहे. इतका चपटा आकार दुसऱ्या कोणत्याही ग्रहाचा नाही. शनीवरील सर्व पदार्थ पाण्याहूनही पातळ असावे, असे अनुमान आहे. शनीभोवती अतिशय दाट व ढगांनी व्यापलेले वातावरण आहे. तो सूर्यापासून खूपच दूर असल्यामुळे त्याच्यावरचे उष्णतामान गुरूपेक्षा कमीच आहे. शनीवर मिथेन वायूच्या रेषा अधिक प्रभावी आणि अमोनियाच्या रेषा कमी प्रभावी दिसतात. शनीच्या पृष्ठभागाचे तपमान सुमारे १५५° सें. ग्रे. आहे. शनीला स्वतःचेही काही तेज असावे, असे वाटते. त्याच्यावरचे वातावरण अतिशय थंड आहे.

शनी हा सूर्याची लहानशी प्रतिमाच आहे. म्हणूनच त्याला सूर्यपुत्र म्हटले असावे. शनीभोवतालच्या १६० लक्ष मैलांच्या प्रदेशात त्याचे ९ उपग्रह त्याच्या भोवती फिरत असतात. त्यांतला सर्वांत मोठा उपग्रह २६०० मैल व्यासाचा आहे; तर सर्वांत धाकटा ३०० मैल व्यासाचा आहे.

शनीभोवती असलेल्या वलयांमुळे तो फार सुंदर दिसतो. या वलयांपैकी बाहेरची दोन वलये चकचकीत आहेत व आतले वलय तेजोहीन आहे. या वलयांचा विस्तार खूप मोठा आहे. सर्वांत बाहेरच्या वलयाचा व्यास १७२ हजार मैल आहे व सर्वांत आतल्या वलयाचा व्यास १५० हजार मैल आहे. बाहेरच्या वलयाची कड शनीच्या मध्यबिंदूपासून ८६ हजार मैल आहे. ही वलये शनीच्या विषुववृत्ताभोवती पसरलेली असून, ती सामान्यपणे पारदर्शक आहेत. धुळीच्या कणाएवढ्या अतिलहान अशा कोटी कोटी उपग्रहांच्या योगाने ती वनली आहेत.



शनी–नवग्रहमूर्तीतले रूप

जातकशास्त्रातले शनीचे वर्णन असे – हा सूर्याला छायेपासून झालेला पुत्र होय. याचा जन्म पौष शु. अष्टमी या दिवशी रेवती नक्षत्रावर सूर्यास्ताच्या वेळी झाला. यम व यमुना ही त्याची भावंडे होत. सूर्याने छायेला उपेक्षेने बागवले हे सहन न होऊन त्याने सूर्याचा युद्धात पराभव केला. सतीच्या विरहाने शंकराच्या नेत्रांतून पाझरणारे अश्रुबिंदू त्याच्यावर पडले म्हणून तो काळा झाला, अशी कथा कालिकापुराणात आहे. याने शिव आणि त्रिपुर यांच्या युद्धात शिवाच्या रथात बसून नरकासुराशी युद्ध केले, अशी कथा भागवत पुराणात आहे. अगस्त्य ऋषीला अश्वत्थ व पिप्पल हे त्रास देऊ लागले, म्हणून शनीने त्यांना ठार मारले. हा लोकांना उपद्रव करू लागला म्हणून याला संतुष्ट करण्यासाठी शंकराने बारा राशींतल्या मकर व कुंभ या दोन राशींचे आधिपत्य याला दिले व जो कोणी शनीची पूजा करील त्याला सुख मिळेल, असे सांगितले.

आकाशात रोहिणीचा तारकापुंज शकटाकृती आहे. क्वचित्प्रसंगी शनी या रोहिणीशकटाचा भेद करून पुढे जातो, तेव्हा जगावर अरिष्ट कोसळते, असे जातकशास्त्रात सांगितले आहे.

शनीच्या गुणकर्मांवरून त्याला शनैश्चर, मंद, रौद्र, कृष्ण, इ. दहा नावे आहेत. या नावांचा एक श्लोक आहे तो असा–

कोणान्तको रौद्रयमोऽथ बभ्रुः।
कृष्णः शनिः पिङ्गलमन्दसौरिः॥

शनीच्या या दहा नावांचे स्मरण केले असता शनीची पीडा दूर होते, असे सांगितले आहे.

शनी हा पापग्रह आहे. त्याची साडेसाती प्रसिद्ध आहे. एखाद्या माणसाच्या राशीच्या मागच्या राशीत, त्याच्या स्वतःच्या राशीत आणि पुढच्या राशीत शनी आला असता शनीची साडेसाती लागली, असे समजतात. प्रत्येक राशीत शनी हा सामान्यपणे अडीच वर्षे असतो. त्यामुळे वरील तीन राशी भोगण्याचा त्याचा काल साडेसात वर्षांचा होतो. या साडेसात वर्षांतली काही वर्षे माणसाला बरी जातात व काही वर्षे वाईट जातात, असा अनुभव सांगतात. मात्र शनी हा दुष्ट ग्रह असला, तरी तो ज्याच्यावर कृपा करतो, म्हणजेच जन्मपत्रिकेत शुभस्थानी असतो, त्या माणसाला यश व धन मिळवून देतो.

दीर्घकाळ टिकणारे विकार, विघ्ने, वैफल्य, विलंब, मृत्यू, इ. गोष्टींचा शनी हा कारक आहे. तूळ राशी ही शनीची उच्च राशी असून, मेष राशी ही नीच राशी आहे. उच्च राशीत, स्वगृहात व मित्रराशीत शुभ ग्रहांनी युक्त असल्यास शनी चांगली फळे देतो व नीच राशीत, शत्रुगृही आणि पापग्रहांनी युक्त असता अशुभ फळे देतो. शनी प्रभावी असलेल्या जन्मकुंडलीची माणसे संशयी, चौकस व दीर्घोद्योगी असतात. सामान्यपणे त्यांचे डोळे घारे असतात. ती कृश व उंच असतात. त्यांचे दात मोठे असतात व लव राठ असते. त्यांची हनुवटी लांबट असते. खालचा ओठ किंचित पुढे आलेला असतो. त्यांना संधिवात होण्याची भीती असते.

शनीची पीडा दूर करण्यासाठी त्याची पूजा करावी, शनिवारी एकभुक्त राहावे व त्याच्या प्रीतीसाठी उडीद, तीळ, तिळाचे तेल, कृष्ण वस्त्र, लोखंड, काळी गाय, पादत्राणांचा जोड या वस्तू



शनी

दान द्याव्या, असे सांगितले आहे. शनीच्या अनुकूलतेसाठी नीलमणी अंगावर वाळगावा, शनिवारी मारुतीची पूजा करून त्याला तेल वाहावे, अश्वत्थाची पूजा करावी, शनिमाहात्म्य वाचावे व शनीचा जप करावा, असेही सांगितले आहे. शनीचा वैदिक मंत्र सांगितला आहे, (ऋ. ८.१८.९)तो असा–

**शमग्निरग्निभिः करच्छं नस्तपतु सूर्यः।**
**शं वातो वात्वरपा अपस्रिधः॥**

शनीच्या मंत्राची जप संख्या तेवीस हजार असावी.

**शनिमाहात्म्य**–या नावाचा एक मराठी ओवीबद्ध ग्रंथ आहे. त्याचा कर्ता कोणी तात्याजी महिपती नावाचा आहे. शनिमाहात्म्याची कथा मूळ गुजराती साहित्यात असून, तात्याजीने तिचा मराठीत अनुवाद केलेला आहे. प्रस्तुत कथेचा सारांश असा –

उज्जयिनीत विक्रम नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या पंडितसभेत एके दिवशी चर्चा सुरू झाली, की ‘ नवग्रहांत श्रेष्ठ कोण ? ’ त्यामध्ये एका पंडिताने म्हटले, की ‘ शनी श्रेष्ठ ’. विक्रमाला ते आवडले नाही. त्याने भरसभेत शनीची टवाळी केली. त्याच वेळी शनीचे भ्रमण उज्जयिनीवरून चालू होते. आपली टवाळी ऐकून शनी खाली आला व विक्रमासमोर उभा राहिला. विक्रमाने त्याचा सत्कार तर केला नाहीच; त्याची दखलही घेतली नाही. त्यामुळे शनी क्रुद्ध झाला. त्याने विक्रमाला आपला प्रताप दाखवायचे ठरवले व तो अंतर्धान पावला.

नंतर शनीने सौदागराचा वेष घेऊन विक्रमाकडे काही घोडे विकायला आणले. घोड्यांची परीक्षा पाहण्यासाठी म्हणून विक्रम एका घोड्यावर स्वार झाला. लगेच शनीने त्याला चाबूक फटकावला. त्यासरशी घोडा आकाशात उडाला. तो दूर कुठे तरी एका अरण्यात उतरला. विक्रमाला आपण कुठे आलो ते कळेना. भटकत भटकत तो तामलिंदापूर नावाच्या नगरात आला. तहान-भूक लागली म्हणून तो एका धनिकाच्या ओसरीवर चढला. तो श्रीमंत विक्रमाच्या रूपसौंदर्यावर भाळला व त्याने त्याचा प्रेमाने आदरसत्कार केला. त्याने विक्रमाला उत्तम शयनगृह दिले. श्रीमंताला वाटले, की आपली कन्या देऊन या तरुणाला जावई करावे. म्हणून त्याने विक्रमाच्या शयनगृहात त्याचा परिचय करून घेण्यासाठी आपल्या कन्येला पाठवले. पण विक्रमाने तिचा मोह टाळला. ती आपला रत्नहार खुंटीवर अडकवून एका कोपऱ्यात झोपी गेली. पण शनीच्या अवकृपेने तो रत्नहार खुंटीवरच्या हंसाच्या चित्राने गिळून टाकला. आपला रत्नहार हरवला, म्हणून ती कन्या रडू लागली. श्रीमंताने विक्रमावर चोरीचा आळ घातला व त्याला त्या नगरीच्या राजापुढे उभे केले. राजाने विक्रमाचे हातपाय तोडण्याची शिक्षा फर्मावली. तो तशा अवस्थेत नगराबाहेर पडून राहिला; पण मेला नाही. एका तेलिणीला त्याची दया आली व तिने त्याला आपल्या घरी नेऊन त्याची शुश्रूषा केली. तो बरा होताच तेलिणीने त्याला आपल्या घाण्यावर काम दिले.

विक्रमाने बरेच दिवस अशा हालअपेष्टा सोसल्या. आपली अशी दुर्दशा का व्हावी याचा तो विचार करीत असता, त्याला आठवले, की आपण शनिदेवाचा अपमान केला होता. मग त्या गोष्टीचा त्याला पश्चात्ताप झाला व त्याने शनिदेवाची करुणा भाकली. शनीलाही विक्रमाची दया आली. मग विक्रमाचे दिवस पालटले. एके दिवशी संध्याकाळी तो दीपराग गात असता त्या नगरीत सर्वत्र दिवे लागले. तिथल्या राजकन्येला त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले. तिने चौकशी सुरू केली. हा प्रकार चोर म्हणून शिक्षा दिलेल्या पुरुषाचा आहे, हे तिला कळले. अधिक चौकशी करता तो पुरुष म्हणजे उज्जयिनीचा चारित्र्यसंपन्न विक्रम राजा आहे, अशीही माहिती तिला मिळाली. एवढ्यात शनिदेव विक्रम राजापुढे प्रकट झाला. विक्रमाने त्याच्या चरणी लोटांगण घालून त्याला प्रार्थिले. ‘माझ्यावर जसा कोपलास तसा दुसऱ्या कोणावर कोपू नको. ’ शनीने ते मान्य केले. शनीच्या कृपेने त्याचे तुटलेले हातपाय परत उगवले. विक्रमाची साडेसाती संपली. हंसाने गिळलेला रत्नहार श्रीमंत कन्येला परत मिळाला. राजाने आपली कन्या देऊन विक्रमाला आपला जावई केले. श्रीमंतानेही आपली कन्या विक्रमाला समर्पित केली. अशा प्रकारे संकटमुक्त होऊन विक्रम राजा परत आपल्या नगरात येऊन राज्य करू लागला.

भारतात काही ठिकाणी शनीची मंदिरे दिसतात. भारतातील काही वन्य जमातींचा शनी हा ग्रामदेव आहे. महाराष्ट्रात शनीप्रीत्यर्थ श्रावणमासी शनिवारी सूर्योदयापूर्वी पिंपळाची पूजा करतात. त्या दिवशी मुंज्या मुलाला अभ्यंगस्नान घालून जेवायला वाढतात. शनिवाराची कहाणी वाचतात किंवा ऐकतात. [ सूर्यकुल; प्रा. च. को.; म. सा. सिं.; जातकमार्गोपदेशिका; पू. मा. प्र. ]

**शपथ** एक प्रतिज्ञानिदर्शक शब्द. याची व्याख्या अशी – आपण जे बोललो ते सत्य आहे, हे पटवून देण्यासाठी उच्चारलेला व असत्य ठरल्यास आपणावर अनिष्ट कोसळो, असे जाहीर करणारा शब्दप्रयोग म्हणजे शपथ होय.

शपथ घेण्याची पद्धती जगात सर्वत्र आढळते. भारतात तर वेदवाङ्मयापासून शपथेचे उल्लेख मिळतात. अनेक अभ्यासकांनी शपथेच्या व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु या शब्दात विविध वैचारिक प्रवाह एकत्रित झाले असल्यामुळे तो प्रयत्न पूर्णांशाने यशस्वी झाला आहे, असे म्हणता येत नाही.

श्री. ओडच्या मते एखाद्या देवतेला किंवा पवित्र वस्तूला आवाहन करून आपल्या वचनातील सत्यता व दृढता याबद्दल खात्री पटवणे म्हणजे शपथ घेणे होय. या व्याख्येत देवता व पूज्य वस्तू यांना प्राधान्य आहे. परंतु प्राचीन काळच्या सर्वच शपथांमध्ये अशा तऱ्हेचे आवाहन आढळते असे नाही; तर केवळ आत्मसामर्थ्याच्या बळावरच शपथा घेत असल्याची कित्येक उदाहरणे सापडतात. उदा० ऐतरेय ब्राह्मणात राज्याभिषेकाच्या संदर्भात राजाने घ्यायची जी शपथ दिली आहे ती या स्वरूपाची आहे (८.४). अर्जुनाने कौरवांना चित्ररथ गंधर्वाच्या हातून सोडविण्यासाठी केलेली (म. भा. वन. २४३.२१) किंवा अभिमन्यूने चक्रव्यूहभेदनाच्या वेळी केलेली प्रतिज्ञा या अशा प्रकारच्या आहेत (म. भा. द्रोण. ३५.२७-२८). याचे आणखी एक उत्तम उदाहरण म्हणजे कर्णाने दुर्योधनासमोर अर्जुनाला मारण्यासाठी केलेली प्रतिज्ञा होय. या प्रतिज्ञेत कर्ण म्हणतो –

> पादौ न धावये तावद् यावन्न निहतोऽर्जुनः ॥
> कीलालजं न खादेयं करिष्ये चासुरव्रतम् ।
> नास्तीति नैव वक्ष्यामि याचितो येन केनचित् ॥
>
> (म. भा. वन. २५७.१६-१७)

अर्थ – हे राजा, जोपर्यंत अर्जुन माझ्या हातून मारला जात नाही, तोपर्यंत मी दुसऱ्याकडून पाय धुवून घेणार नाही, केवळ पाण्यातून उत्पन्न झालेले पदार्थ खाणार नाही, कोणतेही क्रूर कृत्य करणार नाही, आणि कोणत्याही याचकाला विन्मुख पाठविणार नाही.

शपथेच्या या प्रकारावरून वरील ओडची व्याख्या ही अव्याप्त ठरते. शपथेच्या जवळ जाणारी आणि तिची एक छटा स्पष्ट करणारी व्याख्या श्री. वेस्टरमार्कने केली आहे, ती अशी –

'मी बोललेले असत्य असेल तर माझ्यावर अमुक अमुक आपत्ती कोसळेल, अशा प्रकारचा शाप स्वतःच घेणे म्हणजे शपथ होय.' या व्याख्येचीही अनंत उदाहरणे मिळतात. वसिष्ठ मुनीवर, 'तू अभिचार करणारा आहेस' असा आरोप केला गेला असता त्याचे निराकरण करण्यासाठी सुदासाच्या दरबारात त्याने जाहीर केले. 'हे इंद्रसोमांनो, मी मनुष्यघातक जादूटोणा करणारा असल्यास याच क्षणी नष्ट होईन. मला बळेच यातुधान म्हणणाऱ्या दुष्टांचे दहा पुत्र तुम्ही नष्ट करा' (ऋ. ७.१०४.१५). आपण निष्कलंक आहो, हे शपथपूर्वक सांगताना सीता म्हणते : 'रघूत्तम रामाशिवाय मी जर अन्य पुरुषांचे चिंतन केले नसेल, तर ही भूदेवी मला विवर देवो. रामाशिवाय मी अन्य कोणालाच ओळखत नाही. हे माझे म्हणणे सत्य असेल तर, विष्णुपत्नीने मला प्रवेश करायला मार्ग द्यावा.' (वा. रा. उत्तर. ९७.१४–१६). महाभारतात याची काही उदाहरणे आहेत. दुःशासनाकडून द्रौपदीचे वस्त्रहरण होत असताना भीम क्रुद्ध होऊन शपथ घेतो –'मी युद्धात या पाप्याची छाती फोडून रक्त पिणार आहे. हे माझ्या हातून न घडले तर मला उत्तम गती न मिळो' (म. भा. सभा. ६८.५२–५३). त्याचप्रमाणे दुर्योधनाने द्रौपदीला आपली डावी मांडी दाखविली तेव्हाही भीम उसळून त्याला उद्देशून म्हणतो. 'जर मी तुझी ही मांडी युद्धात तोडू शकलो नाही, तर मला पुण्यलोकाची प्राप्ती होणार नाही' (म. भा. सभा. ७१.१४). जयद्रथाला मारण्यासाठी अर्जुनाने केलेली शपथरूप प्रतिज्ञा प्रतिज्ञापर्व या नावानेच प्रसिद्ध आहे. तिचा सारांश असा – अर्जुन म्हणतो. 'मी उद्या जयद्रथाला ठार मारणार आहे. मरणाच्या भीतीने तो जर कौरवांचा पक्ष सोडून मला, कृष्णाला अथवा माझ्या बंधूंना शरण येणार नसेल, तर मी त्याला ठार मारीन. आणि हे सूर्यास्ताच्या आत घडले नाही तर मी अग्निकाष्ठे भक्षण करीन.' या प्रतिज्ञेचा आणखी तपशील सांगताना अर्जुन म्हणतो – 'माता–पित्यांचा घात करणाऱ्या, साधुपुरुषांची निंदा करणाऱ्या, परस्त्रीगमन करणाऱ्या, गायींची हत्या करणाऱ्या, ब्राह्मण, अग्नी व गाय यांना पदस्पर्श करणाऱ्या, जलात मलमूत्राचा त्याग करणाऱ्या, अतिथीला भोजन न देता त्याला परत पाठविणाऱ्या, दुसऱ्याची वंचना करणाऱ्या, मद्यपी, कृतघ्न, धर्ममर्यादा सोडून वागणाऱ्या, ब्राह्मण असून थंडीला घाबरणाऱ्या, क्षत्रिय असून युद्धाला भिणाऱ्या, दुसऱ्यांच्या घराला

आग लावणाऱ्या किंवा विष देणाऱ्या अशा पापी लोकांना जी गती मिळते, तीच गती मी माझी प्रतिज्ञा पुरी करू शकलो नाही तर मला मिळो ' (म. भा. द्रोण. ७३).

परंतु सर्व शपथांमध्ये निर्विवादपणे शाप असतोच असे नाही. त्यामुळे वेस्टरमार्कची व्याख्याही अव्याप्तच वाटते.

अंत:करणपूर्वक दिलेले आश्वासन हा शपथेचाच एक प्रकार आहे, असे मानायला हरकत नाही. ब्रह्मतीर्थावर अगस्त्याची कमळे चोरीला गेली असता सत्तावीस ऋषींनी शपथपूर्वक आपण ती चोरली नसल्याचे अगस्त्यमुनीला सांगितले. शेवटी इंद्राने प्रकट होऊन, शपथ घेऊन म्हटले. ' ज्याने तुमची कमळे चोरली असतील त्याने वेदांचे अध्ययन करावे. तो पुण्यात्मा आणि धार्मिक होऊन मृत्यूनंतर ब्रह्मलोकाला जाईल. ' त्यावर अगस्त्य इंद्राला म्हणतो –

**आशीर्वादस्त्वया प्रोक्तः शपथो बलसूदन ।**

अर्थ – इंद्रा, ही कसली शपथ ! हा तर आशीर्वाद आहे.

या स्वरूपाच्या शपथांमध्ये अतिमानवी शक्तीला आवाहन नसते, की अभिचाराला थारा नसतो. तिथे केवळ भावनेचा संबंध असतो. वैयक्तिक प्रतिष्ठा व नैतिक जबाबदारीच केवळ पणाला लावलेली असते.

**शपथेची निर्मिती** – शपथेच्या निर्मितीचा इतिहास हा राज्यसंस्थेच्या निर्मितीच्या इतिहासाइतका प्राचीन आहे. राज्यसंस्थेच्या उत्पत्तीचा हा पारंपरिक इतिहास महाभारतात भीष्माने युधिष्ठिराला सांगितला आहे. त्यातच शपथेच्या उत्पत्तीची मीमांसा येऊन गेली आहे. तिचा ढोबळ सारांश असा –

प्राचीन काली राज्य किंवा राजा नव्हता. सर्व लोक धर्मनियमांच्या आधारे एकमेकांचे रक्षण व सांभाळ करीत होते. परंतु काही काळाने प्रचलित धर्मनियम शिथिल झाले. त्यामुळे समाजाचा ऱ्हास सुरू झाला. ते पाहून समाजातील काही विचारवंतांनी ब्रह्मदेवाकडे धाव घेतली आणि त्याच्याबरोबर काही विचारविनिमय करून त्यांनी राजाची निर्मिती करायचे ठरविले. ब्रह्मदेवाने त्यांना सांगितले, की विरजाला राजा करा. परंतु विरजाने या गोष्टीला नकार दिला. मात्र त्याच्या काही वंशजांनी राजपद स्वीकारले. त्यांपैकी एका राजाचे नाव वेन असे होते. त्याने साम्राज्य स्थापन केले. पण तो फार अधर्मी व अत्याचारी निघाला. त्यामुळे वेदवेत्त्या ऋषींनी त्याला ठार करून त्याच्या देहातून पृथू नामक पुत्र उत्पन्न केला आणि त्यालाच राज्याधिकारी नेमले. परंतु त्याची निवड करण्यापूर्वी त्यांनी पृथूकडून शपथ घेवविली ,ती अशी–'मी देशालाच देव समजेन. वेदप्रणीत दंडनीतीशी संबंधित असलेल्या धर्माचे मनापासून पालन करीन. स्वच्छंदी बनणार नाही ' (म. भा. शांति. ५९). महाभारतातील ही प्रतिज्ञा श्रुती म्हणून सांगितली आहे. याचा अर्थ तिला [illegible] वैदिक आधार असला पाहिजे. आणि तो ऐतरेय ब्राह्मण[illegible] असावा, असे दिसते. या ब्राह्मणात राज्याभिषेकाच्या [illegible] घ्यायची प्रतिज्ञा दिली असून, ती ' सह श्रद्धया ' म्हणजे श्रद्धा[illegible]पूर्वक घ्यावी असे म्हटले आहे (८.४). महाभारतातील प्रति[illegible]ज्ञाही ' मनसा कर्मणा गिरा ' घ्यावी असा उल्लेख आहे ([illegible] भा. शांति. ५९.१०६). ऐतरेय ब्राह्मणातील आचार्य राजा[illegible] म्हणतो. ' हे क्षत्रिया, तुला आता मी महाभिषेक करणार आहे[illegible] जर तू मज आचार्याशी कधी कपट किंवा द्रोह करशील [illegible] ज्या रात्री तू जन्माला आलास त्या रात्रीपासून, ज्या रात्री[illegible] मरशील त्या रात्रीपर्यंत, तुझ्या हातून घडलेली सर्व श्रौतस्मा[illegible] कर्मे व त्या कर्मांनी मिळणारा पुण्यलोक आणि हातून घडले[illegible] इतर पुण्य, दीर्घायुष्य आणि पुत्रपौत्रादी संतती यांना अंतरण्या[illegible] प्रसंग मी तुझ्यावर आणीन. ' त्यावर राजा म्हणतो. ' आचार्य[illegible] मी शपथपूर्वक आपणास सांगतो, की आपणाशी जर कधी[illegible] द्रोह किंवा कपट करीन, तर मी जन्मलेल्या रात्रीपासून, [illegible] त्या रात्रीपर्यंतच्या कालावधीत माझ्या हातून जी इष्टापूर्त[illegible] सत्कर्मे झाली असतील ती सर्व कर्मे आपल्या इच्छेने[illegible] निष्फळ होवोत. ' ही प्रतिज्ञा आणि महाभारतातील प्रति[illegible] ही बरीचशी एकसारखी आहे. यावरून असे म्हणता येईल, [illegible] प्राचीन कालापासून प्रतिज्ञेचा हा प्रकार अखंडपणे टिकून [illegible]

राज्याभिषेकातील शपथेचे स्वरूप काहीसे पणात्मक [illegible] असे श्री. काशीप्रसाद जायसवाल यांचे मत आहे. ते आ[illegible] सांगतात, की ' काही काम करण्याच्या उद्देशाने ही शपथ घे[illegible] जाते. तीत कोणत्याही दैवी शक्तीला आवाहन नसते, की [illegible] कोणत्याही साधनांचा आश्रय नसतो. शुद्ध मानवी भावना [illegible] या शपथेचे अधिष्ठान असते.'

**शपथेचे माध्यम** – शपथ घेताना एखादी वस्तू, प्रिय [illegible] किंवा दैवी शक्ती यांना मधे घेण्याची किंवा ओलीस ठेवण्या[illegible] पद्धती आहे. यातून शपथेचा आणि अभिचाराचा संबंध [illegible] ठिकाणी संभवतो. शपथेची हीच प्राथमिक व प्राचीन अव[illegible] असावी. देवतेला, पूज्य वस्तूला किंवा प्रिय व्यक्तीला [illegible] शपथ घेतली, तर तिचा प्रभाव अधिक पडतो, अशी सम[illegible] असते. तिच्यात देवतेला आवाहन करायचे ते साक्षीदार म्ह[illegible] किंवा अपराधाची शिक्षा देण्यासाठी. वसिष्ठाने इंद्र-सोम[illegible] उद्देशून घेतलेली शपथ ऋग्वेदात आली आहे, ती याच प्रकार[illegible] आहे (७.१०.१५).

कालांतराने मानवाचा जसजसा सांस्कृतिक विकास होत [illegible] तसतशी या मध्यस्थ वस्तूंमध्ये अधिकाधिक भर पडू ला[illegible] आणि त्या वस्तूच दैवी शक्तीच्या प्रतीक बनल्या. ती [illegible]

योग्य ते काम करील, असा विश्वास बळावला. गंगेच्या पाण्याला, धर्मग्रंथाला किंवा ब्राह्मणाच्या पायाला स्पर्श करून शपथ घेण्याच्या पद्धतीत हाच आशय आहे. मनूने अग्नी व शिर यांना स्पर्श करून घ्यायच्या शपथांचा उल्लेख केला आहे. रामायण-महाभारतात तर पुण्य, पुत्र, पत्नी, बंधू, सत्य, तप, जल, शस्त्रास्त्रे, दान यांना उद्देशून घेतलेल्या अनेक शपथा आढळतात. अर्जुनाने जयद्रथाला मारण्यासाठी सत्य व धनुष्य यांना स्पर्श करून शपथ घेतली होती (म. भा. द्रोण. ७५.४.७). संशप्तकांनी अर्जुनाचा वध करण्यासाठी जलाला स्पर्श करून शपथेचा उच्चार केला होता (म. भा. द्रोण. १७). भीष्माचार्यांकडून शाल्वाकडे आलेल्या अंबेने आपल्या शरीराची शपथ घेतली होती (उद्योग. १७५.१६–१७).

रामायण-महाभारताची ही परंपरा मौर्यकाळातही प्रकर्षाने पाहायला मिळते. किंबहुना अशा तऱ्हेची शपथ घेतली नाही, तर त्या शपथेत काही अर्थ नाही, अशीच मध्ययुगातली समजूत दिसते. या कालातील राजे आपसात केलेले तह मोडले जाऊ नयेत म्हणून अग्नी, उदक, नांगर, तटाची माती, हत्तीचे गंडस्थळ, घोड्याची पाठ, रथातील आसन, शस्त्र, रत्न, धान्य, गंध, रस, सोने किंवा सोन्याचे नाणे यांना स्पर्श करून शपथ घेत. शिवाय या सत्याचे उल्लंघन करणाऱ्याचा नाश होवो अथवा त्या वस्तू त्याला सोडून जावोत, असेही शपथेच्या वेळी म्हणत असत (अर्थशास्त्र ११५).

पायाची शपथ घेण्याचा एक आगळा पण उदात्त प्रकार रामायणात पाहायला मिळतो. रामाने सीतेचा त्याग करायचा निश्चय केल्यावर तो आपल्या बंधूंना म्हणतो ‘तुम्ही माझ्या विचारांना विरोध कराल, तर तुम्हांला माझ्या पायाची शपथ आहे’(उत्तर. ४५.२०). खर-दूषणांनी रामावर आक्रमण केले, तेव्हा रामाने लक्ष्मणाला अशीच आपल्या पायाची शपथ घातली होती (अरण्य. २४.१३). या संदर्भांवरून असे दिसते, की जेव्हा एखादी वयाने लहान असलेली व्यक्ती आपल्या आज्ञेचे उल्लंघन करील अशी मोठ्यांना शंका येई, तेव्हा ते त्याला आपल्या पायाची शपथ घालीत असावे. मोठ्यांच्या आज्ञा मोडू नयेत हा आदरणीय संकेत यामागे आहे.

शपथ घेण्याची प्रथा जशी नागर संस्कृतीत आहे, तशीच ती ग्रामसंस्कृतीत आणि आदिवासी संस्कृतीतही आहे. भारताच्या वायव्य भागात राहणाऱ्या लोकांमध्ये अशी एक पद्धत आहे, की एक कोंबडा कापायचा आणि त्याचे जे रक्त जमिनीवर सांडेल त्याची शपथ घ्यायची. बिहार, ओडिसा व तमिळनाडू प्रदेशातील खोंड आणि कांध लोक वाघाच्या किंवा सरड्याच्या कातडीची अथवा मुंग्यांच्या वारुळाची शपथ घेतात. आणि आपली शपथ खोटी ठरली, तर वाघ आपल्याला खाईल किंवा आपले कातडे सरड्यासारखे होईल अथवा आपली वारुळासारखी माती होईल, असा स्वतःला शाप घेतात. आसाममधील नाग लोक दोरखंडाचे एक वलय करतात व त्यात उभे राहून किंवा शस्त्र हाती घेऊन शपथ घेतात. याशिवाय, ज्या पदार्थाची शपथ घ्यायची तो पदार्थ खाल्ला, तर शपथ फारच प्रभावी ठरते, अशी एक कल्पना आदिवासींमध्ये आहे.

शपथेसाठी एखाद्या वस्तूचा उपयोग करण्यामागे ती वस्तू अद्‌भुत शक्तीने भारण्याची कल्पना असते व शपथ खोटी ठरली, तर ती वस्तू शपथ घेणाऱ्यावर कठोर आघात करील, असा विश्वास असतो. काही लोक पाऊस पडावा म्हणून किंवा पीक चांगले यावे म्हणून सूर्याला शपथ घालतात. शपथेच्या या वापरामागेही हीच कल्पना संभवते.

**शपथ आणि दिव्य** – शपथ घेतल्यामुळे त्या व्यक्तीवर एक प्रकारची नैतिक जबाबदारी येते. त्यामुळे न्यायालयात तिचा उपयोग करण्याची प्रथा प्राचीन काळी सर्वत्र होती. जेव्हा कोणताही लेखी पुरावा किंवा साक्षीदार उपलब्ध नसे, तेव्हा दिव्य किंवा शपथ यांचा आधार न्यायालयात घेतला जात असे. मनूने या प्रकारच्या शपथेला मान्यता दिलेली आहे (८.१०९). विष्णुधर्मसूत्रकार या दैवी पुराव्याला किंवा शपथेला दैवी कृत्य अथवा समयक्रत्य असे म्हणतो.

मनू, नारद, इ. स्मृतिकार शपथ व दिव्य यांत फारसा फरक करीत नाहीत. काहींच्या मते दिव्यामुळे भांडणाचा निकाल तत्काल करता येतो; पण शपथेने तसा करता येत नाही. कारण शपथ घेणाऱ्यावर शपथेचा काय परिणाम होतो, हे पाहण्यासाठी काही काळ थांबावे लागते. त्याचप्रमाणे गंभीर गुन्ह्यासाठी दिव्य करावे आणि सौम्य गुन्ह्यासाठी शपथ घ्यावी, असेही काहींनी सुचविले आहे. तुलादिव्यात तर आरोपीची एकदा तुला केल्यावर मग तुला व आरोपी या दोघांनाही शपथ घालण्यात येत असे (याज्ञ. २.१०१–१०२). अशा प्रकारे सत्य पणाला लावण्याची ही प्रथा त्या काळी विशेष रुढ होती, असे दिसते. शपथ घेताना हातात दूर्वा, तीळ, चांदी, सोने, नांगरलेल्या शेतातील माती, इ. पदार्थ घेत असत (विष्णुध. सू. ९.५–१२). स्कंदपुराणात शपथेची गणना सौम्य दिव्यातच केलेली आहे (कौमारिका खंड ४४.१–९).

शपथ वर्णभेदानुसार घेतली जात असे. साक्षीदाराच्या योग्यायोग्यतेचा विचार, मुख्यत्वे त्यामागे असावा असे वाटते. मनूने ब्राह्मणाला सत्याची, क्षत्रियाला वाहनाची व आयुधाची, वैश्याला गाई, बियाणे व सोने यांची आणि शूद्राला सर्व पापे लागतील, अशा प्रकारची शपथ घ्यायला सांगितले आहे

(८.११३). मनूच्या या विचारांचा नेटका विस्तार चाणक्याने अर्थशास्त्रात केला आहे, असे वाटते. त्याने साक्षीदाराच्या वर्णानुसार निरनिराळ्या शपथा किंवा प्रतिज्ञा दिल्या आहेत. त्यांचा गोषवारा असा–साक्ष घेण्यापूर्वी न्यायाधीशाने ब्राह्मण, जलकुंभ किंवा अग्नी यांच्यासमोर साक्षीदाराला उभे करून सत्य सांगायला सांगावे. साक्षीदार ब्राह्मण असेल तर, 'खरे बोल' एवढेच त्याला म्हणावे. क्षत्रिय व वैश्य यांना उद्देशून 'खोटी साक्ष दिली तर तुला यज्ञक्रियेचे पुण्य मिळणार नाही आणि शत्रूचे निर्दालन करूनही तुला त्याच्या दारी भीक मागावी लागेल' असे त्याला म्हणावे. शूद्राला उद्देशून बोलावे, की तू जर खोटे बोलशील तर तुझे पूर्वजन्मीचे व पुढील जन्मीचे सर्व पुण्य राजाला मिळेल आणि तुला पाप लागेल. शिवाय खोटे बोलल्यास तुला शिक्षा होईल. कारण सत्य कधी ना कधी उघड झाल्याशिवाय राहणार नाही (६८).

काही प्रसंगी खोटी शपथ घेतली तर दोष लागत नाही, असे मनूने म्हटले आहे. त्यात त्याने प्रेयसीबरोबर बोलणे, विवाह, गाईंचा चारा, ब्राह्मणरक्षण इ. बाबी समाविष्ट केल्या आहेत. असे असले, तरी जाणत्याने कोणत्याही क्षुद्र कारणासाठी शपथ घेऊ नये, कारण त्यामुळे इहलोक व परलोक नष्ट होतो, असा नीतिदंडकही घातला आहे.

शपथेचा उपयोग केवळ न्यायालयातच केला जात असे, असे नाही, तर भारतीय राजनीती आणि दैनंदिन जीवनाची विविध अंगे यांनाही तिने व्यापले होते. ऐश्वर्यप्राप्तीचे एक साधन आणि शत्रुनाशाचा एक उपाय म्हणून राजाने तिचा अवलंब करावा आणि हे त्याचे एक कर्तव्यच आहे, असे म्हटले आहे (म. भा. आदि. १३९). याशिवाय आपल्यावर आलेल्या खोट्या आरोपांचे निराकरण करताना, मोठ्या अपमानाचा सूड घेण्यासाठी, आपत्काली, पातिव्रत्य सिद्ध करण्यासाठी, एखाद्या मसलतीची गुप्तता राखण्यासाठी, नवीन मैत्री जोडण्याच्या प्रसंगी, स्वमताचे जोरदार समर्थन करताना, अब्रूरक्षणासाठी आणि राज्याभिषेकाच्या प्रसंगी शपथ घ्यावी असे सांगितले आहे. धृतराष्ट्राच्या वागणुकीतील दंभ उघड करण्यासाठी विदुराने घेतलेली शपथ, हे या प्रकारातील एक अभिनव उदाहरण होय. सांप्रतही निरनिराळ्या अधिकारग्रहणाच्या वेळी थाटामाटाने शपथा दिल्या-घेतल्या जातात.

**शपथ, शाप व प्रतिज्ञा** – शपथ व शाप हे पर्यायी शब्द होते, असे अथर्ववेदावरून कळते (२.७; ४.१७). रामायण-महाभारतातही शपथेसाठी शाप आणि शापासाठी शपथ असे शब्दप्रयोग वारंवार वापरलेले आहेत. परंतु त्यांच्या वापरातील हेतू मात्र भिन्न आहेत. शपथ ही एक प्रकारची हमी आहे, तर शाप ही शिक्षा आहे. शपथेत शाप असतो; पण शापात शपथ असते नाही. शपथेमधील शापांची शिक्षा प्राधान्याने स्वतःपुरती मर्यादित असते आणि शापाची शिक्षा दुसऱ्यासाठी असते. शाप देण्याचे सामर्थ्य अंगी येण्यासाठी फार मोठे तप करावे लागते. पण शपथेला त्याची आवश्यकता नसते. शाप दिल्याने तपस्वीचे सामर्थ्य कमी होते; पण शपथेच्या संदर्भात हे संभवत नाही. शापाला उःशाप असू शकतो, पण शपथेतून सुटका नसते. शाप उलटण्याची भीती असते, पण शपथ उलटत नाही, अशी समजूत आहे. शपथा वर्णभेदानुसार भिन्न असू शकतात; पण शापात वर्णभेद नसतो. शपथ माध्यमामुळे प्रभावी ठरते, तर शाप तपाने प्रभावी ठरतो.

शपथ व प्रतिज्ञा हे एकसारखे भासणारे भिन्न शब्द आहेत. ज्या वेळी शपथेत शापाची छटा नसते आणि आत्मसामर्थ्यावर निर्भर राहून तिचा उच्चार केला जातो, तेव्हा शपथेला प्रतिज्ञा म्हणायला हरकत नाही.

शपथ हा अभिचारातील एक प्रकार आहे. भिन्न नावाने वावरणारा जादूविद्येचा तो एक अवशेष आहे. वैदिक आर्यांनी या अभिचारासंबंधी कडक निषेध व्यक्त केला असला, तरी सामान्यजनांच्या मनात शपथेसंबंधी एक प्रकारची आदरयुक्त भीती सदैव वसत आली आहे. ज्याने शपथ घेतली नाही, असे रामायणात एकही महत्त्वाचे पात्र नाही. महाभारतातील शपथा त्यातून वगळल्या तर, त्या ग्रंथातले ओज कमी होईल. धर्माचरण, न्यायालय, राज्याभिषेक, इ. महत्त्वपूर्ण जीवनांगांतही मूळच्या स्वरूपाहून उन्नत बनलेल्या शपथेने आपले स्थान अढळ केले आहे. जीवनाच्या निम्नस्तरात तर पदोपदी तिचा आढळ होतो.

[हि. ध.; एन्सा. रि. ए.; हिं. रा. तं. २; ऋ. म. भा.; कौ. म. भा.; म. भा. स.; म. भा. ना.; रा. का. स.; कौटिलीय अर्थशास्त्र–संपा. ज.स. करंदीकर, श्री. हिवरगावकर; प्रा. भा. रा.; रा. का. सं.; श्रीरामकोश भाग १; श. क.; वे. इं.]

## शब-इ-बारात

मुसलमानांचा एक पवित्र दिवस. हिजरी सनाचा आठवा महिना शाबान नावाने ओळखला जातो. या महिन्याच्या पूर्णिमेला हा सण पाळतात. त्या दिवशी प्रत्येक मनुष्याचे त्या वर्षाचे भवितव्य ठरते व ते एका ग्रंथात लिहून ठेवले जाते, असा सर्व मुसलमानांचा विश्वास आहे. त्या दिवशी लोकांना नरकातून मुक्ती मिळते आणि पापमुक्त पवित्र होतात, या समजुतीने मृत नातलगांचे स्मरण करून त्यांच्यासाठी प्रार्थना केली जाते. ही प्रार्थना कुराणाच्या प्रथम अध्यायात असून, तिला अल्-फातिहा असे म्हणतात.

शीया पंथाचे अनुयायी हा दिवस इमाम महदीचा जन्मदिन

म्हणून पाळतात आणि हासन-हुसेन यांचे स्मरण करतात. धार्मिक लोक प्रार्थनेसाठी हा दिवस फार शुभ मानतात. या दिवशी गोरगरिबांना गोडधोडाचे भोजन देतात. भोजनात मांसाचे पदार्थ कटाक्षाने टाळलेले असतात. त्या रात्री झाडे-झुडपेही परस्परांशी बोलतात, अशी त्यांची समजूत आहे. रात्री दारूकाम करून जागरण करतात. [ मु. इं.; मु. स. सं. ]

## शबर काक्षीवत

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशेएकोणसत्तरावे सूक्त याच्या नावावर आहे. गोप्रशंसा हा या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा (ऋ. १०.१६९.२) अशी–

**याः सरूपा विरूपा एकरूपा यासामग्निरिष्ट्या नामानि वेद।**
**या अङ्गिरसस्तपसेह चक्रुस्ताभ्यः पर्जन्य महि शर्म यच्छ ॥**

अर्थ – हे पर्जन्या, अंगिरस ऋषिगणांनी निर्माण केलेल्या अग्निज्ञात अशा समान वर्णाच्या विभिन्न गाईंना तू सुखी कर.

वनात गेलेल्या गायी सुखरूप परत याव्यात म्हणून या सूक्ताचा पाठ करावा, असे आश्वलायन गृह्यसूत्रात म्हटले आहे. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को. ]

## शबरपा

(इ. स. चे ८ वे शतक) चौऱ्यायंशी सिद्धांतील एक. याला शबरापा, महाशबर, शबरेश्वर, नव-सरह, इ. नावे आहेत. हा भिल्लांप्रमाणे पोषाख करीत असे म्हणून याला



शबरपा

शबरपा हे नाव मिळाले असावे, असे म्हणतात. लोकी (पद्मावती) व गुना (ज्ञानवती) नावाच्या याच्या दोन बहिणी होत्या. त्यांच्याकडूनच याने महामुद्रेची साधना स्वीकारली.

याच्या जन्मस्थानासंबंधी मतभेद आहेत. पं. राहुल सांकृत्यायनांच्या मते विक्रमशिला किंवा मगध हे त्याचे जन्मस्थान असावे. काहींनी त्याचा जन्म बंगालमध्ये झाला, असे म्हटले आहे. नागार्जुन किंवा सरहपा हा त्याचा गुरू आणि पालवंशी राजा धर्मपाल याचा लेखक लुईपा हा त्याचा शिष्य होय. याने वज्रयोगिनी साधनेचे प्रवर्तन केले. आंध्र प्रदेशातील श्रीपर्वत हे त्याचे प्रमुख केंद्र होते.

तंजूर ग्रंथालयात शबरपाचे सव्वीस ग्रंथ उपलब्ध आहेत. परंतु ते सर्व ग्रंथ याचेच आहेत, असे मानता येत नाही. प्राचीन हिंदी भाषेतील त्याच्या सहा ग्रंथांची नावे अशी– चित्तगुह्य, गंभीरार्थ-गीती, महामुद्रा-वज्रगीती, शून्यता-दृष्टी, सहज-संवर-स्वाधिष्ठान व सहजोपदेश-स्वाधिष्ठान. शबरपाने आपल्या ग्रंथांत साधनेच्या क्षेत्रातील बाह्याचारांवर कडक टीका केली आहे. पाहा – अद्वयवज्र. [ सि. सा.; अ. सा.; पु. त. नि.; हिं. सा. वि. ]

## शबरस्वामी

( सनपूर्व ३ रे शतक ) मीमांसासूत्रांवरील एक प्रसिद्ध भाष्यकार. याचे जीवनचरित्र उपलब्ध नाही. देश आणि काल यांच्या बाबतीतही मतभेद आहेत. काही संशोधक तो उत्तर प्रदेशात जन्मला असे म्हणतात; तर काही तमिळनाडू हे त्याचे जन्मस्थान मानतात. डॉ. संपूर्णानंद दुसऱ्या मताचे आहेत. त्यांच्या मते तमिळनाडू हा त्याचा जन्मदेश असून, बिहार हे त्याचे कार्यक्षेत्र होते. याच्या कालाबद्दल तर खूपच अनिश्चितता आहे. काही संशोधक तो इ. स. च्या ४ थ्या शतकात जन्मला असे मानतात; तर काही त्याला सनपूर्व ३ऱ्या शतकात नेतात. डॉ. संपूर्णानंद हे दुसऱ्या मताचे आहेत. प्रा. बलदेव उपाध्याय यांनी इ. स. चे दुसरे शतक हा त्याचा काल मानला आहे.

शबरस्वामीचे पहिले नाव आदित्य असे होते व तो राजा होता. त्याने चार वर्णांच्या चार मुलींशी विवाह केले. अर्थात तो ब्राह्मण असला पाहिजे. कारण त्या काळी ब्राह्मणांनाच चारही वर्णांच्या स्त्रिया करण्याचा अधिकार होता. पहिल्या ब्राह्मण स्त्रीपासून त्याला वराहमिहिर नावाचा पुत्र झाला. दुसऱ्या क्षत्रिय स्त्रीपासून विक्रम आणि भर्तृहरी पुत्र झाले. तिसऱ्या वैश्य पत्नीपासून हरचंद वैद्य व कुशलशंकू हे दोन पुत्र झाले आणि चौथ्या शूद्र स्त्रीपासून अमर नावाचा पुत्र झाला. अशा एकूण सहा पुत्रांना त्याने जन्म दिला. अर्थात ही दंतकथाच असण्याचा दाट संभव आहे. त्याचे शबरस्वामी हे नाव नंतरचे आहे. जैनांच्या भयापासून संरक्षण मिळावे म्हणून तो शबरवेषात राहत असे. त्यामुळे लोक त्याला शबरस्वामी म्हणू लागले.

याने जैमिनीच्या मीमांसासूत्रांवर भाष्य लिहिले आणि ते विद्वन्मान्य ठरले. या ग्रंथाला शाबरभाष्य असे म्हणतात. जैमिनीच्या सूत्रांनंतर त्या दर्शनावरचा हा सर्वांत पहिला ग्रंथ होय. या ग्रंथाचे बारा अध्याय आहेत. पाद व अधिकरण असे त्याचे बरेच विभाग असले, तरी सूत्र व व्याख्या हे त्याचे प्रमुख दोन भाग होत. शबरस्वामीची सूत्रे जैमिनीच्या सूत्रांप्रमाणे फार विस्तृत नाहीत. शबरस्वामीला ज्या विषयांचे विवेचन करायचे होते, ते विषय प्रथम सूत्ररूपात सांगून मग त्यांचे विश्लेषण व विवरण केले आहे. आपले सिद्धान्त स्पष्ट करण्यासाठी त्याने वेदांतली व लौकिक व्यवहारांतली उदाहरणेही दिली आहेत.

शबरस्वामी हा प्रगत विचारांचा होता. त्याने वेद व यज्ञ यांच्याविषयीची अंधश्रद्धा दूर करून त्यांना उपयुक्ततावादाच्या क्षेत्रात आणले. केवळ वेदाने सांगितले म्हणून कोणतेही कर्मानुष्ठान अनिवार्य ठरत नाही. कर्माविषयी प्रवृत्ती निर्माण होते, ती त्या कर्माचे फळ मिळायचे असेल तरच होते, असे तो म्हणतो. "प्रयोजनं विना न मन्दोऽपि प्रवर्तते" = प्रयोजन असल्यावाचून एखादा मूर्ख मनुष्यही कर्माचरणाला प्रवृत्त होत नाही, असा त्याचा सिद्धान्त आहे. त्याचे सारे विवेचन तर्काधिष्ठित आहे.

मात्र शबरस्वामीने वेद अबाधित राहावे, यासाठी आपल्या भाष्यात पदोपदी प्रयत्न केलेला दिसून येतो. प्रस्तुत भाष्यातला तर्कपाद म्हणजे शास्त्रीय विवेचनाचे भांडारच होय. त्यात शबरस्वामीच्या विचारांचा क्रमिक विकास दिसून येतो. अन्यधर्मियांकडून वेदावर पुसटसा जरी आघात झालेला दिसला, तरी तो परतवून लावताना त्याची लेखणी तीव्र बनते. बौद्धांच्या विज्ञानवादाचे खंडन करताना त्याने काहीही शिल्लक ठेवले नाही. बौद्धांच्या विज्ञानवादाच्या जागी तो आत्मवाद प्रस्थापित करतो. त्याने ईश्वराच्या सर्वश्रेष्ठ सत्तेवर केवळ आक्षेपच घेतला नाही; तर त्याची फलनियामक शक्तीही अमान्य केली. ईश्वराच्या जागी त्याने 'अपूर्व' या सिद्धान्ताची स्थापना केली. त्यामुळे प्राणिमात्राला सुख आणि दुःख देण्याचे जे कार्य पूर्वी ईश्वराकडे होते ते कार्य 'अपूर्व' या तत्त्वाचे आहे असे त्याने मानले. या कामी त्याने कोणाचीही पर्वा केली नाही. मीमांसाशास्त्राच्या स्वतंत्र सत्तेचे हे पहिले प्रतीक होय.

शबरस्वामीच्या विवेचनात रसवत्ता ओतप्रोत आहे. त्याची लेखनशैली मौलिक आहे. मीमांसेला जे साहित्यिक महत्त्व मिळाले आहे, त्याचे श्रेय शबरस्वामीच्या भाष्यालाच द्यावे लागते.

शबरस्वामीच्या पूर्वी मीमांसेला स्वतंत्र दार्शनिक विचारधारा नव्हती आणि तिची अशी तर्कप्रणालीही नव्हती. त्या काळी बौद्ध पंडित चारही दिशांनी वेद, वैदिक यज्ञसंस्था आणि आत्मवाद यांच्या खंडनासाठी जणू तुटून पडले होते. भारतातली वर्णव्यवस्था उखडून टाकण्यासाठीही त्यांनी कंबर कसली होती. वैदिक संस्कृतीवर हे एक महान संकट होते. अशा स्थि[ती]त मीमांसेच्या आधारे वेदांचे रक्षण करणे, त्यांचे प्रामाण्य अबाधित ठेवणे आणि मीमांसेला स्वतंत्र दर्शनाच्या पदवीवर आरूढ करणे, हे सारे महाकठीण कर्म होते. पण शबरस्वामीने [ते] यशस्वीपणे पुरे केले. मीमांसा दर्शनात त्याने जैमिनीपेक्षा[ही] अधिक प्रगती केली.

शबरस्वामीच्या पूर्वी मीमांसा हा केवळ ब्रह्ममीमांसेचा ए[क] भाग होता. शबरस्वामीने त्या विचारसरणीतला ब्रह्मवाद बाजू[ला] ठेवला आणि केवळ धर्मालाच आपले लक्ष्य बनविले. त्यामु[ळे] पुढे ब्रह्मवाद ही उत्तरमीमांसा ठरली आणि धर्मवाद हा पू[र्व]मीमांसा या नावाने प्रसिद्ध झाला. म्हणजे ती दोन स्वतंत्र द[र्शने] झाली. याचे सारे श्रेय शबरस्वामीलाच आहे.

एतावता शबरस्वामी हा मीमांसा दर्शनातला उत्तुंग हि[मा]चल ठरला आहे. [मी. द.; भा. द.]

## शब्द

(१) 'श्रोत्रग्राह्यो गुणः शब्दः' म्हणजे शब्द हा आ[का]शाचा गुण असून, तो श्रवणेंद्रियाने ग्राह्य आहे, [अशी] त्याची व्याख्या आहे. वक्त्याच्या इच्छेला अनुसरण्याच्या श[री]रिक प्रयत्नाने प्रेरित झालेला वायुप्रवाह स्वरतंत्रीवरील आघा[ता]मुळे ध्वनित होतो, म्हणजेच शब्दात परिणत होतो (वाक्य[पदीय] १.१०९). 'भाषेचा लघुतम सार्थ घटक म्हणजे शब्द' [अशी] शब्दाची व्याख्या ॲरिस्टॉटलने केली आहे.

शब्द व त्याचा अर्थ या दोहोंपैकी प्रथम शब्द आणि [नंतर] अर्थ असा क्रम ऐकणाऱ्याच्या दृष्टीने ठीक असला, तरी [बोल]णाऱ्याच्या दृष्टीने हा क्रम उलटा असतो. वस्तू अगोदर आणि [तिचे] नामकरण नंतर म्हणजेच अर्थ अगोदर आणि शब्द नंतर [असा] हा क्रम असतो. शब्द हे प्रत्यक्ष वस्तूचे किंवा तत्संबंधी कल्प[नेचे] दर्शक चिन्ह किंवा प्रतीक आहे. त्यामुळे शब्दाच्या बाब[तीत] तीन बाबींचा संबंध येतो. पहिली बाब वस्तू, दुसरी बाब [त्या] वस्तूची कल्पना आणि तिसरी बाब त्या कल्पनेचे दर्शक [चिन्ह] किंवा प्रतीक. वस्तू, कल्पना व प्रतीक या तीन बाबीं[च्या] परस्परसंबंधाने विशिष्ट शब्दाला विशिष्ट अर्थ प्राप्त होतो.

अर्थाच्या किंवा व्युत्पत्तीच्या दृष्टीने शब्दाचे रूढ, यौगि[क व] योगरूढ असे तीन प्रकार होतात. काही शब्दांचा अर्थ रू[ढीने] किंवा परंपरेने कायमचा ठरवलेला असतो, त्यांना रूढ [शब्द] म्हणतात. उदा० गाय, घोडा, वाघ, मनुष्य, इ. शब्द होत. [ज्या] शब्दांचा अर्थ त्यांच्यांतील धातूंच्या अर्थाप्रमाणे लागतो, [त्यांना] यौगिक म्हणतात. उदा० पाचक, लोहार, विणकरी, इ[त्यादी.] वरील दोन्ही तत्त्वे ज्या शब्दांत आढळून येतात, त्यांना यो[गरूढ]

म्हणतात. त्यांमध्ये व्युत्पत्तीचा एक व रूढीचा एक असे दोन्ही अर्थ असतात. उदा० पंकज, शंकर, गणपती, इत्यादी.

शब्दाच्या अर्थात दोन अंश असतात. एक वस्तुदर्शक व दुसरा भावनादर्शक. या दोन अंशांचा मिळून शब्दाचा अर्थ बनलेला असतो. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर शब्दाच्या अर्थात एक बौद्धिक व दुसरा भावनिक. असे दोन अंश असतात. खुर्ची, वाक, पुस्तक, हार, दार, इ. शब्द उच्चारल्याबरोबर आपणास त्या-त्या वस्तूचे ज्ञान होते. हा जो वस्तुविषयक ज्ञान देऊन व्यवहाराला प्रवृत्त करणारा भाग असतो, त्याला बौद्धिक अंश म्हणतात. शब्दाचे जसे ज्ञान होते, तशाच शब्दापासून भावनाही निर्माण होतात. शहाणा म्हटल्याने माणसाला सुखात्मक भावना उत्पन्न होते आणि मूर्ख म्हटल्याने काहीतरी आघात झाल्यासारखी दुःखद भावना होते. म्हणूनच शब्द हा हर्ष-खेद उत्पन्न करणारा आहे, असे ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे. शब्दात विचार उत्पन्न करण्याचेही सामर्थ्य असते. याविषयी प्रा. कृ. पां. कुलकर्णी लिहितात, ते असे – 'शब्दाच्या अर्थात जसे ज्ञान समाविष्ट झालेले असते, तशा भावनाही समाविष्ट झालेल्या असतात. कधी कधी शब्दाच्या अर्थावर भावनांचे थरच साचलेले असतात. भाषेतील उद्‌गारवाचक अव्यये, विशेषनामे, व्यक्तिनामे, विशेषणे, इत्यादी शब्दांत भावनिक अंशाचा भाग अधिक असतो. धार्मिक शब्द, ऐतिहासिक व्यक्ती, भावनागर्भ अर्थाचे शब्द ह्यात भावनिक अंश अधिक असतो. कधी कधी विशिष्ट स्थितीमुळे, परिस्थितीमुळे एखाद्या साध्या शब्दाच्या अर्थात भावनिक अंश अधिक असतो. रसोत्पादक काव्यातील शब्द भावनिकच विशेष असतात.'

वाच्यार्थ, लक्ष्यार्थ व व्यंग्यार्थ असे शब्दाचे तीन प्रकारचे अर्थ असतात. हे तीन्ही अर्थ व्यक्त करणाऱ्या निरनिराळ्या तीन शक्ती आहेत. त्यांना अनुक्रमे अभिधा, लक्षणा आणि व्यंजना असे म्हणतात.

अभिधा ही शब्दाची पहिली आणि मुख्य शक्ती आहे. विशिष्ट शब्दाचा उच्चार करताक्षणीच जो अर्थ आपल्या मनात येतो, त्याला वाच्यार्थ म्हणतात. हा अभिधाशक्तीने प्राप्त होतो. विशिष्ट शब्दापासून विशिष्ट अर्थ घ्यायचा, हाच त्याचा नियम. म्हणूनच शब्दाच्या या वाच्यार्थाला सांकेतिक अर्थ असेही म्हणतात. सांकेतिक अर्थही अनेक असू शकतात. अशा वेळी ऐकणाऱ्याला विशिष्ट शब्दाचा कोणता अर्थ घ्यावा याविषयी संदेह निर्माण होणे शक्य आहे. म्हणून अर्थनिर्णायक अशा काही बाबी शास्त्रकारांनी सांगितल्या आहेत. त्यासंबंधीचे काव्यप्रकाशातील दोन श्लोक असे –

संयोगो विप्रयोगश्च साहचर्यं विरोधिता ।
अर्थः प्रकरणं लिङ्गं शब्दस्यान्यस्य सन्निधिः ॥
सामर्थ्यमौचिती देशः कालो व्यक्तिः स्वरादयः ।
शब्दार्थस्यानवच्छेदे विशेषस्मृतिहेतवः ॥

अर्थ – संयोग, वियोग, साहचर्य, विरोधीपणा, अर्थ, प्रकरण, लिंग, दुसऱ्या शब्दाचे सान्निध्य, औचित्य, देश, काल, व्यक्ती आणि स्वर इतक्या गोष्टी अर्थनिर्णयाच्या कामी उपयोगी पडतात. यांची क्रमाने उदाहरणे अशी –

संयोग – विष्णू, वानर, सिंह, इंद्र हे हरी शब्दाचे अर्थ आहेत. पण 'शंख–चक्र धारण करणारा हरी.' या वाक्यात हरी शब्दाचा अर्थ विष्णू असाच घेतला पाहिजे. कारण शंख, चक्र आणि विष्णू यांचा नेहमी संयोग असतो. तसा संयोग वानर, सिंह, इंद्र यांचा नाही.

वियोग – 'शंख–चक्र न घेतलेला हरी' असे म्हटले तरीही हरी शब्दाचा अर्थ विष्णु असाच होतो. कारण शंख – चक्र आणि विष्णू यांचा संयोग आपणास ठाऊक असतो. त्याचा या ठिकाणी वियोग झाला आहे.

साहचर्य – 'राम' शब्दाचे दोन अर्थ आहेत. एक भार्गवराम आणि दुसरा दाशरथी राम. पण 'राम आणि लक्ष्मण' या वाक्यातील राम या शब्दाचा अर्थ दाशरथी राम असाच घेतला पाहिजे. कारण लक्ष्मण शब्दाच्या साहचर्याने तो शब्द आला आहे.

विरोधीपणा – नकुल शब्दाचे दोन अर्थ आहेत. एक मुंगूस आणि दुसरा माद्रीचा पुत्र. पण 'अहि–नकुल' असा शब्द आल्यास तिथे त्या शब्दाचा अर्थ पांडवांतला नकुल असा न घेता मुंगूस असाच घेतला पाहिजे. कारण नकुल हा शब्द सर्पाचा विरोधी म्हणून प्रसिद्ध आहे. पांडवांतल्या नकुलाचा आणि सर्पाचा विरोधी भाव नाही.

अर्थप्रयोजन – पांडुरंग शब्दाला दोन अर्थ आहेत. पांडुरंग म्हणजे विठोबा आणि पांडुरंग म्हणजे पांढरा रंग. 'भवमुक्त होण्यासाठी पांडुरंगाला शरण जा' असे वाक्य आले, तर त्या ठिकाणी पांडुरंग शब्दाचा श्रीविठोबा हाच अर्थ घेतला पाहिजे; पांढरा रंग असा घेता येणार नाही. कारण पांढरा रंग हा काही मोक्षाचे प्रयोजन होऊ शकत नाही.

प्रकरण – राजा या शब्दाचेही अर्थ दोन होतात. राजा म्हणजे भूपती आणि राजा म्हणजे त्या नावाचा मनुष्य. एखाद्या लघुकथेत किंवा अन्य कोणत्या तरी प्रसंगी राजा शब्द आला तर विषय किंवा प्रकरण कोणते चालले आहे ते पाहून मागच्या-पुढच्या संदर्भांवरून त्या शब्दाचा अर्थ घ्यावा लागेल.

लिंग – लिंग म्हणजे संभवणारे विशेषण. 'दाता कर्ण' असे वाक्य आले तर कर्ण शब्दाचा कोणता अर्थ स्वीकारायचा? कान असा, की कुंतीचा कानीन पुत्र असा? अशा वेळी वाक्या-

तील विशेषण कोणाला लागू पडते ते पाहावे लागेल. ‘ दाता ’ हे विशेषण कानाला काही संभवत नाही. अर्थात या ठिकाणी कुंतीचा पुत्र असाच अर्थ घ्यावा लागतो.

अन्य शब्दांचे सान्निध्य – ‘ कंसाला मारणाऱ्या देवाला नमस्कार कर. ’ कंसाला मारणारा देव म्हणजे श्रीकृष्ण हे प्रसिद्ध आहे. कंस शब्दाच्या सान्निध्यावरून इथे कृष्ण हा निश्चित झाला.

सामर्थ्य – ‘ पय पिऊन ताकदवान झालेला पुरुष. ’ या वाक्यातला पय शब्दाचा अर्थ दूध असाच घेणे भाग पडते. पाणी असाही त्याचा दुसरा अर्थ आहे. पण पाणी पिऊन कोणाला ताकद येणार नाही. ताकद वाढविण्याचे सामर्थ्य पाण्यात नसून दुधातच आहे.

औचित्य – औचित्य म्हणजे प्रकृत विषयाला अनुकूल असा अर्थ. उदा० निष्कलंक या शब्दाचे दोन अर्थ होतात. एक स्वच्छ आणि दुसरा पवित्र. ‘ केले वरी उदर पांडुर निष्कलंक ’ या ठिकाणी त्या शब्दाचा अर्थ स्वच्छ, कसलाही डाग नसलेले असाच घेतला पाहिजे. कारण पवित्र असा अर्थ उचित नाही.

देश – तमिळनाडमध्ये राव, पंत या शब्दांऐवजी स्वामी म्हणण्याचा प्रघात आहे. यासाठी आपण त्या देशात गेल्यावर स्वामी या शब्दाचा अर्थ संन्यासी असा समजता कामा नये. कारण देशपरत्वे त्याचा अर्थ बदललेला आहे.

काल – ‘ चित्रभानू ’ हे अग्नी आणि सूर्य या दोघांनाही नाव आहे. एखाद्याने रात्रीच्या वेळी म्हटले, की ‘ चित्रभानूचा प्रकाश पडला आहे. ’ तर चित्रभानू शब्दाचा अर्थ अग्नी असाच घेतला पाहिजे. कारण रात्रीच्या वेळी सूर्य नसतो.

स्वर – विशिष्ट प्रकारचे हेल काढून एखादा शब्द उच्चारल्यास त्याचाही चालू अर्थापेक्षा निराळा अर्थ घ्यावा लागतो. ‘ छान केलंस हो. ’ आणि ‘ छाऽऽऽन केलंस होऽऽऽ ! ’ या दोन वाक्यांतील ‘ छान ’ शब्दाचा अर्थ भिन्न होतो. पहिला प्रशस्तिदर्शक असून, दुसरा निंदाव्यंजक आहे.

पुष्कळ वेळा शब्दांचा प्रत्यक्ष सरळ व निश्चित अर्थ कमी पडतो, म्हणजे त्याला बाध येतो. अशा वेळी मुख्यार्थातच संलग्न असा रूढीने मान्य केलेला व काहीतरी जास्त गुण दाखवणारा जो अर्थ घ्यावा लागतो, त्याला लक्ष्यार्थ असे म्हणतात. हा अर्थ शब्दाच्या लक्षणा या शक्तीने निष्पन्न होतो. उदा० ‘ नदीवरील झोपडी ’ या शब्दप्रयोगात वाच्यार्थ नदीच्या पाण्यावरील झोपडी असा होईल; पण तो तर इष्ट नाही. सबब नदीवरील म्हणजे नदीच्या काठावरील असा वेगळा अर्थ घ्यावा लागतो. हीच शब्दाची लक्षणावृत्ती होय. ‘ टेंभा मिरवणे ’ म्हणजे बढाई सांगणे. ‘ कळी उमलणे ’ म्हणजे आकस्मिक हर्ष उत्पन्न होणे. ‘ व्यूह रचणे ’ म्हणजे दुसऱ्याला अडचणीत टाकण्याची योजना आखणे. हे सारे अर्थ शब्दाच्या लक्षणाशक्तीनेच आलेले आहेत.

ज्या शक्तीने मुख्यार्थाचा बोध होऊन मुख्यार्थापेक्षाही अधि[illegible] किंवा केव्हा केव्हा निराळा अर्थ प्रतीत होतो, त्या शक्तीला व्यंज[illegible] आणि तिने प्राप्त होणाऱ्या अर्थाला व्यंग्यार्थ असे म्हणता[illegible] व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाला घालवून आपण त्याच्या जागी [illegible] बसत नाही; तर वाच्यार्थाच्या आधारेच तो त्याच्या मागून [illegible] असतो. त्यासाठी मुख्यार्थ आधी कळला, तरच व्यंग्यार्थ सम[illegible]

या बावतीतले संस्कृत साहित्यातले सुप्रसिद्ध उदाहरण म्ह[illegible] ‘गतोऽस्तमर्कः (=सूर्य मावळला), हे वाक्य होय. हे [illegible] उच्चारताच त्याचा वाच्यार्थ आपणास काय समजला ? तर [illegible] नावाचा आकाशातला एक तेजोगोल पश्चिम क्षितिजाआ[illegible] गेला. आता कल्पना करा. शेतात काम करणाऱ्या एखाद्या [illegible] कऱ्याने म्हटले, ‘ सूर्य मावळला ’ तर ‘ आता घरी जायची [illegible] झाली, ’ असा त्यातून अर्थ ध्वनित होईल. एखाद्या कर्मठ [illegible] णाने हेच वाक्य उच्चारले, तर ‘ संध्येची वेळ झाली ’ असा [illegible] अर्थ होईल. एखाद्या दुःखी, कष्टी आणि निराश झालेल्या म[illegible] साच्या तोंडून हेच शब्द आले तर, ‘ आयुष्यातला एक [illegible] संपला, ’ असे त्यावरून सूचित होईल. एखाद्या आईने अं[illegible] खेळणाऱ्या आपल्या मुलांना उद्देशून हेच वाक्य उच्चारले, [illegible] त्यावरून ‘ आता खेळ पुरे, ’ हा आशय ध्वनित होईल. हे [illegible] निराळे आशय सूचित झाले ते ‘ सूर्य मावळला ’ या दोन शब्दां[illegible] वाच्यार्थात नाहीत. पण असे असले, तरी ते या दोन शब्दां[illegible] सूचित झाले आहेत, ही गोष्ट निःसंशय.

शब्दार्थविज्ञान – भाषा हे लोकव्यवहाराचे एक सुगम [illegible] सर्वश्रेष्ठ साधन आहे. शब्द हा भाषेचा मूलभूत घटक [illegible] प्राचीन काळापासून मानवाच्या ठिकाणी शब्दाविषयी विस्म[illegible] कुतूहल या भावना दृष्टोत्पत्तीस येतात. शब्दाचा महिमा [illegible] भाषांत व सर्व धर्मग्रंथांत गायिलेला आढळतो. शब्दाचे [illegible] जाणवते, ते त्याच्या अंगी वसत असलेल्या अर्थबोधक शक्त[illegible] भारतीय परंपरेत या शब्दार्थशास्त्राचा विचार प्राचीन [illegible] पासून चालत आला आहे. त्याचा मागोवा डॉ. दा. ल. [illegible] यांनी एका लेखात घेतला आहे, त्याचा सारांश पुढीलप्रमा[illegible]

शब्द आणि अर्थ यांतील परस्परसंबंधाचे, तसेच [illegible] उगम, विकास आणि त्यातून प्रतीत होणाऱ्या अर्थाचे प[illegible] यांचे पद्धतशीर अध्ययन म्हणजे शब्दार्थशास्त्र होय. [illegible] बुद्धीच्या सात गुणांचा निर्देश करताना अर्थविज्ञान हा ए[illegible] सांगितला आहे ( म. भा. वन. २.१९ ). ध्वनी, रूप ( प्रकृतिप्र[illegible] अर्थ, वाक्य व व्युत्पत्ती ही भाषाशास्त्राची पाच अंगे आहेत.

भारतात भाषाविषयक विचारांचा प्रारंभ प्राचीन [illegible] पासूनच सुरू झाला आहे. चारही वेदांत वैदिक ऋषींनी [illegible] महती परोपरीने गायिली आहे. उपनिषदांत तर शब्द हे [illegible]

आहे, असे म्हटले आहे (बृहदा. ४.१). वेदांचे व्यवस्थित अध्ययन होण्यासाठी शिक्षादी षडंगे निर्माण झाली. त्यांपैकी शिक्षा, व्याकरण व निरुक्त ही तीन अंगे भाषाविज्ञानात्मक असून, त्यांत अनुक्रमे ध्वनी, रूप, व्युत्पत्ती व अर्थ या दृष्टींनी केलेले विवेचन आढळते. शब्द नित्य की अनित्य, या वादामध्ये यास्क हा शब्दाचे नित्यत्व सांगतो. वाग्व्यवहार इंद्रियाश्रित आहे. बोलण्या-ऐकण्याची क्रिया चालू असताना शब्द एकामागून एक लुप्त होतात, या काही पंडितांच्या विचारांचे खंडन करताना यास्क म्हणतो– शब्द व त्यांचे अर्थ हे वक्त्याच्या आणि श्रोत्याच्या मनात स्थिर असतात. ज्ञात झालेले शब्द लोपले, तरी त्यांचे मूळ मनात राहतेच.

नाम, आख्यात (धातू), उपसर्ग व निपात (अव्यय) असे शब्दांचे चार वर्ग आहेत. निरुक्तात स्वरसंस्कारांचा म्हणजेच आघाताचा आणि प्रत्यय लागून धातूपासून बनलेल्या नामादिकांचा विचार केला आहे. शब्दातील ध्वनींच्या उच्चारपद्धतीचे सूक्ष्म व सविस्तर वर्णन प्रातिशाख्य व शिक्षाग्रंथ यांत आढळते. उपसर्गांना स्वतःचा वेगळा अर्थ असतो आणि नाम व धातू यांच्याशी संयुक्त झाल्यावर ते त्यात नवा अर्थ आणतात, हे गार्ग्याचे मत यास्काला मान्य आहे. व्याकरणाचे व तदनुषंगाने शब्दार्थाचे तात्त्विक विवेचन पतंजलीच्या महाभाष्यात आणि भर्तृहरीच्या वाक्यपदीयात आढळते. न्याय-मीमांसादी दर्शनांनीही शब्दार्थांचे मूलग्राही विवेचन केले आहे.

वैयाकरणांच्या मते शब्दांतून अर्थाचा बोध होतो, तो स्फोटामुळे. अर्थ परिस्फुट करतो, तो स्फोट होय. अल्पजीवी असा ध्वनिरूप शब्द ऐकल्यामुळे अर्थाचा बोध होत नसून, तो अविनाशी व अविभाज्य अशा वाक्‌तत्त्वामुळे, अर्थात स्फोटामुळे होतो. ध्वनी किंवा वर्ण हे चिरंतन स्फोटाचा केवळ आविष्कार करतात. तत्त्वतः स्फोटच शब्द आहे, स्फोट व ध्वनी यांत व्यंग्य-व्यंजक संबंध असतो. स्फोटाची वर्णस्फोट, पदस्फोट व वाक्यस्फोट अशी तीन रूपे आहेत.

मीमांसक व नैयायिक यांना ही स्फोटकल्पना मान्य नाही. मीमांसकांच्या मते ध्वनी नित्य असून, वक्त्याने उच्चारलेला वर्णघटित शब्द एक विचार किंवा भाव व्यक्त करतो. व क्रमानुसार येणारे शब्दातील वर्ण जरी अश्रुत झाले, तरी ते मनावर संस्कार करीत जातात आणि शेवटच्या उच्चाराने होणारा संस्कार आधीच्या संस्कारांशी संकलित होऊन तो शब्दाच्या अर्थाची प्रतीती करतो. मीमांसकांची विचारसरणी ही अशी आहे.

ध्वनी भंगुर आहे असे नैयायिक म्हणतात. पण आधीच्या वर्णांच्या स्मृतीचा अंतिम वर्णाशी सहयोग होऊन पद बनते, ते सार्थ असते व वाक्याचा एक भाग बनते, असे त्यांना वाटते.

**शब्दाची अर्थबोधकता** – शब्द हा ध्वनींचा किंवा वर्णांचा समूह असून, तो कोणता तरी भाव किंवा विचार व्यक्त करण्यासाठी उच्चारला जातो. विवक्षा म्हणजे काहीतरी व्यक्त करण्याची वक्त्याची इच्छा, हे साऱ्या वाचिक व्यवहाराचे आदिकारण होय. शब्दाचा बुद्धीशी कसा संबंध आहे, हे भर्तृहरीने वाक्यपदीयात पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

> **अरणिस्थं यथा ज्योतिः प्रकाशान्तरकारणम् ।**
> **तद्वच्छब्दोऽपि बुद्धिस्थः श्रुतीनां कारणं पृथक् ।।**
> **वितर्कितः पुरा बुद्ध्या चिदर्थे विनिवेशितः ।**
> **करणेभ्यो विवृत्तेन ध्वनिना सोऽनुगृह्यते ।।**

(वाक्यपदीय १.४६-४७)

अर्थ – ज्याप्रमाणे अरणीच्या म्हणजे शमीच्या खोडाच्या ठायी (अदृश्य रूपाने) असणारा अग्नी हा अन्य (प्रकट होणाऱ्या) अग्नीचे कारण असतो, त्याप्रमाणे बुद्धीच्या ठिकाणी (सूक्ष्म रूपाने) असणारा शब्द अनेक नादात्मक श्रुतींचे किंवा शब्दरूपांचे कारण असतो. आधी बुद्धीच्या द्वारा अर्थाचा निश्चय करून (तदनुसार) शब्दाचा प्रयोग करण्यात येतो. इंद्रियांनी स्फुट केलेल्या ध्वनीमुळे त्याचे (विशिष्ट अर्थाने योजलेल्या शब्दाचे) ग्रहण होते. यावरून बुद्धिस्थ शब्द वाणीचे मूळरूप असून तो श्रुतिगोचर होणाऱ्या शब्दाचे कारण आहे, असे म्हणता येते.

अर्थाचे ज्ञान करून देण्यासाठी उच्चारला जाणारा ध्वनिसमूह म्हणजे शब्द होय. हा अर्थ कसा समजायचा म्हणजे त्याचे लक्षण काय, याविषयी भर्तृहरी पुढील श्लोक लिहितो –

> **यस्मिंस्तूच्चरिते शब्दे यदा योऽर्थः प्रतीयते ।**
> **तमाहुरर्थं तस्यैव नान्यदर्थस्य लक्षणम् ।।**

(वाक्य. २.३३०)

अर्थ– शब्दाचा उच्चार होताच (त्या वेळी) ज्या अर्थाची– आशयाची प्रतीती होते, तो त्या शब्दाचा अर्थ होय. अर्थाचे याहून वेगळे लक्षण नाही.

त्यापुढे भर्तृहरी म्हणतो, की वाग्व्यवहारात शब्दांचा प्रयोग करण्याचे ज्ञान, बाह्य अर्थ आणि त्याचे स्वरूप या तीन्ही गोष्टी प्रतीत होतात. शब्दांचा उच्चार झाला, म्हणजे त्यांचा पारस्परिक संबंध निर्धारित होतो.

अप्रत्यक्ष, अविद्यमान (भूत-भविष्यकालीन), अमूर्त (भक्ती, ज्ञान, आनंद), काल्पनिक (आकाशपुष्प, कल्पतरू), अशाही गोष्टींचा बोध शब्दांपासून होतो. तात्पर्य, शब्दापासून होणारा अर्थबोध हा बाह्य व बौद्ध म्हणजेच वस्तुरूप व केवळ बुद्धिगत असा द्विविध असतो. शब्द आणि अर्थ हे रूपतः वेगळे वाटत असले, तरी ते एकाच आत्म्याचे दोन भेद किंवा एकाच तत्त्वाचे दोन आविष्कार असून, ते एकत्रच असतात.

शब्द व अर्थ हे एकमेकांना जडलेले व परस्परपृथक न करता येण्याजोगे आहेत, असे वैयाकरण मानतात. त्यांतील एकरूपता वास्तविक नसून ती आरोपित आहे, असे त्यांचे मत आहे. शब्द ऐकल्यावर अर्थाचा बोध होतो, तो त्या दोहोंत काही संबंध असतो म्हणून. तसे नसते तर 'सर्वे सर्वार्थवाचकाः' या वचनाप्रमाणे सर्व शब्द सर्वच अर्थांचे बोधक झाले असते. पण तसे न होता शब्दापासून काही ठराविक अर्थाचाच बोध होतो, ही अनुभवाची गोष्ट आहे. हा शब्दार्थसंबंध कोणी केव्हा जुळविला हे सांगता येत नाही. नियत अर्थाचा बोध करण्याची शब्दाची शक्ती स्वभावसिद्ध आहे.

**संकेत** – अमुक शब्दापासून अमुक अर्थ जाणावा, अशी ईश्वराची इच्छा म्हणजे संकेत होय, असे प्राचीन नैयायिक म्हणतात. नव्य नैयायिकांनी मात्र संकेत हा लोकांच्या इच्छेप्रमाणे ठरतो, असे म्हटले आहे. संकेत हा लोकव्यवहारावरून समजला म्हणजे शब्द आणि अर्थ यांतील वाच्य-वाचक भावाचे भान होते. 'इच्छामात्रं सङ्केतः' = केवळ इच्छा म्हणजे संकेत होय. या उक्तीमधील इच्छा मात्र केवळ एकटचा-दुकटचाची असून चालणार नाही; ती सामाजिक व सामूहिक अशी व्यापक स्वरूपाची असली पाहिजे.

लोकव्यवहार, शास्त्रज्ञान, भावज्ञान, तत्त्वज्ञान या सर्वच क्षेत्रांत शब्दाचे श्रेष्ठत्व आणि सत्तावैभव अमर्याद आहे. भर्तृहरी त्याचे वर्णन करताना पुढील श्लोक लिहितो –

> इदमन्धतमः कृत्स्नं जायेत भुवनत्रयम् ।
> यदि शब्दाह्वयं ज्योतिरासंसारं न दीप्यते ॥

**अर्थ** – जर शब्द नामक ज्योती संसारभर तेवत राहिली नसती, तर सारे त्रिभुवन निबिड अंधकारात बुडून गेले असते. [ म. भा. उ. वि.; सु. का. शा.; डॉ. दा. ल. अडोणी–वि. सं. मं. वा. १९६८ ]

(२) एक प्रमाण. न्याय दर्शनात शब्द हे एक प्रमाण मानलेले आहे. 'आप्तोपदेशः शब्दः' = आप्त पुरुषाचा उपदेश म्हणजे शब्द होय (न्या. सू. १.१.६). वस्तूचे यथार्थ रूप जाणणाऱ्याला आप्त असे म्हणतात. तसेच, आप्त हा हितोपदेष्टा असल्यामुळे त्याचे वचन आपण प्रमाण मानू शकतो. शब्दाचे लौकिक आणि वैदिक असे दोन प्रकार आहेत. लौकिक पुरुषांच्या वाक्याला लौकिक शब्द आणि श्रुतीतील वाक्याला वैदिक शब्द असे म्हणतात. पदांच्या समूहाला वाक्य असे नाव आहे. पद हे शक्तीने युक्त असते. अभिधा आणि लक्षणा अशी दोन प्रकारची शक्ती नैयायिकांनी मानलेली आहे. पदशक्तीच्या बाबतीत नैयायिकांत मतभेद आहेत. प्राचीन नैयायिक ईश्वराच्या इच्छेला संकेत मानतात. 'हा शब्द या अर्थाचा बोध करो' अशा ईश्वरेच्छेवर शब्दसंकेत म्हणजे शक्ती अवलंबून असते, असे त्यांचे मत आहे. पण नव्य नैयायिक पुरुषाची इच्छा हेही संकेताचे कारण मानतात. शक्तीचे ज्ञान वृद्धव्यवहारावरून होते. एखाद्या अतिवृद्धाने 'घटाला आण' असे म्हटले असता दुसरा मध्यम वयाचा पुरुष घट आणतो. ते एक लहान मुलगा पाहतो. नंतर तो वृद्ध 'गायीला आण व घटाला ने' असे म्हणतो. ते ऐकून मध्यम पुरुष गायीला आणतो व घटाला नेतो. ते पाहून त्या मुलाला घट, गाय, आण व ने या पदांचे ज्ञान घट व गाय यांना आणणे व घटाला परत नेणे, या क्रियांवरून म्हणजे वडील माणसांच्या व्यवहारावरून होते. त्याचप्रमाणे काही बाधक नसल्यास धातू, प्रत्यय, इत्यादींचा शक्तिग्रह व्याकरणावरून होतो.

वाक्याच्या अर्थाचा बोध होण्यासाठी वाक्यात आकांक्षा, योग्यता, संनिधी व तात्पर्यज्ञान ही असण्याची आवश्यकता आहे.

वैदिक वाक्ये ही ईश्वरोक्त असल्यामुळे सर्वच प्रमाण असतात. लौकिक वाक्यांपैकी आप्ताने उच्चारलेली तेवढी प्रमाण व बाकीची अप्रमाण असतात.

न्याय-वैशेषिक, सांख्य व मीमांसक यांच्याप्रमाणेच बौद्ध व जैनही शब्द हे प्रमाण मानतात. [ भा. द.; भा. द. सं. ]

## शमी

एक वनस्पतिविशेष. या झाडाला अग्निगर्भा, केशमथनी, ईशानी, लक्ष्मी, तपनतनया, हविर्गंधा, इ. अनेक नावे आहेत. हे झाड उंच वाढते. मात्र त्याला अंगभर काटे असतात. याची पाने आवळ्याच्या पानासारखी असतात.

शमी हा एक हवनीय वृक्ष आहे. ग्रहयज्ञात शनीसाठी याच्या समिधा वापरतात. चौल संस्कारात मुलाच्या जावळाचे केस शमीच्या पानासह मातेच्या हातात देतात आणि ती ते बैलाच्या शेणावर ठेवते. यज्ञीय अग्नी उत्पन्न करण्यासाठी खालची अरणी शमीच्या लाकडापासून करतात.

अथर्ववेद व पुढील वाङ्मय यात शमीचे उल्लेख आढळतात. शमी ही प्राचीन काळापासून पवित्र मानलेली आहे. सिंधुसंस्कृतीतही तिचे महत्त्व होते. हडप्पा येथील उत्खननात जे अवशेष सापडले आहेत, त्यांत एक शमीही आहे. देव-दानव शमीची फांदी हस्तगत करण्यासाठी आपसात झगडत आहेत, असे एक चित्र सिंधुसंस्कृतीच्या उत्खननात मिळाले आहे.

शमी वृक्षाची उत्पत्ती कशी झाली त्याविषयी गणेश पुराणात एक कथा आहे, ती अशी–

वीतिहोत्र नगरात और्व नावाचा ब्राह्मण होता. त्याला शमिका नावाची कन्या होती. ती त्याने धौम्य ऋषीच्या मंदार नामक पुत्राला दिली. एके दिवशी मंदाराच्या आश्रमात भृशुंडी ऋषी आला. त्याचा देह स्थूल होता आणि त्याला हत्तीच्या सारखी

सोंड होती. ते ध्यान पाहून शमी-मंदार यांना हसू फुटले. भृशुंडीला त्यांचा राग आला. त्याने त्या दोघांना शाप दिला, की 'तुम्ही दोघे वृक्षयोनीत जन्माल!' त्या शापाने तत्काळ त्यांची झाडे बनली.

मंदाराचा गुरू शौनक नावाचा ऋषी होता. त्याला अंतर्ज्ञानाने हे वृत्त कळले. त्या दोघांचा शाप नष्ट व्हावा म्हणून शौनक व शमीचा बाप और्व, यांनी बारा वर्षे गणपतीची आराधना केली. गणपती त्यांना प्रसन्न झाला. त्याने म्हटले. 'भृशुंडी माझा भक्त आहे. त्याचा शाप खोटा ठरायचा नाही. पण तुमच्या भक्तीसाठी मी एक वर देतो. आजपासून मी मंदारवृक्षाच्या खाली वास्तव्य करीन. तिथे जो कोणी शमीपत्रांनी माझी पूजा करील, त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतील.' त्या दिवसापासून गणेशपूजेत शमी व मंदार यांचा अंतर्भाव झाला.

शमी ही दुष्कृत्ये व दुःस्वप्ने यांचा नाश करणारी आहे. ती अमंगलाचे मंगल करणारी आहे. म्हणून दसऱ्याच्या दिवशी लोक शमीपूजन करून मगच सीमोल्लंघनाला निघतात. पांडवांनी अज्ञातवासात जातेवेळी एका शमीवृक्षावर आपली शस्त्रे लपवून ठेवली होती, अशी कथा महाभारतात आहे. [ गणेश कोश; नंदादीप; हडप्पा; वे. इं.; नि. सिं.; पू. मा. प्र. ]

## शमीमूळपूर

महाराष्ट्रातील एक गणेशक्षेत्र. हे स्थान अदोष या नावानेही परिचित आहे. नागपूर–छिंदवाडा रेल्वेफाटयावरील पाटणसावंगी स्टेशनापासून सुमारे चार मैलांवर हे गाव आहे. इथला गणपती शमीविघ्नेश या नावाने प्रसिद्ध असून, तो दशभुज व प्रचंड आहे. त्याची मूर्ती पाषाणाची आहे. या गणेशाला हे नाव का मिळाले, यासंबंधीची एक कथा आहे, ती अशी–

ब्रह्मदेवाने इंद्राच्या विनंतीवरून तिलोत्तमा नावाची अप्सरा निर्माण केली. तिला पाहून ब्रह्मदेव स्वतःच मोहित झाला आणि त्याचे वीर्यस्खलन झाले. त्यातून महापाप, संकट व शत्रू असे तीन भयंकर पुरुष निर्माण झाले. त्यांनी शिवप्रसादाने ब्रह्मांडाचे राज्य मिळविले आणि साऱ्या पृथ्वीला 'त्राहि भगवन' करून सोडले. तेव्हा लोकांनी मुद्गल मुनीच्या सांगण्यावरून गणेशाच्या आराधनेला आरंभ केला. त्या वेळी आकाशवाणी झाली, की 'शमीमूलातून गणेश अवतार घेईल व तो दैत्यसंहार करून तुमचे संरक्षण करील.' पुढे सर्व गोष्टी तशा घडून आल्या. मग मुद्गलांनी शमीच्या मुळाशी गणेशाची स्थापना केली. तेव्हापासून या गणेशाला शमीविघ्नेश आणि या स्थानाला शमीमूळपूर असे नाव मिळाले.

शमीविघ्नेशाच्या कृपेनेच श्रीविष्णूने वामनावतारात बलीच्या यज्ञाचा विध्वंस केला. त्यानिमित्ताने वामनाने शमीविघ्नेशासमीप वक्रतुंड गणेशाची स्थापना केली. तेव्हापासून हे क्षेत्र वामनवरद वक्रतुंड या नावानेही प्रसिद्ध झाले. प्रस्तुत क्षेत्राची गणना एकवीस गणेशक्षेत्रांत केली जाते. [ ग. को.; महागणपती ]

## शयनी एकादशी

आषाढ शुद्ध एकादशीला शयनी किंवा महाएकादशी असे नाव आहे. या एकादशीपासून कार्तिक शुद्ध एकादशीपर्यंत श्रीविष्णू क्षीरसागरात शेषावर शयन करतो, अशी पौराणिक कथा आहे. शयनी एकादशीला विष्णुशयनोत्सव नावाचा व्रतविधी करतात. हे व्रत आठव्या वर्षापासून ऐंशी वर्षांपर्यंत करायचा सर्वांना अधिकार आहे. पुढेही ज्याला शक्य असेल त्याने ते करावे, असे म्हटले आहे. (विष्णुशयन पाहा.) या व्रतासंबंधीची एक कथा पद्मपुराणात उत्तरखंडात सांगितली आहे (अ. ५३), ती अशी–

त्रेतायुगात बली नावाचा एक दैत्य होता. तो सर्व देवांना जिंकून त्रिभुवनाचा अधिपती बनला होता. श्रीविष्णूने वामनावतारात त्याच्या यज्ञमंडपात जाऊन त्याच्याकडे त्रिपाद भूमी मागितली. त्या दानाचे उदक हातावर पडताच दोनच पावलांत त्याने त्रिभुवन व्यापले. तिसऱ्या पावलाला जागा उरली नाही, तेव्हा बलीने त्याला आपल्या मस्तकावर तिसरे पाऊल ठेवायला सांगितले. विष्णूने तसे करून त्याला रसातळात दडपले. त्या दिवसापासून विष्णू एका रूपाने त्याच्या द्वारी तिष्ठत उभा राहिला आणि दुसऱ्या रूपाने त्याच दिवशी क्षीरसागरात शयन करता झाला. पाहा – महाएकादशी. [ध. सिं.]

## शय्या

झोपण्यासाठी लागणारे पलंग वगैरे साहित्य. माणसाला अन्नाप्रमाणेच झोपेचीही अत्यंत आवश्यकता असते. या झोपेसाठी लागणारी शय्या काल आणि परिस्थिती यांच्याप्रमाणे बदलत असते. प्राचीन कालापासून आजच्या सुधारलेल्या युगापर्यंत तिच्यात कितीतरी बदल झालेला आढळतो. त्याचप्रमाणे निष्कांचन व्यक्तीपासून तो श्रीमंत माणसापर्यंत शय्या ही निरनिराळी आढळते.

अगदी प्राचीन मानव भूमीवरच झोपत असे. मानवाने आपल्या राहणीत सुधारणा केल्यावर झोपण्यासाठी बिछाना व पलंग वापरण्यात येऊ लागला. वैदिक वाङ्मयातील काही संज्ञा त्या वेळच्या शय्येच्या सूचक आहेत. ऋग्वेदात तल्प हा शब्द मंचक किंवा बिछाना या अर्थाने योजलेला आहे. मंचक औदुंबर वृक्षाच्या लाकडापासून बनवीत, असे तैत्तिरीय ब्राह्मणातील उल्लेखावरून दिसते. त्या काळात पलंग किंवा मंचक विणून तयार करीत, असे दिसते. कारण अथर्ववेदात नवारीला वर्ध्र (विणण्याचे साधन)

असे नाव आढळते. वाजसनेयी संहिता व तैत्तिरीय ब्राह्मण यांतील नड्वला शब्दाचा अर्थ वेताचा बिछाना असा आहे, असे विद्वान सांगतात. उशीसाठी उपबर्हण, उपधान, उच्छीर्षक असे शब्द योजलेले आहेत. मंचकाच्या शीर्षपीठाला शीर्षण्य म्हटलेले आहे.

वाल्मीकिरामायणाच्या सुंदरकांडात मारुतीने रावणाचे शयनागार पाहिले, त्याचे वर्णन आलेले आहे, ते असे – दिवाणखान्यात हनुमानाला पलंग ठेवण्याचा एक उत्कृष्ट चौरंग दिसला. तो चौरंग स्फटिकाचा असून, रत्नांनी विभूषित केलेला होता. त्याच्यावर स्त्रियांचे मोठमोठे मौल्यवान पलंग ठेवलेले होते. पलंगांचे भाग हस्तिदंती व सुवर्णाचे होते. पलंगावर रत्नजडित आस्तरणे घातलेली होती. त्या पलंगांपैकी एक पलंग सर्वोत्कृष्ट होता. तो सुवर्णाने मढवलेला होता. त्याची प्रभा अग्नीप्रमाणे होती. उत्कृष्ट प्रकारच्या धूपाने तो धुपवलेला होता. सुंदर आस्तरणे त्याच्यावर पसरलेली होती आणि अशोकादी पुष्पांच्या मालांनी तो सर्व बाजूंनी सुशोभित केलेला होता.

बौद्धांच्या विनयपिटकात मंचक किंवा पलंग यांची माहिती आढळते. गांधारकलेत काही पलंग आढळतात. त्यांच्या पायांची रचना निरनिराळ्या प्रकारची असून, ती आकर्षक आहे. या पलंगांचे वैशिष्ट्य असे, की त्यांचा डोके टेकायचा भाग, पाय सोडायच्या भागापेक्षा थोडा उंच असतो.

रायपसेणिय सुत्तात देवशयनीयाचे म्हणजे राजाच्या पलंगाचे वर्णन आले आहे. अशा पलंगाचे पाय सोन्याचे असून, त्यात रत्ने जडवलेली असत. पायांचे सांधे वज्राचे बनवीत. पलंगावर गादी अंथरलेली असे व तिच्यावर उश्या आणि तकिये ठेवीत. गादीवर रेशमी पलंगपोस अंथरीत. ही शय्या गंगातटावरील वाळूप्रमाणे मृदू होत असे. काही वेळा पलंगावर कदलीमृगाच्या चामड्याचेही आस्तरण घालीत.

विनयपिटकातही शय्येचे वर्णन आढळते. सर्वसाधारण पलंग वेळू किंवा वेत यांपासून बनवीत. त्यांना विडाल मंचक असे नाव होते. काही पलंगांवर वरच्या बाजूला वितान असे. पलंगावर गाद्या पसरीत व दोन्ही बाजूंना उश्या ठेवीत. काही वेळा, पलंग दोऱ्यांनी विणीत. पलंगावर प्रथम ताडपत्रांची चटई अंथरीत आणि मग तिच्यावर गादी पसरीत. गादीतला कापूस वृक्षवेलींपासून मिळवलेला असे. पोतकी नावाच्या गवतापासूनही कापूस मिळत असे. कधी कधी कापसाऐवजी पक्ष्यांची पिसे भरून गादी तयार करीत. गादीवर काही वेळा लोकरी चादर अंथरीत. तिच्यावर पानेफुले काढलेली असत. लोकर, कापूस, गवत, पाने किंवा वल्कले भरून उश्या व तकिये तयार करीत आणि वर सुंदर चामड्याने आच्छादीत.

वराहमिहिरानेही शय्येसंबंधी माहिती दिली आहे. त्याच्या मते चंदन, देवदारू, दारुहळद, अंजन, शिरीष, इ. वृक्षांचे लाकूड पलंगासाठी शुभ असून, राजाचा पलंग शंभर आंगळे लांब असावा, असे त्याने सांगितले आहे. हस्तिदंताचा पलंग प्रशस्त होय, असेही त्याने म्हटले आहे.

सोमेश्वराच्या मानसोल्लास या ग्रंथात राजाच्या शय्येचे सात प्रकार दिले आहेत, ते असे – (१) हंसपिच्छ – हंसाच्या पोटाची आणि शेपटीची मऊ पिसे घेऊन ती मऊ अशा चामड्याच्या खोळीत भरून बिछाना तयार करणे. (२) शाल्मलीतूल – जाड रेशमी कापडाच्या खोळीत सावरीचा अतिशय मऊ कापूस भरून शय्या तयार करणे. (३) कार्पास – कापूस पिंजून कापडाच्या खोळीत भरणे. ही पद्धत अजूनही प्रचारात आहे. (४) केशर, कमळ, नागकेशर, इ. सुगंधी फुलांतील केसर व केशराच्या काड्या घेऊन त्रिविध रंगांतील उत्कृष्ट व तलम कापडाच्या खोळीत भरून गादी तयार करणे. (५) पल्लवशय्या – लाल, निळी कमळे व केळी, कैकोली, इ. झाडांची नऊ पाने पलंगावर पसरून त्यांची शय्या तयार करणे. (६) कुसुमशय्या – मोगरा, चाफा यांसारख्या सुवासिक फुलांच्या पाकळ्यांनी शय्या तयार करणे. रतिक्रीडेसाठी ही शय्या सोयिस्कर मानली जाई. (७) पानीयशय्या – कातड्याच्या खोळीत पाणी भरून शय्या तयार करणे. उन्हाळ्यात ही फार सुखकारक वाटे.

या विविध प्रकारच्या शय्या पलंगावर तयार करीत. त्या काळात पलंगाचेही अनेक प्रकार प्रचारात होते. राजेलोकांचे पलंग संपूर्ण सोन्याने बनवीत. त्यांना आठ पाय असत. पलंगावर सुंदर नक्षीकाम केलेले असे. काही पलंगांचे पाय हस्तिदंती असत. तांबे व पितळ यांच्या मिश्रणाने बनलेल्या धातूपासून पलंग तयार करीत. काही पलंगांना आतून स्प्रिंगा बसवलेल्या असत. प्रत्येक हालचालीबरोबर अशा पलंगांचा आवाज होत असे. म्हणून त्यांना रव असे नाव दिलेले होते. काही पलंग वेताने विणलेले असत. त्यांच्या पायांवर आकर्षक नक्षीकाम केलेले असे. कापडाच्या रंगीत पट्ट्या घेऊन पलंग विणीत. त्यांना पट्टिका असे नाव होते. आजही उ. भारतात लोक पांढऱ्या नवारीच्या खाटांचा उपयोग करतात. दोला किंवा झोपाळा हाही पलंगाचाच एक प्रकार होता. झोपाळा चंदनाचा बनवीत आणि त्याला सोन्याच्या कोंदणात हिरेमाणिक जडवीत. झोपाळ्याच्या कड्या सोन्याच्या असत. झोपाळ्याच्या दोन्ही बाजूंना हात टेकण्याची सोय असे.

चौसष्ट कलांत शय्यास्तरणसंयोगपुष्पादिग्रथन ही एक कला सांगितली आहे. उत्तम बिछाना घालणे व तो सुंदर वस्त्रे व पुष्पमाला यांनी सजवणे याला कौशल्य लागते.

अलिकडे सुखवस्तू लोकांत लोखंडी किंवा लाकडी पलंग

वापरण्याचा प्रघात आहे. गुजरात, राजस्थान व उत्तर भारत या प्रदेशात गरीब लोक नवारीच्या खाटेवर निजतात. शहरात सर्वसाधारण लोकांच्या राहण्याच्या जागा लहान असतात. म्हणून 'सोफा-कम-बेड 'सारखे दिवसा बसण्यासाठी व रात्री झोपण्यासाठी उपयोगी पडणारे पलंग आता प्रचारात आले आहेत.

असे जरी असले तरी प्राचीन काळापासून आजतागायत सर्वसाधारण लोक जमिनीवरच अंथरूण घालून झोपतात. सुखवस्तू लोकांत मात्र झोपण्यासाठी गाद्या घालण्याची प्रथा आहे. अंथरुणावर शयन कसे करावे, त्याचा विधी धर्मग्रंथांत सांगितला आहे, तो असा – गोमयाने सारवलेली जमीन रात्री वेदमंत्रांनी व गारुड मंत्रांनी अभिमंत्रून तिच्यावर शय्या पसरून झोपावे. झोपण्यापूर्वी रात्रिसूक्त पठण करावे. सर्पदंश होऊ नये व चोरांनी लुवाडू नये म्हणून पुढील श्लोक म्हणावे –

नर्मदायै नमः प्रातर्नर्मदायै नमो निशि ।
नमोऽस्तु नर्मदे तुभ्यं त्राहि मां विषसर्पतः ।।
जरत्कारो जरत्कार्यां समुत्पन्नो महायशाः ।
आस्तीकः सत्यसन्धो मां पन्नगेभ्योऽभिरक्षतु ।।
कफल्लस्य त्रयो भार्या दाहिनी मोहिनी सती ।
तासां स्मरणमात्रेण चोरो भवतु निष्फलः ।।

त्याचप्रमाणे सुखनिद्रा यावी, म्हणून पाच सुखशायी पुरुषांचे स्मरण पुढील श्लोकाने करायचे असते –

अगस्तिर्माधवश्चैव मुचकुन्दो महामुनिः ।
कपिलो मुनिरास्तीकः पञ्चैते सुखशायिनः ।।

निजताना उश्याजवळ पाण्याचा तांब्या, काठी, पादत्राणे व तांबूल या वस्तू ठेवाव्या. दक्षिणेकडे पाय करून झोपू नये. तसेच झोपताना मस्तक इतर शरीरापेक्षा अधिक उंचीवर ठेवावे.

स्मशान, निर्जन घर, मंदिर, गोशाला, पर्वतशिखर किंवा अशुद्ध जागा या ठिकाणी झोपू नये. तसेच दुष्ट पुरुष व स्त्रिया यांच्या समूहात झोपू नये, असे झोपेसंबंधी काही निषेधही सांगितले आहेत. [ आह्निकसार :; आचारेंदु :; प्रा. भा. सा. सां. भू.; श्री. नीलकंठ – मै. गु. अ. ग्रं.; ह. सा. स्मृ. ग्रं.

**शरणागती** भक्तिमार्गातील एक श्रेष्ठ अवस्था. ईश्वराला सर्वभावे शरण जाणे, असा शरणागती शब्दाचा अर्थ आहे. अहिर्बुध्न्य संहितेत शरणागतीची व्याख्या दिली आहे, (अहि. संहिता ३७.३१) ती अशी–

अहमस्म्यपराधानामालयोऽकिञ्चनोऽगतिः ।
त्वमेवोपायभूतो मे भवेति प्रार्थनामतिः ।
शरणागतिरित्युक्ता सा देवेऽस्मिन् प्रयुज्यताम् ।

अर्थ – परमेश्वराची अशी प्रार्थना केली पाहिजे, की मी अपराधांचे घर आहे, अकिंचन आहे, आश्रयहीन आहे. तूच माझ्या उद्धारासाठी उपाय हो. हिला शरणागती असे म्हटलेले आहे.

भगवद्‌गीतेतही श्रीकृष्णाने अर्जुनाला शरणागतीचे श्रेष्ठत्व सांगितले आहे, (१८.६६) ते असे–

सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोचयिष्यामि मा शुचः ।।

अर्थ – सर्व धर्मांचा त्याग करून तू मला एकटयाला शरण ये. मी तुझी सर्व पापांपासून मुक्तता करीन. तू शोक करू नकोस.

परमेश्वराला शरण गेल्यानेच परम शांतीचा लाभ होतो आणि शेवटी शाश्वत स्थानाचा लाभ होतो, असेही भगवद्‌गीतेत सांगितले आहे.

अनेक भक्तकवींनी आपण ईश्वराला अनन्य शरण आहो, अशा अर्थाची काव्ये रचली आहेत. पाहा – प्रपत्तिमार्ग.

**शरद** सहा ऋतूंपैकी चौथा. आश्विन व कार्तिक या दोन महिन्यांच्या कालखंडाला हे नाव आहे. ज्या कालखंडात ओषधी, धान्य पिकते आणि पावसाळ्यातील गढूळपणा नाहीसा होऊन नद्यानाल्यांचे पाणी स्वच्छ होते, त्या कालखंडाला शरद ऋतू म्हणतात, असे निरुक्तात म्हटले आहे. 'शतं जीव शरदो वर्धमानः' या प्रसिद्ध आशीर्वादमंत्रात येणारा शरद हा शब्द वर्षवाचक असून, त्याचा अर्थ 'तू शंभर शरद ऋतू पाहण्याएवढा जग' असा आहे.

श्री. अरविंद मंगरूळकर यांनी शरद ऋतूचे अत्यंत सुरेख, प्रत्ययकारी वर्णन केले आहे, त्यापैकी एक उतारा असा–

शरद् ऋतू हा संधिकालाचा ऋतू आहे. त्याचे बदलते स्वरूप जसे सूक्ष्म आहे, तसेच बहारीचेही आहे. वर्षा ऋतूत यथेच्छ सचैल स्नान केलेली सृष्टी आता उवडयावर केस सुकवीत बसलेली असते. तिचे अंग या वेळी अगदी स्वच्छ, नितळ झालेले असते. तिची हिरवी-पोपटी रेशमी वस्त्रे तकतकीत झालेली दिसतात. पावसाळ्याचा उवटपणा नाहीसा झालेला असतो. धान्य पिकू लागल्यामुळे पाखरांच्या भराऱ्या आकाशात दिसू लागतात आणि गवताळ जमिनीवर गुरे जोगावताना दिसतात. चिखलाने सारविलेले आकाशाचे अंगण आता धुऊन निघालेले असते. आणि नद्यांतली राडही खाली बसलेली असते.

वाल्मीकी, कालिदास, भारवी, माघ, विशाखदत्त, इ. अनेक ज्येष्ठ संस्कृत कवींनी आपल्या साहित्यातून या ऋतूची बहारदार वर्णने केली आहेत. वाल्मीकीचे शरद्‌वर्णन असे–

तर्पयित्वा सहस्राक्षः सलिलेन वसुन्धराम् ।
निर्वर्तयित्वा सस्यानि कृतकर्मा व्यवस्थितः ।।
स्निग्धगम्भीरनिर्घोषाः शैलद्रुमपुरोगमाः ।

विसृज्य सलिलं मेघाः परिश्रान्ता नृपात्मज ।।
नीलोत्पलदलश्यामाः श्यामीकृत्वा दिशो दश ।
विमदा इव मातङ्गाः शान्तवेगाः पयोधराः ।।
जलगर्भा महावेगाः कुटजार्जुनगन्धिनः ।
चरित्वा विरताः सौम्य वृष्टिवाताः समुद्यताः ।
घनानां वारणानां च मयूराणां च लक्ष्मण ।
नादः प्रस्रवणानां च प्रशान्तः सहसानघ ।।
(वा. रा. किष्किंधा. ३०. २२-२६ व २८)

भावार्थ – इंद्राने विपुल जलवर्षाव करून धरित्रीला संतुष्ट केले आणि धान्य पिकवून (तो) कृतार्थ झाला. धीरगंभीर (अशा) गर्जना करणारे मेघ देखील पर्वत, वृक्ष आणि नगरे यांच्यावर जलवर्षाव करून आता शांत झाले आहेत. नीलकमलाच्या पानांसारखे दिसणारे ढग दशदिशांना हिरवळ करून आता मदहीन हत्तींसारखे थकून गेले आहेत. कुडचाच्या आणि अर्जुनाच्या फुलांच्या वासाने भरलेले आर्द्र वारेही आता वहायचे थांबले आहेत. हे लक्ष्मणा, मेघांचा गडगडाट, हत्तींचा चीत्कार, मोरांच्या केका, ओढ्यांचा खळखळाट आता बंद पडला आहे.

कालिदासाच्या मते शरत्काल हा दिग्विजययात्रेसाठी प्रस्थान ठेवण्याचा आणि सीमोल्लंघन करण्याचा असतो.

या कालात जन्मलेला मनुष्य सत्कर्मात रस घेणारा, शुचिष्मंत, सुशील, गुणी, मानी, श्रीमंत आणि राजकुलात जन्मलेला असतो, असे कोष्ठीप्रदीपात सांगितले आहे.

आश्विन शुद्ध पौर्णिमेला शरत्पूर्णिमा असे नाव असून, त्या दिवशी भगवान श्रीकृष्णाने व्रजमंडळात रासोत्सव साजरा केला, असे श्रीमद्भागवतात म्हटले आहे. [ श. क.; भारतीय व्रतोत्सव–पुरुषोत्तम शर्मा चतुर्वेदी, १९५७; कालिदास का भारत १; संस्कृत साहित्यातील शरद् ऋतू–श्री. अरविंद मंगरूळकर, म. सा. पत्रिका, एप्रिल–जून, १९५६ ]

**शरभ** शिवाचे अर्धमानव, अर्धपशु-पक्षी असे रूप. या रूपासंबंधाने एक कथा आहे, ती अशी – नरसिंहाने हिरण्यकशिपूला ठार केले, तरी त्याचा क्रोध शांत होईना. उलट तो जगाचा संहार करायला निघाला. त्यामुळे देव व मानव शिवाला शरण गेले. शिवाने दोन मुखे, आठ पाय, दोन पंख व लांब शेपूट असलेल्या शरभाचे रूप धारण करून नरसिंहाला मारले, मग त्याचे कातडे काढून पांघरायला घेतले आणि डोके मुकुटावर धारण केले. ही कथा शिवाचे श्रेष्ठत्व दर्शवण्यासाठी रचली गेली असावी, असे वाटते.

शरभाची एक मूर्ती दारासुरमच्या मंदिरात असून, तिला शरभेश्वरमूर्ती असे म्हणतात. या मूर्तीला तीन पाय, सिंहमुख व शेपटी आहे. ती चतुर्भुज असून, तिच्या हातांत पाश, परशु, मृग व अग्नी या वस्तू आहेत. शरभाने नरसिंहाला दाबून धरले असून, तो शरभाच्या तावडीतून सुटण्यासाठी धडपड करीत असलेला दिसतो. ही मूर्ती पौराणिक वर्णनानुसार असली, तरी तीत रेखीवपणा नाही.



शरभमूर्ती–दारासुरम

शरभमूर्तीच्या संदर्भात श्री. ग. ह. खरे लिहितात – 'महाराष्ट्रात अशा प्रकारच्या मूर्ती आढळत नसल्या तरी किल्लेक किल्ल्यांच्या दरवाज्यांवर चार किंवा त्याहून जास्त तीक्ष्ण नखे असलेल्या पायांचा, विक्राळ तोंडाचा, दोन पंखांचा किंवा पंखविहीन आणि लांब शेपटीचा प्राणी काढलेला असतो, तो शरभच असावा असे वाटते.'

सिंह किंवा हत्ती यांच्याहून श्रेष्ठ असलेल्या या प्राण्याचे वर्णन केवळ काल्पनिक आहे; सत्यसृष्टीत असे जनावर आढळत नाही. [ मू. वि.; डे. हिं. इ.; वे. इं.; भा. प्र. वि.; प्रा. च. को.]

**शरभोपनिषद** प्रमुख १०८ उपनिषदांपैकी एक उपनिषद. ब्रह्मा, विष्णू व महेश यांत अधिक श्रेष्ठ कोण, याविषयी ब्रह्मदेव व पैप्पलाद यांच्यामध्ये जो संवाद झाला, तो या उपनिषदात वर्णिलेला आहे. त्यात शेवटी शिवाला श्रेष्ठ ठरवले आहे. या उपनिषदाच्या सतत पठनामुळे पंचमहापातकांपासून मुक्ती मिळते, शिवाची कृपा लाभते व अंती शिवस्वरूप प्राप्त होते, असे सांगितले आहे.

**शर्कराचलदान** दहा पर्वतदानांपैकी एक. आठ भार परिमाण साखर घेऊन तिचा मेरू पर्वत करावा. जेवढ्या भाराचा मेरू पर्वत केला असेल, त्याच्या एकचतुर्थांश

परिमाणाचे चारही बाजूचे पर्वत रचावे. मंदार पर्वतावर कामदेवाची पूर्वाभिमुख आणि विपुलाचलावर वेदमूर्तीची प्राङ्मुख स्थापना करावी. नंतर पूजा व होमहवनादी कृत्ये यथाविधि करून ते पर्वत ब्राह्मणांना दान द्यावे. या दानाचा अन्य तपशील धान्यशैलदानाप्रमाणे आहे. पाहा – धान्यशैल. [दा. चं.; श. क.]

**शर्कराधेनुदान** दशधेनुदानांतील एक दान. त्यासाठी साखरेची गाय व साखरेचेच वासरू करतात. या गोवत्सांची शिंगे सोन्याची, डोळे मोत्यांचे, तोंड गुळाचे व जिव्हा पिठाची करतात. उसांचे पाय, रुप्याचे खूर, लोण्याचेस्तन, प्रशस्तपर्णांचे कान, दर्भाची लव, काशाची कास करून लोकरीने त्यांना बांधतात. गळ्यात अलंकार घालतात. चारी बाजूंना धान्यांनी भरलेली पात्रे ठेवतात. मग त्यांची स्थापना व पूजा करून पंचरत्नांसह त्यांचे दान देतात. फल – अन्नधान्याची सुबत्ता. [दा. चं.]

**शर्करासप्तमी** एक तिथिव्रत. वैशाख शुद्ध सप्तमीला या व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. सूर्य ही या व्रताची देवता होय. व्रतविधान असे – व्रतदिनी श्वेत तिलमिश्रित जलाने स्नान करावे. एका स्थंडिलावर केशराने एक कमळ व बीजकोश काढावा. त्यावर एका तबकात साखरेची सूर्याची प्रतिमा ठेवून तिची पूजा करावी. तबकाशेजारी झोपून, कोणाला ऐकू न जाईल अशा पद्धतीने सौरसूक्त म्हणून पंचगव्य प्राशन करावे. अष्टमीला पूजेतील सर्व द्रव्याचे दान देऊन ब्राह्मणांना साखर, तूप व पायस यांचे भोजन द्यावे. स्वतः मात्र मीठ व तेल वर्ज्य केलेले खाद्यपदार्थ भक्षण करावे. अशा प्रकारे प्रत्येक महिन्यात शुद्ध सप्तमीच्या दिवशी हा व्रतविधी आचरावा. उद्यापनाच्या वेळी साखर, सोने, एक गाय, सर्व सामग्रीसह एक पलंग व सोन्याचे कमळ या वस्तू दान द्याव्या.

सूर्याला साखर प्रिय आहे, कारण ती अमृतोद्भव आहे. फल – दुःखनाश, दीर्घायुष्य, आरोग्य व पुत्रप्राप्ती. [हि. ध.]

**शर्मा विधिचंद्र** (इ. स. चे १६ वे शतक) एक महानुभाव ग्रंथकार. पंजाबात महानुभाव पंथाचा प्रसार करणाऱ्या कृष्णराज ऊर्फ कृष्णमुनी याचा हा शिष्य होता. विधिचंद्राला कविता करण्याचा फार नाद होता. याने हिंदी व पंजाबी भाषेत प्रबंध, स्तोत्र, फटके, आरत्या अशी काव्यरचना केली आहे. महानुभाव पंथाची दीक्षा घेतल्यावर याने चोवीस गुरुव्याख्यान, हंसावतार रासा स्तोत्र, व्रतखंड, प्रसंगनिधान, रुक्मिणीस्वयंवर, परेशावतारचरित्र, ब्रह्मविद्यार्थप्रकाश वगैरे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. [म. म. वा.]

**शर्यणावत** एक सरोवर. याला शर्यणावंत असेही म्हणतात. कुरुक्षेत्राजवळच्या एका सरोवराला हे नाव आहे. ऋग्वेदात याचा अनेकवार उल्लेख येतो. श्री. लुड्‌विग याच्या मते सरस्वती नदीच्या पूर्वेकडील प्रवाहाचे हे नाव आहे. काही विद्वानांच्या मते हे स्थान गढवालमध्ये असून, ते एका पर्वताचे नाव आहे. या पर्वतातून शर्यणावती ही नदी निघते. इंद्र-वृत्रयुद्ध याच नदीच्या काठी झाले. इंद्र ज अश्वाचे मस्तक पर्वतांमध्य शोधीत होता, ते त्याला शर्यणावतात मिळाले, असे यजुर्वेदात म्हटले आहे.

श्री. स. का. दीक्षित यांच्या मते आजचे हरियाणा हे प्राचीन शर्यणावत होय. हरियाणक प्रांताचा एका पुरालेखात उल्लेख आहे. दुसऱ्या एका चाहमानांच्या पुरालेखात हरियान नावाच्या देशात ढिल्लिका (दिल्ली) नावाची नगरी असल्याचा उल्लेख आहे. हा कुरुक्षेत्राचा प्रदेश असून, ऋग्वेदसंहितेपैकी बऱ्याच भागांची रचना इथे झाली असावी. ब्राह्मणग्रंथात कुरुक्षेत्राला पावित्र्याच्या दृष्टीने खूप महत्त्व दिले आहे, त्याचे कारण हेच होय. [वे. इं.; प्रा. भा. सं.; वै. सा.; वेदमाता (ऋग्वेदिक भूगोल) – हरिराम धस्माना, १९५४]

**शर्ववर्मा** कातंत्र व्याकरणाचा कर्ता. हा ब्राह्मण असून, भृगुकच्छचा निवासी होता. हाल सातवाहनाने याला आपल्या गाथासप्तशतीच्या पुष्पिकेत धीसखा म्हणजे विद्वत्तेमुळे झालेला मित्र असे म्हटले आहे. कथासरित्सागरात कातंत्र व्याकरणाच्या रचनेचा वृत्तांत दिला आहे, तो असा –

हाल सातवाहनाला संस्कृत भाषा येत नव्हती. त्याची राणी मात्र संस्कृत जाणणारी होती. त्यामुळे राजालाही आपण संस्कृत शिकावे, असे वाटू लागले. त्या वेळी त्याच्या दरबारात उपस्थित असलेल्या गुणाढ्य नामक कवीने त्याला सहा वर्षांत संस्कृत शिकवितो, अशी प्रौढी मारली; पण शर्ववर्म्याने त्याला फक्त सहाच महिन्यांत संस्कृत शिकवण्याचे वचन दिले. मग शर्ववर्म्याने कार्तिकेयाची आराधना केली आणि त्याच्याकडून हे सरळ व सोपे व्याकरण प्राप्त करून घेतले.

कार्तिकेयाचे वाहन कलापक (मोर) याच्यावरून त्या व्याकरणाला कालापक असेही नाव मिळाले. शर्ववर्म्याने हे व्याकरण राजाला शिकवले आणि राजाने त्याला गुरुदक्षिणा म्हणून भृगुकच्छाचे राज्य दिले.

पुढील काळात या व्याकरणाचा भारतभर प्रसार झाला आणि याच्याच आधारे कच्चायनाने पाली भाषेचे व्याकरण तयार केले. पाहा–कातंत्र व्याकरण. [म. भा. इ.; सं. सा. सो. इ.]

**शर्वोपवासव्रत** एक काम्य व्रत. प्रत्येक महिन्याच्या दोन्ही पक्षांतील अष्टमी व चतुर्दशी या तिथींना उपवास करणे, हा या व्रताचा विधी होय. व्रतावधी एक वर्ष. शिव ही या व्रताची देवता आहे. फल – इच्छितप्राप्ती. [ हि. ध. ]

**शलभासन** एक श्रमसाध्य योगासन. याची कृती पुढील-प्रमाणे – दोन्ही तळहात छातीखाली जमिनीवर ठेवून पालथे झोपावे. मग मागील पाय अधांतरी वीतभर उचलावे. या आसनाला मुनींद्र शलभासन असेही म्हणतात. शलभासनाचे एकपाद व द्विपाद असे दोन प्रकार आहेत. पाहा – एकपाद शलभासन; द्विपाद शलभासन. [ यो. सो. पू. ]

**शलिपा** (इ. स. चे ११ वे शतक) चौऱ्यायंशी सिद्धांपैकी एकविसावा सिद्ध. याला शीलपा व सियारी अशीही नावे आहेत. पं. राहुल सांकृत्यायन यांनी, हा आणि शृंगालिपा एकच होत, असे म्हटले आहे. हा शूद्रकुलोत्पन्न असून, पालवंशी राजा महीपाल (इ. स. ९८८–१०३८) याच्या काळात होऊन गेला. पं. सांकृत्यायन यांनी याचे जन्मस्थान एका ठिकाणी मगध व दुसऱ्या ठिकाणी विधसुर असे सांगितले आहे.

तिबेटातील स्तन्-ग्युरमध्ये याच्या अपभ्रंश भाषेतील ग्रंथ-रत्नमाला या ग्रंथाचा तिबेटी अनुवाद आहे. [ हिं. सा. बि. ]

**शवासन** याला मृतासन असे दुसरे नाव आहे. जमिनीवर शवाप्रमाणे वर तोंड करून शांत झोपले, की हे आसन होते. आसनस्थ असताना सर्व अवयव सैल सोडायचे असतात. मन इष्टदेवता, गुरू अथवा नाभिमंडल या ठिकाणी केंद्रित करायचे असते. हे आसन चित्ताला विश्रांती देणारे आणि श्रमपरिहारक आहे.

ज्यांना शीर्षासनापासून योग्य तो फायदा मिळत नाही, त्यांना शीर्षासनानंतर शवासन केल्यास शीर्षासनाचा भरपूर लाभ होतो, असे म्हणतात. [ उ. यो. द.; यो. सो. पू.; हठयोगप्रदीपिका]

**शशकर्ण काण्व** कण्वकुलातील एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील नववे सूक्त याने रचले असून, त्यात अश्विनीकुमारांची स्तुती गायली आहे. शशकर्णाला आपल्या काव्यशक्तीची जाणीव असावी, असे या सूक्तावरून दिसते. त्याच्या कवित्वाचा प्रत्यय येणारी एक ऋचा अशी–

अभुत्स्यु प्र देव्या साकं वाचाहमश्विनोः।
व्यावर्देव्या मतिं वि रातिं मर्त्येभ्यः।
(ऋ. ८.९.१६)

अर्थ – हे भक्तपाचारित तेजस्वी उषे, अश्विनीकुमारांप्रीत्यर्थ रचलेल्या माझ्या प्रातःकालीन स्तोत्रांनी प्रसन्न होऊन तू आम्हांस विपुल धन प्रदान कर.

प्रस्तुत सूक्तात शशकर्णाचा उल्लेख नाही. परंतु वत्साचा उल्लेख आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.]

**शस्त्र** यज्ञात होता नावाचा ऋत्विज जे मंत्र म्हणतो, त्यांना हे नाव आहे (निरुक्त १. ३. १२). प्रातःसवनात सोमाचा याग करताना आज्य व प्रउग, माध्याह्नसवनात मरुत्वतीय व निष्केवल्य आणि सायंसवनात वैश्वदेव व आग्निमारुत ही शस्त्रे म्हणतात. [ वे. इं. ]

**शस्त्रपूजा** विजयादशमीला शस्त्रास्त्रांची पूजा करण्याची प्रथा प्राचीन कालापासून प्रचलित आहे. पूर्वी राजे, सरदार व सैनिक आपापल्या आयुधांची पूजा करीत. आता सर्व कारागीर आपापल्या उपकरणांची व यंत्रांचीही पूजा करतात. शस्त्रपूजेच्या वेळी म्हणायचे काही मंत्र असे–

असिर्विशसनः खड्गस्तीक्ष्णधारो दुरासदः।
श्रीगर्भो विजयश्चैव धर्माधारस्तथैव च॥
इयं येन धृता क्षोणी हतश्च महिषासुरः।
तीक्ष्णधाराय शुद्धाय तस्मै खड्गाय ते नमः।
सर्वायुधानां प्रथमं निर्मितासि पिनाकिना।
शूलायुधाद्विनिष्कृष्य कृत्वा मुष्टिग्रहं शुभम्॥
चण्डिकायाः प्रदत्तासि सर्वदुष्टनिबर्हिणी।
तया विस्तारिता चासि देवानां प्रतिपादिता॥
सर्वसत्त्वाङ्गभूतासि सर्वाशुभनिबर्हिणी।
छुरिके रक्ष मां नित्यं शान्तिं यच्छ नमोऽस्तु ते॥
सर्वायुध महागात्र सर्वदेवारिसूदन।
चाप मां समरे रक्ष साकं शरवरैरिह॥
धृतं कृष्णेन रक्षार्थं संहाराय हरेण च।
त्रयीमूर्तिगतं देवं धनुरस्त्रं नमाम्यहम्॥

आश्विन शुद्ध नवमीलाही शस्त्रपूजा करतात. या नवमीला खांडेनवमी (खड्गनवमी) म्हणतात. [ पू. मा. प्र.]

**शस्त्रास्त्रे** प्रहार करण्यासाठी जे साधन वापरतात, त्याला शस्त्र म्हणतात. लाठी, गदा, तलवार, भाला हे हातात धरून, जवळून प्रहार करण्याची आयुधे होत. च[illegible] धनुष्यबाण, इ. आयुधे शत्रूवर लांबून प्रहार करण्यासाठी उ[illegible] योगी पडतात. त्यांना अस्त्रे म्हणतात. भाला व गदा या आयुधां[illegible] चाही अस्त्र म्हणून फेकून मारण्यासाठी उपयोग केला जातो.

लाखो वर्षांपूर्वी मनुष्य जेव्हा पशुवत जीवन जगत होता, तेव्हा तो आपले हात, पाय, दात व नखे यांचाच उपयोग मारामारीसाठी, स्वसंरक्षणासाठी किंवा कंदमुळे उकरून काढण्यासाठी करीत असे. पण कालांतराने त्याला दगड, हाडे, लाकडे, झाडेझुडपे यांचा उपयोग करण्याची कल्पना सुचली. दगडाला लाकडाचा दांडा जोडून बनवलेले हत्यार अधिक प्रभावी ठरते, हे त्याला समजले व त्याने कुऱ्हाड बनवली. हाडे व दगड तासून धारदार शस्त्रेही तो बनवू लागला. दगडाचे छिलके दुरूनच शत्रूवर फेकता यावे म्हणून मानवाने गोफण तयार केली. पाषाणयुगाच्या पूर्वार्धातली शस्त्रे ओबडधोबड होती; उत्तरार्धात मात्र मनुष्याने लहान, सुबक व टोकदार शस्त्रे बनवली. लाकूड व हाडे लवकर नाश पावतात, त्यामुळे ती आता सापडत नाहीत. पाषाणयुगातील दगडी आयुधे तेवढी सापडली आहेत.

त्यानंतर धातूचा शोध लागला व मानवाने धातूची शस्त्रे बनवण्यास प्रारंभ केला. ती अधिक मजबूत व टिकाऊ असतात, असे त्याच्या ध्यानात आले. ती अधिक तीक्ष्ण व म्हणूनच जास्त संहारकही ठरली.

सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांत काही शस्त्रे आढळली आहेत. ती संस्कृती ताम्र-कांस्ययुगीन असली, तरी तिच्या अवशेषांत पाषाणाची आयुधेही आहेत. परशू, भाले, खंजीर, तलवारी, गोफणी, धनुष्यबाण, गदा, इ. हत्यारे त्या काळी वापरात होती. परशू व गदा ही हत्यारे पाषाणाची असून, अन्य शस्त्रे तांबे किंवा कांसे या धातूंची असत.

वैदिक संस्कृती लोहयुगीन होती. तांबे व कांसे या धातूंप्रमाणेच आर्य लोक लोहाची शस्त्रेही वापरीत होते. वेदांत अनेक शस्त्रांचा निर्देश आढळतो. वज्र, पट्टिश, परशू, गोशिरस, असियष्टी, अस्तार, लवित्र, कुंत, स्थूण, प्रास, पिनाक, गदा, मुद्‌गर, शिर, मुसल, मुष्टिका, शतघ्नी, खड्ग, इ. आयुधे त्या काळी उपयोगात होती. पट्टिश म्हणजे पट्टा. गोशिरस हा एक प्रकारचा भाला असून, त्याच्या फाळाचा आकार गायीच्या शिंगासारखा असे. असियष्टी ही एक गज लांबीची सुरी होती. लवित्र हे कोयत्यासारखे आयुध असून, त्याचे फाळ वाकडे व टोक तीक्ष्ण असे. अस्तार हे दोन्ही बाजूंनी आघात करण्याजोगे व मध्यभागी वाक असलेले आयुध होते. कुंत हा एक विशेष प्रकारचा भाला होता. तो लोहाचा असून, त्याच्या अग्राला सहा तीक्ष्ण धारा असत. प्रास हे भाल्याच्या जातीचेच, चार ते सहा हात लांबीचे आयुध असून, त्याचा फाळ अत्यंत धारदार असे. स्थूण हे एक सरळ स्तंभाकृती आयुध असून, मनुष्याइतकी त्याची उंची असे व त्याच्या अग्रभागी लोहगोल असत. पिनाक शिवधनुष्य म्हणून प्रसिद्ध आहे. पण धनुर्वेदाप्रमाणे पिनाक म्हणजे त्रिशूल होय. गदा, मुद्‌गर, खड्ग ही आयुधे प्रसिद्ध आहेत. शिर हे नांगराच्या जातीचे आयुध असून, त्याचे अग्र दोन्ही बाजूंना वक्र असे. मुसल हे जाड दंडासारखे आयुध असून, त्याचा अग्रभाग लोहाचा व दंड खैराचा असे. मुष्टिका म्हणजे तीक्ष्ण धारेची लहान सुरी होय. शतघ्नी ही चार गज लांबीची, गदेसारखी असून, तिच्यावर सर्व बाजूंना तीक्ष्ण पोलादी खिळे असत.

धनुष्यबाण हे सर्वश्रेष्ठ प्राचीन आयुध होय. भिंदिपाल, शक्ती, द्रुघन, तोमर, नलिका, लगुड, पाश, चक्र, दंतकांत व मुसुंदी ही या वर्गातली अन्य शस्त्रे होत. भिंदिपाल हे जड सोटयासारखे आयुध होते. त्याची मूठ व धार खूप रुंद असे. त्याची लांबी एक गज असे. शक्ती हे आयुध भाल्यासारखे, दोन गज लांबीचे असून, त्याचे पाते रुंद व झाडाच्या पानासारखे, लोखंडाचे असे. द्रुघन हे मुद्‌गरासारखे आयुध असून, तीन हात लांबीच्या दांड्याला जड लोखंडी गोळा लावलेला असे.

तोमर हे फार प्रसिद्ध आयुध होते. बाणासारखे तीक्ष्ण लोखंडी अग्र व तीन ते नऊ हात लांबीचा दंड, असे त्याचे स्वरूप होते. नलिका म्हणजे लहान मोठ्या पोकळ नळ्या असून, त्यांतून तापलेल्या लोखंडी गोळ्यांचा वर्षाव करीत. लगुड हा एक जड, दोन गज लांबीचा दंड असून, त्याचा उपयोग दोन्ही हातांनी केला जात असे. पाश हे वरुण, यम, इ. देवतांचे आयुध म्हणून प्रसिद्ध आहे. चक्र हे मंडलाकार शस्त्र असून, त्याला चार, सहा, किंवा आठ तीक्ष्णाग्र आरा असत. श्रीकृष्णाचे सुदर्शन चक्र प्रसिद्ध आहे. दंतकान्त हे लोखंडाचे आयुध दंताकृती होते. मुसुंदी हा एक प्रकारचा जाड सोटा होता.

रामायण, महाभारत व पुराणे या संस्कृत ग्रंथांत अनेक प्रकारच्या शस्त्रांची नावे आढळतात. रामायणात राम–रावणांच्या युद्धातील शस्त्रास्त्रांचे वर्णन आहे. त्या युद्धात वानरांनी आदिमानवाची शस्त्रे जी दात, नखे, हात, पाय, झाडे व दगड यांचा उपयोग केला, तर राक्षसांनी अत्यंत सुधारलेली शस्त्रे वापरली. त्या काळी धनुष्य-बाणांचे पुष्कळ प्रकार प्रचलित होते. रावणाने रामाच्या वानरसेनेवर कुक्कुटमुख, मकरमुख, सर्पमुख व वराहमुख, इ. शस्त्रांचा प्रयोग केला होता. ही यंत्रमुक्त शस्त्रे असावी. गदा, पाश, शक्ती यांचेही विविध प्रकार रामायणात आढळतात. दिव्य अस्त्रांचा उपयोग बराच केला जात होता.

महाभारतात शस्त्रांची जी नावे उल्लेखित आहेत, ती अशी– दंड, यष्टी, लगुड, मुसल, हल, गदा, परशू, भल्ल, कुंत, शाबल, त्रिशूल, शक्ती, शूल, मुद्‌गर, खड्ग, वज्र, तोमर, अंकुश, भिंदिपाल, पाश, चक्र, कृपाण, क्षेपणी, धनुष्यबाण, शतघ्नी, मगद.

शस्त्रांचे चार वर्ग केले जातात–

(१) अमुक्त – हातात धरून वापरण्याजोगे. उदा० खड्ग.

(२) मुक्तामुक्त – जे हातात धरून किंवा फेकूनही मारता येते असे शस्त्र. उदा० गदा.

(३) पाणिमुक्त – जे फेकूनच मारावे लागते असे शस्त्र. उदा० चक्र, शूळ, शक्ती ही शस्त्रे हाताने फेकता येतात.

(४) यंत्रमुक्त – यांत्रिक साधनांनी दूर फेकले जाते, असे अस्त्र. उदा० गोफण–गुंडा, धनुष्यबाण, शतघ्नी. अशी अस्त्रे फेकण्यासाठी जी यंत्रे वापरली जात होती, त्यांची नावे महाभारतात आहेत.

कौटिलीय अर्थशास्त्रात व ग्रीक इतिहासकारांच्या लेखांतही अशा शस्त्रास्त्रांचे व यंत्रांचे उल्लेख आहेत. अशा प्रकारची शस्त्रास्त्रे गुप्तकालापर्यंत प्रचलित होती.

शस्त्रास्त्रांमध्ये रक्षणात्मक साधनांचाही समावेश केला पाहिजे. शिरस्त्राण, कवच, खेटक (ढाल), ही साधने प्राचीन काळापासून वापरात आहेत. शिरस्त्राण म्हणजे मस्तकाचे रक्षण करण्यासाठी धातूंचा किंवा इतर मजबूत पदार्थांचा टोप होय. छाती, दंड, हात, पाय यांसाठी वेगवेगळी कवचे वापरीत असत. शरीराच्या मुख्य भागाचे रक्षण करण्यासाठी चिलखत म्हणजे बारीक तारेचा विणलेला अंगरखा वापरीत.

मध्ययुगात जी शस्त्रास्त्रे प्रचलित होती, त्यांची नावे अशी– भाला, तलवार, धनुष्यबाण, पट्टा, खंजीर, सुरा, जमधर, वाघनख, साँग, बाना, गद्दारा, कटचार, कुकरी, खांडा, बरची, जंबिया, ढाल, बंदूक व तोफ. तलवारीचे व भाल्याचे विविध प्रकार अस्तित्वात होते. वजन, आकार, लांबी, रुंदी, धार यांवरून त्यांना निरनिराळी नावे दिलेली होती. अशा प्रकारची हजारो प्राचीन शस्त्रास्त्रे सांप्रत वेगवेगळ्या संग्रहालयात पाहायला मिळतात. सर्व प्रमुख शस्त्रास्त्रांची माहिती या कोशात त्या त्या नावाखाली दिलेली आहे. पाहा – अंकुश, अस्त्रविद्या, कुंत, खड्ग, गदा, चक्र, तलवार, त्रिशूळ, दंड, धनुर्विद्या, परशू, पाश, प्रास, बंदूक, बाण, भाला, मुद्गर, मुष्टिका, मुसळ, वज्र, शक्ती, शूल. [ वे. रा. द.; प्रा. यु. वि.; प्रा. ऐ. श.; त्रिपथगा, शस्त्र-अस्त्र विशेषांक, ऑगस्ट व सप्टेंबर १९६४; भा. सं. प. ]

## शहाजी

(इ. स. चे १६–१७ वे शतक) एक कवी, तंजाऊरच्या भोसले घराण्यापैकी एक कलारसिक राजा व कर्नाटकातील यक्षगान नाट्यांचा पुनरुद्धारक. छत्रपती शिवाजीमहाराजांचा सावत्र भाऊ एकोजी किंवा व्यंकोजी याचा हा जेष्ठ पुत्र होय. इ. स. १६८२ मध्ये हा गादीवर आला. त्याने काही पुंड–पाळेगारांचा पराभव करून आपले राज्य थोडेसे वाढवले व स्थिर केले. या कामी त्याची आई दीपाबाई व त्याचे दोन भाऊ त्याला साह्यकारी झाले. याने सुमारे वीस यक्षगान नाट्ये रचली. त्यांची नावे पुढे दिली आहेत—

किरात-विलास, कृष्णविलास, गंगा-पार्वती संवाद, जलक्रीडा, त्यागराज–विनोद–चित्र–प्रबंध नाटक, द्रौपदी कल्याण, पंचरत्न प्रबंध नाटक, पार्वतीपरिणय, रतिकल्याण, रामपट्टाभिषेक, रुक्मिणी–सत्यभामासंवाद, वल्लीकल्याण, विघ्नेश्वरकल्याण, विष्णुपल्लकिसेवाप्रबंध, शंकरपल्लकिसेवाप्रबंध, शचीपुरंदर, शांताकल्याणमु, सीताकल्याणमु, सतिपति दानविलास व सतीदानशूर.

या यक्षगानांची नावे व विषय पौराणिक असले, तरी यांतला पौराणिक कथाभाग नावापुरताच आहे. पुराणातले कथाप्रसंग घेऊन तत्कालीन समाजाचे, नगरांचे, रीतीभातींचे, आचारविचारांचे व वेषभूषेचे दर्शन घडविणे हा कवीचा हेतू आहे. त्यागराज–विनोद–चित्र–प्रबंध नाटक हे सहा अंकांचे वृहन्नाटक तेलुगू साहित्यात विशेष नावाजले आहे.

यक्षगानातील सूत्रधार, नटी, विदूषक, इ. पात्रांसाठी त्याने काही नियम केले व यक्षगाननाट्याला बांधेसूद स्वरूप दिले. शहाजी हा कन्नड व तेलुगू या उभय भाषांचा चांगला जाणकार होता. [ ते. सा. इ.; कर्नाटक ]

## शहामुनी

(इ. स. १७४८–१८०८) एक मुसलमान मराठी संतकवी. याचा जन्म नगर जिल्ह्यातील पेडगाव नामक एका लहानशा गावी झाला. त्याच्या पित्याचे नाव मनसिंग व आईचे नाव अमाई किंवा ताई असे होते. हा धर्माने मुसलमान असला, तरी त्याच्या कुळात तीन–चार पिढ्यांपूर्वीपासून हिंदू देव–देवतांचीच भक्ती चालत आलेली होती.

शहामुनीचा पणजा शहाबावा हा आरंभी प्रयाग येथे राहत असे. पुढे तो आपली पत्नी अमिना हिच्यासह माळव्यात येऊन उज्जयिनी मुक्कामी स्थायिक झाला. उज्जयिनी म्हणजे द्वादश ज्योतिर्लिंगांपैकी एक महत्त्वाचे शिवस्थान. त्यामुळे स्वाभाविकच शहाबावा व अमिना ही दोघेही शिवोपासनेला लागली. त्यांचा पुत्र जनाजी व सून मंडूबाई यांना विष्णुभक्तीत गोडी वाटू लागली. कालांतराने हे विष्णुभक्त दांपत्य माळव्यातून उठून महाराष्ट्रात आले व नगर जिल्ह्यातील सिद्धटेक नामक गावी येऊन स्थिरावले. तिथे त्यांना एक पुत्र झाला. त्याचे नाव मनसिंग. हाच शहामुनीचा पिता होय. शहामुनीचे मूळचे नाव शहाबावा असेच होते.

शहाबावा लहानपणापासूनच भक्त व विरक्त होता. पुढे तो फिरत फिरत वाराणसी क्षेत्रात पोचला. तिथे इ. स. १७७८ च्या सुमारास मुनींद्रस्वामी नामक एका परमहंस संन्याशाने त्याला गुरूपदेश दिला. त्यानंतर शहाबावाने आपल्या व गुरूच्या

नावाचा मेळ साधणारे असे शहामुनी हे नाव स्वीकारले. मग तो सातारा जिल्ह्यात भ्रमंती करू लागला. या भ्रमणकाळातच इ.स. १७९५ च्या सुमारास चांवळी गावाजवळ असणाऱ्या पठारी मंडण नामक स्थानी, त्याने सिद्धान्तबोध नावाचा एक मोठा ग्रंथ रचला. जीवनाच्या अंती तो मराठवाड्यातील बीड जिल्ह्यात जाऊन राहिला व बीड–औरंगाबाद मार्गावर, बीडपासून तीस मैल दूर, गोदावरीच्या काठी असणाऱ्या शहागड नामक गावी समाधिस्थ झाला.

शहागड येथे गावाबाहेर, गोदावरीच्या प्रवाहाच्या अगदी जवळ, तटबंदीने युक्त असा एक किल्ला आहे. या किल्ल्यात शहामुनींची समाधी आहे. त्याच्या समाधिमंदिराजवळ त्याच्या अनुयायांची पाच मुसलमान घराणी सध्या समाधीची पूजा-अर्चा करून राहतात. प्रतिवर्षी चैत्र वद्य सप्तमी व अष्टमी या दोन दिवशी शहामुनीचा पुण्यतिथिमहोत्सव साजरा होतो. ही पाचही घराणी मुसलमान असूनदेखील शहामुनीच्या परंपरेला अनुसरून मद्य–मांसादी वर्ज्य मानतात, कृष्णोपासना करतात व महानुभाव महंतांकडून गुरूपदेश घेतात. पुण्यतिथीच्या उत्सवात गावातील अन्य मुसलमान भाग घेत नाहीत.

शहामुनीचा एकमात्र उपलब्ध मराठी ग्रंथ म्हणजे सिद्धान्तबोध हा होय. या ग्रंथाची अध्यायसंख्या ५० असून, ओवीसंख्या ९८५८ इतकी आहे. अद्वैत तत्त्वज्ञान हे त्याच्या ग्रंथाचे प्रतिपाद्य आहे व ते त्याने स्पष्ट शब्दांत मांडले आहे. उदा० त्याच्या पुढील ओव्या पाहा–

> या ग्रंथाचें हे निजबीज । समान पाहणे समाधिशेज ।
> अद्वयबोधी संतोषिजे । या सिद्धान्तीं 'मी ब्रह्म' ॥
> अद्वैत बोधी समाधि सुख । ज्यात निमग्न सनकादिक ।
> हेचि वर्म गीतेंत वदला वैकुंठ नायक । वद मनींचे नवनीत ॥
> सर्प वाकडा तिकडा फिरत । वारुळात नीट उतरत ।
> तैसा कवि बहु प्रकारे वदत । शेवटीं सिद्धान्त अद्वैतचि ॥
> त्यांहि 'सिद्धान्तबोधा' त । लिहिला मतभेद द्वैत बहुत ।
> शेवटीं अद्वैत बोधाची मात । बेरीज केली एकचि ॥
>
> (सिद्धान्तबोध ४५.९२–९५)

शहामुनीच्या या ग्रंथात भिन्न भिन्न पुराणांतल्या उत्कृष्ट कथा व रामायण–महाभारतातली सुंदर आख्याने अतिसंक्षिप्त पद्धतीने समाविष्ट केली आहेत. ग्रंथाची भाषा सुबोध, रसाळ व प्रासादिक असून, प्रसंगवर्णने प्रत्ययकारी आहेत. [ मु. म. सं. ]

## शांखायनगृह्यसूत्र

शांखायनरचित या गृह्यसूत्रांत सहा अध्याय आहेत. पहिल्या अध्यायात पार्वण, विवाह, गर्भाधान, पुंसवन, गर्भरक्षण, सीमंतोन्नयन, जातकर्म, अन्नप्राशन, चूडाकरण व गोदान यांचे विवरण आहे. दुसऱ्या अध्यायात उपनयन व ब्रह्मचर्याश्रम यांचे वर्णन आहे. तिसऱ्या अध्यायात स्नान, गृहनिर्माण, गृहप्रवेश, वृषोत्सर्ग, आग्रहायणी व अष्टका यांचे विवेचन आहे. चौथ्या अध्यायात श्राद्ध, अध्यायोपाकरण, श्रावणी, आश्वयुजी, आग्रहायणी व चैत्री या विषयांची माहिती आहे. पाचव्या व सहाव्या अध्यायांत काही प्रायश्चित्ते सांगितली आहेत. [ वै. सा. ]·

## शांखायनश्रौतसूत्र

शांखायनरचित या श्रौतसूत्रांत अठरा अध्याय आहेत. दर्शपूर्णमासादी वैदिक यज्ञांचे यात विवरण आहे. वाजपेय, राजसूय, अश्वमेध, पुरुषमेध व सर्वमेध या यज्ञांचे सविस्तर वर्णन आहे. या ग्रंथावर अनृताने संस्कृत भाष्य लिहिले आहे. [ वै. सा.; प्रा. च. को. ]

## शांडिल्य

एक प्राचीन आचार्य. शंडिलाचा वंशज असल्यामुळे याला हे नाव मिळाले. बृहदारण्यक उपनिषदात शांडिल्याला वात्स्य नामक आचार्याचा शिष्य म्हटले आहे. शांडिल्य हा यज्ञविधीत मोठा कुशल होता. शतपथ ब्राह्मणाच्या सहा ते दहा या कांडांत शांडिल्याच्या मतानुसार वेदीचा विचार केलेला आहे. याचे नाव गोत्रांच्या यादीत असून, शांडिल, असित व देवल हे शांडिल्य गोत्राचे प्रवर आहेत. शांडिल्यविद्या नावाचा एक तत्त्वज्ञानात्मक विचार याच्या नावावर आहे. मृत्यूनंतर आत्म्यात विलीन होणे हे आयुष्याचे साध्य आहे, असे हा सांगतो. शांडिल्यस्मृती, शांडिल्य-धर्मसूत्र, शांडिल्यतत्त्वदीपिका व भक्तिमार्गावरील शांडिल्यसूत्रे हे ग्रंथ याच्या नावावर आहेत. पाहा– शांडिल्यविद्या. [ प्रा. च. को.; वे. इं.; म. ज्ञा. को. ]

## शांडिल्यविद्या

शांडिल्य ऋषीने उपनिषदात सांगितलेली तत्त्वज्ञानात्मक विद्या. छांदोग्य उपनिषदाच्या ३.१४ या खंडात शांडिल्याचे तत्त्वज्ञान पूर्णपणे ग्रथित केलेले आहे. ब्रह्माला याने तज्जलान् अशी संज्ञा दिली आहे. ज्यापासून सृष्टी निर्माण होते, ज्यात जिवंत राहते आणि शेवटी ज्यात लीन होते, असे तत्त्व म्हणजे तज्जलान् होय. अशा ब्रह्माची शांतपणे, मन स्वस्थ करून उपासना करावी, असे यात म्हटले आहे. उपासना ही फार महत्त्वाची आहे. मनुष्य जसा ऋतू म्हणजे निश्चय करतो, तसा तो देहपातोत्तर होतो. म्हणून त्याने असा निश्चय करावा, की परमेश्वराचे स्वरूप पुढीलप्रमाणे आहे—

**मनोमयः प्राणशरीरो भारूपः सत्यसङ्कल्प आकाशात्मा सर्वकर्मा सर्वकामः सर्वगन्धः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तोऽवाक्यनादरः ।**

अर्थ – त्याला प्राण आहे, मन आहे आणि स्वतःचे आणि जगताचे भान आहे. तो सत्याचीच इच्छा करणारा आहे. तो सर्व आकाशात म्हणजे सर्व भूतांमध्ये आपला आत्मा आहे, असे मानणारा आहे. म्हणून त्या सर्व भूतांच्या हिताकरिता सर्व कर्मे करणारा, सर्व प्रकारच्या इच्छा करणारा, सर्व गंधांचा उपभोग घेणारा, सर्व रसांचा उपभोग घेणारा, सर्व जगताला आपल्या इंद्रियांनी ग्रहण करणारा आणि कोणाची निंदास्तुती न करणारा असा आहे.

हा परमेश्वरच माझ्या अंतरहृदयांतील आत्मा आहे. हा आत्मा तांदुळापेक्षा, यवापेक्षा, मोहरीपेक्षा, साव्यापेक्षा किंवा साव्याच्या तांदुळापेक्षा लहान आहे. तो पृथ्वीपेक्षा, अंतरिक्षापेक्षा, स्वर्गापेक्षा, या सर्व लोकांपेक्षा मोठा आहे. हा हृदयस्थ आत्मा म्हणजेच विश्वव्यापक परब्रह्म आहे, असा ज्याचा क्रतू म्हणजे निश्चय असतो, असा निःसंदेह झालेला ज्ञानी पुरुष मरणोत्तर याच परब्रह्माला प्राप्त होतो, असे शांडिल्य ऋषीने सांगितले आहे.

छांदोग्यातील (३.१४) शांडिल्यविद्येचे प्रकरण हा उपनिषदांतील अत्यंत प्राचीन भाग समजला जातो. हाच ब्रह्मात्मैक्यानुभव याज्ञवल्क्याने बृहदारण्यकोपनिषदात प्रभावीपणे मांडला आहे. [वै. वा. भा. वि.; औ. जी. सौ.]

## शांत रस

साहित्यशास्त्रातील एक रस. इ. स. च्या सातव्या शतकापासून शांत रसाची साहित्यशास्त्रात गणना होऊ लागली. त्याच्या आधीच्या ग्रंथांत शृंगारादी आठ रसांचाच उल्लेख केलेला आढळतो. भरतमुनीने सर्व रसांची परिणती अखेर शांत रसातच होते, असे सांगितले आहे; पण नाटकात मात्र त्याने शांत रसाला स्थान दिलेले नाही. शारदातनयाने आपल्या भावप्रकाशात वासुकीला शांत रसाचा आद्य प्रवर्तक मानले आहे. अभिनवगुप्ताने शांत रसाला सर्वश्रेष्ठ रस मानले आहे. कारण जीवनाचे अंतिम ध्येय जे मोक्षप्राप्ती, तेच या रसाचे लक्ष्य आहे.

विश्वनाथाने शांत रसाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे–

**न यत्र दुःखं न सुखं न चिन्ता न द्वेषरागौ न च काचिदिच्छा।**
**रसः स शान्तः कथितो मुनीन्द्रैः सर्वेषु भावेषु समप्रमाणः॥**

अर्थ – ज्या ठिकाणी भावांचे समत्व आहे म्हणजे ज्या ठिकाणी सुख, दुःख, चिंता, राग, द्वेष, इच्छा असे काहीही नाही, त्याला मुनिश्रेष्ठांनी शांत रस असे म्हटले आहे.

शांत रसाच्या स्थायीभावाच्या बाबतीतही साहित्यशास्त्रकारांत मतभेद आहेत. अभिनवगुप्त आणि धनंजय यांनी शम हा शांत रसाचा स्थायीभाव मानला आहे, तर काही आचार्यांनी जुगुप्सा, उत्साह, धृती यांनाही शांत रसाचे स्थायीभाव मानले आहे. पण बहुसंख्य आचार्य निर्वेद हा शांत रसाचा स्थायीभाव मानतात.

या रसाची देवता विष्णू व त्याचा रंग कुंदपुष्पाप्रमाणे किंवा चंद्राप्रमाणे पांढरा मानलेला आहे. संसाराची असारता, क्षणभंगुरता, इ. याचे आलंबन विभाव; सत्संग, तीर्थयात्रा, इ. उद्दीपन विभाव; रोमांच, अश्रू, पश्चात्ताप, ग्लानी, इ. अनुभाव व हर्ष, धृती, मती, स्मृती, इ. संचारी भाव होत.

शांत रसाचे रघुवंशातील एक उदाहरण (रघु. ३.७०) असे –

**अथ स विषयव्यावृत्तात्मा यथाविधि सूनवे**
**नृपतिककुदं दत्त्वा यूने सितातपवारणम्।**
**मुनिवनतरुच्छायां देव्या तया सह शिश्रिये**
**गलितवयसामिक्ष्वाकूणामिदं हि कुलव्रतम्॥**

अर्थ – नंतर सर्व विषयांतून निवृत्त झालेल्या त्या (दिलीप) राजाने तरुण आणि राजश्रेष्ठ अशा आपल्या (रघू नामक) पुत्राला पांढरे छत्र दिले. आणि तो स्वतः आपल्या राणीसह तपोवनातील वृक्षांच्या छायेत जाऊन राहिला. वृद्ध झालेल्या इक्ष्वाकू वंशातील राजांचे हे कुलव्रतच आहे.

ज्ञानेश्वरी ग्रंथात शांत रसाचे प्राबल्य आहे. [भो. रा. हि. क.; काव्यप्रकाश; म. सा. सि.; का. सृ.]

## शांता-चतुर्थी

एक तिथिव्रत. माघ शुद्ध चतुर्थीला शांता असे म्हणतात. या दिवशी हे व्रत करतात. गणेश ही या व्रताची देवता होय. याचा विधी असा–व्रतदिनी उपवास करून गणेशाची पूजा करावी व होम करावा आणि तुपात तळलेले अनरसे व मीठ घातलेला भात यांचा नैवेद्य दाखवावा. मग गुरूची पूजा करून त्याला गूळ, तूप व मीठ यांचे दान द्यावे. फल – सर्वप्रकारची शांतता आणि सामान्य दिवशीच्या फलापेक्षा एकहजार पट अधिक फल मिळते. हे व्रत शांतिचतुर्थी या नावानेही प्रसिद्ध आहे. [हि. ध.; व्र. प.]

## शांतादुर्गा

गोमंतकातील एक देवता व तिचे संपन्न देवस्थान. या देवतेची जन्मकथा अशी –

हरि-हरांच्या एका संग्रामप्रसंगी दोघांपैकी एकालाही विजय मिळण्याची आशा दिसेना व त्यांच्या भयंकर शस्त्रास्त्रांच्या प्रभावामुळे पृथ्वीप्रलय होण्याची चिन्हे दिसू लागली. मग विश्वरक्षणार्थ ब्रह्मदेवाने जगदंबेची प्रार्थना केली. त्या प्रार्थनेने देवी प्रसन्न झाली व युद्धभूमीवर प्रकट होऊन तिने हरि-हरांना शांत केले. तेव्हापासून ही देवी (दुर्गा) शांतादुर्गा झाली.

ही देवता मूळ त्रिहोत्रपूर किंवा तिरहूत या प्रदेशातली होय.

पुढे गोमंतकाच्या वसणुकीसाठी तिथले काही ब्राह्मण जेव्हा इकडे आले, तेव्हा त्यांनी आपल्यासमवेत या देवीलाही आणले.

शांतादुर्गेचे देवालय प्रथम केळशी गावी होते. परंतु इ. स. १५६६मध्ये ते ख्रिस्त्यांनी उद्ध्वस्त केले. भक्त मंडळींनी देवीची मूर्ती तेवढी वाचवली व फोंडे महालातल्या कवळे किंवा कैवल्यपूर गावी नवे देवालय उभारून पुनः प्रतिष्ठापित केली. सांप्रतचे देवालय हेच होय. शांतादुर्गेचे हे देवालय भव्य असून, त्याच्या दोन्ही बाजूस मोठमोठ्या अग्रशाळा आहेत. सज्जाखाली छानदार तळी आहे. मंदिरासमोर ४० फूट उंचीची दीपमाळ आहे. कौशिक, भारद्वाज, वत्स या गोत्रांचे स्मार्त ब्राह्मण इथले कुळावे असून, कवळे हा फोंडे तालुक्यातला गाव या देवस्थानास इनाम मिळालेला आहे.



शांतादुर्गा

देवालयाच्या मुख्य गर्भगृहात देवीची पंचरशी धातुप्रतिमा असून, भोवताली अन्य देवतांचा परिवार आहे. देवालयाच्या उत्तरेस नारायणदेव, ईशान्येस ग्रामपुरुष शिवशर्मा व दीपमाळेजवळ क्षेत्रपाळ यांच्या मूर्ती असून, वायव्येस देवचाराचे स्थान आहे.

ही देवी गोमंतकातील काही गौड सारस्वत ब्राह्मणांची कुलदेवी आहे. [सा. भू.; पुरुषार्थ, डिसें. १९६३; श्रीशांतादुर्गा चतुःशताब्दी महोत्सव समिती ग्रंथ, १९६६ ]

## शांतिदेव

(इ. स. चे ७ वे शतक) एक बौद्ध आचार्य व ग्रंथकार. तारानाथाच्या मते याचा जन्म सौराष्ट्रात झाला. हा एक राजपुत्र होता; पण तारादेवीच्या प्रेरणेने त्याने राज्यत्याग केला. बोधिसत्व मंजुश्री याने योग्याच्या रूपात प्रकट होऊन त्याला भिक्षुदीक्षा दिली, असे सांगतात. अन्यत्र थोडी वेगळी कथा आहे, ती अशी –

शांतिदेवाला यौवराज्याचा अभिषेक झाल्यावर त्याची आई त्याला म्हणाली की 'अरे, राज्य हे पापाला कारण होते. तू त्याचा त्याग करून मंजुवज्राच्या जवळ जा म्हणजे तुला निःश्रेयसाची प्राप्ती होईल.' शांतिदेवाने तो उपदेश मानला. एका घोड्यावर स्वार होऊन तो राज्यातून बाहेर पडला आणि रानावनात भटकत राहिला. एक दिवस एका सुंदरीने त्याचा घोडा धरला. 'मी मंजुवज्राची शिष्या आहे' असे सांगून तिने शांतिदेवाला घोड्यावरून उतरविले. शांतिदेवाला आनंद झाला. बारा वर्षे मंजुवज्राकडे राहून त्याने ज्ञान प्राप्त केले.

अध्ययन संपल्यावर गुरूने त्याला मध्यदेशात जाण्याची आज्ञा केली. तिथे तो अचलसेन या नावाने एका राजाकडे राहिला आणि थोड्याच दिवसांत राजाला प्रिय झाला. त्याच्याजवळ देवदारू वृक्षाचे एक खड्ग होते. इतर सैनिक राजाला म्हणाले, की 'हा लाकडी खड्गाने कसा काय शत्रूशी लढणार?' ते ऐकून राजा म्हणाला, की 'मी सर्वांची खड्गे तपासीन.' अचलसेन म्हणाला, की 'मी माझे खड्ग तुम्हांला एकांतात दाखवीन.' राजा तयार झाला. अचलसेनाने राजाचा एक डोळा बंद करून ठेवला आणि त्याला खड्ग दाखविले. खड्गावर नजर पडताच राजाचा तो उघडा डोळा गळून पडला. राजाला अचलसेनाचे सामर्थ्य पटले. पण अचलसेनाने आपले खड्ग फेकून दिले आणि तो विरक्त होऊन नालंदाच्या विहारात गेला. त्याने शांतिदेव हे नाव धारण केले. तिथल्या तरुण विद्यार्थ्यांनी त्याच्या ज्ञानाची परीक्षा घ्यायचे ठरवले. त्यानुसार तो स्वरचित ग्रंथांपैकी एका ग्रंथावर प्रवचन करीत असता साक्षात बुद्ध तिथे प्रकट झाला आणि शांतिदेवाला घेऊन तो स्वर्गाला गेला. सारे शिष्य व पंडित त्या घटनेने आश्चर्यचकित झाले. त्यांनी शांतिदेवाच्या कुटीत जाऊन पाहिले तो त्यांना तिथे ग्रंथ दिसले. बोधिचर्यावतार, सूत्रसमुच्चय व शिक्षासमुच्चय अशी त्या ग्रंथांची नावे होती. ते ग्रंथ शांतिदेवानेच रचलेले होते. त्या ग्रंथांवरून कळते, की शांतिदेव हा माध्यमिक संप्रदायाचा अनुयायी होता. त्याच्या ग्रंथावर तांत्रिक प्रभावही जाणवतो. [बौ. ध. द. ]

## शांतिदेवी

एक जैन देवता. ही कमलासनावर बसलेली असून, चतुर्भुज आहे. हिच्या तीन हातांत कमंडलू, कुंडिका व माला या वस्तू असतात आणि चौथा हात वरदमुद्रेत असतो. या देवतेची कल्पना खास जैनधर्मीय आहे, असे म्हणतात. ही चतुर्विध जैन शासनाची उन्नती करणारी देवता आहे, असे मानतात. [ प्रतिष्ठाकल्प ]

## शांतिनाथ

जैनांचा १६ वा तीर्थंकर. हा हस्तिनापुरात जन्मला. याच्या पित्याचे नाव विश्वसेन व मातेचे अचिरा. हा गर्भात असता, राज्यात पसरलेली महामारी त्याच्या आईने शांतिजलाचा शिडकाव करून दूर केली, म्हणून त्याचे नाव शांतिनाथ असे ठेवण्यात आले.

तीर्थंकरांच्या मालिकेत शांतिनाथाला विशेष स्थान आहे. जैन संप्रदायाविषयी जनतेत निर्माण झालेली अश्रद्धा याने दूर केली व संप्रदायाचे पुनरुज्जीवन केले. सर्व तीर्थंकरांत हाच चक्रवर्ती झाला.

याच्या अनेक पाषाणमूर्ती आढळतात. त्याच्या मागे चक्र असते. काळवीट हे याचे लांछन होय. दोन काळवीट त्याच्या मूर्तीच्या दोन्ही बाजूंना असतात. काही ठिकाणी याच्या मूर्ती उभ्या, तर काही ठिकाणी बसलेल्या स्थितीत आढळतात. झाशीजवळ याचे एक मंदिर आहे. शांतिनाथाचे चक्र बुद्धाच्या धर्मचक्रासारखे मानतात. [ जै. इ. ]




शांतिनाथ

## शांतिनाथपुराण

तीर्थंकर शांतिनाथाच्या चरित्राचे वर्णन करणारे एक जैन पुराण. हे जिनसेनाच्या शिष्यांनी लिहिलेल्या उत्तर पुराणातील ६२ व ६३ या पर्वात येते. या पुराणात पुढील विषय आले आहेत–

शांतिनाथाच्या गर्भप्रवेशापासून त्याच्या दीक्षाग्रहणापर्यंतचे वर्णन, अनंतवीर्य आणि अपराजित यांची कथा. बलदेवकन्या विजया हिचे स्वयंवर आणि शांतिनाथाचे वैराग्य.

प्रस्तुत पुराणाची श्लोकसंख्या ४३७५ असून त्याची निर्मिती १७ व्या शतकात गुजरातमध्ये झाली.

भट्टारक श्रीभूषण यानेही एक शांतिनाथ पुराण लिहिले असून तेही १७ व्या शतकातलेच आहे. [ हिंदुत्व ]

## शांतिपंचमी

एक काम्य व्रत. आश्विन शुद्ध पंचमीला हे नाव आहे. बारा नाग हे या व्रताची देवता होत. या दिवशी दूर्वांचे बारा नाग व त्यांच्या शेजारी इंद्राणीची मूर्ती मांडून त्यांची पूजा करावी आणि दूध व तीळ यांचे हवन करावे, असे सांगितले आहे. अशी बारा महिने बारा नागांची पूजा शुद्ध पंचमीच्या दिवशी करून उद्यापनाच्या वेळी सुवर्णाचे नाग करून त्यांचे दान करावे. या व्रतामुळे नागांचे भय नष्ट होऊन शांती लाभते.

वराहपुराणात या व्रताचा वेगळा पर्याय सांगितला आहे, तो असा– कार्तिक शुद्ध पंचमीला व्रतारंभ करावा, त्या दिवशी पाणी पिऊ नये, रात्री शेषशायी व अष्टनाग यांची पूजा करावी. [ हेमाद्रिव्रतखंड; हि. ध. ]

## शांतिपा

(इ. स. चे ११ वे शतक) चौऱ्यायंशी सिद्धांपैकी बारावा सिद्ध. हा मगध देशात व ब्राह्मण कुलात जन्मला. प्रथम तो उदंतपुरीच्या विहारात राहिला. तिथे त्याने बौद्धांच्या सर्वास्तिवादाचे अध्ययन केले. तिथून तो पुढील अभ्यासासाठी विक्रमशीलेच्या विहारात गेला. तिथे त्याने बौद्ध तत्त्वज्ञान पूर्णपणे आत्मसात केले. पुढे तो सोनपुरी विहारात आचार्य म्हणून राहिला. नंतर काही वर्षे मध्यदेशात त्याने धर्मप्रसारही केला.

सर्व सिद्धांमध्ये हा विशेष कर्तबगार होता. याने बौद्ध दर्शनावर ९०० हून अधिक ग्रंथ लिहिले. तंत्रशास्त्रावरही २३ ग्रंथ लिहिले. हा कवीही होता. याने अनेक चर्यागीते लिहिली आहेत.

शांतिपाच्या काही गीतांवरून तो सहजिया संप्रदायाचा पुरस्कर्ता असावा, असे वाटते. आपल्या एका गीतात तो म्हणतो, की सहजमार्ग हा स्वसंवेदनाचा व स्वानुभूतीचा मार्ग आहे. मायामोहरूपी समुद्रातून तरून जाण्यासाठी ही एकच नौका आहे. [ प्रा. च. को.; अ. सा. ]



शांतिपा

**शांतिपूर** बंगालमधील नवद्वीपाच्या परिसरातील एक प्रसिद्ध क्षेत्र. हे नवद्वीपापासून बारा मैलांवर आहे. गौडीय वैष्णवांचे श्रीपीठ म्हणून हे प्रसिद्ध आहे. इथे वैष्णव पंथाचा थोर धर्मसुधारक अद्वैताचार्य हा राहत होता. या संप्रदायाचे अनुयायी त्याला शंकराचार्यांचा अवतार मानतात. शांतिपुरात श्यामचंद्र, गोकुलचंद्र व जलेश्वर महादेव यांची प्रसिद्ध मंदिरे असून, महाकालीची एक विशाल मूर्ती आहे. कार्तिकी पौर्णिमेला इथे मोठी यात्रा भरते. [ हि. जॉ. ए. इं.; कल्याण–तीर्थांक ]

**शांतिमंत्र** बृहदारण्यकोपनिषदात पुढील मंत्र हा शांतिमंत्र म्हणून आलेला आहे –

**ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।**
**ॐ शान्तिः । शान्तिः । शान्तिः ।**

अर्थ – ॐ पूर्ण आहे. हे पूर्ण आहे. पूर्णातून पूर्ण निष्पन्न होते. पूर्णातून पूर्ण काढून घेतले तरी पूर्णच शिल्लक राहते.

याचे विवेचन गुरुदेव रा. द. रानडे करतात ते असे–

उपनिषदांत आत्मा व ब्रह्म यांचा भेदाने उल्लेख केलेला आढळतो आणि पुढे त्यांच्यांत अभेद आहे, असे सांगितले जाते. हे दोन्ही एकच आहेत, असा सिद्धान्त ' अयमात्मा ब्रह्म ' (बृहदा. (५.२.१९) किंवा ' अहं ब्रह्मास्मि ' (बृहदा. १.४.१०) या दोन वाक्यांनी प्रतिपादन केलेला आहे. याचा अर्थ आत्मा व ब्रह्म दोन्ही पूर्ण आहेत. पूर्ण ब्रह्मांतून पूर्ण आत्मा वजा घातला तर पूर्णच शिल्लक राहते. एका पूर्णामुळे दुसऱ्या पूर्णास अस्तित्व प्राप्त होते. पण ते एकच असल्यामुळे त्यांच्यांत भिन्नपणा नसतो. आत्मा व ब्रह्म यांचे ऐक्य वरील दोन्ही वाक्यांत सांगितलेले आहे. शेवटी हा मीतूपणाही नष्ट होऊन ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' अशी अवस्था येते. तीच या शांतिमंत्रात प्रतिपादन केलेली आहे. आणि ते याज्ञवल्क्याच्या तत्त्वज्ञानाचे सार आहे.

शांती म्हणजे जीवनाची क्षोभरहित अवस्था होय. हिलाच स्थितप्रज्ञवृत्ती असे म्हणता येईल. शांती हे जीवनाचे अंतिम मूल्य आहे. शांती म्हणजे निवृत्तिपर नैष्कर्म्याची कल्पना नसून, आत्म्यामध्ये उत्साह ओतणारी व त्याला कार्यतत्पर बनवणारी अशी प्रवृत्तिपर भावना आहे. भविष्यकालीन फलप्राप्ती अथवा तात्कालिक कार्यसिद्धी यांपैकी कोणताच हेतू त्या भावनेचा आधार नसतो. डॉ. व्हाईटहेड यांनी सत्य, सौंदर्य, कला व साहस ही जीवनाची चार मूल्ये मानली आहेत. शांती हे या चारही मूल्यांमध्ये सुसंवाद साधणारे पाचवे म्हणजे अंतिम मूल्य होय. जगाला शांतीची तमा नसते. ते केवळ वरील चार मूल्यांच्या मागे लागलेले असते. म्हणूनच जगाच्या व्यवहारात बेचैनी व अहंकार थैमान घालीत राहतात. शांती हे एकच मूल्य असे आहे, की ते या बेचैनीचे व अहंकाराचे सहज निर्मूलन करून जगात श्रेष्ठतम संस्कृतीची प्रतिष्ठापना करू शकेल.

आत्म-दर्शनाने विकास पावलेली विशाल आणि व्यापक मनोवृत्ती म्हणजेच शांती होय. या वृत्तीचा परिणाम म्हणजे मी आणि माझे या अहंतेचे व ममतेचे मनावरील दडपण नष्ट होते. किंबहुना शांतीमध्ये व्यक्तीचे व्यक्तित्वच हरपून जाते. महान सुखाचा निधी प्राप्त झाल्याचा आनंद अनुभवाला येतो. अनंताचे आकलन होऊ लागते आणि सारे अंतर्विरोध शमन पावतात. ही अनुभूती निर्हेतुक असते आणि ती नैसर्गिक रीत्याच प्राप्त होते.

शांतीसाठी हपापलेला मनुष्य मात्र जड, निष्क्रिय आणि आळशी बनतो. ही आलस्याची अवस्था म्हणजे शांती नव्हे, हे लक्षात ठेवले पाहिजे. शांती हे आत्मसंयमाचे अंतिम फल म्हणून प्राप्त होत असते. ती व्यक्तित्वाचा विसर पाडते आणि विश्वबंधुत्वाची भावना परिपुष्ट करते. तिचे दृश्य फल म्हणजे मानवजातीबद्दल इतकेच नव्हे; तर चराचराबद्दल निरतिशय प्रेम हे होय. उपनिषदांत अनेक शांतिमंत्र आलेले आहेत. [ उ. र.; नवभारत, एप्रिल १९५१ ]

**शांतिरक्षित** (इ. स. ६५० चा सुमार) बिहारच्या भागलपूर जिल्ह्याच्या पूर्व भागात हा एका ब्राह्मण-कुलात जन्मला. याने प्रथम वैदिक ग्रंथांचे अध्ययन केले; पण पुढे त्याला बौद्ध धर्माचे आकर्षण वाटले. नालंदा येथे राहून याने बौद्ध धर्माचे अध्ययन केले व आचार्य ज्ञानगर्भ याच्याकडून भिक्षुदीक्षा घेतली. गुरूने त्याचे शांतिरक्षित असे नाव ठेवले.

वयाच्या ७५ वर्षांपर्यंत शांतिरक्षित हा नालंदा येथेच राहिला. नंतर त्याला तिबेटच्या राजाकडून निमंत्रण आले. मार्गातले हाल आणि कष्ट सोशीत तो तिबेटला पोचला. राजाच्या विनंतीवरून तिथे त्याने धर्मोपदेशाचे काम सुरू केले. त्याच्या प्रभावाने ल्हासा येथील लोकांनी बौद्ध धर्माचा स्वीकार केला. काही कालाने तिबेटात महामारीचा रोग फैलावला. लोक पटापट मरू लागले. तिबेटातले लोक भूत-प्रेतपूजक होते. त्यांना वाटले, की राज्यात होणाऱ्या नव्या धर्माच्या प्रसारामुळे भुते खवळली आणि त्यांनी देशात महामारी आणली. राज्यातली सर्व प्रजा राजाविरुद्ध बंड करायला उठली. ती परिस्थिती पाहून राजाने शांतिरक्षिताला तिबेट सोडण्याची विनंती केली. शांतिरक्षित तिथून नेपाळमध्ये गेला.

दोन वर्षांनंतर राजाने पुनः शांतिरक्षिताला तिबेटात बोलावले. या वेळी तो एकटा न जाता पद्मसंभव नावाच्या आचार्याला

बरोबर घेऊन गेला. पद्मसंभव मोठा तांत्रिक होता. तिबेटातील भूतांचा उपद्रव नष्ट करण्याचे काम पद्मसंभवाने केले. पुढे शांतिरक्षिताने नालंदाहून अनेक विद्वानांना तिबेटात बोलावून घेतले. त्या सर्वांनी मिळून अनेक बौद्ध ग्रंथांचे तिबेटी भाषेत



शांतिरक्षित

अनुवाद केले. शांतिरक्षिताने तत्त्वसंग्रह नावाचा पाच हजार श्लोकांचा स्वतंत्र दार्शनिक ग्रंथ लिहिला. तिबेटच्या राजाने त्या सर्व आचार्यांच्या निवासासाठी ल्हासाच्या दक्षिणेस एक विहार निर्माण केला. त्या विहाराचे नाव साम्ये असे होते.

तिबेटात धर्मप्रचार करीत असतानाच इ. स. ७६२ साली वयाच्या १०० व्या वर्षी घोड्याच्या टाचेने घायाळ होऊन शांतिरक्षिताचा मृत्यू झाला. साम्ये विहाराच्या जवळच डोंगराच्या शिखरावर एका स्तूपात त्याच्या शरीराचे अवशेष ठेवलेले होते. सुमारे ५०-६० वर्षांपूर्वी तो स्तूप मोडून पडला आणि त्यातील ते शरीरावशेष खाली पडले. मग तिथल्या बौद्धांनी शांतिरक्षिताचे कपाल, पात्र आणि चीवर या वस्तू साम्ये विहारात सुरक्षित ठेवल्या. चीनने तिबेटावर कबजा करण्यापूर्वी अनेक बौद्ध लोक साम्ये विहारात जाऊन शांतिरक्षिताच्या अवशेषांचे दर्शन घेत असत. [ बौ. ध. बि. ]

**शांतिव्रत** कार्तिक शुद्ध पंचमीला या व्रताला प्रारंभ करावा. एक वर्षभर आंबट पदार्थ वर्ज करावे. रात्री, शेषावर निद्रा करणाऱ्या आणि लक्ष्मीच्या मांडीवर पाय ठेवलेल्या विष्णूच्या मूर्तीची पूजा करावी. पायापासून मस्तकापर्यंत प्रत्येक अवयव आठ नागांपैकी एकेकाचे प्रतीक मानून त्यांची पूजा करावी. नागमूर्तींना दुधाने स्नान घालावे. उद्यापनाच्या वेळी सोन्याचा नाग, एक गाय व सोने दान द्यावे. फल – सर्पविषाच्या संकटापासून मुक्तता.

या व्रताचा आणखी एक प्रकार पुढीलप्रमाणे आहे – तृतीयेला एक वेदी करावी. वेदीवर तांदुळांचे मंडल करावे. मंडलावर नृसिंहाचे आवाहन करावे. मग त्या अवताराची सर्व वैशिष्टचे दाखविणारी मूर्ती स्थापन करून ती निरनिराळ्या फुलांनी, बिल्वफळांनी व तिळांनी अलंकृत करावी. मग विविध उपचारांनी तिची पूजा करावी. नृत्य, गायन व वादन करावे. नृसिंहासमोर पाण्याने भरलेले एक पात्र आणि अष्ट दिशांना आठ पात्रे ठेवावी. तीळ, तूप, इ. द्रव्यांनी होम करावा. तर्पण करून जप करावा. फल – सर्व संकटे, रोग व पापे यांचा नाश. [ हि. ध. ]

**शांती** दुष्ट ग्रह, अनारोग्य, दुष्ट स्वप्न, दिव्य भौम उत्पात, अद्भुत, दुष्ट नक्षत्र व दुष्ट तिथी यांवर जन्म, अशुभ नक्षत्रावर मरण इ. गोष्टींनी सूचित होणाऱ्या अरिष्टाचे निवारण करण्यासाठी जे शास्त्रोक्त कृत्य करतात, त्याला शांती असे म्हटले आहे. या संबंधीचा श्लोक असा –

यथा शस्त्रप्रहाराणां कवचं विनिवारकम् ।
तथा दैवोपघातानां शान्तिर्भवति वारणम् ॥

अर्थ – ज्याप्रमाणे कवच हे शस्त्रप्रहारांपासून संरक्षण करते, त्याचप्रमाणे शांती केल्याने दैवी उपघातांचे निवारण होते.

कोणत्या हेतूसाठी किंवा कोणत्या कारणासाठी कोणती शांती करावी, याविषयी मत्स्य पुराणात (२२७–२३८) विवरण केले आहे, त्याचा संक्षेप असा –

(१) संकटाच्या व भयाच्या परिहारासाठी – अभया.
(२) व्याधिमुक्त होण्यासाठी – सौम्या.
(३) दुष्काळ व चोरभय यांच्या निवारणासाठी – वैष्णवी.
(४) गुरे साथीला बळी पडू नयेत यासाठी – रौद्री.
(५) धर्माविरुद्ध गोष्टी व पाखंड यांचा फैलाव थांबावा यासाठी – ब्राह्मी.
(६) वायूमुळे होणारे क्लेश दूर व्हावे यासाठी – वायवी.
(७) दुष्काळ व अवर्षण पडू नये यासाठी – वारुणी.
(८) शापभय नष्ट व्हावे यासाठी – भार्गवी.
(९) गर्भपात होऊ नये यासाठी – प्राजापत्या.

(१०) भाजीपाल्यावरचे रोग दूर व्हावे यासाठी – त्वाष्ट्री.
(११) बालकांना स्वास्थ्य लाभावे यासाठी – कौमारी.
(१२) अग्निभयाचे निवारण व्हावे यासाठी – आग्नेयी.
(१३) भूतपिशाचांची बाधा होऊ नये, यासाठी – नैर्ऋती.
(१४) वाईट स्वप्ने पडू नयेत यासाठी – याम्या.
(१५) धननाश होऊ नये यासाठी – कौबेरी.
(१६) वृक्ष, भूमी इत्यादींची हानी टळावी यासाठी – पार्थिवी.
या शांतीसाठी शुभ मुहूर्त पाहतात. याव्यतिरिक्त अनेक शांती असून, त्या प्रस्तुत कोशात त्या त्या नावाखाली दिल्या आहेत.

**शांभरायणी व्रत** एक नक्षत्र–व्रत. अच्युत ही या व्रताची देवता होय. व्रतावधी सात वर्षे. कार्तिक, मार्गशीर्ष, पौष यांना अनुक्रमे कृत्तिका, मृगशीर्ष व पुष्य याप्रमाणे वर्षाच्या बारा महिन्यांना बारा नक्षत्रांची नावे द्यावी. कार्तिक मासापासून व्रतारंभ करावा. शांभरायणी नावाच्या देवीची चांदीची मूर्ती करून तिची स्थापना करावी. या देवीची व अच्युताची पूजा हा या व्रताचा प्रधान विधी होय. त्यांना कार्तिकापासून पुढे चार महिने खिचडी, फाल्गुनापासून चार महिने सांजा आणि आषाढापासून चार महिने पायस यांचा नैवेद्य दाखवावा. ब्राह्मणांना नैवेद्याच्या अन्नाचेच भोजन घालावे. फल – सौभाग्य व दीर्घायुष्य यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**शांभवी मुद्रा** योगमार्गातील एक मुद्रा. हिची क्रिया अशी – एकांत स्थळी कृष्णाजिनावर किंवा दर्भासनावर किंवा ऊर्णासन घालून त्यावर बसावे. नंतर गुरुस्मरण करून सोऽहं या मंत्राचा जप करावा व बुबुळे पापणीखाली नेऊन दृष्टी अर्धोन्मीलित ठेवावी आणि भ्रुकुटिमध्यावर स्थिर करावी. मध्यरात्रीच्या अंधारात मन स्थिर करून साधना केल्यास एक मुहूर्त गाढ अंधार दिसेल व नंतर पौर्णिमेचा उजेड दिसू लागेल. त्यानंतर तालुमूलद्वादशात आदिनारायण परब्रह्म कोटिसूर्यप्रकाशाने प्रकट होईल, असे घटचक्र या ग्रंथात सांगितले आहे. [ गा. म. वि.; डॉ. रा. ग. हर्षे, ऐ. सं. नि. ५ ]

**शाकटायन** (१) (सनपूर्व १००० वर्षांचा सुमार) एक प्राचीन वैयाकरण. काही ग्रंथकार याला शकटाचा पुत्र म्हणतात; तर पाणिनी त्याला शकटाचा नातू मानतो. पाणिनीच्या मते हा काण्व वंशातला आहे; तर अन्य व्याकरणकार त्याला काण्वाचा शिष्य म्हणतात. ऋग्वेद व शुक्ल यजुर्वेद यांची प्रातिशाख्ये व यास्काचे निरुक्त यांत शाकटायनाचा उल्लेख येतो. पाणिनी त्याचा श्रेष्ठ वैयाकरण म्हणून उल्लेख करतो (अष्टा. १–४.८६–८७). केशव नामक ग्रंथकार याला आदिशाब्दिक (शब्दशास्त्राचा जनक) म्हणून गौरवितो.

व्याकरणातील उणादिसूत्रे हा याचा ग्रंथ आहे. याच्या मते भाषेतील सर्व शब्द धातुसाधित आहेत. आपले हे मत पटवण्याचा प्रयत्न त्याने उणादिसूत्रांत केला आहे. प्रकृति-प्रत्यय सांगण्याची पद्धती सर्व प्रथम शाकटायनाने सुरू केली आणि पाणिनीने काही प्रमाणात तिचे अनुकरण केले.

बृहद्देवता या ग्रंथात दैवतशास्त्रविषयक काही उदाहरणे दिलेली आहेत, त्यांवरून शाकटायनाचा त्या शास्त्रावर एखादा ग्रंथ असावा, असे अनुमान निघते. याशिवाय शाकटायनस्मृती व शाकटायनव्याकरण असे दोन ग्रंथ याच्या नावावर आहेत; पण त्यांपैकी एकही उपलब्ध नाही. [ प्रा. च. को. ]

(२) (इ. स. च्या ९ व्या शतकाचा उत्तरार्ध) सुप्रसिद्ध जैन वैयाकरण. शाकटायनप्रक्रियासंग्रह हा ग्रंथ लिहून याने स्वतःच या ग्रंथावर अमोघवृत्ती नावाची टीका लिहिली आहे. ग्रंथाला अमोघवृत्ती हे नाव याने अमोघवर्ष राष्ट्रकूटाच्या स्मरणार्थ ठेवले असावे. [ सु. वि. को. ]

**शाकद्वीप** सप्तद्वीपांपैकी एक. मत्स्यपुराणात याचे वर्णन आले आहे, ते असे – याचा विस्तार जंबुद्वीपाच्या दुप्पट व परीघ तिप्पट आहे. यात मेरू, चंद्र, नारद, दुंदुभी, अस्त्र, झंविके व विभ्राज हे पर्वत आहेत. या पर्वतांचे एक टोक क्षारसमुद्रात व दुसरे क्षीरसागरात घुसलेले आहे. शाक नावाच्या वृक्षावरून याला हे नाव मिळाले. सुकुमारी, नंदा, पावनी, शिशिका, ईक्षू, रेणुका व सुकृता अशा सात महासरिता यातून वाहतात. या द्वीपातले लोक निरोगी, दीर्घायू व बलवान आहेत. इथली धर्मव्यवस्था त्रेतायुगातल्यासारखीच आहे.

प्राचीन काळी प्रियव्रताचा पुत्र मेधातिथी हा शाकद्वीपावर राज्य करीत असे. आयुष्याच्या अखेरीस त्याने हे द्वीप आपल्या सात पुत्रांना वाटून दिले व त्या सात मुलांच्या नावांवरून ते सात भाग प्रसिद्ध झाले. शाकद्वीपात वर्णाश्रमधर्म चालतो. या द्वीपात कित्येक नगरे व ग्रामे आहेत. या ठिकाणी प्राणायामाच्या द्वारे वायूची उपासना केली जाते. या द्वीपात विष्णू सूर्याच्या रूपाने राहतो व त्याची उपासना चालते.

महाभारत, विष्णुपुराण, भविष्यपुराण, इ. ग्रंथांत याच्या संबंधी म्हटले आहे, की या द्वीपात सप्त पवित्र नद्यांशिवाय हजारो लहान लहान झरे आहेत. शाक किंवा साग वृक्ष हे या द्वीपाचे वैशिष्ट्य आहे. या द्वीपातील लोक विष्णूचे उपासक आहेत व या द्वीपाभोवती क्षीरसमुद्र पसरलेला आहे.

वरील वर्णनावरून श्री. मुझफर अली यांनी असा निष्कर्ष

काढला आहे, की या प्रदेशात पुष्कळ पाऊस पडतो, त्यात साग वृक्ष विपुल आहेत आणि तो जंबूद्वीपाच्या पूर्वेला आहे. असा प्रदेश मान्सून पाऊस पडणाऱ्या पूर्व आशियात आहे. तेव्हा शाकद्वीप म्हणजे मलाया, सयाम, इंडोचीन आणि दक्षिण चीन असे म्हणता येईल. मत्स्य, वराह, पद्म आणि स्कंद या पुराणांत शाकद्वीप हे जंबूद्वीपाच्या जवळ असून, क्षीरसमुद्र किंवा बंगालचा उपसागर ओलांडला की माणूस शाकद्वीपात पोचतो, असे सांगितले आहे. त्यावरून आपल्या मताला पुष्टी मिळते, असे त्यांचे म्हणणे आहे.

श्री. वि. का. राजवाडे यांच्या मते शाकद्वीप हे क्रौंच द्वीपाच्या पूर्वेला, उत्तर समुद्राच्या व अलताई पर्वताच्या दिशेने होते.

या द्वीपात स्वधर्मनिष्ठ व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्याशी समान असे मग, मागध, मानस व मंदग असे चार वर्ण होते, असेही श्री. राजवाडे यांनी पौराणिक उल्लेखांवरून प्रतिपादन केले आहे. मग वर्णात भारतातील ब्राह्मणांप्रमाणे चारही वेद होते; पण ते विपरीत होते, असे भविष्यपुराणात सांगितले आहे. या मग ब्राह्मणांची अठरा कुले श्रीकृष्णपुत्र सांब याने सूर्याच्या प्रतिष्ठापनेसाठी सांबपुरात आणली आणि त्यांच्यांतील अठरा पुरुषांना सांबाने अठरा भोजक कन्या दिल्या, असेही भविष्यपुराणात म्हटले आहे.

श्री. बुद्ध प्रकाश यांच्या मते शाकद्वीप म्हणजे कास्पियन समुद्राच्या उत्तरेला, पूर्वेला व पश्चिमेला असलेला प्रदेश होय. त्यांच्या मते मगादी जाती या इराणमधील प्राचीन जाती होत. [ जॉ. पु.; रा. ले. सं. ३; पुराणम्, जुलै १९६१; पु. इं. ]

**शाकपूणी** एक आचार्य. हा यास्काच्या पूर्वी होऊन गेला. त्याने ऋग्वेदाच्या एका भागाचे संहितीकरण करून त्याला कठीण शब्दांचा कोश जोडला आहे. सांख्यायन व कौषीतकी यांनी याला तर्पणात स्थान दिले आहे.

**शाकंभरी** महाराष्ट्रातील काही देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची कुलदेवी. हिला वनशंकरी असे आणखी एक नाव असून, तिचे मुख्य ठाणे विजापूरजवळ बादामी येथे आहे. देवी भागवतात हिची उत्पत्तिकथा दिली आहे, ती अशी –

एकदा खूप मोठा दुष्काळ पडला. लोक अन्नपाण्याविना उपाशी मरू लागले. देवीला त्यांची करुणा आली. मग तिने आपल्या अंगातून असंख्य शाकभाज्या उत्पन्न केल्या व लोकांना खाऊ घातल्या. त्यामुळे हिला शाकंभरी हे नाव मिळाले.

पश्चिम राजस्थानात जोधपूर व जयपूर यांच्या सीमेवर असणाऱ्या एका सरोवराकाठी हिचे एक स्थान असल्याचे विष्णुधर्मसूत्रात (८५.२१) सांगितले आहे. याशिवाय हरिद्वार-केदार रस्त्यावर कुमाऊँ टेकडीवर हिचे आणखी एक स्थान असून, तिथे देवीने एक सहस्र वर्षे केवळ शाकभाज्या खाऊन तप केले व त्यामुळे ही देवी शाकंभरी नावाने विख्यात झाली, असे महाभारताच्या वनपर्वात ( ८४.१३ ) व पद्मपुराणात (१.२८.१४–१६) सांगितले आहे.

महाराष्ट्रातील ज्या देशस्थ ब्राह्मणांची ही कुलदेवी आहे, त्यांच्याकडे पौष शु. ७ पासून पौर्णिमेपर्यंत या देवीचे नवरात्र असते. पौष शु. १५ ही शाकंभरी पौर्णिमा म्हणूनच प्रसिद्ध असून, त्या दिवशी साठ भाज्या व साठ कोशिंबिरी करून देवीला नैवेद्य दाखवायचा असतो. पाहा – बनशंकरी [ हि. ध.; दे. ऋ. ब्रा. प. ग्रं.; देवीकोश ३ ]

**शाकवर्जनव्रत** काही काळ एखादी भाजी खाण्याचे बंद करणे, हा या व्रताचा प्रमुख विधी आहे. या व्रताची सांगता श्रावण शुद्ध द्वादशीला करतात. ब्राह्मणाची यथाविधि पूजा करून त्याला आपण वर्ज्य केलेली भाजी शिजवून अथवा न शिजवता दान देतात. [ व्रतराज ]

**शाकसप्तमी** एक तिथिव्रत. व्रतावधी एक वर्ष. सूर्य ही या व्रताची देवता होय. कार्तिक शुद्ध सप्तमीला या व्रताला प्रारंभ करावा. वर्षाचे तीन भाग करून पंचमीला एकभुक्त, षष्ठीला नक्त आणि सप्तमीला उपवास करावा. प्रत्येक भागात निरनिराळी फुले, गंध व धूप यांनी सूर्याची पूजा करावी. पायस, गुळाच्या पोळ्या व भाताची खीर यांचा नैवेद्य दाखवावा. ब्राह्मणभोजन घालावे आणि आपण रात्री भोजन करावे. उद्यापनाच्या वेळी ब्राह्मणभोजन घालून पुराणश्रवण करावे. फल – व्याधिनाश. [ हि. ध.; व्र. प. ]

**शाकाष्टका** फाल्गुन कृष्ण अष्टमीला हे नाव आहे. या दिवशी आठ शाकभाज्या ब्राह्मणाला देऊन पितरांचे श्राद्ध करावे, असे सांगितले आहे. [ श. क. ]

**शाकिनी** (१) चौसष्ट योगिनींतील एक योगिनी. वज्रयानी योगिनींमध्येही हिचा समावेश आहे.

(२) भूतपिशाचांच्या श्रेणीतील एक असेही हिचे स्वरूप आहे. शाकिनीचा उल्लेख नेहमी डाकिनीबरोबर केला जातो. शाकिनी म्हणजे अविवाहित मुलीचे भूत असून, ती बाळंतिणी व मुलास फार त्रास देते, अशी समजूत आहे. ही अरण्यात राहते.

अभिचारकर्म करणाऱ्या स्त्रियांनाही शाकिनी असे म्हणतात.

एका मांत्रिक स्त्रीच्या नादी लागून वामदत्त ब्राह्मणाची स्त्री शाकिनी बनली होती, असा उल्लेख बृहत्कथेतील शशांकवती लंबकात आहे. [ लौ. दं.; देवीकोश २; प्रा. म. ]

**शाक्त पंथ** शक्तीची उपासना करणाऱ्यांना शाक्त व त्यांच्या धर्म–तत्त्वज्ञानाला शाक्तमत किंवा पंथ म्हणतात. या पंथात परमेश्वराची किंवा परमतत्त्वाची कल्पना स्त्रीरूपात केली जाते. या स्त्रीरूपाला ते शक्ती म्हणतात. दुर्गा, त्रिपुरसुंदरी, ललिता, महाभैरवी, आनंदभैरवी, इ. अनेक नावांनी ते शक्तीला संबोधितात. शक्तीची उपासना प्रायः पुढील तीन पद्धतींनी होते –

(१) **सामान्य शिष्ट पद्धती**–हिच्यात अन्य देवतांच्याप्रमाणेच शक्तीची षोडशोपचारादी पद्धतींनी पूजा केली जाते. तिच्यात जप, ध्यान, होम या गोष्टीही अंतर्भूत असतात. ही पद्धती पूर्णपणे अहिंसक असते.

(२) **भयानक पद्धती** – या पद्धतीत देवीला पशुबली आवश्यक मानला जातो. प्राचीन काळी नरबलीही देत असत. या उपासनेचा संबंध कापालिक व कालामुख या उग्र शैवांशी आहे.

(३) **भावात्मक पद्धती** – या पूजेत उपासक हा उपास्य देवतेशी स्वतःचे तादात्म्य स्थापित करून शक्तीची पूजा करतो. प्रायः या पद्धतीची उपासना करणाऱ्या लोकांनाच शाक्त असे म्हणतात. पहिल्या व दुसऱ्या वर्गांना अनुक्रमे स्मार्त व शैव म्हटले जाते.

शाक्तांनी आपल्या पंथासाठी विपुल साहित्य निर्माण केले आहे. याशिवाय अन्य विविध साहित्यातूनही शाक्त पंथाची माहिती विखुरलेल्या स्वरूपात आढळून येते. त्यावरून शाक्तमताचे प्राचीनत्वही अनुमानिता येते.

**शाक्त साहित्य** – शाक्त पंथात शिवोपासना, शक्तीची उपासना व कैवल्यपदप्रापक योग यांचा परस्पर संबंध अविभाज्य आहे. म्हणून शाक्त साहित्याचा आढावा घेताना वरील तीन्ही विषयांच्या साहित्याचा विचार करावा लागतो. ऐतिहासिक दृष्टीने अशा साहित्याचे स्थूलमानाने तीन कालविभाग पडतात– (१) बुद्धपूर्व काल, (२) बुद्धोत्तर काल व (३) शंकराचार्योत्तर काल.

(१) या कालातलें साहित्य ग्रंथस्थ व उत्खननातून उपलब्ध झालेले असे द्विविध आहे. चारही वेद, ब्राह्मणे, आरण्यके, सूत्रे व उपनिषदे हे या काळातले मुख्य ग्रंथ होत. वेदांत आद्या शक्ती ही अदितीच्या रूपात आढळून येते. अदिती ही सर्वांची माता असल्याचे म्हटले आहे. अदितीच्या रूपाने शक्तीचा मातृभाव वर्णिला आहे. सुनीता वागांभृणी हिच्या सूक्तात शाक्तांच्या अद्वैत तत्त्वज्ञानाची प्रेरणा आहे. वैदिक कर्मकांड पुष्कळदा शाक्ततंत्राशी समांतर चालत असल्याचे दिसून येईल. ऐतरेय आरण्यकात जे महाव्रताच्या विधीचे वर्णन आहे, त्यात शाक्त मार्गातील क्रिया-कलाप आढळेल. पौंडरीक यागातही बरीच शाक्तप्रक्रिया आहे. ब्राह्मण-ग्रंथातील सृष्टयुत्पत्तीचे विचार एकत्र केल्यास ते शाक्तांच्या सृष्टिज्ञानाशी जवळीक दाखवतील. उपनिषदांत उपासना व ज्ञान यांना प्राधान्य आहे. शाक्त मार्गही याच विषयांना प्राधान्य देतो व त्यामुळे त्याचा उपनिषदांशी मेळ जमतो. त्रिपुरा, त्रिपुरातापिनी, देवी, भावना, सौभाग्यलक्ष्मी, सीता, कौल, काली, तारा, इ. उपनिषदे शाक्त उपासनेसाठीच निर्माण झाली आहेत. मोहेंजोदडो व हडप्पा येथील उत्खननातून देवी – उपासनेच्या प्राचीनतेविषयी पुरावे उपलब्ध होतात.

(२) बुध्दोत्तर काळात शक्तिविषयक साहित्याचा बराच विस्तार झाला. बाह्य, स्थूल प्रतीकांची पूजा मोठ्या प्रमाणावर सुरू झाली. वैदिक कर्मकांड मूर्तिनिरपेक्ष होते, ते या कालात मूर्तिसापेक्ष झाले. त्यामुळे देवी-उपासनेत पूजा, जप, ध्यान, इ. तपशील प्रविष्ट झाला. महाभारताच्या शांतिपर्वात जी सांख्य–योग–ज्ञान यांची मांडणी आहे, त्याच पद्धतीने शाक्त तत्त्वज्ञान साकारले आहे. या कालात शिव, शक्ती आणि विष्णू या तिघांच्याही उपासना तंत्रबद्ध झाल्या. शिव व शक्ती यांच्या उपासनेचे साहचर्य पूर्वी होते तसेच चालू राहिले. फरक इतकाच झाला, की शैवांनी शिवाला प्रधान व शक्तीला गौण मानले. वैष्णव उपासनेच्या तंत्रातही शिव-शक्तींच्या उपासनेतील बरीच तंत्रे स्वीकारली गेली.

वरील मोठ्या कालखंडातील केवळ शाक्तांच्या साहित्याचा विचार करायचा झाल्यास त्याचे चार भाग पाडता येतील– (१) सूत्रसाहित्य (२) आगमग्रंथ (३) पुराणे व (४) स्तोत्रसाहित्य.

परशुरामकृत कल्पसूत्रे; अगस्त्य, भारद्वाज व नागानंद यांची शक्तिसूत्रे; अंगिरसाची दैवी मीमांसासूत्रे; गौडपादांची श्रीविद्यारत्नसूत्रे व प्रत्यभिज्ञामताची शक्तिसूत्रे, हे एवढे सूत्रसाहित्य शाक्तमताचा प्रपंच करते.

आगमसाहित्य तर याहून विशाल आहे. गौडपाद व शंकराचार्य यांनी ६४ शाक्ततंत्रांचा उल्लेख केला आहे. याशिवाय वामकेश्वर या नावाचेही एक तंत्र आहे.

याव्यतिरिक्त ज्ञानार्णव, कुलार्णव, रुद्रयामल, इ. शाक्त आगम ग्रंथही बरेच आहेत. इ. स. च्या ११ व्या शतकात विद्यारण्य या आचार्याने शाक्तमतावर श्रीविद्यार्णव नावाचा प्रचंड ग्रंथ निर्माण केला. ब्रह्मयामल, पिंगलमत, जयद्रथयामल

या ग्रंथांतही शाक्तमताचेच विवेचन केलेले आहे.

शिवोपासना व योगमार्ग यांचा शाक्त उपासनेशी घनिष्ठ संबंध आहे. यावद्दल प्रमाणभूत आगमग्रंथही फार प्राचीन काळापासूनचे उपलब्ध आहेत. इ. स. ११ व्या शतकातील अभिनवगुप्ताने शक्तिविषयक प्रचंड ग्रंथसंपत्ती निर्माण करून ठेवली आहे. त्याने आपल्या ग्रंथांत अनेक पूर्वाचार्यांचे उतारे देऊन शैवप्रक्रियेचे शाक्तप्रक्रियेशी साम्य दाखवले आहे.

शक्तीच्या उपासनेतले योग हे अंगही प्राचीन आहे. याविषयी श्री. ह. बा. भिडे पुढीलप्रमाणे विवेचन करतात —

प्राचीन उपनिषदांत योगाचे अंधुक निदर्शन आहे. श्वेताश्वतरात ते जास्ती स्पष्ट आहे. मागाहूनच्या उपनिषदांत पुष्कळ तपशील आहे. भगवद्गीतेच्या सहाव्या व चौदाव्या अध्यायांत योगाचा स्पष्ट उल्लेख आहे. यानंतरच्या काळात आल्यावर पातंजल योगसूत्रांचा उल्लेख केला पाहिजे. त्याबरोबर बौद्धविभाषादिकांचाही परामर्श घेतला पाहिजे. या बौद्ध योगात आणि पातंजल योगात पुष्कळ स्थळे परस्पर सदृश आहेत. त्यांचे चिकित्सक दृष्टीने परीक्षण झाले पाहिजे. या सर्वांचा तंत्रोक्त योगाशी निकट संबंध आहे. वरेच योगी शक्ति-उपासक होते. ज्ञानेश्वरांचा योग हा शक्ति—उपासनेचेच अंग आहे. ज्ञानेश्वरांच्या परमगुरूंचे परमगुरू मत्स्येंद्रनाथ यांना श्री शंकरांनी क्षीराब्धीच्या उदरात शांभव योगाचे ज्ञान प्राप्त करून दिले होते. या मत्स्येंद्रनाथांच्या नावावर कौलज्ञाननिर्णय नावाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यात प्रतिपादन केलेले ज्ञान व प्रक्रिया ही आगमोक्त ज्ञान-प्रक्रियांशी जुळतात. त्यांतील एक उतारा असा—

न शिवेन विना शक्तिर्न शक्तिरहितः शिवः ।
अन्योन्यं च प्रवर्तेते अग्निधूमौ यथा प्रिये ।।
न वृक्षरहिता छाया न छायारहितो द्रुमः ।

अर्थ — शिवावाचून शक्ती व शक्ती वाचून शिव राहू शकत नाही. जसे अग्नी आणि धूम तसेच शिव-शक्ती परस्पर संयोगाने प्रवृत्त होतात. (दुसरे उदा० असे) वृक्षावाचून छाया राहत नाही, तसाच छायेवाचून वृक्षही असत नाही.

(३) या कालखडात पुराणांची परिवर्धित संस्करणे बनून गेली होती. या पुराणांतून मुख्यत्वे शिव, देवी व विष्णू यांचे माहात्म्य व उपासना-विधान वर्णित आहे. शिवशक्तींच्या पुराणांतून शक्ती उपासनेचे महत्त्व विशद केले जाणे साहजिक आहे. कारण शिव-शक्तींचे ऐक्य हा मूळ सिद्धान्तच आहे. शिवावाचून शक्तीची व शक्तीवाचून शिवाची उपासना सिद्ध होऊच शकत नाही. पण वैष्णव पुराणांतही विष्णू व त्याची शक्ती यांचा अभेद वर्णिला आहे. कालिकापुराण, देवी भागवत, मार्कंडेयपुराण, सूतसंहिता, इ. ग्रंथ शक्तीच्या उपासनेलाच प्राधान्य देतात.

देवीच्या स्तुतिपर कवन म्हणजे स्तोत्र होय, अशी स्तोत्राची सामान्य व्याख्या करता येईल. शंकराचार्य हे स्तोत्रकारांचे मुकुटमणी शोभतील. त्यांनी देवीची अनेक स्तोत्रे रचली असून, त्यांत सौंदर्यलहरी हे प्रसिद्ध आहे. बाणभट्टाचे चंडीशतक, मूक कवीचे पंचशती, लघुपंचस्तवी, अनेक नावांच्या लहरी, सहस्रनामे हे सर्व स्तोत्रसाहित्यात जमा होते. या स्तोत्रांतून शक्तीच्या उपासनेचे विधि-विधान सांगितलेले नसले, तरी शाक्तयोग व शाक्ततत्त्वज्ञान यांची त्यांतून झलक मिळते.

हिंदी साहित्याच्या प्रारंभिक युगात शाक्तमताचा प्रभाव विशेष दिसून येतो. ८४ सिद्धांमधला एक प्रसिद्ध सिद्ध म्हणजे मत्स्येंद्र हा होय. त्याचा शाक्तातील योगिनी कौल या पोटभेदाशी संबंध होता. संपूर्ण नाथसंप्रदायच कौलमताशी निःसंशय स्नेहबद्ध आहे. सिद्धसाहित्य, नाथसाहित्य व संतसाहित्य यांमध्ये शक्तिसाधनेचा स्पष्ट प्रभाव आहे. नाद, बिंदू, पंचमकार, इ. शाक्तांची प्रतीकभाषा वरील साहित्यातही वापरली गेली आहे. मात्र त्याचबरोबर प्राचीन हिंदी साहित्यात शाक्तांची प्रखर निंदाही केलेली आढळते. त्यावरून असे वाटते, की नाथसिद्धांच्या काळात अस्सल शाक्तमत विकृत झाले होते व त्यात अनेक दुष्ट व अनैतिक रीती व रूढी प्रविष्ट झाल्या होत्या.

**तत्त्वज्ञान** — शाक्तांच्या विविध ग्रंथांत सृष्टिनिर्मितीविषयी विविध मते आढळून येतात. पण त्यांच्या विचारप्रणालींत बाह्यतः जरी भिन्नता दिसून आली, तरी त्यातही एक सुसंगत असे तत्त्व आहे. शाक्त हे अद्वैती आहेत. पण त्यांनी शंकराचार्यांचा विवर्तवाद न स्वीकारता परिणामवाद स्वीकारून आपल्या अद्वैताची उभारणी केली आहे. म्हणूनच त्यांना शक्तिविशिष्ट अद्वैती असे म्हणतात. त्यांच्या मते आद्या शक्ती हे सृष्टीचे मूल तत्त्व होय. ब्रह्मदेवाच्या हातून सृष्टिनिर्मितीचे काम नीट होईना, तेव्हा त्याने शक्तीला त्याविषयी प्रार्थिले. त्यावेळी शक्तीने विमर्श किंवा स्फूर्ती बनून बिंदुरूप धारण केले. मग शिवाने प्रकाश किंवा तेज याच्या रूपाने त्या बिंदूत प्रवेश केला. त्यातून पुढे नाद नावाचे तत्त्व निर्माण झाले. नाद आणि बिंदू हे एकरूप झाल्यावर त्यांना अर्धनारीश्वर किंवा संयुक्त बिंदू हे रूप प्राप्त झाले. श्वेत बिंदू आणि रक्त बिंदू असे आणखी दोन बिंदू शाक्त मानतात आणि त्यांना अनुक्रमे स्त्री व पुरुष अंश म्हणतात. हे दोन्ही मिळून कला निर्माण करतात. अशा प्रकारे संयुक्त बिंदू, रक्त बिंदू व श्वेत बिंदू हे तीन्ही मिळून कामकलेला जन्म देतात. या चार तत्त्वांच्या संयोगातून सृष्टी उत्पन्न होते. कामकला ही सृष्टीची नियामक शक्ती होय.

सांख्यांप्रमाणेच शाक्तही ३६ तत्त्वे मानतात. या तत्त्वांचे तीन विभाग पडतात. शिवतत्त्व, विद्यातत्त्व व आत्मतत्त्व. शिव-तत्त्वाचे दोन विभाग होतात. शिवतत्त्व आणि शक्तितत्त्व. विद्यातत्त्वात सदाशिव, ईश्वर व शुद्ध विद्या ही तीन तत्त्वे येतात. आत्मतत्त्वात पुढील ३१ तत्त्वे येतात – आत्मा, माया, कला, विद्या, राग, काल, नियती, पुरुष, प्रकृती, बुद्धी, अहंकार, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच विषय आणि पंचमहाभूते.

पराशक्तीच्या हृदयात विश्वसृष्टीची इच्छा उत्पन्न झाली, की लगेच तिची शिव आणि शक्ती अशी दोन रूपे होतात. शिव प्रकाशरूप आहे; तर शक्ती विमर्शरूपिणी आहे. पूर्ण अकृत्रिम, अहम्‌ची स्फूर्ती म्हणजे विमर्श होय. यालाच चित्, चैतन्य, स्वातंत्र्य, कर्तृत्व, स्फुरण, इ. नावे आहेत. प्रकाश व विमर्श सदैव एकत्र राहतात. प्रकाश किंवा शिव याला संवित् म्हणतात व विमर्शाला युक्ती किंवा मनन म्हणतात. याच शिव-शक्तीच्या आंतर निमेषाला सदाशिव व बाह्य उन्मेषाला ईश्वर म्हणतात. परा संवित्चे शिवशक्त्यात्मक रूप सर्गात्मक असते. शिवतत्त्वात 'अहम्' हा विमर्श, सदाशिव तत्त्वात 'अहमिदम्' हा विमर्श व ईश्वर तत्त्वात 'इदमिदम्' हा विमर्श राहतो. या तीन्ही विमर्शांत प्रत्येकामध्ये प्रथम पदाचे प्राधान्य असते. शुद्ध विद्या-तत्त्वात अहम् व इदम् या दोहोंनाही समान महत्त्व असते. इथून पुढे माया तत्त्वाचे कार्य सुरू होते. ही माया अहम् व इदम् या दोहोंना पृथक करते. अहम् हा अंश पुरुष होतो व इदम् हा अंश प्रकृती बनते. शिवाला पुरुषरूपात येण्यासाठी माया पुढील उपाधींची सृष्टी करते – कला, विद्या, राग, काल व नियती. या पाचांना मिळून कंचुक किंवा आवरण असे पारिभाषिक नाव आहे. एवढा विस्तार झाल्यावर पुढचा सृष्टिविकास सांख्य दर्शनाप्रमाणे होतो. ज्या क्रमाने सृष्टीचा आविर्भाव होतो, त्याच्या उलट क्रमाने तिरोभाव होतो.

शैवांच्या त्रिक दर्शनातही वरील तत्त्ववाद मान्य केलेला आहे. त्यांच्यामध्ये व शाक्तांमध्ये थोडाच भेद आहे, तो असा–

शैव ३६ तत्त्वांपैकी पहिल्या शिवतत्त्वात शिवभाव प्रधान व शक्तिभाव गौण मानतात; तर शाक्त शक्तितत्त्वात शक्ति-भाव प्रधान व शिवभाव गौण मानतात. तत्त्वातीत दशेत शिवा-लाही प्राधान्य असत नाही व शक्तीलाही प्राधान्य असत नाही. उलट दोघांचे सामरस्य असते. हेच शिवशक्तींचे सामरस्य होय. या सामरस्याला शैव लोक परमशिव आणि शाक्त लोक परा-शक्ती म्हणतात. दोन्ही विश्वात्मक आहेत व विश्वोत्तीर्णही आहेत.

वैदिक तत्त्वज्ञानात केवलाद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैत, इ. मतभेद आहेत. शाक्त तत्त्वज्ञानातही हे सर्व प्रकार दिसून येतात. मात्र या मार्गात जी त्रिपुरोपासना आहे, ती मात्र पूर्ण अद्वैतनिष्ठ आहे. पूर्णाद्वैत हा त्रैपुर सिद्धान्त शंकराचार्यांच्या पूर्णाद्वैताशी पूर्णतया जमतो.

**शाक्त साधना** – वर्णाश्रमविहित कर्मे निष्काम बुद्धीने केल्याने चित्तशुद्धी होते आणि ती झाल्यावर जीव उपासनेचा अधिकारी होतो. उपासना ही सकाम अथवा निष्काम अशी उभयविध असू शकते. निष्काम उपासनेची सिद्धी म्हणजे ज्ञानप्राप्ती होय. ज्ञान-प्राप्तीनंतर मोक्ष सिद्ध आहे. असे हे मोक्षापर्यंतचे मोठे टप्पे आहेत. त्यांपैकी चित्तशुद्धीचा टप्पा गाठल्यावर तिथून उपास-नेचे वेगवेगळे फाटे फुटतात. त्यांपैकीच एक फाटा म्हणजे शाक्त मार्ग होय. हा मार्गही उपासनाप्रधान असून, मोक्षप्राप्ती हेच त्याचेही ध्येय आहे. उपासना व ज्ञान हे शाक्तशास्त्राचे मुख्य विषय होत. शिव-शक्ती हे शाक्तांचे उपास्य म्हणजे उप-निषदातले सगुण ब्रह्म होय. शंकराचार्य म्हणतात, की सगुण ब्रह्म हे उपास्य व निर्गुण ब्रह्म हे ज्ञेय आहे. सगुणाच्या आधारे निर्गु-णात प्रवेश करायचा असतो. शाक्त पंथाचाही हाच सिद्धान्त आहे. उपासनेत द्वैत असते. पण उपासनेची पूर्ती अद्वैतसिद्धीत होते. त्यासाठी शाक्तांनी योगमार्गाला महत्त्व दिलेले आहे. ज्या उपासनेचा शेवट सहजसमाधीत होतो, ती अवस्था योग-साध्यच असल्याचे शाक्तपंथ मानतो. किंबहुना शाक्तमार्ग म्हणजे अद्वैतप्रापक योगमार्गच होय, असे श्री. भिडे म्हणतात. शक्ति-उपासना, शिवोपासना व योग या विषयींचे आगम ग्रंथ प्राचीन काळापासून सांप्रदायिकांमध्ये रूढ आहेत.

**अंतर्याग व बहिर्याग** – शाक्तसाधनेचे किंवा शक्तिपूजेचे हे दोन प्रमुख प्रकार आहेत. मानसपूजेला व यौगिक साधनेला अंतर्याग व बाह्य सामग्रीने केल्या जाणाऱ्या पूजेला बहिर्याग म्हणतात. बहिर्यागाची साधना केल्यावाचून अंतर्याग साध्य होणे दुष्कर आहे.

बहिर्यागाची पुढील पाच अंगे आहेत – जप, होम, तर्पण, मार्जन व ब्रह्मभोजन. महाशक्तीच्या कोणत्यातरी एका स्वरूपाचा बोधक असलेल्या मंत्राचा पुरश्चरणाच्या नियमानुसार जप करणे, जपाच्या दशांश संख्येने हविर्द्रव्यांचे हवन करणे, पंच-द्रव्यांचा उपयोग करून होमाच्या दशांश तर्पण करणे, तर्पणाच्या दशांश शरीरावर मार्जन करणे व मार्जनाच्या दशांश सत्पात्र ब्राह्मणांना भोजन घालणे असा वरील पाच अंगांचा बोध आहे.

अंतर्यागाचीही पुढील पाच अंगे आहेत. – पटल, पद्धती, वर्म, स्तोत्र व सहस्रनाम. मंत्राक्षरांच्या द्वारे मूलाधारादी चक्रांत देवीच्या स्वरूपाची भावना करून चित्ताला शक्तिसंपन्न करणे म्हणजे पटल होय. मंत्रपटलाच्या द्वारे हृदयादी पीठांच्या ठिकाणी देवीची पूजा करणे, याला पद्धती म्हणतात. इष्टमंत्राच्या अक्ष

रांच्या द्वारे स्थूल देहावर आच्छादन निर्माण करणे म्हणजे कवच होय. देवीच्या मंत्राची स्मृती जागृत राहावी म्हणून तिची केली जाणारी स्तुती म्हणजे स्तोत्र होय आणि देवीच्या सहस्र गुणांची निदर्शक अशी सहस्रनामे पठण करणे म्हणजे सहस्र नाम होय.

शाक्त पंथात तीन भाव आणि सात आचार प्रमुख मानले जातात. पशुभाव, वीरभाव आणि दिव्यभाव हे ते तीन भाव होत. हे भाव म्हणजे साधकाच्या तीन मानसिक अवस्था समजाव्यात. पहिल्या भावातून दुसऱ्यात व दुसऱ्यातून तिसऱ्यात प्रवेश करणे हा साधकाच्या जीवनविकासाचा क्रम समजावा. वेदाचार, वैष्णवाचार, शैवाचार, दक्षिणाचार, वामाचार, सिद्धान्ताचार व कौलाचार हे सात आचार होत. यांपैकी पहिले चार आचार पशुभावासाठी, त्यापुढचे दोन आचार वीरभावासाठी व शेवटचा कौलाचार दिव्य भावासाठी आहे. आचार हे बाह्य आचरणाचे द्योतक आहेत. समयाचार हा आणखी एक वेगळा आचार आहे.

या विविध आचारांमध्ये कौलाचार व समयाचार हे दोन महत्त्वाचे होत.

कौलाचार – कुल म्हणजे शक्ती किंवा कुंडलिनी आणि अकुल म्हणजे शिव होय. जो योग मार्गाने कुंडलिनी जागृत करून सहस्रारचक्रात स्थित असलेल्या शिवाशी तिचे सामरस्य घडवून आणतो, त्याला कौल म्हणायचे. इतका उदात्तभाव कौलाचारात अभिप्रेत आहे.

कामाख्या हे कौलाचाराचे मुख्य केंद्र आहे. त्याच्या पूजेत पंचतत्त्व साधनाला महत्त्वाचे स्थान आहे. या पंचतत्त्वांत मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा व मैथुन या पाच मकारादी वस्तूंचा समावेश होतो. कौलमार्गात पूर्वकौल आणि उत्तरकौल असे दोन भेद पडले आहेत. पूर्वकौल पंचमकारांचा प्रत्यक्ष वापर न करता तत्प्रतिनिधिभूत अन्य वस्तूंचा वापर करतात. त्यांतले काही लोक पंचमकार हे विशिष्ट यौगिक प्रक्रियांचे बोधक मानतात. त्या दृष्टीने पाहता पंचमकार ही एक उच्च कोटीची साधना आहे, ती अशी–

मद्य म्हणजे ब्रह्मरंध्रात असलेल्या सहस्रदलातील सुधा होय. मांस म्हणजे पाप-पुण्यरूपी पशूला ज्ञानशस्त्राने मारून ब्रह्मरंध्रात लीन होणे. मत्स्य म्हणजे इडा आणि पिंगला या दोन नाड्यांतले श्वास आणि उच्छ्वास हे दोन वायू होत. त्यांना सुषुम्ना नाडीत नेणे ही मत्स्यसाधना होय. सत्संग करणे म्हणजे मुद्रा. आणि शिवाशी कुंडलिनीचे मीलन हे मैथुन होय. तात्पर्य, पंचमकारांचा संबंध बाह्य वस्तू किंवा क्रिया यांच्याशी नसून तो अंतर्यागाशी आहे.

पण कालांतराने पंचमकारांचे हे उदात्त स्वरूप लुप्त झाले. शाक्त उपासनेला भोंदू आणि विषयलोलुप लोकांनी विकृत रूप दिले. अशा लोकांनाच उत्तरकौल म्हणतात. उत्तरकौल पंचमकार वाच्यार्थाने उपयोगात आणतात. पूर्वकौल श्रीचक्रातल्या त्रिकोणरूप योनीची पूजा करीत, तर उत्तरकौल सुंदर तरुणींच्या योनींची पूजा करू लागले. शाक्त मार्गाविषयी विचारी लोकांत तिरस्कार निर्माण व्हायला हे उत्तरकौलच कारणीभूत ठरले. कबीर, तुलसीदास, इ. संतांनी ज्यांची प्रखर निंदा केली, ते हे वाममार्गी किंवा उत्तरकौलच होत. स्वार्थी आणि विषयी लोकांच्या हाती एखादी साधना गेली म्हणजे तिची कशी आणि किती अधोगती होते, त्याचे उदाहरण म्हणजे शाक्त पंथ होय.

समयाचार – हाही एक महत्त्वाचा शाक्त आचार आहे. आद्य शंकराचार्य हे समयाचारी होते. त्यांच्या सौंदर्यलहरी या स्तोत्रात समयाचाराचे सूचन आढळते. भास्करराय या आचार्यांनी आपल्या ग्रंथातून समयाचारातील गूढ तत्त्वांची सविस्तर चर्चा केली आहे. समयाचार हा एक यौगिक आचार आहे. त्यात हृदयाकाशात चक्राची भावना करून त्याची पूजा करायची असते. या आचारात मूलाधारचक्रामध्ये सुप्त असलेल्या कुंडलिनीला जागृत करून सहस्रारचक्रात विराजमान असलेल्या शिवाशी संयुक्त करायचे असते.

त्रिपुरासिद्धान्त – शाक्त पंथाच्या समयाचारात त्रिपुरासुंदरीची उपासना विहित आहे. शाक्त मतात शिव हा पराशक्तीपासून उत्पन्न होऊन जगताचे उन्मीलन करतो. प्रत्यभिज्ञादर्शनात ज्यांना शिव-शक्ती म्हटले, त्यांनाच त्रिपुरामतात कामेश्वर-कामेश्वरी म्हटले आहे. या दोघांचे सामरस्य म्हणजे त्रिपुरा किंवा त्रिपुरसुंदरी होय. ती सकलाधिष्ठानरूप, सत्यरूप, सच्चिदानंदरूप, इ. आहे. तिलाच ललिता किंवा ललितांबिका असेही म्हणतात. अशा या त्रिपुरसुंदरीची मातृरूपात आराधना करणे, हे समयाचारातले मुख्य तत्त्व आहे. शंकराचार्य हे याच त्रिपुरेचे किंवा ललितेचे उपासक होते. त्यांनी आपल्या सौंदर्यलहरीत तिचे काव्यमय वर्णन केले आहे.

त्रिपुरेची उपासना चंद्ररूपात करतात. चंद्राच्या सोळा कला असून, त्या नित्य आहेत. म्हणून त्रिपुरेला तिच्या सामूहिक रूपात नित्याषोडशिका म्हणतात. सोळाव्या कलेला उदयास्त नसल्यामुळे तिचे नाव अमृता असे आहे. ही षोडशी किंवा त्रिपुरसुंदरी किंवा ललिता ही सौंदर्य व आनंद यांचे परमधाम आहे.

श्रीविद्या या नावानेही ती ओळखली जाते. श्रीविद्या ही पंचप्रेतासनावर विराजमान आहे. ब्रह्मा, विष्णू, रुद्र, ईश्वर व सदाशिव हे पंच प्रेत होत. पहिले चौघे हे प्रेतासनाचे पाय व सदाशिव त्यावरील फळी होय. श्रीविद्येला पंचकामेश्वरी असेही म्हणतात. तिच्या हाती पाश, अंकुश, इक्षुधनू आणि पंचबाण

आहेत. श्रीविद्येचे बारा उपासक प्रसिद्ध आहेत, त्यांची नावे अशी– मनू, चंद्र, कुबेर, लोपामुद्रा, मदन, अगस्ती, अग्नी, सूर्य, इंद्र, स्कंद, शिव आणि दुर्वास. श्रीविद्येच्या उपासकांपुढे ती सदैव सोळा वर्षांची असते.

यौगिक परिभाषेत बोलायचे तर इडा, पिंगला, सुषुम्ना या तीन नाड्या म्हणजेच त्रिपुरा होय, असे गौडपादांनी सांगितले आहे. तिची उपासना योगमार्गाने करायची असते. त्या उपासनेला अंतर्याग असे म्हणतात. ती साक्षात अध्यात्मसाधनाच असते.

**श्रीयंत्र** – हे शाक्त साधकांचे उपास्य प्रतीक होय. त्याला सर्व देवतांचे शरीर व त्यातल्या मंत्रांना त्या देवतांचा आत्मा मानतात. पिंडी ते ब्रह्मांडी असा शाक्तांचा सिद्धान्त आहे. सर्व विश्व हे जसे परमेश्वररूप आहे, तसेच साधकाचे शरीरही विश्वाची छोटी प्रतिकृतीच असल्यामुळे तेही परमेश्वरस्वरूपच आहे. हा सिद्धान्त अनुभवाने बाणवून घेण्यासाठी समयाचारी श्रीयंत्राशी तादात्म्य पावण्याची साधना करतात. श्रीयंत्र हे त्रिपुरसुंदरीचे प्रतीकच मानले जाते. (श्रीयंत्र पाहा.)

शक्तीच्या उपासनेसाठी अनेक आगम व तंत्रग्रंथ निर्माण झाले आहेत. दुर्गासप्तशती हा मार्कंडेयपुराणातला ग्रंथही त्याचसाठी निर्माण झाला असून, शाक्त उपासक त्याचे सुलटे, उलटे, सपल्लव, संपुट पद्धतीचे अशा अनेक प्रकारे पाठ करतात. विविध कामनांसाठी पाठाच्या पद्धतीही विविध आहेत.

**शाक्त तंत्रे** – यांची संख्या विपुल आहे. त्यांतली बरीचशी अद्यापि अप्रकाशित आहेत. किंवा ती मुद्दाम गुप्त ठेवलेली आहेत. प्रकाशित तंत्रांवरूनही शाक्तांच्या उदात्त सिद्धान्तांचा परिचय होतो.

भगवान शंकराच्या पाच मुखांपासून पाच आम्नाय निर्माण झाले. पूर्वाम्नाय, दक्षिणाम्नाय, पश्चिमाम्नाय, उत्तराम्नाय व ऊर्ध्वाम्नाय अशी त्यांची नावे होत. कुलार्णव तंत्राच्या तिसऱ्या उल्लासात त्यांचे विशद वर्णन आहे. पूर्वाम्नाय हा सृष्टिरूप असून, मंत्रयोग आहे. दक्षिणाम्नाय हा स्थितिरूप व भक्तियोग आहे. पश्चिमाम्नाय हा संहाररूप व कर्मयोग आहे. उत्तराम्नाय हा अनुग्रहरूप व ज्ञानयोग आहे. ऊर्ध्वाम्नाय हा दिव्यभावाशी संबद्ध आहे. ऊर्ध्वाम्नाय हा आपल्या मताचा आहे, असे कौलाचारी समजतात, तर समयाचारी तो आपल्या मताचा मानतात.

शाक्तांनी भारत व आशिया महाद्वीप एवढा भूप्रदेश तीन भागांत वाटला आहे. भारताचा उत्तर व पूर्व भाग म्हणजे विंध्यापासून चटगावपर्यंतची भूमी, हिला ते विष्णुक्रांता म्हणतात; उत्तर–पश्चिम भागाला रथक्रांता म्हणतात; यात तिबेटचाही अंतर्भाव होतो. विंध्यापासून दक्षिण समुद्रापर्यंतची भूमी ही अश्वक्रांता होय. या तीन क्रांतांमध्ये ६४ प्रकारची तंत्रे प्रचलित असल्याचे शाक्तांनी लिहून ठेवले आहे.

**तीन केंद्रे** – काश्मीर, कांची व कामाख्या ही शाक्त पंथाची तीन प्रमुख केंद्रे होत. पहिली दोन ही श्रीविद्येच्या उपासनेची केंद्रे होती. कामाख्या हे कौलमताचे फार मोठे केंद्र होते व आजही इथल्या शाक्तांच्या उपासनेवर अनार्य तिबेटी तंत्राचा विशेष प्रभाव आहे. कौलाचारी पंचमकारांचा वाच्यार्थाने उपयोग करू लागले, हा त्यांच्यावर पडलेला तिबेटी तंत्रप्रभाव होय, असे विद्वान मानतात.

शाक्तसाधना ही रहस्यसाधना आहे. ही रहस्ये गुरुमुखानेच जाणायची असतात. शाक्तमत हे सरहस्य जाणून घेतल्यास त्याची निंदानालस्ती करता येणार नाही. कारण ते एक प्रौढ गंभीर दर्शन आहे. वामाचारी लोकांचे साधनेच्या नावाखाली चालणारे विषयविलास व बीभत्स आचार ही शाक्तसाधनेची प्रकृती नसून विकृती आहे. वेदान्तमतात मायेच्या पलिकडे सृष्टीचे विवरण येत नाही. शाक्तमतात मात्र माया लोकाच्या वर महामायेच्या साम्राज्याचा प्रदेश असल्याचे सांगून त्याचे विवरण केले आहे. त्या साम्राज्यात बिंदू या उपादान कारणातून निर्मित अशा अनंत लोकांचे व जीवांचे अस्तित्व आहे. हा गुरुगम्य ठाव खऱ्या साधकालाच प्राप्त होऊ शकतो. शाक्त तंत्रांनी शक्तीचे जडत्व दूर करून तिचे वास्तविक चिद्रूप प्रकट केले आहे. त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य हे, की त्यांनी पूर्ण अद्वैताशी भक्तीचा मनोरम समन्वय घडवून आणला आहे.

**पाहा** – शक्तिदेवता, तंत्रशास्त्र श्रीयंत्र. [ शक्ती अँड शाक्त; भा. द.; ह. बा. भिडे – ऐ. सं. नि. ५; देवीकोश; कल्याण-शक्ति अंक; प्रसाद–शक्ति अंक, ऑगस्ट १९७१; हिं. सा. को. ]

## शाक्य

एक प्राचीन गण. या गणाचे राज्य प्रजातंत्र असून, त्याची राजधानी कपिलवस्तू होती. शाक्य हे इक्ष्वाकुकुलोत्पन्न क्षत्रिय होते. मनूने त्यांना व्रात्य क्षत्रिय म्हटले आहे (१०.४४). शाक्यांची उत्पत्ती कशी झाली व त्यांना शाक्य हे नाव का मिळाले, याविषयीची कथा अशी –

अंबट्ठ नावाचा राजा वाराणसी येथे राज्य करीत होता त्याच्या पहिल्या राणीला चार पुत्र व पाच मुली होत्या. नंतर त्या राजाने दुसरे लग्न केले. त्या राणीला पुत्र होताच तिने त्याच्यासाठी राज्य मागितले. राजाने तिची इच्छा मानली नाही; पण आपल्या पूर्वीच्या मुलांना नव्या राणीपासून काही धोका होऊ नये म्हणून त्याने त्यांना वनवासाला पाठवले. राजा म्हणाला. "तुम्ही वनात जा आणि मी मेल्यावर येऊन राज्याचा ताबा घ्या."

ती नऊ मुले वनवासाला निघाली. त्यांच्याबरोबर राज्या-

तले इतरही अनेक लोक निघाले. सगळे कपिल ऋषीच्या आश्रमाकडे गेले. ऋषीच्या सांगण्यावरून त्यांनी तिथले शाक (साल) वृक्षांचे जंगल साफ करून तिथे नगर वसवले. शाक वृक्षांवरून त्या राजपुत्रांना शाक्य हे नाव पडले. त्या वनात योग्य अशा मुली न मिळाल्यामुळे त्या चार राजपुत्रांनी आपल्या चार बहिणींशीच लग्ने केली. ज्येष्ठ कन्या पिया ही सर्वांची माता झाली. त्या मुलांच्यापासून जो वंश निर्माण झाला तो शाक्य वंश होय. गौतम बुद्ध याच वंशात जन्म पावला.

शाक्यांनी मोठे राज्य निर्माण केले. बिहारमधल्या बस्ती जिल्ह्याचा पूर्वोत्तर भाग, गोरखपूरचा पश्चिमोत्तर भाग आणि बिहारला लागून असलेला नेपाळचा काही भाग एवढा शाक्यांच्या राज्याचा विस्तार होता.

शाक्य लोक एकपत्नी असत. ते आपल्या मुली इतर गणांत देत नसत. तत्कालीन इतर गणांतल्या स्त्रियांपेक्षा शाक्य स्त्रियांना अधिक स्वातंत्र्य असे. त्या अध्ययन करीत व शास्त्रचर्चेत भाग घेत. शाक्यांनी कपिलवस्तूत शस्त्र व शास्त्र यांची विद्यालये स्थापन केली होती. त्यांच्यांतले ग्रामवृद्ध एका संथागारात बसून बहुमताने कायदे करीत व राज्य चालवीत. गावातले लोक ग्रामप्रमुखांची निवड करीत. शाक्य लोक धार्मिक, आतिथ्यशील व अहिंसावादी होते, असे युआन च्वांग म्हणतो. [ प्रा. भा. हिं. का. रामकथा; ट्रा. ए. इं. ]

## शाक्वरी व्रत

शक्वरी हा एक वैदिक छंद आहे. या व्रतात शक्वरी छंदातले मंत्र म्हणायचे असतात. प्राचीन काळी ब्रह्मचारी वेदाध्ययन समाप्त केल्यानंतर काही काळ शाक्वरी व्रताच्या आचरणासाठी आचार्याजवळ राहत असत. अध्ययनाच्या द्वारे जे काही त्यांना उपलब्ध झाले असेल, ते या व्रतकाळात ते संकल्पशक्तीच्या बळावर जीवनोपयोगी बनवीत.

प्रस्तुत व्रताच्या काळात महानाम्नी ऋचांचे पारायण करायचे असे. या ऋचा सामवेदात पूर्वार्चिकाच्या नंतर आणि उत्तरार्चिकाच्या प्रारंभी दिल्या आहेत. यांच्या गायनाला महानाम्नी साम म्हणत. त्या शक्वरी छंदात असल्यामुळे त्यांना शाक्वरी असेही म्हणत. या मंत्रांचा अर्थ असा –

" हे देवांमध्ये वलिष्ठ आणि मंहिष्ठ इंद्रा, तू पूर्वजांच्या शक्तींचा अधिपती आहेस. आम्ही आपल्या नवजागरणात त्या पूर्वज शक्तींचे पुनर्दर्शन करू इच्छितो.

म्हणूनच हे इंद्रा, आम्ही तुझ्या अपराजित तेजाला श्रद्धापूर्वक आवाहन करीत आहो. तुझी अबाधित गती आमच्या रथचक्रात निनादित होऊ दे.

हे शूरा, तू आमच्या समस्त रक्षणशक्तीने आमचे रक्षण कर. अभ्युदय व संरक्षण यांच्यासाठी आम्हांला तुझे सान्निध्य मिळू दे.

हे वसुपते, तू आम्हांला सर्व प्रकारांनी परिपूर्ण कर. कारण, जे सर्वार्थी समृद्ध असतात, त्यांचीच लोकव्यवहारात प्रशंसा होते. हे अद्वितीय मित्रा, तुझा विजय चिरंजीव होऊ दे."

प्राचीनकाळी वरील शाक्वरी मंत्रांचा महिमा गायत्री मंत्राच्या बरोबरीने मानला जात असे. गौतम व बौधायन या धर्मसूत्रांत या मंत्रांना परमपावन म्हटले आहे. ज्या काळी वैदिक शिक्षा हे जीवनाचे उच्च मूल्य आणि साध्य होते, त्या काळी माता आपल्या बालकांना स्तनपान करवीत असताना पुढील आशीर्वाद देत असत –

**शाक्वरीणां पुत्रका व्रतं पारयिष्णवो भवतेति।**
(गोभिलगृह्यसू. ३.२.७९)

अर्थ – हे पुत्रांनो, तुम्ही यथाविधि ब्रह्मचर्याश्रमाचे पालन करून विद्याध्ययन करा आणि अंती महानाम्नी सामापर्यंत उच्च शिक्षणात पारंगत व्हा.

शाक्वरी व्रत हे बलप्राप्तीचे व्रत आहे. इंद्राचे वज्र शक्वरी शक्तीनेच बनले आहे, म्हणून त्याला शाक्वर म्हटले आहे (तै. ब्रा. २.१.५.११). राष्ट्राची रक्षक शक्ती हे शक्वरीचेच सुंदर रूप आहे. जोवर शक्वरी मंत्रांचा आशय राष्ट्रामध्ये प्रत्येकाच्या जीवनात प्रस्फुरत असतो, तोवर ते राष्ट्र सुरक्षित राहते आणि सुखसमृद्धीचा उपभोग घेते. [ वासुदेवशरण अग्रवाल–ना. प्र. प. विक्रमांक पूर्वार्ध – १९४३ ]

## शाट्यायनी

एक आचार्य. एक गुरू म्हणून याचा निर्देश ब्राह्मणग्रंथांमध्ये अनेकवार आला आहे (श. ब्रा. ८.१.८.९; जै. उ. ब्रा. १.६.२). याचे खरे नाव शंग करं होते. शाट्याचा वंशज असल्यामुळे याला शाट्यायन किंवा शाट्यायनी असे म्हणू लागले. ज्वालायन हा याचा गुरू असल्याचे जै. उ. ब्रा. मध्ये म्हटले आहे; तर सामविधान ब्राह्मणात बादरायण हा त्याचा गुरू असल्याचे सांगितले आहे. शाट्यायन ब्राह्मण, शाट्यायन गृह्यसूत्र व जैमिनीय उपनिषद्ब्राह्मण हे ग्रंथ याच्या नावावर आहेत. पहिला सांप्रत उपलब्ध नाही. तिसरा ग्रंथ हा प्रथम इंद्राने ज्वालायनाला शिकवला व त्याने आपला शिष्य शाट्यायन याला पढविला आणि शाट्यायनाने आपला शिष्य राम क्रातुजातेय वैयाघ्रपद्य याला शिकविला, अशी ही गुरुपरंपरा आहे. त्या सर्व आचार्यांपैकी शाट्यायनीमुळे या ग्रंथाला विशेष प्रतिष्ठा प्राप्त झाली.

याच्या शिष्यपरंपरेचा उल्लेख शाट्यायन ब्राह्मणात व अनेक सूत्रग्रंथांत आढळतो. [ प्रा. च. को. ]

**शाड नाँगक्रेम** खासी लोकांचा एक लोकप्रिय धार्मिक उत्सव. प्रतिवर्षी मे किंवा जून महिन्यात सिएम् राजा हा उत्सव घडवून आणतो.

उत्सवाचा दिवस दवंडी देऊन जाहीर केला जातो. प्रमुख पुरोहिताच्या हस्ते त्याची सुरुवात होते. तो पहिल्या दिवशी, मानवाच्या कल्याणासाठी साएमच्या मोठ्या बहिणीने दिलेली दारू एका कमंडलूत भरून, देवांना अर्पण करतो. दुसऱ्या दिवशी मृतात्मे आणि खासी धर्मांचा संस्थापक यांच्यासाठी कमंडलूत दारू भरून ठेवण्याचा विधी होतो. यानंतर थोडा वेळ पवित्र स्तंभासमोर नृत्य होते. नंतरच्या दोन दिवसांत बलिदान करतात. अखेरच्या दिवशी साएमचे भाऊबंद स्तंभासमोर नृत्य करून मग मैदानात येतात. इथे आभाराच्या सार्वजनिक नृत्याचा कार्यक्रम होतो. या नृत्यात अविवाहित मुली आणि पुरुष भाग घेतात. नाचाला ढोलाची साथ असते. मुलींचा पोषाख उंची व भरजरी असतो. त्या पायघोळ झगा वापरतात. गळ्यात जाडजूड हार आणि डोक्यावर रानफुलांचा मुकुट घालतात. त्या आपले केस गाठ मारून मानेवर सोडतात. सदरा, जाकीट व धोतर हा पुरुषांचा पेहराव असतो. त्यांच्या डोक्यावर तुरे खोचलेल्या पगड्या असतात. खासींच्या या नृत्यात फारशी शास्त्रीयता नसते; पण मोहकता मात्र खास असते. थोडा वेळ हे नृत्य झाले, की मग देवाची प्रार्थना होते. प्रार्थनेच्या वेळी राजा आपल्या डोक्यावरची पगडी काढून प्रजा सुखी व्हावी म्हणून देवाची प्रार्थना करतो. [ फे. फे. आ. ]

**शातातप** एक स्मृतिकार. हा एक प्रमुख धर्मशास्त्री आहे, असे याज्ञवल्क्य आणि पाराशर यांनी म्हटले आहे. याचा स्मृतिग्रंथ गद्य-पद्यात्मक आहे. या स्मृतीत सहा अध्याय आणि सुमारे २३१ श्लोक आहेत. तिच्यात आलेले विषय असे—विशिष्ट रोग विशिष्ट पापामुळे होतात असे वर्णन; भूमी, गाय, इत्यादींची दाने; ब्राह्मणप्रशंसा; गो-ब्राह्मणांचा वध, मद्यपान, व्यभिचार, चोरी, इ. पापांबद्दल प्रायश्चित्ते; अपघाताने मरण आलेल्या माणसांची अंत्यक्रिया इत्यादी.

विश्वरूप, हरदत्त आणि अपरार्क यांनी शातातपाचे प्रायश्चित्तविषयक गद्य उतारे दिले आहेत. आचार आणि श्राद्ध या विषयांचे पुष्कळ श्लोक मिताक्षरा, स्मृतिचंद्रिका, इ. ग्रंथांत घेतलेले आहेत.

शातातपाच्या अशा आणखी काही स्मृती आहेत. त्यांपैकी एका स्मृतीत १२ अध्याय असून, तिच्यात प्रायश्चित्ते, विवाह, वैश्वदेव, श्राद्ध, पितृतर्पण, भोजन, आशौच, इ. विषय आहेत. आणखी एका स्मृतीत १३९ श्लोक असून, तिच्यात महापातके व उपपातके यांचा विचार केलेला आहे. आणखी दोन वृद्धशातातपस्मृती नावाचेही ग्रंथ आहेत. हेमाद्रीने वृद्ध शातातपाचा उल्लेख भाष्यकार असा केला आहे. [ हि. ध.; हिंदुत्व ]

**शाप** ज्याने कोणी खोडी काढली असेल, निष्कारण त्रास दिला असेल किंवा अपकृत्य केले असेल, अशा माणसाचा नाश व्हावा किंवा त्याला शिक्षा मिळावी या भावनेने उच्चारलेले वाईट शब्द म्हणजे शाप होय. शाप देण्याची पद्धत जगात सर्वत्र आढळते. भारतात वेदकाळापासून ही चाल दिसते. एखाद्या जीवघेण्या द्रव्याप्रमाणे शापाचा माणसावर वाईट परिणाम होतो, अशी समजूत होती. त्यामुळे वैदिक आर्यांनी शापाचा निषेध केला आहे. आम्हांला सकारण अथवा निष्कारण शाप देणारा वीज पडलेल्या वृक्षाप्रमाणे जळून जावो, अशी प्रार्थना अथर्ववेदात आढळते (७.५९). या वेदात अन्यत्र असे म्हटले आहे, की शाप देणाऱ्या अभिचारकर्त्याला आम्ही मृत्यूच्या स्वाधीन करतो (६.३७.३).

शापाचा परिणाम शाप भोगणाऱ्यांच्या वंशजांवरही होतो. म्हणूनही त्याचा निषेध केला गेला असावा. विश्वामित्राने आपल्या काही मुलांना अशी आज्ञा केली होती, की 'तुम्ही शुनःशेपाला आपला मोठा भाऊ माना.' पण पित्याची ही आज्ञा मुलांनी मानली नाही. त्यामुळे विश्वामित्राने संतापून त्यांना शाप दिला, की 'तुमची संतती चांडाळाहून हलक्या जातीत गणली जाईल' (ऐ. ब्रा. ७.३.६). याचे आणखी एक उत्तम उदाहरण महाभारताच्या शल्यपर्वात आढळते. पशुधनाच्या लोभात पडून त्रिताचे दोघे धाकटे भाऊ, विहिरीत पडलेल्या त्रिताला बाहेर न काढता तसेच पुढे निघून गेले. त्यामुळे त्रिताने त्यांना शाप देऊन म्हटले, की 'तुम्ही दाढी असलेले मेंढे बनाल आणि तुमची संतती वानरादी पशू बनेल.' (म. भा. शल्य. ३६)

शापप्रभाव औषधीने किंवा मंत्राने नष्ट करता येतो, अशी वैदिक धारणा होती (अथर्व. २.७,१०). त्या सामर्थ्यावरच शापकर्त्यांचे शाप आले तसे परत जावोत, अशा प्रार्थनाही आढळतात (अथर्व. ५.१४). पुढील मंत्रात तसा स्पष्ट उल्लेख आहे—

शप्तारमेतु शपथो यः सुहार्त्तेन नः सह ।
चक्षुर्मन्त्रस्य दुर्हार्दः पृष्टीरपि शृणीमसि ॥
(अथर्व. २.७.५)

अर्थ – शाप देणाऱ्यांचे शाप त्यांच्यावरच उलटून आमच्या शत्रूंचा आणि त्यांच्या शरीरांचा नाश होवो. अभिचारप्रवण शत्रूंच्या शिव्या–शापांपासून आमचे बांधव सुखी होवोत.

अथर्ववेदातील प्रस्तुतचे सूक्त हे शापमोचन सूक्त या नावानेच प्रसिद्ध आहे. कौशिकसूत्रकारांच्या मते शिव्या, शाप, दृष्टि-

दोष, इ. अभिचारांच्या निवारणप्रसंगी तोडगा म्हणून दूर्वांचा ताईत अंगावर बांधावा व तसे करताना हे सूक्त म्हणावे. यावरून शाप उलटविण्याची पद्धतही फार प्राचीन आहे, असे दिसते. म्हणजे शाप हा एक अभिचारप्रकार असून, तो उलटविणे म्हणजे प्रत्यभिचार होय, असा त्याचा अर्थ होतो. या प्रत्यभिचाराचे महाभारतातील एक उदाहरण असे—जयद्रथाचा बाप वृद्धक्षत्र याने असा शाप दिला होता, की 'जो माझ्या मुलाचे मस्तक जमिनीवर पाडील, त्याच्या डोक्याच्या ठिकऱ्या उडतील.' अर्जुनाने जयद्रथाचे मस्तक उडवून त्याच्या पित्याच्याच मांडीवर पाडले. त्या वेळी वृद्धक्षत्र जप करीत होता. जप संपवून तो उठला, तेव्हा मुलाचे मस्तक त्याच्या मांडीवरून भूमीवर पडले आणि वृद्धक्षत्राच्या डोक्याचे तुकडे झाले (म. भा. द्रोण. १४६). म्हणजे इथे शाप देणाऱ्यावरच शाप उलटवला गेला.

शापोच्चार करताना इच्छाशक्तीबरोबर कधी कधी माध्यम म्हणून जल, अन्न किंवा अन्य काही वस्तू यांचा वापर करतात. माध्यमाच्या द्वारे ईश्वरी शक्तीला विध्वंस करण्याचे आवाहन करणे, असा याचा अर्थ होतो. अशा प्रसंगी केलेल्या प्रार्थनांनाही मंत्रसामर्थ्य प्राप्त होत असते. हातात पाणी घेऊन शापोच्चार करण्याची प्रथा प्राचीन आहे. शत्रुनाशासाठी मंत्राच्या साह्याने पाण्यात वज्रसामर्थ्य निर्माण करून ते वज्र शत्रूवर सोडणे, असा अर्थ यातून ध्वनित होतो (अथर्व. १०.५). सूर्याला उद्देशून अर्घ्य दिले असता, शत्रुनाशाचे ईप्सित पुरे होते, असा उल्लेख तैत्तिरीय संहितेत आढळतो (६.४).

ऋग्वेदातील शाप या शब्दाचा अर्थ सायणाचार्यांनी जल असा केला आहे (१०.२८.४). तेव्हा शापासाठी जल हे फार प्रभावी माध्यम ठरले होते, असे म्हणता येईल.

**अभिचारात्मक शाप आणि धार्मिक शाप** — जादूविद्येवरील अंधश्रद्धेने दिलेला शाप आणि धार्मिक प्रवृत्तीने दिलेला शाप यांच्या सीमारेषा जीवनाच्या प्राथमिक अवस्थेत फार अस्पष्ट होत्या. पण मानवी मन जसजसे सुसंस्कृत बनू लागले आणि त्यात सामाजिक जाणिवेचा अंकुर दिसू लागला तसतसे या दोन प्रवृत्तींच्या शापातील अंतर स्पष्ट होऊ लागले. आर्ष महाकाव्यांच्या काळात धार्मिक शापाचे स्वरूप फारच प्रगल्भ झालेले दिसते. अशा प्रकारचे शाप देण्यासाठी फार मोठ्या तपाची आवश्यकता असते. कृष्णाला शाप देताना गांधारी म्हणते, की 'मी आजवर केलेल्या दुर्लभ तपाच्या आधारानेच तुला शाप देते' (म. भा. स्त्री. २५). अनुगीता सांगताना कृष्णाने हाच आशय व्यक्त केला आहे (म. भा. आश्व. ५१). शांडिलीने गरुडाला सांगितले आहे, की 'मी अशुभ कार्यापासून दूर राहते व सदाचाराचे पालन करते, त्यामुळे मला शाप देण्याची सिद्धी प्राप्त झाली आहे' (म. भा. उद्योग. ११३). शास्त्रमर्यादा सांभाळण्याने आणि धर्माच्या आज्ञेनुसार वागण्याने शाप देण्याचे सामर्थ्य अंगी येते, असे युधिष्ठिराचेही मत आहे (म. भा. उद्योग. ३१).

शाप ही जशी विनाशक तशीच संरक्षक शक्तीही आहे. ही संरक्षक शक्ती प्राप्त होण्याची मूळ कारणे स्पष्ट करताना सावित्री म्हणते, की 'जर मी तपस्या केली असेल, दान दिले असेल, होमहवन केले असेल, तर माझ्या सासू-सासऱ्यांना ही रात्र शुभकारक होवो' (म. भा. वन. २९७). पातिव्रत्याच्या सामर्थ्याने मुखातून काढलेले शब्द खरे ठरतात, असे धर्मराज सुदर्शनाला सांगतो (म. भा. अनु. २). या सामर्थ्याच्या शक्तीनेच दमयंतीने व्याधाला जाळून टाकले होते (म. भा. वन. ६३). सत्याचरणाने ही शक्ती वाणीत अवतरते, असे पतंजलीचेही मत आहे. या शक्तीच्या आधारे जसा शाप देता येतो, तशी शापापासून मुक्तताही मिळविता येते. दल राजाच्या पत्नीने दलाला या शक्तीच्या आधारेच वामदेवाच्या शापातून मुक्त केले होते (म. भा. वन. १९२). शांडिलीने सुपर्णाला शाप दिला होता आणि त्यापासून मुक्तही केले होते.

**शापाची कारणे** — शाप देण्याचे सामर्थ्य अंगी आल्यावर, ते स्थूलमानाने कोणत्या कारणासाठी वापरायचे याचे काही संकेत ठरलेले होते, असे दिसते. सामान्यतः धर्माचा लोप होऊ नये, अधर्माचे नियमन व्हावे व समाजस्वास्थ्याला ढळ पोचू नये, हे प्रमुख हेतू शाप देण्यामागे असावे, असे दिसते. कुंभकर्ण लोकविनाशासाठी निर्माण झाला म्हणून ब्रह्मदेवाने त्याला शाप दिला, असे बिभीषणाने रामाला सांगितले आहे (वा. रा. युद्ध. ६१). कर्णाला शाप देणारा विजय ब्राह्मण कर्णाला म्हणतो, की 'असत्य भाषण प्रजेच्या नाशाला कारणीभूत होते, म्हणून धर्मरक्षणासाठी मी खोटे बोलणार नाही' (म. भा. द्रोण. ४२). कर्णासंबंधीची खरी माहिती युद्धापूर्वीच सांगितली असती, तर युद्धात झालेली भीषण हत्या टाळता आली असती. या जाणिवेनेच युधिष्ठिराने कुंतीला उद्देशून समस्त स्त्रीजातीलाच शाप दिला (म. भा. स्त्री. २७). यावरून शाप देण्यामागचा उद्देश ध्यानी येतो. समाजस्वास्थ्याला तडे जाऊन जीवन उद्ध्वस्त होऊ नये, म्हणून ज्या कारणांसाठी शाप दिले गेले आहेत, त्यांतील काही प्रमुख कारणे पुढील प्रमाणे आहेत—

(१) परस्त्रीची अभिलाषा अथवा व्यभिचार—इंद्राने गौतमपत्नी अहल्येचा उपभोग घेतला म्हणून त्याला गौतमाने शापून विफलवीर्य केले होते (वा. रा. बाल. १). आपली सखी रंभा हिला रावणाने भ्रष्ट केले, म्हणून नलकूबरांनी त्याला शाप देऊन म्हटले, की इच्छा नसलेल्या स्त्रीवर तो बलात्कार करू लागला, तर त्याच्या मस्तकाचे सात तुकडे उडतील (वा. रा.

उत्तर. २६). ब्रह्मदेवाकडे निघालेल्या पुंजिकस्थला या अप्सरेचा रावणाने असाच उपभोग घेतला, म्हणून ब्रह्मदेवानेही त्याला असाच शाप दिला होता (वा. रा. युद्ध. १३). महाभारतात तर याची अनेक उदाहरणे आहेत. इंद्रपदावर आरूढ झालेल्या नहुषाला ज्या अनेक कारणांनी शाप मिळाला होता, त्यांत त्याने इंद्रपत्नी शचीची अभिलाषा धरली होती, हे एक प्रमुख कारण आहे (म. भा. उद्योग. १०–१७). दमयंतीने याच कारणासाठी व्याधाला जाळून टाकले (म. भा. वन. ६३). त्याचप्रमाणे एखादी स्त्री जर स्वैरपणे वागू लागली, तर तिलाही शिक्षा मिळाल्याशिवाय राहत नसे. मंडूकराजाची मुलगी सुशोभना हिने अनेक राजांना फसविले, म्हणून प्रत्यक्ष तिच्या पित्यानेच तिला शाप देऊन म्हटले, की 'तुझी संतती ब्राह्मणद्रोही होईल.' (म. भा. वन. १९२). यावरून अपत्यप्रेमापेक्षाही सदाचाराला अधिक प्राधान्य दिले जात होते, असे दिसते.

(२) धर्ममान्य कामाचा अव्हेर – परस्त्रीसंग हे जसे निंद्य आणि धर्मबाह्य वर्तन आहे, तसेच धर्ममान्य कामपुरुषार्थाचा अव्हेर करणे किंवा त्यात विघ्न आणणे हेही निंद्यच होय. संगमोत्सुक क्रौंच जोडप्यापैकी नराला निषादाने ठार केले, म्हणून वाल्मीकीने त्याला दिलेला 'मा निषाद' हा शाप फार प्रसिद्ध आहे (वा. रा. बाल. १). मृगरूपधारी ऋषी व त्याची पत्नी हे कामक्रीडेत मग्न असता पंडू राजाने ऋषीचा वध केला. त्यामुळे ऋषीने त्याला शाप देऊन म्हटले, की 'कामरसाचा आस्वाद घेण्यापूर्वीच तू मरशील' (म. भा. आदि. ९५). उर्वशीने आपणहून दर्शविलेली कामेच्छा अर्जुनाने डावलली म्हणून त्याच्यावर तिच्या शापाने एक वर्ष नपुंसक बनण्याचा प्रसंग ओढवला (म. भा. वन.४६). दक्षाने अनेकवार सांगूनही चंद्राने आपल्या सर्व स्त्रियांबरोबर समान व्यवहार ठेवला नाही, म्हणून दक्षाने त्याला शाप दिला होता (म. भा. शल्य. ३५).

(३) परधनाचा लोभ – वसिष्ठाच्या नंदिनी नामक गायीचा अष्टवसूंनी अपहार केला, त्यामुळे ते देव असूनही त्यांना वसिष्ठाच्या शापामुळे मनुष्ययोनीत जन्म घ्यावा लागला (म. भा. आदि. ९९). विभावसू व सुप्रतीक या दोन महर्षींनी धनलोभामुळेच परस्परांना शाप दिले. परिणामतः सुप्रतीक हत्ती झाला आणि विभावसू कासव बनला (म. भा. आदि. २९). परीक्षिताच्या मुलाने वामदेवऋषीचे घोडे, परतीच्या अटीवर आणूनही, परत केले नाहीत, म्हणून तो शापामुळे राक्षसांकडून मारला गेला (म. भा. वन. १९२).

(४) गुरुवंचना – कर्णाने परशुरामाला आपण ब्राह्मण असल्याचे खोटेच सांगून त्याच्याकडून अस्त्रविद्या प्राप्त केली. पण हे रहस्य उघडकीला आल्यावर कर्ण गुरूच्या शापाला बळी पडल्याची कथा आहे (म. भा. शल्य. ४२).

(५) वडीलधाऱ्या मंडळींची अवज्ञा – हेही एक शापकारण असल्याचे दिसून येते. कहोडाची पत्नी गर्भवती असताना, गर्भस्थ बालकाने पित्याला म्हटले, की 'तुमचे वेदोच्चारण अशुद्ध आहे.' त्यावर कहोड संतापून बोलला की 'तू गर्भात असतानाच अशी अमर्यादा करतो आहेस, तेव्हा तुझे शरीर आठ ठिकाणी वाकडे होईल'(म.भा. वन.१३२). कुबेर रावणाला म्हणाला की 'मी तुझा मोठा भाऊ असूनही तू माझा अपमान केलास म्हणून तुझा लवकरच नाश होईल. शिवाय माझ्याकडून हिसकावून घेतलेले विमान तुला उपयोगी न पडता, तुला जो ठार करील त्याच्या उपयोगी पडेल' (म. भा. वन. २७५).

(६) तपात विघ्न आणणे – ऋषीमुनींच्या तपात विघ्न आणण्याचा प्रयत्न करणाऱ्याला शापाची जबर शिक्षा मिळत असे. विश्वामित्राच्या तपात विघ्न आणणाऱ्या रंभेला दहा हजार वर्षे शिळा होऊन पडावे लागले (वा. रा. बाल. ६४). कुबेरसखी वर्गा आणि तिच्या चार मैत्रिणी याच कारणामुळे जलग्रह बनल्या (म. भा. आदि. २१५).

उःशाप – आचार हा धर्माचा कणा आहे. जो सदाचारापासून ढळतो, त्याला शाप मिळतो, असा हा रोखठोक व्यवहार आहे. तरीही शापामागे समाजाच्या भल्याची जाणीव होती, म्हणूनच शाप देणाऱ्या व्यक्ती उःशापही देत असत. शापमुक्तीचा क्षण व मार्गही सांगितला जात असे. शापप्रभाव कमी करण्याचाच हा एक मार्ग आहे. चंद्राने अनेक यज्ञयाग केले, पण तो दक्षाच्या शापातून मुक्त होऊ शकला नाही. शापप्रभावाने तो क्षयी झाला. त्यामुळे औषधी–वनस्पतींची वाढ खुंटून त्या रसहीन बनू लागल्या. त्याचा परिणाम म्हणून प्रजा नष्ट होण्याच्या बेताला आली. हा भयानक प्रसंग पाहून जगाच्या कल्याणासाठी सर्व देव प्रजापतीला शरण गेले आणि मग काही अटीवर चंद्र शापमुक्त झाला (म. भा. शल्य. ३५). असेच आणखी एक उदाहरण सरस्वती नदीचे सांगता येते. ही नदी विश्वामित्राच्या शापाने रक्तवाहिनी बनली. तिच्या काठावर राक्षसांनी वस्ती केली. त्यामुळे अनेकांच्या तीर्थयात्रेत बाधा उत्पन्न होऊ लागली. हे पाहून अनेक ब्राह्मणांनी शिवाची आराधना केली आणि सरस्वतीला शापमुक्त केले (म. भा. शल्य. ४३). या धार्मिक प्रवृत्तीमुळेच शरण आलेल्या व्यक्तीला शाप दिला जात नसे. कली नलाला शरण आला म्हणूनच नलाने त्याला शाप दिला नाही (म. भा. वन. ७२). याशिवाय शापप्रभाव कमी व्हावा म्हणून काही धार्मिक विधी केल्याचे उल्लेख महाभारतात आढळतात (आदि. ३).

**ब्राह्मणांविषयी अपवाद** – प्राचीन समाजरचनेत ब्राह्मणांना

फार महत्त्वाचे स्थान होते. त्यांना भूदेव मानण्याकडे प्रवृत्ती होती. त्यामुळे त्यांना सहसा शाप देऊ नये, असा संकेत दिसून येतो. अग्नीच्या अंगी शाप देण्याची शक्ती असतानाही त्याने भृगूला शाप दिला नाही, याचे एकमेव कारण, तो ब्राह्मण होता हे होय (म. भा. आदि. ७.५). पण याला काही अपवाद आढळतात. अश्वत्थाम्याने उत्तरेच्या गर्भातील बालकावर अस्त्र सोडून पांडवांचा वंशवेल खुडून टाकण्याचा घोर अपराध केला. म्हणून कृष्णाने अत्यंत संतापाने त्याला शाप देताना म्हटले, की सर्व मनीषी लोक तुला भित्रा, पापी, वारंवार पापकर्म करणारा आणि बालघातकी समजतील. म्हणून तू पापकृत्याचा वाटेकरी हो. आजपासून तीन सहस्र वर्षे तू पृथ्वीवर भटकशील. तुला कधीही दुसऱ्या माणसाशी चर्चेचे सुख मिळू शकणार नाही. तू एकाकीच निर्जन जागी भटकत राहशील. हे नीचा ! तू जनसमूहात थांबू शकणार नाहीस. तुझ्या शरीरातून पू व रक्त वाहात राहून त्याची दुर्गंधी सर्वत्र पसरेल. त्यामुळे तुला वनाचा आश्रय घ्यावा लागेल. हे पाप्या ! तू सर्व रोगांनी ग्रासला जाऊन इतस्ततः भटकशील (म. भा. सौप्तिक. १६).

**ब्राह्मणदत्त शाप** – ज्ञान हेच ब्राह्मणांचे धन असते. ते आपल्या तपोबलाने अदेवांनाही देव बनवू शकतात किंवा रागाने देवांचे देवपण नष्टही करू शकतात. अगस्त्य या ब्राह्मणाच्या शापामुळेच समुद्राचे पाणी खारट बनले, असे महाभारतकारांचे म्हणणे आहे. त्यांचा शाप सुख-दुःख द्यायला समर्थ असतो व त्यांच्या तपाचे फळ तत्काल प्रकट होते, असे भीष्माने युधिष्ठिराला सांगितले आहे. त्यामुळे जर ब्राह्मणाने शाप दिला तर तो फार भयंकर असतो, असा समज रूढ झाला. वेदकाळापासूनच लोक ब्राह्मणाच्या शापाला भीत (अथर्व. २. ७). महाभारतात तर या शापाला ब्रह्मविष असे म्हटले असून (विराट. ६८), त्यावर जगात वैद्य भेटत नाही, असा निर्वाळा दिला आहे. ' माझ्या शापाला कोण भीत नाही ' असा प्रश्न स्वतः भृगूनेच आपल्या पत्नीला विचारला आहे (म. भा. आदि. ६. ११). विष्णूला मनुष्यलोकात जन्म घ्यावा लागून भार्यावियोगाचे दुःख भोगावे लागणे (वा. रा. उत्तर. ५१), इंद्राने हतवीर्य बनणे, नहुषाचे स्वर्गपतन, कर्णाला ऐन मृत्यूच्या वेळी अस्त्राचा विसर पडणे किंवा त्याच्या रथाचे चाक भूमीत रुतणे, ही सारी ब्राह्मणदत्त शापाचीच उदाहरणे आहेत. भारतीय युद्धाच्या मुळाशी मैत्रेयाचा शापच आहे. ब्राह्मणाचा शाप कोणी रोधू म्हटले, तर तो रोधला जात नाही. ब्रह्मदेवाकडून अभयदान घेतलेल्या खली दैत्यालाही वसिष्ठाच्या शापाने जळून जावे लागले (म. भा. अनु. १५५).

**शापाचे अन्य अधिकारी** – ब्राह्मतेजाला क्षात्रतेजापेक्षा अधिक महत्त्व होते. द्रोणाचार्य ही या उभय तेजांची मूर्ती होती. असे असले तरीही ब्राह्मणाहून अन्य वर्णाचे श्रेष्ठ लोकही शाप देत असत. कृष्णाने अश्वत्थाम्याला आणि युधिष्ठिराने कुंतीला शाप दिलेला आहे. यक्षराज कुबेरानेही स्थूणाकर्ण यक्षाला शाप दिला आहे (म. भा. उद्योग. १९२). गांधारी, दमयंती, इ. स्त्रियांचे शाप प्रसिद्ध आहेत.

इच्छित वस्तू मिळाली नाही, तर ब्राह्मणाने शाप देणे हा ब्राह्मणधर्म नाही, असे वृषदर्भ राजाने एका ब्राह्मणाला सांगितले आहे (म. भा. वन. १९६). शिवाय क्रोधवशात चटकन शाप देऊ नये; कारण त्यामुळे तपस्या क्षीण होते, असे सर्वसामान्य मत आहे. कृष्णाला शाप द्यायला निघालेल्या उत्तंक मुनीला कृष्णाने सांगितले, की ' माझा तिरस्कार करून अथवा मला शाप देऊन तू तुझे तप नष्ट करू नकोस ' (म. भा. आश्व. ५४). अगस्त्य मुनीनेही हाच विचार देवांना सांगितला आहे (म. भा. अनु. १५५). याशिवाय चुकीच्या किंवा क्षुद्र कारणांसाठी शाप दिला गेला, तर त्याचा प्रभाव पडत नसल्याचीही काही उदाहरणे आहेत. पौष्य राजा व उत्तंकमुनी यांनी परस्परांना दिलेले शाप (म. भा. आदि. ३), किंवा देवयानीने कचाला आणि कचाने देवयानीला दिलेला शाप हे त्या प्रकारात मोडणारे आहेत (म. भा. आदि. ७७), एका तेजस्वी व्यक्तीचा शापप्रभाव दुसऱ्या तितक्याच तेजस्वी व्यक्तीवर पडू शकत नाही, असे ब्रह्मदेवाने म्हटल्याचे महाभारतकारांनी सांगितले आहे (अनु. ८५). पार्वती सर्व देवांना उद्देशून म्हणाली, की 'शिव माझ्यापासून पुत्रोत्पत्ती करू इच्छित असताना, तुम्ही त्यांना या कामापासून निवृत्त केले; त्यामुळे तुम्ही सर्वजण निपुत्रिक व्हाल' (म. भा. अनु. ८४). परंतु तिच्या या शापाचा परिणाम अग्नीवर झाला नाही. त्याने तारकासुराच्या नाशासाठी स्कंदाची उत्पत्ती केली. पण एकाच अर्थाचा शाप दोनदा दिला गेला किंवा उच्चारला गेला तर त्याचा प्रभाव फार मोठा असतो, असे दिसते. गांधारी कृष्णाला उद्देशून म्हणते, की ' तू जाणून बुजून कुरुकुलाच्या नाशाची उपेक्षा केलीस म्हणून, हे कृष्णा ! आजपासून छत्तिसाव्या वर्षी तुझे ज्ञातिबांधव, मंत्री आणि पुत्र आपसांत लढून मरतील. तू सर्वांच्या नजरेआड होऊन, अनाथाप्रमाणे वनात भटकशील आणि तुला निंदित उपायाने मरण येईल. या भरतवंशी स्त्रियांप्रमाणे तुझ्या कुलातील स्त्रियाही, पुत्र आणि इतर बांधव मारले गेल्यावर, त्यांच्या शवांवर पडतील. '

याच अर्थाचा दुसरा शाप यादवांना विश्वामित्र, कण्व, इ. ऋषींकडून मिळाला होता. या ऋषींची चेष्टा करण्यासाठी यादवांनी सांबाला स्त्रीवेष देऊन, त्यांना विचारले, की 'याला मुलगा किंवा मुलगी यांपैकी काय होईल ?' त्यावर मुनींनी

क्रोधाने म्हटले. 'सांब लोखंडी मुसळाला जन्म देईल आणि ते मुसळ यादवांच्या नाशाला कारणीभूत होईल. बलराम स्वतःच आपल्या शरीराचा त्याग करील आणि कृष्ण जरा नामक व्याधाकडून मारला जाईल.' या दोन एकार्थी शापांचा परिपाक म्हणून यादव कुळाचा भयानक संहार झाला (म. भा. मौसल. १). कल्माषपाद राजाला वसिष्ठपुत्र शक्तीकडून आणि एका ब्राह्मणाकडून असाच एकार्थी शाप मिळाला, म्हणून तो राजा नरभक्षक बनला होता (म. भा. आदि. १७५).

शापाचा परिणाम केव्हा व्हावा, हे शाप देणाऱ्याच्याच इच्छेवर अवलंबून असते. कधी तो निकटच्या भविष्यकालात घडतो, तर कधी अनेक वर्षांनी त्याचा प्रभाव दिसू लागतो. गांधारीने कृष्णाला दिलेला शाप छत्तीस वर्षांनंतर अंमलात यायचा होता. तसेच 'भीम तुझी महायुद्धात मांडी फोडील,' असा मैत्रेयाने दुर्योधनाला दिलेला शाप अनेक वर्षांनी खरा ठरणार होता. परंतु काही शाप मात्र तत्काल फलित होताना दिसतात. दमयंतीने व्याधाला दिलेला शाप किंवा अगस्त्याने नहुषाला दिलेला शाप, ही याची उदाहरणे आहेत. अभिचाराशी संबंधित असलेल्या शापाचे परिणाम मात्र सामान्यतः तत्काल भोगावे लागतात.

धार्मिक शापाला अभिचारात्मक शापापासून भिन्न करायचे असल्यास काही गोष्टी सूत्ररूपाने सांगता येतात, त्या अशा —

(१) धार्मिक शाप तप, सदाचार, शील यांमुळे प्रभावी ठरतो, तर अभिचारात्मक शाप माध्यमामुळे प्रभावी ठरतो.

(२) धार्मिक शापामागे शापित व्यक्ती सुधारावी अशी इच्छा असते, तर अभिचारात्मक शापाचा मुख्य उद्देश शत्रुनाश हा असतो.

(३) धार्मिक शाप सामाजिक जाणिवेतून उत्पन्न होत असल्याने, त्याचे साध्य भौतिक किंवा वैयक्तिक असत नाही. पण अभिचारात्मक शाप वैयक्तिक उद्दिष्टांच्या सिद्धीसाठी असतो.

शापाचे मूलस्वरूप आदिवासी संस्कृतीत आजही पाहायला मिळते. हे लोक एखाद्या माध्यमाच्या आधारे अतिमानवी शक्तीला आवाहन करूने शापोच्चार करतात. ज्याला शाप द्यायचा त्याची मेणाची अथवा अन्य वस्तूची प्रतीकमूर्ती करून तीवर प्रयोग करतात व तिला झोडपून काढतात. अर्थात त्याचा परिणाम अपेक्षित व्यक्तीवर होणार, असा त्यांचा दृढ विश्वास असतो. ही मूर्ती म्हणजे एखादा साधा दगड किंवा खांब यासारखी कोणतीही वस्तू असू शकते. कधीकधी शत्रूला कोणत्या तरी उपायाने स्पर्श करून शाप दिला जातो. त्याच्या दाराशी अथवा त्याच्या येण्याजाण्याच्या मार्गावर एखादा बळी देतात. बळीच्या रक्तावर शत्रूचा पाय पडला किंवा त्याची दृष्टी त्यावर पडली, तरी त्याला शाप बाधतो, असे म्हणतात.

शापासंबंधी स्थूलमानाने सांगितले जाणारे काही संकेत असे— मृत्युशय्येवर असलेल्या माता, पिता, गुरू, ब्राह्मण, जादूगार, इ. व्यक्तींचे शाप फार भयंकर असतात. श्रावणाच्या मृत्यूमुळे मरणासन्न झालेल्या, त्याच्या अंध पित्याने दशरथाला दिलेला शाप, हे याचे चांगले उदाहरण आहे (वा. रा. अयोध्या. ६४). असंतुष्ट अतिथीने दिलेला शाप वाईट असतो. कल्माषपाद राजाला एका ब्राह्मणाकडून मिळालेला शाप या प्रकारचा आहे (म. भा. आदि. १७५) छळल्या जाणाऱ्या गरीबांचे आणि आत्मक्लेश करून शाप देणाऱ्यांचे शाप याच वर्गात मोडणारे आहेत. सुथरिया जमातीचे लोक भिक्षेवर जगतात; पण त्यांना कुणी भिक्षा देण्याचे नाकारले, तर ते आपल्या अंगात सुया, दाभण टोचून किंवा डोक्यावर हातोड्याने जखमा करून शाप देतात. त्यामुळे ते सारे गाव शापदग्ध बनते, अशी सिंधी लोकांची धारणा आहे. या लोकांप्रमाणेच चारण लोकही आत्मक्लेश करून शाप देतात.

शाप व शपथ यांचे निकटचे संबंध आहेत. अनेक प्रसंगी शपथेतच शाप अंतर्भूत असतो. परंतु शपथेइतके शापाचे क्षेत्र व्यापक नसते. (शपथ पाहा)

प्राचीन समाजरचनेत शापाला फारच महत्त्वाचे स्थान होते. शाप म्हणजे एक प्रकारची धर्माधिष्ठित दंडशक्ती होय. ही शक्ती नसती, तर हा समाज काहीसा स्वैर व अनिर्बंध बनला असता. रावणाला शापाचे भय होते, म्हणूनच तो सीतेला तिच्या मनाविरुद्ध स्पर्श करू शकला नाही. अज्ञातवासाच्या काळात शापच अर्जुनाला उपयोगी पडला. अशा प्रकारचे शापाचे अनेक फायदे झाले असले, तरी त्याचे दुष्परिणामही बरेच झाले आहेत. मैत्रेयाच्या शापामुळे भारतीय युद्ध घडून भीषण हत्या झाली. गांधारीच्या व ऋषींच्या शापाने कृष्णासह सर्व यादववीरांचा संहार झाला. परंतु जीवनाचे तेज लोपून टाकणारा शाप वाङ्मयाच्या क्षेत्रात मात्र वररूप झालेला दिसतो. महाभारतातील बहुतेक सर्व महत्त्वाच्या घटनांची उभारणी शापावर आधारलेली आहे. कालिदासाचे मेघदूत, बाणभट्टाची कादंबरी ही शापवृक्षाचीच फळे आहेत. एकंदरीत अघोरी आचारांच्या साहाय्याने जीवनाचा ग्रास घेऊ पाहणाऱ्या यातुधानांचा हात सोडून शापाने समाजासाठी झिजणाऱ्या ऋषीमुनींचा हात धरला हेच त्याचे उन्नयन आणि हीच त्याची सांस्कृतिक वाटचाल आहे. [ एन्सा. रि, ए.; श. क.; रा. का. स.; म. भा. स. ]

**शापदोह** सिक्किम प्रदेशातील एक लोकप्रिय नृत्य. शाप म्हणजे चरण आणि दोह म्हणजे गती होय. या नाचात मुले व मुली भाग घेतात. त्यांचे फेर निरनिराळे अस-

तात. पण गाणी मात्र सामूहिक असतात. नृत्याची गती प्रारंभी मंद असून पुढे ती जलद होते. जलद गतीतच नृत्य समाप्त होते. नृत्याला लामा वाद्य-वृंदाची साथ असते.

नर्तकांची वेशभूषा रंगीबेरंगी व आकर्षक असते. पुरुष सर्व अंग झाकणारा रेशमी झगा घालून कमरेला एक रेशमीच पट्टा बांधतात. त्यांच्या डोक्यावर जरीची टोपी असते. मुली प्रथम केह नावाचे अर्ध्या बाह्यांचे वस्त्र घालून त्यावर झिरझिरीत, पूर्ण बाह्यांचा झगा घालतात. मुलींच्या डोक्यावर रुंद किनारीचा जरीचा टोप आणि गळ्यात विविध दागिने असतात.

वाद्य-वृंदातील लामांच्या डोक्यावर शंकूच्या आकाराची टोपी असते. [ भा. लो. नृ. ]

**शाबरमंत्र** एका विशिष्ट मंत्रसमूहाला हे नाव आहे. हे तंत्र-विद्येतले मंत्र आहेत. जगात माणसे नानाविध दुःखे भोगीत आहेत, हे पाहून शंकराला दया आली व त्याने हे दिव्य मंत्र उत्पन्न केले, अशी आख्यायिका तुलसीदासाने यांच्या संबंधात सांगितली आहे (रामचरितमानस २२.५–६). या मंत्रांची रचना अर्थशून्य असते. त्यांत अनेक भाषांतील शब्द येतात. त्यांचे सामर्थ्य अद्‌भुत असते. रोग व संकटे यांतून मुक्ती, मनोरथपूर्ती, इ. कार्ये शाबरमंत्राच्या प्रभावाने होतात.

नवनाथांच्या चरित्रांत त्यांना शाबरमंत्र सिद्ध असल्याच्या कथा आल्या असून, हे मंत्र त्यांनी मानवी कल्याणासाठी सिद्ध केले, असे म्हटले आहे.

नवनाथांपैकी प्रत्येक नाथाने अनेक कोटी मंत्र सिद्ध केले, असे उल्लेख येतात. अर्थात ही संख्या अतिरंजित मानायला हवी. बेंगॉल रॉयल एशियाटिक सोसायटीच्या बृहद्‌हस्त ग्रंथसूचीत अनेक शाबरमंत्रसंग्रहांची सूची आहे. दिव्यशाबरतंत्रम्, काली-शाबरम्, सिद्धशाबरतंत्रम्, इ. त्यांची नावे आहेत. या संग्रहांची रचना पीठ, खंड, पटल, अशा पद्धतीवर केलेली आहे. जरी शाबरमंत्र शंकरापासून निघाले अशी कथा असली, तरी त्यांचे संकलन व संस्करण गोरक्षनाथाने केले आहे. शाबरमंत्रांपैकी एका हनुमंतमंत्राचा नमुना असा –

**पल हनुमत् तुझे नरसीहा बुलाता : हनमंत बिर नरसिंग बिर :**
**झोटिंग बिर दाजकिरे बारा म्हशासुर : पंचविस मुंजे :**
**आग्या वेताल किलाट मेरी भगत गुरु की संगत फुरो**
**मंत्र ईश्वरी वाचा.**

ऐतिहासिक दृष्ट्या या मंत्राचा संबंध शबरिपा या चौऱ्या-यंशी सिद्धांपैकी एका सिद्धाकडे लावतात. डॉ. भट्टाचार्य यांच्या माहितीप्रमाणे शबरिपा हा शबर किंवा सवर या आदिवासी जमातीचा होता. ही जमात बिहार व ओडिसा या भागात आहे. शबरिपाला नागार्जुनाने तंत्रमार्गाची दीक्षा दिली असावी.

शबरिपा हा आदिवासींच्या मंत्रविद्येत निष्णात असावा. तंत्रमार्गात प्रवेश केल्यावर ते मंत्र त्याने महायानपंथाच्या वज्रयान या उपपंथात आणले व तेच शाबरमंत्र म्हणून प्रसिद्ध झाले. पुढे गोरक्षनाथाने त्यांचेच संस्करण व संकलन केले. पाहा – शबरिपा. [ डॉ. वि. वा. करंबेळकर – वि. सं. मं. वा. १९५१ ]

**शाबरोत्सव** एक लोकोत्सव. हा उत्सव प्राचीन असून, रावणवधाचा आनंद व्यक्त करण्यासाठी लोक दसऱ्याच्या दिवशी तो साजरा करीत. देवीची प्रसन्नता मिळवणे हाही या उत्सवामागचा एक हेतू असे. वर्षक्रियाकौमुदीत या उत्सवाचे विधान सांगितले आहे, ते असे –

शंख, ढोल, नगारे, इ. वाद्ये वाजवावी. माती, धूळ कालवून तो चिखल एकमेकांच्या अंगावर उडवावा. हास्यविनोद करावा. अश्लील घोषणा कराव्या. बीभत्स गाणी गावी. कामुक हाव-भाव करावे. अशा प्रकारे हा उत्सव साजरा करावा.

वर उल्लेखिलेल्या गोष्टी केल्या नाही, तर देवी क्रुद्ध होते आणि शाप देते, अशी समजूत आहे.

बृहद्धर्मपुराणात वरील गोष्टींशिवाय ब्राह्मणभोजन घालणे, घरातल्या स्त्रियांना वस्त्रालंकारादी देऊन खूष करणे, इ. गोष्टी अधिक सांगितल्या आहेत. या दिवशी देण्याघेण्याचे व्यवहार बंद ठेवावे आणि सार्वजनिक सुट्टी घ्यावी, असेही सांगितले आहे.

शबर ही पूर्व भारतातली एक आदिम जाती आहे. कोणताही सण-उत्सव साजरा करण्याची त्यांची पद्धत असंस्कृत अशी होती. त्यांच्याच पद्धतीने हा दिवस साजरा करायचा असल्याने त्याला शाबरोत्सव असे नाव मिळाले. महाराष्ट्रात अशा प्रकारचा उत्सव होलिकोत्सव या नावाने फाल्गुन वद्य प्रतिपदेच्या दिवशी केला जातो. [ ह. प्रा. लो. ]

**शामराज** (इ. स. चे १६ वे शतक) गोमंतकातील एक मराठी संतकवी. हा कौशिकगोत्री असून, केळशी गावचा रहिवासी होता. पंढरपूरनिवासी गोविंद हे त्याचे गुरु होत. त्याने भागवताच्या दशमस्कंधातील कंसवधापर्यंतच्या भागावर, एकोणीस अध्यायांची कृष्णचरित्रकथा रचली आहे.

कृष्णाच्या धाकाने भयभीत झालेल्या कंसाला अनेक अप-शकुन होऊ लागले. त्याच्या या दयनीय अवस्थेचे वर्णन कवीने पुढील शब्दांत रेखाटले आहे –

> **मग भयाते पातला। वुठोनी भीतरी गेला।**
> **मंचकीं पहुडला। थोरे रात्री ॥**
> **मग स्वप्नांमाजारी। देखे आपणेया आपण अमान्य करी।**

बैसवोनी गर्धभावरी । हिंडवीताती ।।
प्रेतासवें आळींगण । सर्वे गोष्टी करी जाण ।
ऐसें नीद्रेंत आपण । देखता होये ।।
गळां रक्तपुष्पांचे माळा । नग्न सर्वांगी केश मोकळां ।
शीर छेदीता होयें जवळां । पुरुष येंकु ।।

एकनाथी भागवतापूर्वीची ही टीका म्हणून हिला महत्त्व आहे. [ वि. सं. मं. वा., १९६७ ]

**शामळाजी** गुजरातमधील एक पुण्यक्षेत्र. हे ठिकाण भिलोडा गावाजवळ नदीकाठी आहे. शामळाजी हा दशा आणि निमा या वनियांचा कुलदेव आहे. पद्मपुराणात या क्षेत्राचा उल्लेख आहे. तिथे सोग्ग नारायण याचे दुसरे एक मंदिर असून, ते स्थापत्याच्या दृष्टीने प्रशंसनीय आहे. त्या प्रदेशातील हे सर्वात प्राचीन मंदिर असावे, असे संशोधक म्हणतात. इ. स. च्या बाराव्या व तेराव्या शतकांतील ईडरच्या परमार राजांनी हे मंदिर बांधले असण्याची शक्यता आहे. इथे एका भुयारात महादेवाचे मंदिर आहे. कार्तिक पौर्णिमेला इथे मोठी यात्रा भरते. [ वि. मु. रा. प. ]

**शारंगपाणी** विवाहसमारंभातील एक प्रथा. विवाहस्थळ एखाद्या तीर्थाजवळ असल्यास कन्यादानासाठी त्या तीर्थाचे उदक आणतात. मुलीच्या आप्तांपैकी प्रथमलग्नाचे एखादे जोडपे पाणी आणायला वाजत गाजत मिरवणुकीने जाते. त्या वेळी करवल्या त्या दोघांच्या पदराला गाठ मारतात. पुरुष तांब्या भरून पाणी घेतो आणि तो खाली न ठेवता मांडवात आणून उपाध्यायाच्या हाती देतो. उपाध्याय मग तो तांब्या दर्भावर ठेवून अभिमंत्रित करतो. यालाच शारंगपाणी असे नाव आहे. मग करवल्या पाणी आणणाऱ्या त्या दांपत्याला नाव घ्यायला सांगतात. त्यांनी नाव घेतल्यावर त्यांच्या पदराची गाठ सोडतात. ही प्रथा सार्वत्रिक नाही. [ ल. वि. सो. ]

**शारदातनय** (इ. स. च्या १३ व्या शतकाचा मध्य) एक संस्कृत ग्रंथकार. हा आपणाला शारदेचा पुत्र म्हणवितो. यापेक्षा याची अधिक माहिती मिळत नाही. याने भावप्रकाशन नावाचा, नाट्यशास्त्राचे विवेचन करणारा एक विराट ग्रंथ रचला आहे. या ग्रंथात अनेक अज्ञात रसाचार्यांच्या मतांचा उल्लेख आढळतो. तसेच प्राचीन नाट्याचार्यांचा इतिहास त्यांच्या मतांसह त्यात उद्धृत केलेला आहे. हा ग्रंथ दहा अधिकरणांमध्ये विभागला असून, त्यात भाव, रस, शब्दार्थसंबंध व रूपक, असे चार विषय प्रतिपादन केले आहेत. नाट्य व रस या विषयांवरील प्रामाणिक कोश, अशा शब्दांत भावप्रकाशनाचा गौरव केला जातो. [ सं. सा. इ. २ ]

**शारदामाता** (इ. स. १८५३–१९२०) रामकृष्ण परमहंस यांच्या सहधर्मचारिणी व आधुनिक भारतातील एक थोर संत स्त्री. यांचा जन्म कलकत्त्यापासून साठ मैलांवर असलेल्या बांकुडा जिल्ह्यातील जयरामवाटी नावाच्या एका खेडेगावात झाला. शारदामणी असे त्यांचे नाव ठेवण्यात आले. त्यांच्या वडिलांचे नाव रामचंद्र मुखोपाध्याय व आईचे नाव श्यामासुंदरी देवी. हे दांपत्य परिस्थितीने गरीब, परंतु मनाने सत्त्वशील, ईश्वरभक्तीत रंगलेले आणि नीतिधर्माने कालक्रमणा करणारे होते.

असे सांगतात, की शारदामणीच्या जन्मापूर्वी रामचंद्र मुखोपाध्याय आणि श्यामासुंदरी यांच्या स्वप्नात एकापाठोपाठ थोड्या दिवसांच्या अंतराने एक सुरेख, गोजिरवाणी बालिका आली व लाडिकपणे गळामिठी घालून म्हणाली, 'मी तुझ्या घरी आले आहे.' रामचंद्र मुखोपाध्याय व श्यामासुंदरी या दोघांची मने ईश्वरभक्तीने भारलेली असल्यामुळे स्वाभाविकच त्यांना वाटले, की भगवती शारदादेवी आपल्या पोटी जन्म घेणार आहे. या कल्पनेतूनच पुढे त्यांनी आपल्या मुलीचे नाव शारदामणी ठेवले.

बालपणापासूनच शारदा मोठी मनमिळाऊ, कामसू, व देवा–धर्माविषयी भक्ती बाळगणारी होती. दीनदुबळ्यांविषयी तिच्या मनात प्रेम व करुणा असे आणि अशा अभागी लोकांची सेवा करताना तिला कमालीचा आनंद वाटे.

याच काळात रामकृष्ण परमहंस यांच्या घरी त्यांच्यासाठी वधूसंशोधन चालू होते. व्यक्तिशः रामकृष्णांना संसारात मुळीच रस नव्हता; परंतु आपल्या आईचे मन मोडायला नको, या भावनेने ते लग्नाला सिद्ध झाले होते. रामकृष्ण कालीभक्तीत रंगलेले असल्यामुळे लोकदृष्टीने वेडे ठरले होते. अशा स्थितीत त्यांना मुलगी मिळणे कठीणच होते. आपल्या आईची व वडिल भावाची ही अडचण लक्षात आल्यामुळे एके दिवशी भावावेशात असताना रामकृष्ण सहज म्हणाले, 'मुलीसाठी उगाच इकडे-तिकडे शोध घेऊ नका. जयरामवाटीत रामचंद्र मुखोपाध्यांच्या घरी इष्ट वधू आहे. तिथे जाऊन पाहा.'

रामकृष्णांचे हे उद्गार ऐकून त्यांच्या आईला नवल वाटले. पुढे तिने जयरामवाटीला शोध घेतला, तेव्हा त्यांच्या वचनाची सत्यता तिला पटली व मग यथावकाश शारदामणींचा रामकृष्णांशी विवाह झाला.

विवाहानंतर रामकृष्ण सुमारे वर्षभर कामारपुकुर या आपल्या गावी राहिले. शारदामणी मात्र जयरामवाटीला जाऊन आपल्या

आईवडिलांजवळ राहिल्या. या वेळी एक तर त्या लहानही होत्या आणि रामकृष्णांचेही संसारात लक्ष नव्हते.

वयाच्या तेराव्या वर्षी त्या सासरी राहावयास आल्या; परंतु रामकृष्ण त्या वेळी दक्षिणेश्वरच्या कालीमातेची पूजा-अर्चा करण्याच्या आपल्या नित्य उद्योगाला निघून गेले होते. विवाहानंतर त्यांचे आणि शारदामणीदेवींचे एकत्र वास्तव्य अजून झालेच नव्हते. ती संधी लवकरच चालून आली.

दक्षिणेश्वर येथे रामकृष्णांना अनपेक्षितपणे उदरव्यथा उत्पन्न झाली. साधनेच्या असाधारण ताणामुळे ही व्याधी उत्पन्न झाली होती. या अवस्थेत रामकृष्णांची अत्यंत काळजी घेणे आवश्यक आहे, असे वाटल्यामुळे दक्षिणेश्वरच्या कालीमंदिराचे व्यवस्थापक आणि राणी रासमणीचे जावई मथुरबाबू यांनी रामकृष्णांना कामारपुकुरला त्यांच्या घरी पाठवून दिले. त्या वेळी शारदामणी तिथे नव्हत्या. त्या माहेरी परतल्या होत्या. रामकृष्णांनी त्यांना बोलावून घेतले. शारदामणीही तत्काळ निघून आल्या.

या मधल्या काळात त्यांना पतिदर्शन तर मुळीच घडले नव्हते; उलट रामकृष्णांच्या विषयी अत्यंत प्रतिकूल वार्ताच त्यांच्या कानावर आल्या होत्या. त्यामुळे त्यांना एक चमत्कारिक हुरहूर लागून राहिली होती. परंतु प्रत्यक्ष पति–दर्शनानंतर त्यांच्या मनातले सर्व किल्मिष निघून गेले आणि लवकरच त्या रामकृष्णांच्या स्नेहार्द्र सहवासात रंगून गेल्या. आपला जगावेगळा पती हा प्रत्यक्ष परमेश्वरी अवतार असल्याचे त्यांना क्षणोक्षणी भासमान होऊ लागले. रामकृष्णही त्यांना अत्यंत प्रेमळपणाने बारीक सारीक गोष्टीत मार्गदर्शन करू लागले.

देव, ब्राह्मण, गुरुजन, वडिलधारी माणसे, अतिथी-अभ्यागत, दीन-आर्त, इत्यादींशी कसे वागावे; देश-काल-पात्रपरत्वे विवेक कसा राखावा, मनाची शांती ढळू न देता सर्वांना प्रसन्न कसे ठेवावे; एवढेच काय, दिव्याची वात कशी फुलवावी या विषयीही ते शारदामणींना शिक्षण देत. सर्व प्राणिमात्राविषयी त्यांच्या अंतःकरणात अपार करुणा होती. हीच करुणा आपल्या पत्नीच्याही ठिकाणी निर्माण व्हावी, असा त्यांचा प्रयत्न असे. ते पत्नीला म्हणत. 'नावेत किंवा गाडीत चढावे सर्वांच्या आधी; परंतु उतरावे सर्वांच्या मागून. काही हरवले, विसरले नाही ना, हे पाहून उतरावे.'

रामकृष्णांनी कमालीच्या जिव्हाळ्याने सांगितलेल्या या गोष्टी शारदामणी कानामनात साठवीत आणि तसे वागत.

सुमारे सहा-सात महिने परस्परांच्या संगतीत घालविल्यावर रामकृष्ण पुनश्च दक्षिणेश्वरला निघून गेले व शारदामणीही आपल्या माहेरी परतल्या.

रामकृष्णांच्या अवतारित्वाची व जगावेगळ्या साधुत्वाची कल्पना नसणारे लोक त्यांच्या बालोन्मत्तपिशाचवत वर्तनाने कोड्यात पडत व त्यांच्याविषयी वाईट बोलत. जयरामवाटी येथेही या प्रकारचे अभिप्राय व्यक्त करणारे लोक होतेच. श्यामासुंदरीने आपली लेक वेड्याच्या गळ्यात बांधली; शारदेचा नवरा नग्न हिंडतो, भिकाऱ्यांचे उष्टे खातो, संडास साफ करतो, यासारखी कुत्सित बोलणी शारदामणींना एकसारखी ऐकावी लागत. त्यामुळे त्या कष्टी होत. त्यांना स्वतःला रामकृष्णांची थोरवी मनोमन पटली असली, तरी लोकांच्या या टवाळीमुळे त्यांचे मन सैरभैर होई. शेवटी त्यांनी दक्षिणेश्वरला जाऊन रामकृष्णांच्या सहवासात राहण्याचा निश्चय केला. त्यांचे वडील रामचंद्र मुखोपाध्याय त्यांना सोबत म्हणून निघाले.

जयरामवाटी ते दक्षिणेश्वर हा प्रवास बराच लांबचा असून, त्या वेळी वाहनाची सोय नव्हती. स्वाभाविकच शारदामणींना चालण्याचे श्रम फार झाले व त्यामुळे त्या प्रवासाच्या मध्यावर असतानाच तापाने फणफणून आजारी पडल्या. या तापातच त्यांना प्रत्यक्ष कालीमातेने दर्शन देऊन अभय दिले.

रात्री नऊ वाजता शारदामणी दक्षिणेश्वरला पोचल्या. रामकृष्णांना त्या येत असल्याचे अंतर्ज्ञानाने अगोदरच समजले होते. शारदामणींची चाहूल लागताच रामकृष्ण आपला भाचा हृदयराम याला म्हणाले. 'अरे हृदू, अशुभ वेळ तर नाही ना?... ती इथे प्रथमच आली आहे.'

आपल्या पतीची ती सुहास्य मुद्रा पाहून आणि आपल्याविषयीच्या प्रेमाने उच्चारलेले ते मधुर शब्द ऐकून शारदामणींना धीर आला. गावकऱ्यांनी रामकृष्णांच्या विषयी जे अभद्र उद्गार काढले होते, ते साफ खोटे असल्याचे त्यांना प्रत्यंतर आले. रामकृष्ण वेडे नसून, खरोखरीच ईश्वरावतार आहेत, हा त्यांचा श्रद्धाभाव दृढ झाला.

आरंभी काही दिवस रामकृष्णांनी शारदामणींचा प्रत्यक्ष सहवास टाळला. आपल्या अध्यात्मसाधनेत पत्नीचा सहवास बाधक होईल, असे त्यांना वाटे; परंतु पुढे त्यांनी विचार केला, की स्त्रीसहवास टाळून आपली साधना पूर्णावस्थेला जाणार नाही. शिवाय, शारदामणीदेवींच्या भावभावनांचा विचार करणेही प्राप्त होते.

मग एके दिवशी त्यांनी शारदामणीदेवींना आपल्या शय्यागृहात बोलावून घेतले व सरळच विचारले. 'तू मला संसारात ओढण्यासाठी आली आहेस काय?'

त्यावर शारदामणीदेवींनी मुक्तकंठाने निश्चयपूर्वक उत्तर दिले. 'नाही. मी तुम्हांला इष्टप्राप्तीच्या कार्यात सहयोग द्यावयास आले आहे.'

शारदामणींचे हे उद्‌गार ऐकून रामकृष्णांना परम समाधान वाटले व ते आनंदाने म्हणाले. 'तर मग तू आजपासून माझ्याच बोलीत राहत जा.'

रामकृष्णांनी शारदामणीदेवींना स्वतःच्या निकट सहवासात राहण्याला ही जी संमती दिली, त्याला एक कारण होते. ते स्वतः केव्हाच परमहंसपदी पोचले होते; परंतु त्यांना विषय-गर्तेत लोळणाऱ्या मूढ मानवजातीला दांपत्यजीवनाचा एक भव्य-दिव्य आदर्श दाखवून द्यायचा होता. अज्ञानांधकारात चाचपड-णाऱ्या समस्त मानवजनांचा आध्यात्मिक उद्धार करण्याची त्यांना उत्कट इच्छा होती; परंतु हे काम आपल्यापेक्षा अधिक समर्थपणे आपली पत्नीच करू शकेल, असा त्यांना विश्वास होता.

एके दिवशी शारदादेवींनी त्यांना विचारले, 'तुम्ही माझ्या-कडे कोणत्या दृष्टीने पाहता ?'

रामकृष्णांनी निःसंकोचपणाने उत्तर दिले, 'जी माता मंदि-रात विराजमान झालेली आहे, तिनेच या माझ्या शरीराला जन्म दिला आहे आणि या वेळी तीच माझे पाय चुरते आहे.'

या एका प्रसंगावरून रामकृष्णांचा शारदामणींविषयीचा सद्-भाव कोणत्या पातळीवरचा होता, ते समजून येईल.

या वेळी रामकृष्ण छत्तीस वर्षांचे होते, तर शारदादेवी अवघ्या एकोणीस वर्षे वयाच्या. परंतु तरीही त्यांची आध्यात्मिक सिद्धता मोठी होती. या काळात सतत आठ महिने रामकृष्ण आणि शारदादेवी ही दोघे परस्परांच्या निकट सहवासात होती; परंतु त्यांचा हा सहवास संपूर्ण कामगंधहीन होता.

शारदादेवी दक्षिणेश्वरी रामकृष्णांच्या सहवासात राहू लागल्यावर एके दिवशी एक महान घटना घडली. दि. ५ जून १८७२ या दिवशी रामकृष्णांनी आपल्या पत्नीला—शारदादेवींना एका प्रशस्त चौरंगावर बसवून, त्यांची षोडशोपचारे पूजा केली. पूजा चालू असतानाच शारदादेवी समाधिमग्न होऊ लागल्या. रामकृष्णांनी देवीला आवाहन केले—

'हे सर्वसौंदर्यमयी, निखिल कल्याणदायिनी जगन्माते, हे अखंड कुमारी, तू माझ्यासाठी पूर्णत्वाचे द्वार खुले कर. तुझ्या आसनावर आरूढ झालेल्या या स्त्रीचे तन-मन अंतर्बाह्य पुनीत करून, तूच तिच्या ठायी अवतर आणि जे जे शुभ व आनंदमय असेल, ते ते तिच्याकरवी घडवून आण.'

या पूजाप्रसंगानंतर शारदादेवींच्या अंतर्बाह्य जीवनात मोठेच संक्रमण घडून आले. रामकृष्णांच्या सान्निध्यात परमार्थ आणि व्यवहार या दोहोंतील अनेकानेक उत्तमोत्तम तत्त्वे त्यांनी निष्ठेने आणि झपाट्याने आत्मसात केली. जप कसा करावा, किती आणि केव्हा करावा, देवपूजेत तन्मयता कशी साधावी, इ. गोष्टींबरोबरच दीन-दुबळ्यांची दुःखे दूर कशी करावी, भूत-मात्राचे ठायी ईश्वरभाव कसा बाळगावा, या आणि यासारख्या अनेक बारीक-सारीक गोष्टींत रामकृष्ण शारदादेवींना प्रत्यक्ष आचरणाने मार्गदर्शन करीत. कधी कधी ते वेदोपनिषदांतील आणि पौराणिक कथा-गाथांतील रहस्ये व सिद्धान्त आपल्या अत्यंत सोप्या व मृदु-मुलायम शैलीत त्यांना विशद करून सांगत.

अशा प्रकारे रामकृष्णांच्या सहवासात सुमारे दीड वर्ष राहून व अध्यात्मात मोठी प्रगती साधून शारदादेवी इ. स. १८७३ च्या ऑक्टोबरात जयरामवाटीस, माहेरी परतल्या. थोड्याच दिव-सांत त्यांच्या पित्याचे निधन झाले. शारदादेवी याच त्या कुटुं-बातील सर्वांत श्रेष्ठ अपत्य असल्यामुळे, या आपत्प्रसंगी त्यांनी आपल्या विधवा मातेला व धाकट्या भावंडांना सर्व प्रकारे धीर दिला; इतकेच नव्हे, तर त्यांच्या भरणपोषणासाठी त्या शेती-कामात स्वतः खपू लागल्या. कुटुंबातील कर्त्या पुरुषाची ही भूमिका वठवीत असतानाच, त्या आपल्या गावकऱ्यांचेही दुखले-



शारदामाता

खुपले पाहत, त्यांच्या अडीअडचणीत त्यांना मदत करीत, दिलासा देत. या काळात त्या अष्टौप्रहर अपार श्रम करीत. स्वतःच्या सुखस्वास्थ्याकडे यत्किंचित लक्ष देत नसत. या सर्वांचा परिणाम त्या आजारी पडण्यात झाला. याच वेळी रामकृष्णही दक्षिणे-

श्वरी आजारीच होते; परंतु आपल्या आजाराची वार्ता एक-मेकांस कळू न देण्याची दोघेही दक्षता घेत होते.

या आजारातून शारदादेवी लवकरच बऱ्या झाल्या; पण रामकृष्णांची प्रकृती मात्र दिवसेंदिवस अधिकाधिक खालावत गेली. शेवटी तर त्यांचे दुखणे कर्करोगावर गेले. शारदादेवींना ही वार्ता धक्कादायक होती. तथापि त्या डगमगल्या नाहीत. रामकृष्णांनी एके प्रसंगी त्यांना म्हटले होते, की 'जेव्हा लोक माझी पूजा करू लागतील, मला ईश्वरी अवतार समजून भजू लागतील, तेव्हा तू समज, माझा अंतकाळ जवळ आला आहे.'

रामकृष्णांच्या गंभीर आजाराची वार्ता कानी येताच, शारदादेवी समजल्या, की तो क्षण समीप आला आहे. मग त्या तत्काळ दक्षिणेश्वरला निघून आल्या आणि रामकृष्णांच्या सेवाशुश्रूषेत निमग्न झाल्या. रामकृष्णांचे भक्त, अनेक डॉक्टर-वैद्य आणि खुद्द शारदादेवी या सर्वांनी आपल्या उपायांची शिकस्त केली; परंतु रामकृष्णांच्या प्रकृतीला आराम पडला नाही. उलट दिवसेंदिवस आजार वाढत गेला.

एके दिवशी रामकृष्णांनी शारदादेवींना जवळ बोलावले व म्हटले. 'पाहा, पाहा लोक अंधारात किडयांसारखे वळवळत आहेत. तू त्यांच्याकडे पाहा.'

शारदादेवी अस्वस्थ होऊन म्हणाल्या. 'मी तर अबला आहे. मला हे कसं शक्य आहे?'

रामकृष्ण स्वतःच्या शरीराकडे संकेत करून म्हणाले, 'याने जे केले आहे, ते काहीच नाही. तुला याहून पुष्कळच करायचे आहे.'

वारंवार रामकृष्ण असेच बोलत व शारदादेवी आपल्या असमर्थतेची जाणीव होऊन अधिकच मूक बनत. आपल्या पतीचे उर्वरित कार्य आपण कसे पुरे करणार, या कल्पनेने त्या व्याकूळ होत.

अखेर दि. १५ ऑगस्ट १८८६ या दिवशी रामकृष्णांचे महानिर्वाण झाले. त्यांच्या चिरवियोगाने शारदादेवींना वाटले, आजपर्यंत मानवी रूपात आपल्या समवेत क्रीडा करणारी प्रत्यक्ष कालीमाताच आपल्याला सोडून गेली. त्यांनी अपार शोक केला आणि उद्ध्वस्त मनाने त्या आपली सौभाग्यचिन्हे उतरवू लागल्या. तोच रामकृष्ण अकस्मात कुठूनसे प्रकटले आणि त्यांचे हात पकडून म्हणाले,

'तू हे काय करतेस? सौभाग्यचिन्हे का उतरवतेस? मी काय मरण पावलोय?'

रामकृष्णांच्या या अकल्पित दर्शनाने शारदादेवी स्तिमित झाल्या. देहत्यागानंतरही आपला पती आपल्याला सोबत करणार आहे, हे समजून आल्यामुळे त्यांनी आपला शोक आवरला.

रामकृष्णांच्या महासमाधीनंतर शारदादेवींनी मनाला विरंगुळा मिळावा म्हणून काशी, प्रयाग, वृंदावन, इ. तीर्थक्षेत्रांची यात्रा आरंभली. या काळात त्या सदैव रामकृष्णांच्या चिंतन-मननातच मग्न असत. तथापि कधी कधी रामकृष्णांच्या पार्थिव सहवासाशिवाय जगणे त्यांना अत्यंत दुस्सह होई. त्या उद्विग्न होत. अशा मनःस्थितीत त्यांच्या मनात देहत्यागाची ऊर्मी उसळून येई व मग अकस्मात सदेह साकार होऊन रामकृष्ण त्यांच्या पुढे उभे राहत, त्यांना धीर देत.

यात्रेनंतर शारदादेवी रामकृष्णांच्या जन्मग्रामी, कामारपुकुरला जाऊन राहिल्या. तिथे त्यांची खाण्या-पिण्याची आबाळ होई. थोडयाशा परिश्रमांनीही त्या श्रान्त होत, आजारी पडत. शारदादेवींची ही अवस्था रामकृष्णांच्या नरेंद्रादी शिष्यांना समजताच त्यांनी त्यांना कलकत्त्याला बोलावून घेतले आणि त्यांच्या राहण्याची उत्तम व्यवस्था केली. हे सर्व रामकृष्ण-शिष्य शारदादेवींना 'माताजी' म्हणत व आपल्या आईसारखीच त्यांची सेवा करून, त्यांच्या मार्गदर्शनाखाली राहत.

यानंतर शारदादेवींनी पुनश्च तीर्थयात्रा केली. त्यांच्या समवेत या वेळी स्वामी ब्रह्मानंद, योगानंद, शारदानंद, इ. त्यांचे संन्यासी पुत्र होते. ही यात्रा पार पाडल्यावर त्यांनी आपले उरलेले सर्व आयुष्य आपल्या आणि रामकृष्णांच्या भक्तांना आध्यात्मिक व व्यावहारिक मार्गदर्शन करण्यात, जिज्ञासू मुमुक्षूंना मंत्रदीक्षा देण्यात, बंगालच्या अनेक सशस्त्र क्रांतिकारकांना विविध प्रकारे साहाय्य करण्यात, रामकृष्णसंघाच्या उभारणीला हातभार लावण्यात आणि स्वामी विवेकानंद व भगिनी निवेदिता यांनी आरंभिलेल्या अनेक लोकोपयोगी कार्यांत भाग घेण्यात, व्यतीत केले.

रामकृष्णांच्या माघारी सुमारे चौतीस वर्षे अशा प्रकारे एक दिव्य जीवन जगून शारदादेवी २० जुलै १९२० या दिवशी पंचत्वात विलीन झाल्या.

शारदामातांचे हे अलौकिक जीवन म्हणजे आधुनिक भारतीय स्त्रीजीवनातील एक अद्‌भुत चमत्कार होय. रामकृष्णसंघाशी संबद्ध आणि केवळ परिचित असणारे लक्षावधी भारतीय व जागतिक नागरिक रामकृष्ण आणि शारदामाता या दांपत्याला शिव-शक्तीचा अवतार मानतात. [ श्री शारदामाता – चरित्र आणि उपदेश, श्री. रा. चिं. ढेरे, १९६१ ]

## शारदा लिपी

या लिपीचा प्रचार पंजाब व काश्मीर या प्रदेशांत होता. इ. स. च्या आठव्या शतकापर्यंत तिथे कुटिल लिपी प्रचारात होती. कुटिल लिपीपासूनच पुढे शारदा लिपी निघाली. शारदा लिपीतील सर्वांत जुना लेख इ. स. च्या दहाव्या शतकातला आहे. या लिपीपासूनच सांप्रतच्या

काश्मीरी व टाकरी या लिप्यांची उत्पत्ती झाली. गुरुमुखीतील बरीचशी अक्षरेही या लिपीपासून निघाली आहेत. [सा. भा. वि.; भा. प्रा. लि.]




शारदा लिपी–चंबा राज्यातील सराहा येथील प्रशस्तीमधली काही अक्षरे (इ. स. चे १० वे शतक)

**शार्ङ्ग** विष्णूचे धनुष्य. जरासंधाने मथुरेला वेढा घातला त्या वेळी श्रीकृष्णाला हे मिळाले. प्रस्तुत शब्दाचा दुसरा एक अर्थ शिंगी असा आहे. शिंगी म्हणजे वाजवण्याचे शिंग होय. पारसीक देशातले लोक शिंगी वाजवीत युद्धाला निघत असे कालिदास म्हणतो (रघु. ४.६२). मल्लिनाथाने हे दोन्ही अर्थ दिले आहेत. [पु. इं.]

**शार्ङ्गदेव** (इ. स. चे १३ वे शतक) एक संगीतशास्त्रज्ञ. हा देवगिरी येथे सिंघण यादवाच्या दरबारात गायक होता. काश्मीरी भास्करदेव याचा हा पुत्र होय. याने संगीत-रत्नाकर नावाचा एक ग्रंथ संस्कृत भाषेत रचला. त्याचे सात अध्याय असून, स्वरगत, रागविवेक, प्रकीर्णक, प्रबंध, ताल, वाद्य व नृत्य अशी त्यांची नावे आहेत. त्याने भरत, मतंग, सोमेश्वर, अभिनवगुप्त, इ. प्राचीन आचार्यांच्या मतांचे विवेचन केले आहे. कल्लिनाथ पंडिताने या ग्रंथावर टीका लिहिली आहे. [सं. शा. क. इ.; सं शा.]

**शार्ङ्गधर** (१) (इ. स. चे ११वे शतक) वैद्यकशास्त्राचा एक आचार्य. याच्या वडिलांचे नाव दामोदराचार्य असे होते. शाङ्र्गधरसंहिता नावाचा वैद्यकावरचा एक ग्रंथ याने लिहिला असून, तो तीन खंडांत आणि बत्तीस अध्यायांत विभागला आहे. पहिल्या खंडात औषधांचे गुणधर्म, त्यांचे परिणाम, निदान व चिकित्सा; शारीरशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, गर्भशास्त्र, इ. विषय आहेत. दुसऱ्या विभागात आसवे, काढे, रसायने, मादक पेये यांचा ऊहापोह असून, अखेरच्या भागात रोगनिवारणासंबंधीचे साधे उपचार सांगितले आहेत. रोगांसंबंधी शाङ्र्गधराने चरक, सुश्रुत व माधव यांच्यापेक्षा अधिक चर्चा केली असून, नाडीपरीक्षेसंबंधी विपुल माहिती दिली आहे. हेच याचे वैशिष्टच होय. उमेशचंद्र दत्तांच्या मते शाङ्र्गधर हा भस्मीकरण, इ. कृतीसंबंधी लिहिणारा सर्वांत प्राचीन ग्रंथकार होय. तो रसायने तयार करण्यातही कुशल होता. सोने, रुपे, लोह, इ. निरिंद्रिय धातूंची भस्मे करण्याची पद्धती यानेच शोधून काढली. याच्या ग्रंथाचा रोगचिकित्सेसाठी चांगला उपयोग होतो. [म. ज्ञा. को.]

(२) (इ. स. चे १२वे शतक) एक विद्वान ग्रंथकार. याला राजस्थानातल्या हम्मीर नामक राजाने आश्रय दिला होता. याने हम्मीरविजय व सुभाषितशाङ्र्गधर असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. सुभाषितशाङ्र्गधराची पद्यसंख्या ४६८९ आहे. सुभाषित-शाङ्र्गधर हा ग्रंथ संस्कृत भाषेत असून, हम्मीरविजय हा ग्रंथ लोकभाषेत आहे. [रा. भा. सा.]

**शार्ङ्गधर भोजने** (इ. स. चे १४ वे शतक) एक महानुभावीय ग्रंथकार. डॉ. य. खु. देशपांडे यांच्या मते शाङ्र्गधर भोजने यानेच नवरस नारायण हे टोपण नाव घेऊन ओवीबद्ध महाभारत रचले; परंतु अन्य काही संशोधकांच्या मते नवरसनारायण हा याचा शिष्य होता. शाङ्र्गधराने स्थान-पोथीच्या धर्तीवर तीर्थमालिका नावाचा एक पद्यग्रंथ रचला आहे. गोविंदप्रभू व चक्रधर यांच्याशी संबंधित असलेल्या अनेक तीर्थस्थानांची माहिती प्रस्तुत ग्रंथात आहे. या ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग असून, त्यांत सुमारे दोनशेपन्नास ग्राम-नामांचा उल्लेख आहे. कवीची रचना शिथिल आहे. [म. म. वा.]

**शालभंजिका** एक प्राचीन भारतीय खेळ. बौद्ध वाङ्मयात या खेळाचे विपुल उल्लेख मिळतात. उद्यान-क्रीडेशी या खेळाचा संबंध आहे. फुलांनी बहरून आलेल्या शाल-वृक्षाची फांदी पकडून व फुले तोडून स्त्रिया परस्परात खेळत असत. खेळाचे हे स्थूल स्वरूप होय. भगवान बुद्ध एकदा जेत-वनात असताना श्रावस्ती नगरीत हा उत्सव चालू असल्याचे वर्णन अवदानशतकात आहे. निदानकथेतही या खेळाचे वर्णन आढळते. तिथे बुद्धमाता मायादेवीने या वृक्षाच्या फांदीला पकडल्यावर तिला प्रसवपीडा सुरू झाली, असे म्हटले आहे.

कालांतराने बुद्धमाता ज्या स्वरूपात शालवृक्षातळी उभी होती, त्या मुद्रेलाच शालभंजिका ही संज्ञा प्राप्त झाली आणि मग या मुद्रेने शिल्पात प्रवेश केला. तोरणशालभंजिका, स्तंभ-शालभंजिका ही त्या शिल्पाचीच विविध रूपे होत. [ प्रा. भा. म.; पा. का. भा.; हृ. च.– सां. अ.]

**शालवाडी** एकावन्न शक्तिपीठांतील एक. हे स्थान बंगाल-मधल्या जलपैगुडी जिल्ह्याच्या बोदा भागातील शालवाडी नामक गावी आहे. इथल्या भिस्ता नदीच्या काठी देवीचे मंदिर असून, सतीचा वामचरण इथे गळून पडला होता, अशी समजूत आहे. त्रिस्रोता या अन्य नावाने परिचित असणारे स्थान ते हेच असावे. भ्रामरी ही या देवीची शक्ती आणि भैरवेश्वर हा भैरव आहे. [ कल्याण – तीर्थांक ]

**शालिकनाथ मिश्र** (इ.स. ९व्या शतकाच्या पूर्वी)एक मीमां-सक आचार्य. हा गौड देशात जन्मला होता. प्रभाकरपरंपरेतला हा एक श्रेष्ठ ग्रंथकार होय. प्रभाकरा-च्या सिद्धान्ताचे याने जितके चांगले निरूपण आणि समर्थन केले आहे, तितके दुसऱ्या कोणालाही जमले नाही. तो स्वतःला प्रभाकराचा शिष्य म्हणवतो. त्याने प्रभाकराच्या लघ्वी आणि बृहती या दोन्ही ग्रंथांवर अनुक्रमे दीपशिखा व ऋजुविमला नामक व्याख्या लिहिल्या आहेत. प्रकरणपंचिका हा त्याचा तिसरा ग्रंथ असून तो सर्वाधिक प्रसिद्ध आहे. पंचिकाकार म्हणूनच त्याला ओळखले जाते. पंचिका हा प्राभाकर संप्रदायाचा मान्य ग्रंथ ठरला आहे. शालिकनाथाने प्रभाकराच्या सिद्धान्तांचे केवळ निरूपणच केले नाही, तर त्यांना अधिक उच्च स्तरावर नेले. शालिकनाथाला ब्राह्मणत्वादी जाती मान्य नव्हत्या. [ मी. द. ]

**शालिभद्र सूरी** (१) (इ. स. चे १२ वे शतक) एक जैन भक्तकवी. हा राजगच्छीय वज्रसेन सूरीचा पट्टधर होता. याने भरतेश्वर बाहुवली रास व बुद्धिरास अशी दोन रासकाव्ये रचली आहेत. या रासांची प्राचीन रासकाव्यां-मध्ये गणना केली जाते. पहिल्यात भरतेश्वर व बाहुवली यांच्यां-तील युद्धाचे वर्णन असून, त्यात बाहुवलीचा विजय होतो, पण नंतर तो विरागी बनून तपासाठी वनात निघून जातो, असे कथा-नक आहे. दुसऱ्यात धर्मोपदेश आहे. दोन्ही काव्यांची भाषा अपभ्रंश आहे. पाहा– रासो काव्य. [ हिं. सा. २.; हिं. जै. भ. क.; गुज. सा. इ.; रा. सा. गौ. प. ]

(२) (इ. स. चे १४ वे शतक) पंचपांडवचरितरासू हा याचा ग्रंथ प्रबंधकाव्यांत श्रेष्ठ गणला जातो. हा शालिभद्र सूरी, पूर्णिमागच्छाचा होता. त्याने हा ग्रंथ देवचंद्र याच्या आज्ञेने नर्मदेच्या तीरावरील नादउद्र नामक नगरात रचला. कवीने इ. स. १३५५ हा त्या ग्रंथाचा रचनाकाल म्हणून दिला आहे. या ग्रंथात पाच पांडवांचे चरित्र अर्थात संपूर्ण महा-भारताचे सार सांगितले आहे. मात्र कवीने कथानकाला जैन धर्मानुसार वळण दिले आहे. [ आ. हिं. सा. शो. ]

**शालिवाहन** पैठणच्या सातवाहन घराण्यातील एक राजा. याच्यासंबंधी काही आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्यांपैकी एक अशी–

एका ब्राह्मणाचे दोन मुलगे व एक मुलगी असे तिघेजण आईबापांच्या निधनानंतर, फिरत फिरत पैठण नगरात गेले व तिथे एका कुंभाराच्या घरी राहू लागले. एकदा ती ब्राह्मणकन्या गोदावरी नदीवर गेली असता शेषाचे तिच्यावर लक्ष गेले व त्याने तिला वश केले पुढे त्याच्यापासून तिला एक मुलगा झाला. कुंभाराच्या घरी राहत असल्यामुळे हा मुलगा मातीची खेळणी बनविण्यात तरबेज झाला. मातीच्या भातगाड्या करून हा मुलगा आपल्या सवंगड्यांना देत असे. त्यावरून या मुलाचे नाव शालिवाहन असे पडले.

त्या वेळी पैठणला सोमकांत व उज्जयिनीला विक्रमादित्य राजा राज्य करीत होता. आपला नाश करणारा एक मुलगा पैठण नगरात वाढत आहे, असे विक्रमादित्याला वेताळाकडून समजले. तेव्हा त्याने पैठणवर स्वारी करून सोमकांताचा परा-भव केला व त्याला कैदेत टाकले. शालिवाहनाला या राजाच्या पराभवाचे वृत्त कळले, त्या वेळी तो मातीचे हत्ती, घोडे व शिपाई यांच्याशी खेळण्यात दंग होता. मग त्याला एक कल्पना सुचली. त्याने शेषराजाचे स्मरण केले आणि त्या मातीच्या खेळण्यांत प्राण फुंकले. त्याबरोबर त्यांतून असंख्य शिपाई व घोडेस्वार बाहेर पडले. त्यांच्या साहाय्याने शालिवाहनाने विक्रमादित्याच्या सैन्याचा पराभव केला व त्याला नर्मदेच्या पलिकडे पिटाळून लावले. हे सैन्य नर्मदेपलिकडे जात असताना

ध्रेय राजाची ताकीद विसरून शालिवाहनाचे सैनिक नर्मदेत उतरले आणि क्षणार्धात विरघळून गेले. इकडे पैठणच्या सोमकांत राजाची कैदेतून सुटका झाली. त्याच्या मागून पैठणच्या लोकांनी शालिवाहनाला आपला राजा निवडले. पाहा– सातवाहन वंश. [पै. सा. रा.; म. च. को.]

## शालिवाहन शक

एक कालगणना. कलियुगाची ३१७९ वर्षे झाल्यावर हा शक सुरू झाला, असे समजतात. मलबार व तिनेवेल्ली जिल्हा सोडल्यास सर्व द. भारतात व अंशतः उ. भारतातही याचा प्रचार आहे. महाराष्ट्रात याची गतवर्षसंख्या व तमिळनाडमध्ये चालू वर्षसंख्या सांगण्याची प्रथा आहे. त्यामुळे तमिळनाडमधील याची वर्षसंख्या महाराष्ट्रातील वर्षसंख्येपेक्षा एका वर्षाने पुढे असते. शालिवाहन शकात ७८ किंवा ७९ मिळवले म्हणजे इसवी सन व १३४ किंवा १३५ मिळवले म्हणजे विक्रम संवत येतो.

शालिवाहन शकाचा आरंभ सामान्यतः चैत्र शु. प्रतिपदेला होतो; पण केवळ सौर मान चालणाऱ्या प्रदेशात याचा आरंभ मेषसंक्रांतीच्या आरंभापासून धरतात. द. भारतात याचे महिने अमान्त व उ. भारतात पूर्णिमान्त असतात. द. भारतातील शिलालेख, ताम्रपट, पोथ्या, पुस्तके व कागदपत्र यांत प्रायः याचाच उल्लेख आढळतो. पंचांगात व जन्मपत्रिका, वर्षफले इत्यादींत याचा उपयोग करतात. भारताच्या उत्तर भागातील शेकडो ऐतिहासिक लेखांतही याचा निर्देश केलेला आढळतो.

इ. स. च्या पहिल्या शतकात, शालिवाहन किंवा सातवाहन नामक राजाने हा शक स्थापला, अशी परंपरागत समजूत आहे. पण या राजाने किंवा त्याच्या कोणी वंशजाने हा शक चालू केला, असे दिसत नाही. कारण तसे असते, तर या वंशाच्या एखाद्या तरी कोरीव लेखात या शकाला अनुसरून कालगणना केली असती. पण सातवाहनाच्या एकाही लेखात तसा उल्लेख नाही. या कालगणनेला शककाल किंवा शकनृपकाल म्हटले आहे व त्याच्या वर्षांना शकवर्ष, शकनृपतिसंवत्सर किंवा शकनृपतिराज्याभिषेक संवत्सर, असे उल्लेखिले आहे. तेव्हा हा काल कोण्या शकनृपतीने चालू केला असून, कित्येक शतकांनंतर शालिवाहनाचे नाव त्याला जोडण्यात आले, हे स्पष्ट आहे.

या कालाचा संस्थापक शक राजा कोण होता व तो कुठे होऊन गेला, याविषयी विद्वानांत मतभेद आहेत. तथापि पुष्कळ संशोधकांच्या मते तो कुशाणवंशी कनिष्क असावा. या कनिष्काचे विशाल साम्राज्य उ. भारतात वायव्यप्रांतापासून मगधापर्यंत पसरले होते. याने स्थापलेल्या शकाचा उपयोग त्याच्या हुविष्क, वासुदेव, इ. वंशजांनी आपल्या लेखांत केला आहे. हे राजे शकवंशी नसून, कुशाणवंशी होते. या कालगणनेचा पुढे शक राजांनी उपयोग केल्यामुळे तिला शक हे नाव पडले असावे.

कुशाणवंशाचा अस्त झाल्यावर उ. भारतात या कालगणनेचा हळूहळू संकोच होत गेला. द. भारतात मात्र या शकसंवताने आपले पाय हळूहळू पसरले. भूमक व नहपान या दोन परकी क्षत्रपांचे राज्य उत्तर महाराष्ट्रावर काही काळ होते. नहपान याचे लेख नासिक, कार्ले वगैरे ठिकाणी सापडले आहेत. सातवाहनवंशी गौतमीपुत्राने या नहपानाचा पराभव केला व त्याच्या क्षहरात वंशाचा समूळ उच्छेद केला. त्यानंतर इ. स. च्या दुसऱ्या शतकात हा शकसंवत काही काळ महाराष्ट्रातून लप्त झाला. त्यानंतर बादामीच्या चालुक्यांनी पुनश्च शकसंवताचा पुरस्कार केला. यानंतरचे या संवताचे पहिले ज्ञात वर्ष ४६५ (इ. स. ५४३) हे चालुक्यसम्राट प्रथम पुलकेशी याच्या बादामी येथील लेखात आढळते. चालुक्यांचे साम्राज्य इ. स. च्या सातव्या शतकात महाराष्ट्र, कोकण, गुजरात, विदर्भ व आंध्र या प्रांतांवर पसरले होते. त्यांच्या साम्राज्याबरोबर शकसंवताचाही हळूहळू प्रसार झाला. तेव्हापासून आजपर्यंत हा संवत या प्रांतांत अविच्छिन्नपणे प्रचलित आहे.

चालुक्यांनी शकसंवताचा उपयोग केला असला, तरी त्यांनी तो संवत आपला नसून, शकांचा किंवा शक राजांचा होता असा स्पष्ट निर्देश आपल्या सर्व लेखांत केला आहे.

इ. स. च्या १३ व्या शतकात देवगिरीच्या यादव राजांच्या मांडलिकांच्या एका लेखात प्रथमच त्याला शालिवाहन शक असे नाव मिळाले व त्याचा शालिवाहन या पुरातन राजाच्या नावाशी संबंध जोडला गेला. तेव्हापासून त्याला शालिवाहन शक म्हणतात.

भारत सरकारने जी सौर वर्षगणनपद्धती सुरू केली आहे, तिच्यात शालिवाहन शकाचाच स्वीकार केला आहे.

श्री. वि. का. राजवाडे यांच्या मते या कालगणनपद्धतीचे सवंध नाव शातवाहनशककाल किंवा शातवाहनशकवर्ष किंवा शालिवाहनशकयुद्धकाल असे असावे व पैठणच्या शातवाहन आडनावाच्या कोण्या राजाने शक लोकांचा पराभव ज्या वर्षी केला, त्या वर्षापासून ही कालगणनापद्धती सुरू झाली असावी. [सं. मि.; सं. मु.; रा. ले. सं. २]

## शालिहोत्र

एक आचार्य. प्राचीन भारतीय वैद्यकपरंपरेत याला पशुवैद्यकाचा आद्य आचार्य मानतात. हा कपिल ऋषीचा पुत्र होय. हा अश्वविद्येचा आचार्य असून, अश्वलक्षणांचा जाणकार होता (म. भा. वन. ७०. २७). पंचतंत्रातही याचा प्रमुख अश्वशास्त्रज्ञ म्हणून उल्लेख केलेला आहे.

शालिहोत्रतंत्र अथवा शाल्यहोत्र हा त्याचा अश्वायुर्वेदावरील

ग्रंथ होय. या ग्रंथाच्या प्रारंभीच, त्याला सुश्रुत नावाचा एक मुलगा होता, असे म्हटले आहे. अग्निपुराणाच्या मते शालिहोत्राने सुश्रुताला अश्वायुर्वेद शिकविला (२९२. ४४). इ. स.च्या १४ व्या शतकात त्याच्या ग्रंथाचा अरबी भाषेत अनुवाद झाला होता. लंडनमधील इंडिया लायब्ररीत शाल्यहोत्राच्या दोन हस्तलिखित प्रती सुरक्षित आहेत.

महाभारतानुसार शालिहोत्र हा एक ऋषीही आहे. महर्षी व्यास काही काळ त्याच्या आश्रमात राहत होते (आदि. १५४). पांडवही शालिहोत्राच्या भेटीसाठी तिथे गेले होते (म. भा. आदि. १५४). त्याच्या आश्रमानजीक एक सरोवर आणि एक पवित्र वृक्ष होता. हे सरोवर शालिहोत्राने आपल्या तपस्येने निर्माण केले होते. त्या सरोवरातील जल प्राशन केले असता तहान-भूक हरत असे.

शालिहोत्राला राणायणी शाखेचा आचार्य मानले जाते. याने सामवेदाच्या सहा संहिता केल्या. याचे दुसरे नाव लांगली असावे. अश्वशास्त्रज्ञ शालिहोत्र तो हाच अशी समजूत आहे. [ प्रा. च. को.; तर्पण ]

## शाल्मली द्वीप

प्राचीन सप्तद्वीपांपैकी एक. शाल्मल म्हणजे सावरीचा वृक्ष होय. हे वृक्ष त्या द्वीपात पुष्कळ असल्यामुळे त्याला शाल्मली द्वीप असे नाव मिळाले. त्या वृक्षांच्या बोंडांतून निघालेल्या कापसाचा शुभ्र थर या द्वीपावर पसरलेला असतो. हा वृक्ष हे गरुडाचे निवासस्थान आहे. या द्वीपाला सुरासमुद्राचा वेढा आहे. द्रोण नावाचा एक पर्वत या द्वीपावर असून, तो विविध औषधी वृक्षांच्या तेजाने प्रकाशमान असतो. इथे नेहमी ढग येतात व त्यामुळे आकाशातील ग्रह, तारे किंवा चंद्र दिसत नाही.

प्रियंवद हा इथे राज्य करीत होता. त्याने आपल्या सात पुत्रांना हे द्वीप विभागून दिले. या द्वीपात चातुर्वर्ण्य संस्था होती. कपिल, अरुण, पीत व कृष्ण ही इथल्या वर्णांची नावे होती. इथे सोमाची उपासना चालत असे.

सध्याचा काळा समुद्र व कास्पियन समुद्र यांच्या मधला टापू म्हणजे शाल्मली द्वीप होय, असे श्री. राजवाडे म्हणतात. श्री. मुझफर अली मात्र आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील मादागास्कर बेट व त्याच्या जवळचा आफ्रिकेचा किनारी प्रदेश याला शाल्मली द्वीप समजतात. [ जॉ. पु.; पु. इं.; रा. ले. सं. ]

## शाल्व

प्राचीन लोक व जनपद. पहिल्याप्रथम गोपथ ब्राह्मणात शाल्वांचा उल्लेख येतो (१. २. ९). जैमिनीय ब्राह्मणातही शाल्व जनपद निर्दिष्ट आहे (२. २०६, २९९). शाल्वपुर ही त्यांची राजधानी होती. ज. कॅनिंगहॅम यांच्या मते सांप्रतचे अलवार म्हणजे प्राचीन शाल्वपुर होय. शाल्वदेश कुरुदेशाला लागून होता, असे महाभारतावरून कळते. पाणिनीच्या पूर्वकालीच शाल्वांचे मोठे राज्य सहा भागांत विभक्त झाले होते. या सहा भागांची नावे काशिकावृत्तीत (अष्टा ४. १. १७३ वरील) पुढील श्लोकाच्या द्वारे सांगितली आहेत–

> उदुम्बरास्तिलखला मद्रकारा युगन्धराः ।
> भूलिङ्गशरदण्डाश्च साल्वावयवसंज्ञिताः ॥

अर्थ – उदुंबर, तिलखल, मद्रकार, युगंधर, भूलिंग व शरदंड हे शाल्वांचे अवयव होत.

पतंजलीच्या मताप्रमाणे अजमीढ, अजक्रंद व बुध हेही शाल्व जनपदाचेच अवयव होते. उदुंबर किंवा औदुंबर हा भाग म्हणजे पंजाबातला पठाणकोटजवळचा प्रदेश असावा. त्या ठिकाणी औदुंबरांची कित्येक नाणी सापडली आहेत.

सावित्रीचा पती सत्यवान हा शाल्व देशाचा राजा होता. शाल्वपुर हीच त्याची राजधानी होती. शिशुपाल हाही शाल्व होता. एका शाल्व राजाने द्वारकेवर चाल केली होती; पण कृष्णाच्या हातून तो मारला गेला.

जसजशी शाल्वांची स्थलांतरे झाली, तसतशा त्यांच्या राजधान्याही बदलल्या आहेत. ब्रह्मपुराणात (१९.१६-१८) म्हटले आहे, की शाल्व लोक भारताच्या पश्चिम प्रदेशात राहत होते व मात्रावत ही त्यांची राजधानी होती. जामनगरच्या दक्षिणेस चाळीस मैलांवर आजही मात्रावत हे ठिकाण आहे. महाभारतोत्तर काळात शाल्वांविषयी अधिक काही कळत नाही. त्यावरून शाल्व लोक अन्य जमातीत विलीन झाले असावे, असे वाटते. [ प्रा. च. को.; हि. जॉ. ए. इं. ]

## शास भारद्वाज

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशेबावन्नावे सूक्त याने रचले आहे. प्रस्तुत सूक्ताच्या पहिल्या ऋचेत त्याचा उल्लेखही आहे. इंद्र ही या सूक्ताची देवता आणि त्याची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा अशी –

> स्वस्तिदा विशस्पतिर्वृत्रहा विमृधो वशी ।
> वृषेन्द्रः पुर एतु नः सोमपा अभयङ्करः ॥
>
> (ऋ. १०. १५२. २)

अर्थ – अभयदाता, लोकपालक, वृत्रहंता, निग्रही, बलवान आणि सोमप्रेमी इंद्र आमच्याकडे येवो.

युद्धासाठी निघालेल्या राजाचा उत्साह द्विगुणित व्हावा म्हणून या सूक्ताचा पाठ करतात, असे आश्वलायन गृह्यसूत्रात म्हटले आहे. [ ऋ. म. भा. ]

**शास्ता** केरळातील एक देव. याला धर्मशास्ता, आर्य तात, अय्यनार, भूतनाथ, हरिहरपुत्र, अय्यप्प व अय्यप्पन अशीही नावे आहेत. केरळमधील शबरीमलैवर त्याचे मंदिर आहे. केरळातच त्याने अवतार घेतला व आपले अवतारकार्य पूर्ण केले, असे सांगतात. त्याच्याविषयी लोकांत प्रचलित असलेली एक कथा अशी –

केरळात पंतालम नावाचे एक लहानसे गाव होते. तिथे राजशेखर नावाचा एक सज्जन व न्यायी राजा राज्य करीत होता. त्याला सर्व सुखे होती; पण पोटी संतान नसल्यामुळे राजा व राणी दुःखी होती. पुत्रप्राप्तीसाठी त्यांनी मग देवाची आराधना सुरू केली.

एके दिवशी राजा जंगलात शिकारीला गेला असता त्याला तिथे एक लहान मूल रडताना आढळले. त्या मुलाविषयी त्याला अनुकंपा वाटली व आपण त्याला घरी न्यावे की काय, असा विचार त्याच्या मनात आला. एवढ्यात विष्णू एका तेजस्वी ब्राह्मणाचे रूप घेऊन तिथे आला व राजाला म्हणाला –

' हे राजा, तू या मुलाला घरी घेऊन जा. तो तुला यश व कीर्ती मिळवून देईल. बारा वर्षांनंतर या मुलाविषयी तुला सर्व हकीगत समजेल. याच्या गळ्यात सोन्याचा मणी आहे. तेव्हा तू याला मणिकंठ असे नाव ठेव. "

ब्राह्मणाच्या या बोलण्यानंतर राजा मुलाला घेऊन राजवाड्यात परतला.

मणिकंठ थोडा मोठा झाल्यावर राजाने त्याच्या शिक्षणासाठी गुरूची नेमणूक केली. कुशाग्र बुद्धीचा असल्यामुळे मणिकंठाने विद्येत तसेच, तिरंदाजी व तलवारबाजी यांत प्रावीण्य मिळवले. शिक्षण पूर्ण झाल्यावर गुरुदक्षिणा म्हणून त्याने गुरूच्या सांगण्यावरून त्याच्या आंधळ्या व मुक्या मुलाला दृष्टी व वाचा मिळवून दिली. त्याने आणखीही अनेक चमत्कार केले.

काही कालानंतर राणीला औरस पुत्र झाला. त्यामुळे साहजिकच तिचे मणिकंठावरचे प्रेम कमी झाले. राजाच्या दिवाणालाही मणिकंठाबद्दल राग होता. कारण त्याने दिवाणाची राजा होण्याची संधी घालवली होती. राजाचे मात्र मणिकंठावर पुत्रवत प्रेम होते. मणिकंठ बारा वर्षांचा झाल्यावर राजाने त्याला यौवराज्याभिषेक करायचे ठरवले. राणीला व दिवाणाला हे अर्थातच रुचले नाही. तेव्हा त्यांनी दोघांनी मिळून मणिकंठाला दूर करायचा एक कट रचला. राणीने आपले डोके अतिशय दुखते असे ढोंग करायचे व त्यावर वाघिणीचे दूध हेच एक औषध आहे, असे वैद्याने सांगायचे, असा तो कट होता. ठरल्याप्रमाणे सर्व बनाव घडून आला. वाघिणीचे दूध कसे मिळवायचे, ही चिंता राजाला पडली. पण मणिकंठाने दूध आणण्याची जबाबदारी स्वीकारली. राजा प्रथम त्या गोष्टीला कबूल होईना. पण मणिकंठाने विनवण्या करून त्याची संमती मिळवली. भगवान शंकर हा राजाचा कुलदेव होता. राजाच्या सांगण्यावरून त्याचे प्रतीक म्हणून एक नारळ आणि शिदोरी यांचे एक गाठोडे बांधून त्याने ते डोक्यावर ठेवले व तो रानात निघाला. (यात्रेकरू सध्या जी इरुमुडी नेतात, ते याचेच प्रतीक होय.)

मणिकंठ रानात पोचल्यावर शिवगण त्याच्या मदतीला आले. नंतर तो पंपा नदीच्या तीरावर येऊन पोचला. तिथे आसपासच्या अनेक ऋषिमुनींनी त्याला वंदन केले. नंतर त्यांनी आपल्या तपस्येच्या बळावर एका पर्वताच्या माथ्यावर सुवर्णमंदिर उभारले व त्यात त्याला आसनस्थ केले. या स्थानाला पोन्नंपालमेडू असे नाव आहे.

याच सुमाराला महिषी नावाची एक दैत्यस्त्री देवांना फार त्रास देत होती. तेव्हा तिचा वध करावा, अशी विनंती करण्यासाठी देव मणिकंठाकडे आले. मणिकंठ हा शिव व मोहिनी यांच्यापासून निर्माण झालेला भूतनाथ होता. शिवाने त्याला आपल्याबरोबर कैलासाला नेले आणि त्याला त्याच्या कार्याची कल्पना दिली. शिव त्याला म्हणाला–

" इंद्राला पदभ्रष्ट करून देवलोकावर राज्य करणाऱ्या व देवांना त्रास देणाऱ्या महिषीला ठार मारणे हे कार्य मी तुझ्यावर सोपवलेले आहे. पण त्यापूर्वी बारा वर्षे तू मानवी रूपाने पृथ्वीवर राहा. तेव्हा लहान बालकाचे रूप घेऊन तू पंपातीरी अरण्यात थांब. मग राजशेखर राजा तुला उचलून राजवाड्यात घेऊन जाईल. तिथे तू बारा वर्षे राहिल्यावर तुला महिषीला मारायची शक्ती प्राप्त होईल. "

या घटनेला अनुसरूनच देव आता त्याच्याकडे विनंती करायला गेले होते. त्यांच्या विनंतीला मान देऊन भूतनाथ देवलोकी गेला. तो दिवस मकरसंक्रांतीचा होता. त्याने महिषीच्या शिंगांना धरून तिला खाली पृथ्वीवर फेकले. ती अलसा नदीच्या तीरावर येऊन पडली. भूतनाथही पृथ्वीवर उतरला आणि तिला ठार मारून तिच्या अंगावर नाचला. महिषीचा मृतदेह ज्या ठिकाणी पुरला त्या स्थानाला कल्लीडुंकुन्नू असे नाव आहे.

त्यानंतर शिवाच्या सांगण्यावरून देवांनी वाघांची रूपे घेतली. देवेंद्रही एक वाघ बनला. त्याच्यावर स्वार होऊन भूतनाथ राजशेखराकडे गेला. ते दृश्य पाहून राजशेखराला मणिकंठ हा देव असल्याची खात्री पटली. मणिकंठ रानात गेल्यावर राणीची डोकेदुखी थांबल्यामुळे आता दुधाची काही गरज नव्हती. म्हणून मणिकंठाने सर्व वाघांना अदृश्य व्हायला सांगितले.

यानंतर राजाने त्याला आपल्या राज्यातच राहण्याची विनंती

केली. मणिकंठाने त्याची विनंती मानली व नीलगिरीवर आपल्यासाठी मंदिर बांधायला सांगितले. त्या ठिकाणी त्याच्या हातून मुक्ती मिळावी म्हणून शबरी वाट पहात होती. तिच्यावरूनच त्या पर्वताला शबरीमलै असे नाव मिळाले.

राजशेखराने मग शबरीमलैवर भूतनाथासाठी मंदिर बांधले. भूतनाथाची पट्टबंध व चिन्मुद्रा यांनी युक्त अशी मूर्ती तयार करण्यात आली. परशुरामाने मकरसंक्रांतीला त्या मूर्तीची स्थापना केली.

एवढे सर्व झाल्यावर राजाला मुक्ती मिळाली. केरळात भूतनाथाचे लाखो भक्त आहेत. ते दरवर्षी शबरीमलैवर याच्या दर्शनासाठी जातात.

भूतनाथाच्या दर्शनाला जाण्यापूर्वी काही व्रतांचे काटेकोर पालन करावे लागते. ती व्रते अशी –

यात्रेकरूला प्रथम तुळशीची किंवा रुद्राक्षांची माळ गळयात घालावी लागते. याला मालाधारण असे म्हणतात. एकदा माला धारण केली, की यात्रेकरू भजन-पूजनादी धार्मिक कार्यक्रमांव्यतिरिक्त अन्य गोष्टीत भाग घेत नाही.

यात्रेला जाण्यापूर्वी भक्ताला एकेचाळीस दिवस ब्रह्मचर्य पाळावे लागते. त्याचा आहार सात्त्विक अर्थात निरामिष असावा लागतो. तसेच त्याला निळ्या, काळ्या किंवा भगव्या रंगाची वस्त्रे नेसावी लागतात. परमेश्वर सर्वांभूती आहे, अशी भावना चित्तात ठसवावी लागते. फलाची अपेक्षा न धरता निष्काम कर्म करावे लागते. इतरांची सेवा करावी लागते आणि भूतनाथाला सर्वभावे शरण असावे लागते.

यात्रेला जाण्यापूर्वी इरुमुडी तयार करावी लागते. इरुमुडी म्हणजे एक कापडी पिशवी असून, तिच्यात दोन कप्पे असतात. पुढच्या कप्प्यात गाईच्या शुद्ध तुपाने भरलेला एक नारळ ठेवतात. नारळाचा तिसरा डोळा फोडून आतले पाणी बाहेर काढून टाकतात व त्याच डोळ्यातून आत तूप भरतात. नंतर त्याला घट्ट बूच लावून ते बंद करतात. मागच्या कप्प्यात वाटेत लागणारी शिदोरी व स्वतःच्या गरजेच्या वस्तू ठेवतात. नंतर त्या कप्प्यांना वेगवेगळ्या गाठी मारतात आणि वरच्या बाजूला पुन्हा त्यांची एकत्र गाठ बांधतात. इरुमुडी तयार झाल्याबरोबर लगेच भक्ताने यात्रेचे प्रस्थान ठेवायचे असते. त्या वेळी तो इरुमुडी डोक्यावर ठेवतो, 'स्वामिये शरणम् अय्यप्प' असा उद्घोष करतो आणि मागे वळून घराकडे न पाहता चालू लागतो.

शबरीमलैवरील मंदिराकडे जाण्यासाठी अनेक मार्ग आहेत. पण एरुमेलीवरून जाणारा मार्ग हा अधिक पवित्र मानतात. कारण तो देवाने स्वतःच सांगितलेला आहे. हा मार्ग सर्वांत लांबचा व अधिक कठीण आहे. इथून मंदिर सुमारे ४५ मैल दूर आहे. एरुमेली येथे शास्त्याचे मंदिर आहे. त्यातील मूर्ती शिकाऱ्याच्या रूपातील आहे. प्रथमच यात्रेला जाणाऱ्या भक्ताच्या



शास्ता हरिहरपुत्र

अंगाला इथे निरनिराळे रंग फासतात. नंतर सर्व यात्रेक[illegible] मिरवणुकीने ढोलाच्या साथीवर नाचत नाचत शबरीमलै[illegible] जाण्यासाठी निघतात.

एरुमेलीपासून यात्रेकरू अनवाणी निघतात. तीन-चार मै[illegible] चालून गेल्यावर ते पेरूर थोडू या कालव्याच्या काठी मुक्का[illegible] करतात. दुसरा मुक्काम तिथून सहा मैलांवरच्या अलसा कि[illegible] अझुट्टा नदीच्या तीरावर असतो. तिथून पुढे उभ्या चढणीच[illegible] दगडगोट्यांनी भरलेला अझुट्टा नावाचा पर्वत चढायचा अस[illegible] हा मार्ग इतका अवघड आहे, की तो यात्रेकरूंची दमछाक कर[illegible] हा सर्व भाग घनदाट जंगलाने व्यापलेला आहे. जंगलात हिं[illegible] पशूंचेही वास्तव्य असते. त्यामुळे हा मार्ग भयप्रदही आहे[illegible] पर्वत ओलांडला की मग दुसरा करिमाल ( = हत्तींचे निवा[illegible] स्थान) पर्वत चढावा लागतो. याची उतरणही अत्यंत नित[illegible] असल्यामुळे प्रत्येक पाऊल जपून टाकावे लागते. यानंतर [illegible]

कडे पंपा नदीच्या किनाऱ्यावर पोचतात; तिथे मुक्काम करतात. मकरसंक्रांतीच्या आदल्या दिवशी भूतनाथ इथे वास्तव्य करतो, अशी धारणा आहे. त्यामुळे त्या दिवशी रात्री इथे दिवे व मेणबत्या लावून दीपोत्सव करतात.

त्यानंतर नीलगिरी चढायचा असतो. ही चढण अत्यंत बिकट, उभी व निसरडी असते. ती पार केल्यावर शबरीपीठ लागते. त्यानंतर सुमारे पाऊण तास चालल्यावर यात्रेकरू मंदिराच्या पायऱ्यांशी पोचतात. या एकूण अठरा पायऱ्या असून, त्या पवित्र मानल्या जातात. पंचेंद्रिये, अष्टराग, त्रिगुण, विद्या आणि अविद्या यांचे त्या प्रतीक समजल्या जातात. पायऱ्या चढून गेल्यावर शास्त्याचे मंदिर लागते. मंदिर लहानसेच आहे. त्याच्या आवारातही जेमतेम दोन हजार माणसे बसू शकतात. तरीसुद्धा यात्रेच्या वेळी जमलेल्या सुमारे दहा लाख लोकांना देवाचे दर्शन होऊ शकते. दर्शन घेतल्यावर यात्रेकरू बरोबर आणलेल्या तुपाचा देवाला अभिषेक करतात. मग प्रसाद घेऊन देवाकडे तोंड करून उलट्या पायऱ्या उतरतात व आपापल्या गावी जायला निघतात.

शबरीमलैवरील शास्त्याची मूर्ती कमलपीठावर बसलेली आहे. त्याच्या गळ्यात, हातांत व पायांत अलंकार आहेत. मस्तकावर मुकुट असून छातीवर व गुडघ्यांभोवती वस्त्रपट्ट गुंडाळलेले आहेत.

केरळातील अनेक आदिवासी जमाती व नागर लोकही शास्त्याचे भक्त आहेत. यात्रेला जाताना जात, पंथ, स्पृश्यास्पृश्य हे सर्व भेद विसरून स्त्री-पुरुष निघतात व वाटेत एकमेकांना मदत करतात. मकरसंक्रांत हा शास्त्याच्या यात्रेचा मुख्य दिवस आहे. त्या दिवशी इथे दीपोत्सव करतात. तसेच हजारो रुपयांचा कापूरही इथे त्या दिवशी पेटवतात. शास्त्याच्या अस्तित्वाची साक्ष म्हणून त्या दिवशी संध्याकाळी दीपाराधना झाल्यावर क्षितिजाच्या ईशान्य भागी तेजस्वी प्रकाशज्योत दिसते. त्या भागाला कंठमाल असे नाव आहे. शास्ता तिथे ज्योतीच्या रूपाने राहतो, अशी समजूत आहे. मकरसंक्रांतीच्या दिवशी तो तिथून शबरीमलैवर येतो आणि भक्तांना आशीर्वाद देतो, असे समजतात.

परशुरामाने समुद्रातून केरळची भूमी वर काढल्यावर तिच्या रक्षणासाठी पहाडांवर १००८ शास्त्यांची प्रतिष्ठापना केली, असे केरलोत्पत्ती या ग्रंथात सांगितले आहे. केरळात अनेक ठिकाणी शास्त्याची मंदिरे आहेत. [ डॉ. एस्. के. नायर, युगप्रभात, १६ डिसें. १९६२; एकता, माघ शु. १ शके १८८०; लॉर्ड अय्यपन दि धर्मशास्ता, श्री. पियप्पन, १९७३]

**शास्त्रार्थ** शास्त्रचर्चा, खंडनमंडनात्मक वादविवाद. शास्त्र या शब्दाच्या दोन व्याख्या अशा—

(१) **प्रवृत्तिश्च निवृत्तिश्च पुंसां येनोपदिश्यते ।**
**तद्धर्माश्चोपदिश्यन्ते शास्त्रं शास्त्रविदो विदुः ।।**

अर्थ – कर्माच्या ठिकाणी प्रवृत्ती, कर्मापासून निवृत्ती आणि माणसांचे धर्म या गोष्टी ज्यात उपदेशिलेल्या असतात, त्याला शास्त्रवेत्ते शास्त्र म्हणतात.

(२) **अनेकसंशयोच्छेदि परोक्षार्थस्य दर्शकम् ।**
**सर्वस्य लोचनं शास्त्रं यस्य नास्त्यन्ध एव सः ।।**

अर्थ – शास्त्र हे अनेक संशयांचे निराकरण करून मानवाच्या स्थूल चक्षूंना अगम्य असा अर्थ अभिव्यक्त करते. त्यामुळे शास्त्र हाच सर्वांचा खरा डोळा आहे. तो ज्याला लाभला नाही, तो अंध होय.

शास्त्रालाच दर्शन अशी दुसरी संज्ञा आहे. न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा व वेदान्त अशी ही सहा दर्शने किंवा शास्त्रे वैदिक असून, चार्वाक, बौद्ध, जैन, इ. शास्त्रे अवैदिक आहेत.

शास्त्रांमध्ये जीव, जगत, ईश्वर आणि मोक्ष यांचा प्रामुख्याने विचार केलेला असतो. त्यांचा व्यासंग करताना प्रज्ञावंतांना त्या विषयात काही शंका उपस्थित होतात. काही सिद्धान्त आणि विवेचन त्यांना पटत नाही. अशा वेळी त्या त्या शास्त्राच्या पंडितांमध्ये पूर्वपक्ष, उत्तरपक्ष अशा प्रकारे जी चर्चा होते किंवा जे खंडनमंडन होते, त्याला शास्त्रार्थ म्हणतात. आपले शास्त्र तेवढे उत्तम; इतरांची शास्त्रे गौण अशा आग्रही वृत्तीतूनही शास्त्रविषयक वाद संभवतात. 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' अशी एक उक्ती आहे. परस्पर वाद केल्याने सिद्धान्त दृढ होतो किंवा तत्त्वबोध होतो असा तिचा अर्थ आहे. वाद केवळ दोन शास्त्रांमध्ये, दोन धर्मांमध्ये किंवा दोन संप्रदायांमध्येच होऊ शकतो असे नाही; तर एकाच पंथाचे किंवा एकाच मताचे विद्वान आपसात वाद करून स्वसिद्धान्ताला बळकटी आणू शकतात. प्राचीन काळी काही विद्वान आपली विद्वत्ता सिद्ध करण्यासाठी पंडितांना शास्त्रार्थाचे आव्हान देत. असे पारंगत विद्वान निरनिराळ्या देशांतल्या राजसभेत जाऊन आणि तिथल्या पंडितांना वादात पराभूत करून जयपत्रे मिळवीत असत.

वादाची सामान्यतः तीन स्वरूपे होतात — वाद, जल्प व वितंडा. खऱ्या तत्त्वजिज्ञासू विद्वानांमध्ये जो विचारविनिमय होतो, प्रमाणे पुढे आणली जातात व ती खंडित किंवा मंडित होतात, अशा प्रकाराला वाद म्हणतात. तो खऱ्या अर्थी शास्त्रार्थ असतो.

परपक्षाचे खंडन करून आत्मसिद्धान्ताचे मंडन करण्यासाठी जो वादविवाद केला जातो, त्याला जल्प म्हणतात. या प्रकारात तत्त्वजिज्ञासा नसते. आणि आपल्या मताची स्थापना करण्याच्या अपेक्षेपेक्षाही भलाबुरा युक्तिवाद करून दुसऱ्याला खोडून काढणे

एवढ्याच उद्देशाने जो वाद होतो, त्याला वितंडा म्हणतात.

प्राचीन काळी वेगवेगळ्या शास्त्रांच्या पंडितांत किंवा त्यांच्या पक्षांत वाद व्हायचा असे तेव्हा जय-पराजयाचा निणय सांगण्यासाठी एखाद्या तोलामोलाच्या पंडिताची मध्यस्थ म्हणून नेमणूक करीत.

वेदकालापासून आजतागायत ही शास्त्रार्थपरंपरा भारतात प्रचलित आहे. ब्राह्मणकालात मोठमोठे यज्ञ होत आणि त्या समारंभातले विद्वान ऋत्विज काही हलकेफुलके शास्त्रार्थ करीत, त्यांना ब्रह्मोद्य अशी संज्ञा होती. अश्वमेध किंवा दशरात्र अशासारख्या मोठ्या यज्ञांत ब्रह्मोद्य हा एक आवश्यक भाग असे. (कूट पाहा) त्यातली प्रश्नोत्तरे सामान्यपणे अशा प्रकारची असत —

(१) एकटाच आपल्या मार्गाने कोण हिंडतो ?

(२) सतत पुनःपुन्हा जन्माला कोण येतो ? इत्यादी

उपनिषदांमध्येही शास्त्रार्थाचे अनेक प्रसंग आलेले आहेत. छांदोग्योपनिषदातला प्रवाहण जैवली हा एक पारंगत दार्शनिक राजा होता. त्याच्या दरबारात येणाऱ्या अनेक पंडित ऋषींचा विद्यामद व वादकंडू शमवून त्याने प्रश्नोत्तर पद्धतीने त्यांना तत्त्वोपदेश केला आहे.

जनकाच्या राज्यात असा एक नियम होता, की शास्त्रार्थाच्या किंवा कूट प्रश्नोत्तराच्या वादात जो हरेल त्याला पाण्यात बुडवून मारायचे. कहोळ नामक ऋषी जनकाजवळ द्रव्य मागायला गेला असता वरुणपुत्र बंदी याने त्याला वादात जिंकले व पाण्यात बुडवून मारले. त्यानंतर बारा वर्षांनी कहोळाचा पुत्र अष्टावक्र बापाच्या मृत्यूचा सूड उगवण्यासाठी जनकाच्या दरबारात उपस्थित झाला. त्याने बंदीला वादाचे आव्हान दिले व त्यात त्याला पराभूत केले. जनकाने मग बंदीलाही वरीलप्रमाणेच शिक्षा दिली. (म. भा. वन. १३४–१३६)

उपनिषदानंतरचा काळ हा विविध दर्शनांचा काळ होय. व्याकरण, न्याय, मीमांसा, अद्वैत, बौद्ध, जैन, इ. दर्शनांवर पुढील काळात शास्त्रार्थ होऊ लागले. धर्मशास्त्र हाही एक चर्चेचा विषय ठरला. पतंजलीच्या महाभाष्यात शास्त्रार्थाचे एक मजेदार उदाहरण सांगितले आहे. एक वैयाकरण व एक सूत (रथ चालवणारा) यांच्यामधला तो शास्त्रार्थ आहे.

वैयाकरण विचारतो — 'कोऽस्य रथस्य प्रवेता ?' (या रथाचा सारथी कोण ?)

त्यावर सूत उत्तरतो, 'महाराज या रथाचा प्राजिता मी आहे.'

वैयाकरण – प्राजिता शब्द 'दुरुत' अर्थात अपशब्द आहे.

सूत – तुम्ही उच्चारलेले प्रवेता व दुरुत हे अपशब्द आहेत.

पुढच्या काळात व्याकरणशास्त्रावर अनेक मौखिक आणि लिखित असे शास्त्रार्थ झाले. याविषयीचीही एक आख्यायिका आहे – एका वैयाकरणाने शास्त्रार्थ करीत असता 'पंक्षु' असा शब्दप्रयोग केला. प्रतिस्पर्ध्याने तो अशुद्ध असल्याचे सांगितले. खरोखरी तो अशुद्ध होताच; पण तो शुद्ध आहे हे सिद्ध करण्यासाठी सरस्वतीच्या कृपेने त्याने एका रात्रीत सारस्वत नावाचे नवे व्याकरणच निर्माण केले.

पुढच्या काळात या व्याकरणविषयक वादविवादात काही अपप्रवृत्तीही शिरल्या. भट्टोजी दीक्षित हा सिद्धान्तकौमुदी या ग्रंथाचा कर्ता. त्याने या ग्रंथावर प्रौढमनोरमा नावाची टीका स्वतःच लिहिली. त्याने त्याचा गुरू शेषकृष्ण याच्या प्रक्रियाप्रकाश नावाच्या ग्रंथावरही टीका केली. ते त्याचे कृत्य गुरुद्रोहाचे आहे, असे जगन्नाथ पंडिताला वाटले आणि त्याने भट्टोजीच्या प्रौढमनोरमेवर प्रौढमनोरमाकुचमर्दिनी नावाची खंडनपर टीका लिहिली.

दर्शनाच्या क्षेत्रात वेदान्ती, मीमांसक आणि नैयायिक यांचे मुख्य प्रतिस्पर्धी बौद्ध दार्शनिक होते. वैदिक दर्शनपंडितांना या बौद्धांशी प्रखर सामना द्यावा लागला. पण या वादविवादातून न्याय, वेदान्त, बौद्ध ही आस्तिक-नास्तिक उभयविध दर्शने प्रगत झाली व अधिक सूक्ष्म झाली. विरोध-विकासाची प्रक्रिया या कामी लागू पडली. त्यात अनेकदा अनेकांचा पराजय झाला; पण शास्त्रांचा मात्र लाभ झाला.

कुमारिलभट्ट हा सातव्या शतकातला एक असामान्य मीमांसक होता. त्याने आपल्या शास्त्राच्या पांक्त अध्ययनानंतर बौद्ध दर्शनही, त्यांच्या गोटात शिरून, आत्मसात केले आणि मग अनेक ठिकाणी त्याने आपल्या वाग्मितेच्या प्रभावाने बौद्धांचा वादात पराजय केला.

मंडनमिश्र हा प्रकांड पंडित कुमारिलभट्टाचाच शिष्य होय. त्याचा आणि श्रीशंकराचार्यांचा वाद सुप्रसिद्ध आहे. मंडनमिश्र हा कट्टर मीमांसक आणि शंकराचार्य संन्यासाचे पुरस्कर्ते. आचार्यांनी मंडनमिश्राच्या घरी जाऊन त्याच्याकडे वादभिक्षा मागितली. सकृद्दर्शनी त्यांचा वाद वितंडाच्याच स्वरूपाचा होता. म्हणजे आचार्य वितंडात शिरले होते. 'कुतो मुंडी ?' (अहो संन्यासी महाराज, तुम्ही आलात कुठून) या मंडनमिश्राच्या प्रश्नावर 'मुंडी' या शब्दावर श्लेष करून आचार्य उत्तरले 'आगलान्मुंडी !' (मी गळ्यापर्यंत मुंडन करतो.)

मंडनमिश्र –'अहो किमु सुरा पीता ?' (तुम्ही काय दारू प्याला आहा काय ?)

आचार्य – (पीता या शब्दावर श्लेष करून) 'पीता नाही श्वेता' (दारू पीता म्हणजे पिवळी नसते, तर पांढरी असते.)

मंडनमिश्र –'किं त्वं जानासि तद्वर्णम् ?' (यतिमहाराज तुम्हांला दारूचा रंग माहीत आहे तर.)

आचार्य—'अहं वर्णं भवान् रसम्।' (मला फक्त दारूचा रंगच माहीत आहे. पण तुम्हांला तर तिचा स्वादही ठाऊक आहे. कारण मीमांसकांना यज्ञक्रियेत काही प्रसंगी सुरा प्यावी लागते.)

पण हा वितंडा लवकरच संपला आणि त्यांच्या शास्त्र-विषयक खऱ्या वादाला प्रारंभ झाला. मंडनमिश्राची प्रतिज्ञा ही, की 'मी हरलो तर संन्यास घेऊन गृहत्याग करीन.' आचार्यांची प्रतिज्ञा ही, की 'मी हरलो तर काषायवस्त्रे टाकून गृहस्थाश्रम स्वीकारीन' मग पूर्वपक्ष—उत्तरपक्ष सुरू झाले. मंडनमिश्राची विदुषी भार्या शारदा ही मध्यस्थ म्हणून नियुक्त झाली. तिने मंडनमिश्र पराभूत झाल्याचा निर्णय दिला. पण त्याच वेळी तिने आचार्यांना सांगितले की, 'मी मंडनमिश्राची अर्धांगी आहे. मला जिंकल्याशिवाय तुमचा जय पूर्ण होणार नाही.' आचार्य त्याही गोष्टीला कबूल झाले. शारदेने त्यांना कामशास्त्रातले काही प्रश्न विचारले. शंकराचार्य त्या बाबतीत अनभिज्ञ होते. त्यांनी मुदत मागून घेतली. मग अमरुक राजाच्या मृतशरीरात प्रवेश करून कामशास्त्राचा अनुभव घेतला आणि शारदेच्या सर्व प्रश्नांना उत्तरे देऊन आपला विजय पूर्ण केला. (शंकराचार्य पाहा.)

काही पंडितांना वादविवादातला पराजय जिव्हारी लागे आणि जन्मभर ते दुःखीकष्टी राहत. नैषधकार श्रीहर्षाचा पिता हरिपंडित हा कनौजच्या दरबारात राजपंडित होता. त्याला उदयनाचार्याने वादात पराभूत केले. त्यामुळे मरेपर्यंत त्याला स्वास्थ्य मिळाले नाही. अंतकाळी त्याने आपला पुत्र श्रीहर्ष याला जवळ बोलावून सांगितले. 'तू माझ्या पराभवाचा बदला घे.' श्रीहर्षाने शास्त्रविद्येत पारंगत होऊन ते कार्य पार पाडले.

असे अनेक वाग्मी पंडित 'वादिवृषभ', 'प्रतिवादिभयंकर' अशा उपाधींनी स्वतःला गौरवून घेत. मध्ययुगातील अनेक राजेलोक विरोधी पंथांच्या शास्त्रीमंडळीत शास्त्रार्थ घडवून आणीत आणि त्यात आनंद उपभोगीत. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस पंडितवर्गात सनातनी आणि पुरोगामी किंवा सुधारक' असे दोन पंथ निर्माण झाले. 'धर्म परिवर्तनीय की अपरिवर्तनीय' या विषयावर त्यांचे अनेक ठिकाणी शास्त्रार्थ झाले. पुनर्विवाह, विधवाकेशवपन, पतितपरावर्तन, इ. सामाजिक विषयांवरही दोन्ही पक्षांत वादविवादांची रणे माजली. महात्मा गांधींनीही 'अस्पृश्यतेला धर्मात आधार आहे काय', या विषयावर पंडितांमध्ये शास्त्रार्थ घडवून आणला होता. श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीही बडोद्यात शास्त्रार्थ घडवून आणून मराठ्यांचे क्षत्रियत्व सिद्ध करून घेतले होते.

वादविवादात जयपत्रे घेणारे पंडितश्रेष्ठ दिवसा मशाली घेऊन हिंडत, पराजित पंडितांच्या 'पोथीपत्रा' छिनाऊन घेत. लग्नसमारंभात पंडितसभा होत, त्यांतही हिरीरीने शास्त्रार्थ चालत, अशा लोककथा आहेत. [श्री. विश्वनाथ गौड—आकाशवाणी प्रसारिका, जानेवारी १९५४]

## शाही राजघराणे

कुशाणांचे साम्राज्य नष्ट झाल्यानंतरही त्या वंशातले काही राजे काबूल व गंधार या प्रदेशांवर राज्य करीत होते. अल् बिरुनीने त्यांना तुर्की शाही राजे मानले आहे; पण युआन च्वांग त्यांना क्षत्रिय म्हणतो. या घराण्यातील राजांनी इ. स. च्या ७ व्या शतकापासून ९ व्या शतकापर्यंत अरबी आक्रमणांचा प्रतिकार केला. लगतूरमान हा त्यांतील शेवटचा राजा होय. त्याचा ब्राह्मण मंत्री कल्लर याने राजाला पदच्युत करून स्वतःच राज्य बळकावले. त्याच्या वंशाला अल् बिरुनीने हिंदू शाही म्हटले आहे. राजतरंगिणीत या कल्लराला लल्लिय हे नाव दिलेले असून, त्याच्या वंशजांची माहितीही दिली आहे.

शाही घराण्याचे राज्य इ. स. च्या ९ व्या शतकाच्या उत्तरार्धात सुरू झाले. तेव्हा लल्लियाची सत्ता काबूल व प. पंजाब या प्रदेशांवर होती. पण इ. स. ८७० च्या सुमारास अरबांनी काबूल जिंकले. मग लल्लियाने पंजाबातील उदभांडपूर येथे आपली राजधानी स्थापली. सिंधूच्या काठी, अटकेच्या उत्तरेला १५ मैल उंड नावाचे खेडेगाव आहे, तिथेच हे उदभांडपूर होते. काश्मीरचा उत्पलवंशी राजा शंकरवर्मा याने शाही राज्यावर एकदा स्वारी केली होती, पण लल्लियाने ती मोडून काढली. कल्हणाने लल्लियाच्या पराक्रमाची खूप स्तुती केली आहे. उत्तर भारतातील सर्व राजांमध्ये तो श्रेष्ठ होता, असेही त्याने म्हटले आहे.

लल्लियाला तोरमाण नावाचा एक पुत्र होता, पण लल्लियाच्या मृत्यूनंतर त्याच घराण्यातील सामंत नामक पुरुषाने त्याचे सिंहासन बळकावले. श्री सामंत ही अक्षरे असलेली काही नाणी अफगणिस्तानात सापडली आहेत, ती त्याचीच असावी. इ. स. ९०० च्या सुमारास काश्मीरचा मंत्री प्रभाकर याने उदभांडपुरावर स्वारी करून सामंताला पदच्युत केले आणि तोरमाण याला कमलुक या नावाने सिंहासनावर बसवले. अल् बिरुनीने त्याचा उल्लेख कमलू असा केला आहे. एका कोरीव लेखात त्याला कमलवर्मा म्हटले आहे. याच्या कारकिर्दीत काबुलिस्तानचा प्रशासक फर्दघान याने शाही राज्यातील रुकावंड या तीर्थक्षेत्रावर स्वारी करून ते लुटले. पण कमलू त्याला प्रतिकार करू शकला नाही.

कमलूच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र भीम हा राजा झाला. एका शिलालेखात त्याचा उल्लेख महाराजाधिराज परमेश्वर शाही श्रीभीमदेव असा आढळतो. त्याच्या मुलीची मुलगी दिद्दा ही काश्मीरचा राजा क्षेमगुप्त (इ. स. ९५०–९५८) याची राणी होती. त्यामुळे काश्मीरच्या राजदरबारी भीमदेवाला बराच मान मिळत होता. त्याने विष्णूचे एक भव्य मंदिर बांधून त्याला भीमकेशवाचे मंदिर हे नाव दिले होते. बुमझू येथे जे प्राचीन मंदिर आहे, ते हेच असावे. काबुलिस्तानात याची काही नाणी सापडली आहेत. हा काश्मीरच्या क्षेमगुप्ताचा समकालीन होता. पण याचा राज्यकाल कोणता हे निश्चित कळत नाही.

भीमदेवानंतर जयपाल हा राजा झाला, असे मुस्लिम इतिहासकार म्हणतात. पण तो भीमाचा पुत्र होता की वेगळ्या घराण्यातला पुरुष होता, ते कळत नाही. राजतरंगिणीत जयपालाचा उल्लेख नाही; मात्र त्या काळातील (इ. स. ९५८–७२) थक्कन नामक शाही राजाचा उल्लेख आहे. फिरिश्ताने जयपाल हा इष्टपालाचा पुत्र होता, असे म्हटले आहे. जयपाल इ. स. च्या १० व्या शतकाच्या उत्तरार्धात सिंहासनावर बसला. उत्तर स्वातमध्ये एक शिलालेख सापडला आहे. त्यात परमभट्टारक महाराजाधिराज श्रीजयपालदेव याचा उल्लेख आहे. त्याचे राज्य विशाल प्रदेशावर पसरले होते. पश्चिम पंजाबातील सरहिंदपासून अफगणिस्तानातील लमघानपर्यंत आणि काश्मीरच्या सीमेपासून मुलतानपर्यंत त्याची सत्ता होती. त्यात वायव्य सीमाप्रांतही समाविष्ट होता.

त्याच वेळी सबुक्तिगीन नावाचा पराक्रमी पुरुष गझनीचा सुलतान झाला. त्याने आसपासची लहान राज्ये जिंकून राज्यविस्तार केला व आपले बळ वाढवले. नंतर त्याने शाही राज्यावर आक्रमण सुरू केले. तेव्हा जयपालाने गझनीवर स्वारी केली. जेलालाबादजवळ दोन्ही सेनांची गाठ पडली. पण युद्ध सुरू होण्यापूर्वीच भयानक वादळ सुरू झाले आणि त्यामुळे जयपालाला शत्रूशी तह करून माघार घ्यावी लागली. पण तो तहाच्या अटी पाळत नाही, असे समजल्यावर सबुक्तिगीनाने मोठ्या सैन्यानिशी भारतावर पुन्हा स्वारी करण्याची तयारी केली. त्या संकटाची शक्यता ओळखून जयपालाने भारतातील अन्य राजांना मदतीचे आवाहन केले. कनौजच्या प्रतिहारांचे सामर्थ्य त्या काळी कमी झाले असले, तरी राजाने चाहमान व चंदेल राजांसह जयपालाशी सहकार्य केले. त्या सर्वांची प्रचंड सेनादले मातृभूमीच्या रक्षणार्थ मुसलमानांशी लढली; पण शेवटी त्यांचा पराजय झाला आणि सिंधू नदीपर्यंतचा सर्व प्रदेश सबुक्तिगीनाने जिंकून घेतला.

सबुक्तिगीन इ. स. ९९७ साली मरण पावला आणि त्याचा मुलगा महमूद हा गझनीचा सुलतान झाला. त्याने भारतावर अनेक स्वाऱ्या करून अफाट संपत्ती लुटून नेली. इ. स. १००१ मध्ये त्याने दुसरी स्वारी केली, तेव्हा शाही राजा जयपाल त्याला सामोरा गेला. पेशावरजवळ भयानक युद्ध झाले. जयपालाजवळ प्रचंड सेना असूनही महमुदाच्या विलक्षण डावपेचामुळे त्या युद्धात त्याचा पराजय झाला. जयपाल स्वतः शत्रूच्या हाती सापडला. महमुदाने त्याला खंडणी देण्याच्या अटीवर सोडले. पण जयपालाला ती मानहानी सहन झाली नाही आणि त्याने स्वतःच्या हाताने चिता पेटवून स्वतःला जाळून घेतले. जयपालानंतर त्याचा मुलगा आनंदपाल राजा झाला.

इ. स. १००५–६ मध्ये सुलतान महमुदाने मुलतानवर स्वारी केली. सिंधू नदीला महापूर आला असल्यामुळे त्याला शाही राज्यातून मुलतानकडे जायला मार्ग हवा होता. पण आनंदपालाने तो देण्याचे नाकारले. तेव्हा सुलतानाने आनंदपालाच्या सैन्यावर हल्ला चढवला. पेशावरजवळ त्यांची लढाई झाली. तिच्यात आनंदपालाचा पराभव झाला. मग सुलतानाने मुलतानही जिंकून घेतले.

इ. स. १००८ मध्ये सुलतान महमुदाने पुन्हा शाही राज्यावर स्वारी केली. आनंदपालाचा पुत्र ब्रह्मपाल याने त्याला मोठ्या सुसज्ज सैन्यानिशी प्रतिकार केला. त्या वेळी आनंदपालाने उ. भारतातील अनेक राजांकडे साहाय्य मागितले आणि त्यांनी आपली सेनादले युद्धासाठी पाठवली, असे फिरिश्ताने म्हटले आहे. सुलतान महमूद ओहिंदजवळ तळ ठोकून राहिला होता. त्याने सभोवती खंदक खणले होते. सुमारे चाळीस दिवस दोन्ही पक्ष प्रतिपक्षाकडून हल्ला होण्याची वाट पहात होते. महमुदाने शेवटी सहा हजार धनुर्धारी सैनिकांकडून शत्रुसैन्यावर बाण टाकले. त्यामुळे प्रक्षुब्ध होऊन पंजाबच्या गक्खरांनी मुसलमानी सैन्यावर जबरदस्त हल्ला चढवला. त्यात सुमारे पाच हजार मुसलमान सैनिक मारले गेले. सुलतानाचा पराभव होऊ लागला. पण तेवढ्यात सुलतानाच्या खास सेनादलाने हिंदू सैन्याच्या मागून त्याच्यावर हल्ला चढवला. त्यामुळे हिंदू सैन्यात गोंधळ निर्माण झाला. त्याच वेळी सरसेनापती आनंदपालाच्या हत्तीला एक बाण वर्मी लागून तो बिथरला आणि युद्धभूमी सोडून पळाला. त्यामुळे हिंदू सैनिकांचे धैर्य फार खचले व ते सैरावैरा पळू लागले. मग सुलतानाच्या सेनादलांनी त्यांचा पाठलाग केला आणि २०,००० सैनिकांना ठार मारले.

सुलतान महमुदाने उरलेल्या हिंदू सैन्याचा भीमनगर (नगरकोट) पर्यंत पाठलाग केला. तिथे एका डोंगरावर भक्कम किल्ला असून, त्यात प्रचंड संपत्ती साठवलेली होती. सुलतानाने तो किल्ला जिंकून घेतला आणि सर्व संपत्ती लुटून नेली.

या स्वारीत सिंधूच्या पश्चिमेकडील सर्व प्रदेश सुलतान महमुदाने घेतला. त्यात शाही राजांची राजधानी उदभांडपूर हीदेखील समाविष्ट होती.

इ. स. १००९ मध्ये सुलतानाने पुन्हा भारतावर स्वारी केली व थेट राजपुतान्यातील नारायणगावपर्यंत मजल मारली. तिथल्या राजाचा पराभव करून आणि प्रचंड संपत्ती लुटून तो माघारी गेला. मुलतानचा सुभेदार दाऊद पुन्हा शिरजोरी करू लागला, म्हणून सुलतानाने इ. स. १०१० साली त्याच्यावर स्वारी करून त्याला पकडून नेले.

सुलतान महमुदाचे हे पराक्रम व दिग्विजय पाहून शाही राजा आनंदपाल याची खात्री झाली, की त्याच्याशी लढत राहणे म्हणजे सर्वनाश ओढवून घेणे होय. म्हणून मग त्याने सुलतानाशी तह केला. त्यात दरवर्षी ५० हत्ती, त्यांच्यावर लादलेली संपत्ती आणि २००० दास आनंदपालाने गझनीला पाठवावे, असे ठरले. याउलट शाही राज्यावर स्वारी न करण्याचे सुलतानाने मान्य केले. त्याप्रमाणे आनंदपालाच्या मृत्यूपर्यंत दोन्ही पक्ष वागले. इ. स. १०११ मध्ये सुलतान महमुदाने ठाणेश्वरवर स्वारी केली, तेव्हा आनंदपालाने त्याला आपल्या राज्यातून जाण्यास मार्ग दिला.

इ. स. १०१२ मध्ये आनंदपाल मरण पावला व त्याचा पुत्र त्रिलोचनपाल गादीवर बसला. त्याने खंडणी देण्याचे नाकारले, म्हणून सुलतानाने इ. स. १०१३ साली त्याच्यावर स्वारी केली. शाहींची राजधानी नंदन येथे होती. त्रिलोचनपालाने आपला पुत्र भीमपाल याला मोठ्या सैन्यानिशी सुलतानाचा प्रतिकार करण्यासाठी पाठवले आणि आपल्या सामंतांना मदतीसाठी पाचारण केले. बरेच दिवस घनघोर युद्ध चालले. शाही सैनिक पुष्कळ शर्थीने लढले. पण शेवटी त्यांचा पराभव झाला. हजारो सैनिक मारले गेले. मग त्रिलोचनपाल व भीमपाल यांनी काही सुसज्ज सैन्य राजधानीच्या रक्षणासाठी ठेवून काश्मीरमध्ये माघार घेतली. सुलतानाने महाप्रयासाने नंदनचा किल्ला जिंकला, शाही राज्याचा बराच भाग घेतला आणि खूप संपत्तीही लुटून नेली. नंदन घेतल्यानंतर सुलतानाने काश्मीरकडे मोर्चा वळवला. त्रिलोचनपाल आपल्या उरलेल्या सैन्यासह तिकडे गेला होता. त्याने सुलतानाच्या सैन्याचा प्रतिकार केला. पण तिथेही त्याचा पराजय झाला. मग तो पूर्व पंजाबात पळून गेला. तिथे त्याने सैन्याची जमवाजमव करून काही वर्षे राज्य केले. पण त्या वेळी शर्वनृपती चांदराय याच्याशी त्याला संघर्ष करावा लागला. शर्व म्हणजे सहारणपुराजवळचे ससर्व होय. चांदराय व त्रिलोचनपाल यांचे अनेक संग्राम होऊन दोन्ही पक्षांचे बरेच सैनिक मारले गेले. मग दोघांनी तह केला. शांतता कायम राहावी, म्हणून त्रिलोचनपालाने आपला पुत्र भीमपाल याच्यासाठी चांदरायाच्या कन्येला मागणी घातली. चांदरायाने ती मान्य केली. पण भीमसेन विवाहासाठी शर्वमध्ये जाताच त्याला कैद करण्यात आले. त्रिलोचनपाल त्याला सोडवू शकला नाही.

पुढे इ. स. १०१८ साली सुलतान महमूद पुन्हा प्रचंड सैन्य घेऊन भारतात आला. कनौज हे त्याचे लक्ष्य होते. पंजाब व काश्मीरमधील अनेक राजांनी त्याला मदत केली. पण त्रिलोचनपाल माळव्यातल्या परमार भोजराजाकडे पळून गेला. सुलतानाने इ. स. १०१९ मध्ये शर्ववर हल्ला केला तेव्हा चांदरायही पळून गेला. त्या धामधुमीत भीमपाल कैदेतून सुटला.

इ. स. १०२१–२२ मध्ये सुलतान पुन्हा जेव्हा भारतात आला, तेव्हा त्याने चंदेलांवर स्वारी केली. त्या वेळी शाही राजा त्रिलोचनपाल याने यमुना पार करणाऱ्या मुस्लिम सैन्यावर जोरदार हल्ला केला, पण त्यात त्याचा पराभवच झाला. मग तो चंदेल राजा विद्याधर याच्याकडे जाण्यास निघाला असता वाटेतच मारला गेला.

त्रिलोचनपालाचा पुत्र भीमपाल त्यानंतर पाच वर्षे जिवंत होता. पण त्याचे राज्य महमुदाच्या सत्तेखाली गेले होते.

शाही राजांनी सुमारे २५ वर्षे मुसलमानी आक्रमणांचा प्रतिकार केला. ते पराक्रमी व स्वाभिमानी होते. त्यांचे सेनासामर्थ्यही प्रचंड होते. पण गझनीच्या सुलतानापुढे त्यांना प्रत्येक वेळी नमावे लागले. शाही राजांनी शेवटपर्यंत प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पण त्यांना यश मिळाले नाही. कल्हणाने व अल् बिरुनीनेही त्यांची खूप स्तुती केली आहे. [हि. क. इं. पी., ४ व ५; पू. म. भा.]

**शाहू छत्रपती** (इ. स. १८७४–१९२२) कोल्हापूर या माजी संस्थानचे अधिपती. एक प्रजावत्सल, दलितबंधू, समतेचा पुरस्कर्ता, अभ्युदयाविषयी सर्वांगीण दृष्टी असलेला, 'मोडेन पण वाकणार नाही' अशा निधड्या वृत्तीचा आणि कर्ता समाजसुधारक असा राजर्षी.

महाराजांचा जन्म कागलच्या घाटगे कुलात झाला. त्यांचे नाव यशवंतराव असे होते. त्यांच्या वडिलांचे नाव जयसिंगराव व आईचे राधाबाईसाहेब असे होते. कोल्हापूरचे तत्कालीन शिवाजीमहाराज यांचा अकाली अंत झाल्यामुळे त्यांच्या पत्नी महाराणीसाहेब यांनी यशवंतरावांना दि. १७–३–१८८४ रोजी दत्तक घेतले व शाहू छत्रपती असे त्यांचे नाव ठेवले. इ. स. १८८५ साली शाहूमहाराजांना राजकोट येथील राजकुमार कॉलेजात पाठविण्यात आले. इ. स. १८८९ पर्यंत त्या कॉलेजात अभ्यास करून महाराजांनी आपले शिक्षण पूर्ण केले. पुढे ते सर

फ्रेझर यांच्या देखरेखीखाली पुढच्या शिक्षणासाठी धारवाड येथे राहिले. तिथे त्यांनी इंग्रजी भाषा, राज्यकारभार, जगाचा इतिहास, इ. उच्च विषयांचे अध्ययन केले.

इ. स. १८९१ साली महाराजांचा विवाह झाला. त्यांच्या पत्नीचे नाव श्रीमंत सौ. लक्ष्मीबाईसाहेब असे होते. त्या बडोद्याच्या गुणाजीराव खानविलकर यांच्या कन्या होत्या. इ. स. १८९४ साली महाराजांनी संस्थानाची अधिकारसूत्रे हाती घेतली. सातव्या एडवर्ड बादशहांच्या राज्यारोहणसमारंभाला उपस्थित राहण्यासाठी महाराज इंग्लंडला गेले. या प्रवासात त्यांनी अनेक अनुभव गाठी बांधले. तत्पूर्वी त्यांनी अखिल भारताचा प्रवास करून देशाच्या राजकीय, धार्मिक व सामाजिक परिस्थितीचे सूक्ष्म निरीक्षण केले होते.

महाराज हे विवेकी व धोरणी होते. त्यांच्या काळी उभ्या भारतात स्वराज्याची चळवळ बळ धरू लागली होती. येथील इंग्रज सत्तेचे अधिकारी ही चळवळ दडपून टाकण्यासाठी बद्ध-परिकर झाले होते. भारतातल्या संस्थानिकांवरही त्यांची करडी नजर होती. शाहूमहाराजांना देशाचे स्वातंत्र्य मान्य व अपेक्षितही होते. इंग्रजांशी विरोध करून संस्थानाला धोका निर्माण करणे व राज्य गमावणे हा स्वातंत्र्याच्या पुरस्काराचा एक मार्ग. तर इंग्रजाशी सहकार्य करून संस्थानातल्या बहुजनसमाजाला आपल्या सत्तेचा लाभ करून देणे व त्याची सर्वांगीण उन्नती करण्यासाठी झटणे हा दुसरा मार्ग. महाराजांनी हा दुसरा मार्ग पसंत केला. लोकशाही स्वराज्य तर हवेच; पण त्या आधी ते उपभोगण्यासाठी व राबवण्यासाठी प्रथम जनतेत पात्रता आली पाहिजे व त्यासाठी बहुजन समाजात जागृती झाली पाहिजे, असे महाराजांचे राजकीय चळवळीबाबत धोरण होते. महात्मा फुले आणि आगरकर यांच्या विचारांकडे महाराजांचा ओढा होता.

महाराजांनी राज्यकारभाराकडे काळजीपूर्वक लक्ष पुरवले. न्याय देण्याचे संस्थानचे काढून घेतलेले अधिकार थोड्याच कालात तत्कालीन मुंबई सरकारकडून त्यांनी परत मिळवले. संस्थानातील जहागिरदारांच्या अनियंत्रित कारभाराला त्यांनी अंकुश लावला.

इ. स. १८९९ साली महाराजांच्या जीवनातील वेदोक्त प्रकरण उद्भवले. आणि त्यामुळे सबंध महाराष्ट्रात खळवळ माजली. महाराज दरसाल कार्तिकस्नानासाठी पंचगंगा नदीवर जात असत. महाराज स्नान करीत व पुरोहित मंत्र म्हणत. एके दिवशी महाराज पुरोहिताला म्हणाले. 'तुम्ही संकल्प सांगण्यापूर्वी स्नान का करीत नाही ?'

त्यावर राजोपाध्ये महाराजांना म्हणाले. 'आपण क्षत्रिय नसून शूद्र आहात; तेव्हा मी वैदिक मंत्र म्हणत नाही. मी जे पुराणोक्त मंत्र म्हणतो, त्यासाठी स्नानाची गरज नाही.'

महाराजांच्या मनाला ही गोष्ट लागली. कारण ते शिवाजी-महाराजांचे वंशज होते आणि शिवाजीमहाराजांचे क्षत्रियत्व तर पूर्वीच सिद्ध झाले होते. त्या दिवसापासून महाराजांच्या मनात



राजर्षी शाहू महाराज, कोल्हापूर

वेदोक्ताविषयी आग्रह निर्माण झाला. इ. स. १९०१ साली महाराजांनी कोल्हापुरातल्याच नारायणभट्ट सेवेकरी या वैदिक गृहस्थांच्या करवी आपली वेदोक्त श्रावणी केली. त्या पूर्वी महाराजांनी राजोपाध्यांना राजवाड्यातील कृत्ये वेदोक्तपद्धतीने करण्यास वारंवार सांगितले होते; पण राजोपाध्यांनी तिकडे लक्ष दिले नाही. त्यामुळे महाराजांनी राजोपाध्यांचे इनाम जप्त केले. श्री. तु. बा. नाईक लिहितात – अशा प्रकारे नाइलाजाने इनामी वतने जप्त करण्याचा निर्णय महाराजांना घ्यावा लागला. ६ मे १९०५ च्या हुकुमान्वये राजोपाध्ये यांची सर्व इनामी गावे, जमिनी व वंशपरंपरागत आलेले हक्क काढून घेतले व जप्तीचे हुकूमही तावडतोब दिले. अशा प्रकारे त्या वेळच्या लागणींचे २०–२५ हजारांचे उत्पन्न काढून घेतले. कोल्हापूरच्या दरबारी १६ कायदेकरी म्हणजे धर्मपंडित, पुरोहित, जोशी इत्यादींची धर्मादाय म्हणून दिलेली निरनिराळ्या गावांतील इनामी उत्पन्ने याच वेळी जप्त झाली. अशा प्रकारे १००० जणांची ३०–४० हजार एकर जमीन जप्त झाली.

हे वेदोक्त प्रकरण महाराष्ट्रात फार गाजले. कित्येक विद्वानांनी आणि वृत्तपत्रांनी महाराजांवर टीकेची झोड उठविली. स्थानिक ब्राह्मणांनी तर त्यांना शापही दिले.

या सगळ्या प्रकरणात महाराजांना वाटू लागले, की भिक्षुकशाहीच्या जाळ्यातून बहुजनसमाज मुक्त केल्याशिवाय ही उच्चवर्णियांची धार्मिक मक्तेदारी थांबणार नाही. महात्मा फुल्यांनी याच कारणासाठी सत्यशोधक समाज स्थापन केला होता. म. फुल्यांचे विचार महाराजांनी वाचले होते, पचवले होते. त्यामुळे नकळतच महाराज सत्यशोधक समाजाकडे आकृष्ट झाले.

शाहूमहाराजांचे लक्ष स्वामी दयानंदांच्या आर्यसमाजाकडे वळले होते. आर्यसमाज हा फक्त वेदांवर श्रद्धा ठेवणारा व जात-पात न मानणारा समाज आहे. त्यामुळे महाराजांच्या विचारसरणीशी आर्यसमाजाची मते जुळणारी होती. या समाजाचा महाराष्ट्रात प्रसार व्हावा, म्हणून महाराजांनी १९१८ साली कोल्हापुरात आर्यसमाजाची स्थापना केली व त्या समाजाला पूर्ण राजाश्रय दिला. आर्यसमाजाची अनेक गुरुकुले आहेत. त्या गुरुकुलात होतकरू विद्यार्थ्यांना प्रवेश मिळतो. महाराजांनी तसेच एक गुरुकुल निर्माण केले व त्यात विद्यार्थ्यांचे राहणे, भोजन व शिक्षण अशी सर्व सोय केली.

पण महाराजांच्या कार्याला व व्यक्तिमत्त्वाला सामाजिक क्रांतीचे परिमाण प्राप्त झाले ते वेदोक्त प्रकरणामुळे. हे प्रकरण घडले नसते तर महाराष्ट्रातील सामाजिक चळवळ गतिमान झाली नसती. त्या बाबतीतली महाराजांची भूमिका न्याय्य आणि व्यापक होती. या प्रकरणी व्यक्तिगत अपमानापेक्षा वेदोक्ताचा समान अधिकार ब्राह्मणेतरांना नाकारला जावा, हे शल्य त्यांना बोचले. धार्मिक व्यवहारात ब्राह्मण पुरोहितांच्या वर्चस्वाला शह म्हणून महाराजांनी नवे क्षात्रजगद्‌गुरुपद निर्माण केले. त्यासाठी पाटगाव येथील मौनी मठाच्या पीठावर श्री. सदाशिवराव पाटील या सुशिक्षित गृहस्थाची स्थापना केली व त्यांना क्षात्रजगद्‌गुरू अशी पदवी दिली. श्री. भास्करराव जाधव, प्रबोधनकार ठाकरे, इ. पुढाऱ्यांनी क्षात्रजगद्‌गुरूंच्या या पीठाला विरोध केला. देव आणि मनुष्य यांमध्ये कोणी दलाल नको, असे त्यांचे म्हणणे होते. पण महाराजांनी त्यांचे ऐकले नाही. एका दृष्टीने ही घटना सामाजिक क्रांतीची द्योतक मानता येईल. तिच्यामुळे सामाजिक समतेच्या आड येणाऱ्या ब्राह्मणी धार्मिक मक्तेदारीच्या विघटनाला चालना मिळाली. पण क्षत्रियांची पुरोहितशाही निर्माण होऊनही धर्मनिष्ठ सामाजिक विषमता नष्ट झाली नाही. धर्मपीठ तेच राहिले; पुरोहित फक्त बदलला. या नव्या क्षत्रियांतल्या पुरोहितवर्गाने जुन्या धर्माची आणि धार्मिक विधींची परंपराच चालू ठेवली. ही गोष्ट म. फुल्यांच्या मूलगामी समाजक्रांतीच्या विचारात बसत नव्हती. पण शाहूमहाराजांनी पारंपरिक धर्माची मर्यादा कधी मोडली नाही. हे मर्यादापालन त्यांच्या छत्रपतीपदामुळे आले असावे.

महाराजांच्या काळात कोल्हापूर संस्थानात व बाहेरही सत्यशोधक चळवळीचा प्रभाव दिवसेंदिवस वाढत होता. सत्यशोधक समाजाची मूलतत्त्वे महाराजांनाही मान्य होती. पण तरीही महाराजांनी त्या चळवळीचे नेतृत्व केले नाही; फक्त तिला भरभक्कम राजाश्रय तेवढा दिला. त्यांनी १९१३ साली कोल्हापुरात सत्यशोधकसमाज शाळा स्थापना केली व तिचे प्रमुख म्हणून एका सुशिक्षित धनगर गृहस्थाची नेमणूक केली. या शाळेत सर्व जातीजमातींच्या विद्यार्थ्यांना वेदोक्त विधींचे शिक्षण दिले जात असे. महाराज आपल्या राजवाड्यातले धार्मिक विधी याच शाळेत तयार झालेल्या पुरोहितांकडून करून घेऊ लागले.

विद्येवाचून बहुजनसमाजाला आपला उत्कर्ष करून घेता येणार नाही व प्रस्थापित समाजव्यवस्थेतील ब्राह्मणवर्गाची मक्तेदारी संपणार नाही, ही जाणीव महाराजांच्या मनात विचारांती ठसली होती. ज्ञानाच्या योगे पात्रता वाढवून समाजातल्या सर्व घटकांना समान भूमिकेवर आणता येईल, अशी त्यांची श्रद्धा होती. म्हणूनच त्यांनी आपल्या राज्यात सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा कायदा केला. ते शिक्षणही मोफत केले. महाराजांनी कोल्हापुरात सर्व जातींची वसतिगृहे निर्माण केली. त्यामुळे संस्थानात बहुजनसमाजातले कित्येक विद्यार्थी सुशिक्षित पदवीधर होऊन संस्थानातच उत्कर्षाला चढले.

शाहूमहाराजांच्या जीवनकार्यातला क्रांतिकारक भाग म्हणजे अस्पृश्यतेविरुद्ध त्यांनी दिलेला लढा. हा लढा एकाकी होता. या कामी आप्त, स्वजन, अधिकारी आणि सल्लागार या सर्वांकडून त्यांना विरोध झाला; पण त्यांनी तो जुमानला नाही. शाळा, वसतिगृहे, विहिरी, पाणवठे या सर्व ठिकाणची अस्पृश्यता धुवून काढण्यासाठी महाराजांनी कायदे केले. माहूत म्हणून त्यांनी एका अस्पृश्याला नेमले. एका मांगाच्या मुलाला शिकवून मोठे केले. महारांना मानाच्या तलवारी देऊन सरकारी समारंभात सरदार व क्षत्रियवर्ग यांच्या बरोबरीने मान दिला. हजेरीची प्रथा बंद करून अस्पृश्यवर्गावर परंपरेने लादलेली गुन्हेगारी काढून टाकली. वेठबिगारीतूनही त्यांची सुटका केली. संस्थानातील नोकऱ्यांत त्यांना जागा ठेवल्या. सुशिक्षित महारामांगांना वकिलीच्या सनदा दिल्या. महारांची बलुते पद्धती बंद करून त्यांच्या जमिनी त्यांच्या नावावर रयतवारीने करून दिल्या आणि अशा रीतीने संस्थानातील महारांची महारवतनाच्या गुलामगिरीतून मुक्तता केली. कुलकर्णीवतने नष्ट करून अस्पृश्य वर्गातील लोकांना तलाठी नेमले. एका अस्पृश्याला शहरात उपहारगृह काढून देऊन त्यात महाराज स्वतः चहा

घेऊ लागले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनाही त्यांनी अनेक प्रकारे मदत केली.

सामाजिक ऐक्यासाठी आंतरजातीय विवाह हे उपकारक ठरतील, अशी महाराजांची धारणा होती. अशा विवाहांना मान्यता देणारा कायदाही महाराजांनी केला होता. आर्थिक व औद्योगिक क्षेत्रातही त्यांनी बरेच प्रयत्न केले. शाहू मिलची स्थापना, शेती व औद्योगिक विकास यांसाठी वीजनिर्मिती करणारे राधानगरीचे धरण, गुळाच्या व्यापारासाठी शाहूपुरीची उभारणी, अशा अनेक गोष्टी त्यात अंतर्भूत आहेत.

शाहूमहाराजांचे व्यक्तिमत्व आकर्षक व लोभस होते. दणकट शरीर आणि त्याला साजेशी उंची त्यांना लाभली होती. तरुणपणी त्यांनी विलक्षण ताकद कमावली होती. ते मद्यपान करीत नसत. साधेपणे राहत. प्रजाजनांशी जवळीक साधीत. परदुःखाने दुःखित होण्याची संवेदनक्षमता त्यांच्यापाशी होती. त्यांना अन्यायाची चीड होती. कलेविषयी अपार प्रेम होते. संगीत आणि चित्रकला या क्षेत्रांतल्या नामवंत कलाकारांना व होतकरू कलावंतांनाही त्यांचा आश्रय असे. क्रीडाप्रकारांमध्ये कुस्ती ही त्यांची अत्यंत आवडती क्रीडा होती.

महाराजांचा स्वभाव दिलदार होता. अंतःकरण कनवाळू होते. त्यांच्या प्रत्येक कृतीमध्ये काही एक विचाराचा धागा असे. या संबंधीच्या त्यांच्या काही हृदयंगम गोष्टी पुढीलप्रमाणे—

(१) इ. स. १९२० साली शाहूमहाराज सोनतळी कँपात असता त्यांच्याकडे बडोद्याचे एक बडे मराठी पाहुणे आले होते. जेवण्याच्या वेळी महाराजांनी सर्व जातींची एकच पंगत बसवली. ते पाहुणे गृहस्थ महाराजांना म्हणाले. 'आपण अस्पृश्योद्धाराची चळवळ सुरू केली आहे ती सोडून द्यावी आणि ती शक्ती मराठ्यांच्या उत्कर्षाच्या कामी लावावी.' प्रथम महाराजांनी त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले; पण त्यांनी पुन्हा तोच विषय काढल्याने महाराजांनी त्यांना उत्तर दिले. "मी केवळ मराठ्यांचा उत्कर्ष पाहिला आणि इतर उपेक्षित समाजाकडे दुर्लक्ष केले, तर लोक मला मराठ्यांचा राजा म्हणतील, कोल्हापूरचा राजा म्हणणार नाहीत."

(२) एकदा नामदेव समाजाचे वयोवृद्ध पुढारी श्री. हिरवे हे राजवाड्याकडे निघाले होते. इतक्यात समोरून महाराजांची बगी आली. महाराजांनी हिरवे यांना नमस्कार केला. खरे म्हणजे हिरवे यांजकडून प्रथम मुजरा व्हायला हवा होता. पण त्यांची दृष्टी मंद असल्यामुळे त्यांना महाराज दिसले नाहीत. ही गोष्ट हिरवे यांना नंतर उमगली व त्यांच्या मनाला लागली. लगेच राजवाड्यावर जाऊन त्यांनी महाराजांचे पाय धरले. 'आपण राजे म्हणजे साक्षात विष्णूचे अंश. असे असता मी मुजरा करायला चुकलो. तरी माफी असावी.' असे म्हणून क्षमा मागितली. त्यावर महाराज बोलले. 'बाबा, मी तुमच्या सारखाच एक माणूस आहे. तथापि, तुम्ही जर राजाला देव मानत असाल तर देवाला तुमच्यासारखे भक्त आपणापेक्षा श्रेष्ठ वाटतात. तुम्ही आपले सर्व आयुष्य जनसेवेत घालविले. लोकसेवा हीच तुमची ईश्वरसेवा आहे.'

(३) शहरात प्लेगची साथ होती. शहराबाहेर प्लेगचा कँप होता. त्याची व्यवस्था पाहण्यासाठी महाराज एके दिवशी बगीतून जात होते. बगी ते स्वतःच हाकीत होते. पाठीमागे डॉक्टर वगैरे मंडळी बसली होती. महाराज कँपात आले. बगीतून उतरून एका झाडाखाली पारावर बसले. एवढ्यात एका शेतकऱ्याने त्यांच्यापुढे डांगर-भाकरी आणून ठेवली. महाराजांना त्या शेतकऱ्याचे कौतुक वाटले. त्यांनी ती पोटभर खाल्ली. डॉक्टर आरोग्याच्या सबबीवर त्यांना मना करू लागले; पण महाराजांनी ऐकले नाही. तो शेतकरी महाराजांनी आपली भाकरी खाल्ली हे पाहून हर्षभरित होऊन निघून गेला. महाराज बरोबरीच्या मंडळींना म्हणाले. 'अहो, त्या गरीब माणसाने प्रेमाने आणून दिलेली ती भाकरी! मी तिला दूर कशी लोटू?. माझ्या आरोग्यापेक्षा त्याचा आनंद हा मला मोलाचा आहे.'

(४) एकदा महाराजांची बगी रस्त्याने जात असता एक मुलगी रडत रडत बावड्याला निघालेली त्यांनी पाहिली. तिच्या डोक्यावर गोवऱ्यांनी भरलेली पाटी होती. महाराजांनी तिला बोलावून आणले आणि 'का रडतेस?' म्हणून विचारले. मुलगी घाबरली. ती काहीच उत्तर देईना. महाराजांनी तिला धीर दिल्यावर ती बोलकी झाली. 'या गोवऱ्या विकून सात पैसे घेऊन ये, असे सासूने मला सांगितले आहे. लोक सहा पैशाला मागतात. म्हणून मी विकल्या नाहीत. आता सासू मला बोलेल, उपाशी ठेवील.' महाराजांना त्या पोरीची दया आली. त्यांनी तिच्या हातावर पाच रुपये ठेवले. ती अधिकच घाबरली. रुपये खाली टाकून म्हणाली. 'मला रुपये नगत.' लगेच गोवऱ्यांची पाटी उचलून परत फिरली. एवढ्यात समोरून एक टांगा आला. महाराजांनी त्या टांगेवाल्याला हुकूम केला. 'या मुलीला तिच्या गावी पोचव. तिची शेणाची पाटी टांग्यांत घे आणि हे पाच रुपये नेऊन तिच्या सासूला दे.' टांगेवाल्याने हुकमाची तामिली केली. दुसऱ्या दिवशी सासू महाराजांकडे आली. गयावया करून म्हणाली. 'महाराज! मी यापुढे सुनेला मारणार नाही. एकवार क्षमा करा.'

महाराजांच्या समग्र जीवनाचे आणि कार्याचे विवेचन केल्यावर शेवटी समारोप करताना श्री. धनंजय कीर म्हणतात, 'सत्तेचा उपयोग लोकोद्धारासाठी करावयाचा असतो हे तत्त्व

कृतीत आणून दाखवणारा हा आदर्श राजपुरुष होता. 'बोले तैसा चाले, ह्या वचनाची सत्यता पटविणारा हा वंदनीय नृपती होता.' [ प्रेषित राजर्षी शाहू छत्रपती – श्री. धनंजय कीर, १९७०; छत्रपती राजर्षी शाहू महाराज – श्री. तु. बा. नाईक, १९७४; साधना – शाहू छत्रपती अंक, १५ ऑगस्ट १९७४. ]

**शाळिग्राम** एक पूज्य शिळा. विष्णूचे प्रतीक. नेपाळात पशुपतिनाथापासून १५० कोसांवर मुक्तनाथ नावाचे स्थान आहे. तिथे गंडकी नदीत हे दगड सापडतात. शिवाय तिथे या दगडांचा मोठा डोंगरच आहे. त्या दगडांच्या मूर्तीही करतात. त्यांवर यंत्रे कोरण्याचीही प्रथा आहे. विशिष्ट प्रकारची चक्रे व मुखे यावरून त्या दगडांची परीक्षा होते. त्यांवर लहानशी सोन्याची रेषाही असते. शाळिग्राम कसा बनतो, याविषयी कल्पना अशी –

हरिपर्वताच्या पायथ्याशी चक्रतीर्थ नावाचे एक सरोवर आहे. त्यात शाळिग्रामाचा दगड एक हजार वर्षे राहिल्यानंतर श्रीविष्णू वज्रकीट या किड्याच्या रूपाने त्यात शिरून तिथे चक्राची आकृती कोरतो. शाळिग्रामांचे निरनिराळे रंग असतात. त्यांवरून त्यांना वेगवेगळी नावे दिलेली आहेत, ती अशी – (१) शुभ्र – वासुदेव (२) निळा –– हिरण्यगर्भ (३) काळा –– विष्णू (४) तांबडा –– प्रद्युम्न (५) गडद हिरवा –– श्रीनारायण (६) गडद निळा –– नरसिंह किंवा वामन (७) बारा चक्रे असलेल्या शाळिग्रामाला अनंत म्हणतात.

शाळिग्रामाचे असे ८९ प्रकार सांगितलेले आहेत.

शाळिग्राम दुधात किंवा तांदुळात ठेवतात. तसे केल्याने त्याचा आकार व वजन वाढल्यास तो नित्य पूजेला योग्य समजतात. दक्षिणेतल्या काही विष्णुमंदिरांतून विष्णूच्या गळ्यात शाळिग्रामांची माळ घातलेली असते.

माध्व संप्रदायाचे वैष्णव लोक शाळिग्रामाला प्रत्यक्ष विष्णूच्या मूर्तीपेक्षाही श्रेष्ठ समजतात. पंचायतनपूजेतही विष्णूचा प्रतिनिधी म्हणून शाळिग्रामच असतो. माध्व लोक प्रायश्चित्तासाठी पंचगव्याऐवजी शाळिग्रामाचे तीर्थ घेतात. शाळिग्रामात विश्वातील सर्व पूज्य वस्तूंचा अंतर्भाव होतो. तो फुटला तरी अपूज्य ठरत नाही. शाळिग्रामाची कथा अशी –

विष्णूने नवग्रह निर्माण केले आणि माणसांचे बरे वाईट करण्याचे काम त्यांच्यावर सोपवले. शनी या पापग्रहाला हे सामर्थ्य मिळताच तो ब्रह्मदेवाच्या राशीला गेला. ब्रह्मदेवाने त्याला विष्णूकडे पाठवून दिले. विष्णू घाबरला आणि त्याने 'उद्या ये' असे त्याला सांगितले. दुसऱ्या दिवशी शनी जाऊन पाहतो, तर विष्णू जाग्यावर नाही. शोधाअंती त्याला आढळले, की विष्णू गंडकी शिळेचा पर्वत होऊन राहिला आहे. शनी त्याला म्हणाला. 'ठीक आहे; पाहून घेतो.' तो वज्रकीट नावाचा किडा बनला आणि त्या पर्वताच्या पोटात शिरून त्याला पोखरू लागला. विष्णूला ते पोखरणे सहन होईना. त्याच्या अंगातून दोन घामाच्या धारा बाहेर पडल्या. त्याच्याच पुढे कृष्ण गंडकी आणि श्वेत गंडकी अशा दोन नद्या झाल्या. बारा वर्षांनंतर विष्णू शनीच्या त्रासातून सुटला. त्याने निजरूप घेतले व आपले प्रतीक म्हणून गंडकीतल्या शाळिग्रामाची पूजा करावी, असा जनांना आदेश दिला. (पद्म. पु. उ. खं. १२०) [ सा. इं. इ. गॉं. गॉं. ]

**शाळिग्रामदान** हे दान विष्णु-भक्ताला द्यायचे असते. त्यासाठी शाळिग्राम ताम्रपात्रात ठेवून त्याची तुलसीपत्रांनी पूजा करतात. मग दान घेणाऱ्याच्या नाम-गोत्रांचा उच्चार करून त्याच्या हातावर दानोदक सोडतात. मग पुढील प्रार्थना म्हणतात –

> **महाकोशनिवासेन चक्राद्यैरुपशोभितः ।**
> **शालग्रामप्रदानेन मम सन्तु मनोरथाः ॥**

मग ब्राह्मणाला सुवर्णदक्षिणा देऊन दान समाप्त करतात.

**शिंक** शरीरातील अनावश्यक द्रव्य नाकातोंडावाटे वेगाने बाहेर पडणे या क्रियेला शिंक येणे, असे म्हणतात. जगातील बहुतेक सर्व देशांमध्ये शिंकेसंबंधी काही समजुती आढळतात. भारतात अन्य शकुनापशकुनांच्या समजुतींपेक्षा शिंकाशकुनांना फार महत्त्व दिले जाते. चकपदी नावाची देवी ही शिंकेची देवता म्हणून सांगितली आहे. ब्रह्मदेवाच्या शिंकेतून तिची निर्मिती झाली व त्यामुळे तिला लगेच देवत्व लाभले, अशी कथा पंजाबात आढळते. त्याशिवाय गृत्समदाच्या शिंकेतून त्रिपुरासुराचा जन्म झाला, अशी नोंद गणेशपुराणात आहे (३८).

ज्याप्रमाणे माणसांच्या शिंकण्यांवरून काही गोष्टी गृहीत धरल्या जातात, त्याप्रमाणे जनावरांच्या शिंकण्यांवरूनही काही विश्वास निर्माण झालेले दिसतात. महाराष्ट्रात गाईचे शिंकणे शुभसूचक समजतात आणि गढवाल प्रदेशात प्रवासाच्या वेळी बकरीचे शिंकणे अशुभ मानतात.

प्राचीन काळापासून साधारणपणे शिंक अशुभसूचकच मानली गेली आहे. अथर्ववेदात पुढील (अथर्व. १९.८.५) ऋचांमध्ये तसा उल्लेखही आहे--

> **अनुहवं परिहवं परिवादं परिक्षवम्**
> **सर्वैर्मे रिक्तकुम्भान्परा तान्सवितः सुव ॥**
> **अपपापं परिक्षवं पुण्यं भक्षीमहि क्षवम् ।**
> **शिवा ते पाप नासिकां पुण्यगश्चाभि मेहताम् ॥**

अर्थ – हे सवितृदेवा, मला भासणारे, अनुहव, परिहव, निंदा, शिंक आणि रिक्तकुंभ हे सर्व अपशकुन तू नष्ट कर. अशुभ शिंक, इ. अपशकुन दोषरहित बनून मला लाभदायक होवोत. कोल्हे शुभ शब्द करोत. मला शुभशकुन होवोत.

मनू (५.१४५), याज्ञवल्क्य (१.१९६), इ. स्मृतिकारांनी शिंक आली, तर आचमन करून पवित्र व्हावे, असा विधी सांगितला आहे. त्याशिवाय अन्नावर शिंक पडली, तर ते अन्नही दूषित होते, असा मनूचा अभिप्राय आहे (५.१२५). नंतरच्या पुराणकाळात शिंकेवर नामस्मरणाचा तोडगा सांगितला आहे (भाग. पु. १२. १२. ४६).

पुराणकाळात किंवा त्याआधीही शिंकेला अपशकुनांबरोबर शकुनांचीही जोड लाभलेली दिसते. गरुडपुराणात ज्योतिषचक्राध्यायात दिशापरत्वे शिंकालक्षणांचा बराच तपशील दिला आहे. त्याचा सारांश असा –

पूर्व दिशेची शिंक फलदायी, आग्नेयीची शोक व संताप देणारी, दक्षिणेची हानिकारक, नैर्ऋत्येची शापकारक, पश्चिमेची मिष्टान्न देणारी, वायव्येची अन्न देणारी, उत्तरेची कलहकारक आणि ईशान्येची मृत्युसूचक असते. ज्योतिषशास्त्रातील अन्य काही ग्रंथांत हाच मजकूर थोड्याफार फरकाने आढळतो. आसनावर, शयनस्थानावर, दान देतेवेळी, भोजनप्रसंगी, डाव्या बाजूला किंवा पाठीमागे अशा सहा जागी आलेल्या शिंका शुभ मानल्या जातात, असे ज्योतिर्मयूखात शिंकाप्रश्नांची चर्चा करताना म्हटले आहे.

शिंक आल्यावर 'शतंजीव' म्हणण्याची पद्धत पंजाब, हरियाणा, महाराष्ट्र व दक्षिणेकडील प्रदेश यांत आहे. काही ठिकाणी 'शतंजीव'च्या ऐवजी 'सत्यंजय' असे म्हणण्याचाही प्रघात आहे. पण सत्यंजय हा 'शतंजीवचा'च अपभ्रंश असावा. एखाद्याला शिंक आली, तर तिथे उपस्थित असलेल्या अन्य लोकांनी त्याला उद्देशून 'आयुष्मान् भव' असे म्हणावे आणि शिंकणाऱ्याने इतरांना उद्देशून 'तुम्हीही शतायुषी व्हा' असे म्हणावे, असा नियम विनयपिटकाच्या चुल्लवग्गात आढळतो. हा नियम भिक्षूंसाठी नसून संसारी जनांसाठी आहे. भिक्षूंनी या समजुतींवर विश्वास ठेवू नये, असे गौतम बुद्धाने स्पष्ट सांगितले आहे. हाच मजकूर कथेच्या माध्यमातून गग्ग जातकात आलेला आहे. शिवाय या समजुतीचे वैयर्थ्य उघड करण्यासाठी, शिंकेमुळे एकाचे नाक कापले गेले आणि दुसऱ्याला स्त्रीचा लाभ झाला, असा वृत्तांत असिलक्खण जातकात सांगितला आहे. एकंदरीत ही प्रथा खूप प्राचीन असली, तरी जाणीवपूर्वक तिचा निषेध करणारा गौतमबुद्ध हा पहिला विचारवंत असे म्हणावे लागेल.

शिंका आणि भुते यांचा दृढ संबंध आहे, अशी आदिवासींची समजूत आहे. शिंक आली म्हणजे भुते नाकातून शरीरात प्रवेश करतात किंवा बाहेर जातात, अशी त्यांची धारणा आहे. म्हणूनच त्या वेळी देवाचे नाव घ्यावे, असे म्हणतात. भुते घराबाहेर राहतात. उंबरा म्हणजे घराची संरक्षक लक्ष्मणरेषा होय. ती ओलांडून आत येण्याची शक्ती त्यांच्या अंगी नसते. त्यामुळे दारात शिंकले, तर भुतांना शरीरात प्रवेश करायला संधी मिळते. म्हणून उंबऱ्यावर शिंकू नये या संकेताचा जन्म झाला असावा, आणि त्यातूनही कोणी शिंकले, तर तिथे पाणी शिंपडण्याची चाल आहे. या पाण्यात मंत्रसामर्थ्य असते, त्यामुळे भुते आत शिरू शकत नाहीत, अशा त्याचा यात्वात्मक अर्थ आहे.

शिंक आल्यावर शिंकणाऱ्याचे आयुष्य कमी होते, अशी समजूत आहे. त्यामुळे मरणोन्मुख माणसाला शिंक आली, तर त्याचे नाक व तोंड बंद करून टाकणे, अशी चाल आदिवासींमध्ये आहे. याउलट आजारी माणूस शिंकला, तर तो मरणाच्या तावडीतून सुटला असा विश्वास कोकणात आढळतो. पण ही शिंक एकच आली पाहिजे. जर का त्या दोन आल्या तर त्याचा परिणाम होत नाही, असे म्हणतात.

लग्नाच्या वेळी कोणी शिंकले तर तो फार मोठा अपशकून मानण्याची चाल द. भारतात आहे. मदुरेच्या मीनाक्षीमंदिरात, दरवर्षी छोक्कलिंगम व मीनाक्षी यांचा विवाह समारंभ साजरा करतात. पण ऐनवेळी कोणीतरी शिंकते आणि हा समारंभ पुढच्या वर्षापर्यंत थांबविला जातो. पुढच्या वर्षीही शिंक असतेच. विवाहाचे सर्व सोपस्कार होतात, पण शिंकेमुळे विवाह मात्र होत नाही. पंधराव्या शतकात होऊन गेलेल्या संतोषमुनी कृष्णदास या महानुभाव कवीने रुक्मिनीस्वैवरात अशा शिंकेचा उल्लेख केला आहे (१६.५०-५१).

लग्नाप्रमाणे प्रवास व कार्यारंभ या प्रसंगी आलेल्या शिंकांना काही अर्थ असतो, असे गृहीत धरले जाते. त्याचप्रमाणे शिंक कोणत्या वारी आली, ती किती वेळा आली यावरूनही शुभाशुभ फले सांगितली जातात. शिंकेसंबंधीच्या आणखी काही समजुती अशा – पुरुष बोलत असता त्याच्या पाठीमागे स्त्री शिंकली तर ते अशुभ. उजव्या किंवा डाव्या बाजूला येणाऱ्या शिंका कोणतेही फल देणाऱ्या नसतात. भुताने पछाडलेल्या माणसाला शिंक येत नाही. मूल जन्मताक्षणी शिंकले तर ते काही ठिकाणी शुभ आणि काही ठिकाणी अशुभ मानतात. शिंक आल्यावर खोकला आल्यास ते शुभलक्षण. हातात सोने, तांबे किंवा पितळ असताना शिंक आली तर संकल्पसिद्धी. पण चांदी किंवा लोखंड असताना शिंक आली तर कार्यहानी. वेश्या, शूद्र यांच्या शिंका शुभ असतात. परंतु विधवा, परीट, ताडी काढणारा यांच्या शिंका अशुभ मानल्या जातात.

एकंदरीत जन्मापासून मृत्यूपर्यंत, वैदिक साहित्यापासून लोक-साहित्यापर्यंत आणि काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत सर्वत्र शिंकांच्या शकुनांचे अस्तित्व आहे; पण त्यात कुठेही शास्त्रीयता आणि एकसूत्रता आढळत नाही. अंधश्रद्धा मात्र वरीच आढळते. [अ. म. भा.; एन्सा. रि. ए.; लौ. दं.]

**शिंके** एखादी वस्तू टांगून ठेवण्यासाठी दोरी विणून तयार केलेली जाळी म्हणजे शिंके होय. मधोमध असलेल्या जाळीभोवती आणखी काही जाळ्या असल्या म्हणजे त्या शिक्याला लेकुरवाळे शिंके म्हणतात. शिंके ही स्वैपाकघरात वापरावयाची आवश्यक वस्तू असून, त्यावर दूध-दुभते किंवा अन्न ठेवलेले असते. या टांगून ठेवलेल्या पदार्थांना हवेचा पुरवठा होतो आणि मांजर, लहान मुले इत्यादींपासून त्या सुरक्षितही राहतात. पाणी थंड करण्यासाठी शिक्यावर ठेवावे, असे सुश्रुत-वचनही आहे (४५.१९). दूध-दुभत्याप्रमाणे काही अन्य वस्तूही शिक्यावर ठेवलेल्या पाहायला मिळतात. भीम आपली गदा शिक्यावर ठेवीत असल्याचा उल्लेख महाभारतात आहे (वन. ५१.१२).

फार प्राचीन काळापासून घरात शिंके असल्याचे उल्लेख आढळतात. अथर्ववेदातील गृहरचनासूक्तात त्याचा उल्लेख (९.३.६) आहे, तो असा –

यानि तेऽन्तः शिक्यान्याबेधू रण्याय कम् ।

अर्थ – मजबूत शिक्यांनी युक्त असे हे योग्य उंचीचे घर तिथे वावरणाऱ्यांना सुखदायक होवो.

अजंटाच्या वाकाटककालीन तीन लेण्यांपैकी एका लेण्यात शिक्यात एकावर एक रचलेल्या भांड्यांचे चित्र आहे. सांप्रत शहरी संस्कृती वगळता शिक्याचे हे स्थान भारतात सर्वत्र कायम आहे.

शिंके हे एक यज्ञीय उपकरणही आहे. कधी या उपकरणाचा अन्य वस्तूंवर आरोप केलेला असतो, तर कधी त्याचे प्रत्यक्ष अस्तित्व असते. याचा उल्लेख शतपथ ब्राह्मण, तैत्तिरीय संहिता (५.१.१०; ५.२.४), काठक संहिता (१९.११; २०.२), मैत्रायणी संहिता (३.२.१), इ. ठिकाणी आला आहे. गार्हपत्य अग्नीचे चयन झाल्यानंतर नैर्ऋती देवतेसाठी इष्टिका एकत्रित करून त्या एकावर एक ठेवल्या जातात. त्यांतील अखेरच्या इष्टिकेलाच शतपथ ब्राह्मणात शिंके असे म्हटले आहे. या शिक्यावर अष्टाक्षरी गायत्रीची स्थापना केली असता तिथे गायत्रस्वरूप अग्नी सिद्ध होऊन तो पाप दूर करतो आणि नैर्ऋतीचे आवाहन करतो (श. ब्रा. ७.१.३.१६). केशवपनीय नावाच्या पशुबंधानंतर केल्या जाणाऱ्या अतिरात्र यागात शिक्या-वर सुवर्णकलश ठेवलेला असतो. या कलशात अग्निप्रदेशावरून फिरविण्यासाठी पळी ठेवलेली असते. ही पळी जमिनीवर ठेवायची नसते, म्हणून शिक्याचा वापर केला जात असावा (श. ब्रा. ५.४.६.२८). सर्पवलीच्या विधीत अक्षत सातूचे पीठ ठेवण्यासाठी नवा घडा आणि तो घडा ठेवण्यासाठी नव्या शिक्याची आवश्यकता असते, असे आश्वलायन गृह्यसूत्रात म्हटले आहे. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञाच्या निमित्ताने या उपकरणाचा उल्लेख महाभारतात आला आहे. या प्रसंगी शल्याने शिक्यावर ठेवलेला सुवर्णकलश युधिष्ठिराला भेट म्हणून दिलेला आहे (म. भा. सभा. ५३.९). वामनजयंती व्रतातही संगमावरील तीर्थाने भरलेला घट शिक्यावर ठेवायचा असतो.

कृष्णपर साहित्यात त्याच्या वाललीलांचे वर्णन करीत असताना शिक्याचा उल्लेख केलेला असतो (भाग. पु. १०.८.३०). भागवताच्या दशमस्कंधावर टीका रचणाऱ्या सर्व अन्यभाषिक कवींनीही शिक्याचा उल्लेख केलेला आहे. कृष्णाच्या वाललीला वर्णन करीत असताना, त्याच्या खोड्यांना कंटाळलेल्या गौळणींनी त्याचा योजनापूर्वक केलेला फजितवाडा संत निळोबाने पुढील अभंगात वर्णन केला आहे –

भग लाउनी शिंकियाच्या हारी ।
बैसल्या जागृत आपुल्या घरी ।
कवाडा आड आणि भाजघरीं ।
शिंकिया जवळी भोंवताल्या ॥ १ ॥
पाटीयें तळीं झांकोनी दीप ।
बैसल्या दवडोनियां झोंप ।
तंव हा सच्चिदानंदस्वरूप ।
आला चोरियें त्याचि घरां ॥ २ ॥
गडी ठेवूनियां बाहेरी ।
चाहुली मारूनिया संचार करी ।
तंव या शिंकियाचिया हारी
चाचपडतां सांपडल्या ॥ ३ ॥

कृष्णसाहित्याने प्रभावित झालेल्या काही रामपर साहित्यातही, रामाच्या वालक्रीडा वर्णन करीत असताना शिक्याचा निर्देश आला आहे (अध्या. रा. बाल. ३.५४).

शिक्यमोचनक्रीडा नावाच्या एका प्राचीन खेळाचा उल्लेख भागवतपुराणात केलेला आहे (१०. १२. ५). या खेळाचे स्थूल स्वरूप असे –

शिक्यातील खाद्य पदार्थ काढून ठेवल्यावर ती लपविली जातात. मालकाला आपले शिंके कुठे आहे याचा पत्ता लागला, की तो तिथे जाऊन ते हस्तगत करू पाहतो. तेवढ्यात अन्य खेळाडू ते शिंके दूर फेकतात. अशा तऱ्हेने शिंके हस्तांतरित होत

राहते. अखेर ज्याचे त्याला ते परत करून खेळ संपविला जातो.

प्राचीन काळी शिकी कोण आणि कशापासून तयार करीत असत, हे सांगणे अवघड आहे. पण सांप्रत मांग लोक वाकापासून शिकी तयार करतात. त्यांच्या जीवनात शिक्याला फार महत्त्वाचे स्थान आहे. शिकी तयार करणे हा आमचा जातिधर्म आहे, असे ते म्हणतात. दक्षिणेतील भंगी लोक विवाहाच्या प्रसंगी गणपती ठेवण्यासाठी शिक्याचाच उपयोग करतात.

**शिंग** (१) जनावरांच्या डोक्यावरचा एक अणकुचीदार अवयव. संरक्षण व आक्रमण या उभय हेतूंसाठी जनावरे त्याचा उपयोग करतात. शृंग या संस्कृत शब्दावरून शिंग हा मराठी शब्द तयार झाला. भारताच्या व जगाच्या सांस्कृतिक इतिहासात शिंगाला खूप महत्त्व आहे. सिंधुसंस्कृतीमधील देवांच्या डोक्यांवर शिंगे होती, हे स्पष्ट झाले आहे. त्याचप्रमाणे देवांचे पुजारी, राजे व अन्य श्रेष्ठ लोक यांच्याही डोक्यांवर शिंगे असल्याचे तिथल्या उत्खनित वस्तूंवरून दिसून येते.

ऋग्वेदात अनेक ठिकाणी शिंगांचे उल्लेख आहेत. इंद्राने शृंगधारी शुष्णाला ठार मारले (१.३३.१२). अग्नी म्हणजे ज्वालारूपी शिंगे हलविणारा खोंड होय (१.१४०.६). अग्नीचे रूपकात्मक वर्णन करीत असताना त्याला चार शिंगे, तीन पाय, दोन मस्तके आणि सात हात असलेला महावृषभ असे म्हटले आहे (ऋ. ४.५८.३). वास्तविक वैदिक देवतांना शिंगे नसतानाही ऋग्वेदात अशा तऱ्हेची वर्णने येतात.

शिंगे वापरण्याच्या या प्रथेचा मूळ उगम पशुपूजेत असावा. सिंधुसंस्कृतीमधील लोक वृषभपूजक होते. वृषभ हा शक्तीचे आणि प्रजोत्पादनाचे प्रतीक मानला जातो. त्यामुळे त्याच्या शिंगांतही तीच शक्ती आहे, या समजुतीने ती धारण केली जात असण्याची शक्यता आहे. सर जेम्स फ्रेजरने सांगितलेल्या समीपतावादी यातुसिद्धान्ताचे हे उत्तम उदाहरण आहे. घरात शिंग असले म्हणजे घराचे व माणसांचे संरक्षण होते. शिंगाचा आवाज ऐकला, की भुते पळून जातात, आजारपण जाऊन आरोग्य लाभते. त्याचे ताईत करून गळयात किंवा दंडावर बांधले, की कोणाची वाईट नजर लागत नाही आणि भूतबाधाही होत नाही, अशा समजुती आहेत. यावरून या सर्व उदाहरणांचा यातूशी संबंध आहे हे ध्यानी येते.

अनेक आदिवासी जमातींत आजही डोक्यावर शिंगे वापरण्याची प्रथा आहे. मध्य प्रदेशाच्या बस्तर भागात शिंगी माडिया ही माडियांची एक शाखा आहे. हे लोक रानरेडयाच्या शिंगापासून बनविलेला मुकुट धारण करतात, म्हणून त्यांना शिंगी माडिया असे नाव मिळाले आहे.

शिंग हे त्यांचे एक व्यवच्छेदक लक्षण व शक्तिप्रतीक आहे. या प्रतीकाला ते परंपरेचा ठेवा मानून मोठा मान देतात.



माडियांचा शिंगाचा मुकुट

माडिया पुरुषाला विवाहापूर्वी वधूला, आपल्या पौरुषाचा पुरावा द्यावा लागतो. एखादा रानरेडा मारून त्याची शिंगे आणल्याशिवाय त्याला स्त्रीचा लाभ होत नाही. त्याने रेडा मारून आणला, म्हणजे त्या रेडयाच्या शिंगावर त्याची भावी वधू काही नक्षीकाम करते. आणि मग विवाहाच्या वेळी त्याच्या डोक्यावर तो मुकुट घालते. अलिकडे ही प्रथा लोप पावत चालली आहे आणि शिंगेही दुर्मिळ झाली आहेत. परंतु काही शिंगी माडिया मात्र हा मुकुट बनविण्यासाठी आजही जिवंत जनावरांच्या मोबदल्यात शिंगे मिळवितात आणि विवाहप्रसंगी ती डोक्यावर घालून नाच करतात. त्याचप्रमाणे वंजारा, बैगा, गोंड या जातींतही निरनिराळया प्रसंगी शिंगे वापरतात. ओडिसातील सवर लोक देवतांना शिंगे अर्पण करतात. काही ठिकाणी शिंगे बांधल्याशिवाय देवांची पूजाही करता येत नाही.

लग्नाच्या वेळी वधू-वरांना बांधले जाणारे बाशिंग हा शिंगाचाच सुधारलेला अवतार आहे, असे अभ्यासक म्हणतात. बाशिंग हा शब्दच मुळी भालशृंग किंवा द्विशृंग यापासून व्युत्पादितात.

शिंगापासून बटने, फण्या, इ. वस्तू तयार करतात. [एन्सा. रि. ए.; एन्सा. रि.; सिं. ऋ. हिं. सं.]

(२) एक सुषिर वाद्य. प्राचीन काळी हे रेडा, बैल, इ. जनावरांच्या शिंगापासून तयार करीत. संगीत रत्नाकराच्या वाद्याध्यायात याच्यासंबंधी पुढील माहिती आढळते –

हत्तीच्या सोंडेसारखे मुख असलेले, निर्दोष व गुळगुळीत असे रेडयाचे शिंग घेऊन त्यावर धोतऱ्याच्या फुलाप्रमाणे आकार असणारा, बैलाच्या शिंगाचा आठ अंगुळे लांबीचा तुकडा, नाद मोठा करण्यासाठी बसवावा. दुसऱ्या टोकाला फुंकण्यासाठी छिद्र करावे. त्या छिद्रातून फुंकल्यावर तुथू असा आवाज उत्पन्न होतो. महाभारताच्या भीष्मपर्वात गोविषाणिका नावाच्या एका वाद्याचा उल्लेख आहे (४४.४), तो याच वाद्याला उद्देशून असावा.

अलिकडे हे वाद्य पितळेचे बनविले जाते. त्याची एकूण लांबी सुमारे चार ते सहा फूट असते. त्यात चार-पाच नळकांडी एक

एक बसविलेली असतात. सर्वांत मोठ्या नळकांड्याचे तोंड सामान्यतः सहा इंच व्यासाचे आणि दुसरे टोक सुमारे अर्धा इंच



सर्पाकृती शिंग

व्यासाचे असते. मद्रास व नेपाळ या प्रदेशांतील पितळी शिंगांची फार प्रसिद्धी आहे.

शिंग निरनिराळ्या उत्सवप्रसंगी, राजेरजवाड्यांच्या स्वारीच्या समारंभाच्या वेळी आणि इशारा किंवा संदेश देण्यासाठी वाजविले जाते. याचा आवाज बराच लांबवर जातो. यावर कोणतेही स्वरबद्ध गीत वाजविता येत नाही. याला रणशिंग असेही म्हणतात.

नेपाळमध्ये सर्पाकृती अथवा व्याघ्रमुखी शिंगे असतात.

हे वाद्य पशूच्या शिंगाचे असते, म्हणून दक्षिण भारतात कनिष्ठ वर्गाचे लोक हे वाजवतात. [भा. वा. इ.; सु. वि. को.; डि. सा. इं. म्यु. म्यु.; म्यु. इं.]

**शिंगणापूर** (१) अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे तालुक्यात सोनई गावापासून तीन मैलांवर शनीचे शिंगणापूर हे एक क्षेत्र आहे. इथे शनीचा एक स्वयंभू पाषाण आहे. सुमारे दीडशे वर्षांपूर्वी एका ओढ्याला आलेल्या पुरात ही शिळा वाहत सोनई गावाजवळ आली. त्या रात्री शनिदेवाने एका गावकऱ्याला स्वप्नदृष्टान्त देऊन सांगितले, की 'मी शनिदेव असून मामा-भाच्यांनी मिळून माझी स्थापना करावी.' गावकऱ्यांनी तसे केले. शनीचा हा काळा पाषाण सहा हात उंचीचा आहे. त्यावर कसलाही निवारा नाही. शनिदेवाला निवारा आवडत नाही. एका व्यापाऱ्याला नवसाला पावला म्हणून त्याने त्याच्या भोवती चौथरा तेवढा बांधला आहे.

या गावात कोणाच्याही घराला कुलुप नसते. इथे कोणी कोणाची चोरी करीत नाही. केल्यास त्याला अंधत्व येते, असे म्हणतात. अवर्षण पडले तर या देवाला कौल लावतात. वर्षप्रतिपदा आणि श्रावणातले चारही शनिवार या दिवशी इथे यात्रा भरते. यात्रेकरू प्रवरा व गोदावरी यांच्या संगमावरील पाणी कावडीने वाहून आणून शनीला वाहतात. त्याला तेल, फुले, विल्वे, खिळे, कवड्या, उडीद वगैरे वस्तू अर्पण करतात. वायकांना देवाची पूजा करायचा अधिकार नसतो.

इथे उदासी बाबा नावाचा एक साधू शनीची पूजा करून राहत असे. हल्ली त्याच्या पंथातले लोक ते काम करतात. इथे आसपासची अनेक भजनी मंडळे येऊन आपली हजेरी लावतात.

(२) शिखर शिंगणापूर. एक स्वयंभू शिवस्थान. हे क्षेत्र सातारा जिल्ह्यातल्या माण तालुक्यात दहिवडीपासून सुमारे तेरा मैल अंतरावर आहे. शंभुमहादेव नावाच्या डोंगरावर इथले शिवमंदिर आहे. महादेवाचा हा डोंगर म्हणजे सह्याद्रीचा एक फाटाच होय. इथे दाट जंगल आहे. शिंगणापूर गाव डोंगराच्या पायथ्याशी आहे. हे गाव देवगिरीच्या सिंघण यादवाने वसवले व शिखरावरचे मंदिरही त्यानेच बांधले. शिवाजीमहाराजांचा आजा मालोजी याने इथे एक तलाव बांधला.

मंदिराकडे पोचायला ४०० पायऱ्या चढून जावे लागते. वाटेत शांतलिंगस्वामीची समाधी आहे. त्यापुढे खडकेश्वरमंदिर आहे. शिवमंदिराला दगडी तट असून, त्याला चार दरवाजे आहेत. प्राकारात अनेक दीपमाला आहेत. मुख्य मंडपात पाच दगडी नंदी आहेत. गाभाऱ्यात शिव-पार्वतीची दोन स्वयंभू लिंगे आहेत. इथली एक घंटा पोर्तुगीजांकडून मिळवलेली आहे.

मंदिराच्या पश्चिम दरवाज्याच्या बाहेर बलिमहादेवाचे यादवकालीन हेमाडपंती मंदिर असून, सांप्रत त्याला अमृतेश्वर म्हणतात. महादेवाची रोज चार वेळा पूजा असते. दुपारची पूजा पंचामृताची असते. सोमवार व अमावास्या हे दर्शनाचे महत्त्वाचे दिवस असतात. मोठ्या सणांना देवाची पालखी निघते. महाशिवरात्रीला इथे मोठी जत्रा भरते. चैत्र महिन्यात दहा दिवस देवाचा मोठा उत्सव असतो. ज्यांचा नवस असतो ते खालून पाण्याच्या कावडी आणून देवाला अभिषेक करतात. भुत्या तेलाची कावड सर्वांत मोठी. ते दोन मोठे रांजणच असतात. ती वर चढवताना वाहक लोक 'हे म्हाद्या, धाव. मला संभाळ.' असे देवाचे एकेरी हीनत्वदर्शक नाव घेऊन ओरडतात. इथे भातंगडी नावाची एक सुमारे २५ हात लांबीची काठी मराठवाड्यातील त्याच नावाच्या गावातून आणली जाते.

चैत्र शु. अष्टमीला शिव-पार्वतीच्या विवाहाचा सोहळा असतो. या विवाहासाठी पागोटे विणण्याचा मान ज्या कुटुंबांना मिळालेला असतो, ती कुटुंबे वर्षभर ते काम करतात. पागोट्याची लांबी सुमारे ५५० फूट असते. त्याचे एक टोक अमृतेश्वराच्या आणि दुसरे शंभुमहादेवाच्या शिखराला बांधतात. या विवाहाविषयी कथा सांगतात, ती अशी –

कैलासावर शिव-पार्वती सारीपाट खेळत होती. त्या खेळात शिव प्रत्येक डाव हरत होता. ते पाहून नारदाने शंकराला चिडवले. शिव रागावला आणि कैलासाहून खाली उतरून शिंगणापूरच्या डोंगरात गुप्तपणे राहिला. पार्वती भिल्लिणीच्या वेषात त्याचा शोध घेत इथवर आली. दोघांची भेट चैत्र शु. पंचमीला झाली. मग त्या दोघांचे पुनश्च लग्न लागले.

या सोहळयात पंचमीला हळदी लावतात व अष्टमीला लग्न लागते. दोन जंगम माळी देवाला रोजचा नैवेद्य दाखवतात. त्यांनी अविवाहित राहायचे असते. एकादशीच्या दिवशी घोडयावर बसून व पायात जोडे घालून देवळात जाण्याचा मान नागपूरकर भोसल्यांना असतो.

देवाला दवणा प्रिय असतो. म्हणून त्याची लागवड इथे मोठ्या प्रमाणावर होते. [ कुलदैवत; नंदादीप; पुरुषार्थ – देवता विशेषांक; प्रसाद–शिवविशेषांक ]

## शिंगभूपाल

(इ. स. चे १४ वे शतक) संगीत व नाटच या उभय शास्त्रांचा एक आचार्य आणि आंध्र मंडलाधिपती. विंध्याचलापासून श्रीशैलापर्यंतच्या प्रदेशाचा हा अधिपती होता. राजाचल ही त्याची राजधानी होती. अनंत किंवा अन्नपोत हे त्याच्या पित्याचे नाव होते. अभ्यासकांच्या मते शिंगभूपाल व सिंगम नायडू या दोन्ही व्यक्ती एकच होत. दक्षिणेकडे नायडूंची गणना शूद्रात केली जाते. शिंगभूपालही स्वत:ला शूद्रच म्हणवून घेतो.

संगीत-सुधाकर ही त्याची संगीतरत्नाकरावरील टीका असून, या टीकेत आज नामशेष झालेल्या अनेक प्राचीन ग्रंथकारांची अवतरणे पाहायला मिळतात. म्हणून या टीकेला संगीतशास्त्राच्या इतिहासात मोलाचे स्थान आहे. रसार्णवसुधाकर हा त्याचा नाटचशास्त्रातील अनेक उपादेय विषयांची चर्चा करणारा, अनुपम ग्रंथ आहे. हा ग्रंथ रंजकोल्लास, रसिकोल्लास व भावोल्लास अशा तीन विलासांत विभागला आहे. प्रथम विलासात नायक-नायिकांचे स्वरूप व गुण विस्ताराने वर्णिले आहेत. दुसऱ्या भागात रसविवेचन आहे. अखेरच्या विलासात नाटचवस्तुविन्यास आहे. दशरूपकापेक्षा हा ग्रंथ विस्तृत असल्याने द. भारतात त्याचा अधिक प्रचार आहे. [ सं. सा. इ. २ ]

## शिंदे, विठ्ठल रामजी

(इ. स. १८७३–१९४४) एक समाजसुधारक, अस्पृश्यता-निवारणाचे पुरस्कर्ते, निरनिराळ्या धर्मांतील तत्त्वांचे संशोधक आणि ध्येयवादी विद्वान गृहस्थ. यांचा जन्म जमखिंडी येथे झाला. यांचे घराणे मूळचे सधन, सुखवस्तू होते. पण विठ्ठलरावांच्या वडिलांचे संसारात लक्ष नसल्यामुळे त्या कुटुंबाला दीनदशा प्राप्त झाली.

विठ्ठलराव हे जात्याच हुशार व चुणचुणीत होते. शाळेत ते नेहमीच वरच्या क्रमांकावर असत. त्या काळी मराठा वर्गात शिक्षणाविषयीची आस्था फारशी निर्माण झाली नव्हती; त्यामुळे शाळेत विठ्ठलरावांचे त्यांच्या ब्राह्मण शिक्षकांनी फार कौतुक केले. जमखंडी येथेच ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले व पुढील शिक्षणासाठी पुण्यास आले. शिष्यवृत्त्या मिळवून त्यांनी विद्यालयीन शिक्षण पुरे केले. ते बी. ए. एल्‌एल्. बी. झाले. दारिद्र्याशी झगडून आणि प्रतिकूल परिस्थितीवर मात करून त्यांनी आपले शिक्षण पूर्ण केले.

विश्वविद्यालयात असतानाच त्यांनी मिल व स्पेन्सर यांच्या तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास केला. त्यामुळे त्यांच्या मनात समाजातील दुष्ट रूढींबद्दल तिरस्कार उत्पन्न झाला. याच काळात प्रा. माक्स म्यूलर या पाश्चात्य तत्त्ववेत्त्याशी त्यांची गाठ पडली. धर्मावरील त्यांची विद्वत्तापूर्ण व्याख्याने, पौर्वात्य विचाराबद्दल त्यांना असणारी सहानुभूती आणि संस्कृत भाषेवरचे त्यांचे प्रगाढ प्रेम या गोष्टींनी विठ्ठलरावांच्या मनात त्यांच्याविषयी परम आदर उत्पन्न झाला. त्याचबरोबर प्रि. आगरकर, ह. ना. आपटे, इत्यादींच्या लेखनाचाही त्यांच्या मनावर प्रभाव पडला. या सर्व गोष्टींमुळे त्यांच्या मनात समाजसुधारणेविषयी प्रेम व आस्था निर्माण झाली.

विश्वविद्यालयीन जीवनातच विठ्ठलराव सार्वजनिक कार्यात थोडे थोडे लक्ष घालू लागले. इ. स. १८९५ साली डॉ. सँडरलंड हे अमेरिकन गृहस्थ त्यांना भेटले. ते एकेश्वरी मताचे होते. त्यांचे विचार विठ्ठलरावांना आवडले. विठ्ठलरावांनी त्यांच्याशी चर्चा केली व त्यांचे वाङ्मयही वाचून काढले. त्यातून त्यांचे मन एकेश्वरी वादाकडे झुकले. भारतातले प्रार्थनासमाज व ब्राह्मसमाज हे एकेश्वरी मताचेच पुरस्कर्ते होते. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, न्या. रानडे, न्या. तेलंग, न्या. मंडलिक हे तत्कालीन प्रसिद्ध विद्वान प्रार्थनासमाजाचे पुढारी होते. त्यांच्या विचारांची छापही विठ्ठलरावांच्या मनावर पडली आणि थोडयाच काळात ते प्रार्थनासमाजाचे सभासद झाले.

अमेरिकेतील युनिटेरियन असोसिएशनने भारतातील एकेश्वरी पंथाच्या एका तरुणाला विलायतेत शिक्षण घेण्यासाठी एक शिष्यवृत्ती ठेवली होती. डॉ. भांडारकर यांच्या शिफारशीने ती विठ्ठलरावांना मिळाली. विठ्ठलराव विलायतेस गेले. तिथे दोन वर्षे राहून त्यांनी जगातील अनेक धर्मांचा खोल व तौलनिक अभ्यास केला. युरोपातील नामवंत स्थळेही त्यांनी पाहिली. तिथला मुक्काम हालण्याच्या सुमारास ॲम्स्टरडम येथे एक धर्मपरिषद भरली होती. त्या परिषदेत त्यांनी हिंदुस्थानातील

उदार धर्म या नावाचा एक प्रबंध लिहून वाचला. तो तिथल्या सर्व विद्वानांना आवडला.

ऑक्टोबर १९०३ मध्ये ते हिंदुस्थानात परत आले. पण नोकरीधंद्याच्या मागे न लागता त्यांनी ब्राह्मसमाजाच्या प्रचाराचे कार्य हाती घेतले. या कार्यात त्यांना हिंदुस्थानात सर्वत्र प्रवास करण्याची संधी मिळाली. हिंदुस्थानात फिरत असताना इथल्या अस्पृश्य समाजाची दयनीय अवस्था त्यांना पाहायला मिळाली. ती पाहून विठ्ठलरावांचे करुणामय अंतःकरण हेलावले. या अस्पृश्य वर्गाला स्पृश्य वर्गाकडून सर्व प्रकारे अवहेलना सोसावी लागत होती. शतकानुशतके हा समाज दैन्याचे, अज्ञानाचे व अपमानाचे जिणे जगत होता. विठ्ठलरावांना वाटले, की स्पृश्य समाजाने अस्पृश्यांच्या उन्नतीसाठी जर काही प्रयत्न केले नाहीत, तर समाजातला हा एक मोठा वर्ग ख्रिश्चन व मुसलमान यांच्या धर्मांत ओढला जाईल आणि पुढे तो हिंदूंचा एक कडवा शत्रू म्हणून उभा ठाकेल. हिंदुसमाजाची लोकसंख्या तर घटेलच; शिवाय ती त्यांची कायमची डोकेदुखी होऊन बसेल. विठ्ठलरावांच्या मनातली ही विचारांची वावटळ त्यांना चैन पडू देईना. त्यांनी मग ठरवले, की आपले सारे आयुष्य अस्पृश्यांच्या उद्धारासाठीच सार्थकी लावायचे. अस्पृश्योद्धाराचे ध्येय पक्के झाल्यावर त्यांनी आपल्या कार्याची दिशा ठरवली, ती अशी—



महर्षी विठ्ठल रामजी शिंदे

(१) अस्पृश्यांसाठी शाळा, वसतिगृहे, उद्योगशाळा व दवाखाने उभारणे. अस्पृश्यांमध्ये शिक्षणाविषयी आस्था उत्पन्न करून त्यांना सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्याची दीक्षा देणे.

(२) स्पृश्य समाजाचे मतपरिवर्तन करणे. स्पृश्यांनी अस्पृश्यांना हीन न समजता हिंदुसमाजाचे घटक समजून त्यांच्याशी आपलेपणाने, सहानुभूतीने व समंजसपणाने वागले पाहिजे याची जाणीव उत्पन्न करणे.

(३) अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याला समाजातील सर्व थरांकडून सक्रिय पाठिंबा मिळवणे. विशेषतः राष्ट्रीय सभेने आपल्या कार्यक्रमात अस्पृश्यतानिवारणालाही महत्त्वाचे स्थान द्यावे याबाबत प्रयत्न करणे. या कामी सरकारचे साह्यही मिळवण्यासाठी प्रयत्न करणे.

इ. स. १८९५ सालापासून विठ्ठलरावांचा राष्ट्रीय सभेच्या अखिल भारतीय पुढाऱ्यांशी परिचय घडत होता. आपल्या कार्यासाठी त्यांची मदत मिळवण्याचा ते सतत प्रयत्न करीत होते. इ. स. १९१७ साली राष्ट्रीय सभेचे अधिवेशन डॉ. ॲनी बेझंट यांच्या अध्यक्षतेखाली भरले. विठ्ठलरावांच्या प्रयत्नाने त्या अधिवेशनात अस्पृश्यतानिवारणाविषयी ठराव आला व तो एकमताने संमत झाला. अस्पृश्यांवरील सर्व धार्मिक निर्बंध रद्द करून त्यांना माणुसकीचे सर्व हक्क स्पृश्यांप्रमाणेच प्राप्त व्हावे व सर्व उद्योगधंद्यांत त्यांना समान स्थान मिळावे, असा तो ठराव होता

त्यामुळे अस्पृश्यतानिवारण अखिल भारतीय पातळीवर पोचले.

अस्पृश्यतानिवारणाचे कार्य करीत असता विठ्ठलरावांना अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. त्यांना उपहास, अवहेलना आणि कठोर टीकाही सहन करावी लागली. पण त्यांनी आपल्या मनाची शांती कधीही ढळू दिली नाही. हे कार्य करीत असतानाच समाजसुधारणेच्या इतर बाबींकडेही ते लक्ष पुरवीत होते. मद्यपान, देवदासीपद्धती, शिमग्यातील बीभत्स प्रकार यांना आळा घालण्यासाठी ते यथाशक्ति प्रयत्न करीत. समाजसुधारणेइतकेच राष्ट्रीय स्वातंत्र्याचे महत्त्व आहे, असे त्यांचे ठाम मत होते. इ. स. १९०८ साली लो. टिळकांना सहा वर्षांची शिक्षा झाली आणि त्यांना मंडाले येथे कारागृहात डांबून ठेवण्यात आले. ही शिक्षा भोगीत असता लोकमान्यांना शारीरिक व मानसिक स्वास्थ्य लाभावे यासाठी विठ्ठलरावांनी प्रार्थनासमाजाच्या व्यासपीठावरून प्रार्थना केली. न्या. चंदावरकर हे त्या वेळी प्रार्थनासमाजाचे अध्वर्यू होते. त्यांनी या कृत्याबद्दल विठ्ठलरावांना जाब विचारला. कारण लो. टिळक हे जहाल पक्षाचे होते आणि प्रार्थनासमाजाचे लोक हे मवाळ होते. उभयतांचे विचार भिन्न होते. त्यामुळे प्रार्थनासमाजाच्या बैठकीत लो. टिळकांचा उच्चार चंदावरकरांना रुचला नाही. पण विठ्ठलरावांनी त्यांना नम्रपणे जबाब दिला तो असा–

"मला आपण विश्वासाने आचार्य आणि प्रचारक नेमले आहे. समाजात सर्व प्रकारची, सर्व मतांची आणि सर्व दर्जाची माणसे आहेत, हे मी जाणून आहे. ईश्वरापुढे उभा राहून प्रार्थना करीत असता भारताचे संकलित भवितव्य ओळखून प्रार्थना करणे माझे पवित्र कर्तव्य आहे. ह्यात ब्रिटिश सरकारची कदर ओळखून माझे आध्यात्मिक कर्तव्य करणे भाग आहे. ह्यात मी कच खाल्ली, तर मी स्वतःशीच अपात्र ठरेन. आपला विश्वास असेल तर मला या जागेवर ठेवा, पण माझ्या कामात स्वतः मला आणि माझ्या ईश्वराला जबाबदार राहू द्या."

इ. स. १९३० साली हिंदुस्थानात म. गांधींनी सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू केली. विठ्ठलरावांनी त्या कार्यातही उडी घेतली. त्या सत्याग्रहाला जनतेतून जास्तीत जास्त सहकार्य मिळावे म्हणून विठ्ठलराव खेडोपाडी हिंडले आणि त्यामुळेच ते ब्रिटिश सरकारच्या डोळ्यात खुपले. त्याच साली मे महिन्यात त्यांना अटक झाली.

विठ्ठलराव ब्राह्म धर्माचा प्रचार करीत होते, त्याबरोबरच मानवताधर्माचाही पुरस्कार करीत होते. तसेच ते संकुचित धर्मकल्पना व जुन्या दुष्ट रूढी यांवर कठोर प्रहार करीत होते. अशा प्रकारे जे जे मानवी उन्नतीला पोषक असेल, ते ते त्यांनी पुरस्कारिले व जे जे अवनतीला कारण झाले असेल, ते ते धिक्कारिले. विठ्ठलरावांची दृष्टी विशाल होती. विचारसरणी सडेतोड होती. आपले सर्व कुटुंब त्यांनी समाजसेवेसाठी उभे केले. आपल्या बहिणीला व पत्नीला त्यांनी शाळेत घालून शिकविले. त्यांची निरीक्षणशक्ती सूक्ष्म होती; पांडित्य सखोल व चिकित्सक होते. भारतीय अस्पृश्यांचा प्रश्न हा त्यांचा अविस्मरणीय ग्रंथ होय. भारतातील सर्व प्रदेशांतल्या व निरनिराळ्या नावांनी ओळखल्या जाणाऱ्या अस्पृश्यांची तत्कालीन परिस्थिती त्या ग्रंथावरून कळून येते. अस्पृश्यतेविषयीचे मूलभूत विवेचनही त्यात आढळते. हा ग्रंथ म्हणजे त्यांच्या संशोधक वृत्तीचा परिपाकच होय. माझ्या आठवणी व अनुभव हा त्यांचा दुसरा ग्रंथही अनेक लेखनगुणांनी व परिपक्व विचारांनी समृद्ध आहे. अलिकडेच त्यांच्या सर्व लेखांचा संग्रह शिंदे लेखसंग्रह या नावाने प्रकाशित झाला आहे.

आयुष्यभर दारिद्र्य व हालअपेष्टा सहन कराव्या लागल्यामुळे विठ्ठलरावांच्या प्रकृतीवर पुढे वाईट परिणाम झाला. दृष्टी कमी झाली. हातापायांना कंप सुरू झाला. त्यातच मधुमेहाने डोके वर काढले. त्यामुळे शेवटच्या दहा वर्षांत त्यांच्या हातून विशेष श्रमांचे कार्य होऊ शकले नाही.

अस्पृश्यता हा भारतीय समाजावरचा कलंक आहे आणि तो धुवून काढलाच पाहिजे, या तळमळीने भारतात जे पुरुष झटले, झगडले, त्यांच्या मालिकेत विठ्ठल रामजी शिंदे हे नाव खूप वरचे आहे. म्हणूनच जाणकारांनी त्यांना महर्षी म्हणून गौरवले.
[ माझ्या आठवणी व अनुभव – वि. रा. शिंदे, १९५८; महर्षि शिंदे – हिराजी पाटील, १९६९. ]

**शिंपी** एक जात. या लोकांची वस्ती प्रामुख्याने महाराष्ट्र व कर्नाटक या प्रांतांत आढळते. शिंपी समाजात हिंदूंबरोबर लिंगायत, जैन व मुसलमान लोकही आढळतात. याचे कारण मुळात शिंपी ही जात नव्हती. शिंपीपणा म्हणजे कपडे शिवणे हा एक व्यवसाय होता व तो अनेक जातींचे लोक करीत असत. कालांतराने त्यांची शिंपी ही एक वेगळी जात बनली.

मुळात आपण क्षत्रिय होतो व परशुराम पृथ्वी निःक्षत्रिय करायला निघाला, त्या वेळी आपण कपडे शिवण्याचा पेशा स्वीकारला, असे हे लोक सांगतात. पूर्वी हे लोक कपडे रंगविण्याचा व्यवसायही करीत. पण नंतरच्या काळात कपडे रंगविणाऱ्या रंगाऱ्यांची एक निराळी जात बनली. शिंपी लोकांत अजूनही रंगारी नावाची एक पोटजात आहे.

कपडे शिवणे हा शिंप्यांचा प्रमुख व्यवसाय आहे. पण त्यांच्यापैकी काही लोक कपड्यांचा व्यापार, शेती, मजुरी, इ. व्यवसायही करतात.

यांच्यांत अहीर, भावसार, चतुर, कोकणी, मराठा, नागलिक, नामदेव, रंगारी किंवा गोपाळकाली, पंचम, शेटवाल, श्रावक किंवा जैन, यकताटे, लिंगायत किंवा शिवशिंपीगार, जोगडा ठाकूर शिंपी, वैष्णव नामदेव शिंपी, मुसलमान, इ. पोटजाती आहेत. नामदेव हा महाराष्ट्रीय संत शिंपी जातीतील असल्यामुळे शिंप्यांतील अनेक पोटजाती आपल्या नावात नामदेव या नावाचा समावेश करतात. उदा० नामदेव कोकणी शिंपी, नामदेव मराठा शिंपी, इत्यादी. या पोटजातींत सामान्यपणे रोटीबेटीव्यवहार होत नाही. या पोटजातींतही देशकालपरत्वे आणखी काही भेद पडले आहेत.

या पोटजातींपैकी भावसार समाजात भावसार का बाहुसार असा नावाबाबत वाद सुरू झाला. भावसार या शब्दाला काही अर्थ नसल्यामुळे काही लोकांनी बाहुसार हे नाव धारण केले व त्याला शिवगंगा मठाच्या शंकराचार्यांकडून पाठिंबा मिळवला. पण बहुसंख्य लोकांनी भावसार हे नावच कायम ठेवले. भावसार समाज हिंगलाज देवीचा उपासक आहे. शिंपी समाजात नामदेवाचा जन्म झाल्यावर भावसारांपैकी काही जण त्याचे अनुयायी बनले व त्यांनी भक्तिपंथाची कास धरली. तेव्हा हिंगलाज देवीचे उपासक भावसार नामदेव शिंप्यांपासून अलग राहू लागले. आणि त्यामुळे पुढे हे दोन भेद अस्तित्वात आले.

अक्सरे, वगाडे, बाके, कळसकर, करमुसे, कोल्हे, फुटाणे, पोटे, सरोदे, पाडळकर, निरगुडे, इ. आडनावे यांच्यांत आहेत.

**विवाहप्रथा –** एकाच गोत्रात व एकाच आडनावात विवाहसंबंध होत नाहीत. सर्वसाधारणपणे बहिणीच्या मुलाला मुलगी देण्याचा प्रघात आहे. मुलाचा बाप मुलीला मागणी घालतो. लग्नविधी साधारणपणे देशस्थ ब्राह्मणांच्या पद्धतीप्रमाणे होतो. लग्नातील विधी पुराणोक्त विधीने होतात. स्थानपरत्वे काही सोहळ्यांत फरक पडतो. बेळगाव जिल्ह्यातील गोपाळकाली शिंप्यांत, लग्नसमारंभ संपल्यावर नवरा मुलगा वधूच्या घरी जातो आणि घरातील एक देव चोरून घेऊन आपल्या घरी जातो. नंतर वधू पुरुषवेष धारण करून वराच्या घरी जाते आणि त्याच्या पाठीत रट्टे मारते. नंतर ती आपल्याबरोबर आपल्या घरी येण्यासाठी त्याचे मन वळवते.

महाराष्ट्रातील व कर्नाटकातील शिंप्यांची कात्री, सुया व गज, तसेच पंचपालवी ही देवके असतात. कोकणातील शिंप्यांची आंब्याची पाने, उंबराच्या काठ्या आणि पिंपळाची पाने ही देवके असतात; तर अहीर शिंप्यांची सूप, मातीचा घडा आणि आंब्याची पाने ही देवके असतात.

विधवेचा पुनर्विवाह पौष, आषाढ, भाद्रपद, इ. काही महिने वगळून बाकी महिन्यांच्या अमावास्येला होतो. त्या वेळी ज्ञातिप्रमुख व ब्राह्मण पुरोहित उपस्थित असतात. लग्नानंतर दुसऱ्या दिवशी पहाटे, नवीन जोडपे मारुतीच्या दर्शनाला जाते. त्या वेळी कोणीही त्यांना पाहायचे नसते, म्हणून ही वेळ निवडतात.

ठाणे जिल्ह्यात विधवेचे लग्न तांबडे, पिवळे पट्टे ओढलेल्या पांढऱ्या कापडाशी प्रथम लावतात व मग ते कापड नवऱ्या मुलाजवळ देतात. मग वधूची ओटी भरतात व वधू-वरांच्या वस्त्रांना गाठ मारतात. नासिक जिल्ह्यात वधू-वरांची मस्तके जुळवणे व त्यांच्या वस्त्रांची गाठ मारणे, हा लग्नातील प्रमुख विधी असतो. .

**देवधर्म –** शिंपी लोकांपैकी बरेचजण वारकरी पंथाचे अनुयायी आहेत. खानदेशातील काही शिंपी स्वामीनारायण व कबीर या पंथांचे अनुयायी आहेत. हे लोक बहिरोबा, गिरीचा बालाजी, भवानी, जनाई, जोतिबा, खंडोबा, विठोबा, इ. देवतांना भजतात. त्यांचा मंत्रतंत्रावर व भुताखेतांवर विश्वास आहे.

**मर्तिकप्रथा –** हे लोक मृतांना जाळतात. अंत्यक्रिया कुणबी लोकांच्या अंत्यक्रियेसारखीच असते. ते श्राद्ध व महालय करतात.

श्रावक शिंपी जैन असून, चौवीस तीर्थंकरांची पूजा करतात. तसेच ते बालाजी वगळून ब्राह्मणांच्या इतर सगळ्या देवतांना भजतात. यांचा पुरोहित यांच्याच जातीचा असतो. हे मूल जन्मल्यावर पाचव्या दिवशी सटवीची पूजा करतात. मुलगा जन्मल्यास बारा दिवस व मुलगी जन्मल्यास चाळीस दिवस जननाशौच पाळतात. मुलाचे जावळ पाचव्या महिन्यापासून पाचव्या वर्षापर्यंत केव्हाही काढतात. मुलाची मुंज दहाव्या वर्षाच्या आत करतात. त्या वेळी पार्श्वनाथाचे तीर्थ मुलाच्या अंगावर शिंपडतात. मौंजीबंधन झाले, की त्या दिवसापासून मुलगा जैन होतो. त्यानंतर दिवेलागण झाल्यावर त्याला काहीही खाता येत नाही. विवाहाच्या वेळी वधूच्या व वराच्या घरी पार्श्वनाथाची मूर्ती बसवतात व तिची पंचामृती पूजा करतात. नवरा मुलगा घोड्यावरून लग्नासाठी निघाला, की प्रथम गावातील पार्श्वनाथाच्या मंदिरात जातो. तिथे वधूपिता त्याचा शेलापागोटे देऊन सत्कार करतो व त्याला आपल्या घरी घेऊन जातो.

श्रावक शिंपी आसन्नमरण झाला असता, घरातील लोक धार्मिक ग्रंथांचे पठण करतात. तसेच चौवीस तीर्थंकरांच्या प्रतिमांना स्नान घालून ते तीर्थ त्याला पाजतात. मृत्यूनंतर पुरुषाला मुकटा नेसवून पांढऱ्या चादरीत गुंडाळतात. स्त्री विधवा असेल, तर तिलाही मुकटा नेसवतात. सौभाग्यवती स्त्रीला मात्र पिवळे कपडे घालतात. मृताला जाळतात. मृताशौच दहा दिवस पाळतात. तेराव्या दिवशी मृताच्या घरी पार्श्वनाथाची पूजा करतात व आप्तेष्टांना जेवण देतात. [ ट्रा. का. बॉं.; म. ज्ञा. को.; पुना गॅझे.]

**शिकलगार** एक मुसलमान जात. या लोकांची वस्ती महाराष्ट्रात आढळते. हे हनफी पंथाचे सुन्नी असले तरी, यांचा ओढा हिंदूधर्माकडे असतो. शिकल म्हणजे साफसूफ करणे, उजळा देणे. त्यावरून हत्यारे उजळणारा व ती साफ करून त्यांना धार लावणारा, तो शिकलगार असा शब्द बनला.

शस्त्रांना धार लावणे आणि सामान्यतः जुन्या लोखंडापासून झारे, पळचा, विळचा, तवे, इ. संसारोपयोगी सामान तयार करून विकणे, हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे. याशिवाय ते गावोगाव हिंडून पलंगाचे पाय, पाळणे, खाटा, इ. वस्तू बनवतात. फिरतीवर असताना हे बायकामुलांसह हिंडतात. त्यांचा मुक्काम पाण्याच्या सोईने पालात असतो. [मुं. इ. जा.; म. ग्रा. स.]

**शिकारपूर** एक्कावन शक्तिपीठांतील एक. हे स्थान बांगला देशातील खुलना स्टेशनपासून सुमारे तेरा मैलांवर आहे. इथल्या सुगंधा अथवा सुनंदा नदीच्या काठी देवीचे मंदिर असून, तिथे देवीचे नाक गळून पडले, अशी समजूत आहे. या देवीला उग्रतारा या नावानेही ओळखतात. सुनंदा ही तिची शक्ती असून, त्र्यंबक हा भैरव आहे. [ कल्याण–तीर्थांक ]

**शिकारी** आसाम प्रदेशाच्या जयंतिया पर्वतभागातील लोकांचे एक आवडते समूहनृत्य. धार्मिक समारंभाच्या अंतिम पर्वात या नृत्याचे कार्यक्रम होतात. या नृत्यामुळे देवतांची कृपा लाभते, दुष्टात्मे दूर जातात आणि सुखाची प्राप्ती होते, अशी समजूत आहे. याला लाहोनृत्य असेही म्हणतात.

या नृत्यात केवळ वीर पुरुषांनीच भाग घ्यावा, असा संकेत आहे. यात नर्तकांची वेषभूषा सुंदर व आकर्षक असते. ते विनबाह्यांचा आणि गळपट्टी नसलेला अंगरखा घालतात, धोतर नेसतात. परंतु ज्या व्यक्तीजवळ ध्वज असतो, ती व्यक्ती धोतराऐवजी व्याघ्रचर्म परिधान करते. नृत्याला ढोलांची व नगाऱ्यांची साथ असते. नर्तकांचा आणि वादकांचा पोषाख सारखाच असतो. फक्त वादकांच्या पगडयांना मागे पंख जोडलेले असतात. या नृत्यात स्त्रियाही भाग घेतात. त्या रंगीबेरंगी रेशमी कपडे घालतात. दोन पुरुषांमध्ये एक युवती उभी राहते. ते तिचा एक एक हात स्वतःच्या खांद्यावर धरून ठेवतात.

नर्तकांच्या एका हातात बर्ची व दुसऱ्या हातात, लहान-लहान घुंगरे लावलेली, चामडयाची ढाल असते. त्यामुळे नाचाच्या वेळी घुंगरांचा मधुर आवाज होतो. नर्तक मंडलाकार उभे राहून नाचतात. त्या वेळी ते बर्चीचे विविध हात करतात. अलिकडे एखादी मोठी शिकार मिळाल्यानंतरही या नृत्याचे कार्यक्रम होऊ लागले आहेत. [भा. लो. नृ.]

**शिखर** देवालयातील गर्भगृहावर उंच व वर निमुळता होत गेलेला जो मनोरा असतो, त्याला शिखर म्हणतात. त्यात अनेक मजले किंवा थर दिसतात. मनोऱ्याच्या माथ्यावर एक आमलक असून त्याच्यावर कळस असतो. शिखरांची निर्मिती गुप्तकाळी इ. स. च्या ६ व्या शतकात सुरू झाली, असे बहुतेक पंडितांचे मत आहे. मध्य भारतातील देवगड येथील मंदिराच्या गाभाऱ्यावर कोनाकृती छप्पर किंवा शिखर होते. सौराष्ट्रातील गोप येथील मंदिरावरही असेच छप्पर आढळते. हे शिखरांचे प्राथमिक स्वरूप होय. मात्र त्यापूर्वीच्या काळांतही काही ठिकाणी शिखरे निर्माण झाली असावी. कारण भरहूत, सांची, अमरावती, मथुरा, इ. ठिकाणी जी प्राचीन शिल्पकामे आहेत, त्यांत अशा शिखरांच्या आकृती कोरलेल्या दिसतात. वास्तुशास्त्राच्या ग्रंथांतही अशा शिखरांचा निर्देश आढळतो.

शिखरांचा उगम कसा झाला, याविषयी निरनिराळ्या पंडितांनी भिन्न भिन्न कल्पना केल्या आहेत. मध्य व पूर्व भारतात दोन हजार वर्षांपूर्वी झोपडयांची छपरे कोनाकृती किंवा घुमटासारखी असत. नागर शैलीची शिखरे त्याच नमुन्याप्रमाणे बांधण्यात आली असावी, असे एक मत आहे. बौद्ध शिल्पातील स्तूपही घुमटाकृती असतो. त्याचेच हळूहळू रूपांतर होऊन मनोराशिखर उगम पावले, अशी कल्पना एका पंडिताने केली आहे. देवालयाला कधी कधी रथ म्हणतात. देवतेच्या प्रतिमेची मिरवणूक ज्या रथातून काढतात, त्याला उंच निमुळते छप्पर असते. तसेच छप्पर देवालयाच्या गाभाऱ्यावरही बांधण्यात आले असावे, अशीही कल्पना केली जाते. आणखी एक कल्पना अशी, की शिखराची रचना राजप्रासादांवरून सुचली असावी. राजप्रासाद भव्य असून, त्यात अनेक मजले असतात. राजांच्या निवासस्थानाप्रमाणेच देवांचे निवासस्थानही भव्य असावे, अशी आकांक्षा शिल्पकाराच्या मनात उत्पन्न होऊन त्याने तसे, मंदिर निर्माण केले असेल. मात्र त्यात मजल्यांची आवश्यकता नसल्यामुळे त्याने गाभाऱ्यावर अनेक भूमितल किंवा थर असलेला मनोराच रचला आणि शोभेसाठी तो निमुळता केला.

घरांची उतरती छपरे लाकडी तुळयांवर आधारलेली असतात. पण मंदिरांच्या अशा प्रकारच्या छपरांचे बांधकाम दगडी असल्यामुळे त्याचा भार पेलण्यासाठी लाकडी तुळया निरुपयोगी होतात. तेवढ्या लांबीच्या दगडी तुळया मिळणेही कठीण असते. त्यामुळे वेगळी रचना करण्यात आली. ती म्हणजे परस्परांना सावरून धरणाऱ्या लहान लहान दगडांच्या किंवा विटांच्या कमानी उभारून त्यावर घुमट बांधणे ही होय. अशा शिखरांची संख्या अगदी कमी असून, त्यांत विटाच वापरलेल्या आहेत. दुसरा प्रकार म्हणजे दगडांचे एकावर एक थर असे बसवायचे.

की मधल्या मोकळ्या भागाचा आकार कमी कमी होत जाऊन अगदी वर एकच दगड ठेवता यावा. अशा रचनेमुळे शिखराच्या रचनेत पायऱ्या किंवा थर निर्माण होतात. वरच्या थरातला दगड खालच्या थरातल्या दगडाच्या थोडासा पुढे दिसतो. बाहेरच्या बाजूनेही अशीच उतरंड दिसते. हे थर किंवा भूमितल किती स्पष्टपणे दिसतात, यावर नागर व द्राविड पद्धतींच्या शिखरांतील भेद सांगता येतो. शिल्पकाम सलग रेषेने बद्ध असते तेव्हा ते नागर पद्धतीचे शिखर ठरते. आणि त्यातील थर स्पष्टपणे वेगळे झालेले दिसतात तेव्हा ते द्रविड पद्धतीचे शिखर ठरते. मात्र दोन्ही प्रकारांत मजले असतात व त्यांना भूमी म्हणतात.

शिखराच्या प्रत्येक मजल्याच्या सजावटीत योजलेले शिल्पकाम वरवर पाहता भिन्न पण मूलतः एकाच प्रकारचे असते. नागर शिखरांवर चैत्य, तोरणे, त्यांचे अंश आणि असे अनेक अंश मिळून झालेली जाळीसारखी रचना शोभेसाठी वापरतात. त्याचप्रमाणे आमलकही असतात. द्राविड शिखरांवर कूट व शाला यांची लहानलहान प्रतीके हारीने कोरण्यात येतात. त्यांच्या एका बाजूला चैत्य-गवाक्ष असते. छपराच्या मधोमधही गवाक्षे असतात. नागर शिखरांच्या शिरोभागी आमलक असतो, तसाच कोपऱ्यांवरही असतो. द्राविड पद्धतीच्या शिखरात मात्र आमलक आढळत नाही. नागर शिल्प-पद्धतीत शिखरांच्या लहान प्रतिकृती किंवा त्यांचे मुख्य भाग शिखराभोवती मांडलेले दिसतात. गया येथील महाबोधी मंदिर या दृष्टीने उल्लेखनीय आहे. त्याचे सात मजली शिखर खूपच उंच व सुशोभित आहे. त्याच्या चारही कोपऱ्यांवर शिखराच्या प्रतिकृती बांधलेल्या आहेत.

मध्य प्रदेशातील खजुराहो हे एक अत्यंत प्रसिद्ध कलाक्षेत्र आहे. तिथे चंदेलवंशी राजांनी इ. स. च्या १०–११ व्या शतकांत बांधलेली अनेक सुंदर मंदिरे पाहायला मिळतात. ही मंदिरे अतिशय प्रगत अशा स्थापत्यकलेच्या वैभवाची साक्ष देतात. या मंदिरांच्या निरनिराळ्या दालनांवर लहानमोठी शिखरे असून, गाभाऱ्यावरील शिखर सर्वांत उंच असते. या सर्व शिखरांची रचना लयबद्ध आहे. गाभाऱ्याची रचना आणि वरपर्यंतची उभारणी सप्तरथ पद्धतीची आहे. शिखराच्या रचनेतही अनेक छोटे भाग कित्येक ठिकाणी पुढे आणलेले व अन्य ठिकाणी मागे नेलेले आहेत. त्यांतही एक प्रकारची लय साधलेली आहे. कंदरिया महादेवाचे मंदिर सर्वांत भव्य असून, त्याची रचना परिणत आहे. स्थापत्यकलेच्या दृष्टीने हे मंदिर अखिल भारतातील एक अत्यंत उन्नत व उत्कृष्ट निर्मिती मानली जाते. त्याचे शिखर खूपच उंच व कोरीव नक्षीकामाने सुशोभित आहे. त्या शिखराच्या लहान लहान नक्षीदार प्रतिकृती शिखराच्या पृष्ठभागी वरपर्यंत कोरलेल्या असून, त्यांची संख्या ८५ आहे. त्यांत जागोजागी आमलकही दृष्टीस पडतात. त्यामुळे शिखर सुंदर दिसते.

द. भारतात द्राविड शैलीची, वेगळ्या घाटाची मंदिरे आढळतात. बादामी, महाकूट व पट्टदकल या तीन ठिकाणी मिळून या शैलीच्या प्रारंभिक अवस्थेतील सात-आठ मंदिरे उल्लेखनीय आहेत. त्या सर्वांत बादामीजवळच्या मालेगिट्टी नामक टेकडीवरील शिवालय अधिक जुने आहे. द्राविड शैलीची सर्व महत्त्वाची अंगे त्यात दिसून येतात. द्राविड पद्धतीत गाभाऱ्यावरील आच्छादनाचे दोन भाग कल्पिलेले आहेत. सर्वांत वर घुमटासारखा भाग असतो, त्याला शिखर म्हणतात. हे शिखर गोल, चौकोनी, अष्टकोनी असे विविध प्रकारचे असते. या शिखराच्या खाली पण कपोताच्या वर पायऱ्यापायऱ्यांचे जे शिल्पकाम असते, त्याला विमान म्हणतात. मालेगिट्टी शिवालयात तीन मजली विमान असून, त्यावर अष्टकोनी शिखर आहे. विमानाच्या प्रत्येक मजल्यावर कूट-शाला यांच्या रांगा आहेत. आणि शिखराच्या चारही बाजूंवर चैत्य-तोरणे किंवा नासिका आहेत.

सबंध भारताच्या वास्तुशिल्पात कलाकौशल्याच्या दृष्टीने सर्वोत्कृष्ट अशा ज्या वास्तू आहेत, त्यांत तंजाऊरच्या बृहदीश्वर-मंदिराचा समावेश होतो. हे भव्य, सुंदर मंदिर १८५ फूट उंच असून, त्याला गाभाऱ्यावर निमुळते होत गेलेले, अत्यंत सौष्ठव-



बृहदीश्वर–मंदिर, तंजाऊर

पूर्ण असे तेरा मजली विमान आहे. प्रत्येक मजल्यावर कूट–शाला-पाञ्जर कोरलेले असून, त्यांत अनेक मूर्ती कोरलेल्या आहेत. या सर्वांवर एक प्रचंड अष्टकोनी शिखर आहे. हे शिखर

एकाच अखंड पाषाणाचे असून, त्याचे वजन ८० टन आहे.

हे बृहदीश्वरमंदिर त्याचा भव्यपणा किंवा सजावट यांमुळे अजोड मानले जात नाही; तर त्यातील विविध वास्तुखंडांच्या आकारांचा परस्परांशी जो तोल साधला आहे, त्यामुळे ते सर्वश्रेष्ठ मानले जाते. विमानाचा आकार सर्वसाधारणपणे द्राविड पद्धतीच्या विमानासारखाच आहे. पण निरनिराळ्या मजल्यांना विभागणाऱ्या रेषा अशा प्रकारे नियमित करण्यात आलेल्या आहेत, की सबंध वास्तूच्या गगनाकडे झेपावत जाण्याच्या वृत्तीला त्यामुळे बाध येऊ नये. विमानाचा प्रचंड भार आणि सरळ बाह्य रेषा यांना शिखराच्या वक्ररेषा आणि लहान आकार यांमुळे जास्त शोभा येते. [ स्ट. वा. वि.; प्रा. भा. क.; उ. भा. मं. ]

## शिखरदान

एक दानप्रकार. उसाच्या पानांचे एक कोठार करून, त्यातून गूळ, ऊस वगैरे पदार्थांचे, गौरीच्या प्रतिमेसह जे दान करतात, त्याला शिखरदान असे म्हणतात. या दानाचे गूळ, ऊस, वस्त्र, मीठ, धणे, जिरे, साखर, खजूर, तांदूळ, द्राक्षे, मधापासून केलेली साखर, चंदन व मधुर फळे असे तेरा प्रकार आहेत. मार्गशीर्ष, माघ व वैशाख महिन्यात तृतीयेला रोहिणी नक्षत्र असेल त्या वेळी किंवा भाद्रपद शुद्ध तृतीयेला हे दान देतात. या सर्व दानांचा विधी एकच आहे. फक्त संकल्प करताना ज्या द्रव्याचे दान करायचे असेल त्या द्रव्याचा उच्चार करतात. दानविधी असा –

दानाच्या दिवशी संकल्प करून प्रथम गणेशपूजा, नांदीश्राद्ध व आचार्यांची मधुपर्क पूजा करावी. मग गोमयाने भूमी सारवून त्यावर उसाची पाने पसरून इक्षुपत्रांचे शंक्वाकृती कोठार करावे. कोठाराच्या आतील अंगाने तांबडे वस्त्र लावावे. ज्या पदार्थाचे दान करायचे असेल, त्या पदार्थाने कोठार भरावे. त्यावर इक्षुपत्रांची चटई आणि चटईवर रेशमी वस्त्र पसरावे. गौरीच्या सुवर्णप्रतिमेची स्थापना करून, शिखरासह तिला सूत्रवेष्टन करावे. तिची पूजा करावी. रात्री जागर करावा. दुसऱ्या दिवशी दानसंकल्प करून गौरीसह शिखराचे दान करावे. आचार्याला सुवर्णदक्षिणा आणि ब्राह्मणाला भूयसी देऊन भोजन द्यावे. दानदिवशी दानकर्त्याने मौन पाळून, केस मोकळे ठेवून आणि दूध पिऊन राहावे. [ दानचंद्रिका ]

## शिखा

(१) शेंडी. शिखेला चूडा, केशपाशी, जुटिका, इ. अन्यही नावे आहेत. पुरुषाच्या मस्तकावर टाळूच्या मागच्या बाजूस मधोमध राखला जाणारा केशपुंज म्हणजे शेंडी होय. शेंडी हे आर्यत्वाचे अर्थात हिंदुत्वाचे मुख्य चिन्ह आहे. प्राचीन काळी मस्तकाच्या इतर भागात काही उपशिखा राखण्याचीही पद्धत होती. त्या काळात एक अथवा प्रवरातील ऋषींच्या संख्येइतक्या म्हणजे तीन किंवा पाच शेंड्या ठेवीत असत. शिखांच्या संख्येवरून त्या त्या पुरुषांची कुलपरंपरा समजण्यास मदत होत असे. ऋग्वेदात वसिष्ठांना 'दक्षिणतस्कपर्दाः' (मस्तकाच्या उजव्या बाजूस शेंडी ठेवणारे) असे म्हटले आहे (ऋ. ७.३३.१).

सूत्रकालात शेंडी ठेवून तिला गाठ मारण्याच्या पद्धतीला महत्त्व प्राप्त झाले होते. मस्तकाचे मुंडन करतेवेळी शेंडीचे केस वगळून बाकीचे केस काढावे, असे कात्यायन श्रौतसूत्रात सांगितले आहे (२.१.९). शेंडी ही शुभसूचक असल्याचे प्रस्तुत सूत्रावरून कळते. हिरण्यकेशी गृह्यसूत्रात गोदानविधीचे वर्णन करताना पुढील दोन सूत्रे लिहिली आहेत –

**सशिखं वापयते । शिखामत्रावशिनष्टीत्येकेषाम् ।**

(हि. गृ. २.६.१६-१७)

अर्थ – मुलाचे केस शिखेसुद्धा सर्व मुंडावे. काहींच्या मते मुंडन करताना शिखा वगळावी.

आश्वलायन गृह्यसूत्रात (४.२.९) यज्ञ चालू असता यजमानाने शेंडीसुद्धा काढून टाकावी. कारण, वेदाची तशी आज्ञा आहे असे म्हटले आहे. स्नान केल्यानंतर गायत्री मंत्राने शेंडीला गाठ बांधावी, असे धर्मशास्त्र सांगते (श. क.). शेंडी मोकळी सोडून हिंडू-फिरू नये असेही सांगितले आहे. आश्वलायनाच्या मताप्रमाणे मृताची अंत्ययात्रा काढताना त्याच्या आप्तपुरुषांनी शेंडीची गाठ सोडावी (आ. गृ. सू. ४.२.९). शिखा ही स्नान, दान, जप, होम, संध्या, पूजा, श्राद्ध या कृत्यांच्या वेळी बांधलेली असावी आणि शयन, स्त्रीसंग, भोजन, दंतधावन या प्रसंगी ती मोकळी असावी, असे आह्निकसारात सांगितले आहे.

अलिकडे शेंडी ठेवण्याचा प्रघात महाराष्ट्रात तरी क्वचितच आढळतो. दक्षिणेत हा प्रघात बऱ्याच प्रमाणात चालू आहे. दाक्षिणात्य लोक अर्ध्या डोक्याइतकी शेंडी ठेवतात. उत्तरेतही ब्राह्मणवर्गात शेंडी राखण्याची चाल अजून बऱ्याच प्रमाणात आहे. पण सगळ्या भारतातच हळू हळू शिखेचे महत्त्व व अस्तित्व लोप पावत आहे.

(२) एक वेदविकृती. जटा या वेदविकृतीच्या पुढे एक पद घेऊन म्हणणे याला आर्यलोक शिखा म्हणतात. उदा०–

**ओषधयः सं समोषधयः ओषधयः सं वदन्ते ।**

पाहा–वेदविकृती.

## शिखिव्रत

एक काम्य व्रत. याचा विधी असा – प्रत्येक महिन्याच्या दोन्ही पक्षांतील प्रतिपदेला एकभुक्त राहावे. असे एक वर्षभर करावे. वर्षाच्या शेवटी एक

गाय दान द्यावी. फल–वैश्वानरलोकाची प्राप्ती. [ हि. ध. ]

**शिधा** डाळ, तांदूळ, गूळ, तूप, इ. भोजनोपयोगी पदार्थ एखाद्या ब्राह्मणाला किंवा इतर मनुष्याला देणे, याला शिधा देणे असे म्हणतात. सिद्धान्न या संस्कृत शब्दावरून शिधा शब्द आलेला आहे. सिद्धान्न म्हणजे शिजवून तयार केलेले अन्न. शिधा शब्दात मात्र हा अर्थ बदललेला आहे. सिद्ध अन्नाऐवजी त्याचा पर्याय म्हणून डाळ, तांदूळ, इ. सामग्री देतात, तिला शिधा म्हणायची वहिवाट आहे. भोजन देणे शक्य नसेल, त्या वेळी ब्राह्मणाला शिधा देतात.

**शिबिकादान** एक दान. शिबिका म्हणजे पालखी होय. वैशाख, मार्गशीर्ष, माघ किंवा फाल्गुन महिन्यातील शुद्ध एकादशीला सोन्याच्या विष्णुमूर्तीची पूजा करून, रात्री जागर करतात. द्वादशीला शिबिकेची आणि ज्या ब्राह्मणाला ती दान द्यायची असेल त्याची पूजा करतात. मग दानसंकल्प करून शिबिकेचे दान देतात. शिबिकेबरोबर ब्राह्मणाला त्याच्या एक वर्षाच्या निर्वाहापुरते धान्य देतात. शिबिकावाहकांना वर्षाची पोटगी देतात. फल – सुखप्राप्ती व विष्णुसायुज्य. [ दा. चं. ]

**शिबिर** सैन्याची छावणी. सैन्याची हालवाहालव करताना त्याला वाटेत एक दिवस किंवा काही दिवस मुक्काम करावा लागतो. अशी ही मुक्कामाची जागा कशी असावी याबद्दल काही नियम प्राचीन राजनीतिग्रंथात दिलेले आहेत –

ग्रामाद् बहिः समीपे तु सैनिकान् धारयेत् सदा ।
ग्राम्यसैनिकयोर्न स्यादुत्तमर्णाधमर्णता ।।
सैनिकार्थं तु पण्यानि सैन्ये सन्धारयेत् पृथक् ।
(शुक्र. ४.७)

अर्थ – गावाच्या बाहेर, पण गावापासून जवळ सैनिकांची छावणी असावी. गावातील लोक व छावणीतील शिपाई यांचा देण्याघेण्याचा व्यवहार नसावा. सैनिकांकरिता बाजाराची व्यवस्था छावणीतच करावी.

छावणीचे दोन प्रकार सांगितले आहेत. ज्या छावणीत सैनिकांचे शिक्षण चालू असते, तिथे राहण्यासाठी घरेही बांधलेली असतात. या छावणीला निवेश असे नाव आहे. वरील वर्णन हे निवेशाचे आहे. निवेशाकडे जाण्याचा रस्ता आठ दंड रुंद असावा, असे चाणक्याने सांगितले आहे.

दुसऱ्या प्रकारची छावणी केवळ शिपाई व त्यांचे अधिकारी यांची असे. ही छावणी तंबूत उभारली जात असे, ती वाटेल तेव्हा हालवता येत असे व डोंगरात, किल्ल्यावर किंवा कुठेही उभारता येत असे. हिला शिबिर किंवा स्थानीय असे म्हणत.

महाभारतात शिबिरासंबंधी माहिती दिली आहे, ती अशी– शिबिराची जागा सपाट, चिकणमातीची आणि गवत व इंधन यांची सुबत्ता असलेली असावी. तशीच ती श्मशान, मंदिर, आश्रम, तीर्थक्षेत्र, इत्यादींपासून दूर असावी. ते स्थान समतळ, मनोहर, शुद्ध आणि पवित्र असावे. महाभारतकाळी सर्व सेनेचे एकच शिबिर नसे. सोयीप्रमाणे व योग्यतेप्रमाणे पृथक पृथक शिबिरे असत. त्यात इंधन, भक्ष्यभोज्य, अन्न व पानसामग्री जय्यत तयार असे. त्यात शेकडो विद्वान, शिल्पी, शास्त्रविशारद व वैद्य वेतन देऊन ठेवलेले असत. त्यांची सर्व उपकरणे त्यांच्या सोबत असत. प्रत्येक शिबिरात प्रत्यंचा, धनुष्य, कवच, अस्त्र-शस्त्र, मध ,तूप, राळ यांचे ढीगच्या ढीग असत. तसेच प्रत्येक शिबिरात पाणी, गवत, भुसा, अग्नी, मोठमोठी यंत्रे, नाराच, तोमर, कवच, भाते, इ. वस्तू असत. सैन्याबरोबर मोठमोठे हत्ती असत. त्यांना लोखंडाचे चिलखत असे. युधिष्ठिराची कुरुक्षेत्रातील पहिली छावणी अशी होती. [ व्या. ज्ञा. को.; पां. कृ. सावळापूरकर–विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९७३ ]

**शिमगा** भारतातील एक प्राचीन लोकोत्सव. हा फाल्गुन पौर्णिमेपासून सुरू होतो व तो दोन, तीन, पाच किंवा सात दिवस चालतो. क्वचित सगळा फाल्गुन वद्य पक्ष या उत्सवाचा म्हणून मानतात. पाहा – होळी.

**शिरिंबिठ भारद्वाज** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या अनुक्रमणीमध्ये याला भरद्वाजाचा पुत्र म्हटले आहे. परंतु यास्काचार्यांच्या मते ही व्यक्ती नसून मेघ आहे.

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे-पंचावन्न क्रमांकाचे सूक्त याने रचले असून, त्यात अलक्ष्मीच्या नाशाची प्रार्थना आहे. प्रस्तुत सूक्ताच्या पहिल्या ऋचेत सूक्तद्रष्टयाचा उल्लेख आढळतो. याची एक ऋचा अशी–

अरायि काणे विकटे गिरिं गच्छ सदान्वे ।
शिरिम्बिठस्य सत्वभिस्तेभिष्ट्वा चातयामसि ।।
(ऋ. १०.१५५.१)

अर्थ– हे शिरिंबिठनिष्कामित, आक्रोशकारी, धननाशक, वक्रनेत्र आणि वक्रावयव अलक्ष्मी देवी, तू दूर पर्वतावर निघून जा.

या सूक्ताच्या तिसऱ्या ऋचेत समुद्रावर तरंगणाऱ्या अपौरुषेय काष्ठाचा उल्लेख आहे. हा उल्लेख जगन्नाथपुरीच्या पुरुषोत्तम मूर्तीशी संबंधित असून, त्याच्या उपासनेने वैष्णवलोकप्राप्ती होते, असे सायणाचार्यांचे मत आहे. परंतु म. म. सिद्धेश्वर शास्त्री म्हणतात. 'नौकानयनाच्या साह्याने दारिद्र्यपरिहार करण्याचा

निर्देश येथे अभिप्रेत दिसतो.' [प्रा. च. को.; ऋ. म. भा.]

**शिरोमणिदास** ( इ. स. चे १७ वे शतक ) एक जैन भक्तकवी. पंडित गंगादासाचा हा शिष्य होय. भट्टारक संप्रदायाच्या सकलकीर्तीच्या उपदेशाने हा प्रभावित झाला आणि त्याने हिंदी भाषेत काही ग्रंथरचना केली. हा आगऱ्याचा रहिवासी होता.

धर्मसार व सिद्धांतशिरोमणी हे त्याचे दोन ग्रंथ होत. सिद्धांतशिरोमणीत सम्यक्त्वाचे विवेचन आहे. आध्यात्मिक आचारांच्या अवडंबरावर त्यात टीकाही आहे. धर्मसारात निर्गुण व सगुण भक्तीचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केला आहे. या ग्रंथात संसारातील माया-मोह सोडून शुद्ध स्वरूपाच्या जीवप्राप्तीची धडपड करण्याचा मनाला उपदेश केला आहे. यात सातशे त्रेसष्ट दोहे व चौपाया आहेत. [ हिं. जै. भ. क.]

**शिरोळ** महाराष्ट्रातील एक दत्तक्षेत्र. कोल्हापूरच्या पूर्वेला सुमारे तीस मैलांवर पंचगंगा नदीच्या तीरावर हे गाव आहे. इथे भोजनपात्र नामक दत्तात्रेयाचे एक मंदिर आहे. इथे नरसिंह सरस्वती हे दत्तावतार होऊन गेले. त्यांनी अनेक अलौकिक कृत्ये केली. त्यांचे वर्णन गुरुचरित्रात दिलेले आहे. एकदा त्यांनी एका ब्राह्मणाच्या घरी अनुग्रहासाठी भोजन केले. त्या भोजनाचे पात्र तिथल्या दत्तमंदिरात ठेवलेले आहे. म्हणून त्या मंदिराला भोजनपात्र असेच नाव पडले आहे. इथे त्रिकाल महापूजा होते. नरसोबाच्या वाडीला जाणारे यात्रेकरू जाता येता इथे उतरून दर्शन घेतात. [स. भा. प्र. व.; कल्याण-तीर्थांक ]

**शिलप्पधिकारम्** एक तमिळ महाकाव्य. तमिळमधल्या पंच महाकाव्यांपैकी हे सर्वांत उत्कृष्ट आहे. एवढेच नव्हे; तर प्राचीनही आहे. इ. स. च्या दुसऱ्या शतकात ते लिहिले गेले असावे.

या महाकाव्याचा दुसरा एक विशेष हा, की ते स्वतंत्र आहे. त्याचे संविधानक कुठूनही उसने घेतलेले नाही. त्याची पार्श्वभूमीही तमिळ देश हीच आहे. त्यातील सर्व प्रसंग त्याच देशात घडलेले आहेत.

प्रस्तुत महाकाव्याची कथा ही लहानशी लोककथाच आहे. पण तिच्यात अतिमानवी आणि अद्‌भुत घटनांचा अंतर्भाव करून कवीने त्या कथेला महाकाव्याचे आकारमान दिले आहे. अतिमानवी घटनांबरोबरच त्यात इतिहास, तत्त्वज्ञान, धर्म व नीती या गोष्टींचाही ऊहापोह केलेला आहे. काव्यनिर्मितीच्या काळात तमिळ देशातील चोळ, चेर व पांड्य या राजांचे अंतर्गत संबंध कोणत्या स्वरूपाचे होते, हेही त्यावरून कळून येते.

इळंगो अडिगळ हा या महाकाव्याचा कर्ता होय. शेंगट्टुवान या चेर राजाचा तो धाकटा भाऊ होता. (इळंगो अडिगळ पाहा.)

प्रस्तुत महाकाव्याला नूपुरकाव्य असेही म्हणतात. कारण एका नूपुराभोवती यातील महत्त्वाच्या घटना गुंफलेल्या आहेत. याची कथा सारांशरूपाने अशी–

पुहार या नावाच्या चोळ राजधानीत माशात्तुवान नावाचा एक धनाढ्य व्यापारी होता. त्याला कोवलन नावाचा एक पुत्र होता. तिथलाच दुसरा एक व्यापारी मानाय्यन याला कण्णकी नावाची एक कन्या होती. ही दोघे वयात आल्यावर त्यांचे लग्न झाले. पुढे एक दिवस कोवलनने नगरातल्या माधवी नावाच्या नर्तकीचे नृत्य पाहिले आणि तो तिच्यावर मोहित झाला. कण्णकीला विसरून तो तिच्याच नादी लागला. पुढे त्या नगरीत मोठा इंद्रोत्सव सुरू झाला. त्यानिमित्त माधवी आणि कोवलन ही दोघे समुद्रसहलीला गेली असता माधवीचे आणि त्याचे बिनसले. कोवलनला आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप होऊन त्याने मग कण्णकीची क्षमा मागितली.

मग त्याने स्वतंत्रपणे व्यापार करायचे ठरवले. त्यासाठी तो कण्णकीला घेऊन मदुरेला गेला. तिथे त्याने एका वृद्ध गौळणीच्या घरात आश्रय घेतला. गौळणीचे कण्णकीवर प्रेम जडले. कोवलन धंदा उभारण्यासाठी मदुरेत गेला खरा; पण त्याला कोणीही भांडवल देईना. म्हणून त्याने कण्णकीच्या पायातले माणकाचे नूपुर विकायचे ठरवले. कण्णकीने ते त्याच्या हाती दिले. तो ते विकण्यासाठी सराफकट्ट्याकडे निघाला.

वाटेत त्याला राजाचा सोनार भेटला. कोवलनने ते नूपुर त्याला दाखवले. त्याच्या आधी थोडे दिवस राणीचे एक नूपुर हरवले होते आणि त्या सोनारानेच ते चोरले होते. राजा त्याचा शोध करीत होता. अशा नेमक्या वेळी हे दुसरे नूपुर सोनाराच्या हाती पडले. ते अगदी थेट राणीच्या नुपूरासारखे होते. सोनाराला चांगली संधी सापडली. त्याने कोवलनला त्या नूपुरासह राजाच्या पुढे उभे केले. राजाने त्याला वधदंडाची शिक्षा दिली. कोवलन नाहक मारला गेला. सोनार सुखरूप झाला.

ही वार्ता कण्णकीला कळली. ती क्रोधाने संतप्त होऊन राजापुढे गेली. तिने आपल्या पतीचा प्राण घेतल्याबद्दल राजाला जाब विचारला. राजा म्हणाला. 'तुझा नवरा चोर होता, त्याने राणीचे नुपूर चोरले.' कण्णकी म्हणाली. 'ते नूपुर माझे होते. आणा ते इकडे. मी तुम्हांला प्रचीती दाखवते.' राजाशेजारी राणी होती. तिने ते नूपुर कण्णकीच्या हाती दिले. कण्णकीने राणीला विचारले की 'तुझ्या नूपुरात काय होते ?' राणी म्हणाली. 'त्यात मोत्ये होती.' कण्णकी म्हणाली. 'माझ्या नूपुरा

माणके होती. पाहा आता.' असे म्हणून कण्णकीने ते नूपुर जमिनीवर आदळले. त्यासरशी ते फुटले आणि त्यातून माणके बाहेर पडून सर्वत्र पसरली. अर्थात ते चोरलेले नव्हते हे ठरले. राजाराणीला दुःख झाले. कण्णकी खवळली व तिने राजाला मृत्यूचा शाप दिला. राजा मेला. राणी त्याच्याबरोबर सती गेली.

पण तेवढ्याने कण्णकीचा क्रोध शमला नाही. तिने आपला डावा स्तन उपटून काढला आणि तो अग्निनारायणासाठी हवेत भिरकावला. त्यासरशी आग भडकली आणि तिने सारी मदुरा नगरी जाळून भस्म केली. मग कण्णकी मदुरा सोडून चेर देशात गेली व तिथल्या एका डोंगरावर चढली. एवढ्यात वरून विमान उतरले. त्यातून कोवलन खाली उतरला. त्याने कण्णकीला विमानात बसवले. कण्णकी आपल्या पतीसह स्वर्गात गेली. हे दृश्य तिथल्या कुरवर जमातीच्या लोकांनी पाहिले. त्यांनी कण्णकीला आपल्या जमातीची देवता मानले. ही गोष्ट चेर राजाला कळताच त्याने हिमालयातून सुंदर पाषाण आणून त्या डोंगरावर तिचे देऊळ बांधले.

या महाकाव्यावर बौद्ध धर्माची बरीच छाप आहे. हे महाकाव्य ज्या शेंगट्टुवन राजाच्या दरबारात झाले, तो बौद्ध धर्माला अनुकूल असावा असे दिसते. इ. स. ची पहिली तीन शतके तमिळनाडमध्ये बौद्ध धर्माचे वर्चस्व होते, असे म्हणता येईल. [दि तमिळ्स; ए. सी. चेट्टियार– आकाशवाणी, मे १९५८]

## शिलरी

युगी अथवा नामशूद्र जातीचे लोक. त्यांना हिरली असेही म्हणतात. त्यांची वस्ती बंगाल व आसाम प्रदेशाच्या काही भागात आढळते. जादूगिरी हा त्यांचा व्यवसाय आहे. या लोकांजवळ निसर्गावर सत्ता चालविण्याची शक्ती असते, अशी समजूत आहे. हे वादळी वारे व अन्य निसर्गकोप यांच्यापासून, धार्मिक विधीच्या साहाय्याने शेतीचे संरक्षण करतात. आकाशात ढग जमू लागले, की त्यांना वादळाची कल्पना येते. मग हे कुंकवाचा मळवट भरून, खांद्यावर रणशिंग टाकून शेतात जातात. तिथे गेल्यावर डोक्यावरचे केस घट्ट बांधतात आणि नग्न होऊन शिंग फुंगतात. मग ते पुढील मंत्र मोठ्याने म्हणतात–

'हे शिवा, हे चंडीमाते, मला तुझे संरक्षण हवे आहे.'

मंत्र, त्रिशूळ व शिंग यांच्या साहाय्याने ते वादळाला भीती दाखवितात. विजेच्या तडाख्यापासून घर सुरक्षित राहावे, म्हणून हे काही तांत्रिक विधी करतात. त्यासाठी घराच्या नैर्ऋत्य दिशेला एक खड्डा खणून त्यात मोहरी पेरतात आणि काही मंत्र म्हणतात. नंतर घराच्या छपराला त्रिशूळाने स्पर्श करून ते विजेच्या धोक्यापासून सुरक्षित झाल्याचे घोषित करतात. [इं. फो. लो.]

## शिलान्यासमुहूर्त

श्रवण, मृग, रेवती, हस्त, रोहिणी, पुष्य, अश्विनी व तीन उत्तरा या नक्षत्रांवर गृहाचा शिलान्यास करावा, असे व्यवहारसारात सांगितले आहे. अधोमुख नक्षत्रांवर गृहाचा शिलान्यास करावा, असे वास्तुप्रदीपात म्हटले आहे; तर शिलान्यासासाठी वृषवास्तुचक्र प्रशस्त होय, असे शांतिरत्नाचे सांगणे आहे. चार हातांएवढा खड्डा खणून, तो ब्राह्मणांनी शांतिसूक्ताचा पाठ करीत कुंभोदकाने भरावा, नंतर त्यात ईशान्य दिशेला तांदूळ, पंचरत्ने व घृत यांनी युक्त असा कलश स्थापन करावा आणि त्या कलशावर वास्तुपूजन करून त्याच्यावरच मुहूर्तशिला पुरावी, असा याचा विधी आहे. [नि. सिं.]

## शिलाली

एक आचार्य. पाणिनीने याला नटसूत्रांचा कर्ता असे म्हटले आहे. याच्यावरूनच संस्कृतात नटाला शैलाली असे नाव पडले आहे. शिलालीचा एक वैदिक चरण होता आणि त्यात मुख्यत्वे नाट्यशास्त्राचे अध्ययन-अध्यापन चालत असे. आपस्तंबाने, तसेच श्रौतसूत्रांतही शैलालिक ब्राह्मणाचा उल्लेख केलेला आहे. या वैदिक चरणाच्या विद्यार्थ्यांना कात्यायनाने शैलाल असे नाव दिले आहे. यावरून असे दिसते, की नटसूत्रांचे अध्ययन करणाऱ्या शिष्यांना शैलाली व वैदिक ग्रंथांचे अध्ययन करणाऱ्या शिष्यांना शैलाल असे म्हणत असावे. या चरणात नटसूत्रासारख्या लौकिक विषयाचा विकास करून वैदिक अध्ययनाच्या क्षेत्रात एक नवा पायंडा पाडलेला दिसतो. [पा. का. भा.]

## शिलालेख

पाषाणखंडांवर कोरलेले लेख. असे असंख्य कोरीव लेख भारताच्या सर्व भागांत सापडले आहेत. प्राचीन भारताची राजकीय, धार्मिक व सामाजिक माहिती मिळवण्याच्या दृष्टीने असे कोरीव लेख अत्यंत उपयुक्त ठरले आहेत. पाषाणखंड सहज नष्ट होत नाहीत. त्यामुळे कागदावर लिहिलेल्या ग्रंथांपेक्षा शिलालेख दीर्घकालपर्यंत टिकतात. ग्रंथांच्या प्रती तयार करताना त्यात बदल किंवा चुका होण्याचा संभव असतो, तोही दगडावरील कोरीव लेखांत होऊ शकत नाही. म्हणून त्यांतील ऐतिहासिक माहिती विश्वसनीय असते. अशा शिलालेखांत दिनांकाचा उल्लेख नेहमी मिळत नसला, तरी त्यांतील अक्षरांच्या वळणावरून त्यांचा काल ठरवता येतो.

मौर्य सम्राट अशोक याचे शिलालेख हे सर्वांत प्राचीन असून, ते खडकांवर किंवा स्तंभांवर कोरलेले आहेत. त्याच्या साम्राज्याच्या सर्व भागांत ते आढळतात. त्यांत अशोकाच्या राजाज्ञा व आदेश आहेत. त्या थोर सम्राटाची व त्याच्या काळातील

घटनांची माहिती मुख्यतः त्या लेखांतूनच मिळाली आहे. ते बहुतेक लेख ब्राह्मी लिपीत कोरलेले आहेत. त्या प्राचीन लिपीपासूनच सर्व भारतीय लिप्या उगम पावल्या आहेत.

अशोकानंतरच्या काळातील कोरीव लेख दोन प्रकारचे आहेत. शासकीय लेख हा एक प्रकार आणि समाजातील व्यक्तींनी कोरलेले लेख हा दुसरा प्रकार होय. शासकीय लेखांत बहुधा राजांची प्रशस्ती असते किंवा दानपत्रे असतात. अलाहाबादच्या किल्ल्यात एक स्तंभ असून, त्यावर एक गुप्तकालीन लेख कोरलेला आहे. त्यात गुप्तसम्राट समुद्रगुप्ताचे गुणवर्णन केलेले आहे. हा लेख आणि असेच अनेक कोरीव लेख सापडल्यामुळे गुप्तवंशाची ऐतिहासिक माहिती प्राप्त झाली. ग्वाल्हेर येथील एका लेखात प्रतीहार राजा भोज याची प्रशस्ती आहे. त्या लेखामुळे प्रतीहारवंशाच्या इतिहासावर पुष्कळ प्रकाश पडला. चालुक्य वंशातला प्रसिद्ध राजा पुलकेशी (२ रा) याचा ऐहोळ येथील शिलालेख अशाच प्रकारचा आहे.

दानपत्रे मुख्यतः ताम्रपटांवर कोरलेली असतात. पण काही दानपत्रे शिलाखंडांवर किंवा स्तंभांवरही आढळतात. दानपत्रांत भूमीचे दान देण्याविषयी माहिती असते, त्याचप्रमाणे राजांची वंशावळ असते आणि विद्यमान राजाची प्रशस्तीही असते. त्यामुळे दानपत्रांनाही ऐतिहासिक महत्त्व प्राप्त होते.

राजांची प्रशस्ती त्यांच्या दरबारी कवींनी केलेली असल्यामुळे तीत अतिशयोक्ती असणे संभवते. राजांच्या पराक्रमांचे कविकृत सर्व वर्णन खरे मानणे उचित होणार नाही. पण घटनांचे उल्लेख मात्र विश्वसनीय मानले पाहिजेत. हे लेख खडकांवर किंवा स्थावर वस्तूंवर कोरलेले असल्यास राज्याच्या सीमा समजण्यासाठीही ते उपयुक्त ठरतात.

शासकीय लेखांची संख्या मात्र दुसऱ्या प्रकारच्या कोरीव लेखांच्या मानाने कमी आहे. दुसऱ्या प्रकारचे लेख व्यक्तीचा किंवा कुळांचा गौरव करण्यासाठी कोरलेले असतात. त्यांत विशेष राजकीय माहिती नसते, पण समाजस्थितीविषयी कल्पना करायला त्यांचा उपयोग होतो. असले काही लेख मूर्तींच्या पीठांवर आणि देवालयांच्या भिंतींवर कोरलेले असून, त्यांत तिथी, वार व नक्षत्रे यांचा उल्लेख असल्यामुळे कालक्रम ठरवण्यासाठी ते उपयुक्त ठरतात. त्याचप्रमाणे अशा लेखांतील भाषाशैलींचा अभ्यास करून भाषांचा विकास कसा होत गेला, तेही जाणता येते. गुप्तकाळापूर्वीच्या कोरीव लेखांतले बहुतेक लेख प्राकृत भाषेत लिहिलेले असून, ते बौद्ध व जैन पंथांशी संबंधित आहेत. गुप्तकाळापासूनचे लेख पाहिले तर ते मात्र बहुतेक संस्कृत भाषेतले व वैदिक ब्राह्मणधर्माशी संबंधित आहेत. त्यावरून गुप्तकाळात धार्मिक व भाषिक क्षेत्रांत कसे स्थित्यंतर झाले, त्याची कल्पना येते. या दुसऱ्या वर्गातले बरेच लेख सापडतात.

अशा शिलालेखांतून कित्येक अज्ञात राजांची नावे व त्यांनी केलेल्या कृत्यांचे दिनांक असतात. त्यावरून राजकीय इतिहासाच्या ज्ञानात पुष्कळ भर पडते. एकंदरीत शिलालेख हे प्राचीन भारताच्या इतिहासाचे प्रमुख साधन मानले जाते. आणि त्यात भारताच्या राजकीय, धार्मिक, सामाजिक व आर्थिक स्थितीविषयी चांगली माहिती मिळते, यात काही संशय नाही. यासंबंधी म. म. वा. वि. मिराशी यांनी केलेले विवेचन असे- भारतात प्राचीन इतिहासाची साधने मोठ्या प्रमाणात उपलब्ध आहेत. प्राचीन संस्कृत, पाली, प्राकृत व देशी भाषांतील वाङ्मय, कोरीव लेख, नाणी; स्थापत्य, शिल्प व चित्र या कलांचे अवशेष; परकीय प्रवाशांची वर्णने, उत्खननाने प्राप्त झालेल्या वस्तू व दृष्टीस पडलेल्या वास्तू इत्यादिकांवरून आपणांस प्राचीन कालाच्या इतिहासाविषयी माहिती जमवता येते. या साधनांमध्ये कोरीव लेखांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. त्यावरून केवळ राजकीय इतिहास समजतो असे नाही, तर धार्मिक, सामाजिक व आर्थिक परिस्थिती, चालीरीती, भाषा, लिपी, वाङ्मय, शासनपद्धती वगैरे विविध विषयासंबंधी माहिती मिळते. वाङ्मय, शिल्पकला, चित्रकला, इ. अन्य साधनांचा पुरावा निश्चित करण्यातही कोरीव लेखांची बहुमोल मदत झाली आहे. कोरीव लेखांचा पुरावा समकालीन असल्यामुळे तो अत्यंत विश्वसनीय गणण्यात येतो. या सर्व कारणांमुळे प्राचीन कोरीव लेखांचा अभ्यास करून ते प्रसिद्ध करण्यात अनेक पाश्चात्य व भारतीय विद्वानांनी आपले परिश्रम खर्च केले आहेत.

प्राचीन लेख अज्ञात अशा लिप्यांत कोरल्यामुळे दुर्बोध झाले होते. भारतातील सर्वांत प्राचीन लिपी ब्राह्मी हिचा उलगडा जेम्स प्रिन्सेप याने इ. स. १८३७–३८ मध्ये केला. तेव्हापासून कोरीव लेखांच्या चिकित्सक अभ्यासास सुरुवात झाली. प्रथम कोरीव लेखांचे संपादन यथादृष्ट प्रतींवरून केले जात असे; पण त्यांमध्ये वैयक्तिक दोष संभवत असल्यामुळे त्यांची विश्वसनीयता निर्विवाद नसे. पुढे कोरीव लेखांचे हुबेहूब ठसे घेण्याचे तंत्र माहीत झाल्यामुळे कोरीव लेखांच्या अभ्यासास शास्त्रशुद्ध स्वरूप येऊ लागले.

प्राचीन कोरीव लेखांचा पहिला संग्रह सर अलेक्झांडर कनिंगहॅम याच्या नेतृत्वाखाली इ. स. १८७७ मध्ये प्रसिद्ध झाला व त्यात अशोकाचे शिलालेख संपादित करण्यात आले. या मालेतील तिसरा खंड पूर्वगुप्तांच्या लेखांचा असून, तो फ्लीट यांनी इ. स. १८८७ मध्ये प्रसिद्ध केला. अशा रीतीने भारतीय कोरीव लेखांच्या अभ्यासाचा पाया रचला गेला. इ. स. १८७२ मध्ये भारतीय पुरातत्त्वविद्येस वाहिलेले इंडियन अँटिक्वरी हे नियतकालिक

कालिक सुरू झाले. त्यात मधूनमधून ताम्र-शिलालेख प्रसिद्ध करण्यात येत होते. पण ते पुरेसे नसल्याने इ. स. १८९२ मध्ये एपिग्राफिआ इंडिकाचा पहिला खंड प्रसिद्ध झाला. मूळ लेखांचे शाईचे हुबेहूब ठसे घेण्याचे तंत्र प्रथम सर वॉल्टर एलियट यांनी यशस्वी रीतीने उपयोगात आणले.

शिलालेखांच्या संशोधनार्थ गावोगावी हिंडणाऱ्यांना विचित्र अनुभव येतो. आपल्या गावातील शिळा रामाच्या वेळेपासूनची आहे, तिच्यावरील अक्षरे वाचण्याचा प्रयत्न करणाऱ्यावर आपत्ती येईल, ती ब्रह्मदेवाची शिळा असून पृथ्वीच्या पूर्वीपासून इथे पडली आहे, इत्यादी अनेक कल्पना संशोधकाला ऐकाव्या लागतात

कोरीव लेखांमध्ये बनावट लेख बरेच आढळतात. पण हे ताम्रपटाच्या बाबतीत खरे आहे. बनावट शिलालेख क्वचितच सापडतो. कारण शिलालेख ही एक सार्वजनिक स्वरूपाची वस्तू असून, तिची निर्मिती बहुधा उघड्यावर होते. लांबरुंद शिळेवर दीर्घ लेख कोरण्याचे काम एकटा मनुष्य गुप्तपणे करू शकत नाही.

शिलालेख अवजड असल्यामुळे ताम्रपटांप्रमाणे त्यांचे स्थलांतर बहुधा होत नाही. पण त्यालाही काही अपवाद आहेत. दिल्ली येथील अशोकाचे स्तंभलेख मूळचे तिथले नाहीत. फीरुजशहा तुघलुक याने ते मीरत व बडा तोपरा येथून दिल्लीला आणवलेले आहेत. अलाहाबाद येथील स्तंभलेखही मूळचा तिथला नसून, तो कौशांबीहून आणलेला असावा, अशी कल्पना आहे.

शिलालेखांसाठी वापरण्यात येणाऱ्या शिलांचे अनेक प्रकार आहेत. त्यातील खडक व स्तंभ हे दोन प्रकार मौर्य सम्राट अशोक याच्या लेखांसाठी वापरण्यात आलेले असल्यामुळे विशेष उल्लेखनीय होत. कर्नाटकांतील चंद्रगिरीवर बरेच खडकलेख आहेत. स्तंभलेख अनेक ठिकाणी आढळतात. पिपरवा येथील बौद्ध स्तूपातील अवशेषपेटिकेवरील लेख सर्वांत प्राचीन म्हणजे गौतम बुद्धाच्या मृत्यूनंतर शंभर वर्षांच्या आत कोरलेला आहे. साची येथील स्तूपातील अवशेष-पेटिका–लेख प्रसिद्ध असून, त्यात सारिपुत्र व महामोग्गलान या बुद्धाच्या प्रमुख शिष्यांची माहिती मिळते. स्तूपांच्या बाह्यांगावर कोरलेले अनेक लेख उपलब्ध आहेत. त्यांतील भरहूतच्या स्तूपावरील लेख विशेष उल्लेखनीय आहेत. डोंगरातील लेण्यांतही कोरलेले लेख आढळतात. ओडिसातील हाथिगुंफा व पुणे जिल्ह्यातील नाणेघाट येथील लेण्यांतील अशा प्रकारचे लेख फार प्रसिद्ध आहेत. पाषाणमूर्तींच्या पीठावर लेख कोरण्याची प्रथाही फार प्राचीन असून, इ. स. च्या पहिल्या शतकातले असले दोन लेख उपलब्ध आहेत. एक बोधगया येथील बुद्धाच्या एका प्रचंड मूर्तीच्या पायथ्याशी कोरलेला असून, दुसरा मथुरा येथे जैन तीर्थंकराच्या मूर्तीवर आहे. श्रवणबेळगोळ, कारकल व वेणूर येथील बाहुबलीच्या मूर्तीवरील कोरीव लेखही प्रसिद्ध आहेत. काही वीरगळांवर लहानसे लेख कोरलेले आढळतात. तसेच काही व्यक्तींच्या समाधीवर स्मृतिलेख कोरलेले असतात. असे लेख लहान असले, तरी त्यांतही थोडी ऐतिहासिक माहिती मिळू शकते. [ हि. क. इं. पी. १; प्रा. म. को. ले. ]

## शिलाहार राजवंश

महाराष्ट्रात राज्य करणारा एक वंश. याच्या सहा शाखा होत्या व महाराष्ट्र व कर्नाटक प्रदेशांच्या विविध भागांत त्यांनी राज्ये स्थापली होती, असे त्यांच्या कोरीव लेखांवरून कळते. त्यांपैकी तीन प्रमुख शाखांची राज्ये महाराष्ट्रात होती. एका शाखेची सत्ता उत्तर कोकण म्हणजे ठाणे व कुलाबा या प्रदेशावर होती. दुसरी शाखा दक्षिण कोकणावर राज्य करीत होती. त्यात गोवा, सावंतवाडी व रत्नागिरी जिल्हा एवढा प्रदेश अंतर्भूत होता. त्याला सप्तकोकण असे म्हणत. तिसऱ्या शाखेचे राज्य दक्षिण महाराष्ट्रातील कोल्हापूर, सातारा, सांगली व बेळगाव या जिल्ह्यांवर होते.

या तीन्ही शाखांचे राजे आपण विद्याधराधिपती जीमूतवाहन याच्या वंशात उत्पन्न झालो, असा उल्लेख आपल्या लेखांत अभिमानाने करतात. जीमूतवाहनाच्या कथेतूनच शिलाहार या नावाचा उगम झाला असावा. ती कथा अशी—

गरुडाने वासुकीला एक एक करून त्याचे सर्व प्रजानन बळी देण्यास भाग पाडले होते. एके दिवशी शंखचूड नामक सर्पाची पाळी आली. एका शिळेवर बसून तो गरुडाची वाट पाहत होता. ते पाहून जीमूतवाहनाला त्याची दया आली व त्याने स्वत: शंखचूडाची जागा घेतली. ठरलेल्या वेळी गरुडाने झेप घेऊन त्याला उचलून नेले. त्याला अर्धामुर्धा खाल्ल्यावर गरुडाला आपली चूक कळून आली. मग जीमूतवाहनाच्या पत्नीच्या प्रार्थनेवरून पार्वतीने जीमूतवाहनाला जिवंत केले. तेव्हापासून गरुडाने सर्पांना खाण्याचे सोडून दिले.

या प्रसंगामुळे जीमूतवाहनाच्या वंशाला शिलाहार = शिलेवरील आहार, असे नाव मिळाले असावे. पण या वंशातील छद्वैदेवाच्या सर्वांत प्राचीन ताम्रपटात मात्र या वंशनामाची निराळीच व्युत्पत्ती दिली आहे. त्यात म्हटले आहे, की परशुरामाच्या बाणांमुळे त्रस्त झालेल्या पश्चिम समुद्राचे रक्षण मीलार नामक वीरपुरुषाने केले आणि तोच या वंशाचा मूळ पुरुष होय. कोरीव लेखात या वंशाचे नाव सीलार, शीलार, सियळार, शैलाहार असे विविध प्रकारे आले आहे. त्याचेच शिलाहार हे संस्कृत रूप होऊन, मग वरील व्युत्पत्ती प्रचलित झाली असावी.

उत्तर कोकण आणि दक्षिण महाराष्ट्र या प्रदेशांत राज्य

करणाऱ्या शिलाहार नृपतींनी आपापल्या लेखांत 'तगरपुर-परमेश्वर' किंवा 'तगरपुरवराधीश्वर' अशी बिरुदे लावली आहेत. त्यावरून ते राजे पूर्वी तगर नगरात राज्य करीत होते, असे दिसते. तगर हे मराठवाड्यातील तेर हे गाव होय, असे डॉ. फ्लीटने सिद्ध केले आहे व ते आता सर्वमान्य झाले आहे.

शिलाहार हे कन्नडभाषी होते. त्यांचे मूलस्थान तगर हे प्राचीन काळी कन्नड प्रदेशात अंतर्भूत होते. गेल्या सातआठशे वर्षांत तगरच्या लोकांची भाषा मराठी झाली असून, सांप्रत तगर (तेर) चा अंतर्भाव मराठवाड्यात होतो. तथापि शिलाहार हे कन्नडभाषी होते, हे त्यांच्या कन्नड बिरुदांवरून स्पष्ट दिसते. उदाहरणार्थ मलगलगण्ड, गणूरगण्ड, गणुवङ्गर, नन्नि-समुद्र, विल्लविडेङ्ग, मरुवक्कसर्य, इड्डवरादित्य, इ. कन्नड बिरुदे उ. कोकणच्या शिलाहारांच्या कोरीव लेखांत आढळतात. कोल्हापूर प्रदेशातील सामान्य लोकांची भाषा कन्नड होती, हे तिथल्या शिलाहार नृपतींच्या बिरुदांवरून व कोरीव लेखांवरून स्पष्ट दिसते. द. कोकणच्या शिलाहारांची भाषा कन्नडच असावी. पण त्यांचे थोडेच शिलालेख सापडले असून, ते सर्व संस्कृतात आहेत. त्यांत त्यांची कन्नड बिरुदे नाहीत, पण 'हडप' सारखे काही कन्नड शब्द मात्र आढळतात.

**उत्तर कोकणचे शिलाहार** (इ. स. ८००-१२६५)–हे घराणे राष्ट्रकूटांचे मांडलिक म्हणून उदयास आले. इ. स. च्या ८ व्या शतकात राष्ट्रकूट सम्राट दंतिदुर्ग याने उत्तर कोकणाचा कारभार पाहण्यासाठी अनिरुद्ध नामक अधिकाऱ्याची नेमणूक केली होती. शिलाहार घराण्यातील प्रथम कपर्दी याने राष्ट्रकूट सम्राट गोविंद (३ रा) याला उत्तर कोकणात राज्यविस्तार करायला मदत केली असावी आणि म्हणून त्याला त्या प्रदेशाचे राज्य मिळाले असावे. उ. कोकणाला कपर्दिद्वीप हे नाव या राजाच्या नावावरूनच पडले. या शाखेची राजधानी स्थानक म्हणजे ठाणे येथे होती.

कपर्दी (१ ला)–याच्या काळातला कोरीव लेख अद्याप सापडलेला नाही. पण त्याचा पुत्र पुल्लशक्ती याचा कान्हेरीच्या लेण्यातील लेख शके ७६५ (इ. स. ८४३) चा आहे. यावरून हा कपर्दी इ. स. ८००–८२५ या काळात होऊन गेला असावा.

पुल्लशक्ती (इ. स. ८२५–८५०)– कान्हेरीच्या लेण्यातील लेखांत याला महासामंत व कोकणवल्लभ या पदव्या दिलेल्या असून, महाराजाधिराज अमोघवर्ष याच्या कृपेने समग्र पुरीकोकणचे राज्य याला मिळाले, असे म्हटले आहे.

कपर्दी (२ रा) (इ. स. ८५१–८८०)–याच्या राजवटीतले दोन लेख कान्हेरीच्या लेण्यात आहेत. पहिला शके ७७५ (इ. स. ८५१) चा व दुसरा शके ७९९ (इ. स. ८७७) चा आहे.

वप्पुवन्न (इ. स. ८८०–९१०)–द्वितीय कपर्दींचा पुत्र. याच्या काळात संयान म्हणजे संजाणजवळच्या प्रदेशावर एक अरब घराणे राज्य करीत होते. तेही राष्ट्रकूटांचे मांडलिक होते. डहाणू तालुक्यातील चिंचणी येथे काही ताम्रपट सापडले आहेत. त्यांवरून मधुमती (मुहमद), सहियारहार (शहरियार) व सुगतिप (सुवक्त) हे राजे त्या घराण्यात होऊन गेले, असे कळते. त्यांनी शिलाहारांना बराच त्रास दिला. मधुमतीने पश्चिम किनाऱ्यावरील सर्व बंदरे काबीज करून तिथे आपली ठाणी प्रस्थापित केली होती.

झंझ (इ. स. ९१०–९३०)–वप्पुवन्नाचा पुत्र. अल् मसूदीने याचा उल्लेख केला आहे. हा शिवोपासक असून, त्याने बारा शिवमंदिरे बांधली होती. पण त्यांतले एकही अस्तित्वात नाही.

झंझानंतर त्याचा धाकटा भाऊ गोग्गी आणि त्याच्या नंतर त्याचा पुत्र वज्जड यांनी राज्य केले. वज्जडानंतर त्याचा भाऊ छद्वैदेव गादीवर बसला. त्याने सुमारे दहा वर्षे (इ. स. ९६५-७५) राज्य केले असावे.

अपराजित (इ. स. ९७५–१०१०)– छद्वैदेवानंतर त्याचा पुतण्या, वज्जडदेवाचा पुत्र अपराजित राजा झाला. त्याचे दोन ताम्रपट शके ९१५ (इ. स. ९८३) मधले जंजिरा येथे सापडले आहेत. त्या वेळी तैलपाने राष्ट्रकूटांचा पराभव करून चालुक्यांची सत्ता पुन्हा स्थापली होती. मात्र अपराजिताने त्या उत्तरकालीन चालुक्यांचे स्वामित्व मान्य केले नव्हते. त्याने अनेक विजय प्राप्त केले आणि पश्चिमसमुद्राधिपती, मांडलिकचिनेत्र, इ. बिरुदे धारण केली. प्रथम त्याने संजाण येथील अरबांचा पराभव करून त्यांचा प्रदेश आपल्या राज्याला जोडला. त्यानंतर पुणक (पुणे), संगमेश्वर व चिपुलुण (चिपळूण) हे देशही जिंकून घेतले. तो फार महत्त्वाकांक्षी होता. भोवतालच्या प्रबळ राजांशी मैत्री करून त्याने आपली शक्ती वाढवण्याचा प्रयत्न केला.

तैलपाचा पुत्र सत्याश्रय याने इ. स. ९८० च्या सुमारास शिलाहारांच्या राज्यावर स्वारी केली असावी. अपराजिताचा त्या वेळी पराजय झाला असला, तरी त्याने लवकरच चालुक्यांचे वर्चस्व झुगारून दिले.

अपराजितानंतर त्याचा पुत्र वज्जड (२ रा) गादीवर बसला. हनगल येथील कोरीव लेखावरून दिसते, की कदंबनृपती छट्ट-देव (२ रा) याची राणी कुंदलदेवी ही याची कन्या असावी. वज्जडानंतर त्याचा धाकटा भाऊ अरिकेसरी याला राज्य मिळाले. याच्या राजवटीत परमार राजा भोज याने उत्तर कोकणावर आक्रमण केले. त्याची सत्ता तिथे अल्पकाळच राहिली असावी. चालुक्य राजा जयसिंह याने ती नष्ट केली असावी.

छित्तराज (इ. स. १०२०–१०३५)–याच्या इ. स. १०२४...

ताम्रपटात चालुक्यांच्या सार्वभौमत्वाचा निर्देश आढळत नाही. त्याच्या राजवटीच्या आरंभी गोव्याचा कदंबनृपती द्वितीय षष्ठदेव याने प्रथम द. कोकण जिंकून घेतले व उ. कोकणावर स्वारी केली. षष्ठदेवाने उ. कोकणही जिंकले, पण ते छित्तराजाला परत दिले. छित्तराजाने कदंबांचे स्वामित्व मान्य केले.

छित्तराजा विद्या–कलांचा आश्रयदाता होता. त्याने उदयसुंदरीकथा नामक चंपूकाव्याचा कर्ता सोड्ढल याला आश्रय दिला होता. कल्याणजवळ अंबरनाथ येथे असलेले शिवमंदिर यानेच बांधले. ते पुढे त्याचा धाकटा भाऊ मुम्मुणिराज याने पुरे केले.

छित्तराजानंतर त्याचा धाकटा भाऊ नागार्जुन गादीवर आला. त्याने सुमारे दहा वर्षे राज्य केले असावे. चालुक्य सम्राट सोमेश्वर (१ ला) याने इ. स. १०४५ च्या सुमारास उ. कोकणावर प्रचंड सेनेनिशी स्वारी केली. त्या युद्धात नागार्जुन मारला गेला असावा. नागार्जुनाचा धाकटा भाऊ मुम्मुणी याला गादीवर बसवून सोमेश्वर परत गेला असावा.

मुम्मुणी (इ. स. १०४५–१०७०)—नागार्जुनाचा पुत्र अनंतदेव अल्पवयी असल्यामुळे त्याचा चुलता मुम्मुणी याला राज्य मिळालेले दिसते. त्याच्या राजवटीत शिलाहारांच्या सत्तेला उतरती कळा लागली. त्याला गोव्याच्या कदंबांचे स्वामित्व काही काळ मान्य करावे लागले. त्याने छट्टदेवाला आपली कन्या दिली आणि पाच लक्ष सुवर्णनाण्यांची वरदक्षिणाही दिली. मुम्मुणी हादेखील विद्वानांचा व कवींचा आश्रयदाता होता.

अनंतपाल ( इ. स. १०७०–१११० ) — मुम्मुणीच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र व नागार्जुनाचा पुत्र अनंतपाल यांच्यामध्ये संघर्ष झाला. त्यात गोव्याच्या कदंबांनी मुम्मुणीच्या मुलाचा पक्ष घेतला, असे दिसते. कदंबनृपती जयकेशी याने उत्तर कोकण जिंकून काही काळ आपल्या ताब्यात ठेवले. त्या संघर्षात पश्चिम किनाऱ्यावरील अरब वसाहतीतील अधिकाऱ्यांनी कदंबांना साहाय्य केले असावे. यवन सैनिकांनी देश उद्ध्वस्त केला आणि देवब्राह्मणांचा छळ केला, असे खारेपाटण येथील ताम्रपटात म्हटले आहे. पण नागार्जुनाचा पुत्र अनंतपाल याने शौर्याने लढून त्या यवनांचा पराभव केला आणि देशाचे रक्षण केले, असेही एका श्लोकात म्हटले आहे.

अनंतपालाच्या इ. स. १०९४ च्या खारेपाटण येथील ताम्रपटात त्याला पश्चिमसमुद्राधिपती म्हटले आहे. तो स्वतःला पुरी कोकणादी सवंध कोकण प्रदेशाचा अधिपती समजत होता.

कदंबनृपती जयकेशी याने उत्तर कोकणावर स्वारी केली तेव्हा अनंतपाल युद्धात मारला गेला. मग काही वर्षे उ. कोकणावर जयकेशीची सत्ता राहिली. पुढे अनंतपालाचा पुत्र अपरादित्य (१ ला) याने इ. स. ११२७ च्या सुमारास आपले राज्य परत जिंकून घेतले. त्या युद्धात त्याला कोल्हापूरचा शिलाहार राजा गंडरादित्य याचा पुत्र विजयादित्य याने बरेच साहाय्य केले असे दिसते.

अपरादित्य (इ. स. १११०–११३९) — याचे मूळ नाव अपरार्क असे होते. हा विविध विद्यांत व धर्मशास्त्रातही पारंगत होता. याज्ञवल्क्यस्मृतीवरील याची अपरार्कटीका अद्यापि काश्मीरात प्रमाणभूत मानली जाते. तो संगीतकलेतही प्रवीण होता.

याने द. कोकणात कदंबांचा पराजय करून तिथेही आपली राजसत्ता स्थापली. द. कोकणावर त्याने आपला धाकटा मुलगा विक्रमादित्य याची नेमणूक केली होती. अपरादित्याने समकालीन राजांच्या दरबारी आपले वकील नेमले होते, असे दिसते. काश्मीरमधील त्याचा वकील तेजकंठ याचा उल्लेख मंखाच्या श्रीकंठचरितात आला आहे.

हरिपालदेव ( इ. स. ११३९–११५५ )— याच्या कारकिर्दीपासून उ. कोकणाच्या शिलाहारांचे फक्त शिलालेख मिळाले असून, त्यांत तत्कालीन राजांची वंशावळ दिलेली नाही. म्हणून त्यानंतरच्या राजांचा परस्परसंबंध निश्चितपणे समजत नाही.

मल्लिकार्जुन (इ. स. ११५५–११७०) — हरिपालदेवानंतर हा गादीवर आला. त्याची सत्ता द. कोकणावरही होती, असे दिसते. हेमचंद्राने आपल्या कुमारपालचरितात चौलुक्यनृपती कुमारपाल याने उ. कोकणावर आक्रमण केले त्याचा वृतांत दिला आहे. त्या युद्धात मल्लिकार्जुन मारला गेला.

अपरादित्य (२ रा) (इ. स. ११७०–९५)— मल्लिकार्जुनानंतर याला राज्य मिळाले. त्याने महाराजाधिराज व कोकणचक्रवर्ती या पदव्या धारण केल्या होत्या. त्यावरून त्याने चौलुक्यांचे स्वामित्व नष्ट केले असावे, असे वाटते.

अनंतदेव (२ रा) (इ. स. ११९५–१२००) — हा द्वितीय अपरादित्याचा पुत्र असावा. त्याने अल्पकाळच राज्य केले.

केशिदेव (२ रा) (इ. स. १२००–१२४५) हा अनंतदेवाचा भाऊ असावा. खोलेश्वराच्या आंबेजोगाई येथील शिलालेखांत यादवनृपती सिंघण याने एका केशिराजावर विजय मिळवल्याचा उल्लेख आहे. तो केशिराज म्हणजे हा शिलाहार केशिदेव असावा. याने दीर्घ काल राज्य केलेले दिसते. त्याच्यानंतर अनंतदेव (३ रा) व सोमेश्वर यांनी दहादहा वर्षे राज्य केले असावे. सोमेश्वर हा उत्तर कोकणाचा शेवटचा शिलाहार नृपती होय. त्याने महाराजाधिराज व कोकणचक्रवर्ती या पदव्या धारण केल्या होत्या. त्यावरून तो कोणाचा मांडलिक नसून, स्वतंत्रपणे राज्य करीत असावा, असे दिसते. यादवांचा सेनापती मल्ल याने उ. कोकणावर स्वारी करून सोमेश्वराचा पराभव केला

होता. तथापि त्याची सत्ता चालू राहिली; पण त्यानंतर महादेव यादवाने प्रचंड गजदलासह उत्तर कोकणावर स्वारी केली. तेव्हा सोमेश्वराचा पराभव होऊन त्याने समुद्रात आश्रय घेतला. तिथेही यादवांच्या सेनादलाने त्याच्यावर हल्ला केला व तो समुद्रात बुडून मरण पावला. हे युद्ध इ. स. १२६५ च्या सुमारास झाले. आणि उत्तर कोकणावर यादवांची सत्ता स्थापन झाली.

शिलाहारांच्या या शाखेने उत्तर कोकणावर सुमारे साडेचारशे वर्षे राज्य केले. उत्तर कोकणात १४०० खेडचांचा समावेश होता, अशी परंपरागत समजूत होती. काही प्राचीन लेखांत ही संख्या १४००० अशी दिली आहे. काही लेखांत या प्रदेशाला उत्पन्नावरून सवालाखी म्हटले आहे.

या राजांनी विद्या व कला यांना उदार आश्रय दिला. अंबरनाथ, पेलार व वाळकेश्वर येथील मंदिरे स्थापत्य व शिल्प या कलांतील शिलाहारांच्या नैपुण्याची साक्ष देतात. उत्तर कोकणात इतरत्र ब्रह्मदेव, विष्णू, महिषासुरमर्दिनी, इ. देवतांच्या त्या काळातील सुंदर मूर्ती सापडल्या आहेत. सोड्ढलाच्या उदयसुंदरीकथेत शिलाहारांच्या दरबारातील चंदनाचार्य, विजयसिंहाचार्य, महाकीर्ती, इंद्र यांसारख्या अनेक जैन व हिंदू कवींचा व पंडितांचा उल्लेख आहे. त्यांनाही उदार राजाश्रय लाभला होता. याज्ञवल्क्यस्मृतीवरील अपरार्कटीकेमुळे धर्मशास्त्रातही शिलाहारांचे नाव चिरस्मरणीय झाले आहे.

**दक्षिण कोकणचे शिलाहार** – (इ. स. ७६५–१०२४) हे घराणेही राष्ट्रकूटांचे मांडलिक होते. राष्ट्रकूट सम्राट कृष्ण (१ ला) याच्या वेळी दक्षिण कोकणावर राष्ट्रकूटांची सत्ता स्थापन झाली. कृष्णराजाने शिलाहारवंशातील सणफुल्ल नामक पुरुषाला तिथे प्रशासक नेमले. त्याच्या वंशातील रट्टराज याच्या ताम्रपटात सणफुल्ल याला कृष्णराजाच्या कृपेने राज्य मिळाले असा उल्लेख आहे. सणफुल्ल हा रट्टराजाचा नववा पूर्वज होता. रट्टराजाच्या ताम्रपटात द. कोकणच्या शिलाहारांची वंशावळ दिली आहे, ती अशी –

सणफुल्ल (इ. स. ७६५–७८५) – धम्मियर (इ. स. ७८५ – ८२०) – ऐयपराज (इ. स. ८२० – ८४५) – अवसर (१ ला) (इ. स. ८४५ – ७०) – आदित्यवर्मा (इ. स.८७० – ८९५) – अवसर (२ रा) (इ. स. ८९५ – ९२०) – इंद्रराज (इ. स. ९२० – ९४५) – भीम (इ. स. ९४५ – ९७०) – अवसर (३ रा) (इ.स. ९७० – ९९५) – रट्टराज (इ. स. ९९५ – १०२४).

सणफुल्लाची राजधानी बहुधा चंद्रपूर म्हणजे गोव्यातील पारोदा नदीच्या तीरावरच्या चांदोर या गावी असावी. त्याचा पुत्र धम्मियर याने समुद्रकिनाऱ्यावरील वलिपत्तन वसवले. हे वलिपत्तन म्हणजे सध्याचे रत्नागिरी जिल्ह्यातले खारेपाटण असावे. तिथे रट्टराजाचा एक ताम्रपट मिळाला आहे. धम्मियरने गोव्याच्या उत्तरेकडील प्रदेश जिंकल्यानंतर त्याला खारेपाटणसारखे मध्यवर्ती स्थान राजधानीसाठी आवश्यक वाटले असावे. किंवा कदाचित शत्रूने चंद्रपूर जिंकल्यामुळे त्याने वलिपत्तन येथे दुसरी राजधानी स्थापली असेल.

ऐयपाने शत्रूच्या ताब्यात असलेल्या चंद्रपूरवर स्वारी करून ते नगर परत जिंकून घेतले. त्या विजयाप्रीत्यर्थ त्याने तिने स्वतःला नारळाच्या पाण्याने अभिषेक करवून घेतला, असे वर्णन ताम्रपटात आहे. त्याच्यानंतर गादीवर आलेला अवसर (१ला) राजनीतिनिपुण होता. अवसरानंतर आदित्यवर्मा व त्याच्यानंतर अवसर (२रा) गादीवर आला. या अवसराने चेमुल्य व चंद्रपूर येथील राजांना साहाय्य केल्याचा उल्लेख ताम्रपटात आहे. चेमुल्य म्हणजे मुंबईच्या दक्षिणेस सुमारे ३० मैलांवर असलेले चौल होय. गोव्यातील चंद्रपूरचा राजा म्हणजे कदंब राजवंशाचा मूळपुरुष कंटकाचार्य असावा. अवसराच्या साह्याने त्याने प्रदेश जिंकून चंद्रपूर येथे राजधानी स्थापली असावी.

त्यानंतर अवसराचा पुत्र इंद्र आणि त्याच्या नंतर त्याचा पुत्र भीम हे द. कोकणावर राज्य करू लागले. त्याने चंद्रमंडल म्हणजे गोव्यातील चंद्रपूरभोवतालचा प्रदेश जिंकून घेतला. भीमानंतर अवसर (३रा) राजा झाला. हा मनाचा थोर व स्वभावाने शांत होता. त्याला अजातशत्रू म्हणत. त्याने इ. स. ९८८ मध्ये एक ताम्रपट दिला, त्या वेळी राष्ट्रकूटांची सत्ता नष्ट झालेली होती. तरीही त्याने कृतज्ञताबुद्धीने आपल्या पूर्वीच्या सम्राटांची वंशावळ दिली आहे. तो चालुक्यांचा सामंत झाला नव्हता. तृतीय अवसरानंतर त्याचा पुत्र रट्टराज राज्य करू लागला. याला चालुक्यांची सार्वभौम सत्ता मानावी लागली. तरीही त्याने एका ताम्रपटात प्रथम राष्ट्रकूटांची वंशावळ देऊन मग चालुक्य राजे तैलप व सत्याश्रय यांची प्रशस्ती केली आहे. हा या शाखेचा शेवटचा ज्ञात राजा होय. मध्यंतरी काही काळ त्याने स्वतंत्रपणे राज्य केले. पण चालुक्य राजा जयसिंह याने द. कोकणावर स्वारी करून रट्टराजाचा पराभव केला आणि तो प्रदेश जिंकून घेतला. या घटनेचा उल्लेख त्याच्या इ. स. १०२४ च्या मिरज–ताम्रपटात आहे.

**कोल्हापूरचे शिलाहार** ( इ. स. ९४०–१२१२ ) – उत्तर कोकणच्या शिलाहार राजांप्रमाणेच हे राजे आपण विद्याधर नृपती जीमूतवाहन याचे वंशज असल्याचे सांगतात व तगर पुराधीश्वर हे विरुद धारण करून आपण मूळचे तगरपुरीचे, असे सूचित करतात. तथापि या दोन शाखांचे परस्परसंबंध ...

नाहीत. कोल्हापूरच्या शाखेची कुलदेवता महालक्ष्मी होती. हे राजे आपल्या लेखांत आपणांस महालक्ष्मीचा वरप्रसाद लाभला आहे, असे अभिमानाने म्हणतात.

कोल्हापूरचे शिलाहारही प्रथम राष्ट्रकूटांच्या आश्रयानेच राज्य करीत होते. गंडरादित्याच्या कोल्हापूर ताम्रपटात म्हटले आहे, की या शाखेचा मूळ पुरुष प्रथम जतिग हा गोमंथ किल्ल्याचा अधिपती व गंगनृपती पेर्मानडी याचा मामा होता. हा किल्ला कर्नाटकांतील शिमोगा जिल्ह्यात आहे. यावरून असे दिसते, की जरी कोल्हापूरचे शिलाहार मूळचे तगरपूरचे असले तरी, ते प्रथम काही काळ कर्नाटकात राज्य करीत होते. नंतर त्या शाखेतील राजांनी कऱ्हाडजवळचा प्रदेश जिंकून तिथे आपले राज्य स्थापले.

या शाखेचा पहिला ज्ञात लेख इ. स. १०५८ मधला असून, तो मारसिंहाचा मिरज येथे दिलेला ताम्रपट आहे. मारसिंह हा प्रथम जतिगापासून पाचव्या पिढीतला होता. म्हणून जतिग हा त्याच्या पूर्वी सुमारे १०० वर्षे राज्य करीत असावा (इ. स. ९४०–९६०). त्याने राष्ट्रकूटांचे स्वामित्व मान्य केले असावे. पण राष्ट्रकूटांची सत्ता दुर्बळ होत गेल्यामुळे त्याच्या वंशजांनी स्वातंत्र्य पुकारले असावे. तथापि जतिग (१ला), त्याचा पुत्र नायिवर्मा व नातू चंद्रराज यांच्या राजवटीतील घटनांची काहीच माहिती उपलब्ध नाही. त्यांचे राज्य महाराष्ट्राबाहेर, कर्नाटकातही होते.

चंद्रराजाचा पुत्र जतिग (२रा) याचे त्याचा नातू मारसिंह याच्या मिरज ताम्रपटात पन्नाळ दुर्गाद्रिसिंह असे वर्णन केले आहे. जतिगानेच तो दुर्ग प्रथम जिंकून घेतला असावा. त्याने सभोवतालच्या प्रदेशावर आपली सत्ता स्थापण्याचा प्रयत्न केला, असे दिसते. हेमचंद्राच्या एका काव्यात म्हटले आहे, की महालक्ष्मीच्या कृपेमुळे आपल्या पित्याला झालेल्या कोल्लापुरच्या राजाने चौलुक्यनृपती चामुंडराज (इ. स. ९९५–१००८) याला उत्कृष्ट माणकांचा नजराणा पाठवला होता. हा कोल्हापूरचा शिलाहार राजा द्वितीय जतिगच असावा.

द्वितीय जतिगाचा पुत्र गोंक हा करहाट कुंडी, मिरिंज देश व समग्र कोकणदेश यांचा अधिपती होता. गोंक हा चालुक्य सम्राट जयसिंह याचा समकालीन होता. गोंकाने जयसिंहाला द. कोकण जिंकण्यात मदत करून जयसिंहाकडून तो प्रदेशही मिळवला असावा.

गोंकानंतर त्याचा पुत्र मारसिंह हा राजा झाला. त्याच्या मिरज-ताम्रपटात त्याला महामंडलेश्वर ही पदवी दिलेली आहे, पण सम्राटाचा उल्लेख नाही. त्याने अनेक बिरुदे धारण केली होती. त्यांतले एक रूपनारायण असे होते. त्याची राजधानी पन्हाळगड येथे होती. मारसिंहाचा पुत्र गंडरादित्य याच्या काळातील लेखांत नागलदेवी नामक जैन राणीचा आदरयुक्त उल्लेख केलेला आहे. ती त्याची माता व मारसिंहाची राणी असावी.

मारसिंहाला पाच पुत्र होते. विक्रमांकदेवचरितात विल्हणाने विद्याधर (शिलाहार) राजकन्या चंद्रलेखा हिच्या सौंदर्याचे व स्वयंवराचे वर्णन केले आहे. ही चंद्रलेखा चालुक्य विक्रमादित्य (६ वा) याची राणी असावी.

मारसिंहानंतर गूवल (२ रा) व त्याच्या नंतर बल्लाळ गादीवर आला. बल्लाळानंतर गादीवर आलेल्या गंडरादित्याचे इ.स. १११० पासून ११३५ पर्यंतचे अनेक लेख सापडले आहेत. 'आपण मिरिंजदेश, सात खोल्ल आणि कोकण या देशाचे एकच अधिपती आहो', असे तो एका लेखात म्हणतो. हे कोकण म्हणजे दक्षिण कोकण असावे. चालुक्य जयसिंहाने ते जिंकून घेतल्यापासून त्याच्या बऱ्याच भागावर कोल्हापूरच्या शिलाहारांची सत्ता होती. गंडरादित्य या प्रदेशावर विक्रमादित्याचा मांडलिक म्हणून राज्य करीत असावा. याने हिंदू, जैन व बौद्ध मंदिरे बांधली आणि तलावही निर्माण केले. याला कर्णादेवी नामक जैन राणी होती. त्याचा स्वतःचा जैन धर्माकडे ओढा होता. तथापि तो स्वतःच्या लेखांत आपल्याला श्रीमहालक्ष्मीचा वरप्रसाद प्राप्त झाल्याचा निर्देश करतो. शिरोळजवळच्या खिद्रापूर गावी त्याने कोपेश्वराचे भव्य मंदिर बांधण्यास आरंभ केला होता.

गंडरादित्याचा पुत्र विजयादित्य याने स्थानकाच्या पदच्युत राजाला त्याचे राज्य परत मिळवून दिले, असे कशेळी–ताम्रपटात म्हटले आहे. ही घटना गंडरादित्याच्या राजवटीतच घडली असावी. कदंबनृपती द्वितीय जयकेशीने अनंतदेव (२रा) याला ठार मारून उत्तर कोकणाचे राज्य घेतले होते, ते अनंतदेवाचा पुत्र अपरादित्य याला विजयादित्याने परत मिळवून दिले.

गंडरादित्यानंतर विजयादित्य इ. स. ११४० मध्ये गादीवर आला. त्यानेही अनेक बिरुदे धारण केली होती. त्याने उत्तरकालीन चालुक्यनृपती द्वितीय तैलप याला पदच्युत करण्यात भाग घेतला होता, असे दिसते. कारण त्याच्या साहाय्यामुळेच बिज्जलाला राज्य मिळाले, असे म्हटले आहे. विजयादित्याने आपल्या लेखांत बिज्जलाच्या स्वामित्वाचा निर्देश केलेला नाही. तो स्वतःला श्रीमहालक्ष्मीचा वरप्रसाद प्राप्त झाल्याचे सांगतो. तथापि त्याने अन्य धर्मांच्या अनुयायांनाही उदार आश्रय दिला होता.

विजयादित्यानंतर त्याचा पुत्र भोज (२ रा) गादीवर आला. हा या शाखेतील शेवटचा व श्रेष्ठ राजा होय. त्याच्या काही लेखांत त्याची महामंडलेश्वर ही मांडलिकनिर्दशक पदवी

असली, तरी नंतर त्याने सम्राटपदनिदर्शक राजाधिराज, परमभट्टारक, पश्चिमचक्रवर्ती या पदव्या धारण केल्या होत्या. त्यावरून तो स्वतंत्रपणे राज्य करीत असावा. यादवनृपती सिंघण याने भोजाच्या राज्यावर स्वारी करून त्याचा पराभव केला, असे दिसते. नंतर सिंघणाने प्रणालक दुर्गाला म्हणजे पन्हाळगडाला वेढा घालून लवकरच तो जिंकला, भोज राजाला पकडून त्याच गडावर बंदीत ठेवले व शिलाहारांचे राज्य घेतले (इ. स. १२१२).

भोजराजाही आपल्या लेखांत आपल्याला श्रीमहालक्ष्मीचा वरप्रसाद प्राप्त झाल्याचे सांगतो. त्याने काही दाने श्रीमहालक्ष्मीच्या पूजेकरिता दिली होती.

या शाखेच्या शिलाहारांचाही विद्वानांना आश्रय होता. जैनेंद्रव्याकरणावरील शब्दार्णवचंद्रिकेचा कर्ता सोमेश्वर हा त्यांपैकी एक होता. कन्नड भाषेतील नेमिनाथपुराणाचा कर्ता कर्णपार्य याला विजयादित्याच्या एका मंत्र्याचा आश्रय होता. त्या काळी अनेक ठिकाणी जैन तीर्थंकरांची सुंदर मंदिरे बांधण्यात आली. कोल्हापूर, तेरदळ, जूगळ, खिद्रापूर, इ. ठिकाणची जैन मंदिरे अजूनही उभी आहेत. खिद्रापूरचे सुंदर कोपेश्वरमंदिर तत्कालीन स्थापत्यकलेचे उत्कृष्ट उदाहरण आहे.

शिलाहारांच्या काळात वैदिक यज्ञयाग प्रचारात नसून, पौराणिक धर्माचा उत्कर्ष होऊ लागला होता. पंचमहायज्ञ व विविध देवतांची पूजाअर्चा सर्वत्र प्रचलित होती. मंदिरे बांधून देवतांच्या पूजेची व्यवस्था करणे, त्यांना जोडलेल्या मठांत तपस्वी व विद्यार्थी यांच्या निवासाची सोय करणे, संलग्न अन्नसत्रांत त्यांच्या भोजनाची व्यवस्था करणे, यासाठी राजे, मंत्री आणि सामान्यजनही दाने देत. शिलाहारांच्या लेखांत शिव, विष्णु, आदित्य, ब्रह्मा, महालक्ष्मी, जोगेश्वरी आणि भगवती या देवतांचे निर्देश आहेत. त्यांच्या काळात बरीच शिवमंदिरे बांधली गेली. राजांप्रमाणे मंत्र्यांनी व सामान्य लोकांनीही मंदिरे बांधली. उत्तर कोकणातील सर्व कोरीव लेखांत गजाननाला नमन केलेले आहे. विष्णू हा प्रमुख देव होता. पण त्याची मंदिरे थोडीच होती. ब्रह्मदेवाचे स्वतंत्र मंदिर क्वचितच बांधले जाई. कोल्हापूरच्या ब्रह्मपुरी उपनगरात असे एक मंदिर आहे. गोमंतकातही करमळी येथे ब्रह्मदेवाचे मंदिर आहे. अंबरनाथ येथील शिवालयाच्या भिंतीवर ब्रह्मदेवाची मूर्ती कोरलेली आहे. आदित्याचीही अनेक मंदिरे शिलाहारांनी बांधली. उत्तर कोकणचे शिलाहार राजे सूर्योदयाच्या वेळी त्याची पूजा करून मग दानधर्म करीत. ब्रह्मपुरीत एक आदित्यमंदिर असून, दुसरे लवणनरे म्हणजे भिवंडीजवळील लोनाड येथे आहे.

कोल्हापूरचे शिलाहार महालक्ष्मीचे निःसीम भक्त होते. कोल्हापूरचे महालक्ष्मीमंदिर शिलाहारांपूर्वी करहाटक येथून राज्य करणाऱ्या सिंदवंशी राजाने बांधले असावे. संजानची भगवती देवी सुप्रसिद्ध आहे. साष्टीवेटात जोगेश्वरीचे देवालय आहे.

कोकणातले शिलाहार शिवभक्त होते. त्यांनी दूरदूरच्या प्रदेशांतून शैव मुनींना आपल्या राज्यांत बोलावून ग्रामदाने दिली होती. शिवमंदिरांच्या मठांत शैव संप्रदायांच्या साधूंना आश्रय मिळत असे.

कोल्हापूरच्या शिलाहारांच्या अनेक लेखांत जैन मंदिरांना दिलेल्या दानांचा उल्लेख आहे. राजांनी, त्यांच्या सामंतांनी व अधिकाऱ्यांनी अनेक जैन मंदिरे बांधली होती. त्यांपैकी दोन कोल्हापुरात व तिसरे शिरोळजवळ खिद्रापूर येथे आहे. गंडरादित्याचा सामंत निदंदेवरस याने कोल्हापुरच्या जुन्या शुक्रवार वेशीजवळ रूपनारायण वसती बांधली. या मंदिरात अर्धमंडप, सभामंडप, अंतराळ व गर्भगृह असे चार भाग आहेत. गर्भगृह बाहेरून तारकाकृती असून, त्यात पार्श्वनाथाची काळ्या पाषाणाची उभी मूर्ती आहे. महालक्ष्मीमंदिराच्या आवारात दुसरे जैन मंदिर आहे. ते आदिनाथाचे होते. पण आता त्याचे शेषशायी विष्णूच्या मंदिरात परिवर्तन झाले आहे. खिद्रापूरचे ऋषभनाथाचे मंदिर अजून सुस्थितीत आहे.

शिलाहार राजांनी जी शिवमंदिरे बांधली, त्यांतले अंबरनाथचे मंदिर उत्कृष्ट गणले जाते. ठाणे जिल्ह्यात कल्याणपासून चार मैलांवर हे स्थान आहे. तिथे छित्तराजाने हे शिवमंदिर बांधण्यास आरंभ केला आणि मुम्मुणीराजाच्या राजवटीत इ. स. १०६१ मध्ये ते पूर्ण झाले. ते उंच चौथऱ्यावर उभारलेले नसून खोलगट जागेत बांधलेले आहे. त्याचा गाभारा इतर भागांपेक्षा आठ फूट खोल आहे. कारण त्यातले शिवलिंग स्वयंभू आहे. खडकाच्या एका उंचवटयालाच शिवलिंग म्हणतात. ते जिथे आढळले तिथे मंदिर बांधण्यात आले. हे देवालय पश्चिमाभिमुख असून, त्याची लांबी साठ फूट आहे. त्याचे गर्भगृह व सभामंडप आतून चौकोनी, पण बाहेरून तारकाकार आहेत. गर्भगृहाच्या द्वाराच्या शीर्षपट्टीवर ध्यानस्थ शिव, योगी, सिंह, हत्ती, इ. मूर्ती कोरलेल्या आहेत. दोन्ही बाजूंना किरीटधारी पुरुषांच्या आकृती असून, एका बाजूच्या देवळीत गणेशमूर्ती आहे. सभामंडपाच्या मध्यभागी चार स्तंभ आहेत, ते खाली चौकोनी व वर अष्टकोनी आहेत. त्यावरचा भाग गोल असून, त्यावर सुंदर मूर्ती व नक्षी कोरलेली आहे. त्या स्तंभांवर सभामंडपाचा घुमट आधारलेला आहे. सभामंडपाचे छत लहान होत गेलेल्या पाच वर्तुळांनी बनलेले असून, त्याच्या मध्यभागी कमलाकृती झुंबर आहे. सभामंडप व गर्भगृह यांच्या अनुष्ठानावर कीर्तिमुखे, गजथर

नरथर कोरलेले असून, मंदिराच्या बाहेरच्या भिंतींवर निरनिराळ्या देवता व अप्सरा यांच्या मूर्ती आहेत. त्यांत त्रिमुखी शिव, महाकाली, अष्टभुजा, ब्रह्मदेव या मूर्ती मुख्य जागी असून, अर्धनारीश्वर, शिवपार्वती, विष्णू या मूर्ती इतरत्र दिसतात. अप्सरांप्रमाणेच भिंतींवर तत्कालीन जनपदातील सामान्य स्त्रियांच्या मूर्तीही काही ठिकाणी आढळतात.

गर्भगृह, सभामंडप व इतर मंडप यांवर वेगवेगळी शिखरे आहेत. गर्भगृहावरील शिखर उत्तर भारतीय प्रकाराचे पण दक्षिणी पद्धतीचे आहे. त्याचा बराच भाग कोसळला आहे. उ. भारतीय पद्धतीप्रमाणे ते सरळ उंच गेले आहे, पण दक्षिणी पद्धतीनुसार त्याला चारी बाजूंना मध्यभागी चैत्यगवाक्षादी आकृतींनी विभूषित असे चार पट्टे आहेत. या पट्टयांमधील भागात लहान लहान अंगशिखरे आहेत. याच्या वरचा आमलक, कलश इत्यादी भाग नष्ट झालेला आहे. सभामंडप व द्वारमंडप यांवरील शिखरे घुमटाच्या पद्धतीची असून, त्यांना कंगोऱ्यामुळे शोभा आली आहे.

खिद्रापूरचे कोपेश्वरमंदिर कृष्णा नदीच्या काठी आहे. पूर्ववाहिनी असलेली कृष्णा नदी इथे पश्चिमवाहिनी झाली आहे. म्हणून हे स्थान विशेष पवित्र मानले जाते. हे मंदिर पूर्वाभिमुख असून, १०३.५ फूट लांब, ६५ फूट रुंद व कळसापर्यंत ५२ फूट उंच आहे. गर्भगृह, अंतराळ, गूढमंडप व सभामंडप असे याचे चार भाग आहेत. अंतराळ बरेच मोठे असून, त्याच्या द्वाराच्या दोन्ही बाजूंना जय व विजय या द्वारपालांच्या भव्य, चतुर्भुज आकृती होत्या, पण त्या आता भंगल्या आहेत.

अंतराळापुढील मुख्य गूढमंडपात उत्कृष्ट कोरीव काम केलेल्या स्तंभांच्या योगे एकात एक असे दोन चौक झाले आहेत. बाहेरील चौकास वीस व आतील चौकास बारा स्तंभ आहेत. हे स्तंभ प्रथम चौकोनी, मध्ये अष्टकोनी आणि वर वर्तुळाकार कर्णायुक्त असे असून, कलाकुसरीने भरलेले आहेत. मंडपाचे छत एकावर एक लहान होत गेलेल्या वर्तुळांचे बनलेले आहे. पण त्यावर शिखर नाही. याचा सभामंडपही अपूर्ण आहे. त्या मंडपात १२ खांब असून, बाहेरच्या अंगाला ३६ खांब आहेत. आणि द्वारमंडपाऐवजी सभामंडपापासून वेगळा असा अष्टकोनी विशाल मंडप आहे.

या मंदिराचे गर्भगृह, अंतराळ व गूढमंडप हे बाहेरून तारकाकार असून, विविध प्रकारच्या शिल्पाकृतींनी भरलेले आहेत. भिंतींवर खालच्या भागावर हत्तींच्या आकृती कोरलेल्या असून, त्यांवर शिव, विष्णू, इंद्र, ब्रह्मदेव, इ. देवता आरूढ झालेल्या दिसतात. हत्तींची संख्या ९२ आहे. वरच्या भागात देवता, अप्सरा, नर्तकी, इत्यादिकांच्या आकृती आहेत. याव्यतिरिक्त शिवपार्वती, विष्णू, महिषासुरमर्दिनी, भैरव, ब्रह्मदेव, दिक्पाल, सरस्वती यांच्या मूर्तीही आढळतात. [शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख–श्री. वा. वि. मिराशी, १९७४]

## शिलोंछवृत्ती

शिल आणि उंछ असे दोन उपजीविकेचे पवित्र मार्ग आहेत. शेत कापून नेल्यावर त्यात पडलेली कणसे गोळा करून त्यावर उपजीविका करणे याला शिल असे म्हणतात. आणि शेतातले धान्यकण एकेक गोळा करून त्यावर निर्वाह चालवणे याला उंछ म्हणतात (अमर २.९.२). या दोन वृत्ती ब्राह्मणाला प्रशस्त म्हणून सांगितल्या आहेत.

## शिल्पकला

वास्तुकला, मूर्तिकला व चित्रकला या तीन्ही कलांचा समावेश शिल्पकलेत होतो. तथापि शिल्प या शब्दाचा मूळ अर्थ अधिक व्यापक आहे. ब्राह्मण ग्रंथांत शिल्प हा शब्द कला, अद्भुत कृत्य, कौशल्य, कारागिरी, कलाकृती, इ. विविध अर्थांनी वापरलेला आहे (तैत्ति. ब्रा. २.६.१७.६; २.७.१५.४ व ७). यज्ञयागातील स्तोत्रांनाही शिल्प म्हटले आहे (ऐत. ब्रा. ६.५.१). ही स्तोत्रे देवांना संतुष्ट करतात, म्हणून ती देवशिल्पे होत. मनुष्यनिर्मित कलाकृती म्हणजे मानुष शिल्प होय. कौषीतकी ब्राह्मण व ऐतरेय ब्राह्मण या ग्रंथांत शिल्प हा शब्द शस्त्र (= स्तोत्र) व कलाकृती या दोन्ही अर्थांनी वापरलेला आहे. पण श्रौतसूत्रांमध्ये तो केवळ यज्ञक्रियेतील शस्त्र याच अर्थाने वापरलेला आढळतो.

शिल्प हा शब्द स्पष्टपणे कला या अर्थाने प्रथम मैत्रायणी उपनिषदात वापरलेला आहे. अथर्ववेदाच्या परिशिष्टात शिल्पी हा शब्द कारागीर या अर्थाने आलेला आहे. श्रौतसूत्रे, धर्मसूत्रे, व पाणिनीची अष्टाध्यायी यांत गीत, नृत्य व वादन यांना शिल्प हीच संज्ञा होती.

रामायणात शिल्पी व शिल्पकार हे शब्द अनेक ठिकाणी आले आहेत. शिल्पकार म्हणजे कलावंत आणि शिल्पी म्हणजे चर्मकारासारखा कारागीर होय. स्थापत्य या अर्थानेही शिल्प शब्द रामायणात वापरलेला आढळतो.

कौटिलीय अर्थशास्त्रात शिल्प हा शब्द संगीत, नृत्य, इ. ललित कला या अर्थाने अनेक ठिकाणी वापरला आहे (अर्थ. २.४४). गणिका रूपयौवनशिल्पसंपन्ना असावी, असे म्हटले आहे. शिल्पाचा पर्याय म्हणून कला हा शब्दही अर्थशास्त्रात वापरलेला आढळतो. विशेष कौशल्याची कामे करणारा तो शिल्पी, असे अर्थशास्त्रातील विवेचनावरून दिसते.

भरतमुनीच्या नाट्यशास्त्रात आश्चर्यकारक कृत्य, कौशल्य व ललित कला या तीन्ही अर्थांनी शिल्प शब्दाचा उपयोग केलेला

आहे. कलांमध्ये प्रवीण असलेल्या स्त्रीला नाट्यशास्त्रात (१७.३७) शिल्पकारिका म्हटले आहे. तथापि शिल्प व कला या शब्दांच्या अर्थात भेद असल्याचे नाट्यशास्त्रातील काही वचनांवरून ध्यानात येते. माला गुंफणे, चित्रे काढणे; तसेच माती, लाकूड, इत्यादींपासून वस्तू बनवणे, ही शिल्पकामे होत आणि संगीत, नृत्य, वादन या कला होत, असे अभिनवगुप्ताच्या विवेचनावरून दिसते.

शिल्प, शिल्पी व शिल्पशास्त्र यांच्या व्याख्या स्मृतिग्रंथांत केलेल्या आहेत. उदा० बृहस्पतिस्मृतीत (१.१३) शिल्पीची व्याख्या आहे, ती अशी –

हिरण्यकुप्यसूत्राणां काष्ठपाषाणचर्मणाम् ।
संस्कर्ता तु कलाभिज्ञः शिल्पी प्रोक्तः मनीषिभिः ।।

अर्थ – सुवर्णाचे अलंकार करणारा, इतर साध्या धातूंच्या वस्तू करणारा, तसेच लाकूड, दगड, चामडे यांच्या वस्तू कौशल्याने करणारा याला विद्वानांनी शिल्पी म्हटले आहे.

शुक्रनीतिसारात शिल्पशास्त्राची व्याख्या प्रासादरचना, मूर्तिकाम, घरे बांधणे यांचे शास्त्र, अशी केली आहे (४.३.५८).

वराहमिहिराने कलाकुसरीचे काम या अर्थाने शिल्प हा शब्द बृहज्जातक या ग्रंथात (२४.५) वापरला आहे. शिल्प हा शब्द ललित कलांसाठी अगदी इ. स. च्या नवव्या शतकापर्यंत मधून मधून वापरण्यात येत होता, असे दिसून येते. तथापि नाट्यशास्त्राच्या काळापासून संगीत, नृत्य, वादन इत्यादींना कला हे नाव मिळाले आणि चित्रकला, मूर्तिकला या सारख्या कलांना शिल्प हे नाव मिळाले.

**प्राचीन परंपरा** – भारतीय शिल्पकलेची परंपरा फार प्राचीन आहे. तिचा उगम दोन हजार वर्षांपूर्वी मौर्यकाळात झाला. सिंधुसंस्कृती नष्ट झाल्यामुळे तत्कालीन शिल्पकलेची अतिप्राचीन परंपरा खंडित झाली आहे. आज ज्या कलाकृती उपलब्ध आहेत, त्या सनपूर्व ३ ऱ्या शतकापासूनच्या आहेत. या दीर्घ कालखंडात हजारो वास्तू उभारण्यात आल्या, अगणित मूर्ती व कलाकृती घडविण्यात आल्या आणि असंख्य चित्रेही रंगविण्यात आली. त्यांपैकी बऱ्याच कलाकृती कालाच्या ओघात नष्ट झाल्या. कित्येक वास्तू भग्न अवस्थेत उरल्या आहेत. तथापि ज्या कलाकृती व वास्तू चांगल्या स्थितीत टिकून राहिल्या आहेत, त्यांची संख्याही फार मोठी आहे. भारताच्या महान व उज्ज्वल कलावैभवाची साक्ष त्या देतात.

भारतात सर्वत्र विखरून पडलेल्या कलाकृतींचे जतन व अध्ययन प्रथम पाश्चात्य पंडितांनी सुरू केले. प्रारंभी त्यांनी परकीय निकष लावून कलाकृतींचे परीक्षण केल्यामुळे त्यांचे मूल्यमापन योग्य प्रकारे झाले नाही. तथापि त्या कलाकृती निर्माण करणाऱ्या समाजाच्या समजुती, चालीरीती, तत्त्वज्ञान, धर्मकल्पना या सर्वांचा प्रभाव कलानिर्मितीवर झालेला आहे, ही जाणीव ठेवून त्यांचे समीक्षण करायला हवे, हे काही पाश्चात्य पंडितांच्या ध्यानात आले आणि त्यांनी भारताच्या राजकीय व



जैन मंदिर–गांगाणी, राजस्थान

धार्मिक इतिहासाचे सखोल अध्ययन केल्यामुळे त्यांना प्राचीन भारताच्या कलाकारांचे आदर्श समजले. ते आदर्श ध्यानात घेऊन त्यांनी बहुतेक कलाकृतींचे समीक्षण व रसग्रहण केले; ते पुष्कळच निःपक्षपाती व समतोल झाले आहे.

**धार्मिक भूमिका** – भारतीय शिल्पकलेचा विचार करताना ग्रीक शिल्पकलेशी तिची तुलना केली जाते. पण या दोन कलाप्रकारांत जो भेद दिसून येतो, तो मूलभूत आहे आणि विचारांतील भिन्नतेमुळे उत्पन्न झालेला आहे. म्हणून त्यांच्यांत श्रेष्ठकनिष्ठ ठरविणे योग्य वाटत नाही. धार्मिक श्रद्धा हे भारतीय जीवनाचे महत्त्वाचे अंग आहे. कलेच्या क्षेत्रातही धार्मिक कल्पना प्रभावी ठरली आहे. त्यामुळे भारतीय शिल्पकृतींची निर्मिती बहुतांशी धार्मिक दृष्टीने झालेली आहे. शैव, वैष्णव, बौद्ध, जैन या सर्व धर्मपंथांनी आपापल्या कल्पनांच्या आधारे मंदिरे व मूर्ती यांची रचना केली आहे. यासंबंधी श्री. म. ग. पातकर यांनी जे विचार व्यक्त केले आहेत, ते असे –

अव्यक्त अशा स्वरूपात असणाऱ्या ईश्वराला व्यक्त स्वरूप देताना स्वतःच्याच रूपात परमेश्वराला पाहण्याची कल्पना हीच मूर्तिकलेची सुरुवात होय. निःसीम श्रद्धेच्या पोटी या शिल्पाचा जन्म झाल्यामुळेच त्यामध्ये अलौकिकत्व आले, असे वाटते. कारण श्रद्धा-शून्य कलानिर्मिती ही रसहीन ठरते. ग्रीकांची परमेश्वरविषयक कल्पना ही भारतीयांहून वेगळी होती. ग्रीकांनी

परमेश्वराला माणूस बनवले, तर भारतीयांनी माणसाचा परमेश्वर केला. प्रमाणबद्ध शरीराचा सुंदर मनुष्य ही ग्रीक कल्पना, तर मनुष्य कितीही पूर्ण असला तरी तो अपूर्णच असतो, ही भारतीयांची कल्पना. यामुळे ग्रीकांचे देव ही सुंदर माणसे झाली, तर भारतीयांचे देव हे माणसापेक्षा वेगळे झाले. मानवी स्वरूप कायम ठेवून त्याला देवरूप देण्यासाठी भारतीय शिल्पकारांनी वापरलेली कल्पकता अजोड तर आहेच, पण त्याहूनही ती कलात्मक आहे.

प्रतीकांची योजना हा भारतीय शिल्पाचा वेगळा विशेष आहे. पारंपरिक कल्पना, शास्त्राधार, आकारसाम्य, धार्मिक संकेत या सर्वांच्या आधारावर त्या प्रतीकांची उभारणी केलेली आहे. त्यामुळे भारतीय शिल्पामध्ये शारीरिक पूर्णतेपेक्षा लयपूर्ण लवचिक रचनेला महत्त्वाचे स्थान मिळाले आहे. जगाची उत्पत्ती, स्थिती व लय यांचे कर्ते म्हणून ब्रह्मा, विष्णू, महेश यांच्या त्रिमूर्तीचे प्रतीक हे या कल्पनेचे वैशिष्ट्यपूर्ण उदाहरण होय. वस्तुतः एकाच व्यक्तीच्या धडावर अशी तीन मुखे असणे हे अवास्तव आहे, सत्यसृष्टीत न घडणारे आहे. पण त्याच्या मागे जी विचारसरणी व परमेश्वरस्वरूपाची कल्पना आहे, तिच्याशी ते सुसंगत आहे. या कल्पनेला कलावंताच्या प्रतिभेने दिलेले स्वरूप तितकेच भव्य आहे.

यासंबंधी डॉ. कुमारस्वामी म्हणतात – निरीक्षण व निरीक्षित वस्तूंचा स्मृतीत संचय हा सगळा भारतीय कलेचा पाया आहे. भारतीय कलेची अभिव्यक्ती प्रतीकात्मक आहे; ग्रीक व ख्रिश्चन कलेतील वस्तुनिष्ठता तिच्यात नाही. गूढ आशय प्रतीकांच्या द्वारे व्यक्त करणे, हे भारतीय कलावंतांचे वैशिष्ट्य समजले पाहिजे. इथली शिल्पकला वास्तवतेपासून दूर राहिली आहे. सत्य किंवा निसर्ग यांचे कलेतील हे दर्शन जितके निरीक्षणजन्य आहे, त्याहून ते अनुभूतिजन्य आहे.

**प्रागैतिहासिक काळ**–अतिप्राचीन काळी होऊन गेलेल्या सिंधुसंस्कृतीचे अवशेष पंजाब, सिंध, राजस्थान, इ. प्रदेशांत केलेल्या उत्खननांत सापडले आहेत. हडप्पा, मोहेंजोदडो, कालीबंगाँ, लोथल, इ. ठिकाणी आश्चर्य वाटण्याइतकी योजनापूर्वक केलेली नगररचना आढळते. त्यातील रुंद व सरळ रस्ते, व्यवस्थित बांधलेली प्रशस्त घरे, सांडपाण्याचे नळ, कोठारे, स्नानगृहे, यांचे अवशेष वास्तुशिल्पाच्या प्रगत अवस्थेची साक्ष देतात.

सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांत ज्या मूर्ती, बाहुल्या, खेळणी, इ. वस्तू सापडल्या आहेत, त्या सुबक व प्रेक्षणीय आहेत. हडप्पा येथील पुरुषाचे पूर्णाकार कबंध अवयवांचे प्रमाण व सौष्ठव या दृष्टीने प्रगत शिल्पाचे उदाहरण मानता येते. सिंधुनगरात सापडलेल्या असंख्य मुद्रांवरील पशूंच्या चित्रांवरून आणि भाजलेल्या मातीच्या खेळण्यांवरून कलाकारांचे कौशल्य ध्यानात येते. बैलाच्या आकृतीत त्याचा स्वाभाविक जोम अभिव्यक्त झालेला दिसतो. अशी चित्रे अनेक ठिकाणी आढळतात. त्यावरून हे एका व्यक्तीच्या कौशल्याचे नमुने नसून, एका परंपरेचे आहेत, असे प्रत्ययाला येते. हडप्पा येथील खापरेही उत्तम प्रकारे सुशोभित केलेली आहेत. ती लालसर रंगाची असून, त्यांवर काळ्या रंगाने नक्षीकाम केलेले आहे.

सिंधुसंस्कृतीच्या अस्तानंतर निरनिराळ्या प्रदेशांत ज्या ताम्रपाषाणयुगीन संस्कृती अस्तित्वात आल्या, त्यांच्या अवशेषांतही भाजक्या मातीच्या मूर्ती आहेत. राजस्थानातील आहाड येथे मिळालेल्या वृषभमूर्तींच्या शिंगांचा बाक इतका डौलदार आहे, की त्या घडविणारा मनुष्य अस्सल कलाकार असला पाहिजे, असे वाटते. प्रतीकरूप अथवा सांकेतिक शिल्पांकनही त्या काळात झालेले दिसते. मध्य प्रदेशात व राजस्थानात काही ठिकाणी अशा बैलांच्या मातीच्या मूर्ती मिळाल्या आहेत.

सिंधुसंस्कृतीच्या अस्तानंतर भारतात सर्वत्र आर्यांच्या वैदिक संस्कृतीचा विकास झाला. परंतु त्या संस्कृतीचे बुद्धपूर्वकालातले भौतिक अवशेष उपलब्ध नाहीत. काही प्राचीन यक्षमूर्ती मिळाल्या आहेत. त्यांतली परखम येथील यक्षमूर्ती सांप्रत मथुरा संग्रहालयात ठेवलेली आहे. ती सनपूर्व सातव्या शतकातली आहे, असे काही तज्ज्ञ मानतात. आणखी कलाकृती उपलब्ध नसल्यामुळे त्या काळातील शिल्पकलेसंबंधी काही सांगता येत नाही. सांप्रत ज्या कलाकृती दिसतात त्यांची परंपरा मौर्यकाळात, म्हणजे सनपूर्व तिसऱ्या शतकात सुरू झाली आणि सुमारे दोन हजार वर्षे सतत चालू राहिली. या दीर्घ कालखंडात असंख्य वास्तू निर्माण केल्या गेल्या, अगणित मूर्ती व कलाकृती घडविण्यात आल्या व चित्रेही रंगविली गेली. त्यांतील बऱ्याच कलाकृती काळाच्या ओघात नष्ट झाल्या; असंख्य वास्तू परकीय आक्रमकांनी उद्‌ध्वस्त केल्या. त्यांचे फक्त भग्नावशेष सांप्रत उपलब्ध आहेत. तथापि बऱ्याच कलाकृती व वास्तू चांगल्या स्थितीत उरलेल्या आहेत. त्यांत बौद्ध, जैन व हिंदू या तीन्ही संप्रदायांच्या कलाकृती आहेत. ग्रीक, इराणी अशा परकीय कलासंप्रदायांचा प्रभावही त्यांवर पडलेला दिसतो. तथापि त्यांत भारतीय परंपरेचे वैशिष्ट्य सर्वत्र अबाधित राहिलेले आढळते.

**नागरी वास्तुशिल्प** – उत्तर भारतात निरनिराळ्या ठिकाणी केलेल्या उत्खननांत काही प्राचीन नगरांचे अवशेष मिळाले आहेत. त्यांवरून त्यातील वास्तूंच्या पदविन्यासाची काहीशी कल्पना करता येते आणि आकारमानाविषयीही अनुमान करता येते; पण त्यांच्या स्वरूपाविषयी मात्र कल्पना करता येत नाही. काही नगरांचे अवशेष सनपूर्व पाचव्या शतकातले आहेत, तर

काहींचे मौर्य व शुंग काळातले आहेत. त्या काळी देशात समृद्धी नांदत होती आणि सर्व नगरांत भव्य प्रासाद, धनिकांची उंच घरे, विस्तीर्ण बाजारपेठा, विहार, चैत्य, स्तूप, इ. वास्तूंची संख्या अगणित होती. त्या काळी विटा व लाकूड यांचा उपयोग वास्तुरचनेत विपुल प्रमाणात केला जात असे. चंद्रगुप्त मौर्य याच्या दरबारी येऊन राहिलेला ग्रीक वकील मेगॅस्थेनिस याने पाटलीपुत्र नगरीचे जे वर्णन लिहून ठेवले आहे, त्यात लाकडाचे उंच स्तंभ आणि नगराभोवतालचा प्रचंड लाकडी कोट यांचा उल्लेख आहे. या नगरीचे जे अवशेष उत्खननात मिळाले आहेत, त्यांतही प्रचंड लाकडी स्तंभ व तुळया आढळतात. इतर लाकडी शिल्पकाम नष्ट झाले असण्याचा संभव आहे. उत्कृष्ट प्रकारचे लाकूड वापरून त्यावर विविध प्रकारचे सुंदर नक्षीकामही कोरलेले असावे. त्याचे नमुने मिळाले नसले, तरी तसेच कोरीव काम त्यानंतर लगेच निर्माण झालेल्या पाषाणशिल्पात पाहायला मिळते. भरहूत, सांची व अमरावती येथील शिल्पांत घरे, राजप्रासाद, प्राकार, अट्टालक, चैत्य, स्तूप यांची अनेक चित्रे कोरलेली आहेत. तत्कालीन साहित्यातही अशा वास्तूंची वर्णने केलेली आहेत. त्यांवरून नागरी वास्तुशिल्पांची कल्पना करता येते. विशाल प्रासाद, विस्तीर्ण दालने, वीथिका, मंडप, अशा वास्तूंना अष्टकोनी किंवा गोल स्तंभ, अर्धचंद्राकार गवाक्षे, नक्षीने सुशोभित कठडे, घंटाकार शीर्षे, छपरावर स्तूपी किंवा कलशांची उतरंड यांमुळे फार शोभा येत असे. ही सर्व रचना विटा व लाकूड यांची असल्यामुळे बारीक कोरीव काम व विविध प्रकारचे रंगकाम यांना अनुकूल होती. अजंटा येथील हीनयान पंथाच्या चित्रकारीत विविध रंगांनी व नक्षीने सुशोभित अशी कित्येक दालने चितारलेली दिसतात. त्यावरून प्राचीन काळातील लोक व कलाकार यांची सौंदर्यविषयक अभिरुची किती उच्च होती, ते कळते.

त्यानंतरच्या काळात नागरी वास्तूंची विधाने, बांधकामाच्या पद्धती व वापरलेले सामान यांत फारसा बदल झाला नाही. रचनेत काही बदल झाले. उदा० गजपृष्ठाकार छप्पराच्या जागी कोनाकार असे कौलांचे छप्पर आले. चैत्यतोरणे लुप्त होऊन त्या जागी त्रिकोणिका आल्या. सजावटीचे प्रकार मात्र बहुवंशी तेच राहिले. इस्लामी काळापर्यंत परंपरेचे सातत्य अखंड राहिले.

**बौद्ध व जैन कला** – विहार, चैत्य, स्तूप, स्तंभ व शैलगृहे (लेणी) हे प्राचीन बौद्ध वास्तूंचे मुख्य प्रकार होत. चैत्य म्हणजे स्तूपयुक्त प्रार्थनामंदिर. प्रत्येक विहाराशी संलग्न असे एक चैत्यमंदिर असे. मौर्यकाळात भरहूत, सांची, गया व भाजे ही बौद्ध शिल्पकामाची केंद्रे होती. भरहूतचा स्तूप सर्वांत जुना असून, तो सनपूर्व २ ऱ्या शतकात बांधला गेला. तो स्तूप आता उभा नाही. त्यानंतर सांची व अमरावती येथील स्तूप निर्माण झाले. त्यांत स्तूपाच्या प्रदक्षिणेच्या मार्गावर असलेले कठडे व दरवाजे अर्धशिल्पांनी सुशोभित केलेले आहेत. सांचीच्या स्तूपाची प्रवेशद्वारे सुंदर व आकर्षक आहेत. अमरावती येथील स्तूपावरील शिल्पकाम भरहूत व सांची येथील शिल्पांपेक्षा वेगळे आहे. त्या स्तूपावर बुद्धजीवन व जातक कथा यांचे प्रतीकात्मक चित्रांकन केलेले आहे. बुद्धाची मूर्ती न घडवता त्याचे दर्शन घडावे या हेतूने ही प्रतीके निर्माण करण्यात आली. हत्ती, घोडा, बैल व कमल ही गौतमाच्या जन्माशी संबद्ध अशी प्रतीके त्यात आहेत. बोधिवृक्ष हे ज्ञानप्राप्तीचे, धर्मचक्र हे पहिल्या उपदेशाचे व स्तूप हे महानिर्वाणाचे प्रतीक होय. या प्रतिकांबरोबरच इतर पशू, पक्षी, फुले व पाने यांची चित्रेही कोरलेली आढळतात. हे कोरीव काम उत्तम प्रतीचे आहे.

बौद्ध कलाकृतींत स्तंभ किंवा लाट या शिल्पप्रकाराला महत्त्वाचे स्थान आहे. अशोकाने असे तीस स्तंभ उभारले होते; पण त्यांतले दहाबाराच आजपर्यंत सापडले आहेत. स्तूपांप्रमाणेच हे स्तंभ बुद्धाशी संबंधित अशा स्थानी उभारलेले आढळतात. चैत्यासमोरही ध्वज म्हणून स्तंभ उभारण्याची प्रथा होती.



चैत्यगृह, कार्ले

कार्ले येथील चैत्यासमोर सिंहलांछनांकित स्तंभ होता. काही स्तंभांवर अशोकाचे लेख कोरलेले आहेत. हे स्तंभ बरेच उंच असून, त्यांचे प्रमाण, अलंकरण व निर्मितिकौशल्य शिल्पकलेच्या दृष्टीने वाखाणण्याजोगे आहे. सारनाथ येथील स्तंभ त्यावरील सिंहाच्या प्रतिमांमुळे विशेष प्रख्यात आहे.

बौद्ध शिल्पप्रकारांत शैलगृहांना म्हणजे डोंगरांत खोदून काढलेल्या लेण्यांना विशेष महत्त्वाचे स्थान आहे. मौर्यकालात

अशी बरीच लेणी अनेक ठिकाणी खोदण्यात आली. शैलगृहांची उत्पत्ती, कलाशैली व त्यांचे प्रकार यांच्या अभ्यासाच्या दृष्टीने बिहारमधील गुंफा अत्यंत महत्त्वाच्या आहेत. त्यांतील लोमश गुंफेचा दर्शनी भाग अत्यंत सुंदर व वैशिष्टयपूर्ण आहे. प्रवेशद्वाराची वरची बाजू खालच्यापेक्षा किंचित अरुंद आहे. त्याच्या दोन्ही बाजूंना दोन अर्धस्तंभ कोरलेले असून, त्यांच्यावर अर्धवर्तुळाकार तुळया व जाळ्या आहेत. द्वाराच्या वर चंद्राकृतीत खाली जाळी व वर हत्तींची रांग कोरलेली आहे. या लोमश गुंफेच्या दर्शनी कमानीवरून बौद्ध लेण्यांच्या भव्य दर्शनी कमानी निर्माण करण्यात आल्या. हीनयान काळातील सर्वांत अखेरचे लेणे कार्ले येथे असून, त्यातील शिल्पकला परिणत अवस्थेला पोचलेली आहे. धनुष्याकार मंडप, नासिका व समोर आयताकार ओवरी अशी त्याची मूळची रचना आहे. गजपृष्ठाकार छप्पर व प्रचंड आकाराचे चैत्यतोरण इथे आहेच. गवाक्षाच्या दोन्ही बाजूंना मूर्तिकाम असून, भाजे येथील चैत्याप्रमाणेच इथेही अनेक मजले, सज्जे, गवाक्षे यांच्या प्रतिकृती अशी सजावट आहे. नासिक व अजंटा येथील चैत्यांच्या दर्शनी भिंतींवर आणि भरहूत, सांची येथील कोरीव कामात अशीच सजावट आढळते. दर्शनी भिंतींच्या खालच्या बाजूला पूर्णाकार सन्मुख अशा हत्तींची रांग आहे. पितळ खोऱ्याच्या लेण्यात आणि वेरूळच्या कैलास लेण्यातही असे हत्ती आहेत. चैत्यगृहाच्या अंतर्भागात भव्य स्तंभांच्या रांगा असून, त्यांच्या बुडाशी घटाकार मोठ्या उखळी आहेत. स्तंभांच्या माथ्यावर घटाकार मथळे, त्यांवर आमलक व त्यांवर वाढत्या आकाराचे फलक आहेत. सर्वांत वरच्या पाट्यावर सिंह, हत्ती, घोडे, इ. पशूंच्या पाठीवर आरूढ अशा स्त्री-पुरुषांची पूर्णाकृती शिल्पे आहेत. इथल्या मूर्तिकामात एक प्रकारची सफाई व कुशलता निश्चितच आहे. मात्र या वास्तूची भव्यता व प्रमाणबद्धता विशेष जाणवते.

ओडिसातील उदयगिरी–खंडगिरी येथील शैलगृहे जैन पंथाची मानली जातात. इथेही दालनांच्या द्वारावर अर्धवर्तुळाकार तोरणे आहेत, पण त्यांचा आकार लोमश गुंफेच्या तोरणासारखा नाही. या तोरणांची टोके काहीशी आत वळलेली असून, ती घोड्याच्या नालासारखी दिसतात. अनंत गुंफेतील अर्धस्तंभ उल्लेखनीय आहेत. ते चौकोनी असून, त्यांच्या बुडाशी घटाकार चवुतरे आहेत व शिरोभाग घंटाकार आहे. त्यांवर बैठे दोन पशू आहेत. दोन्ही टोकांना अर्धवर्तुळे असून, त्यांत कमळे कोरलेली आहेत. त्यांतून स्तंभावर वेली लोंबताना दिसतात. कमळांच्या देठांची घडण भरहूत येथील वेलींसारखीच आहे.

या सर्व गुंफांचे भरहूत येथील शिल्पातील वास्तूंशी साम्य स्पष्ट दिसते. विशेषत: वेदीचा आकार आणि तोरणाची सामान्य रचना यांतील साम्य सहज जाणवते. व्याघ्रगुंफा मात्र जरा वेगळी आहे. तिचा अंतर्भाग साधा असला, तरी दर्शनी भाग वाघाच्या मुखासारखा उग्र व अक्राळविक्राळ दिसतो.



बुद्धाची मूर्ती—मथुरा (गुप्त युग)

ही शैलगृहे खोदून काढणारे शिल्पकार उत्तम तंत्रज्ञ होते; तसेच सश्रद्ध कलाकारही होते. भगवान बुद्धाच्या शिकवणुकीचा प्रसार करणाऱ्या भिक्षुसंघाच्या मंदिरांची व निवासस्थानांची निर्मिती त्यांनी श्रद्धेने केल्यामुळे या गुंफा अप्रतिम कलाकृती झाल्या आहेत. डोंगराच्या पोटात मोठाली दालने खोदून काढावी, ती सुशोभित करावी ही कल्पना परकीय म्हणजे इराणमधून आलेली असावी, असे काही तज्ज्ञांचे मत आहे. मात्र या वास्तूंचे स्वरूप, वास्तुशोभनातील रूपके, मूर्तींचे विषय, त्यांची अभिव्यक्ती आणि वास्तुशिल्पांचा उद्देश या गोष्टी पूर्णपणे भारतीय आहेत. या शिल्पप्रकाराचा जो विकास झाला, त्याचे श्रेय भारतीय कलाकारांच्या प्रतिभेलाच द्यायला हवे.

महायान पंथाच्या काळातही पश्चिम महाराष्ट्रात शैलगृहांची निर्मिती झाली. तिचा प्रारंभ इ. स. च्या ५ व्या शतकात होऊन ती ८ व्या शतकात थांबली. वास्तूचे विधान व विहाराची रूपरेखा यांत फारसा फरक पडला नाही. विहाराच्या सगळ्यांत आतल्या बाजूच्या भिंतीत देवतांच्या मूर्ती बसवण्यात येऊ लागल्या. गाभारा व सभामंडप यांच्यामध्ये अंतराळ ठेवण्यास प्रारंभ झाला. अजंटा येथील क्र. १७ चे लेणे ही या प्रकारची सर्वांत परिणत अवस्था होय. चैत्यगृहांच्या विधानात बदल झाला नाही; पण तोरणाच्या आकारात आणि मुखदर्शनाच्या सजावटीत बदल झाला. प्रवेशद्वारासमोर सलग मोठी ओवरी असण्याऐवजी

लहान पण डौलदार भद्र उभारण्यात आले. अजंटा येथील १९ क्रमांकाचे लेणे म्हणजे महायान चैत्यगृहाचे एक अत्यंत सुंदर उदाहरण होय. मात्र बौद्ध लेण्यांच्या प्रगतीची अंतिम अवस्था वेरूळ येथील विश्वकर्मा लेण्यात पाहायला मिळते. त्याचे मुख-दर्शन अगदी वेगळ्या प्रकारचे आहे. इतरत्र दिसणाऱ्या भव्य चैत्यतोरणाऐवजी इथे एक त्रिदळी सुबक तोरण दिसते. या तोरणासंबंधी श्री. म. श्री. माटे यांनी केलेले विवेचन असे– भाजे व कार्ले येथील चैत्यतोरण आकाराने भव्य होते, एवढेच नव्हे तर त्याच्या बाह्य रेषेत गती होती. हे तोरण झेपावत वर जात आहे, असे पाहणाऱ्यास वाटावे. भाजे येथील तोरण पूर्णपणे अर्ध-वर्तुळाकृती होते. कार्ले येथील तोरणाची दोन्ही टोके थोडी आत खेचण्यात आली व त्यामुळे घोड्याच्या नालासारखा आकार प्राप्त झाला. पुढे पुढे या तोरणांत दिसणारा तोल नाहीसा होऊन त्यांना वर्तुळाकारच प्राप्त व्हावयास लागला. अजंटाच्या १९ क्रमांकाच्या लेण्याच्या तोरणात हीच प्रवृत्ती दिसते. या फेर-बदलामुळे सबंध रूपकातील जोम नष्ट होतो. विश्वकर्मा लेण्याच्या मुखदर्शनावरील त्रिदळी तोरण म्हणजे या विकृतीची शेवटची पायरी होय.

**बौद्ध मूर्ती** – बौद्ध संप्रदायात महायान पंथाचा उदय झाल्या-नंतर प्रतीकात्मक शिल्पाची प्रथा बंद झाली व बुद्धाची प्रतिमा घडवण्याची प्रथा सुरू झाली. त्याच काळात भारतीय शिल्प-शैलीवर ग्रीक शिल्पशैलीचा प्रभाव पडून गांधार शिल्पशैली उदय पावली. गांधार देशात एकाच वेळी दगड, माती व चुना यांच्या मूर्ती घडविल्या जात होत्या. मातीच्या व चुन्याच्या मूर्ती घडविणे दगडी मूर्ती करण्यापेक्षा थोडे सोपे होते. त्यामुळे अशा मूर्तींची मुखे अधिक भावदर्शी वाटतात. स्तूप व चैत्य यांच्या सजावटीसाठीच असे मूर्तिकाम केलेले आहे.

गांधार शिल्पकलेची वाढ ज्यांच्या प्रोत्साहनामुळे झाली, त्या कुशाण राजांनी मथुरा व मध्यदेश या भागांतील भारतीय बौद्ध शिल्पकलेचा पुरस्कार केला. मथुराशिल्पात कित्येकदा परकीय प्रभाव दिसतो, त्याचे कारण हेच असावे. प्राचीन यक्षमूर्तींपेक्षा या बौद्धमूर्ती अधिक सुंदर दिसतात. मथुराशिल्पातील मूर्तींची शरीररचना, मुखावरील भाव, रेखीवपणा, मार्दव ही उल्लेख-नीय आहेत. गौतम बुद्धाच्या अंगी असलेली दैवी लक्षणेही त्याच्या मूर्तीत दाखवण्याचा प्रयत्न मूर्तिकारांनी केला आहे. त्याचप्रमाणे विशिष्ट प्रसंगांचे दर्शन घडविणाऱ्या मूर्तींची निर्मितीही सुरू झाली.

मथुरा संप्रदायाच्या शिल्पात काही यक्षी, शालभंजिका, इ. स्त्रीमूर्ती आहेत. भरहूत, सांची येथील स्त्रीमूर्तींप्रमाणेच त्यांची वक्षःस्थळे पुष्ट व नितंब विशाल आहे. मात्र मथुरा संप्रदाया-तल्या स्त्रीमूर्ती काहीशा उत्तान वाटतात. भुतेश्वर येथील स्तंभा-वरील यक्षींच्या मूर्ती अशाच आहेत. त्यांतली त्रिभंगावस्थेतील केस मोकळे सोडलेली यक्षी शृंगार विलासाला आवाहन करीत आहे, असे भासते.



यक्षी– भुतेश्वर

मथुरा शिल्पसंप्रदायाच्या परमोत्कर्षाचा काळ म्हणजे गुप्तयुगाचा प्रारंभ होय. मथुरा व सारनाथ येथे आणि त्यांच्या परिसरात या काळा-तील बौद्ध मूर्ती आढळतात. त्यांतील बुद्धाच्या मुखावर दिव्यत्व व श्रेष्ठत्व दिसून येते. सारनाथच्या किंवा गांधार देशातील आरंभीच्या बुद्धमूर्ती सामान्य माणसा-सारख्या दिसतात. गुप्त काळातील कलाकारांनी मात्र आध्यात्मिक बल प्राप्त झालेल्या आणि देहभान विसरून तत्त्वचिंतनात निमग्न झालेल्या योगी पुरुषाच्या मुखावरील शांती व तेज बुद्धाच्या मुखावर दाख-विण्याचा प्रयत्न केला. त्या-नंतर नासाग्रदृष्टी, ओठांवर किंचित स्मित व मुखावर शांत, सात्त्विक भाव अशा बुद्धमूर्ती निर्माण होऊ लागल्या आणि कित्येक शतके देव-देवतांच्या मूर्ती त्याच पद्धतीने घडविल्या गेल्या.

**हिंदू व जैन कला** – देवालयांची परंपरा बरीच प्राचीन असली तरी इ. स. च्या ४ थ्या शतकापूर्वीची मंदिरे क्वचितच पाहा-यला मिळतात. मध्य भारतातील तिगवा व सांची येथील मंदिरे साधी, प्राथमिक अवस्थेतली आहेत. त्यांत लहानसा गाभारा व मुखमंडप आहे. त्यांचा आकार लहान असून, छप्पर सपाट आहे. भूमरा व नाचणा येथील गुप्तकालीन मंदिरांत सभामंडप व प्रदक्षिणामार्ग आहेत. ही दोन्ही मंदिरे उंच चौथऱ्यावर बांध-लेली आहेत. देवगड येथील मंदिरात अधिक प्रगती झालेली

दिसते. त्याच्या गाभाऱ्यात कोनाकृती छप्पर किंवा शिखर होते. हे शिखर नागर शैलीच्या प्राथमिक अवस्थेचे निदर्शक वाटते.

नागर व द्राविड या भिन्न शिल्पपद्धतींची काही विभाजक लक्षणे आहेत. यांतील सर्वांत महत्त्वाचे लक्षण म्हणजे वास्तुकारांच्या मनासमोर असणारी सौंदर्यकल्पना. नागर मंदिरशैलीत वास्तू खूप उंच दिसावी असा प्रयत्न केलेला आहे, तर द्राविड मंदिरात विस्ताराला महत्त्व मिळाले आहे. एकात ऊर्ध्ववृत्ती, तर दुसऱ्यात समतलवृत्ती. द्राविड वास्तू जमिनीला समांतर अशा आडव्या वाढत जातात. गाभारा आणि मंडप मिळून एक सलग आणि लांबलचक पट्टा तयार होतो. त्याच्या सजावटीची व्यवस्था भिंतीत अर्धस्तंभांचे किंचित विसंवादी सूर ठेवून केली आहे. द्राविड शिखर थवकट असते. त्यात उंचीऐवजी प्रत्येक मजल्याच्या पृथक आविष्काराला महत्त्व दिले आहे. याउलट नागर शैलीतील मंदिरांत वरवर झेपावत जाण्याची प्रवृत्ती जाणवते. याला अनुसरूनच भिंतीची मोडणी करून छायाप्रकाशाचे उभे पट्टे निर्माण करतात. कित्येक वास्तूंत असे पट्टे जमिनीपासून आमलकापर्यंत असतात. त्यांचा तोल सांभाळण्यासाठी भिंतीत मधेमधे ठळक असे आडवे थर योजलेले असतात.

कर्नाटकात पूर्वकालीन चालुक्य वंशाच्या काळात बादामी, ऐहोळ, पट्टदकल वगैरे ठिकाणी बरीच मंदिरे निर्माण झाली. ऐहोळ व पट्टदकल येथे दोन्ही शैलींची मंदिरे आहेत. ऐहोळ येथील तारवसप्पा व हूचिमलगुडी या दोन मंदिरांच्या शिल्पकामात नागर शैलीचे या प्रदेशातील स्वरूप स्पष्ट दिसते. त्यात चौरस गाभाऱ्यासमोर आयताकार मंडप व त्याच्यापुढे भद्र किंवा मुखमंडप आहे. मंडपात स्तंभांच्या दोन रांगा असून, त्यांच्या जोडीला भिंतीत अर्धस्तंभ दिसतात. गाभाऱ्यावर शिखर आहे. पण मंडपाचे छप्पर सपाट आहे. मंदिराच्या भिंती बाहेरून सपाट आहेत. भिंतीवर कपोत, पट्ट, कपोत व शिखर असे भाग एकावर एक आहेत.

पट्टदकल येथील पापनाथमंदिर नागर शैलीचे असले तरी, त्यावर द्राविड पद्धतीचा ठसा काही प्रमाणात दिसतो. याच्या द्वारावरचे मकरतोरण हे प्रगत द्राविड शैलीचे अंग आहे. आलमपूर येथील सहा-सात मंदिरे पापनाथाच्या परंपरेतलीच आहेत; पण त्यांचा काही भाग जास्त डौलदार आहे. स्तंभ अष्टकोनी किंवा षोडशकोनी असून, त्यांवर पूर्णकलश दिसतात.

गुजरातेत इ. स. च्या ६ व्या ते ९ व्या शतकांत अनेक ठिकाणी शिखरयुक्त मंदिरे निर्माण झाली. त्या परंपरेचा अधिक विकास सोळंकी वंशाच्या राजवटीत झाला. इ. स. च्या १० व्या शतकात नागर शैलीची एक वेगळी शाखाच तिथे विकसित झाली. त्या पद्धतीचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे मोढेरा येथील सूर्यमंदिर होय. त्यात सोळंकी शैलीची सर्व वैशिष्ट्ये अत्यंत प्रगल्भ अवस्थेत दिसतात. बर्जेसच्या मते उत्तर गुजरातेत या मंदिराइतके सुबक व आकर्षक मंदिर अन्यत्र नाही.



मकर-तोरण

सौराष्ट्र व उ. गुजरात या भागात अशी अनेक मंदिरे आढळतात. दिलमाल येथील लिंबाजीमाता-मंदिर, सेजकपूर येथील नवलाखा-मंदिर व सिद्धपूरचे रुद्रमहालय ही या समूहातील मंदिरे विशेष उल्लेखनीय आहेत. या सर्व मंदिरांत मूर्तिकामाचा अतिरेक झालेला दिसतो. मूर्तिकामाचा अधिक कौशल्यपूर्ण उपयोग खजुराहो येथील व ओडिसामधील मंदिरांत केलेला आहे.

गुजरात व राजस्थान या प्रदेशांत तारिंगा, गिरनार, पालिताणा, अबू, इ. जैन क्षेत्रांत बरीच जैन मंदिरे आहेत. अबू येथील जैन मंदिरे प्रख्यात आहेत.

गुप्तकाळात मध्य भारतात मंदिररचनेचा खूप विकास झाला आणि मंदिरांची अंगोपांगे ठरून गेली. त्यांतील सजावटीचे रूपही निश्चित झाले. गुप्तोत्तर काळातली मंदिरे मध्य भारतात व उत्तर भारतात सर्वत्र पाहायला मिळतात. त्यांचे स्वरूप साधारणपणे पुढीलप्रमाणे असते – चौरस गाभारा, अंतराळ, मंडप व मुखमंडप. भिंतीत उभे पट्टे किंवा रथ. पीठ फारसे उंच नाही. पीठाच्या वर येणाऱ्या जंघेवर मूर्ती कोनाड्यात किंवा स्वतंत्रपणे भिंतीवर उभ्या. जंघेच्या वरच्या बाजूला मौक्तिकमाला किंवा पुष्पहार कोरलेले; त्यावर कपोत, पट्ट व शिखर. शिखर निमुळते होत गेलेले असून, त्याची बाह्य रेषा बाकदार. त्यावर आमलक व कलश. द्वारशाखा सुशोभित असून, त्यांवर रत्न-पत्र-अर्धस्तंभ-नाग आढळतात. द्वारपालांच्या व गंगा-यमुनांच्या मूर्ती सामान्यपणे असतातच. स्तंभ प्रणालयुक्त असून, त्यावर पूर्णकलश असतो. देवमूर्तीसाठी जंघेवर केलेल्या कोनाड्याच्या शिरोभागी त्रिकोणिका असते. चैत्यतोरण व त्याचे

कंस यांच्या वैचित्र्यपूर्ण गुंफणीतून या त्रिकोणिका तयार होतात.

प्राचीन बौद्ध वास्तुकलेचा प्रभाव अन्य कलासंप्रदायांवर



आदिनाथाचे मंदिर, पालिताणा

बराच पडलेला आहे. तशा प्रकारच्या वास्तू देशभर सर्वत्र दिसतात. आयताकार विधान आणि त्यावर कमानीचे किंवा गजपृष्ठाकार आच्छादन व चांदईच्या भिंतीवरील प्रचंड चैत्यतोरण ही अशा वास्तुशिल्पांची वैशिष्ट्ये होत. त्यात देवकोष्ठ, त्रिकोणिका हे प्रकारही दिसतात.

कुलू जिल्ह्यातील जगतसुख येथील शिवमंदिर गुप्तोत्तर कालातील शिल्पपद्धतीचे साधे पण सुंदर उदाहरण होय. त्याच्या चौरस गाभाऱ्यावर त्रिरथ पद्धतीचे शिखर असून, त्यावर आमलक आहे. तीन्ही बाजूंना देवकोष्ठ व त्यांवर त्रिकोणिका आहेत. स्तंभ सडपातळ व प्रणालयुक्त असून, त्यावर चौकोनी ठोकळे व पूर्णकलश आहेत. जंघेच्या वरच्या बाजूला हार व कपोत आहेत. अर्धमंडपावर गजपृष्ठाकार शिखर असून, त्याच्या मुखावर चैत्यतोरण म्हणजे शुकनास स्पष्ट स्वरूपात दिसते.

ग्यारसपूर (विदिशा) येथील मालादेवीमंदिरात गुप्तोत्तरकालीन मंदिरांची प्रगत अवस्था दिसते. त्याचे शिखर पंचरथ असून, त्यावर आठ उपशृंगे आहेत. हे मंदिर इ. स. च्या ९ व्या शतकाच्या उत्तरार्धातले आहे.

इ. स. च्या ९ शतकानंतर मध्य भारताच्या निरनिराळ्या भागांत नागर शैलीच्या वेगवेगळ्या प्रादेशिक शैली उगम पावल्या. चंदेलांच्या राजवटीत खजुराहो येथे जी सुंदर मंदिरे निर्माण झाली, त्यांत नागर शिल्पशैलीचा सर्वोत्कृष्ट आविष्कार झालेला दिसतो. तिथले कंदरिया महादेवाचे मंदिर म्हणजे त्याचा मुकुटमणी होय.

इ. स. च्या १० व्या शतकात मध्य प्रदेशात कलचुरी राजांनी बांधलेली काही मंदिरे आढळतात. सोहागपूर येथील विराटेश्वर-मंदिर कलचुरी शैलीचे सर्वोत्कृष्ट व विकसित उदाहरण होय. ते इ. स. च्या ११ व्या शतकातले आहे. त्यातील मूर्तिकाम विशेष प्रेक्षणीय आहे.

माळवा, राजस्थान व महाराष्ट्र एवढ्या विस्तृत क्षेत्रात इ. स. च्या १० व्या शतकापासून १३ व्या शतकापर्यंत बहरलेल्या शिल्पशैलीला भूमिज म्हणतात. परमार व यादव या राजवंशांच्या आश्रयाने ही उपशाखा विकास पावली. शिलाहार राजांनीच या शिल्पप्रकाराचा प्रारंभ केला होता. यादवांच्या काळात त्याला प्रगल्भ रूप मिळाले. या पद्धतीच्या मंदिरांचा गाभारा आतून चौरस व बाहेरून नक्षत्राकृती किंवा बहुकोनी असतो. त्यांच्या तीन्ही बाजूंना प्रवेशद्वारे व अर्धमंडप असतात. त्यांच्या बाह्यांगावरील आडवे थर ठळक असतात. पण उभे कोन-प्रतिकोन जास्त तीव्रतेने नजरेत भरतात. गाभाऱ्याच्या बाहेरच्या भिंतींवर जे देवकोष्ठ असतात, त्यांना सामावून घेणारे रथ किंवा पट्टे पायथ्यापासून आमलकापर्यंत सलग व अखंड असतात. अशा प्रकारची उल्लेखनीय मंदिरे उदयगिरी (विदिशा), ऊना (प.



कंदरिया महादेव मंदिर, खजुराहो

नेमावर), चितोड, रामगड, झालारपट्टण, अंबरनाथ, बलसाणे, सिन्नर, इ. ठिकाणी आहेत.

ओडिसातील सर्व मंदिरे नागर शैलीची असली, तरी त्यांत काही प्रादेशिक वेगळेपणा दिसून येतो. वास्तू व मूर्ती या दोन्हीं

कलांचा समतोल व सुंदर आविष्कार या मंदिरांत पाहायला मिळतो. यांतील मूर्तिकाम विपुल व उत्कृष्ट आहे. इ. स. ७ व्या शतकातले भुवनेश्वर येथील परशुरामेश्वर-मंदिर प्रारंभीच्या कालखंडाचे प्रातिनिधिक आहे. याचे शिखर जरा ठेंगणे असून, त्याची बाह्य रेषा बरीच वर सरळ जाऊन मग एकदम आत वळते. त्यामुळे शिखराला काही वेगळाच डौल येतो.



आमलक, भुवनेश्वर

भुवनेश्वर येथील लिंगराजमंदिर ओडिसा शिल्पशैलीचे सर्वोत्कृष्ट उदाहरण होय. कोणार्कचे सूर्यमंदिर तितकेच उत्कृष्ट होते, पण ते अतिशय भग्नावस्थेत उभे आहे. या मंदिरांची शिखरे खूपच उंच आहेत. या मंदिरांत अनेक मंडप आहेत.

नागर शैलीचा आणखी एक प्रादेशिक आविष्कार राजस्थानात पाहायला मिळतो. इ. स. च्या ७ व्या ते १० व्या शतकांत जी मंदिरे निर्माण झाली, ती आबनेरी, बरोली, चितोडगड, ओसिया, उदयपूर, नागदा, किराडू, इ. ठिकाणी आहेत. इ. स. च्या ११ व्या शतकापासून पुढे निर्माण झालेल्या मंदिरांवर सोळंकी शैलीचा प्रभाव पडलेला दिसतो. यांत कुंभारिया, अबू व राणकपूर येथील जैन मंदिरांचा समावेश होतो. अबूवरील मंदिरांतील सुंदर शिल्पकाम नेत्रदीपक आहे.

द. भारतात द्राविड शिल्पशैलीची दोन केंद्रे आहेत. कर्नाटकाची प्राचीन राजधानी बादामी व तिच्या जवळचे महाकूट व पट्टदकल हे एक केंद्र आणि तमिळनाडूमधील महाबलिपुरम हे दुसरे केंद्र होय. या दोन्ही ठिकाणची मंदिरे इ. स. च्या ६ व्या किंवा ७ व्या शतकातली असावी. पहिल्या केंद्रातली द्राविड शैलीच्या प्राथमिक अवस्थेतली सात-आठ मंदिरे उल्लेखनीय आहेत. द्राविड शैलीची सर्व महत्त्वाची अंगे त्यांत दिसून येतात. त्यांत अंतराळ नाही. गाभाऱ्यावर जे पायऱ्या पायऱ्यांचे शिल्पकाम असते, त्याला विमान म्हणतात. त्याच्यावर घुमटाकार शिखर आहे. ते गोल, चौकोनी, अष्टकोनी असे विविध प्रकारचे, पण बहुधा एकाच मोठ्या पाषाणाचे घडवलेले आहे. विमानाच्या प्रत्येक मजल्यावर कूटशाळांच्या रांगा आहेत आणि शिखराच्या चारही बाजूंवर चैत्यतोरणे बसविलेली आहेत. बादामीच्या चालुक्यांच्या राजवटीतले सर्वांत मोठे व सुंदर द्राविड मंदिर पट्टदकल येथे आहे. त्याचे नाव विरूपाक्ष किंवा लोकेश्वरमंदिर असे आहे. विक्रमादित्य (दुसरा) याने पल्लवांवर विजय मिळवला. त्याचे हे स्मारक खूप भव्य आहे.

या मंदिराच्या विधानात नेहमीची सर्व अंगे असून, आणखीही काही अंगे आढळतात. मंडपाला तीन्ही बाजूंनी द्वारे असून, त्यासमोर भद्र उभारलेले आहेत. गाभारा व मंडप यांच्या मध्ये मोकळी जागा आहे, तिलाच पुढे अंतराळ हे नाव मिळाले. मंडपाच्या द्वारावरील अर्धमंडपाचे भद्रशाला स्वरूपाचे आच्छादन मध्ययुगातील गोपुरांचे प्राथमिक रूप मानले जाते. विमान मजल्यांनी व कूटशाळा हारांनी विभूषित आहे.

वरंगळच्या काकतीय राजांनी इ. स. च्या १२ व्या व १३ व्या शतकांत जी मंदिरे बांधली, त्यांची एक वेगळी शैली दिसून येते. ती द्राविड पद्धतीची एक शाखाच आहे. पालमपेट येथील शिवालय हे या काकतीय शैलीचे उत्तम उदाहरण म्हणून उल्लेनीय आहे. त्यातील मंडपाचे स्तंभ विविध प्रकारे सुशोभित केलेले दिसतात. त्यात वेलपत्तीचे नक्षीकाम व मूर्तिकाम आढळते. इ. स. च्या १२ व्या शतकात म्हैसूर प्रदेशात होयसळांच्या राजवटीत जी मंदिरे निर्माण झाली, ती द्राविड शैलीचीच आहेत. त्यांच्या विमानांची रचना, सजावटीचे स्वरूप, स्तंभ ही सर्व अंगे द्राविड पद्धतीची आहेत. तथापि त्यांतील अर्धस्तंभ व गोष्ठपांजर यांवर शिखरांच्या ज्या लहान प्रतिकृती आहेत, त्या नागर शैलीच्या आहेत. तसेच मंदिरांच्या पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंना ज्या देवळ्या आहेत, त्यांची शिखरेही भूमिज शैलीची आहेत. यादवकालीन मंदिरांत दिसणारी उंचीची झेप त्यांत नाही. होयसळ शैलीच्या मंदिरांत विमानांच्या तालांचे पृथक अस्तित्व जाणवू नये म्हणून सर्व खबरदारी घेतलेली आहे. कर्नाटकांतील लकुंडी येथील मंदिरात हा प्रकार पाहायला मिळतो. याचे विधान नक्षत्राकृती असल्यामुळे भिंतींत अनेक कोन-प्रतिकोन निर्माण झाले आहेत. ते शिखरापर्यंत पोचले आहेत. ही रचना भूमिज शैलीशी जुळती आहे.

होयसळ शैलीच्या मंदिरांत वास्तुशोभनासाठी मूर्तिकामाचा उपयोग विपुल प्रमाणात केला गेला आहे. मध्य भारत व ओडिसा या प्रदेशांतील मंदिरांवर विपुल मूर्तिकाम आहे व ते अप्रतिम सुंदरही आहे; पण ते वास्तुसौष्ठवाला बाध आणीत नाही. होयसळ मंदिरशिल्पात मात्र मूर्तिकामाचा अतिरेक झाला आहे. ते सुंदर असले, तरी वास्तुशिल्पाचे सौंदर्य झाकून टाकणारे आहे. हळेबीड येथील होयसळेश्वर आणि बेलूर व सोमनाथपूर येथील केशवमंदिरे अशा प्रकारची आहेत.

द्राविड शिल्पशैलीच्या दुसऱ्या शाखेची जोपासना तमिळनाडमध्ये पल्लव राजांनी केली. महाबलिपुरम येथील मंडप व रथ

यांमध्ये पल्लव मंदिरशैलीच्या अंगोपांगांची बीजे दिसतात. पल्लव मंदिरे शुद्ध द्राविड शैलीची आहेत. महाबलिपुरमची तटमंदिरे उल्लेखनीय आहेत. त्यांच्या भितींत अर्धस्तंभांच्या साहाय्याने चौकटी पाडल्या आहेत. त्या अर्धस्तंभांच्या पायथ्याशी, पुढचे पाय वर उचललेल्या सिंहांच्या प्रतिमा आहेत. त्या कोरण्याचे तंत्र पल्लवांचे आहे. या मंदिरांच्या शिखरांच्या आठही मुखांवर चैत्यतोरणाकृती आहेत. विमानाला अनेक भूमी असल्या तरी, त्यांचे परस्पर प्रमाण असे बसवले आहे की त्यामुळे अखंड अशी बाह्याकृती निर्माण व्हावी. विमानाच्या आकारातून उंचीचा भाव उत्तम प्रकारे प्रगट होतो. पल्लवांच्या



वैकुंठ–पेरुमाळ मंदिर कांची

द्राविड मंदिरांत शुकनास हे अंग सहसा सापडत नाही. कांचीपुरम येथील कैलासनाथमंदिर हे पल्लव शैलीचे अधिक विकसित रूप होय. तिथलेच वैकुंठ–पेरुमाळ हे मंदिरही पल्लव शैलीची प्रगत अवस्था दर्शविते.

पल्लव आणि चालुक्य दोन्ही घराण्यांची मंदिरे द्राविड शैलीची असून, त्यांचा पदविन्यास व दर्शनयोजना यांत विलक्षण साम्य आढळते. स्तंभांचा आकार व सजावट यांत मात्र बराच फरक आहे. पल्लव स्तंभांची शीर्षे कुंभाकार व मोठी असतात. त्यांच्या पायथ्याशी सिंह व व्याल यांच्या आकृती असतात. तसे स्तंभ चालुक्य शैलीच्या मंदिरांत नाहीत. मूर्तीचे घाटही भिन्न आहेत.

चोळ वंशाच्या प्रारंभीच्या काळातील मंदिरे पल्लव पद्धतीचीच आहेत. पण तंजाऊरचे बृहदीश्वरमंदिर म्हणजे त्यांच्या शिल्पकारांच्या अलौकिक प्रतिभेचे मूर्त स्वरूप होय. याच्या विमानाला तेरा भूमी असून, प्रत्येक भूमीवर कूट-शाला-पाञ्जर असे शिल्पकाम आढळते. त्यातही अनेक मूर्ती कोरलेल्या आहेत. आणि या सर्वांवर अष्टकोनी विधानाचे प्रचंड शिखर आहे. या मंदिराची भिन्न भिन्न अंगे पाहिली, तर त्यांत नवीन असे काही नाही. विधान, दर्शन, वास्तुशोभन पारंपरिक पद्धतीचेच दिसते. तरीही हे मंदिर अद्वितीय मानले जाते. याचे कारण त्याच्या भिन्न वास्तुखंडांच्या आकाराचा परस्परांशी साधलेला तोल हे होय.

द्राविड शिल्पशैलीची प्रगती चोळकालानंतरही चालू राहिली. इ. स. च्या १८ व्या शतकापर्यंत निरनिराळ्या दक्षिण भारतीय राजांनी या शैलीची जोपासना केली. त्यांत विजयनगरचे सम्राट, नायक राजघराणी आणि सेतुपतींसारखी लहान घराणी यांचा उल्लेख करायला हवा. इ. स. च्या १२ व्या शतकात द्राविड पद्धती पूर्णावस्थेला पोचली. पुढच्या काळात मंदिरांच्या आकारात व स्वरूपात फारसा बदल झालेला दिसत नाही. पण मंडप, कुंडे व मुख्यतः गोपुरे यांच्यांत खूप प्रगती झाली. तिरुवल्लूर, श्रीरंगम, चिदंबरम, रामेश्वर, मदुरा, तिनेवेल्ली, विजयनगर व ताडपत्री येथील मंदिरे या दृष्टीने फार महत्त्वाची आहेत. श्रीरंगमचे विष्णुमंदिर या प्रकारच्या शिल्पाचे प्रातिनिधिक मानले जाते. मुख्य मंदिर अगदी लहान व साधे आहे. पण त्याभोवती सात प्राकार असून, त्यात चौदा गोपुरे आहेत. मदुरेच्या मीनाक्षीमंदिरावरील गोपुराची बाह्य रेषा मध्यभागी किंचित अंतर्वक्र झाल्यामुळे तिला विलक्षण गती प्राप्त झाली आहे. इतके डौलदार गोपूर अन्यत्र क्वचितच दिसते.

दुसरा उल्लेखनीय वास्तुप्रकार म्हणजे मंडप. रामेश्वराचा मंडप विशेष प्रेक्षणीय आहे. द्राविड शिल्पात कोठेही कमान वापरलेली नाही. हस्त, उपहस्त, कर्ण, तुला यांच्याच आधारावर वास्तू उभ्या आहेत. विजयनगर येथील विठ्ठलस्वामीमंदिर हे या शैलीचे सर्वोत्तम उदाहरण होय. गर्भगृह व शिखर पारंपरिक द्राविड पद्धतीचेच आहे. मंडपाचा आकार लहान असला तरी त्यातील स्तंभांच्या रचनेमुळे तो सुंदर दिसतो. फर्ग्युसनच्या मते भावव्यक्ती व ठाशीवपणा या दृष्टींनी हे शिल्पकाम अजोड आहे. द. भारतातील मंदिरे निर्भेळ हिंदू पद्धतीची आहेत. त्यांवर इस्लामी पद्धतीचा प्रभाव पडलेला नाही.

**शैलगृहे** – हिंदू किंवा ब्राह्मणी पद्धतीची शैलगृहे प. भारतातच अधिक पाहायला मिळतात. त्यांची निर्मिती गुप्तकाळातच सुरू झाली. प्रारंभी त्यात बौद्ध गुंफांचे अनुकरण केलेले दिसते. नंतरच्या काळात मात्र त्यात दोन प्रकारे प्रगती झाली. सौंदर्यनिर्मिती करणे हा एक प्रकार. गुंफेच्या आराखड्यात व सजावटीत नवीन प्रकारचे शिल्पकाम योजण्यात आले. वेरूळचे डुमार लेणे व घारापुरीचे शैव लेणे ही या प्रकारची उत्कृष्ट उदाहरणे होत. दुसरा प्रकार म्हणजे संपूर्ण वास्तू खोदून वेगळी

काढायची. महाबलिपुरम येथील रथमंदिरे या प्रकारची उत्तम उदाहरणे आहेत.

हिंदू गिरिशिल्पांचा बौद्ध लेण्यांशी असणारा संबंध वेरूळ-प्रमाणे इतरत्र क्वचितच प्रचीतीस येतो. येथे बौद्ध वास्तूंमध्ये होत गेलेले बदल आणि त्यांत हिंदू शिल्पकारांनी घडवलेले बदल दोन्ही स्पष्ट दिसतात. चैत्यगृह ही चापाकार वास्तुरचना वेरूळच्या लेण्यांत आढळत नाही. सर्वांत बाहेर एक ओसरी, आत मंडप, त्याच्या तीन्ही अंगांना चौरस दालनांच्या ओळी व मागील भिंतीत मधल्या दालनाच्या जागी गाभारा, अशी आरंभीच्या हिंदू मंदिरांची रूपरेखा दिसते. ही रचना विहाराच्या रचने-सारखीच आहे. काही काळाने भोवतालच्या दालनांची जागा मोठ्या आकाराच्या चौकटींनी घेतली व त्यांत प्रचंड शिल्पपट खोदण्यात आले. गाभाऱ्याभोवती प्रदक्षिणामार्ग आढळतो.

बादामी येथे चार शैलमंदिरे असून, त्यांतील एक जैनांचे आहे. त्यांतील क्र. तीनचे विष्णुमंदिर सर्वोत्कृष्ट आहे. त्यात बरेच भव्य स्तंभ असून, त्यांवर सुंदर नाजूक नक्षीकाम कोरलेले आहे. त्यांवर आणि छतावर प्रेक्षणीय मूर्ती कोरलेल्या दिसतात. छतावरील नागराज व गंधर्वयुग्म अत्यंत सुंदर आहेत. हिंदू शैल-मंदिरात सर्वत्र असे विलक्षण मूर्तिकाम आढळते. त्यातही केवळ शोभनात्मक शिल्पापेक्षा देवदेवता व गंधर्व-सुरसुंदरी यांच्या मूर्ती मुख्यतः दिसतात. वेलपत्ती, पशुपक्षी, विविध आकृतींची नक्षी यांचे कोरीव काम अगदी रेखीव व कलात्मक वाटते. या सर्व गुंफांतील स्तंभ अत्यंत प्रेक्षणीय आहेत.

महाबलिपुरम येथील वराहमंडप नावाचे लेणे हे विष्णुमंदिर असून, पल्लवशैलीचे उत्कृष्ट उदाहरण मानले जाते.

एकाच अखंड पाषाणात खोदून काढलेली संपूर्ण मंदिरे याच वर्गात येतात. महाबलिपुरमची रथमंदिरे त्याची सर्वोत्कृष्ट उदाहरणे होत. तिरुनेलवेली जिल्ह्यात कलुगुमैल येथे वेट्टुवाण-कोविल नावाचे मंदिर आहे. वेरूळच्या कैलास लेण्याप्रमाणेच हे मंदिरही डोंगराच्या उतारावरील खडकात खोदून काढलेले आहे. महाबलिपुरम येथील रथांसारखे ते अलग उभे नाही. त्याचे शिखर दुमजली द्राविड शैलीचे आहे. हे कैलासमंदिरापेक्षा लहान असले, तरी तितकेच चांगले वाटते.

मूर्तिकला – शिल्पकलेच्या या अंगाच्या विकासाविषयी श्री. म. श्री. माटे यांनी केलेले विवेचन असे –

हिंदू कलाप्रवाहाच्या आरंभीच्या खंडातील मूर्तिकामाचे त्या पूर्वीच्या आणि समकालीन बौद्ध मूर्तिकामाशी खूपच साम्य होते ही गोष्ट निर्विवाद होय. वर्ण्य विषयात काहीशी भिन्नता असली, तरी ती पूजामूर्ती व पुराण साहित्यातील कथा एवढ्या-पुरतीच मर्यादित आहे. एरवी ज्यांना कलात्मक रूपके म्हणता येईल, ती दोन्हींतही समानच होती. मूर्तिकामाचे तंत्र आणि सौंदर्याचे आदर्श याही बाबतीत बौद्ध म्हणजेच प्राचीन भारतीय परंपरेचा वारसा हिंदू कलाकारांनी पुढे चालविला. मूर्तिकलेचा उपयोग पूजामूर्ती घडविण्यासाठी निश्चितच होत असे. परंतु प्रायः सर्व भारतीय कलाकारांनी मूर्तिकलेचा उपयोग प्रामुख्याने वास्तु-शोभनासाठी केला आहे. हिंदू मंदिरशिल्प जसजसे विकसित होत गेले, तसतसा या कोरीव कामाला अधिकाधिक वाव मिळत गेला. संख्या आणि गुणवत्ता या दोन्ही दृष्टींनी पूर्वीपेक्षा अत्यंत श्रेष्ठ असे मूर्तिकाम होत गेले. परंतु बौद्ध पर-परेतून बाहेर पडून नव्या आशयाची यथार्थ अभिव्यक्ती होईल अशा पद्धती व तंत्रे निर्माण होण्यास स्वाभाविकच काही काळ जावा लागला. सामान्यपणे असे म्हणता येईल, की गुप्तकालीन भुमरा, देवगड, इ. ठिकाणचे मूर्तिकाम या संक्रमण काळाचे प्रातिनिधिक होय. बादामी, ऐहोळे, वेरूळ, महाबलिपुरम येथील मूर्तिकामात बौद्ध रूपके व शैली ही अधूनमधून डोकावतात. पण या चाकोरीतून ही कला बाहेर पडत आहे, हे स्पष्टपणे जाणवते. यापुढचा काळ आठव्या–नवव्या शतकांचा. वर्ण्य विषय, शैली व तंत्र या तीन्ही बाबतीत या काळातील मूर्तिकाम स्वतंत्र झालेले आहे. या काळात हिंदू मूर्तिकलेचे आदर्श निश्चित झाले आणि पुढे प्रगती झाली ती प्रादेशिक व कालिक अभिरुचीला अनुसरून त्या आदर्शांना अभिव्यक्ती देण्याचे बाबतीत.

गुप्तकालीन व कुशाणकालीन (मथुरा) बौद्ध मूर्तिकला व पहिल्या कालखंडातील हिंदू मूर्तिकला यांत फरक आहे, तो मूर्तिलक्षणांत आहे, सौंदर्यलक्षणांत नव्हे. मूर्तींची शरीरे थोराड आहेत. त्यांचे अवयव स्थूल असून, कोठेही स्नायूंच्या हालचाली-तला बारकावा टिपण्याचा प्रयत्न केलेला नाही. सर्व अंग नितळ, सपाट, क्वचित मृदूही भासते. स्त्रीशरीरेही अशीच पुष्ट व प्रौढत्वा-कडे झुकणारी आहेत. अशा तऱ्हेची शरीरे असणे हे सौंदर्यलक्षण होय, असे तद्विषयक ग्रंथांत सांगितले आहे. पुढच्या काळातील हिंदू मूर्तिकामात हा गुण किंवा अवगुण नेहमीच आढळतो. याला अपवाद फक्त मध्यभारत (चंदेल) व ओडिसा (कोणार्क) येथील अकराव्या-बाराव्या शतकांतील मूर्तिकामाचा आहे. शरीरसौंद-र्याच्या कल्पना जशा कायम राहिल्या, तशाच स्त्री–पुरुष मूर्तींच्या उभे राहण्याच्या वा बसण्याच्या अवस्थाही टिकून राहिल्या. सौंदर्याला वा काही अवयवांना उठाव येईल, अशा प्रकारे देवदेवता व यक्षयक्षी उभ्या आहेत.

अजंटाची मूर्तिकला ही बौद्ध कलाप्रवाहाची आणि वेरूळची मूर्तिकला ही हिंदू कलाप्रवाहाची प्रातिनिधिक मानली, तर दोन्ही ठिकाणच्या मूर्तिकामातील साम्याबरोबरच काही भेदही स्पष्टपणे नजरेत भरतात. वेरूळचे सर्व शिल्प हे जिवंत जोमदार

वाटते; तर अजंट्याचे शांत व कित्येकदा निःसत्त्व भासते.

कर्नाटक भागातील प्रारंभीच्या मूर्तिकामाचे अजंटा–वेरूळ येथील मूर्तिकामाशी बरेच साम्य आहे. ऐहोळे येथील हुच्चपय्या मंदिराच्या छतावरील विष्णुमूर्ती, दुर्गामंदिरावरील महिषासुरमर्दिनी व वृषवाहन शिव; बादामी गुंफेतील वामनावतार व नृसिंह विशेष उल्लेखनीय आहेत. बादामी गुंफांतील मूर्तींचे आकार प्रचंड आहेत. शेषाधिष्ठित विष्णू, तांडव नृत्य करणारा शिव, पृथ्वीला वर काढणारा वराह, बळीला पाताळात लोटणारा त्रिविक्रम. सगळेच अवाढव्य, जाड अवयवांचे, आणि सरळसोट हातपाय असणारे आहेत. या शिल्पांमध्ये दुर्गामंदिरावरील शिल्पात दिसणारी सफाई नाही; मात्र जोम निश्चित आहे. दोन्ही ठिकाणी असलेले नागराज आणि गंधर्व, तसेच पट्टदकलच्या मंदिरात स्तंभांच्या पायाशी असलेली जोडपी फार प्रेक्षणीय आहेत. आकाशगामी गंधर्वयुग्म ही मूर्ती सचेतन व गतिमान भासते.

तमिळनाडूतील मूर्तिकलेचा आरंभ पल्लव राजवंशाच्या काळात त्यांनी खोदवलेल्या शिलामंदिरात झाला. प. भारतातील कलापरंपरेवरून पल्लव कलाकारांनी स्फूर्ती घेतली, अशी समजूत सामान्यपणे रूढ आहे. पण ओडिसा, आंध्र व तमिळनाडू अशी पूर्व भारताची स्वतंत्र परंपरा असावी, असे समजणे जास्त सयुक्तिक वाटते. पल्लव मूर्तिकामाचे काही चांगले नमुने तिरुचिरापल्ली, भैरवकोंड व महाबलिपुरम येथील एकपाषाणी शैलगृहे यांत आढळतात. पल्लव कलाकारांच्या प्रतिभेची साक्ष पटते ती महाबलिपुरम येथील गंगावतरणाच्या शिल्पपट्टात.

वेरूळच्या लेण्यांत असंख्य सुंदर मूर्ती पाहायला मिळतात. मात्र तिथली चौदा क्रमांकाच्या गुंफेतील गजलक्ष्मी, दशावतार गुंफेतील नृसिंह, कैलास लेण्यातील कैलासोद्धार व डुमार लेण्यातील शिवपार्वतीविवाह ही शिल्पे त्यांतल्या त्यांत विशेष मनोरम वाटतात. तिथल्या सरितामंदिरातील यमुना देवीची मूर्ती ही भारतीय शिल्पकलेचा अत्यंत विलोभनीय आविष्कार वाटतो. तिच्या सिंहकटीचा बाक व मानेची मोडणी यांमुळे तिला विशेष डौल प्राप्त झाला आहे.

घारापुरी येथील त्रिमूर्ती जगद्विख्यात आहे. त्या प्रचंड मूर्तीची तीन्ही मुखे रेखीव आहेत, ओठ भावपूर्ण आहेत आणि मुखावर संतोषाची भावना दिसते.

उत्तर कालखंडात म्हणजे इ. स. च्या १० व्या शतकानंतर अगणित मूर्ती निर्माण झाल्या. त्या सर्वांत चंदेल राजवंशाच्या काळातील खजुराहो येथील मूर्तिकाम व पूर्वगंग घराण्याच्या काळातील कोणार्क येथील शिल्प अद्वितीय ठरते. शिल्पपरंपरेच्या प्रगतीचे ते अत्युत्कट बिंदूच आहेत. तंजाऊरच्या राजराजेश्वरमंदिराच्या गोपुरावरील नटराज व गंगैकोंडचोळपुरम येथील चंडेशानुग्रह या दोन मूर्ती द्राविड कलेची उत्कृष्ट उदाहरणे होत.

नागर शैलीच्या शिल्पकामात देवदेवता, मानव, ऋषीमुनी, गंधर्व–अप्सरा या सगळ्या मूर्ती मंदिराच्या वास्तुला अनुरूप अशाच घडविल्या आहेत. सामान्यपणे नागरमंदिरात उंचीला महत्त्व असल्याने बहुतेक मूर्ती उंच आहेत. त्या मूर्तींचे सौंदर्य मात्र त्यामुळे कमी झालेले नाही. उत्तरकालीन मंदिरांवर दिसणाऱ्या मूर्तिकामात स्त्रीसौंदर्य अनेक प्रकारे आविष्कृत झालेले दिसते. त्या मूर्ती अत्यंत कमनीय असून, त्यांची मुखे सुंदर आहेत. अलंकार व केशरचना यांत सफाई आहे. ग्यारसपूर येथे



वाग्देवी–धारा (परमार, इ. स. चे ११ वे शतक)

सापडलेली वृक्षदेवतेची मूर्ती भग्न असली, तरी तिचा चेहरा रेखीव व नाजूक दिसतो. शरीरही पुष्ट व प्रमाणशीर आहे. धारा येथे सापडलेली वाग्देवतेची मूर्ती अत्यंत डौलदार आहे.

डोक्यावरील मुकुट आणि हातापायांतील व गळ्यातील अलंकार शरीरसौष्ठवाला बाध आणीत नाहीत. या स्त्रीमूर्तीचे शरीर घाटदार असूनही त्यात मादकतेचा अंशही नाही. ग्यारसपूरच्या यक्षीपेक्षा ही वाग्देवी अगदी वेगळी आहे. कोणार्कच्या मंदिरातील सूर्यमूर्ती उत्तरकालीन देवमूर्तीचे एक उत्तम उदाहरण होय. हिरव्या दगडात घडवलेला हा सूर्यनारायण समभंग अवस्थेत उभा आहे. त्याचे शरीर अतिशय सुबक व घाटदार वाटते.

**धातुमूर्ती** – ब्रॉझ म्हणजे तांबे व कथील यांच्या संमिश्र धातूचा वापर भारतात मूर्तीसाठी क्वचितच केलेला आढळतो. तो धातू अशुद्ध असून, त्याच्या देवप्रतिमा घडवू नयेत, असे शास्त्रात सांगितले आहे. सामान्यपणे पितळेचा उपयोग बराच केला जात असे. सोने व रुपे यांच्या मूर्ती, करंडक, इ. वस्तू करीत. गुप्तकाळाच्या अंती देवमूर्तीसाठी अष्टधातू वापरण्याची प्रथा रूढ झाली. त्यात सोने, रुपे, लोह, कथील, शिसे, पारा, तांबे व जस्त हे धातू निरनिराळ्या प्रमाणात एकत्र केलेले असत. त्याच काळात द. भारतात पंचलोह हे द्रव्य वापरण्यात येऊ लागले. याला पंचरस असेही म्हणत. त्यात सोने, रुपे, तांबे, शिसे व पितळ या धातूंचे मिश्रण केलेले असे.

धातूच्या मूर्ती व अन्य वस्तू तयार करण्याच्या, ओतीव व घडीव अशा दोन पद्धती आहेत. भारतीय धातुमूर्ती बहुंशी ओतीव असतात. भारताच्या निरनिराळ्या भागांत बुद्ध, शिव, विष्णू, इ. देवतांच्या भिन्न भिन्न पद्धतीच्या मूर्ती बऱ्याच आहेत. त्या निर्माण करणाऱ्या कलाकारांचे कौशल्य प्रशंसनीय आहे. त्यांचे अनेक संप्रदाय होते. निरनिराळ्या संप्रदायांच्या मूर्ती वेगळ्या प्रकारच्या दिसतात.

**वास्तुशोभन** – मंदिरांच्या सजावटीत देवता, यक्ष, गंधर्व, विद्याधर यांच्या मूर्तीप्रमाणेच गज, सिंह, इ. पशू; हंस, मयूर इ. पक्षी; सर्प, विविध प्रकारच्या वेली आणि निरनिराळ्या आकृती यांचा उपयोग केलेला असतो. पीठे, भिंती, तुला यांवर अखंड पट्टे असतात, त्यांत लहरीदार वेल व त्यांच्या तरंगांत मध्येच कुठेतरी यक्षगण किंवा सर्प दिसतात. वेलींचे आरोह–अवरोह आणि त्यांतून फुटणाऱ्या धुमाऱ्यांच्या व फुलांच्या देठांच्या आडव्या–उभ्या रेषा यांमुळे या रूपकाला विलक्षण गतिमानता प्राप्त होते. चौकटीत व गोल तबकात कडेला कळ्या किंवा फुले कोरून मधल्या भागात मिथुने कोरलेली असतात. स्तंभांवर लहान पट्टे व तबके असून, त्यांत पुष्पहार किंवा मुक्तामाला दिसतात. वेरूळच्या लेण्यांतील काही स्तंभांवर अशा मुक्तामाला इतक्या कौशल्याने कोरलेल्या आहेत, की त्या वाऱ्याच्या झुळुकेने हालू लागतील असे वाटावे. तुलाभारांच्या सजावटीसाठी वापरलेले एक उल्लेखनीय रूपक म्हणजे भद्र व शाला या वास्तुप्रकारांच्या लहान प्रतिकृती होत. गज व व्याल यांचा उपयोग मुख्यतः पीठाच्या पट्टावर केलेला असतो. वेरूळच्या कैलास मंदिरात हे प्राणी बहुतेक पूर्णाकार दिसतात. हत्तीच्या मूर्ती भारतीय कलाकारांनी अगदी वास्तवपूर्ण घडवल्या आहेत. त्याच्या प्रत्येक हालचालीतले चापल्य त्यांत स्पष्ट दिसते.

चैत्य–गवाक्ष–तोरण या परंपरागत रूपकाचा उपयोग हिंदू मंदिरांवर विविध प्रकारे केलेला आहे. पीठाच्या शिरोभागी असणाऱ्या कपोताकार थरावर चैत्यगवाक्षमाला दिसतात. देवकोष्ठांच्या माथ्यावरील त्रिकोणिका चैत्यतोरण व त्या तोरणांचे खंड यांतूनच बनवलेल्या असतात. शिखरांवरही याच मूळ रूपकाची व त्यापासून तयार केलेल्या जालकांची योजना केलेली आहे. असे दुसरे पारंपरिक रूपक म्हणजे पूर्णकलश हे होय. कार्ले, नासिक, इ. ठिकाणी स्तंभांच्या बुडाशी असणारे घट काही कालाने स्तंभांच्या मध्यभागी कोरण्यात येऊ लागले. पल्लवयुक्त कुंभ भरहूत येथील शिल्पकामात वापरलेले दिसतात. ते विपुलतेचे प्रतीक मानले जाते. वेरूळच्या काही लेण्यांतील स्तंभांवरील कलश पूर्णाकार व घाटदार आहेत. त्यांतून बाहेर पडणारी पल्लवी नयनमनोहर आहे. द्राविड शैलीच्या मंदिरांत मकरतोरण हे रूपक नेहमी वापरलेले आढळते. त्यात अर्धस्तंभांवर बसलेल्या मकरांच्या मुखातून निघालेल्या वेलींचे तोरण बनवलेले असते. पट्टदकल येथील मंदिरांतील मकरतोरणे अत्यंत सुंदर आहेत.

शिल्पकलेच्या विविध अंगांची माहिती या कोशात निरनिराळ्या नावाखाली दिलेली आहे. पाहा – अजंटा, अमरावती, आमलक, उदयगिरी, ऐहोळ, कमान, कला, कार्ले, खजुराहो, गवाक्ष, गुप्त राजवंश, घुमट, चालुक्य राजवंश, चित्रकला, चैत्यगृह, चोळ राजवंश, जैन कला, तोरण, देवालये, पट्टदकल, पल्लव राजवंश, पाल राजवंश, बादामी, बौद्ध कला, भरहूत, भाजे, मथुरा, मूर्तिकला, राजप्रासाद, राष्ट्रकूट राजवंश, लेणी, वास्तुविद्या, विहार, शिखर, सांची, सारनाथ, स्तंभ, स्तूप, होयसळ राजवंश. [स्ट. वा. वि.; प्राचीन भारतीय कला : इतिहास आणि रूपदर्शन, श्री. रा. शं. वाळिंबे, १९५९; प्राचीन भारतीय कला–प्रा. म. श्री. माटे, १९७४; रूपसौंदर्य ]

## शिव

(१) ब्रह्मा–विष्णु–महेश या त्रिमूर्तीतला एक देव. तमोगुणी. प्रलयकाली सृष्टीचा संहारक. आशुतोष म्हणजे थोड्या कालात संतुष्ट होणारा. कैलासावर वास्तव्य. पार्वती ही त्याची अर्धांगी होय. गजानन व षडानन हे पुत्र, नंदी हे वाहन आणि भैरवादी गण हे सेवक होत.

**शिव शब्दाच्या अर्थाचा विचार** – शिव म्हणजे मंगलमय, कल्याणस्वरूप सदाशिव तत्त्व. त्यालाच परमात्मा किंवा आदिशिव असेही म्हणतात. जन्ममरणादिरूप कोणत्याही विकाराचा त्याला तिळमात्रही स्पर्श नाही. त्रिविध दुःखांपैकी कशाचाही लवलेश नाही. वश् या धातूपासून वर्णव्यत्यासाने शिव शब्द निष्पन्न झाला आहे. वश् धातूचा एक अर्थ प्रकाशणे असा आहे. त्यावरून जो प्रकाशतो तो शिव असे म्हणायचे. शिव हा स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश आहे. तो स्वतः प्रकाशित राहून विश्वालाही प्रकाशित करतो.

शिव हा अखिल भारतात सर्व जातीजमातींना पूज्य असा महादेव आहे. विष्णूपेक्षा शिवाचे क्षेत्र खूप व्यापक आहे. वैदिकांचा रुद्र, द्रविडांचा शिव आणि अनेक जातीजमातींचा तत्सदृश देव यांचा गुणकर्मसमन्वय होऊन सांप्रतचा पौराणिक शिव आकाराला आला आहे.

**रुद्र शिव** – वैदिक आर्यांना शिव माहीत नव्हता. त्यांना ठाऊक होता तो रुद्र. ऋग्वेदात रुद्र ही मध्यम श्रेणीची देवता आहे. केवळ पूर्ण तीन सूक्ते त्याच्या वाटचाला आली आहेत. त्याचा वर्ण भुरा, गोरा किंवा सोनेरी मानलेला आहे. त्याचे विशेष शस्त्र म्हणजे धनुष्य–बाण. त्याचे बाण पशू व मनुष्य या दोघांनाही संहारक ठरतात. तो जटाधारी आहे. त्याच्या सौम्य रूपात तो महान वैद्य असून, त्याच्याजवळ अनेक औषधे असतात.

वेदातले त्याचे आणखी एक महत्त्वाचे विशेषण म्हणजे वृषभ हे होय. हा शब्द वृष् धातूवरून बनला आहे. वृष्टी करणारा आणि अत्यधिक प्रजननशक्ती असलेला, असे त्याचे दोन अर्थ होतात. सांप्रत वृषभ शब्द बैल या अर्थाने प्रयुक्त होतो. त्याचे कारण बैलाच्या ठिकाणी प्रजननशक्ती विशेष असते, असे मानले गेले आहे. गायींच्या कळपात एक बैल असला तरी तो सगळ्या गायींना फळवतो, हे माणसांनी पाहिले आहे.

अथर्ववेदात रुद्राचे पुरुषरूप ऋग्वेदाहून अधिक विकसित झाले आहे. ऋग्वेदात मरुत् हे रुद्राचे पुत्र आहेत, तर अथर्ववेदात ते त्याचे अनुचर झाले आहेत. वैदिक आर्यांना रुद्राच्या उग्र रूपाचे भय वाटत असे. पण अथर्ववेदाच्या काळात त्याच्याविषयी सर्वसामान्य जनतेला श्रद्धा आणि आदर वाटत असलेला दिसतो. अथर्ववेदात त्याला सहस्राक्ष (हजार डोळ्यांचा) असेही म्हटले आहे. ऋग्वेदात सहस्राक्ष ही वरुणाची उपाधी आहे. वरुण आपल्या सहस्र नेत्रांनी मानवांची भलीबुरी कृत्ये पाहतो आणि दुर्वर्तनी लोकांना आपल्या पाशांनी बद्ध करतो. नंतर रुद्राला ही उपाधी दिली गेली त्यावरून अथर्ववेदाच्या काळापर्यंत रुद्र हा प्राणिमात्रांच्या वर्तनावर नजर ठेवणारा नीतिसंरक्षक देव असल्याची कल्पना सर्वमान्य झाली होती, असे दिसते.

रुद्राच्या विकासप्रक्रियेचा हा प्रारंभ समजायला हरकत नाही. या संदर्भात डॉ. यदुवंशी पुढीलप्रमाणे विवेचन करतात–

अथर्ववेदातली विकासप्रक्रिया हळूहळू वाढत गेली आणि तिच्यातूनच शेवटी पौराणिक शिवाचे स्वरूप पूर्णपणे विकसित झाले. या विकासात वैदिक रुद्राने अनेक गौण किंवा जातीय देवतांना आपल्यात सामावून घेतले. अथर्ववेदात भव आणि शर्व अशा दोन देवता दिसतात (११.२.१; १२.४.१७). त्यांचे व्यक्तित्व स्पष्ट नसले, तरी त्या स्वतंत्र देवता होत्या. पण अथर्ववेदातच त्यांचे रुद्राशी तादात्म्य झाले आणि भव व शर्व ही रुद्राचीच नावे बनली. कोणत्या तरी मोठ्या देवाने काही छोटे देव आत्मसात करून घेणे, ही गोष्ट दैवतशास्त्राच्या इतिहासात अनेकवार दिसून येते. जगातल्या सर्व दैवतकथांमध्ये अशी उदाहरणे विपुल आढळतात. वैदिक रुद्रही असाच अनेक छोट्या देवतांना आत्मसात करून वाढला आहे.

**व्रात्यांचा महोदेव** – अथर्ववेदाचे पंधरावे कांड हे व्रात्यकांड म्हणून प्रसिद्ध आहे. त्यात रुद्राचा व्रात्यांशी घनिष्ठ संबंध दाखवला आहे. यजुर्वेदाच्या रुद्राध्यायातही रुद्राला व्रातपती म्हटले आहे. अथर्ववेदाच्या काळी व्रात्यसमाज पूर्व भारतात विशेष बलवान होता. तो संस्कृतिसंपन्नही होता. त्यांच्यामध्ये शूर लढाऊ लोक होते, तसेच योगमार्गाने ध्यानधारणा करणारे विद्वान लोकही होते (व्रात्य पाहा). या व्रात्यांची संस्कृती आर्यांच्या यज्ञप्रधान संस्कृतीहून अगदी भिन्न होती. नीती व अध्यात्म यांना तिच्यात विशेष प्राधान्य होते.

वैदिक आर्यांचा जेव्हा यः व्रात्यांशी संपर्क आला, तेव्हा त्यांना वाटले, की या व्रात्यांना आपल्या संस्कृतीत समाविष्ट करून घ्यावे. उलटपक्षी व्रात्यांनाही आर्यसंपर्क उपयुक्त वाटला. मग व्रात्यांना समाविष्ट करून घेण्यासाठी आर्यांनी व्रात्यस्तोम नावाचा एक विधी निर्माण केला. हे व्रात्य ज्या एका देवाची उपासना करीत होते, त्याचे नाव महोदेव असे होते. हा महोदेव रुद्राला अगदी जवळचा होता आणि रुद्राहून त्यांच्या जीवनात खोलवर प्रविष्ट झालेला होता. वैदिक संस्कृतीत योग हा मोक्ष मार्ग म्हणून प्रविष्ट झाला, तो या व्रात्यांच्याच संपर्कामुळे. व्रात्यांचा हा महोदेव योगमार्गी किंवा योगसिद्ध होता, हे उत्खननातून मिळालेल्या काही मुद्रांवरून दिसून येते. अशा मुद्रा मोहेंजोदडो येथील उत्खननात मिळाल्या आहेत. त्यावरून सिंधु संस्कृतीचे लोकही व्रात्यच होते, असे काही संशोधक म्हणतात. पुराणकारांनी शिवाचे हे यौगिक रूप उचलले आणि त्याला योगमार्गाचा प्रणेता असेही म्हटले.

कालिदासानेही शिवाला एक महायोगी या स्वरूपा

पाहिले व त्याचे योगध्यान पुढील श्लोकात वर्णिले —

पर्यङ्कबन्धस्थिरपूर्वकायं ऋज्वायतं सन्नमितोभयांसम् ।
उत्तानपाणिद्वयसन्निवेशात् प्रसन्नराजीवमिवाङ्कमध्ये ॥

भावार्थ — शिव पर्यंकबंध आसन घालून बसला आहे. त्याची छाती व मान ताठ आहे. पाठीचा कणा सरळ रेषेत आहे. त्याचे बाहू किंचित खाली आलेले आहेत. त्याच्या मांडचांवर दोन्ही हात उताणे आहेत. त्यामुळे त्याच्या मांडचांमध्ये जणू दोन कमळेच उमलली आहेत असे वाटते.

पशुपती — हे रुद्राचे एक आणखी विशेषण. तेच पुढे शिवालाही लागू झाले. अथर्ववेदात म्हटले आहे, की 'व्रात्य (व्रात्यांचा महादेव) पशूंकडे गेला. त्याने रुद्ररूप धारण केले आणि ओषधींना अन्नसेवी बनवले. विभिन्न दिशा व विभिन्न पदार्थ यांच्याकडे जात असता त्याने अन्य देवतांचेही रूप धारण केले.' जातीजमातींच्या अनेक देवांना पोटात घेऊन रुद्र वाढला, या गोष्टीला वरील विधान पुष्टी देते.

यज्ञात आहुती म्हणून रुद्राला पाच प्राणी समर्पित केले जात आणि त्यांत एक मनुष्य असे, असे वर्णनही अथर्ववेदातच आढळते. त्यावरून त्या काळी रुद्राला नरबलीही देत असत, असे वाटते. जरासंध नरबली देऊन शिवाला संतुष्ट करू पाहत होता, ही महाभारतातली कथा पूर्वापर चालत आलेल्या नरबलिप्रथेचीच द्योतक मानतात.

यजुर्वेदात त्र्यंबकहोम आणि शतरुद्रिय असे दोन अनुवाक आहेत. त्यांवरून रुद्राच्या एका वेगळचाच रूपाचा परिचय होतो. त्र्यंबकहोम हा एक विशेष याग आहे. त्यात रुद्राला त्याचा यज्ञभाग देऊन झाल्यावर 'तू मूजवत पर्वतावर निघून जा' अशी त्याची प्रार्थना केली जात असे. मूजवत हा भारताच्या उत्तरेचा पर्वत होता. या प्रार्थनेवरून कळते, की वैदिक आर्य रुद्राला शक्य तितके दूर ठेवण्याचा प्रयत्न करीत.

अथर्ववेद आणि यजुर्वेद यांच्या मधल्या काळात कोण्या एका पर्वतवासी देवतेचे रुद्राशी तादात्म्य झाले असावे, हेही त्र्यंबकहोमावरूनच कळून येते. ही देवता हिमालयाच्या तराईत वास्तव्य करणाऱ्या कोण्या आदिवासी जमातीची देवता असावी. पौराणिक काळात शिवाचा किरातांशी संबंध दाखवलेला आहे. शिव हा प्रसंगी किरातवेष घेऊन गिरिकंदरात भटकतो, असे पुराणकार म्हणतात. दैवी शस्त्रास्त्रांच्या प्राप्तीसाठी हिमालयात तप करणाऱ्या अर्जुनाला शिव किरातवेषातच भेटला आणि अर्जुनाशी युद्ध करून त्याची बलपरीक्षा पाहिल्यावर त्याने अर्जुनाला पाशुपतास्त्र दिले, अशी कथा महाभारताच्या वनपर्वात आहे.

आर्यांचा पहिला संपर्क हिमालयात राहणाऱ्या किरात, निषाद, इ. आर्येतर जमातींशीच आला असणे संभवनीय आहे. कारण आर्यांनी व्यापलेल्या सप्तसिंधूंच्या प्रदेशाला हिमालय अगदी जवळचा आहे. शतरुद्रियावरून हे अनुमान निष्पन्न होते.



सप्तस्वरमाया शिव — वेरूळ

रुद्राला शिव, शिवतर, शंकर, ही कल्याणकारी नावे पहिल्याप्रथम शतरुद्रियातच दिलेली आढळतात. हा शिव गिरिशत, गिरित्र, गिरिशय, गिरिचर, इ. होता हेही तिथेच कळते. पौराणिक शिवाची केदार, श्रीशैल, त्र्यंबक, अमरनाथ, भीमाशंकर, इ. महत्त्वाची क्षेत्रे वेगवेगळ्या पर्वतांवर आहेत, याचे कारण मूळ पर्वतवासी जनांचा कोणीतरी उपास्य देव पुढे शिवाशी तादात्म्य पावला, हे आहे. रुद्राध्यायात रुद्राला स्तेन, कुलुंच, तस्कर, स्तायू, विकृंत, आरण्य, इत्यादींचा पती म्हटले आहे. हे लोक समाजाला उपद्रव देणारे होते; पण ते शिवाचे उपासक होते. पुराणांत हेच रानटी गण शिवाचे अनुचर ठरले आहेत. पुराणांतले शिवगणांचे वर्णन ते लोक रानटी, पहाडी असावे हेच सूचित करते. 'वनानां पती' ही रुद्राची आणखी एक

उपाधी आहे. ती त्याचा वन्य जमातींशी संबंध सूचित करते.

शतरुद्रियातच रुद्राची सहचरी असलेल्या एका देवतेचा उल्लेख येतो. तिचे नाव आहे अंबिका. ती रुद्राची बहीण असल्याचे म्हटले आहे. प्रथम बहीण असलेली ही अंबिका सतत्च्या साहचर्याने पुढे सती व पार्वती या विकसित रूपांत शिवाची अर्धांगी बनली. त्यापुढच्या शाक्त मताच्या तंत्रात ती स्वतंत्ररूपाने उपास्य ठरली.

रुद्राला त्र्यंबक हे नवे नाव यजुर्वेदातच मिळाले आहे. पौराणिक शिवाच्या रूपमंडनात या नावाला विशेष महत्त्व आहे. वैदिक साहित्यात ‘अंब’ या शब्दाचा अर्थ पिता असा आहे. त्यावरून त्र्यंबक म्हणजे तीन पित्यांचा पुत्र ठरतो. वेदात असा एकच देव आहे आणि तो म्हणजे अग्नी होय. पृथ्वी, आकाश व द्यू ही ती तीन अग्नीची पितृस्थाने होत. वेदातच काही ठिकाणी अग्नी व रुद्र यांचे तादात्म्य सांगितले आहे. या तादात्म्यावरूनच त्र्यंबक ही उपाधी पुढे अग्नीकडून रुद्राकडे गेली. कालांतराने अंब शब्दाचा मूळ वैदिक अर्थ लोक विसरले आणि अंब म्हणजे डोळा हा लौकिक नवा अर्थ त्या नावाला चिकटला आणि तीन पित्यांचा रुद्र हा तीन डोळ्यांचा शिव बनला. पुराणकार सांगतात, की शिवाचे दोन डोळे हे माणसासारखे असून, तिसरा डोळा भालप्रदेशी आहे. तो सदैव मिटलेला असतो आणि संहारकालीच तो उघडतो. मदनदहनाच्या वेळी शिवाचा हा तृतीय नेत्र उघडला होता आणि त्यातून निघालेल्या आगीच्या लोळाने मदनाची जळून राख झाली होती. या ‘त्र्यंबक’ नावावरून शैव पुराणांत अनेक कथांची निर्मिती झाली आहे.

अशा प्रकारे ब्राह्मणग्रंथांच्या काळापर्यंत रुद्र ही आर्य धर्मातली एक प्रधान देवता बनली. पौराणिक शिवाचे स्वरूप आणि उपासनेचे प्रमुख अंश वैदिक रुद्राच्या स्वरूपातून आणि उपासनेतूनच स्वीकारले गेले आहेत. खुद्द शिव हे सौम्य, कल्याणप्रद नाव यजुर्वेदातूनच आले आहे. नीलग्रीव हे वैदिक विशेषण पुढे पौराणिक शिवाच्या हालाहलप्राशनाशी संबद्ध झाले. कपर्दी व केशी ही रुद्राची विशेषणे विचारात घेऊनच पुराणांतील शिवाच्या जटाधारी स्वरूपाची कल्पना केली गेली.

केशी हे जटादाढी वाढवणारे मुनी होते. आर्यांप्रमाणे त्यांचा धर्म यज्ञप्रधान नव्हता. ते आर्यकक्षेच्या बाहेर होते. वेदात या केशी मुनींचा रुद्राशी संबंध दाखविलेला आहे. ते वीतराग असत व योगमार्गाने आत्मसाधना करीत. त्यांच्यावरूनच पौराणिक शिवाचा योगाशी संबंध जुळवला गेला आणि शिव हा महायोगीच नव्हे; तर योगमार्गाचा प्रवर्तक ठरला.

रुद्राचा उत्तरेकडील पर्वतात निवास होता, अशा उल्लेखांवरून कैलास हे शिवाचे निजधाम ठरले. शतरुद्रियातले रुद्रधनुष्याचे पिनाक हेच नाव पुढे शिवाच्या धनुष्यालाही लागू झाले.

पण पौराणिक शैव धर्माचे काही अंश असे आहेत, की त्यांचा उगम वैदिक रुद्राच्या उपासनेत सापडत नाही. असा एक प्रमुख अंश म्हणजे शिवाची लिंगरूपात पूजा. ही लिंगपूजा फार प्राचीन असून, तिचे अवशेष सर्व जगात आढळतात. लिंगपूजा ही प्रथम पुरुषाच्या जननेंद्रियाशी संबद्ध होती. तिच्या जोडीने स्त्रीच्या जननेंद्रियाचीही पूजा प्रचलित होती. भग-लिंग ही दोन जननेंद्रिये प्राणिसृष्टीच्या उत्पत्तीला कारणीभूत ठरतात, हे जाणून आदिम मानवसमाजांनी त्या दोन्ही इंद्रियांना पूज्यत्व दिले असावे. पण तरीही फक्त शिवाचीच पूजा लिंगरूपात का, हा प्रश्न उरतो. त्याचे संभाव्य उत्तर असे-



शिवलिंग (पुरुष – विग्रह), गुडिमल्लम

जेव्हा मूर्ती आणि मंदिरे यांची निर्मिती झाली नव्हती, अशा त्या प्राचीन काळी लोक आपापल्या उपास्याची पूजा कोणत्या तरी प्रतीकाच्या आधारे करीत. ही प्रतीके मुख्यत्वे पाषाणाची असत. उपासक आपल्या प्रतीकाला विशिष्ट आकार देत आणि त्याला पूजोपचार समर्पित. त्यात लिंगाच्या आकाराचे पाषाण हे शिवाचे प्रतीक ठरले. वैदिक रुद्र हा संहारक आणि भयकर्ता होता. पण आर्येतर सर्व जातीजमातींचा उपास्य असलेला शिव हा निर्माणकर्ता होता, जगताचा उत्पादक होता. भूमीची सुपीकता आणि उपजाऊ शक्ती यांच्याशी त्याचा घनिष्ठ संबंध होता. सारी मानवसृष्टी शिवनिर्मितच आहे, अशी त्याचे प्रती जनतेची धारणा होती. अर्थात तिला अनुरूप असे त्याचे प्र

प्रजोत्पादक पुरुषलिंगापेक्षा अन्य कोणते असू शकेल !

सिंधुसंस्कृतीच्या उत्खननात या गोष्टीला पुरावा मिळाला आहे. तिथे सापडलेल्या एका खापरावर त्रिमुख देवाची पूर्णाकृती उमटवलेली असून, ती ऊर्ध्वमेढ्र ( उत्थित लिंग असलेली ) दाखवली आहे. या आपल्या उपास्य देवाची पूजा ते लिंगरूपात करीत असत, हे त्यावरून आणि अन्यही काही अवशेषांवरून कळते. वैदिक आर्य 'शिश्नदेव' ( लिंगपूजक ) म्हणून ज्यांची निर्भर्त्सना करीत, ते हेच सिंधुसंस्कृतीचे लोक होत, असे संशोधक सांगतात. या लोकांचा हा शिश्नदेव त्रिमुख होता व ऊर्ध्वमेढ्र होता हे लक्षात घेतले म्हणजे तो पौराणिक शिवाचे पूर्वरूप होता, असे समजायला हरकत नाही. त्या लोकांच्या घनिष्ठ संपर्कात आल्यावर ऋग्वेदाच्या उत्तर कालात आर्यांनी लिंगोपासना स्वीकारली. पण थोड्याच काळात त्यांनी तिचे मूळ स्वरूप पार बदलून टाकले. पूर्वीचे त्या उपासनेतले जननेंद्रियविषयक आचार व उपचार हळूहळू त्यांनी बदलले. इतकेच नव्हे; तर लिंग म्हणजे पुरुषाचे जननेंद्रिय ही धारणाही सामान्य जनांच्या मनातून घालवून टाकली. वेदोत्तर काळात लिंगाचे शिश्नरूप शिल्लक राहिले नाही. ते एक प्रतीक म्हणूनच राहिले व वेदमंत्रांनी पावन झाले.

ब्राह्मणग्रंथांत रुद्राचे जे उन्नयन झाले, त्याला उपनिषद्कारांनी पुष्टी दिली. श्वेताश्वतर उपनिषदात रुद्र हा महेश्वर, शिव, ईशान, इ. नावांनी प्रतिष्ठित झाला. त्या उपनिषदात स्रष्टा, ब्रह्म, परमात्मा, इ. उपाधींनी गौरवून त्याला परमोच्च पदवीला नेले आहे. श्वेताश्वतरातले एतद्विषयक मंत्र असे—

सूक्ष्मातिसूक्ष्मं कलिलस्य मध्ये विश्वस्य स्रष्टारमनेकरूपम् ।
विश्वस्यैकं परिवेष्टितारं ज्ञात्वा शिवं शान्तिमत्यन्तमेति ।।

(श्वेता. ४.१४)

अर्थ – सूक्ष्माहून सूक्ष्म, हृदयरूप गुहास्थानी राहणारा, विश्वाचा उत्पत्तिकर्ता, अनेकरूप, विश्वाला व्यापून उरणारा, अशा शिवाचे ज्ञान झाल्यावर (मनुष्याला) अत्यंत शांती मिळते.

सर्वाननशिरोग्रीवः सर्वभूतगुहाशयः ।
सर्वव्यापी स भगवान् तस्मात्सर्वगतः शिवः ।।

(श्वेता. ३.११)

अर्थ – सर्वत्र मुखे, मस्तके व कंठ असणारा, सर्व भूतांच्या हृदयात राहणारा, सर्वव्यापी असा तो शिव भगवान म्हणूनच सर्वगत आहे.

उपनिषद्ग्रंथांत रुद्र-शिव हा दार्शनिक विचारधारेच्या संपर्कात आला आणि रुद्रांच्या प्राचीन स्वरूपात विलक्षण परिवर्तन झाले. उपनिषत्कालात भक्ती या स्वतंत्र मोक्षसाधनाचा प्रादुर्भाव झाला आणि विष्णू व शिव हे या भक्तिवादाचे प्रमुख आराध्य देव बनले. ईश्वरावर नितांत निष्ठा आणि ईश्वराच्या कृपेने मोक्षप्राप्ती, हे भक्तिवादाचे मूळ सिद्धान्त होत. त्यांच्या प्रभावामुळे रुद्राच्या स्वरूपातला प्राचीन भयावह अंश पार विस्मृत झाला आणि त्या जागी त्याचे सौम्य, प्रसन्न आणि दयावंत रूप पुढे आले. उपनिषत्कालात रुद्र हा खऱ्या अर्थाने शिव (कल्याण-मंगलप्रद) बनला.

रामायणात रुद्राचे हे शिवरूप विशेष दृढ व सर्वसंमत झाले. रामायण हा मुख्यत्वे वैष्णव ग्रंथ आहे. पण त्यात जिथे जिथे शिवाचा संबंध आला, तिथे तिथे त्याला सर्वश्रेष्ठ देव मानले गेले.

रामायणात शिवाचे आणखी एक वैशिष्ट्य दिसते, ते असे— शिवाची उपासना केवळ मानवच करीत नसून, देव आणि दानवही ती करतात. शिव हा देव, मानव, दानव या सर्वांचा प्रभू आहे. रावण हा दैत्य परम शिवभक्त होता. बाणासुरासारख्या अनेक दैत्य-दानवांनी शिवासाठी उग्र तप करून त्याच्याकडून वरदान मिळवले. विद्युत्केश दानवाला तर पार्वतीने दत्तक घेतले होते आणि शिवाने त्याला वरदान दिले होते. देवांनी प्रार्थना केली तरी शिवाने दानवसंहाराचे कृत्य नाकारले (वा. रा. उत्तर. १६.३४, ४.२९; ६.३).

या बाबतीत विष्णू शिवाच्या अगदी विरुद्ध आहे. विष्णूने कोणत्याही दानवाला वर दिला नाही, की कोण्या दानवाने विष्णूसाठी तप केले नाही. शिवाने देवांची प्रार्थना नाकारली, तेव्हा विष्णूने असुरसंहाराचे कार्य स्वतःच्या शिरावर घेतले.

महाभारतात शिवाचे स्वरूप आणि त्याची उपासना यासंबंधी रामायणापेक्षा अधिक माहिती मिळते. तिथे शिवाचे एक दार्शनिक आणि दुसरे लोकप्रचलित असे उभयविध रूप दृष्टोत्पत्तीस येते. दार्शनिक रूपात शिव हा परब्रह्म आहे, असीम आहे, विश्वस्रष्टा आणि विश्वसंहर्ता आहे. श्वेताश्वतर उपनिषदात शिवाच्या ज्या दार्शनिक स्वरूपाची अभिव्यक्ती झाली, तिची महाभारतात परिपूर्णता झाली.

शिवाच्या या तात्त्विक स्वरूपाबरोबरच म. भा. मध्ये त्याचा सांख्य दर्शनाशी संबंध दाखवला आहे. शिव स्वतः सांख्य आहे. तो सांख्यदर्शन स्वतःच स्वतःच्या ठिकाणी जाणतो. जे लोक सांख्य सिद्धान्तांचे विशेष ज्ञानी आहेत, ते शिवाची प्राप्ती करून घेऊन मोक्ष मिळवतात, असे महाभारतात म्हटले आहे.

शिवाचा योगदर्शनाशी जो संबंध आहे तोही त्याच्या दार्शनिक रूपाचेच एक अंग आहे. 'शिव हा योग्यांचा परम पुरुष आहे, तो स्वतः महायोगी आहे,' असे महाभारतात म्हटले आहे (द्रोण. ७४.४१; ५०.४३).

महाभारतातले शिवाचे लौकिक रूप याहून निराळे आहे. अनेक रानटी, पहाडी जातीजमातींनी आपल्या कल्पनेप्रमाणे

घडवलेले शिवाचे रूप तिथे कापालिक या नावाने दाखवले आहे. सामान्य, असंस्कृत जनांना त्याचे हेच रूप प्रिय व पूज्य होते. या रूपात शिवाचा शाकिनी, डाकिनी, भूत, प्रेत, पिशाच, वेताळ, इ. भूतयोनींशी संबंध होता. महाभारतातल्या या लोकप्रिय शिवाचे वर्णन पुष्पदंताने संक्षेपात केले आहे, ते असे –

**श्मशानेष्वाक्रीडा स्मरहर पिशाचाः सहचराः**
**चिताभस्मालेपः स्रगपि नृकरोटीपरिकरः ।**
**अमङ्गल्यं शीलं तव भवतु नामैवमखिलं**
**तथापि स्मर्तॄणां वरद परमं मङ्गलमसि ॥**

भावार्थ – हे मदनदहना, शंकरा ! तुझा निवास श्मशानात आहे. तुझ्या भोवती भूत–पिशाचांचा गराडा आहे. तुझ्या हाती नरकपाल आहे. गळयात नररुंडांच्या माळा आहेत. अंगाला चिताभस्माचा लेप आहे. असा तू सर्वार्थी अमंगळ; पण भक्तांचे मात्र तू सदैव मंगल करतोस.

शिवाचे हे कापालिक रूप होय. याच्याइतकेच जनमानसातले त्याचे प्रिय रूप म्हणजे किरातरूप. या रूपात तो गजचर्म पांघरतो. त्याला मद्य प्रिय असते. तो विविध क्रीडा-विलासांत रत असतो. त्याच्या भोवती हजारो स्त्रियांचा गराडा असतो. त्याच्यापुढे भूतगण हसत, नाचत असतात. भगवती उमाही त्याच्या बरोबर त्याच वेषात असते.

शिवाच्या याच विलासप्रिय रूपाविषयी एक कथा ब्रह्मांडपुराणात दिली आहे, ती अशी –

एकदा शिव ऋषींच्या आश्रमभूमीत गेला. तो पूर्णपणे नग्न होता. त्याचे केस विखुरलेले होते. वनात प्रवेश करताच तो उन्मुक्तपणे गाऊ–नाचू लागला. ते पाहून आश्रमातल्या ऋषिस्त्रिया त्याच्यावर मुग्ध झाल्या. त्या शिवाकडे जाऊन त्याच्या त्या उन्मत्त नृत्यात सहभागी बनल्या. आश्रमातल्या ऋषींना आपल्या बायकांचे हे चाळे आवडले नाहीत. पण तरीही ते त्यांना आवरू शकले नाहीत. मग ते शिवालाच शिव्याशाप देत आपले गाऱ्हाणे घेऊन ब्रह्मदेवाकडे गेले. ब्रह्मदेव त्यांना म्हणाला. 'तो कामोन्मत्त पुरुष सामान्य नाही. तो साक्षात महादेव आहे. तुम्ही त्याची निंदा करू नका आणि त्याला शिव्याही देऊ नका.' मग ऋषींना आपली चूक कळून आली आणि त्यांनी शिवाची स्तुती केली (ब्रह्मांडपु. १. २७).

एका काळी काश्मिरात शिवाचे हे विलासी, नृत्यप्रिय रूप उपासनेचा विषय होते. नीलमतपुराणात सांगितले आहे, की 'कृष्ण चतुर्दशीच्या रात्री काश्मीरी शैव शिवाची विशेष पूजा करतात. त्या दिवशी गाऊन नाचून रात्र जागवतात. आणि त्या प्रसंगी गणिकांसह रतिविलास करतात.'

शैव धर्माच्या उत्कर्षकालात शिवाचे हे विलासी रूप हळूहळू लुप्त झाले. फक्त नृत्याशी तेवढा शिवाचा संबंध कायम राहिला. शिवाच्या त्या नर्तक रूपाचा विकास होता होता



शिव-नटराज कांस्यमूर्ती, चोळ-युग

शिवाची नटराज ही मूर्ती निर्माण झाली. संध्यासमयी शिव सदैव तांडव नृत्य करतो, असे कालिदासाने आपल्या रसिक भाषेत सांगितले आहे (पूर्वमेघ ३६). भारतीय नाट्यशास्त्रात शिवाच्या या नटराज रूपाचा पूर्ण समादर केलेला आहे. तिथे त्याला नृत्यकलेचा महान आचार्य मानले आहे (१. ४५).

**शिवकथा** – शिवकथांचा सांगोपांग विकास पुराणांच्या काळात झाला. रामायण–महाभारतात शिवकथा आहेत; पण त्यांचे विस्तृत रूप पुराणांत पाहायला मिळते. यांपैकी बऱ्याचशा कथांतला वैदिक आशय लुप्त झाला आहे आणि त्यांना नव्या शाखा फुटल्या आहेत. कित्येक कथांना पार्वती, गणेश, स्कंद यांच्या कथांचे अंश जोडले गेले आहेत. शिवाने वरदान दिल्याच्या आणि भक्तांवर अनुग्रह केल्याच्या कथाही पुराणकारांनी नव्याने निर्माण केल्या आहेत. अशा प्रकारच्या शेकडो कथांनी पुराणांचे भांडार भरले आहे. त्यातल्या काही महत्त्वाच्या कथा अशा –

**त्रिपुरदाह** – ही कथा क्रमाने विकास पावली आहे. हिचा मूळ उगम ऐतरेय ब्राह्मणात सापडतो (१. ४. ६). देवासुरांच्या संघर्षात असुरांनी पृथ्वी, आकाश व द्यौ या तीन स्थानांचे तीन दुर्गांत (पुरे) रूपांतर केले. त्यांचे वर्ण अनुक्रमे लोह, रुपे

होते यांचे होते. या कथेत रुद्राचा उल्लेख नाही. देवांनीच ती तीन पुरे उपसदांच्या द्वारे जिंकली असे म्हटले आहे. पुढे ही तीन पुरांची कल्पना देवकथांमध्ये स्थिर झाली आणि शैव धर्माच्या उत्कर्षकालात त्रिपुरविध्वंस हे कृत्य शिवाच्या नावावर चढवले गेले. पुढे रामायण-महाभारतात ही कथा विकास पावली. कर्णपर्वात हिचे पूर्ण विस्तृत रूप पाहायला मिळते. शिवाचा एक अद्‌भुत, अलौकिक पराक्रम म्हणून पुराणांत त्या कथेचा गौरव केला गेला आहे.

तारकासुराला तीन पुत्र होते. त्यांनी ब्रह्मदेवाकडून वर मिळवून तीन पुरे प्राप्त करून घेतली. ही पुरे गगनसंचारी होती. त्यांत बसून ते तीन्ही असुर त्रैलोक्याला उपद्रव करू लागले. त्या तीन्ही पुरांना एकाच बाणाने भेदणारा जो कोणी असेल, त्याच्याकडूनच त्या असुरांचा संहार व्हायचा होता. आणि ही गोष्ट कोणत्याही देवाला अशक्य आहे, ही खात्री असल्यामुळेच ते त्रिपुरासुर इतके माजले होते. ते तीन्ही असुर शिवभक्त होते. त्यांनी एक गोष्ट चांगली केली होती, की सदाचारी आणि वेदोनारायण असे ब्राह्मण आणून त्यांनी त्या पुरांत वसवले होते. त्या ब्राह्मणांचा पुण्यसंचय त्या असुरांच्या कामी येत होता त्यामुळे त्यांचे सामर्थ्य अधिकच वाढले होते.

या असुरांनी स्वर्ग पादाक्रांत केला आणि देव स्थानभ्रष्ट झाले. ते आपले गाऱ्हाणे घेऊन प्रथम विष्णूकडे गेले आणि नंतर विष्णूसह शिवाकडे गेले. देवांची ती दयनीय अवस्था पाहून शिवाने नारदाला पाचारण केले आणि त्याला म्हटले. 'तू मायावी रूप घेऊन असुरांच्या पुरात जा आणि तिथल्या पुण्यशील लोकांच्या मनात पाखंड उत्पन्न कर.' नारदाने तसे केले. पुरांतले लोक सन्मार्ग विसरले, दुराचारी बनले. त्यांचे पुण्य क्षीण झाले. त्यामुळे असुरांचे सामर्थ्यही ऱ्हास पावले.

मग शिवाने त्या असुरांवर चढाई केली आणि एकाच बाणाने त्यांची तीन्ही पुरे भेदून त्यांना मारले. (सौरपुराण)

प्रस्तुत कथा शिवाचे दैवी सामर्थ्य विशद करण्यासाठी जितकी आहे, त्याहून अधिक ती सदाचाराचे महत्त्व पटवण्यासाठी आहे. या कथेतल्या शिवाने आपल्या भक्तांना छलकपटाने मारले, हा अंश काही पुराणकारांना आवडला नाही. म्हणून त्यांनी प्रस्तुत कथेत बरेच परिवर्तन केले. हे परिवर्तन मत्स्यपुराणात आढळते.

बाणासुर नावाचा एक दानव होता. तो परम शिवभक्त होता. त्याची सारी प्रजाही शिवभक्त होती. त्याने स्वतःसाठी गगनसंचारी अशी तीन पुरे बनवली होती. पण कालांतराने त्याची मती फिरली. तो गर्विष्ठ बनला आणि त्रैलोक्याला पीडा देऊ लागला. शिवाला वाटले, की आता बाणासुराला शिक्षा करण्याची वेळ आली. पण तसे करण्याच्या आधी त्याने नारदामार्फत बाणासुराची परीक्षा घेतली. त्या परीक्षेत तो अपयशी ठरला.



वीणाधर दक्षिणामूर्ती – चिदंबरम

मग शिवाने बाणासुरावर आक्रमण केले. बाणासुराला हे समजले. तो सावध झाला; मार्गावर आला. आपल्या प्रजेचा आता संहार होणार हे त्याला उमगले. शिवाचा आघात आपण सहन करावा आणि प्रजेला वाचवावे, असे त्याने ठरवले. तो शिवलिंग मस्तकी धारण करून शिवाचे स्तोत्र गात गात पुढे आला. त्याने शिवाला प्रार्थिले. 'तुझा कोप माझ्या माथी पडू दे; पण माझी प्रजा जगू दे.' शिव त्याच्या प्रजावात्सल्याने प्रसन्न झाला. 'वर माग' म्हणाला. बाणासुराने मागितले. 'माझ्या हृदयात तुझी भक्ती अक्षयी राहो.' मग शिवाने तीन पुरांपैकी एक त्याच्यासाठी सुरक्षित ठेवले आणि दोन खाली पाडली. ह्यांपैकी एक कैलासावर आणि दुसरे अमरकंटकावर पडले (मत्स्यपु. १२९–१३२).

दक्षयज्ञविध्वंस – पुराणांतून या कथेचे वेगवेगळे पर्याय आढळतात. या कथेचे सर्वांत प्राचीन रूप वराहपुराणात दिसते. त्या कथेत आर्यांचा शिवाविषयीचा तिरस्कार प्रामुख्याने आढळून येतो. पण पुराणपरिवर्धनाच्या काळात शिवाविषयी हीन बुद्धी धारण करणारा दक्ष हा अपराधी ठरला आणि वायुपुराणात त्या कथेने वळण घेतले, ते असे–

दक्ष हा प्रजापती होता. त्याला अनेक मुली होत्या. त्या त्याने ऋषी-मुनींना दिल्या. त्यांतली एक सती. तिने बापाच्या मर्जीविरुद्ध शिवाला वरले. एकदा या दक्षाने यज्ञ आरंभिला. त्यासाठी

सर्व जावयांना बोलावणे केले; पण शिवाला वगळले. सतीने शिवाला विचारले, 'असे का?' त्यावर शिव म्हणाला. 'ही तर प्राचीन काळापासूनची रीत आहे. मला कोणीच यज्ञ-भाग देत नाही.' ते ऐकून सती म्हणाली. 'तुम्ही आपला यज्ञ-भोक्तृत्वाचा अधिकार प्रस्थापित करा.' शिव त्या गोष्टीला तयार झाला. दक्षाला शासन करण्यासाठी त्याने वीरभद्र उत्पन्न केला. सतीच्या क्रोधातून भद्रकाली जन्मली. शिवाच्या प्रत्येक रोमरंध्रातून अनेक रुद्र उत्पन्न झाले. त्या सर्वांनी मिळून दक्ष-यज्ञावर धाड घातली व यज्ञ विध्वंसून टाकला. मग वीरभद्राने सगळ्या देवांना कैद केले. ते पाहून दक्ष पुढे झाला. त्याने शिवाला मान्यता दिली. त्यानंतर तो शिवभक्त बनला (वायुपु. ३०).

दक्षयज्ञात सतीने देहत्याग केल्याची सर्वपरिचित कथा ब्रह्म व भागवत या पुराणांत आली आहे.

विषप्राशन – समुद्रमंथनातून उत्पन्न झालेले हालाहल विष सर्व जगाला जाळीत सुटले. कोणताही देव त्याचा स्वीकार करायला पुढे येईना. शिव समुद्रमंथनाच्या उद्योगात सहभागी नव्हता. तो कैलासावर स्थित होता. त्या दुर्धर संकटातून जगाला वाचवण्या-साठी सर्व देव शिवाला शरण गेले. शिव तिथे आला व त्याने जगाला संकटमुक्त करण्यासाठी ते हालाहल प्राशन केले. त्या विषाची शिवाला बाधा झाली नाही. फक्त त्याचा गळा तेवढा काळानिळा पडला. मग देव त्याला म्हणाले. 'देवा, तुझा हा



विषापहरण-शिव, (इ. स. चे ८ वे शतक)–कलुगुमलै

निळा गळा आम्हांला फार आवडतो. तो तसाच राहू दे.' शिवाने ते मान्य केले. त्या प्रसंगाने शिवाला नीलग्रीव, नीलकंठ अशी नावे मिळाली. ही कथा बहुतेक सर्व पुराणांत सारखीच आहे.

मदनदहन – शिवाने मदनाला जाळले ही कथा स्वतंत्र राहिली नसून, ती एका बृहत्कथेचे अंग बनली आहे. तारकासुराच्या उप-द्रवापासून स्कंदजन्मापर्यंत या कथेचा विस्तार झालेला असून, तिच्यातला एक अंश म्हणजे मदनदहन होय. ती कथा अशी आहे–

शिव हिमालयावर तप करीत होता. दुसऱ्या जन्मात सती ही पार्वती झाली आणि तीही शिवाच्या प्राप्तीसाठी हिमालयावरच तप करीत बसली. देवांना त्या दोघांचा विवाह घडून यायला हवा होता. कारण, त्या दोघांच्या लग्नसंबंधातून जन्मणारा स्कंद नावाचा पुत्र देवांचा सेनापती बनून तारकासुराचा वध करणार होता. पण शिवाचे मन काही पार्वतीकडे वळेना. म्हणून मग देवांनी शिवाला पार्वतीविषयी अनुराग उत्पन्न होण्यासाठी मदनाची योजना केली. मदन शिवाच्या तपोभूमीत गेला. एका झुंडपाआड राहून त्याने शिवावर शरसंधान केले. शिवाच्या मनाची चलबिचल झाली. त्याच्या हृदयात विषय-भावनेचा अंकुर उगवला. असे विपरीत का व्हावे, याचा शोध घेता त्याला शरसंधान करणारा मदन दिसला. तत्क्षणी शिवाचा क्रोध उफाळला. त्याच्या भालप्रदेशीचा तिसरा नेत्र उघडला. त्यातून अग्निज्वाळेचा लोळ बाहेर पडला. त्या लोळाने मदनाला भस्म करून टाकले.

त्यानंतर त्याला तप करणारी पार्वती दिसली. तिचा निर्धार त्याने जाणला. मग त्या दोघांचे लग्न झाले. नंतर पार्वतीने मद-नाला जिवंत करण्याविषयी शिवाला गळ घातली. शिवाने त्याला जिवंत केले खरे; पण ते सूक्ष्म रूपाने, अनंग-रूपाने.

अंधकासुरवध – या कथेत शिवाचे उग्र रूप दृष्टिगोचर होते. अंधकाला मारण्यासाठी शिवाने मातृकांचे साहाय्य घेतले आहे. या मातृका म्हणजे संभवत: स्थानीय देवता असाव्या. या कथेची पार्श्वभूमी सांगताना डॉ. यदुवंशी म्हणतात –

पुराणकारांनी शिवाच्या सौम्य रूपाचा विकास केल्यामुळे वैदिक रुद्राचे उग्र रूप मागे पडले. मात्र ते सर्वथा लुप्त झाले नाही. वेदोत्तर कालात जेव्हा त्रिमूर्तिकल्पना उदयाला आली, तेव्हा तिच्यात शिव हा संहारक बनला. नंतरच्या काळात जेव्हा शिवाला देवाधिदेव अशी उपाधी मिळाली, तेव्हा तो सृष्टी, स्थिती आणि प्रलय या तीन्हींचा कर्ता बनला. पण जेव्हा कधी शिवाच्या उग्र रूपाची कल्पना केली जाई, तेव्हा त्याचे वैदिक रूप डोळ्यापुढे उभे राही. या रूपात शिव हा क्रूर, महाभया-नक व महाकाल समजला जातो. या रूपात चंड, भैरव, इ. त्याला नावे मिळाली. या रूपात शिवाचा रंग काळा आहे. त्याच्या गळ्यात रुद्राक्षमाला आहेत. हातात त्रिशूळ आहे. मस्तकी चंद्र आहे. मत्स्यपुराणात त्याचा रंग लाल असल्याचे सांगितले आहे. वैदिक रुद्राचा वर्णही लालच आहे. वायुपुराणात त्याचे कालाशी तादात्म्य दाखवले आहे. त्याला साक्षात मृत्यूच म्हटले आहे. या रूपात तो यक्षांचा अधिपती आहे. गण आणि अनुचर यांची उत्पत्ती शिवाने आपल्या स्वरूपातून केली असल्याचे मत्स्य-

पुराणात म्हटले आहे. या रूपात तो देवा-मानवांच्या शत्रूंचा संहारक आहे. या स्वरूपातले त्याचे प्रमुख कृत्य म्हणजे अंधकासुराचा वध हे होय.

अंधकवधाचे कारण केवळ तो देवांना उपद्रव देत होता एवढेच नव्हते, तर त्याने एकदा पार्वतीचे अपहरण करण्याचाही अतिप्रसंग केला होता. जेव्हा त्याचे आणि शिवाचे युद्ध सुरू झाले, तेव्हा अंधकाच्या अंगातून गळणाऱ्या रक्ताच्या एकेका थेंबातून एकेक अंधक निर्माण होऊ लागला. त्यामुळे देवसैन्य मोठ्याच संकटात सापडले. मग शिवाने माहेश्वरी देवी आणि तिच्याबरोबर मातृका निर्माण केल्या. त्या देवतांनी अंधकाचे रक्तबिंदू वरच्या वर चाटायला सुरुवात केली. त्यामुळे नवे अंधक निर्माण होण्याची प्रक्रिया थांबली. आणि मग शिवाने लीलया अंधकाचा वध केला (वराहपु. २७; सौरपु. २९).

**लिंगोत्पत्तिकथा** – जरी पुराणकालापर्यंत लिंगपूजा पूर्णरूपाने प्रस्थापित झाली असली, तरी लिंग हे शिवाचे जननेंद्रिय आहे, ही कल्पना लोकमानसात जागृत होती. तशा कथाही पुराणांत आलेल्या आहेत. शिव जेव्हा ब्रह्मा-विष्णूंच्यापुढे प्रकट झाला, तेव्हा तो ऊर्ध्वमेढ्र ( उत्थितलिंग ) अवस्थेत होता, असे वायुपुराणात सांगितले आहे (४४). पण लिंगामधली ही जननेंद्रियविषयक जाणीव पुसली जावी आणि त्या जागी एक भव्यदिव्य प्रतीक निर्माण व्हावे म्हणून पुराणकारांनी जो विशेष प्रयत्न केला, तो पुढील कथेत दिसून येईल –

एकदा ब्रह्मा व विष्णू यांच्यामध्ये सर्वश्रेष्ठ देव कोण, याविषयी विवाद उत्पन्न झाला. त्या प्रसंगी शिव एका लिंगाकार अग्निस्तंभाच्या रूपाने त्यांच्यापुढे प्रकट झाला. तो म्हणाला. 'मी तुमच्या वादाचा निवाडा करतो. तुम्ही या लिंगाचे मूळ आणि त्याची उंची यांचा तपास लावा. त्यात जो यशस्वी होईल, तो श्रेष्ठ.' तेव्हा ब्रह्मदेव पुढे सरसावला. तो लिंगाची उंची कुठवर आहे ते पाहण्यासाठी वर गेला आणि विष्णू त्याचे मूळ शोधण्यासाठी अधोलोकात घुसला. पण दोघेही त्या कामी अयशस्वी ठरले. हताश होऊन परत आले. त्यांनी मग शिवाला म्हटले, की 'सर्वश्रेष्ठ देव तू !' (वायुपु. २४. ३३–५५).

लिंगपुराणातल्या याच कथेत त्या लिंगस्तंभाचे दिव्यत्व याहून अधिक वर्णिले आहे. 'त्या लिंगस्तंभातून हजारो अग्निज्वाला निघत होत्या. त्याला आदी, मध्य, अंत काहीही नव्हते. त्याच्या अंगावर ओंकाराचे चिन्ह झगमगत होते. मग साऱ्या देवांनी त्या लिंगाचे प्रणवाच्या रूपात स्वागत केले.'

या आणि अशाच अन्यही काही कथांच्या निर्मितीमुळे शिवलिंगातला बीभत्सभाव ओसरला आणि त्याचे दिव्यत्व लोकांच्या मनावर ठसले.

**शिवाचे मूर्तिकरण** – इ. स. च्या ५ व्या शतकापासून १३ व्या शतकापर्यंतचा प्रदीर्घ कालखंड हा पुराणांच्या अभिवृद्धीचा



शिवज्योतिरस्तंभ

काळ समजला जातो. या कालात शिवप्रतिमा आणि लिंगप्रतिमा देशभर विपुल प्रमाणात घडवल्या गेल्या. याच कालखंडात शैवमत खूप प्रसार पावले. कित्येक शैव संप्रदाय संघटित झाले. शिवोपासना सामान्य जनापर्यंत जाऊन पोचली. शैव क्षेत्रे भरभराटली आणि हे सर्व कार्य शैव पुराणकारांनी केले.

· या कालखंडात पुराणोक्त पद्धतीने शिवमूर्ती घडू लागल्या. शिवाची पुराणप्रणीत उपास्य रूपे अनेक होती. त्यांच्या मुख्य रूपांतून अनेक गौण रूपे निर्माण झाली. हे प्रत्येक रूप विशिष्ट कार्यासाठी उगम पावले. त्यांच्याही मूर्ती कलाकारांनी आकाराला आणल्या. त्यांतल्या काही प्रसिद्ध मूर्ती अशा —

**दक्षिणामूर्ती** — शिवाचे हे सामान्य मानवरूप आहे. या रूपात शिव उभा किंवा बसलेला असतो. त्याची मुखमुद्रा सौम्य-सुंदर असते. तो प्रायः चतुर्भुज असतो. दक्षिणामूर्ती हा विद्या-कलांचा अधिष्ठाता असतो. तत्त्वजिज्ञासू पुरुष याच स्वरूपाचे ध्यान करतात. म्हणूनच शंकराचार्यांनी त्याचे स्तोत्र रचले आहे. अशा मूर्तीच्या सभोवती कित्येकदा पशू, सर्प आणि यति-मुनी असतात. कधी कधी पार्वतीही जवळ असते.

**कल्याणसुंदरमूर्ती** — या मूर्तिकरणात शिव-पार्वतींचा विवाह-सोहळा साकार केलेला असतो. घारापुरी येथील हे शिल्प उत्कृष्ट आहे. विष्णू आणि लक्ष्मी या दंपतीने यात शिवाला कन्यादान केलेले असते. मध्ययुगीन शिल्पकलेचा हा एक सुंदर नमुना आहे.

**अर्धनारीश्वरमूर्ती** — या मूर्तीचा डावा भाग पुरुषाचा असतो. त्याच्या मस्तकी जटाजूट, गळ्यात वासुकीसर्प, हाती कमंडलू किंवा नरकपाल व दुसऱ्या हाती त्रिशूल असतो. अंगावर कातडे पांघरलेले असते. उजवे अंग स्त्रीचे असते. तिच्या शिरी मुकुट, गळा व भुजा यांत अलंकार व कमरेला अधोवस्त्र असते. मुखावर कोमलता असते. या मूर्तीचा देशात बराच प्रचार झाला होता. लोक व कलाकार या दोघांनाही हे रूप मुग्ध करते. बादामी, कुंभकोणम व कांची या ठिकाणच्या अशा मूर्ती सर्वांत प्राचीन आहेत. घारापुरीच्या लेण्यातही अशी मूर्ती आहे. अशा प्रकारच्या ज्या कांस्यमूर्ती बनल्या, त्यांत एक शुकाचीही आकृती दाखवली जाते. हा शुक म्हणजे अग्नीचे रूप होय. अग्नीने या रूपात शिवपार्वतीच्या रतिक्रीडेचा भंग केला होता.

**नटराजमूर्ती** — या रूपात शिवाने नृत्य-नाट्यकला प्रवर्तित केली, अशी धारणा आहे. तो स्वतःही एक पारंगत नर्तक आहे. त्याच्या त्या नृत्याने विश्वव्यापाराला चालना मिळते. या भूमिकेतील शिव चतुर्भुज असतो. त्याने डावा पाय उचलून उजवीकडे धरलेला असतो. त्याचा केशपाश रत्नालंकृत असतो. काही जटा खाली भुरुभुरू उडत असतात. केशबंधात कपाल, सर्प, गंगा, चंद्रमा आणि पत्रमाला शोभत असते. त्याच्या भोवती प्रभावलय असते. (नटराज पाहा)

याशिवाय भिक्षाटन, सोमस्कंद, त्रिमूर्ती, महेश, सदाशिव, लिंगोद्भव, अशा आणखीही काही शिवमूर्ती आढळतात. या सर्व मूर्ती कशा आणि कोणत्या प्रमाणात बनवाव्या, याचे नियम पुराणांत आणि शिल्पशास्त्रावरच्या ग्रंथांत दिलेले आहेत.

**शिवाची करभूषणे** — ही चार असून, त्यांना प्रतीकात्मकता आहे. ती करभूषणे पुढीलप्रमाणे—

त्रिशूल — त्रिगुणांचे प्रतीक. शैव दर्शनात त्रिशूलाची तीन टोके म्हणजे इच्छा, ज्ञान व क्रिया समजतात.

डमरू—शब्दब्रह्माचे प्रतीक. यापासून चौदा माहेश्वर सूत्रांच्या रूपाने (अइउण् ऋलृक्, इ.) वर्णमाला निर्माण झाली.

मृग — चार वेदांचे प्रतीक. या विषयींची कथा — दारुकावनात मुनींनी अभिचारात्मक यज्ञ केला. त्यातून जो एक मृग निर्माण झाला, तो शिवाने हाती धरला.

परशू — म्हणजे कुऱ्हाड. ते आयुध अज्ञानविध्वंसासाठी आहे.

**पंचमुख शिव** — शिवाला पंचमुख मानलेले असून, त्या पाच मुखांची नावे अशी —

सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान.

**शिवपरिवार** — प्रत्येक महत्त्वाच्या देवतेचा एक परिवार असतो. या परिवारातल्या व्यक्ती गौण अशा देवताच असतात. त्यांचे गुणकर्म सामान्यपणे मुख्य देवतेच्याच गुणकर्मासारखे असते. शिवालाही असा एक मोठा परिवार आहे. त्यातील व्यक्ती अशा —

पार्वती — ही केवळ परिवारातली नसून शिवाची अर्धांगीच आहे. तिचा शिवाशी अभेद संबंध आहे. प्रारंभीचे शिवस्वरूप हे पहाडी, उग्र आणि विचित्रवेषधारी होते. वन्य जमातींनी आपल्या कल्पकतेनुसार ते उभे केले होते. प्राचीन काळी शिवाबरोबरच असणारी व पूजली जाणारी जी एक देवता होती, तीच कालांतराने शिवाची भार्या ठरली. प्रथम सतीच्या रूपात आणि नंतर पार्वतीच्या रूपात तिने शिवाला वरले. ही देवीही प्रारंभी उग्रच होती. पण शिवाबरोबरच तिच्याही रूप-गुणांचा विकास झाला. महाभारतात व पुराणांत तिच्या सौम्य व दयाशील रूपाची कल्पना केली गेली. शिव महादेव झाला तशी तीही महादेवी बनली. किंबहुना ती जगाची माताच ठरली. पुराणांतल्या अनेक स्तोत्रांतून जगन्नियामक, सर्वतंत्रस्वतंत्र आणि सर्वमंगल अशा विशेषणांनी ती गौरविली गेली. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात ती आद्या प्रकृती ठरली. शैव सिद्धान्तात तिला शक्ती हे नाव मिळाले आणि शिव-शक्तींचे तादात्म्य प्रस्थापित झाले. गोरक्षनाथाने हा तादात्म्य संबंध पुढील श्लोकात सांगितला —

**शिवस्याभ्यन्तरे शक्तिः शक्तेरभ्यन्तरे शिवः।**
**अन्तरं नैव जानीयाच्चन्द्रचन्द्रिकयोरिव ॥**

अर्थ — शिवाच्या हृदयात शक्तीचा आणि शक्तीच्या हृदयात शिवाचा वास असतो. चंद्र आणि चांदणे ही जशी अभिन्न, तशीच शिव–शक्ती ही अभिन्न होत. त्यांच्यांत भेद मानू नये.

पार्वती ही मूर्तीमती करुणा आहे. दीनदुबळयांच्या दुःखाने आणि त्याला पुढे घालून आर्तत्राणासाठी धाव घेते. पार्वतीचे



कल्याणसुंदर मूर्ती (शिवपार्वती – विवाह), कनौज (इ. स. चे ८ वे शतक)

ती लगेच कळवळते. आर्त भक्ताची हाक शिवाच्याही आधी तिच्या कानी पडते. मग ती शिवाला समाधीतून जागृत करते हे करुणार्द्र मातृस्वरूप पुराणांत अनेक कथांच्या द्वारे प्रस्थापित केलेले आहे. लोककथाही अशाच प्रकारच्या आहेत.

गणपती – शिवपरिवारात गणपतीचा अधिकार फार मोठा आहे. त्याचा वर्ण शेंदरी. तोही त्रिनयन. चतुर्भुज. मस्तकी चंद्रकला. सोंडेत मधाचा कलश. पाशांकुशधारी. गणेशपुराणात एक स्वतंत्र उपास्य देवता म्हणून त्याचे महिमान वाढवले गेले. मात्र प्रारंभी त्याचे रूप उपद्रवी होते. त्याला विनायक म्हणत. रुद्राचे एक रूप म्हणून त्याचा निर्देश होई. विनायकाला शिवानेच उत्पन्न केले, असे वराहपुराणात म्हटले आहे (२३.१४). त्यामुळे शिवाची विशेषणे गणपतीला आणि गणपतीची विशेषणे शिवाला असाही प्रकार झालेला दिसतो. ब्रह्मवैवर्तपुराणात गणपतीला ईश ही उपाधी देऊन त्याला सिद्धयोग्यांचा आचार्य म्हटले आहे (३.१३.४१). वायुपुराणात शिवाला गजेंद्रकर्ण, लंबोदर व दंष्ट्री म्हटले आहे (२४.१४७.३०). उपाधींचे हे परस्पर आदान प्रदान या दोन देवतांचे प्रारंभिक तादात्म्य सूचित करते. सौरपुराणात तर स्पष्टच म्हटले आहे, की 'वास्तवात गणेश हा शिवच आहे' (४३.४८). मूषक म्हणजे उंदीर हा प्रारंभी रुद्राशीच संबंधित होता. पण पुढच्या काळात त्याला रुद्राकडून काढून घेऊन गणपतीचे वाहन बनवण्यात आले. गणपती हा पुराणांत शिव-पार्वतींचा पुत्र ठरला आणि त्याला शिवगणांचे आधिपत्यही मिळाले.

स्कंद – याला कार्तिकेय, शरजन्मा, षडानन अशी अन्यही नावे आहेत. या प्रत्येक नावामागे एकेक कथा आहे. मुळात स्कंदाचा आणि शिवाचा काही संबंध नव्हता. तो अग्निवीर्याने कृत्तिकांच्या ठिकाणी निर्माण झालेला पुत्र होता. पण पुराणकाळात त्याचा अग्नीशी असलेला संबंध अस्पष्ट झाला आणि तो शिवपुत्र ठरला. त्याने देवांचे सेनापतित्व स्वीकारून तारकासुराला मारले आणि त्यामुळे शिवपरिवारात त्याला मानाचे स्थान प्राप्त झाले.

नंदी – कोणत्याही शिवमंदिरात हा शिवाकडे तोंड करून बसलेला असतो. याची पशू व मानव अशी दोन रूपे आहेत. रामायणात तो विकराल, कृष्ण-पिंगल, ठेंगू, छोटचा बाहूंचा आणि महाबली या स्वरूपात दिसतो (उत्तर. १६). पुराणकारांनी त्याला शिवाप्रमाणेच त्रिनेत्र, चतुर्भुज आणि जटाधारी बनवले आहे. तो शिलाद नामक ब्राह्मणाचा मुलगा असल्याचीही कथा आहे. शिवाने याला आपला पुत्र तर मानलेच; शिवाय त्याला गणप्रमुखही नेमून टाकले.

पशुरूपात नंदी हा बैल असून, तो शिवाचे वाहन आहे. वेदात अग्नीला वृषभ म्हटले आहे आणि अग्नी हा रुद्र असल्याचेही सांगितले आहे. त्यामुळे वृषभ (बैल या अर्थाने) आणि रुद्र यांची संगती जुळली. अग्निचयनात वृषभाच्या आकाराची चिती म्हणजे विटांची रचना करीत. पुढे रुद्र जेव्हा शिव झाला, तेव्हा हा वृषभही त्याचे वाहन म्हणून त्याच्यापुढे रुजू झाला. पुढे त्याचे माहात्म्य इतके वाढले, की नंदीचे दर्शन आधी आणि शिवदर्शन नंतर असा नियमच ठरून गेला.

चंडीश – हा शिवाचा अंशरूप असून, त्याच्या कठोर प्रकृतीतून उत्पन्न झाला आहे. युगभेदाने त्याची रूपे, आयुधे आणि वाहने बदलतात. याला ओळखण्याची मुख्य खूण म्हणजे याच्या हातातली कुऱ्हाड. हा एकांतिक शिवभक्त होता. बाप विष्णूचा उपासक. त्यामुळे पिता-पुत्रांत वैर उत्पन्न झाले. एके दिवशी काही प्रसंगाने बापावरचा याचा राग उफाळून आला आणि याने कुऱ्हाडीने बापाचे दोन्ही पाय तोडून टाकले. त्याचे हे कृत्य निंद्य असले तरी ते त्याच्या शिवभक्तीचे निदर्शक ठरते. अशा दृढ शिवनिष्ठेमुळे हा शिवपरिवारात दाखल झाला. दक्षिणेत चंडीशाला शिवमंदिराचा रखवालदार समजतात.

वीरभद्र – दक्षयज्ञाच्या विध्वंसासाठी शिवाने याला आपल्या जटेतून निर्माण केले. हा वर्णाने काळा, त्रिनेत्र, चतुर्भुज व मुंडमाळाधारी आहे. तो साक्षात क्रोधमूर्ती आहे. त्याने वेताळाला आपले वाहन बनवले आहे. लिंगरूपात शिवाची पहिली पूजा वीरभद्राने केली अशी कथा आहे.

भैरव – हा शिवाच्या रक्तातून उत्पन्न झाला. याची अनेक रूपे आहेत. भैरवांची संख्या ६४ आहे. प्रत्येकी आठ असे त्यांचे अष्टवर्ग होतात. भैरव हा नग्न, सर्पभूषित व रुंडमाळाधारी असतो. त्याच्या हाती केस पकडून धरलेले मुंडके असते. एक कुत्रा त्याच्या बरोबर असतो. भैरवाला गांज्याची चिलीम हवी असते. तेवढी दिल्याने तो खूष होतो.

याशिवाय बाणासुर, रावण, भृंगी, रिटी, इ. आणखीही काही व्यक्ती शिवपरिवारात आहेत. शिवाप्रमाणेच शिवाचा परिवारही पूजनीय ठरला आहे. शिवासह ही सर्व परिवारदैवते धोपटमार्गी व अल्पसंतुष्ट आहेत. त्यांना मंदिराचा निवारा हवा असतोच असे नाही. डोंगरावर, झाडाखाली, पिंपळपारी कुठेही ती सुखाने राहू शकतात. त्यांना महानैवेद्याचीही लालसा नसते. एक नारळ फोडला, की त्यांची खुषी होते.

**शिवध्यान** – पूजेच्या वेळी शिवाचे ध्यान पुढील श्लोकाने करतात –

> **ध्यायेन्नित्यं महेशं रजतगिरिनिभं चारुचन्द्रावतंसं**
> **रत्नाकल्पोज्ज्वलाङ्गं परशुमृगवराभीतिहस्तं प्रसन्नम्।**
> **पद्मासीनं समन्तात् स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिं वसानं**
> **विश्वाद्यं विश्ववन्द्यं निखिलभयहरं पञ्चवक्त्रं त्रिनेत्रम्॥**

अर्थ – रुप्याच्या पर्वताप्रमाणे गौर, मस्तकी चंद्रकोर धारण करणारा, रत्नासारखे ज्याचे अंग उज्ज्वल आहे असा, परशु व मृग धारण करणारा, वरद व अभयमुद्रा धारण करणारा,

प्रसन्न, पद्मासनावर अधिष्ठित, सर्व बाजूंनी देवगण उभे राहून ज्याची स्तुती करतात असा, व्याघ्रचर्म पांघरणारा, विश्वाचा आद्य, विश्ववंद्य, संपूर्ण भय हरण करणारा, पंचमुख व त्रिनेत्र असा, महेश शिवाचे ध्यान करावे.

**शिवपूजा** – शिवाची पूजा लिंगरूपात करायची असते. सोमवार हा शिवाचा वार समजतात. त्या दिवशी शिवोपासक नक्तभोजन करतात. प्रत्येक महिन्याच्या शुद्ध त्रयोदशीच्या रात्रीला शिवप्रदोष म्हणतात. शिवाची प्रदोषपूजा प्रशस्त मानतात. प्रत्येक महिन्याच्या वद्य चतुर्दशीची रात्र ही शिवरात्र म्हणून प्रसिद्ध आहे. त्या दिवशी संपूर्ण उपवास करतात. माघातली शिवरात्र ही महाशिवरात्र मानतात. त्या रात्री शिवाची यामपूजा करतात. शिवाला अभिषेक प्रिय असतो. हा अभिषेक रुद्राध्याय म्हणून करतात. हा रुद्राध्याय ११ वेळा म्हटला, की एकादशिनी होते. लघुरुद्र, महारुद्र, अतिरुद्र या एकादशिनीच्याच चढत्या श्रेणी आहेत. शिवव्रत एकदा स्वीकारले, की ते मोडायचे नाही, असा संकेत असतो. शिवाला बिल्वपत्र व शुभ्र कमळ प्रिय असते. शिवाचा महानैवेद्य गुरवाला देतात. गुरव हेच मुख्यत्वे शिवाचे पुजारी असतात. शिवाला नमस्कार पाच घालावे असे सांगितले आहे. शिवाची प्रदक्षिणा सोमसूत्री असते, म्हणजे डाव्या हाताने जायचे आणि अभिषेकाच्या पाण्याची पन्हळ असते तिथवर जाऊन ती न ओलांडता परत फिरायचे आणि पुन्हा पन्हळीपर्यंत उलटे येऊन प्रदक्षिणा पुरी करायची. शिवाला गंध लावायचे ते आडवे किंवा चंद्रकोरीच्या आकाराचे लावतात. उत्सवाच्या वेळी शिवलिंगावर मुखवटा चढवतात. शिवस्थानातून दर सोमवारी देवाची पालखी काढतात.

**शिवाचे अवतार** – अवतार म्हटले, की विष्णूचे मत्स्यकूर्मादी दहा अवतार डोळ्यापुढे येतात. अवतारकल्पना मुळात वैष्णव धर्मात उगम पावली. कालांतराने तिला लोकमान्यता मिळाली. मग अन्य संप्रदायांनीही आपापल्या उपास्याचे अवतार झाल्याच्या कथा निर्माण केल्या. शैव पुराणांतून शिवाचेही दहा अवतार सांगितले आहेत. मात्र त्यांना विष्णूच्या दशावतारांची प्रतिष्ठा कधीही प्राप्त झाली नाही. हे शिवाचे दहा अवतार पुढे दिले आहेत–

| अवतार | पत्नी |
|---|---|
| महाकाल | महाकाली |
| तारण | तारा |
| बाल | बालाभुवनेशी |
| षोडश | षोडशी |
| भैरव | भैरवी |
| छिन्नमस्त | छिन्नमस्ता |
| धूमवान | धूमवती |
| बगलामुख | बगलामुखी |
| मातंग | मातंगी |
| कमल | कमला |

**एकादश रुद्र** – कश्यपाच्या वीर्याने शिव सुरभीच्या ठिकाणी अकरा रूपांनी उत्पन्न झाला, तेच एकादश रुद्र होत. त्यांची नावे अशी – (१) कपाली (२) पिंगल (३) भीम (४) विरूपाक्ष (५) विलोहित (६) शास्ता (७) अजपाद (८) अहिर्बुध्न्य (९) शंभू (१०) चंड व (११) भव.

**यक्षेश्वर अवतार** – समुद्रमंथनानंतर सर्व देव अमृत प्राशन करून अमर झाले. त्यांनी असुरांवर विजय मिळवला. त्यामुळे त्यांना आपल्या शक्तीचा गर्व झाला. देवांचा तो गर्वभार उतरवण्यासाठी शिव यक्षरूपाने त्यांच्यापुढे प्रकटला. त्याने म्हटले. 'देवहो ! तुम्ही मदमत्त होऊन तुम्हांला निर्माण करणाऱ्या महादेवाला विसरलात. तुम्हाला आपल्या शक्तीची घमेंड असेल, तर मी ही गवताची काडी पुढे टाकतो ती तुम्ही तोडून दाखवा.' त्यासरशी देव पुढे झाले. त्यांनी आपापल्या शस्त्रांचे घाव त्या काडीवर घातले. पण ती काडी काही तुटली नाही. एवढ्यात आकाशवाणी झाली. 'देवहो ! तुमच्या समोरचा हा यक्ष म्हणजे साक्षात शंकर आहे.' मग देव लज्जित झाले आणि शिवाला शरण गेले.

नाथ संप्रदायाचा प्रवर्तक मत्स्येंद्रनाथ याला शिवाचा अवतार मानतात. महाराष्ट्रात छत्रपती शिवाजीलाही शिवाचा अवतार मानण्याची प्रवृत्ती आहे.

**शिवाच्या अष्टमूर्ती**– (१) पृथ्वी (२) आप (३) तेज (४) वायू (५) आकाश (६) सूर्य (७) सोम व (८) यजमान अशी शिवाची आठ रूपे आहेत. या आठ रूपांच्या मूर्तींना जी नावे दिली आहेत, ती अनुक्रमे अशी – (१) शर्व (२) भव (३) पशुपती (४) ईशान (५) भीम (६) रुद्र (७) महादेव व (८) उग्र.

**शिव आणि शैव** – भिन्न भिन्न काळी भिन्न भिन्न दैवतांचे शिवाशी संमिश्रण झाले. त्यामुळे आदिशिवाचे सामर्थ्य खूपच वाढले. विष्णू व शिव या दोन देवांमधला फरक असा, की वासुदेवमूलक विष्णूची उत्पत्ती वेदोत्तर ऐतिहासिक कालातली आहे; तर शिवाची उत्पत्ती प्राग्वैदिक कालातली आहे. विष्णू हा मुख्यत्वे प्रेम व भक्ती यांचा देव आहे. तो स्थितिकर्ता आहे. उलट शिवाचे रूप वैदिक परंपरेतही रुद्र म्हणजेच ध्वंसक आणि संहारक आहे.

वैदिक युगाच्या प्रारंभी आणि ऋग्वेदातही शिव नावाचा देव आढळत नाही. वैदिक साहित्याच्या शेवटच्या विभागात

शिव हा देव प्रादुर्भूत झाला. पुढे श्वेताश्वतर उपनिषदात तो एका भक्तिपंथाचा आराध्य व उपास्यही ठरला.

पहिला शैव पंथ म्हणजे पाशुपत संप्रदाय होय. या संप्रदायाचा पुनरुद्धारक लकुलीश नावाचा पुरुष होता. ज्या वेळी यदुवंशात वासुदेव-कृष्ण अवतीर्ण झाला, त्याच वेळी महेश्वर लकुलीशाच्या रूपाने एका प्रेतातून अवतरला.

पाशुपत संप्रदाय हा सनपूर्व ३–४ शतके या कालातला असला पाहिजे. इ. स. च्या दुसऱ्या शतकात जन्मलेल्या लकुलीशाने या संप्रदायाचे पुनरुज्जीवन केले.

पाशुपत संप्रदायाचे दर्शन पाशुपतसूत्र या ग्रंथात आढळते. गुप्तयुगात राशीकर कौंडिण्य याने त्यावर भाष्य लिहिले आहे. माधवाचार्यांच्या सर्वदर्शनसंग्रहात या दर्शनाची तत्त्वे सांगितली आहेत. कार्य, कारण, योग, विधी व दुःखान्त ही पाशुपत मताची पाच अंगे होत. कार्य तीन प्रकारचे – विद्या, कला व पशू अर्थात जीवात्मा. सांख्यांची जी पंचवीस तत्त्वे आहेत, त्यांतली शेवटची दोन वजा जाता तेवीस तत्त्वे ही कारण होत. योग म्हणजे ध्यानधारणादी उपाय होत. विधी म्हणजे धर्माचरणाची पद्धती



महासदाशिव – तंजाऊर

व दुःखान्त म्हणजे ईश्वरप्रसादाने सर्व दुःखांचे निरसन होणे. कापालिक, अघोर, कालामुख, इ. पंथही शैवच होत. ते शिवाच्या घोर रूपाची उपासना करीत. त्यामुळेच ते समाजबाह्य ठरले. हे कापालिक शिवाच्या प्रसादासाठी नरबलीही देत. हे लोक मध्य प्रदेशात वास्तव्य करीत. इ. स. च्या ९ ते ११ या शतकांत द. भारतामध्ये कालामुखांच्या अनेक शाखा प्रचलित होत्या. पाशुपत मतही त्या भागात चालत होते. सामान्यपणे या उग्रपंथी शैवांच्या नावाच्या शेवटी राशी ही उपाधी जोडली जात असे. उदा० शैलराशी, ज्ञानराशी, इत्यादी. पंजाबातही कापालिक संप्रदायाचे अस्तित्व होते. मध्यभारतात इ. स. च्या १० व्या व ११ व्या शतकातली शिवालये आढळतात. तिथल्या राजांचे गुरूही शैव तपस्वी असत. त्यांच्या नावाच्या शेवटी शंभू किंवा शिव ही उपाधी असे. उदा० रुद्रशंभू, धर्मशंभू, सदाशिव, चूडाशिव, अघोरशिव, इत्यादी. हे सर्व मठपती होते. त्यांनी अनेक मठ व मंदिरे स्थापन केली.

विदिशेचा कुषाण राजा वेम कदफिसेस हा शैव होता. तो कदाचित पाशुपत संप्रदायातलाच असावा. त्याच्या सोन्याच्या व तांब्याच्या नाण्यांवर शिव व त्याचे वाहन नंदी यांच्या मूर्ती उठंविलेल्या आहेत.

प्राचीन भारतीय विचारवंतांत व दार्शनिकांत काही पाशुपतही होऊन गेले, असे म्हणतात. वैशेषिकसूत्रांचा कर्ता कणाद हा पाशुपतच होता. त्याचा भाष्यकार प्रशस्तपाद म्हणतो, की कणादाने योग व आचार यांच्या उत्कृष्ट ज्ञानाच्या द्वारे महेश्वराला संतुष्ट केले. वात्स्यायनाच्या न्यायभाष्याच्या उद्योत नामक टीकेचा कर्ता भारद्वाज हा पाशुपताचार्य होता. वराहमिहिर व त्याचा भाष्यकार उत्पल हे दोघे पाशुपतच होते. या पाशुपतांचे नेसते वस्त्र लाल रंगाचे असल्यामुळे त्यांना रक्तपट असेही म्हणत. इ. स. च्या ७ व्या शतकात भारताबाहेरही हा संप्रदाय पसरला होता. हे लोक भस्म चर्चीत, जटा धारण करीत व दिगंबर अवस्थेत राहत. काशीत व माळव्यात यांचे हजारोंच्या संख्येने वास्तव्य असे.

पाशुपत संप्रदायाचा विस्तार पूर्व भारतातही झाला होता. भुवनेश्वर व त्यालगतचा प्रदेश हे मध्ययुगात पाशुपत संप्रदायाचे एक प्रमुख क्षेत्र होते. (पाशुपत संप्रदाय पाहा)

डॉ. रा गो. भांडारकर यांनी उग्रमार्गी शैवांची निंदा केली आहे. त्यांचे मार्ग रानटी व भ्रममूलक होते, असे ते म्हणतात. पण तरीही या संप्रदायाबद्दल एक गोष्ट विसरता कामा नये. पाशुपत मताचे आचार्य हे खरोखरीचे योगी होते व ते लोकनिंदेच्या पलिकडे गेलेले होते. तसेच ते द्वैतवादी होते. त्यांच्या मते जीवात्मा व परमात्मा या दोन्ही शाश्वत व पृथक् वस्तू आहेत. विश्वप्रपंचाचे चिरंतन उपादान कारण प्रधान हे होय. मुक्तावस्थेत जीव हा अज्ञान व दौर्बल्य यांचा त्याग करून

समर्थ होतो. तसेच तो असीम ज्ञान व क्रियाशक्ती यांचा अधिकारी होऊन ईश्वराच्या प्रसादाने महादेवाचे महागणपतित्व प्राप्त करून घेतो (पाशु. सु. १.३८).

दक्षिण भारतात कालांतराने या संप्रदायाचा लोप झाला असता, त्याचा पुनरुद्धार चिल्लूक या पाशुपत योग्याने केला. न्याय व वैशेषिक या दोन्ही दर्शनांत पारंगत असलेला सोमेश्वर सूरी हा पाशुपत असून, त्या मताचा प्रचार करण्यासाठी फार झटत होता. द. भारतातल्या भिन्न भिन्न स्थळीं प्राचीन काळी पाशुपत संप्रदाय अस्तित्वात होता, याचे पुरावे साहित्यात व पुरातत्त्वसंशोधनात उपलब्ध झाले आहेत.

शिवपूजा तमिळ, तेलुगू, कन्नड, या द्रविड भाषांच्या प्रदेशांत प्राचीन काळापासून आस्तित्वात होती. तमिळ भाषेत शिव या शब्दाचा अर्थ लाल वर्णाचा असा होतो. त्यावरून शिव हे अनार्य, द्रविड लोकांचे दैवत होते, असे म्हणता येते. पुढे आर्य व आर्येतर यांचा घनिष्ठ संबंध आला व त्यातूनच शिव ही भारतातल्या सामान्य जनांची सर्वश्रेष्ठ देवता बनली. शिवपूजा दक्षिणेत प्राचीन कालापासून चालू होती, याचे प्रतीक म्हणजे आंध्र प्रदेशातील गुडिमल्लम हे क्षेत्र होय. इ. स. च्या ६ व्या शतकापासून द. भारतात शिवमंदिरे निर्माण होऊ लागली. त्या प्रदेशातले चालुक्य, राष्ट्रकूट, चोळ वगैरे राजे व धनिक यांनी ही सर्व मंदिरे उभारली. पट्टदकल येथील विरूपाक्ष सोमेश्वर, शिवकांची येथील शिव, मदुरेचा सुंदरेश्वर व मीनाक्षी इ. ची मंदिरे याची साक्ष देतात. तमिळ गीतिकाव्यात दक्षिणेतल्या अनेक शिवक्षेत्रांची नावे आढळतात. या काळात सर्वसाधारण ब्राह्मणांचेही शिव हे उपास्य दैवत बनले.

द. भारतातल्या शैव दार्शनिकांत शंकराचार्यांचे नाव अग्रगण्य आहे. बौद्ध व जैन या धर्मांना तिकडील शैवांनी प्रखर विरोध केला; तर शंकराचार्यांनी तर्क व युक्ती यांच्या द्वारे बौद्ध मताचे खंडण केले. इतर शैवांनी तमिळ भाषेत गीतवाङ्मय निर्माण करून शिवभक्तीचा आत्यंतिक प्रचार केला. त्यामुळे द. भारतात बौद्ध व जैन धर्मांचा बहुतेक लोप झाला.

तमिळ भाषेत शिवभक्तांना नायनार किंवा नायन्मार असे म्हणतात. हे संख्येने ६३ आहेत. यांतले २५ ब्राह्मण वगळता बाकीचे सगळे अन्य अनेक जातींचे आणि काही हीन जातींचेही होते. या सर्वांत गीतकार म्हणून ज्यांना प्रसिद्धी मिळाली ते ज्ञानसंबंधर व सुंदरर हे ब्राह्मण होते. संबंधरचा गुरू अप्पर हा वेल्लाळ जातीचा होता. हाही गीतकार होता. याची गीते सर्वांत अधिक लोकप्रिय झाली. त्याच्या पद्यसंग्रहाला तेवारम असे म्हणतात. तेवारम्‌मध्ये मणिक्कवाचकर कांतादित्य, तिरुमूलर, नंबी आंदर नंबी, इ. अनेक कवींच्याही गीतरचना संग्रहित आहेत. तेवारम्‌चे अकरा खंड आहेत. यांतला आठवा खंड तिरुवाचकम् यानावाने प्रसिद्ध आहे. त्याला तमिळ भाषेचे उपनिषदच म्हणतात. दक्षिण भारतातल्या सर्वच शैवांच्या पद्यरचनेत विशुद्ध शिवभक्तीचा प्रत्यय येतो. या शिवभक्तांचे आचरण उग्र व अघोरी नव्हते; तर ते सौम्य, सरळ व पवित्र होते.

काश्मीरातल्या शिवभक्तीचे स्वरूप याहून भिन्न होते. द. भारतातल्या शिवभक्तांच्या कालानंतर काश्मीरात शैव आचार्यांचा उदय झालेला दिसतो. काश्मीरातले शैवही उग्र व अतिमार्गी यांच्यापासून दूर होते. त्यांनी शैव तत्त्वज्ञानाचा विकास व



गंगाधर शिवमूर्ती

प्रचार केला. त्यांच्यामधला पहिला व प्रमुख आचार्य वसुगुप्त हा होय. तो इ. स. च्या नवव्या शतकात होऊन गेला. शिवश्रीकंठ याचा तो पट्टशिष्य होता. शिवश्रीकंठ हा शैवागमांचा प्रवर्तक होय. त्याने शिवसूत्रे रचली. काश्मीरातल्या शैव ग्रंथांत ती सर्वश्रेष्ठ समजली जातात. काश्मीरी शैव मताचा दुसरा

प्रमाणभूत ग्रंथ म्हणजे स्पंदकारिका हा होय. हा ग्रंथही वसुगुप्ताचाच आहे. स्पंदशास्त्र व प्रत्यभिज्ञाशास्त्र या काश्मीरी शैव-मताच्या दोन प्रमुख शाखा होत. दहाव्या शतकाच्या आरंभी सोमानंद नावाच्या आचार्याने या मतात अद्वैतवाद आणला. प्रत्यभिज्ञाशाखेचा तोच प्रवर्तक होय. आपल्या मताच्या सिद्धीसाठी त्याने शिवदृष्टी नावाचा एक ग्रंथ लिहिला. त्याचा शिष्य उदयाकर याने ईश्वरप्रत्यभिज्ञाकारिका नावाचा दुसरा ग्रंथ लिहिला. या उदयाकरालाच उत्पलाचार्य असे दुसरे नाव आहे. या गुरु-शिष्यांच्या जोडीने काश्मीरीय शैव मतात अद्वैतवाद प्रस्थापित केला. पुढच्या काळात भास्कर नावाच्या विद्वानाने शिवसूत्रवार्तिक हा ग्रंथ लिहिला. उत्पलाचार्याचा मुलगा व शिष्य लक्ष्मण नावाचा होता. त्याचा शिष्य अभिनवगुप्त हा होय. त्याने उत्पलाचार्यांचे ग्रंथ व परात्रिंशिका यांवर भाष्ये लिहिली. अभिनवगुप्ताच्या अनेक ग्रंथांत तंत्रालोक व तंत्रसार हे दोन ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. काश्मीरी शैवांमध्ये अभिनवगुप्ताला गुरुपदवी लाभली आहे. तो प्रखर बुद्धीचा व असामान्य प्रतिभेचा पंडितश्रेष्ठ होता. काश्मीरात जो शैव धर्म विस्तारला, त्याचे बरेचसे श्रेय अभिनवगुप्तालाच दिले पाहिजे. याच कालात उत्पल वैष्णव व रामकंठ यांनी अनुक्रमे प्रदीपिका व स्पंदविवृत्ती नावाचे दोन ग्रंथ निर्माण केले. क्षेमराज हा अभिनवगुप्ताचा शिष्य होय. त्याने आपल्या गुरूचे कार्य बरेच पुढे नेले. इ. स. च्या १२व्या शतकातला जयरथ व १८ व्या शतकातला शिवोपाध्याय यांनीही शैव मताची धुरा वाहिली. काश्मीरी शैव संप्रदायाचे हे सारे आचार्य विद्या, बुद्धी, चिंतन व तत्त्वज्ञान यांमध्ये पारंगत होते. त्यांनी ज्ञानाचा जो ठेवा निर्माण करून ठेवला तो पुढील भारतीय व पाश्चात्य तत्त्वज्ञांनाही स्फूर्ती देणारा ठरला.

दक्षिणेत मेयकंठ देवर, अरुळनंदी, मरई ज्ञानसंबंधर व उमापती हे इ. स च्या १३ व्या ते १४ व्या शतकाच्या काळात होऊन गेले. त्यांनी शिवभक्तीला तत्त्वज्ञानाच्या पायावर अधिष्ठित केले. दक्षिणेतील शैव मतात जी चौदा सिद्धान्तशास्त्रे आहेत, त्यांपैकी बहुतेक वरील चौघांनीच रचली आहेत. शिवज्ञानबोधम् नावाचे एक शैवशास्त्र संस्कृत भाषेत असून, ते शैवागमाचाच एक भाग आहे. मेयकंठ देवरने त्याचा तमिळ भाषेत अनुवाद केला. अरुळनंदी हा त्याचाच प्रख्यात शिष्य होय. याने शिवसिद्धी नावाचा ग्रंथ लिहिला.

यामुनाचार्य, रामानुजाचार्य वगैरे आचार्यांनी दक्षिणेत वैष्णव धर्माची प्रतिष्ठा पूर्वीच केली होती. शैव धर्माला परिपूर्णावस्था प्राप्त झाली ती त्यानंतर. कारण दक्षिणेतील शैव धर्मावर वैष्णव धर्माचा काहीसा प्रभाव आहे. पुढच्या काळात शंभूदेव व श्रीकंठ शिवाचार्य यांनी जे शुद्ध शैवमत प्रतिपादिले, त्याच्यावर रामानुजाचार्यांच्या विशिष्टाद्वैताची छाप स्पष्टपणे दिसून येते.

प्राचीन शैव मताचा मूलाधार म्हणजे आगमग्रंथ होत. त्यांची संख्या २८ असल्याचे सांगतात. गोदावरीच्या काठी मंत्रकाली या क्षेत्रात हे शैव आचार्य वंशपरंपरेने राहत. या क्षेत्रात जे चार शैव मठ होते, त्यात आमर्दक हा शैव मठ अत्यंत विख्यात होता. त्याच्या बऱ्याच शाखा भारतात अनेक ठिकाणी पसरल्या होत्या. राजेंद्र हा चोळराजा गंगातीरावरील प्रदेश जिकण्याची मोहीम आटोपून परत निघाला, तेव्हा त्याने आमर्दक मठाच्या काही आचार्यांना आपल्या राज्यात म्हणजे चोळ देशात आणले. त्यांनीच द. भारतात शैव धर्माचा प्रसार केला. याच परंपरेतला अघोर शिवाचार्य हा इ. स. च्या १२ व्या शतकाच्या मध्यावर होऊन गेला. त्याने क्रियाकर्मद्योतिनी नावाचा जो ग्रंथ लिहिला तो शैव दर्शनाचा अत्यंत प्रमाणभूत ग्रंथ ठरला. त्याच्या नंतर त्रिलोचन शिवाचार्य याने सिद्धान्तसारावली व निगमज्ञानदेव याने जीर्णोद्धारशतकम् नावाचे दोन ग्रंथ लिहिले.

वेद व उपनिषदे यांना प्रमाण मानणाऱ्या वेदान्ती शैवांहून आगमवादी शैव वेगळे होते. ते वेदांना फारसा मान देत नसत. त्यांच्या मते पंचमुखी महादेवाच्या पाच मुखांतून आगमशास्त्रे बाहेर पडली. सद्योजात मुखातून कामिकादी पाच आगम, वामदेव मुखातून सुप्रभागमादी पाच आगम, अघोरमुखातून विजयागमादी पाच आगम, तत्पुरुषमुखातून रौरवागमादी पाच आगम व ईशानमुखातून किरणागमादी आठ आगम निघाले. हे सर्व आगम ईश्वरप्रणीत असल्याचे त्यांनी सांगितले असले तरी ते दक्षिणेतील शैवाचार्यांनी इ. स. च्या नवव्या शतकात लिहिले ही वस्तुस्थिती आहे. हे आगमसंप्रदायी शैव आपल्या धर्मानुष्ठानात गृह्यसूत्रात वर्णिलेले कित्येक होम करीत व तिथलेच मंत्र वापरीत. त्यांचे काही स्वतंत्र मंत्र आहेत. पण तेही वैदिक मंत्रांच्या अनुकरणानेच बनलेले आहेत. मात्र त्यांच्या पूजाविधीतला सर्वश्रेष्ठ पंचाक्षरी मंत्र 'नमः शिवाय' हा आहे. त्याप्रमाणे त्यांचा दीक्षाविधीही वैदिक पद्धतीहून भिन्न आहे.

गुरूविना मोक्षप्राप्ती नाही व गुरू हा साक्षात शिव आहे अशी त्यांची श्रद्धा होती. म्हणून ते गुरूकडूनच दीक्षा घेत. संसाराचा त्याग करणाऱ्या लोकांनाच दीक्षापात्र समजले जाई. दीक्षेला पात्र होण्यासाठी त्यांना देवीचा अनुग्रह मिळवावा लागे. त्याला शक्तिपात अशी संज्ञा होती. समयदीक्षा, विशेषदीक्षा व निर्वाणदीक्षा अशा तीन दीक्षा शक्तिपाताच्या व्यतिरिक्त असत. या दीक्षित शिष्यांना शिव, शैवशास्त्र व शिवाग्नी यांची उपासना करावी लागे. यांना समयी म्हणत. विशेष प्रकारच्या दीक्षेचा लाभ झालेल्या लोकांना पुत्रक म्हणत. या पुत्रकांना मृत्यू- नंतर ईश्वरपदाची प्राप्ती व्हायची असे. समयी सर्वसाधारण

दासवृत्तीचे असत. निर्वाणदीक्षा घेतलेले शैव सर्वांत उच्च समजले जात. त्यांना जिवंतपणीच दैवी स्वातंत्र्य व पूर्ण स्वातंत्र्य यांची प्राप्ती होत असे.

मध्ययुगात द. भारतामध्ये वीरशैव अथवा लिंगायत हा संप्रदाय निर्माण झाला. शरीरावर शिवलिंग धारण करणे हे त्याचे प्रमुख लक्षण होय. वीरशैव धर्माचा उगम इ. स.च्या दहाव्या शतकाच्या सुमारास झाला व बसवेश्वराने १२ व्या शतकात त्याचा पुनरुद्धार करून त्याला प्रतिष्ठा मिळवून दिली. या संप्रदायाने स्त्रियांनाही शैव दीक्षेचा अधिकार दिला. बसवपुराण व चेन्नबसवपुराण हे त्यांचे प्रमाणग्रंथ होत. रेणुकाचार्यांचे सिद्धान्तशिखामणी व प्रभुलिंगलीले आणि माईदेवाचे अनुभवसूत्र, इ. ग्रंथ यांत वीरशैव मताचे अंतिम उद्दिष्ट म्हणजे जीव व शिव यांचे सामरस्य होय, असे सांगितले आहे. वैष्णवांच्या विशिष्टाद्वैतमताचा वीरशैवांच्या मतावर परिणाम घडला आहे.

**विदेशातील शैवमत**–इ. स. च्या १३ व्या शतकाअखेर भारतात एक धार्मिक संप्रदाय या स्वरूपात शैवमताचा पूर्ण विकास झाला होता. पण हे शैवमत भारतापुरतेच मर्यादित राहिले नाही. भारताबाहेरही त्याचा प्रसार झाला. इ. स.च्या प्रारंभी किंबहुना त्याही आधी विदेशात भारतीय संस्कृती पोचली आणि तिच्याच अनुषंगाने शैवमतही तिकडे गेले. जोवर भारतीय संस्कृती विदेशात नांदली, तोवर शैवमतानेही तिकडे आपला प्रभाव दाखवला.

सम्राट अशोकाच्या कालात नेपाळ, तिबेट, ब्रह्मदेश आणि सिंहलद्वीप या देशांत बौद्ध धर्माने आपली पाळेमुळे घट्ट केली. आजही त्या देशांत तोच एक धर्म जिताजागता आहे. पण नेपाळात फिरून ब्राह्मणी धर्माने डोके वर काढले. त्यामुळे हळूहळू तिथला बौद्ध धर्म ऱ्हास पावला. त्या जागी शैव आणि वैष्णव या संप्रदायांनी तिथे आपला जम बसवला. नेपाळमध्ये आजही शैव मत प्रचलित असून, तिथले पशुपतीचे स्थान ही त्याची मोठी साक्ष आहे. तिबेटातही काही शिवमंदिरे आढळतात. हिंद-चीनमधल्या शैव मताचा उल्लेख पहिल्या प्रथम चंपामधल्या इ. स. ४०० च्या चोहदिन शिलालेखामध्ये आढळतो. तिथला राजा शिवोपासक होता. मात्र त्या देशातली शिवोपासना प्रारंभी वैदिक रुद्राशी संबंधित होती. पुढच्या काळात ती पौराण पद्धतीची बनली. पाचव्या शतकातल्या शंभुवर्मा राजाचा माइसोन शिलालेखही शिवविषयकच आहे. त्यात शिवाला सृष्टि-स्थिति-प्रलयकर्ता मानले असून, त्याला सर्वज्ञ व सर्वश्रेष्ठ म्हटले आहे. सहाव्या शतकाच्या उत्तरार्धात चंपाच्या प्रकाशधर्मा या राजाने एका मंदिरात शिवलिंगाची स्थापना केली होती. बाराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत चंपामध्ये शैव मत अनुस्यूतपणे चालले, असे तिथल्या शिलालेखांवरून कळते.

जावामध्ये ब्राह्मणीधर्माचा प्रचार प्राचीन कालापासून होता. फाहियानला ही गोष्ट प्रामुख्याने दिसून आली. सातव्या शतकात तिथे अनेक शिवमंदिरे द. भारतीय पद्धतीवर निर्माण झाली. जावाचा द. भारताशी बरीच शतके निकटचा संबंध होता. तिथल्या संस्कृतीवर द. भारताची छाप स्पष्ट दिसते. बाली द्वीपातही शैव मत प्रभावी होते. तिथे शिवाची अनेक मुखलिंगे पाहायला मिळतात. ही लिंगे तेराव्या किंवा चौदाव्या शतकातली आहेत. सुमात्रामधले शैव मत जावातल्याप्रमाणेच होते. मलायामध्येही शिव, गणेश आणि देवी यांच्या मूर्ती आढळतात. त्यावरून तिथेही परिवारासह शिवोपासना प्रचलित असावी, असे अनुमान करता येते. [ गा. दै.; भा. प्र. वि.; डे. हि. इ.; शैवमत; नवभारत, जाने. १९६९; पु. वि.; म. सा. अ.; प्रसाद, शिवदैवत अंक, ऑगस्ट १९७० ]

(२) (इ. स. चे १६ वे शतक) एक विद्वान ज्योतिषग्रंथकार. याच्या पित्याचे नाव कृष्ण असे होते. हा तैत्तिरीय शाखेचा व भारद्वाजगोत्री होता. मल्लारी हे त्याचे कुलदैवत होते. शिवाचे सारे घराणेच पांडित्यासाठी प्रसिद्ध होते. आपला पिता त्रिकालज्ञ असून, त्याने अनेक शास्त्रांवर ग्रंथ लिहिले होते, असे शिवाने म्हटले आहे.

अनंतसुधारस नामक ग्रंथावर शिवाने टीका केली आहे. शिवाय मुहूर्तचूडामणी नावाचा त्याचा एक मुहूर्तग्रंथ आहे. दिवाकर नामक त्याच्या शिष्याने जगद्‌गुरू म्हणून त्याचा गौरव केला आहे. [ म. च. को.; भा. ज्यो. शा. ]

## शिवकल्याण

(इ. स. चे १६ वे शतक) एक मराठी कवी. हा आंबेजोगाईचा रहिवासी होता. त्याच्या पित्याचे नाव त्रिमल आणि उपनाम नित्यानंद असे होते. त्रिमल हाच शिवकल्याणाचा गुरू होय. त्रिमलाचे चतुर्थाश्रमीचे नाव नित्यानंद असे होते. नाथपरंपरेतील, मुक्ताबाईच्या शाखेतील हा चौदावा पुरुष होय.

शिवकल्याणाची वेदांती, योगी, पंडित व कृष्णभक्त म्हणून ख्याती आहे. त्याने भागवताच्या दशमस्कंधावर आणि ज्ञानदेवांच्या अमृतानुभवावर टीका रचल्या. त्याची दशमस्कंधावरील टीका फार मोठी आहे. आजवर त्यातील श्रीकृष्णजन्मपंचाध्यायी, रासपंचाध्यायी, ब्रह्मस्तुती, वेदस्तुती, इ. भागच उपलब्ध होता. परंतु अलिकडे डॉ. वि. म. कुलकर्णी यांना त्याची समग्र टीका मिळाली असून, तिची ओवीसंख्या ४४,१५३ इतकी आहे. त्याने कृष्णलीलेवरील आणि रासपंचाध्यायीवरील टीकेत सर्वत्र आध्यात्मिक तत्त्वे खुलवून सांगितली आहेत. शृंगाररसच शांत-

रसाच्या माध्यमातून आपण मांडला, असे कवीनेच रासपंचाध्यायीच्या संदर्भात म्हटले आहे. ज्या दैत्यांच्या नाशासाठी श्रीकृष्णाने अवतार घेतला ते दैत्य कोण, हे सांगताना श्रीकृष्णजन्मपंचाध्यायीच्या प्रथमाध्यायात शिवकल्याण म्हणतो–

**दरिद्रें पिडिले । अधर्मि प्रवर्तले ।**
**आणि विषयासक्ति माजले । तेचि दैत्य ॥**
**एवं आत्मसुखासि चुकले । विषयी आसक्त जाले ।**
**दैत्यशब्दीं बोलिले । तेचि येथें ॥**

शिवकल्याणाची ख्याती आहे, ती अमृतानुभवावरील टीकेमुळे. मुळात त्याने ही गद्य टीका केली होती. परंतु श्रवण-पठणास सुलभ व्हावे म्हणून नंतर ती ओवीबद्ध केली. या टीकेचे नाव नित्यानंदैक्यदीपिका असे आहे. कृष्णयाज्ञवल्कीच्या गोपाळ नामक मुलाच्या विनंतीवरून त्याने ही टीका रचली. या टीकेचा प्रारंभ देवगिरीला आणि अखेर पंढरपूरला झाली आहे. टीकेत ज्ञानदेवांचे हृद्गत त्याने समरसतेने स्पष्ट करून सांगितले आहे. कारण ज्ञानदेवांविषयी त्याला अपार श्रद्धा आहे. गुरुकुळाचे मंडन, महासिद्ध अशा वेचक शब्दांत तो त्यांचा गौरव करतो. त्याच्या ज्ञानदेवप्रशस्तीच्या काही ओव्या अशा–

**अगा कलिकाले आकलिता जन ।**
**हाती घेऊन ज्ञानखड्ग जाण ।**
**अवतरला आत्मा पूर्ण । ज्ञानेश्वरवेशे ॥**
**अगा ज्ञानाज्ञानविहीन । निखळ ज्ञानमात्र संपूर्ण ।**
**म्हणोनि ज्ञानेश्वर ऐसी खूण । रूपा आली ॥**
**तेणें श्रीगीतालयाचे कपाट । उघडूनि केली मोकळी वाट ।**
**गीतेश्वर प्रगट । दाखविला लोकां ॥**
**तया गीतेश्वराचे दर्शन । केल्या होतसे कलिकाल भग्न ।**
**मग करावया अमृतपान । वाटिका रचिली ॥**
**जेथें विनारोपणेंवीण । शाखापल्लवविहीन ।**
**विकासलीसे जाण । अमृतलता ॥**
**अगा जे अमृतातें जीवविते ।**
**म्हणोनि अनुभवामृत म्हणिजे तयाते ।**
**म्हणिजे लोक म्हणती जयाते । अमृत ऐसे ॥**

(नित्या. १.१२५–१३०)

अमृतानुभवाच्या मूळ आठशे ओव्यांवर त्याने चौसष्टशे दहा इतक्या ओव्या रचल्या आहेत. या टीकेत मूळ ग्रंथाचे नाव अनुभवामृत असे दिले आहे. यावरून सुमारे १६ व्या शतकापर्यंत तरी हा ग्रंथ अनुभवामृत या नावानेच परिचित होता, असे दिसते. संस्कृत ग्रंथांवर टीका करण्याची परंपरा सोडून प्राकृत ग्रंथावर टीका रचण्याचा पायंडा शिवकल्याणाने सुरू केला, असे म्हणावे लागते. [ म. सा.; म. वा. इ. खं. २, संपा. पांगारकर.; प्रा. म. वा. स्व.; प्रा. म. सं.; नित्यानंदैक्यदीपिका; नवभारत, जून १९६३ ]

**शिवकांची** सुप्रसिद्ध कांची नगरीतल्या एका भागाला हे नाव आहे. या भागात कामाक्षी व आम्रेश्वर अथवा एकांबरनाथ ही प्रसिद्ध मंदिरे आहेत. एकांबरनाथ मंदिराच्या महाद्वारावरील गोपुर १८८ फूट उंच असून, ते दहामजली आहे. मंदिराच्या सभामंडपाला एक सहस्र खांब आहेत. पाहा – कांची. [ कल्याण–तीर्थांक ]

**शिवकुमारबेला व्रत** एक जैन व्रत. यात चौसष्ट बेला आणि चौसष्ट पारणा असतात. प्रत्येक महिन्यातील प्रत्येक सप्तमी व अष्टमी अथवा त्रयोदशी किंवा चतुर्दशी या तिथींना बेला आणि नवमी व पूर्णिमा या तिथींना पारणे करतात. व्रतावधी सोळा महिने. [ जै. व्र. वि. सं.]

**शिवकृष्णाष्टमी** एक काम्य व्रत. मार्गशीर्ष कृष्ण अष्टमीला प्रारंभ करून प्रत्येक कृष्णाष्टमीला वर्षभर शिवलिंगाची पूजा करणे हा या व्रताचा विधी आहे. [ हि. ध.]

**शिवगंगा** एक तीर्थक्षेत्र. याला दक्षिणकाशी असेही म्हणतात. म्हैसूर राज्यातील ककुद्‌गिरीवर हे स्थान आहे. इथे गंगाधरेश्वराचे विशाल गुहामंदिर आहे. तसेच, इथे देवीचेही एक सुंदर मंदिर आहे. इथली लहान लहान इतर मंदिरेही गुंफा खोदून बनवलेली आहेत. इथल्या संतेश्वर तीर्थाच्या भिंतींवर रामायणातील बरेचसे कथाप्रसंग अंकित केलेले आहेत. ककुद पर्वतावर पातालगंगा, चक्रतीर्थ, मैत्रेयतीर्थ, गंगातीर्थ इ. नावांची काही कुंडे व सरोवरे आहेत. [ कल्याण – तीर्थांक ]

**शिवगीता** ही पद्मपुराणांतर्गत समजली जाते. या गीतेत १६ अध्याय असून, श्लोकसंख्या ७६८ आहे. रावणाने सीतेचे हरण केल्यानंतर विमनस्क बनलेल्या रामाला अगस्त्य मुनीने ही शिवगीता सांगितली, अशी या गीतेची भूमिका आहे. हिच्यातले विषय अध्यायवारीने असे –

(१) प्रास्ताविक पार्श्वभूमी. (२) अगस्त्य–राघव संवाद. (३) पाशुपतव्रतवर्णन. (४) रामाच्या आराधनेमुळे घडलेले शिवाचे आविर्भाव. (५) रामाला शिवाकडून महापाशुपत अस्त्राची प्राप्ती. (६) विभूतियोग. (७) विश्वरूपदर्शन. (८) पांचभौतिक देहाचे गर्भावस्थेपासून मरणापर्यंतचे स्वरूप. (९) देहाच्या असारतेचे वर्णन. (१०) जीवकूटस्थ...

(११) मुक्तिप्रकारांचे वर्णन. (१२) उपासनाप्रपंचयोग. (१३) कैवल्यमुक्तिवर्णन. (१४) पंचकोशविवरण. (१५) भक्तियोगवर्णन. (१६) मोक्षाधिकारी व शिवपूजा यांचे स्पष्टीकरण करून उपसंहार.

भगवद्गीता ही विष्णु(कृष्ण)पर असून, शिवगीता शिवपर आहे. तिच्यावर भगवद्गीतेचा खूप प्रभाव आहे. भगवद्गीतेतले अनेक श्लोक, श्लोकार्ध व शब्दसमूह जसेच्या तसे किंवा किंचित फरकाने शिवगीतेत आढळतात. भगवद्गीतेतील उदार विचारांचा आदर्श स्वीकारून शिवोपासकांना मार्गदर्शन करण्यासाठी शिवगीतेची निर्मिती झालेली आहे. या गीतेत शिवाची आराधना सांगताना विष्णूचे महत्त्वही कमी लेखलेले नाही. शिवगीतेची ही समन्वयदृष्टी शैव संप्रदायामध्ये महापाशुपत अथवा मिश्रपाशुपत यांची आहे.

शिवगीतेवर अनेक संस्कृत टीका असून, काही मराठी टीकाही आहेत. [श्री. रा. चिं. ढेरे—प्रसाद मासिक, शिवदैवत विशेषांक, ऑगस्ट १९७०]

**शिवचतुर्दशी व्रत** एक काम्य व्रत. याला माहेश्वर व्रत असेही म्हणतात. चतुर्दशी ही शिवतिथी आहे. व्रतावधी एक किंवा बारा वर्षे. व्रतविधी असा —

मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीपासून व्रतारंभ करावा. त्रयोदशीला एकभुक्त करून शिवाची प्रार्थना करावी. चतुर्दशीला उपवास व उमा-महेश्वरांची शुभ्र कमळांनी पूजा करावी. या पूजेचा प्रारंभ पायापासून करावा. व्रतकर्त्याने प्रत्येक महिन्यात वेगवेगळ्या नावांनी शिवनमस्कार करावा आणि मार्गशीर्षापासून पुढे प्रत्येक महिन्यात एकेक याप्रमाणे अनुक्रमे गोमूत्र, गोमय, दूध, दही, तूप, कुशोदक, पंचगव्य, बेल, यव, गोशृंगजल, जल व काळे तीळ या वस्तू भक्षण कराव्या. हाच विधी पुढे सर्व चतुर्दशींना करावा. उद्यापनाच्या वेळी एक निळा बैल पोळ म्हणून सोडावा व एक पलंग दान द्यावा. फल — सहस्र अश्वमेधांचे पुण्य लाभते व पापनाश होतो. हे व्रत नंदीने नारदाला सांगितले होते, अशी कथा आहे. [हि. ध.; व्र. प.]

**शिवतत्त्वरत्नाकर** एक धर्मकोश. बसवभूपाल या राजाने हा कोश रचला. इ. स. १६९४ ते १७९४ असा याचा काळ आहे. हा केलदी प्रदेशावर राज्य करीत होता. हा प्रदेश स्थूलमानाने गोव्याच्या दक्षिणेला कन्ननोरपर्यंत पसरला होता. कर्नाटकातील शिमोगा जिल्हाही या राज्यात समाविष्ट होता. बसवभूपालाने आपला पुत्र सोमशेखर याच्या प्रश्नांना उत्तरे देण्यासाठी प्रस्तुत ग्रंथ रचला. त्याने आपल्या राजवंशाचा संस्थापक चौडप्प याच्यापासून प्रारंभ करून आपल्या माता-पित्यांपर्यंतचा वंशेतिहासही प्रारंभी त्यात दिला आहे.

ग्रंथाचे स्वरूप संकलनात्मक आहे. अनेक स्मृती, शैव ग्रंथ, राज्यशास्त्र, संगीतशास्त्र, वैद्यकशास्त्र, पाकशास्त्र, कामशास्त्र इ. विषयांवरील ग्रंथांतली माहिती त्यात संकलित केली आहे.

प्रस्तुत ग्रंथ संस्कृतश्लोकबद्ध असून, त्याचे कल्लोल नावाचे नऊ विभाग आहेत. कल्लोलांची पुनश्च तरंगांमध्ये विभागणी केली असून, असे तरंग १०८ आहेत. ग्रंथाची श्लोकसंख्या सुमारे तीस हजार आहे. प्रत्येक कल्लोलाच्या शेवटी त्या त्या कल्लोलातील विषय कोणकोणत्या ग्रंथातून घेतले आहेत, त्या ग्रंथांची नावे दिली आहेत.

तत्कालीन धर्माचे स्वरूप समजण्याच्या दृष्टीने या ग्रंथाचा फार उपयोग आहे. कर्त्याने सर्व विषय धर्माचा एक भाग म्हणून मांडले आहेत. त्या दृष्टीने वेगवेगळ्या चालीरीती, अंधविश्वास, देवतांची पूजा, होम, हवन, दक्षिणा, आचाराविषयीचे विधि-निषेध यांची या ग्रंथात रेलचेल दिसून येते. ग्रंथकर्त्याची चातुर्वर्ण्यावर विलक्षण श्रद्धा असून, ते तत्त्व त्याने सर्व सृष्टीला लागू केले आहे. प्रस्तुत कोशातली वानगीदाखल माहिती अशी—

**विश्वरचना** — विश्वात भारत, किंपुरुष, हरिवर्ष, रम्यक, उत्तर, हिरण्मय, उत्तरकुरू अशी सात वर्षे आहेत. पृथ्वीपासून सूर्य एक लक्ष योजने दूर आहे. सूर्यापासून चंद्र लक्ष योजनांवर आहे, इत्यादी.

**आचारधर्म** — अन्नग्रहण करताना मौन पाळावे. फुंकून खाऊ नये. परनिंदा वर्ज्य करावी, थोरांना वंदन करावे, इत्यादी.

**कर्मविपाक** — शुभाशुभ कर्मांचे फल शुभाशुभ मिळते. निंद्य कर्माचे फल म्हणजे नरकप्राप्ती. रौरव, महातम, सुप्रपीडन, संकट, मलपर्वत, इ. नरक आहेत. ब्रह्महत्या, सुरापान, शिवनिंदा, ही महापापे होत. परोपकार म्हणजे पुण्य होय.

**स्वप्ने** — शुभाशुभ फले सूचित करण्याचे सामर्थ्य स्वप्नांमध्ये असते. रात्रीच्या पूर्वभागात पडलेल्या स्वप्नांचे फल उशिरा मिळते. अरुणोदयाच्या वेळी तेच बारा दिवसांनी मिळते. गोदोहनाच्या वेळी तेच तीन रात्रीत मिळते. गाई चरायला सोडण्याच्या वेळच्या स्वप्नाचे फल त्याच दिवशी मिळते.

**शकुन** — भावी गोष्टींची सूचना शकुनांवरून मिळते. बाहेर जाण्याच्या वेळी पाठीमागून वाहणारा वारा कार्यसिद्धी सूचित करतो. बाहेर जाताना सच्छील ब्राह्मण, वेश्या, कन्या, तांदूळ, फलपुष्प, गाय, प्रेत, पूर्णकुंभ, इ. गोष्टी दिसणे म्हणजे शुभ शकुन होय. हिजडा, मुका, बहिरा, संन्यासी, तेल, लोखंड, मांजर, माकड, गाढव, रिकामा घडा, इ. दिसणे हा अशुभ शकुन होय.

**राज्यशास्त्र** — राजाने तृष्णा सोडावी, क्षमा धरावी, पाप-

बुद्धी ठेवू नये, खरे बोलावे, विद्वानांची सेवा करावी, दुःखितांवर दया करावी, सज्जनांची मैत्री करावी, दुष्टांचा सहवास सोडावा, आत्मस्तुती टाळावी व शरणागतांचे रक्षण करावे.

**कर्ज व वाटणी** – अविभक्त कुटुंबासाठी कुटुंबप्रमुखाने कर्ज काढले व तो मृत झाला किंवा परागंदा झाला, तर ते ऋण फेडण्याची जबाबदारी वारसांवर राहते. पती किंवा पुत्र यांनी केलेले ऋण स्त्रीला फेडावे लागत नाही. मद्य, द्यूत व कामप्राप्ती यासाठी केलेले पित्याचे ऋण पुत्राला फेडावे लागत नाही, पित्याने वाटणी करताना ती आपल्या इच्छेनुसार करावी. थोरल्या मुलाला जास्त वाटा द्यावा किंवा सर्वांना सारखा द्यावा.

प्रस्तुत ग्रंथकर्ता हा वीरशैव असल्यामुळे तत्त्वज्ञान, मोक्ष, दीक्षा, आचार, इ. विषय त्याने शैवशास्त्राला अनुसरून सांगितले आहेत. [ डॉ. गणेश थिटे –नवभारत, एप्रिल–मे, १९७४ ]

## शिवदयाल सिंह

(इ. स. १८१८–१८७८) राधास्वामी संप्रदायाचा प्रवर्तक. हा जातीने खत्री सेठ होता. याचा जन्म आग्रा या गावी झाला. याच्या वडिलांचे नाव दिलवाली सिंह असे होते. दिलवाली सिंह प्रथम नानक पंथाचा अनुयायी होता. परंतु संत तुलसीसाहेबाच्या सहवासाने त्याला साहिबपंथाबद्दलही ओढ वाटू लागली. शिवदयालाची आई, आत्या वगैरे घरातील मंडळीही धार्मिक प्रवृत्तीची असल्यामुळे घरचे वातावरण शिवदयालाच्या आध्यात्मिक साधनेला अनुकूल होते. लहानपणी त्याने हिंदी, फारसी, अरबी व संस्कृत या भाषांचे अध्ययन केले. वयाच्या सहाव्या-सातव्या वर्षापासूनच त्याचा सत्संगाकडे व आध्यात्मिक चिंतनाकडे कल झुकला. काही वेळा घरातल्या एखाद्या खोलीत दोन-दोन तीन-तीन दिवस तो चिंतन करीत बसे आणि त्या काळात खोलीबाहेरही येत नसे.

फरीदाबादच्या इज्जतरामाच्या घरातील मुलीशी शिवदयालाचा विवाह झाला. त्याच्या पत्नीला त्याचे अनुयायी राधाजी असे म्हणत. ती उदार होती व तिचाही कल अध्यात्माकडेच होता. या दांपत्याला मूलबाळ झाले नाही. राधाजी इ. स. १८९४ मध्ये मरण पावली.

शिवदयालाला वृंदावनदास व प्रतापसिंह असे दोन धाकटे भाऊ होते. त्यांच्या घरात सावकारीचा धंदा चालत होता. पण वृंदावनदासाने नोकरी पत्करली होती. तेव्हा याने प्रतापसिंहाला सांगितले. 'तू सर्व कर्जदारांना बोलाव आणि त्यांना माझा निरोप सांग, की जर तुम्हांला आमचे कर्ज फेडायचे असेल तर एका आठवड्याच्या आत फेडून टाका. नाहीतर तुमचे सर्व कागदपत्र फाडून टाकण्यात येतील.'

त्याप्रमाणे कर्जदारांना सूचना दिल्यावर काहींनी आपले कर्ज परत केले शिवदयालच्या घरातील सावकारीचा धंदा बंद झाला. शिवदयाल काही दिवस फारसी भाषा शिकवून पैसे मिळवीत होता. ते त्याने बंद केले. त्यामुळे साऱ्या कुटुंबाच्या चरितार्थाचा भार वृंदावनदासावर येऊन पडला.

इ. स. १८६० मध्ये शिवदयालाने लोकांना उपदेश द्यायला सुरुवात केली. त्याच्या मृत्यूपर्यंत त्याला सुमारे आठ-दहा हजार अनुयायी मिळाले. हे अनुयायी हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती व जैन अशा सर्व धर्म-पंथांचे होते. त्यांपैकी सुमारे एक हजार साधू होते आणि बाकीचे गृहस्थ होते.

याचे अनुयायी याला परम पुरुष राधास्वामी दयाळाचा अवतार मानीत व त्याला स्वामीजी महाराज असे संबोधीत. याने सारवचन ( नज्म ) व सारवचन ( नसर ) नावाचे दोन ग्रंथ लिहिले आहेत. सारवचन (नज्म) हा ९९३ पृष्ठांचा मोठा ग्रंथ असून, त्यात याची बेचाळीस वचने व त्या वचनांतील शब्दांचे विवरण आहे. या दोन्ही ग्रंथांत राधास्वामी पंथाची मूलतत्त्वे दिलेली आहेत. ही पुस्तके छापलेली असली तरी, पंथाच्या अनुयायांशिवाय इतरांना ती उपलब्ध होत नाहीत.

शिवदयाल इ. स. १८७८ मध्ये मृत्यू पावला. त्याची समाधी आग्रा येथे स्वामीबागेत आहे. तिथे दरवर्षी त्याच्या पुण्यतिथीला त्याचे अनुयायी जमतात व मोठा उत्सव करतात. याच्या मुख्य समाधीचे काम इ. स. १९०४ मध्ये सुरू झाले व अजूनही ते चालूच आहे. शुद्ध संगमरवरी व इतर मौल्यवान दगडांच्या साहाय्याने हे बांधकाम चालू आहे. स्वामीबाग ही दयालबाग या नावाने अधिक प्रसिद्ध असून, हौशी प्रवासीही या स्थानाला भेट देत असतात. [उ. भा. सं. प.]

## शिवदिन केसरी

( इ. स. १६९८–१७७४ ) एक नाथसांप्रदायिक मराठी संतकवी. त्याच्या पित्याचे नाव कृष्णाजीपंत, आईचे नाव सरस्वती आणि उपनाव जोशी असे होते. हा शुक्ल यजुर्वेदी, माध्यंदिन शाखेचा कौशिकगोत्री ब्राह्मण होय. शिवदिन पैठणचा रहिवासी होता. बालपणी तो फार हूड व छांदिष्ट होता, म्हणून त्याला केसरीनाथांच्या स्वाधीन करण्यात आले. केसरीनाथांनी त्याच्याकडून चांगला विद्याभ्यास करवून घेतला आणि वयाच्या आठव्या वर्षी त्याला गुरुमंत्र दिला. पुढे हाच शिवदिन केसरी या नावाने प्रसिद्ध झाला. शिवदिन कीर्तने करीत असे. त्याविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी— एकदा त्याच्या कीर्तनाला जर्जरीवक्ष नावाचा एक फकीर आला होता. त्याच्या कीर्तनावर प्रसन्न होऊन या अवलियाने आपल्या डोक्यावरची टोपी

काढून त्याच्या डोक्यावर ठेवली आणि त्याला पगडीबंधू केले. तेव्हापासून हा आपल्याला शिवदिननाथ असे म्हणवू लागला. शिवदिनाचे वयाच्या बाराव्या वर्षी लग्न झाले. त्याला नरहरीनाथ व गदाधरनाथ अशी दोन मुले झाली. या दोन्ही मुलांनी पित्याकडूनच गुरुदीक्षा घेतली व अध्यात्मात प्रगती केली. पुढे याने म्हातारपणी पैठणलाच महाशिवरात्रीला समाधी घेतली. तिथे त्याचा मठही आहे.

या संतकवीने विवेकदर्पण, ज्ञानप्रदीप, इ. ग्रंथ आणि काही स्फुट पदे रचली आहेत. ज्ञानप्रदीप ही एक संस्कृत ग्रंथावरील मराठी टीका असून, तिची ओवीसंख्या १२५६ इतकी आहे. या ग्रंथात गणेशनमन, गुरुमहिमा, मराठीचा पुरस्कार, नवविधाभक्ती, सांप्रदायिक तत्त्वज्ञान, इ. विषय आहेत. त्याची पदे मोठी ठसकेबाज व वेधक आहेत. पानपतानंतर महाराष्ट्राची मोडतोड त्याने पुढील पदात वर्णन केली आहे–

सोळा शतें चौऱ्यांशित झाली धुळधानी ।
द्वैतराज्य दुष्टबुद्धी नाशिले प्रधानीं ॥ ध्रु ॥
ब्यांशीं त्र्यांशीं गेले भाऊ नाना दोनी ।
तैसी कोणी कोणाची मानिना निदानी ॥
सारा दाणा जप्ती पट्टी द्रव्य गृह खाणी ।
पंचांशित लुटालुट मांडिली तापत्रय दुःखांनी ॥
देशग्रामवस्ती ओस पाडिल्या पेंढाऱ्यांनी ।
तस्कर पुस्कर पापी उदधी आणिले खिंडाऱ्यांनीं ॥
हाहाःकार तो फारचि केला राघोबा बाघांनीं ।
उरली सुरली ग्रामअहंता बुडविली द्वेषांनीं ।
तीर्थे क्षेत्रें गाई ब्राह्मण फार कष्टलीं क्लेशांनीं ॥
भक्त विरक्त साधुसंत ग्राही बोलति वाणी ।
शिवदिनकेसरी भगवंता तूं यासी पाव निर्वाणीं ॥

याशिवाय त्याची काही पदे फार लोकप्रिय आहेत. [म. सा.; म. वा. इ. खंड ३ रा– संपा. श्री. जोग; गो. च. प.; म. क. च.]

## शिवदीक्षा

शैव पंथात प्रवेश मिळण्यापूर्वी घ्यावी लागणारी दीक्षा. तिचा विधी लिंगपुराणात (उत्तरार्ध, अध्याय २२) सांगितला आहे, तो असा–

उत्तम जागा पाहून ती सुवासिक द्रव्यांनी सारवावी व तिच्यावर छत उभारावे. त्या जागेवर एक हात चौरस असे एक मंडल करावे. त्याच्या आठ दिशांना आठ पाकळ्या येतील असे कमळ काढावे. पाकळ्या पांढऱ्या किंवा तांबड्या रंगाच्या असाव्या. त्या पाकळ्यांवर शंकराच्या पुरुषादी आठ स्वरूपांची व अष्टसिद्धींची स्थापना करावी. उन्मनी व उन्मन यांसह ॐकाररूप शिवाला कर्णिकेत बसवावे. त्याच्या जवळ ब्रह्मा, विष्णू, महेश, अंबादी देवी व लोकपाल यांची स्थापना करावी. नंतर शिवाची व इंद्रादी लोकपालांची पूजा करावी. उत्तम भाताचा नैवेद्य दाखवून अर्धा भात शिवाला अर्पण करावा व अर्ध्या भाताचा होम करावा. हुतशेष भाग शिष्याला खायला द्यावा. 'तत्पुरुषाय०' या मंत्राने होम करावा. 'ईशानः सर्वविद्यानाम्० ' या मंत्राने अभिमंत्रित पंचगव्य प्राशन करावे. 'वामदेव' मंत्र म्हणून भस्म धारण करावे. गायत्रीचा जप करावा व मंडलावर दोन वस्त्रे, यज्ञोपवीत, सुवर्ण व रत्ने ठेवावी. तसेच, पाच कलश भरून ठेवावे व पाच ब्राह्मण त्यांच्या शेजारी बसवावे. मग चरूचा होम करावा आणि राहिलेला भात शिष्याला खायला द्यावा. मग मंडलाच्या दक्षिणेला त्याला दर्भासनावर बसवावे आणि 'अघोरेभ्यो०' या मंत्राने तुपाच्या एकशे आठ आहुती द्याव्या. शिवध्यानपरायण होऊन शिष्याने तिथेच सर्व रात्र काढावी. दुसऱ्या दिवशी त्याला यथाविधि स्नान घालून वस्त्रालंकार घालायला द्यावे व त्याचे मंगल विधी करावे. मग धोतराच्या पदराने शिष्याचे डोळे बांधून त्याला मंडलाजवळ आणावे आणि 'ईशानः सर्वविद्यानाम्०,' हा मंत्र म्हणून सुवर्णपुष्पे त्याच्या ओंजळीत द्यावी. त्याला तीन मंडलप्रदक्षिणा करायला लावाव्या. मग रुद्रावर्तन म्हणून किंवा केवळ ओंकार शब्दाने शिवाचे ध्यान करून शिष्याने ती पुष्पांजली मंडलावर टाकावी. मग शिवतीर्थ शिष्याच्या अंगाला लावावे व 'अघोरेभ्यो०' या मंत्राने त्याच्या अंगाला भस्म चर्चावे. मग त्याच्या डोळ्यांवरचे वेष्टन काढून त्याला मंडलदर्शन घेऊ द्यावे. नंतर शिवाच्या दक्षिणामूर्तीजवळ त्याला दर्भासनावर बसवावे.

## शिवदूत

हे बुटके, स्थूल व लाल वर्णाचे असतात. त्यांच्या मुखातून दोन सुळे बाहेर आलेले असतात. त्यांना चार हात असून, त्यांत पाश, सर्प, त्रिशूळ व मद्यपात्र या वस्तू असतात. त्यांच्या अंगावर अलंकार असतात. शिवभक्त मरण पावल्यावर त्यांच्या आत्म्यांना पुष्पक विमानातून कैलासावर नेणे, हे यांचे कार्य असते. [सा. इं. गॉं.]

## शिवदूती

देवीचे एक रूप. शिवदूतीचा जन्म शिवापासून झाला आणि अंबिकेने तिला शुंभ दैत्याकडे दूती म्हणून पाठवले, असे कालिकापुराणात सांगितले आहे. शैव तसेच शाक्तही हिची पूजा करतात. कालिकापुराणात हिचे वर्णन आढळते, ते असे–

हिचे शरीर स्थूल असून, वर्ण कुंकवासारखा आहे. तिचे दातही लाल आहेत. तिला चार हात असून, त्यांत तिने शूल, खड्ग, पाश आणि चर्म धारण केले आहे. तिचे मुख रुंद व ओठ

जाड आहेत. तिने गळयात मुंडमाला व नागहार घातला आहे. तिच्या कानांत नागकुंडले आहेत. तिच्या केसांचा जटाजूट असून, त्यात अर्धचंद्र चमकत आहे. ती उंच असून, दिसायला भयंकर आहे. तिने आपला उजवा पाय प्रेताच्या छातीवर ठेवला असून, डावा पाय कोल्ह्याच्या पाठीवर ठेवला आहे. तिच्या भोवती शेकडो कोल्हे असतात.

श्रीविद्यार्णवतंत्रात हिला रक्तवसन, त्रिनयन व अष्टभुज असे म्हटले आहे. [ श. क.; दे. को. ३.; पी. के. गो. को. व्हॉं. ]

**शिवनक्तव्रत** एक काम्य व्रत. प्रत्येक कृष्ण अष्टमी व चतुर्दशी या तिथींना नक्तभोजन करून शिवपूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. एक वर्षानंतर उद्यापन करायचे असते. फल–शिवलोकप्राप्ती. [ हि. ध.]

**शिवनक्षत्रपुरुष व्रत** एक काम्य नक्षत्रव्रत. शिव ही या व्रताची देवता होय. फाल्गुन शुक्ल पक्षात हस्त नक्षत्र असेल त्या दिवशी व्रताचा संकल्प करावा. प्रत्येक अवयवाला २७ नक्षत्रांची नावे देऊन शिवाची नखशिखान्त पूजा करावी. तेल व मीठ वर्ज्य करून नक्त भोजन करावे. तांदूळ व घृतपात्र यांचे दान द्यावे. उद्यापनाच्या दिवशी उमा-महेश्वरांच्या सुवर्णमूर्ती व सुसज्ज पलंग यांचे दान द्यावे. फल – शिवलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**शिवनाथदास** (इ. स. च्या १९ व्या शतकाचा पूर्वार्ध) एक हिंदी संतकवी. हा दरियादासाचा शिष्य असून, त्याच्या संप्रदायाचा अनुयायी होता. या संप्रदायाच्या चार प्रमुख मठांपैकी तेलपा मठ हा बिहार प्रदेशाच्या सारण जिल्ह्यात आहे. तिथे शिवनाथाचा निवास होता. तिथेच त्याने आपला शिवनाथसागर नावाचा ग्रंथ रचला. या ग्रंथात निर्गुणोपासना, योग, नामस्मरण, साधुसेवा आणि पुरुषार्थ यांची चर्चा केली आहे. दोहा, चौपाई, सोरठ, इ. छंदांत हा ग्रंथ रचलेला आहे. ग्रंथाची भाषा भोजपुरीने प्रभावित सधुक्कडी आहे. [ हिं. सा. बि.]

**शिवपंचाक्षर मंत्र** 'शिवाय नमः' हा शिवाचा पंचाक्षरी मंत्र आहे. कोण्याही मुमुक्षूला, स्त्रीला व शूद्रालाही हा मंत्र घेता येतो. त्यासाठी होमादी विधान करण्याची गरज नाही. या मंत्राचा ऋषी वामदेव, छंद पंक्ती व देवता ईश आहे. ब्राह्म मुहूर्तावर प्रारंभ करून मध्याह्न होईपर्यंत या मंत्राचा जप करावा. त्यानंतर केल्यास तो विफल होतो. बेलाच्या झाडाच्या मुळाशी बसून मंत्राचा जप केल्याने, एका दिवसाच्या अनुष्ठानानेही पुरश्चरणाचे फळ मिळते. बेलाच्या वृक्षांच्या उद्यानात कुटी उभारून तिच्यात नित्य जप करणाऱ्यांचे सर्व मंत्र केवळ जपानेच सिद्ध होत असतात.

'शिवाय नमः' या मंत्राच्या जपाचा प्रयोग असा – आचमन व प्राणायाम करून कंबलादी आसनावर पद्मासन किंवा स्वस्तिकासन घालून बसावे. नंतर देशकालाचा उच्चार करून 'मम श्रीशिवसाक्षात्कारसिद्धिपूर्वकधर्मार्थकाममोक्षार्थसिद्ध्यर्थं श्रीसदाशिवप्रीत्यर्थं श्रीशिवपञ्चाक्षरविद्योपासनं करिष्ये' असा संकल्प करावा. नंतर अंगन्यास करून शिवध्यान करावे.

नंतर शिवाची बाह्य किंवा मानस उपचारांनी पूजा करावी. मग जपाला प्रारंभ करावा. झालेला जप शिवाला अर्पण करावा. सहा लक्ष जप झाल्यावर घृतयुक्त तिळांच्या किंवा क्षीरवृक्षाच्या समिधांच्या सहा हजार आहुती देऊन कर्म समाप्त करावे. अनुष्ठान पूर्ण होईपर्यंत नियमस्थ व जितेंद्रिय राहावे. [ आचारेन्दुः ]

**शिवपवित्र व्रत** एक काम्य तिथिव्रत. आषाढ पूर्णिमेला यज्ञोपवीत अर्पण करून शिवपूजा करणे व शिवभक्तांना भोजन घालणे, हा या व्रताचा विधी आहे. कार्तिक पौर्णिमेला पुन्हा शिवपूजा व तडीतापसी यांना दक्षिणा द्यावी, असेही सांगितले आहे. फल – शिवलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**शिवपुराण** एक पुराण. हे महापुराण का उपपुराण या बाबतीत मतभेद आहेत. विष्णुपुराणातील यादीत हे महापुराण असून, याचा क्रमांक चौथा आहे. देवीभागवत, मत्स्य व नारद पुराणांत वायुपुराणाला महापुराण म्हटले असून, त्याचाही क्रमांक चौथाच दिला आहे. या पुराणांच्या अन्वये शिवपुराण हे उपपुराण ठरते. पद्मपुराणानुसार हे तामस पुराण आहे. काहींच्या मते वायुपुराण हेच शिवपुराण होय. पण सांप्रत शिव आणि वायु या दोन्ही पुराणांचे स्वतंत्र ग्रंथ मिळतात आणि त्यांच्या आकारप्रकारांत व वर्ण्य विषयांत नितांत भिन्नता आढळते.

शिवपुराण लक्ष श्लोकात्मक असल्याचे सांगितले असून, त्यात पुढील बारा संहिता आहेत – (१) विद्येश्वर (२) रुद्र (३) विनायक (४) ओम् (५) मातृ (६) रुद्रैकादश (७) कैलास (८) शतरुद्र (९) कोटिरुद्र (१०) सहस्रकोटिरुद्र (११) वायुप्रोक्त व (१२) धर्म. या सर्व संहिता मिळून लक्ष श्लोकसंख्या भरते. पण अशी लक्षश्लोकात्मक संहिता कुठेच उपलब्ध होत नाही. सांप्रत मुंबई व मथुरा अशा दोनच प्रती आढळतात. त्या दोहोंतही शिवपुराणाची श्लोकसंख्या २४,००० एवढी आहे. दोन्ही प्रती जवळजवळ सारख्याच आहेत. या प्रतींत शिवपुराणाच्या सात संहिता दिल्या आहेत, त्यांची नावे अशी

(१) विद्येश्वर संहिता अ. २५ (२) रुद्र संहिता अ. १९७. रुद्रसंहितेत सृष्टी, सती, पार्वती, कुमार व युद्ध असे पाच खंड आहेत.(३) शतरुद्र संहिता अ. ४२ (४) कोटिरुद्र संहिता अ. ४३ (५) उमा संहिता अ. ५१ (६) कैलास संहिता अ. २३ व (७) वायवीय संहिता (पूर्वभाग अ. ३५ व उत्तर भाग अ. ४१.)एकंदर सातही संहिता मिळून ४५७ अध्याय होतात.

वरील सात संहितांमधील विषय स्थूलमानाने असे –

(१) विद्येश्वर संहिता – शिवाचे श्रवण, कीर्तन आणि मनन ही मुक्तीची साधने; ही ज्याला शक्य नसतील त्याने शिवलिंगाची पूजा करावी. शिव आणि विष्णू यांच्यांत श्रेष्ठत्वाबद्दल युद्ध. शिवाने फेकलेल्या पाशुपतास्त्राने देव घाबरतात आणि कैलासाचा आश्रय घेतात. शिवाचे श्रेष्ठत्व. ब्रह्मा-विष्णूंना पंचकृत्ये आणि प्रणवमंत्र उपदेशून शिव अंतर्धान पावतो. शिवक्षेत्रे, सदाचार, यज्ञ, पार्थिव पूजा, पंचाक्षर मंत्र, इत्यादींचे वर्णन. पुढे पार्थिव पूजा, भस्मप्रकार, बिल्व, रुद्राक्ष, इत्यादींचे वर्णन.

(२) रुद्र संहिता – नारदगर्वहरण. नारदाचे शिवक्षेत्रदर्शनासाठी पृथ्वीवर भ्रमण. मग काशी क्षेत्रात वास्तव्य. पुढे ब्रह्मदेवाची भेट. ब्रह्मदेव त्याला शिवशक्तीपासून शिवलोक, काशीक्षेत्र, विष्णू, पंचवीस तत्त्वे, इ. उत्पन्न झाल्याचे सांगतो. ब्रह्मा-विष्णू यांच्यामध्ये स्वतःच्या श्रेष्ठत्वाविषयी विवाद. त्यांच्यामध्ये शिवलिंगाची उत्पत्ती. त्याचा आद्यंत दोघांनाही कळत नाही. शेवटी ते दोघे शिवाचे श्रेष्ठत्व मान्य करतात. लिंगपूजा सर्वांचे सर्व मनोरथ पूर्ण करणारी आहे. लिंगपूजेला चाफा व केवडा ही फुले वर्ज्य. पार्वतीचा जन्म, शिव-पार्वतीविवाह, कामदहन, कार्तिकेयजन्म, तारकासुरवध, गणेशजन्म, त्रिपुरदाह, जलंधराख्यान, अंधकासुरवध, बाणासुरचरित्र, इत्यादी.

(३) शतरुद्र संहिता – शिवाचे पाच अवतार व अष्टमूर्ती. अर्धनारीनटेश्वर, नंदी, भैरव, शरभ, हनुमान इत्यादींचे अवतार. बारा ज्योतिर्लिंगे व त्यांचे माहात्म्य.

(४) कोटिरुद्र संहिता – अत्री व अनसूया यांचे तप. पशुपतिनाथमाहात्म्य. गौतमतपश्चर्या, त्र्यंबकेश्वरमाहात्म्य. गोदावरीची उत्पत्ती, शिवरात्रिव्रत. ज्योतिर्लिंग. शिवसहस्रनाम.

(५) उमा संहिता – पापभेद, नरकभेद, अन्नदान, सप्तद्वीपे, सप्तपाताल व देह यांचे वर्णन, वंशवर्णन, इत्यादी.

(६) कैलास संहिता– संन्यासपद्धती, आचार, शिवाचे ध्यान-पूजन, शिवाद्वैत, इत्यादी.

(७) वायवीय संहिता – शिवतत्त्वज्ञान, शक्तीचा उद्भव व प्रभाव, दक्षयज्ञ-विध्वंस, उपमन्युचरित्र, व्यासावतार, शिवदीक्षा, शास्त्रोक्त शिवपूजा व योग, शिवस्तोत्रे आणि शिवसहस्रनाम, इत्यादी.

**कालनिर्णय** – अंतरंग व बहिरंग यांच्या परीक्षणाने शिवपुराणाचा कालनिर्णय करता येतो. तमिळ देशात शिवपुराण प्राचीन कालापासून लोकप्रिय आहे. तिरुमल्लैनाथ याने त्यातील काही भागाचा तमिळ भाषेत अनुवादही केला आहे. इ. स. चे १६ वे शतक हा त्याचा काल होय. अल्‌बिरुनीच्या भारतवर्णनात शिवपुराणाचा नामोल्लेख मिळतो (११ वे शतक). वरील दोन्ही पुराव्यांवरून शिवपुराणाची रचना इ. स. १०३० च्या पूर्वी झाली होती, असे कळते. अंतरंगपरीक्षेत कैलाससंहितेवरूनही काही अनुमान करता येते. त्या संहितेच्या १६ व १७ अध्यायांत प्रत्यभिज्ञादर्शनाचे सिद्धान्त विशद रूपाने प्रतिपादिले आहेत. त्यांत शिवसूत्रांचे व तत्संबद्ध वार्त्तिकांचे सुस्पष्ट निर्देश आहेत. शिवसूत्रे हा वसुगुप्ताचा ग्रंथ आहे. वसुगुप्ताचा काल इ. स. चे नववे शतक हा आहे. शिवसूत्रांवर भास्कर व वरदराज यांची वार्तिके आहेत. या वार्त्तिकांची रचना नवव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास झाली. वरील दोनहीं पुराव्यांवरून शिवपुराणाचा काळ दहावे शतक हा आहे, असे प्रा. बलदेव उपाध्याय सांगतात. ते पुढे म्हणतात, की शिवपुराण व वायुपुराण यांची तुलना करता वायुपुराण निश्चितपणे प्राचीन महापुराण असून, शिवपुराण हे अर्वाचीन व तांत्रिकतेने मंडित असे उपपुराण आहे.

**शिवपुराणातील नीतिवचने** – प्रस्तुत पुराणात नीती, धर्म, सदाचार, इ. विषयांवर अनेक वचने आहेत. त्यांपैकी काही अशी–

**परोपकारसदृशो नास्ति धर्मः परः खलु ।**

(शिवपु. १.१.३६)

अर्थ – परोपकारासारखा श्रेष्ठ धर्म नाही.

**पुण्यक्षेत्रे कृतं पुण्यं बहुधा ऋद्धिमृच्छति ।**
**पुण्यक्षेत्रे कृतं पापं महदण्वपि जायते ॥**

(शिवपु. १.१२.३६)

अर्थ – पुण्यक्षेत्रात केलेले पुण्य अनेक अंगांनी वाढते आणि अणुमात्र पापही मोठे होते.

**धर्मेण धनमाप्नोति तपसा दिव्यरूपताम् ॥**

(शिवपु. १.१३.; ३)

अर्थ – धर्माने समृद्धी मिळते व तपाने दिव्यरूपता प्राप्त होते.

**मातरं पितरं त्यक्त्वा मोक्षमिच्छन् व्रजत्यधः ।**

(शिवपु. २.१४.३६)

अर्थ – आई-बापांचा त्याग करून जो मोक्षाची इच्छा करतो, तो अधोगर्ताला जातो.

**पुण्येन याति देवत्वमपुण्यो नरकं व्रजेत् ।**

(शिवपु. ४.२०.४६)

अर्थ – पुण्यकर्म केल्याने मनुष्याला देवत्व प्राप्त होते व पुण्यहीन मनुष्य नरकाला जातो.

परोक्षमपरोक्षं च द्विविधं ज्ञानमिष्यते ।
परोक्षमस्थिरं प्राहुरपरोक्षं तु सुस्थिरम् ॥
(शिवपु. ७.३१.९८)

अर्थ – परोक्ष व अपरोक्ष असे दोन प्रकारचे ज्ञान आहे. त्यांपैकी परोक्ष हे अस्थिर असून, अपरोक्ष हे सुस्थिर असते.

गुरुर्देवो यतः साक्षात्तद्गृहं देवमन्दिरम् ॥
(शिवपु.७. १५.२५)

अर्थ – गुरू हा साक्षात देव असून, त्याचे घर हे देवमंदिर होय. [ हिंदुत्व; पु. वि.; श्री. बा. मो. कानिटकर – स्वराज्य, ३ डिसेंबर १९६६ ]

**शिवप्रदक्षिणाव्रत** एक काम्य व्रत. वैशाख, श्रावण, कार्तिक किंवा माघ या महिन्यात व्रताची दीक्षा घेतल्यावर शिवपूजा करून शिवलिंगाला एक लक्ष प्रदक्षिणा घालणे, हा या व्रताचा प्रधान विधी आहे. प्रदक्षिणा पुऱ्या झाल्यावर उद्यापन करतात. उद्यापनाच्या वेळी उमा-महेश्वरांच्या सुवर्ण-प्रतिमेची पूजा व होम करतात. त्यानंतर ब्राह्मणभोजन घालून सर्व पूजोपकरणे ब्राह्मणाला दान देतात. दान घेणे, परान्न भक्षण करणे, असत्य बोलणे, शिव व विष्णू या देवतांच्या निंदकांशी संबंध ठेवणे, वगैरे व्रतकालातील निषेध आहेत. फल – ऐश्वर्य व संतती यांची प्राप्ती. [ व्रतराज ]

**शिवभागवत** शिवाच्या उपासकांचा एक पंथ. या पंथातील लोक नेहमी लोखंडी शूळ, दंड व अजिन धारण करतात. या पंथातूनच पुढे लकुलीशाने संघटित केलेला पाशुपत संप्रदाय निघाला असावा. [ डे. हिं. इ. ]

**शिवमहिम्नस्तोत्र** शिवस्तोत्रांतील एक प्रसिद्ध स्तोत्र. पुष्पदंत नामक कवीने याची रचना केली आहे. या स्तोत्राचे मूळ नाव धूर्जटिस्तोत्र असे आहे. परंतु या स्तोत्राचा प्रारंभ 'महिम्न' या शब्दाने झाला आहे. म्हणून त्याला महिम्नस्तोत्र असे नाव मिळाले. इ. स. च्या ९ व्या शतकात होऊन गेलेल्या राजशेखराने काव्यमीमांसेत आणि जयंत भट्टाने न्यायमंजिरीत महिम्नाचा उल्लेख केला आहे. त्यामुळे त्यांच्या पूर्वी हे रचले गेले आहे.

मध्य प्रदेशातील ओंकारमांधाता येथील अमलेश्वराच्या मंदिरात एका भिंतीवर हे स्तोत्र खोदलेले असून, त्या स्तोत्राच्या ३१ व्या श्लोकानंतर 'इति महिम्नस्तवं समाप्तमिति' असा समाप्तिदर्शक उल्लेख आहे. या शिलालेखाचा काळ इ. स. १०६३ असा आहे. आज उपलब्ध असलेल्या या स्तोत्राचे ४३ श्लोक आहेत. म्हणजे ११ व्या शतकानंतर कोणीतरी पुढचे श्लोक रचले असावे, असे अनुमान निघते.

मधुसूदन सरस्वतीची या स्तोत्रावरील व्याख्या प्रसिद्ध आहे. त्याने प्रत्येक श्लोकाचा शिवपर आणि विष्णुपर अर्थ लावून या देवतांमधला अभेद स्पष्ट केला आहे. हाच या स्तोत्रातील तत्त्व-ज्ञानाचा गाभा होय.

शिखरिणी वृत्तात रचलेले हे स्तोत्र भक्तिभावाने ओथंब-लेले आहे. पुष्पदंताच्या भक्तीची उत्कटता पुढील श्लोकात दिसून येईल —

असितगिरिसमं स्यात् कज्जलं सिन्धुपात्रे
सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वी ।
लिखति यदि गृहीत्वा शारदा सार्वकालं
तदपि तव गुणानामीश पारं न याति ॥

अर्थ – हे परमेशा ! जरी भगवती सरस्वती काळ्या पर्वता-एवढी शाई, समुद्राप्रमाणे विस्तीर्ण दौत, कल्पवृक्षाची फांदी ही लेखणी, पृथ्वी हाच कागद असे साहित्य घेऊन तुझ्या गुणांचे वर्णन लिहायला बसली तरी तिला तुझ्या गुणांचा पार लाग-णार नाही.

श्रीहर्षाच्या नैषधचरितावर या स्तोत्राचा काहीसा प्रभाव आहे, असे म्हटले जाते. मराठी कवी चूडामणीसुताची महिम्ना-वर टीका आहे. डॉ. ग. कृ. गर्दे यांनी महिम्नाची मराठी सम-श्लोकी रचना केली आहे. [ सं. सा. इ.; सं. सा. सो. इ.; नैषध-परिशीलन; महिम्नस्तोत्र– संशोधक. द. गो. पाध्ये.; द्विवेदी अभिनंदन ग्रंथ, काशी–नागरी प्रचारिणी सभा, संवत् १९९० ]

**शिवमुष्टिव्रत** एक काम्य व्रत. लग्नानंतर पाच वर्षे क्रमाने, महाराष्ट्रातील ब्राह्मणस्त्रिया हे व्रत करतात. श्रावणातल्या प्रत्येक सोमवारी एकभुक्त राहून शिवलिंगाची पूजा करणे आणि तांदूळ, गहू, तीळ, मूग, हरभरे यांपैकी कोणत्या तरी धान्याच्या पाच मुठी देवावर वाहणे, असा याचा विधी आहे. शक्य असल्यास तांदुळाचा एक दाणा रुप्याचा व गहू वगैरे धान्याचा एकेक दाणा सोन्याचा करून तो इतर धान्याबरोबर अर्पण करतात. धान्याची मूठ वाहताना पुढील मंत्र म्हणतात–

नमः शिवाय शान्ताय पञ्चवक्त्राय शूलिने ।
शृङ्गिभृङ्गिमहाकालगणयुक्ताय शम्भवे ॥

नंतर ब्राह्मणभोजन घालून व पतीसह कथा श्रवण करून व्रताची समाप्ती करतात.

पाच वर्षे व्रत झाल्यावर त्याचे उद्यापन करतात. त्या वेळी चार केळींचा मंडप उभारून तो लतापल्लवांनी सुशोभित कर-

तात. त्याच्यावर पंचरंगी छत बांधतात. मग त्यात शिवलिंगाची स्थापना करून त्याची यथाविधि पूजा करतात. आचार्याला व इतर ब्राह्मणांना यथाशक्ति वस्त्रालंकार, भोजन व दक्षिणा देऊन व्रतसमाप्ती करतात.

फल – सर्व उपद्रवांचा नाश, संतती व संपत्ती यांची प्राप्ती, अखंड सौभाग्यप्राप्ती आणि अंती शिवलोकाची प्राप्ती.

या व्रताची कथा अशी ––

एका राजाला चार सुना होत्या. त्यांपैकी तीन आवडत्या व एक नावडती होती. जेवायला उष्टे, नेसायला जाडेभरडे आणि राहायला गुरांचा गोठा, असे तिला राजाने दिले होते आणि रोज गुरे राखायचे काम तिच्याकडे सोपवले होते. कालांतराने श्रावण मास आला. एका सोमवारी ती रानात गुरे चारायला गेली असता तिला नागकन्या व देवकन्या भेटल्या. त्या शिवामुठीचे व्रत करीत होत्या. त्यांनी तिला ते व्रत सांगितले. नावडतीने ते व्रत सुरू केले. रानातल्या एका शिवलिंगावर ती शिवामूठ वाहू लागली.

राजाने ते पाहिले व एक दिवस तिला विचारले. 'तुझा देव कुठे आहे ? ' तेव्हा ती त्याला घेऊन रानात गेली. देवाने तिच्यावर कृपा करून तिथे सोन्याचे मंदिर उभे केले. राजाला ते पाहून आनंद झाला. त्याने सुनेला पालखीत बसवून घरी आणले. जी नावडती होती, ती आवडती झाली. [ व्रतराज ]

**शिवरथव्रत** एक काम्य व्रत. हेमंत ऋतूत हे व्रत करावे. त्यासाठी विविधरंगी वस्त्रांनी सुशोभित रथ करावा व त्याला चार पांढरे बैल जुंपावे. त्यात तांदुळाच्या पिठाचे लिंग थापावे. रथाची मिरवणूक काढून तो शिवमंदिराजवळ आणावा. मंदिरात दिवे लावावे. रात्री नृत्य-नाट्यादी प्रयोग करून जागरण करावे. दुसऱ्या दिवशी शिवभक्तांना व गोरगरिबांना भोजन घालावे. रथ शिवाला अर्पण करावा.[ हि. ध. ]

**शिवरात्री** प्रत्येक वद्य चतुर्दशीला हे नाव आहे. ही त्रयोदशीयुक्त मध्यरात्रव्यापिनी घेतात. हे शिवव्रत असून, त्याच्या आचरणाने शिवलोक प्राप्त होतो, असे सांगितले आहे. या दिवशी शिवाची पूजा, उपवास व जागरण करतात. सर्व शिवरात्रींत माघ महिन्यातली शिवरात्र ही महाशिवरात्र होय. पाहा – महाशिवरात्री.

**शिवराम अकोलकर** ( इ. स. च्या. १८ व्या शतकाचा उत्तरार्ध ) एक मराठी कवी. याच्या पित्याचे व गुरूचे नाव भट्टंभट्ट असे होते. शिवराम मूळचा विदर्भातला असला, तरी त्याचा दीर्घ निवास पैठणला होता. हा अद्वैती असून, व्यंकटेश ही त्याची कुलदेवता होती. त्याने योगवासिष्ठसारप्रकाश, अष्टावक्रटीका, चैतन्यचंद्रिका व चिद्रत्न असे चार ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी पहिले दोन ग्रंथ गद्यात असून, दुसरे दोन श्लोकबद्ध आहेत. चैतन्यचंद्रिका ही शंकराचार्यांच्या सदाचारावरील टीका असून, चिद्रत्नात वेदान्तविवेचन आहे. हे सर्व ग्रंथ त्याने पैठणच्या कालिकाघाटावरील कालिकामंदिरात रचले. [ म. सा.; म. वा. इ. ३. संपा. श्री. जोग ]

**शिवराम किंकर** (इ. स. चे १८ वे शतक) एक महानुभावीय मराठी कवी. वऱ्हाडातील वेणी (वेनी) नावाच्या गावी, म्हसके आडनावाच्या घराण्यात त्याचा जन्म झाला. कैवल्यदीपिकाकार शारंगधर हा त्याचा पहिला गुरू आणि हरिराज हा दुसरा गुरू होय. शिवरामाने गोपिकास्वयंवर नावाचा एक ओवीबद्ध ग्रंथ लिहिला असून, त्याचे चाळीस अध्याय आहेत. या काव्याचा दहावा अध्याय विजयमाहात्म्य म्हणून छापला गेला आहे. त्या अध्यायात सरस्वती व महिषासुर यांच्या युद्धाचे वर्णन आहे. सरस्वतीने ब्राह्मण, साधुसंत, इ. लोक गावाबाहेर ठेवून महार, मांग, यांच्या साहाय्याने महिषासुराला मारले, अशी कथा यात सांगितली आहे.

शारंगधर विष्णूने लवणासुराला मारल्यावर, त्याने विष्णूला जी प्रार्थना केली तिचा नमुना पुढे दिला आहे ––

माझेनि रुधिरें तुझे पाय । उत्तम भरले निरामय ।<br>
ते अजवरी जान्हवितोय । क्षाळूनी सोयकरी बा तूं ।।<br>
आज सोमवती अमावशा वार शशी । येथें आणि तूं वाराणशी ।<br>
पादतीर्थें पुनित राशीं । करी जन्मासी माझिया तूं ।।<br>
ते मानोनि हृषिकेशी । त्वरें आणिली वाराणशी ।।<br>
तीर्थें स्थान वैकुंठवाशी । मुक्ति दैत्याशीं समर्पिली ।।<br>
तेंचि आद्यापि सोमवती । जाणावी त्या लोणार तीर्थी ।।<br>
असे लोणासूरास स्वहस्ती । वैकुंठपतीनें मारिला ।।

शिवरामाची भाषा प्रसन्न आहे. त्यावरून त्याचा काव्याधिकार मोठा असल्याचे कळते. [ म. सा.; म. म. वा. ]

**शिवलिंगदान** प्रथम संकल्प करून मग शिवलिंगाची पूजा करतात. त्यानंतर पुढील मंत्राने प्रार्थना करतात ––

सालङ्कार महालिङ्गनिवास त्वं वृषध्वज ।<br>
प्रीयतां तव दानेन शिवो गौर्या युतस्तु मे ।।

लिंगाबरोबर रुद्राक्षमालाही देतात. मग ब्राह्मणाला सुवर्णदक्षिणा देऊन दानाची पूर्ती करतात. [ दा. चं. ]

**शिवलिंगव्रत** एक काम्य व्रत. यासाठी आंगठ्याएवढे शिवलिंग करून ते शुभ्र कमळाच्या केसरात ठवून दक्षिणामूर्तीशेजारी स्थापावे. त्याची पांढरे चंदन, शुभ्र कमळे व बिल्वपत्रे यांनी पूजा करावी. फल – शिवलोकाची प्राप्ती. [ हि. ध. ]

**शिवव्रत** एक काम्य व्रत. मार्गशीर्ष महिन्यात प्रारंभ करून कार्तिकाच्या अखेरीपर्यंत रोज शिवपूजा करणे हा या व्रताचा विधी आहे. फल – आरोग्य व दीर्घायुष्य यांची प्राप्ती. या व्रताचे अनेक पर्याय आहेत. त्यांपैकी काही असे–

(१) आषाढ पौर्णिमेपासून चार महिने व्रत करावे व उद्यापनाच्या वेळी तूप व मध भरून सुवर्णपात्र दान द्यावे.

(२) पौषापासून मार्गशीर्षापर्यंत प्रत्येक पक्षातील चतुर्दशी व अष्टमी या तिथींना शिवपूजा करावी आणि उपवास करावा.

(३) पौषात व्रतारंभ करून शिवपूजा, शिवाला तुपाने स्नान, नक्त भोजन व भूमिशयन या गोष्टी कराव्या. [ हि. ध. ]

**शिवशक्तिमहोत्सव** एक काम्य तिथिव्रत. ज्या दिवशी अष्टमीयुक्त नवमी असेल त्या दिवशी शिव-शक्तींच्या प्रीत्यर्थ काशी, श्रीशैल, इ. शिवक्षेत्रांत महोत्सव करावा, असे सांगितले आहे. फल – शिवलोकप्राप्ती. [हि. ध.]

**शिवशयनव्रत** एक शिवव्रत. आषाढ पूर्णिमेला शिव आपला जटाभार सर्पांनी बांधून व्याघ्रचर्मावर शयन करतो. म्हणून या तिथीला रुद्रव्रतविधी आचरावा, असे सांगितले आहे. या दिवशी शिवशयनोत्सवही करतात. फल – शिवलोकप्राप्ती. पाहा – रुद्रव्रत. [ व्रतराज.; व्र. प. ]

**शिवसहस्रनाम** एक स्तोत्र. संस्कृत साहित्यात शिवसहस्रनामाचे बरेच पाठ उपलब्ध आहेत. महाभारताच्या अनुशासन पर्वातील सहस्रनाम तंडीने उपमन्यूला आणि उपमन्यूने कृष्णाला सांगितले आहे. मुळात ही दशसहस्रनामे होती. ती ब्रह्मदेवाने तंडीला सांगितली. तंडीने या स्तवराजाचा संक्षेप करून ती प्रथमच भूतलावर आणली म्हणून त्याला तंडीकृत सहस्रनामस्तवराज असे म्हटले गेले (अनु.१७. १३–२४).

या सहस्रनामांसाठी सुमारे एकशेपंचवीस श्लोक खर्ची पडले आहेत (अनु. १७. ३१–१५३). त्यातील स्थाणू, ईशान, रुद्र, शर्व, इ. अनेक नावे वैदिक वाङ्मयातील असली, तरी शृंगी, शिव, शुची, लोहिताक्ष, ईश्वर, काल, सहस्रहस्त, यज्ञ, विशारद, इ. नावे लौकिक आहेत. हरी, वामन, विष्णू, जलेशय ही प्रसिद्ध विष्णुवाचक नावे शिववाचक म्हणून आलेली आहेत. त्यावरून हा हरिहरैक्याचा प्रयत्न असावा, असे वाटते.

या सहस्रनामांत आलेली काही खास शिववाचक नामे पुढील-प्रमाणे आहेत– श्मशानवासी, नीलकंठ, उमापती, त्रिजटी, पशुपती, पिनाकवान, कपर्दी, प्रेतचारी, भूतचारी, त्र्यक्ष व वृषभ. शिवाय काही नामांची द्विरुक्तीही झाली आहे. उदा० ऊर्ध्वरेता, शंकर, विष्णू, मंत्र, हरी.

पं. वासुदेवशरण अग्रवालांच्या मते, अनुशासन पर्वातील हे शिवमाहात्म्यपर अध्याय शैव, पाशुपत, माहेश्वर, इ. संप्रदा-यांतील शिवाच्या लोकप्रियतेचे प्रतिबिंब आहेत. त्यांची रचना कुशाणसम्राट वेम याच्या काळात, इ. स. च्या पहिल्या शतका-पासून तिसऱ्या शतकापर्यंत झाली असावी.

जो पवित्र भावनेने या पुष्टिवर्धक नावांनी शिवाची स्तुती करतो, तो शिवाला प्राप्त करून घेतो, अशी याची फलश्रुती सांगितली आहे. त्यावरून या नामाचे पाठ करण्याची पद्धती होती, असे म्हणावे लागते.

शांतिपर्वात या नामांचा आणखी एक पाठ आहे. त्याची पार्श्वभूमी अशी – दक्ष प्रजापतीने अश्वमेध यज्ञ केला. पण त्याने त्यासाठी शिवाला निमंत्रण दिले नाही. त्यामुळे पार्वतीला राग आला. तिचा राग शांत करण्यासाठी शिवाने वीरभद्राकरवी यज्ञाचा विध्वंस केला. अखेर दक्ष शिवाला शरण गेला आणि सहस्रनाम म्हणून त्याने त्याचा क्रोध शांत केला. या सहस्र-नामाच्या संदर्भात एक ऐतिहासिक सत्य सांगितले गेले आहे ते म्हणजे, शिवाने वर्णाश्रमधर्माला काहीसे अनुकूल व काहीसे प्रतिकूल असे पाशुपतमत सांगितले हे होय (शांति. २८ १८८–१८९). महाभारताच्या भांडारकर – आवृत्तीत मात्र हे सहस्रनाम प्रक्षिप्त म्हणून वगळले आहे.

महाभारतातील या दोन पाठांशिवाय शिव, लिंग व वामन या पुराणांमध्येही शिवसहस्रनामे आली आहेत. शिवपुराणाच्या कोटिरुद्राध्यायातील आणि लिंगपुराणाच्या पूर्वार्धातील (अ. ९८) शिवसहस्रनामाची पार्श्वभूमी एकच आहे. या दोन्ही ठिकाणच्या सहस्रनामांचे संकीर्तन विष्णूनेच केले आहे. लिंग-पुराणाच्या प्रस्तुत अध्यायातील नामावळीत वैदिक नामांची गणना अगदी अल्प आहे, असे पं. बलदेव उपाध्याय म्हणतात.

लिंगपुराणात आणखी एक तंडीकृत सहस्रनाम आहे (पूर्वार्ध ६५). सूर्यवंशातील त्रिधन्वा नामक राजाने ब्रह्मदेवाचा पुत्र तंडी यापासून हे सहस्रनाम शिकून त्याचा जप केला, त्यामुळे त्याला सहस्र अश्वमेध यज्ञांचे पुण्य लागले आणि तो गणाधिप झाला, असे वर्णन तिथे आढळते. वामनपुराणातील सहस्रनाम वेगळे (अ. ४७) असून, त्यालाच लिंगपुराणात दक्षकृत म्हटले आहे.

असे पं. वासुदेवशरणांचे मत आहे. परंतु प्रत्यक्ष ही दोन्ही सहस्रनामे ताडून पाहता ती भिन्न आहेत, असे दिसते.

ही सहस्रनामे म्हणजे शिवोपासनापर साहित्याचा एक अमोल ठेवा आहे. तो एक प्रकारचा शिवभक्तीचा कोश आहे. परंतु विष्णुसहस्रनामाचे जेवढे प्राचीन उल्लेख मिळतात, तेवढे या सहस्रनामांचे मिळत नाहीत. त्यामुळे विष्णुसहस्रनामाच्या तुलनेने शिवसहस्रनाम अलिकडचे आहे, असे म्हणता येते.

**शिवसंहिता** रामभक्तिशाखेतील एक ग्रंथ. या ग्रंथात वीस अध्याय असून, शिव-पार्वती व अगस्त्य-हनुमान यांच्या संवादातून संतसमागममहिमा, श्रीरामाच्या अनेक गुणांचे व विभूतींचे वर्णन, वनदर्शन, वनक्रीडा, इत्यादींचे वर्णन आलेले आहे. भागवतातील रासलीलेच्या धर्तीवर या ग्रंथात राम-सीतेच्या विलासलीलांचे वर्णन केलेले आहे. अंतर्दृष्टी उघडल्यावर सारे ब्रह्मांडच अयोध्यारूप दिसू लागते आणि तिथल्या वनात नित्य लीलाविहारात मग्न असलेल्या राम-सीतेचे दर्शन होते, असे या ग्रंथात सांगितले आहे. [ रा. सा. म. उ. ]

**शिवस्वरोदय** प्राणशक्तीच्या निरोधावर आधारलेले स्वरोदय नामक एक शास्त्र. हे शास्त्र शिवाने पार्वतीला सांगितले, म्हणून याला शिवस्वरोदय असे नाव पडले. यात एकूण ३९५ श्लोक आहेत. 'संपूर्ण सिद्धी प्राप्त करून देणारे ज्ञान मला सांगा' अशी पार्वतीने शंकराला प्रार्थना केली, म्हणून शंकराने तिला स्वरोदयाची महती, त्याचा उपयोग इत्यादींसंबंधी सविस्तरपणे सांगितले. या शास्त्राच्या परिचयाने योग्याला, ज्योतिष्याला, तसेच हे शास्त्र चांगल्या प्रकारे जाणणाऱ्यालाही अनेक गोष्टींचे ज्ञान होते. आरोग्य कसे टिकवावे, रोग कसे नाहीसे करावे, एखाद्या कार्याला कोणता मुहूर्त चांगला, आपल्याला पडलेल्या एखाद्या प्रश्नाचे उत्तर कोणते, इ. अनेक गोष्टींचा उलगडा स्वरोदयशास्त्राच्या अभ्यासाने होतो. या शास्त्राचे स्पष्टीकरण प्रा. श्री. शं. खानवेलकर यांनी पुढीलप्रमाणे केले आहे–

आपल्या उजव्या नाकपुडीतून श्वासोच्छ्वास होत असतो, तेव्हा सूर्यस्वर चालला आहे व डाव्या नाकपुडीतून श्वासोच्छ्वास चालू असतो तेव्हा चंद्रस्वर चालला आहे, असे समजतात. या दोन स्वरांच्या सूक्ष्म अभ्यासाने योग्यांनी अनेक सिद्धान्त ग्रंथांतून मांडलेले आहेत व त्यांच्यापासून होणारे फायदे-तोटे वर्णन केले आहेत.

आपला स्वर कोणत्या नाकपुडीतून चालला आहे, हे ओळखण्याचे साधन पुढीलप्रमाणे– नाकाच्या खालच्या बाजूला चार बोटे जरा तिरपी धरावी आणि जोराने उच्छ्वास सोडावा, म्हणजे स्वर कोणत्या नाकपुडीतून चालला आहे हे समजते. पुढे पुढे अभ्यासाने ते आपोआप कळते. हे स्वर सूर्य, चंद्र असे ओळखता आल्याने काही कार्यसिद्धी होत नाही; तर ते स्वर ज्या ज्या विशिष्ट वेळेला निरनिराळ्या तत्त्वांतून वाहत असतात त्या तत्त्वांच्या आकृती, चव, रंग, स्थान, गती या समजून घेऊन त्याप्रमाणे अभ्यास केल्यास यश लाभते.

शुक्ल पक्षात आधी चंद्र आणि कृष्ण पक्षात आधी सूर्य अशा क्रमाने प्रतिपदेपासून तीन तीन दिवस चंद्र व सूर्य यांचा उदय बलिष्ठ होतो. चंद्र आणि सूर्य स्वर क्रमाने शुक्ल व कृष्ण पक्षांत प्रत्येकी अडीच घटिका वाहतात. याप्रमाणे दिवसाच्या ६० घटिकांत त्यांच्या चौवीस आवृत्त्या होतात. (अडीच घटिका = १ तास; १ घटिका = २४ मिनिटे) या प्रत्येक आवृत्तीच्या अडीच घटिकांत (१) वायुतत्त्व (२) अग्नितत्त्व (३) भूमितत्त्व (४) जलतत्त्व व (५) आकाशतत्त्व ही पंचतत्त्वे वाहत असतात.

तत्त्वसंख्या, श्वाससंधी, स्वरचिन्ह, स्थान, वर्ण, प्राण, स्वाद आणि गतिलक्षण अशा आठ प्रकारांनी अभ्यास करीत असताना स्वरांचे व तत्त्वांचे ज्ञान होते. हे ज्ञान होण्यास प्रथम प्राणायाम साध्य करण्याची आवश्यकता आहे. प्राणायाम साध्य झाला, की षण्मुखी मुद्रा केल्याने रंगांचे ज्ञान होते.

श्वास वाहत असतांना नाकपुड्यांच्या खाली-वर, सरळ, वक्र, इ. गतींवरून श्वास कोणत्या तत्त्वात वाहत आहे, ते कळते. नाकपुड्यांच्या खाली कोणत्याही ठिकाणी न लागता श्वास मध्येच वाहत असेल तर तेव्हा पृथ्वीतत्त्व वाहत असते. नाकपुड्यांच्या खाली वाहत असेल तेव्हा जलतत्त्व, वरच्या भागाला स्पर्श करीत असेल तेव्हा अग्नितत्त्व, वक्रगतीने वाहत असेल तेव्हा वायुतत्त्व आणि आत संचार करीत असेल तेव्हा आकाशतत्त्व वाहत आहे, असे समजावे. तत्त्वे, आकार, रंग व त्यांची स्थाने पुढील कोष्टकावरून स्पष्ट होतील–

| तत्त्व | आकार | रंग | स्वाद | स्थान | गती |
|---|---|---|---|---|---|
| वायू | वर्तुळ | निळा | आंबट | नाभिमूल | आठ बोटे |
| अग्नी (तेज) | त्रिकोण | आरक्त | तीक्ष्ण (तिखट) | खांदे | चार बोटे |
| भूमी (पृथ्वी) | चतुष्कोण | पिवळा | मधुर | गुद | बारा बोटे |
| जल | अर्धचंद्र | पांढरा | तुरट | तळपाय | सोळा बोटे |
| आकाश | बिंदू | चित्र-विचित्र | सर्व रस | मस्तक | मोकळी |

प्रत्येक तत्त्वावर भावना करून ध्यानही करता येते. षण्मुखी मुद्रा साध्य झाली, की ज्या तत्त्वात वायूची गती असेल, ते तत्त्व आपला रंग भ्रूमध्यासमोर दाखवते. असे झाले, की त्या त्या तत्त्वावर कोणकोणती भावना करावी, ते पुढील तक्त्यात सांगितले आहे–

| तत्त्व | वर्ण | आकार | स्वाद | स्थान | परिमाण | बीज व देवता | परिणाम |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पृथ्वी | पीत | चतुष्कोण | मधुर | कटी (मध्यस्थान) | बारा बोटे | लं (ब्रह्मा) | अंगकांती सोन्यासारखी; हलका देह; शरीर सुगंधित. |
| जल | श्वेत | अर्धचंद्र | तुरट | नाभी | सोळा बोटे | वं (विष्णू) | क्षुधा–तृषेची पीडा होत नाही; पाण्यात बुडत नाही. |
| अग्नी | आरक्त | त्रिकोण | तीक्ष्ण (तिखट) | हृदय | चार बोटे (ऊर्ध्वगामी; उष्ण) | रं (रुद्र) | जठराग्नी प्रदीप्त होणे; अग्नीची पीडा नसणे. |
| वायू | नीळ | वर्तुळ | आम्ल | कंठ | आठ बोटे | यं (ईश्वर) | पक्ष्याप्रमाणे उडण्याची शक्ती. |
| आकाश | चित्रविचित्र | बिंदू | सर्व रस | मस्तक | अस्पष्ट | हं (देवता नाही) | त्रिकालज्ञान; अणिमादि सिद्धींची प्राप्ती. |

या प्रकारची पंचतत्त्वे अडीच घटकांत म्हणजे एका तासात पृथ्वी ५० पळे; जल ४० पळे; अग्नी ३० पळे; वायू २० पळे आणि आकाश १० पळे याप्रमाणे वाहतात.

स्वरांच्या अभ्यासाने त्रिकालज्ञान प्राप्त होते, असे या शास्त्र-कारांचे सांगणे आहे. शुभ-अशुभ; शकुन-अपशकुन; जय-पराजय; रोग्याची रोगमुक्ती वा मरण; कार्यसिद्धी-कार्यनाश, इत्यादी गोष्टींचे ज्ञान स्वरोदयाच्या सिद्धीने समजते.

कोणता स्वर चालू असता कोणती कार्ये करावी व कोणती करू नये यासंबंधीही या शास्त्राने सूक्ष्म विचार केला आहे. त्याचा थोडक्यात तपशील पुढीलप्रमाणे –

**सूर्यप्रवाह** –वायूचा प्रवाह उजव्या बाजूने पूर्ण रीतीने चालला असता तो सूर्यप्रवाह समजावा. उजव्या बाजूच्या नाडीला पिंगला, यमुना अशीही नावे आहेत. सूर्यस्वर चालू असताना श्रमाची, शौर्याची, धाडसाची, कामे करणे इष्ट असते. कठीण व क्रूर विद्यांचे पठण, वीरमंत्रादिकांची उपासना, षट्कर्मांचा अभ्यास, तीव्र औषध सिद्ध करणे, इ. कर्मांच्या ठिकाणी सूर्यप्रवाह शुभ समजावा. सूर्यप्रवाहावर कोणी प्रश्न विचारायला आला तर त्याची उत्तरे कोणती असतील, सूर्यस्वर प्रथम एक तत्त्व असून, नंतर दुसरे प्रगट झाले तर प्रश्नाचे उत्तर कोणते असेल, अशा अनेक गोष्टी ज्योतिष, प्रश्नकुंडलीशास्त्र, शकुनादिक यांच्या दृष्टीने ग्रंथात सांगितल्या आहेत.

**चंद्रप्रवाह** – डाव्या बाजूच्या नाडीस इडा, गंगा, चंद्रस्वर वगैरे अनेक नावे आहेत. डाव्या नाकपुडीने जेव्हा पूर्ण रीतीने श्वास चालतो, तेव्हा चंद्रप्रवाह चालला आहे, असे समजावे. त्या वेळी अलंकारधारण, मंदिर बांधणे, शांतिकर्मे, स्थिरकर्मे, दानधर्म, दिव्य औषधे सिद्ध करणे, धान्यसंग्रह करणे, गुरुदर्शन, दीक्षा घेणे, इ. कर्मे करावी. मात्र चंद्रस्वर चालू असताना तो वायू, तेज व आकाश या तत्त्वांत चालत असेल तर शुभ कर्मे तेवढ्यापुरती थांबवावी व तत्त्व बदलल्यावर चालू करावी. सकाळी चंद्रस्वर नसला व माध्यान्ही तो सुरू झाला, तरी शुभ-प्रद होतो. यासंबंधी ग्रंथात अनेक फले सांगितली आहेत.

**सुषुम्नाप्रवाह** – ज्या वेळी आपला श्वास दोन्ही नाकपुड्यांतून सारख्या वेगाने वाहतो किंवा क्षणात डावीकडे व क्षणात उजवी-कडे वाहतो, तेव्हा त्याला सुषुम्ना, शांभवी, इ. अनेक नावे आहेत. या वेळी कोणतेही शुभ कार्य करू नये.

प्राणांची गती सुषुम्नेत गेली, की मन शून्यात विलीन होते आणि योगी सर्व कर्मे थांबवतो, असे हठयोगप्रदीपिकेत सांगितले आहे.

सुषुम्ना नाडीच्या ठिकाणी कालरूपी अग्नी नेहमी प्रज्वलित

असतो. तो विषाप्रमाणे कार्यारंभास वर्ज्य असतो व तो नित्य अशुभ फल देतो. या वेळी जगदीश्वराचे स्मरण, चिंतन करून योगाभ्यास करावा. परमार्थावाचून इतर कर्मे करू नयेत.

संध्येचा लौकिक अर्थ दिवस व रात्रीचा संधिकाल असा आहे. परंतु स्वरोदयशास्त्रानुसार संध्येचा एक निराळाच अर्थ सांगितला आहे, तो असा –

संधी म्हणजे संध्येचे तीन काळ. प्रातःकाळी इडा व पिंगला यांच्या श्वासाच्या संधीच्या वेळेस संध्या करून भगवंताचे ध्यान करावे व नंतर चंद्रस्वर चालवावा. माध्याह्नसमयी पुन्हा तशीच संध्या आणि ध्यान केल्यानंतर सूर्यस्वर चालवावा. संध्याकाळी म्हणजे सूर्यचंद्राच्या संधीच्या वेळी संध्या व ध्यान करून रात्री सूर्यस्वर चालवावा. याप्रमाणे संध्येचे तीन काळ आहेत व ते सुषुम्नारूप श्वासाच्या संधिरूप संध्येवर आधारलेले आहेत. अनादी, निष्क्रिय, निश्चल असा जो विषमसंधी म्हणजे सुषुम्नास्वर, तो परतत्त्व जे ब्रह्म त्याच्या ठिकाणी लीन होतो. तीच खरी संध्या होय व ज्यामुळे परमात्म्याचे सत्य ज्ञान होते तोच खरा वेद होय. या श्वासाच्या संधिरूप संध्येने अभ्यासकाला त्रिकालज्ञान प्राप्त होते.

हे स्वर आपल्याला हवे तसे बदलता येतात. डाव्या कुशीवर झोपले असता सूर्यस्वर व त्याच्या विरुद्ध बाजूस झोपले असता चंद्रस्वर सुरू होतो. तसेच जो स्वर आपणांस हवा असेल त्याच्या विरुद्ध बाजूच्या नाकपुडीत कापसाचा बोळा घालावा म्हणजे हवा तो स्वर आपणांस मिळतो. समर्थसंप्रदायातली कुबडी स्वर बदलण्यासाठीच आहे. कुबडीचा वरचा खोलगट भाग काखेत दाबून धरून, कुबडीचे टोक जमिनीवर ठेवून, काखेचा भार त्या कुबडीवर द्यावा म्हणजे विरुद्ध बाजूचा प्रवाह सुरू होतो. अनेक प्रकारची शारीरिक दुःखे, ताप, इत्यादी केवळ स्वर बदलण्याने बरे झाल्याची उदाहरणे आहेत. [ श्रीगुरुदत्त-योग– प्रा. श्री. शं. खानवेलकर; शिवस्वरोदय ]

**शिवस्वामी** (इ. स. चे ९ वे शतक) एक संस्कृत कवी. हा काश्मीरचा रहिवासी होता. त्याच्या पित्याचे नाव भट्ट अर्कस्वामी असे होते. शिवस्वामी शैवमतानुयायी होता. तथापि त्याने चंद्रमित्र नामक बौद्ध पंडिताच्या प्रेरणेने अवदानकथेवर आधारलेले कप्फिणाभ्युदय नावाचे एक महाकाव्य रचले. त्याचा गोषवारा असा– कप्फिण हा दक्षिणापथाचा राजा होता. त्याने काही कारणांमुळे श्रावस्तीच्या प्रसेनजितावर स्वारी केली. प्रसेनजिताने गौतमाची प्रार्थना केली होती, त्यामुळे कप्फिणाचा त्यात पराभव झाला. कप्फिणाला आपल्या पराभवाचे कारण समजल्यावर त्यानेही गौतमाची करुणा भाकली. गौतम प्रकट झाला आणि त्याने राजाला बौद्ध धर्माचे रहस्य समजावून सांगितले.

हा सारा कथाभाग कवीने वीस सर्गांत व अनेक छंदांत सांगितला आहे. महाकाव्याची सर्व लक्षणे या काव्यात आहेत. कवीने मेंठ, दंडी, माघ, भारवी, इ. कवींचे अनुकरण केले आहे. याशिवाय त्याने बरीच नाटकेही रचली होती, असे म्हणतात. [ सं. सा. इ.; सं. सा. स्रो. इ.; म. ज्ञा. को. ]

**शिवाग्निकार्य** लिंगपुराणात (उत्तरार्ध अ. २५) याच्याविषयी पुढील माहिती दिली आहे – चांगली भूमी पाहून तिच्यावर प्रथम प्राची साधावी आणि एक सपाट चौरस ओटा तयार करावा. त्याच्यावर एक हात विस्ताराचे कुंड तयार करावे. नित्य होमाच्या कुंडाला तीन मेखला असतात. मेखला हातभर लांब व चार, तीन किंवा दोन बोटे रुंद असावी. मेखलेवर पिंपळाच्या पानासारखी टीचभर लांबीची एक योनी करावी. कुंडात तेवढेच नाभिकमल करावे. त्याला आठ पाकळ्या व कर्णिका असावी. अस्त्राच्या मंत्राने कुंडाचे उल्लेखन व कवचमंत्राने प्रोक्षण करावे. नेत्राच्या मंत्राने कुंडाचे अवलोकन करावे. कुंडात तीन रेषा दक्षिणेकडून उत्तरेकडे काढीत न्याव्या. त्या शिवरूप असतात. शमीच्या किंवा पिंपळाच्या लाकडाची सोळा बोटे लांब अरणी करावी आणि अग्निबीज मंत्राने शक्तिन्यास करावा. यथाविधि अग्नीचे अन्वाधान झाल्यावर त्याच्यावर समिधा घालाव्या. मग अष्टदिशांना जलाने परिसमूहन करावे आणि परिस्तरणे घालावी. अष्टदिशांना इंद्रादी देवतांचे आवाहन करावे. नंतर पात्रासादन करून ती पात्रे दर्भावर पालथी घालावी. त्यांच्या उत्तरेला होमद्रव्ये मांडून त्यांच्यावर दर्भ पसरावे. याप्रमाणे सर्व सिद्धता झाल्यावर होम करावा.

त्यानंतर अग्नीच्या सात जिव्हा कल्पून, प्रत्येकीचा एकेक मंत्र म्हणून तिला आहुती द्यावी. शेवटी तेजस्वी वह्नीला एक आहुती द्यावी.

अरणिमंथन करून प्रदीप्त केलेला किंवा अग्निहोत्र्याच्या घरचा अग्नी आणून त्याची स्थापना करावी. नंतर तो विधिपूर्वक प्रज्वलित करून, त्याच्यावर वागीश्वरी व वागीश्वर यांचे आवाहन करावे. मग त्यांच्यासह अष्ट दिक्पाल, ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांची पूजा करावी व अग्नीचे गर्भाधानादी संस्कार करावे. त्यानंतर सद्योजातादी पाच मंत्र व मूलमंत्र म्हणून शंकराच्या पाच मुखांना आहुती द्याव्या.

याप्रमाणे तीन प्रकारचे शिवाग्निकार्य सांगितले आहे. शक्य असेल, त्याप्रमाणे ते नित्य किंवा नैमित्तिक करावे. याच्यामुळे मरणोत्तर स्वर्गप्राप्ती होते.

**शिवाचतुर्थी** एक व्रत. शिवा, शांता व सुखा अशी चतुर्थ्यांची तीन नावे आहेत. यांतील भाद्रपद शुद्ध चतुर्थीला शिवा अशी संज्ञा आहे. या तिथीला स्नान, दान, जप आणि उपवास असा विधी व शिवाय सासू-सासरे किंवा आई यांना तूप, गूळ, मीठ आणि अनरसे यांचे वाण द्यावे, असे सांगितले आहे. फल – सौभाग्यवृद्धी. [ व्र. प. ]

**शिवाजीमहाराज, छत्रपती** (इ. स. १६३० ते १६८०) हिंदवी स्वराज्याचा संस्थापक, महान द्रष्टा, चारित्र्यसंपन्न महापुरुष व प्रजाहितदक्ष राजा. हा भोसले कुळाचा वंशज होय. भोसले घराण्यातील पुरुष भीमेच्या काठी हिंगणी, बेरडी, देऊळगाव वगैरे गावांच्या पाटिलक्या करून राहत. या कुलात इ. स. १५५० साली मालोजीचा जन्म झाला. मालोजी हा स्वकर्तृत्वाने निजामशाहीत मातबर सरदार बनला. त्याने आपली जहागीर बरीच वाढवली. शहाजी हा त्याचा पुत्र होय. मालोजीच्या मृत्यूनंतर त्याचा भाऊ विठोजी याच्या मदतीने शहाजी जहागिरीची व्यवस्था पाहू लागला. तो १४-१५ वर्षांचा होताच निजामशहाचा दुसरा सरदार लखुजी जाधव याच्या जिजाबाई नावाच्या मुलीशी त्याचे लग्न झाले. शिवाजी हा या दंपतीचा पुत्र होय.

शिवाजीचा जन्म शिवनेरीच्या किल्ल्यावर १९ फेब्रुवारी इ. स. १६३० रोजी शुक्रवारी सूर्यास्तानंतर थोड्या वेळाने झाला. काही विद्वानांच्या मते १६२७ हे शिवाजीचे जन्मवर्ष होय. शिवनेरी किल्ला पुणे जिल्ह्यातील जुन्नर शहराला लागून अर्ध्या कोसावर आहे. किल्ल्यात शिवाई नावाची देवी आहे. तिच्यावरून शिवाजी हे त्याचे नाव ठेवले गेले.

शिवाजीचा जन्म झाला त्या सुमारास शहाजी आदिलशाही सोडून फिरून निजामशाहीत गेला होता. त्या वेळी उत्तरेकडून मोगल व दक्षिणेकडून विजापूरकर अशा दोघांच्या कात्रीत निजामशाही सापडली होती. अशा स्थितीत शहाजीने निजामशाही जगवण्याची पराकाष्ठा केली. इ. स. १६३६मध्ये निजामशाही संपुष्टात आल्यावर शहाजीने आदिलशहाच्या पदरी पुनश्च चाकरी पत्करली. पण तिथे त्याचे फारसे जमले नाही. पुढील आयुष्यात आदिलशहाचा नाममात्र चाकर राहून जवळजवळ स्वतंत्रपणे तो कर्नाटकात राहू लागला.

शिवाजीचा जन्म झाल्यानंतर त्याची पहिली काही वर्षे शहाजीबरोबर महाराष्ट्रात व कर्नाटकात गेली. बंगळूर येथे असताना तो 'लिपिग्रहणयोग्य' झाला असे पाहून, त्याला मुळाक्षरे शिकविण्यात आली. त्याची आई जिजाबाई हिने त्याला रामायण–महाभारतांतील कथा सांगून त्याच्या मनावर क्षत्रियत्वाचे उत्तम संस्कार घडवले. त्याला संस्कृत व फारसी भाषा यांचेही कामचलाऊ ज्ञान दिले गेले. तो अश्वारोहणात



शिवाजीचे जन्मस्थान – शिवनेरी

तरबेज झाला. एकूण तत्कालीन युद्धविद्या त्याने आत्मसात केली.

शिवाजी ६ वर्षांचा झाला असता शहाजीने जिजाबाईसह त्याची रवानगी बंगळूराहून महाराष्ट्रात केली. जोडीला दादोजी कोंडदेवाला पाठवले. शिवाजी व जिजाबाई पुण्यातील लालमहाल या वाड्यात राहू लागले. शहाजीने आपल्या जहागिरीपैकी ३६ गावांचा, कर्यात मावळ या भागाचा एक पोटमोकासा शिवाजीच्या नावे आधीच करून ठेवला होता. शिवाजीने दादोजींच्या हाताखाली राज्यकारभाराचे शिक्षण घेऊन आपल्या जहागिरीच्या मुलुखात वसुलीची पद्धती व्यवस्थित वसवली. न्यायनिवाड्यातही तो लक्ष घालू लागला. दादोजीने जहागिरीत ज्या सुधारणा केल्या, त्याने लोक सुखावले, कृतज्ञ बनले. शिवाजीच्या आकर्षक व्यक्तिमत्त्वाने ते त्याच्याकडे आकृष्ट झाले. शिवाजीला त्या सर्वांची निष्ठाही मिळाली.

शिवाजीचे पहिले लग्न वयाच्या दहाव्या वर्षी पुणे येथे झाले. त्याच्या बायकोचे नाव सईबाई होते. शिवाजीचे दुसरे लग्न मोहिते घराण्यातील एका मुलीशी बंगळूर येथे झाले. तिचे नाव सोयराबाई असे होते.

शिवाजी कसा दिसत होता, याविषयी सर हेन्री ऑक्झिंडन म्हणतो – शिवाजीचा चेहरा सुंदर व पाणीदार. इतर मराठ्यांच्या मानाने वर्ण गोरा. डोळे तीक्ष्ण. नाक लांब, बाकदार व जरासे खाली आलेले. दाढी कापून हनुवटीच्या खाली टोकदार

केलेली. मिशा बारीक. चर्येवर त्वरा, निश्चय, कठोरपणा व जागरूकता हे गुण स्पष्ट दिसतील असे.

शिवाजीने स्वराज्याचा उद्योग सुरू केला तेव्हा उत्तरेत मोगलांचे राज्य होते. त्यांची सत्ता दक्षिणेपर्यंत पसरली होती. आदिलशाही आणि कुतुबशाही ही दक्षिणेतील दोन मुस्लिम राज्ये मोगलांची जवळजवळ मांडलिकच होती. हे मुस्लिम शासक ज्या प्रजेवर राज्य करीत, ती प्रजा बहुंशी हिंदूच होती. या प्रजेवर अत्याचार करणे आणि तिची सर्व प्रकारांनी लूटमार करणे, हे या सुलतानांचे धोरण असे. त्या वेळी वाहतुकीची साधने अत्यंत अल्प होती. तंत्रज्ञानाचा अभाव होता. त्यामुळे एवढ्या विशाल प्रदेशावर सुसूत्रपणे राज्य करणे दिल्लीच्या शासकाला अशक्य होते. म्हणून तो स्थानिक सुभेदार, सरदार आणि मामलेदार नेमी. आपल्याविरुद्ध त्यांनी बंड करू नये आणि आपल्याला हवा तेवढा शेतसारा, खंडणी व लूट पाठवीत राहावे एवढीच त्या स्थानिक अधिकाऱ्यांकडून बादशहाची अपेक्षा असे. हे स्थानिक शासक मग आपापल्या प्रदेशांत आपोआप सर्वसत्ताधीश बनत. ते पदरी सैन्य बाळगीत आणि प्रजेवर हवे तसे अत्याचार करीत. त्यांच्याविरुद्ध गाऱ्हाणे करता येत नसे. शिवाय हे सरदार, सुभेदार शेजारच्या अधिकाऱ्यांशीही सदैव लढाया व मारामाऱ्या करीत. त्यांतही प्रजा भरडली जाई. तिला कोणी वालीच उरला नव्हता. केव्हा कोणाची धाड येईल आणि घरादारावरून गाढवाचा नांगर फिरेल, याचा काही नेम नव्हता. केव्हा कोणाची वाकडी नजर पडेल आणि तरण्याताठ्या पोरीबाळी पळवल्या जातील, याचाही काही भरवसा नव्हता.

शिवाजी जेव्हा आसपासच्या प्रदेशात फिरला, तेव्हा त्याला या परिस्थितीचे सम्यक ज्ञान झाले. त्याला या दीन, दलित, निरपराधी प्रजेची कणव आली. त्याच वेळी त्याच्या मनावर ठसले, की स्वराज्य मिळवल्यावाचून प्रजेच्या या हालअपेष्टा थांबणार नाहीत व तिचा उत्कर्ष होणार नाही. देशाच्या सांप्रतच्या सर्व विपन्नावस्थेचे मूळ पारतंत्र्यात आहे, हे निदान शिवाजीने आपल्या मनाशी पक्के केले आणि तो स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नाला लागला.

मावळचा मुलुख हा अनेक प्रकारे शिवाजीच्या स्वराज्याचा पाया बनला. मोगल व आदिलशाहा या दोघांची सत्ताकेंद्रे पुणे भागापासून दूर होती. मावळचा मुलुख डोंगराळ होता. दळण-वळणाची साधने नव्हती. बाजूला कोकणपट्टी. तिच्या पश्चिमेस समुद्रकिनारा. हे सर्व लक्षात घेऊन शिवाजीने समुद्रकाठची कोकणपट्टी, सह्याद्रीचा घाटमाथा व मावळ प्रदेश एवढ्या भागातच स्वराज्यस्थापनेस प्रारंभ केला. मावळात त्याला जिवास जीव देणारे साहाय्यक भेटले. शिवाजीने मावळात जिव्हाळ्याचे संबंध निर्माण केले. त्यातूनच शिवाजीच्या सत्तेची मुळे जमिनीत खोल गेली. राजगड, रोहिडा, तोरणा, कुवारीगड, या गडांवर आणि त्यांच्या आसपास शिवाजीविषयी प्रेमादर निर्माण झाला. किल्लेदार शिवाजीवर प्रेम करू लागले आणि त्याने इच्छा प्रकट करताच आपापल्या किल्ल्यांसह शिवाजीला येऊन मिळाले.

आपण निर्माण करीत असलेले हे नवे राज्य म्हणजे हिंदवी राज्य आहे आणि ते स्वकीयांचे स्वराज्य आहे, ही भावना या उद्योगाच्या मुळाशी होती. ती शिवाजीने आपल्या अनुयायांच्या मनावरही बिंबवली. या स्वराज्याच्या निर्मितीसाठी शिवाजी, त्याचे सवंगडी आणि देशमुख-देशपांडे यांच्या आणा-शपथा झाल्या होत्या. शिवाजी हा थोड्याच काळात आपल्या जहागिरीमध्ये निग्रहानुग्रहसमर्थ बनला. त्याने तोरणा वगैरे किल्ले दुरुस्त करून आपल्या ताब्यात घेतले. त्या काळची परिस्थितीच अशी होती, की ज्याच्या हातात किल्ले, त्याचे राज्य. राजगड आणि सिंहगड हे पुणे जिल्ह्यातले दोन मोठे किल्ले होत. तेही शिवाजीने युक्तीने आणि सहजपणे मिळवले. शिवाजी राजगडाच्या आश्रयाने मोठ्या बंदोबस्ताने राहू लागला. त्याने शिरवळही घेतले.

शिवाजीचा हा उद्योग म्हणजे आदिलशाही अधिसत्तेला सरळ सरळ आव्हानच होते आणि शिवाजीलाही त्यातल्या धोक्याची पुरेपूर कल्पना होती. तो आपल्या जवानांच्या विश्वासावर विजापूरकरांविरुद्ध सैन्याच्या हालचाली करायला तयार होऊन राहिला होता.

शिवाजीची ही वाढती पुंडाई पाहून आदिलशहाला वाटले, की या कामी शिवाजीला शहाजीचीच आतून फूस आहे. तेव्हा प्रथम त्याने शहाजीचा बंदोबस्त करायचे ठरवले. शहाजीवर उघड उघड आक्रमण करणे आदिलशहाला शक्य नव्हते. कारण शहाजीचे सामर्थ्य तो जाणत होता. म्हणून त्याने कपट करून शहाजीला कैद केले. त्या वेळी कर्नाटकात असलेल्या अफझलखानाने शहाजीच्या पायांत बेड्या घालून त्याला विजापुरात आणले. शिवाजीला ही वार्ता समजली. त्याने त्याच वेळेला मनाशी निश्चय केला असला पाहिजे, की अफझलखानाला त्याच्या पापाचे प्रायश्चित्त दिल्याशिवाय सोडायचे नाही.

शहाजीला कैद केल्यावर शिवाजीचे व त्याचा थोरला सख्खा भाऊ संभाजी यांचे पारिपत्य करण्याचे आदिलशहाने ठरवले. त्याने फर्रादखानाला बंगळूर येथे संभाजीवर व फत्तेखान या सरदाराला शिवाजीवर मोहिमेसाठी पाठवले. शिवाजी सावध होताच. त्याने फत्तेखानाशी सामना दिला. शिरवळ, बेलसर, पुरंदर येथे शिवाजीच्या सवंगड्यांनी अत्यंत शौर्याने व आत्मविश्वासाने लढून फत्तेखानाला रणांगणातून पळायला लावले.

शिवाजीने एका बलाढ्य सत्तेशी समोरासमोर दिलेली ही पहिली लढाई होती. ती जिंकून त्याने स्वतःच्या सैन्यात आत्मविश्वास निर्माण केला. तिकडे बंगळूरलाही संभाजीने फर्रादखानाचा पराभव केला.

शहाजीची सुटका करणे या गोष्टीकडे शिवाजीने आता सर्व लक्ष केंद्रित केले. त्यासाठी शक्तीपेक्षा युक्तीचाच अवलंब करायला हवा होता. म्हणून त्याने मोगलांशी संधान बांधले. मोगल सरदार त्या कामी शिवाजीला मदत करायला तयार झाला. ही वार्ता आदिलशहाच्या कानी गेली. मोगल आणि शिवाजी या दोघांची युती आपल्याला महाग पडेल, हे लक्षात घेऊन आदिलशहाने शहाजीला सोडायचे ठरवले. 'कोंढाणा, बंगळूर व कंदर्पी हे तीन किल्ले तू मला दिल्यास मी तुझी सुटका करीन' असे त्याने त्याला आवडला नाही. त्याने शिवाजीविरुद्ध बंडगाई आणि फंदफितुरी सुरू केली. चंद्ररावाने तसे न करता आपल्याला मिळावे म्हणून शिवाजीने सामोपचार करून पाहिला. पण त्याचा उपयोग झाला नाही. पुढे मागे हा अस्तनीतला निखारा स्वराज्याला घातक ठरेल, असे शिवाजीने हेरले. चंद्रराव बधत नाही असे ठरल्यावर शिवाजीने जावळीवर सैन्य घातले आणि चंद्ररावाचे पारिपत्य करून त्याला सत्तेवरून दूर केले. अशा प्रकारे जावळी स्वराज्यात आली. त्यानंतर त्याने त्या भागात प्रतापगड हा नवा किल्ला बांधवला. रायगडही त्याला याच वेळी मिळाला.

आदिलशहाने वाईच्या सुभेदारीवर अफजलखानाची नेमणूक केली होती; तशीच रुस्तुमजमा या सरदाराची कोकणपट्टीवर केली होती. कुडाळचा लखम सावंत हा आदिलशाहीतला एक



छत्रपती शिवाजीमहाराजांचे हस्ताक्षर.

शहाजीला सांगितले. शहाजी त्या गोष्टीला तयार झाला. इतर दोन किल्ल्यांचे शिवाजीला एवढेसे महत्त्व नव्हते; पण कोंढाणा हा स्वराज्यातला प्रचंड किल्ला असल्यामुळे शिवाजीला तो आदिलशहाच्या स्वाधीन करताना फार दुःख झाले. तथापि वडिलांच्या सुटकेसाठी त्याने तो त्याग केला.

आदिलशहाने शहाजीकडून (सिंहगड) कोंढाणा घेतला आणि शिवाजीने जहागिरीबाहेर पाऊल टाकू नये असा बंदोबस्त केला. त्यासाठी नजीकच्या वाई प्रांताची सुभेदारी त्याने अफजलखानाला दिली.

त्याच काळात जावळीच्या चंद्रराव मोऱ्याचे प्रकरण उद्भवले. तो आदिलशहाचा सरदार होता आणि जावळीच्या प्रदेशावर सत्ता चालवीत होता. शिवाजीचा स्वराज्याचा उद्योग वतनदार होता. त्याने आपल्या प्रदेशात आदिलशाहीविरुद्ध पुंडाई सुरू केली. त्याचा बंदोबस्त करण्यासाठी रुस्तुमजमाने त्याच्याविरुद्ध मोहीम आरंभिली व त्याचा मुलुख जिंकून घेतला. पण लखम सावंताने शिवाजीची मदत मिळवली व त्या दोघांच्या संयुक्त सैन्याने रुस्तुमजमाला खडे चारले. शिवाजीने सावंताला सर्व मुलुख त्याला परत मिळवून दिला; मात्र फोंडा किल्ला व त्याभोवतालचा काही प्रदेश आपल्याकडे ठेवून घेतला.

त्या मोहिमेवरून परत येतो तोच शिवाजीला अफजलखानाच्या संकटाची चाहूल लागली. शिवाजीशी वरपांगी दरमाईचे बोलणे करून त्याला कैद करून आणावे किंवा ठार मारावे, असा अफजलखानाला आदिलशहाचा हुकूम होता. त्याप्रमाणे अफजलखान विजापुराहून त्या मोहिमेवर निघाला.

वाटेत त्याने तुळजापूर, माणकेश्वर, पंढरपूर, शिंगणापूर, इ. हिंदूंच्या धर्मक्षेत्रांवर अत्याचार केले व हिंदूंची मने दुखवली, असे शाहीर अज्ञानदास म्हणतो.

अफजलखानाने वाईला येऊन तळ ठोकला व शिवाजीला निरोप पाठवला; की "घेतलेले किल्ले परत करून शरण ये; नाहीतर तुझा धुव्वा उडवीन."

शिवाजीने जाणले की हा प्रसंग बाका आहे. अफजलखान आपल्याविरुद्ध सर्व सामर्थ्यानिशी लढणार आहे. शिवाजीने ते आव्हान स्वीकारले. त्याला ते स्वीकारणेच भाग होते. त्याने आपल्या सैन्याचा फार मोठा भाग जावळीत एकत्र केला. सर्व



भवानी देवी–प्रतापगड

प्रकारची व्यूह–रचना केली आणि खानाला नरमाईचा प्रतिनिरोप पाठवला. "तुम्ही जावळीस याल तर बरे होईल. तिथे समक्ष भेटीत तुम्ही मागता ते किल्ले मी तुम्हांला देईन आणि वर माझी तलवारही तुमच्यापुढे ठेवीन." शिवाजीने आपला वकील पंताजी गोपिनाथ याच्यामार्फत आपण फार घाबरलो असल्याचा खूप देखावा केला आणि खानाला तो खरा वाटला. अफजलखान त्या निरोपाने हुरळला व जावळीच्या दुर्गम कडेकपारीत सैन्य घेऊन उतरला. शिवाजीला जे हवे होते ते नेमके त्याने केले.



प्रतापगडावर त्या दोघांची भेट ठरली. भेटीत कोणी कसे वागावे याचा करार आधीच ठरला होता. भेटीसाठी मुद्दाम उभारलेल्या वैभवशाली शामियान्यात खान प्रथम आला. शिवाजी नंतर उपस्थित झाला. खान उठला आणि त्याने शिवाजीला आलिंगन देण्याच्या मिषाने कवेत घेतले. त्याने लगेच शिवाजीची मान डाव्या बगलेत दाबून धरली आणि आपले हत्यार शिवाजीच्या कुशीत खुपसले. पण शिवाजीच्या अंगात चिलखत असल्याने खानाचा तो वार वाया गेला. दुसऱ्याच क्षणी शिवाजीने आपल्या बिचव्याचे तीक्ष्ण पाते खानाच्या पोटात खुपसले. खान 'दगा, दगा' म्हणून ओरडला. लगेच शिवाजीने दुसरा वार केला आणि खानाचा निकाल लावला. पाठोपाठ जावळीत विखरून ठेवलेल्या आपल्या सैन्याला त्याने इशारा केला. तो मिळताच ताबडतोब शिवाजीचे सैन्य खानाच्या सैन्यावर तुटून पडले. खानाचे सैनिक लढायला पुढे येण्याऐवजी जीव बचावण्यासाठी वाट फुटेल तिकडे पळत सुटले. खानाबरोबरच त्याचे बरेचसे सैन्य जावळीत गारद झाले. 'मरणान्तानि वैराणि' हे तत्त्व शिवाजी जाणत होता. म्हणून त्याने प्रतापगडावरच खानाला सन्मानाने मूठमाती दिली.

स्वराज्यात सर्वत्र आनंदी आनंद झाला. आदिलशाहाने मनगटे चावली. पण तेवढ्यावरच भागण्याजोगे नव्हते. विजापूरच्या सत्तेला आणखी धक्के बसणार होते. शिवाजीने पाठोपाठ वाई प्रांती येऊन तो सर्व प्रदेश व्यापला. तिथून त्याने कोल्हापुरापर्यंत मजल मारली आणि कोल्हापुराजवळचा पन्हाळगडही काबीज केला. तो किल्ला पुनश्च हस्तगत करण्यासाठी आदिलशहाने रुस्तुमजमा व फाजलखान यांना शिवाजीवर पाठवले. पण इथेही आदिशहाला यश मिळाले नाही. शिवाजीने त्या दोघांची दाणादाण उडवून त्यांना पळता भुई थोडी केली.

मग आदिलशहाने सिद्दी जौहर हा मातबर सरदार शिवाजीवर पाठवला. शिवाजी त्या वेळी मिरजेत होता. सिद्दीची बातमी लागताच शिवाजी मिरज सोडून पन्हाळ्याला आला. सिद्दी जौहराने पन्हाळ्यापर्यंत मजल मारली व गडाला भक्कम वेढा घातला. सुमारे साडेचार महिने शिवाजी त्या वेढ्यात अडकून पडला. त्याच वेळी शिवाजीला बातमी कळली, की उत्तरेहून शायिस्तेखान नावाचा मोगल सरदार दक्षिणेत उतरला आहे आणि तो पुण्यात आपल्या लाल महालात मुक्काम करून आजूबाजूचा मुलुख उद्ध्वस्त करीत आहे. त्याचे पारिपत्य करायचे तर शिवाजीची पन्हाळ्याहून सुटका होणे आवश्यक होते. पण शिवाजीला कोणत्याच प्रकारे तिथून बाहेर पडणे

अशक्य होते. म्हणून त्याने सिद्दी जौहराशी सलोख्याचे बोलणे लावले. त्याने सिद्दी जौहराला जणू शरणागतीचा निरोप धाडला. ‘तुम्ही माझ्यासाठी आदिलशहाकडे रदबदली करावी. मी माझी सर्व मालमत्ता व मिळवलेले राज्य आदिलशहाला अर्पण करण्यास तयार आहे.’ हा निरोप ऐकून सिद्दी जौहराला वाटले, की आपली मोहीम यशस्वी झाली. अनेक सरदारांना पाणी पाजणारा शिवाजी अखेर मला शरण आला, असे तो मनचे मांडे खाऊ लागला. शेवटी शिवाजी व जौहर यांची भेट ठरली. सिद्दी जौहर बेसावध राहिला. वेढ्याचे सैनिकही गाफील झाले, वेढा सैल पडला. शिवाजीला हेच हवे होते. १२ जुलै १६६० च्या रात्री मुसळधार पाऊस पडत असता अंधाराचा फायदा घेऊन शिवाजी पन्हाळ्यावरून खाली उतरला आणि विशाळगडाच्या मार्गाला लागला. विशाळगडावर जायचे तर गजापूरची घोडखिंड पार करावी लागत असे. शिवाजी खिंड पार करून सुखरूप विशाळगडावर पोचावा म्हणून बाजीप्रभू देशपांडे खिंडीच्या तोंडावर निवडक लोकांनिशी उभा राहिला आणि शिवाजी विशाळगड चढू लागला. शिवाजीने आपल्याला चकवले हे थोड्याच वेळात सिद्दी जौहराला कळून आले. त्याचा सरदार सिद्दी मसूद याने सैन्यासह शिवाजीचा पाठलाग आरंभिला व घोडखिंड गाठली. बाजीप्रभूने खिंडीच्या तोंडावर सिद्दीचे सैन्य प्राणपणाने बराच वेळ थोपवून धरले; पण त्या रणधुमाळीत बाजीप्रभू पडला. शिवाजी सुखरूप गडावर पोचल्याचा इशारा मिळताच बाजीप्रभूने प्राण सोडला.

शिवाजीने इथेही आपला दूरदर्शीपणा दाखवला. सिद्दी जौहराशी सुरू केलेले सलोख्याचे बोलणे त्याने पुढे चालू ठेवले आणि पन्हाळगड सिद्दी जौहराला देऊन टाकून त्याला सैन्यासह माघारी फिरवले. शिवाजी आता शायिस्तेखानाकडे लक्ष द्यायला मोकळा झाला. प्रथम शिवाजीने मोगलांच्या एका सरदाराचा उंबरखिंडीत पराभव केला. नंतर त्याने कोकणावर स्वारी करून तिकडे चांगला बंदोबस्त केला. विजापूरकराशीही त्याने सलोखा केला. पण दोनतीन वर्षे खूप प्रयत्न करूनही शायिस्तेखानाला हुसकावून लावणे त्याला जमले नाही. म्हणून एक धाडसी योजना मनात आखूत शिवाजी पुण्यात आला. एका रात्री त्याने शायिस्तेखानावर धाड घालायचे ठरवले. निवडक लोकांसह त्याने लाल महाल गाठला. खानाच्या शय्यागृहात प्रवेश करून तो खानापुढे उभा राहिला. खान घाबरला. दरवाजा बंद आहे असे पाहून तो खिडकीतून पळू लागला. एवढ्यात शिवाजीने त्याच्यावर तलवारीचा वार केला. पण तो निसटता लागल्यामुळे त्याची मान तुटण्याऐवजी हाताची बोटेच तेवढी तुटली. शायिस्तेखान निसटला; पण त्याने शिवाजीच्या या धाडसाचा इतका धसका घेतला, की त्याने पुण्याहून तडक औरंगाबाद गाठले.

भेदरलेला शायिस्तेखान सावध होऊन पुन्हा चढाई करीपर्यंत शिवाजीला दुसरा कोणता तरी पराक्रम करून मराठी सैन्याची हिम्मत वाढवणे आवश्यक वाटले. लगेच तो कोकणच्या स्वारीवर निघाला. राजापुरावरून वेंगुर्ल्यापर्यंत मजल मारून शिवाजीने तो प्रदेश जिंकून घेतला.

एवढ्यात बातमी आली, की मोगलांचे सैन्य पाठीवर असून ते महाडपर्यंत येऊन पोचले आहे. त्या बातमीसरशी शिवाजी कोकणची मोहीम आटोपती घेऊन स्वराज्यात परतला. पण शिवाजीचा स्वराज्यातला बंदोबस्त पक्का असल्याने मोगलांची फारशी प्रगती झाली नाही. १६६४ च्या एप्रिल महिन्यात जसवंतसिंहाने सिंहगडावर चढाई केली, पण तीत त्याला यश मिळाले नाही.

पुढे शिवाजीच्या मनात विचार आला, की काही तरी अद्भुत करून दिल्लीच्या सिंहासनाला हादरा द्यावा. या संदर्भात त्याचे लक्ष सुरतेकडे वळले. ते शहर म्हणजे व्यापाराची फार मोठी पेठ होती. डच, इंग्रज, इ. युरोपियनांच्या मोठमोठ्या वखारी तिथे होत्या. तिथले अनेक व्यापारी नवकोट नारायण होते. ते शहर मोगली साम्राज्यात होते. शिवाजीने त्याच्यावर धाड घातली आणि तिथे मनसोक्त लूट केली. लुटीचा तो सर्व माल त्याने स्वराज्यात आणला.

परतीच्या वाटेतच शिवाजीला शहाजी मरण पावल्याची अशुभ वार्ता मिळाली. शिवाजी दुःखमग्न झाला आणि त्वरेने राजगडावर आला. मातुःश्री जिजाबाई सती जायला निघाली. पण शिवाजीने मोठ्या मिनतवारीने तिला त्या विचारापासून परावृत्त केले. पितृच्छत्र फाटले; पण मातृच्छत्र त्याने शिरावर कायम राखले.

सह्याद्रीच्या आधाराने शिवाजीचे स्वराज्य वाढले. कोकणही त्याला मिळाले; पण ते मिळवताना त्याला पोर्तुगीज, डच, फ्रेंच, इंग्रज आणि दंडाराजपुरीचा सिद्दी या लोकांशी संघर्ष करावा लागला. त्यांच्याजवळ लढाऊ गलबते होती आणि त्यांच्या बळावर हे विदेशी व्यापारवाले समुद्रावर धुमाकूळ घालीत होते. या संघर्षात शिवाजीला जाणवले की या परकीय शत्रूंना लगाम घालायचा तर आपलेही आरमार असायला हवे. हा विचार पक्का होताच शिवाजी त्या उद्योगाला लागला. मालवणजवळ समुद्रात सिंधुदुर्ग उभारून त्याने स्वतःचे आरमारी ठाणे निर्माण केले. तसेच रत्नागिरी, पद्मदुर्ग, विजयदुर्ग, कल्याण, इ. नाविक केंद्रे निर्माण केली. अनेक लढाऊ गलबतेही बांधून घेतली. ... पाचसहा वर्षांच्या काळात शिवाजीला अजिबात उसंत मिळाली

नाही. मात्र तेवढ्या अवधीत त्याने त्या विदेशी व्यापाऱ्यांवर चांगली जरब बसवली.

शायिस्तेखानाची दाणादाण, सुरतेची निर्भय लूट आणि जसवंतसिंहाला सिंहगड घेण्यात आलेले अपयश या तीन गोष्टींनी



छ. शिवाजीमहाराजांच्या जुन्या चित्रावरून काढलेले रेखाचित्र

औरंगजेबाला आपले नाक कापलेसे वाटले. यापुढे शिवाजीला मोकळा सोडणे म्हणजे तो आत्मघात ठरेल, असे औरंगजेबाच्या मनाने घेतले. त्याला वाटले की आपणच स्वतः शिवाजीवर चालून जावे. पण त्याने तो बेत बदलला व स्वतःच्या ऐवजी मिर्झाराजा जयसिंग याला पाठवले. जयसिंग हा यशस्वी सेनापती होता. युद्ध व राजकारण या दोहोंतही तो निष्णात होता. जोडीला दिलेल्या दिलेरखानासह प्रचंड सैन्य घेऊन तो दक्षिणेत उतरला. त्याने पुण्यात आपला तळ ठोकला. मनातून शिवाजीच्या विरुद्ध असलेल्या लोकांना त्याने फितुरीचा मंत्र दिला व त्यांना शिवाजीच्या विरुद्ध उठवले. मग दिलेरखानाने पुरंदराकडे आपला मोर्चा वळवला व पुरंदराला वेढा घातला. तो मोडून काढण्याच्या प्रयत्नात मुरारबाजी देशपांडे धारातीर्थी पडला. मोगलांच्या लहानमोठ्या फौजा आसपासच्या मुलखात जाळपोळ व लुटालूट करू लागल्या. चहूबाजूंनी शिवाजीच्या स्वराज्याची ससेहोलपट सुरू झाली. लढायचे तर मोगलांच्या सेनासागरापुढे आपला निभाव लागणार नाही हे शिवाजीने जाणले. आजवर जे मिळवले ते सर्व जाणार आणि केवळ अपयश आपल्या पदरी पडणार, या जाणिवेने शिवाजीची मती कुंठित झाली. सर्वनाश तर ओढवलाच आहे; त्यातून जेवढे वाचवता येईल तेवढे तरी वाचवावे, या निर्णयावर तो अखेरीस आला. त्याने जयसिंगाकडे सलोख्याचे बोलणे चालू केले. जयसिंगाने त्याकडे प्रथम लक्षच दिले नाही; पण विचारांती त्याला जाणवले की फार ताणून धरले तर मामला विघडेल. शिवाजी कदाचित आदिलशहाची मदत घेईल. कदाचित सर्व बळानिशी आपल्यावर तुटून पडेल. शिवाय पावसाळा तोंडावर आला आहे, त्याचा फायदा शिवाजीला मिळेल. या साऱ्या गोष्टी विचारात घेऊन जयसिंगाने शिवाजीची भेट घेण्याचे मान्य केले. पुरंदर गडाजवळ ती भेट घडून आली. त्या भेटीत जो तह झाला, त्याची कलमे अशी–

(१) पुरंदर, सिंहगड, लोहगड, इ. देशावरचे नऊ व कोकणातले चौदा असे तेवीस किल्ले आणि त्यांच्या खालील चार लक्षांचा मुलूख शिवाजीने औरंगजेबाला द्यावा.

(२) राहिलेले राजगड, तोरणा, रायगड, इ. बारा किल्ले व त्यांच्या खालचा फक्त एक लक्षाचा मुलूख शिवाजीकडे राहावा. आणि

(३) याच्या मोबदल्यात शिवाजीने औरंगजेबाची एकनिष्ठपणे सेवा करावी.

या तहाने शिवाजीच्या स्वराज्याचा कणाच मोडला. शिवाजी मोगलांचा केवळ जहागिरदार बनला. या मोहिमेतली जयसिंगाची वागणूक अत्यंत निर्दय होती. शिवाजीने त्याला कळवले होते. 'तुम्ही राजपूत क्षत्रिय आहा; तुम्ही या देशाचे सम्राट व्हा. मी मिळवलेले सर्व राज्य तुम्हांला समर्पून तुमची चाकरी करीन.' पण धर्मनिष्ठेचा ध्वज मिरवणाऱ्या जयसिंगाने त्या निरोपाची दखल घेतली नाही.

शिवाजीने बादशहाच्या भेटीसाठी आग्र्यास जावे असे कलम तहात नव्हते; पण तरीही जयसिंगाने शिवाजीकडे तसा आग्रहच धरला. तुमच्या जिवाला अपाय होणार नाही, अशी खात्री त्याने शिवाजीला दिली. पण जयसिंगापेक्षा शिवाजी औरंगजेबाला अधिक ओळखत होता. प्रसंग पडल्यास जयसिंगाची पर्वा न करता औरंगजेब आपले वचन मोडील, हे शिवाजी जाणून होता. पण तरीही ते धाडस करण्याचे शिवाजीने ठरवले. यामागे एक महत्त्वाचा राजकीय विचार होता. शिवाजीला दक्षिणेची खूप माहिती होती; पण उत्तरेची काहीच नव्हती. औरंगजेबाचे सामर्थ्य किती आहे व कशात आहे, त्याचा कारभार कसा चालतो, प्रजेच्या मनात काय आहे, दक्षिणेकडून उठाव केल्यास उत्तरेतून कोणाचा किती पाठिंबा मिळेल. या सर्व गोष्टी तिकडे

गेल्यानेच त्याला कळणार होत्या. आणि म्हणूनच शिवाजीने त्या सिंहाच्या गुहेत शिरण्याचा निश्चय केला.

आग्र्याच्या मुक्कामात शिवाजीच्या संरक्षणाची जबाबदारी जयसिंगाने आपला पुत्र रामसिंग याच्यावर सोपवली होती. योग्य वेळी औरंगजेबाच्या दरबारात शिवाजी संभाजीसह उपस्थित झाला. नजराणा, मुजरा वगैरे सर्व गोष्टी झाल्या. पण औरंगजेबाने शिवाजीला योग्य तो मान दिला नाही. त्याला तिसऱ्या दर्जाच्या सरदारांच्या रांगेत उभे केले. या प्रकाराने शिवाजीचा संताप अनावर झाला. 'असा अपमान करून घ्यायला मी या दरबारात आलो नाही ' असे शिवाजी चढ्या आवाजात बोलला. दरबारातले वातावरण तंग झाले. औरंगजेबाने मनाशी ठरवले, की शिवाजी हे प्रकरण भलतेच तिखट आहे. त्याने शिवाजीचे मन वळविण्याचे काही प्रयत्न करून पाहिले; त्याच्याकडे मानाचा पोशाख पाठवला. पण आपला अपमान विसरून पोशाख घ्यायला तो तयार झाला नाही. शेवटी संतप्त शिवाजीला रामसिंग कसाबसा आपल्या डेऱ्यात घेऊन गेला. औरंगजेबाने त्यानंतर काही दिवसांनी त्याच्या मुक्कामावर चौकी पहारे बसवले व त्याला नजरकैद केले.

शिवाजीला परिस्थितीची कल्पना आली. त्याने आपला पवित्रा बदलला. कसेही करून त्याला निसटून जायचे होते. प्रथम त्याने बादशहाची परवानगी घेऊन बरोबरच्या लोकांना दक्षिणेत पाठवून दिले. मग तो वैराग्याच्या गोष्टी बोलू लागला. आपले वैराग्य व नैराश्य बादशहाच्या कानावर जाईल अशी त्याने व्यवस्था केली. मग एक दिवस तो खोटाच आजारी पडला. त्या आजारातून बरे होण्यासाठी साधुसंत व फकीर यांना तो मिठाईचे पेटारे भरून पाठवू लागला. प्रथम काही दिवस बादशहाच्या शिपायांनी पेटाऱ्यांची कसून तपासणी केली. पुढे तो नित्याचाच प्रकार झाल्याने ते तिकडे दुर्लक्ष करू लागले. अशा स्थितीत एके दिवशी शिवाजी व संभाजी दोघेही पेटाऱ्यात बसून बाहेर पडले. कदाचित पेटारे वाहून नेणारे भोई बनूनही ते निसटले असतील.

हा खरोखर प्राणाशी खेळ होता, पण शिवाजीला नशिबाने हात दिला. आग्र्याबाहेर येऊन त्याने साधूचा वेष परिधान केला व तिथून तो परतीच्या वाटेला लागला. संभाजीला त्याने मथुरेत मोरोपंत पिंगळ्यांचे शालक कृष्णाजी त्रिमल मथुरे यांच्याकडे सुरक्षित ठेवून दिले. मग शिवाजी आपल्या जिवलग सहकाऱ्यांसह मजल मारीत दक्षिणेकडे निघाला आणि सुमारे पंचवीस दिवसांत स्वराज्यात येऊन पोचला. शिवाजी सुखरूप परत आला हे समजताच सर्वत्र आनंदी आनंद झाला. त्याच्या अनुयायांची मने ग्रहण सुटल्यागत उजळली.

आता पुनश्च ' हरि: ॐ ' करायला हवे होते. पण शिवाजीने एकदम चढाईचे धोरण स्वीकारले नाही. औरंगजेबाला वाटले, की शिवाजीने जगात आपली 'छी: थू:' केली. एका हिंदूने आपल्या हातावर तुरी दिल्या. त्यामुळे औरंगजेब बेभान झाला. त्या रागात तो उत्तरेतील हिंदूंची तीर्थक्षेत्रे भ्रष्ट करीत सुटला. औरंगजेबाने काशीतील विश्वनाथाचे मंदिर पाडून त्यावर मशिद उभारली, ती याच अविवेकाच्या भरात ! शिवाजीला या सर्व गोष्टी समजल्या. त्याच्या मनात विलक्षण चीड उत्पन्न झाली. त्याने लगेच चढाईचा पवित्रा घेतला. सिंहगडावर हल्ला करण्यापासून या चढाईला प्रारंभ झाला. त्या लढाईत शिवाजीचा उजवा हात असलेला तानाजी मालुसरा हा धारातीर्थी पडला. पण गड शिवाजीच्या हाती आला. जयसिंगाशी झालेल्या पुरंदरच्या तहात त्याने जे गमावले होते ते सर्व त्याने पुनश्च मिळवले. आणखी नवा मुलूखही संपादन केला. सुरतेवर पुन्हा एकदा धाड घालून स्वराज्यासाठी भरपूर धन मिळवले. बादशहाने त्यानंतरही शिवाजीचा पाडाव करण्याचे बरेच प्रयत्न केले. पण शिवाजीने ते सर्व मोडून काढले. दिंडोरी, साल्हेर, मुल्हेर येथे प्रचंड रण झाले. त्याच्या पराक्रमाचा दबदबा वाढला. परदेशी व्यापारीही शिवाजीला दबकून वागू लागले. बुंदेलखंडातील एक वीर युवक छत्रसाल याला याच सुमारास महाराजांच्या प्रत्यक्ष भेटीतून विलक्षण स्फूर्ती मिळाली व तो बुंदेलखंडात स्वराज्य स्थापण्याच्या ईर्षेने प्रेरित होऊन गेला. ऑगस्ट १६७२ मध्ये शिंगणवाडी येथे महाराजांनी श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या सहवासात काही काळ घालविला. समर्थांनी संतुष्ट मनाने महाराजांना गुरुपदेश देण्याचे मान्य केले.' सीवाजीराजे भोसले यांनी परिधावी संवत्सरी शिंगणवाडीचे मठी श्री हनुमंतासमोर परमार्थ झाला.' समर्थांनी महाराजांना राज्यव्यवस्था, लोकसंग्रह, राजकारण व इतर विषयांसंबंधी अत्यंत मोलाची सूत्रे सांगितली व अखेर असा आदेश दिला–'तुमचा मुख्य धर्म राजसाधन करून धर्मस्थापना, देवब्राह्मणांची सेवा, प्रजेची पीडा दूर करून पाळण-रक्षण करावे. हे व्रत संपादून त्यात परमार्थ करावा. तुम्ही जें मनी धराल ते श्री सिद्धीस पाववील.'

त्यानंतर इ. स. १६७३ मध्ये शिवाजीने पन्हाळगड जिंकून घेतला आणि आदिलशाहाच्या मोठ्या सेनापतीचा पराभव केला.

पण एवढे सगळे होऊनही शिवाजी हा सर्वसामान्य प्रजेला राजा आहे, असे वाटत नव्हते. शिवाजीच्या आज्ञेपेक्षा मोगलांच्या किंवा आदिलशाही फर्मानांचे स्थान लोकांच्या दृष्टीने वरचढ राहिले होते. शिवाय काही क्षुद्र मनाचे सरदार – जहागिरदार शिवाजीचा श्रेष्ठपणा मानायला तयार नव्हते. याचे महत्त्वाचे कारण हे होते, की शिवाजीचे राजेपण परंपराप्राप्त संस्कारांनी

सिद्ध झालेले नव्हते. ते सिद्ध करण्यासाठी शिवाजीने स्वतःला राज्याभिषेक करून घेण्याचे ठरवले. त्याच्या सर्व अनुयायांनी आणि स्वराज्याच्या हितचिंतकांनी या विचाराला एकमुखी पाठिंबा दिला. राज्याभिषेक व्हायचा, तर शिवाजी हा क्षत्रिय आहे, हे सिद्ध व्हायला हवे होते. त्यासाठी शिवाजीने काशीतला महापंडित गागाभट्ट याला बोलावून आणले. काहींच्या मते शिवाजीची कीर्ती ऐकून गागाभट्ट स्वतःच त्याच्या भेटीला आला होता. गागाभट्टाने धर्मशास्त्राच्या आधारे शिवाजीचे क्षत्रियत्व सिद्ध केले. तसेच त्याने राज्याभिषेकाचा आग्रह धरला. राज्याभिषेकाची सिद्धता चालू असतानाच नेसरीच्या खिंडीत महाराजांचा शूर सेनानी प्रतापराव गुजर याने बहलोलखानाशी लढताना आपल्या सहा सहकाऱ्यांसह बलिदान केले. पण मराठे हटले नाहीत. आनंदराव या शूर सरदाराने बहलोलखानाचा पराभव केला. याच वेळी महाराजांच्या एक राणीसाहेब सकलसौभाग्यसंपन्न काशीबाईसाहेब या मृत्यू पावल्या. राज्याभिषेकसिद्धता चालू असतानाच महाराजांच्या प्रिय हृदयलक्ष्मीने त्यांचा निरोप घेतला.

रायगड ही नव्या मराठी राज्याची राजधानी ठरली. तिथेच राज्याभिषेकाची तयारी सुरू झाली. गागाभट्टाने प्रथम शिवाजीचे उपनयन केले. राज्याभिषेकाच्या आधी शिवाजीची सुवर्णतुला केली. मग शिवाजी सोयराबाई या पट्टराणीसह सुवर्णाच्या हिरेजडित सिंहासनावर बसला. मग विद्वान ब्राह्मणांनी सुवर्णपात्रातून शिवाजीला अभिषेक केला. समारंभाचे पौरोहित्य गागाभट्टाने केले. शिवाजी आता शास्त्रपूत राजा झाला. हा अभूतपूर्व सोहळा ज्येष्ठ शु. १३ शुक्रवार शके १५९६ या दिवशी मोठ्या उत्साहाने पार पडला. महाराष्ट्राचाच नव्हे तर उभ्या भारताचा तो भाग्यदिन ठरला. या प्रसंगी शिवाजीने 'क्षत्रियकुलावतंस' व 'सिंहासनाधीश्वर' अशी दोन बिरुदे धारण केली.

शिवाजीमहाराजांनी या प्रसंगी राज्य चालविण्यासाठी अष्टप्रधानांची नियुक्ती केली. त्यांची नावे व पदे पुढीलप्रमाणे होती—

| नाव | पद |
|---|---|
| मोरोपंत पिंगळे | मुख्य प्रधान |
| रामचंद्र नीळकंठ | अमात्य |
| हंबीरराव मोहिते | सेनापती |
| मोरेश्वर पंडितराव | पंडितराव |
| निराजी रावजी | न्यायाधीश |
| अण्णाजी दत्तो | सचिव |
| दत्ताजी त्र्यंबक | मंत्री |
| रामचंद्र त्र्यंबक | सुमंत |

ही अष्टप्रधान मंडळाची कल्पना महाराजांना रामायणावरून सुचली असावी. दशरथाचे आठ अमात्य होते, असे तिथे म्हटले आहे. महाभारताच्या शांतिपर्वातही (८६.१०) राजाने आठ मंत्र्यांच्यामध्ये बसून सल्लामसलत करावी, असे सांगितले आहे. सात किंवा आठ ही संख्या मनुस्मृतीतही सांगितली आहे (७.५४). महाराजांनी अष्टप्रधानांची फार्सी नावे बदलून त्यांना संस्कृत नावे दिली. अष्टप्रधानांच्या नित्य आणि नैमित्तिक कर्मकर्तव्यांचे परिपत्रक (कानून जाबता) सिद्ध करण्यात आले.



छ. शिवाजीमहाराजांचे सिंहासन, रायगड

त्यात आठांपैकी सहा प्रधानांना सैन्य घेऊन 'युद्धादि प्रसंग करावे' अशी छत्रपतींची आज्ञा होती.

राज्याभिषेकानिमित्त महाराजांनी होन व शिवराई अशी दोन नवी नाणी पाडली. त्या नाण्यांवर त्यांनी 'राजा शिवछत्रपति' अशी अक्षरे घातली. महाराजांची शासकीय मुद्रा संस्कृत श्लोकबद्ध असून, ती पुढीलप्रमाणे होती –

**प्रतिपच्चन्द्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववन्दिता ।**
**शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥**

अर्थ – शहाजीचा पुत्र शिवाजी याची ही राजमुद्रा (शुद्धपक्षातल्या) प्रतिपदेच्या चंद्रकोरीप्रमाणे वर्धिष्णू आणि विश्ववंदित आहे. ही मुद्रा लोककल्याणासाठी शोभत आहे.

त्यांनी स्वराज्याचा ध्वज भगवा ठेवला. संस्कृत भाषेत स्वत्वाची बीज़े आहेत हे महाराजांनी ओळखूनच संस्कृत भाषेचा व भाषापंडितांचा फार मोठा आदर केला.

राज्याभिषेकानंतर महाराजांनी आणखी एक महत्त्वाचे कार्य केले; ते म्हणजे राजव्यवहारकोश. हा कोश महाराजांच्या प्रेरणेने रघुनाथ पंडित याने तयार केला. तत्कालीन राजकीय परिभाषा फारसी होती. अधिकाऱ्यांची नावे फारसीवरूनच घेतलेली असत. राज्य हे स्वराज्य आहे, ही गोष्ट जर जनमानसावर ठसवायची, तर राज्यकारभाराचे माध्यमही स्वभाषेचेच हवे. परभाषा परकी सांस्कृतिक संकेत घेऊन आलेल्या असतात, तर स्वभाषेच्या द्वारे शुद्ध राष्ट्रीय कल्पना आणि संकेत निर्माण करता येतात. संज्ञांत परिवर्तन झाले की

संवेदनांतही परिवर्तन होते. त्या काळी परंपरेने चालत आलेल्या राज्यविषयक फारसी संज्ञा बदलून त्यांच्या जागी प्राचीन महाभारतकालीन शुद्ध स्वदेशी संज्ञा आणण्याचा व काही नवीन बनवण्याचा प्रयत्न राजव्यवहारकोश या ग्रंथात करण्यात आला. राजपत्रलेखनाविषयीही असेच नियम करण्यात आले.

महाराजांनी राज्याभिषेकाच्या अलौकिक सोहाळ्याचे स्मरण अखंडपणे युगानुयुगे राहावे म्हणून राज्याभिषेकशक सुरू केला. मात्र या शकाला त्यांनी स्वतःचे नाव दिले नाही.

शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाची वार्ता औरंगजेबाच्या कानी जायला वेळ लागला नाही. बादशहा या घटनेने उद्विग्न झाला. तो तीन दिवस आपल्या महालातून बाहेर पडला नाही. महाराजांनी आजवर मोगली साम्राज्यसत्तेवर अनेक आघात केले होते. पण हा आघात सर्वांत दारुण व मर्मांतिक होता. कारण आता शिवाजी एक व्यक्ती नव्हे, तर त्याच्या रूपाने एक स्वतंत्र राजसत्ता औरंगजेबाच्या छातीवर बसली होती.



छ. शिवाजीमहाराजांची राजमुद्रा

राज्याभिषेकानंतरचे काही दिवस महाराजांना वाईट गेले. एक तर त्यांची प्रकृती बिघडली. मातुःश्री जिजाबाईंचे देहावसान झाले. आणि दुसरे म्हणजे युवराजपदाचा अधिकारी असा पुत्र संभाजी महाराजांशी वितुष्ट धरून मोगल सरदार दिलेरखान याला मिळाला. या घटनेने महाराजांची कंबरच खचली. त्यांचा अशक्तपणा वाढला. पावसाळ्यानंतर सातारचा किल्ला पाहण्यासाठी महाराज तिथे गेले असता त्यांना ताप येऊन त्यांची प्रकृती अस्वस्थ झाली. या दुखण्यात त्यांना संतसमागमाचा ध्यास लागला. महाराजांची ही मनोवस्था रामदासस्वामींना समजली. त्यांनी साताऱ्याला येऊन महाराजांची भेट घेतली. महाराजांना रामदासस्वामींचा अनुग्रह राज्याभिषेकापूर्वीच झाला होता. महाराज काही दिवस स्वामींच्या सहवासात राहिले. उभयतांत काही तत्त्वचर्चाही झाली. त्या सहवासाने महाराजांचे कोमेजलेले मन पुनश्च टवटवीत झाले. आजारही हटला. महाराज सिंहासनाधीश्वर झाले होते; पण अजून हिंदवी स्वराज्य फार दूर होते. ते ध्येय साधायचे तर यापुढेही अखंड उद्योग चालू ठेवला पाहिजे, हा निर्धार मनाशी पक्का करून महाराज साताऱ्याहून बाहेर पडले.

आषाढ वद्य चतुर्थी शके १५९८ या दिवशी महाराजांनी बाटविला गेलेल्या नेताजी पालकरला विधिपूर्वक हिंदू करून घेतले. महाराजांनी ठरविले होते, माझा माणूस परका राहाता कामा नये. महाराजांनी ही मोठीच धार्मिक आणि सामाजिक क्रांती केली.

थोड्याच दिवसांत महाराजांनी दक्षिण-दिग्विजयाचे प्रस्थान ठेवले. तिकडे तंजाऊरच्या बाजूस महाराजांचा सावत्र भाऊ एकोजी हा शहाजीराजांच्या जहागिरीची व्यवस्था पाहत होता. शिवाय त्याने काही नवा मुलूखही जिंकला होता. महाराजांनी वाटेत प्रथम हैदराबाद येथे कुतुबशहाशी सख्य जोडले व तिथून ते पूर्व कर्नाटकाकडे निघाले. या स्वारीत त्यांनी वेलोर, जिंजी वगैरे ठिकाणे काबीज केली. तिथून पश्चिमेकडे वळून बंगळूरच्या आसपासचा मुलूख जिंकला. एकोजीकडे येऊन वडिलांच्या जहागिरीचा अर्धा वाटा मागितला. एकोजीने प्रथम खळखळ केली; पण त्याचे काही चालले नाही. इतक्या दूरवर जिंकलेल्या प्रदेशातही महाराजांनी वसुलाची पद्धत ठरवली व कारभाराची घडी नीट बसवली. तिथल्या प्रजेशी महाराजांचे व त्यांच्या अधिकाऱ्यांचे न्याय्य व प्रेमपूर्ण वर्तन पाहून पांडेचरीच्या फ्रेंच वसाहतवाल्यांनी प्रशंसेचे उद्गार काढले. दक्षिणेतून परत येत असताना महाराजांना दिलेरखान आदिलशाहीवर चालून आल्याचे समजले. महाराज ताबडतोब आदिलशहाच्या मदतीस धावून गेले व त्यांनी दिलेरखानाला पिटाळून लावले. अशा प्रकारे या चार-पाच वर्षांच्या काळात महाराज स्वतःचे नुसते राज्य स्थापून स्वस्थ बसले नाहीत; तर त्यांनी दख्खनच्या सत्ताधीशांची एकजूट घडवून आणली व संकटप्रसंगी उपयोगी पडतील अशी निवाऱ्याची ठिकाणे दक्षिणेत निर्माण केली.

देशाच्या दुर्दैवाने महाराजांना दीर्घायुष्य लाभले नाही. काही दिवस ताप येऊन इ. स. १६८०साली चैत्र शुद्ध पौर्णिमेला रायगडावर त्यांचे दुःखद निधन झाले.

**शिवचरित्राची तालिका** – शिवाजीमहाराजांच्या चरित्रातील महत्त्वाच्या घटना पुढीलप्रमाणे–

| | |
|---|---|
| १६३० फेब्रु. १९ | शिवाजीमहाराजांचा जन्म. |
| १६३६ | शिवाजीराजांची पुण्याकडे रवानगी. |
| १६४५ | हिंदवी स्वराज्याची शपथ; तोरणा घेतला; राजगड बांधला. |
| १६४६ जाने. २८ | महाराजांच्या मुद्रेचे पहिले उपलब्ध पत्र |
| १६४७ | कोंढाणा घेतला. |

१६४७ ऑक्टो. १९ पुरंदर किल्ला घेतला.
१६५६ जाने. १५ जावळी घेतली.
१६५६ एप्रिल-मे रायगड घेतला.
१६५७ फेब्रु-मे शिवाजीची तीन लग्ने; संभाजीचा जन्म.
१६५९ मार्च ५ सावंताशी तह.
१६५९ सप्टेंबर ५ सईबाईचा मृत्यू.
१६५९ नोव्हें. १० अफझलखानाचा मृत्यू.
१६५९ नोव्हें. २८ पन्हाळगड घेतला.
१६६० जुलै १२ महाराज पन्हाळ्याहून निसटून गेले.
१६६१ मार्च इंग्रजांची राजापूरची वखार लुटली.
१६६१ एप्रिल २९ शृंगारपूरचे राज्य घेतले.
१६६३ एप्रिल ५ शायिस्तेखानावर लालमहालात छापा.
१६६४ जाने. ६-१० सुरतेची पहिली लूट.
१६६४ जाने.-२३ शहाजीराजांचा मृत्यू.
१६६४ नोव्हें. २५ सिंधुदुर्गाच्या पायाचा चिरा बसवला.
१६६५ फेब्रु. ८ मालवणहून बसनूरकडे आरमारी स्वारी.
१६६५ जून १३ पुरंदरचा तह.
१६६६ मार्च ५ आग्र्याकडे प्रस्थान.
१६६६ ऑगस्ट १७ आग्र्याहून सुटका.
१६६६ सप्टें. १२ शिवाजीराजे राजगडास परत आले.
१६७० फेब्रु. ४ तानाजीने सिंहगड घेतला.
१६७० फेब्रु.-२४ राजारामाचा जन्म.
१६७० ऑक्टो. ३-४ सुरतेची दुसरी लूट.
१६७३ मार्च ६ पन्हाळगड दुसऱ्यांदा घेतला.
१६७४ जून ६ राज्याभिषेक.
१६७४ जून १७ जिजाबाईचा मृत्यू.
१६७६ ऑक्टो. ६ दक्षिणेकडील स्वारीवर प्रस्थान.
१६७७ मे १३ जिंजीचा किल्ला घेतला.
१६७७ जुलै २३-२४ व्यंकोजीची भेट.
१६७८ मे-जून रायगडास महाराज परत आले.
१६७८ जुलै २२ वेलोरचा किल्ला घेतला.
१६७८ डिसेंबर १३ संभाजी मोगलांकडे गेला.
१६७९ ऑगस्ट खांदेरीच्या तटबंदीला सुरवात.
१६७९ ऑक्टो.-नोव्हें. विजापूरकरांना मोगलांविरुद्ध मदत.
१६८० जाने. १३ संभाजी परत आला.
१६८० एप्रिल ३ महाराजांचा मृत्यू.

**शिवछत्रपतींच्या चरित्राचे विवेचन** – महाराजांच्या ह्यातीतच त्यांच्याविषयीच्या अद्‌भुत कथा आसामपर्यंत पसरल्या होत्या. शिवचरित्रावर कवित्व करणे, ही परंपरा तत्कालीन कवी भूषणापासून तो चालू काळातल्या डॉ. श्री. भा. वर्णेकरांपर्यंत अव्याहत चालू आहे. शिवाजीमहाराजांची श्रीमूर्ती तर्ककर्कश इतिहाससंशोधकांनाही श्रद्धेय वाटली, हे विशेष होय. श्री. जदुनाथ सरकार हे काही महाराजांचे भक्त नव्हते. ते औरंगजेबाचे चरित्र लिहायला बसले होते. शिवाजी हे त्या चरित्रातले एक पोटप्रकरण होते. पण जसजशी साधनसामग्री



छ. शिवाजीमहाराजांची समाधी, रायगड.

गोळा झाली आणि ती सत्याच्या निकषावर त्यांनी घासून पाहिली, तसतशी जदुनाथांच्या मनात महाराजांची प्रतिमा उजळू लागली. सरतेशेवटी 'आधुनिक इतिहासातील युगप्रवर्तक राष्ट्रपुरुष' या शब्दांत जदुनाथांनी महाराजांचा गौरव केला.

महाराज हे महामानव होते, असे म्हणणे म्हणजे त्यांची स्तुती करणे नव्हे. ती वस्तुस्थिती आहे. महाराजांनी एक राज्य निर्माण केले, ही गोष्ट खोटी नाही; पण राज्य तर बाबराने, विजयनगच्या हरिहराने आणि हैदर अल्लीनेही निर्माण केले होते; पण त्यांना कोणी महामानव म्हणणार नाही.

महाराजांची मनोभूमिका आणि वागणे पाहिले म्हणजे कौटिल्याने अर्थशास्त्रात कल्पिलेला राजा कौटिल्यानंतर दोन हजार वर्षांनी जन्माला आला, असे म्हणावे लागते. कौटिल्याच्या कल्पनेतला राजा हेरगिरीवर भर देणारा, आक्रमणाचे फायदे स्वतःच्या पदरात पाडून घेणारा, पण विलासशून्य व उपभोगशून्य असा असतो. तो न्यायी व धर्मश्रद्ध असतो. चारित्र्यवानांच्या खेरीज इतरांना राजदंड पेलणार नाही, असे कौटिल्याने म्हटले आहे, तेही महाराजांच्या संदर्भात विचारात घ्यायला हवे.

महाराजांचे सर्व आयुष्य राजकारणात गेले. त्यांच्या जीवनातून राजकारण वेगळे काढताच येत नाही. राजकारण उपायसाध्य असते. साम, दाम, दंड व भेद हे राजनीतीचे चार उपाय होत. महाराजांनी वेळप्रसंग पाहून या चारांचाही अवलंब केला. त्यांनी जयसिंगाशी तडजोड केली, तशीच आदिलशहाशीही केली. किल्लेदारांना धनाचे आमिष दाखवून कित्येक किल्ले हस्तगत केले. अंतःस्थ फूट पाडून अनेक शत्रू जिंकले. युद्ध खेळूनही किती तरी शत्रू धुळीस मिळवले. महाराजांना एक राजनीती चांगली अवगत होती; ती म्हणजे जे ईप्सित ते कोणत्याही मार्गाने साध्य करणे ही होय. त्यांची प्रतिभा अलौकिक होती. देश–काल-परिस्थितीचे त्यांचे ज्ञान आश्चर्यकारक होते. त्या त्या प्रसंगी त्यांना योग्यच निर्णय स्फुरे.

महाराजांनी वयाच्या १५-१६ व्या वर्षी तोरणा घेतला. त्या वेळी त्यांच्यापाशी हजार तरी जवान असतील की नाही, याची शंकाच आहे. पण जे होते ते महाराजांसाठी प्राणांची कुरबानी करायला तयार होते. त्यांच्या बळावर पाहता पाहता त्यांनी तोरणा सर केला. तिथे मिळालेल्या खजिन्याच्या बळावर त्यांनी राजगड बांधला. गडांच्या बांधणीतील बारकावे त्यांना उत्तम समजत. जिंजीचा किल्ला घेतल्यावर त्याचे काही भाग पाडून महाराजांनी नवीन बांधले. संरक्षणाच्या दृष्टीने ही बांधणी एवढी कल्पक होती, की पाश्चात्य तंत्रज्ञांनीही तोंडात बोटे घातली.

महाराजांचे युद्धतंत्र गनिमी पद्धतीचे होते. प्रारंभीच्या छोटया छोटया चकमकींतून ते उत्क्रांत झाले. या लढाईची तंत्रे महाराजांच्या सैनिकांनी अनुभवाने बसवली. हूल दाखविण्यात महाराज पटाईत होते. शत्रूची दिशाभूल ते सहजपणे करीत. शायिस्तेखानाची फजिती महाराजांनी याच तंत्राने केली. सुरतेच्या लुटीच्या वेळी शत्रूला असेच हुलीवर घातले. कर्नाटकातील बसरूरवर नाविक चढाई करतेवेळी त्यांनी हबशी व पोर्तुगीज यांच्या आरमाराची अशीच दिशाभूल केली. अशी आणखी कितीतरी उदाहरणे सांगता येतील.

प्रतापगडचा संग्राम हे महाराजांच्या युद्धकौशल्याचे उज्ज्वल उदाहरण होय. महाराजांनी अफजलखानाशी मैदानी युद्ध चातुर्याने टाळले. कारण ते त्यांना घातक ठरले असते. अफजलखानाचा वध ही महाराजांच्या शौर्यसाहसाची गाथा आहे. पण खानाच्या सैन्याचा धुव्वा उडविणे, हा त्यांच्या रणनीतीचा असामान्य विजय होय. श्री. दि. वि. गोखले म्हणतात –

प्रारंभीचे बहुतेक विजय महाराजांनी पायदळाच्या बळावर मिळविले. पण तरीही पायदळ हे सर्वश्रेष्ठ अशी भावना त्यांनी बाळगली नाही. पायदळाइतकेच त्यांनी घोडदळालाही महत्त्व दिले. मुसलमानांचे सामर्थ्य घोडदळात आहे, ही वस्तुस्थिती राजांनी जाणली होती. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी एतद्देशियांना सैन्यात घेतले; पण तोफखाना, विमानदल आणि नौदल या महत्त्वाच्या अंगांत त्यांना प्रवेश दिला नाही. मुस्लिम राज्यकर्तेही हिंदूंना पायदळात नोकरीस ठेवीत; पण अश्वदळात त्यांना प्रवेश मिळणार नाही, अशी दक्षता घेत. हे जाणून राजांनी अश्वदल हा सेनाविभाग सुसज्ज केला. घोडदळयुद्धाचे तंत्र एकदा आत्मसात झाल्यावर मराठ्यांनी औरंगजेबाच्या मृत्यूनंतर ७०–८० वर्षे भारताच्या सर्व भागांत विजयामागून विजय संपादिले.

महाराज हे भारतीय आरमाराचे जनक होत, असे म्हटले तर ते चूक ठरणार नाही. युरोपीय लोक छोटया छोटया गटांनी भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर उतरले आणि नौदलाच्या जोरावर महत्त्वाची बंदरे बळकावून बसले. एका नव्या दिशेने येऊ घातलेल्या पारतंत्र्याची ती चाहूल होती. या धोक्याकडे आदिलशहाने किंवा मोगलांनी फारसे लक्षच दिले नाही. अशा त्या काळात आरमार हे स्वराज्याचे स्वतंत्र आणि महत्त्वाचे अंग आहे, ही जाणीव महाराजांना झाली. त्यासाठी त्यांनी सिंधुदुर्ग हा जलदुर्ग उभा केला. खांदेरीची तटबंदी त्यांनी लढत लढत बांधून काढली. त्यांनी स्वतःच्या लढाऊ आणि व्यापारी नावा तयार केल्या. युरोपीय सत्तांच्या सागरी युद्धक्षमतेच्या मानाने मराठ्यांची ही आरमारी सिद्धता निश्चितच किरकोळ ठरेल. पण या किरकोळ आरमाराने गाजवलेला पराक्रम मात्र थक्क करणारा होता. पाश्चात्यांच्या आरमाराचा संपूर्ण पाडाव करणे महाराजांना कधी जमले नाही. पण त्यांनी स्वतःच्या आरमाराच्या बळावर सिद्दी, पोर्तुगीज आणि इंग्रज या तिघांचीही नाकेबंदी मात्र केली.

महाराजांची सैन्यव्यवस्था खरोखर वाखाणण्याजोगी होती. कडक कसोटया लावून माणसे सैन्यात भरती केली जात. महाराजांचे आपल्या सैनिकांवर पोटच्या मुलाप्रमाणे प्रेम असे. सैनिकांना साधेपणाची व काबाडकष्टांची शिकवण असे. महाराजांच्या सैन्याचा पगार कधी थकला नाही. त्याला शस्त्रास्त्रांची आणि साधनसामग्रीची कधी उणीव भासली नाही. किल्ल्यांत अन्नधान्य, दारूगोळा व घोडयांना लागणारी चंदी यांचा भरपूर साठा असे. 'धान्याऐवजी मिठाची पोती भरली गेली' ही कल्पनाही शिवशाहीत अशक्य होती. कारण याबाबत जे अधिकारी हयगय' किंवा लांडीलबाडी करत, त्यांना महाराज कधीही दयामाया दाखवीत नसत.

महाराजांचे युद्धनेतृत्व कोणकोणत्या गोष्टींत कसे दिसून येते याविषयी विवेचन करताना प्रा. नरहर कुरुंदकर लिहितात –

युद्धनेतृत्व म्हणजे केवळ लढणे नव्हे. लढणे, पळून जा

तह करणे, पुन्हा उठाव करणे हे सगळे मिळून युद्धनेतृत्व असते. म्हणून तपशीलवार भौगोलिक माहिती मिळवणे, शांततेचा काळ फौजा उभारण्यात आणि साधनसामग्री गोळा करण्यात खर्चणे, आपल्या ध्येयवादाने भारलेली शेकडो कर्तृत्ववान आणि निष्ठावान कार्यकर्त्यांची फळी उभी करणे, हेही युद्धनेतृत्व आहे. पण त्याबरोबरच जिच्या मुक्तीसाठी हा लढा चालू आहे, त्या जन-



अश्वारूढ शिवाजीमहाराज

तेला हा लढा आपल्या मुक्ततेचा आहे, याची खात्री पटवून देणे, ती खात्री अभंग ठेवणे आणि जनतेची स्वातंत्र्याकांक्षा प्रज्वलित करून हे आपले राज्य निर्माण होत आहे, अशी नव्या राष्ट्-

हेही युद्धनेतृत्व आहे. आपल्या सहवासात सामान्य माणसे घेऊन त्यांच्यांत दडलेले सुप्त सामर्थ्य विकसित करणे, त्यांच्यांतून असामान्य युद्धनेते, असामान्य प्रशासक निर्माण करणे आणि

वादाची जाणीव निर्माण करणे, हेही युद्धनेतृत्व आहे. शिवाजी-सारखा युगप्रवर्तक नेता ज्या युद्धाचा नेता असतो, ते युद्ध जनतेचे स्वातंत्र्ययुद्ध असते.

शिवाजीमहाराजांविषयी विचार करताना अनेकांच्या मनांत वर्तमानकाळातील हिंदुविरोधी मुसलमान अशा प्रकारचा झगडा असतो. स्वतःच्या मनातील हा असत्य आणि अनुचित संघर्ष मागच्या इतिहासामध्ये पाहण्याची काहीजणांची धडपड असते. या दृष्टीने शिवाजीमहाराजांकडे हिंदूंचा राजा म्हणून आणि त्यांच्या कार्याकडे मुसलमानांच्या विरुद्ध हिंदूंचा उठाव म्हणून पाहणे काहीजणांना आवडते. पण प्रत्यक्ष शिवाजीमहाराजांच्या चरित्रात अशा धार्मिक संघर्षाला फारसा वाव नाही. ते स्वतः हिंदुधर्मियांच्या धार्मिक राजवटीच्या निर्मितीसाठीच झगडत नव्हते. प्रत्यक्ष त्यांच्या स्वतःच्या आरमारात दर्यासारंग दौलतखान, इब्राहीमखान असे अनेक मुस्लिम अधिकारी होते. त्यांच्या फौजेत विजापूरहून आलेले सातशे पठाणही होते. त्यांनी स्वतः सर्व मुस्लिम धर्मस्थानांना संरक्षण देण्याचा कसोशीने प्रयत्न



मोहोर व होन

केला. राजकारणाच्या पटावर औरंगजेबाविरुद्ध ते उभे होते, तरी त्यांनी औरंगजेबाला त्याचे पणजे अकबर बादशहा यांच्या थोरवीची आठवण करून दिली आहे. कुतुबशाहीशी त्यांचे संबंध प्रायः प्रेमाचे आणि मित्रत्वाचे राहिले. या घटनेकडे आपण दुसऱ्या बाजूकडूनही पाहू शकतो. त्यांना आयुष्यभर ज्या वतनदारांविरुद्ध लढावे लागले, ती नुसती त्यांच्या धर्माची माणसे नव्हती, तर त्यांच्या सोयरेसंबंधातील माणसे होती. घोरपडे, निंबाळकर, जाधव, सावंत, सुर्वे असे अनेक वतनदार नेहमीच त्यांच्या विरुद्ध राहिले.

शिवाजीमहाराज हे जसे हिंदुधर्माचे धार्मिक नेते नव्हते, तसे ते महाराष्ट्राचे अगर मराठ्यांचेही नेते नव्हते. शिवाजीमहाराजांच्या मोठेपणाला महाराष्ट्राच्या चौकटी घालून आपण त्यांच्यावर फार मोठा अन्याय करतो. शिवाजीमहाराजांची भूमिका महाराष्ट्राच्या चौकटीत मावणारी नव्हती. ती भूमिका हिंदवी स्वराज्याची म्हणजे एतद्देशियांच्या राज्याची होती. सर्व भारतभर कुठेही राज्य निर्माण करता येणे त्यांना जमले असते, तर त्यांनी त्या प्रदेशातील जनतेचे नेते म्हणूनच राज्य केलें असते. आपण एतद्देशियांचे राज्य या देशावर व्हावे या भूमिकेचे समर्थक आहो, असे छत्रपतींनी मानले आहे आणि हे राज्यसुद्धा त्यांनी स्वःतचे न मानता परमेश्वराचे मानले आहे. एतद्देशियांचे राज्य येथे स्थापन व्हावे ही 'श्रीं'ची इच्छा आहे, या भूमिकेला अनुसरून त्यांची वर्तणूक चालली होती.

अलमगीर औरंगजेब हा आपल्या काळातला कुशल सेनापती, युद्धनीतितज्ज्ञ आणि मुत्सद्दी असा राजा होता. इ. स. १६८१ साली आपल्या लक्षावधींच्या फौजा घेऊन औरंगजेब जेव्हा दक्षिणेत उतरला, त्या वेळी त्या संघर्षाचे स्वरूप आशयाच्या दृष्टीने धार्मिक नव्हते. एक तर औरंगजेबाच्या फौजेत अक्षरशः लाखांनी मोजावे लागेल एवढे मोठे प्रमाण हिंदू सैन्याचे होते. नुसते सैनिकच नव्हेत तर अनेक सरदार आणि सेनापती हेही हिंदू होते. औरंगजेबाच्या फौजेत असणाऱ्या हिंदूंना हा लढा दोन धर्मांच्या मधील आहे, असे वाटलेले दिसत नाही. स्वतः औरंगजेबसुद्धा मराठ्यांच्या राज्याबरोबर आदिलशाही व कुतुबशाही ही दोन मुस्लिम राज्ये नष्ट करण्याचे ठरवून आलेला होता.

हिंदू आणि मुसलमान अशा जातीय दृष्टीने विचार करणाऱ्या काही विद्वानांचा महाराजांवर आरोप असतो, की महाराजांनी अफजलखानाला दगा देऊन मारले. मात्र अफजलखानाच्या दुष्ट बुद्धीकडे व दगाबाजीकडे सोयिस्करपणे डोळेझाक करतात. पण या संदर्भात प्रा. नरहर कुरुंदकर यांनी जे मूलगामी विवेचन केले आहे, ते लक्षात घ्यायला हवे. ते लिहितात —

शिवाजीने जावळीचे खोरे वेगाने घेतले ते केवळ लढून घेतले नाही. त्यात दग्याचा भाग होताच. मोऱ्यांची बखर सभासद-बखरीपेक्षा अधिक प्रमाण नसते. जावळीचे खोरे जिंकल्यावर शिवाजीने मोऱ्यांचे पुत्र कैद केले. त्यांतील एक पळून गेला, दुसरा शिवाजीने ठार केला. शिवाजीने जावळी लढूनच जिंकली, त्यात दग्याचा भाग नव्हताच; अल्पवयीन कैदी शिवाजी ठार करील कसा? या पद्धतीने विचार करणारे लोक तुकाराम मोजण्याची मोजपट्टी घेऊन शिवाजी मोजीत आहेत. राजनीतीत आवश्यक क्रौर्य गृहीत असते ...... दगा व विश्वासघात या शब्दांचा विचार मित्रांच्या संदर्भात असतो; शत्रूच्या संदर्भात नसतो. शक्य असल्यास शत्रूंना दगाच द्यावयाचा असतो. दगा देण्याचा अधिकार, योग्य वेळी तह मोडण्याचा अधिकार फक्त शत्रूंचा, दगे खाणे हांच आपला प्राक्तन भोग; दगे देणाऱ्या शत्रूवर वांझ चीड ठेवावी, मात्र आपण पुन्हा दगा खावा, हा हिंदूंचा

इतिहासच शिवाजीने बदलून टाकला. [illegible]ा त्याने मित्रांना कधी दगे दिले नाहीत; बंधू, पिता, भगिनी, यांचे खून पाडले नाहीत; आपल्याच प्रजेच्या धनाचा अपहार केला नाही. शिवाजीपासून शत्रूंनी दगे खाण्यास आरंभ केला. शत्रूंची फसवणूक झाली. शिवाजीचे जीवन ही अशा प्रसंगांची मालिकाच आहे.

समजा, खान अत्यंत सज्जनपणे व विश्वासाने वागला असता, तर शिवाजीने त्याला येथवर आल्यानंतर जिवंत परतू दिले असते काय ? शहाजीला बेड्या घालणारा, घाताने कैद करणारा, वडीलबंधू संभाजीच्या मृत्यूला कारण असणारा अफजलखान एक प्रकारे शिवाजीचा व्यक्तिगत शत्रूच होता ...... शिवाजीने खान मारला, ही गोष्ट कमी महत्त्वाची आहे. आधी कुणी दगा दिला याला तर मुळीच महत्त्व नाही. शिवाजीने खानाच्या बारा हजार फौजांचा पाडाव केला, ही खरी महत्त्वाची गोष्ट आहे. ह्या घटनेमुळे शिवाजीला घोडे, तोफा व प्रचंड लूट मिळाली.

पण भूतकाळातील वैरे जिवंत ठेवून वर्तमानकाळात भूतकाळाचा सूड घेणारे आणि अत्याचारी, खुनी राजवट चालवणारे महाराज नव्हते. हा धर्मपिसाटपणा त्यांना शक्य आणि सोयिस्कर असला, तरी त्यांनी तो पत्करला नाही. मात्र हिंदूंवरील आक्रमणाचे युग संपले, यापुढे तसल्या गोष्टी खपवून घेतल्या जाणार नाहीत; त्या मोडून काढल्या जातील, याची चरचरीत जाणीव त्यांनी विधर्मी आणि विदेशी शत्रूंना करून दिली. बजाजी निंबाळकर आणि नेताजी पालकर यांना त्यांच्या डोळ्यादेखत शत्रूने बाटवले. पण महाराजांनी त्यांना शुद्ध करून पुनश्च स्वधर्मात घेतले. इतकेच नव्हे; तर निंबाळकरांना स्वतःची मुलगी देऊन आपल्या कृत्याला प्रतिष्ठा मिळवून दिली.

औरंगजेबाने काशीतल्या विश्वनाथाचे मंदिर पाडून त्यावर मशीद उभारली. आजही ती त्या ठिकाणी दिसते. पण महाराजांनी औरंगजेबाच्या कृतीचा सूड म्हणून एकही मशीद पाडून तिच्यावर मंदिर उभारले नाही. महाराजांनी पूर्वीची मशिदींची इनामेही रद्द केली नाहीत. प्रा. कुरुंदकर म्हणतात–

पण त्याच्या (शिवाजीच्या) नजरेसमोर मंदिर पाडून मशिदी केल्या असत्या किंवा मंदिरांवर चर्चेस उभारली गेली असती तर त्याने त्या मशिदी व चर्चेस पाडून पुन्हा मंदिरे निर्माण केली असती. तसे त्याने केलेही आहे. धर्मपरिवर्तनाची सक्ती करणाऱ्यास त्याने प्राणदंड दिला असता. तसा त्याने दिलेला आहे. या अर्थाने तो हिंदुत्ववादी आहे, हे कबूल करण्यास लाजण्याचे काहीच कारण नाही.

हिंदुस्थानाच्या इतिहासात हिंदू राजे आपापसांत लढले, मुस्लिम राजे आपापसात लढले, हिंदु-मुस्लिम राजेही लढले. वेळोवेळी कोणाचे तरी जय, कोणाचे तरी पराजय होत आले. पण जय-पराजयांचे निर्णय रणमैदानावर लागले. रणमैदानावर जो नेता हरला, त्याचे राज्य जनतेने कधी कुरकुरत तर कधी उत्साहाने मान्य केले. पण यापलिकडे जनतेने कधी भाग घेतला नाही. कारण ही राज्ये राजांची होती. ती जनतेची राज्ये नव्हती. कुणी नेता असो अगर नसो, हे माझे राज्य आहे, ते मला टिकवलेच पाहिजे, या जिद्दीने जनता मध्ययुगीन भारताच्या इतिहासात फक्त एकदाच लढली, ती या शिवाजीच्या राज्यासाठी ! शिवाजीचे मोठेपण असेल तर त्याची कसोटी ही आहे.

शिवाजीमहाराजांच्या धर्मराज्यपद्धतीचे विवेचन करताना तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी लिहितात–

शिवाजीमहाराजांचा काल म्हणजे सतरावे शतक. या काळात सर्वधर्मसहिष्णू राज्यपद्धती स्थापणे हे एक प्रकारचे जागतिक क्रांतिकार्य होते. मुसलमान सुलतान इस्लामशिवाय इतर धर्मांना आणि ख्रिश्चन राजे ख्रिस्ती धर्माशिवाय इतर धर्मांना गौण व हीन लेखत; भिन्नधर्मीय प्रजांना समान दर्जाची रयत म्हणून मान्यता मिळत नव्हती; असा तो काळ होता. भिन्नधर्मीय प्रजांमध्ये धर्मभेदानुसार पक्षपात न करणारे राज्य स्थापण्याचा प्रयत्न सतराव्या शतकाच्या मध्याला शिवाजीमहाराजांनी केला. ही तुलनात्मक ऐतिहासिक दृष्टीने अत्यंत पुरोगामी घटना ठरते. हिंदुस्थानातील मुसलमानी सुलतानशाह्या लहरीप्रमाणे हिंदू धर्माची अवहेलना करून हिंदू प्रजेला दुय्यम दर्जाने वागवीत. पोर्तुगीजांच्या राजवटीत हिंदूंना कसलाही राजकीय अधिकार देणे अनिष्ट मानीत; एवढेच नव्हे तर, ख्रिश्चन मनुष्यावर अख्रिश्चन मनुष्याचा अधिकार चालणे अधर्म्य व अवैध मानीत. अशा काळात शिवाजीमहाराजांनी नवे प्रदेश ताब्यात आल्याबरोबर भिन्नधर्मीय सर्व प्रजांना समान मान्यता देण्याचे कर्तव्य बजावले; मुसलमान काजी व ख्रिश्चन पाद्री यांना सन्मानाने वागविले, त्यांचे धर्मग्रंथ व पूजास्थाने सुरक्षित ठेवली.

धर्मरक्षण व प्रजारक्षण हे ईश्वरी आज्ञेने प्राप्त झालेले कर्तव्य आहे; राज्यलाभसुद्धा प्रजेचा संरक्षणकर्ता म्हणूनच ईश्वरकृपेने झालेला आहे; व ईश्वरशरण होऊन राज्यकारभार करावा अशी निष्ठा राजाच्या ठिकाणी असावी, असे जे आज्ञापत्रात म्हटले आहे त्याचे रहस्य वरीलप्रमाणे सांगता येते.

महाराजांचे स्वराज्य हे कल्याणकारी राज्य होते. त्याला शिस्त होती, न्याय होता आणि प्रेमही होते. महाराजांनी आपल्या राज्यकर्तृत्वाने शेतकरी स्त्री–पुरुषांचा दुवा मिळवला. अधूनमधून येणाऱ्या दुष्काळात त्यांनी प्रजेला करमाफी दिली. दुष्काळानंतर शेतकऱ्यांना बैल, बी–बियाणे मिळे आणि नवे

पीक खळयावर येईपर्यंत अन्न मिळेल याची सोय केलेली असे. याच पद्धतीने त्यांनी नवी गावे वसविली. त्यांनी शिलेदारांचे प्रस्थ मोडले, वतनदारांच्या फौजा काढून घेतल्या. करवसुलीचे व न्यायनिवाडयाचे या वतनदारांचे हक्क काढून घेतले. याविरुद्ध पुंडगिरी करणाऱ्याचे हातपाय तोडले. शेतकऱ्यांच्या स्वाभिमानाला संरक्षण दिले. उत्पन्नाचा दोनपंचमांश हा कर ठरवला. पण पूर्वीच्या वतनदारांप्रमाणे वरकड वसुली कोणत्याही प्रकारे केली नाही.

महाराजांनी तलवारीच्या जोरावर राज्य निर्मिले व तलवारीच्या जोरावरच ते रक्षिले. पण "साहेबी कारकुनाची" अशी घोषणा केली. गड – कोटांना काय हवे ते कारकून देतील, प्रजेकडून कर घ्यायचा तो कारकून घेतील, फौजांना तो हक्क नाही. त्यांनी गावाकडे काहीही मागू नये, फुकट काही घेऊ नये, अशा महाराजांच्या आज्ञा होत्या. महाराजांचे राज्य हे जनतेचे राज्य होते. त्या राज्यात लष्कराने लढावे, पराक्रम गाजवावे, लोकांचे आधिपत्यही स्वीकारावे; पण कारभारात लुडबूड करू नये. कारभार ठीक चालायला हवा असेल, तर मुलकी सत्ता ही लष्करी सत्तेहून श्रेष्ठ असली पाहिजे. मध्ययुगात मुलकी सत्तेचे श्रेष्ठत्व सांगणारा हा माणूस भारताच्या इतिहासातही एकटाच आहे. जगाच्या इतिहासातही तो अनोखा आहे.



रायगडाचे विहंगम दृश्य

महाराजांच्या राज्यकर्तृत्वाची नैतिक बैठक निर्दोष होती. धार्मिक आक्रमणाला सर्वधर्मसमभाव हे त्यांनी दिलेले उत्तर होते. महाराजांच्या शत्रूंनी त्यांच्याविषयी अनेक प्रकारे चीड आणि संताप व्यक्त केलेला असला तरी, त्यांनी एक गोष्ट आवर्जून सांगितली आहे. महाराजांनी स्वतः शत्रुपक्षाच्याही स्त्रीची कधी विटंबना केली नाही; सैन्यालाही करू दिली नाही. वैयक्तिक जीवनात महाराजांना भोगलालसा कधी नव्हतीच. ते संयमी आणि आदर्श असे गृहस्थजीवन जगले. त्यांच्या प्रेरणा आध्यात्मिक होत्या. ते राज्याचे उपभोगशून्य स्वामी होते. समर्थ रामदासांनी पुढील एका ओवीत महाराजांच्या जीवनाचे सारच सांगून टाकले आहे–

**निश्चयाचा महामेरू । सकलजनांसी आधारू ।**
**अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ॥**

आणि म्हणूनच साधुसंतांनी महाराजांना स्वतःच्या शेजारी आपला म्हणून स्वीकारले. श्रद्धाळू जनतेने त्यांना ईश्वरी अवतार मानले. इतिहास–पुराणांत आजवर अनेक पुण्यश्लोक राजेमहाराजे होऊन गेले. प्रजेने त्यांची पुराणे रचली आणि कथागाथाही गायिल्या. पण समकालीन आणि उत्तरकालीन श्रद्धावंतांनी ज्याला ईश्वरी अवतार मानले, असा राजा एकटा शिवाजीच आहे.

**शिवसाहित्य** – छत्रपती शिवाजी महाराज हे केवळ महाराष्ट्राचेच नेते नव्हते, तर ते अखिल भारताचे आदर्श राष्ट्रपुरुष होते. ही धारणा भारतीय विचारवंत व प्रतिभावंत यांच्या मनात शिवकालातच निर्माण झाली आणि आजही ती कायम आहे. म्हणूनच मराठीबरोबरच भारतातल्या अनेक भाषांमध्ये त्यांच्यावर खंडकाव्ये, महाकाव्ये आणि स्फुटकाव्ये निर्माण होऊ लागली. गद्य आणि विवेचक चरित्रेही पुस्तके लिहिली गेली.

महाराजांच्या चरित्रलेखनाला त्यांच्या हयातीतच प्रारंभ झालेला दिसतो. समकालीनांनी हे लेखन केले असल्याने त्याचे महत्त्व विशेष आहे. परमानंद हा कवी महाराजांच्या समकालीन होता. महाराजांनी आग्र्याला जाताना जी सेवकमंडळी बरोबर घेतली होती, त्यांच्यांत परमानंदही होता. महाराजांचा राज्याभिषेकही त्याने पाहिला होता. त्याने महाराजांचे चरित्र शिवभारत या नावाने रचले आहे. खुद्द महाराजांनीच आपल्या

चरित्रलेखनाची प्रेरणा दिली, असे सांगताना त्याने जे श्लोक लिहिले आहेत, ते असे—

योऽयं विजयते वीरः पर्वतानामधीश्वरः ।
दाक्षिणात्यो महाराजः शाहराजात्मजः शिवः ।।
साक्षान्नारायणस्यांशस्त्रिदशद्वेषिदारणः ।
स एकदात्मनिष्ठं मां प्रसाद्येदमभाषत ।।
यानि यानि चरित्राणि विहितानि मया भुवि ।
विधीयन्ते च सुमते तानि सर्वाणि वर्णय ।।
मालभूपमुपक्रम्य प्रथितं मत्पितामहम् ।
कथामेतां महाभाग महनीयां निरूपय ।।

भावार्थ—गडांचा अधिपती, दक्षिणेचा राजा, प्रत्यक्ष विष्णूचा अवतार, यवनांचा संहारकर्ता, वीरपुरुष आणि शहाजीराजांचा पुत्र, अशा शिवाजीचा विजय असो. तो एकदा निष्ठावंत अशा मजवर कृपा करून म्हणाला. " हे सुबुद्धे, मी या पृथ्वीतलावर जी जी उदात्त कृत्ये केली आणि जी सध्या करीत आहे, त्या सर्वांचे तू वर्णन कर. माझा आजा प्रसिद्ध मालोजी याच्यापासून प्रारंभ करून, हे महाभागा, तू ही महनीय कथा सांग. "

मग परमानंदाने हे काव्य लिहिले. महाराजांच्या शृंगारपुरावरील स्वारीपर्यंतचा इतिहास त्यात आलेला आहे. यात ३१ अध्याय पूर्ण व ३२ व्या अध्यायाचे ९ श्लोक आहेत. परमानंदाने फाल्गुन वद्य ३ शके १५५१ ही महाराजांची जन्मतिथी सांगितली आहे.

त्याच काळातला जयराम पिंड्ये हा दुसरा बहुभाषाकोविद असा संस्कृत कवी होय. त्याने संस्कृत पद्यांत, महाराजांनी पन्हाळगड घेतला, त्याचे वर्णन केले आहे. पर्णालपर्वतग्रहणाख्यान असे त्या काव्याचे नाव आहे.

आणखी एक शिवकाव्य नुकतेच प्रकाशात आले आहे. या काव्याचा कर्ता संकर्षण सकळकळे हा आहे. चंद्रराव मोऱ्याचे पारिपत्य, कल्याण-भिवंडीची मोहीम व अफझलवध हे शिवचरित्रातले तीन महत्त्वाचे प्रसंग त्याने वर्णिले आहेत. हा कवीही शिवकालीनच होता. अनेक प्रकारची नवी माहिती या शिवकाव्यात सापडते. यातील शिववर्णनाचे दोन श्लोक असे —

प्रविष्टदेहो महसा भवान्या बन्दीजनस्तोत्रकृतावधानः ।
प्रफुल्लनासापुटकोटिरम्यसुगन्धितास्बूलमुखारविन्दः ।।
प्रतप्तचामीकरचारुमूर्तिराजानुबाहुर्बल एव साक्षात् ।
कल्पान्तमत्तो यम एव नूनं रोषारुणोत्फुल्लसरोजनेत्रः ।।

भावार्थ — भवानीमातेचे तेज शिवभूपालाच्या देहात प्रविष्ट झाले आहे. वंदीजनांनी केलेली स्तोत्रे ऐकून तो सकाळी जागा होतो. त्याचे नाक टोकदार असून प्रफुल्ल आहे. त्याचे मुखकमल तांबूलाने सुगंधित आहे. तप्तसुवर्णासारखा त्याचा सुंदर देह आहे. बाहू आजानू आहेत. तो साक्षात बलाची मूर्ती आहे. शत्रूंना तो कल्पान्तकालीन प्रमत्त यमासारखा वाटतो. त्याचे कमलनेत्र क्रोधाने आरक्त दिसतात.

समर्थ रामदासस्वामींचा गुरूपदेश शिवाजीमहाराजांना लाभला होता. त्यांनी महाराजांच्या अनेक महनीय गुणांचे वर्णन पुढील ओव्यांतून केलेले आहे —

निश्चयाचा महामेरू । बहुतजनांसी आधारू ।
अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ।। १ ।।
परोपकाराचिया राशी । अखंड घडती जयासी ।
तयाचे गुण महत्त्वासी । तुळणा कैंची ।। २ ।।
नरपति, हयपति, गजपति । गडपति, भूपति जळपति ।
पुरंदर आणि शक्ति । पृष्ठभागीं ।। ३ ।।
यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।
पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ।। ४ ।।

अज्ञानदास हा शिवकालातलाच मराठी शाहीर. त्याने जिजाबाईच्या आज्ञेवरून अफझलखानाच्या वधावर पोवाडा केला आणि तो दरबारात गाऊन दाखवला. तो ऐकून महाराज प्रसन्न झाले आणि त्यांनी शाहिराला सोन्याचा तोडा व घोडा बक्षीस दिला. आपल्या पोवाड्यात तो शिवाजी आणि अफझलखान एकमेकांना भिडले, त्या प्रसंगाचे वर्णन करतो, ते असे —

इतकिया उपरी । सरजा गवसून धरला सारा
चालविली कट्यार । सीलवर मारा न जाले जरा
सराईत शिवाजी । त्याने बिचव्याचा मारा केला
उजवे हाती बिचवा त्याला । वाघनख सरज्याच्या पंजाला ।
उदर फाडुनी । खानाची चरबी आणिली द्वारा
खान लव्हा लव्हा बोलिला । खानाचा लव्हा बेगिन आला ।।

आज्ञापत्रकर्ते रामचंद्रपंत अमात्य हे शिवकालातले एक श्रेष्ठ मुत्सद्दी होते. महाराजांनी त्यांचा अष्टप्रधानांतही समावेश केला होता. महाराजांची राजनीती कशी बहुरंगी, समयस्फूर्त आणि यशदायी होती, तिचे रामचंद्रपंतांनी विलक्षण प्रत्ययकारी वर्णन केले आहे, ते असे —

' जागजागा पुंड चंदरराव, सिर्के, सावंत, दलवी, वरघाटे, निंवाळकर, घाटगे आदिकरून देशमुख व काटक सकलही पराक्रमी, सजुते, सामानपूर असताही बुद्धिवैभवे व पराक्रमे कोण्हाची गणना न करिता, कोण्हावरी चालोन जाऊन तुंबल युद्ध करून रणासी आणिले; कोण्हावरी छापे घातले; कोण्हास परस्परे कलह लावून दिल्हे; कोह्याचे मित्रभेद केले; कोण्हाचे डेरियात शिरोन मारामारी केली; कोण्हासी येकांगी करून पराभविले; कोह्यासी स्नेह केले; कोण्हाचे दर्शनास आपण होऊन गेले; कोण्हास आपले दर्शनास आणिले; कोण्हास परस्परे दगे कर-

विले; जे कोण्ही इतर प्रेत्ने नाकलेत त्यांचे देशात जबरदस्तीने स्थले बांधून पराक्रमे करून आकलिले; जलदुर्गाश्रइत होते, त्यांस नूतन जलदुर्गेच निर्माण करून पराभविले; दुर्घटस्थली नौकामार्गे प्रवेशले. यैसे ज्या ज्या उपाये जो जो शत्रू आकळावा तो तो शत्रू त्या त्या उपाये पादाक्रांत करून साल्हेरी–अहिवंतापासून चंदी–कावेरीपर्यंत निष्कंटक राज्य, शतावधि कोटकिल्ले, तैसीच जलदुर्गे व कित्येक विषमस्थले हस्तगत केली.'

भूषण हा एक प्रख्यात हिंदीं कवी. महाराजांची कीर्ती ऐकून तो उत्तरेतून दक्षिणेत आला. त्याने शिवाजीमहाराजांच्या काही मोहिमा समक्ष पाहिल्या. त्याने शिवाबावनी नावाचे एक काव्य ५२ कडव्यांत लिहिले आहे. मालावृत्तामध्ये शिवप्रताप वर्णिताना तो दृष्टान्तांची माळच गुंफतो, ती अशी –

> इंद्र जिमि जंभ पर बाडव सुअंभ पर
> रावण सदंभ पर रघुकुल राज हैं ॥
> पौन बारिबाह पर, संभु रतिनाह पर
> ज्यों सहस्रबाह पर, राम द्विजराज हैं ॥
> दावा द्रुमदंड पर चीता मृगझुंड पर
> भूषन वितुंड पर जैसे मृगराज हैं ॥
> तेज तम अंश पर कान्ह जिमि कंस पर
> त्यों म्लेच्छ बंश पर शेर शिवराज हैं ॥

अर्थ – जसा इंद्र जंभ दैत्यावर तुटून पडावा, वडवानलाने समुद्र जाळावा, गर्विष्ठ रावणावर राम जसा तुटून पडावा, वाऱ्याने मेघ उधळून लावावे, शंकराने मदनाचे दहन करावे, परशुराम सहस्रार्जुनावर कोसळून पडावा, दावानलाने वृक्षसमूहाची त्रेधा उडवावी, चित्ता हरणांच्या कळपावर तुटून पडावा, हत्तीच्या गंडस्थळावर सिंहाने पंजा मारावा, प्रकाशाने अंधाराचा नाश करावा आणि कृष्णाने कंसकंदन करावे, त्याप्रमाणे शूर शिवाजी म्लेच्छांचा कर्दनकाळ ठरला.

महाराजांच्या मृत्यूनंतर म्हणजे इ. स. १६९७ साली कृष्णाजी अनंत सभासद याने जे शिवचरित्र लिहिले, ते सभासदाची बखर या नावाने प्रसिद्ध आहे. सभासद हा महाराजांचा समकालीन असल्यामुळे त्याची बखर विश्वसनीय मानतात. त्याने केलेले शिवराज्याभिषेकाचे वर्णन असे–

'पुढे तक्तारूढ व्हावे, तक्त सुवर्णाचे बत्तीस मणांचे सिद्ध केले. मोठी मोलाची रत्ने तक्तास जडाव केली. जडितसिंहासन सिद्ध केले. रायरीचे नाव रायगड म्हणोन ठेवले. तक्तास स्थळ तोच गड नेमिला. सप्त महानदियांची उदके व थोर थोर नदियांची उदके व समुद्राची उदके, तीर्थक्षेत्र नामांकित, तेथील तीर्थोदके आणिली. सुवर्णाचे कलश केले व सुवर्णाचे तांबे केले. आठ कलश व आठ तांबे यांनी अष्टप्रधानांनी राजियास अभिषेक करावा, असा निश्चय करून सुदिन पाहून मुहूर्त पाहिला. शालिवाहन शके १५९६ ज्येष्ठ मासी शुद्ध १३ समुहूर्त पाहिला.'



सिंधुदुर्ग

याव्यतिरिक्त चित्रगुप्ताची बखर, शेडगावकर-बखर, खंडो बल्लाळ चिटणीस यांची बखर, वाकेनविसांची बखर, मल्हार रामराव चिटणीस यांची बखर, हकीगती बखर, मराठी साम्राज्याची छोटी बखर, शिवाजीची हकीकत आणि श्रीशिवाजीप्रताप अशा आणखी काही शिवचरित्रपर बखरी आहेत.

बंगालचे संस्कृत कवी श्री. कालिदास विद्याविनोद यांचे शिवाजीचरितम् नावाचे काव्य लिहिले असून, ते कलकत्त्याच्या संस्कृत साहित्यपत्रिकेच्या ११ व्या अंकात प्रकाशित झाले आहे. पुरुषोत्तम नामक आणखी एका कवीने. शिवकाव्यम् नावाचे संस्कृत काव्य लिहून त्यात शिवाजीमहाराजांपासून दुसऱ्या बाजीरावापर्यंतचा मराठी साम्राज्याचा इतिहास वर्णिला आहे. इंदूरचे पंडित श्रीपादशास्त्री हसूरकर यांनीही छत्रपती शिवाजी महाराज-चरितम् नावाचे संस्कृत काव्य लिहिले आहे.

बंगालमधील अंबिकादत्त व्यास या महाकवीने प्रौढ आणि प्रगल्भ अशा बाणभट्टशैलीत शिवराजविजयम् नावाचे [illegible] चरित्र लिहिले आहे.

डॉ. श्रीधर भास्कर वर्णेकर या विख्यात संस्कृत पंडितांनी श्रीशिवराज्योदयम् नावाचे सर्गबद्ध महाकाव्य लिहिले आहे. ते ६८ सर्गांचे व ३८६७ श्लोकांचे शिवचरित्र आहे. शिवाजी महाराजांनी तोरणागड घेतला, त्या वेळी रामदास व तुकाराम यांना कशा प्रकारे आनंद झाला, त्याचे कल्पित वर्णन [illegible] वर्णेकरांनी पुढील दोन श्लोकांत केले आहे–

> श्रीरामदासप्रमुखैश्च सद्भिः ध्यानावलग्नाक्षिभिरीक्षितान्तः
> हृत्पुण्डरीके सहसैव काचित् नवोदिता दीपकतोरणाभा ॥
> जगौ तुकाराममुनिर्नवीनम् अभङ्गबद्धं जयगीतमुच्चैः ।

तदा तदाकर्ण्य जहर्ष चेतः पाषाणमूर्तेरपि विठ्ठलस्य ॥

अर्थ – शिवाजीमहाराजांनी तोरणागड घेऊन स्वराज्याचे तोरण बांधले, तेव्हा ध्यानमग्न रामदासांच्या हृदयपुंडरीकात एक अभूतपूर्व दीपतोरण चमकून गेले. आणि तुकारामांनी असा एक नवीन विजयाभंग रचून मोठ्याने गाण्यास प्रारंभ केला, की जो ऐकून पाषाणमूर्ती विठ्ठलासही हर्ष झाला.

मराठीतले पहिले स्वतंत्र ऐतिहासिक खंडकाव्य शिवछत्रपतींवरच आहे. महादेव मोरेश्वर कुंटे यांनी ते रचले. काव्याचे नाव आहे राजा शिवाजी. त्याचे सहा भाग प्रसिद्ध झाले आहेत. मराठ्यांच्या पराक्रमाविषयी श्री. कुंटे लिहितात–

जसा थांबला, थोर हर्हर उडाला
मराया, जिताया, मराठा निघाला
पुढे मी, पुढे मीही, मी मी उडाली
भरे शौर्य पोटी, उठे एक टोळी ॥

बाजी पासलकराच्या मृत्यूविषयी शिवछत्रपती म्हणतात–

पुढे तो शिवाजी म्हणाला : 'पहा हे
विरांनी मरावे रणी, योग्य आहे ।
पडे राव बाजी, पडो वीर सारा
स्वदेशी झडावा मराठा नगारा ॥

दुसरे शिवचरित्रावरचे काव्य गणेशशास्त्री लेले यांचे. त्यात सात सर्ग असून, श्लोकसंख्या ६२३ आहे. शिवछत्रपती समर्थ रामदासांना आपले राज्य अर्पण करीत आहेत, असा प्रसंग कल्पून शास्त्रीबोवा म्हणतात (७.८६–८७) –

वैराग्य भाग्य येता, भूप म्हणे मज नकोचि वैभव हे ।
संपत्ती राज्य धने दिसती मजला समस्त दुःखवहे ॥
ठेवुनि पुनःपुन्हा तो, दासांच्या पादपंकजी भाळा ।
आता राज्य नको मज, म्हणे इतःपर तुम्हीच सांभाळा ॥

स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर हे शिवछत्रपतींचे निःसीम भक्त होते. त्यांनी वयाच्या १९ व्या वर्षी शिवछत्रपतींची एक आरती रचली. तिच्यातले एक कडवे असे –

जयदेव जयदेव जयजय शिवराया
या या अनन्यशरणां आर्यां ताराया ॥ धृ ॥
त्रस्त अम्ही दीन अम्ही शरण तुला आलो ।
परवशतेच्या पायी मरणोन्मुख झालो ।
साधु परित्राणाया दुष्कृति नाशाया ।
भगवन् भगवद्गीता सार्थ कराया या ॥

श्री. कृ. पां. लिमये तथा राधारमण यांचे महाराष्ट्रवीरादर्श हे काव्य शिवाजीमहाराजांवरच आहे. शिवछत्रपतींना राज्याभिषेक झाला, त्या प्रसंगावरचा त्यांचा एक श्लोक असा –

पुण्यश्लोक शिवाभिषेकविधि तो श्रीधामरामप्रभू
जाया त्या मुनिची शिलास्थितिमयी वाटे महाराष्ट्रभू ॥
गेली उद्धरुनी तशा स्थितितुनी, ही त्या प्रभूची कृपा
वानीना मग कोण रामसम त्या प्रेमे शिवाजीनृपा

श्री. गो. रा. हिंगणेकर यांनी दख्खनचा वीर हे खंडकाव्य अफझलखानाच्या प्रसंगावर लिहिले आहे. त्यातील पहिलाच श्लोक असा –

न जो हा बालार्क त्यजुनि उदयाद्रि प्रगटला
तयासे ग्रासाया अहह सहसा मेघ सजला ।
पडे काळोखी, हे विपिन, न दिसे मार्गही अता
बरी आणी देवा त्वरित जगदाधार सविता ॥

श्री. दुर्गाप्रसाद तिवारी यांनी शिवभूषणाच्या शिवाबावनी या काव्याचा मराठी अनुवाद केला आहे. शहाजीराजांनी बाल शिवाजीला विजापूरच्या दरबारात नेले असताना, त्याने सुलतानाला मुजरा केला नाही. 'तू असा का वागलास ?' अशी जिजाबाईने पृच्छा केली असता शिवाजीने म्हटले, ते असे –

तू सांग तुझ्या चरणांशी । ही कापुन ठेविन मान ॥
तू सांग तातचरणांशी । ही तोडुन ठेविन मान ॥
गोब्राह्मण यांच्यासाठी । खड्गावर ठेविन मान ॥
परि परके सत्ताधारी । गृहि शिरुनी झाले वैरी ॥
बघताच तयांना भारी । सक्रोध वृत्ति मम होते ।
लववेना हे शिर माते ॥

श्री. मोरेश्वर विट्ठल जोशी यांचे शिवछत्रपतिकाव्य, कऱ्हाड येथील साहित्य सेवा मंडळाच्या कवींनी रचलेले स्वातंत्र्यशार्दूल हे काव्य, श्री. उ. वा. गोवईकर यांचे शिवशाहीचा अरुणोदय हे काव्य, श्री. नारायण रामचंद्र मोरे यांचे शिवायन हे महाकाव्य, अशी आणखी काही शिवचरित्रपर काव्ये मराठीत निर्माण झाली आहेत. मोऱ्यांच्या शिवायन या काव्यातला, शिवछत्रपतींना संत तुकोबांनी केलेला उपदेश असा –

क्षात्रधर्म तो तुम्हां लाभला पूर्वजपुण्याने ।
पालन त्याचे तुम्ही करावे पूर्ण दक्षतेने ॥
प्रजाजनांचे रक्षण करणे राजधर्म तुमचा ।
विसर तुम्ही लव पडू न द्यावा या कर्तव्याचा ॥
श्री नारायण नृसिंह वामन हरि विट्ठल राम ।
यांचे करणे भजन निरंतर हा अमुचा धर्म ॥
हिंदुधर्म निज रक्षण करणे धर्म एक अमुचा ।
आचरणे तो, तुम्हांस आशीर्वाद असे अमुचा ॥

अलिकडेच महाराष्ट्रकवी यशवंत यांनी शिवचरित्रावर एक महाकाव्य लिहिले आहे. हे काव्य विविध वृत्तांत असून, त्यातली स्वभाव आणि प्रसंग यांची चित्रणे सरस आहेत. शिवाजीमहाराज सिंहासनावर बसायला निघाले, तेव्हा त्यांच्या मनात काय

विचार आले असतील, अशी कल्पना करून कवी यशवंत पुढील पद्यपंक्ती लिहितात –

हरिश्चंद्र पुण्यप्रतापी, विदेही शिबी आदि राजे पुरागान्तरी
होऊन गेले तयांची अकस्मात उदेली स्मृती त्यांचिया अंतरी ॥
गुणश्रेष्ठता त्यांचियासारखी ती हवी त्याग-चारित्र्य-संपन्नता
स्वसौख्या विसर्जून ठेवीत आले सदा जे प्रजारंजनी दक्षता ॥
उरी राज्यकर्त्यांचिया अंश काही असे त्यांचिया थोरवीचा जरी
तयानेच उद्युक्त व्हावे चढायास सिंहासनाची तरी पायरी ॥

अगदी अलिकडेच श्री. विष्णू सखाराम घाटे यांनी 'शिवाजी भारत' या नावाने शिवचरित्रावर एक आर्याबद्ध महाकाव्य लिहिले आहे. हे महाकाव्य अनेक दृष्टींनी महत्त्वपूर्ण आहे. श्री. घाटे यांनी कल्पनाशक्तीला वाव दिला असला, तरी इतिहासाचा धागा कुठेही सोडलेला नाही. त्यांचे उपमा-दृष्टांतादी अलंकार प्रसंगोचित वाटतात. त्यांच्या या महाकाव्यातील शिवराज्याभिषेकाच्या प्रसंगातल्या काही आर्या अशा–

हे राहो ! सरले विधि, एक समारंभ राहिला आतां ।
थाटात भव्य दिसती राजे गडदेवदर्शना जातां ॥
करिणी भूषणमंडित, अंबारी रत्नजडित सोन्याची ।
स्वारी तींत विराजे शुभवस्त्राभरणवंत राजांची ॥
अंकुशधारी माहुत बसती हंबीरराव सैन्यपती ।
पृष्ठीं मोरोपंतहि ढाळिति मोर्चेल राजियांवरती ॥
फडफड करितो भगवा झेंडा अति उंच अंतराळांत ।
सामर्थ्यवंत देई आव्हान परांस धीट डौलात ॥
चालति करिणीभंवतीं प्रधान दुसरे नि अन्य अधिकारी ।
पदवीनुरूप अपुल्या साथ करित लोकराज जयकारी ॥

श्री. श्रीराम आठवले या नवोदित कवीने शिवगीता नावाचे १०२ कवितांचे एक काव्य लिहिले आहे; तर प्रा. सुरेश द. देशपांडे यांनी शिवरायाचे आठवावे रूप या नावाची २८ गीतांची शिवगाथा लिहिली आहे. श्री. ल. ह. पाठक यांनी शिवप्रताप नावाचे एक खंडकाव्य रचले आहे. कोल्हापूरचे श्री. स. ना. दीक्षित यांनी लिहिलेली श्रीशिवगीतांजली हा मराठी कवितेला लाभलेला एक सुंदर गीतात्मक साज होय. शिवचरित्रावर स्फुटकाव्ये लिहिणारे कवी तर कितीतरी झाले आहेत.

शिवाजीमहाराजांचे चरित्र मराठी गद्यात कितीतरी संशोधकांनी आणि विद्वानांनी लिहिले आहे. त्यांपैकी काही नावे अशी –

सर्वश्री कृष्णाजी अनंत केळुसकर, दि. वि. काळे, वा. कृ. भावे, चिं. वि. वैद्य, गो. स. सरदेसाई, ब. मो. पुरंदरे, बाळशास्त्री हरदास, वा. सी. बेंद्रे, शेजवलकर, इत्यादी. अलिकडेच शिवाजीमहाराजांच्या त्रिशतसांवत्सरिक महोत्सवाच्या निमित्ताने 'शिवरायासी आठवावे' या नावाने एक शिवचरित्र महाराष्ट्र सरकारने प्रकाशित केले आहे. सर्वश्री जदुनाथ सरकार, डॉ. बाळकृष्ण आणि सेतुमाधवराव पगडी यांनी शिवछत्रपतींची चरित्रे इंग्रजी भाषेत लिहिली आहेत.

मराठीप्रमाणेच अन्य भाषांतील कवी, महाकवी यांनीही महाराजांच्या चरणी आपली कविता समर्पित केली आहे. त्यांतील काही शिवस्तोत्रांचा ओझरता परिचय असा –

श्री. कोमाराजू वेंकटलक्ष्मणराव हे तेलुगू इतिहासकारांचे अग्रणी समजले जातात. त्यांनी शिवाजीचरितम् या नावाचा एक ग्रंथ लिहिला आहे. श्री. वेंकटशेष शास्त्री यांनी तेलुगू भाषेत शिवभारतम् नावाचे महाकाव्य लिहिले आहे. त्याचे ८ सर्ग आहेत. कवीची कथनशैली रसाळ आणि ओजस्वी आहे. ग्रंथाच्या प्रारंभीच शिवाजीमहाराजांचे एक चित्र असून, त्याखाली कवीने पुढील पद्यपंक्ती लिहिल्या आहेत –

धीराग्रसरमूर्ति, हइंदवधरित्रीभाग्यसत्यापनम् ।
प्रारम्भुडु दयागुणाम्बुधी महाराष्ट्रान्वयोत्तम सुंडो
वीरक्षत्रियमौली देशमतगोवेदादिरक्षापित
श्रीरम्युंडु भवानी भवतुंडु शिवाजीराजु सामान्युडे ॥

अर्थ – धीरोदात्तांचा अग्रेसर, हिंदुभूमीच्या भाग्योदयाचा प्रारंभक, दयेचा सागर, महाराष्ट्रीय चारित्र्याचे प्रतीक, वीरक्षत्रियमौली, देश, धेनू आणि वेद यांचा रक्षणकर्ता, लक्ष्मीचा लाडका आणि भवानीचा भक्त शिवाजीराजा असामान्य होय.

तेलुगूत महाराजांवर अनेक नाटकेही लिहिली गेली आहेत.

कन्नड कवी श्रीनिवास यांनी मावळेगळ गीत या नावाने एक काव्य रचले असून, त्यात शिवछत्रपतींचे वर्णन करणाऱ्या पुढील पंक्ती लिहिल्या आहेत–

शिवरायर शत्रुरायर गंड शिवरायर हगेय जवराय
तवकित म्लेंच्छर कत्तल तंडके शिवराय चंड मार्तांड

भावार्थ – शत्रूंना पुरून उरणारा आणि वैऱ्यांचा कळिकाळ असा हा शिवराय दुर्दांत म्लेंच्छ राज्याच्या अंधकाराला चिरणारा चंड सूर्याप्रमाणे आकाशात तळपत आहे.

कविवर राजरत्न यांनीही शिवचरित्रावर एक दीर्घ कविता लिहिली आहे.

श्री. सुब्रह्मण्य भारती हे तमिळ काव्याचे पितामह मानले जातात. शिवाजीमहाराज हे आपल्या सहकाऱ्यांना उद्देशून भाषण करीत आहेत, असा प्रसंग कल्पून सुब्रह्मण्य भारती पुढील पंक्ती लिहितात–

जय जय भवानी । जय जय भारतम्
शेनैत्तलेवरघाळ, शिरन्दमंत्रीघाळ
नीरदन पुदलवर, इन निनैवहजाविर ।

भारतनाडु पार्कल्लाम तिलकम्
नीरदन पुदलवर इन निनैवहजादिर ।

अर्थ – भवानीचा जयजयकार असो, भारताचा जयजयकार असो. माझ्या सेनापतींनो आणि राज्यकार्यधुरंधर मंत्र्यांनो, तुम्ही या भूमीची लेकरे आहात, हे विसरू नका. या भूमीच्या सुपुत्रांनो, भारतवर्ष हा साऱ्या जगताचा सौभाग्यतिलक आहे, हेही विसरू नका.

श्री. झवेरचंद मेघाणी हे गुजरातचे एक प्रसिद्ध कवी. म. गांधींनी त्यांना राष्ट्रीय कवी म्हणून गौरविले आहे. त्यांनी हालरडूं या नावाने शिवाजीमहाराजांचा एक उत्कृष्ट पाळणा लिहिला आहे. त्यांतील काही पंक्ती अशा–

आभमां ऊगेल चांदलो ने जीजाबाईने आव्या बाळ
बाळडानो मात हिंचोळे घणघण डुंगरा बोले
शिवाजीने नींदरू नावें माता जीजाबाई झुलावे
पेटमां पोटींने सांभळेलीं वाळे रामलक्ष्मणनीं बात
माताजीने मुख जे दीं थी ऊडी एनी ऊंघ ते दी थी

भावार्थ – आकाशात चंद्र उगवला आणि जिजाऊच्या पोटी शिवाजी जन्माला आला. बालकाला जिजाबाई आंदुळते आहे. पण बाजूलाच डोंगराडोंगरांतून संकटाचा घणघण असा आवाज घुमतो आहे. त्यामुळे शिवबाळाला काही झोप लागत नाही. पोटात असतानाच आईच्या तोंडून ऐकलेल्या रामलक्ष्मणांच्या गोष्टींनी त्याची झोप पार उडाली.

मग जिजामाता त्याला म्हणते आहे–

पोट जो रे मारा बाळ पोटींले जो पेट भरीने आज
काले काळा युद्ध खेळाशे लू वाटाणुं क्याय नै रेशे

अर्थ – बाळा, आज पोटभर विश्रांती घे, निद्रा घे. उद्या घनघोर युद्धे खेळायची आहेत. मग झोपायला वेळ नाही व्हायचा.

पेरी ओढी ले जो पातळा रे पीळा लाल पीरो जो चीर
काया तोरी लोही मांना शे ढांकण ते दी ढालनुं था शे

भावार्थ – बाळा, आज पिवळी, लाल, पिरोजी अशा हव्या त्या रंगांची तलम वस्त्रे लेऊन घे. उद्या तुझे अंग रक्ताने माखलेले असेल आणि त्याला केवळ ढालीचेच पांघरूण मिळेल.

श्री. वामन सीताराम मुकादम यांनी गुजरातीमध्ये ५८० पृष्ठांचे एक विशाल शिवचरित्र लिहिले आहे.

बंगालमध्ये गुरुदेव रवींद्रनाथ ठाकूर यांनी शिवछत्रपतींवर एक दीर्घ कविता लिहून बंगाली तरुणांना शिवाजीमहाराजांचा आदर्श पुढे ठेवण्याबद्दल आवाहन केले आहे. छिन्न, विघटित असा भारत एका धर्मराज्यपाशात बांधण्याची महाराजांची आकांक्षा त्यांना अनुकरणीय वाटली आहे. ते म्हणतात–

कोन दूर शताब्देर कोन एक अख्यात दिवसे नाहि जानि आजि
मराठार कोन शैले अरण्येर अंधकारे बसे हे राजा शिवाजी
तव भाल उदभासिया ए भावना तडित्प्रभावत एसे छिलो नामि
एक धर्मराज्यपाशे खंड छिन्न विक्षिप्त भारत बंधे दिबो आमि ।।

कवी वा. भ. बोरकरकृत या काव्याचा अनुवाद असा–

कवण दूर शतकाच्या कवण्या अश्रुत दिवशी केव्हा
नाहि ठाउके आज कवण मराठी शैली वसला
कानन घन अंधारी प्रभु तुम्ही शिवराज
तडित्प्रभावत एक भावना उजळित तुमच्या भाळा
स्थिरावली हृदयात छिन्न विखंडित क्षिप्त भारता
सांधित बांधित एका धर्मराज्यपाशात

श्री. जोगेंद्रनाथ वसू यांचे शिवाजी हे खंडकाव्य असेच सुंदर आणि प्रेरक आहे. अठराव्या सर्गामध्ये ते शिवाजीमहाराजांच्या राज्यव्यवस्थेचे पुढीलप्रमाणे वर्णन करतात–

ज्ञानी गुणी मंत्री जन अलंकृत सभा
धनपूर्ण राजकोष सुखी प्रजागण
रामराज्ये यथा वसे निश्चित निर्भय
स्नेहे प्रेमे बद्ध भृत्य, सैनिक सचिव

भावार्थ – शिवछत्रपतींचे राज्य हे रामराज्य होते. ज्ञानी, गुणी मंत्रिगणांनी राजसभा भूषित होती. राजकोशही भरलेला असून, प्रजा सुखी होती. सैनिक, मंत्री आणि सेवक स्नेहाच्या पाशाने बांधलेले होते.

हिंदी भाषेत शिवचरित्रावर सहा महाकाव्ये असून, खंडकाव्येही बरीच आहेत. शिवाय नाटकेही आहेत. श्री. केदारनाथ मिश्र यांचे 'रक्त के अक्षर' हे खंडकाव्य मोठे उद्बोधक असून त्याचे आठ सर्ग आहेत. त्यातील एका प्रसंगाचे वर्णन असे–

पावक की सरिता उफनी थी यवनों की कीर्ति बढाने को
वीरों का रक्त उबलता था उनको मंझधार डुबाने को
संकेत शिवा का मिला जही पावक पर सेतु बनाने को
प्रत्येक मावला उगम उठा थी होड लगी मर जाने को
है कोन किसे कब रोक सका आशिष भवानी का जिसको

भावार्थ – शत्रूने किल्ल्याभोवती आग पेटवली होती. यवनांना यश मिळवून देण्याचा या आगीचा आशय होता. पण मावळ्या वीरांचे रक्त उसळत होते, शत्रूला प्रवाहाच्या धारेत बुडवण्यासाठी. जेव्हा शिवबाचा संकेत मिळाला तेव्हा प्रत्येक मावळा त्या वणव्यावर आपल्या देहाचा पूल बांधण्यासाठी पुढे आला. प्रत्येकाने आगीत जळून शिवाजीमहाराजांना बाहेर पडू देण्याची जणू स्पर्धा लागली. ज्याला भवानीचा आशीर्वाद प्राप्त आहे, त्याला कोण कसा रोधू शकणार !

श्री. केदारनाथ मिश्र 'प्रभात' यांचे 'राष्ट्रपुरुष' हे शिव-

काव्य सात सर्गांचे आहे. शिवाजीमहाराज आणि त्यांचे मावळे यांनी कशा शपथा घेतल्या, त्याचे वर्णन त्यांनी पुढीलप्रमाणे केले आहे–

हम लेते हैं शपथ हमारे भाव उठेंगे ऊपर
और बाजसा झपटेंगे रिपु पर आक्रमण करेंगे
हम लेते हैं शपथ न होगी चिंता हमें मरण की
शीशदान का पर्व देश के लिये मनायेंगे हम
हम लेते हैं शपथ रुधिर से अयश मैल धोयेंगे
जब तक है तलवार देश का झंडा नहीं झुकेगा ॥

डॉ. सुरेंद्रनाथ यांनी 'शिवाजीमहाराजांची परकीयांनी लिहिलेली चरित्रे' या नावाचा एक ग्रंथ संपादित केला असून, त्यात फ्रान्सिस मार्टिन (फ्रेंच), कॉस्माँ द गार्डा (पोर्तुगीज) आणि अन्य काही डच लेखक यांनी लिहिलेली चरित्रात्मक माहिती एकत्र केली आहे.

फार्सी भाषेत खाफीखान याने शिवाजीमहाराजांविषयी लिहिले आहे. तो महाराजांचा कट्टर द्वेष्टा होता. पण तो शिवछत्रपतींविषयी म्हणतो–

शिवाजीने सार्वकाल स्वराज्यातील प्रजेचा मान राखण्याचा प्रयत्न केला. लज्जास्पद कृत्यापासून तो सदैव अलिप्त राहिला, मुसलमान स्त्रियांच्या अब्रूला तो दक्षपणे जपला. मुसलमान मुलांचेही त्याने रक्षणच केले. या बाबतीत त्याच्या आज्ञा कडक होत्या. जो कोणी या बाबतीत आज्ञाभंग करील, त्याला तो कडक शासन करीत असे.

[ छत्रपति शिवाजी महाराज – श्री. दि. वि. काळे, १९६०; राजा शिवाजी – श्री. गो. स. सरदेसाई; राजा शिवछत्रपति – श्री. ब. मो. पुरंदरे; तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी – नवभारत, जून १९७४; श्री. नरहर कुरुंदकर – साधना, शिवछत्रपति-विशेषांक, १९७४; विवेक, शिवछत्रपति-विशेषांक, १९७४ ]

## शिवानंदनाथ

(इ. स. चे १७ वे किंवा १८ वे शतक) मूळ नाव काशीनाथ भट्ट. हा वाराणसीत राहत होता व शिव आणि शक्ती यांचा उपासक होता. हा दक्षिणाचाराचा पुरस्कर्ता असून, वामाचाराचा कट्टर विरोधक होता. याने तंत्र आणि पुराणे यांवर सुमारे साठ ग्रंथ लिहिले आहेत. बहुतेक ग्रंथ विविध देवतांची तांत्रिक पूजाविधाने सांगणारे आहेत. [दि तंत्राज्, स्टडीज् ऑन देअर रिलिजन अँड लिटरेचर]

## शिवोपासनव्रत

एक काम्य व्रत. शिव ही या व्रताची देवता आहे. उभय पक्षांतील अष्टमी व चतुर्दशी या तिथींना उपवास करून शिवपूजा करणे, असा या व्रताचा विधी आहे. एक वर्षभर व्रत करून मग उद्यापन करावे. फल – शिवलोकप्राप्ती. [ हि. ध.]

## शिशिर

वसंतादी षड्ऋतूंपैकी सहावा ऋतू. यजुर्वेदात ( १५.५७ ) 'तपश्च तपस्यश्च शैशिरावृतू' असा याचा उल्लेख आला असून, त्याचा अर्थ, तपस् म्हणजे माघ आणि तपस्य म्हणजे फाल्गुन या दोन महिन्यांचा काल म्हणजे शिशिर ऋतू असा आहे.

महाभारतकाळी शिशिर ऋतूला ऋतुगणनेत अग्रस्थान असावे, असे वाटते. कारण आश्वमेधिक पर्वात (४४) 'ऋतवः शिशिरादयः' असा उल्लेख येतो. डॉ. केतकर यांच्या मते उदगयनारंभी शिशिरादी क्रमानेच ऋतुगणन होत असावे.

शिशिर ऋतूचा काल हा शीतकाल आहे. 'शीर्यन्ते पर्णानि अस्मिन्निति शिशिरः' आणि 'शशति गच्छति वृक्षादिशोभा यस्मात्' अशा शिशिर शब्दाच्या दोन व्याख्या असून, त्यांत शिशिर ऋतूत वृक्षांची पर्णशोभा गळून पडत असल्याचे सांगितले आहे.

वसंतादी सर्व ऋतूंचे मनोहर आणि सविस्तर वर्णन करणाऱ्या संस्कृत कवींनी शिशिर ऋतूचे वर्णन करताना मात्र काहीसा कृपणपणा दाखविला आहे. कालिदासाने मात्र आपल्या 'ऋतुसंहारा'च्या पाचव्या सर्गात प्रमदांना प्रिय असणाऱ्या या ऋतूचे तपशीलवार वर्णन केले आहे. त्याच्या मते या ऋतूतच भाताची व उसाची शेते आपल्या समृद्धीने रसिकांच्या डोळ्यांचे पारणे फेडीत असली, तरी दिवसेंदिवस वाढत जाणाऱ्या थंडीमुळे व फिकट प्रकाशामुळे रात्री मात्र नकोशा वाटतात. भारवीच्या मते हेमंतातील वर्फाचा थर या ऋतूत कमी झालेला असतो, आम्रवृक्षाला हळूहळू पालवी येत असते आणि निर्गुंडीची फुले उमलण्याच्या बेतात असतात. या दृष्टीने हेमंताचा अंत आणि वसंताचा आरंभ या सीमारेषेवर उभा असणारा हा ऋतू म्हणजे प्रणयी जनांच्या वसंतविहाराची नांदीच होय. शिशुपालवधाचा कर्ता माघ म्हणतो, की शिशिर ऋतूतील वारा लतांना मोहर अर्पण करतो आणि भृंगांच्या गुंजारवाच्या मिषाने प्रियकरांपासून दूर राहणाऱ्या युवतींची जणू निर्भत्सना करतो. [ म. ज्ञा. को.; भारतीय व्रतोत्सव; श. क.; संस्कृत साहित्यातील शिशिर ऋतू–डॉ. मो. दि. पराडकर, मायमराठी, मे १९७४]

## शिशुचांद्रायण

एक प्रायश्चित्त. चांद्रायण प्रायश्चित्ताचा हा एक प्रकार असून, तो बाल व वृद्ध यांच्यासाठीच विहित आहे. यात सकाळी व रात्री अन्नाचे चारचार घास खाऊन राहायचे असते. [हि. ध. ]

**शिशुनाग राजवंश** मगधावर राज्य करणारा एक वंश. काशीचा राजा शिशुनाग याने प्रद्योतवंशी राजाचा पराजय करून मगधाचे राज्य जिंकले व तो राजगृह या राजधानीतून मगधावर राज्य करू लागला, अशी पौराणिक कथा आहे. पुराणांत या वंशातील दहा राजांची नावे दिलेली आहेत, ती अशी – शिशुनाग, काकवर्ण, क्षेत्रधर्मा, क्षत्रौजा, बिंबिसार, अजातशत्रू, दर्शक, उदायी, नंदिवर्धन व महानंदी. या राजांनी इ. स. पू. ६४२ पासून इ. स. पू. ३७२ पर्यंत मगधावर राज्य केले. शिशुनाग याच्यावरून त्याच्या वंशाला शिशुनाग वंश हे नाव प्राप्त झाले.

या वंशाची ही पौराणिक माहिती सुसंबद्ध व विश्वसनीय नाही. बौद्ध साहित्यातली, विशेषतः महावंश या ग्रंथातली माहिती इतिहासज्ञांनी स्वीकारली आहे. या ग्रंथान्वये या वंशातील राजांची नावे अशी – बिंबिसार, अजातशत्रू, उदयभद्र, अनुरुद्ध, मुंड, नागदासक, सुसुनाग, कालाशोक आणि त्याचे दहा पुत्र.

**बिंबिसार** – हा हर्यंक कुलात जन्मला होता. गिरिव्रज (राजगृह)ही त्याची राजधानी होती. बिंबिसाराने अंग देशावर स्वारी करून तो जिंकला आणि त्याची राजधानी चंपा येथे आपला पुत्र कुणिक याला राज्यपाल नेमले. बिंबिसाराने मगध साम्राज्याचा विस्तार केला आणि आसपासच्या व दूरच्या राजांशीही स्नेहसंबंध प्रस्थापित केले. कोसलाधिपती प्रसेनजित याची भगिनी बिंबिसाराची पट्टराणी होती. त्याची दुसरी राणी चेल्लना ही लिच्छवींचा राजा चेटक याची कन्या होती. मद्रदेशाची राजकन्याही त्याची राणी होती. अवंतीच्या प्रद्योत राजवंशाशी बिंबिसाराचे सख्य होते.

बिंबिसाराच्या विशाल साम्राज्याच्या शासनव्यवस्थेची माहिती बौद्ध साहित्यावरून मिळते. निरनिराळ्या गावांचा कारभार ग्रामक म्हणजे ग्रामप्रमुख चालवीत. बिंबिसाराने सर्व साम्राज्यावर आपली सत्ता दृढ ठेवली होती.

बौद्ध साहित्यान्वये बिंबिसाराने स्वतः गौतम बुद्धाकडून दीक्षा घेतली होती. त्या प्रसंगी त्याने राजगृह येथे बुद्ध व त्याचे शिष्य यांना स्वतः भोजन वाढले आणि वेळुवन नामक उपवन त्याने बौद्ध संघाला अर्पण केले. त्याची राणी मद्र–राजकन्या खेमा ही बौद्ध तत्त्वज्ञानात पारंगत होती. बिंबिसाराने आपला राजवैद्य जीवक याला बुद्धाच्या सेवेसाठी पाठवले होते.

जैनांच्या मते बिंबिसार हा महावीराचा अनुयायी होता. त्याची राणी चेल्लना ही देखील जैन पंथाची पुरस्कर्ती होती.

बौद्ध परंपरेनुसार बिंबिसाराचा पुत्र अजातशत्रू याने पित्याचा वध केला. बुद्धाचा चुलतभाऊ देवदत्त हा दुष्ट होता. त्यानेच अजातशत्रूला पित्याचा वध करायला प्रवृत्त केले. जैन परंपरेची माहिती मात्र निराळी आहे. बिंबिसाराने कुणिक (अजातशत्रू) यालाच युवराज मानले होते. तरीही त्याने बिंबिसाराला बंदिशाळेत टाकून राज्यपद घेतले. मग बिंबिसाराने विषप्राशन करून आत्मघात केला.

**अजातशत्रू** – हा महापराक्रमी असून, त्याने आपल्या साम्राज्याचा खूप विस्तार केला. राज्यावर येताच त्याला कोसलाधिपती प्रसेनजित याच्याशी युद्ध करावे लागले. या युद्धात आरंभी अजातशत्रूचा जोर होता; पण अखेरीस त्याचे बळ कमी पडून त्याला पूर्ण पराभव पत्करावा लागला. तो शरण आल्यामुळे प्रसेनजिताने त्याला राज्यपद परत दिले व आपली कन्या वजिराही त्याला दिली.

जैन ग्रंथान्वये अजातशत्रूने पूर्व भारतातील ३६ गणराज्यांच्या प्रबळ संघाचा पराभव केला. लिच्छवी हे घटक राज्य अत्यंत प्रबळ होते. त्याचा पराभव करण्यासाठी अजातशत्रूने कपटकारस्थाने केली. त्याने आपल्या सेनादलातही खूप वाढ केली. त्या युद्धासाठीच त्याने पाटलिपुत्र हे नवे नगर गंगेच्या काठी वसवले. त्याच्या शस्त्रसंभारात महाशिलाकंटक व रथमुसल ही दोन संहारक शस्त्रे होती. हे युद्ध सुमारे १६ वर्षे चालू होते. शेवटी अजातशत्रूचा जय झाला आणि वैशाली नगरी त्याच्या ताब्यात आली.

जैन ग्रंथात अजातशत्रूला जैन पंथाचा अनुयायी म्हटले आहे. तो अनेकदा महावीराला भेटायला गेला होता. बौद्ध ग्रंथान्वये तो बुद्धाचा भक्त झाला होता. प्रथम तो बुद्धाचा शत्रू होता, पण बिंबिसाराचा वध केल्यानंतर त्याला पश्चात्ताप होऊन तो बुद्धाला शरण गेला.

बुद्धाच्या निर्वाणानंतर अजातशत्रूने त्याच्या अवशेषांसाठी राजधानीभोवती अनेक धातुचैत्यगृहे बांधली. पहिली बौद्ध संगीती त्याच्याच वेळी राजगृह येथे भरली. तिथे आलेल्या ५०० भिक्षूंची उत्तम व्यवस्था राजाने केली आणि परिषदेसाठी भव्य सभागृहही बांधले.

अजातशत्रूनंतर त्याचा पुत्र उदयभद्र (उदायी) सम्राट झाला. जैन परंपरेप्रमाणे तो महान पितृभक्त होता. तो चंपा येथे राज्यपाल होता. मगधातील थोर पुरुषांनी त्याला सिंहासनावर बसवण्यासाठी पाचारण केले. मग तो पाटलिपुत्र येथे आला व सिंहासनावर बसला. तिथे त्याने कुसुमपूर नामक नवे नगर वसविले व त्याच्या मध्यभागी एक जैन चैत्यगृह बांधले. तो निष्ठावान जैन असून, नियमित उपासतापास करीत असे; पण लवकरच त्याचा वध झाला. त्याच्या नंतर अनुरुद्ध व मुंड हे क्रमाने राजे झाले. त्यानंतरचा राजा नागदासक हा

पुराणांतील दर्शक असावा. त्यानंतर त्याचा मंत्री शिशुनाग याला प्रजेने मगधाचा राजा केले. त्याने अवंतीच्या प्रद्योताचा पराभव करून ते राज्य मगध साम्राज्यात समाविष्ट केले. वत्स व कोसल ही राज्येही त्याने जिंकली असावी.

शिशुनागाचा पुत्र कालाशोक म्हणजे पुराणांतील काकवर्ण असावा. त्याच्या राजवटीत दुसरी बौद्ध संगीती भरली होती. त्याच्या राणीचा शूद्र वर्णाचा प्रियकर होता, त्याने राजाचा वध केला. त्यानंतर कालाशोकाच्या दहा पुत्रांनी दहा वर्षे राज्य केले. राणीचा प्रियकर त्यांचा मार्गदर्शक म्हणून स्वत: राज्य चालवीत होता. मग त्याने त्या दहा राजपुत्रांचाही वध केला. त्याच्यापासून राणीला जो पुत्र झाला, त्याला मगधाचे राज्य मिळाले व नंदवंश सुरू झाला. [भा. प्रा. रा.; हि. क. इं. पी. १ व २]

**शिशुपालवध** संस्कृत महाकाव्यांपैकी एक. याचा कर्ता माघ हा होय. हा इ. स. च्या ७ व्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला. प्रस्तुत महाकाव्याचे २० सर्ग असून, श्लोकसंख्या १६४५ आहे. पंधराव्या सर्गातले प्रक्षिप्त श्लोक ३४ व कविवंशवर्णनपर ५ मिळून ही श्लोकसंख्या १६८४ भरते. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञाच्या प्रसंगी श्रीकृष्णाने आपले सुदर्शन चक्र फेकून चेदी देशाचा राजा शिशुपाल याला ठार केले, ही कथा यात वर्णित आहे. प्रस्तुत काव्याचा कथाभाग सारांशरूपाने असा–

**कथासार** – एके दिवशी द्वारकेतले लोक आकाशातून उतरणारे एक तेज पाहून आश्चर्यचकित झाले. ते तेज जसजसे खाली उतरू लागले, तसतशी त्यात एक पुरुषाकृती दिसू लागली. ही आकृती नारदमुनींची होती. त्याच्या मस्तकावर पिंगट जटा, खांद्यावर शुभ्र यज्ञोपवीत, गळ्यात स्फटिकमाला व महती नावाची वीणा या वस्तू शोभत होत्या. राजप्रासादासमोर नारद भूमीवर उतरला. लगेच श्रीकृष्ण सिंहासनावरून उठून त्याला सामोरा गेला. त्याने नारदाला आसनावर बसवून त्याची पूजा केली. कृष्ण हा परमेश्वर; त्याच्या पोटात त्रैलोक्य साठवलेले; पण नारदभेटीचा आनंद मात्र त्यात सामावेना. तो म्हणाला. 'तुझ्यासारख्या विभूतीचे दर्शन पापहर व भावी कल्याणाचे सूचक असते. भूतकालीन शुभ कर्मांचा तो परिपाक असतो. नारदमुने, आता तुझ्या आगमनाचा हेतू तू मला सांग.'

त्यावर नारद म्हणाला. 'देवा, तुझ्या दर्शनाची आस महायोग्यांनाही सदैव लागलेली असते. माझेही तुझ्याकडे येण्याचे कारण तेच. मात्र त्यावरोवरच मी तुला स्वर्गातून देवेंद्राचा एक संदेश घेऊन आलो आहे. देवेंद्राने तुला विनवले आहे–

'सांप्रत शिशुपाल नावाचा एक दैत्य माजला आहे. तो सूर्यासारखा तेजस्वी आहे. पूर्वीच्या युगात तो प्रथम हिरण्यकश्यपू होता. नंतरच्या युगात तो रावण बनला. तू अवतार घेऊन त्या दोघांना ठार केलेस. तोच दैत्य आता शिशुपालाच्या रूपाने जन्मला आहे. त्याने जग जिंकण्याची महत्त्वाकांक्षा धरली आहे. देवांनाही पीडा देण्याची त्याची प्रवृत्ती आहे. तेव्हा हे द्वारकाधीशा, तू त्याचा वध करून माझ्या चित्ताला स्वास्थ्य दे.'

श्रीकृष्णाने ती विनंती मान्य केली. एवढ्यात त्याला धर्मराजाकडून राजसूय यज्ञाच्या बाबतीत विचारविनिमय करण्यासाठी निमंत्रण आले. दोन्ही कामे सारख्याच महत्त्वाची, तेव्हा प्रथम कोणते करावे, याचा विचार घेण्यासाठी त्याने आपला चुलता उद्धव आणि ज्येष्ठ बंधू बलराम यांना बोलावून घेतले. कृष्ण दोन्ही कार्ये सांगून त्यांना म्हणाला. 'धर्मराजा आपल्या पराक्रमी बंधूंच्या बाहुबलावर राजसूय यज्ञ पार पाडील. त्यासाठी आम्हांला जायलाच हवे असे नाही. म्हणून म्हणतो, की आपण शिशुपालावरच चाल करावी. कारण शहाण्या माणसाने वाढत्या रोगाची व बलिष्ठ शत्रूची उपेक्षा करू नये, असे नीतिवचन आहे. तरी तुम्हांला काय वाटते ते सांगा.'

त्यावर बलराम म्हणाला. 'कृष्णा, तुझे मत बरोबर आहे. शिशुपाल हा तुझा शत्रू आहे. त्याला देऊ केलेल्या रुक्मिणीचे तू हरण केल्यामुळे तर तो तुझा हाडवैरी बनला आहे. शिवाय त्याने द्वारकेवर हल्ला करून एका यादवाची बायको पळवली, ही गोष्ट विसरण्यासारखी नाही. वारंवार त्याने आपले मोठमोठे अपराध केले आहेत. अशा शत्रूला क्षमा योग्य नाही. म्हणून आपण एकदम चेदी देशावर स्वारी करून शिशुपालाचा काटा काढावा.'

बलरामाचे भाषण ऐकल्यावर कृष्णाने उद्धवाकडे नेत्रसंकेत केला. तो पाहून उद्धवाने आपले मत बलरामाच्या विरुद्ध दिले. तो म्हणाला–

'शिशुपाल तुम्हांला वाटतो तितका क्षुल्लक नाही. शिवाय कालयवन, शाल्व, रुक्मी, इ. अनेक दुष्ट राजे त्याचे पाठीराखे आहेत. तू त्याच्यावर हल्ला केल्यास ते सर्व एकवटून तुला त्रास देतील. तुझे मित्र तुला आणि शिशुपालाचे मित्र त्याला जाऊन मिळतील. त्यामुळे मोठा संघर्ष माजेल. अज्ञाने युधिष्ठिराच्या यज्ञाला विघ्न येईल आणि तूच धर्मराजाचा पहिला शत्रू ठरशील. तेव्हा धर्माच्या यज्ञाला साहाय्य करणे हे तुझे प्रथम कर्तव्य आहे. शिशुपालाचे पारिपत्य उशीरा केले तरी चालेल. तुझ्या दुर्लक्षामुळे पांडव जर दुखावले गेले तर त्यांची समजूत करणे तुला जड जाईल.

याशिवाय आणखीही एक कारण आहे. तू शिशुपालाच्या

आईला वचन दिले आहेस, की ‘तुझ्या पुत्राचे शंभर अपराध मी सहन करीन.’ ते वचन तुला पाळावेच लागेल. तू प्रथम शत्रूच्या गुप्तस्थानांचा हेराकरवी तलास घे. त्याच्या मित्रांना भेदनीतीने त्याच्यापासून तोड. पांडव तुझे भक्त आहेत. यज्ञप्रसंगी ते तुझी अग्रपूजा करतील. ते शिशुपालाला सहन होणार नाही आणि तिथेच युद्धाची ठिणगी पडेल. त्याच वेळी शत्रू व मित्र असे दोन तट पडतील आणि त्या युद्धात तुझे शत्रू पतंगासारखे होरपळून जातील.’

उद्धवाचे हे मुद्देसूद व दूरदर्शी भाषण कृष्णाला मानवले. त्याने राजसूयासाठी धर्मराजाकडे जाण्याचा विचार ठरवला. यादवांची प्रचंड सेना तिकडच्या दिशेने चालू लागली. या सेनासागरात श्रीकृष्ण विशेष शोभत होता. यादवसेना जेव्हा कच्छमध्ये आली, तेव्हा समुद्राने मनुष्यरूपाने प्रगट होऊन श्रीकृष्णाची महाळ्यांचे पाणी व ओल्या सुपाऱ्या देऊन पूजा केली.

पुढे लागला रैवतक नावाचा पर्वत. त्याच्या उदरात सुवर्णाच्या खाणी होत्या. त्यामुळे तो हिरण्यगर्भ ब्रह्मदेवच वाटे. त्या पर्वताचे सौंदर्य काय वर्णावे ! सूर्याचा रथ त्या पर्वताच्या शिखरावरून जाऊ लागला म्हणजे तिथल्या पाचूच्या हिरव्या रंगाने सूर्याचे घोडे हरितवर्ण दिसू लागत.

श्रीकृष्णाला तो पर्वत पाहण्याची फार उत्कंठा झाली. सर्व यादवसैन्य रैवतकाच्या प्रदेशात येऊन दाखल झाले. सैनिकांनी प्रथम पर्वताश्रित सिंहांना ठार मारले. मग तिथल्या गुहांतून यादवराजांनी वसती केली. श्रीकृष्णाचे हत्ती तिथल्या सरोवरांत मनसोक्त क्रीडा करू लागले व घोडे वनात स्वैर फिरू लागले.

श्रीकृष्णाला वाटले, की रैवतकावर आपण काही काळ विसावा घ्यावा. त्याची ती इच्छा पाहताच वसंतादी सहाही ऋतू श्रीकृष्णाला आपापली फलपुष्पसेवा अर्पण करण्यासाठी तिथे प्रगट झाले. अनेक यादव राजे आपापल्या स्त्रियांसह पर्वतविहाराला निघाले. त्या प्रेमळ दंपतींमध्ये हास्यविनोद सुरू झाले. अशा वनविहार करता करता यादव स्त्रियांची अंगे घामेजली. मग त्या सर्वजणी आपापल्या पतीसमवेत तिथल्या सरोवरात जलविहारासाठी उतरल्या. त्या क्रीडेत रमणरमणींचे कामोद्दीपन झाले. एक लावण्यवती बुडी मारून एक कमल घेऊन वर आली. श्रीकृष्णाला वाटले, की ती जणू समुद्रमंथनातून निघालेली लक्ष्मीच आहे.

एवढ्यात सूर्यास्त झाला. सूर्याला पश्चिम दिशारूपी गणिकेने आपल्या आकाशमंदिरातून तिरस्कारपूर्वक घालवून दिले. कारण सूर्य आता निस्तेज आणि निष्कांचन झाला होता. थोड्याच वेळात चंद्र उगवला. त्याचे किरण पसरताच लोकांना (यादवांना) वाटले, की शेषाच्या सहस्र फण्यांवरील रत्नांचा हा प्रकाश असावा. चंद्रप्रकाशानंतर यादव स्त्रियांच्या कामविकाराला उद्दीपनच मिळाले. मद्यप्राशन करून त्यांनी आपली स्वाभाविक लज्जा घालवली आणि त्या क्रीडोन्मुख झाल्या. त्या क्रीडा पहाणाऱ्यालाही लज्जित करणाऱ्या असल्याने रजनीने आपले चंद्रमुख खाली घातले. हळूहळू पहाट झाली. भाटांनी भूपाळचा म्हणून श्रीकृष्णाला जाग आणली. गवळचांच्या घरी दधिमंथन सुरू झाले. रमणी आपल्या रमणांच्या बाहुपाशांतून मोठ्या कष्टाने मुक्त झाल्या. कुमुदे निस्तेज झाली. कमले उमलली. उदयगिरीच्या माथ्यावर सूर्य झळकला.

यादवसेना आता पुढच्या मार्गाला लागली. श्रीकृष्ण आपल्या वेगवान रथावर आरूढ झाला. डोंगरांतून आणि जंगलांतून वाट साफ करीत ते पुढे पुढे जाऊ लागले. या मार्गात श्रीकृष्णाला अनेक राजे येऊन मिळाले. अशा प्रकारे वने, नगरे ओलांडीत यादवसेना यमुनेतून पैलपार झाली.

श्रीकृष्ण येत आहे असे समजताच धर्मराज हर्षित मनाने आपल्या बंधूंसह श्रीकृष्णाला सामोरा गेला. ज्याला त्रैलोक्य वंदन करते, तो श्रीहरी रथाखाली उतरून आपल्या ज्येष्ठ भावाला म्हणजेच धर्मराजाला प्रणाम करता झाला. दोघांची उराउरी भेट झाली. श्रीकृष्ण रथात बसल्यावर धर्मराज स्वतः त्याचे घोडे हाकू लागला. यादव–पांडवांची सैन्ये गंगा-यमुनांच्या प्रवाहाप्रमाणे एकमेकात मिसळून इंद्रप्रस्थाकडे निघाली. नगरात शिरल्यावर त्या मदनसुंदर श्रीकृष्णाला पाहण्यासाठी पौर स्त्रियांची एकच धांदल उडाली. कोणाचे अलंकारच घालायचे राहिले. कोणी वस्त्रही नेसायला विसरल्या. हळू हळू श्रीकृष्णाचा रथ मयसभेपाशी आला.

त्या मयसभेची शोभा काय वर्णावी ! तिच्या रुपेरी आणि स्फटिकमय गगनचुंबी शिखरांच्या धवल प्रभेत आकाशातील चंद्र रात्रीच्या वेळी बुडून जायचा. तिच्या सर्व दालनांची फरसबंदी पाचूचीच केली होती. त्यातून दूर्वांकुरांसारखे हिरवेगार किरण बाहेर पडत. त्या सभेत पुष्पांनी व कमलपत्रांनी युक्त अशी पुष्करिणी आहे, असा भास व्हायचा व चालणारे लोक आपली वस्त्रे गुडघ्यांच्या वर उचलून धरायचे; पण वस्तुतः ती पुष्करिणी नसून इंद्रनील मण्यांची फरसबंदी असे. जिथे सरळ फरसबंदी आहे, असे वाटायचे तिथे नेमकी पुष्करिणी असायची. या दृष्टिभ्रमामुळे माणसे आत पडायची आणि त्यांची वस्त्रे भिजायची.

स्वागतसत्कार झाल्यावर श्रीकृष्ण व धर्मराज विचारविनिमयासाठी बसले. धर्मराजा म्हणाला. ‘श्रीकृष्णा, तुझे गुण अनंत व शक्ती अतर्क्य आहे. आज अखिल भारतवर्षाच्या कारभाराची सूत्रे माझ्या हाती आहेत आणि याला कारण तुझे सामर्थ्य

माझ्या पाठीशी उभे राहिले, हेच होय. मी धर्ममार्गाने धन मिळवले. धर्मानेच ते वाढवले व रक्षिले. आता त्या धनाचा उपयोग मी यज्ञासाठी करणार आहे. याविषयी मला तुझी आज्ञा हवी.'

त्यावर श्रीकृष्ण म्हणाला. 'हे युधिष्ठिरा, माझ्या सामर्थ्यामुळे तुला पृथ्वीचे राज्य मिळाले हे खरे नाही. तूच आपल्या राजनीतिकौशल्याने ते मिळवले आहेस. पथ्य सांभाळले, की रोग बरा होतो, स्वास्थ्य मिळते; त्याचे श्रेय वैद्याला कशाला? तुझ्या यज्ञात तू मला वाटेल ते काम सांग. त्यात कोणी विघ्न आणले तर मी त्याचे मस्तक धडावर राहू देणार नाही.'

कृष्णाच्या या बोलण्याने धर्मराजाला धीर आला. तो यज्ञाच्या तयारीला लागला. त्याने यज्ञकर्मात प्रवीण असे मीमांसक ब्राह्मण पाचारले. त्यांनी कुंडमंडपादी सर्व सिद्धता केली. वेदघोष सुरू झाला. अग्नीमध्ये मंत्रपाठपूर्वक आहुती पडू लागल्या. धूमवलये गगनाला भिडली. देव सगळे हविर्भाग ग्रहण करण्यासाठी मंडपात आल्यामुळे स्वर्गातल्या सुरसुंदरींना विरहव्यथा असह्य झाली. त्या आपले केस मोकळे सोडून वावरू लागल्या. धर्मराजाने ऋत्विजांना व ब्राह्मणांना अपार दक्षिणा दिली. कित्येकांना भूमिदान केले. राजेलोकांना उपहार दिले. सर्व याचकांना तृप्त केले. यज्ञ यथासांग पार पडला.

यज्ञाच्या शेवटी सुयोग्य पुरुषाची अग्रपूजा करायची होती. ती कोणाची करावी म्हणून धर्माने भीष्माला विचारले. भीष्म म्हणाला. 'तू श्रीकृष्णाची अग्रपूजा कर. तोच तिला सर्वथैव पात्र आहे. हे धर्मा, उत्पत्ति-स्थिति-लयकर्ता श्रीकृष्ण तुझ्या यज्ञात साक्षात उपस्थित झाला, हे तुझे भाग्य. तेव्हा त्याची अग्रपूजा करून तू त्रिभुवनाचे धन्यवाद मिळव.'

भीष्माचा हा विचार मान्य करून धर्माने श्रीकृष्णाची अग्रपूजा केली. जमलेल्या सर्व राजांनी त्या गोष्टीची प्रशंसा केली. जळफळाट झाला तो एकट्या शिशुपालाचा. त्याच्या पूर्ववैराने पेट घेतला आणि तो मत्सराने बेभान होऊन कृष्णाची निर्भर्त्सना करू लागला –

'हे धर्मा, तुला विवेक नाही. शहाणपणाही नाही. इथे मोठमोठे राजे जमले आहेत. ते समर्थ आहेत. पराक्रमी आहेत. त्यांना सोडून तू या राजा नसलेल्या एका गवळ्याची पूजा केलीस, हे सर्वथा अनुचित होय. हे तुझे कृत्य यज्ञात आहुती टाकण्याऐवजी ती कुत्र्याला खाऊ घालण्याच्या योग्यतेचे झाले. तू खोटे बोलत नसशील; पण आज खोटे कर्म मात्र केलेस. भीष्माला तर म्हातारचळच लागला आहे. काय पण त्याने श्रीकृष्णाची भाटगिरी केली! अरे श्रीकृष्णा गवळ्या! या खोट्या स्तुतीने तू शेफारून जाऊ नकोस. राजे लोकहो, हा धडधडीत तुमचा अपमान आहे. हा कृष्ण जिच्या स्तनातले दूध प्याला, त्याच मातेसारख्या पूतनेला याने ठार मारले. असा हा कृतघ्न. कंस हा याचा धनी. पण कृष्णाने त्यालाच ठार मारून स्वामिवधाचे पाप पदरी बांधले.'

शिशुपालाचे हे निरर्गल प्रलाप ऐकत असता यादवांचा क्रोध भडकला. त्यांचे हात शिशुपालाला मारण्यासाठी शिवशिवू लागले; पण कृष्णाने त्यांना शांत राहण्याचा संकेत केला. श्रीकृष्णाने शिशुपालाचा हा कितवा अपराध याचे गणित सुरू केले. एवढ्यात भीष्म समुद्रासारखा खवळला. तो म्हणाला. 'या भरसभेत श्रीकृष्णाचा अवमान करणाऱ्यांनी माझ्याशी युद्धाला उभे रहावे. मी सर्वांसमक्ष त्यांच्या मस्तकावर पाय देईन.' ते ऐकून शिशुपाल खवळला. तो आपल्या मित्रांना म्हणाला. 'चला उठा! आपण या सर्वांचे पारिपत्य करू.' शिशुपाल आपल्या मित्रांसमवेत यज्ञमंडपातून बाहेर पडला. आपल्या शिबिरात येऊन त्या कृष्णविरोधी सर्व राजांनी सैन्य सज्ज केले. पण श्रीकृष्णावर चालून जाण्याआधी शिशुपालाने एक कुशल दूत श्रीकृष्णाकडे पाठवला. तो दुटप्पी बोलणारा होता. कृष्णाजवळ येऊन तो म्हणाला. "महाराज, भरसभेत माझे स्वामी शिशुपाल यांनी तुमचा अपमान केला, याबद्दल त्यांना आता पश्चात्ताप होत आहे. त्यामुळे तुमचा राग शांत करून तुमची पूजा बांधण्यासाठी ते इकडे येत आहेत."

या बोलण्यातला प्रच्छन्न अर्थ श्रीकृष्णाला समजला. त्याने उत्तर देण्यासाठी सात्यकीला खुणावले. सात्यकी दूताला म्हणाला. 'तुझे निंदागर्भित भाषण आम्हांला समजले. तुझे शब्द अपशकुनी आहेत. अरे, कुठे भगवान श्रीकृष्ण आणि कुठे तो क्षुद्र शिशुपाल. महात्मे लोक काळवेळ पाहून आपली बोलण्याची ऊर्मी आतल्या आत जिरवतात. श्रीकृष्ण तुला उत्तर देणार नाही. सिंह उत्तर देतो तो गडगडाटी मेघाला; कोल्हेकुईला नव्हे. तुझा स्वामी वाचिवीर आहे. त्याला म्हणावे, युद्धाची खुमखुमी असेल तर पुढे ये. तुझे शंभर अपराध भरले आहेत.'

तो दूतही मोठा धीट होता. त्याने पुढेही आपले वाक्पांडित्य सुरू केले! 'मतिमंदाला स्वतःचे हित कळत नाही. भिंतीवर डोके आपटण्यापूर्वी भिंत किती टणक आहे, हे जाणून घ्यावे लागते. अन्यथा डोकेफोड ठरलेली. कृष्णा, मी तुझ्या हिताचे सांगतो. म्हणे शिशुपालाचे शंभर अपराध मी सहन केले. अरे रुक्मिणीहरणाच्या तुझ्या एकाच अपराधाची शिशुपालाने तुला क्षमा केली, ती शंभर अपराधांच्या क्षमेहून मोठी आहे. तू शिशुपालाला शरण जाऊन स्वतःचा जीव वाचव. अन्यथा तू तर मरशीलच; शिवाय तुझ्या स्त्रियाही अनाथ होतील.'

त्या दूताचे ते शब्द संतापजनक होते. त्यांना शस्त्रानेच

उत्तर द्यायला हवे होते. म्हणून कृष्णाने लगेच यादव सैन्य सज्ज केले. गरुड श्रीकृष्णाच्या ध्वजावर येऊन बसला. रण-दुंदुभींच्या आवाजात वीरांच्या गर्जना मिसळल्या. सैन्याच्या हालचालीने उडालेला धुरळा आकाशाला जाऊन भिडला. लोक भयभीत झाले. त्यांना वाटले, पृथ्वीचा प्रलयकाल ओढवला.

मग उभयदळीं युद्धाला तोंड लागले. संकुल युद्ध सुरू झाले. बलरामाने बाणासुराच्या पुत्राला घायाळ केले. सात्यकीने शाल्वाचा पराजय केला. प्रद्युम्नाने अनेक वीरांना लोळवले. मग शिशुपाल चाल करून आला. कृष्ण आणि शिशुपाल यांचे रथ समोरासमोर भिडले. शरवर्षाव सुरू झाला. पण कृष्णाला एकही बाण लागला नाही. मग शिशुपालाने कृष्णावर झोप आणणारे अस्त्र सोडले. त्यामुळे यादव सैन्यात जिकडे तिकडे अंधार पसरला व यादव सैनिक पेंगुळले. जागा होता तो श्रीकृष्ण. त्याने आपल्या नेत्रांतून दिव्य तेज निर्माण केले आणि त्या निद्रेचा नाश केला. मग अस्त्रयुद्ध सुरू झाले. श्रीकृष्णावर आपली मात्रा चालत नाही, असे पाहताच शिशुपाल श्रीकृष्णाची निंदा करू लागला. एवढ्यात श्रीकृष्णाने आपले सुदर्शन चक्र फेकले. ते चक्र शिशुपालाच्या गळ्यावर जाऊन आदळले. निमिषार्धात शिशुपालाचे शिर धडावेगळे झाले. दुसऱ्याच क्षणी शिशुपालाच्या शरीरातून एक उग्र तेज निघाले आणि ते श्रीकृष्णाच्या शरीरात प्रविष्ट झाले. देवांनी दुंदुभी वाजवल्या आणि श्रीकृष्णावर पुष्पवृष्टी केली. जमलेले सर्व राजे श्रीकृष्णाची प्रशंसा करू लागले.

रसग्रहण – माघाच्या पूर्वी भारवी हा महाकवी होऊन गेला होता. त्याचे किरातार्जुनीय हे काव्य विद्वानांच्या आदराला पात्र ठरले होते. भारवीचा खूप बोलबाला झाला होता. माघ कवीला तो सहन झाला नाही. त्याने भारवीवर ताण करण्यासाठी शिशुपालवधाची रचना केली. भारवीने किरातार्जुनीयाची कथा महाभारतातून घेतली, तशीच ती माघानेही घेतली.

अनेक ठिकाणी त्याने भारवीची उसनवारी केली आहे. इतकेच नव्हे, तर भट्टी आणि कालिदास यांचाही तो ऋणी आहे. शिशुपालवधाच्या ११ व्या व १३ व्या सर्गावर कालिदासाच्या वर्णनशैलीचा प्रभाव स्पष्टपणे जाणवतो. माघाला प्रभातवर्णनाची प्रेरणा रघुवंशाच्या पाचव्या सर्गातून मिळाली आहे. दोहोंतला प्रमुख भेद असा, की कालिदासाने प्रभातवर्णन केवळ १० श्लोकांत आवरले आहे, तर माघाने त्यासाठी ६७ श्लोक खर्ची घातले आहेत. कालिदासाचे वर्णन छोटे असून मार्मिक व अर्थगर्भ आहे; तर माघाचे वर्णन पसरट व कृत्रिम आहे.

पण या सर्वांत माघ हा भारवीचा अत्यधिक ऋणी आहे. शिशुपालवध किरातार्जुनीयाची प्रतिमूर्ती म्हणता येईल, इतके ते ऋण मोठे आहे. कथेची सजावट, सर्गांचे विभाजन आणि वर्ण्य विषयांचे उपस्थापन या गोष्टींत माघ भारवीच्या पाऊलवाटेनेच निघाला आहे.

किरातार्जुनीयाच्या पहिल्या सर्गात वनेचर युधिष्ठिराजवळ येतो. शिशुपालवधात नारद कृष्णाजवळ येतो. किराताच्या दुसऱ्या सर्गात भीम, युधिष्ठिर आणि द्रौपदी यांमध्ये राजनीतिविषयी वादविवाद झाला आहे; तर शिशुपालवधात बलराम, उद्धव व कृष्ण यांच्यामध्ये राजकीय मतभेद दिसत आहे. किरातातले भीम व युधिष्ठिर युक्तिवादी व नीतिनिपुण आहेत; तर शिशुपालवधातले उद्धव व बलराम हे शुक्रनीती व कामंदकीय नीतिसार या ग्रंथातले विचार बोलतात. त्यांच्या भाषणात त्यांचे व्याकरण, दर्शन आणि अलंकारशास्त्र यांचे ज्ञानही प्रगट होते. त्यांचे भाषण प्रभावोत्पादक होण्याऐवजी केवळ शास्त्रीय ठरले आहे. याउलट किरातातल्या भीम–द्रौपदींचा धर्मराजाशी झालेला संवाद रोखठोक, व्यवहारी व प्रभावोत्पादक आहे. अशी अनेक स्थळे दाखवता येतील.

भारवी हा शैव असल्यामुळे त्याने शिवप्रधान कथावस्तू निवडली; तर माघ हा वैष्णव असल्यामुळे त्याने कृष्णप्रधान कथेची निवड केली. किरातार्जुनीयापेक्षा शिशुपालवधाचा जीव छोटा आहे. त्याचे वीस सर्गांचे महाकाव्य बनवताना माघाला पाल्हाळ व कृत्रिमता यांचा आश्रय करावा लागला आहे. आणखी एक डोळ्यात भरण्याजोगे साम्य असे, की भारवीचे महाकाव्य श्री या शब्दाने सुरू होते तर माघाचे काव्यही त्याच शब्दाने ! 'श्रियः कुरूणामधिपस्य पालनीम्' हा भारवीचा प्रथम श्लोक, तर 'श्रियः पतिः श्रीमति शासितुं जगत्' हा शिशुपालवधाचा पहिला श्लोक ! भारवीच्या प्रत्येक सर्गाचा अंतिम श्लोक लक्ष्मी शब्दाने समाप्त होतो, तर माघाचा श्री शब्दाने होतो.

माघाच्या ठिकाणी कवित्व थोडे कमी असले, तरी पांडित्य मात्र भरपूर आहे. तो कालिदास, भारवी, भट्टी आणि श्रीहर्ष यांच्यापेक्षा पंडितवरेण्य आहे. अनेक विद्या, कला त्याला अवगत आहेत आणि त्यांचे प्रदर्शन करण्याची संधी तो कुठेही वाया दवडीत नाही.

भारवीप्रमाणेच माघाचाही अंगभूत काव्यरस 'वीर' हा आहे. पण त्याने शृंगाराला वीररसाच्या माथी पाय द्यायला लावले आहे. शिशुपालवधाचा मध्यभाग वाचल्यावर सहृदय वाचकाला असे वाटायला लागते, की हे शृंगार रसाचेच महाकाव्य आहे.

साकल्याने विचार केल्यास माघ कवीचा मनःपिंड तरल कल्पना व तीक्ष्ण बुद्धी यांनी बनला असला, तरी त्यात भावनेचा ओलावा कमीच दिसतो. तो एक कल्पक पंडित आहे, हेच सर्वत्र जाणवते. त्याला कोणत्याही गोष्टीबद्दल जिव्हाळा नाही किंवा

कशाबद्दल तीव्र द्वेष नाही. त्यामुळे त्याचे रचनाचातुर्य केवळ एक बौद्धिक क्रीडाच वाटते. कालिदासाची उपमा, भारवीचे अर्थगौरव आणि दंडीचे पदलालित्य हे तीन्ही गुण 'माघे सन्ति त्रयो गुणाः' या उक्तीने पंडितांनी त्याला चिकटविले आहेत; पण ती उक्ती परमार्थाने स्वीकारणे कठीण आहे. मात्र माघाचा शब्दसंग्रह अफाट आहे, हे मान्य करायला हवे.

काही काही वेळा माघ हा निसर्गवर्णनाच्या बाबतीत मोठी रंगत आणतो. या दृष्टीने शिशुपालवधाचा ११ वा सर्ग वाचनीय आहे. त्यातील पशू, पक्षी, स्त्रिया, सूर्य, उषःकाल, इत्यादींची वर्णने प्रत्ययकारी आणि चेतोहर वाटतात. इतरही अनेक ठिकाणी अलंकार चित्त वेधून घेतात.

प्रभातकाली सूर्य पूर्वक्षितिजावर आल्याचे माघ पुढील श्लोकात (११.४७) अनेक अलंकारांचा संकर करून वर्णन करतो—

उदयशिखरिशृङ्गप्राङ्गणेष्वेव रिङ्गन्
सकमलमुखहासं वीक्षितः पद्मिनीभिः ।
विततमृदुकराग्रः शब्दयन्त्या वयोभिः
परिपतति दिवोऽङ्के हेलया बालसूर्यः ॥

भावार्थ – प्रातःकालचा समय आहे. बालसूर्य हळूहळू उगवत आहे. तो उदय पर्वताच्या शिखरांच्या अंगणात लहान मुलाप्रमाणे केवळ गुडघ्यांवर रांगतो आहे. पद्मिनी (कमलिनीरूपी सुंदर स्त्रिया) आपल्या कमलमुखातून हसत हसत त्याच्या बाललीला पाहत राहिल्या आहेत. बालरवी आपले कोमल हस्त पसरीत पक्ष्यांच्या कलरवाने बोलणाऱ्या आकाशरूपिणी मातेच्या मांडीवर लीलेने येऊन पडत आहे.

पुढील श्लोक (११.४) माघाच्या स्वभावोक्तीचा नमुना म्हणून दाखवता येईल –

प्रहरकमपनीय स्वं निदिद्रासतोच्चैः
प्रतिपदमुपहूतः केनचिज्जागृहीति ।
मुहुरविशदवर्णां निद्रया शून्यशून्यां
ददवपि गिरमन्तर्बुध्यते नो मनुष्यः ॥

भावार्थ – सकाळ झालेली आहे. राजद्वारीचा पहारेकरी आता झोपायला जाऊ इच्छितो. कारण त्याने आपला पहारा पुरा केला आहे. दिवसाचा पहारेकरी अजून झोपलेलाच आहे. रात्रीचा पहारेकरी त्याला वारंवार जागवीत आहे, पण तो निद्रित चाकर झोपेतच त्याला 'उठतो रे!' अशा प्रकारचे उत्तर देतो; पण जागा मात्र होत नाही.

पुढील श्लोकातील (९.६) माघाचे अर्थगौरव त्याच्याविषयी धन्योद्गार काढायला लावते—

प्रतिकूलतामुपगते हि विधौ विफलत्वमेति बहुसाधनता ।
अवलम्बनाय दिनभर्तुरभून्न पतिष्यतः करसहस्रमपि ॥

भावार्थ – जेव्हा दैव प्रतिकूल होते तेव्हा, साधनसंपत्ती भरपूर असली तरी, ती कामी येत नाही. आता हेच उदाहरण पाहा ना! सायंकाळी सूर्य जेव्हा पश्चिम क्षितिजावर घसरतो, तेव्हा त्याचे हजार हात (पक्षी, किरण) त्याला सावरून धरायला समर्थ ठरत नाहीत.

आपल्या दीड हजारांवर श्लोक असलेल्या महाकाव्यात माघाने जागोजाग सुभाषिते आणि नीतिवचने विखरून दिली आहेत. त्यांतील काही अशी –

अनिर्लोडितकार्यस्य वाग्जालं वाग्मिनो वृथा ।
(२.२५)

भावार्थ – विशिष्ट प्रसंगी काय करावे आणि काय करू नये हे ज्याला कळत नाही, अशा नुसत्या वाक्पटूचे शब्दावडंबर फुकट आहे.

बृहत्सहायः कार्यान्तं क्षोदीयानपि गच्छति ।
(२.१००)

भावार्थ – अगदी क्षुल्लक मनुष्यसुद्धा थोरामोठ्यांच्या साहाय्याने हाती घेतलेल्या कार्यात यश मिळवतो.

क्षणे क्षणे यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः ।
(४.१७)

भावार्थ – प्रत्येक क्षणी जे नवनवीन दिसते तेच रमणीय वस्तूचे लक्षण होय.

न क्षमं भवति तत्त्वविचारे मत्सरेण हतसंवृति चेतः ।
(१०.३५)

भावार्थ – एकदा मत्सराने मनाचा पगडा घेतला, की काय बोलावे आणि काय बोलू नये याचा तोल सुटतो. मग खरी स्थिती काय, याचा विचार माणसाला करताच येत नाही.

किमिवाखिललोककीर्तितं कथयत्यात्मगुणं महामनाः ।
वदिता न लघीयसोऽपरः स्वगुणं तेन वदत्यसौ स्वयम् ॥
(१६.३१)

भावार्थ – मोठ्यांची कीर्ती सर्व लोक गात असल्याने त्यांना आत्मगुण स्वतःच्या मुखाने वर्णावे लागत नाहीत; पण सामान्य माणसाला त्याची कीर्ती गाणारा दुसरा कोणी मिळत नसल्याने त्याला आत्मस्तुती स्वतःच्याच मुखाने करावी लागते.

माघाच्या शिशुपालवधापासून पुढे संस्कृत महाकाव्यांचा अपकर्षच सुरू झाला. या संबंधात डॉ. के. ना. वाटवे लिहितात –

माघापासून पुढे महाकाव्यरचना झपाट्याने कृत्रिम होत चालल्याची साक्ष पटते. कालिदासाची भावनोत्कटता, भारवीची विचारप्रवणता, माघाचा पांडित्यपूर्ण कल्पनाविलास व पुढील कवींचे श्लेषादी शब्दप्राधान्य अशा या उताराच्या चार पायऱ्या आहेत. माघाने जसे भारवीचे, तसे माघाचेही पुढील कवींनी

अनुकरण केले. हरिविजय या महाकाव्याचा कर्ता रत्नाकर, श्रीकण्ठाभ्युदयाचा कर्ता शिवस्वामी, धर्मशर्माभ्युदयाचा कर्ता हरिश्चंद्र, इ. कवी माघाचे अनुकर्ते होत. दंडी, सुबंधू, बाण, कविराज इत्यादींनी प्रवर्तित केलेली श्लेषमूल वक्रोक्ती पुढील महाकवींनी उपयोजण्यास सुरवात केली. 'द्विसंधान' म्हणजे द्व्यर्थी शब्दयोजना ही एक नवी कल्पना निघाली. तिचा उपयोग धनंजयाचे 'राघव-पांडवीय', हरदत्तसूरीचे 'राघवनैषधीय' व चिदंबराचे 'राघव-पांडव-यादवीय' इत्यादी शब्दप्रधान काव्यांत करण्यात आला आहे. पाहा – माघ. [ सं. का. पं. प्रा.; सं. क. द.; सं. सा. सो. इ. ]

## शिष्टाचार

शिष्टाचार म्हणजे पर्यायाने सदाचार होय. शब्दकल्पद्रुमात शिष्ट शब्दाचे लक्षण दिले आहे, ते असे –

दानं सत्यं तपोऽलोभो विद्येज्या पूजनं दमः ।
अष्टौ यानि चरित्राणि शिष्टाचारस्य लक्षणम् ॥

अर्थ – दान, सत्य, तप, अलोभ, विद्या, यजन, पूजन व इंद्रियदमन ही आठ चरित्रे म्हणजे शिष्टाचार होय.

ज्यांनी धर्मनियमांना अनुसरून सांग वेदाचे अध्ययन केले आहे व तदनुसार जे उपदेश करतात, ते शिष्ट होत, असे मनू म्हणतो (१२.१०८–९). जे मत्सररहित, निरहंकार, स्वतः रांजणभरच धान्याचा साठा ठेवणारे, निर्लोभ व विकाररहित असतील, त्यांना शिष्ट म्हणावे असे बोधायन सांगतो (१.५-६). शिष्ट पुरुष सत्यपरायण असतात. ते आपली बुद्धी संयत राखतात; धर्ममर्यादा पाळतात. शिष्ट बनण्याची कामना करणाऱ्या महापुरुषांना महाभारतात पुढील आदेश दिलेला आहे –

उद्योगी बना. वृद्धांची सेवा करा. ज्ञानवृद्धांकडून कर्तव्य समजून घ्या (म. भा. सौप्तिक २.२२). दिवसा असे काम करा, की रात्री सुखाची झोप येईल. वर्षात आठ महिने असे अंगमेहनतीने काम करा, की पावसाळ्यातील चार महिने सुखाने घालविता येतील. तारुण्यात असे काम करा, की वृद्धावस्थेत स्वानंद भोगता येईल. जीवनभर असे काम करा, की मृत्यूनंतर आत्म्याला सुख आणि सद्‌गती मिळेल (म. भा. उद्योग ३५). मनुष्याचे आचरण सूर्यासारखे प्रकाशमय असले पाहिजे. सूर्य जसा सर्वांना जीवन देतो, त्याप्रमाणेच प्रत्येकाने परोपकार हे श्रेष्ठ कर्तव्य समजावे. जो सर्वांना स्नेहदृष्टीने पाहतो, त्यालाच स्वर्गामध्ये सर्वश्रेष्ठ पद मिळते. जो प्राणिमात्राच्या दुःखनिवारणासाठी सतत प्रयत्न करतो, जो लोकांच्या सुखाने सुखी होतो, दुःखाने दुःखी होतो व सर्वांशी प्रेममय वर्तन करतो, तो खऱ्या अर्थाने शिष्ट होय.

शिष्टाचार हे धर्माचे तिसरे मूळ आहे. शिष्टांना धर्मनिर्णय करण्याचा अधिकार असतो. त्यांनी आपली परिषद भरवून धर्मनिर्णय करावा व इतरांनी त्याप्रमाणे आचरण करावे, असा मनूचा आशय आहे. [ धर्मशास्त्रविचार; न. हिं. घ. ]

## शिष्य

जो गुरूजवळ वेदविद्या शिकण्याची इच्छा करतो, त्याला शिष्य असे म्हणतात. गुरू, गुरुपत्नी व गुरुपुत्र यांची सेवा करणे, गुरूच्या आज्ञेप्रमाणे वागणे, भिक्षा मागून अन्न मिळवणे, जमिनीवर झोपणे, वेदाध्ययन करणे व शेवटी गुरुदक्षिणा देणे, ही शिष्याची कर्तव्ये होत, असे नारदस्मृतीत (८.८-१५) सांगितले आहे. पाहा – छात्र, गुरु-शिष्य. [हिं. घ.]

## शिसोदिया राजवंश

मेवाडवर राज्य करणारा एक वंश. इ. स. च्या ६ व्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंत मेवाडवर गुहिलोत वंशाचे राज्य होते. १२ व्या शतकात त्या वंशाच्या दोन शाखा झाल्या. एकीचे नाव रावळ व दुसरीचे राणा. मूळच्या घराण्यातील रणसिंह किंवा कर्णसिंह याला माहप, राहप व क्षेमसिंह हे तीन पुत्र होते. त्यांतील क्षेमसिंहाला मेवाडचे राज्य मिळाले. त्याची शाखा रावळ या नावाने प्रसिद्ध आहे. माहप याला शिसोदे गावची जहागीर मिळाली. त्याच्या शाखेला राणा हे नाव मिळाले. त्याचे घराणे रावळांचे सामंत म्हणून शिसोदे येथे राज्य करू लागले. तेच घराणे पुढे शिसोदिया या नावाने प्रख्यात झाले.

माहपानंतर राणा शाखेतील राहप, नरपती, दिनकर्ण, जसकर्ण, नागपाल, कर्णपाल, भुवनसिंह, भीमसिंह, जयसिंह व लक्ष्मणसिंह यांनी शिसोदे येथे राज्य केले. रावळ शाखेचा रत्नसिंह मेवाडवर राज्य करीत होता, तेव्हा अलाउद्दीन खिलजीने चितोडवर हल्ला केला. त्या वेळी राणा शाखेचा लक्ष्मणसिंह आपल्या पुत्रांसह चितोडगडावर रत्नसिंहाच्या मदतीला गेला होता. तिथे जो घनघोर रणसंग्राम झाला, त्यात रत्नसिंह, लक्ष्मणसिंह व त्याचे सात पुत्र मरण पावले. रत्नसिंहाबरोबर रावळ शाखेचा अंत झाला. लक्ष्मणसिंहाचा एक पुत्र अजयसिंह मात्र घायाळ होऊन पळून गेल्यामुळे वाचला. तो अरवलीच्या जंगलात लपून राहिला होता. तिथे त्याने अनेक वर्षे हालअपेष्टांत काढली. तो स्वतःला मेवाडचा राणा मानू लागला. अशा प्रकारे मेवाडचे राज्य शिसोदिया वंशाला मिळाले.

लक्ष्मणसिंहाचा एक पुत्र अरिसिंह याने सोंगिर चौहान कुळातील एका राजकन्येशी प्रेमविवाह केला होता व त्याला एक पुत्र झाला होता. अरिसिंह चितोडगडावरील युद्धात मारला गेला, तेव्हा त्याचा पुत्र आपल्या आजोळी होता. अजयसिंहाला

त्याचा ठावठिकाणा कळला आणि तो शूर, धाडसी व बुद्धिमान असल्याचे कळले, तेव्हा त्याने मेवाडचे राज्यपद त्यालाच दिले. अजयसिंहाला क्षेमसिंह व सज्जनसिंह नामक दोन पुत्र होते. ते रुष्ट होऊन दक्षिणेत निघून गेले. त्यांपैकी सज्जनसिंहाच्या वंशात छत्रपती शिवाजीमहाराज जन्मले.

**हंमीर (इ. स. १३१४–१३६४)** – अजयसिंह चितोडगड घेऊ शकला नाही. इ. स. १३१४ च्या सुमारास तो मरण पावला व अरिसिंहाचा पुत्र हंमीर हा मेवाडचा राणा झाला. त्याने चितोडगड सर करण्यासाठी आपले बळ संघटित केले. अलाउद्दिनाचा मुलगा खिजरखान चितोडगडावर राहून मेवाडचा राज्यकारभार पाहत होता. हंमीरच्या सैन्याने सर्वत्र धुमाकूळ घातल्यामुळे तो त्रासून दिल्लीला निघून गेला. मग अलाउद्दिनाने मालदेव चौहान याला चितोडगडावर पाठवले. त्याने तिथे अनेक वर्षे उत्तम कारभार केला.

राणा हंमीर अरवली पर्वतराजीतील खेलवाडा येथून राज्यकारभार करीत होता. त्याने प्रथम मेवाडमधले काही किल्ले जिंकून घेतले. चितोडगड घेणे हा त्याचा प्रमुख उद्देश होता. त्यासाठी त्याने भोवतालच्या प्रदेशात लुटालूट सुरू केली. त्याच्याशी सलोखा व्हावा या हेतूने मालदेवाने आपली कन्या त्याला दिली. हंमीरने तिच्याशी लग्न केले आणि पुढे तिच्या मदतीनेच चितोडगड जिंकून घेतला, असे म्हणतात. ती अविस्मरणीय घटना इ. स. १३२७ च्या सुमारास घडली असावी. चितोडगडावर हंमीरने स्वतःला राजतिलक लावून घेण्याचा समारंभ साजरा केला व महाराणा ही उपाधी घेतली.

चितोडगड हातून गेल्यानंतर मालदेव चौहान याचा पुत्र जैसा हा दिल्लीला गेला व प्रचंड मुसलमानी सेनादलासह त्याने मेवाडवर स्वारी केली. पण हंमीरने सिंगोली गावाजवळ सुलतानाच्या सैन्याचा पराभव केला. महाराणा हंमीरने सुमारे ६४ वर्षे मेवाडवर राज्य केले, असे म्हणतात. त्या दीर्घ राजवटीत त्याने मेवाडचे स्वातंत्र्य प्रस्थापित करून प्रजेला सुखी केले. हंमीरच्या अंतकालाविषयी मतभेद आहेत. तो इ. स. १३६४ मध्ये मृत्यू पावला असे म्हणतात. पण इ. स. १३१४ पासून त्याने ६४ वर्षे राज्य केले असेल, तर त्याचा मृत्यू इ. स. १३७८ मध्ये झाला असला पाहिजे.

**क्षेत्रसिंह (इ. स. १३६४ – १३८२)** – हंमीरनंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र क्षेत्रसिंह मेवाडच्या सिंहासनावर बसला. तोही खूप पराक्रमी असून, त्याने आपल्या राजवटीत मेवाडचे राज्य खूप विस्तारले आणि वैभवही वाढवले. त्याने बुंदीच्या हाडा घराण्याचा पराभव करून बुंदीवर आपली सत्ता स्थापली. त्यानंतर माळव्याचा सुभेदार दिलावरखान घूरी याने मेवाडवर आक्रमण केल्यामुळे क्षेत्रसिंहाला त्याच्याशी युद्ध करावे लागले. त्यात क्षेत्रसिंहाचा विजय झाला. त्यानंतर लवकरच तो मरण पावला.

**लक्ष्मणसिंह (इ. स. १३८२ – १४२०)** – क्षेत्रसिंहानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र लक्ष्मणसिंह किंवा लाखा हा मेवाडचा राणा झाला. प्रथम त्याने वदनोरच्या मेर नामक पहाडी जमातीचे बंड शमवले. त्याच्या राज्यकालात जावर नामक ठिकाणी चांदीची व शिशाची खाण सापडल्यामुळे राज्याचे उत्पन्न खूपच वाढले.

लाखा राणा धार्मिक वृत्तीचा व दानशूर होता. मुस्लिम शासकांनी गया, काशी व प्रयाग येथे यात्रेकरूंवर जबर कर बसवले होते, ते याने बंद करवले व त्यासाठी मुस्लिम शासकांना पुष्कळ द्रव्य दिले. त्याने अनेक मंदिरे निर्माण केली. उदयपूरजवळचा पिछोला तलाव याच्या राजवटीत बांधला गेला.

लाखाजीला चूंडा नामक पुत्र होता. तोच मेवाडचा राणा झाला असता. म्हणून मारवाडचा राठोड राजा चूंडा याने आपली कन्या हंसबाई त्याला देऊ केली. पण लाखाजीने स्वतःच तिच्याशी विवाह करण्याचा निश्चय केला. तिचा पिता वृद्ध लाखा राण्याला आपली कन्या देण्यास तयार नव्हता; कारण चूंडा हा युवराज असल्यामुळे तिच्या मुलाला राज्य मिळाले नसते. म्हणून युवराज चूंडाने सिंहासनावरील आपला हक्क सोडून दिला. हंसबाईचे लाखाजीशी लग्न झाले. तिला जो मुलगा झाला, त्याचे नाव मोकल. तोच लाखाजीनंतर मेवाडचा राणा झाला. हंसबाईचा भाऊ रणमल्ल तिच्याबरोबर मेवाडमध्ये येऊन राहिला. मेवाडच्या राज्यकारभारात त्याचा बराच हात होता, असे दिसते.

**मोकल (इ. स. १४२०–१४३३)** – लाखाजीचा पुत्र चूंडा मोकलशी राजनिष्ठ होता. पण हंसबाईला त्याचा विश्वास वाटेना. तेव्हा चूंडा मेवाड सोडून माळव्यात निघून गेला. मग रणमल्ल सर्व कारभार पाहू लागला.

मोकलही पराक्रमी होता. त्याने बुंदी, सांभर, नागौर, जालोर वगैरे संस्थानांवर चढाई करून ते प्रदेश जिंकले. इ. स. १४३३ मध्ये गुजरातच्या सुलतानाने मेवाडवर आक्रमण केले, तेव्हा राणा मोकल स्वतः त्याला प्रतिकार करण्यासाठी निघाला. पण वाटेत त्याचे क्षेत्रसिंहाच्या दोघा अनौरस पुत्रांशी बिनसले व त्यांनी मोकलचा वध केला.

**कुंभा (इ. स. १४३३–१४६८)** – मोकलच्या मृत्यूमुळे राज्यात अराजक माजले. त्याचा मामा रणमल्ल मारवाडात गेला होता, तो लगेच मोठी सेना घेऊन परत आला आणि त्याने मोकलाचा पुत्र कुंभकर्ण याला गादीवर बसवले. चूंडाचा सख्खा भाऊ रघुदेव मोकलाच्या वेळी राज्यकारभारात मार्गदर्शन करीत असे. तो कुंभालाही मार्गदर्शन करू लागला. रघुदेव अत्यंत

सत्त्वशील, प्रजावत्सल, पराक्रमी व देखणा होता. त्यामुळे सर्व प्रजा त्याला फार मान देत होती. पण रणमल्लाला ते सहन झाले नाही. म्हणून त्याने रघुदेवाचा वध करविला आणि स्वत: राज्याची सर्व सूत्रे हाती घेतली. त्यामुळे प्रजाजन संतापले व अनेक सरदारांनी चूंडाच्या साहाय्याने कट करून रणमल्लाला ठार मारले. त्यानंतर महाराणा कुंभा चुंडाच्या मार्गदर्शनाखाली शासन करू लागला.



महाराणा कुंभा

रणमल्लामुळे राठोड व शिसोदिया या दोन राजवंशांची युती दीर्घकाळ चालू राहिली होती. त्यामुळे राजपूतांची सत्ताही राजस्थानात स्थिर होती. रणमल्लाच्या वधानंतर मात्र त्या दोन घराण्यांमध्ये वैर सुरू झाले व ते अनेक शतके चालू राहिले. राणा कुंभाला एकीकडे मारवाडच्या राठोडांशी व दुसरीकडे माळव्याच्या सुलतानाशी लढावे लागले. दरवर्षी माळव्याची मुस्लिम सेना मेवाडात घुसून लूटालूट करीत होती. राजपूत सेना प्रतिकार करून शत्रूला हुसकावून लावीत होती. माळव्याच्या सुलतानाने आपल्या विजयाचे स्मारक म्हणून मांडू येथे विजयस्तंभ उभारला, तर राणा कुंभानेही इ. स. १४४८ साली चितोडवर कीर्तिस्तंभ उभारला. मारवाडातही राणा कुंभाला विजय प्राप्त झाला आणि राठोडांचा सर्व प्रदेश, राजधानी मंडोरसकट, त्याच्या ताब्यात आला.

त्यानंतर ७–८ वर्षे शांततेत गेली. पण इ. स. १४५६ मध्ये राणा कुंभाला नागौरचा राजा व गुजरातचा सुलतान यांच्याशी लढावे लागले. त्या लढाईत कुंभाने सुलतानाचा पराभव केला.

त्यानंतर माळव्याचा सुलतान महमूद खलजी व गुजरातचा सुलतान कुतुबुद्दीन यांनी तह करून मेवाडविरुद्ध फळी उभी केली. मारवाडचा जोधा राठोड हासुद्धा त्यांना सामील झाला. त्याप्रमाणे दोन्ही सुलतानांनी मेवाडवर दोन्ही बाजूंनी आक्रमण केले. पण त्यात त्यांना यश मिळाले नाही. राणा कुंभाने दोघांनाही मागे हटवले.

त्याच वेळी राणा कुंभाचा भाऊ क्षेमसिंह यानेही त्याच्या विरुद्ध कपटकारस्थाने सुरू केली होती. त्याचाही कुंभाने बंदोबस्त केला.

राणा कुंभा हा मध्ययुगातला एक महान राजा होता. त्याला शत्रूंशी व स्वबांधवांशी दीर्घकाल संघर्ष करावा लागला आणि त्यात तो विजयी झाला. तो केवळ शूर होता एवढेच नव्हे; तर विद्या व कला यांचा पुरस्कर्ताही होता. (कुंभराणा पाहा)

महाराणा कुंभाला शेवटी उन्माद रोग झाला. त्या स्थितीतच त्याचा राज्यलोभी ज्येष्ठ पुत्र उदयसिंह याने स्वत: त्याचा वध केला व राज्य बळकावले. पण कुंभाचे सरदार – सामंत उदयसिंहाच्या विरुद्ध होते. उदयसिंहाने सुमारे ४ वर्षे राज्य केले. मग त्याचा धाकटा भाऊ रायमल्ल याला सर्व सरदारांनी राज्यपद दिले. तेव्हा उदयसिंह पळून गेला.

**रायमल्ल** (इ. स. १४७३–१५०९) – उदयसिंहाच्या राजवटीत जी अंदाधुंदी माजली होती, ती याला निस्तरावी लागली. कुंभराण्याचा धाकटा भाऊ क्षेमसिंह याने गादीसाठी उठाव केला. पण रायमल्लाने त्याचा पराभव केला. या लढाईत क्षेमसिंह मारला गेला. माळव्याचा सुलतान घियासुद्दीन खलजी याने मेवाडवर स्वारी केली. तो चितोडपर्यंत मोठे सैन्य घेऊन आला होता, पण रायमल्लाने त्याचा पराभव केला. मेवाडमधील काही आदिवासी जमातींनीही बंड केले. पण रायमल्लाने त्यांचाही त्वरित बंदोबस्त केला.

माळव्याच्या सुलतानाने आपला सरदार जफरखान याला पुन्हा मेवाडवर पाठवले. तो मंडलगडापर्यंत पोचला. पण तिथेच

रायमल्लाने त्याचा पराभव केला आणि त्याचा पाठलाग करून माळव्यावर स्वारी केली. खैरावादच्या जंगलात घनघोर युद्ध झाले व त्यात शत्रूचा पूर्ण नाश झाला.

रायमल्लाला १३ पुत्र होते. त्यांतील पृथ्वीराज, जयमल्ल व संग्रामसिंह हे पहिले तिघे होते. वास्तविक पृथ्वीराज ज्येष्ठ पुत्र व मेवाडचा युवराज होता. पण एका चारणीने संग्रामसिंह राजा होईल असे भाकीत केल्यामुळे पृथ्वीराज व जयमल्ल यांनी संग्रामसिंहावर हल्ला केला. तो घायाळ झाला व पळून गेला. त्यामुळे वाचला. मग त्याने काही वर्षे अज्ञातवासात काढली. पृथ्वीराज पराक्रमी व कर्तबगार होता. तो रायमल्लाला राज्यकारभारात व युद्धात साहाय्य करीत होता. पण त्याच्या वहिणीचा पती सिरोहीचा अधिपती याच्याशी त्याचा कलह झाला व त्याने पृथ्वीराजाला विषप्रयोग करून ठार मारले. जयमल्लही एका लढाईत मारला गेला. त्यामुळे रायमल्ल दुःखाने वेडा होऊन मरण पावला. तेव्हा संग्रामसिंहाला राज्यपद मिळाले.

**संग्रामसिंह** (इ. स. १५०९–१५२७) – हा राणा सांगा या नावाने प्रसिद्ध आहे. मेवाडच्या महाराण्यांमध्ये हा सर्वांत श्रेष्ठ गणला जातो. तो शूर योद्धा तसाच बुद्धिमान शासक होता. त्याने दिल्ली, माळवा व गुजरात या तीन्ही सुलतानांचा पराभव केला व मेवाडची सार्वभौम सत्ता प्रस्थापित केली. मोगलवंशाचा संस्थापक बाबर याने आपल्या आत्मचरित्रात त्याची खूप स्तुती केली आहे.

इ. स. १५२६ मध्ये बाबर दिल्लीचा बादशाह झाला. त्याचा व राणा सांगाचा संघर्ष अटळ होता. इ. स. १५२७ साली शिक्रीजवळ खानवा येथे त्यांचा मोठा संग्राम झाला. राजपुतांचे सामर्थ्य प्रचंड असूनही त्यांचा पराभव झाला. जखमी झालेला राणा सांगा जंगलात जाऊन राहिला. बाबराशी पुन्हा युद्ध करण्यासाठी तो सैन्याची जमवाजमव करीत होता. पण ३० जानेवारी १५२८ रोजी तो मृत्यू पावला. (संग्रामसिंह पाहा)

**रत्नसिंह** (१५२८–१५३१) – संग्रामसिंहानंतर त्याचा तिसरा पुत्र रत्नसिंह राणा झाला. मेवाडची शक्ती कमी झाली असेल, या कल्पनेने माळव्याचा सुलतान महंमूद खलजी याने मेवाडवर स्वारी केली. पण रत्नसिंहाने गुजरातचा सुलतान बहादूरशहा याचे साहाय्य घेऊन माळव्यावर प्रतिचढाई केली व सुलतानाचा पराभव केला. बहादूरशहाने तर मांडूवर हल्ला करून सुलतानाला कैद केले व माळवा आपल्या राज्याला जोडला.

राणा सांगाची राणी कर्मवती ही बुंदीच्या हाडा राजपुत घराण्यातील सूरजमलची बहीण होती. ती व तिचे दोन पुत्र विक्रमादित्य व उदयसिंह रणथंभोर किल्ल्यावर राहत. रत्नसिंह व सूरजमल याचे सख्य नव्हते. एकदा शिकारीच्या निमित्ताने ते एकत्र आले व त्यांचे द्वंद्वयुद्ध होऊन त्यात दोघेही मरण पावले.



महाराणा संग्रामसिंह

**विक्रमादित्य** (इ. स. १५३१–१५३६) – रत्नसिंहाला पुत्र नसल्यामुळे त्याचा धाकटा भाऊ विक्रमादित्य गादीवर बसला. तो व्यसनी व नालायक होता. त्यामुळे राज्याचे आधारस्तंभ सरदार–सामंत नाराज झाले आणि राज्याचा बंदोबस्त ढिला झाला. तेव्हा गुजरातचा सुलतान बहादूरशहा याने मेवाडवर स्वारी केली. त्याने रायसेन किल्ला जिंकून घेतल्यावर चितोडगडावर चढाई केली. राजमाता कर्मवतीने माळव्याचा जो भूभाग मेवाडला जोडलेला होता, तो बहादूरशहाला देऊन तह केला. तथापि त्याला चितोड सर करून मेवाड जिंकण्याची महत्त्वाकांक्षा होती. म्हणून त्याने इ. स. १५३४ साली पुन्हा स्वारी केली. कर्मवतीने सर्व राजपूत सरदारांना देशभक्तीचे आवाहन केल्यामुळे ते चितोडच्या रक्षणासाठी सैन्य घेऊन आले. कर्मवतीने गुहिलोत घराण्यातील वाघसिंहाला तात्पुरते राज्यपद देऊन चितोडच्या रक्षणाची सिद्धता केली. विक्रमादित्य व उदयसिंह बुंदीला जाऊन राहिले. पण सर्व प्रयत्न निष्फळ होऊन

बहादूरशहाने चितोड जिंकला. कर्मवतीने हुमायूं बादशहाला मदतीला बोलावले होते, पण तो वेळेवर येऊन पोचला नाही. तेव्हा गडावरील राजपूत स्त्रियांनी जोहार केला आणि राजपूत वीरांनी रणांगणावर लढतालढता मरण पत्करले.

लवकरच हुमायूं चितोडवर चढाई करण्यासाठी आला. तेव्हा बहादूरशहा त्याला प्रतिकार करण्यासाठी निघाला. मंदसौर येथे युद्ध होऊन बहादूरशहाचा पराभव झाला व तो मांडूकडे पळाला. हुमायूंने त्याचा पाठलाग केला. इकडे राजपूत सरदारांनी चितोडवर हल्ला करून तो परत घेतला आणि विक्रमादित्य व उदयसिंह यांना परत आणले. तथापि विक्रमादित्याचे दुराचरण चालू राहिल्यामुळे सर्व सरदार नाराज झाले. पुढे इ. स. १५३६ मध्ये बनवीर नामक एका दासीपुत्राने विक्रमादित्याचा वध केला व स्वतःच गादी बळकावली. त्याने उदयसिंहालाही मारण्याचा प्रयत्न केला; पण पन्ना नामक दासीने त्याला वाचवले व कुंभलगडावर सुरक्षित पोचवले. पुढे सरदारांनी चितोडवर चढाई करून बनवीरला हाकलून दिले व उदयसिंहाला गादीवर बसवले.

उदयसिंह (इ. स. १५४०–१५७२) – याने दीर्घ काल राज्य केले. पण त्याच्या अंगी कर्तबगारी नव्हती. तो विलासी होता. मेवाडचे वैभव वाढण्यासाठी त्याने काही केले नाही. इ. स. १५६७ साली अकबर बादशहाने चितोडवर स्वारी केली, तेव्हा महाराणा उदयसिंह जंगलात पळून गेला. पण असंख्य राजपूत वीर पुरुष शर्थीने लढून रणांगणावर पडले. त्याचप्रमाणे गडावरील स्त्रियांनी जोहार केला. मगच अकबराला गड जिंकता आला (इ. स. १५६८). पुढच्या वर्षी त्याने रणथंभोरचा किल्लाही घेतला.

त्यानंतर उदयसिंह कुंभलगडावर राहू लागला. त्यापूर्वी त्याने उदयपूर नगर वसविले होते, पण ते पुरे झाले नव्हते. नंतर तेच मेवाडची राजधानी झाली. इ. स. १५७२ मध्ये उदयसिंह मरण पावला. त्याला वीस राण्या, पंचवीस पुत्र व वीस कन्या होत्या. मृत्युसमयी त्याने जगमल नावाच्या नवव्या पुत्राला युवराज नेमले, कारण तो त्याच्या आवडत्या राणीचा पुत्र होता. पण तो नालायक असल्यामुळे राजपूत सरदारांनी त्याला गादीवर बसू दिले नाही. ज्येष्ठ पुत्र प्रतापसिंह यालाच त्यांनी राज्यपद दिले.

प्रतापसिंह (इ. स. १५७२–१५९७) – राणाप्रताप कुंभलगडावरून मेवाडचे शासन करू लागला. पण मेवाडचा बहुतेक भाग व बरेच किल्ले मोगलांच्या ताब्यात होते. राजस्थानातील बहुतेक सर्व राजपूत राजांनी अकबराशी सलोखा केला होता आणि त्याचे मांडलिकत्व पत्करून आपल्या मुली त्याला दिल्या होत्या. राणाप्रताप हा एकटाच स्वाभिमानाने स्वतंत्रपणे राज्य करीत होता. पण त्याचे सामर्थ्य कमी होते. जे सरदार व सामान्य जन त्याच्याशी एकनिष्ठ होते, त्यांना त्याने मोगलांशी सख्य करणाऱ्या राजपुतांवर बहिष्कार टाकण्याची आज्ञा दिली. राणाप्रतापला जिंकण्यासाठी अकबराने प्रचंड सेनेसह राजा मानसिंहाला पाठवले. पण राणाप्रतापने पहाडी जंगली प्रदेशाचा आश्रय घेऊन मोगल सेनेवर छुपे हल्ले सुरू केले. त्यामुळे हैराण होऊन मानसिंह परत फिरला. हळदीघाटच्या खिंडीत तर प्रतापसिंहाने विलक्षण धाडसाने मानसिंहावर स्वतः हल्ला केला; पण मानसिंह थोडक्यात बचावला.

त्यानंतर अकबराने स्वतः मेवाडवर स्वारी केली. मेवाडमधील अनेक ठिकाणे त्याने जिंकली. पण राणाप्रताप त्याच्या हाती लागला नाही. मग निराश होऊन तो परत गेला. आणि प्रतापने पहाडी जंगलातून बाहेर येऊन सर्व ठिकाणे परत घेतली. त्यानंतर अकबराने अनेक मातबर सरदारांना मेवाडवर पाठवले. बादशाही फौजांनी मेवाड पादाक्रांत केला. पण



महाराणा प्रतापसिंह

राणाप्रताप अजिंक्य राहिला आणि इ. स. १५८४ पर्यंत त्याने चितोडगड व मंगलगड वगळून बहुतेक सर्व मेवाड परत घेतला. त्यानंतर सुमारे १३ वर्षे राणाप्रतापला शांतता लाभली.

कारण अकबराने त्याला जिंकण्याचा नाद सोडून दिला. तथापि चितोडगड परत जिंकून घेणे त्याला शक्य झाले नाही. आणि इ. स. १५९७ साली आतड्याच्या विकाराने आजारी पडून तो मरण पावला. (राणाप्रताप पाहा)

**अमरसिंह** (इ. स. १५९७ ते १६२०) – राणाप्रतापाच्या मागून त्याचा ज्येष्ठ पुत्र अमरसिंह मेवाडचा राणा झाला. तो बापाप्रमाणेच शूर, उदार व न्यायप्रिय होता. तथापि प्रतापसिंहा-प्रमाणे त्याचा स्वाभिमान शेवटपर्यंत टिकला नाही. प्रताप-सिंहाच्या मृत्यूनंतर अकबराने सलीमला प्रचंड सेनादलासह मेवाडवर पाठवले. पण अमरसिंह व त्याचे स्वामिनिष्ठ सर-दार यांनी त्याचा पराभव केला. पुढे सलीम दिल्लीचा बादशहा झाल्यावर त्याने मेवाडवर अनेक स्वाऱ्या केल्या, पण त्याला यश आले नाही. मग त्याने अमरसिंहाचा भाऊ सागर याला मेवाडचा राणा म्हणून चितोडच्या गादीवर बसवले. पण एकही राजपूत सरदार या भेदनीतीला बळी पडून सागरसिंहाला मिळाला नाही. शेवटी सागरने चितोडचा किल्ला अमरसिंहाच्या स्वाधीन केला व स्वतः जंगलाचा आश्रय घेतला.

जहांगीरने मेवाडवर सतरा स्वाऱ्या केल्या; त्यांत त्याला अपयश आले, तरी तो हताश झाला नाही. शेवटी त्याने राजपुत्र खुर्रम (शहाजहान) याला प्रचंड सेनेसह मेवाडवर पाठविले. तोपर्यंत मेवाडचे मनुष्यबळ व द्रव्यबळ खूपच कमी झाले होते. अमरसिंहाने कसेबसे सैन्य जमवून प्रतिकार केला. पण त्याचा दारुण पराभव झाला. मग सरदारांचा पोक्तपणाचा सल्ला मानून त्याने बादशहाशी तह केला. त्याच्या अटी अशा होत्या– (१) अमरसिंहाने आपल्या ज्येष्ठ पुत्राला मोगल दरबारात पाठवावे. (२) एक हजार राजपूत स्वार शाही सैन्यात चाकरीला ठेवावे व (३) चितोडगडाची डागडुजी करू नये. अमरसिंहाने या अटी मान्य केल्यामुळे मेवाडचे स्वातंत्र्य संपले. युवराज कर्णसिंह शाहजादा खुर्रमबरोबर बादशहाला भेटायला अजमीरला गेला. तिथे बादशहाने त्याला पाच हजारी मनसब बहाल केली.

हा तह सन्मानपूर्वक झाला असला तरी अमरसिंहाला त्याचे अत्यंत दुःख झाले व कर्णसिंहावर सारा कारभार सोपवून तो उदयपूरच्या राजवाड्यात एकांतात जाऊन राहिला. तिथेच इ. स. १६२० मध्ये त्याचा अंत झाला.

**कर्णसिंह** (इ. स. १६२०–१६२८) –अमरसिंहाचा ज्येष्ठ पुत्र त्यानंतर गादीवर बसला. त्याची राजवट शांततामय झाली. त्या कालावधीत उद्ध्वस्त झालेल्या मेवाडचा बराच भाग त्याने पुन्हा उभा केला.

शाहजादा खुर्रमने जेव्हा जहांगीरविरुद्ध बंड केले तेव्हा तो उदयपूरला गेला. कर्णसिंहाने आपला धाकटा भाऊ भीमसिंह याला सेनेसह त्याच्या मदतीला पाठविले. तो खुर्रमचा शत्रू पर्वेज याच्याशी लढताना इ. स. १६२४ मध्ये मारला गेला. इ. स. १६२८ मध्ये कर्णसिंह मरण पावला.

**जगतसिंह** (पहिला, इ. स. १६२८–५२) – कर्णसिंहानंतर त्याचा पुत्र जगतसिंह गादीवर बसला. त्याच्या कारकिर्दीत बासवाडा, डोंगरपूर, देवलिया व सिरोही येथील सामंतांनी उठाव केला. पण जगतसिंहाने सर्वांचा बंदोबस्त केला. त्यामुळे शहाजहान त्याच्यावर नाराज झाला होता. पण जगतसिंहाने त्याला मोठा नजराणा पाठवून खूष केले.

पुढे जगतसिंहाने तहातील शर्तीविरुद्ध चितोडगडाची डाग-डुजी सुरू केली. पण ती पूर्ण व्हायच्या आधीच तो इ. स. १६५२ साली मरण पावला. हा महाराणा दानशूर होता. त्याने अनेक मंदिरे, प्रासाद व तलाव निर्माण केले.

**राजसिंह** (पहिला, इ. स. १६५२–१६८०) – जगतसिंहानंतर त्याचा पुत्र राजसिंह गादीवर बसला. त्याने चितोडगडची डाग-डुजी चालू ठेवल्यामुळे शहाजहान बादशाहाने त्याच्यावर मोठी सेना पाठविली. पण राजसिंहाने लढाई न करता बादशाहाची क्षमा मागितली व केलेले बांधकाम पाडून टाकले. बादशाहाने अजमीरजवळचा मेवाडचा काही भागही घेतला. त्यामुळे राज-सिंह संतापला होता. पुढे शहाजहान बादशाहा आजारी पडला व त्याचे चारही पुत्र आपसात लढू लागले, ती संधी साधून राजसिंहाने बरीच ठिकाणे परत जिंकून घेतली. पुढे औरंगजेब तख्तावर बसला, तेव्हा त्याने राजसिंह व त्याचा पुत्र सुलतान-सिंह यांचा हत्ती, घोडे व जडजवाहिर पाठवून सन्मान केला आणि बदनोर, डोंगरपूर, बांसवाडा, इ. प्रदेश त्यांना परत केले.

परंतु राजसिंह व औरंगजेब यांचे सख्य टिकले नाही. कारण औरंगजेब हिंदू धर्माचा कडवा शत्रू, तर राजसिंह तितकाच अभिमानी. औरंगजेबाने हिंदूंवर जिझिया कर लादला, त्याला राजसिंहाने खूप विरोध केला. किशनगडचा राजा मानसिंह राठोड याची रूपवती बहीण चारुमती हिचा औरंगजेबाशी विवाह ठरला होता. पण तिने राजसिंहाला पत्र लिहून त्याला वरल्याचे कळविले. तेव्हा राजसिंहाने इ. स. १६६० मध्ये सेना-दलासह किशनगडला जाऊन तिच्याशी विवाह केला व तिला चितोडगडावर आणले. त्यामुळे बादशाहा फार संतापला.

इ. स. १६६२ मध्ये मेवाडच्या दक्षिण भागातील मीना जमातीने उठाव केला, तो राजसिंहाने मोडून काढला. इ. स. १६७८ मध्ये जोधपूरचा महाराणा जसवंतसिंह राठोड हा काबूल-मध्ये मरण पावला, तेव्हा त्याच्या राण्या दुर्गादास राठोड नामक सरदाराबरोबर जोधपूरला परत निघाल्या. बाटेत एक राणी

प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. त्याचे नाव अजितसिंह होय. बादशाहाने जोधपूरचे राज्य खालसा केले व राजपुत्राला (अजितसिंह) दिल्लीला पाठवण्याचा हुकूम काढला. पण दुर्गादासाने तो जुमानला नाही. राजपुत्र अजितसिंहाला घेऊन तो व इतर सरदार मारवाडातील पहाडी जंगलात जाऊन लपले. त्यांच्या संरक्षणात राजसिंह शिसोदियाने बरेच साहाय्य केले. हे कळताच औरंगजेब मोठी फौज घेऊन अजमीरला आला. तेव्हा राजसिंह आपल्या सैन्यासह पहाडी प्रदेशात जाऊन राहिला. बादशाहाने मग उदयपूर घेतले, तिथली मंदिरे पाडली व शाहजादा अकबर याला तिथे ठेवून तो परत फिरला. पाठोपाठ राजपूत सेनेने डोंगरी भागातून बाहेर पडून मुसलमानी सैन्यावर हल्ले केले. औरंगजेबाने पुन्हा मोठी सेना मेवाडवर पाठवली. पण राजपुतांनी छुपे हल्ले करून तिला हैराण केले. इतक्यात इ. स. १६८० मध्ये राजसिंह मरण पावला. तो अत्यंत धाडसी, रणकुशल असून, वृत्तीने धार्मिक व दानशूर होता. तो कवी व विद्वान यांचा आश्रयदाता होता. त्याने अनेक मंदिरे व तलाव निर्माण केले. शिसोदिया वंशातला हा शेवटचा थोर महाराणा होय.

जयसिंह (इ.स. १६८०–९८) – राजसिंहाच्या नंतर त्याचा पुत्र जयसिंह मेवाडचा महाराणा झाला. त्या वेळी बादशाही सेनादले मेवाडमध्ये सर्वत्र होती. त्याने मोगलांशी युद्ध चालू ठेवले व शाहजादा अकबराला बादशाहा बनवण्याचे आश्वासन देऊन वश केले. अकबराने इ. स. १६८१ मध्ये स्वतःला दिल्लीचा बादशाहा म्हणून घोषित केले. औरंगजेबाने त्याला खोटे पत्र पाठवून त्याच्यात व त्याचा पाठिराख्यांत फूट पाडली. पण ते कपट लवकरच उघड झाले. मग महाराणा जयसिंह याने मांडलगडावर चढाई करून तो घेतला. या घटनांमुळे बादशाहाला चिंता वाटू लागली. तिकडे दक्षिणेत मराठ्यांचा जोर वाढला होता. इकडे अकबर विरुद्ध गेला होता. म्हणून बादशाहाने महाराणा जयसिंहाशी तह केला. त्यानुसार बादशाहाने आपली सेना मेवाडमधून काढून घ्यावी, जयसिंहाने जिझिया कराबद्दल बादशहाला काही प्रदेश द्यावा आणि राणा राठोड याला मदत करू नये, असे ठरले. मग बादशाहा दक्षिणेत निघून गेला व तिकडेच राहिला. जयसिंहाने त्यानंतर दीर्घ काल राज्य केले आणि मंदिरे व तलाव बांधले. पण तो विशेष कर्तबगार नव्हता. मेवाडचे वैभव वाढवण्यासाठी त्याने विशेष काही केले नाही. कारकिर्दीच्या अखेरीस त्याचा पुत्र अमरसिंह याने बंडाळी केली. पण दुर्गादास वगैरे सरदारांनी त्याला ३ लाखांची जहागीर देऊन शांत केले. जयसिंह इ. स. १६९८ मध्ये मरण पावला व त्याचा पुत्र अमरसिंह गादीवर बसला.

अमरसिंह (दुसरा, इ. स. १६९८–१७१०) – त्याने बहुतेक सर्व मेवाडवर आपली सत्ता प्रस्थापित केली. औरंगजेब इ. स. १७०७ मध्ये मरण पावल्यानंतर शाहजादा आजम व मुअज्जम यांच्यांत लढाई झाली. अमरसिंहाने मुअज्जमचा पक्ष घेतला. तोच विजयी होऊन दिल्लीच्या तख्तावर बसला.

अमरसिंहाने राज्यव्यवस्थेत अनेक सुधारणा केल्या व सरदारांच्या जहागिरींसाठी नियम तयार केले. तो इ. स. १७१० साली मरण पावला. त्याला एकच पुत्र होता. त्याचे नाव संग्रामसिंह असे होते. बापानंतर तोच गादीवर बसला.

संग्रामसिंह (दुसरा, इ. स. १७१०–३४) – त्या काळी मोगल बादशाहीची स्थिती दुर्बल झाली असूनही मेवाडची सत्ता सार्वभौम नव्हती. सय्यद बंधूंच्या हाती दिल्लीची सत्ता होती. त्यांनी राजपुतांना खूप करण्यासाठी जिझिया कर उठवला. रामपुरा परगणा अकबर बादशाहाच्या वेळेपासून मेवाडमधून वेगळा झाला होता, तो संग्रामसिंहाने परत घेतला. बादशाहा फर्रुकसियरने त्याला मान्यता दिली.

दुर्गादास राठोड जोधपूरला महाराजा अजीतसिंह याच्या जवळ होता आणि तोच मारवाडचा आधारस्तंभ होता. पण इतर मत्सरी सरदारांनी अजीतसिंहाला त्याच्याविषयी खोटेनाटे सांगून द्वेष उत्पन्न केला. मग अजीतसिंहाने त्याला हद्दपार केले. तेव्हा तो महाराणा संग्रामसिंहाकडे आला. संग्रामसिंहाने त्याला रामपुरा परगण्यावर नेमले व विजयपूरची जहागीरही दिली.

संग्रामसिंहाने मराठ्यांशी सख्य केले होते. छत्रपती शाहू मेवाडच्या वंशातलेच असल्यामुळे संग्रामसिंहाला मान देत होते.

संग्रामसिंहाने अनेक मंदिरे बांधली. तो दानशूर असून, अनेक विद्वान ब्राह्मणांना त्याने गावे जहागीर दिली. संग्रामसिंह महत्त्वाकांक्षी नव्हता. त्याने राज्यविस्तार केला नाही. मात्र त्याने उत्तम राज्यव्यवस्था करून शेती, व्यापार व उद्योगधंदे यांना उत्तेजन दिले. धार्मिक व सामाजिक दृष्टीने राजस्थानात त्याला फार मान दिला जातो. त्याच्या प्रजाहितदक्षपणाचे श्रेय त्याचा प्रधान मंत्री बिहारीदास पांचोली याला दिले जाते. त्या काळातले सर्व मुत्सद्दी त्याला मान देत होते. संग्रामसिंहाच्या न्यायनिष्ठुरतेच्या व गुणगौरवाच्या अनेक आख्यायिका राजस्थानात प्रचलित आहेत.

जगतसिंह (दुसरा. इ. स. १७३४ – १७५१) – संग्रामसिंहानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र जगतसिंह गादीवर बसला. याच्या कारकिर्दीतली पहिली महत्त्वाची घटना म्हणजे राजस्थानातील प्रमुख राजांचा मैत्रीचा तह ही होय. सर्वांनी मिळून शत्रूला प्रतिकार करावा, असे त्यात ठरले. पण तो तह कोणीही पाळला नाही. कारण प्रत्येकाचा स्वार्थ वेगळा होता. संकुचित कुलाभिमान, परस्परांचा द्वेष व असूया यांमुळे त्यांच्या मनातली

राष्ट्रीय भावना उपजतच नष्ट झाली आणि तह बारगळला.

त्यानंतर लवकरच बाजीराव पेशवा माळव्यातून मेवाडमध्ये गेला. त्याला महाराणा जगतसिंहाने वार्षिक खंडणी दीड लाखाची देण्याचे मान्य केले. आमेरचा सवाई जयसिंह मरण पावल्यावर तिथे भाऊबंदकी सुरू झाली. त्या भांडणात जगतसिंहाने माधवसिंहाची बाजू घेतली. होळकरांनीही त्याला मदत केली व शेवटी माधवसिंहाला जयपूरची गादी मिळाली.

जगतसिंह ऐषआरामात राहिल्यामुळे त्याचा राज्यकारभार ढिला झाला. सरदार लोकही मन मानेल तसा धुमाकूळ घालू लागले. इ. स. १७५१ मध्ये जगतसिंह मरण पावला व त्याचा पुत्र प्रतापसिंह (दुसरा) गादीवर बसला. त्याने तीनच वर्षे राज्य केले. त्याच्या नंतर त्याचा पुत्र राजसिंह (दुसरा) याने सात वर्षे राज्य केले. त्याच्या कारकिर्दीत मराठ्यांनी मेवाडवर अनेक स्वाऱ्या करून अमाप खंडणी वसूल केली.

राजसिंह इ. स. १७६१ मध्ये मरण पावला. त्याला पुत्र नसल्यामुळे त्याचा चुलता जगतसिंह (दुसरा) याचा पुत्र अरिसिंह हा गादीवर बसला. त्याच्या अंगी कर्तबगारी नव्हती. आणि तो सरदारांचा मानही राखीत नव्हता. त्यामुळे ते विथरले. कर्तबगार प्रधान अमरचंद याला त्याने काढून टाकले. काही राजनिष्ठ सरदारांनाही त्याने कपटाने ठार मारले. इतक्यात राजसिंहाची विधवा गरोदर राणी प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. त्याचे नाव रतनसिंह होय. सरदारांनी त्याला कुंभलगडावर ठेवून तोच मेवाडचा स्वामी असे जाहीर केले.

अरिसिंहाने सिंध व गुजरातमधील मुसलमानांना आपल्या सैन्यात भरती केले. तेव्हा रतनसिंहाच्या सरदारांनी शिंद्यांना १० लक्ष रुपये देऊन त्यांची मदत घेतली. अरिसिंहानेही काही मराठे सरदारांना मदतीला बोलावले; पण शिंद्यांनी त्यांचा पराभव केला व उदयपूरला वेढा घातला. त्याच वेळी मुसलमान शिपायांनीही पगारासाठी त्याच्या महालास वेढा घातला. अशा कठीण अवस्थेत त्याने अमरचंदाला मदतीला बोलावले. अमरचंदाने शिकस्त करून बरेच द्रव्य जमा केले, शिपायांना पगार दिला व शिंद्यांना मोठी खंडणी देऊन परतवले. बुंदीचा राव अजितसिंह हाडा याचे अरिसिंहाशी वैर होते. इ. स. १७७३ साली त्याने शिकारीच्या निमित्ताने अरिसिंहाला जंगलात नेऊन ठार मारले.

त्यानंतर अरिसिंहाचा पुत्र हंमीरसिंह (दुसरा) याने पाच वर्षे राज्य केले. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा धाकटा भाऊ भीमसिंह याने इ. स. १७७८ पासून १८२८ पर्यंत राज्य केले. या कालावधीत गृहकलह, सरदारांची बेबंदशाही आणि शिंदे व होळकर यांच्या स्वाऱ्या यामुळे मेवाडची धूळधाण झाली. पुढे शिंदे व होळकर यांचे इंग्रजांशी युद्ध सुरू झाले. त्यातही मेवाडवर अनेक धाडी आल्या.

भीमसिंहाची कन्या कृष्णाकुमारी हिच्यासाठी जोधपूर व जयपूर या राज्यांचे राजे झगडत होते. ते टाळण्यासाठी व मेवाडवरील आपत्ती दूर करण्यासाठी भीमसिंहाने कन्येला विष देऊन मारून टाकले. त्याच सुमारास अमीरखां पेंढारी यानेही मेवाडात खूप लुटालूट केली व खंडणी घेतली.

अशा प्रकारे मेवाडची दुर्दशा झाली असतानाच इ. स. १८१८ मध्ये पेशवाई बुडाली आणि मग मेवाडचा राणाही स्वखुशीने इंग्रजांचा मांडलिक झाला.

अशा प्रकारे या शिसोदिया वंशाने सुमारे ५०० वर्षे मेवाडवर राज्य केले. त्यांतील सुमारे ३०० वर्षे मेवाड स्वतंत्र होता. बाप्पा रावळपासून सुरू झालेली पराक्रमी वीरांची परंपरा मेवाडात ८०० वर्षे चालू राहिली. त्यांनी मुस्लिम सत्तेला प्रखर प्रतिकार केल्यामुळेच भारतात हिंदूंचा सर्वनाश झाला नाही. राजपुतांच्या या असामान्य कर्तबगारीचे श्रेय मुख्यतः शिसोदिया वंशाला द्यायला हवे. पाहा – कुंभराणा, गुहिलोत राजवंश, राणाप्रताप, संग्रामसिंह, हंमीर. [ हि. क. इं. पी. ५ व ६; रा. रा. उ. न्हा.; राजपुतानेका इतिहास १, श्री. गहलोत]

**शिक्षण** व्यक्तीच्या बौद्धिक, मानसिक व सांस्कृतिक विकासाला कारण होणारे जे ज्ञान, ते शिक्षण होय, अशी शिक्षण शब्दाची व्यापक अर्थाने व्याख्या करता येईल. एखादी व्यक्ती विद्यार्थिदशेत गुरूकडून जे ज्ञान मिळवते, ते शिक्षण होय, अशी शिक्षणाची संकुचित अर्थाने व्याख्या होईल. तसे पाहिले तर माणूस हा जन्मभर शिक्षण घेतच असतो. वाढत्या वयाबरोबर येणाऱ्या अनुभवातून आणि आजूबाजूला घडणाऱ्या घटनांच्या निरीक्षणाने, तसेच ग्रंथ व वृत्तपत्रे वाचून माणसाच्या ज्ञानात सतत भर पडत असते. शिक्षणामुळे माणसाला जीवनात यशस्वी वाटचाल करता येते. एक माणूस दुसऱ्या माणसापेक्षा श्रेष्ठ ठरतो तो त्याला त्याच्यापेक्षा एखादा अवयव जास्त असतो म्हणून नव्हे; तर त्याचे मन आणि बुद्धी ही शिक्षणाने प्रगत व विकसित झालेली असतात, म्हणून होय.

प्राचीन भारतीय लोकांनी त्यांच्या कालाला अनुसरून शिक्षणाचे काही उद्देश मानलेले आहेत. विद्यार्थ्यांच्या मनात चारित्र्यपावित्र्य आणि धार्मिकता यांची भावना निर्माण करणे, त्यांना संवर्धन करणे, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास करणे, त्यांना सामाजिक जबाबदारीची आणि कर्तव्यांची जाणीव करून देणे, तसेच राष्ट्रीय संस्कृतीची वृद्धी व प्रसार करणे, हे शिक्षणाचे मुख्य उद्देश प्राचीन आचार्यांनी मानले आहेत.

शिक्षणविधी – ज्या विशिष्ट पद्धतीने शिक्षक विद्यार्थ्यांना ज्ञानप्रदान करतात, त्या पद्धतीला शिक्षणविधी असे म्हणतात. शिक्षणविधीमध्ये अनेक अध्यापनपद्धती येतात, हे खरे असले तरी सामान्यपणे पाठ्यविषय शिकवण्याच्या दोन पद्धती आहेत. एका पद्धतीत विद्यार्थ्यांना प्रथम एखादा सामान्य सिद्धान्त सांगायचा आणि मग त्याच्या पुष्टीसाठी अनेक उदाहरणे द्यायची. दुसऱ्या पद्धतीत प्रथम अनेक उदाहरणे सांगून विद्यार्थ्यांना त्यांच्या आधारे सामान्य नियम शोधून काढायला सांगावे असते. पहिल्या पद्धतीला निगमनात्मक आणि दुसऱ्या पद्धतीला आगमनात्मक पद्धती असे म्हणतात. आणखी एक पद्धती अशी, की प्रथम पाठ्यवस्तूच्या एकेका अंगाचे ज्ञान करून देऊन मग पूर्ण वस्तूचे ज्ञान घडवायचे. या पद्धतीला संश्लेषणात्मक विधी असे म्हणतात. प्रथम अंगीचे ज्ञान करून देऊन नंतर त्याच्या एकेका अंगाचे ज्ञान करवून देणे या पद्धतीला विश्लेषणात्मक पद्धती म्हणतात.

शिक्षणाचे एक प्रसिद्ध सूत्र आहे, ते म्हणजे मूर्ताकडून अमूर्ताकडे जाणे. वास्तविक माणसाला बाह्य विश्वाचे ज्ञान त्याच्या ज्ञानेंद्रियांच्या द्वारे होते. पंच ज्ञानेंद्रियांत नेत्रेंद्रिय हे प्रमुख आहे. एखाद्या वस्तूवर दृष्टी पडताच मनुष्याला त्या वस्तूचा स्थूल परिचय होतो. म्हणजे मूर्त वस्तू ही ज्ञान मिळवून देण्याचे सरल साधन आहे, असे समजले जाते. म्हणून लहान मुलांच्या शिक्षणाचा प्रारंभ करताना त्यांच्यापुढे वस्तू टाकतात आणि त्याच्या आधारे त्या त्या विषयाचे ज्ञान घडवतात. या शाळात पुष्कळदा अमूर्तालाही मूर्त बनविण्याचा प्रयत्न केला जातो. ३+२ = ५ हे उदाहरण समजून देण्यासाठी विद्यार्थ्यांपुढे तीन गोटचा ठेवतात. त्या मुलांना मोजायला लावतात. नंतर त्यांत दोन गोटचा आणखी मिसळतात. आणि त्याही मुलाला मोजायला सांगतात. मुलाने पाच आकडा उच्चारताच त्याला समजावतात, की तीन वस्तूंत दोन वस्तू मिळविल्यावर त्या दोहोंची बेरीज पाच होते.

उपनिषदांत ज्ञानदानाच्या किंवा जिज्ञासूच्या मनावर प्रतिपाद्य विषय बिंबविण्याच्या अशा अनेक पद्धती आढळून येतात. त्यांतल्या काही अशा—

उपमा किंवा रूपक पद्धती – जग हे अत्यंत विशाल आहे त्याची कल्पना देण्यासाठी श्वेताश्वतर उपनिषदाच्या कर्त्याने या पद्धतीचा अवलंब केला आहे. तो सांगतो – हे विश्व म्हणजे एक मोठा सागर आहे. त्याला पंचेंद्रियरूपी पाच नद्या येऊन मिळतात. पंचमहाभूतात्मक पाच झऱ्यांच्या योगाने त्याला विक्राळ व भयानक स्वरूप प्राप्त होते. पंचप्राण या विश्वरूपी सागरावरच्या लाटा आहेत. अंतःकरणपंचक हा त्याचा उगम आहे. शब्दस्पर्शादी विषय हे त्यावरील भोवरे आहेत. जन्म, शैशव, तारुण्य, वार्धक्य व मृत्यू या त्या विश्वसागराच्या भरतीच्या पाच वेळा आहेत.

अशा प्रकारच्या या समुद्र-रूपकाच्या द्वारे उपनिषत्काराने विश्वाच्या अंतर्बाह्य स्वरूपाचे दिग्दर्शन केले आहे. इथेही लहानाकडून मोठ्याकडे किंवा मूर्ताकडून अमूर्ताकडे जाण्याचा प्रयत्न केलेला आहे.

दंतकथात्मक पद्धती – दंतकथेच्या द्वारे ज्ञान देणे, ही पद्धत उपनिषद्कारांनी अवलंबली आहे. केनोपनिषदात लीनतेचे महत्त्व प्रतिपादण्यासाठी इंद्र व अप्सरा यांची गोष्ट सांगितली आहे. अंतःकरणात नम्रता उत्पन्न झाल्यावाचून ब्रह्मप्राप्ती होत नाही, हे या गोष्टीच्या रूपाने शिकवायचे होते.

सादृश्य पद्धती – याज्ञवल्क्याने आत्म्याच्या अस्तित्वाचे ज्ञान कसे होते, त्याचे विवेचन करताना, त्या ज्ञानाचे, दुंदुभी, शंख, वीणा यांच्या आवाजावरून त्यांचे जे ज्ञान होते, त्यांच्याशी सादृश्य दाखविले आहे. जीवात्मा व परमात्मा यांच्यामध्ये अभेद आहे, एकरूपता आहे, हा उपनिषदांतला एक प्रमुख सिद्धान्त आहे. त्याचे ज्ञान करून देण्यासाठी आरुणीने सादृश्याची अनेक उदाहरणे दिली आहेत. मधमाश्यांनी अनेक पुष्पांतून गोळा केलेले भिन्न भिन्न रस मधामध्ये ज्याप्रमाणे एकरूप होतात अथवा सागराला मिळाल्यानंतर सर्व नद्या ज्याप्रमाणे सागरच बनतात अथवा पाण्यात टाकलेले मीठ विरघळल्यानंतर जसा मीठ व पाणी असा त्यांच्यामध्ये भेदभाव राहत नाही, तद्वतच आत्मा व परमात्मा यांच्यामध्ये अभिन्नता व एकरसता असते. इथे तर्कशास्त्र पद्धतीने जी गोष्ट शिकविता येत नाही, ती गोष्ट सादृश्य पद्धतीने मनावर ठसवण्याचा प्रयत्न केला आहे.

संवाद पद्धती – ही शिक्षणाची पद्धती उपनिषदांत अनेक ठिकाणी उपयोगात आणली गेली आहे. या पद्धतीत जिज्ञासूने प्रश्न करायचा आणि ज्ञानी पुरुषाने त्याला उत्तर द्यायचे असा प्रकार असतो. याज्ञवल्क्य व मैत्रेयी; इंद्र, विरोचन व प्रजापती; यम व नचिकेत; इंद्र व प्रतर्दन यांच्या संवादांतून अध्यात्माचे वेगवेगळे पैलू विशद केले गेले आहेत.

समन्वय पद्धती – हीदेखील एक शिक्षण देण्याची पद्धत आहे. उपनिषदांत तिचा उपयोग केला आहे. कोणताही विचार त्याज्य न मानता, त्यातील सार तेवढेच घ्यायचे, हा या पद्धतीचा विशेष होय. बृहदारण्यकाच्या ४ थ्या अध्यायात जनक राजाने याज्ञवल्क्याला जे सहा प्रश्न विचारले, त्या सहाही प्रश्नांचा समन्वय करून याज्ञवल्क्याने त्यांचे उत्तर दिले आहे.

प्रतिगामिक पद्धती – प्रश्न विचारला असता त्या प्रत्येक प्रश्नाला उत्तर देताना त्याचा मागील प्रश्नाशी संबंध जोडणे,

अशी ही पद्धत आहे. उदा० बृहदारण्यकात जनक राजाने याज्ञवल्क्याला, मनुष्याची ज्योती कोणती, असा प्रश्न केला. त्यावर याज्ञवल्क्याने सूर्य असे उत्तर दिले. पुढचा प्रश्न – सूर्याच्या अभावी कोण ? उत्तर – चंद्र. त्याच्या अभावी अग्नी. आणि त्याच्याही अभावी या सर्व ज्योतींचे अधिष्ठान असलेला आत्मा; हाच मनुष्याला प्रकाश देतो, असे खरे खरे उत्तर शेवटी जनकाने याज्ञवल्क्याकडून वदवले आहे. ही पद्धतीही जिज्ञासूला ज्ञाताकडून अज्ञाताकडे नेण्याचीच आहे.

प्राचीन भारतात कोणत्या ना कोणत्या प्रकारचे शिक्षण विद्यार्थ्यांना मिळतच असे. त्या वेळी अभ्यासाचे विषय काय असत, ते कालक्रमाने पुढे सांगितले आहे –

**वेदकालाचा पूर्वार्ध** (सनपूर्व सुमारे २००० पर्यंत) – या अतिप्राचीन कालखंडात वैदिक मंत्र, इतिहास, पुराण व नाराशंसी गाथा हे अभ्यासाचे मुख्य विषय होते. त्याचबरोबर छंदःशास्त्र, याज्ञिक कर्म, वेदी बांधण्यासाठी आवश्यक तेवढी भूमिती व यज्ञकाल समजण्याइतके ज्योतिष, हेही विषय शिकवले जात. विद्यार्थी वैदिक सूक्ते पाठ करीत. होता, अध्वर्यू व छंदोग हे पुरोहित आपल्या आवश्यकतेपुरता वेदांतला मंत्रभाग शिकत.

**वेदकालाचा उत्तरार्ध व ब्राह्मणकाल** (सनपूर्व सुमारे २००० – सनपूर्व १०००) – या कालात संहितांचे मंत्रभाग हे अपौरुषेय मानण्यात येऊ लागले. लोकभाषा ही वेदभाषेपेक्षा भिन्न होऊ लागली. गंगा-यमुनांच्या खोऱ्यामध्ये पोचल्यावर आर्य लोक अनार्य कन्यांशी विवाह करू लागले. त्यामुळे लोकभाषा ही अधिकच अपभ्रष्ट होऊ लागली. अशा स्थितीत प्राचीन मंत्रांत लोकभाषेतील शब्द घुसडले जाऊ नयेत, म्हणून या कालात संहितेचा मंत्रभाग स्वर, अक्षर व शब्द यांत मुळीच फरक होणार नाही, अशा रीतीने शिकवण्यात येऊ लागला. त्याचबरोबर मंत्रांचा अर्थही विद्यार्थ्यांना शिकवला जाऊ लागला. विद्यार्थ्यांच्या सोयीकरिता वेदांतील अवघड शब्दांच्या याद्या या वेळी आचार्य तयार करू लागले. निघंटू, निरुक्त इत्यादी ग्रंथ अशाच तऱ्हेने निर्माण झाले. ब्राह्मणग्रंथांचे अध्ययन सुरू झाले.

शतपथ ब्राह्मण, तैत्तिरीय आरण्यक, इ. ग्रंथांवरून इतिहास, पुराण, नाराशंसी गाथा, इ. वाङ्मयही या कालात अस्तित्वात होते, असे दिसते. सत्रांमध्ये मध्यंतरी थोडी सुट्टी असे, त्या वेळी जमलेल्या मंडळींच्या मनोरंजनार्थ इतिहास, नाराशंसी गाथा इत्यादी पाठ म्हणत असत. त्यामुळे विद्यालयांत या वाङ्मयाचाही अभ्यास विद्यार्थी करू लागले. या कालात लोकभाषा व वेदभाषा या दोन भिन्न भाषा अभ्यासकांच्या पुढे आल्यामुळे त्यांचा तारतम्याने अभ्यास होऊन व्याकरणशास्त्र उदयाला आले व त्याचाही अभ्यास विद्यालयांतून सुरू झाला. यज्ञयागांचे प्रस्थ या काळात फार होते. त्यामुळे वेदपाठ व वेदार्थ यांचा अभ्यास संपल्यावर, विद्यार्थ्यांना याज्ञिक प्रक्रिया शिकवण्यासाठी आणखी चारपाच वर्षांचा अभ्यास सुरू झाला.

**औपनिषद, बौद्ध व सौत्र काल** (सनपूर्व १००० – इ. स. चा आरंभ) – उपनिषदे, बौद्ध ग्रंथ, जातके, मिलिंदपन्ह वगैरे ग्रंथांवरून या कालातील शिक्षणक्रमाची बरीच माहिती मिळते. धर्मसूत्रेही याच कालात निर्माण झाली. पण त्यांच्यावरून मात्र फारशी माहिती उपलब्ध होत नाही.

या कालात विद्यार्थी वाङ्मयात्मक शिक्षणाबरोबरच धंदेशिक्षणही घेत. मी कवी आहे, माझे वडील वैदिकी करतात व आईचे वडील पाथरवटाचा धंदा करतात, असे एक वैदिक ऋषी म्हणतो (ऋ. ९.११४.३). ब्रह्मविद्या शिकण्यासाठी आलेल्या नारदाला जेव्हा सनत्कुमारांनी, तू काय काय शिकला आहेस असे विचारले तेव्हा, वेदांप्रमाणे ज्योतिष, सैनिकी विद्या, गायनकला व जादूटोणे, मी शिकलो आहे, असे उत्तर त्याने दिले. मिलिंदपन्हावरूनही ब्राह्मणसुद्धा वेदविद्येबरोबर वरीलसारख्या विद्या शिकत, असे दिसते. ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन्ही वर्ण त्या वेळी तीन वेद व अठरा शिल्पे किंवा धंदे शिकत, असे जातकग्रंथांवरून कळते. धनुर्वेद, आयुर्वेद, इंद्रजाल, विषविद्या, ज्योतिष, कायदा, गणित, जमाखर्च, व्यापार, शेती, पशुपालन, इस्सथ्य (?), राज्यशास्त्र, गायन, वादन, नर्तन, चित्रकला व वास्तुशास्त्र या अठरा धंद्यांचा बहुधा अठरा शिल्पांत समावेश होत असावा. एकाच विद्यार्थ्याला तीनही वेद व अठरा शिल्पे यांत प्रावीण्य मिळवणे शक्य नव्हते. पण तक्षशिलेतील महाविद्यालयात ब्राह्मणांना वैदिक शिक्षणाबरोबर काही धंदेशिक्षण व क्षत्रियांना धंदेशिक्षणाबरोबर थोडे वैदिक शिक्षणही देत.

वाङ्मय, तत्त्वज्ञान, उद्योगधंदे व भौतिक कला यांचा विस्तार व प्रगती या कालात फार वेगाने झाली. व्याकरण, धर्मशास्त्र, न्याय, सांख्य, योग, वेदान्त वगैरे नवीन शास्त्रे उदयाला आली. वैदिक कर्ममार्गावरील लोकांची श्रद्धा हळूहळू कमी होऊ लागल्यामुळे, या शास्त्रांचे अध्ययन अधिक प्रमाणावर होऊ लागले. ब्राह्मणांमध्ये काही थोडे लोक या कालात वेदाभ्यास करून वैदिक बनत व बाकीचे जरूरीपुरते वेदमंत्र शिकून न्याय, व्याकरण, इ. शास्त्रांचा व्यासंग करीत. तसेच, या कालात वेदांच्या अनेक शाखा व चरण अस्तित्वात आले. वेदपाठी ब्राह्मण बहुधा आपापल्या शाखांचे अध्ययन करीत. वेदांचे पदपाठ, [illegible] पाठ, घनपाठ, इ. अनेक पाठ या काळात तयार झाले होते, हे वैदिक विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमात दाखल झाले. त्याचबरोबर ब्राह्मणे, उपनिषदे, आरण्यके वगैरे ग्रंथांचाही अभ्यास या कालखंडात आवश्यक मानला जा   लागला.

या कालात तत्त्वज्ञानाच्या उच्च अभ्यासक्रमात निरनिराळ्या मतांचे व धर्मांचे तौलनिक अध्ययन होत असे. सनातनी, बौद्ध व जैन या पंथांत नेहमी वादविवाद होत. त्यामुळे प्रत्येकाला इतर धर्मांच्या ग्रंथांचाही अभ्यास करावा लागे.

स्मृति-पुराणकाल (इ. स. चा प्रारंभ – इ. स. १२००) या कालखंडात वैदिक शाखांचा अभ्यासक्रम सामान्यतः मागील कालखंडाप्रमाणेच होता. पण दिवसेंदिवस वैदिक मंत्रांचा अर्थ समजून घेण्याची प्रवृत्ती कमी होत चालली होती. तिला आळा बसावा म्हणून वेदार्थाचे महत्त्व समाजाच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न शिक्षणशास्त्रज्ञ करीत होते. पण त्याचा फारसा परिणाम झालेला दिसत नाही. सामान्यतः वैदिक ब्राह्मण आपापल्या शाखांचा व वेदांचा अभ्यास करीत. ताम्रपटातील दानग्रहण करणाऱ्या काही ब्राह्मणांची आडनावे चतुर्वेदी, त्रिवेदी, द्विवेदी अशा प्रकारची आढळतात. पण ते ब्राह्मण स्वतः अनेक वेदांचे अध्ययन करीत का त्यांच्या पूर्वजांच्या अध्ययनावरून ही नावे पडलेली होती, हे सांगणे कठीण आहे. महाविद्यालयांत अध्यापन करणारे काही वैदिक ब्राह्मण संहिता, पदपाठ, क्रमपाठ, अनुक्रमणिका, कल्प, उपनिषदे यांव्यतिरिक्त पुराणे, इतिहास व धर्मशास्त्र यांचाही व्यासंग करीत, असे त्या वेळच्या कोरीव लेखांवरून आढळून येते. वैदिक किंवा याज्ञिक ब्राह्मणांव्यतिरिक्त इतर ब्राह्मण त्या वेळी फारसे वेदाध्ययन करीत नसत. इ. स.च्या अकराव्या शतकापर्यंत क्षत्रिय लोक वेदाध्ययन करीत; पण वैश्यांचा त्याबद्दलचा अधिकार गेला होता, असे अल् बिरुनीच्या वृत्तांतावरून दिसते.

वाङ्मय, व्याकरण वगैरे इतर विषयांच्या अभ्यासक्रमाची या काळातील माहिती इत्सिंगच्या वृत्तांतावरून कळून येते, ती अशी – सहाव्या वर्षी धुळाक्षरे शिकायला प्रारंभ होई. पुढच्या दोन वर्षांत थोडे गणित, वाचन वगैरे शिकवीत. नवव्या वर्षी मुले पाणिनीची सूत्रे (अष्टाध्यायी) पाठ करीत. पुढची तीन वर्षे अष्टधातू, उणादी सूत्रे वगैरेंचे अध्ययन करीत आणि मग दोन वर्षे कोश, साहित्य, काव्य यांच्या परिशीलनात घालवीत. अशा प्रकारे त्या काळचे माध्यमिक शिक्षण वयाच्या चौदा-पंधरा वर्षांच्या सुमारास संपे.

यानंतरच्या उच्च शिक्षणात व्याकरण, तर्क, न्याय, वेदान्त, वैद्यक व ज्योतिष यांचा अंतर्भाव होई, असे युआन च्वांगने लिहिले आहे. या सर्व शाखांत व्याकरणशास्त्र हे सर्वांत लोकप्रिय होते. काशिकावृत्ती, पातंजल महाभाष्य यांसारखे ग्रंथ उच्च अभ्यासक्रमात असत. व्याकरणाचे सांगोपांग अध्ययन करण्यास सुमारे दहा वर्षे लागत. ज्यांना विद्वान म्हणून लौकिक मिळवायचा असे, ते व्याकरणाव्यतिरिक्त न्याय, वेदान्त यासारख्या आणखी एखाद्या शास्त्राचा अभ्यास करीत. त्यासाठी आणखी सहा-सात वर्षे लागत. वेदान्ताच्या उच्च अभ्यासक्रमात विरोधी मताच्या ग्रंथांचेही अध्ययन करीत. बौद्ध दिवाकरसेनाच्या विंध्य पर्वतातील आश्रमात आजीवक, जैन, बौद्ध, कापालिक, लोकायतिक वगैरे सर्व मतांचे विद्यार्थी इ. स. च्या सातव्या शतकात अभ्यासासाठी येत व ते स्वमतमंडन आणि परमतखंडन करण्यात गुंतलेले असत, असे हर्षचरितावरून दिसून येते. इ. स. च्या सातव्या शतकात ज्या मोठ्या आचार्यांच्याकडे युआन च्वांगने अध्ययन केले, त्यांपैकी बरेचजण बौद्ध व हिंदू या दोन्ही तत्त्वज्ञानांत पारंगत होते.

या कालखंडाच्या उत्तरार्धात धर्मशास्त्र, पुराण, काव्य व अलंकार या विषयांवर पुष्कळच ग्रंथ लिहिण्यात आले. पुराणे व धर्मशास्त्र यांत सांगितलेला धर्म त्या वेळी वैदिक धर्मापेक्षा फार लोकप्रिय होता. तेव्हा संस्कृत विद्यालयात त्यांचे अध्ययन मोठ्या प्रमाणावर होत असावे, असे वाटते. साहित्यशास्त्रातील उच्च अभ्यासक्रमात व्याकरण, छंदःशास्त्र, अलंकारशास्त्र, इतिहास, पुराणे, लोककथा वगैरे विषयांचा समावेश होता.

बौद्ध शिक्षणसंस्थांतील अभ्यासक्रम काहीसा निराळा असे. या वेळी महायान मताचा भारतात फार प्रसार झाला होता. या मताचे सर्व ग्रंथ संस्कृतात होते. म्हणून बौद्ध विद्यार्थ्यांनाही संस्कृत व्याकरण, कोश व साहित्य हे विषय शिकावे लागत. याच वेळी विनयादी ग्रंथांतील महत्त्वाचे उतारे त्यांच्याकडून पाठ करून घेत. सुमारे सोळाव्या वर्षी त्यांच्याही उच्च शिक्षणाला आरंभ होई. त्यात तर्क व तत्त्वज्ञान यांवरच जास्त भर असे. हेतुविद्या, अभिधर्मशास्त्र यांसारख्या विषयांचा विशेष अभ्यास होई.

बौद्ध भिक्षूंचा अभ्यासक्रम बराच निराळा असे. सुमारे अठराव्या वर्षी ते संघात दाखल होत व त्यानंतर दहा वर्षे त्यांना उपाध्यायाच्या हाताखाली विनय, सूत्रे, पातिमोक्ख व महायान शास्त्रे यांचा अभ्यास करावा लागे. त्यानंतर त्यांना आजन्म धर्म व तत्त्वज्ञान यांच्या व्यासंगात राहावे लागे. सर्वच भिक्षू तसे करीत असे नाही. पण नालंदाला जे सुमारे दहा हजार भिक्षू होते, त्यांच्यापैकी एक हजार भिक्षू वीस शास्त्रग्रंथांत, पाचशे भिक्षू तीस ग्रंथांत व दहा भिक्षू पन्नास ग्रंथांत प्रवीण होते. जालंदर, धेनुकाकट, दक्षिण कोसल यांसारख्या दुर्गम विहारांतही अत्यंत विद्वान भिक्षू होते आणि युआन च्वांग त्यांच्याकडे अध्ययनासाठी कित्येक महिने राहिला होता.

इ. स. च्या तिसऱ्या शतकापासून या कालखंडात संस्कृत विद्येचे व हिंदू धर्माचे पुनरुज्जीवन झाले. त्यापूर्वी बहुतेक सर्व प्रांतांत प्राकृत ही राजभाषा होती. कारण त्या वेळचे राजाज्ञेने लिहिलेले कोरीव लेख प्रायः प्राकृत भाषेमध्येच लिहिलेले

आढळतात. द. भारतातील सातवाहनांसारख्या काही राजांनी तर आपल्या दरबारात प्राकृत भाषाच वापरली पाहिजे, असा नियम केला होता. इ. स. च्या चवथ्या शतकात संस्कृत भाषेचेही पुनरुज्जीवन झाले व ते इतके प्रभावी ठरले, की बौद्ध व जैन आचार्यही आपल्या धर्मसंस्थापकांचा उपदेश झुगारून संस्कृतमध्येच ग्रंथरचना करू लागले.

**शिक्षणपद्धती** – अगदी प्राचीन काळी शिक्षणक्रमात लेखनाची मदत घेत नसत. नंतरच्या काळात ती घेण्यात येऊ लागली. पण तेव्हाही पुस्तके फार दुर्मिळ व महाग असल्यामुळे विद्यार्थ्यांना सर्व विद्या कंठस्थच करावी लागे. गुरू विद्यार्थ्यांना वेदमंत्र शिकवीत व विद्यार्थी ते पाठ करीत. इ. स. च्या नवव्या शतकापर्यंत वेदमंत्र हे मुळी लिहिलेच गेले नव्हते. बुद्धाच्या मृत्यूनंतर कित्येक शतके त्रिपिटकादी बौद्ध ग्रंथही विद्यार्थी पाठ करीत असत.

मात्र हे पाठांतर म्हणजे केवळ पोपटपंची नसे. आचार्य वेदमंत्रांचे विवरण व स्पष्टीकरण करीत; मंत्रांमध्ये उल्लेखिलेल्या ऐतिहासिक किंवा दंतकथात्मक गोष्टींची माहिती देत; तसेच, संहितापाठाचा पदपाठ बनवताना कोणते फरक करायचे व ते का करायचे याचेही विवरण करीत. व्याकरण, पूर्व व उत्तर मीमांसा, न्याय, सांख्य वगैरे विषयांवरील सूत्रग्रंथ केवळ पाठांतर करून समजण्यासारखे नाहीत. हे ग्रंथ शिकवताना अध्यापकांना विस्तृत व सांगोपांग विवेचन करावे लागे. त्या विवेचनापैकी काही भाग पुढे भाष्यग्रंथांत समाविष्ट केलेला आहे. गहन विषय विशद करून सांगण्याची व दुर्बोध विषयावर उद्बोधक विवेचन करण्याची भारतीय गुरूंची हातोटी अवर्णनीय आहे, असे युआन च्वांग म्हणतो.

प्राचीन काळी प्रत्येक गुरूकडे पंधरा-वीस विद्यार्थीच असत. त्यामुळे त्याला प्रत्येकाच्या अडचणी समजून घेऊन प्रत्येकाला निरनिराळे शिकवता येई. विद्यार्थ्याला शिकवलेले समजले का नाही याची रोज चाचणी घेऊन, ते त्याला कळलेले असल्यासच गुरू त्याला पुढचा पाठ देई. त्यामुळे हुषार विद्यार्थ्यांची प्रगती जलद होई व मंदबुद्धीच्या विद्यार्थ्याकरिता त्याला थांबावे लागत नसे. विद्यार्थ्यांची रोजच परीक्षा होत असल्यामुळे शिक्षणक्रमाच्या शेवटी हल्लीसारखी मोठी परीक्षा नसे. शेवटच्या पाठाची परीक्षा झाली, की शिक्षणक्रम संपला, अशी पद्धत होती. शिक्षण संपले, की गुरू विद्यार्थ्याला विद्वज्जनपरिषदेत नेई व स्नातक म्हणून त्याची इतरांशी ओळख करून देई. प्रत्येक स्नातकाला आपले ज्ञान कंठगत ठवावे लागे आणि शास्त्रार्थ करून आपली श्रेष्ठता टिकवावी लागे.

**धंदेशिक्षण** – प्राचीन काळी वैदिक वाङ्मयाबरोबरच व्यापार, विणकाम, सुतारकाम, लोहारकाम यांसारखे हस्तव्यवसाय; वैद्यक, युद्धकला यांसारखे उच्च व्यवसाय; गायनवादनादी ललित कला यांचेही शिक्षण विद्यार्थ्यांना मिळत असे. हे शिक्षण इतर वर्णांतील विद्यार्थ्यांप्रमाणे ब्राह्मण विद्यार्थीही घेत. वेदकाली ऋषिकुलोत्पन्न तरुणांपैकी काही वैद्यकीचा, तर काही गवंड्याचा धंदा करीत. शेती, व्यापार व जादूगिरी यांसारखे धंदे अनेक ब्राह्मण शिकत, शिकवीत व करीत असे जातकांवरून कळते. तक्षशिलेत धनुर्वेदाचे पुष्कळ शिक्षक ब्राह्मणच होते. पांडवांना युद्धविद्या शिकवणारे द्रोणाचार्य हे ब्राह्मणच होते. युद्धविद्येचे शिक्षण क्षत्रियांव्यतिरिक्त इतर वर्णांचे लोकही घेत असत. सैन्यातल्या हुद्याच्या व जबाबदारीच्या जागा मात्र ब्राह्मण व क्षत्रिय यांच्याकडेच असत. सामान्य सैनिकांची भरती सर्व जातींतून होत असे. इ. स. च्या सातव्या शतकात उज्जयिनी, महेश्वर व आसाम इथले राजे ब्राह्मण; परियात्र व कनोज इथले वैश्य आणि सिंध व मतिपूर इथले शूद्र होते. यावरून क्षात्रवृत्ती ही सर्वांना मोकळी होती हे दिसून येईल.

वेद व उपनिषदे यांच्या कालात सर्व त्रैवर्णिकांना वेदाध्ययनाची परवानगी होती. उपनिषत्कालानंतर क्षत्रियांचा वेदाध्ययनाचा अधिकार नष्ट झाला. त्यामुळे ते पूर्वीइतके वेदाध्ययनाकडे लक्ष देईनासे झाले. तरी ते काही वेदमंत्र पाठ करीत. राजपुत्रांच्या अभ्यासक्रमात वेद-वेदान्त म्हणजे आन्वीक्षिकी विद्येचा अंतर्भाव असे. इ. स. च्या प्रारंभी मात्र राजपुत्राने फक्त दंडनीतिशास्त्रच शिकावे, असा विचार पुढे येऊ लागला.

कला, उद्योगधंदे, व्यापार, इ. विषयांच्या शिक्षणासाठी विद्यार्थी एखाद्या कुशल कारागिराकडे जात. शिक्षण संपले तरी एका ठराविक कालापर्यंत आपण तुमच्याकडे कामधंदा करीत राहू, असा करार ते करीत व गुरू त्यांच्या जेवण्याची व राहण्याची सोय करी. अशा रीतीने विद्यार्थ्याला उद्योगधंद्याचे प्रत्यक्ष शिक्षण मिळे. या पद्धतीला अंतेवासी पद्धत असे नाव आहे. प्राचीन भारतात विणकाम, खाणकाम, धातुशास्त्र, वैद्यक, चित्रकला वगैरे अनेक धंद्यांमध्ये जी प्रशंसनीय प्रगती झाली होती, तिचे बरेचसे श्रेय या पद्धतीला होते.

निरनिराळ्या कालखंडांतील धंदेशिक्षणाची व्यवस्था पुढीलप्रमाणे होती –

सनपूर्व सुमारे ८०० पर्यंत – सुतारकाम, गवंडीकाम यांसारखे हस्तव्यवसाय या वेळी हीन दर्जाचे मानले जात नव्हते. रथकार किंवा सुतार याच्या धंद्याला फार मान होता. रथकारसंघाच्या मुख्य श्रेष्ठीला दरबारात फार उच्च स्थान होते व त्याचा प्रधानमंडळातही (रत्नींमध्ये) अंतर्भाव होत असे.

धनुर्विद्या, अश्वसारथ्य, लोहारकी, सुतारकी, वैद्यविद्या, खनिविद्या या विद्या या काळी आर्यांना अवगत होत्या. यांपैकी काही व्यवसाय तरी आनुवंशिक असावे. त्यामुळे त्या घरातील मुलांना मोठ्या माणसाकडून ते ज्ञान मिळत असावे. सुदासासारख्या विजिगीषू राजांच्या राजधानीत सैन्याला लागणाऱ्या रथ, बाण, धनुष्ये, इ. सामग्रीचे मोठमोठे कारखाने असले पाहिजेत.

सनपूर्व सुमारे ८०० ते सनपूर्व सुमारे २५० पर्यंत – या काळातील धंदेशिक्षणाबद्दल फारच थोडी माहिती मिळते. या काळात वैद्यक, विणकाम, नौकाबंधन व खनिशास्त्र या व्यवसायांत भारताने बरीच प्रगती केली होती.

त्या वेळच्या लोकांना सर्पदंशावर अनेक गुणकारी औषधे माहीत होती. त्यांच्या या ज्ञानाने अलेक्झांडरबरोबर आलेले ग्रीक लोक थक्क होऊन गेले. चरकसंहितेला आधारभूत असलेली अग्निवेशसंहिता याच कालखंडात लिहिली गेली.

या कालातला वैद्यकीय शिक्षणक्रम सात-आठ वर्षांचा होता. तक्षशिलेतील विद्यार्थ्यांना शस्त्रक्रिया व औषधिप्रक्रिया यांचेही ज्ञान करून देत.

सोने, रुपे, तांबे, लोखंड वगैरे धातू खाणीत अशुद्ध स्वरूपात असताना त्यांचा रंग कसा असतो, त्याची माहिती अर्थशास्त्रात सामान्यतः बरोबर दिलेली आहे. त्यावरून त्या काळातील खनिशास्त्राबद्दलचे ज्ञान अगदीच प्राथमिक नसावे, असे वाटते.

नौकाबंधन व विणकाम या कलांमध्ये या काळात बरीच प्रगती झालेली होती. या वेळी भारतात नद्यांमधून किनाऱ्या-किनाऱ्याने व परदेशांशीही बराच व्यापार चालत असे, असे अर्थशास्त्र व जातके यांवरून कळते. त्यामुळे नौका बांधण्याच्या कामात या वेळी इतकी प्रगती झाली होती, की अलेक्झांडरचे सर्व सैन्य नदीतून वाहून नेण्यासाठी जितक्या नावांची गरज होती, तितक्या नावा झेलम नदीवर चार महिन्यांत बांधता आल्या.

उपनयनाच्या वेळी बटूला द्यायचे उपरणे हे त्याच दिवशी घरी सूत काढून विणलेले असावे, असे विधान काही गृह्यसूत्रांत आढळते. त्यावरून विणकामाची कला सर्व लोकांना माहीत होती, असे दिसते.

या कालखंडात विजिगीषू राजांनी साम्राज्ये स्थापण्यास सुरवात केली. त्यासाठी त्यांना चतुरंग सैन्य लागे व सैन्यासाठी असंख्य रथ, धनुष्ये, बाण, भाले, बरच्या वगैरे वस्तू लागत. त्यामुळे सुतारकाम, लोहारकाम यांचे मोठे कारखाने सैन्याच्या तळांजवळ उभारावे लागत. तसेच लोहादी धातूंच्या खाणी शोधून व त्यांतील धातू काढून ते शुद्ध करून घ्यावे लागत. त्यामुळे खनिशास्त्रालाही जोराची चालना मिळाली.

या कालात लोकांना मोठ्या प्रमाणावर लष्करी शिक्षण देत. प्रत्येक खेडेगाव स्वसंरक्षणक्षम असावे, असे सामान्यतः राजधोरण असे. ठराविक प्रमाणात कवायत शिकलेले शिपाई पुरवण्याच्या अटीवर ‘ सेनाभक्त ’ गावांना कराची माफी मिळे. या गावांत ग्रामपंचायतीच्या वतीने सर्व सुदृढ तरुणांना लष्करी शिक्षण देत असावे. मोठ्या गावांत उच्च लष्करी शिक्षण देणाऱ्या लष्करी शाळाही होत्या. तक्षशिलेत अशी अनेक विद्यालये होती.

सनपूर्व सुमारे २५० ते इ. स. ८०० – या कालात वैद्यक, शिल्पकला, स्थापत्य, चित्रकला, नौकाबंधन, खनिशास्त्र, इ. शास्त्रे व कला यांत भारतातील लोकांनी उच्च कोटीचे प्रावीण्य मिळवले होते.

**वैद्यक** – चरक व सुश्रुत या ग्रंथांवरून वैद्यकाचे शिक्षण कसे देत, याची चांगली कल्पना येते. निरनिराळ्या शाखांतील निष्णात वैद्यांजवळ विद्यार्थी शिक्षण घेत. गुरूजवळ शिकलेल्या गोष्टींची विद्यार्थ्यांनी आपसांत चर्चा करावी, असे सुश्रुताने सांगितले आहे. औषधिविज्ञान, शवच्छेदन व शस्त्रक्रिया यांचे प्रत्यक्ष शिक्षण देत असत. शवच्छेदनासाठी लागणारी शरीरे पाण्यात कुजवीत आणि मग त्यांचा छेद करून कातडी, स्नायू, रक्तवाहिन्या वगैरेंचे प्रत्यक्ष ज्ञान विद्यार्थ्यांना देत. इ. स. च्या पाचव्या-सहाव्या शतकानंतर शवच्छेदनाची प्रथा मोडली आणि त्यामुळे वैद्यकशास्त्राच्या प्रगतीला बरीच खीळ बसली.

शस्त्रक्रियेपूर्वी शस्त्र चालवण्याचा सराव व्हावा म्हणून मृत जनावरांच्या शरीरांत छिद्रे पाडायला लावीत. पुवाने भरलेली जखम कशी फोडावी, ते पखालीला छेद करायला लावून दाखवीत. जखम कशी शिवावी, ते नाजुक रेशमी कापडाच्या साहाय्याने दाखवीत. चिंध्यांनी भरलेल्या मनुष्याकृतीच्या साहाय्याने निरनिराळ्या ठिकाणच्या जखमा कशा बांधाव्या, त्याचे प्रत्यक्ष शिक्षण देत. यात चांगली प्रगती झाली, की मग रुग्णालयात शस्त्रक्रियेचे प्रत्यक्ष शिक्षण मिळे. मोतीबिंदू, अंडवृद्धी, करटे, गर्भविमोचन यांसारख्या शस्त्रक्रिया त्या काळी सहजपणे करीत.

इ. स. च्या पाचव्या शतकात पाटलिपुत्रात एक मोठे मोफत रुग्णालय होते, असे फाहियानच्या प्रवासवृत्तावरून कळते.

पशुवैद्यकाचे ज्ञानही भारतात प्राचीन काळापासून होते. नकुल व सहदेव हे दोघेही पशुवैद्यकात दर्दी होते. सैन्यात हत्ती व घोडे यांच्यासाठी पशुवैद्य नेमावे, असे अर्थशास्त्रात सांगितले आहे. अशोकाने मनुष्यांप्रमाणे पशूंच्याही औषधाची योजना केली होती. जयदत्ताचे अश्ववैद्यक, नकुलाची अश्वचिकित्सा, पालकाप्याचा हस्त्यायुर्वेद वगैरे ग्रंथ याच कालखंडात लिहिले गेले.

शिल्पादी कला – या कालखंडात शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने निर्माण झाले. अशोकाने जेव्हा दगडी इमारती व स्तूप बांधण्याचा उपक्रम सुरू केला, तेव्हा दगडावरील खोदकामाची आवश्यकता उत्पन्न झाली. गांधार, पंजाब इथली ग्रीक लोकांची शिल्पे पाहून व स्वतःच्या कल्पकतेने भारतीय शिल्पकारांनी शिल्पकलेत बरेच प्रावीण्य मिळवले. पेशावर, मथुरा, सांची, भरहूत, सारनाथ, नालंदा, पाटलिपुत्र, अजंटा, वेरूळ ही शिल्पकलेची केंद्रे होती. शिल्पकारांना मूर्तिशास्त्राचे चांगले ज्ञान असावे लागे.

चित्रकला, नृत्यकला, गायनकला, इ. ललित कलांचे शिक्षण प्रायः राजघराण्यातील किंवा संपन्न घराण्यातील स्त्रीपुरुषच घेत असत.

व्यापारी शिक्षण – मनुस्मृतीत वैश्यांच्या कर्तव्यांविषयी व अर्थशास्त्रात व्यापाराध्यक्षासंबंधी जी माहिती मिळते, तिच्यावरून व्यापारी शिक्षणाच्या सामान्य स्वरूपाची कल्पना येते. कोणता माल कोणत्या देशात होतो व तो कोणत्या मार्गाने आपल्या देशात येतो, याचे ज्ञान व्यापाऱ्याला आवश्यक असे. म्हणून व्यापारी भूगोलाला शिक्षणक्रमात प्राधान्य असे. निरनिराळ्या देशांतील लोकांच्या निरनिराळ्या काळी काय गरजा असतात, निरनिराळ्या ठिकाणी जत्रा केव्हा भरतात, निरनिराळ्या प्रांतांतील व देशांतील नाण्यांचे परस्पर भाव काय असतात, हुंडयांचा व्यापार कसा करावा, इ. गोष्टींबद्दल माहिती व्यापारी विद्यार्थ्यांना देण्यात येई. परदेशी व्यापार करणाऱ्यांना जरूर तेवढ्या परदेशी भाषाही शिकवीत.

लष्करी शिक्षण – बहुतेक सर्व गावांत हौशी तरुणांची संरक्षक सैन्यपथके असत. ज्यांना सैनिकाचा व्यवसाय स्वीकारायचा असे, त्यांच्यासाठी काही सेनापती खास शाळा काढीत. शस्त्रे चालवणे व नेमबाजी यांचे शिक्षण या शाळांत देत. शिक्षण संपल्यावर अध्यापक सेनानी त्यांना राजाच्या सैन्यात दाखल करीत व त्याबद्दल त्यांना रोख रक्कम, जमीन किंवा हत्ती-घोडे मिळत.

इ. स. सुमारे ८०० ते १२०० या काळात बहुतेक सर्व अभ्यासक्रम सोपे करण्याकडे लोकांची प्रवृत्ती होती. बहुतेक सर्व शास्त्रांत या काळात प्रगतीचा अभाव दिसून येतो. रसायनशास्त्र तेवढे या नियमाला अपवाद होय. त्या शास्त्रावर या कालखंडात अनेक ग्रंथ निर्माण झाले.

प्राथमिक शिक्षण – प्राथमिक शिक्षणात कोणकोणत्या विषयांचा अंतर्भाव होत असे, ते कसे दिले जाई याबद्दल थोडीच माहिती उपलब्ध आहे.

सनपूर्व सुमारे ८०० पर्यंत – या कालखंडाच्या प्रारंभी लेखनकला आर्यांना अवगत नव्हती. व्याकरणशास्त्राचा उदय अजून व्हायचा होता व गणितशास्त्र फारच बाल्यावस्थेत होते. त्यामुळे या काळातले प्राथमिक शिक्षण म्हणजे काही वेदमंत्र व नाराशंसी गाथा पाठ करणे एवढेच असावे व ते उपनयनानंतरच सुरू होत असावे.

उत्तरसंहिताकाली लेखनकला लोकांना अवगत झाली होती व वेदाभ्यासी विद्यार्थ्यांना प्रथम अक्षरओळख करून देत, असे वाटते.

सनपूर्व सुमारे ८०० ते सनपूर्व २०० –या काळात प्राथमिक शिक्षणाचे स्वरूप व विषय बरेचसे बदलले. लेखनकला समाजात चांगली रूढ झाली व प्राथमिक शिक्षणात तिचा अंतर्भाव झाला. त्याचप्रमाणे, व्याकरणाची मूलतत्त्वे, थोडेसे गणित, वर्णोच्चारशास्त्र व छंदःशास्त्र यांचीही मूलतत्त्वे उपनयनापूर्वी विद्यार्थ्यांना शिकवू लागले. सर्व प्राथमिक शिक्षण खासगी रीतीनेच चाले. त्यासाठी सार्वजनिक शाळा नसाव्या, असे वाटते.

सनपूर्व सुमारे २०० ते इ. स. ८०० पर्यंत – या कालखंडात प्राथमिक शिक्षणाला शिक्षणक्रमात निश्चित स्थान मिळाले. विद्यारंभ किंवा अक्षरस्वीकरण याला संस्काराचा मान लाभला. तो संस्कार वयाच्या पाचव्या-सहाव्या वर्षी करीत. सुरवातीला मुळाक्षरे, जोडाक्षरे, बाराखडया वगैरे शिकवीत. नंतर पाणिनीची सूत्रे, अमरकोश, समासचक्र, यांसारखी पुस्तके उपनयनापूर्वी विद्यार्थ्यांकडून पाठ करून घेत. या वेळी प्राथमिक शाळांना लिपिशाला व प्राथमिक शिक्षकाला दारकाचार्य म्हणत. लाकडी पाटयांवर बारीक माती किंवा वाळू पसरून तिच्यावर बोटाने किंवा बारक्या काठीने अक्षरे काढीत. लाकडी फळयावर शिक्षक प्रथम एक अक्षर लिही व त्याचे नाव मुलांना सांगे. मुले ते नाव जोराने उच्चारीत व आपल्या पाटीवर ते अक्षर काढीत.

गावात एखादा धनिक असल्यास तो आपल्या खर्चाने प्राथमिक शिक्षक ठेवी व त्याच्या मुलांबरोबर काही गरीब विद्यार्थीही शिक्षणाचा लाभ घेत. काही वेळा गावातले अनेक लोक मिळून एखादा शिक्षक नेमीत व गावातल्या मुलांच्या शिक्षणाची सोय करीत. गावातला जोशी, कुळकर्णी किंवा दुकानदार यांच्या घरातील एखादा तरुण शाळा उघडीत असे. मुलांचे पालक खुषीने जे देत त्यावर तो संतुष्ट असे.

इ. स. सुमारे ८०० ते इ. स. १२०० – या कालखंडाच्या शेवटाच्या सुमारास हल्लीच्या कन्नड, मराठी, गुजराती, हिंदी इ. लोकभाषा प्रचारात आल्या व त्यांचे अध्ययन प्राथमिक शिक्षणक्रमात पूर्वीपेक्षा अधिक होऊ लागले. कर्नाटकातील तालगुंड गावी इ. स. ११५८ मध्ये एक शाळा होती. तिच्यात

कसब शिकवण्याची सोय होती. लेखन, वाचन, गणित, जमा-खर्च, लोकभाषेचे थोडेबहुत ज्ञान व संस्कृत भाषेची जुजबी माहिती एवढ्यांचा समावेश प्राथमिक शिक्षणात होत असे.

प्राथमिक शिक्षण कसे व कोण देत, याबद्दल फारशी माहिती मिळत नाही. ब्रिटिश अंमलाच्या प्रारंभी बंगालमधील खेड्यांत देवळांतील पुजारी प्राथमिक शाळा चालवीत. माळव्यामध्ये याच सुमारास शिक्षक खाजगी शाळा उघडीत व मुलांच्या पालकांकडून खुषीने मिळणाऱ्या द्रव्यावर निर्वाह करीत.

प्राथमिक शिक्षणाचा प्रसार या काळात बराच कमी होत चालला होता. खेडेगावातील बलुतेदारांमध्ये बहुतेक सर्व प्रांतांत प्राथमिक शिक्षक नाही, ही ध्यानात ठेवण्याजोगी गोष्ट आहे. ब्राह्मण, कायस्थ व वैश्य या वर्गांतीलच मुले प्रायः शाळेत जात. इतर मुले तशीच शिक्षणाविना राहत.

इ. स. १२०० ते १७५० – या कालातील मुस्लिम मुलांच्या शिक्षणाचा प्रारंभ बिस्मिल्लाह संस्काराने होत असे. मुलगा चार वर्षे, चार महिने व चार दिवसांचा झाला, की त्याला विद्यारंभासाठी मौलवी किंवा मुल्लाकडे नेत. विद्यारंभ कुराणशरिफातील काही आयते किंवा बिस्मिल्लाहच्या उच्चारणाने होत असे.

प्राथमिक शिक्षण मकतबात दिले जाई. मकतब मशिदीला जोडलेले असत. मुल्ला किंवा मौलवी लहान मुलांना कुराणातील आयते व प्रार्थना शिकवीत. त्याचबरोबर लिहिणे, वाचणे, गणित, लिपी, व्याकरण हे विषयही शिकवीत. काही ठिकाणी हदीस, कविता व नीतिशास्त्र यांचेही पाठ देत. ज्या हिंदू मुलांना अरबी – फारसी शिकायचे असे, तेही मकतबात जात. मुसलमान शासक व श्रीमंत लोक यांच्या आर्थिक साहाय्यावर मकतब चालत.

राज्यकर्ते व धनिक लोक यांच्या मुलांचे शिक्षण घरीच शिक्षक ठेवून होत असे. राजपुत्रांच्या अभ्यासक्रमात अरबी, फारसी, सैनिकी शिक्षण, कायदा व धर्म या विषयांचा समावेश असे.

उच्च शिक्षण मदरसात मिळे. त्यातील अभ्यासक्रमाचे धार्मिक व सांसारिक असे दोन भाग असत. धार्मिक अभ्यासक्रमात कुराणशरिफाचे पठण व समीक्षात्मक अध्ययन, इस्लामचा इतिहास व कायदा यांवर अधिक भर असे. सांसारिक अभ्यासक्रमात अरबी, फारसी, व्याकरण, साहित्य, गणित, इतिहास, भूगोल, शेती, कायदा, नीतिशास्त्र, धर्म, तर्कशास्त्र, ज्योतिष, अर्थशास्त्र, इ. विषयांचा समावेश असे. सर्व शिक्षण अरबी भाषेतून देत. काही मदरसांमध्ये संगीत, शिल्पकला व वास्तुकला यांचेही शिक्षण देत. अकबराने या शिक्षणक्रमात संस्कृत भाषा, साहित्य, भूमिती, शरीरविज्ञान, भौतिक विज्ञान गृहविज्ञान, शासनपद्धती, संगीत, शिल्पशास्त्र, इ. विषयांचा अंतर्भाव केला होता. मोठ्या मदरसांना जोडून ग्रंथालये होती. हा शिक्षणक्रम दहा ते बारा वर्षांचा असे.

सर्व शिक्षण निःशुल्क होते. शिक्षण संपल्यावर विद्यार्थ्यांना प्रमाणपत्रे देत. चुकार विद्यार्थ्यांना कठोर शिक्षा करीत.

या काळात स्त्रीशिक्षणाचा प्रचार फारसा नव्हता. श्रीमंत लोक घरीच मुलींच्या शिक्षणाची व्यवस्था करीत. धर्म, गृहशास्त्र, संगीत, इ. विषय त्यांना शिकवीत.

गुलाम वंशातील इल्तुमिश, रजिया व बलबन हे विद्याप्रेमी होते. त्यामुळे त्यांनी अनेक मकतब व मदरसे उघडले. खिलजी वंशातील अलाउद्दिनाने शिक्षणाला प्रोत्साहन दिले नाही. तुगलक वंशातील सर्व सुलतान शिक्षणप्रेमी होते. त्यांनी शिक्षणाला प्रोत्साहन दिले. सय्यद व लोदी वंशांच्या कारकिर्दीत मात्र शिक्षणाला फारसे प्रोत्साहन मिळाले नाही. मुगल वंशाचे सर्व बादशाहा विद्याप्रेमी होते. त्यांच्यापैकी अकबराने शिक्षणक्रमात अनेक सुधारणा केल्या. त्याने अनेक मकतब व मदरसे उघडले आणि त्यांत मुसलमानांबरोबर हिंदूंच्याही शिक्षणाची सोय केली.

या काळात आग्रा, दिल्ली, जौनपूर, बीदर, विजापूर, प्रयाग, रायपूर, लाहोर, सियालकोट, पाटणा, हैदराबाद, अहमदाबाद व लखनौ, ही शिक्षणाची प्रमुख केंद्रे होती.

याच काळात सर्व भारतात संस्कृत पाठशाळा चालू होत्या व त्यांत तर्क, साहित्य, ज्योतिष, व्याकरण, इ. विषयांचे अध्यापन होत असे.

इ. स. १७५० ते १८३५ या संधिकालात गुरुगृही व संस्कृत विद्यालयांत पारंपरिक पद्धतीने संस्कृताचे व दर्शनांचे अध्यापन चालू होते. ग्रामीण पाठशाळांत प्राथमिक शिक्षण देण्यात येई. मकतब व मदरसा यांत मुसलमान मुलांचे अध्ययन चालू होते. परंतु हळूहळू देशी शिक्षणपद्धतीचा ऱ्हास होऊ लागला आणि इंग्रजी शिक्षणाच्या शाळा अस्तित्वात आल्या.

**आधुनिक शिक्षण** – बंगालमध्ये इ. स. १८१७ साली इंग्रजी शिक्षणाचा प्रारंभ झाला. पण इ. स. १८३५ पर्यंत भारताच्या अन्य प्रांतांत ते शिक्षण सुरू झाले नव्हते. प्राच्य विद्यांचे शिक्षणच सर्वांना द्यावे की पाश्चात्य विद्यांचा प्रसार करावा, असा वाद सुरू झाला होता. राजा राममोहन राय यांनी पाश्चात्य ज्ञानविज्ञानाचा प्रसार व्हायला हवा, असा आग्रह धरला. अज्ञानांधकारात बुडालेल्या हिंदी लोकांना इंग्रजी भाषा व भौतिक विद्या शिकवून त्यांची उन्नती करावी, असा ब्रिटिश राज्यकर्त्यांचा हेतू होता. त्यासाठी मेकॉलेने इंग्रजी शिक्षणाची स्थूल योजना तयार केली. ती लॉर्ड बेंटिंकने इ. स. १८३५ मध्ये स्वीकारली. ही योजना केवळ राज्यकारभाराच्या सोयीसाठी व चांगले

कारकून तयार करण्याच्या दृष्टीने आखली होती, असा एक प्रवाद आहे. पण तो बरोबर नाही. सुबुद्ध हिंदी लोकांना इंग्रजी शिक्षण घेण्याची व पाश्चात्य ज्ञान मिळवण्याची तीव्र इच्छा होती. तोच हिंदी बांधवांच्या उद्धाराचा खरा मार्ग होय, अशी त्यांची खात्री होती. इंग्रजी शिक्षणामुळे बरेच कारकून तयार झाले, हे खरे; पण बरेच अधिकारीही तयार होऊन राज्य-कारभारात भाग घेऊ लागले आणि त्या इंग्रजी शिक्षणामुळेच भारताचा कायापालट झाला.

बेंटिंकने इ. स. १८३५ मध्ये शिक्षणासंबंधी जे धोरण उद्घोषित केले, त्यामुळे भारतात इंग्रजी शिक्षणाचा खूप प्रसार झाला, यात संशय नाही. तथापि इ. स. १८५३ पर्यंत शिक्षणाची सर्वंकष योजना तयार करण्यात आली नव्हती. इ. स. १८५४ मध्ये त्या वेळच्या बोर्ड ऑफ कंट्रोलचा अध्यक्ष सर चार्लस वुड याने तशी योजना तयार करून पाठवली. शिक्षणक्षेत्रात ती अत्यंत महत्त्वपूर्ण मानली जाते. कारण ब्रिटिश शासन-काळात त्याच योजनेच्या आधाराने शिक्षणाचा सर्वांगीण विकास केला गेला.

इंग्रजांच्या अमदानीत अनेक शाळा निघाल्या. प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा, उच्च माध्यमिक शाळा, महाविद्यालय, विद्यापीठ अशा चढत्या क्रमाने शिक्षणसंस्था अस्तित्वात आल्या. सरकारी व खासगी अशा दोन्ही प्रकारच्या शिक्षणसंस्था निघाल्या. खासगी शाळांना सरकारी अनुदान मिळू लागले. प्राथमिक शिक्षणानंतर माध्यमिक शाळांत मातृभाषेऐवजी इंग्रजी माध्यमातून शिक्षण देण्यात येऊ लागले. कलकत्ता, मुंबई, मद्रास या ठिकाणी विश्वविद्यालये स्थापन झाली. प्रत्येक प्रांतात शिक्षणविभाग उघडण्यात आले व शिक्षणसंचालक आणि निरीक्षक यांची नियुक्ती करण्यात आली.

साहित्य, कला, शास्त्र, वाणिज्य, वैद्यक, स्थापत्य, कृषी, इ. विषय शिकवणारी महाविद्यालये इंग्रजी अमदानीत निघाली. त्यांत शिक्षण घेऊन अनेक विद्यार्थी पदवीधर झाले. पदव्युत्तर शिक्षणही याच महाविद्यालयांतून मिळत होते.

इ. स. १८५७ पर्यंत कलकत्ता, मुंबई व मद्रास या ठिकाणी विद्यापीठे स्थापन झाली आणि माध्यमिक शिक्षणावर त्यांनी नियंत्रण ठेवले. माध्यमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम, परीक्षा, शिक्षणाचे माध्यम, इ. गोष्टी विद्यापीठे ठरवू लागली. त्यामुळे विद्यापीठे व त्यांच्याशी संबंधित अशा महालयांसाठी विद्यार्थी तयार करणे, एवढेच माध्यमिक शिक्षणाचे मुख्य उद्दिष्ट बनले. जीवनाला उपयोगी पडणाऱ्या शिक्षणाचा त्यात अभावच राहिला. नाही म्हणायला या शिक्षणामुळे कचेऱ्यांत लागणारे अनेक कारकून मात्र तयार झाले.

या वेळी प्रत्येक प्रांतात एक शिक्षणविभाग उघडण्यात आला. त्याने अनेक सरकारी हायस्कूले उघडली. त्याशिवाय, मिशनने व भारतीयांनी खासगी रीतीने चालवलेली अनेक हायस्कूले अस्तित्वात आली. इ. स. १८५४ पासून १८८२ पर्यंत माध्यमिक शिक्षणाचा बराच विकास झाला. परंतु याच काळात शिक्षणाचा उद्देश, अभ्यासक्रम, भाषासमस्या, परीक्षा, प्रशासन, इ. बाबतींत त्यात अनेक दोष निर्माण झाले.

इ. स. १८८२ नंतर माध्यमिक शिक्षणात मॅट्रिक्युलेशन व स्कूल लीव्हिंग सर्टिफिकेट अशा दोन मुख्य परीक्षा ठेवण्यात आल्या. माध्यमिक शिक्षणक्रमात या वेळी साहित्यिक अभ्यास-क्रमालाच अधिक महत्त्व होते. काही तांत्रिक विद्यालयेही या काळात उघडण्यात आली. माध्यमिक शिक्षणाचे माध्यम इंग्रजी भाषा हेच राहिले.

इ. स. १९४७ मध्ये भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर प्राथमिक शिक्षणाच्या प्रसारासाठी व विकासासाठी सरकारी यंत्रणा कार्यान्वित झाली आहे. प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करण्याविषयी सर्व राज्ये प्रयत्नशील आहेत. प्राथमिक शिक्षण मुख्यतः जिल्हा परिषद व नगरपालिका शिक्षण-मंडळ यांच्याकडे सोपवलेले आहे. तरी काही सरकारी व खासगी प्राथमिक शाळाही निघालेल्या आहेत. ग्रामीण भागातील प्राथमिक शिक्षणासंबंधी अद्यापि काही समस्या आहेत.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर माध्यमिक शिक्षणात बरीच सुधारणा झाली. शहरांप्रमाणेच ग्रामीण व मागसलेल्या विभागातही उच्च माध्यमिक शाळांची आणि विद्यार्थ्यांची संख्या वाढली. बहुतेक शाळांत मातृभाषेतून शिक्षण देण्यात येऊ लागले. अभ्यासक्रमही बहुमुखी बनवण्याचा प्रयत्न करण्यात आला. बहूद्देशीय अनेक शाळा नव्याने निघत आहेत. तसेच उच्च माध्यमिक शाळांत विज्ञानशिक्षणाच्या सोयी वाढत आहेत. ग्रंथालयेही शाळांना जोडण्यात आली आहेत. अनेक उद्योगधंद्यांचे शिक्षणही उच्च मा. शाळांत देण्यात येत आहे. अशा रीतीने माध्यमिक शिक्षणात निरंतर प्रगती व सुधारणा होत आहे.

भारतातील प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाचा प्रसार मिशनरी, इंग्रज अधिकारी व काही भारतीय लोकांच्या पुढाकाराने झाला; पण महाविद्यालयीन शिक्षणाची परिस्थिती मात्र तशी नव्हती. राजा राममोहन राय यांच्यासारख्यांच्या प्रयत्नाने भारतात महाविद्यालये निघाली. इ. स. १८१७ मध्ये कलकत्ता येथे पाश्चात्य धर्तीचे पहिले महाविद्यालय निघाले. पुढे मिशनऱ्यांनी सेरामपूर व मद्रास या ठिकाणी काही महाविद्यालये काढली. इ. स. १८३५ पर्यंत उच्च शिक्षणाची प्रगती अतिशय मंद होती. पण लॉर्ड मेकॉलेच्या शिफारसीमुळे व लॉर्ड बेंटिंकच्या भारती-

यांना पाश्चात्य शिक्षण देण्याच्या धोरणामुळे त्यानंतर महाविद्यालयांची संख्या बरीच वाढली. कलकत्ता, मुंबई, मद्रास, रुडकी या ठिकाणी वैद्यकीय, इंजिनिअरिंग व कायदा यांची महाविद्यालये निघाली.

इ. स. १८५४ मध्ये कलकत्ता, मुंबई व मद्रास येथे लंडन विद्यापीठाच्या धर्तीवर स्वतंत्र विद्यापीठे स्थापन करावी, असे धुडने घोषित केले. त्याप्रमाणे इ. स. १८५७ मध्ये या तीन्ही ठिकाणी विद्यापीठे स्थापन झाली. कलकत्ता विद्यापीठाचा कुलपती गव्हर्नर जनरल व मुंबई आणि मद्रास विद्यापीठांचे कुलपती तिथले गव्हर्नर नेमण्यात आले. या विद्यापीठांना नंतर विज्ञानाचा विभाग जोडण्यात आला. या विद्यापीठांतून विद्यार्थी इंटर, बी. ए. व एम. ए. या परीक्षा उत्तीर्ण होऊ लागले. परीक्षा घेणे व प्रमाणपत्रे देणे, एवढेच काम ही विद्यापीठे सुरवातीला करीत.

लाहोर येथे इ. स. १८६९ मध्ये एका विद्यापीठ–महाविद्यालयाची स्थापना झाली. इ. स. १८८२ मध्ये पंजाब विद्यापीठाची निर्मिती झाली. या विद्यापीठाचे वैशिष्टय असे, की यात संस्कृत व अरबी साहित्याचे देशी भाषेतून अध्यापन होऊ लागले.

नंतरच्या काळात अलाहाबाद येथे आधी महाविद्यालय व मग विद्यापीठ निघाले.

इ. स. १९०४ मध्ये लॉर्ड कर्झनने महाविद्यालये व विद्यापीठे यांवर सरकारी नियंत्रण दृढ केले. त्याविरुद्ध लोकांनी आंदोलन उभारले (इ. स. १९०५) व अनेक राष्ट्रीय शिक्षणसंस्था स्थापन केल्या.

इ. स. १९१६ मध्ये पंडित मदनमोहन मालवीय यांनी बनारस हिंदू युनिव्हर्सिटी स्थापली व इ. स. १९१७ मध्ये पाटणा विद्यापीठ व म्हैसूर विद्यापीठ स्थापन झाले.

इ. स. १९१७ मध्ये सर आशुतोष मुकर्जींच्या प्रयत्नाने कलकत्ता विद्यापीठात स्नातकोत्तर विभाग उघडण्यात आले व जमय तितके स्नातकोत्तर शिक्षण विद्यापीठातच द्यावे, असे ठरवण्यात आले. हे न आवडल्यामुळे या प्रकाराची चौकशी करण्यासाठी सरकारने डॉ. सॅडलर याच्या अध्यक्षतेखाली कलकत्ता विद्यापीठ कमिशन नेमले. कमिशनने अखिल भारतीय शिक्षणाचे सूक्ष्म अध्ययन करून काही शिफारसी केल्या. त्यांतल्या काही अशा–

इंटरमीजिएटचे वर्ग विद्यापीठापासून अलग करावे व इंटरनंतर विद्यापीठात प्रवेश मिळावा. पदवीचा अभ्यासक्रम तीन वर्षांचा करावा.

इंटरमीजिएट वर्गासाठी वेगळी महाविद्यालये उघडावी व त्यांत वैद्यकीय, स्थापत्य, कृषी, वाणिज्य, अध्यापन, व्यवसाय, कला, विज्ञान, इ. विषय शिकवावे.

माध्यमिक शाळा व महाविद्यालये यांतील शिक्षणाचे निरीक्षण व नियंत्रण करण्यासाठी माध्यमिक शिक्षण परिषदा स्थापन कराव्या.

विद्यापीठातील शिक्षणावरचे सरकारी नियंत्रण उठवून त्यांना अधिक स्वातंत्र्य द्यावे.

कुलगुरूचे पद वेतनिक करावे व स्त्रीशिक्षणाकडे अधिक लक्ष द्यावे. तसेच, परीक्षापद्धतीत क्रांतिकारी बदल करावे.

भारत सरकारने इ. स. १९२० मध्ये या शिफारसी स्वीकारल्या. यानंतर भारतात विद्यापीठांची संख्या वाढली. इ. स. १९१८ मध्ये उस्मानिया विद्यापीठाची स्थापना झाली. याचे वैशिष्टय म्हणजे या विद्यापीठात उच्च शिक्षणाचे माध्यम उर्दू भाषा ठेवण्यात आले. तसेच यानंतर अलीगड (१९२०), लखनौ (१९२०), ढाका (१९२१), दिल्ली (१९२२), नागपूर (१९२३), आंध्र (१९२६), आग्रा (१९२७) व अन्नमलै (१९२९) या विद्यापीठांची स्थापना झाली.

याच सुमारास राजकीय क्षेत्रात असहयोगाचे आंदोलन सुरू झाले व पुन्हा एकदा राष्ट्रीय शिक्षणाची भावना प्रबल झाली. गुजरात विद्यापीठ, काशी विद्यापीठ, इ. राष्ट्रीय विद्यापीठांची स्थापना याच कालात झाली. या विद्यापीठांत मातृभाषेतून शिक्षण देण्यात येऊ लागले. विद्यार्थ्यांमध्ये राष्ट्रीय भावना निर्माण करणे, हे या विद्यापीठांचे प्रमुख कार्य होते. विश्वभारती (शांतिनिकेतन) व जामिया मिलिया इस्लामिया यांची निर्मितीही याच काळातली आहे.

उच्च शिक्षण घेतल्यावर चांगली नोकरी मिळते व समाजातही मानमान्यता मिळते, असे दिसून आल्यावर भारताच्या निरनिराळ्या भागांत विद्यापीठे उघडण्याविषयी मागणी होऊ लागली. त्यानुसार इ. स. १९३७ मध्ये त्रिवेंद्रम येथे त्रावणकोर विद्यापीठाची स्थापना झाली. त्याचा मुख्य उद्देश कला व संस्कृती यांचे रक्षण व परिवर्धन करणे, हा होता. याचप्रमाणे, उत्कल विद्यापीठ (१९४३), सागर (१९४६), पूर्व पंजाब (१९४७), राजपुताना (१९४७), गौहाटी (१९४७), पुणे, रुडकी, काश्मीर (१९४८), बडोदा (१९४९), गुजरात, कर्नाटक (१९५०), बिहार (१९५१), महिला विश्वविद्यालय (१९५१–५२), विश्वभारती (१९५१) व श्रीवेंकटेश्वर (१९५५) ही विद्यापीठे स्थापन झाली. नंतरच्या काळातही काही नवी विद्यापीठे निघाली.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर इ. स. १९४८ मध्ये विद्यापीठांच्या सुधारणेच्या दृष्टीने सूचना करण्यासाठी डॉ. राधाकृष्णन यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नेमण्यात आली. तिने आपला अहवाल केंद्र सरकारला सादर केला. त्यातील काही सूचना –

विद्यापीठात प्रोफेसर, रीडर, लेक्चरर व इंस्ट्रक्टर अशा चार श्रेणी असाव्या. त्याशिवाय, प्रत्येक विद्यापीठात काही अनुसंधान अभिसदस्यही (रिसर्च फेलो) असावे.

इंटर किंवा तत्सम परीक्षा झाल्यानंतर विद्यापीठात प्रवेश मिळावा. परीक्षेचे दिवस वगळता वर्षात निदान १८० दिवस हे कामाचे दिवस असावे.

ऑनर्सनंतर एका वर्षाने व बी. ए. किंवा तत्सम परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर दोन वर्षांनी मास्टर डिग्री देण्यात यावी.

एम्. ए. व एम्. एस्सी. या परीक्षांच्या नियमांत साम्य असावे. पीएच्. डी. चे संशोधनकार्य कमीत कमी दोन वर्षे चालावे. यात प्रबंधाशिवाय मौखिक परीक्षाही असावी. डी. लिट्. व डी. एस्सी. या पदव्या मौलिक व उच्च कोटीचे संशोधन करणाऱ्यालाच द्याव्या.

व्यावसायिक शिक्षणाच्या अनेक शाखांबद्दल समितीने पुढील सूचना केल्या आहेत–

भारत हा कृषिप्रधान देश असल्याने कृषिशिक्षण हा मुख्य राष्ट्रीय प्रश्न मानावा. आणि त्याचा समावेश प्राथमिक, माध्यमिक व उच्च शिक्षणात व्हावा. कृषिशिक्षणाच्या संस्था शक्यतो ग्रामीण भागात असाव्या.

वाणिज्य विषयाच्या विद्यार्थ्यांना अध्ययनकालात तीन किंवा चार संस्थांमध्ये व्यावहारिक कार्याचा अनुभव मिळावा.

प्रशिक्षण पाठ्यक्रमात सुधारणा कराव्या आणि अध्यापनाला अधिक महत्त्व द्यावे.

इंजिनिअरिंग व टेक्नालॉजी या विषयांच्या शिक्षणसंस्थांची सुधारणा करावी. तसेच, त्यांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना कारखान्यात प्रथम काम करण्याची संधी द्यावी.

कायद्याच्या कॉलेजांचे पुनर्गठन करावे. तसेच, एका वैद्यकीय कॉलेजात शंभरापेक्षा अधिक विद्यार्थी घेऊ नयेत. त्याला जोडून हॉस्पिटल असावे. ग्रामीण भागातही अशा शिक्षणाची सोय करावी.

प्रादेशिक भाषा व राष्ट्रभाषा यांची उन्नती करावी आणि त्यांत विज्ञानशाखांची पुस्तके तयार करावी. माध्यमिक शाळा व महाविद्यालये यांत मातृभाषा, राष्ट्रभाषा व इंग्रजी या तीन भाषांचे ज्ञान द्यावे. उच्च शिक्षणाचे माध्यम प्रादेशिक भाषा असावे.

परीक्षापद्धतीत सुधारणा करावी. वर्षभर केलेल्या कामाचे गुण परीक्षेच्या गुणांत मिळवावे. डिग्री कोर्स तीन वर्षांचा असावा व प्रत्येक वर्षाच्या शेवटी स्वयंपूर्ण परीक्षा असावी.

महाविद्यालये व विद्यापीठे यांत विद्यार्थ्यांना गुणवत्तेवर प्रवेश द्यावा. लायक व गरजू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या द्याव्या. विद्यार्थ्यांची नियमित वैद्यकीय तपासणी करावी. त्यांच्यासाठी विविध खेळांची व्यवस्था करावी. त्यांना नॅशनल कॅडेट कोअरचे शिक्षण द्यावे. छात्रावासांची सोय करावी आणि विद्यार्थीकल्याण-परामर्श परिषद स्थापावी.

स्त्रीशिक्षणाच्या सोयीत वाढ करावी. स्त्रियांसाठी योग्य असा शिक्षणक्रम तयार करावा.

विद्यापीठाच्या कारभारासाठी व्हिजिटर (राष्ट्रपती), चान्सेलर (राज्यपाल), व्हाइस चान्सेलर (वैतनिक पूर्णकालीन), सिनेट (कोर्ट), प्रबंधकारिणी कौन्सिल (सिंडिकेट), अकॅडेमिक कौन्सिल, फॅकल्टीज्, वोर्ड ऑफ स्टडीज, वित्तसमिती व निवडसमिती असा अधिकारीवर्ग असावा.

उच्च शिक्षणाचा खर्च राज्य सरकारने करावा. खासगी विश्वविद्यालयांना अनुदान द्यावे. ग्रामीण भागात विश्वविद्यालये काढावी.

या शिफारशींपैकी बऱ्याचशा शिफारशी केंद्रीय शिक्षण-परामर्श परिषदेने स्वीकारल्या. त्यानंतर इ. स. १९५३ च्या शेवटी विद्यापीठ अनुदान समिती स्थापन झाली. केंद्र सरकारला उच्च शिक्षणाच्या बाबतीत सल्ला देणे व विद्यापीठांच्या आर्थिक परिस्थितीची पाहणी करून त्यांना अनुदान देणे; तसेच त्यांच्या समस्यांवर उपाय सुचवणे, ही त्या समितीची प्रमुख कार्ये आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतात एकूण उच्च शिक्षणाचा बराच प्रसार झाला व अजूनही होत आहे. विद्यार्थ्यांची महाविद्यालयांत होणारी बेसुमार गर्दी, शिक्षकांची परिस्थिती, शिक्षणाचा स्तर व आर्थिक अडचणी या सांप्रत विद्यापीठांच्या प्रमुख समस्या आहेत व त्या सोडवण्याचे प्रयत्न चालू आहेत.

**राष्ट्रीय शिक्षण** – स्वातंत्र्यप्राप्तीसाठी जे प्रयत्न झाले, त्यांत राष्ट्रीय शिक्षणाला महत्त्वाचे स्थान आहे. लो. टिळकांच्या चतुःसूत्रीपैकी राष्ट्रीय शिक्षण हे एक सूत्र होते. राष्ट्रीय शिक्षण म्हणजे राष्ट्राच्या अभ्युदयासाठी निर्भयपणे व स्वतंत्र रीतीने दिलेले शिक्षण होय. इंग्रजांनी इथे जी शिक्षणपद्धती सुरू केली, ती आपल्या राष्ट्राच्या हितास पोषक नाही, म्हणून काही हिंदी लोकांत असंतोष पसरला होता. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी इंग्रजी शिक्षणपद्धती चांगल्या हेतूने सुरू केली होती. पण त्या शिक्षणामुळे सुशिक्षित झालेल्या सर्वसामान्य तरुणांच्या मनात हिंदी संस्कृतीविषयी तिरस्कार उत्पन्न होऊ लागला. म्हणून भारतीय संस्कृतीबद्दल अभिमान जोपासला जावा, या उद्देशाने काही शिक्षणसंस्था काढण्यात आल्या. त्यांतील पुण्याची न्यू इंग्लिश स्कूल ही संस्था विशेष उल्लेखनीय आहे. बंगालमधील केशवचंद्र सेन यांच्याप्रमाणेच महाराष्ट्रातील अण्णासाहेब कर्वे यांना राष्ट्राच्या प्रगतीसाठी स्त्री-शिक्षणाची नितांत आवश्यकता वाटू

वाटली. म्हणून कर्वे यांनी इ. स. १८९६साली हिंगणे येथे स्त्री-शिक्षणसंस्था सुरू केली. रवींद्रनाथ ठाकूर यांनी इ. स. १९०१ मध्ये शांतिनिकेतन ही संस्था सुरू केली. त्या शाळेत मुलांच्या गुणांचा विकास होण्यास उपयुक्त असे शिक्षण दिले जाई.

पंजाबात स्वामी दयानंद सरस्वती यांचे शिष्य लाला लजपतराय व लाला मुनशीराम यांनी नव्या पिढीत आपल्या धर्माचा व संस्कृतीचा अभिमान उत्पन्न व्हावा, या हेतूने दयानंद अँग्लो-वैदिक कॉलेज व कांगडीचे गुरुकुल या संस्था स्थापन केल्या. स्वामी विवेकानंद यांनी राष्ट्रीय शिक्षणाच्या विचारांना बरीच चालना दिली. पुढे वंगभंगामुळे देशात असंतोष पसरला. इ. स. १९०६ साली राष्ट्रीय सभेने बंगालच्या फाळणीविरुद्ध ठराव केला; तसाच राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्था स्थापन करण्याबद्दलही एक ठराव केला. त्यानंतर बंगालमध्ये 'नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन' ही संस्था स्थापण्यात आली.

श्री. अण्णासाहेब विजापूरकर यांनी जून १९०६ मध्ये कोल्हापूर येथे समर्थ विद्यालयाची स्थापना केली. पुढील वर्षी तळेगाव दाभाडे येथे त्या शाळेचे स्थलांतर करण्यात आले. लवकरच सरकारने समर्थ विद्यालय ही बेकायदेशीर संस्था ठरवली.

समर्थ विद्यालयाच्या धर्तीवर यवतमाळ, अमरावती, पुणे, इ. ठिकाणीही राष्ट्रीय शाळा निघाल्या. यवतमाळची राष्ट्रीय शाळाही सरकारने बंद केली. पुढे इ. स. १९१८ मध्ये समर्थ विद्यालय ही संस्था नवीन समर्थ विद्यालय या नावाने पुन्हा सुरू करण्यात आली.

त्याच सुमारास देशात असहकाराची चळवळ सुरू झाली. त्या चळवळीत सरकारी शिक्षणसंस्थांवर बहिष्कार घालणे हा एक कार्यक्रम होता. त्यामुळे मोकळे झालेल्या विद्यार्थ्यांसाठी राष्ट्रीय शिक्षणसंस्थांची आवश्यकता वाटू लागली. म्हणून १९२१ साली पुण्यात टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना करण्यात आली. त्यानंतर महाराष्ट्रात निरनिराळ्या गावीं सुमारे पन्नास राष्ट्रीय शाळा निघाल्या.

राष्ट्रीय शिक्षणात मातृभाषेचा अभ्यास, मातृभाषेतून शिक्षण, धर्मशिक्षण, आपला इतिहास, शारीरिक शिक्षण व राष्ट्रभाषा हिंदी यांना महत्त्वाचे स्थान दिले गेले.

असहकाराच्या दिवसांत गुजरात विद्यापीठ, बिहार विद्यापीठ, काशी विद्यापीठ, जामिया मिलिया इस्लामिया, इ. अनेक संस्थांची स्थापना झाली. इ. स. १९३० साली एक अखिल भारतीय राष्ट्रीय शिक्षण परिषद बोलावण्यात आली. त्या परिषदेत राष्ट्रीय शिक्षणाचे ध्येय स्पष्ट व मर्यादित केले गेले. राष्ट्रीय शिक्षणाचा हेतू 'स्वराज्यप्रेमी, चारित्र्यसंपन्न, सुसंस्कारी नागरिक तयार करणे हा नसून, शक्य तितक्या लवकर स्वराज्य मिळवून देण्यासाठी जीवन अर्पण करणारे स्वराज्यसेवक निर्माण करण हा आहे' असे त्या परिषदेत ठरवण्यात आले.

पुढे म. गांधींची असहकाराची चळवळ जोरात सुरू होऊन राष्ट्रीय शाळांतील बहुतेक शिक्षक व काही विद्यार्थी तुरुंगात गेले आणि त्या शाळा बंद पडल्या.

राष्ट्रीय शिक्षणामुळे लोकांत स्वाभिमान व आत्मविश्वास उत्पन्न झाला, त्यागाची भावना वाढली आणि असंख्य तरुण स्वातंत्र्याच्या लढ्यात सामील झाले.

**मूलोद्योग शिक्षण** – म. गांधींनी या शिक्षणाचे प्रवर्तन केले. इ. स. १९३५ साली भारताच्या सात प्रांतांमध्ये काँग्रेसची सरकारे निर्माण झाली. त्यांनी राष्ट्राच्या पुनर्निर्माणासाठी एक कार्यक्रम बनवला. त्याच्या ज्या १४ आधारशिला होत्या, त्यांत मूलोद्योग शिक्षण हीही एक होती. गांधीजी मूलोद्योग शिक्षणाला सामाजिक परिवर्तनाचे एक साधन समजत होते. या शिक्षणात मुलांनी शाळेत गेल्यावर काही तरी स्वतः निर्माण करावे आणि त्या निर्मितिप्रक्रियेतूनच विविध विषय शिकावे, असा गांधीजींचा उद्देश होता. सूतकताई, वस्त्रे विणणे, ग्रामोद्योगातून लोकोपयोगी वस्तू निर्माण करणे, इ. गोष्टी मूलोद्योग शिक्षणक्रमात दाखल व्हाव्या, असे गांधीजींना वाटत होते. त्यांनी या पद्धतीत स्वावलंबनावर भर दिला होता. मूलोद्योग शिक्षणातून मुलांमध्ये आत्मविश्वास निर्माण होईल, अशी गांधीजींची श्रद्धा होती. इ. स. १९३८ च्या हरिपूर येथील काँग्रेस अधिवेशनात गांधीजींच्या या मूलोद्योग शिक्षणाला मान्यता दिली गेली. तिथून पुढे या शिक्षणात अनेक प्रयोग झाले. पण १९३९ साली दुसरे महायुद्ध सुरू झाले आणि राजकीय मतभेदामुळे काँग्रेसच्या सरकारांनी त्यागपत्रे दिली. त्यामुळे या शिक्षणाच्या प्रयोगांची पीछेहाट झाली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पुन्हा या शिक्षणाला चालना मिळाली. पण तरीही या शिक्षणपद्धतीत फारशी प्रगती होऊ शकली नाही.

मूलोद्योग शिक्षणाची स्पष्ट अशी व्याख्या नाही. त्यामुळे मूलोद्योग शिक्षण म्हणजे काय, हे सर्वसामान्य लोकांना समजत नाही. गांधीजींनी मूलोद्योग शिक्षणाच्या सिद्धान्ताचे प्रतिपादन करताना एक गोष्ट स्पष्ट सांगितली होती, की शिक्षणाचे केंद्र उत्पादक कार्य हे असले पाहिजे. पण पुढे त्याचेही भिन्न भिन्न अर्थ निर्माण झाले. या शिक्षणाच्या द्वारा मुलांमध्ये आत्मविश्वास निर्माण झाला पाहिजे आणि मूलोद्योग शिक्षणसंस्था या स्वावलंबी बनल्या पाहिजेत, हा त्या शिक्षणाचा मूळ उद्देश. याचा अर्थ असा, की त्या शाळेत मुलांनी निर्माण केलेल्या वस्तूंच्या विक्रीतून शिक्षकांचे वेतन देता आले पाहिजे. पण अनुभवांती ही गोष्ट व्यवहारात येऊ शकली नाही. कोणतीही मूलोद्योग

शिक्षणसंस्था अशा प्रकारे स्वावलंबी बनू शकली नाही. पुढे पुढे तर सरकारला या स्वावलंबनाची कास सोडून द्यावी लागली. भारत सरकारने मूलोद्योग शिक्षणाचा अर्थ स्पष्ट करण्यासाठी 'बुनियादी शिक्षाकी संकल्पना' या नावाची एक पुस्तिका प्रकाशित केली. तिच्यात स्वावलंबनाचा उल्लेखही केलेला नाही.

**स्त्रीशिक्षण** – प्राचीन काळी भारतीय स्त्रियांची शिक्षणाच्या बाबतीत चांगली प्रगती झालेली होती.

सनपूर्व सुमारे ८०० पर्यंत – या काळातील स्त्रियांचा दर्जा पुरुषांबरोबरचा होता. पत्नी शब्दाची व्युत्पत्ती तिच्या यज्ञ-कर्तव्याशी निगडित आहे. त्यावरून पत्नीला यज्ञात महत्त्वाचे काम असे, हे दिसून येईल. यज्ञाच्या वेळी तिचे व्रतोपनयन होत असे व पतीबरोबर तिलाही दीक्षा मिळे. वेदमंत्रांची व त्यांच्या अर्थाची चांगली माहिती असल्यावाचून वैदिक यज्ञात भाग घेता येणे शक्य नसल्यामुळे त्यासाठी उपनयनाची आवश्यकता असे व या काळात सामान्यतः सर्व स्त्रियांचे उपनयन होत असे. काही स्त्रिया त्यानंतर बराच काल अध्ययनात घालवीत, असे दिसते. घोषा, लोपामुद्रा यांसारख्या स्त्रिया मंत्रद्रष्टया म्हणून प्रसिद्ध आहेत. याव्यतिरिक्त आणखी कित्येक स्त्रिया विदुषी असाव्या. या शिक्षणाबरोबरच संपन्न कुलातील स्त्रिया गायनवादनादी ललित कलांचेही शिक्षण घेत.

या कालखंडाच्या शेवटी स्त्रियांचे वैदिक अध्ययन मागे पडू लागले व यज्ञात त्यांचा भाग औपचारिकच राहू लागला.

सनपूर्व सुमारे ८०० ते सनपूर्व सुमारे २०० – नित्य गरज असणाऱ्या वैदिक मंत्रांचे ज्ञान व प्रतिदिन विहित असलेले धार्मिक विधी करण्याची पात्रता या कालात स्त्रियांमध्ये होती. गृह्याग्नीतील रात्रीचा होम पत्नीनेच करायचा असे. दिवसाचा होमही तिनेच करावा, असे काहींचे मत होते. सुगीच्या वेळी करायचा सीतायज्ञ तर स्त्रियांनीच करावा, अशी रूढी होती. स्नस्तरारोहण संस्काराच्या वेळी पत्नीने स्वतः आपल्या उपनीत मुलांसमवेत पुष्कळ मंत्र म्हणायचे असत. वनवासात जायच्या वेळी राम जेव्हा कौसल्येचा निरोप घ्यायला गेला, तेव्हा ती एकटीच होम करण्यात गुंतली होती. वालीची पत्नी तारा हीही मंत्रवेत्ती होती. या उदाहरणांवरून या काळी मुलींचे उपनयन होत असे, हे कळून येईल. उपनयनानंतर वयात येईपर्यंत काही मुली थोडेसे वेदाध्ययन करीत व नंतर लगेच विवाह करीत. अशा मुलींना सद्योद्वाहा म्हणत. काही मुली मात्र लवकर विवाह न करता वेद-वेदान्तपूर्वमीमांसादी शास्त्रांचे अध्ययन करीत. हे शिक्षण त्या घरीच पिता किंवा भ्राता याच्याकडून घेत. त्यांना ब्रह्मवादिनी म्हणत. याज्ञवल्क्याची पत्नी मैत्रेयी ही ब्रह्मवादिनी होती. सुलभा, वडवा प्रातीथेयी, गार्गी, वाचक्नवी या प्रसिद्ध विदुषी होत्या. काही सुशिक्षित स्त्रिया आजन्म ब्रह्मचर्य पाळून अध्यापनाचा व्यवसाय करीत.

क्षत्रिय व वैश्य कुलांतील बऱ्याच स्त्रिया भिक्षुणी बनून आपले आयुष्य तत्त्वज्ञानाच्या व्यासंगात घालवीत. थेरीगाथा या ग्रंथात अशा स्त्रियांची चरित्रे व गाथा आहेत.

सनपूर्व २५० च्या सुमारास मात्र मुलींचे उपनयन बंद झाले. तसेच त्यांचा वेदाधिकार व यज्ञाधिकारही संपुष्टात आणला गेला. याचे प्रमुख कारण म्हणजे आर्यांनी आर्येतर स्त्रियांशी विवाह करणे सुरू केले, हे होय. आर्येतर स्त्रिया घरात आल्याने आर्य स्त्रियांचा दर्जाही कमी होऊ लागला. आर्येतर स्त्रियांना संस्कृत येत नसे. त्यामुळे त्यांना वेदाधिकार किंवा यज्ञाधिकार देणे शक्य नव्हते. पुष्कळदा आर्येतर स्त्रियांना त्यांचे पती धर्मकार्यात सहभागी करीत असावे. पण हा अनाचार टाळावा, म्हणून ऐतिशायनादी आचार्यांनी स्त्रियांचा वेदाधिकार काढून घेण्याचे योजले. जैमिनी, बादरायण वगैरे आचार्यांनी त्याला विरोध केला. पण त्यांना यश आले नाही. मुलींचे विवाह या वेळी तेरा-चौदाव्या वर्षी होत. त्यामुळे उपनयनानंतर त्यांचे फारसे वेदाध्ययन होत नसे. उपनयन हा त्यामुळे निरर्थक संस्कार बनत चालला. तेव्हा स्त्रियांचे उपनयन करू नये व त्यांना वेद शिकवू नये, अशासारखी मते समाजात लोकप्रिय होऊ लागली. त्याचा स्त्रीशिक्षणावर अनिष्ट परिणाम झाला.

सनपूर्व सुमारे २०० ते इ. स. १२०० – या कालखंडात पहिली तीन-चार शतके मुलींचे उपनयन एक संस्कार म्हणून चालू होते. पण त्यानंतर वेदाध्ययन वगैरे काही होत नसे. इ. स. च्या पाचव्या शतकाच्या पुढे मुलींचा उपनयन संस्कार बंद झाला. त्यामुळे त्यांच्या प्राथमिक शिक्षणाकडेही दुर्लक्ष होऊ लागले. दुर्दैवाने मुलींचे विवाहाचे वयही भराभर कमी होऊ लागले. आणि इ. स. च्या पाचव्या शतकापासून मुलींची लग्ने अकरा-बाराव्या वर्षी होऊ लागली. तेव्हा साहजिकच त्यांचे प्राथमिक शिक्षण बंद झाले.

कुलीन, संपन्न व सुसंस्कृत घराण्यांमध्ये मात्र मुलींचे वेदाध्ययन बंद पडल्यावरही त्यांना वाङ्मयाचे थोडेसे शिक्षण देत. इ. स. च्या पहिल्या दोन-चार शतकांत विवाहकाल बारा-तेरा वर्षांचा होता. तोपर्यंत मुलींना लेखनवाचन वगैरे शिकवून वाङ्मयाचीही ओळख करून देत. या वेळी स्त्रियांपैकी काही प्राकृतांचा विशेष व्यासंग करीत व त्या भाषांत कविताही करीत, हे गाथासप्तशतीवरून दिसून येते. इ. स. च्या चौथ्या शतकानंतर जेव्हा संस्कृताचा विशेष अभ्यास होऊ लागला, तेव्हा काही स्त्रियाही संस्कृतामध्ये ग्रंथ लिहू लागल्या. अर्थानुरूप भाषाशैलीबद्दल शीलभट्टारिका नामक कवयित्रीची ख्याती होती. शृंगाररस-

प्रधान मनोहर कविता करण्याबद्दल गुजरातमधील देवी नावाची कवयित्री प्रसिद्ध होती. वऱ्हाडात विजयांकेने उत्तम काव्याबद्दल कीर्ती मिळवली होती. काही स्त्रिया वैद्यकाचाही अभ्यास करीत. रुसा नामक एका स्त्री वैद्याने स्त्रीरोगावर एक पुस्तक लिहिले होते. ते इतके उपयुक्त होते, की आठव्या शतकात त्याचे अरबी भाषेत भाषांतर करण्यात आले. दुर्दैवाने हे कोणतेच ग्रंथ सांप्रत उपलब्ध नाहीत.

या विदुषी बहुतेक अमात्य, प्रधान, मांडलिक यांसारख्या संपन्न व सुसंस्कृत कुलातील असाव्या. कारण इ. स.च्या नवव्या शतकापर्यंत अशा घराण्यात स्त्रियांना उच्च शिक्षण देत असत व शास्त्राभ्यास आणि काव्य करण्याची त्यांच्या अंगी पात्रता असे, असे काव्यमीमांसेवरून कळते. संस्कृत नाटकांतील नायिकांवरून तेच अनुमान निघते. संपन्न कुलातील मुलींना संगीत, चित्रकला, फुलसजावट वगैरे ललित कलांचेही शिक्षण देत, असे संस्कृत नाटके व कामसूत्र यांवरून दिसते.

इ. स. च्या आठव्या-नवव्या शतकाच्या सुमारास जेव्हा मुलींची लग्ने नवव्या-दहाव्या वर्षी होऊ लागली, तेव्हा बऱ्याचशा मुली अशिक्षित राहू लागल्या.

मुसलमानी अंमलामध्ये साक्षरतेचे हे प्रमाण भराभर कमी होऊ लागले. राज्यक्रांतीमुळे बहुतेक संपन्न व सुसंस्कृत कुलांची वाताहात झाली. काही हिंदू कुले संपन्न झाली; पण ती बहुतेक मुळात हीन संस्कृतीची असल्यामुळे मुलींना शिक्षण देण्याकरिता खासगी शिक्षक ठेवण्याची प्रथा त्यांच्यांत निर्माणच झाली नाही. मुलींच्या शिक्षणासाठी सार्वजनिक शाळा नव्हत्याच, त्यामुळे मुसलमानी अंमलात बहुतेक स्त्रिया निरक्षरच राहिल्या. राजपूत राजघराण्यात राजकुमारींना शिक्षण देत असत. जैन विधवांनाही १९ व्या शतकाच्या प्रारंभी मठात धर्मग्रंथ वाचता येण्याइतके शिक्षण देत. पण ही उदाहरणे अपवादात्मक आहेत.

मध्ययुगाच्या शेवटी शेकडा दहापेक्षा जास्त स्त्रिया साक्षर नव्हत्या; तरीही सामान्य स्त्रीसमाज असंस्कृत होता, असे म्हणता येणार नाही. या वेळी पुराणांच्या माध्यमातून हिंदूंच्या संस्कृतीचे ज्ञान लोकांना त्यांच्या भाषेतून देण्याची प्रथा दृढमूल झाली होती. त्यामुळे धर्म, नीती, तत्त्वज्ञान व प्राचीन संस्कृती यांचे ज्ञान निरक्षर लोकांनाही मिळत असे. निरक्षर असूनही हिंदू स्त्रियांनी हिंदू संस्कृतीचे जे संरक्षण केले आहे, त्याचे बरेचसे श्रेय पुराणश्रवण, पौराणिक धर्माचे पालन व मध्ययुगातील संतकवींच्या लोकभाषांतील वचनांचे पठण यांनाच आहे.

मध्ययुगात क्षात्र घराण्यातील व राजकुलातील स्त्रियांना राज्यकारभाराचे व लष्करी कवायतीचे शिक्षण देत असत. मस्सग लोकांचा राजा अलेक्झांडरशी झालेल्या लढाईत जेव्हा पडला, तेव्हा त्याच्या विधवा राणीने राजधानीच्या बचावाचे व राज्यकारभाराचे काम आपल्याकडे घेतले. सातवाहन घराण्यातील नयनिका राणी व वाकाटक वंशातील प्रभावती गुप्ता राणी या दोघीही आपल्या पतीच्या पश्चात् मुलांच्या अज्ञानावस्थेत आपल्या राज्यांचा कारभार पहात होत्या. काश्मीरमध्ये सुगंधा व दिद्दा या दोन राज्यकर्त्या राण्या होऊन गेल्या. चालुक्यांच्या राजवटीत तर राजघराण्यातील पुष्कळ स्त्रियांकडे राज्यकारभारातील जबाबदारीची कामे सोपवीत असत. विजयभट्टारिका, अक्कादेवी, मइलादेवी, कुंकुमदेवी व लक्ष्मीदेवी या चालुक्य राजघराण्यातील स्त्रिया इ. स. च्या सातव्या व अकराव्या शतकात नगराधिकारी किंवा प्रांताधिकारी म्हणून काम करीत होत्या. घोड्यावर बसणे, तलवार व भाला चालवणे, पोहणे, इ. गोष्टी त्यांना येत असत. आपल्या गावाचे रक्षण करता करता धारातीर्थी पडलेल्या स्त्रियांच्या स्मरणार्थ कोरलेले काही लेख सापडले आहेत. मराठा व राजपूत स्त्रियांनाही मध्ययुगात लष्करी शिक्षण देत असत.

इंग्रजी अमदानीच्या सुरवातीला स्त्रीशिक्षणाचा अभावच होता. पण पुढे राजा राममोहन राय, ईश्वरचंद्र विद्यासागर, दयानंद सरस्वती, विवेकानंद, न्या. रानडे, म. फुले, महर्षी कर्वे यांसारख्या विचारवंतांनी स्त्रीशिक्षणाच्या बाबतीत पुढाकार घेतला व हळूहळू स्त्रिया शाळेत जाऊन शिकू लागल्या. या कामी महर्षी कर्वे यांचे कार्य व्यापक आणि उपयुक्त ठरले. कर्व्यांनी आपले सारे आयुष्य स्त्रीशिक्षणासाठीच वाहिले. हळूहळू अनेक कन्याशाळांची स्थापना झाली. स्त्रीशिक्षिका तयार करण्याच्या दृष्टीने प्रशिक्षणसंस्था निघाल्या. शिक्षिकेचा पेशा स्वीकारणाऱ्या स्त्रियांसाठी अनेक प्रलोभने ठेवली गेली. कोल्हापूर, बडोदे, औंध, ग्वाल्हेर, इ. अनेक संस्थानांत स्त्रीशिक्षण मोफत ठेवलेले होते. मुलींच्यासाठी असलेल्या शाळांच्या अभ्यासक्रमात शिवणकाम, विणकाम, कशिदाकारी, गृहोद्योग, गायन, चित्रकला, रंगकाम, इ. ललित कला यांचा समावेश होता.

इ. स. १९४७ पर्यंत भारतात स्त्रीशिक्षणाचा प्रसार बराच झाला होता; पण तो वरच्या वर्गांपर्यंत मर्यादित होता. खेड्यातील मुलींनी शाळेत जावे, म्हणून त्यांना फीत सवलत, मोफत साहित्य अशी प्रलोभने दाखवण्यात येत होती. शाळेत लेखन, वाचन, साधे गणित हे विषय शिकवीत. श्रवण, वाचन, पाठांतर अशा पद्धतीने अभ्यास होई. धार्मिक शिक्षण शाळेत देत नसत. पुढच्या काळात प्राथमिक शिक्षण मुलांमुलींना सक्तीचे करण्यात आले. मुलींच्यासाठी स्वतंत्र शाळा व स्वतंत्र अभ्यासक्रम ठेवण्यात आले.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर शिक्षणासंबंधी विचार

करण्यासाठी डॉ. राधाकृष्णन यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नेमण्यात आली. मुलांच्यासाठी असलेल्या विद्यालयातून मुलींच्या दृष्टीने योजना आखल्या जाव्या, मुलींच्या जीवनगरजांचा विचार कॉलेजातून व्हावा व त्याप्रमाणे त्यांना शिक्षण मिळावे, अशा प्रकारच्या सूचना त्या समितीने केल्या. त्याप्रमाणे मद्रास, वेंकटेश्वर, बडोदे, दिल्ली, कलकत्ता, अलाहाबाद अशा अनेक विद्यापीठांनी गृहविज्ञान या विषयाला अभ्यासक्रमात स्थान दिले. स्त्रियांना आधुनिक शास्त्रीय पद्धतीने त्याचे शिक्षण देण्यास सुरवात केली.

स्त्रीशिक्षणाचाच केवळ विचार करण्याकरिता १९५८ मध्ये श्रीमती दुर्गाबाई देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रीय स्त्री-शिक्षण समिती नेमण्यात आली. तिने काही शिफारसी केल्या आहेत. शाळा नसलेल्या ठिकाणी शाळा काढणे; मागसल्या भागाकरिता मध्यवर्ती शाळा व वसतिगृह काढणे, वाहनांची सोय करणे; गरीब मुलींच्या दुपारच्या जेवणाची सोय करणे; गरजू मुलींना पुस्तके, गणवेष व इतर शालेय साहित्य मोफत पुरवणे; शिक्षणाचा दर्जा उंचावणे, इ. काही त्यांपैकी शिफारसी आहेत.

या समितीने स्त्रीशिक्षणाचा प्रश्न अत्यंत व्यापक तऱ्हेने हाताळला आहे. स्त्री ही सुमाता आणि सुपत्नी बनण्यासाठी तिच्या जीवनात व्यवसायाची आवश्यकता आहे. सामाजिक दृष्टचा उपयुक्त व वैयक्तिक दृष्टचा साफल्याची भावना निर्माण करणारा असा जीवनव्यवसाय प्रत्येक व्यक्तीच्या विकासासाठी आवश्यक असतो. त्यासाठी घराबाहेरचा एखादा योग्य तो व्यवसाय स्वीकारल्याने स्त्रीच्या विचाराचे कार्यक्षेत्र रुंदावते, तिच्या व्यक्तित्वात एक प्रकारचा समतोलपणा येतो. त्यामुळे माता आणि पत्नी या भूमिकांसाठीही ती अधिक कार्यक्षम ठरते, असे समितीने म्हटले आहे.

इ. स. १९६४ मध्ये कोठारी आयोगाची नेमणूक झाली. त्याने आपल्या अहवालात स्त्रीशिक्षणाच्या बाबतीत विशेष सूचना केलेल्या नाहीत; पण स्त्रीशिक्षणावर नेमलेल्या स्वतंत्र समित्यांनी सुचवलेल्या सर्व शिफारसी मान्य केल्या आहेत.

या आयोगाने दहावीपर्यंत मुलामुलींना तोच अभ्यासक्रम सुचविला आहे; कार्यानुभव व भाषेचा अभ्यास या बाबतींत निवड करायला मोकळीक दिली आहे आणि सर्व विषय खालच्या व वरच्या अशा दोन पातळ्यांवर अभ्यासता येतील असे सुचवले आहे.

आज स्त्रीशिक्षणाचा बराच प्रसार झाला आहे. घर व बालसंगोपन यापलिकडे स्त्रीचे क्षेत्र विस्तृत झाले आहे. ती आज पुरुषाबरोबर व्यवसाय करते व समाजाचा सर्वांगीण विकास व्हावा म्हणून पुरुषाबरोबर सर्व जबाबदाऱ्या स्वीकारते. आज पुरुषांना खुले असलेले सर्व दरवाजे स्त्रियांनाही खुले आहेत. स्थापत्य, शेती, वैद्यक, वाणिज्य, कायदा, अध्यापन, कला व शास्त्र या सर्व शाखांत स्त्रिया शिक्षण घेऊन व्यवसाय करीत आहेत. [प्राचीन भारतीय शिक्षणपद्धति– श्री. अ. स. अळतेकर, १९३५; भारतमें शिक्षा– डॉ. श्रीधरनाथ मुकर्जी, बडोदा, १९६०; भारतीय शिक्षाका संक्षिप्त इतिहास– श्री. वंशीधर सिंह, भूदेव शास्त्री, आगरा, १९५७; भारतीय स्त्रीशिक्षण– प्रा. कुंदा दाभोलकर, पुणे, १९७३; महाराष्ट्रातील राष्ट्रीय शिक्षणाचा इतिहास– श्री. पां. श्री. आपटे, १९५८; हिं. वि. को.; उ. र.]

**शिक्षा** पहिले वेदांग. याला वेदरूपी पुरुषाचे नाक असे म्हटले आहे. स्वर, वर्ण, इत्यादींचा उच्चार कसा करावा, ते शिकविणारी विद्या म्हणजे शिक्षा होय, असा शिक्षा शब्दाचा व्युत्पत्तिलभ्य अर्थ आहे.

वेदमंत्राचा उच्चार नीट करण्यासाठी स्वराच्या ज्ञानाची अत्यंत आवश्यकता आहे. स्वर हे शब्दांचे अर्थनियामक आहेत. शब्द एकच असला तरी त्याच्या उच्चारात स्वरभेद झाला, की त्याचा अर्थ भिन्न होतो. स्वरात थोडी जरी चूक झाली, तरी अर्थाचा अनर्थ होतो. म्हणून पाणिनीय शिक्षेत (५२) सांगितले आहे, ते असे ––

**मन्त्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह।**
**स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात्॥**

अर्थ – जो मंत्र स्वर किंवा वर्ण यांनी हीन असतो, तो मिथ्या प्रयुक्त झाल्यामुळे अभीष्ट अर्थाचे प्रतिपादन करीत नाही. ज्याप्रमाणे, स्वराच्या चुकीच्या उच्चारणामुळे इंद्रशत्रू हा शब्द यजमानाचा घातक ठरला, त्याप्रमाणे तो वाग्वज्र होऊन यजमानाचा नाश करतो.

या श्लोकात एका अत्यंत प्राचीन आख्यायिकेचा संकेत आहे. ती अशी – त्वष्टयाने आपला शत्रू जो इंद्र, त्याच्या नाशासाठी एक मोठा यज्ञ आयोजित केला. त्यासाठी ऋत्विजांची नेमणूक केली. यज्ञातील प्रधान मंत्र होता – इन्द्रशत्रुर्वर्धस्व = इंद्राचा शत्रू (=घातक) वाढो. या ठिकाणी इंद्रशत्रू या शब्दाचा इंद्राचा शत्रू असा षष्ठी तत्पुरुष समास अभीष्ट होता. इंद्रशत्रू हा शब्द अन्तोदात्त उच्चारल्यानेच हा अर्थ मिळू शकत होता. पण ऋत्विजांच्या बेसावधपणामुळे तो शब्द आदि-उदात्त उच्चारला गेला. या स्वरपरिवर्तनामुळे हा शब्द तत्पुरुष समासाऐवजी बहुव्रीही समास बनला आणि त्याचा अर्थ इंद्र ज्याचा शत्रू (=घातक) आहे, असा झाला. अशा प्रकारे, यज्ञाचे फल यजमानाला नेमके उलटे मिळाले. म्हणजे इंद्राने त्याचा नाश केला.

म्हणून प्राचीन वैदिक गुरू मंत्रोच्चारणाच्या बाबतीत फार

आवश्यक असत. तीच परंपरा आजही तशीच अविच्छिन्नपणे चालू आहे.

वैदिक कालातच या वेदांगाकडे वैदिक ऋषींचे लक्ष वेधले होते. ब्राह्मणग्रंथांत शिक्षेशी संबंधित असे नियम कुठे कुठे आढळतात. तैत्तिरीय उपनिषदात (१.२) शिक्षेची वर्ण, स्वर, मात्रा, बल, साम व संतान अशी सहा अंगे सांगितली आहेत. त्यांचे क्रमशः विवरण असे –

वर्ण म्हणजे अक्षर. वेदांच्या ज्ञानासाठी संस्कृत वर्णमालेचे ज्ञान अत्यंत आवश्यक आहे. संस्कृत वर्णमालेत त्रेसष्ट किंवा चौसष्ट वर्ण आहेत, असे पाणिनीय शिक्षेत सांगितले आहे.

उदात्त, अनुदात्त व स्वरित असे तीन स्वर आहेत. उच्च स्वराला उदात्त, नीच स्वराला अनुदात्त व या दोहोंच्या मधल्या स्वराला स्वरित असे नाव आहे. वेदाच्या प्रत्येक शब्दात एखादा तरी स्वर उदात्त व बाकीचे अनुदात्त असतात, असा सर्वसाधारण नियम आहे. विशिष्ट परिस्थितीत एखादा अनुदात्त स्वर स्वरित बनतो.

स्वराचा उच्चार करायला जेवढा वेळ लागतो, त्याला मात्रा असे म्हणतात. ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत असे मात्रेचे तीन प्रकार आहेत. एका मात्रेचा उच्चार करायला जेवढा वेळ लागतो, त्याला ऱ्हस्व; दोन मात्रांचा उच्चार करायला जेवढा वेळ लागतो, त्याला दीर्घ व तीन मात्रांचा उच्चार करायला जेवढा वेळ लागतो, त्याला प्लुत असे म्हणतात.

बल म्हणजे वर्णोच्चाराचे स्थान होय. अक्षर उच्चारताना जो प्रयास पडतो, त्याला प्रयत्न असे म्हणतात.

साम याचा अर्थ साम्य असा आहे. दोषरहित व माधुर्यादी गुणांनी युक्त अशा उच्चारणाला साम असे म्हणतात.

संतान म्हणजे संहिता, अर्थात पदांचे सांनिध्य. ते असले तर पदांचा संधी करता येतो.

प्रत्येक वेदात वर्णांचा उच्चार एकाच प्रकाराने होत नाही. मूर्धन्य ष चा उच्चार शुक्ल यजुर्वेदात रेफाच्या किंवा उष्म-वर्णांच्या बरोबर ख असा होतो. याच कारणामुळे प्रत्येक वेदाचा स्वतःचा असा शिक्षाग्रंथ असतो. प्रातिशाख्ये ही शिक्षेचे प्राचीनतम उपलब्ध ग्रंथ आहेत.

काही शिक्षाग्रंथांची माहिती अशी––

पाणिनीय शिक्षा – ही शिक्षा सुप्रसिद्ध व लोकप्रिय आहे. लोक व वेद या उभय शास्त्रांना उपयोगी असल्यामुळे ती महत्त्वाची आहे. हिच्यात साठ श्लोक असून, उच्चारणासंबंधीच्या विषयांचे वर्णन केलेले आहे. हिच्या रचनाकाराची माहिती मिळत नाही. ग्रंथाच्या शेवटी पाणिनीचा उल्लेख दाक्षीपुत्र असा केला असून, त्याच्या स्तुतिपर काही श्लोक दिले आहेत, त्यावरून पाणिनी या ग्रंथाचा कर्ता नाही, हे स्पष्ट होते. पाणिनीच्या मतानुयायी कोण्या वैयाकरणाने हा ग्रंथ रचला असावा. हा ग्रंथ सारगर्भ असून, त्याच्या अध्ययनाने विषयाचे ज्ञान चांगल्या प्रकारे होते. या ग्रंथावर अनेक टीका लिहिलेल्या आहेत.

याज्ञवल्क्य शिक्षा – हिचा संबंध शुक्ल यजुर्वेदाच्या वाजसनेयी संहितेशी आहे. हिच्यात २३२ श्लोक असून, त्यांत वैदिक स्वरांचे सोदाहरण वर्णन केलेले आहे.

वासिष्ठी शिक्षा – हिचाही संबंध वाजसनेयी संहितेशी आहे. या ग्रंथात आलेल्या ऋक् मंत्रांचे व यजुर्मंत्रांचे पार्थक्य यात विस्ताराने केले आहे.

याव्यतिरिक्त, कात्यायनी शिक्षा, पाराशरी शिक्षा, मांडव्य शिक्षा, अमोघनंदिनी शिक्षा, माध्यंदिनी शिक्षा, वर्णरत्नप्रदीपिका, केशवी शिक्षा, मल्लशर्म शिक्षा, नारदीय शिक्षा, मांडूकी शिक्षा, इ. अनेक शिक्षाग्रंथ आहेत.

या शिक्षाग्रंथांपेक्षाही प्राचीन अशी शिक्षासूत्रे अस्तित्वात होती. त्यांपैकी आपिशली, पाणिनी व चंद्रगोमी यांनी रचलेली शिक्षासूत्रे प्रकाशित आहेत.

या शिक्षाग्रंथांवरून, प्राचीन भारतीय ऋषींनी भाषाशास्त्राच्या या अंगाचे किती वैज्ञानिक पद्धतीने अध्ययन केले होते, ते कळून येते. [ वै. सा. सं. ]

## शिक्षात्रय

बौद्ध साधनेचा एक भाग. शीलशिक्षा (अधिशील), समाधिशिक्षा (अधिचित्त) आणि प्रज्ञा हा बौद्धांच्या विशुद्धीचा त्रिविध मार्ग आहे.

कोणत्याही प्राण्याची हिंसा न करणे आणि आचारधर्माची पूर्ती करणे म्हणजे शील होय. भिक्षूंनी शीलसंपन्न होऊन समाधीची भावना करायची असते. कुशलचित्ताची एकाग्रता म्हणजे समाधी होय. समाधीच्या द्वारे चित्ताला शुभ धर्मांच्या ठिकाणी समाहित केल्याने क्लेश दूर होतात. मात्र ते दूर झाले तरी निर्मूल होत नाहीत. त्यासाठी प्रज्ञेची भावना करावी लागते. मोहरूपी अग्नीचा उपशम करण्यासाठी प्रज्ञेची आवश्यकता असते. धर्मांच्या स्वभावाचा प्रतिवेध करणे हे प्रज्ञेचे लक्षण आहे. अशा प्रकारे त्रिशिक्षेची साधना करून विशुद्धी प्राप्त करता येते. [ बौ. ध. द. ]

## शिक्षाव्रते

जैनांच्या आचारधर्माचा एक भाग. देशावकाशिक, सामायिक, प्रोषधोपवास व वैयावृत्य अशी चार शिक्षाव्रते आहेत.

गुणव्रतात ज्या प्रदेशमर्यादा सांगितल्या आहेत, त्या कमी कमी करीत जाणे म्हणजे देशावकाशिक होय.

सकाळ, दुपार व सायंकाळ अशा तीन्ही वेळी नियमित कालपर्यंत एका ठिकाणी बसून तीर्थंकरांच्या गुणांचे स्तवन करणे हे सामायिक होय.

अष्टमी व चतुर्दशी या पर्वतिथींस उपोषण करणे किंवा एकभुक्त राहणे म्हणजे प्रोषधोपवास होय.

यथाशक्ति सत्पात्र व क्षुधित यांना अन्नदान, रुग्णाला औषधदान, भयग्रस्ताला अभयदान आणि जिज्ञासूला ज्ञानदान करणे म्हणजे वैयावृत्य होय. [ जै. ध. ]

## शीख पंथ

प्रथम भक्तिमार्गी पण पुढच्या काळात क्षात्रधर्मी बनलेला पंजाबातील एक पंथ. शीख याचा अर्थ शिष्य असा आहे. गुरू नानकांचे जे शिष्य, त्यांना शीख म्हटले जाते. पंजाबी भाषेत त्यांना सिख्ख म्हणतात. तो शब्द शिष्य या संस्कृत शब्दावरूनच बनला आहे. शीख पंथ हा गुरुमत पंथ आहे. गुरू नानकांच्या पासून तो गुरू गोविंदसिंगापर्यंत जे दहा गुरू त्या पंथात झाले, त्यांच्या उपदेशाप्रमाणे आचरण करणारा जो पंथ, तो शीख पंथ असे समजायला हरकत नाही. शीख लोक वेदप्रामाण्य मानीत नाहीत. ते फक्त गुरूंचे मत हेच प्रमाणभूत मानतात.

**दहा गुरू** – शीख पंथात एकूण दहा गुरू उत्पन्न झाले, त्यांची नावे व काल असा –

(१) गुरू नानक – (इ. स. १४६९–१५३९)
(२) गुरू अंगद – (इ. स. १५३९–१५५२)
(३) गुरू अमरदास – (इ. स. १५५२–१५७४)
(४) गुरू रामदास – (इ. स. १५७४–१५८१)
(५) गुरू अर्जुनदेव – (इ. स. १५८१–१६०६)
(६) गुरू हरगोविंद – (इ. स. १६०६–१६४५)
(७) गुरू हरिराय – (इ. स. १६४५–१६६१)
(८) गुरू हरिकिशन – (इ. स. १६६१–१६६४)
(९) गुरू तेगबहादुर – (इ. स. १६६४–१६७५)
(१०) गुरू गोविंदसिंग – (इ. स. १६७५–१७०८)

वरील दहा गुरूंनंतर शीख पंथात आणखी कोणी गुरू झाला नाही. गोविंदसिंगांनीच तशी घोषणा केली –' यापुढे गुरू होणार नाही. शिखांनी इतउत्तर गुरुग्रंथालाच शरण जावे आणि त्यातल्या उपदेशाप्रमाणे वागावे. गुरुग्रंथामध्ये आजवरच्या सर्व गुरूंची आत्मज्योत प्रकाशत आहे, हे लक्षात ठेवावे.'

**शिखांचा इतिहास** – शीख पंथाचे आद्य गुरू नानक किंवा बाबा नानक व त्यानंतर झालेले इतर नऊ गुरू यांनी केलेली कामगिरी भारताच्या राजनैतिक इतिहासात मोलाची व महत्त्वाची ठरली आहे. महाराष्ट्रात शिवाजी महाराजांनी स्वराज्यस्थापनेचा उद्योग आरंभीपर्यंत या देशात इस्लामी सत्ताधीशांना वाटेल तसा धिंगाणा घालायला रान मोकळे मिळाले होते. पण पंजाबात शिखांनी इ. स. १५०० पासूनच त्यांना प्रतिकार करायला सुरवात केली.

इ. स. १२०० पासून इस्लामी टोळधांनी सतत चालविलेल्या आक्रमणामुळे पंजाबातील हिंदूंना पळता भुई थोडी झाली होती. मुसलमानांकडून होणारा अनन्वित छळ आणि असह्य जुलूम यांना कंटाळून पंजाबातील अर्ध्याहून अधिक हिंदूंनी इस्लामी दीक्षा घेतली होती. या परिस्थितीतून काही तरी मार्ग निघाला पाहिजे व हिंदूंचा छळ थांबला पाहिजे, असे गुरू नानक यांना प्रकर्षाने वाटू लागले. चातुर्वर्ण्यव्यवस्थेच्या आणि त्यातही जातिव्यवस्थेच्या चौकटीत राहून ही गोष्ट साध्य होणार नाही आणि हिंदूंच्या ठिकाणी प्रतिकाराचे सामर्थ्य येणार नाही, हे त्यांनी विचारांती ओळखले व वर्णव्यवस्थेची व जातिव्यवस्थेची कोंडी फोडून एका विशिष्ट लढाऊ पंथाची स्थापना केली. गुरू नानकांनी तत्कालीन इस्लामी सत्तेला विरोध केला नसला, तरी धर्मासाठी मरावे, मारिता मारिता मरावे, क्षात्रतेज जागवावे, या उदात्त कल्पनेची बीजे त्यांनी पेरून ठेवली. आपल्या पंथाला आकार देत असताना हिंदू धर्मातल्या काही तत्त्वांना मुरड घालून त्यांनी ती स्वीकारली. इतकेच नव्हे; तर इस्लाममधल्या काही तत्त्वांचाही स्वीकार केला. अशा प्रकारे त्यांनी दोन्ही धर्मांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. नानकांचा हा पंथ त्या काळी अनेक हिंदूंना व मुसलमानांनाही स्वीकारार्ह वाटला व त्यामुळे उभय धर्मांतले कित्येक लोक त्यांचे अनुयायी म्हणजे शीख (शिष्य) बनले.

तत्कालीन जनतेच्या अधोगतीला राज्यकर्त्यांची राजकीय गुलामगिरी व पुरोहित वर्गाची सांस्कृतिक गुलामगिरी ही दोन मुख्य कारणे आहेत, असे नानकांनी मानले. ईश्वर एक आहे, तो सर्वांचा पिता आहे आणि अखिल मानव हे एकमेकांचे बंधू आहेत, ही नवीन जाणीव उत्पन्न झाली, तरच समाजाचा उद्धार होऊ शकेल, असा एक नवा विचार त्यांनी आपल्या मनाशी निश्चित केला. सर्वांना उपासनेची एकच पद्धत असावी, असे ठरवून त्यांनी ' संगत ' या उच्च-नीचभेदरहित संघटनेचा पाया घातला. मुक्तद्वार सहभोजनाची प्रथा सुरू केली आणि तिला ' लंगर ' हे नाव दिले. अशा प्रकारे त्यांनी हिंदू-मुस्लिम आणि ब्राह्मण-शूद्र यांना समान सामाजिक पातळीवर आणले.

इतर संत–महंतांप्रमाणे नानकांनी स्वतःला केवळ भक्ती व प्रार्थना यांमध्ये गुरफटून घेतले नाही. आपले देशबांधव जुलमी सत्तेच्या टाचेखाली चिरडले जात असता स्वतः केवळ ध्यानधारणा करीत राहणे हे त्यांना पसंत पडले नाही. ते देशात

राजकीय जागृतीच्या कार्याला लागले. तत्कालीन जुलमी शासकांची निर्भर्त्सना करून ते म्हणाले–

कलिकाती राजे कसाई। धर्म पंखकर उड गया ॥
कूड अमावस सच्च चंद्रमा। दिसे नाईके चंडिया ॥

भावार्थ – कलियुगाचा हा काळ सूर्याप्रमाणे तीक्ष्ण आहे, राजे कसाई झाले आहेत, धर्म पार उडाला आहे व सर्वत्र अधर्म प्रभावी झाला आहे. असत्याची काळी अमावास्या पसरली असून, सत्यरूपी चंद्रमा लोपला आहे.

इ. स. १५१६ ते १५२५ या काळात बाबराने पंजाबवर पाच स्वाऱ्या केल्या आणि देशातील दुहीचा जास्तीत जास्त फायदा घेतला. या काळात पंजाब म्हणजे आपसांतील भांडणाचा आखाडा बनला होता. मोगल, लोदी व अफगाण सरदार यांच्या तिरंगी लढ्यात पंजाबमधील जीवन पार भरडून निघाले होते. या परिस्थितीचे वर्णन करताना नानक म्हणतात –

पापकी जब जज काबलो धाया।
जोई मंगई दानवे लालों।
शरम धरम दो हे छप्प खलोरा।
कुड फिरही परधान वे लालो ॥

अर्थ – क्रूर बाबर आपल्यावरोबर पापाची सेना घेऊन भारतावर चाल करून आला आहे. बलात्काराने धन व संपत्ती मागत आहे. लोकलज्जा व धर्म दोन्ही पळून गेले आहेत. सर्वत्र असत्य व पाप यांचा अंमल चालू आहे.

त्या काळी जनतेची काय स्थिती होती, याचे वर्णन करताना नानक म्हणतात –

राजे सिंह मुकदम कुत्ते। जाये नगायन बैठे सुत्ते ॥

अर्थ – निरपराधी जनतेवर मोगल राजे भुकेल्या सिंहाप्रमाणे तुटून पडले आहेत आणि त्यांचे साहाय्यक शिकारी कुत्र्यांप्रमाणे त्यांना मदत करीत आहेत.

नानकांना हिंदूंची आत्मिक मुक्ती तर हवीच होती; पण त्याचबरोबर भौतिक मुक्तीही हवी होती. त्यासाठी त्यांनी लोकांना निर्भय व निर्वैर बनण्याचा उपदेश दिला. मानवजातीची निःस्वार्थ सेवा हीच परमेश्वराची उपासना मानली. त्यासाठी निष्ठा, पावित्र्य, न्याय, दया व नेमस्तपणा या नीतिनियमांवर भर दिला. मूर्तिपूजा व कर्मकांडाचे अवडंबर निरर्थक ठरविले. वैराग्य व संन्यास यांचा निषेध केला. सद्वर्तनी व सदाचारी गृहस्थाश्रम हा आदर्श ठरवला. सत्य उच्च आहे; परंतु सत्यमय जीवन हे त्याहूनही उच्च आहे, असा उद्घोष केला. सेवाधर्माला जीवनात श्रेष्ठ स्थान दिले. या त्यांच्या उपदेशामुळे व आचरणामुळे त्यांना अनुयायी खूप मिळाले आणि त्यांच्या संप्रदायाला जनमानसात आदराचे स्थान प्राप्त झाले.



गुरू नानकांच्या या संप्रदायाचे स्वरूप बाह्यतः इतर भक्तिमार्गी संप्रदायांसारखेच असले, तरी प्रथमपासूनच त्यात महत्त्वाचे भेद होते. इतर भक्तिपंथ निवृत्ती आणि संसारत्याग यांचा



गुरू नानकदेव

पुरस्कार करीत होते; तर नानकांचा या गोष्टींना विरोध होता. त्यांनी संसारत्यागाचा उपदेश तर केला नाहीच; शिवाय तशा उपदेशकांना आपल्या पंथात स्थानही दिले नाही. खुद्द त्यांचा पुत्र श्रीचंद हा संन्यासवादी होता. म्हणून त्यांनी त्याला गुरुपदावर बसवले नाही आणि पुढच्या गुरूंनी तर त्याला संप्रदायाच्या बाहेरच घालवले. पुढे पुढे शीख गुरूंनी अनेक शहरे वसवली, व्यापार–उदीम यांच्याकडे लक्ष पुरवले व आपल्या अनुयायांना तशी प्रेरणाही दिली. यावरून नानकांचा धर्म मुळापासूनच प्रवृत्तिमार्गी होता, हे ध्यानी येईल. शीख गुरूंनी जी धर्मक्रांती केली, तिचे पहिले लक्षण प्रवृत्ती हे आहे. गुरू नानकांनी अनुयायांना क्षात्रधर्माची दीक्षा दिली नाही हे खरे; पण त्यांना पारतंत्र्य व मुस्लिम आक्रमण यांची खंत वाटत होती, हे निःसंशय.

भारतातील भक्तिपंथांनी जातिभेदाचा निषेध केला खरा;

पण तो परमार्थापुरताच राहिला. गुरू नानक यांनी मात्र त्याला व्यावहारिक पातळीवर आणले. भक्ष्याभक्ष्य, पेयापेय, सोवळे-ओवळे, परदेशगमन, समुद्रपर्यटन हे हिंदूंतले निषेध त्यांनी कधीच मानले नाहीत. त्यांनी जातिविनिर्मुक्त अशा लंगराची म्हणजे सहभोजनाची प्रथा चालू केली. हिंदू व मुसलमान यांतही त्यांनी भेद मानला नाही. त्यांचा उपदेश पटल्यामुळे नानकांच्या काळी व नंतरही अनेक मुसलमान शीख पंथात दाखल झाले.

जहांगीर बादशाहा गादीवर येताच त्याला हे धर्मसंकट उमगले व त्याने मुस्लिमांच्या धर्मांतराला पायबंद घालण्याचा आणि त्याबरोबरच शीख पंथ मोडून काढण्याचा निर्धार केला. तिथपासूनच शीख व मुस्लीम हे परस्परांचे हाडवैरी बनले. तिथून पुढचा शिखांचा इतिहास हा पंजाबातून मुस्लिम सत्तेचा उच्छेद करण्यासाठी त्यांनी जे घनघोर प्रयत्न केले, त्यांचा आहे.

नानकांच्या नंतर अंगद, अमरदास, रामदास, अर्जुन व हरगोविंद हे गुरू झाले. त्यांच्या काळात (इ. स. १५३९–१६४५) शीख संप्रदायाची पृथगात्मता निश्चित झाली. शीख समाज इतर हिंदूंपेक्षा प्रबल व संघटित झाला. गुरू अर्जुन यांनी ग्रंथसाहेबांची रचना पूर्ण करून शिखांना एक स्वतंत्र धर्मग्रंथ मिळवून दिला. त्यांनी वेदप्रामाण्य झुगारून दिले. पुराणे, अवतारकल्पना, तीर्थयात्रा, व्रतवैकल्ये, शिखांना वर्ज्य केली. शिखांसाठी नवी तीर्थक्षेत्रे, नवे सण रूढ केले. गुरू गोविंदसिंगांनी शिखांना पृथगात्म करण्याचे हे कार्य पूर्णतेस नेले. या सर्व वैशिष्ट्यांहून शीख गुरूंचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी प्रत्येक शिखाला क्षात्र धर्माची दीक्षा दिली हे होय. शस्त्र हे शिखांच्या धर्मनिष्ठेचेच एक लक्षण आहे, असे त्यांनी ठरवून टाकले. मोगली सत्तेचा आणि तिने चालविलेल्या जुलमांचा प्रतिकार करण्याचे जे काही सामर्थ्य शिखांना प्राप्त झाले, ते या क्षात्र दीक्षेमुळेच होय.

इस्लामपेक्षाही आपली धर्मतत्त्वे श्रेष्ठ आहेत, असे गुरूंनी जाहीर केले आणि मोगली सत्तेला आव्हानच दिले. मोगल सत्ताधाऱ्यांना हे आव्हान सहन होण्याजोगे नव्हते. त्यामुळे जहांगीर बादशाहा शिखांच्या मागे लागला. त्याने गुरू अर्जुन यांना कैद करून हाल हाल करून ठार मारले. शीख समाजाने धर्मासाठी केलेले हे पहिले बलिदान होय. तिथून ही हौतात्म्याची परंपरा शिखांनी जवळ जवळ एक शतकभर चालवली. त्यांच्या वैयक्तिक आणि सामुदायिक क्रूर कत्तली झाल्या; पण शिर तुटता-नाही ते अकालघोषणा करीतच शहीद झाले. अशा प्रकारच्या या आत्मबलिदानातूनच शीखांच्या ठिकाणी महान प्रतिकारशक्ती निर्माण झाली.

गुरू हरगोविंद यांनी त्यापुढे मजल मारली. त्यांनी स्वतःचे घोडदळ तयार केले, तोफखाना उभारला आणि सरळ सरळ लष्करच सज्ज केले. जहांगिराने त्यांनाही पकडून कैदेत ठेवले; पण काही लोकांच्या मध्यस्थीने वर्ष-दोन वर्षांत ते सुटले.



गुरू हरगोविंदजी

त्यानंतर शहाजहान गादीवर येईपर्यंत शिखांचा मोगल सत्तेशी संघर्ष झाला नाही. शहाजहाननेही जहांगिराचेच सत्र पुढे चालू केले. त्याने गुरू हरगोविंदांवर अनेकवार हल्ले केले. ते हल्ले गुरूंनी परतवून लावले हे खरे; पण असे युद्धप्रसंग वारंवार येत गेल्यास आपला निभाव लागणार नाही हे त्यांना उमगले. त्यांनी मग अमृतसर येथील आपले ठाणे हालवले व ते दूरच्या पहाडात कीरतपूर येथे नेले. पुरेशी तयारी करण्यास वेळ मिळावा म्हणून दहा-बारा वर्षे ते सबुरीने राहिले. हरगोविंदांच्या मागून हरिराय व हरिकिशन हे गुरू झाले. त्यांच्या कारकिर्दीत फारसे काही घडले नाही. त्यानंतर १६६४ साली गुरू तेगबहादूर हे गुरुपदी आले.

तेगबहादुरांच्या काळात शीखसमाज फुटीर बनला होता. खुद्द त्यांचा भाऊ मोगलांना जाऊन मिळाला होता. अमृतसरच्या मंदिराचे अधिकारी पथभ्रष्ट व बलदंड बनले होते. गुरू अर्जुन यांनी गावोगावी शीख समाज संघटित करण्यासाठी व प्रत्येक शिखाकडून गुरुदक्षिणा जमा करून ती गुरुपीठाकडे पोचती करण्यासाठी काही लोक नेमले होते. त्यांना मसंद असे म्हणत. हे मसंद पुढे इतके स्वार्थी, भ्रष्ट आणि छळवादी बनले, की त्यांनी शीख समाजाला हैराण केले. पुढे हे मसंद तेगबहादुरांचेही शत्रू बनले.

तेगबहादुरांच्या नातेवाइकांनीही त्यांच्या विरुद्ध बंड उभा-

ते. मसंद त्यांना सामील झाले. त्यामुळे तेगबहादुरांना अमृत-सर येथे राहणेही अशक्य ठरले. म्हणून ते तीर्थयात्रेला निघाले. या यात्रेत त्यांनी पुष्कळ ठिकाणी धर्मप्रचार केला. पुष्कळशा मुसलमानांनाही त्यांनी शीख बनविले. ही गोष्ट औरंगजेबाच्या कानी आली. त्याचा क्रोध भडकला. याच वेळी काश्मीरमधले काही ब्राह्मण औरंगजेबाचा छळवाद असह्य होऊन तेगबहा-दुरांच्याकडे आश्रयाला आले. त्या वेळी गुरूंच्या वृत्तीत एकदम पालट झाला व त्यांनी धर्मासाठी आत्मबलिदान करायचे ठरवले. त्यांनी त्या ब्राह्मणांच्या करवी औरंगजेबाला एक निरोप धाडला. ब्राह्मण औरंजेबाकडे जाऊन म्हणाले. 'तू आम्हांला बाटवायला निघाला आहेस; पण तू गुरू तेगबहादुरांना अगो-दर मुसलमान कर. त्यात तुला यश आले तर मग आम्ही सगळे मुसलमान होऊ.' हा निरोप पोचताच औरंगजेब पराकाष्ठेने खवळला. त्याने गुरूंना पकडले व त्यांचा शिरच्छेद केला. सिख इतिहास लिहिणारे ठाकुर देशराज म्हणतात. 'गुरू तेगबहादुर यांच्या या बलिदानाची महती वर्णन करण्याची शक्ती माझ्या ठायी नाही. मी इतकेच सांगतो, की मृतप्राय झालेल्या हिंदू जातीमध्ये यामुळे एक फार मोठे सामर्थ्य निर्माण झाले व तिने अनेक विजय मिळवले.'

गुरू गोविंदसिंग हे तेगबहादुरांचेच सुपुत्र होत. गुरुपदी आल्यावर त्यांनी पितृवधाचा सूड घेण्याचे ठरवले. पण हे कार्य तडकाफडकी होण्याजोगे नव्हते. त्यासाठी पुष्कळ तयारी करावी लागणार होती. म्हणून प्रारंभीची वीस वर्षे त्यांनी मनन, चिंतन व संघटन यांत घालवली. शीख समाजातील दुही, फूट, स्वजन द्रोह, भ्रष्टाचार या विकृती घालवून त्यांच्या मनात धर्मक्रांतीची बीजे पुरतेपणी रुजवायची तर पुन्हा एकदा धर्म-तत्त्वांना उजळा देणे आवश्यक आहे, असे गोविंदसिंगांना जाण-वले. तेच कार्य त्यांनी प्रथम हाती घेतले.

दुसरी एक गोष्ट त्याच काळात गोविंदसिंगांना प्रतिकूल अशी घडत होती. पंजाबातील पहाडी भागात अनेक छोटे छोटे राजपूत राजे मोगलांच्या कृपाछत्राखाली सुखाने नांदत होते. त्यांना स्वातंत्र्याशी काहीच कर्तव्य नव्हते. शीख समाजातील एकत्र खानपान आणि सर्व जातींची समता या गोष्टी त्यांना अधर्म वाटत होत्या. शीख गुरूंनी सारा भ्रष्टाचार माजवला आहे, असे ते म्हणत आणि त्यांचा द्वेष करीत. अशा राजांचे एक शिष्टमंडळ धर्माबावत तक्रार करण्यासाठी गुरु गोविंदसिंगांकडे आले. त्यांच्याशी झालेल्या संभाषणात गोविंदसिंग म्हणाले—

'तुम्ही ज्याला धर्म समजता तो धर्मच नव्हे. ज्या धर्मात एक माणूस दुसऱ्याला हीन लेखतो, तो सर्व समाजाचा धर्म होऊ शकत नाही. राजेहो, आपल्या धर्मबांधवांवर कोणते संकट आले आहे आणि देशाची काय अवस्था झाली आहे, हे तुम्हांला दिसत नाही काय? तुम्ही आपल्या मुली मोगलांना देऊन त्यांची सेवा करता. त्यामुळे तुमचे धन व तुमच्या कन्या यांवर आपला अधिकारच आहे असे हे तुर्क समजतात आणि ते तुम्ही मान्य करता. तुमच्या अंगी काही क्षात्रतेजच उरले नाही काय? तुर्कांनी चालविलेल्या या घोर अन्यायाचा प्रतिकार करण्याऐवजी तुम्ही कसल्या धर्माधर्माच्या क्षुद्र गोष्टी घेऊन बसला आहां? आम्ही मात्र तुर्कांनी चालविलेल्या अन्यायाचा प्राणपणाने प्रतिकार करायचे ठरवले आहे. त्याला तुम्ही साह्य करावे अशी माझी इच्छा आहे.'

पण या सदुपदेशाचा त्या राजांच्या मनावर काहीच परिणाम झाला नाही. ते गुरु गोविंदसिंगांच्या स्वातंत्र्योद्योगात अडथळेच निर्माण करीत राहिले.

पण हे सर्व विरोध बाजूला सारीत गुरु गोविंदसिंगांनी आपला उद्योग चालूच ठेवला. त्यांनी पहिल्याप्रथम साऱ्या शीख समाजाला खालसा पंथाची दीक्षा दिली. खालसा म्हणजे पवित्र, स्वतंत्र, सत्त्वनिष्ठ! त्यांनी साऱ्या शिखांना नवी आचारबंधने लावून त्या पंथात नवी शक्ती, नवे चैतन्य निर्माण केले.

गुरु गोविंदसिंग आनंदपूर येथे राहत होते. त्यांच्या भोवता-लच्या टापूत त्यांनी लोहगड, फत्तेगड, फूलगड, आनंदगड असे किल्ले बांधले व सैन्यउभारणीस प्रारंभ केला. या वेळी औरंग-जेबाच्या ऐवजी हे राजपूत राजेच एकत्र होऊन त्यांच्यावर चालून आले. भंगाणी येथे मोठी लढाई झाली आणि ती गुरू गोविंदसिंगांनी जिंकली. राजपूत राजांचा पराभव झाला. गुरूंचा असा प्रभाव दिसून आल्यावर बरेचसे पहाडी राजे त्यांना वश झाले व त्यांनी औरंगजेबाला वार्षिक खंडणी देण्याचे बंद केले. यापुढचा रोमहर्षक इतिहास डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे लिहितात, तो असा—

या वेळी औरंगजेब दक्षिणेत असून, मराठ्यांचे स्वराज्य नष्ट करण्याच्या उद्योगात गुंतला होता. त्याला ही खबर मिळताच, अत्यंत चिडून जाऊन, त्याने आपल्या लाहोरच्या सुभेदाराला खरमरीत पत्रे लिहिली व गुरू गोविंदसिंग यांना जिवंत पकडून आपल्यासमोर हजर करण्याचा हुकूम दिला. त्या अन्वये अलीफखा, दिलावरखा, रुस्तुमखा अशा अनेक सरदारांनी आनंदपूरवर स्वारी केली. पण त्या सर्वांचा शिखांनी पराभव केला. त्यानंतर बादशहाने शहाजादा मुअज्जम याला मोठी सेना देऊन गुरूंवर पाठविले. पण त्याचीही काही मात्रा चालली नाही. तेव्हा औरंगजेबाने पंजाबच्या सर्व सुभेदारांना कडक पत्रे लिहून सर्वांनी मिळून शिखांना जमीनदोस्त करण्याचा हुकूम दिला. या वेळी पहाडी राजपूतही पलट खाऊन मोगल सैन्याला मिळाले.

राजपूत व मोगल मिळून एक लाख फौज जमा झाली होती. एवढ्या सेनेने आनंदपूरला वेढा घातला असताना अल्पसंख्य शिखांचा टिकाव लागणे शक्यच नव्हते. त्यातही अन्नाचा तुटवडा पडू लागला. तेव्हा एके दिवशी आपल्या सहकाऱ्यांचा सल्ला घेऊन गुरू गोविंदसिंग रात्रीचे गुप्तपणे किल्ल्याबाहेर निसटले. मोगलांना याचा सुगावा लागताच त्यांनीही लगोलग त्यांना पकडण्यासाठी फौज धाडली. या धावपळीत निभाव लागणे कठीण आहे, हे पाहून गोविंदसिंग यांनी आपली माता, दोन स्त्रिया व धाकटे दोन मुलगे जोरावरसिंग व फत्तेसिंग यांना एका खेड्यात गंगाराम नावाच्या विश्वासू माणसाकडे धाडून दिले आणि आपण स्वत: चमकौरच्या किल्ल्यात अजितसिंह



गुरू गोविंदसिंग

व जुझारसिंह या दोन मुलांसह जाऊन राहिले. तिथेही मोगल सेनेने त्यांना घेरले. त्या वेळी त्यांच्या जवळ अवघे ४० शीख होते. कोणाच्या मते ५०० होते. या वेढ्याच्या प्रसंगी अफाट मोगल सेनेवर स्वत: होऊन चालून जाऊन गुरूंच्या दोन पुत्रांनी अभिमन्यूप्रमाणे बलिदान केले. पण चमकौरच्या किल्ल्यातही निभाव लागेना. तेव्हा गुरू तेथून निसटून गेले व त्यांनी अरण्यवास पत्करला. तेथेही मोगल सेना त्यांचा पिच्छा पुरवीत होतीच. पण ते तिच्या हाती सापडले नाहीत. मात्र याच काळात त्यांच्यावर एक भयंकर आपत्ती कोसळली. गंगाराम हा त्यांचा पूर्वीचा शिष्य व स्वयंपाकी. त्याच्याकडे त्यांनी आपल्या मातेला व धाकट्या दोन मुलांना विश्वासाने ठेविले होते; पण त्याने दगा दिला व सरहिंदचा सुभेदार वजीरखान याला गोविंदसिंगांचा हा परिवार आपल्याकडे असल्याची बातमी दिली. खानाने लगेच त्यांना पकडून नेले आणि 'मुसलमान व्हा नाही तर तुम्हांला देहदंड सोसावा लागेल' अशी धमकी दिली. मुलांनी उत्तर दिले. 'आम्ही गुरू गोविंद यांचे पुत्र आहो. आम्ही मरणाला भीत नाही. पण ध्यानात ठेव, की आमच्या रक्ताच्या थेंबा-थेंबातून अनेक जोरावरसिंग व फत्तेसिंग उत्पन्न होतील व तुझ्यासारख्या जुलमी मोगलांचा प्राण घेतील." अर्थातच दोन्ही मुलांना भिंतीत चिणून ठार मारण्यात आले. यानंतर लवकरच औरंगजेब मृत्यू पावला. त्याच्या मागून गादीवर हक्क सांगणाऱ्या बहादूरशहाला गुरू गोविंद यांच्या मदतीची जरूरी होती. मुअज्जमशी झालेल्या लढाईत गुरूंनी त्याला खूप मदत केली. त्यामुळेच बहादूरशहाला विजय मिळाला व तो गुरूंचा मित्र बनला. त्याने गुरूंना लाख मोहरा नजर केल्या व आपल्याबरोबर दक्षिणेत येण्याचा आग्रह केला. गोविंदसिंगांनी तो मान्य केला व ते दक्षिणेत नांदेड येथे जाऊन राहिले. तेथून मराठ्यांच्या मदतीने पुन्हा पंजाबात जाऊन तेथे स्वराज्य स्थापना करण्याचा त्यांचा विचार होता, असे म्हणतात. पण एके दिवशी रात्री गुरू झोपले असताना दोन पठाणांनी त्यांचा खून केला. त्यांच्या मुलांना भिंतीत चिणून मारणाऱ्या वजीरखानानेच या पठाणांना पाठविले होते. इ. स. १७०८ साली ही दु:खद घटना घडली आणि शीख समाजाच्या सर्व आशा धुळीस मिळण्याची वेळ आली. खालसा स्वराज्य-स्थापना करतील 'राज्य करेगा खालसा' या गुरूंच्या भविष्य-वाणीचे काय होणार, असा प्रश्न निर्माण झाला.

पण या नैराश्याच्या दाट धुक्यातून एक तेजस्वी तारा उदय पावला. त्याचे नाव बंदाबैरागी. हा मूळचा पंजाबी गृहस्थ. तो तरुणपणीच संसारत्याग करून दक्षिणेत येऊन राहिला होता. तिथे त्याला गुरू गोविंदसिंगांचा सहवास घडला. गुरूंनी त्याला शीख पंथाची दीक्षा देऊन पंजाबात धाडले. बरोबर आपले पंचवीस शिष्य दिले. पंजाबातील प्रमुख सरदारांना पत्रे लिहून बंदाबैरागीचे नेतृत्व स्वीकारण्याची आज्ञाही केली. या सर्वांचा परिणाम म्हणून बंदाबैरागीभोवती शीख लोक बहुसंख्येने गोळा झाले. थोडक्याच काळात शिखांची ४०,००० फौज त्याने उभी केली. गुरू तेगबहादूर व गुरू गोविंदसिंगांचे पुत्र यांचे मुसल-मानांनी जे क्रूर हत्याकांड केले, त्याचा या बंदाबैरागीला सूड उगवायचा होता. सरहिंदचा सुभेदार वजीरखान याने गोविंद-

गोविंदसिंगांच्या पुत्रांना भिंतीत चिणून मारले होते. बंदाने प्रथम या वजीरखानाचा सूड घ्यायचे ठरवले. थोड्याच काळात त्याने वजीरखानाला कापून काढले आणि सरहिंद हे शहर धुळीला मिळवले. त्यानंतर तीन चतुर्थांश पंजाब बंदाच्या ताब्यात आला. हे कळताच दक्षिणेत गेलेला बहादूरशहा त्वरेने दिल्लीस आला. त्याने बंदावैरागीवर मोठी फौज पाठवली. बंदाने अनेक लढाया जिंकल्या खऱ्या; पण हळूहळू त्याची ताकद कमी होऊ लागली. अखेर बंदा व त्याचे सैन्य गुरुदासपूरच्या किल्ल्यात वेढले गेले. अन्नपाण्यावाचून त्यांचे हाल सुरू झाले. असे टाचा घाशीत मरण्यापेक्षा सिंहासारखे वीरमरण तरी पत्करावे, असा विचार करून बंदा किल्ल्याबाहेर आला व मोगल सैन्यावर तुटून पडला. मोगल शासकांनी त्याला आणि त्याच्या पाचशे सैनिकांना पकडले आणि हाल हाल करून सर्वांना ठार मारले. ते मुसलमान मारेकरी प्रत्येक शिखाला मरण्यापूर्वी सांगत. 'मुसलमान होशील तर जीवदान मिळेल.' पण एकानेही धर्मत्याग केला नाही. बंदावैरागीचा अद्भुत पराक्रम आणि धर्मासाठी बलिदान या गोष्टी पंजाबच्या इतिहासात अजरामर होऊन राहिल्या आहेत.

बंदावैरागीचा वध इ. स. १७१६ साली झाला. त्यानंतरही मुस्लिमांचे दमनसत्र थांबले नाही. शेकड्यांनी शीख मारले गेले; पण जे जगले होते, त्यांनी आपला निर्धार सोडला नाही. कधी डोंगरदऱ्यांत राहून आणि शत्रूच्या संपत्तीची लुटालूट करून, तर कधी सरळ सामना देऊन मुस्लिम सत्तेशी ते झगडत राहिले. ४०–५० वर्षे अशी गेली. हे अर्धशतक शीख इतिहासातले रोमहर्षक पर्व आहे. त्यात शेवटी इस्लामी सत्तेचा दम उखडला आणि इ. स. १७६८ च्या सुमारास शिखांनी पंजाब स्वतंत्र केला.

शिखांचे नष्टचर्य संपले. लोकांनाही वाटू लागले, की आता आपलेही नष्टचर्य संपले आणि आपल्याला सुखशांतीचे दिवस येतील; पण दुर्दैवाची गोष्ट म्हणजे तसे घडले नाही. संग्रामकाळी शिखांचे वेगवेगळे जथे वेगवेगळ्या ठिकाणी लढा चालवीत होते. स्वातंत्र्यसंग्रामाच्या अखेरीस शिखांचे असे बारा जथे शिल्लक राहिले होते. त्यांना मिसली म्हणत. या मिसली कधीच एकत्र आल्या नाहीत. त्यांच्यांतला भेदभाव संपला नाही. आणि त्यामुळे पंजाबात शीखांना एकमुखी केंद्रसत्ता प्रस्थापित करताच आली नाही. सतलजच्या दक्षिणेचे शीख हे तर स्वातंत्र्यसंग्रामातही सहभागी झाले नाहीत. सतलज नदीवरून शिखांचे दोन प्रमुख गट पडले होते. सतलजच्या उत्तरेचे शीख ते मंझा व दक्षिणेचे ते मालवा. मंझा व मालवा दोघेही खालसाचे अनुयायी खरे; पण स्वातंत्र्यलढ्यात ते संघटित होऊ शकले नाहीत. मंझा शीख सुमारे अर्धशतक सतत लढत राहिले, तर मालवा शिखांत कधी राष्ट्रीय भावनाच निर्माण झाली नाही. शेवटपर्यंत ते लुटारू व पेंढारीच राहिले. या सर्व इतिहासाचे सार सांगताना श्री. जोगेंद्रसिंग सांगतात – या शीख टोळ्यांना एकमुखी नेतृत्व निर्माण करून संघटना करता आली नाही. ते कोणत्याही नायकाशी एकनिष्ठ राहत नसत. त्यामुळे सर्व पंजाबचे ऐक्य करून स्वराज्य व सुराज्य स्थापन करण्याचे आपले ऐतिहासिक कार्य ते करू शकले नाहीत. सर्व शिखांची अभंग निष्ठा स्वतःकडे खेचील, असा नेता त्यांना मिळाला असता, तर भारताच्या इतिहासाला वेगळे वळण लागले असते. पण गुरू गोविंदांनी निर्माण केलेले ऐक्यबंध तोडून खालसा समाज भग्न झाला. त्याच्या अनेक फळ्या झाल्या, शकले झाली. त्यामुळे भारताला स्वातंत्र्य मिळवून देऊन ते अबाधित राखण्याच्या व त्याचे दारिद्र्य नष्ट करून त्याला वैभव-संपन्न करण्याच्या कार्यात शीख यश मिळवू शकले नाहीत. भारताला संघटित करण्याची संधी आली होती; पण ती त्यांनी घालविली.

इ. स. १७२० ते १७६९ या काळात मंझा शीख विघटित होते, तरी त्यांचे ठायी धर्मनिष्ठा, त्यागबुद्धी व प्राणार्पणाची सिद्धता हे गुण जिवंत होते; पण पुढच्या ३० वर्षांच्या कालखंडात त्यांचाही अधःपात झाला. त्यांचा ध्येयवाद संपला आणि त्याची जागा धनलोभ व सत्ता यांनी घेतली. पंजाब बारा मिसलींमध्ये विभागला गेला आणि यांतील प्रत्येक मिसल धाडी घालून आपल्याच समाजाचे रक्त वाहवू लागली. शीख समाज असा क्षीणबल होत असलेला पाहून अब्दालीचा नातू झमानशाहा याने पंजाबवर दोन स्वाऱ्या केल्या आणि पंजाबची राजधानी दोन वेळा लुटली, जाळली, विध्वंसिली. शिखांना पुन्हा वनवासात जाण्याची वेळ आली. मालवा शीख तर झमानशाहाचे पुरस्कर्तेच बनले. अशा या जातीय विध्वंसाच्या कालात झमानशाहाला कोणी प्रतिकार केला असेल, तर तो एकाच व्यक्तीने. ती व्यक्ती म्हणजे महाराजा रणजितसिंग !

रणजितसिंगाचा जन्म १७८० सालात झाला. शुकरचाकिया या मिसलीचा संस्थापक चरणसिंग याचा हा नातू. शीखांचे एकच्छत्री राज्य निर्माण करावे ही त्याची महत्त्वाकांक्षा होती. झमानशाहाला त्याने निर्धारपूर्वक प्रतिकार केला. इ. स. १७९९ साली झमानशाहाला परत घालविल्यावर पुढील दहा वर्षांत साम, दाम, भेद, दंड या उपायांनी बहुतेक सर्व मिसली विलीन करून त्याने पंजाबवर स्वतःचे अधिराज्य प्रस्थापित केले. पण तेवढ्याने दुर्दैव संपले नव्हते. याही वेळी मालवा शिखांनी रणजितसिंगाविरुद्ध इंग्रजांकडे धाव घेतली. इंग्रज टपलेलेच होते. त्यांनी रणजितसिंगाकडे प्रथम वकील पाठवला आणि मागोमाग सैन्य पाठविले. रणजितसिंग इंग्रजांचे सामर्थ्य जाणून होता. त्याला मालवा शिखांच्या बरबुडव्या वृत्तीचा संताप आला. पण आपले

मन विकारवश होऊ न देता त्याने इंग्रजांशी तह केला. त्या तहात सतलज ही रणजितसिंगाच्या राज्याची दक्षिण सरहद्द ठरली. एकच्छत्री शीख राज्याचे त्याचे स्वप्न अशा प्रकारे भग्न झाले.



महाराज रणजीतसिंहजी

पण रणजितसिंग हताश न होता पुढच्या उद्योगाला लागला. वायव्येकडे साम्राज्यविस्ताराला अजून खूप अवसर होता. त्याने तिकडे आपली दृष्टी वळवली. त्याने शिखांचेच नव्हे तर पंजाबातल्या सर्व हिंदूंचे संघटन केले. त्या संघटनेतून एक अभूतपूर्व सामर्थ्य निर्माण झाले. त्याच्या बळावर रणजितसिंगाने विजयामागून विजय मिळवले. त्याने इस्लामच्या पंज्यातून पंजाब तर मुक्त केलाच; शिवाय वायव्यसरहद्द प्रांत व काश्मीर हेही मुक्त केले. नौशेराच्या लढाईत विजय मिळवून त्याने भारताच्या वायव्य सरहद्दीपर्यंत आपली सत्ता नेऊन भिडवली. पठाणांचा हा पराभव चारी मुंड्या चीत असा झाला. पंजाबी खड्ग हे टोळीवाल्यांच्या खड्गापेक्षा श्रेष्ठ आहे, याची रणजितसिंगाने पठाणी टोळ्यांना खात्री करून दिली, असे श्री. खुशवतसिंग म्हणतात. मराठ्यांनी आरंभिलेले कार्य या विजयाने पूर्ण झाले आणि पेशावरपासून कन्याकुमारीपर्यंत मुस्लिम सत्ता निःशेष झाली, असे डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे म्हणतात. शिखांच्या या यशापयशाचे विवेचन करून डॉ. सहस्रबुद्धे यांनी जो समारोपाचा परिच्छेद लिहिला, तो महत्त्वाचा आहे –

" मुस्लिम आक्रमणाचा प्रतिकार करणारी एक स्वतंत्र शक्ती शिखांनी पंजाबात निर्माण केली. हे त्यांचे पहिले मोठे यश होय. मराठ्यांनी औरंगजेबाच्या प्रचंड सेनासामर्थ्याचा दक्षिणेत निःपात केला आणि नंतरच्या ८०–८५ वर्षांच्या काळात दिल्लीची सलतनत निर्जीव व नामशेष करून टाकली हे खरे. पण पंजाब, पेशावर या प्रदेशांत एकदोन भराऱ्या मारण्यापलीकडे त्यांना काही साधले नाही. अशा स्थितीत शिखांचा उदय तिथे झाला नसता तर सिंध, बलुचिस्तान, अफगाणिस्थान यांच्याप्रमाणेच पंजाब, पेशावर, काश्मीर हे प्रदेश हिंदुत्व, हिंदुसंस्कृती व हिंदुस्थान यांना पारखे होऊन मुस्लिम जगतात विलीन झाले असते. पण गुरू गोविंदसिंग, बंदाबहादूर, सहस्र संख्येने धर्मार्थ आत्मबलिदान करणारे त्यांचे अनुयायी, अहमदशाहा अबदालीसारख्या कसलेल्या कडव्या मुस्लिम सेनापतीशी सतत तीस वर्षे लढा चालू ठेवणारे मंझा शीख आणि महाराजा रणजितसिंग यांच्या पराक्रमामुळे भारतावरचा तो अनर्थ टळला. एका फार मोठ्या भयानक विपत्तीतून हिंदू समाजाचे शिखांनी रक्षण केले. हे पराक्रमी शूर पुरुष तेथे पहाडासारखे उभे राहिले नसते तर पठाणांनी पंजाब सर्व गिळून कदाचित् उत्तर प्रदेश, राजस्थान, मध्य प्रदेश यांवरही आक्रमण केले असते.

**गुरुग्रंथ** – याला आदिग्रंथ किंवा ग्रंथसाहेब असे म्हणतात. मुसलमानांचे जसे कुराण, ख्रिश्चनांचे जसे बायबल, त्याचप्रमाणे गुरुग्रंथ हा शिखांचा पवित्र ग्रंथ आहे. शीख लोक गुरुग्रंथाला सगळ्या गुरूंचा ज्योतिःस्वरूप मानतात. शिखांचे नीतिनिर्धारण या ग्रंथाच्या आधारेच होते. शिखांनी मूर्तिपूजा निषिद्ध ठरवली आहे. मात्र गुरुग्रंथालाच ते भजतात.

शिखांना मार्गदर्शन करण्यासाठी एखादा ग्रंथ हवा, ही जाणीव गुरू अंगद यांना झाली आणि त्या दृष्टीने त्यांनी काही काम सुरू केले. गुरू अमरदास यांच्या कारकिर्दीत या कामात अधिक प्रगती झाली. पुढे गुरू अर्जुनदेव यांनी मूळचे संकलन गोविंदवाल येथून आणले व त्यात भर टाकण्याच्या दृष्टीने अनेक हिंदू व मुसलमान संतांच्या श्रेष्ठ वाङ्मयकृती मागवून घेतल्या. मग एका ठिकाणी तलाव ( रामसर ) खोदून व तंबू ठोकून संत व फकीर यांच्या साहाय्याने त्यांनी ग्रंथरचना सुरू केली. गुरुदास भल्ला याने त्याचे लेखन केले. इ. स. १६०४ मध्ये गुरुग्रंथाचे लेखन पुरे झाले. मग ती प्रत अमृतसरमधील सुवर्णमंदिरात ठेवण्यात आली. त्या ग्रंथाची देखभाल आणि सेवा करण्यासाठी भाई बुढ्ढा याला पहिला ग्रंथी म्हणून नेमण्यात आले.

प्रस्तुत ग्रंथात पहिल्या पाच गुरूंची मिळून ४८३९ पद्ये आहेत. शिवाय अन्य सोळा संत व भक्त यांच्याही रचना त्यात समाविष्ट आहेत. तेगबहादुराचीही काही पद्ये आहेत. याशिवाय भाट मंडळींनी गुरूंच्या स्तुतिपर जी पद्ये रचली होती, त्यांतलीही काही यात समाविष्ट केली आहेत. ग्रंथाच्या शेवटी रागमाला व

गुंडवणी अशी दोन प्रकरणे आहेत. त्यांतील बहुतेक पद्ये इ.स.च्या १५-१६ व्या शतकात प्रचलित असलेल्या पंजाबी भाषेत आहेत. सुरवातीचे काही लिखाण सोडले, तर बाकीच्या सर्व रचना रागदारीत बसतील अशा आहेत.

हा गुरुग्रंथ म्हणजे शीख व अन्यधर्मीय साधुसंतांच्या भक्ति-पर वाणीचे संमेलन आहे. या ग्रंथात आता कोणी भर घालू शकत नाही. त्यामुळे त्याची प्रतिष्ठा व पवित्रता वाढली आहे. कोणत्याही गुरुद्वारात गुरुग्रंथाची प्रत सुशोभित मंडपीत सुंदर व मूल्यवान कपड्यात वांधून ठेवलेली असते. तिच्यावर चवऱ्या ढाळल्या जातात.

प्रस्तुत ग्रंथ गुरुमुखी लिपीत लिहिला गेला आहे. गुरू अर्जुन-देव यांनी गुरुमुखीला शिखांची धार्मिक लिपी बनवले. या ग्रंथाच्या निर्मितीमुळे शीख संप्रदायाचे संघटन दृढ झाले.

**सादृश्य व विसादृश्य** – शीख ही हिंदुधर्माच्या प्रवाहापासून झालेली जैन व बौद्ध यांच्यासारखी एक उपजाती आहे. शिखांचे अनेक रीतिरिवाज हिंदूंहून वेगळे आहेत. पण वंशदृष्ट्या ते हिंदूच आहेत. हिंदूंपासून शिखांना अलग करणाऱ्या काही बाबी अशा–

(१) शीख बहुदेवोपासक नाहीत.

(२) ते अवतारांना ईश्वर मानीत नाहीत.

(३) ते पितरांचे श्राद्ध करीत नाहीत.

(४) ते ब्राह्मण पुरोहितांचे वर्चस्व मानीत नाहीत.

(५) ते जात-पात व उच्च-नीच हा भेद मानीत नाहीत.

(६) त्यांचा दीक्षाविधी स्वतंत्र आहे.

(७) त्यांनी आपली वेगळी तीर्थक्षेत्रे निर्माण केली आहेत.

पण पौराणिक आचारधर्मापासून शीख हे सर्व दृष्टींनी वेगळे झाले असले, तरी कित्येक बाबी अशा आहेत, की त्यामुळे ते हिंदूच ठरतात. त्यांपैकी काही बाबी अशा–

(१) शीख आपली नावे सिंहान्त ठेवतात; पुराणांतही कित्येक क्षत्रियांची नावे सिंहान्त आहेत.

(२) मन्वादिस्मृतींत भारतीयांना ज्या दिनचर्येचा उपदेश केला आहे, जवळ जवळ तशीच दिनचर्या शीख गुरू आपल्या शिष्यांना सांगतात.

(३) हिंदूंप्रमाणेच शीखही राम व कृष्ण यांना मानतात. गोविंदसिंग यांनी तर अभिमानाने सांगितले आहे, की आपण रामपुत्र लवकुशांची संतती आहो. (विचित्र नाटक).

(४) शीख गुरूंनी कोणताही अभारतीय धर्म स्वीकारला नाही. म्हणून गुरुग्रंथाला मानणारे शीख आपले वेगळेपण कंठ-रवाने सांगत असले, तरी ती गोष्ट खरी नाही.

(५) गुरुग्रंथ हा केवळ शिखांचाच पवित्र ग्रंथ नसून, तो हिंदूंनाही तितकाच आदरणीय आहे. या ग्रंथात ज्या संतमंडळींची पद्ये समाविष्ट आहेत, त्यांतले कबीर व फरीद सोडल्यास इतर चौदा संत हिंदूच आहेत.

(६) पंजाबातल्या अन्य हिंदूंची जी भाषा, तीच शिखांचीही भाषा आहे.

(७) पंजाबात शीख व हिंदू यांचे सोयरिक संबंधही झाले आहेत व होत आहेत.

**गुरुद्वारा** – शिखांचे उपासनामंदिर म्हणजे गुरुद्वारा होय. हे परमात्म्याचे निवासस्थान नसून त्या निवासस्थानाचा दर-वाजा आहे. उपासनेने प्रभूच्या महालाचा दरवाजा उघडला जातो. द्वारच्या ऐवजी द्वारा असा पुंलिंगी प्रयोग पंजाबी भाषेत केला जातो. भारतभर ज्या ज्या गावी शिखांची वस्ती आहे, तिथे तिथे गुरुद्वारा स्थापन केलेला आहे.

गुरुद्वाऱ्यात कोणतीही देवमूर्ती नसते. तिथे एका कमी उंचीच्या चौरंगावर गुरुग्रंथाची स्थापना केलेली असते. सदर ग्रंथ भरत-काम केलेल्या रेशमी रुमालात गुंडाळलेला असतो. रोज सकाळी समारंभपूर्वक गुरुग्रंथ उघडतात व मग स्त्री–पुरुष त्याचे वाचन करतात. संध्याकाळी पुनश्च तो गुंडाळून ठेवतात. गुरुद्वाऱ्यात ग्रंथसाहेबाची उपासना करण्यासाठी एक सेवक नेमलेला असतो. त्याला ग्रंथी म्हणतात. त्याने गुरुवाणीचा चांगला अभ्यास केलेला असावा लागतो.

नित्याचे उपासनाकार्य पहाटे ५ वाजल्यापासून सुरू होते. जपजी, सुखमनी, आसादीवार, जाप व आनंद हे नित्याचे प्रातः-कालीन पाठ असतात. सुमारे ३ तासांचा हा कार्यक्रम असतो. त्यानंतर उपासनेसाठी जमलेले सगळे स्त्री-पुरुष उभे राहून गुरू अर्जुनदेव यांच्या सुखमनीतली पुढील प्रार्थना म्हणतात –

तुम ठाकुर तुम पे अरदास। जीवु पिंडु सभ तेरी रास॥
तुम मात पिता हम बालक तेरे। तुम री किरपा में सुख घने रे॥
कोइ न जाने तुमरा अंत। ऊंचे ते ऊंचा भगवन्त॥

मग दाही गुरू, चार गुरुपुत्र, पंच प्यारे, चाळीस मुक्तात्मे आणि धर्मरक्षणासाठी ज्यांनी आत्मबलिदान केले असे हुतात्मे, अशा सर्वांचे स्मरण करून प्रार्थना संपवतात. मग सर्वांना गोड शिऱ्याचा प्रसाद वाटला जातो. सायंकाळी रहरासीचा पाठ व प्रार्थना होते. रात्री सोहिलाचा पाठ, प्रार्थना आणि प्रसाद असतो.

नैमित्तिक कार्यक्रमांमध्ये प्रत्येक सूर्यसंक्रांत, दाही गुरूंचे जन्मदिवस, गुरुपदप्राप्तीचे व निर्वाणाचे दिवस आणि गुरू गोविंदसिंगांच्या बलिदानाचा दिवस हे गुरुद्वाऱ्यांमध्ये पाळले जातात. मोठे उत्सव पुढील दिवशी असतात –

(१) कार्तिकी पौर्णिमा – गुरू नानकाचा जन्मदिवस (२) पौष शु. सप्तमी–गुरू गोविंदसिंगांचा जन्मदिवस (३) वैशाखी प्रतिपदा – गुरू गोविंदसिंगांनी पंच प्याऱ्यांना अमृतदीक्षा दिली,

तो खालसा दिवस आणि (४) ज्येष्ठ शुद्ध चतुर्थी – गुरू अर्जुनदेव यांच्या बलिदानाचा दिवस.

यांपैकी पहिल्या तीन प्रसंगों मोठमोठ्या मिरवणुकी निघतात. कविदरबार भरतो. मध्याह्नी सर्वांना मुक्तद्वार भोजन असते.

या गुरुद्वाऱ्यांना शिखांकडून स्वयंस्फूर्तीने देणग्या मिळतात. प्रत्येक शीख सामान्यपणे आपल्या उत्पन्नाचा १० वा हिस्सा धर्मकार्यासाठी देतो. देशात गुरूंच्या स्मरणार्थ उभारलेले जे काही गुरुद्वारे आहेत, अशांपैकी चार गुरुद्वाऱ्यांना शिखांची चार तक्ते (न्यायदानाची धर्मपीठे) म्हणतात. त्यांची ठिकाणे अशी – (१) पूर्वेस पाटणा येथे गुरू गोविंदसिंगांचे जन्मस्थान. (२) पश्चिमेस अमृतसरचे केंद्रीय धर्मपीठ श्री अकाल तख्त. (३) उत्तरेस आनंदपूर व (४) दक्षिणेस नांदेड.

याशिवाय इतर अनेक ठिकाणीही निरनिराळ्या नावांचे गुरुद्वारे उभारले गेले आहेत. सर्व उपासना कार्ये आणि समाजकल्याणाच्या चळवळी गुरुद्वाऱ्यांमधून चालतात. गुरुद्वाऱ्यांच्या मार्फत शाळाही चालविल्या जातात.

उघडया डोक्याने कुणीही गुरुद्वाऱ्यात प्रवेश करू नये, असा सक्त नियम आहे. म्हणून आत प्रवेश करताना स्त्रिया डोक्यावरून पदर घेतात आणि पुरुष टोपी, फेटा, इ. नसल्यास निदान हातरुमाल तरी डोक्याला बांधतात. दर्शनार्थी लोक गुरुद्वाऱ्यात शिरल्यावर ग्रंथसाहेबाजवळ जाऊन त्याच्या रुमालावर काही दक्षिणा ठेवतात. गुडघे टेकून व डोके जमिनीला टेकवून नमस्कार करतात व गुरुग्रंथाला पाठ न दाखवता तसेच मागे येतात.

**शीख संस्कार** – हिंदूंच्याप्रमाणे शिखांमध्ये सोळा संस्कार नाहीत. काही मोजकेच संस्कार गुरुग्रंथाच्या आधारे ते करतात.



सुवर्णमंदिर, अमृतसर

**जातक**– मूल जन्माला आल्यावर पुष्कळसे शीख लोक कोणताच संस्कार करीत नाहीत; पण काही शीख लोक जपजोतले पहिले पाच श्लोक बालकाच्या कानात कुजबुजतात. नामकरण संस्कार मात्र करतात. त्या वेळी गुरुग्रंथाचे कुठलेही एक पान उघडतात आणि त्यावरच्या पहिल्या अक्षराने सुरू होणारे नाव मुलाला ठेवतात.

त्यानंतरचा संस्कार मुलाच्या केसांची पहिली गाठ बांधणे हा असतो. त्या वेळी समारंभ करतात. मुलाला जेव्हा गुरुग्रंथ प्रथमच वाचायला शिकवतात, तेव्हा गुरुद्वाऱ्यात मोठा समारंभ करतात व गोरगरिबांना भोजन वाढतात.

**दीक्षा**– मुले आणि मुली जेव्हा वयात येतात, तेव्हा त्यांना शीख धर्माची दीक्षा देतात. ही दीक्षा प्रत्येक शिखाला आवश्यक असते. त्या वेळी आप्तेष्टांना बोलावतात. समाजातले पंच (ज्येष्ठ, श्रेष्ठ असे पुरुष) दीक्षा देण्याचे काम करतात. या दीक्षेला अमृतदीक्षा किंवा पोल असे नाव आहे. लोखंडी पात्रात पाणी घालून त्यात वत्तासे घालायचे आणि ते पाणी खंडाने (दुधारी खंजीर) ढवळायचे म्हणजे अमृत तयार होते. ते करीत असताना गुरुग्रंथाच्या नित्योपासनेतले पाच मंत्र म्हणतात. मग दीक्षार्थीला खालसा पंथाची शपथ घ्यायला लावतात. ती शपथ घेतल्यावर दीक्षार्थी गुरुग्रंथाला वाकून नमस्कार करतो. मग ते अमृत दीक्षार्थी मुलाला किंवा मुलीला प्यायला देतात. दीक्षा देणारे पंच दीक्षार्थीच्या मस्तकावर पाच वेळा ते शिंपडतात आणि पाच वेळा त्याच्या डोळ्याला लावतात. तसे करताना 'वाह गुरुजीका खालसा'. 'वाह गुरुजी की फतेह'. (=मी परमेश्वराचा खालसा म्हणजे सच्चा शिष्य

आहे. गुरुजीचा विजय असो.) अशी घोषणा करतात. ही दीक्षा झाल्यावर शीख व्यक्तीला नवीन जन्म मिळाला, असे समजतात. काही वेळेला दीक्षित व्यक्तीला दुसरे नावही देतात. त्याच वेळी त्याला पुढील पाच ककार शरीरावर धारण करायला देतात - (१) केश (२) कंगा - लहान फणी (३) कच्छ - तोकडी विजार (४) कडा - लोखंडाचे लहान कडे व (५) कृपाण - लहान तलवारीसारखे शस्त्र.



शीख पुरुषाची केशरचना

दीक्षेनंतर प्रत्येक शिखाला पंथाच्या तत्त्वाप्रमाणे वागावे लागते. त्याला तंबाखूचे सेवन करणे निषिद्ध असते. मुलाला किंवा मुलीला दीक्षा घेतल्यानंतरच लग्न करण्याचा अधिकार मिळतो.

विवाहप्रथा - शिखांचा लग्नविधी सामान्यपणे हिंदूंच्याच सारखा असतो. फरक एवढाच, की विवाहविधीत वैदिक किंवा पौराणिक मंत्रांऐवजी ते गुरुग्रंथातील आनंद नामक मंत्र म्हणतात. ते विवाहालाही आनंदकारज असे म्हणतात.

लग्न ठरल्यावर तिलक लावण्याचा समारंभ होतो. गुरुग्रंथातील एखादा धर्मोपदेशक प्रथम जपजीसाहेबमधील पाच मंत्र म्हणतो, मुलाला मुलीच्या बापाकडून आलेली खारीक चावायला लावतो आणि त्याच्या कपाळी केशराचा टिळा लावून त्याच्यावर अक्षता चिकटवतो. त्यानंतर त्याच्या कपड्यांवर केशरी पाणी शिंपडतो. मग वरपिता वधूसाठी न्हाव्यामार्फत साखर, नारळ, तांदूळ, खारका, पैसे, दागिने, कपडे इ. वस्तू पाठवतो. त्यानंतर एखाद्या शुभ दिवशी मुलीच्या घरी साखरपुडा होतो. त्या वेळी न्हाव्याची पत्नी वधूला वरपित्याकडून आलेली साखर व खारीक खायला देते. त्यानंतर मिठाई वाटून लग्नाचे निमंत्रण देतात. लग्नाच्या आधी काही दिवस आसपासच्या स्त्रिया संध्याकाळी वधूगृही येऊन विवाहगीते गातात. लग्नाच्या आदल्या रात्री वधू-वरांच्या हातांना मेंदी लावतात. लग्नाच्या दिवशी नवरा मुलगा आप्तेष्टांसह वाजत गाजत घोड्यावर बसून वधूगृही जातो. तिथे सर्वांचे स्वागत होते. त्याला मिलनी असे म्हणतात. मग भोजनसमारंभ होतो. त्यानंतर नवऱ्या मुलाला घरात नेतात. तिथे वधूच्या वहिणी व मैत्रिणी त्याचे खूप वेळा पाय ओढतात. मोठ्या माणसांनी जमविलेल्या लग्नात अनेकदा वधू-वर याच वेळी परस्परांना प्रथम पाहतात.

लग्नाचा मुहूर्त सूर्योदयापूर्वी असतो. पहाटेच्या वेळी रागी म्हणजे गायक प्रभातकालीन उपासनेच्या वेळी म्हणायची स्तोत्रे गातात. त्यानंतर वधू-वरांना गुरुग्रंथासमोर बसवितात. मग पुरोहित त्यांना वैवाहिक जीवनातली कर्तव्ये सांगतो आणि नंतर गुरुग्रंथातील विवाहविषयक मंत्र म्हणतो. मग रागी ते मंत्र तालासुरात गातात. नंतर वधू-वर गुरुग्रंथाभोवती चार प्रदक्षिणा घालतात. या विधीने लग्न पक्के होते. शेवटी वधू समारंभाने गृहप्रवेश करते.

शेतकरी शिखांत पुष्कळदा लग्ने लहानपणी होतात. अशा वेळी लग्नानंतर मुलगी माहेरीच राहते आणि वयात आल्यावर सासरी जाते.

मर्तिकप्रथा - माणूस आसन्नमरण झाला, की त्याच्याजवळ बसून गुरुग्रंथातले काही मंत्र म्हणतात. मृतासाठी रडणे व ऊर बडवून शोक करणे याला मनाई असते. शीख लोक मृताला जाळतात. तत्पूर्वी त्याला स्नान घालतात. मग चितेवर ठेवतात. मृताचा मुलगा किंवा उत्तराधिकारी चिता पेटवतो. मृताची रक्षा नदीत विशेषतः कीरतपूर येथे बियास नदीत विसर्जित करतात. मृताचे कोणतेही स्मारक उभारीत नाहीत. श्राद्धही करीत नाहीत. मृताच्या वयानुसार चार ते सहा दिवस आशौच पाळतात. आशौचात जमिनीवर बसतात व झोपतात. आशौचाच्या शेवटच्या दिवशी आप्तेष्ट मृताच्या घरी जाऊन प्रार्थना म्हणतात व गुरुग्रंथाचे वाचन करतात. गृहप्रमुखाचा मृत्यू झाला असल्यास त्याच्या मोठ्या मुलाला सर्वांसमक्ष पागोटे बांधतात व गृहप्रमुख म्हणून त्याला मान्यता देतात.

शीखदर्शन - याला गुरुमतदर्शन असेही म्हणतात. वेद व उपनिषदे यांतील उक्तींवरून भारतीय आस्तिक दर्शनांची निर्मिती व वाढ झाली. शीख लोक वेद आणि उपनिषदे यांना मानीत नाहीत; पण तरीही शीख गुरूंच्या दार्शनिक विचारांवर वेदोपनिषदांचा अव्यक्तपणे प्रभाव जाणवल्यावाचून राहत नाही. शीख दर्शनाची स्वतंत्रपणे उभारणी झालेली नाही. कारण शीख ह्या मुळी आध्यात्मिक पंथच नाही. किंबहुना या दोन गोष्टींविषयी गुरू नानक यांचा निषेधच आहे. नीती, भक्ती व सदाचार यांच्या आधारे शिखांनी उत्तम संसार करावा, असा गुरू नानकांचा उपदेश आहे. पण तरीही मुख्यत्वे गुरू नानकांच्या

वाङ्मयातून व गौणत्वे इतर गुरूंच्या काव्यकृतींतून जे दार्शनिक विचारांचे कण गोळा करता येतात, ते असे –

गुरू नानक म्हणतात – सत् म्हणजे परमात्मा. याच्यापासून वायू उत्पन्न झाला. त्याच्यापासून जल आणि जलापासून त्रैलोक्याची रचना झाली. या सत्चा प्रकाश विश्वातल्या प्रत्येक वस्तूत भरून राहिला आहे. तिथी, दिन, ऋतू, हवा, पाणी, अग्नी, पाताळ इत्यादींची रचना करून सत्ने त्यांच्या मध्यभागी पृथ्वीची स्थापना केली व तिच्यावर अनेक प्रकारचे जीव उत्पन्न केले.

तैत्तिरीय उपनिषदात आकाश व आकाशापासून वायू उत्पन्न झाल्याचे सांगितले आहे. पण गुरू पहिल्या प्रथम वायूची उत्पत्ती झाल्याचे सांगतात. पुढची सृष्टिरचना सामान्यत्वे उपनिषदांच्या-प्रमाणेच गुरुमतात मांडलेली आहे. सृष्टीची उत्पत्ती कुठून होते व तिच्या प्रलयकाली सर्व भौतिक पदार्थ कुठे जातात, याविषयी गुरुमत असे –

**उतपति परलउ सबदे होवै । सबदे ही फिर ओपति होवै ।।**

(माझ महला ३)

**अर्थ** – जगाची उत्पत्ती व प्रलय परमात्म्यापासूनच होतात. आणि उत्पत्ती व प्रलय यांच्या मध्यकाली सर्व भूते त्या पर-मात्म्याच्या ठिकाणी आरोपित राहतात.

**इकस ते होइउ अनंता । नानक ऐकस माहि समाये जीउ ।।**

(माझ अष्टपदी ५ महला ५)

**अर्थ** – ज्या प्रकारे उत्पत्तिकाली तो परमात्मा एकाचा अनेक होतो, त्याचप्रमाणे प्रलयकाली हे सर्व विश्व त्या परमात्म्याचे ठिकाणी विलीन होते.

'एको ऽहं बहु स्याम् । प्रजायेयम्'=मी एक आहे, तो बहू होईन, प्रजा उत्पन्न करीन; व 'तज्जलान्'=परमात्म्यापासून सृष्टी उत्पन्न होते व शेवटी त्यातच लीन होते, या उपनिषद्-वाक्यांनाच या बाबतीत गुरुमत अनुसरले आहे.

**ईश्वर** – या बाबतीत गुरुमत असे, की ईश्वर हा सृष्टिकर्ता आहे. सृष्टीचा जनक जो ब्रह्मदेव त्याचाही तो जनक आहे. विजेहून गतिमान असलेले मन त्यानेच निर्माण केले. उत्तुंग पर्वत त्यानेच बनवले. सूर्य व चंद्र निर्माण करून युगनिर्मितीही त्यानेच केली. विश्वातले आद्य ज्ञानग्रंथ जे वेद, ते त्यानेच निर्मिले.

**जल, थल, महीअल, पूरिआ स्वामी सिरजन हार ।**
**अनेक भांति होइ पसरिआ । नानक एकं कार ।।**

(गौडी थिती महला ५)

**अर्थ** – आपण निर्माण केलेल्या सृष्टीत तो परमात्मा सर्वत्र व्यापून उरला आहे. जल असो, स्थल असो; त्यामध्ये तोच परमात्मा नाना प्रकारे पसरला आहे.

गुरू नानकांचे हे विचार पूर्णपणे 'ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत्' या उपनिषद्वचनाचा पालव धरून प्रकटले आहेत. 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' (ऋ. १.३.६४) या वेदवचना-प्रमाणेच गुरुमतातही एकाच परमात्म्याची एकोंकार, सत्, अकालपुरुष, साहिब, दातार, इ. अनेक नामे सांगितली आहेत.

**बीज बीज देखउ बहु प्रकारा । फल पाके ते एकोंकारा ।**
**घटक बीज महि रवि रहिउ । जाके तीन लोक बिस्तार ।**

(गौडी बावन)

**अर्थ** – तो परमात्मा एवढा महान आहे, की तीन्ही लोकां-एवढा त्याचा विस्तार आहे. तो सूक्ष्म इतका आहे, की लहानशा बीजांमध्ये सामावून राहू शकतो.

'अणोरणीयान् महतो महीयान्' या कठोपनिषदातल्या वचनाचाच हा विस्तार आहे.

**जीव** – गुरू नानक जीवाच्या स्थितीविषयी पुढील पद्यपंक्ती लिहितात –

**पँच ततु मिलि काइआ कीनी । तिस महि राम रतनलै चीनी ।**
**आतम रामु रामु है । आतम हरि पाइऐ सबदि बीचारा हूं ।।**

**अर्थ** – परमात्म्याने पाच तत्त्वे एकत्र करून शरीराची रचना केली आणि त्या शरीरात रामरतन अर्थात जीव याची स्थापना केली. आत्मा म्हणजे जीव हा राम म्हणजे ईश्वर आहे आणि राम म्हणजे ईश्वर हा जीव आहे. या दोन्ही शब्दांचे रहस्य जो जाणील, त्याला ईश्वर प्राप्त होईल.

प्रभूच्या सृष्टीत असंख्य जीव आहेत. ते चौऱ्यायंशी लक्ष योनींत पसरलेले आहेत. त्या सर्वांत मनुष्य श्रेष्ठ आहे. ज्या-प्रमाणे आगीपासून ठिणग्या, पाण्यापासून तरंग आणि मातीपासून कण पृथक होतात, त्याचप्रमाणे ईश्वरापासून जीव पृथक होऊन अनेक योनींत जातात आणि अखेरीस त्याच परमेश्वराच्या ठिकाणी लीन होतात. परमात्म्याप्रमाणेच जीवही अजरामर आहे. त्याचबरोबर तो घटतही नाही व वाढतही नाही. पण फरक एवढाच, की परमात्म्याचे अधिकार जीवाला नाहीत. जीवाचे कर्म निजप्रेरणेने होत नसून, आत्म्याच्या प्रेरणेनेच होते. जीवाला सुख–दुःख, उच्च-नीच, इ. सर्व अवस्था लागू आहेत. खरे तर जीव ईश्वराधीन आहे. या जीवाला सुख-शांती आणि मोक्ष यांचा लाभ हवा असल्यास त्याने पुढील उपायांचा अवलंब करावा-

(१) अहंकाराचा त्याग करून स्वतःला ईश्वरार्पण करणे.
(२) निंदा–स्तुतीपासून स्वतःला अलग ठेवणे.
(३) साधुसंगतीत राहणे.
(४) आत्मज्ञानी सद्गुरूच्या उपदेशाप्रमाणे चालणे.
(५) संसारात कमलपत्रासारखे राहणे.
(६) नीतिमर्यादा पाळणे.

(७) मनाला हरिचरणाच्या मार्गाने नेणे.
(८) परपीडक ठरतील असे व्यवसाय न करणे.
(९) मायापाश तोडण्याचा प्रयत्न करणे.
(१०) सत्य ज्ञानासाठी प्रयत्न करणे. आणि
(११) जीवनातल्या समस्त आकांक्षांच्या वर भक्तीचे स्थान आहे असे समजून तिची कास धरणे.



आनंदपूरचा गुरुद्वारा

गुरुमुखी लिपीत तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ मुबलक आहेत, पण त्यांमधून गुरुग्रंथाचे प्रत्यक्ष विवरण केलेले आढळून येत नाही. सुखसिंह किंवा सुखदेव यांनी लिहिलेला अध्यात्मप्रकाश हा ग्रंथ निर्मलपंथियांचा प्रमाणभूत ग्रंथ मानला जातो. निर्मल नावाचा एक पंथ गुरू गोविंदसिंगांच्या मृत्यूपूर्वी स्थापन झाला. या पंथातून कित्येक संस्कृतज्ञ शीख पंडित तयार झाले. या शीख पंडितांचे तत्त्वज्ञान वेदान्तावर अधिष्ठित होते. मात्र त्यांनी मूर्तिपूजा आणि जातिनिर्बंध त्यात येऊ दिले नाहीत. त्यांचे तत्त्वज्ञान भक्ति-पंथाच्या रूपाने वहरून आले. सुखसिंह हा या निर्मल पंथाचाच एक प्रवक्ता होता. त्याने शंकराचार्यांचा तत्त्वविचार आपल्या ग्रंथात संक्षेपाने मांडला आहे. हा ग्रंथ शीख लोकांच्या पठनपाठनात आहे. दुसरा तसाच एक ग्रंथ विचारसागर हा होय. याचा कर्ता निश्चलदास हा सुखसिंहाच्या नंतर होऊन गेला. त्याने सुखसिंहाप्रमाणे अद्वैताचे मंडन केले आणि द्वैताद्वैताचे खंडनही केले. ग्यानी संतोषसिंह याने आत्मपुराणाचा अनुवाद केला व त्या द्वारे शिखांना अनेक उपनिषदांचा परिचय करून दिला. त्यानंतरच्या काळात चेतनदास याने शिवगीता या ग्रंथात वेदान्ताचा अर्थ आत्यंतिक निवृत्ती असा लावला. अगदी अलिकडच्या काळात हरिचरण यांनी अमरवस्तू नावाचा एक ग्रंथ लिहिला आहे. हे गृहस्थ शीख धर्मात पारंगत असून, त्यांनी वेदान्ताच्या मूलतत्त्वाशी शिखांच्या धर्मतत्त्वाचा समन्वय करण्याचा प्रयत्न केला आहे.

गुरू गोविंदसिंगांच्या काळी निर्मलपंथाबरोबरच ग्यानी पंथ नावाचा एक दुसरा संप्रदाय निर्माण झाला. त्याच्या अनुयायांनी शीख जनतेला गुरुग्रंथातील कवने सोप्या पंजाबीत समजावन सांगण्याचे कार्य केले. भाई मणिसिंह हा पहिला ग्यानी होय. तो गुरू गोविंदसिंगांचाच शिष्य होता. गुरू नानकांच्या जनम-साखीतील धार्मिक आणि तात्त्विक विचारांवर त्याने भाष्य लिहिले आहे. या भाष्यामुळे धर्माचा तौलनिक अभ्यास करणाऱ्या पंडितांमध्ये मणिसिंहाला अग्रस्थान प्राप्त झाले आहे. वीरसिंह हा ग्यानी परंपरेचा पहिला वारसदार ठरतो. इ. स. १८७५ ते १९२५ च्या कालखंडात ज्या सुधारणात्मक चळवळीने मध्यम-वर्गीय शिखांना प्रभावित केले, त्या चळवळीमागची प्रेरक शक्ती भाई वीरसिंह हीच होती. वीरसिंहाने शीखधर्माचे जे मूलभूत तत्त्वज्ञान सांगितले, त्याविषयी श्री. रामसिंह लिहितात, ते असे–

'नाम जपो, किरत करो, वण्ड हको' = परमेश्वराचे नाम-स्मरण करा, काहीतरी उत्पादक श्रम करा आणि आपल्याला जे मिळत असेल त्याचा काही हिस्सा इतरांना द्या.

निर्मलांनी सांगितलेल्या तत्त्वांहून वीरसिंहाने सांगितलेले हे तत्त्व निश्चित प्रगत असून, अर्वाचीन विचारांशी व प्रवृत्तींशी अधिक जुळणारे आहे. त्याग आणि भोग या दोन अंतिम टोकां-मधील मध्यम मार्गाचे त्याने प्रतिपादन केले आणि ज्याची परिणती शेवटी मनुष्याचे व्यक्तिमत्त्व फुलविण्यात होईल अशा सतत मनोविकास साधणाऱ्या जीवन-पद्धतीचा पुरस्कार केला. शेवटी ज्या अवस्थेत अंतरात्म्याच्या सौंदर्याचा साक्षात्कार होऊन सर्व शोध, प्रयत्न आणि समस्या लोप पावतात, अशी अंतिम पूर्णावस्था साधकाला प्राप्त होते, असे त्याने मानले. अशा विकासाचा परमोत्कर्ष गाठणाऱ्या मनुष्याचे मुख्य लक्षण म्हणजे त्याच्या आध्यात्मिक व्यक्तिमत्त्वाचा सुगंध सर्वत्र दर-वळतो, हे होय. भाई वीरसिंहाच्या शीख धर्मविषयक दृष्टि-कोणानुसार मानवाच्या आध्यात्मिक जाणिवेचा जो अत्युच्च आविष्कार होतो, त्यात व्यक्तिनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ असा भेद नष्ट होतो आणि या अभेदाच्या जाणिवेतून उदात्त आनंदाचा अनुभव देणारे सर्जनशील सामर्थ्य व्यक्तीला प्राप्त होते. त्याबरो-बरच उत्स्फूर्तपणे समाजसेवा करण्यास त्या व्यक्तीला प्रेरणा मिळते. नामजपामुळे मनुष्याचे जीवन चिंतनशील बनते व त्याला

शिव, सुंदर, आनंद आणि सत्य या मूल्यांचा क्रमश: अनुभव येत जातो. भाई वीरसिंहाचे साहित्य-काव्य, कादंबऱ्या, दहा शीख गुरूंची चरित्रे, आदिग्रंथाचे विवरण यांतून शीख धर्माच्या या मूलभूत तत्त्वांचे स्पष्टीकरण होते.

**शीख समाज** – शिखांची संख्या अंदाजे ५० लाख असून, त्यांची वस्ती मुख्यत्वे पंजाबात आहे. शीख समाज खत्री, जाट, अरोड, डोगरा, ब्राह्मण, इ. विविध जातींतल्या लोकांचा मिळून बनलेला आहे. शीख स्त्री-पुरुष उंचेपुरे व धिप्पाड असतात. शीख पुरुष शूर, आक्रमक व मेहनती आहेत. जीवनाच्या अनेक क्षेत्रांत ते झुंजार वृत्तीने चमकले आहेत.

पंजाबातले बहुतेक शीख शेती करतात. ते आपल्या शेतांत खूप मेहनत करतात. सुधारलेल्या तंत्राचा व नवीन शोधांचा उपयोग करून ते भारतातील इतर शेतकऱ्यांपेक्षा बरेच अधिक उत्पादन काढतात. पंजाबातल्या पडित, पाणथळ व हिंवतापग्रस्त अशा जमिनी पाकिस्तानातून आलेल्या शीख निर्वासितांनी लागवडीस आणल्या आहेत.

शिखांना लढाऊ पेशाची फार आवड आहे. गेली सुमारे शंभर दीडशे वर्षे ते लोक मोठ्या संख्येने सैन्यात भरती होत आहेत. त्यांच्यापैकी अनेकांनी मर्दुमकी गाजवल्याबद्दल शौर्यपदकेही मिळवली आहेत.

क्रीडाक्षेत्रातही शीख लोक आघाडीवर आहेत. कुस्तीपासून हॉकीपर्यंत अनेक खेळांत ते प्रवीण असून, आंतरराष्ट्रीय क्रीडा-स्पर्धांमध्ये त्यांनी अनेक सुवर्णपदके मिळवली आहेत. हॉकीच्या जागतिक स्पर्धेमध्ये भारताला अनेक वेळा विश्वचषक मिळाला, त्याचे बरेचसे श्रेय शीख खेळाडूंना आहे.

शीख लोक वृत्तीने साहसी असतात. अनेक शीख परदेशात वास्तव्य करून तिथेही उद्योगधंदे करीत आहेत. आशिया आणि आफ्रिका या खंडांतील अनेक देशांत शीख लोक टॅक्सीवाले, पोलिस व व्यापारी म्हणून काम करताना दिसतात. इंग्लंड, अमेरिका व कॅनडा या देशांत अनेक शीख स्थायिक झाले असून, उद्योगधंदे करून ते भरभराटीला आले आहेत. भारतातही हे लोक तंत्रज्ञ, यंत्रज्ञ, सुतार, कारागीर व स्थापत्यविशारद म्हणून प्रसिद्ध आहेत. भारताच्या मोठमोठ्या शहरांतील वाहतुकीचा व्यवसाय बऱ्याच अंशी शिखांच्या ताब्यात आहे.

शीख लोकांत लेखक, कलाकार, विद्वान व शास्त्रज्ञ म्हणून अनेकांनी कीर्ती मिळविली आहे.

शीख लोक खेडेगावात शेतकरी म्हणून राहत असले, तरी त्यांची घरे सुखसोयींनी युक्त असतात. खेड्यांत बहुतेक ठिकाणी एकत्र कुटुंबपद्धती आहे. शीख शेतकऱ्याचा आहार सत्त्वयुक्त असतो. गहू आणि दूध हे त्यांचे मुख्य अन्न होय. या सकस अन्नामुळे त्यांना ताकद खूप असते. सणावारी व लग्नप्रसंगी ते मटण खातात. हिवाळ्यात मोहरीची पालेभाजी लोण्याबरोबर खातात. हा आहारामुळे त्यांना कष्ट करण्यासाठी उत्साह व ताकद यांचा लाभ होतो.

सर्व शीख पुरुषांच्या नावापुढे सिंग व स्त्रियांच्या नावापुढे कौर असे उपपद लावलेले असते; पण सगळेच सिंग व कौर मात्र शीख नसतात. कारण राजपूत व गुरखा या जातींतही ही उपपदे शिखांच्या आधीपासून प्रचारात आहेत. नामपद्धतीवरून माणसाची जात कळते. ती कळू नये व एका जातिनिर्मुक्त समाजाचा बोध व्हावा म्हणून गुरू गोविंदसिंग यांनी अशा उपपदांची सक्ती केली.

शीख पुरुषांना सरदार व विवाहित स्त्रियांना सरदारनी म्हणतात. शेतकरी शिखांत मात्र पुरुषाला भाइजी व स्त्रीला बीबीजी म्हणण्याची पद्धत आहे. श्रीमंत लोकांत कुटुंबप्रमुखाला राजासाहिब व त्याच्या पत्नीला राणिसाहिबा असे म्हणतात.

शीख लोक दाढी व केस वाढवतात व डोक्याला फेटा बांधतात. लहान मुलांची काही वर्षे वेणी घालतात. मुलगा मोठा झाल्यावर तो डोक्यावर मध्यभागी केसांची गाठ मारतो आणि त्याभोवती फेटा गुंडाळतो.

सामान्यपणे, शोक व्यक्त करण्यासाठी पांढरा, लग्नाच्या वेळी गुलाबी व वसंतपंचमीच्या दिवशी पिवळा असे त्यांच्या फेट्यांचे बदलते रंग असतात.

दोन शीख एकमेकांना भेटल्यावर 'सत् श्री अकाल' असे म्हणून परस्परांना अभिवादन करतात. अनेक लोक एकत्र जमले असता किंवा सभा भरली असता त्या समाजाला उद्देशून 'वाह गुरुजीका खालसा' असा उच्चार करतात व प्रत्युत्तर देताना 'वाह गुरुजीकी फतेह' असे म्हणतात. [ शि. इ.; शि. इ.; हिं. स. सं. वि.; गु. ग्रं. को.; शी. स्फू. इ.; वि. ध. द.; भा. सा. सां. रे.; उ. भा. सं. प.; दि सिख टुडे ]

**शीतकृच्छ्र** एक प्रायश्चित्त. तप्त कृच्छ्राच्या उलट. यात सर्व थंड पदार्थ खायचे असतात. तीन दिवस थंड पाणी, तीन दिवस थंड दूध, तीन दिवस थंड तूप व तीन दिवस उपवास असा याचा विधी आहे. [ हिं. ध. ]

**शीतलनाथ** जैनांचा दहावा तीर्थंकर. जन्मस्थान भद्रिकापुरी. बापाचे नाव दृढरथ. आईचे नाव सुनंदा. जन्मनक्षत्र पूर्वाषाढा. लांच्छन श्रीवत्स. (दिगंबरमते पिंपळ.) ज्ञानवृक्ष प्लक्ष. यक्ष ब्रह्मा. यक्षिणी अशोका. (दिगंबरमते मानवी.) 'सकलसत्त्वसंतापहरणात् शीतल :' =सर्व जीवांचा

दुःखसंताप शमवणारा म्हणून शीतल, अशी याची व्याख्या आहे. दुसरी उपपत्ती अशी – हा गर्भात असताना याच्या आईने ज्वरपीडित पतीच्या अंगाला करस्पर्श केला व त्यामुळे त्याचा ज्वर उतरला, म्हणून याला शीतलनाथ असे नाव ठेवले गेले. याच्या स्वतंत्र मूर्ती आढळत नाहीत. [ जै. इ. ]

**शीतला** एक लोकदेवता. ही कोपली तर माणसांना देवी हा रोग होतो आणि तिला शांत केल्याने त्या रोगाचा उपशम होतो, अशी भारतभर समजूत आहे. हिच्या पूजेचे उपचार शीतल असतात आणि तिला शीतल पदार्थ आवडतात, म्हणून तिला शीतला हे नाव मिळाले असावे. उजाली, बसंतबुढी, सेडलमाता, चेचकमाता, मसानी, जगदम्मा, मोठीबाई, अशी प्रदेशपरत्वे तिला भिन्न भिन्न नावे आहेत. शब्दकल्पद्रुमात हिचे रूपध्यान वर्णिले आहे, ते असे –

नमामि शीतलां देवीं रासभस्थां दिगम्बरीम् ।
मार्जनीकलशोपेतां शूर्पालङ्कृतमस्तकाम् ।।

अर्थ – नग्न, गर्दभारूढ, केरसुणी व कलश धारण करणारी आणि जिच्या मस्तकावर सूप आहे, अशा शीतला देवीला मी नमस्कार करतो.

हिच्या इ. स. च्या ११–१२ व्या शतकातील अनेक मूर्ती राजस्थान व गुजरात या प्रदेशांत आढळतात. दक्षिणेत ही वसनेती आणि चतुर्भुज असते. तिच्या तीन हातांत त्रिशूळ, डमरू व ब्रह्मदेवाच्या पाचव्या शिराची कवटी असते. चौथा हात वरद मुद्रेत असतो. महाराष्ट्रात हिची मूर्ती चतुर्भुज आणि उभी असते. एक हात वरद मुद्रेत असतो व तीन हातांत कमळ, कलश व सीताफळ या वस्तू असतात.

पुष्कळदा एखाद्या खडबडीत दगडालाच शीतला समजतात. हिचे ठाणे गावाबाहेर एखाद्या घुमटीत निंबाच्या किंवा पिंपळाच्या झाडाखाली असते.

शीतलेची पूजा नैमित्तिक असते. मंगळवार, शुक्रवार किंवा सोमवार या वारी तिची पूजा करावी, असे स्कंदपुराणात म्हटले आहे(वैष्णव. ८.२२–२३). उत्तर प्रदेशात आषाढातल्या चारही सोमवारी हिची जत्रा भरते. मध्य प्रदेशात तिला कालीचे एक रूप मानून तिला त्रिशूल, पणती, दुग्धपात्र व जल अर्पण करतात. बंगाल, महाराष्ट्र व सिंध या प्रदेशांत तिची शेणाची मूर्ती करून पूजतात. महाराष्ट्रातील शहरी लोक हिला दहीभाताचा नैवेद्य दाखवतात, ओले हरभरे किंवा फुटाणे वाहतात व खणानारळाने तिची ओटी भरतात. ग्रामीण भागातले लोक तिचा मांड वसवतात. चौरंगावर कलश, कलशावर नारळ आणि सभोवती सात प्रकारची फळे अशी मांडाची रचना असते. या मांडापुढे लोक वाद्ये वाजवून शीतलेची गाणी गातात. शीतलेला शिळे अन्न प्रिय असते, अशी समजूत आहे, म्हणून तिच्या पर्वदिवशी आदल्या दिवशी शिजवून ठेवलेले अन्न तिला देतात व स्वतःही तेच खातात.



शीतलादेवी

शीतला ही देवीचा रोग पसरवते, ही समजूत दृढ करणारी एक कथा दक्षिणेत प्रचलित आहे, ती अशी –

पिरुह नावाचा एक ऋषी होता. त्याच्या पत्नीचे नाव नागावली. ती सुंदर आणि पतिव्रता होती. पिरुह एकदा दुसरीकडे गेला असता ब्रह्मा-विष्णु-महेश हे तिची परीक्षा पाहायला तिच्याकडे आले. नागावलीने त्यांची इच्छा जाणली व त्या तिघांना बालके बनवले. त्यामुळे देवांनी तिला शाप दिला, की 'तू कुरूप बनशील.' त्यामुळे तिला देवी आल्या आणि त्यांच्या व्रणांनी तिचा चेहरा विद्रूप झाला. काही कालाने पिरुह ऋषी घरी आला. पत्नी विद्रूप झालेली पाहून त्याने तिला घराबाहेर काढले व तिला शापही दिला, की 'तू राक्षसी होशील आणि देवीचा रोग लोकांत पसरवशील.' त्या दिवसापासून ती पृथ्वीवर देवीचा रोग फैलावू लागली.

भारतभर निरनिराळ्या भाषांतून शीतलेची गाणी आहेत. बंगाली कवींनी शीतलामंगल नावाची काही खंडकाव्येही लिहिली आहेत. [ लो. दं.; गॉ. इं.; व्हि. गॉ. सा. इं.; शोध-पत्रिका ]

**शीतलाव्रत** एक काम्य व्रत. श्रावण कृष्ण सप्तमीला स्त्रिया हे व्रत करतात. या दिवशी शीतलेची सुवर्णमूर्ती करून तिची पूजा व आठ किंवा त्याहून कमी वर्षे वय असलेल्या सात कुमारिकांना भोजन घालणे, असा याचा विधी आहे. फल– सौभाग्यप्राप्ती, दारिद्र्यनाश व संतानप्राप्ती. काही ठिकाणी हे व्रत श्रावण शुद्ध सप्तमीलाही करतात. [ हि. ध. ]

**शीतलाष्टमी** अंगावर येणाऱ्या देवी नामक फोडांच्या निवारणार्थ करायचे एक व्रत. चैत्र कृष्ण अष्टमीला

शीतलादेवीपुढे तुपाचे आठ दिवे अहोरात्र लावून ठेवणे, उशीर (वाळा) नामक एका सुगंधी वनस्पतीने सुवासित केलेल्या थंड पाण्याने व दुधाने शीतला देवीच्या प्रतिमेला स्नान घालणे आणि गर्दभ किंवा गर्दभमूर्ती, केरसुणी व सूप या वस्तूंचे दान करणे, असा याचा विधी आहे. [हि. ध.]

**शीत्तनार** (इ. स. चे २ रे शतक) एक तमिळ महाकवी. मणिमेखला या तमिळ महाकाव्याचा कर्ता. हा तिसऱ्या संघमूचा कवी होता. त्याला त्या संघमूमध्ये मोठा मान होता. तो बौद्ध होता असे दिसते. कारण त्याने बौद्ध सिद्धान्तांचे विवेचन चांगल्या प्रकारे केले आहे. पाहा – मणिमेखला.

**शीया पंथ** मुसलमानांमधला एक पंथ. शीया शब्दाचा अर्थ अनुयायी असा आहे. महंमद पैगंबराचा जावई अली याचे जे अनुयायी, त्यांना शीया म्हणतात. शीया लोक इस्लामचे पहिले तीन खलीफा अबूबक्र, उमर व उस्मान यांना मानीत नाहीत. त्यांच्या मते अली हाच पैगंबराचा वारस म्हणून खलीफापदी नियुक्त व्हायला हवा होता. कारण पैगंबर जेव्हा अंतिम तीर्थयात्रेहून परत येत होता, तेव्हा मार्गात घादिर खुम नामक स्थळी त्याने अलीला आपला उत्तराधिकारी नेमले होते व त्याचे इमाम असे नामकरण केले होते. त्यामुळे खलिफांना मानणारे ते सुन्नी (पैगंबरदर्शित मार्गाने जाणारे) व इमामांना मानणारे ते शीया असा पंथभेद त्यांच्यांत निर्माण झाला.

शीया लोक अली व त्याच्या वंशातील अकरा पुरुष अशा बारा जणांना खरे इमाम मानतात. त्यामुळे त्यांना इमामीया किंवा आशरीया (बारावंथी) अशीही नावे मिळाली आहेत.

शीया लोक जे बारा इमाम मानतात, त्यांची नावे अशी— (१) अली (२) हसन (३) हुसेन (४) हुसेनपुत्र अली (५) मुहम्मद बकर (६) जाफर सादिक (७) मूसा काजिम (८) मामूं रशीद (९) मुहम्मद तकी (१०) अली तकी (११) हसन अस्करी व (१२) मोहम्मद महदी.

शीयांच्या आचारधर्माला व तत्त्वज्ञानाला इमामत असे म्हणतात. श्री. अब्दुल बाकर मजलिसी या शीया पंडिताने इमामतची पाच लक्षणे सांगितली आहेत, ती अशी—

(१) इमामत ही ईश्वर व पैगंबर यांच्या सत्तेवर आधारित आहे. जनमत किंवा जनतेची इच्छा यावर इमामपद अवलंबून नाही. इमामाला ईश्वरदत्त धर्माधिकार असतो.

(२) ईश्वर जसा पैगंबरांना भूतलावर पाठवतो, तसाच तो इमामांचीही नियुक्ती करतो. कारण स्वत: निर्मिलेल्या मनुष्यांना पथप्रदर्शन करण्याची जबाबदारी ईश्वरावर असते आणि त्यासाठी तो इमामांची नियुक्ती करतो.

(३) इमाम हा अभ्रांत आणि पापमुक्त असतो.

(४) कुराण आणि कायदे याचे अधिकृत अर्थ सांगण्याचे व त्यांची व्याख्या करण्याचे काम इमाम ईश्वराज्ञेने करतो.

(५) ईश्वर आणि मानव यांच्यामध्ये इमाम हा मध्यस्थ असतो. इमामाच्या मध्यस्थीनेच मानवाने ईश्वराकडे जायला हवे. अन्यथा ईश्वर मानवांना दंड करतो.

इस्लाम धर्मातील बहुसंख्य लोक सुन्नी असून, शीयांची लोकसंख्या त्यामानाने अत्यल्प आहे. शीयांमध्येही अनेक पोटभेद निर्माण झाले आहेत. [मु. इं.; डि. इ.; हिं. वि. को.]

**शीर्षमुकुटसप्तमीव्रत** एक जैन व्रत. श्रावण शुद्ध सप्तमीला सुवासिनी स्त्रिया व मुली हे व्रत करतात. या दिवशी भगवान आदिनाथाचे पूजन आणि प्रोषधोपवास करणे व सर्व दिवस धार्मिक ग्रंथाच्या वाचनात किंवा ध्यान धारणेत व्यतीत करणे, असा या व्रताचा विधी आहे. फल-सौभाग्यप्राप्ती व त्याची वृद्धी. [व्र. ति. नि.]

**शीर्षासन** एक योगासन. याची कृती अशी – प्रथम शुद्ध खादीचे वस्त्र जमिनीवर पसरावे. डोके व हात त्यावर सहजपणे राहतील, जमिनीवर येणार नाहीत, इतके हे वस्त्र मोठे असावे. पुढे वाकून, गुडघे जमिनीवर टेकवावे आणि दोन्ही हातांचे पंजे एकमेकांत जुळवून हात कोपरांपासून वस्त्रावर टेकवावे. त्यानंतर मस्तक हातांच्या पंज्यांना लागून वस्त्रावर ठेवावे. त्या वेळी हातांची मनगटे डोक्याच्या दोन्ही बाजूंना येतील अशी ठेवावी. त्यानंतर गुडघे वर उचलून हळूहळू छातीजवळ आणावे. हात व डोके यांच्या आधारावर पाय जमिनीपासून वर उचलावे व गुडघ्यांजवळ वाकवून मांड्यांचे जवळ आणावे. हा शीर्षासनाचा पहिला (अपूर्ण) प्रकार झाला.

प्रथम पाच दिवस या अवस्थेत राहण्याचा काळ एक ते तीन मिनिटांपर्यंत वाढवीत न्यावा. आसनाच्या या अवस्थेत शरीर किंचितही हलू-डोलू देऊ नये. पडण्याची भीती वाटल्यास भिंतीचा आधार घ्यावा. चांगली सवय होताच भिंतीपासून दूर होऊन आसन करावे.

शीर्षासनाच्या प्रथमावस्थेनंतर दोन्ही पाय उचलून वर करावे व मांड्या सरळ रेषेत एकमेकींजवळ स्थिर ठेवाव्या. गुडघे सरळ न करता पाय मागे न्यावे. या अवस्थेचा दोन दिवस दोन मिनिटेपर्यंत व पुढे पाचव्या दिवसापर्यंत प्रतिदिवशी पाव मिनिटांपर्यंत अभ्यास करावा. इथे या आसनाची आणखी एक अवस्था पूर्ण होते.

यानंतर तिसरी अवस्था साधण्यासाठी दोन्ही पाय सरळ रेषेत वर ताणून ठेवावे. डोके, छाती, कंबर, गुडघे, पायाचे अंगठे हे सर्व अवयव एका समरेषेत ठेवावे. डोळे उघडे ठेवावे किंवा मिटून घ्यावे. अधिक वेळ या अवस्थेत राहायचे असल्यास डोळे मिटून घेणे चांगले; त्यामुळे मन स्थिर राहते. आसन-काळात श्वासोच्छ्वास मंद, शरीर स्थिर व शरीराचे सर्व वजन सम प्रमाणात राहील असे पाहावे.



शीर्षासन (दुसरा प्रकार)

तीन दिवस दोन मिनिटां-पर्यंत, तीन ते आठ दिवस तीन मिनिटांपर्यंत, नऊ ते पंधरा दिवस पाच मिनिटे हे आसन करावे व पुढे पाच मिनिटांपासून साठ मिनिटां-पर्यंत वेळ वाढवीत न्यावा. स्थूल माणसांनी हे आसन वीस मिनिटांपेक्षा जास्त वेळ करू नये. आसनकाळी श्वासोच्छ्वास नाकाने करावा, तोंडाने करू नये.

शीर्षासनानंतर लगेच उभे राहू नये. काही वेळ शवासनात पडून राहावे व मगच उठावे. सामान्यपणे हे आसन प्रातःकाळी व रिकाम्या पोटी करावे.

शीर्षासनाच्या नित्य अभ्यासाने डोळे चांगले राहतात. झोप शांत लागते, शरीरातील रक्त शुद्ध होते, स्फूर्ती वाढते. आणि सर्व प्रकारचे रक्तविकार नष्ट होतात. [ उ. यो. द. ]

**शील** जीवन परिशुद्ध करणारा एक गुणविशेष. शील याचा अर्थ सद्वर्तन असा अमरकोशात दिला आहे. राग-द्वेषांचा परित्याग म्हणजे शील होय, असे गोविंदराज म्हणतो. महाभारतात शीलाची व्याख्या सांगितली आहे, ती अशी –

अद्रोहः सर्वभूतेषु कर्मणा मनसा गिरा ।
अनुग्रहश्च दानं च शीलमेतत् प्रशस्यते ।

(शांति. १२४.६६)

अर्थ – कर्म, मन आणि वाणी यांनी सर्व भूतांच्या ठिकाणी अद्रोह वृत्तीने राहणे, तसेच अनुग्रह व दान करणे या सर्वांना शील असे म्हणतात.

पुढील तेरा प्रकारांनी शीलाची परिपूर्ती होते, असे हारीताने म्हटले आहे – (१) पवित्र आचार (२) देव–पितृभक्ती (३) सौम्यता (४) दुसऱ्याला परिताप न देणे (५) असूया न करणे (६) मृदुता (७) कठोरपणा नसणे (८) मित्रभाव (९) प्रियवादित्व (१०) कृतज्ञता (११) भयापासून दुसऱ्याचे रक्षण करणे (१२) कारुण्य व (१३) प्रशांती.

वरील प्रकारच्या त्रयोदशगुणी पुरुषाला शीलवान म्हणावे, असे हारीत म्हणतो.

वेदवेत्त्यांची स्मृती आणि त्यांचे शील हे दोन गुण म्हणजे धर्माचे मूलाधार होत, असे मनू म्हणतो (१.२).

शील हे एक जीवनमूल्य आहे. शील असेल तर सर्व काही आहे आणि ते नसल्यास जीवन म्हणजे केवळ देहधारण होय, हा सिद्धान्त मनावर ठसविण्यासाठी महाभारतात एक कथा सांगितली आहे, ती अशी –

एके दिवशी बृहस्पतीच्या प्रेरणेने इंद्र विप्रवेषात प्रल्हादाकडे गेला. त्याने शीलाचे माहात्म्य प्रल्हादाला विचारले. प्रल्हादाने त्याला शीलविषयक सर्व माहिती सांगितली व त्याच्या विनम्र वर्तनाने संतुष्ट होऊन म्हटले. 'हे देवेंद्रा, तुला हवा तो वर मजकडून मागून घे.' इंद्र म्हणाला. 'दैत्यराजा, मला तुझे शील दे.' प्रल्हादाने 'तथास्तु' म्हटले. इंद्र कृतकार्य होऊन स्वर्गाला परत गेला.

त्याच रात्री प्रल्हाद झोपला असता एक परम तेजस्वी आकृती प्रगट झाली. 'तू कोण आहेस' असे प्रल्हादाने त्या आकृतीला विचारले. ती आकृती म्हणाली. "मी शील आहे. तू आज इंद्राला शील दान केलेस, म्हणून मी तुझ्या शरीरातून निघून इंद्राच्या शरीरात प्रवेश करायला निघून जात आहे."

असे बोलून शील निघून गेले. त्याच्या पाठोपाठ धर्म, सत्य, सुरुची, शक्ती व श्री ही तत्त्वेही प्रल्हादाच्या शरीरातून निघून गेली. त्या सर्वांनी प्रल्हादाला सांगितले, की 'जिथे शील असेल तिथेच आमचे वास्तव्य असते. शील नसेल तिथे आम्ही राहू शकत नाही.'

मन, वाचा आणि कर्म यांच्या विकारांपासून अलिप्त राहणे, ईश्वरपरायण असणे, जगाकडून जेवढे घेतले तेवढ्याची तरी परतफेड करणे आणि प्राणिमात्राला आत्मरूप समजणे, ही शील-प्राप्तीची लक्षणे होत, असेही महाभारतात सांगितले आहे.

जीवहिंसादी समस्त निंद्य कृत्यांपासून चित्ताची निरती म्हणजे शील होय, अशी बौद्धांची शील या शब्दाची व्याख्या आहे. सर्व धर्म हे चित्ताच्या अधीन असून, बोधी म्हणजे ज्ञान हे धर्मांच्या अधीन असते. त्यासाठी सर्वांच्या आधी चित्ताचा परिशोध करावा लागतो. शील पारमितेच्या अभ्यासाने ही गोष्ट साध्य होते. जेतवन विहारात एका देवपुत्राला बुद्धाने हाच मार्ग उपदेशिला.

या मार्गाला बौद्धांनी विशुद्ध मार्ग म्हटले असून, शील, समाधी व प्रज्ञा हे या मार्गाचे तीन विभाग असल्याचे सांगितले आहे.

व्रतरक्षण म्हणजे शील होय, अशी जैनांनी शील या शब्दाची व्याख्या केली आहे. याविषयी आचार्य अमितगतीने एक श्लोक लिहिला आहे, तो असा –

संसारारातिभीतस्य व्रतानां गुरुसाक्षिकम् ।
गृहीतानामशेषाणां रक्षणं शीलमुच्यते ॥

अर्थ – संसाराला कारणीभूत अशा कर्मशत्रूंना भिऊन श्रावकाने गुरुसाक्षीपूर्वक जी व्रते ग्रहण केली, त्या सर्व व्रतांचे रक्षण करणे म्हणजे शील होय.

कुंदकुंदाचार्याने याचे अधिक स्पष्टीकरण करताना म्हटले आहे, ते असे – जीवांवर दया करणे, इंद्रिये स्वाधीन ठेवणे, सत्य बोलणे, चोरी न करणे, ब्रह्मचर्याचे पालन करणे, तसेच सम्यक् दर्शन, सम्यक् ज्ञान आणि सम्यक् तप या सर्व गोष्टी शीलाच्या परिवारातल्या आहेत. शील हेच विशुद्ध तप आहे. शील हेच ज्ञान आणि दर्शन यांची विशुद्धी आहे. शील हेच विषयांचा शत्रू आहे. आणि शील हीच मोक्षाची शिडी आहे.

**शीलकल्याणक** एक जैन व्रत. १८० उपवास व १८० पारणा मिळून एका वर्षांत हे व्रत पुरे करायचे असते. [ व्र. ति. नि. ]

**शीलभद्र** (इ. स. ५८५–६४०) एक बौद्ध आचार्य. हा नालंदा विद्यापीठाचा कुलपती होता. धर्मपालाचा हा शिष्य होता, असे सुकुमार दत्त यांनी म्हटले आहे. युआन च्वांगने आपल्या यात्रावर्णनात शीलभद्राची माहिती दिली आहे. युआन च्वांग त्याचा शिष्य होता आणि त्याने त्याच्याकडे बौद्ध दर्शन व संस्कृत भाषा यांचे अध्ययन केले होते.

शीलभद्र हा समतटाच्या (पूर्व बंगाल) ब्राह्मणवंशी राजाचा पुत्र होता. वयाच्या तिसाव्या वर्षापर्यंत त्याने साऱ्या भारतवर्षाचा प्रवास केला व त्यानंतर नालंदा येथे जाऊन धर्मपालाचे शिष्यत्व पत्करले. विद्यार्थिदशेतच त्याने एका पंडिताशी धार्मिक वादविवाद करून त्यात जय मिळवला. त्याच्या या विजयाबद्दल राजगृहाच्या राजाने त्याला खूप मोठे बक्षीस दिले. प्रथम याने ते बक्षीस स्वीकारले नाही; पण राजाने बराच आग्रह केल्यामुळे त्याला ते स्वीकारावे लागले. पुढे त्या पैशातून त्याने नालंदाजवळ एक विहार बांधला.

शीलभद्र मोठा प्रमाणवादी होता. त्याने अनेक ग्रंथ लिहिले होते. पण त्यांपैकी फक्त त्रिपिटकाचा तिबेटी अनुवाद उपलब्ध आहे. [ वि. ज. स्मा. ग्रं.; बु. मं. मो. इं. ]

**शीलव्रत** (१) एक काम्य व्रत. हे तिथिव्रत असून, शिव ही त्याची देवता आहे. प्रत्येक तृतीयेला हे व्रत वर्षभर करायचे असते. या दिवशी अग्निपक्व अन्न खायचे नसते. उद्यापनाच्या वेळी गाय दान द्यावी, असे सांगितले आहे. फल – इष्टकामनापूर्ती [ हि. ध. ]

(२) जैन व्रत – श्रावण शुद्ध नवमीपासून भाद्रपद शुद्ध एकादशीपर्यंत उपवास करणे, असा याचा विधी आहे. दुसरा पर्याय आषाढ शुद्ध चतुर्दशीच्या दिवशी उपवास. [ व्र. ति. नि. ]

**शीलावाप्तिव्रत** एक काम्य व्रत. वराह ही या व्रताची देवता आहे. याचा विधी असा – मार्गशीर्ष पौर्णिमेपासून एक महिनाभर रोज वराहमूर्तीला घृताने स्नान घालावे, त्याच्या आहुती द्याव्या, त्याचा नैवेद्य दाखवावा आणि त्याचेच दान द्यावे. व्रतसमाप्तीपूर्वी दोन दिवस उपवास करावा. उद्यापनाच्या वेळी घृताने भरलेल्या सुवर्णपात्राचे दान करावे. फल – शीलप्राप्ती. [ हि. ध. ]

**शुंग राजवंश** (सनपूर्व १८७–७५) मौर्य वंशानंतर मगधावर राज्य करणारा वंश. वेदात शुंग नामक कुलाचे निर्देश आढळतात. पाणिनीने (४.१.११७) शुंग कुलाचा भारद्वाज या ब्राह्मण कुलाशी संबंध जोडला आहे. या शुंग कुलातला पुष्यमित्र नामक शूर पुरुष मौर्य वंशातील शेवटचा राजा बृहद्रथ याचा सरसेनापती होता. बृहद्रथ विलासी व दुबळा होता. त्यामुळे तो मौर्य साम्राज्याचे रक्षण करण्यास असमर्थ ठरला. त्याच्या कारकिर्दीत आंध्र, कलिंग, विदर्भ व काश्मीर हे प्रदेश स्वतंत्र झाले. त्याच वेळी यवन राजा डिमिट्रियस याने भारतावर आक्रमण करून मगधावरही स्वारी केली.

या काळात लोकस्थितीही बिघडली होती. बौद्ध धर्माच्या प्रभावामुळे भारतीय लोकांचे क्षात्रतेज कमी झाले होते आणि बौद्ध लोक परकीय आक्रमकांना मदत करीत होते. म्हणून पुष्यमित्र शुंग याने बौद्ध धर्माला अनुकूल असलेल्या बृहद्रथ मौर्य राजाचा वध केला आणि तो स्वतः मगधाच्या सिंहासनावर बसला. पाटलिपुत्र हीच त्याची राजधानी होती.

पुष्यमित्र राजा झाला, तरी त्याने सेनापती ही आपली उपाधी कायम ठेवली. प्रारंभी त्याची सत्ता मगधापुरतीच मर्यादित होती. मात्र अयोध्या व विदिशा या नगरी त्याच्या राज्यात समाविष्ट होत्या. लवकरच त्याने यवनांचा पराभव करून पंजाबातील जालंधर व शाकल ही ठिकाणेही घेतली.

पुष्यमित्राने सिंहासनावर बसल्यानंतर लगेच अश्वमेध यज्ञ केला. त्यामुळे वैदिक धर्माला प्रतिष्ठा प्राप्त झाली.

कलिंगाधिपती खारवेल याच्या लेखावरून कळते, की त्याने सनपूर्व १७० मध्ये पुष्यमित्राचा पराभव करून त्याला मथुरेकडे पळवून लावले.

पुष्यमित्राचा पुत्र युवराज अग्निमित्र हा विदिशा येथे राज्यपाल होता. त्याच्या पत्नीचा भाऊ वीरसेन हा नर्मदातीरावरील एका गडाचा अधिपती होता. त्या वेळी विदर्भ देशावर यज्ञसेन नामक राजा राज्य करीत होता. त्याचा चुलतभाऊ माधवसेन अग्निमित्राचा स्नेही होता. त्या दोघा बंधूंचे सख्य नव्हते. एकदा यज्ञसेनाने माधवसेनाला पकडून कैदेत टाकले. तेव्हा अग्निमित्राने वीरसेनाला विदर्भावर स्वारी करण्याची आज्ञा दिली. वीरसेनाने यज्ञसेनाचा पराभव करून माधवसेनाला मुक्त केले. त्यानंतर विदर्भाचे दोन विभाग करून ते यज्ञसेन व माधवसेन यांना देण्यात आले. दोघेही पुष्यमित्राचे सामंत म्हणून राज्य करू लागले.

सनपूर्व १५५ च्या सुमारास यवन राजा मिनँडर याने भारतावर आक्रमण केले. त्याने कच्छ, सौराष्ट्र व मध्यदेश हे प्रदेश घेऊन मथुरा व साकेत ही नगरेही घेतली. परंतु पुष्यमित्र शुंगाने त्याचा पराभव केल्यामुळे त्याला परत जावे लागले. त्यानंतर पुष्यमित्राने दुसरा अश्वमेध यज्ञ केला. त्या यज्ञाचा अश्व बरोबर घेऊन अग्निमित्राचा पुत्र वसुमित्र हा दिग्विजय करीत असता सिंधू नदीच्या तीरावर त्याचा यवनांशी संघर्ष झाला. त्यात वसुमित्राने यवनांचा पराभव केला.

पुष्यमित्र वैदिक धर्माचा अभिमानी होता. बौद्ध परंपरागत आख्यायिकांत त्याने बौद्ध भिक्षूंचा छळ केला व त्यांचे मठ – विहार उद्ध्वस्त केले, असे म्हटले आहे. पण त्याला दुजोरा देणारा इतर पुरावा उपलब्ध नाही.

पुष्यमित्राने सुमारे ३६ वर्षे (सनपूर्व १८७–१५१) राज्य केले. महाभाष्यकार पतंजली त्याचा समकालीन होता. त्याने पुष्यमित्राच्या यज्ञाचे पौराहित्य केले असावे. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नामक नाटकात त्याच्या अश्वमेध यज्ञाविषयी माहिती आहे. विशेषत: वसुमित्राचा दिग्विजय व यवनांशी संघर्ष यांचे वर्णन त्यात केलेले आहे.

पुष्यमित्राचा पुत्र अग्निमित्र हाच कालिदासाच्या प्रस्तुत नाटकाचा नायक होता. त्या नाटकात अग्निमित्र विदिशा येथे राज्यपाल होता, तेव्हाची काही माहिती मिळते. त्याने ८ वर्षे मगधावर राज्य केले, असे ब्रह्मांडपुराणावरून कळते. त्याच्या नंतर वसुज्येष्ठ, वसुमित्र, आर्द्रक, पुलिंदिक, घोषवस, वज्रमित्र, भागवत व देवभूती यांनी राज्य केले. त्यांच्या विषयी फारशी माहिती उपलब्ध नाही.

विदिशा येथे सापडलेल्या एका आलेखात, हेलिओडोरस याने गरुडध्वज उभारल्याचा उल्लेख आहे. तक्षशिलेचा अँटिअलकिद याने त्याला भागभद्र नामक राजाकडे राजदूत म्हणून पाठवले होते. हा भागभद्र म्हणजे शुंग वंशातला पाचवा राजा आर्द्रक (भद्रक) असावा. विदिशा ही त्याची राजधानी होती. दहावा राजा देवभूती याचा वसुदेव नामक मंत्री होता. त्याने कपट-



भरहूत येथील कठड्यावरील एक शिल्पकाम

कारस्थान करून राजा देवभूती याचा वध केला व स्वत: राज्य बळकावले, असे बाणाच्या हर्षचरितावरून कळते. अशा प्रकारे शुंग वंशातील दहा राजांनी सनपूर्व १८७–७५ म्हणजे ११२ वर्षे राज्य केले.

शुंग वंशाचा इतिहास फारसा ज्ञात नसला, तरी त्या वंशाने भारताच्या इतिहासात महान कामगिरी केली, एवढे निर्विवाद होय. पुष्यमित्राने यवनांचे आक्रमण थोपवून, मगध-साम्राज्याचे रक्षण केले. त्यानंतर शुंग व यवन राजांचे सख्य नांदले. पुष्यमित्राने वैदिक यज्ञसंस्थेचा व भागवत धर्माचाही पुरस्कार केला. त्याच्या काळात वैदिक धर्म व भक्तिपंथ यांचा समन्वय करून, तो लोकप्रिय करण्यासाठी पुराणे निर्माण झाली. या काळात संस्कृत भाषा राजभाषा होऊन तिचे महत्त्व वाढले.

वास्तुविद्येत शुंगकालीन शिल्प विशेष उल्लेखनीय ठरले आहे. सांची येथे सम्राट अशोकाने बांधलेल्या स्तूपाभोवती जे

सुंदर कठडे व त्यांची दगडी तोरणे आहेत, ती शिल्पे याच कालात निर्माण झाली. शुंगकालीन मूर्तिकामात साधेपणा व कल्पकता हे गुण असून, ते पूर्ण भारतीय शैलीचे आहे. सांची व भरहूत येथील कठड्यांवरील मूर्ती शुंगकालीन मूर्तिशिल्पात सर्वोत्कृष्ट आहेत. बुद्धाच्या जीवनातील प्रसंग तिथे कोरलेले दिसतात. तिथल्या यक्ष–यक्षिणी व देवता यांच्या पूर्णाकृती प्रतिमाही प्रेक्षणीय आहेत. पाहा– पुष्यमित्र [ भा. प्रा. रा.; हि. क. इं. पी. २; प्रा. भा. सं.; प्रा. भा. इ. सं. ]

**शुक** पोपट. एक सुंदर पक्षी. याचा उल्लेख ऋग्वेद व यजुर्वेद या ग्रंथांत आहे. हा पीतवर्ण असून, त्याला मनुष्यासारखी वाणी असते, असे वर्णन तैत्तिरीय व मैत्रायणी संहितांत आहे.

सामान्यपणे पोपटाचा रंग हिरवा असतो. त्याची चोच तांबडी व बरीच वाकडी असते. त्याच्या हनुवटीस काळा पट्टा असतो. नराच्या गळ्यावर काळी रेघ असते, तिला कंठ म्हणतात. पोपट कळप करून राहतात. ते फळे खातात. त्यांना बोलायला शिकवले तर ते काही शब्द बोलू शकतात. ते दिसायला सुंदर असल्यामुळे बरेच लोक त्यांना पाळतात.

लोकसाहित्यात शुक हा कथाकथक ठरला आहे. शुकसप्तती किंवा शुकबहात्तरी हा कथासमुच्चय एका शुकाने आपल्या विरहिणी स्वामिनीला ऐकवला आणि तिला वाममार्गाला जाऊ दिले नाही, अशी कथा कथासरित्सागराच्या प्रभावती लंबकात दिलेली आहे. बाणभट्टाच्या कादंबरीतही एक शुक असून, तो चतुर व बोलका आहे. [लो. सा. रू.; सु. वि. को.]

**शुक योगींद्र** महाज्ञानी, जीवनमुक्त व परमहंस असा महापुरुष. हा व्यासांचा पुत्र होय. याच्या जन्माच्या कथा भिन्न भिन्न रूपांत आढळतात. महाभारताच्या शांतिपर्वात शुकाचे आख्यान विस्ताराने आले आहे. पुत्रप्राप्तीसाठी व्यासांनी शंकराकडून वर मिळवला. नंतर ते एकदा अरणिमंथन करीत असता घृताची नामक अप्सरा तिथे आली व तिने व्यासांना कामोत्सुक बनवले. तेवढ्यानेच त्यांचे वीर्य न कळत अरणीवर पडले आणि त्या मंथनातून शुक उत्पन्न झाला (शांति. ३३१–३५६).

व्यासांच्या वटिका नावाच्या भार्येच्या ठिकाणी शुक उत्पन्न झाला, असे स्कंदपुराणात म्हटले आहे (६.१४७–१४८).

शुकाचे उपनयन साक्षात शिवाने केले. त्या वेळी इंद्राने त्याला कमंडलू व वस्त्रे दिली. बृहस्पती हा याचा विद्यागुरू होय. शुकाने त्याच्याकडून वेद, उपनिषदे आणि इतिहास यांचे ज्ञान मिळवले. मोक्षधर्म तो व्यासांकडून शिकला. मग त्याला ब्रह्मज्ञानाची जिज्ञासा उत्पन्न झाली. व्यासांनी त्यासाठी त्याला मिथिलेच्या जनक राजाकडे जाण्यास सांगितले. शुक मिथिलेत गेला. पण जनकाने त्याची भेट घेतली नाही. त्याच्या वैराग्याची आधी परीक्षा घ्यावी आणि मग पुढे काय ते करावे, असा त्याने विचार केला. त्याने त्याला उपवनात ठेवून घेतले आणि त्याच्या सेवेसाठी तरुण व सुंदर अशा स्त्रिया पाठविल्या. त्या स्त्रियांनी शुकाला मोहवश करण्याचा खूप प्रयत्न केला; पण त्यात त्यांना यश मिळाले नाही. ही गोष्ट जनकाला समजल्यानंतर त्याने शुकाला भेटीस बोलावले आणि त्याच्या सर्व शंकांचे निरसन करीत करीत त्याला ब्रह्मज्ञान उपदेशिले. शुक कृतार्थ होऊन पुनश्च व्यासांकडे आला.

पुढे त्याने पीवरी नामक कन्येशी लग्न केले. तिच्या ठिकाणी शुकाला कृष्ण, गौरप्रभ, भरी व देवश्रुत हे पुत्र आणि कीर्ती ही कन्या झाली (दे. भा. १.१४; नारद पु. १.५८). पद्म, मत्स्य आणि विष्णू या पुराणांत त्याच्या कन्येचे नाव कृत्वी असे दिले आहे.

भगवान विष्णूने जो द्विविध, वेदोक्त धर्म उपदेशिला, तो परंपरेने व्यासांच्या पर्यंत येऊन पोचला होता. तो धर्म प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण असा उभयविध होता. आगामी कलियुगात अंतर्मुखवृत्तीचे लोक थोडे व बहिर्मुख वृत्तीचे लोक बहुसंख्य होतील, हे ओळखून व्यासांनी तो द्विविध धर्म दोन भिन्न संप्रदायांती प्रवर्तित केला. प्रवृत्तिलक्षण धर्म सुमंतू, जैमिनी, वैशंपायन व पैल यांच्या द्वारा प्रवर्तित केला आणि निवृत्तिलक्षण धर्मासाठी शुक हाच अधिकारी आहे, असे जाणून त्यांनी शुकाला तो उपदेशिला. हा धर्म म्हणजेच ब्रह्मविद्या होय. व्यासांनी ब्रह्मविद्येचे सूत्ररूपाने शास्त्र तयार केले. या शास्त्राला ब्रह्मसूत्रे असे म्हणतात. ही ब्रह्मसूत्रे व्यासांनी शुकाला उपदेशिली. शुकाने त्या सूत्रांची व्यवस्थित मांडणी करून त्यांची संहिता तयार केली. शुकाने ब्रह्मसूत्रांचे संस्करणही केले, असे उल्लेख पतंजलिविजय, गौडपादोल्लास, हरिविश्रीय, इ. ग्रंथांत सापडतात.

व्यासांनी भागवत पुराण रचले आणि ते शुकाला शिकविले. शुक हा परमहंस पदवीला पोचला होता, तरी त्याने ते भक्तिपूर्वक ग्रहण केले. पुढे ते त्याने सात दिवसांत परीक्षिती राजाला ऐकवले. त्यानंतर त्याने भागवताचा प्रचार केला व विस्तारही केला. पुढील श्लोकात या गोष्टीची साक्ष मिळते –

> स्वसुखनिभृतचेतास्तद्व्युदस्तान्यभावोऽ
> प्यजितरुचिरलीलाकृष्टसारस्तदीयम् ।
> व्यतनुत कृपया यस्तत्त्वदीपं पुराणं
> तमखिलवृजिनघ्नं व्याससूनुं नतोऽस्मि ॥
> (भाग. पु. १२.१२.६८).

अर्थ – शुक हा सदैव आत्मानंदात निमग्न असे. या अखंड अद्वैत स्थितीमुळे त्याची भेददृष्टी गळून गेली होती. पण तरीही गोपालकृष्णाच्या रुचिर आणि मनोहर क्रीडांनी त्याचे चित्त आकृष्ट केले. मग त्याने विश्वातल्या प्राणिमात्रावर कृपा करण्यासाठी भगवत्तत्त्व प्रकाशित करणाऱ्या भागवत पुराणाचा विस्तार केला. अशा त्या समस्त पापहर व्यासपुत्र शुकाला मी प्रणिपात करतो.

खरी गोष्ट अशी आहे, की पराशर, व्यास आणि शुक या तीन पिढ्यांच्या पुरुषांनी पुराणांची निर्मिती आणि त्यांचा प्रचार या कामी खूप परिश्रम केले. पराशराने विष्णुपुराणाचे व व्यासांनी भागवतपुराणाचे प्रथम प्रवचन केले. पुढे शुकमुनीने भागवताचा सर्वत्र प्रचार केला. पुराणांचे हे मुनित्रय होय.

आपले जीवितकार्य पूर्ण झाल्यावर शुकाने महानिर्वाणाला जाण्याचा विचार केला. व्यासांनी मोठ्या कष्टाने त्याला संमती दिली. तो उत्तर दिशेने निघाला व कैलासावर जाऊन पोचला. तिथे योगसाधनेच्या योगे तो वायुरूप बनला आणि सूर्यमंडलात प्रविष्ट झाला. तो देहरूपाने गेला; पण आत्मरूपाने स्थावर-जंगमात भरून उरला. म्हणूनच व्यास जेव्हा 'हे शुकाऽऽ' असा आक्रोश करीत त्याच्या मागून निघाले, तेव्हा वृक्षवनस्पतींनी चहुंकडून त्याला 'ओ' दिली.

परम ज्ञान व नैष्ठिक ब्रह्मचर्य यांमुळे शुकमुनी प्रातःस्मरणीय ठरला आहे. [ प्रा. च. को.; पु. वि. ]

**शुक्र** (१) सूर्याच्या ग्रहमालेतील एक अंतर्योगी, तेजस्वी व सुंदर ग्रह. याला सित, उशना, काव्य, इ. अन्यही नावे आहेत. पाश्चात्य देशात शुक्राला सौंदर्याची देवता म्हणजे स्त्री समजतात. व्हीनस हे त्याचे पाश्चात्य नाव आहे. याच्या उत्पत्तीबद्दल काही पौराणिक कल्पना अशा–

शुक्र हा प्रत्यक्ष सूर्यापासून जन्मला. सूर्याचे जे सात प्रमुख किरण आहेत, त्यांपैकी चौथ्या विश्वश्रवा या किरणापासून शुक्राची उत्पत्ती झाली, असे वायुपुराणात सांगितले आहे (५३.४८). सूर्यासारखाच शुक्राचाही एक रथ असून, त्याला दहा घोडे आहेत. ते पृथ्वीपासून उत्पन्न झाले असून, त्यांचे वेगवेगळे दहा रंग आहेत (ब्रह्मांडपु. पूर्वभाग ८१.८३).

शुक्राचे वास्तव वर्णन – शुक्र हा सूर्यापासून मिळालेल्या तेजाचा ६०% भाग परावर्तित करतो. इतर ग्रहांपेक्षा हा ग्रह इतक्या विपुल प्रमाणात प्रकाश परिवर्तित करू शकतो, याची अनेक कारणे आहेत. इतर ग्रहांपेक्षा तो पृथ्वीच्या अधिक जवळ येतो. अंतर्युतीच्या वेळी त्याचा कोनात्मक व्यास ६७" व बहिर्युतीच्या वेळी तो २१" इतका असतो. तरीही त्याचे बिंब इतर ग्रहांपेक्षा तेजस्वी दिसते. कारण शुक्र सूर्यापासून फार दूर नसल्यामुळे त्याच्यावर भरपूर सूर्यप्रकाश पडतो व त्याच्या वातावरणामुळे प्रकाशाचे परिवर्तन विपुल प्रमाणात घडते.

वुधाप्रमाणेच शुक्रही सूर्याभोवती आंदोलने घेताना दिसतो.



शुक्राची मूर्ती

सूर्यापासून तो ४६ अंशांपेक्षा अधिक दूर जात नसल्याने रात्री ९ ते पहाटे ३ वाजेपर्यंत तो दिसत नाही. मात्र दिवसाउजेडीही चांगल्या दृष्टीच्या माणसाला दुर्बिणीवाचून तो पाहता येतो. चंद्र सूर्यापासून १२ अंशांवर दृग्गोचर होतो, तर शुक्र सूर्यापासून ८ अंशांवरच दिसू शकतो.

बुधाप्रमाणेच शुक्रही गोलाकार मार्गाने च सूर्यप्रदक्षिणा करतो. त्याचा नाक्षत्रकाल अगर भ्रमणकाल २२५ दिवसांचा आहे व दिवस २३ तास २१ मिनिटांचा आहे. शुक्राच्या अंतर्युतीपासून ७१–७२ दिवसांनी त्याचा परम इनापगम (सूर्यापासून अति दूर अंतर) होतो. अंतर्युतीच्या वेळी शुक्राचे पृथ्वीपासूनचे अंतर २.६ कोटी मैल तर बहिर्युतीच्या वेळी ते १६ कोटी मैल असते.

चंद्र-बुधांप्रमाणेच शुक्रामुळेही सूर्यग्रहण होते. त्या वेळी एक काळा ठिपका सूर्यावरून जात असलेला दिसतो. याला शुक्राचे अधिक्रमण असे म्हणतात. हे अधिक्रमण २४३ वर्षांत चार वेळा होते, असे गणित केलेले आहे. चंद्राप्रमाणेच शुक्रालाही कला आहेत. अंतर्युतीच्या काळात त्यांचा प्रत्यय येतो.

सूर्यमालेतील ग्रहांमध्ये आकार, द्रव्यसंघ व मध्यम घनता या बाबतींत शुक्राचे पृथ्वीशी बरेच साम्य आहे. दोघांचा आकार व वजनही जवळजवळ सारखेच आहे. यामुळे शुक्राच्या पृष्ठभागावर गुरुत्वाकर्षणाचा जोर पृथ्वीच्या पृष्ठभागावरील

गुरुत्वाकर्षणाइतकाच आहे. शुक्रावर वातावरण फार दाट आहे व त्यात दाट अभ्रेही आहेत. शुक्राभोवती कार्बानिक अॅसिड वायूचा साठा भरपूर आहे. त्यामुळे शुक्रावर वनस्पती नाहीत. पण हे सर्व अंदाज आहेत. अलिकडेच रशियाने शुक्रावर दोन मानवरहित अंतराळयाने पाठवली असून, त्यांचे नेमून दिलेले काम चालू आहे. ही याने पृथ्वीवर जी माहिती पाठवतील तिच्यावरून शुक्राविषयी बरेच काही कळेल.

**जातकातले शुक्रवर्णन** – फलज्योतिषात शुक्र हा सौंदर्याचा आणि पत्नीचा कारक मानलेला आहे. मंत्रतंत्र, जारणमारण, इ. क्रियांचे कारकत्वही त्याच्याकडे जाते. तो वृषभ व तूळ या राशींचा स्वामी आहे. मीन राशीत तो उच्चीचा व कन्या राशीत नीचीचा असतो. जन्मकुंडलीत तो ज्या ज्या स्थानांचा स्वामी असतो, त्या त्या स्थानांच्या शुभ फलाची वृद्धी करतो. मेष, सिंह व धनू या राशींना शुक्राची चांगली फळे मिळतात. तो कर्क व वृश्चिक राशींत असता विषयवासना तीव्र करतो.

मानवी शरीरातील कंठ, घसा, कर्णेंद्रिय, जननेंद्रिय, बीजकोश यांवर शुक्राचा अधिकार चालतो. ज्यांच्या कुंडलीत शुक्र बलवान असतो, अशा स्त्री–पुरुषांचे शरीर कांतिमान व सुडौल असते; स्वभाव शांत, विलासी, सहवासप्रिय व छानछोकीचा असतो. पाहा – ग्रह. [सूर्यकुल; ज्यो. वि.; वे. वि. नि; जा. मा.]

(२) एक आचार्य. हा भृगूपासून हिरण्यकशिपूची कन्या दिव्या हिच्या ठिकाणी उत्पन्न झाला. काही पुराणांत, कर्दम ऋषीची कन्या ख्याती हिच्या ठिकाणी त्याची उत्पत्ती झाली, असे सांगितले आहे. याचा जन्म भोजकट देशात भाद्र. शु. दशमीच्या दिवशी पूर्वाषाढा नक्षत्रावर सायंकाळी झाला. याला काव्य असे दुसरे नाव आहे. हा व च्यवन हे दोघे भृगुकुलातले सर्वांत प्राचीन पुरुष होत. याने दैत्यांचे पौरोहित्य स्वीकारले. त्यामुळे शेवटपर्यंत तो असुरपक्षपाती राहिला. बलीच्या यज्ञात शुक्र हाच त्याचा पुरोहित होता. त्या प्रसंगी बटुवामनाने तिथे येऊन बलीकडे त्रिपाद भूमी मागितली. ती बलीने त्याला देऊ नये; कारण त्यात बलीचाच सर्वनाश आहे, हे जाणून त्याने त्या दानाला विरोध केला. पण बलीने त्याचे ऐकले नाही. बली ज्या झारीतून वामनाच्या हातावर दानोदक सोडणार होता, त्या झारीच्या तोटीत प्रवेश करून शुक्राने पाण्याची धार अडवली. पण बलीने तोटी साफ करण्यासाठी दर्भाची काडी तिच्यात खुपसली, ती सरळ शुक्राच्या डोळ्यात घुसली. त्या दिवसापासून शुक्र एकाक्ष झाला.

शुक्र अंगिरा ऋषीकडे संजीवनी विद्या शिकण्यास गेला. पण अंगिरा ऋषी ती शिकवण्यास विशेषसा राजी नसून, तो केवळ कालहरण करतो, असे निदर्शनास आल्यावरून शुक्राने त्याचे शिष्यत्व सोडले. मग तो शिवाची आराधना करू लागला. शिवाने प्रसन्न होऊन त्याला संजीवनी विद्या दिली. या विद्येच्या वळावर त्याने असुरांना देवांबरोबरच्या अनेक युद्धांत विजय मिळवून दिला. ती विद्या देवांना मिळाल्यावाचून त्यांचा पराभव टळणार नाही, उत्कर्ष होणार नाही, हे जाणून देवगुरु बृहस्पतीने आपला मुलगा कच याला त्यासाठी शुक्राकडे पाठवले. अनेक संकटे सोसल्यावर कचाला ती विद्या मिळाली. पण मग शुक्राचार्यांची कन्या देवयानी आडवी आली. तिचे कचावर प्रेम बसले होते आणि ती त्याला आपल्याशी लग्न करायचा आग्रह करीत होती. पण कचाने ती गोष्ट नाकारल्यावरून तिने त्याला शाप दिला, की 'तू मिळवलेली संजीवनी विद्या तुला फलद्रूप होणार नाही!' पण कचाने ती विद्या दुसऱ्या देवाला शिकवली. मात्र त्यामुळे ती षट्कर्णी झाल्याने कोणालाच तिचा उपयोग झाला नाही.

शुक्राचार्याला पितरांची कन्या गो व इंद्रकन्या जयंती अशा दोन भार्या होत्या. देवयानी ही जयंतीची मुलगी. त्वष्टा, वरुत्री, शंड व मर्क हे गोचे पुत्र. हे चारही पुत्र असुरपक्षपाती ठरल्यामुळे पुढे त्यांचा वंश खंडित झाला व भृगुकुलाची शुक्रशाखा नष्ट झाली.

शुक्राने बार्हस्पत्य नावाचा हजार अध्यायांचा एक अर्थशास्त्रीय ग्रंथ लिहिला. शुक्राचे हे शास्त्र पुढे अनेक आचार्यांनी संक्षिप्त केले आहे. [ प्रा. च. को. ]

(३) एक धातू. शरीर धारण करणाऱ्या सप्तधातूंत हा सारभूत असा सातवा धातू होय. हे शुक्र दुधात वास्तव्य करणाऱ्या घृताप्रमाणे किंवा उसात भरून राहिलेल्या रसाप्रमाणे सर्व शरीराला व्यापून राहते व शरीराचे रक्षण करते. आयुर्वेदाचार्यांनी शुक्राची उत्पत्ती सांगितली आहे, ती अशी–

> रसाद्रक्तं ततो मांसं मांसात् मेदः प्रजायते।
> मेदसोऽस्थि ततो मज्जा मज्जाच्छुक्रस्य सम्भवः।

अर्थ – अन्नरसापासून रक्त, त्यांपासून मांस, त्यापासून मेद, त्यापासून हाडे, त्यांपासून मज्जा व तिच्यापासून शुक्र निर्माण होते.

शुक्र हे शोष्य, पांढुरके, स्निग्ध, बलपुष्टिकर, गर्भबीज व जीवाचे आश्रयस्थान आहे, असे आयुर्वेदात म्हटले आहे. शरीरातील शुक्राचे स्थान पुढील श्लोकात सांगितले आहे–

> द्व्यङ्गुले दक्षिणे पार्श्वे बस्तिद्वारस्य चाप्यधः।
> मूत्रस्रोतःपथे शुक्रं पुरुषस्य प्रवर्तते॥

अर्थ – गुदद्वाराच्या खाली दक्षिण अंगी दोन अंगुळे आणि मूत्रप्रवाहाच्या मार्गात पुरुषाचे शुक्र निर्माण होते.

याविषयी श्री. कृ. के. कोल्हटकर यांनी जे विवेचन केले

आहे. त्याचा सारांश असा– शुक्र हे रक्षण न केले, तर क्षरण पावते. स्त्रीसंग आणि स्त्रीसहवास या बाबतीत संयम न पाळल्यास त्याचे रेत या रूपात अवस्थांतर होते आणि मग त्याचा निर्गम अपरिहार्य होतो. तसे झाल्याने पुरुष निस्तेज व निःसार होतो. पण शुक्राला रेतस् अवस्थेत परिणत होऊ न दिल्यास शुक्र हे ओज नावाच्या आठव्या धातूत परिणत होते. ओजाचा शरीरात संचय झाला म्हणजे तो पुरुष तेजस्वी होतो. त्याची अंतरिंद्रियेही बलवान होऊन त्याचे व्यापार उत्तम रीतीने चालतात. त्याच्या अंगी रोगप्रतिकारक शक्ती वाढून त्याला दीर्घायुष्य मिळते. शरीराप्रमाणे त्याच्या मनावरही चांगला परिणाम होतो. त्याचा उत्साह वाढतो. यालाच योगशास्त्रात वीर्यलाभ असे म्हणतात.

वैद्यकशास्त्रात शुक्राच्या क्षयाची कारणे, त्याविषयीचे पथ्य, तत्संबंधी औषधे व रसायने या संबंधात तपशीलवार विवेचन केलेले आहे. [ श. क.; म. वे. व्या. त. ]

**शुक्रनीती** भारतीय राजनीतिशास्त्रावरचा एक ग्रंथ. हा संस्कृतश्लोकबद्ध असून, याचे चार अध्याय आहेत. शुक्र हा त्याचा कर्ता मानलेला आहे. शुक्रालाच उशना, भार्गव, कवी, योगाचार्य आणि दैत्यगुरू अशी अन्य नावे आहेत. उशना हाच जर शुक्र असेल तर त्याला वैदिक ऋषी मानावा लागेल. ऋग्वेदात उशना काव्य याची अनेक सूक्ते आहेत. यजुर्वेदातही उशना ऋषीचे नाव आले आहे. सामवेदातही कित्येक मंत्रांचा ऋषी उशना असल्याचे सांगितले आहे. शुक्र हे नाव अथर्ववेदातच पहिल्या प्रथम आढळते.

महाभारतात शुक्राची वर दिलेली सर्व नावे आढळतात. शांतिपर्वात उशना ऋषीला दंडनीतीचा प्रमुख आचार्य म्हटले आहे. कौटिल्याने त्याला राज्यशास्त्राच्या एका प्रमुख विचारधारेचा प्रवर्तक मानले आहे. तो चार विद्यांमध्ये केवळ दंडनीतीलाच विद्या मानतो, असे कौटिल्याने म्हटले आहे.

**शुक्रनीतीचा प्रवर्तक –** सांप्रत शुक्रनीतीचा जो ग्रंथ उपलब्ध आहे, तो वैदिक उशना कवीचा आहे, असे मानता येणार नाही. शुक्रनीतीचा प्रणेता कोण, याविषयी दोन मते आहेत. हा ग्रंथकार दुसराच कोणीतरी राजनीतिज्ञ असून, त्याने आपल्या ग्रंथाला मान्यता मिळावी, म्हणून तो ग्रंथ शुक्राच्या नावावर चढविला, असे काही विद्वान म्हणतात. दुसऱ्यांच्या मते ग्रंथकर्त्याचे नाव शुक्र असेल; पण त्याचा व उशना ऋषीचा काहीही संबंध नाही. कौटिल्याने उशना ऋषीच्या अनुयायांची जी मते आपल्या अर्थशास्त्रात उद्धृत केली आहेत, त्या मतांचा प्रस्तुत ग्रंथात कुठेही आढळ होत नाही.

अशीही एक शक्यता आहे, की उशना अथवा शुक्र याने राज्यशास्त्रासंबंधी काही विचार मांडले आणि त्याच्या शिष्यांनी किंवा अनुयायांनी ते विचार चिरस्थायी होण्यासाठी ग्रंथबद्ध केले. पुढे देशकालपरिस्थितीला अनुसरून त्या विचारांचे संशोधन व परिवर्तनही करण्यात आले. आणि एवढे सगळे होऊनही ग्रंथकार किंवा मूलप्रवर्तक म्हणून शुक्राचे नाव कायम राखले गेले.

**शुक्रनीतीचा काल–** प्रस्तुत ग्रंथाचे अंतरंग – परीक्षण केल्याअंती त्याच्या कालाविषयी काही निर्णय होऊ शकतो, तो असा–

शुक्रनीतीतले भारतीय समाजाचे चित्रण हे एका विकसित समाजाचे आहे. ग्रंथ वाचीत असताना असे समजते, की त्याच्या काली वर्णव्यवस्था ही जातिव्यवस्थेत परिणत झाली होती. व्यवसायानुरूप जाती बनल्या होत्या. त्यांच्यांतले आचार, रोटीबेटीव्यवहार यांविषयींचे नियम कडक बनले होते. जाती जन्मनिष्ठ बनल्या होत्या. शूद्र व स्त्रिया यांना समाजात हीन, पतित व स्वाम्याश्रित समजले जात होते. उद्योगधंद्यांची संख्या बरीच वाढली होती. हे समाजचित्र गुप्तकालातले आहे. त्यापूर्वी अशी परिस्थिती नव्हती. या दृष्टीने पाहता, शुक्रनीतीची रचना गुप्तकालात झाली, असे समजायला हवे.

कुल, श्रेणी, गण, इ. संस्था आपापल्या क्षेत्रात न्यायदानाचे कार्य करीत, असे ग्रंथावरून कळते. पण सम्राट हर्षाच्या मृत्यूनंतर वरील प्रकारच्या संस्था प्रायः लुप्त झाल्या. यावरून शुक्रनीतीचा काल हर्षाच्या पूर्वीचा असला पाहिजे, असे मानता येते. याचा निष्कर्ष असा, की इ. स. ४०० ते ६०० या कालात कधीतरी शुक्रनीती हा ग्रंथ निर्माण झाला आणि त्यानंतर त्या ग्रंथात वेळोवेळी भर पडली. प्रस्तुत ग्रंथात बंदुकीच्या दारूचाही उल्लेख आहे, त्यावरून मध्ययुगापर्यंत या ग्रंथात भर पडत राहिल्याचे कळते.

शुक्रनीतीत पुढील मुख्य विषय चर्चिले आहेत– राजाची इतिकर्तव्यता, भूमिमापन, नगरे वसविणे, घरे बांधणे, युवराज व प्रधानादिकांची कामे व त्यांची लक्षणे, सेवकजनांचे वेतन, जमाखर्च ठेवणे, न्यायपरिवर्तन, सुहृदाचे लक्षण, गजाश्वादिपरीक्षण, रत्नधातुपरीक्षा, प्रजाभागहरण, कलाविद्याप्रभेदन-श्रमविभाग, धर्मपरिकल्पन, ग्रामरक्षानिवेदन, प्रासादादिप्रकल्पन, मूर्ती घडविणे, व्यवहारचातुर्य, किल्ले बांधणे, सैन्य ठेवणे, रथ तयार करणे, मनुष्याच्या आयुष्याचे मान, यात्राप्रकल्पन, यंत्रलक्षण, दारुगोळा तयार करणे, निशाण लावणे, शस्त्रास्त्रक्रिया, षड्गुणलक्षण, व्यूहप्रकल्पन, कवाईत-चातुर्य, कापटचकरण, इत्यादी.

नीतिशास्त्र हे शास्त्रांचे शास्त्र आहे आणि त्रैलोक्यात ते उत्तम मार्गदर्शक आहे, अशी शुक्राचार्यांची धारणा आहे.

> सर्वोपजीवकं लोकस्थितिकृन्नीतिशास्त्रकम् ।
> धर्मार्थकाममूलं हि स्मृतं मोक्षप्रदं यतः ।।
>
> (अ. १.५)

अर्थ– नीतिशास्त्र हे सर्वांचे उपजीवक, लोकस्थितीला आवश्यक, त्रिविध पुरुषार्थाचे मूल आणि अंती मोक्ष साधून देणारे आहे.

म्हणून राजा हा नीतिशास्त्राचा जाणकार असला पाहिजे. रुग्ण माणसाला कुपथ्याचे अन्न दिल्याने जो अनर्थकारक परिणाम होईल, तोच राजा नीतिशास्त्राचा अनभिज्ञ असल्याने राज्यावर होईल. नीती नुसती बोलण्यात असून काय उपयोग? तिच्या जोडीला दंडसामर्थ्य असेल तरच राज्याची प्रगती होईल. दंड असल्याशिवाय माणसे नीतिनियमांना अनुसरून वागणार नाहीत, हा मनूचा सिद्धान्त शुक्राने उचलून धरला आहे. माणसे अंतःप्रवृत्तीने चांगली वागतील, ही गोष्ट शुक्राला मान्य नाही. सर्वच प्राचीन हिंदुग्रंथांत थोड्याफार फरकाने भीतीच्या पोटी नीती, असा मानवाच्या सत्प्रवृत्तीवर अविश्वास दाखविणारा सिद्धान्त आढळतो, असे श्री. ना. य. डोळे म्हणतात.

कौटिल्य हा सामर्थ्याच्या आविष्कारासाठी राज्यविस्तार असे म्हणतो, तर शुक्र हा नीतीच्या प्रस्थापनेसाठी राज्यविस्तार, असा सिद्धान्त सांगतो. भारतीय राज्यशास्त्राची ही प्रगती म्हणावी लागेल. राजाने नीतीच्या विरुद्ध वागणाऱ्या राजांचा पराभव करून राज्यविस्तार करावा, अशा राजाशी युद्ध करतानाही आपली नैतिक भूमिका सोडू नये आणि नीतीनेच अनीतीचा पराभव करावा, असे शुक्राने सांगितले आहे.

कौटिल्याच्या नंतरच्या काळात राज्यकारभाराविषयी इतका तपशीलवार माहिती देणारा हाच एकमेव ग्रंथ आहे. पाहा– राज्यसंस्था; दंडनीती. [ भा. रा. प्र.; राजकीय विचारांचा इतिहास– श्री. ना. य. डोळे ]

**शुक्रपात्र** एक यज्ञीय पात्र. हा एक ग्रह आहे. याचा विशिष्ट आकार सांगितलेला नाही. काही श्रौतसूत्रांमध्ये याच्या निर्मितीसाठी विवक्षित वृक्षही सांगितलेला नाही. परंतु सत्याषाढ श्रौतसूत्रात हे पात्र बेलाचे करावे, असे म्हटले आहे (८.१). [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**शुक्रमंत्र** शुक्राचा एक मंत्र. "ॐ वस्त्रं मे देहि शुक्राय स्वाहा" असा हा एकादशाक्षरी मंत्र आहे. याचा ऋषी ब्रह्मा, छंद विराट्, देवता शुक्र, बीज ॐ व शक्ती स्वाहा आहे. याचे दहा हजार पुरश्चरण केल्यावर, त्याच्या दशांश धृताचे हवन करतात. मग हा मंत्र सिद्ध होतो. नंतर इष्टसिद्धीसाठी त्याचा प्रयोग करतात. वस्त्रालंकारांची इच्छा असेल तर शुक्रवारी सुगंधी श्वेतपुष्पांचे हवन करतात. अशा प्रकारे एकवीस शुक्रवारी हवन केल्यावर इष्टप्राप्ती होते. [ मंत्र–महोदधि ]

**शुक्रवार** आठवड्यातला सहावा दिवस. याला देवीचा वार मानतात. हा एक शुभ दिवस असून, या दिवशी सुरू केलेली विविध कार्ये चांगली पूर्ण होतात अशी समजूत आहे. इंद्र हा या दिवसाचा स्वामी असून, इंद्राणी ही देवता आहे.

या दिवशी स्त्रिया नवीन वस्त्र परिधान करून देवीचे दर्शन घेतात. काही स्त्रिया शुक्रवारचे व्रत म्हणून उपवासही करतात. त्यासाठी श्रावणातले शुक्रवार विशेष शुभ मानतात. त्या दिवशी सौभाग्यवती स्त्रिया लक्ष्मी प्राप्त व्हावी म्हणून उपवास करतात, सायंकाळी सवाष्णीला बोलावून हळदकुंकू देतात, तिची ओटी भरतात, तिला फुटाणे व दूध देतात आणि नंतर भोजन करतात. हे व्रत केल्यामुळे दारिद्र्य नष्ट होऊन सौभाग्य प्राप्त झाल्याच्या अनेक कथा पुराणांत सांगितलेल्या आहेत.

श्रावण मासात शुक्रवारी पौर्णिमा आल्यास वर–लक्ष्मीचे व्रत करावे, असे भविष्योत्तर पुराणात सांगितले आहे. ( वर-लक्ष्मीव्रत पाहा )

मुसलमान लोकही शुक्रवार हा शुभ दिवस मानतात. शुक्रवारी पहिला मानव जन्मला व सूर्य प्रथमच उगवला, असे ते मानतात. सर्व जग बुडल्यानंतर एका शुक्रवारी सर्व प्रेतात्मे जिवंत होतील, अशीही त्यांची धारणा आहे. म्हणून या पवित्र दिवशी सर्वांनी उपवास करावा व मशिदीत जाऊन प्रार्थना करावी, असे सांगितले आहे.

ख्रिस्ती लोकही शुक्रवार हा पवित्र दिवस मानतात. त्या दिवशी येशूने प्राणार्पण केले तो शुक्रवार होता. तो गुड फ्रायडे या नावाने साजरा केला जातो. त्या दिवशी उपवास करतात. [ अ. हृ. ज्यो.; की. पॉ.; एन्सा. रि. ए.; दे. को. ४ ]

**शुक्रव्रत** एक काम्य व्रत. शुक्रवारी ज्येष्ठा नक्षत्र असेल, त्या दिवशी नक्त करावे. असे सात वार साधावे. शेवटच्या वारी शुक्रप्रतिमेची पूजा करावी व तिचे दान करावे. फल- आरोग्य व दीर्घायुष्य. [ हि. ध. ]

**शुक्ल कुरुकुल्ला** एक बौद्ध देवता. हिचा वर्ण शुभ्र असून तिला तीन नेत्र आहेत. तिच्या मस्तकावर जटामुकुट असून, त्याच्यावर फुले आणि अमिताभाची मूर्ती आहे. हिची मूर्ती वस्त्रालंकारांनी व सर्पालंकारांनी विभूषित असते. जपमाला व कमलपात्र ही तिची चिन्हे आहेत. [ इं. बु. इ. ]

**शुक्ल बिलावल** हिंदुस्थानी संगीतातील एक राग. हा राग बिलावल थाटातून निघतो. याचे आरोह व अवरोह सातही स्वरांनी होतात. म्हणून याची जाती संपूर्ण-संपूर्ण आहे. याचा वादी स्वर मध्यम व संवादी स्वर षड्ज आहे. इतर बिलावलांपेक्षा याचे स्वरूप अभिनव व रम्य आहे. याचा गानसमय सकाळचा दुसरा प्रहर. ग, सा, ग, प, म हे या रागाचे गुंजन आहे. या रागाची वृत्ती गंभीर आहे. [ क. सं.; सु. वि. को. ]

**शुक्ल यजुर्वेद** यजुर्वेदाचा एक भेद. शुक्ल यजुर्वेदाची मंत्र-संहिता वाजसनेयी संहिता या नावाने प्रसिद्ध आहे. तिच्यात चाळीस अध्याय असून, शेवटचे पंधरा अध्याय खिलरूप आहेत. या संहितेत दर्शपौर्णमासेष्टी, अग्निहोत्र, चातुर्मास्य, अग्निष्टोम, सोमयाग, अग्निचयन, राजसूय, वाजपेय, इ. यज्ञयागासंबंधीचे मंत्र सांगितले आहेत. पाहा—यजुर्वेद, वाजसनेय संहिता.

**शुक्लयजुःसर्वानुक्रमसूत्र** शुक्ल यजुर्वेदाचा अनुक्रमणी ग्रंथ. कात्यायन हा याचा कर्ता मानला जातो. या ग्रंथात पाच अध्याय आहेत. ग्रंथाच्या आरंभी ऋषी व छंद यांच्या ज्ञानाचा महिमा वर्णिला आहे. यांचे ज्ञान करून घेतल्याशिवाय जो वेदाचे पठण करतो, तो मृत्युमुखी तरी पडतो किंवा पापी होतो, असे सांगितले आहे. माध्यंदिन संहितेच्या देवता, ऋषी व छंद यांचे यात विस्तृत विवरण केले आहे. तसेच, यागविधानाचे नियम व अनुष्ठान आणि छंद यांचे-ही सविस्तर विवेचन केलेले आहे. ग्रंथातील सूत्रांचा अर्थ समजण्यासाठी, त्यांवरचे भाष्यही दिलेले आहे. महायाज्ञिक श्रीदेव हा त्या भाष्याचा कर्ता आहे. [ वै. सा. सं. ]

**शुक्लैकादशीव्रतोद्यापन** शुक्ल एकादशीला उपवास करण्याचे व्रत स्वीकारले असेल, तर त्या व्रताच्या पूर्तीसाठी उद्यापन करावे लागते. व्रताच्या पूर्ततेसंबंधीचा उल्लेख संकल्पात करून कर्मारंभ करतात. आचार्य-वरणानंतर आचार्य सर्वतोभद्र मंडल तयार करून त्यावर ब्रह्मादी देवतांची स्थापना व पूजा करतो. मग त्यावर धान्य-राशी पसरतात. कलशाची स्थापना करून अष्टदल कमळावर देवतांचे आवाहन करतात. मध्यभागी सुवर्णप्रतिमेवर पुरुषसूक्त मंत्राने पुरुषाचे आवाहन करून त्याच्या सभोवती आठ लोक-पालदेवतांचे आणि केशवादी बारा विष्णुस्वरूप देवतांचे आवाहन करतात. आवाहित देवतांचे यथाविधि पूजन झाल्यावर त्याच दिवशी किंवा दुसऱ्या दिवशी अग्निस्थापना करून प्रधान देवतांसाठी हवन करतात. पुरुषदेवतेला आज्य; अग्नी, इंद्र, इ. देवतांना आज्य; वसुदेव, श्री, इ. देवतांना व विष्णूला घृताक्त पायस यांच्या आहुती दिल्यानंतर इतर स्थापित देवतांसाठीही आहुती देतात. स्विष्टकृतापर्यंतचे कर्म झाल्यावर पायसावरची पेज काढून तो प्रधानदेवतेला समर्पण करतात. सर्व दिशांना तोंड करून पुरुषाचे उपस्थान केल्यावर पेजेचे भांडे मस्तकावर ठेवून ‘के वैष्णवाः’ असे तीन वेळा यजमान म्हणतो. त्यावर ‘वयं वैष्णवाः’ असे नातलग म्हणतात. नंतर सर्वांना पायसाचा प्रसाद देऊन यजमान तो मंत्रपूर्वक प्राशन करतो. अवशिष्ट कर्म पूर्ण झाल्यानंतर आचार्याचे पूजन करून त्याला पांढरी गाय दान देतात. इतर ब्राह्मणांनाही दक्षिणा देऊन भोजन घालतात. एवढे झाल्यावर व्रताचा उद्यापनविधी समाप्त होतो. [ ऋ. व्र. स. ]

**शुचींद्रम** द. भारतातील एक पवित्र क्षेत्र. हे कन्याकुमारी-पासून वायव्येला आठ मैल अंतरावर आहे. या क्षेत्राला शुचींद्रम हे नाव मिळण्यामागे एक पुराणकथा आहे, ती अशी –

गौतम ऋषीची पत्नी अहल्या हिला इंद्राने कपटाने शील-भ्रष्ट केल्यावर गौतमाने इंद्राला भगे पडण्याचा शाप दिला. त्या शापामुळे होणाऱ्या दारुण यातना सहन न होऊन इंद्र बृहस्पतीला शरण गेला. बृहस्पतीने त्याला जननकारण्यात जाऊन तप करण्यास सांगितले. त्या अरण्यात एका जागी त्रिमूर्तींचे प्रतीक असे एक लिंग होते. इंद्राने त्याची पूजा केली व तिथेच तपही सुरू केले. त्याला शंकर प्रसन्न झाला. इंद्राने त्याला शाप-मुक्त होण्याचा उपाय विचारला. शंकर म्हणाला. ‘तू कैलास पर्वतावरून नंदीची सुवर्णप्रतिमा घेऊन ये. एक सभामंडप उभारून त्यात तीनशे नागरिकांच्या साक्षीने ती प्रतिमा उकळत्या तुपात बुडवून उघड्या हाताने बाहेर काढ. एवढे केल्याने तू शापमुक्त होशील.’

इंद्राने त्याप्रमाणे केले. या दिव्यामुळे त्याचे शरीर पूर्वीप्रमाणेच तेजःपुंज झाले. मग इंद्राने तिथे एक भव्य व कलासंपन्न शिवालय उभारले. या ठिकाणी इंद्राची शुची (शुद्धी) झाल्यामुळे या क्षेत्राला पुढे शुचींद्रम हे नाव मिळाले.

इथल्या शिवमंदिराचे गोपुर फारच भव्य व प्रेक्षणीय असून, त्याचा कळस जमिनीपासून १३४ फूट उंच आहे.

गोपुरातून देवालयात प्रवेश करताच समोर एका प्रचंड वृक्षांचा बुंधा दिसतो. तो पोकळ असून, त्यात ब्रह्मा, विष्णू व महेश यांची लिंगरूप प्रतीके आणि अनसूयेची मूर्ती आहे. त्या वृक्षासमोर एक लहानसे मंदिर असून, त्याच्या जवळ, मुख्य मंदिरासमोर नंदीची प्रचंड, शुभ्र मूर्ती आहे.

मुख्य मंदिरात त्रिमूर्तीची लिंगरूपात स्थापना केलेली आहे. त्या लिंगावर नागफण्याचे छत्र असून, त्यात चंद्राच्या सोळा कला दाखवल्या आहे.

मंदिरात सर्वत्र सुंदर शिल्पकाम केलेले आहे. विविध देव-देवतांच्या मूर्ती व अनेक पौराणिक प्रसंगांची उठावदार चित्रे त्यात कोरलेली आहेत. मुख्य देवालयाचा विस्तार सुमारे ९४००० चौ. फूट असून, त्यात आणखी तीस लहानमोठी मंदिरे सामावलेली आहेत. इथल्या शिवपार्वती, विष्णू, गरुड, हनुमान, दीपलक्ष्मी, इ. मूर्ती फार सुरेख आहेत.

या देवालयातील चार स्तंभ अशा कुशलतेने निर्माण केलेले आहेत की, त्या स्तंभांवर हलकेच आघात केला, तर त्यातून संगीताचे सप्तस्वर उमटतात. एका स्तंभातून तंबोऱ्याचे, एका स्तंभातून मृदंगांचे, एकातून सतारीचे व एकातून जलतरंगाचे स्वर उमटतात.

देवालयाच्या एका प्राकारात एक लहानसे, सुंदर काष्ठ-मंदिर आहे. त्यात राम व सीता यांच्या मूर्ती आहेत. [ टें. त. ना. ]

**शुद्ध कल्याण** हिंदुस्थानी संगीतपद्धतीतील एक राग. हा राग कल्याण थाटातून उत्पन्न होतो. याच्या आरोहात मध्यम व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत. अवरोहात मात्र सातही स्वर लागतात. म्हणून याची जाती औडुव-संपूर्ण आहे. याचा वादी स्वर गांधार व संवादी स्वर धैवत आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर. हा राग भूपाचा सहोदर आहे. याची प्रकृती गंभीर आहे. [ सु. वि. को.; क. सं. ]

**शुद्धाद्वैत** एक संप्रदाय. वल्लभाचार्य हे शुद्धाद्वैत मानणारे होते. मायोपाधिविरहित म्हणजेच नितांत शुद्ध ब्रह्म हेच जगताचे कारण आहे, असे त्यांनी मानले आहे. वल्लभाचार्यांनी प्रवर्तित केला, म्हणून या संप्रदायाला वल्लभ संप्रदाय असेही म्हणतात. पाहा – वल्लभ संप्रदाय.

**शुद्धिव्रत** एक काम्य व्रत. व्रताची देवता विष्णू. विष्णुप्रीत्यर्थ शरद ऋतूचे शेवटचे पाच दिवस उपवास व विष्णु-पूजा हा या व्रताचा विधी आहे. फल – इष्टकामनापूर्ती. [ हि. ध. ]

**शुनहोत्र भारद्वाज** एक सूक्तद्रष्टा. हा भरद्वाजाचा मुलगा आणि गृत्समदाचा पिता होय. ऋग्वेदाच्या सहाव्या मंडलातील तेहतीस व चौतीस ही दोन सूक्ते याने रचली आहेत. इंद्रस्तुती हा या उभय सूक्तांचा विषय आहे. याची एक ऋचा अशी –

य ओजिष्ठ इन्द्र तं सु नो दा मदो वृषन् त्स्वभिष्टिर्दास्वान्।
सौवश्व्यं यो वनवत् स्वश्वो वृत्रा समत्सु सासहदमित्रान्॥
(ऋ. ६.३३.१)

अर्थ – अश्वसमृद्ध शत्रूंचा नाश करणाऱ्या आणि हे उत्तम अश्वयुक्त, वृत्रसैन्यविनाशक, सद्भावनासंपन्न, सामर्थ्यशाली व बलाढ्य इंद्रा, तुझा उमदा उत्साह तू आम्हाला दान कर.

ऋग्वेदात अन्यत्रही शुनहोत्राचा उल्लेख आढळतो (२.४१.१७). [ ऋ. म. भा.; सी. ऋ.; म. ज्ञा. को., ३ ]

**शुनासीर** एक वैदिक जोडदेवता. या देवतेचा उल्लेख ऋग्वेद (४.५७), शुक्ल यजुर्वेद (१२.६९), अथर्ववेद (३.१७), मैत्रायणी संहिता (१.७.१२), इ. ठिकाणी आला आहे. ही जोडदेवता म्हणजे वायू व सूर्य अथवा इंद्र आणि वायू असावी, असे मत आहे. शुन म्हणजे धान्यदेवता आणि सीर म्हणजे शेत नांगरणारी देवता, असेही अर्थ सांगितले जातात. हा नांगराचा प्रतीकात्मक उल्लेख आहे, असे श्री. रॉथ यांचे मत आहे. [ ऋ. म. भा.; वे. इं.; नि. म. भा. ]

**शुनासीरीय** एक पर्व. काहींनी या पर्वाची गणना चातुर्मास्य यागातच केली आहे. हे पर्व मात्र आपल्या इच्छेनुसार केव्हाही करता येते. या पर्वाचे अनुष्ठान बहुतेक सर्व वैश्वदेवपर्वाप्रमाणेच करतात. चातुर्मास्यातील पाच साधारण आहुतींव्यतिरिक्त यात इंद्र शुनासीर देवतेला द्वादशकपाल पुरोडाश, वायूला धारोष्ण दूध आणि सूर्याला एककपाल पुरोडाश अर्पण करतात. यात पाच प्रयाज, तीन अनुयाज आणि एक समिष्टयजू असतात. याची दक्षिणा सहा बैल व एक नांगर किंवा दोन मोठे बैल एवढी असते. सूर्याला पुरोडाश अर्पण केल्याबद्दल पांढरा घोडा किंवा बैल द्यावा लागतो.

शुनासीरौ हा शब्द ऋग्वेदात आढळतो. यास्कमते शुन व सीर याचा अर्थ अनुक्रमे वायू व आदित्य असा आहे. शतपथ ब्राह्मणात (२.६.३.२) शुन म्हणजे वैभव आणि सीर म्हणजे सार असा अर्थ घेतला आहे, असे वाटते. हे पर्व केल्याने त्यांची प्राप्ती होते. पाश्चात्य पंडित याचा संबंध नांगर व नांगराचा फाळ यांच्याशी जोडतात. [ हि. ध.; भा. सा. इ.; चा. या. प. ]

**शुनिक** एक प्राचीन जात. या जातीलाच सौनिक असे नाव आहे. आयोगव पुरुष व क्षत्रिय स्त्री यांची ही संतती होय, असे उशना म्हणतो. ब्रह्मपुराणात त्याला पशुमारक ही संज्ञा दिलेली आहे. शुनिक म्हणजेच खाटिक असे जातिविवेक ग्रंथात म्हटले आहे. [ हि. ध. ]

**शुभं करोति** तीन्ही सांजा देवाजवळ दिवा लावल्यावर घरातली माणसे पुढील श्लोक म्हणून दिव्याला नमस्कार करतात–

शुभं करोति कल्याणमारोग्यं धनसम्पदा
शत्रुबुद्धिविनाशाय दीपज्योति नमोऽस्तु ते
दीपज्योतिः परं ब्रह्म दीपज्योतिर्जनार्दनः
दीपो हरतु पापानि सन्ध्यादीप नमोऽस्तु ते ॥

महाराष्ट्रातील जुन्या वळणाच्या घरांत अजूनही ही पद्धत चालू आहे. शुभं करोतीचे वरील श्लोक म्हणून झाल्यावर मग रामरक्षा, नवग्रहस्तोत्र, इ. स्तोत्रे म्हणतात.

**शुभद्वादशी** एक तिथिव्रत. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत एकभुक्त राहणे, दशमीच्या दिवशी विष्णुपूजा, एकादशीस उपवास आणि द्वादशीच्या दिवशी तीळ व सोने यांचे दान करणे, असा या व्रताचा विधी आहे. फल–विष्णुलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**शुभसप्तमी** एक तिथिव्रत. अर्यमा ही या व्रताची देवता होय. तिच्या प्रीत्यर्थ कपिला गायीची पूजा करावी व तिळांचे दान करावे. याप्रमाणे आश्विन शुद्ध सप्तमीला प्रारंभ करून प्रत्येक महिन्याच्या शुद्ध सप्तमीस, एक वर्षपर्यंत करावे. [ हि. ध. ]

**शुभराय** (इ. स. १७५०–१८२०) आधुनिक कालातील एक सत्पुरुष. यांचा जन्म पूर्वीच्या म्हैसूर संस्थानातील मालूर नामक गावी एका तेलुगू कुटुंबात झाला. यांच्या माता-पित्यांची नावे मिळत नाहीत. मात्र यांचा पिता वेदशास्त्रसंपन्न असल्याचे कळते. शुभरायांचे मूळनाव सुब्बाराव होते. शुभराय हे बालपणापासून एकपाठी व कुशाग्र बुद्धीचे असल्यामुळे अगदी अल्पवयातच ते वेदशास्त्रसंपन्न झाले. लौकरच त्यांनी टिपू सुलतानाच्या दरबारी नोकरी धरली व आपल्या अंगच्या गुणांच्या बळावर ते नायब दिवाणाच्या पदापर्यंत पोचले. टिपू सुलतानाला ते फार विश्वासयोग्य वाटत.

एकदा टिपूच्या दरबारात आलेल्या एका धर्मगुरूने काही क्षुद्र वर्तन केले. ते पाहताच शुभरायांना त्या धर्मगुरूबद्दल घृणा आली. अशा माणसांच्या सहवासात दिवस काढणे त्यांना असह्य झाले व अखेर त्यांनी टिपूचे दिवाणपद सोडून सरळ सोलापूरचा मार्ग धरला. त्यानंतरचे त्यांचे जीवन एक विरागी संत म्हणूनच सर्वांना परिचित झाले. लौकरच त्यांनी सोलापूर येथे आपला मठ उभारला व ईश्वराच्या ध्यानधारणेत ते मग्न झाले. त्याबरोबरच काव्य, संगीत, चित्र, इ. कलांची उपासना त्यांनी आरंभिली.

सामाजिक दृष्ट्या शुभरायांचे आचार-विचार पुरोगामी स्वरूपाचे होते. अनेक जुन्या धार्मिक परंपरा व वर्ण-जातींचे भेदाभेद यांवर त्यांनी आपल्या काव्यातून कठोर प्रहार केले.



शुभराय

त्यांच्या मठातील सेवेकरी पूर्वास्पृश्य जातीचे होते. या सर्वांचा परिणाम सोलापूरच्या व तत्कालीन महाराष्ट्रातल्या ब्रह्मवृंदाने त्यांच्यावर बहिष्कार पुकारण्यात झाला. अखेर या प्रकरणाचा निवाडा करण्यासाठी त्या वेळचे शंकराचार्य सोलापूरला आले. परंतु आल्या आल्या त्यांनी शुभरायांच्या मठात मुक्काम केला. शंकराचार्यांना या मुक्कामात शुभरायांच्या साधुत्वाची व निरपराधित्वाची ओळख पटली. मग त्यांनी शुभरायांवरचा बहिष्कार तर उठविलाच; आणि त्यांच्याविरुद्ध गदारोळ उठविल्याबद्दल ब्रह्मवृंदाची कानउघाडणीही केली.

शुभराय बहुभाषापंडित होते. तेलुगू, संस्कृत, कन्नड, उर्दू व मराठी या भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. शुभरायांचे काव्य परमार्थप्रधान आहे. या काव्याची मोहिनी डॉ. भांडारकर, कन्नड कवी बेंद्रे, आचार्य विनोबा यांसारख्या ज्येष्ठांच्या मनावरही पडली. त्यावरून शुभरायांच्या कवितेचे महत्त्व कळून येईल.

शुभराय शके १७४२ च्या माघ वद्य दशमीला सोलापूर येथे निजधामाला गेले. [ लोकराज्य, १ जुलै १९७५ ]

**शुल्ब** दर्भाची विणलेली दोरी. तीन किंवा पाच दर्भमुष्टी घेऊन त्या एकापुढे एक अशा वळतात. बर्ही म्हणजे दर्भमुष्टी आणि इध्मा म्हणजे समिधा होत. त्या शुल्बाने बांधतात. पशूच्या अनुष्ठानात यूपाला गुंडाळण्यासाठी व पशूच्या गळचाला बांधण्यासाठी शुल्बाचाच उपयोग करीत. [ म. ज्ञा. को. २; श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**शुल्बसूत्रे** कल्पसूत्रे या वेदांगाचा एक भाग. वैदिक कर्मकांड हा कल्पसूत्रांचा मुख्य विषय आहे. कल्पसूत्रांत

गृह्यसूत्रे, श्रौतसूत्रे व धर्मसूत्रे असे तीन प्रकार आहेत. त्यांपैकी श्रौतसूत्रांत अनेक यज्ञयागांचे विवरण आहे. या श्रौतसूत्रांना शुल्बसूत्रे उपयुक्त ठरतात. शुल्ब या शब्दाचा अर्थ रज्जू असा आहे. रज्जूने मोजलेल्या वेदींची रचना हा शुल्बसूत्रांचा प्रतिपाद्य विषय आहे.

कर्मकांडाशी संबंधित असल्यामुळे शुल्बसूत्रे ही यजुर्वेदाच्या शाखांत उपलब्ध होतात. कात्यायन शुल्बसूत्र हे एकच शुल्बसूत्र शुक्ल यजुर्वेदाशी संबद्ध आहे. पण बौधायन, आपस्तंब, सत्याषाढ, मानव, वाराह व वाधूल अशी सहा शुल्बसूत्रे कृष्ण यजुर्वेदाशी संबद्ध आहेत. याशिवाय, आपस्तंब शुल्बसूत्राच्या टीकेत करविंदस्वामीने मशक व हिरण्यकेशी या दोन शुल्बसूत्रांचा उल्लेख केला आहे. पण सांप्रत ती उपलब्ध नाहीत.

या सर्व उपलब्ध सात शुल्बसूत्रांत बौधायन शुल्बसूत्र हे सर्वांत मोठे व बहुधा सर्वांत प्राचीन आहे. यात तीन परिच्छेद व ५२५ सूत्रे आहेत. त्यांत विविध परिमाणे, वेदींच्या निर्मितीसाठी लागणारे रेखागणिताचे प्रमुख नियम, निरनिराळ्या वेदींचा आकार व प्रकार, गार्हपत्यचिती व छंदश्चिती यांच्या निर्मितीचे वर्णन, काम्य इष्टींच्या निरनिराळ्या वेदींच्या निर्माणाचे वर्णन, इ. विषय आलेले आहेत.

आपस्तंब शुल्बसूत्रात सहा पटले, २१ अध्याय व दोनशे तेवीस सूत्रे आहेत. प्रथम पटलात वेदीच्या रचनेला आवश्यक अशा रेखागणिताच्या सिद्धान्तांचे विवेचन आहे. दुसऱ्या पटलात वेदींची स्थाने व रूपे यांचे वर्णन, तसेच वेदी बनवण्याच्या प्रक्रियेचे वर्णन आहे. शेवटच्या पंधरा अध्यायांत काम्येष्टींना आवश्यक अशा विभिन्न वेदींच्या आकार-प्रकारांचे वर्णन आहे.

बौधायन शुल्बसूत्रावर द्वारकानाथ यज्वा व वेंकटेश्वर दीक्षित यांच्या आणि आपस्तंब शुल्बसूत्रांवर कपर्दिस्वामी, करविंदस्वामी, सुंदरराज व गोपाल यांच्या टीका आहेत.

कात्यायन शुल्बसूत्र हे कात्यायन शुल्ब परिशिष्ट किंवा कातीय शुल्ब परिशिष्ट या नावाने अधिक प्रसिद्ध आहे. याचे दोन भाग असून, पहिला भाग सूत्रात्मक व दुसरा श्लोकात्मक आहे. यात वेदीच्या रचनेसाठी आवश्यक असे रेखागणिताचे नियम, वेदींचे स्थान, क्रम व परिमाण, मापाची रज्जू, निपुण वेदिनिर्मात्याचे गुण व कर्तव्ये, इ. विषय आलेले आहेत.

या शुल्बसूत्रावर महीधर, राम किंवा राम वाजपेय, गंगाधर व विद्याधर गौड यांच्या टीका आहेत.

सत्याषाढ शुल्बसूत्राचा समावेश सत्याषाढ श्रौतसूत्रातच केलेला आहे. याशिवाय मानव व वाराह अशी अन्यही शुल्बसूत्रे आहेत; पण ती फारशी महत्त्वाची नाहीत. [ संस्कृत साहित्यका इतिहास, शास्त्रखंड– आचार्य बलदेव उपाध्याय, १९७३ ]

**शुहूर** एक कालगणना. हिला सुहूर, सूर किंवा अरबी सन अथवा मृगसाल असेही म्हणतात. अरबी भाषेतील शहर या मासवाची शब्दाचे शुहूर हे बहुवचन आहे. हे वर्ष तीनशे पासष्ट दिवसांचे असते. याचा आरंभ दरवर्षी सूर्य मृग नक्षत्रात शिरल्यावर होतो. यातील महिने हिजरी गणनेतील अर्थात चांद्र किंवा मोहरमादी असतात, म्हणून याचा प्रत्येक नववर्षारंभ हिजरी तारखांच्या हिशोबाने दहा, अकरा किंवा बारा दिवस उशीरा होतो.

ही कालगणना कोणी व केव्हा सुरू केली यासंबंधी निश्चित काही सांगता येत नाही. पण हिचा प्रारंभ फसली कालगणनेच्या तत्त्वावरच झाला असल्यास, हिचे पहिले वर्ष हि. ७४४ मोहरम १ म्हणजे २६ मे १३४३ या दिवशी मृग नक्षत्रावर सुरू झाले असावे, असे म्हणता येते. मात्र त्या वेळी या कालगणनेचे ७४४ वे वर्ष सुरू झाले असे गृहीत धरल्याने इसवी सनात रूपांतर करण्यासाठी हिच्यात ५९९ किंवा ६०० मिळवावे लागतात.

या कालगणनेचा वापर जुन्या साधनांपैकी आदिलशाही व निजामशाही फर्माने आणि थोड्या फरकाने फारूकी, फार्सी व मराठी फर्माने, खुर्दखते व मिसली यांत वैपुल्याने केलेला आढळतो. प्राधान्याने जमिनीचे इनाम, नोकरांचे वेतन व बदली, द्रव्य गोळा करण्याचे हक्क, इ. बाबतीत म्हणजे जमिनीचे पीक व त्यापासून प्राप्त होणारा पैसा यांचा जिथे संबंध येतो, तिथे या कालगणनेचा हटकून उपयोग केलेला आहे. [ सं. मि.]

**शूद्र** हिंदू समाजातील चातुर्वर्ण्यव्यवस्थेतला चौथा वर्ण. ऋग्वेदातील पुरुषसूक्तात (१०.९०.१२) चारही वर्णांचा रूपकात्मक उल्लेख आहे. ब्राह्मण हे समाजरूपी पुरुषाचे मुख, राजन्य (क्षत्रिय) हे बाहू, वैश्य म्हणजे मांड्या व शूद्र हे त्याचे पाय होत, असे त्यात म्हटले आहे. ज्याप्रमाणे मानवाचे पाय हे त्याचे प्रमुख सेवक होत, त्याचप्रमाणे शूद्र लोक हे समाजाचे सेवक होत, असा त्याचा भावार्थ असावा. ज्या माणसांना उच्च वर्णांना विहित कर्मे करता येत नाहीत, त्यांनी सर्वांची सेवा करावी, असे ओघानेच आले.

आर्य भारतात आल्यावर त्यांचा अनार्य लोकांचा संघर्ष होऊन त्यात अनार्यांचा पराजय झाला व बरेच अनार्य लोक जंगलात पळून गेले. ज्या अनार्य लोकांना आर्यांनी पकडले, त्यांना समाजातील सर्वांची सेवा करायला लावले. कालांतराने अशा जित लोकांना आर्यांनी आपल्या समाजात सामावून घेतले व शूद्र नावाचा चौथा वर्ण उत्पन्न केला. प्रारंभी शूद्र वर्णाच्या लोकांना समाजाची हलकी कामे करावी लागत. तथापि हळूहळू

त्यांनाही आत्मविकास करण्याची संधी मिळू लागली. यजुर्वेदात (२६.२) त्यांना वेदाध्ययनाचा अधिकार असल्याचा उल्लेख आहे. कवप ऐलूष व कक्षीवान हे दासीपुत्र म्हणजे शूद्र असूनही मंत्रद्रष्टे होते. वैदिक युगात अनेक शूद्र वेदाध्ययन करीत होते, असे दिसते.

प्रारंभी पराजित लोक व हीन कुलांतले लोक यांना दास्य-कर्म करावे लागत असले, तरी त्यांतील बुद्धिमान व कुशल व्यक्ती उच्च प्रतीची कामे करून उपजीविका करू लागल्या असाव्या. सूत (नर्तक), शैलूष (गायक), रथकार तक्षा (घर बांधणारा, कारागीर), कौलाल (कुंभार), कर्मार (लोहार), इषुकार (बाण बनवणारा), धनुष्कार, रज्जुसर्ज (दोरी वळणारा), गोपाल, अजपाल (धनगर), सुराकार हे सर्व कारागीर शूद्र वर्णाचे होते. ते वैदिक युगात अस्पृश्य किंवा तिरस्कृत मानले जात नव्हते. त्यांच्याशी त्रैवर्णिकांचे विवाहसंबंधही त्या काळात सुरू झाले होते. अथर्ववेदात रथकार, कर्मार, इ. कारागिरांना प्रतिष्ठित मानलेले आहे. वेदकालात शूद्र वर्णातील लोकांवर कसलीही बंधने नव्हती. शेती, चर्मकर्म, पशुपालन, इ. व्यवसाय शूद्र लोक करीत होते. त्यांचा वर्ण हीन असला, तरी त्यांच्याविषयी समाजाला तुच्छता वाटत नव्हती. राजसूय यज्ञात शूद्र वर्णातील काही व्यक्तींना मानाचे स्थान मिळत असे. अश्वमेध यज्ञातील अश्वाचे रक्षक म्हणून सशस्त्र शूद्र त्याच्या बरोबर पाठवले जात (आप. श्रौ. सू. २०.५.१३).

कष्ट, सेवा याच गोष्टी शूद्रांच्या वाटचाला आलेल्या असल्या तरी, त्यांना उपनयनाचा अधिकार होता व विविध विषयांचे ज्ञानही प्राप्त करता येत होते.

वैदिक युगाच्या अंतिम शतकात मात्र शूद्र लोकांवर काही बंधने लादली गेली. शूद्र हा दुर्गुणांचा पुतळा मानला जाऊ लागला आणि समाजाला त्याच्याविषयी तुच्छता वाटू लागली, असे दिसते. त्यांच्यावर अधिकाधिक बंधने लादण्याची प्रवृत्ती नंतरच्या कालखंडात वाढतच गेली. उच्च वर्णांतील मनुष्यांनी टाकून दिलेले अन्न, वस्त्रे, पादत्राणे, इ. वस्तू शूद्र लोकांनी वापराव्या, असे गौतम ध. सूत्रात (१०.५८-६१) सांगितले आहे. दास्य हेच त्यांचे काम. कष्ट करून जगणारे शूद्र पोटाला पुरेसे न मिळाल्यामुळे कर्जबाजारी होऊन शेवटी दास बनत होते. स्वतंत्रपणे पोट भरणाऱ्या कारागिरांना राजासाठी एक दिवस काम करावे लागत असे. आणि उच्च वर्णांतील लोकांना कन्येचा विवाह किंवा धर्मकृत्य करण्यासाठी लागणारे द्रव्य शूद्राकडून बलाने घेता येत असे (गौतम ध. सू. २८.२४). शूद्र मनुष्याचा प्राण घेणाऱ्या माणसाला फारशी शिक्षा दिली जात नसे (बौधा. ध. सू. ११०.१९.१.६; मनु. ११.१३१).

शूद्र वर्णातील माणसाचा अध्ययन व यजन करण्याचा अधिकार या कालखंडात नष्ट झाला. जर शूद्र मनुष्याने वैदिक मंत्रांचा उच्चार केला तर त्याची जीभ कापावी, त्याने जर वैदिक मंत्र पाठ केले तर त्याच्या देहाचे दोन तुकडे करावे (१२.६) व त्याने जाणुनबूजून वेद श्रवण केले तर त्याच्या कानात धातूचा किंवा लाखेचा तप्त रस ओतावा, असे सांगितले आहे (गौ. ध. सू. १२.४.६). शूद्र मनुष्याने ब्राह्मणाजवळ बसू नये; तो तसा बसला तर त्याला फटके द्यावे, असे धर्मशास्त्र सांगते (गौ. ध. सू. १२.७; आप. ध. सू. २.१०;२७.१५). शूद्र मनुष्याने उच्च वर्णातील स्त्रीशी व्यभिचार केला तर त्याला मृत्युदंड सांगितला आहे (आप. ध. सू. २.१०; २७.८–१०). जैन व बौद्ध वाङ्मयावरून असे ध्यानात येते, की उच्च वर्णातील श्रीमान धनी आपल्या शूद्र दासांना फार छळीत व अघोरी शिक्षा करीत.

शूद्रांची सामाजिक स्थिती या कालखंडांत खूपच हीन झाली होती. स्नातकाने पतित, स्त्री व शूद्र यांच्यासह प्रवास करू नये (बौधा. ध. सू. २.३.६.२२) व विद्यार्थ्याने स्त्री व शूद्र यांच्याशी बोलू नये (बौधा ध. सू. ४.५.४), असे सांगितले आहे. शूद्राने स्पर्श केलेले अन्न ब्राह्मणाने खाऊ नये, हा नियम याच काळात प्रथम झाला (आप. ध. सू. १.५.१६.२२; बौधा. ध. सू. २.२३.१).

त्या काळी उच्च वर्णांतील पुरुषाने शूद्र स्त्रीशी लग्न केलेले चालत होते (वासिष्ठ ध. सू. १.२४; बौधा. ध. सू. १.८.१६). पण त्याने शूद्र स्त्रीशी समागम केला तर कुळाला कलंक लागतो व स्वर्ग मिळत नाही, असे सांगितले आहे (वासिष्ठ ध. सू. १.२७). शूद्र पुरुषाचा उच्च स्त्रीशी विवाह तर प्रतिलोम म्हणून निषिद्ध मानला जात असे व अशा विवाहातून झालेली प्रजा पतित गणली जात असे (गौ. ध. सू. ४.२७).

शूद्र लोक इतके हीन गणले जात होते, की ब्राह्मणाने सकाळ-संध्याकाळ संध्या केली नाही किंवा ब्राह्मणाला निषिद्ध असे उद्योग केले तर त्याला शूद्र मानावे, असे शास्त्र होते (बौधा. ध. सू. २.४.७.१५). सुतार, बुरूड, कुंभार, कोष्टी, चर्मकार, नापित हे कारागीर शूद्र होते व त्यांना हीन मानले जात होते.

मौर्य काळातही शूद्रांची स्थिती दयनीयच होती. पूर्वी श्रीमंत लोक घरकामासाठी दास बाळगीत. मौर्य काळात शेतीसाठीही बरेच दास बाळगण्याची प्रथा सुरू झाली, असे कौटिल्य म्हणतो (अर्थ. २.१४). अर्थशास्त्रांत कारागिरांचे वेतन आणि कामाचे नियम ठरवलेले आहेत. शेतमजुरांचे वेतनही ठरवलेले आहे. पण शूद्रांना जे मिळे ते जीवनाला पुरेसे नसे. कष्टाचे आणि सक्तीचे काम करावे आणि त्या मानाने वेतन मात्र अत्यल्प मिळावे

अशीच अर्थशास्त्रकालात त्यांची स्थिती होती (अर्थ. ५.३).

शूद्रांची सामाजिक स्थिती मौर्य काळीही पूर्वीसारखीच राहिली. त्यांच्यावरची सर्व बंधने कायम होती; पक्षपात चालू होता. सनपूर्व २०० पर्यंत शूद्रांची अशी शोचनीय अवस्था होती. पण सनपूर्व २ ऱ्या शतकापासून त्यांच्या स्थितीत काहीशी सुधारणा झालेली दिसते, असे डॉ. विमलचंद्र पाण्डेय म्हणतात. महाभारत व मनुस्मृती या ग्रंथांत शूद्रांविषयी उदार व सहिष्णू दृष्टिकोन आढळतो. त्या काळी अन्य वर्णांची सेवा हेच त्यांचे एकमेव कार्य राहिले नाही. ते आवश्यकतेप्रमाणे व्यापार, पशुपालन, इ. अन्य उद्योगही करू शकत होते (म. भा. १२.२९४. २-४). सभापर्वात शूद्र राजांचाही उल्लेख आहे. शासनव्यवस्थेत त्यांना अधिकारपदे मिळत, असाही उल्लेख मिळतो. राजसूय यज्ञाच्या प्रसंगी युधिष्ठिरानें शूद्रांनाही निमंत्रण केले होते (शांति ७५.६-१०).

महाभारतात परस्परविरोधी अशा दोन्ही विचारधारा आढळतात. शूद्रांना हीन व तुच्छ मानण्याची परंपरागत रीतही चालू होती आणि त्यांना अन्य वर्णांच्या सामान्य माणसांप्रमाणे वागवण्याची कल्पनाही उगम पावली होती. मनू सनातन धर्माभिमानी व चातुर्वर्ण्याचा पक्षपाती असूनही त्याने शूद्रांना अनेक सवलती दिलेल्या आहेत. त्याने शूद्रांना सर्व धार्मिक कृत्यांचा व संस्कार करण्याचा अधिकार दिला आहे. मात्र त्यांना धर्मकृत्यांत वैदिक मंत्रांचा उपयोग करायला त्याने बंदी घातली आहे (मनु १०.१२.७).

वास्तविक धर्मसूत्रकारांप्रमाणेच मनूनेही शूद्राच्या जीविताला फारशी किंमत दिलेली नाही. प्रत्येक बाबतीत शूद्र मनुष्याला तुच्छ मानण्याची जुनी वृत्तीच मनुस्मृतीत दिसून येते. शूद्रहत्या, शूद्राचा व्यभिचार, इ. बाबतींत तसेच पक्षपाती नियम मनुस्मृतीत आहेत (मनु ११.१२८–३१; ११.१३२; ८.३७४; ४.१४०; ११.२२०). या नियमांचा भंग झाला असता कोणती प्रायश्चित्ते करावी, तेही मनूने सांगितले आहे.

पण तरीही मनूचा शूद्रांविषयी उदार दृष्टिकोन होता, हे त्याच्या पुढील श्लोकावरून (१०.१२६) ध्यानात येते –

न शूद्रे पातकं किञ्चिन्न च संस्कारमर्हति।
नास्याधिकारो धर्मेऽस्ति न धर्मात् प्रतिषेधनम् ॥

अर्थ – शूद्रामध्ये कोणतेच पाप नाही, म्हणून त्याला उपनयनादी संस्कारांची आवश्यकता नाही. त्याने धर्म म्हणजे यज्ञ केलेच पाहिजेत, असे नाही आणि त्याने यज्ञ करू नये, असा प्रतिबंधही नाही.

त्या काळी यवन, शक, कुशाण, इ. परकीय लोकांनी भारतात येऊन राज्ये स्थापली व ते हिंदू समाजात मिसळू लागले. त्यांतील बरेच सामान्य लोक शूद्र वर्णात समाविष्ट झाले. त्यामुळे शूद्रांच्या विचारांत परिवर्तन होऊ लागले. महाभारत व मनुस्मृती यांत असे म्हटले आहे, की किरात, शबर, दरद, द्रविड, यवन, शक, इ. लोक प्रारंभी क्षत्रिय होते, पण ब्राह्मणांचा संपर्क बंद झाल्यामुळे ते शूद्र झाले. यासंबंधी श्री. शर्मा यांनी केलेले विवेचन असे–यवन, शक, कुशाण, इ. परकीयांच्या आक्रमणांमुळे ब्राह्मणांच्या सत्तेला हादरा बसला. त्याच काळात ब्राह्मणांना विरोध करण्याची प्रेरणाही शूद्रांना मिळाली असावी. परकीय राजांनी शूद्रांना आश्रय देऊन आपली सत्ता बळकट केली. बौद्ध व जैन या पंथांचा प्रचारही अनेक शतके चालू होता. शूद्रांना त्या पंथांत समानाधिकार मिळत असल्यामुळे त्यांची दृष्टी बदलत होती. ब्राह्मणांच्या जाचामुळे ते विथरले होते. त्यामुळे पूर्वीप्रमाणे त्यांना तुच्छ मानणे शक्य नव्हते. त्या काळी कारागिरीच्या व्यवसायामुळे काही शूद्रांची स्थिती सुधारली. दासांची संख्या कमी होऊन स्वतंत्रपणे शेती करणाऱ्या शूद्रांची संख्या वाढली. काही शूद्रांना राज्यव्यवस्थेत स्थान मिळू लागले. त्यांची सामाजिक प्रतिष्ठाही वाढली.

प्राचीन काळी शूद्र वर्णाला समाजात किती प्रतिष्ठा होती, हे सांगताना डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी केलेले विवेचन असे – राजाचे मंत्री किती असावे व ते कोणत्या वर्णाचे असावे याविषयी भीष्मांनी पुढीलप्रमाणे अभिप्राय दिला आहे. राजाने चार ब्राह्मण, आठ क्षत्रिय, एकवीस वैश्य, तीन शूद्र व एक सूत, असे मंत्री नेमावे (म. भा. शांति. ८५८). यात ब्राह्मणांपेक्षा शूद्र मंत्र्यांची संख्या एकानेच कमी आहे. 'तीन वर्णांची सेवा हाच शूद्राचा धर्म होय' असे शास्त्र त्या वेळी होते. महाभारतातही तसे शास्त्र अनेक ठिकाणी सांगितलेले आहे. त्या काळात परस्परविरुद्ध असे दोन विचारप्रवाह चालू होते. 'शूद्र राजा होऊ शकेल की नाही ?' या युधिष्ठिराच्या प्रश्नाला उत्तर देताना भीष्म म्हणतात – 'राजा, अपार व नौकाशून्य अशा संकटरूपी समुद्रात जो मूर्तिमंत नौकाच झालेला असतो, तो जरी शूद्र असला तरी, त्याचा सन्मान करणे सर्वथैव योग्यच आहे.' (शांति. ७८.३८) भीष्मांचे हे मत केवळ ग्रांथिक नाही. पुराणकारांच्या मतान्वये भारतवर्षात पहिले विशाल साम्राज्य स्थापन करणारा चंद्रगुप्त मौर्य हा शूद्र होता. पैठणच्या सातवाहनांचे घराणेही पुराणान्वये शूद्रच होते. शक, यवन, दरद हे मूळचे क्षत्रिय, पण संस्कारलोपाने व ब्राह्मणांच्या अदर्शनाने शूद्र झालेले लोक होत, असे मनूने म्हटले आहे. इतर शास्त्रकारांनी त्यांना संकरज म्हणून शूद्र ठरविले आहे. पण महाभारतात अनेक ठिकाणी, या लढाऊ जमाती असून, जरासंध, भगदत्त, दुर्योधन, यांच्या सैन्यात त्या शौर्याने लढल्या, असे वर्णन केले आहे.

सुतार, लोहार, रथकार, कुंभार हे कारागीर शूद्र वर्णाचे असूनही त्यांना नमन करावे, असे यजुर्वेदात म्हटले आहे. त्या नसकाराई जातीही पुढे हीन ठरल्या. अन्नपाण्याच्या स्पर्शास्पर्शासंबंधी सध्या ज्या अतिरेकी कल्पना रूढ आहेत, त्या प्राचीन काळी नव्हत्या, असे पं. सातवळेकरांनी अनेक स्मृतिग्रंथांच्या व पुराणांच्या आधारे सिद्ध केले आहे. अनेक शूद्र गणलेल्या जातींच्या हातचे अन्न खाण्यास व पाणी पिण्यास शास्त्रकारांची अन्य वर्णांना अनुमती होती.

इ. स. २०० ते ५०० या कालखंडातील शूद्रांच्या परिस्थितीची कल्पना याज्ञवल्क्य, विष्णू, नारद, बृहस्पती, कात्यायन यांच्या स्मृतींवरून करता येते. सेवा हाच शूद्रांचा धर्म होता (कामंदकीय नीतिसार २.२१). त्यांना सर्व कष्टाची कामे करावी लागत होती. शेती, पशुपालन, व्यापार, इ. व्यवसायांत त्यांना मजुरी मिळत होती. पण घरगुती काम करणारे व हीन कामे करणारे शूद्र हे दासच होते (नारदस्मृती ५.२६.२८). मनूच्या काळापर्यंत शूद्रांना बळाने दास करण्याची प्रथा होती व तिला धर्मशास्त्राची मान्यता होती. पण याज्ञवल्क्याने या प्रथेचा निषेध करून, राजाने अशा दासांना मुक्त करावे, असे म्हटले आहे (२.१८२).

पूर्वी शेतीत मजुरी करणारे शूद्र लोक गुप्तकाळी स्वतःची शेती करू लागले होते, असे दिसते (मार्कंडेय पु. ४९.४७; कात्यायनस्मृती ४७९-८०). शेती हा शूद्रांचा व्यवसाय ठरला; त्याचप्रमाणे कारागिरी हा देखील त्यांचा व्यवसाय मानण्यात आला (कामंदकीय. २.२१; मार्कंडेय पु. २८.३–८). त्यात सुवर्णकाम, हीन धातुकाम, सुतारी, विणकाम, चर्मकारी, पाथरवटी या कामांचा समावेश बृहस्पतीने केला आहे (१३.३३). शूद्रांना स्वतंत्रपणे व्यापार करण्याचीही मुभा त्या काळी मिळाली होती (याज्ञ. १.१२०; मार्कंडेय पु. २८.३–८). त्यामुळे काही शूद्रांची स्थिती बरीच सुधारली होती. तथापि त्यांचे सामाजिक स्थान मात्र हीनच राहिले होते. राज्यव्यवस्थेत त्यांना स्थान नव्हते. आरक्षी दल, हेरगिरी यांत मात्र त्यांना काम मिळत असे.

या कालखंडात शूद्राच्या जीविताला क्षत्रिय आणि वैश्य यांच्याप्रमाणेच किंमत दिली जात असे. क्षत्रिय, वैश्य, किंवा शूद्र मनुष्याचा वध हा सारख्याच प्रतीचा अपराध गणला जात असे व त्याला सारखेच प्रायश्चित्त सांगितले होते. तसेच क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना एकाच अपराधाबद्दल सारखी शिक्षा होती. गुप्तकाळी शूद्रांना आपत्काली शस्त्र धारण करता येत असे. त्यांना सैन्यात अधिकारपदेही मिळत असावी.

त्या काळी शूद्रांना अस्पृश्य मानीत नव्हते. आपत्काली ब्राह्मणाला शूद्राच्या हातचे अन्नपाणी चालत असे. घरातील शूद्र सेवक, पशुपालक अशांच्या हातचे अन्न वर्ज्य मानले जात नव्हते.

धार्मिक क्षेत्रातही शूद्रांना काही सवलती या कालखंडात मिळाल्या होत्या. मार्कंडेय पुराणात (२८.७–८) शूद्रांना यज्ञ व दानधर्म करण्याची परवानगी दिली आहे. पूर्वी त्यांना श्राद्धविधी करता येत नसत, ते करण्याची अनुज्ञा मिळाली (याज्ञ. १.१२१; वायु पु. २.१३.४९). यासंबंधी श्री. शर्मा यांनी जे विवेचन केले आहे, ते असे – गुप्तकालीन पंडितांनी शूद्रांना दानधर्म करायला विशेष प्रोत्साहन दिले. त्यामुळे त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होतील, त्यांना स्वर्ग प्राप्त होईल किंवा ब्राह्मण वर्णात पुनर्जन्म लाभेल, असे त्यांनी सांगितले (मार्कं. पु. २८-३-८; मत्स्य पु. १७.७१). गुप्तकाळी अनेक शूद्र सधन झालेले असल्यामुळे त्यांनी दानधर्म सुरू केला असण्याची शक्यता आहे. शूद्रांना यज्ञकर्म, श्राद्ध, दानधर्म करण्याची मुभा मिळाली, त्या अर्थी त्यांना त्या कर्मांत ब्राह्मणांचे साहाय्य मिळणे आवश्यक झाले. तसे करणे त्या काळीही निषिद्ध असले तरीही अनेक ब्राह्मण शूद्रांना धार्मिक विधीत साहाय्य करीत होते, यात शंका नाही. काही शूद्रही पुरोहिताचे काम शिकले होते, असे दिसते.

बौद्ध पंथाप्रमाणेच वैष्णव पंथानेही जातिभेदाची तीव्रता कमी केली होती. गुप्तकाळी वैष्णव पंथाचा बराच प्रभाव होता. त्या पंथाने शूद्रांना देवाची भक्ती करून मोक्ष मिळवण्याचा मार्ग सांगितला. तंत्र संप्रदायातही वर्णभेद नव्हता. अशा प्रकारे निरनिराळ्या ग्रंथांत शूद्रांविषयी उदारता व सहिष्णुता व्यक्त झालेली असली, तरी प्रत्यक्षात मात्र तशी परिस्थिती नसावी. जन्माधिष्ठित वर्णांची विहित कर्मे करणे हाच खरा धर्म, या विचाराचा पगडा त्या काळी नष्ट झालेला नव्हता. आणि पुढे तर तो वाढतच गेला. कर्मसिद्धान्ताचा प्रभाव इतका प्रबळ होता, की आपण ईश्वराने ठरवून दिलेली कर्मे केली नाहीत, तर आपली अधोगती होईल, असे भय शूद्रांनाही वाटत असावे.

धर्मसूत्रे व प्राचीन स्मृती या ग्रंथांत शूद्रासंबंधी न्यायदानात व धार्मिक क्षेत्रात पक्षपात केलेला आहे. हा अन्याय आहे असे काही शास्त्रकारांना जाणवले व त्यांनी त्या अन्यायाचे स्वरूप सौम्य करण्याचा प्रयत्न केला. महाभारताप्रमाणे अन्य ग्रंथांतही असे दोन विचारप्रवाह आढळतात; पण पक्षपाती विचारप्रवाहाचा जोर हळूहळू वाढत गेला व समाज विघटित होऊ लागला, असे म. म. काणे यांनी धर्मशास्त्राचा इतिहास या ग्रंथात अनेक ठिकाणी सांगितले आहे. न्यायदानात पक्षपात, धार्मिक क्षेत्रात विषमता व सामाजिक क्षेत्रात अन्याय हा शास्त्रविहित होता. तथापि पूर्वीचा समताधर्म इ. स. च्या १० व्या शतकापर्यंत चालू राहिला. धर्मशास्त्रातील कडक बंधने काटेकोरपणे पाळली जात नव्हती. अनेक शूद्र उच्च स्थानी जात होते. वर्ण-

संकर चालू होता. पण कालांतराने तो समताधर्म लोप पावला. सामाजिक न्याय ही कल्पनाच नष्ट झाली.

सुतार, लोहार, कुंभार, परीट, न्हावी, गुरव, कोळी, तेली, तांबोळी, साळी, माळी, ठाकर, घडशी हे सर्व शास्त्रकारांच्या मते शूद्र होत. चांभार, महार, मांग, बुरूड यांचा पूर्वी शूद्र वर्णातच समावेश होत असे. पण उत्तरकालीन स्मृतिकारांनी त्यांना अस्पृश्य ठरवले. गुराखी, नट, रथकार, भिल्ल यांनाही शूद्र मानलेले आहे. मनुस्मृती, यमस्मृती, पराशरस्मृती, बृहत्पराशरस्मृती, कूर्मपुराण यांत शेतकऱ्यांनाही शूद्र ठरवले आहे. वेदव्यासस्मृतीत वणिक व कायस्थ यांचीही गणना शूद्रात केली आहे. प्रतिलोम संकरापासून उत्पन्न झालेली प्रजा प्राचीन काळापासून शास्त्रकारांनी शूद्र मानली आहे. अनुलोम विवाह दीर्घकाल शास्त्रविहित होते. पण पुढे मातृसावर्ण्य रूढ होऊन संतती मातेच्या वर्णाची ठरू लागल्यामुळे शूद्र स्त्रियांना द्विजांपासून झालेली संततीही शूद्रच ठरू लागली.

सनपूर्व ४ थ्या शतकानंतर भारतात क्षत्रिय वर्णच अस्तित्वात नाही, असे विष्णुपुराण, मत्स्यपुराण व भागवतपुराण यांत सांगितले आहे. नंद वंशातला पहिला राजा महापद्म नंद हा शूद्र होता. त्याने सर्व क्षत्रियांचा संहार केल्यामुळे तेव्हापासून भारतात क्षत्रियच उरले नाहीत, असा त्यांचा अभिप्राय आहे. त्या आधारावर रघुनंदन याने शुद्धितत्त्वात, कमलाकर भट्ट याने शूद्रकमलाकरात व नागेश भट्ट याने व्रात्यताप्रायश्चित्तनिर्णय या ग्रंथांत ' कलावाद्यन्तयोः स्थितिः ' (= कलियुगात ब्राह्मण व शूद्र हे दोनच वर्ण आहेत) असा निर्णय दिला आहे.

शूद्र वर्ण कसा उत्पन्न झाला याविषयी डॉ. आंबेडकर यांची कल्पना अशी— ऋग्वेदकाळी आर्य समाजात ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीनच वर्ण होते. सुदास हा क्षत्रिय राजा असून, वसिष्ठ हा त्याचा मंत्री ब्राह्मण होता. त्यांचे वैर आले. त्यातूनच वसिष्ठ व विश्वामित्र यांचा संघर्ष सुरू झाला. विश्वामित्र क्षत्रिय होता. पुढे तो राजर्षी झाला. ब्राह्मण व क्षत्रिय यांचे हे वैर दीर्घ काळ चालू होते. पुढच्या काळात ब्राह्मण लोक क्षत्रियांचा उपनयनविधी करण्याचे नाकारू लागले. तो विधी करण्याचा अधिकार ब्राह्मणांनी केवळ स्वतःपुरताच ठेवला. उपनयन बंद झाल्यामुळे वेदाध्ययन व यज्ञकर्म करण्यास क्षत्रिय अपात्र ठरले व त्यांचा वेगळा वर्ण झाला. तोच शूद्र वर्ण होय.

डॉ. के. ल. दप्तरी व श्री. शर्मा यांनी या कल्पनेचे खंडन केले आहे. डॉ. दप्तरी यांनी वायुपुराणातील (८.१६१–१७१) श्लोकांच्या आधारे असे दाखविले आहे, की ब्रह्मदेवाने स्वतः ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण उत्पन्न केले व त्यांना निरनिराळी कामे दिली. जे अल्पवीर्य, निस्तेज व सेवा करण्यात आनंद मानणारे (सांगकामे) होते, त्यांना त्याने शूद्र म्हटले. सेवा व कारागिरी ही कामे त्यांना नेमून दिली. शतपथ ब्राह्मणांतही चार वर्णांचा उल्लेख आहे. महाभारतातही (शांति. ६०.२८) प्रजापतीने इतर वर्णांचा दास म्हणून शूद्राला कल्पिले व त्याने इतर वर्णांची सेवा करावी असे सांगितले, असे म्हटले आहे.

वेदकाळी चातुर्वर्ण्यव्यवस्था होती किंवा नाही, याविषयी पंडितांमध्ये मतभेद आहेत. म. म. काणे यांच्या मते त्या काळी वर्ण नसून वर्ग होते. प्रारंभी एकच वर्ण होता व त्यातून गुणकर्मभेदाने चार वर्ण निर्माण झाले, असे रामायण, महाभारत, भागवत, ब्रह्मपुराण, लिंगपुराण, इ. ग्रंथांत वारंवार सांगितलेले आहे. त्यावरून गुणांवरून मनुष्याचा वर्ण ठरतो, जन्मावरून नव्हे, ही विचारधारा जोर धरू लागली होती असे दिसते. ' सत्य, तप, विद्या ही लक्षणे शूद्राच्या ठायी असतील तर तो शूद्र ब्राह्मण होय आणि ब्राह्मणाच्या ठायी ती लक्षणे नसतील तर तो ब्राह्मण शूद्र होय ' असे भृगूने म्हटले आहे. अनुशासन पर्वात शंकर पार्वतीला सांगतो, की हीन कुलात जन्मलेला शूद्र जर आगमसंपन्न असेल, तर त्याला संस्कृत ब्राह्मण मानावे.

आपण सदाचाराने वागलो तर आपली उन्नती होईल, अशी आशा त्या काळी सर्वांनाच वाटत असे. महाभारतात (शांति. २९१.५) तसे सर्वांना आश्वासनच दिलेले आहे–

> वर्णोत्कर्षमवाप्नोति नरः पुण्येन कर्मणा ।
> दुर्लभं तमलब्ध्वा हि हन्यात् पापेन कर्मणा ॥

अर्थ – पुण्यकारक कर्मे केल्याने माणसाला उच्च वर्ण प्राप्त होतो व पापकृत्यांमुळे उच्च वर्णाची प्राप्ती न होता नीचता प्राप्त होते.

' नन्दान्तं क्षत्रियकुलम् ' या वचनान्वये नंद वंशानंतरचे सर्व क्षत्रिय शूद्र ठरले. पण हे मत स्मृतिकारांना मान्य नाही. तथापि इतर लोकांना तरी शास्त्रकारांनी शूद्र का ठरवले हे कळत नाही. पापकर्म, अमंगळ उद्योग, अभक्ष्यभक्षण, वेदत्याग, इ. त्याची कारणे दिलेली आहेत (म. भा. शांति. १८९.१). आपापल्या कर्मांनी अनेक शूद्र होतात, असे वेदव्यासस्मृतीत म्हटले आहे. वर्णसंकरामुळे उत्पन्न झालेली संतती शूद्र ठरते असे अनेक शास्त्रकारांनी म्हटले आहे. काही जातींचे धंदे ओंगळ असतील; पण शेतकरी, माळी, सुतार, लोहार यांचे धंदे ओंगळ नसूनही त्यांना शूद्र का ठरवण्यात आले हे समजत नाही. शूद्रांना धर्मबाह्य, पतित मानून एक बहुसंख्य मानवसमूह समाजातून बाहेर लोटण्याचे एक मोठे दुष्कृत्य धर्मशास्त्राने केले असे म्हणावे लागते.

शूद्रांची संख्या कशी वाढत गेली हे चिं. वि. वैद्य यांनी पुढील-

प्रमाणे दाखविले आहे – पूर्वी शेती हा धंदा वैश्यांचा होता. पण बौद्ध धर्माच्या प्रसारामुळे अहिंसेच्या तत्त्वाचा वडेजाव माजला. शेतकी करताना अपरिहार्यपणे होणारी जीवजंतूंची हत्या वैश्य लोकांना निंद्य वाटू लागली आणि म्हणून त्यांनी ते काम सोडून दिले. मग शूद्र लोक ते काम करू लागले. तथापि पंजाब वगैरे काही प्रदेशातील काही वैश्य लोकांनी मात्र शेती चालूच ठेवली. त्यामुळे कालांतराने त्यांचीही जात हीन ठरली व ते शूद्रांत समाविष्ट झाले. याच कारणास्तव जाट, गुजर व मराठे हे वस्तुतः आर्य वंशाचे असूनही, कृषिकर्म करीत राहिल्यामुळे त्यांना शूद्र वर्गात जाण्याची पाळी आली. मध्ययुगात काही ब्राह्मण व क्षत्रिय यांनीही शेतकी धरली. त्यामुळे त्यांचाही दर्जा घसरला व ते शूद्र लेखले जाऊ लागले. अशी स्थिती हिमालयप्रदेशात व दक्षिण भारतात दिसते.

शूद्राच्या हातचे अन्न खाणे इ. स. च्या ९ व्या शतकापर्यंत शास्त्रकारांनी निषिद्ध ठरवले नव्हते. पूर्वी ब्राह्मणांच्या घरी शूद्र आचारी स्वयंपाक करीत. पण आंगिरस, यम, व्यास, हारीत, संवर्त, इ. शास्त्रकारांनी शूद्राच्या हातचे अन्न ब्राह्मणाला निषिद्ध ठरवले. भविष्यपुराण व पराशरस्मृती या ग्रंथांत तर शूद्राशी कोणत्याही प्रकारे संपर्क आला तर ब्राह्मण पतित होतो, असे म्हटले आहे. पराशराने त्यासाठी प्रायश्चित्ते व मंत्रजप सांगितले आहेत. काही शास्त्रकारांनी मात्र काही पक्व पदार्थांचा अपवाद करून ते पदार्थ शूद्राकडून घेतले तरी चालतील, अशी सवलत दिली आहे.

विज्ञानेश्वराने मिताक्षरेत शूद्राच्या हातचे अन्न घेण्यास बंदी असल्याचा उल्लेखही केलेला नाही. अपरार्काने आपत्काली शूद्राकडून अन्न घेण्यास प्रत्यवाय नाही, असे म्हटले आहे. पण स्मृत्यर्थसार या ग्रंथात कलिवर्ज्य कर्मांची नामावली दिलेली असून, शूद्रान्नभक्षणानंतर उपोषण व पंचगव्य प्राशन करावे, असे सांगितले आहे. रघुनंदन याने मात्र आपल्या शूद्रकृत्यतत्त्व या ग्रंथात शूद्रान्न घेणे निषिद्ध मानलेले नाही.

वीरमित्रोदयात शूद्रांचे सत् व असत् असे भेद सांगितले असून, असत् शूद्रांच्या हातचे अन्न भक्षू नये असे म्हटले आहे. माधवीय व मदनपारिजात यांच्या मते घरातले दास, गोपाल हे सच्छूद्र असून, ते भोज्यान्न होत. पण मदनपारिजातात (१३३) मात्र शूद्राचा स्पर्श झाला असता सचैल स्नान करून शुद्ध व्हावे असे प्रतिपादले आहे.

अशा प्रकारे मध्ययुगीन शास्त्रकारांमध्ये शूद्रांच्या हीनतेविषयी बरेच मतभेद आढळतात. त्या काळी शूद्रांविषयी तुच्छता वाढत गेली आणि त्यांचा संपर्क टाळण्याची वृत्ती बळावली, हे मात्र खरे. इ. स. च्या १९ व्या शतकात शूद्रांना ब्राह्मणांकडून जी वागणूक मिळत होती, ती पाहता शूद्र लोक तोपर्यंत अत्यंत हीन दशेला गेले होते असे वाटते. धर्मशास्त्रान्वये त्यांना समाजात प्रतिष्ठा नव्हती. उच्च वर्गातले लोक त्यांना तुच्छ लेखीत होते. तोपर्यंत शूद्र वर्णातून शेकडो जाती उत्पन्न झालेल्या होत्या. परीट, नापित, कोळी, कासार, सुतार, लोहार, साळी, माळी, तेली, तांबोळी, इ. जातींचे लोक अस्पृश्य मानले जात नसले तरी त्यांनी स्पर्श केलेले अन्नोदक उच्च जातीच्या लोकांना चालत नव्हते.

वरील जातींचे लोक धर्मशास्त्रात शूद्र गणले जात असले, तरी सांप्रत शूद्रवर्ण हीन राहिलेला नाही. चातुर्वर्ण्य ही संस्थाच आता लोप पावत आहे. कारण वर्णविहित अशी कर्मे सांप्रत कोणीही आचरीत नाही किंवा शास्त्रबंधने पाळीत नाही. बंधने पाळली जातात ती जातींची. जातिव्यवस्था मात्र पूर्वीपेक्षाही सांप्रत अधिक दृढ व कठोर बनली आहे. राजकारणात जातीची कास धरल्याने अधिक फायदे पदरात पाडून घेता येतात, असे दिसून आल्याने जो तो सांप्रत जातीला घट्ट मिठी मारीत आहे.

शास्त्रकारांनी शूद्रांना केवळ हीन मानले नाही, तर त्यांच्यांतील काही जाती वेगळ्या काढून त्यांना अस्पृश्यही ठरवले. पं. सातवळेकर, श्रीधरशास्त्री पाठक, म. म. काणे यांच्या मते पूर्वी आजच्यासारखी अस्पृश्यता मुळीच नव्हती. वेदवाङ्‌मयात चर्मकार, चांडाळ पौल्कस, इ. नावे आहेत. पण ते लोक अस्पृश्य मानले गेले नव्हते. मनूच्या मते पाचवा वर्णच अस्तित्वात नव्हता. त्या काळी आजच्या अस्पृश्यांची गणना शूद्रातच होत असे. जन्मजात अस्पृश्यता हिंदुधर्मशास्त्रात फक्त चांडाळाच्या बाबतीत सांगितलेली आहे. ब्राह्मण स्त्री व शूद्र पुरुष यांचे अपत्य म्हणजे चांडाळ होय. तोच फक्त जन्माने अस्पृश्य ठरवलेला आहे. पण हा चांडाळ शब्द जातिवाचक नाही. चांडाळ जात शूद्रच होती. इतर काही लोक त्यांच्या हीन व्यवसायामुळे अस्पृश्य मानले जात; पण ते तात्पुरते. अस्पृश्यांच्या दर्शनाने द्विज अपवित्र होतात, त्यांच्या सावलीनेही विटाळ होतो, ही कल्पना उत्तरकालीन आहे. इ. स. च्या १० व्या शतकानंतर भेदाची ही प्रवृत्ती वाढत गेली, सर्वच जातिबंधने कडक होऊ लागली व त्यामुळे अस्पृश्यता अधिक दृढ झाली. पाहा – अस्पृश्यता, चातुर्वर्ण्य, जातिसंस्था. [ भा. सा. इ.; शू. ए. इं.; हि. ध. २ व ३; हि. स. सं. वि.; डॉ. दप्तरी – नवभारत, एप्रिल १९४८; म. यु. भा. ]

## शूद्रक

मृच्छकटिक या संस्कृत नाटकाचा कर्ता. मृच्छकटिकाच्या प्रस्तावनेत याची माहिती दिली आहे, ती अशी – शूद्रक दिसण्यात फार सुंदर होता. त्याची चालण्याची ढब धीरगंभीर व हत्तीच्या गतीसारखी होती. त्याचे नेत्र चको-

राच्या नेत्राप्रमाणे होते. त्याचे मुख पूर्ण चंद्रासारखे होते. त्याचे सामर्थ्य मोठे होते व तो एक महान क्षत्रिय राजा होता. ऋग्वेद, सामवेद, गणितशास्त्र, ललित कला, वैश्यांची विद्या व हत्तींना शिकविण्याची विद्या यांची त्याला माहिती होती. शंकराच्या प्रसादामुळे त्याला दिव्य दृष्टी लाभली होती. त्याने अश्वमेघ यज्ञ केला होता. आपल्या नंतर त्याने आपल्या पुत्राला गादीवर बसविले. त्याला शंभर वर्षे आणि दहा दिवस इतके दीर्घायुष्य लाभले. अखेरीस त्याने स्वतः होऊन अग्निप्रवेश केला. त्याला युद्ध फार आवडे. तो न्यायदानात प्रमाद करीत नसे. तो वेदविद्या उत्तम जाणत होता. त्याने तप केले होते. शत्रूंच्या हत्तींबरोबर युद्ध करणे त्याला आवडे.

वर दिलेली शूद्रकाची हकीकत आणि ती देण्याची पद्धत यावरून ती स्वत: शूद्रकाने दिलेली नाही, असे दिसते. तसेच ही माहिती देताना परोक्षभूतकाळ वापरला आहे आणि शूद्रकाने अग्निप्रवेश केला, असे म्हटले आहे. यावरून ही हकीकत नंतर कोणीतरी लिहून प्रस्तावनेत घातली असावी. यामुळे हा शूद्रक राजा कोण, तो केव्हा होऊन गेला, इ. बाबी फार गुंतागुंतीच्या होऊन बसल्या आहेत.

प्राचीन इतिहास-पुराणांत शूद्रक नावाचे एक-दोन राजे आहेत. त्यांच्याशी याचा संबंध जोडण्याचा प्रयत्न अनेकांनी केला आहे. कोणी म्हणतात, शूद्रक म्हणजे संवत स्थापणारा विक्रमादित्यच होय. राजशेखराने एका शूद्रकाचा उल्लेख करून असे म्हटले आहे, की या शूद्रक राजाच्या पदरी रामिल आणि सौमिल असे दोन कवी होते आणि त्या दोघांनी मिळून संयुक्त काव्य केलेले आहे. राजशेखराच्या या म्हणण्यावरून कांहींनी असा निष्कर्ष काढला आहे, की शूद्रक राजाच्या या दोन कवींनी मृच्छकटिक नाटक रचले व त्याचा कर्ता म्हणून शूद्रकाचे नाव पुढे केले. सौमिलाचा उल्लेख कालिदासाने आपल्या मालविकाग्निमित्रात केला आहे. त्यावरून हा शूद्रक राजा कालिदासपूर्व असावा.

कथासरित्सागरात एका शूद्रकाचा उल्लेख आहे व त्यालाही शंभर वर्षे आयुष्य मिळाल्याचे म्हटले आहे. हा शूद्रक म्हणजे आभीर राजा शिवदत्त होय (इ. स. सुमारे २५०), असे प्रा. कोनोचे मत आहे. कीथचे तर असे म्हणणे आहे, की शूद्रक हे एक दंतकथेतले नाव असून, त्याला ऐतिहासिक आधार नाही. अलिकडेच भासाची म्हणून जी नाटके सापडली आहेत, त्यांत दरिद्रचारुदत्त हे चार अंकी अपूर्ण नाटक आहे. त्यात आणि मृच्छकटिकाच्या पूर्वभागात बरेच साम्य आहे. यावरून पंडितांनी दोन तर्क काढले आहेत. कोणी म्हणतात, की मृच्छकटिक ही भासाची किंवा दुसऱ्या कोण्या कवीची संपूर्ण कृती असून, तिचा संक्षेप कोणीतरी दरिद्रचारुदत्त या नावाने केला आहे. दुसऱ्या मते दरिद्रचारुदत्त या अपूर्ण नाटकाला जोड देऊन त्याचे मृच्छकटिक हे संपूर्ण नाटक बनविले आहे.

बाणाने आपल्या कादंबरीत आणि दंडीने आपल्या दशकुमारचरितात शूद्रकाचा उल्लेख केला आहे. दंडीच्या काव्यादर्शात मृच्छकटिकातील 'लिम्पतीव तमोऽङ्गानि' हा श्लोक आहे. मृच्छकटिक आणि दशकुमारचरित यांच्या भाषेत आणि आशयात बरेच साम्य आहे. यावरून दंडीने हे नाटक लिहिले असले पाहिजे, असे पिशेल आणि मॅकडोनेल या दोन पाश्चात्य पंडितांनी मानले आहे. पण हे मत फारसे समाधानकारक वाटत नाही. कारण दंडी जर या नाटकाचा कर्ता असेल, तर त्याने आपले नाव त्यावर का घालू नये, ते समजत नाही. शिवाय दंडी राजा नव्हता.

काही पंडितांनी स्कंदपुराणाच्या आधारे, आंध्रभृत्य वंशाचा संस्थापक शिमुक व शूद्रक एकच होत, असे म्हटले आहे.

पं. चंद्रबली पांडे यांनी शूद्रक म्हणजे वासिष्ठीपुत्र पुलुमावी होय, असे मानले आहे. अवंतिसुंदरीकथासार या ग्रंथात इंद्राणिगुप्ताचे दुसरे नाव शूद्रक असे दिले आहे. वासिष्ठीपुत्र पुलुमावी हाच इंद्राणिगुप्त आहे. म्हणून पुलुमावी हाच शूद्रक आहे, असे प्रतिपादन त्यांनी केले आहे. हाच शूद्रक मृच्छकटिकाचा कर्ता आहे. शूद्रक हे पुलुमावीचे उपनाम आहे. पण हे मतही सर्वमान्य झालेले नाही.

या सर्व मतमतांतरावरून मृच्छकटिक नाटकाचा कर्ता कोण, हे निर्णायक रीत्या सिद्ध होत नाही. पण जो कोण या नाटकाचा कर्ता असेल, तो दक्षिण भारतात राहणारा दिसतो. कारण या नाटकात कर्नाटककलहप्रयोग आणि द. भारतात राहणाऱ्या द्रविड, चोळ वगैरे लोकांचा उल्लेख केलेला आहे. हा कर्ता मोठा विद्वान दिसतो. संस्कृताबरोबरच त्याला प्राकृत भाषांचेही चांगले ज्ञान होते. या नाटकात त्याने जेवढ्या भाषांचा प्रयोग केला आहे, तेवढा दुसऱ्या कोणत्याही नाटकात आढळत नाही. छंद व अलंकार यांचाही तो पंडित होता. ज्योतिष व धर्मशास्त्र या शास्त्रांचाही तो चांगला जाणकार होता. तो शिवाचा भक्त होता व योगाभ्यासीही होता.

मृच्छकटिक नाटकाची रचना सनपूर्व २०० ते इ. स. ७०० एवढ्या कालखंडात केव्हातरी झाली असावी.

नाटक या दृष्टीने मृच्छकटिक हे एक श्रेष्ठ नाटक आहे. त्यातील कथा स्वतंत्र आहे. नाटकाचे नावही समर्पक आहे. कारण ज्या लहानशा प्रसंगावरून हे नाव देण्यात आले आहे, त्या प्रसंगाने नायक व नायिका यांच्या आयुष्यावर फार मोठे गंडांतर आणले होते. नाटकात चारुदत्त–वसंतसेना आणि आर्यक-

पातक या दोन कथानकांचा समन्वय साधण्यात नाटककाराची कल्पकता व्यक्त होते. आर्यकाने केलेली राज्यक्रांती त्याने नाटकाच्या कथानकात बेमालूम बसवून टाकली आहे. सुरवातीपासून शेवटपर्यंत वाचकाचे चित्त नाटकात गुंतून राहील इतके ते मनोवेधक बनले आहे. नाटकात प्रसंगांची विविधता असून, त्यातील विनोदही अभिजात आहे. यातील पात्रे व्यक्तिवैचित्र्य दर्शविणारी आहेत. त्यात सच्छील ब्राह्मणापासून वधस्थानावरील घातकापर्यंत सर्व प्रकारची माणसे आहेत. चारुदत्त हा ब्राह्मण असून, व्यापारी आहे. वसंतसेना गणिका असून, एकनिष्ठ आहे आणि शर्विलक ब्राह्मण असून, चोरी करणारा आहे. शकार हे पात्र तर फारच वैशिष्टयपूर्ण आहे. मूर्खपणा व कावेबाजपणा, अज्ञान आणि गर्व, क्रूरपणा आणि लोभ या सर्वांचा तो मूर्तिमंत अवतार आहे. त्याच्या मूर्खपणातून व अज्ञानातून तो विनोद निर्माण करतो. पण त्याच्या इतर अवगुणांमुळे तो एक भयंकर खलपुरुष बनला आहे.

मृच्छकटिक हे दहा अंकी प्रकरण आहे. त्यातील संवाद सहजसुंदर असून, त्यात सांकेतिकता व पांडित्यप्रदर्शन यांचा अभाव आहे. तसेच त्यातील प्रसंग वास्तव व जिवंत वाटतात.

कवी म्हणूनही शूद्रक हा कालिदास व भवभूती यांच्या तोडीचा आहे. त्याचा पुढील श्लोक त्याची काव्यप्रतिभा दाखवायला पुरेसा आहे–

उदयति हि शशाङ्कः कामिनीगण्डपाण्डुः
ग्रहगणपरिवारो राजमार्गप्रदीपः ।
तिमिरनिकरमध्ये रश्मयो यस्य गौराः
स्रुतजल इव पङ्के क्षीरधाराः पतन्ति ॥

अर्थ – कामिनीच्या कपोलाप्रमाणे पांढरा, ग्रहगणाने वेढलेला आणि राजमार्गावरील दीप असा चंद्र उगवला आहे. घन अंधारात पांढरे किरण, वाळून गेलेल्या चिखलात दुधाच्या धारा बरसाव्या, तसे पडत आहेत.

या नाटकात जी सुभाषिते आढळतात, त्यांतली काही पुढीलप्रमाणे–

अल्पक्लेशं मरणं दारिद्र्यमनन्तकं दुःखम् ।

अर्थ – मरणात दुःख थोडे असते. तर दारिद्र्यातील दुःख न संपणारे असते.

आलाने गृह्यते हस्ती वाजी वल्गासु गृह्यते ।
हृदये गृह्यते नारी यदीदं नास्ति गम्यताम् ॥

अर्थ – हत्तीला खांबाला बांधून, घोड्याला लगाम घालून आणि स्त्रीला प्रेमाने बांधून वश करता येते. ही साधने जर आपल्याजवळ नसतील, तर तो नादच सोडावा.

पुरुषेषु न्यासाः निक्षिप्यन्ते न पुनर्गेहेषु ।

अर्थ – ठेव ठेवायची, ती माणसांच्या विश्वासावर, घरांच्या बळकटपणावर नव्हे.

साहसे श्रीः प्रतिवसति ।

अर्थ – साहसात संपत्ती वास करते.

या नाटकात तत्कालीन हिंदू समाजाचे त्यातील गुणदोषांसह वास्तव चित्र शूद्रकाने रेखाटले आहे. [सं. ना. सौं.; सं. सा. सो. इ.; मृच्छकटिकम्–संपा. रामानुज ओझा, १९५४.]

## शून्य

(१) शून्य शब्दाचा अर्थ अभाव किंवा काही नाही, असा आहे. तत्त्वज्ञानात्मक व आध्यात्मिक साहित्यात शून्य शब्दाचा प्रयोग प्राचीन कालापासून होत आला आहे. भिन्न भिन्न साधनापंथांत हा शब्द भिन्न भिन्न भावांचा द्योतक आहे.

वैदिक परंपरेत शून्य शब्द परमतत्त्वाचा निदर्शक मानलेला आहे. महाभारतात विष्णूची सहस्र नामे सांगताना भीष्माने त्याचे एक नाव शून्य असे दिले आहे. त्याच्यावर टीका लिहिताना शंकराचार्यांनी सर्व विशेषणे, गुण व प्रकृती यांनी रहित असल्यामुळे तो शून्यवत आहे, असे म्हटले आहे.

बौद्ध, सिद्ध, निरंजन व नाथयोगी यांनीही शून्य शब्दाचा प्रयोग केला आहे. वज्रयानी साहित्यात शून्य, अतिशून्य, महाशून्य व सर्वशून्य अशी चार प्रकारची शून्ये मानली आहेत. पहिल्या शून्याचा अर्थ प्रज्ञा, दुसऱ्याचा वज्र, तिसऱ्याचा प्रज्ञोपाय युगनद्ध व चौथ्याचा सर्वशून्य असा आहे. यांचेच वर्णन कान्हपाने आपल्या दोहाकोषात शून्य कमळाच्या चार पाकळ्या असे केले आहे.

चार शून्यांची ही कल्पना हिंदूंच्या हठयोग-पद्धतीतही स्वीकारलेली आहे. पण त्यांनी शून्य, अतिशून्य व महाशून्य ही तीन प्रकारच्या शब्दांची विशेषणे मानलेली आहेत. साधनेच्या प्रारंभिक अवस्थेत हृदाकाशात जो शब्द उत्पन्न होतो, त्याला शून्य असे नाव आहे. या अवस्थेत ब्रह्मग्रंथीचे छेदन होते. दुसरी अवस्था ही घटावस्था असून, तिच्यात जालंधरबंधद्वारा विष्णुग्रंथीचे छेदन होते. या वेळी विशुद्धाकाशात कंठस्थानी अतिशून्य शब्द उत्पन्न होतो. तिसऱ्या परिचय अवस्थेत भ्रूमध्याकाशात महाशून्य शब्दाची उत्पत्ती होते.

याच चार शून्यांच्या आधारावर दादूने कायाशून्य, आत्मशून्य व परमशून्य यांची कल्पना केली आहे.

वज्रयानी तंत्रांत सर्व बौद्ध देवता या शून्याचे व्यक्त रूप मानलेल्या आहेत. तसेच शून्य हे नाना रूपे घेऊन लोककल्याणाचे कार्य करते, असेही म्हटलेले आहे.

सहजयानी सिद्धांनी परतत्त्व, परम सुख किंवा महासुख या अर्थी शून्य शब्द योजला आहे.

गोरखनाथी-बानीत शून्य शब्दाचे विवरण केले आहे, ते असे—

बस्ती न सुन्यं सुन्यं न बस्ती अगम अगोचर ऐसा।
गगन सिखर महि बालक बोलै ताका नाव धरहुगे कैसा।।

भावार्थ — परम तत्त्वापर्यंत कोणीच पोचू शकत नाही. कारण ते अगम्य आहे. आपण त्याला बस्ती म्हणू शकत नाही किंवा शून्यही म्हणू शकत नाही. ते काही आहे किंवा काही नाही, असेही म्हणू शकत नाही. ते भाव किंवा अभाव या दोहोंच्या पलिकडचे आहे. ते आकाशमंडलातून बोलणारे बालक आहे. त्याला नाव कसे देता येईल ?

हिंदीभाषिक संतांनीही शून्य शब्दाचा उपयोग केला आहे. ब्रह्म किंवा निर्गुण सर्वात्मा या अर्थाने त्यांनी शून्य शब्द योजला आहे. त्याचबरोबर ह्याच अर्थ प्रगट करण्यासाठी त्यांनी सहस्र-दल कमल, सुन्न गढ, सुन्न महल, सुन्न मंडल, सुन्न बस्ती, सुन्न सरोवर, इ. शब्दांचा प्रयोग केला आहे. कविराने या शून्य-मंडलात प्रवेश करण्याची इच्छा धरली आहे. तिथे अनाहत नादाचे मधुर संगीत ऐकू येते, रोम-रोम प्रकाशित होतो आणि परमात्म्याचे दर्शन होते, असे त्याने म्हटले आहे.

धर्मदासाने सुन्न महालातून अमृताची बरसात होते, असे सांगून संतांना त्यात स्नान करण्याचा उपदेश केला आहे.

दादू, नानक, मलूक, रैदास, दयाबाई, सहजोबाई, इ. संतांनीही परब्रह्मासाठी शून्य शब्द योजला आहे. तसेच कर्नाटकातील शिवशरणांच्या वचनांत, परमात्म्याचे स्वरूप विशद करताना शून्य शब्दाचा उपयोग अनेकदा केला आहे.

बौद्धांच्या मते शून्य शब्दाचा अर्थ रिते, पोकळ असा आहे. आणि ते शून्य, निर्वाणानंतर जीवाला जी अवस्था प्राप्त होते, तिचे सूचक आहे असे म्हटले आहे. अस्तित्वही नाही, नास्तित्वही नाही, दोघांचे मिश्रणही नाही किंवा अस्ति-नास्ति चा अभावही नाही, अशी ही अवस्था आहे.

वज्रयान पंथात शून्य हेच करुणात्मक दैवत बनते आणि मानवांना सुखसमृद्धी देते.

विज्ञानवादी बौद्धांनी शून्याला तथतारूप मानले आहे. बौद्ध सिद्धांनी आपल्या प्रज्ञोपाय योगप्रणालीत या शून्याला नैरात्मा बालिका, प्रज्ञा किंवा महामुद्रा या रूपात स्वीकारले आहे आणि महासुख चक्रात त्याचे अस्तित्व मानले आहे.

माध्यमिक बौद्धांनी शून्य हे परमार्थ सत्य मानले आहे. पाहा—माध्यमिक, वज्रयान, सहजयान. [सि. सा.; इं. बु. इ.; हिं. क. भ. तु. अ.; म. सा. अ.; हिं. सा. को.]

(२) एक संख्या. गणितातील शून्याची कल्पना ह्या प्राचीन भारतीयांचा फार मोठा शोध आहे. शून्यकल्पनेने गणितशास्त्रात नवे युग निर्माण झाले. पाहा—अंकगणित.

**शून्यपुराण** प. बंगालमधील धर्मठाकूर व त्याचा संप्रदाय यांची माहिती सांगणारे एक प्रादेशिक पुराण. हे पुराण जुन्या बंगाली भाषेत असून, तीन खंडात विभागलेले आहे. पुराणाच्या शेवटी गाजन-गीते दिली आहेत. धर्मठाकुराच्या पूजेत या गीतांना फार महत्त्वाचे स्थान असते. पाहा—रामाई पंडित. [बं. सा. सं. इ.]

**शून्यवाद** माध्यमिक या बौद्ध दार्शनिक संप्रदायाने शून्य हे परमार्थ सत्य मानले आहे. म्हणून त्या संप्रदायाला शून्यवाद असेही म्हणतात. शून्यवादाचा सिद्धान्त प्रज्ञापारमिता, रत्नकरंड, इ. प्राचीन सूत्रांत सांगितलेला आहे. पण नागार्जुन, आर्यदेव, भव्य, इ. आचार्यांनी तर्क आणि प्रमाणे यांच्या द्वारे शून्यवादाच्या सिद्धान्ताचा खूप विकास केला. पाहा—माध्यमिक.

**शूरसेन** लोक व जनपद. शूरसेनांचा उल्लेख वैदिक वाङ्मयात आढळत नाही, पण मनुस्मृतीमध्ये तो अनेकवार आला आहे. ब्रह्मर्षी देशामध्ये म्हणजे कुरु-पांचालांच्या प्रदेशात हे लोक राहत असल्याचे मनूने सांगितले आहे. ब्रह्मावर्तात राहणाऱ्या आर्य लोकांच्या खालोखाल शूरसेन लोकांचे सामाजिक स्थान होते. ते स्वतःला यदुवंशीय म्हणत.

रामायण व महाभारत या ग्रंथांमध्ये शूरसेनांचे उल्लेख पुष्कळ ठिकाणी आलेले आहेत. बौद्ध व जैन वाङ्मयातही त्यांचे नाव दिसते. शूरसेन लोक शौर्यधैर्यादी गुणांसाठी विशेष प्रसिद्ध होते. मनूने तर, शूरसेनांना लढाईत आघाडीवर ठेवावे, असे लिहून ठेवले आहे.

मथुरा ही त्यांची राजधानी होय. काहींच्या मते मथुरेत शूरसेन या नावाचा एक राजा झाला व तो कृष्णाचा आजा होता. कृष्णाला शूरसेनाचा वंशज समजतात, ते याचमुळे होय. महाभारतात शूरसेनांचे उल्लेख शाल्व, कुरुपांचाल, चेदी वगैरे जनपदांच्या किंवा देशांच्या अनुषंगाने येतात. शूरसेनांच्या अगदी जवळ राहणारे लोक म्हणजे मत्स्य होत.

सांप्रतचा आग्रा व मथुरा यांना वेष्टून असणारा प्रदेश हाच प्राचीन शूरसेन देश होय. वर्तमान माथुर ब्राह्मण व माथुर नामधारी उपजाती हे प्राचीन शूरसेनांचे अवशेष होत, असे काही विद्वान म्हणतात. [ट्रा. ए. इं.; मध्यदेश.]

**शूर्पारक** एक प्राचीन नगर. प्राचीन काळातील अपरान्त देशाचे शूर्पारक हे मुख्य नगर होते. हल्ली शूर्पारकाला सोपारा असे म्हणतात. ते गाव मुंबईच्या उत्तरेला वसईजवळ आहे. सोपाऱ्याजवळच तीन मैलांवर नाला नावाचे एक

गाव आहे. त्यामुळे त्याचा नालासोपारा असा जोड नावानेही उल्लेख करतात. पूर्वी शूर्पारक हे मोठे बंदर होते आणि इ. स. च्या १५ व्या शतकापर्यंत पश्चिमेकडील देशांशी या बंदरातूनच व्यापार चालत असे.

शूर्पारक व अपरान्त यांचा महाभारतात उल्लेख आहे—

ततः शूर्पारकं देशं सागरस्तस्य निर्ममे ।
सहसा जामदग्न्यस्य सोऽपरान्तमहीतलम् ।।
(म. भा. शांति. ४९.६७)

अर्थ— त्यानंतर सागराने परशुरामासाठी शूर्पारक देश निर्माण केला. हा देश अपरान्ताचा एक भाग होय.

सांप्रतच्या दमणगंगेपासून मुंबईपर्यंतच्या प्रदेशाला शूर्पारक असे नाव होते. या प्रदेशाचा आकार सुपासारखा आहे, म्हणून त्याला शूर्पारक हे नाव मिळाले, असे स्थानिक दंतकथा सांगते. सागरापासून परशुरामाने हा प्रदेश प्रथम मिळवला, पापनाशिनी वैतरणी परशुरामाने पाताळातून भूतलावर आणली, सोपाऱ्याजवळच्या चतुरंगण पर्वतावर परशुरामाचे स्थान होते, अर्नाळा किल्ल्यावरील रेणुकादेवीची स्थापना स्वतः परशुरामाने केली, अशाही काही दंतकथा स्थानिक लोक सांगतात.

गोकर्णाहून प्रभासाला जाताना अर्जुनाने इथे मुक्काम केला होता. इथल्या मुक्कामात त्याने जवळच असलेल्या एका बेटावरील जमदग्नीच्या वेदीचे आणि वैवस्वत, कुबेर, इंद्र, इ. देवतांच्या मंदिरांचे दर्शन घेतले आणि तो समुद्रमार्गे काठियावाडाकडे रवाना झाला, अशी कथा महाभारतात आलेली आहे.

बौद्ध वाङ्मयातही सोपाऱ्याचे अनेक उल्लेख आढळतात. शूर्पारक जातक या नावाचे एक जातक आहे. जातककथांत सोपाऱ्याचा उल्लेख सुपरगपट्टण या नावाने केलेला असून, त्याच्या भोवतालच्या भागाला सूपलक्षित समुद्रप्रदेश म्हटलेले आहे. पूर्ण नामक एका पुरुषाने या भागात बौद्ध धर्माचा प्रसार केला. पूर्ण हा इथल्या एका धनाढ्य व्यापाऱ्याचा दासीपुत्र होता. तो एकदा काशीच्या व्यापाऱ्यांच्या संगतीत समुद्रपर्यटण करीत असताना बुद्धाची पवित्र वचने त्याच्या कानी आली. त्यांनी प्रभावित होऊन तो काशीला गेला व त्याने गौतम बुद्धाकडून बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. तिथून तो धर्मप्रसारासाठी आपल्या गावी परतला. त्याने बौद्ध धर्माचा बराच प्रसार केला. मग त्याच्या सन्मानार्थ सोपाऱ्याच्या व्यापाऱ्यांनी एक उत्तुंग मंदिर उभारले. त्या वेळी बुद्ध स्वतः आकाशमार्गाने तिथे आला. त्याने पाचशे ब्राह्मणांना व पाचशे विधवांना बौद्ध धर्माची दीक्षा दिली. त्या विधवांना त्याने आपली नखे व केस दिले व त्यांच्यावर त्यांनी एक स्तूप उभारला. त्याला विधवांचा स्तूप असे म्हणतात. सोपाऱ्याभोवती वारंवार लुटालूट करणाऱ्या कृष्ण व गौतम या नागराजांनाही बुद्धाने बौद्ध धर्माची दीक्षा दिली.

हे एक जैनांचे क्षेत्र होते. इथे जैन मंदिरेही होती.

सम्राट अशोकाच्या कारकिर्दीत समुद्रमार्गे मध्यपूर्वेशी होणारा व्यापार खूपच भरभराटीला आला होता. त्या वेळी शूर्पारक बंदरातून मुख्यत्वे सोने, हस्तिदंत, मसाल्याचे पदार्थ, कापूस, कमावलेले कातडे, रत्ने या वस्तूंची निर्यात होत होती. व्यापाराच्या ओघावरोवर वाहत येणारी संपत्ती या बंदरात एवढी साचली, की हा भाग सुवर्णभूमी म्हणून ओळखला जाऊ लागला. बायबलात उल्लेख असलेले ओफीर-सोफीर हे सुवर्णसंपन्न शहर शूर्पारकच होय असे म्हणतात. सुमारे दीड हजार वर्षे या बंदरातून अव्याहत व्यापार चालू होता.

इ. स. १८८२ मध्ये पं. भगवानलाल इंद्रजी यांनी इथल्या एका स्तूपाचे उत्खनन केले, तेव्हा त्यांना एका सोन्याच्या करंडकात मृत्तिकापात्राचे तुकडे मिळाले. हे तुकडे गौतम बुद्धाच्या भिक्षापात्राचे असावे, असा अंदाज आहे. इथे प्रस्तर, ताम्र, रजत, स्फटिक व सुवर्ण यांची पात्रे एकात दुसरे अशी ठेवलेली सापडली. ताम्रपात्रात बुद्धाच्या वेगवेगळ्या अवस्थांतील तांब्याच्या आठ मूर्ती, रजतपात्रात सुवर्णपुष्पे व यज्ञश्री सातकर्णीची एक अद्वितीय रजतमुद्रा, सुवर्णपात्रात हिरकणी, पाचू ही रत्ने व मृत्तिकापात्राचे अवशेष अशा वस्तू सापडल्या आहेत. तसेच, अशोकाच्या चौदा शिलाशासनांपैकी सहाव्या शिलाशासनाचा भग्नांश इथे सापडला आहे.

पेरिप्लस आणि टॉलेमीच्या ग्रंथात शूर्पारकाचे सुप्पारक, सौपर व सोपारग या नावांनी उल्लेख आले आहेत. [वि. स्मृ. ग्रं.; गो. ब्रा. इ.; उ. कों. प्रा. इ.; सह्याद्रि; श्री. जोजफ नरोन्हा, महाराष्ट्र टाइम्स, १४ जून १९६४]

## शूलगव

रुद्राच्या प्रसन्नतेसाठी करायचा एक याग. हा याग औपासनाग्नीवर करतात. सात पाक संस्थांमध्ये याचा समावेश आहे.

शूल म्हणजे त्रिशूळ. तो धारण करणारा शूली म्हणजे रुद्र होय. त्याला उद्देशून या यागात सात बैलांचा बळी द्यायचा असतो. बौधायनाच्या मते बैल न मिळाल्यास मेष किंवा अज यांचा बळी द्यायला हरकत नाही. बैल मिळाला तरीदेखील त्याच्या मांसाच्या भक्षणाला विरोध असल्यामुळे, त्याच्या ऐवजी बकऱ्याचाच बळी देत. हल्ली हा यज्ञ मुळीच प्रचारात नाही.

शूलगव याग केव्हा करावा, यासंबंधी सूत्रकारांत बरेच मतभेद आहेत. आश्वलायन गृह्यसूत्राच्या मते (४.९.२) शरद किंवा वसंत ऋतूत आर्द्रा नक्षत्रावर हा याग करावा; तर बौधायन सूत्रानुसार (२.७.१.३) प्रतिवर्षी मार्गशीर्ष पौर्णिमेला किंवा

त्या महिन्यातील आर्द्रा नक्षत्रावर अथवा गुरांना रोग झाला असता हा याग करावा, असे आहे. काही आचार्यांच्या मते शूलगव केव्हाही केला तरी चालतो.

मानव गृह्यसूत्रात या यागाचा तपशील पुढीलप्रमाणे दिला आहे–गावापासून दूर ईशान्येला हा याग करावा. बैलांच्या मध्ये सपर्ण यूप पुरावा. अग्निस्विष्टकृताला शेवटची आहुती देण्यापूर्वी आठ द्रोण रक्ताने भरून आठ दिशांना ते अर्पण करावे. त्या वेळी 'नमस्ते रुद्र मन्यवे' इ. आठ अनुवाक म्हणावे. न शिजवलेला बळी गावात आणू नये. अवशिष्ट पशू पुरून टाकावा.

बौधायन व आश्वलायन गृह्यसूत्रकारांच्या मते आणखी तपशील असा–गाय मारून तिच्या अंगांचा याग करावा. यज्ञीय पशूचे संज्ञपन केल्यावर त्याची वपा व इतर अंगे काढून ती सुळाला टोचून अग्नीवर भाजावी. भाजलेल्या वपेच्या आणि अंगाच्या प्रधान देवतेसाठी आहुती द्याव्या. मुख्य होमापूर्वी रुद्र या प्रधान देवतेचे आवाहन व पूजन करावे. अवशिष्ट हवीचे चार पिंड करून चार दिशांना प्रधान देवतेसाठी बलिदान करावे. दिशांचे उपस्थान करावे. पशूचा उरलेला भाग अग्नीत जाळून टाकावा आणि घरी आल्यावर स्थालीपाक करावा. प्रत्यक्ष पशुयागाच्या ऐवजी ईशान देवतेसाठी चरूचा बली द्यावा, असाही विकल्प बौधायनाने सांगितला आहे.

आपस्तंब गृह्यसूत्रात, ईशानासाठी चरूचाच बली द्यावा, असे म्हटले आहे (१९.१३). स्थालीपाकानुसार चरू शिजवायचा असतो. त्या कृत्यासाठी दोन लहान कुटी म्हणजे मंडप करतात. एका कुटीत ईशान आणि दुसऱ्या कुटीत मीढुषी यांचे आवाहन करतात. आणि दोन कुटींच्या मध्ये जयंताचे आवाहन करतात. तीन पात्रांत चरूचे उद्वासन करून तो प्रत्येक देवतेला अर्पण करतात. मग त्यातील चरूने प्रधानहोम करतात. स्विष्टकृतादी अग्निमुखाचा विधी झाल्यावर तीन पानांचा एक मुढा करतात. शिल्लक राहिलेल्या भाताचा पिंड करून तो त्या मुढयात बांधतात. तो मुढा घरापासून दूर एका झाडाला टांगून ठेवतात. या वेळी रुद्राचे उपस्थान करतात. घरी परतल्यावर क्षेत्रपती देवतेसाठी पुन्हा स्थालीपाक करतात. क्षेत्रपतीला आहुती देऊन उरलेल्या चरूचे घरातील सर्वांनी भक्षण करायचे असते.

शूलगव याग श्रौताग्नीवर करता येतो, असे एक मत आहे.

शूलगवाला ईशानबली असेही म्हणतात. शूलगवकर्म चैत्रात करायचे असल्याने काही ठिकाणी त्याला चैत्री असेही म्हटले आहे.

रुद्र–शिव हा पशुपती असल्यामुळे काही अभ्यासकांच्या मते पोळा या सणाचे मूळ या यागात असावे. पाहा– ईशानबली, पोळा. [ हि. ध.; इं. वे. क. सू.; अ. पा. ]

**शूलपाणी** (इ. स. १३७५–१४६०) बंगालमधील एक धर्मशास्त्रकार. सेनवंशीय बल्लाळ राजाच्या वेळी उदयास आलेल्या राधियांतील साहुदियाल नामक पोटजातीतील हा बंगाली ब्राह्मण. रघुनंदन याला महामहोपाध्याय असे म्हणतो. हा लक्ष्मणसेनाच्या दरबारी न्यायाधीश असावा. याने याज्ञवल्क्यस्मृतीवर दीपकलिका नावाची टीका लिहिली असून, स्मृतिविवेक, तिथिविवेक, दत्तकविवेक, इ. विवेकपदान्त चौदा शास्त्रग्रंथ लिहिले आहेत. आजही याचे ग्रंथ बंगालमध्ये प्रमाणभूत समजले जातात. [ मु. वि. को.; आ. सं. मू. ]

**शूलप्रदान व्रत** एक तिथिव्रत. व्रतावधी एक वर्ष. दर अमावास्येला उपवास करणे हा या व्रताचा विधी होय. उद्यापनाच्या वेळी पिठाचा केलेला एक भाला आणि सोन्याचे अथवा चांदीचे कमळ शिवाला अर्पण करून दान द्यायचे असते. व्रत करणाऱ्याने अहिंसा, ब्रह्मचर्य, भूमीशयन, इ. नियम पाळायचे असतात. फल-दीर्घायुरारोग्यप्राप्ती. [ हि. ध. ]

**शूलिक** एक प्राचीन जात. उशनसाच्या मते ब्राह्मण पुरुष व शूद्र स्त्री यांची ही विवाहबाह्य संतती होय. गुन्हेगारांना सुळावर चढविणे, हा त्यांचा व्यवसाय होता. वैखानस म्हणतो की, क्षत्रिय पुरुष आणि शूद्र स्त्री यांची ही विवाहबाह्य संतती आहे. [ हि. ध. ]

**शूलिनी दुर्गा** एक शाक्त देवता. ही सिंहासनस्थ असून, त्रिलोचना व अष्टभुजा आहे. शूल, बाण, खड्ग, चक्र, दर, गदा, धनुष्य व पाश ही आयुधे तिच्या हातां आहेत. हातांत ढाल-तलवार घेतलेल्या चार मुली हिच्या भोवती असतात. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**शृंखला** लोखंडाच्या किंवा अन्य धातूंच्या कड्या एकात एक गुंतवून केलेली माळ. मूर्तिकलेत कित्येक देवतांच्या हाती शृंखला दिलेली असते. शृंखलेला जेव्हा वज्र जोडलेले असते, तेव्हा तिला वज्रशृंखला असे म्हणतात.

**शृंगार** एक रस. याला रसराज अशी पदवी आहे. शृंगार हा परस्परानुरक्त अशा स्त्री–पुरुषांवर आधारून असतो. त्याच्या काही व्याख्या अशा–

(१) स्त्रीपुंसयोर्मिथो रागवृद्धि: शृङ्गार उच्यते ।

अर्थ– स्त्री-पुरुषांची परस्पर अनुरागवृद्धी म्हणजे शृंगार होय, असे म्हणतात.

(२) पुंसः स्त्रियां स्त्रियाः पुंसि संयोगं प्रति या स्पृहा ।
स शृङ्गार इति ख्यातो रतिक्रीडादिकारणम् ॥

अर्थ– स्त्री-पुरुषांची परस्पर संयोगाविषयी जी इच्छा, तिला शृंगार असे म्हणतात. तो रतिक्रीडा इत्यादी गोष्टींचे कारण असतो.

(३) शृङ्गं हि मन्मथोद्भेदस्तदागमनहेतुकः ।
पुरुषप्रमदाभूमिः शृङ्गार इति गीयते ॥

अर्थ–शृंग म्हणजे मदनाचा उद्‌भव होय. त्याच्या आगमनाला हेतू असणारा आणि स्त्रीपुरुष यांच्यावर आधारून असणारा तो शृंगार असे म्हटले जाते.

रती हा शृंगाराचा स्थायीभाव होय. रतीचे भोजकृत लक्षण असे– 'मनोनुकूलेष्वर्थेषु सुखसंवेदनं रतिः ' (=मनाला अनुकूल अशा विषयांच्या ठिकाणी सुखाची संवेदना होणे म्हणजे रती होय.) अन्य आचार्यांच्या मते स्त्री-पुरुषांची परस्पर नैसर्गिक आसक्ती म्हणजे रती होय. ही भावना या रसात आरंभापासून अंतापर्यंत प्रामुख्याने असते. हा रस परस्परांवर अनुरक्त झालेल्या दोन भिन्नलिंगी व्यक्तींवर आधारून राहतो, म्हणून त्या व्यक्ती या रसाचे आलंबन विभाव होत. पिठोरी चांदणे, वसंत ऋतूचे आगमन, सानुराग संभाषण, कामक्रीडेची चित्रे, आकर्षक वेषभूषा, प्रेमगीतांचे श्रवण, एकांत, इ. गोष्टींनी रतीचे उद्दीपन होते, म्हणून त्यांना विभाव म्हणतात. कामाचे उद्दीपन झाल्यावर भुवया आकुंचित करणे, कटाक्ष फेकणे, आलिंगन देणे, इ. ज्या गोष्टी घडतात, ते या रसाचे अनुभाव होत. हास्य उत्पन्न होणे, लाज वाटणे, शरीर गळल्यासारखे होणे, कंटाळा किंवा आळस येणे हे या रसाचे व्यभिचारी भाव होत.

शृंगाररसाच्या या प्रक्रियेच्या स्पष्टीकरणासाठी दुष्यंत-शकुंतलेची कथा उदाहरण म्हणून घेता येईल –

दुष्यंत आणि शकुंतला या जोडप्यामुळे शृंगाररस निर्माण झाला, म्हणून त्यांना आलंबन विभाव असे समजावे. दुष्यंताने शकुंतलेचे लोकोत्तर सौंदर्य पाहणे, शकुंतलेलाही दुष्यंत मदनासारखा भासणे, त्या दोघांचे साभिप्राय संभाषण, दुष्यंताचे आश्रमात आगमन, कण्व ऋषी आश्रमात नसल्यामुळे तिथे असलेला एकांत, इ. प्रकारांमुळे त्यांची परस्परांवरची आसक्ती प्रबल झाली, म्हणून त्या प्रकारांना उद्दीपन विभाव असे समजावे. त्यानंतर शकुंतलेने व्यक्त केलेली लज्जा, दुष्यंताचे धाष्टर्य, उभयतांचा विवाह होऊन नंतर झालेला संयोग, या गोष्टी अनुभाव या सदरात येतात. या सर्व प्रकारांच्या वेळी कण्व ऋषींबद्दल दोघांनाही वाटणारे भय हा त्या ठिकाणी व्यभिचारी भाव समजावा.

शृंगाररसाचे संभोग व विप्रलंभ असे दोन प्रकार आहेत. परस्परानुकूल कामिजनांचे रतियुक्त दर्शन, स्पर्शन, आलिंगन, इ. व्यापार यांना संभोग ही संज्ञा आहे. वर दिलेले दुष्यंत-शकुंतलेचे उदाहरण संभोग शृंगाराचे आहे. कामिजनांचे रत्यात्मक व्यापार अनंत असल्याने संभोग शृंगार अनंत प्रकारचा आहे. या प्रकाराचे अमरुशतकातले (३६) एक उदाहरण असे–

सन्दष्टेऽधरपल्लवे सचकितं हस्ताग्रमाधुन्वती
मा मा मुञ्च शठेति कोपवचनैरानर्तितभ्रूलता ।
सीत्काराञ्चितलोचना सरभसं यैश्चुम्बिता मानिनी
प्राप्तं तैरमृतं श्रमाय मथितो मूढैः सुरैः सागरः ॥

अर्थ – जी नायिका प्रियकराने अधरदंश केला असता हस्तविक्षेप करते आणि विस्मित होऊन ' हे शठा, जा दूर हो ' असे (कृतक) कोपाने बोलते, रागाने आपल्या भुवया चढवते, दंशाच्या वेदनांनी जी चीत्कार करते व डोळे मिटून घेते अशा मानिनी स्त्रीचे जे चुंबन घेतात, त्यांना (अधर) सुधेची (सहजपणे) प्राप्ती होते. देव खरे म्हणजे मूढ आहेत. त्यांनी अमृतासाठी वृथाच क्षीरसागराच्या मंथनाचा खटाटोप केला.

जिथे प्रेमी युगुल परस्परानुरक्त असूनदेखील कोणत्यातरी अडचणीमुळे किंवा पारतंत्र्यामुळे त्यांचा समागम होऊ शकत नाही, अशा अवस्थेला विप्रलंभावस्था म्हणतात. कालिदासाचे मेघदूत हे विप्रलंभ शृंगाराचे उत्कृष्ट उदाहरण आहे. त्यात एक यक्ष कुबेराच्या शापाने रामगिरीवर येऊन पडतो. त्याला आपल्या प्रियतमेची अहोरात्र आठवण होते. त्याची प्रियतमाही अलका नगरीत त्याच्यासाठी झुरत असते. कालिदासाने मेघदूतात त्या दोघांचीही विप्रलंभावस्था सरस, हृदयंगम केली आहे.

शृंगाराचे असे दोन भेद करणे सोयीसाठी योग्य असले, तरी वस्तुतः त्यात भेद करता येत नाही. कारण संभोगावस्थेतही सूक्ष्मपणे विप्रलंभाची भावना जागृत असते आणि विप्रलंभावस्थेतही संभोगाचे मनाने अनुसंधान होते. या गोष्टी अनुभवसिद्ध असल्यामुळे शृंगार हा नेहमी उभयसंवलितच असतो. या दोन्ही अवस्थांचे एकत्र वर्णन अमरुशतकातल्या (२३) पुढील श्लोकात केले आहे–

एकस्मिञ्शयने पराङ्मुखतया वीतोत्तरं ताम्यतो–
रन्योन्यं हृदयस्थितेऽप्यनुनये संरक्षतोर्गौरवम् ।
दम्पत्योः शनकैरपाङ्गवलनान्मिश्रीभवच्चक्षुषो–
र्भग्नो मानकलिः सहासरभसं व्यावृत्तकण्ठग्रहः ॥

अर्थ – प्रियकर-प्रेयसी एकाच शय्येवर पण एकमेकांकडे पाठ करून झोपली होती. ती एकमेकांशी बोलतही नव्हती. चित्तात जरी अनुनय करण्याची इच्छा असली तरी दोघेही मानीपणा धरून राहिली होती. पण ती अवस्था फार वेळ टिकली नाही. त्या प्रेमिकांचे डोळे अपांगदृष्टीने एकमेकांना भिडले. हळूहळ

मानीपणा गळून पडला आणि मग त्या दोघांनी हास्ययुक्त अशी एकमेकांच्या गळां दृढ मिठी घातली.

शृंगाररसाचे आलंबन विभाव म्हणजे नायक व नायिका ही दोघे होत. त्यांतही विशेषत: नायिकेला प्राधान्य आहे. अभिनवगुप्ताने म्हटले आहे, की 'स्त्रीति नामापि मधुरम्' (=स्त्री हे नावच मुळी मधुर आहे). भरत म्हणतो, की 'सुखस्य हि स्त्रियो मूलम्' (=सर्व सुखाचे मूळ स्त्रीच आहे). ही शृंगाररस निर्माण करणारी स्त्री म्हणजेच नायिका होय. ती उत्तम प्रकृतीची असली पाहिजे, असे विश्वनाथ सांगतो (सा. द. १८३). शृंगारात नायक व नायिका उत्तम प्रकृतीची असायला हवी. दुष्यंत-शकुंतला, नल-दमयंती, मेघदूततले यक्ष-यक्षी ही तशी म्हणजे उत्तम प्रकृतीची होती. श्री. चिं रा. देवधर म्हणतात–उत्तमप्रकृती नायिका प्रियाला सापराध असला तरी कटू वचनाने दुखवीत नाही. तिचा कोप दीर्घ नसतो. ती दोषांवर पांघरूण घालते. आपले आभिजात्य, सौंदर्य व धन यांनी नायकाला आकृष्ट करते. रतिचातुर्य, युक्तायुक्त विचार, प्राप्तकाल व प्राप्तदेश यांची जाणीव व ईर्ष्याभाव, इ. गुणांनी ती शोभते. कारणाशिवाय तिला कोप येत नाही. मध्यमा स्वत:च नायकाकडे जाते. ती मानी, ईर्ष्यायुक्त व कोपशील असली तरी, तिचे सांत्वन करणे कठीण नसते. अधमा मात्र अकारण कोपणारी, प्रतिकूल, कजाग व परुष असते.

नायकाचेही असेच भेद आहेत. शृंगाराला अनुकूल असणारा नायक धीरोद्धत, धीरललित, धीरोदात्त व धीरप्रशांत असावा, असे भरत म्हणतो. रुद्रटाने आपल्या शृंगारतिलकात नायकाचे सर्वमान्य अनुकूल, दक्षिण, शठ व धृष्ट असे चार प्रकार सांगितले आहेत. भोजदेवाने गुण, प्रकृती, प्रवृत्ती व परिग्रह या नायकांच्या चार विभाजक उपाधी कल्पिल्या आहेत. गुणांमुळे नायक उत्तम, मध्यम, किंवा अधम या प्रकारचा असतो; प्रकृतीने सात्त्विक, राजस किंवा तामस असतो; प्रवृत्तीने अनुकूल, दक्षिण, शठ व धृष्ट असतो आणि परिग्रहाने (स्त्रियांच्या संख्येने) असाधारण (एकच पत्नी असलेला) व साधारण (अनेक स्त्रिया असलेला) अशा प्रकारचा असतो, असे भोजदेवाने वर्णिले आहे (सरस्वतीकंठाभरण ५.१०७–१०९ व ५८९–५९२).

शृंगाराचा कामाशी निकटतम संबंध असल्यामुळे त्या रसाला मानसशास्त्रीय महत्त्व प्राप्त झाले आहे. आधुनिक मानसशास्त्र कामाला जीवनाची मूलभूत प्रवृत्ती मानते. प्रख्यात मानसशास्त्रज्ञ फ्राईड हा कामप्रवृत्ती जन्मजात मानतो आणि सभ्यता संस्कृती, कला, इ. ठिकाणी तिचीच परिष्कृत अभिव्यक्ती होते, असे सांगतो. 'कामस्तदग्रे समवर्ततताधि' (=सर्वांत आधी काम निर्माण झाला), असे ऋग्वेदातल्या नासदीय सूक्तातही म्हटले आहे. शृंगार हा जीवनाच्या या मूलभूत कामप्रवृत्तीचे नियमन करतो आणि भावसंतोष निर्माण करून माणसाला अनाचार व दुराचार यांच्यापासून बचावण्याची अदृश्यपणे योजना करतो. त्या दृष्टीने माणसाचे मानसिक संतुलन व सामंजस्य यासाठी शृंगाराचे अतीव महत्त्व आहे. कारण या रसाचा संबंध अशा एका भावधारेशी आहे, की जी अन्य अनेक आवेगांना आपल्यात समाविष्ट करून राहिली आहे. मात्र त्यांबाबत आनंदवर्धनाने ध्वन्यालोकात कवींना आणि लेखकांना एक इशारा देऊन ठेवला आहे की शृंगार हा समस्त संसारीजनांच्या अनुभवाचा विषय आहे आणि कमनीयतेच्या व हृदयंगमतेच्या दृष्टीने सर्वश्रेष्ठ आहे. म्हणूनच त्याच्या वर्णनात कवीला अत्यंत सावध राहिले पाहिजे.

विश्वसाहित्याचा फार मोठा भाग शृंगाररसाने भरलेला आहे. संसारातले जे जे काही पवित्र, उज्ज्वल व दर्शनीय असेल, ते ते शृंगाराच्या अभिषेकाने पुनीत होते, आस्वादनीय होते. [हिं. सा. को.; सु. का. शा.; अमरुशतकम्–चिं. रा. देवधर.]

**शृंगेरी** एक पुण्यक्षेत्र. हे ठिकाण कर्नाटकातल्या कडूर जिल्ह्यात आहे. कडूरपासून शृंगेरी ५५ मैलांवर आहे. गावाला लागूनच तुंगा नदी वाहते. तिचे पात्र बरेच विस्तृत आहे. नदीचे सान्निध्य आणि शंकराचार्यांचा मठ या दोन्ही गोष्टींमुळे या क्षेत्राला दुहेरी पावित्र्य लाभले आहे.

शृंगेरी हे नाव ऋषी व पर्वत या जोडनावातून आले आहे. शृंग म्हणजे ऋष्यशृंग होय. हा विभांडक ऋषीचा पुत्र. विभांडकाने याच क्षेत्रात तपश्चर्या केली. त्याच्या आश्रमाची भूमी शृंगेरीच्या पश्चिमेस सहा मैलांवर दाखवतात. दशरथाने पुत्रकामेष्टीसाठी शृंग ऋषीला येथूनच अयोध्येला नेले होते. गावाजवळच वराहगिरी नावाचा मोठा पर्वत आहे. तुंगा, भद्रा, वेत्रवती आणि वाराही अशा चार नद्या वराह पर्वतातूनच उगम पावल्या आहेत.

आद्य शंकराचार्यांनी येथे मठस्थापना केली, त्यामागची एक कथा सांगतात, ती अशी – एक बेडकी गर्भवती होती. ती पाण्यात राहण्याऐवजी जमिनीवर राहिली होती. एके दिवशी मध्याह्नीचा सूर्यताप तिला सहन होईना. तिच्या जवळच एक नाग होता. त्याला तिची दया आली. तो जवळ आला आणि त्याने तिच्यावर फणाछत्र धरले. योगायोगाने शंकराचार्यांनी हे दृश्य पाहिले. त्यांना मोठे नवल वाटले. साप आणि बेडूक म्हणजे भक्षक आणि भक्ष्य. पण त्या नागाची ती निर्वैर वृत्ती पाहून आचार्यांना तो स्थानमहिमा वाटला. ही जागाच निर्वैर असावी असे वाटून आचार्यांनी तिथे मठस्थापनेचा निर्णय घेतला.

आचार्यांनी स्थापलेल्या सर्व मठांत शृंगेरीचा मठ हा पहिला होय. हा मठ तुंगेच्या घाटाला लागूनच आहे. तो एक प्रशस्त

बाहा आहे. मठात आचार्यांनी स्थापलेली श्रीचक्रयुक्त शारदांबेची मूर्ती आहे. त्याचबरोबर चंद्रमौलीश्वर व गणपतीही आहे. तिथल्या पीठस्थ आचार्यांच्या या नित्यपूजेतल्या मूर्ती होत. हा गणपती स्फटिक आणि माणिक मिळून बनलेला असल्यामुळे त्याला रत्नगर्भ असे नाव मिळाले. ही मूर्ती शंकराचार्यांनी आपले शिष्य सुरेश्वराचार्य यांना दिली होती, असे सांगतात.

शृंगेरीच्या पीठावर शंकराचार्यांनी बसवलेले पहिले आचार्य म्हणजे सुरेश्वराचार्य होत. त्यांच्यापासून आजतागायत जे आचार्य शृंगेरीच्या पीठावर बसले, त्या सर्वांच्या समाध्या वाड्यातच आहेत. दक्षिणेतल्या कित्येक राज्यांनी या मठातल्या पूजेअर्चेसाठी ग्रामदाने दिली आहेत. त्यामुळे मठाचे वार्षिक उत्पन्न कित्येक लाखांचे आहे. याशिवाय भक्तमंडळीकडून जी दक्षिणा मिळते, ती वेगळीच. या उत्पन्नाच्या आधारावर मठाच्या वतीने एक अन्नछत्र चालविले जाते. तिथे येणाऱ्या यात्रेकरूंना एक वेळचे जेवण तिथे मोफत मिळते. मठातर्फे एक संस्कृत विद्यालय चालविले जाते. त्याचे नाव संजीवनी पाठशाळा. तिथल्या आचार्यांना भारती ही उपाधी आहे. भारती संप्रदाय इथूनच प्रवर्तित झाला. एकाहून एक नामांकित विद्वान पुरुष संन्यास घेऊन या पीठावर आरूढ झाले.

इ. स. च्या १४ व्या शतकात पूर्णयोगी, सच्चरित्र आणि वेदान्तपारंगत असे विद्याशंकर हे आचार्य तिथल्या पीठावर बसले. विद्यारण्यस्वामी हे त्यांचे उत्तराधिकारी होत. ते इ. स. १३६१ मध्ये पीठावर आरूढ झाले व इ. स. १३८६ मध्ये समाधिस्थ झाले.

या मठात अनेक ताम्रपट आहेत. त्यांवरून कळते, की इ. स. १३३६ मध्ये विजयनगरचे साम्राज्य प्रस्थापित झाले, त्यामागची प्रेरणा विद्यारण्यांचीच आहे. विजयनगरचा पहिला राजा हरिहर याने मठाला दिलेली जहागीर आजही त्याच्याकडे चालते. पेशवे या पीठाबद्दल विशेष आदरभाव दर्शवीत. म्हैसूरचा सुलतान हैदरअली व त्याचा मुलगा टिपू, हे दोघे मुस्लिम शासकही या मठाबद्दल आदर दाखवीत हे आश्चर्य आहे. या दोघांनी मठाला अनेक नजराणे दिलेले आहेत.

शृंगेरी गावात आचार्यांशी संबद्ध अशी १२० मंदिरे आहेत. त्यांपैकी शारदांबा व विद्याशंकर यांची दोन देवालये महत्त्वपूर्ण आहेत. शारदांबेचे मंदिर चौकोनी आणि साधे आहे; मात्र त्याच्या चारही बाजूंस प्रचंड दगडी सिंह बसवलेले आहेत. शारदेची मूर्ती सुवर्णाची असून, तिचे जडजवाहिरही बरेच आहे. तिथे एका टपोऱ्या मोत्यावर कोरलेला नंदी आहे. विद्याशंकरमंदिर हे विद्यारण्यस्वामींनी आपल्या गुरूंच्या प्रीत्यर्थ विजयनगरच्या राजाकडून बांधून घेतले. हे मंदिर काळ्या पाषाणाचे, अष्टकोनी असून, त्याला गोपूर आहे. त्यात शंकराची लिंगमूर्ती आहे.

वेणुगोपाळ आणि श्रीनिवास यांच्या मंदिरांतील मूर्ती माणकांच्या घडवलेल्या आहेत. इथले नवग्रहमंदिरही प्रेक्षणीय आहे. त्याला बारा कोरीव खांब असून, त्यांच्या माथ्यावर सिंह आणि स्वार यांच्या आकृती आहेत. हे बारा खांब म्हणजे बारा राशींची प्रतीके होत. सिंहांच्या मुखात पाषाणाचे तुकतुकीत गोळे ठेवलेले असून, ते तिथून न पडता फिरू शकतात. ऋतुमानाप्रमाणे त्या त्या खांबावर पडलेले सूर्यकिरण सिंहमुखांतल्या गोळ्यांवर परावर्तित होतात. त्या गोळ्यांवर शनी, गुरू, शुक्र, इ. ग्रहांची प्रतीकात्मक चित्रे बसवली असून, सूर्याभोवती ग्रहमाला कशी फिरते याचे दृश्य तिथे पाहायला मिळते. ही शिल्पकृती म्हणजे कलावंताच्या प्रतिभेचा चमत्कार आहे. गावाजवळच्या टेकडीवर एक शिवालय असून, त्यातील शिवलिंग स्वयंभू आहे. त्याला विभांडकेश्वर अशी संज्ञा आहे. वर चढून जायला पायऱ्या बांधलेल्या आहेत. या शिवलिंगाची पूजा केल्यामुळे इथे कधीही दुष्काळ पडत नाही, असे म्हणतात.

इथल्या पीठावर जे जे आचार्य बसले ते ते सदाचारी, विद्यावंत आणि वैदिक धर्मावर नितांत श्रद्धा ठेवणारे असे होते. [ देवीकोश २; प. भा. व.; कल्याण–तीर्थांक; श्रीगणेश–कोश; श्री. ज. हृ. दवे–भारती १०–२–५७; श्रीशंकराचार्य. ]

## शेंदुर्णी

एक गाव. हा गाव महाराष्ट्रातील जळगाव जिल्ह्यात, पाचोऱ्याच्या पूर्वेला सोन नदीच्या काठी आहे. गावात त्रिविक्रमाचे मोठे मंदिर असून, दरवर्षी कार्तिकी पौर्णिमेला येथे मोठी यात्रा भरते. गावानजिक एक हेमाडपंती शिवमंदिर असून, त्याच्या परिसरात चौवीस देवळे आहेत. हा ऐतिहासिक महत्त्वाचा गाव आहे. दुसऱ्या बाजीरावाचे उपाध्ये दीक्षित पाटणकर यांच्या जहागिरीचे हे गाव होय. इथे कादरबाबा तेली नावाचा एक मोठा संत होऊन गेला. [ म. जि.–जळगाव ]

## शेंस भरणे

कलावंत किंवा देवदासी या समाजात पूर्वी मुलीचे लग्न करण्याऐवजी शेंस भरण्याचा विधी करीत असत. हा लग्नासारखाच एक विधी असे. जातीतल्याच एका मुलीला नवरदेवाचा पोषाख घालून तिच्या हाती कार्तिकस्वामीचे प्रतीक म्हणून एक कटयार देत आणि उपवर मुलीचे त्या कटयारीशी लग्न लावीत. पायात घुंगुरू बांधणे व अंगावर शेला घेणे या गोष्टींचा अधिकार याच वेळी मुलीला मिळत असे. शेंस भरल्यानंतर मुलगी देवाच्या सेवेला पात्र झाली, असे समजले जाई.

कर्नाटकातील कलावंत लोक शेंस भरण्याला पुडी असे म्हण-

तात. परंतु त्यांच्या मुली कट्यारीच्या ऐवजी मृदंगालाच माळ घालतात. सांप्रत या विधीला कायद्याने बंदी आहे. बंदीपूर्वी हा समारंभ मोठ्या थाटात साजरा केला जाई.

लग्नाच्या प्रसंगी इतर जातींतही सुवासिनी स्त्रिया वधू-वरांच्या कपाळावर मळवट भरून त्यावर अक्षता चिटकवीत असतात. त्यालाही शेंस भरणे असेच नाव आहे. या क्रियेच्या मागे नूतन वधू-वरांचे भावी जीवन सुखी व्हावे हा हेतू असतो. पाहा – देवदासी. [ मुं. इ. जा. ]

## शेख

एक मुसलमान जात. यांची वस्ती भारतभर आढळते. शेख म्हणजे मोठा, विद्वान. आरंभी अरबस्तानातून आलेल्या अबुबकर, ओमर व अब्बास यांच्या वंशजांना हा शब्द लावीत असत. परंतु अलिकडे सन्मानदर्शक म्हणून कोणाही मुसलमानाला हा शब्द लावतात.

शेखांच्या खूप पोटजाती आहेत. त्यांतील काही नावे पुढील-प्रमाणे आहेत – क्युरेशी, फरुकी, अनसारी, महाजारीन, क्युरेशी सादिकी, क्युरेशी हश्मी, इत्यादी.

गुजरातमधील शेखांच्या चालीरीती हिंदूंप्रमाणेच आहेत. हे सुंता करीत नाहीत आणि इतर मुसलमानांच्या हातचे अन्नही खात नाहीत. पुष्कळसे शेख स्वामी नारायण पंथाचे अनुयायी असून, काही बाळा महमद शहा या पिराचे भक्त आहेत.

यांच्या लग्नात पुरोहित व फकीर हजर असतात. फकीर निका लावतो आणि पुरोहित चौरीविधी करतो. [ मुं. इ. जा.; वि. मुं. रा. प.; रजःकण ]

## शेख किफायत

(इ. स. चे १८ वे शतक) एक लोकप्रिय सूफी कवी. बिहार प्रदेशाच्या पूर्णिया जिल्ह्यातील दुमका नामक गावी याचा निवास होता. याच्या पित्याचे नाव शेख मुहंमद आणि गुरूचे नाव मौलवी मुहंमद होय. शेख किफायतने अनेक पंडितांच्या प्रेरणेने, एका लोककथेच्या आधारावर विद्याधर नावाचे एक प्रेमकाव्य रचले. हा ग्रंथ दोहा-चौपाई वृत्तात असून, त्यात अनेक ठिकाणी सूफींच्या दार्श-निक सिद्धान्तांचे प्रतिपादन आहे.

बिहारी लोकांत त्याच्या या ग्रंथासंबंधी फार आदर असून, कित्येकांना त्यातला बरासचा भाग पाठही असतो. [ हिं. सा. बि. ]

## शेख तकी

(इ. स. चे १५ वे शतक) एक मुसलमान फकीर. कबीरपंथी मुसलमानांच्या मते हा कबिराचा गुरू होय. परंतु संशोधकांनी या मताला मान्यता दिलेली नाही. त्यांच्या मते कबीर व शेख तकी यांच्यांत वाद-विवाद होत असे आणि त्या गोष्टीचा काहीसा लाभ कबिराला झाला असावा. कबिराप्रमाणेच कबिराचे गुरू रामानंद यांच्या बरोबरही तकीचा वादविवाद होत असे.

अशी एक समजूत आहे, की शेख तकी हा शिकंदर लोदीचा गुरू होता. आणि त्याने गुरूच्या आज्ञेनुसार कबिराला साखळीने बांधून पाण्यात बुडविले होते. कबिराचा प्रसिद्ध शिष्य धर्मदास याने या घटनेचा उल्लेख केला आहे. [ हिं. सा. इ.; सं. सा. ]

## शेख फरीद

(इ. स. चे १६ वे शतक) एक मुसलमान साधू. पंजाबमधील दीपालपूरनजीकच्या कोठीवाला गावी याचा जन्म झाला. शेख फरीदला ताजुद्दीन मुहंमद व मुन-वर शाह शहीद या नावाचे दोन मुलगे होते. पैकी ताजुद्दीन हा मोठा फकीर बनला. शेख सलीम चिस्ती, फतेहपुरी, इ. त्याचे प्रसिद्ध शिष्य होत.

फरीदची सर्व पद्यरचना शिखांच्या आदिग्रंथात आहे. ती सर्व पद्ये उपदेशपर आहेत. त्याच्या उपदेशाचा नमुना असा – सर्व लोक विरह विरह असे म्हणतात. परंतु विरहाचे रहस्य कोणा-लाच समजलेले नाही. विरह हा एक सुलतान आहे. तो ज्याच्या शरीरात उत्पन्न झाला नाही, त्या शरीराला स्मशान म्हटले पाहिजे. जो परमेश्वरावर खरे-खुरे प्रेम करतो, तोच त्याचा खरा अधिकारी होय. परंतु ज्याच्या मनात एक आणि मुखात दुसरेच असते आणि जो परमेश्वराला विसरलेला असतो, तो केवळ पृथ्वीचा भार होय.

शेख फरीदची आणि गुरू नानकांची गाठ पडली होती, असे म्हणतात. शेखची कबर सरहिंदमध्ये आहे. [ उ. भा. सं. प. ]

## शेख महंमद

(इ. स. चे १६-१७ वे शतक) एक मुसलमान मराठी संतकवी. याच्या पित्याचे नाव राजे महंमद आणि मातेचे फुलाई असे होते. शेख महंमदाचा जन्म बीड जिल्ह्यातील धारूर या गावी झाला. राजे महंमद यांचे एक शिष्य चांद बोधले नामक असून, त्यांचा दौलताबादच्या परिसरात पातशाही परिवारासह सर्वांवर विलक्षण प्रभाव होता. राजे महंमदाने या आपल्या शिष्याच्या मार्गदर्शनाखाली शेख महंमदाला ठेवले व बालपणापासूनच त्याच्या ठायी परमार्थाचे शुद्ध संस्कार करवले. श्री. दासगणू यांच्या मते चांद बोधले यांनी शेख महंमदाला गोदातीरी ज्ञानेश्वरीची प्रत देऊन अध्या-त्माचे मार्गदर्शन केले.

शेख महंमदाचा गुरू चांद बोधले हा सूफींच्या कादिरी परं-परेतला होता. त्याच्या सान्निध्यात शेख महंमदाने परमार्थ-वाङ्मयाचे चिंतन–मनन करून आणि त्यांनी दर्शविलेल्या वाटेने

परमार्थसाधना करून परमानुभवपद संपादिले. चांद बोधल्याच्या समाधीनंतर शेख महंमदाच्या साधुत्वाचा गंध सर्वत्र दरवळू लागला. शिवाजीमहाराजांचे आजोबा मालोजीराजे त्या वेळी दौलताबादच्या जवळच असणाऱ्या वेरूळ गावचे पाटील होते. ते शेख महंमदाकडे आकृष्ट झाले व त्यांनी शेख महंमदाचा गुरूपदेश घेऊन त्यांस मकरंदपूर नामक छोट्या गावी मठ बांधून दिला. हा गाव आणि मठ हेच शेख महंमदाच्या पुढील जीवनातल्या परमार्थप्रसाराचे व परमार्थवाङ्मयनिर्मितीचे केंद्र राहिले.

शेख महंमद हा अत्यंत विवेकनिष्ठ असल्यामुळे आपल्या कवनांतून त्याने हिंदू आणि मुसलमान या उभय धर्मांतल्या



शेख महंमदाचा दर्गा—श्रीगोंदे

भोळ्या-खुळ्या समजुतींवर मुक्तपणे प्रहार केले आहेत. मूर्तिभंजन करणाऱ्या धर्मांध मुसलमानांवर ज्या आवेशाने तो तुटून पडतो, त्याच आवेशाने तो मूर्तिपूजक हिंदूंच्या अंधश्रद्धेवर कुठाराघात करतो. मूर्तीत देव नाही, हे तत्त्व हिंदु-मुसलमानांनी नीट समजून घ्यावे, म्हणजे मुसलमान मूर्तिभंजनापासून व हिंदू मूर्तिपूजनापासून परावृत्त होतील, असे त्याचे म्हणणे. तो म्हणतो, 'शेख महंमद अविंध । त्याचे हृदयीं गोविंद ।' परंतु शेख महंमदाला आपल्या या विवेकनिष्ठेपायी हिंदू व मुसलमान या दोन्ही धर्मांतल्या उपद्रवी व्यक्तींकडून हालवनवास सोसावा लागला. हिंदू गुरूचा, हिंदू धर्मग्रंथांचा, हिंदू संतचरित्रांचा आणि हिंदू संतवाणीचा त्याने उत्कट भक्तिभावाने केलेला स्वीकार पाहून मुसलमान त्याला 'काफर' समजू लागले. आणि हा जातीचा मुसलमान असल्यामुळेच आपल्या मूर्तिपूजेचा आणि अन्य धार्मिक रीतीसमजुतींचा निषेध करतो, म्हणून हिंदूही त्याला विरोध करू लागले. आपल्याविषयी लोकांच्या भावना काय आहेत, याचा मागोवा घेताना तो लिहितो –

एक म्हणती हा यातीचा मलवंश ।<br>
म्हणून निखंदितो आमच्या देवतांस ।<br>
याचा मानू ना आम्ही विश्वास । प्रतिमा निखंडिल्या ॥<br>
देखत अविंध देवळे मोडिती ।<br>
हा तो त्यांचाच स्वयाती ।<br>
येणें प्रतिमेची केलीच माती । आतां काय पुजावें ॥<br>
यवन देवतांस करिती मार ।<br>
हें तंव चालिलें पारंपार ।<br>
आम्ही वंदूं ना याचें उत्तर । हा त्यांचाच गोत्या ॥

(योगसंग्राम १६.६२–६४)

आपण मुसलमान असल्याची शेख महंमदाला किंचितही खंत नाही. उलट आपण मुसलमानांसारख्या कडव्या धर्मांधतेच्या खाणीत निपजलो असूनही, निखळ परमार्थाची कास धरून आहोत, याचा त्याला अभिमान वाटतो. एका स्फुट अभंगात आपला हा सार्थ अभिमान व्यक्त करताना तो म्हणतो–

बाभळेच्या झाडा । आंबे आले पाडा ।<br>
अपरोक्ष निवाडा । शेख महंमद ॥<br>
याती मुसलमान । मऱ्हाष्ट्री वचने ।<br>
ऐकती आवडीनें । विप्र शूद्र ॥<br>
इंद्रावळी वेलीं । खरबुजें पिकलीं ।<br>
ते भावें सेविलीं । सदाचरीं ॥<br>
मुसलमान याती । निपजली मती ।<br>
अधिकारी होती । अठरा पगड ॥

शेख महंमद हा योगी असल्यामुळे त्याला प्रदीर्घ जीवन लाभले. श्रीगोंदे येथे त्याने अर्धशतकाहून अधिक काळ परमार्थरंगात रंगून व्यतीत केला आणि अनेक मुमुक्षूंच्या हृदयात परमार्थप्रीतीची ज्योत पाजळून त्यांना मुक्तीचा महापंथ दाखविला. या काळात त्याने योगसंग्राम या प्रमुख ग्रंथाशिवाय, पवनविजय व निष्कलंकप्रबोध हे दोन अपूर्ण ओवीबद्ध ग्रंथ आणि रूपके, भारुडे,

अभंग, पदे, हिंदुस्थानी कवित्त, इ. विपुल काव्यरचना केली. इ. स. १६६० च्या सुमारास फाल्गुन शुद्ध नवमीच्या दिवशी शेख महंमदाने कृतार्थपणे आपली जीवनयात्रा संपविली. श्रीगोंदे येथील त्याच्या कबरीजवळ प्रतिवर्षी असंख्य हिंदू-मुसलमान भक्त जमतात व शेख महंमदाचे पुण्यस्मरण करतात. [मु. म. सं.]

**शेरडुकपेन** एक आदिवासी जमात. नेफाच्या कामेंग सीमा-विभागाच्या नैर्ऋत्य भागात या लोकांची वस्ती आहे. रूपा, जिगाव व शेरगाव या मुख्य शहरांत हे लोक राहतात. त्यांची संख्या १९६० साली सुमारे बाराशे होती.

शेरडुकपेन राहतात ते खोरे लांब आणि अरुंद असून, त्याच्या सभोवती उंच डोंगर आहेत. या खोऱ्यात अनेक जलप्रवाह वाहतात. खोऱ्याची उंची समुद्रसपाटीपासून पाच हजार ते साडेसहा हजार फूट आहे. हा प्रदेश खडकाळ असून, त्याचा वरचा थर वालुकामय आहे. इथला हिवाळा कडक असून, त्या दिवसांत मधून मधून बर्फ पडते. म्हणून दरवर्षी हिवाळ्यात हे लोक दोन-तीन महिने मैदानी प्रदेशातील डोइमारा या ठिकाणी जाऊन राहतात.

शेरडुकपेन लोक तिबेटी-मंगोलाइड वंशाचे असून, त्यांचा रंग गोरा व चेहरा आकर्षक असतो. त्यांचे शरीर बांधेसूद असून, उंची मध्यम असते. ते स्वभावाने सौम्य, प्रेमळ व आनंदी असतात. तसेच, ते मेहनती व प्रामाणिकही आहेत. आपण तिबेटातून इकडे आलो, असे ते सांगतात.

तिबेटच्या एका राजाने आसामी राजकन्येशी लग्न केले होते. त्या दोघांचा धाकटा पुत्र सांप्रतच्या शेरडुकपेन लोकांची वस्ती असलेल्या प्रदेशात आला व तिथला राजा झाला. या राजाच्या वंशजांना थोंग व त्याच्या बरोबर असलेल्या भारवाहकांच्या वंशजांना छाओ असे नाव आहे.

डोंगराच्या उतरणीवर यांची गावे वसलेली असून, रूपा या मोठ्या गावात साठ घरे आहेत. पण लहान गावांत चार घरेही असतात. पाण्याचे झरे व शेतजमीन पाहूनच हे घरे बांधतात.

**घरे** – यांच्या घराचा पाया दगडी असून, घरे जमिनीपासून पाच ते सात फूट उंचीवर बांधतात. घराच्या खालच्या भागात हे बकऱ्या व इतर जनावरे बांधतात. घराच्या भिंतींचा खालचा अर्धा भाग लाकडी व वरचा अर्धा भाग चटयांचा असतो. छप्पर लाकडी फळ्या व बांबूच्या चटया यांचे किंवा काही वेळा गवताचे असते. घरातील जमीन जाड लाकडी फळ्यांची असते. घरे बहुधा दुमजली असून, खालचा मजला राहण्यासाठी व वरचा मजला धान्य साठवण्यासाठी वापरतात. खालच्या मजल्यावर दोन खोल्या व पुढे सज्जा असतो. स्वयंपाक, जेवण व झोपणे यासाठी एकच खोली वापरतात व दुसऱ्या खोलीत महत्त्वाच्या चीजवस्तू ठेवतात. खोलीत बहुधा दोन लोखंडी चुली असतात. चुलीच्या मागे भांडी ठेवण्यासाठी दगडी ओटा व चुलीच्या वर चार-पाच



शेरडुकपेन मुलगा

फूट उंचीवर बांबूची शिंकी असतात. त्यांवर धान्य व मांस वाळवण्यासाठी ठेवतात. चुलीजवळ चटया अंथरून माणसे झोपतात. घराची दारे बांबूची असून, त्यांना कड्या असतात; पण घराला कुलूप मात्र क्वचितच लावतात. घराला खिडक्या नसल्यामुळे आत अंधार असतो.

घराची जागा निवडताना, घरासाठी जंगलातून लाकडे आणताना व घराचा पाया घालताना लामाला विचारून मुहूर्त ठरवतात. घर बांधून झाल्यावर राहायला जाण्यापूर्वी काही धर्मकृत्य करतात. घर बांधायला शेजारी व मित्रमंडळी मदत करतात.

**पोषाख** – हे लोक एकावर एक अनेक कपडे घालतात. सणासुदीला ते रंगीत कपडे घालतात व दागिनेही घालतात. पुरुष छातीभोवती गिरणीच्या कापडाचा किंवा रेशमाचा तुकडा गुंडाळतात. तो सुमारे अडीच वार लांब व दीड वार रुंद असतो आणि साधारण गुडघ्यापर्यंत येतो. त्यावर ते लांब बाह्यांचे जाकिट घालतात. हिवाळ्यात त्यावर ते लहान कोट व आणखी एक लांब कोट घालतात. कमरेभोवती ते रंगीत लुंगी गुंडाळतात किं

विजार घालतात. पुरुष डोक्याला, पुढे गोंडे लावलेली याकच्या केसांची टोपी घालतात. श्रीमंत लोक कालिपाँगहून आणवलेल्या करड्या किंवा पिवळ्या किनखावाच्या टोप्या घालतात. कमरेला आवरण घातलेला डाओ किंवा तलवार व विणलेली सुंदर पिशवी अडकवतात. तसेच खांद्याभोवती हाताने विणलेला व सुंदर नक्षी असलेला झुलीसारखा कपडा गुंडाळतात. कमरेभोवती एक लांब कपडा बांधतात.

स्त्रिया अंगात एक सैलसर व गुडघ्यापर्यंत पोचणारा बिन-बाह्यांचा सदरा घालतात. त्याच्यावर त्या गिरणीच्या कापडाचा व नक्षीदार बाह्यांचा कोट घालतात. कमरेभोवती त्या रंगीत लुंगी गुंडाळतात. माशा चावू नयेत म्हणून पायांभोवती कापडाची पट्टी गुंडाळतात. लहान मुलींचे केस कापतात; पण मोठ्या मुली अगदी तोंड झाकले जाईल इतके लांब केस वाढवतात. पण लग्नानंतर किंवा बाळंतपणानंतर स्त्रिया मानेवर केसांचा अंबाडा बांधतात. आणि सणासुदीला डोक्यावर लहानशी टोपी घालतात.

सर्वसाधारणपणे हे लोक अनवाणी चालतात. ज्या लोकांचा बाहेरच्या सुधारलेल्या लोकांशी संबंध येतो, ते कोट, सदरा, लोकरी विजार व कॅनव्हासचे बूट, असा पोषाख करतात.

अलंकार घालणे हे संपन्नतेचे व प्रतिष्ठेचे लक्षण समजतात. सणासुदीला आणि बाहेरगावी जाताना स्त्री-पुरुष अंगावर अलंकार घालतात. श्रीमंत लोक आपले काही दागिने जंगलात पुरून ठेवतात. पुरुष गळ्यांत मण्यांच्या माळा आणि बोटांत चांदीच्या किंवा पितळेच्या अंगठ्या घालतात. स्त्रिया निरनिराळ्या तऱ्हेच्या रंगीत मण्यांच्या माळा व चांदीचे हार घालतात. त्या हातांत चांदीच्या बांगड्या व अंगठ्या घालतात.



शेरडुकपेन मुलगी

शेरडुकपेन स्त्रिया कुशल विणकर आहेत. घरच्या मागावर त्या सुंदर नक्षी असलेले रंगीत कापड विणतात व त्याच्या पिशव्या बनवतात. कापडासाठी लागणारे सूत त्या विकत घेतात किंवा काही वेळा झुडुपांपासून तयार करतात.



मद्यासाठी वेताची बाटली

हे लोक वेत व वांबू यांपासून घरात लागणारी भांडी, पेले, सुरया, मद्यासाठी लागणारी मोठी पात्रे, टोपल्या, चटया, इ. वस्तू बनवतात. तसेच, ते लाकडापासून दारे, पेटचा, टेबल, खुर्ची, बाक, खोगीर व खाण्या-पिण्यासाठी पेले, वाडगे वगैरे तयार करतात. त्यांना लागणारी डाओ, सुऱ्या-चाकू, विळे, इ. लोखंडी हत्यारेही ते बनवतात.

हे लोक तट्टे, गायी, बैल, शेळ्या, कोंबड्या, कुत्री, मांजरे, इ. प्राणी पाळतात.

सवड असेल तेव्हा हे लोक वैयक्तिक किंवा सामूहिक रीत्या हरिण, अस्वल, वाघ, चित्ते, इ. प्राण्यांची शिकार करतात. जवळपासच्या झऱ्यांत ते मासे पकडतात. मासे हा त्यांच्या जेवणातील महत्त्वाचा घटक असतो.

**उद्योगधंदे** – शेती हा या लोकांचा प्रमुख व्यवसाय आहे. इथली जमीन खडकाळ असल्यामुळे त्यांना शेतीसाठी खूप कष्ट करावे लागतात व खूप पैसाही खर्च करावा लागतो. दाट धुके, पाण्याची टंचाई व रानटी जनावरांच्या धाडी, यांपासून त्यांच्या शेतीला फार उपद्रव होतो. त्यामुळे त्यांना शेतीपासून जेमतेम पोटापुरते उत्पन्न मिळते. ते एकाच जागी व झूम पद्धतीने वेगवेगळ्या जागीही शेती करतात. एकाच जागी असलेल्या शेतात ते गहू, यव, मका व मिलेट ही पिके काढतात. घरामागच्या परसबागेत ते मका, कडधान्ये, बटाटे, रताळी, भोपळा, मुळे, कोबी, इ. पिकवतात. पुरुषांबरोबर स्त्रियाही शेतात राबतात. गरज असेल तेव्हा शेजारीपाजारीही त्यांना शेतीच्या कामी मदत करतात.

**अन्न** – या लोकांचा आहार अगदी साधा असतो. त्यात मुख्यत्वे कडधान्ये, मासे, भाज्या, मका व मिलेट यांपासून बन-

बलेले मद्य, निरनिराळ्या तऱ्हेचे घेवड्याचे दाणे, दूध व लोणी हे पदार्थ असतात. कडधान्ये कुटून त्यांची लापशी करतात व ती मीठमिरची लावून किंवा भाज्यांबरोबर खातात. पाळीव प्राण्यांव्यतिरिक्त इतर प्राण्यांचे मांसही खातात.

**वर्ग –** या लोकांत थोंग आणि छाओ असे दोन वर्ग आहेत. ल्हासाच्या राजाच्या तिसऱ्या मुलाचे वंशज ते थोंग होत. त्याच्या बरोबर आलेल्या हमाल व नोकर यांना व त्यांच्या संततीला छाओ हे नाव मिळाले. नंतरच्या काळात या दोन वर्गात अनेक पोटभेद निर्माण झाले. थोंग हे वरिष्ठ दर्ज्याचे व छाओ हे कनिष्ठ दर्ज्याचे मानले जातात. त्यामुळे थोंग मुलीने छाओ मुलाशी लग्न करणे, हा अपराध मानला जातो. छाओ वर्गातील प्रत्येक घराण्याचा थोंग वर्गातील एखाद्या घराण्याशी संबंध असतो. लग्नकार्य आणि मृत्यू या प्रसंगी छाओ वर्गाला काही ठराविक कामे करावी लागतात.

**विवाहप्रथा –** बाप हा घरातील कर्ता पुरुष असतो. त्याच्या मृत्यूनंतर थोरला मुलगा कर्ता बनतो. यांच्यांत एकत्र कुटुंबपद्धती प्रचलित आहे. पण सांप्रत काही वेळा लग्न झाल्यानंतर मुले वेगळी राहू लागली आहेत. थोंग मुलीने थोंग मुलाशीच लग्न केले पाहिजे, असा नियम आहे. आते–मामे भावंडांचे लग्न प्रशस्त मानले जाते. सर्वसाधारणपणे आई-बाप मुलांची लग्ने ठरवतात.



शेरडुकपेन जोडपे

त्या वेळी मुलांचे मतही विचारात घेतात. जेव्हा मुलीला भाऊ नसेल तेव्हा तिचा बाप त्याच्या घरी राहून त्याला शेतीच्या कामात मदत करील असा मुलगा निवडतो. काही दिवसांनंतर मग त्याच्याशी मुलीचे लग्न होते.

वयात आलेली मुले व मुली बहुधा घरात न झोपता समवयस्क मित्रमैत्रिणींबरोबर वेगळ्या घरात झोपतात. त्यामुळे त्यांना आपला सहचर निवडण्याची संधी मिळते. जेव्हा एखादा मुलगा व मुलगी आपसांत लग्न करायला तयार होतात, तेव्हा ते आपल्या कमरेच्या पट्ट्यांची अदलाबदल करतात. मुलाच्या बापाला ही वार्ता समजल्यावर तो लामाशी मुलीच्या निवडीविषयी विचारविनिमय करतो व मुलीला केव्हा आपल्या घरी आणायची, याबद्दल त्याचा सल्ला घेतो. लामाने ठरवलेल्या दिवशी मुलाचे मित्र मुलीच्या घरी जातात व तिला मुलाच्या घरी आणतात. मुलीला तीन दिवस तिथे राहायला लावतात. त्यानंतर ती आपल्या घरी पळून जाते. या तीन दिवसांत मुलगा आपल्या घरी राहत नाही. नंतर मुलाचा बाप मुलीच्या आई-बापांशी मध्यस्थामार्फत बोलणी करतो व लग्न पक्के करतो. त्या वेळी तो मुलीचा बाप, आई व मोठा भाऊ यांना प्रत्येकी एकेक गळपट्टा भेट देतो व मद्यही देतो. लग्नाचा दिवस लामा ठरवतो. लग्नाच्या दिवशी मुलाचे आई-बाप आप्तेष्ट व गावबुढा यांच्यासह मुलीच्या घरी जातात. त्या वेळी दोन्ही पक्षांतील लोक परस्परांना भेटवस्तू देतात. मुलाचा बाप मुलीच्या आई-बापांना गाय, मेंढी, एंडी रेशमाचे कापड व गळपट्टे देतो आणि मुलीच्या नातेवाइकांना एकेक गळपट्टा देतो. नंतर मुलीचे आईबाप जमलेल्या सर्व लोकांना मद्य वाटतात व जेवण घालतात. मध्यंतरीच्या काळात वधू आईबापांनी दिलेले नवे कपडे व दागिने घालून तयार होते. जेव्हा ती सासरी जायला निघते, तेव्हा घरातील वडीलमाणसांना नमस्कार करते. त्या वेळी बाप तिला गाय, लोखंडी चूल व गळपट्टा; आई स्वयंपाकाची भांडी व गळपट्टा आणि भाऊ, काका वगैरे मंडळी एंडी रेशमाचे कापड व गळपट्टे देतात. यांच्यांत वराला वधूशुल्क म्हणजे देज देण्याची प्रथा आहे.

वधू आप्तेष्टांसह वरगृही जाते. तिथे वरपिता सर्वांना मद्य व जेवण देतो. त्या वेळी लोक विवाहगीते गातात. या सर्व समारंभात वर मात्र गैरहजर असतो. नंतर लामा आशीर्वाद देतो. त्या वेळीही तो उपस्थित नसतो. लग्नविधी संपल्यावर मध्यस्थ आणि लामा यांना मद्य, गळपट्टे व प्रत्येकी पाच रुपये मिळतात.

लग्नानंतर नवरा मुलगा दहा दिवस पत्नीशी समागम करीत नाही.

या लोकांत घटस्फोटाची चाल आहे. पत्नीने घटस्फोट मागितल्यास तिला नवऱ्याला वधूशुल्क परत द्यावे लागते. मुलामुलींचे लग्नापूर्वी संबंध असतात. लग्नानंतर व्यभिचार केल्यास मार शिक्षा होते. लग्नापूर्वी मुलीला अपत्य झाल्यास, त्याच्या पित्याला मुलीशी लग्न करावे लागते. मात्र तो विवाहित असल्यास त्याला फक्त मुलाच्या पालनपोषणाचा खर्च करावा लागतो.

हे लोक सकाळी लवकर उठून न्याहारी करतात, घरी तयार केलेली दारू पितात व मग शेतावर जातात. स्त्रियाही त्यांना मदत करण्यासाठी शेतावर जातात. पुरुष नांगरण्याचे वगैरे काम करतात; स्त्रिया त्यांना पेरणी, कापणी, खुरपणी, इ. कामांत मदत करतात. दुपारी शेतातच जेवण करतात. सूर्यास्तापूर्वी घरी परततात. मग पुरुष दारू पिऊन आरामात गप्पा मारीत बसतात, तर स्त्रिया स्वयंपाकाला लागतात.

मुले दिवसभर घरीच असतात. ती परसातील भाजी तोडून आणतात व जवळपासच्या झऱ्यावरून पाणी आणतात. मोठी झाल्यावर जंगलातून जळण आणणे, गुरांची देखभाल करणे व मुले सांभाळणे, ही कामे ती करतात.

हिवाळ्यात जेव्हा शेतात जास्त काम नसते, तेव्हा पुरुष विणकाम करतात व इतर कलाकौशल्याच्या वस्तू बनवतात. स्त्रिया आणि मोठ्या मुली या काळात धान्य कांडून ठेवतात. एकूणच सर्व लोकांना आणि विशेषतः स्त्रियांना जन्मभर खूप कष्ट करावे लागतात.

प्रसूतिप्रथा – गरोदरपणी स्त्री सुरवातीला सर्व कामे करते. नंतर मात्र ती हलकी कामे तेवढीच करते. या दिवसांत पती तिची खूप काळजी घेतो. प्रसूतीच्या वेळी एखादी अनुभवी स्त्री सुइणीचे काम करते. मुलाची नाळ छाओ स्त्री कापते आणि दूर शेतात नेऊन पुरते.



गळ्यातला ताईत

प्रसूतीनंतर बाळ-बाळंतिणीला गरम पाण्याने स्नान घालतात. बाळंतपणानंतर स्त्रीला मांस, मासे, दूध, लोणी, इ. पौष्टिक आहार देतात व काही दिवस तिला पूर्ण विश्रांती घ्यायला लावतात. नवजात बालकाला पिता सात दिवस स्पर्श करीत नाही.

तिसऱ्या दिवशी स्थानिक पुरोहित मुलाचे नाव ठेवतो. यानंतर मुलाच्या गळ्यात मण्यांची माळ घालतात. पाचव्या दिवशी मामा मुलाला घराबाहेर नेऊन सूर्य-चंद्र दाखवतो. या वेळी नातेवाईक स्त्रिया मुलाला गळपट्टे देतात आणि आईला मद्य देतात. यानंतर जमलेल्या स्त्रियांना मेजवानी देतात. मूल वर्षाचे झाल्यावर मामा त्याचे जावळ काढतो. हे केस घरात जपून ठेवतात. लहान मुलांना फार प्रेमाने वाढवतात.

शयनगृहे – मुले व मुली वयात आली, की शेजघरात झोपायला जातात. मुलांनीच ही शेजघरे ठरवलेली असतात. शेजघरे म्हणजे स्वतंत्र झोपड्या नसतात. ज्या घरात माणसे कमी असतात व म्हणून जागा अधिक असते, अशा निरनिराळ्या घरांत समान वयाच्या मुलांचे व मुलींचे गट झोपतात. एखाद्या मुलाला एका विशिष्ट गटाच्या मुलींबरोबर झोपायची इच्छा झाल्यास, तो त्या मुलींच्या घरी जाऊन झोपतो. जाताना तो आपल्या आवडत्या मुलीसाठी विडी व इतर वस्तू घेऊन जातो. सर्वसामान्यपणे मुलगा आपल्या प्रेयसीबरोबर झोपतो. पण तिच्या संमतीने तो दुसऱ्या मुलीचीही शय्यासोबत करू शकतो. यातूनच मुले-मुली आपसांत विवाह ठरवतात व त्याचे प्रतीक म्हणून कमरेला बांधायच्या वस्त्रांची अदलाबदल करतात. यानंतर मुलाला किंवा मुलीला वेगळ्या मुलीबरोबर किंवा मुलाबरोबर झोपायला बंदी असते. शेजघरात मुलामुलींना लैंगिक शिक्षणाबरोबरच पारंपरिक नृत्ये व कला यांचेही ज्ञान मिळते.

हे लोक घरातील वृद्ध मंडळींना फार मान देतात; त्यांना भारभूत मानीत नाहीत. वृद्ध माणसे घराचा कारभार मुलांवर सोपवतात आणि त्यांना फक्त मार्गदर्शन करतात. गावातील तंटे सोडवणे आणि सामाजिक व धार्मिक कार्यक्रम आखणे, यात वृद्धांचा सल्ला घेतात. वृद्ध माणसे टोपल्या विणणे, मुले सांभाळणे अशी कामे शेवटपर्यंत करीत असतात.

या लोकांना नृत्याची फार आवड आहे. त्यांच्या प्रत्येक नृत्याच्या मागे एक कथा असते. सणासमारंभाच्या वेळी ते नृत्य करतात. पुरुषच नृत्यात भाग घेतात. त्यांना अनेक वर्षे नृत्याचे शिक्षण देतात. स्त्रिया नृत्य करतात, पण ते घरातल्या घरात. याक, हरिण, ससा, गरुड, वाघ, साप, डुक्कर, कुत्रा इत्यादींचे मुखवटे घालून पुरुष नृत्य करतात. नृत्याला वाद्यांची साथ असते.

प्रत्येक मोठ्या गावात ग्रामपंचायत असते. ती सगळ्या गावाचा कारभार पाहते. ग्रामवृद्ध हा पंचायतीचा प्रमुख असतो. तो बहुधा मरेपर्यंत हे पद संभाळतो. त्याच्या मदतीला पंचायतीचे सदस्य व चौकीदार असतात. लोकांचे तंटे सोडवणे व गुन्हेगाराला शासन करणे, ही कामेही पंचायत करते. काही वेळा निरपराधीपणा सिद्ध करण्यासाठी शपथ किंवा दिव्ये यांचा आश्रय करतात.

देवधर्म–हे लोक बुद्धाला व स्थानिक देवतांना भजतात. ते बुद्धाची मंदिरे उभारतात आणि त्याच्या प्रीत्यर्थ उत्सव करतात. आणि त्याला बळीही देतात. भुतांखेतांवरही या लोकांचा विश्वास आहे. भुताखेतांचा बंदोबस्त करणारे पुरोहित या लोकांत असतात. ते त्यांना संतुष्ट ठेवण्यासाठी काही विधिविधाने करतात.

रूपा आणि शेरगाव या ठिकाणी त्यांचे तीनमजली गोंपा आहेत. त्यांत तिबेटी पद्धतीच्या बुद्धाच्या अनेक मूर्ती आहेत. गोंपातील कोनाड्यात अनेक प्रार्थनायंत्रे असून, गोंपाच्या बाह-

रच्या बाजूला उंच खांबांवर प्रार्थनाध्वज फडकत असतात. स्थानिक लामा गोंपांची सर्व व्यवस्था पाहतात.

**सण-उत्सव** – हे लोक अनेक सण व उत्सव साजरे करतात. त्यांपैकी काही पुढीलप्रमाणे–

**छाकुर**– हा पवित्र ग्रंथांचा उत्सव आहे. या उत्सवात लामा सहा दिवस गोंपात धार्मिक ग्रंथांतील मंत्रांचे पठण करतात आणि बुद्धमूर्तीपुढे उदबत्त्या, धूपदीप जाळून घंटा वाजवतात. सातव्या दिवशी कुमारिकांच्या डोक्यावर ग्रंथ ठेवून गावात त्यांची मिरवणूक काढतात. यानंतर लोक काही दिवस शेतातील काम थांबवतात आणि मद्यपान, जेवणावळी, इ. गोष्टीत वेळ घालवतात.

**खिक्सावा**–मार्गशीर्ष किंवा पौष महिन्यात रानावनातील भुताखेतांच्या प्रीत्यर्थ हा उत्सव करतात. त्यामुळे जंगलातून सपाट प्रदेशात जाणाऱ्या लांब मार्गावर ती लोकांना त्रास देत नाहीत, अशी त्यांची समजूत आहे. या वेळी त्यांना भात, फळे, फुले व काही वेळा कोंबडी व बकरे अर्पण करतात.



हातातली वांगडी

**वांग**–ज्येष्ठ किंवा आषाढ महिन्यांत दोन दिवस हा उत्सव करतात. पहिल्या दिवशी बुद्धाच्या कणकेच्या प्रतिमा करतात आणि त्यांचा वरचा भाग लाल रंगाने रंगवतात. दुसऱ्या दिवशी सर्वांनी दिलेल्या धान्यातून गावजेवण घालतात.

**जोन्खजॉन**–डोइमाराहून परत आल्यावर, पाऊसपाणी भरपूर होऊन पिके चांगली यावीत, म्हणून हा उत्सव करतात.

**रेक लापसांग छोंगवा**–पिके समाधानकारक वाढत नाहीत, असे पाहिल्यावर हा विधी करतात. लामा शेतात जातो व अनेक तास धार्मिक ग्रंथांचे वाचन करतो. त्या वेळी बुद्धाच्या कणकेच्या प्रतिमा करतात. त्यांपैकी नंतर काही खातात व उरलेल्या शेतात टाकतात. लामा कृषिदेवतेची पूजा करतो व किडी, रोग आणि जंगली जनावरे यांनी पिकांचा नाश करू नये, म्हणून प्रार्थना करतो.

याशिवाय घरदार, गुरेढोरे, लोक यांचे रक्षण व्हावे म्हणूनही ते काही विधिविधाने करतात.

**मृतकप्रथा** – हे लोक श्रीमंत लोकांना जाळतात व गरीब लोकांना पुरतात. थोंग लोकांना प्रेताला स्पर्श करता येत नाही. म्हणून त्या जातीशी संबंध असणारे छाओ पुरुष प्रेताला स्नान घालतात, त्याच्या मस्तकाला व तोंडाला लोणी फासतात आणि प्रेत कपड्यांत गुंडाळून त्याच्यावर काही नाणी ठेवतात. नंतर लामा प्रेत कोणत्या ठिकाणी न्यायचे, ते सांगतो. स्मशानात प्रेत नेताना ग्रामपुरोहित मंत्र म्हणतो. छाओ पुरुष मृतासाठी खड्डा खणतात. प्रेत खड्ड्यात ठेवल्यावर माती व केळीची पाने यांनी तो बुजवतात व त्याच्यावर थोडी दारू शिंपडतात. प्रेतवाहकांना नंतर मृताच्या घरी जेवण वाढतात व पाच रुपये देतात.

तिसऱ्या दिवशी ग्रामपुरोहित मृतात्म्याला भात, मका वगैरे अर्पण करतो. सातव्या दिवसापर्यंत तसेच १४, व्या व २१ व्या दिवशी मृतात्म्याला असेच अन्न अर्पण करतात. मृताशौच अनेक दिवस पाळतात व एकवर्षपर्यंत मृताचे आप्त नाचगाण्यात भाग घेत नाहीत. हे लोक वर्षश्राद्ध करतात आणि त्या दिवशी उंच खांब उभारून त्यावर मंत्र लिहिलेला ध्वज फडकवतात. या वेळी जमलेल्या गावकऱ्यांना जेवण घालतात. या लोकांचा पुनर्जन्मावर विश्वास आहे. चांगल्या माणसाला पुन्हा मनुष्याचा व वाईट माणसाला जनावराचा जन्म मिळतो, अशी त्यांची समजूत आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारत सरकार या प्रदेशाच्या व लोकांच्याही विकासाकडे अधिक लक्ष पुरवीत आहे. या भागात सरकारने रस्ते व पूल बांधले असून, दळणवळणाची अधिक सोय केली आहे. पोस्ट व बिनतारी संदेशयंत्रणाही त्या भागात कार्यान्वित आहे. रूपा व बोमडिला या ठिकाणीं सरकारी इस्पितळे असून, लोक त्यांचा फायदा घेत आहेत. दरवर्षी मैदानी प्रदेशात जाण्यापूर्वी या लोकांना मलेरिया – प्रतिबंधक औषधे देण्यात येतात. शेतीसाठी त्यांना चांगले बीबियाणे व अवजारे सरकार पुरवते आणि भाजीपाला व फळझाडे लावायला प्रोत्साहित करते. रूपा, शेरगाव व जिगाव या ठिकाणीं प्राथमिक शाळा उघडण्यात आल्या असून, त्यांत बरीच मुले मातृभाषेतून शिक्षण घेतात. बोमडिला इथल्या शाळेमध्येही अनेक विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. सुतारकाम, लोहारकाम, विणकाम, लाकडावरील कोरीव काम, इ. व्यवसायांचे शिक्षण सरकार या लोकांना देत आहे. [ दि शेरडुकपेन्स – आर्. पी. पी. शर्मा १९६१ ]

## शेरोगार

एक जात. या लोकांची वस्ती कर्नाटकात आढळते. हे गोव्याहून इकडे आले असे म्हणतात. शिपाईगिरी हा यांचा मूळ व्यवसाय होता. परंतु अलिकडे हे शेतीही करू लागले आहेत. यांना मांसाहार चालतो; पण ते दारू पीत नाहीत. शेरोगार लोक मुलीचा विवाह आठव्या–दहाव्या वर्षी आणि मुलाचा विवाह चौदा ते अठरा वर्षापर्यंत करतात. यांच्यांत विधवा-विवाहाला बंदी आहे. रवळनाथ, काळभैरव

निरंकार व महामाई ही त्यांची कुलदैवते होत. हे मृताला जाळतात, पण लहान मुलांची प्रेते पुरतात. [ मुं. इ. जा. ]

**शेर्पा** नेपाळमधील एक जात. नेपाळमध्ये जे तिबेटी लोक अनेक शतके वसलेले आहेत, त्या सर्वांना नेपाळी लोक भोटिया या सामान्य नावाने ओळखतात. पण भोटियांच्या अनेक जाती असून, त्यांतली शेर्पा ही जात पर्वत-संचारातील कौशल्यामुळे विशेष प्रसिद्ध आहे. हिमालयातील निरुंद दऱ्यांत, एव्हरेस्टसारख्या अत्युच्च शिखरांच्या छायेत हे लोक वसलेले आहेत. तिबेटीतल्या शर्प या शब्दापासून शेर्पा हे नाव उगम पावले आहे. शर्पचा अर्थ पूर्वेकडील असा आहे. पण शेर्पांची वसती तिबेटाच्या दक्षिणेला असून, त्यांना हे नाव का मिळाले ते समजत नाही.

शेर्पा जातीचे लोक साहसी असून, उच्च प्रकारची राहणी, सामाजिक जाणीव, सुसंस्कार आणि बुद्धाविषयी दृढ भक्ती यांमुळे ते इतर भोटियांहून अगदी वेगळे वाटतात. नीतिमत्ता, विश्वसनीयता व सौजन्य हे शेर्पांचे गुणही विशेष उल्लेखीय आहेत.

शेर्पा लोकांची मुख्य वसती खुंबू, फारक व सोलू या तीन विभागांत आहे. खुंबूमधली गावे १२ ते १३ हजार फूट उंचीवर असून, फारकमधील गावे ८–९ हजार फूट उंचीवर आहेत. सोलू हा भाग फारकच्या नैर्ऋत्येला असून, त्या भागातले पर्वत अधिक उतरते असल्यामुळे तिथे शेतीला जास्त उपयोगी जमीन सापडते. या तीन्ही भागांना मिळून सोलू-खुंबू किंवा शर-खुंबू हे सामान्य नाव लावले जाते. त्या तीन्ही भागांतील शेर्पा एकाच जातीचे असले, तरी खुंबू व सोलू या विभागांतील भूप्रदेश व हवामान यांत बराच फरक असल्यामुळे, त्या भिन्न भागांत वसलेल्या शेर्पांच्या राहणीतही बराच फरक पडलेला आहे.

नेपाळच्या इतर भागांतही शेर्पांची वसती विखुरलेली आहे. आणि बरेच शेर्पा नेपाळची सीमा ओलांडून, बंगालच्या दार्जिलिंग जिल्ह्यात येऊन स्थायिक झाले आहेत.

शेर्पा लोकांची सुमारे अठरा घराणी असून, त्यांचे परस्पर लग्नसंबंध होतात. त्यांच्या भाषेत घराण्याला 'रु' म्हणतात. 'रु' चा अर्थ अस्थी असा आहे. एकाच घराण्यातील माणसे एकाच रक्ताची असतात; त्यांनाच शेर्पा लोक एकाच अस्थीची मानतात. प्रत्येक घराण्याचे वेगळे कुलदैवत असते. या सर्व दैवतांचा समावेश झिदग म्हणजे भूदेवता या वर्गात केला जातो. खुंबू-यूल्ह नावाचा स्थानिक देव त्यांच्याहून श्रेष्ठ मानला जातो.

वरील अठरा घराण्यांतील व्यक्तींना समाजात अधिक प्रतिष्ठा असते; कारण त्यांनाच खरे शेर्पा मानले जाते. इतर शेर्पा त्यांच्यापेक्षा हीन गणले जातात; त्यांना खंबा म्हणतात. मात्र ते समाजातून कोणत्याही प्रकारे वेगळे राहत नाहीत. ते गावातील अधिकारी होऊ शकतात, लामापद मिळवू शकतात, मठाधिपती होऊ शकतात आणि शेर्पांच्या मुख्य घराण्यांतील व्यक्तींशी लग्नसंबंधही करू शकतात. तिबेटमधून जे शेर्पा जातीचे लोक अलिकडच्या काळात नेपाळात आले आहेत, त्यांचाही समावेश या खंबा वर्गातच केला जातो.

या खंबा शेर्पांमध्येही खडचू व खमेंडचू नामक वेगळे पोटभेद आहेत. खडचू हे खमेंडचूहून उच्च होत. खमेंडचू माणसाने उष्टावलेले भांडे खडचू माणसाला चालत नाही. मात्र खमेंडचू हे अन्य कोणत्याही प्रकारे अस्पृश्य मानले जात नाहीत. पण त्या दोन पोटभेदांत परस्पर लग्नसंबंध मात्र होत नाहीत.

शेर्पा लोकांत लग्नापूर्वी तरुणतरुणींच्या लैंगिक संबंधावर विशेष निर्बंध नाहीत. वडील माणसे त्याचा निषेध करीत नाहीत, तर त्याच्याकडे दुर्लक्षच करतात. कारण त्यात काही पाप आहे, असे मानले जात नाही. अशा संबंधातून जर मूल जन्मले, तर मुलीचे आईबाप त्याचा सांभाळ करतात. पुष्कळदा त्या मुलाचे जन्मदाते जोडपे लग्न करते.

**विवाहप्रथा**—तरुण-तरुणी बहुधा स्वतःच आपला जोडीदार निवडतात आणि वडील माणसे त्यांच्या लग्नाला संमती देतात. मात्र जातीच्या नियमांप्रमाणे तो संबंध जुळवलेला असला पाहिजे. कधी कधी वडीलधारी माणसे अन्य दृष्टीने लग्नसंबंध जुळवतात. मुलाचा बाप मुलीला मागणी घालतो. मुलीच्या बापाने



शेर्पा जोडपे

ती मान्य केली तर लग्न ठरते. मात्र ते केव्हाही सहजपणे मोडता येते. आर्थिक नुकसानभरपाई वगैरे प्रश्न उपस्थित होत

नाहीत. लग्नसंबंध बहुधा समान दर्ज्याच्या घराण्यांतच ठरवला जातो. आते–मामे–मावस भावंडांचे लग्न करीत नाहीत.

लग्नसंबंध जुळल्यानंतर तो पक्का करण्यासाठी वाङ्निश्चयासारखा समारंभ करतात. त्या वेळी वराकडील मंडळींना वधूच्या घरी मेजवानी दिली जाते. त्या समारंभाला डेम-चंग म्हणतात. वराकडील मंडळी वाजतगाजत वधूकडे जातात, तेव्हा वधूकडील लोक त्यांचे स्वागत करतात, धूप जाळतात, काही गीते म्हणतात व त्यांना मद्य देतात. त्यानंतर वराकडील दोन तरुण एक गळपट्टा घरातील मुख्य खांबाला गुंडाळतात आणि नंतर सर्व नातेवाइकांना गळपट्टे व मद्य देतात. मग मुलीचा बाप उभा राहून आपली मुलगी अमुक वराला दिली आहे, अशी घोषणा करतो. मग मुलाचा बाप त्याला गळपट्टा व मद्य देतो. अशा प्रकारे डेम-चंगचा विधी पूर्ण होतो. त्यात वधू-वर भाग घेत नाहीत. त्यानंतर नृत्य होते. त्या नृत्यात वर भाग घेऊ शकतो.

या समारंभानंतर वधू-वरांचा संबंध होऊन मूल जन्माला आले, तर ते कायदेशीर मानले जाते. मात्र त्यानंतरही दोघांपैकी कोणी अन्य व्यक्तीशी संबंध ठेवला तरी दुसरा आक्षेप घेऊ शकत नाही.

डेम-चंग समारंभानंतर काही वर्षांनी मुख्य लग्न-समारंभ होतो. कधी कधी नियोजित वधू-वरांना एक किंवा दोन मुले झाल्यानंतरही लग्न करतात. या विलंबाला अनेक कारणे असू शकतात. लग्नानंतर लगेच स्वतंत्र बिऱ्हाड मांडणे शक्य नसणे, मुलीच्या बापाला तिची मदत आवश्यक असणे, इ. कारणांमुळे लग्न लांबते.

लग्नसमारंभात वधूचा पिता व इतर नातेवाईक, स्नेही व गावकरी तिला ज्या वस्तू भेट म्हणून देतात त्या सर्वांचा समावेश हुंड्यात केला जातो. त्या वस्तू जमवणे हाच मुख्य कार्यक्रम असतो. त्या सर्व वस्तू वधूला स्त्रीधन म्हणून मिळतात. त्यावर इतर कोणाचाही हक्क नसतो.

मुख्य समारंभाच्या प्रारंभी एका चटईवर तांदुळाचे दाणे पसरून त्यांत दोन स्वस्तिके कोढतात. त्यांवर वधू-वर बसतात. समोर लामा बसतो. त्यानंतर वधू-वरांच्या मस्तकांना लोणी लावतात व त्यांना परस्परांशी एकनिष्ठ राहण्याचा उपदेश करतात. त्यानंतर वराकडील माणसे शंख फुंकतात व नृत्य करतात. अशा प्रकारे लग्नविधी पुरा होतो. याला ग्येन-कुटोप म्हणतात.

या लग्नसमारंभासाठी बराच खर्च करावा लागतो. तो टाळण्यासाठी रीत नावाचा लग्नाचा एक प्रकार रूढ आहे. त्यात नियोजित वर वधूच्या बापाला सुमारे ६ रुपये देतो आणि वधूला आपल्या घरी घेऊन जातो. अन्य कोणताही विधी करावा लागत नाही. हा प्रकार ग्येन-कुटोपइतकाच कायदेशीर गणला जातो.

शेर्पा जातीत एकाच स्त्रीने एकापेक्षा अधिक भावांशी लग्न करणे, ही गोष्ट प्रचलित आहे. लग्नसंबंध ठरवतानाच तसे ठर-



मंदिर व मठ, तेंगबोचे

वले जाते. त्यामुळे घराण्यातली मालमत्ता विभागली जात नाही. दोन भावांशी एका मुलीने लग्न करण्यात कोणालाही कमीपणा वाटत नाही. सधन व प्रतिष्ठित घराण्यांतले भाऊही तसे लग्न करतात. मात्र अशा प्रकारचा लग्नसंबंध दीर्घ काळ टिकत नाही, कारण धाकटा भाऊ पुष्कळदा दुसऱ्या तरुण मुलीशी लग्न करून वेगळा संसार मांडतो.

एका स्त्रीला एका वेळी दोनापेक्षा अधिक भावांशी लग्न करता येत नाही. पण एका पुरुषाने एकाच वेळी किती बायका कराव्या, यावर निर्बंध नाही. मात्र एका पुरुषाने अनेक बायका करणे ही चाल त्या मानाने कमी रूढ आहे.

शेर्पा लोकांत घटस्फोट सहज घेता येतो. पती व पत्नी दोघांची संमती असली की काम भागते. त्यासाठी दोघांच्या नातेवाइकांना बोलावून मद्य पाजायचे आणि त्यांच्या समोर पतीने सांगायचे की. ‘ आम्ही वेगळे झालो आहो आणि आता आम्ही पतिपत्नी नाही, ’ एवढाच कार्यक्रम करावा लागतो. त्या वेळी पतीने व पत्नीच्या एका नातेवाइकाने हातांनी धरलेला दोरा तोडतात. हे घटस्फोटाचे प्रतीक होय. दोघांपैकी एकाची संमती नसेल तर मात्र, ज्याला लग्न मोडायचे असेल त्याने ३५ रुपये भरपाई-साठी दुसऱ्याला द्यावे लागतात. त्याला फारेजल म्हणतात. त्यासाठी दोघांपैकी एकाने काही अपराध केला आहे, असे सिद्ध करावे लागत नाही.

शेर्पांमध्ये घरजावई करण्याची प्रथा आहे. ज्यांना मुलगा नाही असे आईबाप मुलीच्या पतीला घरी बोलावतात आणि त्याला आपला वारस नेमतात. मात्र त्याचे घराणे वेगळेच राहते. तो सासऱ्याचे नाव घेत नाही.

शेर्पा लोकांत पत्नी ही पतीची दासी मानली जात नाही. संसारात तिला स्वातंत्र्य व मानाचे स्थान असते. आणि शेर्पा पतिपत्नींपैकी कोणी अन्य व्यक्तीशी अनैतिक संबंध ठेवला तरी त्याला कोणी फारसे महत्त्व देत नाहीत; त्याकडे दुर्लक्षच करतात. त्या कारणामुळे घटस्फोट घेतला जात नाही. व्यभिचार हे पाप मानले जाते. दंड म्हणून दारू व द्रव्य दिले, की त्या पापाचे क्षालन होते. पण शेर्पा लोक त्या बाबतीत बरेच सहिष्णू आहेत. अनौरस मुलांनाही ते हीन मानीत नाहीत. प्रतिष्ठित घराण्यांतील पुरुषही अनैतिक संबंधातून जन्मलेल्या आपल्या मुलांना खुशीने सांभाळतात. अशा मुलांना बापाच्या संपत्तीचा वाटाही मिळू शकतो.

शेर्पांची गावे लहान असून स्वावलंबी असतात. शेतसारा सरकारी खजिन्यात भरण्याचे काम गावाचा प्रतिनिधीच करतो. गुन्ह्यांची माहिती सरकारी अधिकाऱ्यांना लगेच कळवली जातेच असे नाही. गावांतील तंटे ग्रामपंचायतीकडून निकाली काढले जातात. गावांतील लोक वजनदार व प्रतिष्ठित व्यक्तींच्या



तेंगबोचे येथील मठातील लामा

मल्याने ठराविक काळासाठी अधिकारी नियुक्त करतात व त्यांना पंचायतीच्या नियमांप्रमाणे कारभार करण्याचे पूर्ण स्वातंत्र्य असते. त्यांची नियुक्ती वंशपरंपरेने केली जात नाही.

उद्योग – शेती, पशुपालन व व्यापार हे शेर्पांचे मुख्य व्यवसाय आहेत. डोंगराळ प्रदेशात वस्ती असल्यामुळे शेतीला उपयुक्त अशी सपाट जमीन सर्वत्र मिळत नाही. अशी बरीच सपाट जमीन ज्या जागी आढळते तिथेच गावे वसलेली आहेत. काही ठिकाणी हिवाळ्यात खूप बर्फ पडत असल्यामुळे सुमारे सहा महिने शेती बंद असते. इतर ठिकाणी हिवाळ्यातही गहू, सातू वगैरे धान्ये पिकवता येतात. उन्हाळ्यात गहू, मका, बटाटे, इ. पिके काढली जातात. नांगर ओढण्याचे काम आजवर माणसेच करीत होती. अजूनही काही ठिकाणी करतात. पण आता नांगराला पशू जुंपण्याची पद्धत सुरू झाली आहे. शेतीच्या कामात स्त्रिया बरीच मदत करतात.

गायी, याक वगैरे पशू पाळणे हा शेर्पांच्या दृष्टीने अधिक उच्च व्यवसाय आहे. श्रीमंत व प्रतिष्ठित लोकही स्वतः त्यात भाग घेणे कमीपणाचे मानीत नाहीत. दूधदुभत्यासाठीच गुरे पाळतात असे नाही, तर विकण्यासाठीही त्यांची जोपासना करतात. त्यांच्या दुधापासून दही व लोणी हे पदार्थ मिळतात. शेर्पांच्या अन्नात त्यांना महत्त्वाचे स्थान असते. धार्मिक विधीत लोण्याचा बराच वापर केला जातो. याकचे मांसही ते काही प्रमाणात खातात. त्याशिवाय वाहन म्हणून याकचा खूपच उपयोग होतो.

शेर्पा लोक इतर जातीच्या लोकांपेक्षा सधन आहेत, त्याचे कारण त्यांचा तिबेटशी चालणारा व्यापार. तिबेटमधून ते मीठ व लोकर आणतात आणि गुरे, धान्य, लोणी, कागद, चामडी, साखर, इ. पदार्थ तिबेटात पाठवतात. काही पदार्थ ते भारतातून आणून तिबेटात पाठवतात. हा व्यापार मीठ व धान्य या पदार्थांच्या देवघेवीने चालतो आणि त्यातच शेर्पांना खूप फायदा होतो.

शेर्पा स्त्रीपुरुषांना सूत कातता येते. ते विणून वस्त्रे तयार करणे हे मात्र केवळ स्त्रियांचे काम होय. याकच्या केसांपासून त्या रग बनवतात. तिबेटी लोकरीपासून चांगले वस्त्र बनवले जाते. त्यापासून कपडे शिवण्याचे काम घरोघरी केले जाते. शिवणकामावर उपजीविका करणारे काही लोकही आहेत. बूट शिवणारे लोकही वेगळे असतात. हे कपडे शिवणारे व बूट शिवणारे बहुतेक लोक तिबेटमधून आलेले, हीन वर्गातले असतात. त्यांना व त्यांच्या कामाला समाजात फारसा मान मिळत नाही. सुतारकाम मात्र प्रतिष्ठित मानले जाते आणि काही शेर्पा लोक शेतीचे काम नसेल तेव्हा घरे बांधण्याचे काम करतात. त्या कामात त्यांना चांगली प्राप्ती होते.

शेर्पा लोक लोहारकाम मुळीच करीत नाहीत. कामी जातीचे हिंदू लोक ते काम करीत आले आहेत. नेपाळी हिंदू लोक

त्यांना अस्पृश्य मानतात, त्याप्रमाणे शेर्पाही त्यांना दूरच ठेवतात.

शेर्पांच्या अंगी जो चपळपणा व काटकपणा आहे तो त्यांना पर्वतसंचारात फार उपयोगी पडतो. गिर्यारोहण हा नवा व्यवसाय त्यांना आता मिळाला आहे.

**देवधर्म** – शेर्पा समाजाचे दोन भाग झालेले आहेत. एक भाग शेती, व्यापार वगैरे उद्योग करून पोट भरणाऱ्या सामान्य लोकांचा आणि दुसरा भाग मठांत राहून धार्मिक जीवन जगणाऱ्या भिक्षूंचा व भिक्षुणींचा. गावाबाहेरील मठात वास्तव्य करणारे भिक्षू संसारापासून अलिप्त असले, तरी लोकांच्या धार्मिक जीवनात त्यांना महत्त्वाचे स्थान असते. कारण सर्व धार्मिक विधी व सण यांतील मंत्रतंत्र त्यांनाच माहीत असतात. त्यांच्यावाचून ते विधी कोणी चालवू शकत नाही. त्यामुळे त्या लामांचा व गावकऱ्यांचा सतत घनिष्ठ संबंध राहतो.

मठांतील भिक्षूंचे व भिक्षुणींचे जीवन अगदी शिस्तबद्ध व आखीव असते. त्यांना धर्माचा सतत अभ्यास करावा लागतो आणि धर्मनियमांचे काटेकोर पालन करावे लागते. त्यांचेही काही सण व उत्सव असतात आणि गावातले लोक त्या प्रसंगी तिथे उत्साहाने जमा होतात. सामान्य शेर्पांना मठातील भिक्षूंविषयी बराच आदर असतो; कारण गृहस्थाश्रमापेक्षा मठातील संन्यस्त जीवन उच्च श्रेणीचे होय, अशीच सर्वांची धारणा आहे. सांप्रतही अनेक तरुण मठातील जीवन स्वीकारतात.

गावात राहून संसार करणारेही काही लामा असतात. गावातील सण-उत्सवांतील धार्मिक विधी ते करतात. विशेष महत्त्वाच्या विधीसाठी मठवासी लामांना बोलावले जाते.

शेर्पा लोक बौद्ध पंथाचे अनुयायी आहेत. ते आपापल्या घरांत प्रार्थना करतात, प्रार्थना–चक्रे फिरवतात आणि गोंबा व चोरटेन यांना प्रदक्षिणा घालतात. काही लोकांच्या घरात देवघर असते. तिथे एका ओटचावर पितळी भांड्यात पाणी भरून ठेवतात. रोज सकाळी ताजे पाणी भरतात व तिथे लोण्याचे दिवे लावतात. घरातील दैनिक पूजेसाठी लामाची आवश्यकता नसते. महत्त्वाचे धार्मिक विधी व सार्वजनिक सण-उत्सव पार पाडण्यासाठी मात्र दोन-तीन लामा लागतात, कारण त्यांतील तांत्रिक भाग सोपा नसतो. त्यासाठी पीठ किंवा भात व लोणी मिसळून तोरमा म्हणजे देवतांच्या आकृती तयार कराव्या लागतात. प्रत्येक विधीसाठी वेगवेगळ्या आकृती तयार करतात. त्यांचे वर्णन करणारी धार्मिक पुस्तके आहेत. विधी पूर्ण झाल्यानंतर त्या आकृती मोडून त्यांचे तुकडे प्रसाद म्हणून वाटतात.

तोरमांच्या पुढे कोणत्या वस्तू व पदार्थ ठेवायचे तेही ठरलेले असते. त्यांत मानवी कवटीपासून बनविलेले तीन पेले असतात व त्यांत मेर म्हणजे मद्य व रक्त ठेवायचे असते. पण रक्त मिळणे अशक्य असल्यामुळे त्याऐवजी चहा ठेवतात. तसेच



तोरमा (भिन्न देवतांच्या आकृती)

पिण्याचे पाणी, पाय धुण्यासाठी पाणी, फुले, सुगंधी द्रव्ये, सुवासिक जल, दीप व खाद्यपदार्थ तोरमाच्या पुढे मांडून ठेवतात. त्याव्यतिरिक्त पाच ज्ञानेंद्रियांसाठी आरसा, वाद्य, सुगंध, अन्न व वस्त्र हे पदार्थ अर्पण केले जातात. त्यांना नंग–चे म्हणतात. आणखीही पाच किंवा सात पितळी वाडगे ठेवून, काहींत तांदूळ किंवा मका व इतर वाडग्यांत पाणी ठेवतात. याशिवाय इतरही बऱ्याच वस्तू पूजेसाठी लागतात. लोण्याचे दिवे बहुतेक मंगल प्रसंगी लावतात. मोठ्या सणाच्या वेळी त्यांची संख्या शंभरपर्यंत जाते.

पूजाविधीत प्रथम देवतांना आवाहन करायचे असते. त्यासाठी वाद्यांचा गजर करतात. मग त्या देवतांचे स्तवन आणि त्यानंतर मंत्रजप करतात. शेवटी प्रार्थना करतात.

**सण व उत्सव** – शेर्पा लोक निरनिराळ्या हंगामांत भिन्न प्रकारचे धार्मिक विधी व सण साजरे करतात. त्यांतले काही विधी व सण असे –

**त्सिरिम** – एप्रिल महिन्यात शेतीची कामे सुरू करताना व ऑक्टोबर महिन्यात ती कामे संपल्यानंतर हा विधी केला जातो. सर्व माणसांना धोकादायक अशी भुतेखेते पळवून लावणे हा त्यामागचा हेतू असतो. हा कार्यक्रम गावातील देवळांत करतात. त्यासाठी दोन स्थानिक लामांची मदत घेतात. देवतेची पूजा झाल्यानंतर लामांना भोजन देतात. गावकऱ्यांना फक्त मद्य दिले जाते.

**ओशो** – शेतात पेरणी केल्यानंतर नवीन पिकांचे देवांनी संरक्षण करावे म्हणून एप्रिल किंवा मे महिन्यात हा विधी नउआ म्हणजे ग्रामपालक याच्याकरवी केला जातो. नउआन

घरात पूजाअर्चा व भोजन झाल्यानंतर काही लोक गावाभोवती प्रदक्षिणा घालतात. त्यामुळे गावाभोवती अदृश्य संरक्षक भिंत तयार होते, अशी त्यांची श्रद्धा आहे.

निउंग्ने – पापमोचनासाठी हा विधी करायचा असतो. हा व्यक्तिगत असला तरी तो सार्वजनिक स्वरूपातही केला जातो. त्यासाठी मोठ्या मठातील लामांना पाचरण करतात. ज्यांना या विधीत भाग घ्यायचा असतो ते सर्व गावातील देवळात जमतात व स्थानिक लामा स्तोत्रे व प्रार्थना म्हणतात. त्या प्रसंगी वाद्ये वाजवीत नाहीत किंवा ओरडत नाहीत. सर्व कार्यक्रम शांतपणे केला जातो. पहिल्या दिवशी चांगले भोजन करतात. मग देवळाला दोन प्रदक्षिणा घालतात. नंतर त्या दिवशी तीनदा, पापाबद्दल क्षमा करावी, अशी पावा चेरेसीची म्हणजे अवलोकितेश्वराची प्रार्थना करतात. दुसऱ्या दिवशीही तसाच कार्यक्रम असतो. मात्र त्या दिवशी सर्वजण उपास करतात. तिसऱ्या दिवशी सर्वजण उपास सोडतात. त्या दिवशी गावकऱ्यांना प्रसाद वाटला जातो. निमंत्रित थोर लामा प्रत्येकाला आशीर्वाद देतो.

दुमजे – हा गावाचा मोठा उत्सव जुलै महिन्याच्या आरंभी केला जातो. तो आठ दिवस चालतो. त्यात सर्व गावकरी देवळात जमून खाणेपिणे व मौज-मजा करतात.

येर-चंग – ज्यांच्याजवळ गुरांचे कळप असतात, ते दुमजेनंतर काही दिवसांनी गुरे घेऊन उंचावरील वसतीवर जातात आणि तिथे पशूंच्या भल्यासाठी हा सण साजरा करतात. त्यात बौद्ध देवता व संत यांची प्रार्थना केली जाते. नंतर मेजवानी व मद्यप्राशन होते.

मणि-रिम्डू — हा सण दुमजे सारखाच असतो; मात्र तो मठात केला जातो आणि त्यात सर्व भिक्षू भाग घेतात. त्या प्रसंगी नाच-गाणे केले जाते. नर्तक निरनिराळ्या देवतांचे मुखवटे घालून नाचतात. त्यानंतर होमहवनही केले जाते. या सणात काही माणसांच्या अंगात देवतांचा संचार होतो.

शेर्पा हे महायान बौद्ध पंथाचे अनुयायी असून, बुद्ध व बोधिसत्त्व या देवतांचे उपासक आहेत. परलोकी आपले भले व्हावे, स्वर्गाची प्राप्ती व्हावी म्हणून ते अमिताभ, अवलोकितेश्वर व पद्मसंभव या देवतांना आणि अन्य दुय्यम देवांनाही भजतात. मात्र इहलोकी ज्या आपत्ती येतात किंवा रोग होतात त्यांचे निवारण करण्यासाठी ते या देवतांची प्रार्थना करीत नाहीत. या जगात जी क्षुद्र दैवते व भुतेखेते आहेत त्यांच्या कोपामुळेच रोग किंवा इतर संकटे येतात व त्यांना खूष केले असता ती संकटे दूर होतात, अशी त्यांची श्रद्धा आहे. अशी त्यांची अनेक दैवते आहेत. काही सामर्थ्यवान व्यक्ती त्यांच्यावर ताबा ठेवू शकतात. लामांच्या अंगी ते सामर्थ्य असते. मात्र कोणते दैवत त्रास देत आहे, ते ओळखण्याचे काम काही थोड्या व्यक्तीच करू शकतात. त्यांच्या अंगात येते, तेव्हा त्या व्यक्ती संकटाचे कारण व त्यावर उपाय सांगतात. मग लामा ते उपाय करतात.



मणि-रिम्डू सणातली भिक्षू नर्तक

अशा क्षुद्र दैवतांना व भुताखेतांना श्रिंडी हे सामान्य नाव असून, त्यांना मद्य व इतर पदार्थ दिले की ती निघून जातात.

शेर्पा लोकांत सर्व माणसांविषयी समभाव, सौजन्य व प्राणिमात्राविषयी दया हे गुण प्रकर्षाने दिसून येतात.

मर्तिकप्रथा – मनुष्य आसन्नमरण झाला की शेर्पा लोक पंचाक्षरी व लामा यांना बोलावून त्याचे प्राण वाचवण्याचा प्रयत्न करतात. पंचाक्षरी मंत्रोपचार करतात; तर लामा धार्मिक पुस्तकाचे पठण करतात. मनुष्य मरण पावला की प्रेत शुभ्र वस्त्राने झाकून ठेवतात. मग लामाला बोलावतात. तो एक प्रार्थना म्हणतो व मृताच्या डोक्याचे थोडे केस उपटतो. तिथून मृताचा आत्मा बाहेर पडतो, अशी त्यांची समजूत आहे. त्यानंतर लामा प्रेताची विल्हेवाट कशी लावायची ते सांगतो. तीन दिवस प्रेत बसल्या स्थितीत भिंतीजवळ बांधून ठेवतात. लामा निरनिराळ्या देवतांच्या तोरमा करून त्यांची स्तोत्रे गातो. त्या वेळी वाद्येही वाजवतात.

यांच्यांत प्रेते जाळण्याची चाल आहे. मुलांची प्रेते मात्र पुरतात. मृत मनुष्य अगदी गरीब असेल किंवा त्याला कोणी नातेवाईक नसेल तर त्याचे प्रेत नदीत टाकून देतात. कधी कधी लामाच्या सांगण्यावरून प्रेत पुरतात.

एक मनुष्य प्रेत पाठीवर वाहून नेतो. स्मशानात जाण्यासाठी निघताना एक हाडांची तुतारी वाजवली जाते. सर्वांच्या पुढे एक लामा प्रार्थना–निशाण घेऊन चालतो व त्याच्या मागे इतर लामा जातात. मृताचे नातेवाईक व मुलगे बहुधा बरोबर

जात नाहीत. लामा धार्मिक पुस्तकांचे पठण करीत जातात.

स्मशानात जाताच प्रेत चितेजवळ ठेवतात आणि नेहमीच्या पद्धतीने एका ओटयावर तोरमा ठेवून देवतांना आवाहन करतात. लामांचे पठण चालू असताना बरीच वाद्ये वाजवण्यात येतात. नंतर प्रेत चितेवर ठेवून पुन्हा धार्मिक पठण करतात. मग प्रेत वाहून नेणारा चितेला अग्नी देतो. चिता जळण्यापूर्वी अग्नीला तोरमा व काही पदार्थ अर्पण करतात. काही तोरमा अन्य देवतांना अर्पण करतात व काही तोरमा प्रसाद म्हणून लामांना व जमलेल्या लोकांना वाटतात.

चिता जळत असतानाच प्रेताच्या हाडाचा एखादा जळका तुकडा काढून घेतात, त्याची पूड करतात व ती चिखलात मिसळून ठेवतात. दहन पूर्ण झाल्यावर सर्वजण घरी जातात. तिथे लामांना व इतरांनाही काही वस्तू किंवा पदार्थ किंवा द्रव्य बक्षीस म्हणून देतात.

त्यानंतर लगेच किंवा सातव्या किंवा अकराव्या दिवशी नपूर नामक विधी असतो. त्या वेळी मृताची एक आकृती करून तीवर त्याचे कपडे घालतात व तिच्या समोर लामा एका पुस्तकाचे पठण करतो. त्या आकृतीला अन्नही देतो व शेवटी मृताच्या आत्म्याला स्वर्गात जायला सांगतो. या विधीच्या वेळी मृताच्या नावाचा एक कागद एका काडीला लावून ती मृताच्या आकृतीजवळ धान्याने भरलेले भांडे ठेवून त्यात उभी करतात. अगदी शेवटी ह्या नावाचा कागद लामा एका हातात धरतो, दुसऱ्या हाताने लाकडाची ढलपी तुपात बुडवून पेटवतो व कागदाला लावतो. कागद जळून राहिलेली राख मृताच्या हाडाची पूड चिखलात मिसळून ठेवलेली असते, त्यात कालवतात व त्या सर्वांची एक आकृती बनवतात. ही आकृती एखाद्या सुरक्षित जागी ठेऊन देतात.

नपूर विधी ज्या दिवशी केला जातो त्या दिवशी नातेवाईक व मित्रमंडळी यांना जेवण घातले जाते.

या लोकांत श्राद्ध करण्याची चाल रूढ नाही. [ दि शेर्पाज ऑफ नेपाळ – सी. एफ. हैमेन्डॉर्फ, १९६४ ]

**शेष** (१) नवनागांपैकी एक नाग. देवा-मानवांचा मित्र. श्रीविष्णूचा अंशावतार. हा कद्रू व कश्यप यांचा पुत्र असल्याचे भागवतात सांगितले आहे. हा पातालात राहतो व आपल्या मस्तकी पृथ्वीचा भार वाहतो. अंशरूपाने तो श्रीविष्णूचे शयनही होतो. भगवंताचे शेषशायी रूप याच्यामुळेच निर्माण झाले आहे. याला सहस्र मस्तके आहेत. त्यामुळेच तो पृथ्वीचा भार वाहण्यास समर्थ होतो. याच्या गळयात शुभ्र रत्नमाला असून, हातात नांगराचा फाळ व कोयता आहे. गंगेने याची भक्ती करून त्याच्याकडून ज्योतिष व खगोल या शास्त्रांचे ज्ञान मिळवले (विष्णुपु. २. ५.१३–२७).

इच्छेला येईल त्याप्रमाणे रूप धारण करण्याची विद्या याला ठाऊक होती. त्यामुळेच त्याचे अनेक अवतार किंवा कला निर्माण झाल्या. वसुदेव नवजात कृष्णाला घेऊन गोकुळात निघाला असता घो घो पाऊस पडू लागला. त्या पावसापासून कृष्णाचे रक्षण करण्यासाठी याने आपले फणाछत्र त्याच्यावर धरले.



शेषनाग – अजंटा लेण्यातील चित्र

रामबंधू लक्ष्मण, कृष्णबंधू बलराम व महाभाष्यकार पतंजली हे शेषाचे अवतार समजले जातात.

शेष हा कालाचे प्रतीक मानला जातो. तो असंख्य रूपांनी सृष्टीच्या संकोच – विकासात सहभागी होतो. विष्णुपुराणात (५.९.२९) याची स्तुती करताना म्हटले आहे, ते असे –

त्वया धृतेयं धरणी बिभर्ति चराचरं विश्वमनन्तमूर्ते।
कृतादिभेदैरज कालरूपो निमेषपूर्वो जगदेतदत्सि॥

अर्थ – हे अनंतमूर्ती शेषा, तू ज्या धरित्रीला धारण करतोस ती पृथ्वी चराचर विश्वाला धारण करते. हे अजा, तू कृतयुगापासून निमेषापर्यंत कालाचे भाग असणाऱ्या विश्वाचे भक्षण करतोस.

सर्व जगाला शेषरूपी कालाने लपेटले आहे. काल आणि दिक् या दोहोंच्या खेचाखेचीत सृष्टीच्या उत्पत्ति-स्थिति-लयांची प्रक्रिया चालते. जेव्हा सर्व सृष्टीचा विनाश होतो, तेव्हा काल शेष उरतो. म्हणून काल आणि शेष हे दोघे एकाच तत्त्वाचे पर्याय ठरतात.

लक्ष्मी व वारुणी या शेषाची पूजा करतात व प्रलयकाळी शेष विषयुक्त अग्निज्वाला बाहेर फेकतो, अशी कल्पना आहे. [ प्रा. च. को.; भा. प्र. वि. ]

(२) यजुर्वेदीय वेदांगज्योतिषाचा कर्ता. या ग्रंथात ४३ श्लोक असून, त्यांपैकी ३० लगधाचे व १३ याचे आहेत. या ग्रंथावर सोमकाची टीका उपलब्ध आहे.

(३) या नावाचा सिंधी स्त्रियांचा एक उत्सव. ज्येष्ठातल्या प्रत्येक रविवारी व अमावास्येला सिंधी स्त्रिया तळी, कालवे किंवा समुद्र यांच्या तीरी जमून चिखलाचे गोळे बनवतात व त्यांत खजुराच्या फांद्या रोवतात. ते जलदेवाचे प्रतीक समजून त्याला गूळ व वाटाणे वाहतात. त्याने आपल्या पति-पुत्रांचे रक्षण करावे म्हणून त्याची प्रार्थना करतात. गोडाधोडाचा स्वयंपाक करून ब्राह्मण व कुमारिका यांना जेवायला वाढतात व त्यानंतर मुलांबाळांसह स्वतः भोजन करतात. [ सिं. क. ]

**शैलव्रत** ही एक प्रकारची पर्वतपूजा आहे. चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून सात दिवस महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमत्, ऋक्ष, विंध्य व पारियात्र या सात कुलपर्वतांची रोज पूजा करावी, यवांनी होम करावा आणि सातूच्या पदार्थांवर निर्वाह करावा, असा या व्रताचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. उद्यापनाच्या वेळी वीस प्रस्थ यव दान द्यावे. फल – पृथ्वीची राज्यप्राप्ती व शत्रुनिर्दालन.

हे व्रत करणाऱ्याने कोणत्याही एका पर्वताची पूजा करावी, असाही एक पर्याय आहे. [ हि. ध. ]

**शैव आगम संप्रदाय** शिवालाच एकमेव उपास्य मानणाऱ्या संप्रदायांना शैव म्हणतात. वैदिक काळी निसर्गातली विध्वंसक आणि भयावह दृश्ये पाहून माणसांनी ती उग्र कृत्ये रुद्र या देवतेची असल्याचे मानले व रुद्राने आपला संहार करू नये म्हणून त्याच्या प्रार्थना केल्या (ऋ. १.११४.७). ऋग्वेदातली रुद्रसूक्ते अशा प्रार्थनांची आहेत. यजुर्वेदात रुद्राच्या प्रसन्नतेसाठी बलिदानाची योजना केली आहे. कालांतराने या रुद्राचे शिव या लोकमान्य देवतेशी संमीलन झाले. रुद्र हा शिवरूप असून, तो जसा संहारकर्ता आहे, तसाच कल्याणकर्ताही आहे, ही कल्पना लोकांमध्ये दृढ झाली. श्वेताश्वतर उपनिषदात रुद्र-शिवाला सर्वश्रेष्ठ देव म्हणजेच परमेश्वर मानले आहे. शिवाचे एक रूप पशुपती हे आहे. त्याचा आढळ अथर्वशिरस या उपनिषदात झाला. तिथे शैव दर्शनातल्या पशू, पाश, इ. पारिभाषिक शब्दांचा उगम झाला. शैव, पाशुपत, कालदमन (कालामुख) आणि कापालिक हे चार माहेश्वर अर्थात शैव संप्रदाय महाभारतात उल्लेखित आहेत. या चार संप्रदायांच्या मूलग्रंथांना शैवागम म्हणतात. त्यामध्ये काही आगम वैदिक आहेत, तर काही अवैदिक आहेत.

शैवागम म्हणजे शैवमताचे शास्त्र होय. उप–आगम धरून या आगमांची संख्या दोनशेपर्यंत जाते. बहुतेक सर्व आगम इ. स. पूर्व सातव्या शतकापर्यंतचे आहेत. याच आगमांचा कालांतराने तमिळ शैव, वीर शैव, आणि काश्मिरी शैव या मतांत विकास झाला.

आगम हे निगमांच्या म्हणजे श्रुतींच्या तोडीचे आहेत, असे शैव मानतात. हे आगमग्रंथ शिव आणि दुर्वास यांच्या मुखांतून बाहेर पडले, अशी शैवांची धारणा आहे. मालिनीविलास, स्वच्छंद, विज्ञानभैरव, उच्छुष्मभैरव, आनंदभैरव, मृगेंद्र, मातंग, नेत्र, नैश्वास, स्वयंभू, रुद्रयामल आणि कामिक हे त्यांतले मुख्य आगम होत. मुळात हे आगम द्वैतवादी होते. पण कालांतराने त्यांत अद्वैत प्रविष्ट झाले. वसुगुप्त व त्याच्या नंतरचे काश्मीरीय दार्शनिक यांनी आगमांचे अद्वैतपर भाष्य केले.

भारतीय कला व साहित्य यांच्यावर आगम शास्त्रांचा सखोल प्रभाव पडला आहे. कालिदासाच्या तीन्ही नाटकांचे मंगल श्लोक शैवागमांतून स्फुरलेले आहेत. नाट्य, नृत्य, शिल्प, वास्तू, चित्र, संगीत, शब्द-शास्त्र, सांख्य-योग आणि न्यायवैशेषिक या सर्व क्षेत्रांत प्रारंभी शैवागमांकडेच दृष्टी होती.

आगमग्रंथांनी ३६ तत्त्वे मानलेली आहेत. त्यांतली २४ तत्त्वे सांख्यांची आणि त्यांची समान आहेत. त्यांच्या व्यतिरिक्त काल, नियती, कला, विद्या, राग, अंशुकमाया आणि प्रकृतिमाया ही सात मिश्रतत्त्वे मिळून त्यांची संख्या ३१ होते. त्यांत शिव, शक्ती, सदाशिव, ईश्वर आणि शुद्ध विद्या ही पाच शुद्ध तत्त्वे मिळवली म्हणजे आगमोक्त तत्त्वसंख्या ३६ भरते.

शैव संप्रदायांपैकी कापालिक व कालामुख हे रुद्ररूपातच परमेश्वराचा स्वीकार करतात. हे संप्रदाय वाममार्गी असून, त्यांची साधना बीभत्स आहे. कंठहार, आभूषण, कर्णभूषण, चूडामणी, भस्म आणि यज्ञोपवीत या सहा कापालिकांच्या मुद्रिका आहेत. कपालात भोजन, चिताभस्माचा लेप, मद्यपात्रावर बसवून शिवाची पूजा, इ. अभद्र गोष्टींना धरून कालामुखांची साधना चालते. दक्षिणमार्गी शैव संप्रदायांचे पाशुपत, शैवसिद्धान्त, काश्मीरीय शैवमत आणि वीरशैवमत असे विभाजन करता येते. पाशुपतांचे केंद्र गुजरात आणि राजस्थान हे आहे. शैवसिद्धान्तांचे केंद्र तमिळ प्रदेश आहे. काश्मीरीय शैवमताचे केंद्र काश्मीर आहे व वीरशैवमताचे केंद्र कर्नाटक आहे. पाहा – शिव, काश्मीरीय शैवदर्शन. [ भा. द.; हिं. सा. को. ]

**शैवनक्षत्रव्रत** एक नक्षत्रव्रत. शिव ही या व्रताची देवता होय. फाल्गुन मासातील शुद्ध पक्षात हस्त नक्षत्र असेल त्या दिवशी व्रतारंभ करतात. व्रतकालात तेल व मीठ न खाता नक्त पद्धतीने राहावे, शिवाची पायापासून मस्तका-

पर्यंतच्या प्रत्येक अवयवाची पूजा हस्त नक्षत्रापासून एकेका नक्षत्राशी संबंध जोडून पृथक पृथक करावी, सर्व नक्तदिनी एक प्रस्थ तांदूळ आणि तुपाने भरलेले एक भांडे दान द्यावे, असा याचा विधी आहे. उद्यापनाच्या वेळी शिव व उमा यांची मूर्ती, एक सुसज्ज पलंग व गाय दान देतात. [ हि. ध. ]

**शैवमहाव्रत** एक मासव्रत. पौष अष्टमीपासून याला आरंभ करतात. याचा विधी असा – व्रतकालात नक्त करावे. परंतु शुद्ध व वद्य अष्टमीला उपवास करावा. रोज त्रिकाळ शिवाची पूजा करावी, होम करावा आणि भूमिशयन करावे. पौर्णिमेला महापूजा करावी. आठ ब्राह्मणांना भोजन घालावे आणि दोन गायी व एक कपिल बैल दान द्यावा. आणि पुढच्या प्रत्येक महिन्यात निरनिराळ्या खाद्यपदार्थांवर नक्तपद्धतीने निर्वाह करावा. या व्रताचे विविध पर्याय आहेत. [ हि. ध. ]

**शोंरचेस** एक लोकनृत्य. लडाख प्रदेशातील बौद्धलोक नव वर्षानिमित्त राजासमोर हा नाच करतात. विशिष्ट कुटुंबांतील नऊ पुरुष अथवा नऊ स्त्रिया यात भाग घेतात. कधी कधी नऊहून अधिक स्त्रियाही असतात. नृत्यात भाग घेणाऱ्या नर्तक मंडळाला रक्शोमा असे म्हणतात. नृत्याला वाद्यांची साथ असते. वादकांची संख्या दहा असते. पूर्वी हे नृत्य सुमारे पंधरा दिवस चालत होते. [ भा. लो. नृ. ]

**शोण** एक नदी. हिला हिरण्यवाह, सोना (सोन) व सोनभद्र अशी नावे आहेत. मध्य प्रदेशाच्या शहडोल जिल्ह्यातील अमरकंटक पर्वतावर सोनमुडा नावाचा एक प्रपात आहे, तोच हिचे उगमस्थान आहे. तिथून ती ईशान्येकडे वाघेलखंड, मिर्झापूर, शाहाबाद या जिल्ह्यांतून वाहात जाऊन पाटण्यानजीकच्या बांकापूरपासून जवळच गंगेला मिळते. गंगेला मिळणाऱ्या मोठ्या नद्यांपैकी ही एक आहे. हिचा शोणनद म्हणून प्राचीन काळापासून यथार्थ गौरव केला जातो. पाटलिपुत्र नगर हिच्या काठी होते, असे ग्रीक भूगोल-अभ्यासकांचे मत आहे.

शोण मगध देशातून वाहते म्हणून रामायणात तिला मागधी म्हटले आहे (१.३२). एक रम्य नदी म्हणून तिथे तिचे वर्णन आहे. विश्वामित्रासह मिथिलेला जाताना राम-लक्ष्मणांनी तिच्या तीरावर एक रात्र मुक्काम केला होता (१.३१). रामायणाप्रमाणेच मत्स्यपुराण (२२.३५), ब्रह्मपुराण (२७.३०) आणि वायुपुराण (४५.९९) यांतही पितृतीर्थ व पुण्यसरिता म्हणून तिचे उल्लेख आहेत.

शोणसंबंधी बऱ्याच दंतकथा प्रचलित आहेत. भागवतातील गजेंद्रनक्रांची लढाई शोण-गंगासंगमाच्या डोहात झाली, अशी समजूत आहे. याशिवाय तिची एक प्रेमकथा पुढीलप्रमाणे आहे.– नर्मदा ही एक राजकन्या होती. सोनभद्र नामक कोण्या पुरुषावर ती अनुरक्त झाली. त्यांनी विवाह करायचे ठरविले. परंतु काही शापामुळे त्यांचे प्रेम सफल होऊ शकले नाही. इतकेच नव्हे, तर ते नदी व नद या रूपात वाहू लागले. जणू काय पुन्हा एकत्रित न येण्यासाठीच नर्मदा पश्चिमेकडे वाहू लागली आणि शोण पूर्वेकडे वाहू लागला. [ हि. जॉ. ए. इं.; हि. ध.; श्रीरामकोश; म. ज्ञा. को.; लोकमाता; अजंता, जानेवारी १९५५ ]

**शोभाकर मित्र** (इ. स. १३ वे शतक) एक आलंकारिक. याच्या पित्याचे नाव त्रयीश्वर असून, तो काश्मीरचा रहिवासी असावा. अलंकाररत्नाकर हा त्याचा केवळ अलंकारावरील ग्रंथ होय. त्यात एकशेबारा गद्य सूत्रे आणि त्यांवरील सोदाहरण वृत्ती आहेत. उदाहरणांसाठी त्याने अनेक प्राकृत गाथाही घेतल्या आहेत. ग्रंथात एकशेसात अलंकारांचे निरूपण असून, चारुता व प्रतीतिभेद या तत्त्वांवर त्यांचे विवेचन आधारलेले आहे. शोभाकराने अनेक जुने अलंकार अमान्य करून सुमारे एकोणचाळीस नवे अलंकार सांगितले आहेत. या नव्या अलंकारांची कल्पना शास्त्रपूत आहे, असे म्हटले जाते. त्यामुळे अलंकारशास्त्राच्या इतिहासात त्याला एक मोलाचे स्थान प्राप्त झाले आहे.

शोभाकराने रुय्यकाच्या स्पर्धेसाठी आपला ग्रंथ रचला आणि त्यात बऱ्याच ठिकाणी त्याच्या मतांचे खंडन केले आहे.

कवी आलंकारिक असला तरी, त्याचे विवेचन रुक्ष नाही. त्याच्या प्रसन्न शैलीतील अलंकारांची उदाहरणे देण्यासाठी, काश्मीरी कवी यशस्कराने देवीस्तोत्र नामक काव्याची रचना केली, असे म्हटले जाते. [ सं. सा. इ., शास्त्र खंड; काव्यप्रकाश- संपा. श्री. अर्जुनवाडकर, श्री. मंगरूळकर, १९६२ ]

**शौच** शौच याचा अर्थ शुचिता असा आहे. हे बाह्य व आंतर असे दोन प्रकारचे आहे. बाह्य शौचात मुख्यत्वे स्नान हे येते. स्नानाने शरीरावरचा मळ स्वच्छ धुऊन काढणे, अस्वच्छ झाले असता हातपाय धुणे, रोज सकाळी मुखमार्जन करणे, विटाळ झाला असता अंगातले कपडे बदलून दुसरे घालणे, इ. गोष्टी बाह्य शौचात येतात. पाणी, माती, बेलफळ, तांदूळ, राख, गोमूत्र व गोमय हे पदार्थ बाह्य शुद्धीसाठी उपयुक्त मानलेले आहेत. ज्या स्थळी आपण राहतो, त्या स्थळाची शुद्धी नित्य करावी लागते. गोमय हे त्यासाठी उपयुक्त आहे. मलमूत्रविसर्जन व मैथुन या गोष्टींनंतरही जल व माती

गोष्टींचा उपयोग करावा, असे आचारेंदू या ग्रंथात सांगितले असून, शौच विषयाचा खूप तपशीलही दिला आहे. आचमन हे एक प्रकारचे शुद्धिसाधन होय. अधोवायू सरणे, खोटे बोलणे, क्रोध किंवा आक्रोश करणे या गोष्टींनीही देह अशुद्ध होतो. अशा प्रसंगी आचमन केल्याने ते ते दोष नाहीसे होतात. आहारशुद्धीविषयी तर धर्मशास्त्रातले विधि-निषेध फार कडक आहेत. कारण, आहारशुद्धीवर मनाची शुद्धी अवलंबून असते. रजस्वला स्त्रीचा स्पर्श, जननाशौच, मृताशौच, प्रेतस्पर्श, चांडाल-स्पर्श अशा प्रकारचा संसर्ग आल्यास सचैल स्नान सांगितले आहे.

अंतःशौच हे बाह्य शौचापेक्षाही अधिक महत्त्वाचे, असे धर्मशास्त्रकार मानतात. दुसऱ्यावर अन्याय न करणे, दुसऱ्यांच्या धनादिकांचा अपहार न करणे, व्यभिचार न करणे, द्रोह, कृतघ्नता, फसवणूक, इ. गोष्टी न करणे हे सर्व नैतिक नियम अंतःशौचात येतात. मनू म्हणतो (५.१०६) –

सर्वेषामेव शौचानामर्थशौचं परं स्मृतम् ।
योऽर्थे शुचिर्हि स शुचिर्न मृद्वारिशुचिः शुचिः ।।

अर्थ-देहशौच, मनःशौच, इ. सर्व शौचांमध्ये अर्थशौच म्हणजे दुसऱ्याच्या धनाचा अन्यायाने अपहार न करणे, हे सर्वश्रेष्ठ शौच होय. जो द्रव्याच्या बाबतीत शुद्ध तो शुद्ध. केवळ माती आणि पाणी यांनी शुद्ध झालेला तो खरा शुद्ध नव्हे.

अद्भिर्गात्राणि शुध्यन्ति मनः सत्येन शुध्यति ।
विद्यातपोभ्यां भूतात्मा बुद्धिर्ज्ञानेन शुध्यति ।।
(मनु. ५.१०९)

अर्थ-जलाने शरीरावयव शुद्ध होतात. मन सत्याचरणाने शुद्ध होते. भूतात्मा म्हणजे सूक्ष्मादी लिंगशरीराने अविच्छिन्न असलेला जीवात्मा ब्रह्मविद्या व तप यांनी शुद्ध होतो. आणि विपर्यय ज्ञानाने उपहत झालेली बुद्धी ज्ञानाने शुद्ध होते.

अशा प्रकारे भारतीय शास्त्रकारांनी आणि त्याचबरोबर साधुसंतांनीही अंतःशुद्धीवर भर दिला आहे. जर भावना दुष्ट असेल तर सगळे गंगाजल आणि पर्वताएवढे मातीचे ढीग मृत्यूपर्यंत उपयोगात आणले तरी त्यामुळे शुचित्व प्राप्त होणार नाही, असे धर्मशास्त्रात स्पष्टच सांगितले आहे.

योगविद्येत स्नानादिकांनी बाह्यशुद्धी व नेती, धौती, बस्ती, नवली, इ. क्रियांनी शरीराची अंतःशुद्धी सांगितली आहे. मनाची शुद्धी ही आभ्यंतर शुद्धी मानून तिच्यासाठी आसन, प्राणायाम, धारणा, ध्यान, इ. गोष्टी सांगितल्या आहेत.

वृद्धगौतमस्मृतीत शौच पाच प्रकारचे सांगितले आहे –(१) मनःशौच – अंतःकरणशुद्धी (२) कर्मशौच – नित्यनैमित्तिक कर्मांचे आचरण (३) कुलशौच – चांगल्या कुळात जन्म (४) वाक्शौच – सत्य व प्रियभाषण व (५) आभ्यंतर शौच– सत्त्वशुद्धीने शरीर व मन ही दोन्हीही शुद्ध झाली, की मनाचा ईश्वरी तत्त्वाशी संयोग व्हायला मदत होते.

धर्मशास्त्रकार हे व्यवहारज्ञही होते. शौचाच्या बाबतीत त्यांनी शास्त्राबरोबरच व्यवहारही ध्यानात घेतला आहे. स्थल, काल, देश, आत्मस्थिती, पदार्थ, ते घेण्याचा हेतू, कार्यकारणभाव, वयोमान, इ. गोष्टी शौचाच्या बाबतीत लक्षात घ्याव्या, यथाविधि शौचविधी न झाल्यास गायत्रीमंत्राचा १०८ जप व तीन वेळा प्राणायाम करावा असे त्यांनी सांगितले आहे.

अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ।
यः स्मरेत्पुण्डरीकाक्षं स बाह्याभ्यन्तरः शुचिः ।।

अर्थ – अपवित्र असो, पवित्र असो किंवा सर्व अवस्थांतून गेलेला असो, जो कोणी श्रीविष्णूचे स्मरण करील, तो बाह्याभ्यंतर शुद्ध झाला असे समजावे.

शुद्ध होण्याचा असा सोपा उपायही सांगितलेला आहे. [ न. हिं. ध.; ध. शा. वि.; श. क.; हिं. ध.; आचारेन्दुः; ]

## शौद्रायण

एक प्राचीन गणराज्य. शूद्र वर्णाहून भिन्न असलेल्या शूद्र जातीच्या लोकांवरून या जनपदाला हे नाव मिळाले असावे. सिंधू नदीकाठच्या अलोरच्या आसपास शूद्रांची वस्ती होती. महाभारतानुसार विनशन (राजस्थानाचा पश्चिम भाग) हा त्यांचा प्रदेश होय (म. भा. शल्य. ३७.१). मार्कंडेयपुराणानुसार अपरांतात अथवा पश्चिम देशात त्यांचे वास्तव्य होते. शिकंदराचे आक्रमण थोपविण्यात त्यांचा वाटा होता असे म्हणतात. सांप्रत अमरकोटच्या जवळपास असलेले सोधा राजपूत हे त्यांच्याच परंपरेतील होत, असे एक मत आहे. [ प. का. भा. ; सि. आ. प. भा. ]

## शौनक

हे अनेक व्यक्तींचे कुलनाम आहे. ऋग्वेदाच्या दुसऱ्या मंडलाचा कर्ता गृत्समद हा शौनक आहे. शतपथ ब्राह्मणातले इंद्रोत व स्वैदायन हे शौनकच आहेत. बृहदारण्यकात रौहिणायनाचा गुरू म्हणून एका शौनकाचा उल्लेख आढळतो. अनेक पुराणांतून भृगुकुलातला मंत्रकार म्हणून एक शौनक दिसतो. हा कुलपती व वेदार्थशास्त्रज्ञ होता. त्याची वंशपरंपरा रुरू – शुनक – शौनक अशी आहे.

महाभारतात शौनकाला योगशास्त्रज्ञ व सांख्यनिपुण म्हणून गौरवले आहे. विविध पुराणांतून त्याला क्षत्रोपेत द्विज, मंत्रकृत मध्यमाध्वर्यू, कुलपती अशा उपाधी मिळाल्या आहेत. याने ऋग्वेदअनुक्रमणिका, ऋक्प्रातिशाख्य, बृहद्देवता, शौनकस्मृती, चरणव्यूह, ऋग्विधान, ऋग्वेदकथानुक्रमणी, इ. ग्रंथ रचले. वैद्यक शास्त्रातील शल्यतंत्र या शाखेचा जनक ह्याच मानला गेला आहे.

शाकल व बाष्कल या ऋग्वेदाच्या दोन शाखांचे याने एकत्रीकरण केले. ऋग्वेदाच्या उपलब्ध अनुक्रमणींमध्ये शौनकाची अनुक्रमणी प्राचीन मानली जाते. तिच्यात ऋग्वेदाची मंडल, अनुवाक, सूक्त अशी विभागणी केली आहे. त्याच्या ऋक्प्रातिशाख्यात वैदिक ऋचांची व शाखांतर्गत मंत्रांची उच्चारणपद्धती सांगितली आहे. याच ग्रंथांत त्याने अनेक पूर्वाचार्यांचा व व्याकरणकार व्याडी याचा वारंवार उल्लेख केला आहे. व्याडी हा शौनकाचा शिष्य असावा असे अनुमान आहे. व्याडीचा काळ सन पूर्व ११०० वर्षे मानतात, त्यावरून शौनकाचा कालही तोच समजायला हरकत नाही.

वर उल्लेखिलेल्या ग्रंथांशिवाय शौनकगृह्यसूत्र, शौनकगृह्यपरिशिष्ट आणि वास्तुशास्त्रावरचा एक ग्रंथ असे आणखीही काही ग्रंथ याच्या नावावर आहेत. ऐतरेय आरण्यकातले ५ वे आरण्यकही यानेच रचले, असे सायणभाष्यावरून कळते.

आश्वलायन हा शौनकाचा एक प्रमुख शिष्य होता. त्याने आपल्या गुरूला प्रसन्न करण्यासाठी गृह्य–श्रौतसूत्रांची रचना केली. त्या सूत्रांवर शौनक इतका खूष झाला, की त्याने स्वतःचे सर्व श्रौतशास्त्रविषयक ग्रंथ स्वतःच्या हाताने नष्ट करून टाकले, अशी आख्यायिका आहे.

शौनकाने अनेक यज्ञ व सत्रे केली, असे पुराणांवरून कळते. यांपैकी नैमिषारण्यातल्या त्याच्या दीर्घसत्रात रोमहर्षणपुत्र उग्रश्रवा या सूताकडून याने महाभारताचे श्रवण केले. महाभारतानुसार शौनक हा एक कुलपती होता. त्याचा आश्रम हे एक मोठे गुरुकुल होते आणि त्यात अध्ययन करण्यासाठी भारताच्या कोनाकोपऱ्यातून विद्यार्थी तिथे येत. त्यांच्या निवास–भोजनाची सर्व सोय आश्रमाच्या मार्फतच केली जात असे. शौनकाच्या या आश्रमातच अथर्ववेदाच्या शौनकशाखेचा विस्तार झाला. महाभारतात शौनकाचा उल्लेख अत्यंत गौरवाने केलेला आहे. परीक्षितीचा पुत्र शतानीक याला शौनकानेच तत्त्वज्ञान उपदेशिले. युधिष्ठिरालाही त्याने धर्मोपदेश केला (म. भा. वन. २८.२३). [प्रा. च. को.; म. भा. इ.; पु. नि.; भा. बृ. इ., भाग २; हिंदुत्व; म. ज्ञा. को.]

## शौनकोपनिषद

एक नव्य उपनिषद. हे शौनकाने सांगितले असल्यामुळे त्याला त्याचेच नाव मिळाले आहे. यात प्रणवाचे माहात्म्य प्रतिपादिले आहे. हे माहात्म्य विशद करताना शौनकाने 'चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादा०' ही ऋग्वेदातली ऋचा (४.५८.३) घेतली आहे. इंद्र हा देवांचा अधिपती असून, त्याच्या वाचून देवांना जय मिळू शकत नाही. म्हणून इंद्र व प्रणव यांचे तादात्म्य यात सुचवले आहे. ओंकाराची उपासना हाच या उपनिषदाचा प्रमुख प्रतिपाद्य विषय आहे.

प्रस्तुत उपनिषदाची विचारपद्धती व भाषापद्धती ब्राह्मणग्रंथांशी मिळतीजुळती आहे. याची परंपराही वैदिकच आहे. [अष्टादश उपनिषद – लिमये, वाडेकर; म. त. म.]

## शौरसेनी

एक प्राकृत भाषा. शूरसेन (मथुरा) देश व त्याच्या आसपासचा प्रदेश, इथली ही लोकभाषा होती. आर्यसंस्कृतीचे केंद्र असलेल्या मध्यदेशातील ही भाषा असल्यामुळे तिच्यावर संस्कृताचा प्रभाव सतत पडत राहिला. त्यामुळे ती संस्कृताच्या बरीच जवळची बनली. संस्कृत नाटकातील स्त्रीपात्रे व मध्यम वर्गातील पुरुषपात्रे हीच भाषा बोलतात. इ. स. च्या पहिल्या शतकातील अश्वघोषकृत सारिपुत्तपकरण, इ. तीन रूपके शौरसेनीत लिहिलेली आहेत.

दिगंबर जैन संप्रदायाच्या अनेक ग्रंथांत शौरसेनीचा उपयोग केलेला आहे.

शौरसेनीची काही वैशिष्टये अशी –

(१) संस्कृतमधील दोन स्वरांच्या मध्ये आलेले त् व थ् शौरसेनीत क्रमशः द् व ध् होतात.

उदा० आगतः– आगदो; गच्छति-गच्छदि.

(२) दोन स्वरांच्या मधल्या द् व ध् यांत बदल होत नाही.

उदा० – जलदः– जलदो; क्रोधः– क्रोधो.

(३) संस्कृतातील क्ष चा शौरसेनीत क्ख होतो. उदा० – कुक्षि– कुक्खि; इक्षु-इक्खु.

(४) संस्कृतातील य च्या जागी अ होतो. उदा० – गम्यति-गमीअदि.

(५) ऋ च्या जागी इ येतो. उदा० – गृध्र-गिद्ध.

(६) ण, ज्ञ व न्य च्या जागी ञ्ज येतो. उदा० – विज्ञ-विञ्जो; कन्यका–कञ्जका.

(७) व्यंजनांचा लोप होऊन फक्त स्वर राहतात. उदा० – हृदय–हिअअं.

डॉ. सुनीतिकुमार चटर्जींच्या मते शौरसेनी प्राकृत ही सर्व प्राकृतांत अधिक सौष्ठवपूर्ण व लालित्यपूर्ण आहे. आधुनिक मथुरेची भाषा व गत कालची व्रज भाषा यांचे शौरसेनी हे प्राचीन रूप आहे.

शौरसेनी अपभ्रंश असा अपभ्रंश बोलीचाही एक प्रकार आहे. [भो. भा. सा.; व्र. ख. बो. तु. अ.; सा. भा. वि.]

## शौर्यव्रत

एक तिथिव्रत. दुर्गादेवी ही या व्रताची देवता होय. व्रतावधी एक वर्ष. आश्विन शुद्ध सप्तमीला संकल्प करून व्रतारंभ करावा. अष्टमीला उपवास आणि नवमीला देवी-

पूजा करावी. ब्राह्मणभोजन घालून सातूच्या पीठावर निर्वाह करावा. उद्यापनाच्या वेळी कुमारिकांना भोजन व वस्त्रे द्यावी.

फल – पांडित्य, शौर्य व राज्यांची प्राप्ती. [ हि. ध.; व्र. प. ]

**श्यामजी** राजस्थानातील एक लोकदेव. हा तिथल्या अनेक घराण्यांचा कुलदेव आहे. पूर्वीच्या जयपूर भागातील खाटू नामक गावी याचे मंदिर आहे. याच्या संबंधी एक दंतकथा पुढीलप्रमाणे सांगतात –

भीमसेनपुत्र घटोत्कच याला बर्बरीक नावाचा एक मुलगा होता. महाभारतीय युद्धाच्या प्रसंगी रणभूमीची पूजा करण्यासाठी कृष्णाने याचा बळी मागितला. तेव्हा याने आपले मस्तक कापून कृष्णाच्या स्वाधीन केले. त्यामुळे कृष्ण त्याच्यावर प्रसन्न झाला. पुढे बर्बरीकाला भारतीय युद्ध पाहण्याची इच्छा झाली. कृष्णाने त्या मस्तकाला दिव्यशक्ती प्रदान करून ते एका उंच पर्वतावर ठेवले. सांप्रत त्याच मस्तकाची कृष्णस्वरूप श्यामजी म्हणून पूजा होते.

श्यामजी हा चौहान वंशातला क्षत्रिय वीर असावा, अशी समजूत आहे. इ. स. च्या १० व्या शतकातील विग्रहराज चौहानाच्या शिलालेखात खाटू गावचा खट्टकूप म्हणून उल्लेख आहे. श्यामजीच्या प्राचीन मंदिराजवळील कुंडाला श्यामकुंड असेच नाव आहे. अनेक भाविक लोक इथे स्नानासाठी येतात. ज्येष्ठ, कार्तिक व फाल्गुन महिन्यांतील शुद्ध द्वादशीला श्यामजीची यात्रा भरते. त्या वेळी अनेक मुलांचे तिथे जावळही काढतात. हा ज्या कुटुंबांचा कुलदेव आहे, त्या प्रत्येक कुटुंबात दर शुद्ध द्वादशीला याच्या नावाचा प्रसाद केला जातो.

औरंगजेबाने श्यामजीच्या प्राचीन मंदिराचा विध्वंस केला, म्हणून इ. स. च्या १८ व्या शतकात याचे नवे भव्य मंदिर उभारले गेले. मंदिरात याची चंदनाची मूर्ती आहे. पण मूर्तीच्या मस्तकाच्या जागी मुकुट घातलेला शालिग्राम आहे.

पंजाबमध्येही याची पूजा होते. [ फो. लो. नॉ. इ.; मरुभारती, ऑक्टोबर १९५५; कुलदैवत ]

**श्यामशबल** (१) एक दिव्य. याला व्रत असेही म्हणतात या दिव्याला अग्निपानीय असेही नाव आहे. यात दिव्य करणाऱ्या व्यक्तीला प्रथम आगीत टाकीत आणि नंतर तिथून काढून लगेच पाण्यात बुडवीत. त्यामुळे त्याच्या शरीराला जर कोणताही अपाय झाला नाही, तर तो निर्दोष आहे, असे समजत. [ गा. स. ]

(२) यमाचे श्वानरूपी दोन दूत. हे सरमेचे पुत्र होत (ऋ. १०.१४.१०). [ प्रा. च. को., हिंदी ]

**श्यामशास्त्री** (इ. स. १७७२ – १८२७) कर्नाटक संगीताच्या परंपरेतील एक थोर गीतकार व गायक. याचा जन्म तंजाऊर जिल्ह्यातील तिरुवारूर येथे झाला. त्याच्या वडिलांचे नाव विश्वनाथ ऐयर व मातेचे नाव वेंगलक्ष्मी असे होते. कांचीच्या कामकोटी पीठातील कामाक्षी देवीची पूजा-अर्चा नियमितपणे व्हावी म्हणून ज्या अर्चकांची नियुक्ती करण्यात आली होती, त्यांत विश्वनाथांच्या पूर्वजांचा समावेश होता. इ. स. च्या १६ व्या शतकात राजकीय परिस्थिती अस्थिर व भीतिदायक झाल्यामुळे कामाक्षी देवीच्या सुवर्णमूर्तीचे कांचीहून तिरुवारूरला स्थलांतर करण्यात आले. श्यामशास्त्र्याचे आजोबा वेंकटाद्री व वडील विश्वनाथ हेदेखील देवीचे उपासक व अर्चक होते.

विश्वनाथ व वेंगलक्ष्मी यांना वेंकटेश्वराच्या कृपाप्रसादाने पुत्र झाला, म्हणून त्याचे नाव वेंकट सुब्रह्मण्य असे ठेवण्यात आले. श्याम हे त्याचे लाडके नाव होते.

लहानपणीच श्यामने संस्कृत व तेलुगू या भाषांचा उत्तम अभ्यास केला. त्याने वेदान्ताचा सखोल अभ्यास करावा, अशी त्याच्या पित्याची अपेक्षा होती. पण त्याला संगीताची विलक्षण ओढ आहे, हे त्याच्या आईने जाणले व त्याला प्रोत्साहन दिले. तिच्या एका भावाने श्यामला संगीताचे प्राथमिक ज्ञान दिले. लहानपणापासून त्याला देवीची उपासना अत्यंत प्रिय होती. त्यांच्या घरातही देवीची पूजा चालत असे आणि त्या पूजेत तिची स्तोत्रे गायिली जात. श्यामची बहीण मीनाक्षी कृष्णाची भक्त होती. तिच्यावरील प्रेमामुळेच श्यामने पुढे श्यामकृष्ण हे नाव धारण केले असावे.

श्याम अल्पावधीतच संगीताच्या विविध अंगांत प्रवीण झाला. एके दिवशी पित्याऐवजी त्याला देवीची अर्चना करावी लागली. त्या वेळी त्याने देवीचे स्तोत्र इतक्या मधुर व भक्तिपूर्ण स्वरात गायिले, की तिथे जमलेले सर्व भक्त मंत्रमुग्ध झाले. एकाने तर आपली शाल त्याच्या अंगावर टाकली. त्यामुळे श्याम अत्यंत आनंदाने घरी जाऊन मामाच्या पाया पडला. पण मामाला श्यामच्या यशाबद्दल आनंद होण्याऐवजी मत्सरच वाटला. श्यामच्या वडिलांनाही तो गायक व्हावा हे मान्य नव्हते. त्याने आपल्या कुलातली देवीची अर्चनाच करीत राहावे, अशी त्यांची इच्छा होती. कारण गायक, नट, इ. कलाकारांना त्या काळी समाजात प्रतिष्ठा नव्हती. धार्मिक वृत्तीच्या भक्तांनी गायन वगैरे कला आत्मसात करणे निषिद्ध मानले जात होते.

पुढे हैदर अलीच्या स्वारीच्या भयाने विश्वनाथ ऐयर सहकुटुंब तंजाऊरला गेला. कामाक्षी देवीची मूर्तीही त्याने बरोबर नेली. तिथे त्याला भोसले राजघराण्याचा आश्रय लाभला. तिथे

देवीसाठी नवीन मंदिर बांधून त्यात त्या मूर्तीची प्रतिष्ठापना करण्यात आली. त्या वेळी विश्वनाथाला राजाने एक ताम्रपट दिला. त्याआधारे त्याला एक अग्रहार व २०० एकर भूमी मिळाली.

काही वर्षांनी काशी विश्वेश्वराचा एक भक्त यात्रा करीत तंजाऊरला गेला असता विश्वनाथाने त्याला आपल्या घरी बोलावून त्याची पाद्यपूजा केली. तो संस्कृताचा महापंडित व संगीतज्ञ होता. श्यामला पाहाताच त्या भक्त स्वामीला त्याच्यात श्रेष्ठत्वाची लक्षणे दिसली व हा थोर संगीतज्ञ होईल, असे त्याने भाकीत केले. तोही श्रेष्ठ संगीतज्ञ होता. त्याने स्वतःच श्यामला संगीताचे पाठ देण्याचे ठरवले आणि त्यासाठी तिथेच वास्तव्य केले. तो संगीतस्वामी या नावाने ओळखला जाऊ लागला.

संगीतस्वामीने तंजाऊर येथील आपल्या अल्प वास्तव्यात श्यामला संगीतशास्त्रात पारंगत केले. तिथून जाताना त्याने 'तुला उज्ज्वल भविष्यकाळ व श्रेष्ठ पद लाभेल' असा आशीर्वाद श्यामला दिला. पण त्याने त्याच्यावर एक बंधन घातले. त्याने दुसऱ्या कोणाचेही शिष्यत्व पत्करू नये, मात्र तंजाऊरच्या दरबारातील श्रेष्ठ संगीतज्ञ यचि मरियम अदियप्पया यांच्याशी स्नेह करून, त्यांच्या संगीतपद्धतीचे अनुकरण करावे, असे ते बंधन होते. श्यामने गुरूच्या आज्ञेप्रमाणे अदियप्पयांशी स्नेह केला व त्यांच्याकडून संगीताचे पुष्कळ ज्ञान मिळवले. त्यांच्या संगीतरचनांमधील उच्च कल्पनांमुळे श्यामला स्फूर्ती मिळाली. त्याने त्यांचा आदर्श पुढे ठेवूनच आपल्या संगीत-रचना केल्या.

तमिळ ब्राह्मण समाजातील आदरणीय व्यक्तींना ऐयर म्हणतात. त्यांतील जो ऐयर वेदान्तपारंगत असतो व ज्याचे आचरण शास्त्रशुद्ध असते, त्याला शास्त्री किंवा दीक्षितार म्हणतात. हा मान तरुणांना सहसा मिळत नाही. तथापि श्यामचे शुद्ध आचरण, सखोल अध्ययन व तीव्र बुद्धिमत्ता यांमुळे वयाची पंचवीस वर्षे पुरी होण्यापूर्वीच लोक त्याला श्यामशास्त्री म्हणून संबोधू लागले.

श्यामशास्त्री आजानुबाहू व उंच होते. त्यांचे व्यक्तिमत्व प्रभावी होते. त्यांची वेशभूषा नेहमी व्यवस्थित असे. ते गळयात रुद्राक्षमाळा धारण करीत. त्यांचे मुख सतत प्रसन्न व सुंदर दिसत असे.

श्यामशास्त्री देवीचे अनन्य भक्त होते. त्यांच्या उपासनेत भक्तिभावनेला प्रमुख स्थान आहे. ते देवीला माता म्हणून संबोधीत. तीच भावना त्यांच्या गीतरचनेत दिसून येते. भारतीय संगीत हे, आत्म्याचे परमात्म्याशी मीलन व्हावे ही भक्ताची आस व्यक्त करण्याचे एक साधन आहे. भक्त कवींनी आपल्या गीतरचनेत धर्म, कला व शास्त्र यांचा सुंदर समन्वय केला आहे. भक्ताची भावना जितकी तीव्र, तितकी त्याची रचना दिव्य होते. अशा गीत-रचनांची परंपरा इ. स. च्या ७ व्या शतकातील अप्पर, सुंदरर, इ. शैव संतांपासून सुरू झाली असून, जयदेव, पुरंदरदास, वेंकटमखी, क्षेत्रज्ञ, गोपाल ऐयर व अदियप्पया हे त्याच परंपरेतले रचनाकार होत. त्यागराज, मुथुस्वामी दीक्षितार व श्यामशास्त्री हे त्याच परंपरेतील त्रिकुट मानले जाते. या संगीतकारांच्या भक्तिपूर्ण रचनांमुळे भजन या गीतप्रकाराचा शास्त्रीय संगीतात समावेश झाला. श्यामशास्त्री देवीचे भक्त असले, तरी त्यांनी आपल्या आत्म्याच्या मुक्तीसाठी तिची प्रार्थना कधीच केली नाही. देवीने माझे रक्षण करावे, मला आयुरारोग्य द्यावे, बुद्धी द्यावी एवढीच इच्छा त्यांनी व्यक्त केली आहे.



श्यामशास्त्री

मुथुस्वामी दीक्षितार व श्यामशास्त्री हे परस्परांचे स्नेही होते. त्यांचा हा स्नेहसंबंध कर्नाटक संगीताला पुष्कळ लाभदायक ठरला आहे.

श्यामशास्त्री तमिळनाडूत जन्मले व राहिले असले, तरी त्यांनी आपल्या संगीत-कृती तेलुगू भाषेत रचल्या; कारण तेलुगू भाषा संगीतरचनेसाठी अत्यंत अनुकूल आहे. त्यागराजानेही आपल्या रचनांसाठी तीच भाषा स्वीकारली. या संगीतकारांच्या कृतींमुळे तेलुगू भाषा संपन्न झाली.

श्यामशास्त्रींना ज्योतिषाचे उत्तम ज्ञान होते. भविष्य सांगण्याचा उद्योग त्यांनी केला नाही. तथापि त्यांना अंतर्ज्ञानामुळे काही भविष्यकालीन घटना समजत असत, असे म्हणतात. त्यांची भविष्यवाणी पुष्कळदा खरी ठरली आहे. त्यांना स्वतःचा अंतकाळ समजला होता. त्याप्रमाणे मृत्यूला सामोरे जाऊन त्यांनी देवीचे स्मरण करीत ६ फेब्रु. १८२७ रोजी इहलोक सोडला.

[ श्यामशास्त्री – श्रीमती विद्या शंकर, १९७० ]

(१) एक देवता. हे ललितेचे एक नाव आहे. हिला श्यामा मातंगी असेही म्हणतात. आश्विन अमावास्येला बंगालमध्ये श्यामा किंवा काली हिचे पूजन करतात. या देवीचे रूप भयप्रद असून, तिने ते राक्षसांच्या नाशासाठी धारण केले, अशी श्रद्धा आहे. श्यामा ही रुधिरप्रिया आहे, असे मानून पूजेच्या दिवशी तिला पशुबली देतात. दुसऱ्या दिवशी तिची मूर्ती जलात विसर्जित करतात. [पु. इं.]

(२) जैन दैवतसमूहातली एक यक्षिणी. हिला अच्युता असे दुसरे नाव आहे. दिगंबरमते ही मनोवेगा होय. हिचे वर्णन पुढील-प्रमाणे आहे– घोड्यावर बसलेली, (श्वेतांबरमते माणसावर आरूढ झालेली), चतुर्भुज, खड्ग, बरची, फल आणि वरदमुद्रा धारण करणारी, (श्वेतांबरमते वीणा, धनुष्य, वरदमुद्रा व अभयमुद्रा धारण करणारी). [जै. इ.; देवीकोश]

**श्यामानददास** (इ. स. चे १६ वे शतक.) एक चैतन्य-मतानुयायी भक्तकवी. हा दुःखी कृष्णदास या नावानेंही परिचित आहे. याचे व्यक्तिगत चरित्र फारसे उपलब्ध नाही. हा धारेंदा बहादुरपूर गावचा रहिवासी असून, खेतुरी उत्सवात उपस्थित होता. गौरीदास पंडित हा याचा गुरू होय. याने वृंदावनात जाऊन जीव गोस्वामीजवळ अध्ययन केले आणि ओडिसा प्रदेशात वैष्णव धर्माचा प्रचार केला. नंतर हा श्रीनिवास व नरोत्तम यांच्यासह बंगालमध्ये परतला. दुःखी कृष्णदास, दुःखिनी अथवा दीन दुःखी कृष्णदास अशा मुद्रा पद-कल्पतरूतील याच्या पदांतून आढळतात. [हिं. बं. वै. क.]

**श्यावाश्व** अत्रिकुलातील सर्वांत मोठा सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील बावन्न ते एकसष्ट आणि एक्यायंशी व ब्यायंशी; तसेच आठव्या मंडलातील पस्तीस ते अडतीस ही सूक्ते याने रचली आहेत. शिवाय नवव्या मंडलातील बत्तिसावे सूक्तही याच्या नावावर आहे. त्या सूक्तांमध्ये अनेक ठिकाणी याचे नाव आढळते. श्यावाश्वाच्या पित्याचे नाव अर्चनानस् आणि मुलाचे नाव अंधीगू असे होते. रथवीती दार्भ्य ऋषीची कन्या ही श्यावाश्वाची पत्नी असून, त्यांच्या विवाहाची हकीगत या सूक्तात वर्णिली आहे (५.६१). श्यावाश्व सूक्तद्रष्टा नाही म्हणून रथवीतीने त्याला आपली मुलगी देण्याचे नाकारले. त्यामुळे त्याने मरुतांची उपासना केली. मरुतांनी प्रसन्न होऊन त्याला ऋषित्व बहाल केले. त्याचप्रमाणे पुढे त्याला तरंत व तरंतपत्नी शशीयसी आणि पुरुमीळ्ह यांच्याकडून विपुल संपत्तीही मिळाली. मग रथवीतीने श्यावाश्वाला आपली मुलगी दिली.

बृहद्देवतामते प्रस्तुत सूक्तातील १–४ आणि ११–१६ या ऋचा मरुत्प्रार्थनेच्या असून, ५–१० या ऋचांमध्ये शशीयसी, पुरुमीळ्ह व तरंत यांच्या दानाची स्तुती आहे. १७–१८ या ऋचांमधून मरुतांनी रात्रिदेवतेच्या मध्यस्थीने रथवीती राजाकडे श्यावाश्वासाठी रदबदली केली आणि अखेरच्या ऋचेत कन्यादान केल्यावर तो गोमती नदीकाठच्या पर्वत प्रदेशात तप करू लागला, असे वर्णन आहे.

श्यावाश्वाच्या या सूक्तांमध्ये मरुतांची प्रार्थना आणि सवितृ, व इंद्र यांची स्तुती हे विषय आहेत. याच्या दोन ऋचा अशा–

> अतीयाम निदस्तिरः स्वस्तिभिर्हित्वावद्यमरातीः ।
> वृष्ट्वी शं योराप उस्रि भेषजं स्याम मरुतः सह ॥
> सुदेवः समहासति सुवीरो नरो मरुतः स मर्त्यः ।
> यं त्रायध्वे स्याम ते ॥

(ऋ. ५.५३. १४–१५)

अर्थ – हे पर्जन्यकारक आणि सुखदात्या मरुतांनो, शत्रुविनाशाचे आणि निंदकसंहाराचे वरदान तुम्ही आम्हांस द्या. तुम्ही आम्हांला जल, दुग्ध, घृत, ओषधी आणि समृद्धी प्रदान करा.

हे देववरदात्या, पुत्रपौत्रदात्या, पूज्य आणि नेतृत्वकुशल मरुतांनो, सर्वस्वी तुमचेच बनण्याची आमची मनीषा तुम्ही पूर्ण करा.

सप्तसिंधुप्रदेशाचा भूगोल जाणण्याच्या कामी श्यावाश्वाची सूक्ते फार उपयुक्त आहेत. त्याने वायव्य भारतातील अनेक नद्यांचा उल्लेख केला आहे (५.५३). त्याचप्रमाणे त्याच्या काही ऋचांना धर्मशास्त्रीय महत्त्वही लाभले आहे. उपनयन संस्कारात त्याची एक ऋचा म्हटली जाते (५.८२.१) आणि दुःखस्वप्ननाशन मंत्र म्हणूनही त्याच्या ऋचा पठण करतात (५.८२.४-५).

श्यावाश्वाने मरुतांना उद्देशून 'अर्हंत' हा शब्द वापरला आहे (५.५२.५). पण त्याचा अर्थ श्रेष्ठ असा आहे. बौद्ध-जैनांनी अर्हंत म्हणजे मुक्त पुरुष असा जो अर्थ केला आहे, तो वैदिक काळी नव्हता, असे दिसते. [सी. ऋ.; प्रा. च. को.; ऋ. द.; ऋ. म. भा.; म. ज्ञा. को., बुद्धपूर्व जग.]

**श्येन आग्नेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे अठ्ठ्यायंशी क्रमांकाचे सूक्त याने रचले आहे. या लघुकाय सूक्ताचा विषय अग्नीची स्तुती हा आहे. हे सूक्त गायत्री छंदात आहे. याची एक ऋचा अशी – (ऋ १०.१८८.२)

> अस्य प्र जातवेदसो विप्रवीरस्य मीळ्हुषः ।
> महीमियर्मि सुष्टुतिम् ॥

अर्थ – सर्वज्ञ, सुपुत्र आणि बलसंपन्न अग्नीचे मी स्तवन करतो. [ऋ. म. भा.; प्रा. च. को.]

**श्येनचयन** सोमयागात पूर्व दिशेकडे काही वेळा निरनिराळ्या आकाराचे ओटे तयार करतात. श्येन पक्ष्याच्या आकाराचा ओटा तयार करण्यासाठी अनेक विटा मांडाव्या लागतात. श्येनचयनाला सुपर्णचयन किंवा गरुडचयन असेही म्हणतात. पाहा—अग्निचयन. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**श्येनयाग** एक सोमयज्ञ. दुसऱ्यावर अभिचार करण्याच्या इच्छेने हा याग करावा, असे सांगितले आहे. मूळ सोमयागात काही बदल करून हा यज्ञ करतात. दुसऱ्याचे वाईट व्हावे यासाठी हा याग सांगितला असल्यामुळे, तो अनर्थाला कारणीभूत होतो म्हणून, त्याला धर्म म्हणू नये, असे मीमांसक सांगतात. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**श्येनव्यूह** सैन्यरचनेचा एक प्रकार. हा व्यूह श्येन म्हणजे बहिरीससाणा या पक्ष्याच्या आकाराचा असतो. याचा अग्रभाग निमुळता असतो, मध्यभाग फार लांब किंवा रुंद नसतो. परंतु पार्श्वभाग मात्र रुंद असतो. पांडवांनी विराट नगरीत असताना त्रिगर्तांबरोबर लढण्यासाठी या व्यूहाची रचना केली होती. चोचीच्या जागी युधिष्ठिर, पंखस्थानी नकुल व सहदेव आणि शेवटी भीम अशी ती योजना होती. हा व्यूह स्वतः युधिष्ठिराने रचला होता. [प्रा. भा. सां.]

**श्रद्धा** एक मानसिक गुण. श्रद्धेची व्याख्या अशी – ‘ शास्त्राचार्योपदिष्टेऽर्थेऽननुभूतेप्येवमेवैतदिति विश्वासः ’ = शास्त्र आणि आचार्य यांनी उपदेशिलेल्या गोष्टींबाबत स्वतःला अनुभव नसला तरी, ‘ हे असेच आहे, ’ असा जो त्या गोष्टींविषयी विश्वास धरला जातो, त्याला श्रद्धा असे नाव आहे (सर्वलक्षणसंग्रह).

श्रद्धा हा शब्द धा (ठेवणे) या धातूच्या मागे श्रत् लावून झाला आहे. ‘ श्रत् सत्यम् । तत् सत्यम् अस्यां धीयते सा श्रद्धा’ = श्रत् म्हणजे सत्य, जिच्यात सत्य ठेवलेले असते, ती श्रद्धा, अशी दुर्गाचार्याने श्रद्धा शब्दाची व्युत्पत्ती सांगितली आहे. ‘ धर्मार्थकाममोक्षेषु अविपर्ययेण एवम् एतत् इति या बुद्धिः उत्पद्यते तदधिदेवता भावाख्या श्रद्धा इति उच्यते ’ = धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांच्या ठिकाणी ढळ न पावता ‘ हे असेच आहे ’ अशी जी बुद्धी उत्पन्न होते, तिची अधिदेवता श्रद्धा होय, असे पुढे त्याने विवरण केले आहे.

‘ श्रद्धा अदृष्टार्थेषु कर्मसु आस्तिक्यबुद्धिर्देवतादिषु च ’ = देवता आणि पारलौकिक व न दिसणाऱ्या गोष्टींविषयी आस्तिकपणा म्हणजे श्रद्धा होय, असे शंकराचार्यांनी श्रद्धेचे स्पष्टीकरण केले आहे.

धर्मात श्रद्धेला फार महत्त्व आहे. अभ्युदय आणि निःश्रेयस या दोहोंची प्राप्ती व्हावी म्हणून धर्माची प्रवृत्ती आहे. यांपैकी निःश्रेयस, परमार्थ किंवा मोक्ष हा विषय श्रद्धेचा आहे. ही श्रद्धा जितकी अविचल, दृढ व प्रबल असेल, तेवढा यशाचा संभव अधिक असतो. त्यामुळे श्रद्धेची जोपासना करणे, हे धर्मवेत्त्यांचे उद्दिष्ट असते. म्हणून तिला पोषक अशी आश्वासने ते देत असतात. ‘ माझा भक्त कधी नाश पावत नाही ’, ‘मी त्याच्या योगक्षेमाची चिंता वाहतो’, ‘त्याच्यासाठी मी वारंवार अवतार घेतो ’ असे भगवंताने गीतेत सांगितले आहे. भगवंताच्या अशा वचनांवर माणसांची श्रद्धा बसते आणि त्याच्या मनातली निराशा दूर पळून, त्याच्या मनात आशेचा अंकुर उगवतो. त्यामुळे त्याच्या अंगात खूप उत्साह संचरतो आणि तो दुप्पट हिंमतीने आपल्या कार्यात दृढ राहतो. मृत्यूच्या पलिकडचे जीवन कोणी पाहिले आहे ? ते कोणी सिद्ध केले आहे ? पण त्याच्यावर श्रद्धा ठेवून हजारो देशभक्त आनंदाने फासावर जातात. याच भूमीत पुन्हा जन्म घेऊन आपले राहिलेले काम आपण पूर्ण करू असा त्यांचा विश्वास असतो. वास्तविक, मरणोत्तर जीवन विज्ञानाने आजवर सिद्ध झालेले नाही. पण त्याच्यावरच्या श्रद्धेमुळे पुढील जन्म चांगल्या कुळात मिळावा आणि तो सकलवैभवसंपन्न व्हावा, म्हणून माणसे या जन्मी पुण्यकृत्यांचे आचरण करतात.

वेदांत श्रद्धेला अवतार मानले आहे. वैदिक वाङ्मयापासून आजपर्यंत निर्माण झालेल्या फार मोठ्या वाङ्मयसंभारात श्रद्धेची स्तोत्रे गायिलेली आहेत. ऋग्वेदात एक श्रद्धासूक्त आहे. श्रद्धा ही हृदयस्थ असून, श्रद्धावंताला इष्ट सिद्धी प्राप्त होत असते, असे ऋग्वेदात (१०.१५१.१-५) सांगितले आहे. श्रद्धा हीच विश्वाचे आश्रयस्थान आहे आणि श्रद्धेनेच देवांना देवपण येते, असेही म्हटलेले आहे.

यजुर्वेदाच्या वाजसनेयी संहितेत (१९.७७) श्रद्धेविषयी पुढील वचन आहे –

दृष्ट्वा रूपे व्याकरोत् सत्यानृते प्रजापतिः ।
अश्रद्धामनृतेऽदधाच्छ्रद्धां सत्ये प्रजापतिः ॥

अर्थ – प्रजापतीने सत्य आणि असत्य ही दोन्ही एकाच स्वरूपात पाहिली आणि नंतर त्यांचे पृथक्करण केले. प्रजापतीने असत्याच्या ठिकाणी अश्रद्धा व सत्याच्या ठिकाणी श्रद्धा स्थापली.

श्रद्धा ही ऋतापासून उत्पन्न झाली व ती सर्व प्राणिमात्रांचे

पोषण करणारी आहे, असे तैत्तिरीय ब्राह्मणात सांगितले आहे (३.१२.३-२).

श्रद्धेच्या योगानेच सत्य म्हणजे परमेश्वर सापडतो, असे याज्ञवल्क्याने म्हटले आहे. त्याचाच अनुवाद गीतेतील 'श्रद्धावान् लभते ज्ञानम्' या वचनात आढळतो.

काही लोक असे मानतात, की जिथे बुद्धीचे काम संपते, तिथे श्रद्धेचे कार्य सुरू होते. बुद्धी आणि श्रद्धा ही कधीच एकत्र नांदत नाहीत. पण याउलट काही लोकांना अश्रद्धा ही आत्मघातकी वृत्ती वाटते. बुद्धीलाही श्रद्धेची बैठक आवश्यक आहे, असे ते मानतात.

श्रद्धा ही एक जीवननिष्ठा आहे. प्रत्यक्ष अनुभव घेत असताना त्या अनुभवाच्या व्यवस्थापनासाठी स्वीकारलेले ते एक मध्यवर्ती सूत्र आहे. या अर्थाने श्रद्धेवाचून कोणाचाही निर्वाह होत नाही. विचारवंतांना श्रद्धेचे वावडे नसावे आणि श्रद्धावंतांना विचार वर्ज्य नसावा, असे हे मत आहे.

जीवनातील काही क्षेत्रे ही बुद्धीच्या किंवा तर्काच्या पलिकडे असतात. ती सर्वसामान्य माणसाला अज्ञात असतात. देवतांचा साक्षात्कार व मंत्रांची सिद्धी ही समाजात फारच थोड्या लोकांना प्राप्त झालेली असतात. पण तरीही माणसे अशा साक्षात्कारी पुरुषांच्या अनुभवावर श्रद्धा ठेवतात. सिद्धी किंवा ईश्वरी साक्षात्कार मिळवायचा तर अशा पुरुषांवर श्रद्धा ठेवावीच लागते, असे माणसांना वाटते. अशा साक्षात्कारी सिद्ध पुरुषाला गुरू किंवा आप्त मानून लोक त्याने दाखवलेल्या मार्गावरून वाटचाल करतात व आपली आध्यात्मिक उन्नती करून घेतात.

सत्याचे ज्ञान होणे अवघड आहे. सत्य हे प्रत्यक्ष कधीच होत नाही. ते तर्काने म्हणजे बुद्धीच्या साहाय्याने जाणून घ्यावे लागते. पण त्यासाठी श्रद्धेची आवश्यकता आहे. यासंबंधीची उपनिषदातली एक गोष्ट अशी –

उद्दालकाचा पुत्र श्वेतकेतू याला प्रत्येक गोष्टीची साधकबाधक चर्चा करण्याची सवय होती. एकदा त्याने आपल्या पित्याला सृष्टीच्या मूलतत्त्वाविषयी माहिती विचारली. सृष्टीचे मूलतत्त्व हे सूक्ष्म असून, त्याचे प्रत्यक्ष दर्शन होणार नाही, असे उद्दालकाने त्याला सांगितले. पण तेवढ्याने श्वेतकेतूचे समाधान होईना. तेव्हा उद्दालकाने त्याला वडाचे एक फळ आणून ते फोडायला सांगितले. श्वेतकेतूने त्याप्रमाणे केल्यावर त्याला त्यात सूक्ष्म आकाराच्या अनंत बिया दिसल्या. तेव्हा उद्दालकाने त्याला त्यांतली एक बी फोडून पाहायला सांगितले. श्वेतकेतूने त्याप्रमाणे केले व आपल्याला त्यात काहीही दिसत नाही, असे सांगितले. त्यावर उद्दालकाने त्याला म्हटले–

**हे सौम्य एतमणिमानं न निभालयसे एतस्य वै सौम्य**
**एष अणिम्नः महान् न्यग्रोधः तिष्ठति श्रद्धस्व सौम्य इति ।**

(छांदोग्य उ. प. ६.१२.२)

अर्थ– वत्सा, तुला हा अणू दिसत नाही. पण या अणूतच वटवृक्षाचे बीज आहे. यांतूनच हा महान वटवृक्ष निर्माण होतो. माझ्यावर विश्वास ठेव.

महाभारतातही श्रद्धेचे विवेचन आहे. श्रद्धेवाचून कोणतेही कार्य यशस्वी होत नाही, असे तिथे म्हटले आहे. जे कार्य श्रद्धापूर्वक केले जाते, त्याचेच पूर्ण फळ मिळते. दान, प्रतिग्रह, इ. सर्व बाबतीत श्रद्धा आवश्यक आहे–

**अश्रद्धा परमं पापं श्रद्धा पापप्रमोचिनी ।**
**जहाति पापं श्रद्धावान् सर्पो जीर्णामिव त्वचम् ॥**

(म. भा. शांति. २६३.१५)

अर्थ– अश्रद्धा हे मोठे पाप आहे आणि श्रद्धा ही पापातून मुक्त करणारी आहे. साप ज्याप्रमाणे जुनी कात टाकून देतो, त्याप्रमाणे श्रद्धाळू मनुष्य पापाचा त्याग करतो. (त्याला पाप लागत नाही.)

'यो यच्छ्रद्धः स एव सः' = ज्याची जशी श्रद्धा असते त्याप्रमाणे तो घडतो, असे गीतेतही म्हटले आहे (१७.३). व्यवहारात किंवा परमार्थात श्रद्धेवाचून माणूस यशस्वी होऊ शकत नाही, असा गीतेचा अभिप्राय आहे. श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतो (गीता १७.२८).

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत् प्रेत्य नो इह ।**

अर्थ– हे पार्था, श्रद्धाविरहित होम करणे, दान देणे, तप करणे किंवा कोणतेही अनुष्ठान करणे, हे असत्कर्म होय. असे अनुष्ठान इह वा परलोकी कुठेच कल्याणप्रद होत नाही.

लोकव्यवहारात तर श्रद्धेला स्थान आहेच; पण परमार्थमार्गात श्रद्धा हे श्रेष्ठतम मूल्य आहे. सर्व उपासनासंप्रदाय श्रद्धेचीच कास धरायला सांगतात. भारतात एका काळी यज्ञसंस्था भरभराटीला आली होती. यज्ञाने स्वर्ग मिळतो आणि यज्ञाने इहलोकीचे जीवन संपन्न व निरावाध होते, अशी वैदिकांची यज्ञाच्या मागे प्रबळ श्रद्धा होती. 'इदं हविः श्रद्धधानो जुहोमि' =मी श्रद्धा ठेवून या हवीचे हवन करतो (ऋ. खिलसूक्त ५) असे एका वैदिक ऋषीने स्पष्ट म्हटले आहे. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळवीनच,' या लो. टिळकांच्या प्रतिज्ञेमागे कमालीची श्रद्धा आहे.

**श्रद्धा व आरोग्य** – आरोग्याचा व मनःशांतीचा घन संबंध आहे. कारण शरीरावर मनाचे बरेच वर्चस्व असते. मन हेच मनुष्याच्या बंधमोक्षाचे कारण आहे, असे गीतेत म्हटले आहे,

ते याच अर्थाने. संताप, चीड, उद्वेग, निराशा, वैफल्य, लोभ, चिंता, भीती, इ. विकार आरोग्याला विघातक आहेत; पण काही भावना आरोग्याला पोषक असतात. आशा, आत्मविश्वास, आनंद यांच्यामुळे मज्जातंतू निरामय राहतात. परमेश्वरावरील श्रद्धा किंवा कोणत्याही तत्त्वावरची श्रद्धा यांनी मन समाहित होते आणि त्यामुळे सुदृढता प्राप्त होते.

मानवी कर्तृत्वाच्या दृष्टीनेही श्रद्धेला जीवनात महत्त्व आहे. मनुष्य श्रद्धामय आहे. ज्याची ज्या ठिकाणी श्रद्धा असते, त्या प्रमाणे तो बनत असतो, हा गीतेचा सिद्धान्त अर्वाचीन मानसशास्त्रज्ञांच्या मते मानवी कर्तृत्वाचा, यशाचा मूलाधार आहे. कोणत्याही कार्यात श्रद्धा हा महत्त्वाचा घटक असतो. स्वतः-वरील श्रद्धेवाचून यश मिळत नाही. आत्मविश्वास, इच्छाशक्ती असा श्रद्धा या शब्दाचा अर्थ इथे अभिप्रेत आहे. प्रत्येकाच्या अंतरात परमेश्वर असतो. म्हणून आत्मश्रद्धा म्हणजे परमेश्वरा-वरील श्रद्धाच होय. ती अनन्य, अविचल असेल तरच उद्योगात यश प्राप्त होईल, असा सिद्धान्त आहे.

**अंधश्रद्धा** – विचार न करता ठेवलेली विपरीत श्रद्धा म्हणजे अंधश्रद्धा होय. समाजाची धारणा व उन्नती यांसाठी समाज-धुरीणांनी वेळोवेळी काही तत्त्वे निश्चित करून, त्याअन्वये काही नियम सांगितलेले असतात. ती तत्त्वे जाणून घेऊन, त्यांवर विश्वास ठेवून मग नियमांचे पालन केले जाते, तोपर्यंत समाजाचा अभ्युदय होतो. पण जेव्हा अज्ञानामुळे त्या मूलभूत तत्त्वांचा विसर पडून लोक केवळ त्या निरर्थक नियमांचे पालन करू लागतात, तेव्हा त्यांना विपरीत रूप प्राप्त होते. वास्तविक धर्म म्हणजे दया, क्षमा, सत्यनिष्ठा, विद्येची उपासना, स्वत्वाचा अभिमान, नीतिमत्ता, इ. तत्त्वे व त्यानुरूप आचार होय. पण सामान्य लोक त्या तत्त्वांकडे लक्ष न देता, खाणेपिणे, शेंडी, टिळे-टोपी, गंध, उपास-तापास, व्रते, तीर्थयात्रा, इ. आचार यांनाच धर्म मानू लागतात. अशा प्रकारचे धार्मिक आचरण करणारे ते धर्मनिष्ठ समजले जातात. कर्मकांडावरची ही विपरीत श्रद्धा म्हणजे अंधश्रद्धा होय. शिक्षण, शेती, लोकशाही, इ. निर-निराळ्या क्षेत्रांतही अशा प्रकारच्या विचारशून्य कल्पना रूढ आहेत. अडाणी लोकांच्या जीवनावर भ्रामक समजुतींचा विल-क्षण प्रभाव दिसून येतो. सुशिक्षित माणसेही, अविवेकाने, अंध-श्रद्धेमुळे विचित्र आचारधर्म पाळताना दिसतात. त्यामुळे समा-जाची फार हानी होते. (लोकभ्रम पाहा)

सात्त्विक, राजस व तामस असे श्रद्धेचे तीन प्रकार गीतेत सांगितले आहेत. सात्त्विक श्रद्धेचे लोक देवांचे भजनपूजन कर-तात; राजस श्रद्धेचे लोक यक्षराक्षसांना आणि तामस श्रद्धेचे लोक भूत-प्रेत-पिशाचादिकांना भजतात. यांपैकी सात्त्विक श्रद्धेची वाढ झाली पाहिज आणि राजस व तामस श्रद्धेपासून दूर राहिले पाहिजे, असेही गीतेत (१७.२–४) म्हटले आहे. [म. भा. स.; नि. म. भा.; भा. सा.; गीतेतील इहवाद–डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, गीतादर्शन, एप्रिल १९७३]

**श्रद्धा कामायनी** एक सूक्तद्रष्टी. हिचे नाव कल्पित असावे असे वाटते. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडला-तील एकशे एक्कावन्न क्रमांकाचे सूक्त हिने रचले आहे. श्रद्धा-सूक्त म्हणून हे सूक्त प्रसिद्ध आहे.

श्रद्धेचे माहात्म्य सांगणाऱ्या प्रस्तुत सूक्तात श्रद्धा हा एक बुद्धीचा प्रकार मानला आहे. बालकाला प्रथम स्तनपान देतेवेळी आणि मौंजीबंधनातील मेधाजनन-संस्कारात हे सूक्त म्हणतात. मेधासूक्त हे श्रद्धासूक्ताच्या अखेरीला येणारे खिलसूक्त आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.]

**श्रद्धान** एक जैन प्रायश्चित्त. याला उपस्थान असेही म्हणतात. एखाद्या श्रमणकाने नकळत अन्य पंथाच्या तत्त्वांचे आचरण केले किंवा मूलसूत्रांत सांगितलेले नियम जर मोडले, तर त्याला हे प्रायश्चित्त देतात. नियम मोडणारा हा आपल्या पंथात नाही किंवा त्याला पदभ्रष्ट केला, अशी प्रथम द्वाही फिरवायची आणि त्याला पुन्हा दीक्षा देऊन पंथात घ्यायचे, असे या प्रायश्चित्ताचे स्वरूप आहे. [हि. जै. मो.]

**श्रद्धानंद** (इ. स. १८५६–१९२६) आर्यसमाजाचे एक निष्ठावंत कार्यकर्ते व गुरुकुल विश्वविद्यालयाचे संस्थापक. यांचा जन्म पंजाबात जालंदरजवळील तळवन गावी एका प्रतिष्ठित क्षत्रिय कुळात झाला. त्यांचे नाव मुनशीराम व त्यांच्या वडिलांचे नाव नानकचंद असे होते. वडील पोलीस-खात्यात होते. त्यांची वारंवार वदली होत असे. त्यामुळे मुनशी-रामाला बराच प्रवास घडला. त्याच्या शिक्षणात खंड पडला, पण विविध प्रकारचा अनुभव मात्र लाभला. काशी येथे त्याचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाले. त्याला इंग्रजीतील चांगल्या वक्तृत्वा-बद्दल एक पारितोषिकही मिळाले.

पुस्तकी शिक्षणाबरोबरच मुनशीरामाने कुस्ती; तसेच लाठी, तलवार चालवणे, इ. शारीरिक शिक्षणही मनःपूर्वक घेतले. पण तरुणपणी काही मित्रांच्या वाईट संगतीमुळे त्याला दारूचे व्यसन लागले. पुढे एकदा काशीविश्वनाथाच्या दर्शनाला तो गेला असता, रेवाची राणी देवाचे दर्शन घेत असल्यामुळे त्याला मंदिरात प्रवेश करता आला नाही. त्यामुळे तो चिडला आणि त्याचा मूर्तिपूजे-वरील विश्वासही उडाला. तो पक्का नास्तिक बनला. मह-

विद्यालयात शिकत असताना त्याचा नास्तिकपणा वाढतच गेला.

इ. स. १८७७ मध्ये मुनशीरामांचा विवाह झाला. पुढे एका विवाहप्रसंगी सर्व मंडळींची मद्यपानामुळे झालेली दैना पाहून त्यांना उबग आला व त्याने मद्याला स्पर्शही न करण्याचा निश्चय केला. इ. स. १८८५ मध्ये त्यांना दयानंद सरस्वतींची व्याख्याने ऐकायला मिळाली व सहवासही लाभला. त्यांच्या प्रभावामुळे मुनशीराम पुन्हा श्रद्धावान झाले व आर्यसमाजी बनले. त्यानंतर त्यांनी कायद्याचे शिक्षण घेतले व लाहोरमध्ये वकिली सुरू केली. मग त्यांनी सद्धर्मप्रसारक नावाचे साप्ताहिक सुरू केले. ते प्रथम उर्दू भाषेत निघत असे; पण नंतर हिंदीत निघू लागले, त्यात त्यांनी स्त्री–शिक्षण, विधवा-विवाह, अनाथ-संरक्षण, इ. सामाजिक प्रश्नांना चालना देऊन, लोकांना प्रत्यक्ष कार्यालाही प्रवृत्त केले. त्यातील लेखांच्या द्वारे स्वामींनी हिन्दी भाषेची चांगली सेवा केली.

आर्यसमाजाने जे दयानंद अँग्लो वैदिक कॉलेज सुरू केले होते, त्यात मुनशीराम होते. पण कालांतराने त्या संस्थेतून बाहेर पडून त्यांनी प्राचीन पद्धतीचे गुरुकुल हरिद्वारजवळ कांगडी येथे सुरू केले (१९०२). त्या संस्थेद्वारा राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्याला त्यांनी आपले सर्वस्व अर्पण केले. त्या संस्थेच्या अनेक शाखा निघाल्या व तिला आता विश्वविद्यालयाचे स्वरूप प्राप्त झाले आहे. तिथे शिक्षणाचे माध्यम हिन्दी असल्यामुळे, त्या भाषेच्या विस्ताराला वरेच प्रोत्साहन मिळाले.

इ. स. १९१५ साली मुनशीरामजींनी संन्यास घेतला. त्या वेळी त्यांना स्वामी श्रद्धानंद हे नाव देण्यात आले.

इ. स. १९१८ मध्ये ते राष्ट्रीय सभेत शिरून राजकारणात भाग घेऊ लागले. लो. टिळकांप्रमाणेच त्यांनी स्वदेशी व बहिष्कार यांचा पुरस्कार केला. पुढे म. गांधींच्या असहकार-आंदोलनात त्यांनी भाग घेतला. रौलट ॲक्टविरोधी चळवळीत भाग घेऊन त्यांनी दिल्ली येथे गुरखा सैनिकांना जमावावर गोळीबार करताना रोखले. त्या प्रसंगी त्यांच्यावरच बंदुका रोखल्या गेल्या. पण ते निर्भयपणे जागीच उभे राहिले.

श्रद्धानंदांचे सर्वांत मोठे कार्य म्हणजे अस्पृश्यतानिवारण व बाटलेल्या हिंदूंचे शुद्धीकरण हे होय. राष्ट्रीय सभेत राहून त्यांनी ते काम करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांना फारसे यश आले नाही. म्हणून त्यांनी राष्ट्रीय सभा सोडली व आर्यसमाजाचे काम सुरू केले. मग दयानंद दलितोद्धार सभेची स्थापना करून त्यांनी लक्षावधी अस्पृश्यांना स्पृश्य करून घेतले.

परधर्मात गेलेल्या हिंदूंना शुद्ध करून परत हिंदू धर्मात घेण्याचे कार्यही श्रद्धानंदांनी धडाडीने केले. दिल्लीजवळ वसलेल्या, पूर्वी हिंदू असलेल्या पण बाटून मुसलमान झालेल्या हजारो मलकाना राजपुतांना त्यांनी शुद्ध करून हिंदू धर्मात घेतले. मलबारातही मोपल्यांनी बाटवलेल्या हिंदूंना त्यांनी स्वधर्मात परत आणले.



स्वामी श्रद्धानंदजी

स्वामी श्रद्धानंदांच्या विविध प्रकारच्या समाजसेवेमुळे त्यांना जनतेने महात्मा ही पदवी दिली. मात्र त्यांच्या शुद्धीकरणाच्या कार्यामुळे मुसलमान त्यांच्यावर खवळले. इ. स. १९२६ मध्ये दिल्ली येथे अबदुल रशीद नावाच्या एका धर्मांध मुसलमानाने त्यांचा खून केला. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या स्मरणार्थ अनेक अनाथाश्रम व महिलाश्रम स्थापन करण्यात आले. [ महर्षि श्रद्धानंद – श्री. अनंत यशवंत देशपांडे, १९४८; सु. वि. को.; एकता मासिक, पौष, शके १८७९ ]

**श्रमण** बौद्ध व जैन यतींना आणि त्यांतही मुख्यत्वे जैन मुनींना श्रमण ही संज्ञा आहे. मोक्षसिद्धीसाठी उग्र तप आणि कठोर व्रते परिश्रमपूर्वक आचरणारा तो श्रमण होय. वर्धमान महावीराला श्रमणभगवान अशी उपाधी आहे, कारण त्याने आपल्या जीवनात उग्र तप आणि कठोर व्रते आचरून श्रमणधर्माचा आदर्श घालून दिला होता. श्रमण हे वीतराग आणि संन्यासी असतात. काही बौद्ध श्रमण वैखानसनियमांचे पालन करीत. त्या नियमसमूहाचे नाव धुतंग असे आहे. वृक्षमूलनिकेतन, अरण्यनिवास, स्मशानवास, अभ्यवकासवास, पांशुकूलधारणा, इ. गोष्टी धुतंगात येतात. संन्याशाला परिव्राजक, मस्करी, मुनी, यती व

भिक्षू ही नावे आहेत. यांपैकी पुढची तीन बौद्ध व जैन यांच्यांत विशेष प्रचलित आहेत.

बुद्धकालात जनतेचे धार्मिक नेतृत्व ऋषी, याज्ञिक व कर्मकांडी ब्राह्मण यांच्या हातून निघून ते मुनी, श्रमण व भिक्षू यांच्या हातीं गेले. श्रमण हे अवैदिक होते. ते यज्ञ–याग तुच्छ मानीत व यज्ञ-फलही तुच्छ लेखीत. श्रमणांमधले काही संप्रदाय तपावर भर देत; पण ईश्वर नावाचा कोणीतरी या जगाचा कर्ता–धर्ता आहे, यावर त्यांचा विश्वास नसे. बौद्ध कालीन अवैदिक, अर्थात नास्तिक अशा श्रमणधर्मी पुरुषांत अजित केशकंबल, पूरणकस्सप, पकुध कच्चायन, संजय वेलट्ठिपुत्त, उद्दक रामपुत्त, आळारकालाम व मंखली गोसाल हे प्रसिद्ध होते. वेदबाह्य अशा समाजात त्यांना आदराचे स्थान होते. हे सगळे श्रमणधर्मी होते. तत्कालीन निगंठ, आजीवक, परिव्राजक, जटिलक, मुंडश्रावक, तेदंडिक, इ. संप्रदाय श्रमणांचेच होते.

पण श्रमणधर्माची खरी वाढ मात्र जैन धर्माच्या अनुषंगानेच झाली. जैनांच्या आगम ग्रंथांपैकी सूत्रकृतांग, स्थानांग आणि



जैन साधू, समेगी (राजस्थान)

औपपातिक या सूत्रांमध्ये तत्कालीन श्रमणसंस्थेबद्दल बरीच माहिती मिळते. सूत्रकृतांग या ग्रंथात जवळजवळ ३६३ निर-निराळ्या श्रमण पंथांचा उल्लेख आहे. स्थानांग सूत्रांमध्ये निर्ग्रंथ, शाक्य, तापस, गेरुय आणि आजीव अशा पाच श्रमण-भेदांचा निर्देश आहे. तत्कालीन श्रमणपंथांची माहिती बौद्धांच्या अंगुत्तरनिकाय, संयुत्तनिकाय, इ. ग्रंथांमध्येही मिळते. या सर्व पंथांचे अनुयायी संसाराचा त्याग करून संन्यस्त जीवन जगत आणि सदैव फिरत राहत. शरीरसुखाची ओढ नसल्याने भिक्षेत मिळेल तेवढ्या अन्नावर उपजीविका करून दिवसातला आपला बहुतेक वेळ ते तप व अभ्यास यांमध्ये व्यतीत करीत.

श्रमणसंस्थेची उत्पत्ती कशी व का झाली, याविषयी अनेक विद्वानांची अनेक मते आहेत; पण या सर्व मतांचा बारीक विचार करून अलिकडेच डॉ. उपाध्ये व डॉ. दत्त यांनी याविषयी काढ-लेले निष्कर्ष अधिक सयुक्तिक वाटतात. डॉ. उपाध्ये यांच्या मताचा सारांश असा– गंगा-यमुनेच्या काठी आर्यांच्या आग-मनाआधी सुद्धा सुसंस्कृत समाज अस्तित्वात होता. त्या समाजाला मार्गदर्शन करणारे विद्वान धर्मगुरूही होते. पूर्व भारतातील मगधात प्रचलित असलेल्या त्या सुसंस्कृत समाजाच्या धर्माबद्दल वैदिक धर्माला कधीही आपलेपणा वाटला नाही; कारण हा पूर्वभारतीय धर्म वैदिक धर्माला मान्यता न देणारा होता. डॉ. दत्त म्हणतात, की आर्यांचे विचार, तत्त्वज्ञान आणि कल्पना यांचा पूर्व भारतातील पूर्णत्वाने आर्यीकरण न झालेल्या समाजावर जो प्रभाव पडला, त्यातूनच बौद्ध धर्माचा उगम झाला असावा. या प्रभावात आर्यांच्या मूलभूत विचारसरणीचा आणि संस्थांचा अभाव जाणवत होता. या संस्कृतिसंपर्कातून श्रमणधर्माच्या रूपाने धर्मप्रचारकांचा एक वर्ग निर्माण झाला. अवैदिक असूनही ब्राह्मणधर्मातून लुप्त होत चाललेल्या सद्वृत्तींची आणि ध्येयनिष्ठ ब्राह्मणांची उणीव यांनी भरून काढली आणि यातच श्रमणसंस्थेची बीजे अंकुरित झाली.

डॉ. शां. भा. देव म्हणतात– जैन श्रमणधर्माच्या प्राचीनत्वाची परंपरा, जैन धर्माचा निरनिराळ्या विभागांमध्ये प्रसार आणि जैनागमाच्या संहितीकरणाची कथा या सर्व गोष्टींनी जैन श्रमण-धर्माच्या विकासावर आणि वैशिष्टयांवर आपली छाप पाडली आहे. संहितीकरणाच्या जाणिवेतूनच श्रमणधर्माच्या आचार-तत्त्वांचा परंपरागत गाभा तयार झाला. निरनिराळ्या प्रदेशांमध्ये श्रमणधर्माचा प्रसार झाला. त्या वेळी नव्या नव्या परिस्थितींची अनुभूती येत गेली आणि यांतून आचारसंहितेचा आणि सवलतींचा विचार करावा लागला. अंतर्गत आणि बाह्य अशा दोन्ही प्रकारच्या परिस्थितीच्या दबावाला तोंड देऊनही जैन श्रमण-धर्माने आपली वैशिष्टये बऱ्याच प्रमाणावर आजही टिकवलेली आहेत.

जैनांचे अंग व मूलसूत्र हे ग्रंथ प्राचीनतम म्हणायला हरकत नाही. अंगग्रंथांमध्ये आचारांग आणि सूत्रकृतांग हे सर्वांत प्राचीन मानावे, याबद्दल बहुतेक विद्वानांची मते अनुकूल आहेत. त्यांचा अभ्यास केल्यास असे दिसते, की या ग्रंथांमध्ये श्रमणांच्या चारित्र्य-विषयक नीतिनियमांवर जास्त भर दिलेला आहे. सूत्रांमध्ये

पंचमहाव्रतांच्या पालनाला आणि इतर आचारसंपदेला जितके महत्त्व दिले आहे, तितके कुठल्याही विषयाला दिलेले नाही. अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य व अपरिग्रह ही ती पाच व्रते होत. जीवांचा घात न करणे; तसेच राग, द्वेष, काम, क्रोध, इ. भाव अंतरात उत्पन्न होऊ न देणे; प्राणावर बेतले तरी असत्य न बोलणे, न दिलेली वस्तू न घेणे, ब्रह्मचर्याचे पालन करणे, अर्थात पंचेंद्रियांना स्वाधीन ठेवून कुठल्याही प्रकारे विषयाधीन न होणे आणि अंतरंग व बहिरंग अशा सर्व प्रकारच्या परिग्रहाचा त्याग करणे, या गोष्टी पंचमहाव्रतांत येतात. पंचमहाव्रतांशिवाय आणखी २३ गुण आहेत. ही व्रते व गुण मिळून त्यांची संख्या २८ होते. तीर्थंकरांची स्तुती करणे, तप वाढवणे, कर्मांची निर्जरा होण्यासाठी कायोत्सर्ग करणे, भिक्षेवर जगणे, उभ्या उभ्या भोजन करणे, दिवसातून एकदाच जेवणे, भूमीवर झोपणे, नग्न राहणे, केशलोंच करणे, इ. गोष्टीही श्रमणधर्मात आवश्यक सांगितल्या आहेत. या सर्वांत पंचमहाव्रते हा श्रमणधर्माचा गाभा आहे.

अंग आणि मूलसूत्र याशिवाय राहिलेले जैन आगमातले ग्रंथ दुसऱ्या गटात पडतात. या ग्रंथांतून श्रमणजीवनाचे अनेक पैलू दृष्टीस पडतात. डॉ. देव म्हणतात – महावीरांच्या नंतर सनपूर्व ४ थ्या शतकापासून गुप्तकाल अखेरपर्यंतच्या हजार वर्षांत जैन धर्माचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर झाल्याचा पुरावा जैन परंपरा, शिलालेख आणि वाङ्मय यांवरून मिळतो. दक्षिण भारत, गुजरात, सौराष्ट्र, मध्य प्रदेश, उत्तर प्रदेश, ओडिसा, बिहार आणि बंगाल या प्रदेशांत तो प्रसार झाला. या प्रसारमोहिमेत प्रादेशिक जीवनाच्या वैशिष्ट्यांतून मुनिजीवन विशुद्ध ठेवण्याच्या जाणिवा आल्या आणि यांतूनच संघटनात्मक पाया दृढ करण्याला लागणाऱ्या नियमांची निकड भासू लागली. दुसऱ्या शब्दांत सांगायचे झाल्यास पहिल्या गटातील ग्रंथांमध्ये श्रमणसंघाची नीतिविषयक प्राथमिक अवस्था दिसून येते; तर दुसऱ्या गटातील ग्रंथांमध्ये संघाच्या स्थिरीकरणाची अवस्था दृष्टोत्पत्तीस येते. आणि हा फरक मुनिजीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात जाणीवपूर्वक केल्यासारखा वाटतो.

गुणवत्तेवर आधारलेले अनेक नियम आणि त्या नियमांना साजेसे होतील अशा मुनिसंघांतील अनेक अधिकाऱ्यांचे उल्लेख या ग्रंथांमध्ये आपणास पाहायला मिळतात. सेह, अंतेवासी, खुड्डग, थेर, उवज्झाय, आयरिय उवज्झाय, गणावच्छेइय, आयरिय, गणिन, इ. अनेक अधिकाऱ्यांचा उल्लेख या गटातील ग्रंथांमध्ये आढळतो. याशिवाय महत्त्वाची गोष्ट अशी, की या प्रत्येकाच्या बाबतीत किमान पात्रता, मुनिसंघामध्ये व्यतीत केलेला काल, त्यांनी अभ्यासिलेले धर्मग्रंथ आणि त्यांना त्यांच्या विद्वत्तेला आणि स्थानाला अनुरूप ठरणाऱ्या काही सवलती, या सर्वांचा खुलासा मिळतो. अशा तऱ्हेचे बारीक-सारीक नियम मुनिसंघाची संघटनात्मक दुसरी अवस्था दर्शवितात.

श्रमणसंघाची विशिष्ट न्यायपद्धती होती. कोणत्या अपराधासाठी कोणते प्रायश्चित्त द्यायचे, ते देण्याचा अधिकार कोणाचा, अपराध्याशी कसे वागायचे, शिक्षेमध्ये सूट कोणी व केव्हा द्यायची, इ. न्यायविषयक तपशिलाची मांडणी छेदसूत्रांत सांगितली आहे.

जैन श्रमणांनी व्यक्तिगत आणि सामूहिक जीवनात उत्कृष्ट आदर्श उभे केले. तत्कालीन समाजजीवनात आचार आणि विचार यांची फारकत झाली होती. ही अवस्था नष्ट करून जैन श्रमणांनी आचार आणि विचार यांचा मेळ घालून, तसा आदर्श लोकांच्या पुढे ठेवला. सुरवातीच्या जैन श्रमणांनी ब्रह्मचर्य, अपरिग्रह आणि चारित्र्य यांवर कसोशीने भर दिला. त्यासाठी खडतर नियमबद्धता स्वीकारली. अहिंसा तत्त्वाच्या पालनात त्यांनी स्थूल अहिंसेबरोबर वाचिक आणि मानसिक अहिंसेचाही पुरस्कार केला. मनात हिंसेचे विचार येऊ द्यायचे नाहीत, आले तर त्याबद्दल प्रायश्चित्त घ्यायचे, आपल्या उक्तीने कोणाला दुखवायचे नाही, अशा तऱ्हेचे आदर्श जैन श्रमणांनी लोकांना प्रत्यक्ष आचरून दाखवले. त्यामुळे समाजात चारित्र्याविषयी आस्था निर्माण होण्यास मदत झाली. श्रमणांनी सामान्यपणे भारतीय समाजाच्या आहारविहारात बदल घडवून आणण्यासही मदत केली. जैन धर्माशी संपर्क आलेल्या काही प्रदेशांतील लोक सामान्यपणे शाकाहारी राहिले. श्रमणांनी जातिव्यवस्था नाकारली, कर्मकांड झुगारून दिले आणि मोक्षाची कवाडे सर्वांना खुली केली. राजाश्रय आणि लोकाश्रय यांच्या बळावर जैन श्रमणांनी बहुमोल ग्रंथसंपदा निर्माण केली; वाङ्मयाच्या अनेक शाखा–प्रशाखा सजवल्या; विद्वज्जनांच्या परंपरा निर्माण केल्या; अनेक ठिकाणी ग्रंथभांडारे उभी केली. जैन धर्माचे हे असाधारण वैशिष्ट्य समजावे लागेल. पाहा– जैन धर्म. [ जै. ध.; जै. सं. सं. ]

**श्रमदानी मूर्ती** शिवमूर्तीचा एक प्रकार. या मूर्तीसंबंधी तिरुवलयडल या तमिळ पुराणात एक कथा दिली आहे, ती अशी –

एकदा वैगाई नदीला अचानक मोठा पूर आला. त्यामुळे नदीच्या बंधाऱ्याला खिंडार पडले व ते पाणी गावात शिरून सगळा गाव वाहून जाण्याची भीती निर्माण झाली. तेव्हा सगळ्या गावकऱ्यांनी माती टाकून ते भगदाड बुजवावे, असा तिथल्या राजाने हुकूम काढला. गावात एक गरीब म्हातारी राहत होती. ती मोठी शिवभक्त होती. तिला स्वतःला माती वाहून नेणे शक्य नव्हते. एखादा गडी मोलाने लावावा, तर तेही तिला शक्य

नव्हते. ती पानग्या विकून कसेबसे आपले पोट भरीत होती. अशा वेळी तिने शिवाची करुणा भाकली. शिव एका दणकट तरुणाचे रूप घेऊन तिच्या समोर उभा राहिला. एका फेरीला पानगीचा एक तुकडा या अटीवर त्याने म्हातारीसाठी माती वाहून नेण्याचे काम कबूल केले. माती वाहून नेताना तो तरुण बऱ्याच गमतीजमती करीत असे. त्यामुळे, हा कामात अळंटळं करतो, अशी तिथल्या मुकादमाची समजूत झाली. राजा कामाची गती पाहायला आला असता, त्याचेही मत तसेच झाले. राजा खूप संतापला. त्याने त्या गड्याच्या पाठीवर चाबकाचे कोरडे ओढले. पण काय आश्चर्य! तरुणाच्या पाठीवरचे वळ तिथल्या सगळ्या लोकांच्या आणि राजाच्याही पाठीवर उमटले. ते दृश्य पाहून सर्व लोक धावरून गेले. मग शिवाने आपले खरे रूप प्रकट केले.

मदुरेच्या शिल्पात शिव दोन्ही हातांनी डोक्यावर मातीची टोपली घेऊन उभा आहे, असे शिल्प खोदलेले आहे.

**श्रवण** (१) अश्विन्यादी गणनेतले बाविसावे नक्षत्र. आकाशात विषुववृत्ताच्या उत्तरेस गरुडपुंजाजवळ या नक्षत्राच्या तीन ठळक तारका ओळीने दिसतात. याचे वैदिक नाव श्रोणा असून, विष्णू ही त्याची देवता आहे. त्याला त्रिकांड किंवा विष्णूचा त्रिविक्रम असे म्हणतात. त्या तीन तारकांच्या रूपाने द्युलोक, अंतरिक्ष व पृथिवी अशी तीन पावले विष्णूने टाकली, असे तैत्ति. संहितेत म्हटले आहे (३.१.२). तिथेच एक कथा सांगितली आहे, ती अशी –

एकदा विष्णूला आपली पुण्यकीर्ती श्रवण करावी व अपकीर्ती आपल्याला शिवू नये अशी इच्छा झाली. त्यासाठी त्याने तीन कपालांवर तयार केलेल्या पुरोडाशाचा याग केला. त्यामुळे त्याने पुण्यकीर्ती ऐकली व अपकीर्ती त्याच्याकडे कधी आली नाही. म्हणून जो यजमान अशा प्रकारे याग करतो, तो पुण्यकीर्ती ऐकतो व त्याला अपकीर्ती शिवत नाही (तै. सं. ३.१.५).

श्रवण नक्षत्राचा स्वामी विष्णू आहे. हे नक्षत्र मकर राशीत येते. ते शुभ, चर, ऊर्ध्वमुख, सुलोचन, वानरयोनीचे, देवगणाचे व अंत्यनाडीचे आहे, असे बृहज्ज्योतिषसारात सांगितले आहे.

या नक्षत्रावर जन्मणारा मनुष्य पुढील प्रकारचा होतो –

शास्त्रानुरक्तो बहुपुत्रमित्रः सत्पुत्रभक्तिर्विजितारिवर्ग: ।
चेज्जन्मकाले श्रवणा हि यस्य प्रेमा पुराणश्रवणे प्रवीणः ॥
(कोष्ठीप्रदीप)

अर्थ – श्रवण नक्षत्रावर जन्मणारा पुरुष शास्त्रप्रेमी, पुत्र व मित्र बहुत असलेला, शत्रुवर्गावर विजय मिळवणारा, प्रेमळ व पुराणश्रवणामध्ये प्रवीण असा होतो.

(२) नवविधा भक्तीतील पहिली भक्ती. कोणत्याही कार्याची प्रवृत्ती व्हायला त्या कार्यापासून जे साध्य करायचे, त्याचे ज्ञान व प्रेम आवश्यक असते. एखाद्या गोष्टीचे बुद्धीत ज्ञान उत्पन्न झाले, की त्यामुळे अंतःकरणात त्या गोष्टीविषयी प्रेम उत्पन्न होते, तिची ओढ लागते आणि मनुष्य तिच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करू लागतो. या नियमानुसार ईश्वरप्राप्तीच्या प्रयत्नाला ईश्वराचे ज्ञान आवश्यक आहे. ईश्वराच्या प्राप्तीने कोणता परमार्थ सिद्ध होईल व त्याच्या अभावी जीवन कसे अपूर्ण राहील, हे समजणे आवश्यक आहे. अंतरात भक्तीची ओढ निर्माण झाली म्हणजे मनुष्य ईश्वरप्राप्तीचा साधक होतो. ही साधनप्रवृत्ती निर्माण करण्याचे कार्य श्रवण भक्तीने होते. ईश्वरप्राप्तीने जीवनाला येणारी धन्यता, ईश्वर दर्शनाचा सुख-सोहळा त्या योगे जीवनाला येणारे पावित्र्य, त्याचप्रमाणे मायाजाळात सापडलेल्या जीवांना होणारे दुःख, इ. गोष्टींचे विवेचन परमार्थपर ग्रंथांत केलेले असते. त्याचबरोबर त्यांत ईश्वरसिद्धीचा मार्ग व त्यासाठी नैतिक गुणांचे अधिष्ठान यांचाही उपदेश असतो. परमार्थमार्ग आक्रमून ईश्वरसाक्षात्काराने कृतार्थ झालेल्या संतांचे उद्‌बोधक व भव्योदात्त दर्शनही अशा ग्रंथांत घडते. श्रवणाने अशा प्रकारचे अनेक पारमार्थिक लाभ घडतील, असे आश्वासन देऊन समर्थ रामदास स्वामी आपल्या दासबोधात श्रवण भक्तीविषयी लिहितात, ते असे–

आता श्रवण केलियाचे फळ । क्रिया पालटे तत्काळ ।
तुटे संशयाचे मूळ । येकसरां ॥
मार्ग सापडे सुगम । न लगे साधन दुर्गम ।
सायोज्यमुक्तीचे वर्म । ठांईं पडे ॥
नासे अज्ञान भ्रांती । शीघ्राची येथे ज्ञानप्राप्ती ।
ऐसी आहे फलश्रुती । इये ग्रंथी ॥
योगियांचे परम भाग्य । आंगी बाणे ते वैराग्य ।
चातुर्य कळे यथायोग्य । विवेकेंसहित ॥
भ्रांत अवगुणी अवलक्षण । तेचि होती सुलक्षण ।
धूर्त तार्किक विचक्षण । सभयो जाणती ॥
आळसी तेचि साक्षपी होती । पापी तेचि पस्तावती ।
निंदक तेचि वंदू लागती । भक्तिमार्गासी ॥
बद्धचि होती मुमुक्ष । मूर्ख होती अति दक्ष ।
अभक्तचि पावती मोक्ष । भक्तिमार्गें ॥
नाना दोष ते नासती । पतित तेचि पावन होती ।
प्राणी पावे उत्तम गती । श्रवणमात्रे ॥
नाना धोके देहबुद्धीचे । नाना किंत संदेहाचे ।
नाना उद्वेग संसाराचे । नासती श्रवणे ॥
ऐसी याची फलश्रुती । श्रवणे चुके अधोगती ।

मनास होय विश्रांती । समाधान ॥
ज्याचा भावार्थ जैसा । तयास लाभ तैसा ।
मत्सर धरी जो पुसा । तयास तेंचि प्राप्त ॥
(दास. १.१.२८–३८)

प्राचीन काळी आजच्या इतका ग्रंथप्रसार आणि शिक्षणाचाही प्रसार नव्हता. त्यामुळे प्रत्येकाजवळ ग्रंथ असण्याची शक्यता नव्हती. एकाने वाचावे आणि अनेकांनी बसून श्रवण करावे, हीच त्या काळची ज्ञानप्रसाराची पद्धती होती. त्यामुळे श्रवण भक्ती हीच ज्ञानसाधनेची पहिली, तशीच भक्तिमार्गातलीही पहिली पायरी होती. या श्रवण भक्तीविषयी ऊहापोह करताना समर्थ रामदास सांगतात, की श्रवणात निरनिराळ्या शास्त्रांचे, मार्गांचे, तीर्थांचे, इ. अनेक विषयांचे ज्ञान श्रवण करावे. पण हे सर्व करीत असता, एका गोष्टीचे पथ्य मात्र अवश्य सांभाळावे–

ऐसे हे अवघेचि ऐकावे । परंतु सार शोधुन घ्यावे ।
असार ते जाणोनि त्यागावे । या नाव श्रवण भक्ती ॥
(दास. ४.१.२९)

ऐसें श्रवण सगुणाचे । अध्यात्मनिरूपण निर्गुणाचें ।
विभक्ती सांडून भक्तीचे । मूळ शोधावे ॥
(दास. ४.१.३३)

जे ऐकले असता मनातील शंकांचे निरसन होत नाही किंवा त्या वाढतात असे ऐकणे हे श्रवण नव्हे; तर ज्या श्रवणाने परमार्थाची गोडी उपजेल, तेच श्रवण होय, असेही समर्थ रामदास पुढे सांगतात.

नवविधा भक्तीपैकी एकेका भक्तीचा अधिकारी कोण झाला, याची उदाहरणे ग्रंथांतून सांगितली आहेत. त्यांमध्ये श्रवण भक्तीने ज्याला परमार्थ साध्य झाला, असा पुरुष म्हणजे राजा परीक्षीती हा होय. त्याने सात दिवसांत भागवत पुराणाचे शुकमुखाने श्रवण केले व तो मोक्षसिद्धी पावला. पाहा – भक्ती.
[सा. वा. चा.; रा. स. रा. ]

**श्रवण-द्वादशी** (१) एक काम्य व्रत. हे तिथिव्रतही आहे. विष्णू ही या व्रताची देवता होय. भाद्रपद शुद्ध द्वादशीला श्रवण नक्षत्राचा योग असता उपवास करून व्रतारंभ करावा. या तिथीला बुधवार आला, तर तो फार मोठा योग मानतात. त्यातून विष्णुशृंखला योग असेल, तर या व्रताचे विशेष महत्त्व मानलेले आहे. विष्णुशृंखला योग म्हणजे एकादशीसह द्वादशी आणि दोन्ही दिवशी श्रवण नक्षत्र असा होतो. नदीच्या संगमावर स्नान आणि विष्णुमूर्तीची पूजा, हा या व्रताचा प्रधान विधी आहे. पारण्याच्या दिवशी दहीभात, कलश आणि विष्णुमूर्ती यांचे दान द्यायचे असते. फल– इच्छापूर्ती.

या व्रताची एक कथा अशी – एक व्यापारी धंद्यासाठी दूर देशी जात असता चुकून मारवाडच्या वाळवंटात शिरला. तिथे तो क्षुधातृषेने व्याकुळ झाला. एवढ्यात त्याला काही पिशाचे दिसली. त्यांच्या अंगावर मुळीच मांस नव्हते. त्यांच्या प्रमुखाने व्यापाऱ्याला अतिथी मानून शमीच्या झाडावर टांगलेला दहीभात जेवायला वाढला. व्यापाऱ्याने विचारले. ' इथे हे अन्नोदक कुठून आले ? ' त्यावर पिशाचप्रमुख म्हणाला –

' हे माझ्या गतजन्मातील दानाचे फळ आहे. बाकीच्या पापांनी मी आणि हे माझे सांगाती असे सर्वजण पिशाच-योनीत गेलो. आता तू हिमालयात जा. तिथे तुला भूमिगत धन मिळेल. त्या धनाने तू गयेत आम्हां सर्वांची श्राद्धे कर. उरलेले धन तू घे. '

व्यापाऱ्याने त्याप्रमाणे केले व त्यामुळे सर्व पिशाचांचा उद्धार झाला. त्या दिवसापासून तो श्रवण-द्वादशीला अन्नोदकाचे दान करू लागला. [ध. सि.; हि. ध.; व्रतराज. ]

(२) एक जैन व्रत. भाद्रपद शुद्ध द्वादशीला बायका हे व्रत करतात. व्रतावधी बारा वर्षे. व्रतदिनी भगवान वासुपूज्य स्वामीची पूजा, अभिषेक व स्तुती करतात. बारा वर्षांनंतर उद्यापन करतात. माळव्यातील पद्मावतीपूरचा राजा नरब्रह्मा, त्याची राणी विजयवल्लभा व मुलगी शीलवती यांनी हे व्रत केल्याची कथा आहे. [जै. व्र. वि. सं.; व्र. ति. नि.; जै. क. ]

**श्रवण बेळगोळ** दिगंबर जैनांचे एक तीर्थक्षेत्र. द. लोहमार्गाच्या बंगलोर–हरिहर–पुणे या मार्गावर आर्सिकेरी स्थानकापासून ४२ मैल, म्हैसूरपासून ६२ मैल व हसनपासून ३१ मैल अंतरावर हे स्थान आहे. श्रवण बेळगोळ या नावाची व्युत्पत्ती अशी– श्रमण म्हणजे जैन संन्यासी. श्रमणचेच पुढे श्रवण असे रूप झाले. आणि बेळगोळ म्हणजे श्वेतकुंड. या गावात मध्यभागी एक तळे आहे. तेच श्वेतकुंड होय. इथे श्रमण येऊन राहत, म्हणून या स्थानाला श्रवण बेळगोळ असे नाव मिळाले. मौर्य सम्राट चंद्रगुप्त हा आयुष्याच्या अखेरीला आपला गुरू भद्रबाहू याच्या बरोबर इथे येऊन राहिला होता. विंध्यगिरी किंवा इंद्रगिरी आणि चंद्रगिरी या दोन डोंगराच्या दुबेळक्यात हे गाव वसलेले आहे. इथे बाहुबली गोमटेश्वराची भव्य मूर्ती आहे. म्हणून याला गोम्मटतीर्थ असेही म्हणतात.

इथल्या इंद्रगिरी नामक ४७० फूट उंच टेकडीवर गोमटेश्वराची ५७ फूट उंचीची एकसंध प्रचंड मूर्ती आहे. स्थानिक लोक या टेकडीला दोड्डु बेट्ट (मोठा डोंगर) असे म्हणतात. टेकडीवर चढून जाण्यासाठी सुमारे पाचशे पायऱ्या बनवलेल्या आहेत. टेकडीवर चढताना प्रथम पार्श्वनाथाचे मंदिर लागते

टेकडीच्या माथ्यावर एक मोठा तट असून, त्यात काही मंदिरे आहेत. चौवीस तीर्थंकारांची वस्ती, चेन्नण्ण वस्ती, ओदेगल वस्ती, सिद्धेर वस्ती, त्यागद ब्रह्मदेव स्तंभ, इ. त्यांची नावे आहेत. बाहुबली व त्याचा भाऊ भरत यांचीही लहान मंदिरे इथे आहेत. ब्रह्मदेव स्तंभ नामक देवळात ब्रह्मयाची व गुळ्ळकायज्जी नावाच्या स्त्रीची पाच फूट उंचीची कलात्मक मूर्ती आहे. हिच्यासंबंधी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे, ती अशी –

चामुंडरायाने गोमटेश्वराची मूर्ती तयार करविल्यानंतर तिच्यावर अभिषेक करायचे ठरवले. अभिषेकाच्या वेळी शेकडो घागरी दूध मूर्तीच्या मस्तकावर ओतले; पण ते मूर्तीच्या फक्त मांड्यांपर्यंतच पोचले. सर्व मूर्ती काही दुधाने माखली जाईना. शेवटी एक गरीब म्हातारी तिथे आली. तिने अभिषेकासाठी गुळ्ळकायी नावाचे एक फळ पोखरून त्यातून थोडे दूध आणले होते. ते दूध मूर्तीवर घालताच सारी मूर्ती दुधाने न्हाऊन निघाली व त्या दुधाचा ओघळ टेकडीवरून खाली वाहू लागला.

आपण एवढी प्रचंड मूर्ती बनवली, याचा चामुंडरायाला गर्व झाला होता; तो उतरवण्यासाठी पद्मावतीदेवीने हे म्हातारीचे रूप घेतले होते, असे सांगतात.

गोमटेश्वराची मूर्ती संपूर्ण नग्न असून, उत्तराभिमुख आहे. तिच्या भुजा विशाल असून, दोन्ही हात सरळ खाली सोडलेले आहेत. हातांची बोटे मोकळी आहेत. मूर्तीच्या आकाराच्या मानाने तिचा गुडघ्यापासून खालचा भाग थोडा आखूड व जाड आहे. तिचा मांड्यांपर्यंतचा भाग मागील बाजूच्या खडकावर टेकलेला आहे. वरचा भाग मात्र निराधार आहे. गुडघ्यापर्यंत दोन्ही बाजूंना दोन लहान दगडी उंचवटे आहेत, ते सापांच्या वारुळासारखे दिसतात. पायांमधून दंडापर्यंत मांड्यांना व हातांना वेष्टून माधवी लता वर गेलेली आहे. या वेलीची कलाकुसर अतिशय नाजुक आहे. मूर्ती कमळावर उभी आहे. मूर्ती शुभ्रवर्ण व गुळगुळीत आणि अतिशय भव्य आहे. तिच्या मुखावर मंद स्मित विलसत आहे.

गंगवंशीय राजा राचमल्ल किंवा राजमल्ल याचा मंत्री चामुंडराय याने इ. स. ९८३ किंवा १०२८ मध्ये ही मूर्ती स्थापन केली. मूर्तीच्या पायाशी 'श्रीचावुंडरायें करवियलें' व 'गंगसुत्ताले करवियलें' ही मराठी वाक्ये नागरी लिपीत कोरलेली आहेत.

मूर्ती प्रचंड असल्याने तिची संपूर्ण पूजा रोज करणे शक्य होत नाही. म्हणून रोज तिच्या पावलांचीच पूजा करतात. अर्थात ही पावलेही खूप मोठी आहेत. प्रत्येक पावलाची लांबी आठ फूट तीन इंच आहे. दर पंधरा वर्षांनी मूर्तीला मस्तकाभिषेक करतात. त्या वेळी सोन्या-चांदीची फुले व नाणी यांचाही मूर्तीवर वर्षाव करतात. हा उत्सव पाहायला हजारो भाविक तिथे जमतात.

विंध्यगिरीच्या समोर चंद्रगिरी टेकडी आहे. ही टेकडी १७५ फूट उंच असून, तिला चिक्क बेट्ट (लहान डोंगर) असे म्हणतात. टेकडीवर चढण्यासाठी पायऱ्या नाहीत. टेकडी चढताना प्रथम भद्रबाहूची गुंफा लागते. तिच्यात त्याची चरणचिन्हे आहेत. टेकडीच्या माथ्यावर तटबंदी असून, तिच्यात कूगे ब्रह्मदेवस्तंभ, मानस्तंभ, कत्तले वस्ती, चंद्रगुप्त वस्ती, शासन वस्ती, शांतिनाथ वस्ती, इ. मंदिरे आहेत. शांतिनाथ वस्तीतील शांतिनाथाची



जैन मंदिर, श्रवणबेळगोळ

मूर्ती काळ्या पाषाणाची असून, अकरा फूट उंच आहे. सर्वच मंदिरांचे शिल्पकाम प्रशंसनीय आहे.

या दोन टेकड्यांप्रमाणे श्रवण बेळगोळ गावातही अनेक प्रेक्षणीय मंदिरे आहेत. त्यांपैकी भंडारी वस्ती, अक्कन वस्ती, दानशाले वस्ती, कलामंदिर, नगर जिनालय, मंगाई वस्ती, जैन मठ वगैरे मंदिरे विशेष महत्त्वाची आहेत. भंडारी वस्ती हे सर्वात मोठे मंदिर असून, त्याच्या सभामंडपात एका वेळी हजार माणसे बसू शकतात. मंदिरात एका ओळीत काळ्या पाषाणाच्या चौवीस मूर्ती आहेत. त्यामुळे याला चतुर्विंशतितीर्थंकर वस्ती असेही म्हणतात. या मंदिराचे छत प्रचंड लांबीरुंदीच्या दगडी फळ्यांचे बनवलेले आहे. या टेकडीवर अनेक प्राचीन शिलालेखही आहेत.

पाहा – बाहुबली, गोमटेश्वर [ कल्याण–तीर्थांक; जै. ध.; डॉ. एम्. एच्. कृष्णा – जै. सि. भा., मार्च १९४०; मा. दे. मा. लो.

## श्रवण–रामायण

या रामायणाची श्लोकसंख्या सव्वालाख असून, त्याचा काल स्वायंभुव मन्वंतराचे चाळिसावे सत्ययुग असा आहे. त्याची रचना इंद्र-जनक संवादात्मक आहे. त्यात दशरथाच्या अहेराचे वर्णन, श्रवणकुमाराची मातृ-पितृभक्ती, त्याचा विवाह, वध, श्रवणपित्याचा दशरथाला शाप, मंथरेची उत्पत्ती, दशरथाच्या मृत्यूचे कारण, सुमंतस्मरण, अष्टसामंत, सोळा-सामंत, राज्यांग, इ. विषयांचे विशेष

वर्णन आहे. याशिवाय यात चित्रकूटावरील राम-भरतसंवाद, वसिष्ठाची मध्यस्थी, जनकाचे आगमन, मिथिला व अवध येथील नागरिकांची संयुक्त सभा, पादुकायाचना, नंदिग्राम-निवास हे विषयही आले आहेत. [ हिंदुत्व ]

**श्रवणाकर्म** स्मार्त विकृतींपैकी एक विकृती. या कर्मामध्ये सर्पदेवतेला धाना, भाताच्या लाह्या आणि पीठ यांचा बली देतात, म्हणून याला सर्पबली असेही म्हणतात. हे कर्म मुख्यतः औपासनाग्नीवर करतात; पण अग्निहोत्री यजमानाने हे कर्म दक्षिणाग्नीवर करावे, असेही एक मत आहे. यातील अग्नीसंबंधीचे कर्म स्थालीपाकाच्या तंत्राने करतात. श्रावणी पौर्णिमेला रात्री संकल्प करून पुण्याहवाचन करतात. अग्नीला परिस्तरणे घालून कर्माला प्रारंभ करतात. भाजलेल्या सातूच्या लाह्या, साळीच्या लाह्या, यवाचे पीठ, पळसाची फुले, अंजन, अभ्यंजन, इ. वस्तू अग्नीच्या उत्तरेला मांडतात. प्रधानहोमाच्या वेळी एका पात्रात धाना म्हणजे सातूच्या लाह्या, साळीच्या लाह्या, पीठ व तूप एकत्र करून त्याच्या चार आहुती देतात. नंतर सर्पदेवतेसाठी पळसाच्या फुलांच्या तीन आहुती देतात. या वेळी प्रजापती किंवा इंद्र ही देवता घ्यावी, असे एक मत आहे. स्विष्टकृतादी कर्म संपल्यावर धानादी साहित्य घेऊन घराच्या पूर्वभागी जातात आणि तिथे एक स्थंडिल घालून त्याच्यावर रेघा आखतात. मग स्थंडिलावर पाणी शिंपडतात. धानादी तीन पदार्थ तुपात मिसळून त्यांचे सर्पदेवतेसाठी चार बली देतात. बलीच्या वर अंजन व अभ्यंजन लावून सर्पांचे उपस्थान करतात. या वेळी सर्व दिशांचेही उपस्थान करतात. मग हातपाय धुवून परत आपल्या स्थानी येतात व कर्म समाप्त करतात.

अशा प्रकारे हे सर्पबलिकर्म श्रावण पौर्णिमेपासून मार्गशीर्ष पौर्णिमेपर्यंत रोज करायला सांगितले आहे. आहुती देण्याचे कर्म मात्र आरंभी एकदाच करायचे असते. श्रावण पौर्णिमेपासून मार्गशीर्ष पौर्णिमेपर्यंत जितके दिवस होतील, ते मोजून दररोजचे सर्पबली एकदमच करावे, असा एक पक्ष आश्वलायन गृह्यसूत्रात (२.१.१५) सांगितला आहे. सर्पबली वर्षातून एकदा किंवा प्रत्येक महिन्यात एकदा करावा, असे विकल्प बौधायन गृह्यसूत्रात सांगितले आहेत (३.१०.२). श्रवणाकर्म हे नित्य आहे, असेही कोणी म्हणतात.

श्रावण पौर्णिमेपासून मार्गशीर्ष पौर्णिमेपर्यंत उंच पलंगावर झोपावे, असे सांगितले आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**श्राद्ध** पितरांना संतुष्ट करण्यासाठी विधी. श्रद्धा या शब्दापासून श्राद्ध हा शब्द निष्पन्न झाला आहे. ब्रह्मपुराणाच्या श्राद्ध प्रकरणात श्राद्धाची व्याख्या दिली आहे, ती अशी–

देशे काले च पात्रे च श्रद्धया विधिना च यत्।
पितॄनुद्दिश्य विप्रेभ्यो दत्तं श्राद्धमुदाहृतम्।

अर्थ – देश, काल आणि पात्र यांना अनुलक्षून श्रद्धा व विधी यांनी युक्त असे पितरांना उद्देशून, ब्राह्मणांना जे (अन्नादी) दिले जाते, त्याला श्राद्ध म्हणावे.

श्राद्ध केल्याने कोणती फलप्राप्ती होते, याविषयी स्मृतिचंद्रिकेत व इतरही ग्रंथांत एक श्लोक दिला आहे, तो असा –

आयुः पुत्रान् यशः स्वर्गं कीर्तिं पुष्टिं बलं श्रियः।
पशून् सौख्यं धनं धान्यं प्राप्नुयात् पितृपूजनात् ॥

अर्थ – आयुष्य, पुत्र, यश, स्वर्ग, कीर्ती, पुष्टी, बल, लक्ष्मी, पशू, सौख्य, धन, धान्य या गोष्टी पितृपूजनाने म्हणजेच श्राद्ध केल्याने प्राप्त होतात.

श्राद्धप्रथा ही फार प्राचीन आहे. पितरांच्या म्हणजेच मृतात्म्यांच्या ठायी पुढिलांचे भले-बुरे करण्याचे सामर्थ्य असते, या कल्पनेतूनच श्राद्ध कल्पनेचा उगम झाला. भारतातल्या बहुतेक सर्व जाती–जमातींत वरील कल्पना आणि तदनुसार काही विधी आढळतात. श्राद्धकल्पना आधीची व पुनर्जन्म, कर्मविपाक, इ. सिद्धांत नंतरचे आहेत, असे डॉ. काणे लिहितात. विशिष्ट प्रसंगी प्रियपूर्वजांचे स्मरण हे माणसाला उत्साहवर्धक आणि प्रसंगी आदर्शरूपही होत असते. मृतदेहाचे दहन झाल्यानंतर मृतात्मे चेतनामय रूप घेऊन यम व पितर यांच्या सन्निध वास्तव्याला जातात, अशी पूर्वी कल्पना होती. वैदिक वाङ्मयात पितर हा शब्द पिता, पितामह व प्रपितामह या अर्थी वापरलेला आढळतो (वाज. सं. २.३१; तै. सं. १.८.५.१.; श. ब्रा.२.४.२.१९).

मनूने पहिल्याप्रथम श्राद्धक्रिया सुरू केली, असे ब्रह्मांडपुराणात म्हटले आहे. (उपो. ९.१५ व १०.९९). म्हणूनच विष्णू (३.११) व वायू (४४.३८) या पुराणांमध्ये मनूला श्राद्धदेव म्हटले आहे. प्राचीन काळी श्राद्धाला पिंडपितृयज्ञ हे नाव होते (गोभिल गृ. ४.४.१–२).

महापितृयज्ञ किंवा अष्टका हे शब्दही श्राद्ध या अर्थी वापरलेले आहेत. श्राद्ध हा शब्द कठोपनिषदात पहिल्याप्रथम आढळतो (१.३.१७).

अष्टका म्हणजे कोणत्याही महिन्यातील वद्य अष्टमी ही तिथी होय. वेदकाळी अष्टकाश्राद्ध हे विशेषतः मार्गशीर्ष, पौष, माघ व फाल्गुन या चार महिन्यांतील वद्य अष्टमीला करीत असत. भाज्या, मांस, वडे, तीळ, मध, तांदुळांची खीर, फळे, कंदमुळे हे पदार्थ श्राद्धात पितरांना अर्पण करीत. विश्वेदेव, अग्नी, सूर्य, प्रजापती, रात्री, नक्षत्रे, ऋतू, पितर व पशू या श्राद्धाच्या देवता मानीत. अन्वष्टका श्राद्धात स्त्रीपूर्वजांचेही

आवाहन करीत आणि त्यांना सुरा, भाताची पेज, नेत्रांजन, फुलांची माळ, इ. वस्तू अर्पण करीत.

प्रत्येक महिन्याच्या अमावास्येला आहिताग्नी ब्राह्मण जे श्राद्ध करतात, त्याला पिंडपितृयज्ञ असे नाव आहे. तो आदर्श श्राद्ध-विधी होय. त्याला श्राद्धाची प्रकृती समजतात. इतर प्रकार म्हणजे श्राद्धाच्या विकृती होत.

श्राद्धाच्या वेळी एखादा अतिथी अचानक आल्यास त्याला अवश्य भोजन द्यावे. कारण योगी, सिद्धपुरुष व देव हे भिन्न रूपे घेऊन पृथ्वीवर हिंडत असतात व ब्राह्मणाच्या रूपाने श्राद्ध-विधीचे निरीक्षण करायला येतात, असे वायू, वराह व विष्णू या पुराणांत सांगितले आहे. त्याचप्रमाणे श्राद्धाच्या वेळी योगी किंवा संन्यासी याला भोजन दिल्यास त्यामुळे पितर अत्यंत तृप्त होतात, असे मार्कंडेयपुराणात सांगितले आहे (२९.२९).

मत्स्यपुराणात श्राद्धासंबंधी एक प्रश्न उपस्थित केला आहे, तो असा – ब्राह्मणाने खाल्लेले किंवा होमाग्नीत अर्पण केलेले अन्न मृतात्म्यांना कसे पोचते ? कारण मृत्यूनंतर ते आत्मे पुनर्जन्म घेऊन दुसऱ्या देहात आश्रय घेतात. या प्रश्नाचे उत्तरही तिथेच दिले आहे, ते असे – वसू, रुद्र व आदित्य या पितृदेवतांच्या द्वारे ते अन्न पितरांना पावते किंवा त्या अन्नाचे भिन्न पदार्थांत म्हणजे अमृत, तृण, भोग, हवा, इ. पदार्थांत रूपांतर होऊन ते भिन्न योनीतील पितरांना मिळते (मत्स्यपु. १९.३–९; १४१. ७४–७५).

**श्राद्धप्रयोग** – श्राद्धाचा प्रयोग सामान्यतः पुढीलप्रमाणे असतो – यजमानाने देशकालाचा उच्चार करून अपसव्य करावे. श्राद्धाला योग्य जे पितर त्यांची षष्ठी विभक्ती योजून 'अमुकश्राद्धं सदैवं सपिण्डं पार्वणविधिना एकोद्दिष्टेन वा अन्नेन आमेन वा हिरण्येन वा सद्यः करिष्ये' असा संकल्प करावा. मग तिलोदक, यवोदक करावे. प्रायश्चित्तासाठी पुरुष-सूक्त म्हणावे. ब्राह्मणांना प्रदक्षिणा व नमस्कार करावा. देव-स्थानी पूर्वाभिमुख व पितृस्थानी उत्तराभिमुख ब्राह्मण बसवावे. ब्राह्मणांना आसनासाठी दर्भ द्यावे, 'उदीरतामवर' या मंत्राने सर्वत्र तीळ टाकावे. पाकप्रोक्षण करावे. क्षण म्हणून ब्राह्मणाचा अंगुष्ठरहित हात धरावा. ब्राह्मणांच्या हातावर अर्घ्य द्यावे. गंधपुष्पांनी ब्राह्मणांची पूजा करावी. देवांना उपचार समर्पिताना 'स्वाहा नमः' व पितरांना उपचार समर्पिताना 'स्वधा नमः' असा उच्चार करावा. मंडले करून त्यांवर ब्राह्मणांसाठी भोजनपात्रे मांडावी. त्यांच्या भोवती भस्माचे वर्तुळ करावे. अग्नौ-करण करावे. त्यासाठी चरूवर तूप घालून त्याच्या ब्राह्मणाच्या हातावर आहुती द्याव्या. मग तुपाने पात्रांचे प्रोक्षण करून भोजनाचे पदार्थ वाढावे. गायत्री मंत्राने अन्नाचे प्रोक्षण करावे. 'ब्रह्मार्पणं' या मंत्राने उदक सोडावे. ब्राह्मणांच्या हातावर आपोशन घालावे. ब्राह्मणांनी प्राणाहुती घेऊन सावकाश भोजन करावे. यजमानाने दहा वेळा गायत्रीजप करावा. विष्णू, रुद्र, ब्रह्मा व सूर्य यांची वैदिक सूक्ते जेवताना ब्राह्मणांना ऐकवावी. भोजन झाल्यावर यजमानाने ब्राह्मणांना तृप्तिप्रश्न व संपत्तिप्रश्न करावे. ब्राह्मणांनी अनुकूल उत्तर द्यावे. त्यानंतर पितरांना उद्देशून पिंड-दान व विकिर करावे. पिंडदान दर्भांवर्हीवर करावे. पिंडांची पूजा करावी. मग पिंड भरून ठेवावे. ते जलाशयात टाकावे अथवा गाईला द्यावे. ( घरात मंगलकार्य झाले असता एक वर्षपर्यंत श्राद्धात पिंडदान वर्ज्य आहे.) पिंडदानानंतर ब्राह्मणांना दक्षिणा देऊन त्यांच्याकडून आशीर्वादाच्या अक्षता घ्याव्या. मग स्वधा-वाचन करून सर्व कर्म ईश्वरार्पण करावे. नंतर वैश्वदेव तर्पण करून आप्तेष्टांसह श्राद्धशेष अन्नाचे भोजन करावे.

**श्राद्धाची परिभाषा** – श्राद्धात देवपूजा करीत असता नेहमी उजव्या पायाचा गुडघा भूमीवर टेकवावा. पितरांची पूजा कर-ताना डाव्या पायाचा गुडघा भूमीवर टेकवावा. देवकर्म प्रदक्षिण व पितृकर्म अप्रदक्षिण करावे. देवांना दर्भ सरळ द्यावे, पितरांचे दर्भ अग्राशी मुडपून घ्यावे. आवाहन, अर्घ्य, संकल्प, पिंडदान, पिंडाभ्यंजन, अन्नदान, अक्षय्योदक, आसन आणि पाद्य या उप-चारात पितरांचे नाम–गोत्र उच्चारावे. गोत्राचे ज्ञान नसेल तर काश्यप गोत्र उच्चारावे. कारण सर्व प्रजा कश्यपापासून उत्पन्न झाल्या आहेत, असे श्रुती सांगते. पितरांच्या नावाच्या शेवटी 'शर्मन्' असा उच्चार करावा. स्त्रियांच्या नावाच्या अंती 'दा' हे उपपद लावावे.

**श्राद्धभेद**–पार्वण, एकोद्दिष्ट, नांदी व सपिंडीकरण असे श्राद्धाचे चार प्रकार आहेत. पित्रादी त्रयीला उद्देशून केलेले जे श्राद्ध ते पार्वण होय. प्रतिसांवत्सरिक, अमावास्यादी ९६ श्राद्धे, महालय, हे पार्वण श्राद्धाचे प्रकार होत. एकाच्याच उद्देशाने व एकाच पिंडाने करायचे श्राद्ध ते एकोद्दिष्ट होय. याचेही अनेक पोटभेद आहेत. पुत्रजन्म, उपनयन, विवाह, इ. शुभ प्रसंगीं जे वृद्धिश्राद्ध करतात ते नांदीश्राद्ध होय. मृत्यूच्या बाराव्या दिवशी मृत व्यक्तीच्या पिंडाचे पितामह, प्रपितामह व वृद्ध प्रपितामह या त्रयीच्या पिंडांशी संयोजन करतात, ते सपिंडीकरण होय.

**श्राद्धदिनकृत्ये**–यजमानाने श्राद्धदिनी भूमी व पात्रे यांची शुद्धी करावी. यजमानपत्नीने शुचिर्भूत होऊन श्राद्धाचा स्वयंपाक करावा. स्वयंपाकाची पात्रे सोने, रुपे, तांबे, कासे किंवा मृत्तिका यांची असावी. श्राद्धाचा स्वयंपाक गृह्याग्नीवर किंवा लौकिकाग्नी-वर करावा. पिंडदान होईपर्यंत इतरांना अन्नदान करू नये.

**श्राद्धब्राह्मणांची संख्या** – विश्वेदेवांच्या स्थानी दोन व पितृ-पार्वणाच्या ठिकाणी तीन मिळून पाच ब्राह्मण श्राद्धाला असावे.

एवढे सामर्थ्य नसेल, तर देवस्थानी एक व पितृस्थानी एक असे दोनच ब्राह्मण सांगावे. कर्ता श्रीमंत असला तरी, त्याने अधिक ब्राह्मण बोलावू नयेत. जेव्हा एकच ब्राह्मण असेल, तेव्हा विश्वेदेवस्थानी शिवलिंग किंवा शाळिग्राम बसवावा. सपिंडीकरणात पार्वणासाठी तीनच ब्राह्मण सांगावे. नांदीश्राद्धात देवस्थानी दोन व प्रत्येक पार्वणाला प्रत्येकी दोन मिळून आठ ब्राह्मण कमीत कमी असावे. ब्राह्मणांना निमंत्रण करायचे ते पूर्वदिवशी किंवा त्याच दिवशी करावे.

**श्राद्धदेश** – गोमयाने सारविलेली, तसेच कीटकादी प्राणी व अपवित्र वस्तू यांनी वर्जित अशी भूमी श्राद्धाला उक्त होय. कुरुक्षेत्र, प्रभास, प्रयाग, नैमिपारण्य, गयशीर्ष, अक्षयवट, ही स्थानेही श्राद्धाचे महाफल देणारी होत. दुसऱ्याच्या घरी श्राद्ध करणे झाल्यास त्या घराच्या धन्याला त्या कालापुरते गृहमूल्य देऊन श्राद्ध करावे.

**श्राद्धकाल** – अमावास्या, वर्षातल्या बारा संक्रांती, चंद्र-सूर्य-ग्रहणे, युगादी व मन्वादी तिथी, अर्धोदयादी पर्वे, मृत्युदिन, श्रोत्रिय ब्राह्मणांचे आगमन, इ. काल हे श्राद्धाला उक्त होत. दिवसाचे पाच भाग केल्यावर त्यांतल्या चौथ्या भागाला अपराह्ण असे म्हणतात. हा काल श्राद्धाला योग्य समजावा. एकोद्दिष्ट श्राद्ध मध्याह्नी व हिरण्यश्राद्ध आणि आमश्राद्ध दिवसाच्या पूर्वभागात करावे. वृद्धिश्राद्ध प्रातःकाली किंवा संगवकाली (दिवसाच्या पाच भागांपैकी दुसऱ्या भागात) करावे. ग्रहणकालीन श्राद्ध व पुत्रजन्माच्या वेळचे वृद्धिश्राद्ध ही रात्रीही करावी.

**श्राद्धद्रव्ये** – दर्भ, व्रीही (साळी), यव, तीळ, उडीद, गहू, सावे, मूग व मोहरी; तसेच पडवळ, बोर, आवळा, खजूर, चिंच, आले, मुळा, द्राक्ष, लवंग, सुपारी, विड्याची पाने, गोरस, इ. पदार्थ श्राद्धाला उक्त होत. प्राचीन काळी श्राद्धात ब्राह्मणांना मांसही वाढीत असत; पण कलियुगात ही प्रथा वर्ज्य आहे.

**श्राद्धविघ्ने** – जननाशौच किंवा मृताशौच आल्यास श्राद्ध त्या तिथीला न करता आशौचाची निवृत्ती होईल त्या दिवशी करावे. श्राद्धातील ब्राह्मण भोजनास बसले असता आशौच प्राप्त झाल्यास न थांबता श्राद्ध समाप्त करावे. पाकप्रोक्षण झाल्यावर आशौच लागू होत नाही. पत्नी रजस्वला असल्यास तिच्या चौथ्या दिवशी श्राद्ध करावे. व्याधी, संकटे, इ. अडचणी आल्यास पुढील मासातल्या उक्त तिथीस श्राद्ध करावे. एखाद्याचा देशान्तरी मृत्यू झाल्यामुळे मास व तिथी ज्ञात नसेल, तर प्रस्थानाच्या तिथीस किंवा मृत्युवार्ता ज्या तिथिमासावर ऐकायला मिळाली, त्या तिथिमासावर श्राद्ध करावे. यांपैकी काहीच माहीत नसेल, तर मार्गशीर्ष किंवा माघ या मासांच्या अमावास्येस श्राद्ध करावे.

**श्राद्धसंपात** – माता–पित्यांचा मृत्युदिवस एकच असल्यास प्रथम पित्याचे व नंतर निराळी पाकसिद्धी करून मातेचे श्राद्ध करावे. एका दिवशी एकाने तिघांची श्राद्धे करू नयेत. तसा प्रसंग आल्यास दोन श्राद्धे स्वतः करावी आणि तिसरे भाऊ किंवा पुतण्या यांच्याकडून करवावे. स्त्रीने मृत पतीबरोबर अग्निप्रवेश केला असल्यास एकाच पाकसिद्धीवर दोघांची श्राद्धे वेगवेगळी करावी.

**श्राद्धांगतर्पण** – प्रतिसांवत्सरिक श्राद्धात दुसऱ्या दिवशी तिलोदकाने पितरांचे तर्पण करावे. अपकर्षाने श्राद्ध पूर्ण झाल्यानंतर त्याच दिवशी पितृतर्पण करण्याची प्रथा आहे. पक्षश्राद्धात व हिरण्यश्राद्धात श्राद्ध झाल्यावर ब्राह्मणांना पोचवून नंतर पितृतर्पण करावे. अष्टकाश्राद्धात श्राद्धाच्या अंतीच तर्पण करावे. वृद्धिश्राद्ध, सपिंडीकरण, प्रेतश्राद्ध, अब्दपूर्तिश्राद्ध, या श्राद्धांत तिलतर्पण करू नये. अपसव्य करून व डावा गुडघा भूमीवर टेकवून आणि पितरांचे नाम–गोत्र द्वितीया विभक्तीने उच्चारून त्याच्या पुढे स्वधा शब्द योजून तर्पण करावे.

**श्राद्धकर्ता व श्राद्धभोक्ता यांचे विधिनिषेध** – स्त्रीसंग, पुनर्भोजन, असत्य भाषण, द्यूत, हिंसा, प्रवास व कलह या गोष्टी कर्त्याला व भोक्त्यालाही निषिद्ध आहेत. कर्त्याने शुभ्र वस्त्र परिधान करावे. पिंडदानाच्या पूर्वी चंदनाचा तिलक लावू नये. भोक्त्याने भस्माचा ऊर्ध्वपुंड्र धारण करावा व भोजनोत्तर दहा वेळा गायत्री जप करावा.

**श्राद्धभोजनाचे प्रायश्चित्त** – श्राद्धात भोजन करणाऱ्या ब्राह्मणाला श्राद्ध ज्या मानाने महत्त्वाचे असेल, त्या मानाने प्राणायाम, गायत्री मंत्राने अभिमंत्रित केलेल्या जलाचे प्राशन, चांद्रायण, उपवास, इ. प्रायश्चित्ते सांगितली आहेत.

**आमश्राद्ध** – स्वयंपाक करून श्राद्ध करण्याची शक्यता नसेल तर आमश्राद्ध म्हणजे न शिजवलेले अन्नधान्य देऊन श्राद्ध पार पाडावे. आपत्काली, भार्येच्या अभावी, तीर्थक्षेत्री, प्रवासात, पुत्रजन्मकाली, भार्या रजस्वला असताना आणि संक्रांतीच्या दिवशी आमश्राद्ध करावे, असे कात्यायनाचे वचन आहे. स्वयंपाकासाठी जेवढे अन्नधान्य घ्यायचे, त्याच्या चौपट किंवा दुप्पट आमान्न द्यावे. अन्नात अंगठा बुडवणे, अग्नौकरण, तृप्तिप्रश्न ही कृत्ये आमश्राद्धात करू नयेत.

**हिरण्यश्राद्ध** – आमान्नाचा अभाव असेल तर धान्याच्या किमतीच्या चौपट किंमतीचे सुवर्ण ब्राह्मणांना देऊन श्राद्ध करावे. इतर कृत्ये आमश्राद्धाप्रमाणेच करावी.

**चटश्राद्ध** – श्राद्धासाठी ब्राह्मण न मिळाल्यास ब्राह्मण बसवायच्या आसनावर चट म्हणजे काही दर्भ ठेवून वचन–प्रतिवचन युक्त असे सर्व श्राद्ध करावे. दक्षिणाही द्यावी.

**संन्याशाचे श्राद्ध** – संन्यासी बनलेल्या आपल्या पित्याचे पुत्राने

पार्वणश्राद्ध करावे. प्रतिसांवत्सरिक श्राद्धही यथाविधि करावे. त्याचे एकोदिष्ट करू नये. महालय करायचा तो समाधि-तिथीस न करता द्वादशीला करावा.

**तीर्थश्राद्ध** – प्रयागादी तीर्थांच्या ठिकाणी गेल्यावर तिथे पितृश्राद्ध करावे. तीर्थयात्रेच्या आरंभी व तीर्थाहून परत आल्यावर घृतयुक्त असे वृद्धिश्राद्ध करावे. [ हि. ध.; नि. सिं.; ध. सिं. ]

**श्राद्धव्रत** एक काम्य व्रत. शिव ही याची देवता आहे. एक वर्षभर केशवमूर्तीच्या समक्ष शिवमूर्तीला चंदन लावणे आणि उद्यापनाच्या वेळी जलधेनू व घृतधेनू दान देणे, असा याचा विधी आहे. फल – शिवलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**श्रावकाचार** जैनधर्मी गृहस्थाला श्रावक व त्याच्या स्त्रीला श्राविका असे म्हणतात. श्रावक आणि श्राविका यांना जैन संघात महत्त्वाचे स्थान आहे. कारण त्यांच्यावाचून मुनि-आश्रम चालू शकत नाही. या श्रावकांतूनच पुढे मुनी तयार होतात. त्यामुळे श्रावकाचा आचार आदर्शरूप असला पाहिजे, असे जैनांनी मानले आहे.

जैन गृहस्थाच्या अंगी अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य, एकदेश-अपरिग्रह आणि मांस, मद्य व मदिरा यांचा त्याग करण्याची वृत्ती हे आठ मूल गुण असले पाहिजेत, असे जैन शास्त्रात सांगितले आहे. जैन गृहस्थाने, ज्यात कमीत कमी हिंसा होईल, असा उद्योग केला पाहिजे. त्याने रात्री भोजन करता कामा नये. पाणी कपड्याने गाळून प्याले पाहिजे. त्याने सदैव सत्य बोलले पाहिजे. त्याने स्वतः चोरी करता कामा नयेच; पण दुसऱ्यालाही चोरी करायला प्रवृत्त करता कामा नये. गृहस्थाने आपली कामवासना फक्त आपल्या पत्नीपुरतीच मर्यादित ठेवली पाहिजे. यालाच ब्रह्मचर्य असे नाव आहे. आपली स्त्री, पुत्र, घर, सोनेनाणे, इ. वस्तूंबद्दल माणसाला 'हे माझे आहे' अशी जी ममता वाटते, त्याला जैन धर्मात परिग्रह असे नाव दिलेले आहे. श्रावकाने ही ममता सोडली पाहिजे.

पाक्षिक, नैष्ठिक व साधक असे श्रावकाचे तीन भेद आहेत. प्रारंभिक अवस्थेतल्या श्रावकाला पाक्षिक असे म्हणतात. तो आठ मूल गुणांचे पालन करतोच. शिवाय, पिंपळ, वड, औदुंबर, इ. वृक्षांची फळे खात नाही, कारण त्यांत खूप जंतू असतात. त्याने रोज मंदिरात जाऊन अर्हंताची पूजा केली पाहिजे, गुरुजनांची सेवा केली पाहिजे आणि सत्पात्री दानधर्म केला पाहिजे, असा नियम आहे.

मध्य दशेतील श्रावकाला नैष्ठिक असे नाव आहे. नैष्ठिक श्रावकाच्या अकरा पायऱ्या आहेत. जैन सिद्धान्तात त्यांना अकरा प्रतिमा असे म्हटले आहे. दर्शनिक, व्रतिक, सामायिकी, प्रोषधोपवासी, सचित्तविरत, दिवामैथुनविरत, ब्रह्मचारी, आरंभविरत, परिग्रहविरत, अनुमतिविरत व उद्दिष्टविरत अशी त्यांची नावे आहेत. या पायऱ्यांचे क्रमाने आचरण करायचे असते.

श्रावकाचा तिसरा भेद साधक हा होय. मृत्युकाल जवळ आला असता शरीरावरील ममता दूर करून, भोजन वगैरेंचा त्याग करून, ध्यानपूर्वक जो आत्म्याचा शोध घेतो, त्याला साधक असे म्हणतात. साधकाच्या या क्रियेला समाधिमरण व्रत किंवा सल्लेखना व्रत असे नाव आहे. मृत्यूच्या आधी आचार्य साधकाच्या कानात उपदेश करतो आणि नंतर साधक पंच नमस्कार मंत्राचा जप करीत शांतिपूर्वक प्राणविसर्जन करतो.

श्रावकांच्या आचाराविषयी जैन वाङ्मयात काही ग्रंथ लिहिलेले आहेत. त्यांपैकी प्राकृतातील सावयपण्णत्ती हा पहिला स्वतंत्र ग्रंथ आहे. याचा कर्ता हरिभद्र असून, त्यानेच त्याच्यावर संस्कृतमध्ये स्वोपज्ञ टीका लिहिली आहे. तसेच वसुनंदीने प्राकृत गाथांच्या द्वारा श्रावकाचार वर्णिला आहे. त्या ग्रंथाचे नाव उपासकाध्ययन असे असून, त्यात ५४६ गाथा आहेत. सावयधम्मदोहा हा अपभ्रंश भाषेतील श्रावकाचारविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहे. रत्नकरंड श्रावकाचार ही संस्कृतमधील श्रावकधर्मविषयीची प्रसिद्ध रचना आहे. यात १५० श्लोक असून, त्यात क्रमाने सम्यग् दर्शन, ज्ञान व चारित्र्य यांचे निरूपण केले आहे. याशिवाय, श्रावकाचाराचे वर्णन करणारे आणखीही काही ग्रंथ आहेत. [ जै. ध.; भा. सं. जै. यो. ]

**श्रावण** चैत्रादी मासगणनेतील पाचवा मास. या महिन्याच्या पौर्णिमेला किंवा तिच्या आगेमागे श्रवण नक्षत्र असते, त्यावरून या महिन्याला श्रावण असे नाव मिळाले आहे. या महिन्यातील बहुतेक सर्व दिवशीं काही ना काही धर्मकृत्य सांगितलेले आहे. दर सोमवारी शिवासाठी एकभुक्त किंवा नक्त व्रत करतात. मंगळवारी नवविवाहित मुली मंगळागौरीची पूजा करतात व गुरुचरित्राचा पाठ करतात. शुक्रवारी स्त्रिया लक्ष्मीची पूजा करतात आणि पुरणपोळी करून सवाष्णीला जेवायला घालतात. संध्याकाळी स्त्रियांना हळदकुंकू लावून दूध व फुटाणे देतात. शनिवारी एखाद्या मुंज्या मुलाला घरी बोलावून तेल लावून आंघोळ घालतात व त्याला जेवायला घालतात. तसेच, या दिवशी शनीला तेल देतात आणि त्याच्या प्रीत्यर्थ नारळ फोडतात. काही स्त्रीपुरुष या दिवशी एकभुक्त राहतात. रविवारी आदित्याची पूजा करतात व त्याला खिरीचा नैवेद्य दाखवतात.

या महिन्यात अनेक सण येतात. शुद्ध पंचमीला नागपंचमी येते. या दिवशी नागांची पूजा करतात. पौर्णिमेला नारळी

पौर्णिमा असे म्हणतात. या दिवशी समुद्रकिनारी राहणारे लोक वरुणदेवतेप्रीत्यर्थ समुद्राची पूजा करून त्याला नारळ अर्पण करतात. याच दिवशी वहीण भावाच्या हातात राखी बांधते. त्यावरून या पौर्णिमेला राखी पौर्णिमा असेही म्हणतात. तसेच ही पौर्णिमा पोवती पौर्णिमा म्हणूनही ओळखली जाते. कारण या दिवशी सुताची पोवती करून ती विष्णू, शिव, सूर्य, इ.



श्रावणमासाचे सांकेतिक चित्र

देवतांना अर्पण करतात व मग कुटुंबातील स्त्रीपुरुष ती पोवती हातात बांधतात. याच दिवशी श्रवण नक्षत्र असेल तर ब्राह्मण पुरुष उपाकर्म करून नवीन यज्ञोपवीत धारण करतात. या विधीला श्रावणी असे नाव आहे. श्रावण वद्य अष्टमीला श्रीकृष्ण-जन्माष्टमी असे म्हणतात. कारण या दिवशी श्रीकृष्णाचा जन्म झाला. या दिवशी भाविक स्त्रीपुरुष उपवास करतात व कृष्ण-जन्माचा सोहळा करतात. या महिन्यातील अमावास्येला पिठोरी अमावास्या असे नाव आहे. संततीच्या प्राप्तीसाठी सौभाग्यवती स्त्रिया पिठोरी व्रत करतात. याच दिवशी काही ठिकाणी शेतकरी लोक पोळा नावाचा सण साजरा करतात. हा सण बैलांसंबंधी असून, या दिवशी बैलांना शृंगारून त्यांची मिरवणूक काढतात.

उत्तर भारतात या महिन्यात झुलन जात्रा, रक्षाबंधन, जन्माष्टमी व नंदोत्सव हे उत्सव विशेष महत्त्वाचे मानतात. झुलन जात्रा हा दोलोत्सव आहे. पौर्णिमेच्या दिवशी राधा व कृष्ण यांना हिंदोळ्यावर बसवून झोके देतात व स्त्रिया त्यांच्या-संबंधी गीते गातात. हा उत्सव एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत चालतो. गीत, वाद्य, वगैरेंच्या साहाय्याने घरोघरी हा उत्सव साजरा करतात. त्या दिवसांत राधा–कृष्णांची पूजा करतात व ब्राह्मण-सुवासिनीला जेवण घालतात. सुखवस्तू लोकांच्या घरी कृष्णचरित्रातील काही भाग नाटचरूपाने दाखवतात. कृष्ण-जन्माच्या दुसऱ्या दिवशी नंदोत्सव करतात. नंदाला पुत्र झाला, या समजुतीने गीत, नृत्य, नाटच यांच्या योगाने हा उत्सव साजरा करतात. तसेच, या दिवशी हळदकुंकू मिसळलेले पाणी पिचकारीने अंगावर उडवतात.

श्रावण हा चातुर्मासातील श्रेष्ठ मास मानला जात असल्यामुळे कित्येक धनिक लोक प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत ब्राह्मणांना व गोरगरिबांना भोजन देतात. देवस्थानांतही या महिन्यात कथापुराणादी कार्यक्रम ठेवतात.

या महिन्यात पावसामुळे सर्वत्र हिरवेगार झालेले असते. याच महिन्यात जाईजुई, पारिजात, सोनचाफा, इ. फुलांच्या वेलींना व झाडांना बहर येतो व त्यांच्या सुवासाने आसमंत दरवळून जातो. [ ध. सिं.; नि. सिं.; आ. स. प्रा. अ. इ. ]

**श्रावणद्वादशी** एक काम्य व्रत. भाद्रपद शुद्ध द्वादशी श्रवण-नक्षत्रयुक्त असेल त्या दिवशी हे व्रत करतात. एकादशीला उपवास व द्वादशीला दहीभाताचे पात्र दान देणे असा याचा विधी आहे. फल– विष्णुलोकप्राप्ती. [ हि. ध.]

**श्रावणिकाव्रत** एक तिथिव्रत. मार्गशीर्ष शुद्ध अष्टमी व चतुर्दशी या दोन तिथी या व्रतासाठी आहेत. त्या दिवशी ब्राह्मण व कुमारिका यांना भोजन घालायचे असते. त्याचप्रमाणे कुमारिकांच्या पुढे बारा जलपात्रे अलंकृत करून ठेवावी आणि एक जलपात्र स्वतःच्या मस्तकावर ठेवून केशवाचे ध्यान करावे, असेही सांगितले आहे. [ हि. ध.]

**श्रावणी** श्रावणातल्या श्रवण नक्षत्रावर करायचा एक वैदिक विधी. श्रावणी म्हणजे मोठा अनध्याय संपवून पुनश्च अध्ययन-अध्यापनाला आरंभ करण्याचा विधी होय. याला उपाकर्म, उपाकरण, इ. आणखीही काही नावे आहेत. श्रावणातले श्रवण नक्षत्र बहुधा श्रावण पौर्णिमेस येते. या दिवशी किंवा नागपंचमीला हस्त नक्षत्रावरही ऋग्वेदी लोकांनी श्रावणी करावी, असे सांगितले आहे. यजुर्वेद्यांना श्रावण पौर्णिमा हा मुख्य काल आहे. भाद्रपदातले हस्त नक्षत्र हा सामवेद्यांच्या श्रावणीचा आणि श्रावण किंवा भाद्रपद पौर्णिमा हा अथर्ववेद्यांच्या श्रावणीचा काल आहे.

श्रावणीची प्रथा ही फार प्राचीन आहे. त्रैवर्णिकांना श्रावणी विहित असली, तरी सांप्रत ब्राह्मणांतच ती काही अंशी रूढ आहे. गृह्यसूत्रांत तिचा विधी दिलेला असतो. निरनिराळ्या वेदांच्या लोकांनी आपापल्या गृह्यसूत्रांनुसार श्रावणी करायची असते. श्रावणी ही सामान्यतः सामुदायिक रीत्या करतात.

प्राचीन काळी पाऊस पडून पीकपाण्याची स्थिती चांगली दिसू लागल्यावर उपाकर्माचा दिवस निश्चित करीत. पाऊस उशीरा किंवा लवकर पडेल त्याला अनुसरून श्रावण, भाद्रपद किंवा आश्विन यांपैकी कोणत्या महिन्यात उपाकर्म करायचे ते ठरवीत. पौष किंवा माघ या महिन्यांच्या शुद्ध पक्षात वेदाध्ययन थांबवायचे असेल, तर जे कृत्य करायचे त्याला उत्सर्जन म्हणत. उत्सर्जन झाल्यावर उपाकर्म होईपर्यंत वेदांचे अध्ययन-अध्यापन करायचे नसे. अलिकडे मात्र उपाकर्माच्याच दिवशी प्रथम उत्सर्जन विधी करून, नंतर लगेच उपाकर्म करण्याची पद्धती रूढ झाली आहे.

श्रावणीचा प्रयोग असा—

ज्या दिवशी श्रावणी कर्तव्य असेल त्या दिवशी प्रातःकाळी स्नान करून व धूत वस्त्रे परिधान करून श्रावणीच्या जागेवर जावे. दर्भासनावर बसावे. प्रयोगकुशल अशा वैदिक ब्राह्मणाला उपाध्याय करावे. दोन कर्मांसाठी दोन स्थंडिले असावी. सर्वांनी मिळून आचमन करून दर्भांचे पवित्रक घालावे. सर्वांनी मिळून पुढील संकल्प करावा—

**ममाध्याप्यानां चाधीतानां छन्द – आदीनां यात-यामतानिरासेनाप्यायनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं एभिर्ब्राह्मणैः सह अद्य (औपाकरणेऽह्नि) अन्तरितमुत्सर्जनाख्यं कर्म करिष्ये ।**

**अर्थ**— मी अध्यापन केलेल्या व अध्ययन केलेल्या वेदांचे शिळेपण नष्ट होऊन त्यांची वृद्धी व्हावी आणि त्या द्वारे परमेश्वराची प्रीती व्हावी म्हणून या सर्व ब्राह्मणांसह आज (उपाकर्माच्या दिवशी) अंतरलेले उत्सर्जन नावाचे कर्म करीत आहे.

मग सर्वांनी मिळून पंचगव्य प्राशन करावे. उपाध्यायाने स्थालीपाक प्रयोगानुसार बलवर्धन नावाच्या अग्नीची स्थापना करून अग्निमुखं करावे. सावित्री, ब्रह्मा, श्रद्धा, मेधा, प्रज्ञा, धारणा, सदसस्पती, अनुमती, छंद व ऋषी या प्रधान देवतांचे आज्याने हवन करावे. अग्नी अप्तृणसूर्य, अग्नी शकुंत, अग्नी मित्रावरुण, अग्नी अप, अग्नी मरुत, अग्नी विश्वेदेव, अग्नी इन्द्रसोम, इन्द्र, अग्न्यामरुत पवमान सोम, सोम, अग्नी व संज्ञान या प्रधान देवतांचे गृहसिद्ध चरूने हवन करावे.

सर्वांनी मिळून ब्रह्मयज्ञ करावा. स्विष्टकृतादी होम समाप्त करून पवित्रक विसर्जन करावे. मग जवळच्या एखाद्या नदीवर अथवा जलाशयावर जाऊन गोमयस्नान, भस्मस्नान, मृत्तिकास्नान, शुद्धस्नान, इ. स्नाने करावी. जलाशयावर जाणे शक्य नसल्यास बसल्याजागी मार्जनानेच स्नानविधी संपादावा. स्नानांग तर्पण करावे. अरुंधतीसहित कश्यपादी सप्तऋषींच्या नावे पाटावर आठ सुपाऱ्या मांडून त्यांची पूजा करावी. नंतर सव्याने ब्रह्मादी देवांचे, निवीती करून ऋषींचे, अपसव्य करून कव्यवाहनादी पितरांचे व आत्मपितरांचे तर्पण करावे. नदीची प्रार्थना करावी.

मग लगेच उपाकर्माला प्रारंभ करावा. उत्सर्जनाच्या संकल्पात ' मम अध्याप्यानामध्येष्यमाणानां ' एवढाच बदल करून उपाकर्माचा संकल्प करावा. पहिल्या प्रधान देवतांसाठी आज्याने व पुढच्या प्रधान देवतांसाठी दह्यात भिजवलेल्या सातूच्या किंवा तांदुळांच्या बारीकशा दोन दोन गोळ्यांनी हवन करावे. मग प्रत्येकाने त्याच द्रव्याच्या दोन दोन गोळ्या व कोणी पंचप्रवरी असल्यास त्याने तीन गोळ्या दातांना न लावता पाण्यावरोबर गिळाव्या. मग यज्ञोपवीताचे हवन करावे. ते उपाध्यायालाही द्यावे. मग यज्ञोपवीत मंत्रांनी ते अभिमंत्रित करून स्वतः धारण करावे. ब्रह्मयज्ञ करून स्विष्टकृतादी होम समाप्त करावा. यथाशक्ति दक्षिणा देऊन ब्राह्मणांचा आशीर्वाद घ्यावा.

**नूतन ब्रह्मचारी श्रावणी**— नव्याने उपनयन झालेल्या बटूंनी जी श्रावणी करतात, तिला हे नाव आहे. ही पहिली श्रावणी गुरु-शुक्रांचे अस्त, अधिकमास आणि गुरू सिंहस्थ असता करू नये. या पहिल्या श्रावणीला पुण्याहवाचन व नांदीश्राद्ध विहित आहे. नूतन बटूला उत्सर्जनविधी नसतो. कारण तो नव्यानेच वेदाध्ययन करण्यास प्रवृत्त झालेला असतो. त्याने फक्त उपाकर्म म्हणजे वेदग्रहण करायचे. त्या वेळी बटूने मेखला, यज्ञोपवीत, दंड, कृष्णाजिन, कटिसूत्र आणि वस्त्र या नव्या वस्तू धारण करायच्या असतात. [ ऋ. ब्र. स. ]

## श्रावस्ती

उ. प्रदेशातील एक प्राचीन नगर. हरिवंशपुराणानुसार युवनाश्व राजाचा पुत्र श्रावस्त याने ही नगरी वसवली म्हणून तिला श्रावस्ती हे नाव मिळाले. सांप्रत हे ठिकाण सहेत-महेत या नावाने ओळखले जाते. अचिरावती किंवा राप्ती नदीच्या तीरावर हे नगर वसले होते. सांप्रतचे सहेत हे गोंडा व महेत हे बहराइच जिल्ह्याच्या कक्षेत येते.

बौद्ध वाङ्मयात श्रावस्तीला सावत्थी हे नाव दिलेले आहे. बौद्धांच्या अष्टमहातीर्थांत त्याची गणना आहे. प्राचीन काळी हे कोसलांची राजधानी होती. बुद्धाने इथे २४ वर्षावास केले. मज्झिमनिकायातल्या १५० सूत्रांपैकी ६५ सूत्रे आणि विनयपिटकातल्या ३५० शिक्षापदांपैकी २९४ शिक्षापदे बुद्धाने इथे सांगितली.

श्रावस्तीशी बौद्धांइतकाच जैनांचाही संबंध आहे. संभव

व चंद्रप्रभ या दोन तीर्थंकरांचा जन्म श्रावस्तीतच झाला. महावीरांनी आपला एक चातुर्मास इथे केला, त्यामुळे श्रावस्ती हे जैन धर्माच्या अध्ययनाचे एक प्रसिद्ध केंद्र बनले. जैनांतर्गत आजीवक शाखेचेही हे एक प्रमुख स्थान होते. त्यांची ८ महान निमित्ते आणि २ मग्ग यांची रचना श्रावस्तीतच झाली. काही मतभेदांमुळे महावीरापासून दूर गेलेल्या मंखलीपुत्त गोसालाने पुनश्च महावीराची भेट घेतली, तीही इथेच.

प्रसेनजिताच्या काळी श्रावस्ती हे वैदिक धर्माचे मोठे केंद्र होते. प्रसेनजित हा वैदिक धर्माचा आग्रही पुरस्कर्ता होता व त्याने श्रावस्तीत व तिच्या बाहेरही अनेक यज्ञ केले होते. मात्र वैदिक असूनही प्रसेनजित हा जैन व बौद्ध यांच्याशी सहिष्णुतेने व उदारबुद्धीने वागे. त्यामुळे त्याच्या राजधानीत भिन्न भिन्न मतांचे लोक सुखाने धर्माचरण करीत.

कुशाणकालापासून श्रावस्तीची भरभराट सुरू झाली. गुप्त-कालापर्यंत तिची कीर्ती वाढत राहिली. त्यानंतर तिला हळू-हळू अवकळा येऊ लागली. श्रावस्तीच्या अवनत अवस्थेचे चित्र फा-हियानच्या प्रवासवृत्तात दिसून येते. तो श्रावस्तीला गेला, तेव्हा ती त्याला उजाड दिसली. तिथले प्राचीन विहार, मंदिरे, स्तंभ त्याला भग्न अवस्थेत दिसले. काही कुटुंबे तिथे कशी-बशी जीव जगवत राहिली होती. फा-हियाननंतर २०० वर्षांनी युआन च्वांग हा चिनी प्रवासी इथे आला. त्याला तर सगळे उजाड आणि उद्ध्वस्तच दिसले. हर्षाच्या मधुबनाच्या दान-पत्रावरून समजते, की श्रावस्ती ही काही काळ हूणांच्या अंम-लाखाली होती. पुढच्या काळात श्रावस्तीचे नावच तेवढे शिल्लक राहिले. त्याचे संशोधन इ. स. १८६२ साली जनरल कनिंग-हॅमने सुरू केले. एका वर्षाच्या परिश्रमानंतर त्याला जेतवन आढळले. बल नामक भिक्षूने तिथल्या विहारात स्थापलेली सुमारे ७॥ फूट उंचीची बुद्धमूर्ती सापडली. या मूर्तीच्या पीठावरील लेखाच्या आधारे इतिहासलेखकांनी सहेत–परिसर म्हणजे जेत-वन आणि महेत–परिसर म्हणजे श्रावस्ती असे निर्धारित केले. कनिंगहॅमच्या मते बुद्धमूर्ती जिथे सापडली तिथे कोसंबकुटी विहार व त्याच्या उत्तरेला गंधकुटी विहार असावा. महेतच्या उत्खननात डॉ. होये याला सोभनाथमंदिराचे भग्नावशेष साप-डले. त्याला मिळालेल्या उत्खनित वस्तूंत सर्वांत महत्त्वाची वस्तू म्हणजे इ. स. ११९ मधला शिलालेख होय. हे उत्खनन बरीच वर्षे चालले आणि त्यात अनेक जैनमूर्ती, बोधिसत्त्वमूर्ती, नाणी, मातीच्या मूर्ती, शिक्के, कनोजनृपती गोविंदचंद्र याचे एक दानपत्र, इ. वस्तुसंभार मिळाला. त्या वस्तूंवरून संशोध-कांनी काही स्थाने निश्चित केली, ती अशी –

जेतवन हे श्रावस्तीच्या बाहेरचे सुंदर उद्यान होय. ते अनाथपिंडक या श्रेष्ठीने जेतकुमार या राजपुत्राकडून विकत घेतले व ते बुद्धाला अर्पण केले. बुद्धासाठी त्याने तिथे एक विहारही बांधला. बुद्ध या वनात येऊन जिथे उभा राहिला, तिथे त्याने गंधकुटी उभारली. तसेच त्याने अनेक छोट्या-मोठ्या इमारतीही बांधून दिल्या. जेतवनाच्या पूर्वेला पूर्वाराम नावाचा एक विहार होता. तो विशाखा नावाच्या एका बुद्धभक्त स्त्रीने बांधला. जेतवनाच्या समोर बुद्धशिष्य आनंदाने बुद्धाच्याच आज्ञेवरून बोधिवृक्षाची एक शाखा आणून लावली आणि तिचाच एक मोठा वृक्ष झाला. प्रसेनजिताने तिथेच रजकाराम नावाचा एक संघाराम उभारला व गंधकुटीच्या समोर मोकळ्या जागेत एक द्वारकोट्ठक (मोठी खोली) उभारून ती बुद्धाला समर्पिली. या द्वारकोट्ठकाच्या समोरच एक पुष्करणी होती. याशिवाय स्नानकोट्ठक, उपस्थानशाला, आसनशाला, तीर्थ-काराम, सोभनाथमंदिर (एक जैन मंदिर), अंधवन हे ५०० अंधभिक्षूंचे निवासस्थान, इ. वास्तू श्रावस्तीच्या व जेतवनाच्या परिसरात होत्या.

अशी ही श्रावस्ती सांप्रत उजाड आणि उद्ध्वस्त आहे. सांप्रत तिथे पक्क्या बांधणीचे ब्रह्मी बौद्ध मंदिर, एक धर्मशाळा व एक चिनी बौद्ध मंदिर एवढ्या वास्तू उभ्या दिसतात. [उत्तर प्रदेश के प्रसिद्ध बौद्ध तीर्थ १, श्रावस्ती – मदन मोहन नागर, संचालक, राजकीय संग्रहालय, लखनऊ (उ. प्र.), १९५६.]

## श्री

(१) लक्ष्मीचे प्राचीन रूप. सांप्रत श्री आणि लक्ष्मी हे एकमेकांचे पर्यायी शब्द झाले आहेत. पण इतिहासाचा मागोवा घेतला तर श्री ही प्राचीन असून, लक्ष्मी ही तिच्या मानाने अलिकडची आहे, असे दिसते. वैदिक साहित्यात श्री शब्द शोभा, सुंदरता आणि सजावट या अर्थांनी प्रयुक्त झाला आहे. जे जे सुंदर, कांतिमान आणि मांगलिक असेल, ते ते श्रीर (श्लील) या शब्दाने व्यक्तविले गेले आहे. प्राचीन काळी या श्रीला मूर्ती नव्हती. पुढे हळू हळू तिला मूर्त स्वरूप येऊ लागले. शतपथ ब्राह्मणात याविषयी एक कथा आहे, ती अशी––

प्रजापती हा तप करीत होता. त्या तपश्चर्येच्या बळाने त्याच्या हृदयातून श्री ही देवता देदीप्यमान अशा नारीरूपाने बाहेर आली आणि त्याच्या पुढे उभी राहिली.

याचा अर्थ असा, की वैदिक मानवाच्या अंतरात भावरूपाने वास्तव्य करणाऱ्या श्रीने प्रजापतीच्या काळात देवीचे स्वरूप धारण केले.

या देशातली दुसरी एक पण अवैदिक अशी संस्कृती म्हणजे सिंधुसंस्कृती. त्या लोकांत मातृपूजा प्रचलित होती. संस्कृति-संगमाच्या प्रक्रियेत कोणत्यातरी काळात श्री आणि माता या

दोन देवता एकरूप झाल्या असणे शक्य आहे. ऋग्वेदात श्रीचा लक्ष्मीशी संबंध सापडत नाही. तैत्ति. संहितेत विष्णूची स्त्री या नात्याने लक्ष्मीच्या ऐवजी अदितीचे आवाहन केलेले आढळते. अदिती ही पूर्णरूपाने श्री नाही; पण अदितीचे काही गुण नंतरच्या काळात श्रीने उचलले आणि पुढे हीच श्री लक्ष्मीच्या रूपात समाविष्ट झाली. लक्ष्मी क्षीरसागरातून वर येताच ऋषींनी श्री सूक्ताने तिचे स्तवन केले, हे पुराणांतले वर्णन, श्री ही लक्ष्मी-स्वरूपात विलीन झाल्याचेच निदर्शक मानतात.



श्रीदेवी, भागलपूर

श्री ही मुळात लक्ष्मीहून वेगळी असल्याचे एक उदाहरणही शिल्परचनेत सापडते. भरहूत येथे सिरिमा नावाची एक देवता कोरलेली दिसते. तिच्या भोवती लक्ष्मीचा परिवार नाही. तथापि तिने उजव्या हातात धरलेल्या कमलावरून आणि सिरि+मा या सादृश्यावरूनही ती श्री आहे, हे सहजपणे ओळखता येते.

श्रीच्या काही प्राचीन मूर्ती विष्णूच्या सान्निध्यात अथवा स्वतंत्रपणे आढळतात. हे श्रीशिल्प वैदिक व बौद्ध वाङ्मयाच्या आधारे विकसित झाले आहे. मत्स्यपुराणात हिची मूर्ती कशी असावी, यासंबंधाने केलेले विवेचन असे — हिची कांती लक्ष सुवर्णासारखी असावी. ही पद्मासनस्थ असून, तिच्या दोन हातांत श्रीफल व कमळ असावे. तिचे तोंड गोल, ओठ लाल आणि केसांचा भांग असावा. ती श्वेतवस्त्र परिधान केलेली असून, तिच्या मागे चामरधारी अनेक स्त्रिया उभ्या असाव्या. दोन बाजूंना सुवर्णपात्रांतून तिला स्नान घालणारे दोन हत्ती असावे. तसेच तिचे स्तवन करणारे गंधर्व व गुह्यकही असावे.

मथुरा येथील शिलापट्टावर श्रीमूर्ती असून, तिच्यावर नागफणी आहे. महाबलिपुरमची मूर्ती भद्रासनात कमळावर बसलेली आहे. तिच्या दोन बाजूंना दोन दासी आहेत. अमरावती (आंध्र प्रदेश) येथेही एक प्राचीन श्रीमूर्ती आहे. याशिवाय दोन श्रीमूर्ती तिबेटमध्ये आहेत. त्यांतील एक खेचरावर आणि दुसरी माणसावर आरूढ झालेली आहे. पाहा—लक्ष्मी. [सं. प्र.; मू. वि.]

(२) संध्यासमयी गाइला जाणारा एक राग. या रागात रे व ध कोमल, मध्यम तीव्र व इतर स्वर शुद्ध लागतात. आरोहात ग वर्ज्य आहे. जाती—षाडव—संपूर्ण; वादी—रे; संवादी—प; समय—सूर्यास्त. रागाचे मुख्य अंग—रे रे प, म म् ध् प, प रे, ग रे सा. आरोह—सा रे म् प ध् प, म् ध् प नि सां

अवरोह—रें नि ध् प, ध् म् प, म् रे, रे, ग, रे, सा.

श्री रागाची प्रकृती गंभीर आहे. वैराग्य भावनेची खुलावट या रागात चांगली होते.

प्राचीन संगीतशास्त्रज्ञांच्या मते सहा स्वतंत्र रागांपैकी श्री हा एक राग आहे (हनुमन्मत.). याच मताप्रमाणे या रागाला पाच भार्या आहेत, त्या अशा – (१) मालाश्री (२) मारवा अथवा मालवा (३) धनाश्री (४) वसंत व (५) आसावरी. [ रागविज्ञान भाग २ – श्री. वि. ना. पटवर्धन; श. क. ]

**श्रीकंठ** एक शैव आचार्य. याच्या जीवनाविषयी काही माहिती उपलब्ध नाही. तो द. भारतात जन्मला असावा व इ. स. चे चौथे शतक हा त्याचा काल असावा, असे अनुमान श्री. रामदास गौड यांनी केले आहे. श्री. बलदेव उपाध्याय त्याचा काल इ. स. चे १३ वे शतक असा मानतात.

अप्पय्य दीक्षिताने आपल्या शिवार्कमणिदीपिका या ग्रंथात याच्याविषयी सांगितले आहे, की हा एक महान योगी होता व लोक त्याला शिवाचा अंशावतार मानीत होते. ब्रह्मसूत्रांवर त्याने जे शैव भाष्य लिहिले आहे, त्यावरून त्याच्या अगाध पांडित्याची कल्पना येते. तसेच, त्याच्या ग्रंथांत त्याची अपार शिवभक्ती

आगोजाग दिसून येते. ब्रह्मसूत्रांवरील भाष्याशिवाय त्याने मृगेंद्र-संहितेवर वृत्ती लिहिली आहे. शिवाचे परब्रह्माशी एकरूपत्व दाखवल्यामुळे त्याच्या सिद्धान्ताला शिव-विशिष्टाद्वैत असे नाव मिळाले आहे.

आचार्य श्रीकंठाच्या मतानुसार शिव हेच परम ब्रह्म असून, शिवाची उपासना केल्यानेच मुक्ती मिळते. ब्रह्मज्ञान हे त्याने वेदान्तशास्त्रगम्य मानले आहे. याच्या सिद्धान्ताचे सार असे –

सृष्टीची उत्पत्ती, स्थिती व लय आणि जीवाच्या बाबतीत तिरोभाव व अनुग्रह ही पंचविध कार्ये शिवच करतो. जीवाला मुक्त करणे, हा जगदुत्पत्तीचा हेतू आहे. जीवाच्या ठिकाणी निसर्गतःच मालिन्य असते. ते कर्मानेच धुवून जाणारे असल्यामुळे त्याला जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून जावे लागते. सतत कर्मे करून आपले मालिन्य झाडून जेव्हा तो शुद्ध होतो व मोक्षप्राप्तीचा अधिकारी होतो, तेव्हा शिव त्याच्यावर अनुग्रह करतो आणि त्याला मुक्ती देतो. शिवाच्या प्रमाणे ऐश्वर्य व अपार आनंद प्राप्त करणे म्हणजेच मुक्ती होय. मुक्ती मिळाल्यावर जीवाला आत्मस्वरूपाची प्रतीती येते, स्वयंप्रकाशित्व प्राप्त होते व शिवस्वरूपाचे द्योतक असे मांगलिक गुणही प्राप्त होतात.

ज्ञान व कर्म या दोहोंच्या समुच्चयापासूनही मुक्ती मिळते, असे श्रीकंठाचे मत आहे. ज्ञानी मनुष्य मृत्यू आल्याबरोबर त्याबाईट कर्मांपासून मुक्त होत नाही; तर शिवनिवासाच्या अलिकडे विष्णुलोकाच्या सरहद्दीवर असलेली विरजा नामक नदी ओलांडून गेल्यावर मुक्त होतो. हा शिवनिवास म्हणजे आत्मस्वरूपाची पूर्ण ओळख करून देऊन मोक्षप्राप्ती करून देणारे स्थान होय.

श्रीकंठाने वेद हे अपौरुषेय मानले आहेत. त्याच्या मते वेद हे शिववाक्य आहे. [ हिंदुत्व; हि. क. इं. पी. ५ ]

**श्रीगोंदे** एक देवीचे स्थान. दौंड–मनमाड लोहमार्गावर, दौंडपासून सुमारे वीस मिनिटांच्या अंतरावर हे स्थानक आहे. स्थानक व गाव यात चार मैल अंतर आहे. गावापासून तीन मैल अंतरावर देवीचे देवालय आहे. ही देवी माहूरची रेणुकादेवीच होय. ही इथे कशी आली, याबद्दल एक आख्यायिका सांगतात, ती अशी –

श्रीगोंदे या गावात एकनाथ पाठक नावाचा गृहस्थ राहत होता. तो माहूरच्या रेणुका देवीचा निःसीम भक्त होता. तो दर पौर्णिमेस देवीच्या दर्शनार्थ माहुरगडी जात असे. वृद्धापकाळापर्यंत त्याचा हा उपक्रम अखंड चालू होता. पुढे त्याला नित्य दर्शनाला जाणे अशक्य झाले. आयुष्यभर चालवलेला उपक्रम यापुढे बंद पडणार, याचे त्याला अतीव दुःख झाले. त्याबद्दल देवीला त्याने गाऱ्हाणे घातले. देवीने त्याचा भाव जाणून त्याला स्वप्नदृष्टान्त दिला, की 'मीच तुझ्याकडे येईन.'

त्याप्रमाणे देवी एकनाथ पाठकाबरोबर यायला निघाली. तो पुढे व देवी मागे असे मार्गक्रमण चालू झाले. निघण्यापूर्वी देवीने एकनाथला सांगितले होते, की त्याने घरी पोचेपर्यंत मागे वळून पाहायचे नाही. त्याप्रमाणे दोघे चालले असता श्रीगोंद्यापासून दोन मैलांवर आल्यावर देवी खरेच आपल्याबरोबर येते किंवा कसे या जिज्ञासेने एकनाथाने मागे वळून पाहिले. त्याबरोबर देवी तिथेच गुप्त झाली.

जिथे देवी अदृश्य झाली, त्याच ठिकाणी सांप्रतचे देवालय आहे. देवीच्या मंदिराभोवती दगडी तट आहे. मंदिराच्या मुख्य दरवाज्यावर नगारखान्याची माडी आहे. या तटालाच पुष्कळशा ओवऱ्या आहेत. त्या ठिकाणी नवरात्रात सप्तशतीचे पाठ चालतात. प्रतिवर्षी येथे नवरात्राचा मोठा उत्सव होतो. देवळाच्या दारासमोर चौदा फूट उंचीचा सभामंडप आहे. या सभामंडपात एक कायमचे होमकुंड बांधलेले आहे. नवरात्रात त्यात होमहवन होते. सभामंडपाजवळच दक्षिणेच्या बाजूला एक विहीर आहे.

मुख्य देवळातही एक सभामंडप असून, त्याला लागून गर्भागार आहे. या गर्भागारातच एक भव्य असा शेंदरी तांदळा आहे. तीच ही रेणुका अथवा सालवण देवी होय. ही देवी जागृत समजली जाते. ही देवी या भागातील अनेक घराण्यांची कुलदेवता आहे. [ प्रसाद – शक्तिअंक, ऑगस्ट १९७५. ]

**श्रीगौड मालवीय ब्राह्मण** हे मूळचे गुजरातचे रहिवासी होते. तिथून ते माळव्यात व माळव्यातून निमाड प्रांतात पसरले. हे यजुर्वेदी, सामवेदी व अथर्ववेदीही आहेत; पण यांच्यात जास्त भरणा यजुर्वेद्यांचा आहे. कात्यायन धर्मसूत्राप्रमाणे यांचे धार्मिक विधी होतात. यांची गोत्रे मुख्यत्वे काश्यप, कौशिक, कौंडिण्य, वत्स, शांडिल्य अशी आहेत. सगळे अद्वैतमतानुयायी आहेत. हे द्वारकापीठाचा अधिकार मानतात. या लोकांना रंगारी, राजपूत, आभीर, गुजराती महाजन या शूद्रांच्या हातचे पाणी चालते. या शूद्र जातींना ते पाणीपित्या असे म्हणतात. हे शाकाहारी आहेत. [ व. व जा. ]

**श्रीचक्र** त्रिपुरसुंदरीच्या पूजोपासनेसाठी अत्यंत उपयुक्त व फलप्रद असे चक्र. याला श्रीयंत्र असेही म्हणतात. हे सर्व चक्रांत श्रेष्ठ मानले गेले आहे. याची रचना अशी –

चतुर्भिः श्रीकण्ठैः शिवयुवतिभिः पञ्चभिरपि
प्रभिन्नाभिः शम्भोर्नवभिरपि मूलप्रकृतिभिः ।।
त्रयश्चत्वारिंशद्वसुदलकलाब्जत्रिवलय –

त्रिरेखाभिः सार्धं तव भवनकोणाः परिणताः ॥
(सौंदर्यलहरी ११)

अर्थ – चार शिवरूप ऊर्ध्वशीर्ष त्रिकोण, पाच शक्तिरूप अधःशीर्ष त्रिकोण, सगळे मध्यबिंदूपासून पृथक् असे मूलप्रकृतिरूप नऊ त्रिकोण, असे सर्व मिळून त्रेचाळीस त्रिकोण; त्याच्या बाहेर अष्टदल, त्याबाहेर षोडशदल, त्याबाहेर त्रिवलय आणि त्याबाहेर भूपुर म्हणजे तीन रेघांचा चौकोन मिळून श्रीचक्र बनते.

या प्रत्येकाचा तपशील असा –

(१) बिंदुचक्र – मध्यभागी बिंदू. तो व्यक्ताव्यक्त. विश्वाचे आदिकारण. अनादी, नित्य, स्वयंप्रकाश. तो अव्यक्त असला तरी योग्याला प्रत्येक वस्तुमात्रात त्याचा अनुभव घडतो. श्रीविद्यादर्शनात याला शिव म्हणतात. या बिंदूचे नाव सर्वानंदमय चक्र. शिवशक्ती ही त्याची अधिष्ठात्री देवता.

(२) त्रिकोणचक्र – बिंदूच्या लगतचे बाह्य चक्र. बिंदुचक्राचाच तो त्रिकोणात्मक विस्तार. त्रिकोण म्हणजे एका बिंदूपासून परिणत झालेले बिंदुत्रय. या चार बिंदूंनी शिवशक्तीचे कामकलाध्यान सिद्ध होते. पहिला बिंदू म्हणजे मुख. बाजूचे दोन म्हणजे स्तनयुग्म. चौथा खालचा बिंदू म्हणजे गुह्यस्थान. ते सर्जनशक्तीचे द्योतक. या त्रिकोणचक्राचे नाव सर्वसिद्धिप्रद चक्र होय.

(३) अष्टार – आठ कोणांचे चक्र. याची स्वामिनी त्रिपुरसिद्धा. हे सर्वरोगहर चक्र होय. विश्वातले अखिल ज्ञान याच चक्रातून उत्पन्न होते.

(४) अंतर्दशार – हे अष्टचक्राच्या बाहेर दहा कोणांचे मिळून बनते. हे सर्वरक्षाकर चक्र होय. त्रिपुरमालिनी ही याची देवता. याचे कार्य विश्वाच्या तसेच देहाच्याही अंतर्गत चालू असते. अन्नरसावर याचेच प्रभुत्व असते.

(५) बहिर्दशार – वरच्याच्या बाहेरचे दहा त्रिकोणयुक्त चक्र. हे सर्वार्थसाधक. त्रिपुरा श्री ही याची देवता होय.

(६) चतुर्दशार – चौदा त्रिकोणांचे चक्र. हे सर्वसौभाग्यदायक. त्रिपुरवासिनी ही याची देवता होय.

(७) अष्टदल – आठ पाकळ्यांचे चक्र. सर्वसंक्षोभण त्रिपुरसुंदरी ही याची देवता. आठ गुप्ततर योगिनी मुख्य देवतेच्या नियंत्रणाखाली या चक्रात विश्वाचे संचलन, वस्तूंचे उत्सर्जन, परिणाम इ. कार्ये करतात.

(८) षोडशदल – सोळा पाकळ्यांचे चक्र. हे सर्वाशापरिपूरक. त्रिपुरेश्वरी ही याची स्वामिनी. याच्या प्रत्येक पाकळीवर एकेक योगिनी आहे. महाभूते, ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये व मनोविकार यांवर या योगिनींचा अंमल चालतो.

(९) त्रिवलय – वरच्याच्या बाहेर सर्व चक्राला घेरून राहिलेली तीन रेषांची वलये. याला मेखलात्रय असे म्हणतात. हे चक्र त्रिगुणांचे द्योतक आहे.

(१०) भूपुर – त्रिवलयानंतर सर्व चक्राला वेष्टून असणारा तीन रेघांचा मोठा चतुष्कोण. याला चार दिशांना चार द्वारे असतात. हे त्रैलोक्यमोहन चक्र होय. त्रिपुरसुंदरी ही याची देवता. हे चक्र म्हणजे त्रिपुरसुंदरीच्या किल्ल्याचा अभेद्य तटच होय.

यातील प्रत्येक चक्राच्या देवतांची स्थाने, माहात्म्ये, पूजाक्रम इ. गोष्टी दीक्षा घेतेवेळी तज्ज्ञ गुरूकडून समजून घेतल्या पाहिजेत, तरच श्रीचक्र फलदायी होते.

श्रीचक्रात २४ संधी व २८ मर्मे असतात. त्यांची व्याख्या अशी –

द्विरेखासङ्गमस्थानं सन्धिरित्यभिधीयते ।
त्रिरेखासङ्गमस्थानं मर्म मर्मविदो विदुः ॥

अर्थ – दोन रेखांचा जिथे संगम होतो, त्याला संधी म्हणतात व तीन रेखांचा जिथे संगम होतो, त्याला मर्म म्हणतात.

श्रीचक्राच्या अष्टदलात व षोडशदलात केसर काढावे नाहीत. काढल्यास भैरव आपल्या योगिनीसह कर्त्यांचा नाश करतो (भूतभैरव तंत्र.)

श्रीचक्राचे एकूण १८ प्रस्तार होतात. त्यात फक्त नऊ त्रिकोणांच्या रेषा कमीअधिक लांबरुंद होतात. त्याचा बाह्य आकार कायम राहतो. तंत्रालोक व तंत्रसार या ग्रंथांत श्रीचक्राचे तपशीलवार वर्णन आहे.

प्रासंगिक पूजेसाठी दुधात केशर खलून त्याने भूमीवर श्रीचक्र रेखावे. कायमच्या अर्थात नित्य पूजेसाठी धातूच्या तुकड्यावर ते कोरावे. सुवर्णाच्या पत्र्यावरचे श्रीचक्र आयुष्यभर काम देते. रुप्याचे ३२ वर्षे, तांब्यावरचे १२ वर्षे फलदायी आणि भूर्जपत्रावरचे ६ वर्षे फलदायी होते. श्रीचक्र लोहत्रयाच्या पत्र्यावरही अंकित करतात. दहा भाग सोने, सोळा भाग रुपे व बारा भाग तांबे मिळून लोहत्रय होते. पोवळे, पद्मराग, इंद्रनील, वैडूर्य, स्फटिक व मरकत या रत्नांवरही श्रीचक्र कोरतात. ते अष्ट सिद्धिप्रद होते. श्रीचक्राची पूजा करण्यापूर्वी त्याची प्राणप्रतिष्ठा करावी. पूजा बाहेरून आत या क्रमाने करावी. चक्रपूजेत उपचार-समर्पणाचे नऊ मंत्र आहेत. वेगवेगळ्या फलासाठी वेगवेगळ्या मंत्राचा विनियोग करायचा असतो. त्यांतला पहिला मंत्र असा –

ऐं ऱ्हीं श्रीं त्रैलोक्यमोहनचक्राधिष्ठात्र्यै प्रकटयोगिनीलक्षितायै श्रीत्रिपुरचक्रेश्वर्यै नमः । पूजयामि ॥

त्रिपुरसुंदरीची पूजा मूर्तीवर न करता ती श्रीचक्रावर करण्याचा प्रघात आहे. कारण 'श्रीचक्रं शिवयोर्वपुः', श्रीचक्र हे शिव-शक्तीचे शरीरच आहे, असे म्हटले आहे.

श्रीचक्राच्या पूजेइतकेच त्याच्या दर्शनाचेही फल आहे –

सम्यक् शतक्रतून् कृत्वा यत्फलं समवाप्नुयात् ।
तत्फलं लभते भक्त्या कृत्वा श्रीचक्रदर्शनम् ॥
(तंत्रसार)

अर्थ – उत्तम प्रकारे शंभर यज्ञ करून जे फल प्राप्त व्हायचे, ते फल भक्तीने श्रीचक्राचे दर्शन केल्यानेही प्राप्त होते.



श्रीचक्र

भारतात शिळेवरची किंवा धातूवरची श्रीचक्रे कित्येक मंदिरांतून आढळतात. कोल्हापूर येथे जगदंबेच्या मंदिरात शिळेवरचे श्रीचक्र आहे. आद्य शंकराचार्यांच्या मठातही श्रीचक्राची स्थापना केलेली असते. कारण आद्य शंकराचार्य हे त्रिपुरसुंदरीचे उपासक होते.

कित्येकदा श्रीचक्रावर जलपूर्ण कलश आणि त्यात विविध रत्ने व द्रव्ये घालून ठेवलेली असतात. त्यातून देवतेचे प्रकटीकरण होते, अशी त्यामागची कल्पना आहे. श्रीचक्राची सकाम व निष्काम अशी उभयविध पूजा करता येते.

श्रीचक्र जळाले, त्या रेषा पुसट झाल्या किंवा त्याचा टवका उडाला तर ते गंगेत विसर्जित करावे. त्या प्रसंगी श्रीविद्यामंत्राचा एक लक्ष जप, होम, तर्पण, गुरुपूजा व ब्राह्मणभोजन या गोष्टी कराव्या. आणि मग पुनश्च नवे श्रीचक्र बनवून घ्यावे.

श्रीचक्र व श्रीविद्या वस्तुतः एकरूपच आहेत. श्रीचक्र हा विश्वाचा नकाशा आहे आणि श्रीविद्या ही त्यातली गतिमान अशी चैतन्यशक्ती आहे. अणुपरमाणुपासून अनंत विश्वे यांतील घडामोडी याच चैतन्यशक्तीने चालतात. याच चैतन्यशक्तीपासून अणूला गती मिळते आणि हीच शक्ती अनंत विश्वात गतिरूपाने भरून राहिलेली असते. [ श्रीचक्र – एस्. शंकरनारायणन; श्रीयंत्रमाहात्म्य – नारायण लक्ष्मण आळवणी व भैरव गणेश हेगडे पाटील; सौंदर्यलहरी – प्रा. ह. वा. भिडे ]

**श्रीचंद** (इ. स. १४९४–१६४३) उदासी संप्रदायाचा प्रवर्तक. श्रीचंद हा गुरू नानकाचा ज्येष्ठ पुत्र होता. त्याच्या मातेचे नाव सुलक्षणी देवी असे होते. बालपणापासूनच श्रीचंद हा विरक्त होता. विद्याध्ययनासाठी तो लहानपणी काश्मीरात गला आणि त्याने अनेक शास्त्रांचे अध्ययन केले. अविनाशी मुनी हा त्याचा दीक्षागुरू होता. या गुरूच्या आदेशावरून त्याने भारतातील तीर्थक्षेत्रांची यात्रा केली व आपल्या धर्माचा प्रचार केला. द. भारतातील यात्रेच्या वेळी त्याने टाकळी येथे रामदासांची भेट घेतली व त्यांना उपदेश केला. त्याने काबूलचाही दौरा केला होता.

उदासी संप्रदायाचे अनुयायी श्रीचंदाला शिवाचा अवतार मानतात. हा संप्रदाय शीख पंथातूनच निर्माण झाला आहे. त्यामुळे श्रीचंद हा नानकाचाच शिष्य होता, असे उदासी लोक मानतात. त्या काळात नाथसंप्रदायी सिद्ध पंजाबात फिरून लोकांना उपदेश करीत होते. त्यांचा प्रभाव श्रीचंदावर पडला आणि त्याने त्यांच्याप्रमाणे जटा वाढवल्या व तो नग्न राहू लागला. तसेच तो तपाचरणही करू लागला. संसारत्यागाने मुक्ती प्राप्त होते, हे त्याला पटले आणि त्याने संसाराकडे पाठ फिरवली. तो अविवाहितच राहिला.

गुरू नानकाचा मृत्यू झाला, तेव्हा श्रीचंदाचे वय सुमारे ४६ वर्षांचे होते. खरे म्हणजे गुरू नानकानंतर तोच शिखांचा गुरू व्हायचा; पण त्याची संसारविरक्ती नानकाच्या प्रवृत्तिपर धर्माला विरोधी होती. म्हणून त्याने गुरुपद श्रीचंदाला न देता ते अंगद या आपल्या दुसऱ्या पुत्राला दिले. पण तरीही गुरू नानकाच्या मृत्यूपर्यंत त्याने पित्याचा आसरा सोडला नाही. त्यानंतर त्याने आपल्या उदासी संप्रदायाची स्थापना केली. नानक पुस्तकी शिक्षणाला विशेष महत्त्व देत नव्हता. त्यामुळे घरच्या घरीच श्रीचंदाचे थोडेसे शिक्षण झाले, असे काही विद्वानांचे मत आहे. आध्यात्मिक विषयांचे ज्ञान मात्र त्याने ऐकून ऐकून व अनुभव घेऊन मिळवले.

उदासी संप्रदायाच्या सिद्धान्तांचे प्रतिपादन त्याने एका लहानशा पुस्तिकेत केले आहे, तिला उदासी साधू मात्राशास्त्र असे म्हणतात. श्रीचंद हा अद्वैतवादी होता. त्याला जवळजवळ दीडशे वर्षांचे दीर्घायुष्य लाभले, असे म्हणतात. आपले शेवटचे

दिवस त्याने काश्मीर व पंजाब या प्रांतांतच घालवले. मृत्यूपूर्वी रावीच्या तीरावरील चंबा प्रदेशात तो एकान्त साधना करीत असता, एक दिवस तिथल्या पर्वतीय वनप्रदेशात अंतर्धान पावला. पाहा–उदासी संप्रदाय. [उ. सं. क. रे.; भा. सं. म.; गंगाजळी]

**श्रीधर** (१) (इ. स. चे १० वे शतक) एक वैशेषिक भाष्यकार. हा श्रीधरभट्टाचार्य व श्रीधराचार्य या नावांनीही प्रसिद्ध आहे. याचे वडील बलदेव आणि आई अच्छोका होय. हा बंगालच्या राढा भागातील भूरिसृष्टी नामक गावचा रहिवासी होता. याने वैशेषिक दर्शनातील प्रशस्तपादभाष्यावर न्यायकंदली नावाची एक विस्तृत व महत्त्वपूर्ण टीका रचली आहे. ही टीका या दर्शनात प्रमाणभूत मानली जाते. या टीकेवरून श्रीधराचा न्याय, मीमांसा, वेदान्त व व्याकरण या विषयांचा सखोल अभ्यास होता, असे जाणवते. बौद्धांनी वैशेषिकांवर घेतलेले आक्षेप या टीकेत खोडून काढलेले आहेत. काही ठिकाणी पूर्वमीमांसकांच्या मतांवरही टीका केलेली आहे.

श्रीधराने स्वतःच न्यायकंदलीत अद्वयसिद्धी, तत्त्वप्रबोध, तत्त्वसंवादिनी व संग्रहटीका या आपल्या ग्रंथांचा निर्देश केला आहे. तत्त्वप्रबोध हा मीमांसाशास्त्रावरील ग्रंथ असल्याचे त्यानेच सांगितले आहे.

न्यायकंदलीवर अनेकांनी टीका रचल्या आहेत. जैन पंडित राजशेखराचीही एक टीका उपलब्ध आहे. यावरून अनेक संप्रदायांत या ग्रंथाला मान्यता होती, असे दिसते. [भा. द. – बलदेव उपाध्याय; म. त. म.]

(२) (इ. स. चे १४ वे शतक) भागवतपुराणाचा एक प्रसिद्ध टीकाकार. याला भागवताचे अंतरंग कळले होते, असे म्हणतात. तो श्रीधरस्वामी या नावाने परिचित आहे. भावार्थदीपिका हे त्याच्या भागवतावरील टीकेचे नाव होय. याशिवाय त्याने गीतेवर आणि विष्णुपुराणावर अनुक्रमे सुबोधिनी व आत्मप्रकाश किंवा स्वप्रकाश नावाच्या टीका रचल्या आहेत. त्याची काही पदेही मिळतात.

श्रीधराच्या या लोकोत्तर भागवती टीकेसंबंधी नाभादासाने एक आख्यायिका सांगितली आहे. श्रीधर काशीमध्ये निवास करीत होता. त्याच्या गुरूचे नाव परमानंद होते. परमानंदाच्या आज्ञेने श्रीधराने भावार्थदीपिका ही टीका रचून परीक्षेसाठी बिंदुमाधवाच्या मूर्तीसमोर अन्य टीकांच्या मध्ये ठेवली. एक प्रहर लोटल्यावर इतर सर्व टीकांच्या वर ही टीका ठेवल्याचे त्याला आढळून आले. यावरून जाणकारांमध्ये या टीकेसंबंधी केवढा आदर होता, हे समजून येते. महाप्रभू चैतन्यालाही भावार्थदीपिकेसंबंधी खूप आदर होता. राधारमण गोस्वामीने तर त्याच्या टीकेवरच दीपनी नावाची दुसरी टीका लिहिली आहे.

श्रीधराची ही टीका पदपदार्थ सांगणारी आणि अद्वैतानुयायिनी आहे. तीत प्रसिद्ध वेदान्ती चित्सुखाचार्यांचा निर्देश आहे.

भागवतावर निरनिराळ्या भाषांमध्ये टीका रचणाऱ्या कवींनी श्रीधराचा आदराने उल्लेख करणे स्वाभाविक आहे. एकनाथमहाराजांनी आपल्या टीकेच्या मंगलाचरणातच त्याला पुढीलप्रमाणे नमन (१.११९) केले आहे–

**आता वंदूं श्रीधर। जो भागवत व्याख्याता सधर।**
**जयाची टीका पाहतां अपार। अर्थ साचार पैं लाभे॥**

भागवतातील कठीण पदबंध श्रीधराने सोपे करून सांगितले आणि त्या भावार्थाचेच मी देशी भाषेत निरूपण केले, अशी ग्वाही नाथांनी दिलेली आहे. [का. सा. सा.; पु. वि.; भा.सं.; भा. सं. ए.]

(३) (इ. स. १६५८ – १७२९) एक आनंदसंप्रदायी, विट्ठलोपासक आणि अत्यंत लोकप्रिय मराठी संतकवी. याचा जन्म पंढरपुरापासून सुमारे बत्तीस मैलांवर असलेल्या, सांगोला तालुक्यातील माण नदीकाठच्या नाझरे गावी झाला. त्याच्या पित्याचे नाव ब्रह्मानंद, आईचे सावित्री आणि उपनाव देशपांडे होते. श्रीधर वासिष्ठ गोत्राचा, देशस्थ, वाजसनेयी माध्यंदिन शाखेचा ब्राह्मण होता. कोल्हापूरची महालक्ष्मी ही त्याची कुलस्वामिनी आणि मल्लारी हे कुलदैवत होते.

श्रीधराचे मूळ घराणे मराठवाड्यातले असून, राघोपंत हा त्याचा पूर्वज होय. राघोपंताला इ. स. च्या १५ व्या शतकात नाझरे महालाचे देशपांडे ऊर्फ देशकुलकर्णी हे वतन मिळून तो नाझऱ्याला राहायला आला. तेव्हापासून हे घराणे नाझरेकर या नावाने ओळखले जाऊ लागले. याशिवाय त्यांना कारणपरत्वे खडके, घोडके अशीही आडनावे मिळाली होती. या कवीचे वाडवडील सदाचरणी, विद्वान व धार्मिक प्रवृत्तीचे होते. प्रसिद्ध संतकवी रंगनाथस्वामी निगडीकर हे त्याचे चुलत चुलते होते. अशा या भगवद्भक्तांच्या कुळीत श्रीधराचा जन्म झाल्याने त्याला उत्तम आनुवंशिक संस्कार मिळाले.

श्रीधराचा विद्याभ्यास प्रारंभी नाझरे गावी झाला. परंतु इ. स. १६७८ च्या सुमाराला त्याचे वडील पंढरपुरी वास्तव्याला गेले. त्यामुळे त्याचा उर्वरित अभ्यास आणि ग्रंथनिर्मिती पंढरपुरी झाली. जुन्या पठडीनुसार त्याने न्याय, व्याकरण, वेदान्त, योग, इ. विषयांचा चांगला अभ्यास केला होता, हे त्याच्या ग्रंथमाला नामक स्फुट प्रकरणावरून स्पष्ट होते. वेदान्तशास्त्र हा त्याच्या आवडीचा विषय होता. याशिवाय पुराणे, काव्य-नाटके हे ग्रंथही त्याने बारकाईने वाचले होते. प्राचीन मराठी संतकवी व पंडितकवी यांच्या वाङ्मयाचाही त्याचा व्यासंग होता. श्रीधराला अभ्यासाची आणि ग्रंथनिर्मितीची स्फूर्ती त्याच्या

वडिलांकडून मिळाली होती. त्यांनीच आत्मप्रकाश नावाचा वेदान्तपर ग्रंथ रचून मुलाला शिकविला होता. तेच त्याचे विद्यागुरू व मोक्षगुरू होते.

श्रीधराच्या वडिलांनी पंढरपुरी आल्यावर काही काळाने संन्यास घेतला आणि तिथेच ते समाधिस्थ झाले. त्यानंतर श्रीधर पंढरपुरीच स्थायिक झाला. तिथे त्याने एक घरही खरेदी केले होते. तो गृहस्थाश्रमी होता. त्याच्या पत्नीचे नाव पार्वतीबाई होते. त्याला दत्तात्रय, मनोहर व रंगनाथ असे तीन पुत्र होते. त्याचा प्रपंच सुखाचा आणि नेटका होता. मध्वमुनी, मानपुरी यासारख्या मित्रांचा त्याचा परिवार मोठा होता आणि शिष्य-मंडळीही खूप होती. त्याचे घर एखाद्या देऊळवाड्याप्रमाणे सदैव गजबजलेले असे. त्याने बहुतेक साऱ्या भारताची तीर्थयात्रा केली होती. अशा प्रकारे गृहस्थाश्रम गौरवून टाकणाऱ्या या संताचे देहावसान पंढरपुरीच झाले. तिथे चंद्रभागेच्या तीरावर, कुंभार घाटावर, पित्याच्या समाधीशेजारी त्याची समाधी आहे.

श्रीधर उत्तम पुराणिक व कीर्तनकार होता. त्याच्या कीर्तन-कौशल्याची तारीफ मानपुरी या हिंदी साधूने पुढील शब्दांत केली आहे–

कीर्तनकी तेरी ढाल लगी है । श्रवन करत हम रीझो

श्रीधराचा वाङ्मयीन प्रपंचही समृद्ध आहे. त्याच्या ग्रंथांची एकूण ओवीसंख्या सुमारे साठ हजारांच्या जवळपास आहे. हरिविजय, रामविजय, वेदान्तसूर्य, पांडवप्रताप, शिवलीलामृत हे त्याचे लोकप्रियतेच्या शिखरावर आरूढ झालेले महत्त्वाचे ग्रंथ होत. याशिवाय पांडुरंगमाहात्म्य, व्यंकटेशमाहात्म्य, मल्लारी-माहात्म्य, ज्ञानेश्वरचरित्र, अंबिकाउदय हे त्याचे छोटे ग्रंथ आहेत. त्याने वरीच स्फुट प्रकरणे व पदेही रचली आहेत. त्याच्या स्याच संस्कृत कविताही उपलब्ध आहेत.

हरिविजय ग्रंथात भागवताचा दशमस्कंध, हरिवंश, पद्मपुराण इ. ग्रंथांतील रसाळ कथा निवडून त्या सांगितल्या आहेत. हरीने म्हणजे कृष्णाने दैत्यांवर विजय मिळविला आणि भूभार हरण केला म्हणून या ग्रंथाला हरिविजय हे नाव दिले आहे. या ग्रंथाचे अध्याय छत्तीस आणि ओवीसंख्या ८१३९ इतकी आहे. यात कृष्णजन्म, त्याच्या बाळलीला, कालियामर्दन, कंसवध, जरासंधवध, रुक्मिणीस्वयंवर, सुभद्राहरण, राजसूय यज्ञ, शिशुपालवध, इ. विषय आहेत. कृष्णाच्या बालनृत्याचे श्रीधराने केलेले वर्णन म्हणजे उत्कट वात्सल्याचा एक नमुना आहे. त्या प्रसंगातील काही ओव्या (ह. वि. ५.६०) अशा –

नेपुरें रुणझुणती साजिरीं । मातेनें कृष्ण धरून करी ।
कांचबंद भूमिवरी । हळूहळू चालवीत ॥
मंद मंद चाले गोविंद । हळूच नेपुरें करिती शब्द ।
तों जवळी पातला नंद । हस्त धरीत हरीचा ॥
नंदहस्ताश्रयें करून । चाले वैकुंठीचें निधान ।
संवेचि पडतो अडखळोन । नंद सावरोन धरीतसे ॥
बळिराम आणि जगज्जीवन । येक येकाचा आश्रय धरून ।
कांपत कांपत दोघेजण । उठोन उभे राहती ।
संवेचि आदळती धरणी । गदगदां हांसे चक्रपाणी ।
संवेचि उभे राहोनी । दुडदुडां नाचताति ॥
नंद आणि यशोदा जननी । भोंवत्या मिळाल्या नितंबिनी ।
शेष आणि चक्रपाणी । नाचत दोघे पाहाती ते ॥

ही विविध रसात्मक कृष्णकथा सांगून झाल्यावर त्याने रामचरित्र वर्णन करण्यासाठी रामविजय ग्रंथ लिहून पुरा केला. रावणाच्या आसुरी राज्याचा नाश करून मिळविलेल्या विजयाचे वर्णन यात आहे. रामविजयाचा प्रधान आधार वाल्मीकि-रामायण आहे. परंतु हे कथानक आकर्षक करण्यासाठी त्याने अग्निपुराण व आनंदरामायण यांचाही उपयोग करून घेतला आहे. या ग्रंथाच्या चाळीस अध्यायांत ९१४७ ओव्या असून, युद्धकांड हे सर्वांत मोठे आहे. रामपुत्र लवाने अश्वमेधाचा श्यामकर्ण धरला आणि त्याच्या कपाळावरील पत्र वाचले. त्या क्षणी त्या वीरपुत्राचे बाहू स्फुरण पावू लागले. त्याचे वर्णन श्रीधराने पुढील शब्दांत केले आहे–

लव उपवन रक्षित । सवें असतीं बाळके बहुत ।
नाना क्रीडा विनोद करित । वृक्षछायें बैसले ॥
अष्टवर्षी दशवर्षी कुमर । कटीं कौपीन मौंजी सुंदर ।
मस्तकीं शिखा परिकर । खेळतां उडे साजिरी ॥
तों श्यामकर्ण धावत । आला त्याच पंथें अकस्मात ।
ऋषिपुत्रांस लहू दावित । पहा रे येतो अश्व कैसा ॥
मग सीतासुतें धावून । शीर्षी धरिला श्यामकर्ण ।
कपाळींचें पत्र तोडून । वाचितसे ते काळीं ॥
पत्रार्थ पाहूनि समस्त । लहू गदगदां हासत ।
बळिया काय रघुनाथ । त्रिभुवनीं थोर जाहला ॥
काय त्यासच व्याली जननी । काय निर्वीर झाली अवनी ।
तरी कैसा अश्व सोडोनी । नेईल पुरुषार्थे पाहूं पां ॥
माझी प्रतिज्ञा हेच आतां । धरिला अश्व न सोडीं मागुतां ।
तरीच सीतेउदरीं तत्वतां । जन्म घेऊन सार्थक ॥
(रा. वि. ३७.१९७)

हरिविजय, रामविजय यासारख्या पौराणिक ग्रंथांनंतर त्याने वेदान्तसूर्य नावाचा अध्यात्मशास्त्राचे अंतरंग उघडे करून सांगणारा, बारा अध्यायांचा ग्रंथ रचला. परंतु या ग्रंथाने कवीला फारसे यश मिळवून दिले नाही. नंतर त्याने पांडवप्रतापाची रचना केली. या ग्रंथात केवळ प्रतापच वर्णन केला आहे. त्यांचे

स्वर्गारोहणपर्व सांगितले नाही. ते का सांगितले नाही, याचे कारण सांगताना श्रीधर म्हणतो–

स्वर्गारोहण पर्व । निजधामा गेले पांडव ।
ते निरूपण अभिनव । पंढरीनाथ लिहो ने दी ॥

त्याचे हे सूत्र हरिविजय व रामविजय या ग्रंथांतही आढळते. कदाचित थोरामोठयांचा अस्त वर्णू नये, या संकेताचा पगडा श्रीधरावर असावा. पांडवप्रतापाची रचना कोणकोणत्या ग्रंथांच्या आधारे केली हे त्याने स्पष्ट सांगितले नाही. परंतु मूळ महाभारताशिवाय त्याने मुक्तेश्वरी महाभारतातूनही काहीभाग घेतल्याचे दिसून येते. मुक्तेश्वरी पर्वाचे कथानक म्हणजे पांडवप्रतापातील पस्तीस अध्यायांतील कथाभाग होय. परंतु त्यापुढील अध्यायांतही त्याची रसस्रावी शैली खंडित झाली आहे, असे नाही. उदाहरणार्थ रणात पडलेल्या अभिमन्यूच्या भेटीचा प्रसंग त्याने पुढीलप्रमाणे वर्णिला आहे–

अभिमन्यूनें रण पाडिले देखोन। आश्चर्य करिती कृष्णार्जुन।
बहुत केलें रणशोधन । परी बाळ कोठें न सांपडे ॥
तों मंजुल श्रीहरीचे स्मरण। ऐकता जाहला अर्जुन ।
हे जगन्निवास मनमोहन । मधुसूदना श्रीहरें ॥
ऐसे अभिमन्यूचे शब्द कोमळ । अर्जुनें ओळखिले तत्काळ ।
रथारूढ पार्थ घननीळ । जवळ आले धांवोनी ॥
अभिमन्यूनें नेत्र उघडिले। पार्थे अंग धरणीस घातलें ।
अभिमन्यूस पोटाशीं धरिलें । पार्थे मांडिलें शोकातें ॥
पार्थाचिया कानीं । हळूच अभिमन्यु बोले वाणी ।
मीं पडिलों घोर रणीं । याचा खेद मज नाहीं ॥
मी निश्चेष्टित पडिलों एथें । मज लत्ताप्रहार केला जयद्रथें ।
तेणें सर्वांग तिडकतें । माझें कांहीं न चालेची ॥
ऐसें ऐकून वचन । संबोखूनि बोले अर्जुन ।
तुझें उसणें मी घेईन । कांहीं खेद न आठवीं ॥

पांडवप्रतापानंतर पाच-सहा वर्षांनी त्याने बारामतीला काशिराजाच्या किंवा काशीविश्वेश्वराच्या मंदिरात बसून शिवलीलामृताची रचना केली. हा ग्रंथ चौदा अध्यायांत विभागला असून; त्याची ओवीसंख्या २४५० इतकी आहे. यात महानंदा, भस्मासुर, श्रीयाळ-चांगुणा, भद्रायू, दक्षयज्ञविध्वंस आणि शिवपार्वतीविवाह या प्रमुख कथा वर्णिल्या आहेत. यांतील महानंदा या वेश्येच्या उद्धाराची कथा सांगणारा अध्याय फारच गाजला आहे. तो अनेकांना मुखोद्गत असतो. सोमवार, श्रावणमास, महाशिवरात्र, इ. प्रसंगी या ग्रंथाचे घरोघर वाचन होते. यात कवीने हरिहरैक्याचा संदेश फार चांगल्या पद्धतीने सांगितला आहे. तो म्हणतो (१३.६०–६२)–

शिव थोर विष्णु लहान । हरीं विशेष हर गौण ।
ऐसे जे म्हणती त्या लागुन । आणोनि नरकी घालावे ॥

शिवलीलामृताला आणखी एक पंधरावा अध्याय जोडलेला असतो, पण तो श्रीधरकृत नाही. इ. स. च्या १८ व्या शतकाच्या पहिल्या चरणात कोण्या रघुकवीने शिवलीलामृतात थोडाफार फरक करून ब्रह्मोत्तर खंड नावाचा एक ग्रंथ रचला आहे. त्यावरून शिवलीलामृताच्या लोकप्रियतेची कल्पना करायला हरकत नाही.

अंबिका–उदय नावाचा त्याचा एक ग्रंथ अलिकडेच प्रकाशित झाला आहे. हा ग्रंथ म्हणजे प्राकृत सप्तशती होय. संस्कृत सप्तशतीच्या आधारे श्रीधराने हा ग्रंथ रचला आहे.

जैमिनी अश्वमेध हा शहाण्णव अध्यायांचा बृहत् ग्रंथ श्रीधरविरचित आहे की नाही, यासंबंधी अभ्यासकांत मतभेद आहेत. म. म. द. वा. पोतदारानी हा ग्रंथ त्याचा नसावा असे सूचित केले आहे. त्याचप्रमाणे श्री. परतुडकरांनी लक्ष्मीनृसिंहसुत अष्टेकर श्रीधर याचा हा ग्रंथ होय, असे मत मांडले आहे. श्रीधरासंबंधी लिहिताना सारस्वतकार भावे म्हणतात–

"श्रीधराच्या गोड वाणीची माधुरी ज्याने मुळीच चाखिली नाही असा अभागी देह – स्त्री किंवा पुरुष – महाराष्ट्रात कोठेही सापडावयाचा नाही. आमच्या अठरापगड जातींत सर्वांचा आवडता, संसारतापाने तापलेल्या अनाथांचे मनरंजन करून त्यांचे चित्त परमेश्वराकडे लावणारा सर्वांचा संकटकाळातला एक तऱ्हेने आधार, असा श्रीधरस्वामीशिवाय दुसरा ग्रंथकार नाही."

कवीची एवढी मुक्तकंठाने प्रशंसा करण्याचे कारण म्हणजे, त्याची भाषाशैली हे होय. सर्व वयांच्या आणि सर्व जातींच्या श्रोत्यांना एका जागी खिळवून ठेवण्याची शक्ती त्याच्या सर्व रचनेत आहे. निवेदनात ओघ असला तरी पाल्हाळ नाही. कथानकाच्या निवडीत आणि मांडणीत आकर्षक नेटकेपणा आहे. मुक्तेश्वरी काव्यातील उत्तम कल्पनांचे, शब्दांचे आणि विचारांचे भरपूर अनुकरण करूनही, त्याला त्याच्याहून काकणभर अधिक यश लाभले आहे. सामान्य आबालवृद्धांमध्ये वाचनाची गोडी त्यानेच निर्माण केली. [म. सा.; श्री. च. का.; पं. क.]

## श्रीधरस्वामी

(इ. स, १९०८ – १९७३) रामदासी संप्रदायातील एक सिद्ध पुरुष. यांच्या वडिलांचे नाव नारायणराव देगलूरकर पतकी व मातेचे नाव कमळाबाई. यांच्या जन्माविषयी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे, ती अशी–

देगलूरकरांच्या घराण्यात कोण्या एका पुरुषाने घराण्याच्या रक्षक असलेल्या नागसर्पाला बंदुकीच्या गोळीने ठार मारले. तेव्हा त्याने ब्राह्मणवेषात त्या पुरुषाच्या स्वप्नात येऊन त्याला सांगितले: 'आज तू मला ठार मारलेस. मी तुमच्या घराण्याचे रक्षण करीत होतो. आता यापुढे हे घराणे टिकणार नाही. त्याच

निर्वंश होईल.' तेव्हा त्या पुरुषाने ब्राह्मणाकडे वंशरक्षणाची प्रार्थना केली. तेव्हा ब्राह्मण म्हणाला. 'या कुळाचा उद्धार करणारा बाल ब्रह्मचारी पुढे निर्माण होईल. तो तुमच्या कुळाचा व जगाचा उद्धार करील. पण वंश मात्र त्याच्या नंतर खुंटेल.'

या शापाच्या परिमार्जनासाठी नारायणराव व कमळाबाई हे दांपत्य गाणगापूरला दत्तात्रेयाच्या सेवेसाठी जाऊन राहिले. तिथे त्यांनी कडक अनुष्ठान केले. त्यामुळे प्रसन्न होऊन साक्षात दत्तात्रेयाने त्यांना श्रीफळाचा प्रसाद दिला आणि सांगितले. 'हे श्रीफळ भक्षण करा. तुमची इच्छा पूर्ण होईल'. अशा प्रकारे दत्तात्रेयाच्या कृपाप्रसादाने, दत्तजयंतीच्याच दिवशी, गाणगापुरापासून जवळच असलेल्या चिंचोळी गावी श्रीधरस्वामींचा जन्म झाला. ते तीन वर्षांचे असतानाच त्यांचे वडील वारले. लहान श्रीधराकडे बघून कमळाबाईंनी आपला शोक आवरला. पुढे श्रीधरालाही खूप देवी आल्या. त्या दुखण्यात त्याची खूप शुश्रूषा कमळाबाईंनी केली. त्यामुळे श्रीधर त्या आजारातून बरा झाला. पण त्याच्या सर्वांगावर देवीचे वण राहिले.

लहानपणापासून श्रीधराला कथाकीर्तने ऐकण्याची गोडी लागली होती. तसेच रामनामाने हुकमी यश मिळते, असाही त्याला अनुभव आला होता. शाळेचा अभ्यास, खेळ, देवपूजा, कथाकीर्तनश्रवण व व्यायाम अशा गोष्टींत त्याचा बाळपणचा काळ मजेत चालला होता. पण वयाच्या बाराव्या-तेराव्या वर्षी त्याची आई वारली आणि त्यात खंड पडला. त्यानंतर हैदराबाद व गुलबर्गा येथे नातेवाइकांकडे राहून त्याने आपले प्राथमिक शिक्षण पुरे केले व माध्यमिक शिक्षणासाठी तो पुण्याला गेला. पण वेद, उपनिषदे, पुराणे यांना गौणत्व देणाऱ्या आणि आपल्या धर्माची श्रद्धा लोपवून टाकणाऱ्या इंग्रजी शिक्षणात श्रीधराला गोडी वाटेना. इतकेच नव्हे; तर त्याबद्दल एक प्रकारची अढी त्याच्या मनात निर्माण झाली. श्रुतिस्मृतिपुराणोक्त चातुर्वर्ण्याधिष्ठित समाजाच्या उभारणीनेच भारताला पूर्ववत वैभव प्राप्त होईल, अशी त्याची श्रद्धा होती. तेव्हा सनातन आर्य धर्माच्या प्रसारासाठी आपण आपले जीवन समर्पित करावे, असे त्याने ठरवले. त्यासाठी आपण आध्यात्मिक क्षेत्रात अधिकार मिळवावा, असे त्याच्या मनाने घेतले. आध्यात्मिक क्षेत्रात प्रगती करण्यासाठी योग्य अशा गुरूची कास धरावी लागते, त्याचप्रमाणे उग्र तपश्चर्याही करावी लागते, हे त्याला माहीत होते. म्हणून त्याने एका विजयादशमीला सज्जनगडावर तपस्येसाठी जाण्याचा निर्णय घेतला. त्या दिवशी आज हा देह भगवंताला अर्पण करायचा, म्हणून त्याने एका कागदावर पुढील अर्थाचा मजकूर लिहिला –

'मी आमरण अस्खलित ब्रह्मचर्य पाळीन. द्रव्याला शिवणार नाही. न मागताही आग्रहाने कोणी दिल्यास त्याचा उपयोग परोपकारार्थ करीन. मठपती होऊन कुठेही राहणार नाही. गरिवाला शक्य होण्याइतक्या साध्या गरजा ठेवीन. स्त्रीपुरुषांना समदृष्टीने बोध करीन. अखिल स्त्रीसमाज मातेप्रमाणे मानीन. देहनिर्वाहाच्या गरजा शक्य तितक्या कमी करून, होईल तितक्या लोककल्याणाकरिता मी तनमनधनाने झटेन. होईल तितका प्रयत्न करून धर्माची अवनती घालवून जग सुखी करीन.

हे सर्व पूर्ण होण्याकरिता हा देह कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्, अशा भगवंताला मी अर्पण केला आहे. मी मुक्त होऊन जगाला मुक्त करावे, हा पुढचा सर्व भार भगवंतावर आहे. त्याने आपल्या ब्रीदाला उणीव न येईल अशा रीतीने या शरण आलेल्या भक्ताचे काळजीपूर्वक संरक्षण करावे. यापुढे या देहाकडून होणाऱ्या चांगल्या किंवा वाईट कर्माचा जबाबदार तोच आहे.'

या त्यांच्या लिखाणावरून त्यांच्या उद्दिष्टाची चांगली कल्पना येते. यानंतर श्रीधरस्वामी पुण्याजवळच्या वनेश्वर येथील शंकराच्या मंदिरात गेले. तिथे त्यांनी समर्थ रामदासस्वामींच्या छायाचित्राची पूजाप्रार्थना करून त्यांच्यापासून अनुग्रह घेतला. आणि चालत चालत दोन दिवसांनी ते सज्जनगडावर जाऊन पोचले.

सज्जनगडावर त्यांनी सेवेचे काम पत्करले. पहाटे उठून स्नानसंध्या आटपून ते काही वेळ जप करीत आणि मग सेवेला सुरवात करीत. श्रीराममंदिर, समर्थांची समाधीची जागा व शेजघर झाडणे, देवाचे तांब्ये घासणे, अभिषेकासाठी पाणी आणणे, फुले, तुळशी आणून त्यांचे हार करणे, समर्थांच्या पलंगावरचे कपडे रोज धुणे, पंक्ती वाढणे, इ. कामे ते करू लागले. गडावरचा स्वयंपाकी गावी गेल्यावर काही दिवस मठात येणाऱ्या लोकांसाठी स्वयंपाक करणे, त्यासाठी अर्धा फर्लांग लांब असलेल्या सोनतळ्यावरून रोज चाळीस-पन्नास घागरी पाणी आणणे, लोकांना वाढणे, उष्टी काढणे, इ. कामेही त्यांनी केली. त्या काळी रोजची पंचवीस-तीस माणसे गडावर जेवायला असत. गुरुवारी तर सुमारे शंभर माणसे जमत. दुपारी वाढून झाल्यावर मंडप, प्रदक्षिणेची वाट, मठापुढची सर्व जागा झाडून मगच ते मध्याह्नस्नान करीत. हे सर्व काम करीत असताना मुखाने ते नामस्मरण करीत असत.

अशी ही निर्वेध सेवा काही काळ चालल्यानंतर गडावरील काही अधिकारी मंडळींनी मत्सराने त्यांची सर्व सेवा बंद केली व त्यांना मठात यायलाही बंदी केली. श्रीधरस्वामींना या गोष्टीचे अत्यंत दुःख झाले. पण त्यानंतर त्यांना साधनेसाठी बराच वेळ मिळू लागला. पहाटे चारच्या सुमारास खंबाळ्चावर स्नान करून ते मध्याह्नापर्यंत जप करीत. नंतर पुन्हा स्नान

करून मारुतीपुढे अकरा भीमरूपी स्तोत्रे म्हणत व गडावरील गावातून मधुकरी मागून आणीत. तिच्यातला काही भाग ते गाई व मासे यांना देत व उरलेले अन्न आपण खात. पण या मधुकरीच्या बाबतीतही काही लोकांनी गावात चुगली केली, की हा सर्व मधुकरी गाईला व माशांना घालतो. तेव्हा याला मधुकरी कशाला घालता ? त्यामुळे त्यांना घास-दोन घासच मधुकरी मिळू लागली. तेवढयाने भूक शमेना म्हणून त्यांनी काही दिवस घाणेऱ्यांच्या बियांचा आहार सुरू केला. कधी कधी ते निवडुंगाची बोंडेही खाऊ लागले. याचा परिणाम म्हणून त्यांची प्रकृती पार ढासळली. तशात ते फक्त एक लंगोटी लावून राहत. गडावरचा हिवाळा फार तीव्र असे. तिथल्या झोंबणाऱ्या वाऱ्यांनी त्यांचे सर्व अंग फुटे. फुटलेल्या पायांना पडलेल्या भेगांतून रक्त येई व दगडगोटचांनी भरलेल्या रस्त्यावरून चालणे फार त्रासाचे होई. पण तसेच ते तळयापर्यंत जात व तळयात आपले शरीर झोकून देत. कारण शरीराचा व आपला काही संबंध आहे, ही जाणीवच नष्ट करण्याचा त्यांचा तो एक प्रकारे अभ्यासच चाललेला होता. त्रिकाळ स्नान तर ते करीतच, शिवाय काही कारणांनी खंबाळयाच्या तळयाची त्यांची दिवसातून चार-पाच स्नाने तरी होत. त्यामुळे अंगावरची लंगोटी सदैव ओलीच असायची. तसेच ते जपासाठी गाभाऱ्यात



श्रीधरस्वामी

वसत. तिथे तर दिवसाही गारठा असे. मग रात्रंदिवस त्या गाभाऱ्यात ओलेत्याने वसणे म्हणजे तीच एक तपश्चर्या असे. त्यांना झोप अशी नसेच. त्यांची झोप म्हणजे स्वस्थ एका जागी बसून नामस्मरणयुक्त विश्रांती.

अशी खडतर तपश्चर्या केल्यानंतर रासदासस्वामींनी त्यांना साक्षात दर्शन दिले आणि त्यांना दक्षिणेकडे संचारार्थ जाण्याची आज्ञा केली. त्यानुसार १९३० च्या दासनवमीला श्रीधरस्वामी गडावरून दक्षिणेकडे संचारार्थ निघून गेले. गडावर त्यांचे वास्तव्य सुमारे सव्वादोन वर्षे होते.

स. इ. १९३० ते १९३५ अशी पाच वर्षे कर्नाटकात संचार केल्यावर ते पुन्हा पाच वर्षे सज्जनगडावर येऊन राहिले. या काळात त्यांनी संस्कृत, मराठी, हिंदी व कन्नड या भाषांत विपुल ग्रंथलेखन केले. इ. स. १९४० मध्ये ते पुन्हा कर्नाटकात गेले व १९४३ च्या विजयादशमीला त्यांनी यतिधर्माची दीक्षा घेतली. त्यानंतर सनातन वैदिक धर्माच्या पुनरुद्धारासाठी ते महाराष्ट्र व कर्नाटक या प्रदेशांत फिरू लागले.

श्रीधरस्वामी नेहमी समाधिसुखात दंग असत. त्या काळात सकल सिद्धी त्यांच्या सहवासात राहू लागल्या. यासंबंधीचे अनेक अनुभव त्यांच्या सहवासात राहणाऱ्यांना येऊ लागले. साहजिकच संसारतापाने पोळलेले अनेक लोक त्यांच्या दर्शनाला येऊ लागले व आपले दुःख त्यांना सांगू लागले. त्यांच्या दुःखनिवारणासाठी स्वामी त्यांना कुलाचार, परंपरागत पूजाविधी, इष्ट देवतांची पूजा-अर्चा, इ. उपाय सांगू लागले. आपला परंपरागत कुलधर्म सोडणाऱ्या व्यक्तीला प्रापंचिक सुखे सहज साध्य होत नाहीत, असे त्यांचे सांगणे असे. पुढे पुढे त्यांच्या दर्शनासाठी हजारो लोक गर्दी करू लागले व त्यामुळे त्यांच्या दैनंदिन आह्निकात व त्रिकाल स्नानसंध्येत व्यत्यय येऊ लागला. म्हणून १९६० मध्ये त्यांनी पुन्हा एकांतवास स्वीकारला. यातला काही काळ त्यांनी सज्जनगडावर व उरलेला कर्नाटकात वरदहळ्ळी येथील मठात व्यतीत केला. इ. स. १९७२ मध्ये त्यांची ही मौन तपस्या संपली. त्यानंतर ते भारतभर धर्मप्रसारार्थ संचार करणार होते, पण अचानक त्यांचे देहावसान झाले.

श्रीधरस्वामींचा आर्य संस्कृती हा मोठा ग्रंथ (मराठी) आणि श्रीरामपाठ, श्रीसमर्थपाठ, श्रीमारुतिमाहात्म्य, श्रीदत्तकरुणार्णव (संस्कृत) व श्रीशिवशान्तस्तोत्रतिलकम् (संस्कृत) ही पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. याशिवाय त्यांची हजारो पृष्ठांची रचना अप्रकाशित आहे. श्रीधरस्वामींचे हजारो भक्त महाराष्ट्रात व कर्नाटकात आहेत. [ भगवान श्रीमत प. प. श्रीधरस्वामी महाराज चरित्र, भाग १ साधना – अमरेंद्र; प्रा. ग. वा. करंदीकर, प्रसाद, मे १९७३ ]

**श्रीधराचार्य** (इ. स. चे ८ वे व ९ वे शतक) एक प्रसिद्ध गणिती व ज्योतिर्विद. हा कर्नाटकातला रहिवासी होता. याचा गणितसार किंवा त्रिशतिका नामक ग्रंथ

प्रसिद्ध आहे. ज्योतिर्ज्ञानविधी व जातकतिलक हे ज्योतिषविषयक ग्रंथ याने रचलेले आहेत. त्या ग्रंथांमुळे याची भारतभर कीर्ती झाली होती. याच्या ग्रंथांतील अनेक नियम भास्कराचार्याने जसेच्या तसे आपल्या ग्रंथांत घेतलेले आहेत.

गणितसार हा गणितशास्त्राचा महान ग्रंथ आहे. याच्या आधारानेच श्रीपती व श्रीसिंहतिलकसूरी यांनी आपले ग्रंथ रचले आहेत. भास्कराचार्यांनी श्रीधराचार्यांच्या बीजगणिताचाही उल्लेख केला आहे; पण तो ग्रंथ उपलब्ध नाही.

श्रीधराचार्य केवळ गणिताचाच नव्हे, तर त्रिस्कंध ज्योतिषाचाही पंडित होता. संहिता, होरा व सिद्धान्त या तीन्ही अंगांवर त्याचा अधिकार होता. जातकासंबंधी याने कन्नड भाषेत रचलेला ग्रंथ जातकतिलक हा बृहज्जातक या ग्रंथाप्रमाणेच विस्तृत व उपयुक्त आहे. ज्योतिर्ज्ञानविधी हा ज्योतिषशास्त्राचा महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. त्यात करण, संहिता व मुहूर्त या तीन विषयांचा समावेश आहे.

याचा लीलावती नामक ग्रंथ कन्नड भाषेत असून, त्यात मुख्यत: अंकगणिताचे विवेचन केलेले आहे.

हा श्रीधराचार्य जैनमतानुयायी होता, असे पं. नेमिचंद्र जैन शास्त्री यांनी प्रतिपादले आहे. अन्य पंडितांच्या मते तो उत्तर भारतीय असून जैन नव्हता. याने पाटीगणित व बीजगणित या विषयांवर ग्रंथ लिहिले होते. [ जै. सि. भा., भाग १४, किरण १, जुलै १९४७ ]

**श्रीनगर** (१) जम्मू व काश्मीर राज्याची राजधानी. हे नगर हिमालयाच्या कुशीत, समुद्रसपाटीपासून ५२५० फूट उंचीवर असलेल्या एका रमणीय पठारावर झेलमच्या काठी वसलेले आहे. काश्मीरचा राजा प्रवरसेन (२रा) याने इ. स. च्या ६ व्या शतकात प्रवरपूर नामक नगर वसवले होते; त्यालाच आता श्रीनगर म्हणतात. मौर्यसम्राट अशोक याने एक नगर इथे वसवले होते; पण ते स्थान सध्याच्या श्रीनगरापासून काही अंतरावर आहे. त्याला पंद्रेठण (पुराणाधिष्ठान) म्हणतात. तिथे प्राचीन राजधानीचे काही अवशेष दिसतात.

विक्रमांकदेवचरित व राजतरंगिणी या ग्रंथांत प्रवरपुराचे अनेक उल्लेख आहेत. तिथे अनेक बौद्ध मठ व शिवमंदिरे होती.

या नगरात १००० फूट उंचीची एक टेकडी आहे. तिच्या माथ्यावरील एका खडकावर एक शिवमंदिर आहे. मंदिराचा चबुतरा वीस फूट उंच आहे. गर्भगृह मात्र त्या मानाने लहान आहे. त्यात ३.५ फूट उंचीचे व २.५ फूट घेराचे स्वयंभू शिवलिंग आहे. हे प्राचीन मंदिर सनपूर्व ४ थ्या शतकात बांधलेले आहे, असे म्हणतात. आद्य शंकराचार्य काही दिवस इथे राहिले होते, म्हणून या टेकडीला शंकराचार्य पहाडी म्हणतात. तिथे त्यांचीही लहानशी मूर्ती बाहेरच्या अंगी बसवण्यात आली आहे.

इथे दुसरी २५० फूट उंचीची टेकडी आहे, तिला हारी पर्वत म्हणतात. काश्मिरी भाषेत हार म्हणजे मैना होय. पूर्वी या जागी एक सरोवर होते. त्यात जलोद्भव नावाचा एक राक्षस होता. तो फार मातला होता, म्हणून देवीने मैनेचे रूप घेऊन आपल्या चोचीने एक खडा उचलला व तो जलोद्भव राक्षसाच्या अंगावर टाकला. तिथे तो रुतून बसला व वाढू लागला. पुढे त्याचा डोंगर झाला व त्याच्याखाली राक्षस दडपला गेला. पुढे कश्यपाने शेषनागाला सरोवरातील पाणी बाहेर काढायला सांगितले. शेषाने तसे केले. तेव्हा तो राक्षस मरण पावला. तो डोंगर म्हणजेच हारी पर्वत होय. अकबर बादशहाने तिथे एक किल्ला बांधला. त्या किल्ल्यात देवीचे मंदिर असून, एक मशीद व एक गुरुद्वाराही आहे.

श्रीनगरमध्ये अनेक सुंदर सरोवरे, बागा, मंदिरे, मशिदी व मकबरे आहेत. पाहा–काश्मीर. [ प्रा. भा. न. न. जी.; म. क.; चि. छा. ]

(२) उ. प्रदेशातील गढवाल जिल्ह्यात अलकनंदा नदीच्या तीरावर वसलेले एक नगर. हे नगर गढवालचा शासक अजयपाल याने इ. स. १३७५ मध्ये निर्माण केले व तिथे राजधानी स्थापली.

हे श्रीनगर एक सिद्धपीठ मानले जाते. इथे केलेली साधना शीघ्र फलदायी होते, असे म्हणतात. देवीभागवतात याचे पुष्कळ माहात्म्य वर्णिलेले आहे. पूर्वी इथे अलकनंदेच्या पात्रात एका खडकावर श्रीचक्र कोरलेले होते. त्यावरून याला श्रीक्षेत्र असे नाव मिळाले होते.

हे नगर अकरा वेळा वसवले गेले व तितक्या वेळा नष्ट झाले, असे सांगतात. इ. स. १८९४ मध्ये नदीच्या महापुरात प्राचीन प्रासाद व बाजारपेठ सर्व वाहून गेले. सध्याचे नगर त्यानंतर पुन्हा वसवलेले आहे. [ हिं. वि. को.; हि. प्र. ]

**श्रीनाथ** (१) गोवर्धन पर्वतावरील एक देव. हा श्रीकृष्णाचा अवतार मानला जातो. पुष्टिमार्गाचे हे मुख्य उपास्य दैवत आहे. पाहा – पुष्टिमार्ग, वल्लभाचार्य,

(२) (इ. स. १३८०–१४६०) तेलुगू साहित्यातील एक महाकवी. तेलुगू कवी कमलनाभामात्य हे याचे आजोबा होत. याच्या वडिलांचे नाव मारयामात्य व आईचे नाव पोतंबा. याचे जन्मस्थान व काल यांसंबंधी विद्वानांत मतभेद आहेत. काहींच्या मते हा कृष्णा जिल्ह्यातील मछलीपट्टणजवळच्या कलपटमचा रहिवासी होता.

लहानपणीच याने तेलुगू व संस्कृत भाषांचा उत्तम परिचय करून घेतला व काव्यरचनाही सुरू केली. त्याची पहिली रचना मरुत्तराट चरित्र व किशोरावस्थेतली शालिवाहन सप्तशती हे ग्रंथ सांप्रत उपलब्ध नाहीत. तरुणपणी याने श्रीहर्षकृत नैषधाचा तेलुगू भाषेत अनुवाद केला. त्याला शृंगारनैषध म्हणतात. त्याची शैली प्रौढ आहे. ते तेलुगूतील पंचमहाकाव्यापैकी एक मानले जाते. त्यातील काव्यगुणांमुळे त्याला कोंडवीडूच्या रेड्डी राजांचा आश्रय लाभला. शिक्षणाधिकारी म्हणून त्याची नियुक्ती करण्यात आली.

इ. स. १४२५ च्या सुमारास श्रीनाथ हे कोंडवीडू सोडून देशाटन करू लागले. त्या भ्रमणातच त्यांनी हरविलासमू हे काव्य रचले. त्यात शिवलीलांचे मनोहर वर्णन केले आहे. पुढे श्रीनाथ विजयनगरला गेले. तिथे त्यांना सम्राट देवरायाचा राजाश्रय लाभला. देवरायाने त्यांचा खूप सन्मान केला. त्याच्या दरबारात श्रीनाथांनी गौड डिंडिमभट्ट नामक कवीला शास्त्रार्थात पराजित केले. त्या विजयामुळे त्यांना 'कविसार्वभौम' ही पदवी मिळाली व राजाने त्यांना कनकाभिषेकही केला.

त्यानंतर श्रीनाथ तेलंगणातील राचकोंडाचा राजा सर्वज्ञ-सिंगम याच्या दरबारी गेले. तिथे त्यांचा मोठा सत्कार झाला. नंतर ते राजमहेंद्रवरमचा राजा वीरभद्र रेड्डी याच्या आश्रयाला गेले. तिथे त्यांनी भीमखंड नामक काव्य रचले. ते स्कंदपुराणातील गोदावरीखंडाचे तेलुगू रूपांतरच आहे. त्यांची शैली अत्यंत प्रौढ व गंभीर आहे. त्यांचे काशीखंड हे काव्यही प्रसिद्ध आहे. त्यात काशीचे माहात्म्य वर्णिलेले आहे, ते काव्य त्यांनी वीरभद्र रेड्डीला समर्पित केले असून, त्यामुळे राजाने त्यांचा मोठा सन्मान केला. श्रीनाथांचे 'पल्नाडी वीर चरित्रमू' हे ऐतिहासिक काव्य पल्लव राजवंशाच्या एका सत्यकथेवर आधारलेले आहे. कवीची प्रतिभा या काव्यात प्रकर्षास पोचली आहे. त्यामुळे हे काव्य अत्यंत लोकप्रिय झाले आहे.

याव्यतिरिक्त श्रीनाथांनी शिवरात्रिमाहात्म्य, पंडिताराध्य-चरित्र, विधिनाटक, इ. काव्य–ग्रंथ रचले. भाषा, भाव, शैली, छंद, अलंकार, इत्यादी दृष्टींनी त्यांनी तेलुगू वाङ्मय समृद्ध केले आहे. स्वच्छंद वृत्तीच्या या महाकवीच्या काव्यरचनेत अलौकिक प्रतिभा दिसून येते. पांडित्यपूर्ण, प्रौढ शैलीप्रमाणेच त्यांच्या रचनेत देशी छंदाचाही वापर केलेला आढळतो. त्यांच्या कालखंडाला 'श्रीनाथयुग' म्हणतात.

यांनी बहुतेक सर्व जीवन मानाने, वैभवात व विलासात घालवले. पण आयुष्याच्या अखेरीस त्यांचा राजाश्रय सुटला व ते शेती करून पोट भरू लागले. त्यामुळे शेवटची काही वर्षे त्यांना फार कष्ट करावे लागले व हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. [ ते. सा. इ.; त्रि. दे. दै.; कवि–श्री. माला–तेलुगू ]

**श्रीनिवासदास** (इ. स. चे १४ वे १५ वे शतक) एक विशिष्टाद्वैती आचार्य. हा देवराजाचा पुत्र व वेंकटनाथाचा शिष्य होता. वेंकटनाथाच्या न्यायपरिशुद्धी या विशिष्टाद्वैती ग्रंथावर याने न्यायसार नावाची टीका लिहिली. याव्यतिरिक्त विशिष्टाद्वैतसिद्धान्त, कैवल्यशतदूषणी, दुरुपदेश-धिक्कार, न्यासविद्या, विजय, मुक्तिशब्दविचार, सिद्ध्युपाय-सुदर्शन, सारनिष्कर्षटिप्पणी आणि वादाद्रिकुलिष हे ग्रंथही श्रीनिवासदासाने लिहिले असावे, असे समजतात. [ म. त. म. ]

**श्रीपंचमी** एक तिथिव्रत. मार्गशीर्ष शु. पंचमीला लक्ष्मीची सोने, चांदी, तांबे, लाकूड किंवा माती यांपैकी कशाची तरी मूर्ती करावी आणि तिची आपादमस्तक पूजा करावी, असे सांगितले आहे. त्या दिवशी सुवासिनींना हळदीकुंकू देऊन भोजन घालावे. एक प्रस्थ (शेर) तांदूळ व तुपाने भरलेले पात्र 'लक्ष्मी माझ्यावर प्रसन्न होवो' असे म्हणून दान द्यावे. व्रतावधी एक वर्ष. प्रत्येक महिन्यात लक्ष्मीची निरनिराळ्या नावाने पूजा करावी. उद्यापनाच्या वेळी एका मांडवात लक्ष्मीच्या मूर्तीची पूजा करावी आणि ती मूर्ती व एक गाय दान द्यावी. फल–एक-वीस पिढ्यांपर्यंत ऐश्वर्यप्राप्ती.

या व्रताचा आणखी एक पर्याय असा–

माघ शु. पंचमीला जलपूर्ण पात्रात ठेवून किंवा शालग्राम पाषाणावर ठेवून लक्ष्मीची पूजा करावी. या दिवशी विष्णूच्या आज्ञेने लक्ष्मी पृथ्वीतलावर आली, असे समजतात. या दिवसाला वसंतपंचमी असेही नाव आहे. पाहा – वसंतपंचमी. [ हि. ध. ]

**श्रीपतिभट्ट** (इ. स. चे ११ वे शतक) एक ज्योतिषी. महाराष्ट्राच्या बुलढाणा जिल्ह्यातील रोहिणखेड गावाचा हा रहिवासी होता. याने ज्योतिषाच्या प्रत्येक शाखेवर एकेक ग्रंथ रचला आहे. धीकोटिकरण, सिद्धान्तशेखर, जातक-पद्धती, पाटीगणित, श्रीपतिनिबंध, ध्रुवमानसकरण, दैवज्ञवल्लभ, श्रीपतिसमुच्चय व ज्योतिषरत्नमाला ही त्याच्या ग्रंथांची नावे होत. रमलावरील एक ग्रंथही याच्या नावावर आहे. यांपैकी ज्योतिषरत्नमाला हा आद्य मुहूर्तग्रंथ असून, श्रीपतीने त्यावर स्वतः मराठी गद्य टीका लिहिली आहे. घरबांधणी, गृहप्रवेश, विवाह, उपनयन, इ. प्रसंगीं सामान्य मनुष्याला हरघडी मुहूर्त पाहण्याची गरज लागते, हे ओळखून मराठी भाषिक जनतेला त्याने हा महत्त्वाचा ग्रंथ उपलब्ध करून दिला. ज्योतिषरत्न-मालेपासून पुढे मुहूर्त हा ज्योतिषशास्त्रात एक स्वतंत्रच स्कंध

मानला जाऊ लागला. याच्या पाटीगणितावर सिंहतिलक नामक जैन आचार्याची टीका आहे. श्रीपती हा ग्रहवेधाचाही चांगला जाणकार होता. एकूण हा एक तत्कालीन अद्वितीय ज्योतिषी होता. [ या. का. म.; सं. सा. इ.–शास्त्रखंड; भा. ज्यो. इ. ]

**श्रीपती** (इ. स. चे १८ वे शतक) हिंदी साहित्याच्या रीतिकालातील एक कवी. हा कान्यकुब्ज असून, काल्पी येथे राहत होता. मिश्र हे याचे आडनाव होते. याने कविकल्पद्रुम, रससागर, अनुप्रासविनोद, विक्रमविलास, सरोजकलिका, अलंकारगंगा व काव्यसरोज हे ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी काव्यसरोज हा ग्रंथ संस्कृत काव्यप्रकाशाच्या आधारे रचलेला आहे. त्याच्या चौथ्या व पाचव्या दलांत काव्यदोषांचे वर्णन केलेले असून, उदाहरणादाखल हिंदीतील प्रसिद्ध कवींच्या काव्यातील दोषदिग्दर्शन केले आहे. त्याच्या आठव्या–नवव्या दलांत काव्यगुण, दहाव्या–अकराव्या व बाराव्या दलांत अलंकार आणि तेराव्या दलात रस यांचे वर्णन केलेले आहे.

याचे हे ग्रंथ सांप्रत उपलब्ध नसून, फक्त याची काही स्फुट रचना तेवढी उपलब्ध आहे. हा रसवादी कवी होता. त्याच्या सर्व कवितांत रसाला प्राधान्य दिलेले आढळते. वर्ण्य विषयाचे साध्या व सरळ प्रकारे चित्रण करणे, हे याच्या काव्याचे वैशिष्ट्य आहे. अनुप्रास योजण्याची याला आवड आहे. तत्कालीन कवींत याचे स्थान महत्त्वपूर्ण आहे. [ हिं. सा. बृ. इ.; हिं. सा. २; अ. श. व्र. प्रे. ]

**श्रीपादराय** (इ. स. चे १५ वे शतक) एक कन्नड भक्त व आचार्य. यांचा जन्म कर्नाटकातील कोलार जिल्ह्यामध्ये झाला. यांचे पहिले नाव लक्ष्मीनारायण असे होते. संन्यासग्रहणानंतर ते श्रीपादराय या नावाने प्रसिद्धी पावले. विबुधेंद्रतीर्थ यांच्याकडे त्यांनी अध्ययन केले. ते संस्कृत भाषेचे आणि दर्शनांचे प्रकांड पंडित बनले. माध्व लोक असे मानतात, की त्यांनी साऱ्या भारतवर्षाची यात्रा केली आणि शास्त्रार्थ करून काशीच्या पंडितांना वादात जिंकले. नंतर ते मुळवागिलू या गावी राहून अध्यापन करू लागले. काही कालाने संन्यास घेऊन ते तिथल्या माध्व पीठाचे अधिपती बनले. असे सांगतात, की त्यांना त्यांच्या विद्वत्तेसाठी विजयनगर व चंद्रगिरी येथील राजांनी जहागिरी दिल्या होत्या.

श्रीपादरायांच्या काळात माध्व पंडित संस्कृत भाषेला प्राधान्य देत आणि कन्नड भाषेला तुच्छ लेखीत. माध्व मठातले सारे धार्मिक विधी व प्रार्थना संस्कृतातूनच चालत. श्रीपादरायांना हे आवडले नाही. त्यांनी हे बंधन तोडले आणि मठात कन्नड भाषेतून भजन-कीर्तने चालू केली. ते जेवढे दार्शनिक तेवढेच विष्णुभक्त होते. रंगविठ्ठल या नाममुद्रेने अंकित अशी कितीतरी भक्तिगीते आणि प्रबंधकाव्ये त्यांनी कन्नड भाषेत रचली.

श्रीपादरायांची बरीचशी कविता भागवताच्या दशमस्कंधावर आधारलेली आहे. सूरदासाप्रमाणे त्यांनी श्रीकृष्णाच्या बाललीलांचे वर्णन केले आहे. त्यांचे याविषयीचे एक पद्य असे –

> **बारो नम्म मनेगे गोपालकृष्ण ॥ ध्रु० ॥**
> **गोल्ल बाल करनु निल्लिसि पेगलेरि**
> **गुल्ल माडदे मोसरेल्ल कुडिद कृष्ण ॥ १ ॥**
> **मुज्जगवनेल्ल बोज्जेयोळगे इट्ट**
> **गेज्जेय कट्टि तप्हेज्जेयनिक्कुत ॥ २ ॥**
> **अंगनेयर व्रतभंगव माडिद**
> **रंगविठ्ठल भवभंगव माडुव ॥ ३ ॥**

अर्थ – हे बालगोपाल, तू आमच्या घरी ये. गोपालबालकांच्या खांद्यावर चढून दही आणि लोणी यांची चोरी करणाऱ्या हे चतुर चोर कन्हैया ! आमच्या घरी चल. त्रिभुवने आपल्या उदरात सामावून घेणाऱ्या हे कृष्णा, ठुमकत ठुमकत आपल्या पायातली नूपुरे वाजवीत उलटचा-सुलटचा चालीने चालत ये. हे गोपांगनांचे व्रत भग्न करणाऱ्या भवभंजक श्रीकृष्णा, तू आमच्या घरी येशील ना ?

श्रीपादरायांनी जी अनेक गीते रचली, त्यांत वेणुगीत, गोपीगीत, भ्रमरगीत व श्रीलक्ष्मीनरसिंहप्रादुर्भावदशक ही अत्यंत प्रसिद्ध आहेत. आजही ती भक्तांच्या मनीमुखी गुंजत असतात.

अन्य माध्व संतांच्याप्रमाणेच श्रीपादरायांची भक्तीही दास्यभावाची आहे. पण त्यांनी आपल्या काव्यात सख्य, वात्सल्य, मधुर, इ. रसभावही आळवले आहेत. [ श्री. एम्. एस्. कृष्णमूर्ती, दक्षिण दर्शन, अर्ध – वार्षिक प्रकाशन, जानेवारी १९६१ ]

**श्रीपाद श्रीवल्लभ** (इ. स. चे १४ वे शतक) दत्त संप्रदायातील एक महापुरुष. हे दत्तात्रेयाचे इतिहासकाळातील पहिले अवतार व नरसिंह सरस्वतींचे पूर्वावतार समजले जातात. गुरुचरित्राच्या पाच ते दहा या अध्यायांत यांची अवतारकथा वर्णिलेली आहे, ती अशी–

श्रीपाद श्रीवल्लभ हे पीठापुरी जन्मले. हे पीठापूर तमिळनाडूच्या गोदावरी जिल्ह्यातील पीठापूर तहशिलाचे प्रमुख ठिकाण असून, राजमहेंद्रीच्या उत्तरेला गोदावरीच्या मुखप्रदेशा जवळ आहे. सध्या हे स्थान पीठापुरम या नावाने ओळखले जाते. त्यांच्या पित्याचे नाव आपळराज आणि मातेचे नाव सुमता. आपळराज हा आपस्तंब शाखेचा ब्राह्मण होता. याच्या घरी एकदा अमावास्येच्या दिवशी श्राद्धविधी असताना, ब्राह्मण

भोजनापूर्वी दारी आलेल्या एका अवधूताला सुमतेने भिक्षा घातली. हा अवधूत दुसरातिसरा कोणी नसून प्रत्यक्ष दत्तात्रेयच होता. त्यामुळे अवधूत तिच्यावर प्रसन्न झाला आणि तिला म्हणाला, की 'तुझ्या मनातील इच्छा प्रकट कर.' तेव्हा सुमता प्रणिपातपूर्वक त्याला म्हणाली. 'मला अनेक पुत्र झाले. पण ते सगळेच काही जगले नाहीत. आणि जे जगले, ते आंधळे, पांगळे आहेत. तेव्हा मला आता ज्ञानी व जगद्वंद्य असा पुत्र मिळावा हीच इच्छा.'

तिची ही प्रार्थना अवधूताने मान्य केली आणि 'तुला तापसी, वंशाचा उद्धारकर्ता, कलियुगात ख्यातिवंत होणारा, दैन्यहारक आणि ज्ञानमार्गे अतुर्बळी असा पुत्र होईल' असा आशीर्वाद तिला देऊन तो अदृश्य झाला.

यथाकाल सुमतेला पुत्र झाला. ब्राह्मणांनी त्याचे जातक वर्तविले, की हा महान तपस्वी आणि दीक्षाकर्ता जगद्गुरू होईल. दत्तात्रेयाच्या आशीर्वादाने जन्म झाला, म्हणून मुलाचे नाव श्रीपाद असे ठेवले. सात वर्षांचा झाल्यावर पित्याने त्याचे उपनयन केले. तोवेळपर्यंत त्याचे वेदाध्ययन पुरे झाले होते. त्याला सोळावे वर्ष लागल्यावर मातापिता त्याच्या विवाहाचा विचार करू लागले. पण प्रथमपासून विरक्त असल्यामुळे त्याने या गोष्टीला सक्त नकार दिला.

या घटनेनंतर त्यांनी घर सोडण्याचा निश्चय केला आणि मातापित्यांकडे उत्तरयात्रेला जाण्याची अनुज्ञा मागितली. मातापित्यांना या गोष्टीचे अतोनात दुःख झाले. त्यांची माता त्यांना म्हणाली. 'आम्ही तुझ्यावरच विसंबून होतो. आता आम्ही म्हातारपणी कुणाच्या आधारावर दिवस कंठायचे? हे तुझे दोन पांगळे आणि आंधळे भाऊ आहेत, त्यांना कोणी पोसायचे?' आईचे हे बोलणे ऐकल्यावर श्रीपादांनी आपल्या दोघा अपंग भावांकडे अमृतदृष्टीने पाहिले. त्याबरोबर चमत्कार असा झाला, की ते दोघे अव्यंग बनले आणि त्यांना प्रज्ञाही प्राप्त झाली. त्यामुळे मातापित्यांची चिंता दूर झाली.

यानंतर श्रीपादांनी उत्तरयात्रा सुरू केली. उत्तरेस जगन्नाथपुरी, काशी आणि बद्रीकेदार या तीर्थक्षेत्रांत भ्रमण केल्यावर ते दक्षिणेत गोकर्ण महाबळेश्वर या ठिकाणी गेले. तिथे तीन वर्षे गुप्तपणे निवास करून ते श्रीशैलावर गेले. तिथे चार महिने राहिल्यावर ते निवृत्तिसंगमावर कृष्णेच्या काठी कुरवपूर नामक गावी गेले.

श्रीपादांचा निवास कुरवपूरला असताना ज्या दोन घटना घडल्या, त्यांचा संबंध त्यांचे उत्तरावतार जे नरसिंह सरस्वती त्यांच्या जीवनाशी आहे. त्यांपैकी पहिली घटना अशी—

कुरवपूर येथे राहणाऱ्या एका वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणाची अंबिका नामक पत्नी होती. तिची मुले अकाली मरत. त्यामुळे ती दुःखी होती. पुढे तिचा एक मुलगा वाचला. पण तो जडमूढ निघाला. त्या धसक्याने ब्राह्मण मरण पावला. तो मुलगा वाढू लागला, तसतशी समाजात त्याची निंदा होऊ लागली. ते असह्य होऊन अंबिका आपल्या पुत्रासह कृष्णेत जीव द्यायला निघाली. ती दोघे कृष्णेच्या प्रवाहात प्रवेश करीत असता त्यांना तिथे श्रीपादयती स्नान करताना दिसले. तेव्हा अंबिकेने पुत्रासह



श्रीपाद श्रीवल्लभ

त्यांना वंदन केले आणि आत्महत्येच्या दोषातून मुक्त होण्यासाठी त्यांच्याकडे आशीर्वाद मागितला. त्यांनी तिला शनिप्रदोषाचे आचरण केल्याने तुझे मनोवांछित पूर्ण होईल, असे सांगितले. अंबिकेचे ईप्सित दुहेरी होते. तिला आपला जडमूढ पुत्र प्रज्ञावान व्हायला हवा होता आणि पुढच्या जन्मी ब्रह्मज्ञानी व जगद्वंद्य असा पुत्र हवा होता. श्रीपादांनी तिच्या मूढ पुत्राच्या मस्तकावर हात ठेवून त्याला ज्ञानसंपन्न बनविले.

ही अंबिका म्हणजेच उत्तर जन्मातील लाड कारंजाची अंबाभवानी आणि तिला झालेला पुत्र म्हणजे नरसिंह सरस्वती होय, अशी गुरुचरित्रकारांची श्रद्धा आहे.

दुसरी घटना अशी— श्रीपादयती नित्य गंगास्नानाला गेले, की तिथे धुणी धूत असलेला एक रजक त्यांना भक्तिभावाने नमस्कार करीत असे. पुढे त्याला त्यांच्या सेवेचे वेड लागले. तो त्यांच्या मठाची झाडलोट करी आणि त्यांच्या चरणसेवेत दिवस काढी. एक दिवस एक म्लेंछ राजा आपल्या परिवारा

वह त्या नदीत विहार करताना रजकाने पाहिले. राजाचे ऐश्वर्य पाहून आपल्या दुःस्थितीविषयी त्याच्या मनात विषाद उत्पन्न झाला. श्रीपादांनी त्याची मनकामना ओळखली आणि 'पुढील जन्मी तू म्लेंछ राजा होऊन राज्यभोग भोगशील' असा त्याला वर दिला. या वराने त्याच्या मनात हर्ष आणि विषाद असे दोन्ही भाव उत्पन्न झाले. राज्यभोगाचा आनंद आणि गुरु-विरहाचे दुःख यांचा संघर्ष त्याच्या मनात सुरू झाला. तेव्हा श्रीपादयती त्याला म्हणाले, की 'पुढच्या जन्मी तू बेदर नगरात राजाचा जन्म घेशील, तेव्हा नरसिंह सरस्वतींच्या रूपाने अंतकाळी तुला मी भेट देईन.'

हाच रजक पुढे बेदरचा मुसलमान बादशहा झाला व तो नरसिंह सरस्वतींचा भक्त बनला, असे यात सूचित केले आहे.

श्रीपादगुरूंनी संन्यास घेतला नव्हता. ते बहुशः अवधूत-वेषाने राहत असावे. त्यांनी आपले उर्वरित आयुष्य कुरवपुरातच व्यतीत केले आणि तिथेच आश्विन वद्य द्वादशीच्या दिवशी निजानंदी गमन केले. हा दिवस आजही गुरुद्वादशी म्हणून दत्तसंप्रदायी लोक श्रद्धेने पाळतात. [द. सं. इ.]

**श्रीप्राप्तिव्रत** वैशाख वद्य प्रतिपदेला या व्रताला प्रारंभ करतात. व्रतविधी असा — नारायण व लक्ष्मी यांची एक महिनाभर रोज फुलांनी व फळांनी पूजा करावी. अक्षत तांदुळांचा व बिल्वफळांचा होम करावा. दुधाचे पक्वान्न करून ब्राह्मणांना भोजन घालावे. मग ज्येष्ठ महिन्यात तीन दिवस उपवास करून सोने व दोन वस्त्रे दान द्यावी. [हि. ध.]

**श्रीभट्ट** (इ. स. चे १६ शतक) एक भक्तकवी व निंबार्कसंप्रदायाचा महान आचार्य. केशव काश्मीरी हे याचे गुरु होते. मात्र याने गुरूची ऐश्वर्य-साधना सोडून मधुर-उपासना स्वीकारली. ब्रजभाषेत काव्यरचना करणारा निंबार्कसंप्रदायातला हा पहिला कवी होय. हा श्रेष्ठ रसिक भक्त असून, याला श्रीहितसखीचा अवतार मानतात.

हा संस्कृत व ब्रज या दोन्ही भाषांचा पंडित होता. त्याने ब्रजभाषेत १०,००० शृंगाररसयुक्त पदे रचली होती, असे म्हणतात. पण त्यांतली केवळ १०० पदे युगलशतक या ग्रंथात समाविष्ट केलेली आहेत. बाकीची उपलब्ध नाहीत. राधाकृष्णांच्या युगल मूर्तीची उपासना त्यात प्रतिपादलेली असल्यामुळे त्याला युगलशतक हे नाव मिळाले. त्यालाच आदिवाणी असेही म्हणतात. कारण ब्रजभाषेतली ही पहिली रचना गणली जाते.

युगलशतकात सुखाच्या सहा प्रकारांचे वर्णन केलेले आहे. त्यांची नावे अशी— सिद्धान्तसुख, ब्रजलीलासुख, सेवासुख, सहजसुख, सुतसुख व उत्सवसुख. या पदांत कवीने राधाकृष्णांचे अनुपम सौंदर्य आणि ब्रजमंडळातील आनंदमय वातावरणात त्यांनी केलेल्या लीला यांचे ब्रजभाषेत वर्णन केले आहे. त्यांतील काही पंक्ती अशा—

> सेऊँ श्री वृन्दाविपिन विलास ।
> जहाँ युगल मिलि मंगल मूरति करत निरंतर वास ॥
> प्रेम प्रवाह रसिक जन प्यारे कबहुँ न छांडत वास ।
> कहा कहो भाग की श्रीभट राधा-कृष्ण रस-चास ॥

भावार्थ — श्रीकृष्णाची युगलमूर्ती जिथे निरंतर वास करते, तिथे प्रेमाचा प्रवाह वाहत असल्यामुळे रसिक जन ते वृंदावन स्थान कधीही सोडीत नाहीत.

श्रीभट्टाच्या रचनेत उत्कट भावभक्तीबरोबरच भाषेची सरसताही आढळते. त्याच्या पदांत अलंकार नसले तरी सरळ, मधुर व प्रवाही शब्दरचनेमुळे ती लोकप्रिय झाली आहेत. [ब्र. कृ. मा. भ.; त. प्र. हिं. कृ.]

**श्रीमाल** एक प्राचीन नगरी. राजस्थानातील जसवंतपुराजवळ भिनमाल नामक एक स्थान आहे, तिथे या प्राचीन नगरीचे भग्नावशेष आहेत. महाकवी माघ याचे हे जन्मस्थान होय. भोजप्रबंध नामक ग्रंथात, भोजराजाने श्रीमाल नगरीला भिल्लमाल हे नाव दिले, अशी आख्यायिका आहे. त्या नावाचे रूपांतर भिनमाल असे झाले.

इ. स. च्या ७ व्या शतकात गुर्जर प्रतीहार वंशाची राजधानी श्रीमाल होती, असे युआन च्वांग म्हणतो. इथे जैनांचे मोठे विद्याकेंद्र होते.

श्रीमालपुराणात या नगरीच्या वैभवाचे वर्णन आहे. इथे एक सहस्र ब्रह्मशाला व चार सहस्र मठ होते. प्रभावकचरितातही या नगरीचे उल्लेख आहेत.

भिनमाल हे ठिकाण अबूच्या वायव्येला सुमारे ५० मैलांवर आहे. काही संशोधकांच्या मते ही नगरी गुजरात प्रदेशात होती. इ. स. च्या १७ व्या शतकाच्या प्रारंभी एक इंग्रज व्यापारी निकोलस फ्लीट याने तिथली भव्य व सुंदर तटबंदी पाहिली होती. वलभीप्रमाणेच या नगरीत ब्राह्मण, बौद्ध व जैन या लोकांची विद्यालये होती. प्रसिद्ध ज्योतिर्विद ब्रह्मगुप्त यांचे जन्मस्थान इथेच होते. जैन आचार्य हरिभद्र सूरी व त्याच्या गुरुपरंपरेतील काही आचार्य यांचा या नगरीशी निकट संबंध होता. त्यांतील सिद्धर्षी हा एक महान संस्कृत कथाकार होता. त्याचे जन्मस्थानही हेच होते. [भा. प्रा. जै. ती.; श्री. लक्ष्मीशंकर व्यास — राष्ट्र भारती, नोव्हेंबर, १९५६]

## श्रीमाळी बनिया

बनियांची एक पोटजात. यांची वसती गुजरातेत सर्वत्र आहे. हे मूळचे गुर्जर असून, नंतर सोळंकी राजपुत मानले गेले. सांप्रत हे वैश्य समजले जातात. यांच्यांत विसा व दसा हे मुख्य पोटभेद आहेत. त्यांच्यांत परस्पर रोटीव्यवहार चालतो, पण विवाहसंबंध होत नाही. श्रीमालची वागेश्वरी ही यांची कुलदेवी आहे. श्रीमाळी ब्राह्मण यांचे उपाध्ये असतात.

विसा श्रीमाळी हे जैन पंथाचे आहेत. त्यांच्यांतही सात उपजाती आहेत. दसा पोटभेदातही तीन उपजाती आहेत. विसा व दसा यांच्याप्रमाणेच लाडवा नावाचा तिसरा पोटभेद आहे. ज्यांची वसती लाट देशात होती, त्यांना हे नाव मिळाले. विसा श्रीमाळी त्यांच्या पंक्तीला बसत नाहीत. [ ट्रा. का. बॉ. ]

## श्रीमाळी ब्राह्मण

गुजरातमधील ब्राह्मणांची एक पोटजात. पूर्वी मारवाडात श्रीमाल नावाचे मोठे नगर होते, ते यांचे मूलस्थान होय. त्या नगराचे वैभव नष्ट झाल्यानंतर तिथले लोक गुजरातमध्ये जाऊन बसले. श्रीमालहून आलेले म्हणून यांना श्रीमाळी हे नाव मिळाले. काही लोकश्रीमाल हा गुजरातचाच भाग मानतात. हे गुजराती ब्राह्मण म्हणूनही ओळखले जातात गुजराती ब्राह्मणांचा पंच द्रविडांत समावेश होतो. काही श्रीमाळी मारवाडातही स्थायिक झालेले आहेत; तरी ते स्वतःला द्रविड ब्राह्मणच मानतात.



श्रीमाळी ब्राह्मण, राजस्थान

यांच्यांतले काही सामवेदी आहेत, काही यजुर्वेदी आहेत व काही अथर्ववेदी आहेत. यांच्यांत १४ गोत्रे आहेत. महालक्ष्मी ही यांची कुलदेवता होय.

उदेपुरच्या राजघराण्याचे परंपरागत पौरोहित्य श्रीमाळी ब्राह्मणांकडे होते. हे लोक बनिया, सोनार वगैरे लोकांचे पौरोहित्य करतात; पण यांच्यावर वैदिक संस्कारांचा फारसा प्रभाव दिसत नाही. यांच्या विवाहात वैदिक किंवा पौराणिक मंत्रही म्हटले जात नाहीत; तर मंत्रांच्या ऐवजी गुजराती किंवा राजस्थानी गाणी म्हटली जातात.

मध्य प्रदेशात यांची वसती बरीच आहे. तिथे हे स्वयंपाकी म्हणून काम करतात. महाराष्ट्रात यांची 'अमृततुल्य' चहाची बरीच दुकाने आहेत. [ रा. जा.; वि. मुं. रा. प.; प्रा. म.; भा. ब्रा. जा. प्र. ]

## श्रीरंगपट्टण

कर्नाटकातील एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र. हे स्थान म्हैसूरपासून ९ मैलांवर कावेरी नदीच्या दोन शाखांमधील बेटावर आहे. बेटाची लांबी सुमारे ३ मैल व रुंदी १ मैल आहे. बेटाच्या पश्चिम टोकाला श्रीरंगनाथाचे भव्य मंदिर आहे. श्रीरंगनाथाचे स्थान म्हणून याला श्रीरंगपट्टण हे नाव मिळाले.

प्राचीन काळी इथे गौतम ऋषीचा आश्रम होता. गौतमाने कावेरीच्या तीरावरील एका मोठ्या खडकावर उभे राहून तप केले, विष्णू त्याच्यावर प्रसन्न झाला आणि गौतमाच्या विनवणीप्रमाणे त्याने इथे वास्तव्य केले, अशी पौराणिक कथा आहे.

इ. स. च्या ९ व्या शतकात गंगवंशाच्या राजवटीत इथे श्रीरंगनाथस्वामीचे मंदिर बांधण्यात आले, असे म्हणतात. इ. स. १२०० मध्ये म्हैसूरवर राज्य करणारा होयसळ राजा वीर बल्लाळ (दुसरा) याने रंगनाथाच्या पूजेसाठी काही जमीन दान दिली, असे मंदिरातील एका शिलालेखावरून कळते.

विजयनगरच्या राजांनी या मंदिराचा विस्तार केला आणि वोडेयार राजांनी त्याचे वैभव वाढवले.

मंदिराच्या गर्भगृहात शेषशायी विष्णूची प्रचंड शयनमूर्ती आहे. तिच्या मस्तकावर शेषनागाने सात फण्यांचे छत्र धरलेले दिसते. विष्णूच्या मस्तकी उंच किरीट व सर्वांगी विविध अलंकार आहेत. त्याच्या पायांजवळ कमल घेऊन बसलेली कावेरी देवीची लहानशी मूर्ती व पावलांजवळ गौतमाची मूर्ती आहे. गाभाऱ्याच्या भिंतींवर अनेक महिरपी असून, त्यांत सुंदर मूर्ती कोरलेल्या दिसतात.

गर्भगृहासमोर नवरंग मंडप असून, त्यातून प्रदक्षिणा मार्ग निघतो. नवरंग मंडपाला बरेच गोल स्तंभ आहेत. त्या मंडपाच्या

प्रवेशद्वाराजवळ दोन प्रचंड द्वारपाल आहेत आणि त्यांच्या समोर एक विशाल प्रांगण आहे. त्या प्रांगणात होयसळ पद्धतीचे अनेक



जुम्मा मशीद, श्रीरंगपट्टण

स्तंभ आहेत. या प्रांगणाच्या चारही कोपऱ्यांत चार लहान मंदिरे आहेत. प्रांगणाच्या प्रवेशद्वाराजवळच हनुमान व गरुड यांची देवळे आहेत. जवळच विजयनगर शैलीचे चार स्तंभ असून, त्यांवर विष्णूच्या केशवादी चौवीस नावांच्या प्रतिमा कोरलेल्या आहेत.

प्रांगणाच्या पूर्व बाजूला मोठा मुखमंडप आहे. त्याच्या मध्यावर उंच गरुडध्वज आहे. प्रांगणाच्या भोवती प्राकाराची उंच दगडी भिंत आहे.

मुखमंडपाच्या उत्तरेला एक वृंदावन असून, त्याच्यावर कृष्ण, रंगनाथ, वेणु-गोपाल व जनार्दन यांच्या सुंदर मूर्ती आहेत. मंदिराच्या महाद्वाराजवळ चार दगडी हत्ती दिसतात. महाद्वारावर विजयनगरपद्धतीचे भव्य गोपुर आहे. गर्भगृहावरील उंच विमानही विजयनगरपद्धतीचेच आहे. हे मंदिर द्राविड शिल्पकलेचे उत्कृष्ट उदाहरण गणले जाते.

रंगनाथमंदिराच्या समोरच लक्ष्मी-नरसिंहाचे मोठे मंदिर आहे. ते वरेच पडलेले होते, पण आता त्याची डागडुजी करण्यात आली आहे. याच्या गाभाऱ्यात एका चौथऱ्यावर लक्ष्मीनरसिंहाची सुंदर मूर्ती आहे. हे मंदिर म्हैसूरचा राजा कंठीरव नरसराज याने बांधले.

तिथून जवळच गंगाधरेश्वराचे मंदिर आहे. हे मंदिर इ. स. च्या १६ व्या शतकातले असून, त्यात सर्वत्र सुंदर नक्षीकाम कोरलेले आढळते. तिथल्या मंडपाच्या भिंतीतील कोनाड्यांत अनेक शैव संतांच्या मूर्ती आहेत.

येथील जुम्मा मशीद म्हणजे पूर्वीचे हनुमानमंदिर होते, असे म्हणतात. टिपू सुलतानाने तिथली मूर्ती हलवून, त्याची मशीद बनवली. तिथल्या भिंतींवर कुराणातली वचने कोरलेली आहेत. एका आलेखात इ. स. १७८७ हे मशिदीच्या रचनेचे वर्ष दिलेले आहे. या मशिदीवर दोन सुंदर मनोरे आहेत. त्यांच्या शिरोभागी पाषाणाचे सुबक कळस दिसतात.

इ. स.च्या १५ व्या शतकात विजयनगरचा सामंत तिरुमलदेव याने या नगराभोवती भुइकोट बांधला. त्याचा तट अजून बराच शाबूत आहे. असे तीन तट व तीन खंदक आहेत. त्या तटांना अनेक दरवाजे आहेत.

या कोटाच्या पूर्वेला दोन फर्लांग अंतरावर नदीच्या काठी दर्या-दौलत नामक बगिचा व त्याच्या मध्यभागी त्याच नावाचा टिपूचा उन्हाळी राजवाडा आहे. त्या राजवाड्यात सर्वत्र चित्रे रंगविलेली असून, एका भिंतीवर चार युद्धांची चित्रे आहेत.

तिथून सुमारे दीड मैलावर, बेटाच्या पूर्व टोकाला टिपूची सुंदर कबर आहे. तिच्या भोवती बाग आहे, तिला लालबाग म्हणतात. कबरीवर ताजमहालासारखा घुमट आहे, म्हणून तिला गुंबझ म्हणतात. ही इमारत पांढऱ्या दगडांची आहे; पण पडवीचे खांब काळे, गुळगुळीत व कलापूर्ण आहेत. दरवाज्यांवर चांगले नक्षीकाम केलेले आहे.

ही कबर टिपूने स्वतः हैदर अलीसाठी बांधली. नंतर टिपूची आई व टिपू यांचेही दफन तिथेच करण्यात आले.

गुंबझच्या आवारात शिरताना डाव्या बाजूला एक स्मारक दिसते. कर्नल बेली नामक इंग्रज सेनाधिकाऱ्याचे त्याच्या पुतण्याने बांधलेले हे स्मारक आहे.



गुंबझ, टिपू सुलतानाची कबर, श्रीरंगपट्टण

श्रीरंगपट्टण येथील श्रीरंगनाथमंदिर हे एक जागृत देवस्थान मानले जाते. हैदर व टिपू या दोघांनीही मंदिरातील पूजा-अर्चा

नीट चालू राहावी, म्हणून चांगली व्यवस्था केली होती.

श्रीरंगपट्टणाप्रमाणेच शिवसमुद्रमच्या जवळ कावेरी नदीच्या पात्रात एक बेट असून, तिथेही श्रीरंगनाथाचे मंदिर आहे. तिरुचिरापल्लीजवळ कावेरी नदीच्या पात्रातील बेटावरही श्रीरंगनाथाचे तिसरे मंदिर आहे. श्रीरंगपट्टणच्या क्षेत्राला आदिरंगम म्हणतात; शिवसमुद्रमला मध्यरंग व तिरुचिरापल्लीजवळच्या क्षेत्राला अंतरंगम किंवा श्रीरंगम म्हणतात. पाहा – श्रीरंगम्. [गा. से. प.; एन्सा. रि. ए.; मा. दे. मा. लो.]

**श्रीरंगम्** तमिळनाडमधील एक पवित्र क्षेत्र. हे तिरुचिरापल्ली (त्रिचनापल्ली)च्या उत्तरेस सुमारे तीन मैल अंतरावर, कावेरी नदीच्या दोन शाखांमधील बेटावर आहे. बेटाची लांबी सुमारे १८ मैल व रुंदी सुमारे ४ मैल आहे. बेटाच्या पश्चिम टोकापासून ५ मैलांवर हे नगर वसलेले असून, पुढे १२ मैलांवर कावेरीच्या दोन्ही शाखा एकत्र मिळतात. उत्तरेकडील शाखेला कावेरी म्हणतात.



वेल्लाडू गोपूर, श्रीरंगम्

येथील रंगनाथमंदिराचा विस्तार ३ मैल लांब व १ मैल रुंद असून, त्यात एकाभोवती एक असे सात प्राकार आहेत. त्या प्राकारांच्या प्रवेशद्वारांवर सुमारे २१ गोपुरे आहेत आणि त्या प्राकाराच्या अंतर्भागातच सर्व नगर सामावलेले आहे. एवढे विशाल देवालय भारतात अन्यत्र कुठेही नाही, असे म्हणतात.



सुवर्णमंडित विमान, श्रीरंगम्

बाहेरच्या तीन प्राकारांत लोकांची वस्ती आहे. चौथ्या प्राकाराच्या आत सहस्रस्तंभ-मंडप, रामानुजाचार्यांचे मंदिर, सुदर्शनचक्राचे मंदिर व श्रीरंगनायकी (लक्ष्मी)चे मंदिर आहे.

सहस्रस्तंभ मंडपाची लांबी ५०० फूट व रुंदी १३८ फूट असून, त्यात ९५३ स्तंभ आहेत. त्यांतील प्रत्येक स्तंभ एकेका अखंड पाषाणखंडातून बनवलेला असून, त्यावर सुंदर नक्षीकाम केलेले दिसते. त्याच प्रांगणात दुसरा लहान मंडप आहे. त्याच्या स्तंभांवर सुंदर अश्वाकृती दिसतात. या चौथ्या प्राकाराच्या पूर्वेकडील द्वारावरचे भव्य गोपुर १४६ फूट उंच आहे. त्याला शुभ्र किंवा वेल्लाडू गोपुर म्हणतात. ते फार प्रेक्षणीय आहे.

पाचव्या प्राकाराच्या आत दक्षिणेकडील गोपुरासमोर एका मंडपात गरुडाची भव्य मूर्ती आहे. याच प्राकारात चंद्रपुष्करिणी नामक सरोवर असून, त्याच्या काठावर अनंतपीठ, प्राचीन पुन्नागवृक्ष, श्रीरामचंद्राचे मंदिर व वैकुंठनाथाचे मंदिर आहे. आसपास काही आळवार संतांची मंदिरेही आहेत.

सहाव्या प्राकाराच्या आत सुवर्णमंडित ध्वजस्तंभ व हनुमानाची भव्य मूर्ती आहे. सातव्या प्राकाराच्या आत श्रीरंगनाथाचे मुख्य मंदिर आहे. ते दक्षिणाभिमुख असून, अगदी लहान आहे. त्याचे विमान ओंकारासारखे दिसते. या विमानावर चार कळस आहेत. हे विमान सुवर्णमंडित आहे. मंदिर चौकोनी आहे, पण त्यातील गर्भगृह मात्र गोलाकार आहे. त्यात शेषशायी श्रीरंगनाथाची द्विभुज, श्यामवर्ण, विशाल मूर्ती दिसते. तिच्या मस्तकावर शेषनागाची फणी आहे. या मूर्तीविषयीची आख्यायिका अशी–

मनूचा पुत्र इक्ष्वाकू याने कठोर तपश्चर्या करून ब्रह्मदेवाकडून श्रीरंगनाथाची दिव्य मूर्ती विमानासह प्राप्त केली व अयोध्या नगरीत तिची प्रतिष्ठापना केली. श्रीरंगनाथ इक्ष्वाकू वंशाचा कुलदेव झाला. लंकाविजयानंतर श्रीराम अयोध्येला परत आल्यावर त्याला राज्याभिषेक करण्यात आला. त्यानंतर त्याने बिभीषणाला श्रीरंगनाथाची मूर्ती विमानासकट दिली. बिभीषण ती घेऊन लंकेकडे जात असता वाटेत कावेरीच्या तीरी, चंद्रपुष्करिणीजवळ थांबला व त्याने ती मूर्ती एका पीठावर ठेवली. पण पुढे जाताना ती मूर्ती त्याला तिथून हलवता येईना. कारण तिथेच कावेरीच्या तीरावर वास्तव्य करावे, अशी देवाला इच्छा झाली. चोळ देशाच्या राजाचीही तशीच इच्छा होती. मग बिभीषण तसाच लंकेला गेला. तेव्हापासून श्रीरंगनाथ कावेरीच्या तीरावरील चंद्रपुष्करिणीजवळ राहिला. तेच स्थान सांप्रत श्रीरंगम या नावाने प्रख्यात आहे.

श्रीरंगम येथील श्रीरंगनाथाच्या मंदिराचे सुवर्णमंडित विमान हे प्रणव महामंत्राचे प्रतीक आहे, त्यावरील चार कळस हे चार वेदांचे प्रतीक आहेत, श्रीरंगनाथाचा शयनमंडप हे गायत्री मंत्राचे प्रतीक आहे आणि मंदिराभोवतालचे सात प्राकार हे भूः, भुवः, इ. सात लोकांचे प्रतीक आहेत, असे मानले जाते.

द. भारतातले आळवार संत हे श्रीरंगनाथाचे परम भक्त होते. श्रीरंगम येथील पूजा-अर्चा रामानुजसंप्रदायाच्या पद्धतीने चालते.

सर्व आळवारांनी श्रीरंगनाथाची स्तोत्रे रचली आहेत. केरळाधिपती कुलशेखर आळवार याने मुकुंदमाला नामक जे स्तोत्र रचले, त्यातील एक श्लोक असा–

> भवजलधिगतानां द्वन्द्ववाताहतानां
> सुतदुहितृकलत्रत्राणभारार्दितानाम् ।
> विषमविषयतोये मज्जतामप्लवानां
> भवति शरणमेको विष्णुपोतो नराणाम् ॥

अर्थ– भवसागराच्या जलात पडलेल्या, परस्परविरुद्ध विचारांच्या लाटांच्या आघातांनी जर्जर झालेल्या; पुत्र, कन्या पत्नी यांच्या चिंतांमुळे व्यग्र आणि विपरीत अशा विषयोपभोगाच्या जळात बुडणाऱ्या जनांना विष्णुरूपी नाव हाच एक आधार आहे.

द. भारतातील पल्लव, चोळ, पांड्य, होयसळ, विजयनगरचे सम्राट व त्यांचे सामंत, इ. सर्व राजवंशांनी श्रीरंगनाथाच्या मंदिराचा विस्तार केला व त्यासाठी दाने दिली. इ. स. १३२६ मध्ये श्रीरंगमवर मुसलमानी आक्रमण आले, तेव्हा तिथल्या व्यवस्थापकांनी श्रीरंगनाथाची मूर्ती तिरुपतीला नेली. पुढे विजयनगरचे स्वतंत्र राज्य प्रस्थापित झाल्यानंतर ती मूर्ती श्रीरंगमला परत आणली गेली.

या मंदिरात वर्षभर विविध उत्सव चालू असतात. मात्र धनुर्मासात (डिसेंबर) अमावास्येपासून वीस दिवस वैकुंठ



शेषशायी श्रीरंगनाथ

एकादशीचा मोठा उत्सव असतो. त्या वेळी तिथे भक्तांची अतिशय गर्दी होते. मंदिराच्या बाहेरून सहाव्या प्राकाराला वैकुंठद्वार आहे, ते त्या प्रसंगी उघडतात. या उत्सवात आळवारांच्या दिव्य प्रबंधातील पदे गायिली जातात.

इथे श्राद्ध करणाऱ्याला अक्षय पुण्य लागते, असे मत्स्यपुराणात सांगितले आहे. इथे रामानुजाचार्यांचे वास्तव्य होते आणि त्यांना इथेच मृत्यू आला. [श्रीरंग क्षेत्रमाहात्म्य—श्रीनरसिंहन, १९६४; इं. इं.; हि. ध.; कल्याण-तीर्थांक]

## श्रीलंका

भारताच्या दक्षिण टोकापासून काही अंतरावर हिंदी महासागरात असलेले एक मोठे द्वीप. याची उत्तर-दक्षिण लांबी सुमारे २७० मैल व पूर्व-पश्चिम रुंदी १४० मैल असून, क्षेत्रफळ २५,३३२ चौ. मैल आहे. या द्वीपाची लोकसंख्या सुमारे १२५ कोटी आहे. कोलंबो ही याची राजधानी होय.

या द्वीपातील त्रिकूट पर्वतावर लंका नामक नगरी विश्वकर्म्याने निर्माण केली, असे रामायणात म्हटले आहे. सुकेश नामक राक्षसाचे पुत्र या नगरीत राहत होते. विश्रवा ऋषीने आपला पुत्र कुबेर याला तिथे वास्तव्य करण्याची आज्ञा केली व कुबेर तिथे राहू लागला. मग त्याचा भाऊ रावण याने ती नगरी युक्तीने मिळवली. रामायणात या सुंदर नगरीच्या वैभवाचे वर्णन केलेले आहे. रावणाचा पराभव केल्यानंतर श्रीरामचंद्राने त्याचा भाऊ बिभीषण याला लंकेचे राज्य दिले.

अत्यंत प्राचीन काळी वेद्द नावाचे आदिवासी लोक या बेटाचे रहिवासी होते. तिथल्या गुहांत राहून ते जंगली प्राण्यांची शिकार करीत व त्यांचे मांस खात. सिंहली भाषेतील वाद्द या नावाचे

वेद्द हे रूपांतर आहे. आणि वाद्द हे नाव संस्कृत भाषेतील व्याध या शब्दावरून आले आहे, असे डॉ. ओस्मन हिल यांचे मत आहे.

प्राचीन बौद्ध वाङ्मयात या देशातील आदिवासींना यक्ष म्हटले आहे. डॉ. सेलिगमनच्या मते हे यक्ष म्हणजे वाद्द लोकच होत. भारतातील नाग लोकांनी या बेटावर आक्रमण करून तिथे राज्य स्थापले आणि ते सनपूर्व ५ व्या शतकापर्यंत चालू राहिले. भारतातील भिन्न भिन्न वंशाचे लोक निरनिराळ्या काल-खंडात श्रीलंकेत जाऊन वसले असावे. महावंश या बौद्ध ग्रंथात श्रीलंकेचा राजा विजय याची कथा आहे. उत्तर भारतातील सिंहबाहू नामक राजाचा पुत्र विजय सनपूर्व ४८३ मध्ये आपल्या ७०० सेवकांसह एका नौकेतून या द्वीपास जाऊन पोचला. तिथे त्याने राज्य स्थापले व एका यक्ष कन्येशी विवाह केला. सिंहबाहूच्या घराण्याचे नाव सिंहल होते. सिंह हे त्याचे देवक असावे. त्या नावावरून या द्वीपाला सिंहलद्वीप हे नाव मिळाले.

त्यानंतर द. भारतातून असंख्य लोक वेळोवेळी सिंहलद्वीपात जाऊन वसले. त्यांतील काही लोक व्यापारासाठी गेले, तर काही पराक्रमी पुरुष राजसत्ता मिळविण्यासाठी गेले. या सर्वांनी श्रीलंकेतल्या लोकांशी विवाहसंबंध केले. गेल्या २५०० वर्षांत हजारो भारतीय लोक श्रीलंकेत जाऊन स्थायिक झाले. त्यांतील बहुतेक सिंहली लोकांत मिसळूनही गेले. अलिकडच्या १०० वर्षांत जे तमिळ लोक तिकडे गेले, त्यांतील काही जण मात्र तमिळ म्हणूनच वेगळे राहिले आहेत.

बुद्धपूर्व काळी श्रीलंकेत यक्षपूजा प्रचलित होती. कुबेर वैश्रवण हा यक्षराज लंकाधिपती होता. तो व अन्य काही यक्ष हे त्या प्रदेशाचे संरक्षक देव मानले जात होते. ही यक्षपूजा अजूनही तिथे प्रचलित आहे. व्याधिदेव (व्याधदेव), कम्मारदेव (लोहारांचा देव), इ. भिन्न व्यवसाय करणाऱ्यांचे देवही वेगवेगळे होते. त्याचप्रमाणे तिथे वृक्ष, चैत्य यांचीही पूजा चालत असे. शिवाची लिंगरूपाने पूजा त्या काळी तिथेही चालू होती.

सिंहल घराणे ब्राह्मण असावे, असे काही पंडितांचे मत आहे. किंवा त्या घराण्यांतील विजयाबरोबर गेलेल्या काही लोकांत काहीजण तरी वैदिक ब्राह्मण असावे. त्या ब्राह्मणांनी तिथे वैदिक धर्माचा प्रचार केला असावा. ब्राह्मणांना तिथे प्रतिष्ठा होती आणि राजकारणावरही त्यांचा प्रभाव होता. काही जैन यतीही श्रीलंकेत गेलेले होते आणि तिथे जैन पंथाचा प्रचार करीत होते. अशा प्रकारे सिंहली लोकांच्या धार्मिक श्रद्धा व समजुती बुद्धपूर्वकाळापासून भारतीय लोकांच्या श्रद्धा-समजुतीं-सारख्याच होत्या.

**प्राचीन इतिहास** – मौर्य सम्राट अशोकाच्या काळात श्रीलंकेत बौद्ध पंथाचा खूप प्रसार झाला. अशोकाचा पुत्र महेंद्र व कन्या संघमित्रा हे बौद्ध भिक्षू व भिक्षुणी बनून सिंहलद्वीपात गेले आणि तिथे त्यांनी विजयाचा वंशज राजा तिष्य याला व अन्य व्यक्तींना बौद्ध पंथाची दीक्षा दिली. त्याच वेळी गयेतील बोधिवृक्षाची एक शाखा तिकडे नेऊन अनुराधपुरात लावण्यात आली. पुढे तिचा मोठा वृक्ष होऊन पसरला, त्याचप्रमाणे बौद्ध पंथाचाही खूप प्रसार झाला. तेव्हापासून इ. स. च्या ३ ऱ्या शतकापर्यंत तिथे हीनयान शाखेचा प्रभाव होता. इ. स. च्या ४ थ्या शतकात मात्र तिथे महायान पंथाचा प्रभाव वाढू लागला.



तालुविल बुद्ध, अनुराधपूर

चोळ देशातील भिक्षू संघमित्तू याने तिथे त्या पंथाचा प्रचार केला. भारताप्रमाणेच श्रीलंकेतही बौद्ध लोक बुद्धाची व बोधि-सत्वांची पूजा करू लागले. पूर्वी जे चैत्य होते त्यांचे नंतर बौद्ध उपासना-मंदिरांत रूपांतर झाले. दागोबा व स्तूप यांचीही निर्मिती सुरू झाली. महायान बौद्धांनी संस्कृत भाषेचे ग्रंथही श्रीलंकेत नेले.

गुप्तकाळात ब्राह्मणधर्माचा प्रभाव वाढला आणि त्यामुळे बौद्ध पंथाचा प्रभाव कमी होऊ लागला. इ. स. च्या ६ व्या शत-कात पल्लववंशाच्या राजवटीत द. भारतात शैव व वैष्णव संतांनी हिंदू धर्माची प्रतिष्ठा वाढवली. त्यानंतर शंकराचार्यांनी वेदान्ताचा म्हणजेच अद्वैत तत्त्वज्ञानाचा प्रसार केला. त्यामुळे बौद्ध पंथाचा प्रसार कमी झाला.

द. भारतातील तमिळ लोक पूर्वीप्रमाणेच त्याही काळी सिंहल-द्वीपात जाऊन वसत होते व व्यापार उदीम करीत होते. अनेक तमिळ पुरुषांनी तिकडे जाऊन राज्ये स्थापली होती. इ. स. च्या

७ व्या शतकात मानवम्म हा सिंहली राजा पदभ्रष्ट होऊन कांची येथील पल्लव राजाच्या आश्रयाला आला होता. त्याने तमिळ सेनेच्या साहाय्याने लंकेवर स्वारी करून आपले राज्य परत घेतले. त्यामुळे लंकेत पल्लवांचा प्रभाव जसा वाढला तसाच तमिळ लोकांचाही वाढला. तिथे शैव व वैष्णव मंदिरेही निर्माण झाली. हिंदूंच्या धार्मिक व सामाजिक कल्पना तिथे पूर्वीपासूनच रूढ होत्या. बौद्ध पंथाचा प्रभाव होता तरी त्या नष्ट झाल्या नव्हत्या. त्यांनी पुन: उचल घेतली. श्रीलंकेतही पंचायतनाची पूजा सुरू झाली. ऐयनार, मातृका, इ. देवतांची उपासनाही चालू राहिली व आजही चालू आहे.

अनुराधपूर ही सिंहलद्वीपाची राजधानी होती. तिथे सनपूर्व १७७–१५५ या कालखंडात तमिळ राजे राज्य करीत होते, असे महावंशावरून कळते. सनपूर्व १४५ ते १०१ या काळातही तिथे तमिळ राजाच राज्य करीत होता. तो चोळ देशातून गेलेला होता व त्याचे नाव एलार असे होते. त्यानंतरही अनेक तमिळ राजांनी श्रीलंकेवर आक्रमणे केली व तिथे सत्ता स्थापली.

**मध्यकाल** – इ. स. च्या १०व्या शतकाच्या प्रारंभी चोळ वंशाची सार्वभौम सत्ता द. भारतात प्रस्थापित झाली. इ. स. ९१३ मध्ये सिंहलचा राजा कासप (५वा) याने पांड्य राजाला चोळ राजाविरुद्ध मदत केली. काही वर्षांनंतर चोळ राजाने पांड्य राजाचा पराभव केला, तेव्हा तो सिंहलद्वीपात आश्रयासाठी गेला. तिथून परत येताना त्याने आपला राजमुकुट व रत्नसंग्रह सिंहलच्या राजाजवळ ठेवला. चोळ राजा परांतक (१ला) याने इ. स. ९४५ मध्ये श्रीलंकेवर स्वारी केली.

त्या काळी श्रीलंकेत तमिळ लोकांची संख्या बरीच वाढली होती. सिंहलच्या सैन्यातही तमिळ सैनिक बरेच होते. त्यामुळे कधी कधी राजाला त्यांच्यापुढे नमते घ्यावे लागे. सेन (५ वा) (९७२–९८१) याला त्यांच्या उच्छादामुळे अनुराधपूर सोडून पोलोन्नरुव येथे राजधानी स्थापावी लागली. त्याच्या नंतर राज्य करणारा मिहिंदू याने अनुराधपूर येथे राजधानी परत नेण्याचा प्रयत्न केला; पण त्यात त्याला यश आले नाही. अशा प्रकारे तिथली राजसत्ता दुबळी झालेली पाहून राजराज चोळ याने इ. स. १००२ च्या सुमारास त्या द्वीपावर स्वारी केली व पोलोन्नरुव सहज जिंकले. राजा मिहिंदू सिंहलद्वीपाच्या मध्यभागी असलेल्या डोंगराळ प्रदेशात राहून छुपे युद्ध करीत राहिला. पुढे राजेंद्र चोळ याने इ. स. १०१७ मध्ये पुन: स्वारी करून मिहिंदूला कैद केले आणि पांड्य राजाचा मुकुट व रत्नसंग्रहही परत मिळवला.

चोळांची सत्ता श्रीलंकेवर इ. स. १०७० पर्यंत अबाधित राहिली. त्या काळात चोळांनी आपले लोक श्रीलंकेत उच्च अधिकारपदीं नेमले होते. पण पुढे या चोळांची सत्ता यादवीमुळे दुबळी झाली. यामुळे चोळांचे सैन्य तिथून परत आले. तेव्हा विजयवाहू नामक राजपुत्राने पोलोन्नरुव घेतले व तिथे स्वतंत्र राज्य सुरू केले. त्या वेळी पांड्य, कलिंग व सिंहल या देशांचे राजे परस्पर मित्र बनले. विजयवाहूने कलिंगाच्या राजकन्येशी विवाह केला व आपली बहीण मित्ता पांड्य राजपुत्राला दिली.

विजयवाहूने इ. स. १११४ पर्यंत राज्य केले. त्या अवधीत त्याने सिंहलद्वीपाचे वैभव वाढविण्याचा बराच प्रयत्न केला; पण अंतर्गत यादवीमुळे त्याला फारसे यश मिळाले नाही. त्याच्या मृत्यूनंतर यादवी अधिकच वाढली. शेवटी इ. स. ११५३ मध्ये मित्ताचा नातू पराक्रमबाहू याने सिंहलद्वीपात आपली सत्ता प्रस्थापित केली. त्याने इ. स. ११८६ पर्यंत राज्य केले. त्याच्या राजवटीत श्रीलंकेची स्थिती सुधारून तिथे समृद्धी नांदू लागली. पराक्रमबाहू पराक्रमी होता. त्याने ब्रह्मदेशावर स्वारी करून जय मिळवला. त्याने पांड्य राजवंशातील यादवीत वीर पांड्य याच्या बाजूने लढण्यासाठी आपली सेना पाठवली. पण चोळ राजा राजाधिराज याने कुलशेखर पांड्य याला साहाय्य केल्यामुळे पराक्रमबाहूला अपयश आले.

पराक्रमबाहूनंतर त्याच्या बहिणीचा पुत्र विजयबाहू (२रा) हा राजा झाला. तो कलिंग देशाचा राजपुत्र होता. तो परकीय म्हणून विरोधकांनी वर्षअखेर त्याचा वध केला. त्याच्या नंतर



शिव-मंदिर, पोलोन्नरुव

कीर्ति नि:शंकमल्ल हा राजा झाला. तोही कलिंग देशातलाच होता. त्याने ११९६ पर्यंत उत्तम राज्य केले. विरोधकांना वळवण्याचा बराच प्रयत्न त्याने केला; पण त्याच्या मृत्यूनंतर कलिंगातील राजघराण्याला पुनश्च विरोध सुरू झाला. त्याचे दमन करण्यासाठी कलिंग वंशातील राजांनी कलिंगातून सेनादल मागवले. माघ (इ. स. १२१४ ते १२३५) हा त्या घराण्यातला

शेवटचा राजा फार क्रूर निघाला. त्याच्या कारकिर्दीत जनतेला फार छळ सोसावा लागला.

इ. स. च्या ११ व्या शतकात श्रीलंकेवर चोळ राजवंशाची सत्ता होती, तेव्हा तिथे हिंदू धर्माचा उत्कर्ष झाला व बौद्ध पंथ मागे पडला. चोळ राजे शिवभक्त असल्यामुळे त्यांनी बरीच शिवमंदिरे तिथे निर्माण केली. शैवपंथाचा प्रभाव श्रीलंकेत चोळांची सत्ता संपल्यानंतरही चालू राहिला. पुढे श्रीलंकेच्या राजांनी बौद्ध पंथालाही साहाय्य केले. पण त्या काळी लोकांना बौद्ध पंथाबद्दल आस्था वाटेनाशी झाली होती. त्यामुळे बौद्ध पंथ तिथे बळ धरू शकला नाही. माघाच्या राजवटीत तर बौद्ध मंदिरांचाही नाश झाला.

इ. स. च्या १३ व्या शतकाच्या आरंभी सिंहलद्वीपाच्या उत्तर भागात एक स्वतंत्र हिंदू राज्य सुरू झाले. त्याचे नाव जाफना असे होते. त्या भागात मुख्यतः तमिळ लोक वसलेले होते आणि त्यांचा प्रमुख जवळ जवळ स्वतंत्रपणे कारभार करीत होता. त्यानेच कलिंग घराण्यातील माघ राजाच्या वेळी संपूर्ण स्वातंत्र्य घोषित केले असावे. त्याची राजधानी सिहनगर येथे होती; पण हे नगर कोणते ते अजून निश्चित झालेले नाही. या राज्याच्या भयाने सिंहली राजांनी अनुराधपूर व पोलोन्नरुव ही नगरे सोडून दक्षिण भागातील दुर्गम प्रदेशाचा आश्रय घेतला. त्या प्रदेशातल्या दंबदेणिय, यापहुव, कुरुनागल, गंपोला, रायिगम, कोट्टे, इ. नगरांत त्यांनी वास्तव्य केले. अनुराधपूर व पोलोन्नरुव यांच्या आसमंतातला प्रदेश लवकरच अरण्याने व्यापला व दोन राज्यांच्या मध्ये एक दुर्गम सीमाप्रदेश निर्माण झाला.

त्या सुमारास द. भारतात पांड्य राजवंश प्रबळ झाला आणि इ. स. च्या १३ व्या शतकाच्या उत्तरार्धात जटावर्मन सुंदर पांड्य याने साम्राज्य स्थापले. त्याने श्रीलंकेवर स्वारी करून जाफनाच्या राजाला मारले व कोणमलैवर (त्रिकोमाली) पांड्य वंशाचा ध्वज लावला. सिंहली राजा भुवनैकबाहूने (१२७३–८४) खंडणी देऊन त्याचे सार्वभौमत्व मान्य केले. त्याच्या नंतर पराक्रमबाहू (३ रा) याने इ. स. १३१० पर्यंत सामंत म्हणून राज्य केले. त्या वर्षी पांड्यांच्या राज्यात यादवी सुरू झाल्यामुळे भुवनैकबाहू (२ रा) याने पराक्रमबाहूकडून राज्य जिंकून घेतले. त्याने इ. स. १३२५ पर्यंत स्वतंत्रपणे कारभार केला. जाफनाचा तमिळ राजाही त्या वेळी स्वतंत्र झाला होता. त्याने सिंहली राज्यावरही सत्ता स्थापन केली. या तमिळ राजाचे नाव आर्य चक्रवर्ती असून, तो बलवान होता. त्याच्याजवळ बरीच जहाजेही होती. दालचिनीचा व्यापार करून त्याने अमाप द्रव्य मिळवले होते, असे इब्न बतूता याने म्हटले आहे. पण इ. स. १३६८ मध्ये सिंहली राजाचा सेनापती निःशंक अळगवकोनार याने तमिळ सैन्याचा पराभव करून, त्याची काही ठाणीही घेतली.

पुढे इ. स. १३८५ मध्ये विजयनगरच्या सम्राटाचा पुत्र विरूपाक्ष याने जाफनावर स्वारी करून ते राज्य जिंकले. त्यानंतर काही काळ ते राज्य स्वतंत्र झाले असावे. पण इ. स. १४३८ मध्ये विजयनगरच्या सम्राटाने ते पुन्हा घेतले व तेव्हा-



कावडीची मिरवणूक, कोलंबो

पासून ते विजयनगरच्या साम्राज्यात समाविष्ट राहिले. पराक्रमबाहू (६वा) (इ. स. १४१५–६७) याने संपूर्ण सिंहलद्वीपावर आपली सत्ता स्थापली होती. पण ती अल्पकाळच टिकली. त्याच्या मृत्यूनंतर तिथे पुन्हा दुफळी झाली. इ. स. च्या १६ व्या शतकाच्या प्रारंभी पोर्तुगीज तिथे आले, तेव्हा तिथे तीन स्वतंत्र राज्ये होती. उत्तरेकडच्या तमिळ राज्याचा राजा परराजशेखरन (इ. स. १४७८ – १५१९) हा होता; मध्यवर्ती डोंगराळ प्रदेशावर विक्रमबाहू राज्य करीत होता; व दक्षिणेकडील सिंहली प्रदेशावर पराक्रमबाहू (८ वा) (इ. स. १४८४ ते १५०९) राज्य करीत होता. विजयनगरची सत्ता नष्ट झाल्यानंतर श्रीलंकेतील उत्तर भागातील तमिळ हिंदू राज्यात पोर्तुगीज प्रबल होऊ लागले.

इ. स. च्या १३ व्या व १४ व्या शतकात पांड्य वंशाची सत्ता व त्यानंतर विजयनगरची सत्ता श्रीलंकेवर होती. तोपर्यंत तिथे शैव पंथाचा प्रसार होता. त्या राजांनी तिथे अनेक शिवमंदिरे बांधली. सिंहली लोकांचे धार्मिक व सामाजिक जीवन ह

भारतातील हिंदूंसारखेच होते. मात्र तिथे बौद्ध धर्माचे जे लोक होते, ते बुद्ध, धम्म व संघ यांची उपासना करीत होते. त्यांच्यासाठी तिथे नवीन विहारही बांधले गेले.

**परकीय सत्ता** – पोर्तुगीजांनी प्रथम दक्षिणेकडील सिंहली राज्यात प्रवेश करून तिथे पाय रोवले. नंतर त्यांनी हळूहळू उत्तरेकडील राज्यात आपली सत्ताकेंद्रे स्थापली. इ. स. च्या १६ व्या शतकाच्या मध्यात जाफनाचा हिंदू राजा संकिली याने पोर्तुगालची अधिसत्ता मान्य केली. मधून मधून ते राज्य स्वतंत्र व्हायचे. पण शेवटी इ. स. १६१८ मध्ये जाफनाचे राज्य पोर्तुगालच्या साम्राज्यात समाविष्ट झाले. पोर्तुगीजांनी दक्षिणेकडील सिंहली राज्यातही आपली सत्ता स्थापली होतीच. त्यामुळे इ. स. १५९७ मध्ये ते राज्यही पोर्तुगालच्या राजाला मिळाले. मधले राज्य तेवढे स्वतंत्र राहिले. श्रीलंकेचा जेवढा प्रदेश पोर्तुगीजांच्या सत्तेखाली गेला, तेवढ्या भागात ख्रिस्ती मिशनऱ्यांनी आपल्या धर्माचा प्रचार सुरू केला आणि असंख्य हिंदू व बौद्ध लोकांना ख्रिस्ती केले. पोर्तुगीजांनी बरीच चर्चे तिथे बांधली. काही मंदिरे व विहार पाडून तिथेच त्यांनी आपली चर्चे किंवा भुइकोट उभारले.

पण कालांतराने डचांनी पोर्तुगीजांचा पराभव करून श्रीलंकेत आपली सत्ता स्थापली. धर्माच्या बाबतीत डच सत्ताधारी एवढे कडवे होते, की त्यांनी हिंदू, बौद्ध, मुस्लिम यांच्याप्रमाणेच रोमन कॅथॉलिक ख्रिस्ती लोकांनाही आपल्या धर्माचे पालन करायला बंदी केली व त्यांचा छळही केला.

इ. स. १७३९ मध्ये डचांनी श्रीलंकेत कोलंबो येथे एक छापखाना सुरू केला, सिंहली व तमिळ अक्षरांचे छाप तयार केले आणि लवकरच बायबलाच्या नव्या कराराचे भाषांतर छापून प्रसिद्ध केले.

या कालखंडात कॅंडीचे मध्यवर्ती राज्य स्वतंत्र होते आणि तिथे हिंदू धर्माला पूर्ण स्वातंत्र्य होते. तिथला राजा राजसिंह (१ ला) (इ. स. १५८२–९२) याने बौद्ध पंथाच्या ऐवजी शैव पंथाला राजाश्रय दिला. त्याने बौद्ध भिक्षूंचा छळ केला व त्यांचे ग्रंथ जाळून टाकले, असे सांगतात.

इ. स. १७९५ मध्ये ब्रिटिश सैन्याने त्रिकोमाली घेतले आणि हळूहळू मानारपर्यंत जाऊन श्रीलंकेच्या किनाऱ्यावरील डचांचे भुइकोटही सर केले. इ. स. १७९६ च्या फेब्रुवारीत डच गव्हर्नरने कोलंबो शहर ब्रिटिशांच्या ताब्यात दिले. तेव्हापासून सिंहलद्वीपावर ब्रिटिश सत्ता स्थापन झाली. दोन वर्षे तिथे ईस्ट इंडिया कंपनीचा कारभार चालू होता; पण इ. स. १७९८ मध्ये ब्रिटिश सरकारने तो स्वतःकडे घेऊन तिथे गव्हर्नरची नेमणूक केली. त्याने जो अहवाल पाठवला, त्यात ख्रिस्ती, इस्लाम व बौद्ध हे धर्म आणि भूतपूजकांचा पंथ यांचा उल्लेख आहे. हिंदू धर्माचा मात्र त्यात उल्लेख नाही. त्यावरून असे दिसते, की त्या काळापर्यंत डचांनी सर्व हिंदूंना ख्रिस्ती केले असावे. मात्र हे बाटलेले हिंदू ख्रिस्ती धर्म पाळीत असल्याचे वरवर भासवीत; पण घरात मात्र हिंदू धर्म व आचार पाळीत. डचांची सत्ता नाहीशी झाल्यानंतर ते पुन्हा हिंदू म्हणून वावरू लागले.



कॅंडीचे मध्यवर्ती राज्य इ. स. १८१५ पर्यंत स्वतंत्र होते. इ. स. १७३९ पासून तिथे भारतातील नायक राजघराण्यातील पुरुष राज्य करीत होते. त्या घराण्याला नायक्कर असे म्हणत. ते हिंदू होते. पण सिंहलद्वीपात त्या वेळी काही लहान लहान राज्ये होती आणि त्यांतून बौद्ध धर्म प्रचलित होता. तिथले राजेही बौद्ध होते. ते कॅंडीच्या नायक्कर राजांचा द्वेष करीत. म्हणून त्यांनी कीर्तिश्री (इ. स. १७४७–१७८०) राजाचा वध करून त्याच्या जागी एका सयामी राजपुत्राला गादीवर बसवण्याचा कट रचला; पण तो ऐनवेळी फसला. अशा अंतर्गत धुमश्चक्रीमुळे कॅंडीचे सामर्थ्य कमी झाले आणि ते राज्य लवकरच ब्रिटिशांच्या ताब्यात गेले.

सिलोन म्हणजेच सिंहलद्वीप संपूर्ण ब्रिटिशांच्या सत्तेखाली गेल्यानंतर लवकरच तिथली जंगले तोडून इंग्रजांनी तिथे कॉफीचे मळे निर्माण केले. पण इ. स. १८७० च्या सुमारास त्या मळ्यांवर रोग पडून ते नष्ट झाले. इ. स. १८३९ मध्ये चहाचे



थूपाराम मठ, पोलोन्नरुव

मळे सुरू करण्यात आले होते, ते त्यानंतर वाढवण्यात आले. रबराची झाडे लावली गेली होती, त्यांतही वाढ करण्यात आली.

या मळ्यांत काम करण्यासाठी बरेच मजूर आवश्यक होते. ते दक्षिण भारतातून बोलावण्यात आले. तमिळनाडूमधील हीन जातींचे गरीब लोक हजारोंच्या संख्येने पोट भरण्यासाठी तिकडे गेले. त्यांना विविध प्रकारची प्रलोभने दाखवली गेली. त्यांच्या वसाहती निरनिराळ्या मळ्यांलगत निर्माण झाल्या. पुढे ते निरनिराळ्या शहरांत जाऊन हलकी सलकी कामेही करू लागले.

अशा प्रकारे तमिळ हिंदूंची लोकसंख्या सिलोनमध्ये फार झाल्यामुळे सिलोन सरकारने १९३८ मध्ये नवीन लोकांना देशात येण्यास बंदी केली.

प्रारंभी श्रीलंकेतील बहुतेक शाळा ख्रिस्ती मिशनऱ्यांनी चालू केल्या होत्या. त्यामुळे हिंदू, बौद्ध, मुस्लिम या सर्वांनाच ख्रिस्ती पद्धतीने शिक्षण घ्यावे लागे. त्यात धर्मप्रचार बराच होता. पण १९ व्या शतकाच्या अखेरीस निरनिराळ्या धर्मांच्या मुलांसाठी वेगळ्या शाळा सुरू झाल्या. तथापि ख्रिस्ती शाळांतील शिक्षणामुळे तिथल्या लोकांत जागृती झाली आणि भारताप्रमाणेच तिथेही हिंदू लोकांत स्वधर्माभिमान उत्पन्न झाला.

इ. स. च्या २० व्या शतकाच्या आरंभी तिथे शैव संप्रदायाचा विशेष प्रसार झाला. सांप्रत तिथले हिंदू लोक सरस्वती, विष्णू, लक्ष्मी, महालक्ष्मी, शिव (लिंग) पार्वती, गणेश, स्कंद, भैरव, वीरभद्र, इ. देवतांना भजतात. त्याचप्रमाणे तिथे ऐयनार, पोट्टूराझू, मरिअम्मा, कालीअम्मा, सातबहिणी, कन्नकै, पत्तिनी, नाच्चिमार, कन्निगल, अन्नमार, इ. दैवतांना भजणारेही लोक आहेत. तिथल्या लोकांची भुताखेतांवरही श्रद्धा आहे. त्यांना ते मुनी म्हणतात. सूर्य, हनुमान, नाग, गाय, वृक्ष, गंगानदी यांनाही सिंहली लोक पूज्य मानतात.

श्रीलंकेत लहान लहान मंदिरे असंख्य आहेत. पण द. भारतातील मंदिरांसारखी भव्य मंदिरे मात्र मुळीच नाहीत. प्राचीन काळातली बहुतेक मंदिरे पोर्तुगीज व डच लोकांनी उद्ध्वस्त केली आणि त्यांचे पाषाण नवीन बांधकामासाठी वापरले.

सण व उत्सव – श्रीलंकेतील हिंदू लोक जे सण साजरे करतात, ते असे –

वर्षप्रतिपदा – चैत्र शुद्ध प्रतिप्रदेला हा सण करतात. तो दोन दिवस थाटामाटाने चालतो. पहिल्या दिवशी अग्नी प्रज्वलित करतात. काही जागी करगम नावाचा तीन दिवसांचा उत्सव होतो. त्या उत्सवात नदीच्या काठी 'स्वामी' म्हणजे मरिअम्मा व मरियाली यांची प्रतीके (कलशावर नारळ) एका ओटचावर ठेवून त्यांची पूजा करतात.

नवरात्र – आश्विन महिन्यातील नवरात्र पार्वती, लक्ष्मी व सरस्वती यांच्या नावाने पाळतात.

दीपावली – हा उत्सव अगणित दिवे लावून आनंदाने साजरा करतात.

स्कंदषष्ठी – ही दीपावलीनंतर येते. त्या वेळी काही भाविक लोक सहा दिवस उपवास करतात. स्कंदाने सूरन नामक असुराचा पराजय केला, या कथेला अनुलक्षून शेवटच्या दिवशी त्याची मिरवणूक काढतात.

तिरुवेंपावै – डिसेंबर महिन्यात मणिक्कवाचकर या शैव संतकवीच्या स्मरणार्थ हा उत्सव असतो. तो वीस दिवस चालतो.

मरकाली पिल्लियार – हा गणेशोत्सव डिसेंबर-जानेवारी महिन्यात एक महिना चालतो. त्यात रोज शेणाची गणेशमूर्ती करून तिची पूजा करतात व शेवटी सर्व मूर्तींचे दहन करून ती पवित्र रक्षा घरात ठेवतात.

पोंगळ – याला थई–पोंगळ म्हणतात. यात मकरसंक्रमणाच्या वेळी पाच दिवस सूर्याची पूजा चालते.

महाशिवरात्री – फेब्रुवारी महिन्यात हा सण असतो. त्या दिवशी उपवास व शिवलिंगाची पूजा करतात.

श्रीलंकेमध्ये अनेक पवित्र स्थाने असून हिंदू लोक निरनिराळ्या प्रसंगी तिथे यात्रेला जातात. त्यांतील विशेष प्रसिद्ध स्थाने अशी –

नल्लूर – या गावी स्कंदाचे मंदिर आहे. ऑगस्ट – सप्टेंबर या काळात तिथे मोठी यात्रा जमते. तिथे कावडी घेऊन जाणारे भाविक यात्रेकरू बरेच आहेत. २४ व्या रात्री एका उंच रथावर स्कंद व त्याच्या भार्या वल्ली व देवयानी यांच्या मूर्ती ठेवून देवळाभोवती त्यांची मिरवणूक काढतात. हा रथ माणसेच ओढतात. या उत्सवाला रुप्परम असे नाव आहे.

कतरगाम – श्रीलंकेच्या आग्नेय भागातील जंगलमय प्रदेशात हे स्थान आहे. जवळून वाहणारी मेनिक ही तिथली सर्वांत पवित्र नदी होय. त्या गावीही स्कंद व वल्लीअम्मा यांची मंदिरे आहेत. शिवाय एक बौद्ध विहारही आहे. जुलै महिन्यात स्कंदभक्त मोठ्या संख्येने त्या ठिकाणी जमतात. त्यांत नवस फेडायला आलेले बरेच असतात.

श्रीपाद (अडॅमस् पीक) – रत्नपूरपासून काही मैलांवर हे पर्वतशिखर आहे. त्याची उंची ७५०० फूट आहे. त्याच्या माथ्यावर एका खडकावर पावलाचा ठसा दिसतो. हिंदू लोक त्याला शिव-पद व बौद्ध लोक बुद्धाचे पदचिन्ह मानतात. तिथे गेल्यावर उगवत्या सूर्याला नमस्कार करायचा असतो.

त्रिकोमाली – हे ठिकाण सिंहलद्वीपाच्या पूर्व किनाऱ्यावर उत्तरभागात असून, तिथे 'स्वामी' नामक खडकावर एक शिवमंदिर आहे. त्याला सहस्रस्तंभ मंदिर म्हणतात. तिथले मंदिर पोर्तुगीजांनी पाडले. पण तिथे जाऊन शिवभक्त त्या खडकाची पूजा करतात. त्याच ठिकाणी उष्ण पाण्याचे झरे आहेत. त्यात स्नान करण्यासाठी यात्रेकरू नेहमीच जातात. जेव्हा माविट्टपुरम येथे जुलै महिन्यात उत्सव असतो, तेव्हा त्या झऱ्यांवरही गर्दी होते.

याव्यतिरिक्त चिलॉजवळचे मुन्नेश्वरमंदिर, जाफनाजवळचे नैनाटीवू बेटावरील नाग पूशानी अम्माचे मंदिर, मुल्लिटीव जवळचे कन्नकई-मंदिर, पॉइंट पेड्रोजवळ वल्लिपुरम येथील

विष्णुमंदिर, तिरुकेतीश्वरम, हकगलजवळचे सीता एलियम्मा मंदिर (अशोक वनात सीता होती ते स्थान) अशी अनेक पवित्र स्थाने आहेत व यात्रेकरू तिथे नेहमी जमतात.

**जाति-जमाती** – श्रीलंकेतील हिंदू समाजात जातिभेद आहेत. ब्राह्मण, वेल्लाळ, करैयर, कोवियर, पंचाल (सोनार), सुतार वगैरे कारागीर, नड्डुवर (गायक), वन्नर (धोबी), अंबत्तर, पल्ल, कुसवर, वडैयर, परैयर, युऊव, इ. अनेक जाती तिथे आहेत.

सिंहलद्वीपात हिंदूपेक्षा बौद्ध पंथाचा प्रभाव अधिक आहे. तिथे ७० टक्के लोक बौद्ध आहेत.

मौर्य वंशातील महेंद्राने लंकेत जो महाविहार स्थापला होता, त्याला कालांतराने फार मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली. इ. स. च्या १० व्या शतकात इतर देशांतील बौद्ध लोकही लंकेतील महाविहारातील भिक्षूंना श्रेष्ठ मानीत होते. श्रीलंकेत बौद्ध धर्म हाच राजधर्म मानला जात होता. चोळ वंशाच्या सत्तेखाली असताना श्रीलंकेतील बौद्ध धर्म नामशेष झाला होता; पण त्यानंतरच्या सिंहली राजांनी तिथे बौद्ध संघाची पुन्हा प्रतिष्ठापना केली. विजयबाहू, पराक्रमबाहू, व निःशंकमल्ल हे राजे बौद्ध होते. इ. स. च्या ४ थ्या शतकात बुद्धाचा एक दात लंकेत नेण्यात आला. तिथे त्याची पूजा केली जाते. त्याची मिरवणूकही काढली जाते. इतकेच नव्हे, तर ते राष्ट्रीय मानचिन्ह समजले जाते. बुद्धानुयायी राजांचे भवितव्य त्याच्या प्रभावावर अवलंबून असे. ज्या राजाजवळ तो बुद्धावशेष असेल, त्याला राज्यपदाबद्दल शाश्वती वाटे. पराक्रमबाहूजवळ तो होता. इ. स. ११ व्या शतकात राजधानीत त्याचा मोठा उत्सव होत असे. सांप्रत तो बुद्धदंत कँडी येथील एका मंदिरात सुरक्षित ठेवलेला आहे.

इ. स. च्या १३ व्या शतकात कलिंग घराण्यातील माघाने बौद्ध धर्मावर अनेक अत्याचार केले. त्यामुळे तो धर्म नष्ट झाला नसला, तरी त्यात पूर्वीचे चैतन्य उरले नाही. कालांतराने तमिळ हिंदूंच्या प्रभावामुळे बौद्ध आचारधर्माला वेगळेच रूप प्राप्त झाले. हिंदूंच्या देवालयात व बौद्ध विहारांत दोन्ही धर्मांच्या देवमूर्ती दिसू लागल्या व त्यांची संयुक्त पूजा होऊ लागली. पराक्रमबाहू (२ रा) याच्या राजवटीत रत्नपूरजवळच्या एका मंदिराला महा-समन देवळे म्हणजे महा-श्रमण बुद्ध याचे मंदिर, असेच नाव देण्यात आले.

गेल्या शतकाच्या अखेरपर्यंत श्रीलंकेत बौद्ध धर्म कसा तरी जीव धरून होता; पण त्यानंतर सिंहली लोकांनी बौद्ध धर्माच्या इतिहासाचा व ग्रंथांचा अभ्यास जोमाने व आस्थेने सुरू केल्यामुळे त्याला ऊर्जितावस्था आली.

इ. स. १८१४ ते १९४८ पर्यंत ब्रिटिश सत्तेखाली राहिल्यानंतर ४ फेब्रुवारी १९४८ पासून सिलोन हे स्वतंत्र राज्य झाले आणि जून १९५६ मध्ये ते सार्वभौम प्रजासत्ताक झाले.

इ. स. १९६४ पासून सिंहली ही सिलोनची राष्ट्रभाषा ठरवण्यात आली आहे.

श्रीलंका हे नाव १९७२ मध्ये नव्याने धारण करून सिलोनच्या शासनाने आपला प्राचीन संस्कृतीचा अभिमान व्यक्त केला आहे. ही प्राचीन संस्कृती पूर्णपणे भारतीय संस्कृतीच आहे, यात संशय नाही.

**हवामान** – चारही बाजूंना समुद्र व मध्यभागी पर्वतराजी अशा भूरचनेमुळे सिंहलद्वीपाचे हवामान नेहमी समशीतोष्ण असते. तिथे ९५° फॅ. पेक्षा अधिक तपमान कधीच नसते. मधल्या डोंगराळ प्रदेशात तर ते कमीच असते. त्या पर्वतराजीत लहानमोठी १६ शिखरे असून, त्यांतले पिदुरुत लागलं हे सर्वांत उंच म्हणजे ८२८१ फूट आहे. त्या शिखराच्या जवळच ६००० फूट उंचीवर नेवार एलिय नामक थंड हवेचे ठिकाण आहे. त्याच्या एका टोकाला रामायणातील अशोकवन होते, असे म्हणतात. त्याला सीतावकं असे नाव आहे.

सर्वसाधारणपणे मेपासून जुलैपर्यंत श्रीलंकेत मोठा पावसाळा असतो. डोंगराळ भागात २०० इंच पाऊस पडतो. पावसाचे सरासरी मान ५० इंच आहे. नोव्हेंबर ते जानेवारीअखेर तिथे दुसरा पावसाळा असतो. त्यामुळे श्रीलंकेची हवा नेहमी चांगली असते आणि भूप्रदेश हिरवागार दिसतो. तिथली जमीनही सुपीक आहे. तांदूळ, चहा, कॉफी, रबर व नारळ हे पदार्थ तिथे मुख्यतः होतात. तांदूळ हेच तियले मुख्य अन्न आहे. वेलची, तंबाखू, कोको व कापूस ही पिकेही तिथे होतात.

पंचवीस हजार चौरस मैलांच्या या प्रदेशात सोळा नद्या वर्षभर दुथडी भरून वाहत असल्यामुळे देश समृद्ध झाला आहे. त्यांतील सर्वांत मोठी महाबली गंगा ही २०६ मैल लांब असून, ती त्रिकोमाली जवळ समुद्राला मिळते. कालू गंगा व केलनी गंगा या दोन नद्याही प्रसिद्ध आहेत.

श्रीलंका ही रत्नांची भूमी म्हणून प्रसिद्ध आहे. तिथे विविध प्रकारची रत्ने सापडतात. त्यांतील नील हे प्रमुख रत्न होय.

**उद्योगधंदे** – शेती हा इथला मुख्य उद्योग आहे. सुती कापड, सीमेंट, काच व चामडयाच्या वस्तू बनवणे, हे मोठे उद्योग आता सुरू झाले आहेत. चहा, कॉफी, नारळ व रबर या पदार्थांचे उत्पादन करून त्यांची निर्यात करणे, हा इथला सर्वांत मोठा उद्योग होय. हातमागावर वस्त्रे विणणे, चटया, टोपल्या, काचेच्या बांगडया, लाकूड व हस्तिदंत यांच्या सुंदर वस्तू आणि धातूंची भांडी बनवणे, अशा प्रकारचे कुटीरोद्योगही तिथे चांगले चालतात. तिथे निर्माण होणाऱ्या वस्तूंना परदेशांतही मोठी मागणी असते.

**प्रेक्षणीय स्थळे** – श्रीलंकेच्या दक्षिण किनाऱ्यावर गॉल

नावाचे शहर आहे. तिथे डचांनी बांधलेल्या भुइकोटाची भिंत व दीपस्तंभ अजूनही पाहायला मिळतात. बहुतेक परकीय आक्रमणे या ठिकाणच्या जवळपास झाली; म्हणून त्याला इतिहासात महत्त्व आहे. हे शहर कोलंबोपासून ७२ मैलांवर आहे. याच्या आसमंतात चहाचे व रबराचे बरेच मळे पाहायला मिळतात.

गॉल-कोलंबो मार्गावर हिक्कडुवां नावाचे एक ठिकाण आहे. तिथे समुद्रात कोरल रिफ म्हणजे समुद्राच्या तळाशी रंगीबेरंगी बाग पाहायला मिळते. अशी बाग अन्यत्र क्वचितच आढळते.

कोलंबो शहराची रचना युरोपातील शहराप्रमाणे सुंदर आहे. तिथे पोर्तुगीजांनी एक किल्ला बांधला होता. पण त्याचे अवशेषही आता दिसत नाहीत.

कोलंबोपासून ७२ मैलांवर डोंगरी प्रदेशात १७०० फूट उंचीवर कँडी शहर आहे. त्याच्या मध्यभागी एक सुंदर तळे व त्याच्या काठी बुद्धमंदिर आहे. त्या मंदिराला दालद मालीगव म्हणतात. त्या मंदिरात बुद्धाचा दात ठेवलेला असून, उत्सवात त्याचे दर्शन होते. सर्व जगातले बौद्ध लोक त्या उत्सवाला येऊन बुद्धदंताचे दर्शन घेतात.

कोलंबोपासून १२८ मैलांवर असलेले अनुराधपूर हे अत्यंत प्राचीन नगर आहे. हे बौद्धांचे पवित्र क्षेत्र मानले जाते. (अनुराधपूर पाहा).

तिथून जवळच मिहिनताला नामक टेकाडावर प्राचीन विहारांचे अवशेष आहेत. ते पाहायला १८४० पायऱ्या चढून जावे



प्राचीन विहारांचे अवशेष पाहण्यासाठी जाण्याचा सोपानमार्ग, अनुराधपूर

लागते. तिथून ३० मैल अंतरावर कलेबेला येथे बुद्धाची ४० फूट उंच भव्य मूर्ती आहे. ती जगातील बुद्धमूर्तीत सर्वांत उंच व उत्कृष्ट बुद्धमूर्ती मानली जाते.

श्रीलंकेमध्ये २०-२५ मोठी शहरे असून, त्यांतील बरीच शहरे समुद्राच्या किंवा नदीच्या किनाऱ्यावर असल्यामुळे त्यांचे सौंदर्य वाढले आहे. या देशातील सुपीक भूमी व हिरवीगार वनश्री यांमुळेही परदेशी लोक श्रीलंकेकडे आकृष्ट होतात. पाश्चात्य पद्धतीच्या सुधारणांतही हा देश फार वेगाने वाटचाल करीत आहे. तिथले बहुसंख्य नागरिक साक्षर आहेत आणि लोक सुबुद्ध व जागृत आहेत. [ हिं. इ. सि.; बु. ई. ए.; हिं. वि को.; मी पाहिलेला सिलोन, श्री. ज. पां. देशमुख, १९७४ ]

**श्रीवत्स** एक प्राचीन मंगल प्रतीक. हिंदू, बौद्ध व जैन या तिघांनाही ते आदरणीय आहे. श्रीवत्साने युक्त असा कौस्तुभ विष्णू आपल्या वक्षःस्थळांवर धारण करतो. बुद्ध व जैन तीर्थंकर यांच्या वक्षःस्थळावरही हे चिन्ह आढळते. हे महापुरुषाचे एक लक्षण मानलेले आहे. श्रीवत्स म्हणजे अंगावरील एक प्रकारचा केसयुक्त तीळ होय. उत्पलाने त्याचे रोमावर्त असे स्पष्टीकरण केले आहे. मोहेंजोदडो येथील उत्खननात हे सापडले आहे. मूर्तिशास्त्रात हे चिन्ह चतुर्दल पुष्पाने दर्शविले जाते आणि ते छातीच्या उजव्या बाजूवर असते. बौद्ध शिल्पात मंगल म्हणून ते यक्षिणीसह खिडकीच्या माथ्यावर कोरतात.

विष्णूला श्रीवत्सलांच्छन असे एक नाव आहे. या संबंधीची एक कथा ब्रह्मपुराणात दिली आहे, ती अशी –

श्राद्धदेवाला श्रीवत्स नावाचा एक पुत्र होता. त्याचे लग्न ठरले, त्या वेळी चातुर्मास होता. त्यामुळे विष्णू निद्रिस्त होता. श्रीवत्साला तर लग्नाची घाई झाली होती. म्हणून त्याने विष्णूला जागे करून विवाह करायचा असे ठरवले. त्याप्रमाणे तो क्षीरसागरात गेला व त्याने विष्णूच्या छातीवर लाथ मारून त्याला जागे केले आणि आपला विवाह उरकून घेतला. श्रीवत्साने लाथ मारली, त्याचे चिन्ह विष्णूच्या वक्षःस्थळावर आहे, म्हणून त्याला श्रीवत्सलांच्छन असे नाव मिळाले.

भृगूनेही विष्णूच्या वक्षावर लाथ मारली होती, असे पुराणात सांगितले आहे. [ डे. हिं. इ.; क. क. भाग १, पूर्वार्ध ]

**श्रीविद्या** तंत्रशास्त्रातली एक प्रमुख विद्या. ही विद्या ललिता, राजराजेश्वरी, षोडशी, महात्रिपुरसुंदरी, बाला व पंचदशी या नावांनीही प्रसिद्ध आहे. श्रीविद्या म्हणजे ब्रह्मविद्या किंवा ब्रह्ममयी विद्या होय. श्रीविद्या शब्दातील श्रीचा अर्थ लक्ष्मी असा नसून महात्रिपुरसुंदरी असा आहे, असे हरितायनसंहितेत व ब्रह्मांडपुराणात सांगितले आहे. महात्रिपुरसुंदरीचे तत्त्व प्रतिपादन करणारी जी विद्या, तीच श्रीविद्या होय. श्रीविद्येची उपासना केल्याने आत्मज्ञानाची प्राप्ती होते. ही उपा-

उपासना जर गुरुकृपेने प्राप्त झाली, तर व्यक्तीला लवकर मोक्ष मिळतो. मोक्षप्राप्तीसाठी कर्ममार्ग वगैरे इतर मार्ग अवलंबिले, तर त्यांत भोगाचा त्याग करावा लागतो. पण श्रीविद्येच्या उपासनेचे वैशिष्टय असे, की त्यात भोगाचा त्याग करावा लागत नाही. म्हणूनच म्हटलेले आहे –

> यत्रास्ति भोगो न च तत्र मोक्षः
> यत्रास्ति मोक्षो न च तत्र भोगः ।
> श्रीसुन्दरीसेवनतत्पराणां
> भोगश्च मोक्षश्च करस्थ एव ।।

अर्थ – जिथे भोग आहे, तिथे मोक्ष नाही आणि जिथे मोक्ष आहे, तिथे भोग नाही. पण महात्रिपुरसुंदरीची उपासना करणाऱ्यांचे भोग व मोक्ष हे एकत्रच असतात.

श्रीविद्या ही आत्मशक्ती आहे. ती कामेश्वरी या नावानेही प्रसिद्ध आहे. कामेश्वरी ही महाकामेश्वराच्या अंकावर विराजमान झालेली आहे. उपाधिरहित शुद्ध आत्मा हाच महाकामेश्वर होय. कामाख्या येथील देवतेला तांत्रिक लोक कामेश्वरी हेच नाव देतात. शिवाला ते कामेश्वर असे म्हणतात. कामेश्वरी देवीच्या चार हातांत पाश, अंकुश, इक्षुधनू व पंच पुष्पबाण ही आयुधे आहेत. पाश म्हणजे छत्तीस रोगांचे निदर्शक चिन्ह, अंकुश म्हणजे द्वेष, इक्षुधनू म्हणजे मन आणि पंचबाण म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पाच तन्मात्रा होत. आत्मशक्तीला जगदंबिका असेही आणखी एक नाव आहे.

श्रीविद्येची शक्ती ही गुणत्रयात्मक असल्याने तिला त्रिपुराशक्ती असेही म्हणतात. श्रीविद्येची ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती व इच्छाशक्ती अशी तीन रूपे आहेत, असे वामकेश्वरतंत्रात सांगितले आहे. इच्छाशक्ती हा शिरोभाग, ज्ञानशक्ती हा मध्यभाग व क्रियाशक्ती हा अधोभाग होय. त्रिपुरा हा शब्द रूढ होण्याचे आणखीही एक कारण आहे. मानवी शरीरात इडा, पिंगला व सुषुम्ना अशा तीन नाडया आहेत आणि त्यांचे वास्तव्य मन, बुद्धी व चित्त या तीन पुरांमध्ये आहे. म्हणून या शक्तित्रयीला त्रिपुरा असे म्हणतात. तसेच ती ब्रह्मा, विष्णू व महेश या तिघांची; तसेच ऋक्, यजु व साम या तीन वेदांची माता म्हणून व प्रलयकाळी भूः, भुवः व स्वः या तीन लोकांना गिळंकृत करणारी शक्ती म्हणून तिचे नाव त्रिपुरा असे रूढ झाले.

श्रीविद्येच्या उपासकांनी प्रतिदिन देवीची पूजा केली पाहिजे. उमानंदनाथाच्या नित्योत्सव या ग्रंथात देवीच्या पूजेचा विधी दिलेला आहे. पण पूजा करणे शक्य नसल्यास श्रीविद्याखड्गमाला या ग्रंथाचे पारायण करावे. कारण या पारायणाने पूजेचे फल मिळते, अशी परंपरागत श्रद्धा आहे. [ देवीकोश २; श्रीविद्याखड्गमाला; श्रीश्रीविद्यानित्यार्चन ]

**श्रीव्रत** (१) एक काम्य व्रत. याचा विधी असा – चैत्र शुद्ध तृतीयेला व्रतारंभ करून त्या दिवशी तूप-भातावर निर्वाह करावा आणि रात्री भूमीवर झोपावे. चतुर्थीला घराबाहेर म्हणजे नदी, तळे, इ. ठिकाणी स्नान करावे. पंचमीला कमळावर लक्ष्मीची मूर्ती ठेवून, तुपाचा दिवा लावून, तिची पूजा करावी. कमळाचा व कमळांच्या पाकळयांचा आणि बिल्वपत्रांचा श्रीसूक्ताने होम करावा. ब्राह्मणांना दूध व तूप वाढून भोजन घालावे. व्रतकर्त्याने हविष्यान्न भक्षण करावे. कालावधी एक वर्ष. फल – शक्ती, सौंदर्य व आरोग्य यांचा लाभ.

चैत्र शुद्ध पंचमीला लक्ष्मीची पूजा करावी, असाही एक पर्याय सांगितला आहे. [ हि. ध. ]

(२) हे व्रत सोळा वर्षांत पूर्ण होते. एका शुभ दिनी स्नान करून व्रताचा संकल्प करावा. सोन्याच्या, चांदीच्या अथवा तांब्याच्या पात्रावर केशरचंदनाने, डाळिंबाच्या लेखणीने श्री हे अक्षर लिहावे. मग त्याचे ईश्वरी, कमला, लक्ष्मी, चला, भूती, हरिप्रिया, पद्मा, पद्मालया, संपद, उच्चैः, श्री व पद्मधारिणी या नावांनी पूजन करावे. श्रीमंत्राचा पाच अथवा दहा सहस्र जप करावा. अशा प्रकारे नित्य एक वर्षभर हा विधी केला म्हणजे एक कला पूर्ण होते. अशा सोळा कला पूर्ण करायच्या असतात. फल – अचलश्रीप्राप्ती. [ व्र. प. ]

**श्रीशांती** मुलाच्या मुंजीच्या वेळी किंवा मुलीच्या विवाहाच्या वेळी तिची आई रजस्वला असल्यास ही शांती करावी लागते. हिचा विधी असा – पुण्याहवाचनादी कृत्ये झाल्यावर एका कलशावर पूर्णपात्र ठेवून श्रीदेवीची सुवर्णप्रतिमा स्थापन करून तिची पूजा करावी. मग अग्निस्थापना करून अग्निमुख करावे. प्रधान होमाच्या वेळी श्रीसूक्तातील मंत्रांनी पायसाच्या आहुती द्याव्या. यजमानाला अभिषेक करावा. आचार्याला दक्षिणा देऊन ब्राह्मणभोजन घालावे. [ ऋ. ब्र. स. ]

**श्रीशैल** द. भारतातले एक पुण्यक्षेत्र. बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक. तसेच एक शक्तिपीठ. आंध्रप्रदेशातल्या कर्नूल जिल्ह्यातील नंदीकोटकूर या तालुक्यात हे क्षेत्र येते. याला दक्षिण कैलास असेही म्हणतात. हे कृष्णेच्या पूर्व तीरावर वसले आहे. हे स्थान शिवाच्या आठ प्रमुख स्थानांपैकी एक समजतात.

श्रीशैल हा एक पर्वत असून, त्याची समुद्रसपाटीपासून उंची १५६३ फूट आहे. डोंगरमाथ्यावर सपाटी आहे. चारही दिशांना उंच उंच शिखरे आहेत. श्रीशैलावर जाण्यासाठी चार दिशांना चार द्वारे आहेत. पूर्वेला त्रिपुरांतक, पश्चिमेला अलंपूर, दक्षिणेला सिद्धवट आणि उत्तरेला महेश्वर. श्रीशैलाभोवतीच्या आठ

शिखरांना आठ रत्नांची नावे आहेत. या पहाडांच्या उतारा-वरून वाहणारे पाणलोट कृष्णेला येऊन मिळतात.

श्रीशैलाला नल्लमलै किंवा नुसते मलै (पर्वत) म्हणतात. कन्नड व तेलुगू वाङ्मयात पर्वत याच नावाने त्याचा उल्लेख येतो. पुराणे, महाभारत व काव्ये त्याला श्रीशैल म्हणतात. श्रीशैल या नावामागे एक आख्यायिका आहे, ती अशी –

श्री ही विष्णुपत्नी; पण इथे ती एक ऋषिकन्या होती. तिने या पर्वतावर तप केले. शिव तिला प्रसन्न झाला. तिने वर मागि-तला, की या पर्वताशी माझे नाव कायमचे निगडित असावे. शिव 'तथास्तु' म्हणाला. त्यामुळे हा पर्वत श्रीपर्वत किंवा श्रीशैल झाला.

पुराणकाली कार्तिकेय शिव–पार्वतींवर रुसला आणि या पर्वतावर येऊन राहिला. शिव–पार्वती दोघेही त्याच्या शोधासाठी इथवर आली. कार्तिकेयाला हे समजले आणि तो तिथून उठून क्रौंच पर्वतावर निघून गेला. पण शिव–पार्वती मात्र इथेच राहिली. शिव स्वयंभू लिंगाच्या रूपात तिथे गुप्तपणे वसला. या स्वयंभू लिंगाचा शोध लागला तो चंद्रावती नामक राजकन्येला.

चंद्रगुप्त राजाची कन्या चंद्रावती ही आपल्या काही दासींसह आणि गोधनासह कृष्णेच्या तीरावरील वनात राहत असे. बहुधा ती राजाची नावडती असावी. अशी कितीतरी वर्षे लोटली. एके दिवशी चंद्रगुप्त राजा रानात शिकारीला गेला असता चंद्रावती त्याला दिसली. राजा तिची ओळखही विसरला होता. एक अपरिचित तरुण स्त्री अशा समजुतीने तो तिच्याशी लगट करायला गेला. तेव्हा चंद्रावतीने त्याला शाप दिला, की 'तू कृष्णेत बुडून मरशील !'

तिथून मग ती श्रीशैलावर राहायला आली. तिचे गोधनही तिच्याबरोबर आले. एके दिवशी तिची एक गाय दूधच देईना. तिच्या कासेतच दूध नव्हते. असे रोजच व्हायला लागले. नंतर एके दिवशी चंद्रावतीने त्या गायीचा लग धरला. गाय कळपातून निघाली आणि झुडपातल्या एका लिंगावर उभी राहून सरसर दुधाच्या धारा सोडायला लागली. चंद्रावतीने मग ते लिंग साफसूफ केले. ती त्याच्या पूजेत तल्लीन झाली असता शिवाने तिला दर्शन दिले. तिने मल्लिका व अर्जुन यांच्या फुलांची माळ करून शिवाला ती सतत मस्तकी धारण करायला विनविले. शिवाने ते मानले. त्या दिवसापासून त्या लिंगाला मल्लिकार्जुन असे नाव मिळाले. ही कथा तिथल्या एका भिंतीवर कोरलेली आहे.

शिव इथे एका शिकाऱ्याच्या रूपात भटकत होता. त्याला या वनात एक तरुणी दिसली. व तिच्यावर भाळला. ती चेंचू या जमातीतली होती. शिवाने त्या तरुणीशी लग्न केले आणि तो चेंचू जमातीचा जावई झाला. या संबंधामुळे चेंचू लोक स्वतःला तिथल्या देवस्थानाचे रक्षक समजतात. उत्सवात देवाचा रथही तेच ओढतात. हीही दंतकथा तिथल्या भिंतीवर कोरून ठेवलेली आहे.



मल्लिकार्जुन – मंदिर, श्रीशैल

इथे सतीचा कंठ गळून पडला म्हणून हे शक्तिपीठ बनले. इथल्या शक्तीचे नाव भ्रमरांबा असे आहे. भ्रमरीच्या रूपात तिने महिषासुराला मारले, म्हणून तिला भ्रमरांबा हे नाव मिळाले. हिचे मंदिर मल्लिकार्जुनाच्या मागच्या अंगाला आहे.

मल्लिकार्जुनाचे देवस्थान २५ फूट उंचीच्या चार भिंतींच्या प्राकाराने वेष्टिले आहे. त्या भिंतींची दक्षिणोत्तर लांबी ६०० फूट असून, पूर्व–पश्चिम रुंदी ५०० फूट आहे. भिंती पाषाणाच्या आहेत. त्यांवर शैव पुराणांतील कथा, युद्धे, देवतांच्या मूर्ती, विविध पशू, इ. शिल्पे कोरलेली आहेत. इथे अनेक धातुमूर्तीही पाहायला मिळतात. त्यांमध्ये शिव-पार्वती, सोमस्कंद, नटराज व गणपती या मूर्ती उत्कृष्ट आहेत. इथली सर्व मंदिरे पूर्वा-भिमुख आहेत. मुख्य शिवलिंग आठ अंगुळे उंच आहे.

इथल्या गोपुरांपैकी पूर्वेचे व दक्षिणेचे ही गोपुरे साधी आहेत. विजयनगरच्या दुसऱ्या हरिहराने यांची पुनर्रचना केली. उत्तरे-कडील गोपुर उंच व शिल्पकलेने अलंकृत आहे. मुख्य मंदिर केव्हा बांधले गेले, याबद्दल काही माहिती मिळत नाही. बहुधा ते इ.स.च्या ८ व्या शतकातले असावे. प्राकारातच उत्तर अंगाला एक विस्तीर्ण वटवृक्ष असून, तो त्रिगुणित आहे. त्याच्या मागच्या अंगाला वृद्ध मल्लिकार्जुन आहे. त्याचे मंदिर मुख्य मंदिराच्याही शंभर वर्षे आधीचे असावे. मागचे भ्रमरांबेचे मंदिर १६ व्या शतकातले आहे. मल्लिकार्जुनमंदिराचे शिखर गोपुरांपेक्षाही अधिक उंच आहे. मल्लिकार्जुनाचे पुजारी लिंगायत असून, भ्रमरांबेचे पुजारी ब्राह्मण आहेत. लिंगायत लोक मल्लिकार्जुनाला लिंगचक्रवर्ती म्हणतात.

मल्लिकार्जुनाच्या उजव्या अंगाला पंडिताराध्याचा मठ आहे. पंडिताराध्य हा वीरशैवांच्या पंचाचार्यांपैकी एक होय.



मल्लिकार्जुन – मंदिराचे गोपूर, श्रीशैल

तो इथल्या शिवलिंगातून उत्पन्न झाला अशी आख्यायिका आहे. त्याची मूर्ती मानवी उंचीची आहे. मंदिराच्या उत्तर अंगाला कोपऱ्यात कल्याणमंडप आहे. त्यात शिव-पार्वतींच्या उभ्या मूर्ती असून, उत्सवात एके दिवशी इथे त्यांचा लग्नसोहळा साजरा होतो. मंदिराच्या पुढे मोठा सभामंडप असून, त्यात मोठा नंदी बसलेला आहे.

इथून जवळच नागलूटी नावाचे क्षेत्र आहे. हे स्थान आणि मल्लिकार्जुन यांच्यामध्ये उद्ध्वस्त मंदिराचे अनेक अवशेष दिसतात.

अमृतकुंड, घंटातीर्थ, मल्लिकाकुंड, कपालकुंड, सारंगतीर्थ, पापनाशन, देवन्हद, काशन्हद, इ. तीर्थकुंडे इथे आहेत.

कल्लू, अरसू, घंटा, विभूती, वीरभद्र व भिक्षावृत्ती हे इथले मठ असून ते वीरशैवांचे आहेत.

**पाताळगंगा** – मुख्य मंदिराच्या पूर्व द्वारातून एक रस्ता सरळ कृष्णा नदीकडे जातो. कृष्णेचे पात्र इथून दोन मैल आहे. इथला कृष्णेचा प्रवाह सुमारे ८०० फूट खोल दरीतून वाहतो, म्हणून इथे कृष्णेलाच पाताळगंगा म्हणतात. तिथवर पोचायला ८५२ पायऱ्या उतराव्या लागतात. परतताना तेवढयाच चढणे भाग असते. मधे काही विश्रामस्थाने बांधलेली आहेत. तिथे यात्रेकरू थोडा वेळ विसावतात. पाताळगंगेत स्नान करणे विशेष पुण्यप्रद मानलेले आहे. तिथे स्नान करून वर येणाऱ्या कोणत्याही जातीच्या स्त्री-पुरुषांना गाभाऱ्यात जाऊन मल्लिकार्जुनाची पूजा करता येते. वीरशैव लोक पाताळगंगेतल्या प्रत्येक वाळूच्या कणाला शिवलिंगरूप मानतात. ते आपल्या हृदयावर जे शिवलिंग धारण करतात, ते पाताळगंगेतून घेतलेले असते.

**अंबाजी** – हे देवीमंदिर मुख्य मंदिरापासून दोन मैलांवर आहे. हे स्थानही एक शक्तिपीठ मानले जाते. हे मंदिर प्राचीन असून भव्य आहे. त्याच्या आसपास प्राचीन मठ-मंदिरांचे भग्नावशेष आहेत.

**हाटकेश्वर** – इथून ६ मैलांवर हे स्थान आहे. इथून मल्लिकार्जुनाचा कळस दिसतो.

**बिल्ववन** – हेही इथून ६ मैलांवर असून, तिथे एकम्मा देवीचे मंदिर व एक वाहते तीर्थकुंड आहे.

श्रीशैलावर एक वीरशिरोमंडप होता. उग्र शैव या मंडपात आपले शिरकमळ किंवा जीभ देवाला अर्पण करीत. इथे केलेली आत्महत्या दोषास्पद नसून मोक्षप्रद मानलेली आहे. अशा आत्मत्यागाला कनू मारी असे म्हणत. श्रीशैलावरच्या कर्मारीश्वर या टेकडीवरून हे उग्र शिवभक्त स्वत:ला लोटून देत. शिवाजीमहाराज इथे मल्लिकार्जुनाच्या दर्शनाला आले असता त्यांनाही आपले शिरकमल देवाला वाहण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली होती. पण बरोबर असलेल्या त्यांच्या प्रधानांनी मोठ्या मिनतवारीने त्यांना त्या गोष्टीपासून परावृत्त केले आणि देशावरचे एक महान संकट टाळले.

**उत्सवसमारंभ** – महाशिवरात्रीला श्रीशैलावर मोठा उत्सव असतो. शिवरात्रीच्या आधी पाच दिवस तो सुरू होतो व वैशाखापर्यंत चालतो. याच कालावधीत भ्रमरांबेचाही उत्सव होतो. या दोन्ही उत्सवांना इथे हजारो यात्रेकरू जमतात. मंगळवार व शुक्रवार या वारी भ्रमरांबेची महापूजा बांधतात.

**इतिहास** – पुराणांतरी श्रीशैलाचे अनेक उल्लेख आढळतात. अर्जुन आपल्या तीर्थयात्रेत श्रीशैलाच्या दर्शनाला आला होता,



मंदिरातील एक भित्तिचित्र, श्रीशैल

असे महाभारतात सांगितले आहे. या क्षेत्राचा इतिहासातला पहिला उल्लेख नासिक येथील एका शिलालेखात झाला आहे. हा शिलालेख गौतमीपुत्र सातकर्णी याचा आहे. इ. स. च्या

प्रारंभी हा पर्वत सातवाहनांच्या राज्यात होता. तिसऱ्या शतकाच्या पहिल्या चरणात इक्ष्वाकुराजांनी सातवाहनांचा पाडाव करून श्रीशैलाची सत्ता मिळवली. पुढे पल्लवराजा सिंहवर्मा याने इक्ष्वाकूंची सत्ता नष्ट केली. तेव्हा श्रीशैल त्याच्या ताब्यांत गेला. सिंहवर्म्याने तिथे बरीच ब्राह्मण कुटुंबे आणून वसवली. पुढे हा प्रदेश विष्णुकुंडिन राजघराण्याच्या ताब्यात गेला. त्यानंतर चोळ, राष्ट्रकूट व चालुक्य या राजवटी आल्या. चालुक्यानंतर काकतीय राजे आले. त्यांच्यापैकी प्रतापरुद्रदेव याने इथे स्वतःची सुवर्णतुला केली. याच राजाचा एक प्रधान वेतेपी कोमय्या याने मल्लिकार्जुनाच्या पूजेअर्चेसाठी काही जमीन इनाम दिली व ती कल्लुमठाच्या स्वाधीन केली. त्यानंतर ही इनाम जमीन अरसुमठाच्या ताब्यात आली.

त्यानंतर आंध्र देश विजयनगरच्या अधिसत्तेखाली आला. पुढे कोंडविडूच्या प्रोलय वेम या रेड्डी राजाने देवालयांवर सुवर्णकळस चढवले व पाताळगंगेवर पायऱ्या बांधल्या. बुक्कराजाने श्रीशैलाची व्यवस्था रावेल घराण्याकडे सुपूर्त केली. हरिहराने देवाचा मुखमंडप बांधला. त्याची राणी विठलांबा हिने पाताळगंगेवर घाट बांधला. पुढे विष्णुदेवरायाने श्रीशैलाचे एक स्वतंत्र राज्यच बनवले.

पुढे मुसलमानी अमदानीत देवालयाची गावे आणि इनाम जमिनी सरकारजमा झाल्या. धर्मांतराच्या आणि प्राणांच्या भयाने श्रीशैलावरचे सगळे लोक स्थलांतर करून निघून गेले. तिथले सर्व उत्सवसमारंभ बंद पडले. श्रीशैल उजाड झाला. इ. स. १६७७ साली शिवाजीमहाराज इथे दर्शनार्थ आले. त्यांना श्रीशैलाचा तो भेणेभाव पाहवला नाही. त्यांनी तिथे देवस्थानाच्या रक्षणासाठी सैन्याची एक तुकडी ठेवून दिली. पुढे हे देवस्थान मोगलांच्या ताब्यात गेले. इ. स. १८२४ साली ते हैदराबादच्या निजामाच्या आधीन झाले. पुढे इंग्रजांचे राज्य आले. ईस्ट इंडिया कंपनीने हा सारा मुलुख आपल्या ताब्यात घेऊन त्याची सर्व मालमत्ता पुष्पगिरीच्या मठाच्या स्वाधीन केली. स्वातंत्र्यानंतर हे देवस्थान आंध्रप्रदेश सरकारने आपल्या ताब्यात घेतले.

**सांस्कृतिक संबंध** – इथे अनेक योग्यांनी आत्मसाधना केली आहे. पुराणकाळी हे ब्राह्मणपुरस्कृत शैव धर्माचे केंद्र होते. ते शक्तिसहित शिवाची उपासना करीत. अघोरपंथी कापालिकांनीही इथे आपला अड्डा जमवला होता. आद्य शंकराचार्यांच्या काळापर्यंत ते इथे ठाण मांडून होते. शंकराचार्य इथे आले असता इथला एक भैरव त्यांच्यावर चालून आला होता. तो भैरव म्हणजे कापालिकच होय. चैत्यवादी बौद्धांचे पूर्वशैलीय व अपर शैलीय असे दोन निकाय आहेत. ही दोन नावे श्रीशैलाच्या पूर्वपश्चिमेच्या पर्वतांवरून पडली आहेत.

नागार्जुन हा बौद्ध महापंडित इथे आला आणि इथेच आपले रासायनिक प्रयोग करून 'रससिद्ध' बनला. रसपुट हा त्याचा त्या शास्त्रावरचा ग्रंथ इथेच निर्माण झाला. इथली माती, पाणी, वनस्पती आणि खनिज द्रव्ये ही रासायनिक प्रयोगांना विशेष अनुकूल अशी वाटल्यामुळे रसरत्नसमुच्चयात या स्थानाला रससाधनेचे केंद्र म्हटले आहे. बौद्धांच्या मंत्रयान व वज्रयान या संप्रदायांचा उगम इथेच झाला. वज्रयान पंथात श्रीशैलाला वज्रपर्वत म्हटले आहे. डॉ. रा. चिं. ढेरे लिहितात–



एक भित्तिचित्र, श्रीशैल

"बौद्धांच्या या तांत्रिक साधना-संप्रदायांनी श्री-पर्वतावरचे वातावरण रहस्यमय बनवले होते. सिद्ध नागार्जुनाची साधनसामुग्री हीच. बौद्ध तांत्रिकांचा प्रभाव ओसरू लागल्यानंतर शैव आणि शाक्त तांत्रिकांनी श्रीपर्वतावर आपले साम्राज्य पसरविलेले दिसते. सर्व ऋतूंत फुले फुलविणारा हर्षाच्या रत्नावलीतील अधार्मिक हा श्रीपर्वतवासीच होता. भवभूतीच्या मालतीमाधवातील अघोरघंट हा कापालिक श्रीपर्वतावरच अघोरी साधना करणारा होता. बाणाच्या कादंबरीतील जरठ द्रविड श्रीपर्वतावरील रहस्यमय वातावरणाच्या हजारो गोष्टी जाणत होता. वीरशैवांचे तर ते एक महत्त्वपूर्ण केंद्र होते."

वीरशैवांच्या पाच महत्त्वाच्या क्षेत्रांतले श्रीशैल हे एक महत्त्वाचे क्षेत्र आहे. रेवणसिद्ध, अक्क महादेवी, मलाम्मा, इ. वीरशैव संतांनी मल्लिकार्जुन व भ्रमरांबा यांची अनन्य साधारण भक्ती केली. कित्येक वीरशैव कवींनी श्रीशैलवर्णनाचे काव्यग्रंथ इथेच बसून लिहिले. नाथपंथाची उदयभूमी म्हणून त्यांच्या ग्रंथातून वर्णिलेले कदलीवन म्हणजे श्रीशैलाचाच परिसर होय. महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर हे ऋद्धिपुराहून इथे आले आणि बारा वर्षे इथे राहिले. त्यांना मुक्ताबाई नावाची योगिनी भेटली ती इथेच.

दत्तावतार श्रीनृसिंहसरस्वती श्रीशैलावर दर्शनासाठी आले

होते, असे वर्णन गुरुचरित्राच्या ४३ व्या अध्यायात आहे. ५२ व्या अध्यायात त्यांचे प्रयाण वर्णिले आहे. या भागात आल्यावर कर्दळीपर्णावर फुलांचे आसन तयार करून त्यावर स्वामी आसनस्थ झाले आणि पाताळगंगेच्या प्रवाहावर तरंगत पैलतीराला जात असता मधेच गुप्त झाले, असे तिथे सांगितले आहे.

काही दशकांपूर्वी श्रीशैलाचा रस्ता अत्यंत अवघड होता. डोंगराचा चढउतार आणि घनदाट अरण्य यांमुळे तो मार्ग दुर्गम झाला होता. या अरण्याच्या आश्रयाने लुटारू लोकही राहत आणि ते पुष्कळदा यात्रेकरूंना मारहाण करून लुबाडीत. त्यामुळे यात्रेकरू श्रीशैलाची यात्रा मुठीत जीव धरून आणि समूहाने करीत. पण अलिकडे ही अडचण उरली नाही. श्रीशैलावर जाण्यासाठी आता अनेक मार्ग उपलब्ध आहेत. सर्व मार्गांवरून वाहनांची सोय आहे. आता तिरुमलै, कर्नूल, गुंटकल, हैद्राबाद अशा अनेक मार्गांनी श्रीशैलावर जाता येते.

श्रीशैल – देवस्थान समितीने तिथे विश्रामगृहे बांधली आहेत आणि अनेक सोयी केल्या आहेत. इतरही निवासस्थाने आणि भोजनगृहे तिथे आहेतच. [ संस्कृतिसुगंध; श्री. द. दि. कुलकर्णी – पुरुषार्थ, फेब्रुवारी १९७३ ]

**श्रीसंप्रदाय** एक वैष्णव संप्रदाय. रामानुजाचार्य हे या संप्रदायाचे प्रधान संस्थापक होते. त्यांच्या नंतर त्यांच्या चौथ्या किंवा पाचव्या शिष्यपरंपरेत स्वामी रामानंद हे आचार्य झाले. त्यांनी या संप्रदायाचा विशेष प्रचार केला. म्हणून याला रामानंद संप्रदाय व त्याच्या अनुयायांना रामानंदी असेही म्हणतात. या संप्रदायाचे दार्शनिक मत विशिष्टाद्वैत या नावाने प्रसिद्ध आहे. पाहा – विशिष्टाद्वैत. [ भा. द.; ना. पं. नि. सं. ]

**श्रीसूक्त** एक लक्ष्मीप्रद सूक्त. हे २५ ऋचांचे आहे. ऋग्वेदाच्या ५ व्या मंडलाच्या अंती ते परिशिष्ट म्हणजेच मागाहून जोडलेले आहे. पण तरीही हे सुमारे तीन हजार वर्षांपूर्वीचे असावे. कारण यास्क व शौनक यांनी त्याचा उल्लेख केला आहे. 'हिरण्यवर्णाम्' ही या सूक्ताची पहिली ऋचा असून, 'तां म आवह' ही १५ वी ऋचा आहे. १५ ऋचांच्या पुढे १६ ते २५ अशा १० ऋचा आहेत. एकूण हे सूक्त २५ ऋचांचे आहे. १६व्या ऋचेत श्रीसूक्ताचे विधान असून, १७ ते २५ या ऋचा फलश्रुतीच्या आहेत. शेवटचा मंत्र लक्ष्मीच्या प्रार्थनेचा अतएव आशीर्वादात्मक आहे.

या सूक्ताची पहिली ऋचा लक्ष्मीच्या नावावर असून, पुढील १४ ऋचांचे ऋषी आनंद, कर्दम, चिक्लीत व इंदिरासुत हे आहेत. पहिल्या ३ ऋचांचा छंद अनुष्टुप्, चौथीचा बृहती, पाच व सहा या ऋचांचा त्रिष्टुप् व पुढील आठ ऋचांचा प्रस्तारपंक्ती आहे. श्री आणि अग्नी या देवता आहेत. अक्षय टिकणाऱ्या लक्ष्मीचा महिमा यात वर्णिला आहे.

प्रत्येक वेदात श्रीसूक्त आहे. वर उल्लेखलेले श्रीसूक्त ऋग्वेदातले आहे. 'रथे अक्षेषु वृषभस्य वाजे' हे चार ऋचांचे श्रीसूक्त यजुर्वेदातले, 'श्रायंतीय' हे सामवेदातले व 'श्रियं धातुर्मयि धेहि' हे अथर्ववेदातले आहे.

श्रीसूक्ताने लक्ष्मीची स्तुती करावी असा निर्देश अग्नी, विष्णू व ब्रह्मांड या पुराणांत आहे. सर्व पुराणांत हे सूक्त लक्ष्मीवर्धक असल्याचे सांगितले आहे. राज्याभिषेकसमयी या सूक्ताचा विनियोग राजाची लक्ष्मी चिरकाल टिकावी, याच उद्देशाने होत असे. लक्ष्मीच्या प्राप्तीची इच्छा करणारे भाविक लोक आजही श्रीसूक्ताचे पुरश्चरण करतात.

**पुरश्चरणविधी** – शुभदिनी संकल्प, पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध, देवतास्थापन व देवीची महापूजा करून पुरश्चरणाला प्रारंभ करावा. एकूण जपसंख्या व प्रत्येक दिवसाची जपसंख्या निश्चित करावी. जपाची जागा एकच असावी. रोजचा जप पुरा झाल्यावर तो देवीला निवेदन करावा. निश्चित केलेली जपसंख्या पुरी झाल्यावर तद्दशांश होम करावा. होमासाठी त्रिमधुरयुक्त कमळे, तूप घातलेला पायस, बेलाच्या समिधा आणि तूप ही हविर्द्रव्ये घ्यावी. प्रत्येक द्रव्याच्या तीनशे आहुती श्रीसूक्ताच्या प्रत्येक ऋचेने द्याव्या. होमानंतर तद्दशांश तर्पण, तद्दशांश मार्जन व तद्दशांश ब्राह्मणभोजन घालावे.

श्रीसूक्तावर विद्यारण्य, पृथ्वीधर व श्रीकंठ यांची भाष्ये असून, काही टीकाही आहेत. [ श्रीविंध्यवासिनी माहात्म्य – वि. कृ. रेळे; श्रीसूक्तविधानम् – ना. वा. जोशी ]

**श्रीहर्ष** (इ. स. चे १२ वे शतक) एक संस्कृत महाकवी. नैषधीयचरित या महाकाव्याचा कर्ता. या कवीचे वैशिष्ट्य असे, की याने नैषधीयचरिताच्या प्रत्येक सर्गाच्या शेवटी व ग्रंथसमाप्तीनंतर मुद्दाम रचलेल्या चार श्लोकांत स्वतःबद्दल माहिती दिली आहे. त्यावरून त्याचे चरित्र कळते ते असे –

कवीश्वरांच्या मुकुटातला हिराच असा हीर नावाचा पंडित श्रीहर्षाचा पिता व मामल्लदेवी ही त्याची माता होती. विशेष गौरवाचे चिन्ह म्हणून कान्यकुब्जाच्या राजाकडून त्याला दोन विडयांचा मान व अग्रासन मिळाले होते. श्रीहर्षाने ज्या कान्यकुब्जाच्या म्हणजे कनोजच्या राजाचा उल्लेख केला आहे, तो विजयचंद्राचा पुत्र जयंतचंद्र असावा. पाचव्या सर्गाच्या शेवटी विजयप्रशस्ती नामक ग्रंथ आपण लिहिल्याचे श्रीहर्ष सांगतो. ती प्रशस्ती या विजयचंद्राचीच असावी. त्याचा मुलगा जयंतचंद्र

म्हणजे गाहडवाल राजपूत जयचंद राठोड होय. त्याने आपल्या शूर व दिग्विजयी पित्यानंतर कनोजचे राज्य केले (इ. स. ११६९–११९३). वाराणसी ही गाहडवाल राजांची दुसरी राजधानी होती. या जयचंदाच्या दरबारात श्रीहर्ष हा राजपंडित होता. त्याने आपले नैषधीयचरित इ. स. ११९३ ते ११९५ या कालखंडाच्या सुमारास लिहिले असावे.

श्रीहर्षाने विजयप्रशस्ती, खंडनखंडखाद्य, गौडोर्वीशप्रशस्ती, अर्णववर्णन, छिंदप्रशस्ती, शिवशक्तिसिद्धी आणि नवसाहसांकचरितचंपू असे सात ग्रंथ लिहिले आहेत. श्रीहर्षाला चिंतामणी मंत्राच्या जपाने काव्यस्फूर्ती होत असे. काव्य व तर्क या दोहोंतही त्याची बुद्धी चालत असे. तो जितेंद्रिय व अत्यंत मातृभक्त असून, मातेच्या चरणांवरील फुले तो मस्तकी धारण करीत असे. काश्मीरसारख्या विद्यापीठातील पंडितप्रकांडांनी त्याची कसून परीक्षा घेतली व त्यांच्या कसोटीला तो पूर्णपणे उतरल्याने त्यांनी त्याचा जयजयकार केला. काव्यरचनेचा एक नवीनच मार्ग त्याने चोखाळला. त्याची वाणी शरच्चंद्रासारखी विशद व रसोत्कट आहे. शृंगार हा त्याचा सिद्ध रस होय. नैषधीयाचा प्रत्येक सर्ग निसर्गोज्ज्वल म्हणजे स्वभावसुंदर आहे, असा त्याचा विश्वास आहे. त्याला योगसमाधीत परब्रह्माचा साक्षात्कार होत असे. याशिवाय, स्थैर्यविचारणप्रकरण व ईश्वराभिसंधी असे दोन ग्रंथही त्याने लिहिले.

श्रीहर्षाने ठिकठिकाणी केलेल्या या उल्लेखांवरून कविमंडळीतील तो एक मोठाच कवी होता, असे दिसते. उज्ज्वल कवित्व आणि गाढ पांडित्य यांच्या जोडीला विशाल ग्रंथकर्तृत्व, तर्क आणि वेदान्त यांच्या रुक्ष घटपटादी खटपटीबरोबर मृदू मातृभक्त अंतःकरण, प्रापंचिक वैभवाबरोबर ब्रह्मसाक्षात्कार, पंडितमान्यतेबरोबर राजमान्यता, जड पढिक विद्वत्तेबरोबर नवे काही करू पाहणारी तल्लख प्रज्ञा, असे दुर्मिळ गुण त्याच्या ठिकाणी एकत्र आले होते. म्हणूनच नैषधकाव्याची प्रभा फाकल्यावर 'उदिते नैषधे काव्ये क्व माघः क्व च भारविः' माघ आणि भारवी यांसारखे पंडित कवी हतप्रभ होऊन गेले, असे पंडितांना वाटू लागले.

आपल्या काव्याचे वैशिष्ट्य, त्याच्या रचनेचा हेतू व त्यावर दुर्बोधपणाचा आक्षेप घेणारे टीकाकार यांच्यासंबंधी श्रीहर्षाने तडफदारपणे आपल्या काव्याच्या शेवटी लिहिले आहे. तो म्हणतो –

तरुणी तरुणांचेच अंतःकरण खेचून घेते. बालांना तिचे आकर्षण कसे वाटावे ? माझी वाणी ही खऱ्या पंडित रसिकांचेच अंतरंग खुलवील. बालिश अरसिकांना तिचे रमणीयत्व काय होय ! थोडे पंडित माझ्यावर खूष असले म्हणजे झाले. मग असंख्य अडाण्यांनी माझा अनादर केला तरी मला त्याची पर्वा नाही.

माझ्या काव्याचा अर्थ सहजपणे कोणालाही लावता येऊ नये म्हणून मी मुद्दाम ठिकठिकाणी शब्दार्थाच्या निरगाठी मारून ठेवल्या आहेत. ज्याने गुरुसंप्रदायानुसार अर्थविवरणपद्धतीचा अभ्यास श्रद्धापूर्वक केला आहे, अशाच प्रयत्नशील व सहृदय व्युत्पन्नाने माझ्या काव्यसरोवरात उसळणाऱ्या लाटांवर यथेच्छ पोहण्याचे सुख अनुभवावे.

या त्याच्या उद्‌गारांवरून श्रीहर्षाचा जबरदस्त आत्मविश्वास प्रगट होतो.

श्रीहर्षाच्या काव्यात श्लेष, यमक, अनुप्रास, इ. शब्दालंकार व विविध अर्थालंकार; रस, ध्वनी, वक्रोक्ती. इ. काव्यजीविते; वैद्यक, कामशास्त्र, राज्यशास्त्र, धर्म, न्याय, ज्योतिष, व्याकरण, वेदान्त, इ. सर्व परंपरागत शास्त्रीय ज्ञान इतके ठासून भरले आहे, की या काव्याला शास्त्रकाव्य असे म्हणण्याची प्रथा आहे. तसेच, या काव्याच्या परिशीलनामुळे अभ्यासकाला हरतऱ्हेचे शास्त्रीय ज्ञान, शब्दव्युत्पत्ती, व्यवहार व सांस्कृतिक विशेष यांचे, काव्यगुणांच्या मधुर अनुपानासह सेवन केल्याचे भाग्य लाभते. त्याची मनबुद्धी निकोप आणि सुदृढ बनते. म्हणून नैषधीयाला 'नैषधं विद्वदौषधम्' (= विद्वानांचे बलवर्धक औषध) असे म्हणतात. नैषधीय वाचताना वाचकाच्या व्युत्पत्तीची व रसिकतेची खरी कसोटी लागते. या काव्याचे बरेच श्लोक पहिल्या वाचनाने कळत नाहीत. कित्येक श्लोक तर खालची टीका वाचूनही उलगडत नाहीत. तत्कालीन पंडित वाचकांच्या अभिरुचीला अनुसरून श्रीहर्षाने आपले काव्य रचले असावे, असे वाटते.

श्रीहर्षाने लिहिलेल्या नऊ ग्रंथांत चार-पाच राजस्तुतिपर आहेत. त्याच्या विजयप्रशस्तीत जयचंद्राचा पिता राजा विजयचंद्र याची स्तुती आहे. छिंदप्रशस्तीत गयेतील छिंदराज घराण्यातल्या छंदस राजाचे स्तवन आहे. गौडोर्वीशप्रशस्तीत गौड देशाच्या पहिल्या महीपाल राजाचे व नवसाहसांकचरितचंपूत माळव्याच्या सिंधू राजाचे वर्णन आहे. अर्णववर्णन काव्यात समुद्राचे वर्णन असावे असे वाटते. पण श्री. भांडारकरांच्या मते हेही एका राजाचेच वर्णन आहे. खंडनखंडखाद्य हा वेदान्तावरील एक अत्यंत कठीण ग्रंथ असून, त्यात उदयनाचार्यांच्या मतांचे खंडन आहे. शिवशक्तिसिद्धीत शिवपूजारहस्य सांगितले आहे. स्थैर्यविचारणप्रकरण व ईश्वराभिसंधी हे ग्रंथ वेदान्तपर आहेत. या ग्रंथांपैकी खंडनखंडखाद्य हा एकच ग्रंथ सांप्रत उपलब्ध आहे. नैषधीयचरित या उपलब्ध काव्याचा विस्तारही असाच मोठा आहे. त्यात बावीस सर्ग व अठ्ठावीसशे चार श्लोक आहेत. हेही काव्य अपूर्ण असून, खऱ्या पूर्ण नैषधीय काव्याचे साठ किंवा

एकवीस सर्ग होते, असे सांगतात. या भारदस्त काव्याचे आणखी एक वैशिष्ट्य असे, की यात दुसऱ्या कोणत्याही महाकाव्यापेक्षा जास्त विनोद आहे.

श्रीहर्षाविषयी एक आख्यायिका रूढ आहे, ती अशी –

श्रीहर्षाचा पिता हीर पंडित हा विजयचंद्राच्या दरबारी कवी म्हणून होता. एकदा उदयन नावाच्या एका कवीबरोबर काव्यरचनेची चढाओढ करीत असता हीर पराभूत झाला. ही गोष्ट त्याच्या मनाला फार लागली. म्हणून मृत्युसमयी त्याने श्रीहर्षाला जवळ बोलावून सांगितले, 'तू राजसभेत उदयनाचा पराभव कर.' श्रीहर्षाने ही पित्याची शेवटची इच्छा मान्य केल्यावर त्या मानी पंडिताने समाधानाने प्राण सोडला. त्यानंतर श्रीहर्ष परप्रांती गेला व त्याने अनेक गुरूंजवळ अनेक शास्त्रांचे उत्तम अध्ययन केले. गंगातीरी एका गुरूकडून त्याने चिंतामणी मंत्र घेतला. त्रिपुरादेवीही त्याच्यावर प्रसन्न झाली. यानंतर त्याने खंडनखंडखाद्य नावाचा उदयनाची मते खंडन करणारा वेदान्तपर ग्रंथ लिहिला. पाहा–नैषधीयचरित. [ सं. का. पं. प्रा.; सं. क. द. ]

**श्रुतकक्ष** आंगिरस कुळातील एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील ब्याण्णव क्रमांकाचे सूक्त याच्या नावावर आहे. इंद्र व सोम यांची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. श्रुतकक्षाने गायी व घोडे यांच्या प्राप्तीसाठी इंद्राची स्तुती केली असावी, असे वाटते (८.९२.२५). याच ऋचेत त्याचे नावही आढळते. याची एक ऋचा (८.९२.११) अशी –

अयाम धीवतो धियोऽर्वद्भिः शक्र गोदरे। जयेम पृत्सु वज्रिवः।

अर्थ – ध्यानमग्न भक्तांना ध्यानसाधने प्राप्त करून देणाऱ्या, पर्वताचा भेद करणाऱ्या, वज्रधारी आणि अश्वयुक्त हे इंद्रा, तू आम्हांला विजय प्राप्त करून दे.

हा एका सामाचाही द्रष्टा आहे (पं. ब्रा. ९.२.७). प्रस्तुतचे सूक्त सुकक्ष आंगिरस याच्याही नावावर आढळते. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ.; म. ज्ञा. को., बुद्धपूर्व जग ]

**श्रुतकीर्ती** (इ. स. चे १६ वे शतक) एक जैन साधू व विद्वान. हा दिगंबरसंप्रदायी भट्टारक असून, नंदी संघाच्या बलात्कारगणाचा अनुयायी होता. त्रिभुवनकीर्ती हा याचा गुरू होय. श्रुतकीर्तीने माळव्यातील जेरहट गावच्या नेमिनाथमंदिरात हरिवंशपुराण, परमेष्ठीप्रकाशसार, योगसार व धर्मपरीक्षा हे अपभ्रंश भाषेतील चार ग्रंथ रचले. हरिवंश पुराण हे पौराणिक महाकाव्य आहे. त्यात सत्तेचाळीस संधी असून, तीर्थंकर नेमिनाथाचे चरित्र आणि संक्षिप्त महाभारतकथा सांगितली आहे. परमेष्ठीप्रकाशसारात सृष्टिरचना व आत्मतत्त्व यांचे वर्णन आहे. योगसार या लघुकाय रचनेत गृहस्थाचे आचार सांगितले आहेत, तर धर्मपरीक्षा ही धार्मिक रचना आहे. [ अ. सा.; मालविका – संपा. वि. श्री. वाकणकर, डॉ. सुरेंद्रकुमार आर्य ].

**श्रुतदेवी** एक जैन देवता. जैनांच्या सोळा विद्यादेवतांची ही स्वामिनी आहे. तिचे वर्णन पुढीलप्रमाणे – गौरवर्ण शुभ्र वस्त्र धारण करणारी, हंसवाहना (दिगंबरमते मयूरवाहना), शुभ्र सिंहासनावर बसलेली आणि चतुर्भुज. तिच्या हातांत वीणा, कमल, पुस्तक व माला ही आयुधे आहेत.

जैन लोक कार्तिक शुद्ध पंचमीला हिची विशेष पूजा करतात. त्या तिथीला ज्ञानपंचमी किंवा जन्मपंचमी अशी नावे आहेत. श्रुतदेवीची द्विभुज मूर्ती लखनौच्या संग्रहालयात आणि चतुर्भुज मूर्ती देवगढच्या किल्ल्यात आढळते.

भगवान जिनसेनाचार्य, महाकवी पुष्पदंत, श्रीअमितगती, आचार्य सोमदेव, वसुनंदी, इ. प्राचीन जैन आचार्यांनी या देवीचे माहात्म्य वर्णिले आहे. [ जैं. इ.; जैं. भ. का. पृ.; देवीकोश. ]

**श्रुतपंचमी व्रत** एक जैन व्रत. ज्येष्ठ शुद्ध पंचमीला उपवास करून हे व्रत करतात. व्रतकालात 'ॐ ह्रीं द्वादशाङ्गश्रुतज्ञानाय नमः' या मंत्राचा त्रिकाल जप करायचा असतो. हे व्रत पाच वर्षे करायचे असते.

या तिथीला आचार्य भूतबलीने षट्खंडागम या महान ग्रंथाची रचना पूर्ण केली व त्याचे पूजन केले. तेव्हापासून ही तिथी श्रुतपंचमी या नावाने प्रसिद्ध झाली आणि जैन लोक त्या दिवशी श्रुतपूजन करतात. [ जैं. व्र. वि. सं. ]

**श्रुतविद् आत्रेय** अत्रिकुळातील एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील बासष्टावे सूक्त याने रचले आहे. ऋग्वेदात अन्यत्रही याचा उल्लेख (५.४४.१२). आढळतो मित्रावरुणांची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा (५.६२.५) अशी –

अनु श्रुताममतिं वर्धदुर्वीं बर्हिरिव यजुषा रक्षमाणा।
नमस्वंता धृतदक्षाधि गर्ते मित्रासाथे वरुणेळास्वन्तः॥

अर्थ – यज्ञरक्षक वेदज्ञानाप्रमाणे पृथ्वीचा उत्कर्ष आणि अन्नसमृद्धी साधणाऱ्या हे सामर्थ्यसंपन्न मित्रावरुणांनो, स्वतःच्या रथाने तुम्ही यज्ञस्थानी या. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**श्रुतसागर** (इ. स. चे १६ वे शतक) एक जैन आचार्य. हा दिगंबर पंथाच्या सरस्वतीगच्छाचा होता. याच्या गुरूचे नाव विद्यानंदी होते. श्रुतसागराने आपल्याला ब्रह्म श्रुत-

सागर अथवा देशयती श्रुतसागर असे म्हटले आहे. हा मोठा विद्वान होता. त्याने टीकाग्रंथांचीच रचना खूप केली असून, त्यांतही मूळ ग्रंथांपेक्षा टीकेलाच अधिक प्राधान्य दिले आहे. त्याचे काही टीकाग्रंथ असे – यशस्तिलकचंद्रिका, तत्त्वार्थवृत्ती, औदार्यचिंतामणी, तत्त्वत्रयप्रकाशिका, जिनसहस्रनामटीका व षट्प्राभृत टीका. याशिवाय त्याचे व्रतकथाकोश, श्रीपालचरित, यशोधरचरित, इ. ग्रंथही मिळतात. त्याने गुजराती भाषेतही ग्रंथरचना केली आहे.

श्रुतसागर एकांतिक व असहिष्णू होता. तो परमतखंडनाबरोबर त्यांची यथेच्छ निंदाही करीत असे. त्याचा सर्वांत अधिक रोख लोंकागच्छातील ढूंढिया जैनांवर होता.

हा गुजरात भागातला असावा. कारण त्याचे गुजराती भाषेतील ग्रंथ उपलब्ध आहेत. त्याच्या गुरूची गादी गुजरातमध्येच होती आणि तो ज्या ढूंढियांवर खरपूस टीका करतो, तो संप्रदायही प्राधान्याने गुजरात प्रदेशातच आहे. [ जै. सा. इ. ]

**श्रुतस्कंधव्रत** एक जैन व्रत. हे व्रत भाद्रपद महिन्यात करतात. याचे उत्तम, मध्यम व जघन्य असे तीन प्रकार आहेत. उत्तम व्रत बत्तीस दिवसांत, मध्यम व्रत वीस दिवसांत आणि जघन्य व्रत सोळा दिवसात पार पाडतात. प्रत्येक व्रतात निम्मे उपवास व निम्मी पारणी असतात. बारा वर्षांनंतर उद्यापन करतात. फल – ज्ञानप्राप्ती आणि यश व कुल यांची वृद्धी. [ जै. व्र. वि. सं.; जै. क.; व्र. ति. नि. ]

**श्रुतज्ञानव्रत** एक जैन व्रत. हे बारा वर्षे आणि आठ महिन्यांत समाप्त होते. यात एकशे अठ्ठेचाळीस उपवास असतात. व्रतकालात ' ॐ ह्रीं द्वादशाङ्गश्रुतज्ञानाय नमः ' या मंत्राचा त्रिकाल जप करतात. या व्रताचे अन्य पर्यायही सांगितले आहेत. [ जै. व्र. वि. सं. ]

**श्रुष्टिगू काण्व** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील एकावन्नावे सूक्त याने रचले असून, ते वालखिल्य सूक्त आहे. इंद्रस्तुती हा सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा (८.५१.९) अशी –

यस्यायं विश्व आर्यो दासः शेवधिपा अरिः ।
तिरश्चिदर्ये रुशमे पवीरवि तुभ्येत् सो अज्यते रयिः ।

अर्थ – आर्य आणि दास लोकांना सारखेच धन देणाऱ्या हे श्रेष्ठ इंद्रा, रुशम आणि पवीरू यांना तू गुप्त धन दिलेस.

प्रस्तुत सूक्तात त्याचा स्वतःचा निर्देश आढळतो. आणि त्याचबरोबर मनू सांवरण, दस्यवे वृक, पार्षद्वाण, रुशम, पवीरू, जिन्नी, इ. राजांचा व पुष्टिगू, नीपातिथी, मेध्यातिथी, इ. ऋषींचा उल्लेख आहे. म्हणून या सूक्ताला ऐतिहासिक मोल आहे. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को. ]

**श्रूपला रचेस** लडाखमधील एक नृत्य. हे धान्य कापणीच्या वेळी करतात. नर्तक सिंहाचा वेष धारण करतात व देवीला सिंहरूपात वास्तव्य करण्याची प्रार्थना करतात. त्या वेळी काही नर्तक काठीच्या किंवा लाकडाच्या घोड्यावर स्वार होऊन नाचतात. [ भा. लो. नृ. ]

**श्रेणी** प्राचीन काळी व्यापारी आणि निरनिराळे कारागीर यांच्या वेगवेगळ्या संघटना असत, त्यांना श्रेणी हे नाव होते. ' एकेन शिल्पेन पण्येन वा ये जीवन्ति तेषां समूहः श्रेणी ' (=एकाच कलाप्रकारावर किंवा एकाच व्यापारावर जीवन चालवणाऱ्या व्यक्तींचा संघ म्हणजे श्रेणी) अशी व्याख्या कैय्यटाने (२.१.५९) केली आहे. मेधातिथीने ' श्रेणयो नानाजातीनां एकजातीयकर्मोपजीविनां संघाताः ' ( = एकजातीय कर्मांवर उपजीविका करणाऱ्या नाना जातींचा संघ म्हणजे श्रेणी) असे म्हटले आहे (२.३०). अशा शिल्पसमूहांचा उल्लेख प्रथम पाणिनीच्या सूत्रांत आढळतो. मात्र पाणिनीने त्या समूहांना पूग, गण, व्रात, संघ अशी नावे दिलेली आहेत. त्यांचे स्वरूप श्रेणींपेक्षा वेगळे होते, असे दिसते.

जातकांत १८ प्रकारच्या श्रेणींची नावे सापडतात. उदा०- सुतार, सोनार, लोहार, चर्मकार, कुंभार, दंतकार, रंगारी, जव्हेरी, नापित, मालाकार, चित्रकार, तेली, कासार, गवळी, बुरुड, सुगंधी, इत्यादी.

धर्मसूत्रांत व अर्थशास्त्रात श्रेणीसंबंधी नियम दिले आहेत. अशा श्रेणींना राजाची मान्यता मिळत असे आणि त्यांच्या कारभारावर राजाचे नियंत्रण असे. काही बाबतींत त्यांना न्यायदानाचाही अधिकार असे.

कौटिल्याने अर्थशास्त्रात श्रेणीबलाचा उल्लेख केला आहे. मित्रबलापेक्षा श्रेणीबल अधिक चांगले असे त्याने म्हटले आहे. मित्रबल म्हणजे मित्रराष्ट्राचे सैन्य व श्रेणीबल म्हणजे श्रेणींचे स्वसंरक्षक दल असावे. ते राजाला साहाय्य करीत असे.

सातवाहन कालातील शिलालेखांत पुढील सहा श्रेणींचा उल्लेख आहे – (१) आदेयंत्तिक (२) तिलपिसक (३) कुलरिक (४) कोलिक (५) धत्रिक व (६) वंसकार. आधुनिक काळातील सहकारी पतपेढ्यांप्रमाणे त्या श्रेणींचे कामकाज चालत असे. लोक आपले द्रव्य त्यांच्याकडे गुंतवीत असत. इ. क्षत्रप उषवदात याने नासिक येथील विणकरांच्या श्रेणीमध्ये

काही द्रव्य अक्षय निधी म्हणून ठेवले होते. अन्य प्राचीन आलेखांतही निरनिराळ्या श्रेणींचे निर्देश मिळतात. 'महावस्तू' मध्ये कपिलवस्तू येथील कित्येक श्रेणींचे वर्णन आहे.

प्राचीन काळी व्यापारी मार्गांवर पुरेशी सुरक्षितता नसे. बराच प्रवास जंगलातून व डोंगरांवरून करावा लागे. अशा प्रवासात चोर-दरवडेखोरांचे भय असे. त्यांनी माल लुटू नये म्हणून व्यापाऱ्यांच्या जथ्थ्याबरोबर सशस्त्र संरक्षक दल पाठवले जाई. प्रत्येक व्यापाऱ्याला हे स्वतंत्रपणे करणे कठिण होते. म्हणून अनेक व्यापारी मिळून एक मोठी पेढी स्थापून सर्वांचा माल एका संरक्षकदलासह पाठवू लागले. अशा प्रकारे एकत्रित व्यापार केल्यामुळे त्यात अधिक लाभ होतो, हे ध्यानात येऊन श्रेणी स्थापण्याची पद्धत सर्वत्र रूढ झाली असावी.

प्रत्येक श्रेणीची रचना व कार्यपद्धती नियमबद्ध असे. श्रेणीप्रमुखाला जातकांत जेठ्ठक म्हटले आहे. त्याचे अधिकारपद आनुवांशिक असे. श्रेणीचे प्रमुख श्रीमान व समाजात प्रतिष्ठित असत. राजदरबारातही त्यांना मान मिळत असे. कारण श्रेणीचे स्वसंरक्षणार्थ ठेवलेले सेनादल कधीकधी राजालाही उपयोगी पडे.

धर्मशास्त्रात श्रेणीधर्माचा उल्लेख आढळतो. श्रेणीधर्म म्हणजे प्रत्येक श्रेणीचे नियम. राजाने त्या नियमांना योग्य तो मान द्यावा, असे मनुस्मृतीत (८.४१) सांगितले आहे –

जातिजानपदान् धर्मान् श्रेणीधर्मांश्च धर्मवित् ।
समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मं प्रतिपालयेत् ॥

अर्थ – धर्मविद राजाने जातिधर्म, जानपदधर्म, कुलधर्म व श्रेणीधर्म म्हणजे त्यांचे रीतिरिवाज नीट तपासून मग त्यांना अनुकूल असे राजकीय विधिनियम बनवावे.

नारद व याज्ञवल्क्य या स्मृतींतही असे वचन आहे. प्राचीन काळातल्या श्रेणी या प्रभावशाली संघटना होत्या. आपल्या सदस्यांमधील भांडणतंटे मिटवण्याचे काम त्या करीत व न्यायदानही करीत. नारद, बृहस्पती, याज्ञवल्क्य, इ. स्मृतिकारांनी श्रेणींना व्यवहारातील महत्त्वाचे निर्णय घेण्याचा अधिकार दिला आहे. त्याला राजाची मान्यता मिळत असे.

देशात सर्वत्र श्रेणींना प्रतिष्ठा प्राप्त होत असे. लोकांचे द्रव्य ठेवून घेऊन त्यांना व्याज दिले जात असे. काही राजे अशा श्रेणींमध्ये धर्मार्थ निधी जमा करीत व त्याच्या व्याजातून धर्मकृत्ये चालत, अशा प्रकारचे उल्लेख अनेक शिलालेखांत मिळतात.

श्रेणींमध्ये निरनिराळ्या जातींचा समावेश होतो, असे मिताक्षरेत म्हटले आहे. वस्तुत: श्रेणी ही व्यावसायिक संघटना असल्यामुळे तिच्यात भिन्न जातींचे घटक असू शकतात. पण कालांतराने धंद्यावरून जाती वेगळ्या झाल्या व प्रत्येक जातीचा परंपरागत धंदा ठरून गेला. त्यामुळे मध्ययुगात श्रेणी बहुधा जातीवरून ठरू लागली. मनू व याज्ञवल्क्य यांच्या काळातील श्रेणी ही संस्था मध्ययुगात टिकून असली, तरी तिच्या अंतर्गत कार्यपद्धतीत व नियमांत कालमानानुसार काही फेरबदल होणे साहजिक होते. हा फेरबदल जातिधर्माप्रमाणे झाला असावा.

मोठा व्यापार करणाऱ्या श्रीमान व्यापारी श्रेणींचे व्यवहार एखाद्या शहरापुरतेच मर्यादित न राहता, ते अनेक शहरांतून व प्रांतांतून चालत. अशा श्रेणींच्या कार्याचा व्याप सांभाळण्यासाठी १०–१५ सभासदांची कार्यकारिणी बनवण्याची पद्धत होती. श्रेणींच्या मूलभूत तत्त्वांत किंवा कार्यपद्धतीत बदल करायचा असल्यास किंवा श्रेणींच्या वतीने धर्मादाय करायचा झाल्यास, त्याविषयी सर्वसाधारण सभेत चर्चा करून निर्णय घेतला जाई. श्रेणींचे नियम सर्व सभासदांना सारखेच बंधनकारक असत. त्यांचे उल्लंघन झाल्यास दंड भरावा लागे.

भारतात प्राचीन काळी व्यापाराची वाढ या श्रेणींमुळे झाली, असे तज्ज्ञांचे मत आहे. [प्रा. भा. न. न. जी.; भा. सा. इ.; पै. सा. रा.; भा. मौ. ए.; या. का. म.; प्रा. भा. सं. द.]

## श्रेय आणि प्रेय

सुखाचे दोन प्रकार. भौतिक सुखाला प्रेय म्हणतात, तर आध्यात्मिक सुखाला श्रेय म्हणतात. यांची व्याख्या कठोपनिषदात यमराजाने सांगितली आहे (कठवल्ली २.१), ती अशी –

अन्यच्छ्रेयोऽन्यदुतैव प्रेय:
ते उभे नानार्थे पुरुषं सिनीत: ।
तयो: श्रेय आददानस्य साधु भवति
हीयतेऽर्थाद्य उ प्रेयो वृणीते ॥

भावार्थ – सुख दोन प्रकारचे असते. एकाला प्रेय म्हणतात व दुसऱ्याला श्रेय म्हणतात. जे आरंभी सुख देते आणि अंती दु:ख देते ते प्रेय होय. जे प्रारंभी दु:खमय असते, पण अंती सुख देते, त्याचे नाव श्रेय होय. जो मनुष्य श्रेयाचे ग्रहण करतो, त्याचे कल्याण होते आणि जो मनुष्य प्रेयाकडे झुकतो, तो पुरुषार्थापासून च्युत होतो.

चक्षुरादी इंद्रियांना गोचर अशा रसादिविषयांचे जे प्राकृत जनांना प्रेम वाटते, ते प्रेयरूप समजावे. प्रेयातले सुख हे पूर्वकालीन तसेच उत्तरकालीन अनंत, त्रिविध दु:खांनी मिश्रित असते. शिवाय ते क्षणभंगुरही असते. हे सुख मानवाला इष्ट नव्हे. जे दु:खसंयोगाने रहित, विषयसुखाहून भिन्न असल्यामुळे इंद्रियांना अगोचर, पण परम एकरस असे सुख असते, ते शाश्वत असल्यामुळे मानवाला इष्ट होय. रज व तम या गुणांनी भरलेली बुद्धी प्रेयाला कवटाळते, तर सत्वगुणप्रधान बुद्धीला श्रेय प्रिय होते. आणि म्हणून प्रेयाचा त्याग आणि श्रेयाचा स्वीकार

या गोष्टी शाश्वत सुखाच्या दृष्टीने आवश्यक ठरतात.

प्रेय हे अस्थिर, परिणामी आणि कर्मजन्य आहे. त्याच्या योगक्षेमासाठी कर्म आवश्यक आहे. कर्मावाचून प्रेयाची प्राप्ती नाही. अशा प्रकारे प्रेय हे कर्मजन्य असल्यामुळे ते निश्चित रूपाने नाशवन्त आहे. अखंड, एकरस, निर्विकार, सच्चिदानंद असे जे परमात्मतत्त्व, त्यावर कोणत्याही कर्माचा यत्किंचितही प्रभाव पडत नाही. त्याचप्रमाणे त्याच्या ठिकाणी कर्माचा कसलाही उपयोग नाही.

नीतिशास्त्राच्या दृष्टीनेही श्रेय हेच परमकल्याण आहे. पुरुषार्थांच्या भाषेत बोलायचे तर अर्थ व काम या पुरुषार्थांची उपासना हा प्रेयाचा मार्ग आणि धर्म व मोक्ष या पुरुषार्थांची उपासना हा श्रेयाचा मार्ग होय. श्रेय हे जीवनसाफल्याचे प्रतीक समजावे. म्हणूनच शंकराचार्यांनी प्रेयाला अविद्या (अज्ञान व दुःख) म्हटले आहे, तर श्रेयाला विद्या (आत्मज्ञान व शाश्वत सुख) म्हटले आहे. [ ब्रह्मविद्या – कृष्णानंद; म. त. म. ]

**श्रेयांशनाथ** जैनांचा अकरावा तीर्थंकर. सिंहपुरी हे त्याचे जन्मस्थान होय. त्याच्या पित्याचे नाव विष्णू आणि आईचे विष्णुद्री. जन्मनक्षत्र श्रवण. लांच्छन गेंडा. ज्ञानवृक्ष तिंदुक. यक्ष ईश्वर. यक्षिणी गौरी. त्रिपिष्ठ वासुदेव हा चवरीधर.

श्रेयांशनाथाच्या वडिलांचे एक सुंदर सिंहासन होते. पण ते भुताने पछाडलेले होते. त्यामुळे राजा त्याच्यावर बसू शकत नव्हता. पण हा गर्भात असता त्याच्या आईला या सिंहासनावर बसण्याची अनावर इच्छा झाली. आणि ती त्यावर बसली. त्यासरशी ते भूत सिंहासन सोडून निघून गेले. अशा प्रकारे श्रेय म्हणजे कल्याण प्राप्त झाल्याने मुलाचे नाव श्रेयांशनाथ असे ठेवण्यात आले. सारनाथ येथे त्याचे मंदिर असून, त्याची मूर्ती फार प्राचीन आहे.

उज्जयिनीच्या जैनमूर्तींच्या संग्रहालयात श्रेयांशनाथाच्या पुष्कळ मूर्ती आहेत. [ जै. इ.; मालविका – संपा. श्री. वि. श्री. वाकणकर, डॉ. सुरेंद्र कुमार आर्य ]

**श्रेष्ठी** नेता, सन्माननीय पुरुष, श्रेष्ठ व्यक्ती, असा या शब्दाचा अर्थ आहे. वैदिक वाङ्‌मयात त्याच अर्थी हा शब्द वापरलेला आहे. पण कालांतराने त्याला महाजन, व्यापारी मंडळाचा प्रमुख, धनाढ्य व्यापारी, इ. अर्थ प्राप्त झाले. प्राकृत भाषेत याला सेठ्ठी म्हणतात. त्यावरूनच शेठ ही उपाधी उगम पावली.

जातकांत सेठ्ठीचा उल्लेख व्यापारी वर्गाचा प्रतिनिधी म्हणून केलेला आहे, त्याचप्रमाणे सद्‌गृहस्थ किंवा श्रीमान व्यापारी म्हणूनही केलेला आहे. लक्षाधीश व कोटयधीश अशा व्यापाऱ्यांना श्रेष्ठी म्हणत. त्यांना समाजात फार मोठा मान असे व राजदरबारीही त्यांची प्रतिष्ठा असे. काही सेठ्ठींचा राजसभेशी बराच संबंध होता. अनेक प्रश्नांसंबंधी राजा त्यांचा सल्ला घेत असे. व्यापारी वर्गाचे प्रतिनिधी म्हणूनही ते राजसभेत बसत. त्यामुळे राज्यतंत्र व सरकारी धोरण यांवर लक्ष ठेवणे त्यांना सुलभ होत असे. हे प्रतिनिधित्व एकाच घराण्याकडे वंशपरंपरेने राहत असे. म्हणजे पित्याच्या मृत्यूनंतर त्याचे प्रतिनिधिपद सेठ्ठीपुत्राला मिळत असे.

व्यापारोद्योगावर व निरनिराळ्या श्रेणींवर नियंत्रण ठेवण्यासाठी राजा श्रेष्ठींचा सल्ला घेत असे; तसेच राज्याच्या आर्थिक व्यवहारावर व कोशागारावर देखरेख ठेवण्यासाठीही तो त्यांचे साहाय्य घेत असावा. त्यांच्या जवळ अमाप द्रव्यसंचय असल्यामुळेही ते राजाला वेळप्रसंगी साहाय्य करीत. राजदरबारी वंशपरंपरागत स्थान लाभल्यामुळे श्रेष्ठींचे व राजघराण्यांचे संबंध जिव्हाळ्याचे असत, असे अनुमान अनेक जातककथांवरून करता येते.

बुद्धाच्या काळापासून अनेक श्रेष्ठींचा बौद्ध पंथाशी संबंध आलेला आहे. बुद्धाचा दानशूर भक्त अनाथपिंडिक हा एक सुप्रसिद्ध सेठ्ठी होता. नंतरच्या काळातही अनेक सेठ्ठींनी चैत्य व विहार निर्माण करण्यासाठी विपुल धनदान दिल्याचे उल्लेख शिलालेखांतून आढळतात.

जैनमतानुयायी श्रेष्ठीही धर्मकृत्ये, मंदिरे, मूर्ती यांसाठी विपुल धन देणगी म्हणून देत असत. [ बु. भा. स.; पैं. सा. रा. ]

**श्रौतसूत्रे** वैदिक संहितांमध्ये व ब्राह्मणांमध्ये सांगितलेल्या यज्ञादी विषयांचे विधान आणि विवरण करणाऱ्या सूत्रांना श्रौतसूत्रे म्हणतात.

निरनिराळ्या वेदशाखांची वेगवेगळी श्रौतसूत्रे आहेत. ब्राह्मणग्रंथातील यज्ञांचे तपशिलाने विवेचन करणे हेच त्यांचे प्रमुख उद्दिष्ट आहे. आश्वलायन व शांखायन ही श्रौतसूत्रे ऋग्वेदाची समजली जातात. कात्यायन श्रौतसूत्र हे शुक्लयजुर्वेदाचे आहे; तर बौधायन, भारद्वाज, आपस्तंब, इ. सहा श्रौतसूत्रे कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेची आहेत. मैत्रायणी संहितेची मानव व वाराह श्रौतसूत्रे उपलब्ध आहेत. सामवेदाची लाटयायन व द्राह्यायण ही दोन श्रौतसूत्रे आहेत. अथर्ववेदाचे वैतान श्रौतसूत्र हे बरेचसे अर्वाचीन आहे. श्रौतसूत्रांची रचना सनपूर्व दोन हजार वर्षे या कालात झाली, असे चि. वि. वैद्य लिहितात. या सर्व श्रौतसूत्रांची माहिती त्या त्या नावाखाली दिलेली आहे. पाहा – कल्पसूत्रे. [ वै. सा. ]

**श्वपच** एक प्राचीन जात. चांडाळाला ब्राह्मण कुमारिकेपासून झालेल्या संततीला श्वपच म्हणावे, असे वैखानस स्मार्त सूत्रात म्हटले आहे (१०.१५). क्षीरस्वामीने डोंबांनाच श्वपच म्हटले आहे. पाहा – डोंब. [ ओ. डे. ध. सू. ]

**श्वास** नाकाने किंवा तोंडाने आत घेतलेला अथवा बाहेर सोडलेला वारा म्हणजे श्वास आणि या उभयविध क्रियेला श्वसन असे म्हणतात. श्वास म्हणजे प्राण होय. ऋग्वेदात (१.६६.१) आयुर्नः प्राणः (= आयुष्य म्हणजे प्राण) व यजुर्वेदात (२०.५) राजा मे प्राणः (= माझा प्राण राजा आहे) अशा शब्दांत त्याचा गौरव केला आहे. निरनिराळ्या उपनिषदांत त्याचा महिमा मुक्त कंठाने गायिलेला आहे. बृहदारण्यकोपनिषद्‌काराच्या मते तर त्या महाभूताचे (परमात्मा) निःश्वास म्हणजे वेद होत (२.४.१०). सायणाचार्यांनी ऋग्वेदभाष्याच्या प्रारंभीच ' यस्य निःश्वसितं वेदाः ' (= परमेश्वराचे निःश्वास म्हणजे वेद) असे त्याचे माहात्म्य सांगितले आहे. योगशास्त्राशी व मानववंशशास्त्राशी श्वासाचे निकटचे नाते आहे. श्वास हे नामजपाचे एक माध्यमही आहे.

वेदकाळापासून श्वासाचा आणि अभिचाराचा संबंध असावा किंवा श्वास हे अभिचाराचे एक माध्यम असावे, असे वाटते. कारण ऋग्वेदातील श्रुतबंधूच्या सर्वज्ञात अभिचारसूक्तसमूहातील एका सूक्तात असुनीती नामक प्राणहरण करणाऱ्या देवतेने प्राण हरण करू नयेत, असे अभिचारात्मक आवाहन केलेले आढळते (१०.५९.६). आयुष्यवर्धनासाठी तांदूळ, यव, इ. धान्यांचा ताईत बांधण्याच्या प्रसंगी अथर्ववेदातील प्रसिद्ध प्राणसूक्त म्हणण्याची प्रथा आहे (११.४).

श्वास म्हणजे प्राण हे समीकरण असल्यामुळे, मनुष्य जिवंत असतानाच त्याचा प्राण बाहेर संचार करू शकतो, ही कल्पना निर्माण झाली असावी. त्यातूनच मनुष्य मेल्यावर त्याचा अतृप्त प्राण भूतयोनीत जातो, ही धारणा उत्पन्न झाली. बाहेर संचार करणाऱ्या या प्राणाला बहिश्चर प्राण अशी लोकप्रसिद्ध संज्ञा आहे. आणि म्हणूनच बहिश्चर प्राण हे श्री. फ्रेजर यांनी सांगितलेल्या संबंधानुगामी (Law of Contact) यातूचे उत्तम उदाहरण आहे. या यात्वाधिष्ठित बहिश्चर प्राणाची कल्पना अथर्ववेदातील प्राणसूक्तातून प्रकट झाली आहे (११.४). त्याचप्रमाणे वानरिंद जातकातही ती दिसून येते. परंतु या जातकात प्राणाची जागा काळजाने घेतली आहे. हा लहानसा फरक गृहीत धरला, तरी त्यामागील तत्त्व कायम असल्याचे दिसून येते. लोककथांमधील राक्षसकथांच्या संभारात याची विपुल उदाहरणे वाचायला मिळतात. एखादा राक्षस एखाद्या सुंदर मुलीला पळवून आणून घरात ठेवतो. सुदैवाने त्या मुलीची आणि राजपुत्राची भेट होते. ती एकमेकांवर अनुरक्त होतात. राजपुत्र राक्षसाला मारण्याच्या प्रयत्नात असतानाच ती मुलगी राक्षसाचा प्राण पक्ष्यात असल्याची माहिती त्याला देते. मग राजपुत्र त्या पक्ष्याला शोधून काढतो आणि मारून टाकतो. त्यावरोबर राक्षसही मरून पडतो. अखेर त्या राजपुत्राचे राजकन्येशी लग्न होते. मारुतीने भुंग्यांना मारल्यावर महिरावणही मरतो, हे उदाहरणही याच संदर्भातील आहे. माणसाच्या सावलीत प्राण असतो, या समजुतीमागेही बहिश्चर प्राणाचीच कल्पना आहे.

प्राणाचे ठराविक स्थान सोडून शरीराच्या अन्य अवयवांमध्ये प्राण असणे हेही बहिश्चर प्राणाचेच एक उदाहरण आहे. हनुमंताचे मरण त्याच्या शेपटीत आहे, हे कळल्यावर ती पेटविल्याचा कथाभाग आनंद रामायणात सांगितला आहे. (सार. अ. ९).

लहान मुलाला न्हाऊ-माखू घातल्यावर किंवा त्याला झोपविण्यापूर्वी मुलाची आई त्याच्या टाळूचे अवघ्राण करते. या अवघ्राणामागे शक्तिसंक्रमणाची किंवा आयुष्यदानाची कल्पना असते. अवघ्राण हे मोठ्यांनी लहानांचे करायचे असते. वयाने लहान असलेली मुले काही कामासाठी बाहेर चालली म्हणजे जे अवघ्राण केले जाते ते आशीर्वादात्मक असते. त्याचप्रमाणे भेटायला आलेल्या कनिष्ठ मंडळींचेही अवघ्राण करतात. रामायण-महाभारताच्या काळापासून ही प्रथा रूढ असल्याचे उल्लेख आढळतात. विश्वामित्राने यज्ञविघातक राक्षसांचा विनाश करण्यासाठी दशरथाकडे रामाची मागणी केली असता, दशरथाने प्रथम रामाचे अवघ्राण केले आणि मग त्याला विश्वामित्राच्या स्वाधीन केले असा श्लोक आहे –

स पुत्रं मूर्ध्न्युपाघ्राय राजा दशरथस्तदा ।<br>
ददौ कुशिकपुत्राय सुप्रीतेनान्तरात्मना ॥

(वा. रा. १.२२.३)

अर्थ – मग दशरथ राजाने पुत्राच्या मस्तकाचे अवघ्राण करून प्रसन्न अंतःकरणाने रामाला विश्वामित्राच्या स्वाधीन केले.

वनात जाण्यासाठी निरोप घ्यायला आलेल्या रामाने कौसल्येला वंदन केल्यावर तिनेही त्याला कवटाळून त्याचे मस्तक हुंगले (वा. रा. २.२०.२१). तिने सीतेचेही अवघ्राण करून तिला रामसेवा करण्याचा उपदेश केला (वा. रा. २.३९.१९).

अवघ्राण करणे हे एक प्रेमप्रतीक आहे. लवणासुराच्या वधानंतर शत्रुघ्न रामदर्शनासाठी अयोध्येला निघाला असता, वाटेत त्याने वाल्मीकीच्या आश्रमात मुक्काम केला. त्या वेळी वाल्मिकीने त्याला म्हटले. ' तू लवणाचा वध केल्यामुळे देवांना

पराकाष्ठेचा आनंद झाला. तेव्हापासून माझ्याही मनात तुझ्या संबंधाने प्रेम उत्पन्न झाले, म्हणून मी तुझ्या मस्तकाचे अवघ्राण करतो. कारण ते प्रेमदर्शनाचे एक चांगले लक्षण आहे (वा. रा. उत्तर. ७१.१०.१२).

रामायणाप्रमाणे महाभारतातही या प्रथेचा आढळ होतो. मयासुराला पांडवांसाठी सभाभवन तयार करण्याची आज्ञा दिल्यावर श्रीकृष्ण द्वारकेला निघाला. त्या वेळी त्याने कुंतीला नमस्कार केल्यावर तिनेही त्याच्या मस्तकाचे अवघ्राण केले आहे (म. भा. सभा. २.३).

वेदग्रंथांचे पठण झाल्यावर गुरू शिष्याच्या कानात श्वास सोडतो. याला कान फुंकणे असे म्हणतात. भुताला झोडपण्यासाठी अथवा जादूटोणा करण्यासाठी भगत मंत्रोच्चाराचा फुंकारा कानात अथवा डोक्यावर सोडतात. बाळाचे न्हाणे झाल्यावर त्याची आई त्याच्या कानात फुंकर मारीत असते. या सर्व उदाहरणांमध्ये श्वासशक्ती संक्रांत करणे हेच तत्त्व असते.

मांत्रिक लोक तोडग्याच्या स्वरूपातला मंत्र म्हणत असताना हातात जल, भस्म, इ. पदार्थ घेऊन, मंत्र पुरा झाल्यावर छूऽऽ असा जोरात शब्दोच्चार करतात. यातला छूकार म्हणजे उच्छ्वास होय. याचा अर्थ असा, की मंत्रोच्चाराने छूकारात एक विशिष्ट प्रकारचे सामर्थ्य येते. आणि त्या सामर्थ्याने हातातील पदार्थ भारले जातात. मग त्या भारलेल्या वस्तूंचा उताऱ्यासाठी उपयोग करतात.

अशा प्रकारच्या श्वासाचे दैवी व आसुरी असे दोन प्रकार कल्पिता येतात. सद्हेतूचे माध्यम म्हणून उच्चारलेला छूकार हा वरस्वरूप असतो. आणि दुष्ट हेतूने उच्चारलेला छूकार हा शापस्वरूप ठरतो. साधुसंतांच्या श्वासांना दैवी श्वास म्हणायला हरकत नाही. एखाद्या आजारी माणसावर त्यांचा श्वास सोडला तर तो आजारातून बरा होतो, अशी समजूत आहे. त्याचप्रमाणे भुताटकीच्या वाड्यात संतांचा प्रवेश झाला की, भुते का पळून जातात त्याचे इंगित या समजुतीत आहे. नुकत्याच जन्मलेल्या मुलाचे अशुभ निवारण्यासाठी गोप्रसव शांती करतात. त्या वेळी त्याला गाईकडून हुंगविले जाते. तसे केल्यावरच अशुभाचा परिहार होतो, अशी समजूत आहे. गायीच्या श्वासातील पावित्र्य ही कल्पना इथे आहे. मातेने किंवा अन्य मोठ्यांनी केलेले अवघ्राण हे याच प्रकारात समाविष्ट होणारे आहे.

वांझ किंवा काही विधवा यांच्या इच्छा अतृप्त असतात. त्यामुळे त्यांचे श्वास वाईट मानण्याची प्रथा आहे. वंध्येचा अथवा जिची सर्व अपत्ये मेली आहेत अशा विधवेचा श्वास एखाद्या बालकावर पडला तर ते मरण पावते अशीही समजूत आहे.

जेम्स अॅबट या महापंडिताने द कीज ऑफ पॉवर या ग्रंथात श्वासासंबंधी अनेक संकेत दिलेले आहेत. त्याची काही उदाहरणे पुढीलप्रमाणे आहेत.

वेदग्रंथांचे वाचन करण्यापूर्वी केलेल्या श्वासोच्छ्वासाने बरकत येते. दृष्ट झालेल्या मुलाच्या मुखावर तीन वेळा फुंकारा मारला तर दृष्टदोष नाहीसा होतो. श्वास सोडणारा व ज्याच्यावर श्वास सोडला जातो तो अशा दोघांच्याही संबंधावर परिणाम होऊन शक्तिसंघर्ष निर्माण होतो. दूषित झालेल्या भागावर फुंकारा मारताना खाली पाहिले पाहिजे. नाहीतर तो फुंकारा परिणामहीन होतो.

जांभई, शिंक, इ. या एकाच वायूच्या विविध कार्यशक्ती होत, असे ज्ञानदेवांनी पुढील ओवीत स्पष्ट केले आहे.

**एवं वायूची हे चेष्टा । एकीचि परी सुभटा ।**
**वर्तनास्तव पालटा । येतसे जें ।।**

(ज्ञाने. १८.३४२)

जांभईच्या वेळी किंवा शिंक आल्यावर भुतेखेते नाकातून शरीरात प्रवेश करतात, किंवा सहज बाहेर जाऊ शकतात, अशी आदिवासींची आवडती समजूत आहे. म्हणूनच जांभईच्या वेळी तोंडापुढे हात धरून किंवा चुटकी वाजवून देवाचे नामस्मरण करावे असा प्रघात आहे.

अथर्ववेदात शिंकेची अपशकुनात गणना केली आहे (१९.८.५) आणि ती अन्नावर पडली तर ते अन्न दूषित होते, असा मनूचा अभिप्राय आहे (५.१२५). अशा प्रकारच्या अनंत समजुती या संदर्भात वाचायला मिळतात. पाहा - जांभई, प्राण, शिंक. [ की. पॉं. ]

## श्वेत

(१) शिवाचा एक अवतार. हा सातव्या वाराहकल्पातल्या वैवस्वत मन्वंतराच्या प्रथम युगचक्रात झाला. हा व्यासांचा समकालीन मानला जात असून, हिमालयाच्या छागल नामक शिखरावर अवतीर्ण झाला, असे सांगितले आहे. श्वेत, श्वेतशिख, श्वेताश्व व श्वेतलोहित या नावाचे याचे चार शिष्य होते. [ प्रा. च. को. – हिंदी ]

(२) हाही शिवाचाच अवतार होता व सातव्या वाराहकल्पातल्या वैवस्वत मन्वंतरातच परंतु त्याच्या विसाव्या युगचक्रात कालंजर पर्वतावर तो अवतीर्ण झाला. उशिक, बृहदश्व, देवल आणि कवी हे याचे चार शिष्य होते. [ प्रा. च. को. – हिंदी ]

## श्वेतकेतू

एक तत्त्वज्ञानी आचार्य. अरुण आणि उद्दालक या आचार्यांच्या कुलात जन्मला असल्यामुळे श्वेतकेतू हा औद्दालकी व आरुणेय अशा नावांनीही ओळखला जातो. शतपथ

ब्राह्मण; छांदोग्य, बृहदारण्यक, कौषीतकी, इ. उपनिषदे व आपस्तंब धर्मसूत्र, तसेच कौषीतकी ब्राह्मण व महाभारत या ग्रंथांतून याचा गौरवपूर्ण उल्लेख येतो. उपवेश-अरुण-उद्दालक-श्वेतकेतु अशी याची वंशवेल मिळते.

छांदोग्य उपनिषदात याला अरुण ऋषीचा पौत्र व उद्दालक आरुणीचा पुत्र म्हटले आहे (५.११.२); तर कौषीतकी उपनिषदात आरुणीचा पुत्र आणि गौतम ऋषीचा वंशज म्हटले आहे (१.१). कौसुरुविंदु औद्दालकी हा याचा भाऊ असून, तो गौतमगोत्रीय असल्याचे म्हटले आहे.

श्वेतकेतु कुरु-पंचाल देशाचा रहिवासी होता. बालपणी हा फार हूड व उनाड होता. त्यामुळे बऱ्याच उशीरा म्हणजे बयाच्या बाराव्या वर्षी त्याचे विद्याध्ययन सुरू झाले. बारा वर्षे गुरुगृही राहून विद्या संपादन केल्यावर तो घरी परतला; परंतु मिळविलेल्या ज्ञानाचा गर्व धरून तो सर्वांशी उद्दामपणे वागू लागला. एके प्रसंगी त्याने आपल्या पित्याचाही अपमान केला. त्या वेळी पित्याने त्याची कानउघाडणी करून त्याला समजाविले, की पुस्तकी ज्ञान म्हणजे सर्वस्व नव्हे; अनुभवाचे ज्ञान हेच महत्वाचे आहे. तसेच त्याने त्याला आत्मज्ञानाचाही उपदेश केला. हा उपदेश 'तत्त्वमसि' या महावाक्याने तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात सुविख्यात झाला आहे.

कौषीतकी ब्राह्मणात याला कौषीतकी लोकांच्या यज्ञसंस्थेचा प्रमुख आचार्य म्हटले आहे. यज्ञकार्यात तिथल्या आचार्यांना दक्षिणा किती दिली-घेतली जाते, यापेक्षा आचार्य-पुरोहितांचे ज्ञान महत्त्वाचे आहे, हे तत्त्व विशद करून सांगणारा एक प्रसंग श्वेतकेतु व त्याचा पिता यांच्या संबंधात घडला असल्याचे शांखायन श्रौतसूत्रावरून कळते. तो प्रसंग असा –

एकदा जल जातुकर्ण्य नामक एका आचार्याला काशी, कोसल आणि विदेह या तीनही प्रदेशांचे पौरोहित्य मिळाले. समान-व्यवसायी असल्यामुळे श्वेतकेतूला या गोष्टीचे स्वाभाविकच वैषम्य वाटले आणि तो आपली नाराजी पित्याजवळ व्यक्त करू लागला. त्यावर पित्याने त्याची समजूत काढली, की पुरोहिताने ज्ञानावर प्रेम करावे, धनावर करू नये.

पित्याच्या या उपदेशाप्रमाणे श्वेतकेतू लवकरच यज्ञसंस्थेच्या सर्व बारीक सारीक बाबींचा जाणकार झाला.

श्वेतकेतु हा पंचाल राजा प्रवाहण जैवली, तसेच विदेह देशाचा राजा जनक यांचा समकालीन होता. प्रवाहण जैवलीचे तर श्वेतकेतूने व त्याच्या पित्याने शिष्यत्वही पत्करले होते. त्याविषयी बृहदारण्यक उपनिषदात (६.२) आलेली कथा अशी – एके दिवशी प्रवाहण जैवलीने आपल्या राज्यात एक विद्वत्-सभा भरवली. त्या वेळी प्रवाहणाने उपस्थित केलेल्या काही तत्त्वज्ञानविषयक प्रश्नांची उत्तरे द्यायला श्वेतकेतू व त्याचा पिता असमर्थ ठरला. मग त्या दोघांनीही विनम्र होऊन प्रवाहण जैवलीकडून आणखी ज्ञान मिळविले.

वात्स्यायन-कामसूत्रातील उल्लेखांवरून कळते, की नंदिन्-विरचित आद्य बृहत् कामशास्त्राचा श्वेतकेतूने संक्षेप केला व त्याची ५०० अध्यायांत विभागणी केली. ब्राह्मणाने मद्यपान करू नये, परस्त्रीसंबंध वर्ज्य मानावा, यांसारख्या सूचना श्वेतकेतूने केल्या आहेत. श्वेतकेतु हा त्याच्या काळातला सामाजिक जाणीव असणारा व समाजाच्या उन्नयनार्थ विविध सुधारणा सुचविणारा असा समर्थ विचारवंत होता. सच्चरित अशा पतिपत्नींनी परस्परांशी एकनिष्ठ राहिले पाहिजे, स्त्री व पुरुष या दोघांना एकच चारित्र्याचा निकष असला पाहिजे, पशुपक्ष्यांहून मानवाचे जीवन वेगळे आहे, त्यामुळेच त्याला वेगळे दंडक असले पाहिजेत, असे श्वेतकेतूचे म्हणणे आहे. प्राचीन काळी हिंदू समाजात विवाहसंस्था नव्हती, ती श्वेतकेतूने अस्तित्वात आणली, असे महाभारतात म्हटले आहे.

देवल ऋषीची कन्या सुवर्चला ही श्वेतकेतूची पत्नी होय.
[ प्रा. च. को. – हिंदी ]

**श्वेतद्वीप** एक प्राचीन देश. यालाच चंद्रद्वीप, वैकुंठ अशीही अन्य नावे आहेत (श. क.). हे हरीला प्रिय असल्याचे सांगितले आहे (भाग. पु. ८.४.१८; १०.६.२४; ११.१५.१८). अध्यात्मरामायणातही श्वेतद्वीपाचा उल्लेख येतो. महाभारतात, नारदमुनी क्षीरसागरासन्निध असलेल्या श्वेतद्वीपात जाऊन नारायणाची पूजा करतो, असे म्हटले आहे.

महाभारताच्या शांतिपर्वात श्वेतद्वीपासंबंधी पुढील माहिती आली आहे – श्वेतद्वीपातील लोक गौरवर्णी व तेजस्वी असून, ते अतिमानवी योनीतले आहेत. त्यांना इंद्रिये नसून, ते अन्नावाचून जगतात. ते पुण्यवान असून, त्यांच्या शरीराला सुगंध येतो. त्यांच्या तेजामुळे पापी मनुष्याची दृष्टी नष्ट होते. हे लोक नारायण या एकमेव अदृश्य अशा ईश्वराची उपासना करतात व त्यांचे हात सदैव जोडलेले असतात.

हर्षचरित, कादंबरी, स्वप्नवासवदत्त, बृहत्कथामंजरी, कथासरित्सागर, इ. ग्रंथांतून श्वेतद्वीपाचे उल्लेख येतात.

सनपूर्व दुसऱ्या शतकात होऊन गेलेला चिनी लेखक ह्यूएनत्सु याने आपल्या 'शान हाइ चिंग' नामक ग्रंथात श्वेतवर्णी लोकांचा उल्लेख केला असून, तो पुढे लिहितो – श्वेतवर्णी लोकांचे राज्य लुंग्यूच्या उत्तरेस आहे. त्यांचे केस मोकळे असतात. ते कोल्ह्याप्रमाणे दिसणाऱ्या व पाठीवर शिंगे असलेल्या वाहनावर (शेंग हुआंग) बसतात. ते दोन सहस्र वर्षांपर्यंत

जगतात. याच ग्रंथाच्या पूर्वार्धात म्हटले आहे, की श्वेतवर्णी लोकांचे राज्य वू लोकांच्या उत्तरेला आहे. हा वू लोकांचा भू-प्रदेश म्हणजे उत्तर कुरू असे आता सिद्ध झाले आहे. श्री. सातवळेकर यांच्या मते श्वेतद्वीप मादागास्कर बेटाजवळ होते. [ पावन जीवन; श्वेतद्वीप इन प्रीख्रिश्चन चायना ]

**श्वेतपंचमी** एक जैनव्रत. पाच वर्षे आणि पाच महिन्यांनी हे व्रत पुरे होते. आषाढ, कार्तिक किंवा फाल्गुन यांपैकी कोणत्याही महिन्यात याला प्रारंभ करतात. प्रत्येक महिन्याच्या शुक्ल पंचमीला उपवास करणे, हा या व्रताचा प्रधान विधी होय. अशा प्रकारे पासष्ट उपवास झाल्यावर उद्यापन करतात. [ जै. व्र. वि. सं. ]

**श्वेत विघ्नेश** एकवीस गाणपत्य क्षेत्रांतील एक क्षेत्र. हे तमिळनाडू प्रदेशाच्या तंजाऊर जिल्ह्यातील कुंभकोणम्‌जवळ कावेरी नदीच्या काठी आहे. समुद्रमंथनाच्या प्रसंगी देवांनी अमृतप्राप्तीसाठी जलातल्या सुधारूप गणेशाची आराधना केली व त्याच्या कृपेने अमृत मिळविले. त्या वेळी ब्रह्मदेवाने अमृताची जी गणेशमूर्ती केली, ती ही होय, अशी लोकांची श्रद्धा आहे. नंतर हीच मूर्ती इंद्राने नित्यपूजेसाठी ठेवून घेतली. पुढे त्या सुधागणेशानेच लोकोद्धारासाठी अवतार घेतला, असे म्हणतात. या क्षेत्रात मुद्‌गलशिष्य हेरंब मुनीचा आश्रम होता.

तमिळनाडमधील तंजाऊर जिल्ह्याच्या तिरुवळंचुळी गावच्या कपर्दीश्वरमंदिरातही याची एक मूर्ती आहे. तिथे वेल्लई पिल्लैयार या नावाने ही मूर्ती ओळखली जाते. वेल्लई पिल्लैयार म्हणजे श्वेत गणेश. गणेशाच्या सान्निध्यात सिद्धी-बुद्धी या देवता आहेत. त्या मूर्तीच्या संबंधी एक दंतकथा सांगतात, ती अशी – समुद्रमंथनापूर्वी देव गणेशपूजन करायला विसरले. त्यामुळे समुद्रातून अमृताऐवजी विष वर आले. देवांना आपली चूक ध्यानी आल्यावर त्यांनी समुद्राच्या फेसापासून गणेशमूर्ती तयार करून तिची पूजा केली. तोच हा श्वेत गणेश होय. अहल्या-इंद्रकथेत इंद्राने याच गणेशाची आराधना करून शापमुक्ती मिळविली होती, असे म्हणतात. [ श्रीगणेशकोश ]

**श्वेतांबर** जैनांमधला एक मोठा संप्रदाय. श्वेतांबर म्हणजे श्वेत वस्त्र परिधान करणारे होत.

महावीराच्या जीवनकाळातही जैनांचे दोन पंथ होते. स्थविरकल्प व जिनकल्प अशी त्यांची नावे होती. स्थविरकल्पाचे जैन साधू वस्त्र परिधान करीत होते, तर जिनपंथाचे काही अनुयायी महावीराप्रमाणे विवस्त्र राहत होते. महावीराने या दोन्ही पंथांना आपल्या प्रभावाखाली आणले व जैनधर्माला व्यवस्थित स्वरूप दिले. महावीराच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव नष्ट झाल्यानंतर ते दोन पंथ पुनश्च विभक्त झाले.

स्थानकवासी श्वेतांबरांच्या परंपरागत आख्यायिकांवरून याविषयी कळते, ते असे –

सनपूर्व ३१० च्या सुमारास मगधात फार मोठा दुष्काळ पडला. त्यामुळे १२ हजार जैन साधू भद्रबाहूच्या नेतृत्वाखाली अन्नाच्या शोधार्थ दक्षिणेकडे गेले. ते सर्व तरुण व सुदृढ असल्यामुळे विवस्त्र ( दिगंबर ) स्थितीत राहू शकत होते व तसे राहतही होते. मागे १२ हजार वयस्क जैन राहिले होते. म्हणून त्यांना वस्त्रे वापरण्याची अनुज्ञा स्थूलभद्र या उपनेत्याने दिली. दुष्काळ संपल्यावर भद्रबाहू उत्तरेत परत आला. त्याला सर्व जैनांनी आपला नेता म्हणून स्वीकारले; पण त्याची विवस्त्र राहणी मात्र सर्वांनी स्वीकारली नाही.

भद्रबाहू दक्षिणेत गेल्याच्या काळात स्थूलभद्राने पाटलिपुत्र येथे एक धर्मपरिषद बोलावली. जैनांचे सर्व पवित्र ग्रंथ जमा करणे, हा त्या परिषदेचा हेतू होता. परिषदेने ११ अंग ग्रंथ जमविले; पण १२ वा तिला उपलब्ध झाला नाही. मग स्थूलभद्राने तो स्वतः तयार केला. हे त्याचे करणे भद्रबाहूला मान्य झाले नाही. तेव्हापासून जैनांतले मतभेद अधिकाधिक प्रबळ होऊ लागले.

श्वेतांबर साधू श्वेत वस्त्र परिधान करतात. त्यांच्या जवळ पुढील चौदा उपकरणे असतात – (१) पात्र (२) पात्रबंध (३) पात्रस्थापन (४) पात्रप्रमार्जनिका (५) पटल (६) रजस्त्राण (७) गुच्छक (८व९) दोन चादरी (१०) लोकरीचे वस्त्र अर्थात कांबळे (११) रजोहरण (१२) मुखवस्त्र (१३) मात्रक व (१४) चोलपट्टक. याशिवाय श्वेतांबर साधू आपल्या हाती लांब दंडही धारण करतात.

स्त्रीलाही मोक्षाचा अधिकार आहे व जीवन्मुक्त केवली हे भोजन ग्रहण करू शकतात, असे श्वेतांबर मानतात. दिगंबर हे सिद्धान्त मानीत नाहीत.

श्वेतांबरांत चैत्यवासी, वनवासी, स्थानकवासी, डेरावासी असे काही उपपंथ आहेत. चैत्यवासी साधू मठमंदिरांत राहतात व ग्रंथ, धन, इत्यादींचा संग्रहही करतात. स्थानकवासी जैन मूर्तीपूजा करीत नाहीत; पण डेरावासी ती करतात.

श्वेतांबरांमध्ये सांप्रत ज्यांना जती किंवा श्रीपूज्य म्हणतात ते चैत्यवासी शाखेचे अवशेष आहेत व ज्यांना संवेगी मुनी म्हणतात, ते वनवासी शाखेचे आहेत.

श्वेतांबरांमध्ये ८४ गच्छ (गट) असल्याचे सांगतात, पण सांप्रत जे गच्छ आढळतात, त्यांची संख्या अवघी सात आहे

त्यातही खरतर, तपा व आंचलिक हेच गच्छ कार्य करीत असलेले दिसतात. पाहा – जैनधर्म; दिगंबर–श्वेतांबर.

**श्वेताश्वतर** एक आचार्य. याने स्वायंभुव ऋषीकडून ब्रह्मविद्या प्राप्त केली. याच्या नावावर कृष्ण-यजुर्वेदाची एक शाखा आहे. या नावाचे एक ब्राह्मणही असल्याचे कळते. मात्र सांप्रत ते उपलब्ध नाही.

**श्वेताश्वतर उपनिषद** हे कृष्णयजुर्वेदाच्या श्वेताश्वतर शाखेचे सुप्रसिद्ध उपनिषद होय. याचे सहा अध्याय आहेत. पहिल्या अध्यायात 'त्रैमूर्त्यात्मक अद्वैत शैव-मत' हे सर्व मतांपेक्षा श्रेष्ठ आहे हे सिद्ध करण्याकरिता इतर मतांची व आत्मवादाचीसुद्धा टीका कशी करता येईल, या विषयी काही विधायक सूचना केल्या आहेत. दुसऱ्या अध्यायात योगाचे बहारदार वर्णन आहे. तीन ते पाच या अध्यायांत सांख्य व शैव दर्शनांचे विवेचन असून, पाचव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात कपिल या शब्दाची व्युत्पत्ती दिली आहे. सहाव्या अध्यायात ईश्वराच्या सगुण रूपाचे वर्णन आहे.

प्रस्तुत उपनिषदाच्या प्रारंभी पुढील प्रश्न उपस्थित केलेले आहेत – कारणब्रह्माचे स्वरूप काय? आम्ही कोणत्या कारणापासून उत्पन्न झालो? आम्ही कशाने जिवंत राहतो? प्रलयकाली आम्ही कुठे राहिलो होतो? हे ब्रह्मवेत्त्यांनो, कोणाकडून नियमित होऊन आम्ही सुख-दुःखात राहत असतो?

वरील प्रश्नांना प्रस्तुत उपनिषदात पुढीलप्रमाणे उत्तरे दिली आहेत–अद्वितीय परमात्मा मायाजाल पसरून आपल्या विचित्र शक्तीने या विश्वाचे आणि विश्वातील प्राणिमात्रांचे नियमन करतो. तो त्रिकाली एकच आहे. तोच उत्पत्ति–स्थिति–संहार-कर्ता आहे.

विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात् ।।
सं बाहुभ्यां धमति सं पतत्रैर्द्यावाभूमी जनयन् देव एकः ।।
(श्वेता. उप.३.३)

अर्थ – परमात्म्याला सर्वत्र नेत्र, मुखे, बाहू आणि पाय आहेत. तो आकाश आणि पृथ्वी यांची सृष्टी करतो. तोच माणसांना दोन बाहूंनी आणि पक्ष्यांना पंखांनी युक्त करतो.

परमात्म्याहून उत्कृष्ट व अपकृष्ट काही नाही. तो स्वयंप्रकाश आणि सर्वभेदशून्य आहे. तोच एकटा चराचर पदार्थांना धारण करतो. त्याची शक्ती त्रिगुणात्मक आहे.

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ।।
(श्वेता. उप. ४.६)

अर्थ – संगतीने राहणारे पण परस्परभिन्न असलेले दोन पक्षी (जीवात्मा आणि परमात्मा) एकाच वृक्षाचा (शरीर) आश्रय करून राहतात. त्या दोहोंतील एक (जीव) हा त्या वृक्षाची मधुर फळे (कर्मफले) खातो; तर दुसरा (परमात्मा) त्यांचा उपभोग न घेता केवळ साक्षी या रूपाने राहतो.

शरीररूपी वृक्षावर आसक्त झालेला जीव दुर्बलतेमुळे मोहात सापडून त्रास भोगतो. पण जेव्हा त्या दुसऱ्या मित्राला तो साक्षात पाहतो तेव्हा त्याचे सर्व ताप नष्ट होतात. माया ही प्रकृती होय. तिचा अधिष्ठाता म्हणजे मायावी, तो ईश्वर होय. तोच जगाचा स्रष्टा व जगाचे निमित्त आहे. त्याच्या कल्पित अवयवांनी हे सर्व जगत व्यापले आहे.

एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।
कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ।।
(श्वेता. उप. ६.११)

अर्थ – तो अद्वितीय परमात्मा सर्व देहांमध्ये गूढ आहे. तो सर्वव्यापी, सर्वांचा अंतरात्मा, सर्व कर्मांचा अध्यक्ष, सर्व भूतांचा आश्रय, साक्षी, निर्गुण, शुद्ध व चिद्रूप आहे.

त्याला जे ज्ञानी साक्षात पाहतात, त्यांना शाश्वत सुख प्राप्त होते. त्याच्या ज्ञानाने अक्षय्य शक्ती प्राप्त होते. या सुखाचे शब्दांनी वर्णन करता येत नाही. त्याचा केवळ अनुभव घ्यायचा असतो.

हे उपनिषद शैव मताचा प्रसार करण्याच्या उद्देशाने लिहिले असावे असे गुरुदेव प्रा. रा. द. रानडे म्हणतात.

प्रस्तुत उपनिषदातला सर्वश्रेष्ठ देव म्हणजे शिव आहे. त्यालाच भगवान म्हटले आहे. भक्ती हा शब्द पहिल्या प्रथम याच उपनिषदात आढळतो. ईश्वराला प्रेमपूर्वक शरण जावे म्हणजे तो आपल्या बुद्धीत प्रवेश करतो, अशासारख्या वर्णनामुळे प्रस्तुत उपनिषदाने भक्तिमार्गाचा दरवाजा उघडला, असे म्हणता येते. मात्र ही भक्ती विष्णूची नसून शिवाची आहे. याचा शेवटचा श्लोक असा–

यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ।।
(श्वेता. उप. ६.२३)

अर्थ – ज्याची परमेश्वराच्या ठिकाणी परमभक्ती आहे, ज्याप्रमाणे देवाची त्याचप्रमाणे गुरूचीही भक्ती आहे, त्या महात्मा पुरुषाच्या हृदयातच हे (पूर्वी) सांगितलेले रहस्यमय अर्थ प्रकाशित होतात.

प्रस्तुत उपनिषदाचे कोणत्या दृष्टीने विशेष महत्त्व आहे ते सांगताना, प्रा. रानडे लिहितात– "सांख्य व वेदान्त या दर्शनांतील मानसशास्त्र व तत्त्वज्ञान ही त्या वेळी परिणतावस्थेस

पोहोचली नसून त्याविषयी अद्याप विचार चालू होता. म्हणून सांख्य व वेदान्त ही दोनही दर्शने अद्याप पूर्णपणे अलग व भिन्न झाली नव्हती. या सर्व कारणांमुळे व विशेषतः सृष्टिनिर्माण-शास्त्र, मानसशास्त्र व तत्त्वज्ञान या विषयावरील सांख्य व वेदान्ताचे विचार या उपनिषदात एकत्र ग्रथित केले असल्या-मुळे ही दोन दर्शने परस्परांहून कशी भिन्न व अलग होत गेली याचा ऐतिहासिक दृष्टचा विचार करण्याचे कामी या उपनिष-दाचा फार उपयोग होतो." [ उ. र.; रि. इं.; म. त. म. ]

**ष** देवनागरी वर्णमालेतील एकतिसावे व्यंजन. या अक्षराची पहिली अवस्था घोसुंडी येथील शिलालेखात (सनपूर्व २ रे शतक), दुसरी अवस्था कुशाण वंशाच्या राजवटीतील मथुरा,



ष च्या रूपाचा विकासक्रम

सारनाथ, इ. ठिकाणच्या लेखांत (इ. स. चे १ ले व २ रे शतक), तिसरी यशोधर्म्याच्या राजवटीतील मंदसोरच्या लेखात (इ. स. ५३२) आणि चौथी तोरमाणाच्या लेखात दिसते.

कामधेनुतंत्रात याचे वर्णन केलेले आहे ते असे–

**षकारं शृणु चार्वङ्गी अष्टकोणमयं सदा।**
**रक्तचन्द्रप्रतीकाशं स्वयं परमकुंडली ॥**
**चतुर्वर्गमयं वर्णं सुधानिर्मितविग्रहम्।**
**पञ्चदेवमयं वर्णं पञ्चप्राणमयं सदा ॥**

अर्थ – हे चारुगात्री पार्वती, षकार हा अष्टकोणमय, रक्त-चंद्रासारखा, स्वतः वर्तुळाकार, चतुर्वर्णमय, ज्याचा देह अमृत-निर्मित आहे असा, तसेच पंचदेवमय व पंचप्राणमय आहे.

मूर्धा हे याचे उच्चारणस्थान होय. [ म. ज्ञा. को.; श. क. ]

**षट्कर्मे** ब्राह्मणांची षट्कर्मे पुढीलप्रमाणे आहेत–अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह. वैश्यांची षट्कर्मे – अध्ययन, यजन, दान, कृषी, गोरक्षण आणि वाणिज्य. योगसाधनेत आवश्यक मानलेली षट्कर्मे – धौती, बस्ती, नेती, त्राटक, नौली, कपालभाती.

मंत्रसिद्धीसाठी आवश्यक अशी तांत्रिक षट्कर्मे–शांती, वशीकरण, स्तंभन, विद्वेषण, उच्चाटन व मारण. ही षट्कर्मे योग्य काळ, ग्रह, नक्षत्रे, इ. पाहून अधिकारी गुरूच्या मार्गदर्श-नानेच करायची असतात. शांतिकर्मामुळे पूर्वजन्मातील पापांचे दुष्परिणाम नष्ट होतात आणि व्याधी, ग्रहपीडा, इत्यादींचा नाश होतो. विविध प्राणी, स्त्री-पुरुष, देवता यांना वश करून वशी-करणाने मंत्रसिद्धी मिळवता येते. आपल्या विरुद्ध कारवाई कर-णाऱ्या शत्रूचे काम थांबविणे आणि अग्नी, वायू, तेज, इ. तत्त्वांच्या नित्य कर्मात अडथळा आणणे स्तंभनामुळे शक्य होते. स्तंभन केले, की अग्नीसुद्धा मंत्रसिद्धीला पीडा करू शकत नाही. विद्वेषणामुळे शत्रूंची संघटना मोडता येते. ते एकमेकांचा द्वेष करू लागतात. शत्रूला अतिशय पीडा देऊन त्याला आपल्या देशातून पळवून लावण्याचे कार्य उच्चाटनामुळे सुकर होते. आणि मारणामुळे शत्रू जगातून नाहीसाच होतो.

ही तांत्रिक षट्कर्मे करताना तारा, कालिका किंवा छिन्नमस्ता या देवीची आराधना करावी लागते. कर्माला आरंभ करण्यापूर्वी रती, वाणी, रमा, ज्येष्ठा, मातंगी, कुलकामिनी, दुर्गा व भद्र-काली यांची षोडशोपचार पूजा करावी लागते. ही षट्कर्मे एकान्त स्थानी करायची असतात. मारणकर्माची साधना प्रेतावर बसून किंवा स्मशानात करावी लागते. ही कर्मे करताना साधकाने विवस्त्र असावे किंवा व्याघ्रचर्म परिधान करावे. रक्तवर्ण रेशमी वस्त्रही चालते.

मानवी अस्थीपासून केलेल्या मण्यांची माळ जपासाठी शुभ होय. स्फटिकांची किंवा इंद्राक्षांची माळही चालते.

साधनेसाठी बसायला मातीचे, दर्भाचे, लाकडाचे किंवा व्याघ्र-चर्माचे आसन घ्यावे. प्रथम निर्भय होण्यासाठी भैरव मंत्राचा जप करावा. नंतर यथाशास्त्र भूतबली द्यावा.

मारणकर्म शनिवारी रात्री करावे, इतर कर्मे रविवारी करावी, असे सांगितले आहे. अनुष्ठानाला आरंभ करताना पहिल्या दिवशी एक प्रहर रात्र उरली असता गणेशादी पंच देवांसह कुलविनाशिनी देवीची पूजा करावी. त्यानंतर विवस्त्र व मुक्त-केश होऊन, श्रीदेवीचे स्मरण करावे आणि मग मंत्राचा जप सुरू करावा.

अशा रीतीने एक लक्ष जप पूर्ण होईपर्यंत रोज कौलिकांना व ब्राह्मणांना भोजन घालावे. नंतर मत्स्य, मांस व मद्य या द्रव्यांच्या शंभर शंभर आहुती अग्नीत द्याव्या आणि गुरूला विपुल दक्षिणा देऊन संतुष्ट करावे.

अनुष्ठान मोठे असेल तर त्या प्रसंगी बकऱ्याचा बळी द्यायचा असतो. पूजेच्या शेवटी अग्नीला त्याची आहुती द्यावी.

प्रत्येक कर्मासाठी वेगळी शक्ती सांगितलेली आहे. शांति-कर्मात पद्मिनी, वशीकरणात शंखिनी, स्तंभन व उच्चाटन या दोन कर्मांत नागिनी आणि मारणकर्मात डाकिनी शक्ती असावी असे म्हटले आहे. शक्ती म्हणून ज्या स्त्रीची निवड करायची, ती संभोगप्रिय, पुत्रवती व सौंदर्यवती असावी.

साधनेसाठी 'क्रीं' हा एकाक्षरी कालिका मंत्र, 'ह्लीं स्त्रीं हूं' हा तारिणी मंत्र किंवा वज्रवैरोचनीय अकरा-अक्षरी मंत्र घ्यावा, असे योगिनी तंत्रात सांगितले आहे. [योगविद्या; योगिनी तंत्र]

**षट्खंडागम** जैनांचा एक महान प्राचीन ग्रंथ. हा जैन आगमांचाच एक भाग आहे. आचार्य धरसेन हा आगमांचा गाढा पंडित इ. स. च्या पहिल्या– दुसऱ्या शतकात होऊन गेला. गिरिनार पर्वतावर चंद्रगुंफेत तप करीत असता त्याच्या ध्यानात आले, की आगमांतील श्रुतज्ञानाचा बराच भाग लोप पावला आहे व उर्वरित श्रुतज्ञानाचाही लोप होण्याची शक्यता आहे. ते न व्हावे म्हणून मग त्याने आंध्र प्रदेशातील पुष्पदंत व भूतबली नामक दोन मुनींना आपल्या जवळचे सर्व ज्ञान उपदेशिले.

आगम ग्रंथांपैकी 'महाकर्मप्रवृत्ति' नामक पाहुड (प्राभृत) होते. त्यात कृती, वेदना, इ. २४ खंड होते. त्यांतील पहिल्या ६ खंडांवर सूत्ररूप रचना या ग्रंथात केलेली आहे. याची रचना इ. स. च्या २ ऱ्या शतकात झाली. त्यात ६ खंड असल्यामुळे त्याला षट्खंडागम हे नाव मिळाले. या ६ खंडांची नावे अशी– (१) जीवस्थान, (२) क्षुद्रकबन्ध, (३) बन्धस्वामित्व, (४) वेदना, (५) वर्गणा व (६) महाबन्ध.

प्रस्तुत ग्रंथात कर्म व जीव यांच्या विषयीच्या सिद्धान्तांचे मार्मिक विवेचन केलेले आहे.

या ग्रंथातील पहिली १७७ सूत्रे पुष्पदंताने रचली आहेत. त्या भागाला सत्प्ररूपणा म्हणतात. उरलेला भाग भूतबलीने ६००० सूत्रांत रचला. या ग्रंथातील अंतिम खंड महाबंध हा पंडितसमाजात महाधवल या नावाने प्रसिद्ध आहे. आचार्य भूतबलीची ती महान रचना मानली जाते. भूतबली हा प्रकांड पंडित होता, तसाच मंत्रशास्त्राचाही जाणकार होता. षट्खंडागम हा विशुद्ध प्राकृत भाषेत लिहिलेला ग्रंथराज आहे. त्यावर अनेक टीका लिहिल्या गेल्या आहेत. त्यांतील धवला ही टीका सर्वांत विस्तृत, प्रामाणिक व उपयुक्त ठरली आहे. पाहा–जैनधर्म. [आ. सं.; प्रा. सा. इ.]

**षट्चक्रभेदन** एक यौगिक प्रक्रिया. प्रत्येक मानवी शरीरात योगशास्त्राने काही चक्रे मानलेली आहेत. शरीरात सर्वांत खालच्या बाजूला गुदद्वार व उपस्थ इंद्रिय यांच्या मध्यावर जी शिवण आहे, तिच्यावर मूलाधार चक्राची स्थिती मानतात. ब्रह्मांडातील भूपृष्ठावरील वायू प्रथम या चक्रात शिरून नंतर चक्रभेदन करीत वर जातो व हृदयाकाशात आणि नंतर चिदाकाशात संचार करतो, म्हणून याला मूलाधार असे म्हणतात. त्याच्या वर लिंगमूलाच्या ठिकाणी स्वाधिष्ठान चक्र आहे. त्याच्या वरच्या बाजूला नाभिस्थलात मणिपूर चक्र आहे. याच्या वर हृदयात अनाहत चक्र आहे. त्याच्या वर कंठप्रदेशात विशुद्ध चक्र आहे. त्याच्या वर भ्रूमध्यात आज्ञाचक्र आहे आणि सर्वांत वर शिरोभागी सहस्रार चक्र आहे. हे सहस्रार चक्र अधोमुख आहे. बाकीची खालची चक्रे जागृत झाली, की ती ऊर्ध्वमुख होतात. सहस्रार चक्राच्या मध्यबिंदूपासून निरंतर अमृतस्राव होत असतो. पण साधारण जीवाची खालच्या भागातील चक्रे सुप्त असल्यामुळे त्याना हा अमृतस्राव धारण करता येत नाही. त्यामुळे हे अमृत कालाग्निकुंडात गळत राहते व त्यामुळे जीवदेहात जरा, विकार व मृत्यू उत्पन्न होतात. परंतु कुंडलिनी जागृत झाल्यावर ही खालची चक्रे क्रमाने जागृत होतात व ऊर्ध्वमुख होतात. त्यामुळे ती सहस्रार चक्रातून गळणारे अमृत धारण करू शकतात.

या षट्चक्रांचे भेदन केल्यावर कुंडलिनी जागृत होते व पुढे स्वरूपाचा साक्षात्कार होतो. या चक्रभेदनाचा विधी असा–

शुचिर्भूत होऊन सिंहासनावर बसावे व मूलबंध साधावा. गुदद्वार आकुंचन करून प्राण वर खेचणे, याला मूलबंध म्हणतात. हा साधला म्हणजे अपान वायूचा खालचा मार्ग बंद होतो व तो आत संकोच पावू लागतो. मूलाधार चक्रावरून प्राण स्वाधिष्ठान चक्रावर येतो व अपान संकोच पावून स्वाधिष्ठान चक्रावर येऊ लागतो. प्राण व अपान यांचे ऐक्य होण्यासाठी मनाची एकाग्रता व्हावी लागते. तशी एकाग्रता झाल्यास अपान हळूहळू प्राणात लीन होऊ लागतो. तसेच सर्व शरीरातील प्राणाची गती एकवटून ती ऊर्ध्व दिशेने वाहू लागते. ध्यानाचा किंवा जपाचा अभ्यास करताना वृत्ती तन्मय-तदाकार होऊ लागली, की श्वासाचे कार्य हळूहळू बंद होते व बेंबीजवळचे पोट आपोआप आत खेचले जाते. यालाच उड्डीयान बंध असे म्हणतात. या वेळी प्राण स्वाधिष्ठान चक्राच्या वरच्या काठावर व नाभिकमलाच्या तळाशी असतो.

नासाग्रदृष्टियोगाच्या अभ्यासात मान खाली वाकते व हनुवटी छातीवर टेकते. हा जालंधर बंध होय. एकाग्रता होत जाते, तसतसा खाली बंधत्रय साधत जातो. हे तीनही बंध साधले म्हणजे प्राण व मन एकमेकांत लय पावू लागतात. त्या वेळी एक प्रकारची शक्ती उत्पन्न होते व ती षट्चक्राच्या मध्य मार्गाने वर जाऊ लागते. उड्डीयान बंध बरोबर साधला म्हणजे नाभिकमलाच्या ठिकाणी असलेली कुंडलिनी नामक प्राणशक्ती जागृत होते व प्राण सुषुम्ना मार्गाने वर जाऊ लागतो. नाभिकमलावरून प्राण अनाहत चक्रावर येतो. इथे मनाचे वास्तव्य मानलेले आहे. इथे मन व प्राण यांचे संपूर्ण ऐक्य होते. या

अनाहत चक्राचे भेदन केले म्हणजे वायूचे स्फुरण होऊ लागते व अनाहत ध्वनी उत्पन्न होतो. या अनाहत चक्राच्या ठिकाणी चिदाकाश महदाकाशाच्या ठिकाणी लीन होऊ लागते. पुढे प्राणाची ऊर्ध्व गती कंठस्थित विशुद्ध चक्रावरून आज्ञाचक्रावर चालू असते. या दोन चक्रांच्या भेदनातील अनुभव प्रकाश किंवा नाद या रूपांत येतात. शेवटी प्राण ब्रह्मरंध्रात म्हणजे सहस्र-दल सहस्रार चक्रात शिरतो. या वेळी ब्रह्मांडाच्या चारही देहांचे अनुभव येतात. चिदाकाश व महदाकाश एक होते. आत्मा व परमात्मा यांचे ऐक्य अनुभवाला येते व अशा प्रकारे स्वस्वरूपी लीन होता येते. हाच मोक्ष होय.

आत्मसाक्षात्कार प्राप्त करून घेण्यासाठी ध्यान, जप, अजपा-जप, अवस्थालय, वृत्तिनिरोध, राजयोग, हठयोग, इ. निरनिराळे मार्ग सांगितलेले आहेत. त्यांचा सतत नियमाने व दृढनिश्चयाने अभ्यास करीत गेल्यास अनेक प्रकारचे अनुभव येतात आणि आत्मसाक्षात्कार होतो असे श्री. वैद्य यांनी प्रतिपादले आहे. [ पूजातत्त्व; षट्चक्रदर्शन व भेदन – श्री. श्री. म. वैद्य, १९६७]

**षट्तिला एकादशी** एक काम्य व्रत. माघ शु. ११ ला चंद्र मृगशीर्ष नक्षत्रात असताना उपवास, शरीराला तीळ लावणे, तिळमिश्रित जलाने स्नान, तिळांचा होम, तिळांचे दान, तिळमिश्रित जलाने पितरांचे तर्पण व तिल-भक्षण या गोष्टी करायच्या असतात. ही तिलयुक्त षट्कृत्ये होत. फल – पापमुक्ती.

पौष कृष्ण एकादशीलाही षट्तिला एकादशी हेच नाव आहे. या दिवशी केलेल्या व्रतामुळे दिव्य देह प्राप्त होऊन स्वर्गसुखे प्राप्त होतात, असे सांगितले आहे. पद्मपुराणाच्या उत्तरखंडात अध्याय ४२ मध्ये याविषयी एक कथा आली आहे, ती अशी –

एक ब्राह्मण स्त्री होती. तिने अनेक व्रतांचे पुण्य संपादन केले होते; पण अन्नदान मात्र केले नव्हते. एकदा नारदमुनी भिक्षु-वेषाने तिच्या दारी आला. त्याने ब्राह्मणीकडे भिक्षा मागताच ती रागावली व तिने त्याच्या भिक्षापात्रात मातीचे ढेकूळ टाकले. मृत्यूनंतर ती स्वर्गात गेली, तेव्हा तिला राहायला उत्तम घर मिळाले, परंतु त्या घरात धान्याचा कणही नव्हता. मग ती तडक नारदाकडे गेली व त्याला या गोष्टीचा जाब विचारू लागली. नारद म्हणाला. ‘ तू मृत्युलोकी कधी अन्नदान केले नाहीस, म्हणून तुलाही येथे अन्नधान्य मिळाले नाही. आता तू तुझ्या घरात जाऊन दार लावून बैस. थोड्या वेळाने तुझ्याकडे देवस्त्रिया येतील, त्यांच्याकडून षट्तिला एकादशीचे व्रत समजा-वून घे व ते व्रत कर. ’ तिने ते त्याप्रमाणे केल्यावर तिला सर्व प्रकारचे स्वर्गसुख लाभले. [ हि. ध. ]

**षट्तिला द्वादशी** एक व्रत. फाल्गुन वद्य द्वादशी जेव्हा श्रवण नक्षत्रयुक्त असते, तेव्हा तिला षट्तिला द्वादशी असे म्हणतात. या दिवशी तीळ वाहून देवांची पूजा, तिळांचा होम, देव्हाऱ्यात व देवालयात तिळाच्या तेलाचे दिवे पाजळणे, तिळाचे दान, तिलमिश्रित जलाने पितरांचे तर्पण, तिलभक्षण या गोष्टी कराव्या. या दिवशी विष्णूने उपवास करून आपल्या पितरांना तिलांजली दिली व पिंडदान केले, अशी कथा आहे. [ हि. ध. ]

**षडह** एक कालमापनपद्धती. वैदिक आर्य संवत्सर-सत्र नामक एक सबंध वर्षभर चालणारा यज्ञ करीत. त्याचा आरंभ उत्तरायणाबरोबर होई. तिथून पुढे सहा सहा दिवस हा यज्ञ चालू राही. हा सहा दिवसांचा कालखंड म्हणजे षडह. या षडहात होणारा याग म्हणजे षडह याग.

वल नामक दैत्याने देवांच्या गायी पळवून नेल्या होत्या; त्या परत मिळवण्यासाठी देवांनी षडह याग केला होता. [ पं. ज्यो. शा.; वै. नि. ]

**षडक्षर देव** (सतराव्या शतकाचा उत्तरार्ध) एक वीरशैव कन्नड कवी. कर्नाटकातील मळवल्ली तालुक्या-तले दगनुरू हे याचे जन्मग्राम. वयाच्या अकराव्या वर्षीच याला कवित्वस्फूर्ती झाली. कंदपद्य छंदातील कवित्वरचनेविषयी याची विशेष ख्याती आहे. याने संस्कृत व कन्नड अशा उभय भाषांत काव्यरचना केली आहे. राजशेखरविलास, शबरशंकरविलास, वसवराजविजय, वीरभद्रक हे याचे कन्नड ग्रंथ म्हणजे कन्नड चंपूकाव्याचे उत्तम नमुने आहेत. कविकर्णरसायन, वीरभद्रोदारण हे याचे संस्कृत ग्रंथ होत. प्रतिभा आणि पांडित्य यांचा संगम त्याच्या काव्यात दिसून येतो.

दगनुरूमठाचा वीरशैव अधिपती स्वामी चिक्कवीर देशिक हा षडक्षराचा गुरू होता. षडक्षरदेव हा यळंदूर मठाचा अधिपती होता. तिथेच तो निजधामाला गेला. [ हि. क. भ. तु. अ.; श्री. एन्. रंगनाथ, अजन्ता, मे १९५७; सु. वि. को. ]

**षडक्षरी लोकेश्वर** अवलोकितेश्वराचा एक प्रकार. साधन-मालेत याचे वर्णन आहे, ते असे – गौरवर्ण, चतुर्भुज, मुद्रा अंजली, अभिज्ञानचिह्न माला व कमळ. मणिधर व षडक्षरी महाविद्या या याच्या परिवारदेवता होत. ‘ ओं मणिपद्मे हुम् ’ हा याचा मंत्र आहे.

सारनाथच्या मूर्तिसंग्रहालयात याची सांग सपरिवार मूर्ती पाहायला मिळते. कलकत्त्याच्या संग्रहालयातही एक सुंदर मूर्ती

आहे. या अवलोकितेश्वराच्या कित्येक मूर्ती नेपाळमधील बौद्ध मठांत आहेत. [ इं. बु. इ. ]



षडक्षरी लोकेश्वर (कलकत्त्याच्या संग्रहालयातील मूर्ती)

**षड्गुण** ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य हे षड्गुण होत. यांना भग असेही म्हणतात. संधी, विग्रह, यान, आसन, आश्रय व द्वैधीभाव हे राजनीतीतील सहा गुण होत.

**षड्दर्शने** (१) सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदान्त.
(२) सौर, शाक्त, गाणपत्य, शैव, वैष्णव व स्कांद.

**षड्ब्राह्मण** मरीची, अत्री, पुलस्त्य, पुलह, वसुमत किंवा वसिष्ठ आणि ऋतू या सहा ब्राह्मणांना षड्ब्राह्मण ही संज्ञा आहे. यांनी विश्वारंभी बहुत सृष्टी निर्माण केली. त्यामुळे त्यांना प्रजापती असेही म्हटले आहे.

**षड्भुज सिततारा** एक बौद्ध देवता. ही ध्यानी बुद्ध अमोघसिद्धी याच्या कुळातली आहे. साधनमालेत हिच्या ध्यान रूपाचे विस्तृत वर्णन केलेले आहे, ते असे—

हिला तीन मुखे व सहा भुजा आहेत. हिचे उजवीकडचे मुख पिवळे व डावीकडचे निळे आहे. प्रत्येक मुखावर तीन नेत्र आहेत. हिच्या उजव्या हातांत अक्षमाला व बाण असून, तिसरा हात वरद मुद्रेत आहे. डाव्या हातांत उत्पल, पद्म व धनुष्य आहे. ही चंद्रबिंबावर अर्धपर्यंकासनात बसलेली असून, चंद्रासारखी तिची प्रभा आहे. हिच्या जटामुकुटावर अमोघसिद्धीची प्रतिमा आहे. हिच्या मस्तकावर चंद्रकोर व पाच मुंडकी आहेत. ही षोडशवर्षा असून, विविध अलंकारांनी विभूषित आहे.

हिचे नेपाळी रूप किंचित वेगळे आहे. त्यात ती वज्रपर्यंकासनात बसलेली दाखवली आहे. [ इं. बु. इ. ]



षड्भुज सिततारा हिचे नेपाळी रूपध्यान

**षड्रसीव्रत** एक जैन व्रत. व्रतावधी सहा महिने. पहिल्या महिन्यात दूध, दुसऱ्यात दही, तिसऱ्यात तूप, चौथ्यात तेल, पाचव्यात मीठ आणि सहाव्यात गोड पदार्थ आहारातून वर्ज्य करणे, असा याचा विधी आहे. या कालात 'ओं ऱ्हीं ऋषभादिवीरान्तेभ्यो नमः'। या मंत्राचा त्रिकाल जप करावा, असे सांगितले आहे. व्रतपूर्तीनंतर उद्यापन करायचे असते. [ जै. व्र. वि. सं. ]'

**षड्विंश ब्राह्मण** सामवेदाचा एक ब्राह्मणग्रंथ. या ग्रंथात पाच प्रपाठक असून, पहिल्या प्रपाठकात सात खंड, दुसऱ्यात दहा, तिसऱ्यात बारा, चौथ्यात सात व

पाचव्यात बारा खंड आहेत. हे ब्राह्मण म्हणजे पंचविंश ब्राह्मणाचा परिशिष्ट भाग आहे, हे त्याच्या नावावरूनच सूचित होते. तसेच, यातील विषयही पंचविंश ब्राह्मणातील विषयांना पूरक आहेत. या ब्राह्मणात सुब्रह्मण्यविधी, सौम्यचरुविधान, बहिष्पवमानधर्म, होत्रकांचे उपाख्यान, ऋत्विग्‌विधान, नैमित्तिक होम, अध्वर्युप्रशंसा, अवभृथ, अभिचारक प्रयोग, द्वादशाहस्तुती, श्येनादियागविधी, वैश्वदेवसत्र, इ. विषय आलेले आहेत. यातील पाचव्या प्रपाठकाला अद्‌भुत ब्राह्मण असे म्हणतात. कारण यात भूकंप, दुष्काळ या वेळी फुलेफळे उत्पन्न होणे, अश्वतरीला गर्भ राहणे, हत्तीण बुडणे, इ. उत्पातांसाठी शांतीचा प्रयोग सांगितलेला आहे. यावरून त्या काळच्या विचित्र कल्पनांची माहिती मिळते या व अशाच चमत्कारिक घटनांसाठी नंतरच्या काळातील ग्रंथांत प्रायश्चित्तविधी सांगितले आहेत. [वै. सा. सं.; म. ज्ञा. को.; हिंदुत्व]

**षण्मुख** जैन दैवत – समूहातला एक यक्ष. हा विमलनाथ या तीर्थंकराचा सेवक होता. दिगंबरमते याचे नाव चतुर्मुख आहे. विमलनाथचरितात याचे वर्णन येते, ते असे–

मयूरवाहन, गौरवर्ण व बारा हातांचा. फल, चक्र, बाण, खड्‌ग, पाश, माला, मुंगूस, थाळी, धनुष्य, पाश, शृंखला व अभयमुद्रा धारण करणारा.

याचे पौराणिक कार्तिकेयाशी पुष्कळच साम्य दिसते. [जैं. इ.]

**षण्मुखी मुद्रा** योगसाधनेतील एक मुद्रा. हिची कृती अशी– दोन्ही कर्णरंध्रे दोन हातांच्या आंगठ्यांनी, दोन्ही नेत्र दोन्ही तर्जन्यांनी, दोन्ही नाकपुडचा दोन्ही मध्यांगुलींनी व मुख अनामिका आणि कनिष्ठिकांनी बंद करावे. असे केल्याने नादश्रवण व तेजदर्शन उत्तम प्रकारे होते. [यो. सो. पू.]

**षण्मुद्रा** बौद्ध मूर्तिनिर्माणशास्त्रातली सहा आभूषणे. कंठी, कंकण, रत्न, मेखला, भस्म आणि सूत्र या सहा वस्तू सहा पारमितांची प्रतीके म्हणून बौद्ध देवमूर्तींच्या अलंकरणात वापरतात. या सहाही वस्तू सामान्यतः मानवी हाडांच्या बनवाव्या, असा संकेत आहे. [इं. बु. इ.]

**षण्मूर्तिव्रत** एक काम्य ऋतुव्रत. चैत्र शुद्ध षष्ठीला सहा ऋतूंच्या पूजनाला प्रारंभ करतात. सहा ऋतू हेच या व्रताच्या देवता होत. व्रतावधी एक वर्ष. ग्रीष्म ऋतूत फळे, फुले, तुरट पदार्थ; वर्षा ऋतूत गोड पदार्थ; शरद् ऋतूत इतर खाद्य पदार्थ व मीठ; हेमंत ऋतूत कडू व आंबट पदार्थ; आणि शिशिर ऋतूत तिखट पदार्थ त्या त्या ऋतूला अर्पण करतात. प्रत्येक महिन्याच्या शु. षष्ठीला उपवास किंवा नक्त भोजन करतात आणि त्या त्या ऋतूला योग्य असेल तो रस सेवन करतात. फल – आरोग्यप्राप्ती. [हि. व्र.]

**षष्ट्यब्दपूर्तिशांती** माणसाच्या वयाला साठ वर्षे पूर्ण झाली, म्हणजे ही शांती करतात. हिला उग्ररथशांती, षष्टितमाब्दिशांती किंवा मार्कंडेयशांती अशीही नावे आहेत. पाहा – उग्ररथशांती.

**षष्ठी** एक बालसंरक्षक लोकदेवता. हिच्या निर्मितीची कथा ब्रह्मवैवर्त पुराणात (२.४३) आणि देवीभागवतात (९.४६) सांगितली आहे. या दोन्ही ग्रंथांतील कथानक व श्लोकही एकसारखेच आहेत. ही मूलप्रकृतीच्या सहाव्या अंशाने प्रकट झाली, म्हणून हिला षष्ठीदेवी असे नाव मिळाले. षष्ठी ही ब्रह्मदेवाची मानसकन्या असून, स्कंदपत्नी देवसेना ती हीच होय. ती षोडश मातृकांत प्रसिद्ध आहे. हिची कथा पुढीलप्रमाणे-

स्वायंभुव मनूचा पुत्र प्रियव्रत नावाचा राजा होता. त्याच्या पत्नीचे नाव मालिनी होते. बरेच दिवस त्यांना मूल नव्हते. कालांतराने मालिनीला मुलगा झाला; पण तो तत्काल मरण पावला. राजा मुलाला घेऊन स्मशानात गेला. तिथे त्याला देवसेना दिसली. पुत्राच्या मृत्यूने दुःखी झालेल्या राजाने तिचे पूजन केले. देवसेनेने प्रसन्न होऊन राजपुत्राला जिवंत केले. राज्यात आपली पूजा सुरू करण्याच्या अटीवर तिने राजपुत्राला त्याच्या स्वाधीन केले. राजा मुलाला घेऊन राजवाड्यात आला. मग त्याने पुत्रजन्माचा महोत्सव करून सहाव्या रात्री षष्ठी देवीचे पूजन केले. 'ॐ ह्रीं षष्ठीदेव्यै स्वाहा' या मंत्राने तिची पूजा केली.

तेव्हापासून लोक तिची पूजा करू लागले. हिच्या कृपेने काकवंध्या आणि मृतवंध्या यांनाही पुत्रप्राप्ती होते.

पुराणातील या षष्ठीकथेच्या निर्मितीचा एक मोठा आधार म्हणजे महाभारतातील जरा राक्षसीची कथा होय (सभा. अ. १८.१९). षष्ठीच्या विकासाच्या इतिहासातील हा एक महत्त्वाचा आधार आहे.

षष्ठीची निरनिराळ्या नावांनी भारतभर पूजा होते. महाराष्ट्रात तिला सटवी, संतुबाई किंवा सुभान संतुबाई असे म्हणतात. सटवी हे षष्ठीचे मराठी भ्रष्टरूप आहे. बहुतेक साऱ्या हिंदीभाषी प्रांतांतून तिचा छठ अथवा छठी असा उल्लेख येतो. छठ हेही 'षष्ठी' चे हिंदी रूप आहे. हरियाणात व राजस्थानात ती बेमाता किंवा बेहमाता या नावाने प्रसिद्ध आहे

शिवाय जातमातृ देवता, जातहारिणी, चर्चिका, इ. तिची नावे म्हणजे तिच्या विकासातील विविध दुवे होत. बौद्धदेवी हारितींचाही षष्ठीशी निकटचा संबंध आहे.

षष्ठीने नवजात शिशूला अपाय करू नये, त्याचे आरोग्य टिकावे आणि आईसह बाळाचे आयुष्य वाढावे म्हणून मूल जन्मल्यावर सहाव्या दिवशी रात्री या देवीची सूतिकागृहात पूजा करतात. त्या वेळी विघ्नेश, जन्मदा, षष्ठी, जीवंतिका व शस्त्रगर्भा या देवतांचेही पूजन करतात. ब्राह्मण शांतिसूक्तांचे पठण करतात. मग ब्राह्मणांना खाद्य, तांबूल व दक्षिणा देऊन आवाहित देवतांचे विसर्जन करतात. इष्टमित्रांना भोजन देतात. या दिवशी रात्री जागरण करण्याची पद्धत आहे.

या पूजेबरोबर काही लोकाचारही केले जातात. ब्रह्मा मुलाचे भाकीत करतो आणि सटवी तो लेख मुलाच्या कपाळी लिहिते अशी समजूत आहे. ही समजूत 'सटवी – ब्रह्म्याची कहाणी' किंवा 'सटवीची कथा' यासारख्या लोककथांवरून रुळते. ब्रह्मदेवाला भाकीत लिहिण्यासाठी साहित्य म्हणून सूतिकागृहात कोरा कागद, दौत, लेखणी, तसेच पाटा, पूजासाहित्य, बाळाच्या घुटीचे साहित्य व नैवेद्य इ. वस्तू असतात. शिवाय एक दिवा अखंड तेवत ठेवलेला असतो. प्रांतपरत्वे, कुलपरंपरेनुसार किंवा जातिनिहाय या पूजाप्रकारात आणि वस्तूंत अनेक पर्याय दिसतात. बंगालमध्ये प्रसूतीच्या सहाव्या



षष्ठीदेवी – वीरभूम

दिवशी सायंकाळी षष्ठीची शेणाची अथवा मातीची मूर्ती करून तिची पूजा करतात. मूर्तीशेजारी पाण्याने भरलेला एक कलश आणि आंब्याचे टहाळे ठेवतात. संताळ परगण्यातील मैथिली ब्राह्मणांकडे मूल जन्माला आले, की बाळंतिणीच्या खोलीत एका भिंतीवर, मुलगा असल्यास दहा व मुलगी असल्यास पाच सरळ रेषा काढतात. सायंकाळी षष्ठीपूजन होते. त्यासाठी भिंतीवर एक चौकोन रंगवितात. चौकोनाच्या मध्यभागी षष्ठीची आकृती असते. भिंतीवरील षष्ठीचे हे आलेखन सहा महिने ठेवतात. नंतर ते दुधाने पुसून टाकतात.

सूतिकागृहाच्या भिंतीवर षष्ठीचे चित्र काढून त्याची पूजा करण्याची पद्धत फार प्राचीन असावी. कारण अनंतदेवाच्या संस्कारकौस्तुभात, ब्रह्मवैवर्तपुराणात, देवीभागवतात आणि महाभारतात (सभा. १८.५) या प्रथेचा आढळ होतो.

महाराष्ट्रात काही ठिकाणी ब्राह्मण घराण्यात षष्ठीपूजेच्या दिवशी पाच मराठा स्त्रियांना जेवायला घालण्याची पद्धत आहे. त्यात दोन सुवासिनी, दोन विधवा व एक कुमारिका असते. याला लोकभाषेत पाचांचा कुलधर्म असे नाव आहे. नंतर एका वर्षाने त्यात एक सुवासिनी, एक विधवा आणि एक कुमारिका जेवायला घालतात.

प्रसूतीच्या सहाव्या दिवसाप्रमाणे पाचव्या दिवशीही सटवीची सूतिकागृहात पूजा करण्याची पद्धत सर्वत्र आहे. याला पाचवीची पूजा असे म्हणतात. या दिवशीची पूजा षष्ठीच्या पूजेप्रमाणेच असते. परंतु काही जाती-जमातींत थोडाफार फरक आढळतो. बाळंतीण व बाळ यांचे उशाचा पायथा व पायथ्याचे उसे करतात. पाच दिवे, पाच मुटके व पाच फळे घेऊन त्यांनी देवीची पूजा करतात. हे सर्व पदार्थ कणकेचे केलेले असतात. हळदीची देवी करून सुपात ठेवलेली असते. त्याचप्रमाणे पाच सुपाऱ्या, पाच खारका व पाच हळकुंडेही घेतात. बिब्याला सुई टोचून तो बाळंतिणीच्या उशाला ठेवतात. बाजेभोवती बिनमिठाच्या घुगऱ्या पसरतात. सटवाईला हळद-कुंकू वाहिल्यावर बाळाला बाजेखाली ठेवतात. मग एक कुमारिका बाळाला सटवाईचा अंगारा लावते आणि प्रथम उजवा पाय पुढे टाकून बाळाला ओलांडते. हा देवीचा अंगारा म्हणजे हिंगाची पूड असते. कित्येक ठिकाणी पाचवीची पूजा विधवेच्या हातून करतात.

पाचव्या दिवसापासून बाळंतिणीच्या खोलीत एक दिवा सतत तेवत ठेवलेला असतो. बंगाल, बिहार, ओडिसा इ. प्रदेशांमध्ये सूतिकागृहात धुनी पेटवून ठेवायची प्रथा आहे. या धुनीमुळे बाळाला व त्याच्या आईला भूतबाधा होत नाही, अशी समजूत असते.

षष्ठीपूजेत न्हाणीपूजनाचा एक प्रकार पाहायला मिळतो. ही न्हाणी म्हणजे एक खड्डा असतो. बाळ-बाळंतिणीला जिथे न्हाऊ घालतात त्या न्हाणीची ही पूजा असते. हे पाणी घराबाहेर जाऊ न देण्याची खबरदारी घेतात. कारण मांत्रिक किंवा वांझ

स्त्रिया या पाण्याच्या स्पर्शासाठी टपलेल्या असतात व हे पाणी प्याल्याने अपत्यहीन स्त्रियांना गर्भसंभव होतो अशी समजूत आहे. या पाण्याचा बाळाशी व त्याच्या आईशी प्रत्यक्ष संबंध आल्यामुळे त्याच्यावर केलेले अभिचारात्मक प्रयोग हे तत्काल फलदायी होतात असे म्हटले जाते.

पाचवीची किंवा सहावीची पूजा ही घरात होते. पण बाळंतीण हिंडूफिरू लागली की चांगला दिवस पाहून तिला सटवीच्या दर्शनाला नेतात. सटवाईचे हे ठाणे गावाबाहेर झाडाझुडपाखाली असते. या सटवीला रानसटवाई असे म्हणतात. पूजेला जाताना बाळंतिणीबरोबर लहान-लहान मुले असतात. देवीला वाहण्यासाठी एक लहानसा पाळणा, नैवेद्याला खिचडी, पुऱ्या व पुरणा-वरणाचा स्वयंपाक इ. पदार्थ असतात. तिथे गेल्यावर बाळंतीण पाच व सात लहान लहान खड्यांच्या दोन रांगा करून, त्यांची हळदकुंकू वाहून पूजा करते.

सटवीच्या या पूजेशिवाय तिची वर्षातून आणखी सहा वेळा पूजा करतात. परंतु जिची मुले मरण पावली आहेत अशी स्त्री प्रत्येक महिन्यात केळीच्या झाडाखाली तिची पूजा करते. केळीच्या झाडाखालचे सटवीचे वास्तव्य ही एक लक्षणीय गोष्ट आहे. कारण केळ ही बहुफला आहे आणि षष्ठीला बहुपुत्रिका असे म्हणतात. त्यामुळे केळीखालच्या सटवीची पूजा ही सुफलीकरणाची इच्छा किंवा सादृश्यानुगामी जादू असावी (law of similarity) असे दिसते.

एखादी स्त्री गरोदर असली तर तिच्या सातव्या महिन्यात एक मराठा विधवा स्त्री सवाष्ण म्हणून सांगतात आणि तिला भोजन देतात. या सवाष्णीला सटवाईची सवाष्ण असे म्हणतात. सटवाईची ही प्रासंगिक पूजा होय.

सटवाईच्या मूर्ती नसतात. गावोगाव तांदळाच्या स्वरूपात, गावाबाहेर एखाद्या घुमटीत किंवा झाडाखाली तिची ठाणी असतात.

षष्ठी ही एक मातृका आहे. मातृका या मुळच्या बालघातक म्हणून प्रसिद्ध आहेत. बालकाच्या अकाली मृत्यूला त्याच जबाबदार असतात अशी प्राचीन कालापासूनची धारणा आहे. तेव्हा त्यांनी आपले बालघातक स्वरूप सोडून बालसंगोपनाचे काम करावे, यासाठी त्यांची पूजा सुरू झाली आणि या पूजाक्षेत्राचा पुढे खूप विस्तार झाला. भारतभर आढळणारी तिची पदं ही या गोष्टीची साक्ष देतात. या पदांमधून अपत्यप्राप्ती, अकालमृत्युहरण, बालसंगोपन हेच विषय पुन्हापुन्हा सांगितलेले असतात. पाहा– चर्चिका, जरा, जातमातृदेवता, बेहमाता, स्कंद, हारिती. [देवीकोश ३; प्रा. भा. लो. ध.; गॉ. इं.; हिंदुधर्माचे स्वरूप, भाग २ रा – श्री. बाबा पदमनजी, १९०१; हि. ध.; सं.को.; म.लो. मा. पुष्प ३ रे; सु. वि.को.; से. इं. वे. बें. १९५१.]

**षष्ठीव्रत** (१) एक काम्य व्रत. पंचमीला उपवास आणि षष्ठीला किंवा सप्तमीला सूर्याची पूजा करणे हा या व्रताचा विधी आहे. अश्वमेधाइतके फल मिळते. याचा दुसरा पर्याय पुढीलप्रमाणे– शुद्ध षष्ठीला मंगळवार असेल तर त्या तिथीला हे व्रत करावे. हे व्रत निरनिराळ्या महिन्यातही करावे. फल– अक्षय पुण्यप्राप्ती [ हि. ध. ]

(२) एक जैन व्रत. हे व्रत सहा वर्षांत पूर्ण होते. प्रतिवर्षी श्रावण शुद्ध षष्ठीला उपवास करणे व ॐ ऱ्हीं श्रीनेमिनाथाय नमः ' या मंत्राचा त्रिकाल जप करणे हा या व्रताचा विधी होय. या व्रतासंबंधी विविध कथा सांगितल्या आहेत. [जै. व्र. वि.सं.]

**षोडश कला** शंखिनी, पद्मिनी, लक्ष्मी, कामिनी, पयोष्णी, ऐश्वर्यवर्धिनी, मोदा, आश्चर्यदा, आल्हादिनी, व्यापिनी, मोहिनी, प्रभाप्रदा, क्षीरवर्धिनी, वेगवर्धिनी, विकासिनी व सौमिनी या चंद्राच्या सोळा कला होत. षोडशकला विद्या ही ब्राह्मविद्या छांदोग्य उपनिषदांतील जाबालीच्या कथेत आली आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**षोडशकारण व्रत** एक जैन व्रत. हे व्रत भाद्रपद, माघ किंवा चैत्र महिन्याच्या वद्य प्रतिपदेला सुरू करतात व पुढील महिन्याच्या वद्य प्रतिपदेला त्याची समाप्ती करतात. प्रतिपदेच्या दिवशी उपवास करून अभिषेक करतात व 'ओं ऱ्हीं दर्शनविशुद्ध्यादिषोडशकारणेभ्यो नमः ' या मंत्राचा त्रिकाल जप करतात. पारणेच्या दिवशी अभिषेक करीत नाहीत. शेवटच्या सोळाव्या उपवासाच्या दिवशी सोळावा अभिषेक करतात.

प्राचीन काळी राजगृह नगरीतील महाशर्मा ब्राह्मणाच्या कालभैरवी नामक कुरूप कन्येने हे व्रत केले. त्यामुळे स्वर्गात ती महर्द्धिक देव झाली आणि त्यानंतर पूर्व विदेहात तिला सीमंधर तीर्थंकराचा जन्म प्राप्त झाला. [ जै. व्र. वि. सं.; व्र. ति. नि.]

**षोडश महादाने** तुलापुरुष, हिरण्यगर्भ, ब्रह्मांड, कल्पवृक्ष, गोसहस्र, हिरण्यकामधेनू, हिरण्याश्व, हिरण्याश्वरथ, पंचलांगलक, धरा, विश्वचक्र, कल्पलता, सप्तसागर, रत्नधेनू, महाभूतघट व कामधेनू ही सोळा महादाने होत.

**षोडश शृंगार** उज्ज्वलनीलमणीच्या राधाप्रकरणात पुढील सोळा शृंगारांचा उल्लेख आलेला आहे– स्नान, नासाग्रजाग्रन्मणी, असितपट, सूत्रिणी, वेणीबंधन, कर्णा-

अर्तास, अंग चर्चित करणे, पुष्पमाला धारण करणे, हातात कमळ घेणे, केसांत फूल घालणे, तांबूल भक्षण करणे, हनुवटीवर कस्तुरीने नक्षी काढणे, डोळ्यांत काजळ घालणे, मकरीपत्र-आदी आकृतींनी शरीर सजविणे, पायांना अळिता लावणे व कपाळावर तिलक लावणे.

नंतरच्या काळात, मुसलमानी प्रभावामुळे दातांना मिस्सी लावणे, याचाही अंतर्भाव सोळा शृंगारांत होऊ लागला.

श्री. नगेंद्रनाथ बसू यांनी सोळा शृंगारांची वेगळी नावे दिली आहेत, ती अशी – अंगाला उटणे लावणे, स्नान करणे, स्वच्छ वस्त्र धारण करणे, केस विंचरणे, काजळ घालणे, भांगात शेंदूर भरणे, अळिता लावणे, कपाळावर तिलक लावणे, हनुवटीवर तीळ रेखाटणे, मेंदी लावणे, सुगंधी अत्तरे लावणे, अलंकार घालणे, पुष्पमाला धारण करणे, मिस्सी लावणे, विडा खाणे व ओठ रंगविणे.

ही सोळा शृंगारांची कल्पना मध्ययुगात प्रचारात आलेली दिसते. सोळा शृंगारांच्या नावांबद्दलही एकवाक्यता नाही. तसेच वेळोवेळी यात नव्या शृंगारांचीही भर पडलेली आहे. मेंदी आणि मिस्सी ही याची उदाहरणे म्हणून सांगता येतील.

**षोडशस्तोम** सोळा दिवस चालणारा एक सोमयाग. तांड्य ब्राह्मणात (१७.१.१) याविषयी एक कथा आहे, ती अशी – देव एकदा स्वर्गात गेले, तेव्हा त्यांच्यावर अवलंबून असणारे काही पृथ्वीवरच राहिले. कारण ते व्रात्य जीवन जगत होते. मग आपला उद्धार व्हावा म्हणून त्यांनी देवांच्या कृपेने मरुतांकडून षोडशस्तोम व अनुष्टुभ् छंद मिळवला. नंतर त्यांना स्वर्गप्राप्ती झाली.

चारही व्रात्यस्तोमांत षोडशस्तोमाचा उपयोग करतात. तांड्य ब्राह्मणात ( १७.१.२ ) म्हटले आहे, की व्रात्य जीवन जगणारे हीन आहेत. ते ब्रह्मचर्य पाळीत नाहीत, शेती किंवा व्यापारही करीत नाहीत; षोडशस्तोमाने त्यांची या सर्व पापां-पासून मुक्तता होते, असेही तिथे सांगितले आहे. [ हि. ध. ]

**षोडशिन्** एक सोमयाग. यात उक्थाप्रमाणेच पंधरा स्तोत्रे आणि पंधरा शस्त्रे म्हणायची असतात. पण या-शिवाय यात आणखी एक स्तोत्र आणि तृतीय सवनात षोडशिन् नामक एक शस्त्र म्हणायचे असते. या यागात प्रातःसवनाच्या वेळी किंवा प्रत्येक सवनाच्या वेळी एक अधिक सोमग्रह अर्पण करावा, असे आपस्तंबाने सांगितले आहे (१४.२.४–५). हा सोमग्रह चौकोनी असून, खदिर वृक्षाचा बनवलेला असतो. सूर्या-स्ताच्या वेळी अध्वर्यूने सामगायकाला सुवर्ण दिल्यावर षोडशिन् ग्रहाचे स्तोत्र सुरू करतात. अटकर बांध्याची आणि तांबूस रंगाचे कान असलेली एक गाय देऊन सोम विकत घेतात. या यागात एक मेंढा इंद्राला बळी देतात. तांबूस तपकिरी घोडा किंवा मादी खेचर ही या यागाची दक्षिणा असते. [ हि. ध. ]

**षोडशोपचार पूजा** आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आच-मन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, मंत्रपुष्प, प्रदक्षिणा व नमस्कार हे पूजेतील षोडशोपचार होत. पाहा – देवपूजा.

**संकटकालव्रत** कार्तिकात शिव आणि विष्णू यांची पूजा, नामस्मरणपूर्वक जागरण, दिवा लावणे आणि उद्यापनास ब्राह्मणभोजन असा या व्रताचा विधी आहे. हे व्रत पिंपळाच्या झाडाखाली अथवा देवालयात बसून करावें असे पद्म पुराणात सांगितले आहे. फल–संकटनाश.

**संकटहरणव्रत** एक जैन व्रत. व्रत वर्षातून तीन वेळा, भाद्रपद, माघ आणि चैत्र मासांतील शुद्ध त्रयोदशीला करतात व पौर्णिमेला ते समाप्त करतात. प्रतिदिनी त्रिकाल 'ओं ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः असि आ उसा सर्वशान्तिं कुरु कुरु स्वाहा' या मंत्राचा जप करणे आणि तीन वर्षे पूर्ण झाल्यावर व्रताचे उद्यापन करणे, असा या व्रताचा विधी आहे. [ जै. व्र. वि. सं.]

**संकर जाती** भिन्न भिन्न वर्णांतील स्त्री-पुरुषांच्या अनुलोम व प्रतिलोम विवाहसंबंधामुळे जी संतती उत्पन्न होते, तिला संकर जाती म्हणतात. या संकर जातींत आणखी परस्पर मिश्रण झाल्यामुळेही आणखी वेगळ्या जाती निर्माण झाल्या. असे संकर असंख्य होतात. सर्व स्मृतिकारांनी सांगितलेल्या जाती एकत्र केल्या तरी त्यांची संख्या शंभराहून अधिक होत नाही. पण आज हिंदुस्थानात हजारो जाती अस्ति-त्वात आहेत.

निरनिराळ्या स्मृतिकारांनी या संकर जातींची उत्पत्ती कशी झाली, ते सांगितले आहे; पण त्यात फार मतभेद आहेत. मनूने निषाद व पारशव हे शब्द समानार्थक मानले असून, ब्राह्मण पुरुष व शूद्र स्त्री यांच्या संततीला ती नावे दिली आहेत (९.१७८); पण नारदाने त्या दोन भिन्न जाती मानून, 'शूद्र स्त्रीला ब्राह्मणापासून झालेली संतती ती पारशव आणि शूद्र स्त्रीला क्षत्रियापासून झालेली ती निषाद' असे म्हटले आहे ( स्त्रीपुंसयोग १०८ ). मिताक्षराकार तर निषाद हे

एक स्वतंत्र जात मानतो. असाच प्रकार करण, रथकार, इ. जातींचा झाला आहे. वैश्याला शूद्र स्त्रीपासून होतो तो करण, असे गौतम म्हणतो (४. १७); पण बोधायनाच्या मते वैश्याला शूद्र स्त्रीपासून होतो तो रथकार होय. गौतम ज्याला भृज्जकंठ म्हणतो (४. १०) त्याला इतर अंबष्ठ म्हणतात. वसिष्ठाच्या मते (१८. ५) वैश्याला राजकन्येपासून झालेला तो पुल्कस होय. पण निषादापासून शूद्र स्त्रीला होतो, तो पुल्कस, असे बोधायन म्हणतो (बो. ध. सू. १.९.१३). अशा प्रकारे कोणाचा कोणाशी मेळ नसल्यामुळे या उपपत्ती वास्तविक किंवा सयुक्तिक नाहीत, असे म. म. पां. वा. काणे यांचे मत आहे. मागध, वैदेहक, आवन्त्य ही नावे देशवाचक असूनही त्यांची उपपत्ती संकराच्या कल्पनेवर लावलेली आढळते. वैश्यापासून ब्राह्मणीला झालेला तो वैदेहक असे बोधायन म्हणतो (१.९.७).

मनूने वीस संकर जाती सांगितल्या आहेत व त्यांचे उद्योग दिले आहेत. जातींच्या उत्पत्तीचा विचार मनू व औशनस या दोघांनीच विस्तृतपणे केलेला आहे. पण त्यात जातींची नावे, त्यांचे धंदे व त्यांची उत्पत्ती यांत फार फरक आहे. औशनस स्मृतीत एकूण अडतीस जातींची उत्पत्ती व त्यांचे धंदे सांगितलेले आहेत. त्या अडतीस जातींपैकी विवाहसंबंधामुळे उत्पन्न झालेल्या जाती २८ असून, अनैतिक संबंधातून उत्पन्न झालेल्या दहा आहेत. विवाहोत्पन्न संकर जातींची नावे अशी–सूत, वेणुक, चर्मकार, मागध, चांडाळ, श्वपच, आयोगव, ताम्रोपजीवी, सूनिक, उद्बंधक, पुक्कस, रजक, नर्तक, वैदेहक, चर्मोपजीवी, सूचिक, मूर्धावसिक्त, नृप, गूढजातक, अंबष्ठ, पारशव, सूत (निराळी उत्पत्ती), उग्र, सूचक, तक्षक, मत्स्यबंधक, कंटकार व काकवच. अनैतिक संकर जातींची नावे – रथकार, पुलिंद, रजक, चक्री ( तेली ), भिषक, कुंभकार, निषाद, मणिकार, शूलिक व कटकार. पाहा–वर्णसंकर. [ध. शा. वि.; ध. शा. मं.]

**संकर्षण** श्रीकृष्णाचा भाऊ बलराम याचे एक नाव. पांचरात्र संप्रदायात याला परमेश्वराचा एक व्यूह मानतात. भागवत संप्रदायात श्रीकृष्ण, संकर्षण, प्रद्युम्न, सांब व अनिरुद्ध या वृष्णी वंशातील पाच पुरुषांना पंचवीर मानण्यात आले होते. परंतु कालांतराने सांबाला वगळून इतर चौघांना व्यूह मानण्यात आले. संकर्षण हा व्यूह ज्ञान व बल धारण करणारा आहे.

काश्मीरात मध्य युगातील चतुर्व्यूह किंवा विष्णूच्या चतुर्मुख मूर्ती आढळतात. त्यांचे एक मुख मानवी मुख, एक सिंहाचे मुख व तिसरे वराहमुख असते. चौथे मुख मागे असल्यामुळे दिसत नाही; पण ते दैत्यमुख असावे. विष्णुधर्मोत्तर पुराणात (३.८५) अशा चतुर्मुख मूर्तीला वैकुंठ म्हटले आहे. त्या मूर्तीचे सिंहमुख संकर्षणाचे असून, ते ज्ञानदर्शक मानले जाते.

बृहत्संहितेत (५७.५.३६) संकर्षणाचे वर्णन आहे, ते असे- त्याच्या हातात नांगराचा फाळ असावा, त्याचे नेत्र गोल व फिरणारे (नशादर्शक) असावे, एकाच कानात कर्णभूषण असावे आणि देह शुभ्र असावा.

मथुरेजवळ सापडलेली मूर्ती सनपूर्व पहिल्या किंवा दुसऱ्या शतकातली असावी. तीत बलराम (संकर्षण) नागफणीच्या छत्राखाली उभा असून, त्याच्या हातात हल व मुसल ही आयुधे आहेत. त्याने आखूड धोतर नेसले असून, डोक्याला मोठे पागोटे बांधलेले आहे. पाहा – चतुर्व्यूह, बलराम. [डे. हिं. इ.]

**संकल्प** कोणतेही धर्मकृत्य करायचे असेल तर त्याआधी त्याचा संकल्प करावा, असे सांगितले आहे. मनाने जे निर्धारित केले असेल, त्याचा वाचेने उच्चार करणे व हाताने उदक सोडणे याला संकल्प म्हणतात. संकल्पाला प्रारंभ करताना प्रथम गणपती, विष्णू, इष्टदेवता, कुलदेवता, ग्रामदेवता, वास्तुदेवता, नवग्रह, इत्यादींचे स्मरण करून नंतर कल्पमन्वंतर, भरतखंड, जंबुद्वीप, त्यातील स्वतःचा वास्तव्यप्रदेश, चालू अवतार, युगाचा चरण, संवत्सर, ऋतू, मास, पक्ष, तिथी, वार, नक्षत्र, त्याचप्रमाणे चंद्र, गुरू आणि रवी यांच्या वर्तमान राशी, इत्यादींचा नामोल्लेख करायचा असतो. सर्वसामान्य संकल्प देवपूजेच्या वेळी करतात, तो असा–

मम आत्मनः श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थम् अस्माकं सर्वेषां सकुटुम्बानां सपरिवाराणां द्विपदचतुष्पदसहितानां क्षेमस्थैर्यविजयाभयायुरारोग्यैश्वर्यावाप्त्यर्थं समस्तदुरितोपशान्त्यर्थं समस्ताभ्युदयार्थं च श्रीमहाविष्णुप्रमुखपञ्चायतनदेवताप्रीत्यर्थं यथामीलितोपचारद्रव्यैः ध्यानावाहनादिषोडशोपचारपूजां करिष्ये ।

हा संकल्प उच्चारून पळीने उजव्या हातावर उदक घालून ते ताम्हनात सोडावे. पूजेच्या ऐवजी एखादे व्रत, दान, जप, याग, इ. कर्तव्य असेल, तेव्हा वरील संकल्पातील 'श्रीमहाविष्णुप्रमुख. . . .' इत्यादीच्या ऐवजी त्या त्या व्रताचा, दानाचा, जपाचा व त्या कृत्याच्या देवतेचा उल्लेख करून उदक सोडावे.

संकल्पावाचून केलेले पूजाव्रतदानादी कृत्य निष्फल होते. याविषयी आचारेंदूतला श्लोक असा–

सङ्कल्प्य च तथा कुर्यात् स्नानदानव्रतादिकम् ।
अन्यथा पुण्यकर्माणि निष्फलानि भवन्ति च ॥

अर्थ – संकल्प न करता स्नान, दान, व्रतादिक पुण्यकर्मे केली तर त्यांचे फळ मिळत नाही. याकरिता प्रत्येक कर्म करताना प्रारंभी ते करण्याचा संकल्प करणे आवश्यक आहे.

संकल्प म्हणजे एक प्रकारची प्रतिज्ञाच होय. कोणतेही कर्म संकल्पपूर्वक करण्याची भारतात चाल आहे. संकल्प केल्याने त्या त्या कृत्यांसाठी आवश्यक ती मानसिक सिद्धता होते आणि सर्व इंद्रियवृत्ती त्या कृत्याकडे आपल्या सामर्थ्यानिशी धावून जातात. कर्मात मन लागून चित्त एकाग्र होणे यासाठी संकल्प हा साधन असतो आणि म्हणूनच संकल्प हा प्रत्येक कृत्याचा आवश्यक भाग ठरला आहे. [ आचारेंदुः; पु. वि.; धा. सं. नि.]

**संकष्टचतुर्थी व्रत** एक तिथिव्रत. प्रत्येक महिन्याच्या वद्य चतुर्थीला संकष्टचतुर्थी असे नाव आहे. श्रावण वद्य चतुर्थीच्या दिवशी या व्रताला प्रारंभ करतात. पुरुषांना व स्त्रियांनाही हे व्रत विहित आहे. या व्रताचा विधी असा – सकाळी स्नानसंध्यादी नित्य कर्मे उरकल्यावर

निराहारोऽस्मि देवेश यावच्चन्द्रोदयो भवेत् ।
भोक्ष्यामि पूजयित्वा त्वां सङ्कटात् तारयस्व माम् ॥

या मंत्राने व्रताचा संकल्प करावा. आपल्या ऐपतीप्रमाणे सोन्याची, रुप्याची, तांब्याची किंवा मातीची गणपतीची प्रतिमा करावी. दिवसभर उपवास करून चंद्रोदयाच्या वेळी त्या प्रतिमेची षोडशोपचार पूजा करावी. तिला एकवीस दूर्वा वाहाव्या व एकवीस मोदकांचा नैवेद्य दाखवावा. एका पात्रात चंदनाने चंद्राची प्रतिमा रेखाटून तिची पंचोपचारांनी पूजा करावी. चंद्रोदय झाल्यावर चंद्राचे दर्शन घेऊन त्याला अर्घ्य द्यावी. तसेच चतुर्थी तिथीला व गणपतीलाही अर्घ्ये द्यावी. मग चंद्रासह गणपतीला महानैवेद्य दाखवावा आणि नंतर ब्राह्मणासह भोजन करावे.

हे व्रत दोन प्रकारांनी करतात. एकाला मिठाची संकष्टचतुर्थी व दुसऱ्याला पंचामृती संकष्टचतुर्थी असे म्हणतात. मिठाच्या चतुर्थीच्या दिवशी एकवीस मोदकांपैकी एक मोदक मिठाचा करतात. उपवास सोडताना मिठाचा मोदक लागला, की पानावरून उठतात. पुढे भोजन करीत नाहीत. उरलेले मोदक गाईला खायला घालतात.

पंचामृती संकष्टचतुर्थीला दर महिन्याला वेगवेगळे पदार्थ सेवन करतात, ते असे – श्रावणात तिळाचे सात लाडू, भाद्रपदात दही, आश्विनात केवळ तीर्थ, कार्तिकात दूध, मार्गशीर्षात निराहार, पौषात गोमूत्र, माघात तीळ, फाल्गुनात तूप व साखर, चैत्रात पंचगव्य, वैशाखात शतपत्र, ज्येष्ठात तूप व आषाढात मध. हे सर्व पदार्थ सव्वा छटाक सेवन करून उपवास सोडतात.

या व्रताचा काल आमरण, एकवीस वर्षे किंवा एक वर्ष असा सांगितलेला आहे. दर महिन्यातील संकष्टचतुर्थी करावी; पण ते न जमल्यास श्रावणातील संकष्टी तरी करावी, असे शास्त्रवचन आहे. फल – चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ती, सर्व पापांचा क्षय, सर्व संकटांचा परिहार व कामनापूर्ती.

मंगळवारी माघ वद्य चतुर्थी येईल, त्या दिवशी हे व्रत घ्यावे आणि वर्षभर आचरून मग त्याचे उद्यापन करावे, असे गणेशपुराणात सांगितले आहे (उ. खं. अ. ५९-६०). ज्या संकष्टीला मंगळवार असतो, तिला अंगारकी म्हणतात. तिचे माहात्म्य विशेष आहे.

व्रताचे उद्यापन श्रावणातील संकष्ट चतुर्थीलाच करतात. सकाळी हवन करून 'गणानां त्वा ..' या मंत्राने १००८, १०८ किंवा २८ मोदकांच्या आहुती देतात. नंतर यथाशक्ति गोदान, दश दाने, शय्यादान, भूमिदान वगैरे देऊन एकवीस ब्राह्मणांची पूजा करतात. नित्याप्रमाणे गणपतीची चंद्रासह पूजा करतात व कथाश्रवण, नृत्यगीत यांत रात्र घालवतात. तसेच दूर्वाहोम, बलिदान, पूर्णाहुती आणि ब्राह्मणभोजन घालून व दक्षिणा देऊन कर्म समाप्त करतात.

या व्रताची कथा अशी –

साम नावाचा एक अंत्यज होता. तो वाटमारी करी आणि पोट भरी. या धंद्यात त्याने बारा ब्राह्मणांची हत्या केली. एके दिवशी वाटमारीसाठी टपून बसला असता त्याला दिवसभर उपास घडला. रात्री चंद्रोदय झाल्यावर तो घरी आला. त्याला गणेश नावाचा मुलगा होता. त्याला त्याने बऱ्याच हाका मारल्या. मग त्याने सर्वांसह भोजन केले. त्या दिवशी संकष्टचतुर्थी असल्यामुळे नकळत त्याच्या हातून उपास व नामस्मरण घडले. त्या पुण्याने तो मृत्यूनंतर स्वर्गलोकी गेला आणि पुढील जन्मी कृतवीर्य नावाचा राजा झाला. मागील जन्मी केलेल्या ब्रह्महत्येने त्याला संतान होत नव्हते. म्हणून त्याने संकष्टचतुर्थीचे व्रत केले आणि त्याला संतती झाली. [ व्रतराज; श्रीगणेशकोश; हि. ध. ]

**संकष्टहर गणपतिव्रत** एक तिथिव्रत. माघ वद्य चतुर्थीला हे व्रत करतात. गणपती ही या व्रताची देवता आहे. चतुर्थीच्या दिवशी चंद्रोदयाच्या वेळी गणपतीची एकवीस नावांनी पूजा करणे व त्याला एकवीस दूर्वा, एकवीस प्रकारची पत्री आणि तांबडी फुले वाहणे, असा या व्रताचा विधी आहे. पूजेच्या वेळी पुरुषसूक्त व पौराणिक मंत्र म्हणावे. शेवटी पुरोहिताला पाच मोदक व दक्षिणा द्यावी. फल – संकटनिवारण. व्यासांनी धर्मराजाला हे व्रत सांगितले होते. [ हि. ध. ]

**संकुसुक यामयान** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील अठरावे सूक्त याने रचले आहे. प्रस्तुतचे सूक्त हे अंत्येष्टिसूक्त किंवा स्मशानसूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. शिवाय वेदकालीन समाजस्थितीच्या अनेक अंगांचे

निर्देश यात असल्यामुळे, याला सामाजिक इतिहासाच्या दृष्टीनेही महत्त्व आहे. स्मशानातील अंत्यविधीच्या वेळी हे सूक्त म्हटले जाते, म्हणून धर्मशास्त्राच्या दृष्टीनेही हे मोलाचे आहे. वेदकालात प्रेतांना पुरत असल्याच्या चालीचा यात निर्देश आहे. त्याचप्रमाणे सती जाऊ इच्छिणाऱ्या स्त्रीला तिचा दीर परत फिरण्याची विनंती करतो आणि स्वतःच तिच्याशी विवाह करण्याचे आश्वासन देतो, असाही उल्लेख आहे. त्यातली एक ऋचा (१०.१८.११) अशी–

**उच्छ्वञ्चस्व पृथिवि मा नि बाधथाः**
**सूपायनास्मै भव सूपवञ्चना ॥**
**माता पुत्रं यथा सिचाऽभ्येनं भूम ऊर्णुहि ॥**

अर्थ – हे मृताचे स्वागत करणाऱ्या पृथ्वीदेवते, मृतावर लोभ ठेवून तू त्याला उच्च स्थानी ने. माता ज्याप्रमाणे बालकाला वस्त्राने आच्छादिते, त्याप्रमाणे तू त्याला आच्छादन घाल.

[प्रा. च. को.; ऋ. म. भा.; ऋ. सां. इ.]

**संकेत रामायण** रामदासी संप्रदायातील गिरिधर हा या ग्रंथाचा कर्ता आहे. इ. स. १७२२ मध्ये त्याने या ग्रंथाची रचना केली. या ग्रंथात १८८ सर्ग व ६७४१ ओव्या आहेत. यातील मुख्य कथाभाग वाल्मीकिरामायणातून घेतला असला तरी, पद्मपुराण, लिंगपुराण, इ. ग्रंथांचाही कवीने आधार घेतला आहे. सनत्कुमाराने गणपतीला, ब्रह्महत्यादोष कसा नाहीसा होईल, असा प्रश्न केला असता गणपतीने ही कथा त्याला सांगितली, असा या ग्रंथाचा आरंभ आहे. तीच कथा कवी मराठी भाषेत सांगत आहे. मात्र ग्रंथाचे कर्तृत्व स्वतःकडे न घेता त्याने ते रामालाच दिले आहे. कवी म्हणतो–

**राम वक्ता राम श्रोता । राम कर्ता ग्रंथ लिहिता ।**
**रामरूपेवीण सर्वथा । दुजे तत्त्वता नाडळे ॥**

भावार्थरामायणासारखा मोठा ग्रंथ वाचणे ज्यांना शक्य नसेल, त्यांना हे संकेत रामायण वाचणे सोयीचे आहे.

सीतास्वयंवराच्या वेळी जमलेल्या राजेलोकांत शिवधनुष्याला बाण लावणारा कोणी दिसत नाही, असे जनकाचे बंदीजन म्हणाले, त्या वेळच्या काही ओव्या अशा–

**ऐकोनि बंदीजनांचे उत्तर । खवळला रावण लंकेश्वर ।**
**उभा राहोनि दशकंधर । काय बोले सर्वांप्रती ॥**
**अरे माझी पुरुषार्थशक्ति । ठाउकी आहे कैलासपती ।**
**इंद्र जिकोनि अमरावती । अमर बंधीं घातले ॥**
**ऐसे बोलूनि गर्वे उचलों गेला ।**
**बळे उचलोनि घेता च्यापे चिंडिला ।**
**पाहा कैलास जेणे हलविला । तो हा उलंडला राजांगणी ॥**
**देखोनि कृपा आली विश्वामित्रा । म्हणे ऊठ वेगीं राजीवनेत्रा ।**
**प्रसंगी सोडवी कुपात्रा । आम्हां सर्वत्र उल्हासवी ॥**
**मग ऋषिवचने रणकेसरी । उठिला राम तो क्षडकरी ।**
**सुरांसि भासे साहकारी । नेणो मारी रावणा ॥**
**सर्वी केले म्लानवदन । काय करी तो रघुनंदन ।**
**च्याप वामांगुष्ठेकरून । वेगीं हुंडारुनि घेतलें ॥**
**लघु लाघवे गुण चढविला । ठाण मांडूनि आकर्ण वोढिला ।**
**ते समई भूमिकंप जाला । कैलास डगमगिला तूं जाणिसी ॥**

गिरिधराने कथेचा फार विस्तार किंवा संक्षेप केलेला नाही. एकंदरीत त्याची भाषाशैली प्रसन्न आहे. [म. वा. इ.]

**संकेश्वर** बेळगाव जिल्ह्यात, हुक्केरीच्या वायव्येला सुमारे ८ मैल अंतरावर, हरिद्रा नदीचे काठी हे रमणीय स्थान आहे. इथे शंकराचार्यांचा मठ आहे. शृंगेरीचे शंकराचार्य नरसिंहभारती यांचे शिष्य शंकरभारती यांनी इ. स. च्या १६ व्या शतकात करवीर येथे पंचगंगातीरावर एक मठ स्थापला. संकेश्वर हे स्थान अधिक रमणीय वाटल्यामुळे ते तिथे जाऊन राहिले व तिथेही एक मठ स्थापण्यात आला. हे दोन्ही मठ करवीर-संकेश्वर या जोडनावाने प्रसिद्ध आहेत. त्यातील करवीर हे मुख्य ठिकाण मानले जाते. शृंगेरीच्या पीठाचीच ही एक शाखा आहे. [शंकराचार्य]

**संक्रमण जननशांती** सूर्यसंक्रांत असताना जन्म झाल्यास ही शांती करण्यास सांगितली आहे. या शांतीचा विधी व्यतीपातजननशांतीप्रमाणे असतो. पाहा– व्यतीपातजननशांती. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**संक्रांती** सूर्य एका राशीतून दुसऱ्या राशीत संक्रमण करतो, त्याला संक्रांती म्हणतात. राशी बारा असून, सूर्य प्रत्येक मासात एका राशीतून दुसऱ्या राशीत जातो, म्हणून प्रत्येक वर्षात बारा संक्रांती होतात. मात्र तो जेव्हा आषाढ मासात कर्कराशीत व पौष मासात मकर राशीत प्रवेश करतो, ते दिवस महत्त्वाचे मानले जातात. कारण कर्कसंक्रमण दक्षिणायनात व मकरसंक्रमण उत्तरायणात होते. मकरसंक्रमणाचा दिवस विशेष पुण्यप्रद मानला जातो.

संक्रांतीला सूर्याच्या गतीचे प्रतीक म्हणून शक्तिदेवता मानतात. तिला मंदा, मंदाकिनी, ध्वांक्षी, घोरा, महोदरी, राक्षसी व मिश्रिता अशी सात नावे आहेत. संक्रांतीच्या दिवशी रोहिणी व तीन उत्तरा यांपैकी एक नक्षत्र असेल तेव्हा देवीचे नाव मंदा असते; चित्रा, अनुराधा, मृगशीर्ष किंवा रेवती नक्षत्र असेल

तेव्हा मंदाकिनी; अश्विनी, पुष्य, हस्त, किंवा अभिजित असेल तेव्हा ध्वांक्षी; तीन पूर्वा, भरणी किंवा मघा असेल तेव्हा घोरा; श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसू किंवा स्वाती नक्षत्र असेल तेव्हा महोदरी; मूळ, ज्येष्ठा, आर्द्रा किंवा आश्लेषा असेल तेव्हा राक्षसी आणि विशाखा किंवा कृत्तिका नक्षत्र असेल तर देवीचे नाव मिश्रिता असते.

वसिष्ठाच्या मते बारा संक्रांतींपैकी दोन अयन संक्राती, दोन विषुव संक्रांती, चार षडशीती व चार विष्णुपदी आहेत. जेव्हा सूर्य कुंभ, वृश्चिक, वृषभ व सिंह या राशींत प्रवेश करतो, तेव्हा त्या संक्रांती विष्णुपदी होत; जेव्हा सूर्य कन्या, धनू, मीन व मिथुन राशींत जातो तेव्हाच्या संक्रांती षडशीती; जेव्हा सूर्य कर्क राशींत जातो, तेव्हा यामायन जेव्हा तो मकर राशींत जातो तेव्हा सौम्यायन आणि जेव्हा तो मेष व तूळ राशीत प्रवेश करतो तेव्हा विषुव संक्रांती असतात.

लौगाक्षी व बोधायन यांच्या मते यामायन व विष्णुपदी संक्रांतींच्या आधीचा काल पुण्यप्रद असतो; विषुव संक्रांतीत संक्रमणकाल पवित्र असतो. षडशीती संक्रांतींच्या नंतरचा काल पवित्र होय. मकर संक्रमणाच्या आधीचा व नंतरचाही काल पुण्यप्रद असतो. हेमाद्रीच्या मते हा काळ वीस घटिका आधी व वीस घटिका नंतर धरावा; पण देवलाच्या मते तो तीस घटिकांचा धरावा. मात्र रात्रीचा काल पर्वकाल मानला जात नाही. संक्रमणापासून दिवसाचा जो भाग जवळ असेल, तो पर्वकाल मानावा, असे सांगितले आहे. मकरसंक्रमण व कर्कसंक्रमण रात्री होते, तेव्हा मात्र रात्रही पुण्यप्रद मानतात.

निरनिराळ्या पुराणकारांनी निरनिराळी संक्रांतिव्रते सांगितलेली आहेत आणि त्यांत दानधर्म, जप, इ. कर्मे करायला सांगितली आहेत.

संक्रांती देवीच्या पूजेचा विधी असा– लहानशा वेदीवर रक्तवर्णाचे वस्त्र पसरून त्यावर तांदुळांचे अष्टदल कमल काढावे. त्यात मध्यभागी सूर्यनारायणाची सुवर्णमूर्ती स्थापून तिची षोडशोपचार पूजा करावी. व्रतकर्त्याने निराहार, एकभुक्त किंवा अयाचित राहावे.

संक्रांतिव्रत केल्यामुळे सर्व पापांचा नाश होतो, आधिव्याधींचे निराकरण होते आणि सुखसंपत्तीची व सुपुत्रांची प्राप्ती होते, असे सांगितले आहे. [ओ. डे. रा. अॅं.; अ. बृ. ज्यो.; दे. को. भाग ३ ]

**संखडी** एक प्राचीन उत्सव. जैनांच्या आचारांगसूत्रात (२.१) या उत्सवाचा उल्लेख आहे. या प्रसंगी समाराधना, नाचरंग आणि मद्य-मांसाची मेजवानी या गोष्टी होत असत. धुर्तंनी स्त्रिया आणि हिजडे या उत्सवात जमून लोकांची मने बिघडवीत. म्हणून जैन साधूंनी अशा उत्सवात भाग घेऊ नये, असे त्या ग्रंथात सांगितले आहे.

**संख्या** वस्तूंची गणना करण्यासाठी जी अंकावली वापरली जाते तिला संख्या म्हणतात. संख्या व्यक्त करण्याच्या अनेक पद्धती प्राचीन काळी प्रचलित होत्या. एकापासून परार्धापर्यंतच्या संख्यांची नावे वैदिक वाङ्मयात आढळतात. १ ते ९ अंक व शून्य यांचा उपयोग संख्यालेखनासाठी केला जात असे. त्यातूनच पुढे अंकगणित व अंकविद्या यांचा उदय झाला. पाहा – अंकगणित, अंकविद्या.

**संगम राजवंश** विजयनगर साम्राज्याची स्थापना करणारा वंश. या वंशातील संगम नामक वीर पुरुषावरून वंशाला संगम हे नाव मिळाले आहे. होयसळ वंशाप्रमाणेच हा वंशही चंद्रवंशी यादवांना आपले पूर्वज मानतो. म्हैसूरच्या पश्चिम भागातील कलास नामक स्थान हे त्याचे मूलस्थान होते. फा. हेरासच्या मते संगम घराणे ही होयसळांचीच एक शाखा होती. संगम हा एक प्रतापी राजा होता. तो होयसळांचा सामंत असावा. अनेक शिलालेखांत त्याची प्रशंसा केलेली आहे.

संगमाला पाच पुत्र होते, असे अनेक शिलालेखांवरून कळते. हरिहर, कम्पण, बुक्क, मारप व मुद्दप अशी त्यांची नावे होती. होयसळ राजा वीर बल्लाळ (तिसरा) याने हरिहराला महामंडलेश्वर ही उपाधी देऊन, त्याच्यावर मुसलमानी आक्रमणाला प्रतिकार करण्याची कामगिरी सोपविली होती. वीर बल्लाळाच्या मृत्यूनंतर हरिहर याने विजयनगरचे स्वतंत्र राज्य स्थापले. त्याच्या भावांनी त्याला त्या कार्यात पुष्कळ साहाय्य केले. पाहा – विजयनगर. [ आ. सा. मा. ]

**संगमस्नान** बहुतेक नद्या पवित्र मानल्या जातात. पुराणांत कित्येक नद्यांचे माहात्म्य गायिलेले आहे. अशा नद्यांमध्ये स्नान करणे पुण्यप्रद असते. दोन नद्या जिथे मिळतात, त्या स्थानाला संगम म्हणतात. अशा ठिकाणी केलेले नदीस्नान अधिकच पुण्यप्रद मानले आहे.

नद्यां प्रत्येकशः स्नानं भवेद्गोदानजं फलम् ।
गोप्रदानैश्च दशभिः स्नानं पुण्यं तु सङ्गमे ॥

अर्थ – प्रत्येक नदीत स्नान केल्याने गोदानाचे पुण्य मिळते. आणि नद्यांच्या संगमात स्नान केल्याने दहा गोप्रदानांचे पुण्य लाभते.

स्नानं कृत्वा सङ्गमे तु सङ्गमेशं प्रपूज्य च ।
सर्वपापविनिर्मुक्तो गतिं प्राप्नोति शाश्वतीम् ॥

अर्थ – संगमात स्नान करून संगमेश्वराची पूजा केल्याने सर्व पापांचे क्षालन होऊन मनुष्याला शाश्वत गती म्हणजे मुक्ती प्राप्त होते.

म्हणून सर्व यात्रेकरू संगमस्नान करायला फार उत्सुक असतात. प्रयाग येथे गंगा, यमुना व सरस्वती या तीन नद्यांचा संगम झाला आहे, म्हणून त्याला तीर्थराज म्हणतात. ते स्थान अत्यंत पवित्र मानले जाते.

**संगला** हिमाचल प्रदेशातील एक लोकनृत्य. या प्रदेशाच्या महासू परगण्यात संगला नावाचे गाव आहे. त्या गावाच्या नावावरून या नृत्यालाही संगला हे नाव मिळाले. हे एक स्त्री-पुरुषांचे संमिश्र नृत्य असून, स्थानीय देवतेस प्रसन्न करण्यासाठीच ते सादर केले जाते. वाक्यांग, डाक्यांग व काक्यांग असे याचे तीन प्रकार असतात. नृत्य करीत असताना नर्तक प्रश्नोत्तरात्मक गीते गातात. या वेळी भोवतालचे लोक डोंगरातून येणाऱ्या प्रतिध्वनीसारखा आवाज काढतात. बहुशः स्त्री-पुरुष स्वतंत्र रांगा करून व समोरासमोर उभे राहून झुलत झुलत नाचतात. नृत्यप्रसंगी नृत्याला गती येण्यासाठी गावठी वाद्यांची साथ घेतात. [ ए. हो. रा. ]

**संगीत (हिंदुस्थानी)** एक श्राव्य आणि श्रेष्ठ दर्जाची कला. सर्व ललित कलांमध्ये संगीत ही कला श्रेष्ठ मानली जाते. संगीत ही श्रवणविद्या आहे. संगीताचे स्वर कानावर पडले, की त्यांचा मनावर काहीतरी परिणाम होतो. साहित्य आणि चित्र या दोहोंचे काम संगीत एकाच वेळी करू शकते. संगीत हा आनंदाचा आविर्भाव आहे. आणि आनंद हे ईश्वराचे स्वरूप आहे. त्यामुळे संगीत हे ईश्वर-स्वरूप ठरते. जे लोक संगीताचा अभ्यास करतात, त्यांना तप, दान, यज्ञ, कर्म, योग, इत्यादींचे कष्ट सोसावे न लागता केवळ त्या कलेनेच मोक्ष साध्य होतो. याविषयी याज्ञवल्क्याने म्हटले आहे, ते असे –

> **वीणावादनतत्त्वज्ञः श्रुतिजातिविशारदः ।**
> **तालज्ञश्चाप्रयासेन मोक्षमार्गं नियच्छति ॥**
>
> (याज्ञ. स्मृ. ३.११५)

अर्थ – वीणावादनाचे तत्त्व जाणणारा, श्रुती, जाती आणि ताल यांचे उत्तम ज्ञान असलेला माणूस प्रयासावाचून मोक्ष-मार्गाला जातो.

संगीताचे वैशिष्टय असे, की त्यामध्ये साध्य आणि साधन दोन्हीही सुखरूप असतात. संगीताच्या आधारे भगवद्‌भजन केले असता मन शीघ्र ईश्वराच्या नामरूपात लीन होते. नुसते नामोच्चारण केल्याने फक्त ओठांची हालचाल होईल. त्यातून ध्वनी निघेल; पण मन त्या नामात असेलच असे सांगता येत नाही. ते दशदिशांना भटकत राहील. पण भगवंताच्या संगीत संकीर्तनाने मनाची भ्रमंती थांबून देवा-भक्तांचे सामरस्य सिद्ध होईल. कारण मानवाइतकेच देवही संगीतप्रिय असतात. याविषयीचे दोन श्लोक असे –

> **गीतेन प्रीयते देवः सर्वज्ञः पार्वतीपतिः ।**
> **गोपीपतिरनन्तोऽपि वंशध्वनिवशंगतः ॥**
> **सामगीतिरतो ब्रह्मा वीणासक्ता सरस्वती ।**
> **किमन्ये यक्षगन्धर्वदेवदानवमानवाः ॥**

अर्थ – सर्वज्ञ आणि पार्वतीपती शिवशंकर गीताने प्रसन्न होतो. अनंत असा गोपीपती श्रीकृष्णही वेणुवादनात मग्न आणि धुंद होऊन राहतो. ब्रह्मदेवाला सामगायन आवडते. सरस्वतीलाही वीणावादनात आसक्ती आहे. मग यक्ष, किन्नर, गंधर्व, देव, दानव, मानव यांच्या संगीतरुचीविषयी काय सांगावे !

मानवाबद्दल बोलायचे तर त्याच्या जीवनातच संगीत भरून राहिले आहे. त्यांच्या चालण्यात लय आहे आणि बोलण्यात ध्वनीचा चढ आणि उतार करण्याची कला आहे. ध्वनीचा चढ आणि उतार हे संगीताचे मूलभूत घटक अशा प्रकारे मानवी जीवनाशी समरस झाले आहेत. तसे ते नसतील तर तो मानव ‘ पुच्छविषाणहीन ’ असा साक्षात पशूच ठरेल.

कोणत्याही आनंदाच्या प्रसंगी संगीत त्यात भर घालते आणि दुःखाच्या प्रसंगी त्याची तीव्रता कमी करते. अंगाईगीत ऐकताना लहान मुले झोपी जातात हे आपल्या अनुभवाचे आहे. सांघिक कामाच्या वेळी शारीरिक कष्ट हलके करण्यासाठी संगीताचा उपयोग होतो. स्वागतगीत किंवा प्रार्थनागीत यांनी सभेला प्रारंभ झाल्यास आधीचा कोलाहल शांत होतो. संगीताने एक-मेकांची मने अधिक जवळ येतात, विसंवाद कमी होतो. भिन्न थरांतील जाती आणि व्यक्ती या सर्वांना एकत्र येऊन आस्वाद घेता येईल, अशी संगीत ही एक कला आहे.

सम् + गीत = संगीत, अशी त्या शब्दाची फोड आहे. सम् हा उपसर्ग गायनातील श्रुतिमाधुर्य व्यक्त करतो.

‘ गीतं वाद्यं च नृत्यं च त्रयं सङ्गीतमुच्यते ’ ( = गीत, वाद्य आणि नृत्य या तिघांना मिळून संगीत म्हणतात) अशी संगीताची भरतमुनिकृत व्याख्या आहे. या व्याख्येत गीताबरोबरच वाद्य व नृत्य या दोन उपांगांचाही समावेश केलेला आहे. या तिहींत गीत हे प्रमुख आहे आणि पूर्ण आहे. व्यवहारात संगीत हा शब्द गीतगायन या अर्थीच प्रयुक्त होतो. तरी पण वरील तिन्हींचा अन्योन्य संबंध आहे. गायनासाठी कुठल्यातरी वाद्याची साथ म्हणून गरज असते. आणि नृत्याला गीत आणि वाद्य यांची

आवश्यकता असते. गाणाऱ्यांच्या स्वरांची नक्कल वाद्यांतून होते आणि या दोहोंतून होणारा आनंद नृत्यामध्ये मुद्राभिनयाच्या द्वारे प्रकट केला जातो.

भारतवर्षात संगीताची आराधना अतिप्राचीन कालापासून चालत आहे. संगीत ही दैवी व पवित्र कला मानली गेली आहे. जे जे दिव्य किंवा पवित्र त्याचा त्याचा उगम कोणत्या तरी देवतेकडून झाला असे मानण्याची भारतीयांची प्रवृत्ती आहे. तिला अनुसरून शिव हा संगीतकलेचा जनक मानला गेला आहे. नृत्य-वाद्याची उत्पत्तीही तिथूनच झाली आहे. असुर-विजयानंतर शंकराने आनंदविभोर होऊन जे नृत्य केले, ते तांडवनृत्य म्हणून प्रसिद्धी पावले. निद्रिस्त पार्वतीला पाहून शंकराने तिच्या आकृतीसारखी वीणा निर्माण केली. अशा प्रकारे संगीत उत्पन्न झाले आणि देवलोकी प्रथम त्याची आराधना चालू झाली. पुढे हे स्वर्गीय संगीत नारदाने पृथ्वीवर आणले. ऋषि-मुनींनी ते त्याच्याकडून ग्रहण केले. देवांच्या प्रीतीसाठीच पृथ्वीवर त्याचा उपयोग होऊ लागला. मोठमोठ्या यज्ञयागात संगीत हे देवताप्रसादासाठी आवश्यक ठरले. त्यासाठीच म्हणून खास सामवेदाची निर्मिती झाली.

यज्ञसंस्थेतले सामगान मुख्यत्वे ऋत्विजांकडून होई. उद्गाता, प्रस्तोता व प्रतिहर्ता अशा त्या ऋत्विजांच्या संज्ञा असत. उद्गाता हा मुख्य सामगायक व इतर दोघे साथीदार असत. सामगायक ऋत्विजांना छंदोग असेही म्हणत. त्याचे कारण म्हणजे सर्व सामे ही वेदातल्या ऋचाच असून, त्या छंदोबद्ध आहेत.

पुढील काळात सामगायन हा काही ऋषिकुळांचा व्यवसाय ठरला. त्यांची गुरुशिष्यपरंपराही निर्माण झाली. वंशब्राह्मणात अशा सामगायकांची सुमारे २०० नावे आढळतात. सामगायनासंबंधी जे ग्रंथ उपलब्ध आहेत, त्यांत छांदोग्य उपनिषद, सामसंहिता, तांड्यब्राह्मण, नारदीय शिक्षा, इ. ग्रंथ महत्त्वाचे आहेत. पुराणांतरी सामवेदाचे १००० संहिता ग्रंथ असल्याचे म्हटले असले, तरी सांप्रत कौथुमी, राणायनी व जैमिनी या तीनच सामसंहिता उपलब्ध आहेत. कौथुमी संहितेत एकंदर १८१० ऋचा असून, त्यांपैकी २६१ ऋचा पुनरुक्त आहेत. उरलेल्यांपैकी १४७४ ऋचा ऋग्वेदातल्या असून, फक्त ७५ मंत्र काय ते बाहेरचे आहेत.

वेदांच्या ऋचा स्वरयुक्त म्हटल्या जातात. या म्हणण्याला पठण असे म्हणतात. उदात्त (उच्च), अनुदात्त (नीच) आणि स्वरित (मध्य) असे हे पठणस्वर होत. पठणात प्रथम काही ऋचा साध्या बोलण्याच्या आवाजात (प्रातःसवनात), काही आवाजाच्या मधल्या टप्प्यावर (माध्याह्नसवनात) व काही आवाजाच्या उंच टप्प्यावर (सायंसवनात) म्हणायच्या व ते मंडल पुरे करायचे, असा सवनयुक्त पठनप्रघात हजारो वर्षांपासून चालत आला आहे. अशा रीतीने स्वर (उदात्तादी),



सवाई गंधर्व (किराणा)

सवने (प्रातर्माध्याह्नसायम्) व गीत (गायत्र्यादी छंद) हे शास्त्रीय विषय वेदपठणात साहजिकच निर्माण झाले. याच ऋचा जेव्हा गायिल्या जाऊ लागल्या, तेव्हा त्यांना सामगीत किंवा नुसते साम हे नामाभिधान प्राप्त झाले व पठणातील नुसत्या उच्च-नीच स्वरांना गायनातील सप्तस्वरांत बसवता आले. सवनांची व्यवस्थाही यातच बसविता आली, ती अशी –

उदात्त – निषाद, गांधार
अनुदात्त – ऋषभ, धैवत
स्वरित – षड्ज, मध्यम व पंचम
प्रातःसवन – सा, रे, ग, म या स्वरांच्या मर्यादेचे
माध्याह्नसवन – प, ध, नि, सा, या स्वरांच्या मर्यादेचे
सायंसवन – सा̍, रे̍, ग̍, म̎ या स्वरांच्या मर्यादेचे

ही व्यवस्था बऱ्याच कालांतराने लावली गेली. तथापि ती वेदपठणाला धरून आहे.

सामगायन सप्तस्वरांचे असे. म्हणजे ते एकाच सप्तकात होत असे. या स्वरांना आरंभी यम अशी संज्ञा होती. 'के ते यमा

नाम । – सप्तस्वरा यमास्ते ' – यम कोणते होत ? सप्तस्वर हे यम होत, असे ऋक्प्रातिशाख्याच्या उद्भटकृत भाष्यात म्हटले आहे.

**स्वरस्थाने** – वेदपठणातील सवनांना सामगायनात स्थाने ही संज्ञा आहे. मंद्र, मध्यम आणि उत्तम अशी त्यांची नावे आश्वलायन श्रौतसूत्रात सांगितली आहेत.

**विकृती** – वैदिक ऋचा सामगीत म्हणून गाताना तिच्या शब्दांच्या मूळ स्वरूपात गायनसुलभ उच्चारणामुळे साहजिकच फरक पडला. त्यांत पुन: रसवर्धक, उद्गारवाचक अव्ययांचीही भर पडली. असेच दुसरेही फेरफार झाले. मूळ ऋचा ही प्रकृती आणि तिच्यात गायनसुलभ जो फेरफार केला जात असे, ती विकृती असे समजले गेले. गमक क्रियांनाही विकृतीच म्हणू लागले.

**सामगीताचे भाग** – सामगायनात पुढील भाग आहेत : (१) हिंकार (२) प्रस्ताव (३) उद्गीथ (४) प्रतिहार व (५) निधन. हे भाग सांप्रतच्या धृपद गायकीतील अनुक्रमे नोम्, थोम्, स्थायी, संचारी व आभोग या पाच भागांसारखे वाटतात. यज्ञात या पाच भागांची वाटणी तीन ऋत्विजांत केलेली असते. निधन हा भाग तिघांनी मिळून गायचा असतो. वरील पाच भागांत पुढे ॐ व उपद्रव हे दोन भाग समाविष्ट केले गेले आणि त्यामुळे पंचपदीची सप्तपदी बनली.

संगीतशास्त्रात विविध परंपरा आहेत. त्यांतल्या तीन परंपरा मुख्य मानल्या जातात – (१) वेदपरंपरा (२) आगम व पुराणे यांची परंपरा व (३) ऋषिप्रोक्त परंपरा. या तीहींतून संगीतशास्त्राचे अवतरण झाले.

(१) वेदपरंपरा ही सामगायनातून निर्माण झाली.

(२) आगम व पुराणे यांच्या परंपरेत संगीताचा आदिकर्ता महादेव हा आहे. शिव-पार्वतींच्या संवादरूपात ३६००० श्लोकांचा एक ग्रंथ गांधर्व या नावाने प्रचलित होता. परंतु तो सांप्रत उपलब्ध नाही. त्याची विषयसूची यामलाष्टक ग्रंथात दिली आहे. याच परंपरेच्या ग्रंथामध्ये नंदिकेश्वरसंहिता हा ग्रंथ येतो; पण तोही सांप्रत मिळत नाही. प्रस्तुत परंपरेत शिल्प, नाट्य, इ. विषयांच्या बरोबरीने संगीतविषयक विचारांचा ऊहापोह केलेला आढळतो.

(३) ऋषिपरंपरेत काश्यपीयम् हा मुख्य ग्रंथ आहे. यातली अवतरणे अन्य ग्रंथांत दिलेली आढळतात; पण मूळ ग्रंथ अप्राप्य आहे.

अन्य परंपरांमध्ये याष्टिक, दुर्गा आणि आंजनेय या परंपरा मुख्य होत. याष्टिक व दुर्गा यांचे अनुसरण करून संगीतरत्नाकरात शार्ङ्गदेवाने रागोत्पत्ती व रागविवरण दिलेले आहे. आंजनेय मताचे अनुकरण चतुर दामोदरकृत संगीतदर्पणात आहे. संगीतरत्नाकरात सर्व संगीतपरंपरांच्या प्रवर्तकांची नावे दिली आहेत, ती अशी –

> सदाशिवः शिवो ब्रह्मा भरतः कश्यपो मुनिः।
> मतङ्गो याष्टिको दुर्गा शक्तिः शार्दूलकोहलौ ॥
> विशाखिलो दत्तिलश्च कम्बलोऽश्वतरस्तथा।
> वायुर्विश्वावसू रम्भाऽर्जुनो नारदतुम्बरू ॥
> आञ्जनेयो मातृगुप्तो रावणो नन्दिकेश्वरः।
> स्वातिर्गणो बिन्दुराजः क्षेत्रराजश्च राहलः ॥
> रुद्रटो नान्यभूपालो भोजभूवल्लभस्तथा।
> परमर्दी च सोमेशो जगदेकमहीपतिः ॥
> व्याख्यातारो भारतीये लोल्लटोद्भटशङ्कुकाः।
> भट्टाभिनवगुप्तश्च श्रीमत्कीर्तिधरः परः ॥
> अन्ये च बहवः पूर्वे ये सङ्गीतविशारदाः।

वरील सर्व पद्धतींचे मंथन करून शार्ङ्गदेवाने संगीतरत्नाकर नावाचा ग्रंथ लिहिला (इ. स. १२००). या ग्रंथावर कुंभकर्ण, केशव, कल्लिनाथ, सिंहभूपाल, हंसभूपाल आणि एक अनामिक यांनी टीका लिहिल्या आहेत. यावरून या ग्रंथाचे महत्त्व कळून येते. श्री. भातखंडे यांच्या मते १३ व्या शतकाचा उत्तरार्ध हा संगीतरत्नाकराचा काल आहे. अखिल भारतातल्या संगीतसंप्रदायांमध्ये एकरूपता आणणारा हाच अंतिम ग्रंथ होय.

रत्नाकराच्या पश्चात जे ग्रंथ लिहिले गेले, ते बहुतेक सगळे हिंदुस्थानी व कर्नाटकी या पद्धतींच्या उत्पत्तीनंतरच लिहिले गेले आहेत. हिंदुस्थानी संगीतात थाट व कर्नाटकी संगीतात मेल या पद्धतींचा उदय झाला. रत्नाकरानंतरच्या हिंदुस्थानी संगीत पद्धतीला आधारभूत झालेल्या ग्रंथांमध्ये (१) रागार्णव (२) रागरत्नाकर (गंधर्वराज) (३) नर्तननिर्णय (पुंडरीक विठ्ठल) (४) मानसोल्लास (सोमेश) (५) संगीतराज (कुंभकर्ण) (६) हृदयप्रकाश (भावभट्ट) (७) षड्रागचंद्रोदय (जयदेव) (८) रागमाला (९) संगीतदर्पण (चतुर दामोदर) हे ग्रंथ उल्लेखनीय आहेत. यांतले पहिले तीन अमुद्रित आहेत. पुढचे छापले गेलेले आहेत.

(१) संगीतसार (विद्यारण्य) (२) स्वरमेलकलानिधी (रामामात्य) (३) संगीतसुधा (रघुनाथ नायक व गोविंद दीक्षित) (४) रागविबोध (सोमनाथ) (५) चतुर्दण्डिप्रकाशिका (व्यंकटमखी) (६) संग्रहचूडामणी (गोविंद) हे कर्नाटक पद्धतीचे आधारभूत ग्रंथ होत. आणखीही काही आहेत; त्यांमध्ये शहाजी भोसले व त्याचे सभापंडित यांनी लिहिलेले रागलक्षण व चतुर्दण्डिलक्ष्य आणि तुलजाराजकृत संगीतसारामृत हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

ह्यापुढील ग्रंथांसंबंधी विवेचन करताना श्री. के. वासुदेव

शास्त्री यांनी जो एक मुद्दा मांडला आहे, त्याचा सारांश असा – वरील ग्रंथांचे अनुकरण करून नंतरच्या काळात बरेच ग्रंथ दोन्ही संप्रदायांत लिहिले गेले आहेत. सामान्यपणे प्राचीन शास्त्रातला बहुतेक भाग न समजल्यामुळे दोन्ही संप्रदायांत लक्षणांना धरून नव्हे; लक्ष्याच्या आश्रयानेच संगीतकलेचे रक्षण आणि पोषण केले गेले आहे. त्याला शास्त्राचा आधार फार थोडा आहे. रागच्छायेचा आवश्यक शास्त्रभाग तर फार पूर्वकाळीच विसरला



अंजनीबाई मालपेकर

गेला आहे. प्राचीन शास्त्राचा एकमात्र अवशेष वादी-संवादी तत्त्व हा असून, तो हिंदुस्थानी पद्धतीतच शिल्लक आहे. कर्नाटक पद्धतीत तर तोही उरला नाही. प्रत्येक रागातले स्वरांचे तीव्र किंवा कोमल रूप आणि त्यांचे क्रम, वक्र, वर्ज्य हे भाव या गोष्टींनाच दोन्ही संप्रदायांतल्या गायक व्यक्ती शास्त्र समजून चालल्या आहेत. गुरुकुलात अध्ययन झाल्याकारणाने रागांचे स्वरूप, मार्ग आणि छाया त्यांच्या मनात उत्तम प्रकारे ठसल्या जातात हे खरे; पण स्वरावलीच्या साहाय्यानेच रागस्वरूप सिद्ध होते, हा मात्र त्यांचा भ्रम आहे. स्वरावलीच्या पलिकडे एक खरेखुरे शास्त्र आपल्या प्राचीन ग्रंथांत उपलब्ध आहे, हे त्यांनी लक्षात घ्यावे.

**ध्वनी, नाद, श्रुती, स्वर** – संगीताचा संबंध ध्वनीशी येतो. ध्वनी दोन प्रकारचे आहेत– (१) आहत आणि (२) अनाहत. घर्षणाने किंवा आघात केल्याने जो उत्पन्न होतो, तो आहत आणि कसल्याही घर्षणावाचून किंवा आघातावाचून उत्पन्न होतो, तो अनाहत होय. आहत आवाजाचे संगीतोपयुक्त आणि संगीतानुपयुक्त असे दोन प्रकार होतात. आघातोत्पन्न सर्व आवाज ध्वनीच असले तरी वाऱ्याची सळसळ, जलौघांची खळखळ, पशुपक्ष्यांचे निरनिराळे आवाज, सागरलहरींचा धीरगंभीर आवाज, माणसांचे बोलणे हे सर्व ध्वनी एकमेकांपासून वेगळे आहेत. यांतील काही संगीताला उपयुक्त असतील तर काही नसतील. संगीताला श्रवणमधुर ध्वनीची जरुरी असते. कोकिळेचा आवाज श्रवणमधुर असल्याने तो संगीतोपयुक्त मानतात; पण कावळ्याचा आवाज कर्कश असल्यामुळे तो संगीतानुपयुक्त समजतात.

श्रुतिमधुर किंवा रंजनक्षम ध्वनीला नाद म्हणतात. नादाव्यतिरिक्त सर्व ध्वनी हे गोंगाट किंवा कोलाहल होत. शार्ङ्गदेवाने नादाला ब्रह्म म्हणून, त्याविषयी श्लोक लिहिला आहे, तो असा–

> चैतन्यं सर्वभूतानां विवृतं जगदात्मना ।
> नादब्रह्म तदानन्दमद्वितीयमुपास्महे ॥
>
> (संगीतरत्नाकर १.३.१)

अर्थ– जे सर्व भूतांचे चैतन्य आहे आणि जे जगदात्म्याने व्यापलेले आहे, अशा त्या अद्वितीय, आनंदमय नादब्रह्माची आम्ही उपासना करतो.

एखाद्या कंपनक्षम पदार्थाच्या कंप पावण्यामुळे त्याच्या अवतीभोवती असणारे वातावरण दोलायमान होते व त्या कंपनलहरी दूरवर पसरत जातात. त्या पुरेशा जलद असल्या व आपल्या कानांपर्यंत पोचल्या तर आपणांस ध्वनीचा बोध होतो. यात वायू हा ध्वनिवाहकाचे कार्य करीत असतो. त्यामुळे त्याच्या लहरींना ध्वनिलहरी असे म्हणतात. त्या नियमित व समानांतर असल्या म्हणजे श्रोत्याला मधुर ध्वनीचा म्हणजेच नादाचा अनुभव येतो. आधुनिक विज्ञानात नादाची कंपनसंख्या नियमित किंवा अनियमित आहे, हे शोधण्यासाठी यंत्रसामग्री उपलब्ध झाली आहे. नियमित कंपनसंख्येच्या नादाचा मुख्य गुणधर्म म्हणजे तो ऐकू येणे, हा होय. पण हाच नाद वेगवेगळ्या प्रकारांनी ऐकू येतो, असा अनुभव आहे. त्याचे कारण नादाची उच्चनीचता, घनता आणि जाती यांपैकी कोणते तरी असते.

**उच्चनीचता** – नादाच्या उच्चनीचतेचा संबंध त्यातून निघणाऱ्या कंपनसंख्येवर अवलंबून असतो. कमी कंपनसंख्या म्हणजे कमी उंचीचा नाद. या गुणधर्मामुळे वेगवेगळ्या स्थानातील नाद ओळखता येतो. मध्य स्थानातील सा पेक्षा तारस्थानातील सा ची कंपने जास्त आहेत. त्यामुळे स्वराचे नाव जरी एकच असले

तरी त्याच्या कंपनसंख्येच्या वेगळेपणामुळे तो दोन्ही ठिकाणी वेगवेगळा ऐकू येतो.

**घनता** – कंपनसंख्या बदलल्याने जसा नाद वेगळा ऐकू येतो, तसा तो कंपनसंख्या न बदलताही ऐकू येतो. एखादा नाद दूरवर ऐकू जाणे किंवा जवळपास सहज ऐकू येणे या भिन्न क्रिया नादाच्या घनता या गुणधर्मामुळे होतात. तंबोऱ्याची तार हळू छेडली तर आवाज जवळपास ऐकू जाईल. आणि जोराने छेडली तर तो मोठा होऊन दूरवर ऐकू जाईल. प्रत्यक्ष गातावाजविताना भावनांचा परिपोष करण्यासाठी कलाकार वेगवेगळ्या जाडीचे नाद वापरतात, हे बहुतेकांच्या अनुभवाचे आहे.

**जाती** – घनता या गुणधर्मामुळे जसा नाद वेगळा, तसाच तो जाती या गुणधर्मामुळेही वेगळा ऐकू येतो. भांड्यावर काठीचा आघात केल्यावर निघणारा, तसाच सतार, दिलरुबा, तंबोरा, इ. वाद्यांतून निघणारा एकाच कंपनसंख्येचा नाद वेगळा ऐकू येतो. याचे कारण नादनिर्मितीचे प्रत्येकाचे माध्यम वेगळे असते. म्हणूनच व्हायोलिन, तबला, सतार, सनई यांचे आवाज नुसते



हिराबाई बडोदेकर (किराणा)

श्रवणाने वेगळे ओळखता येतात. एवढेच काय; पण गायकागायकांचेही आवाज आपण सहजपणे वेगळे ओळखू शकतो.

**स्थान** – गायन-वादन क्रिया करताना हे नाद वेगवेगळ्या स्थानी वापरले जातात. नादाच्या दुप्पट उंचीच्या क्षेत्राला स्थान म्हणतात. मंद्र, मध्य, तार, अशी तीन स्थाने आहेत. स्थानाचा उपयोग नादाची उंची दाखविण्यासाठी केला जातो. जिथे एका स्थानाची मर्यादा संपते तिथून दुसऱ्याची सुरू होते.

ध्वनी किंवा नाद यांच्याविषयी श्री. ह. वि. दात्ये एक परिच्छेद लिहितात, तो असा – ‘प्राचीन काळी ध्वनीच्या मापनाची उपकरणे उपलब्ध नसावीत किंवा ध्वनिशास्त्राची प्रमेयेही सिद्ध झालेली नसावीत, असे वाटते. अन्यथा त्या संबंधांतील उल्लेख प्राचीन ग्रंथांतून कोठे ना कोठे अवश्य आढळला असता. त्या काळात केवळ स्वतःचा कर्णप्रत्यय व अलौकिक प्रतिभा यांच्या भरीस अथांग परिश्रम करूनच संगीतोपयोगी नादस्थाने निवडली गेली असली पाहिजेत, असे म्हणावे लागते. हे अनुमान खरे असल्यास उपकरणांविना व प्रमेयांविना ठरविली गेलेली संगीतोपयोगी नादस्थाने ही पूर्णतः गणितनिष्ठ कशी, असा प्रश्न पडतो. प्राचीन काळी काढलेले निष्कर्ष आजही तसेच्या तसे प्रत्ययकारी असल्याचे आढळून येते व त्याचे आश्चर्य वाटल्याविना राहात नाही. आता ध्वनिलहरींच्या मापनासाठी सुयोग्य उपकरणे उपलब्ध झाली आहेत. त्यांच्या साहाय्याने प्रयोग केल्यास असे आढळून येते, की रंजकता व गणित याचा अतूट संबंध आहे व त्यामुळे रंजकतेचे काही प्रमाणात गणित मांडणे शक्य आहे.’

**श्रुती** – कानाला ऐकू येणाऱ्या प्रत्येक नादाला श्रुती म्हणतात. अशा श्रुती अनंत आहेत. पण या सर्वांचा संगीतात उपयोग होतोच असे नाही. आपले संगीत मूळ नाद आणि त्याच्या दुप्पट उंचीचा नाद एवढ्या क्षेत्रात सीमित आहे. त्यामुळे तेवढ्या क्षेत्रात ऐकू येणारे नाद म्हणजे श्रुती संगीताच्या प्रयोगासाठी वापरतात. अशा श्रुती बावीस आहेत. त्यांची नावे अशी –

(१) तीव्रा (२) कुमुद्वती (३) मंदा (४) छंदोवती (५) दयावती (६) रंजनी (७) रक्तिका (८) रौद्री (९) क्रोधा (१०) वज्रिका (११) प्रसारिणी (१२) प्रीती (१३) मार्जनी (१४) क्षिती (१५) रक्ता (१६) संदीपिनी (१७) आलापिनी (१८) मदंती (१९) रोहिणी (२०) रम्या (२१) उग्रा व (२२) क्षोभिणी (संगीतरत्नाकर).

या श्रुतींच्या दीप्ता, आयता, मृदू, मध्या व करुणा अशा पाच जाती आहेत आणि त्या नादाच्या दीर्घ-लघुत्वावर निर्भर आहेत.

एका नादापासून त्याच्या दुप्पट उंचीपर्यंत बावीसच नाद एकमेकांपासून वेगळे आणि स्पष्टपणे ऐकू येणे शक्य आहे, या-विषयी सर्व विद्वानांचे एकमत आहे.

स्वर – दूरवर टिकणारा, बराच वेळ स्थिर राहणारा, श्रुतींच्या अपेक्षेने जास्त स्पष्ट असणारा व कानांना आनंद देणारा असा जो नाद, त्याला स्वर म्हणतात. निराळ्या पद्धतीने सांगायचे तर बावीस श्रुतींपैकी प्रत्यक्षात उपयोगात आणल्या गेलेल्या नादांना स्वर म्हणतात. स्वराची व्याख्या संगीतशास्त्रात सांगितली आहे, ती अशी –

श्रुत्यनन्तरभावी यः शब्दोऽनुरणनात्मकः।
स्वतो रञ्जयते श्रोतुश्चित्तं स स्वर ईर्यते ॥

याचा तपशीलवार अर्थ असा – (१) एकामागून एक श्रुतीची उत्पत्ती केल्याने स्वर निपजतो.

(२) शब्दाचे अनुरणनरूप म्हणजेच स्वर होय. प्रत्येक शब्दात आहतीच्या नंतर होणारा शब्द, लहरीच्या क्रमाने उत्पन्न होऊन पुनश्च क्रमानेच लीन होणे म्हणजे अनुरणन होय. तेच स्वराचे मुख्य स्वरूप आहे. कारण अनुरणनात स्वरातल्या श्रुतीचे प्रकाशन होते.

(३) प्रत्येक स्वर दुसऱ्या स्वराची मदत घेतल्यावाचून स्वतःच रंजक असतो. असे स्वर सात असून, त्यांची नावे भरताने पुढीलप्रमाणे सांगितली आहेत –

षड्जश्च ऋषभश्चैव गान्धारो मध्यमस्तथा।
पञ्चमो धैवतश्चैव सप्तमश्च निषादवान् ॥
चतुर्विधत्वमेतेषां विज्ञेयं श्रुतियोगतः।
वादी चैवाथ संवादी ह्यनुवादी विवाद्यपि ॥

अर्थ – षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद असे सात स्वर आहेत. हे सात स्वर श्रुतींच्या योगाने म्हणजेच परस्परांत असलेल्या नैसर्गिक संवादधर्माने वादी, संवादी, अनुवादी व विवादी असे चार प्रकारचे होतात.

या सप्तस्वरांना व्यवहारात सा, रे, ग, म, प, ध, नी, अशा सुटसुटीत नावांनी ओळखतात.

बावीस श्रुती या क्रमाने एकाहून एक चढत्या म्हणजे उंच आहेत. या श्रुतींच्या उंचीच्या विशिष्ट ठिकाणी स्वरत्व मानतात. प्राचीन काळी अंतिम श्रुतीवर स्वरत्व मानीत. सा म प यांच्या प्रत्येकी चार, रे ध यांच्या प्रत्येकी तीन व ग नी यांच्या प्रत्येकी दोन श्रुती प्राचीन काळी मानीत. त्यामुळे चार, सात, नऊ, तेरा, सतरा, वीस व बावीस, या श्रुतींवर सा, रे, ग, म, प, ध, नी, हे स्वर मानीत. आधुनिक काळी पहिल्या श्रुतीवर स्वरत्व मानतात. त्यामुळे १, ५, ८, १०, १४, १८ व २१ या श्रुतींवर सा, रे, ग, म, प, ध, नी हे स्वर येतात.

स्वरांचे शुद्ध आणि विकृत असे दोन प्रमुख भेद आहेत. विकृत स्वरांचे तीव्र व कोमल असे दोन पोटभेद आहेत.

जे आपल्या नियत स्थानापासून ढळत नाहीत; म्हणजे ४.३. २.४, ४.३.२. या श्रुत्यंतरावर स्थिर असतात, त्यांना शुद्ध स्वर म्हणतात. जे या श्रुत्यंतरावरून मागे किंवा पुढे ढळतात, त्यांना विकृत स्वर म्हणतात. या सात स्वरांपैकी सा आणि प नेहमी अचल म्हणजेच शुद्ध राहतात. बाकीचे रे, ग, म, ध, नी आपल्या स्थानापासून ढळतात, म्हणून ते चल किंवा विकृत होत. रे, ग, ध, नी हे स्वर आपल्या नियत स्थानापासून कमी उंचीकडे सरकतात, म्हणून त्यांना कोमल म्हणतात. आणि एकटा म उच्च स्थानाकडे सरकतो म्हणून त्याला तीव्र ही संज्ञा मिळते. अशा प्रकारे शुद्ध सात स्वर आणि त्याच्या पाच विकृती मिळून बारा स्वरभेद प्रत्यक्ष गायन-वादनांत उपयोगात आणतात. शुद्ध स्वर-स्थाने कायम राहतात, पण विकृत स्वरस्थाने कारणपरत्वे कमी-जास्त उंचीची होतात. त्यामुळे विकृत स्थानांचे दर्जे वेगवेगळे ठरतात. तरी पण प्रत्यक्ष वापरात या दर्जातील एकच दर्जा वापरायचा असतो. त्यामुळे विकृत स्वरभेद पाचच राहतात.



पं. भीमसेन जोशी (किराणा)

स्वरसप्तक– क्रमाने सात स्वर म्हटल्यास ते सप्तस्वर होतील. सप्तक पुरे करण्यास एक स्थान पूर्ण म्हणून पुढील स्थानांतील स्वर म्हणावा लागतो. सा, रे, ग, म, प, ध, नी या स्थानाला पुढील स्थानाचा आरंभक सा जोडावा लागतो. म्हणजे स्वर जरी ८ झाले तरी इथे आपण ७ स्वरांतरे म्हणत असतो. सा, रे, ग, म, प, ध, नी, असे जेव्हा आपण म्हणतो, त्या वेळी सा

म्हणताना नी, सा, हे स्वरांतर गृहीत धरतो. या सप्तकाच्या स्वरांचे सा, रे, ग, म व प, ध, नी, सा हे दोन समान भाग करतात आणि त्यांना अनुक्रमे पूर्वांग आणि उत्तरांग म्हणतात.

**वर्ण**– प्रत्यक्ष गायन-वादनात ज्या वेगवेगळ्या क्रिया केल्या जातात, त्यांना वर्ण म्हणतात. असे वर्ण चार आहेत. ते अनुक्रमे स्थायी, आरोही, अवरोही आणि संचारी होत.

एखादा स्वर थांबून थांबून तोच तोच पुन्हा म्हणणे ही क्रिया स्थायी वर्ण होय. उदा० सासा, रेरे, इत्यादी.

स्वर चढत्या क्रमाने म्हणत जाणे ही क्रिया आरोही वर्ण समजावी. उदा० सा, रे, ग, म, प, ध, नी, सां.

हेच स्वर उतरत्या क्रमाने म्हणणे ही क्रिया अवरोही समजावी.

आरोही-अवरोही क्रियांचे मिश्रण म्हणजे संचारी वर्ण होय. उदा० सा ग रे, रे म ग, इत्यादी.

**अलंकार** – नियमित स्वरसमूहास अलंकार म्हणतात. स्वरांचे मागील पुढील संदर्भासह अनेक स्वरगुच्छ हे अलंकारच असतात. स्वरांचा आरोही-अवरोही क्रम ठरवून अलंकार बनवितात. आणि तो क्रम कायम राखण्यात खरी कुशलता असते. अलंकाराच्या योगाने प्रत्यक्ष गायन-वादनक्रियेचे सौंदर्य वाढायला मदत होते.

**राग**– 'रञ्जयति इति रागः' = जो श्रोत्यांच्या मनाचे रंजन करतो, तो राग होय. विशिष्ट नियमबद्ध व रंजक अशा प्रकारे स्वरांची योजना केल्याने तो राग बनतो. राग म्हणजे केवळ स्वरावली नव्हे; तर तो असा एक स्वरगुच्छ असतो, की ज्यामध्ये नादसौंदर्य निर्माण करण्याची व स्वरांचे अनेक आकृतिबंध निर्माण करण्याची क्षमता असते.

संगीतोपयोगी नाद म्हणजे २२ श्रुती होत. प्रत्येक वेळी सा, रे, ग, म, प, ध, नी यांपैकीच स्वर घेऊन जो स्वरसमूह तयार होतो, त्याला मेळ म्हणतात. मेळ म्हणजे निरनिराळी सर्वसाधारण अशी सप्तकेच होत. मेळांवर विशिष्ट प्रकारचे संस्कार करून त्यांचे उचित प्रयोग केल्यास त्यांतून रंजकता निर्माण होते. अशा संस्कारांचे विशिष्ट नियम किंवा विधिनिषेध हे अनुभवातून ठरविले गेले आहेत.

एकाच सप्तकातील पाचही चल स्वर (रे, ग, म, ध, नी) हे जेव्हा अविकृत म्हणजेच मूळ स्वरूपात वापरले जातात, तेव्हा त्या सप्तकाला शंकराभरण किंवा वेलावली सप्तक म्हणतात. त्यांतील एकेक चल स्वर अविकृताऐवजी विकृत स्वरूपात वापरीत गेल्यास अनेक प्रकारची सप्तके तयार होऊ शकतात. अशा प्रकारे विकृत स्वरांची निरनिराळी संमिश्रणे वापरीत गेल्यास त्यांतून सप्तकांच्या कित्येक तऱ्हा उपलब्ध होतात. त्यांतील संगीतोपयोगी प्रकार विचारात घेऊन त्यांची वर्गवारी केली गेली आहे. असे वर्ग १०–१२ प्रकारचे असून, त्यांना मेल अशी संज्ञा आहे. मेलांची ही वर्गवारी गणित व उपयुक्तता अशा दोन्ही बाजूंचा विचार करून ठरवली गेली आहे. व्यंकटमखी या संगीतशास्त्रज्ञाने सूक्ष्म विचार करून मेलांची संख्या ७२ पर्यंत पोचवली आहे. कर्नाटक संगीतात ही ७२ मेलपद्धती स्वीकृत आहे.

मेल शब्दाला हिंदुस्थानी संगीतात थाट हे नाव आहे. दक्षिणेकडचे किंवा उत्तरेकडचे सर्वच राग कोणत्या ना कोणत्या तरी मेलातून उत्पन्न झाले आहेत. व्यंकटमखीची ७२ मेलांची पद्धती हिंदुस्थानी संगीतासाठी जशीच्या तशी उपयोगी पडत नाही. हिंदुस्थानी संगीताच्या स्वरांचे निरीक्षण केले असता, या ७२ मेलांपैकी १० मेलांवर काम भागू शकते. कै. भातखंडे यांनी ही १० मेलांची पद्धती किंवा थाटपद्धती पुरस्कारली व ती प्रचारात आणली आणि प्रचारातील सर्व राग स्वरसादृश्याचा निकष लावून १० थाटांत वर्गीकृत करून टाकले. हे दहा थाट पुढीलप्रमाणे आहेत –

(१) बिलावल (सर्व शुद्ध स्वर), (२) खमाज (एक विकृत, कोमल निषाद), (३) कल्याण (एक विकृत, तीव्र मध्यम), (४) काफी (दोन विकृत, ग, नी कोमल), (५) भैरव (दोन विकृत, रे, ध कोमल) (६) मारवा (दोन विकृत, रे कोमल व म तीव्र), (७) पूर्वी (तीन विकृत, रे, ध कोमल, म तीव्र), (८) आसावरी (तीन विकृत, ग, ध, नी कोमल), (९) तोडी (चार विकृत, रे, ग, ध कोमल, म तीव्र) आणि (१०) भैरवी (चार विकृत, रे, ग, ध नी कोमल).

वर दिलेल्या थाटांतून राग उत्पन्न होतात. आरोह, अवरोह, वादी व संवादी यांनी युक्त असा स्वरसमूह म्हणजे राग. रागांचे शास्त्रीय विवेचन करताना श्री. ह. वि. दात्ये पुढील परिच्छेद लिहितात – 'विहित आणि वर्ज्य अशा उभय लक्षणांनी प्रयुक्त अशी स्वरयोजना निरनिराळ्या रागांसाठी आवश्यक असते. राग सिद्ध होण्यासाठी स्वरांचे विशिष्ट प्रकारचे आरोह व अवरोह निश्चित केले गेले आहेत. आरोह म्हणजे अवच स्वराकडून उच्च स्वराकडे चढत जाणे आणि अवरोह म्हणजे उलट उतरत येणे होय. आरोह–अवरोह रागशः वेगवेगळे असून, त्यांच्यामध्ये वर्ज्यावर्ज्य स्वर, वादी-संवादी स्वर आणि सरळ अथवा वक्रतेने घ्यावयाचे स्वर हे ठरलेले असतात. ही तीन लक्षणे आरोह व अवरोह यांत दिसताच एक एक राग सिद्ध होतो. वेगवेगळे राग ओळखण्यासाठी त्यांना वेगवेगळी नावे दिली गेली आहेत. अशा रागांची रूपरेषा किंवा पकड ज्या तीन लक्षणांमुळे ठरते त्यांचा क्रमाने विचार करू.

रागासाठी विहित असलेले स्वर त्या त्या रागाच्या आरोहा-

व अवरोहात घेतले जातात. काही रागांत एखादा दुसरा स्वर वर्ज्य असतो. भूप, दुर्गा, इ. रागांत दोन दोन स्वर वर्ज्य असून,



पं. भास्करबुवा बखले (ग्वाल्हेर, आग्रा, जयपूर,)

भीमपलास यासारख्या काही रागांत आरोहामध्ये दोन स्वर वर्ज्य असले, तरी अवरोहामध्ये सर्व स्वर विहित असतात. काही रागांत विकृत स्वर हवे असतात, तर काही रागांत अविकृत स्वर हवे असतात. काही रागांत विकृत व अविकृत असे दोनही प्रकारांचे स्वर हवे असतात. त्यांच्या आरोहात चल स्वराचे एक रूप विहित असते. उदाहरणार्थ तिलंग, सारंग इत्यादी रागांत आरोहामधील निषाद अविकृत असतो; परंतु तो अवरोहामध्ये मात्र विकृत असतो. अशा प्रकारे कोणते स्वर विहित व कोणते स्वर वर्ज्य हे रागशः ठरलेले असते. षड्ज हा आधारस्वर असल्यामुळे तो मात्र कोणत्याही रागात वर्ज्य नसतो.'

ज्या रागांचा स्वरविलास करताना अन्य कोणत्याही रागांचा भास होत नाही किंवा त्याची छायाही दिसत नाही, अशा रागांना शुद्ध राग असे म्हणतात. ज्यांत थोडी बहुत अन्य रागाची छाया दिसते, त्यांना छायालग राग म्हणतात आणि ज्यांच्या स्वरविलासात दोहोंपेक्षा अधिक रागांची छाया दिसून येते, त्यांना संकीर्ण राग म्हणतात.

सर्वसाधारणपणे स्वरांचा वापर जगात सर्वच लोक करीत आले आहेत. तथापि राग या शास्त्रशुद्ध उत्क्रांतीपर्यंत भारताबाहेर फारसे कोणी पोचले नाही. श्री. गोविंदराव टेंबे याविषयी लिहितात – 'रागरागिण्यांची निर्मिती हा विलक्षण टप्पा, मानवी बुद्धीच्या अतुल प्रकर्षाचे व हेतुपूर्ण अचाट प्रयत्नांचे अजरामर व अनन्य स्मारक आहे. राग-रचना हे भारतीय संगीताचे एकमेव व असाधारण लक्षण ठरेल. केवळ स्वरालापांतून रसनिर्मिती करण्याची किमया भारतीय संगीतातील रागरचनेमध्येच आहे.'

रागातील स्वरांना त्यांच्या महत्त्वाप्रमाणे नावे दिली गेली आहेत, ती अशी – रागातील मुख्य स्वराला वादी म्हणतात. रागाच्या विस्ताराचा हा मध्यबिंदू असतो. वादी स्वराच्या खालोखाल महत्त्वाच्या स्वराला संवादी म्हणतात. 'वादी राजात्र गीयते।' म्हणजे वादी हा कोणत्याही रागातला राजा असतो. त्याच्या खालोखाल संवादी स्वर येतो. हा वादीपासून पाचवा किंवा चौथा असतो. म्हणजेच वादीच्या मध्यम किंवा पंचम भावात असतो. वादी पूर्वांगात असला, तर संवादी उत्तरांगात असतो आणि वादी उत्तरांगात असला, तर संवादी पूर्वांगात असतो.

एक स्वर दुसऱ्या स्वरात जेव्हा बेमालूम मिसळला जातो, तेव्हा त्या क्रियेला संवाद म्हणतात. षड्ज स्वराशी त्याचा तार षड्ज, पंचम आणि मध्यम हे स्वर एकरूप झाल्याचे दिसते. या क्रियांना अनुक्रमे षड्ज-षड्ज भाव, षड्ज-पंचम भाव आणि षड्ज-मध्यम भाव असे म्हणतात. षड्ज-षड्ज भावात बावीस श्रुतींचे, षड्ज-पंचम भावात तेरा श्रुतींचे व षड्ज-मध्यम भावात नऊ श्रुतींचे अंतर असते. यापेक्षा कमी श्रुत्यंतरांचे स्वर संवाद करीत नाहीत. ते षड्जाच्या संदर्भात स्पष्ट ऐकू येतात. याही स्वरांचा रागात उपयोग होतो. या स्वरांना अनुवादी म्हणतात. रागामध्ये ज्या स्वरांचा उपयोग होत नाही, त्यांना विवादी स्वर म्हणतात. रागाची गोडी वाढविण्यासाठी काही रागांत या विवादी स्वरांचा कुशलतेने उपयोग केला जातो.

रागांच्या जाती – रागात उपयोगात आणलेल्या स्वरसंख्येवरून रागांच्या जाती ठरविल्या गेल्या आहेत. रागात जास्तीत जास्त सात स्वर आणि कमीत कमी चार स्वर लागतात. चार स्वर घेणाऱ्या रागांची संख्या अत्यल्प असल्याने रागांच्या औडुव, षाडव आणि संपूर्ण अशा तीन मुख्य जाती मानल्या गेल्या आहेत –

आरोह-अवरोहात पाचच स्वर घेणारे राग औडुव होत.

आरोह-अवरोहात सहाच स्वर घेणारे राग षाडव होत.

आरोह-अवरोहात सातही स्वर घेणारे राग संपूर्ण होत.

उपजाती – असमान आरोह-अवरोहांचे जे राग असतात, त्या

सर्वांना उपजाती म्हणतात. त्या औडुव-संपूर्ण, षाडव-संपूर्ण, संपूर्ण-औडुव, संपूर्ण-षाडव, औडुव-षाडव, षाडव-औडुव होत.

याशिवाय, संकीर्ण जातीचे राग असतात, त्यांत एकाच स्वराच्या दोन दोन रूपांचा उपयोग होतो. ज्या रागांचे आरोह-अवरोह सरळ नसतात, त्यांना वक्र म्हणतात. स्वरसंख्या व वर्ण यामुळे त्यांना 'औडुव-वक्र-संपूर्ण', 'वक्र-संपूर्ण' अशी नावे दिली जातात. या सर्व प्रकारच्या एका मेलात ४८४ राग निघतात. सर्व ७२ मेलांत मिळून ३४८४८ राग बनू शकतात. गणिताने एवढी रागसंख्या सिद्ध केली असली, तरी व्यवहारात मात्र २०० च्या वर राग प्रचलित नाहीत.

रागरचना — एखाद्या मेलातून विशिष्ट आरोह-अवरोह तयार करून त्याला वादी-संवादी यांची जोड दिल्यानेच केवळ रागाची उभारणी होत नाही. त्यासाठी पुढील गोष्टींची जरूरी असते. — (१) आरोह-अवरोह, (२) वादी-संवादी, (३) रंजकता, (४) स्वरसंगती, (५) अल्पत्व-बहुत्व, (६) स्वरवक्रता, (७) न्यास (विश्रांतिस्थाने), (८) साधारण चलन, (९) अस्ताई-अंतरा यांचा उठाव व (१०) निराळेपणा.

या गोष्टींमुळे प्रत्येक राग वैशिष्टचपूर्ण होतो. प्राचीन शास्त्रकारांनी ग्रह, अंश, मंद, तार, न्यास, अपन्यास, संन्यास, विन्यास, बहुत्व आणि अल्पता ही रागाची दहा लक्षणे सांगितली आहेत. (राग पाहा)

मूर्च्छना — रागांची उत्पत्ती पूर्वी प्रचलित असणाऱ्या जातिगायनातून झालेली आहे. या जातींची उत्पत्ती मूर्च्छनांतून झाली आहे. मूर्च्छना म्हणजे वेगवेगळे आरोह होत. ४.३.२.४.४.३.२ या श्रुत्यंतरावर असलेला प्रत्येक स्वर आरंभक समजून जे सात आरोह होतील, त्यांना मूर्च्छना म्हणतात. पूर्वी आपणाकडे दोन मुख्य सप्त स्वरांतरे प्रचलित होती. त्यांना षड्ज ग्राम आणि मध्यम ग्राम म्हणत. मध्यम ग्रामात पंचम तीन श्रुतींचा व धैवत चार श्रुतींचा असे. म्हणजेच ४.३.४.४.३.४.२ अशा श्रुत्यंतराचे ते सप्तक असे. या दोन ग्रामांतून मिळून १४ मुख्य मूर्च्छना निघतात. या मूर्च्छनांमुळे २, ३ व ४ श्रुतींचे वेगवेगळे स्वर प्राप्त होतात. यांतील काहींचे आरोह संवाद स्वरूपात सापडतात. ते गेय होऊ शकतात. तेच घेऊन त्यांवर गीते रचली गेली. प्राचीन काळी प्रत्येक आरंभक स्वर बदलण्याची प्रथा होती. आजच्याप्रमाणे सर्व गायन 'षड्ज' स्वरावर आधारित नव्हते. या जातींच्या स्वरांना षड्ज आधार दिला गेल्याने वेगवेगळे मेलसदृश आरोह प्राप्त झाले. त्यामुळे जातींचा उपयोग मागे पडला. त्यांची जागा रागाने घेतली.

रागवर्गीकरण — रागांची संख्या वाढल्यावर त्यांच्या वर्गीकरणाची आवश्यकता भासू लागली. या वर्गीकरणावर तत्कालीन परिस्थितीचे प्रतिबिंब पडलेले दिसून येते. कालपरत्वे वर्गीकरणाच्या विभिन्न पद्धती दिसून येतात.

प्राचीन वर्गीकरणपद्धती — संगीतरत्नाकर या ग्रंथात तत्कालीन रागांचे वर्गीकरण आढळते, ते असे — (१) ग्राम राग, (२) उपराग, (३) राग, (४) भाषा, (५) विभाषा, (६) अंतर्भाषा, (७) रागांग, (८) भाषांग, (९) क्रियांग व (१०) उपांग. हिला दशविध रागवर्गीकरणपद्धती म्हणतात.

प्राचीन काळी गोत्र पद्धतीच्या आधारावर रागांचे वर्गीकरण केलेले काही ग्रंथांत आढळते. त्यातून शिवमत, भरतमत, कल्लीनाथमत आणि हनुमन्मत अशा चार प्रकारच्या वर्गीकरणांचा उल्लेख सापडतो. या मतानुसार सहा मुख्य राग मानून इतरांचे पत्नी, पुत्र, पुत्रवधू अशा प्रकारांत वर्गीकरण केलेले आढळते. शिव व कल्लीनाथ यांच्या मताप्रमाणे श्री, वसंत, पंचम, मेघ, भैरव, नटनारायण हे सहा मुख्य (पुरुष) राग मानले गेले असून, त्यांच्या पत्नी, पुत्र, पुत्रवधू, राग-रागिण्या वेगळ्या मानल्या आहेत.



कुमार गंधर्व

आधुनिक वर्गीकरणपद्धती—प्राचीन वर्गीकरणपद्धतीत स्वरसाधर्म्य दिसत नाही. त्याचप्रमाणे राग किंवा रागिणी निश्चित

पणे कोणाला म्हणावे, याचे स्पष्ट दिग्दर्शन होत नाही. त्यामुळे ही वर्गीकरणे कपोलकल्पित वाटतात. यामुळेच आधुनिक काळात नवीन प्रकारच्या वर्गीकरणाची जरूरी भासली. त्यातूनच विविध वर्गीकरणपद्धती उत्पन्न झाल्या.

थाट पद्धती —थाटपद्धतीत सर्व समान स्वर असणारे राग एकेका मेलात वर्गीकृत केले गेले आहेत. तदनुसार कल्याण, बिलावल, भैरव, खमाज, काफी, आसावरी, भैरवी, मारवा, तोडी, पूर्वी या दहा थाटांत प्रचलित सर्व थाटांचे वर्गीकरण करण्यात आले आहे. हिंदुस्थानी रागांपैकी सर्वच राग या वर्गीकरणात चपखल बसतातच, असे नाही. त्यामुळे ही थाटसंख्या ३२ पर्यंत न्यावी लागते. या पद्धतीला जन्यजनक पद्धती असे दुसरे सार्थ नाव आहे.

अंगप्रत्यंगांवरून रागवर्गीकरण करताना पूर्वांगप्रधान आणि उत्तरांगप्रधान अशा दोन प्रकारांत रागांचे वर्गीकरण करतात. याचा पोटभेद पूर्वराग व उत्तरराग आहे. त्याचप्रमाणे समान जाती, समान रस, समान वादी-संवादी आणि समान आकृतिबंध यांवरूनही रागांचे वर्गीकरण केले जाते.

रागगायनासंबंधी कर्नाटकी पद्धती व हिंदुस्थानी पद्धती यांची तुलना करून पं. भातखंडे यांनी काही विशेष तपशील सांगितला आहे, तो असा—

(१) वर्तमान हिंदुस्थानी पद्धतीचे शुद्ध किंवा आधारसप्तक बिलावल आहे, तेच कर्नाटक पद्धतीचे कनकांगी सप्तक होय.

(२) हिंदुस्थानी संगीतात रागांचे मुख्य तीन वर्ग आहेत- (१) तीव्र रे, ध लागणारे राग, (२) कोमल रे, ध लागणारे राग व (३) कोमल ग, नी लागणारे राग.

(३) प्रत्येक हिंदुस्थानी रागात सर्वांत मुख्य असा एक स्वर असतो. त्याला वादी म्हणतात. हिंदुस्थानी गायक याचा प्रयोग विशेष रूपाने करतात.

(४) वादी स्वराच्या स्थितीला अनुसरून हिंदुस्थानी संगीतातील रागांचे पूर्व आणि उत्तर असे दोन भाग होतात.

(५) दिवस-रात्रीच्या २४ तासांत प्रत्येक रागासाठी एक निश्चित समय असतो आणि तो मनोविज्ञान आणि शरीरविज्ञान यांना अनुसरून निर्धारित केला जातो.

(६) हिंदुस्थानी पद्धतीत तीव्र मध्यमाला महत्त्वपूर्ण स्थान आहे.

(७) जे राग सूर्योदयाच्या व सूर्यास्ताच्या वेळी गायिले जातात, त्यांना संधिप्रकाश राग म्हणतात. हे राग सामान्यत्वे रे, ध कोमल या वर्गात येतात.

(८) ज्या रागांत ग, नी कोमल असतात, ते सामान्यत्वे मध्याह्नी वा मध्यरात्री गायिले जातात.

(९) रे, ध, ग आणि नी तीव्र असणारे राग संधिप्रकाश रागांच्या नंतरच गायिले जातात.

(१०) सायंगेय रागांचे वादी स्वर बदलून प्रातर्गेय राग बनवता येतात.

(११) उत्तरी पद्धतीत संगीतज्ञ गायक आपल्या रागात केव्हा केव्हा मोठ्या कौशल्याने विवादी स्वरांचाही उपयोग करतात.

(१२) पूर्वरागांचे विशुद्ध स्वरूप आरोहात व उत्तर रागांचे अवरोहात दिसून येते.

ताल–गीत, वाद्य व नृत्य यांच्या क्रियेच्या गतीचे नियमित प्रमाण ज्याच्या योगे दाखवले जाते, त्याला ताल म्हणतात. एक, दोन, तीन, इ. मात्रांच्या उच्चारणाने नियमित अशा कालाचा परिच्छेद दाखविणे म्हणजे ताल होय, अशीही त्याची दुसरी व्याख्या आहे. ताल म्हणजे सांगीतिक वृत्तच होय. तालामुळे गीताला व्यवस्थितपणा येतो. रसोत्पत्तीसाठी ताल मोठे साहाय्य करतात. या तालाच्या संबंधात अनेक पारिभाषिक शब्द येतात.

गीत गाण्या-वाजविण्यास लागणारा अवधी काल म्हणून ओळखतात. या कालाला सप्रमाण गतीचे बंधन घातले, की त्याला लय म्हणतात. लय म्हणजे सप्रमाण खंड असलेला काल होय. कालाच्या लयीच्या दोन खंडांतील अंतर म्हणजे मात्रा होय. एक मात्रावकाश एका सेकंदाचा समजतात. लयीच्या या मात्रांच्या विशेष संख्येच्या गटाला ताल म्हणतात. या तालांचे खंड किंवा विभाग करतात. हे विभाग सम संख्येचे किंवा विषम संख्येचेही असू शकतात. समान मात्रांचे ताल त्यांच्या खंडभेदामुळे भिन्न असतात. तालांच्या या खंडावर जोर द्यायचा असतो. एकूण जोराला वजन म्हणतात.



अब्दुल करीमखाँ (किराणा)

लय तीन प्रकारची आहे. एक मात्रावकाशाची गती ही मध्य लय होय. या लयीच्या दुप्पट सावकाश लयीला बिलंबित व दुप्पट जलद लयीला द्रुत म्हणतात.

तालात एका विशेष मात्रेवर जोर दिला जातो. तिला सम म्हणतात. समेची ही मात्रा तालाच्या सुरवातीची म्हणजे पहिली मात्रा असते.

तालांच्या मात्रांचे दोन समभाग केले असता दुसऱ्या भागाच्या पहिल्या मात्रेला काल असे म्हणतात. तालांच्या मात्रांचे दोन समभाग करतात. पहिल्या भागाला भरी आणि दुसऱ्या भागाला खाली म्हणतात. तबलावादनात या क्रिया सुंदरतेने दाखवायच्या असतात. विशिष्ट मात्रांवर जो आघात करतात त्याला टाळी म्हणतात. तालाच्या एका फेऱ्याला आवर्तन म्हणतात.

गीतात जसे शब्द असतात, तसे तबल्यावरील नादातूनही काही शब्द वाजतात. या विशिष्ट शब्दांचा विशिष्ट संख्येच्या मात्रांचा खंडयुक्त समूह म्हणजे ठेका होय. ताल सशब्द आणि निःशब्द क्रियांनी मोजून दाखवतात. जोराच्या ठिकाणी टाळी देतात. तर निःशब्द क्रिया उताणा हात हवेत सोडून दाखवतात. लयकारी म्हणजे अलंकारिक लय. लयीचे दुप्पट, तिप्पट, चौपट आठपट हे सम विभाजनाने होत जाणारे लयकारीचे प्रकार आहेत. या शिवाय आड, कुवाड, बियाड आदी अवघड व गुंता-गुंतीचेही काही लयप्रकार आहेत. ३ मात्रांत ४ किंवा उलट, त्याचप्रमाणे ५ मात्रांत ६ किंवा उलट, इ. लयप्रकार याही लय-कारीच होत.

एका मात्रेचे चार भाग केले, तर पहिला सम, दुसरा विषम, तिसरा अतीत आणि चौथा अनागत होय. जुन्या शास्त्रग्रंथात (१) काल (२) मार्ग (३) क्रिया (४) अंग (५) ग्रह (६) जाती (७) कला (८) लय (९) यती व (१०) प्रस्तार असे तालाचे दहा प्राण सांगितले आहेत. यांतील काही भाग सांप्रत लोप पावले आहेत, तर काही नव्या नामरूपात प्रचलित झाले आहेत.

ताल अनेक आहेत; पण त्यांपैकी प्रचारात १९–२०च आहेत. गाण्याच्या ज्या अनेक शैली आहेत, त्यांसाठी वेगवेगळे ताल असून, ते त्यांच्या बोलांच्या वादनशैलींवरून ओळखता येतात.

प्रचारात असलेले ताल – (१) तीनताल (२) झपताल (३) दादरा (४) कहरवा (केरवा) (५) धुमाळी (६) द्रुत एकताल (७) रूपक (८) आध्धा (९) तिलवाडा (१०) विलंबित एकताल (११) झुमरा (१२) आडा चौताल (१३) पंजाबी (१४) दीपचन्दी (१५) चौताल (१६) धमार (१७) शूल (१८) तेवरा व (१९) सवारी. यांपैकी १ ते ४ मध्यलयी (छोटा ख्याल) साठी; ५ ते ९ विलंबित ख्यालासाठी; १० ते १४ ठुमरी, भजन, होरी, इ. ललित संगीतासाठी व १५ ते १९ ध्रुपद गायकीसाठी आहेत.

अलिकडे रूपक तालही विलंबित गायकीसाठी वापरतात. क्वचित आडा चौतालात मध्यलयीतील ख्यालही गातात.

ख्याल गायकीचे बोल चाटी बाजाचे असतात, तर ध्रुपद गायकीचे बोल खुल्या बाजाचे असतात. ख्याल गायकीचे ताल तबल्यावर वाजविले जातात, तर ध्रुपद गायकीचे बोल मृदंगा-वर वाजवले जातात.

**निबद्ध-अनिबद्ध गायन** – गायनक्रिया निबद्ध आणि अनि-बद्ध अशा दोन प्रकारांत होते. निबद्ध म्हणजे तालासह गायन व अनिबद्ध म्हणजे तालावाचून गायन होय. निबद्ध गायनात आलापांचा समावेश होतो. या क्रिया प्राचीन काळीही प्रचलित होत्या. रागाचे आलाप कशा प्रकारे करावे यासंबंधी नियम असत. रागालाप, रूपकालाप व आलप्ती हे प्राचीन आलापांचे प्रकार होत. या नियमांना स्वस्थान नियम असे म्हणत. रागनिर्मि-तीचे ग्रहांशादी नियम रागालापालाही लागू होते. आलापाची सुरवात ज्या स्वरापासून होई त्या स्वराला स्थायी म्हणत. त्या स्वरापासून मंद्राकडे चार स्वर येण्याच्या क्रियेला द्वि + अर्ध म्हणत. स्थायी स्वरापासून त्याच्या तारस्थानाच्या स्थानाला द्विगुण म्हणत. द्वि + अर्ध व द्विगुण यांतील स्वरांना अर्धस्थित म्हणत. प्रथम स्थायीपासून सुरवात करायची व द्वि + अर्धाकडे पोचायचे. तिथून द्विगुणाकडे जाऊन पुन्हा स्थायीकडे जावे आणि या क्रिया करताना अर्धस्थित स्वरांचा उपयोग करायचा, अशी प्राचीन रागालापपद्धती होती. रागालापातील लहानलहान स्वरसमूहांना स्थाय म्हणत. आलापाच्या विभागांना विदारी म्हणत व रागोचित अलंकृती केलेल्या स्वरसमूहाला मुखचालन म्हणत.

रागालापाची पुढील पायरी रूपकालाप होय. रूपकालापात रागालापाचे भाग पाडले जात. तर आलप्ती या प्रकारात आवि-र्भाव आणि तिरोभाव या क्रियांचा उपयोग करीत. आलापांना शब्द आणि ताल यांची जोड दिली की तो आक्षिप्तिका प्रकार होत असे. आक्षिप्तिकांचे रूप सांप्रत प्रचलित असलेल्या चिजां-सारखे असावे. निबद्ध गायनात प्रबंध हा प्रकार महत्त्वाचा होता. चार धातू (अवयव) आणि सहा अंगे यांनी पक्का बांध-लेला गीतप्रकार म्हणजे प्रबंध होय. हे चार अवयव असे – (१) उद्ग्राह (सुरवातीचा भाग) (२) ध्रुव (पालुपदासारखा वारं-वार येणारा भाग, उद्ग्राह आणि मेलापक यांना जोडणारा भाग) (३) मेलापक आणि (४) आभोग (अंतिम भाग). या आभोगात कवी आपले नाव नोंदवून ठेवतो. क्वचित अंतरा नावाचा पाचवा भाग असतो.

स्वर, बिरुद, तेन, पद, पाट आणि ताल ही सहा अंगांची नावे होत. स्वर म्हणजे चालीला लागणारी रचना, बिरुद म्हणजे वर्ण्यविषयक काव्य, पद म्हणजे काव्याला अनुरूप स्वररचना.

पाट म्हणजे शुष्काक्षरे (वाद्यांच्या बोलांची अक्षरे) आणि ताल म्हणजे विशिष्ट कालनियमांचे बंधन.

वरील सहा अंगांपैकी व चार धातूंपैकी काही घेऊन प्रबंध-रचना करण्यात येत असे. उद्ग्राह व ध्रुव हे दोन भाग आवश्यक असत. एखाद्या वेळी मेलापकाशिवाय प्रबंध दिसत असे. अंगांपैकी स्वर, बिरुद, पद, ताल हे आवश्यक असत. जुन्या प्रबंधात सर्वच अंगांचा समावेश होत असे. थोडक्यात बंदिस्त किंवा नियमबद्ध रचना म्हणजे प्रबंध होय, हे यावरून कळते. छंद, गीत आणि ग्रंथ यांपैकी गीतप्रबंधच संगीताच्या बैठकीसाठी उपयोगात आणले जात. म्हणजेच ज्यात छंद-काव्यापेक्षा स्वरतालविशेषता असते, अशीच गीते प्रबंधगायनासाठी वापरली जात.

आधुनिक अनिबद्ध गायकीत आलाप आणि ताना यांचा समावेश होतो. आलापाला पूर्वीच्या रागालापाचे बरेच नियम लागू होत असतात. या आलापीला बढत म्हणतात. आलाप करताना रागाचे स्वर, त्यातील वर्ज्यावर्ज्य, वादी-संवादी, विश्रांतिस्थाने, साधारण चलन, स्वरवक्रता, अल्पत्व, बहुत्व आणि काकुभेद यांकडे विशेष लक्ष द्यावे लागते. ध्रुपद गायकीत हे आलाप रि, द, न, इ. अक्षरे घेऊन करण्यात येतात. यांना 'नोम्



मा. कृष्णराव (आग्रा)

थोम्' म्हणतात. षड्ज स्वरापासून सुरवात करून क्रमाक्रमाने मागील पुढील स्वर घेऊन त्यांचे वेगवेगळे स्वरगुच्छ तयार करून हे आलाप तयार होतात. या आलापक्रियेत गमक, हरकती, मींड, खटका, इ. सौंदर्यवर्धक विशेषांचा उपयोग केला जातो. त्यात वैचित्र्यही आणता येते. मंद्र, मध्य आणि तार अशा तीन स्थानांत वावरण्यास संधी मिळत असल्याने रागविस्तार किंवा आलापी तास तास चालू शकते. रागांच्या अंगप्राधान्यत्वे रागांच्या विस्तारक्रियेत फरक पडतो.

नोम् थोम् आलाप प्रथम स्थायीत (एकपदलयीत) राहतात. नंतर त्याच्या दुगुणीत व नंतर चौगुणीत ते वाढत जातात. या क्रिया होत असताना अनेक प्रकारची लयबांट करून दाखवितात. ते या आलापीचे एक मोठे वैशिष्टयच आहे.

ख्यालगायनात गीताक्षरे आलापीच्या अंगाने जेव्हा गायिली जातात, तेव्हा त्यांना बोल आलाप म्हणतात. बोल आलापाच्या द्वारे गीताच्या अर्थाला धरून स्वर वाक्ये तयार करण्यात येतात. गीत, अर्थ, शब्द व स्वर यांच्या एकत्र माध्यमातून बोल व्यक्त करण्यात येतो.

आलापीचे दुसरे महत्त्वाचे अंग म्हणजे तान होय. तान म्हणजे ताणलेले स्वर. एका मात्रावकाशात अधिकाधिक स्वर घेऊन द्रुत क्रियेत गायिल्या जाणाऱ्या स्वरमालेला तान म्हणतात. तानांना लयीचे बंधन असते. लय हा तानांचा प्राण आहे. तानांच्या योगे गायन रोचक होते. त्याची आकर्षकता वाढते. गीताचा उत्कर्षबिंदू तान हाच असतो. या तानांचे सरळ, मिश्र, अलंकारिक, कूट, गमक, खटक्याची, सपाट, लयकारी, छूट, लढत, गिटकडी, इ. अनेक प्रकार आहेत.

तानांचा बोलताना नावाचा एक प्रकार आहे. त्यांत गीतांच्या शब्दांचा वापर करतात. गीताच्या अर्थाची मोडतोड होऊ न देता या ताना म्हणायच्या असतात. शिवाय सबंध अस्ताईचे शब्दही पूर्णपणे या तानेत गुंफायचे असतात. अर्धे शब्द घेणे चूक असते. यातील लयकारीचा भाग अत्यंत महत्त्वाचा असतो.

अनिबद्ध गायकीच्या पुढची पायरी म्हणजे निबद्ध गायकी होय. यात सर्व तालबद्ध गीतांचा समावेश होतो. असे गीतप्रकार अनेक आहेत. ही गीते सुस्वर, सुरस, मधुर, मधुराक्षर, सालंकार आणि सप्रमाण असावी, असे सांगितले आहे. चांगले किंवा वाईट गीत वरील निकषावर ठरत असते.

प्रबंध गायकीतूनच पुढे आधुनिक निबद्ध गीतांची निर्मिती झाली आहे. प्रबंधांचे चार धातू आणि सहा अंगे यांचे काटेकोर बंधन पाळण्याचे नियम शिथिल होत गेले आणि नंतरच्या काळात ध्रुव व आभोग हे दोन धातू आणि स्वर, बिरुद आणि ताल ही तीन अंगे एवढ्याच अंगांवर निर्धारित अशी प्रबंधरचना होऊ लागली. क्वचित स्वर-ताल-तेन, किंवा स्वर-ताल-पाट यांच्या उपयोगानेही प्रबंधरचना केली जाई. स्वर, ताल,

विरुद, तेन आणि पाट यांच्या उपयोगाने होणारा प्रबंध आजच्या 'चतुरंग' प्रबंधाप्रमाणे असे. या प्रबंधांनाच पूर्वी वस्तू आणि रूपक अशी नावे असत. प्रबंध गीतप्रथा महाराष्ट्रात सोळाव्या शतकात प्रचलित होती, हे संतकवी दासोपंतांनी रचलेल्या अनेक रागदारी प्रबंध गीतांवरून दिसते. 'तेन तेन' 'पट' 'सरगम' इत्यादींच्या त्यांच्या रचना मिळतात.

**आधुनिक निबद्ध प्रकार** – संगीतकला परिवर्तनशील आहे. कालमानाप्रमाणे जनरुचीत जसजसा बदल होत जातो, तसतसा कलेच्या आविष्कारातही फरक पडत जातो. पूर्वीच्या प्रबंधगायकीत परिवर्तन होऊन त्यातून ध्रुपदांची निर्मिती झाली. ध्रुपदात अस्ताई, अंतरा, संचारी आणि आभोग असे चार धातू असतात. मेलापकाची जरूरी या परिवर्तनकालात नाहीशी झाली. उद्ग्राहाची जागा अस्ताईने आणि ध्रुवाची जागा अंतऱ्याने घेतली. प्रथम प्रथम अस्ताई, अंतरा, संचारी व आभोग अशी धातू असणारी ध्रुपदे निर्माण केली गेली. पुढे पुढे फक्त अस्ताई, अंतरा एवढ्या दोनच अवयवांची ध्रुपदे प्रचारात राहिली. गीर्वाण आणि लौकिक (मध्यप्रदेशीय) भाषेत रचलेले, नरनारी कथानक असलेले, शृंगार रसाचा आविष्कार करणारे, अनुप्रासयुक्त, चार चरणांचे आणि चार धातूंचे गीत म्हणजे ध्रुपद होय, असे भावभट्टाने आपल्या अनूपरत्नाकरात सांगितले आहे. एकूण ध्रुपदाकडे पाहिले असता त्यातील काव्य उदात्त, गंभीर आणि रसपरिपोषक असते. ध्रुपदाची रचना ईशभक्ती, राजाची स्तुती किंवा कृष्णवर्णन यासाठी केलेली असते. त्यातील काव्याचा दर्जा साहित्यदृष्ट्याही वरचा असतो. पूर्वीचे प्रबंध आणि जनरुचीला आवडणारे लोकसंगीत यांतील दुवा म्हणजे ही ध्रुपदे होत. ध्रुपदगायकीसाठी प्रामुख्याने चौताल (चारताल) वापरतात. तरीही झूल, तेवरा, मत्त, रुद्र, हनुमान, इ. तालांतही ध्रुपदे बांधली गेली आहेत.



फैयाजखाँ (आग्रा)

ग्वाल्हेरच्या मानसिंग तोमर याने ध्रुपदाच्या गायकीचा विशेष पुरस्कार केला. आपल्या राज्यात केवळ ध्रुपदगायकीची शाळा काढून तिथे गायकांना या गायकीचे संवर्धन करण्यास त्याने उद्युक्त केले. त्याची पत्नी मृगनयना हीदेखील गानप्रवीण होती. या उभयतांनी ध्रुपदगायकीला विशेष रूप दिले. अकबराच्या कारकिर्दीत ध्रुपदगायकी विशेष बहरली. हरिदासस्वामी आणि त्यांचे शिष्य तानसेन, रामदास, बैजू, इ. गायकांनी अनेक ध्रुपदांची निर्मिती केली. एवढेच नव्हे, तर याच काळात ध्रुपदगायकीच्या चार तऱ्हा निघाल्या.

**ध्रुपदनायक व गायक** – इ. स. च्या बाराव्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत ध्रुपदाचे अनेक नायक होऊन गेले, त्यांची नावे अशी –

भन्नू, लोहंग, दल्लू, भगवान, धोंडू, बैजू, पांडवे, चरजू, सय्यद निजामोद्दिन व गोपालनायक. या शेवटच्या गोपालनायकाविषयी एक दंतकथा प्रचलित आहे, ती अशी –

अलाउद्दिनाने दक्षिणेवर स्वारी केली, त्या स्वारीत त्याचा सरदार अमीर खुस्रव हाही होता. त्याच काळात यादवांच्या दरबारी गोपालनायक होता. गोपालनायकाचे गाणे ऐकून खुस्रव खूप झाला. दुसऱ्या दिवशी गोपालनायकाचेच गाणे गाऊन पण त्यात मुसलमानी रागांचे मिश्रण करून अमीर खुस्रव गोपालनायकाच्या पुढे गायला. त्याने गोपालनायकाला म्हटले. 'माझ्यासारखे तुम्ही गा; अन्यथा माझे श्रेष्ठत्व कबूल करा.' गोपालनायकाला मुसलमानी गायकी अपरिचित होती. त्यामुळे त्याला खुस्रवचे श्रेष्ठत्व मानणे भाग पडले. पण तरीही अलाउद्दिनाला गोपालनायकाची योग्यता समजून चुकली होती. त्याने परत जाताना त्याला दिल्लीला नेले व दरबारात त्याला आश्रय दिला. तो जेव्हा बैलगाडीत बसून बाहेर फिरावयास निघे, तेव्हा त्या वेळेला अनुरूप अशा रागांचे ध्वनी ज्यातून निघतील, अशा घंटा बांधी असे सांगतात.

कालक्रमात शेवटचा नायक बक्षू हा ठरतो. हा अनेक राजांच्या पदरी राहिला. बहादुरी तोडीचा जनक हाच होय. (१) गोपाललाल (२) बैजूबावरे, (३) हरिदास स्वामी (४) तानसेन (५) ब्रिजचंद (६) श्रीचंद व (७) राजा सन्मुखसिंग (धर्मांतरानंतर नौबतखान) हे प्रख्यात ध्रुपदिये होत.

**धमार** – ध्रुपदाचे काव्य उदात्त व गंभीर असते. पण सर्वसाधारण जनांची रुची शृंगाराकडे विशेष असल्याचे आढळून आल्यामुळे ध्रुपदगायकीतही शृंगार रसाच्या आविष्कारासाठी धमारांची निर्मिती झाली. धमार म्हणजे धमाल. कृष्णाने ज्या अनेक बालक्रीडा केल्या, त्यांच्या वर्णनाची काव्ये म्हणजे धमार होत. ही गीते धमार तालात गायिली जातात आणि त्या काव्यात होरी हा शब्द असतोच. त्यावरून धमार ओळखला जातो.

ख्याल – एका काळी ध्रुपदगायकी संगीतकारांत प्रतिष्ठित मानली जात असे; पण लोकसमाजात मात्र जानपद गीते प्रचारात होती. ही गीते स्त्रीकलावंत गात असत. मात्र त्यांना गायक वर्गाकडून मान्यता मिळालेली नव्हती. परंतु हीच गीते पुढे प्रतिष्ठा पावू लागली. ख्याल हा शब्द फारसी असून, त्याचा अर्थ कल्पना असा आहे. ध्रुपदे व गीते नवीन कल्पनेच्या आधारावर बांधिली जाऊ लागली व त्यांनाच पुढे ख्याल म्हणू लागले. प्रथम त्यांना 'भुंडी ध्रुपदे'च म्हणत. ध्रुपदगायकीत आलाप प्रथम करतात. गीताच्या बरोबर आलापी नसते. ख्यालात मात्र आलाप गीताबरोबरच घेतात. त्यामुळे गायकांना आलाप–तान क्रिया करण्याची नवी रीती मिळाली. आलाप, तान, इ. क्रिया करून समेवर येण्याच्या विविध क्रिया आपल्या कल्पनांनुसार करण्यास या गायकीत वाव असतो. या गायकीसाठी जो काव्यबंध (बंदीष) असतो, तो बहुतांशी शृंगारिक असल्यामुळे हा नवा प्रकार विशेष रंजक वाटू लागला आणि ध्रुपदाला मागे टाकून प्रचारात आला. मोगल राजदरबारात या गायकीचा पुरस्कार केला गेला. त्यामुळे मूळच्या ध्रुपदगायकांनाही ख्यालगायकीत प्रावीण्य मिळवावे लागले.

ख्यालगायकी विलंबित आणि मध्य लयीत गातात. विलंबिताला वडा ख्याल व मध्य लयीच्या ख्यालाला छोटा ख्याल म्हणतात. या छोट्या ख्यालात तीनताल, द्रुत एकताल यांतील चिजा घेतात. विलंबितासाठी तीनताल, तिलवाडा, झुमरा, विलंबित एकताल, आडा चौताल, आडा व (आजकाल) रूपक हे ठेके वापरतात. ग्वाल्हेरच्या मूळ ख्यालांचा तिलवाडा हाच प्रमुख ठेका असे.

द्रुत ख्यालात चिजांप्रमाणे सरगमगीत, लक्षणगीत, तराना, चतरंग, त्रिवट, अष्टपदी, इ. गीतांचा समावेश होतो. सरगमगीतांना स्वरमालिका असेही म्हणतात. रागाच्या स्वरूपाची यथायोग्य कल्पना देणारी सताल स्वररचना म्हणजे सरगम होय. रागाला लागणारे वर्ज्यावर्ज्य, वादीसंवादी हे स्वर, समय, रस, इ. गोष्टी सांगणारे गीत ते लक्षणगीत होय.

प्राचीन तेन अंगाच्या प्रबंधाप्रमाणे 'रीदन' 'तोम्' वगैरे अक्षरे घेऊन तयार केलेल्या सताल रचनेस तराना म्हणतात.

केवळ तबल्याच्या बोलांच्या अक्षरांनी तयार केलेली ती सुरतालबद्ध रचना होय.

गीताक्षरे, तरान्याचे बोल, सरगम आणि एखादी म्हण या चार प्रकारांनी युक्त असे सताल रागबद्ध गीत म्हणजे चतुरंग होय.

ख्यालगायक – अमीर खुस्रव याने ख्याल शोधून काढला असे एक मत आहे. पण पुष्कळ संशोधकांना ते मान्य नाही. सुलतान हुसेन शर्की (१५ वे शतक) हा जौनपूरचा राजा होता. त्याने ख्यालगायनात काही सुधारणा करून त्या गायकीचा फैलाव केला अशी प्रसिद्धी आहे. सोळाव्या शतकात चंचलसेन, सूरजखाँ, चांदखाँ आणि बाजबहादूर हे मोठे ख्यालिये होऊन गेले.



पं. जगन्नाथबुवा पुरोहित (आग्रा)

इ. स. च्या १८ व्या शतकात महंमद शाहा या मोगल बादशहाच्या दरबारात सदारंग व अदारंग असे दोन गवई होते. त्यांनी ख्यालाच्या अनेक चिजा बांधल्या आणि अनेक शिष्य तयार केले. गुलाम रसूल हा त्यांचा पट्टशिष्य होता. त्याने शक्कर व मख्खन या दोघांना ख्यालगायनात तयार केले. लखनौचा बडे महंमदखाँ आणि अहमदखाँ हे दोघे शक्करचे चिरंजीव होत. त्यांनी ख्यालगायकीत खूप लौकिक मिळवला. पुढे अलौकिक गायक म्हणून प्रसिद्धी पावलेले हद्दूखाँ व हस्सूखाँ हे याच परंपरेतले गायक होत. त्यांना ग्वाल्हेर दरबाराचा आश्रय होता. महंमदखाँ व रहिमतखाँ हे हद्दूखाँचे मुलगे. पैकी रहिमतखाँ यांस कै. विष्णुपंत छत्रे यांनी संभाळले. बहिरमखाँ व महमदअल्लीखाँ हे आग्र्याचे. नथ्थनखाँ हा दिल्लीचा. फैज महंमद व फैयाजखाँ हे बडोद्याचे. अल्लादियाखाँ हे

कोल्हापुरचे. नजीरखाँ रायपूरचा. अल्लीबक्ष हा पतियाळाचा. हे सगळे ख्यालाचे धुरंधर गायक होत.

जयदेव कवीच्या गीतगोविंदातील प्रबंधरचना अष्टपदी या नावाने प्रसिद्ध आहे. राधा–कृष्णांचा विप्रलंभ शृंगार या काव्यात वर्णित आहे. मध्यलयीच्या ख्यालाप्रमाणेच या अष्टपद्या गायिल्या जातात.

रागाच्या शब्दावरून केलेली अर्थवाही काव्यरचना म्हणजे रागमाला होय.

ध्रुपद आणि ख्याल यांच्या गायकीतून गायकाचे स्वर आणि ताल यांवरील प्रभुत्व दिसून येते. विद्वत्ता, मेहनत आणि आवाजाचा कस यांच्या योगाने सिद्ध होणारी ही पौरुष गायकी आहे. तरीपण केवळ पौरुषाचे प्रदर्शन हे गायकीचे एक अंग झाले. रसवत्ता व भावनाविष्कार हेही दुसरे तेवढेच महत्त्वाचे अंग आहे. त्याचा अविष्कार होरी–ठुमरी यातून होतो.

होरी – होळीच्या वर्णनाच्या काव्याला होरी म्हणतात. यात होळीच्या प्रसंगाने कृष्णलीलांचे वर्णन असते. ही गीते प्रामुख्याने दीपचंदी तालात गातात. या होरीला कच्ची होरी व धमार तालात गायिलेल्या होरीला पक्की होरी म्हणतात. होरी मध्य लयीत आणि मुख्यत्वे काफी रागात गातात. खमाज व इतर काही रागही काही वेळा वापरतात.

ठुमरी – ठुमरीची निर्मिती मुख्यत्वे शृंगार रसासाठी झाली आहे. ठुमरीची स्वररचना मोहक असते. स्फुरित, तिर्यक्, प्लावित, इ. गमकांचा या स्वररचनेत विपुल प्रमाणात उपयोग केला जातो. विप्रलंभ, करुण, भक्ती, इ. अनेक भावच्छटा या गीतांतून व्यक्तविल्या जातात. ठुमरीचे चलन ख्याल़ाप्रमाणे जडगंभीर नसते. म्हणून ठुमऱ्या खमाज, मांड, काफी, पिलू, देस, तिलककामोद, झिंझोटी, पहाडी, भैरवी, इ. रागांतून गायिल्या जातात. ख्यालापेक्षा ठुमरी ही सामान्य जनांना आकृष्ट करते. कारण ती भावपूर्ण असते. वाराणसीकडील ठुमरी फार प्रसिद्ध आहे. सिद्धेश्वरीदेवी, रसूलनबाई, इ. गायिका वाराणसी ठुमरी गाणाऱ्या म्हणून प्रसिद्ध आहेत. मुख्यत्वे पंजाबी हा ताल ठुमरीला लागतो. दीपचंदी, दादरा, केहरवा, इ. तालांतही ठुमऱ्या बांधलेल्या असतात.

ठुमरीगायकांत जुन्या काळी वाजिद अली शहा, व्यंकट नरसी आणि आधुनिक काळात बडे गुलामअली, सुरेश माने, बेगम अख्तर ही नावे सुप्रसिद्ध आहेत.

टप्पा – टप्पा हा एक वैचित्र्यपूर्ण गीतप्रकार आहे. यातील स्वररचना स्फुरित व गमकयुक्त असते, त्याचप्रमाणे ती गिटकडी तानयुक्त असते.

टप्प्याचा विस्तारही त्या रचनेनुसार करतात. सर्व टप्पा गीते पंजाबी भाषेत रचलेली आहेत. ख्याल आणि ठुमरी यांना जोडणारा हा प्रकार आहे. टप्पे ठुमरीच्या रागांतच बांधलेले असतात. मात्र टप्प्यात ठुमरीतल्याएवढा भावनोत्कर्ष दिसत नाही.

टप्पा गायक – इ. स. च्या १८ व्या शतकात लखनौ येथे मियाँ शौरी नावाचा एक गायक होऊन गेला. याचा बाप नामांकित ख्यालिया होता. पण याने त्या गायकीतूनच एक नव्या प्रकारचे गाणे शोधून काढले. त्याला त्याने टप्पा असे नाव ठेवले. याने अनेक टप्पे अनेक रागांत रचले. मम्मू हा त्याचा पट्टशिष्य आणि मुन्नेखाँ व जज्जूखाँ हे मम्मूचे शिष्य होत. धार येथेही देवजीबुवा, गणपत व लालजी असे नामांकित टप्पागायक होऊन गेले.

झूला, कजरी, दादरा, इ. प्रकारही या ललित संगीतातच मोडतात. या सर्व प्रबंधांत काव्याला फार महत्त्व असते आणि त्यांची स्वररचना काव्यानुरूप असते. संतकवींच्या रचना भजन या सदरात मोडतात. गझल ही यावनी प्रेमगीते असून, कव्वाली ही परमेश्वराच्या प्रार्थनेसाठी उपयोगात आणलेली गीते आहेत.



अल्लादियाखाँ (जयपूर)

याशिवाय विविध प्रदेशांत अनेक भिन्न प्रकारची लोकगीते गायिली जातात, ती सर्व प्रबंध या सदरातच येतात. कारण स्वर

तान, विरुद ही प्रबंधाची मुख्य अंगे यांना आधारभूत असतात. हिंदुस्थानी प्रबंधांचे स्वरनिष्ठ, स्वर-शब्दनिष्ठ, शब्द-स्वर-निष्ठ आणि (४) शब्दनिष्ठ असे चार प्रकार आहेत.

गायकाचे गुणदोष – रंजकता, माधुर्य, स्पष्ट व योग्य उच्चार, साफ आवाज, तीनही स्थानांतील स्वर स्वच्छ व योग्य प्रकारे लागणे, आवाज प्रसंगानुरूप लहान मोठा करता येणे, ताल व लय योग्य प्रकारे संभाळणे, योग्य जागी विश्रांती घेणे, गीताचा अर्थ जाणून तदनुरोधाने चीज वठवणे, हे गायकाचे गुण होत. नीरस व कर्कश आवाज, गाताना डोळे मिटणे, तोंड वेडेवाकडे करणे, जमिनीला डोके टेकणे, हात उभारून अर्धवट उठणे, वेडेवाकडे हातवारे करणे, रागनियम न संभाळणे, ताल आणि लय सोडणे, चोरटा आवाज लावणे, स्वर अनुनासिक करणे, हे गायकाचे दोष होत.

काही पारिभाषिक संज्ञा – संगीताच्या क्षेत्रात विशिष्ट अधिकारपरत्वे काही संज्ञा प्रचलित आहेत, त्या अशा –

नायक – कला व शास्त्र यांत प्रवीण, चिजा बांधण्यात तरबेज, तसेच स्वतः गाण्यात व इतरांना शिकविण्यात निष्णात.

पंडित – कलेचा परिचय असून शास्त्रज्ञानात प्रवीण.

चतुर – गायनकलेत विशारद व शास्त्राचा गाढा पंडित.

कलावंत – ध्रुपद, धमार, ख्याल, यासारखी गंभीर रचना गाण्यात प्रवीण.

कवाल – टप्पा, ठुमरी, गझल, इ. हलकी गीते गाणारा.

नायकी – गुरुपरंपरेने मिळालेल्या तालमीस दिलेली संज्ञा.

गायकी – गुरुमुखाने संपादित गायनाला गुणी गायकांकडून ऐकलेल्या गाण्याची जोड देऊन जे गानस्वरूप बनते, त्याला दिलेली संज्ञा.

संगीताची वाटचाल – संगीताचा उगम वेदकालाइतका प्राचीन मानावा लागतो. चार वेदांपैकी सामवेद हा गायनात्मक आहे. 'गीतिषु सामाख्या' (= संगीताला साम असे नाव आहे), असे सामवेदाचे लक्षणच आहे. यजुर्वेदात 'अगायन् देवाः' (= देवांनी गायन केले), असे म्हटले आहे. 'गायन्तं स्त्रियः कामयन्ते' (= स्त्रियांना गाणारा पुरुष आवडतो) असाही उल्लेख यजुर्वेदात आहे. अश्वमेधप्रसंगी दोन ब्राह्मण वीणेवर गाथा गायन करीत, असा उल्लेख तैत्ति. ब्राह्मणात आढळतो. याचा अर्थ असा की, गायनकला निर्माण झाली आणि ती थोड्याच काळात धर्मकृत्यात व यज्ञसंस्थेतही दाखल झाली.

वैदिक काळात तीन स्वरांच्या गायनाला सामिक म्हणत. हे तीन स्वर ग रे सा हे होते. पुढे हळूहळू ते गायनक्रमाने चार, पाच, सहा व सात स्वरांचे झाले. तशी सामे तयार झाली. तीन, चार व पाच या स्वरांची सामे जास्त मिळतात, तर सहा व सात या स्वरांची सामे फार कमी मिळतात. सामगायकांना स्पष्ट रूपाने प्रथम ग रे सा या तीन स्वरांची प्राप्ती झाली. त्यांना त्यांनी प्रथम, द्वितीय व तृतीय अशी नावे दिली. त्यांचा क्रम अवरोही होता. त्यानंतर त्यांना निषाद मिळाला. त्याचे नाव त्यांनी चतुर्थ असे ठेवले. ही चार नावे संख्यात्मक आहेत. त्यानंतर वैदिकांना जे स्वर मिळाले त्यांना त्यांनी वर्णनात्मक नावे दिली. गांधाराहून उच्च स्वराला मध्यम म्हणतात. त्याला त्यांनी क्रुष्ट (जोराने उच्चारायचा) असे नाव दिले. निषादाच्या खालच्या स्वराला मंद्र (गंभीर) म्हटले. त्याच्याही खाली जो एक स्वर मिळाला, त्याला त्यांनी अतिस्वार्य (ध्वननाची अंतिम सीमा) असे म्हटले. हळहळू सामसंगीत विकसित होऊन सामाचा क्रुष्ट, प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ, मंद्र आणि अतिस्वार्य असा पूर्ण पण अवरोही ग्राम मिळाला. सामसंगीतातली स्वरनामे आणि आधुनिक स्वरनामे यांची सारणी अशी –

| साम | आधुनिक | |
|---|---|---|
| क्रुष्ट | मध्यम | (म) |
| प्रथम | गांधार | (ग) |
| द्वितीय | ऋषभ | (रे) |
| तृतीय | षड्ज | (स) |
| चतुर्थ | निषाद | (नि़) |
| मंद्र | धैवत | (ध़) |
| अतिस्वार्य | पंचम | (प़) |

सामगायनाची विशिष्ट अशी स्वरलिपी होती. सामाचे सर्व मंत्र स्वरलिपीत मिळतात. त्यामुळे आजही ते त्या काळच्या स्वरूपात गायिले जातात. सांप्रत सामगायनाचे जेवढे म्हणून प्रकाशित ग्रंथ मिळतात, त्या सगळ्यांची स्वरलिपी संख्यात्मक आहे. कोणत्याही सामाच्या पहिल्या अक्षरावर एक ते पाच यांपैकी जी संख्या लिहिलेली असते, ती त्या सामाच्या आरंभक स्वराची सूचक असते. सहा व सात ही संख्या आरंभक म्हणून कधीही असत नाही. स्वरांच्या या संख्या अवरोही क्रमाने घ्यायच्या असतात. प्रायः १ ते ५ (मध्यमापासून ते निषादापर्यंत) च्या संख्येचा कोणता ना कोणता आरंभक स्वर असेल तो षड्ज समजायचा. स्वरलिपीत संख्येच्या शेजारी किंवा अक्षराच्या वर र अक्षर लिहिले असल्यास ते दीर्घत्वाचे सूचक समजायचे. उदाहरण म्हणून आज्यदोह नामक सामाची स्वरलिपी मिळते, ती अशी –

| २ र<br>हाउ<br>सऽस<br>मू २र<br>स ऽ | २ र<br>हाउ<br>सऽस<br>ध नि १र<br>रेऽरेरेरे | २ र<br>हाउ।<br>सऽस।<br>दा इ। | २ र<br>आ<br>सऽ<br>वा २ ऽ<br>सऽ | ३<br>ज्य<br>नि़<br>३<br>नि़ | ४ र<br>दो<br>ध़<br>अ १<br>रे | ५<br>हम्।<br>ऽप़<br>र।<br>रे |
|---|---|---|---|---|---|---|

| २ र<br>आ<br>सऽ<br>ति २<br>स | ३<br>ज्य<br>नि़<br>पृ ३<br>नि़ | ४ र<br>दो<br>ध़ऽ<br>थि ४<br>ध़ | ५<br>हम्।<br>प़<br>व्याः ५<br>प़ | २ र<br>आ<br>सऽ | ३<br>ज्य<br>नि़ | ४ र<br>दो<br>ध़ऽ | ५<br>हम्<br>प़ |
|---|---|---|---|---|---|---|---|

या सामात रे, स, नि़, ध़, प़ हे पाच स्वर लागलेले आहेत. संख्येला अनुसरून भिन्न भिन्न सामांचे आरंभक स्वर बदलतात. आरंभक स्वर बदलल्याने भिन्न भिन्न मूर्च्छना मिळतात. या मूर्च्छना जाती व राग यांच्या जननी होत. सामवेदाच्या काळात स्वर, ग्राम व मूर्च्छना यांचा विकास झाला होता. सामवेदात ताल नाही पण लय आहे. स्वर, ग्राम, लय व मूर्च्छना हे संगीताचे आधार आहेत आणि म्हणूनच सामवेदाला संगीताचा आधार मानतात.

प्रातिशाख्यांच्या कालात षडज्, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद अशी स्वरांना सात नावे मिळाली. ग्रामाचा क्रम अवरोही होता तो आरोही बनला. मंद्र, मध्यम व उत्तम (तार) अशी स्वरांची तीन स्थाने निर्धारित झाली.

वाल्मीकिरामायणात जातिगायनाचे उल्लेख मिळतात. जाती हे रागाचे आदिरूप होय.

शिलप्पधिकारम् ( इ. स. ३०० ) या तमिळ महाकाव्यात संगीतविषयक अनेक गोष्टींचे उल्लेख आढळतात. याच काळातील एका जैन कोशात संगीतविषयक काही माहिती मिळते. तिथे संपूर्ण षाडव आणि ओडुव रागांचे उल्लेख मिळतात, त्याचप्रमाणे २२ श्रुती आणि ५ स्वर यांचेही वर्णन आढळते.

हळूहळू संगीतकला वाढू लागली. गायकही निर्माण होऊ लागले. पण कलेच्या धुंदीत वावरत असताना त्यांच्याकडून धर्मनियमांची पायमल्ली होऊ लागली. त्यांच्यामध्ये विलासप्रियता शिरली. हे लक्षण ठीक नाही, असे वाटून मनूसारखे धर्मशास्त्रकार, तसेच बौद्ध भिक्षू व जैन यती यांनी लोकांना संगीतापासून दूर राहण्याचा आदेश दिला. धार्मिक पुढाऱ्यांच्या अशा संगीत विरोधी उपदेशाचा जनमानसावर प्रभाव पडून संगीतकला त्या काळात सुसंस्कृत लोकांपासून दूर झाली असण्याची शक्यता आहे.

पण संगीताची ही खालावलेली प्रतिष्ठा भरतमुनीने सावरली. त्याने संगीताला गांधर्ववेद म्हटले. त्याला सामवेदाचा उपवेद म्हणून बहुमान दिला. पुढे या देशात तंत्रविद्येला व तंत्रमार्गाला असाधारण महत्त्व प्राप्त झाले. अनेक देव–देवतांच्या उपासकांचे तांत्रिक संप्रदाय देशभर चालू झाले. या तांत्रिकांनी भक्तिसाधनेत संगीताचा स्वीकार केला. तंत्रविषयक संस्कृत ग्रंथांत संगीताविषयीचे भरपूर उल्लेख आढळतात. यामलतंत्रात संगीताच्या अनेक अंगोपांगांची चर्चा आहे. त्यातल्या १९ व्या तंत्रात स्वरोत्पत्ती, रागभेद, रागांचा काल, ध्वनिभेद, ताल, श्रुती, लय, मेल, इ. संगीताच्या अंगांचा विचार केलेला आहे. देवेंद्र व शारदातनय यांनी आपल्या ग्रंथांत संगीतातले सिद्धान्त मांडणाऱ्या सदाशिव, ब्रह्मा, भरत, कश्यप, मतंग, याष्टिक, उद्भट, लोल्लट, शंकुक, अभिनवगुप्त, इ. अनेक विद्वानांची नामावली दिली आहे.

अशा प्रकारे संगीतकला हळूहळू प्रगतिपथावर आली. त्याचबरोबर तिचे शास्त्र सांगणारे अनेक ग्रंथकारही निर्माण झाले. नारदीय शिक्षा, मांडूकीय शिक्षा, इ. ग्रंथांतून रागाच्या ओडुवषाडव जाती सांगितल्या असून, रागांचे पुरुष, स्त्री व नपुंसक असे वर्गीकरणही केले आहे.

गुप्त सम्राटांचा काल हे भारताचे सुवर्णयुग समजतात. या कालात अनेक ललितकला वाढीस लागल्या. त्याचबरोबर संगीतकलेचीही अभिवृद्धी झाली. साहित्य, संगीत व कला या तीन गोष्टी सुसंस्कृतपणाचे लक्षण ठरल्या. अनेक राजांनी आपल्या राज्यात संगीताची अनेक विद्यालये निर्माण केली.



पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर (ग्वाल्हेर)

पण हा काळ त्यानंतर पालटला. गझनीच्या महंमदापासून उत्तरेवर मुसलमानांच्या एकामागून एक स्वाऱ्या होऊ लागल्या. त्यामुळे उ. भारतातले जीवन अस्थिर व विस्कळित झाले. विद्या व कला यांची पीछेहाट झाली. संगीतही त्याच्यातच आले. मात्र उत्तरेइतका दक्षिणेला मुसलमानी स्वाऱ्यांचा त्रास न झाल्यामुळे देवगिरीच्या यादवांच्या राज्यात संगीतकला बरीच प्रगत

झाली. दक्षिणेकडचे संगीत शैव–वैष्णव संप्रदायांच्या उपासनेचे एक अंग म्हणून तिकडील देवस्थानांच्या अनुषंगाने वृद्धिगत झाले. शुद्धा, भिन्ना, गौडी, वेसरा आणि साधारणी अशा गीतिगायनाच्या पाच शैली तिथे प्रचलित झाल्या. शार्ङ्गधर याने आपला संगीतरत्नाकर हा ग्रंथ याच काळात लिहिला. गोपालनायक या नावाचा महान गायक शास्त्रज्ञ देवगिरीतच होऊन गेला. अलाउद्दीन खिलजीने देवगिरीचा पाडाव केल्यानंतर त्याच्या एका सरदाराने गोपालनायकाला दिल्लीस नेले. या गोपालनायकाने पर्शियन संगीत व हिंदी संगीत यांचा मेळ घालून व काही प्रमाणात दोन्ही शैलींचा संकर करून संगीताचे एक नवेच दालन उघडले. अमीर खुस्रवने तत्कालीन प्रचलित असलेल्या भारतीय वाद्यांवरून नवीन प्रकारची व ढंगांची वाद्ये तयार केली. पर्शियन संस्कार झालेल्या या संगीताचे लोचन कवीने आपल्या रागतरंगिणीत शास्त्र बनवले.

पुढे या देशात कबीर, नानक, चैतन्यमहाप्रभू, वल्लभाचार्य, तुलसीदास अशा महान संतांचा उदय झाला. त्यांनी आपल्या भजन-कीर्तनात संगीताला मानाचे स्थान दिले. देशात भक्तिसंगीताची लाटच उसळली. त्यागराज, मुथुस्वामी, अशासारखे महान गायक आणि कवी दक्षिणेत निर्माण झाले. बहामनी साम्राज्यातील विजापूरच्या आदिलशाहाने संगीतकलेला उत्तेजन दिले.

इ.स. १५२६ नंतर मोगलकाल सुरू झाला. बाबर हा पहिला मोगल राजा होय. त्याला संगीताची आवड होती. त्याचा मुलगा हुमायून हाही संगीताचा भोक्ता होता; पण आपली सत्ता टिकवण्यासाठी त्याला सारी हयात खर्ची घालावी लागल्यामुळे त्याला संगीतकलेला उत्तेजन देणे शक्य झाले नाही. अकबर गादीवर येण्याच्या पूर्वी ग्वाल्हेरच्या मानसिंह तोमर या राजाने प्राचीन प्रबंधगायकीतून एक नवी अशी ध्रुपदगायकी शोधून काढली व पदरी असलेल्या गायकांच्या द्वारे तिचा प्रसार केला. त्यासाठी त्याने ग्वाल्हेर येथे एक संगीत विद्यापीठच उभारले.

अकबराच्या दरबारात गायक-वादकांना मानाचे स्थान होते. त्याच्या काळी हरिदासस्वामी नावाचे महान गायक होऊन गेले. तानसेन, बैजू बावरा, रामदास, गोपाल, सौरसेन हे त्यांचे शिष्यही थोर गायक म्हणून प्रसिद्धी पावले. या काळात ध्रुपदगायकी वैभवशिखरावर आरूढ झाली. तिच्यात खंडार, नोहार, डागूर व गोबरहरी अशा बाणी म्हणजे शैली निर्माण झाल्या. बीनवादनालाही महत्त्व आले. त्या काळात तानसेन हा अद्वितीय गायक म्हणून संगीताच्या जगात अपूर्व तेजाने तळपला. तानसेनाने रबाब नावाचे वाद्य शोधले. हरिदास स्वामींनी कृष्णलीलांवर अनेक ध्रुपदे रचली. गुजरातेत नरसी मेहता, राजस्थानात मीराबाई, अयोध्येत तुलसीदास, वाराणसीत सूरदास या संतांनी भक्तिसंगीताच्या द्वारे राम-कृष्णांची उपासना मधुर केली. या संत-कवींनी रचलेली काव्ये संगीतसृष्टीत मोलाची ठरली.

अकबराच्या दरबारात संगीताला आश्रय मिळतो, हे समजल्यावर दक्षिणेकडील काही संगीतशास्त्रज्ञ उपजीविकेसाठी तिकडे जाऊन स्थायिक झाले. पुंडरीक विठ्ठल हा त्यांपैकी एक मोठा दक्षिणी संगीतशास्त्रज्ञ होय. त्याने अकबराच्या दरबारात आश्रय मिळवून सद्रागचंद्रोदय, रागमाला, रागमंजिरी व नृत्यनिर्णय हे शास्त्रग्रंथ लिहिले. अकबरानंतरच्या जहांगीर आणि शहाजहान या बादशहांच्या कारकिर्दीतही संगीताला राजाश्रय मिळत राहिला. तानसेनाचा मुलगा बिलासखाँ व नातू लालखाँ हे या काळातले प्रसिद्ध गायक होत. याच काळात सोमनाथाने रागविबोध, दामोदराने संगीतदर्पण, अहोबलाने संगीतपारिजात व हृदयनारायण देव याने हृदयप्रकाश आणि हृदयकौतुक



पं. रामकृष्णबुवा वझे

हे शास्त्रग्रंथ लिहिले. अहोबलाने तारेच्या लांबीवरून स्वरस्थाने निश्चित करण्याचा शोध लावला. स्वरशास्त्रातला हा एक महत्त्वाचा टप्पा मानतात. याच काळात व्यंकटमखीने चतुर्दंडी-

प्रकाशिका हा ग्रंथ लिहून दाक्षिणात्य संगीताचे सुबद्ध शास्त्र निर्माण केले.

शहाजहानाच्या नंतर औरंगजेब गादीवर आला. तो संगीताचा कट्टा दुष्मन होता. त्याने संगीताचा राजाश्रय काढून घेतला. त्यामुळे मोगल दरबारातली संगीतकला पोरकी झाली. गायक-वादक देशोधडीला लागले. खरे तर या आघातामुळे उत्तरेतील संगीतकला नष्ट व नामशेषच व्हायची. पण पोरक्या झालेल्या गायक-वादकांना काही सरदारांनी आश्रय दिला आणि संगीत-कला तगवून ठेवली. याच काळात भावभट्टाने अनूपरत्नाकर व अनूपांकुश, तसाच श्रीनिवासाने रागतत्त्वबोध हे शास्त्रग्रंथ लिहिले. दक्षिणेत तंजाऊरचे तुळाजीराजे भोसले यांनी संगीत-सारामृतोद्धार या नावाचा शास्त्रग्रंथ लिहिला.

दक्षिणेत विजापूरचा आदिलशाहा (२रा) याने संगीताबद्दल बरीच आस्था दाखवली. त्याने किताब-इ-नवास हा रसविषयक ग्रंथ लिहिला आणि काही चिजाही बांधल्या. हैदराबादच्या निजामशाहीत संगीताची काही घराणी निर्माण झाली. पूर्व भारताच्या कित्येक राजांनीही संगीतकला जोपासली. पेशवाईच्या काळात संगीतकलेला खूप उत्तेजन मिळाले. महमदशाहा या मोगल बादशहाच्या कारकिर्दीत सदारंग-अदारंग यांनी ख्याल-गायकी प्रचारात आणली. हिंदुस्थानी संगीतात टप्पा, ठुमरी, तराना, दादरा, कजरी, इ. नवे प्रकार निर्माण झाले व खूप लोकप्रिय झाले. तबला, मृदंग, सतार, वीन, रबाब, सुरबहार, इ. वाद्यांचे महान वादकही निर्माण झाले. अशा प्रकारे संगीतकला सर्वांगी फुलून आली. ग्वाल्हेर आणि आग्रा ही शहरे संगीताची माहेरे म्हणून प्रसिद्धी पावली.

**ब्रिटिशकाल** – पेशवाईच्या काळात नानासाहेब व बाजीराव (दुसरा) यांनी संगीतकलेला मोठा आश्रय दिला. विशेषतः लावणी–संगीत या काळात बहरले. अनेक लावणीकार पेशव्यांच्या उत्तरकाळात उदयाला आले व प्रसिद्धी पावले. पुढे भारतावर ब्रिटिशांचे राज्य आले. ब्रिटिशांना इथल्या संगीतादी कलांविषयी प्रेम नव्हते. त्यामुळे गायक कलावंतांचा राजाश्रय तुटला. संगीताची प्रतिष्ठा घसरली. पण ब्रिटिशांनी या देशात काही संस्थाने निर्माण केली. त्यांपैकी बऱ्याचशा संस्थानांचे अधिपती संगीताविषयी आस्था बाळगणारे होते. त्यांपैकी रामपूर, ग्वाल्हेर, जयपूर, इंदूर, धरमपूर, जामनगर, भावनगर, बडोदे, कोल्हापूर, इचलकरंजी, मिरज, औंध, जमखिंडी, इ. संस्थानिकांनी कित्येक गायक-वादकांना आश्रय दिला. त्यामुळे संगीतकला जिवंत राहिली. यांपैकी कित्येक संस्थानांतून प्रथम श्रेणीचे गायक कलाकार निर्माण झाले. संस्थानिकाच्या पदरी एखादा तरी दरबार–गायक असायलाच पाहिजे, असा जणू अलिखित संकेतच होता. या राजाश्रित कलाकारांनी अशा ठिकाणी शिष्यही तयार केले.

पण संगीताची आराधना करणाऱ्या या गायकवर्गाला संगीत-शास्त्राची माहिती व जाणीवही नव्हती. त्यामुळे पट्टीच्या गायकांतही एकवाक्यता राहिली नाही. ‘ असे का असावे आणि असे का असू नये ’ या बाबतीतही त्यांना काही शास्त्र सांगता येत नसे. ते म्हणत, ‘ गुरूने जसे शिकवले तसे आम्ही गातो. ’

संगीतविद्या अशा आकुंचित अवस्थेत असताना किंवा तिच्या-मध्ये एक प्रकारचे अभ्यासजडत्व आले असतानाच काही ब्रिटिश अधिकाऱ्यांना या विद्येविषयी आस्था निर्माण झाली. कॅ. विलार्ड आणि वुइल्यम जोन्स हे ते अधिकारी होत. ते पाश्चात्त्य संगीताचे चांगले जाणकार होते. भारतीय संगीत काय आहे, ते पाहू या, अशा जिज्ञासेने त्यांनी संगीतपरंपरा आणि संगीताचे शास्त्र याविषयी माहिती गोळा करायला सुरुवात केली. जमवलेली माहिती व्यवस्थित मांडून त्यांनी ती पुस्तक-रूपाने प्रसिद्धही केली. त्यामुळे काही सुशिक्षित लोकांचे संगीता-कडे लक्ष वळले.

याच काळात जयपूरच्या प्रतापसिंहमहाराजांनी एक नवा



मोगुबाई कुर्डीकर

उपक्रम केला. संगीतकला आणि संगीतशास्त्र यांचा मेळ घातला या उद्देशाने त्यांनी जयपूर येथे सर्व मोठमोठ्या गायकांची [illegible]

परिषद बोलावली. या परिषदेत संगीतावर जी चर्चा झाली, तिचे इतिवृत्त संगीतसार या नावाने त्यांनी प्रसिद्धही केले. कृष्णानंद व्यास यांनी संगीतकल्पद्रुम या ग्रंथात बहुतेक सर्व प्रचलित चिजा प्रसिद्ध केल्या. कलकत्त्याचे राजा सुरेंद्रमोहन टागोर यांची कामगिरीही मोठी आहे. त्यांनी 'युनिव्हर्सल हिस्टरी ऑफ म्युझिक' व 'म्युझिक फ्रॉम व्हेरिअस ऑथर्स' अशी दोन पुस्तके इंग्रजीत लिहून आंग्लविद्याविभूषितांना भारतीय संगीताची माहिती दिली. त्यामुळे संगीतकलेला हीन मानणाऱ्या आणि गायक-वादकांना स्वतःहून कमी दर्जाचे समजणाऱ्या सुशिक्षितांचाही कल संगीताकडे वळला. ते मनातली तुच्छतावुद्धी टाकून खुल्या मनाने संगीताचा आस्वाद घेऊ लागले. या वातावरणातून कला आणि शास्त्र यांचे नियम समजून घेण्याची जिज्ञासा वाढली आणि या जिज्ञासेच्या पोटीच इ. स. १९१६ मध्ये बडोद्यात पहिली संगीत परिषद भरविली गेली. या देशात संगीताचे शिक्षण देणारी व संगीतविषयक संशोधन करणारी अशी एक मध्यवर्ती संस्था असायला हवी, असा एक महत्त्वाचा निर्णय या परिषदेत घेतला गेला. त्यानंतर दिल्ली, वाराणसी, वगैरे ठिकाणीं ज्या परिषदा भरल्या, त्यांतही शास्त्रविषयक खूप चर्चा होऊन विचारांची देवाणघेवाण झाली. त्यामुळे रागस्वरूपे निश्चित होण्यास मदत झाली.

एवढे जरी प्रयत्न होत होते, तरी अजून संगीतकला संस्थानिकांच्या राजवाड्यांत आणि श्रीमंतांच्या हवेल्यांतच अडकून पडली होती. ती लोकसमाजापासून दूर होती. तिला राजवाड्यातून बाहेर काढून लोकसमाजापर्यंत पोचवण्याचे महान ऐतिहासिक कार्य कै. विष्णू दिगंबर पलुस्कर यांनी केले.

जनतेला संगीत ऐकायला मिळाले तरच तिला त्याची गोडी लागेल; मग या गोडीतून अभ्यासक निर्माण होतील आणि त्यांच्याकडून संगीत समाजाच्या सर्व थरांत पसरेल, अशी विष्णू दिगंबरांची निश्चित धारणा होती. म्हणून त्या कामी ते बद्धपरिकर झाले. त्यांनी त्यासाठी गांधर्व महाविद्यालय ही संगीतसंस्था स्थापली. या महाविद्यालयात क्रमबद्ध अभ्यास, परीक्षा, पदव्या वगैरे आधुनिक शैक्षणिक रीतींचा अवलंब केला. आपल्या महाविद्यालयाला त्यांनी एखाद्या विश्वविद्यालयासारखे स्वरूप दिले. तिथे सर्वसाधारण जनतेच्या संगीतशिक्षणाची सोय तर केलीच, शिवाय प्रचलित व्यावहारिक शिक्षणाचाही त्या अभ्यासक्रमात समावेश केला. कित्येक होतकरू विद्यार्थ्यांना त्यांनी स्वतःकडे ठेवून गायनाचे शिक्षण दिले. अशा विद्यार्थ्यांपैकी पं. विनायकबुवा पटवर्धन, गोविंदराव पटवर्धन, कशाळकर, नारायणराव व्यास, ओंकारनाथ ठाकूर, वी. आर. देवधर हे प्रसिद्ध गायक होत. त्यामुळे विष्णू दिगंबरांचे हे शिष्य सुशिक्षित नागरिक म्हणून समाजात प्रस्थापित झाले. आपल्या शिष्यांना बरोबर घेऊन त्यांनी उत्तर भारतात अनेक जाहीर जलसे केले. त्यामुळे संगीत ही एक अभ्यसनीय वस्तू आहे, याची जाणीव होऊन अनेक सुशिक्षित लोक आपल्या मुला-मुलींना संगीत शिकवायला तयार झाले. पुढे तर शालेय व विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमातच संगीताचा अंतर्भाव झाला. या अभ्यासातून अनेक हौशी आणि व्यावसायिक कलाकार निर्माण झाले.

सुशिक्षित लोक संगीताचा अभ्यास करू लागल्यावर त्यांना शास्त्रविषयक जिज्ञासा निर्माण झाली. पण ती पुरी करून घेण्याचे साधन मात्र त्यांना दिसत नव्हते. संगीतशास्त्राचे बहुतेक ग्रंथ संस्कृतात लिहिलेले होते आणि तेही दुर्मिळ झाले होते. अशा स्थितीत एक महान साक्षेपी पुरुष संगीतविद्येला लाभला. त्याचे नाव पं. विष्णू नारायण भातखंडे हे होय. श्री. भातखंडे यांनी सर्व भारतभर प्रवास करून संगीताचे दुर्मिळ ग्रंथ पैदा केले आणि ठिकठिकाणच्या गायक-वादकांशी चर्चा करून रागनियम समजावून घेतले. या चर्चेत त्यांना अनेक मतभेदही आढळून आले. या सर्वांचा सखोल अभ्यास करून त्यांनी हिंदुस्थानी संगीतपद्धती या नावाचा एक ग्रंथ पाच खंडांत प्रकाशित केला. त्या ग्रंथावरून संगीताचा इतिहास, स्वरूप, मतभिन्नता, गायक-वादकांच्या परंपरा, जुन्या शास्त्रकारांची मते, प्रचलित कलेचे नियम, इ. गोष्टी जिज्ञासूंना समजून घेता आल्या. लक्षसंगीत नावाच्या संस्कृत ग्रंथात त्यांनी आजच्या संगीताचे शास्त्र सांगितले. याशिवाय दोन इंग्रजी ग्रंथ लिहून त्यांनी संगीतपद्धतींचा तौलनिक अभ्यास करणाऱ्यांना विचारांचे खाद्य पुरवले. त्यांनी विविध गायकांकडून हजारो चिजा मिळवल्या व त्या छापून प्रसिद्ध केल्या. लखनौ येथे मॉरिस कॉलेज ऑफ् म्युझिक त्यांच्याच प्रयत्नाने सुरू झाले. हे महाविद्यालय सांप्रत भातखंडे विद्यापीठ म्हणून ओळखले जाते. भातखंडे यांच्याप्रमाणेच क्लेमंट, देवल, तेलंग, पिंगळे, इ. लोकांनीही संगीताच्या शास्त्रावर संशोधन करून पुस्तके लिहिली. पॉपले, स्ट्रॉंगवेज, या दोन पाश्चात्त्य विद्वानांनीही हिंदी संगीताचा अभ्यास करून ग्रंथ लिहिले.

महाराष्ट्रात याच कालात अनेक संगीत नाटकमंडळ्या उदयाला आल्या. त्यांच्या नाटकांच्या द्वारे शास्त्रीय, सुबद्ध संगीत लोकांना ऐकायला मिळू लागले. सर्वश्री किर्लोस्कर, बालगंधर्व, मा. दिनानाथ, केशवराव भोसले, सवाई गंधर्व, मास्तर कृष्णराव, बाळोबा नाटेकर, बापूराव पेंढारकर, विनायकबुवा पटवर्धन, मिराशीबुवा, भाटेबुवा वगैरे संगीत नाटक मंडळ्यांतील नट हे मूळचे गायकच होते. त्यांनी नाट्यव्यवसाय स्वीकारल्यामुळे त्यांच्या गुरूंचीही या नाटकमंडळ्यांतून ऊठवस सुरू झाली. पं. भास्करबुवा बखले व पं. रामकृष्णबुवा वझे यांनी अनुक्रमे

किर्लोस्कर व ललितकला या मंडळींच्या नाटकांना आपल्या-जवळच्या अनेक रागदारी चिजांवर आधारित असे नवे नाटच-संगीत दिले. अनेक गायकांची गाणी ध्वनिमुद्रित होऊन विक्रीला उपलब्ध झाली आणि लोकांना घरबसल्या उत्तम गाणे ऐक-ण्याची सोय झाली. नारायणराव राजहंस अर्थात बालगंधर्व हे लोकांची संगीताभिरुची वाढीस लावण्यामध्ये अग्रगण्य ठरले.

इ. स. १९२५ सालाच्या सुमारास आकाशवाणी अस्तित्वात आली. तिने आपल्या कार्यक्रमांत संगीताला महत्त्वाचे स्थान दिले. त्यामुळे जुन्या-नव्या कलाकारांना आपली कला लोकांपर्यंत पोचवण्याला अवसर मिळाला. त्यामुळे त्यांना प्रसिद्धीही मिळू लागली. या कालानंतरही अनेक महान गायक कलाकार निर्माण झाले.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर मात्र सर्व ललितकलांचे वर्धन, जपणूक, इ. शासनाची कर्तव्ये म्हणून मानली जाऊ लागली आणि त्यांच्या सर्वांगीण विकासासाठी प्रत्येकासाठी ' अकादमी ' ची स्थापना झाली. संगीतासाठी स्वतंत्र अकादमी स्थापन होऊन तिच्या द्वारे गायन, वादन, नृत्य, नाटच या कलांचे जतन व संशोधन सुरू झाले. अनेक विद्वानांनी या कामी पुढाकार घेऊन त्या त्या विष-याचे साहित्य तयार केले. तरुण कलाकारांना शिष्यवृत्त्या मिळू लागल्या. या अभ्यासू कलाकारांचे शिक्षण प्रथितयश अशा कलाकारांच्या खास मार्गदर्शनाखाली झाल्याने एक प्रकारे जुन्या शिष्यपरंपरेचेच पुनरुत्थान झाले.

आकाशवाणीनेही संगीताच्या संवर्धनासाठी फार मोठा वाटा उचलला. संगीतसंमेलनेही भरू लागली. त्यांत जुन्यांबरोबरच होतकरू गायकांनाही पुढे येण्याची संधी उपलब्ध झाली. विश्व-विद्यालयांतून संगीत विषयाचा अंतर्भाव होऊन तिथेही संगीताचा अभ्यास सुरू झाला.

संगीताची विश्वविद्यालये स्थापन होण्याच्या कितीतरी पूर्वी-पासून खासगी संगीतसंस्था संगीतशिक्षणाचे काम अविरतपणे करीत आल्या होत्या. याच संस्थांतून शाळा-महाविद्यालयांना संगीत अध्यापक मिळाले. यातूनच संगीताचे जाणकारही निपजले.

संगीताची रुची वाढल्यावर त्याच्या श्रवणाची सोय होणे क्रमप्राप्तच होते. ही गरज भागवण्यासाठी अनेक ठिकाणी म्युझिक सर्कलांची स्थापना झाली. अशा सर्कलांच्या द्वारे सामान्य जनतेला संगीताचे श्रवण घडू लागले आणि गायक-वादकांना भरपूर बिदागीही मिळू लागली. पूर्वीची राजाश्रयाची जागा आता या लोकाश्रयी म्युझिक सर्कलांनी घेतली.

**संगीत, आजचे आणि उद्याचे** – स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आता संगीतकला सर्वांगाने फुलू लागली आहे. संगीताचे विविध कार्य करणाऱ्या संस्था सांप्रत उदयास आल्या आहेत. शासनाकडून त्यांना अनुदानही मिळत आहे. त्यामुळे संगीताच्या अभिवृद्धीच्या प्रयत्नांना वेग आला आहे. या संस्थांतून उदयोन्मुख कलाकारांची



बडे गुलामअलीखाँ (पतियाळा)

निपज होत असते; त्याबरोबरच संशोधनही होऊन नवीन ग्रंथ-निर्मिती होत आहे. काही विश्वविद्यालयांनी आपल्या कक्षेतील महाविद्यालयांत संगीतशिक्षणाची विशेष सोय केली आहे. संशोधन, विद्वानांची व्याख्याने, नवे प्रयोग, यामुळे संगीतावर ग्रंथ निर्माण होत आहेत.

इतर विषयांप्रमाणे संगीताचे इयत्तावार अभ्यासक्रम, परीक्षा, पदव्या आदी अस्तित्वात आल्या आहेत. त्यामुळे वेगवेगळ्या स्तरांवरील संगीत अध्यापक निर्माण झाले आहेत. खैरागड येथे केवळ संगीताचे विश्वविद्यालय स्थापन झाले आहे. मुंबई विश्व-विद्यालयात गुरुशिष्यपरंपरेचा अवलंब करून शास्त्र, आधुनिक विज्ञान, सौंदर्यशास्त्र आणि कला यांच्या शिक्षणाची सोय करून सर्वांगीण कलाकार निपजतील अशा प्रकारे शिक्षण देण्याची व्यवस्था केली आहे.

घरंदाज गायकीचा अभ्यास केलेल्या या सुशिक्षित तरुणांनी प्रत्येक घराण्याच्या गायकीचे मर्म समजावून घेतलेले असून त्यांचा समन्वय साधण्याचे प्रयत्न चालू आहेत. पूर्वी केवळ एकाच घराण्याला चिकटून राहण्याची पद्धती होती, ती आता मागे पडत चालली आहे. विशिष्ट घराण्याच्या गायकीचा अभ्यास

होणे जरूर आहे. पण त्या एकाच प्रकाराला कलाकाराने स्वतःला बांधून घेऊ नये, असा आजचा विचार-प्रवाह आहे. त्यामुळे आजच्या कलाकाराच्या गायनशैलीत इतर घराण्यांच्या काही गोष्टींचा समावेश होऊन ते गायन विशेष परिष्कृत वाटते. त्याबरोबरच या सुशिक्षित तरुण कलाकारांना एक विशेष दृष्टी आली असून, त्यांच्या आविष्काराच्या कल्पनांची कक्षा रुंदावत आहे. आपल्याला आवडेल, आपल्या गळ्याला शोभेल अशी गायकी शिकविणाऱ्या गुरूचेच ते शिष्यत्व पत्करीत आहेत.

नवरागांची निर्मिती हे आजच्या काळाचे वैशिष्ट्य आहे अप्रसिद्ध किंवा अनवट रागांचे गायन-वादन हा कलाकारांच आवडीचा विषय झाला आहे. त्याबरोबरच हिंदुस्थानी संगीतात कर्नाटक पद्धतीतील रागांचीही आवक होऊ लागली आहे. पूर्वी प्रचारात फारसे नसलेले अनवट राग आज प्रचलित होऊन बसले आहेत. मिश्र-रागांचा सहजसुंदर आविष्कार करण्यात आजचे कलाकार वाकबगार बनत आहेत.

रागांच्या गायनपद्धतीतही बदल होत चाललेला दिसून येतो. नवशैली निर्माण होत आहे. परंपरागत पद्धतीनेच रागांची अभिव्यक्ती करण्यापेक्षा नव्या दृष्टिकोणातून ती व्हावी ही कल्पना त्यामागे आहे. आजच्या तरुण पिढीवर या शैलीचा प्रभाव पडला आहे. नवीन चिजांची निर्मिती आज विपुल प्रमाणात होत आहे. अप्रसिद्ध रागांतील परंपरागत चिजा न मिळालेल्या व्यक्तींनी नव्या ढंगाच्या त्या रागातील चिजा बांधून हा गीतविभाग समृद्ध केला आहे. यांपैकी अनेक चिजा जुन्या चिजांएवढ्या तोलामोलाच्या आहेतच; पण काही त्यांहून सुंदर बनल्या आहेत.

जी गोष्ट गायनाची तीच वाद्य आणि नृत्य यांची. वादनाच्या विशिष्ट शैली बनत चालल्या आहेत. तसेच वेगवेगळ्या कलाकारांच्या वादनातील सौंदर्यस्थळे एकवटण्याचा प्रयत्न होत आहे. नृत्यातही जयपूर, लखनी यांचे वैशिष्ट्य विशेष रीतीने प्रकट होत आहे. नृत्यनाटिका तयार होत आहेत. सहगान हा प्रकार रूढ होऊ पहात आहे. वृंदवादनातही नवे नवे प्रयोग होत आहेत.

चित्रपटांमुळे संगीताला वेगळे वळण लागून संगीत जनताभिमुख झाले आहे. वृंदवादन आणि पार्श्वसंगीत या दोन नव्या देणग्या चित्रपटाने संगीताला दिल्या आहेत. पार्श्वगायक म्हणून लता मंगेशकर यांनी जागतिक कीर्ती मिळवली आहे. इतरही अनेक पार्श्वगायक लोकप्रिय ठरले आहेत. या पार्श्वगायनाला स्वरसाज देणारे कितीतरी प्रतिभावंत स्वरसंयोजक सांप्रत या क्षेत्रात काम करीत आहेत. चित्रपटसंगीतात केवळ रागदारीला नेत्रदीपक महत्त्व नाही. रागदारी जरी या संगीताचा पाया असला तरी त्यातील संगीत हलके, फुलके मिश्र असे असते आणि ते जनमनाची पकड घेते. जुनी रागदारी आणि प्रादेशिक लोकसंगीत यांच्या मिलाफातून ते तयार झाले आहे. सांप्रत त्यात पाश्चात्य संगीतही मिसळू लागले आहे. काही काही चित्रपट केवळ संगीतामुळे गाजले आहेत केवळ अभिजात संगीताचा वापरही काही चित्रपटात योग्य प्रसंग पाहून केला जात आहे.

आजची पिढी संगीताचा सखोल अभ्यास करीत आहे; त्यावर नव्या दृष्टिकोणातून ग्रंथनिर्मिती करीत आहे. हिंदुस्थानी संगीतात स्वरमेळाची जरुरी नाही. ते संगीत केवळ व्यक्तिगत आहे. पण वृंदगान आता प्रचारात येत असल्याने स्वरमेळाची आवक होणे शक्य आहे. तसे प्रयोग केले जात आहेत. यापुढे संगीताची कक्षा विशेष रुंदावेल. आणि त्यामुळे संगीताचे विशेष स्तर निर्माण होतील.

**संगीतातील घराणी** – हिंदुस्थानी संगीताच्या क्षेत्रात काही घराणी निर्माण झाली आहेत. घराणे म्हणजे काय याचे विवरणात्मक लक्षण डॉ. ना. र. मारुलकर यांनी सांगितले आहे, ते असे –

‘नादब्रह्माच्या अखंड उपासनेत निमग्न राहून स्वतःचे जीवन धन्य करावे आणि इतरांनाही पावन करावे ही सर्व संगीतसाधकांची मूळ मनीषा ! या साधकांमध्ये बुद्धी किंवा भावना यांपैकी जे पारडे ज्यांचे अधिक झुकले, त्या मार्गाला ते साधक लागले. कोणी स्वराच्या मार्गाने भावनेला आवाहन करू लागले. कोणी लय-तालाच्या हिशेबाने बुद्धीला आव्हान देऊ लागले. कोणी कोणी या दोहोंचा कलात्मक मधुर असा समन्वय घातला. त्यामुळे हे निरनिराळे पंथ निर्माण झाले. या निरनिराळ्या पंथांमुळे मूळ एकाच प्रकारच्या आराखड्यावर निरनिरनिराळे साजशृंगार चढू लागले. साजशृंगार चढविण्याच्या कल्पनेत काही नियम तयार झाले. काही बंधने आली. कोणता साज कोठे वापरावा, कोठे वापरू नये, अशा प्रकारचे काही कलात्मक संकेत निश्चित ठरले गेले. अशा निश्चित संकेतांना कलेच्या साम्राज्यात मोठ्या अधिकाराचे आणि मानाचे स्थान अर्पण करण्यात आले. हे सर्व कलेच्या सर्वांगीण समृद्धीच्या दृष्टीने फारच हितावह असेच ठरले. याच सर्व कलात्मक प्रक्रियेला संगीतातील घराणे असे म्हणतात.’

**किराणा घराणे** – उ. भारतातील या नावाच्या गावावरून हे नाव पडले आहे. सुप्रसिद्ध बीनकार बंदेअल्लीखाँ यांना या घराण्याचे प्रवर्तक मानतात. अब्दुल करीमखाँ हे बंदेअल्लीखाँचे शिष्य होते, असे म्हणतात. किराणा घराण्याची प्रतिष्ठा वाढवून ते लोकप्रिय करण्याच्या दृष्टीने अब्दुल करीमखाँ यांची कामगिरी फार मोठी आहे.

किराणा घराण्याची गायकी मुख्यत्वे तंत अंगाची म्हणजे बीन अंगाची आहे. या घराण्यात स्वराला अनन्यसाधारण महत्त्व आहे. त्या मानाने अन्य गोष्टींना महत्त्व कमी. किराणा गायकांत विशेषत: ख्यालाचा संपूर्ण अस्ताई–अंतरा गाणारे गायक फार कमी आहेत. चिजेच्या नुसत्या मुखडचावरच हे अनेकदा आपले काम भागवतात. यांच्यामध्ये ख्यालाची लय विलंबित असते. चिजा बहुधा त्रितालात असतात. अनवट राग हे सहसा गात नाहीत. चार-दोन स्वरांच्या मर्यादेतसुद्धा असंख्य स्वरगुच्छ सादर करतात. बहुधा पूर्वांगप्रधान राग गातात. या गायकांची विलंपत रसिकाना धुंद, मुग्ध करणारी असते. रागविस्तारात संथपणा आणि संयम विशेषत्वाने दाखवतात. कारुण्य आणि मादकता हे त्यांच्या गायकीचे गुणविशेष होत. किराणा घराण्याच्या स्वरसंपन्नतेमुळे श्रोत्यांनाही संगीताविषयी प्रेम आणि आस्था उत्पन्न झाली. आजच्या लोकप्रिय गायकांत या घराण्याचे कलावंत प्रमुख आहेत. सवाई गंधर्व, पं. भीमसेन जोशी, सौ. हिराबाई बडोदेकर, सौ. माणिक वर्मा, कपिलेश्वरीबुवा, बेहरेबुवा, रोशन आरा बेगम, सौ. गंगूबाई हनगल, फिरोज दस्तुर, इ. प्रसिद्ध कलाकार याच घराण्याचे होत.



केसरबाई केरकर

ग्वाल्हेर घराणे – ग्वाल्हेरनरेशांच्या पदरी बडे महमदखाँ व कादरवक्षखाँ हे दोन विद्वान गायक होते. कादरवक्ष यांना हद्दूखाँ व हस्सूखाँ हे दोन मुलगे होते. दोघेही मेहनती आणि असामान्य बुद्धीचे होते. त्यामुळे तेही मोठे गायक बनले. या दोघांनी मुक्तकंठाने विद्यादान करून बरेच शिष्य तयार केले. हद्दूखाँच्या दोन मुलांत रहिमतखाँसाहेब हे प्रभावीपणे पुढे आले. हेच ग्वाल्हेर घराणे होय.

ग्वाल्हेर घराण्यात कित्येक शाखोपशाखा निर्माण झाल्या आहेत. त्यांपैकी हद्दू–हस्सू खाँच्या चुलत घराण्यापासून आणखी एका शाखेचा विस्तार झाला. निसार हुसेनखाँ हे त्या शाखेचे गुरू होत. ग्वाल्हेरचे शंकर पंडित, एकनाथ पंडित, कृष्णा पंडित, या पंडित मंडळींना निसार हुसेनखाँनी तालीम दिली. निसार हुसेनखाँचे आणखी एक प्रसिद्ध शिष्य पं. रामकृष्णवुवा वझे हे होत. त्यांनी अपार कष्ट करून गुरूकडून विद्या मिळवली. तेवढ्याच पुंजीवर गुजराण न करता त्यांनी अनेक गायकांकडून जे आणि जेवढे मिळाले तेवढे मिळवून स्वत:ची विद्या पैलूदार बनवली. सर्वश्री केशवराव भोसले, बापूराव पेंढारकर, मा. दिनानाथ हे गायक नट वझेबुवांच्या शिष्यपरंपरेतले होत.

मूळ ग्वाल्हेर घराण्याचा कीर्तिस्तंभ ज्यांनी उभा केला, ते म्हणजे पं. बाळकृष्णवुवा इचलकरंजीकर हे होत. हस्सूखाँचे शिष्य वासुदेवबुवा जोशी यांच्याकडून त्यांनी परिश्रमपूर्वक विद्या मिळवली आणि ती त्यांनी आपल्या शिष्यांना औदार्याने दिली.

पं. विष्णू दिगंबर पलुस्कर हे पं. बाळकृष्णबुवांचेच शिष्य होत. त्यांनी संगीतविद्येचा भारतभर विस्तार केला. पं. मिराशीबुवा हे त्यांचे दुसरे पट्टशिष्य होत. याशिवाय, अनंत मनोहर जोशी, गुंडुबुवा इंगळे, चाफेकर हे शिष्यही त्यांनी तयार केले. विष्णू दिगंबरांनी गांधर्व महाविद्यालय स्थापून अनेक शिष्य तयार केले. त्यांत ओंकारनाथ ठाकूर, पाध्ये, पटवर्धन, व्यास बंधू, खरे, देवधर, ठकार हे विशेष प्रसिद्धी पावले. विष्णू दिगंबरांचा एकुलता एक पुत्र दत्तात्रय हाही फार तयार गायक होऊन गेला. दुर्दैवाने तो वयाच्या ३५ व्या वर्षी कालवश झाला. त्यांच्या शिष्यांनी वसंतराव राजोपाध्ये, वि. रा. आठवले, विनयचंद्र, नारायण पटवर्धन, दामू दातार, इ. शिष्य तयार केले. जुन्या कलाकारांतील विद्वत्ता, कलात्मकता आणि तयारी या गुणांनी पं. मल्लिकार्जुन मन्सूर हे सांप्रत या घराण्याचे कीर्तिध्वज ठरले आहेत. प्रा. बी. आर. देवधर हे विष्णू दिगंबरांचे एक साक्षेपी शिष्य होत. त्यांनी 'संगीत कलाविहार' या मासिकाच्या द्वारे कित्येक वर्षे संगीत शास्त्राची सेवा केली आहे. कुमार गंधर्व हे त्यांचेच शिष्य होत. त्यांच्याविषयी डॉ. मारुलकर लिहितात –

कुमार गंधर्व हे एक संगीतांतील आश्चर्य आहे असे श्री. गोविंदराव टेंबे लिहितात. कुमार गंधर्व हे एक चालू पिढीचे

देदीप्यमान भूषण आहे. इतका तेजस्वी, प्रतिभासंपन्न, कल्पक आणि मैफल अनेक अंगांनी धुंद करून सोडणारा चतुरस्र कलावंत आपल्या चालू पिढीत तरी नाही. त्यांची गानशैली बहुविध अंगांनी समृद्ध असून, तिच्यातील रसिकतेने उच्चांक गाठलेला आहे. कुमार गंधर्वांच्या या अतुल सामर्थ्यसंपदेने त्यांचा भक्तवर्ग मोठ्या संख्येने निर्माण होऊ लागला असून, दिवसेंदिवस तो एकसारखा वाढत आहे. या सर्वांतून 'कुमार गंधर्वांचे घराणे' निर्माण होऊ लागलेले आहे.

ग्वाल्हेर घराण्याचे गायक विशेषेकरून प्रचारातील राग गातात. त्यांच्या चिजा प्रामुख्याने सदारंग–अदारंग यांच्या असतात. गाण्याला सुरवात करताच प्रथमतः अस्ताई दोन वेळा व अंतरा एक वेळ म्हणतात. रेखीव आणि पिळदार अस्ताई–अंतरा हे या घराण्याचे प्रभावी अस्त्र आहे. एकेका स्वराची कामगत पूर्ण करीत गायकीची बढत करतात. वाढलेल्या लयीत राग संपवितात. या घराण्याची गायकी लयीशी एकजीव झालेली असते.

आग्रा घराणे – गग्गे खुदाबक्षखाँ हे या घराण्याचे प्रवर्तक होत. त्यांच्या परंपरेत नथ्थनखाँ हे एक श्रेष्ठ दर्जाचे गायक होऊन गेले. मैफल गाजविणारा धुरंधर गायक असा त्यांचा लौकिक होता. हे म्हैसूर दरबारचे गायक होते. विलायत हुसेनखाँ हे त्यांचे पुत्र व पं. भास्करबुवा हे त्यांचे शिष्य होत. उस्ताद फैयाजखाँ हे नथ्थनखाँच्या चुलत घराण्यातले गायक होते. हे जसे आग्रेवाले गायक समजले जातात, तसेच रंगीले घराण्याचेही अधिकृत गायक समजले जातात. आग्रा घराण्यातील बहुतेक गायकांचे स्वर ढाले (कमी उंचीचे) असतात. ढाला स्वर ही त्यांच्या गायकीची पहिली निशाणी समजावी. त्यांच्यांत खर्जाची साधना विशेष मेहनतीने होते. गायला सुरवात केल्यानंतर ते प्रथम नोम्‌थोम्‌ करतात. आग्रेवाल्यांची नोम्‌थोम्‌ हा कलात्मक रसवत्तेचा एक श्रेष्ठ प्रकार समजावा लागेल. नोम्‌थोम्‌ नंतर बहुधा धमार गातात. परज, हिंडोल, अडाणा, देशी, रामकली, बिलावल, मेघ, इ. रागांतले त्यांचे धमार अत्यंत कलात्मक असतात. डॉ. मारुलकर लिहितात –

आग्रेवाल्यांची ख्यालगायकी अत्यंत शुद्ध स्वरूपाची असून, तिच्यांत श्रेष्ठ कलामूल्यांचे आणि कला-कौशल्याचे वैपुल्य आहे. रागशुद्धतेच्या दृष्टीने आग्रा घराण्याला पहिला क्रमांकच द्यावा लागेल. त्यांचे अस्ताई-अंतरे रागदृष्ट्या जसे शुद्ध तसेच तालअंगानेही अतिशय चुस्त असेच दिसतील. त्यांतील रेखीवपणा हा एक महान आदर्शच समजावा लागेल. त्यांच्या गायकीत लयकारी उत्तम प्रतीची आहे. तिच्यात कृत्रिमता कोठेही दिसणार नाही. यांची लयकारी अल्लादियाखाँच्या गायकीप्रमाणे आडवळणाने चाललेली दिसणार नाही. किंवा ती कशी तरी रखडत रेंगाळत चालून आपला प्रवास पुरा करीत असल्याचेही दिसणार नाही. स्वर आणि ताल (लय) एकमेकांच्या हातात हात घालून आपल्या गायकीचा खेळ रंगदार रीतीने करीत असल्याचे आढळेल. या गायकीतील काही प्रकार दिढीच्या वजनाने होत असल्याचे दिसतील. परंतु बरेच प्रकार बरोबरीच्या लयीचेच होतात.

मा. कृष्णराव फुलंब्रीकर, आताहुसेनखाँ, शराफत हुसेनखाँ, पं. रातंजनकर, विलायत हुसेनखाँ, पं. रत्नाकर रामनाथकर, पं. जगन्नाथबुवा पुरोहित, त्यांचे शिष्य जितेंद्र अभिषेकी, पं. राम मराठे ही गायक मंडळी आग्रा घराण्याचीच परंपरा संभाळतात.

गोखले घराणे – मिरजेचे गोखले घराणे ज्या गायकीतून निर्माण झाले, तिचे मूळ घराणे लखनौचे मियां घराणे होय. परंपरेनुसार पं. महादेवबुवा गोखले हे तानसेनापासून आठव्या पिढीत येतात. मियां हे दोघे बंधू होते. जैनुल अबदिनखाँ व मुझफरखाँ अशी त्यांची नावे होती. दोघेही निजामाचे दरबारगायक होते. महादेवबुवा या दोघांपैकी अबदिनखाँचे पट्टशिष्य होत. महादेवबुवांना चार पुत्र होते. त्यांपैकी पहिले व शेवटचे हे विद्वान गायक होते. गोखले घराणे हे विद्येने समृद्ध घराणे मानतात. या घराण्याची बरीच रागस्वरूपे प्रचलित स्वरूपाहून भिन्न आहेत. हे गायक लय आणि ताल यांचे खंदे होते. ध्रुपद व ख्याल याशिवाय ते दुसरे काही गात नसत. या गायकांनी विद्यादान फारसे केले नाही.



पं. सदाशिवबुवा गोखले

जयपूर घराणे – अप्रसिद्ध राग आणि तेढी-बांकी गायकी गाणारे म्हणून या घराण्याचा मोठा लौकिक आहे. कोल्हापूरचे गानसम्राट अल्लादियाखाँ यांच्यामुळे हे घराणे विशेष प्रसिद्धीस आले. त्यांचे शिष्यत्व पत्करून पं. भास्करबुवा बखले यांनी आपल्या गानविद्येची सांगता करून घेतली. आवाजाचा खास 'आ'कारयुक्त लगाव हे या घराण्याचे पहिले आणि मोठ्या

कटाक्षाचे तंत्र आहे. या घराण्यातील कलात्मकता अत्यंत श्रेष्ठ दर्जाची असली तरी तितकीच गुंतागुंतीची आहे.

जयपूर घराण्यात हैदरखाँ, मंजीखाँ, भूर्जीखाँ, नथ्थनखाँ, नासिरुद्दिखाँ, सूरश्री केसरबाई केरकर, श्रीमती मोगुबाई कुर्डीकर, श्रीमती लक्ष्मीबाई जाधव व गोविंदबुवा शाळिग्राम या गायक-गायिकांचे श्रेष्ठ स्थान आहे. सौ. किशोरी आमोणकर या मोगुबाईंच्या सुविद्य कन्या होत. तपश्चर्या, कल्पकता, रसिकता आणि पक्की तालीम या भक्कम चौखांबांवर किशोरीबाईंनी स्वतःच्या गायकीची इमारत उभी केली आहे. पाहा—राग, ताल, लय, वाद्ये. [श्री. वसंतराव राजोपाध्ये, मुंबई; गायनी कळा – श्री. ह. वि. दात्ये, १९६८; संगीत शास्त्र – श्री. के. वासुदेव शास्त्री, १९५८; घरंदाज गायकी – श्री. वा. ह. देशपांडे, १९६१; संगीतांतील घराणी – डॉ. ना. र. मारुलकर, १९६२ ]

**संग्रहालये** नानाविध वस्तूंचा संग्रह जिथे व्यवस्थितपणे ठेवलेला असतो, अशा स्थानाला संग्रहालय किंवा वस्तुसंग्रहालय म्हणतात. संग्रहालय हा शब्द म्यूझियम या इंग्लिश शब्दाचा मराठी प्रतिशब्द आहे. असा संग्रह करण्याची कल्पना फार प्राचीन काळी ग्रीस देशात उदय पावली. सनपूर्व २८० या वर्षी पहिल्या टॉलेमीने इजिप्तमधील अलेक्झांड्रिया नामक शहरात पहिले वस्तुसंग्रहालय स्थापले. त्यात ग्रीक पंडितांचे व शूर पुरुषांचे पुतळे, ज्योतिःशास्त्राची साधने, शल्यक्रियेत उपयुक्त ठरणारी उपकरणे, विविध प्रकारचे ग्रंथ व निसर्गातील चमत्कारिक वस्तू यांचा संग्रह करण्यात आला होता. हे संग्रहालय पाचसातशे वर्षे मोठ्या वैभवात नांदत होते.

पुढे युरोपात अशी अनेक खाजगी संग्रहालये निर्माण झाली. राजे, सरदार व श्रीमंत लोक आपापल्या आवडीप्रमाणे भिन्न भिन्न वस्तू जमवून आपल्या घरीच त्यांचे प्रदर्शन करीत. इ. स. १६८३ साली ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीच्या स्कूल ऑफ नॅचरल हिस्टरीचा एक विभाग म्हणून अॅश्मोलियन म्यूझियम स्थापन करण्यात आले. तेच जगातले, पद्धतशीरपणे स्थापलेले पहिले संग्रहालय होय. सुप्रसिद्ध ब्रिटिश म्यूझियमची स्थापना इ. स. १७५९ साली झाली. फ्रान्समध्ये राज्यक्रांतीनंतर इ. स. १७९३ मध्ये राजाच्या खाजगी संग्रहाचे सार्वजनिक संग्रहालयात रूपांतर करण्यात आले. त्यानंतर ही प्रथा भारतात सुरू झाली.

प्राचीन काळी भारतात अनेक विद्यापीठे होती आणि त्या विद्यापीठांत मोठी ग्रंथालयेही होती. पण आधुनिक पद्धतीची वस्तुसंग्रहालये मात्र नसावी, असे वाटते. कारण प्राचीन वाङ्मयात त्यांचे उल्लेख सापडत नाहीत. तथापि प्राचीन काळी मंदिरे, राजप्रासाद, उद्याने, इ. ठिकाणी विविध प्रकारच्या शिल्पकृती, चित्रे, वस्त्रप्रावरणे, रत्नालंकार; लाकडी, हस्तिदंती व धातूंच्या कलाकृती; वाद्ये, दिवे, नृत्यसाधने, इ. वस्तूंचा संग्रह केलेला असे. ही परंपरा मध्ययुगातही सरदार, श्रीमंत लोक व राजेरजवाडे यांनी चालू ठेवली होती. त्यांच्या वाड्यांतील वस्तुसंग्रहदेखील बरेच मोठे व बहुमोल असत. त्यांचे प्रदर्शन करून स्वतःची प्रतिष्ठा वाढवणे हा त्यांचा उद्देश असला, तरी लोकांचे मनोरंजन व शिक्षण या दृष्टीने त्यांना महत्त्व होते आणि ती एक प्रकारची सांस्कृतिक केंद्रेच होती, असे प्रा. हुमायून कबीर मानतात.

कालांतराने अशी वस्तुसंग्रहालये ही मनोरंजनाची व ज्ञानसंपादनाची साधने आणि सांस्कृतिक केंद्रे मानली जाऊ लागली. त्यामुळे सार्वजनिक संग्रहालये स्थापण्याची कल्पना उगम पावली.

इ. स. १७८४ मध्ये कलकत्ता येथे एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगॉल या संस्थेची स्थापना झाली आणि या संस्थेने इ. स. १८१४ साली भूस्तरशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, मानवशास्त्र व पुरातत्त्वशास्त्र यांच्याशी संबंधित अशा वस्तूंचा संग्रह करून भारतीय संग्रहालयाची स्थापना केली.

भारतातले हे पहिले संग्रहालय डॉ. वालिस नामक डॅनिश शास्त्रज्ञाच्या प्रेरणेमुळे स्थापन झाले. त्यानंतर इ.स.१८५१च्या सुमारास मद्रासमध्ये दुसरे संग्रहालय निर्माण करण्यात आले आणि त्याच वर्षी मुंबईचे व्हिक्टोरिया व अल्वर्ट संग्रहालय स्थापण्यात आले. इ. स. १८८७ मध्ये व्हिक्टोरिया राणीच्या कारकिर्दीचा अर्धशतसांवत्सरिक उत्सव झाला. त्या निमित्ताने ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागांप्रमाणेच भारतातही अनेक नवीन संग्रहालये सुरू करण्यात आली. त्यानंतर लॉर्ड कर्झन याच्या अमदानीत अशा संग्रहालयांच्या विकासाला फार मोठी चालना मिळाली. पुराणवस्तुसंशोधन खात्याचे सरसंचालक सर जॉन मार्शल यांच्या प्रोत्साहनामुळे कित्येक ठिकाणी उत्खनन सुरू झाले आणि तिथे भूगर्भात सापडलेल्या पुराणवस्तूंची प्रदर्शने त्या त्या ठिकाणीच मांडण्यात आली. त्यांपैकी सारनाथ येथील संग्रहालय इ. स. १९०४मध्ये व नालंदा येथील संग्रहालय इ. स. १९१७ मध्ये अस्तित्वात आले. त्यानंतर ८–१० वर्षांत मोहेंजोदडो, हडप्पा व तक्षशिला येथेही तशीच संग्रहालये स्थापण्यात आली.

काही शहरांच्या नगरपालिकांनी या बाबतीत विशेष आस्था दाखविल्यामुळे कित्येक संग्रहालये निर्माण झाली आहेत. त्यांतली काही संग्रहालये त्यांतील उत्कृष्ट वस्तुसंग्रहांमुळे फार नावारूपाला आली. मुंबईचे प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियम हे अशा संग्रहालयांपैकी एक होय. मुंबई महानगरपालिकेने व्हिक्टोरिया अँड अल्बर्ट म्यूझियम नावाचे महत्त्वाचे संग्रहालयही चालवले आहे. अलाहाबाद नगरपालिकेच्या अलाहाबाद संग्रहालया

उत्तमोत्तम वस्तूंचा संग्रह केलेला आहे. पुण्याचे लॉर्ड रे इंडस्ट्रियल म्यूझियम (सध्याचे म. फुले वस्तुसंग्रहालय) इ. स. १९२९मध्ये नगरपालिकेकडे देण्यात आले. कलकत्ता, बडोदे व अहमदाबाद येथील नगरपालिकांचीही अशीच चांगली संग्रहालये आहेत.

काही संस्थांनी स्वतःच्या छंदानुसार किंवा आवश्यकतेप्रमाणे वस्तू जमवून लहान लहान संग्रहालये निर्माण केली व त्यांचा हळू हळू विकास होऊन ती मोठी संग्रहालये बनली. पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाचे संग्रहालय अशा प्रकारचे आहे. गौहाटी येथील कामरूप अनुसंधान समितीच्या संग्रहालयाचे पुढे प्रांतिक संग्रहालयात रूपांतर झाले. वंगीय साहित्य परिषदेचे संग्रहालयही असेच आहे.

दिघापाटियाचे शरत्कुमार राय यांनी खूप परिश्रम करून एक संग्रहालय बनवले होते. ते आता वरेंद्र संशोधन मंडळाने चालवले आहे. इ. स. १९१९ साली वाराणसी येथे राय कृष्णदास यांच्या प्रयत्नामुळे भारत कलाभुवन नामक कलाकुसरीच्या वस्तूंचे एक सुंदर संग्रहालय स्थापन झाले. अशी अनेक वस्तुसंग्रहालये काही व्यक्तींच्या उत्साहामुळे व परिश्रमांमुळे निर्माण झाली आहेत. अशी संग्रहालये संग्रह करणाऱ्या व्यक्तीच्या आवडीप्रमाणे विशिष्ट प्रकारच्या वस्तूंची असू शकतात. उदा० डॉ. भाऊ दाजी लाड यांना वनस्पतींचे संशोधन करण्याचा छंद होता. अनेक दुर्मिळ वनस्पती शोधून आणून त्यांनी आपल्या बागेत लावल्या होत्या. मुंबईला राणीचा बाग स्थापन झाला, तेव्हा त्या वनस्पती तिथे नेऊन लावण्यात आल्या. भूतकाळाचा अभिमान, चित्र-शिल्पादी कलांची आवड, शास्त्रीय ज्ञानाविषयी उत्कंठा, अशा प्रेरणांमुळे भिन्न भिन्न प्रकारची संग्रहालये निर्माण झाली आहेत. हैदराबादचे सालारजंग संग्रहालय, पाटण्याचे श्री. राधाकृष्ण जालान यांचे संग्रहालय, पुण्याचे राजा केळकर संग्रहालय ही व्यक्तींनी सुरू केलेली संग्रहालये आता सार्वजनिक झाली आहेत.

विद्यापीठे व महाविद्यालये यांनीही आपापली स्वतंत्र संग्रहालये स्थापन केली आहेत. कलकत्त्याचे आशुतोष मुकर्जी संग्रहालय हे कलकत्ता विद्यापीठाने स्थापन केले आणि त्यातून स्फूर्ती घेऊन इतर अनेक विद्यापीठांनीही तशी संग्रहालये सुरू केली.

गौहाटी विद्यापीठाशी संलग्न असे एक वाणिज्य संग्रहालय आहे. डेहराडून येथील वन-महाविद्यालयाशी संलग्न असा एक संग्रहालयसमूह असून, त्यात वनसंवर्धन, इमारती लाकूड, सामान्य वनोत्पादन व कीटक असे विभाग आहेत. कोइंबतूर येथे एक वन-संग्रहालय व एक कृषि-संग्रहालय अशी दोन संग्रहालये आहेत. अशाच प्रकारची स्थापत्य, वैद्यक, सृष्टिविज्ञान, पदार्थ-विज्ञान, इ. शास्त्रांशी संबंधित संग्रहालये व औद्योगिक संग्रहालये निरनिराळ्या ठिकाणी अस्तित्वात आहेत.

दक्षिण भारतातील काही मंदिरांतही वस्तुसंग्रहालये स्थापण्यात आली आहेत. त्यांत तंजाऊर येथील बृहदीश्वर-मंदिरातील राजराजा संग्रहालय विशेष उल्लेखनीय आहे. त्याचप्रमाणे श्रीरंगम व मदुरा येथील मंदिरांतही चांगली संग्रहालये आहेत. श्रीरंगम्च्या संग्रहालयात शिला व धातू यांपासून बनवलेल्या शिल्पकृतींचा प्रेक्षणीय संग्रह असून, मदुरेच्या संग्रहालयात हस्तिदंती वस्तूंचा सुंदर संग्रह आहे.

संग्रहालयांच्या अगदी प्राथमिक अवस्थेत बहुधा भूस्तरशास्त्र किंवा जीवशास्त्र यांच्याशी संबंधित वस्तूंचा संग्रह करण्यात येई. पण पुराणवस्तुसंशोधन सुरू झाल्यानंतर अशा संग्रहालयांतून पुराणवस्तु-विभाग सुरू करण्यात आले. जनरल कनिंगहॅम, सर जॉन मार्शल व लॉर्ड कर्झन यांच्यामुळे वेगळी पुराणवस्तुसंग्रहालये अस्तित्वात आली व त्यांचा खूप विकास झाला. सर मॉर्टिमर व्हीलर यांच्या प्रयत्नामुळे इ. स. १९४९ मध्ये दिल्ली येथे भारतीय राष्ट्रीय संग्रहालयाची स्थापना झाली.

संग्रहालयांचे कार्य तीन प्रकारचे असते – वस्तूंचा संग्रह करणे, त्यांचे संरक्षण करणे व संदर्शन करणे. या प्रत्येक शाखेचे वेगळे शास्त्र बनलेले आहे. जुन्या व दुर्मिळ वस्तू खऱ्या आहेत की नकली आहेत, हे ओळखणे कठीण असते. अनुभवी जाणकारच ते ओळखू शकतात. वस्तू जितकी जुनी व अस्सल, तितके तिचे मोल जास्त असते.

लाकूड, कागद, वस्त्र यांवर हवेतील द्रव्यांचा परिणाम होतो. कीटकांपासूनही त्यांना भय असते. लोखंडी वस्तू गंजतात. इतर धातूंच्या वस्तूही काळ्या पडतात. अशा वस्तू चांगल्या स्थितीत राहाव्या म्हणून रसायने व द्रावणे वापरावी लागतात. इतर प्रकारेही त्यांची काळजी घ्यावी लागते.

अशा प्रकारे सुरक्षित ठेवलेल्या वस्तू लोकांनी पाहाव्या म्हणून त्यांना आकर्षित करणे आवश्यक असते. ती एक कला आहे व शास्त्रही आहे. भरपूर प्रकाश व हवा येईल अशा पद्धतीने संग्रहालयाची इमारत व दालने बांधून, त्यांत वस्तूंची व्यवस्थित मांडणी करावी लागते. त्या वस्तूंची पूर्ण माहितीही लगेच मिळेल, अशी व्यवस्था करावी लागते. पशू, पक्षी, मासे ठेवलेले असतील तर त्यांच्यासाठी नैसर्गिक निवासस्थाने बनवावी लागतात.

भारतात पुराणवस्तुविषयक संग्रहालयांची संख्या वेगाने वाढली; पण कलाप्रदर्शन विभागांची वाढ मात्र तितक्या वेगाने झाली नाही. बहुतेक प्रमुख संग्रहालयांत कलाविभाग असले तरी, त्या सर्व संग्रहालयांत कलेच्या विकासाचे समग्र दर्शन होत नाही. मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियममधील कलाविभाग समृद्ध आहे. बडोदे येथील संग्रहालयातील कलाविभाग अत्युत्कृष्ट गणला जातो. त्रिवेंद्रम येथील संग्रहालयातही एक समृद्ध

कलाविभाग आहे. म्हैसूर, ग्वाल्हेर, हैदराबाद, मद्रास व दिल्ली या शहरांतील संग्रहालयांतही चांगले कलाविभाग आहेत.

**भारतीय संग्रहालय, कलकत्ता** – हे इ. स. १८१४ मध्ये स्थापन झालेले संग्रहालय खूप वेगाने वाढले. इ. स. १८७५ मध्ये त्यासाठी नवी भव्य इमारत बांधण्यात आली. सांप्रत या संग्रहालयात सहा विभाग आहेत –

(१) मानवशास्त्रविभाग – यात निरनिराळ्या जाती–जमातींच्या जीवनात उपयोगी पडणाऱ्या असंख्य वस्तूंचा संग्रह आहे. त्यावरून भारतीय संस्कृतीची विविधता दिसून येते.

(२) पुराणवस्तुविभाग – यात जुन्या वस्तूंचा फार मोठा संग्रह आहे. शिल्पकृतींचा संग्रह संपन्न आहे. सनपूर्व ४ थ्या शतकापासून मध्ययुगापर्यंतच्या शिल्पकृती त्यात पाहायला मिळतात. शिरोभागी वृषभ व सिंह असलेले, अशोककालीन स्तंभ, श्रीलक्ष्मी व यक्ष यांच्या मूर्ती, भरहूत येथील स्तूपाचे कठडे व प्रवेशद्वार, बोधगयेच्या तटाचे काही भाग, पाटणा येथील चंद्रगुप्त मौर्यकालीन राजप्रासादाचे लाकडी कठडे, इ. वस्तू या दालनात दिसतात. त्याचप्रमाणे गांधार शैलीच्या, बुद्ध व बोधिसत्त्व यांच्या उत्कृष्ट प्रतिमा, जातकांतील प्रसंगांची शिल्पचित्रे, मथुरा येथील कुशाण शिल्पकलेचे दर्शन घडविणाऱ्या कलाकृती; सारनाथ, मथुरा, भूमरा येथील गुप्तकालीन शिल्पकृती आणि भारताच्या निरनिराळ्या भागांतील मध्ययुगीन कलाकृती यांचा त्यात समावेश होतो. जावा व कंबोडिया या देशांतील शिल्पकलेच्या भिन्न शैलींचे उत्तम नमुनेही तिथे आहेत.

मुसलमानकालीन संग्रहात उत्तर भारतातील, विशेषतः बंगालमधील शिल्पे व वास्तू यांचे नमुने, अनेक कोरीव लेख, हस्तलिखिते व फर्माने आहेत. फर्माने व सनदा यांवर राजमुद्रा आहेत.

मोहेंजोदडो, हडप्पा, छन्हुदडो, तक्षशिला, कौशांबी, भिरा, नालंदा, इ. ठिकाणी उत्खननांत सापडलेल्या प्राचीन वस्तू एका जागी आहेत. इ. स. च्या २ ऱ्या ते १२ व्या शतकातील शिलालेख व ताम्रपटही आहेत.

भारतीय नाण्यांचा फार मोठा प्रातिनिधिक संग्रह इथे आहे. त्याचप्रमाणे काही रत्ने, रत्नजडित चषक व अंगठी अशा वस्तू या संग्रहालयात आहेत.

(३) औद्योगिक विभाग – यात शेती, वन, वैद्यक व कुटिरोद्योग यांच्याशी संबंधित अशा वस्तू ठेवलेल्या आहेत.

(४) प्राणिशास्त्रविभाग – निरनिराळ्या प्रकारच्या पशुपक्ष्यांचे व कीटकांचे नमुने यात आहेत.

(५) भूगर्भशास्त्रविभाग – अश्मीभूत प्राणी व निरनिराळी खनिजे यांचा संग्रह.

(६) कलाविभाग – निरनिराळ्या धातूंपासून बनवलेल्या कलात्मक वस्तूंचा संग्रह.

या विभागांशिवाय चित्रपटगृह, ग्रंथालये, संशोधनाची सोय, मुलांचा विभाग असे अन्य विभागही तिथे आहेत.

बहुतेक सर्व राज्यांत व संघप्रदेशांत सरकारी, सार्वजनिक संग्रहालये आता स्थापन झाली आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काही विशिष्ट प्रकारची संग्रहालयेही सुरू करण्यात आली आहेत.

**राष्ट्रीय संग्रहालय, नवी दिल्ली** – याची स्थापना इ. स. १९४९ मध्ये केंद्र सरकारने केली. प्रथम ते राष्ट्रपतिभवनातील एका भागात होते. इ. स. १९६० साली ते नवीन इमारतीत मांडण्यात आले. राष्ट्राच्या विविध भागांतील विद्या-कलांचे ते प्रतिनिधित्व करते म्हणून ते राष्ट्रीय होय. त्यात ठेवण्यासाठी निवडक वस्तू, महत्प्रयासाने मिळवलेल्या असून, त्यांचे संरक्षण व संदर्शनही शास्त्रोक्त व कलात्मक पद्धतीने केलेले आहे.



राष्ट्रीय वस्तुसंग्रहालय, नवी दिल्ली

या संग्रहालयात ३२० शिलाशिल्पकृती, निरनिराळ्या शैलींची ८००० रंगचित्रे, सुमारे ६१५ ब्रॉंझमूर्ती, सुमारे १००० वस्त्रे, ४२०० फारसी व अरबी हस्तलिखिते, २५०० संस्कृत, पाली, प्राकृत व देवनागरी हस्तलिखिते; १०,००० नाणी आणि जवाहिरांचा एक संग्रह आहे. शस्त्रास्त्रांचा एक विभाग आहे. लाकूड व हस्तिदंत यांवरील कोरीव काम, काचेचे व मातीचे सामान, यांनाही त्यात स्थान आहे. प्रागैतिहासिक विभागात मोहेंजोदडो, हडप्पा, झुकर, झंगर, नाळ, इ. ठिकाणी मिळालेल्या वस्तू ठेवल्या आहेत. निरनिराळ्या कालखंडांतील शिल्पकृती वेगळ्या ठेवल्या आहेत.

मध्य आशियातील पुराणवस्तूंचा साठा व सर ओरेल स्टाइन यांनी वालुकाव्याप्त भागात संशोधन करून आणलेल्या भित्तिचित्रांचा सुंदर संचदेखील या राष्ट्रीय वस्तुसंग्रहालयात आहे.

**बडोदे संग्रहालय व चित्रविभाग** – हे बडोदे येथे श्रीमंत सयाजीराव महाराजांनी इ. स. १८९४ मध्ये स्थापन केले. त्यांनी अनेक देशांतून कलेच्या व सौंदर्याच्या दृष्टीने महत्त्वाच्या व दुर्मिळ वस्तू जमा करून या संग्रहालयात ठेवल्या. इ. स. १९२१ साली चित्रविभाग उघडण्यात आला. हे संग्रहालय बहुउद्देशीय असून, त्यात पुरातत्त्वविद्या, नाणकशास्त्र, पाश्चात्त्य व भारतीय चित्रकला, प्राणिशास्त्र, मानवशास्त्र, भूस्तरशास्त्र, व्यावहारिक वनस्पतिशास्त्र, बृहत्तर भारत, चीन, जपान, इजिप्त, इराक, इराण व युरोप या देशांतील कला व संस्कृती यांच्याशी संबंधित वस्तूंचा संग्रह आहे. विविध देशांच्या कलांची वैशिष्टचे दाखविणाऱ्या चित्रांची आठ स्वतंत्र दालने आहेत. भारतीय कलादालनात प. भारतातील प्राचीन ब्राँझमूर्ती हे या संग्रहालयाचे वैभव आहे. इ. स. च्या ५ व्या शतकातील ऋषभनाथ, चौरीधारी यक्षी, इ. स. च्या ८ व्या शतकातील उमा–महेश्वर आणि गुप्तकालीन मूर्ती इथे पाहायला मिळतात. इजिप्तमधील पाच हजार वर्षांपूर्वीची ममी इथे आहे. निसर्गेतिहासविभागात गीरच्या जंगलाची प्रतिकृती इथे निर्माण केली असून, त्यात एक सिंहाचे कुटुंब ठेवलेले आहे. सृष्टिविज्ञान शाखेचे दहा विभाग आहेत. यांतले पाच प्राणिशास्त्रविषयक आणि पाच भूस्तरशास्त्र व प्राचीन प्राणिविद्या यासंबंधी आहेत. मानवशास्त्र विषयक दोन प्रदर्शनविभाग आहेत.

कलादालनात, कापड, लाकूड, लाख, हस्तिदंत, जवाहिर यांच्या सुंदर, कलात्मक वस्तू बऱ्याच आहेत.

चित्रविभागात पहाडी, बसोली, कांगडा, भंडी, कुलू, इ. निरनिराळ्या शैलींची रंगचित्रे (अल्पाकृती) व मोगल शैलीची चित्रे आहेत.

भारतीय व युरोपीय चित्रकलेवर सयाजीरावमहाराजांनी पहिल्यापासूनच भर दिला होता. बडोदे राज्यातील जनतेचे



वडोद्याचे वस्तुसंग्रहालय

जीवन कलासंपन्न व्हावे व कलाकारांच्या डोळ्यांसमोर चित्रकलेचे आदर्श असावे, हा त्यांचा उद्देश होता.

म्युझियॉलॉजीचा डिप्लोमा कोर्स पहिल्याप्रथम बडोदे विद्यापीठाने इ. स. १९५२ मध्ये सुरू केला, तो या संग्रहालयाच्या साहाय्याने. हा भारतातला पहिला उपक्रम होय. संग्रहालयाचे बुलेटिन प्रसिद्ध होते व जगातील संशोधकांना ते उपयुक्त ठरते. दरवर्षी पाच लक्ष लोक हे संग्रहालय पाहायला जातात.

**प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियम, मुंबई** – या संग्रहालयाची मूळ कल्पना इ. स. १८९२ साली उगम पावली व इ. स. १९०४ मध्ये त्यासाठी सरकारने एक समिती नेमली. पण संग्रहालय इ. स. १९२१ मध्ये सुरू झाले. त्यात कला, पुराणवस्तुशास्त्र व सृष्टिविज्ञान हे तीन भाग होते. इ. स. १९३८ मध्ये इमारतीचा बराच विस्तार करण्यात आला.

कलाविभाग – या विभागात भारतीय व परदेशी चित्रांचा मौल्यवान संग्रह, चिनीमातीच्या वस्तू, मौल्यवान दगड, लाखेचा मुलामा केलेल्या जपानी वस्तू, धातूच्या व हस्तिदंती वस्तू, भरतकामाचे नमुने, शाली, शस्त्रास्त्रे, चिलखते, इ. वस्तूंचा समावेश होतो. भारतीय चित्रकला, मूर्तिकला व शोभनकला यांचा विकास कसकसा होत गेला, याचे दिग्दर्शन करण्यावर या संग्रहालयाचा विशेष भर असून, चालुक्यकालीन मूर्ती व गुप्तकालीन हस्तिदंताच्या वस्तूंचा उत्कृष्ट संग्रह इथे आहे

श्री. पुरुषोत्तम मावजी, सर रतन टाटा, सर दोराबजी टाटा, सर अकबर हैदरी यांनी आपापले वस्तुसंग्रह या संग्रहालयाला दिले आहेत. अजूनही त्यात सतत भर पडत असते.

या संग्रहालयात चांदीचे व सोन्याचे दागिने, हस्तिदंती व चंदनी लाकडाच्या कोरीव वस्तू, कागदी लगद्याच्या वस्तू, रेशमी व सुती वस्त्रे, बिदरी वस्तू यांचाही संग्रह आहे.

पुराणवस्तुशास्त्र विभाग – या विभागात उत्खननात मिळालेले अत्यंत प्राचीन काळातले अवशेष, दगडी आयुधे, नाणी, शिलालेख व ताम्रपट, ताडपत्रावरील ग्रंथ, प्राचीन शिल्पकृती व नाणी यांचा संग्रह आहे. इजिप्तमधील ममी इथे पाहायला मिळते.

सृष्टिविज्ञान विभाग – प्राणिजीवनाचे वास्तव दर्शन घडावे म्हणून तयार केलेली प्रकाशमान सुंदर आभासचित्रे इथे बरीच आहेत. त्यांत कित्येक पशू, पक्षी, मासे त्यांच्या नैसर्गिक परिस्थितीत वावरताना दिसतात.

**सरकारी संग्रहालय व कला – प्रदर्शन, मद्रास** – हे संग्रहालय इ. स. १८५१ मध्ये मद्रास सरकारने सुरू केले. याची वाढ खूप वेगाने झाली. त्याचे कला, पुराणवस्तुशास्त्र, मानवशास्त्र, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, भूस्तरशास्त्र व नाणकशास्त्र असे सात विभाग आहेत. हे संग्रहालय मद्रास सरकारचा सर्जन जनरल एडवर्ड बाल्फोर याच्या प्रयत्नांमुळे स्थापन झाले. यात प्रथमच

युरोपातील औद्योगिक क्रांतीचे दर्शन घडविणाऱ्या यंत्रसामग्रीचा संग्रह करण्यात आला आहे. हे संग्रहालय बहुउद्देशीय असले तरी, द. भारतातील धातुमूर्तींचे ते आगर समजले जाते. या धातुमूर्ती केवळ संख्येनेच नव्हे, तर कलात्मकतेच्या व वैचित्र्याच्या दृष्टीनेही विशेष उल्लेखनीय आहेत. त्यांत बऱ्याच शिवमूर्ती असून, एक मूर्ती सर्व जगात उत्कृष्ट गणली जाते. याशिवाय तिथे असंख्य कलाकुसरीच्या वस्तूही आहेत. तसेच या संग्रहालयात नाण्यांचा व शिलालेखांचा खूप मोठा संग्रह आहे.

इथल्या कलाप्रदर्शन विभागात अनेक सुंदर मूर्ती, लाकूड, हस्तिदंत व धातू यांच्या कोरीव आणि नक्षीदार वस्तू, विदरी सामान, तलम वस्त्रे व रंगचित्रे आहेत.

**मध्यवर्ती संग्रहालय, नागपूर** – हे संग्रहालय इ. स. १८६३ मध्ये स्थापण्यात आले. प्रारंभी हे अगदी लहान असले तरी, आता त्याचे (१) कला व उद्योग, (२) पुराणवस्तुशास्त्र, (३) मानववंशशास्त्र, (४) अर्थोत्पादक वस्तू, (५) भूस्तरशास्त्र व (६) सृष्टिविज्ञान असे सहा भाग आहेत. पहिल्या भागात निरनिराळ्या ठिकाणची मातीची भांडी, लाखेची भांडी, पितळेची नक्षीची भांडी, दगडाची भांडी, शिंग, हस्तिदंत, चंदन यांच्या कलात्मक वस्तू, वस्त्रे व रंगचित्रे आहेत. पुराणवस्तुशास्त्र विभागात मुख्यतः मध्य भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचे दर्शन घडविणाऱ्या वस्तू आहेत. त्यांत इतिहास-पूर्वकालीन अवजारे, स्मारके व मूर्ती; शिलालेख, ताम्रपट, नाणी, इ. वस्तूंचा समावेश होतो.

**म्हैसूर सरकारी संग्रहालय, बंगलोर** – याची स्थापना इ. स. १८६६ मध्ये झाली. एडवर्ड बालफोर हेच त्याचे पहिले मुख्याधिकारी होते. यात पुराणवस्तुशास्त्र, सांस्कृतिक इतिहास, नाणी, मानववंशशास्त्र, औद्योगिक कला, भूस्तरशास्त्र, वनस्पतिशास्त्र व प्राणिशास्त्र हे विभाग आहेत. इथे कर्नाटकातील पुराणवस्तू व शिल्पकृती मुख्यत्वे ठेवलेल्या आहेत. मुख्य दालनात प्राचीन व आधुनिक शस्त्रांचा चांगला संग्रह पाहायला मिळतो. हस्तिदंत व चंदन यांच्या नक्षीदार वस्तू, जडजवाहिर, वाद्ये, वस्त्रे व चित्रे यांचा संग्रहही प्रेक्षणीय आहे.

**सरकारी संग्रहालय, त्रिवेंद्रम** – पूर्वीच्या त्रावणकोर संस्थानाधिपतीने इ. स. १८५७ साली त्रिवेंद्रम येथे सार्वजनिक संग्रहालय स्थापन केले. इ. स. १८५९ मध्ये भोवतालच्या सुमारे ६० एकर जमिनीवर बगिचा व प्राणिसंग्रहालय निर्माण करण्यात आले. संग्रहालयात प्रादेशिक कलावस्तू, हस्तव्यवसाय वस्तू, पुराण वस्तू, नाणी व सृष्टिज्ञानविषयक वस्तू ठेवलेल्या आहेत. तिथे नायर समाजाच्या एका प्रातिनिधिक घराचा नमुना पाहायला मिळतो.

जवळच चित्रालयम आहे, त्याची स्थापना इ. स. १९३५ मध्ये झाली. यात राजपूत, मोगल, तिबेटी, चिनी, जपानी, फारसी,



त्रिवेंद्रमचे वस्तुसंग्रहालय

बाली, हिंद-युरोपीय, तंजाऊर व आधुनिक भारतीय शैलींची रंगचित्रे आहेत. राजा रविवर्म्याच्या मूळ चित्रांचा मोठा संग्रह इथल्या तीन चार दालनांत ठेवलेला आहे. तो या संग्रहालयाचा सर्वांत बहुमोल ठेवा होय.

**सरकारी केंद्रीय संग्रहालय, जयपूर** – याची स्थापना जयपूरच्या महाराजांनी इ. स. १८७६ साली केली. पण त्यांची भव्य सुंदर इमारत पूर्ण झाल्यावर इ. स. १८८७ मध्ये तिथे त्याची पूर्ण स्थापना झाली. याचे नऊ विभाग आहेत- (१) कला व उद्योग – धातूच्या, लाकडाच्या व मातीच्या कलापूर्ण वस्तूंचा संग्रह, (२) शस्त्रास्त्रे, (३) वस्त्रे, (४) गालिचे (५) रंगचित्रे, (६) भूस्तरशास्त्र, (७) प्राणिशास्त्र, (८) वनस्पतिशास्त्र आणि (९) खेळणी व बाहुल्या.

**सालारजंग संग्रहालय, हैदराबाद** – नवाब सालारजंग तिसरा मीर युसुफ अलीखान यांनी कलावस्तूंचा फार मोठा संग्रह जमविला होता. ते इ. स. १९४९ मध्ये मरण पावल्यानंतर हैदराबाद सरकारने तो संग्रह त्यांच्याच भव्य वाड्यात व्यवस्थित मांडला. त्या संग्रहालयाचे उद्घाटन पं. जवाहरलाल नेहरू यांनी इ. स. १९५१ साली केले. याचे दोन प्रमुख विभाग म्हणजे पौर्वात्य व पाश्चिमात्य वस्तू. पौर्वात्य विभागाच्या ४० खोल्या आहेत. इथे हस्तलिखितांचा मोठा संग्रह आहे. चिनीमातीच्या भांड्यांचा सुंदर संग्रहदेखील इथे आहे. हत्यारांच्या संग्रहात मोगल बादशहांची हत्यारे पहायला मिळतात. मर्गज या मौल्यवान दगडात कोरीव काम केलेल्या अनेक अप्रतिम वस्तू इथे आहेत. इथे अनेक प्रकारचे उंची गालिचे आहेत.

भारतीय चित्रशाळेत मोगलकालीन छोट्या तसबिरी व दाक्षिणात्य शैलीची रागरागिण्यांची चित्रे प्रेक्षणीय आहेत. एकंदरीत या संग्रहालयात विचित्र व ऐतिहासिक वस्तू बऱ्याच आहेत. पाश्चात्त्य चित्रकारांनी काढलेली अनेक अप्रतिम चित्रे

इ. स. १९५६ मध्ये इथे बालविभाग उघडण्यात आला. त्यात बहु प्रकारची खेळणी ठेवली आहेत. जगात एवढा मोठा बहु-देशीय संग्रह नाही व भारतात इतरत्र एवढा मोठा बाल-विभाग नाही.

**राजा केळकर संग्रहालय, पुणे** – हे वस्तुसंग्रहालय सालारजंग म्युझियमच्या मानाने लहान, पण तशाच स्वरूपाचे आहे. श्री. केळकर यांनी विविध प्रकारच्या विचित्र वस्तू मिळवून एक खाजगी संग्रह बनवला व त्याचे आता सार्वजनिक संग्रहालय झाले आहे. त्यात नाना प्रकारचे दिवे, अडकित्ते, शस्त्रे, वाद्ये, वगैरे अशा मनोरंजक वस्तू आहेत.

**निसर्गेतिहास संग्रहालय, दार्जीलिंग** – या संग्रहालयात त्या भागातील पशुपक्ष्यांचे नमुने ठेवलेले आहेत. ते प्राणी जिवंत भासावे अशा पद्धतीने मांडल्यामुळे, प्रदर्शन अत्यंत आकर्षक झाले आहे.

खास विषयांना वाहिलेली संग्रहालये भारतात बरीच आहेत. त्यांतील पुरातत्त्वसंबंधी संग्रहालयांची संख्या मोठी आहे. आंध्र-मधील कोंडापूर व नागार्जुनकोंड; बोधगया, नालंदा, पाटणा, दिल्लीचा लाल किल्ला, म्हैसूरमधील हळेबीड व हंपी; मध्य प्रदेशातील सांची, इंदूर, ग्वाल्हेर, खजुराहो, छत्तरपूर, रायपूर; ओडिसामधील कोणार्क; राजस्थानातील आहर, जयपूर, विकानेर, अलवार, अजमीर, उदेपूर, जोधपूर,; भरतपूर उ. प्रदेशातील मथुरा, सारनाथ, आणि कलकत्ता वगैरे ठिकाणी पुराण-वस्तुसंग्रहालये आहेत.

याशिवाय दिल्ली येथील भारतीय आदिम जाती सेवक संघाचे संग्रहालय, इंटरनॅशनल डॉल्स म्युझियम, नॅशनल चिल्ड्रेन्स म्युझियम, नॅशनल गॅलरी ऑफ मॉडर्न आर्ट, बिर्ला इंडस्ट्रिअल अँड टेक्निकल म्यूझियम व क्राफ्ट्स म्यूझियम; बंगलोरचे विश्वेश्वरय्या इंडस्ट्रियल अँड टेक्नॉलॉजिकल म्यूझियम; बनारस हिंदू विद्यापीठातील भारत कला भवन, अलिगडचे म्यूझियम ऑफ मॅनकाइन्ड अँड कल्चर, कलकत्ता विद्यापीठाचे आशुतोष म्यूझियम, शांतिनिकेतन येथील कलाभवन, वगैरे संग्रहालये ही विशिष्ट विषयांना वाहिलेली आहेत. संग्रहालयांचा आणखी एक प्रकार म्हणजे थोर पुरुषांच्या वास्तू. ज्या घरात म. गांधी, पं. नेहरू, स्वामी विवेकानंद, सुभाषचंद्र बोस, लो. टिळक व रवींद्रनाथ ठाकूर राहिले त्या घरांचे तत्कालीन स्वरूप कायम ठेवून, तिथे त्या त्या पुरुषांनी वापरलेल्या वस्तू, त्यांना मिळालेली मानपत्रे व अन्य वस्तू, त्यांनी लिहिलेले ग्रंथ, त्यांना अर्पण केलेले ग्रंथ, त्यांची पत्रे, त्यांची छायाचित्रे, इ. वस्तूंचा संग्रह केलेला आहे. दिल्लीत म. गांधी स्मारक संग्रहालय व ग्रंथालय आणि पं. नेहरू स्मारक संग्रहालय अशी दोन संग्रहालये आहेत. पं. नेहरूंचे निवासस्थान 'तीन मूर्ती' या नावाने प्रसिद्ध आहे. तिथेच त्यांचे हे स्मारक-संग्रहालय आहे.

रवींद्रनाथ ठाकूर यांचे स्मारक संग्रहालय शांतिनिकेतन येथे आहे. त्यांच्या मृत्यूनंतर लगेच, इ. स. १९४२ मध्ये त्यांच्या उदयन नामक घरातच हे संग्रहालय प्रथम स्थापण्यात आले होते. पण इ. स. १९६१ साली ते पं. नेहरूंच्या हस्ते नवीन भवनात स्थापण्यात आले. त्या भवनाचे नाव 'विचित्र' असे आहे.

केंद्रीय वैज्ञानिक संशोधन व सांस्कृतिक कार्य मंत्रालयाने इ. स. १९६० मध्ये भारतीय संग्रहालयांची निर्देशिका प्रसिद्ध केली आहे. त्या निर्देशिकेत सुमारे १७५ संग्रहालयांची माहिती दिलेली आहे. त्यांतील आणखी काही संग्रहालये उल्लेखनीय आहेत, त्यांची नावे अशी–

(१) अमरावती (आंध्र प्रदेश)–प्राचीन स्तूपाचे अवशेष व बुद्धाच्या मूर्ती. (२) हैदराबाद संग्रहालय (३) श्रीभवानी संग्रहालय, औंध (४) राणीच्या बागेतील संग्रहालय, मुंबई (५) कोल्हापूर वस्तुसंग्रहालय (६) गांधी स्मारक संग्रहालय, साबरमती (७) कला व पुराणवस्तुसंग्रहालय, वल्लभ विद्यानगर, गुजरात (८) श्रीनगर येथील संग्रहालय (९) त्रिचूरचे पुराणवस्तुसंग्रहालय व चित्रप्रदर्शन (१०) श्रीरंगनाथस्वामी आदिदेवस्थानम संग्रहालय, श्रीरंगम (११) कन्नड संशोधन संस्था संग्रहालय, धारवाड (१२) मध्यवर्ती शीख संग्रहालय, अमृतसर (१३) राजपुताना संग्रहालय, अजमेर (१४) गंगा सुवर्ण महोत्सव संग्रहालय, विकानेर (१५) गुरुकुल संग्रहालय, गुरुकुल, कांगडी (१६) सरकारी संग्रहालय, लखनौ आणि (१७) एशियाटिक सोसायटीचे संग्रहालय, कलकत्ता.

जगातल्या अनेक देशांत या विसाव्या शतकातच संग्रहालयांची संख्या खूप वाढली. इ. स. १९०१–१९२० या वीस वर्षांच्या कालखंडात जर्मनीत १७९ संग्रहालयांची स्थापना झाली. भारतातील संग्रहालयांची संख्या त्या मानाने अगदी कमी आहे.

अनेक देशांत संग्रहालयांची संख्या वाढल्यामुळे, त्यांच्यांत सहकार्य व्हावे, त्यांच्या पुढचे प्रश्न सोडवता यावे व सर्वांमध्ये एकसूत्रता निर्माण व्हावी या उद्देशाने इ. स. १९२६ साली जगातील संग्रहालयांचे एक आंतरराष्ट्रीय कार्यालय स्थापण्यात आले. इ. स. १९४६मध्ये इंटरनॅशनल कौन्सिल ऑफ म्यूझियम्स ही संस्था स्थापन झाली. या संस्थेने संग्रहालयांच्या विकासासाठी इ. स. १९५६ मध्ये जागतिक चळवळ सुरू केली. तीत ६१ राष्ट्रांनी भाग घेतला.

संग्रहालये ही आता ज्ञानसंपादनाची उत्कृष्ट साधने ठरली आहेत. मुलांच्या संग्रहालयांत मुलांचे कुतूहल शमवणारी एवढी साधने असतात, की त्यांचा उपयोग मोठ्या माणसांनाही होतो.

विशेष प्रकारची संग्रहालये त्या त्या विषयांतील तज्ज्ञांना उपयुक्त ठरतात आणि त्यांमुळे अज्ञांच्या ज्ञानातही भर पडते. शिक्षणाचे व प्रबोधनाचे एक साधन म्हणून आज संग्रहालयांचे महत्त्व खूप वाढले आहे. अशी ही वस्तु-संग्रहालये म्हणजे देशाची गौरवस्थाने होत. देशाचे भूतकाळातील कार्य आणि भविष्यकाळातील महत्त्वाकांक्षा; तसेच लोकांची संस्कृती, मनोवृत्ती व अस्मिता यांवर त्या त्या देशातल्या संग्रहालयांमुळे चांगला प्रकाश पडतो. [ भारतीय संग्रहालयांची निर्देशिका – श्री. सी. शिवराम मूर्ती, अभिरक्षक, भारताचे राष्ट्रीय संग्रहालय, नवी दिल्ली, १९६०; श्री. बा. द. सातोस्कर, पणजी ]

**संग्रामपूर** (१) हे प्राचीन गाव उत्तर प्रदेशात उन्नाव जिल्ह्यात मौरावाहून जब्रैलाला जाणाऱ्या रस्त्यावर आहे. दशरथाच्या शब्दवेधी बाणाने श्रावण इथेच मृत्यू पावला, अशी जनश्रुती आहे. इथे एक जलाशय आहे आणि त्याच्या जवळच बाल श्रावणाची पाषाणमूर्ती आहे. श्रावण तहानेने मेला म्हणून असे सांगतात, की मूर्तीच्या नाभीच्या छिद्रात कितीही पाणी ओतले तरी ते छिद्र भरत नाही. [कल्याण–तीर्थांक]

(२) हे गाव गोविंदपूरपासून सुमारे ११ किलोमीटर अंतरावर आहे. प्रभू रामचंद्राच्या सैन्याशी लव-कुशांनी या ठिकाणी युद्ध केले म्हणून या गावाला हे नाव पडले. या गावाजवळ एक लहान तळे असून, तळ्यासमीप जे टेकाड आहे त्या टेकाडावर लव-कुश राहत होते, असे म्हणतात. [ चंपा. गॅझे. ]

**संग्रामसिंह** (इ. स. १४८२ – १५२८) मेवाडच्या शिसोदिया वंशातील एक महाप्रतापी राजा. हा राणा सांगा किंवा संग या नावाने प्रसिद्ध आहे. मेवाडचा राणा कुंभा याचा हा नातू व रायमल्लाचा पुत्र होता. रायमल्लाच्या मृत्यूनंतर इ. स. १५०९ मध्ये हा मेवाडच्या राजसिंहासनावर बसला. त्या वेळी तो सत्तावीस वर्षांचा होता. तो गादीवर आला त्या वेळी त्याचे राज्य दिल्ली, गुजरात व माळवा या मुसलमानी सुलतानांच्या राज्यांनी वेढलेले होते. दिल्लीवर सिकंदर लोदी, गुजरातेत महमूद शाह बेगडा व माळव्यात नसीरुद्दीन खिलजी हे सुलतान राज्य करीत होते. दिल्लीचे राज्य त्या वेळी बरेच कमजोर झाले होते. ही संधी साधून संग्रामसिंहाने आपला राज्यविस्तार करायचे ठरवले. त्याने गुजरातच्या सुलतानाचे आक्रमण मोडून काढले आणि दिल्लीच्या राज्यावर स्वारी केली. दिल्लीचा त्या वेळचा सुलतान इब्राहीम लोदी याच्याशी बूंदीच्या सीमेवर खातोली गावी इ. स. १५१७ मध्ये त्याची लढाई झाली. या लढाईत संग्रामसिंहाचा डावा हात तुटला व गुडघ्यात बाण लागल्यामुळे तो लंगडा झाला. पण युद्धात त्याचाच जय झाला. गुजरातचा सुलतान मुझफ्फर याच्याशी ईडर, अहमदनगर व बीसलनगर या ठिकाणी संग्रामसिंहाच्या लढाया झाल्या. त्यांतही त्याने सुलतानाचा पराभव केला व आपला सामंत रायमल्ल राठोड याला त्याने पुन्हा ईडरच्या गादीवर बसवले.

माळव्याचा सुलतान महमूद याच्याशी झालेल्या लढाईत त्याने महमुदाचा पराभव केला. महमूद युद्धात चांगलाच घायाळ झाला. तेव्हा संग्रामसिंहाने त्याला चितोडगडावर काही काळ कैदेत ठेवले व त्याच्यावर उपचार करविले. नंतर त्याने त्याला मांडू या राजधानीला पोचविले. पण महमुदाने त्यानंतर गुजरातच्या सुलतानाच्या मदतीने पुन्हा मेवाडवर स्वारी केली. त्यातही संग्रामसिंहाने त्याचा पराभव केला. अशा प्रकारे आपल्या पराक्रमाने सर्व मुसलमानी सत्तांना नामोहरम करून त्याने संपूर्ण राजस्थानावर आपली सत्ता स्थापन केली. मेवाडच्या राज्याला त्याने उन्नतीच्या शिखरावर पोचवले. त्याच्या सैन्यात एक लाख योद्धे व पाचशे हत्ती होते. अनेक राजे त्याचे सामंत होते.

संग्रामसिंहाची शेवटची लढाई बाबराबरोवर खानवा येथे झाली. दोन्ही सैन्यांची गाठभेट प्रथम इथेच झाली. बाबराच्या सैन्याची आघाडीची तुकडी पुढे गेली होती, तिची राजपूत सैन्याने कत्तल केली. तेव्हा बाबरांने आपल्या सरदारांना एकत्र वोलावून त्यांच्या धार्मिक भावनेला आवाहन केले आणि बाबराने सैन्यासह पुढे कूच केले. बयानाजवळच्या खानवा गावी दोन्ही सैन्यांची गाठ पडली (इ. स. १५२७). संग्रामसिंह स्वतः हत्तीवर बसून सैन्याचे नेतृत्व करीत होता. सुरुवातीला राजपुतांनी मुसलमान सैन्याला हरवले. पण तेवढ्यात त्यांना नवी कुमक मिळाली. मग मुसलमान सैन्याने तोफांचा मारा सुरू केला. त्यातच संग्रामसिंहाला बाण लागून तो घायाळ झाला. तेव्हा राजपूत सरदारांनी त्याला रणक्षेत्रावरून बाजूला नेले. तोफांच्या माऱ्यापुढे राजपूत सैन्याचा टिकाव लागला नाही आणि बाबराला युद्धात जय मिळाला. मेवाडच्या सार्वभौम सत्तेचा अशा रीतीने अंत झाला.

पुढच्याच वर्षी इ. स. १५२८ मध्ये संग्रामसिंह मरण पावला. तो अत्यंत शूर, उदार व बुद्धिमान होता. बाबरानेही त्याच्या शौर्याबद्दल गौरवोद्गार काढले आहेत. त्याच्या शरीरावर लहानमोठ्या ऐंशी जखमांचे वण होते. तो विनीत व प्रजावत्सल होता. [ रा. रा. उ. न्हा.; रा. इ. ]

**संग्रामेष्टी** युद्धामध्ये जय मिळावा यासाठी निरनिराळ्या देवतांच्या इष्टी सांगितलेल्या आहेत. युद्धारंभ निघण्यापूर्वी, युद्धाच्या जागी पोचल्यानंतर, युद्ध आरंभि

झाल्यावर, शत्रुसेना चाल करून आल्यावर, युद्ध जिंकल्यावर आणि विजय मिळवून परत आल्यावर अशा भिन्न भिन्न वेळी ही इष्टी करण्यास सांगितले आहे. अग्निवैश्वानर, इन्द्र, इन्द्राग्नी इ. या इष्टीच्या देवता आहेत.

पूर्वी राजेलोकांच्या घरी अग्निहोत्र असे आणि वरीलपैकी कोणताही प्रसंग राजावर आला तर राजाच्या पुरोहिताने त्याच्या यशःप्राप्तीसाठी याग करण्याची पद्धती होती. ऋग्वेदामध्ये दाशराज्ञयुद्धासंबंधी जी सूक्ते आहेत, त्यांमध्ये पुरोहित, राजाला जय मिळावा म्हणून, देवतांची स्तुती करतात, असे वर्णन आलेले आहे. त्यांतून पुढे या इष्टीचा उगम झाला. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**संघकळी** केरळातील एक लोकनृत्य. याचे पाच भाग असतात. प्रारंभी एक मोटचा तोंडाचे भांडे वाजवीत नर्तक नाचू लागतात. नाचता नाचता मधूनच बसतात, मधूनच उठतात. त्यानंतर नारळ तोडण्याचा अभिनय करतात. नारळ तोडून झाल्यावर काही लोक हाती पाजळलेले दिवे घेऊन, गाणी गात चारही दिशांनी लचकत, मुरडत, मागे पुढे सरकत नाचतात. मग सर्व नर्तक नाविकांची गीते गात भोजन करतात. भोजनोत्तर उझीचिल नामक एक विधी करतात. हा एक अनिष्टनिवारणार्थ करायचा विधी असतो. यात जळत्या चक्रांचा उपयोग करतात. मग अंग्मंगल नावाचा एक प्रकार होतो. त्यानंतर मूकाभिनयाद्वारे मलबारच्या काही खेळांचे दर्शन घडविले जाते. मग हास्यमंगल नावाचा एक कार्यक्रम होतो. त्यात एकच व्यक्ती वेगवेगळ्या व्यक्तींच्या नकला करून उपस्थितांचे मनोरंजन करते. यानंतर संघकळी नृत्य समाप्त होते. या नृत्यात नर्तकांचे वेगवेगळे संघ भाग घेत असल्यामुळे याला संघनृत्य असे म्हणतात. हे एक धार्मिक लोकनृत्य आहे. [भा. लो. नृ.]

**संघभद्र** (इ. स. चे ४ थे शतक) एक बौद्ध आचार्य. हा विभाषा दर्शनाचा विद्वान असून, मूळचा काश्मीरचा रहिवासी होता. हा वसुबंधूचा प्रतिस्पर्धी होता. त्याच्याबरोबर चर्चा करण्यासाठी हा अयोध्येला आला, असे सांगतात. याचा विहार अहिच्छत्रा नगरीतील गुणप्रभाच्या विहाराशेजारी होता.

वसुबंधूच्या अभिधर्मकोशातील विचारांचे खंडन करण्यासाठी याने समयप्रदीप व कोशकरका नामक ग्रंथांची रचना केली. त्याने हे ग्रंथ मूळ संस्कृत भाषेत रचले होते. सांप्रत ते अनुपलब्ध आहेत. परंतु त्यांचा चिनी अनुवाद मात्र उपलब्ध आहे. या ग्रंथात दहा हजार श्लोक असून, विभाषा दर्शनाचे समस्त सिद्धान्त सुलभ रीतीने सांगितले आहेत. त्याने अयोध्येत राहून या ग्रंथांची रचना केली. [गु. सा. इ.; बौ. ध. द.; उ. प्र. बौ. वि.]

**संघम** प्राचीन तमिळ साहित्यपरिषदेचे नाव. अशा तीन परिषदा झाल्या. पहिल्या परिषदेची स्थापना सनपूर्व सहाव्या शतकात झाली होती. तिचा अंत होऊन दुसरी परिषद केव्हा स्थापन झाली ते ज्ञात नाही. मात्र दुसऱ्या परिषदेचा अंत सनपूर्व दुसऱ्या शतकाच्या प्रारंभी झाला आणि त्याच शतकाच्या मध्यात तिसरी परिषद सुरू झाली. तिसरी परिषद इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अंतापर्यंत अस्तित्वात होती. या परिषदांच्या काळात तमिळ भाषा अत्यंत समृद्ध झाली. पाहा – तमिळ भाषा व साहित्य.

**संघाटकव्रत** एक काम्य स्त्रीव्रत. या व्रताची देवता शिव आहे. कार्तिक शु. प्रतिपदा या तिथीला व्रताचा आरंभ करतात. त्याचा विधी असा – पहिल्या दिवशी एकभुक्त राहावे. द्वितीया व तृतीया या तिथींना उपवास करून चतुर्थीला पारणे करावे. शिव-पार्वतींच्या सुवर्णप्रतिमा करून त्या मंचकावर ठेवाव्या आणि त्यांची पूजा करावी. रात्रौ जागरण व भूमिशयन करावे. प्रत्येक महिन्याच्या शुद्ध पक्षात किंवा उभय पक्षांत अशा एकूण सात पूजा कराव्या. उद्यापनाच्या वेळी वर उल्लेखिलेल्या सुवर्णप्रतिमा आचार्याला दान द्याव्या. फल – पतीचा चिरंतन सहवास. [हि. ध.]

**संजीविनी विद्या** मृताला जिवंत करणारी एक विद्या. हिला मृत-संजीविनी असेही म्हणतात. ही सर्व विद्यांचे सार असून, सदैव सुप्त असते. 'वं मृतसंजीविनि मृत-मुत्थापय स्वाहा' हा या विद्येचा मंत्र होय. या मंत्राचा नित्य एकशे आठ जप केल्याने तो सिद्ध होतो. ज्याला ही विद्या प्राप्त झाली आहे, अशा साधकाने मेलेल्या किंवा चितेवर ठेवलेल्या प्रेताला स्पर्श करून या मंत्राचा जप केल्यास, मेलेला मनुष्य जिवंत होतो.

ही विद्या फार प्राचीन काळापासून भारतातील आचार्यांना अवगत होती. देवासुरांच्या युद्धात दानवांचा पुरोहित शुक्राचार्य या विद्येच्या बलावर दानवांना जिवंत करीत असल्याची कथा महाभारतात आढळते (आदि. ७६). त्याचप्रमाणे त्याने बलीला जिवंत केल्याचा दाखला भागवतपुराणात दिलेला आहे (८.११). बलीच्या समवेत, ज्यांच्या माना व इतर अवयव तुटलेले नाहीत, त्यांनाही शुक्राचार्याने जिवंत केलेले आहे. जालंदरनाथाला ही विद्या शुक्राचार्याकडूनच मिळालेली होती (पद्म. उ. ४. ३७). भृगूपासून त्याच्या घराण्यात ही विद्या चालत आली होती.

भृगूने आपल्या पत्नीला याच विद्येने जिवंत केले होते.

ब्रह्मपुराणमते ही विद्यापरंपरा पुढीलप्रमाणे आहे – शिव —शुक्राचार्य—कच—बृहस्पती. बृहस्पतीने सर्व देवांना ही विद्या दिली.

संजीविनी ही एक औषधी वनस्पती असून, ती मृताला जिवंत करू शकते व ती द्रोणागिरीवर सापडते, असे सांगतात. [ पु. इं.; प्रा. च. को.; योगिनीतंत्र ]

**संजोगी** सिंध प्रदेशातील एक मुसलमान जमात. हे लोक मुळचे हिंदू होते. अद्यापही त्यांच्या काही चाली-रीती हिंदूंप्रमाणेच आहेत. ते हिंदू देवदेवतांना भजतात व गायीला पवित्र मानतात. त्यांची नावेही हिंदू पद्धतीची असतात. परंतु ज्यांचे धर्मांतर पूर्ण झाले आहे, ते स्वतःला शेख म्हणवून घेतात. आर्यसमाजाने धर्मांतराच्या या पद्धतीला पायबंद घातला आणि अनेक संजोगी कुटुंबांना परत हिंदू धर्मात आणले. [ सिं. क. ]

**संतदास** ( इ. स. चे १७ वे शतक ) एक संत. हा चमडिया गोत्रातील अग्रवाल महाजन आणि दादूजीच्या बावन प्रधान शिष्यांतील एक होता. याच्या जन्मकाळाबद्दल निश्चित सांगता येत नाही. याने जीवत्समाधी घेतली होती. समाधिकाळ इ. स. १६३९. याची एक आठखांबी छत्री आजही फतहपुरात अस्तित्वात आहे. याची वाणी नामक रचना आहे, तिची छंद-संख्या बाराहजार आहे. म्हणूनच त्याला बाराहजारी असेही म्हणत असत. या रचनेतील एक उदाहरण असे–

**रैण छमाही हो रही, आया नाही पीव**
**संत सनेही कारणें, तलफै मेरा जीव**
**विहरणी बिछडी पीव सौं, ढूंढत फिरै उदास**
**संतदास एक पीव बिन, निहचल नाहीं बास**

भावार्थ – सहा महिन्यांपासून मी आपल्या प्रियकराची वाट पाहत आहे, परंतु तो आला नाही. त्याच्या प्रेमासाठी माझा जीव व्याकुळ होत आहे. प्रियकरापासून दूर होऊन विरहिणी उदास होऊन त्याला शोधते आहे. संतदास म्हणतात, प्रियकरावाचून तिला कुठेही चैन पडत नाही. [ रा. भा. सा. ]

**संतान–गोपालविधान** एक व्रत. मूल होत नसेल तर श्रीकृष्णाच्या प्रीत्यर्थ हे व्रत करण्यास सांगितले आहे. या व्रतामध्ये "ओम् ग्लौं कृष्णाय गोविन्दाय गोपीजनवल्लभाय स्वाहा" या मंत्राचा एक लक्ष जप करावयास सांगितले आहे. जपानंतर त्याच मंत्राने खिरीचा होम करावा व ब्राह्मणभोजन घालावे, असेही सांगितले आहे. फल – पुत्रप्राप्ती. [ श्री सन्तान गोपालविधानम् । वशीकरणवाराही ]

**संतानसप्तमीव्रत** एक काम्य व्रत. भाद्रपद शु. सप्तमीला हे व्रत करतात. यालाच मुक्ताभरणव्रत असेही नाव आहे. या दिवशी पुत्र-पौत्रांच्या वृद्धीसाठी शिव-पार्वतींची पूजा करतात. गुळाच्या पक्वान्नाचा नैवेद्य दाखवितात. नंतर एक गंडादोरा देवाला अर्पण करून तो हातात बांधतात. या संतानसप्तमीची कथा अशी–

अयोध्येत नहुष नावाचा राजा होता. त्याच्या राणीचे नाव चंद्रमुखी. तिथेच विष्णुगुप्त नावाचा एक ब्राह्मण होता. त्याच्या स्त्रीचे नाव रूपमती होते. दोघींची मैत्री होती. दोघी एक दिवस नदीवर स्नानाला गेल्या असता त्यांना तिथे काही स्त्रिया शिव-पार्वतींची पूजा करताना दिसल्या. राणीने त्यांना विचारले, की 'तुम्ही काय करीत आहा ?' स्त्रिया म्हणाल्या. 'आम्ही मुक्ताभरणव्रत करतो.' मग राणी आणि रूपमती दोघीही त्यांच्यामध्ये सामील झाल्या; [illegible] बांधून घरी आल्या. पण पुढे दोघींनाही त्या व्रताचा विसर पडला. पुढच्या जन्मी राणी झाली वानरी आणि रूपमती झाली कोंबडी. त्यापुढच्या जन्मात राणी झाली राजकन्या आणि रूपमती झाली ब्राह्मणकन्या. राणी झाली मथुरेच्या राजाची राणी आणि रूपमती झाली पुरोहिताची बायको. दोघींची पुन्हा मैत्री जमली. राणी राहिली निपुत्रिक, रूपमतीला मात्र आठ मुलगे झाले. म्हणून राणी तिचा मत्सर करू लागली. तिने रूपमतीच्या आठही मुलांना मारण्याचे खूप प्रयत्न केले; पण रूपमतीने त्या जन्मात मुक्ताभरणव्रत केले होते, त्या पुण्याईने तिचे मुलगे जगले. शेवटी राणीने तिला बोलावून पश्चात्ताप व्यक्त केला. रूपमती म्हणाली, की तू व्रत विसरलीस. मीही विसरले होते; पण मरतेवेळी मला त्याची आठवण झाली. ती या जन्मातही टिकली, म्हणून मी व्रत चालू केले. त्याच्या पुण्याईने पुत्रवती झाले. ते ऐकल्यावर राणीनेही व्रत पुनश्च सुरू केले. आणि पुत्रपौत्र होऊन तिचाही वंश वाढला.

**संतानाष्टमी** एक तिथिव्रत. चैत्र कृष्ण अष्टमीला कृष्ण व देवकी यांची पूजा करावी. त्या दिवशी उपवास करावा. व्रतावधी एक वर्ष. चार चार महिन्यांच्या प्रत्येक भागाच्या शेवटी कृ. अष्टमीला कृष्णाच्या मूर्तीला तुपाने स्नान घालावे आणि तूप दान द्यावे. फल – संतानप्राप्ती. [ हि. ध. ]

**संताळ** एक आदिवासी जमात. या लोकांची वस्ती बंगाल, बिहार आणि ओडिसा या प्रदेशांत आहे. त्यांतही बिहारमधील संताळ परगण्यात यांची वस्ती सर्वांत जास्त म्हणजे

सुमारे दहा लाख आहे. संताळांसंबंधीच्या साहित्यात त्यांचा संताळ, सांथाळ, सांवतार आणि सांवताळ अशा विविध नावांनी उल्लेख आला आहे. पण संताळ पुरुष मात्र स्वतःला होड (मनुष्य) किंवा मांझी (ग्रामप्रमुख) असे म्हणवून घेतो.

संताळ परगण्यातील संताळांची माहिती अशी—

संताळ लोक मध्यम उंचीचे असून, त्यांचे शरीर बांधेसूद असते. त्यांचा रंग काळा व केस काळे, राठ व क्वचित कुरळे असतात. त्यांचे नाक रुंद व चपटे असते. भुवया धनुष्याकृती असतात. त्यांचा चेहरा गोल, डोळे मोठे, जिवणी रुंद व ओठ जाड असतात. त्यांच्या गालांची हाडे किंचित वर आलेली असतात. हे लोक कष्टाळू व सहनशील आहेत.

हे लोक भटक्या वृत्तीचे आहेत. त्यांच्यासंबंधी अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत, त्यांपैकी एक अशी—

एक जंगली बदक समुद्रावरून येऊन अहिडी पिपडी इथे उतरले. तिथे त्याने दोन अंडी घातली. त्यांतून एक पुरुष आणि एक स्त्री यांचा जन्म झाला. हेच संताळांचे पूर्वज होत. पिल्कू हडम आणि पिल्कू बुधी अशी त्यांची नावे होती. तिथून ती दोघे हरदत्तीला गेली. तिथे त्यांना वरीच मुलेबाळे झाली आणि त्यांना खरवार असे नाव पडले. खैरगड आणि हुर्रेडगढी या दोन्ही ठिकाणी भटकल्यावर ते बिहारच्या हजारीवाग जिल्ह्यातील चाय चंपा येथे स्थायिक झाले. तिथे ते अनेक पिढ्या राहिले.

चाय चंपा येथे एका बिरहोर पुरुषाने एका संताळ मुलीचा कौमार्यभंग केला. त्यातून एका मुलाचा जन्म झाला. मधुसिंग असे त्याचे नाव ठेवण्यात आले. तो एक बलवान तरुण बनला. त्याने लग्नासाठी एका संताळ मुलीला मागणी घातली. पण संताळांनी बिरहोर पुरुषाला मुलगी देण्याचे नाकारले. तेव्हा मधुसिंग चिडला आणि त्याने सर्व संताळ मुलींचा कौमार्यभंग करण्याची धमकी दिली. तेव्हा संताळ घाबरले आणि छोटा नागपूर येथे जाऊन राहिले. तो देश मुंडांचा होता. मुंडांचा देव माराङबुरू (मोठा पर्वत) याने त्यांचे पाठलाग करणाऱ्यांपासून संरक्षण केले. तेव्हापासून संताळ माराङबुरूला आपला देव मानू लागले. एका मोठ्या शिळेच्या रूपात ते त्याला भजतात.

त्यानंतर इतर काही ठिकाणी भ्रमंती केल्यावर ते सांवोतच्या जंगलात जाऊन स्थायिक झाले. तिथे त्यांची चांगलीच भरभराट झाली.

एकदा संताळ मुली सांवोतच्या जंगलात नृत्य करीत असता सांवोतच्या राजाने त्यांना पाहिले आणि त्यांतील एकीला लग्नाची मागणी घातली. पण संताळांनी त्या गोष्टीला नकार दिला आणि राजाच्या भयाने पुन्हा एकदा स्थलांतर करून ते सिखर येथे पोचले. त्यांच्यापैकी काही लोकांनी हजारीबाग जिल्ह्यातील सोनावाडी आणि गुत्तियारी येथे वसाहती स्थापन केल्या.

संताळांच्या विविध प्रदेशांत अशा अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्यांतही वरील स्थानांचा निर्देश आढळतो. काहींच्या मते वरील बहुतेक स्थाने हजारीवाग जिल्ह्यातच आहेत. आजही या ठिकाणी संताळांची मोठी वस्ती आहे.

संताळांचे मूलस्थान कोणतेही असो, पण एक गोष्ट निश्चित, की त्यांची वस्ती प्रथम गंगेच्या खोऱ्यात होती. हिंदू लोकांनी तो प्रदेश व्यापताच संताळांनी छोटा नागपूरच्या डोंगराळ प्रदेशाचा आश्रय घेतला. इ. स. च्या १८ व्या शतकात छोटा नागपूरचे पठार हेच त्यांचे मुख्य वसतिस्थान होते. हजारीवाग, पालामाऊ व सिंगभूम हे त्यांचे बालेकिल्ले होते.

अठराव्या शतकाच्या अखेरीला जंगले तोडायला सुरुवात होताच संताळांनी पुन्हा स्थलांतर केले व ते ईशान्येकडे राजमहाल टेकड्यांकडे वळले. दमिन-इ-कोह हे त्यांचे मुख्य केंद्र बनले. इंग्रजांनी जंगले तोडण्यासाठी व नवीन जमीन लागवडीस आणण्यासाठी त्यांचा चांगला उपयोग करून घेतला. पूर्वी संताळांकडे बऱ्याच सुपीक जमिनी होत्या. पण इ. स. १७९०च्या सुमारास इंग्रजांनी बंगालमध्ये जमीनदारी पद्धत सुरू केली. हिंदू व्यापारी व सावकार यांनी संताळ प्रदेशात आपले बस्तान बसवले आणि या सर्वांकडून संताळांची पिळवणूक सुरू झाली. त्यांच्या जमिनी या लोकांनी बळकावल्या व त्यांना गुलाम बनविले.

याचा परिणाम म्हणून संताळांनी आपल्याला त्रास देणाऱ्यांविरुद्ध बंड उभारले. सुरुवातीला त्यांनी सनदशीर मार्ग चोखाळला. सावकारशाही नष्ट करावी व जमिनीवरील कर कमी करावा, अशा मागण्या त्यांनी स्थानिक अधिकाऱ्यांकडे केल्या. पण अधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे दुर्लक्ष केल्याने त्यांनी हिंसेचा मार्ग स्वीकारला. तेव्हा इंग्रजांनी लष्कराच्या साहाय्याने त्यांच्या बंडाचा मोड केला. इ. स. १८५५ सालच्या या बंडात संताळांची अगदी दुर्दशा झाली. पुन्हा त्यांनी स्थलांतर करायला सुरुवात केली. ते गंगा नदी ओलांडून उत्तर बंगालमध्ये शिरले. त्याच वेळी आसाममध्ये चहाच्या मळ्यांची लागवड सुरू झाली होती. मळेवाल्यांनी आपले हस्तक पाठवून मळ्यात काम करण्यासाठी मजूर म्हणून संताळ लोकांची भरती केली.

बंडानंतर दमिन-इ-कोहपासून संताळ वस्तीचा वेगळा असा संताळ परगणा निर्माण करण्यात आला. इंग्रजांनी त्याचा वेगळा राज्यकारभार सुरू केला. प्रत्येक खेड्यात मांझी किंवा पाटील नेमण्यात येऊन त्याच्याकडे पोलिस–अधिकारही देण्यात आले. सरकारने वेठबिगारीची पद्धतही बंद करून टाकली. परंतु संताळांची आर्थिक दुरवस्था मात्र संपली नाही.

इ. स. १९४१ सालच्या शिरगणतीनुसार संताळांची संख्या

२७,३२,२६६ एवढी होती. आता तिच्यात वाढ झाली असेल.

संताळ लोक जी भाषा बोलतात, तिला संताळी असे नाव आहे. ही एक प्राचीन बोली असून, तिचा समावेश मुंडा भाषा-गटात होतो. प्राचीन काळी संताळी भाषेतील साहित्य खूप समृद्ध होते. पण कालौघात ते सर्व नष्ट झाले. त्यानंतर इ. स. च्या १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात या भाषेत लोकांनी रचना करायला सुरुवात केली. अद्यापही अनेक लेखक संताळी भाषेत काव्य, कथा, चरित्रे, इ. साहित्य निर्माण करीत आहेत.

संताळांचे खेडे जंगलाच्या अगदी आतल्या भागात वसलेले असते. प्रत्येक खेड्यात एक लांब रस्ता असतो आणि त्याच्या दोन्ही बाजूंना झोपड्या असतात. सुखवस्तू कुटुंब असेल, तर त्याच्या मालकीच्या दोन झोपड्या असतात. झोपडीचे क्षेत्रफळ साधारणपणे १४′×१४′×८′ असे असते. झोपडीच्या एका कोपऱ्यात एक लहानशी जागा कुलदेव आणि पितर यांच्यासाठी ठेवलेली असते. झोपड्यांना खिडक्या मुळीच नसतात. झोपडीच्या अंगणात एका बाजूला गुरांचा गोठा, डुकरांसाठी आडोसा व कबुतरांचे खुराडे असते. काहीजणांकडे म्हशीही असतात.

झोपड्यांच्या भिंती काठ्यांवर माती लिंपून बनवतात. त्यांची आढी व वासे साल वृक्षाचे व छप्पर बांबूचे असते. छप्पर गवताने शाकारलेले असते.

प्रत्येक खेड्याजवळ साल वृक्षाचे एक पवित्र वन असते. त्याला जाहेर्थान असे नाव आहे. त्यात गावाच्या प्रमुख देवतांचे वास्तव्य असते, अशी संताळांची समजूत आहे. तसेच, प्रत्येक खेड्याच्या ग्रामप्रमुखाच्या घरासमोर मांझीस्थान नामक जागा असते. ग्रामसंस्थापकांचा आत्मा तिथे वास करतो, असे ते मानतात.

संताळांच्या झोपडीत सामान फारसे नसते. एखादी चारपाई, तांब्याची भांडी, काशाचे वाडगे, मातीची गाडगीमडकी, झाडू, एवढ्याच वस्तू त्यांच्या घरात असतात. जेवणासाठी ते साल वृक्षांची पाने व पाणी पिण्यासाठी त्याच पानांचे द्रोण वापरतात. काही घरांत भात कांडण्यासाठी लाकडी किंवा दगडी उखळे व पीठ दळण्यासाठी जाती असतात. याशिवाय, कंदमुळे खणण्यासाठी लोखंडी फाळ बसवलेली लाकडी पहार, शेतीसाठी नांगर, कुदळ, खोरे, कऱ्हा, रक्षा, इ. आयुधे व शिकारीसाठी धनुष्य-बाण, भाले, परशू, इ. हत्यारे असतात.

बीरभूम जिल्ह्यामधील संताळ लोकांच्या झोपड्यांत बांबूच्या खाटा, चटया, लाकडी बाक, बांबूच्या व ताडाच्या झावळ्यांच्या छत्र्या, रॉकेलचे दिवे व कंदील, बांबूच्या टोपल्या, मुसळे, उखळ, जाते, इ. सामान असते. घरगुती उपयोगाची भांडी तांब्यापितळेची, ॲल्युमिनियमची व एनॅमलची असतात.

भात आणि डाळीचे किंवा कडधान्याचे कालवण हे त्यांचे रोजचे जेवण असते. कधीकधी भाजीपाला, मांस, मासे, फळे, कंदमुळे हेही ते खातात. हे लोक दिवसातून दोनदा जेवतात. कारण तिसरे जेवण थोड्याच लोकांना परवडते.



संताळ कुटुंब – कौतोला

हे लोक भातापासून हंडिया नावाची दारू बनवतात. मोहाच्या फुलांपासूनही ते कडक दारू गाळतात. आबालवृद्ध सर्वजण दारू पितात. हल्ली सरकारने हंडियावर बंदी घातली आहे. फक्त सणाच्या दिवशी ती गाळण्याची परवानगी दिलेली असते. हे लोक तंबाखू खातात व विड्याही ओढतात.

**वेषभूषा** – संताळ मजूर कमरेभोवती कापडाचा एक अरुंद पट्टा गुंडाळतात. त्याला कोपणी म्हणतात. इतर पुरुष सहा हात लांब व दोन-अडीच हात रुंद धोतर नेसतात. स्त्रिया बारा हात लांब व तीन हात रुंद साड्या नेसतात. पूर्वी पुरुषही स्त्रियांप्रमाणे लांब केस ठेवीत. हल्ली बहुतेक पुरुष केस कापतात. स्त्रिया केसांचा अंबाडा बांधतात. त्यांना फुले माळण्याची फार आवड आहे. बांगड्या, कर्णफुले, गळ्यात हार, नाकातील चमकी हे त्यांचे मुख्य अलंकार होत. ते धातूचे किंवा काचेचे बनवतात.

**उद्योगधंदे** – शेती हा या लोकांचा मुख्य व्यवसाय आहे. याशिवाय, ते गोपालन, शिकार, मासेमारी, मजुरी व घरकाम हे धंदेही करतात. शेतीत भात, जोंधळे, बाजरी, कडधान्ये व भाजीपाला पिकवतात. ते शेण आणि राख यांचा खत म्हणून उपयोग करतात. शेती बहुधा पावसाच्या पाण्यावर अवलंबून असते. पण काही ठिकाणी नदीनाल्यांना बांध घालून पाणी शेतात खेळवतात. पुरुषांप्रमाणेच स्त्रियांही शेतात राबतात. डोंगरावरील शेतीत एकदाच पीक काढता येते. सखल प्रदेशात ते दोनदा पिके घेतात.

संताळांच्या जीवनात वनस्पती, कंदमुळे, फळे, इ. गोळा करण्याला फार महत्त्व आहे. त्यांच्या आहारात ब्यांयशी प्रकारच्या वनस्पती, सत्तर प्रकारची फळे, एकतीस प्रकारची अळंबी, सात प्रकारची रानटी कडधान्ये यांचा अंतर्भाव होतो. उन्हाळचात जंगली वनस्पती, कंदमुळे, फुले इत्यादींचा ते साठा करतात व अवर्षणाच्या काळात त्यावर उदरनिर्वाह करतात. स्त्रिया गटागटाने जाऊन हे सर्व गोळा करतात.

शिकार बहुधा अनेक लोक मिळून करतात. गावातील सर्व धडधाकट पुरुष उन्हाळचातील सामूहिक शिकारीत भाग घेतात. दिहरी हा त्या शिकारीचा नेता असतो. ही शिकार दोन ते चार दिवस चालते व ती विधिपूर्वक होते. काही वेळा पुरुष एकच दिवस शिकारीसाठी जातात. त्या वेळी दिहरीची आवश्यकता नसते.

हे लोक नदीत आणि तळचात मासेमारी करतात. जाळी टाकून, सापळे लावून, बाणांनी किंवा वनस्पतींच्या विषाने ते मासे पकडतात. अनेकदा मासेमारीत गावातील सर्व लोक भाग घेतात.

या लोकांत श्रम हाच मालमत्तेवरील हक्क म्हणून मानला जाण्याची परंपरा आहे. जे लोक गाव वसविण्यासाठी व लागवडीस आणण्यासाठी जंगल तोडण्यात भाग घेतात, ते सर्व त्या जमिनीचे मालक होतात. जमिनीवर त्या सर्वांचा सामायिक हक्क असतो व त्यांना त्या जमिनीवरील उत्पन्न मिळते. पूर्वी संताळांमध्ये दरवर्षी जमिनीची फेरवाटणी करीत असत. त्यामुळे एकालाच नेहमी चांगली किंवा वाईट जमीन मिळाली, अशी तक्रार करायला जागा राहत नसे. जमीन नेमून देण्याचे व जमिनीची फेरविभागणी करण्याचे काम परणिक या पंचायतीच्या सदस्याकडे असे.

घरे, भांडी, आयुधे, दागदागिने, गुरेढोरे, इत्यादींवर मात्र संताळांची वैयक्तिक मालकी असते. बापाच्या मालमत्तेची त्याच्या मुलांमध्ये समान वाटणी होते. जमिनीच्या बाबतीत वारसांना तिचे उत्पन्न वाटून मिळते. मुलींना वारसाहक्क नसतो.

संताळांत प्रमुख बारा पारी किंवा गोत्रे असून, सगोत्र विवाह निषिद्ध आहे. हासदक, मुरम, किस्कू, हेंब्रोम, सोरेन, तुडू, इ. त्या गोत्रांची नावे आहेत. सांप्रत बारांपैकी एक गोत्र अस्तित्वात नाही. सर्व गोत्रांचे लोक संताळ परगण्यात सर्वत्र पसरले आहेत. प्रत्येक खेड्यात अर्ध्या-अधिक गोत्रांचे लोक रहातात. बेस्रा आणि कोरे ही दोन गोत्रे सोडल्यास बाकीच्या सर्व गोत्रांचा दर्जा समान आहे. ही दोन गोत्रे तेवढी हलकी समजली जातात. प्रत्येक गोत्राची अनेक उपगोत्रे असून, त्यांना खूत असे म्हणतात. असे एकूण २०२ खूत आहेत.

प्रत्येक खुताचे निरनिराळे बोंगा किंवा कुलदेव असतात. त्या खुतातील लोकांनाच त्यांची पूजा-अर्चा करता येते. इतरांना त्यात भाग घेता येत नाही. एकाच खुतांच्या लोकांना लैंगिक संबंध ठेवता येत नाहीत.

नवरा, बायको आणि लहान मुले मिळून संताळ कुटुंब बनते. काही वेळा विवाहित मुलेही कुटुंबात असतात. एखाद्याला एकच मुलगी असली, तर तो घरजावई करतो. थोरल्या भावाच्या विधवेशी आणि बायकोच्या बहिणीशी विवाह करण्याची चाल परंपरागत आहे. कधी कधी थोरल्या भावाची बायको व धाकटे दीर यांच्यामध्येही लैंगिक संबंध निर्माण होतात.

विवाहप्रथा – या लोकांत विवाहाला बापला असे म्हणतात. त्याचे सात प्रकार आहेत, ते पुढीलप्रमाणे–

(१) किरीन बहू बापला – हा विवाहप्रकार सर्वसामान्य असून, त्याला समाजात मान आहे. मुलामुलींचे आईबाप मध्यस्थामार्फत असा विवाह जुळवतात. वधूच्या आईबापांना यात वराच्या आईबापांनी देज द्यायचे असते. त्यावरून या विवाहाला किरीन बहू म्हणजे विकत घेतलेली वधू हे नाव मिळाले आहे. देज म्हणून तीन, पाच किंवा सात रुपये व कापड द्यावे लागते. तीन रुपयांहून देज जास्त असल्यास वधूपक्षालाही वराला काही देणग्या द्याव्या लागतात. पाच रुपये देज मिळाल्यास वराला एक गाय, पितळेचा पेला व कापड या वस्तू द्याव्या लागतात. सात रुपये मिळाल्यास वराला सवत्स गाय आणि पितळेचे ताट द्यावे लागते.

(२) टुंकी दिप्ली बापला – गरीब लोक या प्रकाराने लग्न करतात. यात काही देणे-घेणे नसते. वराचे दोन मित्र वधूला आणण्यासाठी तिच्या घरी जातात. वधू एका टुंकीत म्हणजे टोपलीत आपली चीजवस्तू घेऊन त्या दोघांबरोबर वरगृही जाते. तिथे वर तिच्या कपाळी शेंदूर लावतो. याशिवाय दुसरे कोणतेच विधी या विवाहात नसतात.

(३) संग बापला – एखादा विधुर जेव्हा विधवेशी किंवा घटस्फोटित स्त्रीशी विवाह करतो, तेव्हा त्याला संग असे म्हणतात. विधवेला किंवा घटस्फोटित स्त्रीला, अविवाहित मुलीला जे देज मिळते, त्याच्या निम्मे देज मिळते. याचे कारण असे, की अशी स्त्री मृत्यूनंतर आपल्या पहिल्या नवऱ्याला जाऊन मिळते, अशी यांची समजूत आहे.

(४) घरदी जांवय बापला – एखाद्या पुरुषाला एकुलती एक मुलगी असल्यास तो वराला घरजावई करून घेतो. म्हणजे वर वधूच्या घरी कायमच राहायला जातो. या विवाहात देण्याघेण्याचा काही प्रश्न नसतो. विवाहाचा सगळा खर्च वधूचे आईबाप करतात.

(५) किरीन जांवय वाप्ला – याचा अर्थ विकत–जावई–विवाह असा आहे. एखादी मुलगी विवाहापूर्वी अनैतिक संबंधाने गरोदर राहिली आणि संबंधित तरुण सगोत्रामुळे किंवा अन्य काही कारणाने तिच्याशी लग्न करू शकत नसला, तर त्याला त्या मुलीला नवरा विकत घेऊन द्यावा लागतो. अशा विवाहाचा सर्व खर्च त्यालाच करावा लागतो. पूर्वी अशा विवाहात एक बैलजोडी, सवत्स गाय व बारा मण भात द्यावे लागत असे. आता ते सर्व वीस रुपयात भागते.

(६) इतुत बाप्ला – बळजबरीच्या विवाहाला हे नाव आहे. एखाद्या तरुणाने एखाद्या अविवाहित मुलीच्या कपाळाला शेंदूर फासला, की हा विवाह होतो. एखाद्या तरुणाला मुलीचे आईबाप जेव्हा मुलगी द्यायला तयार नसतात किंवा एखादी मुलगी आपल्याशी विवाह करायला नाखूष आहे, असे त्याला वाटते, तेव्हाच तो अशा विवाहाला प्रवृत्त होतो. पण असा विवाह म्हणजे मुलीच्या आईबापांना आपला अपमान वाटतो. तसेच असा विवाह करताना एखादा तरुण आढळला तर गावकरी त्याला बेदम चोप देतात, त्याच्या घरावर हल्ला चढवतात, त्याची गुरे पळवतात व त्याच्या शेतीचे नुकसान करतात. शेवटी त्याचा बाप मुलीच्या बापाला व गावच्या पाटलाला दंडादाखल पैसे देऊन हे प्रकरण मिटवतो. एवढे सर्व झाल्यावर मुलीच्या आईबापांची तक्रार नसली, तर हा विवाह पुन्हा रूढीप्रमाणे साजरा होतो. पण मुलीच्या आईबापांची संमती नसली तर मुलीला घटस्फोट घ्यावा लागतो.

(७) वीर बोलोक बाप्ला – एखादा तरुण एखाद्या मुलीला फूस लावून तिच्याशी लैंगिक संबंध जुळवतो व मग तिच्याशी लग्न करण्याचे नाकारतो. अशा वेळी ती मुलगी त्याच्या घरात शिरून एका कोपऱ्यात मुकाट्याने बसून राहते. मुलाची आई त्या मुलीला हुसकून लावण्याचा खूप प्रयत्न करते. पण ती जेव्हा काही केल्या घरातून बाहेर निघत नाही, तेव्हा मुलाची आई तिला सून म्हणून पत्करते. पण मुलगा जर तिला पत्नी म्हणून स्वीकारायला तयार नसला, तर ते प्रकरण ग्रामपंचायतीकडे जाते. ग्रामपंचायत मग दोघांनाही दंड करते. पण असे विवाह फारसे होत नाहीत.

सर्वसामान्यपणे विवाहाचा विधी पुढीलप्रमाणे असतो– विवाह ठरला की साखरपुडा होतो. साखरपुड्याच्या दिवशी वधूचे आप्तेष्ट वरगृही जातात. तिथे त्यांना मेजवानी मिळते. पंचायतीसमोर मुलीचा बाप किंवा थोरला भाऊ वराला आपल्या मांडीवर बसवतो व त्याच्या हातात लोखंडी तोडा घालतो किंवा त्याच्या गळयात मंतरलेला ताईत बांधतो. त्यानंतर थोड्याच दिवसांनी वराकडची माणसे वधूच्या घरी जातात व तिथेही असाच विधी होतो. वराचा बाप वधूच्या गळयात एक दागिना घालतो. त्यानंतर विवाहाचा मुहूर्त ठरवतात. विवाहाला जितके दिवस अवकाश असेल, तितक्या गाठी एका दोरीला बांधतात. नवरा मुलगा रोज एक गाठ सोडतो. शेवटची गाठ सोडली की त्या दिवशी वराकडील लोक वधूगृही जायला निघतात. वऱ्हाडी मंडळी गावाच्या सीमेवर पोचल्यावर तिथे मांझी त्यांचे स्वागत करतो व स्त्रिया त्यांचे पाय पाण्याने धुतात. नंतर सर्वजण वधूच्या घरी जाऊन नृत्य करतात व गाणी गातात. मध्यरात्रीपूर्वी थोडा वेळ नवरा मुलगा भावी सासऱ्याच्या खांद्यावर बसून लग्नाच्या मांडवात येतो. वधूला तिचा मेहुणा किंवा भाऊ एका उथळ टोपलीत बसवून आणतो. मग वर वधूच्या कपाळी शेंदूर किंवा कुंकू लावतो. त्या वेळी जमलेले लोक 'हरिबोल' अशी घोषणा करतात. वरील सिंदूरदान हा विवाहातील मुख्य विधी असतो. तो झाला, की वधूवर पतिपत्नी होतात. दिवसभर वधू-वरांनी उपास केलेला असतो. यानंतर दोघे एकत्र जेवण करतात. या जेवणानंतर वधूला वराच्या गोत्रात प्रवेश मिळाला, असे समजतात.

नंतर वरपक्षाचे लोक गावाबाहेरच्या राईत परततात. पण लगेच त्यांना तिथून बोलावून आणून एक बकरी देतात. मग माराङबुरु या देवाला व पितरांना भाताची दारू अर्पण करतात. उपस्थितांनाही दारू वाटतात. याच वेळी वरपिता देजाची रक्कम देतो.

दुसऱ्या दिवशी वधू-वरांना गुण्यागोविंदाने नांदण्याचा उपदेश करतात. त्यानंतर वरपक्ष वधूला घेऊन आपल्या गावी जायला निघतो. गावात पोचल्यावर वधू-वरांना घरोघर नेऊन गूळपाणी देतात. मांझीच्या घरी शेवटच्या दिवंगत मांझीला वधू-वर अर्घ्य देतात. दुसऱ्या दिवशी वधूपक्षाच्या लोकांना वराच्या घरी मेजवानी देतात. जेवणापूर्वी वधू-वर 'आम्ही एकमेकांना मदत करू व जे काय असेल ते वाटून खाऊ' अशी शपथ घेतात. संताळ विवाहात पुरोहित नसतो.

संताळ लोकात प्रेमविवाहही बरेच होतात. या लोकांत बहुपत्नीत्वाची प्रथा नाही. पण पहिली बायको वांझ निघाली तर पुरुष दुसरी बायको करतो.

या लोकांत घटस्फोट रूढ आहे. व्यभिचार, एकमेकांशी न पटणे किंवा बायको चेटूक करते, असे नवऱ्याला वाटणे, इ. घटस्फोटाची कारणे असतात.

प्रत्येक संताळ व्यक्तीच्या जीवनात जनम चटियर (जन्मविधी), काको चटियर किंवा समाजाचे सदस्यत्व मिळवण्याचा विधी, विवाहविधी आणि अंत्यसंस्कार हे चार महत्त्वाचे विधी मानलेले आहेत.

जनम चटियर – मुलगा झाल्यास पाचव्या दिवशी आणि मुलगी झाल्यास तिसऱ्या दिवशी हा विधी करतात. गावातील सर्व लोक त्या दिवशी नवजात मुलाच्या घरी जमतात. प्रथम पुजारी, नंतर मांझी आणि त्यानंतर पंचायतीचे इतर सदस्य व मग गावकरी अशा क्रमाने न्हावी सर्वांची हजामत करतो. नंतर तो मुलाचे जावळ काढतो. मग पुरुष तळचावर जाऊन स्नान करतात. त्यानंतर स्त्रिया स्नानाला जातात. सुईण एक दोरा हळदीत बुडवून मुलाच्या कमरेला बांधते. नंतर ती पीठ पाण्यात कालवून ते सर्वांवर शिपडते. म्हणजे सर्व लोक शुद्ध होतात. मग ती मुलाचे नाव जाहीर करते. नावे परंपरागत नियमांनुसार ठेवतात. थोरल्या मुलाला आजोबाचे, दुसऱ्याला आईच्या वडिलांचे, तिसऱ्याला बापाच्या चुलत्याचे, अशी त्याविषयी परंपरा असते. मुलींना आजीचे, आईच्या आईचे, बापाच्या चुलतीचे अशी क्रमाने नावे ठेवतात. या नावाबरोबरच त्याला दुसरेही एक नाव ठेवतात.

शेवटी कडुलिंबाची पाने घातलेली तांदुळाची पेज सर्वांना प्यायला देतात. या विधीने घर आणि गाव यांचे जननाशौच संपते. मुलाला त्याच्या बापाच्या गोत्रात प्रवेश मिळून होडचा म्हणजे माणसाचा दर्जा प्राप्त होतो व त्याला व्यक्ती म्हणून नाव मिळते.

काको चेटियर – या विधीने मुलाला समाजात प्रवेश मिळतो. तो केल्याशिवाय कुठल्याही व्यक्तीला विवाह करता येत नाही किंवा मृत्यूनंतर त्याचे दहन करता येत नाही. हा विधी स्त्रियांना लागू नाही. साधारणपणे चार ते बारा वर्षांच्या दरम्यान मुलाचा हा विधी करतात. त्या दिवशी गावकरी मुलाच्या घरी जमतात. पुजारी व त्याची पत्नी आणि मांझी व त्याची पत्नी यांना तेलहळद लावून स्नान घालतात. मग सर्वांना दारू वाटतात. सर्वजण प्रसंगोचित गीते गातात व नृत्य करतात. नंतर गुरु पुराण सांगतो. ते संपल्यावर पुन्हा एकदा मद्यपान होते आणि गावकरी मुलाला समाजाचे सदस्यत्व दिल्याचे जाहीर करतात.

बासरी हे संताळांचे आवडते वाद्य आहे. लहानपणापासून संताळ मुलांना त्यांचे वडील बासरी वाजवायला शिकवतात. संध्याकाळी जोगमांझीच्या घरासमोरच्या मोकळ्या जागेत तरुण बासरी व ढोल वाजवतात. त्यांचा आवाज ऐकून मुली वेणीफणी करून व केसात फुले माळून तिथे नाचायला जातात.

पंचायत – प्रत्येक गावाचा कारभार पंचायतीमार्फत चालतो. तिच्यात सात अधिकारी असतात, ते असे– (१) मांझी किंवा पाटील (२) परणिक किंवा उपपाटील (३) नायके किंवा नातो नायके (हा गावचा पुरोहित किंवा भगत असतो. सालाबाद होणाऱ्या जत्रांच्या वेळी गावातील देवतांची हा पूजा करतो.) (४) कुडाम नायके (हा जंगलात राहणाऱ्या स्थानिक भुतांना संतुष्ट करतो.) (५) जोग-मांझी (हा गावातील तरुणांच्या नैतिक आचरणांवर नजर ठेवतो.) (६) जोग-परणिक. (हा परणिकांचा मदतनीस असतो.) (७) गोडेत (हा पंचायतीचा सांगकाम्या किंवा निरोप्या असतो). खेड्याच्या स्थापनेच्या वेळी या अधिकाऱ्यांची निवड होते. त्यांचा अधिकार बहुधा वंशपरंपरा असतो. गावाच्या हिताचे रक्षण करणे हे त्यांचे मुख्य काम असते.

दहा ते बारा खेड्यांचा मिळून एक गट बनतो. त्याचे नेतृत्व करणाऱ्याला परगणा किंवा परगणाइत म्हणतात. या गटाचीही एक पंचायत असते. तिच्यात सर्व खेड्यांचे मांझी व प्रतिष्ठित लोक यांचा समावेश असतो. दोन खेड्यांमधले वादग्रस्त प्रश्न या पंचायतीत सोडवतात.

देवधर्म – संताळांच्या पुराणानुसार ठाकूरदेवाने पृथ्वीला पाण्यातून वर काढली. ठाकूर हा सर्वश्रेष्ठ देव असून, तो पृथ्वीवर पाऊस पाडतो व धान्य निर्माण करतो. तो आकाशात राहतो. पृथ्वीवरील माणसांकडून त्याची अवज्ञा झाली, तर तो त्यांच्यावर कोपतो. प्रत्येक संताळाने त्याची जन्मात एकदा तरी पूजा केली पाहिजे. ठाकूरदेवाशिवाय हे लोक आणखी पुष्कळ बोंगांना भजतात. हे सर्व दुष्ट आत्मे असून, डोंगर, जंगल, नदी, तळे, इ. ठिकाणीं त्यांचे वास्तव्य असते. ते माणसाचे वाईट करू शकतात. तसेच ते रोगराईही आणतात. म्हणून त्यांना संतुष्ट करण्यासाठी हे लोक कोंबडी, बकरी यांचे बळी देतात. माराङ-बुरू, मेरेको, जहर एरा, गोसाय एरा, परगणा बोंगा, मेंझी बोंगा हे मुख्य बोंगा होत. पहिल्या पाच बोंगाचे वास्तव्य प्रत्येक संताळ खेड्याला लागून असलेल्या साल वृक्षांच्या बनात असते. ठाकूर व बोंगा यांच्याशिवाय ते आणखी अनेक राक्षस, वेताळ किंवा भुते मानतात.

संताळांमध्ये गुप्तपणे जादूटोणा करणारे लोक असतात. विशेषेकरून स्त्रियाच या कृत्यांत अधिक भाग घेतात. पुष्कळ वेळा स्त्रिया बोंगांना वश करून त्यांच्याकरवी आपली कामे करून घेतात. त्या माणसांचे यकृत निकामी करून त्यांना मारून टाकतात.

सण-उत्सव – संताळ दरवर्षी इरोक सिम, हरियर सिम, इरी गुंडली नाडवाई, जंथर, सोहराय, माघ सिम, बाहा छटा पोरोब, जत्रा पोरोब आणि पटा किंवा पोटा परब हे सण साजरे करतात. पहिल्या सात सणांच्या वेळी मुख्य बोंगांची पूजा करतात. पहिले पाच सण शेतीच्या निरनिराळ्या अवस्थांशी संबंधित आहेत. इरोक सिमचा पेरणीशी आणि हरियर सिमचा भाताच्या

उगवणीशी संबंध आहे. इरी गुंडली नाडवाई या सणात इरी व गुंडली या ज्वारीची पहिली कणसे देवाला अर्पण करतात. जंथर हा उत्सव मार्गशीर्ष महिन्यात येतो. त्या वेळी नवीन पिकलेले भात देवाला अर्पण करतात. पौषात त्यांचा सोहराय हा सण येतो. तो सुगीचा सण पाच दिवस व पाच रात्री चालतो. पौष अमावास्येला ते पितरांची पूजा करतात. त्या दिवशी ते शिकारीला जातात.

माघ सिम हा माघ महिन्यात येतो. माघ महिन्यात संताळांचे वर्ष संपते. या वेळी गुराख्याचे नोकरीचे सर्व जुने करार संपतात. सर्व वार्षिक पगार या वेळी चुकते करतात. माघ सिम या सणाला राजकीय व सामाजिक महत्त्वही आहे. या वेळी पंचायतीचे सर्व अधिकारी आपली त्यागपत्रे समाजाच्या हाती देतात. तसेच शेतकरीही आपला जमिनीवरचा अधिकार सोडून देतात. पण हे सर्व नावालाच असते. कारण राजिनामा दिल्यानंतर दहा दिवसांनी मांझी सर्व खेड्याची एक सभा बोलावतो. जमलेल्या सर्व लोकांना तो दारू पाजतो आणि सांगतो, 'लोकांची इच्छा असल्यास मांझी म्हणून राहण्याची आपली तयारी आहे.' बहुधा त्याची फेरनिवड होते. इतर अधिकारीही असेच निवडून येतात. शेतकऱ्यांनाही आपल्या जमिनी परत मिळतात. सर्वांचे पुन्हा मदिरापान होते व लोक घरी परततात.

बाहा हा वसंत ऋतूतील सण असतो. या वेळी मोहाची फुले व इतर फळेफुले देवाला अर्पण करतात. हे सर्व सण जहेर्थानमध्ये साजरे होतात. माघ सिम तेवढा एखाद्या जलाशयाशेजारी होतो. या सर्व सणात सहभोजन, नृत्य, गीत व मदिरापान यांची रेलचेल असते. तसेच या वेळी अनेक देवदेवतांना कोंबडा, बकरी वगैरेंचा बळीही दिला जातो.

हे लोक जादूटोणा आणि बोंगा यांच्यापासून आपले रक्षण करण्यासाठी जान गुरू आणि ओझा गुरू यांची मदत घेतात. ओझा गुरू हा माणूस आजारी पडला असता त्याला झाडपाल्याची औषधे देतो आणि मंत्रतंत्र म्हणून बलिदानही करतो. संताळांना झाडपाला, वनस्पती आणि मुळे यांपासून मिळणारी तीनशेपाच प्रकारची औषधे माहीत आहेत. गुरांसाठी त्यांच्याकडे पंधरा औषधे आहेत. याशिवाय ते गंडेदोरे व ताईत यांचाही उपयोग करतात.

**मर्तिकप्रथा** – मनुष्य मरण पावला, की घरातील लोक शोक करतात, प्रेताला तेल लावतात; नंतर मृताचे आप्तेष्ट मृताला कोपाई नदीच्या तीरावर नेऊन जाळतात. तत्पूर्वी गरीब लोक मृताच्या अंगावरील कपडे काढून घेतात व त्याला डहाळ्यांनी झाकतात. मृताचा थोरला मुलगा किंवा जवळचा नातेवाईक चितेला अग्नी देतो. तो एक काटकी घेऊन तिला मृताच्या कपड्याचा तुकडा गुंडाळतो आणि तिने चिता पेटवतो. नंतर जमलेले लोक चितेत एक एक ढलपी टाकतात. प्रेत जळल्यावर त्याच्या कवटीचा थोडा भाग व गळ्याजवळची दोन हाडे काढून घेऊन ती धुवून एका मडक्यात ठेवतात. नंतर मृताचे आप्त सोडून बाकीचे लोक गुत्त्यात जाऊन दारू पितात.

सुगीचा सण झाल्यावर साधारणपणे डिसेंबर महिन्यात मृताच्या अस्थी दामोदर नदीत किंवा कोपई नदीत विसर्जित करतात. या विधीला जान बाहा असे म्हणतात. नदीच्या किनाऱ्यावर मृताच्या व पूर्वजांच्या नावे कापड, पितळेची थाळी, दातवणाच्या काड्या वगैरे ठेवतात. या विधीमुळे मृतात्मा आपल्या पितरांत जाऊन मिळतो, अशी समजूत आहे. पुण्यात्मे स्वर्गात व पापात्मे नरकात जातात, असे हे मानतात.

पितरांच्या नावे बलिदान करून त्या दिवशी मृताच्या नातेवाइकांना व गावकऱ्यांना जेवण देतात. एवढ्याने मृताशौच संपते. देशपरत्वे अंत्यविधीत थोडा फरक आढळतो.

इ. स. च्या तेराव्या शतकापूर्वी कमीत कमी एक हजार वर्षे अगोदर संताळांचा हिंदूंशी संबंध आला. संताळांच्या पूर्वजांनी राम-लक्ष्मणांना साहाय्य केले होते, असा उल्लेख रामायणात आढळतो. इ. स. च्या तेराव्या शतकानंतर संताळांचा मुसलमानांशी आणि अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात इंग्रजांशी संबंध आला. पण त्यांच्या जीवनावर मुसलमानी संस्कृतीचा फारसा परिणाम झाला नाही.

संताळांच्या संस्कृतीवर हिंदू धर्माचा मोठा प्रभाव पडलेला आहे. भौतिक, आर्थिक, सामाजिक, धार्मिक व भाषिक या संताळजीवनाच्या सर्व घटकांवर हिंदू धर्माचा पगडा दिसून येतो. उदा० त्यांचा सर्वश्रेष्ठ देव ठाकूर याची नावे हिंदू आहेत. पूर्वी त्यांच्या खेड्यात पंचायत असते. हे पंचायत नाव हिंदू आहे. पूर्वी हे लोक प्रेते पुरीत असत. पण हिंदूंशी संबंध आल्यापासून ते ती जाळू लागले आहेत.

संताळांच्या खरवार किंवा खेरवार चळवळीने त्यांना हिंदू धर्माच्या अधिक जवळ आणले. ही चळवळ सामाजिक व राजकीय अशी दुहेरी होती. इ. स. १८७१ मध्ये भाग्रत नावाच्या पुढाऱ्याने संताळांमध्ये राम कांडो या नावाने रामाची उपासना सुरू केली. त्यानंतर इतरही हिंदू देवतांची उपासना सुरू झाली. कोंबडी, बकरी, इ. प्राण्यांचे मांस रामाच्या उपासकांनी वर्ज्य केले. रोज आंघोळ करणे, स्त्रियांनी सांजवात लावणे, ईश्वरचिंतन करणे वगैरे प्रथा राम कांडोच्या उपासकांनी संताळांमध्ये सुरू केल्या. त्यामुळे संताळ मोठ्या प्रमाणावर हिंदू बनले. काही तर जानवेही घालू लागले. जानवे धारण करणारे लोक पूर्णतः शाकाहारी बनले. ते स्वतःला जानवे न घालणाऱ्या लोकांपेक्षा

श्रेष्ठ समजतात आणि त्यांच्याशी बेटीव्यवहार करीत नाहीत. अशा रीतीने संताळांमध्ये एक नवीन हिंदू जमात निर्माण झाली.

खरवार चळवळीचा राजकीय भाग हा आर्थिक उन्नतीचा होता. त्यासाठी संताळांना आपल्या प्रदेशातील उपऱ्यांना घालवून देऊन स्वतःच्या प्रदेशाचे स्वतः मालक व्हायचे होते. ही चळवळ सुरवातीला चांगलीच प्रखर होती. पण नंतर ती मंदावली. पण स्वातंत्र्योत्तर काळात तिने नवीन रूप धारण केले आहे. भारतीय संघराज्यात संताळांना आदिवासी लोकांचे स्वायत्त राज्य हवे आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून संताळांचा ख्रिश्चन मिशनऱ्यांशी संबंध आला. इ. स. १८६० साली इंग्लंडच्या चर्च मिशनरी सोसायटीच्या कार्यकर्त्यांनी संताळ परगण्यात कार्य करायला प्रारंभ केला. त्यानंतर इतरही अनेक मिशनरी तिथे काम करू लागले. संताळांची आर्थिक स्थिती त्या वेळी फार खालावलेली होती. तरीही ख्रिश्चन मिशनऱ्यांना त्यांना आपल्या धर्मात मोठ्या प्रमाणावर ओढता आले नाही. अगदी थोडे संताळ ख्रिस्ती धर्मात गेले.

ख्रिश्चन मिशनऱ्यांनी संताळांमध्ये एक महत्त्वाचे कार्य केले. ते म्हणजे त्यांनी त्यांच्या बोलीसाठी स्वतंत्र लिपी तयार करून अनेक शाळा सुरू केल्या. संताळी भाषेचे पहिले व्याकरण इ. स. १८५२ साली प्रकाशित झाले. एका मिशनने संताळी भाषेत पेरा हर नावाचे नियतकालिक सुरू केले. ते अजूनही चालू आहे.

कालमानानुसार संताळांच्या जीवनात बदल झाले आहेत. हल्ली जंगले कमी झाली आहेत; तसेच जंगलसंरक्षणाबाबतचे कायदेही कडक झाले आहेत. त्यामुळे संताळांना कंदमुळे व जंगली फळे मिळेनाशी होऊन त्यांच्या आहारात कमतरता निर्माण झाली आहे. त्याचप्रमाणे त्यांच्या हंडिया आणि पाउरा या दारूवरही दारूबंदीकायद्यानुसार नियंत्रण आले आहे. त्या लोकांत आता सिगारेट व हुक्का यांचाही प्रसार झाला आहे. संताळ स्त्रिया आता हिंदू स्त्रियांप्रमाणे साड्या नेसू लागल्या आहेत.

त्यांच्या शेतीच्या उत्पन्नातही आता बदल झाला आहे. त्यांचे मुख्य पीक भात असले, तरी त्याच्या जोडीला ते गहू, जव, बटाटा, हरभरा, तंबाखू, इ. पिकेही काढतात.

कर्जबाजारीपणा, जमिनी जाणे, सारा थकणे, इ. गोष्टींमुळे संताळ लोक आता मोठ्या प्रमाणात चहाच्या मळ्यांत मजुरी करतात. लोहमार्ग तयार करणे, कोळसा आणि अभ्रक यांच्या खाणी, भाताच्या गिरण्या, पोलादाचे कारखाने, इ. ठिकाणींही ते आता मजूर म्हणून कामे करू लागले आहेत.

पूर्वी संताळांची जमिनीवर वैयक्तिक मालकी नसून गावाची सामायिक मालकी असे. पण आता जमिनीवर वैयक्तिक मालकी प्रस्थापित झाली आहे. त्यामुळे व्यक्ती आता कुटुंबावर किंवा समाजावर अवलंबून राहत नाही.

संताळांच्या राजकीय संस्थांतही आता बदल झाला आहे. मांझी आणि परगणा हे आता लोकांऐवजी सरकारला जबाबदार आहेत. त्यांच्याकडे सारा वसूल करण्याचे व कायद्याचे पालन करण्याचे पोलिस-अधिकार देण्यात आले आहेत. त्यामुळे मांझी आणि परगणा यांचा एक नवा सुखवस्तू वर्ग निर्माण झाला आहे. स्वातंत्र्योत्तर काळात संताळांना लोकसभेत आणि विहार, प. बंगाल व ओडिसा यांच्या विधिमंडळात काही जागा मिळाल्या आहेत.

संताळ प्रदेशात आता रुग्णालये व दवाखाने निघाले आहेत. तसेच काही ठिकाणी प्राथमिक व माध्यमिक शाळा सुरू झाल्या आहेत. ह्या लोकांत त्यामुळे साक्षरतेचे प्रमाण वाढत आहे. काही तरुण विश्वविद्यालयातही शिकत आहेत.

बीरभूममधील संताळांना शांतिनिकेतन अगदी जवळ असल्यामुळे त्याच्या संपर्काने ते बंगाली हिंदूंचे अधिकाधिक अनुकरण करीत आहेत. बंगाली भाषेचा त्यांनी स्वीकार केला आहेच. पण हिंदू देवतांची उपासनाही त्यांच्यामध्ये मोठ्या प्रमाणात सुरू झाली आहे. कालांतराने हा समाज म्हणजे हिंदूंचाच एक पोटभाग होईल. [ वन्यजाति, जाने. १९७१, एप्रिल १९७१; दि संताल, ए स्टडी इन कल्चर चेंज, श्री. नवेंदु दत्त–मजुमदार, १९५६; ॲनल्स ऑफ रूरल बेंगॉल, हंटर ]

**संतूर** एक वाद्य. हे स्वरमंडलासारखेच असते. याला शंभर तारा असतात. प्राचीन काळातील शततंत्री या शब्दाचा अपभ्रंश संतीर किंवा संतूर असा झाला असणे संभवनीय आहे. स्वरमंडळ किंवा कानून यात एकेक तार एकेका स्वराला लावलेली असते. पण संतूरमध्ये चार चार तारा जुन्या पद्धतीप्रमाणे एकेका स्वराला लावतात. लाकडी पेटीवर एका बाजूला असलेल्या पट्टीला तारांचे एक टोक बांधून चार चार अशा लहान तारा लहान गोलाकार घोड्यांवरून घेऊन दुसऱ्या बाजूला असणाऱ्या लहान लोखंडी खुंट्यांना पिळून घेतात. दोन घोड्यांच्यामध्ये चार चार तारा अशाच एका स्वराला लावलेल्या असतात. थोडा वक्र आकार असणाऱ्या अशा दोन नाजूक काड्यांनी तारांवर आघात करून हे वाद्य वाजवतात. आघात होताच त्या स्वराचा नाद गुंजत राहतो. त्यामुळे अनुरणनामुळे येणारे नादमाधुर्य या वाद्यात निर्माण होते. पण हा नाद नियंत्रित करण्याची सोय नसल्याने संतूरच्या वादनाला मर्यादाही पडल्या आहेत. हे वाद्य काश्मीरमध्ये प्रचारात आहे. सांप्रत त्याला बरीच लोकप्रियता मिळू लागली आहे. [ भा. वा. इ. ]

**संतोषी माता** एक देवता. भारताच्या बऱ्याच भागात हिची मंदिरे आहेत. हिची चतुर्भुज मूर्ती असते. चार हातांपैकी दोन हातांत तलवार व त्रिशूळ ही आयुधे असतात. उर्वरित दोन हातांपैकी एक हात वरद मुद्रेत असतो आणि दुसऱ्या हातात प्रसादपात्र असते.

संतोषी मातेचे व्रतही करतात. व्रतावधी चार महिन्यांचा असतो. या व्रताला प्रारंभ करण्यापूर्वी व्रतधारी व्यक्तीने एकवीस गाठी मारलेला एक पिवळा दोरा गळयात घालायचा असतो. पुरुषाने तो दोरा उजव्या हातात बांधला तरी चालतो. शुक्रवारी उपवास करून देवीची पूजा करतात. मग तिची कहाणी ऐकतात. नंतर फुटाणे व गूळ यांचा प्रसाद वाटतात. दर तीन शुक्रवारांनंतर एका ब्राह्मणाला भोजन देतात. उद्यापनाच्या वेळी पाच ब्राह्मण व एक कुमारिका यांना भोजन व यथाशक्ति दक्षिणा देऊन अहेर करतात. व्रताच्या दिवशी कोणत्याही आंबट पदार्थांचे सेवन करायचे नाही आणि ते पदार्थ कोणाला खायला द्यायचे नाहीत, असा एक कडक निर्बंध या व्रतात पाळायचा असतो. फल– दारिद्र्यनाश व पुत्रप्राप्ती.

या देवीची पदे, आरत्या व कहाण्या, इ. साहित्यही निर्माण झाले आहे. [संतोषी माता व्रतकथा]

**संधिकाल** सकाळी सूर्योदयापूर्वी आणि संध्याकाळी सूर्यास्तानंतर अठ्ठेचाळीस मिनिटांच्या (दोन घटिका) काळाला संधिकाल असे म्हणतात. मध्याह्नकालासही संधिकाल असे म्हटले जाते. या काळाला पर्वकाल असा दुसरा शब्द आहे. धर्मशास्त्रात आणि रूढीने प्रचलित असे या कालासंबंधीचे काही विधिनिषेध पुढीलप्रमाणे सांगितले आहेत –

संधिकालात झोपणे, खाणे-पिणे, भोजन करणे, इ. गोष्टी निषिद्ध आहेत. कारण या काळात यमदंडाचे भय असते. मध्याह्नीच्या अथवा अस्तसमयीच्या सूर्याचे दर्शन घेत नाहीत. वेदमंत्रांचे पठण करीत नाहीत. अग्निहोत्री या कालापूर्वीच अग्नी प्रज्वलित करतात; पण संधिकाल टळून गेल्यावर होम करतात. गरोदर स्त्रिया या वेळी दरवाज्यात उभ्या असल्या तर त्यांच्या गर्भांना अपाय होतो, असे मानतात. सायंकाळी घरी परतणारी गुरेही गर्भवतीने पाहू नयेत असा संकेत आहे. कारण भुतेखेते गुरांच्या पायांत प्रवेश करून घरात शिरण्याचा प्रयत्न करीत असतात. कोणतीही हिंसात्मक कृत्ये पर्वकालात करीत नाहीत. शपथ घेणे, शिवीगाळ करणे, भांडणतंटा करणे, अभद्र व असत्य बोलणे इ. गोष्टी या कालात आवर्जून टाळतात.

गावात कोणत्याही प्रकारचा साथीचा रोग पसरला तर तोडगा म्हणून सर्व प्रकारची धान्ये एकत्र शिजवून त्याचा रस या कालात गावाच्या सीमेवरून शिंपडावा, असे म्हणतात.

सायंकालच्या संधिकालात जास्त वाईट शक्ती असते, त्यामुळे या वेळी कोणी कोणाला पांढरी वस्तू देत नाहीत, प्रवासाला निघत नाहीत, पैशांची देवाणघेवाण करीत नाहीत. या कालात केलेले वाईट कृत्य अधिकच वाईट होते. अश्रुमोचनही या वेळी करीत नाहीत. त्याचप्रमाणे कोणत्याही शुभ कार्याचा प्रारंभही करीत नाहीत. पाहा – पर्व. [ की. पॉ. ]

**संध्या** (१) एक उपासना. ही संध्यासमयी त्रैवर्णिकांनी नित्य करायची असते. मुलाचे उपनयन होताच त्याच्या संध्येला प्रारंभ होतो. 'अहरहः सन्ध्यामुपासीत'=उपनीत पुरुषाने सकाळ-संध्याकाळ ही उपासना केलीच पाहिजे, अशी श्रुती आहे. संध्या केल्याने पुण्य मिळत नाही; पण न केल्याने दोष लागतो, असा संकेत आहे. स्वतःसाठी सामर्थ्य आणि प्रेरणा मिळण्यासाठी संध्येची आवश्यकता प्रतिपादली आहे. मागच्या संध्येपासून चालू संध्येपर्यंत माझ्याकडून घडलेल्या पातकांचा नाश होऊन परमेश्वराची प्रीती व्हावी म्हणून मी संध्योपासना करतो, असा संध्येचा संकल्प आहे.

संध्येत आचमन, प्राणायाम, मार्जन, अघमर्षण, अर्घ्यप्रदान, आसनविधी, न्यास, ध्यान, गायत्रीजप, उपस्थान, दिग्वंदन व गुरूला अभिवादन असे लहान लहान भाग असले तरी, आचमन, प्राणायाम, अर्घ्य, जप व उपस्थान हे मुख्य विधी होत.

आचमनात पहिल्या तीन नावांनी उजव्या तळव्यावरून उदक प्राशन करायचे असते. प्राणायामात गायत्री मंत्राने पूरक, कुंभक, रेचक असा त्रिविध प्राणायाम करायचा असतो. मग वरीलप्रमाणे संकल्प. त्यानंतर 'आपो हि ष्ठा...' या तीन मंत्रांनी मार्जन. नंतर मंत्राचमन. यात तळहातावर पाणी घेऊन प्राशन करायचे असते. पापनाश हा त्याचा हेतू असतो. नंतर दुसरे मार्जन. पुढे 'ऋतं च सत्यं च' या तीन मंत्रांनी अघमर्षण. अघमर्षणात शरीरातल्या पापपुरुषाचे निःसारण करायचे असते. मग गायत्री मंत्राने सकाळी सूर्याला व संध्याकाळी वरुणाला अर्घ्य द्यायचे. मग आसनविधी, न्यास व गायत्रीचे ध्यान करायचे. नंतर १०८ किंवा २८ किंवा १० यांपैकी शक्य तेवढा गायत्री जप अर्थानुसंधान राखून करायचा. नंतर उपस्थान म्हणजे स्तुतियुक्त प्रार्थना. सकाळी सूर्याचे व सायंकाळी वरुणाचे उपस्थान करायचे. मग स्वतःभोवती फिरून दाही दिशांना नमस्कार करायचा. शेवटी स्वतःच्या गोत्र – प्रवरांचा उच्चार करून गुरूला वंदन करायचे. मग उदक सोडून द्विराचमन करायचे असते.

संध्येतले बहुतेक सगळे मंत्र आरोग्यासाठी, बुद्धीचे तेज वाढविण्यासाठी व पापनाश होण्यासाठी विनियुक्त आहेत.

सकाळी, दुपारी व संध्याकाळी अशी तीन वेळा संध्या करावी, असे सांगितले आहे; पण प्रातःसंध्या व सायंसंध्या करण्याचा प्रघात असून, माध्याह्नसंध्या प्रचारात नाही.

संध्या म्हणजे सूर्यबिंबात असणाऱ्या आदित्य देवतेचे ध्यान होय. तोच आदित्य आपल्याही हृदयात असतो. त्याचेही ध्यान संध्येच्या द्वारे होते. प्रातःसंध्या सूर्योदयापूर्वी आणि सायंसंध्या सूर्यास्ताच्या पूर्वी करावी. नदीतीरी किंवा पवित्र स्थळी वसून संध्या करावी. प्रातःसंध्या उभ्याने व पूर्वाभिमुख होऊन आणि सायंसंध्या बसून व वायव्येस तोंड करून करावी. संध्या करताना बोलू नये. मनू म्हणतो, की दीर्घकाल संध्योपासना करीत असल्यामुळे प्राचीन ऋषींना दीर्घायुष्य, बुद्धिमत्ता, वैभव, कीर्ती व आत्मिक उन्नती लाभली. [ कु. धा. सं. नि.; सं. म. ]

(२) ब्रह्मदेवाची मानस कन्या. शिवपुराणानुसार शिवाची पत्नी. हिला पाहून एके दिवशी ब्रह्मदेवाला कामवासना झाली. त्यामुळे संध्येने निजदेह टाकून हरिणीचे रूप घेतले. ब्रह्माही हरिणरूप घेऊन हिच्या मागे लागला. शिवाने ते पाहिले व बाण मारून हरिणरूपी ब्रह्मदेवाचे मस्तक उडविले. मग ब्रह्माने निजरूप घेऊन शिवाची प्रार्थना केली. हे हरिणमस्तक म्हणजेच मृगशीर्ष होय. कालिकापुराणात थोडी वेगळी हकिगत आहे, ती अशी – ब्रह्मदेवाने धरलेल्या अभिलाषेला घाबरून संध्येने देहत्याग केला व दुसऱ्या जन्मी ती अरुंधती झाली. मग तिचा वसिष्ठाशी विवाह झाला आणि तिला शक्ती वगैरे अनेक पुत्र झाले. [ प्रा. च. को. ]

(३) एक तांत्रिक देवता. हिचे रूपविधान असे – षडानना, द्वादशभुजा, श्वेतपद्मातील केसरावर बसलेली, ताम्रवर्णा, षोडशवर्णा, मुख श्वेत, देह पीत व कमरेखाली नील असे तिचे वर्ण आहेत. [ लक्ष्मीकुलार्णव. ]

**संध्यावळी** एक देवता. हिला सरस्वती असेही एक नाव आहे. पंढरपूर क्षेत्राच्या पूर्वेला, अगदी नजिक, भीमा व शिशुमाला या दोन नद्यांच्या संगमावर या देवतेचे स्थान आहे. या स्थानाला पंढरपूर क्षेत्राचे पूर्वद्वार असे म्हणतात. विष्णूने हिची स्थापना केली. ब्रह्मदेव इथे अश्वत्थरूपात असतो. सहा महिने या देवीची सेवा केली असता, माणूस कोणत्याही पापातून मुक्त होतो, अशी श्रद्धा आहे. संगमात स्नान व उपोषण करून देवीचे दर्शन घेतले असता ब्रह्मलोकप्राप्ती होते, असे म्हटले आहे.

या संगमात सारस्वत नामक तीर्थ आहे. या तीर्थात स्नान करून देवीचे दर्शन घेणारा मोठा वक्ता होतो, असे मानतात. कार्तिक शुद्ध अष्टमीला हिचे दर्शन विशेष फलदायी होते.

संध्यावळी अनेकांची कुलदेवताही आहे. [ पंढरीमाहात्म्य. ]

**संनिहित** उ. भारतातील एक प्राचीन तीर्थ. हे कुरुक्षेत्रात आहे. हे तीर्थ म्हणजे पूर्वीच्या ब्रह्मसराचाच एक भाग आहे, असे म्हणतात. या ठिकाणी श्राद्ध करणारा पितृऋणातून मुक्त होतो, असे विष्णुधर्मोत्तरपुराणात म्हटले आहे. सूर्यग्रहणाच्या वेळी इथे मोठी यात्रा भरते. वामनद्वादशी, कृष्णजन्माष्टमी, दसरा, या प्रसंगीही इथे यात्रा भरतात. या सरोवराच्या तीन बाजूंना घाट असून, पश्चिमघाटानजिक लक्ष्मीनारायणाचे सुंदर मंदिर आहे. [ कल्याण – तीर्थांक ]

**संन्यास** आश्रमव्यवस्थेतील चौथा आश्रम. संन्यास म्हणजे काम्य कर्मांचा न्यास (त्याग) होय, अशी त्याची व्याख्या आहे. याविषयी गीतेतले वचन (गीता १८.२)असे –

काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।।

अर्थ – काम्य कर्मांचा त्याग म्हणजे संन्यास होय, असे विद्वान म्हणतात.

संन्यास केव्हा करावा याविषयी मनुस्मृतीत एक श्लोक दिला आहे, तो असा (६.३३)–

वनेषु च विहृत्यैवं तृतीयं भागमायुषः ।
चतुर्थमायुषो भागं त्यक्त्वा सङ्गान् परिव्रजेत् ।।

अर्थ – अशा प्रकारे आयुष्याचा तिसरा भाग वनामध्ये घालवून आयुष्याच्या चौथ्या भागात सर्वसंगपरित्याग करून संन्यस्त व्हावे.

संन्यासग्रहणाविषयी दोन पक्ष आहेत. तीन आश्रमांचे यथाविधि आचरण केल्यानंतर संन्यास घेणे हा पहिला पक्ष व 'यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्' (=ज्या दिवशी वैराग्य उत्पन्न होईल त्याच दिवशी, आश्रमक्रम विचारात न घेता संन्यासाश्रम करावा) हा दुसरा पक्ष होय. संन्यासाचे विविदिषा व आतुर असे दोन प्रकार आहेत. पहिला सविधी व दुसरा अविधी असतो. विविदिषा म्हणजे आत्मज्ञानाच्या इच्छेने घेतलेला संन्यास होय. आता मृत्यू जवळ येऊन ठेपला आहे, असे वाटल्यानंतर चतुर्थाश्रमात मरावे, या हेतूने तडकाफडकी घेतलेला संन्यास म्हणजे आतुर संन्यास होय.

संन्यासात कर्मांचा त्याग करायचा किंवा कर्मफलाचा त्याग करायचा, याविषयी श्री. विनोबा विवेचन करतात, ते असे –

संन्यासात कर्मे स्वरूपतः सोडण्याची अपेक्षा नाही. पण १४ व्या अध्यायातील सात्त्विक, राजस आणि तामस हे त्रिविध वर्गीकरण पाहता राजसतामस कर्मविभागाचा स्वरूपतः आणि सर्वथा त्याग अभीष्ट ठरतो. फलत्याग ही सार्वभौम कोटी आहे. कर्मांचा स्वरूपतः त्याग या अर्थाने संन्यास ही मर्यादित कोटी आहे (गीताई – शब्दार्थ कोश).

**संन्याशाचे चार प्रकार** – (१) कुटीचक – मुलाने बांधून दिलेल्या खोपटात राहणारा व त्रिदंड, कमंडलू आणि शिखा-सूत्र ठेवणारा. हा पुत्र व आप्त यांच्याकडे भिक्षा मागतो. (२) बहूदक–त्रिदंड, कमंडलू व भगवी वस्त्रे धारण करणारा. याने सात घरी भिक्षा मागायची असते. मांस, मीठ व शिळे अन्न वर्ज करायचे असते. (३) हंस – हा गावात एक रात्र व नगरात पाच रात्री राहतो. हा ११ महिने भिक्षा मागतो व एक महिना उपोषण करतो. (४) परमहंस – हा झाडाखाली, ओसाड घरी किंवा स्मशानात राहतो. एक वस्त्र वापरतो किंवा नग्न राहतो. याला धर्मकर्मांचे विधिनिषेध नसतात. याला सर्वांच्या घरची भिक्षा चालते. हा द्वंद्वमुक्त, समदर्शी व सर्वात्मा असतो. बाह्याचारावरून तो जणू वेडाच वाटतो.

हे चार प्रकार क्रमाने उत्तरोत्तर श्रेष्ठ होत. संन्यासी हा निर्भय व अभयदानी असतो. तो जीवनाचे अभिनंदन किंवा मरणाचा शोक करीत नाही. तो दोहीकडे निरपेक्ष असतो. तो प्रणवाचा उपासक असून सम्यक्‌दर्शनसंपन्न, सर्वभावांविषयी निस्पृह व सर्व द्वंद्वांच्या अतीत असतो. या आश्रमात मनुष्याला सर्वतंत्रस्वतंत्र होऊन अध्यात्मशील वनण्याचा अवसर मिळतो. जोवर तो विशिष्ट स्थान, कुटुंब, ग्राम, देश, कुल, धर्म, व्यवसाय व पद यांच्याशी संबद्ध असतो, तोवर त्याच्या बुद्धीचे आणि विचारांचे क्षेत्र मर्यादित राहते. संन्यास घेतल्यावर त्याने या सर्व सीमा ओलांडून पलिकडे जायचे असते. याच आश्रमात त्याला व्यक्तित्वाच्या असीमतेचा अनुभव घडू शकतो व अंतिम सत्याच्या प्राप्तीसाठी आपल्या साऱ्या शक्तीचा पूर्ण उपयोग करता येतो.

वानप्रस्थातले मनन, चिंतन आणि तप हे संन्याशाच्या ब्रह्म-ज्ञानाला साधक होते. ब्रह्मज्ञान झाल्यावर मग त्याला या साध-नांची आवश्यकता उरत नाही. अशा ब्रह्मज्ञानी संन्याशांचे उल्लेख उपनिषदांतून आढळतात. असे संन्यासी ब्रह्मसंस्थ होतात, असे छांदोग्यात म्हटले आहे. मनू म्हणतो (६-८१)

> **अनेन विधिना सर्वांस्त्यक्त्वा सङ्गाञ्छनैः शनैः।**
> **सर्वद्वन्द्वविनिर्मुक्तो ब्रह्मण्येवावतिष्ठते ॥**

अर्थ – असा संन्यासी पुत्रकलत्रक्षेत्रादींच्या ठिकाणी ममत्व स्वरूप असलेल्या सर्व आसक्तींना टाकून व हळूहळू मानापमा-नादी द्वंद्वांपासून मुक्त होऊन ब्रह्माच्या ठिकाणी आत्यंतिक लय मिळवतो.

अशा यतीच्या संपर्काने काय होते, त्याविषयीचा आचारें-दूतला श्लोक असा –

> **यतीनां दर्शनं चैव स्पर्शनं भाषणं तथा ।**
> **कुर्वाणः पूयते नित्यं तस्मात् पश्येत नित्यशः ॥**

अर्थ – यतीचे दर्शन, स्पर्शन किंवा भाषण यांचा लाभ झाला असता कर्ता पवित्र होतो. म्हणून नित्य यतीचे दर्शन घ्यावे.

संन्याशाच्या मानसिक वृत्तीचे विवेचन करताना मनू म्हणतो, की तो मैत्री भावनेचे संवर्धन करतो. कोणी शिवीगाळ केल्यास किंवा भांडायला उठल्यास गप्प राहतो. कोणाचा अनादर करीत नाही. कोणाशी वैरभाव धरीत नाही. त्याच्यापासून कोणत्याही प्राण्याला भय असत नाही. कोणी रागावला तरी त्याची वाणी अनाक्रोश असते. तो सांसारिक विषयांत रस घेत नाही. जे अध्यात्माचे चिंतन करीत नाहीत, त्यांच्या मरणोत्तर दुर्गती-बद्दल मात्र त्याला विचार करावासा वाटतो.

**संन्यासाचे अधिकारी** – संन्यास घेण्याला अधिकारी कोण, या प्रश्नाविषयी अनेकांची अनेक मते आहेत. मुंडक व बृहदार-ण्यक यांत संन्यासाच्या संदर्भात ब्राह्मण असा शब्द आलेला आहे (मुंडक १.२.१२; बृहद. ३.५.२). हा ब्राह्मण शब्द उपलक्षण समजून कित्येक धर्मशास्त्री त्यात सर्व द्विजांचा म्हणजे त्रैवर्णि-कांचा अंतर्भाव करतात. जाबालोपनिषदावरून वाटते, की संन्यास कोणत्याही वर्णाला घेता येतो. वैराग्य उत्पन्न झाल्यास कोणीही संन्यासी व्हावे, असे महाभारतात म्हटले आहे (शांति. ६३.११.१२). कात्यायनमते त्रैवर्णिकांना संन्यासाचा अधि-कार असून स्त्रियांना मात्र तो वर्ज्य आहे. युधिष्ठिर संन्यासी होऊ पाहत होता, तेव्हा तुला तसा अधिकार नाही, असे कोणी त्याला सांगितले नाही. रघुराजा संन्यास घेऊन गावाबाहेर आवसा घालून राहिला व मुनिवृत्तीने वागून त्याने परमात्म-दर्शन करून घेतले, असे कालिदासाने रघुवंशात (४.२५) म्हटले आहे. महाभारतात तर शूद्रालाही सर्व आश्रमांचा अधिकार सांगितला आहे. (शांति. – ६१.१२–१४).

मात्र असे असले तरी ब्राह्मणाबाचून इतर वर्णांत संन्यासाचा प्रघात नव्हता. त्रैवर्णिक आणि शूद्र संन्यासी केवळ अपवाद-भूतच समजावे. म्हणून जिथे जिथे संन्यासाचे वर्णन येते, तिथे तिथे ब्राह्मणच अभिप्रेत असलेला दिसतो. 'मी संन्यास ब्राह्म-णासाठीच सांगितला आहे,' असे मनूने तर स्पष्टच म्हटले आहे (६.९७). शंकराचार्यांनीही हेच मत प्रतिपादले आहे. (बृहद. ३.५.१ वरचे भाष्य).

**संन्यासग्रहणाचा विधी** – संन्यासग्रहणास उत्तरायण प्रशस्त होय. आतुराला दक्षिणायनही प्रशस्त आहे. संन्यासेच्छूने प्रथम काही दिवस गुरूजवळ राहून यतिधर्माचा अभ्यास करावा. मग गायत्रीजप, रुद्रजप, कूष्मांड होम, इत्यादींनी देहशुद्धी केल्या-वर रिक्ता तिथीला (चतुर्थी, नवमी, किंवा चतुर्दशी) देव-कालांचे स्मरण करून अधिकारप्राप्तीसाठी काही दाने द्यावी. आठ श्राद्धे करावी. दुसऱ्या दिवशी सहा केस ठेऊन इतर सर्व

केसांचे वपन करवावे. स्नान करून संचित द्रव्यादिक असेल ते ब्राह्मण व पुत्र यांना द्यावे. कौपीन, छाटचा, इत्यादींस कावेचा रंग देऊन ठेवावा. ब्राह्मणांकडून वांबूचा दंड आणवून ठेवावा. कंथा व पादुका याही तयार करून ठेवाव्या. नंतर संन्यास-ग्रहणाचा संकल्प करावा. गणपतिपूजन, पुण्याहवाचन, मातृका-पूजन व नांदीश्राद्ध करावे. देवतांचा नामजप करावा. काही वैदिक सूक्ते म्हणावी. तीन मुठी सातूंचे पीठ प्रणवमंत्र म्हणून तीनदा प्राशन करावे. नाभीला स्पर्श करावा. दूध व दही. यांनी मिश्रित घृत किंवा पाणी तीनदा प्राशन करून उपवास करावा. मग सावित्रीप्रवेश व ब्रह्मान्वाधान करावे. सायंसंध्या, होम व वैश्वदेव करून अग्नीजवळ जागरण करावे.

दुसऱ्या दिवशी सकाळी, वैश्वानर स्थालीपाक करावा. प्राणाय स्वाहा, इ. पाच मंत्रांनी समिधा, चरू व आज्य या तीन द्रव्यांचा होम करून 'पुरुषायेदं न मम' असा त्याग म्हणावा. मग समिधा, चरू व आज्य यांपैकी प्रत्येक द्रव्याच्या चाळीस आहुतींनी विरजाहोम करावा. तो समाप्त करून ब्रह्मचाऱ्यांना काही दाने द्यावी. मग तीन वेळा यजुर्मंत्र म्हणून अग्नीची ज्वाला प्राशन करीत स्वतःच्या ठिकाणी अग्नीचा समारोप करावा. घरातून बाहेर निघताना पुत्रादिकांना पुढील आशीर्वाद द्यावा –

सर्वे भवन्तु वेदाढ्याः सर्वे भवन्तु सोमपाः ।
सर्वे पुत्रमुखं दृष्ट्वा सर्वे भवन्तु भिक्षुकाः ।।

अर्थ – सगळे वेदसमृद्ध होवोत. सगळे यज्ञात सोमपान कर-णारे होवोत, सगळे पुत्रमुख पाहून संन्यासी होवोत.

त्यानंतर 'न मे कश्चित् नाहं कस्यचित्' (= माझा कोणी नाही व मी कोणाचा नाही) असे पुत्रादिकांस सांगून त्यांचा निरोप घ्यावा. नंतर जलाशयावर जाऊन जलानेच जलात तीन ओंजळी अर्घ्य द्यावे.

पुत्रैषणा वित्तैषणा लोकैषणा सर्वैषणा मया परित्यक्ता
अभयं सर्व भूतेभ्यो मत्तः स्वाहा ।

अर्थ – मी पुत्राची, धनद्रव्याची, यश– कीर्तीची आणि सग-ळ्याच गोष्टींची इच्छा टाकून दिली आहे. माझ्यापासून आता सर्व भूतांना अभय आहे.

असे म्हणून पुन्हा एकवार जलात उदकांजली सोडावी.

नाभिप्रमाण उदकात पूर्वाभिमुख उभे राहून 'तरत्समन्दी ...' या सूक्ताचा पाठ करावा. आणि 'यापुढे पुत्रैषणा व लोकैषणा यांच्यातून बाहेर पडलेला मी आजपासून भिक्षेवर जगेन' असे म्हणून आणखी एक उदकाची ओंजळ पाण्यात सोडावी. शिखा उपटून यज्ञोपवीतासह ती उदकात टाकावी. विष्णूची प्रार्थना करावी. दिगंबर होऊन उत्तराभिमुख पाच पावले चालावे. कौपीन व वस्त्र परिधान करावे. हातात दंड, कमंडलू व आसन या वस्तू घ्याव्या. गुरूला शरण जावे. गुरूचे पाय धरावे. 'मला ब्रह्मज्ञान सांगा' असे त्याला प्रार्थावे. गुरूने शंखात पाणी घेऊन व ते प्रणवमंत्राने अभिमंत्रित करून त्याने शिष्याला अभिषेक करावा. शांतिपाठ म्हणून शिष्याच्या मस्तकावर हात ठेवावा. पुरुषसूक्ताचा पाठ करावा. शिष्याच्या हृदयावर हात ठेवून त्याच्या उजव्या कानात 'तत्त्वमसि' हे किंवा दुसरे कोणते तरी महावाक्य उच्चारून त्याचा अर्थ सांगावा. नंतर संप्रदायानुसार शिष्याचे नाव ठेवावे. त्या नावाच्या पुढे तीर्थ, आश्रम वगैरे-पैकी एखादे उपपद असावे.

नंतर एखाद्या पुण्यदिवशी एखाद्या गृहस्थाने संन्याशाला समोर बसवून मृत्तिका व उदक याने त्याचे हातपाय धुवावे. मग त्या यतीने कटीची शुद्धता करून कटिसूत्र व कौपीन धारण करावे. कमरेभोवती वस्त्र गुंडाळावे. यतीने ज्येष्ठ यतींना नमस्कार करावा. गृहस्थ पुरुषांनी यतीला नमस्कार करावा. यतीने 'नारायण' असा आशीर्वाद द्यावा.

अग्निहोत्र्याला संन्यास घ्यायचा असेल तर त्याने काही इष्टी कराव्या. औपासनाग्नीत प्राणादिहोमापासून विरजाहोमापर्यंत कर्मे करावी. अरणी, मुसळ व उखळ यांवाचून बाकीची काष्ठ-पात्रे आहवनीय अग्नीत दहन करावी. त्या अग्नीचा स्वतःच्या ठिकाणी समारोप करावा. अरणी गार्हपत्य अग्नीत टाकून अग्नीचा स्वतःच्या ठिकाणी समारोप करावा. उखळ व मुसळ यांचे दक्षिणाग्नीत हवन करून त्या अग्नीचाही समारोप करावा. नंतर औपासनाग्नीचाही समारोप करावा. इतर गोष्टी वर सांगित-लेल्या संन्यासविधीप्रमाणे कराव्या.

**संन्याशाचा अंत्यसंस्कार** – संन्यासी मृत झाल्यावर पुत्राने किंवा शिष्याने वपन करून घडाभर पाणी अभिमंत्रित करावे व रुद्रसूक्त, विष्णुसूक्त व इतर काही ऋचा म्हणत, यतीला स्नान घालावे. अंगाला चंदन व गळयात पुष्पमाला घालावी. दीड हात खड्डा करून तो पंचगव्याने प्रोक्षित करावा. दंड तीन ठिकाणी मोडून यतीच्या उजव्या हातावर ठेवावा. भूर्भुवःस्वः हा मंत्र म्हणून शंखाने यतीचे मस्तक फोडावे. खड्डयात मीठ टाकावे. मग त्यांत मृत यतीला बसवावे. खड्डा भरून घ्यावा. जमलेल्या सर्वांनी नदीत स्नान करून घरी जावे. कुटीचकाचे दहन करावे; बहूदकाला पुरावे, हंसाला जलसमाधी द्यावी व परमहंसाला त्याच ठिकाणी पुरावे, असे वचन आहे. संन्याशाची प्रेतक्रिया करू नये.

कर्त्याने केवळ दहा दिवस रोज तर्पण करावे. लिंगपूजन, पायसवली व दीपदान या गोष्टी कराव्या. अकराव्या दिवशी पार्वण श्राद्ध करावे. बाराव्या दिवशी नारायणबली करावा. तेराव्या दिवशी तेरा संन्यासी किंवा तेरा ब्राह्मण यांना भोजन

घालावे. भाद्रपद कृष्ण पक्षात द्वादशीला यतीचे महालयश्राद्ध करावे, असेही सांगितले आहे.

**संन्याशाचे धर्म –** संन्याशाने सकाळी उठावे. ब्रह्मणस्पतीच्या मंत्रांचा पाठ करावा. देहशुद्धी व दंडशुद्धी करावी. प्रणवाने दंतधावन करावे. स्नान करून प्राणायाम व केशवादी नामांनी तर्पण करावे. सूर्योपस्थान करून त्रिकाल विष्णुपूजा करावी. निर्वाहासाठी माधुकरी भिक्षा मागावी. भिक्षान्न व्याहृतिमंत्रांनी सूर्यादिदेवतांना व भूतांना भूमीवर द्यावे. शेप अन्न विष्णूला निवेदित करून भक्षण करावे. चंडी, विनायक, इ. देवतांचा नैवेद्य भक्षण करू नये. भोजनानंतर आचमन करून सोळा प्राणायाम करावे. संन्याशाला भिक्षा घालताना दात्याने प्रथम त्याच्या हातावर उदक घालून मग भिक्षा वाढावी. पुन्हा उदक घालावे. यतीने वर्षाकालाखेरीज इतर काली गावात एक रात्र व नगरात पाच रात्री राहावे. पावसाळ्यात चार महिने एका ठिकाणी राहून आठ महिने भ्रमण करावे. महाक्षेत्रात राहणाऱ्यांनी भ्रमण करू नये. भिक्षाटन, जप, स्नान, ध्यान, शुचिर्भूतपणा व देवपूजन या सहा गोष्टी यतीला आवश्यक आहेत. मंचक, श्वेतवस्त्र, स्त्रियांच्या गोष्टी, चंचलता, दिवसा झोप व वाहन या सहा गोष्टी यतीचा अधःपात करणाऱ्या आहेत. यतीची पात्रे माती, वेळू, काष्ठ किंवा भोपळा यांची असावी. त्याने इतर कोणत्याही विषयांचे अध्ययन न करता केवळ वेदार्थाचेच मनन–चिंतन करावे. मनू म्हणतो (६-४६)–

> दृष्टिपूतं न्यसेत् पादं वस्त्रपूतं जलं पिबेत् ।
> सत्यपूतां वदेद्वाचं मनःपूतं समाचरेत् ।।

**अर्थ–** संन्याशाने नीट पाहून (कोणा जंतूवर पाय पडणार नाही अशा बेताने) पाऊल टाकावे. पाणी गाळून प्यावे. सत्याने पवित्र अशी वाचा बोलावी. आणि मनात कोणत्याही प्रकारचे प्रतिषिद्ध संकल्प येऊ न देता पवित्र असे आचरण करावे.

संन्याशाला कोणतेही निर्बंध किंवा विधिनिषेध नसतात, अशी सांप्रत लोकसमजूत आहे. पण पूर्वी ती तशी नव्हती. केवळ बाह्यचिन्ह हे धर्माचे लक्षण नसून, कृती हेच धर्मसाधन होय, असे मनू व याज्ञवल्क्य सांगतात (६.६६; ३.६५). सत्य, अहिंसा, अक्रोध, ऱ्ही, शौच, इ. धर्म सर्वांनाच लागू आहेत, असे स्मृती सांगतात. काही ठिकाणी कलिवर्ज्य प्रकरणात संन्यासाचाही कलियुगात निषेध केलेला आढळतो; पण अजूनही संन्यास घेण्याची पद्धत चालूच आहे.

**आश्रमपरिवर्तन–** एकदा संन्यासाश्रम स्वीकारल्यावर त्याचा त्याग करून पुनश्च गृहस्थाश्रमात येता येत नाही. अशा पुरुषाला राजाने आपल्या राज्यातून हाकलून द्यावे, असे स्मृतिकार सांगतात. दक्षस्मृतीत (७.३३) तर असे सांगितले आहे, की 'संन्यास घेतल्यावर जो कोणी तद्विरुद्ध वर्तन करील, त्याला राजाने हद्दपार करावे आणि तसे करताना त्याच्या अंगावर कुत्र्याच्या पायाचे चिन्ह उमटवावे.

**संन्यास कल्पनेचा इतिहास–** वेदांत वानप्रस्थ व संन्यास हे शब्द नाहीत. संन्यासी शब्दाचा प्रतिशब्द वाटेल असा यती शब्द वेदांत येतो; पण त्याचा जादूटोणा करणारा असा कुत्सितार्थ आहे. वेदांतील यती व यातू (जादू) यांत एकच यत् हा धातू आहे. यातू करणारे ते यती म्हणजे जादूगार असा त्याचा वेदांतला अर्थ आहे. तथापि वातवसन म्हणजे वात हेच ज्यांचे वस्त्र आहे, असे मुनीही ऋग्वेदात आढळतात (ऋ. १०.१३६.२). पण अशा मुनींना चतुर्थाश्रमी असे म्हणता येणार नाही. यावरून संहिताकालात वानप्रस्थ व संन्यास हे आश्रम म्हणून प्रस्थापित झाले नसावे, असे वाटते. पुढे उपनिषत्काळात ते चालू झाले. उपनिषदांच्या काळी यज्ञयाग व कर्मकांड यांच्यावरची वैदिकांची श्रद्धा ढळली व ज्ञान-वैराग्याचे महत्त्व वाढले. याच विचारक्रांतीतून संन्यासाश्रम उगम पावला. उपनिषदांत चारही आश्रमांची कल्पना आहे; पण तसे प्रत्यक्ष शब्द मात्र नाहीत. याज्ञवल्क्य आणि मैत्रेयी यांची कथा बृहदारण्यकात आली आहे. तिथे याज्ञवल्क्य म्हणतो. 'हे मैत्रेयी, मी आता घर सोडून प्रव्रज्या घेणार आहे, म्हणजेच संन्यास करणार आहे' (४.५.२.) प्रव्रज्या हा संन्यासाचाच पर्याय शब्द आहे. बौद्ध वाङ्मयातही तो आढळतो. पण संन्यासाचे विशद वर्णन आढळते, ते जाबालोपनिषदात. मुंडकोपनिषदाच्या कालापर्यंत चार आश्रमांची कल्पना दृढ होऊन, त्यात संन्यासाला प्राधान्य दिले गेले. पाणिनीच्या काळापर्यंत संन्यासी किंवा परिव्राजक ही संस्था संघटित झाली. संन्यासधर्माच्या उपदेशासाठी भिक्षुसूत्रेही निर्माण झाली. पुढे धर्मसूत्रांनी तर पूर्वीच्या तीन आश्रमांबरोबरच संन्यासाचेही वर्णन केले.

**संन्यास आणि वेदान्त–** आद्य शंकराचार्य, विवेकानंद, रामतीर्थ, इ. अनेक महान संन्यासी भारतात होऊन गेले. शंकराचार्यांनी या देशात धर्माची व्यवस्था लावून एक धर्मसाम्राज्य स्थापिले. विवेकानंद आणि रामतीर्थ यांनी परदेशांत भारतीय संस्कृतीचा आणि भारतीय जीवनमूल्यांचा महिमा उद्घोषित केला. शंकराचार्यांना जसे तोलामोलाचे शिष्य लाभले, तसेच विवेकानंद व रामतीर्थ यांनाही लाभले. या सर्वांची शिष्यपरंपरा फार मोठी आहे. त्यांचे ज्ञानप्रसाराचे कार्य आजही चालू आहे. हे सगळे संन्यासी वेदान्ती होते.

वेदान्त आणि संन्यास यांचा निकटचा संबंध आहे हे कळून येते. वेदान्तसाधना म्हणजे आत्मसाधना होय. संन्यास हे तिचे एक आवश्यक अंग आहे. जीवनात जे जे काही मूल्यवान असेल त्या त्या सर्वांचा त्याग करून आत्मप्राप्तीचा साधक ह्याने

असते. समस्त मानवी बंधने आणि स्त्री, गृह, पुत्र, वित्त यांचे पाश तोडूनच कोणीही अध्यात्ममार्गावर आरूढ होऊ शकतो. म्हणून केवळ वेदान्ताचेच नव्हे; तर सर्व प्राचीन दर्शनांचेच संन्यास हे एक आवश्यक अंग ठरले आहे. भौतिक पदार्थ आणि आत्मा यांच्यामध्ये तत्त्वतः विरोध नाही. कारण 'सर्वं खल्विदं ब्रह्म' असा सिद्धान्तच आहे. पण माणसाचा सामान्य दृष्टिकोण भौतिक मूल्यांवर अधिक जोर देणारा असतो आणि हीच गोष्ट अध्यात्माला प्रतिकूल ठरते. मोक्षाच्या चरमावस्थेत जेव्हा समस्त सत्तेच्या एकतेचा अनुभव घडतो, तेव्हा सहजपणे भौतिक प्रवृत्तींचे आध्यात्मीकरण होऊन जाते आणि भौतिक आणि आध्यात्मिक अशा दोन्ही जीवनांत पूर्ण सामंजस्य प्रस्थापित होते.

त्या दृष्टीने संन्यासाचे मूल्य फार मोठे आहे. आत्म्याच्या गूढ रहस्यांविषयी जिज्ञासा जागृत होण्यासाठी भौतिक मूल्ये व शरीर-भोग यांचा आधी त्याग करावा लागतो. कारण इंद्रिय-भोगांची आसक्ती व भौतिक मूल्यांचा मोह ही माणसाला अविद्येच्या अंधारात बुडवतात व सत्यदर्शनाच्या कामी बाधा उत्पन्न करतात. मात्र याचा अर्थ भौतिक मूल्यांचे महत्त्व झिडकारणे किंवा त्यांचा निषेध करणे असा नाही. आध्यात्मिक मूल्यांच्या सिद्धी-साठी आणि त्याचबरोबर शेवटी त्यांना नवीन व महत्तर मूल्य प्रदान करण्यासाठी हा त्याग त्यांना करायचा असतो. भौतिक मूल्यांचा त्याग हा त्यागासाठी त्याग नव्हे. तो उपवासासारखा आहे. बाह्य दृष्टीने भोजनाचा त्याग कष्टकारक खरा, पण कष्ट हा उपवासाचा उद्देश नव्हे; सुखद शरीरमनःस्वास्थ्याची प्राप्ती हा त्याचा उद्देश असतो. पण वेदान्ताच्या बाहेर असलेल्या काही योगसंप्रदायांनी संन्यासाला आत्यंतिक शरीरकष्टांपर्यंत नेऊन पोचविले. त्यांच्यासाठी संन्यास हे केवळ साधन नव्हते; तर साध्य होते आणि अंतिम सिद्धान्तही होते.

एक मुंडकोपनिषद सोडल्यास अन्य कोणतेही उपनिषद संन्यासाला अंतिम सिद्धान्ताच्या रूपात प्रतिपादीत नाही. उपनिषदांतले आचार्य हे सर्व मानवी गुण आणि भावना यांनी संपन्न होते. भौतिक मूल्यांची कदर त्यांनाही होती.

कित्येक धर्मशास्त्री ब्राह्मणांनाच संन्यासाचा अधिकार असल्याचे सांगतात. पण ब्राह्मणांनाच संन्यासाचा अधिकार आणि संन्याशालाच ब्रह्मज्ञानाचा अधिकार असे मानल्यास ते अन्य सर्वच वर्णांना ब्रह्मज्ञानाच्या अधिकारापासून वंचित करणे ठरेल. वेदान्तशास्त्रात अशा प्रकारचा कोणताही प्रतिबंध नाही. प्राचीन उपनिषदांत कित्येक क्षत्रिय ब्रह्मज्ञानी या स्वरूपात आढळतात. त्याचबरोबर ब्रह्मज्ञानासाठी अशा क्षत्रियांना नम्रतापूर्वक शरण जाणारे आणि त्यांच्याकडून ब्रह्मविद्येचे ग्रहण करणारे असे जिज्ञासू ब्राह्मणही आढळतात. जनकराजा व प्रवाहण जैवली हे क्षत्रिय राजे उच्च कोटीचे ब्रह्मवेत्ते होते. रैक्व हा तर एक गाडीवान होता. अशी आणखी कितीतरी उदाहरणे सांगता येतील. उपनिषदांमध्ये केवळ संन्याशालाच ब्रह्मज्ञानाचा अधिकार आणि केवळ ब्राह्मणच संन्यासाचा अधिकारी अशा अर्थाचा पुसटसाही संदर्भ आढळत नाही. खरे तर ब्रह्मज्ञानावर ब्राह्मणांचा एकाधिकार कधीही नव्हता. वेदान्तानुसार ब्रह्म हे समस्त भूताचा आत्मा आहे आणि प्रत्येक जीवाला ब्रह्मज्ञानाचा अधिकार आहे. जाती, वर्ण, धर्म, हे भेद मनुष्यकृत आहेत. सत्याच्या शोधक्षेत्रात त्यांना काही स्थान नाही. शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रभाष्याच्या प्रारंभी ब्रह्मज्ञानाचे अधिकारी होण्यासाठी जी चार साधने सांगितली, ती सर्व नैतिक व आध्यात्मिक आहेत; वर्णाश्रमधर्मांपैकी त्यांतले एकही नाही. [ उ. र.; ऋ. ब्र. स.; हि. ध.; ध. शा. वि.; ध. सिं.; भा. वि. प.; हिं. इ. आ. ]

**संबर** एक बौद्ध देवता. संवर हा हेवज्राचेच एक रूप आहे. हा एकमुख व द्विभुज असून, याच्या मस्तकावर विश्ववज्र व अक्षोभ्यमूर्ती असते. त्याच्या गळयात मुंडमाला व कपाळाभोवती कपालमाला असते. त्याने व्याघ्रचर्म पांघरलेले असते. त्याचा वर्ण नील असून, तो त्रिनेत्र असतो. त्याचे वाहन कालरात्री व चिन्हे वज्र आणि घंटा ही आहेत. तो आलीढ मुद्रेत असून, सर्व वर्णांपासून त्याची उत्पत्ती झाली आहे. तो प्रज्ञा वज्रवाराही हिच्या आलिंगनात असतो. चतुर्मुख आणि द्वादशभुज असे याचे आणखी एक रूप आहे. [ इं. बु. इ. ]

**संबळ** एक अवनद्ध वाद्य. कालिकापुराणानुसार, शिवाने पार्वतीच्या संतोषासाठी याची निर्मिती केली. संबळ हे तबल्याप्रमाणे दोन वाद्यांची जोडी असून, ती दोन्ही वाद्ये एकत्र जोडलेली असतात. हे दोन्ही भाग लाकूड कोरून पोकळ केलेले असतात. डाव्या हाताने वाजविण्याचा भाग कधी कधी तांब्याचाही बनविलेला असतो. याचा एक भाग लहान व एक भाग मोठा असतो. त्यांचा आकार पंचपात्राप्रमाणे असतो. लहान वाद्याच्या तोंडाचा घेर मोठ्या वाद्याच्या घेरापेक्षा निम्मा असतो. यांची तोंडे कातडयाने मढवून सुताच्या दोरीने आवळलेली असतात.

संबळ तरवडाच्या किंवा वेताच्या बारीक छडीने वाजवितात. मात्र या छडयांचा पुढील भाग छत्रीच्या दांडयाप्रमाणे वळविलेला असतो. या छडयांची लांबी सुमारे एक ते सव्वा फूट असते. छडया हातातून निसटू नयेत, म्हणून त्यांच्या दुसऱ्या बाजूंना कापड गुंडाळलेले असते.

सनईवादनाच्या वेळी साथीला हे वाद्य असते. वासरीच्या वेळी साथ करताना हे वाद्य हातांनी वाजवितात. गोंधळी लोक गोंधळाच्या वेळी आवर्जून याचा उपयोग करतात.

हे वाद्य शांत व उग्र असून, कोमल व तीव्रही आहे. तसेच ते ऐक्य व विग्रह करणारे आहे, असेही समजतात. या वाद्यातील खर्ज स्वर निघणाऱ्या भागाला बंब किंवा धम असे म्हणतात आणि दुसऱ्याला झील म्हणतात.

वेदकालीन स्तंबर किंवा स्तंबल वाद्य ते हेच असावे, असे म्हटले जाते. [ सु. वि. को.; भा. वा. इ. ]

**संभल** उत्तर भारतातील एक प्राचीन तीर्थस्थान. उत्तर प्रदेशाच्या मुरादाबाद जिल्ह्यात हे ठिकाण असून, कलियुगाच्या अखेरीला इथल्या विष्णुयश ब्राह्मणाच्या घरी भगवान कल्की अवतार घेणार अशी श्रद्धा आहे.

या नगरीला सत्ययुगात सत्यव्रत, त्रेतात महद्‌गिरी व द्वापरात पिंगल अशी नावे होती. सांप्रत म्हणजे कलियुगात तिला संभल असे म्हणतात. इथे हरिमंदिर नावाचे एक अतिविशाल व प्राचीन मंदिर आहे. मुसलमान समाज आता या मंदिरात नमाज पढतो. याव्यतिरिक्त चंद्रेश्वर, भुवनेश्वर व संभलेश्वर अशी शिवस्थानेही इथे आहेत.

संभल नगरीत अडुसष्ट तीर्थे व एकोणीस कूपतीर्थे आहेत. भाद्रपद मासात या प्रत्येक तीर्थस्थानी यात्रा भरते. आणि कार्तिक शुद्ध चतुर्थी व पंचमी या तिथींना या तीर्थांची परिक्रमा करण्याची पद्धत आहे. परिक्रमेचा घेर अठ्ठेचाळीस मैलांचा आहे. [ कल्याण–तीर्थांक ]

**संभूयसमुत्थान** पातीचा, भागीदारीचा किंवा समाईक धंदा अथवा अनेकांनी मिळून केलेला व्यवसाय. याला सहक्रिया असेही म्हणतात. यज्ञामध्ये पुरोहित जे काम करतात, त्यात सहक्रियाच असते. त्यांना जी दक्षिणा मिळते ती कशी वाटून घ्यावी, याबद्दलचे नियम मनुस्मृतीत आलेले आहेत (८.२०६–२१०). प्रत्येकाचे काम आणि त्याचे स्थान लक्षात घेऊन, त्या प्रमाणात त्याला दक्षिणा द्यावी आणि हेच धोरण अन्य भागीदारीत सांभाळावे, असे तिथे म्हटले आहे (८.२११). व्यापारी, गायक, नर्तक, नट, इ. कलावंतांच्या भागीदारीचा उल्लेख नारद (६.१) व कात्यायन (६.२४) यांच्या स्मृतींत आला आहे. समाईक व्यवसाय करणाऱ्या लोकांच्या अंगी कोणते गुण असावे व त्यांनी आपला लाभ कोणत्या प्रमाणात वाटून घ्यावा, यासंबंधीचे काही नियम बृहस्पतीने दिले आहेत. एखाद्या भागीदारावर अफरातफरीचा आरोप आला तर, त्याला शपथ घेऊन किंवा दिव्य करून, आपण निर्दोषी आहोत हे सिद्ध करावे लागे.

याज्ञवल्क्यस्मृतीने एका स्वतंत्र अध्यायात या विषयाची चर्चा केली असून, धर्मकृत्यातील ब्राह्मणांनाही तेच नियम लागू आहेत, असे म्हटले आहे. यावरून मनूच्या काळी यज्ञक्रियेचा व्याप मोठा होता, पण उद्योगधंद्यात फारशी भागीदारी नव्हती असे दिसते. या उलट याज्ञवल्क्याच्या काळात उद्योगधंद्यातील भागीदारी वाढली, असे अनुमान करता येते. [ हि. घ. ]

**संमोहना** एक शाक्त देवता. ही रक्तवर्णा, रक्तवसना, त्रिनयना आणि अर्धचंद्रधारिणी असते. तिच्या हाती कमळ, पाश, अंकुश व कपाल ही आयुधे असतात. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**संमोहिनी** एक तांत्रिक देवता. ही त्रिनेत्रा, अर्धचंद्रधारिणी आणि अष्टभुजा असते. अक्षमाला, इक्षुचाप, पाश, दोन कमळे, अंकुश, शर (बाण) व पुस्तक ही आयुधे तिच्या हाती असतात. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**संयमनी** यमाची नगरी. ही मेरुपर्वताच्या दक्षिणेला असल्याचा उल्लेख भागवत (५.२१.७, ५.३.३), मत्स्य (१२३.२२), इ. पुराणांत आहे. सांदीपनीच्या मृत पुत्राला परत आणण्यासाठी कृष्ण व बलराम या नगरीला गेले होते (भाग. पु. १०.४५.४२–४६). त्याचप्रमाणे द्वारकानिवासी एका ब्राह्मणाचा मृत बालक परत आणण्यासाठी अर्जुनही संयमनी नगरीला गेला होता (भाग. पु. १०.८९.४३). [ पु. इं. ]

**संयुत्त निकाय** एक बौद्ध ग्रंथ. सुत्तपिटकाच्या पाच निकायांपैकी तिसरा निकाय. संयुत्त निकायात लहानमोठ्या अशा सुत्तांचा संग्रह आहे. म्हणून त्याला हे नाव पडले. यात एकूण २८८९ सुत्ते आहेत. बहुधा प्रत्येक सुत्तात बुद्धाचा उपदेश आहे. बुद्धाच्या कालातील भारताच्या ग्रामीण जीवनाचे सुंदर चित्र यात पाहायला मिळते.

संयुत्त निकाय हा ग्रंथ सगाथ वर्ग, निदान वर्ग, खंध (खंध) वर्ग, षडायतन (सळायतन) वर्ग व महा वर्ग अशा पाच वर्गांत विभागलेला असून, त्यांत अनुक्रमे ११, १०, १३, १० व १२ सुत्ते आहेत.

सगाथ वर्गात देवता, देवपुत्त, कोसल, मार, भिक्खुनी, ब्राह्मण, वंगीस, वन, यक्ख व सक्क अशी अकरा संयुत्ते आहेत. यातील सूत्रांत गद्याबरोबर गाथाही आहेत. म्हणून याला सगाथ

वर्ग असे नाव मिळाले आहे. पहिल्या दोन संयुत्तांत देवता व देवपुत्र यांची बुद्धाशी झालेली प्रश्नोत्तरे आहेत.

कोसलराज प्रसेनजित हा बुद्धाचा भक्त होता. तो धर्मचर्चा करण्यासाठी मधून मधून बुद्धाकडे येत असे. कोसल संयुत्तात धर्मचर्चेचे वर्णन आहे. याव्यतिरिक्त कोसल आणि मगध या दोन देशांत ज्या राजनैतिक घडामोडी चालल्या होत्या, त्यांचेही वर्णन यात आहे.

मार संयुत्तात, बुद्ध व त्याचे शिष्य यांनी मारावर कसा विजय मिळवला, त्याचे वर्णन आहे.

भिक्खुनी संयुत्तात दहा भिक्षुणींचे काव्यमय आख्यान आहे.

ब्रह्मा संयुत्तात ब्रह्म्याने बुद्धाला लोकांना उपदेश करण्याची विनंती केली आहे.

ब्राह्मण संयुत्तात एका ब्राह्मणाच्या प्रव्रज्येचे वर्णन आहे.

वंगीस संयुत्तात वंगीश नामक भिक्षूने कामवासनेवर कसा विजय मिळवला, ते सांगितले आहे.

वन संयुत्तात वनदेवता पथभ्रष्ट भिक्षूंना कशा प्रकारे सम्यक् मार्गावर आणतात, त्याचे कथन आहे.

यक्ख संयुत्तात भयानक यक्षांचे वर्णन असून, बुद्धाने त्यांना धर्मोपदेश करून त्यांचे कसे दमन केले, ते सांगितले आहे.

सक्क संयुत्तात इंद्राचे माहात्म्य दाखवले आहे.

निदान वर्गात निदान, अभिसमय, धातु, अनमतग्ग, कस्सप, लाभसक्कार, राहुल, लक्खण, ओपम्म व भिक्खू अशी दहा संयुत्ते आहेत.

निदान संयुत्तात प्रतीत्यसमुत्पादाचे वर्णन आहे. अविद्येपासून संस्कार व संस्कारापासून विज्ञान, इत्यादींची कशी उत्पत्ती होते व त्यांचा क्रमाने निरोध कसा होतो, ते यात सांगितले आहे.

धातु संयुत्तात चक्षू, श्रोत्र, घ्राण, इ. इंद्रिये, त्यांचे विषय व विज्ञाने यांचे वर्णन आहे.

अनमतग्ग संयुत्तात संसारचक्राचे अनादित्व दाखवले आहे.

कस्सप संयुत्तात भगवान बुद्धाने महाकाश्यपाच्या संतुष्ट वृत्तीची प्रशंसा केली आहे.

लाभ-सक्कार संयुत्तात बुद्धाने भिक्षूंना लाभ व सत्कार यांपासून दूर राहण्याचा उपदेश केला आहे.

राहुल संयुत्तात राहुलाला संयमाचा उपदेश केला आहे.

भिक्खू संयुत्तात महामोग्गल्लानाने भिक्षूंना आर्य-मौनावर उपदेश केला आहे.

खंध वर्गात खंध, राध, दिठ्ठी, ओक्कंतिक, उप्पाद, किलेस, सारिपुत्त, नाग, सुपण्ण, गंधब्बकाय, वलाह, वच्छगोत्त व झान ही संयुत्ते आहेत.

खंध संयुत्तात पंच स्कंधांचे वर्णन आहे. दिठ्ठिसंयुत्तात मिथ्या मतवादांच्या उत्पत्तीची कारणे सांगितली आहेत.

वच्छगोत्त संयुत्तात वच्छगोत्त नामक परिव्राजकाच्या काही मिथ्या धारणांचे बुद्धाने निराकरण केले आहे.

झान संयुत्तात ध्यान किंवा समाधी हिचे वर्णन आहे.

सळायतन वर्गात सळायतन, वेदना, मातुगाम, जंबुखादक, सामंडक, मोग्गल्लान, चित्त, गामणी, असंखत व अब्याकत ही संयुत्ते आहेत.

सळायतन संयुत्तात चक्षुरादी इंद्रिये व मन आणि त्यांचे विषय हे अनात्म, अनित्य व दुःखद आहेत, असे सांगितले आहे.

मातुगाम संयुत्तात बुद्धाने स्त्रियांच्या परिस्थितीचे व त्यांच्या एकूण कष्टदायक जीवनाचे वर्णन केले आहे.

सामंडक संयुत्तात बुद्धाने सामंडकाला निर्वाणासंबंधी उपदेश केला आहे.

मोग्गलान संयुत्तात महामोग्गलानाने भिक्षूंना चार ध्यानां-संबंधी केलेला उपदेश आहे.

महा वर्गात मग्ग, बोज्झगं, सतिपट्ठान, इंद्रिय, सम्मप्पधान, बल, इद्दिपाद, अनुरुद्ध, झान, आनापान, सोतापत्ती व सच्च ही संयुत्ते आहेत.

यांपैकी इंद्रिय संयुत्तात श्रद्धा, वीर्य, स्मृती, समाधी व प्रज्ञा या पाच ज्ञानशक्तींचे वर्णन आहे.

सम्मप्पधान संयुत्तात चार प्रयत्नांची माहिती आहे. झान संयुत्तात ध्यानाच्या चार अवस्थांचे वर्णन आहे.

सच्च संयुत्तात चार आर्य सत्यांचे विवरण आहे.

या ग्रंथात, बुद्धकालीन भारतात प्रचलित असलेले धार्मिक संप्रदाय, त्यांचे प्रमुख आचार्य व बुद्ध आणि बौद्ध धर्म यांच्याशी त्यांचे असलेले संबंध यांचे बरेच वर्णन आहे. तसेच त्या वेळच्या ऐतिहासिक व भौगोलिक परिस्थितीचे या ग्रंथावरून चांगले ज्ञान होते. [ पा. सा. इ.; हिंदी साहित्य, प्रथम खंड, वर्मा ]

**संवत्सर** महाकालाचा एक भाग. वर्ष. संवत्सराची व्याख्या अशी -- 'सम्यग् वसन्ति मासादयोऽस्मिन्' (=ज्यात मास आदी कालविभाग व्यवस्थित सामावतात, त्याला संवत्सर असे म्हणतात.) बारा मासांच्या कालखंडाला संवत्सर असे नाव आहे. महिन्यांचे जसे चांद्र, सावन व सौर असे भेद आहेत, तसेच संवत्सराचेही चांद्र, सावन व सौर असे तीन प्रकार आहेत.

चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून फाल्गुन अमावास्या अखेरचा जो काळ, त्याला चांद्र संवत्सर असे म्हणतात. चांद्र संवत्सर तीनशे चौपन्न दिवसांचे मानलेले आहे. तीनशे साठ दिवसांच्या काल-खंडाला सावन संवत्सर असे नाव आहे. मेष राशीत सूर्याने प्रवेश केल्या दिवसापासून मीन राशीतून तो बाहेर पडण्याच्या दिवसा-

अखेरपर्यंत जो कालखंड, ते सौर वर्ष होय. सौर वर्ष तीनशे पासष्ट दिवसांचे असते.

क्वचित संवत्सराचे बार्हस्पत्य व नाक्षत्र असे आणखी दोन प्रकार मानलेले आहेत. बार्हस्पत्य संवत्सरात तीनशे एकसष्ट दिवस असतात. तीनशे चौवीस दिवसांचे नाक्षत्र संवत्सर असते.

भारतीय पंचांगात शालिवाहन शकाबरोबर एक संवत्सर दिलेले असते. ते साठ वर्षांचे एक चक्र आहे. या साठ संवत्सरांची नावे अशी – प्रभव, विभव, शुक्ल, प्रमोद, प्रजापती, अंगिरा, श्रीमुख, भाव, युवा, धाता, ईश्वर, बहुधान्य, प्रमाथी, विक्रम, वृष, चित्रभानू, सभानू, तारण, पार्थिव, व्यय, सर्वजित्, सर्वधारी, विरोधी, विकृती, खर, नंदन, विजय, जय, मन्मथ, दुर्मुख, हेमलंब, विलंबी, विकारी, शर्वरी, प्लव, शुभकृत्, शोभन, क्रोधी, विश्वावसू, पराभव, प्लवंग, कीलक, सौम्य, साधारण, विरोधकृत्, परिधावी, प्रमादी, आनंद, राक्षस, अनल, पिंगल, कालयुक्त, सिद्धार्थी, रौद्र, दुर्मती, दुंदुभी, रुधिरोद्गारी, रक्ताक्ष, क्रोधन व क्षय.

नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील भारताच्या सर्व भागांत कलियुगाचे प्रथम वर्ष प्रमाथी संवत्सर होते, असे मानतात व दरवर्षी चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून संवत्सराचा आरंभ धरतात. अशा रीतीने क्रमशः क्षय संवत्सरापर्यंत येऊन एक चक्र पूर्ण झाले, की पुन्हा प्रभव संवत्सरापासून आरंभ करतात.

कलियुगाच्या प्रारंभी कोणते संवत्सर मानावे, याबद्दल नर्मदेच्या उत्तरेकडील भारतात मतभेद आहेत. वराहमिहिराच्या मते ते विजय मानावे, असे आहे; तर ज्योतिषतत्त्व या ग्रंथाचा कर्ता ते प्रभव मानावे, असे सांगतो. या भागात संवत्सराचा आरंभ तत्त्वतः गुरूच्या संक्रमणापासून मानतात; पण व्यवहारात मात्र चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून नवीन संवत्सर सुरू होते, असे समजतात.

**संवत्सरफल** -- प्रत्येक पंचांगात आरंभी त्या संवत्सराचे फल दिलेले असते. संवत्सराच्या फलात राजा, मंत्री, अग्रधान्येश, मेघेश व पश्चाद्धान्येश यांची नावे दिलेली असतात व त्या ग्रहांच्या स्थानांची ठराविक फलेसुद्धा दिलेली असतात. हे अधिकारी पुढीलप्रमाणे ठरवतात --

राजा – चैत्र शुद्ध प्रतिपदा ज्या वारी आली असेल, त्या वाराचा अधिपती त्या संवत्सराचा राजा मानतात. उदा० बुधवारी चैत्र शुद्ध प्रतिपदा आली, तर संवत्सराचा राजा बुध; गुरुवारी आली तर गुरू, इत्यादी.

मंत्री – मेषसंक्रांत ज्या वारी येईल, त्या वाराचा अधिपती मंत्री समजतात. एखाद्या वर्षी मेषसंक्रांत रविवारी आली, तर त्या संवत्सराचा मंत्री रवी असतो.

अग्रधान्येश – (लवकर तयार होणाऱ्या धान्यांचा अधिपती) कर्कसंक्रांत ज्या वारी येईल, त्या वाराचा अधिपती हा अग्रधान्येश मानतात.

मेघेश -- आर्द्रा नक्षत्रावर सूर्य ज्या वारी येईल, त्या वाराचा अधिपती हा मेघेश समजतात.

रसेश -- तुलासंक्रांत ज्या वारी येईल. त्या वाराचा अधिपती तो रसेश होय.

पश्चाद्धान्येश -- (उशिरा तयार होणाऱ्या धान्यांचा अधिपती) मूळ नक्षत्रावर सूर्य ज्या वारी येईल, त्या वाराचा अधिपती हा पश्चाद्धान्येश होय.

रवी राजा असल्यास अमुक फळ देईल, चंद्र असल्यास त्याचे फळ अमुक असेल, अशी जी ग्रहांची फले दिलेली असतात, ती त्या त्या संवत्सराच्या पंचांगातल्या वर्षफलात पाहायला मिळतात. [पुरुषार्थ चिंतामणि; म. ज्ञा. को. – प्रस्तावना खंड, ३]

## संवनन आंगिरस

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे एक्याण्णव क्रमांकाचे एक महत्त्वपूर्ण लघुसूक्त याने रचले आहे. प्रस्तुत सूक्तातील दोन ते चार या ऋचा म्हणजे एक राष्ट्रीय आकांक्षा व प्रार्थनाच समजली पाहिजे. समाजातील मतभेद दूर व्हावे, स्नेह वाढावा आणि ऐक्य प्रस्थापित व्हावे, हा सद्हेतू या सूक्तरचनेच्या मुळाशी असावा. परस्परविरोधी लोकांमध्ये सामंजस्य निर्माण करण्यासाठी या सूक्ताचे पठण करावे, अशी सूचना ऐतरेय ब्राह्मणात आहे (२३.१). हे सूक्त पुढीलप्रमाणे आहे –

संसमिद्युवसे वृषन्नग्ने विश्वान्यर्य आ ।
इळस्पदे समिध्यसे स नो वसून्या भर ॥ १ ॥
सं गच्छध्वं सं वदध्वं सं वो मनांसि जानताम् ।
देवा भागं यथा पूर्वे संजानाना उपासते ॥ २ ॥
समानो मन्त्रः समितिः समानी
समानं मनः सह चित्तमेषाम् ।
समानं मन्त्रमभि मन्त्रये वः
समानेन वो हविषा जुहोमि ॥ ३ ॥
समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।
समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥ ४ ॥

अर्थ – हे उत्तरवेदीत प्रदीप्त झालेल्या, जगद्व्यापक आणि कामपूरक परमेश्वर अग्ने, तू आम्हांला धन दे.

हे लोकांनो, तुम्ही एकविचाराचे, एकभाषणाचे आणि एकज्ञानाचे व्हा. पुरातन सहविचारी लोकांप्रमाणे तुम्ही आपली कार्ये एकमताने करा.

(हे लोकांनो,) आपणा सर्वांची प्रार्थना, विचारस्थान, तसेच ज्ञान आणि मने एकसारखी असावी. एकाच सामग्रीने आ[illegible]

देवपूजन करावे. (हे लोकांनो,) संघशक्तीच्या पुष्टीसाठी तुमचे अभिप्राय, अंतःकरण, तसेच मन एकसारखे असावे.

या सूक्ताच्या पहिल्या ऋचेत इळस्पद स्थानाचा उल्लेख आहे. पृथ्वीवरील आद्य अग्नी या जागी निर्माण झाला अशी वैदिकांची धारणा आहे. सायणाचार्यांच्या मते इळस्पद म्हणजे उत्तरवेदी, कुरुक्षेत्र होय. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को. ]

**संवर** जैन धर्मातील एक तत्त्व. कर्मांच्या आस्रवाचा विरोध हाच संवर होय. कर्मपरमाणू आत्म्याकडे आकृष्ट होऊ नयेत किंवा त्यांनी आत्म्यात प्रवेश करू नये म्हणून ज्या उपायांचा अवलंब करतात, त्यांना संवराची कारणे असे म्हणतात. गुप्ती, समिती, धर्म, अनुप्रेक्षा, परीषह-जय, तप व चारित्र अशी या कारणांची नावे आहेत. आस्रव हे संसाराचे कारण आहे व संवर हे मोक्षाचे कारण आहे. [ जैनधर्मामृत; भा. द. सं. ]

**संवरण प्राजापत्य** एक सूक्तद्रष्टा. हा प्रजापतीचा मुलगा म्हणून याला प्राजापत्य असे म्हटले आहे. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील तेहतीस व चौतीस क्रमांकाची दोन सूक्ते याने रचली आहेत. इंद्रस्तुती हा या दोन्ही सूक्तांचा विषय आहे. याव्यतिरिक्त तेहतिसाव्या सूक्तात त्रसदस्यू पौरुकुत्स्य, विदथ मारुताश्व, च्यवतान व लक्ष्मण्य ध्वन्य या राजांच्या दानशूरपणाचे वर्णन आहे. चौतिसाव्या सूक्तातील चौथ्या ऋचेत इंद्राला यतंकर म्हणजे यती लोकांचा नाश करणारा असे म्हटले आहे. या सूक्तातही प्रख्यात राजा अग्निवेश्य याचे स्तवन आहे. याची एक ऋचा (५.३४.५) अशी –

न पञ्चभिर्दशभिर्वष्ट्यारभं नासुन्वता सचते पुष्यता चन।
जिनाति वेदमुया हन्ति वा
धुनिरा देवयुं भजति गोमति व्रजे ॥

अर्थ – अनेक शत्रूंशी एकाकी लढणारा, शत्रुसंहारक इंद्र सोमव्रतापासून वंचित झालेल्या महान राजाला जिंकून त्याला ठार मारतो. भक्तांना तो धेनुसंपन्न गौळवाड्याप्रत नेऊन पोचवितो. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को.; सी. ऋ. ]

**संवर्गविद्या** उपनिषदांतील एक विद्या. संवर्ग शब्दाचा अर्थ ग्रहण करणे किंवा ग्रास करणे असा आहे. अग्नी विझला की तो कुठे जातो ? तसेच चंद्रसूर्य मावळल्यावर त्यांचे काय होते ? या प्रश्नांचे उत्तर, वायूकडून ते ग्रासले जातात, असे आहे. त्यांच्यावर वायूचे वेष्टन पडते. या तिघांचीही उत्पत्ती वायूपासून आहे व हे तीनही अग्निरूपच आहेत. सूर्य व चंद्र हे प्रकाशमय होतात, याचे कारण ते अग्नितत्त्वापासून झालेले आहेत, हे आहे. त्यांच्याप्रमाणेच वाणीसुद्धा वायूतच लीन होते. जेव्हा गाढ झोप लागलेली असते, तेव्हा वाणी, डोळे, कान व मन ही सर्व इंद्रिये प्राणवायूत लीन होऊन राहतात. त्या वेळी फक्त श्वास म्हणजे प्राणवायू चालू असतो. दुसऱ्या इंद्रियांच्या क्रियाही लुप्त झालेल्या असतात. याचा अर्थ इंद्रियांचा प्राणवायूत संवर्ग होतो. पण या प्राणवायूचा संवर्ग कुठे होतो ? याचे उत्तर प्राणवायूचा संवर्ग परमात्म्यात किंवा ब्रह्मात होतो, असे आहे.

हे ब्रह्म सर्वांचा ग्रास करते, पण त्याचा ग्रास कोणीही करू शकत नाही. त्याच्यात सर्व विलीन होते; पण ते कशातही विलीन होत नाही. या महामहिमशाली ब्रह्मापासूनच सर्वांची उत्पत्ती होत असते.

या परब्रह्माची उपासना करून जो ब्रह्मनिष्ठ होतो, तो जीवन्मुक्त होतो आणि अंती संसारचक्रातून कायमचा सुटतो.

रैक्वाने जानश्रुती राजाला या विद्येचा उपदेश केला होता. [ संवर्गविद्या, डॉ. चतुर्भुज सहाय; कल्याण-साधनांक ]

**संवर्गेष्टी** संवर्ग अग्नीसाठी करायची इष्टी. हिला गायत्रीष्टी असे म्हणतात. पाहा – गायत्रीष्टी.

**संवर्त** एक प्राचीन स्मृतिकार. याज्ञवल्क्याने दिलेल्या स्मृतिकारांच्या यादीत याचे नाव आढळते. याच्या दोन स्मृती उपलब्ध असून, त्यांत दोनशे सत्तावीस आणि दोनशे तीस श्लोक आहेत. त्या स्मृतींमध्ये व्रतबंधानंतरचे ब्रह्मचाऱ्याचे कर्तव्य, विवाहोत्तर गृहस्थाचा आचार, फलांसह अनेक दानांचे वर्णन, संन्यासधर्माचे निरूपण, इ. विषय आहेत. याव्यतिरिक्त व्यवहारविषयाची विपुल चर्चा याने केली आहे.

संवर्ताची काही मते पुढीलप्रमाणे आहेत –

जेव्हा तोंडी पुरावा लेखी पुराव्याच्या विरोधी असतो, तेव्हा तोंडी पुरावा त्याज्य मानावा. ज्या व्यवहारात व्याजाचा उल्लेख केलेला नसेल, त्यात व्याज देऊ नये.

ज्या अपराधांसाठी राजाने शिक्षा करावी, असे काही अपराध संवर्ताने सांगितले आहेत, ते असे – पतिविना गर्भधारणा, बलात्कार, उघड साधन नसताना आलेली श्रीमंती, सार्वजनिक मार्गाला अडथळा; सभागृहे, झाडे, पिके यांचा नाश; मूल किंवा मनुष्य पळवून नेणे, पतित ब्राह्मण आणि गोब्राह्मणहत्या.

संवर्ताच्या मते मुलीचा विवाह आठव्या वर्षी करावा. मामाच्या मुलाशी विवाह करण्याचा त्याने निषेध केला आहे.

संवर्ताच्या स्मृतीतले अनेक उतारे अपरार्काने व विश्वरूपाने दिलेले आहेत. यावरून याचा काळ बराच प्राचीन असावा, असे वाटते. [ हि. ध.; प्रा. च. को.; हिंदुत्व. ]

**संवर्त आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. हा अंगिरसाच्या मुलांपैकी एक असून, त्याला वीतहव्य असे दुसरे नाव आहे (यो. वा. ५.८२.१०). ऐतरेय ब्राह्मणानुसार हा मरुत आविक्षित राजाचा पुरोहित होता (८.२१).

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे बहात्तरावे सूक्त याच्या नावावर असून, त्यात उषा देवतेचे वर्णन आहे. याची ऋचा (१०.१७२.४) अशी –

**उषा अप स्वसुस्तमः सं वर्तयति वर्तनिं सुजातता ॥**

अर्थ – रात्रिरूपी भगिनीने निर्मिलेला अंधकार नष्ट करणारी उषा आपला रथ यज्ञस्थानी आणते.

संवर्त बराच प्राचीन यज्ञकर्ता असावा. ऋग्वेदात अन्यत्रही त्याचा यज्ञकर्ता म्हणून उल्लेख आढळतो (८.५४.२).

हा आपला भाऊ बृहस्पती याच्याबरोबर सदैव स्पर्धा करीत असे. त्यामुळे मरुत्त-बृहस्पती संघर्षात याने मरुत्ताला मदत केली. मरुत्ताचा बृहस्पतीने अर्धवट सोडलेला यज्ञ यानेच पुरा केला. या यज्ञात त्याने अग्नीलाच जाळून टाकण्याची धमकी दिली आणि इंद्राचे वज्र स्तंभित करून त्याला यज्ञात यायला भाग पाडले.

संवर्त हा एक महान तपस्वी होता. या तपाच्या प्रभावामुळे सर्व देव त्याच्या स्वाधीन होते. ज्या जागी याने तप केले ती जागा पुढे संवर्तवापी नावाने ओळखली जाऊ लागली. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को., हिंदी; म. ज्ञा. को., बुद्धपूर्वजग ]

**संवर्तक योग** मुहूर्त–ज्योतिषातील एक योग. बुधवारी प्रतिपदा आणि रविवारी सप्तमी आली असता हा योग होतो. शुभकर्माला हा योग वर्ज्य मानतात. [ मु. चिं. ]

**संस्कार** एक मूल्यवर्धक प्रक्रिया. संस्कार शब्दाची व्युत्पत्ती अशी – सम् + कृ + घञ् = संस्कार. म्हणजे कृ धातूच्या मागे सम् हा सम्यक्त्व दर्शक असा उपसर्ग व पुढे घञ् हा प्रत्यय लागून संस्कार शब्द बनला आहे. त्याचा अर्थ चांगले करणे, शुद्ध करणे, सुंदर करणे, वस्तूतील वैगुण्य दूर करून तिला नवे आकर्षक स्वरूप देणे, असा बहुविध आहे. अर्थात ज्या क्रियेच्या योगाने मनुष्याच्या ठिकाणी सद्‌गुणांचे विकसन व संवर्धन होते, त्या क्रियेला संस्कार असे म्हणावे.

जीवनात संस्कारांना फार महत्त्व आहे. ते माणसाच्या शारीरिक व मानसिक स्थित्यंतराचे द्योतक ठरतात. संस्कारांमुळे माणसाला योग्य तो सामाजिक दर्जा प्राप्त होतो. संस्कारांत अनेक आरंभिक विचार, धार्मिक क्रियाकलाप, त्यांच्या बरोबर येणारे काही नियम व आचरणपद्धती यांचा समावेश आहे. या सर्वांचा उद्देश केवळ औपचारिक देहसंस्कार एवढाच नाही; तर संस्कार्य व्यक्तीच्या संपूर्ण व्यक्तित्वाचा परिष्कार, शुद्धी आणि पूर्णता एवढा व्यापक आहे.

आर्यांच्या समाजात संस्कारांचा उदय वैदिक कालात किंवा त्याच्याही पूर्वी झाला होता, हे वैदिक कर्मकांडाच्या मंत्रांवरून विदित होते. ऋग्वेदात विध्यात्मक नियमांचा किंवा पद्धतींचा निर्देश नाही; पण प्रासंगिक रूपाने जे अनेक उल्लेख आढळतात, त्यांवरून वैदिकांच्या मनात संस्कारकल्पना उदित झाली होती, हे कळून येते. मात्र वैदिक साहित्यात संस्कार हा शब्द आढळत नाही. ब्राह्मण ग्रंथांमध्येही तो शब्द नाही. पण त्यांत उपनयन, विवाह, अंत्येष्टी, इ. काही संस्कारांच्या अंगांचे वर्णन केलेले आहे.

संस्कारकल्पनेचा विस्तार आणि त्यांची संख्या याविषयी गृह्यसूत्रांत बराच ऊहापोह केला आहे. संस्कार हा गृह्यसूत्रांचा खास विषय आहे. गृह्यसूत्रांत सामान्यतः विवाहापासून आरंभ करून समावर्तनापर्यंतच्या दैहिक संस्कारांचे निरूपण केलेले आहे. बऱ्याच गृह्यसूत्रांत अंत्येष्टीचा संस्कार म्हणून उल्लेख नाही. पाराशर, आश्वलायन, बौधायन, इ. काही गृह्यसूत्रांत अंत्येष्टीचे वर्णन आहे. गृह्यसूत्रांतली संस्कारसंख्याही भिन्न भिन्न आहे. नावांतही थोडा बदल आहे. काही गृह्यसूत्रांत संस्कारप्रकार वाढवलेले आहेत; तर काहींत ते कमी केलेले आहेत. आश्वलायन गृह्यसूत्रात ११, पारस्कर, बौधायन व वाराह या गृह्यसूत्रांत १३ व वैखानस गृह्यसूत्रात १८ संस्कार सांगितले आहेत.

गौतम धर्मसूत्र हे सर्वांत प्राचीन असून, त्यात ४८ संस्कार सांगितले आहेत. 'चत्वारिंशत् संस्काराः अष्टौ आत्मगुणाः' (= ४० संस्कार आणि ८ आत्मगुण मिळून ४८ संस्कार होत.) असे गौतम म्हणतो. या ४८ संस्कारांची नावे अशी –

(१) गर्भाधान (२) पुंसवन (३) सीमंतोन्नयन (४) जातकर्म, (५) नामकरण, (६) अन्नप्राशन, (७) चौल, (८) उपनयन, (९) ते (१२) चार वेदव्रते, (१३) स्नान (समावर्तन), (१४) सहधर्मचारिणीसंयोग (विवाह), (१५) देवयज्ञ, (१६) पितृयज्ञ, (१७) मनुष्ययज्ञ, (१८) भूतयज्ञ, (१९) ब्रह्मयज्ञ, (२०) अष्टका ( माघ वद्य अष्टमीस करायचे श्राद्ध), (२१) पार्वण ( पौर्णिमा व अमावस्या या दोन तिथींना व्रतस्थ राहून दुसऱ्या दिवशी भाताच्या दोन आहुती अग्नीत देणे. या कर्मास स्थालीपाक असे म्हणतात), (२२) मासिक श्राद्ध, (२३) श्रावणी, (२४) आग्रहायणी ( मार्गशीर्षी पौर्णिमेला [illegible] करावा लागणारा सर्पबली व उत्सर्गहोम अथवा प्रत्यवरोहण [illegible] नावाचे कर्म), (२५) चैत्री (चैत्र महिन्यातील पौर्णिमेस करावे लागणारे शूलगव नामक कर्म), (२६) आश्वयुजी (आश्विन पौर्णिमेस रुद्र किंवा पशुपती याच्या उद्देशाने करायचा स्थाली-

पाक), (२७) अग्न्याधान (अग्निहोत्र घेताना प्रारंभी करायचा विधी), (२८) अग्निहोत्र, (२९) दर्शपूर्णमास, (३०) आग्रयण (आश्विनी पौर्णिमेस नव्या धान्याचा पुरोडाश करून त्याचे हवन करणे), (३१) चातुर्मास्ये (एका वर्षात विशिष्ट अशा चार महिन्यांत अनुक्रमे एक एक याग करून संपविला जाणारा यज्ञ), (३२) निरूढ पशुबंध (सहा सहा महिन्यांनी, एकामागून एक, अथवा दरवर्षी एक वेळ करावा लागणारा पशुयज्ञ), (३३) सौत्रामणी (सुत्रामा ही उपाधी असलेल्या इंद्रासाठी करावा लागणारा सुरायज्ञ), (३४) अग्निष्टोम (सोमयाग), (३५) अत्यग्निष्टोम (सोमयाग), (३६) उक्थ्य (सोमयाग), (३७) षोडशी (सोमयाग), (३८) वाजपेय (सोमयाग), (३९) अतिरात्र (सोमयाग) व (४०) आप्तोर्याम (सोमयाग) असे चाळीस.

गौतमाने सांगितलेले आठ आत्मगुण पुढीलप्रमाणे–

दया सर्वभूतेषु क्षान्तिरनसूया शौचमनायासो माङ्गल्यमकार्पण्यमस्पृहेति ।

अर्थ– (१) भूतमात्रावर दया (२) क्षमा (३) अनसूया (निर्मत्सरता) (४) शौच (अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा) (५) अनायास (क्षुद्र कामासाठी शरीरास कष्ट न देणे) (६) मांगल्य (सदा उत्साही व आनंदी मनोवृत्ती) (७) अकार्पण्य (कधीही दीनवाणे नसणे व सत्पात्री दान करण्याची संधी आल्यास हात आखडता घेऊन कृपणपणा न करणे) व (८) अस्पृहा (परक्याच्या वस्तूचा कधीही अभिलाष न धरणे).

हे संस्कार कमी कमी होत शेवटी १६ वर आले. त्यांची नावे वेदव्यास स्मृतीत (१४–१६) दिली आहेत, ती अशी–

गर्भाधानं पुंसवनं सीमन्तो जातकर्म च ।
नामक्रिया निष्क्रमोऽन्नप्राशनं वपनक्रिया ।।
कर्णवेधो व्रतादेशो वेदारम्भक्रियाविधिः ।
केशान्तः स्नानमुद्वाहो विवाहाग्निपरिग्रहः ।।
त्रेताग्निसंग्रहश्चेति संस्काराःषोडश स्मृताः

अर्थ – गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रम, अन्नप्राशन, चूडाकर्म, कर्णवेध, उपनयन, वेदारंभ, केशान्त, समावर्तन, विवाह, विवाहाग्नीचा स्वीकार व दक्षिणाग्नी, गार्हपत्य आणि आहवनीय या तीन अग्नींचा संग्रह म्हणजे अग्निहोत्र हे ते सोळा संस्कार होत.

यांपैकी पुंसवन व सीमंतोन्नयन हे गर्भिणीचे संस्कार प्रथम गर्भधारणेच्या वेळीच करायचे असतात. प्राचीन काळी मुलांप्रमाणे मुलींचेही संस्कार होत. त्यांचा व्रतबंधही होत असे; पण नंतरच्या काळी मुलींचे संस्कार मागे पडत चालले आणि पत्नी या नात्याचा विवाहसंस्कार तेवढा समंत्रक असा चालू राहिला. मुलांच्या समंत्रक संस्कारांपैकी उपनयन व विवाह एवढेच तूर्त जेमतेम चालू आहेत. नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन हे संस्कार होतात; पण ते अमंत्रक व केवळ लौकिक असतात.

संस्कार मुख्यतः त्रैवर्णिकांना सांगितले आहेत. शूद्रांना विहित असे १० संस्कार अमंत्रक करावे व मुलींचेही संस्कार अमंत्रकच करावे, असे सांगितले आहे. वेडे व मुके यांचे संस्कार करू नयेत, असे शंखस्मृतीत म्हटले आहे. गर्भाधान संस्काराने उत्पन्न झालेल्या पुत्राला ब्रह्मविद्येचा अधिकार प्राप्त होतो. पुंसवनाने गर्भ पुंलिंगात परिणत होतो. सीमंतोन्नयनाने त्याच्या ठिकाणी मातापित्यापासून प्राप्त झालेले पाप नष्ट होते. रेत, रक्त, गर्भाशय, इत्यादींमुळे उत्पन्न झालेली पंचविध पापे जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, इ. संस्कारांनी धुतली जातात. गर्भाधानादी आठ संस्कारांमुळे द्विज पवित्र होतो.

**संस्काराची विधायक अंगे** – सगळे संस्कार हे मनुष्याच्या अंतरातल्या श्रद्धा, भावना, मानवी स्वभाव आणि अतिमानुष शक्ती यांच्याशी निगडित आहेत. संस्कार हे विविध तत्त्वांचे मिश्रण आहे. अग्नी, प्रार्थना, आशीर्वाद, अभिषेक, दिशानिर्देश, प्रतीकत्व, फलज्योतिष आणि सामाजिक आशय अशी संस्काराची विविध अंगे आहेत. त्यांची क्रमाने माहिती अशी –

**अग्नी** – प्रत्येक संस्कार हा अग्निसाक्षिक असतो. भारतीय दैवतशास्त्रात इंद्राच्या खालोखाल अग्नीला महत्त्व आहे. ऋग्वेदात अग्नीला गृहपती आणि चांगला अतिथी म्हटले आहे. देव आणि मानव यांच्यामधला तो दुवा आहे. मानवांनी दिलेला हविर्भाग तो देवतांना नेऊन पोचवतो. म्हणून संस्कारात प्रथम स्थंडिलावर अग्निस्थापना करतात. प्रत्येक संस्काराच्या अग्नीचे नाव भिन्न भिन्न असते. अग्निमुखाचे कृत्य झाल्यावर प्रधान देवतांचे हवन करून त्या त्या संस्काराची कृत्ये करतात.

**प्रार्थना** – संस्काराच्या प्रसंगी ज्या देवतांची पूजा व होम केला जातो, त्या देवतांची प्रार्थना करतात. उपनयनात ब्रह्मचारी सद्‌गुणांची प्राप्ती व दुर्गुणांचे निवारण यांच्यासाठी देवतांची प्रार्थना करतो. सुप्रसिद्ध गायत्रीमंत्रही सवित्याच्या प्रार्थनेचाच आहे. वटू अग्नीत आहुती देताना अग्नीला म्हणतो – 'हे, अग्ने, तू मला मेधा दे, बुद्धी दे, मला तेजस्वी कर, दीप्तिमान बनव,' विवाहसंस्कारात वर जेव्हा वधूसह सप्तपदी करतो, तेव्हा तो विष्णूला प्रार्थितो, की वधूचा पहिला पदन्यास इषासाठी, दुसरा ऊर्जासाठी, तिसरा समृद्धीसाठी, इ. समर्थ होवो. गर्भाधानसंस्कारातही देवांनी पत्नीच्या ठिकाणी गर्भधारणा होईल अशा प्रकारे साहाय्य करावे अशी प्रार्थना असते. प्रत्येक शिशुसंस्कारात शिशूला आयुष्य, आरोग्य, अभिवृद्धी, इ. गोष्टी मिळाव्या म्हणून त्या त्या देवतांची प्रार्थना असते.

**आशीर्वाद** – प्रत्येक संस्कारात गुरुजनांचा व ब्राह्मणांचा आशीर्वाद घेतला जातो. आशीर्वादाचा शुभ परिणाम होतो, असे मानले आहे. संस्कारार्ह व्यक्तीलाच नव्हे; तर त्याच्या कुटुंबालाही आयुरारोग्यादी गोष्टी लाभतात, असा सर्वसामान्य विश्वास आहे. पत्नीला अधोवस्त्र भेट म्हणून देताना पती तिला आशीर्वाद देतो – ' तू दीर्घायुषी हो आणि वैभव व संतती यांनी समृद्ध हो. ' जातकर्माच्या वेळी पिता आपल्या मुलाला आशीर्वाद देतो –

**अश्मा भव परशुर्भव हिरण्यमस्नुतं भव ।**

(पार. गृ. सू. २.३.२)

**अर्थ** – हे शिशो, तू दगडासारखा घट्ट, परशूसारखा दृढ आणि सुवर्णासारखा कांतिमान हो.

**अभिषेक** – अभिषेक म्हणजे ब्राह्मणांनी मस्तकावर शिंपडलेल्या तुषारांचे स्नान होय. स्नानालाही अभिषेक म्हटले आहे. भारतीय संस्कारात स्नान हे पुण्यप्रद व जीवनप्रद मानले आहे. जलामध्ये दिव्य शक्ती निहित असते. त्यामध्ये अशुभ प्रभाव व भूत-पिशाचांचे निराकरण करण्याचीही क्षमता असते (ऋ. ७.४७.४९; १०.९.३०). स्नानाने सर्व प्रकारच्या व्याधी आणि त्रिविध दुःखे दूर होतात. जातकर्म, चूडाकर्म व उपनयन यांच्यापूर्वी मुलाला स्नान हे अत्यावश्यक मानले आहे. समावर्तन संस्कार हा एक स्नान संस्कारच आहे. वधू-वरांना लग्नाच्या पूर्वी जे मांगलिक स्नान घालतात, ते त्यांच्या भावी शुभमंगलासाठी असते. संस्कार समाप्त झाल्यावर ब्राह्मण व पुरोहित संस्कारित व्यक्तीला कलशातील पाण्याने अभिषेक करतात तो यश, श्री, विद्या व ब्रह्मवर्चस यांच्यासाठी असतो.

**दिशानिर्देश** – वेगवेगळ्या दिशांवर वेगवेगळ्या देवता आधिपत्य करतात, असे पुराणात सांगितले आहे. पूर्व दिशा ही प्रकाश, उष्णता, जीवन, सुख आणि समृद्धी यांची दिशा आहे. पश्चिम दिशा अंधकार, शीत, मृत्यू व विनाश यांची दिशा आहे. दक्षिण ही यमाची दिशा आहे. ती सर्व कार्यांत अशुभ होय. उत्तर दिशा ही अध्यात्म व मरणोत्तर स्वर्गगती यांची दिशा आहे. आसन कसे घालावे व कोणत्या दिशेला मुख करून घालावे याविषयीच्या विविध रूढींना अशा प्रकारच्या श्रद्धा व समजुती यांनी जन्म दिला. सर्व मंगल कार्यात संस्कारित व्यक्तीला पूर्व दिशेकडे मुख करून बसवतात. त्यातला आशय त्याला जीवन व प्रकाश यांची प्राप्ती व्हावी हा असतो. प्रदक्षिणा करण्यात सूर्यमार्गाचे अनुसरण केले जाते. म्हणजे प्रदक्षिणा ही पूर्वेकडून पश्चिमेकडे असते. अशुभ संस्कारात म्हणजे मृताच्या अंत्यक्रियेत प्रदक्षिणेची गती याच्या उलट असते. मृताचे शरीर चितेवर ठेवताना त्याचे मस्तक दक्षिणेकडे करतात. कारण मृत व्यक्ती दक्षिण दिशेचा अधिपती यम याच्या आधीन व्हायची असते.

**प्रतीकत्व** – संस्कारात प्रतीकवाद हा ठायी ठायी दिसतो. भौतिक, मानसिक व आध्यात्मिक गुणांची प्राप्ती हा प्रतीकवादाचा उद्देश आहे. तो मुख्यत्वे सादृश्यावर आधारलेला आहे. सदृश वस्तूपासून सदृश गोष्टी उत्पन्न होतात, असा सर्वसामान्य लोकांचा विश्वास असतो. संस्कारात जलपूर्ण कलशाची स्थापना करतात. हा कलश म्हणजे पूर्ण जीवनाचे प्रतीक होय. दगड हा दृढतेचे प्रतीक मानले आहे. म्हणूनच वधूला विवाह होमाच्या वेळी एका दगडावर (म्हणजे सहाणेवर) उभी करतात व पुढील मंत्र म्हणतात –

**इममश्मानमारोहाश्मेव, त्वं स्थिरा भव ।**

**अर्थ** – हे वधू, तू या दगडावर आरोहण कर आणि माझ्या जीवनात आणि संसारात दगडाप्रमाणे स्थिर हो.

हा मंत्र वराने वधूसाठी म्हणायचा असतो. वधूला ध्रुवदर्शन करवतात, तेही कुटुंबातील तिच्या ध्रुवत्वासाठी असते. लाह्या व तांदूळ बहुप्रजा व समृद्धी यांची प्रतीके आहेत. वर तुपाच्या द्रोणात बोट बुडवून वधूच्या हृदयाला टेकवतो, याला समंजन म्हणतात. ते स्नेह व प्रेम यांचे प्रतीक आहे. हृदयस्पर्श हा अनुचित्ततेचे प्रतीक आहे. उपनयन संस्कारात पिता आपल्या पुत्राच्या हृदयावर हात ठेवून म्हणतो – ' मम व्रते हृदयं ते दधामि मम चित्तमनुचित्तं ते अस्तु ' (= मी माझ्या व्रताच्या ठिकाणी तुझे हृदय (अंतःकरण) ठेवतो. तुझे चित्त हे माझ्या चित्ताला अनुसरणारे असू दे.) पुंसवन संस्कारात दोन बाजूंना दोन उडीद व मध्ये एक यव असे तीन दाणे स्त्रीच्या हातावर ठेवून दह्यासह तिला प्राशन करायला लावतात. हे तीन दाणे म्हणजे पुरुषाचे दोन अंडकोश व एक लिंग यांचे प्रतीक असतात. या कृत्याने ती पुत्राला जन्म देईल अशी धारणा असते. अंजन हे आयुष्य व मांगल्य यांचे प्रतीक असते. अशा प्रकारे धार्मिक व लौकिक अशी कितीतरी प्रतीके संस्कारात गुंफलेली आहेत.

**फलज्योतिष** – संस्कारकृत्यांना तिथी, नक्षत्र, इ. दिनशुद्धी अपेक्षित असते. ग्रहांचे आनुकूल्यही आवश्यक असते. विशिष्ट कृत्यांसाठी त्या कृत्यांचा आशय लक्षात घेऊन विशिष्ट तिथि-वार–नक्षत्रें शुभ मानली जातात. देवनक्षत्रे ही शुभ संस्कारांना स्वीकार्य आहेत. मृत्यू, यमघंट, इ. अशुभ योग वर्ज्य आहेत. बटूला उपनयनासाठी गुरुबलाची आवश्यकता असते. विवाहात वर– वधूपत्रिका– मेलन हेही ग्रह व नक्षत्रे यांवरच आधारलेले आहे. विवाह लग्नाच्या अष्टमस्थानी पापग्रह असू नयेत, असे सांगितले आहे. उपनयन आणि विवाह या संस्कारांना गुरु-शुक्रांचे अस्त निषिद्ध आहेत. उपनयनाला अनध्याय तिथी वर्ज्य आहेत. वद्यपक्षातील चतुर्दशी व अमावस्या या तिथी विवाहा-

अनुक्त आहेत. असा आणखी कितीतरी मुहूर्तशास्त्रीय तपशील विविध संस्कारासाठी सांगितलेला आहे.

सामाजिक आशय – संस्काराच्या प्रारंभी घराची रंगरंगोटी करावी, द्वारावर गणपतीचे चित्र स्थापावे, तोरण बांधावे, दारापुढे मांडव घालून तो सजवावा, जमिनीवर सडासंमार्जन करून स्वस्तिक, कमल, शंख, गोपद्म, इ. चिन्हांची रांगोळी काढावी, संस्कार्य व्यक्तीला नूतन वस्त्रालंकारांनी भूषवावे, आप्तस्वकीयांनीही वस्त्रालंकार घालावे, आप्तेष्टांना निमंत्रण द्यावे, त्यांनी संस्कार्य व्यक्तीला आहेर करावे, यजमानाने त्यांना भोजन घालून त्यांची संभावना करावी, असे सांगितले आहे. या सर्व गोष्टीत एक सामाजिक आशय आहे; त्याचबरोबर मांगलिक आशयही आहे. अशा गोष्टींनी संस्कारसमारंभाचे वातावरण प्रसन्न राहते आणि ही प्रसन्नता यजमानाला कितीतरी काल पुरते.

संस्काराची प्रयोजने – प्रत्येक संस्कार वेगवेगळ्या प्रकारचा आणि वेगवेगळ्या प्रयोजनासाठी असतो. संस्काराचा धर्मशास्त्रीय प्रयोग सारखा असला तरी त्याबाहेर संस्काराची काही लौकिक अंगेही असतात. त्या प्रत्येकाचे प्रयोजन वेगळे असते. एकाच संस्कारात संस्कार्य व्यक्तीला अनेक शुभ फले प्राप्त व्हावी व अशुभ फलांचे निराकरण व्हावे यासाठी संस्कार प्रयोगात विविध कृत्ये गुंफलेली असतात. अशा प्रयोजनांचे विवरण डॉ. राजबली पांडेय यांनी केले आहे, त्याचा सारांश असा –

अशुभ प्रभावांचा प्रतिकार – जगातल्या सर्व मानवसमाजात अशी एक प्रकट किंवा गूढ श्रद्धा वास्तव्य करते की, मनुष्यमात्र चहूबाजूंनी अतिमानुष शक्तींच्या प्रभावांनी घेरलेला आहे. या अतिमानुष शक्ती माणसाचे बरे किंवा वाईट करण्याची शक्ती धारण करतात. कोणत्याही महत्त्वपूर्ण प्रसंगी या शक्ती माणसाच्या जीवनात हस्तक्षेप करू शकतात. भूत-प्रेत-पिशाचादी वर्ग हे या अतिमानुष शक्तीत येतात. संस्काराच्या प्रसंगी या अतिमानुष शक्तींनी संस्कार्य व्यक्तीवर हल्ला करू नये म्हणून त्यांना वलिदान करून त्यांची प्रार्थना करतात. बालक जन्मल्यावेळी त्याचा पिता रोगकारक भूतांना उद्देशून म्हणतो –' बालावर आक्रमण करणाऱ्या कुर्कुर व सुकुर्कुर भूतांनो, तुम्ही या बालाला बाधा करू नका. हे सिसरा, तूही तसाच निघून जा. मी तुझ्याविषयी आदर बाळगीन (पार. गृ. सू. १.१६.२०; गोभिल गृ. सू. २.७.१७).

या प्रार्थनेच्या उपायाने काम झाले नाही, तर त्यांना निष्फल व निष्क्रिय करण्याचा दुसरा उपाय असतो. यात भूत-प्रेत-पिशाचांची पूजा-प्रार्थना करीत नाहीत; तर त्यासाठी निराळेच उपाय योजतात. उदा० मुंडन संस्कारात मुलाचे कापलेले केस गोमयाच्या पिंडात अदृश्य करून ते गोठ्यात पुरतात किंवा नदीत फेकतात. त्यामुळे कोणत्याही भूतपिशाचाला त्या केसांच्या आधारे मुलापर्यंत जाता येत नाही. काही प्रसंगी या भूतप्रेतांच्या मनांत भ्रम निर्माण केला जातो. उदा० एखादा रोगी आसन्नमरण झाला की, त्याची प्रतिकृती तयार करून ती जाळून टाकतात. उद्देश हा, की मृतव्यक्ती जळून गेली, अशा भ्रमाने त्यांनी खऱ्या मृताच्या आत्म्यावर आक्रमण करू नये.

या दोन्ही उपायांव्यतिरिक्त तिसरा एक उपाय असतो तो म्हणजे त्यांच्यावर आक्रमण करण्याचा व त्यांची निंदा-निर्भर्त्सना करण्याचा. सर्षपांना (मोहऱ्या) भुते घाबरतात, अशी समजूत आहे. म्हणून संस्कार क्षेत्राच्या भोवती मोहऱ्या फेकतात.

' यदत्रसंस्थितं भूतं ० ' इ. मंत्रांनी ' भूतांनो, तुम्ही या जागेतून निघून जा ' असे त्यांना बजावतात. जातकर्म संस्काराच्या वेळी शिशूचा बाप म्हणतो. 'शंड, मर्क, उपवीर, इ. भूत-प्रेतांनो, तुम्ही या भागातून अदृश्य व्हा. ' (पार. गृ. सू. १. १६-१९; आप. गृ. सू. १.१५). चतुर्थी कर्माच्या वेळी नवोढेचा पती, भूत-प्रेतांनी तिला बाधा करू नये म्हणून अग्नी, वायू इंद्र, इ. देवतांचे आवाहन करतो. ब्रह्मचारी व स्नातक हे त्याचसाठी हातात दंड धारण करतात (पार. गृ. सू. २. ६. २६). काही वेळा माणसे आपस्वार्थी बनून आपल्या संस्कार्य व्यक्तीला त्रास देणाऱ्या भूत-प्रेतांना दुसऱ्या कोणावर तरी लोटून देतात. वधूचे वैवाहिक वस्त्र हे भूत-प्रेतांना तिच्यावर आक्रमण करण्याचे एक हमखास माध्यम असते. ब्राह्मणाला कोणतीही भुते छळू शकत नाहीत. म्हणून ते वस्त्र ब्राह्मणाला दान देतात किंवा ते वृक्षावर अथवा गोठ्यात टांगून ठेवतात.

शुभ प्रभावांचे आकर्षण – अशुभ प्रवाहापासून संस्कार्य व्यक्तीला बचावण्याचे प्रयोग वर सांगितले. ही झाली निराकरणाची बाजू. दुसरी बाजू शुभ प्रभाव आकर्षित करून घेण्याची आहे. त्यासाठी अनेक देवतांची स्तुती, प्रार्थना व आवाहन या गोष्टी केल्या जातात. गर्भाधानाची व विवाहाची प्रधान देवता प्रजापती ही असून, उपनयनाची प्रधान देवता बृहस्पती ही आहे. त्या त्या प्रसंगी त्या त्या देवतांची सूक्ते म्हणून त्यांच्याकडे अभीष्ट शुभफल मागतात.

शुभ वस्तूंच्या स्पर्शाने मंगल परिणाम प्राप्त होतात, अशीही समजूत आहे. म्हणून सीमंतोन्नयन संस्काराच्या वेळी उदुंबर या शुभवृक्षाची शाखा गर्भवतीच्या गळ्याला टेकवतात (पार. गृ. सू. १. १५.४६). उंबराला जशी विपुल फळे येतात, त्याप्रमाणे ही स्त्री बहुप्रजा होवो, अशी कामना या कृत्यात असते. मनुष्याचा श्वासोच्छ्वास हा त्याच्या जीवनाचे प्रतीक समजला जातो. नवजात बालकाचे श्वास-प्रश्वास चांगल्या प्रकारे चालावे

म्हणून त्याचा पिता आपला श्वास तीन वेळा त्याच्यावर सोडतो.

सांस्कृतिक प्रयोजन – संस्कारांची वरील प्रयोजने पूर्णपणे स्वीकारून त्याच वेळी महान धर्मशास्त्रज्ञांनी या शास्त्रात उच्चतर धर्म व पवित्रता यांचा समावेश केला आहे. मनू (२.२६) म्हणतो –

> वैदिकैः कर्मभिः पुण्यैर्निषेकादिर्द्विजन्मनाम् ।
> कार्यः शरीरसंस्कारः पावनः प्रेत्य चेह च ।।

अर्थ – द्विजांचे गर्भाधानादी शारीरिक संस्कार वैदिक कर्मांच्या आधारे करावे. त्यामुळे संस्कार्य व्यक्तीचे इहलोक व परलोक दोन्ही शुभ व प्रशस्त होतात.

याज्ञवल्क्यही या विचारांची पुष्टी करतो. बीज आणि गर्भवास या गोष्टी अशुद्ध व अपवित्र असतात, अशी समजूत असते. जातकर्मादी संस्कारांनी ती अशुद्धता दूर होते. शरीर हे आत्म्याचे निवासस्थान असते. हे स्थान शरीरसंस्कारांनी शुद्ध होते. मनू (२.२८) म्हणतो –

> स्वाध्यायेन व्रतैर्होमैस्त्रैविद्येनेज्यया सुतैः ।
> महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः ।।

अर्थ – स्वाध्याय, जप, होम, यज्ञ, देव–ऋषि–तर्पण, प्रजोत्पत्ती व पंच महायज्ञ यांच्या योगे मानवशरीर ब्रह्मप्राप्तीला योग्य असे बनते.

नैतिक प्रयोजन – कालक्रमाने संस्काराच्या कर्मकांडात्मक स्वरूपातूनच संस्कारांच्या नैतिक अंगांचा विकास झाला. माणसाचे ४० भौतिक संस्कार सांगून गौतम त्यापुढे दया, क्षमा, अनसूया, शौच, शम, योग्य व्यवहार, निःस्पृहता आणि निर्लोभता या आठ आत्म गुणांचा संस्कारात समावेश करतो. या आठ आत्मगुणांना विध्यात्मक भागापेक्षाही विशेष महत्त्व आहे, असे सांगताना तो पुढे म्हणतो – ' व्यक्तीने ४० संस्कारांचे यथाविधि अनुष्ठान केले; पण आठ आत्मगुण आत्मसात केले नाहीत, तर त्याला ब्रह्मसान्निध्य प्राप्त होत नाही. याउलट संस्कार शक्य तेवढेच केले आणि आत्मगुण आठही मिळवले तर त्याला ब्रह्मप्राप्ती निश्चित होते. '

संस्कार हे केवळ संस्कार म्हणूनच करायचे एवढीच धारणा संस्कार कल्पनेत कधीही नव्हती. संस्कारांचा परिपाक नैतिक गुणांच्या अभिवृद्धीत व्हावा, अशीच अपेक्षा होती. म्हणूनच संस्कारांत जीवनातल्या प्रत्येक पायरीसाठी व्यवहाराचे नियम धर्मशास्त्रज्ञांनी निर्धारित केले. गर्भिणीधर्म, अनुपनीतधर्म, ब्रह्मचारिधर्म, स्नातकधर्म, गृहस्थधर्म हे त्यासाठीच सांगितले आहेत. त्यांमध्ये कित्येक गोष्टी अंधश्रद्धेच्याही असू शकतील; पण त्यात व्यक्तीच्या नैतिक विकासाचे प्रयत्न स्पष्टपणे दिसून येतात. व्यक्तित्वाची निर्मिती आणि विकास या गोष्टी धर्मशास्त्रज्ञांनी आवर्जून सांगितल्या आहेत. उपनयन व शिक्षण यांसंबंधींचे संस्कार ही एक सांस्कृतिक भट्टीच आहे. प्राचीन काळी बालकाला या विधिनियमांच्या चक्रात घालून त्याला प्रगतिशील आणि परिष्कृत जीवन व्यतीत करण्यासाठी पात्र व समर्थ केले जात होते. विवाह हा संस्कार हे मानवी सभ्यतेचे एक विकसित स्वरूप आहे. त्या संस्कारात नवदंपतीला केला जाणारा उपदेश त्यांची स्वार्थपरायणता नष्ट व्हावी आणि त्या दंपतीने आपण समाजाचे एक उपकारक अंग आहो ही भावना धरावी, यासाठी असतो.

आध्यात्मिक प्रयोजन – शास्त्रीय संस्कारांनी उत्पन्न होणाऱ्या नैतिक गुणांतून संस्कार्य व्यक्तीचा आध्यात्मिक विकास घडावा अशीही अपेक्षा असते. संस्कारित जीवन हे भौतिक धारणा आणि आत्मवाद यांच्यामधला मध्यम मार्ग आहे, अशी तत्त्वज्ञ आचार्यांची धारणा होती. जैन, बौद्ध, आणि वेदान्ती हे शरीराला पंच तत्त्वमय व सारहीन वस्तू समजतात. चार्वाक, लोकायत, इ. लोक शरीर हेच खरे आणि शरीरापलिकडे काही नाही, असे मानतात. शरीराची एकदा जळून राख झाली, की सारे काही संपले, अशी त्यांची धारणा आहे. पण मध्यममार्गी आचार्य शरीर हे निःसार मानीत असले तरी, शरीर हे आत्ममंदिर आहे आणि म्हणूनच ते मूल्यवान आहे, असे समजतात. या मूल्यवान आत्ममंदिराला संस्कारांनी परिष्कृत करून ते आत्म्याला आवडते असे निवासस्थान बनवावे, असा त्यांचा आशय असतो.

संस्कार हे अशा प्रकारे आध्यात्मिक शिक्षणाच्याच वरच्या पायऱ्या मानल्या गेल्या आहेत. सुसंस्कारित व्यक्तीला संपूर्ण जीवन हे संस्कारमयच आहे आणि संपूर्ण दैहिकक्रिया या आध्यात्मिक विचारांनीच अनुप्राणित आहेत, असा अनुभव घडू शकतो. सांस्कारिक जीवनाचा आध्यात्मिक तत्त्वांशी समन्वय संस्कारांच्या द्वारेच स्थापित केला जातो. जीवनाच्या या सुसंस्कृत पद्धतीत शरीर आणि त्याचे कार्य पूर्णत्वाच्या प्राप्तीला बाधक न होता साधकच होते. संस्कारिक व्यक्तींना एक सुप्त विश्वास असतो, की विधियुक्त संस्कारांच्या अनुष्ठानाने आपण देहबंधनातून मुक्त होऊन मृत्युसागराच्याही पैलपार जाऊ [ हि. ह. ]

## संस्कृत भाषा आणि साहित्य

संस्कृत या संज्ञेचा व्यापक अर्थाने प्रयोग केला जातो तेव्हा तिच्या कक्षेत वैदिक वाङ्मयातील 'वैदिक' भाषा, रामायण-महाभारतादी ग्रंथांतील 'आर्ष' संस्कृत, पाणिनीने आपल्या अष्टाध्यायीत सांगोपांग वर्णिलेली आणि वररुचि-पतंजलींनी अनुवर्णित अशी 'भाषा', तसेच या मुनित्रयाने

प्रामाण्याने उत्तर कालात सुमारे दोन सहस्रकांच्या अवधीतल्या ग्रंथकारांनी धार्मिक, ललित आणि शास्त्रीय रचनांसाठी अवलंबिलेले 'अभिजात' संस्कृत; इतकेच काय, पण या पाणिनिप्रमाणित भाषेशी काही अंशी फटकून वागणारे बौद्ध (क्वचित जैन) परंपरेतले 'संकर' संस्कृत या सर्वांचा समावेश होतो. अभिजात संस्कृत वाङ्मयात प्रतिबिंबित झालेली संस्कृत भाषा आजही भारताच्या घटनेने मान्यता दिलेल्या भाषांपैकी एक असून, अल्प प्रमाणात का असेना, लेखनाचे आणि भाषणाचे अखिल-भारतीय माध्यम म्हणून कार्य करीत आहे. इ. स. १९६१-च्या जनगणनेनुसार आपली गृहभाषा संस्कृत सांगणाऱ्यांची संख्या २४६० आहे. यात उत्तर प्रदेश १३३०, मध्य प्रदेश ३८४, महाराष्ट्र ८२ (गॅझे. इं. १.१९६५). शब्दसंपदा आणि विचारसंपदा यांनी प्रमुख अर्वाचीन भारतीय किंबहुना भारताबाहेरच्याही काही देशांतील भाषांचे शतकानुशतके पोषण करणारा चिरंतन मूलस्रोत म्हणून संस्कृत भाषा आणि साहित्य यांना जसे अखिल-भारतीय आणि बृहद्-भारतीय महत्त्व आहे, तसे यूरो-भारतीय भाषाकुटुंबातली एक अग्रगण्य, ज्येष्ठ भाषा म्हणून संस्कृताला, आणि मानवाने निर्मिलेले प्राचीनतम समृद्ध वाङ्मय म्हणून संस्कृत वाङ्मयाला जागतिक विद्याक्षेत्रात मानाचे स्थान आहे. जगातल्या राष्ट्रांत ज्येष्ठ राष्ट्र म्हणून भारताचे संस्कृत हे यथार्थ प्रतीक आहे.

**संस्कृत आणि यूरोपीय भाषा** – संस्कृताचे जागतिक विद्याक्षेत्रातले महत्त्व हे पाश्चात्त्य पंडितांनी इ. स. च्या अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकांत संस्कृत विद्येची जी अनन्य उपासना केली तिचे फळ होय. पाश्चात्त्य जगाला संस्कृताची ओळख कशी झाली याचा इतिहास सतराव्या शतकाच्या मध्यापासून सुरू होत असला, तरी या भाषेचे जागतिक महत्त्व लक्षात आल्याची खूण पटते ती सर विल्यम जोन्सच्या उद्गारात. कलकत्त्याच्या रॉयल एशिॲटिक सोसायटी ऑफ बेंगॉल या संस्थेत इ. स. १७८६ मध्ये केलेल्या आपल्या प्रसिद्ध भाषणात तो म्हणतो –

'संस्कृत भाषेची प्राचीनता काय असेल ती असो, तिची घटना आश्चर्यकारक आहे – ग्रीक भाषेहून बांधेसूद, लॅटिनहून समृद्ध, आणि दोहोंहून प्रौढ परिष्कृत; आणि तरी क्रियापदांचे धातू आणि व्याकरणाची रूपे यांच्या दृष्टीने पाहता केवळ योगायोगाने संभवणार नाही इतकी या दोन्ही भाषांशी दृढ जवळीक दाखवणारी, – खरोखर इतकी दृढ की त्यांचे परीक्षण करताना भाषाशास्त्रज्ञाला या भाषा कोणत्या तरी एकाच उगमातून अवतरल्या आहेत, असे मानल्यावाचून गत्यंतरच राहत नाही.'

याच समानोद्भव भाषांच्या गटात सर विल्यम जोन्सने गॉथिक, केल्टिक आणि पर्शियन या भाषांचा अंतर्भाव केला आहे.

ग्रीक, लॅटिन, संस्कृत आणि अन्य अनेक भाषांचे जे हे रक्ताचे नाते विल्यम जोन्सच्या 'आर्ष' चक्षूंना दिसले त्याची काहीशी प्रचीती निर्दिष्ट भाषांतील उच्चारतः आणि अर्थतः सदृश असलेल्या शब्दांच्या पुढील उदाहरणांवरून येऊ शकेल –

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **संस्कृत :** | पितर् | भरामि | श्वन् | गो |
| **ग्रीक :** | पातेर | फेरोमि | क्युऑन | बौस |
| **लॅटिन :** | पातेर | फ़ेरो | कनिस् | बोस |
| **जर्मन/गॉथिक:** | फ़ाटर | बेर | हुंड | खू |
| **इंग्रजी :** | फ़ादर | बेअर | हाउंड | खाउ |

**यूरो-भारतीय भाषा** – वर उद्धृत केलेल्या जोन्सच्या उद्गारांची सत्यता पुढच्या साधारणतः दीडशे वर्षांत तुलनात्मक भाषाशास्त्राचा जो विकास झाला त्याने पुरेपूर पटवून दिली. भारतातल्या आणि यूरोपमधल्या बहुसंख्य भाषांच्या ज्या समान उगमाचे अद्भुत स्वप्न विल्यम जोन्सने पाहिले त्याची उपलब्ध भाषांच्या तुलनात्मक अभ्यासाच्या आधाराने पुनर्घटना करण्याचा पहिला पद्धतशीर व्यापक प्रयत्न फ्रान्झ बोप्प (१७९१–१८६७) याने केला आणि तुलनात्मक भाषाशास्त्राचा पाया घातला. आधुनिक भाषाशास्त्राचा जन्म अशा रीतीने पाश्चात्त्य पंडितांच्या संस्कृताध्ययनात झाला. भाषाशास्त्रज्ञांनी अनेक पिढ्यांच्या अध्ययनाने पुनर्घटित केलेली, बहुसंख्य यूरोपीय आणि भारतीय (म्हणजे यूरो-भारतीय) भाषांची जननी असलेली जी मूल भाषा ती 'इंडो-युरोपियन' अर्थात भारतीय-यूरोपीय किंवा 'यूरो-भारतीय' भाषा म्हणून निर्देशिली जाते. ती भाषा जे लोक बोलत त्यांचे नामकरण भाषाशास्त्रांनी 'विरोस' म्हणजे 'वीर', या जन, लोक अशा अर्थाच्या शब्दाने केले आहे. यूरो-भारतीय भाषांचे कुटुंब पृथ्वीच्या सर्वाधिक भागावर पसरले असून, त्या बोलणारे लोकही संख्येच्या आणि सांस्कृतिक-वैज्ञानिक प्रगतीच्या दृष्टीने इतरांच्या पुढे आहेत.

**यूरो-भारतीयांचे मूळ स्थान** – विरोस लोकांचे मूळ वसतिस्थान कोणते या प्रश्नाचा पुष्कळ खल झाला असून, अनेक उपपत्ती मांडल्या गेल्या आहेत. वैदिक आर्य मुळात उत्तर ध्रुव प्रदेशात राहत होते, हे टिळकांनी आपल्या ओरायन या ग्रंथात मांडलेले मत; वैदिक आर्य हे मूळ सप्तसिंधू प्रदेशातच राहणारे, तेथून त्यांच्यापैकी काहींनी विदेशांत प्रयाण केले, हे कूझरचे पावगींनी प्रपंचित केलेले मत; तसेच यूरो-भारतीय हे मूळ मध्य आशियातले, हे माक्स म्यूलरप्रभृती पंडितांनी उचलून धरलेले मत; ही आता या विषयाचा इतिहास अपूर्ण राहू नये म्हणून उल्लेखिली जाणारी मते सोडली, तर आजच्या अभ्यासकांना कमी अधिक प्रमाणात विचारणीय वाटणारी दोन मते राहतात–

(१) विरोस लोक मूळचे यूरोपमधले व (२) विरोस मूळचे उत्तर किरघीज प्रदेशातले. ही आणि सदृश मते, त्यांच्या उपपत्ती, त्यांतली न्यूने, बलाबले यांचा सविस्तर परामर्श करून डॉ. रा. ना. दांडेकर शेवटचे मत ग्राह्य ठरवतात. ते म्हणतात–

'या मूळ वसतिस्थानापासून, मूल-यूरो-भारतीय-भाषिकांची दोन मोठी निर्गमने घडून आली. ज्या लोकांनी पश्चिमेकडे जाऊन यूरोपातील प्रिपेट प्रदेशात पुन्हा काही काल वसती केली, त्यांना सामान्यपणे पूर्वयूरोपीय अशी संज्ञा देता येईल. या पूर्वयूरोपीयांच्याही पूर्वी मूल-यूरो-भारतीय-भाषिकांच्या काही टोळ्यांनी उत्तर-किरघीज प्रदेशातून, बल्ख प्रदेशाकडे प्रयाण केले होते. हेच लोक पूर्वार्य. या पूर्वार्यांनी बल्ख प्रदेशात बऱ्याच कालपर्यंत वसती केली होती. पण पुढे त्यांचीही तीन मोठी निर्गमने झाली. मिटानी, हुरियन इत्यादी लोकांचे पूर्वज मध्य-आशियांत गेले; प्राचीन इराण्यांचे पूर्वज इराणकडे गेले; आणि वैदिक भारतीयांच्या पूर्वजांनी सप्तसिंधू प्रदेशावर विजयाक्रमण केले.'

विरोस लोकांच्या मूल वसतिस्थानाविषयीची ही उपपत्ती प्रामुख्याने ब्रांडेनस्टाईनच्या याविषयीच्या १९३६ मध्ये प्रसिद्ध झालेल्या संशोधनावर आधारलेली आहे. या विषयावर मूलभूत आणि बारीक सारीक पुष्कळ मतभेद आहेत.

**यूरो-भारतीय आणि उत्तर कालखंड** – या मूळ वसतिस्थानी विरोस लोक कोणत्या काळात राहत होते, हा तर्काचा विषय असून, वेदवाङमयाचा काळ ठरवणे ही गोष्ट अपरिहार्यपणे त्याच्याशी निगडित आहे. चतर्जींनी यूरो-भारतीय काल ख्रिस्तपूर्व ३५००–३००० वर्षे, इराणी-भारतीय काल (ज्या काळात प्राचीन इराणी आणि प्राचीन आर्य एकत्र होते) ख्रिस्तपूर्व २००० वर्षे आणि वैदिक आर्यांचा भारतप्रवेशकाल ख्रिस्तपूर्व १५०० वर्षे सांगितला आहे. पहिल्या कालखंडात आजच्या भारतीय, पारसीक–इराणी आणि यूरोपीय लोकांचे प्राचीन पूर्वज अविभक्त अवस्थेत उत्तर किरघीज प्रदेशात राहत होते. तेथून अनेक निष्क्रमणे होऊन काही जनगण यूरोपकडे गेले, तर एक बल्ख प्रदेशात उतरला. बल्ख प्रदेशात आलेल्या जनगणात प्राचीन पारसीक–इराणी आणि भारतीय वैदिक आर्य दुसऱ्या कालखंडात अविभक्त होते. ते पुढे विभक्त झाले. पारसीक–इराणी इराणात जाऊन वसले, तर वैदिक आर्य सप्तसिंधू प्रदेशात राहिले. येथे तिसरा कालखंड येतो. वैदिक वाङमयाच्या निर्मितीचा काळ आर्यांच्या भारतप्रवेशकालाच्या आधी आणि नंतर असा दोन्ही दिशांनी पसरला आहे. यांपैकी पहिल्या कालखंडातल्या परिस्थितीने भारतीय आणि यूरोपीय भाषांत आढळणाऱ्या समानभाषिक आणि सांस्कृतिक सामग्रीची संगती लागते. दुसऱ्या कालखंडातल्या परिस्थितीने अवेस्ता आणि वेद या वाङ्मयसंप्रदायांमध्ये भाषा, धर्म आणि संस्कृती या दृष्टींनी आढळणाऱ्या समान प्रवृत्तींची उपपत्ती लागते; तर तिसऱ्या कालखंडातल्या परिस्थितीने या दोन संप्रदायांतल्या भिन्न प्रवृत्तींचा आणि वैदिक आर्यांच्या संस्कृतीच्या उत्तर–कालीन विकासाचा उलगडा होतो.

**यूरो-भारतीय भाषेचे स्वरूप** – यूरो-भारतीय भाषेत अ, इ, उ, ए, ओ हे मुख्य स्वर; अँ हा ह्रस्व अर्धमात्रात्मक स्वर; कवर्ग (त्रिविध), तवर्ग, पवर्ग हे व्यंजनवर्ग; य्-र्-ल्-न् हे अंतःस्थ; स् हा ऊष्म वर्ण होते. इ आणि उ या स्वरांचे परिस्थितीनुसार य् आणि व् यांमध्ये परिवर्तन होत असे. स् हे अघोष व्यंजन घोष व्यंजनांच्या संबंधात आल्यास ज् या घोषरूपात परिणत होई. नामरूपांत धातुरूपांत स्वरविकृती होत असे. आठ विभक्ती, तीन वचने, तीन लिंगे होती. पण द्विवचनाचा प्रयोग दोन ही संख्या दाखवण्यासाठी नव्हे, तर जोड-शब्दांच्या अंती होई; लिंगाचा विशिष्ट विभक्ति–प्रत्ययाशी अविच्छेद्य संबंध नसे. धातूंना प्रत्ययांपूर्वी जोडायची विकरणे तीस होती. उपसर्ग बरेच होते; त्यांतलाच एक 'अ' हे रूप पावून पुढे भूतकालाच्या रूपांत सर्वत्र आरंभी जोडला जाऊ लागला व बाकीच्यांतले २१ उरले. समास होते. असे हे काही यूरो-भारतीय भाषेचे ठळक विशेष आहेत. तिची अधिक कल्पना पुढे दिलेल्या गायत्री मंत्राच्या आजच्या परिचित उच्चारणाचे लिखित रूप आणि यूरो-भारतीय भाषेतले अनुमित रूप यांच्या तुलनेने येऊ शकेल –

गायत्री मंत्राचे आजचे परिचित रूप –

> तत् सवितुर् वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।
> धियो यो नः प्रचोदयात् ।।

या मंत्राचे यूरो-भारतीय रूप –

> तत् सवितृस् बरइनिअं भर्गज् दइवस्य धीमधि ।
> धियज् यज् नस् प्र क' उदयात् ।।

**इराणी–भारतीय भाषा** – इराणी-भारतीय भाषेचे स्वरूप त्या भाषेच्या परंपरेतला प्राचीनतम ग्रंथ जो अवेस्ता त्यातल्या पुढील उदाहरणावरून लक्षात येईल. मूळ मंत्राबरोबर त्याचे संस्कृत रूपांतरही दिले आहे –

अवेस्तामधील मंत्र –

> अषॅम् वोहू वहिश्तॅम् अस्ती
> उश्ता अस्ती उश्ता अह्माइ ।
> ह्यत् अषाइ वहिश्ताइ अषॅम् ।।

या मंत्राचे संस्कृत रूपांतर –

> ऋतं वसु वसिष्ठम् अस्ति

ओषितृ अस्ति ओषितृ अस्मै ।
यत् ऋताय वसिष्ठाय ऋतम् ॥

'सतम्' आणि 'कॆंतुम्' – यूरो-भारतीय भाषांचे 'सतम्' आणि 'कॆंतुम्' असे दोन गट करण्याची जुनी पद्धत आहे. शंभर अशा अर्थाचा 'क्म्तोम्' हा शब्द आहे. त्याचा आद्य कंठ्य वर्ण काही भाषांत अविकृत राहिला आहे. उदा० – ग्रीक 'कातोन्' लॅटिन 'कॆंतुम्', केल्टिक (प्राचीन आयरिश) 'केत्', वेल्श 'कंत्', तुखारी 'कंत्'; तर काहींत तो अनुरूप ऊष्म वर्णांत परिवर्तित झाला आहे. उदा० – संस्कृत 'शतम्', अवेस्ता 'सतम्', प्राचीन स्लाव 'सुतो', लियुआनियन 'शिम्तस्'. असे अन्यही कंठ्य वर्णांचे रूपांतर 'सतम्' वर्गातल्या भाषांत झालेले आढळते. 'सतम्'वर्गीय भाषा बहुतांशी पूर्वेकडे (भारतीय, इराणी-भारतीय, बाल्टिक, स्लॅवॉनिक, आर्मेनियन, अल्बानियन), आणि 'कॆंतुम्'वर्गीय बहुतांशी पश्चिमेकडे (ग्रीक, लॅटिन, केल्टिक, जर्मॅनिक इत्यादी) आढळतात.

**वैदिक आर्यांच्या बोली** – वैदिक आर्य भिन्न भिन्न काळी गटागटांनी सप्तसिंधू प्रदेशात आले, असे मानतात. या गटांच्या बोली काही प्रमाणात एकमेकींहून भिन्न होत्या. त्यांतून एक साहित्यिक प्रमाणभाषा साकार झाली आणि तीत ऋग्वेद-अथर्ववेदांतली सूक्ते रचली गेली. वैदिक आर्यांच्या विविध बोलींचे काही काही विशेष जसे या सूक्तांतून डोकावतात, तसे ते उत्तर वैदिक वाङ्मय आणि वेदोत्तर संस्कृत वाङ्मय यांत आलेल्या काही निर्देशांवरूनही माहीत होतात. कौषीतकी ब्राह्मणात (७.६) एका ठिकाणी उदीच्य (उत्तर) प्रदेशातली भाषा अधिक विख्यात म्हणून निर्देशिली आहे; तांड्य ब्राह्मणात (१७.४) पूर्वेकडच्या व्रात्यांची भाषा हेटाळणीने निर्देशिली आहे. पतंजलीच्या महाभाष्यात उद्धृत केलेल्या एका उताऱ्यात असुर लोक र् च्या जागी ल् उच्चारत, 'अरय:'च्या ऐवजी 'अलय:' असे म्हणत, असा उल्लेख आहे. पुढे ज्या प्राकृत भाषा साहित्यासाठी उपयोगात आल्या, त्यांत ज्या वर्णविकृतीच्या प्रवृत्ती आढळून येतात, त्या पूर्वकालीन वैदिक-संस्कृत साहित्यातही इकडे तिकडे जागा धरून बसल्या आहेत, असे काही शब्दांवरून आढळते. उदा०– भल्ल (भद्र), क्षुल्ल (क्षुद्र), विकट (विकृत), निकट (निकृत), दण्ड (दन्द्र, ग्रीक 'देन्द्रोन'), पठ् (प्रथ्), घट् (ग्रथ्).

**संस्कृतावर प्राकृताचा प्रभाव** – पाणिनीचे व्याकरण संस्कृताचे नियंत्रण करू लागल्यावरही भारताच्या विविध प्रदेशांतल्या पंडितांच्या संस्कृत उच्चारांत वेगवेगळ्या प्रवृत्तींच्या रूपाने प्राकृताचा प्रभाव जिवंत राहिला, तो आजच्या घडीलाही अनुभवाला येतो. 'ज्ञ्'चा उच्चार संस्कृतज्ञांमध्येसुद्धा 'ग्य्, द्न्य्, न्' असा विविध प्रकारचा आढळतो. 'ष'चा उच्चार मैथिली पंडित 'ख्' करतात (खट् शास्त्राणि). श्, ष्, स् या तीन वर्णांचा उच्चार बंगालमध्ये श् असाच प्राय: केला जातो. आसाममध्ये तर या तीन्हींची जागा ह् ने घेतली आहे. यासंबंधी एक श्लोक प्रचलित आहे तो असा–

आशीर्वादं न गृह्णीयात् पूर्वदेशनिवासिन: ।
शतायुरिति वक्तव्ये हतायुरितिवादिनाम् ॥'

अर्थ – पूर्व देशातल्या रहिवाश्याकडे आशीर्वाद मागू नये, कारण आशीर्वाद 'शतायु: भव' असा अभिप्रेत असला तरी, तो 'हतायु: भव' अशा उच्चारामुळे शापच ठरायचा!

उत्तरेकडे होणारे 'स्नाना'चे 'अस्नान', 'शतपथा'चे 'सत्पथ', 'संसारा'चे 'सन्सार', केरळातले 'सकल'चे 'सगल', 'वट'चे 'वड', 'अभवत्'चे 'अभवल्', अशा अगणित उदाहरणांतून हेच वैविध्य प्रत्ययाला येते. ही सर्व संस्कृताची प्रादेशिक रूपे होत. त्यांतल्या त्यात महाराष्ट्र आणि आंध्र, कर्नाटक, तमिळनाडू प्रदेशांतले संस्कृत उच्चार कमी विकृत म्हणून प्रमाणभूत समजतात.

**बुद्धकालातली भाषिक स्थिती** – अशा चोरवाटांनी एकमेकींच्या घरात शिरणाऱ्या बोलींच्या प्रवृत्ती सोडल्यास बुद्धकालात उत्तर भारतात भाषेच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे परिस्थिती असावी– (१) सरस्वती नदीच्या उत्तरपश्चिमेकडचा उदीच्य प्रदेश, त्याच्या पूर्वेकडचा दूरचा प्राच्य देश आणि या दोहोंमधला मध्य देश या तीन प्रदेशांत प्रचलित असलेल्या तीन बोली. यांपैकी उदीच्य देशातली बोली वेदभाषेला सर्वांत जवळची आणि प्राच्य देशातली बोली सर्वांत दूरची होती. (२) छांदस किंवा आर्ष भाषा– वैदिक वाङ्मयाची भाषा. हिचे अध्ययन पाठशालांत चाले. (३) मध्य देश आणि प्राच्य देश यांत प्रचलित असलेल्या बोलींचे काही प्रवृत्तिविशेष आत्मसात केलेल्या उदीच्य बोलीचे प्राचीन रूप. ही त्या काळातली शिष्ट जनांच्या व्यवहाराची आणि शास्त्रग्रंथांच्या निर्मितीसाठी उपयोजिली गेलेली भाषा.

वर निर्देशिलेल्या तीन बोलींपैकी प्राच्य भाषा छांदस भाषेहून किती दूर गेली होती, याचा प्रत्यय बौद्ध परंपरेत प्रचलित असलेल्या एका प्रसंगावरून येतो. प्राच्य भाषा कळण्यास उदीच्य देशीयाला जी अडचण येई, तिचे निराकरण व्हावे यासाठी दोघां ब्राह्मण शिष्यांनी एकदा बुद्ध भगवानाला सुचवले, की 'आपल्या उपदेशाचा छांदस, अर्थात शिष्ट भाषेत अनुवाद केला जावा.' बुद्धाने ही सूचना मानली नाही आणि प्रत्येकाला आपापल्या मातृभाषेच्या द्वारा हा उपदेश उपलब्ध व्हावा, असा आग्रह धरला.

**पाणिनीचे कार्य** – अशा या बोलींमधले अंतर वाढत अस-

तानाच शुद्धतानिष्ठ उदीच्य भाषेला तिच्या भाग्याने एक अद्वितीय वैयाकरण लाभला आणि त्याच्या ग्रंथात तिचे स्वरूप जे सांगोपांग रेखांकित झाले ते कायमचे. गांधार देशातल्या शलातुर (आजचे पाकिस्तानातले लाहोर) गावी जन्मलेल्या या जगात सर्वश्रेष्ठ मानल्या जाणाऱ्या वैयाकरणाचे नाव 'पाणिनि' आणि त्याने अत्यंत लाघवयुक्त सूत्रशैलीने रचलेल्या ग्रंथाचे नाव 'अष्टाध्यायी'. अष्टाध्यायीने ज्या 'भाषे'चे निरूपण केले तिलाच कालांतराने 'संस्कृत' हे नाव मिळाले. 'देववाणी' म्हणून दंडीने हिचा गौरव केला, 'संस्कृतं नाम दैवी वाक् अन्वाख्याता महर्षिभिः' (काव्यादर्श १.३३). या भाषेने ललित आणि शास्त्रीय वाङ्मयाची एक महान परंपरा निर्माण केली. ही भाषा, हे वाङ्मय आणि या दोहोंतले सांस्कृतिक धन यांनी शतकानुशतके केवळ भारतातल्याच नव्हे; तर भारताबाहेरच्याही, विशेषतः पूर्वेकडील देशांतल्या भाषा, लोक व परंपरा यांवर चिरस्थायी ठसा उमटवला.

**पाली आणि प्राकृत परंपरा** – भारतीय आर्यांच्या प्रमाणभाषेचे जे रूप पाणिनीच्या अष्टाध्यायीत प्रतिबिंबित झाले आहे, ते शास्त्रीय आणि ललित वाङ्मयाच्या एका महान परंपरेचे शतकानुशतके वहन झाले, त्याचप्रमाणे या प्रमाणभाषेला धरून ज्या बोली व्यवहारात रुळल्या होत्या, त्याही विशिष्ट संप्रदायांत वाङ्मयाचे वहन म्हणून स्वीकारल्या जाऊन, त्यांच्याही परंपरा निर्माण झाल्या. बौद्ध संप्रदायाची पाली भाषेतील वाङ्मयाची परंपरा आणि जैन संप्रदायाची अर्धमागधी भाषेतील वाङ्मयाची परंपरा या वेदोत्तर कालातील संस्कृत वाङ्मयाच्या परंपरेइतक्याच प्राचीन आहेत. पण संस्कृत वाङ्मयाच्या निर्मितीची परंपरा थेट आजच्या काळाला येऊन भिडली आहे. तर या अन्य परंपरा काही काळ चालू राहून पुढे थांबल्या आहेत. म्हणजे संस्कृतात आजही साहित्य निर्मिती चालू आहे, तशी पाली आणि प्राकृत या भाषांत चालू नाही.

**संस्कृत आणि प्राकृत** – पाली व प्राकृत यांना भाषा असे म्हणायचे ते केवळ सोयीसाठी; त्या संस्कृताहून भिन्न भाषा आहेत, असे संस्कृत साहित्यिकांना अथवा त्यांच्या वाचकांना वाटत नव्हते. संस्कृत म्हणवणाऱ्या नाटकांतून विशिष्ट पात्रांच्या तोंडी प्राकृत भाषणे घातलेली आढळतात ती त्यामुळेच. संस्कृत साहित्य-शास्त्रग्रंथांतूनसुद्धा उदाहरणे म्हणून प्राकृत पद्ये विपुल प्रमाणात उद्धृत होतात. ही नाटके ज्या काळात रंगमंचावर प्रयुक्त होत, त्या काळात संस्कृत बोलणाऱ्या श्रोत्यांना त्यांतले प्राकृत संवाद आणि प्राकृत बोलणाऱ्यांना संस्कृत संवाद, कळण्यात काही अडचण येत नव्हती, असा याचा अर्थ होतो. आजच्या मराठी नाटकात पात्रानुसार कोकणी, मावळी इत्यादी बोलींतले संवाद कळायला जशी श्रोत्यांना अडचण येत नाही, त्याप्रमाणे म्हणजे भाषा एकच, पण ती उच्चारण्याच्या धाटण्या वेगवेगळ्या, असा दृष्टिकोन संस्कृत आणि प्राकृत भाषांकडे पाहण्याचा त्या भाषांतून व्यवहार करणाऱ्या लोकांचा होता. ही गोष्ट विदेशी प्रवाशांच्या निरीक्षणावरूनही लक्षात येते. अल् बिरुनीने आपल्या भारतातील प्रवासाच्या वृत्तात लिहिले आहे, की येथल्या भाषेची दोन रूपे आहेत – (१) संस्कृत व (२) प्राकृत. संस्कृत हे शिष्टांच्या आणि साहित्याच्या भाषेचे रूप. प्राकृत रूप याहून मूलतः भिन्न मानले जात नव्हते. पाली वाङ्मयात प्राचीन काळात काव्ये, नाटके निर्माण झालेली आढळत नाहीत, यावरून अशा वाङ्मयासाठी बौद्ध परंपरेतही संस्कृत हेच माध्यम प्रचलित होते, असा निष्कर्ष निघतो.

**असांप्रदायिक संस्कृत** – संस्कृत ही एखाद्या विशिष्ट वर्गाची किंवा धर्माची भाषा असे कोणाला कधी वाटले नाही. म्हणूनच भारतातल्या मुस्लीम राज्यकर्त्यांनीसुद्धा संस्कृत विद्येला आश्रय दिला; इतकेच नव्हे तर आपले काही शिलालेखही संस्कृतात रचवले. अरबी पंडित भारतीय पंडितांना बगदादला बोलावून वैद्यक, ज्योतिष, इ. विषयांवर त्यांची व्याख्याने करवीत, संस्कृत ग्रंथांची त्यांच्या करवी अरबीत भाषांतरे करवीत, याचे तरी कारण हेच होय. असे असताना संस्कृताला उत्तेजन म्हणजे विशिष्ट धर्म किंवा वर्ग यांच्या वर्चस्वाला आवाहन असे समजणे तर्कहीन आहे. संस्कृताचे अध्ययन सर्व यूरो-भारतीय भाषांच्या शाळांतून व्हावे, असे काही पाश्चात्त्य ग्रंथकार आवाहन करीत आहेत, हे पाहिल्यावर तर वर निर्देशिलेल्या समजुती क्षुद्र वाटू लागतात.

**वैदिक भाषेचे विशेष** – पाणिनीने अष्टाध्यायीत प्रामुख्याने संस्कृत भाषेचे निरूपण केले असले, तरी छांदस अर्थात वैदिक भाषा उपेक्षिलेली नाही. अवसर दिसेल तेथे त्याने संस्कृत भाषेतल्या रूपप्रवृत्तीहून ज्या भिन्न प्रवृत्ती वैदिक भाषेत असतात त्यांचे दिग्दर्शन केले आहे. या दोन भाषांची ध्वनिप्रक्रिया प्रायः समानच आहे. जो भेद आहे तो शब्दसंपदेत आणि रूपप्रक्रियेत. संस्कृताची जी वर्णावली आहे, तीत ळ् हे व्यंजन ('अग्निमीळे पुरोहितम्'; 'अरं दासो न मीळ्हुषे') आणि काही अनुस्वारविशेष यांची भर घातली की वैदिक वर्णमाला तयार होते.

नामरूपप्रक्रियेत वैदिक भाषेत येणारी पुष्कळ रूपे संस्कृतातून लुप्त झाली आहेत. उदा० – देवा (= देवौ), विश्वा (= विश्वानि), देवासः (= देवाः), देवेभिः (= देवैः), देवीः (=देव्यः), भगवः (=भगवन्), अस्मे (= अस्मासु), आवम् (= आवाम्), युवम् (= युवाम्).

धातुरूपप्रक्रियेत तर खूपच फरक पडला आहे, म्हणजे वैदिक

भाषेत आढळणारी विविधता संस्कृतात अनेक रूपांचा लोप होऊन पुष्कळच मर्यादित झाली आहे. उदा० – मिनीमसि (= मिनीमः, वर्त. प्र. पु. व. व) अशी 'मसि' प्रत्ययान्त वैकल्पिक रूपे; दुह्रे (= दुहे, वर्त. प्र. पु. ए. व.), अनैः (= अनैषीत्) आणि 'लेट्'-ची सर्व रूपे (लेट् म्हणजे आज्ञार्थ आणि विध्यर्थ यांच्या दरम्यानचा 'सक्तीची विनंती' असा आशय व्यक्त करणारा अर्थ) संस्कृतातून लुप्त झाली. लेट्-चा प्रथम पुरुषच काय तो संस्कृत आज्ञार्थात उरला आहे. 'मा स्म गमः', 'मा कार्षीः' अशा प्रयोगातली 'गमः', 'कार्षीः' इत्यादी रूपे हा वैदिक लेट्-चा आणखी एक अवशेष. विविध हेत्वर्थक अव्ययांपैकी तुम्-प्रत्ययान्त (गन्तुम्, कर्तुम्, हे सुद्धा वेदात अल्पप्रयुक्तच) तेवढे उरले; बाकीची (गन्तोः, गन्तवि, कर्तोः कर्तवे,) लोप पावली. पूर्वकालवाचकांपैकी (हित्वा, हित्वाय, हित्वी) त्वान्त तेवढे उरले, ल्यबन्त सोपसर्ग धातुंपुरते मर्यादित झाले. वेदांत उपसर्ग आणि क्रियापद यांच्यामध्ये वाटेल तितके अन्य शब्द येऊ शकतात, हे वैशिष्टच, 'कर्मप्रवचनीय' संज्ञा धारण करणाऱ्या काही उपसर्ग-अव्ययांचे तुरळक प्रयोग सोडता, पुढे संस्कृतात राहिले नाही.

शब्दसंपदेत पडलेला फरक – पुढील वैदिक शब्दांच्या उदाहरणांवरून लोप, अर्थान्तर, इ. फरक कळून येईल – अत्क (= वस्त्र), अपस् (= कर्म), आपि (= मित्र), गातु (= मार्ग), ग्ना (= देवपत्नी), जनि (= स्त्री), तितउ (= चाळणी), तोक (= पुत्र, अपत्य), दस्म, दस्र (= दर्शनीय, देखणा, कुशल), दम (= घर), पन् (= स्तुती करणे), मर्य (= युवा), मृळीक (= दया), वध्रि (= खच्ची केलेला), वाज (= लूट, बक्षीस), स्योन (= मृदू); असुर (= बलवान, ईश्वर; देवशत्रू), कारु (= कवी; पुढे शिल्पी), रजस् (= आकाश; पुढे धूळ), पायु (= रक्षणकर्ता; पुढे पुरुषाचे गुह्यांग), वह्नि (= रक्षणकर्ता; पुढे अग्नी), क्रतु (= क्रियानिश्चय, संकल्प; पुढे यज्ञ).

वेदांत समास आहेत; पण ते प्रायः दोन, क्वचितच तीन, घटकांचे. पुढे स्थूल मानाने बाणभट्टाच्या काळापासून त्यांच्या लांबीला काही अंतच राहिलेला नाही. भवभूतीच्या मालतीमाधवातला (५.२३) हा समास पाहा –

> प्रचलितकरिकृत्तिपर्यन्तचञ्चन्नखाघातभिन्नेन्दु –
> निष्यन्दमानामृतश्च्योतजीवत्कपालावलीमुक्तचण्डाट्टहास–
> त्रसद्भूरिभूतप्रवृत्तस्तुति ।

यात २४ घटक शब्द आहेत. याहून अधिकही घटकांचे समास संस्कृत वाङ्मयात आढळून येतात.

अन्य भाषांची संस्कृताला देणगी – वैदिक आर्य सप्तसिंधू प्रदेशात आले त्यापूर्वी नेग्रिटो, ऑस्ट्रिक (निषाद), द्रविड (दास, दस्यू, शूद्र), मोंगोलॉइड (किरात) या वंशांचे लोक भारतात येऊन स्थिरावले होते. त्यांपैकी नेग्रिटो वंशाचे लोक आता मुख्य भूमीवरून प्रायः लुप्त झाले आहेत; ते केवळ अंदमान द्वीपसमूहात उरले आहेत. त्यांच्या भाषेचे काहीही अवशेष आता भारतीय भाषांत उरलेले नाहीत; पण अवशिष्ट तीन वंशांच्या भाषांतून फार प्राचीन काळापासून संस्कृताने शब्दांची उचल केलेली आढळते. ऑस्ट्रिक वर्गातल्या मुख्य जाती कोल आणि मुंडा (= संथाल, मुंडारी, हो, कोरवा, कूर्कू, इ.) यांच्या भाषांतून संस्कृताने पुढील शब्द उचलले – उंदुरु (उंदीर), कदली (केळ), कर्पास (कापूस; ग्रीक 'कार्पासोस'), तांबूल (विडयाचे पान), मरीच (मिरी), लांगल (नांगर), सर्षप (मोहरी), नारिकेल (नारळ), गुवाक (सुपारी), हरिद्रा (हळद), शृंगवेर (आले).

उत्तर भारतातल्या एका मोठ्या नदीचे नाव असलेला 'गंगा' हा शब्द ऑस्ट्रिक भाषांतल्या एका, नदी अशा सामान्य अर्थाच्या शब्दाचे संस्कृत रूप दिसते. उदा० – थाय 'खोंग'; चिनी 'किआंग', बंगाली 'गाङ्', अनामी 'खोउंग'.

द्रविड भाषांतून तर संस्कृताने खूपच शब्द घेतले आहेत. उदा० – अनल (अग्नी), अलस (आळसी), उलूखल (उखळ; हा शब्द वैदिक वाङ्मयातही आला आहे.), कज्जल (काजळ), कटु (तिखट), कठिन, कलुष (गढूळ), काक (कावळा), कानन (अरण्य), काल (काळा), कुटिल (वक्र), कुंड (खळगा), कुंडल, कुंतूल, कुवलय (कमळ), केतक (केवडा), कोटर (ढोली), कोण (कोपरा), खल (धान्याचे खळे; दुर्जन), गंड (टेंगूळ), चतुर, चंदन, चिक्कन (स्निग्ध), चुंबू, चूडा (शेंडी), तूल (कापूस), दंड (काठी), नक्र (सुसर), निबिड (दाट), नीर (पाणी), पटोल (पडवळ), पंडित, पल्ली (पाल – प्राणी), पिटक (पुटकुळी), पिंड (गोळा), पुंख (बाणाचे शेपूट), बक, बल, बिडाल, बिराल (मांजर), बिल (बीळ), बिल्व (बेल), मटची (टोळ – हा शब्द उपनिषदांत आला आहे), मयूर, मल्लिका (मोगरा), मषि (शाई), महिला, माला, मीन (मासा), मुकुट, मुकुल (कळी), मुक्ता (मोती), लाला (लाळ), वलय, वल्ली (वेल), शकल (तुकडा), शठ (लबाड), शव, शूर्प (सूप), इत्यादी.

किरातांचा (चिनी, तिबेटी, सयामी, ब्रह्मी) आणि त्यांच्या चिनी–भोटा वर्गातील भाषांचा प्रभाव प्रायः उत्तर भारतापुरताच मर्यादित राहिला. तथापि चिनी भाषेतून संस्कृतात येऊन बसलेले पुढील शब्द आता ओळखू येणेही कठीण आहे – कीचक (बांबू), मुसार-मसार (रत्न, नीलमणी), शय (कागद), सिंदूर, तसर (वस्त्रविशेष). याप्रमाणे संस्कृतात अनेक उगमां-

तून विविध शब्द येत राहिले आणि पर्यायी शब्द प्रचारात आले. यांतले बहुसंख्य शब्द वेदोत्तर कालात संस्कृतात येऊन बसले असले, तरी काही वेदांतही शिरले आहेत. भारतीय आर्यांच्या प्रसरणापूर्वी भारतात भाषांची गुंतागुंत कशी असली पाहिजे याची यावरून कल्पना येते.

वर उद्धृत केलेल्या अनार्य उगमांतून संस्कृताने जशी उचल केली, तशी इराणी, ग्रीक अशा नात्यातल्या भाषांतूनही केली आहे. 'लिपि, वारबाण (चिलखत), अश्ववार' हे 'दिपि, वरोपन, असबार' या इराणी शब्दांवरून आलेले आणि 'खलीन (लगाम), सुरुंगा (भुयार), क्रमेलक (उंट)' हे 'कलीनोस, स्यूरिक्स, कामेलोस' या ग्रीक शब्दांवरून आलेले संस्कृत शब्द याची साक्ष देतील. 'लवंग' हा इंडोनेशियन (लवङ) शब्द संस्कृतात व्यापारी मार्गाने येऊन रुळला

भाषाभाषांमध्ये अशा तऱ्हेची देवाणघेवाण नित्यच चालू असते; आणि ती राजकीय, सांस्कृतिक वर्चस्वाशी निगडित होऊन प्रमाणाबाहेर जाऊ लागली, की शुद्धीकरणात्मक प्रतिक्रियाही प्रकट होऊ लागते. ही शुद्धीकरणात्मक प्रतिक्रिया दोन रूपांनी प्रकट होते–(१) पर भाषेतल्या शब्दाला ध्वनि-दृष्ट्या स्वभाषेतल्या शब्दांशी आपाततः सदृश असे रूप देणे; व (२) पर भाषेतल्या शब्दाच्या स्थानी स्वभाषेतल्या घटकांच्या साहाय्याने नव्याने निर्माण केलेला शब्द योजणे. ही प्रतिक्रिया गेल्या दोन सहस्रकांतल्या, विशेषतः मोगली आणि इंग्रजी राज्यकालातल्या आणि आधुनिक संस्कृत वाङ्मयात दिसून येते. उदा० – 'सुरत्राण (सुलतान), सर्वंकार (सरकार), मोक्षमूलर (माक्स म्यूलर), देवसेन (डॉयसन), शार्मण्य (जर्मन), गोतीर्थ (ऑक्सफर्ड), वनकुहर (व्हँकूव्हर), शीतल (सिॲटल), सुवर्ण-पुरुष (गोल्डमन), शालिनी (सॅली), आङ्ग्ली (इंग्लिश), हृदयकुमार (हिडिओ किमुरा), ध्वनिमुद्रण (टेप-रेकॉर्डिंग), आकाशवाणी (रेडिओ), चलच्चित्रपट (सिनेमा).

**संस्कृतचे कवींना वरदान** – अनेक उगमांतून आलेले आणि समासपद्धतीमुळे, तद्धित प्रत्ययांमुळे अनंत पटींनी वाढू शकणारे विविध पर्यायी शब्द, प्रत्ययबद्ध पदांमुळे वाक्याच्या बांधणीत मिळणारी स्वतंत्रता आणि आलेली बहुविधता, समासांच्या लांबीवर बंधन नसल्यामुळे वाक्ये किंवा वाक्यांश एका सामासिक पदात कोंडण्याची शक्ती या संस्कृताच्या विशेषांमुळे संस्कृत कवींना अनेक गुणांनी आणि शब्दार्थालंकारांनी विनटलेले असे काव्य लघुगुरुक्रमाने काटेकोरपणे नियमित अशा वृत्तांत रचण्यास अनुकूलता लाभली. संस्कृत ही सामान्य व्यवहाराची भाषा म्हणून राहिली नाही, तशा शब्दाशब्दांमधल्या बारीक अर्थच्छटा मागे पडत गेल्या आणि जवळजवळचे पण भिन्न अर्थ प्रकट करणारे शब्द एकमेकांना समानार्थक ठरले; आणि कवीला हवे त्या लांबीचे आणि 'ल' 'ग' क्रमाचे शब्द उपलब्ध होऊ लागले. त्यातच जोड शब्दांच्या घटकांच्या जागी त्यांचे पर्यायी शब्द योजून नवे समास सिद्ध करता येऊ लागल्यामुळे, शब्दांच्या निवडीला उपलब्ध असलेले क्षेत्र अपरंपार वाढले. या क्षेत्राची कल्पना देण्यासाठी इंगल्स यांनी 'राजा' या अर्थाच्या शब्दांचे उदाहरण दिले आहे. पृथ्वीचा शास्ता, जगाचा रक्षिता अशा अर्थाचा कोणताही शब्द घडवला, की तो संस्कृतात राजा हा अर्थ व्यक्त करतो. आता पृथ्वी अशा अर्थाचे मूळ शब्द संस्कृतात सात आठ आहेत आणि शास्ता, रक्षिता इत्यादी अर्थांचे दहा पंधरा आहेत. या दोहोंच्या संयोगाने राजा अशा अर्थाचे शेकडो शब्द तयार होतात. त्यांतला वृत्तालंकारानुरूप, व्यंग्यार्थानुकूल शब्द कवीला निवडता येतो. संस्कृतात प्रत्येक पद प्रत्ययबद्ध असते. त्यामुळे ते सामान्यतः वाक्याच्या आदि-मध्य-अवसानी कोठेही योजले, तरी अर्थात फरक पडत नाही. 'कंसं जघान कृष्णः' 'जघान कृष्णः कंसम्' 'कृष्णः कंसं जघान' किंवा आणखी काही असो; अर्थ तोच. त्यामुळे कवी स्वतःला इष्ट असलेला आणि वृत्त, अलंकार, व्यंग्यार्थ इत्यादींच्या दृष्टीने सर्वाधिक लाभ करून देणारा क्रम ठरवितो. 'बाह्योद्यानस्थितहर-शिरश्चन्द्रिकाधौतहर्म्या' (मेघदूत ७) या एकाच सामासिक विशेषणात कालिदासाने अलका नगरीचे शब्दचित्र किती थोडक्यात पण किती प्रभावीपणे उभे केले आहे! हे मराठीत स्वाभाविक पद्धतीने मांडले तर असे होईल – 'हिच्या बाहेर एक उद्यान आहे. त्यात वसती करणाऱ्या शिवाच्या शिरी जी चंद्राची कोर आहे, तिने या नगरीतले प्रासाद उजळून निघतात.'

**संस्कृताचे विविध नमुने** – संस्कृत भाषेचा हा चार सहस्रकांचा बहुरंगी चित्रपट सूक्ष्मपणे निरीक्षिणे हे मनोरम पण परिश्रमाचे काम आहे. पण या प्रदीर्घ जीवनक्रमातले वेगवेगळे टप्पे, ढंग, प्रकार कळून येण्यास संस्कृत वाङ्मयातले काही निवडक वेचे केवळ भाषेच्या दृष्टीने पुढे उद्धृत केले आहेत –

(१) उपो रुरुचे युवतिर्न योषा विश्वं जीवं प्रसुवन्ती चरायै।
अभूदग्निः समिधे मानुषाणामकर्ज्योतिर्बाधमाना तमांसि॥
विश्वं प्रतीची सप्रथा उदस्थाद् रुशद्वासो बिभ्रती शुक्रमश्वैत्।
हिरण्यवर्णा सुदृशीकसंदृग् गवां माता नेत्र्यह्नामरोचि॥
देवानां चक्षुः सुभगा वहन्ती श्वेतं नयन्ती सुदृशीकमश्वम्।
उषा अदर्शि रश्मिभिर्व्यक्ता चित्रामघा विश्वमनु प्रभूता॥
(ऋ. ७.७७.१-३)

(२) ऋणं ह वै जायते यो ऽस्ति। स जायमान एव देवेभ्य ऋषिभ्यः पितृभ्यो मनुष्येभ्यः। स यदेव यजेत। तेन देवेभ्य ऋणं जायते तद्भ्येभ्य एतत् करोति यदेनान् यजते यदेभ्यो

जुहोति। अथ यदेवानुब्रुवीत। तेनर्षिभ्य ऋणं जायते तद्भ्येभ्य एतत् करोत्यृषीणां निधिगोप इति ह्यनूचानमाहुः। अथ यदेव प्रजामिच्छेत। तेन पितृभ्य ऋणं जायते तद्भ्येभ्य एतत् करोति यदेषां संततान्यवच्छिन्ना प्रजा भवति। अथ यदेव वासयेत। तेन मनुष्येभ्य ऋणं जायते तद्भ्येभ्य एतत् करोति यदेनान् वासयते यदेभ्यो ऽशनं ददाति।

(श. ब्रा. १.५.५.१–५)

(३) अथ ह वै पजयो नामासुरा देवानां गोरक्षा आसुः। ताभिरहापातस्थुः। ता ह रसायां निरुध्य बलेनापिदधुः॥१॥ ते देवा अतिकुप्य लेपुः। सुपर्ण, इमा नो गा अन्विच्छेति। इति। तथेति। स हानुप्रपपात॥२॥ ता हान्वाजगाम रसायामन्तर्बलेनापिहिताः। तस्मै हान्वागताय सर्पिः क्षीरमामिक्षां दध्नीत्येतदुपनिदधुः। तस्य ह सुहित आस। तं होचुः। सुपर्ण, एष एव ते बलिर्भविष्यत्येतदन्नम्। मा नः प्रवोच इति॥३॥ स ह पुनरावपात। तं होचुः। सुपर्ण, अविदो गा इति। का कीर्तिश्चिद्गवामिति होवाच॥४॥ एवैव कीर्तिर्गवामिति तस्य हेन्द्रो गलं पीळयन्नुवाच।

(जैमिनीयब्राह्मण २.४३८)

(४) सत्यकामो ह जाबालो जबालां मातरमामन्त्रयांचक्रे। 'ब्रह्मचर्यं भवति विवत्स्यामि। किंगोत्रो न्वहमस्मि' इति। सा हैनमुवाच। 'नाहमेतद्वेद तात यद्गोत्रस्त्वमसि। बह्वहं चरन्ती परिचारिणी यौवने त्वामलभे। साहमेतन्न वेद यद्गोत्रस्त्वमसि। जबाला तु नामाहमस्मि। सत्यकामो नाम त्वमसि। स सत्यकाम एव जाबालो ब्रुवीथा' इति।

(छान्दोग्य. ४.४.१५)

(५) सहाध्यायिनोऽमात्यान् कुर्वीति दृष्टशौचसामर्थ्यत्वादिति भारद्वाजः। ते ह्यस्य विश्वास्या भवन्तीति। नेति विशालाक्षः सहक्रीडितत्वात् परिभवन्त्येनम्। ये ह्यस्य गुह्यसधर्माणस्तानमात्यान् कुर्वीत समानशीलव्यसनत्वात्। ते ह्यस्य मर्मज्ञभयान्नापराध्यन्तीति। साधारण एष दोष इति पाराशराः।

(अर्थशास्त्र १.८)

(६) यथापि कास्यपा मेघो लोकधातुय उन्नतः।
सर्वमोनहती चापि छादयन्तो वसुंधराम्॥५॥
सो च वारिस्य संपूर्णो विद्युन्माली महाम्बुदः।
निर्नादयन्त शब्देन हर्षयेत् सर्वदेहिनः॥६॥
सूर्यरश्मी निवारित्वा शीतलं कृत्व मण्डलम्।
हस्तप्राप्तोऽवतिष्ठन्तो वारि मुञ्चेत् समन्ततः॥७॥

(सद्धर्मपुण्डरीक ९१–९२)

(७) जयति ते ऽधिकं जन्मना व्रजः
श्रयत इन्दिरा शश्वदत्र हि।
दयित दृश्यतां दिक्षु तावकास्त्वयि धृतासवस्त्वां विचिन्वते॥
शरदुदाशये साधुजातसत्सरसिजोदरश्रीमुषा दृशा।
सुरतनाथ तेऽशुल्कदासिका वरद विघ्नतो नेह किं वधः॥
विषजलाप्ययाद्व्यालराक्षसाद्वर्षमारुताद्वैद्युतानलात्।
वृषमयात्मजाद्विश्वतोमयादृषभ ते वयं रक्षिता मुहुः॥
न खलु गोपिकानन्दनो भवानखिलदेहिनामन्तरात्मदृक्।
विखनसार्थितो विश्वगुप्तये सख उदेयिवान् सात्वतां कुले॥

(भाग. पु. १०.३१.१–४)

(८) तदनन्तरं रामः सान्त्ववचननिवारितसुमन्त्रः ससौमित्रिर्मङ्गलानि प्रार्थयमानया तया मैथिल्या सह गुहेनानीतां नावमारुरोह।

स एव निविश्य निषादाधिपतेरनुगमनमपि तूर्णमेव वितीर्णसुरसरित्पूरः संपूर्णसस्ये वत्साभिधाने जनपदे कृतपदश्चललक्ष्यवेधनचतुरश्चतुरो मृगान्निहत्य कुत्रचिद्वनस्पतिमूले निशामनैषीत्।

(चम्पूरामायण अयोध्या ५.२)

(९) अथ दत्तसूनोर्माघस्योच्यते। माघस्य जन्मनि पित्रा जातकं कारितम्। आयुर्वर्षाणां चतुरशीतिः, परं प्रान्ते चरणशोफेन मृत्युः। पित्रा ऋद्धिप्राग्भारकलितेन षोडशवर्षादूर्ध्वं दिनदिनसम्बन्धी लट्टितो हारको द्रम्माणां भुक्तः। अतिव्ययवानपीयता सुखं निर्वहिष्यते। स प्रौढः सन् पठितुं प्रवृत्तः। कवित्वं कृत्वा पितुर्दर्शयति। ईदृशानि कवित्वानि कुरुषे, पूर्वकवित्वानां शतांशेनापि न प्रभवन्ति। पुत्रेण शिशुपालवधो नाम काव्यं कृत्वा चुल्हकोपरि च्छन्नं धृतम्। एकदा पितुः पुस्तकं जीर्णप्रायं धूमेन कृत्वा दर्शितम्। पिता वाचयन् शिरोऽवधूनन् आह – वत्स! ईदृशानि कवित्वानि क्रियन्ते। तेनोक्तम्। तात! भव्यानि? किमुच्यते। तर्हि मया कृतानि।

(पुरातनप्रबन्धसंग्रह पृ. १७)

(१०) धूम्या भेलपुरी चहा नटनटीव्रान्सिष्टरा गीतिकाः
फिल्माङ्काश्चलचित्रदर्शनगृहा रम्भादयः पत्रिकाः।
नैलानं वसनं प्रसाधनकलाः क्लासास्तथा दीपिकाः-
रत्नानीति चतुर्दश प्रतिदिनं कुर्युः सदा मङ्गलम्॥

(कण्टकाञ्जलिः १५०)

पुष्णन्तस्तरवीरुधः फलवतीः शाकाकरान् कौक्कुटं
श्वाश्वाञ्छूकरबर्करानानडुहो विन्दन्ति मानं धनम्।
विद्यागोपनवर्धनप्रसरणेष्वायुःक्षयं कुर्वताम्
अस्माकं तु हतात्मनां गतिरियं – न श्वापि नः पृच्छति॥

(कण्टकाञ्जलिः ११४)

(११) पाली भाषेतील वेचा –
अतीते वाराणसियं ब्रह्मदत्ते रज्जं कारेन्ते बोधिसत्तो अरञ्ञे

कुक्कुटयोनियं निब्बत्तित्वा अनेकसतकुक्कुटपरिवारो अरञ्ञे वसति। तस्स अविदूरे एका बिळारिका पि वसति सा उपेत्वा बोधिसत्तं सेसकुक्कुटे उपायेन वञ्चेत्वा खादि। बोधिसत्तो तस्सा गहणं न गच्छति। सा चिन्तेसि – "अयं कुक्कुटो अतिविय सठो, अम्हाकं च सठभावं उपायकुसलभावं च न जानाति, इमं मया 'भरिया ते भविस्सामी'ति उपलापेत्वा अत्तनो वसं आगतकाले खादितुं वट्टती" ति। सा तेन निसिन्न-रुक्खस्स मूलं गन्त्वा वण्णभासनपुब्बंगमाय वाचाय तं याचमाना पठमं गाथं आह–

सुचित्तपत्तच्छदन लम्बचूलविहङ्गम।
ओरोह दुमसाखाय मुधा भरिया भवामि तेति॥

(कुक्कुटजातक)

(१२) अर्धमागधी भाषेतील वेचा –

चंपाए नयरीए दहिवाहणो राया। तस्स चेडगधूया पउमावई देवी। अन्नया य तीसे दोहलो जाओ। किहाहं रायनेवत्थेण नेवत्थिया महारायधरियछत्ता उज्जाणकाणणाणि हत्थिखंधवरगया विहरेज्जा। सा ओलुग्गा जाया। राइणा पुच्छिया। कहिओ स भावो। ताहे राया य साय जयहत्थिम्मि आरुढाइं। राया छत्तं धरेइ। गया उज्जाणं। पढमपाउसो य तया वट्टइ। सीयलएणं सुरहिगंधमट्टियागंधेण हत्थी अज्झाहओ वणं संभरेइ।

(करकंडु – कहाणयतिगं ४८)

**संस्कृताची भारतीय भाषांना देणगी–** संस्कृताने अन्य भाषांतून शब्दांची उचल केली त्याहून कितीतरी अधिक पटींनी अन्य भारतीय भाषांनी, इतकेच काय पण पूर्वेतील अनेक देशांतील भाषांनी, वेळोवेळी संस्कृतातून शब्दांची उचल केली. आणि ही प्रक्रिया भारतीय भाषांत अद्याप चालू आहे, पुढेही चालू राहील. हिंदी, मराठी, गुजराती, बंगाली, इ. आधुनिक आर्य-भारतीय भाषांत संस्कृत तत्सम शब्दांचे प्रमाण स्थूलमानाने पन्नास टक्क्यांहून अधिक आहे आणि ते उत्तरोत्तर वाढतेच आहे. द्राविडी भाषावर्गातसुद्धा एक तमिळ भाषा सोडली तर अन्य भाषांत (कन्नड, तेलुगू, मलयाळम) हे संस्कृत तत्सम शब्दांचे प्रमाण खूपच आहे. मलयाळम भाषेत तर ते नव्वद टक्क्यांच्या आसपास असल्याचे सांगतात. त्यामुळे केरळातला रस्त्यावरचा साधा माणूसही संस्कृतात बोलतो, असे म्हणण्याचा प्रघात पडला आहे. तमिळ भाषेने संस्कृतातून शब्द उचलताना त्यांच्या वर्णविन्यासात काही परिवर्तन केले आहे. अलिकडे काही वर्षे राजकीय चळवळींमुळे तमिळ भाषेतल्या संस्कृत शब्दांची हकालपट्टी करून त्यांच्या जागी तमिळ शब्दांची स्थापना करण्याची प्रवृत्ती वाढत्या प्रमाणावर आहे. ही प्रवृत्ती सोडली तर सामान्यत: तमिळ भाषाही संस्कृत प्रभावापासून मुक्त नाही. संगम साहित्यातला प्राचीनतम उपलब्ध ग्रंथ आणि तमिळ भाषेचे प्राचीनतम व्याकरण तोलकाप्पियम् यावरच्या आपल्या टीकेत शिवज्ञानमुनिवराने म्हटले आहे– 'जो संस्कृत शिकलेला नाही त्याला तमिळ भाषेचे स्वरूप स्पष्ट कळणार नाही.' संगम साहित्यात संस्कृत शब्द बरेच आहेत आणि उत्तरोत्तर ते वाढत गेले आहेत. संगम साहित्य हे आशयाच्याही दृष्टीने संस्कृत साहित्याचे प्रतिबिंब आहे. आशयाबरोबर तो व्यक्त करणारे शब्दही तमिळने संस्कृतातून उचलले आहेत.

**संस्कृताचा अन्य देशांत प्रसार –** धर्मप्रसार, व्यापार, राजकारण, इ. विविध उद्देशांनी भारतातून स्थल–जलमार्गांनी, असंख्य आपत्तींना तोंड देऊन भारतीय लोक खोतान, लंका आणि ब्रह्मदेशादी पूर्वेकडचे देश यांत जा-ये करू लागले. याचा इतिहास खिस्तपूर्व तिसऱ्या शतकापासून उपलब्ध होऊ लागतो. या लोकांनी आपली भाषाही त्या त्या ठिकाणी नेऊन रुजवली. यांपैकी लंका आणि ब्रह्मदेश या देशांत संस्कृताची सहोदरा जी पाली भाषा, ती धार्मिक भाषा म्हणून आणि तेथल्या भाषांची आधारभूत आणि पोषक भाषा म्हणून मानाच्या स्थानी प्रतिष्ठित झाली. सयाम (द्वारावती), कंबोडिया (कंबुज), अनाम (चंपा), इ. क्षेत्रांत भारतीय प्रवाशांबरोबर संस्कृत भाषा पसरली, याची साक्ष ख्रिस्ताब्दाच्या दुसऱ्या तिसऱ्या शतकातले या प्रदेशांतले संस्कृत शिलालेख देतात.

**सयाम –** सयामी भाषेत तर आज संस्कृताचे स्थान भारतीय भाषांतल्याइतकेच महत्त्वाचे आहे. इतकेच काय पण पारिभाषिक, शास्त्रीय, शासकीय क्षेत्रांत आज सयामी भाषेत जितके संस्कृत आहे तितके भारतीय भाषांतसुद्धा नाही. उदा० – दूरशब्द (स्थानिक उच्चार थोरोसप्/थुरसप्), आकाशयान (=आगात्‌-छान्) शतांश (=सिदांग), अरण्यप्रदेश (= आराञ् पथेत् = एका शहराचे नाव). कुलीन व्यक्तींची नावेही मोठ्या प्रमाणावर संस्कृतातून वेचली जातात. 'स्याम की संस्कृतमूलक शब्दावली' या पुस्तिकेत तर सयामी भाषेत प्रचारात असलेल्या अशा जवळ ७०० संस्कृत शब्दांची त्यांच्या इंग्रजी पर्यायांसह वर्णानुक्रमाने यादी दिली आहे. यांतले काही शब्द असे–

वारांची नावे–आदित्य, चंद्र, अंगार, बुध, बृहस्पती, शुक्र, सौर. महिन्यांची नावे–मकरा (जानेवारी), कुंभा (फेब्रुवारी), मीना, मेषा, वृष्भा, धन्वा इत्यादी. काही उत्सव – माघापूजा, मेषापूजा. दुकानांची नावे– नारीयाभरण परिषद्, जयश्री परिषद्, विविधाभरण (विविध वस्तू), समभोजन (अन्न भांडार), विश्वकर्म शाला. गावांची व शहरांची नावे – काञ्चनपुरी, तक्षशिला, नगरस्वर्ग, विष्णुलोक, स्वर्गलोक. अन्य शब्द–मंदिर

घोषणा, क्षेत्रकर्म, विग्रह, पंडित, महापंडित, आभा, सूतिपत्र, प्रनागार, शांतिपाल, आर्यधर्म, धनपत्र, प्रजाधिपत्य, मर्यादा, अनुग्रह, ईश्वर भाव, अनागत काल, अनामय, दर्शनी, एक जन, विद्युतयान, सूचिपत्र, प्रभा, सामाजिक, प्रेषणीय, विनाडी (सेकंद), नाडी (मिनिट), नालिका (तास), देशपाल, नावी, धनुर्वेद, सिद्धिपत्र, आयुर्वेद, आचार्य, स्थानी, चराचर, हिरण्यक, स्वस्ती इत्यादी.

सुमात्रा, जावा, बाली – सुमात्रा, जावा, बाली यांही द्वीपांत असलेला संस्कृताचा प्रभाव दृष्टीतून सुटत नाही. उदा० – काही शहरांची नावे पाहा – शूरकृत (स्थानिक उच्चार, सूरकर्त), जोग्यकर्त (= जाकार्ता), ब्रह्मा (ब्रोमो), वनसभा (वोनोसोबो), सुमेरू (स्मेरू).

यवद्वीपात (जावा) इस्लाम धर्म असूनही संस्कृताचा प्रभाव किती तरी नावांत जाणवतो उदा० – सुराधिपुर (सुरादिपूर), आर्य-आदिविजय (आर्जे...), शास्त्रवीर्य (शास्त्रोविर्य), सहस्रप्रवीर (सस्त्र ...), वृद्धि-उत्तम (वुद्धि-ऊतोमो, संस्कृति-संमेलनाचे नाव), वनिता विराम (वोनितो-विरोमो = महिलामंडळ).

बाली द्वीपात आजही दहा लाख लोकांपैकी ९९ टक्के काहीशा परिवर्तित, मिश्रित अशा हिंदू धर्माचे अनुयायी असून, धार्मिक संस्कार, विधी, कार्ये संस्कृत मंत्रांच्या पठनासह होत असतात. यांच्या जोडीला स्तोत्रवाङ्मय आहे; रामायण-महाभारतासारखे स्थानिक भाषेत अनुवादित ग्रंथ आहेत; संस्कृत व्याकरणावरच्या पुस्तिकाही आहेत. या सर्व वाङ्मयात वेदोपनिषदांतले आणि पुराण-तंत्रवाङ्मयातले काही उतारे आहेत. गायत्री मंत्र केवळ 'भर्गो देवस्य धीमहि' असा एकाच चरणाचा प्रचलित आहे. तेथे संध्या आहे, पूजा आहे, देवालये आहेत; पण मूर्ती मात्र नाहीत. शिव, नारायण, गणेश, सरस्वती, इ. पुष्कळ देवता आहेत; त्यांत बुद्धही (शिवाचा धाकटा भाऊ) आहे. सर्वांत विस्मयकारक गोष्ट म्हणजे जे संस्कृत मंत्र, स्तोत्रे तेथल्या पुरोहितांना मुखोद्गत असतात, त्यांतल्या एका अक्षराचाही अर्थ तिथे कोणाला कळत नाही. अशाही परिस्थितीत त्यांनी उपलब्ध संस्कृतिधन ज्या श्रद्धेने जतन करून ठेवले आहे ती अपार आहे !

तिबेट, चीन – संस्कृताच्या प्रभावातून तिबेटी भाषा अलिप्त राहिली. या भाषेत पुष्कळ संस्कृत आणि पाली ग्रंथांचे अनुवाद खिस्ताब्दाच्या सातव्या शतकापासून होत आले; पण त्यांतल्या विशेषनामांचेसुद्धा अनुवाद करण्याची तिबेटी भाषेची प्रकृती आहे. उदा०– सेङजे = बुद्ध, चेन-रे-सी = अवलोकितेश्वर, शेस्-रब्-फारोल्-तु = प्रज्ञापारमिता. एवढा सांस्कृतिक प्रभाव असूनसुद्धा भाषिक प्रभाव शून्यप्राय आढळतो.

चिनी भाषासुद्धा संस्कृतापासून इतकी अलिप्त राहिली नाही. सुमारे दीड हजार वर्षांपूर्वी तीत काही संस्कृत शब्द शिरून बसले आहेत; त्याचे रूप इतके पालटून गेले आहे, की सांगितल्याशिवाय लक्षातही येत नाही. उदा०–बुद्ध = स्म्वत्, फ्वात्, फ़ात्, फ़ो, फ़ू; अमिताभ किंवा अमित बुद्ध = ओमितो फू; काश्यप = का-येप्, का-येह्, किया-येह्, चिया-येह्; ब्रह्मा = फान्; ब्राह्मण = पोलोमेन्.

खिस्ताब्दाच्या सातव्या आठव्या शतकात रचले गेलेले संस्कृत-चिनी कोश उपलब्ध आहेत. संस्कृताच्या अध्ययनातून चिनी विद्वानांना आपल्या भाषेच्या ध्वनिशास्त्राचा अभ्यास करण्याची आणि मांडण्याची प्रेरणा मिळाली. बौद्ध धर्माचा अभ्यास आणि प्रभाव चीनमध्ये उत्कर्षाला पोचला होता आणि भारतीय संस्कृततज्ज्ञ हे बौद्ध ग्रंथांचे चिनी भाषेत अनुवाद करीत होते. त्या काळात चीनमध्ये संस्कृताच्या अध्ययनासाठी एक विद्यापीठ अस्तित्वात होते. यातून शिक्षित होणाऱ्या स्नातकांची संख्या किती असावी, याची कल्पना, एका 'बोधिरुची' विहारात सातशे संस्कृतज्ज्ञ होते यावरून येते.

जपान – चीनच्या द्वारा संस्कृत कोरिया, जपान या देशांत पोचले. त्यांपैकी जपानमध्ये अजूनही काही बौद्ध संप्रदायांत गुप्तोत्तरकालीन लिपीसुद्धा जिवंत आहे. जपानी भाषेवर संस्कृताचा प्रभाव चिनी भाषेपेक्षा अधिक आहे. उदा०– बुत्सुबुत्सु (बुद्ध), बोन् (ब्रह्मा), बरमोन् (ब्राह्मण), दरुम (धर्म), तुदुमि (दुन्दुभि), पति (पात्र), विनयक (विनायक), येम (यम), सुतर(सूत्र), नरक, बिकु (भिक्षु), बिकुनी (भिक्षुणी), बेद-विद (वेद), हुंदरिके (पुण्डरीक).

इ. स. च्या सातव्या शतकातले ताडपत्रावर लिहिलेले काही संस्कृत ग्रंथही जपानमध्ये सुरक्षित आहेत. 'झेन' बौद्ध संप्रदायाची 'झेन' ही संज्ञाही 'ध्यान' शब्दावरून व्युत्पादितात.

संस्कृताचा हा अन्य देशांशी फार प्राचीन काळापासून आलेला दृढ संबंध आणि त्याचे महत्त्व सांगताना संस्कृतायोगाच्या प्रतिवृत्तात म्हटले आहे, 'उगम आणि मूल प्रकृती यांच्या द्वारा संस्कृताने आमचे पश्चिमेशी गोत्राचे नाते जोडले आहे; तितकेच दृढ नाते आशियातील देशांशी सांस्कृतिक दृष्टीने जोडले आहे. मध्य आशिया (मध्य युगातील चिनी आणि भारतीय संस्कृतींचे संगमस्थान), तिबेट, चीन आणि त्याच्या कक्षेतले देश – कोरिया, जपान, व्हिएत्नाम; दूर भारतात (बृहद् भारतात) मोडणारे देश – ब्रह्मदेश, सयाम, पाये लाओ, कांबोडिया, चंपा, कोचीन-चीन, मलाया, इंडोनेशिया, लंका हा तर ऐतिहासिक, सांस्कृतिक दृष्टीने भारताचाच विस्तार होय. या सर्व देशांत खिस्तपूर्व सहस्रकाच्या शेवटच्या शतकांपासून भारतीय तत्त्वज्ञान आणि संस्कृती शांततापूर्ण विस्तार पावत

संथपणे वाहत राहिल्या आणि त्यांचे वहन म्हणून संस्कृतालाही या देशांत मानाचे स्थान मिळाले. कमीत कमी चार सहस्र वर्षांत भारतीय संस्कृतीचा जो विकास होत आला आणि या विकासक्रमात तिचा इतिहासपूर्व कालात आणि इतिहास-कालात युरोप आणि आशिया खंडातल्या देशांशी संबंध जडला, त्या सर्वांचे जतन संस्कृताने केले आहे; आणि त्याचा अखंडित प्रवाह आजही चालू आहे. भारतीय जन आणि संस्कृती जणू संस्कृताच्या कुशीत जन्मली आणि मांडीवर खेळत मोठी झाली. संस्कृत हे भारतीय जनांच्या अभिमानाचा विषय आणि एकतेचे जिवंत प्रतीक ठरले आहे. भारत हे एक राष्ट्र का, पाच दहा राष्ट्रे का नव्हे, याचे एकमेव कारण म्हणजे भारताच्या साठ कोटी लोकांना एकत्र बांधणारी संस्कृत नावाची शक्ती.

**अर्वाचीन काळातील संस्कृत** – अर्वाचीन काळात देखील संस्कृतचे महत्त्व अनेक मुखांनी प्रतीतीला आल्यावाचून राहत नाही. स्वातंत्र्यपूर्व काळात 'वन्दे मातरम्' हे बंकिमचंद्र चतर्जींचे गीत 'राष्ट्रगायत्री' ठरून पाहता पाहता भारतभर पसरले आणि लाखो लोकांना स्फुरणदायी ठरले, ते प्रायः संस्कृत निबद्ध होते म्हणूनच. स्वातंत्र्योत्तर काळात हिंदीला शासकीय भाषा म्हणून बहुमताने मान्यता मिळाली. ती हिंदी संस्कृतनिष्ठ म्हणून विशेषित केल्यामुळेच. हिंदीच्या विकासासाठी आवश्यक ते नवे शब्द प्रामुख्याने संस्कृतातून घ्यावे असे भारताच्या घटनेत स्पष्ट नमूद केले आहे – 'हिन्दी भाषाया ... शब्दभाण्डाराय मुख्यतया संस्कृताद् गौणतया च अन्यभाषाभ्यः शब्दग्रहणेन तस्याः समृद्धेः संपादनं संघस्य कर्तव्य भवेत् ।' डॉ. रघुवीरांचा 'आंग्ल – भारतीय महाकोष' म्हणजे संस्कृताच्या आधाराने हिंदीला शास्त्र आणि व्यवहार यांना आवश्यक अशी शब्दसंपदा उपलब्ध करून देण्याचा प्रचंड उद्योग होय. साहजिकच स्वातंत्र्यो-त्तर काळातल्या अनेक लहान मोठ्या गोष्टींतून संस्कृताविषयीची ही राष्ट्रीय अस्मितेची भावना प्रतिबिंबित झाली आहे. 'भारत' हे देशाचे अधिकृत म्हणून स्वीकारलेले नाव; 'सत्यमेव जयते' हे बोधवचन; 'जनगणमन ...' हे ९० टक्के संस्कृत असलेले राष्ट्रगीत; 'श्री' आणि 'श्रीमती' ही शासकीय व्यवहारातली अधिकृत उपपदे; धर्मचक्रप्रवर्तनाय (लोकसभा), बहुजनहिताय बहुजनसुखाय (आकाशवाणी), योगक्षेमं वहाम्यहम् (आयुर्विमा महामंडळ), शं नो वरुणः (भारतीय नौदल), नभःस्पृशं दीप्तम् (भारतीय वायुदल) इत्यादी बोधवचने; 'पंचशील' हा परराष्ट्रीय नीतीचे तत्त्व सांगणारा संस्कृत शब्द; अनेक विश्वविद्यालयांचे संस्कृतातून चालणारे स्नातक-समारंभ; या सगळ्यांतून राष्ट्रीय स्वाभिमान पुनःप्रतिष्ठापित करण्याचे प्रभावी वहन म्हणून संस्कृताची जाण योग्य प्रकारे व्यक्त झाली आहे. महाराष्ट्रातही अनेक संस्थांनी स्वीकारलेल्या संस्कृत बोध-वचनांतून ही जाण प्रत्ययाला येते. उदा०–प्रतिपच्चन्द्रलेखेव वर्धि-ष्णुर्विश्ववन्दिता । महाराष्ट्रस्य राज्यस्य मुद्रा भद्राय राजते ॥ (महाराष्ट्र राज्य शासन); शीलवृत्तफला विद्या (मुंबई विद्या-पीठ); विद्या परं दैवतम् (नागपूर विद्यापीठ); यः क्रियावान् स पण्डितः (पुणे विद्यापीठ); ज्ञानमेवामृतम् (शिवाजी विद्या-पीठ, कोल्हापूर); वरं जनहितं ध्येयम् (पुणे महानगरपालिका); मुद्रेयं लोकमङ्गला (बँक ऑफ महाराष्ट्र); ज्ञानसेवा तु साफ-ल्यम् (राज्य शिक्षण संस्था); सत्फलाय सहकारिता (महा-राष्ट्र राज्य सहकारी बँक); उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः (महाराष्ट्र लघु-उद्योग विकास महामंडळ); योगः कर्मसु कौश-लम् (फोरम ऑफ इंडस्ट्रिअल टेक्नॉलॉजिस्ट्स्, महाराष्ट्र).

**भारताची राष्ट्रभाषा आणि संस्कृत** – पण एवढ्याने संस्कृ-ताला भारताच्या राष्ट्रीय जीवनात योग्य स्थान मिळाले असे नाही, असे मानणारा एक वर्ग भारतात आहे. त्याच्या भावना संस्कृत आयोगापुढे आलेल्या काही लोकांच्या साक्षींत आणि प्रकट भाष-णांत व्यक्त झाल्या आहेत. श्री. श्रीप्रकाश, डॉ. काटजू, डॉ. सी. व्ही. रामन यांनी संस्कृत हीच राष्ट्रभाषा व्हावी असे मत अने-कदा मांडले आहे. डॉ. काटजूंनी आपल्या साक्षीत एका प्रख्यात फ्रेंच संस्कृत-पंडिताच्या मताचा निर्देश केला. भारतात राष्ट्रभाषा कोणती असावी याविषयी वाद उद्भवावा या गोष्टीचे त्याला आश्चर्य वाटले; कारण त्याच्या मते भारताची राष्ट्रभाषा पूर्व-सिद्धच आहे आणि ती म्हणजे संस्कृत. दुसरे एक पाश्चात्त्य भार-तीयविद्याभ्यासक, एफ. डब्ल्यू. थॉमस यांच्या मते संस्कृत हे अखिल भारतीय माध्यम होण्याची कल्पना निराश होऊन सोडून देण्याची वेळ आलेली नाही; कारण हे स्थान संस्कृताला न मिळाल्यास दोनच पर्याय राहतात– एक तर असे अखिल-भारतीय माध्यमच नसणे, किंवा पुष्कळ लोकांची अनिच्छा असली तरी एखाद्या विशिष्ट प्रादेशिक भाषेचे सर्व देशात वर्चस्व चालणे. याच शेवटी मांडलेल्या भीतीच्या पोटी घटनासमितीत राष्ट्र-भाषेच्या प्रश्नावर इतके रण माजले, की काही सदस्यांनी हा प्रश्न सोडवण्यासाठी संस्कृत भाषा राष्ट्रभाषा करावी असे मत मांडले. या मताला अनुकूल असणाऱ्यांत डॉ. आंबेडकर, डॉ. केस-कर, श्री. कृष्णम्माचारी, इ. बरेच सदस्य होते.

संस्कृत ही कोणत्याही एका विशिष्ट प्रदेशाची भाषा नसल्यामुळे ती स्वीकारली तर सर्व हेवेदावे, कटुता आणि यातून निर्माण होणारे मनोगंड नाहीसे होतील आणि अमकी तमकी भाषा कोणावर तरी लादण्याचा प्रश्नच उत्पन्न होणार नाही, असा युक्तिवादही मांडला गेला. या युक्तिवादात गर्भित असलेली संस्कृताची अपक्षता हा राष्ट्रभाषेला आवश्यक

असलेला अत्यंत महत्त्वाचा निकष होय. हा काही संस्कृताच्या ठिकाणी असलेला अभावात्मक गुण नव्हे. संस्कृताची अपक्षता ही सर्व भारतीय भाषांतून जे जे उत्तम ते ते स्वीकारल्यामुळे साकारलेल्या समन्वयाच्या स्वरूपाची आहे. संस्कृताला भारताच्या सर्व प्रदेशांनी समृद्ध केले आहे. या सर्व गोष्टी लक्षात घेता संस्कृत ही समधिक राष्ट्रभाषा म्हणून उद्‌घोषित करावी अशी संस्कृत-आयोगाने सूचना केली होती.

संस्कृताचे हे राष्ट्रीय जीवनातले महत्त्व अर्वाचीन काळातल्या अनेक विचारवंतांच्या उद्‌गारांत आणि लेखनात प्रतिबिंबित झाले आहे. श्री. जवाहरलाल नेहरू म्हणतात. 'भारताची सर्वांत मोलाची दौलत कोणती? सर्वांत मोलाचा वारसा कोणता? असे जर मला कोणी विचारले तर संस्कृत भाषा, वाङ्मय आणि त्यांत आहे ते सर्व, असे मी ठाम उत्तर देईन.' हा भव्य वारसा जोवर टिकेल आणि भारतीयांचे जीवन प्रभावित करील तोवर भारताची अंत:प्रवृत्ती आणि सर्जनशक्ती अविच्छिन्न राहील. याच धारणेतून त्यांनी भारतातील संस्कृताची जपणूक आणि विकास यांच्या विचारासाठी इ. स. १९५६ मध्ये भारतीय शासनाच्या वतीने संस्कृत आयोगाची नेमणूक केली. या आयोगाने देशभर हिंडून संस्कृत विद्येच्या परंपरेची पाहणी करून, शेकडो विचारवंतांच्या साक्षी घेऊन अभ्यासपूर्वक आपले निष्कर्ष संसूचनांसह प्रतिवृत्त रूपाने शासनाला सादर केले.

या संसूचनांच्या मागोव्याने आता केंद्रीय शिक्षण मंत्रालयाचा एक भाग म्हणून एक 'केंद्रीय संस्कृत परिषद' संस्कृताच्या योगक्षेमासाठी स्थापन झाली आहे (१९७१) आणि प्रत्येक राज्यात एक याप्रमाणे उभ्या राहायच्या केंद्रीय संस्कृत विद्यापीठांच्या (यांपैकी पाच विद्यापीठे तिरुपती, दिल्ली, पुरी, अलाहाबाद, जम्मू या ठिकाणी स्थापन झाली आहेत) एकसूत्रतेसाठी विद्यापीठ अनुदान आयोगासारखी स्वायत्त संघटनाही — 'राष्ट्रीय संस्कृत संस्थान' — स्थापन झाली आहे (१९७०). पारंपरिक संस्कृत विद्यांना आधुनिक विषयांची जोड द्यायची आणि प्राचीन परंपरेचे जतन करून त्या परंपरेतल्या स्नातकांना आजच्या युगातल्या व्यवहाराची क्षमताही प्राप्त करून द्यायची या कल्पनेतून केंद्रीय संस्कृत विद्यापीठे अस्तित्वात आली आहेत. या विद्यापीठांच्या योगक्षेमाबरोबरच केंद्रीय संस्कृत परिषद ही संस्कृतविषयक संस्था, प्रकाशने आणि उपक्रम यांना आर्थिक साहाय्य देत असते. इ. स. १९७०–७१ या वर्षात केंद्रीय परिषदेने संस्कृताचे कार्य करणाऱ्या ५०० हून अधिक खाजगी संस्थांना १८.४२ लक्ष रुपये साहाय्य केले. चौथ्या पंचवार्षिक योजनेच्या काळात संस्कृतासाठी केंद्रीय अर्थसंकल्प २.७५ कोटींचा आहे. साहित्य अकादेमीनेही गेल्या काही वर्षांपासून प्रतिवर्षी अन्य भारतीय भाषांतील ग्रंथांप्रमाणे सर्वोत्कृष्ट संस्कृत ग्रंथालाही पारितोषिक देऊन त्याचा गौरव करण्याची प्रथा चालू केली आहे.



**संस्कृत साहित्य**– या विषयात येणारा पुष्कळसा भाग प्रस्तुत कोशात देवता, ग्रंथ आणि ग्रंथकार यांच्या नावांखाली आला असल्यामुळे त्याची पुनरुक्ती न करता या साहित्याचा संकलितपणे परामर्श इथे घेण्यात आला आहे.

संस्कृत साहित्याचे दोन भाग होतात– वैदिक साहित्य आणि अभिजात संस्कृत साहित्य. या दोहोंमधली विभाजनरेषा स्थूलमानाने पाणिनीय व्याकरणाने ठरते.

**वैदिक वाङ्मय**– हे केवळ संस्कृतातच नव्हे, तर जागतिक भाषांतही विस्तृत असे प्राचीनतम, उपलब्ध वाङ्मय होय. प्राचीन मानवाचे, विशेषत: यूरोभारतीय मानव समाजाचे जीवन आणि मन प्रतिबिंबित करणारे आणि कोणताही फरक न होता आजपर्यंत टिकलेले, याच्याइतके प्राचीन वाङ्मय जगातल्या अन्य कोणत्याही भाषेत उपलब्ध नाही. त्यामुळे मानवी संस्कृतीच्या इतिहासात या वाङ्मयाला अनन्यसाधारण महत्त्व आहे. वैदिक वाङ्मय हे मुख्यत मौखिक परंपरेने आजच्या काळापर्यंत येऊन पोचले असून, आजही ही परंपरा जिवंत आहे. इतकेच नव्हे, तर लिखित आणि मौखिक परंपरांतील पाठांमध्ये भेद आढळला, तर प्रामाण्य मौखिक परंपरेतील पाठाला दिले जाते. याचे कारण हे, की वेदग्रंथांचे पाठांतर सलग संहितेच्याच रूपाने होत आलेले नाही, तर संहितेतल्या पदांच्या उलट सुलट मांडणीने सिद्ध होणाऱ्या अनेक विकृतींच्याही (पद, क्रम, जटा, घन) रूपाने होत आले आहे. त्यामुळे हे वाङ्मय शुद्ध राखण्यास फार मोठे साहाय्य झाले आहे. एवढे हे प्रचंड वाङ्मय कंठस्थ करून हजारो वर्षे जिवंत ठेवले गेले, हे एक जागतिक विद्याक्षेत्रातले मोठे आश्चर्य मानले जाते. या गोष्टीचे श्रेय जितके वेदांविषयीच्या पूज्यतेच्या भावनेला, तितकेच विद्येची जपणूक करण्याच्या आस्थेला द्यावयास हवे. 'ब्राह्मणेन निष्कारण: धर्म: षडङ्ग: वेद: अध्येय: ज्ञेयश्च' (पतंजलीचे महाभाष्य) = ब्राह्मणाने धर्माचे आणि सहा अंगांसह वेदवाङ्मयाचे निरपेक्षपणे अध्ययन करावे आणि त्याचा अर्थही जाणावा. ही वेदाज्ञा भारतीय वैदिक पंडितांनी हजारो वर्षांच्या परंपरेने आचरणात आणून या अमोल वाङ्मयाचा जगाला लाभ करून दिला.

या वेदांविषयीच्या पूज्यतेच्या भावनेचा उगम 'वेद हे ईश्वराचे नि:श्वास आहेत' (बृहदा. २.४.१०) या परंपरागत श्रद्धेत आहे. वेद हे अपौरुषेय आहेत या श्रद्धेतून वेदांना आणखी काही गुणधर्म लाभले. वेद याचाच अर्थ ज्ञान असा

आहे. उत्तर काली विकसित झालेल्या शास्त्रांची बीजे वेदवाङ्मयात आढळतातही. वेद हा ज्ञानाचा चिरंतन मूलस्रोत आहे. त्याला आदी नाही, अंत नाही.

वेदांविषयी अशी परंपरागत श्रद्धा असली, तरी ऐतिहासिक आणि चिकित्सक दृष्टीने वेद पौरुषेय, म्हणजे मनुष्यप्रणीत, अनेककर्तृक, अनेक शतकांच्या कालपरंपरेतून निर्माण झालेले आणि संग्रहात्मक आहेत, असे मानले जाते. व्यासांनी वेदवाङ्मयाचे संपादन करून सूक्तांची, मंत्रांची वर्गीकरणपूर्वक व्यवस्था केली, म्हणूनच त्यांना 'वेदव्यास' हे नाव मिळाले. सर्वच्या सर्व वेदवाङ्मय सुरक्षित राहिले आहे असे नाही. पुष्कळसे वाङ्मय लुप्तही झाले आहे. वेदांच्या अनेक शाखांचा उल्लेख येतो. त्यांतल्या काही थोड्याच शाखांचे वाङ्मय आज उपलब्ध आहे. लुप्त झालेले वाङ्मय उपलब्ध वाङ्मयाहून सर्वस्वी वेगळे असावे असे म्हणता येत नाही; कारण उपलब्ध वाङ्मयात भिन्न भिन्न शाखांच्या पाठपरंपरांत समान अंश पुष्कळ आहे.

या वाङ्मयाचा पुष्कळसा भाग परंपरेने जतन करून ठेवला आहे. यातील सर्व संहिता, तैत्तिरीय ब्राह्मण आणि आरण्यक, शतपथ ब्राह्मण व आरण्यक एवढे वाङ्मय सस्वर उपलब्ध आहे. (वेद पाहा)

**ऋग्वेद** – वेदकालीन शिष्टसमाजाच्या धर्माचे स्वरूप दाखवणारे सूक्तसंग्रहात्मक वाङ्मय. त्यात बहुसंख्य सूक्ते अग्नी, इंद्र, वरुण, इ. विविध देवतांना उद्देशून रचलेली, स्तवनपर अशी आहेत; काही यज्ञविधिसंबद्ध आहेत, काही तत्त्वज्ञानविचारात्मक, काही संवादात्मक; काही यातुमय, तर काही केवळ ऐहिक जीवनपर आहेत. देवतास्तवनपर सूक्तांमध्ये काहींत तुरळक प्रमाणात तर काहींत स्थायी स्वरूपात काव्यगुण प्रकट झाले आहेत.

ऋग्वेदातले ऋषी एखाद्या देवतेचे स्तवन करू लागले, की अनेकदा ती देवता त्या वेळेपुरती सर्वश्रेष्ठ मानून सूक्ते रचतात. ऋग्वेदीय दैवतशास्त्र केवळ बहुदैवत नाही तर लक्ष्यैकनिष्ठही आहे. ऋग्वेदात पुनर्जन्म व संसार या कल्पनांचा पुसटही निर्देश नाही. विंटरनिट्झ म्हणतो, 'या सूक्तांत जी प्रवृत्ती स्पंदन पावते, ती उत्तरकालीन वाङ्मयाला व्यापून बसलेल्या प्रवृत्तीहून अगदी वेगळी आहे.'

ऋग्वेदातला सूक्तसंग्रह हा प्रामुख्याने धार्मिक वाङ्मय असला तरी त्यात लक्षणीय काव्यगुण आढळतात. हे काव्य क्वचित योगायोगाने जुळून आलेले असले तरी बहुतेक स्थळी बुद्धिपुरस्सर प्रयत्नांतून निर्माण झाले आहे, याचा प्रत्यय येतो. त्यात पदसमूहांच्या, पदांच्या किंवा पदांशांच्या आवृत्तीने लय साधून अनुप्रासासारखा शब्दालंकार निर्माण करण्याचा प्रयत्न जाणवतो; अगणित उपमांतून, रूपकांतून वर्ण्य विषय सजवण्याचाही प्रयत्न जाणवतो. हा शब्दांचा फुलोरा गृत्समदाच्या रचनांत विशेष दृष्टीत भरणारा आहे.

जमिनीवर उगवलेल्या गवताचा अग्नी ग्रास करतो याची एका ऋषीला गंमत वाटते आणि तो चटकन उद्‌गारतो; 'पाहा, अग्नी भूमीचे केस कापत आहे. ( अग्निर्हं दाति रोमा पृथिव्याः )' (१.६५.४). पूर्वी अरणींचे मंथन करून अग्नी उत्पन्न करीत. ती प्रक्रिया पाहता पाहता ऋषीला कल्पना सुचते, की या बालकाला दहा युवतींनी ( अंगुलींनी ) जन्म दिला (१.९५.२), घर्षणाने गरम झालेल्या अरणी पेटू लागत. ऋषी म्हणतो, 'काय तरी हे पोर ! जन्माला येता येताच आयांना खाऊ लागते '(जायमानो मातरा गर्भो अत्ति) (१०.७९.४). वैदिक कवींच्या या मुक्त कल्पना नवकाव्यालाही मागे सारणाऱ्या आहेत. अशी अलंकृत भाषा देवतांच्या वर्णनांतून ठायी ठायी येते.

ऋग्वेदात जशी काव्यगुणसंपन्न सूक्ते आहेत, तशी यज्ञविधी, संस्कार, इ. विषयांची कंटाळवाणी, अशीही सूक्ते आहेत. सोम देवतेचे त्याच त्या शब्दांनी स्तवन करणारे सबंध नववे मंडल हे केवळ सोमयागांसाठी अवतरले आहे. त्याखेरीज आप्रीसूक्ते आहेत, मरणोत्तर संस्काराविषयीची सूक्ते आहेत. तत्त्वज्ञान हा वस्तुतः ऋग्वेदाचा प्रांत नव्हे. पण नासदीय सूक्त (ऋ. १०.१२९), हिरण्यगर्भसूक्त (१०.१२१), पुरुषसूक्त (१०.९०) यांसारखी पूर्ण सूक्ते, आणि 'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति' (१.१६४.४६) यासारख्या ऋचा यांत तत्त्वचिंतन आढळते. यातूनच पुढे उपनिषदांचे तत्त्वज्ञान साकार झाले आहे. ऋग्वेदातल्या संवादसूक्तांत उत्तरकालीन महाकाव्यांची, तसेच नाट्यवाङ्मयाची बीजे अभ्यासकांना दिसतात. मंडूक सूक्त (७.१०३) हे शिष्य व आचार्य यांच्या व्यवहाराचे विडंबन आहे, असे कोणी मानतात; पण ते यातुमय असून, पाऊस पाडण्याचा मंत्र म्हणून त्याचा विनियोग असला पाहिजे, असे त्याचे युक्तिपुरःसर व्याख्यान ब्लूमफील्डने केले आहे. अशी अन्यही यातुसूक्ते ऋग्वेदात आहेत. ती अथर्ववेदातल्या सदृश सूक्तांहून कोणत्याही प्रकारे भिन्न नाहीत किंवा अन्य सूक्तांहून अर्वाचीनही नाहीत. अशी यातूशी किंवा धर्माशी संबद्ध नसलेली, शुद्ध ऐहिक जीवनपर अशीही काही सूक्ते ऋग्वेदात आहेत. त्यांत सुमारे ४० दानस्तुतिसूक्ते आहेत, तसेच कूटसूक्त (ऋ. १.१६४), अक्षसूक्त (१०.३४) इच्छासूक्त (९.११२), द्यूतकर सूक्त ... सूक्ते गणली जातात. या सर्वांचा परंपरेनुसार दूरान्वयाने धर्मकर्मांशी संबंध जोडला जातो. त्यामुळेच शेवटच्या दोन ... सूक्तांचा संहितेत अंतर्भाव होऊन, ती लुप्त होण्यापासून वाचली. कूट काव्यात्मक ऋचांचा संग्रह ज्यात आहे अशा एका सूक्ताला

त्याच्या आरंभावरून 'अस्य वामीय सूक्त' असे नाव पडले आहे. त्यात निसर्ग, यज्ञसंस्था, सामान्य जीवन, तत्त्वज्ञान इत्यादी अनेक क्षेत्रांतल्या घटनांचे प्रायः संख्यांचा सूचक उपयोग करून रूपकात्मक वर्णन केले आहे. (ऋग्वेद पाहा)

अथर्ववेद – हे प्राकृत समाजाचे धार्मिक वाङ्मय असून, त्यात नाना प्रकारच्या प्रयोजनांसाठी यातुमय म्हणजे जादूमय मंत्र दिलेले आहेत. या मंत्रांचे उद्दिष्ट संक्षेपतः त्रिविध आहे– उपशमन, आशंसन व शपन. शिष्ट धर्माचा संबंध देवतांशी, तर यातुमय प्राकृतधर्माचा भूत–राक्षसांशी असतो. रोग, आपत्ती या भूत-राक्षसांमुळे येतात अशी समजूत आहे. त्यांचा परिहार भूत-राक्षसादींचे उपशमन किंवा शपन यामुळे होतो, असा सार्वत्रिक समज आहे. या उपशमनादी विधींची भाषा आणि त्यांच्या जोडीने विशिष्ट वनस्पतींचा उपयोग या गोष्टी पुष्कळदा आश्चर्य वाटावे, इतक्या दूर दूर प्रदेशांत आणि परंपरांत सारख्या आढळतात. अशा वाङ्मयात काव्याला अवसर कोठून ? पण तरीही अधूनमधून एखादे काव्य आढळते उदा० – रक्तस्राव थांबवण्यासाठी सांगितलेल्या एका सूक्तातील रक्तवाहिन्यांचे वर्णन असे–

अमूर्या यन्ति योषितो हिरा लोहितवाससः ।
अभ्रातर इव जामयस्तिष्ठन्तु हतवर्चसः ।।

(अथर्व. १.१७.१)

अर्थ – या ज्या तांबड्या साड्या नेसून मुली – (शिरा) चालल्या आहेत, त्या निर्बल होऊन, ज्यांना भाऊ नाही अशा बहिणींप्रमाणे थांबू देत.

वाचताना काव्यमय वाटेल, पण वस्तुतः तसा नव्हे, असा एक भाग म्हणजे रोगकारक क्रिमींचा. या क्रिमींत स्त्रिया आहेत, पुरुष आहेत, त्यांना रंग आहे, रूप आहे, कुटुंबे आहेत, राजाही आहे, राजाचा अधिकारीही आहे. अथर्ववेदातली वृष्टिसूक्त (४.१५) व भूमिसूक्त (१२.१) ही दोन सूक्ते निःसंशय काव्यात्मक आहेत. (अथर्ववेद पाहा.)

अथर्ववेदातल्या सूक्तांचे विषयदृष्टीने पुढील वर्ग केले जातात– भैषज्यानि (औषधिविषयक), आयुष्याणि, पौष्टिकानि (यांतच वृष्टिसूक्त येते), प्रायश्चित्तानि, सांमनस्यानि (सलोखा), स्त्रीकर्माणि, आभिचारिकाणि (परघातक), राजकर्माणि ब्रह्मकर्माणि, यज्ञीयानि (यांतच 'कुंतापसूक्ते' येतात – २०. १२७–१३६), विश्वोत्पत्ति सूक्तानि. या यादीत उल्लेखिलेल्या कुंतापसूक्तांत काही दानस्तुती, काही यज्ञमंत्र, काही कूटे आणि काही अश्लील गीते आहेत. 'कुंताप' या संज्ञेचे अथर्ववेदीय गोपथब्राह्मणात 'कुत्सितं, तपति इति' म्हणजे 'हलक्या दर्जाची करमणूक' असे विवरण केले आहे. यांत काही असंबद्ध प्रलापही आहेत. उदा० –

एता अश्वा आ प्लवन्ते । प्रतीपं पाति सुत्वनम् ।।
तासामेका हरिक्निका । हरिक्निके किमिच्छसि ।।
साधुं पुत्रं हिरण्ययम् । क्काहतं परास्यः ।।
यत्रामूस्तिस्रः शिंशपाः । परित्रयः ।।
पृदाकवः । शृङ्गं धमन्त आसते ।।

(अथर्व. २०.१२९.१-१०)

अर्थ – हे अश्व तरंगत आहेत. सुत्वन प्रतीपाला रक्षितो. त्या दोघींपैकी एक हरिक्निका. हरिक्निके, तुला काय हवे ? सुंदर सोनेरी मुलगा. मार देऊन त्याला कोठे पिटाळले ? जेथे हे तीन शिसवी वृक्ष आहेत. सभोवती तिघे, साप शिंग फुंकत आहेत.

यजुर्वेद आणि सामवेद या संहिता यज्ञ या विशिष्ट प्रयोजनासाठी, याज्ञिकांच्या उपयोगासाठी निर्माण झाल्या आहेत. म्हणून या संहितांना याज्ञिक संहिता म्हणता येईल. या दोन्ही संहितांच्या रचनेत ऋग्वेद – अथर्ववेदांचे पूर्वास्तित्व गृहीत आहे, उक्तही आहे. यजुर्वेदात ऋग्वेदातल्या अनेक ऋचा आढळतात. सामवेदात तर वाङ्मयदृष्टीने नवीन असे प्रायः काहीच नाही, कारण त्यातल्या बहुतेक ऋचा ऋग्वेदाच्या नवव्या मंडलातल्या आहेत. या सोमदेवताक ऋचांच्या आधाराने यज्ञात जी गाने गाइली जातात त्यांना 'साम' म्हणतात. 'गीतिषु सामाख्या (जैमिनि सूत्र). यजुर्वेदात विकसित रूपाने दृष्टीस पडणाऱ्या यज्ञसंस्थेत चारही वेदपरंपरांच्या ऋत्विजांना स्थान मिळालेले आहे. यज्ञसंस्थेच्या इतिहासाच्या दृष्टीने यजुर्वेद आणि भारतीय संगीताच्या इतिहासाच्या दृष्टीने सामवेद यांना फार महत्त्व आहे. वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने गद्याचा प्रयोग करणारा यजुर्वेद हा पहिला ग्रंथ होय. ही गद्याची परंपरा पुढे यज्ञविधीचे विवेचन करणाऱ्या ब्राह्मण ग्रंथांनी चालू ठेवली. प्रमुख दहा उपनिषदांत ईश, कठ, मुंडक ही उपनिषदे पद्यात्मक आहेत. केन उपनिषद गद्यपद्यात्मक आहे. अवशिष्ट उपनिषदे गद्यात्मक आहेत.

ब्राह्मणग्रंथ – विषयाच्या दृष्टीने ही यजुर्वेदाची संतती होय. यज्ञाविषयीचा बारीक सारीक विशेष, त्याविषयीची मते, त्यांचा ऊहापोह, यज्ञातल्या विविध क्रियांची अन्वर्थकता सांगणाऱ्या कथा, विविध शब्दांच्या संदर्भानुरोधी व्युत्पत्त्या, असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. थोडक्यात हे यज्ञशास्त्र आहे. ब्राह्मण ग्रंथांचेही महत्त्व धर्मकल्पनेच्या इतिहासाच्या दृष्टीने अनन्यसाधारण आहे. भारताच्या सांस्कृतिक आणि भौगोलिक इतिहासाच्या दृष्टीनेही ब्राह्मणांत आलेली सामग्री मोलाची आहे. दैवतशास्त्राच्या दृष्टीने संहितांतल्याच देवता ब्राह्मणांत आहेत; पण त्यांच्या श्रेष्ठ-कनिष्ठ भावात पुष्कळ फरक पडला आहे. ऋग्वेदात कनिष्ठ प्रतीच्या असलेल्या शिव, विष्णू, प्रजापती या देवतांना या वाङ्मयात उच्च स्थान मिळाले आहे. आधीच्या काळात

यज्ञ हे देवतांच्या आराधनेचे साधन होते; तोच आता साध्य ठरला आहे. त्यामुळे त्यात विशेषज्ञ असलेल्या पुरोहित वर्गाला उच्चाधिकार मिळाला आहे. या अधिकाराची अभिव्यक्ती पुरोहितांच्या गर्वोक्तीत अधूनमधून होते. उदा०—राजसूय यज्ञात राजाला अभिषेक केल्यावर पुरोहित लोकांना सांगतो. 'एष वो भरता राजा सोमोऽस्माकं ब्राह्मणानां राजा (तै. ब्रा. १-७-६) 'हे भरतांनो, हा तुमचा राजा. आम्हा ब्राह्मणांचा राजा सोम.' ब्राह्मणकालाविषयी गार्वे लिहितो. 'तत्त्वज्ञानविचाराचा उदय होण्यापूर्वीच्या दुष्काळी शतकांतली एकमेव वाङ्मयी निर्मिती म्हणजे यज्ञशास्त्र.' पण ब्राह्मणांत केवळ यज्ञशास्त्रच आले आहे हेच मुळात यथार्थ नाही. पुरोहितवर्गाने जशी या शास्त्राची उभारणी केली, तशी इतिहास, पुराणे, गाथा, नाराशंसी यांचीही निर्मिती केली. यांतच उत्तरकालीन महाकाव्याची बीजे आढळतात. शिवाय गुंतागुंतीची यज्ञसंस्था ही एक मोठी खर्चाची गोष्ट आहे. अशी संस्था विकसित होण्यास संब्रद्ध लोक उद्योगी आणि उपक्रमशील असावे लागतात आणि यज्ञसंस्था विकसित करणारे लोक तसे असले पाहिजेत. कारण त्यांनी कथा, गीते याही स्वरूपाचे वाङ्मय निर्मिले. यज्ञाखेरीज ब्राह्मणांत व्याकरण, ध्वनिशास्त्र, ज्योतिःशास्त्र यांचीही बीजे दिसून येतात. आणि तत्त्वज्ञानविचाराचा उदय म्हणायचा झाला तर तो ब्राह्मणांच्याही पूर्वी झाला होता, याला ऋग्वेद-अथर्ववेदांतली तत्त्वज्ञानपर सूक्ते साक्ष आहेत, असे विंटरनिट्झने म्हटले आहे. ब्राह्मणपूर्वकालापासून चालू झालेला तत्त्वज्ञानविचार पुरोहितांच्या वर्गापुरताच मर्यादित होता असेही नाही. तत्त्वज्ञानविचारात भर टाकणाऱ्या लोकांत क्षत्रिय होते, हलक्या आणि संदिग्ध कुळातील लोक होते, स्त्रियाही होत्या, हे उपनिषदांत आलेल्या निर्देशांवरून स्पष्ट होते. तत्त्वज्ञानविषयक प्रश्न घेऊन ब्राह्मणही क्षत्रियाकडे गेल्याचे प्रसंग वर्णिलेले आढळतात. अशा ब्राह्मण-अब्राह्मण, स्त्री-पुरुष तत्त्वचिंतकांतून अरण्यात राहणारे वानप्रस्थ आणि संन्यासी हे आश्रमी उदयाला आले आणि त्यांतूनच पुढे बौद्धांसारखे संप्रदायही जन्माला आले.

वैदिक वाङ्मयाचे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद असे चार संप्रदाय चालत आले असून त्या प्रत्येकात संहिता, ब्राह्मणे, आरण्यके आणि उपनिषदे असे विषयांच्या अनुरोधाने स्थूल मानाने चार भाग केले जातात. यांपैकी संहितांना मंत्र आणि अवशिष्ट तीन्ही भागांना ब्राह्मण अशी संज्ञा मीमांसकांच्या परंपरेत प्रचलित आहे. आरण्यके आणि उपनिषदे मुळात ब्राह्मणांचेच अंश होते; ईशावास्योपनिषद् हे मात्र संहितेचा अंश आहे. प्रत्येक संप्रदायाच्या कमीअधिक शाखा असून, या प्रत्येक शाखेची स्वतंत्र संहिता, स्वतंत्र ब्राह्मणे, आरण्यके आणि उपनिषदे असे चतुर्विध वाङ्मय पूर्वी असावे. (ऋग्वेद इ. पाहा)

ऋग्वेद आणि अथर्ववेद या प्राचीन वेदसंहितांमध्ये प्रतिबिंबित झालेल्या धर्माचे दोन समांतर प्रवाह होते. एक शिष्ट समाजाचा आणि दुसरा प्राकृत किंवा अवशिष्ट समाजाचा. यांपैकी शिष्ट समाजाचा धर्म ऋग्वेदात आणि प्राकृत समाजाचा अथर्ववेदात प्रतिबिंबित झाला आहे. शिष्टधर्माचे स्वरूप होते निसर्गपूजा, वीरपूजा आणि अग्निपूजा. प्राकृतधर्माचे स्वरूप होते जादूटोणा, जारणमारण, चेटूक व अभिचार. दोन्ही धर्मांचा आधार आहे अतिमानवी शक्तींवर श्रद्धा. पण ऋग्वेदातल्या ऋषींचा मार्ग आहे, सूक्तांनी देवतांना प्रसन्न करून त्यांच्याकडून अभीष्ट प्राप्त करून घेण्याचा; अथर्ववेदातल्या ऋषींचा मार्ग आहे मंत्रशक्तीने अतिमानुष शक्तींना अभीष्ट साधून देण्यास भाग पाडण्याचा.

कालक्रमाने यज्ञसंस्था विकसित झाली, आणि ती धार्मिक सामाजिक व सांस्कृतिक उपक्रमांचे केंद्र बनली. तिच्या स्वरूपाचे सांगोपांग विवेचन करण्यासाठी प्रथम यजुर्वेदसंहितेचा आणि तिच्या पाठोपाठ ब्राह्मणग्रंथांचा उदय झाला. ऋग्वेदातल्या निवडक ऋचांच्या आधारावर बसवलेल्या विविध गानांनी सामवेद तयार झाला. पुढे आरण्यकांचा विकास झाला; त्यांनी क्रियाकर्मांच्या मानस आचरणाचा मार्ग दाखवला. तेच सूत्र धरून पुढे उपनिषदे प्रकट झाली; त्यांनी क्रियाकर्मांची निरर्थकता सांगून आत्मज्ञानाने पुरुषार्थप्राप्ती होते, असे प्रतिपादिले. ब्राह्मण हे जसे यज्ञविद्येला वाहिलेले ग्रंथ, तसे उपनिषदे हे तत्त्वज्ञानाला वाहिलेले आद्य ग्रंथ. यज्ञसंस्थेविरुद्ध बंड हा उपनिषदांच्या अवताराचा हेतू आहे. काही अभ्यासकांच्या मते यज्ञसंस्थेतीलच काही कल्पनांमधून उपनिषदांतल्या सर्वव्यापी पुरुषाची कल्पना विकसित झाली आहे. ब्राह्मणे आणि उपनिषदे यांच्या निखळ विरोधाच्या आधारावर या गोष्टीची संगती लावता येणार नाही. पण ज्याप्रमाणे व्युत्पत्त्यर्थापासून आरंभ करून दूर जात जात शेवटी भाषेतले काही शब्द वेगळ्याच अर्थांनी रूढ होतात, त्याप्रमाणे एखाद्या परंपरेतून प्रेरणा घेऊनसुद्धा नवे विचार पुष्कळदा वेगळ्या दिशेने विकसित होतात, आणि पुढे मूळ परंपरेला किंवा तिच्या विशिष्ट अंशाला विरोधही करू लागतात. ज्ञानाला 'यज्ञ' म्हणून गीतेने यज्ञाचा गौरवही केला आहे, आणि 'पुष्पितावाक्,' 'गतागतं कामकामा लभन्ते,' इ. वचनांनी त्याची हेटाळणीही केली आहे. ब्राह्मणोपनिषदांच्या संबंधाचीही अशी उपपत्ती लावणे शक्य आहे.

आरण्यके आणि उपनिषदे यांमधली विभाजनरेषा दाखवणे कठीण आहे; कारण ही दोन्ही मुळात ब्राह्मणांचेच भाग आहेत. तथापि पुरोहित, धर्माचे तत्त्वज्ञान, यज्ञाविषयीचा गूढवाद आणि प्रतीकवाद ही प्रायः आरण्यकाची लक्षणे होत. ही लक्षणे काही

प्रमाणांत उपनिषदांतही संक्रांत झाली आहेत. पण उपनिषदांचा गाभा म्हणजे आत्मानात्मविवेक, जगत्कारणाचा शोध, परमार्थ-तत्त्वाचे स्वरूप, जीवतत्त्वाचे संशोधन, शाश्वत सुख आणि त्याचे साधन होय.

उपनिषदे – कर्मांनी जे सुख मिळते ते शाश्वत नसते. ते शाश्वत असण्यासाठी स्वरूपभूत असावे लागते; कारण जे स्वरूपभूत नसते ते शाश्वत असत नाही. म्हणून आपण स्वरूपाचा शोध केला पाहिजे; 'मी कोण' हे शोधले पाहिजे. हा शोध करू जाता असे कळून चुकते की अनेक व्यावहारिक उपाधींनी चित्रित केले आहे ते काही 'मी'चे – आत्म्याचे – यथार्थ रूप नव्हे. त्याच्या यथार्थ रूपाचा अनुभव येतो तो सुषुप्तीत, म्हणजे गाढ निद्रेत. या अवस्थेत आत्म्याच्या सर्व उपाधींचा विलय झालेला असतो; विषयरहित शुद्ध, केवळ सत्-त्वाची संवेदना असते; आणि ती आल्हादक असते. सुषुप्तीतून आत्मा पुन्हा जागृतीत येतो. पुन्हा सर्व उपाधी. पुन्हा सुखदुःखानुभव. हे जे गवसते ते पुन्हा का हरवते ? कारण सुषुप्तीत अन्य सर्व उपाधी गळल्या तरी एक उपाधी शिल्लक राहते.

अविद्या, म्हणजे अज्ञान. त्याचा निरास ज्ञानाने होतो. म्हणून आत्म्याचे परिपूर्ण ज्ञान मिळवले पाहिजे. सुषुप्तीवरून कळते, की आत्म्याचे उपाधिरहित स्वरूप सत् आहे, चित् (संवेदनात्मक) आहे, आनंद आहे. आता विश्वाचा शोध. स्थूल सूक्ष्मातून निघते, ते अतिसूक्ष्मातून. जसजसे सूक्ष्माकडे जावे, तसतसे विशेष धर्मांना सामान्य धर्मांचे स्वरूप येते; आणि असे कळून येते की या सामान्याचे विनाशी विशेष आविष्कार काही सत्य नव्हेत, सामान्यभूत कारणच सत्य आहे. घटादी कार्ये असतात म्हणजे वस्तुतः मृत्तिकाच असते. ती वगळली तर घट म्हणून काय राहील ? 'वाचारम्भणं विकारो नामधेयं, मृत्तिकेत्येव सत्यम्' (छांदोग्य ६.१४) असे स्थूलाकडून सूक्ष्माकडे विवेचन करीत गेल्यास निर्विशेष असे मूल कारण कोणते सापडेल ? सत् म्हणजे अस्तित्व. हे सत् चेतनही असले पाहिजे; कारण ते जड मानल्यास त्याला प्रेरणा करणारे वेगळे चेतन तत्त्व मानणे भाग पडेल. त्यापेक्षा मूळ तत्त्वच चेतन मानणे लाघवाचे. आणि ते आनंदरूपही असले पाहिजे; कारण आनंद हा धर्म सत्, चित् या धर्मांशी निगडित आहे. असे हे सृष्टिमूल सत्-चित्-आनंदरूप तत्त्व सुषुप्तीत अनुभवास येणाऱ्या तशा तत्त्वाहून भिन्न मानण्यास काही प्रमाण नाही. तेव्हा जीव म्हणजेच जगत्कारण, ब्रह्म. याचा साक्षात्कार–प्रत्यक्ष अनुभव–म्हणजे ज्ञान. अशा ज्ञानाने अज्ञानाचे निवारण झाले, की स्व-स्वरूपाचा जो अनुभव येतो तोच मोक्ष. तोच स्वरूपानुभव असल्याने अक्षय, शाश्वत असतो. (उपनिषदे पाहा)

उपनिषदांतील विचारांचे सामर्थ्य सुमारे तीन सहस्रके भारतीय संस्कृतीवर प्रभाव पाडत आले आहे आणि तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातल्या निर्मितिक्षम भारतीय प्रज्ञेचे जागतिक संदर्भात चिरस्थायी प्रतीक ठरले आहे. सतराव्या शतकात औरंगजेबाचा भाऊ दारा शिकोह याने काही उपनिषदांचे पर्शियन भाषेत भाषांतर केले होते. त्यावरून एकोणिसाव्या शतकात एका फ्रेंच पंडिताने (आँक्वेतिल दु पेराँ) 'ऊप्नेक्हत्' अर्थात 'ऊपनेखत' हे लॅटिन भाषांतर केले. हे भाषांतर पुष्कळ सदोष असले तरी त्याच्याच द्वारा उपनिषद् वाङ्मयाची पाश्चात्त्य जगाला प्रथम ओळख झाली. या सदोष भाषांतरातूनसुद्धा उपनिषदांतील विचार इतके प्रभावी ठरले, की शोपेनहॉअर या जर्मन पंडिताने 'अत्युच्च मानवी प्रज्ञेची निर्मिती' या शब्दांनी त्यांचा गौरव केला.

तेव्हापासून या वाङ्मयाचा प्रभाव पाश्चात्त्य तत्त्वचिंतकांवरही पडत आला असून, आज हा जगाचा एक थोर समाईक वारसा ठरला आहे. जगातली अशी एकही प्रगत भाषा नाही; की जीत उपनिषदे आणि गीता यांचे भाषांतर झालेले नाही.

प्रस्थानत्रयीत पहिले स्थान उपनिषदांना दिले गेले. त्यात जे सांगितले आहे तो अखेरचा शब्द ठरला. प्रस्थानत्रयीतल्या अन्य दोन प्रस्थानांची (गीता व ब्रह्मसूत्रे) कृतार्थताही पहिल्या प्रस्थानावरच आधारलेली राहिली. भारतीय तत्त्वज्ञानात बुद्धोत्तरकालीन दुःखवादाची भर पडली. मैत्रायणीसारख्या उपनिषदांत या वृत्तीचा प्रभाव जाणवतो. जुनी वैदिक कालातील उपनिषदे प्रतिपादनात आशावादी आहेत. पण त्यातही निराशावादाची बीजे आहेत. 'ब्रह्म सत्यम्' याची दुसरी बाजू आहे 'जगत् मिथ्या'. पुढच्या तत्त्वज्ञानग्रंथांतून या भावनेवर पुष्कळ भर दिलेला आढळतो. वैराग्य भावनेचे एक अंग म्हणून देहादींचे किळसवाणे वर्णन, जगातल्या दुःखमय घटनांचे वर्णन, मानवाची दुर्बलता, कर्मवशता अशा गोष्टी येतात.

औपनिषद तत्त्वज्ञान हे लौकिक सुख–दुःख, आशा-निराशा अशा सगळ्याच द्वंद्वांच्या, एवढेच नव्हे तर नीती-अनीती, धर्म-अधर्म यांच्याही पलीकडचे आहे. 'अन्यत्र धर्मात्, अन्यत्र अधर्मात्' (कठ २.१४). शाश्वत आनंदाची ज्याला ओढ आहे त्याच्या दृष्टीने सर्व अशाश्वत गोष्टी आणि अविद्येवर आधारलेले व्यवहार स्वाभाविकपणे आणि तर्कदृष्टीने असार, त्याज्य ठरतात. आणि तत्त्वज्ञान ही केवळ बौद्धिक करमणुकीची गोष्ट नसेल तर तत्त्वज्ञान मार्गाचा पथिक या गोष्टींकडे आदराने पाहील, हे कसे शक्य आहे ? स्वप्नांतल्या घटनांकडे आपण कसे पाहतो ? बौद्ध परंपरेत जगाच्या दुःखमयतेचे वर्णन येते, अतिरेक वाटण्याइतके येते, त्याचीही उपपत्ती अशी लावणे शक्य आहे. कारण बुद्ध तरी उपनिषदांतील तत्त्वविचाराच्या

पृष्ठभूमीवरच उदयाला आला. त्याची परिभाषा वेगळी असली तरी त्याला उपनिषदांपेक्षा फार वेगळे काही सांगायचे होते असे दिसत नाही.

उपनिषदांना 'वेदान्त' असे दुसरे नाव आहे; आणि ते प्रत्यक्ष एकदोन प्राचीन उपनिषदांतच आले आहे (मुंडक ३.२.६; श्वेताश्वतर ६.२२). वेदान्त म्हणजे वेदांचा अंत, अर्थात वेदवाङ्मयाचा, वेदाध्ययनाचा, वेदपठनाचा शेवट. यातून उपनिषदांचे मंत्रब्राह्मणात्मक वेदांशी निकटचे नाते सूचित होते. उपनिषद् हे नाव लावणाऱ्या दोनशेहून अधिक रचना आज उपलब्ध आहेत; त्यांतील फारच थोडया वरील अर्थाने वेदान्त आहेत. अवशिष्ट उपनिषदांची रचना उत्तरकालीन, आहे; आणि 'अल्लोपनिषद्' यासारख्या रचना तर मोगल सत्तेच्या काळातल्या आहेत. ज्या प्राचीन रचना आहेत त्यांतही काही नवीन वाटावे असे भाग दिसतातच; पण त्या प्राय: बुद्ध-पाणिनिपूर्व काळातल्या मानल्या जातात. शंकराचार्यांनी प्रमाण म्हणून ज्या उपनिषदांतली वचने उद्धृत केली आहेत, त्यांच्या प्राचीनत्वाविषयी वाद नाही. त्यांनी मांडूक्य आणि मैत्रायणी या दोन उपनिषदांतली वचने उद्धृत केलेली नाहीत. त्यामुळे आधुनिक अभ्यासक या दोन रचना फार प्राचीन समजत नाहीत.

वेदांगे – उपनिषदांनंतर वैदिक परंपरा बौद्ध धर्माच्या उत्कर्षकाली मागे पडली. तिच्या पुनरुज्जीवनासाठी झालेला पहिला वाङ्मयीन प्रयत्न म्हणजे वेदांगे. वेदग्रंथांचा पाठ आणि अर्थ, तसेच त्यांतले कर्मकांड यांच्या बोधासाठी उपयुक्त असे वाङ्मय वेदांगे म्हणून प्रसिद्ध आहे; आणि ते पौरुषेय मानले जाते. वेदांगांच्या उदयाबरोबर संस्कृतात एक नवी ग्रंथशैली लोकप्रिय झाली. तिचे नाव 'सूत्र', म्हणजे 'सुटसुटीत, असंदिग्ध, संक्षिप्त विधान'. या शैलीमुळे विस्तृत शास्त्र थोडया वाक्यांत सामावू लागले आणि तोंडपाठ करणे सोपे झाले. संस्कृत वाङ्मयाखेरीज जगात अन्य भाषांतील वाङ्मयात अशी शैली आढळात नाही. बृहदारण्यक उपनिषदात (४.५.११) तिचा उल्लेख आहे आणि काही ब्राह्मण भाग सूत्रशैलीत रचलेला आहे. या शैलीचा एक विशेष जे लाघव म्हणजे संक्षेप, त्याची पराकाष्ठा पाणिनीच्या अष्टाध्यायीत दिसून येते. लाघवासाठी मोठे सामासिक शब्द योजण्याची प्रवृत्ती सूत्रवाङ्मयात जन्मली आणि ती पुढे काव्यातही पसरली. सूत्रांचे विवरण आरंभी तोंडी केले जात असे; पुढे ते लिखित रूपातही उपलब्ध होऊ लागले. याच विवरणाला त्याची व्याप्ती, प्रयोजन, अधिकारी लक्षात घेऊन भाष्य, वार्त्तिक, वृत्ती, टीका, व्याख्या, टिप्पणी, इ. नावे दिली गेली. शास्त्रग्रंथांची सूत्रभाष्यात्मक रचना ग्रंथकारांना फार आवडली; आणि अनेक शास्त्रांवर या शैलीने ग्रंथ लिहिले गेले. सूत्रे प्राय: गद्यात रचण्याची प्रथा आहे. पण काही सूत्रग्रंथ पद्यबद्धही आहेत. त्यांत सूत्राच्या समाप्तीचा पद्याच्या समाप्तीशी मेळ असतोच असे नाही. वार्त्तिक म्हणून जो मूळ ग्रंथातल्या न्यूनाधिकाचा विचार करणारा टीकाप्रकार आहे, तोही असाच गद्यात्मक किंवा पद्यात्मक आढळतो. बहुतेक शास्त्रांत वार्त्तिक हे सूत्रभाष्यांवर असते. पाणिनीय व्याकरणात मात्र सूत्रवार्त्तिकांवर भाष्य आहे. (वेदांगे पाहा)

सूत्रभाष्यात्मक पद्धतीने मांडलेल्या संस्कृत शास्त्रांचे पुरुषार्थकल्पनेच्या आधारावर वर्गीकरण रूढ आहे. कल्पसूत्रांचा विषय धर्मशास्त्र. अर्थशास्त्रावर अनेक ग्रंथ आहेत त्यांत सूत्रशैली विशेष आढळत नाही. कामशास्त्रावर वात्स्यायनाची सूत्रे आहेत. मोक्षशास्त्रात विविध तत्त्वज्ञान संप्रदाय मोडतात.

दर्शने – सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, वेदान्त व मीमांसा ही जी प्रमुख सहा आस्तिक दर्शने आहेत, त्या सर्वांवर प्राचीनतम ग्रंथ सूत्रात्मक आहेत. सांख्य दर्शनावरही कपिलाची म्हणून सूत्रे आहेत; पण ती अभ्यासकांच्या मते उत्तरकालीन आहेत. सांख्य दर्शनावरचा प्राचीनतम ग्रंथ म्हणजे ईश्वरकृष्णाच्या सांख्यकारिका (इ.स. १००–२००). अवशिष्ट दर्शनांचे सूत्रकार क्रमश: पतंजली, गौतम, कणाद, बादरायण आणि जैमिनी; आणि भाष्यकार क्रमश: व्यास, वात्स्यायन, प्रशस्तपाद, शंकराचार्य व शबर. या सहा आस्तिक दर्शनांवर सन पूर्व ४०० ते सन पूर्व १५० या काळात सूत्रग्रंथ रचले गेले. सर्वांत प्राचीन भाष्य पतंजलींचे पाणिनीच्या अष्टाध्यायीवरील महाभाष्य (सनपूर्व १५०). अन्य भाष्यांची रचना त्यामागून लवकरच सुरू झाली आणि ती पुढे अनेक शतके चालू राहिली. या सूत्रभाष्यात्मक शास्त्रवाङ्मयावर टीका, उपटीका, निबंध, इ. स्वरूपाचे प्रचंड वाङ्मय अनेक शतके निर्माण होत राहिले.

या सहा आस्तिक, म्हणजे वेदप्रामाण्य मान्य करणाऱ्या दर्शनांव्यतिरिक्त जी दर्शने निर्माण झाली ती नास्तिक, म्हणजे वेदप्रामाण्य मान्य न करणारी. त्यांतली मुख्य बौद्ध, जैन, चार्वाक ही होत. बौद्ध धर्माचे प्राचीन 'आगम' वाङ्मय पाली भाषेत, तर जैन धर्माचे अर्धमागधी भाषेत ग्रथित आहे. या संप्रदायांचे शास्त्रीय परिभाषेतील दर्शनग्रंथ पुढच्या काळात निर्माण झाले; ते प्राय: संस्कृतात निबद्ध आहेत, कारण संस्कृत ही पंडितांची व्यवहारभाषा होती. चार्वाक हे भारतीय परंपरेतले जडवादी तत्त्वज्ञान होय. त्यातील मताचा निर्देश आणि खंडन अन्य दर्शनग्रंथांतून केलेले आहे. पण या दर्शनाचा स्वतंत्र अधिकृत ग्रंथ असा उपलब्ध नाही. (दर्शने पाहा).

अभिजात वाङ्मय – अभिजात संस्कृत वाङ्मयाच्या क्षेत्रात परामर्श केलाच पाहिजे असे ग्रंथ पुष्कळ आहेत. या वाङ्मयाचे

मूळ अभ्यासकांनी ऋग्वेदातल्या संवादसूक्तांत आणि ब्राह्मण ग्रंथांतल्या आख्यानांत, इतिहास-पुराणांत, म्हणजे त्या काळातल्या पोवाडे वाङ्मयात शोधले आहे. यांत दिसते तसे कथाप्रधान काव्य प्रारंभी यज्ञसमारंभाचा एक भाग म्हणून प्रचारात आले, आणि प्रसंगविशेषात कौटुंबिक क्षेत्रातही शिरले. अशा वाङ्मयाचा 'इतिहास-पुराण' या नावाने वैदिक वाङ्मयातही उल्लेख येतो, आणि त्याचे महत्त्व जाणून त्याला 'पाचवा वेद' असे मानण्यात येते. या पाचव्या वेदाचे ग्रंथ असे नव्हते; तो वेद ऐतिहासिक आणि पौराणिक यांच्या मौखिक परंपरेने जिवंत राहिला आणि एक सार्वजनिक संपदा ठरला. त्यातून बौद्ध व जैन संप्रदायांनीही वेळोवेळी उचल केली. ती जातककथा, जैन रामायण इत्यादी रचनांत आढळते. 'गाथा नाराशंसी' या नावाचा या वाङ्मयाचा जो दानस्तुतींशी, कुंतापसूक्तांशी निगडित असा भाग होता, त्यातून पुढे प्रदीर्घ वीरकथात्मक महाकाव्ये निर्माण झाली. या प्राचीन महाकाव्यांतले अवशिष्ट, उपलब्ध ग्रंथ म्हणजे महाभारत आणि रामायण. या वीरकथाकाव्यांचे संरक्षण, वर्धन आणि कथन करणारा 'सूत' म्हणून एक वर्ग प्राचीन राजकुलांत असे. आपल्या कामाचा एक भाग म्हणून तो युद्धप्रसंगी रणक्षेत्रावरही उपस्थित असे. महाभारतातला संजय हा असाच एक सूत होता. 'कुशीलव' नावाचे ही गायक असत. संस्कृत नाटकांतून वैतालिक (म्हणजे भाट) असतात, ते याच परंपरेतले. महाभारत आणि रामायण हे ग्रंथ याच परंपरेतून आले आहेत. यांचा मूळ गाभा वीरकथेचा. त्यात विविध लोकांनी विविध प्रकारची सतत भर टाकली. त्यातून या ग्रंथांना आज दिसते ते स्वरूप आले. त्यांचे मूळचे एकजिनसी स्वरूप या मधल्या स्थित्यंतरांमुळे लुप्त झाले. महाभारत हा तर एक विराट विश्वकोशच झाला. त्याच्या मानाने रामायण पुष्कळच एकजिनसी आणि काव्यात्म राहिले.

महाभारत व रामायण – अठरा पर्वांचे महाभारत म्हणजे भरतकुलातील राजांच्या युद्धाची महान गाथा. परंपरेने या ग्रंथाचे कर्तृत्व व्यासांना दिले आहे. यातल्या भरतकुलाचा इतिहास ऋग्वेदाइतका जुना आहे. ऋग्वेदातल्या दाशराज्ञ युद्धात एक पक्ष भरतांचाच होता. दुष्यंत-शकुंतलापुत्र भरताचा व कुरुक्षेत्राचा ब्राह्मणग्रंथांत उल्लेख आहे. त्याच्या वंशजांमध्ये आपापसांत झालेल्या युद्धात सबंध कुलाचा कसा नाश झाला त्याची कथा हा महाभारत ग्रंथाचा गाभा आहे. त्यात भर पडत पडत हा ग्रंथ इतका मोठा झाला की यात मूळ भाग कोणता आणि भर कोणती हे ओळखणे अशक्य झाले आहे. यात मूळ कथेत जी भर पडत गेली तीत प्राचीन वीरगाथा; ब्राह्मण समाजाच्या परंपरेतल्या पुराणकथा, पशुपक्ष्यांच्या नीतिकथा, रूपककथा आणि धर्मविवेचन, असे विविध वाङ्मय आहे. सोळा हजार श्लोकसंख्येचा हरिवंश एकोणिसावे पर्व म्हणून, जोडला गेला. महाभारताचा विस्तार स्थूल मानाने लक्षश्लोकात्मक (शतसाहस्री संहिता) सांगितला जातो, तरी त्यात काही भाग गद्यही आहे.

अशा ग्रंथाचा काळ निश्चित करणे ही अत्यंत बिकट गोष्ट आहे. त्याविषयीच्या विविध प्रमाणांची आणि मतांची छाननी करून विंटरनिट्झने सन पूर्व ४०० ते इ. स. ४०० हा महाभारताच्या विकासाचा काळ ठरवला आहे. (महाभारत पाहा)

सात कांडांत रचलेल्या रामायणाचे पहिले बालकांड आणि सातवे उत्तरकांड यांतला पुष्कळसा भाग ही मागून पडलेली भर आणि मूळ ग्रंथ मधल्या पाच कांडांचा आहे, असे अभ्यासकांचे मत आहे. याचे एक कारण म्हणजे या कांडांत आलेल्या मुख्य कथेचा प्रवाह खंडित करणाऱ्या पौराणिक कथांचे बहुजिनसी स्वरूप आणि दुसरे म्हणजे राम हा विष्णूचा अवतार ही या कांडांतली भूमिका. या कांडांतली भाषा आणि शैली मधल्या कांडांशी तुलना करता कमी प्रतीच्या आहेत. मधल्या कांडांत मुख्य कथेत विक्षेप आणणारी अवांतर सामग्री वेगळ्या प्रकारची आणि अत्यंत अल्प आहे; आणि राम हा प्रायः मानवी वीर आहे. या भागात पुराणांश नाही असे नाही; पण त्यात इंद्र ही सर्वश्रेष्ठ देवता आहे. रामकथेतली जनक-सीता ही नावे वैदिक वाङ्मयात आढळतात. त्यात जनक हा विदेह देशाचा तत्त्वज्ञ राजा आहे; सीता ही नांगरलेल्या भूमीची देवता आहे. पण त्यांचे रामायणातल्या रामकथेशी नाते काय ते सांगता येत नाही. बौद्ध वाङ्मयात एक 'दसरथजातक' आहे; त्याचा रामायणाशी काही प्रमाणात मेळ बसतो. दशरथाने मृगयाप्रसंगी श्रावणाचा चुकून वध केला. असाच प्रसंग 'सामजातका'तही आहे. पण रावण, कपिसेना इत्यादी अंशांचा जातकांत पत्ता लागत नाही. रामकथेच्या अनेक परंपरा असाव्या. त्यांतली एक बौद्ध जातकांत, तर एक जैन रामायणात दिसते. रामकथा उपाख्यान म्हणून महाभारतात आली आहे आणि वनवास, द्रौपदीचा अपहार, दिव्यास्त्रप्राप्ती, धनुर्धारी अर्जुन, इ. महाभारतकथेतले अंश रामायणातल्या सदृश अंशांशी जुळणारे आहेत. त्यामुळे रामायण–महाभारतांच्या पौर्वापर्याचाही प्रश्न निर्माण होतो. याविषयी बराच ऊहापोह करून विंटरनिट्झने असा निष्कर्ष काढला आहे, की रामायण महाभारताहून अर्वाचीन आहे, पण महाभारताच्या विकासाची पूर्णता रामायणाच्या निर्मितीनंतर झाली असली पाहिजे. त्यामुळे महाभारतात रामायणाचे अनुकरण करणारे प्रसंग आणि रामकथा हे अंश समाविष्ट झाले. अर्थात मूळ रामायणाची निर्मिती सनपूर्व तिसऱ्या शतकात झाली आणि त्याची वाढ इ. स. च्या दुसऱ्या शतकात पूर्ण झाली.

महाभारत आणि रामायण या ग्रंथांनी भारतीय मनावर शतकानुशतके अखंड प्रभाव पाडला. तो भारतीय शिल्प, कला, साहित्य यांत तर मुरलाच आहे, पण भारतातून प्राचीन काळी परदेशी जाऊन स्थायिक झालेल्या भारतीयांनीही हा वारसा आपल्या परंपरेत जतन करून ठेवला आहे. या ग्रंथांच्या निर्मितीनंतर संस्कृतात आणि पुढे प्रादेशिक भाषांत जे ललित वाङ्मय निर्माण झाले, त्यातल्या अनेक कृतींचा उगम किंवा प्रेरणा या दोन ग्रंथांत, विशेषतः रामायणात, आहे. हा प्रभाव थेट अर्वाचीन कालापर्यंत येऊन पोचला आहे. रामचरितावर विस्तृत काव्याची रचना करून आदिकवी वाल्मीकी पुढच्या कवींचे मार्गदर्शक आणि स्फूर्तिदाते ठरले. महाभारत आणि रामायण या ग्रंथांचे एकजिनसी स्वरूप त्यांच्या वाढीमुळे लोपले तरी त्यांच्या गाभ्याचा काव्यात्म परिणाम निर्विवाद आहे. अकराव्या शतकापासून पुढे प्रादेशिक भाषांत रामायणाच्या आधाराने रचना होऊ लागल्या. त्यांत तुलसीदासांच्या रामचरितमानसाने लोकप्रियतेची परा सीमा गाठली. महाभारत आणि रामायण हे यथार्थतेने भारताचे राष्ट्रीय ग्रंथ आहेत.

पुराणे – संस्कृत साहित्याच्या नव्हे, तर सांस्कृतिक परंपरेच्या दृष्टीने महाभारत–रामायणांइतके महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे पुराणे होत. 'पुराण' हा शब्द वैदिक वाङ्मयात प्रायः इतिहासाच्या जोडीने अनेक ठिकाणी 'प्राचीन आख्यान' अशा अर्थाने आला आहे, पण त्या ठिकाणी विशिष्ट ग्रंथांचा अभिप्राय नसून विषयाचा आहे. आज उपलब्ध असलेल्या पुराणांच्या नावाचा प्रत्यक्ष निर्देश सापडू लागतो तो सूत्रकालापासून. आणि यात येणाऱ्या ऐतिहासिक राजांच्या नामावलींत हर्षवर्धन किंवा त्यापुढचे राजे आढळत नाहीत. यावरून प्राचीन पुराणांच्या रचनेचा काल सनपूर्व ५०० ते इ. स. ६०० हा ठरतो. अर्थात पुराणांतही वेळोवेळी भर पडत आली आहे. त्यामुळे एखादे पुराण प्राचीन आहे याचा अर्थ त्यात अर्वाचीन काळात भर पडलेली नाही, असा होत नाही. अशी भर आणि काही पुराणेही सातव्या शतकाच्या पुढे निर्माण होत राहिली. उगमाच्या दृष्टीने महाभारत–रामायण आणि पुराणे यांच्यांत भेद नाही. किंबहुना महाभारतातच एका ठिकाणी महाभारताचा पुराण या नावाने निर्देश आहे आणि अन्य पुराणांप्रमाणे त्याचा प्रवचनकारही सौती आहे. पुराणवाङ्मय प्रायः कोणत्या तरी देवतेच्या भक्तिसंप्रदायाला धरून निर्माण झाले असून, हिंदुधर्माला साकार करण्याचे कार्य पुष्कळसे त्यानेच केले आहे. पुढच्या काळातल्या अनेक साहित्यकृतींचेही उगम पुराणवाङ्मयात असून, भागवतासारखी खुद्द काही पुराणेही साहित्यगुणसंपन्न आहेत. स्तोत्रवाङ्मयाचाही उगम पुराणवाङ्मयातच आहे. एवढेच नव्हे; तर त्यांतल्या काही लोकप्रिय कृती मुळात पुराणांचेच अंश आहेत. या वाङ्मयाने विविध भक्तिसंप्रदायांचे शतकानुशतके पोषण केले आणि या क्षेत्रातल्या प्रादेशिक भाषांतील साहित्यालाही प्रेरणा दिली. (पुराणे पाहा)

संहिता, आगम, तंत्र – या नावाने ओळखले जाणारे वाङ्मय भक्तिवाङ्मयाच्याच संप्रदायात मोडते. यांपैकी संहिता वैष्णवांच्या, आगम शैवांचे, आणि तंत्रे शाक्तांची. तथापि या सगळ्यांचा तांत्रिक वाङ्मय म्हणून सरसकट निर्देश केला जातो. या वाङ्मयाचा आरंभ इ. स. च्या पाचव्या–सहाव्या शतकांत झालेला असावा. सातव्या–आठव्या शतकांत या हिंदू तंत्रांचा बौद्ध संप्रदायातही प्रवेश झाला आणि थोड्याच काळात बौद्ध तंत्रांची चिनी आणि तिबेटी भाषांत भाषांतरेही झाली. तंत्रवाङ्मयाचा उदय पुष्कळ उशिरा झाला असला, तरी त्याची बीजे वैदिक वाङ्मयापर्यंत जाऊन पोचतात. त्यांत आर्य आणि आर्येतर संस्कृतींचे मिश्रणही झाले आहे. पुराणे आणि तंत्रे यांचा बराच भाग काव्यदृष्ट्या नीरस असला, तरी धर्मेतिहासाच्या दृष्टीने या वाङ्मयाचे मूल्य फार मोठे आहे. या वाङ्मयाची व्याप्ती हिंदुधर्मापुरती मर्यादित नाही, तर बौद्ध आणि जैन परंपरांचेही या स्वरूपाचे स्वतःचे वाङ्मय आहे. 'ललितविस्तर' (सनपूर्व पहिले शतक) हा बौद्ध परंपरेतला ग्रंथ स्वतःला पुराणच म्हणवतो. 'सद्धर्मपुंडरीक', 'कारंडव्यूह' हे ग्रंथ (इ. स. चे पहिले दुसरे शतक), 'महावस्तु' ग्रंथातले काही वेचे (सनपूर्व तिसरे शतक) यांचे स्वरूप पुराणवाङ्मयासारखेच आहे. सातव्या शतकापासून पुढे जैनांची पुराणे उपलब्ध होऊ लागतात. त्यांत पद्मपुराण, हरिवंशपुराण, आदिपुराण, महापुराण, पांडवपुराण इ. पुराणे आहेत.

महाकाव्ये – वाल्मीकीच्या रामायणानंतर संस्कृत वाङ्मयातील महाकाव्य म्हणजे अश्वघोषाचे (इ. स. १००) बुद्धचरित होय. अभिजात संस्कृत महाकाव्यांची लक्षणे ज्या आरंभीच्या कृतींवरून घडली, त्यांत अश्वघोषाच्या कृतींची गणना केली पाहिजे. अश्वघोष हा केवळ कवीच नव्हे, तर तत्त्वज्ञही होता, हे त्याच्या अन्य कृतींवरून दिसते. त्याच्या अनेक कृतींचे चिनी भाषांतर झाले आहे. जगाचे मांगल्य ही अश्वघोषाच्या काव्यरचनेची प्रेरणा होती.

भारतीय परंपरा आणि पाश्चात्त्य अभ्यासक या दोघांनीही सर्वश्रेष्ठ संस्कृत कवी म्हणून कालिदासाचा गौरव केला आहे. त्याचा काल कोणताही असो, त्याने काव्यमार्गावर उमटवलेली आपली मुद्रा इतकी ठळक आहे, की दीड-दोन हजार वर्षे उलटून जाऊन देखील, त्याचे स्थान अबाधित राहिले आहेत. या प्रदीर्घ काळात तो संस्कृत-प्राकृत कवींना स्फूर्ती आणि रसिकांना रस-

स्वाद अखंड देत आला आहे. भौतिक आणि मानस निसर्गाची स्थूल सूक्ष्म स्पंदने; सुखे आणि दुःखे; आदर्श आणि आकांक्षा; धर्म आणि तत्त्वज्ञान; ज्ञान आणि भक्ती; चार आश्रम आणि चार पुरुषार्थ; कुटुंब आणि समाज; स्वर्ग आणि पृथ्वी; तपोवने आणि प्रासाद; कर्मशक्ती आणि तपःशक्ती; शाप आणि उश्शाप; भाव आणि विवेक; साधना आणि सिद्धी. या सर्वांमधून व्यापक मानवी आणि भारतीय संस्कृती कालिदासाच्या वाङ्मयात प्रतिबिंबित झाली आहे. याच्याबरोबरच त्याची तरल प्रतिभा, कलेची जाण, प्रसादमधुर भाषा, संयत मंडित शैली, आणि त्याचा विशाल व खोल अनुभव त्याच्या वाङ्मयात दिसून येतो. कालिदासाचे भारतभूमीवरचे प्रेम त्याच्या कृतींत अनेक ठिकाणी जाणवते. या भूमीचे अनेक भाग त्याने पाहिले, मनात साठवले, काव्यचित्रात रेखांकित केले. त्याच्या कृतीत सर्वसाधारण माणूस फारसा आलेला नाही, पण माणसाचे सर्वसाधारण भाव सर्वत्र आले आहेत. त्यामुळेच त्याच्या कृतीचा अनुभव घेताना हृदयसंवाद चटकन होऊन आपले, जवळपासचे चित्र पाहिल्यासारखे वाटते. भारताचा राष्ट्रीय कवी ही गौरवोपाधी ज्या निवडक संस्कृत साहित्यनिर्मात्यांना देता येईल, त्यांत कालिदास अग्रगण्य आहे.

अभिजात संस्कृत वाङ्मयात जी 'पंच महाकाव्ये' प्रसिद्ध आहेत, त्यांतली दोन कालिदासाची, (रघुवंश व कुमारसंभव), आणि प्रत्येकी एक भारवी (किरातार्जुनीय), माघ (शिशुपालवध), श्रीहर्ष (नैषधचरित) यांचे. यांपैकी शेवटचे तीन कवी निःसंशय कवी होते, पण त्यापेक्षा अधिक ते पंडित होते, असे त्यांची काव्ये वाचताना वाटते. यांत आणि या परंपरेत पुढे निर्माण झालेल्या अन्य महाकाव्यांत, तुरळक अपवाद सोडता, शब्दचमत्कृतींवरचा भर आणि पांडित्याचा हव्यास उत्तरोत्तर वाढत गेला आहे, असे दिसते. महाकाव्य म्हटले की त्यात अमूक अमूक वर्णने आलीच पाहिजेत; पद्मबंध, मुरजबंध, गोमूत्रिकाबंध, सर्वतोभद्र, एकाक्षरी श्लोक (म्हणजे एका श्लोकात एकाच व्यंजनाच्या बाराखडीतली अक्षरे), द्व्यक्षरी श्लोक, गतप्रत्यागत (म्हणजे उलटसुलट कसाही वाचला तरी श्लोकात तीच अक्षरे त्याच क्रमाने येणे) या आणि अन्य अगणित चमत्कृती आल्याच पाहिजेत, असा संकेत रूढ झाला. यांतून कवीचे व्याकरणपांडित्य, वत्सभाषाप्रभुत्व दिसून येई. एकाने तसे केल्यावर दुसऱ्याने न करून कसे चालेल ? यातून जणू चढाओढच सुरू झाली. यावर ताण करण्यासाठी काहींनी अशी काव्ये रचली की त्या सबंध काव्यातून दोन दोन अर्थ निघतील; उदा.– 'राघवपाण्डवीय' (इ. स. चे बारावे शतक – एक अर्थ रामकथानुसारी तर दुसरा पांडवकथानुसारी. अशा रचनांना आनंदवर्धन 'चित्र' म्हणजे केवळ काव्यानुकरण) असे नाव देतो. अशी काव्ये संस्कृतात का निर्माण झाली ? कारण ती केवळ पंडितांसाठी निर्माण होत होती. याचे पहिले कारण संस्कृत भाषा पंडित समाजापुरती मर्यादित झाली होती व दुसरे कारण संस्कृत भाषा व्यवहारातून गेल्यामुळे सर्व प्रकारच्या कृत्रिमतेला मोकळे रान मिळाले. वाटेल तेवढे लांब समास, अर्थानुरोधाने शब्दांना हवे तितके सामासिक पर्याय निर्माण करण्याची शक्यता, प्रत्ययबद्धतेमुळे पदक्रमात यथेच्छ फिरवाफिरव, अलंकारानुरोधाने हव्या तेवढ्या लांबीचा आणि वर्णघटनेचा शब्द निवडण्याची शक्यता आणि हे सगळे ज्याच्याशी तुलून नियंत्रित करता येईल अशा स्वाभाविक प्रयोगांचा अभाव, अशा अनेक गोष्टी जमून आल्या. त्यांनी संस्कृत भाषेची एकीकडे आविष्कारशक्ती वाढली, तशी दुसरीकडे कृत्रिमता वाढली. याच कारणाने या काव्यांचा समकालीन जीवनाशीही संबंध राहिला नाही. (महाकाव्य पाहा)

महाकाव्य या बंधाशी निगडित असलेले नियम-संकेत जाचक वाटल्यामुळे कदाचित संस्कृत कवींनी संकेतमुक्त आविष्कारासाठी नवे प्रकार शोधून काढले. त्यांतला एक खंडकाव्य व दुसरा मुक्तककाव्य. कालिदासाचे मेघदूत हा अभिजात संस्कृत खंडकाव्याचा पहिला आविष्कार होय. जेथे सुटसुटीत आकार, लक्ष्यभूत रसावर केंद्रित मांडणी, आढळून येते, जेथे कथेचे फारसे बंधन नाही – असा कवींच्या प्रतिभेला अनिबंध अवसर देणारा काव्यप्रकार मेघदूताने दाखवून दिला. या काव्यात नायक आणि नायिका यांच्या वंशाचे वर्णन नाही. त्यात बालपण नाही, तारुण्यात पदार्पण करण्याच्या काळातले नित्याचे वर्णन नाही, नायक-नायिकांची नावनिशी सुद्धा नाही. एकदम विरहाने सुरुवात, आणि संदेश सांगून होताच शेवट. पण जो परिणाम महाकाव्याने होणार नाही तो या शे-सव्वाशे पद्यांच्या लघुप्रबंधाने करून दाखवला. मेघदूताने दाखवलेल्या मार्गात सुप्त सामर्थ्य फार मोठे सामावलेले आहे. पण पुढिलांनी त्या सामर्थ्याचा उपयोग आपल्या अनुभूती ग्रथित करण्यासाठी न करता केवळ मेघदूताचे अनुकरण केले आणि संस्कृतात संदेशकाव्यांची भली मोठी माळका तयार झाली. मेघदूताचा खरा वारसा ज्याने घेतला असे बिल्हणाच्या चौरपंचाशिकेसारखे (इ. स. १०८०) काव्य क्वचितच कोठे दृष्टीला पडते. आणखी एक जयदेवाचे 'गीतगोविंद' (बारावे शतक) आहे. त्यात लयीच्या बांधणीत आणि भावानुरूप परिवर्तनात पुष्कळ काही अभिनव आहे. संस्कृत ध्वनींची आणि पदांची हृद्य लयानुकूलता इतक्या प्रमाणात गीतगोविंदानेच प्रथम दाखवून दिली. पण हे नवीन प्रयोगक्षेत्र सोडले तर याही काव्यात एकूण प्रतिभेचा दुष्काळ ! अशाही

दुष्काळात संस्कृत प्रतिभेचे सामर्थ्य अजून टिकून असल्याचे प्रत्ययाला आणून दिले ते मुक्तककाव्यांनी.

मुक्तक म्हणजे सुटे पद्य. जे पद्य अर्थदृष्टीने स्वयंपूर्ण असते, मागच्या-पुढच्यात गुंतलेले नसते, त्याला मुक्तक म्हणतात. हा प्रकार संस्कृत कवींना फार सोयीचा वाटला. एखादी हृद्य कल्पना सुचली, की अनुरूप आकाराच्या वृत्तात ती मांडून मोकळे व्हावे. कालिदासाने हाही प्रकार चाळवून पाहिला; पण पुढे सोडून दिला. त्याचे 'ऋतुसंहार' म्हणजे मुक्तकांचाच संग्रह होय. या संग्रहातील मुक्तकांना एकमेकांशी बांधणारा विशिष्ट ऋतू हा दुवा आहे खरा; पण तो नाममात्रच. कोणतेही पद्य अर्थतः दुसऱ्यावर अवलंबून नाही. अशी अन्यही कवींची लघुकाव्ये मुक्तकसंग्रहात मोडण्यासारखी आहेत. असे सुभाषितांचे, सूक्तींचे संग्रह इतरांनीही केले. पद्यांच्या मूळ कर्त्यांचा काही संग्रहकारांनी नामनिर्देश केला, तो त्या कर्त्यांच्या कालनिश्चितीचेही एक प्रमाण म्हणून क्वचित उपयोगी पडू लागला. ज्यांची या संग्रहातल्या पद्यांखेरीज अन्य कृती उपलब्ध नाही, असेही कवी यात आहेत. त्यांचे काव्य या संग्रहांनीच वाचवले. बहुतेक संग्रहांत पद्यांचे विषयानुरोधाने गट केले आहेत. बरेचसे संग्रह शंभर शंभर पद्यांचे आहेत; त्यांचा परामर्श 'शतककाव्ये' म्हणून करण्याची पद्धत आहे. मुक्तकसंग्रहांतल्या कवींत पुष्कळ वैचित्र्य आहे, त्यांची पातळीही वेगवेगळी आहे. त्यांत स्त्रिया आहेत, पुरुष आहेत, यती आहेत, गृहस्थ आहेत; वैदिक, अवैदिक, राजे, रंक, पंडित, अपंडित असे पुष्कळ आहेत. त्यांत एखादा भावगंभीर अमरू असतो. संस्कृत काव्यमीमांसकांनी या सगळ्यांची दखल घेतली आणि काव्याचे असे लक्षण केले की जे लहानात लहान मुक्तकालाही उपपन्न होईल. मुक्तक साहित्याचा काव्यमीमांसेवर पडलेला हा प्रभाव लक्षणीय आहे. संस्कृत साहित्याच्या समीक्षेत येऊ शकत नाहीत, पण संस्कृत काव्यमीमांसकांनी ज्यांतून अनेक पद्ये उद्धृत केली आहेत, असे गाथासप्तशती, वज्जालग्ग यासारखे मुक्तकसंग्रह प्राकृतातही आहेत आणि ते काव्यगुणसंपन्नही आहेत.

असे मुक्तकात्मक संग्रह कालिदासादी प्रसिद्ध कवींचेही आहेत. पण ही परंपरा वैदिक वाङ्मयापर्यंत पोचण्यासारखी आहे; कारण ऋग्वेदातल्या 'अस्यवामीय' सूक्तासारखी काही सूक्ते संग्रहात्मकच आहेत. कालिदासामागून भर्तृहरीने (सातवे शतक) नीतिशतक, शृंगारशतक व वैराग्यशतक यांसारखे संग्रह केले. त्यांतली काही पद्ये अन्य संग्रहांत अन्य कवींच्या नावाने दिलेली आढळतात. पुढे अमरुशतकात (इ. स. चे आठवे-नववे शतक) स्त्रीपुरुषप्रेमाच्या इतक्या विविध छटा, इतक्या लहान अवकाशात, इतक्या नाजूक हाताने, इतक्या परिणामकारकपणे रंगवल्या आहेत, की या कलेत अमरूसारखा तोच! भल्लट या काश्मिरी मुक्तक-कवीचे 'भल्लटशतक' (इ. स.चे नववे शतक) आपल्या वेगळेपणाने डोळ्यात भरते. विविध विषयांवर प्रचंड ग्रंथरचना करणाऱ्या क्षेमेंद्राचे (इ. स. अकरावे शतक) अनेक मुक्तक संग्रह आहेत.

'कवींद्रवचनसमुच्चय' (बारावे शतक, ५२५ पद्ये, ११३ कवी), वल्लभदेवाची 'सुभाषितावली' (बारावे शतक, ३५२७ पद्ये, ३६० कवी), श्रीधरदासाचे 'सदुक्तिकर्णामृत' (तेरावे शतक, २३७० पद्ये, ४८५ कवी), जह्लणाची 'सूक्तिमुक्तावली' (तेरावे शतक, २७९० पद्ये, २४० कवी), शार्ङ्गधराची 'शार्ङ्गधरपद्धती' (चौदावे शतक, ४६८९ पद्ये, २९२ कवी), हे इ. स. च्या ११ व्या शतकानंतरचे काही ठळक संग्रह होत. जगन्नाथ पंडितानेही (सतरावे शतक) आपल्या स्फुट कवनांचा संग्रह करून त्याला 'भामिनीविलास' नाव दिले.

जगन्नाथानंतर संस्कृत वाङ्मयनिर्मिती संपली, असे काही संस्कृतज्ञ मानतात. पण संस्कृत वाङ्मयाची निर्मिती त्यानंतरही अखंड चालू राहून ती आजच्या काळापर्यंत येऊन पोचली आहे.

विषयानुरूप अभिव्यक्तिप्रकार शोधणाऱ्या साहित्यिकाच्या कल्पक प्रतिभेचा नवांकुर असलेले संस्कृत कवी फारच थोडे सापडतील. अशा फार थोड्यांमध्ये 'कलिविडंबन'कार नीलकंठ दीक्षित (इ. स. सतरावे शतक) आणि 'महिषशतक'कार वांछेश्वर (अठरावे शतक) यांची गणना केली पाहिजे. कलियुगातल्या जीवनाची झलक साध्या शंभर पद्यांत दाखवताना नीलकंठ लिहितो– पंडितसभेत विजयी होण्यासाठी काय करावे? भिड सोडून द्यावे आणि प्रतिपक्ष्याचे म्हणणे समजून किंवा ऐकून घेणेही सोडून द्यावे. उत्तर तत्काळ द्यावे. विजय निश्चित. ('कलिविडंबन' १) सभेतला मध्यस्थ अविद्वान असेल तर नुसता आवाज चढवून बोलले की पुरे; तो चढत्या आवाजाच्या बाजूने निर्णय देईल. मध्यस्थ विद्वान असेल आणि त्याचा निर्णय आपल्या विरुद्ध जात असेल तरी धीर सोडू नये. त्याच्यावर सरळ पक्षपाताचा आरोप करावा! विद्यार्थी शंका विचारू लागताच नाना सबबी पुढे करून उत्तर टाळू पाहणाऱ्या दिखाऊ अध्यापकाची बिंगे फोडताना तो म्हणतो–

> वाच्यतां समयोऽतीतः स्पष्टमग्रे भविष्यति।
> इति पाठयतां ग्रन्थे काठिन्यं कुत्र विद्यते?॥
>
> (कलिविडंबन ८)

अर्थ – 'वेळ संपली' असे म्हणावे. 'ही गोष्ट पुढे स्पष्ट होईल' असे सांगावे. अशा प्रकारे जे अध्यापन करीत असतील त्यांना कठिणता कुठून असणार!

(वेळ मारून नेऊन आपले अज्ञान लपवण्याचा हा प्रकार).

ज्योतिष्याविषयी नीलकंठ सांगतो (क. वि. १६) –

आयुःप्रश्ने दीर्घमायुर्वाच्यं मौहूर्तिकैर्जनैः।
जीवन्तो बहु मन्यन्ते मृताः प्रक्ष्यन्ति कं पुनः ? ॥

अर्थ – आयुष्याविषयी प्रश्न विचारला तर ज्योतिष्याने नेहमी भरपूर आयुष्य सांगावे. विचारणारा जगला तर ज्योतिष्याचा भाव वाढतो. समजा, लवकर मेला, तरी बिघडत नाही. मेला माणूस जाब विचारायला थोडाच येतो !

वैद्यावद्दल तो म्हणतो (क. वि. २५) –

' भैषज्यं तु यथाकामं पथ्यं तु कठिनं वदेत् ।
आरोग्यं वैद्यमाहात्म्यादन्यथात्वमपथ्यतः ॥

अर्थ – औषध वाटेल ते द्यावे. पथ्य मात्र कडक सांगावे. रोग हटला तर औषधाच्या गुणामुळे. वाढला तर पथ्य मोडल्यामुळे !

महिषशतक हे कुलीन संस्कृतज्ञांच्या उपेक्षेला पात्र ठरलेले असेच एक रत्न आहे. याचा कर्ता वांछेश्वर तंजाऊरच्या दरबारी पंडित होता. कालगतीने प्रतापसिंह नावाचा एक अल्पवयी दासीपुत्र गादीवर आला (इ. स. १७४०–१७६३). वाईट लोकांच्या नादी लागून त्याने दरबारातल्या सगळ्या शहाण्या लोकांना अर्धचंद्र दिला. किंकर्तव्यतामूढ झालेल्या वांछेश्वराने अखेर एक रेडा विकत घेतला आणि तो नांगराला जोडून जमीन कसायला सुरवात केली. त्याच्या कष्टांना फळ आले आणि त्याची विवंचना मिटली. या सगळ्या खटाटोपातून त्याच्या मनाचा कायाकल्प झाला. नकळत त्याच्या मनात रेडा आणि राजा यांची तुलना सुरू झाली; आणि बऱ्याच विचारमंथनानंतर त्याची खात्री पटली की राजापेक्षा रेडाच श्रेष्ठ ! रेड्याविषयीचा त्याचा भक्तिभाव महिषशतक या स्तोत्रकाव्याच्या रूपाने प्रकट झाला. या स्तोत्राच्या निमित्ताने त्याने आपल्या काळातली राजसंस्था, लाचलुचपत, जुलूम, जबरदस्ती, गरीब रयतेची पिळवणूक, विद्यावंतांची दुरवस्था, इ. परिस्थितीचे इतके भयानक चित्र विडंबन, उपहास, उपरोध यांनी नटलेल्या शैलीने रंगवले आहे, की ते वाचून अंगावर काटा उभा राहतो. 'महिषशतका'सारख्या कोपऱ्यात पडलेल्या कृतींत संस्कृत साहित्यात अंकुरणाऱ्या नव्या प्रवृत्तींचे दर्शन घडते.

महाकवींच्या झगझगाटात प्रकाशवेड्या लोकांना मुक्तककवींचे आणि लघुकाव्यलेखकांचे खद्योत कोठून दिसावे ! पण खद्योतांचेही काही वेगळे सौंदर्य असते आणि ते अंधाराच्याच पृष्ठभूमीवर पहावे लागते. शिवाय महाकवींच्या काव्यातून प्रायः न आढळणारी एक गोष्ट या मुक्तककवींच्या काही रचनांतून आढळते, ती म्हणजे समकालीन जीवनाचे चित्रण. सुजन-दुर्जन, गरीब-श्रीमंत, विद्वान-मूर्ख, शत्रु-मित्र, परोपकार, दान, याचना, दया, क्षमा, काम, क्रोध, इ. मानव जातीच्या सामान्य प्रवृत्तींवर सगळेच कवी उण्याअधिक प्रमाणात लिहितात. पण आपल्या आजूबाजूचे व्यावसायिक, नातेवाईक, गुरुशिष्य, राजे, रजवाडे, धनको, ऋणको, साधू, संन्यासी, भोंदू बुवा इ. विषयांवर क्वचितच कोणी संस्कृत कवी लिहितो. थट्टा, विनोद, विडंबन, उपहास, उपरोध, इ. गोष्टींवर संस्कृत कवींनी जणू बहिष्कार टाकला आहे, असे वाटते. हा बहिष्कार काही प्रमाणात मुक्तककवींनी उठवला आहे. काही लघुकाव्यलेखकांनीही हा बहिष्कार उठवायला हातभार लावला आहे. शतकानुशतकांच्या गतानुगतिक संस्कृत साहित्यात अल्प प्रमाणात का होईना, ताजेपणा टिकवला असेल तर तो या मुक्तककवींनी. त्यांचे हे कार्य ऐतिहासिक महत्त्वाचे आहे. या मुक्तकपरंपरेला साजेल अशी रचना आजही संस्कृतात होत आहे.

संस्कृत साहित्याला स्त्रियांचाही हातभार लागला आहे ही गोष्ट मुक्तकवाङ्मयाचे समालोचन करताना दृष्टीत भरते. काव्यचर्चा करताना राजशेखर (दहावे शतक) लिहितो. 'पुरुषवत् योषितोऽपि कवीभवेयुः।' म्हणजे पुरुषांप्रमाणे स्त्रियांनाही कवी होता येईल. (काव्यमीमांसा, अ. १०) राजशेखराच्या या भूमिकेला अनेक संस्कृत कवयित्रींनी आपल्या कृतींनी यथार्थता आणून दिली आहे. मम्मटासारख्या काव्यमीमांसकांनी शीला भट्टारिकेसारख्या कवयित्रींची पद्ये उत्तम काव्याची उदाहरणे म्हणून उद्धृत केली आहेत. विद्या, अर्थात प्राकृतात विज्जा, विज्जिका, (इ. स. चे सातवे–नववे शतक) नावाची एक कवयित्री लिहिते –

धन्यासि या कथयसि प्रियसङ्गमेऽपि
नर्मोक्तिचाटुकशतानि रतान्तरेषु ।
नीवीं प्रति प्रणिहिते तु करे प्रियेण
सख्यः ! शपामि यदि किञ्चिदपि स्मरामि ॥

अर्थ – धन्य आहेस गडे तू ! प्रियाशी रमतेस तेव्हा – काय म्हणालीस ? – काव्यशास्त्रविनोद करतेस, मिठ्ठास भाषणे, आणि बरेच काही ! मला बाई असले काही जमत नाही. माझ्या प्रियाने निरीला हात घातला की – शप्पत सांगते – असले मला काही सुचतच नाही.

आणि ही विकटनितंबा ( इ. स. चे नववे शतक) म्हणते –

बाला तन्वी मृदुतनुरियं त्यज्यतामत्र शङ्का
दृष्टा काचिद् भ्रमरभरतो मञ्जरी भज्यमाना ? ।
तस्मादेषा रहसि भवता निर्दयं पीडनीया
मन्दाक्रान्ता विसृजति रसं नेक्षुयष्टिः समग्रम् ॥

अर्थ – कोवळी पोर, नाजूक नार म्हणून का तुझी चलबिचल चालली आहे ?

अरे बाबा, भुंग्याच्या भाराने मोहोर मोडलेला पाहिला आहेस का कधी ? तर ऐक, मुळीच नको करू गय हिची, एकांतात. हलके

हलके, वरवर पिळली तर देईल का पूर्ण रस उसाची अंगुळी ?

यावरून संस्कृत कवयित्रींविषयी सामान्य सिद्धांत बांधणे घाईचे होईल. त्यांनी रचलेले सोज्वळ काव्यही पुष्कळ आहे. त्यांनी रचलेली काही लघुकाव्येही उपलब्ध आहेत; त्यावरून ऋग्वेदकालीन सूक्तकर्त्या स्त्रीऋषींचा वारसा पुढे चालू राहिल्याचा विश्वास पटतो.

लघुकाव्ये आणि मुक्तककाव्ये यांच्या जोडीला संस्कृतातल्या आणखी एका काव्यवर्गाचा निर्देश केला पाहिजे तो म्हणजे स्तोत्रकाव्ये. एखाद्या देवतेविषयी, देवतातुल्य व्यक्तीविषयी आपल्या मनात दरवळणारा भाव कवीने शब्दरूपाने प्रकट केला, की स्तोत्र साकार होते. स्तोत्रवाङ्मय फार जुने आहे. ऋग्वेदातली सूक्ते ही प्रायः स्तोत्रेच आहेत. अशीच स्तोत्रे पुढे अभिजात संस्कृतात प्रसंगानुरोधाने मोठ्या ग्रंथांतून आणि पुढे स्वतंत्रपणेसुद्धा रचली जाऊ लागली. त्यांना भक्तिसंप्रदायांत फार महत्त्व आले. हा प्रकार विकसित आणि लोकप्रिय करण्यात पुराणवाङ्मयाचा वाटा मोठा आहे. सर्वच स्तोत्रे काव्यगुणांनी संपन्न आहेत असे नाही. महाभारतातल्या विष्णुसहस्रनाम या स्तोत्रात काव्याचा गंधही नाही; पण भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायाचा वराचसा भाग स्तोत्राच्याच स्वरूपाचा आहे. भागवत पुराणात स्तोत्रे जागोजाग आली आहेत; आणि काव्य, तत्त्वज्ञान यांच्या दृष्टीने त्यांतल्या अनेक रचना उच्च योग्यतेच्या आहेत. रघुवंशादी महाकाव्यांतूनही प्रसंगानुसार स्तोत्रजातीय रचना आल्या आहेत. स्वतंत्रपणे लिहिल्या गेलेल्या स्तोत्रांत पुष्पदंताच्या ( इ. स. च्या दहाव्या शतकापूर्वीचा काळ) शिवमहिम्नस्तोत्रासारख्या रचना फारच उच्च प्रतीच्या आहेत. शंकराचार्यांनी अशी पुष्कळ स्फुट स्तोत्रे रचली असून, त्यांतल्या काहींत काव्य आणि तत्त्वज्ञान यांचा सुरेख संगम आहे. अन्यही संप्रदायांच्या आचार्यांनी आणि त्यांच्या अनुयायांनी असंख्य स्तोत्रे निर्माण केली आहेत. अशीच स्तोत्रपरंपरा जैन आणि बौद्ध संप्रदायांतही आहे. या स्तोत्रवाङ्मयात समाविष्ट होऊ शकतील अशा मोठ्या ग्रंथांतल्या किंवा स्वतंत्र मुक्तकात्मक रचनाही असंख्य आहेत. मंगलात्मक संस्कृत रचना केवळ संस्कृत ग्रंथांतच येतात असे नाही. तुलसीदासाच्या हिंदी रामचरितमानसाचे मंगल उत्तम काव्यमय संस्कृतात निबद्ध आहे. स्तोत्रात्मक रचना प्रायः पद्यबद्ध असते; पण गद्यात्मक स्तोत्रवाङ्मय अपवादापुरते का असेना, क्वचित क्वचित आढळून येते. स्तोत्रवाङ्मयात वृत्तांची जी बहुविधता दिसते ती अन्यत्र सहसा दिसत नाही. याचे कारण, ही रचना पठनासाठी केलेली असते. संस्कृत लोकमुखी जिवंत ठेवण्याचे आणि वाचाशुद्धीचा संस्कार करण्याचे फार मोलाचे कार्य संस्कृत स्तोत्रवाङ्मयाने केले आहे.

काही स्तोत्रांभोवती दंतकथांची वलये निर्माण झाली आहेत. सूर्यशतक रचून मयूर कवी कुष्ठरोगमुक्त झाला, शिवमहिम्नस्तोत्र रचून पुष्पदंत शापमुक्त होऊन पुन्हा पूर्वपदाला पोचला, शंकराचार्यांनी रचून दिलेल्या कनकधारास्तवाच्या पाठाने कोणी ब्राह्मणी दारिद्र्यमुक्त झाली, इ. कथा प्रसिद्ध आहेत. बृहत्कथा हा प्रचंड ग्रंथ रचून गुणाढ्य शापमुक्त होऊन शिवलोकाला परतला, अशी कथा खुद्द बृहत्कथेतच आहे.

गद्य वाङ्मय – याचा इतिहास यजुर्वेदसंहितेपासून सुरू होतो. महाभारतात काही कथाभाग गद्यात आहे; पातंजल महाभाष्यासारख्या ग्रंथातून गद्य ललितकृतींचा निर्देश आढळतो; पण त्या आज उपलब्ध नाहीत. ललित गद्यात रचलेले काही शिलालेख दुसऱ्या शतकापासून सापडू लागतात. ललित गद्यशैलीतला जुन्यात जुना उपलब्ध ग्रंथ आहे तो म्हणजे सुबंधूची 'वासवदत्ता'. सुबंधूच्या नंतर बाणभट्टाने ' कादंबरी ' ही कल्पित कथा आणि ' हर्षचरित ' ही इतिहासाश्रित आख्यायिका लिहून गद्याचे सौंदर्य आणि सामर्थ्य यांची प्रचीती आणून दिली. बाणभट्टाच्या नंतर येतो ' दशकुमारचरित'कार दंडी. सुबंधू, बाणभट्ट आणि दंडी हे तिघेही सातव्या शतकातले, एकमेकांपासून काही थोड्याच काळाने अलग झालेले. त्यामुळे त्यांच्या पौर्वापर्याविषयीही विद्वानांत वाद आहे. त्यांच्या कृतींपैकी 'वासवदत्ता', 'कादंबरी' आणि ' दशकुमारचरित ' या कल्पित कथा आहेत; तर 'हर्षचरित ' हा इतिहासप्रधान काव्यप्रबंध आहे. म्हणूनच त्याला परंपरेने ' आख्यायिका ' असे वेगळे नाव दिले आहे. केवळ मूळ प्रसंग जसाच्या तसा सांगण्याने त्यांना साफल्य नाही, ही गोष्ट ओळखून आनंदवर्धनाने एका ठिकाणी कवींना त्यांच्या अधिकाराची आठवण करून देत म्हटले आहे.–

कविना काव्यमुपनिबध्नता सर्वात्मना रसपरतन्त्रेण भवितव्यम् । तत्र इतिवृत्ते यदि रसाननुगुणां स्थितिं पश्येत् तदा इमां भङ्क्त्वापि स्वतन्त्रतया रसानुगुणं कथान्तरम् उत्पादयेत् । न हि कवेः इतिवृत्तमात्रनिर्वहणेन किंचित् प्रयोजनम्, इतिहासादेव तत्सिद्धेः । ' (ध्वन्यालोक ३.१४ वरील वृत्ती)

अर्थ – काव्य निर्माण करताना कवीने रसानुकूल अशी काव्यरचना करावी. इतिवृत्तात जर रसहीनता असेल, तर त्याने त्याचा आधार सोडून स्वतंत्रपणे रसवाही अशी कथा निर्माण करावी. कवीने इतिवृत्त जसेच्या तसे सांगण्यात काहीच प्रयोजन नाही. ते इतिहासावरून कळतेच.

मूळ कथेत रसानुरोधाने फेरफार करण्याचे कवीचे हे स्वातंत्र्य भवभूतीसारख्या महाकवींनी रामकथेसारख्या अत्यंत प्रसिद्ध कथावस्तूत अवलंबिले असून, ते परंपरेने वाखाणलेही आहे.

' वासवदत्ता ' आणि ' कादंबरी ' या रचनांतल्या कथा देवभूमी आणि मानवभूमी यांच्यामध्ये आंदोलित होणाऱ्या आहेत.

यांतल्या मानवी व्यक्तिरेखाही दैवी गुणांनी, शक्तींनी संपन्न आहेत, किंवा शबर-किरातांसारख्या वन्य समाजांतल्या आहेत. 'दशकुमारचरिता'तल्या व्यक्तिरेखा मात्र मानवभूमीवरच्याच आणि फार व्यापक नागर समाजातल्या आहेत. पाखंडी, वेश्या, कुंटिणी, वाणी, व्यापारी, जुगारी, बदफैली स्त्रीपुरुष, मदांध राजे, चोर, भटके अशी अठरापगड माणसे, म्हणजे खरीखुरी माणसे, दंडीच्या विश्वात भेटतात; आणि कल्पनासृष्टीतून वास्तव सृष्टीत आल्यासारखे वाटते. संस्कृत साहित्यातल्या या वास्तवतेचे मूळ गुणाढ्याच्या 'बृहत्कथे'त शोधावे लागेल. सुबंधू, बाण, दंडी यांनी रुळवलेली ललित गद्याची परंपरा पुढेही चालू राहिली; तिच्यावर सर्वाधिक प्रभाव बाणभट्टाचा आहे. पण एकंदरीने शुद्ध गद्यात पद्याच्या मानाने ग्रंथ कमी निर्माण झाले; याचे कारण गद्यपद्यांच्या मिश्रणाने केलेली रचना पुढे अधिक लोकप्रिय झाली.

चंपू वाङ्मय – गद्यपद्यमिश्रित रचनेला संस्कृत परंपरेत 'चंपू' असे नाव आहे. नाटकांतही गद्यपद्यांचे मिश्रण असते, पण त्यांच्यासारखे बहुढंगी संवादात्मक रूप चंपूचे नसते. चंपूत सर्व कथन कवीचे आणि एकाच ढंगाचे असते. कारण नाटकाप्रमाणे चंपू हे दृश्य काव्य नव्हे, श्रव्य काव्य आहे. मधल्या काळात बौद्ध जातककथांच्या संस्कृत रूपांतरांत आणि काही शिलालेखांत या शैलीचे स्वरूप दिसते. या काळात या शैलीत काही ग्रंथ निर्माण झाले असावे; कारण दंडीच्या काव्यादर्शात चंपूचे लक्षण आले आहे. या स्वरूपाची सर्वांत प्राचीन अशी आज उपलब्ध असलेली रचना त्रिविक्रमभट्टाची 'नलचंपू'. ही चंपू अपुरी आहे. हिच्या मागून काही चंपू जैन कवींनी जैन पुराणांच्या आधाराने रचलेल्या सापडतात. त्यांत 'यशस्तिलकचंपू'(इ. स. ९५९) विशेष प्रसिद्ध आहे. भोज राजाने (इ. स. १०१८–१०६३) रामकथेवर, अभिनवकालिदासाने (१०५०) भागवतावर आणि अनंतकवीने (इ. स. १५००–समीप) महाभारतकथेवर चंपू रचली आहे. वेंकटाध्वरीच्या (१६५०) चार चंपूंपैकी 'विश्व गुणादर्शचंपू' विशेष प्रसिद्ध आहे. या शैलीचे जवळजवळ अडीचशे ग्रंथ उपलब्ध आहेत. चंपूकाव्यात प्राय: शब्दचमत्कृती आणि अर्थचमत्कृती यांची रेलचेल असते. केवळ गद्यमय रचनेपेक्षा या गद्यपद्यमय रचनेने कवींच्या आणि वाचकांच्या मनाची अधिक पकड घेतली असे दिसते. (चंपूवाङ्मय पाहा.)

गद्यपद्यांच्या मिश्र उपयोगाचा एक वेगळ्या दिशेने झालेला आणि अधिक प्रभावी विकास नाट्यवाङ्मयात आढळतो. तसा पद्याचा प्रयोग नाटकांत अपरिहार्य नाही; पण संस्कृत नाटकांत परंपरेने गद्याच्या जोडीने पद्याचाही प्रयोग होत आला आहे. संस्कृत वाङ्मयात आज उपलब्ध असलेल्या नाटकांची संख्या ६५० च्या आसपास आहे. संस्कृत नाटकांचा उगम ऋग्वेदातल्या संवादसूक्तांत असल्याचे अभ्यासक मानतात. त्यानंतरच्या काळातले वाङ्मय,स्थलशिल्प इत्यादींमधल्या सामग्रीवरून नाट्यकाव्य, नाट्यप्रयोग, नाट्यमीमांसा अशा अंगांनी ही कला विकसित होत होती हे कळून येते. पण जुन्यात जुनी नाटके आणि नाट्यशास्त्रग्रंथ उपलब्ध होईतो खिस्ताब्दारंभ उलटून जातो. सर्वांत प्राचीन उपलब्ध नाटकांचा कर्ता भास आणि नाट्यविवेचन करणाऱ्या सर्वांत प्राचीन उपलब्ध ग्रंथाचा कर्ता भरत होय. भासाच्या उपलब्ध 'भासनाटकचक्रा'त सर्वश्रेष्ठ असे 'स्वप्नवासवदत्त' हे नाटक आहे. यात मानवी मनाचे सूक्ष्म व गुंतागुंतीचे व्यापार साध्या शब्दांनी अल्प अवकाशात चित्रित करण्याचे, आणि त्याला अनुरूप असे प्रसंग निर्माण करण्याचे भासाचे कौशल्य हृदयस्पर्शी आहे. या प्रक्रियेत भास अनेक ठिकाणी उत्तरकालीन नाटकांत पाळलेल्या काही संकेतांचे उल्लंघन करतो. तथापि त्यामुळे त्याच्या कृतीत रसनिर्मितीत अंतराय आलेला नाही. भासाच्या अवशिष्ट कृतींत काही एकांकिका आहेत व दोन शोकान्तिका आहेत. भासाचे लहानात लहान नाटक एक अंकाचे आणि मोठ्यात मोठे सहा अंकांचे आहे. त्याच्या नंतरच्या काळात सात अंकी, दहा अंकी, चौदा अंकी नाटके लिहिली गेली. भासाच्या कृतींचे याप्रमाणे नाट्येतिहासाच्या दृष्टीने बहुविध महत्त्व आहे.

कालिदासाने भास, कविपुत्र, सौमिल्ल या आपल्या पूर्वसूरींचा प्रथितयश म्हणून निर्देश केला आहे; पण भासाखेरीज इतरांच्या कृतींचा पत्ता लागत नाही. कालिदासाने आपल्या तीन नाटकांपैकी एकाचे कथानक वैदिक वाङ्मयातून (विक्रमोर्वशीय), दुसऱ्याचे महाभारतातून (अभिज्ञानशाकुंतल) व तिसऱ्याचे ऐतिहासिक चरितातून (मालविकाग्निमित्र) घेतले आहे. यांपैकी अभिज्ञान-शाकुंतल हे सर्वोत्कृष्ट म्हणून प्राचीन, अर्वाचीन भारतीय परंपरेने आणि पाश्चात्त्य जगाने वाखाणले. या नाटकाविषयी लिहिताना रवींद्रनाथ टागोर म्हणतात. 'कालिदासाच्या सौंदर्यलोलुपतेच्या आत भोगांविषयीचे स्थिर वैराग्य विलसत आहे, याचे कारण त्याची काव्ये सौंदर्य आणि विलास यांतच समाप्त होत नाहीत, तर त्याहून वरच्या भूमिकेवर, वैराग्याच्या उच्च भूमिकेवर जाऊन तिथे ती समाप्त होतात.'

कालिदासाच्या जोडीने नाव घेतले जाते भवभूतीचे (इ. स. ७०० समीप). त्याची तीन नाटके उपलब्ध आहेत; पण त्याला कविकीर्ती लाभली ती उत्तररामचरिताने. त्यातल्या करुणरसाने फत्तरालाही पाझर फुटेल, असे भवभूतीनेच अभिमानाने सूचित केले आहे; आणि रसिकांनीही त्याचे कौतुक केले आहे.

भास–कालिदास–भवभूतींप्रमाणेच संस्कृत नाट्यसंसाराला मंडित करणारे आणखी काही प्रतिभासंपन्न नाटककार होऊन गेले.

त्यांत मृच्छकटिककार शूद्रक ( कालिदासोत्तर काल ), मुद्राराक्षसकार विशाखदत्त ( सहावे शतक, उत्तरार्ध ) आणि वेणीसंहारकार भट्ट नारायण ( आठवे शतक ) ही नावे घेतलीच पाहिजेत. शूद्रक हा गुणाढ्य, दंडी, क्षेमेंद्र यांच्या गोत्रातला आहे. त्याच्या नाटकात दिसणारा समाज बहुविध आहे. त्यात स्थिर वृत्तीने येणारा विनोदही बहुरंगी आहे. त्यावरून शूद्रक हा संस्कृत साहित्यात विनोदसम्राट म्हणून प्रसिद्ध झाला आहे. मुद्राराक्षसाचे कथानक चाणक्याच्या कुटिल राजकारणावर आधारलेले, ऐतिहासिक वळणाचे आहे. अन्य संस्कृत नाटकांत स्त्रीपात्रांची रेलचेल असते. पण मुद्राराक्षसात स्त्रीपात्र अपवाद म्हणूनच आणि अगदी गौण भूमिकेत येते. वेणीसंहाराचे कथानक महाभारताचा केंद्रबिंदू असलेले जे भारतीय युद्ध त्यावर आधारलेले आहे. त्यात नाटयाच्या परिपोषासाठी कवीने निर्माण केलेले प्रसंग इतके लोकप्रिय झाले आहेत, की ते आता बहुतेकांना मूळ महाभारतातलेच वाटू लागले आहेत. वर निर्देशिलेल्या नाटककारांचे अनुकरण करणारे हर्षासारखे (सातवे शतक) पुष्कळ नाटककार संस्कृतात होऊन गेले. त्यांच्या कृतींत स्वतंत्र प्रतिभा क्वचितच दिसते. एवढ्या मोठ्या संस्कृत साहित्यसागरात स्वतंत्र प्रज्ञेचे खरे मोती थोडेच सापडतात.

संस्कृत नाटकांतले संवाद संस्कृत-प्राकृतमिश्र असतात. कारण प्राकृत ही संस्कृताहून मूलतः वेगळी भाषा नाही. केवळ प्राकृतात रचलेली नाटकेही उपलब्ध आहेत. जसे, राजशेखराचे ( इ. स. चे दहावे शतक) 'कर्पूरमंजरी' हे 'सट्टक'. संस्कृत नाटयवाङ्मयात 'भाण' आणि 'प्रहसन' अशा स्वतंत्र वर्गात गणलेल्या काही वैशिष्टयपूर्ण कृती आहेत.

प्रा. सुरूंनी राजशेखराला या वाङ्मयवर्गाचा पथप्रदर्शक मानून, त्याचे मराठी साहित्यातल्या पेशवेकालीन राम जोशीशी समीकरण मांडले आहे. याही वाङ्मयात बोधायनाच्या भगवदज्जुकीय यासारख्या रचना चमत्कृतिपूर्ण कथावस्तूने दृष्टीत भरतात. या प्रहसनात एक यती आणि एक गणिका यांच्या शरीरांत आत्म्यांची अदलाबदल होते; यातून उद्भवलेले गमतीचे प्रसंग कवीने रंगवले आहेत.

गुणाढ्याची (सनपूर्व पहिले—चौथे शतक) 'बृहत्कथा' हा आकाराने आपले नाव सार्थ करणारा ग्रंथ मूळ पैशाची, म्हणजे पिशाच समाजाच्या, भाषेत होता. तो आज लुप्त झाला आहे. त्या ग्रंथाचे स्वरूप आज कळते ते त्याच्या तीन संस्कृत पद्यमय अनुवादांवरून. बुद्धस्वामीचा बृहत्कथा-श्लोकसंग्रह (इ. स. चे आठवे-नववे शतक), क्षेमेंद्राची बृहत्कथामंजरी (अकरावे शतक), सोमदेवाचा कथासरित्सागर (अकरावे शतक), या तीन्हींत शेवटचा अनुवाद सर्वाधिक विस्ताराचा असून साधारणपणे २४,००० श्लोकसंख्येचा आहे. बृहत्कथेचे विश्व त्रिभुवनव्यापी आहे; देव, मानव, दानव या तीन्ही समाजांचा समावेश करून घेणारे आहे. प्राचीन भारतीय लोककथांचा हा एक प्रचंड संग्रह आहे. अद्भुत हा याचा स्थायी रस आहे. यातल्या कथांत देव, गंधर्व, यक्ष, किन्नर, विद्याधर, नाग येतात; राजे, मंत्री, व्यापारी, ऋषी—मुनी, पुरोहित, आचार्य, नरबली देणारे कापालिक, पर्वतराजीतले शबर, चोर, वेश्या, कुंटिणी, विट, धूर्त, जुगारी, कुंभार, सुतार, न्हावी इत्यादी चौफेर मानवसमाज येतो; भूत, प्रेत, वेताल, पिशाच, राक्षस याही योनीतली मंडळी भेटतात. यातली कथा कधी स्वर्गात जाते, कधी पातालात, कधी राजवाड्यात, कधी नगरात, कधी रानावनांत, कधी भूमीवर, कधी सागरात, कधी अंतरिक्षात. यात प्रेमकथा आहेत आणि त्या पुष्कळ ठिकाणी आंतरजातीयच नव्हे तर आंतरविश्वीयही आहेत. मानव पुरुष आणि अतिमानव स्त्री यांच्या प्रेमाच्या असंख्य कथा यात आहेत. भयकथा आहेत, अद्भुत कथा आहेत, भूतकथा आहेत, वीरकथा, धूर्तकथा, सागरकथा, व्यभिचारकथा, चातुर्यकथा, नीतिकथा, इ. पुष्कळ कथा आहेत. कोणी तरी व्यापारी नौकेत माल भरून समुद्रमार्गाने सुवर्णद्वीपाला किंवा कुठे तरी जायला निघाला, वाटेत वादळ झाले, नाव बुडाली, फळकुटाला धरूण कोणी तरी वाचले, अद्भुत बेटाला पोचले, अशा ठशाच्या कथा यात वारंवार भेटतात. अभ्यासकांच्या मते या कथा अन्य वाङ्मयाबरोबर पश्चिमेकडे पसरत गेल्या. 'अरेबियन नाइट्स्' मधल्या पुष्कळ, विशेषतः सिंदबादच्या, कथांचा उगम बृहत्कथेतील सामग्रीत आहे. या ग्रंथाने कथावस्तू आणि समाजाच्या सर्व थरांचे चित्रण या दृष्टींनी पुढच्या काळातल्या संस्कृत साहित्याचे ज्या प्रकारे पोषण केले आहे ते पाहता या ग्रंथाचे स्थान संस्कृत साहित्यात महाभारतादी ग्रंथांच्या तोडीचे ठरते. बृहत्कथेतून ज्यांनी आपल्या साहित्यासाठी कल्पनांची, कथांची उचल केली त्यांमध्ये भास, भवभूती, बाणभट्ट, दंडी, क्षेमेंद्र यांची नावे ठळक आहेत. (कथासरित्सागर पाहा).

बृहत्कथेत विविध प्रकारचे कथास्रोत आहेत. एक स्रोत लोककथांचा आहे. दुसरा महाभारत, रामायण, पुराणे यांतून चित्रित झालेल्या, अर्थात शिष्टपरंपरागत पुराण कथांचा. तिसरा नीतितत्त्वे, व्यवहारचातुर्य प्रतिबिंबित करणाऱ्या बोधकथांचा. चौथा इतिहासप्रधान कथांचा. पहिल्या स्रोताचा उगम वैदिक वाङ्मयातील हरिश्चंद्राचे आख्यान इत्यादींत, आणि मधला प्रवाह बौद्ध जातककथावाङ्मयात तसेच महाभारत, रामायण, पुराणे यांतूनही दिसतो. लोककथांची जी बहुविधता, विस्तार आणि रचनावैशिष्टये बृहत्कथेत दिसतात ती पूर्ववाङ्मयात नाहीत. त्यामुळे या क्षेत्रातली बृहत्कथेची भर मूलभूत ठरते.

पाली जातककथांचे अलंकृत संस्कृत संस्करण 'जातकमाला' या आर्यशूराच्या संग्रहात पाहायला मिळते. याचा चिनी भाषेत अनुवाद खि. ४३४ मध्ये झाला; त्यावरून मूळ संग्रह चौथ्या शतकापूर्वीचा ठरतो. बृहत्कथेतील लोककथेच्या स्रोतातून आणि त्याच्या साहचर्याने निर्माण झालेल्या कथावाङ्मयात 'वेतालपंचविंशतिका' (वेताळपंचविशी) 'शुकसप्तति' (शुकबहात्तरी), 'सिंहासनद्वात्रिंशिका' (सिंहासनबत्तिशी) या नावांनी प्रसिद्ध असलेल्या कथासंग्रहांचा प्रथम निर्देश केला पाहिजे. सर्वसाधारण मानवी मनाला अद्‌भुताची फार मोठी भूक असते. ती शमवण्याचे कार्य हे संग्रह संस्कृत, प्राकृत, प्रादेशिक भाषांतून शतकानुशतके करीत आले आहेत आणि अजूनही त्यांची गोडी अवीट आहे. या स्रोतातून आलेल्या कथांचा जागतिक लोकवाङ्मयाच्या संदर्भात काही पाश्चात्त्य अभ्यासकांनी उल्लेख केला असून, त्यांत 'कथासरित्सागरा'चे टॉनीने केलेले भाषांतर महत्त्वाचे आहे. इ. स. च्या चौदाव्या शतकात 'शुकसप्तती'चा अनुवाद फारसीत झाला; अर्थात मूळ ग्रंथ त्यापूर्वीचा आहे. या संग्रहाचे पंचतंत्रपूर्व कालात जे स्वरूप होते, त्यातून व्यभिचारी स्त्रियांच्या काही कथा पंचतंत्रानेही उचलल्या आहेत.

या स्वरूपाचे संग्रह पुढच्या काळात जैन परंपरेतही झाले. त्यांत मेरुतुंगाचा प्रबंधचिंतामणि आणि राजशेखराचा प्रबंधकोश हे चौदाव्या शतकातले संग्रह उल्लेखनीय आहेत. यांत ऐतिहासिक व्यक्तींच्या नावाभोवती गोळा झालेल्या पुष्कळ अनैतिहासिक दंतकथांचा संग्रह आहे. याच संग्रहांच्या परंपरेत बल्लाळाचा भोजप्रबंध (सोळावे शतक) येतो. त्यात त्याने अकराव्या शतकात होऊन गेलेल्या भोज राजाच्या सभेत मागच्या पुढच्या सुमारे दीड हजार वर्षांतल्या संस्कृत कवींचे सम्मेलन भरवून त्यांच्या रोचक दंतकथा ऐकवल्या आहेत. जैन परंपरेत लोककथांचा मोठा संग्रह आगमग्रंथांवरील प्राकृत टीकांतून आढळतो. लोकसाहित्याच्या अभ्यासात याही वाङ्मयाचे मूल्य मोठे आहे.

बृहत्कथेतल्या नीतिकथांचा उगम कोणी वैदिक वाङ्मयापर्यंत नेऊन पोचवतात. पण असंदिग्ध स्वरूपात या प्रकारचे वाङ्मय प्रथम पाली जातककथांत आणि मग महाभारतापासून पुढे आढळून येते. जातककथांचे तात्पर्य परोपकार, क्षमा, शांती यांसारख्या शाश्वत धर्मतत्त्वांत आहे. महाभारत आणि पंचतंत्र यांसारख्या ग्रंथांतल्या बोधकथांत राजनीती आणि व्यवहार यांतली तत्त्वे गुंफलेली आहेत. त्यांचा उगम, विकास आणि रचनातंत्र स्वतंत्र आणि पूर्णपणे भारतीय आहे. या वाङ्मयात विष्णुशर्म्याचे गद्यपद्यात्मक पंचतंत्र (इ. स. चे तिसरे शतक) प्रसिद्ध असून, फार पूर्वीपासून त्याचा भारताबाहेरही प्रसार झाला आहे. या ग्रंथाचे प्राचीन स्वरूप आज उपलब्ध नसले, तरी ते कसे होते याची कल्पना त्याचे प्राचीन अनुवाद आणि विविध संप्रदायांतली संस्करणे यावरून बांधता येते. पंचतंत्राचा पहलवी भाषेत इ.स. ५७० पूर्वी अनुवाद झाला. तो आज उपलब्ध नाही. पण त्यावरून झालेले सीरियन आणि अरबी अनुवाद उपलब्ध आहेत. त्यांवरून काहींचा तर्क आहे की या ग्रंथाचे प्राचीन नाव त्यातल्या आरंभीच्या कथांतल्या 'करटक-दमनक' या कोल्ह्यांच्या जोडीशी निगडित असावे. आज या ग्रंथाचे 'तंत्र' या नावाचे पाच भाग आहेत म्हणूनच हे 'पंच-तंत्र' होय. पूर्वी बारा भाग असावे. याचा एक हिंदी अनुवाद अल्-बिरुनीने (अकरावे शतक) उल्लेखिला आहे. याचे हिब्रू (अकरावे शतक), स्पॅनिश (तेरावे शतक), लॅटिन, तसेच इंग्रजी (सोळावे शतक) इत्यादी सुमारे ५० विदेशी भाषांत आणि प्रमुख भारतीय भाषांत अनुवाद झाले आहेत. यातल्या बऱ्याच कथांचा आणि अन्यही काही कथांचा 'हितोपदेश' या नावाचा बंगालमधल्या नारायण पंडिताने (इ. स.चे अकरावे शतक) केलेला संग्रहही लोकप्रिय आहे. या दोन्ही संग्रहांत कथांश गद्यात दिलेला असून, त्यात मधूनमधून विपुल प्रमाणात प्राचीन ग्रंथांतील तत्त्वबोधप्रधान पद्ये उद्धृत केली आहेत. या पद्यांचे तसेच कथांतून निर्दिशित केलेल्या तत्त्वांचे प्रमुख उगम पंचतंत्रात आरंभी दिलेल्या एका श्लोकात एकत्र कळून येतात —

**मनवे वाचस्पतये शुक्राय पराशराय ससुताय ।**
**चाणक्याय च विदुषे नमोऽस्तु नयशास्त्रकर्तृभ्यः ॥**

पंचतंत्र व हितोपदेश यांचे शिक्षणशास्त्राच्या इतिहासातले स्थान महत्त्वाचे आहे.

कुट्टनीमत या पद्यमय ग्रंथात दामोदरभट्टाने (आठवे शतक) कामशास्त्र कथेच्या स्वरूपात मांडले. कुट्टनीमतातली पात्रे सगळी बृहत्कथेत वारंवार आलेली आहेत — लुच्च्या, लुब्ध वेश्या, कुंटिणी, बावळट आणि विलासी राजपुत्र, धनिक वणिक्पुत्र, विट, तमासगीर, जुगारी, कलाल इत्यादी. वात्स्यायनाने कामसूत्रात वैशिकीकला म्हणून जी वेश्या आणि विलासी यांच्यासाठी विवेचिली आहे तिची या ग्रंथावर दाट छाया आहे. दामोदरभट्टाने यात आपल्या काळातले विलासी लोकांचे जीवन बाह्यतः तटस्थतेने पण प्रच्छन्न मिस्किलपणाने चितारले असून, याचे अध्ययन करणारा माणूस वेश्या आणि त्यांचे दलाल यांच्या जाळ्यात फसणार नाही, असे आश्वासन दिले आहे. आपला स्वतंत्र वाङ्मयवर्ग निर्माण करण्याची क्षमता असलेल्या या ग्रंथातून सुभाषितसंग्रहकार आणि मम्मटासारखे आलंकारिक यांनी अनेक पद्ये उद्धृत केली आहेत.

ललित पद्धतीने शास्त्राची तत्त्वे मांडू पाहणारे असे आणखीही ग्रंथ संस्कृत वाङ्मयात आहेत. त्यांत पाणिनीय व्याकरणाचे

विवरण करणारे 'भट्टिकाव्य' किंवा 'रावणवध' हे भट्टि-कवीचे (इ. स. चे सहावे-सातवे शतक) महाकाव्य आणि अध्यात्म-शास्त्रातली प्रमेये मांडणारे 'प्रबोधचंद्रोदय' हे कृष्णमिश्राचे (इ. स.चे अकरावे शतक) नाटक यांचा निर्देश केला पाहिजे.

बृहत्कथेत नंद, चाणक्य, चंद्रगुप्त, सातवाहन, वर्ष, उपवर्ष, व्याडी, पाणिनी, वररुची, इ. अनेक ऐतिहासिक व्यक्तींच्या कथा, दंतकथा आलेल्या आहेत. राजांच्या वंशावळीही आहेत. जैन, बौद्ध परंपरांतही याच्याशी तुलण्याजोगी काही सामग्री उपलब्ध आहे. प्राचीन शिलालेख हे एका दृष्टीने ऐतिहासिक वाङ्मयच आहे. बाणभट्टाचे हर्षचरित, वाक्पतिराजाचे (इ. स. चे आठवे शतक) प्राकृत गउडवह काव्य, पद्मगुप्ताचे नवसाहसांकचरित (इ. स. १००५ च्या आसपास), बिल्हणाचे विक्रमांकदेवचरित (इ. स. १०८८ पूर्वी) इत्यादी ऐतिहासिक व्यक्तींवर रचलेली चरितकाव्ये ही इतिहासापेक्षा अधिक काव्ये आहेत. या सर्व वाङ्मयात ज्याला इतिहास हे नाव शोभेल असा वास्तव घटना कालनिर्देशपूर्वक नमूद करणारा ग्रंथ नाही. इतक्या प्रदीर्घ संस्कृत परंपरेत इतिहास म्हणण्यासारखा ग्रंथ भेटायला बाराव्या शतकापर्यंत थांबावे लागते. या काळात काश्मीरमध्ये कल्हणाने इतिहास या नावाला साजेसा 'राजतरंगिणी' (इ. स. ११४८) हा ग्रंथ लिहिला. कल्हणाला पुढे अनुयायी लाभले नाहीत. त्याच्या मागून ऐतिहासिक व्यक्तींवर लिहिले गेलेले ग्रंथ जुन्या काव्याच्या वळणावर गेले आहेत. सबंध संस्कृत परंपरेत या क्षेत्रात कल्हण हा एकटाच ग्रंथकार आहे.

अर्वाचीन वाङ्मय—आधुनिक काळात निर्माण झालेल्या संस्कृत साहित्याच्या परामर्शात प्रथमतःच वैदिक सूक्तांचा निर्देश केला तर विचित्र वाटेल; पण वैदिक वाङ्मयातली स्वरांकित भाषा आणि छंद यांच्या माध्यमाने कर्नाटकातील गोकर्ण येथील ब्रह्मर्षी देवरात यांनी रचलेल्या ५० सूक्तांचा, ४४८ ऋचांचा 'छंदोदर्शन' हा संग्रह पाहिला तर 'आधुनिक काळातली वैदिक सूक्ते' हा आपाततः विसंगत वाटणारा निर्देश काही सुसंगत अर्थाचा प्रत्यय आणून देईल. या ऋचांवर देवरातांचे गुरू वासिष्ठ गणपतिमुनी यांनी भाष्य लिहिले असून, या ऋचांच्या प्रादुर्भावाचा वृत्तान्त उपोद्घातात कथन केला आहे. इ. स. १९१७ मध्ये मद्रास राज्यात रेणुकांबा क्षेत्री 'पउवेट' गावी तपःपूत देवरात (वय २५ वर्षे) समाधीच्या अवस्थेत असताना त्यांच्या मुखातून उमटलेले मंत्रवर्ण गणपतिमुनींनी लिहून घेतले. हा क्रम १६ दिवस चालला. या काळात लिहून घेतलेले पूर्ण मंत्र प्रस्तुत संग्रहात आहेत. ब्रह्मसाक्षात्कार जसा प्राचीन अर्वाचीन काळात शक्य आहे, तसे वेदमंत्रांचेही दर्शन शक्य आहे. त्यासाठी आवश्यक ती परिस्थिती मात्र निर्माण झाली पाहिजे, असा या संबंधातला गणपतिमुनींचा युक्तिवाद आहे. देवरातांचे संस्कृत भाषेवर प्रभुत्व नसताना त्यांच्या मुखातून प्रगटलेली छंदोमयी वाणी दैवी प्रतिभेचाच आविष्कार मानला पाहिजे, असे या प्रस्तावनेत म्हटले आहे. या ऋचा गायत्री, अनुष्टुभ्, त्रिष्टुभ् व जगती या चार छंदांत, आणि मित्र, आत्मन, सवितृ, सरस्वती, ब्रह्मणस्पती इत्यादी वैदिक देवतांना उद्देशून रचलेल्या आहेत.

या रचनांची जी पूर्वपीठिका गणपतिमुनींनी लिहिली आहे, ती श्रद्धेचा विषय आहे. त्या भूमिकेवरून चिकित्सा असंभाव्य आहे. व्यासंगाने अनुकरण साधते, असे मात्र पुष्कळ ठिकाणी आढळून येते.

जगन्नाथानंतरच्या संस्कृत परंपरेत जे वाङ्मय निर्माण झाले त्याचे वळण पुष्कळ काळ पुष्कळ अंशी पूर्वपरंपरानुसारीच राहिले. या वाङ्मयात महाकाव्ये आहेत, लघुकाव्ये आहेत, चंपू आहेत, नाटके, ललित गद्य, स्तोत्रे, सुभाषिते, सर्व आहेत. बहुसंख्य ग्रंथांत कथावस्तू किंवा विषय रामायण, महाभारत, शैव आणि वैष्णव पुराणे यांतून किंवा सदृश उगमातून उचललेला आढळतो. याला काही अपवाद आहेत. आद्य शंकराचार्य, शिवाजीमहाराज यांसारख्या लोकोत्तर विभूती, तसेच कवींना आश्रय देणारे राजे, राजवंश, धनिक यांची चरित्रे, पराक्रम, कार्य हेही काही ग्रंथांचे विषय झाले आहेत. काही जैन मुनींच्या चरित्रांवरही ग्रंथरचना झाली आहे. प्राचीन काळात सम्राट हर्षवर्धनही एका विख्यात काव्याचा विषय झाला आहे. पण असे विषय पाश्चात्त्य संस्कृतीशी जवळचा संबंध येण्यापूर्वीच्या काळात अन्य विषयांच्या तुलनेने कमी आढळतात.

पूर्वपरंपरेचा कित्ता गिरवून केलेल्या या रचनांत, काव्य हे ज्यांत चमत्कृतीचे किंवा शास्त्राचे सेवक झाले आहे, अशा कृतींचा मोठा वर्ग आहे. वाङ्मयाभ्यासकांच्या मते ही वाङ्मयाच्या ऱ्हासाची लक्षणे आहेत. प्रत्येक श्लोकाचा एक अर्थ कृष्णकथेला आणि दुसरा रामकथेला उपपन्न होईल, अशा रीतीने समग्र महाकाव्य रचण्याचा खटाटोप कर्त्याची चिकाटी आणि विद्वत्ता दाखवीत असला, तरी अखेर काव्यदृष्टीने त्यातून वाचकाच्या पदरी काय पडते ? पण पांडित्याच्या स्पर्धेत विचारा रस गळून गेला आणि दोनच काय, पण तीन, पाच, सात अर्थ काढता येतील अशी काव्ये लिहिण्यात कवींनी कृतार्थता मानली. यादवराघवीय (वेंकटाध्वरी, इ. स. चे १७ वे शतक) हे काव्य सुलट वाचले की एक अर्थ, उलट वाचले की दुसरा ! राघवयादवपांडवीय (चिदंबर, १७वे शतक), पंचकल्याणचंपू (चिदंबर), सप्तसंधान महाकाव्य (मेघ विजय गणी, १७वे शतक), या काही नावांवरून अशा प्रकारच्या काव्यांचा पल्ला कळून येईल. या वर्गात 'कोसल भोसलीय' (शेषाचल, १८वे शतक) हा एक ग्रंथही

आहे कलिदूषण ( घनश्याम, १८ वे शतक ) हे काव्य संस्कृत म्हणूनही वाचता येईल, प्राकृत म्हणूनही वाचता येईल, अशी कवीने खुबी केली आहे. म्हणजे सबंध काव्य भाषाश्लेषात. असले दुसरे काव्य नाही. 'कंकणबंधरामायण ( कृष्णमूर्ती, १९ वे शतक)ही आणखी एक अद्भुत चीज. ३२ अक्षरांचे वर्तुळाकार (कंकण) पद्य. त्यात प्रत्येक अक्षरापासून पुढे ३२ अक्षरे वाचली की नवे पूर्ण पद्य होते. अशी ३२ पद्ये सुलट वाचताना आणि तितकीच उलट वाचताना सिद्ध होतात. एकूण ६४ पद्यांत रामायण पूर्ण होते. याच्यावर मात करणारा एक कवी निघाला. त्याने ३२ अक्षरांच्या एका पद्याचे १२८ अर्थ निघतील अशी योजना केली ! ही कसरत संस्कृताहून अन्य भाषेत होणे शक्य नाही. व्याकरण आणि अलंकारशास्त्र यांतल्या तत्त्वांची, रूपांची उदाहरणे देण्यासाठी काव्य हीही गोष्ट अन्य भाषेत होणे शक्य नाही. भट्टीने अशा व्याख्यागम्य काव्यांचा पायंडा पाडला. पुढिलांनी तो गिरवला. अलंकारांची उदाहरणे देणारी अशी काव्ये रामचंद्रापासून सुरू होऊन लोकमान्य टिळकांपर्यंत येऊन पोचली आहेत. रूपकात्मक किंवा लाक्षणिक नाटके हाही प्रकार याच वर्गात गणायला हवा. कृष्णमिश्र यतीने (इ. स.चे १२वे शतक) प्रबोधचंद्रोदय लिहून हा प्रकार निर्माण केला; तो पुढच्या कवींनी रुळवला. या वर्गातल्या साहित्यात न्यायशास्त्रावरचे 'अनुमितिपरिणय '(नरसिंह, १८ वे शतक) आणि व्याकरणाचे पाठ देणारे 'नाटचपरिशिष्ट ' ( कृष्णानंद) ही नाटके दृष्टी वेधून घेणारी आहेत.

काव्यशास्त्रावरच्या काही ग्रंथांच्या कर्त्यांनी आपल्या आश्रयदात्या राजावर पद्ये रचून, तसेच काहींनी सबंध नाटक रचून, आपल्या ग्रंथात उदाहरणे म्हणून दिली आहेत. असे ग्रंथ छंदःशास्त्रावरही रचलेले आहेत.

इ. स. १८५७ नंतर निर्माण झालेल्या ग्रंथांकडे पाहिले तर या प्रवृत्तीत वरेच परिवर्तन झालेले लक्षात येते. असे परिवर्तन सर्वच प्रादेशिक भाषांतील साहित्यात झालेले दिसते. हा पाश्चात्त्य साहित्याचा प्रभाव होय. या प्रभावापासून संस्कृत साहित्यही अलिप्त राहिले नाही. संस्कृत साहित्यावर तर पाश्चात्त्य साहित्याचा आणि त्याने प्रभावित झालेल्या प्रादेशिक भाषांतील साहित्याचा असा द्विविध प्रभाव पडलेला आढळून येतो. या प्रभावातून निर्माण झालेल्या साहित्यात राणा प्रतापासारखे वीर; पतंजलीसारखे शास्त्रकार; ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, मीरा यांसारखे संतजन; शीख गुरू; लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, जवाहरलाल नेहरू यांच्यासारखे लोकनेते; वाराणसीचे पंडित; धान्यकुमारासारखे वणिक्पुत्र; चुंडुरी वेंकट रेड्डीसारखे व्यापारी; शंकर पांडुरंग पंडितांसारखे पाश्चात्त्यविद्या-विभूषित विद्वान हेही काव्यविषय झाले आहेत. प्रस्थापित राजसत्तेचे आणि तिच्या अधिकाऱ्यांचे गुणगान ही एक वाङ्मयक्षेत्रातली शाश्वत प्रवृत्ती आहे. तीतून परकी सत्तांची आणि सत्ताधाऱ्यांची स्तुतिस्तोत्रे संस्कृत कवींनी गाइलेली जगन्नाथाच्या काळापासूनची उपलब्ध आहेत. अशा कृतींच्या विषयात सिकंदर, गझनीचा महंमद, आसफखान, दारा शिकोह, अकबर, शाइस्तेखान, विजापूरचे बादशहा, बेगडा महंमद, निजाम, व्हिक्टोरिया, एडवर्ड, पंचम जॉर्ज, इ. मंडळी आढळतात. अशी आपल्यावर संस्कृत कवींनी उधळलेली स्तुतिसुमने हा आपल्या पक्षाचा अनुकूल पुरावा म्हणून वॉरन हेस्टिंग्जने आपल्यावरील अभियोगात मांडला होता, अशी माहिती मिळते. या साहित्याचे वर्णन वर्णेकरांनी 'राजस्तुतिपर काव्ये लिहिण्याच्या प्राचीन परंपरेची एक खेदकारक विकृती ' असे केले आहे.

अर्वाचीन संस्कृत साहित्यात ठळकपणे दृष्टीत भरणारी एक प्रवृत्ती म्हणजे राष्ट्रीय प्रबोधन. या प्रवृत्तीतून निर्माण झालेल्या साहित्यात राणा प्रताप, शिवछत्रपती, रामकृष्ण, विवेकानंद, दयानंद, टिळक, गांधी, सुभाषचंद्र बोस, नेहरू, इ. अनेक ऐतिहासिक आणि आधुनिक विभूतींवर, आणि त्यांच्या तत्त्वज्ञानावर महाकाव्ये, नाटके, स्तोत्रे, मुक्तके, गद्यप्रबंध रचले गेले आहेत; त्याचप्रमाणे प्राचीन अर्वाचीन विभूती, पुण्यक्षेत्रे, नेते, कवी, ध्वज, ग्रंथ अशा भारतीय एकात्मतेच्या अनेक प्रतीकांवर स्वतंत्रपणे आणि एकत्रित साहित्यकृती निर्माण झाल्या आहेत. 'क्रांतियुद्ध ' (बागेवाडीकर) हा ग्रंथ १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धावरचा आहे. सत्याग्रहगीता व उत्तरसत्याग्रहगीता (क्षमा राव) हे दोन ग्रंथ गांधींच्या सत्याग्रहसंग्रामावरचे आहेत. अशा संस्कृत रचना प्रादेशिक भाषांतील ग्रंथांतही मधून मधून आढळतात. 'वंदे मातरम्' हे बंकिमचंद्रांच्या 'आनंदमठ' या बंगाली कादंबरीतले संस्कृतप्राय गीत हे याचे प्रसिद्ध उदाहरण होय. राष्ट्रीय उत्थानाच्या काळात संस्कृत हे भारताचा एक श्रेष्ठ मानबिंदू आणि एकात्मतेचे प्रतीक होते, याची यावरून साक्ष पटते.

पाश्चात्त्य आणि प्रादेशिक साहित्यांच्या प्रभावाने संस्कृतात नव्याने आलेल्या गद्य साहित्यबंधात जसा कथा, कादंबरी आणि प्रसंगवर्णने यांचा, तसा पद्य साहित्यबंधांत संस्कृतेतर भाषांतून आढळणाऱ्या छंदांच्या प्रयोगाचाही निर्देश करणे आवश्यक आहे. आधुनिक संस्कृत कथा-कादंबरी वाङ्मयात देवदेवता, राजेरजवाडे, वीरनेते यांचा साहित्यविषय होण्याचा युगानुयुगांचा अनन्य अधिकार संपुष्टात येऊ लागला आहे. सामान्य माणूसही आता या स्थानी येऊन बसत आहे, याची जाणीव होते. मंदारवती ( कृष्णम्माचार्य, १९२९) ही १८ प्रकरणांची कादंबरी आधुनिक कादंबरीच्या पद्धतीस अनुसरून लिहिली आहे. शैव-

लिनी व कुमुदिनी (चक्रवर्ती राजगोपाल), सरला (हरिदास सिद्धांतवागीश) या कादंबऱ्या या परंपरेतल्या. संस्कृतातले बरेचसे कथावाङ्मय संस्कृत कालिकांतून प्रकाशित झाले आहे. प्रवासवर्णनात्मक साहित्य फार अल्प आहे; त्यात 'तीर्थाटन' (राजगोपाल, इ. स. १८८२–१९३४), 'त्रिबिल्वदलचंपू' (रामस्वामी शास्त्री), कोकणचा प्रवास (सखारामशास्त्री), 'न्यक्तर-जनपदशोभा' (हॉलंडचा प्रवास : छात्रा), 'कावेरी-गद्य' (श्रीशैल दीक्षित) या कृतींचा उल्लेख मिळतो.

संस्कृत पद्यरचना शतकानुशतके प्रायः अक्षरगणवृत्तांनी प्रभावित राहिली आहे. तीत मात्रानियत जातिरचना फारच अल्प झाली. अशी नाव घेण्यासारखी प्राचीनतम रचना जयदेवाच्या गीतगोविंदात आढळते. उपलब्ध प्राकृत जातिरचना प्रायः अंत्ययमकनिबद्ध आहे. आणि संस्कृतात अंत्ययमक दुर्घट आहे, हे कदाचित अशी रचना अत्यल्प होण्याचे कारण असेल. अशी रचना संस्कृतात करता येत नाही, हा ग्रह दूर करण्यासाठी मथुरानाथ (मंजुनाथ) शास्त्रींनी हिंदी आणि उर्दू काव्यातल्या गजल, ठुमरी, दोहा, चौपाई, इ. विविध छंदांत विपुल स्फुट संस्कृत रचना केली असून, ती साहित्यवैभव या संग्रहात समाविष्ट केली आहे. या रचनांच्या विषयांमध्ये रेडिओ, रेल्वे, विमान, मोटर, ट्रामवे, जहाज यांसारखेही आधुनिक विषय आहेत. आजवर संस्कृत कवींनी नवीन प्रकारची वृत्ते व नवीन विषय हाताळले नाहीत, त्यामुळे संस्कृत भाषेचा प्रचार कमी झाला, असे मथुरानाथशास्त्र्यांचे मत आहे; म्हणून त्यांनी प्रस्तुत रचना केली. अशा रचना संगीतस्वरांच्या बंधांना सोयीच्या असतात आणि सुबद्ध संगीतस्वरांमुळे गीते लोकांच्या मुखी घोळू लागतात. अशा पुष्कळ स्वतंत्र आणि अनुवादात्मक संस्कृत रचना अलिकडच्या काळात संस्कृत कालिकांतून प्रकाशित झाल्या आहेत.

प्रादेशिक भाषांतील साहित्यांचा इतिहास असे दाखवतो की आपले साहित्य अधिक लोकांना कळावे म्हणून लेखक संस्कृत सोडून प्राकृताकडे वळले. कालांतराने प्राकृतात जिवंत झरे निर्माण झाले, संस्कृततातले आटत गेले आणि संस्कृताने प्राकृतातून उचलावे असे धन प्राकृतात निर्माण झाले. पूर्वी केवळ संस्कृत ग्रंथांचे प्राकृतात अनुवाद होत असत; अलिकडे प्राकृत आणि पाश्चात्त्य कृतींचे संस्कृत अनुवाद पुष्कळ होऊ लागले आहेत. अनुवादित ग्रंथांत जसे 'धम्मपद', 'मिलिंदपञ्ह' यांसारखे पाली भाषेतले, 'गाहासत्तसई' सारखे माहाराष्ट्री प्राकृततातले ग्रंथ आहेत, तसे तमिळ, तेलुगू, मलयालम, हिंदी, बंगाली, मराठी, इ. प्रादेशिक भाषांतलेही ग्रंथ आहेत; फारसी, इंग्रजी, जर्मन, फ्रेंच अशा विदेशी भाषांतलेही ग्रंथ आहेत. अनुवादित संस्कृत वाङ्मयात 'नालायिरम्' (शठकोप नम्मालवार), या तमिळ काव्याचा गोविंदसुत रामानुजाने केलेला अनुवाद बहुधा प्रादेशिक भाषेतील ग्रंथाचा पहिलाच संस्कृतानुवाद ठरेल. 'कथाशतक' (एस. वेंकटरामशास्त्री) हा निरनिराळ्या प्रादेशिक भाषांतील १०० कथांचा अनुवाद आहे. 'कामायनी' (हिंदी, जयशंकर प्रसाद, अनु. भगवद्दत्तशास्त्री), 'कपालकुंडला' (बंगाली, अनु. हरिचरण भट्टाचार्य), 'लावण्यमयी' (बंगाली, बंकिमचंद्र, अनु. अप्पाशास्त्री राशिवडेकर), 'गीतांजली' (बंगाली, टागोर), 'ज्ञानेश्वरी' (ज्ञानदेव, अनु. खासनीस), 'मनाचे श्लोक' (रामदास, अनु. 'तपतीतीरवासी,' डेग्वेकर), 'केकावली' (मोरोपंत, अनु. साकुरीकर), 'बलिदान' (न. चि. केळकर, अनु. लाटकर), 'अग्निजा' (सावरकर – निवडक कविता, अनु. पळसुले), 'संगीत सौभद्र' (देवल, अनु. वेलणकर), उमर खय्यामच्या रुबाया (फारसी – इंग्रजी, अनु. गिरिधर शर्मा, डांगे, सुरू), 'जयसिंहराजं प्रति श्रीमच्छत्रपतेः शिवप्रभोः पत्रम्' (मूळ फारसी काव्य, अनु. कविराज), 'दुःखोत्तरं सुखम्' (अरबी कथासंग्रह), 'अल्फर्जबादश्पिद्द' (फारसी 'जामे उल्लिकायान्' अनु. अहम्मद), 'चोरचत्वारिंशी' (= अलिबाबा आणि चाळीस चोर. अनु. गो. कृ. मोडक), ही काही निवडक नावे आहेत. अनुवादित इंग्रजी ग्रंथांत बरीच बायबलची आणि काही ख्रिश्चन संप्रदायातल्या अन्य ग्रंथांची भाषांतरे आढळतात. मूळ बायबलची भाषा इतकी सुंदर असताना त्याचे संस्कृत अनुवाद मात्र काहीसे क्लिष्ट व नीरस झाले आहेत. याव्यतिरिक्त ग्रंथांत शेक्सपीयरचे 'कॉमेडी ऑफ एरर्स' (भ्रान्तिविलासम्, अनु. श्रीशैल दीक्षित), शेक्सपीयर, वर्डस्वर्थ, शेली यांची काही कविता (किंकिणीमाला, अनु. महालिंग शास्त्री), 'ॲज यू लाइक इट' (= पुरुषदशासप्तक, अनु. रामचंद्राचार्य), 'यथाभिमत', (अनु. आर. कृष्णम्माचार्य), 'हॅम्लेट' (पितुरुपदेशः, अनु. रामचंद्राचार्य), 'ए मिडसमरनाइटस् ड्रीम (= वासन्तिक स्वप्न, अनु. आर. कृष्णम्माचार्य), 'ऑथेल्लो' (अनु. राजराज वर्मा), विकार ऑफ वेकफिल्ड' (= प्रेमराज्य, अनु. रंगाचार्य) टेनिसनचे 'हि[illegible] कप' (= कमलाविजय अनु. वेंकटरमणाचार्य) इत्यादी ललित ग्रंथ आहेत; तसे बर्कले, लॉक, बेकन यांचे निबंध, ॲरिस्टॉटलचे पोएटिक्स्, इंग्रजीची व्याकरणे असेही ग्रंथ आहेत. गटेच्या 'फाउस्ट' या जर्मन नाटकाचा अनुवाद 'विश्वमोहन' (अनु. ताडपत्रीकर), अरविंदाश्रमाच्या माताजींच्या फ्रेंच '[illegible] हिस्टोर'चा अनुवाद 'कथामंजिरी' (अनु. जगन्नाथ) [illegible] उल्लेखनीय आहेत. अरविंदांच्या तीन इंग्रजी कवितांचा [illegible] शास्त्रींनी केलेला 'कवितांजली' हा आणि गांधींच्या [illegible]

सुभाषितांचा चिं. द्वा. देशमुखांनी केलेला 'गांधीसूक्तिमुक्तावली' हा अनुवाद प्रसिद्ध आहे. भारताच्या राज्यघटनेचे जसे सर्व प्रादेशिक भाषांत तसे संस्कृतातही 'भारतस्य संविधानम्' या नावाने भाषांतर झाले आहे. हे अनुवाद वाङ्मयसंबंधित वाङ्मयाविषयीची संस्कृताची संवेदनशक्ती प्रत्ययाला आणून देणारे आणि म्हणून महत्त्वाचे आहे.

प्रादेशिक आणि पाश्चात्त्य वाङ्मयाचा संस्कृत साहित्यावर पडलेला प्रभाव त्यातील विनोद, विडंबन, उपहास प्रवृत्तीतूनही जाणवतो. पण साधारणपणे ही प्रवृत्ती तुरळक लघुकाव्ये आणि मुक्तक साहित्य यातूनच जिवंत राहिली आहे. 'काकदूत' या एकाच नावाची दोन काव्ये (सहस्रबुद्धे, अय्यंगार), 'वल्लवदूत' (बटुकनाथ शर्मा), 'मुद्‌गरदूत' (रामावतार शर्मा), ही कालिदासाच्या मेघदूताची विडंबने, 'पल्लांडुशतक' (= कांदाशतक, अनु. श्रीकृष्णराम शर्मा), 'होलिकाशतकम्' (विश्वेश्वर), 'संमार्जनीशतक' ( = केरसुणीशतक, अनु. अनंताल्वार), 'चहागीता' (सहस्रबुद्धे) 'कॉफीशतक' (वेंकटेश्वर), 'साहित्य विनोदराज' (राजे), 'सात्त्विक स्वप्न' (नीलकंठ शर्मा), काँग्रेसगीता ( सुरतेच्या अधिवेशनातील धिंगाणा ) ही अन्य काहींची विडंबने, वर्णेकरांचे 'मंदस्मित', 'कंटकांजली' (कंटकार्जुन, १९६५) हा याच परंपरेतला मुक्तसंग्रह. दीड हजार वर्षांत झाली नाही एवढी अशा प्रकारची रचना या पन्नास-साठ वर्षांत झाली. साहित्यनिर्मितीला परंपरेने घातलेल्या वेड्या निखळत चालल्याचे हे लक्षण आहे. अशा वाङ्मयातून अपरिहार्यपणे समकालीन समाजजीवन प्रतिबिंबित होते. भाषेत आणि साहित्यात त्यामुळे जिवंतपणा उमटू लागतो. हे सर्वच वाङ्मय सारखेच गुणसंपन्न आहे असे नाही. पण ही प्रवृत्ती राहिली तर गुणसंपन्न वाङ्मय निर्माण होण्यास अनुकूल असे वातावरण सिद्ध होते. कांदा, केरसुणी यासारख्या क्षुल्लक विषयांवर काव्य करण्यास लाज वाटत नाही.

पण साहित्य प्रगतिशील होण्यासाठी कांदा-केरसुणींवरच काव्य निर्माण व्हावे लागते असे नाही; कारण साहित्याची नवीनता त्याच्या विषयावर अवलंबून नसते. जुन्याही विषयांवर नव्या दृष्टिकोनाने, नव्या आविष्कार पद्धतीने लिहिता येते. रामायण-महाभारतातील प्रसंग व व्यक्ती यांवर अजूनही प्रादेशिक भाषांत ललित रचना होत आहेत आणि त्या लोकप्रियही होतात. संस्कृतातही आधुनिक काळात निर्माण झालेल्या कृतींचे अवलोकन केले तर असे दिसते की त्यांचे विषय आधुनिक असूनही काही कृती जुनाट वाटतात; याच्या उलट काही कृती अशा आहेत, की त्यांचे विषय तसे जुनेच असले तरी, त्यांत कांही नवा दृष्टिकोन, नवा आशय मांडण्याचा प्रयत्न जाणवतो आणि तो पुष्कळ वेळा सफलही होतो. अशा कृती अर्थातच फार अल्प संख्येत दृष्टीला पडतात. त्यांत 'मुक्तकांजलि', 'मुक्तक मंजूषा' (वहुलीकर) या मुक्तकसंग्रहांचा निर्देश केला पाहिजे.

**संस्कृत कालिके** -- आधुनिक काळात ही बहुविध संस्कृत साहित्याची निर्मिती होण्यास संस्कृत कालिकांनी मोठा हातभार लावला आहे. संस्कृत कालिकांचा इतिहास इ. स. १८६९ मध्ये लाहोरला निघालेल्या विद्योदय मासिकापासून सुरू होतो. लाहोरच्या संस्कृत महाविद्यालयातले प्राध्यापक हृषिकेश भट्टाचार्य हे याचे संपादक होते. हे मासिक पुढे भट्टाचार्यांच्या मागोमाग लाहोरहून कलकत्त्याला आले आणि ५० वर्षे चालून बंद पडले. विद्योदयाच्या उदयानंतर मंजुभाषिणी, सहृदया, संस्कृतचंद्रिका यांच्यासारखी नामवंत मासिके निघाली. संस्कृत चंद्रिका प्रथम कलकत्त्याला प्रकाशित होत असे; पुढे तिचे संपादकत्व अप्पाशास्त्री राशिवडेकरांकडे येऊन, ती कोल्हापूरला प्रसिद्ध होऊ लागली. अंबिका दत्त व्यास यांचे शिवराजविजय हे गद्यकाव्य याच पत्रिकेत प्रथम क्रमशः प्रसिद्ध झाले. राशिवडेकरांचे असामान्य भाषाप्रभुत्वाने विनटलेले बहुविध लेखन या मासिकातून आणि पुढे त्यांनी सुरू केलेल्या सूनृतवादिनी या साप्ताहिकातून प्रसिद्ध झाले. इ. स. १९१३ मध्ये राशिवडेकरांच्या निधनानंतर ही दोन्ही कालिके बंद पडली. पण या सुरुवातीच्या कालिकांनी सुरू केलेली परंपरा अन्य अनेक कालिकांनी पुढे येऊन जिवंत ठेवली. त्यांत संस्कृत रत्नाकर (जयपूर), संस्कृत (अयोध्या), मधुरवाणी (बेळगाव), इ. पत्रिकांनी आपापल्या गुणविशेषांनी ख्याती मिळवली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर संस्कृत कालिकांना बहरच आला. त्या सगळ्यांचा समग्र नामनिर्देशही करणे कठीण आहे. पुण्याहून 'भारतवाणी' आणि 'शारदा' ही दोन पाक्षिके आणि 'संस्कृति' हे दैनिक प्रसिद्ध होऊ लागले. त्यांतले केवळ एक (शारदा) अजून टिकून आहे. अनेक नवोदित संस्कृत लेखकांच्या लहानमोठ्या कृती या पाक्षिकाने प्रकाशात आणल्या. साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळवलेले वर्णेकरांचे 'शिवराज्योदयम्' महाकाव्य शारदेतूनच प्रथम क्रमशः प्रसिद्ध झाले. सुधर्मा नावाचे दैनिक म्हैसूरहून निघते. संस्कृतप्रतिभा नावाचे साहित्य अकादमीचे षाण्मासिक दिल्लीहून प्रसिद्ध होते. अशा दैनिकापासून वार्षिकापर्यंतच्या एकूण ५३ कालिकांची नाममालिका १९७२ च्या अधिकृत शासकीय प्रकाशनात मिळते. शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे यांच्या कालिकांतूनही संस्कृत साहित्य प्रकाशित होत चालले आहे. संस्कृताचे लौकिकीकरण करण्यात जसा या कालिकांचा, तसा आकाशवाणीच्या विविध केंद्रांवरून प्रक्षेपित होणाऱ्या बहुविध संस्कृत कार्यक्रमांचाही वाटा आहे. इ. स. १९७५ पासून आकाशवाणीवर दिल्लीहून संस्कृत वार्ताही सुरू

झाल्या आहेत. पण संस्कृत वार्ता सुरू करण्याचा पहिला मान जर्मन रेडिओचा आहे. प्रादेशिक भाषांतही काही कालिके नियमित, तर काही अधूनमधून संस्कृत लिखाण प्रसिद्ध करून संस्कृताच्या प्रसाराला हातभार लावत असतात. नेपाळची सांस्कृतिक परंपरा भिन्न नाही. तेथेही ' जयतु संस्कृतम् ' या नावाचे एक संस्कृत मासिक काठमांडूहून प्रकाशित होते.

संस्कृत कालिकांच्या या पीठावर एकत्र झालेल्या संस्कृतप्रेमीं-मध्ये बहुविध वैचित्र्य आहे. त्यांत पुरुष आहेत, स्त्रिया आहेत; पारंपरिक पंडित, नवशिक्षित, तरुण, वृद्ध, अध्यापक, विद्यार्थी, डॉक्टर, वकील, सरकारी अधिकारी, मंत्री, उद्योगपती, हिंदू, मुस्लीम, ख्रिश्चन, जैन, बौद्ध, भारतीय, पाश्चात्त्य आणि अन्य अनेक लोक आहेत. कोणी शास्त्रीय विषयांवर लिहितात, कोणी लौकिक विषयांवर. कोणी कथा, कोणी गीते, कोणी नाटके. संस्कृतावर प्रेम करणारा फार मोठा समाज अजून अस्तित्वात आहे. आपापल्या शक्तीला, दृष्टिकोनाला अनुरूप असे प्रयत्न करणाऱ्या संस्था व व्यक्ती ठिकठिकाणी दिसतात. कोणी संस्कृत नाटके बसवून रंगमंचावर आणतात, कोणी विद्यार्थ्यांसाठी आणि हौशी लोकांसाठी संस्कृत भाषेच्या परीक्षा चालवतात, कोणी संस्कृत माध्यमाची शिशुशाला चालवतात, कोणी संस्कारवर्ग, कोणी वक्तृत्वादी स्पर्धा, कोणी संस्कृत वाङ्मयावर भाषणे घडवून आणतात. पुष्कळशा प्रशाला, महाविद्यालये यांत संस्कृत संघटना असतात; त्या आपापल्या क्षेत्रात विद्यार्थ्यांसाठी, लोकां-साठी कार्यक्रम, उपक्रम चालवतात. महाराष्ट्र राज्याचे शासन एक संस्कृत नाट्यस्पर्धा चालवते. या सर्व प्रयत्नांना श्रमानुरूप फल येण्यासाठी संस्कृताचा समज असलेला मोठा वर्ग निर्माण व्हायला हवा. त्यासाठी नैसर्गिक भाषा शिक्षणपद्धतीने संस्कृत शिकण्याची योजना आखून ती कार्यान्वित केली पाहिजे. संस्कृत भाषा आणि साहित्य यांना लोकजीवनात असा भक्कम आधार मिळाला तर संस्कृताच्या भवितव्याची चिंता करण्याचे कारण उरणार नाही. [ भा. आ. भा. हिं.; भा. वि. को.; दि सं. लँ.; रि. सं. क.; हि. सं. लि.; सं. सा. इ.; रि. इं. रि.; वं. दे. वॉ. इं.; अ. सं. सा.; हि. इं. लि. १; वे. शा. दी.; सं. वा. वि. इ.; ज्ञान प्रबोधिनी संस्कृत – संस्कृति – संशोधिका, पुणे (द्वारा प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर) ]

## संस्कृती

हा शब्द सांप्रत कल्चर या इंग्रजी शब्दाचा प्रतिशब्द म्हणून रूढ झाला आहे. संस्कार शब्द आपण प्राचीन काळापासून वापरीत आलो आहो. संस्कार आणि संस्कृती हे दोन्ही शब्द सम् अधिक कृ या एकाच धातूपासून बनले आहेत. त्यांचा अर्थही व्याकरणदृष्ट्या एकच आहे; पण संस्कार हा शब्द धार्मिक क्षेत्रापुरताच मर्यादित राहिला. धर्मासह समग्र अंतर्बाह्य जीवनाच्या उन्नत अवस्थेसाठी संस्कृती हा शब्द वापरला जातो. त्या शब्दाचा अर्थही खूप व्यापक झाला आहे.

संस्कृतीची सुटसुटीत व्याख्या करता येत नाही; पण त्या शब्दाच्या जोडीने प्रकृती व विकृती हे दोन शब्द ठेवल्यास संस्कृतीचा नेमका अर्थ मनात ठसू शकतो. प्रकृती म्हणजे निसर्ग, विकृती म्हणजे निसर्गात होणारा विकार आणि संस्कृती म्हणजे प्रकृतीत विकार किंवा बिघाड होऊ नये, या उद्देशाने प्रकृतीवर करण्याचा संस्कार. उदा० दूध ही प्रकृती. विशिष्ट कालाने किंवा जंतूंच्या प्रवेशाने ते नासून जाणे, पिण्यास अयोग्य ठरणे म्हणजे त्याची विकृती. आणि दूध नासू न देता ते आटवणे, त्यात केशर-वेलदोडे व साखर घालून ते अधिक आस्वाद्य करणे, त्याचा खवा बनवून त्याचे पेढे बनवणे, त्यांना आकर्षक रंग व आकार देणे, ही दुधाची संस्कृती होय.

एवढे जरी कळले तरी संस्कृतीचा समग्र आशय ध्यानात येत नाही, तिची व्याप्तीही कळत नाही, म्हणून संस्कृतीची विवरणा-त्मक व्याख्या सांगावी लागेल ती अशी –

मनुष्य व त्यांच्या भोवतीचे विश्व मिळून निसर्ग बनतो. या निसर्गामध्ये जीवनोत्कर्षाला अनुकूल असे बदल करून, म्हणजेच निसर्गावर काही संस्कार करून मनुष्य आपली जीवनयात्रा चाल-वीत असतो. मनुष्य हा देखील भोवतालच्या निसर्गाचाच एक अंश आहे. तो केवळ बाह्य विश्वातील पदार्थांवर संस्कार करतो असे नव्हे, तर स्वतःचा देह आणि मन-बुद्धी यांच्यावरही संस्कार करून स्वतःमध्ये बदल घडवून आणतो. संस्कृती या शब्दात हे दोन्ही प्रकारचे बदल किंवा संस्कार अभिप्रेत आहेत. बाह्य विश्व आणि आंतर विश्व या दोहोंवरही माणसाला यावच्छक्य विजय मिळवता येतो, तेव्हाच त्याचे जगणे जीवन या उदात्त अर्थाला पात्र होते. आपले जीवन सुखी, समृद्ध आणि आकर्षक व्हावे यासाठी माणूस स्वतःही झगडतो आणि समुदायशःही झगडत असतो. या दोन्ही क्रिया मानवी जीवनात थोड्याफार प्रमाणा-मध्ये एकाच वेळी, सुरू असतात. ओबडधोबड दगडावर छिन्नीचे संस्कार करून त्यातून सुंदर मूर्ती आकाराला आणणे हा माणसाने निसर्गनिर्मित वस्तूवर केलेला संस्कार होय. हा संस्कार कधी सुटा राहत नाही. त्याच्या अनुषंगाने मूर्ती घडवणाऱ्या [illegible] माणसाच्या मनावरही काही संस्कार घडत असतो. अशा [illegible] प्रयत्नाने माणसाला मूर्तिकलेत प्रावीण्य लाभते आणि [illegible] मूर्तींच्या दर्शनाने व पूजनाने त्याच्या मनालाही प्रसन्नता लाभते. दगडावरच्या संस्काराने मनावर घडणारा हा संस्कार म्हणजे संस्कृतीचा आध्यात्मिक भाग होय. माणसाच्या [illegible] प्रकारच्या प्रयत्नांतूनच भौतिक वस्तुरूप सृष्टी आणि [illegible]

तिक सृष्टी निर्माण होते. अशी ही द्विविध निर्मिती म्हणजेच संस्कृती होय. आधिभौतिक व आध्यात्मिक ही दोन विशेषणे वेगवेगळी असली, तरी संस्कृती या नावाची वस्तू एकच असते. शेती, पशुपालन, स्थापत्य, धातुकाम, यंत्रनिर्मिती, यंत्रांच्या उपयोगाने वस्त्रोत्पादन, अर्थोत्पादन या गोष्टींच्या संपन्नतेला आधिभौतिक संस्कृती असे म्हटले जाते. बाह्य विश्वाचा अनेक प्रकारे उपभोग घेणे, निसर्गाला आपल्या सेवेत राववणे आणि तशी महत्त्वाकांक्षा धरून सतत प्रयत्नशील असणे, या गोष्टी आधिभौतिक संस्कृतीच्या निदर्शक आहेत. धर्म, नीती, कायदा, विद्या, ललित कला, वाङमय, सभ्यता आणि शिष्टाचार या गोष्टींचा संस्कृतीच्या आध्यात्मिक भागात अंतर्भाव होतो. माणसाच्या मानसिक आशा-आकांक्षांना आधिभौतिक सुधारणेमुळे मूर्त स्वरूप येते आणि भौतिक सुधारणांची इमारत अध्यात्माच्या पायावर उभी केली गेली, तरच तिला संस्कृतीचा दर्जा प्राप्त होतो. सुसंस्कृत जीवनात बाह्य समृद्धीवरोबर मन, बुद्धी आणि इंद्रिये यांच्यावरही नियंत्रण असावे लागते. या दोन्ही गोष्टी एकसमयावच्छेदाने साध्य करण्याच्या प्रक्रियेलाच संस्कृती म्हणता येईल. यासाठी पुढील उदाहरण सांगता येईल—

माणसाला स्त्रीचा व धनाचा अभिलाष उत्पन्न होणे ही नैसर्गिक प्रवृत्ती आहे. अशा अनेक माणसांच्या नैसर्गिक प्रवृत्ती अनिर्बंधपणे वाढू लागल्या तर त्यातून स्वैराचार, फसवणूक, लुवाडणूक, दंगेधोपे अशा अनेक भयावह गोष्टी मनुष्यसमाजात घडू लागतील आणि त्याचे जीवन अस्थिर व अशाश्वत होईल. अशा समाजाला समाज हे नावच प्राप्त होणार नाही. म्हणून विचारवंत माणसांनी अनेक पिढ्यांच्या अनुभवातून विवाहसंस्था आणि आर्थिक जीवनाचे नियम निर्माण केले. त्या नियमांमुळे माणसाच्या भोगलालसेवर नियंत्रण बसले. त्यांतूनच स्वतःच्या श्रमाने संपादिलेल्या धनवैभवावर स्वत्वाची कल्पना आणि पतिपत्नींमधले अतूट प्रेम ही मूल्ये माणसाने निर्मिली. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यासंबंधी लिहितात —

मनुष्याच्या स्वभावात निसर्गतःच अधोगतीला व प्रगतीला नेणाऱ्या प्रवृत्ती भरलेल्या आहेत. श्रद्धा, सत्यनिष्ठा, मैत्री, सहानुभूती, परिश्रमाची आवड, दया, औदार्य, ज्ञानलालसा, तार्किक चिकित्सा, न्यायबुद्धी, इ. सद्‌गुण आणि अश्रद्धा, मिथ्यावाद, मत्सर, द्वेष, आलस्य, क्रौर्य, झोपाळूपणा, विद्याविमुखता, इ. दुर्गुण मनुष्यस्वभावात बीजरूपाने राहतात. मनुष्याला अनुभवाने, विचाराने आणि रूढीच्या साहाय्याने सत्प्रवृत्तीची निवड करून वाढ करावी लागते. म्हणून उच्च व आध्यात्मिक मूल्ये एका अर्थाने चिरंतन आहेत व दुसऱ्या अर्थाने मानवनिर्मित आहेत. निष्ठायुक्त स्त्री-पुरुषांची जोडपी जीवनसंग्रामात यशस्वी झालेली पाहिल्यावर माणसाला विवाहसंस्थेचा शोध लागला. ती त्याने संघटित केली. धर्म, नीती व कला यांतील उच्चतम मूल्ये शाश्वत असूनही माणसाला शोध करून निर्माण करावी लागली आहेत. या शोधात त्याला यश व अपयश ही दोन्ही प्राप्त झाली आहेत. वारंवार बदल करावा लागला आहे. ह्या मूल्यस्थापनेचा इतिहास म्हणजे मानवजातीचा इतिहास होय. कामक्रोधादी विकारांचा संयम करून चित्ताची समता साध्य करणे, ह्या उच्चतम सद्‌गुण शोधण्यासही माणसास युगे घालवावी लागली. तात्पर्य, आध्यात्मिक संस्कृतीला इतिहास आहे. आध्यात्मिक संस्कृतीचे आविष्करण मुख्यतः आत्मकेंद्रित असते. या दृष्टीने गणित व भौतिक विज्ञानेसुद्धा आध्यात्मिक संस्कृतीचे भाग होत.

ललित कलासुद्धा प्राधान्याने आत्मनिष्ठ असतात. त्यांचे माध्यम तेवढे बाह्य असते. ललित कला हेसुद्धा आध्यात्मिक संस्कृतीचे एक उच्च स्वरूप आहे.

प्रत्येक संस्कृतीची विशिष्ट रचना असते. तिच्यात सर्व सामाजिक संस्था एकमेकींत गुंफलेल्या असतात. त्या एकमेकींवर अवलंबूनही असतात. त्यांच्यापैकी एका घटक संस्थेत बदल झाला, की त्याचा परिणाम इतर घटक संस्थांवर होतो. भिन्न संस्कृती परस्परांच्या सान्निध्यात आल्यावरही त्यांच्यांत प्रथम संघर्ष सुरू होतो. पुढे त्या परस्परांत देवघेव करू लागतात. शेवटी त्या दोघींचे मिळून एक नवेच स्वरूप उदयाला येते. देशकालपरिस्थितीच्या भिन्नत्वाने जगाच्या पाठीवर संस्कृतींची विविधता दृष्टोत्पत्तीस येते. जीवनोपयोगी लहानसहान वस्तूंपासून आध्यात्मिक विचारांपर्यंत सर्वत्र भिन्न भिन्न प्रकारची निर्मिती आढळते. त्यामुळे संस्कृतींची अनेकता ही वस्तुस्थिती मान्य करावीच लागते. मानव म्हणून सर्वांच्यामध्ये बऱ्याच बाबतीत सारखेपणा दिसला, तरी पाश्चात्त्य व पौरस्त्य किंवा युरोपीय आणि भारतीय माणसांच्या अनेक गोष्टींत वेगळेपणा जाणवतो. तीच गोष्ट भारतीयत्वाची आणि प्रादेशिकतेची. पाश्चात्त्यांच्या संदर्भात आपण भारतीय संस्कृतीचे आहो, ही गोष्ट निस्संशय खरी; पण भारतामध्येही मराठी, गुजराती, कर्नाटकी, असमिया, बंगाली, राजस्थानी अशी प्रादेशिक संस्कृतिभिन्नता आहेच.

**संस्कृतीचा विकासक्रम**—कोणत्याही संस्कृतीचा विकास म्हणजे तिच्या घटक संस्थांचा, ध्येयांचा व पद्धतींचा विकास होय. संस्कृतीतील प्रत्येक पद्धतीच्या आकारात काही एक उच्च-नीच क्रम असतो, किंवा तारतम्य असते. संस्कृतीच्या अर्थपद्धतीत विकासाच्या उच्च-नीच पायऱ्या स्पष्टपणे दाखविता येतात. समाजातल्या वयात आलेल्या सर्व व्यक्तींच्या श्रमांवर उत्पन्न

झालेली व जेमतेम जगविणारी अशी समान वाटणीची आर्थिक व्यवस्था ही प्राथमिक स्थिती होय. या स्थितीत कुठेही संचित धन फारसे नसते. खासगी मालकीची संपत्ती असणे ही दुसरी अवस्था होय. ती गुलामांच्या व जनावरांच्या मदतीने उत्पन्न होते. या पद्धतीत संपत्तीची वाटणी विषम असते. ज्या अवस्थेत गुलामगिरीची संस्था नष्ट झालेली असते, ती अर्थपद्धती ही तिसरी अवस्था होय. या अवस्थेत जमिनीची मालकी नसलेला श्रमिकवर्ग शेतीच्या धंद्यात सक्तीने काम करून आपली गुजराण करतो. चौथ्या अवस्थेत यांत्रिक कारखान्यातल्या बहुविध उत्पादनाला प्राधान्य असते आणि विज्ञानाच्या साहाय्याने मनुष्य निसर्गाला आपल्या सेवेत राबवतो. या चार अवस्था ठोकळ मानाने बरोबर ठरतात; परंतु भूतकाळातील व वर्तमानकाळातील सर्व प्रकारच्या आर्थिक व्यवस्थांचा वरील चार प्रकारांत समावेश होईलच असे नाही.

इतर सांस्कृतिक अंगांच्या विकासक्रमाविषयी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी पुढील विवेचन केले आहे–

विवाहसंस्था, धर्म, विद्या, कला, राज्य, इत्यादिकांतसुद्धा विकासक्रम संचित करणारा रचनाक्रम सांगता येतो. बहुपत्नीकत्व, एकपत्नीकत्व आणि समान अधिकार असलेल्या पतिपत्नींचा विवाहसंबंध अशा तीन अवस्था गुणांच्या तारतम्याने दिसून येतात. बालविवाहापेक्षा स्वयंवर ही उच्चतर अवस्था होय, असे एका अर्थी म्हणता येते. धर्मसंस्थेतही हीनोच्च स्वरूपे सूचित करणाऱ्या भिन्न अवस्था सापडतात–(१) जादू, कर्मकांड; मनुष्येतर प्राण्यांची, वनस्पतींची व जड वस्तूंची पूजा इत्यादींना प्राधान्य ज्या स्थितीत असते, ती हीन स्थितीतली धर्मसंस्था होय. (२) एकेश्वराची तत्त्वचिंतनात्मक भक्तिप्रधान असलेली धर्मसंस्था उच्चतर स्वरूपाची धर्मसंस्था होय. कोणत्याही विशिष्ट धर्मोपदेशकांना, पवित्र ग्रंथांना व धर्मसंस्थापकांनाच नितांत श्रद्धेने प्रमाण मानणे, हे या दुसऱ्या अवस्थेतील धर्मसंस्थेचे महत्त्वाचे अंग असते; यामुळे सर्व मानवजातीबद्दलची बंधुत्वाची कल्पना विस्तार पावण्यास बंधन होते. (३) शब्दप्रामाण्याची व परंपरेवरील श्रद्धेची मर्यादा न जुमानणारी मनोभूमिका ज्या धर्माने तयार होते, ज्या धर्माने धर्मसंप्रदायांचा, संकुचित भेदभावाचा लय होतो, सर्व मानव जातीबद्दल आत्मीयता निर्माण होते व मर्यादित श्रद्धेपेक्षा व्यापक सत्यशोधनास ज्यात महत्त्व येते, तो धर्म; ही धर्मसंस्थेची तिसरी व उच्चतम अवस्था होय.

विद्या आणि कला यांच्या क्षेत्रांतही विकासक्रम निश्चित करता येतो. ज्या सामाजिक स्थितीत ज्ञान व कला केवळ 'अनुभवांचा संग्रह' एवढ्याच स्वरूपात अस्तित्वात असते, तीस विद्येची व कलेची प्राथमिक अवस्था म्हणतात. विषयाचा परंपरेने साठवलेला अनुभवसंग्रह जेव्हा सामान्य नियम व विचारसंगती यांच्या स्वरूपात मांडला जातो, तेव्हा त्यास शास्त्र ही पदवी येते. ही विद्येच्या प्रगतीची दुसरी अवस्था होय. सर्व प्रकारच्या अनुभवांचे क्षेत्र व्यापणाऱ्या शुद्ध व अव्यक्त कल्पना सांगणारे विज्ञान ही विद्येची तिसरी व उच्चतर अवस्था होय. यात गणित, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान यांचा अंतर्भाव होतो. जेव्हा गणित व तर्कशास्त्र यांच्या साहाय्याने वस्तुस्थितीचे निरीक्षण व पदार्थांच्या कार्यकारणभावाच्या व घटकांच्या शोधाकरिता प्रयोग करणे, याच्या योगे विद्या किंवा कला अव्याहत विस्तार पावू लागते, तेव्हा ती विकासाच्या चौथ्या उच्चतम अवस्थेत पोचते.

**संस्कृतीची निर्मिती –** मानवी जीवनाचा इतिहास गेल्या सहा लाख वर्षांचा माहीत झाला आहे. त्या अतिप्राचीन काळचा माणूस परंपराप्राप्त असे समाजजीवन जगला असेल, हे कोणाला शक्य वाटेल काय ? पण ते घडले आहे. आजचा मानवी समाज आणखी १०० वर्षांनी कोणत्या अवस्थेत असेल, हे सुद्धा सांगणे कठीण आहे; कारण मानवी जीवन सारखे बदलत असते. त्यात सतत नवनिर्मिती चालू असते. माणूसच ती स्वतः करतो, तिचा सांभाळ करतो आणि ती नव्या पिढीच्या हवाली करून मृत्यूच्या दरवाजाने निघून जातो. मात्र ही नवनिर्मिती एकट्यादुकट्या व्यक्तीची नसून ती समाजाची निर्मिती असते. एकट्यादुकट्या व्यक्तीच्या जीवनक्रमात संस्कृतीची निर्मिती होणे अशक्य आहे. कुटुंब, घरदार, शेतवाडी, धनसंपदा, वस्त्रे-भूषणे, आप्तेष्टांचा परिवार या सर्व सांसारिक उपाधीतूनच संस्कृतीची निर्मिती होते. माणसे आपली सर्व भौतिक व मानसिक संपत्ती मागे ठेवून परलोक सुधारतात आणि त्यांची ती उभयविध संपत्ती पुढच्या पिढीला जशीच्या तशी मिळते. माणूस पूर्वीच्या पिढीकडून प्राप्त झालेल्या वस्तूंचा व मूल्यांचा वारसदार होतो. उदाहरणार्थ, कधी काळी वैदिक ऋषींनी रचलेल्या सूक्तांचा वारसा परंपरेने चालू पिढीपर्यंत आला आहे. व्यासांचे महाभारत, वाल्मीकीचे रामायण, कालिदासाचे शाकुंतल ही वाङ्मयरत्ने वारसाहक्काने आपल्याला मिळाली आहेत. फुलपाखराची प्रत्येक अळी नव्याने आपल्या जीवनाला आरंभ करते; पण मानवी मूल पूर्वजांच्या भौतिक व मानसिक संचय-वर उभे राहते. त्याचा देह संचित धनावर पोसतो, तर त्याचे मन धर्म, रूढी, विज्ञान व भाषा या संचित मनोद्रव्यावर पोसते. म्हणजे मनुष्याला प्राप्त होणारे भौतिक व मानसिक धन हे नेहमी परंपरागत असते. परंपरा दोन प्रकारच्या असतात. एक शारीर परंपरा आणि दुसरी साहचर्यपरंपरा. या संबंधात

प्रा. शेणोलीकर आणि प्रा. देशपांडे पुढीलप्रमाणे लिहितात –

पशुपक्ष्यांना शारीर परंपरेने आईबापांप्रमाणे शरीररचना व क्रियासामर्थ्य लाभते, पण त्यांच्यात साहचर्यपरंपरा नसते. म्हणून पशुपक्ष्यांना नैसर्गिक जीवन आहे, पण संस्कृती नाही. गाय, मांजर यांसारख्या माणसाळलेल्या प्राण्यांमध्ये दोन पिढ्यांत बरेच साहचर्य घडते. मांजराचे पिल्लू किंवा गाईचे वासरू जन्मते शारीर परंपरेप्रमाणे. पण आईच्या सहवासाने ते बऱ्याच गोष्टी शिकते. ही अत्यल्प अशी संस्कृतीची सुरुवात आहे. माणसाच्या बाबतीतही अंगयष्टी, रंगरूप व काही गुणदोष शारीर परंपरेने येतात; पण जीवनाचे सर्व व्यवहार वडील पिढीकडून त्याला शिकावे लागतात. माणसाला दोन-तीन पिढ्यांचे साहचर्य बराच काळ मिळते. मातापित्यांच्या छत्राखाली त्याचे संरक्षण होते, त्याबरोबरच ज्ञानानुभवाचे संक्रमणही होत राहते. खाणे-पिणे, बोलणे-वागणे, पोषाख व अलंकार, आचार-विचार, श्रद्धा–समजुती, सणवार, व्रतवैकल्ये, बऱ्यावाईटाच्या आणि पाप-पुण्याच्या कल्पना, कलात्मक अभिरुची, इ. अनेकविध गोष्टींचे संस्कार घर, शाळा-महाविद्यालये आणि इतर सामाजिक संस्था यांच्या द्वारा अगदी लहानपणापासून मनुष्याच्या मनावर होत राहतात.

वरील विवेचनावरून एक गोष्ट कळते. ती म्हणजे संस्कृतीची दोन रूपे असतात. एक स्पर्शाला जाणवणारे, डोळ्यांना दिसणारे व हातांना मिळणारे असते, तर दुसरे ज्ञानेंद्रियांच्या द्वारेच समजून घ्यायचे असते. या दोन स्वरूपांविषयी श्रीमती इरावती कर्वे यांनी जे लिहिले आहे. त्याचा सारांश असा –

घरे, कपडे लत्ते आणि खाण्यापिण्याचे पदार्थ डोळ्यांनी दिसतात व स्पर्शालाही जाणवतात. हे संस्कृतीचे बाह्य आणि स्थूल स्वरूप होय. व्यक्ती या स्थूल निर्मितीचा उपभोग घेत असते. मात्र ती सृष्टी म्हणजे त्या एकटच्या व्यक्तीची निर्मिती असते, असे नाही. काही भाग मागील पिढ्यांनी निर्माण करून ठेवलेला असतो व तो सामाजिक वारशाने त्याच्याकडे येतो. या स्थूल वस्तू इतर व्यक्तींच्या श्रमाने निर्माण झालेल्या असतात व त्या देवघेवीच्या द्वारे माणसाला मिळतात. व्यक्तीला स्वतःच्या शक्तीने जेवढे निर्माण करून उपभोगता आले असते, त्याच्या कितीतरी पटींनी अधिक वस्तू सामाजिक वारशाने त्याला उपभोगायला मिळतात. माणूस व इतर सर्व प्राणी यांच्यांत हा मोठाच फरक आहे. इतर सर्व प्राणी स्वतःच्या श्रमाने मिळेल तेवढेच खातात. माणूस मात्र पिढ्यान्‌पिढ्यांच्या श्रमाचे खातो व उपभोगतो. माणूस भोवतालच्या सृष्टीतून आपल्या उपयोगाचे पदार्थ निर्माण करतो, ती कला इतरांना शिकवतो आणि ते पदार्थ पुढीलांसाठी ठेवून निघून जातो. माणसे एकमेकांकडून नव्या नव्या कला शिकू शकतात. इतर प्राणी मात्र प्रत्येक नवीन पिढीला तीच तीच कामे पुन्हा करीत राहतात.

संस्कृतीचे दुसरे रूप बुद्धिगम्य आहे. हे रूप म्हणजे माणसाने सामाजिक जीवन जगण्यासाठी ठरवून घेतलेली रीत होय. माणसांनी परस्परांशी कसे वागावे, कसे बोलावे आणि संघटित जीवन कसे जगावे, याचे काही सामाजिक संकेत असतात. त्याचबरोबर धर्म आणि नीती यांच्यासंबंधीही ठराविक कल्पना असतात. हे संकेत किंवा या कल्पना यांचा सगळ्याच वेळी कार्यकारणभाव दाखवता येतो असे नाही; पण तरीही त्यांच्यामुळे व्यक्तीच्या जीवनाला वळण लागत असते. योग्य-अयोग्य, न्याय्य-अन्याय्य, धार्मिक-अधार्मिक, पाप-पुण्य, देव-असुर, सृष्टी आणि ईश्वर, इ. सर्व कल्पना परंपरेने आलेल्या असतात. त्याचप्रमाणे कौटुंबिक नाती, त्यांची परस्परांशी वागणूक, इ. गोष्टी परंपरागत असतात. या साऱ्या गोष्टी एकटा माणूस निर्माण करीत नाही; तो फक्त त्या थोड्याफार प्रमाणात आत्मसात करतो.

**संस्कृतीचे नित्य परिवर्तन** – संस्कृतीचा वारसा वडिलांकडून पुढिलांना मिळत असताना त्यात काही बदलही घडत असतो. म्हणजे कोणतीही संस्कृती स्थिर व अपरिवर्तनीय नसते. तिच्यात हळूहळू नित्य बदल होत असतो. क्रांतिकालात तर हा बदल फार मोठा असतो. हा बदल माणूसच घडवून आणतो. संस्कृती हा एक प्रचंड प्रवाह आहे आणि माणूस हा त्या प्रवाहात पडलेले एक काष्ठ आहे, हे खरे असले तरी, माणूसच संस्कृतीला वळण लावतो, हे नाकारता येणार नाही. अश्मयुगातील ओबडधोबड हत्यारे व मातीची भांडी ही कोण्यातरी माणसानेच बनवली होती. त्या अतिप्राचीन काळातही प्रत्येक निर्मिती माणसाकरवीच झाली आहे. पोषाख, खाणेपिणे, आचारविचार या सर्वांत माणूसच बदल घडवीत असतो. एखाद्या समाजाची संस्कृती काय आहे, हे ठरवायचे झाल्यास त्यातील व्यक्तीच्या जीवनक्रमाचे सूक्ष्म परीक्षण करावे लागते. एका दृष्टीने संस्कृती ही माणसाला दैवाने मिळते; पण दुसऱ्या दृष्टीने संस्कृतीचा कर्ता धर्ता समाजातला एकेक माणूसच असतो. माणूस ज्या संस्कृतीत जन्माला येईल, तिला अनुसरून त्याचा जीवनक्रम ठरतो, हे बऱ्याच अंशांनी खरे असले, तरी माणसाला स्वतःचा जीवनक्रम घडविण्याची थोडीफार स्वतंत्रता व तसे करीत असताना सामाजिक संस्कृती बदलण्याचीही थोडीफार शक्ती असते. व्यक्तीच्या क्रियेला ज्या वेळी सामाजिक संमतीचे शिक्कामोर्तब होते, तेव्हा ही क्रिया संस्कृतीच्या ओघात मिळते व मिळता मिळता त्या ओघाला वळणही लावते.

कित्येकदा संस्कृतीतल्या विशिष्ट विधि-विधानांचे कर्तृत्व एखादा देव, ऋषी किंवा राजा यांच्याकडे दिलेले असते. तशा कथाही घडवलेल्या असतात. सर्व जगभर अशा संस्कृतिनिर्मि-

तीच्या कथा पसरलेल्या आहेत. स्वतः करायचे, ते रूढ करायचे आणि त्या कृत्याचा दबदबा वाढविण्यासाठी त्याचे कर्तृत्व कोणत्या तरी देवाच्या, ऋषीच्या किंवा राजाच्या नावे जमा करून मोकळे व्हायचे, हा माणसाचा आवडता छंद आहे. खरे पाहता देव, ऋषी किंवा राजे कायदे किंवा विधिनिषेध निर्माण करीत नाहीत. ते माणूसच निर्माण करतो. विवाहसंस्था श्वेतकेतूने निर्माण केली नाही. ती निर्माण होऊन कित्येक पिढ्या लोटल्यावर माणसांनी ती श्वेतकेतूच्या नावावर चढवली. तशी कथाही निर्माण केली. या देशात यज्ञसंस्थेची पाळेमुळे घट्ट झाल्यावर मग ब्राह्मणग्रंथांतल्या अर्थवादात्मक कथा उत्पन्न झाल्या. भारतात असंख्य जाती निर्माण होऊन त्या पिढ्यान्‌पिढ्या नांदत आल्या. त्यांचे परस्परव्यवहाराचे संबंध रूढीने दृढ झाले आणि मग कधी तरी मनूने ते सर्व आचार, विचार आणि संबंध एकत्र करून त्यांची संहिता तयार केली.

समाजातल्या चांगल्या गोष्टींची जी अवस्था, तीच वाईट गोष्टींची. एखाद्या संस्कृतीत जे चांगले किंवा वाईट आढळते त्याला विशिष्ट व्यक्ती किंवा वर्ग फारसे जबाबदार नसतात.

संस्कृती ही समाजाच्या अंतर्बाह्य जीवनातून बनत असते. अप्रत्यक्षपणे प्रत्येकजण ती घडवीत असतो. तिच्या परिवर्तनात प्रत्येकाचा हात असतो.

इतिहासाच्या कोणत्याही कालखंडाचा विचार केला तर असे आढळेल, की प्रत्येक व्यक्ती विशिष्ट संस्कृतीत जन्मते, तद्विशिष्ट वातावरणात वाढते व बुद्धीची वाढ होण्याच्या आतच त्या संस्कृतीची मूल्ये आत्मसात करते. ती मूल्ये सहसा बदलत नसतात. कारण ती अबुद्धिपूर्वकच समाजातील व्यक्तींच्या मनात दृढ झालेली असतात. या मूल्यांच्या विरुद्ध बऱ्याच व्यक्ती जेव्हा एकसमयावच्छेदाने बंड करून उठतात, तेव्हाच ती मूल्ये बदलतात. पुष्कळदा अशा बंडखोर व्यक्तींना अपयशही पदरात घ्यावे लागते.

संस्कृतीत बदल होण्यास त्या संस्कृतीत जन्मलेल्या व्यक्तींचे गुण किंवा वर्तन जसे कारणीभूत होते, तसेच अन्य संस्कृतीशी संबंध आला असताही परिवर्तनाला चालना मिळते. या बाबतीत श्री. इरावती कर्वे लिहितात — मानवांच्या समतेबद्दल भारतात बुद्धापासून वैष्णवांपर्यंत निरनिराळ्या व्यक्तींनी व पंथांनी चळवळ केली; पण त्या चळवळींचा म्हणावा तसा उपयोग झाला नाही. मानवी समतेची बुद्धाची कल्पना व वैष्णवांची कल्पना मोक्षमार्गाबद्दल होती; सामाजिक व्यवहार, विशेषतः बेटीव्यवहारांबद्दल नव्हती. पाश्चिमात्यांचे एकछत्री राज्य, मिशनऱ्यांची धर्मपरिवर्तनाची चळवळ, स्वातंत्र्ययुद्धाच्या लढाईत पुढाऱ्यांना एकोप्याच्या आवश्यकतेची झालेली जाणीव, 'समता ही एकोपा साधण्याची गुरुकिल्ली होय,' या तत्त्वाचे ज्ञान व पाश्चिमात्यांच्या लोकसत्तेच्या कल्पना, ह्यांमुळे जातिभेद व अस्पृश्यता ह्या प्रश्नांना चालना मिळाली. ह्या बाबतीतही व्यक्ती प्रभावी की संस्कृती प्रभावी हा प्रश्न विचारल्यास संस्कृति-संस्कृतींच्या संगमाचा प्रभाव जास्त असेच म्हणावे लागेल.

संस्कृतीच्या अंगोपांगांची निर्मिती व्यक्ती-व्यक्तीकडूनच होत असते. मात्र असे असले, तरी विशिष्ट व्यक्तीला त्या निर्मितीचे श्रेय देता येणार नाही; परंतु व्यक्ती आणि वर्ग संस्कृतीच्या निरनिराळ्या अंगांचा भरपूर फायदा घेताना दिसतात. ब्राह्मण व वरिष्ठ वर्ग यांनी आजवर संस्कृतीतल्या जातिव्यवस्थेचा निश्चितपणे फायदा घेतला आहे. पुरुषवर्गाने पितृप्रधान कुटुंबपद्धतीचा लाभ उठवला, हेही तितकेच खरे. ज्या समाजव्यवस्थेत एखाद्या व्यक्तीचा किंवा वर्गाचा फायदा होत असतो, ती समाजव्यवस्था बदलायला ती व्यक्ती किंवा तो वर्ग तयार नसतो, असा अनुभव आहे. त्यासाठी अशा व्यक्ती किंवा वर्ग हे जुन्या समाजसंस्था या ईश्वरप्रणीत असून, त्या नीतिधर्माला धरून आहेत, असे इतरांना भासविण्याचा सतत प्रयत्न करीत असतात. पुनर्जन्म व कर्मफल या वेदान्तातील कल्पनांचाही हे लोक त्या कामी फायदा घेतात.

निरनिराळ्या परिस्थितीत मानवाला जीवनासाठी सतत झगडत राहावे लागते. सामाजिक झगडेही त्यातच येतात. अशा या संघर्षमय जीवनाला भाषेचे साहाय्य मिळते आणि त्या झगड्यात मानवाने जे इंद्रियग्राह्य व बुद्धिग्राह्य असे काही निर्मिले असेल, त्याला भाषेचे साहाय्य मिळते आणि त्यामुळेच त्याला संस्कृती असे नामाभिधान प्राप्त होते. माणूस भाषेच्या द्वारे संस्कृती दुसऱ्याला देतो व दुसऱ्याकडून स्वतःही ग्रहण करतो. या आदानप्रदानाच्या प्रक्रियेमुळे संस्कृतीत सतत बदल घडत राहतो. शतकाच्या कालखंडानंतर हा सूक्ष्म बदल घडता घडता मोठे रूप धारण करतो. अशा वेळी 'धर्म बुडाला', 'संस्कृती नष्ट झाली' अशी ओरड स्थितिवादी प्रवृत्तीची माणसे करू लागतात; पण तो बदल त्यांना थांबवता येत नाही. सगळेच बदल काही वाईटासाठी होत नसतात. काही देशकालानुरूप चांगल्यासाठीही होतात, म्हणून केवळ बदल झाला यासाठी ओरड करणे जसे योग्य नव्हे, तसेच बदल झालाच पाहिजे, असा अट्टाहास करणेही योग्य नव्हे. व्यक्तींचे आचार–विचारांचे स्वातंत्र्य नष्ट झाल्यास संस्कृती म्हणजे एक डबके बनेल. तिचा प्रवाह अखंड वाहत राहिला पाहिजे आणि तिच्यात विचारवंत व बंडखोर अशा व्यक्तींचे नवे नवे झरेही निर्माण होत राहिले पाहिजेत.

**भारतीय संस्कृती** — भारत हा एक खंडप्राय देश आहे. यात कमीत कमी ६–७ हजार वर्षांचा इतिहास आहे. देश प्रचंड, तसेच

इथे येऊन सरमिसळ झालेले मानववंशही अनेक. या सर्व मानववंशांनी या भूमीवर संस्कृती निर्माण केली. तिच्यात परिवर्तनेही झाली. यांतली बरीचशी परिवर्तने आणि फरक भूगोलामुळेही झालेले आहेत. इथे भौगोलिक विषमता व विभिन्नता खूपच आहे. मूळ सांस्कृतिक तत्त्व एकच असले, तरी प्रादेशिक विषमतेमुळे त्यावर विविध रंग चढले आहेत. या सर्वांचा स्थूल मानाने विचार करता भारतीय संस्कृतीची तीन विधायक अंगे मानावी लागतात– (१) भूमी (२) भारतीय जन (३) भाषा व साहित्य. या तीन्हींचा क्रमाने विचार असा–

(१) भूमी – या खंडप्राय देशाला भारतवर्ष अशी संज्ञा मिळाली आहे. हे नाव सर्व जनांना प्रिय व आदरणीय आहे. वर्ष शब्दाचा अर्थ वृष्टिसंस्थान असा होतो. हिमालयापासून कन्याकुमारीपावेतो हा देश एकाच वृष्टिसंस्थानात येतो. याला भारत हे नाव का पडले, याची उपपत्ती डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांनी सांगितली आहे, ती अशी–

भरत या नावाची आर्यांची एक पराक्रमी शाखा होती. तिने पंजाबात आपली वस्ती मांडली. तिला भरत जनपद असे नाव मिळाले. ब्राह्मणकालात भरत जनांचा अंतर्भाव कुरुपांचालांच्या क्षत्रियात झाला. या भरत जनपदाचे राजकीय प्रभुत्व वैदिक काळातच प्रस्थापित झाले होते. पुढे या भरतांनी गंगा–यमुनांच्या अंतर्वेदीपर्यंत आपली सत्ता वाढवली. त्यामुळे भारत हे नावही सगळ्या व्याप्त प्रदेशाला लागू झाले आणि तेच पुढे आसमुद्र समस्त देशाचे वाचक बनले. भारतीय संस्कृतीच्या मौलिक एकात्मतेचा प्रबळ आधार म्हणजे भारतवर्ष होय.

प्रारंभी या भूमीवर छोटी छोटी गणराज्ये कारभार करीत होती. त्यांची स्मृती आजही काही अंशी कायम आहे. आजही भारतातल्या कित्येक प्रदेशांची नावे गणवाचकच आहेत. अंग, वंग, कलिंग, मत्स्य, मगध, कोसल, गांधार, केकय, सिंधू, सौराष्ट्र ही प्रदेशनामे गणवाचकच आहेत. हे गण आपल्या राज्याच्या चतुःसीमेच्या भूमीला मातृभूमी मानून तिच्याविषयी श्रद्धा वाळगीत होते. पण इतिहासाने माणसांच्या या संकुचित दृष्टीत बदल घडवून आणला. या देशात गेल्या हजारो वर्षांत ज्या ऐतिहासिक घडामोडी झाल्या, जी स्थलांतरे आणि संक्रमणे झाली, त्यामुळे लोकांना फार मोठ्या भूमीची आणि तिच्या भिन्न भिन्न रहिवाशांची ओळख झाली. त्यांच्यांत सांस्कृतिक आणि वैचारिक देवाणघेवाणही झाली. त्यातून ही विशाल भूमी म्हणजे भारतभूमी आहे आणि आपण भारतभूमीची लेकरे आहो, ही भावना उगम पावली. आज हजारो वर्षे हिमालयात वास्तव्य करणाऱ्या माणसाला तमिळनाडूमधली कन्याकुमारी ही आपलीच भूमी वाटते. या भूमीशी इथल्या मानवाने आपला माता-पुत्रसंबंध प्रस्थापित केला. 'माता भूमिः पुत्रोऽहं पृथिव्याः' असे अथर्ववेदात उद्घोषित केले आहे. मातृभूमीला महती देवता मानून तिच्यावर वसलेल्या मानवजीवनाला श्रेष्ठ बनवण्याचा भाव भारतीय साहित्यात प्राचीन काळापासून आढळून येतो. 'भारतभूमी ही स्वर्ग व मोक्ष या दोहोंच्याही प्राप्तीला उपकारक व साधनभूत आहे', असे विधान विष्णुपुराणात आहे (२.३.२४).

आर्य लोक जेव्हा गटागटाने पंजावच्या भूमीवर आले, तेव्हा त्यांचा समस्त देशाशी एकदम परिचय झाला नाही. ते सिंधू नदीपासून गंगा नदीपर्यंतच्या प्रदेशालाच भारत-वर्ष मानीत होते. उत्तर वैदिक कालात आर्यांच्या भूमिपरिचयाचे क्षेत्र अधिक वाढले. शतपथ ब्राह्मणातल्या विदेघ माथवाच्या कथेवरून कळते, की त्या काळी आर्यांनी सदानीरा (गंडकी) नदीपर्यंत आपला यज्ञाग्नी पोचवला होता. त्यांनी त्या प्रदेशाला प्राच्य देश असे नाव ठेवले. मनुस्मृतीच्या काळी सरस्वती व दृषद्वती यांच्या मधल्या भूमीला ब्रह्मावर्त म्हणत. पुढे ब्रह्मावर्ताचा विस्तार ब्रह्मर्षी देशाच्या रूपाने झाला. त्यात कुरुक्षेत्र, मत्स्य (जयपूर व अलवार), शूरसेन (मथुरा, आग्रा, अलिगड, इ.) व पांचाळ (कनोज, फरुकाबाद, बरेली, इ.) या प्रदेशांचा समावेश झाला. गंगा-यमुनांच्या उत्तर तीरावरील हा प्रदेश मनूच्या दृष्टीने अत्यंत आदर्श होता. तो म्हणतो–

> एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
> स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ।।
>
> (मनु. २.२०)

अर्थ – या ब्रह्मर्षिदेशात उत्पन्न झालेल्या ब्राह्मणांकडून पृथ्वीतल्या सर्व मानवांनी आपापले चरित्र शिकून घ्यावे.

ब्रह्मर्षिदेशातल्या या सदाचारामुळे भारताच्या स्थूल भौगोलिक प्रदेशाला पुण्यभूमी अशी प्रतिष्ठा लाभली. हा देश यज्ञप्रधान होता; नीती, त्याग आणि तपस्या यांचा आदर्श होता.

क्रमिक देशविस्ताराची वरची श्रेणी म्हणजे मनूचा मध्यदेश होय. उत्तरेला हिमालय, दक्षिणेला विंध्य, पूर्वेला मगध आणि पश्चिमेला विनशन क्षेत्रात गुप्त होणारी सरस्वती नदी एवढा त्या मध्यदेशाचा विस्तार होता. बौद्ध वाङ्मयातही हाच त्याचा विस्तार सांगितला आहे. एवढ्या मोठ्या प्रदेशात आर्यांचे उपनिवेश स्थापित झाले. हा आर्यक्षेत्राचा विस्तार पाणिनीच्या पूर्वकाळीच झाला होता. पाणिनिकालात त्या प्रदेशाला आर्यावर्त म्हणू लागले. या आर्यावर्ताच्या चतुःसीमा मनू पुढील श्लोकात सांगतो– (मनु २.२२)

> आसमुद्रात्तु वै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात् ।
> तयोरेवान्तरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः ।।

अर्थ – पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत आणि उत्तरेस हिमालय व दक्षिणेस विंध्य या चतुःसीमांमधल्या प्रदेशाला विद्वान लोक आर्यावर्त असे म्हणतात.

प्राचीन काळी विंध्य पर्वताच्या दक्षिण भूप्रदेशाला आर्यावर्तातले लोक अंधकारमय प्रदेश, यमाची भूमी किंवा राक्षसांची भूमी असे म्हणत. हळूहळू त्या प्रदेशाविषयी जिज्ञासा वाढू लागली आणि हा दक्षिण प्रदेश कसा काय आहे, तो एकदा तरी पाहूयाच, असा विचार करून काही साहसी ऋषी आपला यज्ञाग्नी घेऊन त्या यात्रेला निघाले. ते वाट काढीत विंध्याच्या दक्षिण अंगाला उतरले. या मोहिमेचा अग्रदूत अगस्त्य ऋषी होता.

अगस्त्याला दक्षिणेत आर्यसंस्कृतीचा फैलाव करायचा होता. दक्षिणेतही थोड्या वेगळ्या रंगाची पण आपल्यासारखी माणसेच आहेत, असे त्याला आढळून आले. इतर कल्पना भ्रममूलक ठरल्या.

सनपूर्व सुमारे ८०० ते ९०० वर्षे हा या अगस्त्याचा प्रवासकाल असावा, असे डॉ. भांडारकर सांगतात. दक्षिणेत यज्ञसंस्थेचे बीजारोपण यानेच केले. त्याच्याच सांगण्यावरून दक्षिणेतले राजे व सामंत यज्ञ करू लागले. अगस्त्याने आर्यधर्माच्या प्रचाराबरोबरच तिथल्या लोकांची संस्कृती जाणून घेतली आणि आर्य–द्रविड संस्कृतींचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. त्याने तमिळ भाषेचे अध्ययन करून तिचे एक बृहद् व्याकरणही रचले. आर्यांचे वेद आणि संस्कृत भाषा त्याने तिकडे प्रविष्ट केली. आर्यांच्या कथा-गाथा त्यांना ऐकवल्या. तमिळ भाषेच्या वृद्धीसाठी तिकडील कवींचा एक संघही स्थापिला. दक्षिणापथाच्या या प्रवासात त्याने पूर्व अंगाची अनेक जंगले तोडून तिथे नव्या वसाहती उभारल्या. त्या कामी त्याला दक्षिणेतील वेळीर व अरुवालर या दोन जमातींनी खूप मदत केली.

अगस्त्याने निर्मिलेल्या या पायवाटेने मग अनेक ऋषिमुनी आपापल्या शिष्यांसह दक्षिणेत उतरले आणि त्यांनी यज्ञसंस्थेच्या द्वारे उभय संस्कृतींचा मैत्रीव्यवहार प्रस्थापित केला. या ऋषिमुनींनी तिकडील मुलींशी लग्ने करून आपापले संसार उभे केले. अगस्त्याची भार्या लोपामुद्रा ही दक्षिणेतल्याच एका जातीची होती, अशी कथा आहे.

दक्षिणापथाचा पूर्वभाग अशा प्रकारे भारतवर्ष या संज्ञेखाली आला. वेद हे वायव्य दिशेकडून भारतात उतरलेल्या आर्यजनांचे सूक्तसंग्रह. त्यांचा आणि दक्षिणेतील लोकांचा सुतराम संबंध नव्हता; पण आजमितीस उत्तरेपेक्षाही दक्षिणेचा वेदाभिमान अधिक जाज्वल्य आहे.

जे कार्य दक्षिणापथाच्या पूर्वभागात अगस्त्याने केले, तेच काम पश्चिम सागराच्या तीरावर थेट केरळापर्यंत परशुरामाने केले. वैतरणेपासून तो कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशालाही मध्ययुगीन ग्रंथांत परशुरामक्षेत्र अशी संज्ञा दिलेली आढळते. परशुरामानेही उत्तरेतून विद्वान ब्राह्मणांची किती तरी कुळे या प्रदेशात आणली आणि या भूमीवर वसवली. चित्तपावन ब्राह्मण, गौड सारस्वत ब्राह्मण, केरळातले नंपूतिरी ब्राह्मण या जाती, परशुरामानेच आपल्याला इकडे आणले, अशा कथा सांगतात. जे प्रेम दक्षिणापथाच्या पूर्वभागात अगस्त्याला मिळाले, तेच पश्चिम भागात परशुरामालाही मिळाले. या भूपट्टीतल्या जातीजमाती आजही परशुरामाला भजताना दिसतात.

अशा प्रकारे अगस्त्य आणि परशुराम या दोन साहसी पुरुषांनी दक्षिण व उत्तर यांची सांधेजोड केली. त्यामुळे हा प्रदेशही भारतभूमी या नामाभिधानाला पात्र ठरला आणि मग पुराणांत भारताच्या चतुःसीमा सांगितल्या गेल्या, त्या अशा –

आयतोह्या कुमारिक्यादागङ्गाप्रभवाच्च वै।

(वायुपु. ४५.८१)

अर्थ – कन्याकुमारीपासून गंगेच्या उगमस्रोतापर्यंत पसरलेला देश तो भारत होय.

डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांनी याच गोष्टीचे भावनात्मक महत्त्व विशद करताना एक मधुर कल्पना सांगितली आहे, ती अशी –

शिव हा सर्वश्रेष्ठ देव. जगताचा पिता. तो उत्तरेस कैलास पर्वतावर राहतो. पार्वती ही जगन्माता. कन्याकुमारी हा तिचाच अवतार. ती भारताच्या दक्षिण टोकावर राहते. तिची नजर कैलासपतीकडे लागली आहे आणि कैलासावरून शिवाची प्रेमळ दृष्टी सतत तिचा वेध घेते आहे. या जगाच्या माता-पितरांच्या दृष्टिसंगमाचे पवित्र क्षेत्र म्हणजे भारतभूमी होय.

(२) जन – भारतभूमी ही अनेक जनजातींना आपल्या अंकावर घेऊन बसली आहे. ही एकच मातृभूमी हजारो जनजातींना आपले स्तन्य शतधारांनी पाजीत आहे. हे वास्तव सत्य अथर्ववेदाच्या काळीच द्रष्ट्या ऋषींना जाणवले. पुढील मंत्र हा या द्रष्टेपणाचा द्योतक आहे–

जनं विभ्रती बहुधा विवाचसं नानाधर्माणं पृथिवी यथौकसम्।

(अथर्व. १२.१.४५)

भावार्थ – मातृभूमी ही ध्रुवधेनू आहे. ती निश्चल भावाने स्थित आहे. नाना प्रकारचे जन तिच्यावर आपापल्या स्थानी वसले आहेत. त्या सर्वांना ही मातृभूमी समान प्रेमाने पाळीत आणि पोषीत आहे.

हा मंत्र म्हणजे भारताच्या राष्ट्रीय संस्कृतीचे संविधानपत्रच आहे, असे डॉ. वासुदेवशरण म्हणतात. या मंत्रात प्रत्येक जातीच्या सुरक्षिततेचा संदेश आहे. भाषा, धर्म आणि जन यांच्या वैशिष्ट्यांच्या रक्षणाचे हे शाश्वत अभयपत्र आहे. हे तत्त्व

केवळ ग्रंथगतच राहिले नसून, ते लोकजीवनाच्या रोमरोमात भिनलेले आहे. जनजातींच्या विषयात सहिष्णुतेची ही भावना राष्ट्रीय कल्याणाला उपकारक ठरली आहे.

भारतात जितक्या विभिन्न जातिजमाती आहेत, तितक्या त्या जगाच्या पाठीवरील कोणत्याही देशात नाहीत. भिन्न जाती आणि भिन्न रंगरूपे यांचे इथे वैपुल्य आहे. आर्य, द्रविड, निषाद, किरात, शक, पल्हव, पारद, यवन, हूण, तुषार, कांबोज, किन्नर, ब्रह्म, असुर, राक्षस, शबर, कोल, मुंड, तोड, भिल्ल, चेंचू, पुक्कस, नाग, वारली, ठाकूर, कातकरी, इ. असंख्य जातीजमाती भारतीय जनसागरात समरसून गेल्या आहेत. ज्या जाती बाहेरून इकडे आल्या आणि रुळल्या, त्यांचे आगमन, राहणी, वृद्धि-क्षय, इत्यादींच्या रोमहर्षक कथा इतिहास-पुराणांत आढळतात. वर उल्लेखिलेल्यांपैकी बऱ्याच जनजाती या आदिवासी समजल्या जातात. आसाम, छोटा नागपूर, बस्तर, हैदराबाद, तमिळनाडू-मधली जंगले, सह्यांद्रीची दरीखोरी ही आदिवासींची मुख्य स्थाने होत. अतिप्राचीन काळापासून या आदिम जमाती या देशात नांदत आहेत. आजच्या राष्ट्रीय दृष्टीने त्यांच्या पृथक्‌पणावर भर देणे अनुचित आहे. शिवाय, हे पार्थक्य हिंदू या महासंज्ञेत विरून गेलेले आहे.

इथल्या विविध जनजीवनाचे दुसरे एक वैशिष्टच असे, की या सर्व जाती विभिन्न स्तरावर समाजात आपल्या जीवननिर्वाहाच्या कामी स्वतंत्र राहिल्या आहेत. प्रत्येक जात इथे आंतरिक स्वातंत्र्याचा उपभोग घेत आहे. भाषा, धर्म, दैवते, श्रद्धा, सामाजिक संस्कार, इ. सर्व विषयांत प्रत्येक जात आपल्या इच्छेनुसार आचरण करायला स्वतंत्र आहे. इथे सर्व जातींना एकाच साच्यात कोंबण्याचा कोणी प्रयत्न केला नाही. त्यामुळे भारतीय संस्कृतीत आचार, विचार आणि श्रद्धा यांचे अनेक कोश संपुटित झाले आहेत.

भारतीय जनांतला एक मोठा समुदाय द्रविड जनांचा आहे. तेलुगू, कन्नड, तमिळ व मलयाळम या द्रविड भाषा बोलणारे लोक आंध्र, कर्नाटक, तमिळनाड व केरळ या प्रदेशात राहतात. भारतातले $\frac{1}{4}$ लोक द्रविड भाषा बोलणारे आहेत. एका काळी हे द्रविड भारताच्या वायव्येस, पश्चिमेस व मध्य भारतात प्रबळ होते, असे सांगतात. मध्य भारतातील गोंडी भाषा ही द्रविड-परिवारातलीच आहे, असे भाषाशास्त्रज्ञांचे मत आहे. या द्रविडांचा व आर्यांचा संपर्क हजारो वर्षांपूर्वी झाला आणि त्या दोन समुदायांमध्ये सांस्कृतिक आदान-प्रदान बऱ्याच प्रमाणात झाले. या गोष्टीला पुराणांची साक्ष आहे. भारताच्या समन्वित संस्कृतीच्या निर्मितीत द्रविडांचा फार मोठा वाटा आहे, असे संशोधनांती सिद्ध झाले आहे. द्रविड भाषेचे अनेक शब्द संस्कृत भाषेतही येऊन वसले आहेत. त्याच बरोबर आर्य भाषेतले किती तरी शब्द द्रविड भाषांनी खुल्या दिलाने स्वीकारले आहेत. मलयाळम्‌मध्ये शेकडा ८०, तेलुगूमध्ये शेकडा ६०, कन्नडमध्ये शेकडा ५० आणि तमिळमध्ये शे. ३० शब्द संस्कृत भाषेतले आहेत.

इथल्या कित्येक जातींचे भारतातच अनेक ठिकाणी स्थलांतर झालेले आहे. पंजाबचे मालवगण इ. स.च्या तिसऱ्या शतकापूर्वी आपल्या जन्मभूमीतून उठून उत्तर राजस्थानात आले आणि तिथूनही पुढे अवन्ती प्रदेशात शिरून उज्जयिनीच्या चारही बाजूंस स्थायिक झाले. मालवांमुळेच उज्जयिनीकडील प्रदेशाला माळवा असे नाव पडले. उशीनर देशाचे निवासी हे शिवी गण होत. ते तिथून निघून राजस्थानातील उदयपूरनजिकच्या मध्यमिका नगरीत येऊन वसले. तिथे त्यांचे शिलालेख मिळालेले आहेत. पंजाबच्या आग्नेय भागातील अग्रवाल जातीचे लोक उ. प्रदेशात व राजस्थानात येऊन सर्वत्र पसरले. मथुरेचे यादव प्रथम द्वारका आणि तिथून खाली उतरत उतरत म्हैसूरपर्यंत येऊन पसरले. दक्षिण भागात त्यांनी राज्येही मिळवली. सारस्वत ब्राह्मण असेच पंजाबच्या भागातून निघून पूर्वेस बंगाल व दक्षिणेस कोकण-पट्टीत वसते झाले. कऱ्हाड प्रदेशातल्या ब्राह्मणांनी कोकणात स्थलांतर केले. महाभारताच्या आदिपर्वावरून कळते, की एकाच कुरुवंशातल्या अनेक राजांनी विविध जनपदांतल्या मुली परणून आणल्या. कुरूने कोसल, प्राचिन्वानाने अश्मक, सार्वभौमाने कैकय, जयत्सेनाने विदर्भ, अक्रोधाने कलिंग, देवातिथीने विदेह, भरताने काशी, भूमन्यूने दशार्ह, विदूरथाने मगध, हस्तीने त्रिगर्त, प्रतीपाने शिबी, धृतराष्ट्राने गंधार आणि पंडूने मद्र या जनजातींशी आपल्या सोयरिकी जमवल्या.

जनजातींच्या अशा अनेक उलाढाली इथे झाल्या आहेत आणि कित्येकांच्या वेगळ्या अस्तित्वाच्या खुणाही नष्ट झाल्या आहेत. या सर्व जनजातींच्या श्रद्धा, आचारपरंपरा, उपासना, संस्कार-पद्धती, रूढी, व्रते, इ. गोष्टींचे संकलन करून पुराणकारांनी आपला प्रपंच विस्तारला आहे. 'आचंडाल सर्व जातीजमातींना आम्ही उद्धाराचा मार्ग दाखवून पुनीत करू,' अशी त्यांची प्रतिज्ञाच आहे.

(३) भाषा व साहित्य – भाषेची निर्मिती ही माणसाची एक अत्युत्तम कृती आहे. मनुष्य भाषेच्या द्वारेच बोलू व विचार मांडू शकतो, भाषेमुळेच माणसा-माणसांतील व्यवहार चालू शकतात. भाषेमुळे माणसाला प्रेरणा मिळते आणि त्याच्या भावनांचाही परिपोष होतो. संस्कृत भाषा ही भारताची धर्मभाषा असून, ती संस्कृतीलाही आश्रयभूत आहे, 'संस्कृतिः संस्कृताश्रिता'. भारतीय संस्कृती संस्कृत भाषेच्या आश्रयाने वाढली-

विस्तारली. वैदिक कालापासून सूत्रकालापर्यंत जे वाङ्मय आर्यावर्तात निर्माण झाले, ते संस्कृत भाषेमध्येच होते. वेदांची भाषा तत्कालीन लोकांच्या बोलीभाषेला जवळची होती. वेदांतली शब्दावली, त्यांतले भाव, त्यांतले काव्य, त्यांतले अर्थालंकार हे सगळे आपल्याला भारतीय साहित्याच्या प्राचीन परंपरेपर्यंत घेऊन जातात. या देशात अनेक भाषा प्रचलित आहेत. त्यांपैकी बहुतेक भाषांचे मूळ संस्कृत भाषा हेच आहे. संस्कृताच्या ब्रह्मसरोवरातून अनेक प्रादेशिक भाषांच्या धारा निर्गत झाल्या आहेत. बुद्ध आणि महावीर यांच्या कालात भारतातल्या प्राकृत भाषांचा उदय झाला. बौद्धांचे त्रिपिटक साहित्य पाली भाषेत आणि जैनांचे अंग साहित्य अर्धमागधीत निर्माण झाले. पण इ. स. च्या पहिल्या शतकातच बौद्धांनी आपली धर्मभाषा म्हणून संस्कृत भाषेला जवळ केले. महाकवी अश्वघोषाने आपले बुद्धचरित हे महाकाव्य पाली भाषेत न लिहिता संस्कृतातच लिहिले. गुप्तकालातच त्रिपिटकाचा संस्कृत अनुवाद झाला. सर्वास्तिवादी महासांघिक व सम्मितीय हे बौद्धांचे उपसंप्रदाय होत. त्यांनीही संस्कृत भाषाच स्वीकारली. गुप्तकालात मध्य आशियापासून दक्षिणोत्तर भारत आणि आग्नेयीकडील द्वीपे या सर्व प्रदेशांची संस्कृत ही धर्मभाषा, राष्ट्रभाषा व कविभाषा बनली. या सुवर्णयुगात संस्कृत भाषेने राष्ट्राच्या विचारात तेज, साहस आणि आत्मविश्वास यांची अभूतपूर्व सृष्टी केली. गुप्तकालात जैन आचार्यांनीही संस्कृत भाषेत ग्रंथरचनेला प्रारंभ केला. सिद्धसेन दिवाकर या मेधावी आचार्याने संस्कृतात अनेक द्वात्रिंशिका (बत्तिश्या) लिहिल्या. या काळात जैन विद्वान जे संस्कृताच्या क्षेत्रात उतरले, ते पुढे एक हजार वर्षेपर्यंत तिथे ठाण मांडून राहिले.

अनेक धार्मिक आणि दार्शनिक विचारांची परंपरा इथे वेदकालापासूनच सुरू होते. वैदिक साहित्य हे खऱ्या अर्थाने भारतीय विचारधारांचे जन्मस्थान आहे. सृष्टी, चैतन्य, प्रकृती, पुरुष, प्राण, ऋत, सत्य, आत्मा, परमात्मा, ईश्वर या गोष्टी दार्शनिक क्षेत्रातल्या आहेत. त्या सर्वांचे उगमस्थान वैदिक साहित्यातच आढळते. वैदिक भाषा ही भारतीय संस्कृतीच्या एकात्मतेचे मूळ बीजच आहे. या वैदिक साहित्याची अध्ययन-अध्यापनाची परंपराही या देशात सर्वत्र एकाच प्रकारची राहिली आहे. वैदिक सूक्तांचे मौखिक परंपरेने ग्रहण करून आणि एक स्वरही बिघडू न देता त्यांचा स्वाध्याय करणे हे आश्चर्यजनक कार्य इथे वैदिकांनी गेली सहा-सात हजार वर्षे अबाधित ठेवले आहे. श्रौतसूत्रांनी यज्ञयागादी कर्मकांड आणि गृहस्थांचे सर्व संस्कार संस्कृत भाषेतच प्रयोगबद्ध केले आणि आजही त्या त्या यज्ञक्रिया आणि ते ते संस्कार त्याच भाषेत देशभर चालू आहेत.

भारत हा खंडप्राय देश असल्यामुळे इथे विचारांची विभिन्नता निर्माण होणे स्वाभाविकच होय. या भिन्न भिन्न विचारांचे दर्शन भारतीय तत्त्वज्ञानात आढळून येते. मुद्दाम उल्लेख करण्याजोगी गोष्ट ही, की इथे कोणताही भिन्न व नवा विचार दडपला गेला नाही. आपला विचार मुक्तपणे अभिव्यक्त करण्याची स्वतंत्रता प्रत्येकाला जशी या देशात मिळाली, तशी ती मध्ययुग संपेपर्यंत युरोपीय देशातही मिळाली नाही. इथे आस्तिक दर्शने जशी निर्माण झाली, तशी नास्तिक दर्शनेही निर्माण झाली. ईश्वर, लोक, परलोक, आत्मा, जीव, संसार, कर्म, पाप, पुण्य, स्वर्ग, नरक, पुनर्जन्म, द्वैत, अद्वैत, ज्ञान, मोक्ष, इ. विषयांत इथे प्रज्ञावंतांनी मुक्तपणे विचार केला.

भारताच्या धार्मिक व दार्शनिक जगात विचारांची सहिष्णुता, प्रचार, परस्पर आदान-प्रदान, यांचा जो एक अभूतपूर्व प्रयोग झाला, तो या देशाच्या इतिहासाचे महत्त्वपूर्ण अंग ठरला आहे.

वाल्मीकीचे रामायण आणि व्यासांचे महाभारत हे दोन महान ग्रंथ निर्माण झाले आणि ते थोड्याच कालात आसेतुहिमाचल भारताचे राष्ट्रीय ग्रंथ ठरले. रामायणाचा नायक दाशरथी राम आणि महाभारतात तत्कालीन जगाची सूत्रे हालवणारा श्रीकृष्ण हे दोघेही या देशात परम उपास्य झाले. रामकृष्णांचे मंदिर नाही आणि राम-कृष्णांचे काव्य किंवा नाटक नाही असा एकही प्रदेश, एकही भाषा या देशात आढळणार नाही. भारतातल्या सर्व प्रस्थापित भाषांमध्ये रामायण-महाभारताचे मुक्त अनुवाद झाले आहेत. याशिवाय ज्या शेकडो हजारो बोली इथ बोलल्या जातात, त्यांमध्येही राम-कृष्णांची कथा आढळल्यावाचून राहत नाही. रामायण-महाभारत हे समस्त भारतीय भाषांचे उपजीवक ग्रंथ ठरले आहेत.

पाणिनीची अष्टाध्यायी सनपूर्व सहाशे वर्षे या कालात निर्माण झाली आणि आश्चर्याची गोष्ट ही, की तो साऱ्या देशात व्याकरणाचा अध्ययन ग्रंथ ठरला. 'आकुमारं यशः पाणिनेः' कन्याकुमारीपर्यंत पाणिनीचे यश पसरले, या उक्तीत हीच घटना अभिव्यक्त झाली आहे.

इ. स. च्या चौथ्या शतकात कालिदासाचा रघुवंश जन्माला आला आणि काव्याच्या अध्ययनात देशभर त्यालाही पहिले स्थान मिळाले.

नीतिग्रंथ आणि सुभाषिते हा संस्कृत वाङ्मयाचा एक मोठा ठेवा आहे. महाभारतातली विदुरनीती हे या देशाच्या व्यावहारिक ज्ञानाचे सार आहे. सुमारे पाचशेपन्नास श्लोकांचा हा नीतिसंग्रह भारतीय साहित्यातला कोहिनूर हिरा आहे. समस्त भारताची नीतिविषयक विचारसरणी समान स्वरूपाची ठेवण्याचे राष्ट्रीय कार्य या नीतिसंग्रहाने केले आहे. याच्याच

आधारे चाणक्य, भर्तृहरी, जगन्नाथ पंडित, इ. पुरुषांनी भारताचा नीतिविचार पुढे नेला. द. भारतात तिरुकुरळ या तमिळ ग्रंथाने तेच कार्य केले. वेमन्न या कवीने आंध्रात तेच नीतिविचार व्यक्त केले. तुलसीदास, कबीर, रहीम, गिरिधर, इ. लोकभाषी कविश्रेष्ठांनी महाभारतातलाच नीतिविचार नव्या ढंगाने प्रस्तुत केला. भारतीय लोकभाषांतील म्हणी व वाक्प्रचार पाहिल्यास त्यांतही तेच प्राचीन नीतिविचार व्यक्त झालेले आढळतात.

**भारतीय संस्कृतीची प्रमुख वैशिष्ट्ये** — भारताच्या सांस्कृतिक इतिहासाची वाटचाल पाहिल्यास तिच्यात तीन प्रमुख वैशिष्ट्ये दिसून येतात —(१) अखंडित परंपरा (२) राजकीय व धार्मिक सत्तांच्या केंद्रीकरणाचा अभाव आणि (३) संस्कृतिसंघर्ष टाळून संस्कृतिसंगम करण्याची प्रवृत्ती.

**(१) अखंडित परंपरा** — इंडो-जर्मॅनिक भाषांपैकी सर्वांत जुने वाङ्मय भारतातल्या संस्कृत भाषेत आहे. या वाङ्मयाला वेद म्हणतात. त्यांपैकी ऋग्वेदाचा काल सुमारे सात हजार वर्षांच्या आगेमागे मानतात. वेदग्रंथ मुखोद्गत करून मौखिक परंपरेच्या साहाय्याने त्यात कानामात्रेचाही फरक होऊ न देता ते पिढ्यान्पिढ्यांना शिकवणे हा प्रकार केवळ भारतातच दिसून येतो. त्या प्राचीन काळी प्रार्थनेसाठी, हवनासाठी किंवा आशीर्वादासाठी जे मंत्र, जसे सस्वर म्हटले जात, तेच मंत्र, तसेच त्याच कारणासाठी आजही म्हटले जातात.

कोणत्या ना कोणत्या स्वरूपात वेदांतील देवदेवता आजही पूजिल्या व उपासिल्या जातात. कित्येक वैदिक ऋषींची परंपरा गोत्ररूपाने आजही चालू आहे. गोत्रसंस्थेच्या बाहेरचे लोकही काश्यप गोत्र सांगताना दिसतात. त्या प्राचीन काळी सुरू झालेल्या सांस्कृतिक गोष्टी आजही भारतातून पूर्णतया नष्ट झालेल्या नाहीत. देशाच्या या ना त्या विभागात त्या जतन करून ठेवलेल्या आढळतात. पुराणवस्तुसंशोधनात ज्या प्रकारची मातीची भांडी सापडली आहेत, त्याच प्रकारची मातीची भांडी आजही देशात कुठे ना कुठे घडत असतात. प्राचीन शिल्पांतून किंवा चित्रांतून ज्या प्रकारच्या वेषभूषेच्या तऱ्हा आढळतात, त्याच प्रकारच्या वेषभूषेच्या तऱ्हा आजही कुठे ना कुठे प्रचारात आहेत. वैदिक युगापासून विसाव्या शतकापर्यंत यज्ञसंस्था ही अखंड परंपरेने चालत आलेली आहे. अथर्ववेदातले जादूटोणे, तोडगे, औषधींचे प्रयोग आजही बहुसंख्य लोकांच्या वापरात आहेत. पूर्वजांचे ग्रंथ, त्यांचे पोषाख, त्यांची दैवते, त्यांच्या चालीरीती, त्यांचे तत्त्वज्ञान, त्यांच्या नीतिविषयक कल्पना या सर्वांविषयी भारतात एक प्रकारे आपुलकीचा अभिमान दिसून येतो, याचे कारण या अखंड, अतूट परंपरेत शोधावे लागेल.

**(२) राजकीय व धार्मिक सत्तांच्या केन्द्रीकरणाचा अभाव** — ब्रिटिश राज्य या देशावर येण्याआधी भारतात सर्वांसाठी सारखा कायदा व त्याची सारखी अंमलबजावणी करील, अशी प्रबळ केंद्रीय सत्ता कधीच नव्हती. साम्राज्ये पुष्कळ झाली. भरताचे साम्राज्य, पांडवांचे साम्राज्य, मौर्यांचे साम्राज्य, गुप्तांचे साम्राज्य इत्यादी. एक तर सबंध भारतभर त्या साम्राज्यांचा अधिकार निर्माण झाला नाही व जेवढ्या भागावर झाला, तेवढ्या भागातही लोकांच्या दैनंदिन व्यवहारात आणि सांस्कृतिक आचारांत त्यांनी बदल केला नाही. स्वयंपूर्ण अशा प्रादेशिक गटागटांतून लोकांचे विशिष्ट प्रकारचे जीवन अबाधित चालू राहिले. प्राचीन काळापासून ब्रिटिशांच्या काळापर्यंत भारतात हजारो छोटीमोठी राज्ये नांदत होती. प्राचीन काळी तर विशिष्ट प्रदेशापुरती गणराज्येच चालू होती. ही सर्व लहानमोठी राज्ये एका केन्द्रीय सत्तेच्या अंमलाखाली आणण्याचा प्रयत्न चाणक्याने चंद्रगुप्त मौर्याकरवी केला. काही काल तो यशस्वीही झाला; पण मौर्यांची केंद्रसत्ता शिथिल झाल्याबरोबर जागोजागचे सुभेदार आपणच राजे म्हणून स्वतंत्र कारभार करू लागले.

धार्मिक बाबतीत तर सर्वंकष केन्द्रसत्ता कधीच निर्माण झाली नाही. एखाद्या विशिष्ट प्रेषिताचा आग्रह धरून देशभर त्याने उपदेशिलेल्या धर्मतत्त्वांचा दंडयुक्त प्रचार इथे कोणी केला नाही. ईश्वर एकच आहे, असे इथे संतांनी व तत्त्ववेत्त्यांनी सांगितले व लोकांनीही ते मानले. पण ख्रिस्त किंवा महंमद हा ईश्वराचा एकमेव प्रेषित आहे, असे या देशात कोणी सांगितले नाही. ख्रिस्ताला किंवा महंमदाला भजणारे व मानणारे तेवढेच काय ते स्वर्गाचे धनी व बाकीचे सारे नरकगामी, अशा प्रकारचा आग्रह कोणत्याही भारतीय धर्मपंथाने धरला नाही. भारतातले अंतिम मूल्य स्वर्ग नसून, मोक्ष हे आहे. त्यामुळे इथे स्वर्गाची कदर फारशी कोणी केली नाही. त्यामुळे जशा अनेक राजसत्ता, तसे अनेक धर्मसंप्रदाय इथे एकमेकांच्या शेजारी नांदले. परमेश्वर एकच असला, तरी त्याची भिन्न रूपे असायला हरकत नाही व त्यांची उपासना करायलाही हरकत नाही, असे या देशाने मानले. दुसऱ्या दैवताला कोणत्याही प्रकारे कमीपणा न आणता प्रत्येक जातीला किंबहुना प्रत्येक कुटुंबाला इथे स्वतःसाठी कोणतेही खास दैवत स्वीकारायला मोकळीक मिळाली. अशा गोष्टींमुळेच येथील सांस्कृतिक जीवनाचे स्वरूप केंद्रीकृत किंवा विशिष्ट ठशाचे असे झाले नाही. एका गटाचा, संप्रदायाचा किंवा जातीचा देव इतरांनी या ना त्या स्वरूपात आपल्याच देवाचा एक अंश कल्पिला.

**(३) संस्कृतिसंगमाकडे प्रवृत्ती** — हजारो वर्षांपासून हजारो लोक गटागटाने भारतात प्रवेश करून इथे वसले आहेत. या

प्रत्येक गटाच्या भिन्न भिन्न संस्कृतींचा इथे दीर्घकालीन संपर्क होत राहिला. असे असूनही या संपर्कातून एका संस्कृतीला पूर्णपणे दडपून टाकून किंवा तिला नष्ट करून दुसरीने जिवंत राहावे, असा तीव्र संस्कृतिसंघर्ष कधीच निर्माण झाला नाही. एका बाजूला जुने एतद्देशीय व दुसऱ्या बाजूला नवे परकीय यांच्यामध्ये नेहमी सांस्कृतिक तडजोडच होत राहिली.

त्यामुळे इथे जी एक समन्वित परंपरा इस्लामच्या अगोदर परिणत झाली, तिच्यात सर्व संस्कृतींची मूलतत्त्वे जिवंत राहिली. यावरून, निश्चितपणे असे म्हणता येते, की तडजोड किंवा समन्वय हा भारतीय संस्कृतीचा आत्मा आहे. भारतात अनेक देवदैवते सर्वत्र आणि विशिष्ट जातिपरत्वे पूजिली जातात. भारतीय संस्कृतीने त्यांच्यांत भेदभाव ठेवला नाही.

इथे वैदिक विष्णूइतकाच अवैदिक शिवही पूज्य ठरला. कोणत्याही देवाला केलेला नमस्कार एकाच परमेश्वराला पोचतो. 'सर्वदेवनमस्कारः केशवं प्रति गच्छति।' असे तत्त्वज्ञान या देशात निर्माण झाले. या देशात बहुपतित्व आहे; तसेच बहुपत्नीत्वही आहे. कुटुंबपद्धती पितृप्रधान आहे, तशी मातृप्रधानही आहे. इथे वेद मानणारे लोक आहेत, तसेच न मानणारेही आहेत कोणावर बहिष्कार नाही. कोणाशी झगडा नाही. अनेकत्वातून एकत्वाची प्रचीती घेण्याचे बाळकडू या संस्कृतीला मिळाले आहे. ते इथल्या लोकांच्या रोमरोमात भिनले आहे. त्यामुळे दोन संस्कृतींचा संघर्ष होऊन त्यात एकीचा पाडाव आणि दुसरीचा विजय असे दृश्य भारतात दिसत नाही. त्यांचा इथे संगम होऊन दोन्ही संस्कृतींचा काही अंशी विजय आणि काही अंशी पाडाव झाला आहे. शेवटी त्या दोहोंमध्ये एक मजेदार असे सामंजस्य निर्माण झाले आहे. असे अनेक संस्कृतिसंगम इथे घडले. कुठेही सहिष्णू वृत्तीला तडा गेला नाही. त्यामुळे गेल्या पाच-सात सहस्र वर्षांत इथे विविध रूढींचा व परस्पर विसदृश अशा चालीरीतींचा मोठाच साठा जमला आहे. दंतकथा व इतिहास, क्षेत्रे व मंदिरे यांची माहात्म्ये, विविध राजघराण्यांच्या पराक्रमगाथा, तत्त्वज्ञानांची प्रमेये, नीतिविषयक कल्पना, देवांच्या आणि वीरांच्या कथागाथा, महाभारत, पंचतंत्र व बृहद्‌कथा यांत वर्णिलेल्या लोककथा हे सर्व आता भारतातल्या सर्व प्रदेशांचे व सर्व जमातींचे सामायिक धन झाले आहे.

**अन्य काही वैशिष्ट्ये** – संस्कृती हा शब्द फार व्यापक आहे. त्याच्या पोटात धर्म, दैवते, दर्शने, इ. अनेक विषय येतात. ह्यांपैकी काही वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे –

**ऋणकल्पना** – जन्माला आलेल्या प्रत्येक माणसाच्या शिरावर देवऋण, ऋषिऋण आणि पितृऋण अशी तीन ऋणे असतात (तै. सं. ६.३.१०.५). याशिवाय चौथे एक मनुष्यऋणही शतपथ ब्राह्मणात सांगितले आहे. ही ऋणे फेडल्याशिवाय माणसाला परलोकी स्वर्ग मिळत नाही. भारतीय समाजशास्त्रातली ही एक मूलभूत कल्पना असून, आश्रमव्यवस्थेशी या ऋणकल्पनेची सांगड घालून दिलेली आहे. ही ऋणे कशी फेडायची, त्यासंबंधीही उपदेश आहे. यजन-पूजनाने देवऋण, विद्याध्ययनाने ऋषिऋण, प्रजोत्पादनाने पितृऋण आणि परस्पर सहकार्य आणि परोपकार यांनी मनुष्यऋण फिटते. (ऋणत्रय पाहा.)

**आश्रमकल्पना** – मानवी आयुष्याचे चार भाग कल्पून त्या प्रत्येक भागाला आश्रम असे नाव दिलेले आहे. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास अशी त्यांची नावे आहेत. ब्रह्मचर्यात गुरुगृही राहून अध्ययन व व्रतपालन करायचे. ते झाल्यावर यज्ञ, प्रजोत्पत्ती व स्वाध्याय यांच्या द्वारे तीन ऋणे फेडायची. मग केस पांढरे होऊ लागले, की वानप्रस्थ या तिसऱ्या आश्रमासाठी वनात जायचे. आयुष्याच्या अखेरीस संन्यास घेऊन आत्मज्ञानाने मोक्ष मिळवायचा आणि अशा प्रकारे समग्र जीवन कृतार्थ करायचे, अशी ही विचारसरणी आहे. मनुष्याच्या अंतरातल्या अर्थ-कामांना योग्य तो वाव देऊन हळूहळू त्यांना त्यांपासून निवृत्त करणे हेच हितावह असते. मानवी जीवन आश्रमव्यवस्थेत नियमित केल्यानेच हा उद्देश सफळ होईल, असे समाजधुरीणांनी मानले आणि तशी व्यवस्था लावून दिली. (आश्रम पाहा.)

**पुरुषार्थकल्पना** – धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे माणसाचे चार पुरुषार्थ भारतीय संस्कृतीने मानले आहेत. आरंभी पहिले तीनच पुरुषार्थ मानीत व त्यांना त्रिवर्ग म्हणत. उपनिषत्कालात मोक्षाला पुरुषार्थाचे स्थान मिळून चतुर्विध पुरुषार्थ ही कल्पना रूढ झाली.

नीतिशास्त्राच्या दृष्टीने पुरुषार्थकल्पना फार मौलिक आहे. केवळ धर्म किंवा मोक्ष हे जीवनाचे साध्य होऊ शकत नाहीत. धर्म-मोक्षांना अर्थ-कामांचाही आधार लागतो. मात्र ते दोन्ही धर्माला अनुसरूनच असले पाहिजेत. धर्माला अविरोधी असा काम ही माझी विभूती आहे, असे भगवंताने गीतेत म्हटले आहे. आपस्तंबही तसेच सांगतो (११.८.७.२२-२३). भारतीय शास्त्रकारांनी अर्थ-कामांची पुरुषार्थांत गणना करून मानवाच्या ऐहिक जीवनक्रमाला नैतिक व धार्मिक अधिष्ठान प्राप्त करून दिले. तसेच स्वार्थ आणि परार्थ यांत संवादित्व स्थापून व्यक्ती आणि समाज यांचा अन्योन्याश्रय दृढ केला. (पुरुषार्थ पाहा.)

**चातुर्वर्ण्य** – ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शुद्र असे चार वर्ण हिंदू धर्मशास्त्रकारांनी मानले आहेत. त्याबाहेर असलेले समाज वर्णबाह्य होत. या चारही वर्णांची कर्तव्ये, अधिकार, व्यवहार उच्चनीचत्व, परस्परावलंबित्व, परस्परपूरकत्व, इ. गोष्टींचा विचार करून धर्मशास्त्रकारांनी जी एक सामाजिक चौकट

देशात निर्माण केली, तिला चातुर्वर्ण्य असे नाव दिलेले आहे.

समाजात कर्मांच्या भिन्नत्वामुळे चार वर्ग निर्माण होतात, ही कल्पना अत्यंत जुनी आहे. हिंदूंच्या धर्मशास्त्रात चातुर्वर्ण्याच्या कल्पनेला जितके सनातनत्व आहे, तितके दुसऱ्या कोणत्याही सामाजिक नियमाला नाही. आजकाल समाजातले व्यवहारनियम बदलले, रीतीभाती बदलल्या, भक्ष्याभक्ष्याच्या कल्पना शिथिल झाल्या, शासनसंस्था बदलल्या, जीवनाच्या उद्दिष्टांचे सिद्धान्तही बदलले, तरी एवढा अतिदीर्घ कालखंड तोटूनही चातुर्वर्ण्यकल्पना मात्र स्थिर राहिली आहे.

अध्ययन-अध्यापन, लोकसंरक्षण, अर्थोत्पादक व्यवहार व सेवाकर्म या क्रिया ज्यामध्ये नाहीत, तो मानवसमूह समाज या संज्ञेलाच पात्र ठरणार नाही. अर्थात चातुर्वर्ण्याचे अस्तित्व स्वाभाविक आहे. मात्र इतर देशांतले चातुर्वर्ण्य व भारतातले चातुर्वर्ण्य यांत फरक आहे. भारतातले चातुर्वर्ण्य संस्कारपूत आहे; इतर देशांतले तसे नाही.

चातुर्वर्ण्य हे जन्माधिष्ठित आहे, अशीच बहुतेक स्मृतिकारांची धारणा आहे. महाभारताचे मत याहून जरा उदार आहे. त्याने चातुर्वर्ण्य जन्माप्रमाणेच गुणांवरही अधिष्ठित असावे आणि ते ते वर्णविशिष्ट गुण असतील, तरच तो तो मनुष्य त्या त्या वर्णाचा आहे, असे समजावे, असा दृष्टिकोन मांडला आहे. कोणत्याही कुटुंबात सामान्यतः वर्ण, स्वभाव, बुद्धिमत्ता, इ. बाबतीत मुले आई-बापांच्या वळणावर असतात. अनुवंशशास्त्राचा हाच आधार आहे. तोच प्रमाण मानून मन्वादी स्मृतिकारांनी समाजरचनेचे नियम सांगितले. निरनिराळ्या कार्यांसाठी लागणारे निरनिराळे गुण मनूला सामान्यत्वे विशिष्ट मानवसमूहात आढळले आणि ते आनुवंशिक आहेत, असे त्याने मानले. आणि मग त्या त्या वर्णावर समाजोपयोगी अशा त्या त्या कार्याची जबाबदारी त्याने टाकली. त्या कार्यातच त्या त्या वर्णाचा जीवननिर्वाहही व्हावा आणि त्यात विक्षेप येऊ नये म्हणून एका वर्णाचा धंदा दुसऱ्या वर्णाने करू नये, असा निर्बंधही घातला (मनु. १०.५–१९). सांप्रत व्यवहारात चातुर्वर्ण्य कोणीच पाळीत नाही; ते पाळणेही अशक्यच आहे. पण असे असूनही बहुतेक सर्व सुशिक्षित अशिक्षित हिंदूंत चातुर्वर्ण्याचा अभिमान मात्र बराच आहे. (चातुर्वर्ण्य पाहा.)

जातिसंस्था – जातिसंस्था हे हिंदू समाजाचे एक महत्त्वाचे अंग आहे. आपापले परंपरागत आचार कटाक्षाने पाळणारे असे जे हजारो सामाजिक गट हजारो वर्षांपासून भारतात आहेत, त्यांना जाती असे म्हणतात. जातींची व्यवच्छेदक लक्षणे अशी–

(१) फक्त जातीतच विवाहसंबंध करणे.

(२) मर्यादित भागात आणि समान भाषाविभागात असणे.

(३) पारंपरिक असे एक किंवा अनेक धंदे करणे.

(४) इतर जातींच्या अनुषंगाने त्यांना उच्च अथवा नीच असे निश्चित स्थान असणे.

प्रत्येक जातीचे जीवन इतर जातींहून वेगळे व स्वतंत्र असते; पण इतर जातींशी तिचे सहकार्य मात्र चालू असते. जातीतील व्यक्तींच्या वर्तनावर नियंत्रण ठेवण्यासाठी बहुतेक जातीत जातपंचायत असते. चाकोरीबाहेर जाऊन विरुद्ध वर्तन करणाऱ्या व्यक्तींना शिक्षा करण्याचा अधिकार जातपंचायतीला असतो. त्या दृष्टीने जात म्हणजे एक लहानसे सांस्कृतिक संस्थानच असते. प्रत्येक जातीला आपण शेजारच्या जातीपेक्षा श्रेष्ठ आहो, असे वाटत असते. अगदी तळच्या जातींनासुद्धा हा जातिश्रेष्ठत्वेचा अभिमान असतो. काही जाती तर ब्राह्मणाच्या हातचेही अन्नोदक घेत नाहीत. श्रेष्ठत्वाच्या व शुद्धत्वाच्या भावनेवरच जातिसंस्था उभारली गेली असल्यामुळे भारतात जात ही एक प्रबळ आणि ताठर वस्तू झालेली आहे.

भारताच्या राज्यघटनेत जातींचे अस्तित्व मान्य केलेले नाही. कोणत्याही जातीला विशेष अधिकारही दिलेले नाहीत. भारतातली जातिसंस्था मोडली जावी, नामशेष व्हावी असा घटनेचा कटाक्ष आहे; पण तरीही अजून जातिसंस्थेचा पाया घट्ट आहे. (जातिसंस्था पाहा).

दर्शने – भारतीय संस्कृती ही निगमागममूलक आहे. निगम म्हणजे वेद व आगम म्हणजे तंत्र होय. भारतीय दर्शनांकडे या उभय धारांच्या अनुषंगाने पाहावे लागते. कर्म, उपासना, ज्ञान यांचे स्वरूप निगमांनी सांगितले, तर जीवनातले भोग आणि मोक्ष हे पुरुषार्थ साधून घेण्याचे उपाय आगमांनी सांगितले आहेत.

दर्शनांत विवेचिलेली सर्व तत्त्वे मूलतः उपनिषदांमध्ये आली आहेत. मात्र ती संगतवार नसून, विखुरलेली आहेत. ऋषिमुनींना तपस्या व चिंतन यांच्या द्वारे ज्या तत्त्वांची अनुभूती घडली, ती तत्त्वे त्यांनी उपनिषदांत व्यक्त करून ठेवली. मात्र या अनुभूती व्यक्तिगत असल्यामुळे त्यांत भिन्नताही आढळते. या भिन्न भिन्न अनुभूतींतल्या विरोधांचा परिहार करून त्यांची संगतवार मांडणी करणे आणि त्यांतून एक दर्शन उभे करणे हे काम पुढच्या आचार्यांनी केले.

आस्तिक आणि नास्तिक अशी उभयविध दर्शने भारतात निर्माण झाली आहेत. वेदांचे प्रामाण्य मानणारी ती आस्तिक आणि वेदप्रामाण्य न मानणारी ती नास्तिक दर्शने होत. या दृष्टीने न्याय, मीमांसा, वेदान्तादी दर्शने ही आस्तिक व चार्वाक, जैन, बौद्धादी दर्शने ही नास्तिक होत. सर्व आस्तिक दर्शने ही आत्मज्ञानासाठीच प्रवृत्त झालेली आहेत. 'आत्मानं विद्धि' (= आत्म्याला जाणून घे), हा या दर्शनांचा मूलमंत्र आहे.

आत्म्याचे ज्ञान होण्यासाठी त्याला प्रथम सर्व अनात्म पदार्थां-पासून वेगळे करणे आवश्यक ठरते. यालाच आत्मानात्मविवेक असे म्हणतात. भारतीय दर्शनांनी हे आत्मानात्मविवेकाचे कार्य सर्वत्र तर्कबुद्धीचा अवलंब करून केले आहे. प्रमाणे, युक्ती, तर्क व ज्ञानी पुरुषांची अपरोक्ष अनुभूती या चार खांबांच्या आधारा-वर सगळ्या दर्शनांची उभारणी झाली आहे.

नाना नामरूपात्मक जगताची पारमार्थिक एकता हा सिद्धान्त तर्कमूलक असून, त्याचे विवेचन वेदान्तदर्शनात केले आहे.

ध्यान-धारणा-समाधी यांच्या द्वारा या सर्वत्र अनुस्यूत अस-लेल्या एकतेचा मूलाधार जो परमात्मा, त्याचा साक्षात अनुभव घेणे हा व्यावहारिक सिद्धान्त असून, त्याचे निरूपण योगदर्शनात केलेले आहे.

भारतातले विविध दार्शनिक संप्रदाय उपनिषद्वाङ्मयातूनच जन्म पावले आहेत. या औपनिषदिक ज्ञानाचे पर्यवसान म्हणजे 'तत्त्वमसि' (=ते म्हणजे ब्रह्म व तू म्हणजे जीव या दोहोंचे नितान्त ऐक्य आहे) हे महावाक्य होय. चतुर्विध पुरुषार्थातला शेवटचा पुरुषार्थ म्हणजे मोक्ष होय. दर्शनरूपी कल्पवृक्षाचे ते अमृतफळ आहे. आणि हा मोक्ष मिळवण्याचे एकमेव साधन म्हणजे ज्ञान होय. या बाबतीत सर्व दर्शनांची एकवाक्यता आहे. हा मोक्षलाभ मानवाला 'याचि देही' घडू शकतो, म्हणजेच त्याला जीवन्मुक्ती प्राप्त होऊ शकते. जीवन्मुक्तीची कल्पना ही उपनिषदांनी मानवजातीला दिलेली बहुमोल देणगी होय.

मोक्षप्राप्तीसाठी अज्ञाननिवृत्ती आवश्यक असते. ती निवृत्ती केवळ दार्शनिक सिद्धान्त समजले एवढयाने होऊ शकत नाही. त्यासाठी तर्कगम्य सिद्धान्त मनन आणि निदिध्यास या उपा-यांच्या द्वारे अंतरात ठसवावे लागतात. हा मोक्षाचा साधनमार्ग होय. बहुतेक दर्शनकारांनी या साधनमार्गावर विशेष भर दिला आहे. (दर्शने पाहा).

**दैवतसृष्टी** – जिच्या ठिकाणी दिव्य तेज अथवा सामर्थ्य असते, ती देवता होय. चराचर भौतिक सृष्टीच्या पलिकडे अदृश्य, अव्यक्त व कल्पनारम्य अशी एक दुसरी सृष्टी कल्पिली गेली आहे, तिला दैवतसृष्टी म्हणतात. देवतांचा पसारा म्हणजे दैवतसृष्टी. तिच्यात विविध शक्तींची आणि विविध नामरूपांची दैवते वास्तव्य करतात.

वाङ्मयात पहिल्या प्रथम देवता आढळतात, त्या ऋग्वेदात. इंद्र, अग्नी, यम, वरुण, उषा, सूर्य, इ. त्यांची नावे असून, संख्या ३३ आहे. त्यांतील इंद्र हा सर्वश्रेष्ठ देव होय. वेदातील देवतांचे विशिष्टत्वदर्शक गुण अत्यल्प असून, बहुतेक सर्व देवांना सगळे प्रभावी गुण लावलेले दिसून येतात. वैदिक ऋषींनी देवतांच्या भौतिक स्वरूपावर मानवाचे गुणधर्म आरोपित केले. तेहतिसां-पैकी ११ आकाशात, ११ पृथ्वीवर व ११ उदकांमध्ये राहतात, असे सांगितले. काम, मन्यू, श्रद्धा, इ. अमूर्त भावांनाही देवत्व दिले. मरुत, रुद्र व आदित्य हा देवतांचा संघ असल्याचे मानले. अथर्ववेदात आणखी नव्या देवता निर्माण झाल्या.

ब्राह्मणकालात देवांचे मानवीकरण पूर्ण झाले. त्यांना माणसां-सारखीच माता, पिता, बंधू, भगिनी अशी नाती निर्माण झाली. ब्राह्मणग्रंथांनी तर देवांवर चातुर्वर्ण्यव्यवस्थाही लादली. उप-निषत्कारांनी संघटक, प्रकाशक व कार्यकारी असे देवतांचे त्रिविध वर्गीकरण केले.

पुराणकालात बऱ्याच वैदिक देवतांचा लोप झाला, तर काही सामान्य थरावर येऊन बसल्या. वैदिक इंद्र व वरुण यांचे माहात्म्य घसरले आणि त्यांच्या जागी विष्णू व रुद्र यांचे ऐश्वर्य वाढले. कित्येकांचे सामर्थ्य व सत्ताक्षेत्र मर्यादित झाले. कित्येक देवता कोणत्या तरी मोठ्या देवात विलीन झाल्या. त्यांचे स्वरूप आणि स्वभाव या गोष्टींतही अंतर पडले.

पौराणिक युगात त्रिदेवकल्पना पुढे आली. ब्रह्मा, विष्णू, महेश हे तीन देव वेगवेगळ्या कारणांसाठी महत्त्व पावले. ब्रह्याने सृष्टी करावी, विष्णूने तिचा प्रतिपाळ करावा आणि महेशाने अंतकाली तिचा संहार करावा अशी त्यांची कार्यविभा-गणी ठरली. ब्रह्मा पुराणकालातच अपूज्य ठरला. शैव पुराण-कारांनी शिवाला आणि वैष्णव पुराणकारांनी विष्णूला सर्वश्रेष्ठ देव ठरवले. पुराणकारांनी पंचायतन या स्वरूपातही देवतांचा उपासनामार्ग प्रचलित केला. विष्णू, शिव, शक्ती, गणपती व सूर्य हे पंचायतन मानण्यात आले.

देवी म्हणजे शक्ती किंवा जगदंबा. मुळात ती धरित्रीचे प्रतीक या स्वरूपातच होती. तिची अनेक उग्र, भयंकर रूपे होती. पुराणकालात या तिच्या सर्व रूपांसह तिचे उन्नयन झाले. शाक्तांनी देवीचे माहात्म्य स्वतंत्रपणे वाढवले. ती शिवाची भार्या खरी; पण तिच्यावाचून शिव हा शव आहे, असे त्यांनी प्रतिपादिले. या सर्व महत्त्वाच्या देवतांची परिचर्या करणारा असा एक दुय्यम देवतांचा संघ कल्पून, तो त्या त्या देवतांच्या परिवारात समाविष्ट केला गेला. सरस्वती व लक्ष्मी यांना पती-बरोबर, तशीच स्वतंत्रपणेही प्रतिष्ठा प्राप्त झाली.

मानव आणि देव या दोहोंच्या मध्ये एका देवसदृश योनीची कल्पना केली गेली. या योनीत अनेक जातिसंघ असून, विद्याधर, यक्ष, गंधर्व, किन्नर, पिशाच, सिद्ध, इ. त्यांची नावे आहेत.

ग्रामदेवता म्हणजे ग्रामाच्या संरक्षक देवता होत. त्यांची नामरूपे अनेक आहेत. अशा प्रत्येक देवतेच्या मागे काही आख्या-यिका असतात आणि त्या विशिष्ट क्षेत्रापुरत्याच मर्यादित असतात. ग्रामदेवता या पुष्कळशा स्त्रीदेवता असतात, त्या कोंपिष्ट

असतात. पशुबली देऊनच त्यांचा क्रोध शमवावा लागतो. जशा ग्रामांच्या, तशाच कुलांच्याही विशिष्ट देवता असतात. ग्रामदेवतांच्याही खाली एक देवतासमूह असतो. त्यांना क्षुद्रदेवता म्हणतात.

भारतीय लोकांनी जे काही दिव्य, भव्य असेल किंवा जे जीवनसिद्धीला उपकारक असेल, त्या त्या सर्व वस्तूंना देवत्व प्रदान केले आहे. भारताने कृषिसाधक म्हणून गाय, बैल, शेतीची औजारे या सर्वांना देवत्व दिले आहे. वर्षातल्या विशिष्ट दिवशी शेतकरी त्यांची पूजा करतात. वड, पिंपळ, औदुंबर, शमी, वेल, इ. वृक्ष इथे देवत्व पावले आहेत. काही शिलाखंडही देव झाले आहेत. कित्येक जातिजमातींची देवके वृक्ष, पशू, पक्षी, जलचर, नाग, इ. आहेत. या बाबतीत भारतीय संस्कृतीचा दृष्टिकोन असा (गीता १०.४.१)–

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् ।।

अर्थ – जे जे सत्त्व (अस्तित्व) ऐश्वर्य, श्री व ऊर्जा यांनी युक्त असेल, ते ते, हे अर्जुना, माझ्या तेजाच्या अंशापासून उत्पन्न झाले आहे, असे तू जाण. (देवता पाहा)

तीर्थक्षेत्रे – भारतीय जनांचे मातृभूमीविषयीचे उत्कट प्रेम तीर्थकल्पनेत परिणत झाले. पुराणकारांनी अशा असंख्य भूभागांना तीर्थरूपता देऊन त्यांचे माहात्म्य गायिले. प्रत्येक नदी, जलधारा, झरा, कुंड, जलाशय, पर्वत यांचे नामकरण करून त्या प्रत्येकाशी कोणत्या ना कोणत्या देवाचा, ऋषीचा, पूर्वजाचा किंवा एखाद्या महान घटनेचा संबंध जोडून देण्याचे कार्य पुराणकारांनी केले. त्यामुळे देशातील हजारो तीर्थांना जनतेची सर्वमान्यता मिळाली. या कल्पनेत हिमालय हा दगड, माती, खडक यांचा उत्तुंग ढीग राहिला नाही; तर तो देवतात्मा बनला. ही कल्पना देशात सर्वत्र दृढमूल झाली. गंगा ही केवळ जलधारा न राहता ती भारताची माता बनली. भारतात विविध प्रयागे, चार धामे, सप्त पुऱ्या, एकावन्न शक्तिपीठे, बारा ज्योतिर्लिंगे, अष्टविनायक, त्याचप्रमाणे भास्करक्षेत्रे, दत्तक्षेत्रे असे तीर्थांचे गट निर्माण होऊन मान्यता पावले. काशी-रामेश्वर ही उत्तर-दक्षिण भेदांना मिटविणारी दोन सर्वश्रेष्ठ क्षेत्रे ठरली.

महाभारतात धौम्य आणि पुलस्त्य यांनी वर्णिलेल्या दोन तीर्थयात्रा आहेत. या दोहोंत धौम्याची यात्रा प्राचीन, संक्षिप्त आणि क्रमबद्ध आहे. पुलस्त्याची यात्रा पूर्वेला कामरूप, पश्चिमेला सिंधुसागर, दक्षिणेला कन्याकुमारी आणि उत्तरेला हिमालय एवढा खंडप्राय देश व्यापते. या सर्व तीर्थांच्या यात्रा भारतीय लोक गेली हजारो वर्षे करीत आले आहेत. या तीर्थयात्रांमुळे त्यांच्या अंतरातील धर्मभावना व पुण्यभावना वाढली आहे. आणि या पुण्यलाभाच्या पोटात अनेक अन्य लाभ लपले आहेत.

तीर्थयात्रेमुळे भारतीय लोकांना ठिकठिकाणचे निसर्गसौंदर्य अनुभवता येते, अद्‌भुत शिल्पे पाहता येतात, त्यांवरची कलाकुसर निरखता येते; पुराणांतील महनीय व्यक्तींचा परिचय घडतो; इतिहासातले रोमहर्षक प्रसंग कळतात; परकीयांनी केलेल्या विध्वंसाचीही कल्पना येते; मनुष्य बहुश्रुत व बहुदृष्ट होतो; बुद्धीला जागृती येते; मन विस्तार पावते. सामान्य जनांच्या दृष्टीने महाभारताच्या वनपर्वात एक प्रश्न उपस्थित करून त्याचे समाधान केले आहे, ते असे–

ऋषि-मुनींनी वेदांत अनेक प्रकारचे यज्ञ सांगितले आहेत. ते यज्ञ करणाऱ्या यजमानाला कीर्ती आणि प्रतिष्ठा लाभते आणि मरणानंतर स्वर्ग मिळतो. पण सर्वसामान्य दरिद्री जनतेला हे पुण्यफल कसे मिळायचे ? यज्ञासाठी विविध प्रकारची सामग्री लागते. आणि ती सामग्री संपन्न करायची तर द्रव्यबळाची आवश्यकता असते. निर्धन लोकांना यज्ञ असाध्य असून, त्यांना यज्ञ न करता यज्ञफल कसे मिळेल ? असा तो प्रश्न आहे. या प्रश्नाचे उत्तर तीर्थयात्रा असे आहे. तीर्थयात्रेचे पुण्य यज्ञापेक्षाही अधिक आहे, असे महाभारतात सांगितले (वन. ८.३४) आहे.

महाभारतकारांचे हे महान आश्वासन चरितार्थ ठरले. भारतीय जनता यावच्छक्य तीर्थयात्रा करून जीवनाची सार्थकता अनुभवू लागली.

ही तीर्थस्थाने एका विशिष्ट धर्मापुरती अगर संप्रदायापुरती मर्यादित राहिली नाहीत. प्रत्येक मताच्या आचार्यांनी ते ते क्षेत्र आपापल्या दृष्टीने पाहिले आणि आपापल्या संप्रदायासाठी उपदेशिले. त्यामुळे अनेक धर्मांचे व संप्रदायांचे लोक क्षेत्रात येऊ लागले. त्यांचा परस्पर परिचय घडू लागला. त्यामुळे सांप्रदायिक पूर्वग्रह कमी होण्यास मदत झाली. विविध संप्रदायांना मान्य असलेली ही तीर्थे महातीर्थे बनली. जी जी स्थाने धर्म, विद्या, व्यापार आणि राजनीती या चारही दृष्टींनी महत्त्वपूर्ण होती, ती महापुरी या रूपात मान्यता पावली.

बौद्धांनीही मोठ्या भक्तिभावाने तीर्थयात्रेचा स्वीकार केला. सम्राट अशोकाने स्वतः बुद्धाच्या जन्मस्थानाची यात्रा केली होती. सगळे बौद्ध भिक्षू व गृहस्थ बुद्धजीवनाशी संबंधित असलेल्या लुंबिनी, बुद्धगया, सारनाथ आणि कुशीनगर या चार महास्थानांची यात्रा करीत असत. बौद्धांची अनेक पवित्र क्षेत्रे भारतभर पसरलेली आहेत. जैन धर्मालाही तीर्थयात्रेविषयी अपार प्रेम आहे. त्यांनी सिद्ध क्षेत्रे आणि अतिशय क्षेत्रे अशी दोन प्रकारची क्षेत्रे मानली आहेत. मथुरा, वाराणसी, अयोध्या, पैठण, नासिक ही हिंदूंची तीर्थक्षेत्रे जैनांनीही आपली मानली आहेत. त्याशिवाय त्यांची स्वतंत्र तीर्थेही आहेत.

भारतवर्ष गेली कित्येक सहस्रके अनेक मानववंशांच्या संस्कृतींची प्रयोगशाला बनले आहे. या प्रयोगशालेतला सर्वांत प्रभावशाली मंत्र समवाय किंवा समन्वय हा आहे. भारतवर्ष हे अनेक संस्कृतींचे संगमस्थान आहे. भारतीय संस्कृती हे अनेक मानवसमाजांच्या संस्कृतिसंगमातून विकसित झालेले एक सहस्रदल कमल आहे. या कमलाचे तेज, सौंदर्य आणि ताजेपण या गोष्टी आजमितीस जरी झाकाळलेल्या असल्या, तरी एका काळी या संस्कृतीने आपला सर्वोत्कर्ष पाहिला आहे. या ऱ्हासकालातही, उत्कर्षाची ती बीजे भारतीय मनोभूमीत जिवंत आहेत.

सांप्रत विश्वमानवापुढे प्रत्यही नवी नवी आव्हाने उभी ठाकत आहेत. भारतही अशा अनेक समस्यांच्या धगीने जळत–तापत आहे. यातून बाहेर पडायचे, तर विश्वमानवाला विरोध आणि विग्रह यांची संगत सोडून प्रेम आणि सहकार यांचा मंत्र जपावा लागेल. त्यासाठी जुनी मूल्ये तावून सुलाखून घ्यावी लागतील. काही नवी मूल्येही प्रस्थापित करावी लागतील. भारताचा वर्तमान काल नसला तरी अतीत काल या बाबतीत विश्वमानवाला प्रेरणा देऊ शकेल. आणि ती प्रेरणा ही असेल–

**समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।**
**समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ।।**

(ऋ. १०.१९१.४)

अर्थ –( हे लोकांनो ), संघशक्तिपुष्टचर्थं तुमचे अभिप्राय, अंत:करण, तसेच मन एकसारखे असावे.

[ भा. मौ. ए.; म. लो. सं.; वै. सं. वि.; ध. शा. वि.; इंडियन कल्चर–हिरेंद्रनाथ दत्त, १९४१; क. हे. इं.; इ. फी. इं. क. ]

## संहितोपनिषद् ब्राह्मण

सामवेदाचे एक अतिशय छोटे ब्राह्मण. यात केवळ पाच खंड आहेत. या ब्राह्मणात सामगायनाने उत्पन्न होणाऱ्या प्रभावाचे वर्णन आहे; तसेच साम आणि सामयोनी मंत्र यांच्या परस्पर संबंधाचेही वर्णन आहे. सामवेदाच्या इतर ब्राह्मणांप्रमाणे हे ब्राह्मण उत्तरकालीन वैदिक वाङ्मयात मोडते. या ब्राह्मणाची भाषापद्धती जरी इतर ब्राह्मणग्रंथांसारखी आहे, तरी जुनी वैदिक रूपे या ग्रंथांत आढळत नाहीत. यातील विषयांवरूनही वरील विधान दृढ होते. याच्या तिसऱ्या अध्यायात 'विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम' (= विद्या ब्राह्मणाकडे आली), ही निरुक्तातील भाषणरूप आख्यायिका थोडचा फरकाने आढळते.

मागाहूनच्या संस्कृत वाङ्मयात या ग्रंथासंबंधी फारच थोडे उल्लेख सापडतात. सायणाचार्यांना हे ब्राह्मण माहीत होते. या ब्राह्मणाच्या पहिल्या अध्यायात सामे आणि मंत्र यांचा पृथक्त्वाने विचार करण्याच्या कल्पनेचे मूळ स्वरूप दिसते आणि हाच विषय मागाहूनच्या फुल्लसूत्र व सामतंत्र या ग्रंथांत अधिक सविस्तर रीतीने उपपादिला आहे. [ म. ज्ञा. को.; वै. सा. सं. ]

## संज्ञपन

यज्ञातील पशू मारण्याच्या पद्धतीला संज्ञपन असे म्हणतात. संज्ञपनात पशूचे नाक व तोंड बंद करून श्वासनिरोधाने त्याला गतप्राण करतात. हे करीत असताना पशूला ओरडू द्यायचे नसते. यज्ञविहाराच्या बाहेर, ईशान्येला असलेल्या शामित्र शाळेत संज्ञपन करतात. त्यासाठी ब्राह्मणेतर शमिताही चालतो. काही सूत्रकारांच्या मते, ऋत्विजांपैकीच कोणीतरी संज्ञपन करावे, असे आहे. कात्यायन श्रौतसूत्रात (६.५.१७, १८) पशूच्या गळचाला फास लावून त्याला मारावे, असा विकल्प सांगितला आहे. संज्ञपन कर्म चालू असताना शमित्याशिवाय तिथे कोणीही उपस्थित राहायचे नसते. सर्व ऋत्विज या वेळी मौन पाळतात. या वेळी होता नावाचा ऋत्विज 'पशू देवतेकडे जावो' इ. अर्थाचे मंत्र म्हणत असतो. या मंत्रांना अध्रिगू असे नाव आहे. देवतेसाठी असलेला हा पशू मारून त्याच्या वपेचा व अंगाचा याग करायचा असतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## संज्ञानी इष्टी

समान जातीच्या लोकांमध्ये उत्पन्न झालेला मत्सर नाहीसा होऊन त्यांच्यांत ऐकमत्य व्हावे, या उद्देशाने ही इष्टी करावी, असे तै. संहितेत सांगितले आहे ( २.२.११ ). यासंबंधी तिथे एक कथा दिली आहे, ती अशी – देव आणि असुर युद्ध करायला तयार झाले असता, देवपक्षाचे नेतृत्व कोणाकडे असावे याविषयी देवांमध्ये वाद निर्माण झाला. प्रत्येकजण मीच नेता होणार असे म्हणू लागला. त्यामुळे देवांमध्ये द्वेष निर्माण होऊन त्यांच्यांत फूट पडली. अग्नी वसूंसह वेगळा झाला. सोमाने रुद्रांसह आपला सवता सुभा निर्माण केला. इंद्र मरुतांना घेऊन बाजूला झाला. आपले प्रमुखत्व देवांनी मान्य करावे असे इंद्राला वाटत होते. त्यासाठी मार्ग विचारायला तो प्रजापतीकडे गेला. प्रजापतीने त्याच्याकडून संज्ञानी इष्टी करविली. तिच्या प्रभावाने सर्व देव निर्मत्सर झाले आणि त्यांनी इंद्राचे पुढारीपण मान्य केले.

या इष्टीमध्ये अग्नी, सोम, इंद्र व वरुण या चार देवतांसाठी निरनिराळे हवी तयार करावे किंवा त्या सर्वांसाठी एकदम हवी घेऊन एकच प्रधानयाग करावा असे सांगितले आहे. या इष्टींचे अन्य सर्व विधी दर्शपूर्णमासाप्रमाणे करावे. [ हि. घ. ]

## स

देवनागरी वर्णमालेतले बत्तीसावे व्यंजन. याला सांप्रतचे स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी पाच अवस्थांतून जावे लागले आहे.

अशोकाच्या गिरनार येथील शिलालेखात याची पहिली अवस्था पाहायला मिळते. दुसरी अवस्था ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या सुमारास खोदलेल्या मथुरा येथील जैन लेखात, तिसरी पाचव्या शतकातील करडांडाच्या लेखात, चौथी त्याच शतकातील विलसद येथील स्तंभलेखात व पाचवी सहाव्या शतकातील उष्णीषविजयधारिणी या ग्रंथातील वर्णमालेत आढळते.



स च्या रूपाचा विकासक्रम

या वर्णाचे स्वरूप कामधेनुतंत्रात पुढीलप्रमाणे वर्णिले आहे—

सकारं शृणु चार्वङ्गी शक्तिबीजं परात्परम् ।
कोटिविद्युल्लताकारं कुण्डलीत्रयसंयुतम् ॥
पञ्चदेवमयं देवि पञ्चप्राणात्मकं सदा ।
रजःसत्त्वतमोयुक्तं त्रिबिन्दुसहितं सदा ॥

अर्थ – हे चारुगात्री, सकाराचे वर्णन ऐक. तो एक शक्तिबीज आहे. कोटिविद्युत्प्रभ, कुंडलीत्रययुक्त, पंचदेवमय व पंचप्राणमय, तसेच त्रिगुण व त्रिबिंदू यांनी युक्त असा तो आहे.

दंत हे याचे उच्चारणस्थान होय. [ म. ज्ञा. को.; श. क. ]

**सकराय माता** राजस्थानातील एक देवता. जयपूर विभागातील सीकर जिल्ह्यात खंडेला नामक गावापासून पाच कोस दूर हिचे स्थान आहे. काही लोक हिला शाकंभरीमाता म्हणूनही संबोधतात. परंतु देवालयातील एका प्राचीन शिलालेखावरून हिचे नाव शंकरा असल्याचे समजते. शिलालेखातील मूळ संस्कृत शब्द शंकराय असा असून, त्याचेच पुढे सकराय शब्दात रूपान्तर झाले असावे. हिला पशुबळी चालत नाही; गोडाधोडाचा नैवेद्य लागतो. कारण ओसवाल जातीचे लोक तिचे उपासक आहेत. मात्र सकराय माता म्हणजे महिषासुरमर्दिनीच होय, असे तिचे पुजारी सांगतात. [ कुलदैवत ]

**सकरोबा** महाराष्ट्राच्या विदर्भ विभागातला एक सण. नागपंचमीच्या दुसऱ्या दिवशी हा साजरा करतात. त्यासाठी कुंभाराकडून मातीचा एक देव्हारा बनवून आणतात आणि तो सजवितात. त्यात हत्ती, घोडे, पालखी, इ. चित्रे ठेवलेली असतात. बहुजन समाजातील स्त्रिया हा देव्हारा घरीच तयार करून, त्यात महादेवाची पिंड ठेवतात. मग देव्हाऱ्याभोवती पिंगा घालून अनेक प्रकारची लोकगीते म्हणतात. काही ठिकाणी पानाफुलांचाही देव्हारा असतो. त्याला श्रीयाळ अथवा शिराळ असे म्हणतात. [ नंदादीप ]

**सकुन पक्षी** आंध्र प्रदेशातील एक भिक्षेकऱ्यांची जात. हे लोक भिक्षा मागायला निघताना कबूतराच्या पिसांचा तुरा डोक्यावर धारण करतात आणि कबूतराला शकुनपक्षी म्हणतात, त्यावरून या जातीला हे नाव मिळाले आहे. सकुन पक्षी पुरुष भिक्षेला निघण्यापूर्वी कपाळावर रामानुजी पंथाचा नाम लावतो, हरिणाच्या कातड्याची पिशवी खांद्याला अडकवतो आणि वेडकाच्या कातड्याचा डमरू हाती घेतो.

हे लोक भिक्षेशिवाय भविष्य सांगणे, भूतबाधा घालविणे, जादूगिरी आणि वैद्यकीही करतात. विंचु – दंशावरची मुळी नेहमी त्यांच्याजवळ असते. [ का. ट्रा. स. इं. ]

**सकोलडे** पंजाबमधील स्त्रियांचा एक सण. हा श्रावणातल्या संक्रांतीला साजरा करतात. या सणाच्या निमित्ताने आई-वडील आपल्या विवाहित मुलींना कपडे, दागिने, इ. वस्तू भेट म्हणून पाठवितात. सणाच्या दिवशी अनेक मुली एकत्र जमून नदीच्या तीरावर जातात, तिथे गाणी गातात, पक्वान्नाचे भोजन करतात व मग परत फिरतात.

या दिवशी लग्न झालेल्या व न झालेल्या मुली आपापल्या कानात एक विशिष्ट प्रकारचे फूल खोचतात. त्या फुलाला सकोलडे असे नाव आहे. म्हणून तेच नाव या सणाला मिळाले आहे. हे फूल तांबूस पिवळसर रंगाच्या धाग्यांचे बनविलेले असते. [ पं. जी. सा. ]

**सक्किया** तमिळनाडमधील त्रेसष्ट नायन्मार संतांपैकी एक. याने सर्व धर्ममतांचा अभ्यास केला होता. याची शिवभक्ती जगावेगळी होती. शिवलिंग दिसताच, तो एक दगड उचलून त्यावर फेकीत असे. या विरोधी उत्कट भक्तीमुळे याला शिव-साक्षात्कार झाला. [ पे. पु. ]

**सखाराम महाराज** (इ. स. १७५७–१८१८) एक साक्षात्कारी संत आणि वारकरी संप्रदायाचा मोठा अनुयायी. यांचा जन्म खानदेशातील अमळनेरपासून तीन मैलांवर असलेल्या पिंपळी नामक खेडचात झाला. सीताबाई व रामभट अमळनेरकर हे त्यांचे आई-वडील होत. महाराजांना बालपणापासूनच ईश्वरभक्तीचे वेड होते. परंतु त्या वयातच त्यांचे माता-पिता निवर्तल्याने ते आपला चुलतभाऊ रंगनाथ याच्याकडे राहायला गेले. पुढे त्यांचा गंगाबाई नामक स्त्रीबरोबर विवाह झाला. त्यांच्या साधकावस्थेलाही त्याच वेळी प्रारंभ झाला. अशा अवस्थेतच त्यांना श्रीनिवासमहाराजांचा गुरुबोध झाला. पुढे काही कौटुंबिक कटकटी उत्पन्न झाल्या आणि सखाराम

महाराजांनी घर सोडले. मग त्यांनी जवळच एक झोपडे बांधून त्यात संसार थाटला. तिथे त्यांना एक पुत्र झाला. पण लवकरच गंगाबाई आणि त्यांचा पुत्र हे दोघे निवर्तले.

वैराग्य आणि नियमांचे काटेकोर पालन यासंबंधी महाराजांची ख्याती होती. विठ्ठलाची वारी हा त्यांचा नेम होता. प्रतिवर्षी वारीला निघताना ते आपली झोपडी पेटवून देत आणि पुढे निघत. असेच एकदा वारीला जात असता वाटेत गोदावरीला मोठा पूर आला होता. पूर ओसरण्याचे चिन्ह दिसेना तेव्हा त्यांनी पुरात उडी घेतली आणि ते पंढरीला गेले. मान्या भिल्लाचे त्यांनी हृदय परिवर्तन केले होते. अशा तऱ्हेच्या अनेक गोष्टी महाराजांनी केल्या. मात्र सिद्धीवर त्यांचा विश्वास नव्हता. महादेवबुवा नामक एका सिद्धाने आपल्याला प्राप्त झालेल्या अनेक सिद्धी त्यांना देऊ केल्या असता, त्यांनी त्या नाकारल्या.

महाराज उत्तम कीर्तन करीत. दुसरा बाजीराव त्यांच्या कीर्तनाने प्रभावित झाला होता. कीर्तनाबरोबर त्यांनी बरेच अखंड नाम सप्ताह आणि विपुल अन्नदान केले. दुसऱ्या बाजीरावाला अन्नदानाची स्फूर्ती त्यांच्याकडूनच मिळाली, असे म्हणतात.

अखेर वैशाख मासातील एका नामसप्ताहात त्यांनी देह ठेवला. त्यांच्या शिष्यांनी त्यांच्या झोपडीच्या जागीच एक विशाल विठ्ठलमंदिर उभारले. त्यांची शिष्य परंपरा बरीच आहे. पंढरपुरात त्यांचा एक मठ आहे. सुमारे पाच हजार ओव्यांचे त्यांचे एक चरित्रही उपलब्ध आहे. [ संत सखाराम महाराज अमळनेरकर–प्रा. प्र. स. पंडित. १९६७ ]

## सखी संप्रदाय

सखी संप्रदाय हा निंबार्क संप्रदायाचीच एक अवांतर शाखा आहे. स्वामी हरिदास हे या शाखेचे प्रवर्तक होते. त्यांनी निंबार्क संप्रदायाची दीक्षा घेतलेली होती व मधुरोपासना त्यांना मान्य होती. तरी त्यांनी गोपीभाव हा भगवत्प्राप्तीचे उत्तम साधन आहे, असे मानले व त्याचा स्वीकार करून या संप्रदायाची स्थापना केली.

स्वामी हरिदासांच्या जन्मकाळासंबंधी मतभेद आहेत. पण इ. स. १४८४ ते १५२८ या दरम्यान केव्हातरी त्यांचा जन्म झाला, असे मानतात. वृंदावनातील मानसरोवराच्या मागचे निधुवन हे त्यांचे साधनास्थान होते. इथेच त्यांना बांकेविहारीची मूर्ती मिळाली होती. ते महान संगीतज्ञ होते. सुप्रसिद्ध गायक तानसेन हा त्यांचाच शिष्य होता. त्यांनी वृंदावनात टट्टी संस्थानाची स्थापना केली. कृष्णभक्तिसाहित्यात त्यांनी संगीताचा समावेश केला, हे त्यांचे वैशिष्ट्य होय.

राधा–कृष्णांची युगलरूप उपासना हरिदासांना मान्य होती पण राधाकृष्णांच्या ललित लीलांचा आनंद ते सखीभावाने घेत होते. संगीताच्या द्वारे ते राधा-कृष्णांना प्रसन्न करू इच्छीत होते. राधा-कृष्णांवर त्यांची परम भक्ती होती. त्यांच्या सौंदर्यावर आणि रासलीलेवर त्यांनी अनेक पदे रचली आहेत. त्यांतील रासलीलेसंबंधीचे एक पद असे–

> अद्‌भुत गति उपजति अति नाचत
> दोऊ मंडल कुंवर किशोरी ।
> सकल सुगंध अंग भरि झोरी
> प्रिय नृत्यति मुसकति मुख मोरी ।
> ताल धरैं बनिता मृदंग चंद्रागति
> घात बजैं थोरी थोरी ।।
> मधुर भाव भाषा विचित्र अति, ललित
> गीत गावैं चित्त चोरी ।
> श्री वृंदावन फूलति फूल्यौ पूरन
> ससि समीर गति थोरी ।
> गति विलास रस हास परस्पर
> भूतल अद्‌भुत जोरी ।।
> श्री जमुना जल बिथकित पुहुपति छवि
> रतिपति डारत तृन तोरी ।
> श्री हरिदास के स्वामी स्यामा कुंजबिहारी जू कौ
> रस रसना कहै कोरी ।।

भावार्थ – कृष्ण आणि गोपी जेव्हा मंडलाकार नृत्य करतात, तेव्हा अद्‌भुत गती निर्माण होते. त्यांच्या सर्वांगातून सुगंध ओसंडतो. प्रिय कृष्ण नृत्य करीत असताना माझ्या मुखावर हास्य उमलते. नृत्याच्या वेळी स्त्रिया मृदंगावर ताल धरतात. नृत्यातील भाव मधुर आणि भाषा अद्‌भुत आहे. नृत्याच्या वेळचे गीत ललितमधुर व मनमोहक आहे. या नृत्यामुळे वृंदावन आनंदाने भरून जाते. या वेळी पूर्ण चंद्र उगवला आहे. मंद वारा वाहत आहे. राधा-कृष्ण ही भूतलावरील अद्‌भुत जोडी आहे. त्यांचे नृत्य पाहायला यमुनेचे जल जणू काही थांबून राहिले आहे. कृष्ण आणि राधा यांच्या रासक्रीडेचे वर्णन करायला माझी वाणी अपुरी पडेल, असे स्वामी हरिदास म्हणतात.

स्वामी हरिदासांच्या भक्तिपर पदांचा संग्रह केलिमाला या नावाने प्रसिद्ध आहे. त्यांनी स्थापलेल्या टट्टी-संस्थानच्या वैष्णवांची परंपरा आजपर्यंत अखंड चालत आलेली आहे. त्यांच्या शिष्यपरंपरेत विठ्ठल विपुल, बिहारिनीदेव, भगवत्‌रसिक व सहचरिचशरण हे प्रमुख आहेत.

विठ्ठल विपुलाने राधा–कृष्णांची निकुंजलीला, रासलीला, तसेच हिंडोला, झोपाळा, इ. विषयांवर पदे रचली आहेत. त्यांच

शिष्य बिहारिनीदेव यानेही कृष्णलीलेवर काव्यरचना केली आहे. याशिवाय, या संप्रदायातील नागरीदास, सरसदेव, नरहरदेव, सहचरिशरण, इ. भक्त कवींनी व्रज भाषेतील भक्तिसाहित्यात भर घातली आहे. [ भागवत दर्शन ]

**सख्यभक्ती** नवविधा भक्तीपैकी आठवी भक्ती. भगवंतावर मित्रभावाने नितांत प्रेम करणे यालाच सख्यभक्ती अशी संज्ञा आहे. भगवंताची पूर्ण कृपा झाली तरच ही भक्ती घडू शकते. त्यामुळे सख्यभक्तीचा अधिकार भक्ताला प्राप्त होणे न होणे, ही गोष्ट सर्वस्वी ईश्वराच्या इच्छेवर अवलंबून आहे. रामदासस्वामी म्हणतात—

देवाच्या सख्यत्वासाठी । पडाव्या जिवलगांसी तुटी ।
सर्व अर्पावे सेवटी । प्राण तोही वेचावा ॥
आपुले अवघेचि जावे । परी देवासी सख्य राहावे ।
ऐसी प्रीती जीवेभावे । भगवंती लागावी ॥

देवाला आपला जीव की प्राण समजणे, हे परम प्रीतीचे लक्षण आहे. देवाशी असे सख्य केले म्हणजे देवालाच आपली काळजी लागते. आपण अनन्यभावाने त्याची भक्ती केली, तर तो तत्काळ पावतो. कारण तो कृपेचा सागर आहे. भगवंताच्या रामावतारात सुग्रीव व विभीषण आणि कृष्णावतारात गोप, गोपी, उद्धव व अर्जुन अशा काही भाग्यवान भक्तांनाच सख्यभक्तीचा लाभ घडला. [ कल्याण – साधनांक; रा. स. रा. ]

**सगनभाऊ** (इ. स. चे १८–१९ वे शतक) एक मुसलमान मराठी शाहीर. हा पुण्याजवळच्या जेजुरी गावचा रहिवासी. याचा पिढीजात धंदा शिकलगारीचा म्हणजे हत्यारांना धार लावण्याचा होता. परंतु त्याला त्या धंद्यात रस वाटेना किंवा तो धंदा त्याला नीट साधेना, म्हणून तो पुण्याला आला व तमाशाच्या फडात शिरला. लौकरच त्याला कवित्वस्फूर्ती झाली व तो कवने रचून स्वतःच गाऊ लागला. होनाजीसारख्या मातबर शाहिराशी स्पर्धा करून त्याने स्वतःचे नाव तमाशाच्या फडात गाजते ठेवले.

सिदू रावळ हा नाथपंथी शाहीर सगनभाऊचा गुरू होता. सगनभाऊला मराठी बोलीचा आणि मराठी परंपरेचा फार अभिमान होता. त्यामुळेच मराठी स्वराज्याचा अस्त होताच तो व्यथित झाला. त्याची ही व्यथा त्याने पुढे दिलेल्या काव्यपंक्तींत, प्रत्ययकारी शब्दांत वर्णन केली आहे —

राजा कुणिकडे, प्रजा कुणिकडे,
काय अशी आग पाखडली ।
वस्त्र विसरलो, पाणि विसरलो,
वाळंवटि जशी मासोळी पडली ।।
तसेंच काय हो – चहुंमवत्या फौजा,
भयभीत झाल्या आभाळांत ।
जरिपटक्याचा हत्ती अमुचा, रुतला गाळांत ।।

अन्य मराठी शाहिरांप्रमाणे सगनभाऊनेही प्रीतीची गाणी मुक्त स्वरात गायली आहेत. श्री. रा. चिं. ढेरे त्याच्या कवनांचे काव्यात्म वर्णन करताना लिहितात — ‘सगनभाऊला रामजोशीची रुणझुणती रसवंती लाभली नव्हती आणि होनाजीची जरतारी जडणघडणही जमली नव्हती; पण त्याच्या मनाचे पाखरू जातिवंत प्रीतीच्या राज्यात मोकाटपणाने भिरभिरत आणि कंठ फुटेपर्यंत उत्कटपणे प्रीतीची गाणी गाते.’



सगनभाऊ

सगनभाऊची भाषा सहजसुंदर व रचना प्रत्ययकारी वर्णनांनी सजलेली असते. ‘ तू प्राणहंस, मी कांचन कायाकुडी । तू कल्पवृक्ष, मी छाया तुज तळवटी ’ यासारख्या हृदयाला भिडणाऱ्या काव्यपंक्ती तो लीलया लिहितो. [ मु. म. सं. ]

**सगुणोपासना** ईश्वरोपासनेचा एक सुलभ मार्ग. जगाची उत्पत्ती, स्थिती आणि लय यांना कारणीभूत असलेल्या परमेश्वराची व्यक्त आणि अव्यक्त अशी दोन रूपे असतात. त्यांतील व्यक्त रूपाला सगुण रूप असे म्हणतात. आणि ज्याचे केवळ कल्पनेने, मनाने वर्णन करावे लागते त्याला निर्गुण स्वरूप म्हणतात. अर्थात निर्गुणतत्त्व हे प्रगल्भ मानसिक अवस्थेचे एक प्रतीक आहे. मानवाची प्राथमिक अवस्था प्रगल्भ असणे अशक्य वाटते आणि म्हणून सगुणातूनच निर्गुणाची कल्पना पुढे आली असावी.

मानवाचा प्राथमिक अवस्थेतला धर्म जादूटोण्यावर व निस-

र्गावर आधारलेला होता. जादूटोण्यांना प्रतीकांची आवश्यकता असते. अशा तऱ्हेची प्रारंभीची अवघड किंवा ओवडधोवड प्रतीके ही सगुणोपासनेच्या मुळाशी असावी. पुढे मानवाची बुद्धी विकसित झाली आणि त्या ओवडधोवड स्वरूपात चैतन्य स्थिरावले. मग या मूर्तींना रेखीवपणा आला. त्या दैवी गुणांच्या प्रतीक ठरल्या आणि त्यांची पूजा सुरू झाली. वैदिक संस्कृतीहून भिन्न असलेल्या सिंधुसंस्कृतीत म्हणजे वेदपूर्वकालात सगुणोपासना होती, असे कळून येते. कारण मोहेंजोदडो, हडप्पा इथल्या उत्खननात हजारो मूर्ती सापडल्या आहेत. वैदिक आर्यांचा धर्म यज्ञप्रधान होता. इंद्र, वरुण, अग्नी, इ. त्यांच्या देवता होत्या. यज्ञाच्या माध्यमातून ते या देवतांना प्रसन्न करीत असत.

पण या उभय समाजांच्या संगमावस्थेत ही स्थिती सामान्यांना पेलणारी नव्हती. कोणत्या ना कोणत्या तरी रूपात त्यांना देव समोर हवा होता. चित्ताच्या स्थैर्यासाठी, मनाच्या एकाग्रतेसाठी व समाधानासाठी साकार देवाशी जवळीक करणे हे सामान्य माणसांना सुकर होते. हाच विचार तुकारामाने पुढील अभंगात सांगितला आहे–

**सकळिकांचे समाधान । नव्हे देखिल्यावांचून ॥**
**रूप दाखवीं रे आतां । सहस्रभुजांच्या मंडिता ॥**
**शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित ये गोविंदा ॥**
**तुका म्हणे कान्हा । भूक लागली नयनां ॥**

अशा प्रकारे भक्त त्याला आपली सुखदु:खे सांगू शकतो. त्याच्याशी सलगीने व लडिवाळपणे बोलू शकतो. कधी तो त्याच्यावर रागावतोही–

**पतीतपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा ।**
**पतीतपावन न होसी म्हणुनी जातो माघारा ॥**

हे नामदेवाचे त्राग्याचे उद्‌गार याच मानसिक अवस्थेचे द्योतक आहेत. एकंदरीत सामान्य जनांना परमेश्वराच्या निकट नेणारा राजमार्ग म्हणजे सगुणोपासना होय.

निर्गुणोपासना ही क्लेशकारक व खडतर असते. म्हणून ज्ञानदेव म्हणतात–

**म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा ।**
**तया दु:खाचिया वाटा । भागा आला ॥**

(ज्ञाने. १२.६९)

या वाटेवरचे दु:ख जाणूनच श्रीकृष्णाने गीतेत म्हटले आहे की माझ्या सगुण रूपावर चित्त ठेवणाऱ्या भक्तावर मी प्रेम करतो, मृत्युसंसारसागरातून त्याचा उद्धार करतो; कळिकाळाचा पराभव करून त्याला पदरात घेतो. (गीता १२.७).

सगुणोपासनेतही कोणत्या रूपाची उपासना करायची असा एक प्रश्न संभवतो. कृष्णसखा अर्जुनाने या प्रश्नाचे उत्तर दिलेले आहे. श्रीकृष्णाने आपल्या विभूतींचे वर्णन केल्यावर अर्जुनाने त्याचे ते विश्वरूप पहाण्याची इच्छा व्यक्त केली. कृष्णाने आपले विश्वरूप त्याला दाखविले. परंतु त्या विक्राळ, विराट रूपाला पाहून अर्जुन भयभीत झाला. ते रूप त्याला साहवले नाही. त्याने पुन्हा कृष्णाला सौम्य रूप दाखविण्याची विनंती केली.

सगुणातून निर्गुणाची निर्मिती असा मानसशास्त्राचा दावा असला तरी, आज निर्गुणाच्या प्राप्तीसाठी सगुणोपासना सांगितली जाते. एकनाथांनी म्हटले आहे–

**सगुण उपासना स्थिती । तद्द्वारा निर्गुण प्राप्ती ।**
**उद्धवाप्रती हरि बोले ॥**

असे असले तरीही सगुण आणि निर्गुण या एकाच चित्तत्त्वाच्या उभय छटा आहेत, असे ज्ञानेश्वरांनी पुढील अभंगात सांगितले आहे –

**तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे**
**सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ।**

निर्गुणोपासनेच्या तुलनेने सगुणोपासनेचा प्रसार अधिक झाला आहे. नवविधा भक्तीतील पादसेवन, अर्चन व वंदन हे भक्तिप्रकार तर खास सगुणोपासनेशी संबंधित आहेत. जगाच्या पाठीवर निर्माण झालेली विविध देवतांची मंदिरे हे त्याचे बोलके उदाहरण आहे: पाहा – निर्गुणतत्त्व; भक्ती.

**सचल** (इ. स. १७३९–१८२९) एक सूफी संतकवी. सिंध प्रांतातील खैरपुर राज्यातील दारजन गावी याचा जन्म झाला. त्याचे मूळ नाव अब्दुल वहव असे असून, सचल किंवा सचू (= सत्याचा उपासक) हे त्याने काव्यासाठी घेतलेले नाव होते. सचल अनेकदा उन्मनी अवस्थेत असे. म्हणून लोक त्याला सरमस्त असे म्हणत. तो लहान असतानाच त्याचा पिता मृत्यू पावला. त्यामुळे फकीर अब्दुल हक या त्याच्या चुलत्याने त्याचे पालनपोषण केले. अब्दुल हक त्याचा आध्यात्मिक गुरू व सासराही होता. लग्नानंतर दोनच वर्षांनी सचलाची पत्नी वारली. त्यानंतर पुन्हा त्याने लग्न केले नाही.

सचलाने आपल्या गुरूची वारंवार प्रशंसा केली आहे. तो त्याला देवाचाही देव असे म्हणत असे.

सचलाने फारसी आणि अरबी या भाषांचे चांगले अध्ययन केले होते. कुराण तर त्याला मुखोद्‌गत होते. सिंधी, हिंदी, उर्दू, सरैकी, फारसी, अरबी व पंजाबी या सात भाषांत तो काव्यरचना करीत असे. जेव्हा तो उन्मनी अवस्थेत असे, तेव्हा त्याला आपोआप काव्य स्फुरत असे. संगीताचा तो फार शोकता होता. तबल्याची साथ असलेले सारंगीवादन ऐकले, की त्याचे देहभान हरपे आणि त्याच्या मुखातून काव्यपंक्ती स्रवू लागत.

गूढवादी कवी म्हणून तो फार लोकप्रिय होता. सत्य, प्रेम आणि सौंदर्य हाच आपला धर्म आहे, असे तो सांगत असे. जातीजातींत प्रेम असावे, अशी शिकवण तो देत असे.



सचल सरमस्त

त्याचे काव्य आध्यात्मिक रंगाने रंगलेले आहे. सूफींच्या मेळाव्यात मोठ्या आवडीने त्याची पदे गायिली जातात.

एकांत व मौन ही त्याने आपल्या साधनेची आवश्यक अंगे मानली आहेत. प्रियतम परमात्म्याचा शोध कुठे लागेल, ते त्याने पुढील काव्यात सांगितले आहे—

विनयसंपन्न पवित्र अंत:करण
तथा निर्मल और प्रबुद्ध मनमें
प्रियतम का दर्शन करो ।
तुम इधर उधर क्यों भटकते हो ?
तुम्हारे हृदयमें एक सौंदर्यपूर्ण
रमणीय उपवन हैं जो ।
स्वच्छ हैं और उसमें बुलबुल
गाती हैं – प्रियतमका दर्शन करो ।

अर्थ– विनयसंपन्न आणि पवित्र अंत:करणात, त्याचप्रमाणे निर्मळ व जागृत मनात तुम्ही प्रियतम परमात्म्याचे दर्शन घ्या. तुम्ही इकडे तिकडे का भटकत आहा ? तुमच्या हृदयात एक स्वच्छ, सुंदर व रमणीय उपवन आहे, त्यात बुलबुल गात आहे, की इथे प्रियतमाचे दर्शन घ्या.

युसिफ, याकूब, बेदिल, हे त्याचे प्रमुख शिष्य होते.

वयाच्या नव्वदाव्या वर्षी दारजन इथे त्याने आपल्या देहाचा त्याग केला. दारजन गावीच त्याची समाधी आहे. [ भा. सं. म.; सचल सरमस्त, श्री. कल्याण बी. अडवानी, १९७१ ]

**सचियामाता** जैन ओसवाल जातीची कुलदेवी. हिला सच्चिकादेवी असेही म्हणतात. जोधपूरपासून ३९ मैल दूर ओसियाँ नामक गावी टेकडीवर हिचे देऊळ आहे. महिषासुरमर्दिनीचे सौम्य रूप म्हणून ही देवी ओळखली जाते. उपकेश गच्छपट्टावली नामक एका ग्रंथात हिच्याविषयी एक कथा आढळते, ती अशी—

एकदा ही देवी तिथल्या जैन आचार्यांसमोर सदेह प्रकट होऊन खायला मागू लागली. आचार्यांनी तिला फळे, दूध, मिठाई असा सौम्य आहार दिला. परंतु देवीला पशुबळी हवा होता. आचार्यांनी तिला नम्रतापूर्वक म्हटले 'मातु:श्री, तुझी इच्छा मी पुरी करू शकत नाही.'

आचार्यांच्या या प्रांजळ नकारामुळे देवी प्रसन्न झाली व आपले उग्र रूप टाकून सौम्य बनली. [ कुलदैवत; जै. भ. का.पृ. ]

**सजोदरा ब्राह्मण** गुजरात प्रदेशातील ब्राह्मणांची एक जात. या लोकांची वस्ती केवळ भडोच जिल्ह्यात आहे. अंकलेश्वराजवळ सजोद नावाचे एक खेडेगाव आहे, तिथे हे राहतात. म्हणून यांना सजोदरा हे नाव मिळाले. यांच्यांत संसारी व भिक्षुक असे दोन वर्ग आहेत. भिक्षुकवर्गातील काही लोकांनी वेदशास्त्राचा अभ्यास केला आहे. काही ज्योतिषी व काही पुराणिकही आहेत. या ब्राह्मणांची राहणी अतिशय मलिन असते. यांची उत्पत्तिकथा अनावळा ब्राह्मणांप्रमाणेच आहे. पाहा– अनावळा ब्राह्मण. [ वि. मुं. रा. प. ]

**सज्जनगड** महाराष्ट्रात साताऱ्याच्या पश्चिमेला ६ मैलांवर परळी नामक गाव आहे. त्याच्या जवळ एका डोंगरावर हे स्थान आहे. या गडावर समर्थ रामदासांची समाधी आहे. गडाचा तट बहुतेक पडलेला असून, प्रवेशद्वाराजवळचा काही भाग तेवढा शिल्लक आहे. तटाखाली डाव्या बाजूला मारुतीचे व उजव्या बाजूला सवत्स धेनूचे लहानसे देऊळ दिसते. महाद्वारातून आत शिरताच डाव्या व उजव्या बाजूला वराह व हनुमान यांच्या मूर्ती दिसतात. त्यांची स्थापना आधुनिक संतपुरुष श्रीधरस्वामी यांनी केली आहे.

त्यानंतर पायऱ्या चढून गेले, की समोर मठाचा दरवाजा दिसतो. त्याच्या उजव्या बाजूला मारुतीचे लहान मंदिर आहे. त्याच्या पाठीमागे पिण्याच्या पाण्याचे तळे असून, जवळच श्रीधर-कुटी नावाची भव्य वास्तू आहे.



सज्जनगडाचा पूर्वदरवाजा

मठाचे आवार विस्तीर्ण आहे. त्याच्या प्रवेशद्वारातून आत शिरले, की समोर समर्थांचा मठ आणि उजव्या हाताला श्रीराम-मंदिर व समर्थांची समाधी आहे. मठाची जुनी वास्तू शिवाजी महाराजांनी बांधलेली आहे. तिथेच समर्थ रामदासांनी आपले अखेरचे दिवस घालवले आणि देह ठेवला. तिथल्या शेजघरात त्यांच्या विविध वस्तू जपून ठेवलेल्या आहेत.

श्रीराममंदिराच्या सभामंडपात सिद्धिविनायक व हनुमान यांच्या मूर्ती आहेत. सभामंडपातून काही पायऱ्या चढून पुढे गेले, की मुख्य मंदिर लागते. त्यात श्रीराम, लक्ष्मण व सीता यांच्या पंचरसमूर्ती दिसतात. त्या मूर्ती समर्थांनी बनवून घेतल्या होत्या. मोगल सेनेने महाराष्ट्रात धुमाकूळ घातला, त्या काळात त्या मूर्ती वासोट्याच्या किल्यावर लपवून ठेवण्यात आल्या होत्या. छत्रपती राजाराम महाराजांच्या वेळी सज्जनगडावर नवीन मंदिर बांधून त्यात त्यांची पुनःप्रतिष्ठा करण्यात आली.

श्रीराम मंदिराच्या गाभाऱ्यातूनच खाली समाधीकडे जायला भिंतीतील दगडी जिना आहे. तिथे पितळी पेटीत समर्थांच्या पादुका आहेत.

मंदिराच्या मागील बाजूस नैर्ऋत्य कोपऱ्यात एक मारुति-मंदिर असून, वायव्य कोपऱ्यात वेणाबाईचे वृंदावन आहे. समर्थांच्या दुसऱ्या शिष्या आक्काबाई यांची समाधी राममंदिरा-पुढील भागात उत्तरेला आहे. तिथे आता समर्थ सेवा मंडळाने मोठे सभागृह बांधले आहे.

मठापासून काही अंतरावर एका बुरुजापाशी आंग्लाईचे मंदिर आहे. हे मंदिर समर्थांच्या काळातले असून, समर्थ सेवा मंडळाने त्याचा जीर्णोद्धार केला आहे. आंग्लाईची मूर्ती फार सुबक आहे. अंगापूरच्या डोहात रामाच्या मूर्तीबरोबरच ही रामवरदायिनीची मूर्ती समर्थांना सापडली; म्हणून तिचे नाव आंग्लाई असे ठेवले गेले. या मूर्तीचे ध्यान महिषासुरमर्दिनीचे असून, ती चतुर्भुज व सायुध आहे.

या गडावर प्रतिवर्षी दासनवमीला मोठा उत्सव असतो. तो माघ वद्य प्रतिपदेपासून नवमीपर्यंत चालतो. त्या दिवसांत ४०-५० हजार समर्थभक्त तिथे जमतात. नवमीला समर्थांची पुण्यतिथी असल्यामुळे अलोट गर्दी होते. याशिवाय महाशिवरात्रीला व रामनवमीलाही इथे बरीच यात्रा जमते.

या गडाचे जुने नाव परळीचा गड असे होते. समर्थ रामदासस्वामी तिथे राहू लागल्यानंतर शिवाजी महाराजांनी त्याला सज्जनगड हे नाव दिले व तिथे समर्थांसाठी मठ बांधला. [ जय जय रघुवीर समर्थ, अमरेंद्र, १९६०; ती. म. १; स. भा. प्र. व.]

**सट्टक** प्राकृत भाषेतील एक उपरूपक. सट्टक हे प्राकृतातील नाटिकेप्रमाणेच आहे. फक्त त्यात विष्कंभक आणि प्रवेशक नसतात. सनपूर्व २०० च्या भरहुत येथील शिलालेखात वापरलेला सादिक किंवा सट्टिक हा शब्द सट्टक या शब्दाचे पूर्वरूप असावा. इ. स. च्या आरंभापूर्वीच लोकांत सट्टकाचा प्रचार झाला होता.

सट्टकाचे मूळ भावनात्मक आणि क्रीडात्मक प्रवृत्तींमध्ये आहे. त्यात नृत्य आणि संगीत यांबरोबर अभिनयालाही वाव असतो. त्यात अद्‌भुत रसाला प्राधान्य असते. त्यात चार अंक असून, त्यांना जवनिका असे म्हणतात.

नाटिकेप्रमाणे सट्टकाची कथावस्तू काल्पनिक असते. त्यातील नायक हा प्रख्यात धीरललित राजा असतो. त्याची महाराणी ही ज्येष्ठ, प्रगल्भ, राजकुलोत्पन्न, गंभीर आणि मानिनी असते. त्यामुळेच नायकाचे नूतन नायिकेशी प्रेम जमते. नूतन नायिका मुग्धा व राजकुलोत्पन्न सुंदरी असते. राजाचे तिच्यावरचे प्रेम वृद्धिगत होत जाते. पण पट्टराणीच्या धाकामुळे तो आतल्या आत कुढत राहतो. शेवटी पट्टराणीच्या संमतीने दोघांचे प्रेम सफल होते. मग राजा मंत्र्यांवर राज्यकारभार सोपवून विलासांत मग्न होतो. साहजिकच सट्टकात शृंगाराची वर्णने विपुल आढळतात.

सट्टकाचे नामकरण नायिकेच्या नावावरून केले जाते. तसेच

शत शेवटी आश्चर्यकारक दृश्यांचे आयोजन केलेले असते.

राजशेखरकृत कर्पूरमंजरी, रुद्रदासकृत चंदलेहा, घनश्यामकृत आनंदसुंदरी, नयचंद्रमुनिरचित रंभामंजरी, विश्वेश्वररचित शृंगारमंजरी ही सट्टकाची उदाहरणे आहेत. [ प्रा. भा. सा. आ. इ.; हिं. सा. आ. ]

**सडा–संमार्जन** एक प्रातःकालीन गृहकृत्य. सकाळी लवकर उठून गृहिणी घरापुढचे अंगण झाडते व त्यावर गोमय पाण्यात कालवून त्याचा सडा घालते. नंतर ती अंगणात रांगोळीने स्वस्तिक काढते; काही वेळा स्वस्तिकाच्या जोडीला आणखीही एखादी रांगोळी घालते. सडा-संमार्जन करून स्वस्तिक न काढता त्या जमिनीवरून चालत जाणाऱ्या स्त्रीचे आयुष्य, धन व यश नष्ट होते, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे.

**सत्** जगताचे मूळ कारण. जगाच्या प्रारंभी सत् तेवढेच होते, असे छांदोग्य उपनिषदात स्पष्टपणे सांगितले आहे (६. २.१.४). हे सत् एकमेव व अद्वितीय होते. आपण अनेक व्हावे व प्रजोत्पत्ती करावी असे सत्च्या मनात आले व त्याने अग्नी उत्पन्न केला. अग्नीने आपण अनेक व्हावे व आपली प्रजा असावी, असे मनात आणले व त्याने पाणी उत्पन्न केले. पाण्यानेही तसाच विचार केला व अन्न उत्पन्न केले. अशा प्रकारे या मूल सत्पासून तेजोवन्नात्मिका (तेज, आप व अन्न एतदात्मिक) अशी त्रिविध प्रकृती उत्पन्न झाली. [ उ. र. ]

**सतनी** भिक्षेकऱ्यांची एक जात. या लोकांची वस्ती प्रामुख्याने कर्नाटक राज्यात आढळते. हे लोक आपल्या कपाळावर दोन रुंद पिवळ्या रेघा आणि त्यांच्यामध्ये त्याच रंगाची एक लहानशी रेघ काढतात. सतनी हे ब्राह्मणांशिवाय अन्य लोकांच्या हातचे अन्न खात नाहीत. कोणत्याही कामाला जाताना हा भिक्षेकरी भेटला तर तो अपशकुन समजला जातो. [ बां. बे.ऋा.]

**सतार** एक ततवाद्य. हे साधारणपणे तंबोऱ्यासारखे असून, त्याला एक भोपळा व एक लाकडी पोकळ दांडी असते. ही दांडी वरच्या बाजूला चपटी व खालून गोलाकार असते. तिची लांबी सुमारे तीन फूट व रुंदी तीन ते साडेतीन इंच असते. या दांडीवर दोन अटी व १६ ते २१ पितळी पडदे असतात. भोपळ्यावर बसवलेल्या पाटीवर घोडी असते. दांडीच्या दुसऱ्या टोकाला सात खुंट्या बसवलेल्या असतात. संगीतसार या ग्रंथात, पडदे असलेला तंबोरा म्हणजे सतार होय, असे म्हटले आहे.

हे वाद्य अमीर खुस्रव याने निर्माण केले, असे म्हणतात. प्रारंभी या वाद्याला तीनच तारा असत. सेह या फारसी शब्दाचा अर्थ तीन असा आहे. त्यावरून या वाद्याला सितार हे नाव मिळाले



सतार

होते. संगीतसमयसार या ग्रंथात सितार हेच नाव आहे. पण सांप्रत याला सात तारा असतात. सप्ततार वरून सतार हे नाव रूढ झाले, असे काही पंडितांचे मत आहे.

सतारीच्या काही तारा पोलादी व काही पितळी असून, त्या भिन्न भिन्न स्वरांत लावलेल्या असतात. उजव्या हाताच्या तर्जनीवर घातलेल्या नखीने त्या छेडतात. डाव्या हाताच्या बोटांनी पडद्यावर तारा दाबून वेगवेगळे स्वर काढता येतात. वीणेचे पडदे स्थिर असतात, तसे सतारीचे नसतात. वादकाला ते आपल्या इच्छेप्रमाणे सरकवता येतात.

साधी व तरफेची असे सतारीचे दोन प्रकार आहेत. दुसऱ्या प्रकारच्या सतारीत साहाय्यक ध्वनी निर्माण करणाऱ्या पोलादी तरफा असतात. त्यांची संख्या ११ ते १३ असते. तरफांच्या तारा दांडीच्या बाजूला असणाऱ्या लहान खुंट्यांना बांधलेल्या असतात. काही सतारींना दांडीच्या वरच्या बाजूला एक लहान भोपळा लावलेला असतो.

एकोणीस पडद्यांच्या सतारीला चल थाटाची व २१ पडद्यांच्या सतारीला अचल थाटाची सतार म्हणतात. सतारवादन फार कष्टसाध्य असले, तरी सध्या हे वाद्य अत्यंत लोकप्रिय झाले आहे. [ मु. वि. को.; म्यु. इं.; भा. वा. इ. ]

**सतारा** एक सुषिर वाद्य. यात अलगोज्याप्रमाणेच दोन बासऱ्या असतात, पण त्यांची लांबी अलगोज्यापेक्षा जास्त असते. प्रत्येक बासरीला सहा छिद्रे असतात. एका बासरीतून फक्त आधारषड्ज हा एकच स्वर निघतो. दुसरीवर मात्र

त्यानंतर पायऱ्या चढून गेले, की समोर मठाचा दरवाजा दिसतो. त्याच्या उजव्या बाजूला मारुतीचे लहान मंदिर आहे. त्याच्या पाठीमागे पिण्याच्या पाण्याचे तळे असून, जवळच श्रीधर-कुटी नावाची भव्य वास्तू आहे.



सज्जनगडाचा पूर्वदरवाजा

मठाचे आवार विस्तीर्ण आहे. त्याच्या प्रवेशद्वारातून आत शिरले, की समोर समर्थांचा मठ आणि उजव्या हाताला श्रीराम-मंदिर व समर्थांची समाधी आहे. मठाची जुनी वास्तू शिवाजी महाराजांनी बांधलेली आहे. तिथेच समर्थ रामदासांनी आपले अखेरचे दिवस घालवले आणि देह ठेवला. तिथल्या शेजघरात त्यांच्या विविध वस्तू जपून ठेवलेल्या आहेत.

श्रीराममंदिराच्या सभामंडपात सिद्धिविनायक व हनुमान यांच्या मूर्ती आहेत. सभामंडपातून काही पायऱ्या चढून पुढे गेले, की मुख्य मंदिर लागते. त्यात श्रीराम, लक्ष्मण व सीता यांच्या पंचरसमूर्ती दिसतात. त्या मूर्ती समर्थांनी बनवून घेतल्या होत्या. मोगल सेनेने महाराष्ट्रात धुमाकूळ घातला, त्या काळात त्या मूर्ती वासोटयाच्या किल्यावर लपवून ठेवण्यात आल्या होत्या. छत्रपती राजाराम महाराजांच्या वेळी सज्जनगडावर नवीन मंदिर बांधून त्यात त्यांची पुनःप्रतिष्ठा करण्यात आली.

श्रीराम मंदिराच्या गाभाऱ्यातूनच खाली समाधीकडे जायला भिंतीतील दगडी जिना आहे. तिथे पितळी पेटीत समर्थांच्या पादुका आहेत.

मंदिराच्या मागील बाजूस नैऋत्य कोपऱ्यात एक मारुति-मंदिर असून, वायव्य कोपऱ्यात वेणाबाईचे वृंदावन आहे. समर्थांच्या दुसऱ्या शिष्या आक्काबाई यांची समाधी राममंदिरापुढील भागात उत्तरेला आहे. तिथे आता समर्थ सेवा मंडळाने मोठे सभागृह बांधले आहे.

मठापासून काही अंतरावर एका बुरुजापाशी आंग्लाईचे मंदिर आहे. हे मंदिर समर्थांच्या काळातले असून, समर्थ सेवा मंडळाने त्याचा जीर्णोद्धार केला आहे. आंग्लाईची मूर्ती फार सुबक आहे. अंगापूरच्या डोहात रामाच्या मूर्तीबरोबरच ही रामवरदायिनीची मूर्ती समर्थांना सापडली; म्हणून तिचे नाव आंग्लाई असे ठेवले गेले. या मूर्तीचे ध्यान महिषासुरमर्दिनीचे असून, ती चतुर्भुज व सायुध आहे.

या गडावर प्रतिवर्षी दासनवमीला मोठा उत्सव असतो. तो माघ वद्य प्रतिपदेपासून नवमीपर्यंत चालतो. त्या दिवसांत ४०-५० हजार समर्थभक्त तिथे जमतात. नवमीला समर्थांची पुण्यतिथी असल्यामुळे अलोट गर्दी होते. याशिवाय महाशिवरात्रीला व रामनवमीलाही इथे बरीच यात्रा जमते.

या गडाचे जुने नाव परळीचा गड असे होते. समर्थ रामदासस्वामी तिथे राहू लागल्यानंतर शिवाजी महाराजांनी त्याला सज्जनगड हे नाव दिले व तिथे समर्थांसाठी मठ बांधला. [ जय जय रघुवीर समर्थ, अमरेंद्र, १९६०; ती. म. १; स. भा. प्र. व. ]

**सट्टक** प्राकृत भाषेतील एक उपरूपक. सट्टक हे प्राकृतातील नाटिकेप्रमाणेच आहे. फक्त त्यात विष्कंभक आणि प्रवेशक नसतात. सनपूर्व २०० च्या भरहुत येथील शिलालेखात वापरलेला सादिक किंवा सट्टिक हा शब्द सट्टक या शब्दाचे पूर्वरूप असावा. इ. स. च्या आरंभापूर्वीच लोकांत सट्टकाचा प्रचार झाला होता.

सट्टकाचे मूळ भावनात्मक आणि क्रीडात्मक प्रवृत्तींमध्ये आहे. त्यात नृत्य आणि संगीत यांबरोबर अभिनयालाही वाव असतो. त्यात अद्‌भुत रसाला प्राधान्य असते. त्यात चार अंक असून, त्यांना जवनिका असे म्हणतात.

नाटिकेप्रमाणे सट्टकाची कथावस्तू काल्पनिक असते. त्यातील नायक हा प्रख्यात धीरललित राजा असतो. त्याची महाराणी ही ज्येष्ठ, प्रगल्भ, राजकुलोत्पन्न, गंभीर आणि मानिनी असते. त्यामुळेच नायकाचे नूतन नायिकेशी प्रेम जमते. नूतन नायिका मुग्धा व राजकुलोत्पन्न सुंदरी असते. राजाचे तिच्यावरचे प्रेम वृद्धिंगत होत जाते. पण पट्टराणीच्या धाकामुळे तो आतल्या आत कुढत राहतो. शेवटी पट्टराणीच्या संमतीने दोघांचे प्रेम सफल होते. मग राजा मंत्र्यांवर राज्यकारभार सोपवून विलासांत मग्न होतो. साहजिकच सट्टकात शृंगाराची वर्णने विपुल आढळतात.

सट्टकाचे नामकरण नायिकेच्या नावावरून केले जाते. तसेच,

...त शेवटी आश्चर्यकारक दृश्यांचे आयोजन केलेले असते. राजशेखरकृत कर्पूरमंजरी, रुद्रदासकृत चंदलेहा, घनश्यामकृत आनंदसुंदरी, नयचंद्रमुनिरचित रंभामंजरी, विश्वेश्वररचित शृंगारमंजरी ही सट्टकाची उदाहरणे आहेत. [ प्रा. भा. सा. आ. इ.; हिं. सा. आ. ]

**सडा-संमार्जन** एक प्रातःकालीन गृहकृत्य. सकाळी लवकर उठून गृहिणी घरापुढचे अंगण झाडते व त्यावर गोमय पाण्यात कालवून त्याचा सडा घालते. नंतर ती अंगणात रांगोळीने स्वस्तिक काढते; काही वेळा स्वस्तिकाच्या जोडीला आणखीही एखादी रांगोळी घालते. सडा-संमार्जन करून स्वस्तिक न काढता त्या जमिनीवरून चालत जाणाऱ्या स्त्रीचे आयुष्य, धन व यश नष्ट होते, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे.

**सत्** जगताचे मूळ कारण. जगाच्या प्रारंभी सत् तेवढेच होते, असे छांदोग्य उपनिषदात स्पष्टपणे सांगितले आहे (६.२.१.४). हे सत् एकमेव व अद्वितीय होते. आपण अनेक व्हावे व प्रजोत्पत्ती करावी असे सत्च्या मनात आले व त्याने अग्नी उत्पन्न केला. अग्नीने आपण अनेक व्हावे व आपली प्रजा असावी, असे मनात आणले व त्याने पाणी उत्पन्न केले. पाण्यानेही तसाच विचार केला व अन्न उत्पन्न केले. अशा प्रकारे या मूल सत्पासून तेजोबन्नात्मिका (तेज, आप व अन्न एतदात्मिक) अशी त्रिविध प्रकृती उत्पन्न झाली. [ उ. र. ]

**सतनी** भिक्षेकऱ्यांची एक जात. या लोकांची वस्ती प्रामुख्याने कर्नाटक राज्यात आढळते. हे लोक आपल्या कपाळावर दोन रुंद पिवळ्या रेषा आणि त्यांच्यामध्ये त्याच रंगाची एक लहानशी रेघ काढतात. सतनी हे ब्राह्मणांशिवाय अन्य लोकांच्या हातचे अन्न खात नाहीत. कोणत्याही कामाला जाताना हा भिक्षेकरी भेटला तर तो अपशकुन समजला जातो. [ बाँ. वे.ऋा.]

**सतार** एक ततवाद्य. हे साधारणपणे तंबोऱ्यासारखे असून, त्याला एक भोपळा व एक लाकडी पोकळ दांडी असते. ही दांडी वरच्या बाजूला चपटी व खालून गोलाकार असते. तिची लांबी सुमारे तीन फूट व रुंदी तीन ते साडेतीन इंच असते. या दांडीवर दोन अटी व १६ ते २१ पितळी पडदे असतात. भोपळ्यावर बसवलेल्या पाटीवर घोडी असते. दांडीच्या दुसऱ्या टोकाला आत खुंट्या बसवलेल्या असतात. संगीतसार या ग्रंथात, पडदे असलेला तंबोरा म्हणजे सतार होय, असे म्हटले आहे. हे वाद्य अमीर खुसरव याने निर्माण केले, असे म्हणतात. प्रारंभी या वाद्याला तीनच तारा असत. सेह या फारसी शब्दाचा अर्थ तीन असा आहे. त्यावरून या वाद्याला सितार हे नाव मिळाले



सतार

होते. संगीतसमयसार या ग्रंथात सितार हेच नाव आहे. पण सांप्रत याला सात तारा असतात. सप्ततार वरून सतार हे नाव रूढ झाले, असे काही पंडितांचे मत आहे.

सतारीच्या काही तारा पोलादी व काही पितळी असून, त्या भिन्न भिन्न स्वरांत लावलेल्या असतात. उजव्या हाताच्या तर्जनीवर घातलेल्या नखीने त्या छेडतात. डाव्या हाताच्या बोटांनी पडद्यावर तारा दाबून वेगवेगळे स्वर काढता येतात. वीणेचे पडदे स्थिर असतात, तसे सतारीचे नसतात. वादकाला ते आपल्या इच्छेप्रमाणे सरकवता येतात.

साधी व तरफेची असे सतारीचे दोन प्रकार आहेत. दुसऱ्या प्रकारच्या सतारीत साहाय्यक ध्वनी निर्माण करणाऱ्या पोलादी तरफा असतात. त्यांची संख्या ११ ते १३ असते. तरफांच्या तारा दांडीच्या बाजूला असणाऱ्या लहान खुंट्यांना बांधलेल्या असतात. काही सतारींना दांडीच्या वरच्या बाजूला एक लहान भोपळा लावलेला असतो.

एकोणीस पडद्यांच्या सतारीला चल थाटाची व २१ पडद्यांच्या सतारीला अचल थाटाची सतार म्हणतात. सतारवादन फार कष्टसाध्य असले, तरी सध्या हे वाद्य अत्यंत लोकप्रिय झाले आहे. [ सु. वि. को.; म्यु. इं.; भा. वा. इ. ]

**सतारा** एक सुषिर वाद्य. यात अलगोज्याप्रमाणेच दोन बासऱ्या असतात, पण त्यांची लांबी अलगोज्यापेक्षा जास्त असते. प्रत्येक बासरीला सहा छिद्रे असतात. एका बासरीतून फक्त आधारषड्ज हा एकच स्वर निघतो. दुसरीवर मात्र

गीताचे वादन केले जाते. हे वाद्य विशेषतः सिंधमध्ये प्रचारात असून, तिथून ते राजस्थानात आले. [ भा. वा. इ. ]

**सतीप्रथा** पती मरण पावला असता त्याच्या प्रेताबरोबर आत्मदहन करणाऱ्या स्त्रीला सती आणि या प्रथेला सतीप्रथा असे म्हणतात. ही प्रथा सहमरण, सहगमन, अन्वारोहण, अनुमरण, इ. नावांनी ओळखली जाते. सतीप्रथा प्राचीनतम असून, जगातल्या निरनिराळ्या जातींत ती रूढ होती. श्रोडर व इतर पंडित यांच्या मते ही चाल इंडो-जर्मॅनिक असून, भारताप्रमाणे ती युरोपात व अतिपूर्वेकडील देशांतही प्रचलित होती. प्रोकापियुस नावाच्या प्राचीन लॅटिन लेखकाने, गॉथिक युद्धे या ग्रंथात सतीचा उल्लेख केला आहे. ट्युटॉनिक या जर्मन टोळचांनी युरोपाच्या बऱ्याच भागात ही चाल नेली, असे म्हणतात. स्कँडिनेवियन लोकांमध्ये ही पद्धत असल्याचे ग्रीम या जर्मन लेखकाने सांगितले आहे. त्याचप्रमाणे स्लाव, केल्ट, युनानी, नार्वेजियन, सिथियन, चीनी, इ. लोकांमध्ये ही प्रथा होती. सिथियन लोकांच्या या चालीचे अनुकरण हिंदूंनी केले असावे, असे मोनियर विल्यम्सचे मत आहे. ही चाल वायव्य सरहद्दीतून भारतात आली असण्याची शक्यता आहे.

सतीप्रथेच्या निर्मितीमागे अनेक कारणपरंपरा असाव्या. परलोकात पतीचे पुनर्मीलन व्हावे, हा एक मोठा हेतू त्यामागे असतो. नुबेलुंग या प्राचीन जर्मन महाकाव्यात ब्रुनहिल्डच्या सहगमनाचा उल्लेख आहे. परलोकात सिगर्डचे व आपले मीलन व्हावे या इच्छेने तिने चितेत उडी घेतल्याचा वृत्तांत आहे. मृताला परलोकात त्याच्या आवडत्या वस्तूंची गरज भासेल म्हणून त्या वस्तू मृताबरोबर पाठविल्या जात. सिथियन राजांच्या दफनाच्या जागी त्यांच्या रखेल्या, नोकर, घोडे यांचा बळी देत असत. इजिप्शियन राजांच्या थडग्यांमध्ये-स्त्रियांची प्रेते सापडली आहेत. याशिवाय पति-पत्नींची परस्परासंबंधीची अनुरक्ती, अतूट साहचर्याची भावना, पतीच्या मरणाने निर्माण होणारी असहायता, शीलरक्षणाची चिंता, समाजाचा विधवांसंबंधीचा दृष्टिकोण, इ. अनेक कारणे यामागे आहेत.

प्राचीन भारतीय वाङ्मयात थोड्याफार फरकाने हीच कारणे धर्माच्या अवगुंठनातून सांगितलेली आढळतात. ' पतिं विना मृतं श्रेयो नार्याः ' हे इथले तत्त्वज्ञान आहे. व्युषिताश्वपत्नी भद्रा म्हणते, की पतीशिवाय जगणारी विधवा स्त्री निरंतर दुःखात असते. त्यामुळे ती जिवंत असूनही मृतवत होते. म्हणून पतीच्या मरणानंतर स्त्रीने मरणे यातच तिचे कल्याण असते. ( म. भा. आदि. १२० ). पतीला देवस्वरूप मानणे, वीरपत्नीपदाची आकांक्षा धरणे हीही कारणे या प्रथेच्या निर्मितीमागे आहेत. पतीची अतृप्त इच्छा पुरी करण्यासाठी पांडुपत्नी माद्री सती गेल्याचे महाभारतात म्हटले आहे (आदि. १२४). कालांतराने अहेव मरणाची इच्छा मूळ धरू लागली. सती गेल्याने स्त्रीला मोक्ष मिळतो व त्यामुळे उभय घराण्यांची प्रतिष्ठा वाढते, असे समजले जाऊ लागले. संपत्तीचा स्वार्थी हेतूही त्यात डोकावू लागला. अशा अनेक कारणांचा परिपाक म्हणून सती जाणे हे स्त्रीच्या इच्छेवर न राहता ते समाजाच्या हाती गेले. त्यामुळे सतीप्रथेचा हेतूच बदलला आणि स्वार्थाच्या अतिरेकाने त्याला हिडीस स्वरूप प्राप्त झाले.

भारताबाहेरील आर्यांमध्ये ही पद्धत रूढ असली, तरी वैदिक वाङ्मयाच्या आधारे, ही प्रथा भारतीय आर्यांमध्ये होती असे निश्चयपूर्वक सांगता येणार नाही. भारतात प्रवेश केल्यानंतर येणाऱ्या प्रत्येक संकटाला तोंड देण्यासाठी त्यांना संख्यावाढीची आवश्यकता असावी आणि म्हणून ही प्रथा लोप पावली असावी. कालांतराने एखाद्या राजघराण्याने ती पुन्हा सुरू केली असावी, असे म्हटले जाते. ऋग्वेदात मृत पतीबरोबर स्मशानात गेलेल्या स्त्रीला परत बोलावल्याचा उल्लेख आहे ( १०.१८.७–८ ). मृताला चितेवर ठेवल्यानंतर त्याच्या स्त्रीला उत्तर बाजूला बसवीत. मग तिचा दीर अथवा अन्य कोणीतरी " हे गतधवा स्त्रिये, लोकाग्रहास्तव प्रेताजवळून उठून तू इकडे ये. तुझा दीर तुझ्याशी पुनर्विवाह करायला सिद्ध आहे." इ. मंत्र म्हणून तिला परत बोलावीत असे. (आश्व. गृ. सू. (४.२.१६–१९). अथर्ववेदात " हे मृत पुरुषा, तुझ्या मृत देहाशजारी पतिलोकाची इच्छा करणारी तुझी स्त्री प्राचीन धर्माचे पालन करीत पडली आहे " असा उल्लेख आहे (१८.३.१). हे दोन्ही उल्लेख प्राचीन प्रथेचे स्मरणांश असावे, असे म्हणतात. कारण वैदिक आर्य हे जीवनवादी विचारांचे पुरस्कर्ते होते. त्याचप्रमाणे वेदकाली स्त्रियाही प्रेतयात्रेबरोबर स्मशानात जात असल्याच्या चालीचा हा निर्देश असण्याची शक्यता आहे. कारण रामायणात – महाभारतातही अशा तऱ्हेच्या स्त्रिया प्रेतयात्रेला गेल्याचा उल्लेख आढळतो. शिवाय सतीसंबंधीचे वैदिक मंत्र आढळत नाहीत. यावरून वेदपूर्वकाली सतीची चाल असून नंतर ती बंद पडली, असा निष्कर्ष निघतो.

वेदपूर्वकाली चालू असलेल्या या प्रथेचा उल्लेख ब्राह्मण ग्रंथांत व सूत्रग्रंथांतही आढळत नाही. मनूने या प्रथेची दखलही घेतलेली नाही. उलट त्याने अशा स्त्रियांना सहगमनाचा मार्ग न सांगता ब्रह्मचर्याचा मार्ग सांगितला आहे(५.१६०). विष्णुधर्मसूत्रात वैकल्पिक पद्धतीने या प्रथेचा उल्लेख आला आहे. " भर्तरि मृते ब्रह्मचर्यमन्वारोहणं वा " ( नवरा मरण पावला असता स्त्रीने ब्रह्मचर्याचे पालन करीत तरी राहावे किंवा

त्याच्याबरोबर सहगमन तरी करावे) असे तिथे म्हटले आहे.

रामायणात कोणत्याही स्त्रीने सहगमन केल्याचा उल्लेख नाही. दशरथ व रावण मरण पावले असता त्यांच्या स्त्रिया सती गेल्या नाहीत. तथापि कौसल्येने मात्र सहगमनाचा विचार व्यक्त केलेला आढळतो. ती म्हणते. " या माझ्या पतीच्या देहाला आलिंगन देऊन मी अग्निप्रवेश करीन"(वा. रा. २.६६.१२). यावरून ही प्रथा अत्यंत तुरळक प्रमाणात विशिष्ट वर्गापुरतीच मर्यादित होती, असे दिसते. उत्तरकांडात वेदवती सती गेल्याच्या घटनेचा उल्लेख आहे. पण विद्वानांच्या मते हे कांड प्रक्षिप्त असल्याने त्याची ऐतिहासिकता गृहीत धरता येत नाही.

महाभारतातील सतीप्रथेचा उल्लेख हा पहिला उल्लेख मानावा लागतो. पांडुपत्नी माद्री सती गेली आहे(आदि. १२४). परंतु तिने सती जाण्याचे जे कारण दिले आहे, ते धार्मिक दिसत नाही. वसुदेवाच्या चार बायका देवकी, भद्रा, रोहिणी व मदिरा यांनी सहगमन केले, असे मौसल पर्वात म्हटले आहे. कृष्णनिधनानंतर अर्जुनाबरोबर इंद्रप्रस्थाला गेलेल्या रुक्मिणी, गांधारी, शैब्या, हैमवती व जांबवती या त्याच्या स्त्रियांनी अग्निप्रवेश केल्याचे वर्णन आहे (मौसल. ७.७३). असे असले तरी त्या काळात या प्रथेने व्यापक प्रमाणात मूळ धरले होते असे वाटत नाही. कारण स्त्रीपर्वात, अनेक योद्धे रणांगणावर मरून पडलेले असताना एकाही योद्धयाची बायको सती गेलेली नाही.

सतीची चाल अशा प्रकारे प्रारंभिक अवस्थेत असतानाच काही स्मृतिकारांनी तिच्यासंबंधीची प्रतिकूलता व्यक्त केली आहे. विष्णुस्मृतीत म्हटले आहे, की सतीची चाल तर्काला पटणारी नाही व मरूनदेखील भर्त्याच्या सान्निध्यात राहता येणे शक्य नाही. अंगिरसाच्या मताला विरोध करताना मेधातिथी म्हणतो, 'अंगिरसाने जरी अनुमरणाला मान्यता दिली असली, तरी ती आत्महत्या असल्यामुळे स्त्रियांनी तसे करू नये.' स्मृतिकारांच्या या विचारांचा काही ग्रंथकारांवर फारसा अनुकूल परिणाम झालेला नाही. त्याचे एक प्रमुख कारण म्हणजे तत्कालीन समाजावर त्यागाची जबरदस्त पकड होती. पुरुषाचे स्त्रीबरोबरचे मित्रत्वाचे नाते संपून त्याला देवपणाची प्रतिष्ठा लाभली होती. त्याचप्रमाणे स्त्रियांनाही मोक्षाचा मोह निर्माण झाला होता. या प्रवृत्तीतूनच त्या वेळी सतीधर्माचा कडवा पुरस्कार करणारे धर्मशास्त्रकार निर्माण झाले. अंगिरस म्हणतो. ' पतिमरणानंतर स्त्रीला त्याच्यासह अग्नीत पडण्याखेरीज दुसरा मार्ग नाही.' हारीताने सांगितले आहे, की ' गारुडी जसा सापाला बिळातून बाहेर काढतो, तशी सती जाणारी स्त्री आपल्या पतीला नरकातून बाहेर काढते.'

काही स्मृतिकारांनी सतीप्रथेला अशा प्रकारे संमती दिली असली, तरी त्यांनीच पुढीलप्रमाणे निर्बंधही निर्माण केले आहेत. मूल लहान असेल तर, स्त्री गरोदर असेल तर, किंवा त्या वेळी ती रजस्वला असेल तर तिने सहगमन करू नये.

प्राचीन बौद्ध व जैन साहित्यात सतीप्रथेचे उल्लेख आढळत नाहीत. अशोकाच्या लेखात, मेगॅस्थिनीसच्या वर्णनात अथवा कौटिल्याच्या अर्थशास्त्रात या चालीचे अस्तित्व दिसत नसले, तरी सन पूर्व ३०० च्या आगेमागे ही प्रथा भारतात सुरू झाली असावी, असे इतिहासाच्या आधारे म्हणता येते. या चालीचे जुन्यातले जुने ऐतिहासिक उदाहरण सन पूर्व ३१६ सालचे असून, ते डिओडोरस सिक्युलस या ग्रीक इतिहासकाराच्या ग्रंथातले आहे. ग्रीकांविरुद्ध लढताना एक हिंदू सेनापती रणांगणावर मरण पावला; त्या वेळी त्याच्या दोन्ही बायका सती जायला तयार झाल्या. परंतु त्या वेळी थोरली गरोदर होती; म्हणून तिला सती जायला परवानगी मिळाली नाही. धाकटी आपल्याला सती जायला मिळणार म्हणून आनंदित झाली. तिने आपल्या नातलगांच्या व आप्तेष्टांच्या समोर महावस्त्रे परिधान केली. अंगावर उंची अलंकार घातले आणि ती धीराने चितेकडे चालत गेली. तिच्या भावानेच तिला चितेवर चढायला मदत केली.

इतिहासाच्या या कालखंडात आत्यंतिक त्यागाचे उदाहरण म्हणून या घटनेची नोंद झाली असावी. नाटककार भास हा या कालखंडाच्या जवळपास वावरणारा आहे. त्याने महाभारतातील प्रसंगात बदल करून, दूतघटोत्कच व उरुभंग या नाटकात उत्तरा, दुःशला व पौरवी या अनुक्रमे अभिमन्यू, जयद्रथ व दुर्योधन यांच्या बायका सती गेल्या, असे म्हटले आहे. अर्थात ही अपवादात्मक उदाहरणे आहेत असे म्हटले पाहिजे. कारण गुप्तकाळात सतीची अत्यंत अल्प उदाहरणे दिसतात. वात्स्यायनाच्या कामसूत्रात या प्रथेचा उल्लेख आहे. इंद्रसाहाय्यार्थ धावलेला रामपुत्र कुश दुर्जय दैत्याला मारून स्वतःही मरण पावला. त्या वेळी त्याची पत्नी कुमुद्वती सती गेल्याचे वृत्त रघुवंशात आहे (१७.६).

यानंतर म्हणजे सुमारे सहाव्या शतकानंतर या चालीसंबंधी बरीच उलट-सुलट चर्चा झालेली आहे. स्त्रीकैवारी म्हणून प्रसिद्ध असलेला वराहमिहिर बृहत्संहितेत म्हणतो. 'पुरुष एकांतात बायकोशी गोड गोड बोलतो. पण ती मेल्यावर तो सारे विसरून जातो. परंतु स्त्री मात्र सदैव पतीशी कृतज्ञ असते. तो मेल्यानंतरही ती त्याच्या चितेत उडी घेते(७४.१६).' बाणभट्टाने हर्षचरितात सतीचा उल्लेख केला आहे ( उच्छ्वास ५ ). हर्षाची आई यशोमती पती आसन्नमरण असता मरणप्रसाधने घालून सती गेल्याचे अत्यंत करुण वर्णन बाणाने केले आहे. कादंबरीतही त्याने या चालीचा उल्लेख करून तिचा कडक शब्दांत निषेध केला आहे. तो म्हणतो, ' यदेतदनुमरणं नाम तदतिनिष्फलम् ।

अविद्वज्जनाचरित एष मार्गः' (= प्रिय व्यक्तीच्या पाठोपाठ मरण पत्करणे हे निष्फल होय. मूर्ख लोक या चालीचा अंगिकार करतात.) बाणाच्या मते मोहाने घडत असलेला हा प्रमाद आहे. आत्महत्येमुळे सती जाणारी व्यक्ती नरकात जाते. बाणाच्या या विचारसरणीमुळे त्याला सतीप्रथेचा पहिला बुद्धिनिष्ठ विरोधक म्हणायला हरकत नाही. महानिर्वाणतंत्रातही मोहाने सती जाणारी स्त्री नरकात जाते, असे म्हटले आहे.

इ. स. ७०० ते ११०० पर्यंतच्या काळात उत्तर भारतात, विशेषतः, काश्मीरमध्ये कित्येक स्त्रिया सती गेलेल्या दिसतात. जयमती व विज्जला यासारख्या राण्या सती गेल्याचे कल्हणाने राजतरंगिणीत सांगितले आहे (८.३६१–३६९). केवळ राण्याच सती जात होत्या असे नाही; तर राजाची आई, वहीण, प्रधान, रखेल्या याही सहगमन करीत असत, असे कल्हण म्हणतो. राणी सूर्यमतीसमवेत गंगाधर, टक्किबुद्ध व दंडक हे सेवक आणि उद्दा, नोनिकाषवल्गा या दासी, इ. सर्वांनी अग्निप्रवेश केला (७.४८१).

काश्मीरमधल्या या विचारांचे लोण महाराष्ट्रात आले असण्याची शक्यता आहे. शिलाहार राजवंशातला राजा अपरार्क याचा तेजकंठ नावाचा वकील काश्मीरनृपती जयसिंह याच्या दरबारी होता. शिवाय अपरार्कानें आपल्या टीकेत या प्रश्नासंबंधी निरनिराळ्या स्मृतिकारांच्या मतांची चर्चा करून अखेरीला सतीप्रथेचा पुरस्कार केला आहे. पतीच्या मरणानंतर ब्राह्मण स्त्रीने धर्माचरणासाठी सती जायला हरकत नाही, असे मत त्याने प्रकट केले आहे. यादवांच्या घराण्यातील सती कामाई राणीचे उदाहरण हे महाराष्ट्राच्या इतिहासातील एक प्रख्यात उदाहरण आहे. रामदेवरावाच्या मृत्यूनंतर शंकरदेवाने गादीच्या लोभाने कामाईला सती जायला भाग पाडले होते. त्यामुळे राणीने संतापाने 'तुझा निर्वंश होईल आणि यादव राज्याचा अल्पकाळातच निःपात होईल' असा शाप देऊन चितारोहण केले. शाहू राजाच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी सकवारबाई आणि नाटकशाळेतील लक्ष्मीबाई या दोघीही सती गेल्याची नोंद इतिहासात आहे. माधवराव पेशव्यांच्या पत्नी रमाबाई यांचे उदाहरण तर सर्वज्ञात आहे. यासारखी काही मोजकी उदाहरणे सोडली, तर महाराष्ट्रातही स्त्रियांना त्यांच्या इच्छेविरुद्ध सती जाणे भाग पडत असल्याचे दिसून येते.

महाराष्ट्राच्या तुलनेने बंगालमध्ये याचा अतिरेक झाला होता, असे दिसून येते. त्याचे एक प्रमुख कारण म्हणजे त्या प्रांतात इतर प्रांतांच्या तुलनेने स्त्रियांना मिळकतीत अधिक वाटा होता. दायभाग ग्रंथानुसार तिथला वारसाहक्क चालू होता. हा हक्क डावलण्यासाठी रूढिनिर्मित व शास्त्रपूत मार्गांचा अवलंब करून, स्त्रियांचा अडसर दूर करण्यासाठी लोकांनी सतीप्रथेला उचलून धरले. त्यामुळे शेकडो स्त्रिया सती जाऊ लागल्या. कधी कधी विधवेला उपाशी ठेवून भांगेसारखे मादक पदार्थ तिला पाजीत आणि त्या नशेत तिने सती जाण्याची इच्छा व्यक्त केली, की तिला चितेत ढकलीत. चितेतल्या ज्वालांनी चटके बसून स्त्री बाहेर पडण्यासाठी धडपडू लागली, की तिला ओल्या वांबूनी ढोशीत आणि तिचा आक्रोश लोकांना ऐकू येऊ नये म्हणून मोठमोठ्या वाद्यांचा गजर करीत.

लॉर्ड बेंटिंकला हे सारे असह्य झाले आणि त्याने इ. स. १८२९ साली सतीबंदीचा कायदा करून हा भयंकर प्रकार बंद केला. अर्थात बेंटिंकला या कामात फार मोठी मदत विख्यात समाज सुधारक राजा राममोहन राय यांनी केली. ही चाल बंद व्हावी म्हणून राजा राममोहन राय यानी सुधारक पक्षाच्या वतीने एक अर्ज तयार केला होता. त्या अर्जात म्हटले आहे, ते असे –

"विधवा स्त्रियांच्या निकट वारसांना त्यांच्या मृत्यूपासून लाभ होणार असल्यामुळे त्यांनी आपल्या पतीच्या चितेवर स्वतःला जाळून घ्यावे याबद्दल त्यांचे मन वळविल्याची अनेक उदाहरणे अर्जदारांस प्रत्यक्ष किंवा विश्वासू साक्षीदारांच्या सांगण्यावरून माहीत आहेत. आपल्या मृत पतीबरोबर सती जाण्याचा निश्चय दुःखाच्या पहिल्या आवेगात अविवेकाने केलेल्या इतर अनेक स्त्रिया आयत्या वेळी भीतीने तो निश्चय बदलतात; पण अशांना दोऱ्यांनी बांधून चितेवरच अग्नीने जाळून त्यांची राख होईपर्यंत सक्तीने हिरव्या बांबूंनी ढोसून डांबून ठेवण्यात येते. इतर काही स्त्रिया पेटलेल्या चितेवरून पळून जातात; पण त्यांचे भाऊबंद पुनः त्यांना उचलून आणून जाळून मारितात. कोणत्याही शास्त्राच्या दृष्टीने किंवा जगातील कोणत्याही लोकांच्या सारासार विचाराने पाहिले तरी हे सर्व खूनच आहेत, असे आपल्या अर्जदाराचे नम्र मत आहे."

बंगालमधील ही स्थिती म्हणजे स्वार्थाने अंध झालेल्या माणसांच्या तर्कहीन पोथीनिष्ठेचे ज्वलंत उदाहरण आहे.

राजस्थान व पंजाब या प्रदेशांमध्येही सतीप्रथा होती. राजस्थानात तर एकही गाव असे नाही, की जिथे सतीच्या शिळा किंवा मंदिरे नाहीत. यावरून तिकडच्या सतीप्रथेची व्यापकता ध्यानात येते. झुंझनू गावचे राणी सतीचे मंदिर हे भारतातल्या प्रसिद्ध मंदिरांपैकी एक आहे. जोधपूर येथील मिस्तरा देवळीतील शिलालेखात गुहिलोत राजवंशातल्या दोन राण्या सती गेल्याचे वर्णन आहे. स्थूलमानाने रात्रंदिवस युद्धाचा प्रसंग येऊ लागल्यावर, राजवंशातल्या आणि सामान्य स्त्रियांतील सतींची संख्या वाढू लागली.

अरबांची आणि तुर्कांची मोठी आक्रमणे होऊ लागली,

ंव्हा सतीप्रथेला जोहाराचे स्वरूप प्राप्तझाले. (जोहार पाहा.) पंजाबमध्ये याहून निराळी परिस्थिती नव्हती. ब्रिटिशांनी सतीप्रथेच्या बंदीचा कायदा केला असला, तरी संस्थानांतून याबाबत फारशी सुधारणा झाली नव्हती. रणजितसिंगाच्या प्रेताबरोबर त्याच्या चार स्त्रियांना जाळण्यात आले होते. राजा सुचेतसिंगाच्या प्रेतसंस्कारात तीनशेदहा स्त्रियांनी आत्मदहन केले होते. त्यांत दहा राण्या व तीनशे रखेल्या होत्या. परंतु सरदार शान-



सतीची शिळा, सुंदरेसी, मध्यप्रदेश

सिंगाची पत्नी सोन्नाव मात्र स्वेच्छेने सती गेली होती. पंजाबमधील ही अखेरची सती, असे सर लिपल ग्रिफीन याने १८९८ मध्ये म्हटले आहे.

द. भारतातही ही चाल होती. तिकडे सतीच्या समाधीला महासती कल्ल म्हणून ओळखतात.

अमुक एका जातीतल्या स्त्रीनेच सती जावे, असेही ठरलेले नव्हते. महाभारतातील ब्राह्मणी आंगिरसीने (आदि. १८१.२२) आणि कमलाकर भट्टाच्या उमा नामक मातेने अग्निप्रवेश केला होता. कर्नाटकातील बेलतुरु येथील शके ९७९ च्या शिलालेखात एक शूद्र स्त्री सती गेली, म्हणून तिच्या बापाने तिच्या स्मरणार्थ एक वीरगळ उभा केल्याचे वर्णन आढळते. सती गेलेल्या जैन धर्मानुयायी ओसवाल स्त्रियांची, केवळ बिकानेरमध्ये अठ्ठावीस मंदिरे आहेत. याशिवाय मोदी, माहेश्वरी, अग्रवाल, शिंपी, सोनार, चारण यांच्या स्त्रियाही हे अग्निदिव्य करीत असत.

सतीने सहगमनप्रसंगी कोणकोणती कृत्ये करावी याची माहिती सहसा आढळत नाही. पण शुद्धितत्त्व या ग्रंथात सतीकृत्याची पुढीलप्रमाणे माहिती आहे–

विधवा स्नान करून दोन श्वेत वस्त्रे परिधान करते, हातात दर्भ घेते आणि पूर्वेकडे वा उत्तरेकडे तोंड करते. मग ब्राह्मण 'ओम् तत्सत्' म्हणतात. नंतर ती नारायणाचे स्मरण करते, मास, पक्ष व तिथी यांचा उच्चार करून संकल्प करते. मग सूर्य, चंद्र, अग्नी अशा अष्ट लोकपालांची नावे घेऊन त्यांस साक्ष ठेवते. चितेला तीन प्रदक्षिणा घालते. इतके झाल्यावर ब्राह्मण 'इमा नारी' हा ऋग्वेदातला मंत्र म्हणून पुराणातील "या फार चांगल्या व पवित्र पतिव्रता स्त्रिया पतीच्या प्रेताबरोबर अग्निप्रवेश करीत आहेत" या अर्थाचा श्लोक म्हणतो. मग सती जाणारी स्त्री 'नमो नमः' असे म्हणून चितेत उडी घेते.

राणी सूर्यमतीच्या सतीप्रसंगाचे वर्णन राजतरंगिणीत आले आहे ते असे– राजा अनंतदेव विजयेश्वराच्या मंदिरासन्निध मरण पावला. मग राणीने सतीचे वाण घेतले. तिने पतीच्या प्रेताला साजशृंगार चढविण्याची आज्ञा केली. मग त्याचे प्रेत शिबिकेत ठेवले. सूर्यमती विजयेश्वराला नमस्कार करून पालखीत बसली. अनंतदेवाची शिबिका पताकांनी सजविली होती. त्या शिबिकेला राजपुत्रांनी खांदे दिले होते. प्रेतयात्रेबरोबर वाद्यांचा गजर चालू होता. प्रेतयात्रा सूर्यास्ताच्या सुमाराला स्मशानात पोचली. मग सूर्यमतीने वितस्तेचे जल हातांत घेऊन 'हे जल प्राशन करणाऱ्यांना ब्रह्मवाद्यांप्रमाणे मोक्ष मिळतो' या अर्थाचा मंत्र म्हणत, ते जल प्राशन केले. त्याच जलाने तिने मार्जनही केले. मग तिने समाधानाने चितेत उडी टाकली. (७.४६१–४८१.).

निरनिराळ्या काळात भारतात आलेल्या युआन च्वांग, कांटी, व्हॉल, टॅव्हेर्निअर, मॉंडस्लो, बर्नियर, निकोलो मनुची या परदेशी प्रवाशांनी सतीचे प्रसंग प्रत्यक्ष पाहून त्यांची वर्णने लिहून ठेवली आहेत. त्यांतील काही वर्णने अशी –

व्हेनिसचा कांटी (इ. स. १४४९) विजयनगरच्या साम्राज्यात बराच काळ राहिला होता. त्याने केलेले वर्णन असे–

मृताला एका चबुतऱ्यावर ठेवीत. मग सुवासिक लाकडांच्या चितेला अग्नी दिल्यावर भरजरी वस्त्रे ल्यायलेली गतधवा गाणी म्हणत चितेला प्रदक्षिणा घाली. त्या वेळी वाद्यांचा गजर चालू असे. मग पुरोहित एका उंच जागेवर उभा राहून समुदायाला उपदेश करी, की 'जगणे व मरणे या दोन्ही गोष्टी तुच्छ आहेत. सतीसाठी सर्व भोग, दागदागिने, संपत्ती, परलोकात आहेतच.' प्रदक्षिणा आटोपल्यावर सती आपली महावस्त्रे बाजूला ठेवी. स्नान करी आणि शुभ्र वस्त्रे परिधान करून पुरोहिताने सांगितल्यावर अग्नीत उडी टाकी. भयाने एखादी स्त्री कच खाऊ लागली तर सभोवतीचे लोक तिला चितेत ढकलीत.

दुआर्ट बार्बोसा (इ. स. १५०८) म्हणतो – एखादी श्रीमंत व उच्चकुलीन स्त्री असली तर तिला घोड्यावर बसवून मिरवितात. सती तीन चार पायऱ्या चढून, सूर्याकडे तोंड करून आपल्याभोवती प्रदक्षिणा करते. मग अंगावरची उंची वस्त्रे अलंकार जमलेल्या मंडळींना वाटून टाकते. नंतर एका वस्त्रानिशी डोक्यावर तेलाचा हंडा ठेवून चितेला प्रदक्षिणा घालते व हंडा चितेत फेकून त्या मागोमाग आपण उडी घेते. तिथे जमलेले लोक बरोबर आणलेले तेल व लोणी आगीत फेकतात.

फ्रेंच प्रवासी बर्नियर याने सती या विषयावर बरेच लिहून ठेवले आहे. अनेक स्त्रिया सती जाताना त्याने पाहिल्या होत्या. आणि त्यांना चितेत लोटणाऱ्यांचा क्रूरपणाही त्याला दिसला होता. तो लिहितो. ' लाहोरला एक बारा वर्षांची सुंदर मुलगी सती जाताना मी पाहिली. चितेपर्यंत पोचेतो ती अर्धमेली झाली होती. मग चार ब्राह्मणांनी व एका वृद्धेने तिला बळजबरीने चितेवर डांबून ठेवले, हात-पाय बांधले व चितेला अग्नी दिला.

अशा प्रकारे काहीशा दिव्य आणि काहीशा भयानक प्रवृत्तीचे प्रत्यंतर घडविणाऱ्या या चालीचे निर्मूलन करण्याचा अनेकांनी प्रयत्न केला. त्यात काही प्रयत्न व्यक्तिगत पातळीवर आणि काही सरकारी पातळीवर झाले आहेत. विष्णुस्मृती, मेधातिथी, हर्ष, कबीर, नानक, इत्यादिकांचे प्रयत्न हे पहिल्या प्रकारात मोडतात. नानकासारखा समाजहितैषी संत म्हणतो– ' विधवेवर सतीची सक्ती काय म्हणून ? प्रिय व्यक्तीच्या विरहाग्नीत ती आधीच होरपळून निघालेली असते. तशात हा सहानुभूतिशून्य निर्दयपणा आणखी कशाला ? बरे, ती विरहाग्नीने होरपळत नसेल तर केवळ शरीर जाळण्यात काय अर्थ ? '

ही घोर चाल बंद करण्यासाठी मुगलसम्राट अकबर, जहांगीर, इत्यादींनी खूप परिश्रम घेतले, सुभेदारांच्या परवानगीशिवाय सतीला मनाई केली. जयपूरच्या राजघराण्यातील एक स्त्री सती जाणार हे समजताक्षणीच, पाचशे मैलांचे अंतर कापून अकबराने तो प्रसंग टाळला, हे ऐतिहासिक सत्य आहे.

ब्रिटिशांच्या राजवटीत एल्फिन्स्टन, कॉर्नवालिस, वेलस्ली यांनी या संदर्भात प्रयत्न केले; पण बेंटिंकचे प्रयत्न हे अनन्यसाधारण आहेत. राजा राममोहन राय यांनी अभ्यासपूर्वक सतीच्या चालीविरुद्ध दोन पुस्तिका लिहिल्या. नाना शंकरशेट यांनीही या चालीच्या निर्मूलनासाठी बरेच कष्ट घेतले होते. [भा. सा. इ.; वै. सा. ना.; पे. का. म.; या. का. म.; म. भा. ना.; पु. भा. सा. इ.; आ. भा.; हिं. सा. बृ. इ.; पो. वी. हिं. सि.; भा. स्त्री; म. सा. पु.; राजतरंगिणीकोश; नवयुगधर्म; हेन्री जेफरी व आनंद के. कुमारस्वामी यांचा लेख ]

## सतोहा

ब्रजमंडलातील एक पवित्र स्थान. हे मथुरेपासून सुमारे तीन मैलांवर आहे. इथे शांतनुकुंड नावाचा एक मोठा तलाव असून, त्याच्या दोन बाजूंना पक्के घाट बांधलेले आहेत. हे शांतनु राजाचे ठिकाण म्हणून ओळखले जाते. या तलावात शांतनुविहारीचे मोठे मंदिर आहे. तलावात स्नान करून शांतनूचे दर्शन घेतले असता अपत्यप्राप्ती होते, अशी समजूत आहे. भाद्रपद शुद्ध षष्ठीला इथे मोठी यात्रा भरते. ब्रजपरिक्रमेचा दुसरा मुक्काम या गावी असतो. [ ब्र. सां. इ. ]

## सत्कार्यवाद

कार्य व कारण यासंबंधी सांख्यांचे एक विशिष्ट मत सत्कार्यवाद या नावाने प्रसिद्ध आहे. या बाबतीत एक प्रश्न असा उपस्थित होतो, की नाना प्रकारची सामग्री व प्रयत्न यांमुळे उत्पन्न होणारे कार्य, त्यापूर्वी कारणात विद्यमान असते का नाही ? कुंभार दंडाच्या साहाय्याने मातीपासून घडा बनवतो. तेव्हा उत्पन्न होण्यापूर्वी घडा मातीत विद्यमान होता का नव्हता ? यावर न्याय-वैशेषिकांचे उत्तर 'नाही' असे आहे. घडा उत्पत्तीपूर्वी मातीत नव्हता; तर सामग्रीच्या साहाय्याने घडयाची उत्पत्ती झाली. म्हणजे घडा ही एक नवीनच वस्तू तयार झाली. जर तो आधीपासूनच होता, असे मानले तर घडयाची उत्पत्ती झाली या म्हणण्याला काही अर्थ राहत नाही. तसेच मग घडा बनविण्यासाठी कुंभाराच्या मेहनतीचीही गरज राहणार नाही.

जर कार्य हे कारणात आधीपासूनच विद्यमान आहे असे मानले, तर कार्य व कारण यांत भेद का मानतात ? माती व घडा या दोघांनाही एकच नाव का देत नाहीत ? तसेच मातीचा ओला गोळा घडयाचे काम का करीत नाही ? घडयात आपण पाणी भरू शकतो, तसे मातीच्या गोळयात भरून ठेवता येईल का ? या प्रश्नाचेही उत्तर ' नाही ' असेच द्यावे लागेल. जर असे मानले, की कार्य व कारण यांत आकारगत भेद आहे, म्हणजे माती व घडा यांच्या आकारात फरक आहे, तर कार्य ही एक मूळ कारणात नसलेली अशी नवीच वस्तू तयार झाली असे मानणे भाग पडेल. या सर्वांचा निष्कर्ष असा, की कार्य हे उत्पत्तीपूर्वी कारणात विद्यमान नसते असे समजणेच इष्ट होईल. नैयायिकांच्या या सिद्धान्ताला असत्-कार्यवाद असे नाव आहे.

सांख्यांचा सिद्धान्त यापेक्षा वेगळा आहे. त्यांच्या मते कार्य हे उत्पत्तीपूर्वी कारणात अव्यक्त रूपाने विद्यमान असते. अशा प्रकारे कार्य व कारण यांत वास्तविक अभिन्नता असते. कार्याच्या अव्यक्तावस्थेला कारण व कारणाच्या व्यक्तावस्थेला कार्य असे नाव आहे. म्हणजे कार्य जेव्हा प्रकट नसते, तेव्हा त्या वस्तूला कारण म्हणतात व जेव्हा ते प्रकट होते, तेव्हा त्याला कार्य म्हणतात. अशा प्रकारे, कार्यकारणाचा हा भेद व्यावहारिक आहे. हा सिद्धान्त म्हणजेच सत्कार्यवाद होय.

या सिद्धान्ताच्या पुष्टीसाठी सांख्यांनी पुढील युक्त्या दिल्या आहेत–

(१) जी वस्तू कारणात विद्यमान नाही, ती काय वाटेल ते झाले तरी उत्पन्न करता येणार नाही. जर कार्य हे कारणात राहत नसेल तर कर्त्याने कितीही प्रयत्न केला तरी ते कार्य उत्पन्न होऊ शकणार नाही. सहस्र मल्लांनी मनावर घेतले तरी ते वाळूपासून तेल काढू शकणार नाहीत. कारण वाळूत तेल नसते.

(२)ठराविक कार्य प्राप्त करून घेण्यासाठी ठराविक कारण-द्रव्याची आवश्यकता असते. दही हवे असेल, तर आधी दूध घेऊन मग त्याला विरजण लावावे लागते. बर्फ बनवायचे असेल तर आधी पाणी घ्यावे लागते. या व्यावहारिक दृष्टान्तांवरून सिद्ध होते, की कार्य व कारण यांचा संबंध नियत आहे. म्हणजे कार्य हे कारणात पूर्वीपासून उपस्थित असते.

(३)कारणात एखादे विशिष्ट कार्य उत्पन्न करण्याची शक्ती असते. म्हणूनच विणकर कापड बनवायचे असेल, तर तंतू घेतो. त्याला माहीत असते, की तंतूमध्ये कापड तयार करण्याची शक्ती आहे. तसेच, कुंभार घडा बनवायचा असेल तर मातीच घेतो. तंतू नाही. सर्व कारणांपासून सर्व कार्यांची उत्पत्ती झालेली कधी दिसत नाही.

(४) शक्तिसंपन्न कारणापासून शक्य वस्तू उत्पन्न होते हे पाहून कारणात कार्याची सत्ता अवश्य विद्यमान असते, असे म्हणता येते.

(५)कार्य व कारण ही वस्तुतः एकच आहेत. एकाच वस्तूच्या भिन्न अवस्थांची ती भिन्न नावे आहेत, हे आपण व्यवहारात पाहतो. घडा हे मृत्तिकेचे कार्य पाहत असताना, ही मृत्तिकेचीच विशेष अवस्था आहे असा प्रत्यय येतो. तसेच, पट ही तंतूंचीच एक विशेष अवस्था आहे, हेही कळते.

या सर्व प्रमाणांवरून असे सिद्ध होते, की कारणव्यापाराच्या पूर्वीही कारणात कार्य विद्यमान असते. यामुळेच सांख्य हे कोणत्याही वस्तूची उत्पत्ती किंवा विनाश होतो, असे मानीत नाहीत. कर्त्याच्या व्यापारामुळे वस्तूचा फक्त आविर्भाव होतो, वस्तू प्रकट होते, असे ते मानतात.

परिणामवाद व विवर्तवाद अशी सत्कार्यवादाची दोन रूपे आहेत. कारणापासून उत्पन्न होणारे कार्य जेव्हा वास्तविक असते तेव्हा त्याला परिणाम असे म्हणतात. उदा० दुधापासून दही हा पदार्थ उत्पन्न होतो, तो खरा असतो. म्हणजे दही हा दुधाचा परिणाम आहे. सांख्य हे परिणामवाद मानणारे आहेत; तर अद्वैत-वेदान्ती हे विवर्तवाद मानणारे आहेत. त्यांचे म्हणणे असे, की कारणापासून जे कार्य उत्पन्न होते ते वास्तविक नसून आभासमात्र असते. कार्याची केवळ प्रतीती येते. वास्तविक ते नसते. अंधारात पडलेली दोरी पाहून हा साप आहे असे समजून आपण घाबरतो. इथे दोरीवर सर्पाची उत्पत्ती झाली. परंतु ती केवळ कल्पना आहे. खरी घटना नाही. कारण दिव्याच्या प्रकाशात पाहिले तर आपल्याला दोरीच दिसते; साप दिसत नाही. अद्वैत-वेदान्तानुसार ब्रह्मापासून हे नामरूपात्मक जगत उत्पन्न होते. परंतु जगत हे असत्य आहे. ती केवळ कल्पना आहे. स्वप्नासारखे ते खोटे आहे. ब्रह्म हेच एकमेव सत्य आहे. [ भा. द.; म. त. म. ]

**सत्कुलावाप्तिव्रत** एक तिथिव्रत. मार्गशीर्ष शु. प्रतिपदेला या व्रताला आरंभ करतात. तीन निरनिराळ्या रंगांच्या फुलांनी, तीन प्रकारच्या विलेपनाने, तीन मधुर पदार्थांनी व तीन दिव्यांनी विष्णूची पूजा करणे आणि यव व तीळ यांचा होम करणे, हा या व्रताचा मुख्य विधी आहे. यात सोने, चांदी व पितळ हे तीन धातू ब्राह्मणाला दान द्यायचे असतात. फल – चांगल्या कुळात जन्म. [ हि. ध. ]

**सत्नामी पंथ** सत् म्हणजे सत्य किंवा सत्त्व आणि सत्नाम म्हणजे परमेश्वर. सत्नामी हे नाव धारण करणारे तीन पंथ भारतात आहेत.

(१) साध पंथ – या पंथाचे अनुयायी स्वतःला सत्नामी म्हणवतात. (साध पंथ पाहा)

(२) उत्तर प्रदेशाच्या बाराबंकी जिल्ह्यातील सरदहा या गावाचा जगजीवनदास याने इ. स. च्या १७ व्या शतकाच्या अखेरीला सत्नामी पंथाची स्थापना केली. तो चंदेल ठाकूर जातीचा होता. तो कबीरपंथी असून, सर्व जातींना रुचेल असा उपदेश त्याने केल्यामुळे त्याला सर्व वर्णांचे शिष्य मिळाले. तो योगी व कवीही होता.

हे सत्नामी लोक एकाच परमेश्वराचे उपासक आहेत. सृष्टीतील सर्व वस्तूंची आणि प्राण्यांची निर्मिती एकाच परमेश्वराने केली असून, तो निर्गुण व निराकार आहे, अशी त्यांची वेदान्त्यांप्रमाणे श्रद्धा आहे. असे असले तरी ते दशावतारांपैकी राम व कृष्ण यांना मानतात आणि हनुमानाची उपासना करतात. आपल्या पंथाची खूण म्हणून ते उजव्या मनगटात पांढरा किंवा काळा दोरा बांधतात व कपाळावर भस्माचा उभा नाम लावतात.

या पंथाचे अनुयायी भौतिक जग आणि विशेषतः मानवी सुखदुःखे यांविषयी उदासीन असतात. परमेश्वरावर श्रद्धा ठेवून ते आपली कर्तव्ये पार पाडतात.

जगजीवनदासाने ज्ञानप्रकाश, महाप्रलय, प्रथमग्रंथ, इ. काही ग्रंथ लिहिले असून, त्यांत प्रस्तुत पंथाचे तत्त्वज्ञान सांगितले आहे.

(३) मध्य प्रदेशातील छत्तीसगड विभागात सत्नामी याच नावाचा आणखी एक पंथ असून, त्याचे अनुयायी चार लाखांहून अधिक आहेत. त्यांतील बहुतेक लोक चांभार जातीचे आहेत. घासीराम किंवा घासीदास नामक एका चांभार पुरुषाने इ. स. १८२० ते १८३० च्या दरम्यान या पंथाची स्थापना केली. हा एक शेतमजूर होता. पण त्याच्या संन्यस्त वृत्तीमुळे आणि त्याच्या हातून घडलेल्या काही चमत्कारांमुळे त्याची साधू म्हणून कीर्ती पसरली. नंतर काही काळ त्याने वनवासात घालवला. तिथे त्याला साक्षात्कार झाला. मग त्याने लोकांना उपदेश करायला

सुरवात केली. एकाच परमेश्वराचे चिंतन, मद्यमांसाचा निषेध, मूर्तिपूजेचा त्याग, गायींचा शेतीच्या कामी उपयोग न करणे मध्याह्नानंतर शेत न नांगरणे, सूर्यपूजा, इ. गोष्टींचा त्यात समावेश होतो. घासीरामाने जातिभेद न मानण्यावर विशेष भर दिला होता. घासीराम व त्याचे कुटुंब हे श्रेष्ठ व बाकी सर्व अनुयायी समान असे या पंथात मानतात. पंथदीक्षा देण्याचे काम घासीरामाच्या कुळाकडे असते.

या पंथात धोबी, घासिया व मेहतर या जातीचे लोक वगळून इतर सर्वांना प्रवेश मिळतो.

घासीराम इ. स. १८५० मध्ये मरण पावल्यावर या पंथातील मागसलेल्या लोकांच्या जुन्या अंधश्रद्धा पुन्हा प्रभावी झाल्या आणि काही धार्मिक दुराचार पुन्हा सुरू झाले. घासीरामाने तंबाखू वर्ज्य मानली होती. पण त्याच्या नंतर काही लोकांनी पुन्हा तिचा स्वीकार केला. तसेच काही लोकांनी मूर्तिपूजाही सुरू केली आणि मग त्यांचा चुंगिया नावाचा एक उपपंथच बनला. [ एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को.; वि. ध. द.; उ. भा. सं. प. ]

**सत्पंथ** महाराष्ट्र–गुजरातमधील एक पंथ. याला सत्यपंथ असेही म्हणतात. इ. स. १४४९ मध्ये इमामशहा नावाचा एक साधू इराणातून गुजरातेत आला. हा या पंथाचा प्रवर्तक होय. अहमदाबादच्या दक्षिणेस सुमारे ९ मैल अंतरावर गीरमथा गावाजवळ एका टेकडीवर त्याचे वास्तव्य होते. त्याने बरेच चमत्कार दाखविल्यामुळे लोकांची त्याच्यावर भक्ती बसली. त्याचे पाच मुख्य शिष्य होते, त्यांची नावे अशी– (१) हाजरबेग (२) भाभाराम (३) नागाकाका (४) साराकाका आणि (५) जिजीबाई अथवा चिचीभाई (भाभारामाची वहीण).

इराण येथे त्याची मुख्य गादी आहे. तिथे प्रतिवर्षी मोठा उरूस भरतो. इमामशहाचे शिष्य मुख्यत्वे ब्राह्मण, वाणी, लेवा व कडवा कुणबी हेच आहेत. इमामशाही शाखेच्या गादीवरील महंत ब्रह्मचारी असतो व तो लेवा पाटीदार जातीचा असतो. सांप्रत खानदेशात लेवा पाटीदारांची बरीच वस्ती असून, त्या जातीचे लोक स्वामीनारायण, सत्पंथ, महानुभाव, माळकरी, इ. अनेक पंथांचे अनुयायी आहेत. जळगाव जिल्ह्यातील यावल तालुक्यातील फैजपूर गावी सत्पंथी लोकांचे मंदिर आहे. भगवद्‌गीता, भागवत, रामायण, इ. ग्रंथ सत्पंथीय लोक पवित्र मानतात. सत्पंथीय लोकांचा गुरुमंत्र 'शिवोऽहम्' (मी शंकर आहे) असा आहे व ते त्या मंत्राचा जप करतात. शंकराचार्यांनाही ते मानतात. मौंजीबंधन, शिखासूत्र, चार वर्ण, चार आश्रम हे या पंथाला मान्य आहेत. ते अभक्ष्यभक्षण आणि अपेयपान करीत नाहीत. सत्पंथीय समाजात विधवाविवाह प्रचलित आहे. या पंथाचे बहुतेक सर्व अनुयायी हिंदू आहेत. या संप्रदायाचे सतवचन, ब्रह्मप्रकाश, इ. अनेक ग्रंथ आहेत. [ सु. वि. को.; वि. ध. द. ]

**सत्य** एक अंतिम तत्त्व. याची व्याख्या अशी – 'कालत्रयाबाध्यम्' (= वर्तमान, भूत व भविष्य या तीन्ही कालांतही जे बाधित होत नाही, ते सत्य होय.) (सर्वलक्षणसंग्रह) सत्य बोलणे हा एक श्रेष्ठ सद्‌गुण आहे. पण या मर्त्य लोकात निर्भेळ सत्य आढळत नाही. 'सत्यं देवाः अनृतं मनुष्याः' (= देव हे सत्यवादी आहेत व मनुष्य असत्यवादी आहेत), असे शतपथ ब्राह्मणात सांगितले आहे. याचा अर्थ मनुष्यलोकात सत्य मुळीच नाही असा नव्हे; तर इथे सत्यात असत्याची भेसळ झालेली असते, असा आहे. 'सच्चासच्च वचसी पस्पृधाते' (= सत्य व असत्य यांचे सारखे वाग्युद्ध जुंपलेले असते), असे ऋग्वेदात (७.१०४.१२) म्हटले आहे.

सत्य व असत्य यांच्यामधली ही स्पर्धा आजकालची नसून, ती जगाच्या आरंभापासून सुरू आहे. देव आणि असुर यांच्यांत ती होती व आजही मनुष्यांत ती विद्यमान आहे. या स्पर्धेत काही काळ असत्याची सत्यावर मात झाल्यासारखी दिसते. जेव्हा अगदी निकराची वेळ येऊन ठेपते, तेव्हा सत्यप्रेमी देव सत्याची बाजू घेऊन त्याचे रक्षण करतात. त्या दोहोंत जे सत्य असते, सरळ असते, त्याचे सोमदेव रक्षण करतो. तो असत्याचा व असत्याची बाजू घेणाऱ्याचाही नाश करतो आणि अशा प्रकारे अंती सत्याचाच विजय होतो, असे ऋग्वेदात (७.१०४). म्हटले आहे.

सर्व उपनिषत्कारांची सत्यावर विशेष प्रीती आहे. याची अनेक उदाहरणे उपनिषदांत आढळतात. त्यांतील मुख्य उदाहरण म्हणजे छांदोग्य उपनिषदातील सत्यकाम जाबालाची कथा हे होय. सत्यकाम जाबाल हा ब्रह्मचर्याची दीक्षा घेण्याकरिता गुरुकडे गेला असता, गुरूने त्याला त्याचे कुल व गोत्र विचारले. त्यावर सत्यकाम म्हणाला, 'माझे गोत्र कोणते, ते खरोखर मला माहीत नाही. मला फक्त माझ्या आईचे नाव माहीत आहे. तरुणपणी ती स्वैराचारी असल्यामुळे तिलासुद्धा माझ्या पित्याचे नाव ठाऊक नाही.' सत्यकामाचे हे बोलणे ऐकून गुरूने त्याला उत्तर दिले. 'हे शब्द अब्राह्मणाच्या तोंडून यायचे नाहीत. चल, मी तुला दीक्षा देतो. कारण तू सत्यापासून ढळला नाहीस.'

निर्भेळ व शुद्ध सत्य बोलल्याने एका स्वैराचारी स्त्रीच्या मुलालाही ब्राह्मणाची पदवी कशी प्राप्त झाली, ते या कथेत सांगितले आहे.

सत्य हे ब्रह्माचेच प्रतिबिंब असल्याने सत्याने मनुष्य मृत्यूपासूनही कसा सुटतो, ते याच उपनिषदात अन्यत्र सांगितले आहे. एखाद्या मनुष्याने चोरी केली, तर त्याला हातबेड्या घालून

ऐरणीच्या जागी आणतात. त्यासाठी एक कुऱ्हाड तापवतात. त्याने जर खरोखरीच चोरी केली असेल, तर तो स्वतःला असत्याने झाकून तापलेली कुऱ्हाड धरतो व जळून मरतो. पण त्याने जर चोरी केली नसेल, तर तो स्वतःला सत्याने आच्छादून ती कुऱ्हाड धरतो व त्यायोगे तो मुळीच न जळता निर्दोष ठरतो.

इतर काही उपनिषदांतही सत्याचा गौरव केलेला आढळतो.

सत्यमेव जयते नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः ।
येनाक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत् सत्यस्य परमं निधानम् ।।
(मुण्डकोप. ३.१.६)

अर्थ – सत्याचाच जय होतो, असत्याचा नाही. सत्याने देवयान मार्ग मोकळा होतो. त्या मार्गाने पूर्णकाम ऋषी जिथे सत्याचे महान भांडार आहे, अशा ठिकाणी पोचतात.

सत्य बोला व भिऊ नका; अंतःकरण जर शुद्ध असेल, तर एकट्याच्या अंगी दहा लोकांचे बळ येते; पण हृदयात असत्याची कीड लपवून ठेवली, तर भर मध्याह्नी हिंडतानाही मृत्युभय प्राप्त होईल, असे उपनिषदात एके ठिकाणी सांगितले आहे. प्रश्नोपनिषदातील भारद्वाज ऋषीचे उद्गारही अशाच प्रकारचे आहेत. तो म्हणतो, की 'असत्य बोलण्याने मनुष्य समूळ वाळून जातो, म्हणून आपण असत्य बोलण्याचे धाडस करीत नाही.'

शतपथ ब्राह्मणात (२.२.२.१६) सत्याला प्रज्वलित अग्नीची उपमा दिली आहे. 'ज्याप्रमाणे प्रज्वलित अग्नीत घृताची आहुती टाकली असता अग्नी अधिक प्रदीप्त होतो, त्याप्रमाणे जो उत्तरोत्तर सत्याचे पालन करीत जातो, तो अधिकाधिक तेजस्वी बनतो.' अशाच प्रकारे तिथे असत्याला जलाने विझलेल्या अग्नीची उपमा दिलेली आहे. 'जो मनुष्य असत्याचा आश्रय करतो, त्याचे तेज रोजच्या रोज कमी होत जाते व तो पापी बनतो. म्हणून नेहमी सत्य बोलावे. देवताही सत्याचेच आचरण करतात. त्यामुळे त्यांना यश मिळते.' (श. ब्रा. १.१.१.४).

पुराणांतही सत्याची प्रशंसा केली आहे. 'सत्यपूतां वदेद् वाणीम्' (= सत्याने पवित्र झालेली वाणी बोलावी) असे पद्मपुराणात (स्वर्ग. ५९.१९) सांगितले आहे.

सत्यामुळेच सूर्य प्रकाशत असतो. सत्यावरच पृथ्वीचे अधिष्ठान आहे. सत्य हाच श्रेष्ठ धर्म आहे. सत्यावरच स्वर्ग प्रतिष्ठित आहे. एक हजार अश्वमेध यज्ञ आणि सत्य यांची जर तुलना केली, तर सत्याचेच पारडे जड होईल, असे मार्कंडेयपुराणात म्हटले आहे (८.४१–४२).

सत्य बोलावे, हे खरे; पण त्या बाबतीतही काही तारतम्याचे नियम सांगितले आहेत, ते असे –

सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न ब्रूयात् सत्यमप्रियम् ।
प्रियं च नानृतं ब्रूयादेष धर्मो विधीयते ।।

अर्थ – सत्य बोलावे. प्रिय बोलावे. अप्रिय सत्य बोलू नये. तसेच, असत्य असलेले प्रियही बोलू नये. हाच धर्म होय, असे सांगितले आहे.

(स्कंद पु. ब्रा. ध. मा. ६.८८)

सत्याची म्हणून स्वतःची एक शक्ती असते. नेहमी सत्य बोलणारी व्यक्ती एखाद्या आपत्प्रसंगी आपल्या सत्याची शक्ती पणाला लावते व आपल्याला इष्ट असेल, ते साध्य करून घेते. जादूच्या दुष्प्रभावापासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी ऋग्वेदकाळी लोक सत्याचे मंत्रपठण करीत, असे उल्लेख ऋग्वेदातच आलेले आहेत. रामायण–महाभारत या ग्रंथांतही सत्य पणाला लावल्याची काही उदाहरणे आहेत. सीतेला जेव्हा अग्निदिव्य करायला सांगण्यात आले, तेव्हा तिने भगवती वसुंधरेची प्रार्थना केली, ती अशी–'जर मी रामचंद्राशिवाय अन्य कोणाचे मनानेही चिंतन केले नसेल तर, हे वसुंधरे, तू मला पोटात घे.' सीतेचे हे वचन सत्य असल्यामुळे लगेच धरणी दुभंगली व तिने सीतेला आपल्या उदरात आश्रय दिला.

महाभारतातही सत्यप्रतिज्ञेची काही उदाहरणे आहेत. उत्तरेचा पुत्र परीक्षित मृत्यू पावला असता, त्याला जिवंत करताना श्रीकृष्णाने आपल्या सत्यवाणीच्याच शक्तीचा उपयोग केला. त्या वेळी श्रीकृष्ण म्हणाला. 'मी आजवर खेळतानासुद्धा कधी असत्य भाषण केले नाही. तसेच, माझ्यात जर सत्य व धर्म ही दोन्ही प्रतिष्ठित असतील, तर त्यांच्या शक्तीच्या योगाने हा बालक जिवंत होईल.' आणि त्याप्रमाणे परीक्षित जिवंत झाला.

यानंतरच्या वाङ्मयातही, विशेषतः बौद्ध जातकांत अशा प्रकारची काही उदाहरणे आढळतात.

सत्य, ब्रह्मचर्य, अहिंसा, अस्तेय व अपरिग्रह ही पाच मुख्य व्रते मानलेली आहेत. मानवी उन्नतीच्या मार्गात त्यांचे फार महत्त्व आहे. या व्रतांच्या पालनावाचून कोणताही समाज खरा मानवसमाज बनू शकत नाही.

ज्यांनी कर्ममार्गाचा त्याग केला आहे अशा संन्यस्त व्यक्तींना सत्य-असत्याचे प्रसंग क्वचित येतात. सत्याची खरी गरज रोजच्या व्यवहारातच आहे. सत्यानेच सर्वांचा व्यवहार निर्दोष, सरळ व कोणाचेही नुकसान न होईल, अशा प्रकारे चालवणे शक्य आहे. सत्याने चालण्याकरिता धैर्याची तसेच साधेपणाचीही आवश्यकता असते. समाजातून सत्य ज्या मानाने कमी होते, त्या मानाने समाजात अंदाधुंदी, अव्यवस्था, तंटे वगैरे निर्माण होतात. त्यामुळे समाजाच्या नियमनाकरिता अनेक प्रकारचे कायदे बनवावे लागतात. कायद्यांच्या अंमलबजावणीसाठी निरनिराळी खाती निर्माण करावी लागतात. त्या सर्वांचा खर्च समाजावरच पडतो. आपण आगगाडीने प्रवास करताना तिकिट काढतो. त्याची जी किंमत

असते, ती आगगाडीतून जाण्यायेण्याचे केवळ भाडेच नसते. तर बिनतिकिटाने प्रवास करणाऱ्यांना शोधण्याकरिता, त्यांना पकडण्याकरिता वगैरे करावा लागणारा खर्च धरून ती किंमत आकारलेली असते. यावरून लक्षात येईल, की आज आपल्या समाजाच्या दूषित आचरणामुळे आपली कितीतरी शक्ती, द्रव्य व वेळ व्यर्थ खर्च होत असतो. आपण जर सत्याचे उपासक होऊ, तर निरनिराळ्या कायद्यांमुळे आपल्यावर पडणाऱ्या करांचा भार कितीतरी कमी होईल. तसेच, आपण निर्भय व निश्चित होऊ. तसे पाहिले तर सत्य हे बहुतेक सर्वांना प्रिय असते. पण कोणी लोभाने, कोणी मोहाने, तर कोणी दौर्बल्यामुळे सत्य सोडून वागत असतो.

आधुनिक काळात म. गांधींनी सर्व व्यवहारांत सत्याचीच कास धरली व सत्याचे प्रयोग केले. सत्याग्रह नावाचे अहिंसक प्रतिकाराचे एक नवे साधनही त्यांनी शोधून काढले. सत्य म्हणजेच ईश्वर अशी त्यांची श्रद्धा होती.

दैवी जीवन हे नेहमी सत्याच्या व्रताशी निगडित असते. माणसाच्या शरीरातील दैवी मन त्याला सत्यव्रताचे पालन करण्याची सतत प्रेरणा देत असते व सत्य-असत्याचा विवेक करायला शिकवीत असते. सत्यानेच ब्रह्मज्ञानाचीही प्राप्ती होते, असे सांगितले आहे. [ उ. र.; भा. सा. २; धर्म क्या कहता है, भा. २, ४; वेदविद्या; डॉ. कन्हैयालाल सहल, वरदा, एप्रिल १९५९]

## सत्यनारायण

एक काम्य व्रत. बंगाल व महाराष्ट्र या प्रांतांत हे व्रत फार लोकप्रिय आहे. हिमालयाच्या परिसरात सत्यनारायणाची काही मंदिरे आहेत. तिथून हे व्रत बंगालमध्ये व खाली दक्षिणेत आले असावे. शंभर वर्षांपूर्वी महाराष्ट्रात हे व्रत कोणाला माहीत नव्हते. पेशवाईतल्या कागद पत्रांत सत्यनारायणाच्या पूजेचा उल्लेख आढळत नाही. सत्यनारायण हे जोडनाव आहे. विष्णुसहस्रनामात ते आलेले नाही. उत्तर प्रदेशात सत्यनारायण हे माणसाचे नाव रूढ आहे.

म. म. हरप्रसाद शास्त्री यांच्या मते सत्यनारायणाच्या पूजेचा उगम मुसलमानी आहे. या पूजेचे प्रारंभीचे नाव सत्यपीरेर पूजा असे आहे. सांप्रतही पुष्कळ ठिकाणी हे नाव प्रचलित आहे. सत्यपीराला शिर्णी अर्पण करण्याची मुसलमानांची चाल बंगाली हिंदूंनी सत्यनारायणाच्या पूजेत स्वीकारली. सत्यपीर हा वृद्ध ब्राह्मणाच्या रूपाने लोकांना दर्शन देतो, अशा प्रकारच्या कथा ओडिसात प्रचलित आहेत.

हे व्रत स्त्रियांना विहित नाही. पण सत्यनारायणाच्या कथेत मात्र लीलावती आणि कलावती या मायलेकींनी ते केल्याचा उल्लेख आहे. सत्यनारायणाचे हे व्रत गेल्या शंभर वर्षांत फारच लोकप्रिय झाले आहे. सत्यनारायण नवसाला पावतो, अशी भाविकांची दृढ श्रद्धा आहे. महाराष्ट्राचे अनुकरण करून कित्येक मद्रासी कुटुंबांनीही हे व्रत स्वीकारले आहे.

सांप्रत सत्यनारायण पूजेला सोहळ्याचे स्वरूप प्राप्त झाले आहे. तसेच लग्नानंतर नवदांपत्याने ही पूजा करण्याचा प्रघात सर्वत्र दिसून येतो.

महाराष्ट्रात ही पूजा वैयक्तिक व सार्वजनिक रीत्याही करतात. श्रावण महिन्यात अनेक कुटुंबांत ही पूजा करण्याची प्रथा आहे. तसेच, हे काम्य व्रत असल्यामुळे वर्षाच्या कोणत्याही दिवशी ते करण्याचा प्रघात आहे. या व्रताचा विधी असा –

या व्रतात सत्यनारायण ही प्रमुख देवता असून, सूर्यादी नवग्रह, गणपती, गौरी, वरुण, अष्ट लोकपाल, इ. परिवारदेवता आहेत. म्हणून या मांडावळीत मध्यभागी तांदुळांच्या किंवा गव्हांच्या राशीवर उदकयुक्त कलश ठेवून त्यात दूर्वा, पंचपल्लव, सुपारी, सोन्याचे नाणे, इ. घालतात व त्याच्यावर पूर्णपात्र ठेवतात. पूर्णपात्रात सत्यनारायणाची प्रतिमा किंवा शालिग्रामशिला किंवा बाळकृष्णाची मूर्ती किंवा नारळ ठेवतात. कलशाच्या भोवती उंची वस्त्र गुंडाळतात व त्याला गंधाक्षतापुष्पांनी सुशोभित करतात. नंतर सत्यनारायणाची षोडशोपचार पूजा करतात. सव्वा शेर गव्हाचा किंवा तांदुळाचा रवा, तेवढेच तूप, तसेच केळी, दूध, साखर किंवा गूळ या सर्वांचा शिरा करतात आणि त्याचा नैवेद्य दाखवतात. पूजा झाल्यावर व्रतकर्ता कथाश्रवण करतो. त्यानंतर पोथीची पूजा व कथावाचकाची पूजा करून दक्षिणादान देऊन पूजा समाप्त करतात.

व्रतकर्ता नंतर तीर्थप्रसाद ग्रहण करतो. जमलेल्या लोकांना प्रसाद वाटतात. काहीजण नृत्यगायनाने रात्र जागवतात. फल – इच्छापूर्ती.

सत्यनारायणाच्या अनेक कथा स्कंदपुराणाच्या रेवा खंडात पाच अध्यायांत सांगितल्या आहेत, त्या अशा –

हे व्रत श्रीविष्णूने नारदाला सांगितले. ते त्वरित फल देणारे म्हणून नारदाने पृथ्वीवरच्या लोकांत प्रसृत केले.

एक दरिद्री ब्राह्मण भिक्षेवर जगत होता. एक दिवस तो अगदी थकून गेला. त्या वेळी सत्यनारायणाने वृद्ध ब्राह्मणाच्या रूपाने त्याला दर्शन दिले आणि आपले व्रत करायला सांगितले. ब्राह्मणाने ते केले आणि तो दारिद्र्यमुक्त झाला. त्याच्यापासून ते एका मोळीविक्या शूद्राला मिळाले. तोही सुखी झाला. साधु नावाचा एक वाणी होता. त्याला संतान नव्हते. त्याने सत्यनारायणाला नवस केला. त्याला कलावती नावाची मुलगी झाली. साधुवाण्याने व्रताची चालढकल केली. पुढे कलावतीचे लग्न झाले. सासरे-जावई व्यापारासाठी दूरदेशी गेले. तिथे सत्यनारायणाच्या

...ने ते चोर म्हणून राजाच्या कैदेत पडले. त्याच वेळी ...च्या घरी साधुवाण्याची पत्नी लीलावती आणि मुलगी ...वती यांनी हे व्रत केले. त्या पुण्याने ते बंदीतून सुटले व ...ात बसून परत आपल्या गावी यायला निघाले. ही बातमी ...ताच मायलेकींनी पुन्हा व्रत केले. लीलावती बंदरावर त्यांना ...यला गेली. पण कलावती प्रसाद घेतल्यावाचून भेटायला ...मुळे गलबत बुडाले आणि त्यात तिचा पती नष्ट झाला. ... पुन्हा ते व्रत केल्यावर तो जिवंत झाला. अंगध्वज नावाच्या ...जाने सत्यनारायणाच्या प्रसादाचा अवमान केल्यामुळे त्याचे ...शंभर पुत्र मेले आणि राज्यही गेले. त्याने व्रत करून क्षमा माग...तच गेलेले सर्व परत मिळाले.

...याशिवाय, अनेक प्रांतांत सत्यनारायणाच्या विविध कथा ...चलित आहेत. [ हि. ध.; पू. मा. प्र. ]

**सत्यलोक** सप्त लोकांपैकी एक लोक. या ठिकाणी ब्रह्मदेव आपली पत्नी सरस्वती हिच्यासह वास्तव्य ...रतो. गंगेचा मूळ साठा या लोकातच आहे व इथूनच तिचा ...प्रवाह पृथ्वीवर अवतरला आहे. हा सर्वोच्च लोक असून, ...आचरणी ब्राह्मणांसाठीच तो राखून ठेवलेला आहे.

**सत्यविनायक** एक काम्य व्रत. सत्यनारायणाच्या अनुकरणातून हे व्रत निघाले आहे, असे वाटते. ...विनायक देवतेचा जन्म वैशाख पौर्णिमेला झाला. त्या दिवशी ...किंवा भाद्रपद शु. चतुर्थीला किंवा सोमवारी किंवा शुक्रवारी ...सत्यविनायकाची पूजा करतात. त्याचा विधी असा –

...व्रतकर्त्याने त्या दिवशी सकाळी अंगाला तेल व आवळ्याचा ...कल्क लावून स्नान करावे. संध्याकाळी पुन्हा स्नान करावे. एका ...चौरंगाला केळीचे खुंट बांधून त्याच्या भोवती रांगोळी घालावी. ...चौरंगावर एक जलपूर्ण कलश ठेवावा. त्याच्यावर तांब्याच्या ...पत्रावर कोरलेली गणेशाची प्रतिमा ठेवावी. चार कोपऱ्यांवर ...लक्ष्मी-नारायण, पार्वती-महेश्वर, पृथ्वी-वराह व रति-मदन ...यांच्या मूर्ती ठेवाव्या. संध्याकाळी सत्यविनायकाची षोडशोपचार ...पूजा करावी. त्याला दूर्वा व शमीपत्रे वाहावी. सव्वाशेर कणीक, ...साखर व खवा घेऊन त्याचे मोदक करावे. त्या मोदकांचा, ...केळे पेरू, केळी व इतर फळे यांचा नैवेद्य दाखवावा. मग ...सत्यविनायकाची कथा ऐकावी. नंतर पूजा सांगणाऱ्या ब्राह्मणाची पूजा करावी. सुवासिनींना हळदीकुंकू व प्रसाद द्यावा. ...नंतर भोजन करावे. नृत्यगायन, बुद्धिबळ वगैरे मनोरंजक प्रकारांनी ती रात्र जागवावी. फल – धन, धान्य, पत्नी, पुत्र, आरोग्य, ...दीर्घायुष्य वगैरे जे इच्छित असेल, त्याची प्राप्ती.

या व्रताची कथा ब्रह्मांड पुराणात सांगितली आहे, ती अशी–

पूर्वी ब्रह्मदेव, विष्णू व कृष्ण यांनी ही पूजा केली होती. तसेच कृष्णाचा मित्र सुदामा यानेही कृष्णाच्या घरी सत्यविनायकाची पूजा केली होती. त्यानंतर सुदामा परत आपल्या घरी निघाला असता वाटेत त्याला मणी नावाचा एक श्रीमंत वाणी भेटला. तो सोन्याच्या नाण्यांनी व रत्नांनी भरलेल्या शंभर गोण्या बैलांच्या पाठीवर लादून निघाला असता, वाटेत चोरांनी त्याचे सर्व द्रव्य लुटून नेले. लुटलेले द्रव्य जर परत मिळाले, तर मी अर्धे द्रव्य दानधर्मात खर्च करीन, असे त्याने मनात म्हटले. सुदैवाने सुवर्णनाण्यांची एक गोणी त्याला परत मिळाली तेव्हा त्याने त्यातले अर्धे द्रव्य सुदाम्याला दिले. लगेच सुदाम्याने तिथे सत्यविनायकाची पूजा केली. सत्यविनायकाने सुदाम्याला दर्शन दिले व खूप द्रव्यही दिले. नंतर सुदामा आपल्या घराजवळ पोचला, तर त्याला घराऐवजी मोठा राजवाडा दिसला. तसेच उंची वस्त्रे, जडजवाहीर, नोकरचाकर यांनी तो राजवाडा भरलेला दिसला. सत्यविनायकाची पूजा केल्यामुळे आपल्याला हे ऐश्वर्य प्राप्त झाले, असे सुदाम्याने आपल्या पत्नीला सांगितले.

मणी वाण्यानेही आपल्या घरी गेल्यावर सत्यविनायकाची पूजा केली व तिथला राजा आणि त्याचा चित्रबाहू नावाचा मंत्री यांना तीर्थप्रसादाला बोलावले. त्याच वेळी मणी वाण्याचे द्रव्य ज्यांनी लुटले होते, ते चोर त्यातली काही रत्ने घेऊन आले व चित्रबाहूला ती विकत घ्यायला सांगू लागले. पण मणी वाण्याने आपली रत्ने ओळखली, तेव्हा चोर घाबरले आणि त्यांनी चोरलेले सर्व द्रव्य वाण्याला परत दिले.

चित्रबाहू मंत्र्याला पुत्र नव्हता. म्हणून पुत्र झाल्यास सत्यविनायकाची पूजा करीन, असा नवस त्याने केला. त्याप्रमाणे त्याला पुत्र झाला. पण तो पूजा करायचे विसरला. तेव्हा त्याच्यावर अनेक संकटे आली. पण शुकमुनीने त्याला पूजेची आठवण करताच, त्याने सत्यविनायकाची पूजा केली, तेव्हा त्याला पुन्हा पूर्वीचे वैभव प्राप्त झाले.

**सत्यशोधक समाज** महाराष्ट्रातील एक पंथ. म. जोतीराव फुले यांनी इ. स. १८७३ साली त्याची स्थापना केली. त्या समाजाची मुख्य तत्त्वे पुढीलप्रमाणे –

(१) ईश्वर एक असून, तो सर्वव्यापी, निर्गुण, निर्विकार व सत्स्वरूप आहे आणि सर्व माणसे त्याची लेकरे आहेत.

(२) ईश्वराची भक्ती करण्याचा पूर्ण अधिकार प्रत्येक मानवाला आहे. त्यासाठी मध्यस्थाची आवश्यकता नाही.

(३) मनुष्य जातीने श्रेष्ठ ठरत नसून, गुणांनी श्रेष्ठ ठरतो.

(४) कोणताही ग्रंथ सर्वांशी प्रमाण व ईश्वरप्रणीत नाही.
(५) परमेश्वर सावयवरूपाने अवतार घेत नाही.
(६) पुनर्जन्म, कर्मकांड, जपतप या गोष्टी अज्ञानमूलक आहेत.

याविषयी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी विवेचन केले आहे, ते असे –

ईश्वरशक्ती व मनुष्यांची नैतिक एकता यांचा मिलाफ हे सर्व धर्मांचे अबाधित रहस्य आहे. सत्यशोधक समाजातर्फे हेच तत्त्व महाराष्ट्रात प्रसृत करण्याचा प्रयत्न झाला.

ब्राह्मसमाज व सत्यशोधक समाज यांच्या तत्त्वांत पूर्ण साम्य दिसते. पण खोलपणे पाहता ब्राह्म समाज ही धार्मिक चळवळ होती. सत्यशोधक समाजात ईश्वरोपासना व ब्रह्मचिंतन यांना कधीच महत्त्व नव्हते. अहंमन्य वरिष्ठांच्या विरुद्ध मागासलेल्या जमातींचे बंड उठविणे हाच उद्देश त्यात प्रामुख्याने होता.

ब्राह्म समाज ही हिंदू समाजातील वरच्या थरांची धार्मिक-सामाजिक सुधारणेची वैचारिक हाक होती; तर सत्यशोधक समाज ही सामाजिक मूल्ये बदलण्याबद्दलची खालच्या थरांची त्वेषपूर्ण ललकारी होती. बहुजनसमाजावर हिंदूंच्या ब्राह्मणी परंपरेने जे युगानुयुगे वर्चस्व गाजविले तिच्याविरुद्ध बंड करणारी प्रवृत्ती सत्यशोधक समाजाच्या रूपाने जागी झाली. इंग्रजी राज्याच्या प्रवृत्तीबद्दल इतर सुधारकांप्रमाणेच सत्यशोधकाच्या ठिकाणीही आदरबुद्धी होती. पाहा – फुले म. जोतीराव.
[ म. जी. १; वै. सं. वि.; नवभारत, फेब्रुवारी १९५४ ]

**सत्याग्रह** अन्यायाला शांतपणे व निश्चयाने प्रतिकार करण्याचा एक अभिनव अहिंसक मार्ग. सत्याचा आग्रह धरणे असा त्याचा अर्थ आहे. सत्यव्रत, सत्यनिष्ठा, सत्यवन्त, सत्यसंध हे शब्द प्राचीन वाङ्मयात वापरलेले आढळतात. पण सत्याग्रह या शब्दाचा अर्थ त्याहून व्यापक आहे. सर्वांगीण जीवनाची अखंड तत्त्वधारा या अर्थाने आज त्याचा उपयोग केला जातो. सत्य व प्रीती यांमधून निर्माण झालेली शक्ती म्हणजे अहिंसा होय.

म. गांधींच्या मते सत्य व अहिंसा एकरूपच आहेत. जीवितवित्ताची कोणत्याही प्रकारे हानी करणारी हिंसक कृती सत्याग्रहात करायची नसते. शत्रूचा निःपात करणे ही कल्पना सत्याग्रहामागे नसून संयम, सहानुभूती व आत्मक्लेश यांच्या योगाने त्याचे मतपरिवर्तन करणे, त्याला दुष्कृत्यापासून परावृत्त करून सन्मार्गावर आणणे, ही त्यातील कल्पना आहे. सत्याग्रहाचा अवलंब प्रेमपूर्वकच केला जातो. सत्याग्रही कोणाकडे शत्रुत्वाच्या भावनेने पाहत नाही; तर मित्रत्वाच्या भावनेनेच पाहतो. मनुष्याच्या नैसर्गिक सत्प्रवृत्तीवर त्याचा अढळ विश्वास असतो.

**पूर्वपीठिका** – पौराणिक कथा व आख्यायिका यांत सत्याग्रहांची काही उदाहरणे आढळतात. अन्यायाविरुद्ध त्यांनी आत्मक्लेशाचा मार्ग अनुसरून, सविनय प्रतिकार केला. प्रल्हाद व हरिश्चंद्र ही त्यांतली विशेष उल्लेखनीय उदाहरणे होत. प्रल्हाद हा विष्णुभक्त असून, त्याचा पिता हिरण्यकशिपू देवविरोधी होता. देवभक्ती म्हणजेच विष्णुभक्ती करू नये म्हणून बापाने प्रल्हादाला खूप बजावले, पण त्याने ते मानले नाही. बापाने केलेला सर्व छळ सहन करून तो अविचल व ईश्वरनिष्ठ राहिला. अखेर ईश्वराने अवतार घेऊन त्याच्या निर्दय बापाला ठार मारले.

अयोध्येचा राजा हरिश्चंद्र यानेही आपल्या अलौकिक सत्यनिष्ठेमुळे राज्याचा त्याग केला आणि विश्वामित्रामुळे ओढवलेल्या अनेक हाल-अपेष्टा सोसल्या. शेवटी त्याच्या प्रामाणिकपणामुळे ईश्वर त्याच्यावर प्रसन्न झाला.

ऐतिहासिक काळातले बुद्ध व महावीर यांनी अहिंसेची शिकवण दिली. येशू ख्रिस्त व सॉक्रेटिस यांनी सत्यासाठी आत्मबलिदान केले. नंदनार, तुकाराम, एकनाथ या साधुसंतांनीही अन्यायाचा प्रतिकार शांतपणे व प्रेमपूर्वक केला. 'अहिंसा परमो धर्मः' व 'सत्यान्नास्ति परो धर्मः' हे त्यांच्या जीवनाचे सूत्र होते. येशू ख्रिस्ताच्या आयुष्यात सत्याग्रहाचे तत्त्व जास्त निश्चित व सुस्पष्ट झालेले दिसून येते. परंतु राजकीय किंवा आर्थिक प्रश्न सोडवण्यासाठी सत्याग्रहाचा अवलंब कोणी केल्याची प्राचीन काळातली उदाहरणे उपलब्ध नाहीत.

**उगम** – सत्याग्रह ही जीवनाकडे व जगाकडे बघण्याची एक वृत्ती आहे. या वृत्तीचा उगम माया, प्रीती, इ. कौटुंबिक भावनांत होतो. प्रेम, आपुलकी, आदर हे कौटुंबिक जीवनाचे आधारस्तंभ आहेत. प्रेमाचे साफल्य कृतीतच होऊ शकते. ज्यांच्याबद्दल प्रेम वाटते, त्यांच्यासाठी सेवेने व त्यागाने आत्मसमर्पण करणे यातच प्रेमाची सफलता आहे. आदर्श कौटुंबिक जीवनात पाळली जाणारी तत्त्वे सर्व मानवी संबंधांना लागू करणे, हीच सत्याग्रहाची जीवनप्रवृत्ती होय.

गांधीजी सत्याग्रहाचा धडा कौटुंबिक जीवनातच शिकले. प्रेम आणि औदार्य या तत्त्वांनुसार आचरण करणाऱ्या सगळ्या संतांची कोणत्याही स्वरूपातील विरोधाविषयीची व्यक्तिगत प्रतिक्रिया एकच होती. गांधीजींनी जीवनातील सर्व समस्यांसाठी तिचा अवलंब केला, हे विशेष होय. शामलभट यांच्या गुजराती कवितेतील, अपकाराविरुद्ध उपकार करणे यातच खरे सौंदर्य सामावलेले आहे, हे वचन गांधीजींच्या मनात लहानपणीच फार ठसले आणि त्याप्रमाणे आचरण करण्याचा प्रयत्न त्यांनी सुरू केला. त्यानंतर बायबलातील 'सरमन ऑन दि माउंट

त्यांनी वाचला. त्यातील 'तुमच्या शत्रूवर प्रेम करा आणि त्यावर प्रभूची कृपा व्हावी म्हणून, तुमचा छळ करणाऱ्याचे कल्याण व्हावे, अशी प्रार्थना करा' हे वचन वाचून त्यांना फार समाधान झाले. कारण ते वचन त्यांच्या अंतःप्रेरणेला पोषक होते. भगवद्गीतेमुळे त्यांच्या विचाराला दृढपणा आला आणि टॉलस्टॉयच्या 'तुमच्या अंतःकरणातच ईश्वरी साम्राज्य आहे,' या पुस्तकामुळे त्याला निश्चित स्वरूप प्राप्त झाले. गांधीजी म्हणतात– 'मी माझ्या पत्नीकडून अहिंसेचा (व सत्याग्रहाचा) धडा शिकलो. प्रथम मी तिला माझ्या इच्छेप्रमाणे वागवण्याचा प्रयत्न केला. एका बाजूला तिने खंबीरपणे केलेला प्रतिकार आणि दुसऱ्या बाजूला माझ्या मूर्खपणाकरता तिने सोसलेले मूक क्लेश, यांमुळे अखेरीस माझी मलाच लाज वाटू लागली. तिच्यावर सत्ता गाजविण्यासाठीच माझा जन्म आहे, या माझ्या विचारसरणीतील वेडगळपणा माझ्या ध्यानात आला. शेवटी अहिंसेच्या बाबतीत ती माझी गुरू बनली आणि तिने तिच्या बाबतीत अजाणता उपयोगात आणलेल्या सत्याग्रहाच्या नियमांचा विस्तारच काय तो मी दक्षिण आफ्रिकेत केला.'

दक्षिण आफ्रिकेतील मॉरिटबर्ग, पार्डेबर्ग, जोहान्सबर्ग, प्रिटोरिया व डरबान या ठिकाणी म. गांधींना आलेल्या वैयक्तिक अनुभवांमुळे सत्याग्रहाच्या मार्गावर त्यांची प्रगती झाली आणि त्या देशात सामुदायिक सत्याग्रहाची चळवळ चालवण्यास ते समर्थ झाले.

प्राचीन काळातील प्रेषित व संत यांनी आपल्या जीवनात सत्याग्रह तत्त्वाचा अंगिकार केला असला तरी, सत्याग्रह ही व्यक्तिगत धार्मिक प्रवृत्तीच त्यांनी मानली होती. आर्थिक, सामाजिक किंवा राजकीय क्षेत्रातील अन्याय नष्ट करण्याचा सामुदायिक मार्ग म्हणून त्याचा पद्धतशीर उपयोग करण्याचा विचार कोणाच्याही मनात आला नव्हता. गांधीजींनीच फक्त वैयक्तिक सत्याग्रहाला सामाजिक शक्तीचे रूप देऊन, स्वातंत्र्य व स्वतःचे हक्क यांसाठी लढण्याचे एक प्रभावी हत्यार निर्माण केले. त्यांनी सत्याग्रहाला तात्त्विक भूमिकेचे अधिष्ठान दिले असून, त्याचे संपूर्ण शास्त्र बनविले आहे. कोणत्याही परिस्थितीत, केवढीही जबर किंमत द्यावी लागली तरी, प्रेम व अहिंसा यांच्या द्वारा सत्याची जाणीव, उपासना व तदनुरूप आचार यासंबंधीचा आग्रह हे सत्याग्रहाचे अधिष्ठान होय. सत्य हेच सत्याग्रहाचे अंतिम ध्येय असून, अहिंसा किंवा प्रेम हेच त्याचे प्रमुख साधन असते. सत्याग्रह म्हणजे प्रेम, अहिंसा व आत्मक्लेश या साधनांनी सत्याचा शोध घेणे होय.

सत्याग्रहाचा दृष्टिकोन–सत्याची पूर्ण प्रचीती व तादात्म्य हे सत्याग्रहाचे आदर्श होत. मात्र तो अध्यात्मशास्त्रातील अव्यक्त सत्याचा किंवा काव्यमय सत्याचा उपासक नसतो. आयुष्यातील संपूर्ण सत्याची प्रचीती कृतीच्या द्वारा व्हावी यासाठी तो प्रयत्नशील असतो. यासंबंधी श्री. रंगराव दिवाकर यांनी केलेले विवेचन असे–

केवळ सत्याचे चिंतन केल्याने किंवा फक्त हृदयाच्या आतल्या गाभ्यालाच तेवढे त्याचे ज्ञान झाल्याने सत्याग्रह्याचे समाधान होत नाही. त्याच्या बुद्धीला सत्याचा शोध लागला तर तेवढ्यानेच तो सुखी होत नाही. त्याच्या भावना सत्यावर केंद्रित झाल्या किंवा सत्याशी तन्मय झाल्या यातच तो समाधान मानत नाही. आपल्या जीवनाच्या अणुरेणूंत सत्य भरून राहावे अशी त्याला उत्कंठा लागून राहिलेली असते. आणि सत्याचरण करण्याकरिता तो आपले प्राण वेचण्यासाठी तयार असतो. त्याच्या दृष्टीने आचारशून्य ज्ञान म्हणजे केवळ निरर्थक शोभा होय.

सत्याकडे जाण्याचा त्याचा मार्ग एखाद्या कर्मयोग्याप्रमाणे असतो. आपले स्वतःचे शरीर, भोवतालची परिस्थिती, आपले बांधव व त्यांची सुखदुःखे यांपासून सुरुवात करून तो त्यापलिकडे पोहोचण्याचा प्रयत्न करतो. रोगराई, दारिद्र्य, दुःख, अन्याय, गुलामगिरी, विषमतेचे परिणाम, आक्रमण आणि पिळवणूक या कटू सत्यांपासून तो पळ काढू इच्छीत नाही, तर उलट त्यांचा प्रतिकार करणे हे आपले निकडीचे कर्तव्य समजतो. पिळवणूक करणाऱ्या उद्दामांचा अहंकार, पाशवी शक्तीमुळे स्वतःला सुरक्षित समजून जुलूम करणाऱ्यांचा बेफामपणा ही वास्तवता असून, निर्भय आणि अहिंसक लढ्याच्या किंवा धर्मयुद्धाच्या व्यतिरिक्त त्यातून मुक्त होण्याचा दुसरा मार्ग नाही, हे तो जाणून असतो. सत्याविषयीच्या त्याच्या या वृत्तीतूनच त्याच्यातील मानव्याच्या सर्वंकष प्रेमभावनेची वाढ होते. इतर सर्व इच्छा, प्रेरणा आणि आकांक्षा यांचेच ते दिव्य रूप होय. त्याला त्याचाच ध्यास लागून राहतो व त्यामुळेच त्याच्या हातून आपल्या बांधवांच्यासाठी सेवेची आणि त्यागाची कृत्ये घडत असतात.

केवळ सत्याचे आकलन झाल्याने निम्मेदेखील काम भागणार नाही. सत्यानुसार आचरणामुळे सत्याग्रह्याला तो दर्जा प्राप्त होतो. सदैव आणि निरपवादपणे तो सत्याचरण करतो व ते अप्रतिहतपणे अहिंसेनेच करीत असतो.

सत्याग्रही फक्त प्रेमाच्याच द्वारा सत्यप्राप्ती करून घेण्यावर विश्वास ठेवतो. हा विश्वास हाच त्याचा मूलाधार होय. तो त्याचा धर्मच होय. त्यावर त्याची निर्विकल्प निष्ठा असते.

सत्याग्रह्याचे जीवन म्हणजे आत्मशुद्धी, संयम, सेवा, स्वार्थत्याग व आत्मसमर्पण या गुणसमुच्चयाचा एक अखंड व आनंदमय असा क्रम आहे. आपल्या समजुतीप्रमाणे व शक्तीप्रमाणे तो स्वतः विधायक कार्याला व बांधवांच्या सेवेला वाहून घेतो.

त्याच्या कार्यात अडथळा करणाऱ्या शक्ती अन्याय्य व प्रतिगामी असल्याची त्याची खात्री असेल तर तो आपले धैर्य खचू न देता त्यांच्या बरोबर लढा देईल. अन्याय करणाऱ्याबद्दल त्याच्या मनात अप्रीती नसते. सत्याग्रह्याची वागणूक सहानुभूतीची व सहनशील असते. त्याची अशी श्रद्धा असते, की केवळ आत्मक्लेशच तो व त्याच्या विरोधकामधील अंतर भरून काढतील.

**सामाजिक शस्त्र** – गांधीजींच्या मते अहिंसा हा केवळ वैयक्तिक सद्‌गुण नसून, इतर गुणांप्रमाणेच जोपासना करण्यासारखा तो एक सार्वजनिक गुण आहे. अपवादात्मक व्यक्तीच तेवढया अहिंसेचा अवलंब करू शकतील, असे नाही तर सामान्य स्त्रीपुरुषांचे शिस्तबद्ध गटदेखील ती आचरणात आणू शकतील.

सत्याग्रहाचा शस्त्र म्हणून अवलंब करायची ज्याची इच्छा असेल, त्याची त्या मार्गावर श्रद्धा असली पाहिजे. इतर कोणत्याही मार्गापेक्षा हा मार्ग प्रभावी आहे. प्रतिस्पर्धी शरीराने कितीही बलाढ्य असला, आणि त्याचे हिंसेचे तंत्र कितीही कार्यक्षम असले, तरीही हा मार्ग अवलंबिता येतो. आपण निर्भय असलो आणि आपली इच्छाशक्ती जबर असली तर एकाकी असूनही जगातील सर्वांत शक्तिशाली प्रतिस्पर्ध्याबरोबर दोन हात करता येतील. मात्र सत्याग्रहाचा अवलंब करणाऱ्या जनसमुदायाने काही शिस्त पाळली पाहिजे. ज्या गाऱ्हाण्यासाठी झगडण्यास लोक प्रवृत्त झाले असतील, ते नाहीसे व्हावे अशी खरी तळमळ त्यांना असली पाहिजे. चिथावण्याचा कितीही प्रयत्न करण्यात आला तरी त्यांनी अहिंसा सोडता कामा नये. त्यांच्यांत एकी व कार्यक्रमाबद्दल एकमत असले पाहिजे. हसतमुखाने आत्मक्लेश सहन करण्याची तयारी त्यांनी ठेवली पाहिजे. त्यांनी नेत्यावर श्रद्धा ठेवून शेवटपर्यंत त्याच्या आज्ञेत राहिले पाहिजे.

प्रबल पाशवी शक्तीच्या अंकित असलेल्या पददलित व निःशस्त्र लोकांना सहजपणे वापरता येईल असे सत्याग्रहाखेरीज अन्य साधन सापडू शकेल असे वाटत नाही, असा निष्कर्ष अनेक पाश्चात्य विद्वानांनी काढला आहे. ज्याच्यापाशी नैतिक आणि मानसिक शक्तीचा अभाव असेल, त्याला या शस्त्राचा उपयोग करता येणार नाही. शारीरिक दौर्बल्य किंवा म्हातारपण हे काही या मार्गातले अडथळे ठरत नाहीत. स्त्रिया व मुलेही या मार्गाचा अवलंब करू शकतील.

एखाद्या व्यक्तीविरुद्ध हत्यार म्हणून उपयोग केला जावा, अशी मूळ कल्पना सत्याग्रहाची नाही. त्याचा रोख अन्यायाविरुद्ध असतो. अन्यायाचे अवलंबन व्यक्तींच्या द्वारा होते म्हणून त्या व्यक्तीविरुद्ध सत्याग्रह करावा लागतो. परंतु सत्याग्रही त्या व्यक्तीवरही प्रेम करीत असतो. आत्मक्लेशाच्या योगाने व्यक्तींना ते करीत असलेल्या अन्यायापासून परावृत्त करण्याची त्याची इच्छा असते. तो अन्यायावर हल्ला चढवतो, व्यक्तीवर नव्हे.

भारतीय स्वातंत्र्य–संग्रामातील सामुदायिक कायदेभंगाच्या चळवळीत सत्याग्रहाच्या सामर्थ्याचा प्रत्यय आला. मात्र केवळ निःशस्त्र प्रतिकार म्हणजे सत्याग्रह नव्हे. सत्याग्रह हे एक जीवनदर्शन आहे; ती एक मूलगामी व सर्वंकष निष्ठा आहे, असे श्री. गं. बा. सरदार यांनी प्रतिपादले आहे. त्यांच्या विवेचनाचा सारांश असा –

गांधीजींच्या सत्याग्रही जीवनदृष्टीला 'अध्यात्मनिष्ठ व्यक्तिवाद' असे नाव देणे उचित होईल. कारण या विचारप्रणालीत व्यक्तीची अंतःप्रेरणा, व्यक्तीचे नैतिक सामर्थ्य, व्यक्तीची निर्माणक्षमता आणि व्यक्तीचे हृदयपरिवर्तन या गोष्टींना विशेष प्राधान्य आहे. सत्याग्रह म्हणजे सत्याची उपासना, आचरण, आग्रह असे म्हटले तरी, सत्यासत्याचा निर्णय कोणी व कसा करायचा, हा प्रश्न शिल्लक राहतोच. या बाबतीत गांधीजींचा अभिप्राय अगदी स्पष्ट आहे. संपूर्ण शाश्वत सत्य हे अनंत, अचिंत्य व अनाकलनीय आहे. कोणाही मानवाला त्याचा पूर्ण साक्षात्कार होणे कधी शक्य नाही. म्हणून सत्याग्रही मनुष्याचे जीवन हा एक अविरत शोध असतो, अखंड साधना असते. अनासक्त बुद्धीने आणि अंतर्मुख दृष्टीने आपली कर्तव्ये करीत राहणाऱ्या व्यक्तीच्या अंतःकरणातच सत्याचे स्फुरण होते. सत्याग्रही जीवननिष्ठेत परंपरेचे पावित्र्य, रूढींचे प्रामाण्य, धर्मग्रंथांचे अनुसरण यांपेक्षा अंतःप्रतीती, अंतर्नाद, अंतःप्रकाश यांचे स्थान अनन्यसाधारण आहे. सत्यासत्याची, नीति-अनीतीची, कर्तव्याकर्तव्याची छाननी करताना मोठमोठ्यांच्या अनुभवांचा आणि विचारांचा मागोवा घेणे आवश्यकच आहे. पण कोणत्याही प्रश्नाचा अखेरचा निर्णय करताना प्रत्येक व्यक्तीने आपल्या सदसद्विवेकबुद्धीलाच कौल लावला पाहिजे, असा सत्याग्रहशास्त्राचा दंडक आहे.

युद्धात शस्त्रबळाचा विजय झाला तरी न्यायाची सरशी होईलच असे नाही. त्या दृष्टीने सत्याग्रहाचा मार्ग अधिक मूलगामी व परिणामकारक ठरण्याचा संभव आहे. प्रतिपक्षाची न्यायबुद्धी जागृत करणे हे सत्याग्रह्याचे उद्दिष्ट असल्याने सत्याग्रहाची परिणती नेहमी सलोख्यात व सामोपचारातच झाली पाहिजे. सत्याच्या व न्यायाच्या स्थापनेतच त्याची सफलता आहे.

मनुष्यातील सत्प्रवृत्ती व समंजसपणा यांवरील विश्वास हाच सत्याग्रहाचा मूलाधार होय. स्वतःच्या कृतीने विरोधकांच्या पुढे उच्चतर मूल्यांचा आदर्श ठेवून, त्यांची मने जिंकण्यात व बदलण्यातच खरा पुरुषार्थ आहे. आणि त्यातच सत्याग्रहाचे रहस्य सामावलेले आहे. पाहा – गांधी म., मोहनदास करमचंद; गांधीवाद. [ सत्याग्रह (तंत्र आणि इतिहास) श्री. रंगराव दिवाकर, १९४५; श्री. सरदार यांचे आकाशवाणीवरील भाषण ]

**सत्याणुव्रत** जैन गृहस्थाने पालन करायचे एक व्रत. त्याने सदैव सत्य बोलले पाहिजे; पण दुसऱ्याला त्रास होईल, असे सत्य त्याने बोलता कामा नये. बहिऱ्या मनुष्याला बहिरा म्हणणे हे वास्तविक सत्य आहे. पण त्यामुळे त्याला जर वाईट वाटणार असेल, तर असले सत्य त्याने बोलू नये. तसेच सत्य बोलल्याने एखाद्याच्या प्राणावर संकट येणार असेल, तर त्या वेळी ते सत्य बोलणेही दोषास्पद होईल. क्रोध, भय, लालूच, इ. कारणांनी त्याने कधी सत्याचा त्याग करू नये. [ जै. ध. ]

**सत्यामलनाथ** ज्ञानेश्वरांच्या नाथपंथी परंपरेतील मुख्य शिष्य. सत्यामलनाथाच्या नावावर सिद्धान्तरहस्य किंवा ललितप्रबंध, नवरत्नमाला व अनेक अभंग अशी ग्रंथरचना आहे. सिद्धान्तरहस्य हा ग्रंथ वेदान्तपर असून, त्यात बारा हजार श्लोक व अभंग आहेत. हा ग्रंथ स्वतंत्र असून, दुसऱ्या कोणाच्या ग्रंथावरील टीका नाही. यासंबंधी कवी म्हणतो –

संस्कृत असोनि वरी टीका केली । तैसी नव्हे झाली ग्रंथोत्पत्ती ।।
वेदांतवनीची वेंचोनीया फूले । दहा हार केले प्रकरणाचे ।।

त्याच्या नवरत्नमाला या ग्रंथात एकूण नऊ रत्ने (अध्याय) असून, एकूण ओवीसंख्या १२५७ आहे. परंतु या नऊ रत्नांपैकी वैडूर्य, पुष्पराग व इंद्रनील ही तीन रत्ने (ओव्या ३२५) अनुपलब्ध आहेत. पद्मराग, गोमेद, वज्र, पाचू, प्रवाळ व मंगळ ही सहा रत्ने (ओव्या ९३२) उपलब्ध आहेत. हा सर्व ग्रंथ अभंग-ओवी वृत्तात लिहिलेला आहे. उपलब्ध भागात प्रकृतिपुरुषविवेक, दैवासुरसंपद्विभाग, योगविवरण, परब्रह्मस्वरूप, आत्मसाक्षात्कार, इ. विषय वर्णिले आहेत. तसेच या ग्रंथात सत्यामलनाथाने आपले गुरू ज्ञानेश्वर यांचे चरित्र वर्णिले असून, त्यातील समाधिविषयक भाग ज्ञानेश्वरचरित्रावर नवा प्रकाश टाकणारा आहे. ग्रंथात सर्वत्र भक्तीचा जिव्हाळा दाटलेला असून, त्याची शैली ओघवती व प्रसादपूर्ण आहे. ज्ञानेश्वरांचे वर्णन करताना तो लिहितो–

ज्याच्या मंद हास्ये सुमनें झरती । पदस्पर्शें होती । जीव ब्रह्म ।।
षडैश्वर्याद्भुत । रसाचे हे लिंग । पाहुनी अनंग । आर्तभूत ।।

सिद्धान्तरहस्य या ग्रंथात प्रारंभी अनेक कवींना नमन केले आहे. त्यात तुकाराम-रामदासांचा उल्लेख आहे. यावरून हा सत्यामलनाथ शके १६०० च्या नंतरचा असावा, असे वाटते. परंतु ग्रंथात कवी आपणांस ज्ञानेश्वरांनी अनुग्रह दिल्याचे सांगतो. यावरून सत्यामलनाथास ज्ञानेश्वरांनी स्वप्नात येऊन अनुग्रह दिला असावा, असे मानावे लागते.

सत्यामलनाथाच्या जन्मापूर्वी त्याच्या मातापित्यांनी ज्ञानेश्वरांना नवस केला होता, की ' हे ज्ञानदेवा, आम्हांला पुत्र द्या; तो आम्ही शिष्य म्हणून तुमच्या चरणी अर्पण करू, ' असे चिंतामणिनाथकृत ज्ञानकैवल्यात सांगितले आहे. हा नवस फळास येऊन त्या दंपतीला जो पुत्र झाला तोच ज्ञानदेवशिष्य सत्यामलनाथ होय. हा नवस करण्याचा विधी ज्ञानदेव समाधिस्थ झाल्यावर त्यांच्या समाधिस्थानाच्या सानिध्यात घडला असावा, असे श्री. रा. चिं. ढेरे यांचे मत आहे. [ म. सा.; गो. च. प.; स्वामी विवेकानंद जन्मशताब्दी स्मृतिग्रंथ; ज्ञानकैवल्य ]

**सत्र** (१) बारापेक्षा अधिक दिवस जे सोमयाग चालतात, त्यांना सत्र असे म्हणतात. त्यांत त्रयोदशाह यज्ञापासून सहस्र संवत्सर यज्ञापर्यंत सोमयागांचा समावेश होतो. निरनिराळ्या सोमयागांच्या आवृत्ती त्या कालावधीत केल्या जातात. या यज्ञातले १७ ऋत्विज हे सर्व दीक्षित म्हणजे यजमान असतात. मात्र त्यातील एकजण गृहपती मानला जातो. सत्राचे फल सर्वांना समान मिळत असल्यामुळे कोणालाही दक्षिणा दिली जात नाही.

सत्राच्या आरंभी दीक्षाग्रहण करून बारा दिवस व्रत पाळायचे असते आणि त्यानंतर बारा दिवस उपसदेष्टी करायची असते. त्यानंतर सत्राचा आरंभ करतात. सत्राच्या समाप्तीला उत्थान म्हणतात. गवामयन, आदित्यानामयन, अंगिरसामयन असे सत्रांचे अनेक प्रकार आहेत. अनेक इष्टींच्या समुच्चयाने काही सत्रे करायची असतात. त्यांत नक्षत्रसत्र, स्वर्गसत्र, इ. सत्रांचा समावेश होतो.

नैमिषारण्यात शौनकादी ऋषींनी एक प्रदीर्घ सत्र सुरू केले होते. ते चालू असताना सौतीने कौरव पांडवांची कथा त्या ऋषींना विस्ताराने सांगून भारताचे महाभारत केले. सत्रांच्या कालावधीत ऐतिहासिक गाथा व आख्याने गाण्याची प्रथा प्राचीन काळापासून प्रचलित होती. [ वे. शा. दी.; वै. सा. सं. ]

(२) महापुरुषिया पंथाच्या मठाला सत्र म्हणतात. याची रचना बौद्ध विहारामारखी असते. त्याच्या मध्यभागी नामघर किंवा कीर्तनघर म्हणजे प्रार्थनागृह असते. ते पूर्व – पश्चिम बांधलेले असून, त्याच्या पूर्व बाजूला एक लहान खोली असते. त्या खोलीला मणिकूट म्हणतात. या मणिकूटात सत्रातील बहुमोल वस्तू ठेवतात.

नामघरात भक्तजन जमून प्रार्थना करतात. या पंथात मूर्तिपूजेला महत्त्व नाही. नामघरात गुरूचे आसन असून, त्यावर गुरूचा ग्रंथ ठेवलेला असतो. त्या आसनाची पूजा काही भक्त करतात. मात्र ती अत्यावश्यक नसते. काही सत्रांत एक अक्षय दीप तेवत ठेवलेला असतो.

शंकरदेव व माधवदेव यांच्या वेळी सत्रांत देवतेची मूर्ती नसे. कालांतराने काही सत्रांत मूर्तींची स्थापना करण्यात आली. पण

त्या मूर्तीची पूजा ऐच्छिक व प्रासंगिक असे. सत्रांतील विविध कार्यक्रम व विधी मूर्तीसमोर न करता गुरूच्या आसनासमोर केले जातात.

काही मठांत शंकर, माधव व दामोदर यांनी वापरलेल्या वस्तू जतन करून ठेवलेल्या आहेत; तर काही ठिकाणी गुरूंच्या पद-शिला आहेत. गुरूंची पायधूळही काही मठांत ठेवलेली आढळते.

नामघराभोवती मठवासियांना राहण्यासाठी खोल्या असतात आणि मठाभोवती भिंत असते.

मठातील रहिवासी नामघरात जमून जे कार्यक्रम करतात त्यांना प्रसंग असे म्हणतात. त्या कार्यक्रमात मुख्यत: देवाची भक्ती व प्रार्थना असल्यामुळे त्यांना हरि-प्रसंग असेही म्हणतात. नाम-प्रसंग म्हणजे देवाची स्तोत्रे गाणे व भागवत-प्रसंग म्हणजे भागवतपुराणाचे पठण, असे प्रसंगांचे दोन मुख्य प्रकार आहेत. सकाळचे, दुपारचे व सायंकाळचे प्रसंग असेही तीन प्रकार मानले जातात. या प्रसंगांत मूर्तिपूजेचा समावेश कधीही होत नाही.

या सत्रांचा लोकांच्या सामाजिक जीवनावर बराच प्रभाव पडला होता. आसामातील आहोम राजे व उमराव यांनी वैष्णव धर्माचा स्वीकार केल्यामुळे सत्र या संस्थेला समाजात खूप प्रतिष्ठा प्राप्त झाली व सत्रांचा प्रमुख समाजाचा धार्मिक नेता मानला जाऊ लागला. [ शं. हि. टा. ]

## सथवारा

एक जात. या लोकांची वस्ती गुजरात, काठियावाड आणि कच्छ या प्रदेशांत आहे. त्यांच्या चावडा, डाभी, कच्छेटिया, मघडिया, परमार, राठोड, इ. आडनावांवरून हे मूळचे राजपूत असावे, असे वाटते. हे लोक गुजराती भाषा बोलतात.

यांच्यापैकी काही लोक शेतकरी असून, काहीजण शेतमजुरी व गवंडीकाम करतात. त्यांची बायकामुले त्यांना शेतीच्या कामी मदत करतात.

**विवाहप्रथा**—आई-बाप मुलांची लग्ने ठरवतात. चौदा वर्षांच्या आत मुलीचे लग्न झालेच पाहिजे, असा नियम आहे. काही वेळा पाळण्यातच मुला-मुलींची लग्ने लावतात. लग्नाचा मुहूर्त पुरोहित काढून देतो. लग्नापूर्वी पाच-सहा दिवस गणपतिपूजन होते आणि वधू-वरांच्या अंगाला हळद लावतात. लग्नाच्या दिवशी संध्याकाळी वधूच्या घरी नक्षत्रशांती करतात. त्याच दिवशी वधू-वरांना त्यांचे मामा कपडे व दागिने यांची भेट पाठवतात. मध्यरात्री वर आपल्या आप्तेष्टांसह वाजतगाजत वधूगृही जातो. तिथे दारात वधूमाता त्याचे स्वागत करते व त्याला लहानसा नांगर, बाण व रवी या वस्तू दाखवते. नंतर वराला मांडवात नेऊन वधूच्या शेजारी बसवतात. मग त्या दोघांच्या वस्त्रांच्या टोकांना गाठ मारून पुरोहित त्यांचे हात जुळवतो. नंतर वधू-वर अग्नीभोवती चार प्रदक्षिणा घालतात व एकमेकांना लाडूचे घास देतात. आप्तेष्ट मग वधू-वरांना आहेर करतात. नंतर वधू-वर गणपती, ध्रुवतारा व आईबाप यांना नमस्कार करतात. वधू-वरांचे वडील पुरोहिताला दक्षिणा देतात. मग ज्ञातिभोजन होते. नंतर तीन दिवस वधूपिता वराच्या आप्तेष्टांना जेवण घालतो.

विधवाविवाह व घटस्फोट या लोकांत रूढ आहे. धाकट्या भावाला वडील भावजयीशी लग्न करता येते.

**देवधर्म** — हे लोक वल्लभाचार्य, रामानंदी, स्वामीनारायण व बीजमार्गी या पंथांचे अनुयायी असून, ते विष्णू, शंकर व देवी यांना भजतात. दसऱ्याच्या दिवशी ते नीलकंठ पक्ष्याची पूजा करतात. औदीच्य, श्रीमाळी किंवा मोढ ब्राह्मण त्यांचे पौरोहित्य करतात. हे लोक डाकोर, द्वारका, सिद्धपूर, काशी, प्रयाग, मथुरा-वृंदावन, इ. क्षेत्रांची यात्रा करतात.

**मर्तिकप्रथा** — जेव्हा एखादा माणूस आसन्नमरण होतो, तेव्हा त्याला स्नान घालून शेणाने सारवलेल्या जमिनीवर ठेवतात. त्याच्या कपाळी टिळा लावतात. त्याच्या तोंडात तुळशीची पाने, दही व चांदीचे नाणे ठेवतात. तो मृत झाला, की प्रेत तिरडीवर बांधून स्मशानात नेतात. तिथे प्रेताला जाळतात. तिसऱ्या दिवशी मृताचा उत्तराधिकारी एका मोठ्या मडक्यात पाणी व लहान मडक्यात दूध घेऊन, पुरोहितासह स्मशानात जातो. दूध व पाणी मृताच्या रक्षेवर ओततात व पाण्याचे मडके रक्षेच्या ढिगावर ठेवतात. लहान मडक्यात मृताच्या अस्थी ठेवतात व नंतर त्यांचे एखाद्या नदीत विसर्जन करतात. मृताशौच पाच ते नऊ दिवस पाळतात. बाराव्या दिवशी आणि मासिक, षाण्मासिक व वार्षिक श्राद्धाच्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात. [ ट्रा. का. बां. ]

## सथिया

एक भटकी जमात. राजस्थानातील हाडोती राज्य हे या लोकांचे मूलस्थान होय, असे म्हणतात. त्यांची भाषाही हाडोती भाषेशी साम्य असणारी आहे. हे लोक मूळचे राजपूत असून परिस्थितीमुळे त्यांना भटके जीवन पत्करावे लागले, अशी समजूत आहे. गावोगाव आठवड्याचे बाजार करीत, कुटुंबासह हे हिंडत असतात. लहान खोंड विकत घेऊन, त्यांचे खच्चीकरण करून, मग ते विकणे हा त्यांचा व्यवसाय आहे. याशिवाय ते अन्य गुरांचाही व्यापार करतात.

सथिया लोक फार धर्मभोळे आहेत. त्यांचा भुताखेतांवर विश्वास असतो. ते क्षुद्र देवतांची उपासना करतात. पिंपळाला ते फार पवित्र मानतात. शपथ घ्यायची तर पिंपळाचीच घेतात. कुटुंबातील कोणी आजारी पडले, तर ते देवाला नवस करतात.

त्यांचा विवाहविधी अत्यंत साधा असतो. विवाहात ते वराची

...सांभाळीत नाहीत. कोणत्याही वयात ते लग्न करतात. ...तोक फार मद्यपान करतात. त्यावरून त्यांच्यांत भांडणेही ...त. पण भांडणे मिटविण्यासाठी ते कधी कोर्टाची पायरी ...नाहीत. याशिवाय त्यांच्यांत स्त्रिया गहाण टाकण्याची एक ...चाल आहे. त्या गहाण ठेवून घेणारे सावकारही त्यांच्याच ...चे असतात. एखादी स्त्री गहाण असताना गरोदर राहिली, ...कर्जफेडीनंतर नवऱ्याकडे परत येताना ती ते मूल सावकारा-...ठेवून येते. नवऱ्याला स्त्री गहाण ठेवण्यात आणि स्त्रीला ...राहण्यात कोणताच कमीपणा वाटत नाही. सधिया स्त्रियांचे ...नैतिक आचरण सोडल्यास त्या आपल्या नवऱ्यांना व्यवसा-...बूप मदत करतात. [ से. इं. १९३१, व्हॉ. १ ]

**सद** यज्ञासाठी घातलेला एक मंडप. सद म्हणजे सभास्थान. हा मंडप महावेदीच्या पश्चिम अंगाला असतो. चौवीस ...च्या कांडचाने या मंडपासाठी दक्षिणोत्तर २७ कांडी लांब ...पूर्वपश्चिम ९ कांडी रुंद अशी जागा आखून घेतात. या मंड-...सहा-सहा खांबांच्या दक्षिणोत्तर तीन ओळी असतात. ...मंडपाप्रमाणेच याला पूर्वेला एक व पश्चिमेला एक अशी ...दारे असतात. मंडपाच्या वर नऊ कळक उत्तरेला शेंडे करून ...तात आणि त्यांच्या वर सहा कळक पूर्वेला शेंडे करून ठेव-...मंडपाच्या मधल्या ओळीतले खांब यजमानाच्या मस्तका-...उंच असतात. पूर्व व पश्चिम या दोन ओळींतले खांब यज-...च्या बेंबीइतके उंच असतात. त्यामुळे मंडप दुपाखी व सुंदर ...तो. वर टाकलेल्या कळकांच्या मधून पांझरण घालून मंडप ...टाकलेला असतो. मंडपाच्या कडेने कांबींचा कूड घाल-...पूर्वेच्या दाराच्या दोन्ही बाजूंच्या खांबांना दर्भ गुंडाळून ...दोरीचे वेढे दिलेले असतात. [ म. शा. को. — वेदविद्या ]

**सदंतजननशांती** जन्मत:च मुलाला दात असल्यास ते अशुभ मानतात व त्याच्या परिहारासाठी ही ...करतात. प्रथम अग्निस्थापना करतात. नंतर एका सुवर्ण-...वर बालकाला ठेवून सुगंधी जलाने त्याला स्नान घालतात. ...कलशांवर धाता, वह्नी, सोम, वायू, पर्वत आणि केशव या ...चे आवाहन व पूजन करतात. धातृदेवतेसाठी चरूचा आणि ...देवतांसाठी आज्याचा होम करतात. शेवटी बलिदान व ...करून आचार्याला यथाशक्ति दक्षिणा देतात. [ऋ. ब्र. स.]

**सदस्य** यज्ञातील एक ऋत्विज. यज्ञात काम असणाऱ्या सोळा ऋत्विजांचे चार गट कल्पिलेले आहेत. सदस्य हा ...ऋत्विज होय. होता, अध्वर्यू, उद्गाता इत्यादींच्या तोडीचे स्थान याला दिलेले आहे. यज्ञात याला कोणतेही विशिष्ट काम नसते. सर्व ऋत्विजांच्या कामावर तो देखरेख ठेवतो. याला सोमपान करण्याचा अधिकार आहे. प्रत्येक यज्ञात सदस्य असलाच पाहिजे, असा नियम नाही. वाजपेय यज्ञात मात्र सदस्य असावा लागतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**सदानंद बाबा** (इ. स. चे १८ वे शतक ) एक सिद्ध, संत आणि कवी. याची विहारच्या चंपारण्य जिल्ह्यातील सरभंग संप्रदायाच्या प्रधान प्रवर्तकांमध्ये गणना होते. या जिल्ह्यातील चनाइनवान नामक गावी याचा निवास होता. बालपणीच काहीशा निमित्ताने याने विरक्त बनून घर सोडले. घर सोडण्यापूर्वीचे त्याचे नाव चित्रधर मिश्र असे होते. नंतर तो सदानंद म्हणून ओळखला जाऊ लागला. त्याच्या गुरूचे नाव अज्ञात आहे. हा मोठा सिद्ध होता. सदानंद नित्य आपली आतडी मुखावाटे बाहेर काढून स्वच्छ करून पुन्हा पोटात ठेवीत असे, असे सांगतात. त्याच्या सिद्धीने प्रभावित झालेल्या बादशहाने त्याला काही वतन दिले. आजही त्याच्या वंशजांकडे ते वतन आहे. सदानंद मोठा कवीही होता. परंतु त्याचे बरेचसे काव्य अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडले. जे काही वाचले आहे ते चंपारण्या-तील मुसहरवानिवासी श्री. नरसिंह चोबे यांच्या संग्रहात आहे.

याचा शिष्यपरिवार मोठा आहे. त्याने जिवंत समाधी घेतली, असे म्हणतात. त्याची समाधी चनाइनबानमध्ये असून, तीवर सुंदर मंदिर उभारलेले आहे. [ सं. स. सं. ]

**सदानंद योगींद्र** (इ. स. चे १६ वे शतक) वेदान्तसार या ग्रंथाचा कर्ता. वेदान्तसार हा अद्वैत वेदान्ताचा प्रकरण ग्रंथ आहे. हा ग्रंथ अत्यंत सरळ व सुबोध असल्या-मुळे फार लोकप्रिय आहे. याच्यावर अनेक टीका झालेल्या असून, ग्रंथाच्या अनेक आवृत्त्याही निघाल्या आहेत. हा ग्रंथ रचून सदा-नंद योगींद्राने मुमुक्षू लोकांवर अतिशय उपकार केले आहेत. याशिवाय त्याने वेदान्तशास्त्रसिद्धान्त, सारसंग्रह व स्वरूपनिर्णय हे ग्रंथ लिहिले आहेत. [ हिंदुत्व; म. त. म. ]

**सदानीरा** सदैव जलयुक्त असणारी एक नदी. शतपथ ब्राह्म-णात (१.१.१.१४) कोसल व विदेह या प्रदेशां-मधील सीमा म्हणून हिचा उल्लेख आला आहे. वेबरच्या मते सदानीरा हीच गंडकी नदी होय. पण पार्जिटरच्या मते ती राप्ती नदी आहे. काही पंडितांच्या मते सदानीरा व करतोया एकच होत. पण करतोया ही उत्तर बंगालमधली नदी आहे. महाभार-तात सदानीरा, करतोया व गंडक यांचा वेगवेगळा उल्लेख आहे.

तथापि सदानीरा म्हणजे गंडकी हे वेबरचे मत बहुतांशी मान्य झालेले आहे. [ म. ज्ञा. को. – बुद्धपूर्व जग; वै. सा.; वे. ए. ]

**सदापृण आत्रेय** अत्री कुलातला एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील पंचेचाळीसावे सूक्त याने रचले आहे. या सूक्ताची देवता विश्वेदेव असून, त्यांची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. पणींनी चोरलेल्या आंगिरसांच्या गायी इंद्राने सोडवून आणल्याचाही उल्लेख त्यात आहे. सरमा-पणी संवादाचाही थोडासा निर्देश आहे. याची एक ऋचा अशी–

**विश्वे अस्या व्युषि माहिनायाः सं यद् गोभिरङ्गिरसो नवन्त ।**
**उत्स आसां परमे सधस्थ ऋतस्य पथा सरमा विदद् गाः ।।**

(ऋ. ५.४५.८)

अर्थ–सत्ययज्ञमार्गी सरमेच्या साहाय्याने उषःकाली धेनू मिळविणाऱ्या आंगिरस ऋषिसमूहाने नव्याने उपलब्ध झालेल्या गायीच्या दुधाचा उपयोग श्रेष्ठ यज्ञांसाठी केला.

याचा उल्लेख याच मंडलातील चव्वेचाळीसाव्या सूक्ताच्या बाराव्या ऋचेत आला आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ.]

**सदारंग** ख्याल रचणारा संगीतकार. दिल्लीच्या महंमद-शहाच्या (इ. स. १७१९–१७४८) दरबारात न्यामतखां व फिरोजखां या नावाचे दोघे बंधू होते. ते उत्तमपैकी बीनवादक होते. बादशहाने एकदा, त्यांनी स्वतंत्र वादन न करता दरबारगायकांना साथ करावी, असे फर्मान काढले. हा आपला अपमान आहे, असे समजून दोघेही बंधू दिल्ली सोडून निघून गेले. त्यांना अनेक रागांतील कितीतरी ध्रुवपदे येत होती. त्या नमुन्या-वर त्यांनी अनेक रागांत ख्याल नावाची नवी पद्ये रचली. मोठे ख्याल त्यांनी ध्रुवपदाच्या नमुन्यावर रचले म्हणून त्यांना मुंढी ध्रुवपदे असे म्हणतात. त्या ख्यालात त्यांनी सदारंग व अधारंग या टोपण नावांनी बादशहाची स्तुती केली. पुढे दोन-तीन वर्षांनी आपल्या शिष्यांना त्यांनी दिल्लीदरबारात ते ख्याल गायला लावले. ते ऐकून बादशाह खूष झाला व त्याने सदारंग-अधारंगांना पुन्हा मानाने आपल्या दरबारात बोलावले. हे दोघे ख्यालगायनाचे प्रवर्तक होत.

यांच्या वेळेपासून ख्यालगायन शिष्ट समाजात प्रसृत झाले व ध्रुवपदगायनाची परंपरा कमी झाली. ख्यालगायन लोकप्रिय झाले आहे हे पाहून, अनेकजणांनी पुढच्या काळात टोपण नावाने ख्यालांची रचना केली. [ सं. शा. क. इ. ]

**सद्गुरु** सर्व संतमहंतांनी सद्गुरूचा महिमा विशेषेकरून वर्णिला आहे. सद्गुरूच्या मार्गदर्शनावाचून साधकाला मोक्षमार्गाची वाटचाल करता येत नाही. सद्गुरू आणि परब्रह्म अभिन्न आहेत. सद्गुरू ही परमेश्वरमूर्ती मानणे हीच खरी भक्ती आहे, असे एकनाथ म्हणतात. सर्वांभूती देव दाखवणाऱ्या गुरूच्या ऋणातून मुक्त होणे अशक्य आहे. म्हणून त्याच्या चरणी माथा ठेवणे हेच युक्त होय.

ईश्वरसाक्षात्कार होऊन ज्याला ब्रह्मपद प्राप्त झाले, त्याला सद्गुरू म्हणावे. कबिराच्या पदांच्या आधारे गुरुदेव रा. द. रानडे यांनी अशा सद्गुरूची नैतिक, शारीरिक, साक्षात्कारविषयक व सामाजिक लक्षणे सांगितली आहेत, ती अशी –

**नैतिक लक्षणे** – आनंद हे सद्गुरूचे मुख्य लक्षण होय. ग्लानी, थकवा, असमाधान, उपेक्षा, इ. दोष त्याच्या जीवनात कधीच दिसत नाहीत. कर्म करीत असताही त्याच्या ठिकाणी नैष्कर्म्य असते. आपली सर्व कर्मे परमेश्वराला अर्पण करीत असल्यामुळे तो कर्ता असूनही अकर्ता असतो. तो निर्भय बनलेला असतो. त्यामुळे त्याचा आनंद वृद्धिंगत होतो.

**शारीरिक लक्षणे** – एकाग्रतेसाठी सद्गुरू इंद्रियांची द्वारे बंद करीत नाही किंवा प्राणनिरोधही करीत नाही. त्याच्या आध्यात्मिक आनंदामुळे त्याच्या ज्ञानेंद्रियांचे व कर्मेंद्रियांचे प्रयत्नावाचून आपोआप नियमन होते. तो डोलला तरी त्याचे चित्त विचलित होत नाही. तो बोलला तरी त्याचे अनुसंधान सुटत नाही. आपल्या आध्यात्मिक आनंदात त्याचे मन सदा निमग्न असते. तो सदैव सहजसमाधी भोगीत असतो. नुसती दृष्टी टाकल्याबरोबर ईश्वराचे दर्शन होणे ही सहजसमाधी होय. साक्षात्कारी सद्गुरू मूलाधार चक्र व सहस्रार चक्र यांच्यामध्ये केवलकुंभक करून राहतो. हा केवलकुंभक अन्य कुंभकांपेक्षा भिन्न आहे. तो प्रयत्नाने करता येत नाही; तर आपोआप होतो. त्या वेळी श्वासोच्छ्वास इतका सूक्ष्म होतो, की तो चालू आहे किंवा नाही हे कळतच नाही. आणि त्यामुळे सद्गुरूचे मन व शरीर ही अगदी शांत असतात.

**साक्षात्कारविषयक लक्षणे** – सद्गुरू आपला आत्मा शब्दाला जोडतो व नादांचे अनुसंधान करतो. तो जिकडे पाहतो तिकडे त्याला ईश्वरच दिसतो. डोळे झाकून त्याला आत जसे रूप दिसते, तसेच बाहेर डोळे उघडे ठेवूनही दिसते. त्याच्या अंतर्बाह्य साक्षात्काराचे स्वरूप अगदी एकच असते.

**सामाजिक लक्षणे**–शिष्याचा उद्धार करणे हे सद्गुरूचे सामाजिक कार्य असते. त्याचा आध्यात्मिक अनुभव शिष्यामध्ये उतरला पाहिजे. त्याच्या कृपेने शिष्याला आत्मानुभव येत येत तो ईश्वरस्वरूपात अवस्थित व्हावा. त्याचे जन्ममृत्यूचे चक्र थांबावे. अशा सद्गुरूचे दर्शन म्हणजे प्रत्यक्ष ईश्वराचेच दर्शन होय.

ज्ञानेश्वरांनी सांगितलेली सद्गुरूची लक्षणे अशाच स्वरूपाची

आहेत. ते म्हणतात – गुरू हा सुखाचा सागर, प्रेमाचे आगर आणि धैर्याचा डोंगर आहे. तो साधकाला साहाय्यभूत असून, भक्ताची जणू माताच आहे. तो शिष्याच्या डोळ्यांत ज्ञानांजन घालून त्याला निजधन म्हणजे आत्मस्वरूप दाखवतो. तो नाना उपकारांनी शिष्याचे पाप नष्ट करतो आणि वासनामय लिंग-देहाच्या ग्रंथी सोडतो. [ना. भा. ध.; जीवनविकास, मार्च, १९६२]

**सद्गोप** बंगालमधील एक जात. मुळात हे लोक गवळी होते. पण सांप्रत त्यांनी शेतीचा व्यवसाय पत्करला आहे. हे लोक कृष्णभक्त आहेत.

या लोकांत कर्णवेध, जावळ काढणे व उपनयन हे तीन संस्कार नाहीत. यांच्या विवाहातील काही विधी पुढीलप्रमाणे असतात – लग्नापूर्वी तीन दिवस वराच्या अंगाला हळद लावतात. वराच्या स्नानासाठी गावातील मुली पाणी काढतात. त्याला जलसव असे नाव आहे. एका तबकात दैनंदिन उपयोगाच्या बावीस वस्तू ठेवून त्यांचा वराच्या कपाळाला स्पर्श करतात व त्या त्याला अर्पण करतात. त्याच वेळी वराच्या मनगटाला दूर्वा बांधतात. पितरांना आहुती देतात. चोहोबाजूंनी केळी असलेल्या जागेत जलसवाच्या पाण्याने वराला स्नान घालतात. वराच्या कपाळाला विडा, सूप, इ. वस्तूंचा स्पर्श करतात. हेच सर्व विधी वधूच्याही घरी होतात.

विवाह वधूगृही होतो. विवाहासाठी जेव्हा वर वधूगृही जायला निघतो तेव्हा त्याची आई त्याला विचारते. 'बाळा, तू कुठे चाललास ?' तेव्हा तो उत्तर देतो. 'आई, तुला एक दासी आणण्यासाठी मी निघालो आहे.' वधूगृही गावचा न्हावी वराचे स्वागत करतो व त्याच्यावर साखर आणि अक्षता टाकतो. नंतर वराला घरात नेतात. तिथे तो चोहोबाजूंनी केळी लावलेल्या जागेत उभा राहतो. सहा सुवासिनी त्याच्या भोवती सात प्रदक्षिणा घालतात. मग वधूला एका मोठ्या परातीत बसवून बाहेर आणतात व वराभोवती सात वेळा फिरवतात. नंतर वधू-वर एकमेकांना प्रथमच पाहतात. याला शुभ दृष्टी असे नाव आहे. वधू-वरांना मग बाहेर आणतात व जमलेल्या लोकांसमोर ठरलेले विधी करतात. वधूपित्याने कन्यादान केल्यावर वधू-वर एकमेकांच्या फुलांच्या हारांची अदलाबदल करतात. नंतर वर वधूच्या कपाळी सिंदूरतिलक लावतो व विवाहविधी समाप्त होतो.

हे लोक जननाशौच व मृताशौच एकेक महिना पाळतात. [इं. स्ट. पा. प्रे. व्हॉ. १.३, एप्रिल १९६०]

**सद्धर्मपुंडरीक** महायान बौद्ध धर्माचा एक प्रमुख ग्रंथ. महायानाच्या वैपुल्यसूत्रांपैकी हा ग्रंथ आहे. पुंडरीक म्हणजे श्वेतकमल. ते जसे चिखलात उगवूनही त्यापासून अलिप्त असते, त्याचप्रमाणे बुद्ध या जगात जन्मूनही त्यातील क्लेशांपासून अलिप्त असतो, असे या ग्रंथाच्या नावावरून सुचवायचे आहे, असे श्री. अनिसाकी यांनी म्हटले आहे.

हा ग्रंथ गद्यपद्यात्मक आहे. गद्याची भाषा उत्तम संस्कृत असून, पद्याची भाषा मिश्र संस्कृत आहे. ग्रंथाची रचना इ. स. च्या पहिल्या शतकाच्या सुमारास झाली असावी. धर्मरक्षाने इ. स. २८६ मध्ये, कुमारजीवाने इ. स. ३८३ मध्ये आणि ज्ञानगुप्त व धर्मगुप्त यांनी इ. स. ६०१मध्ये या ग्रंथाचे चिनी भाषेत अनुवाद केले. चीनमधील काही बौद्ध पंथांचा व जपानमधील तेन्दाई व निचिरेन या पंथांचा हा धर्मग्रंथ असून, झेन पंथाच्या मंदिरांतून त्याचे पठण चालते.

या ग्रंथाचे सत्तावीस अध्याय असून, त्यांना परिवर्त असे नाव आहे. त्यात विविध प्रकारच्या कथांच्या द्वारा महायानांच्या सिद्धान्तांचे प्रतिपादन केले आहे. तसेच मूर्तिपूजा, बुद्धपूजा, स्तूपपूजा, इ. अनेक पूजांचे विधान यात वर्णिले आहे. भिंतीवर बुद्धाची मूर्ती चित्रित करून, एका फुलाने जरी त्याची पूजा केली, तरी मूढ पुरुषालाही कोटी बुद्धांचे साक्षात दर्शन होते, अशा प्रकारची वचने यात आहेत. 'नमोऽ स्तु बुद्धाय' या मंत्राच्या केवल उच्चाराने मूढ पुरुषाला अग्रबोधी प्राप्त होते, असेही यात सांगितले आहे (२.९६).

या ग्रंथात भगवान बुद्ध व बुद्धयान यांचे माहात्म्य प्रामुख्याने वर्णिले आहे. तरी काही ठिकाणी अवलोकितेश्वरादी बोधिसत्त्वांना बुद्धाच्या बरोबरीने स्थान दिले आहे. 'नमो नमस्तस्मै अभयंदद अवलोकितेश्वराय बोधिसत्त्वाय महासत्त्वाय' या मंत्राचा जो जप करील, त्याचे जहाज बुडणे, आग किंवा पाप यांपासून संरक्षण होईल, असे यात म्हटले आहे. ग्रंथाच्या शेवटी बुद्धाने या ग्रंथाचे संरक्षण व प्रचार करण्याचा आदेश दिला असल्याचे म्हटले आहे. [बौ. ध. द.; बौ. द. मी.; आजकल वार्षिक अंक, डिसेंबर १९५६]

**सद्यःशौच** जन्म, मृत्यू, इ. प्रसंगांमुळे जे आशौच पाळावे लागते, ते तात्पुरते थोडा वेळ पाळून लगेच स्नान करून शुद्ध होणे, याला सद्यःशौच असे नाव आहे (याज्ञ. ३.२९; पराशर ३.१०). लहान मूल, पतित, संन्यासी व परदेशी गेलेले मनुष्य यांचा मृत्यू, पाण्यात किंवा अग्नीत आत्महत्या अशा प्रसंगी सद्यःशौच पाळावे, असे विष्णुपुराणात (३.१३.७) सांगितले आहे. यज्ञासाठी दीक्षित ब्राह्मण, होमहवनात गुंतलेला ब्राह्मण, अन्नछत्रात वाढण्याचे काम करणारा मनुष्य, चांद्रायणादी दीर्घ प्रायश्चित्त घेत असलेला मनुष्य, स्नातक किंवा

ब्रह्मचारी, रोज गोदान किंवा सुवर्णदान करीत असलेला मनुष्य, राजा, संन्यासी, इ. व्यक्तींना सपिंडाच्या जन्माच्या किंवा मृत्यूच्या प्रसंगी सद्यःशौच पाळून शुद्ध होता येते. लग्न, युद्ध, शत्रूचे आक्रमण, दुष्काळ, इ. विशेष प्रसंगी सद्यःशौच पाळावे असे याज्ञवल्क्य ( ३.२८–२९ ), मनू ( ५.९३ ) व गोभिल ( ३.६४–६५ ) या स्मृतिकारांनी म्हटले आहे. [ हि. ध. ]

**सधारू** (इ. स. चे चौदावे शतक) एक जैन भक्तकवी. हा जातीने अग्रवाल वैश्य असून, मध्य प्रदेशातल्या एरच्छ नामक नगराचा रहिवासी होता. याच्या पित्याचे नाव साहू महाराज व आईचे सुघनू असे होते. सधारूच्याविषयी अन्य अधिक माहिती उपलब्ध नाही. मात्र त्याचे प्रद्युम्नचरित्र नामक एक हिंदी महाकाव्य उपलब्ध असून, ते जैन परंपरेत महत्त्वाचे मानले जाते. या महाकाव्यात ७०० पदे असून, त्यात श्रीकृष्णाचा पुत्र प्रद्युम्न याचे चरित्र रसाळपणे वर्णिले आहे. [ हिं. जै. भ. क. ]

**सनई** एक सुषिर वाद्य. याला प्राचीन काळी नाई असे म्हणत. या वाद्याला सनई हे नाव मिळण्याचे कारण असे – प्राचीन काळी इराणच्या शहाला एका वादकाने नाई नावाचे वाद्य वाजवून दाखवले. शहाला त्या वाद्याच्या श्रवणाने फारच आनंद झाला. त्यामुळे हे वाद्य शहानाई या नावाने ओळखले जाऊ लागले. कालान्तराने शहानाईचेच शहनाई व सनई (मराठी) असे त्याचे रूपान्तर झाले. आज शहनाई व सनई ही दोन्ही नावे प्रचारात आहेत.

सनईची रचना कशी असते, ते सांगताना श्री. प्रभाशंकर गायकवाड लिहितात, ते असे–

सनईचा जो भाग तोंडात धरून वाजवला जातो, त्याला जिभाळ असे म्हणतात. जिभाळ हे महाराष्ट्रात मुख्यत्वे ताडाच्या पानाचे व उ. भारतात देवनळ किंवा नरकट नामक झाडाच्या नळ्यांपासून बनवतात. जिभाळ आकाराने लहान आणि जिभेसारखे असते. शिवाय, हवा फुंकून विशिष्ट सूर, ताना, इ. काढताना त्याच्याशी वारंवार जिभेचा संबंध येतो. त्यामुळेच याला जिभाळ हे नाव मिळाले असावे. हे जिभाळ प्रत्येक सनईवादकास स्वतःच बनवावे लागते. ते तयार स्वरूपात कुठे मिळत नाही. कारण प्रत्येक जिभाळाचा आकार त्या त्या वादकाच्या सोयीनुसार व फुंकीप्रमाणे लहानमोठा असतो. हवामानाचाही त्याच्यावर परिणाम होऊन ते प्रसंगी आकुंचन किंवा प्रसरण पावते. त्यामुळे प्रत्येक वादकाला एकापेक्षा अधिक जिभाळे सतत स्वतःजवळ ठेवावी लागतात. हे जिभाळ बनवण्याची पद्धती अशी –

प्रथम ४ ते ५ फूट लांब व १।। ते २ इंच रुंद अशी ताडाची पाने घेतात. मग त्याचे ५–६ इंच लांब तुकडे करतात. यांपैकी दोन तुकडे १५–२० मिनिटे थंड पाण्यात बुडवून ठेवतात. त्यामुळे पाने नरम होतात. मग ती पाने बोटांनी खोडून अधिक मुलायम बनवतात. नंतर दोन पाने एकावर एक जुळवून प्रथम त्यांच्या दोन घड्या करून त्यांचे एकूण आठ पापुद्रे बनवतात. घड्यांचा खालचा भाग दोऱ्याने बांधून ठेवतात व वरचा भाग कापून वर रुंद आणि तळाशी योग्य प्रमाणात निमुळता असा



सनई

त्याला आकार देतात. प्रत्येक वेळी कापताना जिभाळ सुराला लागले किंवा नाही हे वारंवार पाहतात. नवे जिभाळ एकदम सुराला लागत नाही. चार पाच दिवस सराव करून मगच ते सुरात वाजते.

उत्तर हिंदुस्थानातील जिभाळ एक उंच लांबीची नरकटाची नळी पाण्यात भिजवून त्याचे बनवतात. त्याला दोनच घड्या असतात. हे जिभाळ लहान मुलांच्या पिपाणीसारखे वाजते. वाजवताना ते प्रत्येक वेळी जिभेने ओलसर करावे लागते. अन्यथा त्याचा आवाज कर्कश येतो व फुंकण्यासही ते जड जाते.

जिभाळ या वाद्यांगानंतर त्याच्या पुढचे सनईचे महत्वाचे अंग म्हणजे पावी किंवा पाई. जिभाळ ओठात पकडून तोंडावाटे फुंकलेली हवा जिभाळातून तांबे, पितळ, जस्त यांपैकी एका धातूच्या पोकळ नळीच्या द्वारा सनईमध्ये आणतात. ही धातुनलिका म्हणजे पावी. ही सोनार किंवा ओतारीच बनवतात. पावीची लांबी सनईच्या लांबीच्या प्रमाणात लहान मोठी असते. कमी उंचीची पावी लावल्यास स्वर चढा मिळेल; पण त्याच सनईस अधिक उंचीची पावी लावल्यास कमी उंचीचा सूर मिळेल. नुसत्या सुरासाठी वापरायच्या सनईची व पावीचीही लांबी जास्त असते. पावीच्या वरच्या निमुळत्या तोंडावर जिभाळ बसण्यासाठी, तसेच पावीच्या खालचा त्या मानाने रुंद असलेला भाग सनईच्या वरच्या तोंडात बसण्यासाठी पावीच्या नळीवर सुताच्या दोऱ्याने कमी अधिक वेढे द्यावे लागतात व स्वराचा कायमपणा निश्चित ठेवावा लागतो. सनईवादकाजवळ जिभाळ्याप्रमाणेच या पाव्याही एकापेक्षा अधिक असाव्या लागतात. पावीतून येणारा सूर हा जास्त मोठा व मोकळा वाटत असेल, तर गूळ व चुना पाण्यात मिसळून, सहाणेवर त्याचा पातळसा लेप बनवून तो पावीच्या नळीत भरतात व मग त्यातून मऊ गवताची काडी फिरवतात.

नंतर पावी मोकळ्या हवेत टांगून ठेवून तीमधील गूळ-चुन्याचा थर सुकला, की जिभाळ पावीत बसवतात.

पावीच्या खाली क्रमाने येणारा भाग म्हणजे सनईची नळी. ही हवा-पाणी यांच्यापासून ज्यावर त्वरित परिणाम होणार नाही अशा खैर, शिसवी किंवा सागवान यासारख्या लाकडापासून बनवतात. या नळीत पावी वारंवार घातल्या-काढल्यामुळे तिचे तोंड रुंद होते व रुंद तोंडाच्या सनया कालान्तराने निकामी होतात. सनईचे तोंड असे रुंदावू नये म्हणून तिच्या तोंडाभोवती एक गोल धातूचे टोपण बसवतात. या टोपणाची लांबी एकूण सनईच्या $\frac{1}{4}$ किंवा $\frac{1}{5}$ ठेवतात. या टोपणास शेंबी अशी संज्ञा आहे.

शेंबीच्या खाली सनईला सारख्या अंतरावर व सारख्या आकाराची आठ छिद्रे असतात. जिभाळ तोंडात धरून दोन्ही हातांचे अंगठे सनईच्या खालच्या बाजूस व अंगठ्याशिवायची चार चार बोटे वरच्या बाजूस ठेऊन सनईवादनास सुरुवात करतात. वाद्य वाजवताना करंगळीशिवायच्या तीन तीन बोटांचा वापर केला जातो. मंद किंवा तार सप्तकातील सूर लावताना करंगळीचाही उपयोग करतात. जिभाळ तोंडात पूर्ण धरून फुंकल्याने तार स्वरांची उत्पत्ती होते, तर ते ओठात वरच्या भागी पकडून फुंकल्याने मंद्र स्वराची उत्पत्ती होते. हवेला कमी अधिक वेग देऊनही विविध स्वरांची उत्पत्ती करता येते.

सनईच्या शेवटच्या छिद्रापासून तीन ते चार बोटे अंतरावर सनईला एक कंगोरा किंवा खोबण असते. सनईतून निघणारा सूर जास्त मोठा किंवा नादमधुर यावा म्हणून या खोबणीत धोत्र्याच्या आकारासारखे एक धातूचे भांडे बसवलेले असते. त्याला अन्नस म्हणतात. हे अन्नस क्वचित लाकडाचेही बनवतात.

सनई हे सुषिर वाद्य असल्याने ते वाजवण्यास तोंडात दातांची आवश्यकता असते. दात नसल्यास सनईचे सूर पिचके येतात.

सनई हे वाद्य मंगल समारंभात वाजवले जाते. अलिकडे त्याचे स्वतंत्र कार्यक्रमही सादर केले जातात. सर्वश्री बिस्मिल्लाखाँ, गायकवाड, देवळणकर, इ. सनईवादक प्रसिद्ध आहेत. [ भा. वा. इ.; स्वराज्य, १६ मार्च १९७४. ]

**सनक-संप्रदाय** एक वैष्णव भक्ति-पंथ. आचार्य निंबार्क यांना या पंथाचे प्रवर्तक मानतात. त्यांच्या तत्त्वज्ञानाला द्वैताद्वैत मत म्हणतात. राधा-कृष्णयुगुल हे त्यांचे उपास्य होते. निंबार्काचार्यांच्या दशश्लोकी या ग्रंथात या पंथाचे सर्व सिद्धान्त सांगितलेले आहेत. उत्तर भारतात राधा-कृष्णांच्या भक्तीचा प्रचार करणारे हे सर्वांत पहिले आचार्य होत. वृंदावन हे या पंथाचे मुख्य क्षेत्र मानले जाते. पाहा – द्वैताद्वैत दर्शन; निंबार्क. [ वैष्णव धर्म; रा. अ. ग्रं. ]

**सनगर** एक जात. या लोकांची वस्ती प्राधान्याने महाराष्ट्रात व कर्नाटकात आढळते. घोंगड्या विणणे हा त्यांचा प्रमुख व्यवसाय होय. हे लोक एके काळी लिंगायत होते; पण ते मद्यमांस सेवन करू लागल्यामुळे लिंगायतांपासून वेगळे झाले. परंतु अजूनही ते लग्नासाठी व अंत्यविधीसाठी जंगमाला बोलावतात. भवानी, जनाई, जोतिबा, खंडोबा यांची ते पूजा करतात.

हे लोक मृतांना पुरतात किंवा जाळतात. [ मुं. इ. जा. ]

**सनत्कुमार** ब्रह्मयाचा पुत्र व नारदाचा गुरू. छांदोग्य उपनिषदात याने एक प्रकारचा आध्यात्मिक सुखवाद प्रतिपादला आहे. तो सांगतो, की सर्व कर्मांचे मूळ कारण सुख होय. कर्म हे विश्वासाचे व विश्वास हे श्रद्धेचे कारण आहे. आपल्या श्रद्धेप्रमाणे मनुष्य विचार करू लागतो, विचाराने त्याला समज येते व समजू लागले म्हणजे सत्यज्ञान प्राप्त होते. त्याच्या मते सुख, कर्म, विश्वास, श्रद्धा, विचार, ज्ञान व सत्य ही स्वानुभवाची नैतिक सोपानपंक्ती आहे (छां. उप. ७.१७-२२).

याच्या तत्त्वज्ञानातील दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे भूम्याची मीमांसा. सर्वत्र परमेश्वरच दिसू लागल्यावर जो अपरिमित आनंद होतो, तोच भूमा होय. तदितर सर्व अल्प समजावे. आत्मा हा सर्व शक्तींचे, सर्व ज्ञानाचे व सर्व आनंदाचे आगर आहे (छां. उप. ७.२५).

याने सांख्यायन व नारद यांना भागवताचे महत्त्व सांगितले. तसेच, त्याने वृत्रासुराला विष्णुमाहात्म्य व रुद्राला तत्त्वसृष्टी ऐकवली. याला शापामुळे उंटाचा देह प्राप्त झाला होता. तो टाकून याने नंदीपासून शिवव्रत श्रवण केले (लिंग पु. २.९). वास्तुशास्त्र, सनत्कुमारसंहिता, सनत्कुमारतंत्र व सनत्कुमारकल्प हे ग्रंथ याच्या नावावर आहेत. [ उ. र.; प्रा. च. को. ]

**सनाढ्य ब्राह्मण** कान्यकुब्ज ब्राह्मणांची ही एक शाखा आहे, असे मानले जाते. यांच्याविषयी एक आख्यायिका आहे, ती अशी– लंकाविजय मिळाल्यावर व रावणवध केल्यानंतर श्रीरामचंद्राने एक यज्ञ करण्याचा संकल्प केला, पण रावण हा ब्राह्मण असल्यामुळे व रामाच्या हातून ब्रह्महत्या घडली असल्यामुळे सर्व ब्राह्मणांनी त्यात सहकार्य करण्याचे नाकारले. सनाढ्य ब्राह्मणांनी मात्र ते कार्य स्वीकारून यज्ञ पूर्णतेस नेला, तेव्हा अन्य ब्राह्मणांनी त्यांच्यावर बहिष्कार टाकला. तेव्हापासून हे वेगळे झाले.

हे लोक राजसियाजीबरोबर कनोजहून मारवाडात गेले. त्यांच्यांत ७५० पोटभेद असून, त्यातले ५१ प्रमुख आहेत. त्यांतील फक्त ७ पोटभेद मारवाडात आढळतात. त्यांची नावे

अशी–(१) करोटिया, (२) मूजवाड, (३) चतुरेला, (४) चपला, (५) गुंजेला (६) गोला व (७) मोटा. हे लोक वैष्णव पंथाचे अनुयायी आहेत. यांची जातपंचायत असते. जातीतील



सनाढ्य ब्राह्मण

चार समंजस व प्रामाणिक पुरुष पंचायतीचे सदस्य असतात. ते जातीचे अंतर्गत प्रश्न सोडवून निकाल देतात. [ रा. जा. ]

## सनातन गोस्वामी

(इ. स. १४९०–१५९१) चैतन्य मताचे महान आचार्य म्हणून सहा गोस्वामी प्रसिद्ध आहेत, त्यांतील सनातन हे एक जेष्ठ व सन्मान्य संत होत. यांचा जन्म बंगालमधील जैसोर जिल्ह्यातील फतेहाबाद येथे एका भारद्वाजगोत्री आणि श्रीमंत अशा ब्राह्मण कुलात झाला. त्यांच्या पित्याचे नाव कुमारदेव आणि मातेचे नाव रेवतीदेवी असे होते. रूप गोस्वामी हा यांचा धाकटा भाऊ होय. या दोघांच्या जन्मकालाविषयी मतभेद आहेत. मात्र हे दोघे बंधू इ. स. १५९१ मध्ये निधन पावले, असे आचार्य बलदेव उपाध्याय यांचे मत आहे. सनातन गोस्वामींचे मूळ नाव अमर होते, असे म्हणतात.

सनातन गोस्वामींनी संस्कृत भाषेचे शिक्षण पूर्ण करून विविध शास्त्रे व धर्मग्रंथ यांचे सखोल अध्ययन केले. ते अरबी व फारसी भाषांचेही पंडित होते. त्या काळातला बंगालचा नबाब हुसेनशाह हा गुणग्राही व विद्वानांचा आश्रयदाता होता. त्याने सनातन व रूप गोस्वामी या दोघांनाही आपल्या राज्यकारभारात अधिकारपदे दिली होती. सनातन गोस्वामींची विद्वत्ता व कार्यकुशलता पाहून हुसेनशाहाने त्यांना प्रधानमंत्रिपद दिले आणि साकर मल्लिक अशी पदवीही दिली. सनातन व रूप हे न्यायप्रिय, प्रजावत्सल व कुशल मंत्री असल्यामुळे अत्यंत लोकप्रिय झाले होते. पण त्यांचे मन राज्यकारभारात रमत नव्हते. हरिभक्त व सत्संगपरायण असल्यामुळे राज्यकारभार करून उरलेला वेळ ते भगवद्भक्तीत व सत्संगतीत घालवीत.

त्या काळी बंगाल व ओडिसा या प्रदेशांत चैतन्य महाप्रभू हरिकीर्तनाच्या द्वारा कृष्णभक्तीचा मार्ग लोकांना सांगत होते. त्याचा प्रभाव या दोघा बंधूंच्या मनावर पडला आणि त्यांनी मंत्रिपदांचा त्याग करून चैतन्य महाप्रभूंचे शिष्यत्व पत्करले. चैतन्यदेवांनी त्या दोघांना धर्मशास्त्र, भक्ती, रसतत्त्वसाधना, इ. विषयांचे ज्ञान दिले आणि व्रज-वृंदावनात राहून कृष्णभक्तीचा प्रचार करण्याचा आदेश दिला. त्यानुसार दोघेही व्रजवासी झाले.

एकदा काही कारणाने सनातन गोस्वामी एवढे विषण्ण झाले, की त्यांनी पुरी येथे जगन्नाथाच्या रथाखाली देहत्याग करण्याचा निश्चय केला. पण चैतन्यदेवांनी त्यांचे मन वळवून त्यांना वृंदावनास परत पाठवले. मग तिथे ते श्रीकृष्णाच्या भजन-पूजनात सदैव मग्न होऊन राहिले.

यांच्याजवळ एक पारसमणी होता, तो त्यांनी एका दरिद्री ब्राह्मणाला देऊन टाकला, अशी आख्यायिका आहे.

रूप व सनातन गोस्वामी हे दोघे चैतन्यमताचे शास्त्रकर्ते मानले जातात. रूप गोस्वामींनी त्या पंथाच्या गूढ सिद्धान्तांचे विवेचन केले आणि सनातन गोस्वामींनी त्या पंथाच्या आचारधर्माचे व नियमांचे विवरण केले. ते दोघेही धर्मतत्त्व, भक्तितत्त्व व रसतत्त्व यांचे महान ज्ञाते असून, त्यांनी चैतन्यदेवांच्या उपदेशाचे विवेचन आपल्या विद्वत्तापूर्ण ग्रंथांत केले आहे. म्हणूनच त्यांचे ग्रंथ हे चैतन्यमताचे आधारग्रंथ मानले गेले. त्यांनी चैतन्यमताच्या प्रासादाचा पाया घातला एवढेच नव्हे; तर त्या प्रासादावर कळसही चढवला. सनातन हे चैतन्यमताच्या कर्मकांडाचे निर्माते असून, त्यांच्या नियमानुसारच त्या संप्रदायाच्या मंदिरातली पूजा-अर्चा होते आणि मठांतील साधूंचा जीवनक्रम चालतो.

सनातन गोस्वामींनी हरिभक्तिविलास, बृहद् भागवतामृत, भागवत दशम स्कंधावरील बृहद्वैष्णवतोषिणी टीका व दशमचरित हे ग्रंथ रचले. हरिभक्तिविलासात मूर्तींची निर्मिती, प्रतिष्ठापना व पूजा कशी करावी ते सांगितले आहे आणि वैष्णवांच्या जीवनचर्येचे मनोरंजक वर्णन केले आहे.

...भागवतामृतात भागवत पुराणातील सिद्धान्तांचे वर्णन आहे. ...या दोन बंधूंची कीर्ती ऐकून अनेक राजे-महाराजे त्यांच्या ...दर्शनासाठी वृंदावनाला येत असत. इ. स. १५७३ मध्ये अकबर ...बादशहा त्यांच्या भेटीला गेला व त्यांच्या नितांत कृष्णप्रेमामुळे ...प्रभावित झाला, असे म्हणतात. [भा. सं.; ब्र. ध. सं. इ.]

**सनातन धर्म** ईश्वर, जीव आणि जगत यांच्या स्वरूपा-विषयी व संबंधाविषयी विवरण करणारे ...तत्त्व, आदिशक्तीचे स्वरूप, जगताचे आदिकारण आणि आदि-...तत्त्व हे शाश्वत, त्रिकालाबाधित, सनातन आहेत. धर्म या ...शब्दाच्या भिन्न भिन्न अर्थांतील फरक ध्यानात न घेता सर्व-...साधारण लोक जातिभेद, वर्णाश्रमव्यवस्था, अस्पृश्यता, मांसा-...हारनिषेध, स्नानसंध्या, पूजा, इ. कर्मकांड यालाच सनातन ...धर्म मानतात. पण ही त्यांची समजूत भ्रामक आहे. याविषयी ...स्वा. वि. दा. सावरकरांनी जे विवेचन केले आहे, ते असे–

...भगवद्गीतेत किंवा उपनिषदांत याविषयीचे जे सिद्धान्त ...प्रकट केलेले आहेत, ते काय ते सनातन असू शकतील. कारण ...जगताचे आदिकारण आणि त्याची इच्छा व शक्ती हे बदलणे ही ...मनुष्यशक्तीच्या बाहेरची गोष्ट आहे. ते जे आहेत ते तसेच ...सर्वकाळ राहणार आहेत. मनुष्यजात जरी नष्ट झाली तरी ते ...नष्ट होणार नाहीत. सबंध पृथ्वी जरी एखाद्या धूमकेतूने ...उडवून टाकली, तरी त्या महान धर्माचे अस्तित्वास रेसभरही ...धक्का लागणार नाही. अर्थात ज्याचे जीवित अत्यंत अशाश्वत ...आहे, त्या मनुष्यावर अवलंबून असणाऱ्या, ज्यांची रंगरूपे अनेक-...दा बदललेली दिसत आहेत, ज्या मनुष्यनिर्मित कृत्रिम आणि ...त्याच्या इच्छेप्रमाणे भंग पावणाऱ्या आहेत, त्या जातिभेद, ...अस्पृश्यता किंवा वर्णाश्रमव्यवस्था अशा संस्थांना सनातन धर्म ...हे नाव अन्वर्थक होणार नाही. कारण तिथे धर्म शब्दाचा अर्थ ...आचार असा होतो. आचार हे मनुष्यकृत असल्यामुळे नश्वर ...व अशाश्वत असतात. आणि म्हणूनच जातिभेद किंवा सर्व ...कर्मकांड जरी बदलले गेले, तरी सनातन धर्म बुडणे शक्य नाही. ...विश्वाचा जो सनातन धर्म त्यालाच हिंदू लोक सनातन धर्म ...म्हणतात. जो प्रलयानंतर असतो व जो प्रभवापूर्वीही असतो तो ...सनातन धर्म होय. धर्माची जी मूलतत्त्वे आहेत, ती स्वभावतःच ...सनातन आहेत. आचारधर्म मात्र स्वभावतःच परिवर्तनशील ...असतो. आणि तसा तो असलाच पाहिजे. त्यामुळेच समाज जिवंत ...राहतो. चातुर्वर्ण्य व जातिभेद हे दोन्ही आचार आहेत; सनातन ...धर्म नव्हेत. चातुर्वर्ण्याच्या आचारात भेद होऊन जातिभेदाचा ...प्रकार सुरू झाला. त्यामुळे जसा सनातन धर्म बुडाला नाही, ...तसा जातिभेदाचे आजचे विकृत रूप नष्ट केल्यानेही खरा सनातन धर्म म्हणजे ईश्वर जीव जगत यांच्या स्वरूपाचे आणि आदितत्त्वाचे सत्य सिद्धान्त बुडू शकणार नाहीत.

श्री. गो. रा. राजोपाध्ये यांनी आपल्या सनातनधर्मतत्त्व-प्रणाली या ग्रंथात सनातनधर्माविषयी आपले मत सांगितले आहे, ते असे –

ही सृष्टी कशी उत्पन्न झाली व कशी चालते या प्रश्नाचा विचार केला असता, असे दिसते, की सृष्टीचा व्यापार नियम-बद्ध आहे. या नियमबद्धतेला प्राचीन ऋषींनी धर्म हे नाव दिले. हे नियम घालून देणारा जो ईश्वर, त्यानेच सृष्टी निर्माण केली. ही पंचमहाभूतात्मक सृष्टी हे ईश्वराचे शरीर आहे. ती ईश्व-राला जाणत नाही; पण ईश्वर तिला जाणतो व तिचे आतून नियमन करतो, अशा अर्थाची वाक्ये उपनिषदांत आहेत. तसेच प्राणिमात्रांच्या हृदयात राहून ईश्वर त्यांना चालवितो, असे भगवद्गीतेत म्हटले आहे. ईश्वर व त्याच्याशी जीवाचा संबंध जोडणारा धर्म सर्व विश्वाला, मानवी समाजाला व प्रत्येक मान-वाला व्यापून आहे. मनुष्याच्या वैश्विक, सामाजिक, वैयक्तिक जीवनाचे नियम हे सर्व धर्मच होत. त्या सगळ्यांचा मिळून सनातन धर्म बनतो. भारतीयांचे समाजशास्त्र आध्यात्मिक आहे. व्यक्तिजीवनाची भौतिक, मानसिक, नैतिक, आर्थिक, राजकीय, आध्यात्मिक, ऐहिक, पारलौकिक व वांशिक ही सर्व अंगे त्यात समाविष्ट आहेत. अशा समाजशास्त्राचे नियम म्हणजे सनातन-धर्मतत्त्वप्रणाली होय. हे समाजशास्त्र शाश्वत व परिपूर्ण असून, सर्वांच्या निर्वाहाची व सुखशांतीची निश्चिती सर्वांना आत्मो-न्नती साधण्याची सुलभता, सर्वांचा अभ्युदय, निश्रेयस, इ. जिच्या योगाने साधतील व चिरकाल राहातील अशा समाज-रचनेची तत्त्वे मुख्यतः सनातन धर्मात सांगितली आहेत. सूर्य, चंद्र, नक्षत्रे, ग्रह, तारे, पंचमहाभूते, इ. पदार्थ आपापली नेमलेली कामे नियमाने करतात. ते सर्व एक प्रकारचा यज्ञच करीत असतात. ईश्वराने हे यज्ञचक्र प्रवर्तित केलेले आहे. मानवी समाज हा या विश्वातील एक पदार्थ आहे. इतर पदार्थांप्रमाणे या समाजरूपी पदार्थाला, त्यांतील व्यक्तींना कर्तव्यरूपी यज्ञचक्र लावून देण्याचे काम या रचनेने केले आहे. म्हणून ते काम ईश-कार्यव्यवस्थेशी सुसंवादी झालेले आहे.

भूदानयज्ञाचे विवेचन करताना विनोबांनी आपल्या चळव-ळीला 'धर्मचक्रप्रवर्तन' हे नाव दिले आहे आणि आपल्या धर्माला सनातन म्हटले आहे. ते म्हणतात– धर्म दोन प्रकारचा असतो. एक असा असतो, की कधीही परिवर्तन होत नाही. उदा० सत्यपालन. प्राचीन काळी सत्य हे धर्मस्वरूप होते आणि आजही आहे. भारताप्रमाणे हे इतर देशांतही धर्म मानले जाते. देश-कालामुळे सत्यात बदल होत नाही. म्हणून सत्य हे नित्य व

सनातन होय. त्याचप्रमाणे प्रेम, वात्सल्य हे सर्व सनातन धर्म आहेत. उपासनापद्धती वेगळ्या असल्या तरी भक्ती हा सनातन धर्म आहे. सर्वत्र समता आणि एकता स्थापन केली पाहिजे. कारण तीही सनातन आहे. [ सनातन धर्मतत्त्वप्रणाली–श्री. गो. रा. राजोपाध्ये, १९५२, भू. स. द.; स. सा. वा. ३ ]

**सपिंड** पिंड या शब्दाचा एक अर्थ शरीर असा आहे. ज्यांची शरीरे एकाच प्रकारच्या कणांनी बनलेली असतात, त्यांना सपिंड मानले जाते. पिता व पुत्र यांच्या शरीरांतील कण सारखे असतात म्हणून ते सपिंड होत. पितामह, प्रपितामह, पित्याचे बंधू व त्यांची मुले; माता व तिचे वडील; नातू, इ. व्यक्तींशी रक्ताचा संबंध असल्यामुळे त्यांनाही सपिंड मानतात (मिताक्षरा – याज्ञ. स्मृती १.५२–५३ वरील टीका). पित्याच्या वंशात सातव्या पिढीपर्यंत आणि मातेच्या वंशात पाचव्या पिढीपर्यंत ही सपिंडता अस्तित्वात राहते; पुढे नाही.

दायभाग पद्धतीप्रमाणे सपिंडाचा अर्थ निराळा आहे. श्राद्धाच्या वेळी मृत पूर्वजांना जे भाताचे गोळे अर्पण केले जातात, त्यांना पिंड म्हणतात. ज्या व्यक्ती अशा पिंडदानामुळे संबंधित असतात, त्यांना सपिंड म्हणतात. दायभाग मानतो, की पुत्र, पिता, पितामह, भाऊ, त्याचे पुत्र व नातू हे सर्व वडिलोपार्जित धनाचे वाटेकरी असतात व म्हणून ते सपिंड होत. मनूच्या मते (मनु. ९. १८६ – ८७) जो मनुष्य पिंडदान करतो तो व ज्यांना पिंड अर्पण केले जातात ते पितर, हे परस्परांचे सपिंड होत.

सपिंड स्त्री-पुरुषांचा विवाह करू नये, असा हिंदू धर्मशास्त्राचा नियम आहे. याचा अर्थ असा, की वराच्या मातेकडून पाच पिढ्यांचा आणि पित्याकडून सात पिढ्यांचा वधूशी संबंध नसेल, तर ते वधू-वर विवाहयोग्य समजावे. (पराशर माधवीय १.२).

पाणिनीने सपिंड हा शब्द रक्तसंबंध अशा अर्थी वापरलेला आहे. मिताक्षरा पद्धतीप्रमाणे वारसा-हक्क रक्तसंबंधामुळे प्राप्त होतो. दायभाग पद्धतीप्रमाणे वारसा-हक्क पिंडदानाच्या अधिकारावर अवलंबून असतो. परंतु मूळ हक्क रक्तसंबंधामुळेच प्राप्त होतो, हे उघड आहे.

पिंड हा शब्द ऋग्वेद व तैत्ति. संहिता या ग्रंथांत आहे. पण तिथे, पशुबलीच्या ज्या आहुती अग्नीत टाकतात, त्यांसाठी तो वापरलेला आहे. शतपथ ब्राह्मणात, पितरांना अर्पण करण्यासाठी केलेले भाताचे गोळे असा याचा अर्थ आहे. निरुक्तातही त्याच अर्थाने हा शब्द आला आहे. पण संपूर्ण वैदिक संहितांमध्ये सपिंड हा शब्द आढळत नाही. त्याचा उपयोग प्रथम धर्मसूत्रांत केलेला असून, सपिंड विवाह निषिद्ध होय, असे त्यांत म्हटले आहे. त्यानंतरच्या सर्व धर्मशास्त्रकारांनी सपिंड विवाहाचा निषेध केलेला आहे. [ हि. ध.; भा. सा. इ. ]

**सपिंडीकरण** श्राद्धाचा एक प्रकार. मृत मनुष्याचा आत्मा पितरांमध्ये समाविष्ट व्हावा, या उद्देशाने हे श्राद्ध करतात. हे मृत्यूनंतर बाराव्या दिवशी किंवा वेचाळिसाव्या दिवशी; चौथ्या, सहाव्या किंवा अकराव्या महिन्यात किंवा एक वर्ष संपताच करता येते. पुत्र–जन्म, विवाह, इ. मंगल प्रसंगाच्या आधीही हे श्राद्ध करता येते. (कौ. गृ. सू. ४. २; भार. गृ. सू. ३.१७). या श्राद्धामुळे मृताचे प्रेतत्व नष्ट होते व तो पितृलोकाला जातो.

या श्राद्धाचे स्वरूप एकोद्दिष्ट व पार्वण असे दुहेरी आहे. त्यात ब्राह्मणांना क्षण देणे, अग्नौकरण, ब्राह्मणभोजन चालू असताना वेदपठण, काम व काल या विश्वेदेवांचा सत्कार, धूपदीप, स्वधा, नमस्कार, इ. कर्मे अंतर्भूत असतात. श्राद्धप्रसंगी चार पात्रांत पाणी, चंदन, तीळ व कुश घालून ठेवतात. त्यांतील एक प्रेतासाठी व तीन पितरांसाठी असतात. एकातले थोडे पाणी बाकीच्या तीन पात्रांत ओततात व उरलेले पाणी अर्घ्य म्हणून एका ब्राह्मणाच्या हातावर घालतात. इतर पात्रांतील पाणी इतर ब्राम्हणांच्या हातावर घालतात. मग चार पिंड करून प्रेतपिंडाचे तीन भाग इतर तीन पिंडांत मिसळतात. आत्मा प्रेतावस्थेत असेपर्यंत क्षुधा, तृष्णा यांमुळे त्याला जो त्रास होत असतो, तो पितृत्व प्राप्त होताच बंद होतो. कारण रुद्र, वसू, आदित्य या पितृदेवतांशी त्याचा संबंध प्रस्थापित होतो. हे श्राद्ध स्त्रियांसाठीही केले जाते. (मिताक्षरा– याज्ञ. स्मृती. १. २५४ वरील टीका). [ हि. ध. ]

**सप्तकण्णिगे** द. भारतातील एक देवता. या सात कुमारिका आहेत. यांच्या चिकण मातीच्या मूर्ती असतात. त्यांच्या समोर त्यांचे शरीरसंरक्षक असतात. प्रत्येक देवतेशेजारी एक गोल मासा असतो. त्या माशावर एक पुरुष देव आणि एक स्त्री देवता असते. स्त्रीचे नाव मीनाक्षी आणि पुरुषाचे नाव मदुरै-वीरन असे आहे. प्रतिवर्षी या देवतांच्या जत्रा भरतात. त्यांना बलीही देतात. [ व्हि. गॉ. सा. इं. ]

**सप्तकोटीश्वर** गोव्यातले एक पुरातन शिवस्थान. हे डिचोलीजवळच्या नार्वे या गावी आहे. सह्याद्रिखंडात या स्थानाची कथा आली आहे, ती अशी –

श्रीकाशीविश्वेश्वर याने काशीतला आपला निवास सोडून काही काल रामेश्वर येथे वास्तव्य केले. तिथून पुढे तो गोमंत-

…वर आला आणि या स्थानी प्रगटला. इथे तो तेजोमय …च्या रूपात राहतो आणि भक्तांना मोक्षप्रद होतो. म्हणून …क्षेत्र मुक्तिक्षेत्र म्हणूनही ओळखले जाते.

…या सप्तकोटीश्वर देवस्थानाशी गोमंतकाचा सुमारे दोन …हजार वर्षांचा इतिहास निगडित आहे. इतिहासातली गोमंत…काची पहिली सत्ता कदंबांची होय. इ.स.चे चौथे ते चौदावे …शतक असा सुमारे हजार वर्षांचा काल हा कदंबकाल होय. …सप्तकोटीश्वर हे कदंबकुलाचे कुलदैवत होते. त्यांनी हे क्षेत्र …भरभराटीला आणले. चालुक्य, राष्ट्रकूट, इ. अन्य सत्ता…धीशांनी या देवस्थानाचे वैभव वाढवण्यात हातभार लावला.

…पुढे मुसलमानी सत्ता गोव्यावर आली. त्या काळात या मंदि…राला अवकळा आली. नंतर आलेल्या पोर्तुगीजांनी गोव्यातल्या …अनेक मंदिरांचा विध्वंस केला, त्या वेळी त्यांनी सप्तकोटी…श्वरावरही हात टाकला. नवीन गोवा शहराच्या उभारणीसाठी …त्यांनी या मंदिराचे दगड उखडून नेले, असे आंद्रे कोर्साली …हा इटालियन प्रवासी सांगतो.

छ.शिवाजीमहाराज सप्तकोटीश्वराच्या दर्शनाला गेले होते. …त्यांनी या मंदिराचा जीर्णोद्धार केला. त्या विषयीचा कोरीव …लेख आजही मंदिराच्या महाद्वारावर दिसतो. महाराजांनी …मंदिराचा चौक नव्याने बांधला आणि शिखराची शिल्परचना …नव्याने केली. देवाच्या पूजेअर्चेसाठी कायमची व्यवस्था त्यांनी …करून ठेवली.

सप्तकोटीश्वर हा गोव्यातील काही सारस्वत घराण्यांचा …कुलदेव आहे. [ सा. भू.; सह्याद्रिखंड ]

**सप्त गंगा** गंगा, गोदावरी, कावेरी, ताम्रपर्णी, सिंधू, शरयू आणि नर्मदा यांना सप्त गंगा असे म्हणतात. गंगा, …पावनी, ह्रादिनी, ल्हादिनी, सीता, सिंधू व वंक्षू या नद्यांनाही …कोणी सप्त गंगा म्हणतात.

**सप्तगू आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील सत्तेचाळिसावे सूक्त याने …रचले असून, प्रस्तुत सूक्ताच्या सहाव्या ऋचेत त्याचा निर्देश …आहे. या सूक्तात वैकुंठ इंद्र नामक इंद्रावताराची स्तुती करण्यात …आली आहे आणि पुढच्या दोन सूक्तांत इंद्राने त्या स्तुतीला …दिलेले उत्तर ग्रथित केले आहे. याची एक ऋचा अशी –

सुब्रह्माणं देववन्तं बृहन्तमुरुं गभीरं पृथुबुध्नमिन्द्र ।
श्रुतऋषिमुग्रमभिमातिषाहमस्मभ्यं चित्रं वृषणं रयिं दाः ।।
(ऋ. १०.४७.३)

अर्थ – हे इंद्रा, देवभक्त, शत्रुनाशक, ज्ञानसंपन्न आणि उग्र असे पुत्ररूपी आश्चर्यकारक आणि बलसंपन्न धन तू आम्हांला दे.

बृहद्देवतामते विकुंठा नामक असुर स्त्रीने पुत्राच्या इच्छेने तपस्या केली असता स्वत: इंद्रानेच वैकुंठ इंद्र नावाने तिच्या पोटी जन्म घेतला. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**सप्तदशार रथचक्र** वाजपेय यज्ञात सतरा आरे असलेले एक चाक लागते. ज्या वेळी रथशर्यत चालू असते, त्या वेळी चात्वालामध्ये एका खांबावर हे चाक बसवतात आणि त्या चाकावर बसून ब्रह्मा नावाचा ऋत्विज सामगान करतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**सप्तद्वीपव्रत** एक काम्य व्रत. याचा आरंभ चैत्र शुद्ध प्रतिपदेला करून, सात दिवस क्रमाने सात द्वीपांची पूजा करतात. तुपाचा होम करणे, नक्त करणे, भूमीवर शयन करणे व सात धान्यांचे दान करणे, असा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. फल – कल्पांतापर्यंत स्वर्गवास. [ हि. ध. ]

**सप्तपर्णी गुहा** ही गुहा बिहारमध्ये राजगृहाजवळच्या वेभार पर्वतात खोदलेली आहे. बौद्ध धर्माची पहिली संगीती (परिषद) या गुहेत झाली. त्या परिषदेसाठीच ही गुहा निर्माण करण्यात आली. पाहा – राजगृह. [ हि. जॉ. ए. इं. ]

**सप्त पाकयज्ञ** विवाहानंतर औपासनाग्नीवर करायचे निरनिराळे सात संस्कार सांगितले आहेत. विवाहानंतर अग्निहोत्र घेऊन पुढचे संस्कार करायचे असतात, असे एकवीस संस्कार आहेत. त्यांचे तीन गट करून त्यांना पाकयज्ञ, हविर्यज्ञ आणि सोमयज्ञ अशी नावे दिलेली आहेत. त्यांपैकी सात हविर्यज्ञ किंवा सात सोमयज्ञ हे अग्निहोत्री यजमानालाच करता येतात. प्रत्येक गटाचे असे विशिष्ट तंत्र असते. म्हणून त्या त्या तंत्राला अनुसरून पाकसंस्था, हवि:संस्था व सोमसंस्था असेही शब्दप्रयोग योजलेले आहेत.

पाकयज्ञात कोणते सात संस्कार अंतर्भूत होतात, यासंबंधी मतभेद आहेत. गोपथ ब्राह्मणात (५.२३) त्याविषयी पुढील श्लोक आलेला आहे –

सायंप्रातर्नित्यहोमौ स्थालीपाको नवश्च यः ।
बलिश्च पितृयज्ञश्च अष्टका सप्तमः पशुः ।।

अर्थ – सायंहोम, प्रातर्होम, नवान्न स्थालीपाक, बली, पितृयज्ञ, अष्टका आणि पशू असे सात पाकयज्ञ आहेत.

‘ पशव्यो हि पाकयज्ञः ’ = पशुयागयुक्त पाकयज्ञ असतात, असे शतपथ ब्राह्मणात (२.३.१.२१) म्हटले आहे.

पाकयज्ञात अग्नीवर चरू शिजवून त्याचा होम करायला सांगितला असल्यामुळे त्याला पाकयज्ञ (पाकः यस्मिन् भवति स यज्ञः = पाकयज्ञः) असे म्हणतात. एका अग्नीवर होणारे किंवा अग्निविरहित होणारे संस्कार पाकयज्ञात अंतर्भूत होतात. विवाहाच्या वेळी घेतलेल्या अग्नीला गृह्याग्नी, स्मार्ताग्नी, औपासनाग्नी, शालाग्नी अशी निरनिराळी नावे आहेत. विवाहाच्या वेळी आवसथ्य नामक अग्नीचे आधान करावे, असे पारस्कर गृह्यसूत्रात सांगितले आहे. पाकयज्ञाचे दोन प्रकार काहींनी सांगितले आहेत. स्थालीमध्ये भात शिजवला जातो, तो स्थालीपाक आणि स्थालीमध्ये पशूची अंगे शिजविली जातात, तो पशुपाक होय. आश्वलायन गृह्यसूत्रात (१.१) पाकयज्ञाचे तीन प्रकार सांगितले आहेत. (१) अग्नीवर आहुती देऊन करायचे यज्ञ (२) अग्नीहून इतर ठिकाणी आहुती देऊन करायचे यज्ञ आणि (३) ब्राह्मणभोजनयुक्त यज्ञ, असे ते तीन प्रकार होत. श्राद्धादी विधीत ब्राह्मणभोजन विहित आहे, म्हणून त्याला ब्रह्मणिहुत यज्ञ असे म्हणतात. पारस्कर गृह्यसूत्रात (१.४) पाकयज्ञाचे, ज्यात होम आहे (हुत), ज्यात होम नाही (अहुत) ज्यात अग्निव्यतिरिक्त होम आहे (प्रहुत) आणि ज्यात भोजन आहे (प्राशित) असे चार प्रकार सांगितले आहेत. पाकयज्ञाचे पाच किंवा नऊ भेदही केलेले आढळतात. हुत, प्रहुत, आहुत, शूलगव, बलिहरण आणि प्रत्यवरोहण असे सात प्रकार बौधायन गृह्यसूत्रात (१.१) दिलेले आहेत. अष्टका, पार्वण, श्राद्ध, श्रावणी, आग्रहायणी, चैत्री आणि आश्वयुजी हे सात पाकयज्ञ होत, असेही सांगितलेले आहे. स्थालीपाक, अष्टका, अमाश्राद्ध, औपासनहोम, श्रावणी, आग्रहायणी व चैत्री असे सात पाकयज्ञ वैखानस गृह्यसूत्रात आढळतात. आपस्तंब गृह्यसूत्रातही सातच पाकयज्ञ सांगितले आहेत. 'लौकिकानां पाकयज्ञशब्दः' (= लौकिक विधींना पाकयज्ञ म्हणतात) असे आपस्तंब गृह्यसूत्रात (२.९) पाकयज्ञ शब्दाचे लक्षण सांगितले आहे. शिष्टसंमत विधींचा अंतर्भाव पाकयज्ञात करतात. अग्निहोत्रासंबंधी असलेल्या विहाराच्या (= अग्नींच्या) बाहेर करायचे जे संस्कार, त्यांचा समावेश पाकयज्ञात होत असल्यामुळे पाकयज्ञांची संख्या निश्चित नाही, असे बौधायनाच्या कर्मान्तसूत्रांत म्हटले आहे.

लाट्यायन सूत्रात (५.४.२२) पाकयज्ञांचा समावेश हविर्यज्ञसंस्थेतच केलेला आहे. अग्नीवर केले जाणारे आणि अग्नीशिवाय केले जाणारे असे पाकयज्ञाचे दोन मुख्य प्रकार आहेत. अग्नीवर केल्या जाणाऱ्या संस्कारांतही काही गृह्याग्नीवर आणि काही लौकिक अग्नीवर करतात. गृह्याग्नीवर केल्या जाणाऱ्या पाकयज्ञांचा समावेश हविर्यज्ञात करतात. एकूण, पाकयज्ञात कोणते कोणते संस्कार अंतर्भूत होतात, यासंबंधी एकवाक्यता नाही. पाकयज्ञांची संख्या सात असून, प्रत्येक गृहस्थाने ते केले पाहिजेत हे मात्र निश्चित आहे. पाकयज्ञात सांगितलेल्या काही संस्कारांत घरातील सर्व लोकांनी भाग घ्यायचा असतो. काही संस्कार घरापासून दूर अंतरावर जाऊन करायचे असतात. काही संस्कार रात्री करायला सांगितले आहेत. अशा रीतीने पाकयज्ञसंस्थेत विविधता आढळते. कुटुंबातील सर्व लोक सुखी व्हावे, त्यांच्यावर कोणत्याही प्रकारचे अरिष्ट येऊ नये, क्षुद्र योनीपासून कोणालाच त्रास पोचू नये, इ. हेतू मनात धरूनच पाकयज्ञांची मांडणी केलेली आहे. इतकेच नव्हे; तर घरातील चतुष्पाद प्राण्यांच्या सुखासाठीही शूलगवासारखे संस्कार पाकयज्ञात समाविष्ट केलेले आहेत. पाकयज्ञांचे अनुष्ठान करण्यासाठी गृह्याग्नी नित्य धारण करावा लागतो. अग्निहोत्र घेतल्यानंतरही पाकयज्ञांचे अनुष्ठान करता येते. पाकयज्ञातील काही संस्कारांत दक्षिणाग्नीचा उल्लेख केलेला आढळतो. विवाहापर्यंतचे पंधरा संस्कार झाल्यावर पाकयज्ञ, हविर्यज्ञ, आणि सोमयाग करून, त्यानंतर आत्मशुद्धीसाठी आठ संस्कार करावे, असे सांगितले आहे. ज्याने सर्व संस्कार केले आहेत, त्यालाच मोक्षाची प्राप्ती होते. तसेच, ज्याने अजिबात संस्कार केले नाहीत, त्याचा जन्म निरर्थक होय, असे सांगितले आहे. निरनिराळ्या पाकयज्ञांची माहिती त्या त्या विषयात दिली आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## सप्तबदरी

भगवान नारायण लोककल्याणासाठी युगानुयुगे बदरीनाथाच्या रूपाने भूतलावर वास करतो, अशी समजूत आहे. अशी सात बदरीक्षेत्रे असून, ती सर्व उत्तराखंडात आहेत. त्यांची नावे अशी – (१) श्रीबदरीनारायण – बदरिकाश्रमधाम. (२) आदिबदरी – उरगम ग्राम. हे कुम्हारचट्टीपासून सहा मैलांवर आहे. याला ध्यानबदरी असेही म्हणतात. (३) वृद्धबदरी – उखीमठ. (४) भविष्यबदरी – जोशीमठापासून नऊ मैलांवर. (५) योगबदरी – पांडुकेश्वर या ठिकाणी. (६) आदिबदरी – कैलासाच्या मार्गावर शिवचुलम व थुलिंगमठ यांच्या मध्ये. व (७) नृसिंहबदरी – जोशीमठात. पाहा– बदरीनाथ. [ कल्याण – तीर्थांक ]

## सप्तमी लोकव्रत

एक काम्य व्रत. शुद्ध सप्तमीला भूः, भुवः, इ. सात लोकांची पूजा हा या व्रताचा विधी आहे. फल – बुद्धिप्राप्ती. [ हि. ध. ]

## सप्तमी व्रते

ही सर्व व्रते सूर्यप्रीत्यर्थ असून, त्यांचे अनेक प्रकार आहेत. महिन्याच्या शुद्ध सप्तमीला ही व्रते करतात. त्यांची नावे व कृत्ये अशी –

(१) **कल्याणसप्तमी** – ज्या शुद्ध सप्तमीस रविवार येईल, त्या तिथीला हे नाव आहे. या दिवशी तांदुळांमध्ये अष्टदल कमळ काढून सूर्याची प्रतिमा स्थापतात व तिची पूजा करतात. व्रतावधी १३ महिने. उद्यापनाला गोप्रदान. फल – दुष्ट रोगनाश.

(२) **विशेषसप्तमी** – माघ शुद्ध सप्तमीला हे नाव आहे. सूर्यपूजा व तेल-मीठ वर्ज्य करून भोजन, असा याचा विधी आहे. व्रतावधी – एक वर्ष. फल – मनोरथपूर्ती.

(३) **फलसप्तमी** – मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीला हे नाव आहे. सूर्याची सुवर्णमूर्ती करून तिची पूजा करणे व ती मूर्ती ब्राह्मणाला दान देणे, असा या व्रताचा विधी आहे. उद्यापनाच्या वेळी साखरेचे दान व दंपतीभोजन करतात.

(४) **शर्करासप्तमी** – वैशाख शु. सप्तमीला हे नाव आहे. या दिवशी सूर्याची प्रतिमा साखरेवर ठेवून तिची पूजा करतात. मौन धरून भोजन करतात. व्रतावधी एक वर्ष. उद्यापनाच्या वेळी सुवर्णकलशात साखर भरून त्याचे दान करतात.

(५) **कमलसप्तमी** – चैत्र शु. सप्तमीला हे नाव आहे. यात सोन्याच्या पात्रात तीळ भरून त्यावर सूर्यप्रतिमेची पूजा करतात. व्रतावधी – एक वर्ष.

(६) **मंदारसप्तमी** – माघ शु. सप्तमीला हे नाव आहे. ताम्रपात्रात काळे तीळ भरून त्यावर सूर्याची पूजा करतात. व्रतावधी एक वर्ष.

(७) **शुकसप्तमी** – आश्विन शुद्ध सप्तमीचे नाव. त्या दिवशी स्नान, उपवास, सौर सूक्ताचा जप व कपिला गायीची पूजा करतात. व्रतावधी – एक वर्ष. [मत्स्य पु. अ. ७४-८०]

**सप्तमी स्नपन** एक काम्य सूर्यव्रत. यात सूर्य व रुद्र यांना दुधमिश्रित तांदुळाच्या आहुती, तसेच अर्क व पलाश यांच्या समिधा, यव, काळे तीळ आणि तूप यांच्या १०८ आहुती देतात.

ज्या स्त्रीची अपत्ये लहानपणी मरत असतील, तिच्यासाठी हे व्रत सांगितले आहे. मुलाच्या जन्मापासून ७ व्या महिन्यात सप्तमीस हे व्रत करतात. सात पुत्रवती सुवासिनी स्त्रिया व्रतकर्त्या स्त्रीवर पाच घड्यांतील पाण्याने अभिषेक करतात. जन्मलेल्या बालकाचे रक्षण करण्याबद्दल व्रतकर्ती स्त्री सूर्यादी देवतांची पूजा व प्रार्थना करते. तसेच यमाची सुवर्णमूर्ती करून तिची पूजा करते व ती मूर्ती ब्राह्मणाला दान देते. [हि. ध.]

**सप्तर्षिव्रत** चैत्र महिन्यातील शुक्ल पक्षात या व्रताला प्रारंभ करतात व पुढे सात दिवस रोज सप्तर्षींपैकी म्हणजे मरीची, अत्री, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, ऋतू आणि वसिष्ठ यांपैकी एकेकाची फुले, फळे व गायीचे दूध यांनी पूजा करतात. सर्व दिवस नक्त भोजन करावे, महाव्याहृतींनी तिळांचा होम करावा व अग्निहोत्री ब्राह्मणाला कृष्णमृगाचे चर्म दान द्यावे असे सांगितले आहे. फल–मोक्षप्राप्ती. [हि. ध.]

**सप्तर्षी** प्रत्येक मन्वंतराचे सप्तर्षी भिन्न भिन्न असतात. एका मन्वंतरात सात म्हणजे चौदा मन्वंतरांत अठ्ठ्याण्णव सप्तर्षी होतात. पुराणभेदाने यांची नावे वेगवेगळी आढळतात. महाभारतात त्यांच्या नावांच्या दोन याद्या दिल्या आहेत, त्या अशा – (१) कश्यप, अत्री, भरद्वाज, विश्वामित्र, गोतम, जमदग्नी व वसिष्ठ. (२) मरीची, अत्री, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, ऋतू व वसिष्ठ.

वर्तमान वैवस्वत मन्वंतरात वसिष्ठ, कश्यप, अत्री, जमदग्नी, गोतम, विश्वामित्र व भरद्वाज हे सप्तर्षी मानलेले आहेत. इतर मन्वंतरांत नावे वदललेली आहेत. पण यांच्याच वंशातील पुरुष सप्तर्षी असावे, असे ब्रह्मांडपुराणातल्या यादीवरून वाटते. सप्तर्षी हे सूक्तद्रष्टे आहेत. मनू, देव, सप्तर्षी व इंद्र ही अधिकाराची स्थाने असावी.

ऋषिपंचमीचे व्रत वैवस्वत मन्वंतरातील ऋषींना उद्देशूनच केलेले असते. श्रावणी वगैरे कित्येक धर्मकृत्यांत सप्तर्षींची पूजा करतात. कित्येक ठिकाणी लग्नाच्या वेळी वधू-वरांना वसिष्ठपत्नी अरुंधती हिचे दर्शन घ्यायला लावतात. एखाद्याला अरुंधती दिसेनाशी झाली, तर सहा महिन्यांनी त्याचा मृत्यू आहे, असे समजतात. शिव व पार्वती यांच्या विवाहाच्या वेळी सप्तर्षी मध्यस्थ होते, अशी कथा आहे.

उत्तरेला ध्रुव ताऱ्याभोवती प्रदक्षिणा करणाऱ्या सात ठळक ताऱ्यांना सप्तर्षी असे नाव आहे. एक चौकोन व त्याला जोडलेले तीन ताऱ्यांचे वाकडे शेपूट, अशी ती सामान्यतः पतंगासारखी आकृती आहे. यांना खाटले वाजले म्हणायचीही पद्धत आहे. शेपटातल्या मधल्या ताऱ्याजवळ एक अंधुकशी तारका आहे, तिला अरुंधती म्हणतात आणि तिच्या जोडीदाराला वसिष्ठ मानतात. यांना ध्रुवरक्षक तारे असे मानलेले आहे. मरीची, अत्री, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, ऋतू आणि वसिष्ठ अशी त्यांची नावे आहेत. हे सप्तर्षी वैषुविक वृत्ताच्या उत्तरेला ५० ते ६० अंशांच्या अवकाशात असल्यामुळे ते आपल्या माथ्यावर कधीच येत नाहीत. ते ईशान्येला उगवतात आणि वायव्येला मावळतात. जाट लोक त्यांना रथ समजतात आणि ध्रुव हा त्यांचा मालक असे मानतात. त्यांना ऋक्ष म्हणजे अस्वल मानण्याची प्रथाही बऱ्याच देशांत आहे. वैदिक ऋषीही त्यांना ऋक्षच मानतात. [प्रा. च. को.; वि. पु. भा.; नक्षत्रलोक]

**सप्तर्षी संवत** एक प्राचीन कालगणना. काश्मिरात व आसपासच्या डोंगरी प्रदेशात ही अजून प्रचलित आहे. अल् बिरूनीच्या काळी ही पंजाबातही प्रचारात होती. राजतरंगिणीत या कालगणनेचा उपयोग केलेला आहे. यात वर्षातील मास पूर्णिमांत असून, वर्ष बहुधा वर्तमान लिहितात. पण क्वचित गतवर्षेही लिहिण्याची प्रथा आहे.

हा संवत मर्यादित प्रदेशात चालू असल्यामुळे याला लौकिक काल असेही म्हणतात. डोंगरी भागात चालू असल्यामुळे पहाडी संवत आणि पंचांगात व ज्योतिषग्रंथात वापरला जातो म्हणून शास्त्र संवत अशी याची अन्य नावेही रूढ आहेत. याचे शतकांचे आकडे वगळून वरची वर्षेच लिहिण्याची पद्धत आहे. म्हणून याला कच्चा संवत असेही म्हणतात.

याला सप्तर्षी संवत हे नाव मिळण्याचे कारण सप्तर्षी तारकापुंजाच्या गतीशी याचा संबंध जोडलेला आहे, हे होय. पुराणे व ज्योतिषग्रंथ यांत अशी कल्पना सांगितलेली आहे, की सप्तर्षी तारकापुंज एकेका नक्षत्रात १०० वर्षे राहून २७०० वर्षांत एक नक्षत्रचक्र पूर्ण करतो व पुन्हा दुसऱ्या चक्रभ्रमणाला आरंभ करतो. सप्तर्षींची ही गती काल्पनिकच आहे. व्यवहारात नक्षत्राचे नाव न सांगता, विशिष्ट शतकातील सप्तर्षींचे कितवे वर्ष चालू आहे तेवढेच सांगितले जाते. ग्रंथांत व पंचांगात मात्र या संवताची आरंभापासून किती वर्षे झाली हे लिहिण्याचा प्रघात आहे. काश्मीरमध्ये याचा आरंभ कलियुगारंभानंतर २५ वर्षांनी झाला, असे मानले जाते. पण पुराणे व ज्योतिषग्रंथ यांत या संवताचा प्रारंभ कलियुगसंवतापूर्वी झाला, असे सांगितले आहे. विक्रम संवतात ३०१९ वर्षे, इसवी सनात ३०७५ वर्षे आणि शालिवाहन शकात ३१५४ वर्षे मिळवली असता सप्तर्षी संवताचे वर्ष येते. याचा वर्षारंभ चैत्र शुद्ध प्रतिपदेला होतो. उलट, शतकांचे आकडे गाळून लिहिलेल्या सप्तर्षी संवताच्या वर्षांत २५ मिळविले असता कलियुगाचे व ४६ मिळविले असता शालिवाहन शकाचे वर्ष मिळते. [ म. ज्ञा. को. ५ – विज्ञानेतिहास; सं. मि. ]

**सप्तवध्री आत्रेय** अत्रिकुलातील एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील अठ्ठ्याहत्तरावे आणि आठव्या मंडलातील विकल्पाने ब्याहत्तरावे सूक्त याने रचले आहे. प्रस्तुतच्या दोन सूक्तांशिवाय ऋग्वेदात (१०.३९.९), अथर्ववेदात (४.२९.४), आणि बृहद्देवतेत याचा उल्लेख आढळतो. ऋग्वेदातील एका सूक्तात (५.७८) असुरांनी पेटीत बंद केलेल्या सप्तवध्रीला अश्विनीकुमारांनी बाहेर काढून पुत्रदान केल्याची आख्यायिका ग्रथित केली आहे. सायणाचार्यांच्या मते असुरांनी या ऋषीला पेटीत बंद करून त्याची व त्याच्या पत्नीची गाठभेट अशक्य केली. अश्विनौदेवांनी ऋषीची मुक्तता केली, पतिपत्नींची भेट घडविली आणि मग त्याला पुत्रप्राप्ती झाली. याच्या सूक्तातील एक ऋचा अशी –

> **अत्रिर्यद् वामवरोहन्नृबीसमजोहवीन्नाधमानेव योषा ।**
> **श्येनस्य चिज्जवसा नूतनेनाऽऽगच्छतमश्विना शन्तमेन ॥**
> (ऋ. ५.७८.४)

अर्थ – बंदिवासी अत्री ऋषीने असहाय्य स्त्रीप्रमाणे आळविलेल्या, हे रथावर आरूढ झालेल्या अश्विनौ देवांनो, श्येनसदृश द्रुत गतीने तुम्ही अत्रीच्या मदतीसाठी अवतीर्ण झालात.

या सूक्ताच्या अखेरच्या दोन ऋचांमध्ये आपली पत्नी सुखरूप प्रसूत व्हावी म्हणून, त्याने केलेली प्रार्थना दिली आहे. त्याचप्रमाणे मानवी गर्भ दहा महिने आईच्या पोटात राहत असल्याचा उल्लेख वैद्यकीयदृष्ट्या महत्त्वाचा आहे. यातील सात ते नऊ या तीन ऋचा गर्भस्राविणी उपनिषद या नावाने प्रसिद्ध आहेत. बाळंतपणाच्या वेळी अडलेली स्त्री सुखरूप सुटावी म्हणून या मंत्राने अभिमंत्रित केलेले जल तिला प्यायला देतात. [ प्रा. च. को.; म. ज्ञा. को.– बुद्धपूर्वजग.; सी. ऋ.; ऋ. म. भा.]

**सप्तवार व्रत** सात आदितवार, सात सोमवार, सात मंगळवार असे सात दिवस उपवास करून सातव्या दिवशी ब्राह्मणभोजन घालणे, असा या व्रताचा विधी आहे. यात आदित्याची सुवर्णमूर्ती बनवून तिची पूजा करतात. सातव्या रविवारी श्वेतवस्त्रयुग्म, छत्र व पादत्राणे ब्राह्मणाला दान देतात.

चित्रा नक्षत्र असेल तेव्हा आठ सोमवारी उपवास करतात व ब्राह्मणभोजन घालतात. श्वेतवस्त्रयुग्म, सोम, छत्र, पादुका यांचे दान करतात. काशाच्या पात्रात खीर देतात.

स्वाती नक्षत्र असेल तेव्हा आठ मंगळवारी उपवास करतात. शेवटी ब्राह्मणभोजन घालून तांब्याच्या पात्रात मंगळाची सोन्याची प्रतिमा ठेवून ब्राह्मणाला दान देतात.

याप्रमाणे नक्षत्रांच्या अनुक्रमाने एक एक वार धरून उपवास व शेवटी सुवर्णदान करतात. नंतर विधिवत अग्निकार्य करायचे असते. फल – देव, पितर व सर्व ग्रह संतुष्ट होतात, आरोग्य लाभते आणि सर्व कामना पूर्ण होतात. [ कृ. क. ]

**सप्तशतिक हयग्रीव** बौद्धांचा एक देव. हयग्रीवाचे एक रूप. हा अमिताभाच्या कुळातला असून, याचा वर्ण लाल आहे. वज्र व दंड ही याची अभिधानचिन्हे होत. साधनमालेत याचे रूपध्यान वर्णिले आहे, ते असे –

रक्तवर्ण, भयप्रद मुद्रा, तीन नेत्र, कपिलकेश, बृहदुदर, रागीट, उघड्या दाढांमुळे भयानक, दात व ओठ यांसहित असलेल्या

…तांची माला गळ्यात घातलेला, जटामुकुटावर अमिताभाची प्रतिमा; दुसरे मुख घोड्याप्रमाणे व निळे; आठ नागांचे अलंकार घालणारा, ठेंगू, व्याघ्रचर्म पांघरलेला, सर्वालंकारभूषित. हातांत वज्र व दंड धारण करून सर्व देवासुरांना भय दाखवणारा. मुख्य मस्तकावर अश्वशिर असणे हे हयग्रीवाचे विशेष लक्षण आहे. मात्र अन्य देवतांबरोबर दुय्यम देव म्हणून तो असतो, तेव्हा हे अश्वशिर नसते. हयग्रीवाच्या मूर्ती तिबेट व चीन या देशांत आढळतात. [ इं. बु. इ. ]

**सप्तशृंगी** महाराष्ट्रातील शक्तिपीठांपैकी एक. सात शृंगे किंवा शिखरे असलेल्या डोंगरावरील देवीचे स्थान. प्रत्यक्ष पाहता तिथे चारच डोंगरशिखरे आढळून आल्यामुळे हिलाच कोणी चतुशृंगी या नावानेही संबोधतात. हे स्थान नासिकच्या उत्तरेला २७ मैल अंतरावर, चांदवड डोंगरांच्या रांगेत असलेल्या सप्तशृंग नामक एका डोंगरावर आहे. हा डोंगर समुद्रसपाटीपासून अंदाजे साडेचार सहस्र फूट उंच आहे. नासिकपासून मोटारमार्गाने दिंडोरी तालुक्यातील वणी नामक एका गावी पोचल्यावर, तिथून सप्तशृंगगडाच्या चढणीला आरंभ होतो. वणीलाही एक देवीचे स्थान असून, त्यालाही सप्तशृंगी असेच नाव आहे.

वणीच्या बाजूने सप्तशृंगगडावर जाण्यास पायऱ्यांचा मार्ग आहे. आरंभीच्या सुमारे तीन मैलांची चढण पायीच चढावी लागते. तिथून पुढे ३५० पायऱ्या चढून गेल्यावर गणेशकुंड हे विश्रांतिस्थान लागते. इथे गणेशकुंड व गणेशमंदिर असून, भोवती सर्वत्र पठार आहे. या पठारापासून देवीकडे जाणाऱ्या चढणीच्या मार्गावर सुमारे ४७५ पायऱ्या आहेत. या सर्व पायऱ्यांचे बांधकाम रुद्राजी, कोंडाजी, इ. तिघा कान्हेरे बंधूंनी व पेशवेकालीन सरदार दाभाडे यांची शूर पत्नी उमाबाई हिने, वेगवेगळ्या काळी केले. डोंगर चढून गेल्यावर एका कड्याच्या टोकावर देवीचे स्वयंभू स्थान आहे.

देवीची मूर्ती भव्य, अंदाजे ८–१० फूट उंच, उभी व अष्टादशभुजायुक्त अशी आहे. त्यामुळे तिची पूजा शिडीवर चढूनच करावी लागते. देवीला सदैव सिंदुराचे विलेपन केलेले असते. ही मूर्ती एका प्रचंड खडकात कोरलेली आहे. ती पूर्वाभिमुख असून, तिचा डाव्या बाजूचा हात कानावर टेकलेला आहे. किंचित त्याच बाजूला कललेल्या अवस्थेत ती उभी आहे. देवी सकाळी बाला, दुपारी तरुणी व अस्ताचलसमयी वृद्धारूप भासते. देवीच्या मूर्तीभोवती बांधीव दगडी मंदिर नाही. एका १० × २० च्या गुहेत ती उभी आहे. या गुहेच्या माथ्यावर एक दुर्गम सुळका असून, त्यावर निशाण चढवणे हा देवीच्या यात्रेतला महत्त्वाचा धाडसी कार्यक्रम असतो. निशाण चढवण्याचा मान बुरी गावच्या वतनी घराण्यातील माणसाकडे असतो. पौर्णिमेच्या रात्री, हजारो



सप्तशृंगी देवी - वणी

लोकांच्या साक्षीने तो लीलया मागचा कडा चढून जातो व त्या सुळक्यावर निशाण फडकवतो.

चैत्री व आश्विनी पौर्णिमेला इथे मोठी यात्रा भरते. ही देवी अनेक देशस्थ ब्राह्मणांची कुलदेवी आहे. सप्तशती या देवीमाहात्म्य वर्णन करणाऱ्या ग्रंथात हिच्या अवतरणाची कथा साद्यंत निवेदन केली आहे. [ म. जि. नासिक; देवीकोश २ व ३; कल्याण – तीर्थांक; आ. द. दे. ]

**सप्तसप्तमी कल्प** एक काम्य व्रत. याचा अर्थ सात शुद्ध सप्तमींच्या दिवशी करायचे व्रत, असा आहे. उत्तरायण सुरू झाल्यावर शुक्ल पक्षात रविवारी पुंनक्षत्र असेल त्या दिवशी या व्रताला प्रारंभ करतात. त्याचा विधी असा – पंचमीला एकभुक्त. षष्ठीला ब्रह्मचर्यपालन. सप्तमीच्या दिवशी अर्कसंपुट, मरीच, निंब, फल, अनोदना, विजया व कामिनी अशी सात सप्तम्यांची नावे सात पानांवर लिहावी. ती कोऱ्या भांड्यांत घालावी. एका अबोध मुलाला त्यांतले एक पान उचलायला सांगावे व त्या सप्तमीला हे व्रत करावे. व्रतावधी – एक वर्ष. फल – मनोरथपूर्ती व सूर्यलोकाची प्राप्ती. [ हि. ध. ]

**सप्तसागरदान** एक दानव्रत. याचा विधी पुढीलप्रमाणे – सोन्याची सात कुंडे करावी. ती मीठ, दूध, तूप, गूळ, दही, साखर आणि तीर्थोदक यांनी भरावी. प्रत्येकात शिवप्रतिमा ठेवावी आणि मग त्या सातही कुंडांचे दान ब्राह्मणाला द्यावे. फल – शिवलोकप्राप्ती (मत्स्य पु. २८८).

**सप्तसागर व्रत** एक काम्य व्रत. याचा प्रारंभ चैत्र शु. प्रतिपदेला करावा. त्या दिवसापासून पुढे सात दिवस सुप्रभा, कांचनाक्षा, विशाला, मानसोद्भवा, मेघनादा, सुवेणू आणि विमलोदका या देवतांची पूजा करावी. दह्याचा होम करावा व ब्राह्मणांना दहीभाताचे भोजन घालावे. कर्त्याने स्वतः रात्री तूपभात जेवावा. वर्षानंतर उद्यापन करावे. त्या वेळी सात वस्त्रे दान द्यावी. फल – इष्टकामनापूर्ती. [ हि. ध. ]

**सप्त सिंधु** सात नद्या किंवा सात नद्यांचा प्रदेश, असा या शब्दाचा अर्थ आहे. सात नद्या या अर्थाने हा शब्द ऋग्वेदात अनेक वेळा आलेला आढळतो. (ऋ. १.३२.१२; १.३५.८). या सातही नद्या समुद्राला मिळणाऱ्या आहेत (१. ७१.१). आठव्या मंडलातील चौविसाव्या सूक्तात मात्र या शब्दाचा अर्थ, सात नद्यांचा प्रदेश, असा आहे. बहुतेक पंडितांच्या मते सप्तसिंधू प्रदेश म्हणजे पंजाब असून, वितस्ता (झेलम), असिक्नी (चिनाब), परुष्णी (रावी), विपाशा (बियास), शुतुद्री (सतलज), सिंधू व सरस्वती या त्या सात नद्या होत. या प्रमुख नद्यांमुळे त्या प्रदेशाला सप्त-सिंधू हे नाव मिळाले असले तरी, त्यातून दृषद्वती, तृष्टामा, रसा, श्वेती, कुभा, गोमती क्रुमू, मेहत्नू, इ. नद्या वाहत होत्या. पश्चिमेला खैबर घाट, पूर्वेला यमुना, उत्तरेला हिमाचल आणि दक्षिणेला राजस्थानातले वाळवंट अशा या प्रदेशाच्या सीमा होत्या. त्या सीमित प्रदेशात आर्य लोक कित्येक शतके राहिले. बियास व रावी या दोन नद्यांमधील डोंगराळ जंगलात किरातांचे राज्य होते आणि मैदानात आर्य दिवोदासाचे राज्य होते.

परंतु पंजाब म्हणजे सप्तसिंधू प्रदेश हे मत सर्वमान्य झालेले नाही. कारण पंजाब हे नाव पाच नद्यांचा प्रदेश या अर्थाने मिळालेले आहे. आणि त्या सर्व नद्या समुद्राला मिळत नाहीत. सप्तसिंधूच्या व्याप्तीविषयी विद्वानांत मतभेद आहेत.

मध्य आशियात रशियन तुर्कस्तानातील काही भागाला सात नद्यांचा प्रदेश म्हणतात. भारतीय आर्यांचे पूर्वज अत्यंत प्राचीन काळी त्या प्रदेशात वसलेले होते. तिथून ते कालांतराने पंजाबात आले आणि प्राचीन वसाहतीसारखीच ही भूमी पाहून त्यांनी तिला सप्त-सिंधू हेच नाव दिले असावे, असे श्री. सरदेसाई यांनी सुचविले आहे. अशी प्रथा अजूनही चालू असल्याचे दिसते.

डॉ. संपूर्णानंद यांनी श्री. दास यांचे मत मान्य करून, ते सारांशरूपाने सांगितले आहे, ते असे –

सप्तसिंधूच्या उत्तरेला हिमालय असून, दक्षिणेला समुद्र होता. तो समुद्र कोरडा पडून तिथे राजस्थानचे वाळवंट झाले. पूर्वेलाही हिमालयाच्या पायथ्याशी एक समुद्र होता. तो सुकून तिथे भूप्रदेश निर्माण झाला. त्या भूप्रदेशात उत्तर प्रदेश, बिहार, आसाम यांचा समावेश होतो. पश्चिमेला सुलेमान पर्वत होता. यावरून पंजाब व काश्मीर या प्रदेशांचा सप्त-सिंधूत समावेश होत असावा. गेल्या २५–५० सहस्र वर्षांत भरतखंडाच्या भौगोलिक रचनेत खूपच बदल झालेला आहे, हे भूगर्भशास्त्रज्ञांनी मान्य केले आहे. सप्त-सिंधू प्रदेश पूर्वी समुद्राने वेढलेला होता, तेव्हा तिथले हवामान समशीतोष्ण होते. पण आता ते तसे राहिले नाही, कारण समुद्राच्या जागी जमीन व वाळवंट आले आहे. याच सप्त-सिंधू प्रदेशात आर्यांचे मूळ वसतिस्थान होते.

श्री. भार्गव यांच्या मते गंगेच्या तीरावरील मेरठ व कुमाऊं, जम्मू, काश्मीर, वायव्यसीमाप्रांत आणि अफगाणिस्तानचा पूर्व भाग एवढ्या विस्तीर्ण भूप्रदेशाचा सप्त-सिंधूमध्ये समावेश होत असे. [ ऋ. आ.; भां. को. व्हॉ.; आ. आ. दे.; जों. ऋ. इं. ]

**सप्तसुंदरक व्रत** एक काम्य व्रत. याचा विधी असा – पार्वतीच्या कुमुदा, माधवी, गौरी, भवानी, पार्वती, उमा व अंबिका या सात नावांनी तिची पूजा करावी. सात कुमारिकांना सात दिवस भोजन घालावे. प्रत्येक दिवशी देवीच्या सात नावांपैकी एकेक नाव घेऊन 'कुमुदा देवी संतुष्ट होवो' असे सहा दिवस सहा नावांनी म्हणावे. सातव्या दिवशी सातही देवींना आवाहन करावे. मग पूजा करून आणि तांबूल, हिंगूळ व नारळ देऊन त्यांचा सन्मान करावा. पूजेनंतर सात देवींच्या मागे प्रत्येकी एकेक आरसा ठेवावा. फल – सौंदर्य व सौभाग्य यांची प्राप्ती आणि पापनाश. [ हि. ध. ]

**सप्ताक्षर** हेवज्र या बौद्ध देवतेचे एक रूप. त्रिमुख व षड्भुज. मस्तकावर अर्धचंद्र आणि विश्ववज्र. हा कालरात्रीवर पाय देऊन उभा असतो. ज्या सूर्यचक्रावर हा आरूढ असतो, त्या चक्राच्या सहा आरांवर सहा देवता असतात आणि त्यांची रूपे भयानक असतात. वज्रवाराही ही याची सहचरी असून, हा तिच्या आलिंगनात असतो. [ इं. बु. इ. ]

**सप्री वाजंभर** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकोणायंशी क्रमांकाचे सूक्त याने

रते आहे. अग्निस्तुती हा या सूक्ताचा विषय असून, अग्नी हीच सूक्ताची देवता आहे. याची एक ऋचा अशी –

प्र मातुः प्रतरं गुह्यमिच्छन् कुमारो न वीरुधः सर्पदुर्वीः ।
ससं न पक्वमविदच्छुचन्तं रिरिह्वांसं रिप उपस्थे अन्तः ।।

(ऋ.. १०.७९.३)

अर्थ – पृथ्वीवरील लता आणि मुळे भुकेलेल्या बालकाप्रमाणे भक्षिणारा, अग्रगामी अग्नी पृथ्वीतील शुष्क तृण पाकनिष्पादित अन्नाप्रमाणे भक्षण करतो.

प्रस्तुतचे सूक्त सौचीक अथवा वैश्वानर अग्नी यांच्या नावानेही आढळते. सप्ती वाजंभरासह ही सर्व नावे म्हणजे एकाच नावाचे पर्याय असावे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**सफला एकादशी** मार्गशीर्ष वद्य एकादशीला हे नाव आहे. ही पापनाशक आणि बहुफल देणारी आहे. हिची कथा अशी – चंपावती नगरीत माहिष्मत नावाचा राजा राज्य करीत होता. त्याचा एक पुत्र फार दुर्वर्तनी निघाला. म्हणून लोक त्याला लुंबक म्हणू लागले. राजाने त्याला राज्याबाहेर घालवले. तो दिवसा रानात राहून रात्री नगरात येई आणि चोऱ्या करी. एके दिवशी त्याला उपवास घडला आणि थंडीमुळे जागरण घडले. त्या दिवशी सफला एकादशी होती. त्या जागरणामुळे त्याला पश्चात्ताप झाला. त्याची पापबुद्धी नष्ट झाली. मग त्याला पित्याचे राज्य मिळून तो सुखी झाला. (प. पु. उ. खं. अ. ४२ )

**सभा** राजसत्तेवर नियंत्रण ठेवणाऱ्या संस्था म्हणून सभा व समिती यांचा उल्लेख वैदिक साहित्यात अनेक वेळा आलेला आहे. त्यांच्या स्वरूपाविषयी मात्र विद्वानांत मतभेद आहेत. या दोन्ही संस्थांचे मूळ विदथ नामक प्राचीन लोकपरिषदेत आहे, असे डॉ. जयस्वालप्रभृती काही पंडित मानतात. परंतु अन्य काही विद्वानांनी विदथचा अर्थ यज्ञ किंवा यज्ञप्रसंगी भरलेली विद्वत्सभा असा लावला आहे.

सभेची कार्यपद्धती कशी होती, ते सांगता येत नाही. मात्र सभेत सार्वजनिक कामासंबंधी वादविवाद व विचार केला जात असे. सभा न्यायदानाचे कार्यही करीत असे. त्याचप्रमाणे सभेत मनोरंजनाचे कार्यक्रम, कथाकथन, पशुपालनाविषयी चर्चा, इ. गोष्टीही होत असत. जुगारी लोकांच्या बैठकीलाही सभा म्हणत (ऋ. १०.३४.६).

राजनैतिक अर्थाने सभा ही ग्रामजनांनी निवडलेली लहान संस्था असावी. सभा ही ग्रामपंचायतीप्रमाणे असावी, असे काही विद्वानांनी अनुमान केले आहे. पण सभेत राजा स्वतः उपस्थित राहत असे, या आशयाचे अनेक उल्लेख आढळतात. सभेमध्ये निवडक लोकच जमत असत. ती समितीइतकी व्यापक नव्हती. ती सध्याच्या राज्यसभेसारखी असावी.

सभेय हा शब्द सभेत उत्तम वक्तृत्व करणारा या अर्थाने ऋग्वेदात (८.४.९) आला आहे. त्यावरून सभेसाठी वादकुशल वक्ते निवडले जात, असे वाटते. तिथे सर्वांचे एकमत न झाल्यास, बहुमतानुसार अंतिम निर्णय घेण्याची प्रथा असावी (अथर्व. ७.१२.३). पाहा – समिती. [ ऋ. आ.; वै. सा.; वे. रा. द.; प्रा. भा. सां. – अ. ]

**सभादीपदान** एक काम्य व्रत. श्रावण शुद्ध पौर्णिमेला किंवा अन्य दिवशी ब्रह्मवृंदाचे उपाकर्म चालू असताना तिथे स्त्रिया दीपदान करतात. त्यासाठी सोन्याच्या, चांदीच्या किंवा तांब्याच्या पात्रात एक प्रस्थ चांगले गहू घालून त्यांवर गव्हाच्या पिठाचा दिवा ठेवतात. त्या दिव्यात तूप किंवा तेल व तीन वाती घालून तो प्रज्वलित करतात. मग त्या दिव्याची पूजा करून तांबूल व दक्षिणा यांसमवेत आचार्याला किंवा अन्य ब्राह्मणाला त्याचे दान करतात. त्या वेळी पुढील मंत्र म्हणतात —

सदक्षिणः सताम्बूलः सभादीपोऽयमुत्तमः ।
अर्पितो देव देवस्य मम सन्तु मनोरथाः ।।

पाच वर्षे असे दीपदान केल्यानंतर या व्रताचे उद्यापन करतात. फल – सौभाग्य, पुत्र, दीर्घायुष्य व ऐहिक सुखोपभोग यांची प्राप्ती. [ व्रतराज ]

**सभ्य** (१) अग्निहोत्रशाळेत जे चार अग्नी ठेवलेले असतात, त्यांतील एका अग्नीचे नाव. हा अग्नी सभेमध्ये ठेवतात म्हणून याला सभ्य असे म्हणतात. याचे आयतन आहवनीय अग्नीच्या आयतनाप्रमाणेच करावे, असे सांगितले आहे. दर्शपूर्णमासयागात या सभ्य अग्नीची विजयासाठी प्रार्थना करतात. रोज सकाळी सभेमध्ये जाऊन सभ्य अग्नीजवळ बसावे, असे कात्यायन श्रौत सूत्रात (४.१५.३२) सांगितले आहे. सभ्याग्नी ठेवण्याची प्रथा सांप्रत केवळ शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मणांत चालू आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

(२) उपन्यायाधीश. मुख्य न्यायाधिशाला साहाय्यक म्हणून तीन ते सात उपन्यायाधीश नेमण्याची प्रथा प्राचीन काळी होती (मनु. १०.११; अर्थ. ३.१). मुख्य न्यायाधिशाप्रमाणेच सभ्य हा शक्यतो ब्राह्मण असावा; नसल्यास क्षत्रिय किंवा वैश्य चालेल, पण शूद्राला ते पद कधीही देऊ नये, असे मनूने म्हटले आहे (८.२०). जो सभ्य स्वार्थामुळे, मैत्रीसाठी किंवा भयाने

श्रुतिस्मृतींमधील नियमांच्या विरुद्ध निर्णय देतो, त्याला दंड करावा व त्याची सर्व संपत्ती जप्त करावी, असे सांगितले आहे. (अर्थ. ४.९; याज्ञ. २.४; विष्णुध. सू. ५.१८०). [ हि. ध. ]

**समगर** एक पूर्वास्पृश्य जात. हे चांभार आहेत. यांची वस्ती प्रामुख्याने दक्षिण कर्नाटकातील कुंदपूर तालुक्यात आहे. समगरांमध्ये कर्नाटकी समगर व आर्य समगर असे दोन पोटभेद आहेत. आर्य समगर मराठी बोलतात. हे रंगाने उजळ असतात. यांच्या धार्मिक प्रथा व सामाजिक चालीरीती होलेयां-प्रमाणेच असतात. यांच्या स्त्रिया सुंदर असतात. ब्राह्मण त्यांचे पुरोहित असतात. चामडे कमविणे हा समगरांचा प्रमुख व्यवसाय होय. [ का. ट्रा. स. इं.; डि. क्ला. सा. कॅ. ]

**समंतपंचक** कुरुक्षेत्रातले एक तीर्थस्थान. ब्रह्मयाची एक वेदी. इथे परशुरामाने पितरांचे तर्पण करण्यासाठी पाच द्रोणींनी युक्त असे जे सरोवर खोदले, त्याला समंतपंचक हे नाव मिळाले. पाहा – कुरुक्षेत्र.

**समंतभद्र** (१) पहिला ध्यानी बोधिसत्त्व आणि वैरोचनाचा पुत्र. चिंतामणी हे याचे प्रतीक असून, नीलकमल हे अभिधानचिन्ह आहे, याचा वर्ण हरित आहे. हत्ती हे याचे वाहन आहे. योगाचारपंथी बौद्ध याला योगमार्गाचा जनक मानतात.

निष्पन्नयोगावलीत याच्या पाच भिन्न रूपांचे वर्णन केलेले आहे, ते असे– हा सोळा बोधिसत्त्वांचा नेता आहे. याचा वर्ण कधी पिवळा, कधी निळा, तर कधी शुभ्र असतो. याच्या हातांत वज्र, रत्नमंजरी, घंटा, कपाल, उत्पल (कमल), इ. वस्तू असतात. याच्या विविध प्रकारच्या मूर्ती उपलब्ध आहेत. एका मूर्तीत याला त्याची शक्ती धर्मवज्रा हिने आलिंगन दिलेले आहे. [ गॉं. नॉं. बु.; इं. बु. इ. ]

(२) (इ. स. चे ५ वे शतक) एक महान जैन दार्शनिक. याच्या काळाविषयी विद्वानांत मतभेद आहेत. श्री. के. बी. पाठक यांच्या मते हा इ. स. च्या ८ व्या शतकात होऊन गेला. डॉ. विद्याभूषण इ. स. ६०० चा सुमार हा त्याचा काळ मानतात. परंतु श्री. युगलकिशोर मुख्तार यांनी विशेष संशोधन करून इ. स. चे ५ वे शतक हा त्याचा काळ असल्याचे सिद्ध केले आहे. जैन परंपरेप्रमाणेही हेच मत बरोबर ठरते.

जैन साहित्यात याचा निर्देश त्याच्या प्रगाढ पांडित्यामुळे, विशेष आदराने केलेला आहे.

आत्ममीमांसा नावाचा याचा एक ग्रंथ आहे. त्यावर टीका लिहिताना विद्यानंदाने त्याची खूप प्रशस्ती केली आहे.

हा दिगंबर पंथाचा आचार्य असून, कर्नाटकाचा रहिवासी असावा. कन्नड कवी याचा आदरपूर्वक उल्लेख करतात. मणुव-कहळ्ळी येथे त्याने तप केले, असे देवचंद्राच्या राजावली कथेत लिहिले आहे. याच्या संस्कृत व प्राकृत ग्रंथांवर कन्नड भाषेत टीका उपलब्ध आहेत. याने बिहार, माळवा, सिंध, पंजाब, इ. प्रदेशांत जाऊन वादविवाद केले आणि जय मिळविले, असे श्रवण-बेळगोळ येथील एका शिलालेखात म्हटले आहे.

याने अनेक ग्रंथ रचले आहेत; त्यांची नावे अशी– (१) युक्तानुशासन – यात जैन दर्शनाचे विवेचन आहे. (२) रत्नकरंडक श्रावकाचार – याचे दुसरे नाव तपासकाध्ययन असे आहे. यात श्रावकांच्या व्रतांचे व नियमांचे विस्तृत वर्णन आहे. (३) स्वयंभूस्तोत्र (चतुर्विंशतिजिनस्तवन) – यात चौवीस तीर्थंकरांची स्तुती आहे. (४) गंधहस्तिमहाभाष्य – हा याचा सर्वांत श्रेष्ठ ग्रंथ म्हणजे उमास्वातीच्या तत्त्वार्थाधिगमसूत्र नामक ग्रंथावरील टीका होय. त्याची प्रस्तावना आप्तमीमांसा किंवा देवागमस्तोत्र या नावाने प्रसिद्ध आहे. त्यात न्याय दर्शनाच्या सिद्धान्तांचे विवेचन केलेले आहे; तसेच स्याद्वादाचे विस्तृत विवरण आहे. याने केवळ दर्शनाचेच सुबोध विवेचन केले असे नाही, तर सरस स्तोत्रेही रचली. त्यामुळे याला कवी ही उपाधी मिळाली होती. [ म. च. को.; गु. सा. इ. ]

**समंध** भूत-पिशाच योनीतील एक प्रकार. ज्या माणसाला वारस नसतो व ज्याचे काही संस्कार करायचे राहिलेले असतात, तो मरणानंतर समंध होतो. एखादा मनुष्य इच्छा तृप्त होण्यापूर्वीच मरण पावला तर तोदेखील समंध होतो. लोभी मनुष्य जर समंध झाला, तर तो मागे राहिलेल्या संपत्तीचा उपभोग इतर कोणाला घेऊ देत नाही आणि आपल्या शत्रूला त्रास देत राहतो. तो पिंपळ, वड, उंबर, इ. झाडांवर किंवा ओसाड घर, पडकी विहीर अशा ठिकाणी राहतो. हा खूप दांडगा असतो, अशी समजूत आहे. मांत्रिकाकडून समंधाची आराधना करविली तर तो त्रास देत नाही; उलट कुटुंबाच्या हितासाठी झटू लागतो. [ लो. दं.; पि. प. ]

**समन** एक प्राचीन सामाजिक उत्सव. ऋग्वेदात याचे उल्लेख अनेक वेळा आले आहेत. या शब्दाचे संग्राम, वैर, भेट, साहचर्य, मीलन, संमेलन, विवाहसमारंभ, इ. अनेक अर्थ होतात. मात्र ऋग्वेदकाळी हा मुख्यतः एक मनोरंजक कार्यक्रमांचा आनंदोत्सव होता. धनुर्धर, घोडेस्वार, कवी, चित्रकार आपापले कौशल्य या प्रसंगी दाखवीत. या उत्सवात स्त्रियाही भाग घेत

...उत्सव. लहान, थोर, तरुण, तरुणी, वयस्क स्त्रियाही या कार्य-...ची उत्सुकतेने वाट पाहत. युवक-युवती परस्परांशी अत्यंत ...मोकळेपणे वागून परिचय करून घेत व आपापले जोडीदारही ठरवीत.

आर्यांचा जीवनविषयक दृष्टिकोण कसा होता, हे या उत्सवा-तील कार्यक्रमांवरून ध्यानात येते. आनंद प्राप्त करून घेण्यासाठी सर्व लोक अत्यंत उत्सुक असत. त्या उत्सवात घोडदौड, रथ पळ-वणे, नेमबाजी, काव्यगायन, इ. स्पर्धा असत. तरुण स्त्रिया वर-संशोधनार्थ त्यात भाग घेत. अनार्य तरुणींची संख्या मोठी असे. कारण आर्य तरुण त्यांतल्या सुंदर तरुणींना पसंत करीत. रात्र-भर नृत्यगायन चालत असे. वारांगनादेखील तिथे आपल्या देहाचे प्रदर्शन करून गिऱ्हाईक मिळवण्याचा प्रयत्न करीत. तिथे मद्यपानही चालत असे. [श्री. कालीचरणशास्त्री, न्यू इं. अॅ.; सौंदर्याच्या शोधात – श्री. बाळकृष्ण दाभाडे, १९७१]

**समयसार** जैन धर्माचे तत्त्वज्ञान विशद करणारा एक अधि-कृत ग्रंथ. कुंदकुंदाचार्य (इ. स. चे १ले शतक) हा या ग्रंथाचा कर्ता होय. यात एकूण ४१५ (किंवा ४३९) श्लोक आहेत. हा ग्रंथ गृहस्थांनी वाचावयाचा नाही असा जैन-मंडळीत संकेत आहे. त्या ग्रंथाचा सारांश असा –

कर्म आणि त्याचे फल यांचा अन्योन्यसंबंध कसा असतो हे ज्ञानी माणसाशिवाय इतरांना कळणे शक्य नाही. साधकाने अनासक्त बनून जीव आणि आत्मा सर्वथा भिन्न आहे व आपण स्वतः शुद्ध व मुक्त आहो, असे समजले पाहिजे.

आत्म्याचे वास्तव स्वरूप, कर्मबंधाचे स्वरूप, त्यातून मुक्त होण्याचे उपाय, इ. विषयांवर कुंदकुंदाने या ग्रंथात विशद चर्चा केली आहे. काही ठिकाणी परावस्तूबद्दलचे स्वतःचे अनुभवही नमूद केले आहेत. अनेक ग्रंथांचे आधार घेऊन व स्वतःचे विचार मांडून ग्रंथकर्त्याने आपला ग्रंथ सजवला आहे. ] कुं. ती. र. ]

**समयसुंदरगणी** (इ. स. १५६४ ते १६४६) राजस्थाना-तील एक जैन कवी. मारवाडातील साचौर गावी याचा जन्म झाला. जिनचंद्रसूरीकडे याने अध्ययन केले. पुढे याने पाचशेहून अधिक ग्रंथांची निर्मिती केली. त्यांपैकी काही नागरी प्रसारिणी पत्रिकेतून प्रकाशित झाले असले तरी, बरेचसे अजून अप्रकाशित आहेत.

याचा अष्टलक्षी हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याच्या उत्पत्ती-विषयी एक दंतकथा सांगतात, ती अशी– एकदा एका जैनेतर विद्वानाने जैन धर्मातल्या 'एगस्स सुतस्स अनन्तो अत्थो' (एका सूत्राचे अनंत अर्थ होतात) या वाक्याची कुचेष्टा केली. समयसुंदराला ती सहन झाली नाही. त्याने त्या जैनेतर पंडिताच्या कुचेष्टेला उत्तर म्हणून अष्टलक्षी नामक ग्रंथाची रचना केली. त्या ग्रंथात 'राजानो ददते सौख्यम्' (राजे सौख्य देतात) या अष्टाक्षरी वाक्याचा १०२२४०७ प्रकारांनी अर्थ लावून दाखवला. ही करामत त्याने अकबर बादशहासमोर करून दाखवली. त्यावर अकबराने त्याची खूप प्रशंसा केली.

इ. स. च्या १७ व्या शतकातला विद्वान कवी म्हणून समय-सुंदराचा गौरव करतात. सामान्य जनामध्ये सचोटी, ज्ञान, वैराग्य, धर्म, नीती, इ. सद्गुणांचा प्रसार व्हावा या उदात्त हेतूने त्याने आपली काव्यशक्ती राबवली. तो अनेक भाषांचा प्रभू होता. त्याची शिष्यशाखाही फार मोठी आहे. [पुणे विद्या-पीठ पत्रिका, १९६५–ज्ञानखंड २१.]

**समयाचार** श्रीविद्येतले एक पारिभाषिक नाव. श्रीविद्येच्या उपासनेत हृदयाकाशामध्ये श्रीचक्राचे ध्यान करून तिथे त्याची मानसपूजा करायची असते. या क्रियेला समयाचार म्हणतात. यात पुरश्चरण, जप, होम, इ. बाह्य आचार व उपचार नसतात. मनानेच या साऱ्या गोष्टी करायच्या असतात. आद्य शंकराचार्य हे श्रीविद्येचे उपासक आणि समया-चारी होते, असे सांगतात. [भा. ध. त.]

**समर्पण** (परमेश्वराला किंवा इष्टदेवतेला) चांगल्या प्रकारे विविध वस्तू अर्पण करणे, असा या शब्दाचा अर्थ आहे. जी वस्तू जिथून आली असेल, तिथे तिला परत पोचते करणे असा त्या शब्दाचा आशय आहे. सर्व जीव हे भगवंतापासून आले आहेत. समर्पणक्रियेच्या द्वारे ते पुनश्च भगवंताच्या ठिकाणी जाऊन पोचतील, अशी समर्पणामागची भावना आहे.

समर्पणातला हा सर्वोच्च भाव असला तरी सर्वच समर्पणे त्या भावाने होत नाहीत. त्यात इतर काही गौण भावही कार्या-न्वित असतात.

मनुष्य निधन पावल्यानंतर त्याचा आत्मा परलोकी जातो. त्या वेळी प्रवासात किंवा तो थडग्याजवळ वास्तव्य करून राहत असला तर तिथे, त्याला उपयोगी पडावे या हेतूने थडग्याजवळ अन्नपाणी ठेवण्याची चाल फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. पुढे आत्म्याविषयी उदात्त कल्पना प्रसृत झाल्या, त्यांना दिव्य रूप प्राप्त झाले व त्यांना प्रसन्न करून घेण्यासाठी काही पदार्थ अर्पण करण्याची कल्पना उदय पावली. सृष्टीच्या घडामोडीत ज्या अनेक शक्तींचा प्रत्यय येतो त्यांच्याकडून काही लाभ करून घेणे किंवा त्यांचा कोप टाळणे या हेतूने त्यांना काहीतरी अर्पण करण्याची प्रथा त्यानंतर सुरू झाली. अन्नधान्य,

फळे, पशुबली, नरबली, इ. अनेक प्रकारचे समर्पण, करणारा व स्वीकारणारा यांच्या स्वभावधर्माला अनुसरून होऊ लागले.

सर्वसाधारणपणे, ज्या दैवी शक्तीशी संबंध प्रस्थापित करून घेण्याची इच्छा असते, तिला अर्पण केलेला पदार्थ स्वतः भक्षण केल्याने तो हेतू साध्य होतो, ही समजूत सर्वत्र दिसून येते. जंगली जमातींच्या बलिदानात ही कल्पना असते, तशी ख्रिश्चन धर्मातील 'युखारिस्ट' या विधीतही ती आहे.

भूताखेतांचा कोप टाळणे किंवा देवतांना प्रसन्न करून लाभ मिळविणे हा समर्पणातील हेतू जगातील सर्वच मानवी समाजांत आढळतो हे खरे; परंतु अशा प्रकारचा कोणताच हेतू मनात न ठेवता देवाने जे दिले आहे, त्याबद्दल केवळ कृतज्ञता दर्शविण्यासाठी त्यातलाच थोडा भाग त्याला समर्पण करणे, ही प्रथाही सर्वत्र आढळते. मात्र ही निरपेक्ष बुद्धी मानवजातीच्या प्राथमिक अवस्थेत क्वचितच आढळते. परमेश्वराशी एकरूप होण्याच्या इच्छेने आत्मार्पण करण्याची उदात्त कल्पना तर उच्च सुसंस्कृत समाजातच आढळते. [ एन्सा. रि. ए. ]

**समवकार** संस्कृत भाषेतील दश रूपकांपैकी एक प्रकार. समवकारातील कथा प्रसिद्ध असली पाहिजे, त्या कथेचा संबंध देव व दैत्य यांच्याशी असला पाहिजे, तसेच, त्यातील मुख्य रस वीरच असला पाहिजे, अशी त्याची लक्षणे सांगितलेली आहेत. समुद्रमंथन नावाचा एक तीन अंकी समवकार वत्सराजाने लिहिला आहे. अमृतमंथन नामक एका समवकाराचा प्रयोग झाल्याचा नाट्यशास्त्राच्या चौथ्या अध्यायात उल्लेख आहे. [ सं. ना. सौं. ]

**समस्तहोम** जयहोम, अभ्यातानहोम आणि राष्ट्रभृद्धोम हे तीन्ही एकाच वेळी करणे, याला समस्तहोम असे म्हटले आहे. समस्त होम करण्यासंबंधी तैत्ति. संहितेत (३.४.६) अप्रत्यक्षपणे विधान आहे. बौधायन सूत्रांत (१४. १६) समस्तहोमाचे विधान असून अभ्यातान, जय आणि राष्ट्रभृत् असा या होमाचा क्रम तिथे सांगितला आहे. तैत्तिरीय शाखेच्या आपस्तंबादी इतर सूत्रांमध्येही समस्तहोमाचे विधान आहे. गृह्यकर्मांच्या अनुषंगानेही समस्तहोम करायला सांगितला आहे. प्रधानयागाच्या नंतर स्विष्टकृद् यागापूर्वी जय, अभ्यातान व राष्ट्रभृत् होम करावा, असे सत्याषाढ सूत्रात (१९.१.५०) सांगितले आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**समस्य होम** गृहस्थाने गृह्याग्नी ठेवून रोज सकाळ संध्याकाळ होम करायचा असतो. पण सायंप्रातर्होम सायंकाळीच एकसमयावच्छेदाने करणे, याला समस्य होम असे नाव आहे. [ ध. सिं. तृ. प. ]

**समस्यापूर्ती** मनोविनोदनाचा एक प्राचीन प्रकार. जेव्हा संस्कृत भाषेचे अध्ययन सर्वत्र होत होते, तेव्हा चार जाणकार मंडळी एकत्र जमली की संस्कृत काव्याच्या आधारे कूटे, प्रहेलिका, अर्थगोपन, समस्यापूर्ती अशा अनेक प्रकारे स्वतःचे मनोरंजन करीत. त्यात त्यांच्या बुद्धीलाही चालना मिळे. समस्यापूर्ती हा त्यांतला एक बुद्धीला चालना देणारा विशेष प्रकार होय.

कोणीतरी काहीसा असंबद्ध, असंभवनीय अर्थाचा आणि चमत्कारिक असा एक चरण रचून तो कविजनांपुढे टाकायचा. याला म्हणायचे समस्या. मग चतुर कवींने तिच्यातील असंबद्ध अर्थाला सुसंबद्ध करतील असे तीन चरण स्वतः रचून व तो चौथा चरण त्यांना जोडून समस्यापूर्ती करायची. उदा.

**ओतुना भक्षितः शिवः ।**

अर्थ – बोक्याने शिवाला खाल्ले.

शिव हा आदि देव आणि महादेव. त्याला बोका कसा खाऊ शकेल ? पण समस्या तर आली. अर्थात् ती सोडवण्यासाठीही एक चतुर कवी पुढे आलाच. तो म्हणाला–

**नवनीतमयं लिङ्गं पूजार्थं केनचित् कृतम् ।**
**पूजकस्य प्रमादेन ओतुना भक्षितः शिवः ।।**

भावार्थ – कोण्या एका शिवपूजकाने पूजेसाठी लोण्याचे शिवलिंग बनवले. पण कोणत्या तरी कारणासाठी तो त्या लिंगापासून दूर गेला. एक बोका तिथे टपलेला होताच. त्याने त्या लिंगावर झडप घातली आणि ते मटकावून टाकले.

समस्येचे दुसरे एक प्रसिद्ध आणि वेगळ्या जातीचे उदाहरण म्हणजे–

**तक्रं शक्रस्य दुर्लभम् ।**

अर्थ – इंद्राला ताक दुर्लभ.

कसे शक्य आहे हे ? इंद्र तर स्वर्गाचा राजा. अष्टैश्वर्यांचा धनी. त्याला ताक का मिळणार नाही ? म्हणून कवीला या समस्येची पूर्ती वेगळी रीत अवलंबून करावी लागली ती अशी–

**भोजनान्ते च किं पेयं जयन्तः कस्य वै सुतः ।**
**कथं विष्णुपदं प्रोक्तं तक्रं शक्रस्य दुर्लभम् ।।**

अर्थ – भोजनाच्या शेवटी काय प्यावे ? 'तक्रम्' = ताक. जयंत हा कोणाचा मुलगा ? 'शक्रस्य' = इंद्राचा. आणि विष्णुपद अर्थात् विष्णुलोक मिळवणे हे कसे म्हटले आहे ? 'दुर्लभम्' = मोठ्या कष्टाने प्राप्त होणारे. हे सर्व मिळून 'तक्रं शक्रस्य दुर्लभम्'. (झाली समस्यापूर्ती).

या समस्यापूर्तीच्या करमणुकीत रसिक राजेही भाग घेत असत व समस्यापूर्ती करणाऱ्या कवीला बक्षीसही देत असत. स्कंदपुराणाच्या उत्तर खंडात खड्गबाहूची कथा आली आहे. तो राजा एका समस्यापूरक कवीवर इतका खूष झाला, की त्याने आपला एक हत्तीच कवीला बक्षीस देऊन टाकला. आता त्या कंगाल कवीने तो हत्ती पोसायचा कसा? शेवटी त्याने तो शंभर रुपयांना दुसऱ्या राजाला विकून टाकला. (१९१.१४-१५)

वात्स्यायनाने कामसूत्रात समस्यापूर्ती ही एक कला मानलेली आहे (१.३.१६) [ सं. सा. वि.; प्रा. भा. क. वि. ]

**समाज** एक प्राचीन उत्सव. समन हे याचे मूळ रूप होय. आर्यावर्तात आर्य लोकांच्या वसाहती सर्वत्र स्थापन झाल्या व त्यांना स्थैर्य लाभले, तेव्हा त्यांच्या आचार-संहितेत बदल होऊ लागला. धर्मसूत्रकालापर्यंत समन हा उत्सव लोकप्रिय होता. पण त्यात अनाचाराचे प्रमाण वाढले होते. वरिष्ठ वर्गातील स्त्रीपुरुषांना तो उत्सव नकोसा वाटू लागला. तथापि त्यांना मनोरंजनासाठी वेगळा काही कार्यक्रम आवश्यक वाटत होता. म्हणून त्यांनी तो उत्सव वेगळ्या स्वरूपात चालू ठेवला व त्याला 'समाज' हे नाव दिले. मात्र स्नातकांनी त्या उत्सवात भाग घेऊ नये, असे आपस्तंब व वसिष्ठ यांनी म्हटले आहे.

रामायणात या उत्सवाचे उल्लेख आहेत. अयोध्येत हा उत्सव साजरा केला जात असे आणि प्रतिष्ठित स्त्रीपुरुष त्यात भाग घेत असत. त्या उत्सवात नाटके, खेळ, नाचगाणी होत आणि लोक त्यांतून आनंद मिळवीत. महाभारतकालातही हा उत्सव लोकप्रिय होता. वारणावत नगरातील या उत्सवाचे वर्णन महाभारतात केलेले आहे. त्यात राजे व सामान्य जन या सर्वांनी भाग घेतला होता. 'समाज' म्हणजे आनंदी संमेलन होय, असे पतंजलीने म्हटले आहे. त्यात संगीत, नृत्य व नाट्य यांचे प्रयोग होत असत.

बौद्ध साहित्यात या उत्सवाला समज्जा हे नाव दिलेले आढळते. त्याचे स्वरूप मात्र तेच होते. त्यात विविध प्रकारचे कार्यक्रम केले जात असत. नृत्य, संगीत, नाट्य या बरोबरच पोवाडे, हत्तींच्या साठमाऱ्या, घोड्यांच्या शर्यती, बकऱ्यांच्या टकरा, कोंबड्यांची झुंज, लाठीयुद्ध याही गोष्टी होत असत. हे कार्यक्रम फार लोकप्रिय असून, खूप मोठ्या प्रमाणावर केले जात होते. ते सात दिवस चालत. त्यात मद्यपानही खूप होत असे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात समाज या उत्सवाचे असेच वर्णन आहे. त्या उत्सवात मद्यपानावर निर्बंध नव्हते. पण मद्य व मांस यांचा अतिरेक झाल्यामुळे मौर्य सम्राट अशोक याने त्यावर बंधन घातले, असे त्याच्या पहिल्या शिलालेखावरून दिसते. त्याचा हिंसेला विरोध होता. अन्य कार्यक्रमांना तो प्रोत्साहन देत असे.

हा उत्सव अनेक शतके चालू होता. राजे लोकही प्रजेसाठी या उत्सवाची व्यवस्था करीत असत. [ सौंदर्याच्या शोधात – श्री. बालकृष्ण दाभाडे, १९७१ ].

**समादेवी** ओडिसा प्रदेशातील संबळपूर जिल्ह्यात उडिया सांजिया नावाची एक जमात आहे, त्या जमातीची देवी. हिच्याविषयी एक आख्यायिका प्रचलित आहे, ती अशी– या जमातीतील एका सुंदर तरुणीवर द्रुग येथील राजाची दृष्टी पडली आणि त्याने तिच्या प्राप्तीसाठी खूप प्रयत्न केले. ती तरुणी विवाहित असल्यामुळे जमातीने राजाला प्रखर प्रतिकार केला व शेवटी स्थलांतरही केले. तरीही राजाने त्या तरुणीचा नाद सोडला नाही. शेवटी वैतागून तिने अग्निप्रवेश केला. त्यामुळे तिला मानाचे स्थान व देवत्व प्राप्त झाले. उडिया गीतांमध्ये ही कथा आहे.

बेळगाव येथे या देवीचे एक मंदिर आहे. नार्वेकर वैश्य जातीची ही प्रमुख देवता आहे. [ दे. को. ३ ]

**समाधी** अष्टांग योगातली शेवटची पायरी. समाधी शब्द संस्कृतात पुंलिंगी आहे; पण मराठीत तो स्त्रीलिंगीच रूढ आहे. समाधीची व्याख्या अशी –

**तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधि : ।**

(पातं. यो. सू. ३.३)

भावार्थ– भाव्य वस्तूव्यतिरिक्त दुसरा कोणताही अर्थ भासमान न होता केवळ ती भाव्य वस्तूच भासमान होणे, ही त्या भाव्य वस्तूची अर्थमात्र निर्भासता म्हणजे समाधी होय.

याचे स्पष्टीकरण श्री. कोल्हटकर यांनी केले आहे, ते असे – चित्ताची भाव्य वस्तूशी इतकी तन्मयता होणे, की अमुक भाव्य वस्तूचे ध्यान मी करीत आहे, असे स्फुरण न होणे ही त्याची स्वरूपशून्यता होय. ध्येय अशा रीतीने केवळ अर्थरूपानेच तेवढे भासमान होणे आणि त्याच्या स्वरूपाचेही अनुसंधान न होणे हीच समाधी होय.

ध्यानाची पुढची अवस्था म्हणजे समाधी. ध्यान जेव्हा ध्येयस्वरूप होऊन त्याला अन्य पदार्थाचे निराळे ज्ञान काहीच राहत नाही, अशा अवस्थेला समाधी म्हणावे. समाधीत देशालंबन सुटते आणि अर्थमात्राचाच एकाकार प्रत्यय येतो. त्याचप्रमाणे योगात येणारे विक्षेप म्हणजे अडथळे ते सर्व दूर होऊन चित्ताची एकाग्रता साधते. हाच आशय वेगळ्या शब्दांत विद्यारण्यस्वामींनी सांगितला आहे. तो असा –

**ध्यातृध्याने परित्यज्य क्रमाद् ध्येयैकगोचरम् ।**

निवातदीपवच्चित्तं समाधिरभिधीयते ॥

(पंचदशी १.५५)

अर्थ – ज्या वेळी ध्याता, ध्यान व ध्येय या त्रिपुटीपैकी क्रमाने ध्याता व ध्यान या जोडीचा लोप होऊन केवळ एका ध्येयावरच चित्त एकाग्र होऊन निर्वातस्थानी असलेल्या दीपाप्रमाणे निश्चल होते, तेव्हा तिला समाधी म्हणतात.

समाधीचे मुख्यत्वे दोन भेद आहेत – (१) संप्रज्ञात व (२) असंप्रज्ञात.

**संप्रज्ञात समाधी** – या समाधीमध्ये भाव्य पदार्थाविषयी संशय किंवा खोटे ज्ञान न राहता त्या भाव्य पदार्थाचे स्वरूप उत्तम प्रकारे समजते. या समाधीत चित्त वृत्तिरहित होत नाही तर ध्येयाविषयी वृत्ती तशीच कायम राहते, म्हणून तिला सबीज समाधी असेही म्हणतात.

संप्रज्ञात समाधीचे चार भेद होतात, ते असे –

(१) सवितर्क – ज्याचे चिंतन करायचे, त्याला भाव्य म्हणतात. ते दोन प्रकारचे असते – ईश्वर आणि तत्त्वे. तत्त्वे जड आणि चेतन अशी दोन प्रकारची असतात. जड तत्त्वे चोवीस आहेत आणि चेतन तत्त्व एकच आहे व ते म्हणजे पुरुष. पुरुष अनंत आहेत. सवितर्कात पंचमहाभूते व इंद्रिये हे स्थूल विषय ध्यानाला आलंबन म्हणून असतात.

(२) सविचार – पंचतन्मात्रे, अंतःकरण, इ. सूक्ष्म विषयांचा आश्रय करून देश, काल व धर्म यांच्याविषयी जेव्हा भावना चालते, तेव्हा त्या समाधीला सविचार म्हणतात. तसेच जेव्हा देशादिकांचा विचार उत्पन्न न होता केवळ धर्माविषयी भावना चालते, तेव्हा तिला निर्विचार समाधी म्हणतात.

(३) सानंद – ज्या वेळी रज-तमांच्या क्लेशांनी मुक्त झालेल्या बुद्धितत्त्वाची भावना चालते, तेव्हा तिची शक्ती गौण ठरून सुखोत्पादक सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो. अशा वेळी जो आनंदाचा आविर्भाव होतो, त्याला सानंद समाधी म्हणतात.

(४) सास्मित समाधी – रज-तमांचा लेशही न राहता सत्त्वगुण हा ध्यानाचा आश्रय होऊन जी भावना चालते, तिच्यातील सत्त्वगुण हळूहळू दुर्बल होत जाऊन चितिशक्तीचे प्राबल्य होते, अशा वेळी 'अहं सुखरूपः अस्मि' यातील फक्त 'अस्मि'चे भान होते. म्हणून या अवस्थेला सास्मित समाधी असे म्हणतात.

**असंप्रज्ञात समाधी** – सर्व वृत्तींचा लय होऊन केवळ संस्कार शिल्लक राहणे, असा जो चित्ताचा निरोध त्याला असंप्रज्ञात समाधी असे नाव आहे. श्रेष्ठ दर्जाच्या वैराग्याचा सतत अभ्यास हे या समाधीचे साधन आहे. श्रेष्ठ वैराग्यात चिंतनीय वस्तू नसते व समाधीत भाव्य वस्तू नसते. या अवस्थेत वैराग्य आणि अभ्यास यांनी चित्त निर्विषय होऊन ते वृत्तिरूप कोणतेही कार्य न करता मृतवत पडून राहते. संसाराचे बीजभूत असलेले जे संस्कार तेच अशा प्रकारे नष्ट झाल्यामुळे या अवस्थेला निर्बीज समाधी असेही म्हणतात.

असंप्रज्ञात समाधीची योग्यता फार मोठी आहे. या स्थितीत गेल्यावर पुनर्जन्म प्राप्त होत नाही.

असंप्रज्ञातसमाधीचेही उपायप्रत्यय व भवप्रत्यय असे दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार या लोकी व याच जन्मी साध्य होतो. दुसऱ्या प्रकारात अविद्या हे कारण सुटले नाही, तर साधकाला केवळ देवत्व प्राप्त होते. पण मुक्ती मिळत नाही (पातं. यो. सू. १.१९-२०).

असंप्रज्ञात समाधीला भगवान पतंजलींनी धर्ममेघ समाधी असे म्हटले आहे. विवेक जागृतीने होणाऱ्या ज्ञानाची प्राप्ती झाल्यानंतरही जो फलेच्छेचा त्याग करील, त्याला धर्ममेघ समाधीची प्राप्ती होईल (पातं. यो. सू. ४.२९). विद्यारण्यस्वामींनी हिचे वर्णन वेगळ्या प्रकारे केले आहे, ते असे –

धर्ममेघमिमं प्राहुः समाधिं योगवित्तमाः ।
वर्षत्येष यतो धर्मामृतधाराः सहस्रशः ॥

(पंचदशी १.६०)

अर्थ – या समाधीला श्रेष्ठ योगीजन धर्ममेघ असे म्हणतात. कारण या अवस्थेत तो योगी धर्मरूपी अमृताच्या हजारो धारा बरसत असतो.

समाधीचे सविकल्प व निर्विकल्प असेही दोन प्रकार मानतात. चित्तात जोवर ध्याता, ध्यान व ध्येय या त्रिपुटीचे स्फुरण होत राहते, तोवर त्या अवस्थेला सविकल्प समाधी म्हणतात. निर्विकल्प समाधीत मन हे मनपणालाच विसरलेले असते. अशी समाधी मुख्य साध्य असून, ती फलस्वरूप असते.

समाधिदशेचे वर्णन अनेक संतांनी आणि आचार्यांनी केले आहे. अखंड ब्रह्माकार होणे व प्राण, मन, इत्यादींचा आत्मस्वरूपी लय करणे म्हणजे समाधी हे त्यावरून कळते. या अवस्थेतला आनंद अत्यंत उच्च असून, तो अखंड व एकरस असतो. या आनंदाचे स्वानुभवात्मक वर्णन स्वामी विवेकानंदांनी केले आहे, ते असे –

"समाधी ही आपल्या अस्तित्वाची अत्युच्च दशा होय. या ठिकाणी 'मी आहे' इतकीच केवळ भावना शिल्लक उरलेली असते. 'मी अमुक', 'मी मोठा' इत्यादी प्रकारची गुणोपाधियुक्त भावना तेथे उत्पन्नच होत नाही. यामुळे शोकमोहादी विकारही तेथे पोहोचू शकत नाहीत; या विकारांच्या अभावी कोणत्याही प्रकारची इच्छा उद्भवणे शक्य नाही. हेच शुद्ध आनंदाचे स्थान. कसल्यातरी प्रकारची इच्छा अथवा आसक्ती चित्तात शिल्लक आहे, तोपर्यंत निरामय आनंदाची प्राप्ती कधीही होणार नाही. केवल स्वरूपात स्थिर राहून साक्षित्वाने सर्व विश्वगत

[मनु]ष्यांचे निरीक्षण करण्याजोगी अवस्था जेव्हा आपण प्राप्त करून [घेऊं], तेव्हाच खरा आनंद आपणांस उपभोगावयास सापडेल. [पशूं]चा आनंद इन्द्रियतृप्तीत असतो, मनुष्याचा आनंद बुद्धिगत [असतो] आणि परमेश्वराचा आनंद साक्षित्वात असतो. आनंदाच्या [ह्या] निरनिराळ्या पायऱ्या आहेत. मनुष्यत्व सोडून ईश्वरत्व पावणे [हे] आपले अंतिम साध्य आहे. याकरिता बुद्धिगत आनंदाचा त्याग [करून] साक्षित्वाचा आनंद प्राप्त करून घेणे ,यातच आपले खरे [मनु]ष्यपण आहे." (स्वा. वि. ग्रं. २ रा खंड पृ. १११)

बौद्धांच्या ध्यानयोगातही समाधीला स्थान आहे. बुद्धघोष आपल्या विसुद्धिमग्ग या ग्रंथात समाधीची व्याख्या करतो, ती [अशी] — एकाच आलंबनावर मन व मानसिक व्यापार यांना [सम]ान व सम्यक रूपाने लावणे म्हणजे समाधी होय.

उपचार व अर्पणा अशा दोन प्रकारच्या समाधी बौद्धांनी मानल्या आहेत.

**हठयोगातली समाधी** — याविषयी श्री. खानविलकर यांनी [जे] विवेचन केले आहे, त्याचा सारांश असा —

हठयोगी लोक आसन, प्राणायाम, इ. साधनांनी शरीराला [विशि]ष्ट सवयी लावून घेतात. नानाविध प्रक्रियांनी शरीर शुद्ध [केल्]याने, खेचरी मुद्रेचा बराच काल अभ्यास केल्याने, विशिष्ट [प्रका]रचा आहार केल्याने, विवक्षित वनस्पतींचा काढा घेतल्याने, [का]ही मुद्रा व बंध साधल्याने त्यांना तात्पुरता प्राणजय साध्य [हो]तो. मग अशी समाधी लावणे त्यांना कठिण पडत नाही.

राजयोगातली समाधी ही मनोजय केल्याने आणि अखंड [ध्]यानावस्थेच्या योगाने प्राप्त होणारी वस्तू असते. ती अवस्था [अ]त्यंत आणि अखंड आनंदरूप असते. या अवस्थेचा हठयोग्यांच्या [स]माधीशी सुतराम संबंध नसतो. हठयोग्यांच्या समाधीत-आशा, [तृ]ष्णा, वासना, इत्यादींचा क्षय होत नाही. ही चित्समाधी नसून [जड]समाधी असते.

हठयोग्यांना अशी समाधी घेण्याच्या अगोदर महिना महिना [त्या] समाधीसाठी सिद्ध व्हावे लागते. समाधी घेणाऱ्या माणसाला [आ]पली आतडी, मूत्रमार्ग, इ. शुद्ध करावे लागतात. बरेच दिवस [उ]पवास करावा लागतो. समाधीची जागा पक्क्या विटांनी चांगली [बां]धून काढावी लागते. त्या जागेवर बेल, तुळशी, निर्गुंडी अशा [व]नस्पतींचा पाला आणून त्यावर आसन घालावे लागते. कारण [अ]शा वनस्पतींच्या पानातून प्राणवायू उत्पन्न होतो, असे म्हण-[ता]त. सिद्धासनात बसून, जिभेचा शेंडा घशात घालून कान, नाक, [डो]ळे मेणाने बंद करावे लागतात. सिद्धासनात गुद व मूत्रद्वार [आ]पोआप बंद होतेच. कोणताही उपसर्ग होऊ नये म्हणून पूर्ण [द]क्षता घ्यावी लागते. इतकेच नव्हे तर पूर्ण काळजी घेऊनही जर [स]माधीच्या जागेत मूत्रोत्सर्गादी क्रिया करणे भाग पडले तर अत्यंत घातुक परिणाम होतात व प्रसंगी मृत्यूसुद्धा येतो. इतके झाले तरीही वासनेचे बीज शिल्लक राहतेच. अशा समाधी लावणाऱ्या माणसांच्या आणि सामान्य माणसांच्या मनोवृत्तीत वासनादिकांच्या दृष्टीने काहीच फरक आढळत नाही. [ योगविद्या ]

**समाराधना** कुलदेवता, इष्टदेवता किंवा ग्रामदेवता यांच्या प्रीत्यर्थ अनेक ब्राह्मणांना भोजन घालतात, त्याला समाराधना असे म्हणतात. ग्रामदेवतेच्या समाराधनेत मात्र केवळ ब्राह्मणांनाच नव्हे, तर गावातल्या प्रत्येक घरातील एका तरी माणसास जेवायला मिळते.

**समावर्तन** एक विद्यासंस्कार. वेदाध्ययन संपवून ब्रह्मचारी गुरुगृहातून स्वगृही परत जायला निघाला म्हणजे हा संस्कार करीत. गौतम, आपस्तंब, याज्ञवल्क्य, इ. सूत्रकार याला स्नान म्हणतात. कित्येक मानवशास्त्रज्ञांच्या मते या स्नानाचे प्रयोजन ब्रह्मचाऱ्याला दिव्य शक्तीपासून दूर करणे, असे होते. ब्रह्मचर्याच्या अवधीत तो दिव्य संपत्तीत वास करीत असतो. तो संपर्क दूर केल्यावाचून त्याला सामान्य जीवनात आणल्यास ते दिव्य गुण कलंकित होतील व ब्रह्मचारी दैवी कोपाला पात्र होईल, अशीही समजूत होती. प्राचीन भारतीय आचार्य ब्रह्मचर्याच्या दीर्घ अवधीला एक दीर्घ सत्र समजत. म्हणून यज्ञाच्या अंती यजमानाला जसे अवभृथस्नान आवश्यक, तसेच ते ब्रह्मचर्यरूपी सत्राच्या अंती ब्रह्मचाऱ्यालाही आवश्यक मानीत. मनूने स्नान व समावर्तन या दोन्ही संज्ञा उपयोजिल्या आहेत. अपरार्क सांगतो, की स्नान हे ब्रह्मचर्यसमाप्तीचे द्योतक आहे. ज्याला आजन्म ब्रह्मचारी राहायचे असेल, त्याला या संस्काराची आवश्यकता नाही. ज्याने पित्याच्याच घरी अध्ययन केले असेल, त्यालाही स्नानाची आवश्यकता नाही. कारण त्या ठिकाणी समावर्तन म्हणजे गुरुगृहातून परत येणे नसते.

समावर्तन हा लग्नापूर्वी त्रैवर्णिकांनी करायचा एक आवश्यक संस्कार असल्याचे समजले जाते. पण प्राचीन काळी ज्यांचे वेदाध्ययन पूर्ण झाले आहे अशांचेच समावर्तन केले जाई. या बाबतीत मानव गृह्यसूत्रकार स्पष्टच म्हणतो. (१.२.३) 'संपूर्ण वेदच मुखोद्‌गत केल्याने समावर्तनाची पात्रता येत नाही. वेदाचा अर्थ सांगण्याइतकी विद्वत्ता ब्रह्मचाऱ्याचे अंगी आली असेल, तरच त्याचे समावर्तन करावे' जेव्हा उपनयन हा एक आवश्यक असा शारीरिक संस्कार मानला जाऊ लागला, तेव्हाच समावर्तन हे विवाहापूर्वी करायचा एक आवश्यक संस्कार बनले.

ज्याचे विधिपूर्वक स्नान अर्थात समावर्तन झाले, त्याला स्नातक असे म्हणतात. समावर्तनानंतर विवाह होईपर्यंतच्या

काळापुरतीच ही स्नातकावस्था असते. पारस्कर गृह्यसूत्रात (२.५) स्नातकाचे तीन प्रकार सांगितले आहेत, ते असे –

(१) विद्यास्नातक – वेदाध्ययन समाप्त करून, पण ब्रह्मचर्यव्रताचे पालन न करता जो समावर्तन करतो, तो.

(२) व्रतस्नातक – ब्रह्मचर्यव्रते पाळून, पण वेदाध्ययन न करता जो समावर्तन करतो, तो. व

(३) विद्याव्रतस्नातक – व्रते आणि वेदाध्ययन समाप्त करून समावर्तन करतो, तो.

**समावर्तनाची दिनशुद्धी**– उत्तरायण, शुक्लपक्ष, तसेच रोहिणी, मृगशीर्ष, पुष्य, उत्तरा, हस्त, चित्रा व विशाखा ही नक्षत्रे, अशा दिनशुद्धीवर समावर्तन संस्कार करावा, असे सांगितले आहे.

**समावर्तनाचा विधी** – आश्वलायन गृह्यसूत्रात समावर्तनाचा विधी पुढीलप्रमाणे सांगितला आहे – गुरुगृहातून परत स्वगृही जाऊ इच्छिणाऱ्या ब्रह्मचाऱ्याने प्रथम रत्ने, कर्णभूषणे, दोन वस्त्रे, छत्री, जोडे, दंड, माला, उटणे, विलेपन, काजळ, पागोटे या सर्व वस्तू आचार्यासाठी व स्वतःसाठी तयार ठेवाव्या. एवढी ऐपत नसेल, तर त्या गुरूकरताच घ्याव्या. यज्ञीय वृक्षाची ईशान्येकडील समिधा तोडून आणावी. वैभव आणि तेज यांची इच्छा करणाऱ्याने समिधा वाळलेली घ्यावी. दोन्ही इच्छिणाऱ्याने ती अर्धी ओली व अर्धी वाळलेली घ्यावी. ती जमिनीवर न ठेवता उंच जागी ठेवावी. ब्राह्मणांना अन्नदान व गोप्रदान द्यावे. गोदानविधीप्रमाणे सर्व विधी करावे. त्यातले मंत्र स्वतःला उद्देशून म्हणावे. उदा० 'ओषधे त्रायस्व एनम्'. यातील 'एनम्' जागी 'माम्' असे पद घालावे. उटण्याने अंगमर्दन करावे. कोमट पाण्याने स्नान करावे. दोन वस्त्रे परिधान करावी. 'माझ्या डोळ्यांचे संरक्षण कर' अशा अर्थाच्या मंत्राने डोळ्यांत काजळ घालावे. कर्णभूषणे घालावी. केशरी गंध लावावे. गळ्यात पुष्पमाळा घालावी. 'तुम्ही देवाचे आधार आहा. माझे सर्व बाजूंनी रक्षण करा.' या अर्थाच्या मंत्राने जोडे पायात घालावे. छत्री, दंड व रत्न धारण करावे. डोक्यावर पागोटे घालून उभ्याने अग्नीत एक समिधा टाकावी. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातील १२४ व्या सूक्ताचा प्रत्येक मंत्र म्हणून अग्नीत एकेक समिधा टाकावी.

थोडयाफार फरकाने इतर गृह्यसूत्रांतला विधी असाच आहे. ब्रह्मचाऱ्याने समावर्तनाच्या दिवशी एका बंद खोलीत बसून राहावे व दुपारी बाहेर येऊन गुरूची पूजा व होम करावा, असे भारद्वाज सांगतो. स्नातकाने दिवसभर मौन धरून सूर्यप्रकाशापासून दूर राहावे व नक्षत्रे उगवल्यावर दिशा, नक्षत्रे व चंद्र यांची प्रार्थना करावी, असे गोभिल सांगतो. ब्रह्मचाऱ्याला बैलाच्या कातडयावर बसवावे, असे शांखायन म्हणतो. आणि ब्रह्मचाऱ्याने उगवत्या सूर्याची पूजा करून मुंजमेखला सोडून टाकावी, असे पारस्कर सांगतो. महाराष्ट्रात असाच विधी आहे. म्हणून त्याला सोडमुंज असे नाव पडले आहे.

ब्रह्मचर्यावस्थेत असताना जे सपिंड मृत झाले असतील, त्यांच्या उद्देशाने समावर्तन झाल्यावर स्नातकाने तिलांजली द्यावी व तीन दिवस अतिक्रान्ताशौच धरावे, असे संस्कार-कौस्तुभात सांगितले आहे.

प्राचीन काळी ब्रह्मचारी जीवनाची समाप्ती हा विद्यार्थ्यांच्या आयुष्यातला एक महत्त्वाचा प्रसंग असे. या वेळी विद्यार्थ्याला जीवनाच्या दोन मार्गांपैकी एका कुठल्यातरी मार्गाची निवड करावी लागे. त्यांपैकी एक प्रवृत्तिमार्ग होय. या मार्गात विवाह करून संसाराची संपूर्ण जबाबदारी स्वीकारायची असे. दुसरा निवृत्तिमार्ग होय. या मार्गात समस्त सांसारिक उपाधींपासून दूर राहून, शारीरिक व मानसिक तपस्या करीत जीवन सार्थक करावे लागे. जे विद्यार्थी पहिला मार्ग स्वीकारीत, त्यांना उपकुर्वाण म्हणत व जे दुसरा मार्ग पत्करीत, त्यांना नैष्ठिक म्हणत.

**आचार्यांची अनुमती** – समावर्तनापूर्वीचे एक महत्त्वपूर्ण कर्म म्हणजे गुरूला दक्षिणा देणे व पुढच्या वैवाहिक जीवनासाठी आचार्यांची अनुमती मिळवणे हे होय. गुरूची अनुमती हे विवाहासाठी प्रशस्तिपत्रकच समजले जाई. गुरूला भूमी, सोने, गाय, अश्व, छत्र, पादत्राण, वस्त्र, फल आणि वनस्पती दक्षिणा म्हणून द्यावी, असे मनूने सांगितले आहे (२.२४६). अशा वेळी विद्यार्थी आपापल्या कुवतीप्रमाणे गुरूला काहीना काही गुरुदक्षिणा दिल्यावाचून राहत नसत. कारण त्यापूर्वी गुरूने विद्यार्थ्यांकडून काहीही शुल्क घेतलेले नसे.

समावर्तन झाल्यावर गुरू आपल्या शिष्याला मधुपर्काचे प्रदान करी. मग त्याला अलंकृत करून रथातून किंवा हत्तीवरून विद्वत्सभेत मिरवीत नेई आणि सभेला आपल्या शिष्याची एक विद्वान म्हणून ओळख करून देई. त्या काळी अशा विद्वान स्नातकाला फार मान मिळत असे. आश्वलायन गृह्यसूत्रात त्याला महद्भूतम् (= महान व्यक्ती) असे म्हटले आहे.

वेदाध्ययन कोणत्या वर्षी संपायचे हे प्रत्येकाच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून असे. म्हणूनच समावर्तनाचा संस्कार वयाच्या अमुकच वर्षी करावा, असा नियम कुठे आढळत नाही. सामान्यतः २० ते ४० वर्षांच्या अवधीत अध्ययन संपत असे. १६ व्या वर्षाच्या सुमारास जेव्हा त्याला दाढी येई, तेव्हा गोदान नामक संस्काराने त्याच्या दाढीचे वपन करीत.

जेव्हा बालविवाह समाजात रूढ होऊ लागले, तेव्हा गोदानाच्या वेळीच समावर्तनाचा संस्कार उरकून त्याचा विवाहमार्ग मोकळा करावा, अशी नवी विचारसरणी काही धर्मशास्त्रकारांनी

...कारली. सांप्रत तर उपनयनाच्या चौथ्या दिवशी, क्वचित ...ऱ्या दिवशीही बटूची सोडमुंज करून मोकळे होतात. [ हिं. ...; हिं. ध.; प्रा. भा. शि. प. ]

**समिती** राजसत्तेवर नियंत्रण ठेवणारी एक महान प्राचीन संस्था. आजच्या राज्यशास्त्रीय परिभाषेप्रमाणे समिती ही राष्ट्राच्या प्रतिनिधींची सभा होती. राजा नियुक्त करण्याचे व त्याला पदच्युत करून दुसऱ्या राजाला सिंहासनावर बसवण्याचे अधिकार तिला होते.

ही समिती विश्‌मधून म्हणजे लोकांमधून व्यापक प्रमाणावर निवडलेली असे. समितीच्या अधिवेशनात राजाला उपस्थित राहावे लागे. समितीत शांततेने वादविवाद होत आणि राज्यकारभारातल्या विविध प्रश्नांवर निर्णय घेतले जात. ते निर्णय राजावर बंधनकारक असत. समितीचा अवमान व क्षोभ राजाला घातक ठरत असे.

समितीत प्रत्येकाला मतस्वातंत्र्य असे. पण बहुमताने निर्णय घेतले जात. समितीच्या पतीला ईशान म्हणत असावे.

समितीत ग्रामणी, सूत, रथकार, कर्मकार यांचा समावेश होत असे. गाव हा समितीचा आधार होता. मात्र गावाचा प्रतिनिधी कसा निवडला जाई, ते कळत नाही.

समितीत लोकप्रतिनिधी विविध विषयांवर चर्चा करीत आणि राजकारणाव्यतिरिक्त अन्य विषयांचीही चर्चा तिथे चाले, हे छांदोग्योपनिषदातील एका कथेवरून दिसून येते. [ऋ. आ.; वैं. ना.; वे. रा. द.; प्रा. भा. – सां. अ.]

**समिधा** एक हविर्द्रव्य. कोणताही होम करण्यापूर्वी समिदाधान करणे अवश्य असते. समिधेवाचून होम करणे, हे होम न करण्यासारखेच आहे. पळस, खैर, पिंपळ, रुई, शमी, उंबर, आघाडा, दूर्वा व दर्भ यांच्या समिधा कराव्या, असे सांगितलेले आहे. समिधांची साल काढू नये. त्या सरळ, गुळगुळीत, मऊ, समान जाडीच्या व दहा किंवा बारा अंगुळे लांब असाव्या; तसेच त्या ओल्या, जून, अंगुलीइतक्या जाड व वर्तुळाकृती असाव्या. त्यांच्यावर ओरखडे नसावे व त्या किडलेल्या नसाव्या. अशा प्रकारच्या समिधांनी होम करणाऱ्याला विपुल संपत्ती मिळते. हवन करताना समिधा मूल व मध्य यांच्यामध्ये धरावी. मूळ धरून हवन केल्यास कर्मनाश होतो. मध्यभागी धरून हवन केल्यास पुत्रनाश होतो. अग्र धरून हवन केल्यास व्याधी जडतात. एका हाताने हवन केल्यास धनक्षय होतो. म्हणून उजव्या हाताने समिधेचे हवन करताना त्याला डाव्या हाताचा स्पर्श करावा, असे सांगितलेते आहे. [आचारेन्दुः]

**समिष्टयजू** इष्टी, पशुयाग व सोमयाग या तीनही यागांमध्ये हवनविषयक कर्म संपायच्या वेळी तुपाच्या तीन आहुती देतात. या आहुतींचा मंत्र पदबद्ध नसून, अनियताक्षरात्मक असतो. त्यामुळे त्या मंत्राच्या अनुरोधाने केलेल्या आहुति प्रक्षेपाला समिष्टयजू असे नाव आहे. [ म. ज्ञा. को. – वेदविद्या ]

**समुद्र** भारताचा दक्षिण भाग हे हिंदी महासागरात निमुळते होत गेलेले एक मोठे द्वीपकल्प आहे. या द्वीपकल्पाला सुमारे २५०० मैल लांबीचा समुद्रकिनारा लाभलेला आहे. त्यामुळे भारतीय लोकांच्या जीवनात समुद्राला फार महत्त्वाचे स्थान लाभले आहे. पुराणांत समुद्राला नद्यांप्रमाणेच पवित्र मानले आहे (वायु. पु. ७७.११७). पर्वकाळी समुद्रस्नान करणे हे अत्यंत पुण्यप्रद मानले जाते. त्यामुळे सप्तजन्माची पापे नष्ट होतात, अशी समजूत आहे. समुद्रकाठी संध्या केली असता शतपट पुण्य लागते असे म्हणतात. गर्भाधानाच्या विधीने समुद्राला आवाहन करतात, कारण त्यामुळे विघ्ने नष्ट होतात. श्रावण शुद्ध पौर्णिमा नारळी पौर्णिमा म्हणून प्रसिद्ध आहे. त्या दिवशी वरुणदेवतेप्रीत्यर्थ समुद्राची पूजा करून त्याला नारळ अर्पण करण्याची चाल आहे.

भारतीय लोकांना वेदपूर्वकालीन सिंधुसंस्कृतीच्या काळापासून समुद्र परिचित असावा, असे अनुमान केले जाते. गुजरातमध्ये खंबायतजवळ लोथल येथे सिंधुसंस्कृतीचे जे अवशेष सापडले आहेत, त्यांत गोदीचा एक बंधारा आहे. तिथे एक बंदर असावे, असे वाटते. आर्य लोकांना समुद्र माहीत नव्हता, असे काही पाश्चात्य विद्वानांचे मत होते. परंतु वेदांच्या सखोल अभ्यासामुळे आता असे निःसंदिग्धपणे सिद्ध झाले आहे, की आर्य लोक समुद्र व त्यांतील मोती, शंख, इ. वस्तूंशी परिचित होते. ते समुद्रावरून प्रवासही करीत होते आणि त्यांना नौकानयन चांगले माहीत होते.

जातकसाहित्यात समुद्रमार्गे दूरदूरच्या देशांशी व्यापार करणाऱ्या साहसी पुरुषांच्या अनेक कथा आहेत. त्याचप्रमाणे रामायण व महाभारत या ग्रंथांतही समुद्रप्रवासाचे उल्लेख आढळतात.

प्राचीन काळी भारतीय लोक समुद्रमार्गे परदेशांशी विविध वस्तूंचा व्यापार करीत होते. इ. स. च्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकात द. भारतातील पल्लव वंशातील कौंडिण्य नामक एक धाडसी पुरुष आपली जहाजे घेऊन पूर्वेकडे गेला. त्याने हिंदचीनच्या राणीचा पराभव केला व तिच्याशी विवाह केला. त्यानंतर असंख्य भारतीय लोक जावा, सुमात्रा, वगैरे देशांत जाऊन वसले व तिथे त्यांनी राज्ये स्थापली.

प्रसिद्ध चिनी प्रवासी फाहियान याने भारतीय जहाजातून श्रीलंका ते चीन हा प्रवास सुरक्षितपणे केला. पूर्वेकडील सागरावर भारतीय राजांचे वर्चस्व इ. स. च्या ११ व्या शतकापर्यंत अबाधित चालू होते. त्यानंतर द. भारतातील चोळ राजे आणि सुमात्रामधील श्रीविजयचे राजे यांचे सागरी युद्ध सुमारे शंभर वर्षे चालू राहिले. त्या युद्धात दोन्ही राजांची नौदले दुबळी झाली.

त्यानंतरही अनेक शतके भारतीय व्यापारी स्वतःच्या जहाजांतून परदेशांशी व्यापार करीत होते. पुढे पोर्तुगीज लोकांनी सागरावर प्रभुत्व मिळविले आणि भारताचा सागरी व्यापार परदेशी लोकांच्या हाती गेला. तथापि मराठेशाहीत काही काळ अरबी समुद्रावर मराठ्यांच्या आरमाराचे वर्चस्व निर्माण झाले होते.

मध्ययुगात समुद्रप्रवास निषिद्ध मानला गेला. द्विजाने समुद्रप्रवास केल्यास धर्मशास्त्रात त्याला प्रायश्चित्त सांगितलेले आहे आणि प्रायश्चित्त घेऊन तो पापमुक्त झाल्यावरही त्याला समाजात घेऊ नये, त्याच्यावर बहिष्कार टाकावा, असा दंडक सांगितला आहे. बौधायन आणि मनू यांनी समुद्रप्रवास करणे हे पाप मानले आहे (बौ. ध. सू. २.१.५१; मनु. ३.१५८, १६६–६७). पण समुद्रप्रवास ज्याने केला आहे अशा ब्राह्मणाला श्राद्धाला आमंत्रण देऊ नये, एवढाच दंडक मनूने घातला होता. त्याच्यावर बहिष्कार टाकावा, असे त्याने सांगितलेले नाही. तसेच मनूने केवळ ब्राह्मणांनाच समुद्रगमन निषिद्ध मानले होते, अन्य वर्णांना नाही. प्राचीन धर्मशास्त्रकारांनी शूद्रांना समुद्रप्रवास निषिद्ध मानला नव्हता. तथापि कलिवर्ज्यप्रकरणात समुद्रप्रवास निषिद्ध ठरवण्यात आला. मध्ययुगातील धर्मशास्त्रकारांना आपल्या बांधवांच्या पावित्र्याविषयी विशेष चिंता वाटू लागली होती: समुद्रप्रवासात व परदेशांत गेल्यानंतर हिंदू लोक परकीयांच्या संपर्कामुळे व जातीबाहेरच्या मनुष्यांशी अन्नोदक संबंध आल्यामुळे पतित होतील व जातिबाह्य ठरतील, म्हणून त्यांनी, समुद्रप्रवास करू नये, परदेशी जाऊ नये, असा निर्बंध घातला. मात्र पूर्वीचे साहसी व पराक्रमी हिंदू लोक अशा निर्बंधांना न जुमानता परदेशी जाऊन व्यापार करीत होते, राज्येही करीत होते. पण मध्ययुगातले लोक वरील निर्बंधांमुळे समुद्रप्रवास निषिद्ध मानू लागले. त्यामुळे त्यांचा व्यापार थांबला, परदेशातली राज्येही नामशेष झाली आणि त्यांच्या उत्कर्षाला पायबंद बसला.

गेल्या शतकात भारतावर इंग्रजांचे राज्य सुरू झाल्यानंतरदेखील धर्मशास्त्रातील समुद्रप्रवासनिषेध काही धर्मनिष्ठ लोक पाळीतच होते आणि परदेशी जाऊन आलेल्या व्यक्तींनी प्रायश्चित्त घ्यावे, असा आग्रह धरीत होते. पाहा – नौकानयन. [ हि. ध.; की. पॉ.; पी. थॉमस, इलस. विकली ऑफ इंडिया, ७ डिसेंबर १९५८; वै. सा. सं.; भारतीय संस्कृति ]

**समुद्रगुप्त** (इ. स. ३२० – ३८०) गुप्त राजवंशातला सर्वश्रेष्ठ सम्राट. चंद्रगुप्त (१ ला) व कुमारदेवी यांचा पुत्र. कुमारदेवी ही लिच्छवी राजकन्या होती. चंद्रगुप्ताने महाराजाधिराज ही पदवी धारण केली असली तरी, त्याचे राज्य लहान होते. गुप्त घराणे वैश्य वर्णाचे होते. लिच्छवी या पराक्रमी क्षत्रिय घराण्याशी विवाहसंबंध केल्यामुळे गुप्त घराण्याची प्रतिष्ठा वाढली असावी आणि सामर्थ्यदेखील वाढले असावे. समुद्रगुप्ताला आपल्या मातेच्या लिच्छवी कुळाचा खूप अभिमान वाटत होता.

समुद्रगुप्ताचा जन्म इ. स. ३२० च्या सुमारास झाला. चंद्रगुप्त (१ ला) इ. स. ३४० च्या सुमारास मरण पावल्यानंतर समुद्रगुप्त सिंहासनावर बसला.

चंद्रगुप्ताला आणखी काही पुत्र असावे. समुद्रगुप्त हा सर्वांत ज्येष्ठ पुत्र नव्हता. तरीही त्याचे कर्तृत्व पाहून चंद्रगुप्ताने त्यालाच युवराज नियुक्त केले. त्यामुळे त्याचे अन्य पुत्र असंतुष्ट झाले आणि त्यांनी समुद्रगुप्ताविरुद्ध उठावही केला. पण समुद्रगुप्ताने त्यांचा पराभव करून आपले सिंहासन स्थिर व सुरक्षित केले.

प्रयाग येथील अशोकस्तंभावर समुद्रगुप्ताची प्रशस्ती कोरलेली आहे. ही प्रशस्ती त्याचा महादंडनायक हरिषेण याने रचलेली आहे. त्या प्रशस्तीत समुद्रगुप्ताचे व्यक्तित्व आणि कर्तृत्व यांचे विस्तृत वर्णन केलेले आहे. त्याने जे महापराक्रम करून गुप्तांचे साम्राज्य स्थापले, त्यांचेही वर्णन प्रयागप्रशस्तीत आहे. त्या प्रशस्तीतच समुद्रगुप्ताच्या राजवटीची बहुतेक माहिती मिळते. मात्र त्याने केलेल्या युद्धांचा कालक्रम नीटपणे समजण्याचे कोणतेही साधन उपलब्ध नाही.

प्रयाग प्रशस्तीत समुद्रगुप्ताने शंभर युद्धांत प्रगट केलेल्या रण कौशल्याचे सुंदर वर्णन आहे. त्यावरून तो एक महान योद्धा होता, हे ध्यानात येते. इतिहासकार त्याला भारतीय नेपोलियन मानतात, याचे कारण हे की, त्याची सारी कारकीर्द दिग्विजय करण्यातच गेली. कौटिल्याच्या अर्थशास्त्रातली राजकीय तत्त्वे आत्मसात करून त्याने सतत आक्रमक धोरण स्वीकारले. प्रथम त्याने उत्तर भारतातील चंबळ नदीपर्यंतच्या प्रदेशातल्या अनेक राजांचा पराभव करून त्यांची राज्ये आपल्या राज्याला जोडली. पूर्वेकडील बंगाल, आसाम; उत्तरेकडील नेपाळ; आणि पश्चिमेकडील मालव, यौधेय, आर्जुनायन, मद्र, आभीर, इ. गणराज्ये समुद्रगुप्ताला आपण होऊन शरण आली आणि त्यांनी सम्राटाला खंडणी देण्याचे मान्य केले. समुद्रगुप्ताचा महान पराक्रम पाहून गुजरातमधील शक-क्षत्रप व अफगाणिस्तानातील कुशाण राजेही भयग्रस्त झाले आणि त्यांनी समुद्रगुप्ताशी मैत्रीचे प्रयत्न सुरू केले. मध्य

त्यानंतर समुद्रगुप्ताने दक्षिण दिग्विजय सुरू केला.

प्रदेशातील जंगली प्रदेश पार करून तो ओडिसात शिरला आणि बंगालच्या उपसागराच्या किनाऱ्याजवळ असलेल्या प्रदेशातून कांचीपर्यंत गेला. दक्षिण भारतातील बाराहून अधिक राजांचा त्याने युद्धांत पराजय करून त्यांना कैद केले होते. पण एवढ्या दूरच्या प्रदेशांवर स्वतःची सत्ता चालू ठेवणे अवघड आहे, हे जाणून त्याने त्या राजांना त्यांची राज्ये परत दिली ते गुप्त सम्राटाचे सामंत म्हणून राज्य करीत राहिले. हिंदी महासागरातील काही द्वीपेही समुद्रगुप्ताने जिंकली होती किंवा तिथले राजे त्याला शरण आले होते. त्यावरून समुद्रगुप्ताचे नौकादलही असावे, असे वाटते. मात्र त्यासंबंधी निश्चित पुरावा उपलब्ध नाही.

समुद्रगुप्ताच्या साम्राज्यात चार प्रकारचे प्रदेश होते – (१) मुख्य राज्य – उत्तरेला हिमालय, पश्चिमेला यमुना व चंबळ या नद्या, पूर्वेला ब्रह्मपुत्रा नदी आणि दक्षिणेला भिलसा व जबलपूर यांतून जाणारी रेषा या त्या राज्याच्या सीमा होत्या. सम्राट स्वतः त्या राज्यावर शासन करीत असे. मात्र राज्यपाल व अन्य उच्च अधिकारी प्रत्यक्ष कारभार करीत. (२) या राज्याच्या पूर्वेला व पश्चिमेला असलेली राज्ये व गणराज्ये गुप्त सम्राटाची सार्वभौम सत्ता मानीत होती. (३) शक व कुशाण यांची राज्ये– ही स्वतंत्र असली तरी गुप्तांची सत्ता मानीत होती. (४) द. भारतातील बारा राज्ये. समुद्रगुप्ताने तिथल्या राजांना जिंकून पुन्हा गादीवर बसवल्यामुळे ते गुप्तांच्या अंकित होते.

समुद्रगुप्त जसा शूर व कुशल योद्धा होता, तसाच राज्यशासनधुरंधरही होता. त्यामुळे तो एवढे साम्राज्य स्थापू शकला व त्याच्या उदार धोरणामुळे ते दीर्घ कालपर्यंत स्थिर राहिले. तो स्वतः कवी व संगीतज्ञ असून, त्याने अनेक पंडितांना आश्रय दिला होता. त्याला उत्तम व्यक्तिमत्त्व लाभले होते. प्रयागप्रशस्तीत केलेले हे सारे गुणवर्णन केवळ काल्पनिक नसून, खरे असावे, असे मानायला नाणी, आलेख इत्यादींचा आधार आहे.

गुप्त राजे ब्राह्मण धर्माचे अभिमानी होते. समुद्रगुप्ताने अश्वमेध यज्ञ करून प्राचीन वैदिक परंपरेचे पुनरुज्जीवन केले. तथापि तो अन्य धर्म-पंथांनाही उदारतेने साहाय्य करीत असे. श्रीलंकेच्या बौद्ध राजाला त्याने बोधगया येथे बौद्ध विहार बांधण्यास अनुमती दिली. लंकेतील बौद्ध भिक्षूंना बोधगयेत राहण्यासाठी योग्य स्थान नव्हते. म्हणून त्यांनी लंकाधिपती मेघवर्ण याच्याकडे मागणी केली आणि त्याने आपला राजदूत समुद्रगुप्ताकडे पाठवला. त्याने समुद्रगुप्ताला विपुल रत्नालंकार देऊन विहार बांधण्यासाठी अनुमती मागितली व समुद्रगुप्ताने ती दिली. अशा प्रकारे लंकेच्या राजावरही त्याने प्रभाव पाडला होता. बौद्ध पंडित वसुबंधूला त्याने आश्रय दिला होता.

या महापराक्रमी सम्राटाने विक्रमांक ही पदवी धारण केली होती. त्याची विविध प्रकारची सोन्याची नाणी उपलब्ध आहेत. समुद्रगुप्ताला अनेक राण्या होत्या. त्यांतील दत्तदेवी ही पट्टराणी होती. तिचा पुत्र चंद्रगुप्त हा समुद्रगुप्तानंतर सिंहासनावर बसला. समुद्रगुप्ताच्या राजवटीत भारतीय विद्या व कला यांचा विकास सुरू झाला, समृद्धी नांदू लागली आणि सुवर्णयुग सुरू झाले. [ समुद्रगुप्त – श्री. लल्लनजी गोपाल, १९६९; ए. इं.; हि. क. इं. पी.३; गु. सा. इ. ]



**समुद्रमंथन** एक महत्त्वाची पौराणिक कथा. ही कथा वैदिक साहित्यात आढळत नाही. पण रामायण, महाभारत आणि पुराणे या ग्रंथांत ती भिन्न भिन्न प्रकारे सांगितलेली आहे. अमृताच्या प्राप्तीसाठी देव-दानवांनी समुद्राचे मंथन केले, म्हणून त्याला अमृतमंथन असेही म्हणतात. ती कथा अशी–

एकदा देवेंद्र आपल्या हत्तीवर बसून चालला असता त्याला दुर्वास ऋषीने पाहिले आणि प्रसन्न होऊन आपल्या गळ्यातली दिव्य सुमनांची माला त्याला दिली. त्याने ती माला हत्तीच्या मस्तकावर ठेवली. पण ती खाली पडली व हत्तीच्या पायदळी तुडवली गेली. त्यामुळे दुर्वास ऋषी संतप्त झाला आणि त्याने इंद्राला शाप दिला, की 'तुझे वैभव व राज्य नष्ट होईल.' त्या शापामुळे इंद्राची व सर्व देवांची शक्ती नष्ट झाली. पुढे देवासुरांचा संग्राम झाला. त्यात देवांचा पराजय होऊ लागला. देवांच्या अंगी पुरेसे बळच न राहिल्यामुळे ते शतशः मृत्युमुखी पडू लागले. दानव मात्र मेले तरी शुक्राचार्यांच्या संजीवनी विद्येमुळे पुन्हा जिवंत होत. ते पाहून देवांना चिंता वाटू लागली. तेव्हा ते भगवान विष्णूला शरण गेले. श्रीविष्णूने त्यांना उपदेश केला, की 'तुम्ही दानवांशी तह करा आणि त्यांच्या साहाय्याने समुद्रमंथन करून अमृत मिळवा. मी त्या कामी तुम्हांला साहाय्य करीन. अमृत तुम्हांलाच मिळेल, दानवांना मिळणार नाही, अशी व्यवस्थाही मी करीन'.

मग देवेंद्र दानवांचा राजा बळी याच्याकडे गेला व त्याने अमृत प्राप्त करून घेण्याची कल्पना त्याला सांगितली. बळीने ती योजना मान्य केली. मग त्यांनी मंदर पर्वत उचलून समुद्रात उभा केला आणि तो घुसळण्यासाठी वासुकी नागाला दोरी होण्याची विनंती केली. तो तयार झाला. वासुकीची दोरी मंदर पर्वताभोवती गुंडाळून देवांनी वासुकीची शेपटी धरली आणि दानवांनी तोंड धरले. मग त्यांनी मंथन आरंभिले. पण पर्वताला खाली काही आधार नसल्यामुळे तो समुद्रात बुडू लागला. तेव्हा भगवान विष्णूने कासवाचे रूप घेऊन पर्वताला खाली आधार दिला. एका हाताने पर्वताच्या माथ्यालाही त्याने आधार दिला. मंदर पर्वतावर असंख्य वनस्पती व पशुपक्षी होते. ते सर्व समुद्र-

मंथन चालू झाल्यावर समुद्रात पडले. त्यांच्यापासून वारुणी उत्पन्न झाली. तिचे प्राशन केल्यामुळे देव-दैत्यांना समुद्रमंथन करण्यास अधिक उत्साह लाभला. वासुकीच्या मुखातून विषारी वायू बाहेर पडू लागल्यामुळे दानव होरपळू लागले. विष्णूने त्या वायूचे मेघांत रूपांतर केले व देवांवर पर्जन्यवृष्टी केली.

समुद्रमंथनामुळे समुद्रातील सर्व प्राणी खवळून गेले आणि त्यांच्यापासून उत्पन्न झालेले विष समुद्रातून वर आले. त्याला हालाहल असे नाव मिळाले. त्याच्या तीव्र प्रभावामुळे देव-दैत्य होरपळू लागले. तेव्हा ते सर्व मिळून शंकराला शरण गेले. शंकराने प्रसन्न होऊन ते विष प्राशन केले. त्या विषामुळे शंकराचा गळा निळा झाला व त्याला नीलकंठ हे नाव मिळाले.

त्यानंतर देव-दैत्यांनी समुद्रमंथन पुन्हा चालू केले. काही वेळाने कामधेनू ही गाय वर आली व ऋषींनी तिचा स्वीकार केला. नंतर उच्चैःश्रवा नामक शुभ्र घोडा बाहेर आला, तो बळिराजाने घेतला. घोड्यानंतर चार शुभ्र दात असलेला हत्ती वर आला, तो इंद्राला मिळाला. त्यानंतर कौस्तुभमणी मिळाला. तो श्रीविष्णूने घेतला. मग पारिजात हा कल्पवृक्ष बाहेर आला, तो देवांनी स्वर्गात नेला. त्यानंतर अप्सरा व नंतर आपल्या रूपकांतीने सर्वांचे मन आल्हादित करणारी लक्ष्मी समुद्रातून वर आली. सर्वांनी तिची पूजा केली. ती सर्वांनाच हवी होती. पण तिला मात्र सर्वगुणसंपन्न असा पुरुष हवा होता. म्हणून तिने स्वयंवर पद्धतीने श्रीविष्णूला वरले.

लक्ष्मीनंतर सुरा वर आली. दानवांनी तिचा स्वीकार केला. शेवटी अनेक भूषणांनी अलंकृत व रूपसंपन्न असा दिव्य पुरुष बाहेर आला. त्याचे नाव धन्वंतरी. तो विष्णूचा अंशावतार होता. त्याच्या हातात अमृतकुंभ होता. दैत्यांनी तो कुंभ हिसकावून घेतला, तेव्हा देव हतबुद्ध होऊन बघत राहिले. पण श्रीविष्णूने त्यांना धीर दिला.

दैत्यांनी अमृतकुंभ पळवला खरा; पण अमृताच्या वाटपाबद्दल त्यांच्यांत भांडण सुरू झाले. प्रत्येकजण 'मला आधी' 'मला आधी' करू लागला. इतक्यात विष्णूने अत्यंत सुंदर असे मोहिनीरूप घेतले. आणि ती मोहिनी दैत्यांसमोर प्रकट झाली. तिच्या अप्रतिम लावण्याने दैत्य मोहून गेले. त्यांनी अमृतकुंभ तिच्या हाती दिला व अमृताचे योग्य वाटप करायला तिला सांगितले. मग देव व दैत्य यांच्या दोन स्वतंत्र पंक्ती तिने करायला सांगितल्या. पंक्ती झाल्यावर मोहिनीने दैत्यांना आपल्या हास्य-कटाक्षांनी झुलवीत ठेवले व सर्व अमृत देवांना वाटले.

दैत्यांना अमृत मिळाले नाही, त्यामुळे ते खवळले व युद्धाला प्रवृत्त झाले. मग देव-दैत्यांचे घनघोर युद्ध झाले. त्यात दैत्यांनी सर्व सामर्थ्य पणाला लावले. देव अमर झाले असूनही दैत्यांच्या प्रखर आघातामुळे संत्रस्त झाले. तेव्हा विष्णू त्यांच्या साहाय्याला आला. मग दैत्यांची दैना झाली आणि देव विजयी झाले.

विवाहप्रसंगी, वधू-वरांचे मंगल करावे, असे आवाहन चौदा रत्नांना केले जाते, तो श्लोक असा--

> **लक्ष्मीः कौस्तुभपारिजातकसुराधन्वन्तरिश्चन्द्रमाः ।**
> **गावः कामदुधा सुरेश्वरगजो रम्भादिदेवाङ्गनाः ॥**
> **अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शङ्खोऽमृतं चाम्बुधेः ।**
> **रत्नानीह चतुर्दश प्रतिदिनं कुर्वन्तु वो मङ्गलम् ॥**

हा श्लोक अत्यंत लोकप्रिय असून, त्यात उल्लेखित चौदा रत्ने समुद्रमंथनामुळे प्राप्त झाली, अशी समजूत आहे. पण हा श्लोक कोणी रचला ते कळू शकत नाही. आणि त्यातील हरिधनू व शंख ही रत्ने समुद्रमंथनातून मिळाल्याचा उल्लेख कोणत्याही पुराणात आढळत नाही. किंबहुना निरनिराळ्या ग्रंथांत रत्नांची संख्या व नावे भिन्न आहेत. रामायणात केवळ सहा रत्नांचा उल्लेख आहे. त्यांची नावे अशी– धन्वंतरी, अप्सरा, सुरा, उच्चैःश्रवा, कौस्तुभ व अमृत.

महाभारतात सातच रत्नांचा नामनिर्देश केलेला असून, ती रत्ने अशी – सोम (चंद्र), श्री, सुरा, उच्चैःश्रवा, कौस्तुभ, धन्वंतरी व अमृत.

या दोन्ही महान ग्रंथांतील रत्नांत विषाचा उल्लेख नाही. पण महाभारताच्या प्रक्षिप्त भागात आणखी पाच रत्नांचा उल्लेख आहे. काही पुराणांतही एकूण पाचच रत्ने समुद्रातून प्राप्त झाल्याचे सांगितले असून, त्यांची नावे अशी–कालकूट, अप्सरा, पारिजात, सुरभी व ऐरावत. काही पुराणांत अन्य काही रत्ने मिळाल्याचे उल्लेख आहेत. अशी एकूण चोवीस रत्ने होतात. त्यांत वरील बारा रत्नांव्यतिरिक्त छत्र, कुंडले, विजया, तुलसी कलिप्रिया, लशुन, धत्तुर, पुष्कर, इ. वस्तूंचा समावेश होतो.

या कथेत मुख्यतः विष्णूचा महिमा गायलेला दिसून येतो. यातील आदीपासून अंतापर्यंत सर्व घटनांवर विष्णूचे प्रभुत्व आहे. कालकूट किंवा हालाहल या विषाचे प्राशन शिवाने केल्यामुळे सर्वांचे रक्षण झाले, ही घटना मात्र शिवमाहात्म्य वाढवते. सर्व घटनांमध्ये शिव आणि विष्णू यांचे सहकार्य दिसून येते. दोघेही देवांचे रक्षण करतात. विषप्राशन करण्यापूर्वी शिव विष्णूचे नाव घेतो. पद्मपुराणात ब्रह्मदेवाने देवांना शिव आणि विष्णू या दोघांची प्रथम पूजा करायला सांगितले आहे. [श्री. भा. क. शि.; श्री. वि. म. बेंडेकर, पुराणम्, जानेवारी, १९६७]

**समुद्रव्रत** एक काम्यव्रत. व्रतावधी एक वर्ष. याचा विधी असा – वर्षप्रतिपदेला व्रतारंभ करावा. समुद्र सात आहेत म्हणून सात दिवस व्रत करावे. प्रत्येक दिवशी मीठ, दूध,

…दूध, दह्याची निवळी, जलमिश्रित मद्य, उसाचा रस आणि मधुर पाणी यांनी सप्तसमुद्रांची पूजा करावी. रात्री हविष्यान्न सेवावे. प्रत्येक महिन्यात याच क्रमाने पूजा करून वर्षानंतर उद्यापन करावे. त्या वेळी दुभती गाय दान द्यावी. फल– आरोग्य, संपत्ती व स्वर्ग यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**समुद्रस्नान** एक पुण्यकारक धार्मिक कृत्य. निरनिराळ्या पुराणग्रंथांतून समुद्रस्नानाची महती वर्णिलेली आहे. अनेक पुण्यसरिता सागराला मिळतात म्हणून त्याला तीर्थराज अशी गौरवोपाधी मिळाली आहे. ब्रह्मा, विष्णू व इतर अनेक देवता समुद्रात वास करतात. मागच्या दिवसरात्रीत केलेले पाप केवळ समुद्रदर्शनाने नष्ट होते. स्नानाबद्दलचे पुण्य तर अपारच. वैशाखमासात समुद्रस्नान अवश्य करावे. तसेच ते अमावास्या, पौर्णिमा, सूर्य-चंद्र ग्रहणे, इ. पर्वकाळीही करावे. शुक्रवार व मंगळवार या दिवशी करू नये. मात्र सेतुबंध व रामेश्वर या ठिकाणी हा निषेध नाही.

स्नानविधी– शुचिर्भूत होऊन व उत्तरीय वस्त्र घेऊन तसेच पवित्रक हातात घालून समुद्रतीरावर जावे. श्रीफल, पंचरत्ने, पुष्पे व तांबूल अर्पण करून समुद्राला नमस्कार करावा. एक रत्न दान देऊन क्षौर करवावे.

पिप्पलादसमुत्पन्ने कृत्ये लोकभयङ्करे ।
पाषाणं ते मया दत्तं आहारार्थे प्रकल्प्यताम् ।।

हा मंत्र म्हणून समुद्रात पाषाण टाकावा. नंतर ' विश्वाची च घृताची च ' या मंत्राने समुद्राची प्रार्थना करून बुडी मारावी. नंतर पूर्वाभिमुख होऊन सुग्रीव, दक्षिणाभिमुख होऊन नल, पश्चिमाभिमुख होऊन मैंदबव, उत्तराभिमुख होऊन शरभ यांचे स्मरण करावे. नंतर –

सर्वरत्नो भवान् श्रीमान् सर्वरत्नकरो यतः ।
सर्वरत्नप्रभावस्त्वं गृहाणार्घ्यं नमोऽस्तु ते ।।

या मंत्राने ओंजळभर उदक घेऊन समुद्राला अर्घ्य द्यावे. मग तर्पण करावे. अश्वत्थाला स्पर्श न करता समुद्राची पूजा करावी. शनिवारी मात्र अश्वत्थस्पर्शपूर्वक त्याची पूजा विहित आहे. यानंतर गाय दान देऊन स्नानाची सांगता करावी. त्या दिवशी उपवास करावा. दुसऱ्या दिवशी पितरांना पिंडदान व तिसऱ्या दिवशी सूर्याप्रीत्यर्थ पूजा व हवन करावे. बारा ब्राह्मण-सुवासिनींना वस्त्रालंकार देऊन भोजन घालावे. [नि. सिं.; व्रतराज]

**समेगी** जैन साधूंचा एक वर्ग. जैन यतींचे अनेक जथे एकत्र होऊन हा वर्ग बनला आहे. इ. स. च्या १६ व्या शतकात अहमदाबाद येथे आनंद विमल सूरी याने याची स्थापना केली. समेगी साधू पिवळी वस्त्रे वापरतात आणि सतत भ्रमण करीत राहतात. एका ठिकाणी हे लोक २७ दिवसांपेक्षा जास्त काळ राहत नाहीत.

हे मूर्तिपूजा करीत नाहीत. विवाह करीत नसले, तरी यांच्या दलात स्त्रिया असतात. त्यादेखील पिवळी वस्त्रे वापरतात. पुरुष व स्त्रिया दोघेही जवळ एक दंडा बाळगतात. हे लोक भिक्षा मागून पोट भरतात.

मनुष्य मरण पावल्यावर त्याच्या प्रेताला स्नान घालून मग ते जाळण्याची प्रथा या लोकांत आहे. [ रा. जा. ]

**समोखनसिंग** (इ. स. चे १६ वे १७ वे शतक) एक प्रसिद्ध बीनवादक. हा राजपूत असून, राजस्थानातील खंडार गावचा रहिवासी होता. याने फार परिश्रम करून बीनवादनात प्रावीण्य संपादन केले. पुढे अकबराच्या कानापर्यंत त्याची कीर्ती पोचली. त्याने समोखनसिंगाला बोलवून घेतले व दरबारवादक म्हणून त्याची नेमणूक केली. याचे बीनवादन ऐकून अकबर फार खूष झाला व त्याने याला राजा ही पदवी दिली. अकबराच्या दरबारात तानसेन हा गायक होता. त्याच्या सांगण्यावरून समोखनसिंगाने मुसलमान धर्म स्वीकारला व तो नौबदखाँ बनला. तानसेनाने मग त्याला आपली मुलगी दिली. नौबदखाँला अनेक रागांतील पुष्कळ ध्रुवपदे येत होती. त्याच्या ध्रुवपद म्हणण्याच्या पद्धतीला खंडारवाणी असे नाव आहे. याचा हात वाजवण्यात फार मधुर होता. तसेच, त्याचा व्यासंग व खंडारवाणीचे नवे वळण यांमुळे त्याचा फार लौकिक झाला. याला रसबीनखाँ व रागरसखाँ असे दोन पुत्र होते. ते दोघे अनुक्रमे बीनवादक व गवई म्हणून प्रसिद्ध झाले. [ सं. शा. क. इ.]

**सम्मानबाई** (इ. स. चे १९ वे शतक) एक राजस्थानी भक्त कवयित्री. पूर्वीच्या अलवार संस्थानांतर्गत तिहाली नामक गावी हिचा जन्म झाला. हिच्या पित्याचे नाव रामनाथ असे असून, तो त्या काळी एक श्रेष्ठ हरिभक्त व उत्तम चारणकवी म्हणून सर्वत्र नावाजला जात होता. सम्मानबाईवरही अगदी लहान वयात ईश्वरभक्तीचे संस्कार झाले आणि उत्तरोत्तर ते अधिक दृढ होत गेले.

तत्कालीन रिवाजानुसार बालपणीच तिचा विवाह झाला. माददचा ठाकूर रामदयाळ बारहठ हा तिचा पती. विवाहानंतर सम्मानबाई प्रथम सासरी गेली, तेव्हा तिने पतीला एकांतात म्हटले, ' महाराज, लहानपणापासून मला ईश्वराची पूजा-अर्चा आणि भजन करण्याचा छंद आहे. या विषयात मला आपली अनुमती आहे ना ?'

यावर तिच्या पतीने तिला देवभक्तीचे संपूर्ण स्वातंत्र्य तर दिलेच; शिवाय या विषयात काही अडचण आल्यास तिच्या निराकरणार्थ परिपूर्ण साहाय्य करण्याचेही अभिवचन दिले. पतीच्या या उदार वृत्तीमुळे सम्मानबाई समाधान पावली व कालान्तराने राम, कृष्ण, विष्णू, इ. देवतांचे वास्तव्य पतीच्याच ठायी असल्याचे समजून त्याचीच एकनिष्ठेने भक्ती व सेवा करू लागली. पुढे पुढे तिच्या या पतिभक्तीने एवढा प्रकर्ष गाठला, की पतिशतक नावाचे शंभर दोह्यांचे एक भक्तिकाव्य तिने रचले. या काव्यात एके ठिकाणी ती म्हणते –

**देखो तो त्रिलोकी नाथ पति में विराज रह्यिो**
**कहत 'सम्मान' राम पति में प्रकाशैं आप ।।**

अर्थ – पाहा, तो त्रैलोक्याचा स्वामी माझ्या पतीच्या ठायीच वास्तव्य करून राहिला आहे. सम्मान म्हणते, (तो प्रभू) राम-(चंद्र) (माझ्या) पतीमध्येच प्रकाशतो आहे.

सम्मानबाईचे हे पतिशतक काव्यदृष्टचा अत्यंत रसाळ व भावपूर्ण आहे. या काव्याव्यतिरिक्त सम्मानबाईने कृष्णबाल-लीला, सोले, सवैया, छंद, इ. आणखीही लहानमोठी काव्ये व काही स्फुट दोहेवजा कविता लिहिली आहे. राम आणि कृष्ण या दोनही दैवतांवर तिची परम भक्ती असून, त्यांच्या लीला हाच तिचा काव्यविषय आहे.

सम्मानबाईच्या स्फुट कवितेत बनागीत नावाचा एक गीत-प्रकार अधिकांश आढळतो. जन्मापासून विवाहापर्यंत जीवना-तल्या प्रत्येक मंगल संस्कारप्रसंगी गायिली जाणारी अशी ही स्त्रीगीते आहेत.

सम्मानबाईने आपल्या सोले नामक काव्यग्रंथात रामसीता यांच्या कंकणमोचनाचे वर्णन अत्यंत रोचक शब्दांत केले आहे.

**हँस खोलत दुलहो राम सियाकर डोरोरी ।**
**मिथलापुर री कांमणी रेशम गांठ घुलाय ।**
**जद चतूराई जाणस्यां खोलो की रघुराय ।।**

भावार्थ – नवरदेव राम हसत हसत सीतेच्या कंकणाची गाठ सोडतो आहे; ( परंतु ही ) मिथिलेच्या स्त्रियांनी बांधलेली रेशीमगाठ आहे. रघुराया, (मोठ्या) चातुर्यानेच ती तुम्हांला सोडायला हवी.

डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांच्या मते मीराबाईनंतर राज-स्थानी भाषेला ललामभूत झालेली श्रेष्ठ कवयित्री म्हणजे सम्मान-बाईच होय. [ संयुक्त राजस्थान, आॅक्टो.–नोव्हेंबर १९५७ ]

**सम्मितीय संप्रदाय** एक बौद्ध संप्रदाय. याला वात्सी-पुत्रीय असेही म्हणतात. बौद्धांच्या दुसऱ्या संगीतीनंतर थोड्या काळाने स्थविरवादी बौद्धांच्या महीशासक व वज्जिपुत्तक अशा दोन शाखा झाल्या. त्यानंतर सामान्यतः दहा वर्षांनी वज्जिपुत्तकांच्या ज्या चार उपशाखा निर्माण झाल्या, त्यांमधल्या एका शाखेचे नाव सम्मितीय असे पडले. तिब्बती इतिहासकार बुस्तन लिहितो की, बुद्धाचा प्रसिद्ध शिष्य अवंतीचा महाकच्चायन हा आपल्या संप्रदायाचा संस्था-पक होय, असे सम्मितीय लोक सांगतात.

बुद्धाच्या निर्वाणानंतर जवळजवळ दोनशे वर्षांनी हा संप्रदाय निघाला आणि हर्षवर्धनाच्या (इ. स. ७ वे शतक) काळी त्याला महत्त्व प्राप्त झाले. हर्षवर्धनाची बहीण राज्यश्री ही याच मताची भिक्षुणी बनली होती असे सांगतात.

युआन च्वांग याने या मताचे सोळा ग्रंथ आपल्याबरोबर नेले होते. सम्मितीयांचे त्रिपिटक उपलब्ध नाही. फक्त विनयपिटक तेवढे चिनी अनुवादात सापडते.

सम्मितीय लोकांचा इतर संप्रदायांशी सिद्धान्तांच्या बाब-तीत थोडा बहुत मतभेद आहेच; पण मुख्य भेद आहे तो पुद्-गलाच्या संबंधात. सम्मितीय हे पुद्गलवादी आहेत. हा सामा-न्यतः आत्मसिद्धान्त आहे. बुद्धाची दोन वचने त्यांच्या सिद्धा-न्ताला आधारभूत आहेत – 'जो आपल्या स्वार्थासाठी परिश्रम करतो, असा तो पुद्गल आहे' व 'जो बहुजनहितासाठी, बहुजन सुखासाठी आणि लोकानुकंपेसाठी पुन: जन्म घेतो असा तो एक पुद्गल आहे.'

वरील वचनांच्या आधारे सम्मितीयाचार्य पुढील विवेचन करतात – पुद्गल ही भावात्मक वस्तू आहे. ते मृगजळ नव्हे किंवा एखादी कपोलकल्पित कथाही नव्हे. पुद्गल ही या शरी-रात 'अहम्' या प्रकारे लक्षित होणारी एकाकार प्रतीती आहे. ती प्रतीती क्षणिक नसून चिरस्थायी आहे. ही प्रतीती पंच-स्कंधांच्या आश्रयाने उत्पन्न होत नाही. कोणताही पुरुष केवळ एकच व्यक्ती या रूपात कार्य किंवा चिंतन करतो; पाच वस्तूंच्या रूपात नव्हे. मनुष्याचे स्रोतापन्नत्वादी गुण भिन्न भिन्न जन्मां-मध्येही एकाच रूपाशी अनुस्यूत असतात. या घटनांवरून निश्चितरूपाने मान्य करावे लागते, की पंचस्कंधांहून निराळा असा एक नवीन मानस व्यापार विद्यमान असून, तो अहंभावाचा आश्रय आहे. तसाच तो एका जन्मातून दुसऱ्या जन्मात कर्मांच्या प्रवाहाला अविच्छिन्न रूपाने कायम ठेवतो. स्कंधांच्या परिवर्तना-बरोबरच मानस व्यापारही बदलत राहतो. याच मानस व्यापा-राला पुद्गल असे नाव आहे आणि तो स्कंधांच्या बरोबरच राहतो. निर्वाणकाली जेव्हा स्कंधांचा विनाश होतो, तेव्हा पुद्गलाचाही उपशम होतो.

पुद्गलाला संस्कृत म्हणता येत नाही, तसेच असंस्कृतही म्हणता येत नाही. तो स्कंधांपासून अभिन्न नसला तरी त्याच्या-

स्कंधयुक्त (संस्कृत) जीवाच्या सुखदु:खादी काही दशा असतात. तसेच त्यामध्ये असंस्कृत पदार्थांचे गुणधर्मही असतात. तो जन्मजरा-मृत्यू यांच्या अधीन नाही. धर्म हे पुद्गलाला सोडून जन्मांतर ग्रहण करू शकत नाहीत. जेव्हा ते जन्मान्तर घेतात, तेव्हा ते कार्य पुद्गलाच्या बरोबरच होते. या सर्व गोष्टींवरून पुद्गल हा पंचस्कंधांहून वेगळा (सहावा) मानस व्यवहार आहे, हे ठरते आणि पुद्गलाची सत्ता स्वीकारावी लागते. [ बौ. द. मी.; उ. प्र. बौ. वि. ]

**सम्मेदशिखर** एक जैन क्षेत्र. बिहारमधल्या हजारीबाग जिल्ह्यात हा एक डोंगर आहे. याला पार्श्वनाथाचा डोंगर असे म्हणतात. पारसनाथहिल नावाचे एक स्टेशन लागते. तिथून नऊ मैलांवर या डोंगराचा पायथा आहे. तिथे मधुबन नावाचे एक गाव आहे. तिथे दिगंबरांची बाव्वन चैत्यालये असून, पंधरा फूट उंचीची बाहुबलीची प्रतिमा आहे. तिथल्या श्वेतांबरी धर्मशाळेत यात्रेकरूंना आवश्यक त्या सुखसोयी विनामूल्य पुरवल्या जातात.

मधुबनापासूनच पहाडाची चढण सुरू होते. ही चढण दमछाक करणारी आहे. सम्मेदशिखराचे तीन पहाड फार दुर्गम आहेत. वर भिल्लवस्ती आहे. प्रथम कुंथुनाथाचे मंदिर लागते. त्याच्या जवळच गौतम गणधराच्या पादुका आहेत. शिखराच्या पठारावर वीस तीर्थंकरांची मंदिरे आहेत. हे पार्श्वनाथादी वीस तीर्थंकर इथूनच मोक्षाला गेले, असे सांगतात. या सर्व मंदिरांचे दर्शन घ्यायला सहा मैलांची वाटचाल करावी लागते. प्रदक्षिणेचा रस्ता वीस मैल भरतो. हे जैनांचे सिद्धक्षेत्र असून, सर्व संप्रदायांना समान रूपाने पूज्य आहे. [ जै. ध.; जै. क. ]

**सम्यक् संबुद्ध** एक बौद्ध कल्पनाबंध. प्राचीन बौद्ध धर्मात मुमुक्ष साधकाला मोक्षाप्रत जाण्यासाठी तीन अवस्था पार कराव्या लागत. श्रावक, प्रत्येक बुद्ध व सम्यक् संबुद्ध ही त्यांची नावे होत. सम्यक् संबुद्ध या अवस्थेला जाणे म्हणजेच बुद्धाला प्राप्त करून घेणे होय. त्यासाठी कोटी कोटी जन्मांची तपश्चर्या खर्ची घालावी लागते. अंत:करण विश्वकल्याणाच्या भावनेने ओतप्रोत भरून जावे लागते. द्वैतभाव नकून पडावा लागतो. उत्तरकालीन बौद्ध साहित्यात जिचा बोधिसत्त्वावस्था म्हणून वारंवार उल्लेख होतो, तिलाच प्राचीन साहित्यात सम्यक् संबुद्ध अवस्था म्हटले आहे. अनंत ज्ञान आणि प्राणिमात्राविषयी असीम करुणा ही या सम्यक् संबुद्धत्वाची प्रधान लक्षणे होत.

मेलसुत्तमते सम्यक् संबुद्धाचे दर्शन आणि जन्म दुर्लभ असतो. एका प्राचीन कथेवरून कळते, की शाक्यमुनी गोतमाने ५५० जन्म घेऊन आणि विविध पारमितांचा अभ्यास करून सम्यक संबुद्धत्व प्राप्त करून घेतले [ म. सा. अ. ]

**सयामी रामायणे** सयामी भाषेतील रामकथाविषयक ग्रंथ. (१) रामकियेन – सर्वपरिचित असणाऱ्या रामकथेपेक्षा या रामायणात काही वेगळीच माहिती दृष्टोत्पत्तीस येते, ती अशी – लक्ष्मण शूर्पणखेच्या एका मुलाला ठार मारतो. एका प्रसंगी लक्ष्मण व हनुमान यांचे युद्ध होते. रामाने सेतू बांधण्यापूर्वीच रावण एका तपस्वी ब्राह्मणाच्या रूपाने रामाला येऊन भेटतो व युद्ध न करण्याविषयी उपदेश करतो. एकदा बिभीषणाची बेंजकाय नामक मुलगी सीतेच्या रूपाने व मेलेल्या अवस्थेत नदीतून वाहात जाताना रामाला दिसते आणि त्यामुळे तो शोकाकुल होतो. रावण रामाविरुद्ध ब्रह्मदेवाच्या दरबारी तक्रार करतो; ब्रह्मदेव राम आणि सीता या दोघांनाही आपल्या दरबारी उपस्थित राहण्यासाठी बोलावणे धाडतो, तेव्हा राम एकटाच जातो. सीता रावणाच्या बंदीवासात असल्यामुळे जाऊ शकत नाही. राम ब्रह्मदेवाला सीतेच्या न येण्याचे कारण सांगतो, तेव्हा स्वाभाविकच ब्रह्मदेव रावणाची निर्भत्सना करतो. त्याला सीतेला रामाकडे परत पाठवण्याची आज्ञा करतो. रावण ती मानीत नाही. मग ब्रह्मदेव त्याला शाप देतो.

या रामायणातील सर्वात विसंगत व चमत्कारिक गोष्ट म्हणजे हनुमंताच्या शृंगारचेष्टा. अनेक स्त्रियांशी तो प्रेमलीला करतो; इतकेच नव्हे, तर प्रत्यक्ष रावणपत्नी मंदोदरीशीही त्याच्या कामक्रीडा चालतात. एकदा त्याचा रामाशी मतभेद होतो व तो सरळ रामाला युद्धाचे आव्हान देतो.

(२) रामजातक – हे सयामी भाषेची उपभाषा लाओ नामक भाषेत आहे. यातही परंपराप्राप्त रामकथेपेक्षा वेगळ्या प्रकारची माहिती आढळते. या रामायणाच्या आरंभीच सांगितले आहे, की राम व रावण हे चुलत बंधू असून, लक्ष्मण हा एकच रामाचा सख्खा भाऊ होता. शांता नावाची रामाची एक सहोदर भगिनी होती. सीताशुद्धीसाठी बाहेर पडल्यावर रामाने प्रथम स्वत:च दोन लग्ने केली; त्याची एक बायको होती वालीपत्नी तारा व दुसरी होती, वाली व सुग्रीव यांची बहीण. रामाच्या या दोन्ही बायका लढाऊ असून, त्यांनी राम-हनुमंत युद्धात भाग घेतला होता. सीतेशी रामाचे लग्न झाले होते.

श्री. परशुराम चतुर्वेदी यांच्या मते या दोन्ही रामायणांतील कथानक पाहता त्यावर बौद्ध विचारप्रणालीचा दाट प्रभाव दिसतो. [ भा. सा. सां. रे. ]

**सय्यद** मुसलमानांची एक प्रतिष्ठित जात. मुहंमद पैगंबराची मुलगी फातिमा व तिचा पती अली यांच्या वंशजांना हे नाव मिळाले आहे. या शब्दाचा अर्थ अमीर किंवा प्रमुख असा आहे. या जातीला पीरजादा व मशैक अशी अन्यही नावे आहेत. भारतात मुस्लिम सत्ता चालू असताना तुर्कस्तान, अरबस्तान व मध्य आशिया या प्रदेशांतून धर्मोपदेशक, सैनिक व साहसी व्यापारी म्हणून बरेच सय्यद लोक भारतात आले व इथेच राहिले.

हे लोक आपली जात शुद्ध राहावी म्हणून फार जपतात. बहुधा जातीतच लग्नसंबंध होतो. पण अन्य उच्च जातीच्या मुसलमानांशीही हे लोक विवाहसंबंध करतात. या जातीचे पुरुष आपल्या नावामागे सय्यद किंवा मीर ही उपाधी लावतात किंवा नावापुढे शहा लावतात. स्त्रीच्या नावापुढे बेगम किंवा बिबी लावतात.

हे लोक शीया पंथाचे अनुयायी आहेत. या पंथाचे लोक आपल्या उत्पन्नातील दहावा भाग सय्यद घराण्यातील गरीब माणसासाठी राखून ठेवतात. गरीब सय्यद लोक स्वाभिमानी असल्यामुळे भीक मागत नाहीत किंवा सामान्य गरिबांसाठी ठेवलेल्या जकातमधूनही मदत घेत नाहीत. आजारी मनुष्यावर ओवाळून टाकलेले पदार्थही हे लोक घेत नाहीत. मात्र 'इमाम झमिनी' म्हणजे रक्षणकर्त्या साधूच्या नावाने वाटलेली मिठाई ते घेतात.

सय्यद लोक व्यापार वगैरे उद्योग करीत नाहीत. ते मुख्यतः मुनशी, मुल्ला, मौलवी, कुराणवाचक, वकील, सरकारी अधिकारी म्हणून काम करतात. काही लोक शेती करतात; तर काही सेनादलात नोकरीही करतात. धार्मिक दृष्टीने या लोकांना अमीर मानले जाते. ही अत्यंत श्रेष्ठ पदवी आहे.

गुजरातेतील काही सय्यद घराणी सुन्नी पंथाची आहेत. [ ट्रा. का. बाँ.; मु. इं.; सुरत गॅझे. ]

**सय्यद राजघराणे** (इ. स. १४१४–१४५१) दिल्लीच्या तख्तावरून राज्य करणारे एक सुलतान घराणे. या घराण्यातला पहिला सुलतान खिज्रखान हा फीरूजशाह तुगलुकच्या वेळी मुलतानचा सुभेदार होता. इ. स. १३९५ साली दीपालपूरचा सुभेदार सारंगखान लोदी याने खिज्रखानाचा पराभव करून मुलतान घेतले. पुढे तैमुरलंगाने भारतावर स्वारी करून दिल्ली घेतली. परत जाताना त्याने खिज्रखानाला मुलतान, लाहोर व दीपालपूर या प्रांतांचा सुभेदार नेमले होते. त्याच वेळी त्याने खिज्रखानाला दिल्ली येथील राजप्रतिनिधीही नेमले होते, असे म्हणतात. पण तुगलुक घराण्यातला शेवटचा सुलतान नसीरुद्दीन महमूदशाह गुजरातेत पळून गेला होता त्याला त्याचा वजीर मल्लू इकबाल याने परत बोलावून दिल्लीच्या तख्तावर बसवले. पुढे इ. स. १४१२ साली सुलतान महमूद मरण पावल्यावर त्याचा वजीर दौलतखान लोदी हा दिल्लीच्या तख्तावर बसला. पण खिज्रखान याने दिल्लीवर स्वारी करून ती जिंकली व तो स्वतः तख्तावर बसला. अशा प्रकारे इ. स. १४१४ मध्ये दिल्ली येथे सय्यद घराण्याची सत्ता सुरू झाली.

**खिज्रखान** (इ. स. १४१४ ते १४२१) – तख्तावर बसताच खिज्रखान याने आपले विश्वासू अधिकारी नेमून नवीन राज्यव्यवस्था सुरू केली. मात्र त्याने तुगलुक सुलतानाच्या सरदारांना दयाबुद्धीने वागवले. त्याचप्रमाणे त्याने गरिबांना मदत म्हणूनही बराच खर्च केला. तैमूरचे अत्याचार व त्यानंतरचे अराजक यांमुळे दिल्लीतील लोकांची जी दुर्दशा झाली होती, ती खिज्रखानाच्या प्रयत्नांमुळे जरा सुधारली.

तैमुरलंगच्या प्रभावामुळेच आपल्याला सत्ता व प्रतिष्ठा प्राप्त झाली, अशी खिज्रखानाची दृढ श्रद्धा असल्यामुळे तो तैमुरचा मुलगा शाह रुख याला शेवटपर्यंत खंडणी व नजराणे पाठवीत राहिला. तो स्वतःला शाह ही पदवी न घेता 'रायन-इ-अल्ला' म्हणवून घेत असे. तीन वर्षे त्याने सार्वजनिक प्रार्थनेत स्वतःच्या नावाऐवजी शाह रुखचे नाव ठेवले होते. त्यानंतर इ. स. १४१७ पासून त्याने स्वतःचेही नाव घातले.

त्या वेळी भारतात अनेक स्वतंत्र राज्ये प्रस्थापित झालेली होती. दिल्ली, दुआबचा काही भाग व मेवात एवढ्या लहान प्रदेशावरच सुलतानाची सत्ता होती. खिज्रखानाने सलोख्याचे खूप प्रयत्न केले, तरी तुर्क लोक त्याला बधले नाहीत. त्यांनी खिज्रखानाविरुद्ध उठाव केले. पण खिज्रखानाच्या सैन्याने त्यांचा पुरता बंदोबस्त केला.

खिज्रखान बुद्धिमान, न्यायी, दयाळू व निर्व्यसनी होता. त्यामुळे तो जनतेला प्रिय ठरला. दिल्ली जिंकून राज्य स्थापताना त्याने शौर्य दाखवले असले, तरी राज्याचा विस्तार करण्यात मात्र त्याला यश मिळाले नाही.

**मुबारकशाह** (इ. स. १४२१ ते १४३४) – खिज्रखानानंतर त्याचा मुलगा मुबारक तख्तावर बसला. त्याने स्वतःला शाह ही पदवी घेतली आणि स्वतःच्या नावाने खुत्बा पढण्याची प्रथा सुरू केली. त्याच्या भोवती अनेक शत्रू उभे होते. उत्तर व पश्चिम भागांत खोकर राजपूत, तुर्क व मोगल यांनी बरीच बंडाळी सुरू केली होती आणि दक्षिणेकडील माळवा, पूर्वेकडील जोनपूर वगैरे राज्येही दिल्लीवर आक्रमण करण्याची संधी शोधत होती. पण मुबारकशाहाने या सर्व शत्रूंना तोंड देऊन

आपले राज्य राखले. सर्व बाजूंनी आक्रमणे झाली; पण मुबारकशाहाने सर्वांचा पराभव केला. मात्र शेवटी त्याचाच वजीर सरवर-उल्-मुल्क याने कपट कारस्थान करून त्याचा खून केला.

मुबारकशाहा हाच सय्यद घराण्यातील सर्वांत कर्तबगार सुलतान ठरला. तो शूर योद्धा होता. पण राज्यकारभारातली मुत्सद्देगिरी त्याच्या अंगी नव्हती. तो न्यायी व दयाळू होता. तो इस्लामनिष्ठ असला तरी धर्मवेडा नव्हता. अन्य धर्मांच्या लोकांशीही तो उदारपणे वागत असे. त्याने इ. स. १४३३ मध्ये यमुना नदीच्या काठी मुबारकबाद नावाचे शहर वसवले.

मुहंमदशाह (इ. स. १४३४–४५) – मुबारकशाहानंतर त्याच्या भावाचा मुलगा मुहंमदखान हा तख्तावर बसला. सरवर-उल्-मुल्क याला त्याने खान-इ-जहान ही पदवी दिली. तोच पहिले पाच-सहा महिने सारी सत्ता गाजवीत होता. पण कमाल-उल्-मुल्क याच्या नेतृत्वाखाली अनेक सरदारांनी त्याला विरोध करून दिल्लीवर स्वारी केली. सरवरने मुहंमदशाहालाही ठार मारण्याचा प्रयत्न केला. पण त्यात तो स्वतःच मारला गेला. मग सुलतानाने कमाल-उल्-मुल्क यालाच आपला वजीर नेमले आणि तो स्वतः राज्यकारभाराकडे दुर्लक्ष करून विलासातच दंग राहिला. मग मेवाती नेता जलालखान याच्या बोलावण्यावरून माळव्याचा सुलतान महमूद खलजी याने दिल्लीवर स्वारी केली, तेव्हा मुहंमदशाहाने सरहिंदचा सुभेदार बुहलूल लोदी याला मदतीला बोलावले. तो २०,००० घोडेस्वारांनिशी धावून आला, पण लढाई चालू असतानाच मुहंमदशाहाने महमूद खलजीशी तहाचे बोलणे सुरू केले. त्यानेही लगेच ते मानले व आपले सैन्य मागे घेतले. पण बुहलूल लोदीला सुलतानाचे हे कृत्य पसंत पडले नाही आणि त्याने खलजीच्या सैन्यावर पाठीमागून हल्ला करून खूप लुटालूट केली. वेडपट मुहंमदशाहाने त्याबद्दल बुहलूलची स्तुती करून त्याला आपला मुलगा मानले व खान-इ-खानान ही पदवी दिली. पुढे सुलतानाच्या संमतीने बुहलूलने बहुतेक पंजाब प्रदेशावर आपली सत्ता स्थापली. त्याने इ. स. १४४३ साली दिल्लीवरही स्वारी केली. पण तिथे मात्र त्याला जय मिळाला नाही.

मुहंमदशाहाच्या कारकिर्दीच्या शेवटच्या काही वर्षांत त्याची सत्ता दुबळी झाली व त्याच्या अनेक सरदारांनी स्वतंत्रपणे आपली राज्ये सुरू केली. मुलतान हे स्वतंत्र राज्य झाले. शर्की घराण्याने पूर्वेकडील काही परगणे बळकावले. इ. स. १४४५ मध्ये सुलतान मुहंमदशाहा मरण पावला.

अलाउद्दीन आलमशाह (इ. स. १४४५ ते १४५१)–मुहंमदशाहानंतर हा दिल्लीचा सुलतान झाला. त्याने आलमशाहा ही मोठी पदवी घेतली खरी; पण तो अगदी नालायक होता आणि नाममात्र सुलतान होता. शेवटी तो बदाऊला जाऊन राहिला व तिथे विलासात मग्न झाला. त्याचा वजीर हमीदखान याने बुहलूल लोदी आणि नागोरचा कियामखान या दोघांनाही निमंत्रण पाठविले. दोघांपैकी एकजण नामधारी सुलतान बनेल व आपण स्वतः वजीर म्हणून सर्व सत्ता चालवू, अशी हमीदखानाची आकांक्षा होती. बुहलूल लोदी लगेच दिल्लीला गेला व तख्तावर बसला. त्याने लवकरच हमीदखानाला कपटाने ठार मारले आणि स्वतः सुलतान झाल्याचे वर्तमान आलमशाहाला कळवले. त्याने आलमशाहाला बदाऊ येथे स्वतंत्रपणे राहण्यास परवानगी दिली. अशा प्रकारे सय्यद घराण्याची सत्ता संपली व दिल्लीवर लोदी सुलतानांची सत्ता प्रस्थापित झाली. [ हि. क. इं. पी. ६ ]

**सरक** एक प्राचीन जमात. छोटा नागपूर, बंगाल व ओडिसा या प्रदेशांत या लोकांची वस्ती आहे. ही एक लहानशी जमात असून, १९०१ च्या शिरगणतीनुसार त्यांची संख्या १७,३८५ एवढी होती. रिस्लेच्या मतानुसार ही हिंदू धर्माची दीक्षा घेतलेली पूर्वीची जैन जमात आहे. सरक हा शब्द श्रावक या शब्दाचा अपभ्रंश असावा. ब्रह्मवैवर्त पुराणात सरक लोकांची उत्पत्ती जोलाह पुरुष आणि कुविंद स्त्री यांच्यापासून झाली, असे सांगितले आहे. हे लोक काही ठिकाणी विणकामाचा व्यवसाय करतात.

पश्चिम बंगालच्या मानभूम जिल्ह्यातील आणि छोटा नागपूरमधील सरक लोक आपण मूळचे अग्रवाल असून, परेशनाथाचे उपासक असल्याचे सांगतात. हा परेशनाथ म्हणजे पार्श्वनाथ असावा. हे सरयू नदीच्या तीरावर राहत आणि सावकारी व दुकानदारी यांवर उपजीविका करीत. बीरभूम आणि बरद्वान या भागात, ते शिल्पकार व गवंडी म्हणून गुजरातेतून आले, अशी त्यांची प्रसिद्धी आहे. त्यांनी बांधलेल्या मंदिरांचे अवशेष आजही बराक नदीच्या तीरावर पाहायला मिळतात. बीरभूम, बांकुरा आणि मानभूम या जिल्ह्यांतले सरक स्वतःला हिंदू म्हणवून घेतात. त्यांचे पुरोहित ब्राह्मण असतात. इथल्या सरक लोकांत सात गोत्रे व पाच पोटजाती आहेत. चार पोटजाती स्थानांवर व एक व्यवसायावर आधारलेली आहे. व्यवसायावर आधारलेली पोटजात कोष्टी असून, तिला तांती सरक किंवा सरकी तांती असे नाव आहे. हे लोक पूर्ण शाकाहारी आहेत.

ओडिसातील सरकांना सरकी तांती असे नाव असून, ते कोष्टी आहेत. पुरीमधील सरकांचा ओडिसातील इतर सरकांशी संबंध तुटलेला आहे. बरांबा, तगारिया आणि बांकी येथील सरकांचा आपसांत रोटीबेटी व्यवहार होतो. बरांबामधील सरकांची खानेसुमारीत बौद्धधर्मी म्हणून नोंद झालेली आहे.

ते पुरी येथे यात्रेकरता गेले असता तिथल्या बौद्ध राजाला त्यांच्याविषयी आपुलकी वाटली आणि त्याने त्यांना आपल्या राजवाड्याशेजारी राहायला जागा दिली व त्यांच्या निर्वाहाचीही सोय केली, असे सांगतात. नंतर या लोकांनी बौद्ध धर्म स्वीकारला असावा.

बौद्ध सरकांची चार गोत्रे आहेत. ते वर्षातून एकदा माघ सप्तमीला खंडगिरीच्या लेण्यात जमतात व तिथल्या बुद्धमूर्तीची पूजा करतात. जगन्नाथाशिवाय इतर कोणत्याच हिंदू देवतेला ते भजत नाहीत.

विवाह आणि इतर धार्मिक विधी यांच्यासाठी ते पुरोहिताला बोलावतात. मंत्र वाचायला येणारा कोणीही पुरोहित होऊ शकतो. होमासाठी मात्र ब्राह्मणाला बोलावतात. विवाहविधीची सुरवात बुद्धाच्या स्वागताने होते. नंतर गणपती व वरुण यांचे पूजन होते. मग बुद्ध आणि दिक्पाल यांना नैवेद्य दाखवतात. त्यानंतर वधू-वरांचे स्वागत करतात. यानंतर अठरा मातृकांची पूजा, नांदीश्राद्ध व कन्यादान हे विधी होतात. मग बुद्धाला पंचामृत अर्पण करतात व ते वधू-वरांना प्यायला देतात. मग वधू-वरांचे हात जुळवून वधूपिता वधूला वराच्या हाती सुपूर्त करतो. मग विवाह-होम होतो. मग आचार्य वधू-वरांना आशीर्वाद देण्यासाठी बुद्धाला आवाहन करतो. एवढ्याने विवाहविधी समाप्त होतो.

या जमातीची संघटना असते. जमातीच्या प्रमुखाला महापात्र असे म्हणतात. तो जातीच्या तंट्यांचा न्यायनिवाडा करतो. त्याच्या हाताखाली परमाणिक नावाचा अधिकारी आणि थानपती (शिपाई) व परवा (हुजऱ्या) हे सेवक असतात. महत्त्वाच्या प्रश्नांचा ऊहापोह करण्यासाठी जमातीची सभा बोलावण्यात येते. महापात्र गुन्हेगारांना जो दंड करतो, त्या पैशातून दरवर्षी वैशाखात ते बुद्धाची पूजा करतात. विवाहसमारंभात महापात्र आणि परमाणिक यांना वस्त्रे मिळतात. तसेच थानपती व परवा यांना प्रत्येकी दहा सुपाऱ्या मिळतात.

हे लोक प्रेते जाळतात किंवा पुरतात व अकराव्या दिवशी मृताचे श्राद्ध करतात. [ से. इं. १९५१, वे. बें. ]

## सरगाराह

चांभारांसारखी असलेली एक जात. या लोकांची वस्ती राजस्थानात आहे. शर म्हणजे बाण. सर हे 'शर' चे अपभ्रष्ट रूप आहे. हे लोक पूर्वी बाण बनविण्याचा व्यवसाय करीत होते. त्यावरून त्यांना सरगाराह हे नाव प्राप्त झाले असावे. अलिकडे ते आपला पहिला व्यवसाय सोडून गावच्या वेशीवर पहारा करण्याचा आणि दवंडी पिटण्याचा व्यवसाय करू लागले आहेत.

हे लोक आपली उत्पत्ती वाल्मीकीपासून झाली, असे सांगतात. विलारा जिल्ह्यातील पिचियाक गावी वाल्मीकीचे मंदिर असून, तिथले पुजारीपण यांच्याकडेच आहे. देवापुढे येणारे सारे उत्पन्न तेच घेतात.



सरगाराह जोडपे

यांच्यांत बऱ्याच पोटजाती आहेत. गुर्रा जातीचे लोक त्यांचे पुरोहित आहेत. यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे.

हे गायीला पवित्र मानतात. त्यांना मांस चालत नाही.

यांच्यांत प्रेताचे दहन करतात. [ रा. जा. ]

## सरंजामशाही

मराठेशाहीत काही सरदारांना सैन्याच्या खर्चासाठी किंवा किल्ल्याचा बंदोबस्त ठेवण्यासाठी इनामी जमीन देत, तिला सरंजाम म्हणत. त्याचप्रमाणे सरकारातून पालखी वगैरे मानमरातब दिला गेला, की त्याच्या खर्चासाठीही अशी इनामी जमीन देत, तिलाही सरंजाम म्हणत. सरंजामी सरदारांनी युद्धाच्या प्रसंगी आपली सेना सरकारच्या

मस्तीला पाठवावी, असा करार केला जाई. तशी सेना न ठेवल्यास सरंजामाचे उत्पन्न सरकारकडे भरावे लागे. कराराप्रमाणे सैन्य जमविले की नाही, याची पाहणी पेशवे करीत. मध्यवर्ती सत्ता प्रबळ असे, तेव्हा सरंजामी सरदार कराराची कलमे पाळून सेवा करीत. छ. शाहूच्या वेळी मराठी साम्राज्याच्या वाढीसाठी या सरंजामी पद्धतीचा अवलंब केला गेला. पुढे हे सरंजामी सरदार फार प्रबळ होऊन स्वतंत्रपणे वागू लागले. पेशवाईत शिंदे, होळकर, पवार, पटवर्धन, पानसे, इ. अनेक सरदारांनी सर्वत्र मुलुखगिरी करून मराठी साम्राज्याचा विस्तार केला. कालांतराने त्यांचे प्रस्थ फार वाढले आणि साम्राज्याचा नाश झाला, असे काही इतिहासकारांचे मत आहे.

प्राचीन काळी ब्राह्मणांना व धार्मिक संस्थांना गावे दान करण्याची पद्धत होती. गुप्तकाळात सरकारी अधिकाऱ्यांनाही वेतनाऐवजी अशी गावे नेमून देण्याची प्रथा सुरू झाली. त्यानंतरच्या काही शतकांत या पद्धतीची खूप वाढ झाली. ब्राह्मणांना ग्रामदान केले जाई, तेव्हा ते तिथल्या उत्पन्नाचा उपभोग घेत. मठांना व मंदिरांना अशी अनेक गावे नेमून दिली जात. त्यांची धार्मिक सत्ता असून जमिनीचे उत्पन्न संस्थेच्या खर्चासाठी वापरले जाई. पण सरकारी अधिकाऱ्यांना अशी गावे मिळत, तेव्हा तिथे त्यांची सत्ता चाले. ते राजाचे नोकर असले तरी, त्यांच्या सरंजामी गावात ते मन मानेल तसा कारभार करीत, भरपूर कर वसूल करीत आणि लोकांना सक्तीने स्वतःच्या कामाला लावीत. या पद्धतीतूनच सरंजामशाही उगम पावली, असे श्री.राम शरण शर्मा यांनी प्रतिपादले आहे. साम्राज्याच्या रक्षणासाठी केंद्र सरकारची सेनादले पुरी पडत नसत, म्हणून सरंजामी सरदारांची सेना बोलवावी लागे. त्यांना त्या सैन्याच्या खर्चासाठी गावे नेमून दिली जात. त्या गावांवर त्यांची अनिर्बंध सत्ता चालत असे. मात्र त्यांना स्वतंत्र राजे किंवा सामंत म्हणता येत नाही. कारण त्यांचे राज्य स्वतंत्र नसे. पाहा – वतनदारी. [ सु. वि. को.; पे. का. म.; इंडियन फ्युडॅलिझम : इ. स. ३००–१२००, श्री. राम शरण शर्मा, १९६५ ]

## सरदेशमुखी

एक वतन. देशमुखी व सरदेशमुखी ही वतने महाराष्ट्रात शिवकालापूर्वीपासून चालू आहेत. अनेक देशमुखांचा वरिष्ठ तो सरदेशमुख. देशमुखांचे जे काम तेच सरदेशमुखांचे असे. ठराविक प्रदेशातील जमीनमहसूल गोळा करून तो सरकारात भरणे, त्या प्रदेशात बंदोबस्त ठेवणे, सरकारी मालमत्तेचे संरक्षण करणे, गुन्हेगारांचे पारिपत्य करणे, त्यासाठी सैन्य बाळगणे, उजाड गावांत वसाहत करणे, चोरांचा बंदोबस्त करणे, इ. कामे देशमुख करीत. तीच सरदेशमुखही करी आणि त्यासाठी त्याला सरकारी साऱ्यापैकी दहा टक्के उत्पन्न मिळे.

शिवाजीने स्वराज्य स्थापल्यानंतर तो आपल्या राज्यातील देशमुखांचा सरदेशमुख झाला. त्या सरदेशमुखीच्या हक्काबद्दल दहा टक्के उत्पन्न वसूल करण्यासाठी एक अधिकारी नेमलेला होता. हा वसूल शिवाजीच्या खाजगी उत्पन्नाकडे जमा होई. हा वसूल शिवाजी स्वराज्यातच करीत असे; परराज्यात करीत असल्याचे दिसून येत नाही. शिवाजी परराज्यात चौथाई वसूल करीत असे. पुढे छ. शाहूने चौथाईबरोबर सरदेशमुखीचा हक्कही मोगल बादशाहाकडून मिळवला.

चौथाई-सरदेशमुखीपैकी सरदेशमुखी ही केवळ छत्रपतींच्या खासगी खर्चासाठी राखीव म्हणजेच कुटुंबखर्चासाठी होती; दौलतीसाठी म्हणजे राज्यकारभारासाठी नव्हती. ते उत्पन्न स्वतःच्या इच्छेप्रमाणे ते कोणालाही देऊ शकत. पाहा –देशमुखी. [ म. स. द.; शि. व शि. ]

## सरभंग संप्रदाय

अघोर किंवा औघड संप्रदायालाच बिहारमधील चंपारण्य जिल्ह्यात सरभंग संप्रदाय असे म्हणतात. या संप्रदायाच्या अनेक संतांनी आपल्या वाणीत संप्रदायाचे सिद्धान्त, साधना व आचार यासंबंधी विवेचन केले आहे. या संप्रदायाचे सिद्धान्त थोडक्यात पुढीलप्रमाणे आहेत –

परमात्मतत्त्व व आत्मतत्त्व मूलतः अभिन्न व अद्वैतरूप आहे. या संप्रदायाच्या उत्तर प्रदेशीय शाखेचा सर्वप्रमुख आचार्य किनाराम याने परमात्मतत्त्व किंवा ब्रह्म याला निरालंब अशी संज्ञा दिली असून, जीवात्मा व परमात्मा हे सद्‌गुरूच्या कृपेने द्वंद्वरहित व अभिन्न होतात, असे म्हटले आहे. किनारामाने आपल्या विवेकसार या ग्रंथात आत्मा, परमात्मा व जगत ही अभिन्न असल्याचे सविस्तर प्रतिपादन केले आहे. व्यवहारात ईश्वर, जीव व प्रकृती हे तीन भिन्न भिन्न दिसतात, त्याचे कारण माया किंवा अविद्या हे आहे. मायाविवश झाल्यामुळे जीवात्मा विषय व असत्य यांत मग्न होतो व ज्ञानापासून दूर जातो. किनारामाचा शिष्य आनंद सांगतो, की पाच तत्त्वांचा एक पिंजरा बनलेला असून, जीवात्मा त्यात बद्ध आहे. पिंजऱ्याला आशा व तृष्णा यांचे दार लावलेले असून, मायामोहाचे कुलूप ठोकलेले आहे. सारे जगच मायेच्या भ्रमजालात अडकले आहे, ही आश्चर्याची गोष्ट आहे. किनाराम म्हणतो, की मातापिता, पतिपत्नी, सगेसोयरे हे सर्व उपाधिजन्य व आभासमात्र आहेत. संसाराची असारता व शरीराची नश्वरता लक्षात घेऊन माणसाने या जन्मीच आपला उद्धार करून घेतला पाहिजे. सत्संग व भगवद्‌भजन हा उद्धाराचा एकमेव मार्ग आहे. किनाराम

सांगतो, की तुम्ही हरिनामाची शेती करा; त्यात तुम्हांला कवडीचाही खर्च येणार नाही; नफा मात्र पुष्कळ होईल.

भक्तियोगाप्रमाणे ज्ञानयोगानेही मनुष्याला मोक्ष प्राप्त करून घेता येतो. मोक्षाची प्राप्ती योगसाधनेनेही करून घेता येते; मात्र त्यासाठी हठयोगापेक्षा ध्यानयोग अधिक श्रेयस्कर होय. ध्यानयोगाच्या द्वारे पिंडात ब्रह्मांडाचे, आत्म्यात परमात्म्याचे व शिवात शक्तीचे तादात्म्य संपन्न होते.

योगसाधनेचे वाम व दक्षिण असे दोन भेद आहेत. वाम पक्षात पंच मकार हे सिद्धीला साहाय्यभूत ठरतात. त्यामुळे शक्तीचे प्रतीक असलेल्या माईराम म्हणजे साधिका या साधकाबरोबर सहचरी म्हणून राहू शकतात. शक्तीचे प्रतीक म्हणून कुमारीची पूजा हेही साधनेचे एक अंग आहे. निर्जनस्थान, विशेषतः श्मशान, हे साधनेसाठी योग्य स्थान आहे. शवसाधन हे साधनेचे एक प्रमुख अंग आहे. या सर्व साधनेसाठी गुरूची आवश्यकता आहे. त्याच्या मार्गदर्शनाखालीच सर्व साधना करायला हवी.

ध्यानयोगक्रियेत साधकाची सुरती म्हणजे ध्यानदृष्टी नेत्रातील अष्टदल कमलात असणाऱ्या सूचीद्वाराच्या मार्गाने ब्रह्मांडात प्रवेश करते आणि इडा, पिंगला व सुषुम्ना यांच्या त्रिवेणीत मज्जन करून सहस्रदलात फिरत राहते. तिथून ती 'बंकनाला'त प्रवेश करते व वर चढून 'भंवर गुंफे'त दाखल होते. या गुंफेत शिरल्याबरोबर साधकाला दिव्य दृष्टी प्राप्त होते आणि त्याला अद्भुत दृश्ये दिसू लागतात, तसेच अनोळखी सुगंधही येऊ लागतात. इथे अनाहत नाद गुंजत राहतो. हीच संतांची अमरपुरी किंवा अकह् लोक होय. इथे आत्मा व परमात्मा यांचे अद्वैत होते. हाच मोक्ष होय.

योगप्रक्रियेच्या अवस्थेत साधकाने 'सोऽहं' जप अवश्य केला पाहिजे. कारण जोपर्यंत 'सोऽहं' जपाचा अभ्यास होत नाही तोपर्यंत साधकाचे दैहिक, दैविक व भौतिक ताप नष्ट होत नाहीत.

या संप्रदायात गुरुभक्ती आणि सत्संग म्हणजे भगवद्भक्तांची संगती यांवर भर दिलेला आहे. सत्संगामुळे मनाची मलिनता धुवून जाते, तशीच अध्यात्ममार्गातही प्रगती होते. साधूंची संगती ही कल्पवृक्षाप्रमाणे आहे. तिच्या योगाने संसारातील दुःख व क्लेश नाहीसे होतात.

अघोर मताचा प्रसिद्ध आचार्य किनाराम याने हरिदास किंवा संत यांचे आचारविचार कसे असावे, ते सांगितले आहे. तो म्हणतो, संत हे सत्यव्रत असले पाहिजेत. त्यांचा सद्गुरूवर विश्वास असला पाहिजे. आध्यात्मिक प्रेमाच्या मस्तीत दंग होऊन त्यांनी साधनामार्गावर अग्रेसर राहिले पाहिजे. संतोष हे त्यांचे व्रत, क्षमा हे कुटुंब, धैर्य हा साथीदार व कर्तव्य हे मित्र असले पाहिजे. दुसरा एक संत धवलराम म्हणतो, की जटा, भस्म, माला व मृगचर्म यांच्या योगे कोणी संत बनत नाही. तसेच संताला पूजा, व्रते, इ. बाह्य कर्मकांडाची आवश्यकता नाही. त्याने रामनाम घेतले म्हणजे झाले. खरा संत हा त्यागी व विरागी असतो. तो तपाचरणात मग्न असतो. सर्वांभूती त्याचा समभाव असतो. तसेच, या जगात राहूनही, कमलपत्राप्रमाणे तो जगाच्या व्यवहारापासून निर्लिप्त असतो. तो जातपात, शिवाशिव किंवा भक्ष्याभक्ष्य असले भेदभाव मानीत नाही. लोकांच्या कल्याणासाठी तो जडीबूटी, औषधे, मंत्रोपचार, इत्यादींची माहिती करून घेतो.

सरभंग मताचा अधिक प्रचार उत्तर भारतातील बिहार, बंगाल, आसाम व उत्तर प्रदेश या राज्यांत आहे. बिहारमधील चंपारण्य जिल्हा हे या मताचे केंद्र आहे. चंपारण्यात या संप्रदायाचे एकसष्ट मठ आहेत. हे मठ प्रायः गावापासून दूर, गंडकीच्या तीरावर किंवा गावाच्या श्मशानाजवळ आहेत. याशिवाय, सारण जिल्ह्यात बावीस व मुजफ्फरपूर आणि नेपाळचा तराईप्रदेश यांत वीस मठ आहेत. काशीचा किनाराम, चंपारण्यातील भिनकराम, भीखमराम, सदानंदबाबा व बालखंडीबाबा आणि सारणमधील लक्ष्मीसखी या संतांनी या मताचा विशेष प्रचार केला आहे.

या मताच्या संतांचे निर्वाणी (निरबारी) व घरबारी असे दोन भेद आहेत. किनाराम व भिनकराम हे दोघे निर्वाणी संत होते. निर्वाणी मतात स्त्रियांना स्थान नाही. भीखमरामाच्या परंपरेत घरबारी असतात. बालखंडीबाबाच्या परंपरेत माईराम म्हणजे स्त्रिया असतात व साधू विवाह करून घरदार थाटू शकतात. निर्वाणी मतावर वैष्णव मताचा आणि घरबारी मतावर तांत्रिक शाक्तांचा अधिक प्रभाव आहे. घरबारी मठात माईराम म्हणून ज्या स्त्रिया आहेत, त्यांपैकी बऱ्याचशा नैतिक अधःपतनामुळे त्यांच्या समाजातून बहिष्कृत केलेल्या आहेत. मठात आश्रय घेतल्यावर त्या एकेका साधूशी पत्नीत्वाच्या नात्याने राहू लागल्या. जातिबहिष्कृत झालेले अनेक पुरुषही या संप्रदायात शिरले आहेत.

या पंथातील लोक भक्ष्याभक्ष्याचा विधिनिषेध पाळीत नाहीत. सामान्यपणे यांना काहीही अखाद्य व अपेय नाही. कुठल्याही प्राण्याचे मांस हे खातात. इतकेच नव्हे, तर मेलेल्या माणसाचे मांसही हे भक्षण करतात. मद्य, मासे यांचेही ते सेवन करतात. जो असा अनियंत्रित आहार-विहार करतो, तो मोठा सिद्ध समजला जातो.

या संप्रदायाचे अनुयायी पिण्यासाठी मातीचा कमंडलू व खाण्यासाठी एक खापर जवळ बाळगतात. त्यांची वस्त्रे भगव्या

किंवा खाकी रंगाची असतात. हे लंगोटी, लांब कुडता, लुंगी व चादर किंवा घोंगडी एवढी वस्त्रे वापरतात. काही लोक हातात कडे घालतात व अंगाला भस्म लावतात. यांच्यापैकी काही भिक्षा मागतात व त्या वेळी एकतारी, खंजिरी, इ. वाद्ये वाजवतात.

या मताचे लोक भेटले असता बंदगी किंवा 'राम राम' म्हणून एकमेकांना अभिवादन करतात. भक्ष्याभक्ष्याचा प्रकार सोडल्यास यातील संतांचे वर्तन प्रायः आदर्श असते. ते सदाचारी, त्यागी व उदार मतांचे असतात. जेव्हा केव्हा त्यांना जनतेची सेवा करायची संधी मिळते, तेव्हा ते तिचा फायदा घेतात. मंत्र व जडीबुटी यांच्या द्वारे ते लोकांच्या रोगराईवर उपचार करतात. यांच्यापैकी काही लोक भक्ष्याभक्ष्याबाबतची सामान्य नियंत्रणे पाळतात. अशा लोकांना समाजात अधिक मान-मान्यता व प्रतिष्ठा मिळते. काशीचा किनाराम लोकप्रिय होता व त्याच्या मठाबद्दलही लोकांच्या मनात आदराची भावना होती.

सामान्यपणे त्या त्या मठाच्या गुरूच्या निर्वाणदिनी मठात भंडारा होतो. त्या वेळी अन्नाबरोबरच मांस व मदिरा यांचेही वाटप होते. याशिवाय, निरनिराळ्या मठांत ठराविक दिवशी मेळावे भरतात. काशीच्या किनारामाच्या मठात दरवर्षी भाद्रपदातील लोलार्क षष्ठीला मेळावा भरतो. त्या वेळी अनेक साधू तिथे जमतात. स्त्रिया त्यांच्याकडे आशीर्वाद मागायला येतात. काशीतील वेश्या या संप्रदायाच्या शिष्या असून, वर्षातून दोनदा त्या मठात जातात आणि तिथल्या साधूंना काही उपहार देतात. असे केल्याने आपला आवाज बिघडणार नाही, असा त्यांचा विश्वास असतो. माधोपूर (चंपारण्य जिल्हा) येथील मठात दरवर्षी माघ तृतीयेला मेळावा भरतो व तो महिनाभर असतो. त्या वेळी दूरदूरहून सरभंगी साधू इथे येतात. मेळाव्याच्या काळात नाचगाणे होते, रास होतो व लोक खूप मजा करतात.

बहुतेक मठांत, मठाच्या आद्य संस्थापकाची समाधी असते. समाधीच्या पुढे त्याच्या काही वस्तू ठेवलेल्या असतात. रोज समाधीबरोबर त्या वस्तूंचीही पूजा होते. समाधीपुढे धूपदीप जाळतात आणि खाद्यपदार्थांचा नैवेद्य दाखवतात. विशेष प्रसंगी मासे, मांस व मद्य हे पदार्थही अर्पण करतात. काही ठिकाणी समाधीला भांग, गांजा हे पदार्थही अर्पण करतात.

या संप्रदायाचे लोक आपल्या गुरूशिवाय अन्य देवदेवतांची पूजा करीत नाहीत. रोज स्नान झाल्यावर ते गुरूच्या समाधीला पुष्पहार घालतात आणि स्वयंपाक झाल्यावर त्यातील थोडे अन्न घेऊन समाधीजवळच्या अग्नीत त्याच्या आहुती देतात.

या संप्रदायातले काही साधू शेतीवाडी करून उदरनिर्वाह करतात. काहीजण लाकडाच्या किंवा लोखंडाच्या वस्तू तयार करून विकतात. काहीजण भिक्षा मागतात; तर काही ठिकाणी हे लोक स्वतः उपजीविकेसाठी काहीच करीत नाहीत. गावातील लोक त्यांना वार्षिक काही द्रव्य देतात व त्यावर त्यांचा उदरनिर्वाह चालतो. [ सं. स. सं. ]

**सरमा** (१) वेदकालातील एक मंत्रद्रष्टी स्त्री. पणी लोकांनी आर्य जनांच्या गायी पळवून नेल्या असता इंद्राने हिला गायींचा शोध करण्यास सांगितले. गायींचा शोध करीत ती पणींकडे गेली तेव्हा तिचा पणींशी जो संवाद झाला, तो एका सूक्तात (ऋ. १०.१०८) आहे.

रसा नदीच्या पलिकडे फार दूर असलेल्या गुप्त अशा वसाहतीत ती अचानक गेल्यामुळे पणी आश्चर्यचकित झाले. पणींनी आपल्या जवळील संपत्ती इंद्राच्या स्वाधीन करावी, असा इंद्राचा निरोप तिने पणींना सांगितला. गोधन लपविल्याबद्दल इंद्र त्यांना योग्य ती शिक्षा करील, असेही तिने सांगितले. सर्व धन पर्वतावर सुरक्षित आहे, त्याचे संरक्षण करण्यास शस्त्रसज्ज व शूर योद्धे आहेत, अशी बढाई मारीत, पणींनी धनाचा पत्ता सांगितला. सरमेच्या धमकीमुळे घाबरलेले पणी तिला वश करण्यासाठी म्हणाले, 'आम्ही तुला आमची भगिनी मानून तुला धनभाग देऊ.' पण तिने नकार दिला व शेवटी ती म्हणाली, 'ऋताच्या मार्गाने जाण्यासाठी गाईंना मुक्त करा.'

ऋग्वेदात अन्यत्र सरमेचे तीन निर्देश आहेत. यजुर्वेदात (मैत्रा. सं. ४.६) सरमा म्हणजे वाणी, असे म्हटले आहे. पण वेदोत्तर वाङ्मयात तिला देवशुनी म्हणजे देवांची कुत्री म्हटले आहे. यास्काने निरुक्तात तोच अर्थ दिला आहे. पारस्कर गृह्यसूत्रात सरमा ही कुत्री असल्याचे सुचविले आहे. सरमा शब्दापासून सारमेय हा शब्द झाला. त्याचा अर्थ देवांचे कुत्रे असा होतो. श्याम व शबल हे देवांचे दोन कुत्रे सरमेचे पुत्र मानले गेले आहेत.

बृहद्देवतेत मात्र (२.५२–८४) सरमेचा स्त्री म्हणून निर्देश केलेला आहे. आधुनिक संशोधकांनाही सरमा ही देवांची कुत्री होती, हे मत मान्य नाही. कुन्हनच्या मते सरमा म्हणजे वादळी मेघ होय. माक्स म्यूलरने सरमा म्हणजे उषा असे प्रतिपादले आहे. हेच मत ग्राह्य मानून हिलेब्रान्टने सरमा = उषा हे समीकरण सिद्ध केले आहे. सारमेय म्हणजे सूर्य व चंद्र असेही तो म्हणतो.

एन्ही याने सरमेची सरयूशी तुलना करून, सरमा म्हणजे वादळाची देवता आणि सारमेय हे तिचे पुत्र वायुदेव होत, असा निष्कर्ष काढला आहे. मॅक्डोनेलच्या मते, सरमा ही कुत्री होती असे सुचविणारा एकही शब्द ऋग्वेदात नाही.

सरमा म्हणजे उषा या मताचे विवेचन प्रा. उषा. वि. करंबेळकर यांनी केले आहे, ते असे –

प्राचीन व अर्वाचीन सर्वत्र लेखकांनी सरमा शब्दाची व्युत्पत्ती स = सरणे या धातूपासून दिली आहे. त्यामुळे सरमा म्हणजे पुढे सरणारी देवता असा अर्थ होतो. सरण्यू हा शब्द सरमा शब्दाशी जुळणारा आहे. दोन्ही शब्दांत सृ हा एकच धातू आहे. ब्लूमफील्डने सरण्यू = उषस् असे मत मांडले आहे. त्याच प्रमाणे सूर्या या शब्दातही सृ हाच धातू आहे.अशा प्रकारे व्युत्पत्ति-शास्त्राच्या दृष्टीने सरमा, सरण्यू व सूर्या एकच होत. सरमेला उद्देशून किंवा तिच्या संबंधाने वेदांत आलेल्या ऋचांचे बारकाईने निरीक्षण केले तर, ते सरमा = उषस् हे समीकरण सिद्ध करण्यास उपयोगी पडते. सरमा ही सातत्याने गाईंच्या संबंधात आलेली आहे. अगदी असाच संबंध उषस् आणि गाई यांचाही आहे. उषस्शी संबंधित गाई म्हणजे प्रकाशाची तांबूस किरणे होत. सरमा ही अगदी आकाशाच्या अंतापासून, फार दूरच्या मार्गाने येते. उषेचे वर्णनही तसेच आहे. ऋताच्या मार्गाने जाऊनच सरमेला गाईंचा शोध लागला. उषसू ही तशीच ऋताच्या मार्गाने जाणारी आहे. दोघीही सुभगा म्हणजे सुंदर आहेत. उषस् व सरमा दोघींना देवांची माता म्हटलेले आहे.

पणींनी चोरलेल्या गोधनाचा शोध करण्यासाठी इंद्राने दूती म्हणून सरमेला पाठवले व तिने ते गोधन शोधून काढले. उषस्-चाही पणींशी असाच संबंध आहे. पणी म्हणजे अंधकाराच्या शक्ती व उषस् ही अंधकाराचा नाश करणारी म्हणून तिची वारंवार स्तुती केलेली आहे. पणी गाईंना म्हणजे प्रकाशकिरणांना लपवून ठेवतात. सरमा ही पणींना गाई सोडण्यास सांगते व उषस् ही अंधकाराला तेच सांगते. यावरून सरमा म्हणजे दीर्घकालीन रात्रीनंतर येणारी उषस् असा निष्कर्ष काढता येतो. [प्रा. च. को.; प्रा. उषा करंबेळकर, नवभारत, सप्टेंबर १९६९]

(२) ऋषभ पर्वतावरील शैलूष नामक गंधर्वाची कन्या. हिचा जन्म मानस सरोवराच्या तीरावर झाला. त्या वेळी सरोवराचे पाणी सारखे वाढत होते. हिची आई त्या पाण्याला 'सर मा' असे म्हणाली, तेव्हा पाणी वाढणे थांबले. त्यावरून हिचे नाव सरमा असे पडले. ही रावणाचा भाऊ बिभीषण याची पत्नी झाली (वा. रा. ३.१२). ही सीतेला वस्तुस्थिती सांगून तिचे सांत्वन करीत असे. त्यामुळे तिला धीर येई [प्रा. च. को.]

**सरयू** (१) एक प्राचीन नदी. ऋग्वेदात हे नाव तीनदा आले आहे. यदु व तुर्वश या लोकांनी सरयू नदी ओलांडली आणि चित्ररथ व अर्ण यांचा पराजय केला, असे वर्णन एका ठिकाणी आहे. एका ऋचेत सरयूचा उल्लेख सिंधू व सरस्वती या नद्यांबरोबर केलेला आहे आणि दुसऱ्या एका ऋचेत (५.५३.९) रसा, अनितभा व कुभा यांच्या बरोबर आहे. सरयू ही नदी मोठी असून, सिंधू व सरस्वती यांच्यामधून वाहत होती. हिला सांप्रत घग्घर असेही म्हणतात. घर्घरा या संस्कृत शब्दाचा हा अपभ्रंश आहे. ही नदी पंजाबात आहे. [म. ज्ञा. को. ३; प्रा. भा. सं.; जॉ. ऋ. इं.]

(२) उत्तर प्रदेशातली एक पवित्र नदी. हिला सांप्रत घाघ्रा असे म्हणतात. अयोध्या नगरी सरयूच्या तीरावर आहे, असे रामायणात सांगितले आहे. ही नदी गंगेला मिळते. दशरथ राजाने सरयूच्या तीरावर अश्वमेध यज्ञ केला. लक्ष्मणाने यात नदीत देहत्याग केला.

सरयू नदी मानस सरोवरात उगम पावते, असे महाभारतात सांगितले आहे. बौद्ध वाङ्मयात हिचा निर्देश सरभू या नावाने केलेला आढळतो. मिलिंदपन्ह या ग्रंथात भारतातील दहा मोठ्या नद्यांत हिचा समावेश केलेला असून, ही हिमालयात उगम पावते, असे म्हटले आहे.

वीरमित्रोदयाच्या तीर्थप्रकाशात सरयूचे माहात्म्य वर्णिलेले आहे. ही नदी विष्णूच्या डाव्या अंगठ्यातून उगम पावली आणि मानस सरोवरातून बाहेर येऊन हिमालयातून भारतात वाहत आली. तिचे जल अत्यंत पवित्र तीर्थ आहे; या नदीत स्नान केल्यामुळे महापातकांचे क्षालन होते, असे सांगितले आहे [हि. जॉ. ए. इं.; हि. ध; . इं. इं. ४.]

**सरयूदास** (इ. स. १८४७ – १९११) एक रामोपासक संत. हा गुजरातमधील पारडी या गावी जन्मला. लहान वयातच याचे लग्न झाले होते; पण थोड्याच कालात त्याची पत्नी निवर्तली. त्यानंतर त्याने भगवानदास या संताचे शिष्यत्व स्वीकारले. गुरूने याचे पूर्वीचे भोगिलाल हे नाव बदलून ते सरयूदास असे ठेवले. याने गुरूसमवेत तीर्थयात्रा केल्या, गुरुसेवा केली आणि त्याचबरोबर शास्त्राध्ययनही केले.

त्रिकमदास पटेल याने दरियापुरवाडी येथे मुरलीधराचे मंदिर बांधून तिथे सरयूदासाची राहण्याची सोय केली. सरयूदास काही काळ तिथे राहिला व तिथे एक अन्नछत्र स्थापून तो पुढे अहमदाबादला गेला.

उपासनामयसिद्धान्त नावाचा एक ग्रंथ सरयूदासाने रचला असून, त्यात अनेक ग्रंथांच्या आधारे उपासनेची तत्त्वे विशद केली आहेत. रामानुजीय नारायणोपासना, वृंदावनातील कृष्णोपासना आणि अयोध्येतील रामोपासना, या तीन्ही उपासनांचे रहस्य या ग्रंथात सांगितले असून, तीन्ही उपासनापद्धतींचा मेळ घातला आहे. हा सर्वांना पुढीलप्रमाणे उपदेश करी –

मृत्यू व ईश्वर यांचे सतत स्मरण ठेवा. परधन मृत्तिकेसमान लेखा. परस्त्री मातेसमान माना. गोड बोला. पण मितभाषी व्हा.

आणि सदैव सत्याचा आश्रय करा. [ भा. सं. म.; रा. भ. शा. ]

**सरवदे जोशी** भिक्षेकऱ्यांची एक जात. या लोकांची वस्ती महाराष्ट्रात व कर्नाटकात आढळते. एकनाथ, तुकाराम, रामदास, इ. मराठी संतांनी यांचा उल्लेख केला आहे. पंचांग सांगून भिक्षा मागणे हा यांचा प्रमुख व्यवसाय होय. परंतु यांना पंचांग समजतेच असे मात्र नाही. सत्ययुगात आम्ही देवांना भविष्य सांगत होतो आणि आता आम्हांला जी भिक्षा मिळत होते ती त्याचे फळ आहे, असे हे सांगतात. यांच्या कुटुंबातील सर्वच घटक, गावोगाव भटकत भविष्य सांगण्याचा धंदा करतात. भिक्षा मागताना यांच्या पाठीवर हुडकी नावाचे डमरूसारखे एक लहानसे वाद्य असते. कधी कधी हे गायी, म्हशी यांच्या खरेदी-विक्रीचाही व्यवसाय करतात. हे लोक पायजमा व लांब अंगरखा घालतात व डोक्याला पांढरे पागोटे बांधतात. [ बॉं. ग. प्रा.; म. श. को. ७ ]

**सरसदास** (इ.स. चे १७ वे शतक) हरिदासी संप्रदायाच्या अष्टाचार्यांतील पाचवा आचार्य. तत्कालीन बंगालच्या राजाचा मंत्री कमलापती याचा हा पुत्र असून, प्रसिद्ध संत नागरीदास याचा धाकटा भाऊ होय. नागरीदासाच्या परलोकगमनानंतर हा टट्टी संस्थानाच्या गादीवर बसला.

सरसदास गौड ब्राह्मण होता. संत विहारिनदास हा याचा गुरु होय. याने सुमारे बेचाळीस वर्षे वृंदावनात घालविली. हा सिद्धकोटीतील महात्मा होता, अशी त्याच्या संबंधीची समजूत होती. याने आपल्या उत्तराधिकाऱ्याचा परिचय नसतानाच त्याचे नाव घोषित केले आणि त्याची ती वाणी सत्य ठरली, असे म्हणतात.

सरसदासाचे काव्य पदे, कवित्त व सवैय या स्वरूपात उपलब्ध आहे. त्याची समस्त कविता सिद्धांतपद व शृंगारपद या दोन प्रकारांत विभागली जाते. पहिल्या प्रकारात पूर्वाचार्यांची स्तुती असून, दुसऱ्यात राधा-कृष्णांच्या विविध लीलांचे वर्णन आहे. या समग्र काव्यात व्रजभाषेबरोबर अन्य बोलीतील शब्दांचाही वापर आढळतो. त्यावरून त्याची बहुभाषाभिज्ञता दिसून येते. [ व्र. ध. सं. इ.; व्र. कृ. मा. भ. ]

**सरस्वती** (१) एक प्राचीन महानदी. वैदिक आर्यांनी सप्तसिंधू प्रदेशात म्हणजे पंजाबात वसाहत केली, त्या काळी त्या प्रदेशातून वाहणाऱ्या नद्यांमधली ही श्रेष्ठ नदी आहे. ऋग्वेदात ६.६१, ७.९५ व ७.९६ ही तीन सरस्वतीसूक्ते असून, अन्य काही सूक्तांतही सरस्वती नदीचा निर्देश केलेला आहे. दुसऱ्या मंडलातील एका सूक्तात (२.४१.१६–१७) आर्य जनांनी हिला देवी व माता मानून तिची प्रार्थना केली आहे, ती अशी –

> अम्बितमे नदीतमे देवितमे सरस्वति ।
> अप्रशस्ता इव स्मसि प्रशस्तिमम्ब नस्कृधि ।।
> त्वे विश्वा सरस्वति श्रितायूंषि देव्याम् ।
> शुनहोत्रेषु मत्स्व प्रजां देवि दिदिड्ढि नः ।।

अर्थ – हे श्रेष्ठ माते, श्रेष्ठ नदी, श्रेष्ठ देवी, सरस्वती, आम्ही अज्ञात आहो. आम्हांला तू सुविख्यात कर. हे सरस्वती देवी, तुझ्यावर सर्वांची आयुष्ये अवलंबून आहेत. आम्हां शुनहोत्रांच्या घरी येऊन तू संतुष्ट हो आणि आम्हांला विपुल प्रजा लाभू दे.

वेदकाली सिंधू, सरस्वती व सरयू यांची गणना महानद्यांत होत असून, त्यांतली सरस्वती ही सर्वश्रेष्ठ नदी मानली जात होती. ऋग्वेदातील एका सूक्तात हिचे वर्णन केले आहे, ते असे –

गजराजाने कमळ उपटावे त्याप्रमाणे आपल्या प्रबळ प्रवाहाने व प्रचंड लाटांनी ही पर्वताचे कडे उलथून टाकते. हिचे सामर्थ्य अपार असून, ही अजिंक्य आहे. ही तेजस्वी जलधारांनी खळखळ आवाज करीत जाणारी, उदकपूर्ण नदी आमच्या सर्व शत्रूंना व्यापून टाको (ऋ. ६.६१.२–९).

त्याच सूक्तात हिला सप्त नद्यांची भगिनी, पंचजनांचा उत्कर्ष करणारी, रथसदृश वेगवती, धनदात्री अशा प्रकारे सर्वश्रेष्ठ म्हटले आहे (६.६१. १०–१४). दुसऱ्या सरस्वतीसूक्तांतही पर्वतात उगम पावून समुद्राला मिळणाऱ्या नद्यांमध्ये श्रेष्ठ, अत्यंत वेगवती, जलसमृद्ध, पवित्र, कल्याणकारी व अन्नदात्री असे हिचे वर्णन आहे (ऋ. ७.९५ व ९६).

ऋग्वेदातील सिंधुसूक्तात ( १०.७५.५ ) यमुना, शुतुद्री, परुष्णी, असिक्नी, वितस्ता, इ. नद्यांच्या समवेत सरस्वतीचा उल्लेख आलेला आहे. हिच्या तीरावर वैदिक ऋषींनी असंख्य यज्ञ केले. सरस्वतीसूक्तांत ( ७.९५ व ९६ ) सरस्वान देवाचा निर्देश केलेला आहे. ज्या समुद्राला सरस्वती मिळते, त्याचे सरस्वान हे नाव असावे. हा समुद्र सप्तसिंधू प्रदेशाच्या दक्षिणेला पसरलेला असावा.

वेदोत्तर काळात सरस्वती नदी कुरुक्षेत्रात एका जागी गुप्त झाली. त्या स्थानाला विनशन म्हणतात. त्याचा उल्लेख ब्राह्मण ग्रंथांत आढळतो. (पं. विं. ब्रा. २५.१०.६; जै. उ. ब्रा. ४.२६). हिमालयात प्लक्षप्रस्रवण नामक स्थानी या नदीचा उगम झाला, असे महाभारतात सांगितले आहे. हे स्थान विनशनाच्या उत्तरेला, घोड्यावरून प्रवास केल्यास चाळीस दिवस लागतील इतक्या अंतरावर होते. या दोन स्थानांमधील सरस्वतीच्या तीरावरील भूमी सारस्वत सत्र करण्यास अत्यंत योग्य होय

असे तांड्य ब्राह्मणात सांगितले आहे (२५.१०.१२).

महाभारतात (वन. १३०.४–५) विनशन आणि चमसोद्भेद या दोन तीर्थांचा उल्लेख आढळतो. विनशन या स्थानी सरस्वती नदी भूगर्भात लुप्त झाली आणि चमसोद्भेद या स्थानी ती पुन्हा प्रकट झाली व तिथे तिला अनेक नद्या मिळाल्या, असे म्हटले आहे. सरस्वती नदी गुप्त झाली या घटनेचा उल्लेख श्रौत सूत्रांतही आहे. कात्यायनाने 'शुक्लपक्ष सप्तम्यां दीक्षां सरस्वतीविनशने' हे सूत्र रचले, त्या वेळी सरस्वती नदी विनशन येथे गुप्त झालेली होती, असे दिसते. यासंबंधी लाटचायनाने दिलेली माहिती अशी —

सरस्वतीचा स्रोतःप्रवाह पश्चिम दिशेकडे जातो. तिचा प्रथमांश व शेषांश अद्याप सर्व लोकांना दिसतो आहे. मध्यभाग मात्र भूगर्भात गुप्त होऊन वाहत आहे, तो कोणालाही दिसत नाही. त्याला विनशन असे म्हणतात (ला. श्रौ. सू. १०.१५.१).

सरस्वती नदी हिमालयात उगम पावली, कुरुक्षेत्रातून वाहत जाऊन राजस्थानाच्या वाळवंटात लुप्त झाली, ती अबू पर्वतातून प्रकट होऊन कच्छच्या रणात पुन्हा लुप्त झाली, सौराष्ट्रात पुन्हा प्रकट होऊन शेवटी प्रभासतीर्थाजवळ समुद्राला मिळाली, असे वर्णन पुराणांत केलेले आहे. या सरस्वती नदीच्या तीरावर असलेल्या अनेक तीर्थस्थानांचा उल्लेख त्यात आहे. श्रीकृष्णाचा भाऊ बलराम याने प्रभास क्षेत्रापासून प्लक्षप्रस्रवण या स्थानापर्यंत तीर्थयात्रा केली, तिचे वर्णन महाभारतात केलेले आहे (शल्य. ३५–५४). प्लक्षप्रस्रवण हे हिमालयातले सरस्वतीचे उगमस्थान पाहून बलराम आश्चर्यचकित झाला. ते स्थान गंगोत्री–जम्नोत्रीप्रमाणेच अत्यंत पवित्र मानले जाते.

सध्या पंजाबातून वाहणारी सरसुती नदी हीच प्राचीन सरस्वती होय, असे मानले जाते. ही नदी हिमालयाच्या शिवालिक पर्वतराजीतील सिरमूर पर्वतात उगम पावून, अंबाला जिल्ह्यात आद-बद्री या ठिकाणी पठारावरून वाहू लागते. ती छलौर नामक गावाजवळ वाळूत लुप्त होऊन भवानीपुराजवळ प्रकट होते; बलछप्पर येथे ती पुन्हा लुप्त होऊन बरखेडाजवळ पुन्हा प्रकट होते. उणइजवळ मार्कंडा नदी हिला मिळते आणि मग ती घग्गर नदीला मिळते. घग्गर नदीला प्राचीन काळी सरयू हे नाव होते. अशी ही सरस्वती त्यानंतर कुरुक्षेत्रातील विनशन म्हणजे राजस्थानातील हनुमानगडाजवळील भटनेर गावाजवळ वाळवंटात लुप्त होते.

पुराणांत सरस्वती नदीला देवी मानून तिचे स्तवन केले आहे आणि तिच्याविषयी अनेक काल्पनिक कथा रचलेल्या आहेत. सरस्वती नदी विनशन येथे गुप्त का झाली यासंबंधी काही भिन्न भिन्न कथा निरनिराळ्या पुराणांत सांगितलेल्या आढळतात. त्यांतली पद्म पुराणात सांगितलेली कथा अशी —

वडवानल सर्व देवांना ग्रासू लागला तेव्हा ब्रह्मदेवाने आपली कन्या सरस्वती हिला सागरात त्याचे विसर्जन करण्यास सांगितले. मग एका कलशात वडवानल घालून ती नदीरूपाने हिमालयावर अवतरली. मार्गावरील पापी जनांचा स्पर्श होऊ नये म्हणून ती विनशन येथे भूगर्भात शिरली. वडवानलाचा ताप असह्य होऊ लागला, की ती भूतलावर अवतीर्ण होत असे. शेवटी तिने पश्चिम समुद्रात प्रभास क्षेत्री वडवानलाचे विसर्जन केले. (पद्म पु. ५.१८.१५९–६०).

शिवाने ब्रह्महत्या केल्यामुळे त्याला जे महापातक लागले, त्याच्या क्षालनासाठी तो सरस्वती नदीत स्नान करू लागताच ती गुप्त झाली, असे वामन पुराणात सांगितले आहे (३.८). उतथ्य ऋषीच्या शापामुळे ती मरुप्रदेशात गेली व तिथे शुष्क झाली, अशीही एक कथा आहे.

ब्रह्मवैवर्त पुराण आणि देवीभागवत यांतील कथा अशी – लक्ष्मी, गंगा व सरस्वती या श्रीविष्णूच्या पत्नी होत्या. एकदा गंगा व सरस्वती यांचे भांडण होऊन दोघींनी एकमेकांना शाप दिला. त्यामुळे त्या नदीरूपांत पृथ्वीवर अवतरल्या.

पुराणांत सरस्वती नदीचे तीन भिन्न प्रकारचे उल्लेख आढळतात – (१) कुरुक्षेत्रातली नदी, (२) पुष्कर-सरस्वती व (३) प्रभास येथे समुद्राला मिळणारी नदी. वामन पुराणात कुरुक्षेत्रातील सरस्वतीचे उल्लेख असून, पद्म पुराणांत पुष्कर-सरस्वती व प्रभास-सरस्वतीचे उल्लेख आहेत. पुराणकारांच्या मते या तीन्ही नद्या एकच होत. पण आधुनिक संशोधकांच्या मते त्या तीन वेगवेगळ्या नद्या आहेत.

महाभारतात सरस्वती व दृषद्वती या नद्यांच्या मधल्या प्रदेशाला कुरुक्षेत्र म्हटले आहे (वन. ८३.२०४–२०५). त्याच प्रदेशाला मनूने ब्रह्मावर्त हे नाव दिले आहे (मनु. २.१७-१८). सरस्वती ही कुरुक्षेत्राची उत्तरेकडील सीमा होय. कुरुक्षेत्रात विनशन येथे गुप्त झालेली सरस्वती नंतर चमसोद्भेद, शिवोद्भेद व नागोद्भेद या तीन ठिकाणी पुन्हा प्रकट झाली, असे महाभारतात म्हटले आहे (वन. ८२.१११-१२).

पंजाबातील पाच नद्या म्हणजे सरस्वती नदीच्याच पाच धारा होत, असे यजुर्वेदात म्हटले आहे (३४.११).

या नदीच्या मार्गात अनेक सरोवरे निर्माण झालेली आहेत, म्हणून हिला सरस्वती हे नाव मिळाले असावे.

ही गुप्त झालेली सरस्वतीच अरवली पर्वतात पुन्हा उगम पावली व कच्छच्या रणात पुन्हा लुप्त झाली. गुजरात व सौराष्ट्र या प्रदेशांत सरस्वती नावाच्या दोन लहान नद्या आहेत, असे म्हणतात. एक सरस्वती नदी पालनपूर, महीकांठा व बडोदे या

प्रदेशांतून वाहत जाऊन मग प्रभास क्षेत्रात समुद्राला मिळते.

सरस्वती नदी कोणती यासंबंधी संशोधकांनी बरेच तर्कवितर्क केले आहेत. रॉथ, झिमर, ग्रिफिथ व लुडविग यांच्या मते ऋग्वेदातील सरस्वती ही सिंधूच होय; पण हे मत सर्वमान्य झालेले नाही. सरस्वती ही सिंधूची एक उपनदी होती, असेही काही संशोधकांचे मत आहे; पण तेही सिद्ध झालेले नाही. पूर्व पंजाबातली सरसुती हीच प्राचीन सरस्वती होय, असे मानले जाते. ती भटनेरजवळ वाळवंटात गुप्त झाली आहे.

राजस्थानात हक्रा नामक नदीच्या कोरडचा पात्राचे संशोधन सर ऑरेल स्टीन याने केले असता, तिथे अनेक प्रागैतिहासिक स्थानांचा शोध लागला. ती हक्रा म्हणजेच वाळवंटात लुप्त झालेली प्राचीन सरस्वती होय, असे के. एन. दीक्षित यांचे मत आहे. पूर्व पंजाबातील घग्गर म्हणजे सरस्वती नदी राजस्थानात पुढे कोरडी झाली आणि तिलाच पुढे हक्रा हे नाव मिळाले.

ऋग्वेदातील सरस्वती पूर्ववाहिनी होऊन गुप्त झाली व प्रयाग क्षेत्रात गंगा-यमुनासंगमाला मिळाली, अशी समजूत प्रचलित आहे. त्यामुळे त्या संगमाला त्रिवेणीसंगम म्हणतात. भाविक हिंदू त्या संगमाला तीर्थराज म्हणजे सर्वश्रेष्ठ तीर्थ मानतात. पण सरस्वती नदीविषयीची ही कल्पना भ्रामक आहे.

आर्य लोक भारतात येण्यापूर्वी इराणात वसले होते, तेव्हा त्यांनी तिथल्या एका नदीला सरस्वती हे नाव दिले होते आणि भारतात येऊन पंजावात स्थायिक झाल्यावर त्यांनी तेच नाव इथल्या एका नदीला दिले असावे, असे अनुमान डॉ. वी. के. घोष यांनी केले आहे. तसे असेल, तर आर्य लोक इराणात असतानाच ऋग्वेदाची रचना सुरू झाली असावी, ही हिलेब्रांटची कल्पना बरोबर मानावी लागेल.

डॉ. डी. डी. कोसांबी यांच्या मते सरस्वती ही वैदिक नदी अफगाणिस्तानात होती. सांप्रत तिला हेलमंड हे नाव आहे. कालांतराने आर्यांनी सरस्वती हेच नाव पंजाबातल्या महानदीला दिले, असे त्यांचे म्हणणे आहे. याविषयी श्री. वा. द. सातोस्कर म्हणतात –

डॉ. कोसंबी यांचे मत मला ग्राह्य वाटते. कारण आर्य लोक कॉकेशस पर्वताच्या पायथ्यापासून मध्यपूर्व, इराण, अफगाणिस्तान, वायव्य सरहद्द प्रांत या मार्गे भारतात येऊन पंजावात स्थिर झाले. पूर्व पंजाबातील अंबाला, पतियाळा, जिंद, हिसार या भागाला ब्रह्मावर्त किंवा कुरुक्षेत्र म्हणतात. तो प्रदेश सरस्वती व दृषद्वती यांच्या मधे होता. वेदांची रचना इराणात सुरू होऊन ब्रह्मावर्तात पूर्ण झाली असावी. ब्रह्मावर्ताच्या वायव्य सीमेवरील सरस्वती ही ऋग्वेदातील अखेरची सरस्वती असावी. स्थलांतर केल्यावर मूळ प्रदेशातील नावे नवीन प्रदेशातील स्थळांना देण्याची प्रथा आधुनिक काळातही दिसून येते. पूर्वकाळातही ती तशीच असावी.

श्री. मनोहर लाल भार्गव यांनी हिमालयापासून सिंधुसागरापर्यंत सरस्वतीच्या पात्राचे संशोधन करून जो निष्कर्ष काढला आहे, तो असा –

ऋग्वेदात सरस्वान नामक समुद्राचा निर्देश अनेक जागी आढळतो (७.९५.३; ७.९६ ४–६; १०.६६.५). त्या समुद्राला सरस्वती नदी मिळत असल्यामुळे तिच्यावरून त्याला सरस्वान हे नाव मिळाले. तो तिचा पती अशी कल्पना करून वैदिक ऋषींनी त्यालाही देव मानले. त्यांनी त्याचे जे वर्णन केले आहे, त्यावरून असे दिसते, की ज्या नद्यांच्या तीरी यज्ञयाग केले जात होते, त्यांचे पाणी या समुद्राला मिळत होते. हा समुद्र सप्तसिंधू प्रदेशाच्या दक्षिणेला असून, त्याच्या पूर्वेला अर्वावत समुद्र आणि पश्चिमेला परावत समुद्र होता.

हा सरस्वान समुद्र कालांतराने कोरडा झाला. त्याचे जे काही भाग उरले होते, त्यांचे उल्लेख नंतरच्या संस्कृत वाङ्मयात आढळतात. रामायणात रामाने द्रुमकुल्य समुद्र आटवला असे म्हटले आहे (६.२२.३१,४१). आभीर लोक त्या समुद्राच्या काठी वसलेले होते. हे आभीर लोक विनशनाजवळ होते, असे महाभारतात म्हटले आहे. त्यावरून द्रुमकुल्य समुद्र बीकानेरच्या उत्तर भागात होता, असे वाटते. सांभर, सरगोट, रिवासा, कुचावन, डीडवाना, इ. तलावांत खारे पाणी आहे. हे तलाव म्हणजे सरस्वान समुद्राचे अवशेषच होत. सध्याचे राजस्थानी वाळवंट आहे तिथेच सरस्वान समुद्र असावा.

भूस्तरशास्त्रज्ञांनी राजस्थानात प्राचीन काळी समुद्र होता हे मान्य केले आहे. ऋग्वेदकालानंतर त्या समुद्राचा तळ हळूहळू वर आला असावा आणि केव्हातरी तिथे प्रचंड उत्पात होऊन उरले सुरले पाणी दक्षिणेकडील महासागरात वाहून गेले असावे. त्यानंतर ती भूमी कोरडी व्हायला दीर्घ काळ लागला असेल. त्या अवधीत सरस्वती नदीच्या प्रवाहाने त्या वालुकामय प्रदेशातून मार्ग काढला असावा. ही महानदी अंबाला विभाग, उत्तर राजस्थान, भवालपूर, सिंध, कच्छ व सौराष्ट्र या प्रदेशांतून वाहत जाऊन प्रभास क्षेत्रात पश्चिम समुद्राला मिळाली.

कालांतराने राजस्थानातील काही भूभाग पूर्ण कोरडा होऊन तिथे वाळवंट निर्माण झाले. तोपर्यंत सरस्वतीचा प्रवाह अनेक कारणांनी क्षीण झाला असावा. सरस्वती म्हणजे घग्गर नदी पंजाबातील सिर्सा गावाच्या उत्तरेस काही अंतरावरून पश्चिमेकडे वाहत जाते. हे तिचे पात्र वालुकामयच आहे. पुढे हनुमानगडाजवळ ते अगदी कोरडे होते. हे कोरडे पात्र पाकिस्तानातही आहे, तिथे त्या नदीला हक्रा म्हणतात. तीच पुढे कच्छच्या

रणातून कच्छच्या आखाताला मिळते. [ जॉ. ऋ. इं.; हि. जॉ. ए. इं.; हि. ग्र.; ऋ. द.; वे. ए.; सा. भू.; इं. इं.; श्री. आनंदस्वरूप गुप्त – प्रो. ऑ. ओ. कॉं. २२ भाग २ ]

(२) विद्या व कला यांची देवता. हिला वाक्, वाग्देवी, वागीश्वरी, वाणी, शारदा, भारती व वीणापाणी अशीही अन्य नावे आहेत. सरस्वती शब्दाचा अर्थ गतिमती असा आहे. आध्यात्मिक अर्थाने ती निष्क्रिय ब्रह्माचे सक्रिय रूप आहे. म्हणूनच तिला ब्रह्मा–विष्णू–महेश या सर्वांना गती देणारी शक्ती असे म्हणतात. सरस्वतीचा वर्ण उज्ज्वल असल्यामुळे ती जोतिर्मय



सरस्वतीदेवी

ब्रह्माचे प्रतीक आहे. याच अर्थाने ब्रह्मा–विष्णू–महेशांना ती पूज्य आहे.

ऋग्वेदकालापासूनच सरस्वतीला महत्त्व प्राप्त झालेले आहे. ऋग्वेदात तिला देवता न म्हणता नदीचे मानवी स्वरूप मानले आहे. दुसऱ्या एका ठिकाणी तिला देवतांची राणी म्हटले आहे (ऋ. ८.८९. १०–११). उपनिषदांत सरस्वतीची वाणीशी एकरूपता मानलेली आहे. प्रज्ञावृद्धीसाठी आणि वाणीत गोडवा यण्यासाठी उपनिषदांत तिची प्रार्थना केलेली आढळते.

सरस्वती ही मुळात पंजाबातील एक नदी. तिच्या प्रवाहाची अस्खलित वाणीशी तुलना केलेली आढळते. तिथूनच सरस्वतीला वाणीची स्फूर्तिदेवता आणि विज्ञान व साहित्य यांची अधिष्ठात्री देवता मानले गेले.

पुराणांत सरस्वतीला कुठे ब्रह्मदेवाची पत्नी, तर कुठे त्याची कन्या असे म्हटले आहे. काही ठिकाणी तिला विष्णूची पत्नीही म्हटले असून, तिचे नाव पुष्टी असे आहे.

विष्णुधर्मोत्तर पुराण, अंशुमद् भेदागम, पूर्ण कारणागम, रूपमंडन, इ. ग्रंथांत तिचे स्वतंत्रपणे वर्णन केले आहे, ते असे –

सरस्वती शुभ्रवर्ण, शुभ्रवस्त्रधारिणी, अलंकारविभूषित, चतुर्भुज, पुंडरीक (शुभ्र कमल), माला, वीणा व कमंडलू धारण करणारी आहे. पुस्तक व वीणा ही तिची प्रमुख चिन्हे होत. हिचा ध्यानश्लोक पुढीलप्रमाणे आहे –

या कुन्देन्दुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता
या वीणावरदण्डमण्डितकरा या श्वेतपद्मासना ।
या ब्रह्माच्युतशङ्करप्रभृतिभिर्देवैः सदा वन्दिता
सा मां पातु सरस्वती भगवती निःशेषजाड्यापहा ॥

अर्थ – कुंद, चंद्र व हिमतुषार यांच्यासारखा जिचा वर्ण आहे, जी शुभ्र वस्त्रांनी आवृत आहे, जिचा हात सुंदर वीणेने अलंकृत आहे, जी श्वेत कमलावर बसली आहे, जिची ब्रह्मा–विष्णू–महेशादी देवगण सार्वकाल वंदना करीत आहेत आणि जी सर्व प्रकारच्या जडतेचा नाश करणारी आहे, अशी सरस्वती देवी माझे रक्षण करो.

पुढील ध्यानश्लोक सरस्वतीचे आध्यात्मिक सामर्थ्य व्यक्त करणारा आहे –

शुक्लां ब्रह्मविचारसारपरमामाद्यां जगद्व्यापिनीं
वीणापुस्तकधारिणीमभयदां जाड्यान्धकारापहाम् ।
हस्ते स्फाटिकमालिकां विदधतीं पद्मासने संस्थितां
वन्दे तां परमेश्वरीं भगवतीं बुद्धिप्रदां शारदाम् ।

अर्थ – शुभ्र वर्णाची म्हणजेच सत्त्वगुणी, ब्रह्मविद्येचे श्रेष्ठ असे सार, विश्वातली आद्य अशी शक्ती, जगताला व्यापून उरलेली, वीणा व पुस्तक धारण करणारी, अभयदात्री, अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करणारी, हातात स्फटिकमण्यांची माळ धारण करणारी, पद्मासनावर बसलेली आणि बुद्धिदात्री अशा त्या भगवती परमेश्वरी शारदेला मी वंदन करतो.

बृहदारण्यकात तिला धेनू म्हटले असून, तिची उपासना करण्यास सांगितले आहे, त्या पंक्ती अशा –

वाचं धेनुमुपासीत । तस्याश्चत्वारस्तनाः । स्वाहाकारो वषट्कारो हन्तकारः स्वधाकारः। तस्या द्वौ स्तनौ देवा उपजीवन्ति स्वाहाकारं वषट्कारं च । हन्तकारं मनुष्याः स्वधाकारं पितरः । तस्याः प्राण ऋषभो मनो वत्सः ॥

अर्थ – वाचारूपी धेनूची उपासना करावी. स्वाहाकार, वषट्कार, हन्तकार व स्वधाकार असे तिला चार स्तन आहेत. पहिल्या दोहोंकडून देव आपले उपजीवन मिळवतात. तिसरा व

नववा हे अनुक्रमे मनुष्य व पितर यांना उपजीवन देतात. प्राण हा या धेनूचा वृषभ असून, मन हे तिचे वासरू आहे.

सरस्वतीच्या चार भुजा या चार दिशांची प्रतीके आहेत. हे तिचे सर्वव्यापित्वाचे लक्षण होय. तिच्या हातातले पुस्तक हे स्थूल अर्थाने ज्ञानप्राप्तीचे साधन असून, आध्यात्मिक अर्थाने सर्वज्ञान-मय अशा वेदांचे प्रतीक आहे. तिच्या हातातली माला ही स्थूल अर्थाने एकाग्रतेचे चिन्ह असून, आध्यात्मिक अर्थाने मातृकावर्ण-शक्ती आहे. वीणा ही स्थूल अर्थाने जीवनसंगीताचे प्रतीक व आध्यात्मिक अर्थाने साधकांना सिद्धी व निर्वाण देणारी आहे. कमल हे सृष्टीचे प्रतीक होय.

श्वेत हंस हे सरस्वतीचे वाहन कल्पिलेले आहे. सरस्वती कधी हंसावर बसलेली दिसते, तर कधी हंस तिच्या मागे असतो. बौद्ध व जैन परंपरेत मयूर हे तिचे वाहन आहे. क्वचित सिंहही तिचे वाहन म्हणून दाखवतात. हिंदू, बौद्ध व जैन या सर्व धर्मांना सरस्वती ही पूज्य आहे. बौद्ध परंपरेत ती मंजुश्रीची पत्नी आहे. बौद्धांनी तिचे पाच भिन्न आकार-प्रकार कल्पिले आहेत, ते असे—

१. महासरस्वती – द्वादशवर्षा, हिमगौर, द्विभुज, उजवा हात अभयमुद्रेत आणि डाव्या हातात कमळ.

२. वज्रवीणा-सरस्वती – गौर, द्विभुज व वीणावादिनी.

३. वज्रशारदा – कमलात बसलेली, मुकुटात चंद्रकोर, त्रिनेत्र, द्विभुज, तसेच कमल व पुस्तक धारण करणारी.

४. आर्यसरस्वती – चतुर्दशवर्षा, गौरकांती, डाव्या हातात कमलनाल व त्यावर प्रज्ञापारमितेची पोथी.

५. वज्रसरस्वती – त्रिमुख, षड्भुज, रक्तवर्ण, रक्तकेशी, समोरचे मुख निळे, रक्तकमळावर प्रत्यालीढ मुद्रेत बसलेली, हातात कमल व त्यावर प्रज्ञापारमितेची पोथी. तलवार आणि कात्री ही डाव्या हातांतली आयुधे व उजव्या हातीं ब्रह्मकपाल, रत्न व चक्र.

जैनांची श्रुतदेवी म्हणजे सरस्वतीच आहे. हिचे रूपध्यान वर दिलेल्या 'या कुन्देन्दु' या श्लोकातल्यासारखेच आहे.

स्कंदपुराणात शिवाची शक्ती अशा कल्पनेने तिचे रूपध्यान वर्णिले आहे, ते असे – जटामुकुट, त्यावर चंद्रकोर, गळा निळा, त्रिनेत्र. या वर्णनावरून ही सरस्वती म्हणजे शिवाचे स्त्रीरूप वाटते.

द्विभुज, चतुर्भुज, षड्भुज व दशभुज अशी तिची रूपे आहेत. द्विभुज व चतुर्भुज ही पौराणिक रूपे होत. षड्भुज हे बौद्ध रूप आहे व शिल्परत्नात दशभुज रूपाची कल्पना केलेली आहे.

उ. भारतातल्या सरस्वतीच्या मूर्ती सामान्यपणे द्विभुज किंवा चतुर्भुज आहेत. ज्या वेळी ती द्विभुज असते, त्या वेळी ती विष्णु-पत्नी असते. भारतीय कलेत द्विभुज सरस्वती सनपूर्व दुसऱ्या शतकापासून आढळते.

भरहूतच्या कठड्यावर तिचे जे मूर्तिकरण झाले आहे, ते बहुधा पहिले असावे. इथे ही देवी पद्मपीठावर डौलाने उभी असून, दोन हातांनी वीणा वाजवीत आहे. तिच्या मुखावरील दिव्य गूढ भाव व अलंकारांचे रुचिर प्रदर्शन यांमुळे तिला दैवी सौंदर्य प्राप्त झाले आहे. मध्ययुगात बंगाल-बिहारमध्ये ती चतु-र्भुज व वीणाधारिणी बनली. तिकडील मूर्तिकारांनी अग्निपुरा-णात सांगितल्याप्रमाणे तिच्या अनेक मूर्ती बनवल्या. सनपूर्व दुसऱ्या शतकातील मानता येईल अशी एक मूर्ती आंध्रप्रदेशात घंटशाला येथे आहे. हे मूर्तिकरण मोहेंजोदडो येथे आढळणाऱ्या कलेशी सादृश्य दाखवणारे आहे.

मथुरेजवळ कंकाली टीला येथील उत्खननात एक मूर्ती मिळाली आहे. ती जैनकालीन सरस्वती वाटते. ती बसलेली असून, तिच्या अंगावर विपुल वस्त्रे आहेत. तिच्या दोन बाजूंना दोन सेवक असून, एकाच्या हाती जे पात्र आहे, ते बहुधा ज्ञान-पात्र असावे.

गुप्तकालापासून सरस्वतीच्या मूर्तिकरणात खूप विकास झाला. संगमरवरी सरस्वती मूर्ती घडल्या त्या बाराव्या शतकात. संगमरवरी सरस्वती त्रिभंग अवस्थेत उभी असते. तिच्या हाती पूर्ण विकसित कमळ असते. हात चार. पहिल्या उजव्या हाताची वरमुद्रा, मनगटात माळ, पुढल्या डाव्या हाती कमंडलू, मागच्या उजव्या हाती कमळ आणि डाव्या हाती पुस्तक. राजस्थानी मूर्तीत वीणा आढळत नाही. तिच्या दोन्ही अंगी दोन दासी असतात. त्यांच्या हाती मात्र वीणा असते. तिच्या पीठिकेवर एक पुरुष व एक स्त्री हात जोडून व देवीकडे तोंड करून उभे असतात. पीठिकेच्या मध्यावर एका वर्तुळात हंस कोरलेला असतो.



सरस्वतीची मूर्ती, पल्लू (बीकानेर), इ. स. चे १२ वे शतक

दक्षिणेत चोल व चालुक्य यांच्या कालात सरस्वतीच्या मूर्ती घडू लागल्या. तंजाऊर येथील बृहदीश्वराच्या मंदिरात वीरासनावर बसलेली एक द्विभुज सरस्वती आहे. तिच्या डाव्या हातात पुस्तक आहे. मस्तकावर उंच मुकुट असून, त्यावर एक छत्र आणि त्याही वर एक वृक्ष दिसतो. बोधिवृक्षासारखा हा ज्ञानवृक्ष असावा. तिच्या बाजूला चवरीधर सेवक आणि वरच्या अंगी उडते विद्याधर आहेत.

उत्तर भारतातल्या सरस्वतीच्या मूर्ती मूर्तिकलेच्या दृष्टीने सामान्यतः सारख्या आहेत. दक्षिण भारतातले मूर्तिकरण याहून वेगळे आहे. उत्तर भारतात ती ज्ञानदेवता आहे, तर दक्षिण भारतात ती शिवशक्ती आहे. सरस्वतीच्या ज्या षड्भुज मूर्ती आढळतात, त्या बहुतेक दक्षिण भारतातल्या आहेत. आणखी एक द. भारतीय वेगळेपण म्हणजे तिची कुचबंधपट्टिका हे होय.

चालुक्यकालीन (१०वे शतक) एक मूर्ती षड्भुज व परशुधारिणी आहे. तिने उजव्या हाताने कल्पवृक्षाची डहाळी धरलेली असून, ती भुजंगत्रासित नावाचे नृत्य करते. त्यासाठी तिचा डावा पाय उजव्या मांडीपर्यंत उचललेला दिसतो. श्रीशैलम येथे ब्रह्मेश्वराच्या मंदिरात अशीच एक षड्भुज मूर्ती आहे. होयसळ यादवांच्या काळातली अशीच एक सरस्वती होयसळेश्वराच्या मंदिरात आहे. तिथे ती षड्भुज, नर्तकी व शिवाची शक्ती या रूपात दिसते. तिच्या माथी जटामुकुट असून, तिच्या अंगावर अलंकारांची रेलचेल आहे. तिला प्रभावळ असून, दोही अंगी दोन सेविका उभ्या आहेत. [ इं. बु. इ.; ऋ. द.; इ. मा. हिं. बु. डी.; भा. प्र. वि.; डे. हिं. इ.; वेदविद्या; क्रि. स्ट. ले. उ. ]

**सरस्वतीशयनसप्तमी** एक व्रत. आश्विन शुद्ध सप्तमीस प्रारंभ करून नवमीपर्यंत हे पाळतात. सप्तमीला ग्रंथांची पूजा करतात व त्या दिवसापासून व्रतस्थ राहतात. दशमीपर्यंत अध्ययन, अध्यापन व लेखन बंद ठेवतात. कारण त्या काळात सरस्वती निद्रिस्त असते. या व्रतात चतुर्भुज, सर्वालंकारविभूषित, तसेच पुस्तक, वीणा व कमंडलू धारण करणारी, अशी सरस्वतीची सुवर्णाची किंवा पाषाणाची मूर्ती समोर ठेवून तिचे ध्यान करावे, असे सांगितले आहे, फल – तीव्र बुद्धीची प्राप्ती. [ व्र. प. ]

**सरहपा** (इ. स.चे ८वे शतक) चौऱ्यायंशी सिद्धांतला पहिला सिद्ध. हा राहुलभद्र व सरोजवज्र या नावांनीही ओळखला जातो. भारताच्या पूर्वभागातील राज्ञी नामक नगरीत हा एका ब्राह्मण कुळात जन्मला. याने प्रथम संस्कृत भाषेत प्रावीण्य मिळवले व पुढे तो बौद्ध भिक्षू बनला. नालंदा येथील विद्यालयात तो कितीतरी वर्षे राहिला. तिथेच तो ध्यान-मंत्र-तंत्र यांच्याकडे आकृष्ट झाला. नालंदाहून तो दक्षिणेतल्या श्रीशैल पर्वतावर वास्तव्याला गेला. तिथेच कदाचित तो मंत्रमार्गाकडे आकृष्ट झाला असावा.

तिबेटी परंपरेत याचा जन्म ओडिसात झाल्याचे सांगितले जाते. त्याने मध्यदेशात जाऊन त्रिपिटकांचे अध्ययन केले आणि ओडिसात जाऊन त्याने मंत्रयानाची दीक्षा घेतली, असेही तिबेटी परंपरा सांगते.

सरहपा मंत्रयानातून पुढे सहजयानी बनला. तिथे शर(सर) =बाण बनवणाऱ्या शरकाराच्या कन्येला आपली महामुद्रा बनवून तो सहजसाधनेसाठी अरण्यात गेला. तिच्या बरोबरीने तोही बाण बनवू लागला म्हणून लोक त्याला सरहपा म्हणू लागले. तिथे त्याला अनेक शिष्य मिळाले, त्यात शवरपा हा त्याचा प्रमुख शिष्य बनला. काही लोक नागार्जुनालाही सरहपाचा शिष्य मानतात.

सरहपाने काही ग्रंथ संस्कृतात आणि काही अपभ्रंश भाषेत लिहिले आहेत. कायाकोष, अमृतवज्रगीती, चित्तकोष, अजवज्रगीती, डाकिनीगुह्यवज्रगीती, दोहाकोष, उपदेशगीती, इ. त्याच्या ग्रंथांची नावे आहेत. तंजूर येथील ग्रंथालयात त्याच्या २१ ग्रंथांपैकी १६ ग्रंथ भोटिया भाषेत अनुवादित केलेले आहेत.

सरहपाने हिंदू, शैव, जैन आणि बौद्ध या सर्वांच्या साधनापद्धतीवर कठोर टीका केली आहे. ब्राह्मणांबद्दल तो म्हणतो – ब्राह्मणांना रहस्यज्ञान नाही. ते व्यर्थच वेदपाठ करतात आणि जल व कुश घेऊन मंत्रानुष्ठान करतात. ते घरात बसून होम करतात आणि उगाच डोळ्यात धूर भरून घेतात...

सरहपाची साधना वज्रयानी तत्त्वज्ञानाला अनुसरून असली तरी तो वज्रयान मागे टाकून खूप पुढे गेला आहे. सरहपाचा सगळा जोर चित्तशुद्धीवर आहे. तो म्हणतो –

> चित्तेक्के सअलबीअं भवणिव्वाणो वि जस्स विफुरति।
> तं चिंतामणि रुअं पणमह इच्छा फलं देंति ।
> चित्ते बज्झे बज्झइ मुक्के मुक्कइ णत्थि संदेहा ।
> बज्झंति जेण विजडा लहु परिमुच्चंति तेण वि बुहा ॥

अर्थ – चित्त हेच सर्वांचे बीजरूप आहे. भव किंवा निर्वाण दोन्ही चित्तामुळेच निर्माण होतात. त्या चिंतामणिरूप चित्ताला प्रणाम करा. त्याचा आश्रय घ्या. तेच तुम्हांला अभीष्ट प्राप्त करून देईल. बद्ध चित्तामुळे बंधने आणि मुक्त चित्तामुळे मुक्ती प्राप्त होते, यात कसलाही संदेह नाही. ज्या चित्ताने जड जीव बंधनग्रस्त होतात, त्याच चित्ताच्या साहाय्याने पंडित लोक शीघ्र मुक्त होतात.

रहस्यवाद, पाखंडखंडन, मंत्र-देवतादिकांची व्यर्थता, योग-

…र्व, गुरुमहिमा, हे सरहपाच्या काव्याचे प्रमुख विषय आहेत. [हि. सा.; अ. सा. ; उ. भा. सं. प.]

**सरहुल उत्सव** उरांव, मुंड, संताळ, इ. आदिवासी लोकांचा एक उत्सव. हा एक पुष्पोत्सव आहे. वसंत ऋतूत पलाश, मोह, शाल, इ. वृक्ष रंगीबेरंगी फुलांनी बहरले आणि त्यांचा सुगंध आसमंतात दरवळू लागला, की आदिवासी लोकांना या उत्सवाचे वेध लागतात. सर्वसाधारणपणे या उत्सवाला सरहुल असे नाव असले, तरी निरनिराळे आदिवासी आपल्या बोलीत त्याला निरनिराळ्या नावाने ओळखतात. मुंड आदिवासी त्याला बा(फूल)परब, उरांव खद्दी व संताळ बाहा असे म्हणतात.

मुंड लोक चैत्र महिन्यात हा उत्सव साजरा करतात. गावातील जाहेरथानात (देवस्थानात) या दिवशी ग्रामपुरोहित ग्रामदेवतांची पूजा करतो, त्यांना शेंदूर, अक्षता व साल वृक्षाची फुले अर्पण करतो, मद्याचा नैवेद्य दाखवतो व कोंबडा बळी देतो. पूजा झाल्यावर पुरोहित घरोघर जातो व लोकांना आशीर्वाद देऊन प्रसाद म्हणून साल वृक्षाची फुले वाटतो. लोक त्याला तांदुळाचे मद्य प्यायला देतात. त्यानंतर लोक संगीत व नृत्य यांत रंगून जातात. हा उत्सव झाल्यावाचून मुंड लोक नव्या फुलाफळांचे सेवन करीत नाहीत.

साल वृक्षाला फुले आली, की उरांव लोक हा उत्सव करतात. चैत्र पंचमीच्या दिवशी लोक गावाच्या पहानाबरोबर गावाच्या साल वृक्षांच्या पवित्र राईत जातात. तिथे असलेल्या सारना बुढी देवतेची पहान पूजा करतो आणि तिला पाच कोंबडे बळी देतो. नंतर त्या कोंबड्यांचे मांस तांदुळाबरोबर शिजवून खिचडी बनवतात आणि प्रसाद म्हणून ती जमलेल्या लोकांना वाटतात. नंतर सर्वजण रानात जाऊन साल वृक्षाची फुले गोळा करून आणतात. दुसऱ्या दिवशी पहान काही लोकांसह गाजत गाजत गावातल्या प्रत्येक घरी जातो. घरातील स्त्रिया त्याचे पाय धुतात व त्याला नमस्कार करतात. नंतर तो त्यांच्याबरोबर नृत्य करतो. नृत्य संपल्यावर तो स्त्रियांच्या केसात साल वृक्षांची फुले माळतो आणि घराच्या दारावरही काही फुले खोचून ठेवतो. मग स्त्रिया त्याच्या अंगावर पाणी ओततात, त्याला तेल लावतात, खायला देतात आणि तांदुळाचे मद्य प्यायला देतात. त्यानंतर सर्वजण भोजन व मद्यपान करतात. मग तरुणतरुणी मस्तकी साल फुलांचे सुंदर टोप घालून रात्रभर व दुसऱ्या दिवशीही खूप नाचतात.

उरांव लोक हा उत्सव झाल्यावरच शेतीच्या कामाकडे वळतात. मुळात पृथिवी व सूर्य यांच्या विवाहाप्रीत्यर्थ उरांव लोक हा उत्सव साजरा करीत असत, असे म्हणतात. उत्सवाच्या वेळी लोक गीते गातात व नृत्य करतात.

संताळ लोक फाल्गुन महिन्यात हा उत्सव करतात. तो तीन दिवस चालतो. त्या वेळी नायके हा पुरोहित देवपूजा करतो आणि देवाला शेंदूर, दुर्वा, अक्षता आणि मोहाची व साल वृक्षाची फुले वाहतो; त्याला तांदुळाच्या दारूचा नैवेद्य दाखवतो आणि कोंबडा बळी देतो. त्या कोंबड्याची खिचडी बनवून प्रसाद म्हणून लोकांना वाटतात. दुपारी नायके घरोघर जाऊन लोकांना आशीर्वाद देतो व साल वृक्षाची फुले वाटतो. लोक नायकेचा खूप आदरसत्कार करतात. त्यानंतर लोक एकमेकांवर पाणी उडवतात. हा उत्सव झाल्यावरच लोक नव्या पानांचा उपयोग करू लागतात. [इं. स्ट. पा. प्रे., एप्रिल १९६०; वन्यजाती, जुलै १९६८]

**सरहुल नृत्य** उरांव लोकांचे एक नृत्य. सरहुल उत्सवाच्या वेळी हे नृत्य करतात. हे स्त्री-पुरुषांचे संमिश्र नृत्य असून, ते अनेक दिवस चालते. एखादे गाव यजमानाची भूमिका घेऊन इतर गावांना नृत्यासाठी निमंत्रण देते. मग त्या गावांतील स्त्री-पुरुष हातांत मशाली घेऊन गीते गात त्या गावात जातात. मग तिथे रात्रंदिवस नृत्याचा कार्यक्रम चालतो. एका गावाचे लोक नाचून दमले, की दुसऱ्या गावाचे लोक त्यांची जागा घेतात. नृत्याच्या वेळी स्त्रिया व पुरुष समोरासमोर रांगा करून उभे राहतात. नृत्याला ढोल, नगारा, घंटा, इ. वाद्यांची साथ असते. वाद्यांच्या तालावर स्त्रिया वाकून पुढे पावले टाकतात, तेव्हा पुरुष मागे सरकतात आणि पुरुष जेव्हा पुढे पावले टाकतात, तेव्हा स्त्रिया मागे होतात. मागेपुढे पावले टाकताना स्त्रिया पाठ वळवीत नाहीत; पण पुरुष मात्र वळवतात. पुरुषांच्या हालचाली अधिक जोमदार असतात. 'हो हो' अशा आरोळ्यांनी नृत्याला सुरुवात होते. नंतर ते गीते गाऊ लागतात. गीते बहुधा लहानच असतात. त्यांतले एक गीत असे –

> इसामई काला लगी सोना
> दोसर समय किरोका माला रे
> किरांगा किरो बहीन मद्दूर मोखना समय किरों
> रे मद्दूर मोखना समय किरों

अर्थ – युवती म्हणते, की माझे तारुण्य एकदा गेले तर पुन्हा कधीही परत यायचे नाही. त्यावर युवक उत्तरतो, की तारुण्यही एक वेळ माघारी येऊ शकेल. पण प्रेमभराने आघात करण्याची वेळ मात्र पुन्हा कधी येणार नाही.

मुंड, संताळ, इ. लोकही सरहुल उत्सवाच्या वेळी नृत्ये करतात व गीते गातात. [ए. हो. रा.]

**सराणिया** एक जात. या लोकांची वसती काठेवाडभागात आहे. मारवाड ही यांची मूलभूमी असल्याचे सांगतात. चाकू, कात्र्या, सुऱ्या यांना धार लावणे हा यांचा व्यवसाय असून, त्यासाठी हे गावोगाव भटकत असतात.

यांची लग्ने उघडया मैदानावर होतात. वधूची आई आणि वराचा बाप हे आपापल्या ओटीपोटाला एक मडके बांधून एकमेकांकडे धावत जातात. त्यांची टक्कर होऊन मडकी फुटली म्हणजे लग्न झाले असे समजतात. नवरा जिवंत असेपर्यंत स्त्री दुसरे लग्न करू शकत नाही. तो मेल्यावर तिला लग्न करायला मोकळीक असते.

कालिका व हनुमान या देवतांना हे भजतात.

यांच्यांतील काही लोक प्रेते जाळतात, तर काहीजण प्रेताच्या तोंडावर गवत टाकून ते गवत जाळतात आणि मग प्रेत पुरतात. [ट्रा. का. बाँ.; वि. मुं. रा. प.]

**सरावगी** राजस्थानातील एक जैन जमात. सरा म्हणजे दारू आणि ओगिया म्हणजे घृणा करणारा. या दोन



सरावगी पुरुष

शब्दांनी सरावगी हे नाव बनले आहे. त्याचा अर्थ दारूची घृणा करणारी जमात असा होतो.

या जमातीत दोन संप्रदाय आहेत – (१) तेरापंथी आणि (२) वीसपंथी. मुक्तीसाठी जे तेरा वचनांची आवश्यकता मानतात, ते तेरापंथी आणि वीस वचनांची आवश्यकता मानतात, ते वीसपंथी होत. दोन्ही पंथांत मूर्तिपूजा आहे; पण पूजाप्रकारात भेद आहे.

तेरापंथी लोक जिनमूर्तीला वस्त्र नेसवतात, पण फल-पुष्प वाहत नाहीत. याचे कारण फल-पुष्पे तोडताना झाडाची किंवा वेलीची मोडतोड होऊन हिंसा होते, असे त्यांना वाटते. मात्र दुसऱ्याने तोडून आणलेले फल-पुष्प ते जिनमूर्तीला वाहतात. मूर्तीपुढे दिवे लावतात.

वीसपंथी लोक मात्र वरीलपैकी काहीही करीत नाहीत. ते फक्त सुक्यामेव्याचा नैवेद्य दाखवतात.

मारवाडात वीसपंथियांच्याविषयी आदर आहे, तेवढा तो तेरापंथियांविषयी नाही.

**विवाहप्रथा** – लग्नासाठी पुरोहिताला बोलवीत नाहीत. वधू-वरांनी तोरणाला स्पर्श करणे एवढाच विवाहविधी असतो.

**मर्तिक प्रथा** – सरावगी लोक मृताचे सुतक पाळीत नाहीत आणि क्रियाकर्मांतरही करीत नाहीत. तिसऱ्या दिवशी बसून एक दगड पाठीमागे टाकतात व म्हणतात. 'तू तुझा आम्ही आमचे!' मनुष्य मेल्यावर त्याचे आणि त्याच्या आप्तेष्टांचे कसलेही लागेबांधे राहत नाहीत, असे ते मानतात. [रा. जा.]

**सराव संपुट** गुजरात प्रदेशातील जैन समाजाच्या विवाहातला एक विधी. त्यासाठी नवरा मुलगा वधूगृही आल्यावर त्याच्या वाटेत लग्नमंडपाजवळ विस्तव व मीठ घातलेला एक परळ ठेवतात. त्यावर दुसरा परळ झाकण ठेऊन त्या संपुटाला तांबडे सूत गुंडाळतात. नवरदेव आपल्या पायाने संपुट फोडून मंडपात प्रवेश करतो. [ल. वि. सो.]

**सरोद** एक ततवाद्य. याला सराबत किंवा शारदी वीणा अशीही अन्य नावे आहेत. श्री. आबासाहेब मुजुमदार यांच्या मते या वाद्याचे प्राचीन नाव स्वरोदर किंवा स्वरावर्त असे असावे.

एका मोठ्या लाकडाच्या ठोकळ्यातून हे वाद्य कोरून बनवलेले असून, त्याची लांबी ३॥–४ फूट असते. वाद्याचा खालचा भाग काहीसा गोलाकार, सुमारे एक फूट व्यासाचा असून तो चामडयाने मढवलेला असतो. हा गोल भाग पुढे निमुळता होत जाऊन पुढच्या गळ्याला जोडलेला असतो. या वाद्यात चिकारीसह मुख्य सहा धातूच्या तारा असून, त्या खालच्या भागात बसवलेल्या घोडीवरून घेऊन, वरच्या टोकाला दोन्ही बाजूंना

वाजणाऱ्या तीन तीन खुंटयांना बांधलेल्या असतात. वरच्या निमुळत्या पोकळ लाकडी भागावर पितळेचा किंवा चांदीचा



सरोद

पातळ व गुळगुळीत पत्रा बसवलेला असतो. त्यामुळे बोटांची त्यावर हालचाल सुलभपणे होते. अनुध्वनीसाठी ११–१२ तारा असतात. उजव्या हातातील जव्याने तार छेडून डाव्या हाताच्या बोटांनी दाबून स्वर वाजवले जातात. जवा म्हणजे बदामाच्या आकाराचा छोटा हस्तीदंती तुकडा होय. या वाद्याच्या कर्नाटकी प्रकारात वरच्या पत्र्यावर सात पडदे असतात. खालच्या बाजूला असलेल्या कातडयाच्या गोल भागात वरच्या काठाला लागून दोन मोठी भोके असतात. त्यामुळे आवाज खुलण्याला मदत होते. या वाद्यावर आलाप, जोड, झाला व मींड उत्कृष्टपणे वाजवता येतात. मंद्र सप्तकात सरोदचा आवाज भरदार व गंभीर असतो. हे वाद्य स्वतंत्र वादनासाठीच प्रसिद्ध आहे. प्राचीन भारतीय शिल्पांत गिटारसारखे जे वाद्य दिसते ते सरोदचे पूर्वरूप असावे, असे श्री. तारळेकर यांचे मत आहे. या वाद्याचा प्रचार खाँसाहेब असदुल्लाखान यांनी शंभर वर्षांपूर्वी बंगालमध्ये केला व आजही तियेच त्याचा विशेष प्रचार दिसतो. [ भा. वा. इ. ]

**सरोवरे** नद्या आणि कुंडे यांच्याप्रमाणेच भारतातली काही सरोवरेही पवित्र म्हणून प्रसिद्ध आहेत. पंपा, बिंदू, पुष्कर, सांभर, मान, नारायण, इ. त्यांची नावे आहेत.

**सर्जेतोलानी** लग्नविधीतील एक लौकिक सोहोळा. बंगालमध्ये लग्न झाल्यावर वधू-वरांना एका खोलीत पाठवितात. त्या खोलीला वासरघर (शयनगृह) असे म्हणतात. तिथे त्या दोघांचे रात्रभर अनेक सोहोळे केले जातात. सकाळी नवरा मुलगा शयनगृहातून बाहेर आला म्हणजे त्याच्या मेहुण्या त्याच्या वस्त्राचा पदर धरून त्याला सर्जेतोलानी मागतात. रात्रभर जागल्याबद्दल आणि त्यांचा बिछाना काढल्याबद्दल हा एक मानाचा कर नवऱ्या मुलाने मेहुण्यांना द्यायचा असतो.

महाराष्ट्रातही हा प्रकार रूढ आहे. मुलीचे गर्भाधान झाले, की दुसऱ्या दिवशी मुलाची वहीण मुलाचा बिछाना काढते. त्या वेळी नवरदेवाने गादीखाली ठेवलेली काही रक्कम बहिणीला मिळते. काही ठिकाणी बहिणीच्या ऐवजी मेहुणीही असते. [ ल. वि. सो.]

**सर्पदंशव्रत** एखाद्याला सर्पदंशाने मृत्यू आला असता त्याच्या आप्तांनी त्याच्या मृत्यूनंतर जीवनाच्या सुखावहतेसाठी करायचे एक व्रत. व्रतकर्त्याने कोणत्याही महिन्याच्या शुक्ल पंचमीच्या दिवशी उपवास करून पिठाच्या पंचफणायुक्त नागप्रतिमेची पूजा करावी. पायसान्नाचे ब्राह्मणभोजन घालावे. घृताच्या आहुती देऊन होम करावा. मग सुवर्णाची नागप्रतिमा ब्राह्मणाला दान देऊन व्रतसमाप्ती करावी. [ ध. सिं. ]

**सर्पपंचमी** कोणत्याही शुद्ध पंचमीला हे व्रत करतात. कर्त्याने त्या दिवशी पयोव्रत पाळावे व सुवर्णाचा सर्प ब्राह्मणाला दान द्यावा. फल – सर्पांपासून अभय. [ हि. ध. ]

**सर्पविद्या** सर्पविष उतरविण्याचे मंत्र असलेली एक पुरातन विद्या. ही विद्या शतपथ ब्राह्मण व छांदोग्य उपनिषद यांत आढळते. तिचे विस्तृत वर्णन काश्यपीय संहितेत आहे. गोपथ ब्राह्मणाचे वर्णन सर्पवेद म्हणून केले जाते. या विद्येलाच गारुडविद्या असे दुसरे नाव असून, आजही मंत्र घालून साप धरणारे गारुडी तिचा उपयोग करतात. ज्या सर्पाने एखाद्याला दंश केला असेल, त्याच सर्पाला जखमेच्या ठिकाणी पुन्हा दंश करायला लावून विष शोषून घ्यायला लावणे, हा या विद्येतील एक प्रमुख भाग आहे. [ सु. वि. को. ]

**सर्पविषापह पंचमी** श्रावण शु. पंचमीचे नाव. या दिवशी सर्पप्रीत्यर्थ व्रत करायचे असते. त्याचा विधी असा – दाराच्या दोही अंगी गोमयाने सर्पांच्या प्रतिमा तयार करून मांडाव्या. गहू, चणे, दही, दूध, दूर्वा व फुले यांनी त्यांची पूजा करावी. फल – सर्पांचा संतोष व सर्पांपासून अभय. पाहा – नागपंचमी. [ हि. ध. ]

**सर्पसंस्कारविधी** एक संस्कार. हा चंद्रदर्शनयुक्त अमावास्येस, पौर्णिमेस किंवा पंचमीस करावा, असे सांगितले आहे. ज्याने या किंवा पूर्वजन्मी सर्पवध केला असेल, त्याने तो लोकांस निवेदन करून तत्प्रीत्यर्थ चौदा कृच्छ्रांचे प्रायश्चित्त करावे. प्रायश्चित्तादाखल ब्राह्मणाला लोहदंड अगर

लोहदंडाचे मूल्य द्यावे. मग राळे, व्रीही, गहू अथवा तीळ यांच्या पिठाची सर्पप्रतिमा बनवून सुपात ठेवावी व पुढील मंत्राने सर्पाची प्रार्थना करावी –

एहि पूर्वमृतः सर्प अस्मिन् पिष्टे समाविश ।
संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः ।।

अर्थ – हे पूर्वी मृत झालेल्या सर्पा, या पिठात तू प्रवेश कर. मी तुझ्या संस्कारासाठी शांत मनाने व भक्तीने तुझी प्रार्थना करीत आहे.

प्रार्थनेनंतर त्या सर्पप्रतिमेची पूजा करावी. मग प्राणायाम करून संस्काराचा संकल्प करावा. संस्कारकर्मानंतर लौकिकाग्नीची प्रतिष्ठा करून त्यात समिधा टाकाव्या. अग्नीच्या आग्नेयीला उदकाचे प्रोक्षण करून चिती करावी. मग आग्नेयी दिशेस अग्र करून दर्भ पसरावे. नंतर अग्नीचे परिसमूहन, परिस्तरण, पर्युक्षण करून पूजन करावे. नंतर इध्माधान, आधारहोम व चाक्षुषीहोम करून सर्प चितीवर ठेवावा. सर्पाच्या मुखात समस्त व्याहृतीने आज्यहोम करावा. स्रुव्याने शेष आज्य सर्पावर घालावे. चमसपात्रातील उदकाने अभ्युक्षण करून, 'अग्ने रक्षा णो०' या मंत्राने अग्नी द्यावा. त्या वेळी 'नमो अस्तु सर्पेभ्यो०' या मंत्राने उपस्थान करावे. नंतर प्रार्थना करावी. [ नि. सिं. ]

## सर्पस्तंभनयंत्र

सर्पदंशापासून आबालवृद्ध जनांना पीडा होऊ नये, यासाठी या यंत्राचा प्रयोग करतात. याची कृती अशी – धोतऱ्याच्या रसाने एका सुंदर भूर्जपत्रावर यंत्र काढतात. साध्यनाम लिहून त्याला दुरेघी वर्तुळाचे वेष्टन देतात. त्याबाहेर अष्टदलपद्म काढून त्याच्या प्रत्येक दलात 'हंसः' हा बीजमंत्र लिहितात. नंतर त्याची यथाविधि पूजा करून ते त्रिलोहाच्या डबीत भरतात व ती डबी दंडात बांधतात. हे यंत्र दृष्टीस पडताच सर्प दूर जातात. चुकून सर्पावर पाय पडला तरी सर्प हे यंत्र धारण करणाऱ्याला दंश करीत नाही व त्याने दंश केला, तरी त्याचे विष चढत नाही, अशी समजूत आहे. यासाठी या यंत्राचा उपयोग करण्यास गरुडाने सांगितले आहे. [ यं. चिं. ]



सर्पस्तंभनयंत्र

## सर्पादिभयनाशनयंत्र

सर्प, वाघ, चोर, इ. उपद्रवी प्राणिमात्रांपासून अभय प्राप्त व्हावे, यासाठी या यंत्राचा उपयोग करतात. याची कृती अशी – शुभ दिवशी गोरोचन, केशर, कापूर व कस्तुरी यांच्या मिश्रणात जाईच्या काष्ठाची लेखणी बुडवून भूर्जपत्रावर यंत्र काढतात. नंतर यंत्राच्या उजव्या वरच्या बाजूस 'ह्रीं' हे बीजाक्षर लिहून, त्याच्या खाली एका खालोखाल अक्षरे काढून साध्यनाम लिहितात. नंतर त्या अक्षरांच्या मागे त्या अक्षरांनी जेवढी जागा व्यापिली असेल, तेवढ्याच जागेत, तेवढ्याच आकाराची 'म', 'ल', 'व' व 'यू' ही बीजाक्षरे लिहितात.

यंत्र पुरे केल्यावर त्याची पूजा करतात. पूजेत गंधहीन किंवा रक्तवर्ण पुष्पे कटाक्षाने वर्ज्य करतात. ही पूजा तीन दिवस करायची असते. या काळात सप्तशतीचा पाठ, खीर व घृत यांनी युक्त असे ब्राह्मण-भोजन व तीन्ही दिवस भूमिशयन या गोष्टी करायच्या असतात. पूजनोत्तर हे यंत्र त्रिलोहाच्या डबीत बंदिस्त करून कंठात अथवा दंडात बांधतात. या यंत्राच्या प्रभावामुळे सर्प, व्याघ्र इत्यादींच्या भयापासून मुक्तता लाभते, अशी समजूत प्रचलित आहे. [ यं. चिं. ]



सर्पादिभयनाशनयंत्र

## सर्पाभय पंचमी

एक काम्य व्रत. याचा विधी असा – श्रावण शु. पंचमीला घराच्या दोन्ही दारांवर गाईच्या शेणाने नागाच्या फणीचे चित्र काढावे. मग त्याची दही, दूर्वांकुर, दर्भ, गंधाक्षता, फुले, इ. पूजाद्रव्यांनी पूजा करावी व ब्राह्मणाकरवी तर्पण करावे. असे केल्याने सर्प व नाग यांच्यापासून भय राहत नाही. [ कृ. क. ]

## सर्वकामव्रत

एक काम्य व्रत. याचे दोन पर्याय आहेत, ते पुढीलप्रमाणे –

(१) माघ वद्य चतुर्दशीला पितरांची पूजा करतात. हे व्रत करणाऱ्याला एक यज्ञ केल्याचे फळ मिळते.

(२) मार्गशीर्ष शु. एकादशीला व्रतारंभ करतात. त्या दिवशी

उपवास करतात व चंद्र, मंगळ, सूर्य, निर्ऋती, वरुण, अग्नी, रुद्र, मृत्यू, दुर्गा, इ. अकरा देवतांची पूजा करतात. वर्षभर अशी पूजा केल्यावर वर्षाच्या अखेर एक गाय दान देतात. फल–रुद्रलोकाची प्राप्ती. [ हि. ध. ]

**सर्वकामावाप्तिव्रत** एक काम्य व्रत. व्रतावधी एक वर्ष. याचा विधी असा–कार्तिकापासून व्रतारंभ करावा. कार्तिक पौर्णिमेला कृत्तिका नक्षत्र असेल त्या दिवशी उपवास करावा आणि नरसिंहाची गंधपुष्पादिकांनी पूजा करावी. उद्यापनाच्या वेळी एक पांढरी गाय, पांढरे वासरू आणि रुपे या वस्तू दान द्याव्या. फल – शत्रूपासून मुक्तता. पुढे मार्गशीर्षापासून आश्विनापर्यंत त्या त्या महिन्यातील पौर्णिमेला उपवास करून श्रीकृष्णाची व त्याच्या निरनिराळ्या रूपांची पूजा करावी. उद्यापनाच्या वेळी निरनिराळ्या प्रकारची दाने द्यावी. फल – सर्व इच्छापूर्ती, पापमुक्तता, स्वर्गप्राप्ती. [ हि. ध. ]

**सर्वकामेश्वरी** एक शाक्त देवता. कालिका पुराणानुसार हिचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे – ही सुंदर कुमारिकेसारखी असून, तिचा वर्ण अरुणाप्रमाणे असतो. ती तरुण आहे. तिचे स्तन उन्नत आहेत. ती मुक्तकेशी आहे. तिची वस्त्रे अरुणप्रभेसमान आहेत. तिच्या गळचात हार आहे. ती प्रेताच्या छातीवर अर्धचंद्राकारात उभी आहे. तिला योनिमुद्रा आवडते. ती विपुल धन देते. वायूप्रमाणे तिची गती आहे. पण ती एका विशिष्ट जागी स्थिर राहू शकते. [ पी. के. गो. को. व्हॉ. ]

**सर्वतोभद्रमंडल** एक तांत्रिक मंडल. एखाद्या वैष्णव व्रताच्या उद्यापनप्रसंगी विशिष्ट चौकोनांनी युक्त अशा सर्वतोभद्रमंडलावर व्रताच्या देवतेची स्थापना व पूजा करतात. सर्वतोभद्राच्या अंतर्गत चौकोनांत निरनिराळे रंग भरावे, असे सांगितले आहे. या मंडलाची मोजमापे निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळी सांगितलेली आहेत. मंडल तयार केल्यावर त्या मंडलात ब्रह्मादी देवतांचे मंत्रपूर्वक आवाहन करतात व त्यांची पूजा करतात. नंतर त्या मंडलावर धान्यराशी घालून त्यावर कलशाची स्थापना करतात. या कलशावर व्रताच्या मुख्य देवतेचे आवाहन करतात. प्रधान होमाच्या वेळी मंडलावर मांडलेल्या देवतांसाठीही आहुती देतात.

सर्वतोभद्रमंडलाचा आत्मसंरक्षणासाठी व इतर अनेक लाभांसाठी उपयोग होतो, असे यंत्रचिंतामणीत सांगितलेले आहे. त्याचा विधी असा –

कृष्णपक्षातल्या रात्री कस्तुरी, चंदन व हिम यांच्या मिश्रणाने एका भूर्जपत्रावर विशिष्ट अंतराने उभ्या-आडव्या पाच रेषा काढाव्यात. त्यामुळे एकूण सोळा कोठे निर्माण होतील.




सर्वतोभद्रमंडल (श. कृ.)

मग त्या कोठचांमध्ये अकारादी क्रमाने सोळा स्वर एकापुढे एक लिहावे. एवढचाने यंत्र पुरे होते. मग त्याची पूजा करावी. ब्राह्मणाला भोजन व दक्षिणा द्यावी.



सर्वतोभद्रमंडल (ऋ. ब्र. स.)

नंतर ते यंत्र एका डबीत किंवा ताइतात घालून पुरुषांनी

आपल्या उजव्या हातात व स्त्रियांनी आपल्या गळ्यात बांधावे. असे केल्याने यंत्र धारण करणारी व्यक्ती सर्वांना प्रिय होते, तिचे भाग्य उदयाला येते व सर्व प्रकारच्या भयांचा निरास होतो, असे सांगितले आहे. [ श. क.; ऋ. ब्र. स. ]

**सर्वनिवरणविष्कंभा** एक बोधिसत्त्व. हा सर्व पापांचा नाश करतो. निष्पन्नयोगावलीत याच्या दोन भिन्न भिन्न रूपांचे वर्णन केलेले आहे.

मंजुवज्र मंडलातले वर्णन असे – याचा वर्ण नील किंवा शुभ्र असून, याचा डावा हात भूस्पर्श मुद्रेत आहे. उजव्या हाताचा



सर्वनिवरणविष्कंभी

अंगठा व तर्जनी जुळवून आणि मूठ वळवून हा प्रशमनाचा अभिनय करतो.

धर्मधातुवागीश्वर मंडलातले वर्णन असे – हा नील वर्णाचा असून, याच्या उजव्या हाती खड्ग व डाव्या हाती विश्ववज्रांकित ध्वज आहे.

हा बोधिसत्त्व चीन व तिबेट या देशांत अत्यंत लोकप्रिय आहे. याच्या भिन्न वर्णांनुसार हा अक्षोभ्य किंवा वैरोचन यांच्या कुलातला मानला जातो.

साधनमालेत विष्कंभी या नावाने याचे वर्णन केलेले आहे, ते असे – हा क्षारवर्णाचा म्हणजे राखी रंगाचा असून, याच्या एका हाती उत्तम रत्न व दुसऱ्या हाताची वरदमुद्रा आहे. खड्ग व पुस्तक ही याची प्रतीके आहेत. [ इं. बु. इ. ]

**सर्वपित्री अमावास्या** भाद्रपद अमावास्येला हे नाव आहे. या तिथीला सर्व पितरांना उद्देशून श्राद्ध करतात. बहुतेक सर्व घरांतून किमान एक तरी ब्राह्मण भोजनाला बोलावतात. कोळी, ठाकूर, कातकरी, कुणबी, इ. जातीत पितरांच्या उद्देशाने या दिवशी भाताचे अथवा पिठाचे पिंड देतात आणि आपल्याच जातीतील काही लोकांना जेवायला घालतात. यांच्यांत या दिवशी ब्राह्मणांना शिधा देण्याचीही चाल आहे. काही ब्राह्मण या रात्री मंत्रजागर करतात आणि इतरेजन ही रात्र नाचगाण्यात घालवितात. पाहा – महालय [ फो. डा. म.; सा. इं. फे. ]

**सर्वपृष्ठेष्टी** इंद्रियांना बळकटी यावी आणि ऐश्वर्य व सामर्थ्य लाभावे या हेतूने ही इष्टी करतात. हिचे वैशिष्टच असे, की हिच्यामध्ये सहा देवता असून, त्या सर्वांसाठी एकच पुरोडाश करतात. राथंतर इंद्र, बार्हत इंद्र, वैरूप इंद्र, वैराज इंद्र, शाक्वर इंद्र व रैवत इंद्र या त्या सहा देवता होत. याचा विधी असा – बारा कपालांवर भाजून एक पुरोडाश तयार करावा. सहाही देवतांच्या यागासाठी एकाच पुरोडाशातून अवदान घ्यावे. पहिल्या देवतेची याज्या ती पुढील देवतेची पुरोनुवाक्या म्हणावी. एकूण ऋचा तीनच असतात. अश्व, वृषभ व बोकड दक्षिणा म्हणून द्यावे. या इष्टीचा बाकीचा विधी दर्शपूर्णमासेष्टीप्रमाणेच असतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे. ]

**सर्वप्रायश्चित्त** मृत्यू जवळ आला आहे याची जाणीव होताच माणूस आपल्या गत आयुष्यात केलेल्या पापांचा स्वमुखाने उच्चार करून जे प्रायश्चित्त घेतो, त्याला सर्वप्रायश्चित्त म्हणतात. त्याचा विधी असा –

दोन किंवा तीन वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण बोलवावे. कर्त्याने क्षौर व स्नान करून, शक्य असल्यास ओले वस्त्र नेसून त्यांना प्रदक्षिणापूर्वक साष्टांग नमस्कार घालावा. ब्राह्मणांनी मग त्याला म्हणावे, ' तुझे काय असेल ते खरे सांग, खोटे बोलू नको. ' मग कर्त्याने एक गाय आणि एक बैल यांच्या किंमतीइतके द्रव्य ब्राह्मणांपुढे ठेवावे व 'इदं न मम' असे म्हणावे. मग नामगोत्रांचा उच्चार करावा. जन्मापासून मृत्युकालापर्यंत जाणता-अजाणता घडलेल्या पापांचा उच्चार करावा. ' मला या पातकांतून मुक्त होण्यासाठी प्रायश्चित्त सांगा ' अशी प्रार्थना करावी. ब्राह्मणांनी ग्रंथाधारे कर्त्याच्या पापाला योग्य असे प्रायश्चित्त अनुवादकाच्या मुखाने सांगावे. कर्त्याने अनुवादकाची पूजा करून त्याला दक्षिणा द्यावी. मग सांगितलेले प्रायश्चित्त यथाशक्ति आचरावे व शेवटी 'तू सर्व पापांपासून मुक्त झालास' असा त्रिवार आशीर्वाद घ्यावा.

एवढा सर्व खटाटोप करण्यापेक्षा सर्वांत सोपा आणि सहज अनुसरता येण्यासारखा उपाय म्हणजे माणसाने आपण केलेल्या पापांचा चारचौघांत मोठ्याने उच्चार करणे हा होय. हातून घडलेल्या पापांची उघडपणे कबुली देणे सामान्य माणसांना कमीपणाचे वाटते. त्यात आपली प्रतिष्ठा संपेल अशी धास्ती वाटते. पण एखाद्या माणसाला केलेल्या पापांची अशी काही बोच लागते, की त्याची निष्कृती केल्याशिवाय मरणोत्तर आपल्याला सद्‌गती लाभणार नाही, असे त्याला वाटते. म्हणून अंतकाळी तो केलेल्या पापांची जाहीर कबुली द्यायला तयार होतो. 'पश्चात्तापेन शुद्‌ध्यति' असे शास्त्रवचन आहे. त्याला अनुसरून जी पापविमुक्ती होते, ती धर्मशास्त्रालाही संमत आहे. [हि. ध.]

**सर्वफलत्याग** एक काम्य व्रत. कोणत्याही महिन्याच्या शुद्ध तृतीया, अष्टमी, द्वादशी किंवा चतुर्दशी या तिथीला व्रतारंभ करावा. वर्षभर ब्राह्मणांना पायसाचे भोजन घालावे. कर्त्याने अठरा धान्यांपैकी एक धान्य, सर्व फळे व फुगीर कंद यांचे वर्षभर सेवन करू नये. उद्यापनाच्या वेळी रुद्र, नंदी व यम यांच्या सुवर्णमूर्ती कराव्या. सोन्या-चांदीची फळे व कंद बनवावे. हे सर्व धान्याच्या राशीवर ठेवावे. तिथेच दोन जलपूर्ण कलश व एक पलंग ठेवावा आणि हे सर्व गोप्रदानासह ब्राह्मणाला दान द्यावे. फल – सौभाग्यप्राप्ती. [हि. ध.]

**सर्वभूतरुतविद्या** ज्या ज्ञानाच्या प्रभावाने पशु-पक्ष्यांची भाषा समजते, त्याला सर्वभूतरुतविद्या असे नाव आहे. भारतात प्राचीन कालापासून ही विद्या अनेकांना अवगत होती, असे दिसते. ज्ञानश्रुतीला हंसांच्या संवादामुळेच विरागी रैक्वाची भेट झाल्याचा कथाभाग छांदोग्योपनिषदात वर्णिला आहे (४.१). विविध पुराणांमध्येही याची बरीच उदाहरणे वाचायला मिळतात. मघर नामक विद्याधराची मुलगी विभावरी हिने ही विद्या राजा स्वरोचिषाला दिली होती (मार्क. ६४.३). राजा ब्रह्मदत्ताला किड्यांची भाषा समजत होती, असे मत्स्य पुराणावरून दिसते (२०). ब्रह्मदत्ताच्या या विद्येचा उल्लेख पद्म पुराणातही आढळतो (सृष्टि. १०).

कर्नाटकात बुड्बुडिके नावाची एक भटकी ज्योतिषी जात आहे. हे लोकही पक्ष्यांच्या आवाजावरून भविष्य सांगतात. [पु. वि.; लो. सा. रू.; का. ट्रा. स. इं.]

**सर्वमंगलत्रयोदशी** एक काम्य व्रत. याचा विधी असा – प्रत्येक महिन्याच्या शुद्ध त्रयोदशीला कर्त्याने एकभुक्त राहावे किंवा उपवास करावा. कृष्ण, बलभद्र व मंगला (दुर्गा) या देवतांच्या मूर्तींची पूजा करावी. त्यांना फुले, मद्य व मांस या वस्तू अर्पण कराव्या. व्रतावधी एक वर्ष. या व्रताची कथा अशी – कृष्णाने सांदिपनी गुरूचा मृत पुत्र जिवंत केला, त्या आधी ते कार्य आपल्या हातून व्हावे म्हणून मंगलेचे ध्यान-पूजन केले होते. फल – दीर्घायुरारोग्यप्राप्ती. [हि. ध.]

**सर्वव्रत** एक काम्य व्रत. ज्या शुद्ध त्रयोदशीला शनिवार असेल त्या दिवशी शिवाची पूजा करून उपवास करावा. फल – ब्रह्महत्यादी महापातकांपासून मुक्ती. [हि. ध.]

**सर्वशोकतमोनिर्घातमती** एक बोधिसत्त्व. हा सर्व दुःखे आणि सर्व तम यांचा नाश करतो. याचा वर्ण पीत, सितपीत किंवा लाल असून, दंड हे याचे प्रतीक आहे. वर्णानुसार हा रत्नसंभव किंवा अमिताभ याच्या कुळातला मानला जातो.

निष्पन्नयोगावलीच्या तीन मंडलांत याच्या तीन भिन्न रूपांचे वर्णन केलेले आहे.

दुर्गतिपरिशोधन मंडलातले वर्णन असे – हा सितपीत वर्णाचा



सर्वशोकतमोनिर्घातमती

असून, त्याच्या उजव्या हातात दंड आहे व डाव्या हाताची मूठ कमरेवर ठेवलेली आहे.

मंजुवज्र मंडलातले वर्णन असे – हा पीत वर्णाचा असून

दोन्ही हात जुळवून प्रहार करण्याचा अभिनय करीत आहे.

धर्मधातुवागीश्वर मंडलातले वर्णन असे – हा रक्त वर्णाचा असून, याच्या उजव्या हाती वज्र आणि डाव्या हाती शक्ती ही आयुधे आहेत. [ इं. बु. इ. ]

**सर्वस्वार** एक एकाह याग. ज्या मनुष्याला स्वर्गप्राप्तीची किंवा मृत्यूची इच्छा होते, तो हा याग करतो. तृतीय सवनाच्या वेळी आर्भवपवमान गायिले जात असता यजमान ऋत्विजांना यज्ञ समाप्त करण्याची विनंती करतो आणि स्वत: अग्निप्रवेश करतो. [ हि. ध. ]

**सर्वज्ञ** ( इ. स. चे १७ वे शतक ) एक कन्नड निर्गुणोपासक संतकवी. हा वीरशैव पंथाचा अनुयायी होता. याचे साधार चरित्र उपलब्ध नाही. पण त्याच्याच वचनांतून त्याचे चरित्र समजते, ते असे –

सर्वज्ञ हा पूर्वजन्मी पुष्पदत्त नामक एक शिवगण होता. शिवाच्या आज्ञेने त्याला पृथ्वीवर मनुष्यजन्म घ्यावा लागला. कर्नाटकातील अंबळूर गावात बसवरस किंवा मल्लरस नामक एक आराध्य ब्राह्मण राहत होता. त्याला मूलबाळ नव्हते. कुणी तरी त्याला सांगितले. 'तू काशीक्षेत्री जाऊन विश्वनाथाला साकडे घाल.' बसवरसाने तसे केले. मग विश्वेश्वराने त्याला 'तुला पुत्र होईल' असा वर दिला. बसवरस मग आपल्या घरी परतला; परंतु मार्गात त्याला मुसळधार वृष्टीमुळे एका कुंभाराच्या घरी आश्रय घ्यावा लागला. त्या कुंभाराला मालव्वा नावाची एक तरुण रूपवती मुलगी होती. ती आणि बसवरस अल्पशा सहवासाने परस्परांवर अनुरक्त झाले व त्यांच्या संबंधातून त्यांना एक मुलगा झाला. हा मुलगा म्हणजेच पुष्पदत्त शिवगण किंवा नंतरच्या काळातला सर्वज्ञ होय.



सर्वज्ञ

सर्वज्ञ हा बालपणी फार हूड आणि उनाड होता. शिक्षणात त्याचे लक्ष नव्हते. एके दिवशी त्याच्या आईने त्याला कौतुकाने विचारले. 'बाळ, तू कुणाचा ?' त्यावर सर्वज्ञ उत्तरला. 'मी देवाचा आहे. शिवाचा दूत आहे.'

सर्वज्ञाचे हे उत्तर ऐकून आई रागावली व तिने त्याला 'घरातून चालता हो' असे म्हटले. सर्वज्ञाने ही आज्ञा मानून खरोखरीच घर सोडले.

गृहत्याग केल्यावर त्याने देशाटन सुरू केले, अनेक तीर्थक्षेत्रांच्या यात्रा केल्या, ठिकठिकाणच्या समाजस्थितीचा बारकाईने अभ्यास केला आणि स्वत:चे असे एक वैशिष्ट्यपूर्ण तत्त्वज्ञान बनवून, त्याने लोकांना त्याचा उपदेश सुरू केला.

आपले लोककल्याणकारी विचार सर्वांना सुगमपणे समजावे, यासाठी सर्वज्ञाने त्रिपदी नावाच्या एका सोप्या व लहानशा छंदाच्या माध्यमातून ते व्यक्त केले. सर्वज्ञापूर्वीही या छंदात अनेक सत्पुरुषांनी आपले विचार गुंफले होते; परंतु सर्वज्ञाने त्रिपदीत अशी काही प्रभावी आणि यशस्वी रचना केली आहे की त्रिपदी म्हटले, की कन्नड लोकांना एकदम सर्वज्ञाचीच आठवण होते. सर्वज्ञाने आपल्या या त्रिपदीतून मूर्तिपूजा, जातिभेद, वंशाभिमान, ढोंगधत्तुरा, इ. सामाजिक दोषांवर कडाडून हल्ले चढवले आहेत. त्याच्या मते अंतरंगशुद्धी तेवढी खरी; बाकी बाह्य रंगरंगोटी निरर्थक होय. तीर्थयात्रा, जपजाप्य, इ. प्रकारांपेक्षा मनोमय भक्तीच श्रेष्ठ असल्याचे तो निर्धाराने सांगतो. त्याच्या या परखड परंतु अंतरीच्या ओलाव्याने आर्द्र झालेल्या उपदेशाचा कन्नड लोकांवर एवढा प्रभाव पडला आहे, की कोणत्याही वेळी त्यांच्या तोंडी सर्वज्ञाचीच वचने येतात.

मानवाच्या अंतरात्म्यात वास करणाऱ्या परमेश्वराला डावलून जो प्रतिमेच्यापुढे मस्तक नमवतो, तो अन्यायच करतो असे स्वच्छ शब्दांत सांगून, सर्वज्ञ मूर्तिपूजकाचा पुढील तीव्र शब्दांत उपहास करतो –

> कल्लु कल्लने ओट्टि कल्लिनलि मनेकट्टि मनेकट्टि ।
> कल्लमेलकल्ल कोळुव मानवरेल्ल । कल्लिनंतहरु सर्वज्ञ ॥

भावार्थ – दगडाचे मंदिर बनवून त्यात दगडाची मूर्ती स्थापन करणारा माणूस हा स्वत:च एक दगड म्हटला पाहिजे.

त्या अनंत, अव्यक्त परमेश्वराच्या अस्तित्वाचे ज्ञान होण्यासाठी काय केले पाहिजे, हे सांगताना सर्वज्ञ म्हणतो–

> ध्यानदा होसबत्ति मौनदा तिळिदुप्प ।
> स्वानुभववेंब बेळगिना ज्योतिय । ज्ञानवं मुड्डगु सर्वज्ञ ॥

भावार्थ – ध्यानरूपी नवी वात, मौनरूपी स्वच्छ तूप आणि स्वानुभवरूपी ज्योत, अशा दीपानेच अज्ञानाचा अंधकार दूर होऊन (ईश्वरी) ज्ञानाची प्राप्ती होते.

सर्वज्ञ हे त्याचे खरे नाव नाही. त्याचे खरे नाव अज्ञातच आहे. 'सर्वज्ञ' परमेश्वराला उद्देशून त्याने सर्वज्ञ या नामाचा

आपल्या काव्यात वापर केला आहे. [ कर्नाटक; हिं. क. भ. तु. अ.]

**सर्वज्ञात्ममुनी** अद्वैत संप्रदायातील एक प्रमुख आचार्य. याचे दुसरे नाव नित्यबोधाचार्य असे होते. सुरेश्वराचार्य हे त्याचे गुरू होत. परंतु त्याने देवेश्वर असे आपल्या गुरूचे नाव सांगितले आहे. या दोन्ही व्यक्ती एकच की भिन्न या संबंधी अभ्यासकांत मतभेद आहेत. त्याचप्रमाणे त्याच्या कालासंबंधीही पंडितांत एकमत नाही. डॉ. दासगुप्तांनी त्याचा काळ इ. स. चे नववे शतक असा दिला आहे. पण काही अभ्यासक म्हणतात, की हा इ. स. च्या अकराव्या शतकाच्या सुरुवातीला झाला. त्याने त्रिवेंद्रमच्या पद्मनाभाचा उल्लेख केला आहे. 'अहं ब्रह्म' या शृंगेरी मठाच्या महावाक्याच्या स्वीकृतीवरून हा दक्षिणेकडील असावा, असे म्हणतात.

संक्षेपशारीरक, पंचप्रक्रिया व प्रमाणलक्षण हे त्याचे तीन ग्रंथ होत. संक्षेपशारीरक ब्रह्मसूत्रशांकरभाष्याच्या आधारे लिहिलेला ग्रंथ असून, त्यात बाराशे चाळीस श्लोक आहेत. हा ग्रंथ चार अध्यायांत विभागलेला आहे. त्यात त्याने प्रतिबिंबवादाचा पुरस्कार केला आहे. पंचप्रक्रियेत अभिधा, लक्षणा व व्यंजना या तीन शब्दशक्तींचा विचार आहे. 'अहं ब्रह्म' या महावाक्याच्या अर्थाचा विचार, तत्त्वपदार्थव्याख्यान, बंधमोक्षविचार, इ. विषयही संक्षेपाने सांगितले आहेत. प्रमाणलक्षणात मीमांसेच्या प्रमाणांची चर्चा आहे.

संक्षेपशारीरभाष्यावर अनेक आचार्यांच्या टीका आहेत. त्यांत नृसिंहाश्रमाची तत्त्वबोधिनी, मधुसूदन सरस्वतीची सारसंग्रह, पुरुषोत्तम दीक्षिताची सुबोधिनी व रामतीर्थाची अन्वयार्थप्रकाशिका, या टीका प्रसिद्ध आहेत. [ हिंदुत्व; म. च. को.; श्री. शंकराचार्य, श्री. बलदेव उपाध्याय, १९५० ]

**सर्वांगासन** एक योगासन. याची कृती अशी – जमिनीवर उताणे निजावे. दोन्ही हात शरीराशी समांतर ताठ ठेवावे. मग दोन्ही नाकपुड्यांतून श्वास आत घेऊन दोन्ही पाय जमिनीपासून हळूहळू वर उचलावे. प्रथम हातांनी जमिनीचा आधार घ्यावा. कंबर वर उचलल्यानंतर हात कंबरेवर ठेवून त्यांच्या आधारे पाठीचा भाग वर उचलावा आणि पाय सरळ वर न्यावे. दोन्ही पाय जुळवून चवडे ताठ करून वरच्या बाजूस ताणून धरावे. पाठ, कंबर व पाय एका सरळ रेषेत ठेवण्याचा प्रयत्न करावा. पाय हालवू किंवा वाकवू नयेत.

या आसनाला विपरीत करणी असेही नाव आहे. या आसनामुळे दृष्टी सुधारते; पायांचे, कंठाचे व रक्तविकारामुळे उद्भवणारे रोग बरे होतात. शरीरातील चक्रे जागृत ठेवण्यासाठी याचा उपयोग होतो. काही साधक कुंडलिनी शक्ती जागृत



सर्वांगासन

करण्यासाठीही या आसनाचा उपयोग करतात. [ उ. यो. द. ]

**सर्वानुक्रमणी** एक वेदविषयक ग्रंथ. याचा कर्ता कात्यायन होय. ऋग्वेदाच्या समस्त विषयांच्या ज्ञानासाठी हा ग्रंथ आवश्यक आणि प्रमाणभूत आहे. हा सूत्रबद्ध आहे. यात प्रत्येक सूक्ताचे आद्य पद, सूक्तांच्या ऋचांची संख्या, सूक्तकर्त्यांचे नाव, गोत्र, सूक्ताची व तदंतर्गत मंत्रांची देवता आणि सूक्तांतील मंत्रांचा छंद यांचा क्रमबद्ध निर्देश केलेला आहे. देवतानिर्देशासाठी या ग्रंथात बृहद्देवता या ग्रंथाला आधार मानले आहे.

शुक्ल यजुर्वेदाची अशीच एक अनुक्रमणिका असून, तीही कात्यायनप्रणीतच आहे, असे श्री. बलदेव उपाध्याय मानतात. शुक्ल-यजुःसर्वानुक्रमसूत्रांत पाच अध्याय आहेत. सूत्रांच्यावर अर्थज्ञानासाठी त्या त्या सूत्राचे भाष्य दिले असून, त्याचा कर्ता श्री. देव हा आहे. यात माध्यंदिन संहितेचे ऋषी, देवता आणि छंद यांचे विस्तृत वर्णन आहे. छंदाचे विस्तृत विवेचन हे या सर्वानुक्रमसूत्राचे वैशिष्ट्य आहे.

कात्यायनाच्या या ग्रंथांच्या पदांमध्ये अनेक वैदिक वैशिष्टचे आढळतात, तसेच काही अपाणिनीय पदांचेही प्रयोग मिळतात. यावरून सर्वानुक्रमणीची रचना करणारा कात्यायन हा वार्तिककार कात्यायनाहून भिन्न आणि त्याच्या पूर्वकालीन आहे, असा निष्कर्ष निघतो. त्यामुळे सर्वानुक्रमणीची रचना पाणिनीपूर्वी झाली, असे निःसंदिग्धपणे मानता येते. [ वै. सा. सं. ]

**सर्वापायंजह** एक बोधिसत्त्व. हा सर्व संकटांचे निवारण करणारा आहे. अंकुश हे याचे प्रतीक आहे. निष्पन्नयोगावलीत याच्या दोन भिन्न रूपांचे वर्णन केलेले आहे.



सर्वापायंजह

याचे मंजुवज्र मंडलातले वर्णन असे – याचा वर्ण शुभ्र असून, हा दोन्ही हातांनी पापक्षेपण दर्शवितो.

दुर्गतिपरिशोधन मंडलातले वर्णन असे – वर्ण शुभ्र. दोन्ही हातांनी याने अंकुश धरला आहे.

हा अक्षोभ्याच्या कुळातला मानला जातो. [ इं. बु. इ. ]

**सर्वाप्तिव्रत** एक काम्य व्रत. याला चतुर्मूर्तिव्रत असेही नाव आहे. त्यासाठी वर्षाच्या बारा महिन्यांचे चार भाग करावे आणि प्रत्येक भागाच्या कालाला वासुदेव, संकर्षण, रुद्र व अनिरुद्ध अशी चार नावे द्यावी. त्या त्या विभागात त्या त्या देवतेची पूजा करावी. चैत्रापासून प्रारंभ करावा. प्रत्येक भागासाठी अनुक्रमे प्रपंचोपयोगी वस्तू, युद्धसाधने, शेतीची अवजारे व यज्ञोपयोगी वस्तू दान द्याव्या. फल – श्रीकृष्णाशी सालोक्य प्राप्त होते. [ हि. ध. ]

**सर्वाप्तिसप्तमी** एक काम्य व्रत. माघ वद्य सप्तमीस सूर्याची पूजा व त्यानंतर प्रत्येक वद्य सप्तमीस सूर्याच्या मार्तंड, अर्क, चित्रभानू, इ. नावांनी सूर्यपूजा. कर्त्याला रात्रिभोजन, तेल व मीठ वर्ज्य. वर्षाच्या उत्तरार्धातल्या सहा महिन्यांत स्नान व भोजन यांमध्ये पंचगव्याचा उपयोग. फल – आरोग्य, बल व तेज यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**सर्वारिष्टशांती** एक शांती. शास्त्रात निषिद्ध ठरवलेली किंवा एखादी अशुभ गोष्ट घडली असता ही शांती करतात. 'अमुकनिमित्तसूचितसर्वारिष्टपरिहारार्थम्' असा संकल्प करून या शांतीला आरंभ करतात. नंतर पुण्याहवाचनादी कृत्ये करून अग्निस्थापनेनंतर एका वेदीवर कुंभ मांडतात. त्यावर सुवर्णप्रतिमा ठेवून तिच्या ठिकाणी इंद्राचे आवाहन करतात. मग अष्ट दिक्पालांचे आवाहन करतात. दुसऱ्या एका वेदीवर नवग्रहांचे आवाहन करून, सर्व देवतांचे यथाविधि पूजन करतात. प्रधान यागाच्या वेळी इंद्रासाठी पळसाच्या समिधा, चरू आणि आज्य यांच्या एकशे आठ आहुती देतात. ग्रहांच्या प्रीत्यर्थ समिधा, चरू व आज्य यांचा होम करतात. काकनिमित्त शांती असेल, तर बलिदानाच्या वेळी इंद्रदेवतेच्या समोर हुतशेष चरूचा कावळ्यांसाठी बली ठेवतात. पूर्णाहुतीनंतर यजमानास अभिषेक करून ही शांती पूर्ण करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**सर्वार्तिहरव्रत** एक काम्य व्रत. याचा विधी असा – फाल्गुन शुद्ध चतुर्दशीच्या दिवशी प्रातःस्नानादी नित्यकर्मे आटोपल्यावर 'मम सकलपापतापप्रशमनकामनया ईश्वरप्रीतये सर्वार्तिहरव्रतं करिष्ये' असा संकल्प करावा. मग कामक्रोधादी विषयांचा व मिथ्याभाषणादींचा त्याग करून सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत सूर्यसन्मुख उभे राहावे. त्यानंतर पुनश्च स्नान करून विधिवत सूर्यपूजा करावी. रात्री निराहार राहून दुसऱ्या दिवशी उपवास सोडावा. फल – रोगमुक्ती व पापनाश. [ व्र. प. ]

**सर्वार्थसिद्धिव्रत** एक जैनव्रत. याचा विधी असा – कोणत्याही महिन्याच्या शुक्ल पक्षातील सप्तमीला एकाशन करून व्रताची प्रतिज्ञा करावी, अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत आठ दिवस उपवास करावा आणि कृष्ण पक्षाच्या प्रतिपदेला उपवासाची पारणा करावी. उपवासकालात णमोकार मंत्राचा त्रिकाल जप करावा व शेवटी उद्यापन करावे.

हे व्रत दहा दिवसांत पुरे करायचे असते. [ जै. व्र. वि. सं. ]

**सर्वास्तिवाद** एक बौद्ध निकाय. बौद्ध धर्माच्या अठरा निकायांत सर्वास्तिवादाची गणना आहे. एका काळी या निकायाचा देशात फार प्रभाव आणि प्रसार होता. हा निकाय म्हणजे स्थविरवादाचीच एक शाखा होय. याचा इतिहास सिंहली ग्रंथात दिला आहे, तो असा –

बुद्धाच्या परिनिर्वाणाच्या काळी बौद्ध धर्माचा थेरवाद हा एकच संप्रदाय होता. बौद्धांची दुसरी धर्मसंगीती भरली, तिच्यात बौद्ध संप्रदायाचे दोन ठळक विभाग पडले– एक थेरवाद आणि दुसरा महासांघिक. पुढे हे दोन विभाग अनेक शाखांमध्ये विभक्त झाले. थेरवाद किंवा स्थविरवाद याच्यातून बारा शाखा निघाल्या आणि महीशासक या स्थविरवादी शाखेतून सर्वास्तिवादाची उत्पत्ती झाली. तिबेटी अनुश्रुती अशी आहे, की आचार्य राहुलभद्र याने सर्वास्तिवादाची स्थापना केली.

सम्राट अशोक हा स्थविरवादी होता. त्याने स्थविरवाद्यांना उचलून धरल्यामुळे सर्वास्तिवाद्यांना बिहारमध्ये राहणे अशक्य झाले. ते विहार सोडून उ. प्रदेशात पळून गेले. पुढे त्यांनी आपल्या संप्रदायाची दोन केंद्रे स्थापित केली– एक मथुरेत आचार्य उपगुप्ताच्या नेतृत्वाखाली आणि दुसरे काश्मीरात आचार्य मध्यान्तिक याच्या नेतृत्वाखाली.

काही असे शिलालेख उपलब्ध झाले आहेत, की त्यावरून पेशावर, काश्मीर, मथुरा, श्रावस्ती, सारनाथ आणि बलुचिस्तान या ठिकाणी सर्वास्तिवाद्यांचे अस्तित्व प्रमाणित होते. काही शिलालेखांवरून असेही कळते, की प्राचीन शक राजे बौद्ध धर्माचे, विशेषतः सर्वास्तिवाद्यांचे समर्थक होते.

युआन च्वांग हा यात्रिक लिहितो, की या देशात आणि मध्य आशियात सर्वास्तिवाद्यांचे ५००हून अधिक विहार असून, त्यांत १६००० भिक्षू राहतात. इत्सिंग म्हणतो, की सर्वास्तिवादी भिक्षू उ. भारतात सर्वत्र आहेत. शिवाय त्यांचे अनुयायी जावा, सुमात्रा, चंपा व द. चीन यांमध्येही पसरले आहेत. लंकेत मात्र सर्वास्तिवाद पोचला नाही, असे म्हणतात.

वाङ्मय – सर्वास्तिवाद्यांच्या साहित्याला वैभाषिक नय म्हणतात. यांचे पुष्कळसे साहित्य नष्ट झालेले आहे. सर्वास्तिवाद्यांचा स्वतंत्र आगम होता आणि तो संस्कृतात होता. सर्वास्तिवादी संपूर्ण विभाषा ग्रंथ मानीत नाहीत. त्यातले केवळ ज्ञानप्रस्थान आणि त्याचेही सहा पाद मानतात. अभिधम्मकोश हा वसुबंधुरचित ग्रंथ सर्वास्तिवाद्यांचा प्रमाणभूत ग्रंथ होय. या ग्रंथात काश्मीरमधल्या वैभाषिकांच्या नयाला अनुसरून अभिधम्माचे व्याख्यान केलेले आहे. हा ग्रंथ ६०० कारिकांचा आहे. या ग्रंथावर वसुबंधूचेच भाष्य आहे. समस्त बौद्ध विश्वावर या ग्रंथाचा फार मोठा प्रभाव आहे. यावर अनेक आचार्यांच्या व्याख्या आहेत आणि तिबेटी व चिनी या भाषांत त्याचे अनुवादही झाले आहेत.

सर्वास्तिवाद्यांचे स्वतःचे संपूर्ण त्रिपिटक असून, ते संस्कृतात लिहिलेले होते. सूत्र आणि विनय या पिटकांचे काही अंश, तसेच संपूर्ण प्रातिमोक्षसूत्र मध्य आशियात भूर्जपत्रावर लिहिलेले सापडले आहे. पाली सुत्तपिटकाच्या निकायांप्रमाणे सर्वास्तिवाद्यांचे सूत्रपिटकही दीर्घागम, मध्यमागम, संयुक्तकागम, एकोत्तरागम आणि क्षुद्रकागम अशा पाच निकायांचे होते. वसुबंधूप्रमाणे गुणवती, स्थिरमती, वसुमित्र, घोषक आणि यशोमित्र असे अनेक ग्रंथकार या संप्रदायाला लाभले.

सिद्धान्त–'सर्वम् अस्ति' म्हणजेच सर्व पदार्थ सत्तावान आहेत, हा सर्वास्तिवादाचा मुख्य सिद्धान्त होय. विश्वातले समस्त पदार्थ तीन्ही कालात राहतात. पदार्थ नष्ट झाला तरी त्याचा सर्वथा लोप होत नाही. जरी त्या पदार्थावर ज्ञानेंद्रियांची क्रिया होत नसली, तरी मनात त्याचे ज्ञान कायम राहते. कारण केवळ विगत पदार्थच मनाचे विषय होतात. ज्या क्षणी डोळे एखादी वस्तू पाहतात, त्याच क्षणी त्या डोळ्यांचे कार्य समाप्त होते. डोळे त्या वस्तूचा मनावर संस्कार करतात आणि मनात त्या वस्तूची धारणा आणि स्मृती विद्यमान राहते. अतीत वस्तूचे अस्तित्व स्वीकारावेच लागते. कारण त्याशिवाय मनाची क्रियाच होऊ शकत नाही. अतीत पदार्थाचे अस्तित्व मानले नाही, तर मनाचेही अस्तित्व मानता येणार नाही. अन्यथा अतीत आणि भविष्य यांतील वस्तूपासून आपल्या मनाला निःसंग करण्याचा उपदेश बुद्धाने आपल्या शिष्यांना केलाच नसता.

या विषयात धर्मजात हा आचार्य प्रतिपादन करतो, ते असे – पदार्थ आहे तोच राहतो; फक्त त्याचे अवस्थापरिवर्तन (भावान्यथात्व) होते, म्हणजेच त्याचे रूप व गुण बदलतात. या बदलामुळेच पदार्थाच्या संबंधात अतीत, वर्तमान, भविष्य, इ. भिन्न धारणा उत्पन्न होतात. जेव्हा एखादी वस्तू नव्या अवस्थेला प्राप्त होते, म्हणजेच नवीन रूप-गुण धारण करते, तेव्हा ती वस्तू उत्पन्न झाली, असे म्हणतात आणि जेव्हा त्या रूप-गुणांचा त्याग करते, तेव्हा ती वस्तू नष्ट झाली, असे म्हणतात. जेव्हा एखादी वस्तू आपल्या भावी अवस्थेला किंवा रूप-गुणाला टाकते, तेव्हा ती वस्तू वर्तमान या अवस्थेला प्राप्त होते.

अन्य काही सिद्धान्त – संस्कृत आणि असंस्कृत असे सृष्टीचे दोन भेद आहेत. संस्कृत सृष्टी सास्रव (सदोष) आणि अनित्य आहे. त्यामुळे दृश्य संसाराची बाह्य व आभ्यंतर ही सर्व तत्त्वे त्या सृष्टीत अंतर्भूत आहेत. भूत, भौतिक, अविज्ञप्ती व चित्त ही बाह्य व आभ्यंतर तत्त्वे होत.

असंस्कृत सृष्टी ही शुद्ध आणि नित्य आहे. तिची तीन तत्त्वे आहेत – (१) आकाश (२) प्रतिसंख्यानिरोध ( ज्ञानद्वारा मुक्ती किंवा निर्वाण) आणि (३) अप्रतिसंख्यानिरोध (ज्ञानाविना मुक्ती किंवा निर्वाण)

सर्वास्तिवादी निकायामध्ये पुढील चार नय आहेत – (१) भावान्यथिक (२) लक्षणान्यथिक (३) अवस्थान्यथिक आणि (४) अन्यथान्यथिक. पहिल्या नयाचा प्रणेता धर्ममात्र आहे, दुसऱ्या नयाचा प्रणेता घोषक आहे, तिसऱ्या नयाचा प्रणेता वसुमित्र आहे आणि चवथ्या नयाचा प्रणेता बुद्धदेव आहे. हे चारही नय सर्वास्तिवादाचे निरूपण करतात, पण या चारही नयांत काही अंशी फरक आहे. पाहा– वैभाषिक. [बौ. ध. द.; उ. प्र. बौ. वि.]

**सर्वेश्वरवाद** तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातील एक मत. सर्व काही जे आहे, ते ईश्वर आहे व ईश्वर सर्व काही आहे; या सिद्धान्ताला सर्वेश्वरवाद असे नाव आहे. सर्व याचा अर्थ जगत असा आहे. त्यामुळे जगत ईश्वर आहे व ईश्वर जगत आहे, असा त्याचा दुसरा अर्थ होतो. म्हणजे ईश्वर व जगत यांमध्ये अभेद आहे.

सर्वेश्वरवादानुसार जगत हे ईश्वराने निर्माण केलेले नसून जगत हे स्वतःच ईश्वर आहे. गौडपादाचार्यांनी याला अजातिवाद असे म्हटले आहे.

सर्वेश्वरवाद हा अद्वैतवाद आहे. ईश्वर हेच एकमेवाद्वितीय तत्त्व असून, इतर जे काही आहे, ते ईश्वराचा आभास आहे, असे यात मानलेले आहे. सर्वेश्वरवाद हा एकेश्वरवाद व बहुदेववाद या दोहोंपेक्षाही भिन्न आहे.

सर्वेश्वरवाद्यांना काहीजण निरीश्वरवादी असे म्हणतात. कारण सर्वेश्वरवादी एखाद्या विशिष्ट धर्माच्या ईश्वराला मानीत नाहीत. त्यांच्या मते जगत हेच ईश्वर आहे.

सर्वेश्वरवाद्यांनी ईश्वर हे एक सर्वव्यापी तत्त्व मानले आहे. त्याला ब्रह्म असेही म्हणता येईल. शांडिल्याने छांदोग्योपनिषदात 'सर्वं खल्विदं ब्रह्म' (= हे सर्व ब्रह्म आहे) असे म्हणून सर्वेश्वरवाद्यांच्या ईश्वराला ब्रह्म ही संज्ञा दिली आहे. शंकराचार्यांनी त्याला आत्मा असे म्हटले आहे. काही संतांनी त्याला अनाम म्हटले आहे, तर काहींनी अनिर्वचनीय, एकमेवाद्वितीय असे त्याचे वर्णन केले आहे. यावरून सर्वेश्वरवादातील ईश्वराची कल्पना ही ईश्वराच्या सामान्य कल्पनेपेक्षा वेगळी आहे, हे कळून येईल. त्यातील ईश्वर हे परम सत्य आहे. अशा प्रकारे ब्रह्मवाद हा सर्वेश्वरवादाचा दार्शनिक आधार बनलेला आहे.

(१) जीव ईश्वराहून भिन्न आहे, (२) जीव परस्पर भिन्न आहेत, (३) जड वस्तू जीवाहून भिन्न आहेत, (४) जड वस्तू परस्पर भिन्न आहेत आणि (५) जड वस्तू ईश्वराहून भिन्न आहेत, या पाच भेदांचे निराकरण करून त्यांच्यांत अभेद स्थापन करणे हे सर्वेश्वरवादाचे मुख्य प्रयोजन आहे. काही सर्वेश्वरवादी हे पाचही भेद वस्तुतः माया किंवा मिथ्या आहेत, असे म्हणतात. ते ईश्वराचे केवळ आभासमात्र आहेत, ईश्वराचे नामरूप आहेत, असे ते सांगतात.

कबीरापासून स्वामी रामतीर्थांपर्यंत सर्व निर्गुणोपासक संतांनी सर्वेश्वरवादाचे निरूपण केले आहे. ईश्वर हा सर्वव्यापक असल्यामुळे मंदिरात किंवा मशिदीत जाणे; मूर्तिपूजा, तीर्थाटन, इ. गोष्टी करणे हे सर्व व्यर्थ आहे, असे त्यांनी सांगितले व मानस पूजेवर अधिक भर दिला. याच कारणासाठी त्यांनी जातिव्यवस्थेची निंदा केली व विश्वबंधुत्व कल्पनेचा पाठपुरावा केला. कबीर म्हणतो, की जिकडे पाहावे तिकडे परमात्माच भरलेला आहे. हिंदी भाषेत रचना करणाऱ्या मुसलमान सूफी कवींनीही सर्वेश्वरवादाचा स्वीकार केला आहे. त्यांच्या सर्वेश्वरवादात कवीची भावुकता आणि रहस्यवाद्याची अनुभूती या दोहोंचे मिश्रण आहे. त्यांनी प्रेम हाच ईश्वरप्राप्तीचा उपाय सांगितला आहे.

या सर्वेश्वरवादावर काही आक्षेप घेतलेले आहेत, ते असे – यात व्यक्तिवादाला काहीच स्थान नाही. मानवव्यक्ती असत् आहे, सर्व जीव असत् आहेत, फक्त एक ईश्वरच सर्वत्र राहतो, असे म्हणणे हे सर्व अनुभवाच्या विरुद्ध आहे. तसेच जगताला काही अस्तित्व नाही, जगत हे मिथ्या आहे, ते माया आहे, असे यात म्हटले आहे. ही जगताची वैज्ञानिक व्याख्या नाही. जगताची वैज्ञानिक व विकासवादी व्याख्या याच्या विरोधी आहे. तसेच नैतिकदृष्ट्या सर्वेश्वरवाद नैतिकता, मानवस्वातंत्र्य, कर्मविपाक या सर्वांचा अपलाप करतो. यात धर्माधर्म, शुभाशुभ, कर्माकर्म, इ. सर्व ईश्वरच होय, असे मानलेले आहे. त्यामुळे अधर्म, अशुभ, अकर्म, करायला काही प्रतिबंध होत नाही.

सर्वेश्वरवाद्यांनी आपल्या परीने या आक्षेपांचे खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचे म्हणणे असे, की या वादात व्यक्तित्व व मानवस्वातंत्र्य यांचे अपलापन होऊन त्यांना अधिक गंभीर अर्थ प्राप्त झाला आहे. व्यक्ती ईश्वर आहे, असे म्हटल्याने व्यक्तीचा दर्जा एकदम उंचावतो. इथे जगत हेच ईश्वर किंवा ब्रह्म आहे, असे म्हटलेले आहे. अल्प चिंतनावर आधारलेले जगताचे रूप निःसंशय मिथ्या आहे. पण अनंत चिंतनावर अवलंबून असलेले त्याचे रूप साक्षात ब्रह्म आहे. सर्वत्र ईश्वराचे अस्तित्व मानल्यामुळे कर्म करण्याची, सेवा करण्याची व सर्वांवर प्रेम करण्याची इच्छा उत्पन्न होते. शुभाशुभ, कर्माकर्म, धर्माधर्म या सर्वांच्या पलिकडे ईश्वर आहे. त्याचा अर्थ समाजात अनैतिकता वाढावी, असा होत नाही. सर्वेश्वरवादाचे नीट आकलन न

झाल्यामुळे त्याच्या अनुयायांनी समाजात अनैतिकता व भ्रष्टाचार वाढवला. पण तो दोष सर्वेश्वरवादाचा नव्हे. [ हिं. सा. को.]

**सर्वोदय** सर्वांचा उदय, सर्वांचे कल्याण, असा या शब्दाचा भावार्थ आहे. गीतेतील सर्वभूतहिताची कल्पना यात आहे. कुटुंबात ज्याप्रमाणे प्रत्येक जण दुसऱ्याची चिंता वाहतो, त्याप्रमाणे समाजातही प्रत्येकाने इतरांची चिंता वाहावी, त्यांच्या हितासाठी झटावे, याला सर्वोदय म्हणतात.

सर्वोदयात समन्वयाचा विचार महत्त्वाचा आहे. सर्व विचारांचा मेळ घालण्याची व त्यांना एकत्र आणण्याची शक्ती सर्वोदयाच्या तत्त्वज्ञानात आहे. आधी सर्वांचा उत्कर्ष व्हावा, त्यातच माझाही उत्कर्ष आहे, अशी वृत्ती सर्वोदयासाठी आवश्यक असते. व्यक्तीने सर्वांच्या कल्याणासाठी त्याग करायला तयार असले पाहिजे. आणि त्या त्यागामुळे होणाऱ्या बाह्य दुःखात आंतरिक सुखाचा अनुभव त्याला घेता आला पाहिजे.

स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर राष्ट्रीय सभेचे विसर्जन करावे आणि लोकसेवक संघ स्थापावा, असे म. गांधींना वाटत होते. राजकीय व जातीय स्पर्धेपासून अलिप्त राहून, आर्थिक, नैतिक व सामाजिक स्वातंत्र्य मिळवण्याचा प्रयत्न करावा, हे त्यांच्या लोकसेवक संघाचे उद्दिष्ट होते. अशा संघाची स्थापना करण्यापूर्वीच गांधीजींचा अंत झाला. त्यानंतर लवकरच सेवाग्राम येथे गांधीभक्तांचे संमेलन भरले. त्या संमेलनात सर्वोदय समाज स्थापण्याचा ठराव झाला. आचार्य विनोबा भावे हे त्याचे प्रेरक होते.

जातिशून्य, हिंसाशून्य व शोषणशून्य असा समताधिष्ठित समाज निर्माण करण्याचे ध्येय या सर्वोदय समाजापुढे होते. इ. स. १९५१ साली हैदराबादजवळ पोचमपल्ली येथे चौथे सर्वोदय संमेलन झाले. त्यात एका जमीनदाराने १०० एकर जमीन भूमिहीन हरिजन कुटुंबांसाठी दान केली आणि त्यातूनच विनोबांना भूदानयज्ञाची प्रेरणा मिळाली. गांधीजींनी देशाला भीती सोडण्याचा धडा शिकवला आणि विनोबांनी भूदानाद्वारे लोभ सोडण्यास शिकविले. हृदयपरिवर्तनाने लोभत्याग जनतेला शिकवण्यासाठीच विनोबांनी गेल्या कित्येक वर्षांपासून प्रजासूय यज्ञ आरंभला आहे. समाजात ते स्वामित्वविसर्जनाची वृत्ती उत्पन्न करीत चालले आहेत. भूमीप्रमाणे संपत्तीवरील स्वामित्व सोडण्याचे आवाहनही त्यांनी केले आहे. स्वामित्वाचे विसर्जन एकदा झाले, की स्वार्थ संपेल, द्वेष सरेल व हिंसा लोपेल, असे त्यांचे भाकित आहे. आणि त्यांच्या या मार्गाचे ध्येय आहे, सर्वोदय ! या सर्वोदयी तत्त्वज्ञानाची भूमिका विनोबांनी पुढीलप्रमाणे मांडली आहे –

सर्वोदयकारी आमचे तत्त्वज्ञान, रचनात्मक कार्यक्रम हा आमचा कर्मयोग आणि नामस्मरणाचे व परमेश्वराचे साह्य घेऊन अहिंसादी व्रतांचे आचरण हा आमचा भक्तिमार्ग, असे हे जीवनाचे तिहेरी सम्यक् दर्शन आहे.

शरीरश्रम करून उत्पादन वाढविणे व इतरांची चिंता वाहणे ही सर्वोदयवाद्यांची दोन कर्तव्ये होत. विनोबांनी सर्वोदय समाजाची लक्षणे सांगितली आहेत, ती अशी –

(१) जीवन अविभाज्य आहे. नैतिक, आर्थिक, सामाजिक व राजकीय या सर्व क्षेत्रांत समता स्थापन करणे, हे सर्वोदयाचे ध्येय आहे. आत्म्याच्या एकत्वातूनच समता उत्पन्न होते.

(२) शासनमुक्त समाजव्यवस्था स्थापन करण्याकरिता सत्तेचे विकेंद्रीकरण आवश्यक आहे.

(३) आर्थिक क्षेत्रात विकेंद्रीकरण करण्यासाठी गाव हे घटक आहे. कताई, विणाई, इ. गृहोद्योग व कागद वगैरे ग्रामोद्योग चालवावे.

केवळ भूमीचेच नव्हे, तर सर्वांचेच स्वामित्व विसर्जित करण्याची ही आध्यात्मिक प्रक्रिया आहे. स्वामित्वबुद्धीचाच लोप करणे, हे या समग्र व शांतिपूर्ण क्रांतीचे बीज होय.

सर्वोदयाच्या दृष्टीने समाजरचनेत जो बदल घडवून आणायचा आहे, त्याचा आरंभ व्यक्तीच्या जीवनातील परिवर्तनाने करायला पाहिजे. वैयक्तिक व सामाजिक जीवनात असत्याचा व हिंसेचा त्याग केला पाहिजे. समाजातील विषमता अहिंसेनेच दूर करायची आहे, असे विनोबांचे म्हणणे आहे.

सर्वोदयात सगळे सारखे आहेत. कोणीही उच्च किंवा नीच नाही. सगळ्यांची सारखीच काळजी घेतली जाईल, सर्वांना विकासाची सारखी संधी मिळेल, सर्वांना सारखेच शिक्षण मिळेल.

सर्वोदयात दोन गोष्टी आधारभूत मानल्या गेल्या आहेत– (१) अन्न, वस्त्र, इ. नित्याच्या वस्तू गावातच उत्पन्न केल्या जाव्यात. त्यामुळे लहान लहान उद्योगांच्या द्वारा लोक स्वावलंबी बनतील. (२) लोखंड, कोळसा, इ. जे मोठे उद्योगधंदे आहेत, ते साऱ्या समाजाच्या मालकीचे झाले पाहिजेत. त्यावाचून सर्वोदय होऊ शकणार नाही. [ विनोबांचे जीवन–मंत्र, श्री. दा. न. शिखरे, १९५८ ]

**सर्षपव्रतसप्तमी** एक तिथिव्रत. सूर्य ही या व्रताची देवता आहे. या व्रताचा विधी असा – व्रतकर्त्याने सात सप्तमी तिथींना सूर्याकडे तोंड करून बसावे आणि आपल्या तळहातावर पंचगव्य किंवा इतर द्रव पदार्थ घेऊन त्यात मोहरीचे एक ते सात दाणे अनुक्रमे पहिल्या सप्तमीपासून सातव्या सप्तमीपर्यंत घालावे. मग मोहरीला उद्देशून मंत्र म्हणावा आणि ते दातांना स्पर्श न करता प्राशन करावे. नंतर होम

व जप करावा फल – पुत्र व संपत्ती यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**सलतानगर** एक मुसलमान जात. या लोकांना तान्नेर असेही म्हणतात. यांची वस्ती थोड्याफार प्रमाणात महाराष्ट्राच्या पुणे व सोलापूर जिल्ह्यांत आढळते. हे मूळचे हिंदू चांभार असून, औरंगजेबाने त्यांना बाटविले असे सांगतात. त्यांचा तीव्र ओढा हिंदू धर्माकडे असला, तरी ते काजीला मान देतात आणि त्याच्या आज्ञाही पाळतात. हे सुन्नीपंथाचे हनफी आहेत. स्वजातीतच त्यांची लग्ने होतात. कातडी कमावणे हा त्यांचा प्रमुख व्यवसाय होय. सर्व सलतानगर हे सुसंघटित आहेत. [ ट्रा. कॉ. बॉं.; मुं. इ. जा. ]

**सलाट** एक जात. या लोकांची वस्ती गुजरात प्रदेशात आहे. सोमपारा सलाट, कुंभार सलाट व तलाब्द सलाट असे यांचे तीन पोटभेद आहेत. या तीनही वर्गांतील लोक आपापसात रोटी-बेटीव्यवहार करीत नाहीत. पाथरवटाचे काम हा त्यांचा प्रमुख व्यवसाय होय.

सलाटांमध्ये निकटच्या नातेवाइकांत लग्ने होत नाहीत. त्याचप्रमाणे त्यांच्यांत घटस्फोटाची चाल नाही. विधवेला धाकट्या दिराशी लग्न करायला मोकळीक असते.

हे स्वामीनारायण पंथाचे अनुयायी असून, काही शैव आहेत. त्यांचा चेटकिणी, दृष्ट, भूतबाधा यांच्यावर विश्वास आहे. यांना मद्य-मांस चालत नाही. [ ट्रा. का. बॉं.; मुं. इ. जा. ]

**सलामीचा नाच** महाराष्ट्रातील एक लोकनृत्य. या नृत्यात भाग घेणारे लोक एका ओळीत उभे राहतात. त्यांच्या समोर तरापीवादक असतो. नृत्यातील लोक हातांनी व पायांनी सलामी देण्याचा अभिनय करतात. ज्या वेळी उजवा हात उचललेला असतो त्या वेळी उजवाच पाय उचलावा लागतो. वारंवार हीच क्रिया नर्तक करीत असतात. त्यांना आपली जागा सोडता येत नाही. [ भा. लो. नृ.; फो. डा. म. ]

**सल्लेखना** एक जैनव्रत. याला समाधिमरण असेही म्हणतात. यात श्रावकाने सर्व प्रकारच्या मोहांचा त्याग करून समाधिमरणाचा स्वेच्छेने स्वीकार करायचा असतो. उपसर्ग, दुर्भिक्ष, वार्धक्य, असाध्य रोग अशांनी जेव्हा जगण्याची आशा संपेल, अशा वेळी धर्म म्हणून सल्लेखना करावी, असे श्रावकांच्या आचारधर्मात सांगितले आहे. या सल्लेखनेचा विधी असा–

प्रथम सर्वांना क्षमा करावी. सर्वांची क्षमा मागावी. आपल्या संपत्तीचा जिनधर्माच्या उत्कर्षासाठी व्यय करावा. सर्वसंग-परित्याग करून महाव्रती बनावे. सातही भयांचा त्याग करावा. धर्मध्यान करीत णमोकार मंत्र जपावा. भक्ष्य, भोज्य, लेह्य आहारांचा क्रमाने त्याग करावा. दुग्धादी स्निग्ध पदार्थांचे पान करावे. पुढे तेही सोडून ताक, कांजी, इ. पदार्थ सेवावे. क्रमाने त्यांचाही त्याग करून काही दिवस निराहार राहावे. आणि असे होता होता शरीर क्षीण झाले, की त्याचा त्याग करावा.

या सल्लेखनेचे फल सांगितले आहे, ते असे–

निःश्रेयसमभ्युदयं निस्तीरं दुस्तरं सुखाम्बुनिधिम् ।
निःपिबति पीतधर्मा सर्वैर्दुःखैरनालीढः ।।

अर्थ– ज्या पुरुषाने आजीवन धर्मामृताचे पान करून समाधि-मरण स्वीकारले आहे, तो स्वर्गीय सुखे भोगून अंती सर्व दुःखांनी रहित होत्साता सुखसागरातल्या अमृतरसाचे प्राशन करीत राहतो म्हणजेच निर्वाणाला प्राप्त होतो.

पाहा – जैन धर्म. [ जैनधर्मामृत ]

**सव** ज्या यज्ञांच्या शेवटी यजमानाला विशिष्ट रीतीने अभिषेक करण्यात येतो, त्या यज्ञांना सव अशी संज्ञा आहे. सोमरसाच्या, पशूंच्या अंगांच्या अथवा पुरोडाशांच्या हवनप्रधान कर्मांनी हे सव नामक यज्ञ संपादले जातात. ओदनसवात शिजविलेल्या भाताचा होम हा प्रमुख विधी असतो. याव्यतिरिक्त इतर सवांत दूध, तूप, दही व सातू यांनी भरलेली पात्रे यजमानाकडे दिली जातात. या चार पात्रांना चार निरनिराळ्या व्यक्ती हात लावतात. यजमान मंत्र म्हणतो. शेष भात हा यजमानाने खायचा असतो. त्यानंतर यजमानाला अभिषेक केला जातो. [प. का. भा.]

**सवर** एक आदिवासी जात. या लोकांची वस्ती मुख्यतः तमिळनाडू, मध्य प्रदेश, उत्तर प्रदेश, बिहार, बंगाल व ओडिसा या प्रदेशांमध्ये आढळते. त्यांना सोरा, सोएरी किंवा सुईरी अशीही नावे आहेत. सवर म्हणजे त्यांच्या भाषेत कुऱ्हाड होय. या जातीच्या लोकांच्या हाती नेहमी कुऱ्हाड असते, म्हणून त्यांना हे नाव मिळाले असावे. ज्या प्रदेशात विपुल प्रमाणात हिरे सापडतात, त्या प्रदेशात राहणारे हे लोक आहेत, अशी एक समजूत आहे. असा भूभाग मध्यप्रदेशात संबळपूरनजीक आहे. प्राचीन काळचे शबर लोक ते हेच होत, असेही मानले जाते. शबर हे प्रोटो ऑस्ट्रलॉईड लोकांचे वंशज होते, असे मानववंशशास्त्रज्ञांचे मत आहे.

सवर लोकांची वस्ती विखुरलेली असून, ते मुख्यत्वे जंगलात राहतात. तिथे अन्य लोकांच्या सहवासाने त्यांच्या चालीरीती, देवदेवता व श्रद्धा भिन्न भिन्न बनल्या आहेत. तेलुगू बोलणारे सवर कापू सवर म्हणून ओळखले जातात. त्याचप्रमाणे बेसड

...र, विमा सवर वगैरे त्या त्या प्रदेशाच्या वैशिष्ट्यानुसार ते ओळखले जातात. डोंगराळ भागात राहणारे हे लंबू लांझिया ...या नावाने ओळखले जातात.

स्थूलमानाने सवर माणूस मध्यम उंचीचा, बसक्या चेहऱ्याचा, ...ड ओठांचा, रुंद व सपाट नाकाचा आणि गालाची हाडे वर ...आलेला असा असतो. त्याची दृष्टी तिरळी आणि शरीरयष्टी ...ट्ट बळकट असते. डोक्यावर जड ओझे घेऊन, उंच डोंगर ...चढून जाण्याइतका तो काटक असतो. त्यांच्या बायकाही दिस... ...ण्यात सामान्यच असतात.

सवर स्त्रिया व पुरुष दोघेही हातात बांगडया घालतात. पुरुष उजव्या नाकपुडयात व स्त्रिया दोन्ही नाकपुडयांत वलये घालतात. याशिवाय गळयात व कानात निरनिराळया प्रकारचे सोन्याचे किंवा पितळेचे दागिने ते घालतात.

हे लोक कपडे कमी प्रमाणात वापरतात, असे दिसते. पुरुष फक्त लंगोटी वापरतात. स्त्रिया स्वतःच विणलेले, जाडेभरडे, पिवळ्या काठाचे फडके कमरेला गुंडाळतात. त्या चोळया किंवा पोलकी घालीत नाहीत. काही विशिष्ट वर्गाचे लोक लाल, निळया व किरमिजी रंगाच्या पगडया घालतात.

**व्यवसाय** – शेती हा त्यांचा प्रमुख व्यवसाय आहे. ते झूम पद्धतीने आणि डोंगराळ भागात ओटे बांधून शेती करतात. शेतीत प्रामुख्याने भात पिकवितात. एका पुरुषाला अनेक बायका असल्या तर त्यांतली प्रत्येक बाई आपापल्या स्वतंत्र जमिनीत काम करून मग नवऱ्याला त्याच्या जमिनीच्या कामात मदत करते. ते द्रोण-पत्रावळीसाठी पाने, मध व मेण गोळा करतात. दारूसाठी मोहाची फुले गोळा करून विकतात. काही लोक चहाच्या मळयांत काम करतात. त्यांच्यांतील काही लोक पूर्वी घरफोडया करीत असत. आणि हे करीत असताना कोणी पकडायला आले तर त्याला ठारही मारीत असत.

**गृहरचना** – त्यांची घरे पडवीवजा असून, ती बहुधा दगड-मातीची असतात. घरावर छप्पर गवताचे किंवा झाडपाल्याचे असते. विटा आणि कौले ते वापरीत नाहीत. कारण त्या वस्तू वापरल्याने घरात भुतांचा प्रवेश होतो, अशी त्यांची समजूत आहे. चिंचेचे लाकूडही ते उपयोगात आणीत नाहीत. ते लाकूड वापरले तर वाघांचा उपद्रव होतो, असे त्यांना वाटते. वड, पिंपळ व काजू या झाडांची लाकडेही त्यांना वर्ज्य आहेत.

घराची पडवी ओलांडून आत गेले म्हणजे एक लहानशी खोली असते. त्या खोलीच्या मध्यभागी एक मजबूत लाकडी खांब असतो. त्यावर घराचा सारा भार असतो. या खांबाच्या एका बाजूला मुले व दुसऱ्या बाजूला मुली झोपतात. निम्म्या-अधिक भागावर, जमिनीपासून सुमारे चार फूट उंचीवर एक माळा असतो. त्यावर ते सर्व धान्य साठवून ठेवतात. या माळयाखाली एका कोपऱ्यात चूल असते. त्यामुळे स्त्रियांना स्वयंपाकासाठी सरपटत आत जावे लागते. चुलीशेजारी कुटुंबप्रमुख व त्याची पत्नी झोपते. घरात कुऱ्हाड, सुऱ्या, तलवार, धनुष्यबाण, शेतीची साधने, इ. वस्तू असतात.

काही घरांत आतल्या खोलीत, तर काही घरांत बाहेरच्या पडवीत एक लाकडी खुंट पुरलेला असतो. त्या खुंटाला एक कोनाडा असतो. त्यात देवाचा नैवेद्य ठेवतात. कोनाडयाच्या खाली दोन स्तन कोरलेले असतात. घरातील मुलीला कोणी मागणी घालायला आले म्हणजे ते आपल्याबरोबर आणलेल्या बांगडया व बाण या दोन स्तनांच्या मध्ये लटकावून ठेवतात.

**पोटजाती** – सवरांच्या सहा पोटजाती असून, त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत–(१) जाती सवर – ही जात गोमांस खात नाही म्हणून श्रेष्ठ मानली जाते. (२) अर्सी सवर– हे शेती करतात व जाडेभरडे कापड विणतात. (३) लुआर किंवा मुली सवर–हे बाणांची पाती व इतर लोखंडी हत्यारे बनवितात. (४) किंडल– हे लोक धान्य साठविण्याच्या टोपल्या बनवितात. (५) जादू सवर– हे कोल्लकोट व पुत्तसिंगी यांच्या पलिकडील डोंगराळ भागात राहातात व (६) कुंभी सवर– हे कुंभारी काम करतात.

याशिवाय सखल प्रदेशात राहाणारे सवर, कापू म्हणजे शेतकरी आणि सुद्धो ( चांगले ) अशा दोन पोटजातींत विभागले जातात. या प्रत्येक पोटजातीचे गमांग, बुया व परजा असे तीन सामाजिक वर्ग आहेत. गमांग हा गावाचा सनदी प्रमुख असतो. पूर्वी त्याला राजा समजत असत. परंतु आता त्याचा दर्जा न्यायाधीशासारखा आहे. बुया म्हणजे गावाचा पुरोहित. गमांग आणि बुया यांचा परस्परांमध्ये रोटी-बेटी व्यवहार होत नाही. परजांचा दर्जा निकृष्ट असतो. गमांग व बुया परजांच्या मुली करतात, पण आपल्या मुली ते परजांना देत नाहीत. या तीन्ही वर्गांतील लोकांची घरेही एकमेकांशेजारी नसतात. त्यांच्या प्रत्येकाच्या स्मशानभूमीही वेगवेगळया असतात.

या जातीत गोत्रे नाहीत. एकाच गावातील मुला-मुलींची लग्ने होत नाहीत. कारण ती भावंडे समजली जातात. पण बाहेरून गावात आलेल्यांशी मात्र लग्ने होतात. त्याचप्रमाणे ते मामे व मावस बहिणींबरोबरही विवाह करीत नाहीत. हे नियम मोडून विवाह करणाऱ्यांना जातगंगेकडून शिक्षा होते. त्यांच्या पोटजातीमध्येही परस्परांशी विवाह करीत नाहीत.

**विवाहप्रथा** – मुलाचे आईवडील आप्तेष्टांमार्फत मुलीची निवड करतात. ही निवड झाली, की मुलाचे नातेवाईक पुरुष वधूपित्याच्या घरी जातात. परंतु मुलीच्या बापाला हा संबंध पसंत

नसेल, तर तो त्यांच्याशी मौन धरतो आणि वरपक्षाने आणलेल्या दारूला स्पर्शही करीत नाही. अशी नापसंती दर्शविली गेली, तर वरपक्षाला कार्य जमत नाही, म्हणून परत जावे लागते. पण मुलीच्या बापाला हा संबंध पसंत असेल, तर तो आलेल्या पाहुण्यांना शिविगाळ व मारहाण करतो. वरपक्षाचे लोक हे सारे सहन करतात. कारण ते वधूपित्याच्या पसंतीचे लक्षण आहे, असे मानले जाते. मग उभय पक्षाचे लोक दारू पितात. दोन-तीन दिवसांनी नवरदेवाकडील मंडळी पुन्हा दारू घेऊन जातात.



सवर स्त्री (सूत कातताना)

या वेळीही वरीलप्रमाणेच प्रकार घडतो. तिसऱ्या खेपेला हे लोक दारू व हळद घेऊन घरी जातात. हळद नवरीच्या नातेवाइकांच्या पाठीला व नितंबांना लावतात. मग सर्वजण दारू पितात. नंतर मुहूर्त ठरून लग्न पार पडते.

सवर पुरुष तीन-चार बायका करू शकतो. पण त्यांतील कोणतीही स्त्री आपल्या नवऱ्याला सोडून जाऊ शकते. अशा स्त्रीच्या नव्या नवऱ्याला पहिल्या नवऱ्यासाठी दंड म्हणून एक रेडा व डुक्कर द्यावा लागतो. त्यांच्यांत विधवाविवाह व घटस्फोटही रूढ आहे. विधवेच्या विवाहातही धार्मिक विधी असतो. त्यात एक डुक्कर बळी देऊन त्याचे मांस व दारू विधवेच्या नवऱ्याच्या मृतात्म्याला अर्पण करतात.

**प्रसूतिप्रथा** – सवरांचे मूल ज्या वारी जन्माला येईल त्या वाराचे नाव ते मुलाला ठेवतात. परंतु अशा नामकरणानंतर ते मूल खूप रडू लागले किंवा दूध पीत नाही असे दिसले तर, मृतांपैकी कुणा मृताची त्या मुलाला आपले नाव ठेवावे, अशी इच्छा आहे, असे समजून पुरोहिताकडून त्याचे दुसरे नामकरण करतात.

नवजात बालकाचे जावळ बारशाच्या दिवशी करतात. दहाव्या वर्षापर्यंत ते मुला-मुलींच्या डोक्यावर केस ठेवीत नाहीत. दहाव्या वर्षांनंतर मुली केस वाढवू लागतात.

**देवदेवता** – बंगालमधील सवर हे देवदेवतांच्या पूजेसाठी ब्राह्मण पुरोहिताची मदत घेतात. परंतु ओडिसातील सवर या पुरोहितांच्या मदतीवाचून थानपती व वनसुरी या त्यांच्या मूल-देवतांना भजतात. त्यांना कोंबडे, बकरे यांचा बळीही देतात आणि हे काम त्यांच्याच जातीतील वृद्ध माणूस करतो. उत्तर प्रदेशात वस्तीला असणारे सवर शिव, महावीर, हनुमान, शीतला, पाचोपीर यांची पूजा करतात; तर तमिळनाडमधील हे लोक जाकरा किंवा लोडुलू यांना भजतात. या देवतांच्या मूर्ती किंवा मंदिरे नसतात. डोंगराळ भागातील सवरांना जलिया नामक भुताची फार भीती वाटते. त्यांच्या मते ते फार दुष्ट भूत असून त्याला शांत करण्यासाठी बळी अर्पण करावा लागतो. एका गवती छपराखाली त्याच्या सर्व सुखसोयी करून ठेवल्या जातात. किटुंग म्हणजे विश्वाचा निर्माता आणि अयुंगंग म्हणजे सूर्य असे त्यांना वाटते. सूर्यामुळेच प्रजोत्पादन होते; पण तो कधी-कधी रोगराई-ही निर्माण करतो, असे ते समजतात. कन्नी हे त्यांचे जाणखी एक दुष्ट भूत आहे. मध्य प्रदेशातील सवर दुल्हादेव, बुऱ्हादेव, भैरव व भवानी यांना पूजतात.

हे लोक जादुटोणा करण्यात फार तरबेज आहेत. सर्वसाधारणपणे सवर लोक जलिया, किटुंग, रथू, धर्मबोज व कन्नी या देवतांना भजतात. किटुंग हा आपल्या जातीचा निर्माता आहे, त्यानेच सर्व प्राणी निर्माण केले अशी त्यांची श्रद्धा आहे. एक पाषाण हे त्याचे प्रतीक असते. या देवासाठी जंगले राखून ठेवलेली असतात. तिथली झाडे ते कुऱ्हाडीने तोडीत नाहीत. रथूला ते गळयाच्या रोगाची देवता मानतात. कन्नी नामक दुष्ट देवता जंगलातील मोठ्या झाडात वास करते. त्यामुळे ते झाड कोणी तोडीत नाही. याशिवाय दिरीमा, खिस्तू, किंचियुंग, इल्डा, लोबो, इ. अनेक देवतांना ते मानतात आणि त्यांच्यासाठी सरडा, माकड, मोर, इ. प्राणी बळी देतात. कटचार, बंदूक, तलवार, कुऱ्हाड व बाजविण्याचे शिंग या वस्तूही त्यांना अर्पण करतात.

हे लोक आपल्या देवकृत्यांसाठी व इतर धार्मिक विधींसाठी ज्या लोकांची मदत घेतात, त्यांत बुया, कुरानमरान, इदाईमरन व सिग्गामरन यांचा समावेश आहे. बुया हा ग्रामपुरोहित असून लग्नकार्यादी प्रसंगीं त्याची उपस्थिती आवश्यक असते. कुरानमरान हा मांत्रिक व वैद्य आहे. बळी द्यायच्या वेळी तो हजर असतो. त्याला जादुटोणा, दृष्ट काढणे, भुताखेतांचा बंदोबस्त करणे, इ. कामे करावी लागतात. ही विद्या तो आपल्या बापाकडून किंवा निकटच्या नातलगांकडून घेतो.

सवरांच्या स्त्रियाही जादुटोणा करणाऱ्या असतात. त्यांना

शामानी असे म्हणतात. त्या स्वप्नदृष्टांतातून किंवा नातेवाइकां-कडून आपली विद्या ग्रहण करतात.

इदाईमरन हा अंत्यसंस्कार करणाऱ्या शामान पुरोहिताचा मदतनीस होय. प्रेते जाळणे हे सिग्गामरनचे प्रमुख काम असते.

सवरांचे सांस्कृतिक जीवन समृद्ध आहे. जनन, मरण व इतर अनेक सणवार ते उत्साहाने साजरे करतात. त्या निमित्ताने ते बरेच बळीही देतात. या सर्व प्रसंगीं बऱ्याच तांत्रिक बाबी त्यांना सांभाळाव्या लागतात. त्या सर्व शामान-शामानी हे पुरोहित सांभाळतात. त्यांचे सणवार पुढीलप्रमाणे आहेत –

अब्बानदूर हा सण ते मोहाची फुले खायला प्रारंभ करण्या-पूर्वी चैत्र-वैशाखांत पाळतात. कडधान्यांसाठी श्रावणामध्ये बुरियानदूर नावाचा सण असतो. त्या वेळी कडधान्यांच्या पिठाने भिंतीवर रांगोळ्या काढतात. त्याचप्रमाणे गुणगयानदूर, कोडेमानदूर, पुज्जींगदूर, रोगोनदूर, उदनदूर हे सणही अशाच प्रकारचे आहेत.

**सामाजिक जीवन** – या लोकांचे सामाजिक जीवन लोक-शाहीप्रधान आहे. महत्त्वाच्या सर्व प्रश्नांबाबत उघड्या जागेत सभा घेऊन तिथे निर्णय केले जातात. अशा सभांमधून स्त्रियाही भाग घेतात. सर्व प्रकारच्या गुन्ह्यांना दंड करतात. हा दंड दारू व गुरे या स्वरूपाचा असतो. पण चोराला चोरी करताना पक-डले तर त्याला वधाची शिक्षा देतात. पुरुषवधापेक्षा स्त्रीवधाचा गुन्हा अधिक गंभीर मानला जातो.



सवर कुटुंब

व्यभिचाराच्या प्रकारात केवळ पुरुषाला शिक्षा होते; स्त्रीला नाही. गुन्ह्याच्या शाबितीसाठी शपथ व दिव्य यांचा उपयोग करतात. स्थावर मालमत्तेचे कोणत्याही प्रकारचे व्यवहार कर-ताना प्रथम मृतात्म्यांना प्रार्थना करतात. अशा प्रकारची कामे करीत असताना कोणालाही आर्थिक मोबदला मिळत नाही.

**मर्तिकप्रथा** – सवर लोक अलिकडे मृताचे दहन करू लागले आहेत. देवीच्या रोगाने मेलेल्याचे डोके दक्षिणेकडे करून त्याला पुरतात. ज्या वाटेने देवी आल्या त्याच वाटेने त्यांनी मृताचा प्राण न्यावा अशी समजूत त्यामागे आहे. जी प्रेते जाळतात त्यांची डोकी उत्तरेला करतात. त्या मागची धारणा अशी, की सवर हे उत्तरेकडून आले, म्हणून मृतात्म्याने त्या मार्गाने आपल्या मायदेशी परत जावे.

पुरुष मृत झाला तर त्याचे प्रेत पुरुष आणि स्त्रिया स्मशानात वाहून नेतात. लहान मूल मृत झाले तर त्याला स्त्रिया वाहून नेतात. प्रेताला पाठुंगळी वाहून नेण्याचीही प्रथा आहे. काही जण तिरडीचाही उपयोग करतात. कोणाचाही मृत्यू झाला, की हे प्रथम बंदुकीचे बार काढतात. त्या आवाजाने मग लोक जमा होतात. हे आवाज काढण्यामागची आणखी एक समजूत अशी, की कुल्वा म्हणजे मृतात्मा पळून जावा. नंतर मृताला घरात आंघोळ घालून त्याला स्मशानात घेऊन जातात.

चिता ओल्या आंब्याच्या लाकडांची असते. चितेत मयताच्या सर्व चीजवस्तू म्हणजे धनुष्यबाण, कोयता, कुऱ्हाड, कट्यार, थोडे भात व तांदूळ टाकतात. या वस्तू त्याच्याबरोबर जाळल्या नाहीत तर तो मृतात्मा त्या वस्तू मागायला परत येईल आणि आपल्याला त्रास देईल, अशी त्यांची समजूत असते. चिता पेट-विल्यावर थोड्या वेळाने एक कोंबडे बळी देऊन तिथेच थोडे भात व मांस खातात. या जेवणात मृताचे नातेवाईक भाग घेतात आणि त्याला लिम्मा असे म्हणतात.

दुसऱ्या दिवशी रक्षा गोळा करून ती स्मशानाजवळच पुर-तात. त्यावर एक लहानसे झोपडे उभारतात. लिम्मानंतर मृता-त्म्याच्या मुक्तीसाठी गुअर नावाचा एक विधी करतात. त्यात एक रेडा बळी देऊन नातेवाईक व गावकरी यांना भोजन देतात. मृताच्या संपत्तीचा जो वारस असेल, त्यालाच हा विधी करा-यचा अधिकार असतो. पुरुष मृत झाला तर त्याच्याच गावी ही कृत्ये करतात. पण स्त्री मृत झाली तर तिच्या सासरी व माहेरी हा विधी वेगवेगळा करायचा असतो. ज्या मृतात्म्यांचा हा संस्कार झालेला नसतो, ते मृतात्मे वारसदारांना पीडा देतात. त्यांच्या-मुळे गुरेढोरे मरतात व मुलांना आरोग्य लाभत नाही, अशी सम-जूत आहे. मृतात्म्यांची ही भुते निरनिराळी रूपे घेऊन वावरत असतात.

मृतात्म्याला संतुष्ट करण्यासाठी दर दुसऱ्या वर्षी कर्जा नावाचा आणखी एक संस्कार करतात. हा संस्कार एकाच मृताच्या नावाने न करता, गावातील सर्व मृतांच्या नावाने कर-तात. मोराचा बळी देणे हा या संस्कारातील एक विशेष भाग

आहे. काही ठिकाणी मोराच्या ऐवजी रेडाही असतो. [ का. ट्रा. स. इं.; एन्सा. रि. ए.; से. इं. १९३१.; रि. इं. ट्रा. ]

**सवलैकारन** तमिळनाडमधील एक जात. या जातीचे लोक जुन्या काळी समुद्रात मच्छीमारी करीत. आजही काही लोक करतात. काही शेती करतात आणि देवालयात वाद्ये वाजवतात. यांचा विवाहविधी तीन दिवस चालतो. यांच्यांत विधवाविवाह निषिद्ध आहे. हे लोक प्रेते जाळतात.

**सवाई माधोपूर** राजस्थानातील जैनांचे एक सांस्कृतिक केंद्र. इथे जैनांची सात प्राचीन मंदिरे व एक चैत्यालय आहे. या सर्व मंदिरांत मिळून जैनधर्माचे १५०० हस्तलिखित ग्रंथ आहेत. इथून जवळच रणथंभोर नावाचा प्राचीन किल्ला असून, तो सांप्रत भग्नावस्थेत आहे. या किल्ल्यातही एक प्राचीन जैनविहार आहे. त्यात चंद्रप्रभ नावाच्या तीर्थंकराची मानवी उंचीची पाषाणमूर्ती आहे. या मूर्तीची पूजा-अर्चा चालते. [ जै. सि. भा., मार्च १९३८ ]

**सविता** एक वैदिक देवता. ऋग्वेदात याच्यासाठी पूर्ण ११ सूक्ते आहेत. सविता शब्द सू धातूपासून बनला आहे. त्याचा अर्थ प्रेरणा करणे, उद्दीपित करणे, चेतना देणे असा आहे. तो प्रसविता आणि प्रेरक आहे म्हणून त्याचे सविता हे नाव आहे. याचे आणि सूर्याचे गुणधर्म सामान्यतः एकच आहेत. आदित्य, सूर्य, विवस्वान, पूषा, अर्यमा, वरुण, मित्र, भग, इ. देवता ऋग्वेदात त्या त्या नावांनी वेगळ्या आलेल्या असल्या तरी, ती सविता किंवा सूर्य यांची विभिन्न रूपे होत (ऋ. ५.८१.४; १०.१३३.१). काही विद्वान सविता व सूर्य हे भिन्न मानतात; तर काही अभिन्न मानतात. सायणाचार्यांनी त्यातला फरक सांगितला आहे, तो असा – उदयापूर्वीचा आणि अस्तानंतरचा सूर्य म्हणजेच सविता होय. दुसऱ्या एका मंत्रातही या अर्थाचे सूचन होते –

**यथा प्रसूता सवितुः सवायं एवा रात्र्युषसे योनिमारैक् ।**
(ऋ. १.११३.१)

अर्थ – रात्रीपासून उत्पन्न झालेली उषा ज्याप्रमाणे सवित्याला जन्म देते त्याप्रमाणे रात्रसुद्धा आपला उत्तरार्ध उषेचे जन्मस्थान करते.

सूर्य आकाशातून सुवर्णाच्या रथात बसून फिरतो, हेच वर्णन सवित्याला लागू करणारी एक ऋचा आहे, ती अशी –

**हिरण्ययेन सविता रथेना देवो याति भुवनानि पश्यन् ।**
(ऋ. १.३५.२)

अर्थ – सविता देव समस्त भुवनांचे निरीक्षण करीत सोन्याच्या रथातून जातो.

सवित्याचे गुणवर्णन – सविता हा सोनेरी हातांचा, सोनेरी डोळ्यांचा आणि सोनेरी जिभेचा आहे. त्याचे सगळेच हिरण्मय म्हणजे सोनेरी आहे. तो स्वर्ग, पृथ्वी आणि अंतरिक्ष यांच्या ठिकाणी सुवर्णाची झळाळी पसरवतो. दोन शीघ्रगामी घोडे जोडलेल्या रथातून तो संचार करतो. अंतरिक्षातले त्याचे प्राचीन मार्ग स्वच्छ आणि सुंदर आहेत. तो प्राण्यांची पापे दूर करतो. जिथे सदाचारी लोक राहतात, तिथे तो मृतात्म्यांना पोचवतो. तो मनुष्यजातीच्या अडचणी दूर करून मानवांचे आयुष्य वाढवतो (ऋ. ८.४८.७; १०.३७.७). सृष्टीतल्या प्राण्यांना किंवहुना सर्व सृष्टीला तो उत्पन्न करतो. सारी मानवसृष्टी याच्याच आधारावर जगते, काम करते आणि प्रेरणा मिळवते. तो देवांचा पुरोहित आहे. देवांना केलेली प्रार्थना सवित्याच्या द्वारेच ज्याला त्याला पोचती होते. तो मानवजातीची विघ्ने दूर करतो, म्हणून द्विज संध्यासमयी त्याला अर्घ्य देतात व जगाला त्रस्त करणाऱ्या असुरांपासून आपले संरक्षण व्हावे म्हणून त्याची प्रार्थना करतात.

ज्ञानकोशकार म्हणतात की सविता हे विशेषण प्रथम सूर्याला लावीत असत. कारण सूर्य हा विश्वामध्ये गती आणि जीवन देणारा असून, सर्व गतींचे नियंत्रण करणारी अशी गती त्याचे ठिकाणी आहे. सूर्याचे विशेषण या नात्याने सविता या शब्दाचा उपयोग होऊ लागल्यावर पुढे सूर्यापासून हे विशेषण विभक्त करून त्यात दर्शविलेल्या युगाची वेगळी देवता मानण्यात आली.

उदार व धनवान सविता – सविता हा फार मोठ्या धनाचा स्वामी आहे. ते धन तो उदार हस्ताने लोकांना देतो. वैदिक ऋषींनी त्याबद्दलच त्याच्या प्रार्थना केल्या आहेत. त्यांतल्या काही प्रार्थना अशा–

**विभक्तारं हवामहे वसोश्चित्रस्य राधसः । सवितारं नृचक्षसम् ॥**
(ऋ. १.२२.७)

अर्थ – लोकांचा नेत्र असणाऱ्या आणि अनेक प्रकारचे धन देणाऱ्या सवित्याचे आम्ही आवाहन करतो.

**अभि त्वा देव सवितरीशानं वार्याणाम् । सदावन् भागमीमहे ॥**
(ऋ. १.२४.३)

अर्थ – हे नित्यरक्षक सवित्या, इच्छिण्याजोग्या धनांचा स्वामी असणाऱ्या तुझ्याकडे आम्ही धन मागतो.

यजुर्वेदात सवित्याचा उल्लेख पुष्कळ ठिकाणी येतो. 'सवितृ देवाच्या प्रेरणेने' ही शब्दसंहती यजुर्वेदात वारंवार आली आहे. काही ठिकाणी इतर सर्व देवतांहून सविता श्रेष्ठ आहे, असेही उल्लेख आहेत.

सुप्रसिद्ध गायत्रीमंत्र सवित्याचाच आहे. त्यात बुद्धीला प्रेरणा

...त्याबद्दल त्याची प्रार्थना आहे. पाहा – सूर्य. [ ए. एफ. एफ. ...मू.; म. ज्ञा. को.; वै. सा. सं.; वै. वा. भा. वि. ]

**सवैया** व्रजभाषेतील एक काव्यछंद. डॉ. नगेंद्र यांच्या मते हा सपादिका या शब्दाचा अपभ्रंश असावा. पूर्वी भाट, चारण हे लोक आपले काव्य या छंदातच करीत. हे लोक पद्याची शेवटची ओळ प्रथम दोन वेळा व चौथ्या ओळीच्या शेवटी सवा एकदा म्हणत. त्यामुळे तो छंद सव्वापटीचा समजला जाई. म्हणूनच त्याला सवैया म्हणू लागले.

हा छंद संस्कृत काव्यात आढळत नाही. प्राकृतात मात्र तो तुरळकपणे आढळतो. प्राचीन पैंगल साहित्यात या छंदाचा उगम झाला आहे. त्याच्यात कालपरत्वे पुष्कळ बदल झाले आहेत. सवैया छंदाचा प्रयोग अकबर, गंग, तोडरमल, नरोत्तमदास, तुलसीदास आदी कवींनी मुक्तपणे केला आहे. या कवींच्या भाषाशैलीवरून असे दिसते, की सवैया छंदाच्या प्रायोगिक कालांतरची ही अवस्था आहे. भाट, चारणादी कवींनी मौखिक परंपरेने जोपासलेला हा छंद वरील कवींना काव्यानुकूल वाटला व त्यांनी त्याचा स्वीकार केला.

शब्दरसायनात या छंदाचे बारा प्रकार सांगितले आहेत. त्यांतले आठ भेद प्राचीन, तर चार नवीन आहेत.

सवैया छंद २२ ते २६ वर्णांचा बनतो. चरणाच्या अंती येणाऱ्या लघुगुरूंच्या मिश्रणाने सवैयातून अनेक दुसरेही छंद निर्माण होतात. भानूच्या छंदप्रभाकरामध्ये त्यांची नावे दिली आहेत, ती अशी –(१) मदिरा,(२) मंदारमाला, (३) चकोर, (४) मत्तगयन्द, (५) सुमुखी, (६) गंगोदक (लक्ष्मी, खंजन), (७) किरीट, (८) मुक्तहरा, (९) दुर्मिल, (१०) बाम, (११) आभार, (१२) अरसात, (१३) सुंदरी व (१४) मुख्य. यांतील पुष्कळ छंद लोकप्रिय झाले आहेत. मत्तगयन्द हा छंद सर्वाधिक लोकप्रिय आहे. त्याच्या खालोखाल दुर्मिल, किरीट व सुमुखी हे छंद येतात. हा छंद गेय आहे.

पुढील सवैया हा त्याचा एक नमुना आहे–

राम एक तापस तिय तारी ।
नाम कोटि खल कुमति सुधारी ।।
रिषि हित राम सुकेतुसुताकी ।
सहित सेन सुत किन्हि बिबाकी ।।
सहित दोष दुख दास दुरासा ।
दलइ नामु जिमि रबि निसिनासा ।।
भंजेउराम आपु भव चापू ।
भवभयभंजन नाम प्रतापू ।।

(रामचरितमानस बालकांड २–३)

अर्थ–श्रीरामाने एका तपस्विनीचा (अहिल्या) उद्धार केला; परंतु त्याच्या नामानेच कोटचवधी भ्रष्ट बुद्धीचे दुष्ट तरले. श्रीरामाने विश्वामित्राच्या हितासाठी सुकेतू यक्षाची कन्या ताडका, तिची मुले व सैन्य यांचा विध्वंस केला, पण त्याच्या नामाच्या प्रभावानेच भक्तांचे दोष, दुःख व दुराशा, इत्यादींचा सूर्यप्रकाशाने अंधार नाहीसा व्हावा त्याप्रमाणे नाश होतो. श्रीरामाने शिवधनुष्य भग्न केले खरे, परंतु त्याच्या नामाच्या प्रतापानेच संसारभयाचा नाश होतो.

हा छंद इ. स. च्या १३व्या शतकात प्रचलित असावा, असे अनुमान करता येते. [ हिं. सा. बृ. इ., भाग ६ ]

**सव्य** शरीराच्या डाव्या अंगाला सव्य असे म्हणतात. यज्ञोपवीत डाव्या खांद्यावरून उजव्या खांद्याखाली घेणे याला सव्य अशी संज्ञा आहे. पाहा – अपसव्य; तर्पण.

**सव्य आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. हा अंगिरसाचा पुत्र म्हणून याला आंगिरस असे म्हटले आहे. याने ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलातील ५१ ते ५७ अशी सात सूक्ते रचली आहेत. या सर्व सूक्तांमध्ये इंद्राने केलेल्या पराक्रमाचे वर्णन आढळते. यात इंद्राला सर्व जगाचे मूलकारण म्हटले आहे. अंतरिक्षाचा अधिपती म्हणूनही त्याचे वर्णन आढळते. तिथल्या पापी लोकांना शासन करणे हे त्याचे प्रमुख काम होय. त्याच्या पराक्रमाप्रमाणेच त्याची काही चांगली कामेही त्यांत वर्णिली आहेत (१.५१.१३). एकावन्नाव्या सूक्ताच्या सहाव्या ऋचेत त्याने दिवोदास राजाचा अतिथिग्व नावाने उल्लेख केला आहे. याची एक ऋचा अशी –

अनुव्रताय रन्धयन्नपव्रतानाभूमिरिन्द्रः श्नथयन्ननाभुवः ।
वृद्धस्य चिद् वर्धतो द्यामिनक्षतः स्तवानो वम्रो वि
जघान संदिहः ।।
(ऋ. १.५१.९)

अर्थ – अधार्मिकांना (दस्यूंना) धार्मिकांच्या (आर्यांच्या) स्वाधीन करणारा आणि अभक्तांचा संहार भक्तांच्या द्वारा करविणारा इंद्र सर्वश्रेष्ठ आहे. मुळातच महान असलेला इंद्र द्युलोकाला भिडण्याइतका बृहदाकार झाल्याची प्रशंसा वम्र नामक भक्ताने केली आणि त्याला मुक्ती मिळाली.

अंगिरस ऋषीने इंद्राप्रमाणे पराक्रमी पुत्राच्या प्राप्तीसाठी घोर तपश्चर्या केली. पृथ्वीवर आपल्याला कोणी शत्रू निर्माण होऊ नये म्हणून इंद्रानेच सव्य नावाने जन्म घेतला, असे बृहद्देवताकार (बृहत्. ३.११५) व सायणाचार्य यांचे मत आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**सस आत्रेय** अत्रिकुळातला एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील एकवीस क्रमांकाचे सूक्त याच्या नावावर आहे. अग्निस्तुती हा या सूक्ताचा विषय असून, तोच या प्रस्तुतच्या सूक्ताची देवता आहे. याची एक ऋचा अशी—

**त्वां विश्वे सजुजोषसो देवासो दूतमक्रत ।**
**सपर्यन्तस्त्वा कवे यज्ञेषु देवमीळते ।।**

(ऋ. ५.२१.३)

अर्थ – देवांनी दूत म्हणून नियुक्त केलेल्या हे ज्ञानवान आणि तेजस्वी अग्ने, यज्ञीय भक्त प्रतिदिनी तुझे स्तवन करतात.

या सूक्ताच्या चौथ्या ऋचेत 'ससस्य' असे पद आहे. सायणाचार्यांनी ससऋषी असा त्याचा अर्थ केला आहे. पण काही अभ्यासकांनी या अर्थाविषयी शंका व्यक्त केली आहे. [ऋ. म. भा.; म. ज्ञा. को. बुद्धपूर्वजग; सी. ऋ.]

**ससर्परी** एक विद्या व शक्ती. हिचे स्वरूप विशद करताना डॉ. स. अं. डांगे लिहितात – वैदिक परंपरेनुसार ससर्परी म्हणजे सरसरणारी किंवा गतिमान असणारी वाणी. काही आधुनिक पंडितांच्या मते ससर्परी म्हणजे युद्धात वाजवली जाणारी तुतारी होय. ऋग्वेदात तिला सूर्यकन्या म्हटले आहे—

**ससर्परीरमतिं बाधमाना बृहन्मिमाय जमदग्निदत्ता ।**
**आ सूर्यस्य दुहिता ततान श्रवो देवेष्वमृतमजुर्यम् ।।**

(ऋ. ३.५३.१५)

अर्थ – जमदग्नींनी दिलेली ससर्परी अमंगल दूर करणारी आहे; ती मोठ्याने ओरडली. ती सूर्याची कन्या अखंड आणि अमर्त्य असे यश देवांपर्यंत प्रसृत करती झाली.

त्याच्या पुढच्याच ऋचेत (३.५३.१६) म्हटले आहे, की पंचजनांच्या वसाहतीत ससर्परीने त्यांना सुयश प्राप्त करून दिले. नवजीवन प्राप्त करून देणारी ती एक पक्षिणी होय. तिचे दान पलस्तिजमदग्नींनी आम्हांला (विश्वामित्राला) केले.

हे दोन्ही मंत्र भरतवंशातील सुदासाच्या अश्वमेध यज्ञाच्या प्रसंगी उच्चारलेले आहेत. जमदग्नींनी विश्वामित्राला दिलेली ही ससर्परी पक्षिणी सूर्याची कन्या म्हणजे सावित्री होय; कारण सूर्य हा सवितृ आहे. सावित्री म्हणजेच गायत्री होय. सर्व छंदांमध्ये गायत्रीलाच सावित्री ही संज्ञा आहे. ससर्परी म्हणजे सावित्री – गायत्री मंत्र होय. हा मंत्र म्हणून विश्वमित्राने अश्वमेधीय अश्व सोडल्यामुळे अश्वमेध सफल होणारच अशी निश्चिती सुदासाला वाटली असेल.

दाशराज्ञ युद्धात मात्र ही ससर्परी अयशस्वी ठरली. त्यानंतर वसिष्ठांनी शक्वरीच्या योगाने सुदाम राजाला जय मिळवून दिला. [अश्वत्थाची पाने – डॉ. स. अं. डांगे, १९७४]

**सहचरिशरण** (इ. स. १७७३–१८३७) हरिदासी संप्रदायाचा एक आचार्य. सखीशरण हे त्याचे दुसरे नाव होते. टट्टी संप्रदायाचा महंत श्री. राधाशरण याचा हा शिष्य असून, त्याच्या नंतरचा उत्तराधिकारी होता. सहचरिशरण हा परम भक्त व उत्तम कवीही होता. ललितप्रकाश, सरसमंजावली, गुरुप्रणालिका, आचार्योत्सवसूचनिका, नखशिखध्यान व वचनिकासिद्धान्त हे त्याचे ग्रंथ होत. ललितप्रकाश व सरसमंजावली या ग्रंथांमध्ये टट्टी संप्रदायातील वैष्णवांची चरित्रे, सांप्रदायिक सिद्धान्त, उत्सव, इ. विषयांचे विवेचन आढळते. त्यामुळे हरिदासी संप्रदायाचा इतिहास समजण्यासाठी या ग्रंथांचा आधार घ्यावा लागतो. सहचरीच्या या ग्रंथांचा प्रमुख आधार म्हणजे किशोरीदासविरचित निजमतसिद्धान्त हा होय.

ब्रजमिश्रित खडीबोली ही कवीच्या ग्रंथांची भाषा आहे. तीत संस्कृत व फारसी शब्दांची रेलचेल आढळते. मात्र त्यात सर्वत्र नेटकेपणाही आहे. [भा. सं.; ब्र. ध. सं. इ.]

**सहजकीर्ती** (इ. स.च्या १७ व्या शतकाचा पूर्वार्ध) एक जैनभक्तकवी. जिनचंदसूरी हा याचा गुरू होता. त्यानेच सहजकीर्तीला जैन धर्माची दीक्षा दिली. हा खरतर गच्छातला होता. याने आपल्या विद्वत्तेच्या वळावर विद्याक्षेत्रातल्या अनेक पदव्या मिळवल्या. आपल्या ४०–४५ वर्षांच्या आयुष्यात विपुल ग्रंथनिर्मिती करून याने जैनवाङ्मय समृद्ध केले. संस्कृत व प्राकृत या दोन्ही भाषांत मिळून याने २५ ग्रंथ लिहिले. सप्तद्वीपिशब्दार्णवव्याकरण, अनेकशास्त्रसारसमुच्चय, नामकोश, इ. त्याच्या संस्कृत ग्रंथांची नावे आहेत. सुदर्शन चौपाई, कलावती चौपाई, शांतिनाथविवाह, वैराग्यशतक, उपदेशछत्तिसी, इ. त्याचे प्राकृत ग्रंथ होत.

सहजकीर्तीने धर्मप्रसाराचे बरेच कार्य केले. [जै. सि. भा., डिसेंबर १९४९; हिं. जै. भ. क.]

**सहजयान** एक चैतन्यपूर्व बौद्ध संप्रदाय. वज्रयान आणि सहजयान हे दोन्ही संप्रदाय सामान्यपणे एकाच काळी निर्माण झाले. हा संप्रदाय सुरवातीला एकूण बौद्ध संप्रदायाच्या कक्षेबाहेर होता. कालांतराने तो बौद्ध संप्रदायात प्रविष्ट झाला.

योगाचार संप्रदायात जो अर्थ शून्याचा, तोच प्रस्तुत संप्रदायात सहजाचा आहे. सहजयानी आचार्यांनी, विशेषतः सिद्धांनी शून्यता शब्द टाकून सहज शब्द स्वीकारला. सिद्ध हे प्रत्येक साधनावस्तूला सहज म्हणत. उदा० सहजज्ञान, सहजस्वरूप, सहजसुख इत्यादी. बुद्धालाही त्यांनी सहज असेच नाव दिले आहे.

सहजयानींच्या मते योगाचारातला शून्य हा शब्द परम तत्त्वाला पूर्ण अर्थाला अभिव्यक्त करू शकत नाही. ते कार्य हा शब्द करू शकतो. परमतत्त्वाच्या ठिकाणी केवळ शून्यता असे नाही; तर तिच्या जोडीने करुणाही असते. म्हणून साधकाला शून्यतेबरोबरच करुणेचेही ज्ञान व्हायला हवे. तसे न झाल्यास परमार्थ साधत नाही.

सहजयानी साधूंनी परम तत्त्व आणि आत्मा अशा दोन्ही अर्थी सहज शब्द वापरला आहे. जन्माच्या बरोबरीने जी वस्तू उत्पन्न होते ती वस्तू सहज होय, हा त्या शब्दाचा व्युत्पत्तिलभ्य अर्थ होय. पण त्या संप्रदायात हा अर्थ टिकला नाही. बंगालमधल्या सहजयानी आचार्यांनी त्याचा अर्थ बदलला. सहज म्हणजे मन व इंद्रिये यांची स्वाभाविक प्रवृत्ती होय, असे त्यांनी मानले. मन व इंद्रिये यांना त्यांच्या स्वाभाविक मार्गाने जाऊ देणे व त्यांचा निग्रह न करता त्यांच्या इच्छा-आकांक्षा पुऱ्या करणे हीच सहज साधना होय, असे ते प्रतिपादू लागले.

सहजयानात गुरूला फार महत्त्व आहे. सहजयानी आचार्य म्हणतात – शून्यता व करुणा यांची मिलितमूर्ती किंवा प्रज्ञा व उपाय यांचा समरस विग्रह म्हणजे गुरू होय. गुरूचे हे युगनद्ध रूप म्हणजे परमार्थ व महासुख यांचे आलय आहे. गुरूचे अवलंबन केल्यावाचून निर्वाण मिळू शकत नाही.

दुर्लभा सहजावस्था सद्गुरोः करुणां विना ।

अर्थ – सद्गुरूच्या करुणेशिवाय सहजावस्था दुर्लभ होय.

योगीगुरूची मौनमुद्रा हाच त्याचा उपदेश. गुरु-शिष्यांमध्ये शब्दद्वारा संवाद नाही. मौखिक उपदेश व्यर्थ आहे.

सद्गुरुः शिष्ये रतिस्वभावेन महासुखं तनोति ।

अर्थ – सद्गुरू आनंद किंवा रती हिच्या प्रभावाने शिष्याच्या ठिकाणी महासुखाचा विस्तार करतो.

प्रज्ञोपायांचे सामरस्य हेच निर्वाण होय. प्रज्ञा म्हणजे निःस्वभाव, उपाय म्हणजे स्वभाव. दोहोंपैकी कोणत्याही एकाने बुद्धत्वाची प्राप्ती होणार नाही. दोहोंची अभिन्नता हवी. त्या स्थितीत भोग व मोक्ष जणू एक होऊन जातात.

उभयोर्मीलनं यश्च सलिलक्षीरयोरिव ।
अद्वयाकारयोगेन प्रज्ञोपायस्तदुच्यते ।।

(प्रज्ञोपायविनिश्चयसिद्धी)

अर्थ – जेव्हा दूध-पाण्याप्रमाणे भोग-मोक्ष अद्वयाकार योगाने एक होतात, तेव्हाच त्या अवस्थेला प्रज्ञोपाय असे म्हणतात.

इंद्रियनिरोधाने निर्विकल्प समाधीचा उदय होऊ शकत नाही, असे सहजयानी असे म्हणतात. तसेच विषयांचा परित्याग केल्याने किंवा वैराग्यसाधन केल्याने कोणतेही फल मिळत नाही. कारण त्यात युगल अवस्था प्राप्त करून देण्याची शक्ती नाही. मन व इंद्रिये यांच्या स्वाभाविक प्रवृत्तीला अनुसरून युगलप्राप्तीच्या मार्गात आले पाहिजे. त्यावाचून सामरस्य संघटित होऊ शकणार नाही. म्हणूनच सहजमार्ग हा राजमार्ग आहे, असे समजावे. सहजमार्गात व्रतनियम, तप, इ. गोष्टी निष्फल आणि निरर्थक आहेत. त्या उपायांनी केवळ कष्टच पदरात पडायचे. याविषयी श्रीसमाज नामक तंत्रात म्हटले आहे ते असे –

पञ्चकामान्परित्यज्य तपोभिर्न च पीडयेत् ।
दुःखाब्धौ क्षिप्यते चित्तं विक्षेपात् सिद्धिरन्यथा ।।

अर्थ – पंचेद्रियांच्या कामनांचा परित्याग करून तपादी गोष्टींनी शरीराला पीडा देऊ नये. इंद्रियांच्या मार्गात निक्षेप आणल्याने चित्त दुःखसागरात पडते आणि सिद्धी दूर जाते.

भारताच्या सांस्कृतिक इतिहासात सहजयानाला विशिष्ट स्थान आहे, असे संशोधक म्हणतात. नंतरच्या हिंदूधर्मावर आणि साहित्यावर त्याचा व्यापक प्रभाव पडला आहे. सहजयानाच्या पूर्वी धर्म-मोक्षसाधनेत भोगविषयांचा त्याग आवश्यक मानला गेला होता. नंतरच्या हिंदू परमार्थात विषयत्याग हा गौण मानला गेला. सहजयानाच्या पूर्वीचे धर्माचार्य प्रायः ऋषी, यती, मुनी अशांसारखे होते. ते इंद्रियनिग्रह आणि कठोर साधने यांचा आग्रह धरणारे होते. पुढच्या काळातले कबीर, नानक, दादू, एकनाथ, तुकाराम, इ. धर्मधुरीण किंवा परमार्थी गुरू हे मात्र गृहस्थ होते, म्हणजेच धर्माला विरुद्ध न ठरणारे विषयभोग घेणारे होते.

सहजयानी साधक गुरूच्या आदेशानुसार एखाद्या स्त्रीला आपली महामुद्रा बनवीत. या महामुद्रेच्या सहवासातच ते आपली साधना करीत. महामुद्रेला ते प्रज्ञा म्हणत व स्वतःला उपाय समजत. दोहोंच्या मनोवृत्तीत पूर्ण साम्यावस्था निर्माण करण्याचा त्यांचा प्रयत्न असे. सर्वप्रकारच्या कामोपभोगांनीच सहजसिद्धी प्राप्त होईल, या विश्वासाने ते महामुद्रेशी रममाण होत असत. सहजयान साधकांची ही महामुद्राच पुढे वैष्णवधर्मात परकीया नायिका म्हणून दाखल झाली. त्यामुळेच कृष्णकथेत रसिकतेचा समावेश झाला. पुढे इ. स. च्या १५–१६ व्या शतकात भारतामध्ये जो भक्तिवादाचा विकास झाला आणि परकीया भावाला महत्त्व मिळून राधामाधवयुगल हे उपास्य ठरले, त्यामागे सहजयान पंथाच्या मतांचा प्रभाव आहे, हे नाकारता येणार नाही. यासंबंधी श्री. राहुल सांकृत्यायन यांनी अधिक विवेचन केले आहे, ते असे –

इतर धार्मिक पंथांप्रमाणेच बौद्ध धर्मातही प्रारंभी ब्रह्मचर्य व भिक्षुजीवन यांवर भर होता. पण बाराव्या शतकापर्यंत आल्यावर वरील दोन्ही गोष्टी ढोंग ठरल्या. मठविहारांमधल्या भिक्षुजीवनात अनेक प्रकारचे अनाचार शिरले. बौद्ध भिक्षू ब्रह्मचर्याच्या गोष्टी केवळ तोंडाने बोलत; पण आचरणात मात्र

गुप्तपणे यथेष्ट विषयोपभोग घेत. सहजयान हो या बाह्यात्कारी ढोंगाची प्रतिक्रिया होती. सहजयानींना वाटले, की मोक्षसाधना सुद्धा माणसाच्या स्वाभाविक प्रवृत्तींना अनुसरून इंद्रियांची भूक भागवीतच झाली पाहिजे.

पण ही गोष्ट ते उघडपणे सांगू शकत नव्हते. तसे त्यांनी केले असते, तर त्यांना समाजाचा तीव्र विरोध झाला असता. त्यांचे अस्तित्वच संपुष्टात आले असते. म्हणून त्यांनी विश्वासाच्या मंडळीत याचा गुप्तपणे प्रचार सुरू केला. वेगवेगळ्या ठिकाणी असे गुप्त गट निर्माण झाले. त्यांनी एकत्र येणाऱ्या स्त्री-पुरुषांना मद्य-मैथुनाची पूर्ण स्वतंत्रता दिली. सहजयानी आचार्यांनी या मुक्त लैंगिक संबंधाला धर्माचे आवरण चढवण्यासाठी चक्रसंवर, इ. देवता, मंत्र आणि पूजाप्रकार निर्माण केले. त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला. सहजयानी गुह्य समाजात अनाचार आणि अनैतिकता यांना ऊत आला. ज्यांनी ही पद्धती निर्माण केली त्या आचार्यांनाही हा अनाचार पुढे थोपवता आला नाही. पाहा – वज्रयान. [ सं. चा. अ. ]

## सहजानंद

(१) (इ. स.चे १६ वे शतक) आनंद संप्रदायातील एक कवी. यांचे चरित्र उपलब्ध नाही. यांची गुरुपरंपरा अशी – विष्णू – विधी – अत्री – दत्त – सदानंद – रामानंद अमलानंद–गंभीरानंद–ब्रह्मानंद व सहजानंद. यांची ग्रंथ रचना पुढीलप्रमाणे आहे –

ज्ञानप्रदीप अथवा ज्ञानदीपिका; सहजानंदी टीका (अमृतानुभवावरील संस्कृत टीका) व योगवासिष्ठटीका. या ग्रंथांत अद्वैताचे प्रतिपादन आहे. ग्रंथरचना ओवीबद्ध असून, पंडिती पद्धतीची आहे.

सहजानंद हे रामदास पंचायतनातील रंगनाथस्वामी निगडीकरांचे परात्पर गुरू होत. [ म. वा. को. ]

(२) (१८व्या शतकाचा उत्तरार्ध) एक ग्रंथकार. विदर्भातील पुसदचा रहिवासी. जयदेवाचा शिष्य. ज्ञानदीपिका नावाचा एक ओवीबद्ध टीकाग्रंथ याने रचला असून, त्यात योग व वेदान्त या विषयांचे विवेचन आहे. मूळ ग्रंथ संस्कृत भाषेत असून, त्याची नऊ प्रकरणे आहेत. [ वि. सं. मं. वा. १९७१ ]

## सहजिया संप्रदाय

चैतन्यपूर्व कालातला एक संप्रदाय. इ. स. च्या १४ व्या शतकात बंगालमध्ये या संप्रदायाची निर्मिती झाली. हा संप्रदाय म्हणजे सहजयानाचाच विस्तार आहे. यातही सहजयानी प्रज्ञोपायमीलन स्वीकारलेले आहे. यालाच ते युगनद्धरूप म्हणतात. त्याच्यामुळेच महासुखाचा विस्तार होतो. किंबहुना महासुख प्राप्त करून घेण्याचा तोच एक राजमार्ग आहे. कामाला रागामध्ये परिणत करण्यातच महासुखाची सिद्धी असते; या रागाचे परिशोधन करण्यासाठी सहजिया लोक अनेक तांत्रिक मुद्रांचा प्रयोग करतात.

माधुर्यभाव हीच सहजियांची एकमात्र उपासना आहे. अन्य कोणताही भाव माधुर्यभावापेक्षा श्रेष्ठ नाही, असे ते समजतात. माधुर्यभावात परकीयातत्त्व प्रमुख आहे. मात्र त्यांनी परकीया पक्षाची आध्यात्मिकताच तेवढी स्वीकारली असून, त्याला सामाजिक मान्यता दिलेली नाही.

सहजिया पंथाच्या साधनापद्धतीचा विचार केल्यास हा पंथ वाममार्गी तांत्रिक पंथ आहे, असे दिसून येते. त्यांच्या परकीयाभावाला वाममार्गच सोयीस्कर ठरणारा होता. कारण त्यात वैदिक विधि-विधानाला कोणत्याही प्रकारचे स्थान नाही. सहजिया संत आपल्या शरीरात सरोवरांची कल्पना करतात. या कल्पनेचे मूळ तांत्रिकांच्या चक्रकल्पनेत असणे शक्य आहे. साधनेसाठी योगातली अनेक तत्त्वे या संप्रदायाने मान्य केली आहेत.

सांप्रदायिकांचे सांगणे आहे, की सहजिया साधकाने सर्व कामनांचा त्याग करून आपल्या आराध्य अशा श्रीकृष्णाच्या सान्निध्यात निरंतर मग्न राहिले पाहिजे. प्रेमरसाचा असा निरंतर आस्वाद घेत राहिल्यानेच त्याला माधुर्यभावनेच्या परम पावन क्षेत्रात पदार्पण करता येते. मग त्याला राधा-कृष्णांच्या मधुर लीलाविलासांचे नित्य दर्शन होत राहते.

सहजिया आचार्यांनी आपल्या संप्रदायाची दहा तत्त्वे निश्चित केली आहेत, ती अशी –

(१) परमात्मा हा माधुर्यरसाचा एक स्रोत आहे.

(२) हे माधुर्य सार्वभौम आहे.

(३) राधा-कृष्ण युगल हेच परम उपास्य आहे.

(४) प्रेम हा त्या उपास्याचा धर्म आहे.

(५) स्वरूपज्ञानाने हे प्रेम उत्पन्न होते.

(६) या प्रेमाच्या बळावर भगवन्मय होऊन राहणे, ही साधनेची सफलता आहे.

(७) रूपाच्या संयोगाने स्वरूपाची प्राप्ती संभवनीय आहे.

(८) परकीयेच्या साधनेत प्रेमासक्ती असणे आवश्यक आहे.

(९) व्यक्तीच्या अंतरात राहणारे स्वरूप कृष्णाचे आध्यात्मिक तत्त्व असून, रूप हे भौतिक तत्त्व आहे.

(१०) श्रीकृष्णाचे पुरुषत्व आणि राधेचे प्रकृतित्व सिद्ध आहे.

वृंदावन हे राधा-कृष्ण युगलाचे विहारस्थल आहे. वृंदावनाची रूपे तीन आहेत – (१) प्राकृतिक वृंदावन (२) मन वृंदावन आणि (३) नित्य वृंदावन. सिद्धावस्थेला गेलेला सहजिया साधक पहिली दोन वृंदावने पार करून तिसऱ्या नित्य वृंदावनात युगलरूपाचे दर्शन करू शकतो. राधा-कृष्ण युगलाच्या स्वरूपलीलेचे

वृंदावन हे केंद्रस्थल असून, संप्रदायाच्या भक्तांनी त्याला प्राणस्वरूप मानलेले आहे.

चंडीदास आणि विद्यापती हे या पंथाचे प्रवक्ते कवी मानले जातात. चंडीदास हा सहजसाधक होता आणि रामी धोबीण ही परकीया त्याच्या साधनेचे माध्यम होती. तो एका पद्यात तिला उद्देशून म्हणतो –

'हे धोबिणी, तू माझी रमणी आहेस. मी त्रिकाल संध्येने तुझेच ध्यान करतो. तू वेदमाता गायत्री आहेस. तू वाग्वादिनी सरस्वती आहेस. तू वयाने किशोरी आहेस. पण तुझ्या रूपात कामाचा गंधही नाही. माझ्या उपासनेचा रस तूच आहेस.' [हिं. कृ. मा.; हिं. ते. वै. भ.; बं. सा. सं. इ.]

**सहजोबाई** (इ. स. १६८३–१७६३) एक हिंदी संत कवयित्री. राजस्थानातील डेहरा नामक गावी ढूंसर वैश्य कुलात ही जन्मली. हिच्या पित्याचे नाव हरिप्रसाद असे होते. तो दिल्लीचा प्रसिद्ध व्यापारी होता. घरी समृद्धी होती. पण बालपणापासूनच सहजोबाईच्या मनात वैराग्य निर्माण झाले. पुढे तिला संत चरणदासाचा गुरूपदेश लाभला. गुरूपदेशानंतर सहजोबाईची आध्यात्मिक उन्नती वेगाने झाली. ती आजन्म अविवाहित राहिली व तिने गुरूलाच ईश्वर मानून त्याची अखंड सेवा केली. सहजोबाईच्या या जगावेगळे जीवन जगण्याच्या निग्रहामुळे तिच्या आप्तस्वजनांनी तिचा खूप छळ केला; परंतु तिने तो विनतक्रार सहन केला. सहजोबाईने सहजप्रकाश, शब्द, सोलहतत्त्वनिर्णय, इ. ग्रंथ लिहिले आहेत. गुरुमहिमा वर्णन करताना सहजोबाई लिहिते –

सब परबत स्याही करूँ, घोलूं समुंदर जाय।
धरती का कागद करूँ, गुरू अस्तुति न समाय।।

भावार्थ – सर्व पर्वत समुद्रात घोळून घुसळून त्यांची शाई केली आणि धरतीचा कागद केला तरी गुरुस्तुती त्यात सामावणार नाही.

सहजोबाईची भाषा सोपी व प्रसादपूर्ण असून, विषयविवेचनही सुलभ आहे. चरणदासाच्या उपदेशानंतर ती निर्गुण भक्तीकडून सगुण भक्तीकडे वळली. आपल्या काव्यात तिने कृष्णाचे सरससुंदर वर्णन केले आहे. [सं. प. प. पं.; सं. सा. स्व.; सं. द.; हिं. सा. को. २; मि. मि. इं.]

**सहदेव जोशी** महाराष्ट्रातील एक लोकज्योतिष्यांची जात. हे लोक आपणांस सहदेवाचे वंशज म्हणवितात. हे प्राधान्याने पुणे आणि रत्नागिरी या जिल्ह्यांत आढळतात. एका ब्राह्मण ज्योतिष्यास एका कुणबी बाईपासून झालेल्या सहदेव नामक मुलापासून आपली उत्पत्ती झाल्याचे हे सांगतात. दारोदार फिरून लोकांना भविष्य सांगणे व त्यावर मिळणाऱ्या पैशांवर व धान्यावर आपली गुजराण करणे हा यांचा व्यवसाय होय. हे मृतांना पुरतात. यांच्या अन्य चालीरीती व कुळधर्म-कुळाचार मराठा-कुणब्यांप्रमाणेच आहेत.

हे सहदेव जोशी ज्या सहदेवाला आपला पूर्वज मानतात, त्या सहदेवाने आणि भाडळी नामक एका स्त्रीने परस्पर-संवादातून जे लौकिक पातळीवर ज्योतिषविषयक आडाखे बांधले, त्यांना महाराष्ट्रात सहदेव–भाडळी–मत असे म्हटले जाते. हे आडाखे मुख्यत्वे पर्जन्य आणि शकुनविषयक असल्यामुळे शेतकऱ्यांच्या जीवनात त्यांचा विशेष प्रचार आढळतो. 'पडतील स्वाती तर पिकतील माणिक मोती' या सारख्या म्हणी आणि 'रोहिणी वाजे गडगडाट, मग पडे दिवस आठ। भाडळी म्हणे सहदेवा, नद्या वाहती काठोकाठ।।' यासारखी पर्जन्यविषयक वचने सहदेव जोशांची म्हणून आजही खेडोपाडी लोकप्रिय आहेत. [लो. सं. क्षि.]

**सहवासी ब्राह्मण** पंचद्रविड ब्राह्मणांची एक पोटजात. यांना सवाशे ब्राह्मण असेही म्हणतात. या जातीची वस्ती महाराष्ट्रात कोल्हापूर, मिरज, सांगली, कराड, कागल येथे आहे. कर्नाटकातही या जातीचे लोक आढळतात. यांना सहवासी म्हणण्याची कारणे सांगतात, ती अशी –

(१) श्रीरामाच्या दंडकारण्यवासात हे त्याचे सहवासी होते. (२) हे आपल्या आचार्यांच्या सहवासात होते. (३) सह्याद्रीच्या जवळचे म्हणजे सहवासी होते.

काही इतिहासकारांच्या मते हे कोकणस्थांपैकी असावे. पण हे मत ग्राह्य वाटत नाही. कारण कोकणस्थांत निषिद्ध असलेला मातुलकन्यापरिणय यांच्यांत आहे. यांच्यांत मामा–भाची असाही लग्नसंबंध होतो. हे शुद्ध देशस्थ ब्राह्मण असून, त्यांना पंक्तीला घेण्यास कोणी हरकत घेऊ नये, अशा अर्थाचे निवाडे आचार्यपीठांनी दिले आहेत. काहींनी त्यांची गणना कर्नाटकी ब्राह्मणांत केली आहे. उपमन्यू, भारद्वाज, कौशिक, वसिष्ठ, गौतम अशी यांची गोत्रे आहेत. हे ऋग्वेदाच्या शाकल शाखेचे असून, आपले धार्मिक संस्कार आश्वलायनसूत्राच्या आधारे करतात. व्यंकटेश, उडुपीचा श्रीकृष्ण व पालीचा खंडोबा ही यांची कुलदैवते आहेत.

सहवासी हे काश्मीरी ब्राह्मण असून, व्यापारउदीम व सावकारी करण्यासाठी ते काश्मिरातून व अहिच्छत्रातून दक्षिणेत आले व महाराष्ट्र-कर्नाटकात स्थायिक झाले. धारवाड जिल्ह्यातील हावेरी गावी भिंतीला टेकून इ.स. ११५२चा एक शिलालेख आहे. त्यात सावासी महादेवरस या महासामंताधिपतीचा उल्लेख असून, त्याला काश्मीर-मुखमंडन असे म्हटले आहे. यावरून

वरील विधान निःसंदिग्ध ठरते. कल्याणचे चालुक्य व कोल्हापूरचे शिलाहार यांच्या राजवटीत सहवासी ब्राह्मण मोठमोठ्या हुद्द्यांवर होते.

सारस्वत व सहवासी यांचे दक्षिणेतील आगमन काहीसे समकालीन वाटते. फरक इतकाच, की सारस्वत कोकणपट्टीला अधिक चिकटून राहिले व सहवासी कोकणात न थांबता कर्नाटकात उतरले. विल्हण कवी खुष्कीच्या मार्गाने काश्मिरातून गुजरातेत आला व तिथून गलवतात बसून दक्षिणेत शिरला. सहवासी ब्राह्मणही याच मार्गाने खाली आले असावे. इ. स. ११०० पूर्वी हे आगमन झाले असावे, कारण बाराव्या शतकाच्या प्रारंभापासून यांच्याबद्दलचे शिलालेख व दानपत्रे आढळून येतात.

हे प्रथम शैव होते आणि नंतर मध्वाचार्यांच्या उपदेशावरून वैष्णव बनले. मध्वाचार्यांच्या अनेक मठांपैकी राघवेंद्रस्वामींचा मठ हे यांचे धर्मपीठ आहे. [ या. का. म.; मु. पू. म. खंड २ ]

## सहस्रगीती

श्रीसंप्रदायाचा मधुरोपासना विशद करणारा एक ग्रंथ. हा शठकोपमुनीने निर्माण केला. शठकोप हा श्रीसंप्रदायाचा पहिला आचार्य होता.

सहस्रगीती हा सातव्या शतकातला ग्रंथ आहे. यात दहा शतके असून, प्रत्येक शतकात दहा दशके आहेत. या ग्रंथात जे विषय आले आहेत, त्यांची नावे अशी–भगवंताचा किंकर होणे हा परम पुरुषार्थ आहे. ईश्वर हेच परमभोग्य रूप आहे. अर्चावताराची स्तुती आणि सेवा हा कल्याणाचा हेतू आहे. भगवंताचे चरणयुगुल हे प्राण्यांना सर्व प्रकारे संरक्षक आहे. नारायण हा जीवाचा मोक्षदाता आहे. लक्ष्मीला शरण जाऊन तिच्या द्वारे भगवच्छरण व्हावे. ईश्वरप्राप्तीला सांसारिक सुख विरोधी आहे. नारायणाची भक्ती ही अहं व मम यांच्या त्यागाचा उपाय आहे. नारायणशरणता हाच नित्यानंदाचा भोग आहे. [ रा. भ. शा. ]

## सहस्रतमीदान

एक सहस्र गायींची दक्षिणा ज्या यज्ञात द्यायची असते, त्या यज्ञात सहस्र गायींपैकी विशिष्ट लक्षणाची एक गाय निवडतात. तिला सहस्रतमी (हजारावी) अशी संज्ञा देतात. मग तिचे एका विशिष्ट विधीने दान करतात. एक वर्षाची गाय सोमदेवात्मक, चार वर्षांची इंद्रदेवतात्मक व म्हातारी यमदेवतात्मक समजतात. या गायींच्या दानाच्या योगाने सहस्रगोदानात्मक सोमयागातील सर्व दोष नाहीसे होऊन, तो यथासांग होतो. [ म. ज्ञा. को. – वेदविद्या ]

## सहस्रभोजन

एक काम्य व्रत. यात एका दिवशी किंवा विशिष्ट दिवसांच्या मुदतीत सहस्र ब्राह्मणांना भोजन घालायचे असते. हे सहस्रभोजन स्वतःच्या घरी किंवा देवालयात घालावे. त्या वेळी केशव, नारायण, इ. विष्णूच्या चोवीस नावांनी घृतासह शिजविलेल्या अन्नाचा होम करावा. इतरही दाने द्यावीत. फल – स्वर्गलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

## सहस्रार चक्र

योगविद्येतील ज्ञानचक्रांमधले सातवे चक्र. मूर्धा म्हणजे मस्तक हे त्याचे स्थान होय. मेंदूच्या अगदी वरच्या भागात टाळूजवळ हे चक्र असते. परमात्मा ही याची देवता, आकाश हे तत्त्व आणि मूलाकृती ही शक्ती होय. षट्चक्रांचा भेद करून कुंडलिनी सहस्रारचक्रात शिरते व तिथे स्थिर होते. मग साधक मुक्त होतो. सहस्रार चक्रात शिवशक्तींचे सामरस्य होते, जीवशिवांचे ऐक्य होते.

या चक्राला सहस्रदलपद्म असेही म्हणतात, कारण ते कमलाकार असून, त्याला एक सहस्र दले आहेत.

तंत्रग्रंथांत या चक्राचे वर्णन केलेले आहे, ते असे – सहस्रार हे महापद्म आहे. ते शिरःकपाटस्थित असून, शुभ्रवर्ण व अधोमुख



सहस्रार चक्र

आहे. ते शंखिनी नाडीच्या वर शिखरात, शून्यदेशात प्रकाशते. याला सहस्र दले आहेत. पूर्णचंद्राप्रमाणे हे अतिशुभ्र आहे. त्यात शून्याकाश व दिव्य तोरण आहे. चंद्रमंडलमध्यात हंस-

...क जीव शुद्धस्फटिकवर्ण असा, विराजमान झालेला आहे. ...यांत सहस्रार चक्राला शिवाचे स्थान मानले आहे. ...आ मध्यबिंदूतून निरंतर अमृतस्राव होत असतो. पण ...पणे षट्चक्रांची कमले सुप्त असल्यामुळे ती त्या अमृताचा ...ार करू शकत नाहीत. त्यामुळे ते अमृत कालाग्निकुंडात ...व त्याच्या प्रभावानेच जरा–विकार उत्पन्न होतात. पण ...नी शक्ती जागृत होऊन षट्चक्रांतून वर गेली, की ती ...ही जागृत होतात व अमृताचा स्वीकार करून पुष्टिलाभ ...करतात.

...धार चक्रापासून स्वाधिष्ठान चक्रापर्यंतच्या भागाला ...कोश, स्वाधिष्ठान ते मणिपूरपर्यंत प्राणमय कोश, मणि-...ते अनाहतपर्यंत मनोमय, अनाहत ते विशुद्धपर्यंत विज्ञानमय ... विशुद्ध ते आज्ञा चक्रापर्यंत आनंदमय कोश म्हणतात. ...च्या वरचा भाग कोशातीत असून, त्याला विशुद्ध सत्त्वमय ...ला मानतात. [ श्रीगुरुदत्तयोग; पूजातत्त्व; स. पाँ. ]

...द्री पुराणांत उल्लेखिलेल्या सात कुलपर्वतांतील एक पर्वत. भारतातील पर्वतांमध्ये हिमालयानंतर सह्य ...सर्वांत मोठा पर्वत आहे. याची मुख्य रांग तापीतीरापासून ...कुमारीपर्यंत पसरलेली आहे. मात्र तापीपासून सुमारे ... मैल लांबीची पर्वतराजी सलग असून, त्यानंतर सुमारे १६ ...रुंदीचे खिंडार लागते, त्याला पालघाट म्हणतात. त्यानंतर ...कुमारीपर्यंत पसरलेल्या २०० मैल लांबीच्या पर्वतश्रेणीला ...णांत मलय पर्वत म्हटले आहे.

सह्याद्रीची उंची ४००० फुटांपेक्षा अधिक नाही. महाराष्ट्रात ...ची सरासरी उंची ३००० फूटच आहे. मात्र या पर्वतराजीत ...क उंच शिखरे आहेत. कळसूबाई हे महाराष्ट्रातले अत्युच्च ...खर ५४२७ फूट उंच आहे. महेंद्र पर्वत हे सह्याद्रीचे दक्षिणे-...ील अखेरचे शिखरही ५४०० फूट उंच आहे. कर्नाटकात ...काही शिखरे ६ ते ८ हजार फूट उंच आहेत. नीलगिरी-...तील दोड्डाबेट्टा हे शिखर ८१२५ फूट उंच आहे.

सह्य पर्वतराजी आणि पश्चिम समुद्र यांच्यामध्ये जी कोकण-...ी पसरलेली आहे, तिची रुंदी २० ते ६० मैल आहे. त्या ...गातून पूर्वेकडील पठारावर जाण्यासाठी योग्य अशी बरीच ...खिंडी या पर्वतराजीत आहेत. त्यांना घाट म्हणतात. कोंडाई-...री घाट, वाभुळणा घाट, थळ (कसारा) घाट, बोरघाट ...(...री घाट), कुंभार्ली घाट, नाणेघाट, भोरघाट, आंबेघाट, ...घाट, आंबोली घाट, पालघाट, सुब्रह्मण्यघाट, चारमाडी ..., शिराडी घाट व अंगुबे घाट हे त्यांतले प्रमुख घाट होत. ...हे घाट चढून वर गेल्यानंतर जो सपाट प्रदेश लागतो, त्याला घाटमाथा म्हणतात. त्याची लांबी सुमारे २०० मैल व रुंदी ५० मैल आहे. त्याची पश्चिम सीमा नाणेघाट, भीमाशंकर, रायगड, प्रतापगड व विशाळगड यांवरून भूधर गडापर्यंत गेलेली आहे. पूर्वसीमा जुन्नर, पुणे, सातारा व कोल्हापूर या शहरा-जवळून गेली आहे.

सह्याद्रीचे पूर्वेकडील फाटे महाराष्ट्राच्या पूर्व सीमेपर्यंत पसर-लेले आहेत. सातपुडा, सातमाळ, बालाघाट व महादेव या सह्याद्रीच्या महाराष्ट्रातील मुख्य शाखा होत. श्री. स. आ. जोगळेकरांच्या मते सातपुडा हा सह्यपर्वताचाच एक भाग आहे. पालघाटाच्या उत्तरेस असलेल्या सह्याद्रीच्या फाटयाला माल-नाड व दक्षिणेकडील फाटयाला अनैमलै अशी नावे आहेत. कोचीन व त्रावणकोर या भागांतल्या डोंगरांना वेलदोडयाचे पर्वत म्हणतात.

भूगर्भशास्त्राच्या दृष्टीने सह्याद्रीचे दोन भाग होतात. त्याचा मालवणपर्यंतचा प्रदेश कृष्णप्रस्तरांचा व दक्षिणेकडील स्फटिक प्रस्तरांचा आहे. ज्वालामुखीतून उफाळलेल्या तप्तरसापासून बनलेल्या खडकांना कृष्णप्रस्तर म्हणतात. ज्वालामुखीचे अनेक उद्रेक भिन्न भिन्न कालखंडांत होऊन, अशा खडकांचे थर एका-वर एक निर्माण होतात. महाराष्ट्राचा बहुतेक प्रदेश अशा खड-कांचा बनलेला आहे. सह्याद्रीप्रमाणेच सातपुडयाची रचना कृष्णप्रस्तरांपासून झालेली आहे.

हिमालय पर्वत विस्ताराने व उंचीने सह्याद्रीपेक्षा मोठा असला तरी, त्याचे वयोमान सह्याद्रीच्या मानाने कमी आहे. सह्याद्रीची घडण अत्यंत प्राचीन काळी झाली आहे. तो भरत खंडाचा मूलाधारच होय. हिमालयावर देवभूमी आहे व त्याची शिखरे दुर्लंघ्य आहेत. सह्याद्रीची शिखरे मात्र दुर्गम नाहीत. सह्याद्रीवरही अनेक देवस्थाने आहेत. ती त्याच्या पायथ्याशी नसून शिखरावर आहेत. ती बहुतेक शंकराची मंदिरे आहेत. सह्याद्रीच्या परिसरात विविध स्थानिक नावांनी ओळखली जाणारी शंकराची क्षेत्रे आहेत. त्यांतली काही शिवलिंगे परशु-राम व रामचंद्र यांनी स्थापन केलेली आहेत, असे म्हणतात.

ज्योतिर्लिंगे हे सह्याद्रीचे वैशिष्टय आहे. बारा ज्योतिर्लिंगां-पैकी आठ सह्याद्रीच्या शिखरांवर किंवा परिसरात आहेत. हा पर्वत व दक्षिण-पठार ज्वालामुखीच्या उद्रेकांमुळे निर्माण झाले, त्याचे हे द्योतकच होय. भूगर्भातील घडामोडींचे प्रतिध्वनी आणि अग्नीच्या ज्वाळा सह्याद्रीतील ज्योतिर्लिंगातून वेळोवेळी प्रकट होत असल्याच्या आख्यायिका त्या स्थानांच्या माहात्म्यांत सांगितलेल्या आहेत.

बौद्ध पंथाची बहुसंख्य प्राचीन व भव्य लेणी सह्याद्रीच्या कडयांत खोदलेली आहेत, कारण त्याचा गाभा निर्मळ, एकसंध

व कणखर आहे. भारतातील सर्व लेण्यांपैकी नऊ-दशांश लेणी महाराष्ट्रात, सह्याद्रीत आहेत. त्यांतली अर्धीअधिक लेणी बौद्ध पंथाची आणि बाकीची जैन व ब्राह्मणी आहेत. महाराष्ट्राच्या धार्मिक सहिष्णुतेचे हे प्रतीकच होय.

सह्याद्रीवर असंख्य डोंगरी किल्ले आहेत. त्यांतले बहुतेक महाराष्ट्रात आहेत. घाटमाथा, त्याच्या लगतचा पठारी प्रदेश व कोकणातील डोंगरफाटे एवढ्या भागात सुमारे साडेतीनशे किल्ले आहेत. सह्याद्रीच्या इतर रांगांवरही किल्ले आहेत आणि त्यांतले काही महत्त्वाचेही आहेत.

सह्यपर्वतराजीतून उगम पावणाऱ्या नद्यांची संख्याही बरीच मोठी आहे. त्यांतील प्रमुख नद्यांची नावे अशी – वैनगंगा, तापी, गोदावरी, मांजरा, भीमा, प्रवरा, मुळा, नीरा, कृष्णा, वेणा, कोयना, तुंगभद्रा, पन्नार, कावेरी, वरदा, घटप्रभा, मलप्रभा, काळी, गंगावती, ताद्री, शरावती, पेरियर, पंपा, वैगाई, ताम्रपर्णी, पंबियर, नेत्रवती, उल्हास, वैतरणा, दमणगंगा, वासिष्ठी, सावित्री, वेदवती, इत्यादी.

या सर्व नद्यांचा जनक सह्य पर्वत हा दक्षिणापथातील लोकांचा जीवनाधारच आहे. द. भारताचे हवामान, पाऊसमान व पीकपाणी सह्याद्रीवर अवलंबून आहे. सह्याद्रीच्या उंच डोंगरांमुळे मोसमी ढग अडवले जाऊन कोकणात व घाटमाथ्यावर विपुल वृष्टी होते. ती देशावर पूर्वेकडे कमी कमी होत जाते. पूर्वी सह्याद्रीवर घनदाट अरण्ये पुष्कळ होती. पण बेसुमार झाडतोडीमुळे ती आता कमी झाली आहेत. त्यांत असंख्य औषधी वनस्पती सापडतात आणि सर्व प्रकारचे लाकूडही मिळते. [ सह्याद्रि; जॉ. पु ; सु. वि. को.; इं. इं. ४ ]

## सांकाश्य

प्राचीन बौद्ध तीर्थक्षेत्र. उत्तर प्रदेशात कनौजच्या वायव्येला ४५ मैलांवर काली (इसुमती) नदीच्या तीरावर वसंतपुराजवळ संकिसा नावाचे गाव आहे, तेच हे स्थान होय. भगवान बुद्ध त्रयस्त्रिंश नामक स्वर्गातून पृथ्वीवर या स्थानी अवतरले, अशी आख्यायिका आहे. तिथे अनेक बौद्ध विहार, चैत्य व स्तूप निर्माण केले गेले होते. पण सांप्रत त्यांचे भग्नावशेषच तिथे पाहायला मिळतात. फाहियान व युआन च्वांग या दोघांनी हे स्थान पाहून त्याचे वर्णन लिहून ठेवलेले आहे. तिथे अशोकाने एक स्तंभ उभारला होता. त्याचा गजमुखी शिरोभाग मात्र तिथे उरला आहे. तिथे विसहरी देवीचे मंदिर आहे.

रामायणात या नगरीचा उल्लेख आहे. जनक राजाचा भाऊ कुशध्वज हा तिथे राज्य करीत होता.

जैन लोकही या स्थानाला तीर्थक्षेत्र मानतात. कारण तेरावा तीर्थंकर विमलनाथ याला इथे केवलज्ञान प्राप्त झाले, असे मानतात. हे जैनांचे अतिशय क्षेत्र आहे. [ कल्याण–तीर्थांक; प्ले. बु. इं.; उ. प्र. बौ. वि.; वा. रा. को.]

## सांकेतिक भाषा

वर्णांचा व्यत्यास करून, दोन अक्षरांच्या किंवा शब्दांच्या मध्ये काही विशिष्ट वर्ण घुसडून आणि हातांची बोटे विशिष्ट प्रकारे हालवून, डोळ्यांची उघडझाप करून किंवा मुद्राभिनयाद्वारे आपल्या मनातला आशय दुसऱ्याला कळवणे यासाठी काही संकेतकारी खुणा किंवा वस्तू यांचा वापर करणे, म्हणजे सांकेतिक भाषा होय.

सांकेतिक भाषेचा उगम वेदांमध्ये सापडतो. वेदांतर्गत दिव्यवाणी हा सांकेतिक भाषेचाच एक आविष्कार आहे.

सांकेतिक भाषेची दोन रूपे प्रचलित आहेत. (१) जे बोललेले कानांनी ऐकता येते ते व (२) लिपीद्वारा जे लिहिले जाते, ते.

लिपीयुक्त अक्षर हे विचाररूप मानसिक क्रियेचे बोधचिन्ह आहे. त्या चिन्हावरून मानसिक विचाराचे यथार्थ दर्शन होते. स्वयंभू भाषा व सांकेतिक भाषा यांचे संबंध जितके घनिष्ठ असतील, जितक्या या दोन्ही भाषा एकमेकांशी तादात्म्य पावतील, तितकी भाषेची व्यापकताही वाढत जाते. हाच नियम बोधचिन्हालाही तंतोतंत लागू पडतो. स्वयंभू भाषेचे अक्षररूप बोधचिन्ह हे प्रणवयुक्त आहे. ते म्हणजे ॐ. या ॐकाराचा नागरी लिपीशी अतिनिकट संबंध आहे व या नागरी लिपीचा संस्कृतादी वेदभाषांशी घनिष्ठ संबंध आहे.

सांकेतिक भाषेचे मुख्य माध्यम म्हणजे हावभाव व अंगविक्षेप होय. बोलण्याने आपण जे जे काही व्यक्त करू शकतो ते ते सर्व हावभावाने व अंगविक्षेपाने व्यक्तविता येते.

बोलीभाषेप्रमाणेच सांकेतिक भाषांचेही परिवार असतात. आणि त्यांच्यावरही राष्ट्रीय, सांस्कृतिक, भौगोलिक वगैरे प्रभाव स्पष्टपणे पडत असतात. अर्थातच त्यांच्यांतही बोलीभाषेप्रमाणे परिवर्तन व विकास यांचा अखंड क्रम चालू असतो. चित्रे, मूर्ती वगैरेंच्या साहाय्याने सांकेतिक भाषांचा विकासक्रम आणि बदल यांचा अभ्यास करता येतो. सांकेतिक भाषा स्वतःपुरती तर परिपूर्ण आहेच; परंतु तिच्यावाचून बोली-भाषेचे कार्यसुद्धा अपूर्ण राहत असल्यामुळे तिचे अधिकच महत्त्व आहे.

सांकेतिक भाषेची निर्मिती भिन्न भिन्न प्रकारच्या भावनात्मक घडामोडींमुळे होत असते. खुणा या कित्येकदा मर्यादा दर्शविण्यासाठी केल्या जातात आणि समूहात वावरताना त्या बहुधा रहस्यमय बनतात. खुणांचे दोन प्रकार आहेत. (१) ऐच्छिक व (२) अनैच्छिक. राग, दुःख, तिरस्कार, आनंद आदींमुळे चेहऱ्यावर होणारे बदल हा अनैच्छिक प्रकार होय.

ऐच्छिक खुणा काही ना काही उद्देशाने केल्या जातात. त्यांचेही सामान्य, असामान्य व विशिष्ट असे तीन प्रकार आहेत. सर्वसाधारण लोकांशी सामान्य व्यवहार करताना उपयोगात आणल्या जाणाऱ्या सामान्य खुणांचा एक प्रकार. ह्या खुणा सर्वांना माहीत असतात व त्यांचा उपयोग सर्वत्र व्यापक प्रमाणावर होत असतो. दुसरा प्रकार म्हणजे असाधारण (असामान्य नव्हे) व्यक्तित्व असलेल्या लोकांतच ज्यांचा प्रामुख्याने व्यवहार केला जातो व त्यामुळेच ज्यांचे स्वरूप काहीसे विस्कळीत असते, अशा खुणा त्या असामान्य खुणा होत. या खुणांची भाषा सर्वांना समजत नाही म्हणून तिचा उपयोगही फारसा करता येत नाही. दारुडे, वेडे आणि लहान मुले ह्यांची खुणांची भाषा ही विशेष प्रकारचे जीवन व्यतीत करणाऱ्या, विशिष्ट व्यवसाय करणाऱ्या लोकांतच प्रचलित असते. त्या त्या क्षेत्रात वावरणाऱ्या लोकांना ही भाषा चटकन कळते. विक्रेते, दलाल, वेश्या, गुंड व गुन्हेगार लोक, सैनिक, गुप्तचर ह्यांच्या आपापल्या अशा प्रकारच्या स्वतंत्र भाषा असतात.

खुणांचे माध्यम विभिन्न इंद्रिये व मुद्रा हे होय. त्यावरून इंद्रियगत व मुद्रागत असे खुणांचे दोन प्रकार होतात. इंद्रियगत खुणा ह्या संयुक्त किंवा स्वतंत्र दोन्ही प्रकारच्या असू शकतात. 'जेवणाचा उल्लेख करण्यासाठी हात तोंडाकडे नेणे', 'गप्प राहा' असे सांगण्याकरिता ओठांवर एक बोट उभे करणे, 'चालणे' दर्शविण्यासाठी पायाला हात लावणे, ही संयुक्त इंद्रियगत खुणांची उदाहरणे आहेत.

मुद्रागत खुणांची भाषा ही बोलीभाषेला पूरक आहे. ती अत्यंत सूक्ष्मग्राही व कठीण असल्याने विचार व भावना प्रकट करण्याचे फार मोठे सामर्थ्य तिच्यामध्ये सामावलेले आहे. ह्याचे मुख्य कारण असे, की भावनांचा आवेग व मनोदशा दर्शविण्याचे ह्यासारखे दुसरे सुलभ साधन नाही.

मुद्रागत खुणा ह्या ऐच्छिक तशाच आरोपितही असू शकतात. त्यांचा अभ्यास करण्यासाठी मनोविज्ञानाचे ज्ञान असणे आवश्यक आहे. ते नसेल तर त्यांची संगती लावणे पुष्कळ वेळा जड जाते. त्यांची निर्मिती डोळे, जीभ, भुवया, ओठ, गाल आणि नाक यांच्या द्वारे होत असते. ह्या खुणा विशिष्ट उद्देशाने निरनिराळ्या रंगांबद्दल इशारा करण्यासाठीही उपयोगात आणता येतात. पत्ते खेळणारे लोक जिभेने लाल व केसांनी काळ्या रंगासंबंधी खुणा करतात, हे सर्वांना माहीत आहे.

हात हे खुणांच्या भाषेचे मुख्य माध्यम आहे. हाताची बोटे व तळहात ह्यांच्या साहाय्याने आपण चित्रनिर्देश, संख्यानिर्देश व क्रियानिर्देश सर्व काही करू शकतो. संख्यानिर्देश तर इतर कोणत्याच माध्यमाद्वारे करता येणार नाही. बोटांचा लवचिकपणा विभिन्न चित्रांच्या आणि भावनांच्या प्रकटीकरणासाठी फारच उपयोगी ठरतो. व्याख्यान देताना वक्ता, अभिनय करताना नट आणि निरनिराळ्या परिस्थितीत एकमेकांना आवश्यक त्या सूचना देण्यासाठी गुंड व गुन्हेगार लोक हाताच्या बोटांनीच पुष्कळशा खुणा करीत असतात. हस्तसंकेतात दोन्ही हातांचे हावभाव अत्यंत महत्त्वाचे आहेत.

सांकेतिक भाषेने बोलीभाषेच्या विकासाला फार मोठा हातभार लावला आहे, असे नीट विचार केला असता दिसून येते. जगातील सर्व बोलीभाषांमध्ये प्रचलित असलेले कित्येक वाक्प्रचार, अंगविक्षेप आणि हावभावादी खुणा ह्यांचेच शाब्दिक अनुवाद आहेत. शरीराच्या प्रत्येक अवयवांशी संबंधित असे अनेक वाक्प्रचार प्रचलित आहेत. डोळे वटारणे, डोळा मारणे, कानांवर हात ठेवणे, जीभ बाहेर काढणे, जीभ सैल सोडणे, नाक मुरडणे, नाकाने वांगी सोलणे, दात दाखवणे, अंगठा दाखवणे, गुडघा टेकणे, बोटे घालणे, हात टेकणे, पाठ दाखवणे, छाती पुढे काढणे, गळा काढणे, पोटावर मारणे, इत्यादी. असे अनेक वाक्प्रचार आहेत, की ज्यांचा तुलनात्मक व विश्लेषणात्मक अभ्यास केला असता सांकेतिक भाषेचा विकासक्रम समजावून घेणे कठीण जाणार नाही. [श्री. सूर्यदेव शास्त्री, नवनीत मराठी–मे, १९६२; दे. लि. स्व. वि. स.]

## सांख्य दर्शन

भारतीय षड्दर्शनांपैकी एक दर्शन. अथर्ववेदाच्या काळातच सांख्य दर्शन प्रादुर्भूत झाले. तिथल्या ब्रह्मसूक्तात म्हटले आहे, की त्रिगुणांनी आवृत अशा नवद्वार पुंडरीकात जे मूर्तिमंत यक्षरूप ब्रह्म आहे, त्याला ब्रह्मवेत्त्यांनी जाणले (१० ८.४३). हे नवद्वार पुंडरीक म्हणजे त्रिगुणांनी आवृत मानवशरीरच होय. कठ, श्वेताश्वतर, प्रश्न व मैत्रायणी या प्राचीन उपनिषदांवर सांख्य दर्शनाचा खोल ठसा आहे. उपनिषत्कालानंतर भारतीयांच्या विचारसरणीत सांख्य दर्शनाने अढळपद मिळवले. सांख्य व वेदान्त यांचा संगम करून वैदिक भारतीयांनी दार्शनिक विचारसरणी निर्माण केली. महाभारत, गीता, पुराणे व मनुसंहिता यांतील तत्त्वज्ञान सांख्य-वेदान्तांच्या समन्वयानेच बनले आहे. बुद्ध व जिन यांचे विचारही सांख्य दर्शनाच्या वातावरणात वाढले. सांख्य विचारपद्धती सनपूर्व ८०० च्या सुमारास अस्तित्वात आली असावी. शुद्ध बुद्धिप्रामाण्यावर आधारलेले हे दर्शन आहे.

प्रा. स. रा. गाडगीळ यांनी सांख्य दर्शनाबद्दल पुढील विचार मांडले आहेत– सांख्य दर्शन हा विश्वविकासाची भौतिक दृष्टिकोनातून मीमांसा करण्याचा पहिलाच भव्य आणि तर्कनिष्ठ असा प्रयत्न आहे. तत्पूर्वी शेकडो वर्षे लोकजीवनामध्ये प्रचलित

असलेल्या स्थूल आणि ग्राम्य इहलोकवादाला शास्त्रीय चिंतनाची बैठक देऊन सांख्यांनी एक सुसंगत आणि युक्तिसिद्ध असे जीवनदर्शन निर्माण केले. स्त्रीला निर्मितिकेंद्र कल्पून तांत्रिकांनी आपली विश्वनिर्मितिविषयक उपपत्ती मांडली होती. यातूनच सांख्यांचा प्रकृतिपुरुषविचार उद्भवला. अर्थात सांख्य म्हणजे तंत्रसाधना नव्हे. तांत्रिकांच्या वामाचारादी मंत्रतंत्रात्मक कर्मकांडातून बाहेर पडून सांख्यांनी प्रकृति-पुरुष विचाराला तत्त्वचिंतनाच्या पातळीवर आणून सोडले. प्राचीन परंपरेप्रमाणे सांख्याला प्रारंभी तंत्र या नावानेच संबोधीत असावे. शंकराचार्यांनी सांख्यांचा 'कपिलस्य तन्त्रं' असाच उल्लेख केला आहे. स्वतः सांख्यकारिकाकर्त्यानेही आपल्या तत्त्वज्ञानाचा उल्लेख तंत्र याच शब्दाने केला आहे. तेव्हा सांख्य आणि तंत्र यांचा संबंध त्या काळात सर्वमान्य असावा. सांख्यांनी तांत्रिकांचा प्रकृति-पुरुष विचार घेऊन त्यातून आपला सुप्रसिद्ध अचेतनप्रधान कारणवादाचा सिद्धान्त मांडला. अर्थात त्यांचा हा सिद्धान्त उत्तर काळात मूळ शुद्ध स्वरूपात टिकला नाही. त्यांच्या तर्कशुद्ध विचारांना विज्ञानाची जोड मिळण्यापूर्वीच त्याचे वेदान्तात विलिनीकरण झाले. मूळ सांख्य तत्त्वज्ञानाचे स्वरूप पूर्णपणे जडवादी व वेदविरोधी होते.

कपिल हा सांख्य दर्शनाचा प्रवर्तक आहे. सांख्य या नावाची व्याख्या अनेक प्रकारे केलेली आहे. या दर्शनाने पहिल्याप्रथम तत्त्वांची गणना केली. गणनेला संख्या असेही नाव आहे. संख्येला प्राधान्य दिल्यामुळे या दर्शनाला सांख्य असे नाव मिळाले. सांख्य शब्दाची दुसरीही एक व्याख्या केलेली आहे. संख्या म्हणजे विवेकज्ञान. प्रकृती व पुरुष यांच्या बाबतीत अज्ञान असल्यामुळे माणूस जन्म-मरणाच्या फेऱ्यात सापडतो. पण जेव्हा माणसाला पुरुष (जीव) हा प्रकृतीपासून भिन्न व स्वतंत्र आहे, असे ज्ञान होते, तेव्हा त्याला मोक्षाची प्राप्ती होते. या विवेकज्ञानाला प्राधान्य असल्यामुळे या दर्शनाला सांख्य हे नाव पडले. प्रकृती व पुरुष ही दोन मूलभूत तत्त्वे या दर्शनात मानल्यामुळे हे द्वैतवादी दर्शन आहे. प्राचीन कालातील विचारविश्वावर या दर्शनाचा खूपच प्रभाव पडला होता. म्हणून याचा प्रवर्तक महर्षी कपिल याला प्रथम दार्शनिक (आदिविद्वान) असे गौरवाने संबोधले गेले आहे.

**आचार्यपरंपरा** – या दर्शनाचे काही प्रसिद्ध आचार्य पुढीलप्रमाणे आहेत –

**कपिल** – हा सांख्य दर्शनाचा प्रवर्तक होय. उपनिषदात उल्लेखिलेल्या सांख्य सिद्धान्तांचे यानेच पहिल्या प्रथम शास्त्रीय विवेचन केले व सांख्याला दर्शनाची प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. म्हणूनच याला आदिविद्वान असे म्हणतात. तत्त्वसमास व सांख्यसूत्र हे दोन ग्रंथ याने रचले आहेत. (कपिल पाहा)

**आसुरी** – हा कपिलाचा साक्षात शिष्य होता. प्राचीन ग्रंथांत याच्या सिद्धान्तांचे वर्णन आढळते.

**पंचशिख** – हा आसुरीचा शिष्य असून, षष्टितंत्र हा ग्रंथ याने रचला आहे. (पंचशिख पाहा)

**ईश्वरकृष्ण** – याने रचलेला सांख्यकारिक हा ग्रंथ लोकप्रिय व प्रामाणिक आहे. या ग्रंथावर अनेक टीका निर्माण झाल्या आहेत. (ईश्वरकृष्ण पाहा)

**विंध्यवास** – याचे नाव रुद्रिल असे होते. पण विंध्य पर्वताच्या जंगलात राहिल्यामुळे याला विंध्यवास या नावाने ओळखू लागले. याचा ग्रंथ उपलब्ध नाही. पण दार्शनिक ग्रंथांत याच्या सिद्धान्तांचा उल्लेख आढळतो. (विंध्यवास पाहा)

**विज्ञानभिक्षू** (इ. स. चे १६ वे शतक) – सांख्य दर्शनाचा हा शेवटचा आचार्य होय. हा काशीत राहत होता. भिक्षू हे नाव धारण केलेले असले, तरी तो बौद्ध नव्हता. हा स्वतंत्र विचारांचा आचार्य होता. याने सांख्यसूत्रांवर सांख्यप्रवचनभाष्य हा ग्रंथ लिहिला. याशिवाय त्याने योगवार्तिक, विज्ञानामृतभाष्य, सांख्यसार व योगसार हे ग्रंथ रचले आहेत. याच्या काळापर्यंत सांख्यतंत्राचे अध्ययन–अध्यापन अगदी कमी प्रमाणावर होऊ लागले होते. तेव्हा याने फार खटपट करून सांख्य व योग यांना पुन्हा प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. भावागणेश हा याचा शिष्य होता. (विज्ञानभिक्षू पाहा)

**तत्त्वमीमांसा** – सांख्य दर्शनात तत्त्वांची मीमांसा फार चांगल्या रीतीने केलेली आहे. सांख्यांनी पंचवीस तत्त्वे मानलेली आहेत. त्यांचे यथार्थ ज्ञान झाले असता कोणाही व्यक्तीला दुःखापासून मुक्ती मिळते. या पंचवीस तत्त्वांचे पुढील चार प्रकारांत वर्गीकरण केलेले आहे –

(१) एक तत्त्व असे आहे, की जे सर्वांचे कारण आहे; पण कार्य मात्र कोणाचेच नाही. याला प्रकृती असे नाव आहे.

(२) काही तत्त्वे स्वतः कार्य असतात. पण ती दुसऱ्या कोणाला उत्पन्न करीत नाहीत. त्यांना विकृती असे म्हणतात.

(३) काही तत्त्वे कार्य व कारण अशा दोन्ही रूपांत असतात. त्यांना प्रकृति–विकृती असे नाव आहे. व

(४) काही तत्त्वे कार्य व कारण या उभयविध संबंधाने रहित असतात. म्हणजे ती कार्यही नसतात किंवा कारणही नसतात. त्यांना 'न प्रकृति–न विकृती' असे नाव आहे.

प्रधान, अव्यक्त किंवा प्रकृती हे तत्त्व प्रकृती या वर्गात येते. पंच ज्ञानेंद्रिये, पंच कर्मेंद्रिये, पंच महाभूते व मन अशी सोळा तत्त्वे विकृती या सदरात मोडतात.

महत्तत्त्व, अहंकार व शब्दतन्मात्र, स्पर्शतन्मात्र, रूपतन्मात्र, रसतन्मात्र गन्धतन्मात्र ही पाच तन्मात्रे प्रकृति–विकृती या

वर्गात येतात. पुरुष या तत्त्वाचा समावेश न प्रकृति–न विकृती या वर्गात होतो.

सांख्य हे सत्कार्यवाद मानणारे आहेत. त्यांच्या मते कार्य हे उत्पत्तीपूर्वी कारणात अव्यक्त रूपाने अवश्य विद्यमान असते. (सत्कार्यवाद पाहा)

सांख्य दर्शन हे द्वैत मताचे प्रतिपादक आहे. त्यात प्रकृती व पुरुष ही दोन मूलतत्त्वे मानलेली असून, त्यांच्या परस्पर संयोगाने या सृष्टीचा आविर्भाव होतो, असे त्यांचे म्हणणे आहे. तसेच प्रकृती ही जड व एक आहे, तर पुरुष चेतन व अनेक आहेत, असे ते मानतात.

या जगातील मन, शरीर, इंद्रिय, बुद्धी, इ. सर्व पदार्थ सीमित व परतंत्र असल्यामुळे कार्यरूप आहेत. त्यांची उत्पत्ती कोणत्या-तरी मूलतत्त्वापासूनच झालेली आहे. या मूलतत्त्वाचे अन्वेषण व तात्त्विक विवेचन करणे हे प्रत्येक दर्शनाचे आवश्यक कार्य आहे. सांख्य दर्शनात स्थूल व सूक्ष्म अशा सर्व कार्यांची म्हणजे जगताची उत्पादक प्रकृती मानलेली आहे.

या प्रकृतीच्या सिद्धीसाठी अनेक युक्त्या दाखवलेल्या आहेत, त्या अशा –

(१) जगतातील सर्व पदार्थ सीमित व परतंत्र आहेत; त्यामुळे त्यांचे मूलकारण अपरिमित व स्वतंत्र असले पाहिजे.

(२) जगातील सर्व पदार्थांत सत्त्व, रज व तम हे तीन गुण दृष्टीला पडतात. प्रत्येक पदार्थ सुख, दुःख व मोह उत्पन्न करणारा आहे. त्यामुळे ही वैशिष्ट्ये असलेले एक मूल कारण असले पाहिजे.

(३) प्रत्येक कार्य हे कारणात अव्यक्त रूपाने राहत असते. हे जग म्हणजे कार्यांचा एक समूह आहे. तेव्हा तो कोणत्या ना कोणत्या कारण जगात अव्यक्त रूपाने राहतो. हे मूल कारण म्हणजे अव्यक्त किंवा प्रकृती होय.

(४) कार्य हे कोणत्या तरी कारणातून उत्पन्न होते व शेवटी त्याच कारणात लीन होते, असे सर्वत्र दिसते. हेच कारण कोणत्या तरी सूक्ष्म कारणातून उत्पन्न होते. ते पुन्हा सूक्ष्मतर कारणातून निर्माण होते. असे करता करता शेवटी जे सूक्ष्मतम तत्त्व राहते, ती प्रकृती होय आणि तीच सर्वांचे कारण आहे. तिच्या पासूनच हे विश्व उत्पन्न होते. प्रलयाच्या वेळी याच्या उलट क्रिया होते. म्हणजे स्थूल कार्य आपल्या कारणात लीन होते. ते कारणही आपल्या सूक्ष्मतर कारणात लय पावते. अशा प्रकारे, ही परंपरा जिथे संपते, तेच सूक्ष्मतम अव्यक्त तत्त्व होय. अशा तऱ्हेने विश्वाच्या आविर्भावाचे व तिरोभावाचे कारण जे अंतिम तत्त्व मानावे लागते, तीच प्रकृती होय.

प्रकृतीचे रूप – सत्त्व, रज व तम हे तीन गुण प्रकृतीच्या ठिकाणी राहतात. त्यामुळे जगातील पदार्थांतही हे गुण राहतात. एकच वस्तू कोणाला आनंद तर कोणाला दुःख देते आणि कोणाला मोहात पाडते. प्रकृती हे मूलतत्त्व असून, ते नित्य, व्यापक, एक, अवयवरहित व कोणावरही आश्रित नसणारे आहे. प्रकृती स्वतंत्र आहे. ती आपल्यातून सर्व विश्व निर्माण करते व प्रलयाच्या वेळी पुन्हा आपल्यातच त्याचा लय करते. ती जडरूप आहे. अव्यक्तरूप असल्यामुळे तिला अव्यक्त, प्रधान कारण असल्यामुळे प्रधान व सर्वांची जननी असल्यामुळे प्रकृती अशी निरनिराळी नावे आहेत. प्रकृती स्वतः अज आहे, ती कारण असली तरी स्वतः कोणाचे कार्य नाही.

गुण – प्रकृती ज्या तीन द्रव्यांची स्वतः बनलेली आहे, त्यांना गुण असे सामान्य नाम आहे. सत्त्व, रज व तम ही त्यांची नावे आहेत. गुण म्हणजे दोरी होय. सत्त्वादी गुण पुरुषाला बंधन-कारक होतात. अशा रीतीने दोरीप्रमाणे यांचे कार्य होते, म्हणून यांना गुण असे म्हटले आहे.

जगातील प्रत्येक पदार्थात हे तीन गुण दृष्टिगोचर होतात. झाडावरून पडलेला आंबा मिळावा, म्हणून दोन मुले धावत असतात. आंबा ज्याला मिळतो, त्याला सुख होते; ज्याला मिळत नाही, त्याला दुःख होते व ही गोष्ट तटस्थपणे पाहणारा तिसरा त्या बाबतीत उदासीन असतो. एका आंब्याने तिघांच्या तीन प्रतिक्रिया घडवल्या. तसेच सुंदर युवती आपल्या पतीला सुख देते, सवतींना दुःख देते व दुसऱ्या पुरुषाला मोहात पाडते.

जे धर्म कार्यात असतात, तेच कारणातही असतात. म्हणून जगताचे मूल कारण असलेल्या प्रकृतीतही ते विद्यमान असतात. सत्त्व, रज व तम या तीन गुणांची साम्यावस्था म्हणजे प्रकृती.

सत्त्व गुण लघू, प्रकाशक व इष्ट असतो. तो ज्ञानविषयाला प्रकाशित करतो. इंद्रिये याच्याचमुळे रूपादी विषय ग्रहण करतात. याचा रंग पांढरा असतो.

रजोगुण स्वतः चंचल असतो व दुसऱ्यांनाही चंचल बनवतो. तो क्रियेचा प्रवर्तक आहे. वायूची चंचलता व गतिशीलता रजोगुणामुळेच असते. रजोगुणामुळेच इंद्रिये आपल्या विषयांच्या मागे धावत सुटतात. सत्त्व व तम ही दोन्ही निष्क्रिय असतात. त्यांना कार्य करायला हा प्रवृत्त करतो. हा दुःखात्मक असतो. याचा रंग लाल असतो.

तमोगुण हा गुरू व सत्त्वगुणाच्या विरोधी आहे. तो रजोगुणाच्या प्रवृत्तीला रोखून धरतो. तो जडता व निष्क्रियता यांचे प्रतीक असून, मोह किंवा अज्ञान निर्माण करतो. गतीला रोखून धरून हा प्रमाद, आळस, निद्रा व तंद्रा उत्पन्न करतो. याचा रंग काळा असतो.

हे तीन्ही गुण परस्पर विरोधी असले तरी सहकार्याने एकच

कार्य करतात. यासाठी दिव्याचे उदाहरण बरोबर लागू पडते. तेल, वात व ज्वाला ही परस्पर विरोधी असली, तरी त्यांच्या सहकार्याने दिवा पेटत राहतो. वात, पित्त व कफ हे तीन्ही परस्पर विरोधी आहेत; पण ते तीन्ही मिळून शरीर धारण करतात. तसेच या तीन गुणांचे आहे. ते नेहमी बरोबर राहतात. पण जो प्रबल असेल, तो इतर दोघांना दाबून आपला प्रभाव दाखवतो.

हे तीन्ही गुण सदैव परिवर्तन, परिणाम किंवा विकार उत्पन्न करीत असतात. सृष्टिकालातील व प्रलयकालातील असे हे विकार दोन प्रकारचे असतात. प्रलयकाळी एक गुण आपल्याला दुसऱ्या दोन गुणांपासून अलग करतो व आपल्याच रूपात म्हणजे सत्त्व सत्त्वरूपात, रज रजरूपात व तम तमोरूपात परिणत होते. या वेळी हे तीन्ही आपल्या सम रूपात असतात. त्यामुळे यांच्यापासून काहीच कार्य उत्पन्न होत नाही. कार्य उत्पन्न होण्यासाठी यांचे परस्पर मीलन व्हावे लागते आणि तेही विषम प्रमाणात. जेव्हा एक गुण प्रबल होऊन दुसऱ्या दोघांना दाबून टाकतो, तेव्हाच सृष्टी उत्पन्न होते. याला विरूप परिणाम असे नाव आहे. प्रलयदशेत स्वरूप परिणाम असतो. म्हणजे तीन्ही गुणांची साम्यावस्था असते.

पुरुष किंवा आत्मा – पुरुष व प्रकृती अशी दोन मूलतत्त्वे आहेत. पुरुष हा स्वयंसिद्ध आहे. 'मी आहे', 'हे माझे घर आहे' अशा दैनंदिन जीवनातील वाक्यात येणारे मी व माझे हे शब्द आत्म्याचेच परिचायक आहेत.

पुरुषाचे रूप हे प्रकृतीहून व इतर व्यक्त पदार्थांहून भिन्न आहे. पुरुष हा शरीर, इंद्रिय व मन यांपासून भिन्न व स्वतंत्र आहे. तो शुद्ध चैतन्यरूप व ज्ञाता आहे. तसेच तो निष्क्रिय व उदासीन असतो. प्रकृती जगत निर्माण करते, तेव्हा हा फक्त साक्षी असेतो. तो अविकारी, कूटस्थ, नित्य व व्यापक असतो.

पुरुष तत्त्वाच्या सिद्धीसाठी पुढील युक्त्या आहेत–

(१) जगातील सर्व पदार्थ संघातमय आहेत. विटा, दगड, चुना, सिमेंट, इ. वस्तूंचा समुदाय म्हणजे घर होय. अनेक तंतूंचा समूह म्हणजे वस्त्र होय. अशा या संघटित वस्तू नेहमी दुसऱ्या कुणाच्या तरी उपयोगासाठी असतात. म्हणून प्रकृतीपासून निर्माण झालेले हे संघातमय जगत प्रकृतीपेक्षा दुसऱ्या कुणासाठी तरी असले पाहिजे. हा दुसरा कोणीतरी म्हणजे या जगापासून विलक्षण असलेला पुरुष होय.

(२) त्रिगुणात्मक प्रकृतीपेक्षा भिन्न असल्यामुळेही एका असंघात पदार्थाची कल्पना करणे न्याययुक्त ठरते. तोच पुरुष होय.

(३) जड पदार्थांत चेतन कोणीतरी असल्याशिवाय, त्यात प्रवृत्ती दिसत नाही. रथामध्ये त्याचा नियंता असा चेतन सारथी असल्याशिवाय, तो एका स्थानापासून दुसऱ्या स्थानाकडे जाऊ शकत नाही. त्याचप्रमाणे सुखदुःखमोहात्मक अशा जगताचा कोणीतरी चेतन अधिष्ठाता असल्यामुळेच त्यात प्रवृत्ती दिसून येते.

(४) जगातील सर्व विषय हे भोग आहेत. तेव्हा त्यांचा भोक्ता कोणीतरी असलाच पाहिजे. तोच पुरुष होय.

(५) या जगात काही मानव असे असतात, की जे दुःखाने व्यथित होऊन मुक्ती मिळवण्याचा प्रयत्न करतात. यावरून असे दिसते, की कोणीतरी निश्चितपणे दुःखापासून निवृत्ती मिळवू शकतो. तोच पुरुष होय.

सांख्यांनी प्रत्येक व्यक्तीला वेगळा आत्मा मानला आहे. अशा प्रकारे त्यांनी अनेक पुरुष मानले आहेत. पुरुषाची अनेकता सिद्ध करण्यासाठी त्यांनी पुढील युक्त्या दिल्या आहेत–

(१) निरनिराळ्या व्यक्तींचे जन्म-मृत्यू, ज्ञान व कृती यांमध्ये खूप व तफावत दिसते. जर आत्मा एकच असता, तर एका पुरुषाचा जन्म झाल्यावर सर्व पुरुषांचाच जन्म झाला असता. एका पुरुषाचा मृत्यू झाल्यावर सर्वच पुरुष मरण पावले असते. एक पुरुष आंधळा व बहिरा असता, जगातील सर्वच पुरुष आंधळे व बहिरे झाले असते. पण असे कधी होत नाही. म्हणून पुरुष अनेक मानावे लागतात.

(२) व्यक्तींमध्ये एकाच वेळी एकच प्रवृत्ती दिसत नाही. एकाच वेळी कोणी पुरुष रडत असतो, तर कोणी हसत असतो. सकाळच्या वेळी कोणी विद्यार्थी अंगणात खेळत असतो, तर कोणी घरात बसून अभ्यास करीत असतो. यावरून पुरुष किंवा आत्मे अनेक असून, ते आपल्या इच्छेनुसार एकाच वेळी भिन्न भिन्न कामे करीत असतात.

(३) या जगात व्यक्तींत अनेक भेद दिसतात. सर्वच मनुष्यांचा स्वभाव सारखा नसतो. काही व्यक्ती चिंतनशील असतात, तर काही सतत काही ना काही उद्योग करीत असतात. कोणी अभ्यासू असतात, तर कोणी आळशी असतात. एकच आत्मा किंवा पुरुष असता, तर व्यक्तींत स्वभावभेद दिसला नसता. सर्व व्यक्ती एकाच प्रकारच्या झाल्या असत्या. यावरून सिद्ध होते, की पुरुष एक नसून अनेक आहेत.

डॉ. उमेश मिश्र यांनी वरील युक्तिवादाला हरकत घेतली आहे. त्यांचे म्हणणे वरील युक्त्या निर्लिप्त व त्रिगुणातीत पुरुषाच्या बाबतीत लागू पडत नाहीत. निर्लिप्त पुरुषाचा जन्ममृत्यूशी काय संबंध आहे? तो तर कधी जन्म घेत नाही व कधी मरतही नाही. त्याचा इंद्रियांशीही संबंध नसतो. त्यामुळे त्याला आंधळा किंवा बहिरा म्हणता येत नाही. तो तर नित्य, सर्वव्यापक व त्रिगुणातीत आहे. म्हणून या युक्त्या बद्ध पुरुषाच्या बाबतीत सांगितलेल्या आहेत. बद्धावस्थेत तेवढे पुरुष अनेक असतात.

डॉ. मिश्रांच्या मतें सांख्यांनी निर्लिप्त, बद्ध व मुक्त अशा तीन पुरुषांचा विचार केला आहे. जर सर्वच पुरुष बद्ध मानले, तर निर्लिप्त, त्रिगुणातीत, इ. विशेषणे त्यांना कशी लावता येतील? बद्ध पुरुष अनादी कालापासून आहेत. मुक्तावस्थेतही पुरुष सत्वगुणापासून सर्वथा मुक्त नसतो. याच कारणाने एक मुक्त पुरुष दुसऱ्या मुक्त पुरुषापासून भिन्न असतो. अशा स्थितीत बद्ध व मुक्त पुरुषांपासून भिन्न असा एक निर्लिप्त, त्रिगुणातीत, स्वतंत्र असा पुरुष मानावा लागतो.

सृष्टिक्रम – प्रकृती व पुरुष यांच्या संयोगाने सृष्टी उत्पन्न होते. प्रकृती जड असल्यामुळे केवळ तिच्यापासून जगत निर्माण होऊ शकत नाही. किंवा स्वभावतः निष्क्रिय असलेल्या पुरुषापासूनही ते उत्पन्न होऊ शकत नाही. पण इथे प्रश्न असा उत्पन्न होतो, की विरुद्ध स्वभाव असलेल्या प्रकृति-पुरुषांचा संयोग कशा प्रकारचा असतो? सांख्य लोक या बाबतीत अंध व पंगू यांचा दृष्टान्त देतात. आंधळ्याला चालायची शक्ती असते; पण त्याला मार्ग दिसत नाही. पंगूला मार्ग दिसतो; पण चालता येत नाही. परंतु एकमेकांच्या सहकार्याने ते आपले काम साधतात. त्याचप्रमाणे जड पण सक्रिय प्रकृती व निष्क्रिय पण चेतन पुरुष यांचा संयोग परस्परकार्यसाधक आहे. प्रकृती ही भोग्य आहे. तेव्हा भोक्त्याच्या अभावी तिची स्वरूपसिद्धी होऊ शकत नाही. तेव्हा भोक्त्याने अनुभवल्यावरच तिचे भोग्यत्व निष्पन्न होते. प्रकृतीपासून विवेकज्ञान प्राप्त करून मोक्ष मिळवावा, म्हणून पुरुष प्रकृतीच्या संयोगाची इच्छा करतो.

गुणक्षोभ – प्रलयदशेत प्रकृती साम्यावस्थेत असते. तिचे तीन्ही गुण सम प्रमाणात असतात. पण पुरुषाशी संयोग होताच त्या गुणांत क्षोभ उत्पन्न होतो. प्रत्येक गुण बाकीच्या दोन गुणांना आपल्या वर्चस्वाखाली आणण्याचा प्रयत्न करतो. त्यामुळे गुणांचे पृथक्करण होते व त्यांचे निरनिराळ्या प्रमाणात मिश्रण होऊन सृष्टिकार्याला प्रारंभ होतो.

महत् – उत्पत्तीमध्ये पहिला पदार्थ जो उत्पन्न होतो,त्याचे नाव महत् तत्त्व असे आहे. आभ्यंतरिक दृष्टीने यालाच बुद्धी असे म्हणतात. ही बुद्धी प्रत्येक जीवात असते. निश्चय करणे हे बुद्धीचे विशेष कार्य आहे. सत्त्वगुण अधिक असल्यास बुद्धीमधे धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य या चार गुणांचा उदय होतो. पण तमोगुणाचे आधिक्य झाल्यास अधर्म, अज्ञान, आसक्ती व अशक्ती हे दुर्गुण उत्पन्न होतात. प्रकृतीचे कार्य असल्यामुळे बुद्धी जड आहे. पण ती पुरुषाच्या अधिक जवळ असल्यामुळे त्याच्या चैतन्याचे प्रतिबिंब तिच्यावर पडते व ती चेतन भासते. प्रत्येक पुरुष आपल्या अधिकारानुसार हे माझे कर्तव्य आहे असे ठरवतो, ते बुद्धीच्याच द्वारे होय. इंद्रिये व मन यांचा व्यापार बुद्धीसाठी होतो व बुद्धीचा व्यापार पुरुषासाठी होतो. सुख किंवा दुःख याचा अनुभव प्रथम बुद्धीतच होतो व नंतर बुद्धी तो अनुभव पुरुषाला अर्पण करते. मग पुरुष त्याचा उपभोग घेतो. बुद्धीच्याच साहाय्याने पुरुष आपल्याला प्रकृतीहून भिन्न व स्वतंत्र समजतो.

अहंकार – महत् तत्त्वानंतर दुसरे तत्त्व अहंकार हे निर्माण होते. मी व माझे असा अभिमान बाळगणे, हे अहंकाराचे रूप आहे. या अहंकारामुळेच पुरुष भ्रमाने स्वतःला कर्ता व भोक्ता, मानतो. इंद्रिये व मन आपण अनुभवलेले विषय अहंकारासमोर ठेवतात, तेव्हा अहंकार 'हे काम करायला मीच अधिकारी आहे' असा विचार करतो व मग कार्यरत होतो. ही अहंभावनाच जगाच्या सर्व व्यवहाराच्या मुळाशी आहे.

गुणांच्या विषमतेमुळे अहंकाराची सात्त्विक, राजस (तैजस) व तामस अशी तीन रूपे होतात. सात्त्विक अहंकारापासून पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये व मन ही उत्पन्न होतात व तामस अहंकारापासून तन्मात्रे निर्माण होतात. हा उत्पत्तीचा क्रम सांख्यकारिका व वाचस्पती मिश्र यांच्या मताप्रमाणे आहे. पण विज्ञानभिक्षूने यापेक्षा वेगळा क्रम सांगितला आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे सात्त्विक अहंकारापासून मन, राजस किंवा तैजस अहंकारापासून दहा इंद्रिये व तामस अहंकारापासून पाच तन्मात्रे उत्पन्न होतात.

इंद्रिये – नेत्र, श्रोत्र, घ्राण, रसना व त्वक् ही पाच इंद्रिये रूप, शब्द, गंध, रस व स्पर्श या विषयांचे ग्रहण करतात. मुख, हात, पाय, गुदद्वार व जननेंद्रिय ही पाच कर्मेंद्रिये होत. इंद्रिये ही आंतरशक्ती असून, त्यांचे कधी प्रत्यक्ष होत नाही.

मन – हे अकरावे इंद्रिय आहे. ते ज्ञानेंद्रिय व कर्मेंद्रिय असे उभयविध स्वरूपाचे आहे. कारण ते दोन्ही प्रकारच्या इंद्रियांना आपापल्या कार्यात प्रवृत्त करते. मन अधिष्ठित झाल्यावर नेत्रेंद्रिय रूप पाहू शकते. मनाचे रूप संकल्पात्मक आहे. इंद्रिये केवळ निर्विकल्पक ज्ञान प्रकट करतात. त्याचे स्वरूप 'हे काहीतरी आहे' अशा प्रकारचे असते. हे ज्ञान मन सविकल्पक बनवते. ते सांगते, की 'समोर दिसणारी, हलणारी पांढरी वस्तू ही गाय आहे, घोडा नाही.' मन हे आंतर इंद्रिय आहे.

तन्मात्रे – तन्मात्र म्हणजे सूक्ष्म तत्त्व. तामस अहंकारापासून शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांच्या तन्मात्रांचा उदय होतो. फार सूक्ष्म असल्यामुळे त्यांचे प्रत्यक्ष होत नाही, तर अनुमान होते. या तन्मात्रांच्या योगाने पाच स्थूल महाभूतांचा विकास होतो.

ज्ञानमीमांसा – जगातील पदार्थांचे ज्ञान आपल्याला इंद्रियांच्या साहाय्याने होते. इथे प्रश्न असा उपस्थित होतो, की ज्ञान कोणात राहते? नेत्राच्या द्वारे घटाचे प्रत्यक्ष होते, ते कोण करून देतो? पुरुष का बुद्धी? याचे उत्तर असे, की एकटचा

पुरुषात किंवा एकट्या बुद्धीत ज्ञानाची उपलब्धी होत नाही, तर दोहोंच्या मीलनामुळे ज्ञानव्यापार समजावला जातो. जेव्हा आत्म्याचे चैतन्य बुद्धीत प्रतिबिंबित होते, तेव्हा ज्ञानाची उत्पत्ती होते. आत्म्याला किंवा पुरुषाला बुद्धी, मन व इंद्रिये यांच्या साहाय्याने पदार्थांचे ज्ञान होते. मन व इंद्रिये जे विषय बुद्धीच्या पुढे प्रस्तुत करतात, त्यांच्याप्रमाणे बुद्धी आकार धारण करते. आणि जेव्हा बुद्धीवर पुरुषाच्या चैतन्याचा प्रकाश पडतो, तेव्हा आपल्याला त्या विषयांचे ज्ञान होते. अशा प्रकारे झालेल्या यथार्थ ज्ञानाला प्रमा असे म्हणतात.

यथार्थ ज्ञानाची उत्पत्ती प्रमाता (जाणणारा), प्रमेय (ज्ञान-विषय वस्तू) व प्रमाण (ज्ञान उत्पन्न करून देणारे साधन) यांवर अवलंबून असते.

सांख्यांनी प्रत्यक्ष, अनुमान व शब्द ही तीन प्रमाणे मानलेली आहेत.

प्रत्यक्ष – एखाद्या विषयाचा इंद्रियाशी संयोग झाल्यावर, त्याचे जे साक्षात ज्ञान होते, त्याला प्रत्यक्ष असे म्हणतात. प्रत्यक्षाची प्रक्रिया पुढीलप्रमाणे होते– समजा, आपल्या समोर एक वृक्ष आहे. आपण त्याला पाहण्याचा प्रयत्न केला, की आपल्या नेत्रेंद्रियाचा संयोग त्या वृक्षाशी होतो. नेत्रेंद्रिय तो विषय मनासमोर ठेवते. तेव्हा मन आपला संकल्पात्मक व्यापार त्याच्यावर करते, की 'हा वृक्षच आहे; दुसरी कोणती वस्तू नाही.' मग मन त्या संकल्पित वृक्षाला बुद्धीच्या समोर ठेवते. त्या वेळी बुद्धी स्वतः वृक्षाचे रूप धारण करते. मग बुद्धीवर पुरुषाच्या चैतन्याचा प्रकाश पडतो. त्यामुळे बुद्धीची वृक्षाकार वृत्ती लगेच उद्भासित होते. त्याच वेळी ज्ञान होते, की हा समोर दिसणारा पदार्थ वृक्ष आहे.

प्रत्यक्षाचे आलोचन म्हणजे निर्विकल्पक व सविकल्पक असे दोन प्रकार आहेत. ज्या वेळी इंद्रियाचा विषयाशी संयोग होतो, त्या वेळी विषयाचे जे आलोचन होते, त्याला निर्विकल्पक असे म्हणतात. या दशेत वस्तू केवळ इंद्रियाच्या द्वारे गोचर होते. मनाची क्रिया त्याच्यावर झालेली नसते. त्या वेळी ही एक काहीतरी वस्तू आहे, एवढेच ज्ञान झालेले असते. मनाची क्रिया झाल्यावर हा पदार्थ गाय आहे, तिचा रंग पांढरा आहे, इ. ज्ञान होते, त्याला सविकल्पक असे म्हणतात.

अनुमान – अनुमानाचे वीत व अवीत असे दोन प्रकार होतात. जे अनुमान व्यापक विधिवाक्यावर अवलंबून असते, त्याला वीत असे नाव आहे. वीत अनुमानाचे पुन्हा पूर्ववत व सामान्यतो दृष्ट असे दोन प्रकार आहेत. दोन पदार्थांच्या ठिकाणी निश्चितपणे असलेल्या व्याप्तिसंबंधावर आधारित जे अनुमान ते पूर्ववत होय. उदा० धूमावरून वह्नीचे अनुमान. धूम आणि वह्नी यांच्यांतील निश्चित संबंधाचे ज्ञान आपल्याला पाकशाला वगैरे ठिकाणी आधी झालेले असते. जेव्हा हेतू आणि साध्य यांच्यामधील व्याप्तिसंबंधाचे प्रत्यक्ष ज्ञान आपल्याला होत नाही, तेव्हा सामान्यतो दृष्ट अनुमान होते. इंद्रियांच्या अस्तित्वाचे ज्ञान आपल्याला प्रत्यक्षद्वारा कधी होत नाही. ते अनुमानानेच करून घ्यावे लागते. कोणतीही क्रिया करायची, तर तिला साधन किंवा करण याची आवश्यकता असते. वृक्ष तोडण्यासाठी कुऱ्हाड लागते. लेखनक्रियेसाठी लेखणीची गरज असते. त्याचप्रमाणे पाहणे ही एक क्रिया आहे व तिचे साधन म्हणून नेत्रेंद्रियाची सत्ता आपण मानतो. हे सामान्यतो दृष्ट अनुमान होय.

अवीत अनुमानाला न्यायदर्शनात शेषवत म्हटलेले आहे. 'शब्द हा गुण आहे', हे अनुमान त्या प्रकाराचे आहे. अनेक हेतूंच्या द्वारे शब्द हा इतर सहा पदार्थ नाहीत असे सिद्ध करतात व शेष: पदार्थ एकच राहतो. तो म्हणजे गुण. तेव्हा शब्द हा गुण आहे, असे मानतात.

शब्द – हे तिसरे प्रमाण आहे. आप्तवचनाला शब्द असे नाव आहे. आप्त म्हणजे सच्चा विश्वस्त पुरुष. त्याचे वचन प्रामाणिक असते. त्यालाच शब्दप्रमाण असे म्हणतात. त्याचप्रमाणे वैदिक वाक्यही प्रमाणभूत असते. ज्या अलौकिक गोष्टींचे ज्ञान प्रत्यक्ष किंवा अनुमान यांच्या द्वारे होत नाही, त्यांचे ज्ञान आपल्याला वेदवाक्यांनी होते. वेद हे सत्य व अपौरुषेय आहेत. त्यामुळे ते स्वतःप्रमाण आहेत.

कर्तव्य शास्त्र – माणसाचे जीवन हे सुखदुःखांनी भरलेले असते. सुखाने मनुष्याला आनंद होतो. दुःखाने तो त्रस्त होतो. सुखापासून मिळणारा आनंद हा क्षणिक असतो. तो स्थायी नसतो. जगात एकूण दुःखच अधिक दिसते. दुःखाचे आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक असे तीन प्रकार होतात. आध्यात्मिक याचा अर्थ आत्म्यासंबंधी असा आहे. पण आत्मा या शब्दाचा अर्थ इथे देह, शरीर असा आहे. मन व शरीर यांच्यासंबंधी जे दुःख ते आध्यात्मिक होय. आधी म्हणजे मानसिक चिंता, उद्वेग, क्रोध इत्यादी व व्याधी म्हणजे शारीरिक रोग, आघात, इत्यादी. या दोहोंचे संमीलित रूप म्हणजे आध्यात्मिक दुःख होय. आधिभौतिक दुःख हे बाह्य पदार्थांपासून उत्पन्न होते. साप किंवा विंचू चावणे, काठीचा मार लागणे, इ. हे आधिभौतिक दुःख होय. भूतप्रेतपिशाच्च यांपासून उत्पन्न होणारे दुःख ते आधिदैविक होय.

दुःखापासून मुक्त होण्यासाठी प्रत्येक प्राणी धडपडत असतो. तसेच, त्याची प्रत्येक क्रिया ही सुख व आनंद मिळविण्याच्या हेतूने केलेली असते. परंतु नश्वर शरीर व दुर्बल इंद्रिये यांमुळे सुख हे पुष्कळदा दुःखमिश्रित असते. तेव्हा दुःखापासून आत्यंतिक निवृत्ती हे मानवी जीवनाचे लक्ष्य आहे.

अज्ञान हे सर्व दुःखाचे कारण आहे. जगातील वस्तूंचे यथार्थ रूप न जाणल्यामुळे दुःख उत्पन्न होते आणि जसजसे त्यांचे यथार्थ रूप आपल्याला समजू लागते, तसतशी दुःखाची निवृत्ती होत जाते. 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' म्हणतात, ते हेच होय.

विवेकज्ञान – सांख्य दर्शनात पुरुष व प्रकृती ही दोन मूलतत्त्वे मानलेली आहेत. पुरुष हा शुद्ध चैतन्यरूप व देश, काल, कारण, इ. बंधनांपासून मुक्त आहे. पण व्यवहारात तो अज्ञानामुळे आपल्याला बुद्धी किंवा मन यांपासून वेगळा मानत नाही. तो मनाचे सुख, दुःख, इ. धर्म आपलेच मानतो आणि स्वतःला सुखी किंवा दुःखी समजतो. तसेच, व्यवहारात तो आपल्याला प्रकृती या जड तत्त्वापासून भिन्न समजत नाही आणि तिचे सर्व धर्म आपल्यावर आरोपित करून घेतो. या आरोपाचा जेव्हा अंत होतो, तेव्हा पुरुष दुःखापासून मुक्त होतो. यालाच विवेकख्याती असे शास्त्रीय नाव आहे. पुरुष प्रकृतीपासून वेगळा आहे, हे ज्ञानच मोक्षप्राप्तीचा एक मार्ग आहे.

अपवर्ग – पुरुष स्वभावतः असंग व मुक्त आहे. पण अविवेकामुळे त्याचा प्रकृतीशी संयोग निष्पन्न होतो. या संयोगामुळे प्रकृतिजन्य दुःखाचे पुरुषाच्या ठिकाणी जे प्रतिबिंब पडते, तोच त्याचा दुःखभोग असतो. या संसाराचे किंवा दुःखभोगाचे मूळ कारण अविवेक हे असून, दुःखनिवृत्तीचे साधन विवेक हे आहे. प्रकृती व पुरुष यांचा वियोग होणे हेच अपवर्गाचे स्वरूप आहे. पुरुषाला मुक्ती मिळते याचा अर्थ असा, की तो आपली स्वतंत्र, असंग व केवल अशी दशा प्राप्त करून घेतो. अशा वेळी प्रकृतीचा व्यापार आपण होऊनच थांबतो. प्रत्येक पुरुषाच्या अपवर्गसिद्धीसाठीच प्रकृतीचा समस्त व्यवहार असतो. त्यामुळे अपवर्गाची सिद्धी झाल्यावर, प्रयोजनाभावी प्रकृतीचा सर्व व्यवहार बंद होणे स्वाभाविक आहे.

विवेकज्ञानामुळे पुरुषाच्या ठिकाणी कैवल्यज्ञानाचा उदय होतो. या वेळी त्याला 'नास्मि' = मी स्वभावतः निष्क्रिय आहे. 'नाहम्' = माझ्या ठिकाणी कोणतेही कर्तृत्व नाही व 'न मे' = मी असंग आहे, असा अनुभव येतो. प्रत्येक मनुष्याला या जन्मात अशी मुक्तावस्था प्राप्त करून घेता येणे शक्य आहे.

जीवन्मुक्ती व विदेहमुक्ती – जीवन्मुक्ती आणि विदेहमुक्ती असे मुक्तीचे दोन प्रकार आहेत. विवेकज्ञान झाल्यावर मनुष्य याच जन्मात ज्या मुक्तीचा अनुभव घेतो, तिला जीवन्मुक्ती असे म्हणतात. जीवन्मुक्त व्यक्ती कर्मव्यापारापासून विरत होत नाही, तर पूर्वीइतक्याच आस्थेने प्रारब्ध कर्मे करीत राहते. परंतु आता ही कर्मे त्या व्यक्तीला बंधनकारक होत नाहीत. घट बनल्यावर कुंभाराने चाक फिरवायचे थांबवले, तरी पूर्वीच्या गतीमुळे ते जसे थोडा वेळ फिरत राहते, त्याचप्रमाणे प्रकृतीची निवृत्ती झाल्यावरही व्यक्ती काही काळ प्रारब्ध कर्मे करीत राहते. शरीराचा नाश झाल्यावर व्यक्तीच्या ऐकांतिक (अवश्य) व आत्यंतिक म्हणजे अविनाशी अशा दुःखांचा नाश होतो. यालाच विदेहमुक्ती अशी शास्त्रीय संज्ञा आहे. विज्ञानभिक्षूने याच मुक्तीला खरी मुक्ती मानलेली आहे.

समीक्षा – सांख्यांची पदार्थमीमांसा ही वैशेषिकांच्या तत्त्वमीमांसेपेक्षा अधिक सयुक्तिक आहे. वास्तविक जगात चैतन्य, मन व पंच महाभूते मानली, की काम भागू शकते. सांख्यांनी चैतन्याची सत्ता पुरुषरूपात स्वीकारली आहे आणि मन व पंच महाभूते यांचा अंतर्भाव प्रकृतीत केला आहे. म्हणून सांख्यांनी पुरुष व प्रकृती ही दोनच मूलभूत तत्त्वे मानली आहेत. वैशेषिकांच्या नऊ द्रव्यांचा समावेश या दोन तत्त्वांत मिळून होतो.

सांख्यांच्या तत्त्वांवर वेदान्तमतात काही आक्षेप घेतलेले आहेत. बादरायणाने आपल्या ब्रह्मसूत्रांत अनेक ठिकाणी सांख्यांनी मानलेली तत्त्वे खोडून काढली आहेत. शंकराचार्यांनी आपल्या शारीरक भाष्यात सांख्याला प्रधान मल्ल असे म्हटले आहे, आणि तत्त्वविचाराच्या आखाड्यात या मल्लाचा पराभव केल्याशिवाय वेदान्तमताचा विजय होणार नाही, असे सूचित केले आहे. सांख्यांच्या सिद्धान्तांतील जड प्रकृतीचे कर्तृत्व व चेतन पुरुषाचे अनेकत्व यांवर वेदान्त्यांनी आक्षेप घेतले आहेत. जड प्रकृतीकडे जगाचे कर्तृत्व देणे, हे श्रुतिसंमत नाही, तर केवळ दुर्बळ अनुमानावर आधारलेले आहे, असे बादरायणाने म्हटले आहे. तसेच सांख्यांनी प्रकृतीला सगुण मानले व नित्यही मानले. पण हे बरोबर नाही, कारण जी वस्तू सगुण असते, ती नाशिवंत असतेच. याशिवाय, चेतनाचे अधिष्ठान नसताना प्रकृतीत प्रवृत्ती कशी उत्पन्न होते, हा विवाद्य प्रश्न आहे. तसेच गुणसाम्यरूप प्रकृतीत विषमतासूचक क्षोभाचा उदय कसा होतो, हाही एक प्रश्न आहे. यावर सांख्यांनी उत्तर दिले, की ज्या प्रकारे वसंतामागून ग्रीष्म, ग्रीष्मामागून वर्षा असे ऋतू आपोआप येत असतात, त्याप्रमाणे प्रकृती ही पुरुषाच्या कैवल्यसिद्धीसाठी स्वतः प्रवृत्त होते. पण हा दृष्टान्त बरोबर नाही. कारण चेतन सूर्यामुळे पृथ्वीवर ऋतुपरिवर्तन होते, ते आपोआप होत नाही.

पुरुषबहुत्वाचा सिद्धान्तही दोषयुक्त आहे. जनन, मरण, मानसिक दशा, इ. कारणांमुळे सांख्यांनी एक पुरुष न मानता अनेक पुरुष मानले आहेत. प्रत्येक पुरुषाच्या शारीरिक व मानसिक अवस्थेत इतका फरक असतो, की अनेक पुरुष मानावेच लागतात. पण सांख्यांनी देह-धर्म भिन्न असल्यामुळे चैतन्यस्वरूप पुरुषही भिन्न भिन्न मानले आहेत. अंधत्व, काणत्व हे देहाचे धर्म आहेत. त्यामुळे शुद्ध आत्मा कसा भिन्न होईल? चैतन्यरूपाने सर्व पुरुष एकासारखेच आहेत. अशा वेळी पुरुषाला

चैतन्यरूप मानणे व त्याच वेळी त्याला वेगवेगळे मानणे हे कितपत तर्कसंगत आहे ? या पुरुषाचा प्रकृतीशी प्रथम संयोग कसा होतो, हाही विचारणीय प्रश्न आहे. याही प्रश्नाचे सांख्यांनी दिलेले उत्तर समाधानकारक नाही. असे असले तरी सांख्यांची सूक्ष्म तर्कमूलक विवेचनपद्धती ही विशेष प्रशंसनीय आहे. त्यांनी केलेले तत्त्वविश्लेषण हे दूरगामी व तलस्पर्शी आहे. त्यांनी तत्त्वमीमांसेला अशा स्थानी पोचविले, की तिथून वेदान्त्यांनी ती ग्रहण केली व पूर्णतेला नेली. [ भा. द.; वै. सं. वि.; प्रा. स. रा. गाडगीळ, नवभारत, मे १९६४ ]

**सांची** एक बौद्ध क्षेत्र. हे ठिकाण मध्य प्रदेशात भोपाळपासून २८ मैलांवर आहे. इथल्या रेल्वे स्टेशनापासून अर्ध्या मैलावर विंध्याचलाची टेकडी असून, ती सुमारे २५० फूट उंच आहे. या टेकडीभोवती प्राचीन काळी दगडी तटबंदी होती. तिच्या खुणा अजून दिसतात. टेकडीच्या माथ्यावर प्राचीन बौद्ध स्तूप, विहार व मंदिरे यांचे अवशेष सगळीकडे विखरून पडलेले आहेत. इथल्याच अभिलेखांवरून या टेकडीला पूर्वी काकनाद, काकनादबोर व श्रीपर्वत अशी नावे असल्याचे कळते. महावंशात या टेकडीला चेतियगिरी असे म्हटले आहे.

सांची हे प्राचीन विदिशेला जवळचे असे क्षेत्र होते. प्राचीन काळी ही पूर्व माळव्याची राजधानी होती. सांचीला महत्त्व आले ते विदिशेमुळेच.



सांची येथील दुसरा स्तूप

सांचीचा इतिहास अशोकाच्या कालापासून मिळतो. सांचीची वास्तुकला व कोरीवकला अशोकपूर्वकालापासून इ. स. च्या १२ व्या शतकापर्यंतच्या दीर्घ कालखंडातली आहे. सांचीचा बुद्धाच्या जीवनाशी संबंध नाही. प्राचीन बौद्ध साहित्यातही सांचीचा उल्लेख सहसा आढळत नाही. हे क्षेत्र पुढे मौर्यकालात उदयास आले. सम्राट अशोकापासून याच्या अभिवृद्धीला प्रारंभ झाला.

इथे तीन बौद्ध स्तूप आहेत. त्यांतला एक खूप मोठा आहे. संशोधकांच्या मते तो अशोकापूर्वी शंभर वर्षे या कालात उभारला गेला.

सांचीचा हाच मुख्य स्तूप होय. याची उंची ७५ फुटांहून अधिक आहे. त्याच्या आत बुद्धाच्या अस्थींचे अवशेष ठेवले आहेत, असे सांगतात. प्रारंभी स्तूप विटांचा असून, तो अर्धमंडलाकार होता. कालांतराने तो उपेक्षित झाला, त्याच्या विटाही चोरीला जाऊ लागल्या. पण पुढे शुंगकालात त्याची ही दुर्दशा संपली. कोण्या एका शुंग राजाने त्याच्या भोवती लाल रंगाच्या वालुकामय दगडी विटांची उभारणी करून त्याचा आकार १२० फूट व्यासाचा बनवला. पुढच्या कालातल्या बौद्ध राजांनी सभोवती वेदी निर्माण केली, प्रदक्षिणामार्ग आणि वर चढण्यासाठी अशा दुहेरी पायऱ्या बांधल्या; स्तूपाच्या माथ्यावर वेदिका आणि छत्र बनवून त्या वाढत्या कार्याची सांगता केली.

इथल्या दुसऱ्या एका स्तूपात बुद्धाचे दोन प्रमुख शिष्य सारिपुत्त व मोग्गलायन यांच्या अस्थी एका दगडी करंडकात घालून ठेवल्या होत्या. ज. कनिंगहॅम याला त्यांचा शोध लागला. इ. स. १८३१ साली ते रक्षावशेष त्याने लंडनला पाठवून दिले. पुढे स्वातंत्र्यानंतर १९५३ साली ते इकडे परत आणवले गेले आणि त्यांच्यासाठी एक नवा विहार बांधून त्यात त्यांची स्थापना झाली.

तिसऱ्या स्तूपावरच्या वेदिकेवरचे कोरीव काम भारतीय शिल्पकलेचा एक सुंदर नमुना आहे. इ. स. १८२२ साली कॅ. जॉन्सनने हा स्तूप वरून खाली असा खोदवला. पण त्या वेळी त्याला आत काही सापडले नाही. पण इ. स. १८५१ साली ज. कनिंगहॅमला मात्र त्यात एक धातुपात्र सापडले. त्या पात्राच्या पोटात आणखी चार लहान पात्रे होती. त्यांत जे अस्थींचे अवशेष होते, ते प्राचीन बौद्ध आचार्यांचे असावे.

तोरणे हाच सांचीचा सर्वांत विलोभनीय आविष्कार होय. ही मोठ्या स्तूपाच्या चारही दिशांना चार असून, ती ३४ फूट उंच आहेत. ती इतर ठिकाणच्या तोरणांप्रमाणे अंतर्वक्र नसून, चौकोनी आहेत. त्यांचे स्तंभ खाली चौकोनी आहेत. त्या स्तंभांच्या उताळचांवरचे सिंह, ठेंगू यक्ष आणि हत्ती हे तीन प्राणी आपल्या मस्तकावर तोरणाचा वरील भाग उचलून धरीत आहेत असे वाटते. प्रत्येक तोरणाच्या माथ्यावर एकावर एक असे तीन शिलापट्ट एकमेकांपासून विलग असे बसविले आहेत. दोन फलकांच्या मध्ये दगडी खुंट्या बसवून त्यांचा विलगपणा

...म केला आहे. ही सारी तोरणे दिसायला सारखी असली ...री त्यांवरच्या शिल्पकृती मात्र वेगवेगळ्या आहेत.



सांची येथील स्तूपाचे तोरणद्वार

पूर्व दिशेच्या तोरणावर कोरीव कलेचा उच्चतम आविष्कार दिसून येतो. त्यातल्या एका चित्रात बोधिवृक्ष असून, अशोक, त्याची राणी व राजपुत्र ही मंडळी त्या वृक्षाखाली बुद्धाची पूजा करतात, असे दाखवले आहे. त्याच तोरणावर बुद्धाचे महाभिनिष्क्रमण, कश्यपऋषीची कथा, इ. बरीच मोठी चित्रे कोरलेली दिसतात.

सांचीचे दक्षिण तोरण हे सर्वांत प्रथम बनवले गेले. या तोरणावर कमलवनातली लक्ष्मी, अशोकाची रामग्रामाची यात्रा, छदंत जातक, इ. चित्रे कोरलेली असून, अनेक चौकटींतून बुद्धप्रतीकांच्या उपासनेची दृश्ये कोरलेली आहेत. एका ठिकाणी नृत्याचे मनोहर दर्शन आहे.

पश्चिमेच्या तोरणावर हत्तींनी केलेली बोधिवृक्षांची पूजा, बुद्धाच्या अस्थींसाठी त्यांच्या अनुयायांची लढाई, महाकपिजातक, इ. चित्रे कोरलेली आहेत.

उत्तर दिशेच्या तोरणावर वेस्संतरजातक, माराचे बुद्धावर आक्रमण, जेतवनदान, इ. कथा कोरलेल्या आहेत. त्याच्या माथ्यावर मध्यभागी एक चक्र असून, त्याच्या दोन्ही बाजूंना त्रिशूलाकृती शिल्पे आहेत. त्या शिल्पांत मध्यावर एक चक्र आणि त्यावर त्रिशूल आहे. त्या त्रिशूलात दोन अधोमुख कमळे असून, त्यांची तीन दले दिसतात. त्रिशूलाची तीन्ही अग्रेही त्रिशूलाकार आहेत. डॉ. जनार्दन मिश्र यांच्या मते हे त्रिशक्तीचे प्रतीक आहे. पण शिल्पशास्त्रज्ञ फर्गसन, ते शिल्प बुद्ध, धर्म व संघ या त्रिरत्नांचे प्रतीक आहे, असे मानतो.

सांची हे १२ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत एक प्रसिद्ध बौद्ध क्षेत्र मानले जात होते. वेळोवेळी अनेक दानशूर पुरुषांनी इथे नवे नवे स्तूप उभारले. तिथल्या भग्न अवशेषांच्या संभारात अशोकाने उभारलेला एक स्तंभ असून, त्यावर ' लोकांनी आपसांत भेदभाव वाढवू नये ' अशी ब्राह्मी लिपीत कोरलेली आज्ञा आहे. चार सिंहांनी अलंकृत असलेला त्याचा शिरोभाग जवळच्या संग्रहालयात ठेवला आहे. इथे विहारांचे अवशेष आहेत, तसेच मंदिरांचेही आहेत.

सांची व भरहूत यांतले चित्रविषय सामान्यपणे सारखे आहेत. सांचीतले यक्ष-यक्षी भरहूत येथील यक्ष-यक्षिणींहून अधिक सुंदर



तोरणावरील त्रिरत्न प्रतीक–सांची

आहेत. यक्षिणी आम्रवृक्षाची फांदी पकडून उभ्या असल्याचे दाखविले आहे. नागांचीही अनेक दृश्ये मनोहर आहेत. एका

दृश्यात नाग बुद्धपूजेसाठी सरोवरातून वर येत आहेत, असे दाखविले आहे. दुसऱ्या एका दृश्यात एक नागराजा प्रसन्न मुद्रेत बसला असून, त्याच्या राण्याही त्याच्या जवळ आहेत आणि एक नर्तकी त्याच्या समोर नाचत आहे, असे दाखवले आहे.

इथल्या चित्रशैलीत मानव, पशू व वनस्पती यांच्यांत एक प्रकारचे गूढ, मधुर असे सामंजस्य दिसून येते. पूर्व तोरणावरच्या एका चित्रात बुद्ध एका जंगलात एकटाच बसला असून, हरिण, पक्षी, साप व दैत्य हे त्याच्या भोवती वावरताना दिसत आहेत. या चित्राच्या द्वारे चित्रकाराला समस्त चेतन प्राण्यांमधल्या भ्रातृभावाचा आशय सूचित करायचा असावा. इथल्या कलाकारांना मोराचे विशेष प्रेम दिसते. कारण इथे जागजागी मोर कोरलेले आहेत. इथल्या स्त्री-पुरुषांच्या मुखमुद्रेवरचे भाव साधेभोळे वाटतात. हे सगळे लोक आनंदित दिसतात. महत्त्वाची गोष्ट अशी, की इथल्या शिल्पातील कुणीही पुरुष उघडा-बोडका आढळत नाही. विदिशा नगरीत एका काळी हस्तिदंतावरची कला खूप प्रगत आणि सूक्ष्म झाली होती. सांचीच्या कलाकारांनी या कलेतूनच प्रेरणा घेतली असावी, असे श्री. रामकृष्ण दास यांचे मत आहे [ भा. सं. क.; क. प्रा. बु.; पा. पु. क.; आजकल, वार्षिक अंक, डिसेंबर १९५६ ]

## सांजवात

तिन्हीसांजा झाल्यावर देवघरात व तुलसीवृंदावनापुढे दिवा लावण्याची फार जुनी पद्धत आहे. या पद्धतीला सांजवात करणे असे म्हणतात. हे दिवा लावण्याचे काम घरातली गृहिणी करते. दिव्याचे तोंड पूर्वेला किंवा उत्तरेला करावे, पण पश्चिमेला व दक्षिणेला करू नये, असा धर्मशास्त्राचा दंडक आहे.

या वेळी सामान्यतः लहान मुले हात-पाय धुतात, घरातील वडीलधाऱ्या मंडळींना नमस्कार करतात व देवापुढे बसून 'शुभंकरोति ', रामरक्षा व काही पारंपरिक ओवीगीते म्हणून देवाची प्रार्थना करतात. स्थूलमानाने काही पाठभेद वगळता, जी ओवीगीते सर्वत्र आढळतात, त्यांतील एक पुढीलप्रमाणे आहे–

**दिव्या दिव्या रे दीपत्कार । कानी कुंडले मोतीहार**
**दिव्याला पाहून नमस्कार ।।**
**दिवा लावला देवापाशी । उजेड पडला तुळशीपाशी**
**माझा नमस्कार सर्व देवांपाशी ।।**
**घरातली इडा-पीडा बाहेर जावो ।**
**बाहेरची लक्ष्मी घरात येवो ।।**

सांजवातीच्या वेळेला नमस्कार करण्याच्या या पद्धतीचा अत्यंत काव्यात्म व सूचक उल्लेख, महानुभाव पंथाचा तृतीय आचार्य भास्करभट्ट बोरीकर याने शिशुपालवधात केला आहे.

सांजवातीची प्रथा बरीच प्राचीन आहे. प्रसिद्ध धर्मशास्त्रकार मरीचीने यासंबंधीचा दिलेला एक श्लोक असा –

**रवेरस्तं समारभ्य यावत्सूर्योदयो भवेत् ।**
**यस्य तिष्ठेद्गृहे दीपस्तस्य नास्ति दरिद्रता ।।**

अर्थ – सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत ज्याच्या घरी दिवा तेवत असतो, त्याला दारिद्र्य येत नाही.

विद्वानांच्या मते मरीची इ. स. च्या अकराव्या शतकापूर्वी होऊन गेला असावा. त्यामुळे ही चालही तितकीच, किंबहुना त्याहून अधिक प्राचीन आहे, असे म्हणता येते.

सांजवातीची पद्धत भारतव्यापी आहे. मराठी, मैथिली, हिंदी इ. भाषेतील लोकगीतांमधून त्यासंबंधीचे स्पष्ट उल्लेख मिळतात. एका कुमाऊं लोकगीतात सायंकाळी करायच्या कामांची अनेक विधिनिषेधांसह तपशीलवार नोंद आढळते. त्यातील काही अंश पुढीलप्रमाणे आहे.–

**पडनी संजया मांजा के काम करला**
**पडनी संजया मांजा दीपक जगाला**
**शालीका ग्रामकी पूजन करला**
**पडनी संजया मांजा यों काम करला**
**बालक के बोत्यूनी सुभाग बोलला हरी**
**झगडो नैं करना पडनी संजया मांजा**
**झाडो नैं झाडना तनौ घरनौ मांजा आबा**
**लक्ष्मी झाडी जैंछ**

भावार्थ – सायंकाळी कोणकोणती कामे करावी ? तर दीप प्रज्वलित करावा. शाळिग्रामाची पूजा करावी. मुलांना आनंदी ठेवून, भांडणे करू देऊ नयेत. सायंकाळी झाडू नये. जे लोक यावेळी घरातील केर काढतील त्यांची लक्ष्मीच झाडल्यासारखी होईल.

या संध्याकालीन कर्मांची उत्कटता व पावित्र्य स्पष्ट करणारी अनेक लोकगीते गढवाल प्रदेशातही आढळतात. तिथल्या लोकांच्या मते ही वेळ शुभ असते. रात्रभर दिवा जळावा ही अपेक्षा व्यक्त करीत असताना गढवाली स्त्रिया म्हणतात–

**मट्टी को दीपक कबास की बाती ।**
**तिलु को तेल, जागो दिया पुरी-पूरी राती ।।**

धर्मशास्त्रकारांपासून लोकसाहित्यकारांपर्यंत सर्वांनी दारिद्र्यनाश हा सांजवातीचा हेतू म्हणून सांगितला आहे. यावरून या वेळी केलेली दीपवंदना ही लक्ष्मीच्या आगमनासाठी आणि पर्यायाने अलक्ष्मीच्या निस्सारणासाठी केलेली असते, असे स्पष्ट दिसून येते. हाच हेतू उघड करून सांगणारी बरीच लोकगीते ऐकायला मिळतात. त्यांचा एक नमुना असा–

**भरली तीनसांज । दिवा लावावा सूनबाळ,**
**लक्ष्मीची झाली वेळ ।।**

भरली तीनसांज । साजबाई फुलली ।
दारी लक्ष्मी बोलली ।।
भरली तीनसांज । लक्ष्मीमाय आली घरा ।
दिव्याची जल्दी करा । मोती पवळचानं ओटी भरा ।।

या समजुतीचे एक प्रतीक म्हणून आजही अनेक कुटुंबांतून या समयी घरात एक पाट मांडून त्यावर पाण्याने भरलेले एक तांब्या-भांडे ठेवतात. नैवेद्यासाठी दूध किंवा साखर असते.

अशा प्रकारच्या विचारांच्या सातत्याने लक्ष्मीच्या व अलक्ष्मीच्या भोवती वावरणाऱ्या अनेक संकेतांना जन्म मिळाला आहे. या करकरीत तिन्हीसांजेला घरातला केर काढू नये; काढला तरी तो बाहेर टाकू नये; भोजन व अभक्ष्य भक्षण करू नये; तोंडखं घरात आणू नये; दिवा विझू देऊ नये; गुरू, देव व अतिथी यांचा अनादर करू नये; कलह करू नये; आंथरूण टाकू नये. जिथे आंथरूण टाकलेले असते तिथे रोगराईचे वास्तव्य होते. या वेळी कोणाला मीठ व विरजण देऊ नये; दळण दळू नये; भांडी घासू नयेत; लाकडे फोडू नयेत. तसेच अश्रुमोचन करणे, प्रवासाला निघणे, पैशांचे व्यवहार करणे, इ. गोष्टीही निषिद्ध आहेत.

भरली तिन्हीसांज ही भुताखेतांच्या वावरण्याची वेळ असते. त्यामुळे स्त्रियांनी व मुलांनी, विशेषत: गरोदर स्त्रियांनी फार काळजीपूर्वक वावरावे, असे सांगितले जाते. अशा स्त्रिया या वेळी दरवाज्यात उभ्या राहिल्या तर त्यांच्या गर्भाला अपाय होतो, अशी समजूत आहे. सायंकाळी राखोळीहून घरी परतणारी गुरेही त्यांनी पाहायची नसतात. कारण भुतेखेते गुरांच्या शरीरात प्रवेश करून घरात शिरण्याचा प्रयत्न करीत असतात. पाणवठ्याशेजारी जाणे किंवा झाडाखालून जाणे या बाबी त्यांनी कटाक्षाने टाळल्या पाहिजेत. रामरक्षा किंवा भीमरूपी यासारख्या स्तोत्रांचे पठण भूतबाधा दूर व्हावी या उद्देशानेच या वेळी केले जाते. रामरक्षा म्हणून या मंत्रसामर्थ्याने भारलेली विभूती बालकांना लावतात त्यामागील हेतूही हाच असतो.

सायंकाळी दिवा लावल्यानंतर गायली जाणारी गीते सांझगीते या नावाने प्रसिद्ध आहेत. या गीतांतील मांगल्य ध्यानी घेऊन पुढे त्यांचा विनियोग विविध शुभकार्यांतही होऊ लागला असावा. [आचरेंदु:; लो. सा. ले.; ग. लो. सां. अ.; उ. प्र. लो.]

**सांझीपूजा** एक पूजाव्रत. माळवा, राजस्थान, पंजाब, मध्य प्रदेश, इ. प्रदेशात हे व्रत प्रचलित आहे. सांझी ही एक लोकदेवता आहे. शक्तिदेवतेची पूजा प्राचीन कालापासून भारतात प्रचलित आहे. सप्तमातृकांची पूजाही निरनिराळ्या स्वरूपांत सर्वत्र आढळते. तिच्या पूजेसंबंधी विधिविधानेही ग्रंथांतरी मिळू शकतात. पण अशाही काही देव-देवतांची भारतात पुरातन कालापासून पूजा चालू आहे, की त्यासंबंधी धर्मग्रंथांत कोणत्याही प्रकारचे पूजाविधान आढळत नाही. अशा काही देवतांपैकी सांझी ही देवता आहे. हिला संजा, संजाबाई, इ. नावांनीही ओळखतात. सांझी किंवा संझा हे संध्याशब्दाचे अपभ्रंश आहेत. सांझीची पूजा म्हणूनच सायंकाळी केली जाते.

सांझी ही कुमारी होती म्हणून अविवाहित मुलींनाच तिची पूजा करायचा अधिकार असतो. सुवासिनी स्त्रिया तिच्या पूजेत भाग घेत नाहीत. पितृपक्षातल्या प्रतिपदेपासून नवरात्रातल्या प्रतिपदेपर्यंत सोळा दिवस सांझीची पूजा चालते. क्वचित नवरात्राचे नऊ दिवस तिच्या पूजेसाठी घेतात.

सांझी ही एक विविध चित्रांची चौकोनी रचना असते. सांझीच्या अनेक आकृत्या असतात आणि त्या भिंतीवर काढायच्या असतात. प्रदेशपरत्वे त्यांची रचना भिन्न असते. त्यासाठी प्रथम भिंतीचा एक चौकोन शेणाने सारवतात. मग सूर्यास्तापूर्वी आळीतल्या मुली एकत्र जमतात. प्रथम भिंतीवर शेणाचे ठिपके



सांझीच्या विविध आकृत्या

ठेवून त्यांना चंद्र-सूर्य म्हणतात. त्यांवर फुलांच्या पाकळ्या चिकटवतात. ही पहिल्या दिवसाची सांझी झाली. दुसऱ्या दिवशी

आदल्या दिवशीच्या आकृत्या पुसून त्या जागी चंद्रकोर व चौरस काढतात. तिसऱ्या दिवशी छाबडी, चौथ्या दिवशी चौपड, पाचव्या दिवशी गोरवेसऱ्या, घेवर, कुमार व कुमारी अशी चित्रे काढतात. या सर्व चित्रांना एक सांकेतिक अर्थ असतो. पाचव्या दिवसाला कुमारपंचमी म्हणतात आणि त्या दिवशी कुटुंबात मृत झालेल्या कुमारांचे श्राद्ध करतात.

सहाव्या दिवशी पुन: चौपड, सातव्या दिवशी स्वस्तिक आणि सप्तर्षींचे प्रतीक असलेले सात ठिपके काढतात. आठवा दिवस हा अष्टतीर्थपूजनाचा असतो. आठ पाकळ्यांचे फूल, नगाऱ्यांची जोडी आणि गजलक्ष्मी ही चित्रे असतात. नववा दिवस ही वृद्धतिथी असते. त्या दिवशी वृद्ध जोडपे चितारतात. दहाव्या दिवशी पंखा, अकराव्या दिवशी केळीचे झाड व बाराव्या दिवशी खुळखुळा चितारतात. तेराव्या दिवशी किल्लाकोट, ऋद्धिसिद्धी व खोडचो बामण चितारतात. हा बामण सांझीला नेण्यासाठी 'मूळ' येतो अशी समजूत आहे. पंधराव्या दिवशी किल्लेकोटाची पूजा करून खीरपुरीचा नैवेद्य दाखवतात. सोळाव्या दिवशी सांझीची शेवटची पूजा असते. ती झाल्यावर त्या चिकटवलेल्या साऱ्या चित्राकृती भिंतीवरून काढतात व सर्व मुली मिरवणुकीने जलाशयावर जाऊन त्यांचे पाण्यात विसर्जन करतात. परत येताना पाण्यातले दहा खडे आणून शेणात मिसळतात व त्याचा गोळा बनवतात. याला म्हणायचे डुमडो. त्यावर स्वस्तिक काढतात. अंगणात चार खुंट पुरून त्यांच्या मध्यभागी डुमडो ठेवतात. मग सर्व मुली तिथे बसून त्याची कहाणी ऐकतात. नवरात्राचे नऊ दिवस डुमडोची पूजा करून दसऱ्याच्या दिवशी तो डुमडो एका ढोली जातीच्या पुरुषाला देऊन या पूजाव्रताची सांगता करतात.

माळवा, राजस्थान, इ. प्रदेशांत सांझीपूजेची अनेक लोकगीते प्रचलित आहेत.

सोळाव्या दिवशी सांझीबाई लग्न होऊन सासरी जायची असते. मुलींना तिच्या जाण्याचे दु:ख होते, म्हणून त्या तिला गाणी म्हणून राहण्याचा आग्रह करतात. यासंबंधीचे एक गीत असे—

**उभी रो संझाबाई उभी रो**
**म्हारा माथाने भंमर घड़ावा दो**
**मैं कांई जाणू रसिया कुण दिन पधार्या**
**म्हारा झेला में झूटणा जडावा दो ॥**

भावार्थ — हे संजाबाई, थोडा वेळ उभी राहा. मला माझ्या कपाळावरचा भंवर (एक दागिना) घडवू दे. मला काय माहीत, की प्रियकर कोण्या दिवशी घरी येईल. तू थांब. माझ्या झेल्यात झूटणा (एक अलंकार) जडवू दे.

संजाबाई ही एक आदर्श कुमारिका आहे. लाल भय्याने जी एक बाग लावलेली असते, ती संजाबाई येऊन शिंपते. हा आशय पुढील ओळीत सांगितला आहे—

**लाल भैया बाग लगावे संजाबाई सींचण जाय।**
संझाबाई निघून गेल्यावर माझी बाग सुकून जाईल—
**संजाबाई चाली सासरे म्हारो बाग सूख्यो जाय।**

पण ती घटना थांबत नाही. संजाबाईचे लग्न होते, तिची वरात निघते आणि ती निघून जाते. पण काय आश्चर्य!

**बाई आई देहरी**
**म्हारो बाग लहरिया खाय।**

सासरी जाण्यासाठी म्हणून सांजीबाईने दारात पाय ठेवला मात्र; सगळी बाग चैतन्याने बहरू लागली.

सांझीपूजा ही कुमारिकांना मंगलप्रद असते, म्हणून कुमारिका ती मनोभावे आचरतात. [ लोककला त्रैमासिक, मध्यभारत (मालवा) अंक; संयुक्त राजस्थान, ऑक्टो. १९५६ ]

## सांतपन

एक प्रायश्चित्त. हे दोन दिवसांचे असते म्हणून याला द्वैरात्रिक सांतपन म्हणतात. यात आदल्या दिवशी पंचगव्य प्राशन करून दुसऱ्या दिवशी उपोषण करतात. याज्ञवल्क्यमते हे कृच्छ्र सांतपन होय (याज्ञ. ५.३१४). पायावर पाय ठेवून, अर्धे वस्त्र नेसून व अर्धे पांघरून किंवा तोंडाने फुंकून अन्न भक्षण केल्यास हे कृच्छ्र सांतपन करायचे असते. सांतपनाचे महासांतपन, अतिसांतपन असे विविध प्रकार आहेत. पाहा-महासांतपन, अतिसांतपन. [ हि. ध.; प्रा. व्य. प्र.]

## सांबपुराण

एक उपपुराण. हे सौर पुराण असून, त्यात सूर्योपासना हा मुख्य विषय आहे. प्रारंभी सविता, भास्कर, आदित्य, इ. नावांनी सूर्याला वंदन केले आहे. सूर्य हाच विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचा कारक असून, ब्रह्मा-विष्णु-महेशांचा तो आत्मा आहे, असे पुढे त्याचे स्तवन केले आहे. प्रस्तुत पुराणात पुढील विषयांचे विवेचन आलेले आहे —

श्रुति-स्मृतींचा आशय, सूर्योपासनेची पद्धती, सांबाची कथा, इतर मनोरंजक कथा, विश्वाचे उत्पत्ति-स्थिति-लय, भूत — वर्तमान — भविष्य हे काल, मंत्र, सांगोपांग समाहार, वशीकरणादी सहा कर्मे, मंडले, याग, दाने, उपवास, इत्यादी.

**सांबाची कथा** — वासुदेव श्रीकृष्णाचा सांब नावाचा एक अतिशय देखणा पुत्र होता. तो तारुण्यात आल्यावर सदैव कामक्रीडेतच निमग्न राहू लागला. एकदा नारदमुनी द्वारकेस आला असता सांबाने त्याचा आदर न करता त्याच्याकडे दुर्लक्ष केले. नारदाला त्या गोष्टीचा राग आला. पुढे एकदा श्रीकृष्ण रैवतक पर्वतावर आपल्या सर्व स्त्रियांसह जलविहार करीत असता

नारदमुनी तिथेही गेला. त्या सर्व स्त्रिया मद्य पिऊन धुंदपणे विहार करीत होत्या. त्या वेळी नारदाने आपल्या मागच्या अपमानाचे उट्टे काढायचे ठरवले. त्याने सांबाला तिथे बोलावून घेतले. सांबाला पाहताच रुक्मिणी, सत्यभामा व जांबवती वगळून इतर सर्व स्त्रिया सांबावर मोहित व कामाकुल झाल्या. ही गोष्ट श्रीकृष्णाच्या ध्यानात येताच त्याने सर्व स्त्रियांना व सांबालाही शाप दिला. त्या शापामुळे सांबाला कुष्टरोग जडला. तो रोग दूर होण्यासाठी सांब नारदाला शरण गेला. नारदाने त्याला सूर्याची उपासना करण्यास सांगितले. मग सांब चंद्रभागेच्या तीरावर असलेल्या मित्रवन नावाच्या पवित्र स्थळी गेला व तिथे तपाला बसला. कालांतराने सूर्य प्रसन्न झाला व त्याने सांबाला रोगमुक्त केले. मग चंद्रभागेत स्नान करताना त्याला नदीच्या पात्रात एक सूर्यप्रतिमा मिळाली. सांबाने एक मंदिर बांधून त्यात तिची प्रतिष्ठा केली.

या प्रतिमेचा इतिहास सूर्यानेच स्वतः सांबाला सांगितला, तो असा –

सूर्य निर्माण झाला आणि प्रकाशू लागला. पण त्याचे तेज अतिप्रखर होते. विश्वातल्या प्राणिमात्रांना ते सहन होईना. म्हणून मग विश्वकर्म्याने सूर्याला एका यंत्रावर घालून तासून काढले. ही घटना शाकद्वीपात घडली. त्यानंतर विश्वकर्म्याने कल्पवृक्षाच्या काष्ठापासून एक सूर्यप्रतिमा तयार केली आणि ती चंद्रभागेत सोडली.

ही कथा सांगून सूर्य सांबाला म्हणाला, की 'तुला सापडलेली प्रतिमा ही विश्वकर्म्याने जी घडवली तीच आहे.'

मग त्या प्रतिमेची उपासना कशी करावी, असे सांबाने विचारताच सूर्य म्हणाला–

'माझ्या उपासनेची पद्धती शाकद्वीपातल्या मग नामक ब्राह्मणांना माहीत आहे. तेव्हा तू त्या मगांना इकडे घेऊन ये.' नंतर सांबाने शाकद्वीपातून १८ मग कुटुंबे आणून मित्रवनात वसविली. या मित्रवनालाच पुढे सांबपूर असे नाव मिळाले.

चंद्रभागा ही पंजाबातल्या सिंधू नदीची उपनदी असून, सांबपूर म्हणजे सध्याचे मुलतान होय.

सांबपुराणातील इतर असंख्य विषय सूर्याची श्रेष्ठता सांगण्यासाठी आलेले आहेत.

या पुराणाचे मुख्य दोन भाग करता येतात. १–३८; ४४–४६ व ८४ एवढे अध्याय पहिल्या भागात मोडतात. ३९–४३ व ४७–८३ मिळून दुसरा भाग बनतो. हे दोन भाग भिन्न काळी, भिन्न व्यक्तींनी आणि भिन्न प्रदेशांत रचले आहेत, हे स्पष्ट दिसते. यांतील पहिला भाग चंद्रभागेशी संबंधित आहे व त्यात सांबाची कथा सांगितली आहे. दुसऱ्या भागात सांबाचा उल्लेखही नाही. तो भाग ओडिसातील कोणार्क येथील मंदिराच्या उत्पत्तीचा आणि तद्विषयक इतर गोष्टींचा आहे. पहिल्या भागात वेदांना श्रेष्ठत्व दिलेले असून, दुसऱ्या भागात तंत्रशास्त्राला प्राधान्य आहे. तांत्रिक प्रतीके, मंत्र, मंडले, मुद्रा, इ. तांत्रिक गोष्टींचे विवेचन दुसऱ्या भागात आहे.

प्रस्तुत पुराणाचा पहिला भाग इ. स. ५०० ते ८०० या कालखंडात रचला गेला असावा आणि दुसरा भाग इ. स. ९५० नंतर रचलेला असावा.

सांबपुराणाला सुसूक्ष्म असे दुसरेही नाव होते. याचा काही भाग गद्यात्मक असून, ४४ वा अध्याय सूत्रात्मक आहे. [ स्ट. उ.]

**साँयाजी** (इ. स. १५६५–१६४६) एक राजस्थानी कृष्णभक्त कवी. हा जातीने चारण असून, ईडर राज्यातील लीलछा गावच्या स्वामिदासाचा द्वितीय पुत्र होय. ईडरनरेश राव कल्याणमल हा याचा आश्रयदाता होता. रुक्मिणीहरण व नागदमण ही त्याची कृष्णपर दोन काव्ये उपलब्ध आहेत. पहिल्यात श्रीकृष्ण–रुक्मिणींच्या विवाहाचे वर्णन असून दुसऱ्यात कालियामर्दन कथा सांगितली आहे. शिवाय त्यात कृष्णाची किशोरावस्था, यशोदेचे वात्सल्य, कृष्णाचे गोपीप्रेम, इ. विषयही आहेत. एक प्रासादिक ग्रंथ म्हणून या ग्रंथाला बरीच मान्यता आहे. कवी काठियावाडी असल्यामुळे त्याची भाषा गुजरातीने प्रभावित अशी डिंगल आहे. [ रा. भा. सा. ]

**सांवता माळी** (इ. स. १२५० – १२९५) एक मराठी संतकवी. हा पंढरपूरजवळच्या अरणभेंडी या गावचा रहिवासी होता. याच्या वडिलांचे नाव परसूबा व आईचे नांगिताबाई असे होते. शेतीवर उदरनिर्वाह करून फावल्या वेळी हरिभजन करीत काळ कंठावा, असा या दांपत्याचा नित्यक्रम होता. परोपकारी वृत्ती व भगवद्भक्ती यांमुळे त्यांना पंचक्रोशीतले लोक फार मान देत. बराच वृद्धापकाळ होईपर्यंत त्यांना संतानप्राप्ती झाली नाही. शेवटी विठोबापुढे धरणे धरल्यावर, पांडुरंगाच्या कृपाप्रसादाने त्यांना एकच पुत्र झाला, तोच हा सांवता माळी होय.

सांवता माळी हाही आपल्या माता-पित्यांप्रमाणेच भगवद्भक्त निपजला. वयात आल्यावर भावनशे आडनावाच्या घराण्यातील जनाबाई नामक मुलीशी सांवतोबाचा विवाह झाला. परंतु संसारात असूनही त्याची वृत्ती दिवसेंदिवस जास्त जास्त विरक्त बनत चालली. एकदा तो भजनात दंग असता, त्याच्या सासुरवाडीची मंडळी त्याला भेटायला आली; परंतु सांवतोबाला त्यांचे स्वागत करण्याचे भान राहिले नाही. त्यामुळे

त्याची पत्नी त्याच्यावर रागावली. त्या प्रसंगी सांवतोबाने आपल्या पत्नीला पुढीलप्रमाणे उपदेश केला –



सांवता माळी

प्रपंचीं असूनि । परमार्थ साधावा ।
वाचे आठवावा । पांडुरंग ॥
उंच नीच कांहीं । न पाहे सर्वथा ।
पुराणींच्या कथा । पुराणींच ॥
घटका आणि पळ । साधी उतावीळ ।
वाउगा तो काळ । जाऊं नेदीं ॥
सांवता म्हणे कांते । जपें नामावळी ।
हृदयकमळीं । पांडुरंग ॥

सांवतोबाच्या पारमार्थिक अधिकाराविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी–

एकदा ज्ञानदेव व नामदेव यांना बरोबर घेऊन प्रत्यक्ष पांडुरंग लहूळ गावी कूर्मदासाला भेटायला चालला असता, वाटेत अरणभेंडी येथे थांबला आणि ज्ञानदेव-नामदेव यांना म्हणाला. 'थोडे थांबा. मी सांवतोबाला भेटून येतो.' ज्ञानदेव-नामदेव तिथेच थांबले. पांडुरंग मळ्यात शिरला व सांवतोबाला म्हणाला, 'माझ्यामागे दोन चोर लागले आहेत. त्यांच्यापासून मला आधी लपव.' सांवतोबाने क्षणाचाही विचार न करता जवळचे खुरपे घेऊन आपले पोट चिरले. मग पांडुरंगाने बालरूप धारण करून त्यात प्रवेश केला व सांवतोबाने त्यावर घोंगडी पांघरली. थोड्या वेळाने ज्ञानदेव आणि नामदेव पांडुरंगाला शोधीत मळ्यात आले. पाहतात तो सांवतोबा भजनरंगात दंग झालेला आणि पांडुरंगाचा पत्ता नाही. सांवतोबाला विचारले, तर तो सांगेना. शेवटी नामदेवाने व्याकुळ होऊन देवाला साद घातली, तेव्हा पांडुरंग सांवतोबाच्या पोटातून बाहेर आला. ते अद्भुत दृश्य पाहून ज्ञानदेव आणि नामदेव या दोघांना सांवतोबाचा पारमार्थिक अधिकार कळून आला.

सांवतोबाने काही अभंगांची रचना केली आहे. त्यांपैकी एक अभंग असा–

कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी ॥
लसूण मिरच्या कोथिंबिरी । अवघा झाला माझा हरी ।
ऊंस गाजर रताळू । अवघा झालासे गोपाळू ॥
मोट नाडा विहीर दोरी । अवघी व्यापिली पंढरी ।
सांवता म्हणे केला मळा । विठ्ठलपायीं गोंविला गळा ॥

आषाढ वद्य १४, शके १२१७ या दिवशी सांवतोबाने देह ठेवला. प्रतिवर्षी अरणभेंडी येथे त्याच्या पुण्यतिथीचा सोहळा साजरा होतो. [ प्रा. म. सं. ]

**सांसी** एक भटकी जमात. या जमातीचे लोक पंजाब, उत्तर प्रदेश, राजस्थान, मध्य प्रदेश व विदर्भ या प्रदेशांत आढळतात. भरतपूरचा रहिवासी सासमल हा यांचा मूळ पुरुष होय, अशी समजूत आहे. त्यालाच हे लोक आपला गुरू मानतात. त्याला हे मंगलशाह असेही म्हणतात. त्याच्या नावावरूनच यांना सांसी हे नाव मिळाले आहे.

हे लोक सदैव जंगलात भटकतात आणि शिकार करून हिंस्र पशूंचे मांस खातात. गाढवे, शेळ्या, बकरी, कोंबड्या, डुकरे व कुत्रे पाळणे व विकणे; गवत, वांबू यांच्या वस्तू विणणे व भिक्षा मागणे हे यांचे उद्योग होत. यांच्या बायका नाचगाणे करतात.

हे लोक नाचगाण्यात फार प्रवीण आहेत. स्त्रिया व पुरुष मिळून नाच करतात. होळीच्या दिवसांत तर नाचगाण्याला विशेष बहर येतो. नाचगाणे हे यांच्या जीवनाचे एक अंगच बनले आहे.

पंजाबातील जाट लोकांचे हे भाट आहेत. राजस्थानातले सांसी स्वतःला भाटच म्हणतात.

मात्र यांचा सामाजिक दर्जा भंग्यांपेक्षाही हीन आहे. भंग्यांचे उष्टे अन्न यांना चालते. भंग्यांचे हे चारणच आहेत. यांच्या स्त्रिया भंग्यांपुढे नाचतात व त्यांना धनी म्हणतात. यांच्यातील तंटे भंगी सोडवतात. हे स्वतःला ढोलियांपेक्षा श्रेष्ठ मानतात.

गावोगावी भटकून गुरे चोरणे, घरफोडी करून चोरी करणे वगैरे गुन्हेगारीबद्दल हे लोक एका काळी प्रसिद्ध होते. द. भारतातही यांच्या टोळ्या संचार करीत आणि दरवडे घालीत.

यांची अनेक कुटुंबे एकत्र वसती करतात, तेव्हा त्याला डेरा म्हणतात. सामान वाहण्यासाठी हे गाढवे बाळगतात.

पंजाबातले सांसी गुग्गा पीराची पूजा करतात; ज्वालामुखी व काली यांनाही भजतात. राजस्थानातले सांसी मानादेवीचे उपासक आहेत. होळी व दिवाळी या सणांत हे तिला बकऱ्याचा बळी देतात. हे लोक निंब, पिंपळ आणि वड या वृक्षांना पूज्य मानतात.

या लोकांच्या दोन पोटजाती आहेत. एकीचे नाव बीजा व दुसरीचे माला. यांच्यांत विवाहसंबंध होतात. पण त्यांच्या पोटभेदांत परस्पर विवाह होत नाहीत. राजस्थानातले सांसी मात्र अन्य प्रदेशांतल्या सांसींशी विवाहसंबंध करीत नाहीत.

**विवाहप्रथा** – तरुण-तरुणींचे आईबाप लग्न ठरवतात. खोवऱ्याच्या वाटचा वाटून विवाह निश्चित करतात. वराच्या बापाने वधूच्या बापाला देज म्हणून १००–२०० रुपये किंवा गाढवे



सांसी स्त्री

द्यावी असा नियम आहे. विवाहाचा दिवस केव्हाही सोयीप्रमाणे ठरवतात. विवाहविधीसाठी ब्राह्मण पुरोहिताची आवश्यकता नसते. अंगणात एक लाकडाचा खांब पुरतात, त्याला गवत बांधतात आणि वधू-वर त्याला सात फेऱ्या घालतात. वधूचा भाऊ किंवा वराची बहीण दोघांच्या वस्त्राची गाठ बांधते. त्यानंतर दोघे एकत्र बसून जेवतात. एका रोटीचे चौदा तुकडे करून ते दोघे खातात. मग वर वधूला घेऊन घरी जातो.

राजस्थानातील सांसींमध्ये विधवा विवाह रूढ नाही; पण मृत पुरुषाची बायको त्याच्या भावाजवळ राहू शकते. हे लोक स्त्रियांच्या नैतिक वर्तनाला फार जपतात. विवाहित सांसी स्त्रीशी व्यभिचार करणाऱ्या पुरुषावर १८ महिने बहिष्कार टाकतात. त्यानंतर त्याने जातीला जेवण घातले, की बहिष्कार उठवतात. जुने जोडे पाठीवर ठेवून वरात काढणे, लाडू फेकून मारणे, इ. शिक्षाही त्याला केली जाते. मात्र दुसऱ्या जातीतील स्त्रीशी संबंध ठेवल्यास इतकी कडक शिक्षा करीत नाहीत. थोडा दंड करून आरोपीला सोडून देतात.

बाळंतपणी जी स्त्री मरण पावते तिचे भूत फार त्रास देते, अशी त्यांची समजूत आहे. अशा भुतांचा बंदोबस्त करणारे मांत्रिक यांच्यांत आहेत. त्यांना शांत करण्यासाठी त्यांच्या नावाने लहान मुलांना जेवायला घालण्याचीही चाल आहे.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते जाळतात. अंत्यक्रिया इतर हिंदू जातींप्रमाणेच करतात. [ रा. जा.; एन्सा. रि. ए.; रा. लो. गी.]

## साईदास

(इ. स. १४६२–१५४३) एक हिंदी संतकवी. याचा जन्म पंजाब प्रदेशाच्या गुजराणवाला जिल्ह्यात बद्दोकी नावाच्या गावी झाला. हा सारस्वत ब्राह्मण असून, रामानंदी संप्रदायाचा अनुयायी होता. नरहरी हा त्याचा गुरू असावा. अभ्यासकांच्या मते शिखांच्या आदिग्रंथात याचा उल्लेख असून, गुरू नानकाबरोबर त्याची चर्चाही झाली होती. ज्ञानरत्न नावाचा एक ग्रंथ त्याने रचला आहे. त्यात सगुण व निर्गुण या उभय विचारधारा आढळतात. त्याने योगमार्गाचाही अभ्यास केला होता. ज्ञानरत्न या ग्रंथाची भाषा ब्रज आहे आणि तिला मुलतानीचा स्पर्श झालेला आहे. [ पं. हिं. सा. इ. ]

## साईबाबा

( इ. स. चे १९ वे व २० वे शतक ) आधुनिक काळातील एक संत. साईबाबा हे मूळचे कुठले, त्यांचे नाव-गाव काय, ते कोणत्या जातीचे किंवा धर्माचे, इ. सर्वच गोष्टी अज्ञात आहेत. ते नगर जिल्ह्यातल्या शिर्डी गावी प्रगट झाले. तेव्हापासून त्यांच्या निर्याणापर्यंतचे त्यांचे चरित्रही अनेक चमत्कारांनी व दंतकथांनी भरलेले आहे.

हातात एक पत्र्याचे टमरेल, खांद्याला मळकट कापडाची एक झोळी, अंगात कफनीसारखा ढगळ अंगरखा, डोक्याला फकिरासारखे फडके बांधलेले, अशा वेषात साईबाबांनी शिर्डीत प्रथम प्रवेश केला, तेव्हा त्यांचे नावही कोणाला माहीत नव्हते. शिर्डी गावाबाहेरच्या खंडोबाच्या देवळाजवळ ते येऊन थांबले, तेव्हा

तिथल्या लोकांनी त्यांना मुसलमान समजून देवळात प्रवेश करण्यास प्रतिबंध केला. त्यामुळे ते देवळाबाहेरच्या वटवृक्षाखाली चिलिम फुंकीत बसून राहिले. एवढ्यात त्या खंडोबाच्या देवळाचे मालक म्हाळसापती सोनार तिथे आले व त्या फकिरास म्हणाले, 'आवो, साईबाबा !' तेव्हापासून सर्व लोक त्यांना साईबाबा याच नावाने ओळखू लागले.



साईबाबा

म्हाळसापतीने साईबाबांना शिर्डी गावात आणून, त्यांची चांगल्या जागेत व्यवस्था केली. यानंतर देह ठेवीपर्यंत साईबाबा शिर्डीतच राहिले. लवकरच शिर्डीतल्या आबालवृद्ध जनांना त्यांच्या ठिकाणच्या अलौकिक सामर्थ्याचा प्रत्यय आला व ते त्यांच्या भजनी लागले.

सामान्यपणे साईबाबांना दत्तात्रेयाचे अवतार समजले जाते, ते त्यांच्या फकिरी बाण्यामुळे. परंतु खुद्द त्यांनी कोणास दत्तोपासना सांगितली नाही. ते स्वतः रामोपासक होते. प्रसंगपरत्वे ते कोणास हनुमंताची, कोणास रामाची, तर कोणास शंकराची भक्ती करण्याचा उपदेश करीत. त्यांचा प्रयत्न चमत्कार करून लोकांचे लक्ष ईश्वरभक्तीकडे वेधण्याचा असे. अगदी आरंभी दुकानदाराने पणतीत घालायला तेल दिले नाही, म्हणून त्यांनी नुसते पाणी घालून पणती पेटवली व लोकांना चकित केले. त्याचप्रमाणे त्यांनी अनेकांची शारीरिक व्याधी दूर केली, कोणाची पिशाचबाधा घालवली, तर पुष्कळांना धन-धान्यसमृद्ध केले. साईबाबांना योगविद्याही अवगत होती.

साईबाबा जिथे राहत, त्या जागेला ते द्वारकामाई असे म्हणत. तिथे सतत एक धुनी पेटलेली असे. त्या धुनीतली उदीच ते भक्तमंडळींना प्रसाद म्हणून देत. ते गावात भिक्षा मागून खात. कुत्री, गाढवे, बेवारशी जनावरे, अनाथ-अपंग, आजारी-रोगी या सर्वांवर ते फार प्रेम करीत.

वऱ्हाडचे दादासाहेब खापर्डे, संतकवी दासगणू, साकोरीचे उपासनीबाबा ही सारी साईबाबांची शिष्यमंडळी होत.

साईबाबांनी कधी कनवाळूपणाने, कधी धाकदपटशा दाखवून, कधी नीट समजूत घालून, तर प्रसंगी नुसत्या हस्तस्पर्शाने अनेकांना परमार्थाला लावले. सर्वांभूती समभाव बाळगावा व नीतीने राहावे, अशी त्यांची शिकवण असे.

दि. १५ ऑक्टो. १९१८ या दिवशी साईबाबा शिर्डी येथे निजधामाला गेले. त्यांच्या निर्याणानंतर शिर्डी येथे त्यांचे भव्य समाधिमंदिर बांधले असून, यात्रेकरूंच्या राहण्या-जेवण्याची सोयही उत्तम प्रकारे केली आहे. [ श्री द. ज्ञा. को. ]

**साकंप्रस्थायीयेष्टी** पशुसमृद्धी व्हावी म्हणून अमावास्येच्या दिवशी दर्शेष्टीऐवजी ही इष्टी करतात. या इष्टीमध्ये अग्नीसाठी पुरोडाश आणि इंद्र अथवा महेंद्र याच्यासाठी पुरोडाश व सान्नाय हे हवी तयार करतात. अमावास्येला अनेक गाईंचे दूध काढायला सांगितले आहे. दुसऱ्या दिवशीही बऱ्याच गाईंचे दूध काढायचे असते. यागाच्या वेळी एकाधिक उंबराचे चमस घेऊन, त्यांतून दुधाचा याग करायचा असतो. उंबराच्या पात्रात सान्नाय (दूध व दही) एकत्रित घेऊन मग याग करावा, असे काही सूत्रकारांचे मत आहे (बौधा. श्रौ. सू. १७. ४८). त्याचप्रमाणे दोन सायंदोह व दोन प्रातर्दोह करावे, असेही म्हटले आहे. उंबराच्या निरनिराळ्या पात्रांत दही व दूध घेऊन त्यांचा एकदम याग करतात. यागासाठी हे सर्व कुंभ एकदम घेऊन जातात म्हणून या यागाला साकंप्रस्थायीय असे म्हणतात. या यागाचे सर्व विधान तैत्तिरीय संहितेत आहे (२.५.४). [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**साकमेध** चातुर्मास्ययागातील तिसरे पर्व. हे पर्व कार्तिक किंवा मार्गशीर्ष पौर्णिमेला दोन दिवस करतात. क्रीडियात अनीकवतीष्टी, सांतपनेष्टी, गृहमेधीया, पूर्णदर्व्य, क्रीडिनीष्टी, महाहविषेष्टी, पितृयज्ञ, त्र्यंबकहवी व आदित्येष्टी इतके

[याग] असतात. या निरनिराळ्या यागांचा विधी पुढीलप्रमाणे — आदल्या दिवशी सकाळी अनीकवान् अग्नीला अष्टाकपाल पुरोडाश, मध्याह्नीला सांतपन मरुतांना चरू आणि सायंकाळी गृहमेधी मरुतांना, यजमानाच्या जेवढ्या दुभत्या गाई असतील त्या सर्वांच्या दुधात शिजविलेला चरू, ही हविर्द्रव्ये अर्पण करतात. या चरूसंबंधीचे विधान असे, की तो जर जास्त शिजविलेला असेल, तर रात्री पुरोहित व यजमानाच्या घरची मुंज झालेली मुले तो पोटभर खातात आणि भूक किंवा गरिबी याबद्दल काही न बोलता झोपतात. त्या रात्री दुभत्या गाई वासराजवळ सोडतात. परंतु जे वासरू लुचवून दुसऱ्या दिवशी दूध काढायचे असते, त्याला तेवढे बांधून ठेवतात. दुसऱ्या दिवशी यजमान गृहमेधी मरुतांसाठी शिजविलेल्या चरूची खरवड व कढ दर्वीत (पळीमध्ये) घेतो व होम करतो. अध्वर्यू मग यजमानाला एक बैल आणायला सांगतो आणि त्याला हंबरायला लावतो. त्या हंबरण्याबरोबर यजमान दर्वीतील चरूची गार्हपत्याग्नीवर आहुती देतो. बैल हंबरला नाही तर तो ब्रह्माच्या आदेशावरून आहुती देतो. हा बैल अध्वर्यूला दक्षिणा म्हणून मिळतो. यानंतर क्रीडिन् मरुतासाठी इष्टी करून त्याला सप्तकपाल पुरोडाश व अदितीला चरू अर्पण करतात.

यानंतर महाहवी होतो. त्यात आठ देवतांना आठ आहुती देतात. चातुर्मास्यातील पाच सामान्य आहुतींखेरीज इंद्राग्नीला द्वादशकपाल पुरोडाश, महेंद्राला चरू व विश्वकर्म्याला एककपाल पुरोडाश अर्पण करतात. महाहवींची दक्षिणा एक बैल असते.

मग महापितृयज्ञनामक पितृयाग होतो.

साकमेधातील अखेरचा विधी म्हणजे त्र्यंबकहोम होय. हा रुद्राच्या नावाने करतात. (चातुर्मास्य याग पाहा)

आपस्तंबाच्या मताप्रमाणे पांढरा घोडा, पांढरा बैल किंवा पांढऱ्या ठिपक्यांचा बैल ही याची दक्षिणा होय.

साकमेधांनी प्रतिष्ठा प्राप्त होते, त्र्यंबकहवीमुळे रुद्र संतुष्ट होतो आणि पितृयज्ञाने स्वर्गप्राप्ती होते, अशी त्याची फलश्रुती तैत्ति. ब्राह्मणात सांगितली आहे. [ हि. ध.; श्रौ. य. प. ]

**साकेत** कोसल देशातील एक प्रमुख नगर. हे श्रावस्तीपासून सात योजने दूर होते, असे बौद्ध ग्रंथांवरून समजते. उत्तर प्रदेशातील उन्नाव जिल्ह्यात, सई नदीच्या काठी सजनकोट नामक स्थानी जे प्राचीन नगराचे अवशेष आहेत, ते साकेत नगराचे होत, असे मानले जाते. बहुतेक पंडित अयोध्या व साकेत ही एकाच नगरीची भिन्न नावे मानतात. पण ऱ्हिस डेव्हिड्स यांच्या मते बुद्धाच्या वेळी ही दोन वेगळी नगरे होती. साकेत हे प्रसिद्ध व्यापारकेंद्र होते. गौतम बुद्ध अनेक वेळा या नगरात राहिला होता. पाली ग्रंथांत तिथल्या अंजनवन व कालकाराम नामक विश्रामगृहांचा उल्लेख आहे. त्यांत गौतम बुद्ध विसावा घेत असे.

हे जैनांचे तीर्थक्षेत्रही आहे. जिनप्रभ सूरीच्या विविधतीर्थकल्प नामक ग्रंथात, हे स्थान घग्घर व सरयू नद्यांच्या संगमावर असून, ते स्वर्गद्वार असल्याचा उल्लेख आहे. पाहा—अयोध्या. [ प्रा. भा. न. न. जी.; प. का. भा.; बौ. का. भा.; भा. प्रा. जै. ती. ]

**साखीसरवर** एक पवित्र क्षेत्र. पंजाबमधील डेरागाझीखान जिल्ह्यात सुलेमान डोंगरावर हे ठिकाण असून, तिथे साखीसरवर नावाच्या मुस्लिम साधूचे स्मारक आहे. त्या स्थानाला निगाहा असेही म्हणतात. साखीसरवर हा 'लखदाता' व 'सुलतान' या नावांनीही प्रसिद्ध आहे. त्याचे खरे नाव सय्यिद अहमद असून, तो इ. स. च्या १२व्या ते १६व्या शतकांत केव्हातरी होऊन गेला. त्याच्या नावाभोवती अनेक अद्भुत कथा रचल्या गेल्या आहेत. वरील ठिकाणी त्याचे, त्याची बायको बीबीराए हिचे आणि त्याने ज्या दैत्यावर मात केली, त्याचे अशी तीन थडगी आहेत. तिथे अनेक रोगी रोगनिवारणासाठी जातात व बरे झाल्यानंतर प्रत्येकजण एक सुशोभित उशी तिथल्या भिंतीवर टांगून ठेवतो. ज्याची दृष्टी सुधारते तो चांदीचे व सोन्याचे नेत्र थडग्याला अर्पण करतो. तिथे गेल्यामुळे भूतबाधा बरी होते व अपत्यलाभही होतो, अशी लोकांची श्रद्धा आहे.

या साधूच्या अनुयायांना सुल्तानी म्हणतात. भरई नावाचे त्यांचे उपाध्याय असतात. ते भैरव या हिंदू दैवताचीही उपासना करतात. [ एन्सा. रि. ए. ]

**सागर** (१) बंगालमध्ये हुगळी नदीच्या मुखाजवळ असलेले एक बेट. हे स्थान पवित्र तीर्थक्षेत्र मानले जाते. जानेवारी महिन्यात मकर संक्रांतीच्या दिवशी सर्व भारतातून असंख्य भाविक लोक समुद्रस्नानासाठी इथे जमतात. या तीर्थात स्नान केल्यामुळे सर्व पापांचे क्षालन होते, अशी त्यांची श्रद्धा असते. तिथे प्राणत्याग केला असता मनुष्य तत्काल परमेश्वररूप होतो, या श्रद्धेमुळे गेल्या शतकापर्यंत इथे अनेक स्त्रीपुरुष आपला देह सागरार्पण करीत असत.

अयोध्येचा राजा सगर याच्यावरून या स्थानाला सागर हे नाव मिळाले आहे. त्याची कथा अशी—

सगर राजाने १०० अश्वमेध यज्ञ करण्याचा संकल्प केला होता. त्याने ९९ यज्ञ पूर्ण केले तेव्हा, आपले इंद्रपद जाईल या भयाने इंद्र चिंताग्रस्त झाला. राजाने शंभरावा अश्वमेध सुरू केला, तेव्हा इंद्राने यज्ञाचा अश्व चोरला व पाताळात नेऊन लप-

वला. सगर राजाचे ६०,००० पुत्र अश्वाचा शोध करीत पाताळात पोचले. तिथे कपिल मुनी तप करीत होते. त्यांनी अश्व चोरला असेल, असे वाटून सगरपुत्रांनी त्यांना दोष दिला. तेव्हा ते कोपले व त्यांनी सर्व सगरपुत्रांना भस्मसात केले. त्यांना मोक्ष मिळावा म्हणून सगराचा पणतू भगीरथ याने तप केले, स्वर्गातील गंगा पृथ्वीवर आणली व हिमालयातून ती पाताळापर्यंत नेली. तिथे गंगाजलाने त्याच्या पितरांची रक्षा पुनीत झाली. सगराचे पुत्र सागर जिथे भस्मसात झाले व पुढे मोक्ष पावले तेच हे स्थान सागर या नावाने प्रख्यात आहे.

या बेटावर कपिलमुनींचे मंदिर आहे. [ एन्सा. रि. ए. ]

(२) एक जात. हे लोक मुख्यतः गुजरातमधील काठियावाड, महीकाठा, अहमदाबाद व भरूच या भागात आढळतात. सूर्यवंशातील सगर राजापासून आपली उत्पत्ती झाली, असे हे मानतात. गंगेच्या खोऱ्यातून हे सगराचे वंशज प्रथम भिलवाडा येथे गेले व तिथून गुजरातेत पसरले.

गुजराती आणि सोरठिया असे यांचे मुख्य पोटभेद आहेत. उद्योगावरूनही यांच्यांत आणखी पोटभेद उत्पन्न झालेले आहेत. उदा० पथार(पाथरवट), भेसानिया(म्हशी पाळणारे), कलथिया(कलथी नामक धान्य पिकवणारे शेतकरी), इत्यादी. या पोटभेदांतील स्त्री-पुरुषांचा लग्नसंबंध होऊ शकतो. मात्र एकाच पोटभेदातील स्त्रीपुरुषांचे लग्न होत नाही. सोरठिया व गुजराती या मुख्य पोटभेदांतील स्त्रीपुरुषांचा विवाह करीत नाहीत. मात्र तो निषिद्ध मानला जात नाही.

यांच्यांत आते, मामे किंवा मावस भावंडांचे लग्न करीत नाहीत. पुरुषाला बायकोच्या बहिणीशी लग्न करता येते. दोन भाऊ दोन बहिणींशी लग्न करू शकतात.

मुलींची लग्ने वयाच्या १२ व्या वर्षाच्या आधी व मुलांची २० व्या वर्षापूर्वी केली जातात. काही कारणाने मुलीचे लग्न लांबले तरी, ते वीस वयाच्या आत व्हायलाच पाहिजे, असा दंडक आहे. लग्नापूर्वी लैंगिक संबंध निषिद्ध असून, तसा कोणी केलाच तर त्याला त्या मुलीशी लग्न करावे लागते किंवा जातपंचायतीला दंड भरावा लागतो. अन्यथा मुलीच्या कुटुंबावर बहिष्कार टाकला जातो.

**विवाहप्रथा** – मुलीचा बाप सगाईची बोलणी सुरू करतो. जातीतले वयस्क लोक त्याला मदत करतात. मुलाचा बाप मुलीच्या बापाला देज म्हणून १००–२०० रुपये देतो. लग्न ठरल्यानंतर मुलीचा बाप मुलीला वस्त्रालंकार पाठवतो. लग्नाच्या आदल्या दिवशी वधू-वरांच्या हाताला मिंडोल नावाचे फळ बांधतात आणि दोघांच्या कपाळाला व गालांना हळद लावतात.

लग्नाच्या दिवशी वराकडील मंडळी वधूगृही जातात. तिथे वराला नारळ देऊन त्याचे स्वागत केले जाते. पुरोहित त्याच्या कपाळी कुंकुमतिलक व अक्षता लावतो.

लग्नमंडपाच्या चारही कोपऱ्यांत सात सात घटांची उतरंड असते. मंडपात एका ओटयावर क्षेत्रपालाची स्थापना केलेली असते. वधू-वर त्याला चार प्रदक्षिणा घालतात. हाच मुख्य विवाहविधी होय. मग वराचे लोक वधूसह परत जातात.

या लोकांत विधवाविवाह रूढ आहे. काडीमोडही रूढ आहे. मात्र फक्त पतीला तो अधिकार असतो, पत्नीला नाही. पागोट्याचा तुकडा फाडणे हे काडीमोडीचे प्रतीक समजतात.

**देवधर्म** – हे लोक रामसनेही पंथाचे अनुयायी आहेत. शिव, विष्णू, गणपती, राम, कृष्ण, देवी, इ. सर्व देवतांची उपासना हे करतात. चामुंडा, हरदत्त, खोडियार, महामाया या त्यांच्या कुलदेवता होत. रामदेपीर या साधूला ते भजतात. यांच्या गुरूंना गोंधळी म्हणतात. यांचा धर्मप्रमुख मारवाडात शाहापूर येथे असतो. हे लोक भारतातील सर्व तीर्थक्षेत्रांची यात्रा करतात व सर्व सणही साजरे करतात. गायीला पूज्य मानतात. दसऱ्याच्या दिवशी शस्त्रपूजन करतात. इस्लामपीर यालाही हे फार मान देतात व त्याला नारळ वाहतात. ते नारळ फोडून सर्वांना वाटतात. एखाद्या रोगाची साथ पसरते तेव्हा हे लोक खोडियार या दैवताला धान्य, नारळ वगैरे पदार्थ अर्पून शांत करतात. राज खेडवाल ब्राह्मण हे या लोकांचे पौरोहित्य करतात.

हे लोक मांसमच्छर खात नाहीत. हीन जातीच्या माणसाने मातीच्या भांड्यात शिजवलेले अन्न यांना चालते. पूर्वी हे लोक जमीनदार होते. पण आता बहुतेक सर्वजण साधे शेतकरी आहेत. काहीजण पाथरवटाचे काम करतात आणि काही मोलमजुरी करतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक सामान्यपणे मृतांना जाळतात; पण साधू व लहान मुले यांची प्रेते पुरतात. देवी, महारोग व पटकी या रोगांमुळे मेलेल्यांनाही पुरतात. सर्पदंशामुळे मेलेल्या माणसांना जाळतात. साधूचे प्रेत बसल्या स्थितीत उत्तरेकडे तोंड करून पुरतात व इतरांची प्रेते उत्तरेकडे डोके करून आडवी पुरतात. प्रेतदहनानंतर तिसऱ्या दिवशी राख एका मडक्यात ठेवून त्यावरच्या झाकणावर भाताचा पिंड ठेवतात व ते मडके नदीत टाकतात. अस्थी गिरनार पर्वतावर नेऊन तिथल्या तळ्यात टाकतात. या लोकांत पितरांसाठी श्राद्ध करण्याची प्रथा आहे. [ ट्रा. का. वाँ. ]

## सागरगोट्यांचा खेळ

मुलींचा एक खेळ. पाच, सात, नऊ किंवा अकरा सागरगोटे घेऊन मुली हा खेळ खेळतात. पाच सागरगोट्यांच्या खेळाला पाचखाच, साताच्या सातभात, नवाच्या नऊखऊ आणि अकराच्या अकरा

करा अशी नावे आहेत. प्रथम सगळे सागरगोटे उजव्या हातात घेऊन ते एकदम जमिनीवर टाकतात. त्यांतून एक वर टाकण्यासाठी उचलून हातात घेतात. याला खडा घेणे, असे नाव आहे. खडा वर टाकायचा आणि तेवढ्यात जमिनीवरचा एक सागरगोटा, इतर सागरगोट्यांना धक्का न लावता उजव्या हाताने उचलून वरचा खडा झेलायचा, असे या खेळाचे स्वरूप आहे. असे सगळे सागरगोटे एकेक करून घ्यायचे. याला एरखई असे म्हणतात. खडा वर टाकून जमिनीवरचे दोन सागरगोटे उजव्या हाताने घेऊन, त्याच हाताने वरचा खडा झेलायचा, याला दुरखई असे नाव आहे. अशाच क्रमाने तिरखई, चौखई, पाचखई, सहाखई, सातखई, आठखई, नऊखई व दहाखई खेळतात. त्यानंतर हंडी खेळतात. हंडीचे वेगवेगळे प्रकार आहेत. त्यांपैकी एक पुढीलप्रमाणे –

ओंजळीत सगळे सागरगोटे घेऊन ते वर फेकतात आणि पुन्हा दोन्ही हातांच्या पाठीवर झेलतात. झेलताना एखादा सागरगोटा खाली जमिनीवर पडला, तर डाव जातो. खडा खळता आला नाही, जमिनीवरचे सागरगोटे उचलता आले नाहीत किंवा उचलताना इतर सागरगोट्यांना धक्का लागला, तरी डाव जातो आणि दुसरी मुलगी एरखईपासून खेळायला सुरवात करते.

**सागरनंदी** नाट्यशास्त्रातील एक आचार्य. त्याचे मूळ नाव सागर असून, तो नंदी कुलात जन्मला म्हणून त्याला सागरनंदी असे म्हणू लागले. तो जैन क्षपणक असावा, अशी एक समजूत आहे. त्याच्या कालासंबंधी अभ्यासकांमध्ये बरेच मतभेद आहेत. आचार्य बलदेव उपाध्याय यांच्या मते तो इ. स. च्या १५ व्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला. अन्य काही पंडित त्याला इ. स. च्या ११ व्या शतकातला मानतात.

नाटकलक्षण रत्नकोश हा त्याचा नाट्यशास्त्रावरील एक महत्त्वपूर्ण ग्रंथ होय. त्याने श्रीहर्ष, विक्रम, मातृगुप्त, गर्ग, अश्मकुट्ट, इ. आचार्यांच्या मतांची चर्चा करून, भरत मुनीच्या सिद्धांताबरोबर आपल्या मतांची तुलना करण्याची इच्छा व्यक्त केली आहे. त्याच्या ग्रंथात रूपक, अवस्थापंचक, भाषाप्रकार, अर्थप्रकृती, अंक, उपक्षेपक, संधी, प्रदेश, पताकास्थान, वृत्ती, लक्षण, अलंकार, रस, भाव, नायिकांचे गुण-भेद, रूपक प्रकार व उपरूपक प्रकार या विषयांची चर्चा आहे. नाटकासाठी लागणाऱ्या साहित्याचेही वर्णन यात आढळते. याशिवाय जी अन्य वैशिष्ट्ये आढळतात, ती अशी –

अभिनव गुप्ताच्या मते वर्तमान राजाचे चरित्र हा नाटकाचा विषय होऊ शकत नाही. पण हा नाट्यविषय होऊ शकतो असे सागरनंदीचे मत आहे. शिवाय तो वृत्तिविभाजनाच्या प्रसंगी भरताचे अनुकरण न करता कोहलाचे अनुकरण करतो.

सागरनंदीने जानकीराघव नावाचे एक नाटक लिहिले असावे असे वाटते. छंदःशास्त्र, संगीत, निघंटू, इ. विषयांवरही त्याने विपुल लेखन केले आहे. [ सं. सा. इ. शास्त्रखंड.; कं. सं. लि. ]

**सागरमती** एक बौद्ध देव. हा शुभ्रवर्ण असून, सागरलहरी किंवा शंख हे त्याचे अभिज्ञान आहे. निष्पन्नयोगावलीनुसार, तो दोन्ही हात पसरून बोटांनी लाटा दर्शवीत



सागरमती

असतो. धर्म-धातू वागीश्वर मंडलानुसार त्याच्या उजव्या हातात शंख आणि डाव्या हातात वज्रखड्ग असते. [ इं. बु. इ. ]

**सागरव्रत** एक मासव्रत. याची चतुर्मूर्ती-व्रतांत गणना करतात. श्रावण महिन्यापासून चार महिने हे व्रत करतात. या व्रताचा विधी असा – वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध ही हरीची चार स्वरूपे चार सागरांची प्रतीके मानावी आणि त्या प्रतीकांसाठी पाण्याने भरलेल्या चार पात्रांची पूजा करावी. व्रतकालात नदीचे स्नान करावे. रोज होम करावा. कार्तिकाच्या अखेरीला ब्राह्मणांचा सन्मान करून त्यांना तिळाचे तेल दान द्यावे. फल– स्वर्गप्राप्ती. [ हि. ध. ]

**सागरेश्वर** महाराष्ट्रातील एक प्राचीन शिवस्थान. हे ठिकाण सांगली जिल्ह्यातील देवराष्ट्रे नामक गावी आहे. पुणे-मिरज लोह मार्गावरील ताकारी स्टेशनपासून हे दोन मैल अंतरावर आहे. इथे सुमारे चाळीस-पन्नास लहान मोठी शिवमंदिरे असून, त्या सर्वांची बांधणी एकसारखीच आहे. त्यांपैकी प्रमुख मंदिर सागरेश्वर या नावाने ओळखले जाते. त्याचे बांधकाम हेमाडपंती वळणाचे आहे. या भागात पूर्वी फुत्तांड नावाचे राष्ट्र होते. त्या वेळची ही बांधणी असावी असे वास्तुशास्त्रज्ञांचे मत आहे. मंदिरात बरेच शिलालेखही आहेत. श्रावणातल्या दर सोमवारी इथे यात्रा भरते. सागरेश्वर माहात्म्य नामक पोथीत या देवस्थानाचा इतिहास सांगितला आहे.

या शिवालयात पाण्याची तीन टाकी आहेत. मंदिरासमोर विमलतीर्थ नावाचे पाण्याचे एक कुंड आहे. ते कुंतल नरेशाने बांधले असे सांगतात. कुंडातील पाणी औषधी असून, या पाण्याने स्नान केले असता कोड, कुष्ठरोग, इ. रोग बरे होतात, असा समज आहे. [ म. जि.–सांगली.; प्रसाद, ऑगस्ट १९७० ]

**साटेलोटे** एक विवाहप्रकार. आपल्या घरची मुलगी ज्या घरी दिली असेल त्याच घरची मुलगी आपल्या घरी आणणे, अशा परस्पर सोयरीक संबंधाला हे नाव आहे. भारताप्रमाणे भारताबाहेरही हा विवाह प्रकार रूढ होता. दोन घराण्यांत अथवा दोन कुटुंबांत परस्पर स्नेहसंबंध दृढ व्हावे, यासाठी जुन्या काळी या विवाहप्रकाराची मदत होत असावी. विनिमयविवाह हा याच विवाहाचा एक भाग असावा. पाहा – विवाह.

**सात** एक महत्त्वपूर्ण अंक. प्राचीन काळापासून भारतीयांनी सात या आकड्याला महत्त्व दिलेले आहे. त्यांनी सप्त ऋषी मानले. त्यांच्या मातृकांची, स्वर्गांची, समुद्रांची, पातालांची, पवित्र नद्यांची, पवित्र द्वीपकल्पांची, प्रमुख क्षेत्रांची, कुलपर्वतांची संख्या सातच आहे. वैदिक वाङ्मयात सात प्रकारचे आनंद, सप्त रत्ने, अग्नीच्या सात जिव्हा किंवा ज्वाला, सप्त किरण, सप्त छंद, सप्त खेळ, सप्त स्वर, सप्त यज्ञ, सप्त गाई, सप्त अश्व यांचे उल्लेख अनेकवार येतात. सप्तक किंवा सात दिवसांचा काळ हा वैद्यक शास्त्रात औषधयोजनेकरिता स्वीकारलेला आहे. रोगातील फरक प्रत्येक सात दिवसांनंतर पडत असतो. सात दिवसांच्या पटीचा म्हणजे एकवीस किंवा एकूणपन्नास दिवसांचा काळही शुभ मानतात. जप किंवा मौन सात दिवसांसाठी धरतात. पवित्र धार्मिक ग्रंथांचे पारायणही सात दिवस करतात. वैदिक पद्धतीच्या विवाहात सप्तपदी झाल्यावाचून विवाहविधी पूर्ण होत नाही. वांझपणा घालवण्यासाठी स्त्रीला सात विहिरींचे पाणी स्नानासाठी देतात. मारुतीला सात प्रकारची धान्ये किंवा सात पक्वान्नांचा नैवेद्य अर्पण करतात.

लोककथांतही सात हा आकडा अनेकदा येतो. त्यांत सात समुद्रांचा उल्लेख वारंवार येतो. 'साता समुद्रांपलिकडे' हा वाक्प्रयोग प्रसिद्ध आहे. लोककथांतील नायक सात डोंगर किंवा सात वने ओलांडताना आढळतो. [ की. पाँ.; लो. सा. रू.; भा. प्र. वि.]

**सातपुडा** महाराष्ट्राच्या उत्तर सीमेवरील एक पर्वत. सह्याद्री व सातपुडा हे पर्वत एकमेकांशी काटकोनात पसरले आहेत. ते भिन्न व स्वतंत्र आहेत, अशी समजूत आहे. पण श्री. स. आ. जोगळेकर यांच्या मते सातपुडा हा सह्याद्रीचाच एक भाग आहे.

सातपुडा हा पर्वत अमरकंटकापासून सह्याद्रीपर्यंत पूर्व-पश्चिम असा पसरलेला आहे. त्याची लांबी सुमारे सहाशे मैल असून, रुंदी वीस ते शंभर मैल आहे. सातपुड्याची सर्वसाधारण उंची सुमारे दोन हजार फूट आहे. या पर्वताचे एकामागे एक असे सात निरनिराळे डोंगर आहेत, म्हणून याला सातपुडा हे नाव मिळाले आहे. आखराणी (४३४६), पंचमढी (४३५८), आणि अमरकंटक (३४३३) ही सातपुड्याची अत्युच्च शिखरे होत. तोरणमाळ व पंचमढी ही याच्यावरची विस्तीर्ण पठारे आहेत.

सातपुड्याच्या पूर्व भागात तापी नदी उगम पावते व पश्चिमेकडे वाहत जाते.

सह्याद्रीप्रमाणे सातपुड्यावरही घनदाट अरण्ये होती व त्यांत भिल्ल व गोंड यांची वसती होती. आता ती अरण्ये कमी झाली आहेत. पाहा – सह्याद्री. [ सह्याद्रि; सु. वि. को. ]

**सात बाहिणी** या सात ग्रामदेवता असून, द. भारतात त्यांची स्थाने आहेत. कोकणातील चौल या गावी सात देवतांची मंदिरे आहेत. चंपावती, शीतला, एकवीरा, पद्मावती, कळलागी, हिंगुळजा व चतुर्सिती अशी त्या देवतांची नावे आहेत. यांपैकी चंपावती ही ग्रामदेवता आहे. चौल म्हणजे पूर्वीची चंपावती नगरी होय. सांप्रत चंपावतीचे मंदिर अस्तित्वात नाही. चौल-चंपावती हे नाव इथल्या सोनचाफ्याच्या झाडामुळे पडले, असे म्हणतात. पूर्वी इथल्या सोनचाफ्याच्या झाडाची पूजा करीत.

या सर्व देवतांत हिंगुळजेचे महत्त्व फार असून, तिची दरवर्षी यात्रा भरते. हिच्या कुंडात फुले टाकली, तर ती काशीतल्या गंगेत वर येतात, अशी समजूत आहे.

या देवतांपैकी कळलागीची कथा मिळते; पण मुळात ती चंपावतीची कथा असावी. ही कथा अशी– कळलागीला सोनचाफ्याची फुले फार प्रिय होती. तिच्या एका श्रीमंत भक्ताने

रोज एक हजार रौप्यमुद्रांची सोनचाफ्याची फुले खरीदून त्यांची माळ करून तिला घालण्याचे व्रत घेतले. एकदा बाजारात त्याला फुले मिळाली नाहीत. तेव्हा एका झाडावरचे एकच फूल त्याला दिसले. त्यासाठी त्याने सहस्र रुपये मोजले आणि ते एकच फूल दोऱ्यात ओवून देवीच्या गळ्यात घातले. त्यासरशी जणू काही हजार रौप्यमुद्रांच्या भाराने तिची मान वाकडी झाली. देवी कोपली व तिच्या कोपामुळे तो भक्त निर्धन झाला.

कर्नाटक, तेलंगण व तमिळनाडू या प्रदेशांत सात बहिणींचे खूप माहात्म्य आहे. या फार तामसी, रक्तलोलुप व रोगांच्या अधिष्ठात्या म्हणून प्रसिद्ध आहेत. मरी किंवा शीतला ही सर्वांत मोठी असून, देवीच्या रोगाची व महामारीची ती देवता आहे.

तेलंगणात पेड्डम्म, इसोदम्म, मरीअम्म, अंकलम्म, एल्लम्म, नकुलम्म आणि अरिकम्म या नावांनी या प्रसिद्ध आहेत; तर नेल्लोर जिल्ह्यात त्या पोलेरम्म, अंकम्म, मुथिलम्म, दिल्ली पोलासी, बंगारम्म, मायम्म व रेणुका या नावांनी प्रसिद्ध आहेत. यांपैकी पोलेरम्म ही देवीच्या रोगाची देवता आहे. हिची एक आख्यायिका विशेष प्रसिद्ध आहे, ती अशी –

वेरा कुलील राजू नावाचा एक ब्राह्मण पोलेरम्माचा भक्त होता. त्याला सहा मुलगे होते. सातवा मुलगा जेव्हा मातेच्या गर्भात आला, तेव्हा योनिमार्गे जन्म घेण्याचा मार्ग त्याला किळसवाणा वाटला. म्हणून त्याने मातेच्या पाठीतून जन्म घेतला आणि जन्मल्याबरोबर तो एका कोहळ्यात लपून बसला. तो कोहळा वेलीवर वाढत होता. एकदा तो वेलीवरून तुटला व मातेच्या पायांशी घरंगळत आला. तिने तो फोडला. तर त्यातून तिचा हरवलेला मुलगा बाहेर पडला. त्याबरोबर तिचे घर सोन्याचे झाले. तिने त्याचे नाव पट्टेडी रुद्र असे ठेवले.

पुढे त्या गावचा राजा निपुत्रिक मेला, तेव्हा लोकांनी हत्तीच्या सोंडेत माळ देऊन नव्या राजाची निवड करायचे ठरवले. हत्तीने या मुलाच्या गळ्यात माळ घातली. नंतर त्याने सात बहिणींची पूजा बंद केली आणि पोलेरम्माला खड्ड्यात टाकून दिले. पोलेरम्माने मग मायम्म व आपला भाऊ किंवा पती पोट्टुराजू याला व त्याच्या बरोबर आणखी तीनशे साठ देवतांना पाचारण केले. इकडे राजाला गळवे झाली व तो मृत्युशय्येवर पडला. मातेने त्याला देवींची पूजा पुन्हा सुरू करण्याविषयी सांगितले. पण त्याने ते मानले नाही. मग मातेने मायम्माची पूजा केली. तेव्हा तिने सांगितले, की राजाच्या प्रधानाच्या दातांचे कवड्यांत, बरगड्यांचे काठ्यांत, पोटाचे भोपळ्यात व नसांचे तारांत रूपांतर केले, तरच राजा बरा होईल. पण राजाने या गोष्टीला संमती दिली नाही.

मग पोट्टुराजूने गावात शिरून रोगांचा कहर उडवून दिला. गुरेढोरे, माणसे तडफडून मरू लागली. तेव्हा राजा घाबरला. त्याने मग प्रधानाला मारून त्याच्या अवयवांच्या कवड्या, काठ्या, भोपळा व तारा बनवून त्यांपासून एक वाद्य तयार केले. हे वाद्य म्हणजेच सांप्रतची सतार होय. त्याच्या आवाजाने देवी संतुष्ट झाली.

म्हैसूर प्रदेशात या सात बहिणींना मरीभगिनी असे म्हणतात. विसलमरी (तापाची देवता), गुर्रलमरी (दम्याची देवता), केलमरी (मातीच्या भांड्याची देवता), हिरी देवता, सग्गेरे मरी, चामुंडीश्वरी व उत्तनहळ्ळी अशी त्यांची नावे आहेत. पोट्टूराजू हा त्यांचा भाऊ किंवा पती होय.

कोइंबतूरमध्येही सात बहिणी आहेत. सेनाकटची अम्मन किंवा पिडारी, कोली अम्मन, उलकिरनी अम्मन, अकारी अम्मन, वंछी अम्मन, सेल्ली अम्मन व कुंयन अम्मन अशी त्यांची नावे आहेत. ऐनार हा त्यांचा भाऊ आहे. या सात बहिणी पार्वतीपासून उत्पन्न झाल्या, असे समजतात. [श्रीमती दुर्गा भागवत, नवभारत, डिसेंबर १९५९]

**सातवाहन राजवंश** (सनपूर्व २५० ते इ. स. २२७) महाराष्ट्रात सार्वभौम सत्ता स्थापणारा पहिला राजवंश. काही संस्कृत ग्रंथांत या कुळाला शातवाहन असे नाव दिलेले आहे. पण या वंशातील राजांचे शिलालेख महाराष्ट्री प्राकृतात असून, त्यांत सातवाहन असेच त्यांचे नाव आढळते. पुराणांत त्यांना आंध्र किंवा आंध्रभृत्य म्हटले आहे. या वंशातील ३० राजांनी ४६० वर्षे राज्य केले आणि शिशुक हा त्यांतील पहिला राजा होय, अशी माहिती पुराणांत मिळते. पण ती बरोबर नाही, असे आता सिद्ध झाले आहे. हैदराबाद संस्थानात सातवाहन नामक राजाची दोन नाणी सापडली, तेव्हा सातवाहन हा या वंशाचा मूळ पुरुष असून, त्याच्यावरून या वंशाला सातवाहन हे नाव मिळाले, हे ध्यानात आले. याच राजाचे आणखी एक नाणे कोंडापूर येथील उत्खननात सापडले. त्यावरून हे घराणे मराठवाड्यात उदयास आले असावे, असे म. म. मिराशी यांचे मत आहे.

सातवाहनांचे मूलस्थान, त्यांचा आरंभकाल व त्यांचा वर्ण यासंबंधी विद्वानांत बरेच मतभेद आहेत. त्यांतील कोणतेही मत निर्णायक म्हणून स्वीकारता येत नाही; कारण त्यासाठी आवश्यक असणारा ऐतिहासिक पुरावा फारसा उपलब्ध नाही. त्यांची नाणी, त्यांचे शिलालेख, त्या काळातील इतरांचे शिलालेख आणि वाङ्मयीन परंपरा यावरून पंडितांनी काही स्थूल निष्कर्ष काढले आहेत, ते असे–

**मूलस्थान** – पुराणांत या घराण्याला आंध्रजातीय म्हटले

आहे, त्यावरून ते मूळचे कृष्णा नदीच्या मुखाजवळच्या आंध्र-पथ प्रदेशातले असावे, असे एक मत होते. पण सातवाहनांनी आपल्या राजवटीच्या उत्तरार्धात आंध्र प्रदेशात सत्ता प्रस्थापित केली होती. आणि पुराणे रचली गेली त्या काळी सातवाहनांचे महाराष्ट्रातले राज्य नष्ट होऊन, आंध्र प्रदेशातच त्यांची सत्ता उरली होती; तेवढ्यावरून पुराणकारांनी त्यांना आंध्र ठरवले असावे, असा निष्कर्ष काही पंडितांनी काढला आहे. सातवाहन राजे आपल्या कोणत्याही शिलालेखात स्वतःला आंध्र म्हणत नाहीत. आणि खारवेल, शक, कदंब यांच्या शिलालेखांतही सातवाहनकुल असेच उल्लेख आहेत.

या वंशाचे अगदी आरंभीचे शिलालेख पश्चिम महाराष्ट्रात नासिकजवळच्या पांडव लेण्यात व जुन्नरजवळच्या नाणे घाटा-तील लेण्यात सापडले आहेत. हे सर्व शिलालेख महाराष्ट्री प्राकृत भाषेत आहेत. त्यांचा एकही शिलालेख द्राविड भाषेत नाही. हाल सातवाहन राजाचा गाथा सप्तशती (गाहासत्तसई) हा ग्रंथही महाराष्ट्री भाषेतच रचलेला आहे. त्यावरून सातवाहन महाराष्ट्रीय होते हे सिद्ध होते. लीलावई या महाराष्ट्री काव्याचा कर्ता कवी कौतूहल याने, हाल सातवाहन हा अश्मक देशातील प्रतिष्ठान (पैठण) नगरीचा राजा होता व त्या प्रांतातील स्त्रिया मरहट्ट होत्या, असे वर्णन केले आहे.

जैन वाङ्मयातही पैठण ही सातवाहनांची राजधानी होती, असा निर्देश आढळतो. टॉलेमीनेही सातवाहनांची राजधानी पैठण होती, असेच म्हटले आहे.

या राजांची नाणी महाराष्ट्रात निरनिराळ्या ठिकाणीं सापडली आहेत. त्यावरून सातवाहन घराणे महाराष्ट्रीय होते, असे दिसते.

पुण्यापासून २०–२१ मैलांवर तळेगाव दाभाडे नावाचे गाव आहे. त्या गावाच्या आसपासच्या भागाला अंदरमावळ किंवा आंध्रमावळ म्हणतात. तिथून जवळच आंध्रा नावाची नदी वाहते. नदीवरून प्रदेशाला व लोकांना तिचे नाव मिळाल्याची अनेक प्राचीन उदाहरणे आहेत. त्याचप्रमाणे या आंध्रा नदी-वरून त्या प्रदेशाला व तिथल्या रहिवाश्यांना आंध्र हे नाव मिळाले असावे, असे श्री. स. आ. जोगळेकरांनी प्रतिपादले आहे. त्या परिसरात आजही आंध्रे नावाचे मराठे घराणे आहे. त्या-वरून सातवाहन मूळचे आंध्र मावळातले असावे आणि म्हणून पुराणांत त्यांना आंध्र म्हटले असावे, असे अनुमान करता येते.

यासंबंधी प्रा. पु. ग सहस्रबुद्धे यांनी व्यक्त केलेला विचार असा – एखाद्या घराण्याने स्वभूमी कोणती मानली, कर्मभूमी कोणती स्वीकारली, ते कोणत्या प्रदेशात दीर्घकाळ स्थिर राहिले, कोणत्या प्रदेशातील जीवनाशी ते एकजीव झाले यावरून ते घराणे महाराष्ट्रीय की आंध्र आहे हे ठरते. सातवाहनांची राजधानी पैठण होती; त्यांचे कोरीव लेख नासिक, जुन्नर, कान्हेरी, कार्ले या भागात आहेत; आणि त्यांच्या प्रतिमा नाणे घाटात आहेत. गाथा सप्तशतीत महाराष्ट्रीय जीवनाचे वर्णन आहे. त्यांची भाषा महाराष्ट्री प्राकृत होती. त्यावरून हे घराणे पूर्ण-पणे महाराष्ट्रीय होते, यात शंका राहत नाही.




सातवाहन राजांची नाणी–(१) तांब्याचे नाणे, नासिक, (२) शिशाचे नाणे, सातकर्णीचे, नेवासे, (३) शिशाचे नाणे, नेवासे, (४) पोटीनचे नाणे, कोल्हापूर (५) नहपानाचे रुप्याचे नाणे, त्यावर गौतमीपुत्र सातकर्णीचा छाप.

**आरंभकाल** – पुराणांत असे सांगितले आहे की शुंग वंशाने मौर्य वंशाचा, काण्व वंशाने शुंग वंशाचा व आंध्रांनी काण्वांचा नाश करून राज्य स्थापले. मौर्यांनी १३७ वर्षे, शुंगांनी ११२

र्ग आणि काण्वांनी ४५ वर्षे राज्य केले, असेही पुराणांवरून कळते. चंद्रगुप्त मौर्य याचे राज्यारोहण सनपूर्व ३२४ मध्ये झाले, हे सर्वमान्य झाले आहे. त्यावरून आंध्र घराण्यातील शिशुक याने सनपूर्व ३० च्या सुमारास काण्व वंशातील राजा सुशर्मा याचा पराभव केला, असे ठरते. काही पंडितांच्या मते शिशुकाने



मिथुन—शिल्प, कार्ले

आपल्या राजवटीच्या अखेरीस हा पराक्रम केला असावा. पुराणान्वये त्याने २३ वर्षे राज्य केले. म्हणून त्याचा राज्यकाल सनपूर्व ५० च्या सुमारास सुरू झाला असावा.

पण पुराणांतली माहिती निश्चित किंवा विश्वसनीय नसल्यामुळे, तिच्या आधारे ऐतिहासिक कालक्रम ठरवणे, हे काही पंडितांना योग्य वाटत नाही. मत्स्य पुराणात काण्व घराण्याचा उच्छेद करण्याचे श्रेय पुलुमावीला दिलेले आहे. हा आंध्र घराण्यातला १५ वा राजा आहे. अर्थात त्याच्या आधीचे १४ राजे काण्व व शुंग या वंशांना समकालीन असले पाहिजेत.

पुण्याच्या उत्तरेला ५६ मैलांवर जुन्नरजवळ असलेला नाणेघाट किंवा नानाघाट इतिहासप्रसिद्ध आहे. त्या घाटातील एका लेण्यात सातवाहन राजघराण्यातील काही व्यक्तींच्या प्रतिमा कोरलेल्या असून, त्यांच्या खाली त्यांची नावेही आहेत. एका भग्न प्रतिमेखाली 'सिमुक सातवाहनो' असे नाव तत्कालीन प्राकृत भाषेत कोरलेले आहे. पुराणांतील शिशुक किंवा शूद्रक तोच हा सिमुक होय. सिमुकाच्या शेजारी देवी नागनिका व राजा श्रीसातकर्णी यांचा जोड पुतळा आहे, असे त्यावरील लेखावरून कळते.

नाणेघाटातील लेण्यात आणखी एक मोठा प्राकृत भाषेतला शिलालेख आहे. त्यावरून तत्कालीन इतिहासावर वराच प्रकाश पडतो. सिमुकानंतर त्याचा भाऊ कृष्ण हा राजा झाला. त्याच्या काळातला एक लेख नासिकजवळच्या पांडवलेण्यात कोरलेला आहे. या दोन्ही लेखांतील अक्षराचे वळण समकालीन असून, ते सनपूर्व तिसऱ्या शतकातील आहे, असे प्राचीन लिपितज्ज्ञ बुल्हर याचे मत आहे. औरंगाबाद येथे सापडलेले नाणे सातवाहन वंशाच्या संस्थापकाचे असून, त्यावरील 'सिरी सातवाहन' या अक्षरांचे वळणही सनपूर्व तिसऱ्या शतकातले आहे, असे म. म. मिराशी यांचे मत आहे. मौर्यसम्राट अशोक याच्या मृत्यूनंतर मौर्यांची सत्ता क्षीण झाली. मौर्य साम्राज्य द. भारतात म्हैसूरपर्यंत पसरलेले होते; अर्थात महाराष्ट्राचा त्यात अंतर्भाव असावा, असे काही पंडितांचे मत आहे. अपरांतावर मौर्यसत्ता होती. पण अशोकाचे शिलालेख महाराष्ट्रात नाहीत त्यावरून त्याची सत्ता महाराष्ट्रावर नसावी, असे डॉ. केतकरांचे मत आहे. मात्र त्याचे धर्मप्रसारक महाराष्ट्रात पोचले होते. सातवाहन राजे मौर्यांचे सामंत असावे, असेही काही पंडितांचे मत आहे. पण कोणत्याही मताला निश्चित आधार उपलब्ध नाही. सातवाहन नामक पुरुषाने सम्राट अशोकाच्या अखेरच्या काळात महाराष्ट्रात आपले लहानसे राज्य स्थापले असावे. त्यासाठी त्याला मौर्य सत्तेशी लढावे लागले, असा उल्लेख कोठेही नाही. त्यावरून मौर्यांची सत्ता महाराष्ट्रात नसेल किंवा असली तरी त्या वेळी ती क्षीण झाली असेल. अशा परिस्थितीत सातवाहनांनी स्वराज्याची स्थापना केली असावी. यावरून या वंशाचा उदय सनपूर्व २५० च्या सुमारास झाला असावा, असे अनुमान करता येते.

**वर्ण** – सातवाहन हे कुल ब्राह्मण होते, क्षत्रिय होते की शूद्र होते, हा प्रश्नही वादग्रस्त आहे. दंतकथा व पुराणे यांवरून मूळ पुरुष सातवाहन हा ब्राह्मण स्त्री व नाग पुरुष यांचा पुत्र होता, असे समजते. पण गौतमीपुत्र सातकर्णी याची माता गौतमी बलश्री हिने नासिक येथे कोरविलेल्या लेखात आपल्या पुत्राचा 'एक ब्रह्मणस, खतियदपमानमदन' असा गौरव केला आहे. तसेच तिने स्वतःला राजर्षिवधू म्हटले आहे. 'एक ब्रह्मणस' याचे 'असामान्य ब्राह्मण, ब्राह्मण या नावाला एकमेव योग्य, ब्राह्मणांचा एकमेव प्रतिपालक' असे भिन्न भिन्न अर्थ निरनिराळ्या

विद्वानांनी केले आहेत. त्यांतला 'ब्राह्मणांचा एकमेव प्रतिपालक' हा डॉ. भांडारकरांनी लावलेला अर्थ सयुक्तिक व ग्राह्य वाटतो. राजर्षिवधू या शब्दावरूनही या घराण्याचे क्षत्रियत्व सिद्ध होते. गौतमीपुत्राला खतियदपमानमदन म्हटले आहे, तिथे खतिय म्हणजे सर्व क्षत्रिय वर्ण असा अर्थ घेणे आवश्यक नाही.



कोंडोण येथील लेण्याचा दर्शनी भाग

खतिय नामक वेगळी जमात त्या काळी असेल. गौतमीपुत्राने शकांचा निःपात केला होता आणि मनूने शक, यवन, इ. परकीयांनाही संस्कारलोपामुळे शूद्रत्व पावलेले क्षत्रिय मानले आहे. तेव्हा शकांना उद्देशूनही खतिय हा शब्द वापरलेला असेल. यावरून सातवाहन हे क्षत्रिय होते, असे काही पंडितांनी मानले आहे. म. म. मिराशी यांनी 'एक ब्रह्मणस' याचा अर्थ 'एकमेव ब्राह्मण' असा लावून, सातवाहन हे ब्राह्मण घराणे होते, असे म्हटले आहे.

**सातवाहन** (सनपूर्व २५० चा सुमार) – या वंशाचा मूळ पुरुष सातवाहन याचा पुराणांत किंवा शिलालेखांत उल्लेख नसल्यामुळे त्याच्याविषयी अधिक माहिती उपलब्ध नाही. इ. स. १९४५ साली 'सिरी सातवाहन' अशी अक्षरे अंकित केलेली त्याची नाणी सापडली तोपर्यंत त्याच्या अस्तित्वाचीही माहिती नव्हती. त्याच्या नाण्यांमुळे तो मूळ पुरुष होता हे समजले. त्याने लहानसे स्वतंत्र राज्य पैठण येथे स्थापले असावे, असे दिसते.

**सिमुक** (सनपूर्व २३०चा सुमार) – म. म. मिराशी यांच्या मते सातवाहन या मूळ पुरुषाचा हा नातू असावा. यानेच मौर्य सत्ता क्षीण झाल्यावर महाराष्ट्रात स्वराज्य स्थापले. त्या कामी त्याला रथिक आणि भोज जमातींची खूप मदत झाली, म्हणून स्वतःला राया ही पदवी घेताना त्याने त्या जमातींच्या प्रमुखांना महारथी ही पदवी दिली व त्यांच्याशी सोयरीक केली. त्याच्या राज्याचा विस्तार प्रतिष्ठान नगरीच्या परिसरात झालेला असावा.

**कृष्ण** – सिमुकानंतर त्याचा भाऊ कृष्ण हा राजा झाला व त्याने १८ वर्षे राज्य केले, असे वर्णन पुराणांत आहे. सातवाहन कुळातील राजा कन्ह याच्या एका श्रमण महामात्राने नासिक येथील एक लेणे खोदवले, असा शिलालेख त्या लेण्यात आहे. हा कन्ह म्हणजेच पुराणांतील कृष्ण होय. पण नाणेघाटातील लेण्यात त्याची प्रतिमा नाही. त्याच्यानंतरचा राजा सातकर्णी अल्पवयी होता तोपर्यंत याने राज्यकारभार सांभाळला असावा, म्हणून त्याची प्रतिमा केली गेली नाही, असे अनुमान करता येते. त्याने नासिकपर्यंत राज्यविस्तार केला असला पाहिजे.

**सातकर्णी** (१ला) – कृष्णानंतर हा सिंहासनावर बसला. पुराणांत त्याला कृष्णाचा पुत्र म्हटले आहे. पण म. म. मिराशी यांच्या मते सातकर्णी हा सिमुकाचा पुत्र असावा आणि तो अल्पवयी असल्यामुळे कृष्णाने काही वर्षे राज्य केले असावे. सातकर्णी हा सातवाहन कुलातील पहिला सम्राट होय. देवी नागनिका (नायनिका) हे त्याच्या राणीचे नाव होते. त्या दोघांचा जोडपुतळा नाणेघाटातील लेण्यात सिमुक राजाच्या पुतळ्याशेजारी आहे. या सातकर्णीने १८ वर्षे राज्य केले, असे मत्स्यपुराणात सांगितले आहे. हा राजा कलिंगाधिपती खारवेल व पुष्यमित्र शुंग यांचा समकालीन होता. त्या काळी यवनांनी अयोध्येपर्यंत आक्रमण केले होते. मौर्य राजा अगदी निष्प्रभ झालेला असल्यामुळे तो यवनांचा प्रतिकार करू शकला नाही. यवनांची सेना मगधावर चालून येणार, असे दिसताच, खारवेलानेच आधी चढाई केली आणि यवनांना पिटाळून लावले. त्याच वेळी सातकर्णीने प. माळवा, अनूप (नर्मदेचे खोरे) व विदर्भ हे प्रदेश जिंकून घेतले आणि ते आपल्या साम्राज्यात समाविष्ट केले.

खारवेलाने महाराष्ट्रावर दोनदा आक्रमण केले. पण सातकर्णीने त्याचा पराभव केला असावा. कारण सातकर्णीने दोन वेळा अश्वमेध यज्ञ व एकदा राजसूय यज्ञ केला, असे शिलालेखांवरून कळते.

श्रीसातकर्णीची राणी नागनिका हिने नानाघाटात जो मोठा शिलालेख कोरविला आहे, त्यावरून सातवाहन हे वैदिक धर्माचे व हिंदू परंपरेचे अभिमानी होते, असे दिसते. त्या लेखात आरंभी

इंद्र, वासुदेव व संकर्षण यांना नमन केलेले आहे आणि नंतर यम, वरुण आणि कुबेर यांना नमन केले आहे. त्या लेखात अश्वमेध, राजसूय, अग्न्याधेय, गवामयन, गर्गत्रिरात्र, दशरात्र, इ. यज्ञांचा आणि त्या यज्ञांत दिलेल्या विविध प्रकारच्या दक्षिणांचा निर्देश आहे. त्यांपैकी काही यज्ञ नागनिका राणीने राजाची सहधर्मचारिणी म्हणून व कांही स्वत: केले होते. नागनिका ही अंगिय कुळातील महारठी कळलाय नामक नाग सरदाराची कन्या होती. तिला वेदिश्री, सतिश्री व हकुश्री हे तीन पुत्र होते. त्यांच्या प्रतिमा नाणे घाटातील लेण्यात आहेत. सातकर्णी मृत्यू पावला तेव्हा वेदिश्री लहान होता. म्हणून नागनिकेने काही काळ राज्यशासन केले. पतिनिधनानंतर ती तापसी वृत्तीने राहत होती, असे तिच्या लेखात लिहिलेले आहे. आपला पुत्र वेदिश्री याचे वर्णन तिने वीरस, सूरस, अप्रतिहत चकस, दखिनापथपति, असे केले आहे. त्यावरून शिलालेख कोरला तेव्हा वेदिश्री हा राज्य करीत होता, असे दिसते. तो पित्याप्रमाणेच शूर वीर व दक्षिणापथाचा स्वामी होता. प. महाराष्ट्रात मिळालेल्या दोन नाण्यांवर सिरी साकनिस ही अक्षरे व हत्ती आणि नदी ही चिन्हे आहेत. ही अक्षरे आणि नाणे घाटातील शिलालेखातील अक्षरे यांचे वळण सारखे आहे. त्यावरून ती नाणी आणि शिलालेख एकाच काळातील असून, नाणी सातकर्णीची आहेत, असे रॅप्सनचे मत आहे.

या सातकर्णीनंतर वेदिश्री राजा झाला. पण त्याचे नाव पुराणांत नाही. पुराणान्वये सातकर्णीनंतर पूर्णोत्संग याने अठरा वर्षे राज्य केले व नंतर स्कंदस्तंभी हा राजा झाला. ही दोन्ही नावे नाणेघाटातील लेखात नाहीत. त्या लेखात वेदिश्री आणि त्याचा भाऊ सति(शक्ति)श्री याचा उल्लेख आहे. वेदिश्रीची नाणी सापडलेली नाहीत, पण सतिश्रीची सापडली आहेत. वेदिश्रीनंतर सतिश्रीने राज्य केले असावे. पूर्णोत्संग आणि स्कंदस्तंभी ही कदाचित त्यांचीच दुसरी नावे असतील.

सातकर्णी (२रा) — पुराणांनुसार हा सहावा सातवाहन राजा होय. त्याने ५६ वर्षे राज्य केले आणि सातवाहन साम्राज्याला दृढता आणि स्थिरता प्राप्त करून दिली. पहिल्या सातकर्णीने प. माळवा जिंकला होता. याने पूर्व माळवाही जिंकला. विदिशा येथील एका शिलालेखात सातकर्णीचा उल्लेख आहे, तो याचाच होय, असे बहुतेक पंडितांचे मत आहे.

सातकर्णीचा प्रमुख शिल्पकार वासिष्ठीपुत्र आनंद याचा एक दानलेख सांची येथील स्तूपाच्या तोरणद्वारावर कोरलेला आहे. त्यावरून तिथपर्यंत सातवाहनांची सत्ता प्रस्थापित झाली असावी, असे वाटते. याची नाणी मराठवाड्यात तेर, पैठण; प. महाराष्ट्रात नेवासे, नासिक, कोल्हापूर; विदर्भात चांदा व तऱ्हाळा; माळव्यात उज्जयिनी, एरण व विदिशा येथे सापडली आहेत. त्यावरून त्याच्या राज्यविस्ताराची कल्पना करता येते.

सातकर्णी (२रा) याच्यानंतर लंबोदर व त्याच्यामागून आपिलक ही नावे पुराणांत दिलेली आहेत. आपिलकाची नाणी मध्य



जुन्नर येथील विहार, भीमाशंकर गट

प्रदेशात सागरजवळ सापडली आहेत. पण पुराणांत या राजांची फारशी माहिती मिळत नाही. सातकर्णी (२रा) याच्यानंतरच्या व गौतमीपुत्र सातकर्णी याच्या आधीच्या १६ राजांची नावे पुराणांत आहेत; पण त्यांची माहिती मात्र नाही. तेरावा सातवाहन राजा कुंतल सातकर्णी याचा उल्लेख वात्स्यायनाच्या कामसूत्रात आहे. आणि १५ वा राजा पुलुमावी याने काण्वांचा उच्छेद केला, असे मत्स्यपुराणात सांगितले आहे. सतरावा राजा हाल हा त्याच्या गाहासत्तसई (गाथा सप्तशती) या प्राकृत ग्रंथामुळे प्रख्यात आहे. इ. स. २१ हा त्याचा काल मानला जातो. त्याची सत्ता मावळांत व इंध्याद्रीलगत गोदावरीच्या काठावरील प्रदेशात असावी.

सातकर्णी (२रा) याच्यानंतर सनपूर्व पहिले शतक व इ. स. चे पहिले शतक एवढ्या २०० वर्षांच्या कालखंडातील सातवाहन राजांचा इतिहास अज्ञात आहे. इ. स. च्या पहिल्या शतकात शक क्षत्रपांनी सातवाहनांकडून अपरांत घेतले असावे. शक क्षत्रप

नहपान याने तर पुणे आणि नासिक या भागातही आपली सत्ता स्थापली होती.

नासिक, जुन्नर व कार्ले येथील लेण्यांत शकांचे शिलालेख कोरलेले आहेत. बाविसावा सातवाहन राजा शिवस्वाती याला भागवत पुराणात अरिंदम म्हटलेले आहे. त्यावरून त्याने शक क्षत्रपांविरुद्ध उठाव सुरू केला असावा, असे वाटते. त्याची राणी महादेवी गौतमी, हिचा एक लेख पांडवलेण्यातील क्र. ३ या गुंफेत आहे. तिचा पुत्र गौतमीपुत्र सातकर्णी याने महाराष्ट्राला शकांच्या दास्यातून मुक्त केले.

**गौतमीपुत्र सातकर्णी** – शक क्षत्रपांचे राज्य महाराष्ट्रात स्थापन झाले तेव्हा सातवाहनांना प. महाराष्ट्रातून परागंदा व्हावे लागले. पण मग ते कुठे राज्य करू लागले याविषयी निश्चित माहिती मिळत नाही. ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या आरंभी नहपानाचा पराभव करून प. महाराष्ट्र आपल्या सत्तेखाली आणणारा गौतमीपुत्र सातकर्णी नासिकच्या लेण्यातील आपल्या कोरीव लेखात बेनाकटकस्वामी असा स्वतःचा निर्देश करतो. त्यावरून तो व त्याचे काही पूर्वज बेनाकटक येथे राज्य करीत असावे, असे वाटते. बेनाकटक म्हणजे बेना किंवा वेणा नदीच्या काठचा प्रदेश. ही नदी म्हणजे वैनगंगा असावी, असे म. म. मिराशी यांचे मत आहे.

नासिकच्या लेण्यातील प्राकृत लेखात गौतमीपुत्राला शक, यवन व पल्हव यांचा निःपात करणारा आणि सहरात वंशाचा समूळ उच्छेद करणारा, अशी विशेषणे लावली आहेत. त्या विजयानंतर त्याने शकांच्या सर्व चांदीच्या नाण्यांवर आपल्या नावाचा व उज्जैनी चिन्हाचा असे दोन छाप उठवून, मग ती आपल्या राज्यात चालू केली. अशा नाण्यांचा एक मोठा साठा नासिक जिल्ह्यात जोगळटेंभी येथे सापडला आहे.

क्षत्रपांचा पराभव केल्यानंतर गौतमीपुत्राने आपली सत्ता उत्तरेस सुराष्ट्र, अनूप व माळवा; पश्चिमेस कोकण; पूर्वेस आंध्र व दक्षिणेस मलयपर्वतापर्यंत प्रस्थापित केली. त्याला 'तिसमुदतोयपीतवाहन' असेही विशेषण लावलेले आहे. त्याने २१ वर्षे राज्य केले, असे पुराणांत म्हटले आहे. पण त्याच्या राजवटीच्या चौविसाव्या वर्षातील एक लेख नासिकच्या लेण्यात आहे. तो लेख माता व पुत्र या दोघांनी मिळून कोरवला आहे. त्यानंतर लवकरच तो निधन पावला असावा. त्यावरून इ. स. १०६–१३० हा त्याचा राज्यकाल असावा, असे अनुमान करता येते.

गौतमीपुत्र सातकर्णीच्या निधनानंतर १९ वर्षांनी, वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या राजवटीत, सातकर्णीची माता गौतमी बलश्री हिने नासिकच्या लेण्यात एक विस्तृत लेख कोरविला होता, त्यात तिच्या पुत्राविषयी पुष्कळ माहिती दिलेली आहे. तिच्या स्वतःविषयीची माहितीही त्या लेखात आहे. गौतमी हे तिचे गोत्रनाम असून, बलश्री हे तिचे स्वतःचे नाव होते. ती महादेवी, राजर्षिवधू, महाराजमाता व महाराजपितामही होती. ती धर्मपरायण, सच्छील, साध्वी; तसेच दानधर्म, उपवास, व्रते व ईश्वरोपासना यांत मग्न अशी होती. तिला आपल्या पराक्रमी पुत्राचा यथार्थ अभिमान होता. त्याचे वर्णन तिने केले आहे, ते असे –

सातकर्णी हा हिमालयासारखा थोर होता. त्याचे राज्य ऋषीक (खानदेश), अश्मक (गोदातीर), मूळक (पैठणजवळचा प्रदेश), सुराष्ट्र, कुकुर (राजस्थान), अपरांत (कोकण), अनूप, विदर्भ, माळवा, इ. प्रदेशांवर होते. विंध्य, ऋक्षवान (सातपुडा), पारियात्र (अरवली), सह्याद्री, कृष्णगिरी, मलय, श्वेतगिरी, चकोर, इ. पर्वतांचा तो स्वामी होता. तो अत्यंत देखणा होता. तो उदार, मातृभक्त, धर्मार्थकामांचे योग्य आचरण करणारा, पराक्रमी, धर्मनिष्ठ, प्रजावत्सल असा होता.

क्षहरात घराण्याचा सातकर्णीने उच्छेद केल्यानंतर त्याच्या जागी कार्दमक नावाचे शक घराणे राज्य करू लागले. त्या घराण्यातील रुद्रदामन याने सातवाहनांच्या साम्राज्यातील उत्तरेकडचा काही भाग जिंकून घेतला होता, असे दिसते. टॉलेमीच्या ग्रंथावरून समजते, की चष्टन याने माळवा घेतला होता. कान्हेरी येथील शिलालेखात वासिष्ठीपुत्र सातकर्णी याचा उल्लेख रुद्र-



कान्हेरी येथील चैत्य क्र. ३

दामनाच्या मुलीचा पती असा केला आहे. हा सातकर्णी गौतमीपुत्राचा पुत्र व पुलुमावीचा भाऊ असावा. या विवाहसंबंधामुळे

कार्दमक क्षत्रप रुद्रदामन याने सातकर्णींचा पूर्ण नाश केला नाही, असे जुनागड येथील इ. स. १५० च्या शिलालेखांत म्हटले आहे.

पुलुमावी (इ. स. १३०–१५९) – गौतमीपुत्रानंतर वासिष्ठीपुत्र पुलुमावी हा प्रतिष्ठानच्या सिंहासनावर बसला. याचे शिलालेख नासिक, कार्ले आणि आंध्र प्रदेशातील अमरावती (कृष्णा जिल्हा) येथे सापडले आहेत. आंध्र प्रदेशात त्याची बरीच नाणीही मिळाली आहेत. त्यावरून त्याने आपली सत्ता तिथपर्यंत प्रस्थापित केली होती, असे दिसते. त्याने बेल्लारी जिल्हाही घेतला असावा. या नवीन प्रदेशाला आंध्रापथ व सातवाहनीय प्रांत अशी नावे मिळाली होती.

शिवश्री (इ. स. १५९ – ६६) पुलुमावीनंतर हा राजा झाला. याचे पूर्ण नाव वासिष्ठीपुत्र शिवश्री सातकर्णी असे होते. याची नाणी कृष्णा व गोदावरी जिल्ह्यांत सापडली आहेत. हाच रुद्रदामनाच्या कन्येचा पती होय. याने रुद्रदामनाच्या मृत्यूनंतर शक क्षत्रपांकडून अपरांत जिंकून घेतले असावे, असे दिसते.

पुराणांतील नामावलीत शिवश्रीनंतर शिवस्कंद व यज्ञश्री सातकर्णी ही नावे आहेत. शिवस्कंदाने इ. स. १६७ ते १७४ राज्य केले असावे. त्याची काही नाणी सापडली आहेत. पण त्याच्याविषयी अन्य काही माहिती उपलब्ध नाही. आंध्र प्रदेशातील अमरावती येथील शिलालेखात सिवमक सात असे नाव आहे, ते याचेच असावे आणि तऱ्हाळे येथील काही नाण्यांवर स्कंद सातकर्णी हे नाव आहे, तेही याचेच असावे.

यज्ञश्री (इ. स. १७४–२०३) – सातवाहन वंशातला हा शेवटचा सम्राट होय. त्याचे शिलालेख नासिक, कान्हेरी व चिन्नगंजम येथे आहेत. याची नाणी गुजरात, सौराष्ट्र, अपरांत, विदर्भ, मराठवाडा, आंध्र या सर्व प्रदेशांत सापडली आहेत. त्यावरून याने आपली सत्ता दूरवर प्रस्थापित केली होती, असे दिसते. याची चांदीची नाणी सोपारा येथे सापडली आहेत. याची बरीच नाणी शक क्षत्रपांच्या नाण्यांसारखी दिसतात. प्रसिद्ध बौद्ध पंडित नागार्जुन हा याचा सुहृद होता, असे म्हणतात. याच्या काही नाण्यांवर अश्वचिन्ह आहे, त्यावरून याने अश्वमेध केला असावा, असे काही पंडितांचे अनुमान आहे. जहाजाची आकृती कोरलेली काही नाणी सापडली आहेत, ती याचीच मानली जातात. त्यावरून समुद्रावरही याची सत्ता असावी, असे वाटते. बाणाने हर्षचरितात याला त्रिसमुद्राधिपती म्हटले आहे.



यज्ञश्री सातकर्णीचे नाणे

यज्ञश्री सातकर्णीच्या मागून या वंशातील काही राजांनी राज्य केले; पण त्यांची सत्ता क्षीण झाली होती. यज्ञश्रीचा पुत्र विजय याने सहा वर्षे राज्य केले. त्याची नाणी तऱ्हाळे येथील नाण्यांत आहेत. त्याचा पुत्र चंद्रश्री याने दहा वर्षे राज्य केले. याचा एक शिलालेख पूर्व गोदावरी जिल्ह्यात कोडवली येथे सापडला आहे. अश्वप्रतिमा असलेली याची नाणी आंध्र प्रदेशात सापडली आहेत. पुलुमावी हा तिसावा सातवाहन राजा. याचीही चार नाणी तऱ्हाळे येथे सापडली आहेत. याचा एक लेख बेल्लारी जिल्ह्यात म्याकडोणी येथे आहे. अशा प्रकारे शक क्षत्रपांनी सातवाहन राजांना महाराष्ट्राबाहेर हुसकावून लावले, असे दिसते. पण महाराष्ट्रात आभीर लोकांनी सत्ता प्रस्थापित केली. आंध्र प्रदेशात इक्ष्वाकू हे सातवाहनांचे सरदार होते, तेही स्वतंत्र झाले. आणि विदर्भात वाकाटकांचा उदय झाला. पुलोमा (पुलुमावी) याने इ. स. २२७ पर्यंत राज्य केले असावे. तो सातवाहन वंशातला अखेरचा राजा होय.

महाराष्ट्राच्या विश्वसनीय प्राचीन इतिहासाला आरंभ सातवाहन कालापासूनच होतो. सनपूर्व ३०० च्या सुमारास महाराष्ट्री भाषेमुळे महाराष्ट्र समाजाला पृथगात्मता आली व अस्मिता प्राप्त झाली. आणि त्यानंतरच लवकरच महाराष्ट्रात सातवाहनांची सत्ता प्रस्थापित झाली. त्यामुळेच महाराष्ट्राची पृथगात्मता, अस्मिता व संस्कृती यांना दृढ रूप प्राप्त झाले.

प्राचीन साहित्यात या घराण्याविषयी अनेक रम्य, पण अवास्तव कथा आढळतात. त्या कथा वगळल्या तरीही या घराण्याचा इतिहास अलौकिक वाटतो. सतत साडेचारशे वर्षे या वंशाने महाराष्ट्रात राज्य केले आणि मोठे साम्राज्य स्थापले. या वंशांत अनेक कर्ते पुरुष निर्माण झाले. त्यांनी शकांचा निःपात केला, वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन केले, विद्या–कलांचे संवर्धन केले आणि कृषि-व्यापारोद्योगांची वृद्धी करून महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचा पाया घातला.

शासनव्यवस्था – सातवाहनांची शासनपद्धती राजसत्ताक असून, राजपदाची प्राप्ती पैतृक परंपरेने होत असे. मात्र राजसत्ता निरंकुश नसून, तिच्यावर नैतिक बंधने होती. या कुलातील सर्व राजे प्रजापालक, न्यायी व दानशूर होते, असे दिसते.

मौर्य शासनाप्रमाणेच सातवाहनांचे शासन श्रेणीबद्ध होते. राज्याची विभागणी आहारांमध्ये केलेली असून, प्रत्येक आहारावर अमात्याची नियुक्ती केली जात असे. गोवर्धन, मामल, कापुर, इ. आहारांचा उल्लेख नासिक येथील शिलालेखात आहे. कान्हे-

रोच्या शिलालेखात सोपरग आहारावरोबर प्रतिष्ठान पथाचा उल्लेख आहे. पथ हा घटक आहारापेक्षा लहान असावा. विषय व देश हे शब्दही पथ या विभागासाठी वापरलेले आढळतात.

अमात्याखेरीज महामात्र व भांडागारिक या दोन अधिकाऱ्यांचा उल्लेख शिलालेखांत आहे. भांडागारिक म्हणजे कोषाधिकारी होय.

महारठी, महाभोज, महासेनापती, इ. नावेही शिलालेखांत आहेत. पण त्यांचे स्थान कोणते ते कळत नाही.

त्याकाळी ग्रामीण भागातली शासनव्यवस्था कशी होती, ते हाल राजाच्या गाथा सप्तशतीवरूच ध्यानात येते. प्राचीन काळी जी ग्रामव्यवस्था प्रचलित होती, तीच सातवाहनांच्या राज्यात होती. नगरव्यवस्थेत निगम नामक सभेला उच्च स्थान असावे, असे वाटते.

**समृद्धी** – सातवाहन कालातील भौतिक स्थितीची कल्पना पैठण, तेर, नासिक, कऱ्हाड, कोल्हापूर, नेवासे, कौंडिण्यपूर येथील उत्खननात मिळालेल्या वस्तूंवरून करता येते. त्या काळी पक्की घरे बांधली जात होती. त्यांचे अवशेष सापडले आहेत, त्यांत चांगल्या विटा व कौले आहेत. सांडपाण्याची व्यवस्थाही त्या काळी चांगली होती.

सातवाहन कालाच्या पूर्वार्धाच्या थरांत सापडलेल्या वस्तू साध्या आणि उपयुक्त अशा आहेत, तर उत्तरार्धाच्या थरांतील वस्तू अधिक कलात्मक आहेत. उत्तरार्धात रोमशी व्यापार सुरू झाल्यामुळे तिथून या वस्तू आलेल्या असाव्या. लेण्यातील शिल्पे, उत्खननात मिळालेल्या वस्तू आणि गाथा सप्तशतीतली वर्णने यांवरून केशभूषा व वेशभूषा यातील सौंदर्यदृष्टी प्रत्ययास येते. याखेरीज उत्कृष्ट झिलईची खापरे, विविध प्रकारची खेळणी, उपकरणे आणि हत्यारेही सापडली आहेत.

त्या काळात व्यापाराची उलाढाल खूप मोठी होत असे. अंतर्गत व्यापाराप्रमाणेच परदेशांशीही मोठा व्यापार चालू होता. त्यामुळे सातवाहनांच्या साम्राज्यात समृद्धी नांदत होती.

**देवधर्म** – सातवाहन राजे वैदिक धर्माचे अभिमानी होते. मात्र त्या काळी महाराष्ट्रात बौद्ध व जैन पंथांचा प्रसार झालेला होता. आणि राजे त्यांना दाने देत होते, प्रोत्साहन देत होते व त्यांच्या विहारांना आर्थिक मदतही करीत होते. सर्वसामान्य लोक भागवत संप्रदायाच्या देवतांची पूजा करीत होते आणि बौद्ध स्तूप व चैत्य यांचीही पूजा करीत होते. त्या काळी मातृदेवतांची पूजाही प्रचलित होती. ग्रामदेवतांची संख्याही बरीच मोठी असली पाहिजे.

**शिल्पवैभव** – सातवाहन कालातील शिल्पकाम मुख्यतः लेण्यांमध्ये दिसून येते. बहुतेक सर्व लेणी बौद्धांची आहेत. नाणेघाटातील सातवाहन-देवकुल हे एकच अन्य प्रकाराचे उदाहरण होय. या काळातली शिल्पकला बहुजन समाजाच्या प्रेरणेने व आश्रयाने बहरली. राजे, महारठी, महाभोज यांच्याप्रमाणेच श्रेष्ठी व इतर सामान्य लोक यांनी लेणी कोरवली आणि दाने दिली, असे सांगणारे सुमारे २५० शिलालेख त्या लेण्यांतच आहेत. त्या काळातली बौद्ध लेणी हीनयान पंथाची आहेत. बहुतेक सर्व लेणी व्यापारी मार्गावर खोदलेली आहेत. या लेण्यांतील शिल्पकाम अप्रतिम आहे. त्यांतील विविध प्रकारच्या मूर्तीही अत्यंत सुबक आहेत. गिरिशिल्पाची उत्तम जोपासना याच काळात झाली. भव्य चैत्यगृहे व ठाशीव व रेखीव शिल्पे ही या गिरिशिल्पांची विशेष उल्लेखनीय अंगे होत. कार्ले येथील



सांची येथील स्तूपाचे तोरण-द्वार

चैत्यगृह त्यांत सर्वोत्कृष्ट गणले जाते. अजंटा येथील काही लेणी सातवाहन काळातली असून, त्यांत भिंतीवरची रंगीत चित्रे

असून पाहायला मिळतात. गाथा सप्तशतीत रंगीत चित्रांचे उल्लेख आहेत. त्यावरून त्या काळी ही कला बरीच विकसित झाली होती, असे वाटते. नागार्जुनकोंडा व अमरावती येथील स्तूप याच काळातले आहेत. सांची येथील स्तूपाजवळचे एक तोरणद्वार याच काळात उभारलेले असून, ते सातवाहन नृपती सातकर्णी याने निर्माण केले. त्याचे शिल्पकाम अत्यंत सुंदर आहे. सातवाहनकालीन शिल्पांत सजावटीचा डामडौल नसून, सहजरम्यता व भाविकता दिसून येते.

शालिवाहन शकाची स्थापना सातवाहन वंशातील राजाने केली अशी परंपरागत समजूत आहे. पण तिला काही आधार नाही. सातवाहन राजांच्या एकाही शिलालेखात शक वर्षं दिलेले नाही. आणि शालिवाहन व सातवाहन या नावांत थोडेसे साम्य आहे, यापलिकडे त्यांचा काहीही संबंध नाही. इ. स. च्या १३ व्या शतकापूर्वी या कालगणनेला शालिवाहन हे नावही दिले गेले नव्हते.

गाहासत्तसई (गाथा सप्तशती) हा महाराष्ट्रीय प्राकृतातील प्रख्यात काव्यग्रंथ हाल सातवाहन राजाने संपादित केला. उत्तरकालीन संस्कृत कविपंडितांनी त्याची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. [ हि. क. इं. पी. २; सं. मु. २; पै. सा. रा.; महाराष्ट्र-संस्कृती–प्रा. पु. ग. सहस्रबुद्धे, 'वसंत' मार्च १९६८ ]

## सात सलाम

सलाम म्हणजे शांती. हा शब्द कुराणातील ज्या सात सुऱ्यांत आलेला आहे त्या सुऱ्यांना सात सलाम असे म्हणतात. धार्मिक वृत्तीचे, श्रद्धाळू मुसलमान आजारीपणात किंवा संकटकाळी किंवा दुःखद प्रसंगी या सात सुऱ्यांचा पाठ करतात. काही ठिकाणीं हे सुरे कागदावर लिहून व तो कागद पाण्याने धुऊन ते पाणी पितात. त्यामुळे संकट-निवारण होते, अशी समजूत आहे. [ डि. इ. ]

## सातानी

देवालयांत सेवा करणाऱ्या लोकांची एक जात. यांची वसती तमिळनाडू, आंध्र व कर्नाटक या प्रदेशांत आहे. विराट पुरुषाच्या स्वेदापासून आपली उत्पत्ती झाली, असे हे लोक मानतात. इतर लोक यांना शूद्र मानतात. यांना उच्च श्रेणीच्या शूद्रांच्या हातचे अन्न चालते. श्रीवैष्णव ब्राह्मणांच्या हातचा प्रसाद हे लोक भक्तीने सेवन करतात.

**देवधर्म**– हे वैष्णव पंथाचे अनुयायी व रामानुजाचार्यांचे भक्त आहेत. ते दिव्यप्रबंधम नामक तमिळ ग्रंथाला पवित्र मानतात व त्यातील स्तोत्रांचे पठण करतात. विवाहादी मंगल प्रसंगीही तीच स्तोत्रे म्हणतात.

यांच्या चार पोटजाती आहेत – (१) एकाक्षरी –– ओं या अक्षराचा जप करणारी, (२) चतुराक्षरी –– रामानुज या चार अक्षरांचा जप करणारी, (३) अष्टाक्षरी –– ओं नमो नारायणाय या आठ अक्षरांचा जप करणारी व (४) कुलशेखर –– कुल-शेखर आळवार याचे वंशज. हे लोक जानवी घालतात.

**व्यवसाय** – हे मुख्यतः मंदिरात माळा करणे, मशाली धरणे, झाडलोट करणे, इ. सेवाचाकरी करतात. काही जण गावोगावी फिरून वैष्णव धर्माचा उपदेश करतात; काही जण वैष्णव शूद्रांचे पौरोहित्य करतात. आता काही लोक शेती करू लागले आहेत. छत्र्या, परड्या, पेट्या, तयार करणे हे उद्योगही काही जण करतात. काही जण भिक्षाही मागतात. काही हनुमान मंदिरांत हे पुजारीही असतात.

**विवाहप्रथा** – मुलगी वयात येण्यापूर्वीच तिचे लग्न करतात. यांच्यांत थोरल्या वहिणीच्या मुलीशी लग्न करता येते. बहुपत्नी-प्रथा आहे. साटेलोटे पद्धतही रूढ आहे. यांचा विवाहविधी व इतर संस्कार इतर शूद्रांप्रमाणेच आहेत.

मुलगी वयात आल्यानंतर तिला एका वेगळ्या झोपडीत तीन दिवस ठेवतात. चौथ्या दिवशी तिने नदीच्या वाहत्या पाण्यात स्नान करायचे असते. मग ती शुद्ध होते. त्यानंतर १६ दिवसांत गर्भाधान समारंभ केला जातो. त्या कालावधीत तिला चांगले अन्न देतात. तोपर्यंत मुलगी माहेरीच राहते. मग तिला सासरी पाठवतात.

भिक्षेसाठी बाहेर पडताना सातानी पुरुष गळ्यात तुळशीच्या माळा घालतात व शरीरावर मुद्रा छापतात. दोवे दोवे गाणे गात घरोघर भिक्षा मागतात. भिक्षेचे धान्य भोपळ्यापासून बनवलेल्या पात्रात घेतात.

**मर्तिकप्रथा**– हे लोक बहुधा प्रेताचे दहन करतात; पण काही प्रसंगीं प्रेते पुरतात. अकरा दिवस सुतक पाळतात. दरवर्षी श्राद्ध व महालय करतात. काही जण मासिक व अन्य श्राद्धेही करतात. [ का. ट्रा. स. इं.; मै. ट्रा. का.; हिंदुत्व ]

## सात्वत संप्रदाय

वासुदेव कृष्ण हा ज्याचा उपास्य आहे, असा एक भक्तिपंथ. याचे दुसरे नाव पांचरात्रमत असे आहे. विष्णुसहस्रनामाच्या एका भाष्यकाराने सात्वत पदाचा वैष्णव भागवत असा सामान्य अर्थ सांगितला आहे. पण सात्वत शब्दाला एक ऐतिहासिक अर्थ आहे, तो विचारात घेतला पाहिजे.

उत्तर भारताच्या शूरसेन मंडलात वास्तव्य करणाऱ्या एका क्षत्रिय जातीला सात्वत असे नाव होते. सात्वत लोक यादववंशी होते आणि ह्याच वंशात श्रीकृष्णाचा जन्म झाला होता. वैष्णव मताच्या प्रचारात या सात्वत मताला एक विशिष्ट स्थान आहे.

हे लोक ज्या ज्या प्रदेशात गेले, त्या त्या प्रदेशात त्यांनी आपल्या संप्रदायाचा प्रचार केला.

जरासंधाच्या शेवटच्या आक्रमणानंतर सात्वत यादवांना शूरसेन देश सोडावा लागला. तिथून ते राजस्थानमार्गे सौराष्ट्रात जाऊन वसले. पुढे पश्चिम किनाऱ्याने खाली उतरत उतरत ते महाराष्ट्र, कर्नाटक व तमिळनाडू इथवर पोचले आणि त्यांनी त्या त्या ठिकाणी आपल्या मताचा प्रचार केला. डॉ. कृष्णस्वामी अय्यंगार म्हणतात, की द्रविड देशातले अनेक राजे आपण सात्वत वंशीय असल्याचे सांगून श्रीकृष्णाशी आपला संबंध जोडतात. सात्वत वंशीय क्षत्रियांच्या संबंधामुळेच द्रविड देशात वैष्णव धर्माचे इतके प्राबल्य राहिले. पांचरात्र किंवा सात्वत या मताची उत्पत्ती उत्तर भारतात, विशेषत: व्रजमंडलात झाली; पण सात्वतांच्या प्रभावामुळे आणि प्रचारामुळे द्रविड देशात त्याचा विशेष बोलबाला झाला.

सात्वत धर्माचा मुख्य उपास्य देव वासुदेव कृष्ण हा आहे. मूल प्रवर्तकही त्यालाच मानतात. वासुदेव शब्दाची व्युत्पत्ती महाभारतात कृष्णमुखाने सांगितली आहे, ती अशी—

छादयामि जगद्विश्वं भूत्वा सूर्य इवांशुभिः ।
सर्वभूताधिवासश्च वासुदेवस्ततो ह्यहम् ।।
(म. भा. शांति. ३४१.४१)

अर्थ — सूर्याच्या किरणांप्रमाणे सर्व विश्व मी आच्छादित करतो आणि सर्व भूतांमध्ये वास्तव्य करतो, म्हणून मला वासुदेव म्हणतात.

पांचरात्र मताच्या उदयापूर्वी वासुदेव हा कोणी वेगळाच देव असावा; पण पांचरात्र मतात तो कृष्णाच्या स्वरूपात विलीन झाला आणि सात्वत लोक त्याला वासुदेव कृष्ण म्हणू लागले. मग ते दोन्ही शब्द एकमेकांचे पर्याय बनले. कालांतराने वासुदेवसहित कृष्ण हाच विष्णूचा अंशभूत मानला जाऊ लागला. आणि शेवटी वासुदेव, कृष्ण, विष्णू आणि नारायण एकमेकात मिसळून ती एकाच भगवंताची नावे ठरली. त्याबरोबर आणखी एक गोष्ट घडली, की वरील चारही देवांना वेगवेगळे भजणारे समाज पांचरात्र मताच्या छत्रच्छायेखाली पूर्णरूपाने संघटित झाले आणि अभिन्न बनले.

सात्वतांचा विचार करीत असतानाच पांचरात्रमताची प्राचीनता सिद्ध होते. ऐतरेय व शतपथ या प्राचीनतम ब्राह्मणांत सात्वतांचा नामनिर्देश आला आहे. ऐतरेय ब्राह्मणाच्या ऐंद्रमहाभिषेकाच्या प्रसंगी सात्वतांचा निवास द. भारत हा सांगितला आहे (८.३.१४). प्रस्तुत ब्राह्मणाचा रचनाकाल सनपूर्व दहाव्या शतकाच्या जवळपास येतो. यावरून त्या काळाच्या आधीच सात्वत लोक द. भारतात येऊन सुप्रतिष्ठित झाले होते, हे कळून येते. पांचरात्रमताच्या उत्पत्तीचा कालही तोच मानणे युक्त ठरते. पांचरात्रमताने वैष्णव भक्तीला तात्त्विक आणि सर्वांगीण स्वरूप दिले. त्यातूनच पुढे इतर वैष्णव पंथ निघाले. पाहा — पांचरात्र. [ भा. सं.; वैष्णव धर्म; पौ. भा. ध. ]

## साधक

मृत्युलोकातील दु:खापासून कायमची सुटका व्हावी व शाश्वत सुखाची प्राप्ती व्हावी, म्हणून शास्त्रात सांगितल्याप्रमाणे जे कोणी प्रयत्न करतात, त्यांना साधक व त्यांच्या प्रयत्नांना साधनमार्ग असे म्हणतात. परमार्थमार्गावर अगदी आरंभापासून ईश्वरदर्शन होईपर्यंत व पुढेही प्रत्येकजण साधकच असतो, असा रामदासस्वामींचा अभिप्राय आहे. जो संतांना शरण जातो व ज्याला संत आत्मज्ञानाचा उपदेश करतात, तोच खरा साधक होय. त्याच्या साधनमार्गात अनेक विकट व धोक्याच्या जागा असतात. त्या धोक्यांची जाणीव संत त्याला करून देतात. एकनाथमहाराजांनी आपल्या भागवतात साधकांना सुस्पष्ट व अचूक मार्गदर्शन केले आहे. त्याचा सारांश असा—

साधकाने सदैव अंतर्बाह्य निर्मळ राहिले पाहिजे. कर्माचरण करून बाह्य शुद्धी साधते व विवेकाच्या साधनेने अंत:शुद्धी साधते. निरनिराळ्या वासनांमुळे मलिन झालेले मन गुरुवाक्याने धुवावे. गुरूच्या उपदेशाने अंत:करण शुद्ध झाले म्हणजे अंतर्बाह्य अशी पवित्रता प्रगट होते. तसेच, त्याने नेहमी एकाकी राहिले पाहिजे. कारण लोकांत मिसळल्याने साधनेत विक्षेप उत्पन्न होतो. कनक आणि कांता या दोन्हीविषयींची आसक्ती जीवाच्या नाशाला कारण होते. स्त्री व पैसा यांच्याविषयी मनापासून उबग आला, तरच साधकाची परमार्थात वाटचाल होऊ शकते. साधकाने स्त्रीचा एकांतात संग जसा वर्ज्य केला पाहिजे, तसाच शिष्यिणी करून त्याने खोड्यात अडकता कामा नये. अंत:करणात कामविकार उत्पन्न होऊ नये, यासाठी साधकाने जागरूक राहिले पाहिजे. तप करण्यासाठी साधक वनात गेला आणि मनात जर कामवासना असेल, तर भगवंताच्याऐवजी स्त्रीचेच चिंतन करू लागेल. स्त्री जरी विरक्त असली, तरी साधकाने तिची संगती धरू नये. कारण स्त्रीच्या संगतीने वृत्ती विकारवश होते. तसेच, त्याने वेदाज्ञेला धरून विहित विषयाचे परिमितच सेवन करावे. त्याच्या आहार, विहार व निद्रा या गोष्टी योग्य त्या प्रमाणात पाहिजेत. इंद्रियांची प्रवृत्ती स्वभावत:च विषयांकडे असते. म्हणून निषिद्ध विषय सर्वथा त्याज्य ठरवून, विहित विषयही परिमितच सेवन केले पाहिजेत. सिद्ध अवस्था प्राप्त होईपर्यंत म्हणजे अविद्येचे बंधन असेपर्यंत त्याने वेदोक्त नियम कसोशीने पाळले पाहिजेत.

साधकाचे चित्त सदैव त्याच्या ताब्यात पाहिजे. चित्ताला विष-

याची ओढ लागलेली असते. त्यामुळे ते परमात्म्याकडे लावायचा प्रयत्न केला, तरी पुन्हापुन्हा विषयाकडे धावते. म्हणून गुरुकृपेची अत्यंत आवश्यकता आहे. गुरुकृपेने विवेक उत्पन्न होतो व मग विषयाच्या व मनाच्या गाठी सुटतात. या मनाचा एक उत्तम गुण असा, की त्याला एकदा का परमात्म्याची चटक लागली, की ते वारंवार त्याचीच इच्छा करते. मग परमार्थातले कष्ट संपतात.

साधकाने सर्वत्र आपणच भरून राहिलो आहो, असा अभ्यास केला पाहिजे. म्हणजे क्रोधाचे प्रसंग आले, तरी साधक विवेकाने आपला राग आवरू शकेल. आपली साधना करताना त्याने दुसऱ्याचे गुणदोष मनात आणू नयेत. एक परब्रह्मच सर्वत्र भरले आहे, त्यात समविषम नाही, असे त्याने मानावे.

श्रवण किंवा ध्यान याचा अभ्यास करताना साधकाने लय, विक्षेप, कषाय आणि रसास्वाद हे चार अडथळे टाळावे. तसेच त्याने सतत भगवंताचे अनुसंधान ठेवावे, म्हणजे साधनमार्गात त्याची प्रगती होत राहील आणि अंती त्याला आत्मज्ञान होईल. [श्री. स. के. नेऊरगावकर, एकनाथदर्शन खंड २ ]

## साधनमाला

एक बौद्ध ग्रंथ. हा ग्रंथ तांत्रिक असून, यातले मंत्र-तंत्र ध्यानीबुद्ध, त्यांची कुले, तारा आणि तिची विभिन्न रूपे यांच्या पूजोपासनेसाठी निर्माण केलेले आहेत. भूतविद्येतल्या सिद्धी प्राप्त व्हाव्या, हा साधनमालेचा मूळ उद्देश असला तरीही, योगाभ्यास, पूजाअर्चा, मैत्री, करुणा, इ. साधनांचा त्यात समावेश आहे. या ग्रंथात एकूण ३१२ साधने आहेत. इ. स. च्या ७ व्या शतकापासून १२ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंतच्या प्रदीर्घ कालखंडात अनेक बौद्ध लेखकांनी या साधनांत भर घालून हा ग्रंथ वाढवला आहे.

मध्ययुगात तांत्रिक पंडित म्हणून ख्याती पावलेल्या लोकांनीच साधनमालेची रचना केली आहे. प्रत्येक साधन हे वेगवेगळ्या देवतांसाठी असते. या ध्यानात निरनिराळ्या देवतांची अंगोपांगे आणि आयुधे सांगितलेली असतात. त्या ध्यानांवरूनच मूर्तिकारांनी तारा, वज्रतारा, ध्यानीबुद्ध, त्यांच्या परिचारिका इत्यादींच्या मूर्ती घडविल्या.

ध्यानी बोधिसत्त्व हा या मूर्तिसंभारातील प्रमुख देव होय. याचेही अनेक प्रकार आणि अनेक नावे आहेत. बोधिसत्त्व ओळखण्याची मुख्य खूण म्हणजे त्याच्या मुकुटातील ध्यानी बुद्धाची मूर्ती होय. ज्या वेळी अशी मूर्ती नसेल, त्या वेळी इतर चिन्हांवरून बोधिसत्त्व ओळखतात.

पण काही वेळा ध्यानी बुद्धाच्या ऐवजी दुसरीच एखादी मूर्ती मुकुटात आढळते. उदा० – सारनाथ येथील उच्छुष्मजंभल या मूर्तीच्या मुकुटात अक्षोभ्य किंवा रत्नसंभव याची मूर्ती पाहिजे होती, पण त्याऐवजी तिथे अमिताभाची मूर्ती आढळते.

साधनमालेतील देवतांच्या मूर्तिध्यानात रंग, आयुधे आणि आसने या गोष्टींना आध्यात्मिक महत्त्व आहे. देवता एकाकी असेल तर निरनिराळ्या पूजाविधीप्रमाणे तिचे वर्ण निरनिराळे असतात. शांतिकविधीत पांढरा किंवा पिवळा, पौष्टिक विधीत पिवळा, वश्यविधीत हिरवा, पिवळा, तांबडा, इत्यादी.

साधनमालेतील मूर्तींची आसनेही मूर्तींच्या विविध अवस्था दाखवतात. उदा० – वज्रपर्यंक = ध्यान; ललितासन = शांती; आलीढ = शौर्य; प्रत्यालीढ = नाश, इत्यादी.

साधनमालेत यब्-युम् नावाच्या मूर्ती सांगितल्या आहेत. यातील यब् = पिता व युम् = माता. यब् म्हणजे शून्यता आणि युम् म्हणजे करुणा असाही त्यांचा अर्थ आहे. ती दोघे संपृक्त अवस्थेत असतात. त्या दोहोंचा संगम म्हणजे श्रेष्ठतम निर्वाणावस्था होय. (यब्–युम् पाहा)

वज्रयान पंथाने शून्य हे अंतिम सत्य मानले आहे. त्यांच्या ध्यानीबुद्धासह सर्व स्त्री-पुरुष देवता मुळात शून्यस्वरूपातच आहेत. त्यांच्या मते देवता आणि त्यांची पूजा करणारा साधक हे दोन्ही एकच होत. देवतांना खरे तर अस्तित्वच नाही; पण साधकाने उच्चारलेल्या बीजमंत्राच्या प्रकाशकिरणातून त्या आविष्कृत होतात.

साधने जसजशी वाढत गेली तसतशा मूर्तीही वाढल्या. तीन काया, चार आनंद, पाच स्कंध, दहा पारमिता, इ. प्रकारे त्यांचा मूर्तिसंभार वाढला. ज्याप्रमाणे सर्व बौद्ध देव-देवता शून्य या कल्पनेभोवती गुंफलेल्या आहेत, त्याप्रमाणेच त्यांची निरनिराळी आयुधे बोधिचित्त या एकाच कल्पनेवर आधारलेली आहेत. वज्रयानी आचार्य बोधिचित्ताला शून्याचेच सत्त्व मानतात. या आयुधांना वेगवेगळी कामे पार पाडायची असतात. म्हणून बोधिचित्तही वेगवेगळ्या स्वरूपात प्रकट होते. उदा० अज्ञान दूर करणे किंवा दुष्टांना निर्दाळणे यांसाठी खड्ग बनते. दुष्टांची हृदये भग्न करण्यासाठी ते अंकुश बनते आणि मारांना बंधनात टाकण्यासाठी ते पाश बनते. वज्रयानमते अभयमुद्रा, वरदमुद्रा, धर्मचक्र ही सर्व बोधिसत्त्वाचीच रूपे होत. बोधिचित्ताच्या मदतीनेच देव साधकाला बुद्धत्व देतो, अशी बौद्धांची समजूत असल्याचे साधनमालेवरून कळते. [ तां. बौ. सा. सा.; इं. बु. इ. ]

## साधसंप्रदाय

उत्तर भारतातील एकेश्वरी मताचा एक संप्रदाय. या संप्रदायाचा मूळ प्रवर्तक कोण आणि त्याचा काल कोणता, हे प्रश्न अजून अनिर्णीत आहेत. त्याच्याबद्दल पौराणिक स्वरूपाची जी माहिती सांगितली जाते, ती अशी – हा संप्रदाय साक्षात महादेवापासून सुरू झाला. कृत-

युगात गोविंद व परमेश्वर यांनी, त्रेतायुगात राम-लक्ष्मण यांनी, द्वापरयुगात कृष्ण-बलराम यांनी व कलियुगात वीरभान व जोगीदास यांनी या संप्रदायाचा प्रचार केला.

वीरभान व जोगीदास हे महादेवाचे अवतार मानले जातात. ते सहोदर बंधू होते. त्यांच्याही पूर्वी त्यां वंशाच्या ११ पिढ्यांत हा संप्रदाय चालू होता. पण संप्रदायाचा प्रभावीपणे प्रसार या दोघांनीच केला. त्यांच्याही चरित्राविषयी निश्चित अशी माहिती उपलब्ध होत नाही. थोडे फार कळते, ते असे –

साधांच्या फर्रुखाबाद व बीजेसर अशा दोन शाखा होत्या. वीरभान हा दुसऱ्या शाखेचा होता. त्याने इ. स. च्या १६ व्या शतकाच्या मध्यास उदयदास नामक साधूकडून दीक्षा घेतली. त्याने वीरभानाला संप्रदायाच्या काही सिद्धांतांचा परिचय करून दिला. वीरभानाच्या पूर्वी उदयदास हाच त्या संप्रदायाचे प्रचारकार्य करीत असे. या उदयदासाची काही दंतकथात्मक माहिती मिळते, ती अशी –

उदयदास हा तरुण वयात दलपत नावाच्या एका व्यापाऱ्याकडे जहाजावर खलाशी होता. एके दिवशी त्या व्यापाऱ्याचे जहाज आपोआप बंद पडले आणि ते काही केल्या पुढे जाईना. जेव्हा उदयदास त्यावरून खाली उतरला, तेव्हा ते पुढे चालू झाले. उदयदास किनाऱ्यावरच्या एका देवळात मुक्कामाला राहिला. झोपेतून जागा होऊन पाहतो, तर त्याला आपण स्वतः-च्याच घरी असल्याचे आढळून आले.

उदयदासाचा भाऊ गोपाळदास. वर उल्लेखिलेले वीरभान व जोगीदास हे गोपाळदासाचे पुत्र होत. उदयदास त्यांना राम-लक्ष्मणांचे अवतार मानू लागला. उदयदासाने त्या दोघांना दीक्षा देऊन पंथप्रचाराच्या कामी लावले. पुढे मुख्यत्वे जाट लोकांनी या पंथाचे अनुयायित्व पत्करले व साधांचा संघ वाढत गेला.

वीरभान व जोगीदास हे दोघे भाऊ साधांच्या दोन शाखांचे प्रवर्तक झाले. या दोन्ही शाखांचे प्रचारक्षेत्र दिल्ली, पंजाब व उत्तर प्रदेश एवढ्या भागात राहिले.

**तत्त्वज्ञान** – या संप्रदायाचे तत्त्वज्ञान सत्नामी संप्रदायाशी बरेचसे मिळते-जुळते आहे. त्याचा व सांप्रदायिकांच्या आचार-धर्माचा परिचय थोडक्यात असा —

परमेश्वर हा एकच असून, तो सृष्टीचा कर्ता, धर्ता व हर्ता आहे. तो निराकार, सर्वव्यापी, सर्वशक्तिमान व परमदयाळू आहे. नामस्मरण, सत्संग, संयम, सत्यनिष्ठा या गोष्टींनी त्याची प्राप्ती करून घ्यायची असते. त्याच्या उपासनेसाठी मूर्तीची पूजा करण्याची गरज नाही. परमात्मा तोच सद्गुरू होय.

या संप्रदायाचा वैयक्तिक साधनेवर भर आहे. संप्रदायप्रवर्तकाच्या बारा आज्ञा अनुयायांनी पाळायच्या असतात, त्या अशा –

(१) ईश्वर एकच आहे, असा बळकट विश्वास ठेवा. तोच सत्य, शुद्ध, अनाद्यनंत व सदाअविगत्त आहे, असे माना.

(२) नम्र आणि कोणत्याही विषयात अनासक्त असा.

(३) खोटे बोलू नका. कोणाचाही मर्मभेद करू नका. कोणाचाही द्वेष बाळगू नका आणि कशाबद्दलही शपथ घेऊ नका.

(४) वाईट गोष्टी ऐकू नका. भजनाशिवाय अन्य संगीत ऐकू नका. संगीताची सर्व सामग्री तुमच्यामध्येच अंतर्भूत आहे.

(५) कशाचीही अभिलाषा धरू नका. जे मिळेल, ते ईश्वर-दत्त समजा. ध्यान आणि आत्मसमर्पण यांनी परमेश्वराला प्रसन्न करून घ्या.

(६) कोणी विचारल्यास मी साध आहे, असे सांगा. जातीचा व कुळाचा उच्चार करू नका. परमेश्वराशिवाय अन्य गुरू करू नका.

(७) शुभ्र वस्त्र परिधान करा. मेंदी, सुर्मा यांचा त्याग करा. तिलक लावू नका. कान टोचू नका. दाढी वाढवू नका.

(८) मादक द्रव्यांचा वापर व व्यापार करू नका. तांबूल, तंबाखू व सुगंधी पदार्थ निषिद्ध माना. परमेश्वराशिवाय अन्य कोणालाही वंदन करू नका. कोणाचीही नोकरी करू नका.

(९) अपहार आणि जीवहिंसा टाळा. अहिंसा हा मुख्य धर्म समजा.

(१०) एकपत्नीव्रत व एकपतिव्रत पाळा.

(११) भिक्षावृत्तीचा त्याग करा. विरक्त साधूचा वेष धारण करू नका.

(१२) शुभाशुभ दिवस व मुहूर्त आणि शकुन-अपशकुन यांवर विश्वास ठेवू नका.

**प्रमाण ग्रंथ** – संत वीरभान याने बानी नावाचा एक ग्रंथ पद्यात रचला आहे. जोगीदास याने निर्वाणज्ञान असा दुसरा ग्रंथ रचला आहे. हे दोन ग्रंथ व आदी उपदेश नावाचा आणखी एक ग्रंथ असे तीन ग्रंथ साध लोक प्रमाण मानतात.

अलिकडे पृथ्वीलाल नावाच्या एका लेखकाने साधपंथ नावाचा एक ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथात गोरख, गरीब, कबीर, गोपीचंद, इ. संतकवींची वचने संग्रहित केलेली आहेत. उमराव-सिंह नावाच्या दुसऱ्या एका लेखकाने 'नसीहत की पुड़िया' या नावाचा ग्रंथ लिहिला असून, त्यात उपदेशात्मक वाक्यांचा संग्रह आहे. साध संप्रदायावर कबीराच्या सिद्धांतांचा पुष्कळच प्रभाव आहे. साध लोक आपला पंथप्रवर्तक उदयदास याला कबीराचाच अवतार मानतात.

**व्यवसाय** – साध लोक मुख्यत्वे शेती, व्यापार आणि जमीन-दारी हे व्यवसाय करतात. काही जण विणकामही करतात. कापडावर नक्षीकाम करण्यात हे लोक विशेष प्रवीण आहेत. यांच्या

या कारागिरीची प्रशंसा व प्रसिद्धी परदेशातही होत आहे.

**विवाहप्रथा** – साध लोक आपल्या संप्रदायाच्या अनुयायांतच विवाहसंबंध जुळवतात. विवाह साधेपणाने, डामडौल न करता साजरा करतात. ज्या घराण्यात एकदा लग्नसंबंध घडला असेल, त्या घराण्याशी पुनश्च संबंध करीत नाहीत. हुंडा, मानपान, देणी-घेणी या सर्व गोष्टींना या संप्रदायात बंदी आहे. वरपिता वधू-पित्याकडे जाऊन मुलीला मागणी घालतो. ती मान्य झाल्यास उभय पक्ष संबंधितांना मिठाई वाटतात. त्याच वेळी विवाहदिन निश्चित करतात. लग्न जुळविणाऱ्याला रुपया व पगडी अहेर म्हणून देतात.

वधू-वरांना शुभ्र चादरीसमोर हातात हात देऊन बसवतात. त्या वेळी नातेवाईक आणि वृद्ध हे काही वेळ ध्यानधारणा करतात. वधू-वरांच्या हातांचे ग्रंथिबंधन करून त्यांना एका वेदीला प्रदक्षिणा घालायला लावतात. त्यावेळी सर्वांत वृद्ध असलेला गृहस्थ खड्या आवाजात सर्वांना प्रश्न करतो. “ साध सोध ई पाई ?” सर्व लोक उत्तर देतात. “ पाई. ” मग दुसरा प्रश्न. “ सब पंचो को भाई?” सगळे उत्तर देतात. “ भाई.” या वेळी गायका जमून मंगल गीते गातात. एवढ्याने विवाहविधी संपतो. लग्नासाठी त्यांना ब्राह्मण पुरोहित लागत नाही.

**चालीरीती** – व्यभिचारी स्त्री-पुरुष दंडार्ह मानले जातात. साधांच्या पंचायतीत त्यांना दंड होतो व तो लगेच वसूलही केला जातो. भेटीच्या वेळी ते परस्परांना दंडवत घालतात. धार्मिक गोष्टी गुप्त राखतात. हे लोक मूर्तिपूजा निषिद्ध मानीत असले तरी आपल्या धर्मग्रंथांची दर पौर्णिमेला पूजा करतात. प्रत्येक गावात त्यांचे मंदिरवजा एक स्थान असते. त्याला ते चौकी म्हणतात. तिथे त्यांचे मेळावे जमतात. फर्रुखाबाद, दिल्ली व आग्रा या ठिकाणी त्यांच्या प्रमुख चौक्या आहेत. तिथे दीक्षाविधी, सत्संग, भंडारा इ. गोष्टी मोठ्या प्रमाणात चालतात. [ उ. भा. सं. प. ]

**साधुवेला तीर्थ** सिंध प्रांतातले एक पुण्यक्षेत्र. योगिराज श्री ११०८ सद्गुरू बनखंडीजी महाराज यांनी इ. स. १८२३ मध्ये सिंध प्रांतातील सक्कर शहराजवळ सिंधू नदीमध्ये एका टेकडीवर या तीर्थाची स्थापना केली. या तीर्थाभोवती घाट बांधून त्यांनी यात्रिकांच्या स्नानादी पुण्य कृत्यांचीही सोय करून ठेवली. पाकिस्तान निर्माण होण्याच्या अगोदर साधू लोकांचे हे एक विश्रामस्थान होते.

प्रारंभी या पहाडावर बसून श्रीबनखंडीमहाराजांनी अन्नपूर्णा मातेची आराधना केली. मातेने त्यांना वरदान म्हणून बदामी रंगाचा एक कमंडलू दिला.

साधुवेला तीर्थ येथे असणाऱ्या महंतांनी धर्मप्रचाराबरोबर विद्येचाही प्रसार केला. सिंध प्रांतभर त्यांनी लोकांत सनातन धर्माबद्दल आदर निर्माण केला. [कल्याण-तीर्थांक]

**साधु-बैरागी** भिक्षेकऱ्यांचा एक वर्ग. लांब केस व दाढी-मिश्या वाढलेल्या, अंगाला राख फासलेली, भगवी कफनी, छाटी किंवा लंगोटी, गळ्यात रुद्राक्षांच्या माळा, दंडात लोखंडी कडी आणि हातात चिमटा किंवा त्रिशूळ असा यांचा पेहराव असतो. कोणी डोक्यावर जटांची गाठ बांधतात, तर कोणी पाठीवर जटा लांब सोडतात. काही साधू पूर्ण मुंडन केलेले असतात. काही साधू केवळ लंगोटी घालतात, तर काही पूर्ण नग्न राहतात. कोणी दंडाला घंटा बांधतात, तर कोणी गळ्यात लिंग बांधतात. कोणाजवळ शंख असतो. कोणाच्या तोंडावर व अंगावर निरनिराळ्या आकृती काढलेल्या असतात, तर कोणाच्या कपाळी गंधाच्या रेघा असतात; शेंदुराचा टिळाही असतो. अशी यांची ही रूपे काही अंशी भयप्रदच असतात.



भेसूर बैरागी

हे साधू निरनिराळ्या जातींतले व निरनिराळ्या पंथांचे असतात. ते एका जागी वसती न करता वर्षभर वेगवेगळ्या गावी, जत्रा भरतात तिथे किंवा तीर्थक्षेत्रांत जाऊन राहतात, जे मिळेल ते खाऊन पोट भरतात व तियून दुसरीकडे जातात. त्यांच्याजवळ एक भिक्षापात्र असते आणि पाण्यासाठी कमंडलू असतो. बहुतेक सर्व साधू व्यसनी असून, ते भांग पितात व गांजा ओढतात.

काही साधू नुसतीच भिक्षा मागतात, तर काही वेड्यावाकड्या अवस्थेत बसून किंवा उभे राहून देहाला कष्ट देतात. तीर्थक्षेत्रांत भोळ्या भाविकांची गर्दी असल्यामुळे अशा भिक्षेकऱ्यांना भरपूर भिक्षा मिळते. काही जण लोखंडी खिळे ठोकलेल्या बिछान्यावर झोपतात; काही जण उलटे टांगून घेतात.

कोणी हात वर करून दीर्घ कालपर्यंत उभे राहतात; तर कोणी साष्टांग दंडवत घालीत यात्रा करतात.



भिन्न-भिन्न अवस्थेत राहून देहदंड सोसणारे साधू



धुंदीत असलेला साधू

या साधूंतले सगळे खरे भिक्षेकरी असतात असे नाही. त्यांतले बरेच भोंदू असतात, काही क्रूर असतात, तर काही चोरही असतात. काही फरारी गुन्हेगारही साधुवेषात राहून दिवस कंठीत असतात. काही साधू चमत्कार करणारे असतात; ते चमत्कार त्यांच्या भक्तांना कधी लाभदायक तर कधी घातकही होतात.

परदेशी प्रवाशांनी साधु-बैरागी, फकीर वगैरे भिक्षेकऱ्यांची वर्णने लिहून ठेवली आहेत, त्यावरून ही परंपरा शेकडो वर्षांपासून चालू असल्याचे समजते आणि मध्ययुगातल्या साधु-बैराग्यांची माहितीही मिळते. त्या काळी कित्येक साधू रानावनांत राहून कठोर जीवन जगताना त्या प्रवाशांना आढळले. ते लहानशा झोपडीत राहत. तिथे एक धुनी सदैव पेटलेली असे. अशा बैराग्यांचे स्वतःच्या देहाकडे फारसे लक्ष नसे. ते नेहमी गांजा ओढीत व धुंदीत असत. ते बहुधा नग्न राहत व अंगाला राख फासत.

पूर्वीच्या काळी शेकडो साधु-वैरागी जमावाने नग्न फिरताना आढळत. ते स्वसंरक्षणासाठी शस्त्रेही बाळगीत. गावातून वैरागी जाऊ लागले, की स्त्रिया आणि मुले कुतूहलाने ते दृश्य बघत. कोणालाही त्यात काही विचित्र वाटत नसे. [ मि. श्रॅ. सें. इं. ]

## साधु-संत

सज्जन, परोपकारी, देवभक्त आणि साक्षात्कारी अशा माणसांना साधुसंत म्हणतात. साधू या शब्दाचा अर्थ पुण्यशील, सदाचरणी, सज्जन असाच आहे. सत्कर्मरत, निर्वैर, निरपेक्ष, निःसंग, निष्काम ही संतांची लक्षणे कबीर, तुलसीदास, तुकाराम, इ. संतांनी सांगितली आहेत. महाभारतात संत हा शब्द सदाचारी या अर्थाने व भागवतात पवित्रात्मा या अर्थाने वापरलेला आहे. भर्तृहरीने संत या शब्दाचा प्रयोग परोपकारी या अर्थाने केला आहे. रामचरित-मानसात सज्जन, साधू, सत्पुरुष, भक्त व संत हे शब्द समानार्थी आहेत. हे संत कामक्रोधादी षड्रिपूंना जवळ न करणारे, अंतर्बाह्य शुद्ध, निष्पाप, निश्चल, श्रद्धायुक्त, क्षमाशील, दयाळू, जितेंद्रिय, परोपकारी, परदुःखाने द्रवणारे व विरागी असतात, असेही त्या ग्रंथात म्हटले आहे.

सामान्य जन व साधुसंत यांच्या विचारांत पुष्कळ भेद असतो. सामान्य लोक ज्याला सुख मानतात, त्याला संतजन अभिशाप मानतात. लोक मृत्यूला भितात, पण संत त्याचे अपरिहार्यत्व जाणून त्याविषयी निर्भय असतात. लोक सुखोपभोग प्राप्त करून घेण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करतात, तर संत विषयवैराग्य बाळगून यदृच्छालाभसंतुष्ट असतात. सामान्य लोकांना मृत्यूनंतर मोक्ष हवा असतो, पण संतांना जीवन्मुक्तीच हवी असते. त्यासाठीच त्यांची सर्व साधना असते.

भारतात संतांची परंपरा अत्यंत प्राचीन आहे. द. भारतात आळवार नावाचे बारा वैष्णव संत होऊन गेले. त्यांचा काळ

निश्चितपणे सांगता येत नाही. नायन्मार नावाचे शैव संतही द. भारतात होऊन गेले. यांची संख्या ६३ असल्याचे सांगतात. साधारणपणे इ. स. चे ५ वे शतक ते १० वे शतक हा त्यांचा काळ मानला जातो. महाराष्ट्रात व कर्नाटकात वारकरी संप्रदायाचे अनेक संत होऊन गेले. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम या थोर मराठी संतांनी महाराष्ट्रात भक्तिमंदिर उभारले; कर्नाटकातील पुरंदरदासादी संतही भक्तिमार्गीच होते. उत्तर भारतातील संतपरंपरा जयदेवापासून सुरू होते आणि त्या परंपरेत



संत दादू दयाळ

कबीर, रविदास, नानक, दादूदयाळ, इ. संतांचा समावेश होतो. गुजरातेत नरसी मेहता, विजयसिंह बोडाणा, धन्नाभगत, इ. संत होऊन गेले. आसामात शंकरदेव, माधवदेव, इ. संत झाले. बंगालमध्ये चैतन्य, चंडीदास, इ. संत निर्माण झाले. निरनिराळ्या प्रदेशांतील या भिन्न परंपरांचा परस्परांशी काय संबंध होता हे निश्चित सांगता येत नाही. नामदेवाने पंजाबात काही दिवस भ्रमण केले होते आणि कबीराने द. भारताची यात्रा केली होती. कबीराने नामदेवाला आदर्श भक्त मानले आहे.

भारताच्या भिन्न भिन्न भागांतील या संतांच्या जीवनात, आचार-विचारांत व आध्यात्मिक साधनेत विविधता असली तरी, आत्मज्ञान किंवा मोक्ष याबाबतीत एकवाक्यता आढळते. परमेश्वरप्राप्तीची तळमळ व त्यासाठी अनन्यभक्ती हा संतांच्या जीवनाचा गाभा आहे. घरदार-संसार विसरून हरिकीर्तनात दंग राहणारे अनेक संत होते. त्यामुळे त्यांच्या योगक्षेमाची चिंता प्रत्यक्ष भगवंताला घ्यावी लागत असे.

अशा साधुसंतांच्या सहवासामुळे सामान्य जनांच्या जीवनात बराच बदल घडून येतो, अशी समजूत आहे. संतांच्या विशुद्ध आचरणामुळे व प्रेमामुळे त्यांच्या भक्तांचें मन सात्त्विक बनते, त्यांचे आचार-विचार शुद्ध होतात व त्यांना शांती लाभते. म्हणूनच तुकोबा म्हणताल –

**न लगे मुक्ति, धनसंपदा । संतसंग देई सदा ।।**

संतसमागमामुळे ईश्वर जवळ येतो, एवढेच नव्हे तर आत्मसुखाचा अंकुरही उगवतो. अमृतराय म्हणतात –

**दे हरि संतपदाची जोड ।**
**संतसमागमे आत्मसुखाचा सुंदर उगवे मोड ।।**

शुद्ध व सात्त्विक जीवन जगणारे, संसारात राहूनही कमलपत्राप्रमाणे निर्लेप असणारे हजारो सत्पुरुष समाजात आढळतात. अशा साधुसंतांची सेवा व भक्ती करून लक्षावधी लोक आपले पारमार्थिक जीवन समृद्ध करून घेताना दिसतात. त्यांच्या दृष्टीने 'साधुसंत येती घरा। तोचि दिवाळी दसरा' होय. कारण सत्पुरुषांचे आशीर्वाद मिळाले, की जीवनातील कोणत्याही आपत्तीला तोंड देण्याचे सामर्थ्य अंगी येते आणि पारमार्थिक आनंद लाभतो, अशी त्यांची श्रद्धा असते.

या बाबतीत महाराष्ट्रीय संतमंडळाच्या कार्याविषयी श्री. गं. बा. सरदार यांनी व्यक्त केलेले विचार असे – वारकरीपंथाने बहुजन समाजाला मानसिक व पारमार्थिक विकासाचा मार्ग मोकळा करून दिला. कोणत्याही जातीच्या मनुष्याला भक्तिपंथाच्या द्वारा आध्यात्मिक उन्नती साधता येईल, प्रापंचिक दुःखावर मात करता येईल, असा विश्वास खालच्या थरांतील लोकांतही निर्माण झाला. संतांच्या चळवळीत धर्मसुधारणेची व लोकजागृतीची भावना असली तरी, समाजक्रांतीची उठावणी नव्हती. एवढ्यावरून त्यांचा भक्तिमार्ग ही एक पळवाट होती, असे म्हणता येत नाही. ऐहिक दुःखांचा व दैन्याचा विसर पाडून मनुष्याला कोणत्यातरी काल्पनिक वातावरणात गुंगवून ठेवणाऱ्या प्रवृत्तीला पळवाट हे नाव शोभेल. परंतु वारकरीपंथाने तर स्त्री-शूद्रांतील जडत्व नाहीसे करून, त्यांच्या जीवनात एक कार्यप्रवर्तक निष्ठा उत्पन्न केली. शास्त्रीय शोधांच्या अभावी बाह्यसृष्टीवर प्रभुत्व मिळविण्याची उमेद जोपर्यंत मानवामध्ये नव्हती, तोपर्यंत त्याच्या व्यक्तिविकासाला आध्यात्मिक अधिष्ठानाची नितांत आवश्यकता होती. म्हणूनच ज्ञानेश्वरांनी महाराष्ट्रातील लक्षावधी लोकांच्या निःसत्व जीवनक्रमाला अध्यात्मज्ञानाची जोड मिळवून दिली. त्यामुळे त्यांना आपल्या दुःखाचा विसर पडला नाही, तर आपल्यातील सुप्त शक्तींची व भाव-

नांची जाणीव झाली; पराभूतपणाची वृत्ती नाहीशी होऊन, प्रतिकूल परिस्थितीला कणखरपणाने तोंड देण्याची त्यांच्या मनाची तयारी झाली. नुसत्या नामसंकीर्तनाचा प्रचार करूनच संत थांबले नाहीत; तर आपल्या आचरणाच्या व ग्रंथांच्या-द्वारे अंतःशुद्धी, कर्तव्यनिष्ठा, भूतदया, क्षमाशीलता, परोपकार,



नरसिंहसरस्वती

इ. दैवी गुणांची जोपासना त्यांनी केली. त्यांनी कर्मठपणाचे वंड मोडले, पण कर्मप्रवृत्तीचा नाश केला नाही. त्यांच्या भागवतधर्मात विवेक आणि नीती यांना फार मोठे स्थान आहे. मनुष्याचा मोठेपणा हा त्याच्या सामाजिक प्रतिष्ठेवर अवलंबून नसून, वैयक्तिक चारित्र्यावर आहे, ही गोष्ट त्यांनी पुनःपुन्हा आवर्जून सांगितली.

वारकरी संतांनी फक्त धार्मिक क्षेत्रातील भेदभाव दूर केला. देवाच्या मंदिरात हा ब्राह्मण, हा शूद्र असा फरक नाही. त्याच्या-पुढे सर्व भक्त सारखे.

**विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म भेदाभेद भ्रम अमंगळ ।**

असे तुकोबा म्हणतात. त्यांची ही शिकवण जनमनात फार खोलवर रुजली.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी 'संत आणि चमत्कार' या विषयावर बोलताना व्यक्त केलेले विचार असे–

"संतांच्या लक्षणांत त्यांच्या चमत्कार–कर्तृत्वाचा उल्लेख कुठेही आढळत नाही. उपनिषदांपासून मध्ययुगीन संतांच्या वचनांपर्यंत अनेक ठिकाणी संतलक्षणे सांगितलेली आहेत; परंतु त्यांत चमत्कारांना स्थान नाही. बुद्धाने सांगितलेली मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा ही अर्हत्पदाची चार लक्षणेच संतांनीही वेगळ्या शब्दांत संतलक्षणे म्हणून उच्चारली आहेत. विश्वातील भूतमात्राशी मैत्री, सकल दुःखितांविषयी अपार करुणा, इतरांच्या उत्कर्षाने मुदित होण्याची प्रवृत्ती आणि त्यांच्या दोषांची निंदा करण्याऐवजी त्यांविषयीचा उपेक्षाभाव बुद्धाने साधुलक्षणांत आवर्जून समाविष्ट केला आहे. 'जें जें भेटें भूत । तें तें मानिजें भगवंत' अशी भक्तियोगाची व्याख्या करणारे ज्ञानदेव, 'भेटो कोणी एक नर । धेड महार चांभार । त्याचे राखावे अंतर । या नाव भजन' असे भक्तिलक्षण सांगणारे रामदास किंवा 'जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुलें' असे साधुलक्षण सांगणारे तुकाराम हे बुद्धविचारांशी एकरूपच आहेत.

सकल दर्शनांचा महासमन्वय साधणाऱ्या भगवद्गीतेनेही भक्त, ज्ञानी, उत्तम पुरुष, स्थितप्रज्ञ, इ. संज्ञांनी संतांच्याच लक्षणांचा विचार केला आहे; परंतु त्यात कुठेही चमत्कार-कृतींना स्थान दिलेले नाही. पतंजलीने मात्र योगसूत्रांच्या समाधि-पादात अष्टमहासिद्धींच्या रूपाने योग्याच्या चमत्कारसामर्थ्याची चर्चा केलेली आहे. संतांच्याकडून कदाचित चमत्कार घडत असतीलही; परंतु ते हेतुतः चमत्कार करण्याच्या विरुद्धच दिसतात. ज्ञानदेव, तुकाराम आणि रामदास हे थोर संत कार्य-कारणभावाच्या अज्ञानातून उद्भवणाऱ्या चमत्कारनिष्ठेचे विरोधकच होते. विश्वातील घटनांच्या कार्यकारणभावाचे रहस्य जाणून घेण्याच्या जिज्ञासेतून विकसित झालेले विज्ञान आणि संतांचे अध्यात्मज्ञान यांत विरोध नाही. विज्ञानाने जे जे नाना शोध लावले आहेत आणि नाना अद्भुत साधने निर्मिली आहेत, त्यांचा उपयोग मानवसंहारासाठी न होता मानवजातीच्या सुखासाठी व्हावा, याकरिता 'ईश्वरनिष्ठांची मांदियाळी' या भूतळावर अनवरत संचार करीत राहिलीच पाहिजे."

संतांच्या कार्याविषयी श्री. संतकुमार टंडन यांनी व्यक्त केलेले विचार असे– "संत हे ईश्वर व सामान्य जन यांच्यामधील दुवा आहेत. संतांना ईश्वराचा साक्षात्कार होतो आणि ते संसारी माणसांना तसा साक्षात्कार घडवण्याचा प्रयत्न करतात. मध्य-युगात हिंदू समाज व धर्म संकटग्रस्त झाला होता. परकीय आक्रमणांमुळे सर्वत्र अंदाधुंदी माजली होती. लोक खरा धर्म विसरले होते, भक्तिमार्ग सोडून भलत्याच मार्गाला लागले होते; वामाचार, बाह्य अवडंबर, अंधश्रद्धा यांमुळे धर्माला विकृत रूप प्राप्त झाले होते; भेदभाव फार वाढले होते. संतांनी या परिस्थितीवर कडक शब्दांत टीका करून, लोकांना खरा धर्म, सदाचार, भक्तिमार्ग याचा उपदेश केला. मानवता, धार्मि-कता, उदारता, दया, सहिष्णुता, अहिंसा, सत्य व धैर्य यांवर

सर्व संतांनी भर दिला आहे. त्यांनी जनतेला पलायनवाद शिकवला नाही, तर आशावाद शिकवला, संघर्षाला प्रोत्साहन दिले व जीवनातील उत्साह वाढवला.



संत नरसी मेहता

आध्यात्मिकता, सहिष्णुता, उदारता ही भारतीय संस्कृतीची विशेष अंगे आहेत. त्या अंगांचा परिपोष व विकास साधावा म्हणून संतांनी पुष्कळ सायास केले. हिंदू व मुस्लिम या भिन्न संस्कृतींचा समन्वय साधावा म्हणूनही त्यांनी प्रयत्न केले. संत-साहित्यात लोककल्याणाची चिंता वाहिलेली आहे. त्यासाठी त्यांनी ज्या धर्माचे प्रतिपादन केले, त्यात प्रेम, समता, सेवाभाव, यांना विशेष स्थान आहे. तो मानवधर्मच आहे.'

पारमार्थिक साधनेत गुरुकृपेला अत्यंत महत्त्व असते आणि गुरुकृपेमुळेच ईश्वरप्राप्ती होऊ शकते, अशी साधकांची धारणा आहे. संतांनीही सद्गुरूचा महिमा गायिला आहे. त्यांनी सद्गुरूला ईश्वरापेक्षाही श्रेष्ठ मानले आहे. गुरूला शरण जावे, त्याची अनन्यभावे सेवा करावी, असा उपदेश त्यांनी केला आहे. समर्थ रामदासांनीही स्वच्छ सांगितले आहे, की ' सद्गुरूवाचून कधीही ज्ञान होणार नाही. ज्याला मोक्ष हवा असेल त्याने सत्संग धरावा. ' गुरू सर्व सिद्धींचा दाता आहे, अशीही श्रद्धा काही संतांनी व्यक्त केली आहे.

संतसाहित्यात नामाचाही महिमा गायिलेला आहे. सर्व संतांनी नामाचे स्तवन केले आहे. गोस्वामी तुलसीदासाच्या मते नामामुळे सर्व कामना पूर्ण होतात व मुक्ती मिळते. सुंदरदासाच्या मते नामस्मरण हे ब्रह्मोपासनेचे सर्वोत्तम साधन होय.

गेल्या शतकाच्या चतुर्थपादात साधुसंतांच्या चळवळीची ऐतिहासिक चिकित्सा होऊ लागली. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांच्या मते ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, इ. भागवतधर्मी संतांनी आपल्या समाजाच्या ऐहिक उत्कर्षाची चिंता केली नाही; किंवा इस्लामी आक्रमणाला प्रतिकार करून हिंदूधर्माचे रक्षण करण्याचाही यत्किंचितसुद्धा प्रयत्न केला नाही; उलट समाजात निवृत्तिधर्माचा प्रसार करून त्याला निःसत्त्व करून ठेवले. संसार क्षणभंगुर आहे, विठ्ठलाचे भजन-कीर्तन करावे, वासना नष्ट कराव्या व ऐहिकाविषयी उदासीनता अंगी बाणवावी; भोवतालच्या घटनांविषयी हर्ष-खेद, रागद्वेष आपल्या चित्तात उठू देऊ नयेत, कारण त्यांमुळेच मनुष्य संसारात बद्ध होऊन मोक्षाला आंचवतो, असा उपदेश संतांनी केला. त्यामुळे महाराष्ट्रीय समाज इहविन्मुख झाला व पारतंत्र्याच्या नरकात पिचत पडला. फक्त एकटया समर्थ रामदासांनी मात्र समाजाला प्रपंचाचे महत्त्व सांगितले, प्रवृत्तिधर्म शिकवला; पराक्रम, स्वराज्य यांवाचून मोक्षधर्माला अर्थ नाही, असा उपदेश केला आणि त्याचा परिणाम होऊन महाराष्ट्रात स्वराज्याच्या स्थापनेची प्रचंड चळवळ निर्माण झाली.

राजवाडे यांचे मत कित्येक सुशिक्षित पंडितांनी मान्य केले आहे. प्रा. पु. ग. सहस्रबुद्धे हे त्यांपैकी एक होत. त्यांनी राजवाडयांच्या मताचा विस्तार केला आहे, तो असा –

संतांना प्रवृत्तिधर्म सांगावयाचा असता, तर त्यांनी देशकालपरिस्थितीचे वर्णन करून लोकांत विजिगीषुवृत्ती जागृत केली असती, राजधर्माचा उपदेश केला असता. स्वातंत्र्य, ऐहिक ऐश्वर्य लाभावे हे संतांचे उद्दिष्ट असते, तर त्यांनी फार निराळा उपदेश केला असता. पण त्यांनी संसाराची व ऐश्वर्याची निंदाच केली आहे. संसारात राहावे पण त्याची सतत घृणा करावी, असे संत सांगतात. समाजाची भौतिक प्रगती त्यांच्या दृष्टीने अगदी गौण होती. मोक्ष हेच त्यांचे उद्दिष्ट होते. त्यांच्या मते ईश्वरभक्ती हीच त्यासाठी आवश्यक असल्याने, त्यांनी राजधर्माकडे पाठ फिरवली. '

संतांनी प्रवृत्तिधर्म उपदेशिला नसला, तरी त्यांनी भागवतधर्माचे पुनरुज्जीवन करून समाजात एक नैतिक बळ निर्माण केले आणि समाजाचे इस्लामी संकटापासून रक्षण होण्यासाठी त्याचा उपयोग झाला, यात संशय नाही. याचे विवेचन प्रा. सहस्रबुद्धे यांनी ' महाराष्ट्र संस्कृती ' या लेखमालेत केले आहे, त्याचा सारांश असा –

" भक्तियोग हे संतप्रणीत भागवतधर्माचे पहिले लक्षण होय.

परमेश्वर निर्गुण, निराकार आहे; सर्व भूतांच्या ठायी आहे, म्हणून सर्व भूतांची सेवा ही खरी भक्ती होय. सर्व मानवतेची



संत कबीर

सेवा हा संतांनी उपदेशिलेला श्रेष्ठ धर्म होय. संतांच्या भक्ति-योगाचे सार असे–

जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती। देह कष्टवीती उपकारे।।
भूतांची दया हे भांडवल संतां। आपुली ममता नाही देही ।।
जे का रंजले गांजले। त्यांसी म्हणे जो आपुले।
तोचि साधु ओळखावा। देव तेथेंचि जाणावा।।

स्वधर्माचरण हे भागवतधर्माचे दुसरे लक्षण होय. वर्णप्राप्त कर्म करून त्या कर्मांनी परमेश्वराची पूजा करायची. त्यामुळेच लोकसंस्थेचे रक्षण होते.

संन्यासविरोध हे तिसरे लक्षण. परमेश्वरप्राप्तीसाठी संसार सोडून वनात जाण्याची गरज नाही, असे संतांनी निक्षून सांगितले आहे. त्यांचा कटाक्ष मनोनिग्रहावर, वासनाजयावर आहे. जितेंद्रिय होऊन केलेला संसारातील भोग मोक्षाच्या आड येत नाही.

शुद्ध चारित्र्याची महती आणि कर्मकांडाचा निषेध हे भागवतधर्माचे चौथे लक्षण होय. शुद्ध चर्या, नीतिनिष्ठा यांवाचून समाजाचा उत्कर्ष कधीही होत नाही, हे जाणूनच संतांनी या गुणांचा महिमा गायिला आहे. शास्त्रीपंडितांनी कर्मकांडाला महत्त्व देऊन धर्माला हीन पातळीवर नेले होते. तीर्थयात्रा, व्रतेवैकल्ये, श्राद्ध-पक्ष, मंत्र-तंत्र हाच त्यांच्या मते धर्म होता. संतांनी या कर्मकांडात्मक आचारधर्मावर कडक टीका केली. टिळा, टोपी, माळा यांचाही त्यांनी निषेध केला. दांभिक आचार, सोंगेढोंगे याची त्यांना चीड होती. भावभक्ती, नीती, सदाचरण, निर्मळ जीवन या खऱ्या भागवतधर्माचे महत्त्व संतांनी समाजमनावर बिंबवले हे त्यांचे कार्य फार मोठे आहे.

हीन, क्षुद्र दैवतांचा निषेध करून विठ्ठल या परमश्रेष्ठ देवाच्या भक्तीचा उपदेश हे भागवतधर्माचे पाचवे लक्षण होय. त्या काळी समाजात जाखाई, मरीआई, सटवाई, कालकाई, इ. क्षुद्र दैवतांचे पूजन चालू होते. ती क्रूर, सूडबुद्धी बाळगणारी दैवते आहेत. पण खरा देव तसा नाही. तो मातेप्रमाणे भक्तांचा प्रतिपाळ करतो, त्यासाठी बळी द्यावा लागत नाही. केवळ भक्तीने, प्रेमाने तो वश होतो. हा उदात्त विचार संतांनी समाजाला शिकवला.

मुस्लीम आक्रमणे सुरू झाली तेव्हा जातिभेद व अस्पृश्यता यांना फार तीव्र स्वरूप आले होते. त्यामुळे हीन गणलेल्या लोकांना बाटवणे मुस्लिमांना सुलभ झाले होते. अशा वेळी वर्णभेद व जातिभेद यांवर कडक टीका करून, तसेच समतेचा उपदेश करून संतांनी सर्वांना मोक्षमार्ग खुला करून दिला, परमार्थक्षेत्रात शूद्रांना व अस्पृष्टांना काही प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. त्यामुळे धर्मांतराला थोडा तरी आळा बसला.

वर्ण व जाती गुणांवरून मानाव्या असा विचार संतांनी काही ठिकाणी मांडला असला तरी, तो फक्त भक्तीच्या क्षेत्रात. त्यांनी वर्णसमतेचा उपदेश केला असला, भेदाभेद अमंगळ मानले असले, तरी नित्याच्या जीवनात जातिभेद व अस्पृश्यता पाळायला पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता. मात्र हरीचा भक्त हीन जातीचा असला, तरी तो श्रेष्ठ, ब्राह्मणाच्या योग्यतेचा मानावा, असे त्यांनी सांगितल्यामुळे अशा अनेक भक्तांना प्रतिष्ठा मिळाली व मानसिक बळ प्राप्त झाले. संतांनी भक्तिमार्गातील समतेचा उपदेश करून, काही मर्यादित प्रमाणात का होईना, हीन जातींना उन्नत केले. हे त्यांचे कार्य बहुमोल आहे.

ज्ञानदेवादी संतांनी सर्व देव एकच आहेत, त्यांत भेद करणे हे पाप आहे, असे आवर्जून सांगितले आहे. त्याचप्रमाणे निरनिराळ्या पंथांना एका वारकरीसंप्रदायात समाविष्ट करून घेऊन संतांनी सर्व महाराष्ट्राला विठ्ठलाचे भक्त बनवले. हे त्यांचे कार्य समाजसंघटनेच्या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे. एक धर्म व एक दैवत यांच्याप्रमाणेच एक प्राचीन परंपरा आणि एक भाषा यांचाही समाज एकरूप करण्यासाठी उपयोग होतो. संतांनी वेद, उपनिषदे, महाभारत, गीता, रामायण यांची परंपरा अखंड राखण्याचा व त्या परंपरेचा अभिमान जागृत ठेवण्याचा सतत प्रयत्न केलेला दिसतो. तसेच मराठी भाषेची

उपासना करून संतांनी तिला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली आणि मराठी समाजाला एकरूपता आणली.



संत तुकाराम

अशा प्रकारे धर्मभावना सतत जागृत ठेवून संतांनी हिंदूंच्या अस्मितेची जपणूक केली. पुढे समर्थ रामदासस्वामी आणि शिवछत्रपती यांनी महाराष्ट्रात राष्ट्रधर्माची स्थापना केली. त्यामुळे संतांच्या प्रयत्नांनी जिवंत राहिलेल्या धर्मभावनेला राष्ट्रभावनेची जोड मिळून समाजाला पुन्हा जीवशक्ती प्राप्त झाली आणि तो मुस्लीम आक्रमणाचा उच्छेद करू शकला."

संतपरंपरा प्राचीन काळापासून वर्तमानकाळापर्यंत अखंड चालू आहे. शुद्ध आचरण, दया, क्षमा, शांती, सर्व भूतांवर प्रेम, परोपकार, ईश्वरनिष्ठा, अनन्यभक्ती, समता, बंधुता, इ. लक्षणे आजच्या संतांमध्येही दिसून येतात. मात्र आता संतांचे कार्य केवळ धार्मिक व परमार्थिक क्षेत्रांपुरते मर्यादित राहिलेले नाही; तर ते सामाजिक व राजकीय क्षेत्रांतही सुरू झाले आहे. यासंबंधी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे विचार असे—

"नव्या सामाजिक चळवळीला संतांच्या आदर्शाची आवश्यकता आहे. परंतु आधुनिक संतांचा आदर्श तुकारामापर्यंतच्या संतपरंपरेपेक्षा काही अंशी निराळा असला पाहिजे. माणूस वैयक्तिक रीतीने रूढीवर हल्ला करून अखेरीस रूढीचे प्रचंड किल्ले भुईसपाट करू शकतो; माणसे मोठमोठ्या चळवळी उभारून इतिहासाला कलाटणी देऊ शकतात, अशी जाणीव पूर्वीच्या सामान्य जनांत तर नव्हतीच; पण संतमहंतांतही नव्हती. सामाजिक स्थिती चालू ठेवणे किंवा बदलणे हे माणसांवर अवलंबून आहे, या गोष्टीची स्पष्ट जाणीव हे नवयुगाचे वैशिष्टच आहे. माणसाला त्या जबाबदारीची जाणीव आता झालेली आहे. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी समाजसुधारकांची नवी धार्मिक चळवळ सुरू झाली, त्यात माणसांच्या सामाजिक जबाबदारीचे तत्त्व जाणले गेले होते. त्याचबरोबर ही क्रांतिकारक जबाबदारीची जाणीव सफल होण्यास आध्यात्मिक शक्तीची आवश्यकता आहे, याही गोष्टीचा प्रत्यय त्या चळवळीच्या धुरीणांस आला होता. त्या चळवळीचा पहिला धुरीण राजा राममोहन राय हा भारतातील पहिला आधुनिक संत होय. पुराण धर्मसंस्थांनी मानव समाजाच्या भोवती उभारलेल्या व अनेक युगे पोसलेल्या भेदभावांच्या तटबंदींना उडवून देणारी शक्ती निर्माण करण्याचे कार्य त्यांनी हाती घेतले होते. सामाजिक सुधारणा व राजकीय क्रांती ही दोन्ही ध्येये निर्वाणीच्या त्यागास तयार होऊन त्यांनी जागृत ठेवली होती. या संताच्या राजकीय क्रांतीच्या व समाजसुधारणेच्या मुळाशी अध्यात्मशक्ती होती."

स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ, दयानंद सरस्वती, अरविंद, पं. मदनमोहन मालवीय, म. गांधी हे थोर पुरुष आधुनिक संतच असून, त्यांनी भारतीय समाजाचे सर्वांगीण पुनरुत्थान व्हावे यासाठी आपले सारे जीवन व्यतीत केले. सारांश, गेल्या दोन हजार वर्षांत होऊन गेलेले साधुसंत हे भारतीय संस्कृतीचे आधारस्तंभच आहेत, असे मानले पाहिजे. [ उ. भा. सं. प.; संतदर्शन; सं. सा. फ.; सा. स. चिं.; संतांचे कार्य—पु. ग. सहस्रबुद्धे, 'वसंत' ऑक्टोबर १९७५, जाने. १९७६; वैं. सं. वि. ]

**साध्य** तामस मन्वंतरातील देवगण. यांची संख्या बारा आहे. मनस्, अनुमंतृ, प्राण, नर, नारायण, वृत्ती, तपस्, हय, हंस, विभू, प्रभू व धर्म अशी यांची नावे आहेत. ब्रह्मांड व मत्स्य या पुराणांत यांची नावे थोडी वेगळी दिलेली आहेत. धर्म व साध्या यांचे हे पुत्र होत. हे यज्ञभाग ग्रहण करणारे असून, यज्ञांत त्यांना पूज्य मानलेले आहे.

स्वायंभुवादी मन्वंतरांत यांना जित, हरी, तुषित, सत्य, वैकुंठ, इ. नावे आहेत.

वैवस्वत मन्वंतरात हेच आदित्य झाले आहेत. [ प्रा. च. को.]

**सान्नाय्य** एक हवी. दूध आणि दही यांच्या मिश्रणाला सान्नाय्य असे म्हणतात. यागाच्या आदल्या दिवशी गाईंची धार काढून दुधाला विरजण लावून ठेवतात. यागाच्या दिवशी सकाळी गाईंची धार काढून ते दूध तापवतात. प्रत्यक्ष देवतेला हवी देण्याच्या वेळी स्रुचीमध्ये दूध व दही एकत्र घेतात व ते देवतेला अर्पण करतात.

दही आणि दूध यांच्या मिश्रणाला सान्नाय्य का म्हणायचे, यासंबंधी तैत्ति. संहितेमध्ये (२.५.३) एक कथा आली आहे, तिचा सारांश असा– वृत्रासुराला मारल्यामुळे इंद्राच्या इंद्रियांचे सामर्थ्य पृथ्वीच्या पोटात शिरले. त्यापासून वृक्षवेली उत्पन्न झाल्या. आपले सामर्थ्य पृथ्वीत शिरले असून, त्यापासून वृक्षवेली उत्पन्न झाल्या आहेत, अशी इंद्राने प्रजापतीकडे तक्रार केली. प्रजापतीने पशूंना सांगितले, की इंद्राचे सामर्थ्य त्याच्याकडे पोचवा. नंतर पशूंनी वेलींचे भक्षण केले. त्यापासून दूध तयार झाले. त्यांनी ते दूध आणि त्यापासून तयार झालेले दही इंद्राकडे पोचविले. 'यत् समनयन् तत् सान्नाय्यस्य सान्नाय्यत्वम्' = इंद्राचे सामर्थ्य त्याला पुन्हा परत नेऊन दिले, म्हणून त्या हवीला सान्नाय्य असे म्हणतात.

सान्नाय्य हा हवी आणखी काही यागांमध्ये सांगितला आहे. सोमयाजी अग्निहोत्र्याच्या दर्शेष्टीमध्ये महेंद्र ही सान्नाय्याची देवता असते. [म.ज्ञा.को.–वेदविद्या; श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**सामराज** (इ. स. चे १७ वे शतक) एक शिवकालीन मराठी आख्यानकवी. याच्या आईचे नाव काशी आणि वडिलांचे नाव लक्ष्मण होते. कवीचे घराणे ऋग्वेदी असून, तो आश्वलायन सूत्राचा व शाकल्य गोत्राचा होता. तुळजापूरची भवानी व खंडोबा ही या घराण्याची कुलदैवते होत. आर्वीचा मुद्‌गलेश्वर हेही त्याचे दुसरे कुलदैवत होते.

मुद्‌गलाचार्य गोसावी हा या घराण्याचा मूळ पुरुष होय. या घराण्यातील तेरावा पुरुष लक्ष्मण याला दोन बायका होत्या. त्यांपैकी धाकटीचा शामभट म्हणजे सामराज असून, त्याच्यापासून कोल्हापूरच्या राजोपाध्ये शाखेला प्रारंभ झाला. राजारामाबरोबर काही काळ हा कवी पन्हाळ्याला होता, म्हणून त्याला पन्हाळकर असेही म्हणत असत. शेवटी तो राजारामाबरोबरच सिंहगडावर गेला आणि तिथे मृत्यू पावला.

रुक्मिणीहरण ही याची प्रमुख रचना होय. त्याशिवाय मुद्‌गलाख्यान, काही पदे व आरत्या, इ. वाङ्मय त्याने रचले आहे. परंतु त्याची ही स्फुटरचना अत्यल्प, आहे. रुक्मिणीहरण या महाकाव्याचा मूलस्रोत म्हणजे भागवताच्या दशम स्कंधातील (अ. ५२–५३) रुक्मिणीस्वयंवर हा कथाभाग होय. याशिवाय त्याने रघुवंश, कुमारसंभव, शिशुपालवध, नैषधीयचरित यांच्या आधारे आपले काव्य सजवले आहे. रुक्मिणीहरण या महाकाव्याची श्लोकसंख्या ११४० इतकी असून, त्याची त्याने आठ सर्गांत विभागणी केली आहे. त्याची भाषा संस्कृतप्रचुर असली तरी, त्याचे निवेदन साधे, सरळ व सोपे आहे. रुक्मिणीच्या विरहव्याकुळ अवस्थेचे वर्णन करताना तो लिहितो –

> तुहिनकर नव्हे, हें बीज चिंतालतेचें  
> विकसित अथवा हे पुष्प उद्वेगतेचे ।  
> अभिनव मदनाचें छत्र किंवा उभारे  
> युवतिजन जयाच्या दर्शनेमात्र भारे ॥  
> नभ धवलित केलें विश्व आनंदवीलें  
> परि विरहिजनाचें चित्त उन्मादवीलें ।  
> क्षणभरि मज, बाई, याकडे पाहवेना  
> प्रलयदहनकल्पस्पर्श हा साहवेना ॥  
> मज निज नलगे हे वैरिणी शेज झाली  
> तगमग सुटलीसे, राति मध्यास आली ।  
> क्षणभरि सपनींही कृष्ण दृष्टी पडेना  
> नयनसलिलयोगें चित्रिचा सापडेना ॥  
> (रु. ह. ३.१०७–१०९)

हे काव्य म्हणजे शिवकालीन भाषेचा एक उत्तम नमुना आहे. [म. सा.; म. वा. इ.–संपा. रा. श्री. जोग; प्रा. म. वा. स्व.]

**साम्नविधान** सामवेदाचे एक ब्राह्मण. सर्वसाधारणपणे ब्राह्मणग्रंथांत आढळणाऱ्या विषयांपेक्षा यातील विषय अगदी भिन्न आहेत. यात एखाद्या व्यक्तीला गावातून पळवून लावण्यासाठी, शत्रूचा नाश करण्यासाठी, तसेच नाना प्रकारच्या उपद्रवांच्या शांतीसाठी सामगायनाबरोबर करायच्या काही अनुष्ठानांचे विधान सांगितले आहे.

या ब्राह्मणात तीन प्रकरणे असून, पहिल्या प्रकरणात कृच्छ्र, अतिकृच्छ्र, इ. प्रायश्चित्तांचे वर्णन आहे. या ब्राह्मणग्रंथाला धर्मसूत्रांची पूर्वपीठिका असे म्हणता येईल. कारण धर्मसूत्रांत विस्ताराने वर्णन केलेले अपराध व त्यांची प्रायश्चित्ते हे विषय यात प्रामुख्याने आले आहेत. [वै. सा. सं.]

**सामवेद** चतुर्वेदांतला तिसरा वेद. याची उत्पत्ती सूर्यापासून झाली असे म्हटले आहे. सामवेदापासून ब्राह्मणांची उत्पत्ती झाली असे तैत्तिरीय संहितेत म्हटले आहे.

साम शब्दाचे अर्थ – साम शब्दाचा पहिला अर्थ प्रिय किंवा प्रियकर वचन असा आहे. कुठे कुठे गान या अर्थानेही तो प्रयुक्त आहे. प्रचलित सामवेदाला हाच अर्थ लागू पडतो. सामवेदात

ऋग्वेदातले पुष्कळसे मंत्र घेतले असून, त्यांच्या आधारे केल्या जाणाऱ्या गायनाला साम म्हणतात. काही ठिकाणी तर ऋग्वेद-मंत्रांनाच साम म्हटले असून, ते यथार्थ आहे. कारण ऋग्वेदातले मंत्र हाच सामाचा आधार आहे. 'ऋचि अध्यूढं साम' (ऋचे-वर वसवलेले ते साम होय) अशी छांदोग्याची उक्तीच आहे.

साम शब्दाची एक विशेष निरुक्ती वृहदारण्यकात आढळते. तिथे म्हटले आहे–

**सा च अमश्चेति तत् साम्नः सामत्वम् ।**

(वृहदा. १.३.२२)

अर्थ – सा म्हणजे ऋचा आणि अम म्हणजे गांधारादी स्वर होत. दोन्ही मिळून साम होते.

यावरून ऋचेशी संबद्ध असे स्वरप्रधान गायन म्हणजेच साम, असा त्याचा व्युत्पत्तिलभ्य अर्थ प्राप्त होतो. ऋचा आणि साम यांचा परस्पर दृढ संबंध सूचित करण्यासाठी ऐतरेय ब्राह्मणात त्या दोहोंमध्ये दांपत्यभावाचीही कल्पना केलेली आहे.

सामवेदाचे महत्त्व – 'सामानि यो वेत्ति स वेद तत्त्वम्'(=जो पुरुष साम जाणतो, त्यालाच वेदांचे रहस्य समजते) असे वृह-द्देवतेत म्हटले आहे. 'वेदानां सामवेदोऽस्मि' (=सर्व वेदांमध्ये मी सामवेद आहे) असे श्रीकृष्णाने त्याला गौरविले आहे (गीता १०.४२). ॐकार हे सामवेदाचे सार असल्याचे छांदो-ग्यात म्हटले आहे. ऋग्वेद व अथर्ववेद या दोन्ही वेदांत साम-वेदाची प्रशस्ती आढळते. 'यो जागार तमु सामानि यन्ति' (=जो मनुष्य जागरणशील असतो त्यालाच सामे प्राप्त होतात) (ऋ.५.४४.१४). उच्छिष्ट म्हणजेच परब्रह्म; याच्यापासून सामवेदाचा प्रादुर्भाव झाला आहे (अथर्व. ११.७.२४).

प्राचीन वैदिक साहित्यात विशिष्ट सामांची नावे प्राप्त होतात. वैरूप, वृहत्, रैवत, गायत्र, भद्र, इ. सामांची नावे ऋग्वे-दात आढळतात. रथंतर, वैराज्य, वैखानस, वामदेव्य, शाक्वर, रैवत, अभीवर्त ही नावे यजुर्वेदात येतात. नौधस, रौरव, अग्नि-ष्टोमीय, इ. सामे ऐतरेय ब्राह्मणात निर्दिष्ट होतात. यावरून सामांची प्राचीनता स्पष्टपणे कळून येते.

सामवेद आणि यज्ञसंस्था – 'वेदा हि यज्ञार्थमभिप्रवृत्ताः' (=वेद हे यज्ञासाठीच प्रवृत्त झाले आहेत) अशी वैदिकांची धारणा आहे. यज्ञसंस्थेचा विचार करता ऋग्यजुःसाम या तीन्ही वेदांचा यज्ञाशी साक्षात संबंध पोचतो. यज्ञातील वेगवेगळी कर्मे करणारे ऋत्विज निरनिराळे असतात. त्यांना विशिष्ट नावे अस-तात. देवतांना संतुष्ट करण्यासाठी ऋचांचे गायन करण्याचे काम सामवेद्यांचे असते. ते करणाऱ्या चार ऋत्विजांचा एक गट असतो. त्यांच्या प्रमुखाला उद्गाता म्हणतात. एखादे साम तयार झाले, की त्याच्या गायनाचे पाच अवयव होतात, ते असे–

(१) प्रस्ताव – हा मंत्राचा आरंभिक भाग असतो. त्याचा प्रारंभ हुं अशा उच्चाराने होतो. गायक गटातला प्रस्तोता हा या अवयवाचे गायन करतो.

(२) उद्गीथ – या अवयवाच्या प्रारंभी ॐकार उच्चारला जातो. उद्गाता हा अवयव उच्च स्वरात गातो.

(३) प्रतिहार – याचा अर्थ दोन पदांना जोडणारा असा आहे. याच्या शेवटी ॐकार येतो आणि हा अवयव प्रतिहर्ता गातो.

(४) उपद्रव – या नावाचा एक अवयव असतो, तो उद्गाता गातो.

(५) निधन – यात मंत्राच्या अंतिम दोन पदांचे अंश किंवा ॐकार राहतो. याचे गायन उद्गाता, प्रस्तोता आणि प्रतिहर्ता असे तिघे मिळून करतात.

सामगानपद्धती – सामयोनी मंत्राच्या आधाराने ऋषींनी गानपद्धतीची रचना केली आहे. या रचनेचे चार प्रकार होतात–

(१) ग्रामगेयगान – यालाच प्रकृतिगान किंवा वेयगान असेही म्हणतात. (२) आरण्यकगान (३) ऊहगान (४) ऊह्यगान (याला रहस्यगान असेही म्हणतात).

सामयोनी मंत्रांना गानरूपात परिवर्तित करताना त्या मंत्रांत संगीतानुकूल अशी सहा शाब्दिक परिवर्तने होतात, त्यांची नावे अशी–

(१) विकार – शब्दाचे परिवर्तन. उदा०– अग्ने च्या जागी ओग्ना इ.

(२) विश्लेषण – यात एकाच पदाचे पृथक्करण होते. उदा० वीतयेच्या स्थानी वो यि तो या २ इ.

(३) विकर्षण – एका स्वराचे दीर्घकालपर्यंत विभिन्न उच्चा-रण. उदा० 'ये' या अक्षराचे या २ ३ यि.

(४) अभ्यास – एखाद्या पदाचे पुनः पुन्हा उच्चारण. उदा० तोयायि, तोयायि.

(५) विराम – सोयीसाठी एखाद्या पदाच्या मध्यभागी थांबणे उदा० 'गृणानोह, व्यदातये' यातील 'ह' वर विराम घेणे.

(६) स्तोभ – औ, ओवा, हा, उ, इ. गानानुकूल उद्गारांचे उच्चारण.

सामगान करीत असतांना त्यांतील ऋचांची आवृत्ती केली जाते. अशा आवृत्त ऋचेला स्तोम असे म्हणतात. साम हे प्रायः तीन ऋचांवर गाइले जाते आणि त्याचे तीन पर्याय म्हणजे आवृत्ती करतात. सामातील ऋचांची आवृत्ती किती वेळा होते यावर स्तोत्रांची संख्या अवलंबून असते. तांड्य ब्राह्मणात स्तोमांचे नऊ प्रकार सांगितले आहेत, त्यांची नावे अशी –

(१) त्रिवृत् (२) पंचदश (३) सप्तदश (४) एकविंश (५) त्रिणव (६) त्रयस्त्रिंश (७) चतुस्त्रिंश (८) चतुश्चत्वा-

रिंश व (९) अष्टचत्वारिंश. पंधरा आवृत्ती होते तो पंचदश.

सामगानात पदांच्या वर १ ते ७ अंकांनी संगीताच्या स्वरांचा निर्देश केला जातो. प्रायः अधिकांश मंत्रांमध्ये पाचच स्वर लागतात. सहा स्वरांनी गायिली जाणारी सामे थोडी आहेत आणि सात स्वरांची त्यांहून थोडी आहेत. सामगानातल्या या सात स्वरांचा बासरीच्या सात स्वरांशी संबंध येतो, तो असा –

| साम स्वर | बासरी स्वर |
|---|---|
| (१) प्रथम | मध्यम (म) |
| (२) द्वितीय | गांधार (ग) |
| (३) तृतीय | ऋषभ (रे) |
| (४) चतुर्थ | षड्ज (सा) |
| (५) पंचम | निषाद (नि) |
| (६) षष्ठ | धैवत (ध) |
| (७) सप्तम | पंचम (प) |

विनत, प्रणत, उत्स्वरित व अभिगीत असे अवांतर चार स्वर सांगितले आहेत. स्वरसप्तक आणि अवांतर स्वर गाताना उद्गात्याने बोटांच्या पेऱ्यांना व अंगुलींना आंगठ्याचा स्पर्श करून तो तो स्वर दाखवायचा असतो.

**शाखाविस्तार** – 'सहस्रवर्त्मा सामवेदः' या पतंजलीच्या वचनावरून कोण्यातरी काळी सामवेदाच्या सहस्र शाखा असाव्या असे वाटते. कदाचित सामगानांची संख्या एक हजार असावी. सामवेदाच्या शाखा निर्माण करणाऱ्या तेरा ऋषींची नावे उपलब्ध होतात, ती अशी–राणायन, सात्यमुग्र, व्यास, भागुरी, औतुंडी, गौल्गुलवी, औपमन्यव, काराटी, मशकगार्ग्य, वार्षगव्य, कुथुम, शालिहोत्र आणि जैमिनी.

ऋषितर्पणात ही तेराच नावे उल्लेखित होतात आणि त्या त्या शाखा त्या त्या नावांवरून ओळखल्या जातात. याचा अर्थ हजारातल्या तेराच शाखा अस्तित्वात राहिल्या, असा होतो. कालांतराने त्यांतल्या ४ गळल्या व ९ उरल्या आणि त्यांतल्याही सांप्रत तीनच अस्तित्वात आहेत, त्यांची नावे अशी – कौथुम, राणायनीय व जैमिनीय. पहिली गुजरातेत, दुसरी महाराष्ट्रात व तिसरी दक्षिणेतल्या केरळ प्रांतात व तिनेवेल्ली आणि तंजाऊर या जिल्ह्यांत प्रचलित आहे. यांचे क्रमाने वर्णन असे –

**(१) कौथुम शाखा** – हिची संहिता सर्वांत अधिक लोकप्रिय आहे. याच संहितेची तांड्य नावाची एक उपशाखा आढळते. गुजरातमधील श्रीमाळी आणि नागर ब्राह्मण, तसेच वंगीय ब्राह्मण यांच्यामध्ये या शाखेचा प्रचार आहे. या संहितेचे पूर्वार्चिक व उत्तरार्चिक असे दोन भाग आहेत. पहिल्या भागाला छंद, छंदसी किंवा छंदसिका असे म्हणतात. पूर्वार्चिकाचे आग्नेय, ऐंद्र, पवमान व आरण्यक असे चार भाग आहेत. हे भाग विषयानुसार असून, त्यांना पर्व असेही म्हणतात. पूर्वार्चिकाचे सहा प्रपाठक किंवा अध्याय आहेत. प्रत्येक प्रपाठकाचे दोन खंड आहेत. प्रत्येक खंडात एक दशती म्हणजे १० ऋचा असायला हव्या. दशती या शब्दाचा अर्थ तोच आहे. पण कुठे कुठे त्या दहांहून कमी भरतात, तर कुठे दहाहून अधिक भरतात. दशतीच्या मंत्रांचे एक छंद व एक देवता या प्रकाराने वर्गीकरण केलेले असते. पहिल्या प्रपाठकाला आग्नेय पर्व म्हणतात. त्यात अग्निविषयक ऋचांचा समूह एकत्र केलेला आहे. दुसऱ्या ते चवथ्या प्रपाठकांत इंद्रदेवताविषयक मंत्रांचे संकलन असल्यामुळे त्याला ऐंद्र पर्व म्हणतात. पाचव्या प्रपाठकाचे नाव पवमान असून, त्यात ऋग्वेदाच्या नवव्या मंडलातील सोमविषयक ऋचांचा संग्रह आहे. सहाव्या प्रपाठकाला आरण्यक असे नाव आहे. त्यात छंद आणि देवता यांची भिन्नता आढळत असली तरी, त्यात गानविषयक एकता आहे. १ ते ५ प्रपाठकांतल्या ऋचांना ग्रामगान म्हणतात. या ऋचा ग्रामात म्हणजे लोकसमूहात गायच्या असतात. सहाव्या प्रपाठकातल्या ऋचा मात्र अरण्यातच गातात. या प्रपाठकाच्या अंती परिशिष्टरूपाने महानाम्नी नामक १० ऋचा दिल्या आहेत. या सर्वांची बेरीज करता पूर्वार्चिकातल्या ऋचा ६५० भरतात.

उत्तरार्चिकात नऊ प्रपाठक आहेत. त्यांतील पहिल्या पाच प्रपाठकांचे प्रत्येकी दोन खंड आहेत आणि शेवटच्या चार प्रपाठकांचे प्रत्येकी तीन खंड आहेत. उत्तरार्चिकाचे विषयानुसार सात भाग होतात. त्यांची नावे अशी – दशरात्र, संवत्सर, एकाह, अहीन, सत्र, प्रायश्चित्त व क्षुद्र.

उत्तरार्चिकाच्या सर्व मंत्रांची संख्या १२२५ आहे. पूर्व व उत्तर अर्चिकांची संमीलित संख्या १८७५ भरते. सामवेदातल्या ऋचा ऋग्वेदातूनच उचललेल्या असल्या तरी, काही ऋचा ऋग्वेदाच्या शाकलसंहितेत आढळत नाहीत. दुसरी विशेष गोष्ट म्हणजे पूर्वार्चिकातले २६७ मंत्र पुनश्च उत्तरार्चिकात घेतलेले आहेत. ऋग्वेदातून १५०४ ऋचा घेतल्या असून, ९९ ऋचा नवीन व वेगळ्या आहेत. या ९९ ऋचांचे संकलन संभवतः अन्य शाखासंहितांतून केले असावे.

**(२) राणायनीय शाखा** – मंत्रगणनेच्या दृष्टीने ही शाखा कौथुमशाखेच्या बरोबरीची आहे. केवळ उच्चारणपद्धतीत कुठे कुठे वेगळेपण दिसते. कौथुमीय लोक जिथे 'हा, उ', व 'अ, आ, इ' असा उच्चार करतात, तिथे राणायनीय लोक 'हा, वु' व 'या, यी' असा उच्चार करतात.

राणायनीय शाखेची एक उपशाखा सात्यमुग्री नावाची आहे. त्या शाखेने तिची उच्चारणपद्धती वरील दोहोंहून वेगळी आहे. त्या शाखेचे लोक एकार व ओकार यांचे ऱ्हस्व उच्चारण करतात. प्राकृत भाषा व आधुनिक प्रादेशिक भाषा यांमध्ये ए ओ चे जसे ऱ्हस्व

उच्चारण होते, तशा प्रकारचे हे उच्चारण असते.

(३) जैमिनीय शाखा – या शाखेचे संहिता, ब्राह्मण, श्रौतसूत्र व गृह्यसूत्र असे चारही अंश उपलब्ध झाले आहेत. या शाखेतल्या मंत्रांची संख्या १६८७ आहे. म्हणजेच कौथुम शाखेहून तिच्यात १८२ मंत्र कमी आहेत. दोहोंत पाठभेदही अनेक आहेत. जैमिनीयांचे सामगान कौथुमशाखेहून जवळजवळ एक हजाराने अधिक आहे.

सामवेदाची ब्राह्मणे – तांडच महाब्राह्मण किंवा पंचविंशब्राह्मण, षड्विंशब्राह्मण, जैमिनीय ब्राह्मण, वंशब्राह्मण, आर्षेयब्राह्मण, मंत्रब्राह्मण आणि सामविधानब्राह्मण ही सर्व सामवेदाची ब्राह्मणे होत. सर्व ब्राह्मणांत तांडचब्राह्मण फार मोठे व जुने आहे. छांदोग्य, केन, जैमिनीय किंवा तलवकार अशी या वेदाची तीन उपनिषदे आहेत.

सामतंत्र – यात तेरा प्रपाठक असून, सामगायनाचा विधी, त्याचे संकेत आणि त्याच्या पद्धती यांचे वर्णन आहे. हे एक प्रकारचे सामवेदाचे व्याकरणच आहे. काहींनी या सामतंत्राचे नाव 'सामलक्षणं प्रातिशाख्यशास्त्रम्' असे दिले आहे. ऋग्वेदातील मंत्रांना सामामध्ये परिणत करण्याच्या विधीच्या संबंधात सामवेदाचे बरेच सूत्रग्रंथ आहेत.

गांधर्ववेद – हा सामवेदाचा उपवेद मानला आहे; पण तशा नावाचा स्वतंत्र ग्रंथ मात्र सापडत नाही. [ वे. शा. दी.; वै. सं. वि.; भा. ध. त.; श्री. वासुदेवशरण अग्रवाल, आजकल, जून १९५८; वै. सा. सं.; वै. सा. ]

## सामव्रत

एक संवत्सर व्रत. व्रतावधी एक वर्ष. या व्रताचा विधी असा – गोमयाचे एक वर्तुळ करून त्यात शिव व केशव यांची पूजा करावी. उद्यापनाच्या वेळी सामऋचांचे गायन करणाऱ्या एका ब्राह्मणाला तिलधेनूसह एक सुवर्णपात्र दान द्यावे. फल – दीर्घायुष्य व समृद्धी यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

## सामिधेनी

ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलातील सत्ताविसाव्या सूक्तातील एक ते अकरा ऋचांना सामिधेनी असे नाव आहे. श्रौत यागात हवींचे आसादन केल्यावर अग्नीला प्रदीप्त करण्यासाठी अध्वर्यूंच्या आज्ञेवरून होता या ऋचा म्हणतो. प्रत्येक ऋचेच्या शेवटी प्रणव म्हणायचा असतो. अध्वर्यू प्रणवाबरोबर अग्नीत एकेक समिधा देतो. सामिधेनी ऋचा या अग्नीच्या स्तुतिपर आहेत. अकरा ऋचांपैकी पहिली व अकरावी तीन तीन वेळा म्हणतात व म्हणून त्या एकूण पंधरा सामिधेनी होतात. यांतल्या चौथ्या ऋचेला समिध्यमानवती व अकराव्या ऋचेला समिद्धवती असे म्हणतात. या दोन ऋचांच्या मधल्या ऋचांना धाय्या असे नाव आहे. दर्शपूर्णमास यागात पंधरा सामिधेनी म्हणायच्या असतात. पण निरनिराळ्या यागांत सामिधेनींची संख्या कमी-जास्त असते. सामिधेनींची संख्या अधिक असल्यास नित्याच्या पंधरा ऋचांत बाहेरच्या अधिक ऋचांची भर घालावी लागते. [ पा. का. भा.; श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## सामुद्रिक

मनुष्याच्या शरीरावरील भिन्न लक्षणे पाहून त्याचा स्वभाव, त्याचे गुणदोष, त्याचा भूतकाल, व भविष्यकाल यांविषयी निदान करण्याची विद्या. समुद्र नामक प्राचीन आचार्यांचा शारीरिक लक्षणांविषयी एक ग्रंथ होता. त्या ग्रंथातील लक्षणांचे ज्ञान ज्याला आहे, तो सामुद्रविद किंवा लक्षणज्ञ होय. अशा व्यक्तींना प्राचीन काळी समाजात फार मान मिळत असे.

रामायण–महाभारताच्या काळापासून ही विद्या भारतात प्रचलित आहे. युरोपखंडातील प्रख्यात हस्तसामुद्रिक चीरो याने आपल्या ग्रंथात, ही विद्या त्याला भारतीय सामुद्रिकांकडून प्राप्त झाली, असे म्हटले आहे. वराहमिहिराच्या बृहत्संहितेतील तीन अध्यायांत या विद्येची माहिती आहे.

गौतम बुद्धाच्या शरीरावर बत्तीस महापुरुषलक्षणे होती, असे म्हणतात. प्रत्येक मनुष्याच्या शरीरावर काहीतरी लक्षण आढळतेच. राय बहादुर गुप्ता नामक सामुद्रिकाने अशा अनेक लक्षणांचे अर्थ पुढीलप्रमाणे सांगितले आहेत –

ज्या मनुष्याच्या कपाळावर अनेक आडव्या रेषा असतात, तो दीर्घायुषी होतो. मात्र कपाळावर दोनच रेषा असल्यास, तो मनुष्य चाळीसपेक्षा अधिक वर्षे जगत नाही; तीन रेषा असल्यास पाऊणशे वर्षे जगतो; चार रेषा असल्यास शतायुषी होतो.

हसताना ज्याच्या गालाला खळी पडते, तो मनुष्य चारित्र्यहीन समजावा. ज्याची हनुवटी मोठी असून, तिला मध्यभागी चीर असते, तो मनोनिग्रही असतो. ज्याची हनुवटी लहान व गोल असते, त्याच्याविषयी स्त्रियांना फार आकर्षण वाटते.

ज्या पुरुषाचे कान मोठे असतील तो स्वैराचारी समजावा. नाकाच्या वरच्या भागावर खोल आडवी चीर असेल तर तो मनुष्य अधिकारी होतो. पुरुषाच्या पाच बोटांच्या अग्रांवर चक्र हे चिन्ह असेल तर तो राजपुत्र समजावा. दहाही बोटांवर चक्र असेल तर तो पुरुष सम्राट होतो.

पुरुषाच्या पायाच्या तळव्यावर, अंगठा व दुसरे बोट यांच्या मध्ये जर एक रेषा असेल तर त्याला पालखी प्राप्त होते. स्त्रीच्या पायाची अंगुली जर जमिनीस स्पर्श करीत नसेल, तर ती स्त्री व्यभिचारी समजावी.

पुरुषाची चार बोटे सूर्यासमोर धरली असता त्यांच्या फटीतून

प्रकाश दिसला, तर तो पुरुष खर्चिक स्वभावाचा असतो.

**हस्तसामुद्रिक** – तळहातावरील रेषा, उंचवटे व अन्य चिन्हे यांच्यावरून मनुष्याच्या भूत, वर्तमान व भविष्यकाळांतील शुभाशुभ घटनांचा विचार करता येतो. मनगटापासून निघून अंगठा व तर्जनी यांमधील भागापर्यंत जी रेषा जाते, तिला पितृरेषा म्हणतात. हाताच्या मागील भागापासून निघून तळहातावरून अंगठा व तर्जनी यांच्या मधील भागापर्यंत जाणारी रेषा मातृरेषा किंवा धनरेषा होय. अंगठा व तर्जनी यांच्या मधील भागाकडे जाणारी तिसरी एक रेषा असते, तिला आयुष्यरेषा म्हणतात. ज्यांच्या हातावरील या रेषा पूर्ण व निर्दोष असतात त्यांना संतती, धन व आयुष्य भरपूर लाभते. पितृरेषेचा स्वामी ब्रह्मा, मातृरेषेचा विष्णू व आयुरेषेचा शिव मानलेला आहे. तसेच इंद्र, यम, वरुण व कुबेर हे तळहाताच्या चारही बाजूंचे स्वामी मानलेले आहेत.

वरील तीन रेषांवरून कफ, वात व पित्तप्रकृतीचे निदान करता येते; तसेच मनुष्याचा स्वभाव स्थिर, चंचल किंवा मिश्र आहे, ते सांगता येते.

छत्र, कमल, धनुष्य, वज्र, स्वस्तिक, बाण, सिंह, वृक्ष, चक्र, शंख, कलश, दर्पण, लक्ष्मी, पुष्पमाला, मोर, इ. शुभ लक्षणे ज्याच्या हातावर असतील तो मनुष्य पुण्यवान व भाग्यवान असतो, असे सांगितले आहे.

हात व मेंदू यांचा जो संबंध असतो, त्यावरून मनुष्याचा हात पाहून त्याच्या स्वभावाचे वर्णन करता येते. हाताचा सर्वसाधारण आकार, तळहातावरील रेषा व उंचवटे यांचा ग्रहांशी संबंध जोडण्यात आला आहे. त्यामुळे हात पाहून मनुष्याचे ग्रहजन्य भविष्य सांगता येते. डावा हात कामासाठी कमी वापरला जातो, त्यामुळे त्यावरील रेषा वगैरे अधिक स्पष्ट दिसतात. म्हणून बहुधा उजव्याबरोबर डाव्या हाताचीही परीक्षा करतात. अंगठा व त्याच्या भोवती जी रेषा असते त्यांचा प्रामुख्याने विचार करतात. ही रेषा जितकी दीर्घ तितके दीर्घ आयुष्य मनुष्याला लाभते. ती रेषा नागमोडी नसेल तर जीवन सुखी असते. अंगठ्याचे पहिले पेरे हे इच्छाशक्तीचे स्थान व अंगठ्याच्या बुडाशी जो उंचवटा असतो, तिथे शुक्राचे स्थान मानले जाते. शुक्राच्या स्थानावर मनुष्याचे प्रेमसाफल्य अवलंबून असते. पहिल्या बोटाजवळचा उंचवटा हे गुरूचे स्थान असून, ते अहंकाराचे निदर्शक आहे. मधल्या बोटाजवळचा उंचवटा हे शनीचे स्थान असून, ते दुर्दैवाचे निदर्शक मानले जाते. तिसऱ्या बोटाजवळचा उंचवटा हे सूर्याचे स्थान असून, ते भाग्याचे निदर्शक होय. करंगळीजवळचा उंचवटा हे बुधाचे स्थान बुद्धीचे निदर्शक असते. तळहाताच्या बुडाशी मंगळाचे व चंद्राचे स्थान आहे. मंगळाचे स्थान धैर्य व क्रौर्य यांचे निदर्शक असून, चंद्राचे स्थान कल्पकता किंवा मूर्खपणा यांचे द्योतक असते.




तळहातावरील रेषा व अन्य चिन्हे

आयुर्मर्यादा, बुद्धी, भावना व भाग्य दर्शविणाऱ्या रेषा सामुद्रिकात ठरविलेल्या आहेत. आयुष्यरेषेला पहिल्या बोटाखाली मिळणारी रेषा ही बुद्धीची रेषा होय. तिच्यावर तिला समांतर अशी हृदयाची किंवा भावनेची रेषा असते. हाताच्या मध्यातून सरळ वरती जाणारी रेषा ही दैवरेषा आणि तिला समांतर असलेली भाग्यरेषा होय. आयुष्यरेषेच्या उगमापासून करंगळीपर्यन्त जाणारी रेषा आरोग्यरेषा मानलेली आहे.

प्रत्येक बोटाजवळ ज्या ग्रहाचे स्थान असते त्या ग्रहाचे स्वभावधर्म त्या बोटाच्या पेऱ्यांवरून जाणता येतात. उदा०– अंगठ्याजवळच्या बोटाचे पहिले पेरे गुरूचा गूढवाद, मधले पेरे त्याची बुद्धिमत्ता आणि खालचे पेरे त्याची अंतःस्फूर्ती दर्शविते.

मलबारमध्ये सुमारे ४०० वर्षांपूर्वी रचलेला एक हस्तसामुद्रिकाचा ग्रंथ उपलब्ध झाला आहे. तो कार्तिकेय-विचारपद्धतीचा आहे. हा ग्रंथ लहानच पण बहुमोल आहे, असे ज्योतिषाचार्य श्री. द. शं. केळकर यांनी म्हटले आहे. या ग्रंथात सुमारे

१५० हस्तरेषांची नावे देऊन त्यांचे सविस्तर वर्णन केलेले आहे. पाश्चात्य सामुद्रिकांना ज्या रेषांचा अर्थ सांगता आलेला नाही, अशा अनेक रेषांचा अर्थ त्यात सांगितलेला आहे. भारतीय सामुद्रिकांनी या शास्त्राचा अभ्यास किती सूक्ष्मपणे केला होता, ते या ग्रंथावरून कळते.

या विद्येविषयी सामुद्रिकाचार्य श्री. ल. के. तांबे यांनी जे विचार व्यक्त केले आहेत, ते असे—

हस्तसामुद्रिक हे मानवनिर्मित शास्त्र नसून, ती एक अलौकिक विद्या आहे. तळहात व बोटे यांचा आकार, त्यावर दिसणाऱ्या रेषा आणि त्या रेषांच्या परस्पर संयोग-छेदनातून निर्माण होणारी विविध प्रकारची चिन्हे या सर्व गोष्टी निसर्गतःच प्राप्त होत असतात. मानवाला त्यात अणुमात्र फेरफार करता येत नाही. हातावरील रेषा पाहून मानवाचे भवितव्य वर्तवता येते. डाव्या हातावरील संकेत प्रारब्धदर्शक असतात. वंशपरंपरेने जे गुणावगुण मानवाच्या ठायी संभवतात, त्यांचा अंदाजही डाव्या हातावरून करता येतो. हृदयाच्या सन्निध असणाऱ्या डाव्या हातावरून भावनांचे प्राबल्यही समजू शकते. उजवा हात वर्तमानकालीन जीवनाचा दर्शक असतो. त्यावरील रेषांवरून प्रारब्धाला मुरड घालण्याचे मानवी सामर्थ्य समजते. माणसाची बुद्धिमत्ता, त्याची सारासार विचारशक्ती, त्याचे मनोधैर्य, त्याचे भावनांवरील नियंत्रण यांचाही अंदाज होऊ शकतो. एका हाती दैव आणि दुसऱ्या हाती पौरुष घेऊनच प्रत्येकजण जन्माला येतो.

हातावरील रेषा बदलतात, याचा अर्थ माणसाच्या जीवनातील सगळ्याच घटना अटळ नसतात, असा असला पाहिजे. परिस्थिती हेरून, संधी साधून व प्रयत्नांची पराकाष्ठा करून प्रारब्धाला इष्ट वळण लावता येणे कितपत शक्य आहे, इतकेच हस्तसामुद्रिक विद्या दर्शविते. ही विद्या सर्वसामान्य माणसाला आत्मोन्नतीची दिशा दाखविते, त्याच्या ऐहिक प्रगतीचे कामी मार्गदर्शन करू शकते, अडीअडचणींची सूचना आगाऊ देऊन सावध करते आणि कोणत्याही महत्त्वाच्या प्रश्नाचा अंतिम निर्णय घ्यावयास बहुमोल मदत करीत असते. विवाहसंबंध जुळविताना वधू-वरांच्या हातावरील रेषा व ग्रहांचे बलाबल पाहून त्यांच्या गुणावगुणांची, कर्तबगारीची व आरोग्याची विश्वासार्ह माहिती मिळू शकते. उद्योगधंद्यातील जोडीदाराची पारखही या विद्येच्या साहाय्याने करणे शक्य आहे. [ पु. वि.; कल्याण— हिंदुसंस्कृति-अंक; एन्सा. रि. ए.; ज्योतिष कौस्तुभ; का. ह. सा.; श. शा. ]

## साम्राज्य

राज्याचा एक प्रकार. ऐतरेय ब्राह्मणात राज्यांचे जे अनेक प्रकार सांगितले आहेत, त्यांतला साम्राज्य हा पहिला प्रकार आहे. आजच्या अर्थाने त्या वेळी साम्राज्य हा शब्द प्रचलित नव्हता. आजच्या साम्राज्यकल्पनेत अर्थकारणाचा मोठा भाग आहे, तो तत्कालीन कल्पनेत नव्हता. आर्य लोक पराक्रम सिद्ध करण्यासाठी किंवा एखाद्या देशातील अन्याय व अत्याचार यांचे निर्मूलन करण्यासाठी दुसऱ्या देशावर चढाई करीत, त्या राजाला युद्धात जिंकीत आणि जित राजाला किंवा त्याच्या वंशातल्या कोणाला तरी राज्यावर वसवून त्याला आपला मांडलिक बनवीत. पराजित देश लुटणे किंवा त्याला आग लावणे किंवा त्याचे सतत आर्थिक शोषण करीत राहणे, या अनैतिक गोष्टी त्यांच्या साम्राज्यकल्पनेत नव्हत्या. रामाने रावणाला मारले; पण विभीषणाला त्याच्या जागी सिंहासनावर बसवले व लंकेत पायही न देता परतीचे प्रस्थान ठेवले.

प्राचीन काळी सम्राटांच्या राज्याभिषेकासाठी विशेष संस्कार तयार करण्यात आले होते. अश्वमेध यज्ञ करण्याचा अधिकार केवळ सार्वभौम सम्राटालाच होता, असे आपस्तंब श्रौतसूत्रात (२०.१.१) सांगितले आहे. भरत वंशातील दौःषन्ती व सत्राजित शतानीक हे दोन राजे सम्राट होते. दौःषंतीने सत्वंत जनाचा पराभव केला व कुरू देशात साचीगुण येथे व गंगा-यमुनांच्या तीरावर अश्वमेध यज्ञ केले. सत्राजित शतानीकाने काशी जनपदाच्या राजाला पराजित केले. ऐतरेय ब्राह्मणात व शतपथ ब्राह्मणात अशा बारा सम्राटांची नावे दिलेली आहेत.

सम्राटाच्या अंकित असलेल्या मांडलिक राजांना आपल्या राज्यातील अंतर्गत कारभारात पूर्ण स्वातंत्र्य असे. त्यांच्या स्थानिक कायद्यांत व रीतिरिवाजांत साम्राज्यसत्ता हस्तक्षेप करीत नसे. त्याबद्दल शांततेच्या काळात मांडलिक राजे सम्राटाला करभार देत आणि युद्धाच्या किंवा संकटाच्या प्रसंगी आपले सैन्य पाठवून सम्राटाला मदत करीत. [ वै. सा.; हिं. स.; अ. स. अळतेकर, नवभारत, फेब्रुवारी १९४९ ]

## सायणाचार्य

(इ. स. १३१५–१३८७) एक मुत्सद्दी, संग्रामशूर, प्रकांड पंडित आणि वेदभाष्यकार. याचा जन्म आंध्र प्रदेशातल्या एका ब्राह्मणकुळात झाला. त्याच्या वडिलांचे नाव मायण व आईचे श्रीमती असे होते. सायण हा माधवाचार्यांचा धाकटा भाऊ होय. त्यालाही एक धाकटा भाऊ होता. आणि त्याचे नाव भोगनाथ असे होते. सायणांच्या वडिलांची आर्थिक स्थिती सामान्यच होती.

सायणांना लहानपणापासूनच उत्तम शिक्षणाचा लाभ झाला. पहिल्याप्रथम त्यांनी व्याकरणात प्रावीण्य मिळविले. ऋग्वेदाच्या पहिल्या अष्टकाच्या भाष्याकडे बारकाईने पाहिले असता सायणांनी एकेका वैदिक पदाची सिद्धी किती पांडित्यपूर्ण रीतीने केली आहे, ते दिसून येईल. त्यावरून सायण हे महावैयाकरणी होते.

याबद्दल संशय राहत नाही. मीमांसाशास्त्रातही ते प्रगाढ पंडित होते. हे शास्त्र त्यांनी त्यांचे थोरले बंधू माधवाचार्य यांच्याकडून मिळवले असावे.

सायणाचार्यांचे एकूण तीन विद्यागुरू होते, असे दिसते. सायणांना भाष्यकाराच्या महायोग्यतेस चढवणारे त्यांचे मुख्य गुरू म्हणजे शृंगेरी पीठाचे स्वामी विद्यातीर्थ हे होत. सायणांची या गुरूंवर नितांत भक्ती होती. भारती कृष्णतीर्थ हे सायणांचे दुसरे गुरू होत. ते शृंगेरी पीठावर अधिष्ठित होते. श्रीकंठनाथ हे सायणांचे तिसरे गुरू होत. ते कांचीपुरस्थ होते. ते शैवदर्शनाचे महापंडित असून, इतरही अनेक शास्त्रांत पारंगत होते. दक्षिणेतील विद्वन्मंडळात त्यांचा चांगला लौकिक होता.

सायणांचे बाल्य आणि तारुण्य असे केवळ विद्यासंपादनातच गेले. पुढे जे त्यांना वेदभाष्याचे प्रणयन करायचे होते, त्याची बौद्धिक तयारी त्यांनी याच कालात करून घेतली.

वयाच्या ३१ व्या वर्षी सायणाचार्य हे हरिहराचा धाकटा भाऊ कंपण याच्या राज्याचे महामंत्री झाले. त्याविषयीचा उल्लेख कोडवलूर येथील शिलालेखात आढळतो. सायणाचार्यांनीही सुभाषितसुधानिधीच्या पुष्पिकेत 'पूर्वपश्चिम समुद्राधीश्वर श्रीकंपराज महाप्रधान' असा स्वत:विषयी उल्लेख केला आहे. कंपणाच्या मृत्यूपर्यन्त ते त्याचे महाप्रधान होते. कंपण हा आंध्र प्रदेशातील उदयगिरी (जि. नेलोर) येथे विजयनगर–सम्राट हरिहर याचा प्रतिनिधी म्हणून राज्य करीत होता.

कंपणाचा पुत्र संगम (२रा) हा कंपणाच्या मृत्यूच्या वेळी फार लहान होता. कंपणाने त्याला सायणाचार्यांच्या हाती निरवले आणि देह सोडला. सायणांनी त्याला शिक्षण देऊन राजकारणात तरबेज बनवले. एवढे करूनच ते थांबले नाहीत; तर त्याच्या समस्त राज्याचा भार त्यांनी आपल्या माथी घेतला. सायणाचार्यांनी संगमाचे राज्य उत्तम चालवले व समस्त प्रजेला सुख-शांतीचा लाभ दिला. त्याच्या उत्तम राज्यकारभाराची प्रशंसा पुढील श्लोकार्धात केलेली आहे –

सत्यं मही भवति शासति सायणार्ये ।
सम्प्राप्तभोगसुखिन: सकलाश्च लोका: ।।

अर्थ – सायणाचार्य राज्याचे शासन करीत असता खरोखर सगळ्या लोकांना उपभोगांची सुखे प्राप्त झाली.

सायणांनी संगमाचे राज्य केवळ सांभाळले असे नव्हे, तर ते वाढवलेही. या उद्योगात त्यांना तलवारही हाती घ्यावी लागली. त्याचा इतिहास असा –

चोळ देशाचा चंप राजा मोठा संधिसाधू व महत्त्वाकांक्षी होता. त्याची सीमा उत्तरेस उदयगिरीच्या राज्याला जाऊन भिडलेली होती. कंपण मृत्यू पावला आहे आणि राजपुत्र संगम (२रा) लहान आहे, अशा वेळी आपण त्याच्या राज्यावर चाल केल्यास आपल्याला अधिक मुलूख मिळेल, अशा समजुतीने त्याने संगमाची कुरापत काढली आणि त्याच्या राज्यावर चाल केली. पण सायण सावध होते. त्यांनी तलवार घेऊन आपल्या सैन्यासह कांचीपुरम्‌पर्यंत त्याच्या राज्यात धडक मारली. ही लढाई इ. स. १३५५ च्या सुमारास झाली. तिच्यात सायण विजयी झाले आणि चंपराजा त्यांना शरण आला. याविषयी अलंकारसुधानिधीत एक श्लोक आढळतो, तो असा –

दिष्ट्या दैष्टिकभावसम्भृतमहासम्पद्विशेषोदयम् ।
जित्वा चम्पनरेन्द्रमूर्जितयशा: प्रत्यागत: सायण: ।।

भावार्थ – संपत्तीने मदांध झालेल्या चंपराजाचा पराभव करून धवलकीर्ती सायण परत आला.

वयाच्या सुमारे ४८व्या वर्षापर्यंत संगम राजाचे राजकारण सांभाळून सायणाचार्य नंतर विजयनगरला सम्राट बुक्क राजाच्या राज्यात आले. तिथेही त्यांना प्रधानपद प्राप्त झाले. हे त्यांच्या ऋग्वेदभाष्याच्या पुष्पिकेवरून कळून येते. तिथे ते स्वत:विषयी 'वीरबुक्क साम्राज्यधुरंधर' असे लिहितात.

कंपणाचे अमात्यपद सांभाळीत असतानाच सायणांनी ग्रंथलेखनास प्रारंभ केला होता आणि काही लोकोपयोगी ग्रंथ निर्माणही केले होते. त्यांची नावे व परिचय असा –

(१) सुभाषितसुधानिधी – कंपणाच्या मंत्रिपदाच्या कारकिर्दीतच या ग्रंथाची रचना झाली, असे कळते. यात त्यांनी विविध विषयांतली बोधप्रद संस्कृत सुभाषिते निवडून त्यांचा संग्रह केला आहे.

(२) आयुर्वेदसुधानिधी – धर्माचरणाला आयुर्वेदाचे ज्ञान उपकारक आहे, असे जाणून त्यांनी या ग्रंथात आयुर्वेदातील रहस्यांचे स्पष्टीकरण केले आहे.

(३) अलंकारसुधानिधी – या ग्रंथात संस्कृत साहित्यातील विविध अलंकार सांगून त्यांचे सोदाहरण स्पष्टीकरण केले आहे. हा ग्रंथ द. भारतात आजही प्रचारात असून, अप्पय्य दीक्षित या प्रसिद्ध संस्कृत पंडिताने आपल्या चित्रमीमांसेत त्याचा गौरव केला आहे.

(४) पुरुषार्थसुधानिधी – या ग्रंथात चतुर्विध पुरुषार्थांच्या सिद्धीसाठी उपयुक्त अशी महाभारत व पुराणे यांतील उत्तमोत्तम वचने संग्रहीत केली आहे.

(५) प्रायश्चित्तसुधानिधी – या ग्रंथात धर्मशास्त्रातील आचार, व्यवहार व प्रायश्चित्त या विषयांवर विवेचन केले आहे.

(६) धातुवृत्तिसुधानिधी – ही पाणिनीय धातुपाठावरची विस्तृत व प्रामाणिक अशी टीका आहे. या ग्रंथात सायणांनी हेलाराज, भट्ट भास्कर, क्षीरस्वामी, शाकटायन, पतंजली,

भर्तृहरी, कैयट, हरदत्त, जयादित्य, इ. अनेक प्राचीन वैयाकरणांच्या मतांचा ठायी ठायी उल्लेख केला आहे. हा ग्रंथ शब्दशास्त्रीय ज्ञानाचे भांडारच आहे.

याशिवाय यज्ञतंत्रसुधानिधी नावाचा एक ग्रंथ भाष्यरचनेच्या काळातच त्यांनी निर्माण केला असावा.

**सायणाचार्यांची वेदभाष्ये** – ही भाष्ये म्हणजे वेदार्थाच्या जिज्ञासूंना कल्पवृक्षासारखीच ठरणारी आहेत. सायणाचार्य हे भाष्यकार या नावानेच अजरामर झाले आहेत. अलौकिक विद्वत्ता, व्यापक पांडित्य आणि वर्षानुवर्षांचा अविरत उद्योग या तीन महनीय गुणांचा परिचय या भाष्यांच्या परिशीलनाने होऊ शकतो. प्रस्तुत भाष्यरचनेचा उपक्रम झाला, तो असा –

बुक्क राजा जसा शूर आणि धुरंधर होता, तसाच तो विद्याप्रेमी व धर्मजिज्ञासू असा होता. ज्ञानप्रसाराविषयी त्याला ओढ होती. माधवाचार्यांनी लिहिलेला पराशरमाधव हा धर्मशास्त्रावरचा मौल्यवान ग्रंथ पाहून बुक्क राजाला फार आनंद झाला. त्याचबरोबर त्याला असेही वाटले, की अशाच जातीचा वेदांचा अर्थ सुगम व सुबोध करून सांगणारा एखादा ग्रंथ माधवाचार्यांनी लिहावा, आपली वेदार्थ जाणण्याची इच्छा पुरी व्हावी आणि पुढे तो ग्रंथ जगाला उपकारक ठरावा.

राजाची ही ज्ञानतृष्णा पाहून माधवाचार्यांना फार आनंद वाटला. पण ते म्हणाले–

" महाराज, आपली इच्छा अवश्यमेव पुरी होईल. पण ती माझ्या हातून नव्हे, तर माझा धाकटा भाऊ सायण याच्या हातून. या कामी माझ्यापेक्षा तो अधिक योग्य असून, विविध शास्त्रांचा गाढ व्यासंगी आहे. तुम्ही त्याच्यावरच हे काम सोपवा. "

बुक्क नरेशाने ती गोष्ट मान्य केली आणि सायणाचार्यांना त्याबाबत भीड घातली. माधवाचार्यांनीही सायणाकडे तसा आग्रह धरला आणि मग सायणाचार्यांना वेदभाष्यलेखन हाती घेणे भाग पडले.

सायणाचार्यांनी भाष्यलेखनासाठी प्रथम घेतला तो कृष्णयजुर्वेद. वेद हे यज्ञासाठी अभिप्रवृत्त आहेत हे त्यांना मान्य होते. कोणत्याही यज्ञामध्ये अध्वर्यूच्या कर्माला प्राधान्य असते. यज्ञाची परिभाषा आणि कृत्यप्रणाली यजुर्वेदात सांगितली आहे. त्यामुळे सायणाचार्यांनी यजुर्वेदालाच अग्रमान दिला.

कृष्ण यजुर्वेदावर प्रथम भाष्य लिहिण्याचे आणखीही एक कारण संभवते. सायणाचार्य स्वतः कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचे होते. म्हणूनही त्यांनी आपल्या वेदाला अग्रपूजेचा मान दिला असणे शक्य आहे. तैत्तिरीय संहितेवरील भाष्य पुरे झाल्यावर त्यांनी तैत्ति. ब्राह्मण व तैत्तिरीय आरण्यक यांच्यावरही भाष्ये लिहिली आणि यजुर्वेदाची वाङ्मयी पूजा पूर्ण केली.

त्यानंतर सायणांनी ऋग्वेदाचा क्रम लावला.. यज्ञामध्ये अध्वर्यूच्या नंतर होता या ऋत्विजाचे कार्य महत्त्वपूर्ण असते. होत्याच्या या कर्माला हौत्र म्हणतात. ऋग्वेद हा हौत्रकर्माचा वेद आहे. म्हणून ऋग्वेदभाष्याचे काम त्यांनी पुरे केले. नंतर ऐत. ब्राह्मण व ऐत. आरण्यक या ऋग्वेदीय ग्रंथांवरही त्यांनी भाष्ये लिहिली.

त्यानंतर सायणाचार्यांनी सामवेदाचे व त्यानंतर अथर्ववेदाचे भाष्य पुरे केले.

सायणाचार्यांच्या सर्व भाष्यांत शतपथब्राह्मणावरील भाष्य ही शेवटची रचना होय. अथर्व व शतपथ यांवरची भाष्ये बुक्क नरेशाच्या कारकिर्दीत निर्माण होऊ शकली नाहीत. ती हरिहर (२रा) याच्या कारकिर्दीत पुरी झाली. सायणाचार्यांच्या एकूण भाष्यग्रंथांची यादी पुढीलप्रमाणे –

| | |
|---|---|
| (१) तैत्तिरीय संहिता | (१०) सामविधान ब्राह्मण |
| (२) ऋग्वेद संहिता | (११) आर्षेय ब्राह्मण |
| (३) सामवेद संहिता | (१२) देवताध्याय ब्राह्मण |
| (४) काण्व संहिता (८२० अध्याय) | (१३) उपनिषद् ब्राह्मण |
| | (१४) वंश ब्राह्मण |
| (५) अथर्ववेद संहिता | (१५) संहितोपनिषद् ब्राह्मण |
| (६) तैत्तिरीय ब्राह्मण | (१६) शतपथ ब्राह्मण |
| (७) ऐतरेय ब्राह्मण | (१७) तैत्तिरीय आरण्यक |
| (८) तांड्य ब्राह्मण | (१८) ऐतरेय आरण्यक |
| (९) षड्विंश ब्राह्मण | |

सायणाचार्यांनी आपल्या वेदभाष्याच्या पुष्पिकेत त्या त्या भाष्यनामाच्या पूर्वी माधवीय असे विशेषण जोडले आहे. त्यावरून काही विद्वानांनी अशी समजूत करून घेतली होती, की ही भाष्ये सायणाचार्यांनी न लिहिता माधवाचार्यांनी लिहिली आहेत. पण या समजुतीत तथ्य नाही, असे सिद्ध झाले आहे. माधवाचार्यांची प्रेरणा आणि प्रोत्साहन या ग्रंथांच्या मागे होते आणि सायणांना आपल्या वडीलबंधूंबद्दल नितांत आदर होता. तो आदर व्यक्त करण्यासाठी आपल्या ग्रंथांना माधवीय असे विशेषण त्यांनी जोडले. ही सर्व वेदभाष्ये एककर्तृक नाहीत, असेही काही विद्वानांना वाटते. पण तेही खरे नव्हे. नारायण, नरहरी व पंढरी दीक्षित या तीन वैदिक पंडितांचे साहाय्य आणि सहकार्य घेऊन सायणांनीच संपूर्ण भाष्ये लिहून पुरी केली.

चालू शतकात अनेक युरोपियन व अमेरिकन संस्कृतज्ञांनी चारही वेदांचे सखोल अध्ययन केले आहे. त्यांनी वैदिक ग्रंथांची शुद्ध संस्करणेही प्रकाशित केली आहेत, माक्स म्यूलर, वेब्बर, बेनफी, रॉथ, व्हिटने, विल्सन, ग्रासमन, लुडविग, ग्रिफिथ, कीथ,

विंटरनिट्झ, हे वैदिक वाङ्मयाचे महान पंडित म्हणून प्रसिद्ध आहेत. या मंडळींनी ह्यातभर वेदांवर जे परिश्रम केले, त्यांना तोड नाही. यांपैकी कित्येकांनी सायणाचार्यांची भाष्ये अभ्यासली आहेत हे निश्चित. पण सायणाचार्यांना प्रमाणभूत वेदभाष्यकार मानायला ते तयार नाहीत. सामान्यपणे त्यांचे मत असे –

ज्याला वेदार्थाचे अनुशीलन करायचे असेल, वेदांतून खरा अर्थ काढायचा असेल, त्याला तौलनिक भाषाशास्त्राचे ज्ञान हवे. त्याचबरोबर भारताबाहेरच्या देशांचे धर्म, रीतिरिवाज यांचाही परिचय हवा. हे सर्व असेल तरच वेदार्थ निश्चित समजू शकेल. सायणाचार्यांना असे काही ज्ञान नसल्याने त्यांना वेदार्थाचे सम्यक आकलन झाले नाही. सायणाचार्यांना भारतीय परंपरेचेही ज्ञान नाही. कारण त्यांच्यापर्यंत ती परंपरा लुप्त झाली होती. त्यांनी कित्येक ठिकाणी एकाच शब्दाचे भिन्न भिन्न अर्थ दिले आहेत, त्याचे कारण परंपरालोपातच आहे. यावरून अर्थनिश्चयाच्या बाबतीत ते स्वतःच संशयग्रस्त होते, असे दिसते.

पण हे आरोप अर्धसत्य आहेत. सायणाचार्यांना तौलनिक भाषाशास्त्राचे आणि जगातल्या इतर धार्मिक परंपरांचे ज्ञान नसणे शक्य आहे; पण भारतीय धर्म आणि भारतीय परंपरा यांचे त्यांना सम्यक ज्ञान होते, याबद्दल कोणी शंका घेऊ नये.

सायणांनी आपली वेदव्याख्या प्राचीन आचार्यांचा ठायी ठायी आधार घेतच लिहिली आहे. प्राचीन परंपरा सायणापर्यंत अविच्छिन्न रूपाने चालत आली होती, याचीही काही प्रबल प्रमाणे सांप्रत उपलब्ध होत आहेत. स्कंदस्वामीने सहाव्या शतकाच्या सुमारास ऋग्वेदावर भाष्य लिहिले होते. स्कंदस्वामी आणि सायण या दोघांचेही ग्रंथ ताडून पाहता ते दोघेही एकाच परंपरेचे आहेत, हे स्पष्ट कळून येते. सायणांनी निरुक्तकार यास्क यांच्या मताचाही शेकडो वेळा उल्लेख केला आहे. यास्कांच्या कित्येक व्याख्या सायणांनी स्वीकारल्या आहेत आणि कित्येक व्याख्या यास्कांच्या व्याख्यांना अनुरूप अशा नव्या केल्या आहेत. यावरून यास्क ज्या परंपरेत वाढले, तीच परंपरा सायणापर्यंत येऊन पोचली होती, हे निश्चित ठरते.

'इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपवृंहयेत्' (=इतिहास व पुराणे यांच्या साह्याने वेदांचे उपबृंहण म्हणजे विशदीकरण करावे) अशी विचारसरणी दृढमूल आहे. सायणाचार्यांना ही इतिहास – पुराणे माहीत होती. त्यांनी वैदिक पदांचा परंपरागत अर्थ स्वीकारून त्या अर्थांच्या पुष्टीसाठी पुराणे, इतिहास, स्मृती, महाभारत, इ. ग्रंथांतली वचने आवश्यकतेनुसार उद्धृत केली आहेत. त्यांनी अर्थनिश्चितीसाठी वेदांच्या षडंगांचाही आधार घेतला आहे; कल्पसूत्रांचा उपयोगही व्यापक प्रमाणावर केला आहे; सूक्तविषयक उपलब्ध आख्यायिकाही दिल्या आहेत.

सायणांनी आपल्या भाष्यात याज्ञिक पद्धतीला बरेच महत्त्व दिले आहे. त्या कालाची ती गरज होती. कारण त्या कालात कर्मकांडाचा खूप प्रचार होता. त्यामुळे त्यांच्या काही यज्ञपरक वेदव्याख्या बरोबर नसण्याचीही शक्यता आहे. म्हणून त्या पदांचा आणि सूक्तांचा मूलगामी अर्थ लावणे ही गोष्ट इष्ट ठरणार असली, तरी तेवढ्यावरून सायणाचार्यांना वेदार्थविषयात अपंडित ठरवणे केव्हाही रास्त होणार नाही.

वेदांचे परिशीलन करणाऱ्या प्रत्येक भारतीयाने आणि पाश्चात्य अभ्यासकानेसुद्धा सायणाचार्यांच्या पुढे नतमस्तक झाले पाहिजे. पाश्चात्य पंडितही सायणभाष्याच्या मदतीनेच वैदिक मंत्राच्या अर्थावगाहनात कृतकार्य झाले आहेत. पाचही वेदसंहितांवर इतके सुव्यवस्थित, पूर्वापरविरोधहीन आणि पांडित्यपूर्ण भाष्य लिहिणे हीच मुळी असामान्य गोष्ट आहे. सायणाचार्य परंपरेचे यथार्थ ज्ञानी असल्यामुळे त्यांची वेदभाष्ये हीच वेदार्थाचे सिंहद्वार उघडण्याची गुरुकिल्ली आहे. आणि काही युरोपीय पंडितांनी सायणांच्या या वेदभाष्यांचे महत्त्व पूर्णपणे जाणले आहे. ऋग्वेदाचा इंग्रजी अनुवाद करणारा इंग्रज पंडित विल्सन म्हणतो, की 'सायणांचे वेदज्ञान इतके विशाल आहे, की कोणाही युरोपीय विद्वानाला स्वतःला तेवढे ज्ञान आहे असा दावा करता येणार नाही.' सायणभाष्याचे प्रथम संपादन करणारा माक्स म्यूलरही म्हणतो, की 'जर सायणभाष्य नसते तर वेदार्थाच्या दुर्भेद्य किल्ल्यात मला प्रवेशही मिळाला नसता. वास्तवात सायण म्हणजे आंधळ्याची काठी आहे.' [आचार्य सायण और माधव – श्री. बलदेव उपाध्याय; वेदमहाभाष्यकार सायणाचार्य – श्री. रा. गो. कोलंगडे]

**सारंग** महा जातीतील एक प्रमुख राग. हा राग औडव-औडव वर्गाचा असून, आरोहात व अवरोहात पाच पाच स्वर घेतो. यात गंधार व धैवत वर्ज्य आहेत. अवरोहात हा कोमल निषाद घेतो. याचा वादी रिषभ व संवादी पंचम आहे. री-म, प, म, री-सा हे स्वर ध्वनित झाले, की रागमूर्ती प्रगट होते. यातील पंचमाचे स्वयंभू सौंदर्य, मध्यमाचे उदात्त गांभीर्य आणि रिषभाचे प्रशांत ओज यांमुळे हा राग अननुभूत नादब्रह्म निर्माण करतो. परमेश्वरस्वरूपी तल्लीनता निर्माण करणे, हे या रागाचे प्रथम कार्य आहे.

या रागाचे शुद्ध सारंग, सामंत सारंग, वृंदावनी सारंग, मधमाद सारंग, नूर सारंग, इ. काही प्रकार आहेत. तीव्र मध्यम व धैवत यांचा समावेश केल्याने शुद्ध सारंग होतो; नुसत्या धैवतामुळे सामंत सारंग; कोमल गंधारामुळे वृन्दावनी; मध्यम वादी करून मधमाद; आणि मध्यम व निषाद तीव्र ठेवून नूर सारंग

होतो. शुद्ध सारंगात सर्व शुद्ध स्वर लागतात आणि गंधार वर्ज्य आहे. शुद्ध सारंगाची वृत्ती सारंगापेक्षा निराळी आहे. मध्याह्न हा सारंगाचा गानसमय आहे. [क. सं.]



सारंग रागाचे सांकेतिक चित्र, राजस्थानी शैली

## सारंगी

एक ततवाद्य. फणस, साल, इ. वृक्षांचे लाकूड पोखरून हे वाद्य तयार करतात. सारंगीची लांबी सुमारे दोन फूट असते. तिच्या खालच्या बाजूला मंथान व वरच्या भागाला छाती किंवा गळा असे नाव आहे. तिच्या खालच्या भागाला कातड्याचे वेष्टन असते. वरच्या पोकळ भागात प्रत्येक बाजूला



सारंगी

दोन दोन खुंट्या बसवलेल्या असतात. हिला कमी-अधिक जाडीच्या तीन तातीच्या तारा व एक पितळी तार अशा चार तारा आधारस्वरासाठी लावलेल्या असतात. काही वेळा चारही तारा तातीच्या असतात. प्राण्यांच्या शरीरातील आतड्यापासून तातीच्या तारा बनवतात. सध्याच्या सारंगीत अनुध्वनीसाठी पंधरा ते वीस तारा मुख्य तारांच्या खाली लावलेल्या असतात. बाजूला बसवलेल्या लहान खुंट्यांना या तारा बांधलेल्या असतात. तारा पितळी व पोलादी असून, रागाला अनुसरून त्या स्वरसप्तकात लावतात. सारंगीचा वरचा भाग खांद्याशी ठेवून व खालचा भाग मांडीवर घेऊन उजव्या हातात धरलेल्या गजाने तार वाजवतात व डाव्या हाताच्या बोटांनी तार बाजूच्या तारेकडे दाबून स्वर निर्माण करतात. गजाला स्वच्छ केलेले घोड्याचे केस लावलेले असतात.

हकीम वक्रात गौ याने सारंगी हे वाद्य निर्माण केले, असे म्हणतात. मियाँ कल्लूखाँने ते तयार केले, असेही सांगतात. शार्ङ्गदेवाने सारंगीचा उल्लेख केला आहे. नारायणाने (इ. स. च्या १६ व्या शतकाची अखेर) दिलेले सारंगीचे वर्णन सांप्रतच्या सारंगीशी बरेचसे जुळणारे आहे. सारंगीच्या मध्यकालीन उल्लेखांवरून, हे मुळात लोकवाद्य असावे व नंतर योग्य त्या सुधारणा करून त्याचा अभिजात वाद्यांत समावेश केला गेला असावा, असे वाटते. हे मधुर वाद्य असून, मींड कामासाठी हे विशेष अनुकूल आहे. ते साथीसाठी तसेच स्वतंत्र वादनासाठी वापरतात.

बुंदुखाँ, गुलाम साबिर, मिर्जा महमूद अली, राम नारायण, इ. काही प्रसिद्ध सारंगीवादक आहेत. [भा. वा. इ.; सं. शा.]

## सारनाथ

एक सुप्रसिद्ध बौद्ध क्षेत्र. हे स्थान वाराणसीपासून दोन कोस उत्तरेस गाजीपूरच्या मार्गावर आहे. याला पूर्वी ऋषिपत्तन (इसिपत्तन) आणि मृगदाव (मिगदाव) अशी नावे होती. इथे प्राचीन काली ऋषींचा निवास होता म्हणून याला ऋषिपत्तन हे नाव मिळाले.

मृगदाव म्हणजे हरिणांचे वन. या नावाचा अर्थ निग्रोधमिग जातक या कथेवरून कळतो. तथागत बुद्धाने बोधिसत्त्व अवस्थेत अनेक जन्म घेतले, त्यांत तो एकवार मृगयोनीतही जन्मला होता. त्या मृगराजावर काशीचा राजा प्रसन्न झाला आणि या वनात त्याला आणि त्याच्या कळपाला त्याने अभय दिले. यावरून पुढे हे क्षेत्र मृगदाव या नावाने ओळखले जाऊ लागले.

या मृगदाव नावाचा अर्थ कायम राहावा म्हणून भारत सरकार व उ. प्र. सरकार यांनी मिळून इथल्या मूलगंधकुटीच्या जवळ एक कृत्रिम अरण्य निर्माण केले असून, त्यात १०० हरणे मुक्तसंचारासाठी सोडली आहेत. हे काम बुद्धाच्या २५०० व्या महापरिनिर्वाण–दिनानिमित्त केले गेले.

सारनाथ हे गाव या दोन्ही नावांहून अलिकडचे आहे. श्री.

मार्शल यांच्या मते हे नाव सारंगनाथ या शब्दावरून आले असावे. सारंगनाथ या नावाचे एक शिवमंदिर या ठिकाणी होते. युआन च्वांग या चिनी यात्रेकरूने इथे १०० फूट उंचीची एक महेश्वराची मूर्ती पाहिली होती; ती बहुतेक सारंगनाथाचीच असावी. सारंगनाथ हा शब्द शिव आणि बोधिसत्त्व या दोघां-नाही लागू पडतो. त्याचाच अपभ्रंश होऊन सारनाथ हे नाव रूढ झाले असावे.

बौद्ध धर्माच्या इतिहासात सारनाथाला अतिमहत्त्वाचे व गौरवपूर्ण स्थान आहे. भगवान बुद्धाने पहिला धर्मोपदेश इथेच केला. बोधगया येथे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर बुद्ध आपल्या निवासासाठी पवित्र भूमी शोधीत असता या ठिकाणी आला. इथे त्याला कौंडिन्य व त्याचे चार सोबती असे पाच ऋषी भेटले. बुद्धाने पहिल्याप्रथम त्यांना धर्मचक्रप्रवर्तनसूत्राचा उपदेश केला. इथेच त्याने भिक्षुसंघ स्थापला आणि भिक्षूंना पुढील उपदेश दिला – 'भिक्षूहो, बहुजनांच्या हितासाठी, बहुजनांच्या सुखा-साठी, लोकांना दया दाखवण्यासाठी, देव-मनुष्यांच्या प्रयोजना-साठी तुम्ही इथून सर्वत्र विचरण करा.'

बुद्ध आणि त्याचे शिष्य इथे पर्णशालेतच राहत असत. अशा पर्णशालांची चित्रे अनेक बौद्ध क्षेत्रांतल्या कलाकृतींतूनच पाहा-यला मिळतात. पण बौद्ध अनुश्रुतीप्रमाणे बुद्धाच्या कालातच या भूमीवर दोन पक्के विहार उभारले गेले.

सम्राट अशोकाच्या वेळी सारनाथाची प्रसिद्धी खूप वाढली होती. अशोक आपल्या गुरूसह इथे यात्रेसाठी आला होता.



धम्मेख स्तूप

याच वेळी त्याने बुद्धाच्या उपदेशस्थानावर एक विशाल स्तंभ निर्माण केला व एका धातुचैत्याची निर्मिती केली.

शुंगकालामध्ये (सनपूर्व २रे व १ले शतक) इथे एक वेदिका आणि एक अर्धचंद्राकार मंदिर निर्माण केले गेले. या मंदिरात अनेक मूर्ती होत्या. त्यांचे खंडित अवशेष तेथील संग्रहालयात ठेवलेले आहेत.

गुप्तराजे आणि सम्राट हर्ष यांनीही सारनाथाची वृद्धी केली. हर्षवर्धनाच्या पश्चात सारनाथ कनौज येथील गुर्जर-प्रतीहार यांच्या शासनाखाली गेले. त्यानंतर पाल राजे व त्यानंतर गाह-डवाल नरेश यांचे सारनाथाला संरक्षण मिळाले.

इ. स. १०१७ साली गझनीच्या महंमदाने वाराणसीची लूट-मार केली, तेव्हा सारनाथालाही तडाखा दिला. त्यानंतरही १२ व्या शतकात परधर्मीय आक्रमकांनी सारनाथ येथील मूर्ती आणि मंदिरे भग्न करण्यात धन्यता मानली.

त्यानंतर सारनाथ उपेक्षित व निर्जन झाले. तिथे नको ते वृक्ष व काटेरी झाडे-झुडपे वाढली. केवळ वन्य पशूंच्या विहाराचेच ते स्थान बनले.

पुढे १८३५ साली ज. कनिंगहॅमने सारनाथची पाहणी केली आणि त्या स्थानाच्या संरक्षणाकडे लक्ष दिले. इ. स. १९०४ साली वैज्ञानिक दृष्टीने येथे उत्खनन सुरू झाले. ते काम पुढे कित्येक वर्षे चालू राहिले. त्यामुळे अनेक भग्नावशिष्ट इमारती प्रकाशात आल्या आणि पुरातत्त्वीय महत्त्वाची अशी इतर पुष्कळ सामग्री उपलब्ध झाली.

सांप्रत सारनाथ येथे जी दर्शनीय स्थाने आहेत, ती अशी –

**चौखंडी स्तूप** – एका टेकडीवर अष्टकोनी घर बनविलेले आहे, त्याला चौखंडी स्तूप म्हणतात. याचा खालचा भाग तेवढा प्राचीन स्तूपाचा अंश आहे. काही विद्वानांच्या मते याचे मूळ नाव संमूखं चैत्य असून, पंचवर्गीय भिक्षू तथागत बुद्धाला याच ठिकाणी भेटले. पूर्वी हा स्तूप २०० फूट उंच होता; पण सांप्रत अष्टकोनी घरासह याची उंची केवळ ८४ फूट आहे. यावर चढून जाण्यासाठी पायऱ्या बनवलेल्या आहेत.

**धर्मराजिक स्तूप** – हा स्तूप प्रथम सम्राट अशोकाने बनवला होता. पुढे याचा सात वेळा जीर्णोद्धार झाला. शेवटचा जीर्णो-द्धार इ. स. च्या १२ व्या शतकात झाला. १९०८ साली श्री. मार्शलने याची खोदाई करून असे सिद्ध केले, की सारनाथमधील सर्वाधिक पवित्र स्तूप तो हाच होय. याच्या चारही बाजूंना छोटे छोटे बरेच स्तूप आहेत.

**मूलगंधकुटी** – वरील स्तूपाच्या जवळच ६४ फूट लांब रुंद असे एक उद्ध्वस्त मंदिर आहे. पुरातत्त्वज्ञांच्या मते ही गंधकुटी होय. इथेच बसून तथागत बुद्धाने धर्मचक्रप्रवर्तनसूत्राचा उपदेश केला. बुद्धाने इथे एकदा वर्षावासही केला होता. हे मंदिर बौद्ध धर्माच्या वैभवकालात अनेक सुंदर मूर्तींनी अलंकृत झालेले असावे. इथल्या खोदाईत अशा अनेक मूर्ती व त्यांच्या पीठिका मिळाल्या आहेत.

**अशोक स्तंभ** – इथे अशोकाने एक सिंहशीर्षस्तंभ उभारला,

होता. हा स्तंभ भग्न आहे. तो एका अखंड पाषाणाचा असून त्याची उंची ७० फूट होती. सांप्रत याचे सिंहशीर्ष ही स्वतंत्र, सार्वभौम भारताची राजमुद्रा ठरली आहे. या स्तंभाच्या खालच्या अंगावर सम्राट अशोकाने ब्राह्मी लिपीत भिक्षूंना पुढील आदेश देऊन ठेवला आहे –

देवांना प्रिय प्रियदर्शी अशोकाची आज्ञा अशी, की पाटलीपुत्र आणि इतर प्रांत यांच्यामधील बौद्धसंघांमध्ये फूट पाडू नये. जो कोणी अशी फूट पाडील त्या भिक्षूला किंवा भिक्षुणीला पांढरे वस्त्र नेसवून बहिष्कृत केले जाईल.

**धर्मचक्र विहार** – गंधकुटीजवळून उत्तरेकडे जाताना एक मोठी लांबच लांब भिंत लागते. या भिंतीच्या पश्चिमेस एक पवित्र सरोवर होते आणि त्यात भगवान बुद्ध स्नान करीत असे. त्यापुढे आणखी काही अंतरावर दुसरे एक सरोवर होते, त्यात भिक्षुगण आपली जलपात्रे धूत. त्याच्या उत्तरेस तिसरा एक तलाव होता, त्यात भिक्षुगण आपली वस्त्रे धूत.

भिंतीच्या पश्चिम बाजूस एक गुंफा आहे. तिच्यात जाण्यासाठी पायऱ्या बनवल्या आहेत. या गुंफेच्या पूर्वेस धर्मचक्र विहार लागतो. कनौजची महाराणी कुमारदेवी हिने इ. स. च्या १२व्या शतकात हा विहार बनवला. याला मोठे प्रांगण आहे.

**चंक्रमणभूमी** – गंधकुटीजवळ दगडी पायऱ्या लागतात. त्या ओलांडल्यावर दोन्ही अंगीं छोटचा छोटचा स्तूपांची रांग लागते. पुढे एक सिंहासन असून, ते स्थापत्यकलेचा उत्कृष्ट नमुना आहे. या सिंहासनाच्या समांतर पूर्व-पश्चिम एक दीर्घ मार्ग जातो. भिक्षूंना फिरायला जाण्यासाठी तो बनवला होता.

**धम्मेख स्तूप** – चंक्रमण भूमीच्या पूर्वेस एक विशाल असा १४३ फूट उंचीचा जो स्तूप आहे, त्याला धम्मेख स्तूप म्हणतात. धम्मेख हा शब्द धर्मेक्ष याचा अपभ्रंश आहे, असे काही लोक म्हणतात. या स्तूपाचे दोन भाग आहेत. खालचा भाग अधिक घेराचा असून, तो दगडांचा आहे; तर वरचा भाग कमी घेराचा असून, तो विटांचा आहे. खालच्या दगडी भागावर सुंदर नक्षी कोरलेली आहे. हा स्तूप इ. स. च्या ७व्या शतकात उभारला गेला. मात्र त्याच्या आत अशोककालीन मूळ स्तूप असावा.

**मूलगंधकुटी विहार** – धम्मेख स्तूपाच्या पूर्वेस हा विहार उभा आहे. हे वास्तुशिल्प आधुनिक काळातले आहे. हा भव्य आणि विशाल असा विहार भिक्षू अनागारिक यांच्या प्रयत्नाने १९३१ साली उभा झाला. या विहारात धर्मचक्रमुद्रा दर्शविणारी संगमरवरी सुंदर बुद्धमूर्ती आहे. विहाराच्या भिंतीवरील चित्रे जपानी चित्रकार श्री. कोसत्सु नोसु यांनी काढली आहेत. त्यांनी आपल्या या चित्रांतून भगवान बुद्धाच्या जीवनातील काही कथा साकार केल्या आहेत. अन्य ठिकाणचे अवशेषही तिथे आहेत.

सारनाथावर हीनयानांपैकी सर्वास्तिवादी संप्रदायाचे आधिपत्य होते.



मूलगंधकुटी विहार

सांप्रत या ठिकाणी महाबोधी विश्वविद्यालय, अतिथिनिवास, औषधालय, पुष्पोद्यान, धर्मशाळा, वाचनालय, इ. अनेक नव्या इमारती उभ्या झाल्या आहेत. त्यामुळे सारनाथ हे यात्रिकांना सर्व सोयींनी युक्त असे क्षेत्र बनले आहे. या क्षेत्राचा जो विस्तार आणि कायापालट झाला, त्याचे श्रेय स्व. भिक्षू धर्मपाल आणि महाबोधी सभा यांनाच दिले पाहिजे.

हे जैनांचेही पवित्र क्षेत्र आहे. या जागी पूर्वी सिंहपुरी नामक नगरी होती. त्या नगरीत जैनांचा ११ वा तीर्थंकर श्रीश्रेयांसनाथ याचा जन्म झाला. तिथे जैन मंदिरे आहेत. [इं. इं.; उ. प्र. बौ. वि.; श्री. विश्वनाथ मुखर्जी, धर्मयुग ५ ऑगस्ट १९५१]

## सारस्वत ब्राह्मण

पंचगौड ब्राह्मणांतील एक जात. या जातीची मूळ वस्ती गोमंतकात झाली. इ. स.च्या १४व्या शतकात मुसलमानांनी गोव्यावर कबजा केला, तेव्हा त्याने हिंदूंना बाटवून मुसलमान करण्याचा प्रयत्न केला. त्याने हिंदूंची देवालये नष्ट भ्रष्ट केली आणि हिंदूंचा परोपरीने छळही केला. या धार्मिक गंडांतरांतून स्वधर्माचे रक्षण व्हावे म्हणून अनेक गोमंतकीय सारस्वत घराणी कोचीनला जाऊन स्थायिक झाली. इ. स. च्या सोळाव्या ते अठराव्या शतकांत पोर्तुगीजांनी मोठ्या प्रमाणात हिंदूंचा छळ करून धर्मांतर

घडवून आणले. त्याही वेळी सारस्वत व इतर जाती यांनी गोवा सोडला. गोव्यात तिसवाडी, साष्टी व बारदेस या तीन तालुक्यांतच प्रथम सारस्वतांची वसाहत होती. ते उत्तर व दक्षिण कानडा, कोचीन संस्थान, उत्तरेकडे रत्नागिरी जिल्हा व पूर्वेकडे बेळगाव, हुबळी, धारवाड, वगैरे ठिकाणींही गेले. पुढे मराठेशाहीत, पेशवाईत व आंग्लशाहीत नशीब काढण्यासाठी अनेक सारस्वत घराणी पुणे, मुंबई, वडोदे, इंदूर, ग्वाल्हेर वगैरे ठिकाणीं जाऊन स्थायिक झाली. गोव्याशिवाय मुंबई व कोचीन या ठिकाणीं त्यांची वस्ती केंद्रित झाली असून, वर सांगितलेल्या सर्व ठिकाणीं ती विखुरलेली आहे.

सारस्वत ब्राह्मण हे उत्तरेतून गोव्याला आले व परशुरामाने त्यांना गोव्यात आणले अशी परंपरागत समजूत आहे. याचा ऐतिहासिक अर्थ एवढाच आहे, की परशुरामाने अनार्यव्याप्त पश्चिम किनाऱ्यावर आर्यांच्या वसाहती स्थापन केल्या. त्या करताना त्याने आर्यावर्तांतून ब्राह्मणादी आर्यकुलांना कोकण, मलबार व केरळ या भागांत नेले. ज्या काळात ही ब्राह्मणकुळे त्याने कोकणात नेली त्या काळात जातिव्यवस्था निर्माण झाली नव्हती. अर्थात गुर्जर, चित्पावन, हविग, तुळुव, करहाटक, नंपूतिरी अशा ब्राह्मणजाती निर्माण झाल्या नव्हत्या. सर्व ब्राह्मणांची पंचगौड व पंचद्रविड अशी विभागणीही झाली नव्हती. म्हणजे गोव्यात जी ब्राह्मणकुळे परशुरामाने आणली ती केवळ सारस्वत ब्राह्मणांची होती, असे म्हणता येत नाही. ती ब्राह्मणकुळे होती एवढेच म्हणता येईल. आणि तरीही परशुरामाने दहा गोत्रांचे सारस्वत ब्राह्मण यज्ञकार्यार्थ गोव्यात आणले व त्यांना तिथे वसविले, असा सह्याद्रिखंडाचा आधार देऊन सांगतले जाते. सह्याद्रिखंडातील यासंबंधीचा श्लोक असा –

> पश्चात् परशुरामेण ह्यानीता मुनयो दश ।
> त्रिहोत्रवासिनश्चैव पञ्चगौडान्तरे स्थिताः ।।
> गोमाञ्चले स्थापितास्ते पञ्चक्रोश्यां कुशस्थले ।
> भरद्वाजः कौशिकश्च वत्सकौण्डिन्यकश्यपाः ।।
> वसिष्ठो जमदग्निश्च विश्वामित्रश्च गौतमः ।
> अत्रिर्दशर्षयश्चैते स्थापितास्तत्र चैव हि ।।
> श्राद्धार्थं चैव यज्ञार्थं भोजनार्थं च कारणात् ।

अर्थ – नंतर परशुरामाने पंचगौडातले दहा मुनी त्रिहोत्रपुराहून आणून (गोव्यात) कुशस्थळीच्या पंचक्रोशीत वसवले. भरद्वाज, कौशिक, वत्स, कौंडिन्य, कश्यप, वसिष्ठ, जमदग्नी, विश्वामित्र, गौतम व अत्री अशी त्यांची गोत्रे होती. हे ब्राह्मण परशुरामाने श्राद्ध व यज्ञ संपन्न करण्यासाठी आणून स्थापले.

वर दिलेली सर्व गोत्रे आजही आहेत. पण यांशिवाय आणखीही काही गोत्रे सारस्वतांत आहेत, ती कुठून आली हे सांगितलेले नाही. पण तरीसुद्धा सारस्वतांचा इतिहास लिहिताना या श्लोकाचा आधार पूर्वीच्या सर्व लेखकांनी घेतला आहे. या ब्राह्मणांनी गोव्यात येताना आपापले कुलदेवही बरोबर आणले, असे स्कंद पुराणांतर्गत सह्याद्रिखंडात सांगितले आहे. त्याच्या उत्तरार्धातील पहिल्या अध्यायातला एक निर्देश असा –

> आनीता भार्गवेणैते गोमान्ताख्ये च पर्वते ।
> मांगिरीशो महादेवो महालक्ष्मी च म्हालसा ।।
> शान्तादुर्गा च नागेशः सप्तकोटेश्वरं शुभम् ।
> तथा च बहुला देवा ह्यानीता भार्गवेण तु ।।
> स्थापिता भक्तकार्यार्थं तत्रैव च शुभस्थले ।

अर्थ – परशुरामाने मांगिरीश महादेव, महालक्ष्मी, म्हाळसा, शांतादुर्गा, नागेश, सप्तकोटेश्वर तसेच अन्य पुष्कळ देव गोमंत पर्वतावर भक्तांच्या कल्याणासाठी स्थापले.

पण इतिहासक्रमाच्या दृष्टीने तर्कशुद्ध विचार केला तर ही गोष्ट खरी वाटत नाही. परशुरामकाळात आर्यसंस्कृती ही यज्ञप्रधान होती. आर्यांनी शक्ती व लिंगदेवता यांचा द्रविडांकडून स्वीकार केला तो काळ पुढे यायचा होता. शिवाय गोव्यातल्या या दैवतांविषयी काही दंतकथा आहेत, त्या या बाबतीत परशुरामाचे कर्तृत्व सांगत नाहीत. कुठे गायीने पान्हा सोडला तेव्हा लिंग सापडले, कुठे पाण्यातून देवी वर आली, कुठे गुराख्याला मूर्ती मिळाली, अशा या दंतकथा आहेत. त्यांचा अर्थ असा की, गोव्यात आलेल्या आर्यांनी आणि अर्थातच ब्राह्मणांनी दैवतकल्पनेचा स्वीकार द्रविडांकडून केला असावा.

गोव्यात परशुरामाने ब्राह्मण आणले, हे मत अनेक संशोधकांना मान्य नाही. परशुरामाचा काळ सनपूर्व पाच हजार वर्षांपासून सनपूर्व हजार वर्षे असा वेगवेगळ्या संशोधकांनी वेगवेगळा मानला आहे. परंतु डॉ. पुसाळकरांनी सनपूर्व २।। हजार वर्षे हा परशुरामाचा काळ असावा, असे गृहीत धरले आहे. ते सयुक्तिक वाटते. अर्थात त्याच सुमारास गोव्यात ब्राह्मण आले असावे.

परशुराम ही व्यक्ती ऐतिहासिक नव्हतीच आणि परशुरामाने कोकणपट्टीत व मलबार-केरळमध्ये ब्राह्मण कुळे आणली ही निखळ दंतकथा आहे, असे मानणाऱ्या श्री. माटे यांच्यासारख्या संशोधकांनी सारस्वत गोव्यात आल्याचा काळ सनपूर्व एक हजार ते इ. स. चे चौदावे शतक असा वेगवेगळा गृहीत धरला आहे. डॉ. भांडारकर, डॉ. भाऊ दाजी प्रभृती मंडळींचा यात समावेश होतो. परंतु हे मत बरोबर नसून अगस्त्य, परशुराम, राम, कृष्ण, या ऐतिहासिक व्यक्ती होत्या व त्यांनी दक्षिण भारताचे आर्यीकरण केले, हे मत संशोधकांपैकी अनेकांनी मान्य केले आहे. आणि म्हणूनच सनपूर्व २।। हजार वर्षे गोव्यात ब्राह्मण आले असावे, हे मत अधिक ग्राह्य वाटते.

त्यानंतर सुमारे एक हजार वर्षांनंतर उत्तर भारतातून आणखी एकदा ब्राह्मणांचे गोव्यात आगमन झाले. या लोकांना पूर्वी आलेल्या ब्राह्मणांनी आपल्यांत सामावून घेतले. या कालापर्यंत दक्षिण भारताचे आर्यीकरण पूर्ण झाले होते, असे डॉ. पुसाळकरांचे मत आहे.

यानंतर आर्यांत जातिव्यवस्था निर्माण झाली. तेव्हा गोव्यातील ब्राह्मणांना सारस्वत हे नामाभिधान प्राप्त झाले असावे. सारस्वत या नावाचे स्पष्टीकरण दोन प्रकारांनी करण्यात येते. सरस्वती नदीच्या तीरावरील सारस्वत नावाच्या देशातून आलेले म्हणून सारस्वत हे एक, आणि सारस्वत ऋषीच्या शिष्यसमुदायाचे वंशज किंवा गोत्रज हे दुसरे. या दोन्ही कल्पनांचा समन्वय साधता येतो, तो असा – उत्तर भारतात एकदा फार मोठा दुष्काळ पडला. त्यामुळे सर्व ब्राह्मण देशोधडीला लागले. सारस्वत नामक ऋषी हा तेवढा सरस्वतीच्या तीरावर राहून नदीतील मासे खाऊन चरितार्थ चालवीत आणि वेदरक्षण करीत राहिला. ज्या सरस्वती व दृषद्वती या नद्यांच्या दुआबात सारस्वत ऋषी राहिला, तो देश म्हणजे सारस्वत किंवा ब्रह्मावर्त होय. दुष्काळ संपल्यावर सर्व ब्राह्मण ब्रह्मावर्तात परत आले, तेव्हा ते आपले वेद विसरून गेले होते. त्यांना सारस्वताने पुन्हा वेद शिकवले. या ब्राह्मणांपैकीच काही ब्राह्मणांना पुढे परशुरामाने गोव्यात व कोकणपट्टीत नेले.

गोव्यात सारस्वत कोणत्या ठिकाणाहून आले याबद्दलही मतभेद आहेत. ते काश्मीरहून आले; गौड म्हणजे बंगालमधून आले; ज्यात श्रावस्ती नगरीचा समावेश होतो त्या कोसल देशाच्या उत्तरभागाला गौड म्हणत, तिथून आले; सारस्वतदेशाहून आले; सारस्वतांची दुसरी टोळी कान्यकुब्जाहून आली आणि ते तिरहूतहून आले, अशी विविध मते यासंबंधी मांडण्यात आली आहेत. सह्याद्रिखंडातील वर दिलेल्या एका श्लोकात त्रिहोत्राहून सारस्वत आल्याचा उल्लेख आला आहे. ते बंगालमधून आले असे डॉ. भांडारकर, शंकर पांडुरंग पंडित, बाँबे प्रेसिडेन्सी गॅझेटियरचे संपादक कँपबेल यांनी प्रतिपादन केले आहे. कारण भाषा, आहार, दुर्गापूजा, इ. गोष्टींत बंगाली ब्राह्मण व गोव्यातील सारस्वत ब्राह्मण यांत साम्य आहे, असे त्यांनी गृहीत धरले आहे. डॉ. सुनीतिकुमार चाटुर्ज्या यांसारखे काही बंगाली संशोधकही हेच मत मांडतात. परंतु बंगाली व गोवेकर या ब्राह्मणांत असलेले हे साम्य फसवे आहे. या ब्राह्मणांच्या मागे लागणाऱ्या गौड या उपाधीचा बंगाल किंवा कोसलातील गौड प्रदेश यांच्याशी कोणताच संबंध नसून, गौड म्हणजे उत्तर व द्रविड म्हणजे दक्षिण इतकाच अर्थ या ठिकाणी घ्यायचा आहे. गौड सारस्वत हे उत्तरेतील ब्रह्मावर्त किंवा सारस्वत देशातून दक्षिणेत आलेले ब्राह्मण, एवढाच या शब्दांचा अर्थ असावा, असे वाटते.

सारस्वतांना शेणवी असे एका काळी संबोधीत असत व ते ब्राह्मण नसून कायस्थ, परभू यांच्यासारखी एक जात होती, असे मानीत असत. ते ब्राह्मण असलेच तर षट्कर्मी नसून त्रिकर्मी आहेत, असाही इतर ब्राह्मणांचा दावा होता. गेल्या शतकात या विषयावर खूप वादविवाद झाला, ग्रामण्ये झाली आणि कोर्टकचेऱ्याही झाल्या. याचे एक कारण हे, की सारस्वत हे मत्स्याहारी होते. पण शेवटी काही धर्मनिर्णयांतून व कोर्टाच्या निर्णयांतून त्यांचे षट्कर्मी ब्राह्मणत्व मान्य करण्यात आले.

शेणवी हे जातिवाचक नाव आहे, पदवीवाचक आहे, की व्यवसायनिदर्शक आहे, याबद्दलही बराच ऊहापोह झाला असून, त्या शब्दाच्या निरनिराळ्या व्युत्पत्ती सुचविण्यात आल्या आहेत. शर्मन आर्यवरून (रा. भि. गुंजीकर), शाणोवरून (रा. ब. तालमकी, प्रा. मालशे), शिक्षाज्ञपती वरून (प्रा. अ. का. प्रियोळकर), श्रेणीपती किंवा सेनापती वरून (राजवाडे, भांडारकर, कृ. पां. कुलकर्णी, शणै गोंयबाब), तिसवाडी व साष्टीतील ९६ गावांचे अधिकारी म्हणून शांण्णवी शब्दावरून (मठस्थ गणेश रामचंद्र शर्मा), कानडी शानभाग वरून, अशा या शेणवी शब्दाच्या अनेक व्युत्पत्ती आहेत. शेणवी किंवा शणै याचा व्यवहारातील एके काळचा अर्थ शिक्षक किंवा विद्वान असा होता. सारस्वतातील जो स्मार्त सांप्रदायी वर्ग आहे तो शिक्षक व कारकुनी या पेशातच होता. यावरून सारस्वतांना इतर लोक शेणवी म्हणू लागले. स्वतः सारस्वत मात्र शणै किंवा शेणवी हा शब्द आपल्या वडिलांच्या नावानंतर आडनाव म्हणून वापरीत. ही प्रथा मुख्यतः स्मार्तांतच अधिक होती. यावरून हा शब्द पंडित किंवा शर्मन या अर्थांनी वापरला जात असावा, असे दिसते.

उत्तरेतून गोव्यात सारस्वतांचे दोन वेळा बहुसंख्येने आगमन झाले. त्यांतल्या प्रथम आलेल्यांना, साष्टी तालुक्यातील आठ ग्रामांत राहिले म्हणून अष्टग्रामी किंवा साष्टीकर आणि नंतर आलेल्यांना, केळोशी, कुठ्ठाळकर (हे या दोन गावांतच राहिले). अशी नावे पडली. या दोन गटांच्या मनोधारणेत व व्यवसायातही पूर्वीपासूनच फरक होता. साष्टीकरांनी गोव्यात येताच पूर्वी अस्तित्वात असलेल्या अनार्यांशी लागेबांधे जोडून ग्रामपंचायतींना शिस्त लावून दिली; सहकारी तत्त्वावर शेती व इतर जमिनींची व्यवस्था वसवून दिली; गावगाडा चालू केला. त्यामुळे अध्ययन अध्यापनाकडे व कर्मकांडाकडे त्यांचे दुर्लक्ष झाले; त्यांच्या स्वभावात एक प्रकारचा उदार दृष्टिकोन आला; त्यांचा धार्मिक आग्रहीपणा कमी झाला.

मागाहून दुसरा गट आला तेव्हा गोव्यातल्या गावांची घडी बसली होती. तरीही जुन्या गटाने त्यांना केळोशी व कुठ्ठाळी हे

दोन गाव दिले. म्हणूनच त्यांना केळोशी-कुठ्ठाळकर म्हणू लागले. वाढत्या वस्तीला गावे पुरी पडेनात तेव्हा इतर गावांतील ग्रामपंचायतीत त्यांना कुळकर्णी म्हणून घेण्यात आले. हे लोक कुशाग्र बुद्धीचे व काही प्रमाणात कर्मठ होते. तसेच ते विद्याव्यासंगीही होते. शेणवी हे उपनाव याच गटातील लोक बहुतेक वापरतात, त्याचे कारण हे आहे. या दोन गटांत सोयरिकसंबंध होत होते, पण थोडी परकेपणाची भावना वसत होती.

इ. स. च्या चौदाव्या शतकात हा परकेपणा वाढून त्यांच्यांत इतके वैमनस्य निर्माण झाले, की सारस्वतांच्या या दोन पोट जातीच बनल्या.

पूर्वी हे दोन्ही शैवसांप्रदायी होते व आद्य शंकराचार्यांचे प्रशिष्य श्रीविवरणानंदसरस्वती यांनी कुठ्ठाळी येथे स्वतंत्र मठ स्थापना करून सारस्वतांचे गुरुपद स्वीकारले होते. पुढे तेराव्या शतकात मध्वाचार्यांनी अद्वैत मत नाकारून द्वैत मांडले व उडुपी येथे मठस्थापना करून सर्व दक्षिणेत स्वमताचा प्रसार केला. गोव्यातही ते येऊन गेल्याचे त्यांच्या चरित्रात नमूद आहे. पण उडुपीमठाचे श्रीनारायणतीर्थ नावाचे एक आचार्य पंधराव्या शतकात गोव्यात पंथप्रचारार्थ आल्याचाही पुरावा आहे. त्यांनी या पंथाचा एवढा प्रचार केला, की एकूणएक साष्टीकर समाजाने वैष्णव वा माध्व मताचा स्वीकार केला. नारायणतीर्थांनी मग प्रथम गोकर्ण व गोव्यातील पर्तगाळ या गावी इ. स. १४५८ साली मठस्थापना केली. या घटनेमुळे सारस्वतांत सामाजिक दुफळी पडली; रोटी-बेटी व्यवहार बंद झाले. उभे (गोपीचंदनाचा उभा टिळा लावणारे) व आडवे (आडवे भस्माचे पट्टे ओढणारे) किंवा वैष्णव व स्मार्त या नावांनी हे दोन गट ओळखले जाऊ लागले. अगदी अलिकडेपर्यंत हे भेद कायम होते. गेल्या पन्नास वर्षांत या गटांतील वैमनस्य कमी होत चालले असून, दोन्ही पोटजाती जवळ जवळ आल्या आहेत. इतकेच नव्हे, तर हे पंथभेद आता नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत.

सारस्वतांत काही ग्रामण्ये होऊन आणखी काही पोटजाती बनल्या. त्या कशा बनल्या याचा अस्सल पुरावा उपलब्ध नसला तरी कोंकणमाहात्म्यात त्यांची माहिती दिली आहे ती अशी –

वैष्णव समाज हा व्यापाराप्रमाणे शेतीही करी. बारदेस महालातील काही वैष्णव नदी ओलांडून भातग्रामात शेती करायला जात. सूर्यराव देसाई नावाच्या तिथल्या विजापूरच्या सुभेदाराकडे कुणीतरी तक्रार केली, की हे लोक "नावेवरूनी आणिती अन्नासी शेती भोजन संपादिती." त्यावर सुभेदाराने हुकूम काढला, की त्यांनी प्रायश्चित्त घेऊन शुद्ध व्हावे. परंतु त्यांचे म्हणणे होते, की आम्ही शिजविलेले अन्न नावेवरून नेले नाही आणि शेतात ते खाल्लेही नाही. म्हणून आम्ही प्रायश्चित्त घेणार नाही. तेवढ्यात देसाई सुभेदार मरण पावला व त्याच्या जागी सुखटणकर सुभेदार आला. त्याने हुकूम काढून त्यांच्यावर बहिष्कार घातला. तेव्हापासून वैष्णवांची बारदेसकर ही पोटजात बनली. अलिकडे इतरांशी त्यांचे रोटी-बेटी व्यवहार होऊ लागले आहेत.

पेडणेकर व कुडाळदेसकर या पोटजातींसंबंधीच्या कथा वेगळ्या आहेत. पेडणेकर ही स्मार्तसांप्रदायी पोटजात आहे. खुद्द पेडणेकरांचे म्हणणे मात्र असे आहे की, आम्ही सारस्वत नसून, आद्यगौड आहो व वैष्णव व स्मार्त सारस्वतांहून आमची जात वेगळी आहे. लग्नप्रसंगी झालेल्या एका तंटयावरून कुडाळातील स्मार्तसांप्रदायी सारस्वतांची कुडाळदेसकर ही वेगळी पोटजात निर्माण झाली. ही मंडळीही सारस्वतांहून आपण वेगळे असून, आद्यगौड आहो असे मानते. त्यांची मठपरंपराही स्वतंत्र आहे. दाभोळी येथे त्यांचा मठ आहे.

उत्तर कानडा किंवा कारवार या जिल्ह्यात गेलेल्या सारस्वतांत स्मार्त व वैष्णव दोन्ही पोटजातींचा भरणा असून, त्यांनी आपापल्या गावी आपापल्या कुलदैवतांची स्थापना केली असली तरी, गोव्यातील मूळ कुलदैवतांशी त्यांचा संबंध कायम आहे. मधूनमधून ते गोव्यातील आपल्या कुलदेवाच्या दर्शनाला जात असतात.

दक्षिण कानडा जिल्ह्यातील प्रकार थोडा वेगळा आहे. तेथील वैष्णवांनी गोव्याशी आपला संबंध ठेवला आहे. स्मार्तांनी मात्र स्वतःचे स्वतंत्र गुरुपीठ चित्रापूरमठ या नावाने १७१९च्या सुमारास चित्तर या गावाजवळ स्थापन केले. या लोकांना 'शणैपैकी' असे इतर सारस्वत संबोधतात. या नावात एक हीनतादर्शक छटा आहे. ते स्वतःला चित्रापूर सारस्वत म्हणवतात व आपला गोमंतकातील सारस्वतांशी कोणताही संबंध नसून, आपले पूर्वज काश्मीरातून थेट दक्षिण कानडा जिल्ह्यात आले, असे मानतात. रावबहादूर तालमकी यांना हे मत मान्य नसून, ते लोक मूळ गोव्यातले स्मार्तसंप्रदायीच आहेत, असे प्रतिपादन त्यांनी केले आहे. कोंकणाख्यानकारांनी मात्र वेगळी माहिती दिली आहे. हे लोक शाक्तसंप्रदायी तंत्रमार्गी बनले म्हणून त्यांना वाळीत टाकले, असे कोंकणाख्यानात म्हटले आहे.

कोचीन संस्थानात गेलेल्या सारस्वतांचा एक स्वतंत्र गट बनला आहे. गेली अनेक शतके त्यांचा गोव्याशी संबंध सुटला आहे. त्यांनी तिथल्याच देवता स्वीकारल्या व केरळीय जीवनाशी ते समरस झाले. दक्षिण व उत्तर कानडा जिल्ह्यातील लोकांप्रमाणेच त्यांनी घरी मात्र कोकणी भाषा बोलण्याचा परिपाठ ठेवला व आता स्वतंत्र कोकणीच्या शिक्षणसंस्थाही स्थापन केल्या आहेत. श्रीवेंकटेशाचे भव्य मंदिर त्यांनी कोचीनला बांधले

असून, उपास्य देवता म्हणून श्रीव्यंकटेशाचा स्वीकार केला आहे. ही बहुतेक सर्व मंडळी वैष्णव आहेत. गोकर्ण-पर्तगाळी मठाच्या नवव्या परंपरेचे श्रीलक्ष्मीनारायणतीर्थांचे शिष्य संयमेंद्रतीर्थ यांनी तिथे मठस्थापना करून केरळीय सारस्वतांसाठी स्वतंत्र मठपरंपरा निर्माण केली. अलिकडे कोकणी चळवळीच्या निमित्ताने या सारस्वतांचा गोव्याशी संबंध येऊ लागला आहे.

गोव्यात आणि इतरत्र सर्व भारतात पसरलेला सारस्वत समाज शांतताप्रिय म्हणून ओळखला जातो. सेनापती शब्दावरून शेणवी हा शब्द आला असल्याचे बहुसंख्य संशोधकांचे मत असले आणि आदिलशाही, मराठेशाही व पेशवाई या राजवटीत काही सारस्वतांनी तलवार गाजवून देसाई, सरदेसाई, वगैरे पदव्या संपादन केल्या असल्या तरी सारस्वतांची क्षात्रपरंपरा नाही. ही जात बुद्धिजीवी आणि बुद्धिमान आहे. ती लेखणीबहाद्दर आहे. सारस्वत राजे झाले नाहीत, पण अमात्य, मंत्री, वकील, दुभाषी, नाडकर्णी, कुलकर्णी, शानभाग, पागनीस, फडणीस, कोटणीस, वाकनीस, नाईक किंवा भांडारी झाले. ते उदारमनस्क, आतिथ्यशील व सुधारणावादी असल्याचा डॉ. विल्सन निर्वाळा देतात व बुद्धिमत्ता व परिश्रम यांत चित्पावनांशी त्यांचे साधर्म्य सांगतात. कोणत्याही व्यवसायात ते चमक दाखवतात, शिक्षण व संस्कृती या क्षेत्रांत ते आघाडीवर असून, पश्चिम भारतात ते सर्वांत बुद्धिमान व संपत्तिमान जातींपैकी एक असल्याचाही अभिप्राय श्री. कँपबेल यांनी व्यक्त केला आहे.

गोव्यात सारस्वतांना बामण या नावाने ओळखले जाते. त्यांच्यांत वेदपारंगत विद्वानांची परंपरा होती, परंतु पौरोहित्याचा व्यवसाय खंडित झाला होता. कऱ्हाडे व पद्ये हे त्यांच्याकडचे पौरोहित्य करीत. गेल्या शंभर वर्षांतच गरजेपोटी पौरोहित्य करणारी घराणी निर्माण झाली असली तरी, बहुसंख्य सारस्वत हे गृहस्थधर्मीच आहेत.

सारस्वत ब्राह्मण हे ऋग्वेदी असून, त्यांच्या पूर्वी असलेल्या १० गोत्रांत आणखी ५–६ गोत्रांची भर पडली आहे. मुख्य गोत्रे कौशिक, कौंडिण्य, वत्स, अत्री, भारद्वाज, गार्ग्य, कश्यप ही आहेत. शांतादुर्गा, सप्तकोटीश्वर व मंगेश या स्मार्तांच्या कुलदेवता असून, म्हाळसा, रामनाथ, कामाक्षा, नवदुर्गा, महालक्ष्मी, देवकीकृष्ण या वैष्णवांच्या आहेत. नागेश हे दोन्ही पंथांचे दैवत आहे. कुलदेवांची काही 'पालवी' दैवते असतात, तशाच ग्रामदेवताही असतात. ही तीन दैवते सारस्वतांची श्रद्धास्थाने होत.

सारस्वत जात ही बुद्धिजीवी असली तरी, देवधर्माच्या बाबतीत श्रद्धा बाळगणारी आणि कुलाचार व कुलपरंपरा निष्ठेने पाळणारी आहे. श्राद्ध, पक्ष, व्रत-वैकल्ये, सण वगैरे गोष्टी सुशिक्षितांच्या घरांत आजही चालतात. विशेष प्रसंगी आणि विशेषतः लग्न ठरवताना कुलदैवताचा प्रसाद किंवा कौल घेण्याचा प्रघात आहे. कुलदैवताच्या जत्रा व इतर उत्सवांत सहभागी होण्याचा कुलाचार प्रौढ पिढी कटाक्षाने पाळते व तरुण पिढी हौस म्हणून त्यात सहभागी होते. गोव्याबाहेरील सारस्वत अधूनमधून कुलदैवताच्या भेटीला येत असतात. लग्नानंतर प्रथम देवदर्शनाला आलेल्या दंपतीने परस्परांच्या वस्त्रांना गाठ मारून देवळाला प्रदक्षिणा घालण्याचा एक प्रघात इथे आहे. त्याला 'गाठवल' अशी संज्ञा आहे. कर्नाटकातील सारस्वत हा विधी कटाक्षाने पाळतात.

सारस्वतांची राहणी ही इतर ब्राह्मणांप्रमाणे अभिरुचिपूर्ण असते. गोव्यातील द्रविडब्राह्मण सारस्वतांच्या मानाने गरीब असल्यामुळे, तसेच शिक्षणातही मागसलेले असल्यामुळे साधारण स्थितीतल्या सारस्वताची राहणीही छानछोकीची वाटते. ही जात कलाप्रिय असून चित्र, संगीत व नाट्य या कलांची विशेष शोकीन आहे. कुलदेवतेच्या जत्रांतून तरुणांची संगीत नाटके होतात. विद्या, संपत्ती व कला यांच्या संगमामुळे गोव्यात सारस्वतांकडे समाजाचे नेतृत्व आले असल्यास नवल नाही. कोचीनकडील सारस्वत हे व्यापारात पडले असून, कर्नाटकातील सारस्वतांकडे तेथील शिक्षण, सहकारी चळवळ व बँकिंग यांचे नेतृत्व आले आहे. उर्वरित भारतातील सारस्वत डॉक्टरी, वकिली, प्राध्यापकी आणि सरकारी व बिनसरकारी नोकऱ्या या व्यवसायांत आहेत.

यांच्या चालीरीती इतर ब्राह्मणांप्रमाणेच आहेत. स्थानपरत्वे वेगळेपणाही दिसतो. मुख्य फरक आहाराचा. सारस्वत हे मत्स्याहारी आहेत. मासे हा त्यांचा नेहमीचा आहार असतो. वैष्णवांत मांसाहार निषिद्ध नसला तरी, त्यावर बऱ्याच मर्यादा आहेत. एका काळी सबंध वैष्णव समाज हा मत्स्याहारी नव्हता हे सत्य आहे. माध्वमताचा आणि कदाचित जैन धर्माचा हा प्रभाव असावा. पण अलिकडे स्मार्त-वैष्णव असे रोटी-बेटी व्यवहार सर्रास होत असल्यामुळे वैष्णवही मत्स्याहाराकडे वळले आहेत.

**विवाहप्रथा** – सारस्वतांत मुलांमुलींची लग्ने वडील माणसे जमवतात. लग्न जुळविण्याची पद्धत जवळजवळ महाराष्ट्रांतल्या पांढरपेशा समाजाप्रमाणेच आहे. आधी मुलीच्या बापाला वर संशोधन करावे लागते. ३०–४० वर्षांपूर्वी लग्न जुळविताना पोटजात पाहिली जाई. पूर्वी दुसऱ्या पोटजातीत विवाहसंबंध करीत नसत. गेल्या तीस वर्षांत स्मार्त, वैष्णव व बारदेसकर यांच्यांत एकमेकांत लग्ने होण्याची प्रथा सुरू झाली आहे. सारस्वतांत मामाच्या मुलीशी लग्न करण्याची प्रथा आहे. ती सोयरीक आधी पाहतात व ती जुळण्यासारखी नसल्यास दुसरी स्थळे पाहतात.

प्रथम वधू-वरांच्या जन्मपत्रिका पाहतात. त्या जुळत नसल्यास

पुढे बोलणी होत नाहीत. गोत्राचा विचार प्रथम होतो. सगोत्र विवाह होत नाहीत. गेल्या काही वर्षांत यावर एक तोड निघाली आहे. वधूवरांचे गोत्र एकच असले व ठरलेले लग्न व्हावे अशी उभय पक्षांची इच्छा असली, तर लग्नापूर्वी वधूचे दत्तकविधान करून तिचे गोत्र बदलतात आणि मग लग्न करतात. हल्ली हाही विधिनिषेध पाळीत नाहीत.

५०–६० वर्षांपूर्वी रजोदर्शन होण्यापूर्वीच मुलीचे लग्न करीत. त्या वेळी वधूचे वय १२ च्या आत व वराचे १८ ते २० च्या दरम्यान असे. वधूपसंतीचा सर्व अधिकार वडील माणसांचा असे. चालू काळात वधू-वरांच्या लग्नाची मर्यादा वाढली आहे. आज वधूचे वय २५ व वराचे ३० ही मर्यादा समजली जाते.

वये वाढल्यामुळे व शिक्षणाच्या संस्कारांमुळे मुलाने मुलगी पसंत करणे हा एक आवश्यक विधी होऊन बसला आहे. मुलाशिवाय मोठी बहीण, आई, बाप, मामा, काकी वगैरे वडील मंडळींकडूनही मुलगी पाहण्याचा समारंभ होतो. हा विधी मुलीच्या घरी, परंतु शक्यतो चित्रपटगृह व सार्वजनिक बाग अशा ठिकाणी होतो. अलिकडे मुलगा पसंत आहे किंवा नाही हे मुलीलाही विचारण्यात येते. कारण मुलीही हल्ली शिकलेल्या व बहुधा नोकरी करणाऱ्या असतात.

यानंतर वडील मंडळींत लग्नाची बोलणी होतात. कधी कधी मुलगी पाहण्यापूर्वीच अमुक इतका हुंडा वधूपक्षाकडून मिळेल असे मध्यस्थाकडून सुचविण्यात येते. वरपक्ष हुंड्याशिवाय इतर प्रश्नांवर फारसे ओढून धरीत नाही. किंबहुना इतर प्रश्नांवर बोलणीच होत नाहीत. वराला हुंड्याशिवाय तेल-हळदीच्या वेळी पोषाख देतात. त्याबद्दल ठरवावे लागत नाही. वरपक्षाकडील इतर मंडळींना मानपानाबद्दल काही द्यायचेच नसते. म्हणून मानपानाच्या याद्या करणे किंवा लग्नाचा वधूपक्षाचा खर्च कुणी करायचा वगैरे विषय या बोलण्यांत येत नाहीत. लग्नाचा खर्च ज्याचा त्यानेच करायचा असतो. फक्त लग्नाच्या वेळी उपस्थित असलेल्या पाहुण्यांना उपाहार तेवढा वधूपक्षाने द्यावयाचा असतो.

बोलणी झाल्यावर वरपिता व वधूपिता वरपक्षाच्या कुलदेवाकडे कौल (प्रसाद) मागण्यासाठी जातात. अनुभवी भटजींच्या कौशल्यामुळे कौल बहुधा मिळतोच. नंतर देवापुढे साखरेचे ताट ठेवतात आणि मग सर्वांना ती साखर वाटतात. हाच जुन्या पद्धतीचा साखरपुडा किंवा वाङ्‌निश्चय होय.

अलिकडे गोव्यातील सारस्वत मुंबई-पुण्याकडील लोकांच्या अनुकरणाने साखरपुड्याचा खास कार्यक्रम करू लागले आहेत. हा समारंभ वधूगृही होतो किंवा मोठ्या प्रमाणात असला तर कार्यालयात केला जातो. त्या वेळी वधू-वर परस्परांच्या बोटांत आंगठ्या घालतात. वरपक्षाकडून वधूला साडी व वधू-पक्षाकडून वराला पोषाख मिळतो आणि विवाहसंबंध निश्चित होतो.

लग्नापूर्वी नातेवाइकांना आणि मित्रमंडळींना प्रत्यक्ष निमंत्रण करण्याची पद्धत अजूनही चालू आहे. पोस्टाने निमंत्रणे पाठविण्याची पद्धत नुकतीच सुरू होत आहे.

लग्नाच्या पूर्वदिवशी वधू-वरांच्या घरी 'देवकारे' (देवकार्य= ब्राह्मणभोजन) होते. त्याच दिवशी वधूला चुडा भरतात. वधूला नातेवाइकांकडून केळवण व अहेर होतो.

लग्नाच्या दिवशी दोन्ही घरी पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध व देवकप्रतिष्ठा झाल्यावर वधू-वरांना तेलहळद लावायचा विधी होतो. आधी वधूकडून वराकडे सुवासिनी तेलहळद घेऊन जातात व वराला आंब्याच्या पानाने तेल लावतात. या वेळी वराला पोषाख मिळतो. हाच विधी नंतर वरपक्षीय स्त्रियांकडून वधूगृही होतो. वधूला या वेळी शालू दिला जातो. वधू-वरांनी ही वस्त्रे लगेच नेसायची असतात. या विधीला 'तेल' अशी संज्ञा आहे. या वेळी दोन्ही घरांत जमलेल्या सुवासिनींना सौभाग्यवाणे देतात. नंतर वर मिरवणुकीने वधूगृही जातो. पुढचे सर्व विधी इतर वैदिक ब्राह्मणांप्रमाणे वैदिक पद्धतीने होतात.

पूर्वी वरपक्षाकडील वऱ्हाडी मंडळीच्या करमणुकीसाठी कलावंतिणींची मैफल होई. तिला 'मजलस' हा शब्द वापरीत. ही प्रथा आता बंद आहे. याच मजलशीत उपस्थितांना अल्पोपाहार दिला जाई. वरातीच्या आधी वराला वस्त्रालंकार व रोख रक्कम देतात. वरातीच्या आधी सासरचे वस्त्रालंकार वधूच्या अंगावर चढवतात. वरात निघताना वधूला संसारोपयोगी अनेक वस्तू देतात. सारस्वतांतले हे देणे फार खर्चाचे असते.

नववधूने स्वतःच्या नव्या घरी प्रवेश केल्यावर तिचे नवे नाव ठेवण्यात येते. सुपातल्या तांदुळांत नवरा आपल्या आवडीचे नाव बोटाने लिहितो व ते नाव वाचून दाखवतो. सांप्रत नाव सहसा बदलत नाहीत.

पूर्वी दुसऱ्या व तिसऱ्या दिवशी एकमेकांकडे 'व्याहीभोजने' होत असत. त्या वेळी व्याही व विहीण यांना उंची वस्त्रांचा अहेर करीत. वरपक्षाकडील इतर नातेवाइकांना मानपान करण्याची पद्धत सारस्वतांत नाही. लग्नभोजनाच्या वेळी घरचे जुने जावई यांचा मानपान केला जातो.

**प्रसूतिप्रथा** – मुलीचे पहिले बाळंतपण माहेरी करण्याची प्रथा आहे. गरोदर मुलीची पाचव्या, सातव्या व नवव्या महिन्यात वाडी भरली जाते. बाळंत झाल्यावर दहा दिवस सुवेर पाळायची प्रथा आहे. बारसे बाराव्या दिवशीच होते. मुलाला मृत पूर्वजाचे नाव ठेवण्याची चाल आहे. पण हाक मारण्यासाठी एखादे आधुनिक नाव ठेवतात. मुलाच्या जन्माच्या सहाव्या दिवशी सटवी-पूजन होई. पण ही प्रथा आता बंद पडली आहे.

**सांस्कृतिक प्रथा** – वटसावित्री, श्रावणी सोमवार, कृष्णजन्माष्टमी, सोळा सोमवार, वगैरे व्रते स्त्रिया भाविकतेने पाळतात. मंगळागौरीची प्रथा नाही. पण भाद्रपद शुद्ध तृतीयेला गौरीपूजन करून 'तृतीयेचे व्रत' पाळण्याची प्रथा स्त्रियांमध्ये प्रचलित आहे. सुवासिनी स्त्रिया संक्रांतीची वाणे संक्रांतीपासून रथसप्तमीपर्यंत घरोघरी वाटतात. श्राद्ध व महालय अजूनही काही घराण्यांत होतात. कोणतीही सुवासिनी पहिल्याप्रथम घरी आली तर खणानारळाने तिची ओटी भरणे हा कुलधर्म समजला जातो.

**मर्तिकप्रथा** – मृत्यूनंतर मंत्राग्नी देऊन प्रेताचे दहन केले जाते. दहा दिवस आशौच पाळतात. दहा व अकरा या दिवशी क्रियाकर्मांतर करतात. बाराव्या दिवशी ब्राह्मणांना भोजन व दाने देतात. मृतांच्या अस्थींचे विसर्जन नासिक किंवा नरसोबावाडी येथे करतात. मनुष्य मृत झालेल्या जागी समई तेवत ठेवतात. तिथेच पाने व दुधाची वाटीही ठेवतात. बाराव्याप्रमाणेच वर्षश्राद्धही बराच खर्च करून करतात. [ श्री. बा. द. सातोस्कर ]

## सारस्वत व्रत

एक काम्य व्रत. गायत्री व सावित्री म्हणजे सरस्वती या प्रस्तुत व्रताच्या देवता आहेत. व्रतावधी बारा किंवा तेरा महिने. व्रतारंभ शुभदिनी किंवा रविवारी करतात. या व्रताचा विधी असा–

गायत्रीची पूजा करावी. दिवसभर उपवास करावा. रात्री मौन धरून भोजन करावे. चांदवा, घंटा, दुभती गाय, चंदन, इ. वस्तू देवीला अर्पण कराव्या. या व्रताचा दुसरा पर्याय असा–

वर्षप्रतिपदेला व्रतारंभ करून पुढे सरस्वतीच्या पुढील सात नाम-रूपांनी तिची पूजा करावी. – (१) सुप्रभा (२) कांचनाक्षी (३) विशाला (४) मानसी (५) त्रिनादा (६) सुवेणू व (७) विमलोदका. प्रत्येक दिवशी पूजेनंतर दह्याचा होम करावा, ब्राह्मणांना दधिमिश्रित भोजन द्यावे. रात्री घृतमिश्रित भात खावा. वर्षाच्या शेवटी म्हणजे फाल्गुनात कृष्ण प्रतिपदेपासून सप्तमीपर्यन्त पूजन करावे. प्रत्येक दिवशी निरनिराळ्या रंगाचे वस्त्र दान द्यावे. फल – वाणीला माधुर्य, विद्येत प्रावीण्य, मानसन्मान व ब्रह्मलोक यांची प्राप्ती. [ हिं. ध.; मत्स्य पु. ६६]

## सारिपट

एक प्राचीन बैठा खेळ. यालाच सोंगटयांचा खेळ असेही म्हणतात. सारी म्हणजे जे चालवायचे ते, अर्थात सोंगटी आणि पट म्हणजे ज्यावर चालवायचे ते.

बाणभट्टाने (इ. स. चे सातवे शतक) आपल्या 'कादंबरी'त एका नगराचे वर्णन करताना म्हटले आहे, की तिथे रिकामी घरे काय ती सोंगटयांचीच होती. यावरून इ. स. च्या सातव्या शतकातही हा खेळ सर्वज्ञात होता, असे समजते. शिव-पार्वती सारिपट खेळत होते, असे उल्लेख अनेक कहाण्यांतून येतात.

सोंगटयांचे मुख्य खेळ दोन– (१) दोन फाशांनी खेळायचा व (२) तीन फाशांनी खेळायचा. द्यूतही फाशांनीच खेळले जाई व त्याचे उल्लेख बऱ्याच जुन्या वाङ्मयात आढळत असल्यामुळे सारिपटाचा खेळ हा द्यूतातूनच निघाला असावा, अशी कल्पना आहे.

सारिपट खेळण्यासाठी १६ सोंगटया, चौपट (पट) व तीन किंवा दोन फासे वापरतात. काही ठिकाणी फाशांऐवजी कवडया वापरतात. सारिपट दोन फाशांनी खेळला जातो, तेव्हा ते फासे सरासरी अर्धा इंच लांब, पाव इंच रुंद व पाव इंच जाड असे असतात. प्रत्येक फाशाच्या एका बाजूवर एक टिंब, दुसऱ्या बाजूवर तीन टिंबे, तिसऱ्या बाजूवर सहा टिंबे व चौथ्या बाजूवर चार टिंबे असतात.

तीन फाशांनी खेळल्या जाणाऱ्या सारिपटाचे फासे सामान्यत्वे पाच ते सहा इंच लांब, एक इंच रुंद व एक ते सव्वा इंच जाड असे असतात. त्यांच्या चारही बाजूंवर क्रमशः एक, दोन, पाच व सहा टिंबे असतात.

सोंगटया लाकडाच्या व फुगीर शंक्वाकृती असतात. सोळा सोंगटयांपैकी चार तांबडया, चार काळया, चार पिवळया व चार हिरव्या असतात. दुरंगी नामक खेळात तांबडया व काळया सोंगटयांना पक्क्या आणि पिवळया व हिरव्या सोंगटयांना कच्च्या, अशा संज्ञा आहेत. या दुरंगी खेळाव्यतिरिक्त दुसरे जे सोंगटयांचे खेळ आहेत, त्यांत हा कच्च्या–पक्क्यांचा भेद नाही.

चौपट किंवा पट हा रंगीत खारव्याचा, अलवणाचा, साटणीचा अथवा दुसऱ्या कोणत्याही रंगीत कापडाचा करतात. त्याचा आकार गणितातल्या अधिक चिन्हासारखा असतो. सरासरी दोन फूट लांब व अर्धा फूट रुंद अशा आकाराच्या कापडाच्या चार पट्टया घेऊन त्यांच्यावर रेशीम, कलाबूत अथवा पांढरा दोरा यांच्या साहाय्याने भरतकाम करतात. नंतर अर्धा फूट लांब आणि तेवढाच रुंद असा एक कापडाचा तुकडा घेऊन त्याच्या चार बाजूंना वर सांगितलेले चार तुकडे शिवतात. अशा प्रकारे चौपट तयार होतो.

ज्या चार तुकडयांचा चौपट बनविलेला असतो त्यातील प्रत्येक तुकडयाला पट म्हटले जाते. या पटावर दोऱ्याने, रेशमाने किंवा कलाबुतीने जे समभुज चौकोन रेखलेले असतात, त्यांना घरे म्हणतात. ज्या घरात दोन सरळ रेषा एकमेकांस काटकोनात छेदतात, त्यास कट म्हणतात व प्रत्येक पटातील घराच्या तीन रांगांपैकी मधल्या रांगेतील शेवटच्या घरास पोटघर म्हणतात.

सोंगट्यांचे खेळ अनेक आहेत. काही केवळ स्त्रियांचे, काही केवळ पुरुषांचे, तर काही स्त्री-पुरुषांना एकत्र खेळता येण्यासारखे आहेत. दुरंगी, चौसार, हूल हे खेळ पुरुषांचे व कवड्या, ओकाबोकी, उडत पगडा हे स्त्रियांचे म्हणून प्रसिद्ध आहेत.

यांपैकी दुरंगी नामक खेळाची माहिती पुढे दिली आहे –

अ पक्ष.



ब पक्ष.

सारिपटातला चौपट

या खेळात दोन अगर त्याहून जास्त परंतु समसंख्येचे खेळाडू असावे लागतात. दोहोपेक्षा अधिक खेळाडू असल्यास त्यांनी आपले समसमान संख्येचे दोन पक्ष करावे.

सोळा सोंगट्या, चौपट व तीन फासे हे या खेळाचे साहित्य. या सोळा सोंगट्यांपैकी या खेळापुरत्या तांबड्या व काळ्या सोंगट्या पक्क्या म्हणून आणि हिरव्या व पिवळ्या सोंगट्या कच्च्या म्हणून ओळखण्याची प्रथा आहे.

प्रथम चौपट जमिनीवर मांडून, त्याच्या एका बाजूस एका पक्षातील खेळाडू व दुसऱ्या बाजूस दुसऱ्या पक्षातील खेळाडू बसतात. प्रत्येक पक्षाने आपल्या कच्च्या सोंगट्या आपल्या पटाच्या मधल्या रांगेतील सहाव्या घरात दोन व सातव्या घरात दोन याप्रमाणे ठेवाव्या. पक्क्या सोंगट्या आपल्या उजव्या हाताकडील पटाच्या पहिल्या रांगेतील सातव्या घरात दोन व आठव्या घरात दोन याप्रमाणे ठेवाव्या.

खेळणाराने फासे हातात घेऊन खुळखुळवून खाली टाकले, की त्यांच्यावरील जी टिंबे वर दिसतील त्यांच्या बेरजेला दान असे म्हणतात. उदा० फासे खाली टाकल्यावर एका फाशाची सहा टिंबे असलेली बाजू, दुसऱ्याची दोन टिंबे असलेली बाजू व तिसऱ्याचे एक टिंब असलेली बाजू वर आली, तर ६+२+१ मिळून नऊ (छ, तीन, नऊ) दान पडले असे होते.

तीन फाशांची एकूण वीस दाने असून, त्यांपैकी प्रत्येकास वेगवेगळे नाव आहे. ही दाने व त्यांची नावे पुढे दिली आहेत –

| दान | नाव |
|---|---|
| १+१+१ | = तीन काणे किंवा तीन पैसे |
| २+१+१ | = चार काणे किंवा चार पैसे |
| २+२+१ | = पंचडी किंवा पाच पैसे |
| २+२+२ | = छकडी |
| ५+१+१ | = पाच, दोन, सात |
| ५+२+१ | = पाच, तीन, आठ |
| ६+१+१ | = छ, दोन, आठ |
| ५+२+२ | = पाच, चार, नऊ |
| ६+२+१ | = छ, तीन, नऊ |
| ६+२+२ | = छ, चार, दहा |
| ५+५+१ | = दस, प्यादा, अकरा |
| ५+५+२ | = दस, दोन, बारा |
| ६+५+१ | = कच्चे बारा |
| ६+५+२ | = वाकडे तेरा |
| ६+६+१ | = पो-पाव-बारा, तेरा |
| ६+६+२ | = चौदा |
| ५+५+५ | = पंधरा |
| ५+५+६ | = सोळा |
| ६+६+५ | = सतरा |
| ६+६+६ | = अठरा |

वरील दानांपैकी ज्यांत दोन दोन समान संख्या आहेत, त्यांस जूगाचे किंवा गाडीचे दान असे म्हणतात. जूगाच्या दानाचे दोन भेद असतात– कच्चे आणि पक्के. उदा० चार पैसे, तीन काणे, अठरा; दस, दोन, बारा वगैरे दानांत कच्चे व पक्के हा भेद आहे. कारण त्यांत दोन दोन समान संख्या आहेत. परंतु छ, तीन, नऊ; पाच, तीन, आठ इत्यादी दानांत हा भेद नाही. कारण या दानांतील तिन्ही संख्या भिन्न भिन्न आहेत.

कच्चे दान म्हणजे दोन फाशांवर जी समान संख्या असेल तेवढे द्वय व तिसऱ्या फाशावरील संख्या. पक्के दान म्हणजे दोन फाशावरील समान संख्येच्या दुप्पट द्वय व तिसऱ्या फाशावरील संख्या. उदा० चार पैसे यांचे कच्चे दान म्हणजे एक द्वय व दोन आणि पक्के दान म्हणजे दोन द्वये व दोन.

सोंगट्या नेहमी उजव्या बाजूने पुढे पुढे चालतात. सोबतच्या

आकृतीत दाखवलेल्या पटात अंक घालून व पक्षाच्या सोंगटचा कशा चालतील, ते स्पष्ट केले आहे. सोंगटचा फिरत फिरत ७५ घरात आल्यावर अनुक्रमे ८, ७, ६ या क्रमाने चालतात.

पडलेल्या दानातील कोणत्याही दोन फाशांवरील संख्येच्या बेरजेने एक सोंगटी व तिसऱ्या फाशावरील संख्येने दुसरी सोंगटी अथवा सबंच दानाने एक सोंगटी याप्रमाणे सोंगटचा चालतात. गाडीच्या दानाने जूग चालते. गाडीचे दान कच्चे दिले, तर त्यात जितकी द्वये असतील तितकी घरे जूग चालते व त्याच जूगातील एक सोंगटी बाकी राहिलेल्या संख्येने पुढे जाते. उदा० २५ या घरात जूग आहे व ५+५+२ (दस, दोन, बारा) या दानाने ते चालायचे आहे, तर वरील दान कच्चे दिल्यास जूग ३० या घरात जाईल व त्यांपैकी एक सोंगटी पुढे दोन घरे म्हणजे ३२ या घरात जाईल. हेच दान पक्के दिले, तर जूग ३५ या घरात जाईल व त्यांपैकी एक सोंगटी पुढे दोन घरे म्हणजे ३७ या घरात जाईल.

एका सोंगटीच्या मागे काही घरे दुसरी सोंगटी असून, पडलेल्या गाडीच्या दानाने त्यांचे जूग असल्यास, त्यांचे जूग होऊन ते पुढे चालते. उदा० एक सोंगटी ५४ या घरात आहे व एक सोंगटी ४८ या घरात आहे. ६+६+६ (अठरा) हे दान द्यायचे आहे, तर या दानातील ६ या संख्येने ५४ या घरातील सोंगटीचे जूग होईल व ते कच्चे दान दिल्यास पुढे सहा घरे म्हणजे ६० या घरात व पक्के दान दिल्यास पुढे बारा घरे म्हणजे ६६ या घरात जाईल.

गाडीच्या दानाने जूग चालवलेच पाहिजे असे नाही, तर त्याने एक सोंगटी अथवा वेगवेगळ्या दोन सोंगटचाही चालविता येतात. मात्र एक एकटी सोंगटी चालविली म्हणजे तिला कच्चे व पक्के दान देता यायचे नाही.

दुरंगी खेळात येणारे काही खास पारिभाषिक शब्द आहेत. उदा० दान देणे. म्हणजे पडलेल्या दानाने सोंगटी चालविणे. 'जूग' म्हणजे एकाच जातीच्या दोन सोंगटचा एका घरात येणे. आपली एक सोंगटी एका घरात असून, विरुद्ध पक्षाची सोंगटी त्याला पडलेल्या दानातील कोणत्याही एका संख्येने, दोन संख्यांच्या बेरजेने किंवा तीन्ही संख्यांच्या बेरजेने त्याच घरात आल्यास आपली 'सोंगटी मरते', म्हणजे तिला पटातून बाहेर काढावे लागते. 'सोंगटी लागणे' म्हणजे एकदा मेलेली सोंगटी पुन्हा खेळात आणणे. आत गेलेल्या (निजलेल्या) सोंगटीस, ती ज्या घरात असेल, त्या घरातून काढून पुन्हा पूर्वीप्रमाणे चालविणे याला 'सोंगटी बाहेर काढणे' अशी संज्ञा आहे.

खेळ चालू असता एखाद्या पक्षाला पडलेले दान त्याला पूर्णपणे द्यायला मार्ग राहिला नाही, तर त्या पक्षावर विरुद्ध पक्षाची 'कुजी झाली' असे म्हणतात. म्हणजे त्या पक्षाचे ते दान कुजते.

आपल्या चारही पक्क्या सोंगटचा आपल्या पटातील पहिल्या, म्हणजे आपल्या डाव्या हाताकडील रांगेत आल्या व विरुद्ध पक्षाच्या माऱ्यातून सुटल्या, की आपली 'सई झाली' असे म्हणतात.



सारिपटातले फासे

सई झाल्यानंतर आपल्या सोंगटचा आपल्या पटाच्या मधल्या रांगेत येऊन, तिथून त्या रांगेच्या पलिकडच्या मोठ्या घरात गेल्या, की 'सोंगटचा उठल्या' असे समजावे.

आपली सई झाल्यानंतर आपल्या पक्क्या व कच्च्या अशा सर्व सोंगटचा, विरुद्ध पक्षाची सई होण्यापूर्वी उठल्या की विरुद्ध पक्षावर 'दुरंगी' झाली असे म्हणतात.

दुरंगी खेळ खेळण्याची पद्धती अशी – प्रथम एका पक्षातील मुख्य खेळाडूने फासे टाकावे. (या मुख्य खेळाडूला लाग्या असे म्हणतात.) मग जे दान पडले असेल, त्याने एक अथवा दोन सोंगटचा चालवाव्या. नंतर त्याच्या भिडूंनी एकामागून एक याप्रमाणे फासे टाकावे व त्यांना जी दाने पडतील, त्यांनी सोंगटचा चालवाव्या. एका पक्षातील सर्व खेळाडूंनी फासे टाकून दान दिल्यावर दुसऱ्या पक्षातील खेळाडूंनी फासे टाकावे व दाने द्यावी. याप्रमाणे दोन्ही पक्षांनी आलटून पालटून खेळावे.

खेळ चालू असता प्रत्येक पक्षाने आपल्या चारही पक्क्या सोंगटचा आपल्या पटाच्या पहिल्या म्हणजे आपल्या डाव्या हाताकडील रांगेत आणण्याच्या प्रयत्नात राहावे. उदा०चौथी सोंगटी त्याच्या पटावरील पहिल्या रांगेत येताच, त्या चारही सोंगटचांपैकी कोणतीही एक सोंगटी, विरुद्ध पक्षाच्या अठरा किंवा त्याहून कमी दानाच्या माऱ्यात बसवावी.

आपल्या चारही पक्क्या सोंगटचा आपल्या पटावर आणून, त्यांपैकी एक सोंगटी विरुद्ध पक्षाच्या माऱ्यास दिल्यावर, जर ती त्या पक्षाने त्याच वेळेस मारली नाही, तर आपली सई होते.

एका पक्षाची सई झाल्यावर त्या पक्षाने विरुद्ध पक्षाची सई करू न देता, प्रथम आपल्या चारही पक्क्या सोंगटचा उठवाव्या. मग कच्च्या सोंगटचा उठवाव्या. विरुद्ध पक्षाची सई होण्यापूर्वी जर आपणांस आपल्या सर्वच्या सर्व सोंगटचा उठवता आल्या,

तर विरुद्ध पक्षावर आपण दुरंगी केली असे होते व खेळ संपतो. पुष्कळदा एका पक्षाची दुसऱ्या पक्षावर सई झाली, की खेळ पुरा करण्याची प्रथा आहे. याला रंग सई असे म्हणतात.

या खेळात दान देण्यातच खरी खुबी असते. हवे तेच दान घेणे आपल्या स्वाधीनचे नसले, तरी योग्य दान दिल्यास विरुद्ध पक्षाचा डाव सहसा आपल्यावर होणार नाही. योग्य दान कसे द्यावे, हे अभ्यासानेच ध्यानी येते. पाहा – द्यूत. [ स. म. खे. पु.]

## सार्थवाह

सार्थ म्हणजे व्यापारी किंवा यात्रिक लोकांचा समूह, तांडा. त्याला मार्गदर्शन करणारा तो सार्थवाह होय. सार्थवाह हा ज्येष्ठ व्यापारी असे. प्राचीन काळी हे सार्थवाह ताम्रलिप्तीपासून सीरियाच्या अंताखी नगरीपर्यन्त, यव द्वीप व कटाह द्वीप (जावा व केडा) यांपासून चोलमंडलापर्यन्तच्या बंदरांत आणि पश्चिमेला यवन व बर्बर देशांपर्यन्तच्या विशाल भूभागावर संचार करीत होते. हे सार्थवाह बुद्धिमान, सत्यप्रिय, साहसी, व्यवहारात मुरलेले, उदार, दानशूर, धर्म व संस्कृती यांविषयी आस्था असणारे, देश-विदेशांची चांगली माहिती असणारे आणि यवन, शक, पल्लव, रोमक, ऋषिक, हूण, इ. लोकांशी मिळून मिसळून वागणारे, त्यांची भाषा व रीतिरिवाज जाणणारे असे होते.

वैदिक साहित्यात साथवाह हा शब्द आढळत नाही. पण पणी नामक व्यापारी व त्यांचा व्यापार यांचे वर्णन त्यात आढळते. तसेच त्यात नावेसंबंधी अनेक शब्द येतात. त्यावरून त्याकाळी समुद्रावरून लोकांची ये-जा चालू होती, असे दिसते. सनपूर्व सुमारे पाचव्या शतकातील बौद्ध साहित्यावरून त्या काळातील यात्रांची माहिती मिळते. व्यापारी वर्गाप्रमाणेच साधुसंन्यासी, तीर्थयात्री, फेरीवाले, खेळ-तमाशे करणारे, विद्यार्थी, अध्ययन पूर्ण झाल्यावर देश पाहण्यासाठी हिंडणारे चरक नामक विद्वान, इ. निरनिराळ्या प्रकारचे लोक यात्रा करीत असत. त्या काळात राज्यकर्ते नवीन नवीन रस्ते तयार करीत व त्यांच्या रक्षणाचीही व्यवस्था करीत. तरीही वाटेत चोर, डाकू यांच्यापासून भय असे. सार्थाच्या संरक्षणाची पूर्ण जबाबदारी सार्थवाहावर असे व त्यासाठी तो पहारेकऱ्यांची नेमणूक करीत असे. मार्गात चोर-लुटारू तर हल्ले करीत असतच; शिवाय जंगली श्वापदांपासूनही भीती असे. जंगले पार करताना रस्ता चुकण्याचीही धास्ती असे. अशा वेळी सार्थवाह आपल्या बुद्धिकौशल्याने सर्व लोकांना संकटापासून वाचवीत असे. सार्थ कुठल्या मार्गाने आणि कसा न्यायचा याचे सर्व अधिकार त्याच्याकडे असत आणि त्या बाबतीत सार्थातील लोक त्याला पूर्ण सहकार्य देत. वाटेत कुठे पडाव टाकायचा, हे तोच ठरवीत असे. सार्थाच्या खाण्यापिण्याची व्यवस्था त्यालाच करावी लागे. सर्वांना सारख्या प्रमाणात भोजन मिळते का नाही, हे तो पाहत असे. तो चतुर व्यापारी असे. संकटे आली असता तो विचलित न होता शांत चित्ताने त्यांतून पार होत असे. सार्थवाह हा सार्थाचा केवळ नेताच नव्हे, तर यात्राकालात तो सार्थाचा सर्वाधिकारी असे.

सार्थवाहाच्या साहाय्यासाठी सर्व तऱ्हेची पूर्ण व्यवस्था असे. वाळवंटातून प्रवास करताना विशेष प्रकारची व्यवस्था असे. मध्यदेशाच्या बाजूने वणू किंवा बन्नू येथे जाणारा मार्ग वण्णुपथ या नावाने ओळखला जात असे. तो वाळवंटी प्रदेशातूनच जात असे. त्याचप्रमाणे द्वारवती (द्वारका) पासून एक रस्ता मारवाडातील वाळवंट मरुधन्व पार करून प्राचीन सौवीराची राजधानी रोरुक या नगरातून मध्य आशियातील कंबोजपर्यंत जात होता. वाळवंटातून जाताना नक्षत्रांच्या गतिस्थितीचा अंदाज घेऊन सार्थवाह मार्गक्रमण करीत असे.

भारतातील सर्वांत महत्त्वाचा यात्रामार्ग उत्तरी महापथ या नावाने ओळखला जात असे. एका काळी हा महापथ कास्पियन समुद्रापासून चीनपर्यंत आणि बाल्हीकपासून पाटलिपुत्र-ताम्रलिप्तीपर्यन्त असा साऱ्या आशिया खंडातून जात होता.

मणिभद्र यक्ष हा स्थलयात्रा करणाऱ्या सार्थवाहांचा अधिष्ठाता देव होता. सर्व उत्तर भारतात मणिभद्राची मंदिरे होती. पवाया (प्राचीन पद्मावती, ग्वाल्हेर) येथे मणिभद्राच्या पूजेचे मोठे केंद्र होते. महाभारताच्या वनपर्वातील नलोपाख्यानात चेदी देशाला जाणाऱ्या एका मोठ्या सार्थाचा उल्लेख आहे. या सार्थाने वेत्रवती नदी पार केल्यावर दमयंती त्या सार्थाच्याच सोबतीने चेदी देशाला पोचली. या सार्थाचा नेता घनदाट जंगलातून जाताना यक्षराज मणिभद्राचे स्मरण करीत होता, असे तिथे सांगितले आहे.

वनपर्वात (अ. ६१–६२) या महासार्थाचे वर्णन आलेले आहे. त्या महासार्थात हत्ती, घोडे, रथ यांची गर्दी होती. तसेच त्यात बैल, गाढव, उंट व पायी चालणारे यांची एवढी प्रचंड संख्या होती, की चालणारा सार्थ म्हणजे माणसांचा समुद्रच आहे, असे वाटावे. त्यात मुख्यत: व्यापाऱ्यांचा भरणा होता. शिवाय त्यात वेदपारंगत ब्राह्मण व बाल, तरुण, वृद्ध अशा सर्व प्रकारच्या स्त्रीपुरुषांचा समावेश होता. संध्याकाळ झाल्यावर सार्थातील लोक दमत असत व सार्थवाहाच्या संमतीने एखाद्या चांगल्या ठिकाणी मुक्काम करीत असत.

त्या काळी व्यापारी लोक समुद्रावरूनही व्यापार करीत असत. समुद्रातून प्रवास सुखरूप होण्यासाठी सार्थात कुशल मार्गदर्शक असत. त्यांना जलनिर्यामक असे नाव होते. शूर्पारक बंदरात निर्यामकसूत्राचे शिक्षण देण्याची व्यवस्था केलेली होती.

समुद्रावर एकत्र प्रवास करणाऱ्यांना सांयात्रिक असे म्हणत. द. भारतातील मणिमेखला देवी ही समुद्रयात्रेची अधिष्ठात्री होती व नाविकांना पूज्य होती. पुहार नामक नगरात तिचे मोठे मंदिर होते.

सार्थवाह व प्रवासी यांच्या द्वारे भारतीय कथासाहित्यात खूप भर पडली आहे. समुद्राशी संबंधित अशा अनेक यक्ष, नाग, भूत-प्रेत व निरनिराळ्या प्रकारचे जलचर आणि दैवी आश्चर्ये यांच्या कथा नाविक लोक सांगत व प्रवासात आपला वेळ घालवीत.

मौर्यकालात राज्यकर्त्यांनी व्यापाराकडे लक्ष दिले आणि तो अधिक व्यवस्थित व सुरक्षित केला. त्यानंतर शुंगकालातही तीच व्यवस्था चालू राहिली. सातवाहन राजांनी समुद्रावरील व्यापाराची वाढ केली. कुषाणकालात भारताचा रोमशी व्यापार बऱ्याच मोठ्या प्रमाणात वाढला. याचे श्रेय समुद्री सार्थवाहांना अधिक होते. पूर्वेकडील समुद्रकिनाऱ्यावर बौद्ध धर्माला जे ऐश्वर्य प्राप्त झाले, त्याचे कारण हा व्यापारच होता. बौद्ध धर्मानुयायी व्यापाऱ्यांनी अमरावती, नागार्जुनकोंड व जग्गय्यपेट्ट येथील विशाल स्तूप बांधायला मदत केली. त्याचप्रमाणे पश्चिम समुद्र-किनाऱ्यावर भाजे, कार्ले व कान्हेरी येथील महाचैत्य व विहार बांधण्यासाठी रोमन साम्राज्याशी व्यापार करून धनकुबेर बनलेल्या व्यापाऱ्यांनी आर्थिक साहाय्य केले.

गुप्तयुगात अनेक लोक परदेशांशी समुद्री व्यापार करून धन मिळवीत होते. मोठमोठे जलसार्थवाह निरनिराळ्या द्वीपांतून सोने, रत्ने वगैरे कमावून परत स्वदेशी आले, की विपुल सोने दान देत असत. मत्स्यपुराणातील षोडश महादान प्रकरणात एक सप्तसमुद्रमहादानही सांगितलेले आहे. ज्या कूपातील जल घेऊन हे दानसंकल्प करण्यात आले, त्यांना सप्तसमुद्रकूप असे म्हणत असत. त्या काळातील मथुरा, काशी, प्रयाग, पाटलिपुत्र, इ. प्रमुख व्यापारी नगरांत अजूनही असे सप्तसमुद्रकूप आहेत.

भारतीय सार्थ घरात बसलेल्या लोकांना बाहेर येऊन ऊन-वाऱ्यातील जीवन जगण्यासाठी आवाहन करीत असे. सार्थाबरोबर केलेला प्रवास व्यक्तीला कधीच त्रासदायक होत नसे. त्यात आनंद, उत्साह, परस्परांचे हित पाहण्याची बुद्धी, इ. गोष्टी सामावलेल्या असत. सार्थांच्या या आनंदप्रधान जीवनाचे रहस्य महाभारतातील (वनपर्व २९७.४५) एका वाक्यात सांगितले आहे, की घरात राहणाऱ्या व्यक्तीला स्त्री जशी सखी असते, तसेच घराच्या बाहेर प्रवास करणाऱ्या व्यक्तीला सार्थ हा सखा असतो. [ सार्थवाह –डॉ. मोतीचंद्र, १९५३ ]

**सार्पराज्ञी** एक सूक्तद्रष्टी. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे एकोणनव्वद क्रमांकाचे सूक्त हिने रचले आहे. सूर्य ही या सूक्ताची देवता आहे. त्यातील एक ऋचा अशी–

अन्तश्चरति रोचनाऽस्य प्राणादपानती ।
व्यख्यन्महिषो दिवम् ॥ (ऋ. १०.१८९.२)

अर्थ – द्यावापृथ्वींमध्ये उदय व अस्त पावणाऱ्या सूर्याचे तेज अंतरिक्षात दृग्गोचर होते.

वैदिक साहित्यात अनेक ठिकाणी हिचे सर्पराज्ञी म्हणून उल्लेख येतात. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को. ]

**सार्वभौम व्रत** एक काम्य व्रत. कार्तिक शुद्ध दशमीला या व्रताचा प्रारंभ करतात. सकाळी स्नान केल्यावर नक्त भोजनाचा संकल्प करतात. विविध रंगांच्या फुलांनी दिशांची पूजा करतात व त्यांना दहीभाताचा नैवेद्य दाखवतात, रात्री स्वतः दहीभाताचे भोजन करतात. ब्राह्मणांना विविध रंगांची फुले व खाद्यपदार्थ देतात. प्रत्येक महिन्याच्या शुद्ध दशमीला वर्षभर हे व्रत राजाने केल्यास तो दिग्विजयी आणि सम्राट होतो, असे सांगितले आहे. [ व्र. प.; हि. ध. ]

**सार्वसेनी यज्ञ** संतती होण्यासाठी हा याग करावा, असे शांखायन ब्राह्मणात (४.६) सांगितले आहे. पूर्णमासेष्टी आणि दर्शेष्टी यांमध्ये असलेल्या देवतांच्यासाठी पूर्णिमेच्या दिवशी एकत्र याग करायचा असतो व पंधरा दिवस व्रतस्थ राहायचे असते. अमावास्येच्या दिवशी नित्याप्रमाणे इष्टी करायची नसते. त्या दिवशी केवळ पिंडपितृयज्ञ करावा, असेही एक मत आहे. सार्वसेनी नावाच्या ऋषीने शत्रूवर अभिचार करण्यासाठी चार हवी असलेला याग केला असे बौधायन सूत्रात (१७.५४) म्हटले आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**सालबेग** (इ. स. चे १६ वे शतक) ओडिया भाषेतील एक संतकवी. त्याचा बाप लालबेग नावाचा मुसलमान सेनापती असून, आई ब्राह्मणकन्या होती. ऐन तारुण्यात सालबेग एका युद्धात जबर जखमी झाला. त्याच्या जखमा काही केल्या बऱ्या होईनात. त्या हाल–अपेष्टांना कंटाळून त्याने आत्महत्या करण्याचा विचार केला. परंतु त्याच्या आईने त्याला जगन्नाथाला शरण जाण्याचा उपाय सुचविला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे तो जगन्नाथाला शरण गेला आणि क्षतमुक्त झाला. तेव्हापासून तो जगन्नाथाचा भक्त बनला. त्याने संसार सोडून व जीवनाच्या अखेरपर्यंत जगन्नाथपुरीत राहून त्याची उपासना केली.

सालबेग सहजसिद्ध व लोकप्रिय कवी होता. ओडिया भजन-साहित्यात त्याच्या रसात्मक भजनांना फार मान आहे. त्याची एक भजनावली प्रसिद्ध आहे. [ उ. सा. इ. ]

**सालापू** एक जात. ही जात आंध्रात विजगापट्टम येथे आढळते. हे लोक कोष्टी आहेत. मार्कंडेय ऋषीपासून आपली उत्पत्ती झाल्याचे हे सांगतात.

या जातीत दोन पोटभेद आहेत; एक लिंगवंत व दुसरा वैष्णव. पोटजातींत परस्पर विवाहसंबंध होतात. लिंगवंतांचे पुरोहित जंगम व वैष्णवांचे सातानी हे असतात.

**विवाहप्रथा** – ही जात समान गोत्रात विवाहसंबंध करीत नाही. मुलींची लग्ने त्या वयात येण्यापूर्वी करतात. मातुलकन्या-परिणयाची चाल आहे. विवाहापूर्वी काही महिने हळदीचा विधी होतो. त्या वेळी वरपक्षाकडील स्त्रिया वधूला हळद लावून तिच्या हातात चांदीचे कंकण घालतात. वधूचे देज घेण्याची चाल आहे. बाकीचे लग्नविधी इतर तेलुगू जातीतल्या पद्धतीप्रमाणे असतात. घटस्फोट व विधवाविवाह यांना परवानगी असते.

**चालीरीती** – या जातीचा एक जातप्रमुख असतो. त्याला सेनापती म्हणतात. जातीतील भांडणतंट्यांचा निकाल तो देतो. विवाहसमारंभात त्याला प्रथम गंध लावतात व प्रथम जेवायला वाढतात. इतरही काही मान त्याला असतात.

**मृतकप्रथा** – लिंगवंत लोक मृताला बसलेल्या स्थितीत पुरतात व वैष्णव लोक मृताचे दहन करतात. [का. ट्रा. स. इं.]

**सालियन** एक जात. तमिळनाडूतील तंजाऊर जिल्ह्यात कोरनाड आणि अय्यमपेठ येथे हे लोक राहतात. हे आपण सालिय महर्षींचे वंशज असल्याचे सांगतात. हे लोक जानवे घालतात. पूर्वी उच्चवर्णीय लोक यांच्या कपड्यांना शिवत नसत. सांप्रत या जातीचा सामाजिक दर्जा उंचावलेला आहे. इतर जाती जरी यांच्या घरी भोजन करीत नसल्या, तरी हे लोक आपल्या घरी ब्राह्मण स्वयंपाकी नेमतात. ऋषींच्या नावांवरून यांची गोत्रे निर्माण झालेली आहेत.

तंजाऊर जिल्ह्यातील सालियन आणि तिनेवेल्ली जिल्ह्यातील सालियन यांच्यांत रोटीबेटी व्यवहार होत नाही. पहिली पत्नी जिवंत असता सालियन सहसा दुसरी पत्नी करीत नाहीत. जरी पत्नीला मूल झाले नाही, तरीही दुसरा विवाह करीत नाहीत; फार तर दत्तक घेतात. [का. ट्रा. स. इं.]

**साले** विणकाम करणारी दक्षिणेतली एक मोठी तेलुगू जात. साले हा शब्द संस्कृत 'सालिक' या शब्दापासून बनला आहे व त्याचा अर्थ विणकाम करणारा असा आहे. या जातीच्या व्युत्पत्तीविषयी आंध्र पदपारिजातम् या ग्रंथात एक दंतकथा सांगितली आहे, ती अशी –

देवांना व त्यांच्या सेवकांना जेव्हा वस्त्रांची इच्छा झाली, तेव्हा इंद्राने मार्कंडेयाकडे वस्त्रे विणून देण्याची मागणी केली. ती ऐकून मार्कंडेय विष्णूकडे गेला. विष्णूच्या सांगण्यावरून त्याने एक यज्ञ केला. यज्ञकुंडातून भावन नावाचा एक ऋषी वर आला. त्याच्या हातात सुताचा गुंडा होता. ते सूत विष्णूच्या नाभिकमलाच्या तंतूपासून बनले होते. त्या सुताची वस्त्रे विणून मार्कंडेयाने देवांना दिली. पुढे मार्कंडेय ऋषीने भद्रावती व प्रसन्नावती या दोन सूर्यकन्यांशी विवाह केला. त्यांच्या ठिकाणी मार्कंडेयाला १०१ पुत्र झाले. त्यांच्यापैकी १०० पुत्रांचे वंशज पद्मसाले बनले व एका पुत्राचे वंशज पट्टुसाले झाले. मग सूर्यनारायणाने मार्कंडेयाला पद्मवेद या नावाने पाचवा वेद दिला.

यांच्यांत शंकुसाले नावाची आणखी एक पोटजात आहे. पट्टुसाले जानवे घालतात. पद्मसाले ते घालीत नाहीत. पट्टुसाले तलम कापड विणतात, तर पद्मसाले जाडेभरडे कापड विणतात. विड्या बनवणे, सावकारी, इ. धंदेही ते करतात. त्यामुळे ही जात आर्थिक दृष्ट्या सुस्थितीत आहे.

हे लोक प्रथम कर्नाटकात आले व पुढे तमिळनाडूमध्येही पसरले. त्यांची मूळची तेलुगू भाषा ही फक्त पद्मसाले बोलतात. पट्टु- साले व शंकुसाले यांनी कानडी भाषा स्वीकारली आहे. पद्मसाले हे वैष्णव असून, पट्टुसाले हे लिंगायत बनले आहेत. चोडेश्वरी ही वैष्णवांची देवी होय. हे लोक आपल्या पूर्वजांचीही पूजा करतात. सुताच्या गुंड्यावर ही पूजा होते. त्यासाठी वर्षातला दिवस नेमलेला असतो. त्या दिवशी आप्तेष्टांना मेजवानी देतात. प्रसंगी ग्रामदेवतांनाही पूजतात.

**विवाहप्रथा** – हे लोक मुलामुलींची लग्ने ती वयात आल्यावर करतात. मोठी माणसे लग्न जमवितात. अनेक बायका करणे निषिद्ध नसले तरी, सामान्यपणे एकपत्निप्रथा प्रचलित आहे. मामाच्या मुलीशी लग्न होते. थोरल्या बहिणीच्या मुलीशीही लग्न करण्याची प्रथा आहे. लग्न ठरल्यावर गावातल्या वडील मंडळींना एकत्र जमवून पानसुपारी वाटतात व तिथिनिश्चय करतात. लग्नसमारंभ चार दिवस चालतो. लग्नाआधी मुलगा विधिपूर्वक यज्ञोपवीत धारण करतो. वधूला ताळी बांधल्यानंतर कंकणबंध होतो. मग वधू-वर एकमेकांचा हात धरून मंडपातल्या देवकाच्या खांबाला प्रदक्षिणा घालतात.

त्यानंतर नवरा मुलगा रुसून एका मंदिरात जाऊन बसतो. मग वधूगृहातून एक मुलगा वरवेष करून खऱ्या वराला शोधतो व त्याला लग्नमंडपात घेऊन येतो.

वधू-वर एका ताटात जेवायला बसतात. नंतर वधू-वरांचे हात जुळवून पुरोहित त्यांवर दुधाची धार सोडतो.

शेवटच्या दिवशी नागावली नावाचा एक समारंभ होतो. त्या वेळी वधू-वर वारुळाची पूजा करून त्याची माती घरी

आणतात. इतक्या सर्व गोष्टी झाल्यावर लग्नसमारंभ पूर्ण होतो.

या लोकांत विधवाविवाहाला मान्यता नाही. व्यभिचारी स्त्रीला घटस्फोट देतात; पण पुर्नविवाह करू देत नाहीत.

**प्रसूतिप्रथा**–पत्नी गर्भवती असता तिच्या पतीला एखाद्याच्या अंत्यक्रियेत भाग घेण्याला बंदी असते. पट्टुसाले नवजात शिशूच्या गळ्यात लिंग बांधण्यासाठी जंगमाला बोलावतात. लिंग बांधल्यावर जंगम आपल्या उजव्या पायाचा अंगठा बाळाच्या कपाळाला लावतो. वैष्णवांच्या घरी अकराव्या दिवशी बाळंतिणीला न्हाऊ घालून ज्ञातिभोजन देतात. त्याच दिवशी मुलाला पाळण्यात घालतात. मुलाला बहुधा एखाद्या मृत पूर्वजाचे नाव ठेवतात.

**मर्तिकप्रथा** – वैष्णव साले मृतांना जाळतात व लिंगायत साले मृतांना पुरतात. प्रौढ मृताचे बारा दिवस व लहानांचे तीन दिवस आशौच पाळतात. वैष्णव साले महालयाच्या वेळी ब्राह्मणांना शिधा देतात. [मै. ट्रा. का. व्हॉ. ४ ]

## सालोटगी

हा गाव विजापूर जिल्ह्यात असून, प्राचीन काळी संस्कृत शिक्षणासाठी प्रसिद्ध होता. या गावाचे मूळ नाव पाविट्टिगे असे होते. पुढे ते गाव सालोटगी या नावाने प्रसिद्धी पावले. इ. स.च्या १०व्या शतकात इथले संस्कृत विद्यापीठ फार प्रसिद्ध होते.

राष्ट्रकूट घराण्यातील तिसऱ्या कृष्णाच्या, नारायण नावाच्या मंत्र्याने या गावी त्रयीपुरुषाचे एक मंदिर बांधले. मंदिराला जोडून बांधलेल्या मंडपात विद्यार्थ्यांच्या अभ्यासाची सोय करण्यात आली होती. सत्तावीस जागीं त्यांच्या निवासाची सोय होती. त्यांच्या दिवाबत्तीच्या सोईसाठी साठ एकर जमिनीचे उत्पन्न लावून दिले होते. यावरून विद्यापीठातील विद्यार्थ्यांची संख्या किती मोठी असेल, त्याची कल्पना करता येते. इथे कोणते आचार्य अध्यापन करीत होते ते मात्र सांगता येत नाही. [ प्रा. भा. वि. ]

## सावदाम्मा

द. भारतातील विणकऱ्यांची देवता. ही उत्तर भारतातून दक्षिणेत आली, असे सांगतात. तिच्याविषयी दंतकथा पुढीलप्रमाणे – एकदा मानव आणि राक्षस यांचे युद्ध जुंपले. त्यात मानवांचा पराभव होऊ लागला. तेव्हा त्यांनी शिवाचा धावा केला. शिवाने मानवाच्या साहाय्यास पार्वतीला पाठविले. तिने अवतार घेऊन राक्षसांचा निःपात केला. तीच ही देवता होय. [ व्हि. गॉ. सा. इं. ]

## सावन वर्ष

सूर्योदयापासून पुन्हा सूर्योदय होईपर्यंतचा जो काल, त्याला सावन दिन असे म्हणतात. अशा तीस सावन दिवसांचा एक महिना होतो आणि बारा सावन महिन्यांचे एक वर्ष होते. [ नि. सि. ]

## सावरकर, स्वा. विनायक दामोदर

(इ. स. १८८३ ते १९६६) महान क्रांतिकारक, समाजसुधारक, हिंदूसंघटक, इतिहासकार आणि महाकवी. दामोदरपंत व राधाबाई या दंपतीच्या पोटी नासिक जिल्ह्यातल्या भगूर नावाच्या खेडचात सावरकरांचा जन्म झाला. तीन भाऊ आणि एक बहीण अशी ही चार अपत्ये होती. सावरकरांचे थोरले बंधू बाबाराव आणि धाकटे बंधू नारायणराव. त्यांचे घराणे इनामदारांचे होते. घरी समृद्धी होती.

वयाच्या ७ व्या वर्षी विनायकराव सावरकरांचे उपनयन झाले. सोप्या धार्मिक ग्रंथांचे वाचन त्यांनी लहान वयातच पूर्ण केले. त्यांच्या घरी देवी अष्टभुजेची मूर्ती होती. समजू



तरुण विनायकराव सावरकर

लागल्यापासून ते तिचे ध्यान धरीत. तिचे एक स्तोत्रही त्यांनी रचले होते. सावरकरांची बुद्धी तल्लख आणि धारणाशक्ती

जबरदस्त होती. ८ ते १० या वयातच त्यांना वृत्तपत्रे वाचण्याचा नाद लागला. ते वृत्तपत्रीय वार्तांवर मित्रमंडळीत चर्चा करू लागले.

त्याच वयात त्यांना मातृवियोग झाला. वडिलांनी दुसरे लग्न न करता या अपत्यांचे मातेच्या वत्सलतेने संगोपन केले. इ. स. १८९७ साली माध्यमिक शिक्षणासाठी विनायकराव सावरकर नासिकला आले. तिथल्या गणेशोत्सवांतून त्यांच्या देशभक्तीच्या कार्याला प्रारंभ झाला. हळू हळू त्यांचे वक्तृत्वही फुलू लागले. समवयस्क विद्यार्थ्यांचे ते पुढारी बनले. त्यांची स्वदेशभक्ती हळू हळू वाढत चालली.

१८९७ साली चाफेकर बंधूंना रँडसाहेबाच्या हत्येबद्दल फाशीची शिक्षा झाली. विनायकराव सावरकरांच्या देशभक्तीचा अंगार फुलण्यास ही गोष्ट विशेषत्वाने कारणीभूत झाली. त्यांनी चाफेकरांच्या या बलिदानावर एक फटका रचला.

या प्रसंगानंतर विनायकराव सावरकरांनी वयाच्या १५ व्या वर्षी कुलस्वामिनीच्या पुढे सशस्त्र क्रांतीच्या मार्गाने भारताला स्वतंत्र करण्याची प्रतिज्ञा घेतली.

इ. स. १८९९ साली भगूरला प्लेगाचा कहर उसळला आणि त्यात त्यांच्या वडिलांचा अंत झाला. मग हे सर्व कुटुंब भगूर सोडून नासिक येथे राहायला आले. विनायकरावांनी १८९९ सालीच राष्ट्रभक्तसमूह या नावाच्या क्रांतिकारी गुप्त संस्थेची स्थापना केली. पुढे लगेच मित्रमेळा नावाची एक दुसरी संस्था काढली. अनेक कार्यक्रम हाती घेऊन त्यांनी नाशिकचे समाजजीवन भारून टाकले. शिवाजी उत्सवही सुरू केला. या उत्सवाची भूमिका सांगताना ते म्हणाले – 'गतगोष्टींच्या आदराचे प्रतीक म्हणून नव्हे, तर ध्येयसिद्धीचे साधन म्हणून आम्ही या उत्सवाचा स्वीकार करीत आहोत. गेलेले स्वातंत्र्य परत मिळविणारा एक थोर राष्ट्रवीर म्हणूनच शिवछत्रपती आम्हांस वंद्य नि स्मरणीय आहेत.'

१९०४ साली त्यांनी नासिक येथे एक मोठा मित्रमेळा भरवला. महाराष्ट्रातून शेकडो देशभक्त तरुण या मेळाव्याला आले होते. त्या सभेत त्यांनी आपल्या मित्रमेळा या संस्थेचे 'अभिनव भारत' असे नामकरण केले.

इ. स. १९०१ साली विनायकराव सावरकरांचा विवाह झाला. सौ. यमुनाबाई हे त्यांच्या पत्नीचे नाव होते. त्यांचे सासरे चिपळूणकर या आडनावाचे असून, जव्हार संस्थानचे तत्कालीन दिवाण होते. त्याच काळात सावरकर उच्च शिक्षणासाठी पुण्याला येऊन फर्ग्युसन कॉलेजमध्ये दाखल झाले.

१९०४ साल हे वंगभंगाच्या चळवळीने देशभर गाजले. महाराष्ट्रही संतापून उठला. त्यातूनच स्वदेशी व बहिष्कार ही चळवळ उत्पन्न झाली. या चळवळीचा एक भाग म्हणून सावरकरांनी पुण्यात विलायती कपड्यांची होळी घडवून आणली. १९०५ साली सावरकर बी. ए. झाले आणि पुढच्या वर्षी बॅरिस्टर



सौ. यमुनाबाई (माई) विनायक सावरकर

होण्यासाठी विलायतेला गेले. या कामी त्यांना लो. टिळकांचे पाठबळ लाभले. आर्थिक मदत त्यांच्या श्वशुरांनी केली.

सावरकर लंडनमध्ये पोचल्यावर श्यामजी कृष्णवर्मा यांच्या इंडिया हाऊसमध्ये उतरले. श्यामजी हे क्रांतिकारी विचारांचा पुरस्कार करणारे होते. ते इंग्लंडमध्येच स्थायिक झाले होते. त्यांनी स्वातंत्र्यवाद्यांची संघटना करण्याच्या उद्देशाने होमरूल नावाची एक संस्था स्थापली होती.

**क्रांतिकार्य** – इंडिया हाऊस हे इंग्लंडला शिक्षणासाठी जाणाऱ्या भारतीय विद्यार्थ्यांचे वसतिगृह होते. थोड्याच काळात सावरकर त्याचे सूत्रधार बनले. तिथे स्वातंत्र्यवादी तरुणांच्या साप्ताहिक बैठकी भरू लागल्या. सावरकर त्या तरुणांना क्रांतिवादाची शिकवण देऊन त्यांची मने भारून टाकू लागले. हळूहळू अभिनव भारत या संस्थेचे सभासद वाढत चालले.

सावरकरांनी 'जोसेफ मॅझिनी यांचे आत्मवृत्त व राजकारण' हा क्रांतीची प्रक्रिया सांगणारा ग्रंथ लंडनमध्ये लिहिला. तो ग्रंथ तर गाजलाच; पण त्याची सावरकर-लिखित प्रस्तावना त्याहून अधिक गाजली. हा ग्रंथ सरकारने जप्त केला. त्यामुळे त्याला

आणखी मोल चढले. सेनापती बापट आणि पंजाबचे लाला हरदयाळ हे सावरकरांना लाभलेले ज्वलज्जहाल अनुयायी होत. हरदयाळ यांनी हिंदुस्थानात येऊन पंजाबमध्ये क्रांतिकारकांची संघटना सुरू केली.

१९०७ साली १८५७ सालच्या स्वातंत्र्यसमराला पन्नास वर्षे पूर्ण झाली. 'शिपायांची भाऊगर्दी' अशा नावाने इंग्रज व त्यांच्या तालावर नाचणारे भारतीय विद्वान त्या युद्धाला हिणवीत होते. सावरकरांना तो अपसमज दूर करण्याची नितांत गरज भासली. त्यांनी '१८५७ सालचे स्वातंत्र्यसमर' या नावाचा एक ग्रंथ मराठीत लिहिला आणि लंडनमध्ये त्या स्वातंत्र्यसमराचा स्मृतिमहोत्सव मोठ्या थाटाने साजरा केला. त्या उत्सवाच्या वेळी 'ओ मार्टिर्स' या नावाने एक पत्रक छापून त्यांनी सर्वांना वाटले. सावरकरांनी लिहिलेल्या त्या पत्रकातला जणू ज्वालामुखीचा उद्रेक असा एक परिच्छेद पुढीलप्रमाणे होता —

आज १० मे हा दिनांक आहे. हुतात्म्यांनो! भारताच्या रणांगणावर तुम्ही स्वातंत्र्य—संग्रामातील पहिली मोहीम सुरू केली, ती १८५७ या नित्यस्मरणीय वर्षी, याच दिवशी. आपल्या या मातृभूमीला ज्या दास्यामुळे अवकळा आलेली होती, त्या दास्याची जाणीव झाल्यामुळे मायदेशाने त्या दिवशी आपले खड्ग म्यानांतून बाहेर काढले. त्याने आपल्या शृंखला ताड्कन तोडून टाकल्या व स्वातंत्र्य नि स्वाभिमान यांच्या प्रीत्यर्थ त्याने पहिला घाव घातला. सहस्रावधी लोकांच्या कंठातून 'मारो फिरंगीको' हा रणनाद निघाला. मीरत येथील सैनिक उठावणी करून भीषण उत्थानाच्या उत्साहाने दिल्लीकडे निघाले. सूर्यप्रकाशात चमकणारे यमुनाजल त्यांनी पाहिले. जुना मनू व नवा मनू यांच्या संधिकालावर उभा असलेला ऐतिहासिक क्षण नेमका हेरून एका क्षणात त्यांनी आपला नेता, आपला ध्वज व आपला पक्ष यांची निश्चिती केली. त्यांनी बंडाला राष्ट्रसंग्रामाचे व धर्मसंग्रामाचे स्वरूप प्राप्त करून दिले. ते सर्व याच दिवशी घडले.

याच कालात सावरकरांच्या कुटुंबावर आणखी एक आपत्ती कोसळली. सावरकरांचा पहिला मुलगा प्रभाकर देवीरोगाने मृत्यू पावला. सावरकरांनी 'शीखांचा इतिहास' हा ग्रंथ त्याच्या स्मृतीस समर्पण केला.

इ. स. १९०९ साली सावरकरांचे थोरले बंधू गणेश दामोदर तथा बाबाराव यांना क्रांतिकारक म्हणून अटक झाली. 'राजाविरुद्ध बंड करणे' असा आरोप ठेवून इंग्रजांनी त्यांना जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा दिली.

भारतातील क्रांतीची चळवळ दडपून टाकण्यासाठी त्या काळात इंग्रज सरकारने अत्याचारांचे थैमान मांडले होते. राजद्रोहाच्या आरोपाखाली अनेक तरुणांना फाशीच्या किंवा जन्मठेपीच्या शिक्षा ठोठावल्या जात होत्या. या क्रांतिकारकांना इंग्रज सरकार खुनी म्हणे. १९०९ सालीच सावरकरांचे सहकारी मदनलाल धिंग्रा यांनी लंडनमध्ये जहांगीर हॉलमध्ये कर्झन वायली



श्री. बाबाराव सावरकर

या गृहस्थांना ठार केले. त्यांच्यावर न्यायालयात अभियोग चालू असता मदनलाल धिंग्रांचे वक्तव्य सावरकरांनी तयार करून दिले होते. १७ ऑगस्ट १९०९ या दिवशी धिंग्रांना फाशी देण्यात आले.

त्यानंतर सावरकरांनी इंडिया हाऊस सोडले व ते विपिनचंद्र पाल यांच्या घरी राहू लागले. त्याच काळात १८५७ चे स्वातंत्र्यसमर या मराठी ग्रंथाचे त्यांच्या मित्रांनी इंग्रजीत भाषांतर केले व तो ग्रंथ हॉलंडमध्ये छापून घेतला.

१९०९ सालच्या विजयादशमीच्या दिवशी सावरकर व म. गांधी यांची पहिली भेट झाली. अभिनव भारताच्या वतीने जो १८५७ च्या स्वातंत्र्यसमराचा ५० वा स्मृतिमहोत्सव साजरा झाला, त्याला गांधीजी उपस्थित होते. त्या वेळी आपल्या भाषणात गांधीजींनी सावरकरांविषयी जे उद्गार काढले, ते असे — काही मतभिन्नता असली तरी मला देशभक्त सावरकरांसन्निध बसण्याची संधी मिळाली याबद्दल अभिमान वाटत आहे. त्यांच्या स्वार्थत्यागाची व देशभक्तीची मधुर फळे आपल्या देशाला दीर्घकाल लाभोत.

इकडे भारतात लॉर्ड मिंटो यांच्यावर बाँब टाकण्याच्या

कटात सामील असल्याच्या संशयावरून सावरकरांचे धाकटे बंधू डॉ. नारायणराव यांना अटक झाली. पती काळचा पाण्यावर, धाकटा दीर तुरुंगात, व विनायकराव सावरकर परदेशात अशा अवस्थेत बाबारावांच्या पत्नीचा धीर खचला आणि त्यांनी सावरकरांना एक पत्र लिहिले. त्या पत्राला सांत्वन म्हणून सावरकरांनी जे उत्तर पाठविले, ते उदात्त साहित्याचे भूषणच होते, असे म्हणावे लागेल. त्यातील काही ओव्या अशा–

जयासी तुवां प्रतिपाळिलें। मातेचें स्मरण होऊं न दिलें
श्रीमती वहिनी वत्सले। बंधु तुझा तो तुज नमीं ॥
आशीर्वादपत्र पावलें। जें लिहिलें तें ध्यानीं आलें।
मानस प्रमुदित झालें। धन्यता वाटली उदंड ॥
धन्य धन्य अपुला वंश। सुनिश्चयें ईश्वरी अंश।
कीं रामसेवा-पुण्य लेश। आपुल्या भाग्यीं लाधला ॥
अनेक फुलें फुलतीं। फुलोनियां सुकोन जाती।
कोणी त्यांची महती गणती। ठेविली असे?
परी जें गजेंद्रशुंडेनें उपटिलें। श्रीहरीसाठी मेलें।
कमलफूल तें अमर ठेलें। मोक्षदायी पावन ॥
अशींच सर्व फुलें खुडावीं। श्रीरामचरणीं अर्पण व्हावीं।
काही सार्थकता घडावी। या नश्वर देहाची ॥
तू धैर्याची अससी मूर्ति। माझे वहिनी, माझे स्फूर्ति।
रामसेवाव्रताची पूर्ति। ब्रीद तुझे आधींच ॥
महत्कार्यांचे कंकण धरिलें। आतां महत्तमत्व पाहिजे बाणलें।
ऐसें वर्तन पाहिजे केलें। कीं जें पसंत पडलें संतांना ॥

धिंग्राप्रकरण थोडेसे शांत होताच सावरकरांनी प्रचारपत्रके, ग्रंथ, बाँब बनविण्याची पत्रके व पिस्तुले भारतात पाठविण्याचा धडाका सुरू केला. भारतातील वातावरण सरकारी अत्याचारांनी सतत तापत होतेच. अशा स्थितीत दि. २१ डिसेंबर १९०९रोजी श्री. अनंत कान्हेरे यांनी नासिकच्या विजयानंद नाट्यगृहात जिल्हा कलेक्टर श्री. जॅक्सन यांना ठार केले. त्या खटल्यात कान्हेरे व त्यांचे सहकारी कर्वे व देशपांडे यांना फाशीची शिक्षा झाली. जॅक्सन ज्या पिस्तुलाने ठार झाले ते पिस्तुल सावरकरांनी भारतात पाठविले होते, असा शोध लागताच या कटाचे सूत्रधार सावरकर हेच आहेत असे समजून सरकार त्यांना अटक करण्यास प्रवृत्त झाले. श्री. बाळशास्त्री हरदास लिहितात –

'सावरकर त्या वेळी इंग्लंडमध्ये नसून पॅरिसमध्ये होते. ते सुरक्षिततेसाठीच पॅरिसमध्ये गेले होते. त्यांनी तिथे 'तलवार' या नावाचे वृत्तपत्र चालविले होते. या पत्रात त्यांनी 'मार्टिर ऑफ नासिक' या नावाचा कान्हेरे यांचा गौरव करणारा लेखही लिहिला होता. सावरकर या वेळी आजारी होते व पॅरिस येथे कामाबाईंच्या निवासस्थानी राहत असत. ते पॅरिस येथे असताना इंग्रजांच्या क्रोधाग्नीत त्यांच्या सहकाऱ्यांच्या होरपळून निघणाऱ्या संसाराची हृदयद्रावक वृत्ते त्यांच्या कानी येऊ लागली. त्यांच्या चित्तावर त्याचा विलक्षण परिणाम झाला. आपल्या शब्दांसाठी यमयातना भोगणाऱ्या



सौ. येसूवहिनी

सहकाऱ्यांच्या समवेत आपणही असले पाहिजे, ही भावना त्यांच्या मनात प्रबळ झाली व त्यांनी सहकारी नको नको म्हणत असताही पॅरिसहून लंडन येथे जावयाचे निश्चित केले. सावरकर लंडनला जाताच त्यांना अटक करण्यात आली. या अटकेचे पर्यवसान कशात होणार याची कल्पना आल्यामुळे सावरकरांनी आपल्या वहिनींचा निरोप घेण्यासाठी 'मृत्युपत्र' या नावाची कविता लिहिली. त्या कवितेतील उदात्त रसाचा आविष्कार केवळ अतुलनीय आहे. त्यातील काही भाग पुढीलप्रमाणे –

हे मातृभूमि! तुजला मन वाहियेलें।
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेलें ॥
तूतेंचि अर्पिलि नवी कविता रसाला।
लेखाप्रती विषय तूंचि अनन्य झाला ॥
त्वत्स्थंडिलीं ढकलिली गृहवित्तमत्ता।
दावानलांत वहिनी नवपुत्र कांता ॥
त्वत्स्थंडिलीं अतुल धैर्य वरिष्ठ बंधु।
केला हवी परमकारुण पुण्यसिंधु ॥
त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाळ झाला।

त्वत्स्थंडिलीं बंध अता मम देह ठेला ।।
हें काय, बंधु असतों जरि सात आम्ही ।
त्वत्स्थंडिलीच असते दिधले बळी मी ।।

सावरकरांवरील अभियोगाचे प्रारंभीचे काम इंग्लंडमध्ये तीन महिने चालले. पुढे सावरकरांचा अभियोग हिंदुस्थानमध्ये चालवायचा असा निर्णय इंग्रज सरकारने घेतला. त्यामुळे हिंदुस्थानात नेल्यावर आपले भवितव्य काय घडणार हे सावरकरही समजून चुकले. म्हणून त्यांनी ब्रिक्स्टनच्या तुरुंगातून 'शेवटचा रामराम' या मथळ्याचे एक पत्र बाहेरच्या क्रांतिकारक सहकाऱ्यांना उद्देशून पाठविले. त्यातला एक परिच्छेद असा –

'मित्रांनो ! ईश्वराने आपल्यापैकी प्रत्येकाची भूमिका ठरवून टाकली आहे. आपण प्रत्येकाने आपली भूमिका पार पाडावी यासाठी आपली ताटातूट होत आहे. ईश्वराने नेमून दिलेली भूमिका करीत असताना, प्रसंगी जळत्या खडकांना बांधून, कोंडून पडावे लागेल; प्रसंगी कीर्तीच्या उसळणाऱ्या लाटांच्या शिखरावर स्वार होता येईल. कधी आपण लोकांना दिसू; तर कधी अदृश्य राहू. कधी आपण अवनत होऊ, तर क्वचित उन्नत होऊ ! जगन्नियंत्याने कोणत्याही परिस्थितीत ठेवले तरी ती परिस्थिती सर्वोत्तम आहे असे मानून आपण असे समजले पाहिजे, की आपले जीवितकार्य एकाकी पार पाडणे हेच आपल्या वाटयाचे कार्य आहे.'

सावरकरांना अत्यंत गुप्तपणे दि. १–७–१९१० या दिवशी 'मोरिया' बोटीत चढविण्यात आले. त्या बोटीला वाटेत कोणत्याही बंदरात न थांबण्याची आज्ञा होती. सावरकरांवर पहाराही कडक होता. तशाही स्थितीत सावरकरांनी एक अद्भुत साहस केलेच ! फ्रान्सच्या किनाऱ्यावरील मार्सेलिस बंदरात बोट उभी असताना शौचास जाण्याच्या निमित्ताने ते शौचगृहात गेले आणि त्यांनी तिथल्या पोर्टहोलमधून समुद्रात उडी ठोकली. त्या प्रकारात त्यांचे सारे अंग सोलून निघाले; पण तरीही ते पोहत पोहत किनाऱ्याकडे जाऊ लागले. किनारा अर्धा मैल लांब होता. सावरकर निसटले आणि पोहत किनाऱ्याकडे चालले हे पाहून बोटीवरच्या रक्षकांनी त्यांच्यावर गोळ्या झाडल्या. सावरकरांनी त्या चुकवल्या आणि शेवटी किनारा गाठलाच. तिथल्या तटाची भिंत चढून त्यांनी फ्रान्सच्या भूमीवर उडी ठोकली. तिथून ते सारखे पळू लागले. एवढ्यात इंग्रज अधिकाऱ्यांनीही पाठलाग करून त्यांना गाठले आणि ज्या फ्रेंच पोलिसापुढे सावरकर आश्रयार्थ उभे होते, त्या पोलिसाला काही द्रव्य देऊन त्यांनी सावरकरांना आपल्या ताब्यात घेतले. 'मला तू तुझ्या अधिकाऱ्याकडे घेऊन चल; या इंग्रज शिपायांच्या स्वाधीन करू नको,' असे आग्रहाने सावरकर त्याला सांगत होते; पण त्याने ते मानले नाही. शेवटी फ्रान्सच्या भूमीवर पदार्पण करूनही सावरकर पुनश्च इंग्रजांचे बंदी झाले. त्यातूनच पुढे एक महत्त्वाचा आंतरराष्ट्रीय प्रश्न उपस्थित झाला. फ्रान्सच्या भूमीवरील कैद्याला पकडून नेण्याचा नैर्बंधिक अधिकार इंग्रज राष्ट्राला आहे काय ? हा तो प्रश्न होय. फ्रान्सच्या सरकारने हेगच्या न्यायालयात हा प्रश्न मांडला; पण त्या न्यायालयाने फ्रान्सला अनुकूल असा निर्णय न देता इंग्रजांना अनुकूल असा निर्णय दिला.

सावरकरांना हिंदुस्थानात आणून त्यांच्यावर जॅक्सनवधाच्या कटाचे सूत्रधार अशा आरोपाखाली अभियोग चालवण्यात आला आणि त्याच्या जोडीला इतर अनेक आरोप लादले जाऊन त्यांना दोन जन्मठेपींची म्हणजे पन्नास वर्षांची काळ्या पाण्याची शिक्षा ठोठावण्यात आली. या दोन्ही प्रदीर्घ शिक्षा वेगवेगळ्या भोगायच्या होत्या. पन्नास वर्षे काळेपाणी म्हणजे तिथून जिवंत परत येणे नाही, असाच त्याचा अर्थ होता. त्यांना तिकडे नेण्याआधी त्यांच्या पत्नी डोंगरीच्या तुरुंगात त्यांची जणू शेवटचीच भेट घ्यायला गेल्या. त्या वेळी सावरकर त्यांना धीर देताना म्हणाले–

'जर कधी या सामान्य संसाराचा मोह होऊ लागला, तर असा विचार करावा, की मुला-मुलींची वीण वाढवणे व चार काटक्या एकत्र करून घरटी बांधणे यालाच जर संसार म्हणायचे असेल तर असले संसार कावळे चिमण्या करीतच आहेत. पण संसाराचा याहून भव्यतर अर्थ जर घेणे असेल तर मनुष्यासारखा संसार थाटण्यात आपणही कृतकृत्य झालो आहोत. आपली चार चूल-बोळकी आपण फोडून टाकली, पण पुढे-मागे त्यायोगे हजारो जणांच्या घरी क्वचित सोन्याचा धूर निघेल. आणि घर-घर करीत असताही प्लेगने नाही का शेकडो जणांची घरें ओसाड पाडली.'

**काळेपाणी** – अंदमानात नेल्यावर सावरकरांना पहिल्याप्रथम कोठडीबद्ध करण्यात आले पुढे कारागृहाचे अधिकारी त्यांच्याकडून छिलका कुटण्याचे, काथ्या वळण्याचे व कोलू फिरवण्याचे अशी वेगवेगळी अतिकष्टाची कामे करवून घेऊ लागले. उणी पुरी दहा वर्षे सावरकरांनी अंदमानच्या सिल्व्हर जेलमध्ये नरकतुल्य यातना भोगल्या. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी, की अशा यातना भोगत असतानाही 'कमले' सारखे नितान्तमधुर काव्य त्यांना स्फुरले. घायपाताच्या काट्याने ते भिंतीवर काव्यचरण लिहीत व मग ते मुखोद्गत करीत. ही गोष्ट एकदा उघडकीस आली आणि त्यांना आठवडाभर हातकडीत टांगून ठेवण्यात आले. पुढे अंदमानातही त्यांनी राजबंद्यांची संघटना घडवून आणून त्यांना काही सुधारणा मिळवून दिल्या. तिथले मुसलमान हिंदू बंद्यांना बाटवीत तेही त्यांनी थांबवले.

लोकांनी अनेक प्रयत्न केल्यानंतर शेवटी इंग्रज सरकारने सावरकरांना अंदमानातून १९२१ सालाच्या प्रारंभी हिंदुस्थानात आणले. १९२४ च्या जानेवारीत सावरकरांची तुरुंगातून



स्वातंत्र्यवीर विनायकराव सावरकर (अंदमान येथे बंदिवेषात)

सशर्त मुक्तता झाली व त्यांना रत्नागिरीला स्थानबद्ध करण्यात आले. स्थानबद्धतेचे निर्बंध असे होते –

(१) पाच वर्षेपर्यंत सावरकरांनी कोणत्याही राजकीय चळवळीत भाग घेऊ नये व (२) या अवधीत रत्नागिरी जिल्ह्याच्या सीमेतच राहिले पाहिजे.

**समाजसुधारणा** – १९२४ साली वयाच्या ४१ व्या वर्षी बंधमुक्त होऊन सावरकर रत्नागिरीला आले. ते पुढे साडे तेरा वर्षे रत्नागिरीतच राहिले. काही वेळा मुंबई सरकारच्या अनुमतीने त्यांना निश्चित काळासाठी जिल्ह्याबाहेर जायला मिळे. सावरकरांना राजकीय काम करायला बंदी होती, म्हणून ते स्वस्थ बसले नाहीत. त्यांनी समाजसुधारणेचे कार्य हाती घेतले.

रत्नागिरीच्या सार्वजनिक जीवनातून सावरकरांनी अस्पृश्यता व रोटीबंदी या गोष्टींचे उच्चाटन केले. याच कालखंडात त्यांनी हिंदूंच्या संघटनेबद्दल विपुल लेखन केले. लिपिशुद्धी व भाषाशुद्धी यांचे आंदोलन उभारून राष्ट्रभाषेचा व राष्ट्रलिपीचा प्रश्न सोडविण्याच्या संबंधात मूलभूत मार्गदर्शन केले. त्यांच्याच प्रेरणेने गोमंतकातल्या ख्रिस्ती गावड्यांचे मसूरकर आश्रमाच्या महंतांनी शुद्धीकरण घडवून आणले. त्यांच्याच प्रेरणेने श्रीमान भागोजी कीर यांनी रत्नागिरी येथे पतितपावनाचे मंदिर बांधले आणि ते अस्पृश्यांसह सर्वांना खुले ठेवले. स्थानबद्धतेच्या काळात सरकार सावरकरांना महिना केवळ साठ रुपये निर्वाहवेतन देई. तेवढ्यातच आपले सगळे भागविण्याची त्यांनी स्वतःला सवय लावून घेतली. ही त्यांची काटकसरीची सवय पुढील सर्व जीवनात त्यांना सोडता आली नाही. रत्नागिरीच्या वास्तव्यात त्यांचा घरसंसार पुनश्च उभा झाला. सौ. यमुनाबाई अर्थात माई त्यांच्याबरोबर राहायला आल्या. विश्वास आणि प्रभात (कन्या) अशी दोन मुलेही त्यांना या काळात झाली.

**हिंदुसंघटन** – १९३७ च्या मे महिन्यात सावरकरांवरील सर्व निर्बंध रद्द होऊन ते पूर्ण स्वतंत्र झाले. त्यानंतर सावरकर कोणत्या पक्षात जातील, याविषयी लोकांमध्ये औत्सुक्य निर्माण झाले होते. पण ' हिंदुत्व हेच भारताचे राष्ट्रीयत्व ' या सिद्धान्तावर त्यांचा अढळ विश्वास असल्यामुळे त्यांनी हिंदुमहासभेत प्रवेश केला. त्या पक्षाचे नेतृत्वही लौकरच त्यांच्याकडे आले. हिंदुसभेच्या अनेक अधिवेशनांचे ते अध्यक्ष झाले. श्री. बाळशास्त्री हरदास लिहितात – 'हिंदू राष्ट्राचे कर्णधार या नात्याने सावरकरांनी स्वतःचा असा स्वतंत्र कार्यक्रम आखून भागानगर व भागलपूरचे दोन निःशस्त्र प्रतिकाराचे लढे दिले व त्यांत यशस्वी होऊन महासभेला सामर्थ्य प्राप्त करून दिले. भागानगरचा निःशस्त्र प्रतिकार निझामाच्या अत्याचाराविरुद्ध होता, तर भागलपूरचा लढा इंग्रज सरकारविरुद्ध होता. हा दुसरा लढा सावरकरांनी इतक्या कुशलतेने व प्रभावीपणाने लढविला, की सत्याग्रहतंत्राचे आद्य प्रणेते व आचार्य महात्मा गांधी यांनी सावरकरांना स्वतःहोऊन तारेने धन्यवाद दिले. '

हिंदुमहासभेच्याद्वारे सावरकर वैध व सनदशीर राजकारण करीत होते खरे; पण कोणत्याही देशाचे स्वातंत्र्य वैध व नैर्बंधिक कक्षेत राहून केलेल्या चळवळींनी मिळू शकते, यावर त्यांचा

कधीच विश्वास नव्हता. इंग्रजांविरुद्ध शेवटचे स्वातंत्र्ययुद्ध करायचे, तर त्यासाठी भारतीय तरुण सैनिकी शिक्षण घेतलेले व शस्त्रसज्ज असणे आवश्यक आहे, असे त्यांचे ठाम मत होते. दुसऱ्या महायुद्धाने इंग्रजांनी सैन्याची द्वारे भारतीयांसाठी पूर्ण मोकळी केली होती. या घटनेचा तरुणांनी पुरेपूर फायदा घ्यावा, यासाठी सावरकरांनी हिंदुमहासभेच्या वतीने सैनिकीकरणाचा कार्यक्रम हाती घेतला व साऱ्या भारतात संचार करून सैनिकीकरणाचा प्रभावीपणाने प्रचार केला.

स्वातंत्र्ययुद्धाचे बाहेरून नेतृत्व करणारे नेताजी सुभाषबाबू आपल्या अंतिम निर्णयावर येण्याच्या आधी मुंबईस येऊन सावरकरांना भेटून गेले होते आणि त्या दोघांचा गुप्त विचारविनिमयही झाला होता. सुभाषबाबू ब्रिटिशांच्या हातावर तुरी देऊन भारतातून निसटले आणि त्यांनी ब्रह्मदेशात जाऊन आझाद हिंद सेनेची उभारणी केली. ही आझाद हिंद सेना इंग्रजांच्या शत्रुराष्ट्रांच्या मदतीने पूर्वेच्या बाजूने भारताकडे शेवटच्या स्वातंत्र्ययुद्धासाठी कूच करून निघाली होती, हा इतिहास सर्वश्रुत आहे.

अखेर १५ ऑगस्ट १९४७ रोजी भारताला स्वातंत्र्य देऊन इंग्रज या देशातून निघून गेले. सावरकरांनी कुलस्वामिनीसमोर जी प्रतिज्ञा केली होती व जे अभिलषित अंतःकरणात बाळगले होते ते अशा रीतीने पूर्ण झाले. सावरकरांना या घटनेचा परमानंद झाला यात नवल ते काय? त्या दिवशी सावरकरांनी आपल्या घरावर भारतीय राष्ट्रध्वज उभारला व आपला आनंद व्यक्त केला. पुढे अभिनव भारत ही संघटना ज्या उद्देशाच्या पूर्ततेसाठी त्यांनी स्थापन केली होती, तो उद्देश पूर्ण झाला या समाधानाने त्यांनी पुणे येथे अभिनव भारताचा सांगतासमारंभ घडवून आणला. या महापर्वाच्या वेळी त्यांनी सर्व क्रांतिकारकांना दिलेल्या शपथेतून प्रकटपणे मुक्त केले.



स्वातंत्र्यवीर सावरकर

पण एका बाजूने स्वातंत्र्याचा त्यांना जेवढा आनंद झाला होता, तेवढेच भारत खंडित झाला या घटनेचे त्यांना दुःख झाले होते. ते शल्य त्यांच्या जिव्हारी शेवटपर्यंत सलत होते.

सावरकर हे केवळ स्वातंत्र्यवीर नव्हते. त्यांच्या जीवनाला अनेक तेजस्वी पैलू होते. त्यामुळे त्यांचे जीवन सर्वांगी शोभायमान आणि प्रकाशमय झाले होते. त्यांचे वक्तृत्व अमोघ होते. त्यांचे निबंध म्हणजे जणू स्फुल्लिंगांचे मोहोळच वाटायचे. त्यांच्या ठिकाणी महाकवीची प्रतिभा विलसत होती. आत्मचरित्रकार म्हणूनही त्यांनी वाचकांवर एक खोल ठसा उमटवला होता. समाजसुधारणेचा आणि अस्पृश्योद्धाराचा त्यांना सतत ध्यास होता. ते नाटककारही होते. भाषाशुद्धी व लिपिशुद्धी यांचे ते पुरस्कर्ते होते. या त्यांच्या सर्व अंगांचा अल्पांशाने तरी परिचय करून दिल्यावाचून त्यांचे सर्वस्पर्शी चरित्र पुरे होणार नाही.

**धर्मसुधारणा** – सावरकर हे हिंदुत्वाचे, हिंदू धर्माचे आणि हिंदू राष्ट्रवादाचे कडवे पुरस्कर्ते होते. हिंदू संघटनेसाठी, हिंदूंच्या उत्कर्षासाठी व हिंदुत्वाच्या समर्थनासाठी त्यांनी सारा जन्म सार्थकी लावला. त्यांचा हिंदूराष्ट्राचा अभिमान अत्यंत तीव्र होता. हिंदूंच्या प्राचीन परंपरा, दिव्य देववाणी आणि आर्य-भूमाता यांचे गुणगान हे त्यांचे प्रातःस्मरण होते.

पण एवढे असूनही सनातन धर्माभिमानी, शास्त्री, पंडित त्यांच्यावर आग पाखडीत आणि त्यांना हिंदू धर्माचे वैरी समजत. असे का व्हावे? याचे प्रमुख कारण असे होते –

चातुर्वर्ण्य, जातिभेद, अस्पृश्यता, श्रुतिस्मृतिप्रामाण्य, इ. गोष्टींना सामान्यपणे सनातन हिंदू-धर्म म्हटले जाते. साधारणपणे गेली हजार वर्षे हिंदू-धर्म याच रूढींनी आणि विचारांनी बांधलेला आहे. पण सावरकर नेमके याच रूढींचे आणि विचारांचे विरोधक होते. चातुर्वर्ण्य, जातिभेद, अस्पृश्यता, पतितशुद्धिनिषेध, परदेशगमननिषेध यांवर ते प्रखर टीका करीत आणि या रूढींमुळेच हिंदू-समाजाचा नाश झाला असे प्रतिपादीत. वर्णसंकर व जातिसंकर हे सनातन्यांना अत्यंत भयावह वाटत. "संकरो नरकायैव" अशी त्यांची धारणा असे. पण सावरकरांनी अनेक दृष्टींनी संकर हा हितावह आहे, असे मत मांडले आहे. "हिंदूंमधील वाटेल त्या जातीच्या स्त्री-पुरुषांना परस्परांशी विवाहबद्ध होण्यास आडकाठी नसावी. पोथीजात जातिभेदाच्या या प्राणघातक विळख्यांना तोडून फोडून टाकलेच पाहिजे." असे ते आग्रहाने प्रतिपादीत. यज्ञ, जप, शांती, व्रते-वैकल्ये यांवर श्रद्धा ठेवणाऱ्यांचा सावरकर अतिशय कडवट शब्दांत उपहास करीत.

प्रत्यक्षनिष्ठ व प्रयोगक्षम असा विज्ञानधर्म हाच सर्वश्रेष्ठ धर्म होय, असे सावरकरांचे मत होते. या विज्ञाननिष्ठेमुळेच पूर्वजन्म, कर्मवाद, इ. गोष्टी त्यांना मंजूर नव्हत्या. गाय हा एक उपयुक्त

पशू असून, ती माता नव्हे आणि देवता तर नव्हेच नव्हे, असे ते परखड शब्दांत सांगत.

ते म्हणत – हिंदू राष्ट्र ज्यामुळे जिवंत आणि वर्धमान ठेवता येईल, ते ते साधन श्रौत आणि स्मार्तच आहे. जुन्या स्मृती याला अनुकूल नसल्या तर त्या नवीन करायला हव्यात. स्मृती या राष्ट्रासाठी आहेत. ज्यांनी राष्ट्रनाश होतो, त्या स्मृतीच नव्हेत, धारण करीत नाही तो धर्मच नव्हे आणि अस्पृश्यांच्या दर्शनाने बाटतो तो देवच नव्हे.

"दोन शब्दांत दोन संस्कृती" या निबंधात सावरकरांनी श्रुतिस्मृतिपुराणोक्ताची, ग्रंथप्रामाण्याची व वेदांच्या अपौरुषेयत्वाची हेटाळणी केली आहे. पण त्यात श्रुतिस्मृतींची किंवा जुन्या धर्मग्रंथांची हेटाळणी मात्र मुळीच नाही. हेटाळणी या ग्रंथाची नव्हे, तर ती त्या ग्रंथांना त्रिकालाबाधित मानून हजारो वर्षे स्वतःची बुद्धी गहाण ठेवणाऱ्या सनातन्यांची केली आहे.

दुसऱ्या एका निबंधात सावरकर प्राचीन धर्मग्रंथांविषयीचा आपला आदर पुढीलप्रमाणे व्यक्त करतात – 'जुन्या धर्मग्रंथांतील काही किंवा सारे निबंध वा विचार आज आम्हांस त्याज्य वाटले तरी त्या काळी राष्ट्रधारणेस ते कारणीभूत झाले असल्यामुळे ती राष्ट्रीय संपत्ती आम्ही ऐतिहासिक कृतज्ञतेने व साभिमान ममत्वाने आदरणीय व संरक्षणीयच मानली पाहिजे. आणि आमच्या राष्ट्राच्या प्राचीन पराक्रमाचे नि यशाचे हे श्रुति-स्मृति-पुराणेतिहासप्रभृती संस्कृत वाङ्मय एखाद्या हिमालयासारखे मूर्तिमंत स्मारकच असल्यामुळे त्या दृष्टीने आम्ही ते पूज्य व पवित्रही मानले पाहिजे.'

परंपरेच्या अभिमानातच कोणत्याही समाजाचे स्वत्व साठवलेले असते, हे सावरकरांनी जाणले होते. स्वपरंपरेचा अभिमान हा समाजजीवनाचा प्राणच आहे, यात वाद होऊच शकणार नाही. कारण प्राचीन पराक्रमी आणि राष्ट्रोद्धारक पुरुष म्हणजे पर्यायाने मीच होय, असा त्या अभिमानाचा अर्थ होतो. मनुष्याचे सारसर्वस्व 'मी' या जाणिवेत आहे. त्याची नावे बदलली, त्याचे रक्त बदलले तरी त्याचे जीवनाशी निगडित झालेले अपरिवर्तनीय नाव 'मी' हेच असते. ते त्याचे 'मी' पण संपले, की तो मनुष्यच संपतो. त्याचे स्वतंत्र व्यक्ती या रूपाचे अस्तित्वच लोपते. आपल्या हिंदू राष्ट्राचा 'हिंदू' हा शब्दच तो 'मी' आहे.

सावरकर स्वधर्म आणि स्वराज्य यांत अभेद मानीत. राजकारण आणि समाजकारण यांतही अभेद मानीत. सत्तावनचे स्वातंत्र्यसमर या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणात ते म्हणतात – 'स्वधर्माची आमची कल्पना ही स्वराज्याच्या कल्पनेशी मुळीच विरोधी नाही. स्वधर्मावाचून स्वराज्य हे जसे तिरस्करणीय नि तुच्छ, तद्वतच स्वधर्म हाही स्वराज्यावाचून दुर्बल नि पंगू; म्हणून ऐहिक अभ्युदयाची, स्वराज्याची ही असिलता आपल्या पारलौकिक निःश्रेयसाची चिंता वाहणाऱ्या स्वधर्माकरिता सदैव उपसलेलीच असली पाहिजे.'

हिंदू-समाज हा सात शृंखलांनी जखडला गेला म्हणून त्याचा अधःपात झाला, असे ते सांगत. वेदोक्तबंदी, म्हणजे ब्राह्मणांखेरीज इतरांना वेदाधिकार नसणे. व्यवसायबंदी म्हणजे विशिष्ट व्यवसायाला विशिष्ट जातीचे बंधन. स्पर्शबंदी म्हणजे अस्पृश्यता. सिंधुबंदी म्हणजे समुद्रगमननिषेध. शुद्धिबंदी म्हणजे बाटवून परधर्मात गेलेल्यांना परत स्वधर्मात घेण्याची बंदी. रोटीबंदी म्हणजे विशिष्ट जातींनी विशिष्ट जातींकडचे अन्न खाऊ नये असा निर्बंध. आणि बेटीबंदी म्हणजे हिंदूतल्या जातीजमातींनी आपल्या जातीजमातींतच विवाहसंबंध घडविले पाहिजेत, हा निर्बंध. या त्या सप्तशृंखला होत. क्रांती या शब्दाचा सावरकरांना कोणता अर्थ अभिप्रेत होता, हे यावरून कळून येईल. केवळ राजकीय क्रांती ही खरी क्रांती नव्हे, तर समाजाच्या मूलतत्त्वात आमूलाग्र परिवर्तन, ही खरी क्रांती होय, असे ते मानीत. सामाजिक सुधारणांविषयी सावरकरांनी इतके क्रांतिकारक विचार सांगितले आहेत, की त्यांच्या मागल्या काळातल्या सुधारकाग्रणींनाही त्यामुळे भोवळ यावी.

अस्पृश्यतेविषयी सावरकर म्हणतात – जे जातिभेदाचे तेच अस्पृश्यतेचे. पूर्वीच्या काळी जन्मजात अस्पृश्यता नव्हतीच. मनुराजर्षींनी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चारच वर्ण सांगितले. आणि पाचवा वर्णच नाही असाही खुलासा केला. पण विटाळवेड्या हिंदूसमाजाने ही अस्पृश्यता निर्माण करून समाजाचे एक अंग कापूनच टाकले.

या अस्पृश्यतेच्या बाबतीत सावरकरांनी नुसते तत्त्वज्ञानच सांगितलेले नसून, रत्नागिरीत ती क्रांती प्रत्यक्ष घडवून आणली.

हिंदू-राष्ट्रवाद हा राजकीय क्षेत्रातला सावरकरांचा प्रमुख सिद्धान्त होय. पण त्याविषयी अनेक गैरसमज पसरलेले आहेत, असे सांगून डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे पुढे लिहितात – हे ध्यानी घेतले पाहिजे, की अगदी प्रथम सावरकरांनी क्रांतिकार्याला प्रारंभ केला त्या वेळी त्यांनी 'हिंदू-राष्ट्रवाद' सांगितला नव्हता. दादाभाई, रानडे, टिळक यांच्या सारखेच ते पूर्ण राष्ट्रवादी होते. 'सत्तावनचे स्वातंत्र्यसमर' हा आपला ग्रंथ त्यांनी इंग्लंडमध्ये १९०८ साली लिहिला. त्याच्या प्रस्तावनेत ते म्हणतात की 'इतिहासाचे अगतिक दास म्हणून जगण्यापेक्षा राष्ट्राने त्या इतिहासाचे स्वामी झाले पाहिजे. कारण काही गोष्टी, ज्या आज विचारात घेणे सर्वस्वी अनावश्यक आहे, त्या केवळ पूर्वी आचरणात आलेल्या होत्या म्हणून, पुन्हा आज करीत बसणे निखालस मूर्खपणाचे आहे. मुसलमानांविषयीची शत्रुभावना शिवाजीच्या

काळात न्याय्य नि अत्यंत आवश्यक अशीच होती; परंतु तीच शत्रुभावना जर आपण, ती त्या वेळच्या हिंदूंच्या ठिकाणी प्रामुख्याने वसत होती म्हणून, आजही तशीच मनामध्ये बाळगू लागलो तर ते अन्याय्य नि वेडेपणाचे होईल.' या अवतरणावरून वीर सावरकरांची राष्ट्रभावना प्रारंभीच्या काळी कशी होती हे ध्यानी येईल. पण परिस्थितीमुळेच त्यांना पुढे हिंदूराष्ट्रवादाचा आश्रय करावा लागला, हे पुढचा इतिहास पाहता सहज ध्यानात येईल.

**वक्ते सावरकर** – भारत देशात जे संस्मरणीय आणि चिरस्मरणीय वक्ते झाले, त्यात सावरकरांना फार वरचे स्थान आहे. त्यांचे वक्तृत्व इतिहासाच्या प्रगाढ ज्ञानाने ठाशीव असे. द्रष्टेपणामुळे ते 'अनेकसंशयोच्छेदि परोक्षार्थस्य दर्शकम्' असे. हिंदुत्वाविषयीच्या प्रखर निष्ठेमुळे ते जाज्वल्य असे आणि निसर्गदत्त कविप्रतिभेमुळे सरसरमणीयही असे. ते धीरगंभीर पावले टाकीत व्यासपीठाकडे जात व सस्मितमुखाने लोकांना प्रणाम करीत. त्यांच्या केवळ दर्शनानेच सहस्रावधी प्रेक्षकांच्या भावना उचंबळून येत. त्यांचे भाषण आधी तयार केलेले नसे. प्रसंग पाहून ते उत्स्फूर्तपणे बोलत. त्यांच्या व्याख्यानाचा समारोप हा अत्यंत भावस्पर्शी असे. त्यांच्या आवाजाला आकर्षक अशी धार होती. गंगेसारखा त्यांच्या वाणीचा ओघ सुरू झाला, की त्यांचे डोळे विशेष तेजाने लकाकू लागत. भावनोत्कट शब्दांमधून ते तर्कनिष्ठ युक्तिवाद मांडीत. कृत्रिम ढोंगांवरचा बुरखा फाडून परिस्थितीचे नग्न चित्र श्रोत्यांपुढे उभे करीत. त्यांच्या भाषणात नाट्यपूर्ण चढ-उतार असत. त्यांचें व्याख्यान ऐकताना श्रोते मंत्रमुग्ध होत, भारून जात.

**साहित्यिक सावरकर** – रत्नागिरीच्या कारागृहात सावरकरांची साहित्यसेवाही चालूच होती. त्या सेवेचा तपशील देताना सावरकर लिहितात –

'रत्नागिरीस बंदीत असताना अंदमानात रचलेल्या त्या खंड कविता – ज्या एकदा काव्याच्या अनुबंधाने गोवल्या जाणार होत्या, त्या आम्ही पूर्ण केल्या. पूर्वीच पुऱ्या झालेल्या कविता संकलित केल्या आणि हिंदू-संघटनेस अत्यंत आवश्यक – त्या कार्याचा केवळ पायाच असलेली जी 'हिंदू' शब्दाची व्याख्या – तिचे निश्चित स्वरूप ठरविण्यासाठी 'हिंदुत्व' हा ग्रंथ लिहिला. अंदमानामधून आमची कित्येक लिखाणे आम्ही घरी धाडलीच होती. वरील सर्व कवितांतून निवडून आमच्या बंधूंनी 'कमला', 'सप्तर्षि' आणि 'गोमांतक' ही काव्ये प्रसिद्ध केली. 'कमला', 'गोमांतक' आणि 'महासागर' ही खंडकाव्ये त्या संकल्पित महाकाव्याची उपांगे म्हणून निर्मिलेली होती.'

'माझी जन्मठेप' या ग्रंथाची जुळणी सावरकरांनी येथेच प्रथम आपल्या स्मृतिपटलावर आणि नंतर लाल विटांच्या तुकड्यांनी तुरुंगाच्या भिंतीवर केली.

१९३७ च्या नंतरच्या काळातले सावरकरांचे प्रमुख असे चार ग्रंथ म्हणजे 'माझ्या आठवणी', 'भारताच्या इतिहासातील सहा सोनेरी पाने' 'पूर्वपीठिका' आणि 'शत्रूच्या शिबिरात' हे होत. 'माझ्या आठवणी' हा ग्रंथ आत्मचरित्रपर आहे. 'सहा सोनेरी पाने' या ग्रंथाचे दोन खंड आहेत. बुद्धकाळाच्या आरंभापासून इंग्रजी राजवटीच्या अखेरीपर्यंत भारताच्या पराक्रमी स्त्री-पुरुषांनी परकीयांची आक्रमणे परतवून लावून भारताच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचे पुनरुज्जीवन केले, त्या पराक्रमाचा, त्यामागील हेतूंच्या स्पष्टीकरणाचा आणि स्वातंत्र्ययुद्धाचा इतिहास सावरकरांनी या ग्रंथात सांगितला आहे.

'शत्रूच्या शिबिरात' हा ग्रंथही आत्मवृत्तपरच आहे. 'पूर्वपीठिका' या ग्रंथात लेखकाने स्वतः भारतीय राजकारणात पदार्पण करण्याच्या वेळी असलेल्या राजकीय परिस्थितीची मीमांसा केलेली आहे.

**महाकवी सावरकर** – 'मी वृत्तीने कवी आणि कलावंत आहे, पण परिस्थितीने मला राजकारणी पुरुष बनविले' असे उद्गार सावरकरांनी एका ठिकाणी काढले आहेत. वयाच्या आठव्या वर्षाच्या सुमारास सावरकरांनी कवितेची धूळपाटी हातात घेतली आणि तेव्हापासून सुमारे चाळीस वर्षे त्यांनी काव्यलेखन केले. क्रांतिकार्याच्या धकाधकीत आणि अंदमानातल्या यातनामय जीवनात कवितेने त्यांना साथ-सोबत केली. तशा त्या एकाकी, उपेक्षित आणि कष्टपूर्ण जीवनात कवितेनेच त्यांना धीर आणि दिलासा दिला. सावरकरांच्या कवितेची संख्या सुमारे ११,००० पंक्ती इतकी भरेल. केवळ जनरंजनासाठी किंवा बुद्धिप्रदर्शनासाठी किंवा लोकैषणेसाठी सावरकरांनी कविता लिहिली नाही. सावरकरांची कविता हे त्यांच्या क्षुब्ध अंतःकरणातून पिळवटून निघालेले उद्गार आहेत, त्यांच्या चरित्राचे पूर्ण प्रतिबिंब आहे. त्यांचे जीवन आणि त्यांचे काव्य ही परस्परांशी इतकी एकजीव आहेत, की फुलांच्या पाकळ्यांपासून ज्याप्रमाणे गंध वेगळा करता येत नाही, त्याचप्रमाणे सावरकरांच्या कवितेपासून त्यांचे व्यक्तिमत्त्व अलग करता येत नाही.

सावरकरांनी स्वतंत्रता देवीची स्तोत्रे अनेक छंदांतून गायिली आहेत. प्रा. अ. ना. देशपांडे आपल्या आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास या ग्रंथात लिहितात –

"स्वातंत्र्यविषयक कविता केशवसुतादींनीही लिहिलेली आहे, पण स्वातंत्र्याचा पुरस्कार काव्याच्या माध्यमातून सावरकरांनी इतक्या तन्मयतेने, तेजस्वितेने आणि निर्भयतेने केलेला आहे, की प्रभावी आणि प्रतिभासंपन्न असे सर्वश्रेष्ठ स्वातंत्र्यशाहीर म्हणवून

घेण्याचा त्यांचा एकट्याचाच हक्क आहे. स्वातंत्र्यसंगरात सर्वस्वार्पण करणारे ते स्वतः स्वातंत्र्यवीर असल्यामुळे त्यांच्या स्वातंत्र्यविषयक कवितांना उत्कट स्वानुभूतीचे आणि अपार आत्मप्रत्ययाचे असाधारण तेज प्राप्त झाले आहे. "

**आत्मार्पण** – त्यांचा ६१ वा वाढदिवस संपूर्ण भारतातील जनतेने उत्साहाने साजरा केला. त्यांचे हीरकमहोत्सव व मृत्युंजय-दिन हेही सर्वत्र साजरे झाले. ते मुंबईत दादर येथे स्वतःच्या सावरकर सदनात राहत होते. हळूहळू त्यांचे शरीर जराजीर्ण होत चालले होते. अशा वेळी या महापुरुषाच्या मनात, आत्मशरीराचे विसर्जन करावे, असे विचार दृढ होऊ लागले, तर त्यात नवल नाही. मृत्यूने आपल्यावर येऊन झडप घालण्याच्या पूर्वी आपणच त्याच्यापुढे उभे ठाकावे हेच वीरोचित होय, असे त्यांच्या मनाने घेतले. संत ज्ञानदेव, समर्थ रामदास, चैतन्य महाप्रभू, एकनाथमहाराज हे स्वतः होऊन मृत्यूला कवटाळायला गेले होते, हे त्यांना माहीत होते. तोच मार्ग आपणही स्वीकारायचा असा त्यांनी निश्चय केला. मग कोणाकडेही वाच्यता न करता त्यांनी आपल्या देहविसर्जनाचा कार्यक्रम आखला व तो पार पडला. त्यांनी प्रथम औषधोपचार बंद केले. ठरल्या दिवशी अन्न घेणे थांबवले आणि शेवटी पाणीही घेणे वर्ज्य केले. अखेरीस दि. २६ फेब्रुवारी १९६६ रोजी त्यांनी आपला जराजीर्ण देह काळाच्या अधीन केला. निराळ्या अर्थाने मृत्यूच्या माथा पाय देऊन ते अशाश्वतातून शाश्वतात विलीन झाले.

**असामान्य सावरकर** – सावरकरांचे चरित्रकार श्री. धनंजय कीर हे सावरकरांचे जीवन कसे अजरामर साहसप्रसंगांनी समृद्ध झाले होते ते सांगून, अनेक बाबतींतले त्यांचे असामान्यत्व पुढील परिच्छेदात व्यक्त करतात –

ज्या काळात एखाद्याने 'राज्य' किंवा 'स्वराज्य' हा नुसता शब्द उच्चारला तरी त्याच्यावर सर्वस्व–हानीचे संकट ओढवत असे, त्या काळात 'संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य हे भारताचे उद्दिष्ट आहे' असे प्रकटपणे उद्घोषित करणारे सावरकर हेच आद्य राजकीय नेते होत. विशिष्ट राजकीय विचारसरणी व्यक्त केली म्हणून ब्रिटिश सरकारने 'बॅरिस्टर' ही पदवी देण्यास ज्यांना नकार दिला, असे सावरकर हेच पहिले बॅरिस्टर होत. देशभक्ती दाखवली म्हणून एका भारतीय विद्यापीठाने ज्यांची पदवी काढून घेतली, असे सावरकर हेच पहिले भारतीय पदवीधर होत. भारतीय स्वातंत्र्याच्या प्रश्नाला आंतरराष्ट्रीय महत्त्व मिळवून देणारे सावरकर हेच पहिले भारतीय नेते होत. ज्यांचा ग्रंथ छापण्यापूर्वीच वा प्रकाशित होण्यापूर्वीच दोन राष्ट्रांच्या सरकारांनी जप्त करून त्या ग्रंथाला जागतिक साहित्याच्या क्षेत्रात एक अजोड बहुमान मिळवून दिला, असे सावरकर हेच पहिले ग्रंथकार होत. ब्रिटिश न्यायालयाचा अधिकार अमान्य करणारे, सावरकर हेच पहिले बंडखोर भारतीय नेते होत. हेगच्या आंतरराष्ट्रीय न्यायालयात ज्यांच्या अटकेच्या प्रश्नावर अटीतटीचे रण माजले, असे सावरकर हेच जगाच्या इतिहासातले पहिले राजकीय बंदिवान होत. जगाच्या संपूर्ण इतिहासात, अर्ध्या शतकाच्या जन्मठेपेची शिक्षा दिले गेलेले, सावरकर हेच पहिले राजकीय बंदिवान होत. कागद-लेखणी ही साधने उपलब्ध नसल्यामुळे कारागृहाच्या भिंतीवर काट्याने अथवा अणकुचीदार दगडाने कविता लिहून त्या सहस्रावधी काव्यपंक्ती वैदिक चिकाटीने स्मृतिगत करून ठेवणारे आणि नंतर इतरांच्या मुखाने त्या कविता भारतात प्रसृत करणारे, सावरकर हेच जगाच्या इतिहासातील पहिले महाकवी होत. [ प्रसाद, सावरकर विशेषांक, ऑगस्ट १९६६; स्वातंत्र्यवीर सावरकर– श्री. धनंजय कीर, १९७२; सावरकर, एक चिकित्सक अभ्यास – डॉ. प्र. ल. गावडे, १९७५; प्रा. पु. ग. सहस्रबुद्धे – 'सह्याद्री' मासिक, मार्च १९६७ आणि 'वसंत' मासिक, ऑक्टोबर १९६६ ]

## सावली

भारतीय तत्त्वज्ञानात आत्मा ही एक महत्त्वाची संज्ञा असून, तिच्याशी सावलीचा संबंध सांगितला आहे. छांदोग्य उपनिषदात आत्मा म्हणजे काय, याचे क्रमशः विवेचन चालू असताना, इंद्र-विरोचन कथेच्या संदर्भात छायेला आत्मा असे म्हटले आहे (८.८.३). कौषीतकी उपनिषदात तर, आरशातल्या पुरुषाची मी उपासना करतो असे म्हणून आत्म्याची व प्रतिबिंबाची सांगड घातली आहे (४.१०). यावरून नागर संस्कृतीत माणसाचा आत्मा त्याच्या सावलीत किंवा प्रतिबिंबात असतो अशी समजूत निर्माण झाली असावी. एखाद्याची सावली धरून त्याची गती कुंठित करता यावी इतका हा जवळचा संबंध आहे. वाल्मीकिरामायणात अशा प्रकारच्या संबंधाचे एक चांगले उदाहरण आहे. हनुमान समुद्रावरून सीतेच्या शोधाला चालला असता सिंहिका नामक राक्षसीने त्याच्या छायेला पकडून त्याच्या गतीचा जोर कमी केला होता (सुंदर.१.१८७ – १९०).

आदिवासी संस्कृतीत तर ही समजूत फारच दृढ आहे. जेम्स फ्रेझर व जेम्स अॅबट यांसारख्या प्रख्यात अभ्यासकांनी या विचारांचा चांगलाच पाठपुरावा केला आहे. जेम्स अॅबटचे म्हणणे असे – माणसाचे व त्याच्या सावलीचे नाते लोकसंस्कृतीत इतके जवळचे मानले आहे, की एखाद्या माणसाला जखम केली, की त्याच्या सावलीला जखम होते, आणि सावलीला जखम केली, की त्याच्या शरीराला इजा होते. त्यामुळे हे लोक दुष्ट शक्तीपासून स्वतःच्या सावलीला सतत दूर ठेवण्याचा प्रयत्न करीत असतात. सावली व माणूस यांच्या या अन्योन्य संबंधामुळे व्यक्ती ज्या

गुणधर्माची असेल त्याच गुणधर्माची त्याची सावली असते, असे मानले गेले आहे.

आदिवासींचा धर्म हा यातुप्रधान आहे. सावली हे संबंधानुगामी यातुधर्माचे चांगले उदाहरण आहे, असे श्री. फ्रेझर म्हणतो. या तत्त्वामुळेच सावली ही माणसापासून प्रत्यक्ष विलग असली, तरी त्या उभयतांची अदृश्य शक्ती एकच असते. आणि म्हणूनच सावलीला तुडविले, की माणसाला वेदना होतात, असे सांगतात. त्यामुळे यातुप्रधान धर्मात सावलीसंबंधी अनेक समजुती निर्माण झाल्या आहेत.

मनूनेही सावलीविषयी काही गोष्टी सांगितल्या आहेत. कोणा कोणाच्या सावल्या ओलांडू नयेत हे सांगताना मनू (४.१३०) लिहितो –

**देवतानां गुरो राज्ञः स्नातकाचार्ययोस्तथा ।**
**नाक्रामेत्कामतश्छायां बभ्रुणो दीक्षितस्य च ।।**

अर्थ – पाषाणाच्या देवमूर्ती, गुरू, राजा, स्नातक, आचार्य, कपिला गाय व यज्ञदीक्षा घेतल्यानंतर अवभृथ स्नान होईपर्यंतचा अग्निहोत्री, यांची छाया मुद्दाम ओलांडू नये.

आत्मा सावलीत असतो, अशी समजूत असल्यामुळे स्वाभाविकच पाण्यातील व आरशातील प्रतिबिंबातही तो असतो अशी भावना निर्माण झाली. पाण्यात सूर्याचे व आपलेही प्रतिबिंब पाहू नये असे मनूचे (४.३७–३८) व याज्ञवल्क्याचे मत आहे. आणि हे प्रतिबिंब दिसले तर याज्ञवल्क्य स्मृतीने एक प्रायश्चितही सांगितले आहे (३.२७९). गरोदर स्त्रियांनी व बालकांनी हे प्रतिबिंब पाहू नये असा एक दंडक प्रचलित आहे. स्वप्नातही पाण्यात प्रतिबिंब दिसणे अशुभ मानतात. या सर्व विचारांमागे एक सूत्र आहे आणि ते म्हणजे जलाशयासन्निध अतिमानवी शक्तींचा निवास असतो आणि त्याच्याकडून प्रतिबिंबावर म्हणजे आत्म्यावर झडप घातली जाण्याची शक्यता असते.

पाण्यातील प्रतिबिंबाप्रमाणेच आरशातील प्रतिबिंबासंबंधीही खूप संकेत आहेत. आरसा फुटणे हे अशुभ मानतात. कारण आरसा फुटला म्हणजे जणू, आत्माच पंचत्वात विलीन झाला, अशी कल्पना त्याच्या मुळाशी असते. रात्रीं आरशात पाहणे हे प्राचीन कालापासून निषिद्ध मानलेले आहे. अनेक संकटांचे ते पूर्वचिह्न होय, अशी कल्पना त्यामागे आहे. कृष्णाकडून मरण्यापूर्वीच्या रात्री स्वप्नात कंसाने आपले प्रतिबिंब आरशात पाहिले होते, असा उल्लेख भागवतात आढळतो (१०.४२.२८). घरात कोणी मरण पावले तर आरसे उलटे करून ठेवण्याची पद्धत आहे. याचे यात्वात्मक स्पष्टीकरण असे, की माणसाचे प्रेत घरात असताना कोणाचे प्रतिबिंब आरशात पडले तर मयताचे भूत त्या प्रतिबिंबाला लगोलग झपाटण्याची शक्यता असते. रात्री आरशात पाहणे ही वेश्याधर्माशी संबंधित असलेली बाब आहे, असे म्हटले जाते.

माणसांच्या सावलीत काही खास गुणधर्म असतात, अशी सार्वत्रिक समजूत आहे. मुंडा जमातीचे लोक कोंबडयांच्या झुंजी लावतात. आणि प्रतिस्पर्ध्याच्या कोंबडयावर आपली छाया पाडण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळे त्या कोंबडयाचे धैर्य खचते आणि आपला कोंबडा विजयी होतो, असे ते म्हणतात.

सत्पुरुषांच्या सावल्या या सदैव शुभ फल देणाऱ्या आणि पवित्र मानल्या जातात. एखाद्या साधूची प्रेतयात्रा चालली तर वांझ स्त्री आपली कूस उजविण्याच्या अनिवार इच्छेने त्याच्या सावलीला स्पर्श करण्याचा किंवा त्याच्या तिरडीखालून जाण्याचा प्रयत्न करीत असते. आजारीं माणसांना संतांच्या भेटीला नेण्यामागेही हाच हेतू असतो. या लोकांसमोर भुतेखेतेदेखील उभी राहू शकत नाहीत, हा समजही खूप प्राचीन आहे. पंचकोळासारख्या ब्रह्मसमंधाला चक्रधराने पिशाच योनीतून मुक्त केल्याची कथा लीळाचरित्राच्या एकांकात आढळते (१९). त्याचप्रमाणे एकदा चक्रधर गंगेच्या काठाने चालला असता त्याची सावली पाण्यात पडली आणि त्याबरोबर त्याचे दर्शन घेण्यासाठी सर्व जलचर वर आले, अशी एक कथा लीळाचरित्रात आहे.

मुसलमान लोक मौलवी, फकीर, लहान मुले यांची सावली अंगावर पडणे हे चांगले लक्षण मानतात. तसेच एखाद्या सज्जनाची सावली दुर्जनावर पडली तर त्याच्या प्रवृत्तीत बदल घडण्याचीही शक्यता मानतात. हाती घेतलेल्या कोणत्याही कामात यश मिळू लागले, तर कोण्या सत्पुरुषाची सावली पडली काय, म्हणून पृच्छा करण्याची पद्धत आहे. विवाह-सोहळयात सासूसासरे आपल्या नववधूचे मुख आरशात पाहतात. त्यातही तिच्यामध्ये काही चांगले गुण संक्रमित करायचा हेतू असावा, असे दिसते.

काही स्त्रियांच्या सावल्या या सदैव अशुभ मानल्या जातात. त्यात विधवा, वांझ, विटाळश्या आणि जिची बरीच मुले मेली आहेत अशा स्त्रियांची गणना केली जाते. विटाळशीची सावली गर्भवतीच्या गर्भाला अपाय करते, मुलावर तिची सावली पडली तर त्याला मुडदूस होतो, अशी समजूत आहे. तिला लग्न मंडपापासून दूर ठेवतात. जावळ, उपनयन, इ. कार्यांत ती लांब असते. तुळस, बेल, अग्नी, इ. वर तिची छाया पडू देत नाहीत.

माणसांप्रमाणेच वृक्षांच्या संदर्भातही काही शुभ-अशुभ कल्पना निर्माण झाल्या आहेत. ढोबळमानाने वृक्षांच्या छाया अशुभ मानल्या जातात. त्यामुळे गरोदर स्त्रिया झाडाखालून जाण्याचे टाळतात. याचे एक प्रमुख कारण असे असावे, की भुतांचा निवास झाडांवर असतो आणि त्यांच्या छाया पडत नाहीत. त्यामुळे

नकळत त्यांची बाधा होण्याची शक्यता असते. ज्या झाडांचा चीक पांढऱ्या रंगाचा असतो ती झाडे पवित्र मानतात. तुळस व आवळी यांची गणनाही यातच आहे. मुसलमान समाज निंबाच्या झाडांना पवित्र मानून त्यांची छाया थडग्यांवर पडावी अशी व्यवस्था करतात. याशिवाय काही वृक्षांसंबंधी विशेष संकेत निर्माण झालेले दिसून येतात. उदा० हिंदू स्त्रिया नेहमी बिब्ब्याच्या झाडाची सावली टाळतात. बिब्ब्याचा उपयोग सदैव जादुटोण्यासाठी करीत असल्यामुळे त्याच्या संबंधी ही कल्पना निर्माण झाली असावी. कर्नाटकात नव दांपत्याला चिंचेखालून जायला बंदी असते. हिवराच्या छायेत बसले असता कुबुद्धी वाढते; म्हणून सज्जन लोक त्याची छाया टाळतात, असे ज्ञानदेवांनी म्हटले आहे (९.४३७). या झाडासंबंधीचा या स्वरूपाचा तिरस्कार लीळाचरित्रातही व्यक्त झालेला आहे. हिरड्याच्या झाडाबद्दल असाच एक संकेत आहे. या संकेताचे मूळ महाभारतातील नलकथेत असावे असे वाटते. राजा ऋतुपर्णाचा सारथी म्हणून बाहुक (नल) विदर्भ देशाकडे निघाला असता त्याच्या अंगातील कलीने या वृक्षात प्रवेश केल्याचे वृत्त तिथे निवेदन केले आहे (वन. ७२.३८).

अशुभ फल देणाऱ्या असंख्य सावल्या आहेत. त्यांत अनेक प्राण्यांच्या सावल्यांचा समावेश करावा लागतो. कोंकणात भिलकवडा नावाचा एक पक्षी आहे. तो चितेवर शिंपडण्यासाठी आणलेले पाणी प्याला तर त्याची सावली माणसांना व जनावरांना निकामी करते. त्याचप्रमाणे नुकतीच घरटयाबाहेर पडलेल्या चिमणीची छाया एखाद्या बालकावर पडली, तर त्या बालकाचा एखादा अवयव निकामी होतो. देवी आलेल्या मुलावर गाढवाची छाया पडली तर मुलाला आराम मिळतो. याचे संभाव्य कारण असे, की गाढव हे शीतलेचे वाहन असून, शीतला त्या रोगाची देवता आहे. कोणत्याही धर्मकार्यात कुत्र्याची छाया अपवित्र मानतात.

नागछाया शुभ मानण्याची प्रथा आहे. इतकेच नाही, तर ती ज्याच्यावर पडेल त्याच्या भावी भरभराटीची ती सूचक मानली जाते. शिवाय संकटकाळी तिच्याकडून अभयाचे वरदान लाभते, अशी ऐतिहासिक काळापासून चालत आलेली एक समजूत आहे. वसुदेव श्रीकृष्णाला मध्यरात्री दुथडी भरून वाहणाऱ्या यमुनेतून गोकुळात नेत असताना भयनिवारणासाठी शेषाने आपले फणाछत्र त्याच्यावर धरल्याची कथा आहे (भाग. पु. १०.३.५०). गौतमबुद्ध संबोधी प्राप्त करून घेण्यासाठी एका वृक्षातळी समाधी लावून बसला असता माराने त्याच्या मार्गात अनंत अडथळे उत्पन्न केले. परंतु त्याचे सर्व प्रयत्न हाणून पाडण्यासाठी नागाने आपली सावली त्याच्यावर धरली होती. जैन तीर्थंकर पार्श्वनाथावरही धरणेन्द्र व पद्मावती नावाच्या नागयुगुलाने छाया धरली होती.

गर्भिणीची सावली नागावर पडली, तर तो अंध बनतो आणि तिच्या प्रसूतीनंतर त्याचे अंधत्व नष्ट होते, असा एक समज आहे.

सावलीमुळे अन्न विटाळते. कुत्र्यांच्या सावलीने अन्न विटाळल्याचे बरेच उल्लेख प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश या ग्रंथात दिले आहेत. शिवाय सरमापुत्राने, मी जनमेजयाच्या यज्ञातील अन्नाकडे पाहिलेदेखील नाही, असे स्पष्टीकरण दिले आहे (म. भा. आदि. ३) कुत्र्याप्रमाणेच रजस्वला व वंध्या यांच्या सावलीनेही अन्न विटाळते (म. भा. अनु. १२७.१३–१४). जननाशौच व मृताशौच असलेल्या व्यक्तींना अन्नापासून दूर ठेवतात. भरलेल्या पंगतीतून मधेच एखाद्याने उठू नये असा संकेत आहे. मधेच कोणी उठले तर त्याच्या छायेने आजूबाजूंच्या माणसांचे अन्न विटाळते अशी त्यामागची समजूत असावी.

आजाऱ्याचे आजारपण घालविण्यासाठी अनेक तोडगे करण्यात येतात. आजाऱ्याला तेलात त्याचे प्रतिबिंब दाखवून मग ते तेल मारुती, रोकडोबा यांच्या डोक्यावर ओततात. तसे केले म्हणजे तो आजार देवाकडे निघून जातो, अशी धारणा असते.

मरणाच्या पंथाला लागलेल्या माणसाची सावली कमी-कमी होत जाते किंवा त्याच्या सावलीत काही विकृती उत्पन्न होतात, असा समज आहे. कृष्णाच्या हातून मरण्यापूर्वी कंसाला त्याच्या छायेत छिद्रे दिसू लागली होती (भाग. पु. १०.४२.२९).

मेलेल्या माणसांच्या जशा छाया पडत नाहीत, तशा भुताखेतांच्या व देवादिकांच्याही सावल्या पडत नाहीत. हा समज नैषधीय चरितावरून (अ. १३) आणि महाभारतातील नलोपाख्यानावरून बळकट होतो (वन. ५०).

मंदिराचे दर्शन शुभ असले, तरी त्याची सावली घरावर पडणे हे मात्र वाईट समजतात. त्यामुळे मंदिराचा परिसर सोडून घरे बांधावी असे म्हटले जाते. मंदिराच्या गर्भागारांना खिडक्या ठेवण्याची पद्धत नसते. कारण त्यातून मूर्तीवर अशुभ छाया पडू नये, हा उद्देश असतो. तसेच मंदिरात उत्तरेकडे तोंड करून पूजा करणाऱ्याची सावली देवावर पडू नये, अशी खबरदारी घेण्यात येते.

ज्या वेळी माणसाची सावली लांब असते, त्या वेळी त्याच्या आत्म्याची ग्रहणशक्ती अधिक असते, असा समज आहे. त्यामुळे कोणत्याही नव्या शक्ती मिळवण्यासाठी सकाळची व संध्याकाळची वेळ प्रशस्त मानली जाते. मध्याह्नीची सावली आखूड असते, म्हणून तिचे अंतःसामर्थ्य कमी असते. त्यामुळे ही वेळ अशा अभ्यासाला अयोग्य समजली जाते.

सावलीचा आणि फलज्योतिषाचाही संबंध आहे. ज्योतिर्मयू-

खात सावलीच्या मोजेमापावरून अनेक शुभाशुभ फले सांगितलेली आहेत. त्याचप्रमाणे प्राचीन कालापासून सावली हे कालमापनाचे एक उत्तम साधन असल्याचा उल्लेख चाणक्याच्या अर्थशास्त्रात आढळतो (४१).

छायानाट्य हा मनोरंजनात्मक ऐतिहासिक कलाप्रकारही सावलीशीच संबंधित आहे. महाभारतकालाच्या पूर्वीपासून छायानाट्याचे प्रयोग होत असत, असे अभ्यासकांचे मत आहे. वैदिक तत्त्वज्ञान, लौकिक यातुधर्म, कालमापन, मनोरंजन, इ. जीवनातील बहुतेक सर्व अंगांशी छायेचा थोडाफार संबंध आहे. छायेचे आणि यातुधर्माचे नाते केवळ भारतापुरतेच मर्यादित नाही. ते नाते जागतिक आहे. [की. पॉं.; गो. बा.; एन्सा. मुंडा.]

## सावित्री मंत्र

सवित्याच्या प्रार्थनेचा मंत्र. यालाच गायत्री मंत्र म्हणतात. प्राचीन काळी सर्व त्रैवर्णिकांसाठी एकच सावित्री मंत्र होता, तो असा –

तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि।
धियो यो नः प्रचोदयात् ॥

(ऋ. ३.६२.१०)

पण कालांतराने वर्णव्यवस्था अधिक दृढ झाल्यावर क्षत्रिय व वैश्य यांना निरनिराळे सावित्री मंत्र सांगण्यात आले. मेधातिथीच्या मते क्षत्रियांचा सावित्री मंत्र असा –

आ कृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यं च।
हिरण्ययेन सविता रथेना देवो याति भुवनानि पश्यन् ॥

(ऋ. १.३५.२)

मेधातिथी, शातातप व लौगाक्षी यांनी वैश्यांसाठी पुढील सावित्री मंत्र सांगितला आहे –

विश्वा रूपाणि प्रति मुञ्चते कविः
प्रासावीद् भद्रं द्विपदे चतुष्पदे।
वि नाकमख्यत् सविता वरेण्योऽनु
प्रयाणमुषसो वि राजति ॥

(ऋ. ५.८१.२)

आश्व. गृ. सू. (३.७) व वाराह गृ. सू. (६) यांत वैश्यांसाठी पुढील सावित्री मंत्र सांगितला आहे –

युञ्जते मन उत युञ्जते धियो
विप्रा विप्रस्य बृहतो विपश्चितः।
वि होत्रा दधे वयुनाविदेक इन्
मही देवस्य सवितुः परिष्टुतिः ॥

(ऋ. ५.८१.१)

प्राचीन काळी विद्यार्थ्यांना प्रथम सावित्री मंत्राचा उपदेश केला जात असे. त्यामुळे बुद्धीच्या तीव्रतेवर जगातील श्रेष्ठत्व अवलंबून असते, ही कल्पना त्यांच्या मनावर चांगली ठसविली जाई. [प्रा. भा. शि. प.]

## सासर-माहेर

या जोडशब्दांत स्त्री-जीवनाच्या दोन भिन्न भूमिका सामावलेल्या आहेत. माहेर म्हणजे मातेचे घर आणि सासर म्हणजे सासूसासऱ्यांचे घर. लग्न होऊन मुलगी पतीच्या घरी जाते तेव्हा तिच्या आयुष्याचे एक नवे पर्व सुरू होते. माहेरी ती आईवडिलांची लाडकी लेक असते, भावाची बहीण असते, भावजयीची नणंद असते. सासरी गेल्यावर तियल्या नवीन जीवनक्रमात रुळत असताना तिला माहेराची ओढ वाटते व सर्व प्रियजनांची एकसारखी आठवण येते. सासरी ती पत्नी; सून, भावजय या नात्याने वावरू लागते. तिथे तिला फार जपून वागावे लागते. कारण सासर व माहेर या दोन्ही कुलांचे नाव तिला राखायचे असते. ती जबाबदारी जी स्त्री उत्तम प्रकारे पार पाडते, ती आदर्श गृहिणी ठरते. त्यासाठी तिला अनेक प्रसंगांना सामोरे जावे लागते आणि त्यांतून तावूनसुलाखून बाहेर पडावे लागते. अशा स्त्रीलाच सासरी मान मिळतो.

आपल्या मुलीने सासरी सर्वांशी नम्रतेने वागावे, पतीची व सासूसासऱ्यांची मनापासून सेवा करावी. दीर, नणंद यांच्याशी प्रेमाने वागावे, अशीच तिच्या मातापित्यांची इच्छा असते. ते तिला तसाच उपदेश करतात. वैदिक साहित्यात व रामायण-महाभारतात सासू-सुनांच्या प्रेमळ संबंधांचे वर्णन केलेले आहे. सासू वृद्ध झाल्यानंतर सुनेने गृहस्वामिनी म्हणून सर्वांवर मायाममतेने अधिकार चालवावा, असा आशीर्वाद तिला दिला जात असे (ऋ. १०.८५.४६). कौसल्या व सीता, कुंती व द्रौपदी ही अत्यंत प्रेमळ सासू-सुनांची उदाहरणे उल्लेखनीय आहेत. त्या काळी आणि त्यापूर्वीच्या काळीही सासू-सुनांचे संबंध असेच असावे, असे वाटते. बौद्ध कथांमध्ये मात्र सासू-सुनांच्या संघर्षाच्या कथा वाचायला मिळतात. सासूच्या जाचाला वैतागून काही सुना भिक्षुणी बनून बौद्ध मठांत गेलेल्या आढळतात.

सासरी सुनेचा छळ होणे ही गोष्ट सामान्यपणे प्राचीन काळापासूनची आहे; ती नंतरच्या काळातही चालू होती आणि अजूनही काही प्रमाणात चालू आहे. सासू व नणंदा सुनेला व भावजयीला छळून जीव नकोसा करीत, असे वर्णन अनेक लोकगीतांत व लोककथांत केलेले आहे. त्यामुळे तिला माहेरची आठवण येणे व ती अश्रू गाळीत बसणे हे स्वाभाविक ठरते. माहेरी किती सुख होते व बालपण तिथे किती आनंदात गेले, हे मनात येऊन ती व्याकुळ होते. आईवडिलांप्रमाणेच प्रेमळ भाऊ व बहिणी यांची आठवण तिला येते. माहेरी जो आनंदीआनंद असतो, त्याचे विपुल वर्णन लोकगीतांत केलेले आहे.

भाऊ भेटायला आला की तिचा आनंद गगनात मावेनासा होतो. अर्थात सासरी तिला छळ भोगावा लागत नसला तरीही माहेरची ओढ तिला असतेच.

तथापि सासरी जे काही सुखदुःख भोगावे लागत असेल ते भोगत तिथेच राहावे, अशी वृत्ती सामान्यपणे बहुतेक स्त्रियांमध्ये असते. पती कसाही असला तरी स्त्रीचे ते दैवत आहे. त्याच्याशिवाय तिला अन्य गती नाही. त्याचे घर हे तिचे शाश्वतीचे घर होय. त्या घरातील सासू-सासऱ्यांनी, नणंदांनी, दिरांनी, जावांनी कितीही छळले, तरी ते घर सोडून जावे हा विचारच तिच्या मनाला प्रशस्त वाटत नाही. इतकेच नव्हे तर आपला हा छळवाद विवेकी सासुरवाशीण आपल्या आई-बापांनाही कळू देत नाही. विशेषतः आपल्या आईला हे दुःख कळले तर तिला फार वेदना होतील असे तिला वाटते.

आणि हेच भारतीय स्त्रियांचे वैशिष्ट्य आहे. पाहा – पति-पत्नी, दीर-भावजय, पिता, भाऊ-बहीण, माता. [ हिं. प. मी.; जा माझ्या माहेरा– संपा. डॉ. सरोजिनी बावर, १९६३]

## सासुरे

सोलापूर जिल्ह्यात बार्शीपासून सुमारे पंधरा मैलांवर या नावाचे गाव आहे. गावाजवळून नागझरी नावाची एक लहानशी नदी वाहते. नदीकाठी महंकाळेश्वर नामक एक शिवालय आहे. हे दैवत जागृत आहे अशी लोकांची श्रद्धा आहे. सर्पदंश झालेल्या माणसाला महंकाळेश्वराच्या देवालयात आणले, की तो बरा होतो, असा आजवरचा अनुभव आहे. कार्तिकी पौर्णिमेला या देवतेची मोठी यात्रा भरते.

सासुरे गावच्या परिसरात एकही विहीर नाही. कोणी खणण्याचा प्रयत्न केला तर त्याच्यावर गंडांतर येते, असे म्हणतात. शेतकऱ्यांची अनेक कुटुंबे या प्रयत्नात मरण पावली, असेही सांगितले जाते. [ कुलदैवत ]

## साहबरामदास

(इ. स. चे १८ वे शतक) एक हिंदी संतकवी. याचे मूळ नाव साहबराम झा असे होते. हा बिहार प्रदेशाच्या दरभंगा जिल्ह्यातील कुसुमौली गावचा निवासी होता. याचा प्रीतम नावाचा एकुलता एक मुलगा आकस्मिक मरण पावल्याने हा दुःखीकष्टी होऊन विरागी बनला. नंतर याने योगिराज बलिरामदास या साधूकडून दीक्षा घेतली. त्यामुळे त्याची योगमार्गात प्रगती झाली. कृष्णमूर्तीपुढे हा दोन दोन तास समाधी लावून बसत असे. याने अनेक तीर्थयात्रा केल्या आणि जागोजाग मठस्थापना केली. त्यात पचाढी, एकमा, दिगौना क्वेटा, जमैला, कैथाही, इ. मठ प्रसिद्ध आहेत. याच्यासंबंधी अनेक दंतकथाही प्रचलित आहेत.

साहबरामदास हा कवी होता. त्याची कृष्णभक्तिपर शेकडो पदे आहेत. त्या पदांतून साहबदास, साहबजन अशा मुद्रा आढळतात. त्याच्या भाषेवर ब्रजभाषेची दाट छाया आहे. [ हिं. सा. बि.]

## साहित्यशास्त्र

संस्कृत वाङ्मयाचे मार्गदर्शक शास्त्र. प्रारंभी या शास्त्राला अलंकारशास्त्र असे म्हणत व त्या शास्त्राच्या आचार्यांना आलंकारिक अशी पदवी असे. अलंकार या शब्दाचा सांप्रतचा अर्थ शब्दालंकार आणि अर्थालंकार एवढ्या पुरताच मर्यादित झाला आहे. पण प्राचीन काळी रस, रीती, गुण, वक्रोक्ती. इ.विषयांचा अंतर्भावही अलंकारातच होत असे. रुद्रट सोडल्यास भामह, दंडी, इ. साहित्यशास्त्रकारांनी आपल्या ग्रंथनामात अलंकार हाच शब्द योजिला आहे.

याशिवाय या शास्त्राला क्रियाकल्प असेही एक नाव होते. त्याचा अर्थ काव्य करण्याचे नियम असा होता. वात्स्यायनाच्या ६४ कलांच्या यादीत हे नाव दिलेले आहे.

त्या मानाने साहित्य हा शब्द नंतरचा आहे. रुद्रटानंतर तो हळूहळू रूढ होत गेला, असे दिसते. इ. स. ९००च्या सुमारास साहित्य हा शब्द काव्यमीमांसेचे शास्त्र या अर्थी रूढ झाला. शब्द व अर्थ यांचे परस्परांना अनुरूप असे सौंदर्यशालित्व म्हणजे साहित्य होय, असे स्थूलमानाने ठरले. कुंतक आणि भोज यांनी साहित्य शब्दाचा तपशीलवार विचार केला असून, चौदाव्या शतकातल्या विश्वनाथाने तर नाट्यसहित संपूर्ण काव्यांगांचे विवेचन करणाऱ्या आपल्या शास्त्राला साहित्यदर्पण असेच नाव दिले आहे.

साहित्यशास्त्रात प्रामुख्याने पुढील विषय चर्चिलेले असतात–

**काव्यलक्षण** – स्थूलमानाने काव्याची व्याख्या अशी – मात्रावृत्तात किंवा गणवृत्तात जे रचलेले असेल ते काव्य होय. काव्यशास्त्रज्ञांनी काव्यावर फार सूक्ष्म विचार केला असून, काव्याच्या अनेक व्याख्या केलेल्या आहेत. त्यांतल्या काही अशा –

(१) **वाक्यं रसात्मकं काव्यम्** (विश्वनाथ)

अर्थ – ज्यात नवरसांपैकी एक किंवा अनेक रस असतील, त्याला काव्य म्हणावे.

(२) **निर्दोषं गुणवत्काव्यं अलङ्कारैरलङ्कृतं। रसात्मकम्** (भोज)

अर्थ – ज्यात दोष नाहीत, ज्यात अलंकारांची शोभा आहे आणि जे रसात्मक आहे, ते काव्य होय.

(३) **रमणीयार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम्** (जगन्नाथ)

अर्थ – रमणीय अर्थाचे प्रतिपादन करणारा शब्द (किंवा अनेक शब्द) म्हणजे काव्य होय.

आधुनिक कालातील नामवंत मराठी साहित्याचार्यांनी

काव्याच्या व्याख्या केलेल्या आहेत. त्यांतील दोन खाली दिल्या आहेत – काव्याचा आत्मा वैचित्र्य, चमत्कृती अथवा अपूर्वता आहे. (श्री. कृ. कोल्हटकर)

कल्पनाविलास व भावनांचा उत्कर्ष हे ज्याचे मुख्य गुण आहेत, ते काव्य. (न. चिं. केळकर)

**काव्यप्रयोजन** – काही तरी प्रयोजन अथवा हेतू असल्याशिवाय अज्ञ मनुष्य कोणत्याही कार्याला प्रवृत्त होत नाही, असे एक सुभाषित आहे. मग सूज्ञ असा कवी प्रयोजनावाचून काव्य करण्याला कसा प्रवृत्त होईल ? एतदर्थं मम्मटाने पुढील सहा प्रकारचे काव्यप्रयोजन सांगितले आहे –

**काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।**
**सद्यःपरनिर्वृतये कान्तासम्मिततयोपदेशयुजे ॥**

याचा तपशीलवार अर्थ असा –

(१) कीर्ती – सत्कवी म्हणून आपला लौकिक व्हावा, लोकांनी मान द्यावा आणि रसिकांनी कौतुक करावे, अशा प्रकारची इच्छा, हे काव्याचे पहिले प्रयोजन होय.

(२) अर्थप्राप्ती – मोठमोठ्या कवींना काव्यनिर्मितीपासून अर्थप्राप्ती झाल्याची उदाहरणे आहेत. कालिदास, बाणभट्ट, भूषण, इ. अनेक कवींना राजाश्रय लाभून द्रव्यप्राप्ती झाली होती. हे दुसरे प्रयोजन होय.

(३) व्यवहारज्ञान – कवी आपल्या काव्यामध्ये जे लोकचरिताचे निदर्शन करतो, त्यावरून वाचकांना मानवी व्यवहाराचे अनेकदा ज्ञान होते. अनेक कवींनी अशी अनेक सुभाषितवजा काव्ये लोकांच्या व्यवहारज्ञानासाठी लिहिलेली आहेत. हे तिसरे प्रयोजन होय.

(४) अशुभनिवारण – ईशस्तुतिपर काव्य किंवा स्तोत्र रचल्याने अशुभाचे निवारण होते, अशी समजूत आहे. मयूर कवीने आपले कुष्ट दूर होण्यासाठी सूर्यशतक रचले होते. हे चौथे प्रयोजन होय.

(५) उपदेश – काव्यात उपदेश असतो, पण तो वडील-माणसे किंवा शिक्षक मुलांना करतात तसा नसून, पत्नी जशी प्रेमाने पण आडवळणाने एखादी गोष्ट पतीला पटवून देते तसा काव्यातला उपदेश असतो. महाभारत वाचल्यानंतर दुर्योधनासारखे वर्तन करू नये, धर्मराजासारखे वागावे किंवा रामायण वाचल्यावर रामासारखे वागावे, रावणासारखे वागू नये, असे प्रत्यक्षपणे सांगावे लागत नाही; नकळत तसा वाचकाच्या मनाला बोध होतो. प्रत्यक्ष उपदेश करावा या हेतूने जरी काव्य लिहिले जात नसले आणि उपदेश हा काव्याचा हेतू नसला, तरी अप्रत्यक्षपणे त्यातून जो बोध व्हायचा तो होतोच. हे काव्याचे पाचवे प्रयोजन होय.

(६) परनिर्वृती – याचा अर्थ उच्च प्रकारचा आनंद आणि समाधान असा आहे. या आनंदाला साहित्यशास्त्रज्ञांनी ' ब्रह्मास्वादसहोदरः ' ( = ब्रह्मानंदाचा सख्खा भाऊ) असे म्हटले आहे. या आनंदाच्या वेळी इतर गोष्टींचे भान राहत नाही आणि चित्ताच्या साऱ्या वृत्ती प्रफुल्लित होतात. लौकिक आनंद हा विषयजन्य असतो तसाच तो स्वार्थमूलकही असतो. पण काव्यानंदात कोणत्याही प्रकारचा स्वार्थ किंवा इंद्रियसुख संभवत नाही. त्यामुळेच काव्यानंद हा शुद्ध आणि उच्च असतो. हे सहावे आणि सर्वांत महत्त्वाचे प्रयोजन होय.

**प्रतिभा** – काव्याला जे सौंदर्य आणि सरसत्व येते, ते प्रतिभा या विशिष्ट दैवी देणगीमुळेच येत असते. प्रतिभा या शब्दातील ' भा ' धातूचा अर्थ भासणे, प्रकाशणे असा आहे. ज्ञानेंद्रियांच्या द्वारे जो विषय मनाला सर्वसामान्यपणे समजतो, तोच विषय एका विशिष्ट प्रकाराने भासणे अथवा प्रकाशित होणे, असा प्रतिभा शब्दाचा भावार्थ आहे. हरघडी डोळ्यांना दिसणाऱ्या, कानांना ऐकू येणाऱ्या, व्यवहारात नित्य उपयोगी पडणाऱ्या, साध्यासुध्या विषयांवरसुद्धा प्रतिभेची फुंकर पडली, की त्यातूनही कितीतरी सुंदर आणि गूढ असे तत्त्वार्थ प्रकट होऊ लागतात. त्याच विषयांना एक अलौकिक अशी चमक येते. परिसाचा स्पर्श होताच लोखंडाचे सोने व्हावे, तद्वत् प्रतिभेमुळे व्यवहारातल्या क्षुल्लक वस्तूलासुद्धा सुवर्णाचे मोल चढते. शून्यातून ब्रह्मांड निर्माण करणे, ब्रह्मांडाला शून्य बनवणे, मोहरीएवढ्या क्षुद्र वस्तूला पर्वताचा आकार देणे, महत्तम वस्तूला सामान्य कोटीत ढकलणे, एकच वस्तू नव्या नव्या रंगरूपांनी नटवून जगाला दाखविणे, इ. सारे प्रतिभेचेच विलास होत.

रुद्रटाने सहजा म्हणजे जन्मसिद्ध आणि उत्पाद्या म्हणजे अभ्यासाने साध्य केलेली असे प्रतिभेचे दोन प्रकार सांगितले आहेत. कवी म्हणून कीर्ती मिळवायची असेल तर जन्मसिद्ध प्रतिभेवर भिस्त ठेवून भागणार नाही; तर शास्त्रज्ञान, बहुश्रुतपणा, लोकव्यवहाराचे सूक्ष्म अवलोकन आणि अभ्यास या गुणांनी तिचे तेज वाढवावे लागेल.

**शब्द आणि त्याचे अर्थ** – वाच्यार्थ, लक्ष्यार्थ, आणि व्यंग्यार्थ असे शब्दाचे तीन प्रकारचे अर्थ असतात. हे तीन अर्थ व्यक्त करणाऱ्या तीन निरनिराळ्या शक्ती आहेत. त्यांना अनुक्रमे अभिधा, लक्षणा आणि व्यंजना असे म्हणतात.

अभिधा – ही शब्दाची पहिली आणि मुख्य शक्ती आहे. कोणत्याही शब्दाचा उच्चार करताक्षणीच जो अर्थ आपल्या मनात येतो, त्याला वाच्यार्थ असे म्हणतात. पाणी म्हटले, की पिण्याजोगा एक द्रवरूप सृष्टपदार्थ असे कळते. अग्नी म्हटला, की जळणारी वस्तू हे लगेच समजते. यावरून विशिष्ट शब्द उच्चा-

रताच विशिष्ट अर्थ व्यक्त करणारी जी शक्ती, तिला अभिधा असे म्हणतात.

लक्षणा – जेव्हा अर्थबोध होण्यासाठी वाच्यार्थ लागू पडत नाही आणि तो लावल्यास भलतेच काही विपरीत ज्ञान होते, अशा वेळी त्या शब्दातून एक निराळाच अर्थ काढावा लागतो. उदा० 'गङ्गायां घोषः' (= गंगेवर गौळवाडा आहे.) इथे गंगेच्या प्रवाहावर गौळवाडा असणे संभवत नाही, म्हणून गंगेवर म्हणजेच गंगेच्या तीरावर गौळवाडा आहे, असा वेगळा अर्थ घ्यावा लागतो. यालाच लक्ष्यार्थ म्हणतात. तो ज्या शक्तीने प्राप्त होतो, तिला लक्षणा म्हणतात. लक्ष्यार्थ हा शब्दाचा खरा अर्थ नव्हे; तो गौणार्थ होय.

व्यंजना – पुष्कळदा एखादे वाक्य ऐकले, की त्याचा वाच्यार्थ लक्षात येतो. त्यातून एखादा लक्ष्यार्थ निघत असल्यास तोही कळतो. हे दोन्ही अर्थ कळून त्यावाचून आणखी कोणता तरी अर्थ किंवा भाव प्रत्ययास येतो. हा तिसरा अर्थ व्यक्त करणारी जी शक्ती तिला व्यंजना असे म्हणतात. व्यंजनेने जो अर्थ कळतो, तो व्यंग्यार्थ होय. व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाला घालवून देऊन आपण त्याच्या जागी येऊन बसत नाही. उलट वाच्यार्थाच्या आधारानेच तो मागून येत असतो. मुख्यार्थ आधी कळावा लागतो म्हणजे मगच व्यंग्यार्थ समजतो. पण तो मुख्यार्थात मात्र सामावलेला नसतो.

याचे साहित्यशास्त्रातले सुप्रसिद्ध उदाहरण म्हणजे 'गतोऽस्तमर्कः' (सूर्य मावळला) हे होय. हे वाक्य उच्चारताच त्याचा वाच्यार्थ आपणास काय समजला ? तर सूर्य नावाचा आकाशातला एक तेजोगोल पश्चिम क्षितिजाखाली गेला. आता आपण कल्पना करा की शेतात काम करणाऱ्या एखाद्या शेतकऱ्याने म्हटले, सूर्य मावळला, तर 'आता घरी जायची वेळ झाली' असा अर्थ त्यातून ध्वनित होईल. एखाद्या कर्मठ ब्राह्मणाने हेच वाक्य उच्चारले तर 'संध्येची वेळ झाली' असा त्याचा अर्थ होईल. एखाद्या दुःखी-कष्टी आणि निराश झालेल्या माणसाच्या तोंडून हेच शब्द आले, तर 'आयुष्यातला एक दिवस संपला' असे त्यावरून सूचित होइल. एखाद्या आईने अंगणात खेळणाऱ्या आपल्या मुलांना उद्देशून हेच वाक्य उच्चारले तर त्यावरून 'आता खेळ पुरे' असा अर्थ सुचविला जाईल.

हे जे निरनिराळे आशय सूचित झाले ते 'सूर्य मावळला' या दोन शब्दांच्या वाच्यार्थात नाहीत, असे जरी असले तरी ते या दोन शब्दांतूनच सूचित झाले आहेत ही गोष्ट निःसंशय !

रस – काव्यातले मुख्य तत्त्व किंवा काव्याचा प्राण रस हाच होय. शब्दांना जे काव्यत्व येते, ते रसांमुळेच येते. 'रस्यते इति रसः' = ज्याचा आपण आस्वाद घेतो किंवा जो आपण आवडीने चाखतो, तो रस होय. मनुष्याच्या अंतरंगात ज्या मूलभूत आणि स्वयंभू अशा भावना आहेत, त्यांनाच अनुलक्षून काव्यशास्त्रवेत्त्यांनी निरनिराळे रस ठरविले आहेत. अशा प्रसिद्ध रसांची नावे पुढीलप्रमाणे आहेत – (१) शृंगार (२) हास्य (३) करुण (४) रौद्र (५) वीर (६) भयानक (७) बीभत्स आणि (८) अद्भुत. निरनिराळ्या पंडितांनी शांत, भक्ती आणि प्रेयान असे आणखी तीन रस मानले आहेत.

ज्या भावना मूलतःच अंतरंगात असतात व रसाच्या काली ज्या वृद्धिंगत होऊन मनाला व्यापून टाकतात आणि नंतरही ज्यांचा ठसा अंतःकरणावर बराच काल उमटून राहतो, त्या भावनांना स्थायीभाव असे म्हणतात. हे स्थायीभाव रती, हास्य, शोक, क्रोध, उत्साह, भीती, जुगुप्सा किंवा किळस व विस्मय असे आठ असून, त्यांवर अनुक्रमे शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स व अद्भुत हे आठ रस आधारलेले आहेत.

स्थायीभावाप्रमाणेच रसनिर्मितीला विभाव, अनुभाव आणि व्यभिचारीभाव यांची आवश्यकता असते. यांच्या साहचर्यानेच स्थायीभाव परिपुष्ट होऊन रसाची सिद्धी होते. वासनारूपाने अंतरात असलेल्या रत्यादी स्थायीभावांना आस्वादयोग्य करून, रसपदवीला नेतात, ते विभाव होत. आलंबन आणि उद्दीपन असे विभावाचे दोन प्रकार आहेत. काव्यातील नायक अथवा नायिका यांना आलंबन विभाव म्हणतात आणि नायक-नायिकांच्या निरनिराळ्या कृती, त्याचप्रमाणे देश, काल आणि परिस्थिती यांना उद्दीपन विभाव म्हणतात.

स्थायीभावांचा अनुभव घडविणारे म्हणजेच त्यांचा शरीरावर परिणाम दाखविणारे ते अनुभाव होत.

स्थायीभावांचा परिपोष करून त्यांना काव्यात सर्वत्र संचारयोग्य करणारे ते व्यभिचारीभाव होत.

काव्यगुण – विशिष्ट शब्दरचना, सोपे शब्द, सुटसुटीत समास, इ. ज्या गोष्टींमुळे काव्यसौंदर्यात भर पडते, त्या गोष्टींना काव्यगुण असे म्हणतात. काहींच्या मते काव्यगुण चोवीस आहेत, तर काहींच्या मते फक्त तीनच आहेत. काही विद्वानांनी ही गुणसंख्या दहा आहे, असे ठरविले आहे. पण वस्तुस्थिती अशी आहे, की काव्यगुणांची संख्या चोविसांपर्यंत लांबवीत नेली, तरी त्यांपैकी बरेचसे गुण केवळ नाममात्र भिन्न असून, त्यांचे स्वरूप जवळजवळ सारखेच आहे. काव्यगुण फक्त तीनच मानले तर त्या तीन गुणांत सगळ्या गुणांचा अंतर्भाव व्यवस्थितपणे होऊ शकत नाही. त्यासाठी पुष्कळ विद्वानांना मान्य असलेली दहा हीच गुणसंख्या स्वीकारणे सोयीचे ठरेल. त्या दहांची नावे अशी– श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सौकुमार्य, अर्थव्यक्ती, उदारता, ओजकांती आणि समाधी. या दहांपैकी उदारता, माधुर्य व

समाधी या गुणांचा शब्दरचनेशी व अर्थाशी संबंध असतो. जितके गुण अधिक तितके ते काव्य श्रेष्ठ ठरते.

**काव्यदोष** – रसाचा अपकर्ष करणारे ते दोष होत, अशी सामान्यपणे दोषांची व्याख्या आहे. म्हणजे काव्यातील रस व त्याची प्रतीती करून देणारा वाच्यार्थ यांची ज्यांच्यामुळे हानी होते, ते काव्याचे दोष असे समजावे. काव्याचा अर्थ वाचकाला सुलभपणे समजेनासा झाला, की तिथे काहीतरी दोष आहेच असे समजायला हरकत नाही. कवीच्या मनातला अर्थ समजूनही तो जर काव्यातील रसाला बाध आणीत असेल, तर ती गोष्टही दोषालाच कारणीभूत होईल. काव्य निर्दोष होण्यासाठी एवढी सगळी अवधाने सांभाळावी लागतात. असे काही काव्यदोष पुढीलप्रमाणे – वृत्तभंग, यतिभंग, यमकदोष, असाधुत्व, संधिविश्लेष, दुःश्रवत्व, अश्लीलता, अनुचितार्थत्व, विरुद्धमतिकृत्, अप्रयुक्तता, अवाचकत्व, क्लिष्टत्व, संदिग्धता, ग्राम्यता, निरर्थकत्व, अधिकत्व, न्यूनपदत्व, पुनरुक्ती, अपुष्टार्थत्व, दूरान्वय इत्यादी.

**अलंकार** – काव्याला शोभा देणाऱ्या धर्मांना अलंकार असे म्हणतात. शब्दालंकार आणि अर्थालंकार असे अलंकारांचे दोन प्रकार आहेत. शब्दालंकारांनी शब्दांचे सौंदर्य वाढून ते कानाला गोड लागतात आणि अर्थालंकारांनी काव्यातला अर्थ खुलतो.

अनुप्रास, यमक आणि श्लेष हे मुख्य शब्दालंकार होत.

अर्थालंकार एकूण एकूणसाठ आहेत. त्यांचे सूक्ष्म निरीक्षण केल्यास त्यांच्या वर्गीकरणाचे एक ढोबळ तत्त्व आपणांस कळून येईल. पुष्कळशा अलंकारांच्या मुळाशी साम्य किंवा विरोध यांपैकी काहीतरी असते. उदाहरणार्थ, उपमा हा अलंकार घ्या. नेत्र हे कमलासारखे आहेत – या ठिकाणी उपमा जी झाली ती नेत्र आणि कमल यांच्या साम्यामुळे झाली. तसेच रूपक, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ती, अनन्वय, भ्रांतिमान, स्मरण, तद्‌गुण, निदर्शना, इ. बरेच अलंकार प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे साम्यावरच आधारून राहिलेले आहेत. त्याचप्रमाणे विरोधाभास, विषम, प्रतीप, प्रत्यनीक, अतद्‌गुण, विभावना, इ. अलंकार विरोधाच्या पायावर उत्पन्न झालेले आहेत.

**इतिहास** – साहित्यशास्त्राचा उदय भरताच्या नाटचशास्त्र या ग्रंथाने झाला असे समजतात. त्या पूर्वीचे राजशेखराने उल्लेखिलेले श्रीकंठ, त्याचे चौसष्ट शिष्य, सहस्राक्ष, सुवर्णनाभ, शेष, उतथ्य, कामदेव, इ. साहित्यशास्त्रकर्ते हे दंतकथात्मक समजले पाहिजेत.

राजशेखर आपल्या काव्यमीमांसेत असे सूचित करतो, की काव्यशास्त्र हे प्रथम अस्तित्वात आले आणि त्यानंतर काव्याची रचना होऊ लागली. पण हा क्रम स्वाभाविक नव्हे. काव्यशास्त्राचा उदय होण्यापूर्वी काही काव्यांची रचना झालेली असणे आवश्यक आहे, असे मानावे लागते. आधी भाषा आणि मग तिचे व्याकरण; त्याचप्रमाणे आधी काव्य व मग त्याचे शास्त्र हाच क्रम सयुक्तिक होय. प्रथम साहित्याची निर्मिती होते आणि त्याच्या परिशीलनाने पुढे शास्त्र उत्पन्न होते.

भारतातील सर्वांत प्राचीन काव्यग्रंथ म्हणजे ऋग्वेद होय. त्यात देवतास्वरूपाची आणि त्यांच्या सामर्थ्याची वर्णने आणि प्रार्थना आहेत. उषा, सविता, पर्जन्य, इ. देवतांना उद्देशून रचलेल्या सूक्तांत काव्यमय निसर्गवर्णन आढळते. इंद्र-वृत्रांच्या युद्धवर्णनात व मरुतांच्या सूक्तांत वीररसाचा प्रत्यय येतो. वसिष्ठाच्या काही सूक्तांत करुणरसाच्या छटा दिसतात. ऋग्वेदातली यम-यमी, सरमा-पणी यांची संवादसूक्ते नाटचपूर्ण वाटतात. ऋग्वेदांत उपमा आणि उत्प्रेक्षा अनेकदा दिसतात.

ऋग्वेदकाळानंतर सहा वेदांगे निर्माण झाली. त्यांतली व्याकरण व निरुक्त ही दोन वेदांगे शब्द व अर्थ यांचा विचार करण्याच्या उद्देशाने रचली गेली आहेत. निरुक्तात ऋग्वेदातील उपमांचा विश्लेषणात्मक विचार आहे. मात्र तो विचार सूक्तांतील ऋचांची शोभा वाढविणारा अलंकार म्हणून केलेला नसून, आवश्यक साधन म्हणून केला आहे.

वैदिकयुगात काव्यरूप वाङ्मयाची निर्मिती होत असली, तरी त्याचे सौंदर्य समजावून देण्याच्या प्रक्रियेस प्रारंभ झालेला नव्हता.

पाणिनीच्या अष्टाध्यायीत काही आख्यानांचा निर्देश आहे. शिलाली आणि कृशाश्व या दोन आचार्यांनी रचलेल्या नटसूत्रांचाही तो उल्लेख करतो (४.३.११०–१११). ही नटसूत्रे नटांनी अभिनय कसा करावा हे सांगण्याच्या उद्देशाने लिहिलेली असणार हे उघड आहे. यावरून पाणिनीच्या काळात नाटच या ना त्या स्वरूपात विद्यमान होते, हे मान्य करावे लागते.

पाणिनीच्या काळात अन्य वाङ्मयाच्या निर्मितीस प्रारंभ झाला असावा. खुद्द पाणिनीने जांबवतीजय किंवा पातालविजय नावाचे काव्य लिहिले होते, असा उल्लेख काही ठिकाणी आढळतो. आख्यायिका नावाचा दुसऱ्या एका वाङ्मय प्रकाराचा पतंजलीने निर्देश केला असून, वासवदत्ता, सुमनोत्तरा आणि भैमरथी अशी तीन आख्यायिकांची नावे महाभाष्यात दिली आहेत. पण वरील आख्याने व आख्यायिका सांप्रत उपलब्ध नाहीत.

वेदोत्तर वाङ्मयापैकी महत्त्वाचे उपलब्ध वाङ्मय म्हणजे वाल्मीकीचे रामायण हे होय. रामायणाची रचना सन पूर्व ४-५ शतकांत झाली असावी असे मानतात. त्याच सुमारास आधुनिक संस्कृत काव्य निर्माण होऊ लागले होते, असे समजण्यास हरकत नाही. महाभारत हा जरी इतिहास ग्रंथ असला तरी, त्याची गणना काव्यरूप वाङ्मयात केलेली आहे. आख्याने व आख्या-

यिका यांसारखी अनेक आख्याने महाभारतात आहेत. नंतरच्या काळात रामायण-महाभारतांतील अनेक प्रसंग अनेक कवींच्या काव्यनाटकांचे विषय झाले आहेत. अशा प्रकारचे विवेचन करून श्री. र. पं. कंगले पुढे लिहितात, ते असे –

" सनपूर्व दुसऱ्या तिसऱ्या शतकाच्या आसपास बरेचसे संस्कृत वाङ्मय परिशीलनासाठी उपलब्ध झाले असावे. तेव्हा त्या सुमारास ह्या वाङ्मयाचे स्वरूप, त्याचे गुणदोष इत्यादीं-विषयी चर्चा व्हावयास सुरवात झाली असावी, असे समजण्यास हरकत नाही. ह्या विषयावर ग्रंथनिर्मिती होण्यास त्या काळीही प्रारंभ झालेला असणे शक्य आहे. नटसूत्रांचा निर्देश पाणिनीच्या अष्टाध्यायीतच आहे. परंतु अशी ग्रंथनिर्मिती त्याकाळी झाली असली तरी, त्यापैकी आज काहीही उपलब्ध नाही. तथापि ह्या विषयावर सध्या उपलब्ध असलेला सर्वांत प्राचीन ग्रंथ जो भरताचे 'नाट्यशास्त्र' त्यावरून असे स्पष्टपणे दिसून येते, की हा ग्रंथ काही प्राचीन ग्रंथांच्या आधारेच रचण्यात आला आहे. सहाव्या रसाध्यायात तर अनेक आर्या व श्लोक पुरातन म्हणून उद्धृत केले आहेत. तेव्हा भरताच्या नाट्यशास्त्राच्या रचने-पूर्वी ह्या विषयावर काही ग्रंथ लिहिले गेले होते, हे निश्चित. नाट्यशास्त्राच्या रचनेच्या कालाबद्दल एकमत नाही. सर्वसंग्रा-हक स्वरूपाच्या ह्या ग्रंथाची रचना इ. स. च्या दुसऱ्या-तिसऱ्या शतकात झाली असावी, असे सामान्यपणे मानतात. त्यातील काही विषयांचे विवेचन तत्पूर्वीच्या ग्रंथांच्या अधारे केले असावें, या विषयांच्या विचाराला प्रारंभ दोन तीन शतके अगोदर झाला असावा, असे समजण्यास हरकत नाही. यावरून काव्यविषयक विवेचनाचा प्रारंभ म्हणजे काव्यशास्त्राचा उदय सनपूर्व पहिल्या अथवा दुसऱ्या शतकात झाला असावा, या वरील तर्काला बळकटी येण्यासारखी आहे.

प्राचीन काव्यशास्त्राचे प्रथम दर्शन होते ते भरताच्या नाट्य-शास्त्रात. भरताने काव्यशास्त्राच्या कक्षेत येणाऱ्या काही विष-यांचे विवेचन केले आहे. स्थूलमानाने ६,७,१७,२० व २२ या अध्यायांत काव्यशास्त्रीय विषय असून, नाट्यशास्त्राला अंगभूत म्हणून त्याने ते विवेचिले आहेत. नाट्यशात्रात रसविवेचन सविस्तर आले आहे. विभाव, अनुभाव, संचारीभाव, स्थायीभाव, इ. रसमीमांसेतल्या पारिभाषिक संज्ञा प्रथम नाट्यशास्त्रातच आढळतात. भरताने रसप्रक्रियेची जी एक चौकट निर्माण केली, तिच्या कक्षेतच भरतामागूनच्या काव्यशास्त्रज्ञांनी रसचर्चा केली आहे. रसविवेचन ही भरताने साहित्याला दिलेली मोलाची देणगी आहे.

नाट्यशास्त्रात जे काव्यविवेचन आले आहे, त्यात भरताने काव्याकडे एक नाट्यांग म्हणून पाहिले आहे. पण सारेच काव्य काही अभिनयासाठी निर्माण होत नाही आणि अभिनयाची जोड नसली तरी आस्वाद्य व्हायचे राहत नाही. रामायण हे महाकाव्य रसिकांना मान्य झाले, ते काही ते अभिनेय आहे म्हणून नव्हे. काव्याच्या ठिकाणी अभिनय-संगीतादिनिरपेक्ष असे केवळ स्वतःचे म्हणून रंजकत्व निर्विवादपणे असते. त्याचे रहस्य उलगडण्यासाठी काव्याचा विचार एक स्वयंपूर्ण रचना या दृष्टीने करणे आवश्यक आहे.

**ग्रंथ व ग्रंथकार** – काव्यशास्त्रातील प्राचीनतम ग्रंथ म्हणजे भामहाचा काव्यालंकार हा ग्रंथ होय (इ. स. ६०२). भामहाने प्रथम काव्याचे लक्षण सांगून ३८ शब्दालंकारांचे आणि अन्य काही आनुषंगिक विषयांचे विवेचन केले आहे. भामह काव्य-गुणांना महत्त्व देतो; पण रीतींना मुळीच महत्त्व देत नाही.

दंडी (इ. स. ७००) हा भामहाला जवळचाच आहे. त्याने काव्यादर्श हा ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथातली काव्यविषयक भूमिका भामहाच्या भूमिकेशी मिळती-जुळती आहे. यासंबंधी प्रा. अर्जुन-वाडकर व प्रा. मंगरूळकर लिहितात –

'अलंकार' तत्त्वाच्या बाबतीत भामह आणि दंडी यांचे प्रायः मतैक्य दिसून येते. भामहाने या तत्त्वाला 'वक्रोक्ति' असे नाव देऊन ते सर्वकाव्यव्यापी मानिले; आणि रसांचाही त्यातच अंतर्भाव केला. दंडीने 'वक्रोक्ती'च्या व्याप्तीतून 'स्वभावोक्ति' तेवढी वेगळी काढली (दंडी २.३६३); आणि 'काव्यशोभाकर धर्म म्हणजे अलंकार' (दंडी २.१) असे अलंकाराचे सामान्य स्वरूप सांगून 'गुणां'नाही 'अलंकार' संज्ञा उत्पन्न होत अस-ल्याचे सूचित केले; इतकेच काय, भरतोक्त 'संध्यंगे, वृत्त्यंगे, लक्षणे' इत्यादी तपशिलाचाही दंडीने अलंकारांतच अंतर्भाव सांगितला आहे (दंडी २.३६७). भामह-दंडींच्या काळात अलं-कारतत्त्व हे असे अत्यंत व्यापक स्वरूपाचे मानिले गेल्यामुळेच 'काव्यमीमांसा म्हणजे अलंकारमीमांसा' असे समीकरण सिद्ध होऊन 'अलंकारशास्त्र, आलंकारिक' ही नावे प्रचारात आली; आणि पुढे अलंकारकल्पना संकोचल्यावरही तशीच प्रयोगात राहिली.

दंडी-भामहांच्या बरोबरीने उद्भटाचेही नाव घेतले जाते. (इ. स. ८००). तो काश्मीरच्या जयापीड राजाचा सभापती होता. काव्यालंकारसारसंग्रह हा त्याचा ग्रंथ होय. त्यात त्याने फक्त अलंकारांचीच चर्चा केली आहे आणि काही ठिकाणी स्वतंत्र विचारसरणी मांडली आहे. अलंकारांच्या लक्षणांत आणि प्रका-रात त्याने स्पष्टपणा आणि काटेकोरपणा आणला आहे. उत्तर-कालीन अलंकारग्रंथांवर त्याच्या विवेचनाची छाप स्पष्टपणे दिसून येते.

वामन हा उद्भटाचा समकालीन, पण त्याचा प्रतिस्पर्धी

मानला गेला आहे. काव्यालंकारसूत्र हा त्याचा ग्रंथ होय. त्यावर त्याने स्वतःच कविप्रिया नावाची वृत्ती रचून अलंकारशास्त्रात मोलाची भर टाकली आहे. काव्यमीमांसेच्या सर्व अंगांना स्पर्श करणारा तो एक आकर ग्रंथ असून, त्याची लेखनशैली दार्शनिक पद्धतीची आहे. काव्यविवेचनाच्या संदर्भात सौंदर्यतत्त्वाचा स्पष्ट निर्देश करणारा वामन हाच पहिला आलंकारिक होय. वामनाला रीतिविषयक सिद्धान्ताचा मुख्य पुरस्कर्ता मानतात.

त्यानंतरचा काव्यशास्त्रज्ञ म्हणजे रुद्रट हा होय (इ. स. चे ९ वे शतक). त्याचा काव्यालंकार हा ग्रंथ अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. रुद्रटाने अलंकारांची संख्या दीडपट केली. त्याने प्रथमच अर्थालंकारांची वास्तव, औपम्य, अतिशय व श्लेष या चार भागांत विभागणी केली. त्याने नवरसांत प्रेयान् या दहाव्या रसाची भर घातली.

वामनाच्या नंतरचा अगदी जवळचा काव्यमीमांसक म्हणजे आनंदवर्धन हा होय (इ. स. ८४०–८७०). याने ध्वन्यालोक नावाचा ग्रंथ लिहून काव्यमीमांसेला प्रगतीच्या शिखरावर चढवले. त्यामुळेच साहित्यशास्त्राच्या इतिहासात आनंदवर्धन हा युगप्रवर्तक ठरला आहे. त्याने आपल्या या ग्रंथात वाच्य-लक्ष्य या प्रसिद्ध अर्थाहून भिन्न असा व्यंग्य नावाचा अर्थ शब्दातून प्रकट होत असतो, ही गोष्ट अनेक प्रमाणे देऊन सिद्ध केली आहे आणि या व्यंग्यार्थाचा अर्थात 'ध्वनी'चा निकष लावून सर्व काव्यांगांचा पुनर्विचार केला आहे. हा 'ध्वनी म्हणजेच काव्याचा आत्मा' असे सांगून, काव्यातील त्याच्या श्रेष्ठ-कनिष्ठ स्थानाला अनुलक्षून आनंदवर्धनाने काव्याचे भेद-प्रभेद आणि प्रतवारी यांचे निरूपण केले आहे. आनंदवर्धनाने काव्यमीमांसेला दिलेला हा वैचारिक वारसा फार मोलाचा आहे. या मौलिक ग्रंथाचा उत्तरकालीन सर्व काव्यमीमांसकांवर विलक्षण प्रभाव पडलेला दिसून येतो.

आनंदवर्धनाच्या वरील उपपत्तीचे साहित्यशास्त्रातील महत्त्व सांगताना डॉ. ग. त्र्यं. देशपांडे लिहितात –

"या उपपत्तीचा एक महनीय विशेष असा, की कवीपासून रसिकापर्यंत येणाऱ्या प्रतीतीच्या अखंडतेवर ही उपपत्ती आधारली आहे. त्यामुळेच काव्याच्या सर्व अंगांची यात सुसंगत व्यवस्था लागू शकली. म्हणूनच आनंदवर्धनापूर्वीचे सर्व विचार-प्रवाह या उपपत्तीत विलीन झाले व नवीन विचारप्रवाहांना या उपपत्तीने चालना दिली. भामहाची वक्रोक्ती, दंडीचे काव्यशोभाकर धर्म, उद्भटाची अमुख्यवृत्ती, वामनाची रीती, रुद्रटाची वृत्ती, ही पूर्वीची सर्व 'काव्यप्रस्थाने' आनंदवर्धनाने विचारात घेऊन त्यांची यथायोग्य व्यवस्था आपल्या उपपत्तीत अविरोधाने लावली. या आपल्या उपपत्तीचे सूत्रात्मक विधान त्याने 'काव्यस्यात्मा ध्वनिः' या प्रसिद्ध वचनाने केले आहे. या वचनाचे दोन अर्थ करण्यात आले. रसध्वनी हा काव्याचा आत्मा आहे, हा एक अर्थ व ध्वनन किंवा व्यंजनाव्यापार हाच काव्यगत शब्दार्थांचा आत्मा आहे, हा दुसरा अर्थ. यांपैकी रसाचे काव्यात्मत्व हे सर्व साहित्यपंडितांस मान्य झाले. पण ध्वनन व्यापाराबद्दल पंडितांत मतभेद झाले. या मतभेदांतूनच ध्वनिविरोधकांचा उदय झाला व काव्यचर्चेला वेगळीच कलाटणी मिळाली."

आनंदवर्धनाने केलेली दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे काव्यात रसाचे स्थान काय याचे निर्धारण. वामनाने रसाला गुणांमध्ये स्थान दिले पण त्याच्याही व्यवस्थेत रसाला केंद्रस्थान प्राप्त झाले नाही. ते आनंदवर्धनाच्या व्यवस्थेत प्राप्त झाले.

आनंदवर्धनानंतर मम्मटाच्या उदयापर्यंत जे काही काव्यशास्त्रज्ञ होऊन गेले. त्यांत पहिले नाव येते ते राजशेखराचे (इ. स. ९०० ते ९१५). त्याने काव्यमीमांसा नामक ग्रंथ लिहिला आहे. वेदवेदांगादी चौदा पारंपरिक विद्यास्थानांच्या पंक्तीत त्याने काव्य हे पंधरावे विद्यास्थान मानले आहे. आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता आणि दंडनीती या कौटिल्योक्त चार विद्यांच्या पंक्तीत साहित्याला त्याने पाचव्या विद्येचे स्थान दिले आहे. त्याने विषयप्रतिपादनाची पद्धती कौटिल्याच्या अर्थशास्त्रावरून उचलली आहे. त्याने कवीच्या दिनचर्येवरही विस्ताराने लिहिले आहे.

त्यानंतर कुंतकाचे (इ. स. ९२५ – १०२५) नाव येते. वक्रोक्तिजीवित हा याचा ग्रंथ होय. त्याने भामहाच्या काव्यालंकारातून वक्रोक्ती ही कल्पना उचलली आणि ती अधिक व्यापक बनवली. सहा प्रकारची वक्रता काव्यात असते, असे त्याने सांगितले आहे. कुंतकाने शब्द आणि अर्थ अलंकार्य म्हणून सांगितले आणि वक्रोक्ती ही त्यांची अलंकृती म्हणून कल्पिली. काव्य हे अलंकृतीसहच काव्य या संज्ञेला पात्र होते, असे तो म्हणतो. काव्यमीमांसेतील मार्ग अर्थात रीती ही कल्पना कुंतकाने सर्वांत सुसंगतपणे मांडली आहे. त्याने सांगितलेल्या सुकुमार, विचित्र व मध्यम या मार्गांच्या सामान्य आणि विशेष गुणांची एकूण संख्या दहा भरते.

आचार्य अभिनवगुप्त (इ. स. च्या १० व्या शतकाचा उत्तरार्ध) हा काव्यशास्त्रातील महान भाष्यकार होता. त्याची ध्वन्यालोकावरील लोचन नामक टीका आणि अभिनवभारती ही भरताच्या नाट्यशास्त्रावरील एकमेव पांडित्यपूर्ण व्याख्या हे दोन ग्रंथ बहुमोल ठरले आहेत. त्याचे अनेक रस-सिद्धान्त मान्यता पावले आहेत.

भोज हा त्याच्या पुढचा काव्यशास्त्रज्ञ होय. सरस्वतीकंठाभरण व शृंगारप्रकाश हे त्याचे दोन ग्रंथ होत. पहिला ग्रंथ

कारिका आणि त्यांवरील सोदाहरण गद्यवृत्ती या स्वरूपात निबद्ध आहे. शब्दालंकार, अर्थालंकार आणि उभयालंकार असे तीन अलंकारवर्ग त्याने कल्पिले असून, प्रत्येक वर्गात चोवीस अलंकार सांगितले आहेत. भोजाच्या दुसऱ्या ग्रंथाची छत्तीस प्रकरणे असून, तो सगळाच ग्रंथ अवाढव्य आहे.

त्यानंतरचा साहित्यशास्त्रकार क्षेमेंद्र (इ. स. १०२५-१०७५) हा काश्मीरी होता. याने औचित्यविचारचर्चा आणि कविकंठाभरण असे दोन ग्रंथ लिहिले. पहिल्या ग्रंथात पद, वाक्य, प्रबंध, अलंकार, रस, इ. अनेक गोष्टींच्या संबंधात उचित काय आणि अनुचित काय, याचे त्याने सोदाहरण विवेचन केले आहे. दुसऱ्या ग्रंथात कवित्व कसे मिळवावे, चमत्कृतियुक्त काव्य कसे रचावे, दोष कसे टाळावे, गुण कसे योजावे, इ. विषयांचे थोडक्यात विवेचन केले आहे.

मम्मट हा त्यानंतरचा महान ग्रंथकार होय. (इ. स. ११००) त्याचा काव्यप्रकाश हा काव्यशास्त्रावरील सर्वांत प्रसिद्ध असा ग्रंथ आहे. आजपावेतो त्याच्या अध्ययन-अध्यापनांत खंड पडलेला नाही. या ग्रंथावर एकंदर सत्तराहून अधिक टीका लिहिलेल्या आहेत. या ग्रंथाविषयी श्री. र. पं. कंगले लिहितात, ते असे —

" ह्या ग्रंथाला असे महत्त्व प्राप्त होण्याची दोन कारणे संभवतात. तत्पूर्वी मांडण्यात आलेल्या अनेक मतप्रवाहांचा त्यात समन्वय साधलेला दिसून येतो आणि त्यामुळे परिणत स्वरूपातील संपूर्ण काव्यशास्त्राचे ज्ञान त्यापासून होऊ शकते हे एक; आणि त्यातील विवेचन समजण्यास प्रायः सोप्या आणि थोडक्या शब्दांत केलेले असल्यामुळे अध्ययनाच्या कामी तो उपयुक्त ठरला आहे हे दुसरे. कारिका आणि त्यावर वृत्ती असे ह्या ग्रंथाचे स्वरूप असून, त्यात एकंदर दहा उल्लास आहेत. त्यांपैकी पहिल्या उल्लासात काव्याचे प्रयोजन, हेतू, लक्षण आणि भेद यांचा निर्देश केला आहे. दुसऱ्या उल्लासात शब्दाच्या अभिधा, लक्षणा आणि व्यंजना ह्या तीन शक्तींचे विवेचन आहे, तर तिसऱ्यात अर्थाचे व्यंजकत्व सिद्ध केले आहे. चौथ्या उल्लासात ध्वनिकाव्याच्या भेदांचे निरूपण करून अभिनवगुप्ताला अनुसरून रससिद्धान्ताची मांडणी केली आहे. पाचव्या उल्लासात गुणीभूत व्यंगकाव्याचे प्रकार आणि सहाव्यात चित्रकाव्याचे प्रकार यांचे विवेचन आहे. सातव्या उल्लासात दोषांचे आणि आठव्यात गुणांचे विवरण आहे. नवव्या उल्लासात शब्दालंकारांचे आणि दहाव्यात अर्थालंकारांचे विवेचन करून ग्रंथ संपवला आहे. यातील कारिका मूळ भरतकृत असून, मम्मटकृत नाहीत असे जे एकमत आहे, ते बरोबर नाही. ध्वनिसिद्धान्ताशी भरताचा परिचय असण्याची शक्यता नाही. काव्यप्रकाशावरील काही टीकाकारांनी असे प्रतिपादन केले आहे, की हा ग्रंथ मम्मट व अलक ह्या दोघांनी मिळून लिहिला आहे. तदनुसार असे मानण्यात आले आहे, की मम्मटाच्या हातून अपूर्ण राहिलेल्या ग्रंथाची परिपूर्ती अलकाने केली असावी. काही पंडितांच्या मते दहाव्या उल्लासातील परिकर अलंकारापर्यंतचा भाग मम्मटाचा आणि शेष भाग अलकाचा. हे मत अगदीच असंभाव्य नाही. मम्मटाने जरी काही नवीन सिद्धान्त मांडलेले नसले तरी, काही बाबतींत त्याने पूर्वीच्या आचार्यांशी मतभेद प्रकट केले आहेत. काव्यप्रकाशाशिवाय मम्मटाने 'शब्दव्यापारविचार' नावाचा दुसराही एक ग्रंथ लिहिला आहे. त्यात अभिधा आणि लक्षणा ह्या दोन शब्द शक्तींचा विचार आहे."

रुय्यक (इ. स. ११३५–५०) याचा अलंकारसर्वस्व हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाच्या उपोद्घातात रुय्यकाने भामहापासून महिमभट्टापर्यंतच्या मुख्य आलंकारिकांच्या मताचा ध्वनिदृष्ट्या आढावा घेतला असून, महिमभट्टाखेरीज इतरांच्या मतांत प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे ध्वनीला मान्यता कशी मिळाली आहे, त्याचे संक्षेपतः दर्शन घडविले आहे.

रुय्यकाने आपल्या ग्रंथात अनुप्रासयमकादी शब्दालंकारांचे वर्णन केल्यानंतर ७५ अर्थालंकारांचे विवेचन केले आहे. त्याच्या ग्रंथावर जयरथाने विमर्शिनी नामक टीका लिहिली आहे.

वाग्भट असे नाव असणाऱ्या दोन जैन पंडितांनी काव्यशास्त्रावर लिहिले आहे. त्यांपैकी पहिल्या वाग्भटाचा ग्रंथ 'वाग्भटालंकार' म्हणून ओळखला जातो. दुसऱ्या वाग्भटाच्या ग्रंथाचे नाव 'काव्यानुशासन' असे आहे. पहिला वाग्भट गुजरातेतील अणहिलवाड पाटण येथील राजा जयसिंह ऊर्फ कर्ण याच्या कारकिर्दीत (इ. स. १०९३–११४३) होऊन गेला. वाग्भटालंकारात पाच परिच्छेद असून, त्यात काव्याचे लक्षण, त्याचे हेतू, काव्यसंकेत, काव्याचे प्रकार, गुण, दोष, अलंकार, रीती, रस, नायक-नायिका इत्यादी सर्व विषयांचे विवेचन आहे. दुसरा वाग्भट मेवाडात होऊन गेला असावा. त्याचा काल निश्चित करण्यास पुरेसा पुरावा उपलब्ध नाही. तो तेराव्या-चौदाव्या शतकात होऊन गेला असण्याची शक्यता आहे. दुसऱ्या वाग्भटाच्या काव्यानुशासनात काही अलंकार नवीन असले तरी, एकंदर विवेचन पूर्वसूरींच्या मतांना अनुसरूनच केले आहे.

हेमचंद्र (इ. स. १०८८–११७२) हा गुजरातमधील जैन ग्रंथकार होय. काव्यानुशासन हा ग्रंथ त्याने लिहिला आहे. या ग्रंथाचे आठ अध्याय आहेत. त्यावर त्याने स्वतःच विवेक नावाची व्याख्या लिहिली आहे. हा ग्रंथ काव्यप्रकाशाच्या आधारे रचलेला असावा. शुद्ध तात्त्विक काव्यविवेचन, नाट्यविवेचन आणि कविशिक्षा या तीन्ही विषयांना कमीअधिक प्रमाणात स्पर्श करणारा हा पहिलाच ग्रंथ ठरेल.

शोभाकर मित्र (इ. स. ११५०–१२००) याचा अलंकाररत्नाकर हा ग्रंथ पंचवीस वर्षांपूर्वी प्रथम प्रकाशित झाला. त्याने आपले सर्व अलंकारविवेचन चारुता आणि प्रतीतिभेद या दोन सूत्रांना धरून केलेले आहे. ते करताना त्याने अनेक जुने अलंकार अमान्य केलेले असून, सुमारे एकोणचाळीस नवे अलंकार सांगितले आहेत. हा ग्रंथ शोभाकराने रुय्यकाच्या मतांच्या खंडणासाठीच लिहिला आहे, असे वाटते. पण तरीही शोभाकराचे प्रतिपादन प्रसन्न, युक्तिसंगत आणि विचारप्रेरक झाले आहे.

काव्यशास्त्राच्या संभारात काव्यप्रकाशाच्या खालोखाल लोकप्रिय ग्रंथ म्हणजे साहित्यदर्पण हा होय. विश्वनाथ कविराज (इ. स. १३००–१३८४) याने हा ग्रंथ लिहिला आहे. काव्यप्रकाशाच्या धर्तीवरच त्याची रचना केली आहे. या ग्रंथाचे दहा परिच्छेद असून, चौथ्या परिच्छेदात रसविवेचन, पाचव्यामध्ये व्यंजनाविवेचन आणि सहाव्यात नाट्यविवेचन आहे. याच परिच्छेदात त्याने दहा रूपक प्रकारांचे, अठरा उपरूपकांचे आणि कथा, आख्यायिका, महाकाव्य, इ. प्रबंधभेदांचे निरूपण केले आहे. विश्वनाथाची निरूपणपद्धती सुबोध आहे. त्यामुळेच साहित्यदर्पणाचा पुष्कळ प्रचार झाला.

अप्पय्य दीक्षित (इ. स. १५५० – १६२५) याने काव्यशास्त्रावर वृत्तिविवेक, कुवलयानंद व चित्रमीमांसा असे तीन ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी कुवलयानंद हा अर्थालंकारांचे निरूपण करणारा ग्रंथ विशेष प्रचारात आहे. चित्रमीमांसा या ग्रंथात अलंकारांची शास्त्रीय चिकित्सा आहे. हा ग्रंथ अपूर्ण आहे.

पंडितराज जगन्नाथ (इ. स. १६२० – १६५०) याचा रसगंगाधर हा एक काव्यशास्त्रातला तोलामोलाचा ग्रंथ आहे. गद्य सूत्रे आणि त्यांवरील सोदाहरण गद्यवृत्ती असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. यातली उदाहरणे ग्रंथकाराने स्वतः रचून घातली आहेत. रसगंगाधर हा ग्रंथ अपूर्ण आहे. उत्तर अलंकाराच्या विवेचनात तो खंडित झाला आहे. जगन्नाथपंडिताने चित्रमीमांसाखंडन असा आणखी एक ग्रंथ लिहिला आहे. त्याचा जन्म तेलंगणातच झाला आहे. याच्या थोरवीविषयी प्रा. अर्जुनवाडकर-मंगरूळकर लिहितात –

"जैमिनिसूत्रांवरील शाबरभाष्य, बादरायण सूत्रांवरील शांकरभाष्य यांसारख्या थोर ग्रंथांची आठवण करून देईल, अशा शैलीने, प्रौढतेने आणि प्रतिष्ठेने रचलेला हा ग्रंथ अलंकारशास्त्राचा एक मोलाचा अलंकार ठरला आहे. जगन्नाथाची कुशाग्र प्रज्ञा, त्याचा विविध शास्त्रांचा तलस्पर्शी व्यासंग, समग्र विषयाचा व्याप एका झेपेत स्वतःमध्ये सामावून घेणारी त्याची दृष्टी, त्याचे दीर्घ चिंतन, त्याची वादपटुता, त्याचा अहंकार, त्याचे कवित्व, त्याची रसिकता, त्याचे गांभीर्य, या सर्वांचे एक विलक्षण रसायन रसगंगाधरांत झालेले आहे. नव्यन्यायाने शास्त्रीय क्षेत्रात जी विवेचनपद्धती आणिली आणि रुळविली, तिचा अवलंब करून जगन्नाथाने ध्वनिसिद्धांताधिष्ठित काव्यमीमांसा नव्याने प्रतिपादन केली आहे. रसगंगाधर रचून जगन्नाथाने जणू असे बजावून सांगितले आहे, की हे साहित्यशास्त्र सर्व शास्त्रांचे सार असून, त्याचे आकलन आणि विवेचन करण्यास अन्य प्रतिष्ठित शास्त्रांतल्या इतक्या प्रज्ञा-व्यासंगाची आवश्यकता आहे.

साहित्यशास्त्र आरंभी नाट्याच्या संदर्भात उदयास आले. पुढे त्याचे विषय विविध आणि व्यापक झाले. सुमारे दीड सहस्र वर्षे या शास्त्रावर ग्रंथरचना होत राहिली. त्यातही भामहापासून मम्मटापर्यंतचा सुमारे पाच शतकांचा काळ हा या शास्त्राचा परम उत्कर्षकाल होय. या कालखंडातच काव्यशास्त्राचे अंतिम स्वरूप निश्चित झाले आणि ते निश्चित करण्यात आनंदवर्धन आणि अभिनवगुप्त या दोन शास्त्रकारांनी फार मोलाची कामगिरी केली. [प्रा. का. शा.; भा. सा. शा.; काव्यप्रकाश– श्री. अर्जुनवाडकर, श्री. मंगरूळकर, १९६२; सु. का. शा.]

## साळी

विणकामाचा धंदा करणारी एक जात. या लोकांची वस्ती महाराष्ट्र, आंध्र, कर्नाटक व गुजरात या प्रदेशांत आढळते. यांना गुजरात मधून आणून कर्नाटकात वसविल्याचा उल्लेख एका ताम्रपटात आढळतो. बनशंकरी हे इकडच्या साळ्यांचे कुलदैवत आहे. त्यामुळे महाराष्ट्रातील साळी हे कर्नाटकातून इकडे आले असावे, असे अभ्यासकांचे मत आहे. साळीमाहात्म्यपुराण नामक संस्कृत ग्रंथात या जातीचा इतिहास आहे. हा ग्रंथ अत्रिऋषीने रचला अशी त्यांची समजूत आहे. या ग्रंथाचे प्राकृत रूपांतरही झाले आहे.

**विवाहप्रथा** – साळ्यांमध्ये अनेक पोटजाती आहेत. त्यांचे परस्परांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीत. पूर्वी बालपणीच मुलामुलींची लग्ने करीत. आते किंवा मामे बहिणीशी लग्न करण्याची चाल यांच्यांत आहे. विवाहात देवक बसण्यापूर्वी हातमागासाठी वापरायचा दोरीचा एक तुकडा, दगडी दिवा, इ. साहित्य घेऊन ते मारुतीच्या मंदिरात जातात. तिथे देवाची पूजा करून घरी येतात. मग विवाहसोहळा पार पडतो. बहुधा देशस्थ ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात.

यांच्यांत घटस्फोट व विधवा-विवाह रूढ आहे. पण विधवेने नवऱ्याच्या कुळात लग्न करता कामा नये, असा दंडक आहे.

साळी लोक मुलीचे बारसे बाराव्या दिवशी आणि मुलाचे बारसे तेराव्या दिवशी करतात. सहाव्या महिन्यापासून तिसऱ्या वर्षापर्यंत केव्हाही ते मुला-मुलींचे जावळ करतात.

काही साळी जानवी घालतात. काहींना मद्य, मांस चालते, काहींना चालत नाही.

**मर्तिकप्रथा** –हे लोक मृताला जाळतात व दहा दिवस सुतक पाळतात. पाहा – कोष्टी, देवांग, पद्मसाळी. [म. लो. सं.; म. ज्ञा. को.; पूना गॅझे.]

## साक्ष

डोळ्यांनी पाहिलेले असा या शब्दाचा अर्थ आहे. त्यामुळे साक्षीदाराच्या साक्षीला प्रत्यक्ष ज्ञानाचे मोल असते. साक्षीदार हा उदासीन असावा म्हणजे प्रत्यक्ष विवादात न पडणारा, पण विवाद पाहणारा, भांडणाऱ्या दोन व्यक्तींहून निराळा आणि कोणाचाही पक्ष न घेणारा असा असावा. अशी प्रत्यक्ष साक्ष न्यायनिवाड्याच्या कामी फार उपयुक्त ठरते. न्यायदान हे राज्यसंस्थेचे एक महत्त्वाचे कार्य आहे. हे कार्य बव्हंशी साक्षीदारांनी दिलेल्या माहितीच्या आधाराने होत असते. त्या दृष्टीने साक्षीदार हा न्यायमंदिराचा एक चिरा ठरतो. चाणक्याच्या मते साक्ष हा व्यवहाराचा पाया आहे. इतके महत्त्व साक्षीला असल्यामुळे प्राचीन राज्यशास्त्रप्रणेत्यांनी त्याचा बराच विचार केलेला आढळतो.

मनुस्मृती, याज्ञवल्क्य स्मृतीतील साक्षिप्रकरण आणि चाणक्याचे अर्थशास्त्र या ग्रंथांतून साक्षीसंबंधाने झालेला ऊहापोह हा सामान्यपणे सारखाच आहे. पण अर्थशास्त्रातील विचार मात्र अत्यंत नेटका, सूत्रबद्ध व आटोपशीर वाटतो.

साक्षीदाराचे कृत व अकृत असे दोन प्रकार आहेत. साक्षित्वाने निरूपण केलेला कृत आणि निरूपण न केलेला तो अकृत साक्षीदार होय. नारदाच्या मते कृत साक्षीदाराचे लिखित, स्मारित, यदृच्छाभिज्ञ, गूढ व उत्तरसाक्षी असे पाच प्रकार आहेत. गाव, न्यायाधीश, राजा, व्यवहार करणारे यांनी आपल्या कामाचा ज्याला अधिकार दिला आहे असा, अर्थीने पाठविलेला, तसेच कुलविवादात कुलातील लोक हे अकृत साक्षीदार होत.

साक्षीदाराच्या योग्यायोग्यतेचा विचार करीत असताना तो तपस्वी, दानशील, कुलीन व सत्यवादी असावा, असा आग्रह धरणे स्वाभाविक आहे. व्यवहारनिर्णयाच्या कामी सामान्यत: तीन साक्षीदार असावे. कधी कधी वादी–प्रतिवादींच्या संमतीने दोन साक्षीदार चालतात, असे चाणक्याचे मत आहे. परंतु कर्जाच्या व्यवहारात मात्र एक साक्षीदार चालत नाही.

पक्षकाराशी नात्याने वा अन्य प्रकाराने संबंधित असलेला, शारीरव्यंग असलेला, रोगी, गावकऱ्यांनी पोसलेला, शिक्षा भोगलेला, जातिभ्रष्ट, सरकारी नोकर, इ. लोक साक्ष द्यायला अपात्र मानले गेले आहेत. परंतु नोकराच्या विरुद्ध मालक, शिष्याच्या विरुद्ध गुरू, आणि मुलाविरुद्ध आईबाप स्वखुशीने साक्ष द्यायला आले असतील, तर ते साक्ष द्यायला लायक मानले जात होते.

कोणत्या वर्णाचा साक्षीदार कोण असावा हे प्राचीन काळी ठरले होते, असे दिसते. ब्राह्मणांच्या दाव्यात ब्राह्मण साक्षीदार असावा, क्षत्रियांचे साक्षीदार क्षत्रिय असावे आणि स्त्रीसंबंधित दाव्यात स्त्रियांची साक्ष काढावी, असे म्हटले आहे (मनु. ८.६८).

साक्ष घेण्यापूर्वी साक्षीदाराला विविध मंदिरे, ब्राह्मण, जलकुंभ व अग्नी यांच्या समोर उभे करून सत्य सांगायला सांगत असत. कधी कधी न्यायनिवाड्याच्या सभा मंदिरातही भरत असत. देवासंबंधीच्या अपार श्रद्धेमुळे लोक देवा–ब्राह्मणांसमोर किंवा देवांच्या वास्तूत खोटे बोलत नाहीत, अशी धारणा यामागे असे. साक्षीदाराच्या साक्षीला प्रारंभ होण्यापूर्वी त्यांना वर्णांनुसार निरनिराळ्या शपथा घ्यायला लावत. या शपथांचा तपशील चाणक्याने पुढीलप्रमाणे सांगितला आहे – ब्राह्मण साक्षीदाराला उद्देशून 'खरे सांग' एवढेच म्हणावे. क्षत्रिय व वैश्य यांना म्हणावे, की 'खोटी साक्ष दिलीस तर तुला यज्ञाचे पुण्य मिळणार नाही.' शूद्राला म्हणावे 'खोटे बोलशील तर तुझे पूर्वजन्मातील व पुढच्या जन्मातील पुण्य राजाला मिळेल आणि तुला पाप लागेल. शिवाय शिक्षा होईल ती वेगळीच. कारण आज ना उद्या सत्य उघडकीला येईलच' (अ. ६८). साक्षीदाराने साक्ष द्यायचे नाकारल्यास त्याला दंड करीत.

साक्षीदारांनी दिलेल्या साक्षीत परस्परविरोध दिसून आला तर बहुमतानुसार निर्णय द्यावा हा ढोबळ नियम होता. परंतु न्यायमूर्तींनी त्यांना जे साक्षीदार सज्जन व प्रामाणिक वाटतील त्यांच्या मताप्रमाणे निर्णय द्यायला हरकत नाही, असा एक आदर्शवादी नियमही चाणक्याने सांगितला आहे.

खोटी साक्ष देणाऱ्या व्यक्तीबद्दल निरनिराळ्या धर्मशास्त्रकारांनी थोड्याफार शिक्षा सांगितल्या आहेत. मनूच्या मते द्रव्यलोभाने, पशुलोभाने, भयाने, कामासक्तीने किंवा मैत्रीने मनुष्य खोटी साक्ष द्यायला प्रवृत्त होतो. कारणांच्या अनुरोधाने त्याला शंभर पणांपासून अडीच हजार पणांपर्यंत दंड करावा, असे त्याचे मत आहे. परंतु चाणक्याचे मत वेगळे आहे. अशा खोट्या साक्षीदाराला केवळ चोवीस पण दंड करावा, असे तो सुचवतो. खोट्या व्यवहारात साक्ष दिली, तर अर्धा पण दंडावरच त्याने भागवले आहे. खोटे साक्षीदार कसे शोधून काढावे यासंबंधी त्याने काही निकषही सांगितले आहेत (अ. ८१). अशा प्रकारच्या कूट साक्षीदारांची गणना चाणक्याने ग्रामकंटकांत केली आहे.

एखाद्या साक्षीमुळे एखाद्याचा मृत्यू ओढवणार असेल, तर त्या साक्षीत प्राणरक्षणासाठी खोटे बोलायला हरकत नाही, असे

मनूचे व याज्ञवल्क्याचे मत आहे. या उभयतांनी या अनृताच्या प्रायश्चित्तासाठी एक याग करायला सांगितला आहे.

साक्षीदाराला भत्ता द्यावा व त्याच्या वाटखर्चाबद्दल वादाच्या मानाने कमीअधिक रक्कम द्यावी, असे चाणक्याने सुचविले आहे (अ. ५८). शिवाय साक्षीदार फार दूर राहत नसल्यास ज्यान त्याने आपापला साक्षीदार आणावा; पण जे घराबाहेर पडत नाहीत किंवा दूर राहतात, त्यांना सरकारी हुकुमाने आणावे, असाही एक उपाय कौटिल्याने सांगितला आहे.

साक्ष द्यायला कोणी नसतील, तर किंवा साक्षीच्या पुराव्यावर विसंबून निकाल देणे कठीण वाटत असेल, तर न्यायाधीश प्राचीन काळी सत्यशोधनासाठी शपथांचा अवलंब करीत असत. मनूने शपथेला पर्याय म्हणून निरनिराळ्या दिव्यांचा निर्देश केला आहे. दिव्य या न्यायप्रकारामागे ईश्वर हा सर्वसाक्षीदार आहे, हे तत्त्व गृहीत धरलेले असते. म्हणून त्याच्यावर भरवसा टाकून जो निर्णय घेतला जाईल, तो खरा समजावा अशी एक समजूत होती. पंचमहाभूते ही कायमची साक्षीदार आहेत, अशी धारणा असे (म.भा. आदि. ५.२७). मनूने अंतरिक्ष, पृथ्वी, पाणी, आत्मा, सूर्य, चंद्र, हृत, अंतक, अग्नी, रात्र, दोन्ही संध्या व धर्म हे सर्व कृत्यांचे साक्षीदार आहेत, असे म्हटले आहे. [ प्रा. भा. रा.; अर्थशास्त्र – संपा. श्री. करंदीकर, हिवरगांवकर; याज्ञवल्क्यस्मृति, भाषांतर – श्री. विष्णुशास्त्री बापट; पे. का. म. ]

## साक्षात्कार

ईश्वराचे प्रत्यक्ष दर्शन अथवा अपरोक्ष प्रातिभ अनुभूती. परमेश्वराचे अशा प्रकारे दर्शन होऊ शकते आणि जीवनाचे अंतिम ध्येय हेच होय, या विचारसरणीला साक्षात्कारवाद असे म्हणतात. या वादात शांतपणाने व समाधानाने ईश्वरचिंतनाचा आनंद उपभोगणे ही कल्पना अंतर्भूत असते.

ईश्वर हा बुद्धी, मन, इ. इंद्रियांच्या अतीत असल्याने त्याचे ज्ञान होत नाही किंवा तो श्रद्धेचा विषय असल्याने त्याची अनुभूती घेता येत नाही, असे स्पेन्सर, कांट, इ. पाश्चात्य विचारवंतांचे मत आहे. उपनिषदांतील तत्त्वज्ञानानुसार परमेश्वर प्रत्येकाच्या अंतर्यामी आहे व योग्य मार्गाने आपण सतत, दीर्घकाल व निश्चित प्रयत्न केले,तर त्याचा साक्षात्कार होऊ शकतो.

बुद्धी, भावना व क्रियाशक्ती यांच्या पलिकडे असणाऱ्या व परतत्त्वाने स्पर्श केलेल्या प्रतिभेच्या साहाय्याने साक्षात्कार घडू शकतो, एवढेच नव्हे; तर साक्षात्कार हे प्रतिभेचे कार्य आहे, असे संतमत आहे. उचित अनुग्रह झाला आणि आपण साधन केले म्हणजे प्रतिभा जागी होऊन तिच्यामुळे साक्षात्कार होतो.

प्रतिभेमुळे होणाऱ्या साक्षात्काराच्या पद्धतीत अंतःस्फूर्ती आणि अतींद्रियता या कल्पना असतात. बाहेरून इंद्रियद्वारा येणारा अनुभव महत्त्वाचा नसतो. अंतःस्फूर्त अनुभव हाच महत्त्वाचा असतो. साधकाला परमेश्वराच्या रूपाचे दर्शन होणे, अनाहत नाद ऐकू येणे, अमृताचा आस्वाद घेता येणे, आंधळ्याने पाहणे किंवा बहिऱ्याने ऐकणे हे अनुभव अंतःस्फूर्त असतात. ते अतींद्रिय असले तरी प्रत्यक्षासारखे असतात. तो आभास नसतो किंवा वर्णन ऐकून मनापुढे आलेले चित्र नसते. तो कविकल्पनेसारखा अनुभव नसतो; तर अगदी प्रत्यक्षासारखाच असतो.

हे अनुभव सत्य असतात, असे गुरुदेव रा. द. रानडे यांचे मत आहे. त्यांनी त्याच्या सत्यतेचे निकष पुढीलप्रमाणे सांगितले आहेत –

(१) शरीरशास्त्राच्या दृष्टीने आत्मानुभवातील प्रत्यक्षता हे पहिले प्रमाण होय.

(२) मानसशास्त्रमते अखंडपणा, सातत्य हे त्याच्या सत्यतेचे दुसरे प्रमाण आहे. कोणत्याही स्थळी, काळी किंवा जागृती, स्वप्न व तुर्या या अवस्थांमध्येही त्यात खंड पडता कामा नये. अनुभव आज आला आणि उद्या नाही, तर तो आत्मानुभव नव्हे. शिवाय तो नित्य वाढला पाहिजे. त्यात वाढ नसेल तर त्याला अखंड, अव्यय म्हणता येणार नाही. साक्षात्कारातील ही वाढ भक्तीवर अवलंबून असते. भक्तीमुळे साक्षात्कार लवकर व्हायला मदत होते. सुषुप्ती अवस्था ही जड म्हणजे अज्ञानासारखी असते. त्यामुळे या अवस्थेत आत्मदर्शन घडत नाही. जागृती व तुर्या या अवस्थांमध्ये साक्षात्कार अवघड असला तरी अशक्य नसतो.

(३) सर्व साक्षात्कारी महानुभावांच्या आत्मानुभवांची एकरूपता आणि सार्वत्रिकता हे सत्यतेचे महत्त्वाचे प्रमाण आहे.

(४) साक्षात्कारापासून होणारा आनंद हे त्याचे एक निर्विवाद प्रमाण आहे. म्हणून आत्मानंद देणारा आत्मानुभव हे परमसत्य आहे.

(५) साक्षात्कारी पुरुषाची बुद्धी, भावना व क्रियाशक्ती यांच्यांत वाढ होते. ते आत्मतृप्त होतात. प्रत्येक साधकात या सर्व गोष्टींची पूर्ण वाढ अपेक्षित असते, असे नाही; तर त्यांपैकी एखाद्या शक्तीचा तरी भरपूर विकास होणे अवश्य असते. आणि तसे नसेल तर त्याला खरा साक्षात्कारी पुरुष म्हणता येणार नाही. विचारातील गोंधळ नाहीसा होणे हा बौद्धिक साक्षात्कार आहे. ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीसारखी अमर कृती निर्माण केली, त्याचे कारण साक्षात्काराने कुशाग्र झालेली त्यांची बुद्धी, हे होय. शुद्ध, उत्कट व विपुल भावना असल्यावाचून साक्षात्काराची आशाच नसते. ईश्वराबद्दलचे अनन्यप्रेम हे साक्षात्काराच्या सत्यतेचे प्रमाण आहे. व्यक्तीची व समाजाची नैतिक उन्नती घडवि-

ण्याचे सामर्थ्य साक्षात्कारात असते. ईश्वराच्या दर्शनाने, चिंतनाने त्याच्यासारखेच सुंदर विचार व सद्‌गुण निर्माण होतात.

ईश्वराच्या ध्यानाने त्याचे मोठेपण व आपली क्षुद्रता ध्यानी येते. त्याचा परिणाम म्हणून आपल्या अंगी नम्रता येते; जीवन सद्‌गुणसंपन्न होते. आत्मानुभवी पुरुष अंत:प्रवृत्तीशी प्रतारणा करीत नाही.

ज्याला 'अहं ब्रह्मास्मि' हा साक्षात्कार झाला आहे, अशा सद्‌गुरूची साक्षात्कारासाठी फार आवश्यकता असते, असे सर्व संत सांगतात. सद्‌गुरूच्या मार्गदर्शनावाचून हा अनुभव येणे शक्य नसते. गुरू स्वत: ईश्वराचे स्वरूप पाहतात आणि ते शिष्याला दाखवितात. ते अनाहत नाद ऐकतात आणि शिष्यालाही ऐकवितात. परमार्थाच्या मार्गातील अनंत अडचणी ते दूर करू शकतात.

अशा अधिकारी सद्‌गुरूकडून मिळालेला नाममंत्र हा ईश्वरप्राप्तीचे साधन ठरतो. सदगुरूचे हेच प्रधान कार्य होय. अन्य संतही नामस्मरणाची दीक्षा देऊ शकतात, पण ज्या नाममंत्राच्या योगाने ईश्वर जोडला जातो असे सबीज नाम फक्त सद्‌गुरूच देऊ शकतात, असे गुरुदेव रानडे यांचे मत आहे. याविषयी संत तुकाराममहाराज यांचा एक अभंग असा –

> **राम राम राम अवघेचि म्हणती ।**
> **कोणी न जाणती आत्माराम ।।**
> **राम हा कालचा सुत दशरथाचा ।**
> **अनंत युगाचा आत्माराम ।।**
> **रामासी हा राम ठावे जरी असता ।**
> **शरण कां जाता वसिष्ठासि ।।**
> **तुका म्हणे राम तुझा तुजपाशी ।**
> **विचारूनी घेसी गुरुमुखे ।।**

जो नाममंत्र साक्षात्काराच्या वाटेने जातो तोच खरा नाममंत्र होय. या नामाचे ध्यान करताना ते आपोआप, त्याला कल्पना नसताना किंवा त्याने विचार न करताही साधकाच्या अनुभवाला येते. यालाच काहीजण दिव्य नाम असे म्हणतात. निंबर्गीमहाराज म्हणतात, 'हे नाम म्हणजे देहधारी देवच होय.' सद्‌गुरूकडून मिळालेल्या नामस्मरणाची वाढ सत्संगतीने होते. सत्संगतीवाचून परमार्थातील प्रगती अशक्य असते.

पूर्ण साक्षात्कार होण्यासाठी साधकाला एका विशिष्ट निराशेच्या अवस्थेतून जावे लागते. साधकाच्या साधनेतील हे एक अटळ अंग असून, ते सार्वत्रिक आहे. दुर्दैवाचे शारीरिक व मानसिक आघात सहन करावे लागले नाहीत असा संत विरळा! त्या आघातांमुळे विलक्षण निराशा उत्पन्न होते. ही निराशेची रात्र म्हणजे सूर्योदयानजीकचा काळ, असे म्हटले जाते. कारण या स्थितीतही साधकाच्या मनाची तळमळ सारखी वाढत असते.

साक्षात्कारवादात मधुराभक्तीला स्थान नाही; त्याचप्रमाणे स्वप्नात होणाऱ्या दर्शनांनाही फारसे मोल नाही, असे गुरुदेव रानडे यांचे मत आहे.

मनुष्याच्या मनात साक्षात्काराची म्हणजे ईश्वरदर्शनाची अनावर ओढ का निर्माण होते, तिचा विकास कसा होतो व त्याला पूर्णता कशी येते, याचीही अनेक कारणे आहेत. जीवनातील दैन्य, दु:ख, जरा, मृत्यू, इ. संकटांतून पार पडण्यासाठी ईश्वरसान्निध्य हा एकच मार्ग आहे, असे सांगितले जाते. मृत्यूच्या व दु:खाच्या जाणिवेने अगतिक झालेला संत नामदेव म्हणतो –

> **अंतकाळी मी परदेशी । ऐसे जाणोनी मानसी ।**
> **म्हणोनिया हृषीकेशी । शरण तुजसी मी आलो ।।**
> **नवमास गर्भवासी । कष्ट झाले त्या मातेसी ।**
> **ते निष्ठुर झाली कैसी । अंती दूर राहिली ।।**
> **बहिणी बंधूंचा कळवळा । ते तूं जाणसी रे दयाळा ।**
> **जेव्हा लागली यमशृंखळा । तेव्हा दूर राहिली ।।**
> **कन्या पुत्रादिक बाळें । ते तव स्नेहाची स्नेहाळे ।**
> **तुझ्या दर्शनाहूनि व्याकुळे । अंती दूर राहिली ।।**
> **मित्र आले गोत्रज आले । तेहि स्मशानी परतले ।**
> **मी तव जळतसे स्मशानी । अग्नीसवे एकला ।।**
> **ऐसा जाणोनी निर्धार । मज आला गहिंवर ।**
> **तंव दाही दिशा अंधकार । मज काही न सुचे ।।**
> **नामा म्हणे तुझे पायी । ठाव देई विठोबा ।।**

जीवनातील अस्थिरता, चिंता, विषयासक्ती, लोभ, यांच्या विकृत परिणामांच्या जाणिवेमुळे माणूस परमार्थाकडे वळतो. याला पुनर्जन्मातील दु:खे, अटळ प्रारब्धगती हेही एक कारण आहे. पापाची जाणीव त्याच्या जोडीला असते. शिवाय ईश्वराच्या अगाध सामर्थ्याने माणूस अवाक् बनतो आणि त्याच्या प्राप्तीसाठी धडपडतो.

अशा प्रकारे आध्यात्मिक जीवनाला प्रारंभ झाल्यावर त्यात यश प्राप्त व्हावे म्हणून काही नैतिक आचरण आवश्यक असते. लोकेषणा, संशय, परस्त्रीची अभिलाषा, आचारभ्रष्टता, दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, कठोरता, अज्ञान, इ. गोष्टींचा त्याग करावा लागतो आणि सद्‌गुण संपादावे लागतात. शिवाय अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, करुणा, समता, क्षांती, आर्जव, आचार्योपासना, शुचित्व, स्थैर्य, वैराग्य, इ. गुणांची अंगी वाढ करावी लागते.

साक्षात्कारासाठी आवश्यक असणारी नैतिक तयारी झाली की देव-भक्तांचे एक नाते निर्माण होते. ईश्वराला भक्तांइतके दुसरे काहीही प्रिय असत नाही. तो आपल्या हृदयात भक्ताला

स्थान देतो आणि त्यांच्या योगक्षेमाचीही चिंता वाहतो. भक्ताने भक्तिभावाने काहीही अर्पण केले तरी तो आनंदाने त्याचा स्वीकार करतो. त्यांच्यांतील कलहांचा शेवट गोड होतो. तो भक्तांचे संकट दूर करतो. जन्म-मृत्यूंच्या लाटेवर त्याला हेलकावे खाऊ देत नाही.

अखंड भक्तिभावाने नामसाधन करून साधकाला ज्या प्रकारचे आत्मानुभव येतात त्या प्रकारावरून त्यांचे वर्ग कल्पिले जातात. अर्थात एकाच साधकाला अनेक प्रकारचे अनुभव येणे शक्य असते. रूपदर्शी, तेजोदर्शी, वर्णदर्शी, नादश्रवा व रसास्वादी असे त्यांचे वर्ग कल्पिले आहेत. स्पर्शानुभव व गंधानुभव हे फार थोडचा साधकांना येतात.

साधकाला प्रारंभी येणारा रूपाचा अनुभव बिंदुलयाच्या स्वरूपात असतो. या अनुभवाला आध्यात्मिक अणू असे म्हटले जाते. 'तिळायेवढा बिंदू' असा ज्ञानदेवांनी याचा उल्लेख केला आहे. अन्य संतही मोती, रत्न, प्रवाल, लाल या प्रकारांत या रूपाचे वर्णन करतात. शून्याच्या स्वरूपातला आत्मानुभव ज्ञानदेव, जनार्दनस्वामी, तुकाराम, इ. संतांनी वर्णिला आहे. याशिवाय डोळ्याचे दर्शन, ईश्वराच्या चरणांचे दर्शन, हेही फार मोठे अनुभव आहेत. देवाचे आपादमस्तक दर्शन तर फार दुर्लभ आहे.

तेजाच्या व वर्णांच्या स्वरूपातला ईश्वराचा अनुभव हा एक महत्त्वाचा प्रकार आहे. ज्ञानदेवांना ईश्वराच्या अनेक रंगांचे दर्शन झाले होते. उदा०—

> नीळवर्ण तनु नीळवर्ण गुणू ।
> निळी निळिमा पूर्ण हृदयी नांदे ।।

अनाहत नादाच्या स्वरूपातला आत्मानुभवही अनेकांनी वर्णन केलेला आढळतो. हा नाद कुठून येतो, कुठे जातो हे कळत नाही. "आपल्या जीवनाला अनाहत नादापासून व्यवस्थित वळण लागले", असा उल्लेख गुरुदेव रानडे यांनी केला आहे.

एकाग्रतेने ध्यान होत असता अनुभवाला येणारा रामरस म्हणजे अमृतरस फार मोलाचा आणि क्वचितच अनुभवाला येणारा असतो, असे कबीर म्हणतो. या अमृतरसाची गोडी अवीट असते. याचे सेवन करणारा साधक स्वतःच रस होतो व रसातच विलीन होतो. या अमृतमय रसाचे निर्मितिस्थान ईश्वर असून, तो ईश्वराचा गुण म्हणून स्रवतो.

स्पर्शानुभव, गंधानुभव हा फार विरळा असतो. संत रामानंदांना आणि निवृत्तिनाथांना गंधानुभवाच्या स्वरूपातला साक्षात्कार घडला होता, अशी श्रद्धा आहे. कधी कधी या सर्व अनुभवांचा संमिश्र अनुभव येतो. कनकदासाला झालेले वैकुंठदर्शन हे या अनुभवाचे चांगले उदाहरण म्हणून सांगितले जाते.

आत्मसाक्षात्कार किंवा स्वरूपसाक्षात्कार हा साधकाचा उच्चतम अनुभव होय. देव व भक्त यांच्यांतील द्वैताचा निरास होणे, आत्माच सर्वत्र भरलेला आहे, ब्रह्म एकमेवाद्वितीय आहे; सर्व काही मीच आहे असा अनुभव त्यात येतो.

साक्षात्काराचे परिणाम — साक्षात्कारी पुरुषांजवळ जायला काळ भितो. त्याचे काम, क्रोध आणि मद नष्ट होतात. शिवाय त्याची अनेक युगांची तृष्णा शमते. कर्म, भ्रम, पाप व रोग दूर जातात. आनंद हा साक्षात्काराचा मोठा परिणाम आहे. या आनंदाचे वर्णन छांदोग्य उपनिषदात (२.२२.२५) पुढीलप्रमाणे आहे — जेव्हा सर्वत्र आत्मा परिपूर्ण भरलेला दिसतो, दुसरे काहीही प्रत्ययाला येत नाही, तेव्हा जे सुख होते ते खरे सुख होय. गीतेतदेखील आनंद व शांती हेच साक्षात्काराचे परिणाम म्हणून सांगितले आहेत (६.२१–२२). ज्ञानदेवांनी आत्मलाभासारखे गोमटे असे दुसरे काहीच नाही, असे म्हटले आहे. साक्षात्कारी पुरुषांना कोणतीच भीती उरत नसते. त्यांच्या वासनांचा नाश होऊन अनासक्ती हा गुण त्यांच्या अंतःकरणांत दृढ होतो. जगातील व्यवहाराचे आपण निमित्तमात्र कारण आहोत, असा विश्वास साक्षात्कारी पुरुषाच्या मनात बळावलेला असतो.

आत्मसाक्षात्कारावाचून माया व भ्रम यांचा निरास होऊ शकत नाही. जीव–ब्रह्मैक्य, केवलाद्वैत, सर्वात्मभाव हे साक्षात्काराचे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने घडणारे परिणाम आहेत. मुक्ती हा त्यांतलाच एक भाग आहे. साक्षात्कारानंतर असे पुरुष केवळ उपकारासाठी जगत असतात. साक्षात्काराच्या सामाजिक परिणामांचे मूलगामी विवेचन करीत असताना गुरुदेव रानडे लिहितात —

"जेव्हा जेव्हा व जेथे जेथे ईश्वराचा संदेश प्रसृत करणे शक्य आहे, तेव्हा तेव्हा व तेथे तेथे तो प्रसृत करणे हेच साक्षात्कारी पुरुषाचे कर्तव्य उरते व ठरते. एक ईश्वर, एक विश्व, एक मानवता, हाच त्यांच्या आचाराचा आधारभूत सिद्धांत असावा, ईश्वराधिष्ठित विश्वबंधुत्व हेच त्यांचे ब्रीदवाक्य असले पाहिजे. ईश्वर एकच आहे, तो सर्वत्र भरलेला आहे, हा साक्षात्कार ज्याला झाला, तो पुरुष, ईश्वराच्या ऐश्वर्याचे जगाला ज्ञान व्हावे, एवढेच नव्हे तर, ईश्वराच्या ऐश्वर्याची जगाला प्राप्ती व्हावी, या एकाच कार्याला आपल्याला वाहून घेतल्याशिवाय राहणार नाही."

जीवनाला धन्य व परिपूर्ण करणारे विश्वकल्याणकारी असे हे साक्षात्काराचे तत्त्वज्ञान आहे. [ गु. रा. सा. त. सो.]

**साक्षीगोपाल** ओडिसा राज्यातील एक वैष्णव क्षेत्र. खुर्दा रोड-जगन्नाथपुरी लोहमार्गावर, पुरीपासून

दहा मैलांवर साक्षीगोपाल नामक स्थानक आहे, तिथून अर्धा मैल दूर साक्षीगोपालाचे मंदिर आहे. मंदिराजवळ यात्रेकरूंच्या निवासासाठी धर्मशाळा, स्नानसंध्येसाठी चंदन नावाचा तलाव आणि मंदिराच्या दोन्ही बाजूंना श्यामकुंड व राधाकुंड नावाची दोन सरोवरे आहेत. मंदिरद्वारी गरुडस्तंभ असून, जवळच राधेचेही मंदिर आहे. मंदिरात गोपाळकृष्णाची मनोहर मूर्ती आहे. या स्थानाविषयी एक कथा सांगितली जाते, ती अशी –

पुरीजवळच्या एका गावातील एक वृद्ध ब्राह्मण एकदा तीर्थयात्रेला निघाला. त्याला सोबत आणि मदतनीस म्हणून एक ब्राह्मण तरुणही निघाला. मार्गात त्या तरुणाने वृद्धाची मनोभावे सेवा केली. त्यामुळे तो वृद्ध त्या तरुणावर फार प्रसन्न झाला. वृंदावनाला पोचल्यावर तो त्या तरुणाला म्हणाला. 'घरी परतल्यावर मी तुला माझी मुलगी देईन.'

परंतु यात्रेहून परतताच ब्राह्मण दिलेले वचन विसरला. कारण तो श्रीमंत होता आणि तो तरुण गरीब होता. वृद्ध माणूस आपले वचन पाळीत नाही, असे पाहिल्यावर ब्राह्मण तरुणाने सरळ गावपंचायतीपुढे आपले गाऱ्हाणे मांडले. पंचांनी विचारले. 'कुणाच्या साक्षीने या वृद्धाने तुला हे वचन दिले? त्या साक्षीदाराला तू घेऊन ये.' तरुण म्हणाला. 'गोपाळकृष्णाच्या साक्षीने याने मला वचन दिले. हवे तर मी त्याला इथे घेऊन येतो.' हा तरुण मोठा कृष्णभक्त होता. आपण आपल्या या कसोटीच्या प्रसंगी गोपाळकृष्णाला साक्षीसाठी बोलावले, तर तो नक्की येईल असा त्याचा दृढविश्वास होता. त्याने मग गोपालकृष्णाला कळवळून साकडे घातले. कृष्ण प्रसन्न होऊन त्याला म्हणाला. 'मी तुझ्यासाठी साक्षीला येतो. तू पुढे चाल. मी मागाहून येईन. माझ्या चरणींचा नूपुरध्वनी तुला ऐकू येईल. मात्र एक लक्षात ठेव, तू मागे पाहता उपयोगी नाही. मागे पाहशील तर मी तिथेच स्थिर होईन.' तरुणाने ते मान्य केले. मग पुढे तो आणि मागे गोपालकृष्ण असा त्यांचा प्रवास सुरू झाला. फुलअलसा गावाजवळ आल्यावर मार्गातील वाळूत गोपाळकृष्णाचे पाय रुतले व त्यामुळे नूपुरध्वनी थांबला. तरुणाने भान न राहून मागे पाहिले, गोपालकृष्ण तिथेच स्थिर झाला.

तरुण मग धावत पळत गावात आला आणि पंचांना घेऊन गोपालकृष्ण थांबला होता तिथे गेला. पंचांची खात्री पटली. तरुणाला हवी ती मुलगी मिळाली.

पुढे कटकच्या राजाने ही गोपालकृष्णाची मूर्ती जगन्नाथपुरीच्या मंदिरात नेऊन स्थापन केली. परंतु यात्रेकरू जगन्नाथासाठी आणलेला नैवेद्य या गोपालकृष्णापुढेच ठेवू लागले. त्यामुळे जगन्नाथाने आपल्या भक्तांच्या स्वप्नात जाऊन, आपल्याला पडणाऱ्या उपासाची तक्रार त्यांच्या कानी घातली. मग गोपालकृष्णाची मूर्ती भक्तांनी तिथून उचलली आणि दुसरे साक्षीगोपालाचे मंदिर उभे करून त्यात स्थापली.

कार्तिक शुक्ल नवमीला इथे राधादर्शनाचा मोठा सोहळा होतो. [ कल्याण–तीर्थांक ]

**सिंगफो** आसाममधील एक जमात. ब्रह्मदेशात इरावतीच्या काठी काख्येन किंवा ककू नावाचे लोक वसलेले आहेत. त्यांच्यापैकी काही टोळचांनी इ. स.च्या १८ व्या शतकात आसाममध्ये प्रवेश केला आणि ईशान्य आसामातील तेंगपाणी व नामरूप या भागांत वसाहती केल्या. याच लोकांना सिंगफो म्हणतात.

आसामचा राजा गौरीनाथ सिंग याच्या राजवटीत महामारिया लोकांनी बंड केले होते; ते त्याने सिंगफोंच्या मदतीने शमवले. त्यामुळे तिथल्या शेतकऱ्यांनी सिंगफोंचे स्वागत केले. पण पुढे इ. स. १८१७ मध्ये ब्रह्मी सैन्याने आसामवर स्वारी केली, तेव्हा सिंगफोंनी आसामी शेतकऱ्यांना लुटले आणि हजारो लोकांना गुलाम म्हणून पकडून नेले. तसेच महामारियांबरोबर सिंगफोही सखल भागात शिरून लुटालूट व जाळपोळ करू लागले. त्यामुळे आसामी शेतकऱ्यांना त्यांची फार दहशत वाटू लागली. पुढे ब्रिटिश सेनापथकांनी अनेकदा सिंगफोंच्या खेडयांवर हल्ले करून तिथे जाळपोळ केली आणि सिंगफोंच्या तावडीतून हजारो आसामी शेतकरी गुलामांची सुटका केली.

इंग्रजांनी आसामात सत्ता प्रस्थापित केल्यावरही अनेक वर्षे सिंगफो त्यांना त्रास देत असत. इ. स. १८४३ मध्ये सिंगफोंनी इंग्रजांविरुद्ध मोठे बंड केले. तेव्हा इंग्रजांनी एक कमिशन नेमून सिंगफोंच्या असंतोषाची कारणे शोधून काढली व योग्य ते उपाय योजून सिंगफोंना शांत केले.

हे लोक मंगोलियन वंशाचे असून, त्यांचे डोळे व भुवया खूप तिरकस असतात. जिवणी रुंद, गालाची हाडे वर आलेली आणि चेहरा चौकोनी असतो. यांचा रंग पिंगट किंवा पिवळसर असतो. सिंगफोंची शरीरे उंच व पिळदार असतात. त्यांच्या अंगी ताकदही मोठी असते. त्यामुळे ते खूप कष्टाची कामे करू शकतात.

यांच्या दहा-पंधरा टोळ्या आहेत. टोळीप्रमुखावरूनच टोळीचे नाव ठरते. प्रत्येक टोळीचे जीवन स्वतंत्र असते. लढण्याच्या प्रसंगी मात्र त्या एकत्र येतात. ही जमात सामान्यपणे जंगली व अडाणी मानली जात असली, तरी तिच्यात एक खानदानी वर्गही आहे.

सिंगफोंच्या भाषेत अबोर, ब्रह्मी व मणिपुरी भाषांतील बऱ्याच शब्दांचा भरणा झालेला आहे. त्या भाषेचे व्याकरण मात्र ब्रह्मी भाषेच्या व्याकरणासारखे आहे.

या जमातीची विभागणी पाच गोत्रांत झालेली आहे. त्यांतील

प्रत्येक गोत्राच्या कक्‌ू व सिंगफो अशा दोन शाखा असतात.

**वेषभूषा** – हे लोक आपले केस डोक्यावर घेऊन त्यांची गाठ बांधतात. ते सुती लुंगी नेसून कुडते घालतात. त्यांचे कपडे रंगीत



सिंगफो टोळी–प्रमुख

असून, लुंगीवर चौकटी असतात. टोळीप्रमुख ब्रह्मी पद्धतीचा पोषाख करतात. कधी ते चिनी पद्धतीचे मखमलीचे जाकिटही घालतात. त्याच्या गुंड्या सोनेरी किंवा स्फटिकाच्या असतात.

विवाहित स्त्रिया डोक्यावर केसांची गाठ बांधतात व तिच्याभोवती चांदीची साखळी घालतात. अविवाहित मुली मात्र मानेवर केसांची गाठ बांधतात. त्या गळ्यांत मण्यांच्या माळा व कानांत स्फटिकांचे तुकडे घालतात. विवाहित स्त्रिया पायांवर व पुरुष हातांवर थोडेसे गोंदून घेतात.

स्त्रियाही रंगीत लुंगी नेसतात आणि लाल व निळ्या रंगाचे उभे पट्टे असलेली जाकिटे घालून त्यावर गळपट्टा गुंडाळतात.

**घरे** – या लोकांची घरे गोठ्यासारखी लांब असून, भिंती बांबूच्या व छपरे बांबूच्या पानांची असतात. घरे जमिनीपासून ४–५ फूट उंच बांधलेली असतात. एका मोठ्या घरात अनेक कुटुंबे राहतात. शेतीची अवजारे दाराशी ठेवलेली असतात. घराभोवती कोंबडी, डुकरे वावरत असतात. टोळी-प्रमुखाचे घर मात्र खूप मोठे असते. त्याचे खांबही मोठे असतात व त्यात अनेक खोल्या असतात.

**उद्योगधंदे** – शेती, विणकाम, शस्त्रे बनवणे, इ. उद्योग हे लोक करतात. लोखंड ओतून किंवा घणाने ठोकून ते विविध प्रकारची हत्यारे बनवतात. ते डाओ नावाच्या लहान तलवारी बनवतात. त्यांचा उपयोग त्यांना लढाईच्या वेळी होतो; तसाच जंगल साफ करण्यासाठीही होतो. त्या आयुधाला सरहद्दीवरील प्रदेशात बरीच मागणी असते. ते हाडांचा भाला व तिरकमठा ही आयुधेही बनवतात. तसेच गेंड्याच्या कातडीपासून मोठाल्या ढाली व शिरस्त्राणेही तयार करतात.

**कलाकुसर** – सुंदर शस्त्रांप्रमाणेच हे लोक इतर वस्तूही चांगल्या बनवतात. माकडाच्या कातड्याच्या पिशव्या ते फार आकर्षक बनवतात. स्त्रिया वस्त्र विणण्यात व रंगविण्यात कुशल असतात. वस्त्र विणून किंवा त्यावर कशिदा काढून त्या सुंदर पिशव्याही बनवतात.

**देवधर्म** – सिंगफोंच्या परमेश्वराविषयीच्या कल्पना अस्पष्ट आहेत. त्यांचा स्वतःचा असा धर्म नाही. ज्या ज्या लोकांशी त्यांचा संबंध आला, त्या त्या लोकांच्या धर्मातून त्यांना जे चांगले वाटले, ते त्यांनी घेतले. त्यामुळे त्यांचा धर्म म्हणजे अनेक धर्मांचे मिश्रण झाले आहे. तथापि हे लोक स्वतःला बुद्धाचे उपासक समजतात. त्यांच्या गावांत बुद्धमंदिरे व भिक्षू (पुजारी) आढळतात. गावात रोगराई पसरली किंवा दुष्काळ वगैरे संकटे आली, तर ते मेघदेवतेची पूजा करतात. भुताखेतांनाही हे लोक भजतात व त्यांना संतुष्ट करण्यासाठी कोंबडी, डुकरे व कुत्री बळी देतात. एखाद्या मोठ्या मोहिमेवर निघताना ते रेड्याचाही बळी देतात.

**विवाहप्रथा** – यांच्यांत अनेक बायका करण्याची चाल आहे. आई व बहीण वगळून नात्यातील कोणत्याही स्त्रीशी त्यांना लग्न करता येते. ते सावत्र आईशीही लग्न करू शकतात. भावजयीशी विवाह सर्रास रूढ आहे. गुलाम स्त्रियांशीही त्यांचे घनी संबंध ठेवतात आणि त्यांच्या मुलांमुलींना औरस मुलांप्रमाणेच वागवतात. यांच्यांत प्रौढ विवाह रूढ आहेत.

विवाह समारंभांत नवरा मुलगा वधूच्या आईवडिलांना एक लहान तलवार, एक मखमलीचे जाकिट, एक रेशमी धोतर व एक गुलाम देतो. श्रीमंत लोक सोने, चांदी, म्हशी व अनेक गुलाम देतात. वरपक्ष सर्वांना भोजन घालतो. देवधी म्हणजे पुरोहित काही धार्मिक विधी करतो. वधूला वराच्या हवाली करताना तिचे आईवडील तिच्या अंगावरचे दागिने काढून घेतात.

यांच्यांत घटस्फोटाची चाल आहे. व्यभिचार हे घटस्फोटाचे कारण असेल, तर व्यभिचारी पुरुषाला प्रेयसीच्या पतीला नुकसानभरपाई द्यावी लागते. त्यासाठी तो काही देऊ शकत नसल्यास त्याला तुरुंगवास भोगावा लागतो. अविवाहित स्त्रीशी अनैतिक संबंध केल्यामुळे ती गरोदर राहिल्यास पुरुषाला तिच्या आईबापांना गुलाम व म्हैस द्यावी लागते. होणाऱ्या मुलावर त्याचा हक्क असतो; पण त्या स्त्रीशी लग्न करण्याचे बंधन नसते. कुमारिकांना बरेच लैंगिक स्वातंत्र्य असते.

**मृतकप्रथा** – हे लोक सामान्यपणे प्रेते पुरतात. पण बाळंतपणी मेलेल्या स्त्रीचे प्रेत जंगलात नेऊन जाळतात. एखाद्याने आपले प्रेत जाळावे अशी इच्छा व्यक्त केली, तर त्याचे प्रेत जाळतात. टोळीप्रमुख मरण पावला, की त्याचे प्रेत प्रथम एका लाकडी पेटीत ठेवतात. त्याच्या डोक्यावर थोडे सोने किंवा चांदी ठेवतात. प्रेताला स्नान व नवीन कपडे घालतात. नंतर सर्व नातेवाईक जमा झाल्यावर ते प्रेत जाळतात व त्याची रक्षा एका करंडकात ठेवतात.

अंत्यसंस्कारात देवाला कोंबडा, डुक्कर किंवा मासा बळी देतात. टोळीप्रमुखाच्या अंत्यसंस्कारात अनेक विधी करतात. देवघी मयतासाठी प्रार्थना व मंत्र म्हणतो. मग मयतासाठी मोठी मेजवानी देण्यात येते. तिच्यासाठी रेडे, कोंबडे, डुक्कर, हरणे मारली जातात. दारूचा वापरही मोठ्या प्रमाणात केला जातो. [ इं. स्ट. पा. प्रे., जाने. १९६०; इं. नॉ. फ्राँ. ना. सें. ]

**सिंगाजी** (इ. स. १५१९–१५५९) निमाड प्रदेशातील एक श्रेष्ठ संतकवी. हा पूर्वीच्या मध्यभारतातील बडवानी राज्याच्या (आताचे प. निमाड) खजूरी नामक एका लहानशा गावी जन्मला. याच्या वडिलांचे नाव भीमाजी व आईचे गौरीबाई. भीमाजी जातीने आणि व्यवसायाने गवळी होता. सिंगाजी पाच वर्षांचा असताना भीमाजीने खजूरी गाव सोडले व तो (आताच्या) पूर्व निमाडमधील हरसूद नामक गावी मुलाबाळांसह जाऊन स्थायिक झाला.

सिंगाजीची मनोवृत्ती बालपणापासून वैराग्यशील विचारांनी भारावलेली होती. वाढत्या वयाबरोबर त्याची ही वृत्ती वाढतच गेली. दिवसचे दिवस तो विमनस्कपणे वावरू लागला. भीमाजीने त्याला गुरे सांभाळण्यासाठी रानावनात पाठविले, की तो गुरे चरायला सोडून एकान्तात ध्यानधारणाच करीत बसे. मुलाचे हे वैराग्य झटकून जावे म्हणून मग भीमाजीने त्याचे लग्न लावून दिले. हेतू हा, की सांसारिक जबाबदारी पडली, मुलेबाळे झाली, की तो ताळ्यावर येईल. परंतु हाही उपाय असफल झाला. सिंगाजी संसारात रमला नाही. त्याची उदास वृत्ती वाढतच गेली. भीमाजीने मग त्याला भामगढचा राजा लखमेरिंग याच्याकडे नोकरीला लावून दिले. काम टपाल पोचवण्याचे होते. वेतन मासिक एक रुपया ठरले. बसायला घोडा, संरक्षणासाठी कमरेला हत्यारे असा त्याचा थाट होता. सिंगाजी नोकरीवर रुजू झाला.



संत सिंगाजीची समाधी

एकदा सिंगाजी हरसूदहून भामगढकडे चालला होता. मार्गात भैंसावा गावाजवळ त्याच्या कानी, ब्रह्मगीर गोसाव्याचा शिष्य मनरंगीर गोसावी याने गायिलेल्या पुढील काव्यपंक्ती पडल्या –

**समुझि ले ओ रे मना, भाई, अंत न होय कोई अपना।**
**यहीं माया के फंदे मे, तरआ न भुलाना ॥**

भावार्थ – हे मना, बंधो, हे समजून घे, की शेवटी आपले कोणी नाही. या मायेच्या भोवऱ्यातून तरून जा, फसू नको.

हे गीत ऐकताच सिंगाजी भानावर आला. या गीतपंक्ती जणू आपल्यालाच सावध करण्यासाठी आहेत, असे त्याला मनोमन वाटले. तडकाफडकी तो घोड्यावरून उतरला व त्याने मनरंगीर गोसाव्याच्या पुढे लोटांगण घातले. सिंगाजीने त्याला आपल्याला आध्यात्मिक मार्गदर्शन करण्याची व पंथदीक्षा देण्याची कळवळून विनंती केली. परंतु मनरंगीर त्याला म्हणाला –

" बाबारे, तू प्रापंचिक गृहस्थ दिसतोस. आमच्या या मार्गावर पाऊल टाकण्याचे धाडस तू करू नको. मुकाट्याने घरी जाऊन आपला घरप्रपंच आणि नोकरीधंदा सांभाळ. "

मनरंगीरच्या या कठोर बोलण्यामुळे सिंगाजी मनात खट्टू झाला. त्याने त्या वेळी माघार घेतली खरी; तथापि काहीही करून मनरंगीरकडून दीक्षा घ्यायचीच असा निश्चयही केला.

सिंगाजी मग भामगढच्या राजाकडे गेला व त्याने आपणास नोकरीतून मुक्त करावे, अशी राजाला विनंती केली.परंतु राजाला त्याच्या प्रामाणिकपणाचा व विश्वासूपणाचा प्रत्यय आला असल्यामुळे तो त्याला नोकरीतून मुक्त करीना. उलट त्याने सिंगाजीला वेतन वाढवून देण्याची आणि अधिक मानाची जागा देण्याची तयारी दाखवली. परंतु सिंगाजीने आपला हट्ट सोडला नाही. नोकरी सोडून सिंगाजी पुन्हा मनरंगीरकडे गेला व त्याला म्हणाला. 'मी आता नोकरीची व संसाराची सर्व जबाबदारी सोडून मुक्तपणे तुमच्या पायांपाशी आलो आहे. कृपा करून मला आता पंथदीक्षा द्या व आध्यात्मिक मार्गदर्शन करा.'

सिंगाजीची ही उत्कट इच्छा पाहून मनरंगीर प्रसन्न झाला व त्याने सिंगाजीला पंथदीक्षा दिली. या वेळी सिंगाजीचे वय एकूणचाळीस वर्षांचे होते.

त्याच वर्षीच्या कृष्णजन्माष्टमीच्या दिवशी सिंगाजी गुरु मनरंगीरची सेवा करीत असता एक प्रसंग घडला. संध्याकाळच्या वेळी मनरंगीर त्याला म्हणाला. 'मला झोप आली आहे. मी झोपतो. तू कृष्णजन्माच्या प्रसंगी मला उठव.' यावर सिंगाजी बरे म्हणाला; परंतु त्याचा स्वतःचा कल निर्गुण भक्तीकडेच अधिक असल्यामुळे जन्माष्टमीसारख्या उत्सवात त्याला रस नव्हता. त्यामुळे त्याने मनरंगीरला कृष्णजन्माच्या वेळी उठवले नाही. पुढे मनरंगीर एकाएकी जागा झाला, तेव्हा त्याला सर्व प्रकार कळून चुकला. तो सिंगाजीवर खूप संतापला. त्याने सिंगाजीला कठोर शब्दांत म्हटले. 'आत्ताच्या आत्ता इथून चालता हो; मला पुन्हा तोंड दाखवू नकोस.'

गुरूच्या या संतप्त उद्गारांमुळे दुःखी झालेला सिंगाजी तिथून उठला आणि पिपल्याच्या वनात जाऊन राहिला. या प्रसंगानंतर गुरुविरहामुळे त्याला विलक्षण अस्वस्थता आली. अशा परिस्थितीत त्याला जगणे दुस्सह झाले. शेवटी त्याने जीवत्समाधी घेण्याचा निर्णय घेतला. लौकरच त्याने किकड नदीच्या काठी एक भूगर्भगुंफा खोदून घेतली व इ. स. १५५९ साली श्रावण शुद्ध ९ या दिवशी त्या गुंफेत शिरून तो समाधिस्थ झाला. त्या स्थानाला आता सिंगाजी असे नाव मिळाले आहे.

सिंगाजीच्या समाधीची वार्ता ऐकून मनरंगीरला खूप वाईट वाटले. झाल्या घटनेला आपणच कारणीभूत आहो, हे समजून आल्यामुळे तो पश्चात्तापाने पोळून निघाला.

सिंगाजीने हजारो भजने लिहिली असल्याचे सांगितले जाते; तथापि सांप्रत त्याची अवघी ७००–८०० पदेच उपलब्ध झाली आहेत. या पदांचा विषय निर्गुण भक्ती व गूढ आध्यात्मिक अनुभव हाच असला, तरी त्यांची भाषा साधी व सोपी आहे. त्याची पुष्कळ पदे, त्यांतल्या आर्ततेमुळे हृदयाला भिडतात व मनाला हुरहुर लावतात. सामान्य जनांना एरवी अत्यंत कठीण व जटिल वाटणारा विषय सिंगाजी व्यवहारातल्या साध्या साध्या उपमा-दृष्टान्तांनी सोपा करून समजावून सांगतो. सिंगाजीच्या या रचनाचातुर्याने निमाडच्या आबालवृद्ध जनांना एवढी विलक्षण मोहिनी घातली आहे, की आजही त्यांच्या तोंडी नेहमी सिंगाजीचीच अवतरणे येतात.

सिंगाजी निर्गुण निराकार परमेश्वराला आपला एकमेव स्वामी किंवा धनी मानतो. त्या धन्याला उद्देशून रचलेल्या एका पदात सिंगाजी म्हणतो –

> **मैं तो जाणू सांई दूर है, मुझे पाया नेड़ा ।**
> **रहणी रही सामरथ भई, मुझे परवना तेरा ।।**
> **तुम सोना, हम गहणा, मुझे लागा टांका ।**
> **तुम तो बोली, हम देह धरि बोले कै रंग भाखा ।।**
> **तुम दरियाव हम मीन हैं विश्वास का रहणा ।**
> **देह गली मिट्टी भई, तेरा तूही में समाणा ।।**
> **तुम तो वृक्ष हम बेलड़ी, मूल से लपटाना ।**
> **कर सिंगा पहचाण ले पहचाण ठिकाणा ।।**

भावार्थ – हे स्वामी, तू किती तरी दूर आहेस, असे मी समजत होतो; परंतु (शोधान्ती) तू किती जवळ निघालास! तुझ्या अस्तित्वानेच मला केवढे बळ प्राप्त झाले! माझ्या पाठीवर तुझा धीर देणारा हात मी पाहत होतो. (खरे तर) तू सोने आणि मी त्यापासूनच बनविलेला अलंकार. (मी) सदैव प्रपंचात गुंतलेला. तूच सांग, आम्ही देहधाऱ्यांनी कुठे जावे? तू अथांग महासागर, तर मी त्यातला एवढासा मासा. परंतु तुझ्या विश्वासावरच (मी) अजून टिकून आहे. माझा देह (भाव) गळून पडेल तोही या महासागरात मिळून जाण्यासाठी. तू वृक्ष आहेस आणि मी क्षुद्र वल्ली. तुझ्या मूळरूपी चरणांना घट्ट लपेटून आहे. सिंगाजी म्हणतो, माझ्या प्रवासाचे शेवटचे ठिकाण (तुझे चरण) हेच आहे, हे मी पुरतेपणी जाणले आहे.

सिंगाजीने दुसऱ्या एका गीतात म्हटले आहे, की माझ्या धन्याच्या महालावर दोन दिवे लखलखत आहेत. अखंड स्मरणाचा तिथे पहारा आहे. मी माझ्या झुकलेल्या मस्तकाचेच फळ घेऊन त्याच्या दारी जातो. परंतु आतून कोणी तरी 'थांब' असे मला दरडावते. खरे तर 'थांब' 'थांब' हे शब्द ऐकता ऐकता किती तरी काळ लोटला आहे. तरीही हे परमेश्वरा, या 'थांब' अशा वाणीतही मी तुलाच पाहतो. माझा स्वीकार करण्यापेक्षाही तुझे हे 'थांबवणे', हे 'वाट पहायला लावणे,' हेच मला अधिक

सुखदायक वाटते, मनाला फार समाधान देणारें वाटते.

सिंगाजीच्या काळी भक्तीच्या क्षेत्रात शिरलेल्या पाखंडांचे आणि अवडंबराचे त्याने आपल्या समर्थ वाणीने सविस्तर वर्णन केले आहे व शेवटी त्यांचा खरपूस समाचार घेतला आहे. एका गीतात तो लिहितो –

**बिन देही को सायेब मेरो, देह धरी संसारे ।।**
**ताल पखावज बजे झांझरी, ज्ञान कहे बहु तेरा रे ।।**
**किरतन कर्‍यो बार बहुतेरा, वो ही सायब नाँहि माना रे ।।**
**देव देव पूजा बहुतेरा, बैठो देऊँ तुला दान रे ।।**
**लिंग भांग पूजा बहुतेरा, सो बी साहिब नाँहि माना रे ।।**
**नागा, मूनी और डिगंबर मुगत राह नाँहि माना रे ।।**
**करे तपस्या झूले-ऊर्धमुख सो बी साहिब नाँहि माना रे ।।**
**मैं तो देखूं पाखण्ड सारा, मोहे पीछे जाना रे ।।**
**कहे जन सिंगा सुनो भाई साधू, आपहि आप पहचाना रे ।।**

भावार्थ – माझा (निर्गुण) विदेही परमेश्वर ! या सगुण-भक्तांसाठी जणू भूलोकी देहधारी बनला. मग त्याच्या भक्तीसाठी झांज आणि पखवाज वाजू लागले. ज्ञानाच्या गोष्टी सांगणारे पंडित पुढे आले. (काहीजण) कीर्तने करू लागले. परंतु मला विचाराल, तर मी हा स्वामी मानीत नाही. 'देव' 'देव' करून पूजापाठ करणारे खूप भेटले, देवाची तुला करणारेही भेटले. कोणी लिंगपूजा करणारे, कोणी योनिपूजा करणारे. परंतु त्यांच्या त्या पूजासमारंभातही मला माझा धनी दिसत नाही. कोणी नागे, कोणी मौनी, कोणी दिगंबर आणि मुक्त पुरुष. परंतु कोणालाच ते घर सापडले नाही. कोणी ऊर्ध्व दृष्टीने तप करणारे किंवा अधांतरी राहणारे होते. पण त्यांनीही माझा स्वामी पाहिला नाही. मी हे सर्व पाखंड पाहतो आणि मला वाटते, मला मागे फिरले पाहिजे. सिंगाजी लोकांना सांगतो, हे माझ्या बंधूंनो, साधुजनांनो, ऐका. तुम्ही (दुसरे काही न करता) केवळ स्वतःलाच ओळखा म्हणजे पुरे.

सिंगाजी हा जसा श्रेष्ठ साधक होता, तसाच उच्च कोटीचा विचारवंतही होता. त्याच्या पदांवरून कळते, की त्याचा सर्व भर अंतरंगसाधनेवर आहे. परमात्म्याचा शोध घेण्यासाठी त्याला मंदिरे, मशिदी, तीर्थे, यांची गरज भासत नाही. त्याचा दृढ-विश्वास आहे, की परमात्मा बाहेर कुठेही नसून, तो अंतःकरणात स्थित आहे.

सिंगाजीने एखादा मठ स्थापन केला नाही, की एखाद्या संप्रदायाचे प्रवर्तनही केले नाही. त्याचे समाधिस्थान हे अनेक भक्तजनांना पवित्र क्षेत्र वाटत असले, तरी खुद्द सिंगाजीला असल्या क्षेत्रांतून भरणाऱ्या यात्रा-जत्रांत मुळीच परमार्थिक रस नव्हता. त्याचा शिष्यपरिवारही फारसा नाही. दलूदास हा त्याचा एकमेव शिष्य होय. तो सिंगाजीचा नातू होता, असे म्हणतात.

प्रतिवर्षी आश्विन शुद्ध दशमीपासून पौर्णिमेपर्यंत सिंगाजीच्या समाधिस्थानी एक यात्रा भरते. 'त्याला सिंगाजी का मेला' असे म्हणतात. या वेळी यात्रेकरू त्याच्या समाधीवर साखरेच्या मुठी वाहतात. असे सांगतात, की एवढ्या मोठ्या प्रमाणात तिथे साखर जमा होऊनही मुंग्या, चिमण्या किंवा दुसरे कोणतेही जीव-जीवाणू त्या परिसरात साखरेच्या मोहाने फिरकत नाही. सिंगाजीच्या समाधिस्थानाच्या आसपासच्या जागेतच त्याच्या आई-वडिलांच्या, पत्नीमुलांच्या, व भावंडांच्या शिष्य-प्रशिष्यांच्या समाध्या आहेत. निमाडच्या कोणाही रहिवाशावर कसलेही संकट आले, तर तो प्रथम सिंगाजीकडे धाव घेतो. सिंगाजीला नवस केला, सांकडे घातले, की आपण संकटमुक्त होऊ, अशी त्याची दृढ श्रद्धा असते. निमाडच्या स्त्री-पुरुषांच्या मनीमुखी एक वचन सदैव असते, ते असे –

**म्हारा सिरपर सिंगा जबरा ।**
**गुरु मैं सदा करत हूँ मुजरा ।।**

भावार्थ – मला शिरोधार्य असणारा महात्मा एकच. त्याचे नाव सिंगाजी. तो माझा गुरु असून, मी त्याला नमस्कार करतो.

सिंगाजीच्या नावावर आज निमाडीत भागवताचा द्वादशस्कंध, पद्रतीत, महिम्नस्तोत्र, जाप, नराज, बाणाबढै, इ. नऊ-दहा ग्रंथ असल्याचे सांगितले जाते; तथापि हे ग्रंथ त्याचेच असल्याविषयी अजून अभ्यासकांत एकमत नाही. पाहा – निमाडी भाषा व साहित्य. [ हिं. सा. को. २; नि. उ. सा.; उ. भा. सं. प.; निमाड के संत-कवि सिंगाजी – डॉ. रमेशचंद्र गंगराडे, १९६६ ]

## सिंगारमाता

एक लोकदेवता. हिला हेलाडवाई असेही म्हणतात. शृंगारवरून सिंगार शब्द आला आहे. विदर्भातल्या चंद्रपूर जिल्ह्यात आणि मध्य प्रदेशातल्या दुर्ग जिल्ह्यात हिची ठाणी आहेत. दुर्ग जिल्ह्यातले गोंड लोक हिला सात बहिणींपैकी सर्वांत लहान व सुंदर समजतात. ओझा लोक हिचे उपासक असून, त्यांच्या स्त्रिया गोंदायच्या वेळी हिची गाणी म्हणतात. या देवीजवळ तीन सुया असतात. त्यांपैकी एक सोन्याची, दुसरी रुप्याची आणि तिसरी लोखंडाची असते, अशी समजूत आहे. सोन्याच्या सुईने ती मोठ्या वाया अथवा देवी आणि रुप्याच्या सुईने गोवर, कांजिण्या टोचते. लोखंडाची सुई तिने आपल्या मुलींना म्हणजे ओझा स्त्रियांना दिली. या सुईने गोंदून स्त्रियांचे दृष्टिदोषापासून संरक्षण करायचे, शारीरसामर्थ्य व सौंदर्य वाढवायचे आणि आजारपणापासून संरक्षण करायचे अशी देवीची आपल्याला आज्ञा आहे, असे या स्त्रिया सांगतात. सिंगारमातेसंबंधी अनेक लोकगीते आढळतात. [ ध. लो. सा. ]

**सिंगेश्वर** एक शिवस्थान. हा गाव बिहार प्रदेशाच्या साहरस जिल्ह्यात असून, तिथे याच नावाचे शिवमंदिर आहे. दशरथाने पुत्रकामेष्टी यज्ञाला प्रारंभ केला तेव्हा ऋष्यशृंगाने या शिवाची स्थापना केली, अशी कथा सांगतात.

वराह पुराणात या देवस्थानासंबंधी सांगितलेली कथा पुढीलप्रमाणे आहे – एकदा भगवान शिव श्लेष-आत्मक नावाच्या अरण्यात गेला. जाताना त्याने नंदीश्वराला म्हटले, की 'माझा ठावठिकाणा तू कोणाला सांगू नकोस.' पुढे ब्रह्मा व विष्णू यांना घेऊन इंद्र मुंजवत पर्वतावर आला आणि त्याने नंदीश्वराला शिवाचा पत्ता विचारला. पण त्याने तो सांगण्यास नकार दिला. त्यामुळे ते सर्वजण शिवशोधार्थ श्लेष-आत्मक अरण्यात गेले. आपणाला कोणी ओळखू नये म्हणून शिवाने हरणाचे रूप घेतले होते. हे शिवाचेच रूप आहे, असे देवांनी ओळखले आणि ते त्याच्या मागे धावू लागले. इंद्राने हरिणाची शिंगे पकडली. ब्रह्मदेवाने मधला भाग धरला आणि विष्णूने त्याचे पाय पकडले. इतक्यात शिंगाचे तीन तुकडे झाले व हरिण त्यांच्या हातून निसटून पळून गेले. त्या वेळी आकाशवाणी झाली. 'हे देवांनो! तुम्हांला शिव सापडणार नाही, म्हणून तुम्ही तुमच्या हातीं जे शिंग आहे, त्यावरच संतोप माना.' मग इंद्राने त्याच्या हातातील तुकडा स्वर्गात नेला. ब्रह्मदेवाने तिथेच त्याची स्थापना केली. या दोन्ही तुकड्यांना कोकरण असे म्हणतात. विष्णूने आपल्या हातातले शिंग मानवाच्या कल्याणासाठी भूमीवरच स्थापन केले. कालांतराने त्यालाच सिंगेश्वर असे नाव प्राप्त झाले.

शिवरात्रीला सिंगेश्वराची फार मोठी यात्रा भरते. त्या वेळी तिथे गुरांचा बाजारही भरतो. वर्षभरांत सुमारे एक लक्ष लोक या शिवलिंगाचे दर्शन घेतात. पुत्रकामेष्टी यज्ञाच्या दंतकथेमुळे अनेक निपुत्रिक स्त्रिया रोज इथल्या शिवलिंगाची पूजा करतात.

सुमारे दोनशे वर्षांपूर्वी हरिचरण चौधरी नामक एका धनाढ्य व्यापाऱ्याने या मंदिराचा जीर्णोद्धार केला. वास्तुशास्त्राच्या दृष्टीने या मंदिराला फारसे महत्त्व नाही. [ टें. ली. बि. ]

**सिंटेंग** आसामातील जयंतिया डोंगरावर राहणारी एक जमात. या लोकांचे खासी लोकांशी बरेच साम्य आहे. हे लोक वर्णाने काळे आहेत. खासी लोकांप्रमाणेच सिंटेंग पुरुष बिनबाह्यांचा कोट घालतात; मात्र ते डोक्यावर जरा निराळी उंच टोपी घालतात. स्त्रियांचा पोशाख खासी स्त्रियांसारखाच असतो. त्या अनेक रंगीबेरंगी वस्त्रे वापरतात.

हे लोक खासी लोकांप्रमाणेच दगडी किंवा लाकडी घरे बांधतात; आंगण व भिंती माती-शेणाने सारवतात. यांची गावेही खासींच्या गावांसारखीच असतात.

हे लोक गुरे पाळण्याचा धंदा करतात. त्यांच्या स्त्रिया सुती कापड विणतात.

तांदूळ व मांस हे यांचे मुख्य अन्न होय. तांदुळापासून केलेली दारू हे लोक खूप पितात.

खासी लोक ज्या देवतांची व भुतांची पूजा करतात, त्यांचीच पूजा सिंटेंगही करतात.

यांच्यांत मातृसत्ताक कुटुंबपद्धती चालू आहे. [ दि खासीज् ]

**सिंदूर** लाल रंगाचे चूर्ण. याला शेंदूर असेही म्हणतात. हा पदार्थ शिसे व प्राणवायू यांच्या संयोगाने निर्माण होतो. लाल रंग व नळचा जोडण्यासाठी लुकण म्हणून याचा उपयोग केला जातो. तेले घट्ट करण्यासाठीही शेंदूर वापरतात.

काही देवतांना शेंदूर फार प्रिय असतो. म्हणून तो त्यांना वाहण्याची प्रथा आहे. गणपती, मारुती, देवी, ग्रामदेवता यांच्या बहुतेक मूर्ती ओबडधोबड दगडी आकृतींना शेंदूर फासून बनवलेल्या असतात. शेंदूर तेलात कालवून त्याचे लेप दगडी मूर्तीवर वारंवार लावल्यामुळे त्याचे जाड कवच तयार होते. अशा मूर्ती खेडेगावांत जागोजागी आणि शहरांतही काही ठिकाणी आढळतात. 'दगडाला शेंदूर फासून देव बनवणे' हा वाक्प्रचार त्यावरूनच प्रचलित झाला आहे. आदिवासी लोक आपल्या ग्रामदेवतांना पशुबळी दिल्यानंतर त्याचे रक्त देवरूप दगडांवर वाहत असावे. त्याच प्रथेतून कालांतराने देवरूप दगडांना शेंदूर फासण्याची चाल उदय पावली असावी.

काही आदिवासी जमातींच्या लग्नसमारंभात सिंदुराचा उपयोग अपरिहार्य समजला जातो. विशेषत: मुंड लोकांच्या विवाहात सिंदुराचा टिळा लावणे हा महत्त्वाचा विधी असतो. एखाद्या मुंड तरुणाने मुंड तरुणीच्या कपाळी सिंदूर लावला, तर त्यांचा विवाह झाला असे मानले जाते. अन्य काही विधी करावे लागत नाहीत.

प्राचीन काळी नाग लोकांत सिंदुराचा असा उपयोग प्रचलित होता. वैदिक आर्यांना नाग किंवा अन्य आर्येतर जमातींकडूनच सिंदुराचा उपयोग माहीत झाला असावा. अमरकोशात 'नागसम्भवम्' हा त्याचा पर्याय शब्द दिला आहे, त्याचे कारण हेच असावे, असे वाटते.

कुंकू, मेंदी यांसारखे सिंदूर हे देखील एक शृंगारक मानले जाते. काही स्त्रिया केसांच्या भागात सिंदूर घालतात. हे एक सौभाग्यद्रव्यही आहे. पूर्वी काही प्रदेशांतल्या विवाहित स्त्रिया भाली सिंदूरतिलक लावीत. पतीचे निधन झाल्यास तो पुसून टाकीत.

सिंदूर ऊष्ण, विसर्पकुष्ठकण्डविषापह, व्रणशोधक व भग्न-

संधानजनक असतो, असे वर्णन भावप्रकाशात आहे. [ सु. वि. को; श. क.; एन्सा. मुंडा.; संस्कृतिसंगम. ]

## सिंधव

एक पूर्वास्पृश्य जात. गुजरात प्रदेशातल्या पालनपूर व रेवाकाठा भागात या लोकांची वस्ती आढळते. शिंदीच्या झावळ्यांच्या चटया विणणे व केरसुण्या तयार करणे हा त्यांचा प्रमुख व्यवसाय आहे. त्यावरून त्यांना सिंधव हे नाव मिळाले असावे. याशिवाय ते अन्यही काही धंदे करतात.

**विवाहप्रथा** – मुलीचा बाप लग्नाची बोलणी करतो. त्याला तीस रुपयांपर्यंत देज मिळते. हे लोक लग्नात गणपतीची पूजा करतात. गारुड ब्राह्मण त्यांची लग्ने लावतात. अग्नीभोवती नवरानवरीने पाच प्रदक्षिणा घालणे, हा लग्नातला प्रमुख विधी होय.

सिंधव लोकांत सोडचिठ्ठीची पद्धत रूढ आहे. विधवा धाकट्या दिरावरोबर लग्न करू शकते, पण तिला मावसभाऊ, मामेभाऊ व आतेभाऊ यांच्याशी लग्न करता येत नाही. तिचे लग्न रविवार, मंगळवार किंवा गुरुवार या वारीं होते. या लग्नात सुवासिनी स्त्रिया उपस्थित राहत नाहीत.

सिंधव लोक बीजमार्गी व रामानुज पंथाचे अनुयायी असून, रामडीपीर व भिलडीमाता यांचे भक्त आहेत. भिलडीमातेची ते नारळाच्या स्वरूपात पूजा करतात. अंबा, डाकोर, द्वारका ही त्यांची तीर्थक्षेत्रे होत.

**मृतकप्रथा** – हे लोक मृताला उत्तरेकडे तोंड करून पुरतात. पितरांसाठी श्राद्ध किंवा इतर कोणतेही विधी करण्याची चाल या लोकांत नाही. [ मुं. इ. जा.; अ. प्र.; ट्रा. का. बाँ. ]

## सिंधी भाषा व साहित्य

सिंधी भाषा ही आधुनिक भारतीय आर्यभाषांपैकी एक आहे. ती सांप्रत ज्या प्रदेशात बोलली जाते, त्या प्रदेशात प्राचीन काळी पैशाची ही प्राकृत भाषा बोलली जात होती. पुढे सिंधमध्ये आभीर येऊन वसले. त्यांची बोली अपभ्रंश ही होती. ती त्यांनी त्या प्रदेशात रूढ केली. त्यामुळे सध्याच्या सिंधी भाषेत पैशाची व अपभ्रंश असे दोन्ही संकेत आढळतात. उच्चार व प्रयोग या दोन्ही बाबतींत सिंधी व पंजाबी या भाषांमध्ये बरेच साम्य आढळते.

सिंधी भाषेचे सहा पोटभेद आहेत. त्यांची नावे अशी – (१) सिराइकी (२) विचोली (३) लाडी (४) थडेली (५) कच्छी व (६) लासी.

**(१) सिराइकी** – सिंधुनदाच्या पूर्वतीरावर खैरपूरपासून उबावडोपर्यंत, त्याचप्रमाणे पश्चिम तीरावर सेहवान शहर धरून संपूर्ण लाडकाना जिल्हा आणि जाकोबाबाद जिल्ह्यातील कश्मोर तालुका, एवढा सारा भूभाग सिंधचा शिरोभाग मानला जातो. या प्रदेशात जी बोली बोलली जाते, तिला सिराइकी म्हणतात. या भागात बलोच व जाट या दोन जाती बहुसंख्य आहेत. या दोन्ही जातींचे लोक सिराइकी भाषा बोलतात.

**(२) विचोली** – सिंधुनदाच्या पूर्व तीरावर कंडीयारो तालुका धरून व पश्चिम तटावर सेहवान धरून कोटरी विभागापर्यंतच्या भूप्रदेशात ही बोली बोलली जाते. ही भाषा सिंधीची ग्रांथिक भाषा आहे. म्हणून तिला साहिती असेही म्हणतात.

**(३) लाडी** – सिंधच्या दक्षिण भागात म्हणजे कराची जिल्हा संपूर्ण व हैद्राबाद जिल्ह्याच्या बदीन तालुक्यापासून गूनी तालुक्यापर्यंतचा भाग एवढ्या प्रदेशात लाडी बोली बोलली जाते.

**(४) थडेली** – सिंधुनदाच्या पूर्वतटावरील खैरपूर प्रदेश, नवाबशाह व हैद्राबाद हे जिल्हे, कच्छचे रण, त्याचप्रमाणे जोधपूर एवढा प्रदेश, थरपारकर या नावाने प्रसिद्ध आहे. या भागातले सिंधी लोक थडेली बोली बोलतात. ही बोली मारवाडी व सिंधी या दोन भाषांचे मिश्रण आहे.

**(५) कच्छी** – सिंधू प्रदेशाचा थरपारकर जिल्हा, नगरपारकर तालुका व गुजरातचा कच्छ प्रदेश एवढ्या भागात ही बोली बोलली जाते.

**(६) लासी** – लसवेलो भाग, बलुचिस्तानाच्या दक्षिणेकडील कलात जिल्ह्यातील झलावान, दक्षिणेकडील कराची तालुका, पूर्वेकडील झलावानचा काही भाग व पश्चिमेकडील मकरान, या भागांत ही बोली बोलली जाते.

सिंधीच्या साहित्यिक भाषेचा एक नमुना असा –

**हिकिडे माण्हुअ-खे ब पुट् हुआ। तिनि माँ नंढे पिउ-खेचयो, एबाबा! माल मांजेको भाडो मुंहिजे हिसे अचे, सो मँ-खे खणी डे। जहिं-ॅ ते हुन मालु बिन्ही-खे विराहे डिनो। थोरनि म्हॅनि खाँ पोइ संदुसि नंढो पुटु सभु-की हथिकरे हिकिडे डूराहे डेह डे उथी हलिओ, जिते पँहि-ॅ जो मालु अझलाइअ-मे ॅ विञायाँई। सभि खपाइण-खाँ पोइ इतिफाकाँ उन्हे डेह-मे डाढो डुकरु अची पिओ। जँहि-ॅ करे हो परवसि थिअण लगो। (पाण-खे तंगि हाल-मे डिसी) उन्हे डेहजे हिकिडे रहंदड-खेजोअं तीअं करे वञी चंबिडिओ, जँहि-ॅ पँहिंजे बनिअ-में सुअरचारण-लोइ मोकिलिउसि।**

**अर्थ** – एका माणसाला दोन मुलगे होते. त्यांतल्या धाकट्याने बापाला म्हटले. 'बाबा! आपल्या संपत्तीतला जो भाग माझ्या वाट्याला येत असेल, तो तुम्ही मला द्या.' त्यावर बापाने आपली संपत्ती दोन्ही मुलांत वाटून दिली. थोड्या दिवसांनी त्याचा धाकटा मुलगा आपल्या वाट्याला आलेले सगळे धन

एकत्र करून दूर देशाला निघून गेला. तिथे त्याने आपले सर्व धन विनकमाईच्या व्यवहारात खर्ची घातले. त्याची सर्व मालमत्ता खलास झाली. एवढ्यात दुर्दैवाने त्या देशात भयंकर दुष्काळ पडला. त्यामुळे त्याचे हाल होऊ लागले. अशा स्थितीत काहीतरी पोटाची सोय व्हावी म्हणून त्या देशातल्या एका गृहस्थाला आपली दुर्दशा सांगून तो त्याच्याकडे राहिला. त्या मालकाजवळ खूप डुकरे होती. ती चारण्यासाठी त्याने या कंगाल पुत्राची योजना केली.

**सिंधी लिपी** – सिंधी भाषेच्या वर्तमान लिपीचे नाव अरबी सिंधी असे आहे. पण सुमारे १५० वर्षांपूर्वी सिंधी भाषेच्या चार लिप्या प्रचलित होत्या. हिंदू पुरुष ती देवनागरीत लिहीत. हिंदू स्त्रिया गुरुमुखीचा वापर करीत. मेमण, बोहरी, खोजा व व्यापारी हटवणिको या लिपीचा वापर करीत. हटवणिको म्हणजे रूपे आदी, मध्य व अंत्य यांमध्ये भिन्न भिन्न होतात. स्वरांचे संकेत अनिवार्य न ठरविल्यामुळे एकाच शब्दाचे निरनिराळे उच्चार होतात. उदा० मीम्(म्), टे (ट्) यांमध्ये स्वरचिन्ह न दिल्यामुळे त्याचे मट्, मिट्, मुट, मट्ट, मिट्ठ, मुट्ट, मटि, मिटि आणि मुटी असे अनेक उच्चार होतात. त्यामुळे संदर्भ न समजल्यास शिक्षित मनुष्यही शब्दाचा अशुद्ध उच्चार करू शकतो.

**भाषेचे वैशिष्ट्य** – सिंधीचे सगळे शब्द स्वरान्त असतात. ध्वनीमध्ये ग, ज, ड, द व व यांचे नेहेमीच्या ध्वनींव्यतिरिक्त निराळे ध्वनी आहेत. ते त्या त्या अक्षरांखाली अधोरेखा देऊन दाखवले जातात. संस्कृतातल्या अनुदात्तांप्रमाणे त्यांचे उच्चारण खाली दाब देऊन केले जाते. संस्कृताचे संयुक्त व्यंजन आणि प्राकृताचे द्वित्तरूप सिंधीमध्ये समान होते. मात्र पूर्वीचा ऱ्हस्व स्वर दीर्घ होत नाही.

सिंधी

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| اَ | آ | اِ | اِي | اُ | او | اي | اَيْ | او | او | | |
| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ए | ऐ | ओ | औ | | |
| ق | ک | گ | گھ | ڱ | خ | ڳ | غ | چ | ڇ | ج | ڄ |
| क | ख | ग | घ | ङ | ख़ | ग॒ | ग़ | च | छ | ज | ज॒ |
| جھ | ڃ | ٽ | ٺ | ڊ | ڙ | ڍ | ڙھ | ڻ | ط ت | ٿ | د |
| झ | ञ | ट | ठ | ड | ड़ | ढ | ढ़ | ण | त | थ | द |
| ڏ | ڌ | ن | پ | ڦ | ف | ب | ٻ | ڀ | م | | |
| द॒ [ड॒] | ध | न | प | फ | फ़ | ब | ब॒ | भ | म | | |
| ي | ر | ل | و | ھ | س | ش | | | | | |
| य | र | ल | व | ह | स | श | | | | | |

सिंधी लिपी

ब्राह्मी लिपीचे एक परिवर्तित रूप होय. मुसलमान व सरकारी कर्मचारी फारसी लिपीचा वापर करीत.

इ. स. १८५३ साली ईस्ट इंडिया कंपनीने सिंधीची लिपी निश्चित करण्यासाठी एक समिती नियुक्त केली. या समितीने काही अरबी लिपीतले तर काही फारसी लिपीतले वर्ण एकत्र करून तिसरी एक विचित्र लिपी निर्माण केली, तीच ही अरबी सिंधी लिपी होय. हिच्यात ५१ अक्षरे स्वीकृत केली आहेत. याशिवाय सिंधी ध्वनीसाठी सवर्ण अक्षरांमध्ये अतिरिक्त बिंदू जोडून नवीं अक्षरे बनवली आहेत. सांप्रत ही लिपी सर्व वर्गांच्या व्यवहारात चालू आहे. या ५१ अक्षरांपैकी बहुतेक अक्षरांची

अकारान्त संज्ञा या नेहमी स्त्रीलिंगी असतात. उदा० खट (खाट), जिभ (जीभ), सूंह (शोभा). ओकारान्त संज्ञा या नेहमी पुंलिंगी असतात. उदा० घोडो, कुतो, महिनो, हफ्तो, इत्यादी. आकारान्त आणि ऱ्हस्व-दीर्घ इकारान्त संज्ञा बहुधा स्त्रीलिंगी असतात. ऱ्हस्व-दीर्घ उकारान्त संज्ञा प्रायः पुंलिंगी असतात. उदा० किताबु, घरु, मुहु. पुंलिंगाचे स्त्रीलिंग बनवताना इ, ईं, नि व आणि हे प्रत्यय लागतात.

सिंधी भाषेत लिंगे दोनच आहेत – पुंलिग व स्त्रीलिंग. वचनेही दोनच आहेत. एकवचन आणि बहुवचन. पुंलिंगाच्या बहुरूपात वैविध्य आहे. सिंधीतले सर्वनामाचे प्रत्यय संज्ञा व क्रिया

यांच्याशी संयुक्त केले जातात. उदा० पुट्रऊँ (आमचा मुलगा), भासि (त्याचा भाऊ), भाउरनि (त्यांचे भाऊ). चयुमि (मी सांगितले), इत्यादी. सिंधी अव्यये संख्येने अधिक आहेत. सिंधीचे शब्दभांडार अरबी-फारसी शब्दांनी भरलेले आहे. सिंधी आणि हिंदी या दोन्ही भाषांमध्ये वाक्यरचना, पदक्रम आणि अन्वय या गोष्टींत विशेष अंतर नाही.

**सिंधी साहित्य**–इतर अनेक भाषांप्रमाणेच सिंधी साहित्याचा प्रारंभही काव्यरूपानेच झाला आहे. आजही सिंधी भाषेत कवितेलाच प्राधान्य आहे. सिंधी कविता मुख्यतः सूफी फकिरांची कविता आहे. या कवितेचा विशेष गुण असा, की ती कोणत्याही संप्रदायापासून मुक्त आहे. बरेचसे सूफी कवी स्वतःला गोपी व परमात्म्याला कृष्ण मानून आपले कवित्व प्रकट करतात. ते ईश्वराला आपला पिता व मनुष्यमात्राला आपले बंधू मानतात. परमात्म्याच्या ठिकाणी लीन होणे हे या कवींचे ध्येय आहे. ज्या ठिकाणी मी, तू आणि तो असा भेद विरून जाईल, अशा प्रकारचे एक अनिर्वचनीय ठिकाण या सूफी कवींना अपेक्षित आहे.

प्रारंभी हे सूफी कवी दोहे आणि सलोक (श्लोक) लिहीत असत. पुढे ब्रिटिशांचे राज्य आल्यानंतर ते कसीदे, गजला, मसनवी आणि रुबाया लिहू लागले. या सर्व कवितेत हिंदु-मुस्लिम विचारधारांचा समन्वय करण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न होता; पण पुढच्या कालात ही भावना शिल्लक राहिली नाही.

सिंधीचे काही प्राचीन दोहे अरबी–फारसी इतिहासग्रंथांत आढळतात. दोदे–चनेसर ही सिंधीतली प्रथम कृती होय (इ. स. १३१२). हे एक वीररसात्मक प्रबंधकाव्य आहे. हे काव्य अपूर्ण अवस्थेत राहिले आहे. दोदा व चनेसर असे दोन राजपुत्र होते. भूनगरच्या सिंहासनासाठी त्या दोघांमध्ये यादवी युद्ध झाले. प्रस्तुत काव्यात त्याचेच वर्णन केलेले आहे. ही रचना दोहा छंदातली आहे.

इ. स. च्या चौदाव्या शतकाच्या शेवटी शेख हमाद बिन रशीदुद्दीन जमाली आणि शेख इसहाक आहनगर नावाचे दोन सूफी कवी झाले. त्यांची काही फुटकळ कविता आढळते. १५ व्या शतकाच्या शेवटी मामुईच्या सूफी दरवेशांची सात पद्ये उपलब्ध होतात. त्यांमध्ये सिंधप्रांतावर येऊ घातलेल्या विपत्तीची भविष्यवाणी आहे. मखदूम अहमद भट्टी, काजी काजन, मखदूम नूह हालाकंडी व शाह अबदुल करीम हे १६ व्या शतकातले सूफी फकीर होत. यांनी दोहे रचले आणि त्यांतून परमात्म्याच्या प्रेमाची आणि विरहाची भावना शब्दांकित केली. प्रेम, तप आणि आत्मसमर्पण या गोष्टींवर त्यांनी भर दिला. उस्मान एहसानी हा १७ व्या शतकातला सूफी कवी. त्याचा वतननामा उपलब्ध आहे. तो या जगाला आपला देश मानीत नाही. तो म्हणतो – 'हे जग ही एका रात्रीची वस्ती आहे. जिथून आपण आलो आणि जिथे आपल्याला जायचे आहे. तो आपला देश होय.'

इ. स. च्या अठराव्या शतकाचा पूर्वार्ध म्हणजे सिंधी साहित्याचे सुवर्णयुग होय. या कालात शाह इनायत, शाह लतीफ, मखदूम मुहमद जमान, मखदूम अब्दुल हसन, पीर मुहमद बका, इ. मोठमोठे सूफी कवी होऊन गेले. या कवींनी सिंधी काव्यात नवे छंद आणि नवे प्रकार आणले आणि त्याचबरोबर गंभीर दार्शनिक विचारांचेही प्रवर्तन केले. इनायतने अनेक किस्से, मुक्तके, दोहे आणि सुर लिहिले. शाह लतीफ हा सिंधीचा मोठा आणि लोकप्रिय कवी आहे. त्याने आपले विचार नव्या शैलीत मांडून सिंधी भाषेला उन्नत केले. त्याचा रिसालो हा सिंधीचा मूल्यवान निधी आहे. श्री. हरदेव बाहरी लिहितात –' रिसालोमध्ये प्रबंधात्मक कथा, मुक्तक कविता, इतिवृत्तात्मक छंद आणि भावपूर्ण गीतेही आहेत. त्यात प्रेमाची कोमलकान्त अभिव्यक्ती आहे आणि युद्धाचे यथातथ्य चित्रणही आहे. त्यात हिंदूंचा वेदान्तही आहे आणि इस्लामी तसव्वुफही आहे. त्यात ईश्वरभक्तीबरोबर देशभक्तीही आहे. त्याच्या हृदयात पक्ष्यांविषयी प्रेम आहे आणि मानवाविषयी सहानुभूतीही आहे. त्याच्या कहाण्यांचा बाह्य आविष्कार लौकिक आहे, पण त्यांचा आशय मात्र आध्यात्मिक आहे. तो रहस्यवादी कवी आहे.'

तालपुरी शीया नवाबांच्या कारकिर्दीत (इ. स. १७८३–१८४३) सिंधी साहित्याने एक नवे वळण घेतले. त्यामागच्या साहित्याला प्रेमकथांचे खंडरूप प्रस्तुत झाले होते. आता त्या कथा सर्वांगी वृद्धिगत होऊन विशद रूपात प्रसिद्ध होऊ लागल्या. दोह्यांचे प्रमाण कमी झाले आणि त्यांच्या जागी काफ्या, कशिदे, मर्सिए अधिक प्रमाणात लिहिले जाऊ लागले. गद्याचे रूपही स्पष्ट होऊ लागले. सचल हा या कालखंडातला सर्वांत प्रसिद्ध कवी होय (इ. स. १७३९ ते १८२६). या कवीविषयी सूफी संत मोठा आदर दाखवतात. त्याच्याइतक्या मधुर गीती आणि रसाळ काफ्या फार थोड्या कवींनी लिहिल्या आहेत. बाह्य लोकाचार, कर्मकांड आणि ज्ञान या गोष्टी प्रेमी भक्ताच्या दृष्टीने तुच्छ आहेत, असे तो मानतो. सचलाच्या कवितेचा एक नमुना असा –

**बोलि पखी परदेसी अडा तूँ कहिडे देसऊँ आवंद एँ**  
**हथविच मुरली पेरें घुंघडें गलिअ गलिअ बजावंद एँ।**  
**उथों आय परें लंगडा इथोंत पाँवर पावंद एँ।**  
**जदहाँ तूँ आयो ढूंढ महल विच तदहाँ तूँ क्या कुझु खावंद एँ।**  
**जदहाँ तूँ आयो बालापण विच हर किसी नूँ भावंद एँ।**  
**जदहाँ तूँ आयो मदघर विच आदिअंत मुलजावंद एँ।**  
**लाला मोहन। लज नही आवंदी जरा नही शरमावंद एँ।**

भावार्थ – परदेशी पाखरा, वोल, तू कोणत्या देशाहून आला आहेस ? हातात मुरली, पायांत घुंघरू अशा वेषात गल्लीगल्लीतून मुरली वाजवीत तू जात आहेस. तिथून पायाने लंगडत आलास, इथे पायात नूपुर बांधतो आहेस. जेव्हापासून शरीरात आलास तेव्हापासून तू काही खातो आहेस का ? जेव्हापासून तू वालपणात आलास तेव्हापासून तू सगळ्यांना आवडतोस. जेव्हा तू यौवनात आलास तेव्हा आदि–अंत विसरून गेलास. लाला मोहन, तुला लाज वाटत नाही का? जराही शरमत नाहीस का तू?

सचल कवीच्या कालातच दीवान, दलपतराय आणि सामी हे हिंदू कवी होऊन गेले.

सचलानंतरच्या सिंधी साहित्याचे सामान्यपणे तीन खंड पडतात, ते असे –

(१) प्रारंभिक गद्यकाल – (इ. स. १८५३ ते १९१४)
(२) कौडोमल–कलीच बेगकाल (इ. स. १९१४ ते १९४७)
(३) स्वातंत्र्योत्तर काल (१९४७ च्या पुढे).

(१) प्रारंभिक गद्यकाल – इंग्रजांनी १८४३ साली सिंध प्रदेशावर विजय मिळवला. नंतर इतर अनेक क्षेत्रांप्रमाणेच सिंधीच्या साहित्यक्षेत्राकडेही त्यांनी लक्ष दिले. त्या काळी सिंधीला निर्धारित लिपी नव्हती. इ. स. १८५३ साली त्यांनी ती पक्की केली. मग त्या लिपीतून पाठ्यपुस्तकांची रचना सुरू झाली. कोश आणि व्याकरणग्रंथ रचले गेले. इ. स. १८५४ साली गुलाम हुसेन कुरेशी व सैयद मीरां मुहमद शाह यांनी काही पुस्तके हिंदीतून अनुवादित केली. मुन्शी नंदीराम मीरानी, नारायण जगन्नाथ, साधू नवलराय, मुनशी उधाराम मीरचंदानी, दीवान केवलराम, इ. काही लेखकांनी हिंदी, फारसी व इंग्रजी या भाषांतील काही पुस्तके अनुवादित केली. साधारणपणे हा कालखंड अनुवादाचाच होता. या कालखंडात हिंदीतल्या कित्येक कादंबऱ्या सिंधी रूप घेऊन पुढे आल्या.

(२) कौडोमल-कलीच बेगकाल – कौडोमल आणि कलीच बेग या दोन धुरंधर लेखकांनी साहित्यक्षेत्रात पदार्पण करताच सिंधी भाषेला जणू नवचैतन्य आले. कौडोमल हा ब्रह्मसमाजाचा प्रेमी होता. त्याने सुमारे ६० पुस्तके लिहिली.

कलीच बेग याची प्रतिभा सर्वतोमुखी होती. त्याने काही स्वतंत्र व काही अनुवादित अशी सुमारे २०० पुस्तके लिहिली. कौडोमल व कलीच बेग हे नाटककारही होते. या दोघांनी कित्येक नाटके लिहिली. त्यांच्या समकाली जेठानंद खिलणदास व दीवान लीला रामसिंह हे दोघे नाटककार म्हणून प्रसिद्धीस आले. खानचंद दर्यानी याने चार स्वतंत्र नाटके रचली.

याच कालातला परमानंद मेवाराम याने सिंधी भाषेला साहित्यिक आणि अभिव्यंजक असे रूप देण्याचा यशस्वी प्रयत्न केला. हा गृहस्थ पुढे ख्रिस्ती झाला आणि सिंधी भाषेत जोती नावाचे साप्ताहिक चालवून त्याने ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. सिंधी भाषेचा कोश तयार करणे ही त्याची महनीय कामगिरी होय. याच काळात निरनिराळ्या विद्वानांनी गीता, पातंजल योग, सुखमनी, इ. धार्मिक ग्रंथांवर टीकाग्रंथ लिहिले. पं. द्वारकाप्रसाद यजुर्वेदी यांनी लो. टिळकांच्या गीतारहस्याचा आणि फतहचंद मेंघराज यांनी शिखांच्या गुरुग्रंथाचा सिंधीत अनुवाद केला.

याच कालात सिंधुसुधार, सरस्वती, प्रभात, सनातन धर्मपत्रिका, सिंधुभास्कर, आनंद, इ. नियतकालिके प्रकाशित होऊ लागली आणि त्यांनी सिंधी भाषेची व सिंधी समाजाची बहुमोल सेवा केली.

सिंधी भाषेत निबंध साहित्य विशेष प्रमाणात निर्माण झाले नाही. जे काही झाले त्याच्या लेखकांची नावे पुढीलप्रमाणे – राजर्षी दयाराम, केवलराम सलामतराय, नारायण जगन्नाथ वैद्य, उधाराम भांवरदास, नवलराय, हीरानंद, इत्यादी.

इ. स. १९१४ साली सिंधी साहित्य सोसायटीची स्थापना झाली. श्री. जेठमल परसराम गुलराजाणी हे या संस्थेचे प्रमुख होते. यांनी आपल्या भारतवासी नामक पत्रिकेच्या द्वारे साऱ्या सिंधमध्ये एक उत्साहाची लहर पसरविली. यांनी काही पाश्चात्त्य नाटकांचे अनुवाद केले व कित्येक धार्मिक पुस्तके लिहिली. श्री. लालचंद हे श्री. जेठमलांचे सहकारी होते. त्यांनी कादंबऱ्या, नाटके, कथा, निबंध आणि समीक्षात्मक अशी अनेक पुस्तके लिहिली.

विसाव्या शतकाच्या पहिल्या चरणात सिंधमध्ये एक मोठा कवी होऊन गेला. त्याचे नाव किशिनचंद. ' वेवसी. शहरु वेवसी, शीरीं शहरू, मौजी गीत आणि गुरु नानक जीवन कविता असे त्याचे काव्यग्रंथ आहेत. वेवसीला सिंधी काव्यात युगप्रवर्तक मानतात. त्याच्या कित्येक शिष्यांनीही त्याचे कवितेचे व्रत पुढे चालविले आहे. वेवसीच्या कवितेचा एक नमुना असा –

नेण दर्सन लाइ खोल्यो शह सुवारी थी अचे ।
दिलि अंदरि दरिबारी लगंदी जाति बारी थी अचे ।।
छोह मां छुटिकी हवा-कखु पनु उदी पासे थियो ।
वाउ खुदि शहराह ते पाइण बुहारी थो अचे ।।१।।
अबुरु छिणिकार्यो पटनि ते बादलनि बूंदूं हणी ।
गुल छटण लड अणमया खणंदी बहारी थी अचे ।।२।।
दार जे दौंकनी सां वण छेजं हणनि था हेज मां ।
पनलुदनि ताडियूं वजनि पदमिणि पियारी थी अचे ।।३।।
रअद जा बुधंदे नकारा कई परव्युनि शरना शुरू ।
खिवणि दिलि खोले नचे नौबत नियारी थी अचे ।।४।।
हुकुम थ्यो सिज खे त सोना वर्क रस्तनि ते चढनि ।

दिसु त किरणुनि जे कम्युनि जी कीअं कतारी थी अचे ।।५।।
मैरिफति रूपी मशालूं थ्यूं बरनि हर शइ अंदरि
चहचिटे चांडाणि सां चौदिसि दियारी थी अचे ।।६।।

भावार्थ – दर्शनासाठी आपले नेत्र उघडा. विराटाची रथयात्रा येत आहे. आता हृदयाच्या गाभ्यात दरबार जमेल; कारण महत्तमाचे आगमन होत आहे.

वारा मोठ्या वेगाने वाहत आहे त्यामुळे रस्त्यावरची गवत-काडी उडून दूर जात आहे. वायुदेव रस्ता झाडण्यासाठी जातीने आला आहे.

मेघांनी आपले थेंब बरसून चोहो बाजूंनी जणू अत्तराचा शिडकाव केला आहे. मार्गावर अंथरण्यासाठी वसंत ऋतू असंख्य फुलांचे ओझे घेऊन आला आहे.

डहाळचारूपी डंके वाजवून वाजवून वृक्ष आनंदाने नृत्य करीत आहेत. पाने हालवून हालवून टाळचा वाजवीत आहेत. कारण प्रियतमा पद्मिनी येत आहे

वर्षाऋतू भेरी-नगारे वाजवीत आहे, हे ऐकून विहंगवृंदाने सनई वाजविणे सुरू केले आहे. विद्युल्लता आपले हृदय खोलून नाचू लागली आहे. कारण अनोखी रथयात्रा येत आहे.

अरुणदेवाला आज्ञा झाली आहे, की सगळा मार्ग सोनेरी वर्खाने मढवून टाक. पाहा, किरणरूपी श्रमिकांच्या पंक्ती कशा प्रकारे खाली उतरत आहेत.

भक्तिरूपी उल्का प्रत्येक वस्तूच्या अंतरात प्रज्वलित होऊन उठल्या आहेत. आनंददात्री चंद्रिकेने चारी दिशांना दिवाळी सजवून दिली आहे.

**स्वातंत्र्योत्तर काळ** – १९४७ साली भारत स्वतंत्र झाला आणि त्याचबरोबर त्याचे विभाजनही झाले. त्या विभाजनामुळे सिंध प्रदेशातील हिंदू आपले वित्त, जीवित आणि धर्म जगविण्यासाठी भारतात आले आणि जिथे आसरा मिळाला तिथे स्थायिक झाले. त्यांना परस्परव्यवहारासाठी आणि आपण सिंधी आहो ही भावना जागविण्यासाठी भाषा हा एकच आधार उरला. सिंधी साहित्यकारांनी ते जाणले आणि ते भाषेच्या नवनिर्मितीसाठी बद्धपरिकर झाले. मातृभाषेच्या द्वारे मुलांना शिक्षण द्यायचे, तर त्यांच्याजवळ पाठ्यपुस्तकांची उणीव होती. यांतून मार्ग काढण्यासाठी अजमेर येथील काही सिंधी मित्र एकत्र आले व त्यांनी 'सिंध पब्लिशिंग सोसायटी' या नावाची एक संस्था स्थापन केली. साहित्यनिर्मितीला प्रोत्साहन देण्यासाठी इ. स. १९४९ साली मुंबईमध्ये सिंधी साहित्य मंडलाची स्थापना झाली. याच काळात सिंधी उद्योजकांनी नये दुनिया कहानी, हिंदवासी, फुलेली, इ. काही नियतकालिकेही सुरू केली. या नियतकालिकांमधून कित्येक लेखक आपले निबंध, कथा, कादंबरी, इ. विषय घेऊन पुढे आले. आनंद गोलाणी, सुगुनु आहुजा, पोपटी हीरानंदाणी, कीरतुबाणी, असे कितीतरी कथाकार स्वातंत्र्योत्तर काळात सिंधी भाषेला लाभले.

विभाजनपूर्व कालात व विभाजनोत्तर कालात साधू वास्वानी यांनी गीता व संत साहित्य विपुल प्रमाणात प्रकाशित करून सिंधी लोकांचा परमार्थमार्ग सुकर केला.

सरगम साहित्यमाला, भारतजीवनमाला, हिंदुस्थान किताबघर अशा कित्येक प्रकाशनसंस्था कार्य करीत असून, त्यांच्याद्वारे अनेक कादंबरीकार प्रकाशात आले आहेत. सर्वश्री गोविंद-माल्ही, मोतिप्रकाश, आनंद गोलाणी, दासुतालिब, मोहन-कल्पना, मोहनकल्याण, चंदूलाल जयसिंहाणी हे स्वातंत्र्योत्तर काळातले कादंबरीकार होत.

सांप्रत सिंधी पुस्तके देवनागरीमध्ये लिहिली आणि छापली जाऊ लागली आहेत. एकट्या दिल्ली विद्यापीठानेच आठ पुस्तके देवनागरीत छापली आहेत. सिंधी साहित्यसंमेलनाची स्थापना झाली असून, त्याची अधिवेशने दिल्ली, मुंबई, नागपूर, गांधीधाम व भोपाळ या ठिकाणी भरली आहेत.

स्वातंत्र्यपूर्व अर्ध्याशतकात सिंधी भाषेचे जे कार्य झाले, त्याच्या कितीतरी पटीने अधिक असे कार्य स्वातंत्र्योत्तर काळात झाले. आजही सिंधी साहित्याची अभिवृद्धी दिवसेंदिवस होताना दिसत आहे. [ सिं. भा. सं. प.; हिं. वि. को.; कवि-श्रीमाला, सिंधी– श्री. देवदत्त कुन्दाराम शर्मा, १९६२]

## सिंधी लोक

हिंदुस्थान स्वतंत्र झाला, पण त्याच वेळी देशाची फाळणी झाली. त्या फाळणीत सिंध प्रांत पाकिस्तानात गेला. तिथल्या हिंदूंना जीवित, वित्त, अब्रू व धर्म यांच्या रक्षणासाठी आपला प्रांत सोडून भारतात यावे लागले. असे लक्षावधी लोक भारतात आश्रयाला आले. सिंध प्रांतातून आले म्हणून त्यांना सिंधी म्हणतात. सिंध प्रांतात १९४७ साली १४ लक्ष हिंदू होते; त्यांतील १२.५ लक्ष लोकांना स्थलांतर करावे लागले. ते भारतातील निरनिराळ्या राज्यांत येऊन वसले. सरकारने त्यांच्यासाठी छावण्या उघडल्या होत्या. त्यांत लाखो गरीब सिंधी लोकांना काही वर्षे आसरा मिळाला. त्यानंतर सरकारने त्यांचे पुनर्वसन केले. बाकीच्या लोकांनी स्वतंत्रपणे आपली सोय लावली. काही झाले तरी भीक मागायची नाही, तर स्वकष्टावरच जगायचे, असा त्यांचा बाणा होता. त्यांनी भारतात विविध ठिकाणी निरनिराळे उद्योगधंदे सुरू करून आपले जीवन मार्गी लावले.

**सिंध प्रदेश** – हा हिंदुस्थानातील अगदी पश्चिमेकडील प्रांत होता. त्याच्या पूर्वेला राजस्थानमधील वाळवंट, दक्षिणेला कच्छचे

रण व सिंधुसागर, पश्चिमेला बलुचिस्तान आणि उत्तरेला बलुचिस्तान व पंजाब हे प्रदेश आहेत. त्याचे क्षेत्रफळ ४८०००चौ. मैलांपेक्षा जास्त असून, त्यात कराची, हैदराबाद, थर-पारकर, लाडकाना, सक्कर, नबाबशाहा व उत्तर सिंध हे जिल्हे येतात.

या प्रदेशात पाऊस अगदी थोडा पडतो. पण सिंधू नदीमुळे तो प्रदेश सुपीक झाला आहे. सिंधमधील मोहेंजोदडो व पंजाव-मधील हडप्पा येथे केलेल्या उत्खननात सिंधूच्या खोऱ्यातील अत्यंत प्राचीन संस्कृतीचा शोध लागला. तिला सिंधुसंस्कृती हे नाव देण्यात आले आहे. ही सिंधुसंस्कृती वैदिक आर्यांच्याही पूर्वीची असून, द्रविड लोकांनी ती निर्माण केली, असे मानण्यात येते (सिंधुसंस्कृती पाहा). त्यांच्यानंतर आर्यांनी वैदिक संस्कृतीची स्थापना केली.

सिंधवर अनेक परकीय आक्रमणे आली. यवन, पल्हव, शक व कुशाण या लोकांच्या टोळ्यांनी भारतात वसाहती केल्या, राज्ये स्थापिली आणि अखेरीस ते लोक इथल्या मूळच्या लोकांत विलीन झाले. सिंधमधील लोकांत शकवंशाचा भाग बराच आहे. तथापि हळूहळू सर्वांचा मिळून हिंदू समाज तिथे निर्माण झाला. बौद्ध व जैन पंथांचाही त्या प्रदेशात प्रसार झाला होता.

इ. स. च्या ८ व्या शतकात अरबांनी सिंधवर आक्रमण केले, तेव्हा तिथे हिंदू धर्म चांगला प्रस्थापित झालेला होता. मुलतान हे त्याचे मुख्य केंद्र होते. शिव, पार्वती व गणेश या त्यांच्या प्रमुख देवता असून, ब्रह्मा व सूर्य यांचीही ते लोक पूजा करीत. चिनी-प्रवासी युआन-च्वांग याने मुलतानमध्ये आठ हिंदू मंदिरे पाहिली होती. त्यांत सूर्याचे मंदिर अत्यंत भव्य व सुंदर होते.

हिंदू धर्माप्रमाणे बौद्ध पंथाचाही सिंधमध्ये बराच प्रभाव होता. शासनव्यवस्थेत अनेक अधिकारी बौद्ध होते. त्यांनी तिथे अनेक बौद्ध मंदिरे निर्माण केली होती. बौद्धांनी अहिंसेचा खूप प्रचार केल्यामुळे सिंधी लोकांची क्षात्रवृत्ती नष्ट झाली, असे म्हणतात.

इ. स. च्या ७ व्या शतकात मुसलमानांनी दक्षिण भारताशी व्यापार सुरू केला होता. एकदा काही मुसलमान यात्रेकरू सिंहल-द्वीपाहून मक्केकडे जात असता वादळामुळे त्यांचे जहाज सिंधच्या किनाऱ्याला लागले. किनाऱ्यावरील लोकांनी त्या यात्रेकरूंना लुटले. त्या वेळी सिंधवर चच घराण्यातील दाहर नामक राजा राज्य करीत होता. बगदादच्या खलिफाने त्याला खलिता पाठवून त्या लुटीबद्दल जाब विचार[illegible] दाहरने तिकडे फारसे लक्ष दिले नाही. तेव्हा खलिफाने [illegible] करून पाठवले. त्याने इ. स. ७११ मध्ये सिंधवर स्वारी केली. दाहर शूर होता; पण त्याने युद्धाची काहीच तयारी केली नव्हती. त्याच्या राज्यात फितुर लोक[illegible] दाहरचा पराभव झाला व कासीमने त्याच्या असंख्य सैनिकांची कत्तल केली. मग त्याने सगळाच सिंध प्रदेश सहजपणे जिंकून घेतला.

अरबांनी सिंधमध्ये अनेक वसाहती स्थापल्या, हजारो हिंदूंना बाटवले, हिंदू स्त्रियांना पळवून नेले व हिंदूंची मंदिरे नष्ट भ्रष्ट करून तिथे मशिदी उभारल्या. त्यांनी सिंधचा व्यापार मात्र खूप वाढवला.

अरबांच्या मागून तार्तर, अफगाण, तुर्क व मोगल यांनीही सिंधवर आक्रमणे केली आणि तिथल्या असंख्य हिंदूंना मुसलमान बनवले. अनेक हिंदू जवळच्या प्रदेशांत पळून गेले. तथापि लक्षावधी हिंदू सिंधमधील खेड्यापाड्यांत अनेक आपत्तींना तोंड देत राहिले. त्यांचे फार हाल झाले; त्यांनी खूप छळ सोसला; पण आपला हिंदू धर्म त्यांनी सोडला नाही.

इ. स. च्या ११ व्या शतकात गझनीच्या महंमुदाने सिंधवर स्वारी केली. त्यानंतर इ. स. १०५० पासून सुमारे २५० वर्षे सिंधवर सूम्रा या हिंदू घराण्याची सत्ता होती. अलाउद्दीन खिल-जीने त्या राजाचा पराभव केला. नंतर सम्मा या हिंदू घराण्याने तिथे राज्य केले. इ. स. १५९२ मध्ये अकबर बादशहाने ते राज्य जिंकून घेतले.

इ. स. च्या १७ व्या शतकाच्या अखेरीस सिंधमध्ये कल्होरा नामक घराण्याने राज्य स्थापले होते; पण इ. स. १७३९ साली नादिरशाहाने ते नष्ट केले. नंतर सुमारे १०० वर्षे तिथे ताल-पूरच्या मीर घराण्याची सत्ता होती. पण इ. स. १८४३ मध्ये इंग्रजांनी सिंध प्रांत घेतला.

अशा प्रकारे अस्थिरता व अशांतता असूनही हिंदू लोक सिंध-मध्ये अनेक शतके राहू शकले. काही घराण्यांना आपला उत्कर्षही करून घेता आला. पण या विसाव्या शतकात पूर्वीसारखीच भयानक परिस्थिती उत्पन्न होऊन लक्षावधी हिंदूंना धर्मांतराच्या भयामुळे निर्वासित होऊन भारतात आश्रय घ्यावा लागला.

जाती–सिंधी लोकांत अनेक जाती आहेत. त्यांतल्या लोहाणा, भाटिया व खत्री या व्यापारी जाती आहेत; सारस्वत, पुष्कर्णा, जाजिक व भाट या धार्मिक जाती आहेत; सोनार, वानहन, गुर या व्यावसायिक जाती आहेत. सहत व छप्रू या अन्य जाती आहेत. लोहाणा ही प्रमुख जात असून, त्या जातीची लोकसंख्या बरीच मोठी आहे.

यांच्यांत अमिल नामक एक वर्ग आहे. त्यात सर्व सरकारी अधिकाऱ्यांचा समावेश होतो. सिंधच्या मुस्लिम शासकांनी बहुतेक अधिकारपदे हिंदूंना दिली होती. लोहाणा, खत्री व पंजाबी शीख यांतील कर्तबगार व्यक्तींनी तिथे उत्तम राज्यकारभार केला. कालांतराने त्यांची एक वेगळी जातच बनली. अमल या फारसी शब्दावरून अमिल हे नाव त्या जातीला मिळाले. सरकारी अधिकारी झाल्यामुळे त्यांची सांपत्तिक स्थिती खूप सुधा-

रली व समाजात त्यांना प्रतिष्ठा प्राप्त झाली. मूळचे लोहाणा किंवा खत्री असूनही हे लोक त्या त्या जातीत विवाहसंबंध न करता या अमिल वर्गातील व्यक्तींशीच संबंध जोडू लागले. अधिकारपदी नेमणूक झाल्यामुळे नवीन लोहाणा घराणी या वर्गात समाविष्ट होऊन जातीची लोकसंख्या खूप वाढली.

ठाकूर, उदासी, मसंद, गुर्पोटो व भाई या नावाच्या जातीही सिंधी लोकांत आहेत. अन्य प्रदेशांतील हिंदू लोकांसारखीच ही जातिव्यवस्था आहे. मात्र ती थोडीशी शिथिल आहे. निरनिराळ्या जातींचे परस्परांशी लग्नसंबंध होऊ शकतात. ब्राह्मण जातीला अन्य जातींचे लोक श्रेष्ठ मानतात. सर्व जातींचे धार्मिक विधी ब्राह्मण चालवतात. सर्व जातींच्या लोकांना परस्परांचे अन्नोदक चालते. या लोकांत विटाळ व अस्पृश्यता या कल्पना जवळजवळ नाहीत.

प्रत्येक जातीची पंचायत असते व तिच्या प्रमुखाला मुखी म्हणतात. पूर्वी हे पद वंशपरंपरागत होते; पण आता तसे नाही. प्रतिनिधींच्या सभेत त्याची निवडणूक होते आणि ती सभा त्याला साहाय्यही करते. पूर्वी जेव्हा मुखीचे पद वंशपरंपरागत होते, तेव्हा मुखीच्या मृत्यूनंतर तिसऱ्या दिवशी नवीन मुखीला पंचायतीची पगडी घालण्याचा समारंभ करीत. आता नवीन पद्धतीप्रमाणे पोक्त माणसांची एक समिती निवडली जाते आणि त्या समितीचे सदस्य आपल्यांतील एकाची अध्यक्ष म्हणून निवड करतात. ही निवड एक किंवा तीन वर्षांसाठी असते. अध्यक्षाचे अधिकार व कामे निश्चित नसतात. त्याचा अधिकार त्याच्या व्यक्तिमत्त्वावर अवलंबून असतो.

सिंधमधील ग्रामपंचायती जन्म, जावळ, मुंज, विवाह, मृत्यू, इ. विधींचे नियमन करीत. सण-सोहळ्यांची व्यवस्थाही पंचायतीच्या नियमांप्रमाणे केली जाई. जुन्या रूढी बंद करून नवीन प्रथा सुरू करण्याचा अधिकार पंचायतीला असे.

स्मशानाची व्यवस्था ठेवणे, मंदिरे, धर्मशाळा, विहिरी यांवर देखरेख ठेवणे, ही कामेही ग्रामपंचायतीकडे असत. मात्र तिचे सर्वांत महत्त्वाचे काम म्हणजे सदावर्त चालविणे हे असे. तिथे साधु-वैराग्यांना भिक्षा मिळे, गावांतील सर्व प्रकारच्या सुखसोयींकडे लक्ष देणे व व्यवस्था करणे ही कामे ग्रामपंचायती करीत.

( अपूर्ण )

जगात ज्या मोठमोठ्या शक्ती काम करीत आहेत, त्यांचे यथातथ्य आकलन आपणांस न होणे ही गोष्ट शक्य आहे. पण एवढे तरी आपण समजून घेणे अगत्याचे आहे, की भारत म्हणजे काय आहे व त्याने आपल्या सामाजिक व्यक्तित्वाचा विकास कशा प्रकारे करून घेतला आहे; भारता[illegible] विभिन्नत्वाचे पैलू कोणते आणि त्याची सुदृढता कुठे [illegible] आहे. या मूलभूत गोष्टी आहेत. त्यांचे ज्ञान जर [illegible] मिळवले नाही, तर आपण भारत काय आहे ते जाण[illegible] असमर्थ ठरू आणि जर आपण भारताला जाणू श[illegible] नाही, तर आमचे भाव, आमचे विचार, आमची कार्ये या सर्व गोष्टी अपूर्ण राहतील व आपण भारताची सर्वांगीण आणि प्रभावपूर्ण अशी सेवा करू शकणार नाही.

—पं. जवाहरलाल नेहरू

('संस्कृति के चार अध्याय' प्रस्तावना)

भारतीय संस्कृति कोश मंडळ, पुणे